


# ।। साहित्य ।।

इतिहास । राजकारण । प्रशासन । शिक्षण । धर्म व अध्यात्म । कृषी । अर्थकारण । कला । साहित्य । क्रीडा । विज्ञान व तंत्रज्ञान । भविष्यवेध



# आधुनिक महाराष्ट्राची जडणघडण
# शिल्पकार चरित्रकोश
## खंड २
# साहित्य

**संपादक**
सुभाष भेण्डे

**सहसंपादक**
चंद्रकांत वर्तक

**प्रमुख प्रायोजक**
निर्माण ग्रुप ऑफ कंपनीज


**प्रकाशक**
साप्ताहिक विवेक
(हिंदुस्थान प्रकाशन संस्था)

आधुनिक महाराष्ट्राची जडणघडण
शिल्पकार चरित्रकोश, खंड २ - साहित्य

**पहिली आवृत्ती :**
पौष शु. चतुर्थी शके १९३१,२०डिसेंबर २००९
**प्रकाशक :**
**साप्ताहिक विवेक** (हिंदुस्थान प्रकाशक संस्था)
५/१२, कामत औद्योगिक वसाहत
३९६ - स्वा. सावरकर मार्ग, प्रभादेवी,
मुंबई - ४०००२५
दूरध्वनी : (०२२) २४२२९४५१
फॅक्स : (०२२) २४३६ ३७५६
e-mail : charitrakosh@gmail.com
Website : www.maharashtranayak.com
**संगणकीय अक्षरजुळणी :**
अक्षय फोटोटाईप सेटर्स, ठाणे.
**मुद्रक**
सिद्धी ऑफसेट प्रा. लि. प्रभादेवी, मुंबई - २५.
**मुद्रितशोधन :**
वृषाली फडके
मिलिंद केसरीनाथ वेलिंगकर
शुभांगी गावडे
**मुखपृष्ठ :** आशुतोष सरपोतदार
**संदर्भ आणि छायाचित्रे यांसाठी विशेष आभार :**
महाराष्ट्र साहित्य परिषद, पुणे
मुंबई मराठी ग्रंथसंग्रहालय, मुंबई
दादर सार्वजनिक वाचनालय, मुंबई
मुंबई विद्यापीठ, विद्यानगरी, कालिना, मुंबई
राम देशपांडे, कोल्हापूर
पुणे मराठी ग्रंथालय, पुणे
मराठी विश्वकोश मंडळ, वाई
विश्वचरित्रकोश, गोवा
संक्षिप्त मराठी वाङ्मयकोश
जी. आर. भटकळ फाऊंडेशन
विदर्भ साहित्य मंच
तरूण भारत, नागपूर,
मुंबई मराठी साहित्य संझ
**मूल्य : ९०० रूपये**



## साहित्य खंड

**संपादक**
सुभाष भेण्डे

**सहसंपादक**
चंद्रकांत वर्तक

**कार्यकारी संपादक**
सुपर्णा कुलकर्णी

**संपादन व निर्मितिप्रमुख**
दीपक हनुमंत जेवणे

**संपादकीय सल्लागार**
डॉ. सुरेश जोशी
मधू जामकर
वामन तेलंग
अनंत देशमुख
डॉ. अरुणा ढेरे
डॉ. रवींद्र शोभणे

**खंड सहयोग**
पिनॅकल ग्रुप, पुणे

**प्रकल्प समर्थक देणगीदार**
कै. मंगलाताई अभ्यंकर यांच्या स्मरणार्थ
डॉ. शालिनी मनोहर बर्वे
(कै. मनोहर व्यंकटेश बर्वे यांच्या स्मरणार्थ)
चंद्रकांत दिवाकर खरे, मुलुंड
गजानन गोपाळ फडके, दादर
दी अवॉर्ड गॅलरी, गोरेगाव
सुनील मोहन भिडे, पुणे

**✻ प्रकल्प सहप्रायोजक ✻**
**दि सारस्वक को-ऑप बँक लि.**

# भूमिका



आधुनिक महाराष्ट्राची जडणघडण – शिल्पकार चरित्रकोश या महत्त्वाकांक्षी प्रकल्पातील दुसरा खंड वाचकांच्या हाती देत असताना आम्हांला आनंद होत आहे. महाराष्ट्राच्या ऐतिहासिक जडणघडणीची ओळख करून देण्यापासून भविष्यकालीन महाराष्ट्राचा वेध घेण्यापर्यंत या प्रकल्पाची व्याप्ती आहे. महाराष्ट्राचा इतिहास, वर्तमान आणि भविष्य यांसंबंधी एक व्यापक जाणीव महाराष्ट्र राज्यनिर्मितीच्या सुवर्ण महोत्सवाच्या निमित्ताने आम्ही वाचकांसमोर ठेवत आहोत. महाराष्ट्राचे भावविश्व घडविण्यामध्ये साहित्यविश्वाचा महत्त्वाचा वाटा प्राचीन काळापासून राहिला आहे. महाराष्ट्राचा सुवर्णकाळ म्हणून ओळखल्या जाणाऱ्या सातवाहन काळात गाहा सतसईच्या रूपाने त्या वेळी लोकांत प्रचलित असलेल्या कवितांचे जे संकलन प्रकाशित झाले आहे, त्यातून त्या वेळच्या वैविध्यपूर्ण लोकजीवनाचे भावविश्व आपल्यासमोर येते. संत ज्ञानेश्वरांच्या ज्ञानेश्वरीने तर मराठी भाषेला एका सुसंपन्न भरजरी अलंकृत रूपात सादर केले व गीतेसारखे तत्त्वज्ञान समर्थपणे पेलण्याइतकी मराठी भाषा समृद्ध आहे, याची अनुभूती त्यांनी दिली. ज्ञानेश्वर, नामदेव, एकनाथ यांच्यापासून जी संतमालिका प्रवर्तित झाली, त्याचा कळसाध्याय तुकारामांच्या अभंगवाणीमध्ये दिसतो. त्यामुळे तुकारामांच्या अभंगांनी मराठी लोकजीवनाच्या सर्वच क्षेत्रांत भावमुद्रा उमटवली आहे. संतकाव्य, पंतकाव्य, शाहिरी काव्य, लावणी, बखर आदी विविध माध्यमांतून साहित्याचा झरा ग्रामीण व नागरी भागांत झिरपला असल्यामुळे महाराष्ट्राची भूमी साहित्यिकदृष्ट्या संपन्न आहे. त्यामुळे इंग्रजी राजवटीनंतर आधुनिक साहित्यिक संकल्पना जेव्हा महाराष्ट्रात रुजू लागल्या, तेव्हा त्याचा पडसाद मराठी साहित्यविश्वात उमटावा हे स्वाभाविकच म्हटले पाहिजे. गेल्या दोनशे वर्षांत महाराष्ट्रातील साहित्य-प्रवाहाने कसकशी वळणे घेतली व ती वळणे घेण्यास कोणकोण कारणीभूत ठरले, याचा समग्र इतिहास या साहित्य खंडाच्या रूपाने वाचकांपुढे ठेवण्यात आम्हांला कार्यपूर्तीचे समाधान वाटत आहे.

या खंडाकरिता डॉ. सुभाष भेण्डे व डॉ. चंद्रकांत वर्तक यांना आम्ही संपादन करण्याची विनंती केली व या कार्यासाठी त्यांनी सहर्ष संमती दिली. आपल्या प्रकृतिअस्वास्थ्यामुळे डॉ. चंद्रकांत वर्तक गेले काही महिने आपले काम करू शकले नाहीत, त्यामुळे ही सर्व धुरा डॉ. सुभाष भेण्डे यांच्याच खांद्यावर पडली व ती त्यांनी समर्थपणे पेलली. साहित्यिकांच्या हस्ताक्षरांचा संग्रह करणारे कोल्हापूर येथील श्री. राम देशपांडे यांनी आपल्या संग्रहाचा उपयोग करू देण्यास मान्यता दिल्याने या ग्रंथाचे संदर्भमूल्य आणखी वाढले आहे. या ग्रंथाची अभ्यासपूर्ण प्रस्तावना प्रा. डॉ. विलास खोले यांनी लिहिली आहे. मराठी साहित्यविश्वाच्या अभ्यासकांना ही प्रस्तावना मौलिक वाटेल, असा आम्हांला विश्वास आहे.

हा प्रकल्प यशस्वी करण्यासाठी स्वयंप्रेरणेने किंवा आमच्या विनंतीला मान देऊन विविध विषयांतील तज्ज्ञ, पुरस्कर्ते आणि ग्राहक यांचे सहकार्य लाभले आहे, लाभत आहे; त्याबद्दल आम्ही त्यांचे ऋणी आहोत. अशा प्रकारचा प्रकल्प भरीव अर्थसाहाय्याशिवाय पूर्ण होऊ शकत नाही. या साहाय्यासाठी प्रमुखतः निर्माण ग्रुप ऑफ कंपनीज, दि सारस्वत को-ऑप. बँक यांनी व अन्य अनेक प्रायोजकांनी सहकार्य दिले. त्यामुळे हा प्रकल्प थोडा अधिक काळ घेऊन का होईना पण निश्चितपणे पूर्ण होईल, असा विश्वास आम्हांला आहे.

– दिलीप करंबेळकर

‘आधुनिक महाराष्ट्राची जडणघडण – शिल्पकार चरित्रकोश’ हा गेल्या दोनशे वर्षांतील महाराष्ट्राच्या जडणघडणीचा मागोवा घेणारा एक भव्य प्रकल्प होय. विविध क्षेत्रांतील परिवर्तनास कारणीभूत ठरलेल्या ५००० व्यक्तिमत्त्वांची ओळख वाचकवर्गाला व्हावी या हेतूने हाती घेतलेल्या या प्रकल्पातील पहिल्या खंडाचे म्हणजेच इतिहास खंडाचे प्रकाशन दि. २१ जून २००९ या दिवशी पुण्यात पार पडले. या मालिकेतील दुसरे पुष्प म्हणजेच साहित्य खंड होय. इतिहास खंडाचे स्वरूप लेखात्मक असल्याने, चरित्रकोशात्मक स्वरूपाचा हा त्या दृष्टीने पहिलाच खंड होय.

तर्कतीर्थ लक्ष्मणशास्त्री जोशी यांच्या संपादकत्वाखाली निर्माण होणाऱ्या ‘विश्वकोश प्रकल्पा’शी माझा तीन दशके संबंध आला होता. कोशकार्यात मला मनापासून रस असल्यानेच मी विश्वकोश निर्मिती मंडळाच्या समितीचे सदस्यत्व स्वीकारले व त्याचे कामही केले.

शिल्पकार चरित्रकोशाचे प्रबंध संपादक दिलीप करंबेळकरांनी दि. २३ जून २००७ रोजी ‘वेलिंगकर इन्स्टिट्यूट’मध्ये झालेल्या बैठकीत साहित्य खंडाच्या संपादकपदाचा कार्यभार माझ्यावर सोपविला आणि या खंडाच्या कामाला माझ्याकडून खऱ्या अर्थाने सुरुवात झाली. प्रत्येक विषयाची माहिती, व्याप्ती सांगणारा कोश म्हणजे त्या विषयाचा गाभा असतो, म्हणूनच या कामाला अनन्यसाधारण असे महत्त्व प्राप्त झाले आहे. गेल्या दोनशे वर्षांत साहित्य–क्षेत्रात वैशिष्ट्यपूर्ण कामगिरी करणाऱ्या व साहित्याला नवीन वळण देणाऱ्या चरित्रनायकांची यादी या कोशासाठी तयार करणे, चरित्रनायकांच्या नोंदीमध्ये येणाऱ्या माहितीचा आराखडा तयार करणे, चरित्रनायकांवर नोंद लिहून देणाऱ्या लेखकांचा शोध घेणे आणि सरतेशेवटी लेख प्राप्त करणे ही या खंडाची प्रमुख कामे होती. यासाठी दि. ४ ऑगस्ट २००८ रोजी मुंबईत एक बैठक घेण्यात आली. यामध्ये महाराष्ट्राच्या प्रत्येक भागातील प्रतिनिधित्व व्हावे या दृष्टीने महाराष्ट्राच्या साहित्य–क्षेत्रातील काही निवडक मान्यवरांना आमंत्रित केलेगेले. या बैठकीला डॉ. चंद्रकांत वर्तक, डॉ. अनंत देशमुख, डॉ. अरुणा ढेरे, डॉ. रवींद्र शोभणे, श्री. वामन तेलंग, डॉ. सुरेश जोशी, प्रा. मधु जामकर उपस्थित होते. या बैठकीत चरित्रनायकांच्या यादीवर विचारविनिमय करण्यात आला.

लेखकांकडून लिहून घेण्यात येणाऱ्या चरित्र–नोंदींमध्ये एकसूत्रता असावी, ठरवलेल्या शब्दमर्यादेत नोंद असावी, नोंदीमध्ये चरित्रनायकाची नेमकी माहिती मिळावी या हेतूंनी दि. ५ ऑक्टोबर २००८ या दिवशी सुरेंद्र गावसकर सभागृह, मुंबई मराठी ग्रंथसंग्रहालय येथे व त्यानंतर महाराष्ट्र साहित्य परिषद, पुणे येथे लेखकांसाठी कार्यशाळा घेण्यात आल्या. चरित्रनायकाची चरित्रविषयक अचूक व वस्तुनिष्ठ माहिती, त्यांच्या कार्यकर्तृत्वाचा समग्र आढावा व मराठी साहित्यातील त्यांचे योगदान, त्यांना लाभलेले मानसन्मान व पुरस्कार या सर्व गोष्टींचे मूल्यमापन नेमक्या शब्दांत कसे करावे, याविषयी डॉ. अनंत देशमुख यांनी मार्गदर्शन केले. पुण्याच्या कार्यशाळेला प्रमुख पाहुणे म्हणून अखिल भारतीय मराठी साहित्य महामंडळाचे अध्यक्ष कौतिकराव ठाले–पाटील उपस्थित होते. लेखकांच्या शंकांचे आणि समस्यांचे निरसनही कार्यशाळेत योग्य प्रकारे केले गेले.

चरित्रनायकांवर लिहून घेतलेल्या नोंदींमध्ये एकसूत्रता यावी यासाठी कार्यशाळेत झालेल्या चर्चेच्या आधारावर संपादक मंडळातर्फे मार्गदर्शक सूत्रे तयार करण्यात आली व ती सर्वच लेखकांना पाठविण्यात आली. त्यामुळेच

लेखकांकडून आलेल्या चरित्रनोंदी तपासण्याचे अत्यंत जिकिरीचे काम काही प्रमाणात सुकर झाले. लेखकांकडून आलेल्या हस्तलिखितातील तपशील काळजीपूर्वक तपासले गेले, त्रुटी दूर केल्या गेल्या, अपेक्षित शब्दसंख्येबाहेर गेलेल्या नोंदींचा संक्षेप केला गेला. ह्या सर्व कामांमध्ये प्रारंभीच्या काळात डॉ. चंद्रकांत वर्तक यांची साथ लाभली; परंतु अर्ध्यापेक्षा अधिक काम झाल्यावर डॉ. वर्तकांच्या प्रकृतिअस्वास्थ्यामुळे संपादनाच्या कामाचे दायित्व मला उचलावे लागले. जवळजवळ वर्षभर हे काम अखंडपणे चालू होते.

महाराष्ट्रातील साहित्यिक घडामोडी, साहित्याची जडणघडण व साहित्यिकांचा परामर्श घेणारे बरेचसे कोश उपलब्ध आहेत. परंतु साहित्यिकांचा निवळ चरित्रविषयक तपशील नमूद करणारा व त्यांच्या साहित्यिक कार्यकर्तृत्वावर नेमकेपणाने भाष्य करणारा 'आधुनिक महाराष्ट्राची जडणघडण – शिल्पकार चरित्रकोश' हा एकमेव प्रकल्प आहे. साहित्यिक आणि साहित्य प्रकार यांच्या आधारे साहित्यविषयक अभ्यास करणाऱ्या मंडळींना याचा निश्चितच फायदा होणार आहे, आणि हेच या कोशाचे इतर कोशांपेक्षा वेगळेपण आहे.

संदर्भमूल्य आणि माहितीच्या दृष्टीने परिपूर्णता हे तर आत्तापर्यंतच्या सर्वच कोशांचे वैशिष्ट्य राहिले आहे, परंतु या कोशाचे आणखी एक वेगळेपण सांगताना 'प्रस्तुतिमूल्य' हा एक शब्द द्यावासा वाटतो आहे. एकंदर कोशाकडे नीरस, रटाळ व कंटाळवाणा साहित्यप्रकार म्हणून पाहण्याची भावना अभ्यासक व्यक्तींची नसली, तरी सहज प्रथमच कोश हाताळणाऱ्या नव्या पिढीतील विद्यार्थ्यांना तसे वाटण्याची शक्यता असते. त्यामुळे अशा लोकांनाही हा कोश आकर्षक वाटेल, त्याची रचना नेत्रसुखद वाटेल याचीही पुरेशी काळजी घेण्यात आलेली आहे. अरुण फडके यांच्या सहयोगामुळे या खंडातील शुद्धलेखनाचे आणि व्याकरणाचे अवधानही चांगले सांभाळले गेले आहे.

विविध कोशांचा व साहित्यविषयक ग्रंथांचा संदर्भ पाहून या कोशाच्या चरित्रनायकांची प्राथमिक यादी तयार करण्याचे काम डोंबिवली येथील प्रा. संध्या टेंबे व निशा रानडे या द्वयीने अत्यंत आनंदाने स्वीकारले. या यादीत पुढे मार्गदर्शक व सल्लागार तज्ज्ञ मंडळींमार्फत वेळोवेळी बदल करण्यात आले व या यादीला शक्य तितके अद्ययावत, निर्दोष आणि परिपूर्ण करण्याचा प्रयत्न झाला. चरित्रनायकांच्या छायाचित्रांची जमवाजमव करणे ही अत्यंत महत्त्वपूर्ण बाब होती. प्रत्येक चरित्रनायकाचे छायाचित्र प्राप्त करण्याचे सर्वतोपरी प्रयत्न केले गेले. या कामी मुंबई मराठी ग्रंथ संग्रहालय, मुंबई; महाराष्ट्र साहित्य परिषद, पुणे व अन्य संबंधित व्यक्तींचे आभार मानायला हवेत. साहित्य खंडातील आणखी वेगळेपण म्हणजे मान्यवर साहित्यिकांची हस्ताक्षरे. हा सहित्याचा खजिना श्री. राम देशपांडे, कोल्हापूर यांनी उपलब्ध करून दिला याबद्दल आम्ही त्यांचे आभारी आहोत.

मनोगताचे समापन करताना एकच पण अत्यंत महत्त्वाची गोष्ट सांगावीशी वाटते, ती म्हणजे संपादनाचे काम पार पाडताना साप्ताहिक 'विवेक'ने कोणत्याही विशिष्ट तत्त्वप्रणालीचा आग्रह धरला नाही, संपादक मंडळास संपूर्ण स्वातंत्र्य दिले आणि सर्वतोपरी सहकार्य केले. संपादनाचे काम करताना सौ. सुपर्णा कुलकर्णी यांचे मोलाचे साहाय्य झाले. या प्रचंड प्रकल्पाचे शिवधनुष्य उचलताना यात काही त्रुटी राहणे साहाजिकच आहे. विशेषतः ज्या साहित्यिकांचा समावेश शिल्पकार म्हणून करायला हवा होता, अशाही काही साहित्यिकांची नावे अनवधानाने राहिली असण्याची शक्यता आहे. तसेच प्रारंभीच्या काळातील काही साहित्यिकांची छायाचित्रे उपलब्ध झाली नाहीत, ही खंत आहेच. प्रकल्पाशी संबंधित अनेकांनी केलेल्या प्रत्यक्ष व अप्रत्यक्ष सहकार्यासाठी सर्वांचे औपचारिक आभार.

**– सुभाष भेण्डे**
संपादक

कोणत्याही कोशाचे वाचन कथा अथवा कादंबरीप्रमाणे सलग असे सामान्यपणे केले जात नाही. वाचकास हवा असलेला संदर्भ सुलभपणे आणि शीघ्रतेने उपलब्ध करून देणे, हे कोशाचे प्रमुख प्रयोजन समजले पाहिजे. वाचकांना या कोशाचा उपयोग करणे सोपे आणि सुलभ व्हावे या हेतूने या चरित्रकोशाच्या रचनेबाबत आणि स्वरूपाबाबत माहिती देत आहोत.

**कोशाचे स्वरूप**

कोशाचे दोन मुख्य प्रकार असतात. पहिला प्रकार म्हणजे विशिष्ट विषयाचा व दुसरा प्रकार म्हणजे सर्वविषयसंग्राहक. 'आधुनिक महाराष्ट्राची जडणघडण – शिल्पकार चरित्रकोश' हा पहिल्या प्रकारचा प्रकल्प म्हणजे विशिष्ट विषयाचा कोश आहे. या प्रकारच्या कोशरचनेचे काही स्वाभाविक फायदे आहेत. भारंभार माहितीतून आपणास हवी असलेली माहिती शोधून काढणे वाचकाला सुलभ आणि सोपे होणे हा सर्वांत मोठा फायदा आहे. प्रस्तुत कोश हा या प्रकल्पातील साहित्य खंड आहे. या प्रकल्पाचा आणखी एक विशेष म्हणजे हा व्यक्तिचरित्रकोश आहे. त्यामुळे यात व्यक्तींच्या चरित्रनोंदी दिल्या आहेत.

**संपादकीय भूमिका**

या खंडाच्या संपादक-मंडळाने त्या खंडाची एकंदर पृष्ठसंख्या लक्षात घेऊन चरित्रनायकांच्या नोंदींची विभागणी चरित्रनोंद, टिपण नोंद आणि नामोल्लेख नोंद अशी केलेली आहे. वास्तविक पाहता कोणत्याही चरित्रनायकाच्या एकंदर कार्याचा आवाका हा त्याच्या चरित्रकाराशिवाय अथवा चरित्रअभ्यासकाशिवाय अन्य थोरामोठ्या अभ्यासकांनाही सर्व बारकाव्यांनिशी पूर्णपणे लक्षात घेऊन त्याच्या नोंदींची शब्दसंख्या ठरवून अशी विभागणी करणे, हे जिकिरीचे कार्य होते. कारण अशा विषयाधारित चरित्रकोशात एखाद्या चरित्रनायकाचे सर्वक्षेत्रीय योगदानाचा व कार्यकर्तृत्वाचा सांगोपांग तपशीलवार उल्लेख करण्याचे सूत्र स्वीकारले, तर त्या कार्याला काही अंतच राहत नाही. तसेच प्रत्येक चरित्रनायकाचे सर्वक्षेत्रीय योगदान कथन करणे, हे विषयाधारित कोशाचे उपयोजन नाही व नसते, हे लक्षात घेतले पाहिजे. विषयाधारित कोश त्या व्यक्तीच्या अन्यक्षेत्रीय पैलूंबाबत काही ठरावीक मर्यादेपर्यंतच मार्गदर्शन करू शकतो. चरित्रनायकाचे विशिष्ट क्षेत्रातील कार्यकर्तृत्वाचे नेमके चित्रण करण्याचा एक प्रयत्न, म्हणजे विषयाधारित कोश असतो. तरी संपादक मंडळाने आपले सर्व कौशल्य वापरून या सूचीला अंतिम रूप दिलेले आहे.

**विषयाधारित वर्गीकरण**

चरित्रनायकांचे विषयाधारित वर्गीकरण करताना जाणवणारी अडचण अशी की, एका चरित्रनायकाचे योगदान त्या विशिष्ट कार्यक्षेत्रापुरतेच मर्यादित नसून अन्यही क्षेत्रांत त्याने लक्षणीय अथवा भरीव कामगिरी केलेली आहे असे दिसले. अशा परिस्थितीत एकाच चरित्रनायकाच्या नोंदीची पुनरावृत्ती वेगवेगळ्या खंडांत होऊ नये म्हणून अशा सरमिसळ होऊ शकणाऱ्या चरित्रनोंदींसाठी काही मर्यादा व निकष ठरविण्यात आले. त्यानुसार भिन्न खंडांच्या संपादक मंडळांना तशा सूचना देण्यात आल्या. मात्र अन्य खंडांत या चरित्रनायकांची

त्या क्षेत्रातील कामगिरी अधोरेखित करणारी टिपणनोंद घेतली जाईल, याचीही दक्षता घेण्यात आली व अशा सर्व टिपणांच्या सुरुवातीलाच सदर चरित्रनायकाची मुख्य नोंद ज्या खंडात आहे, त्या खंडाचे नाव देण्याचीही दक्षता घेण्यात आलेली आहे. जेणेकरून वाचकांना ती संपूर्ण नोंद त्या-त्या टिपणासोबत वाचता येईल.

मुख्य चरित्रनोंद ही एकाच खंडात घेण्याचा निर्णय हा मुख्यत्वे सामायिक मुद्द्यांची उदाहरणार्थ जन्म, बालपण, शिक्षण, कौटुंबिक पार्श्वभूमी, मृत्यू यासारख्या माहितीची पुनरावृत्ती टाळण्यासाठीच घेण्यात आलेला आहे. याचबरोबर मुख्य चरित्रनोंद व टिपणनोंद यांच्या ठिकाणी आणखी एक सुविधा देण्यात आलेली आहे, ती म्हणजे चरित्रनायकाचा एका ओळीत परिचय. हा परिचय वाचल्यानंतर त्या व्यक्तीचे बहुआयामी कार्य वाचकांच्या लक्षात येईल व त्या क्षेत्रांच्या अनुषंगाने त्या-त्या विषयांच्या खंडांत चरित्रनायकाच्या टिपणनोंदी त्यांना वाचता येतील.

**चरित्रनोंदींचे स्थूल स्वरूप**

चरित्रकोशातील नोंदींचे स्थूल स्वरूप पुढीलप्रमाणे आहे. यातील नोंदी सर्वसाधारणपणे आडनावांनी दिल्या आहेत. पहिल्या ओळीत चरित्रनायकाचे नाव (आडनाव प्रथम) दिले आहे.

उदाहरणार्थ: *अत्रे, प्रल्हाद केशव*

*आपटे, नारायण हरी*

या सर्वसाधारण धोरणास काही अपवाद करावे लागले आहेत. ते पुढीलप्रमाणे आहेत:

१. जी व्यक्ती टोपणनावाने प्रसिद्ध आहे, तिची नोंद त्या अतिपरिचित टोपणनावानेच दिलेली आहे.

उदाहरणार्थ: *केशवसुत, गोविंदाग्रज, बालकवी*

२. ज्या व्यक्तींची उपनावे लोकमानसात रूढ झालेली आहेत, त्यांची नोंद त्या उपनावांनीच दिलेली आहे.

उदाहरणार्थ: *इंदिरा संत, जीए कुलकर्णी, बाबा पद्मनजी*

ज्या नावाने नोंद देण्यात आलेली आहे, ते नाव मोठ्या जाड ठशात पहिल्या ओळीत दिलेले आहे. नंतरच्या दुसऱ्या ओळीत त्या व्यक्तीचे मूळ नाव-उपनाव-टोपणनाव तिरप्या जाड ठशात दिलेले आहे.

यानंतरच्या ओळीत त्या व्यक्तीचे एकंदर योगदान दर्शविणाऱ्या क्षेत्रांचा उल्लेख केलेला आहे. त्यापुढच्या ओळीत चरित्रनायकाच्या जन्म व (दिवंगत असल्यास)मृत्यू ह्या तारखा दिल्या आहेत. जेथे जन्म अथवा मृत्यूच्या तारखा उपलब्ध नाहीत तेथे केवळ साल व शक्य झाल्यास महिनासुद्धा दिलेला आहे. यानंतर चरित्रनोंदीच्या मजकुराची सुरुवात करून त्यात चरित्रनायकाची व्यक्तिगत माहिती, शिक्षण, कार्यक्षेत्राची ठिकाणे व पदे, त्यांचे साहित्यिक कार्य, उल्लेखनीय ग्रंथ व पुस्तके यांची माहिती, त्यांना मिळालेले मानसन्मान आणि पुरस्कार यांचा उल्लेख केला आहे. काही ठिकाणी चरित्रनायकांचे हस्ताक्षर नोंदीसोबत देण्याचा प्रयत्न केला आहे. त्यात केवळ स्वाक्षरी, एखादा उतारा वा परिच्छेद, संदेश, पत्र अथवा कविता असे प्रकार देण्यात आलेले आहेत. या अक्षरभेटीतून त्या चरित्रनायकाची भेट झाल्याचा आनंद वाचकांना अनुभवता येईल.

**संदर्भसूची**

चरित्रनोंदीत समाविष्ट माहितीची विश्वसनीयता आणि अधिकृतपणा लक्षात यावा या हेतूने नोंदीच्या शेवटी सदर नोंद लिहिण्यासाठी ज्या संदर्भसाधनांचा वापर केला गेला आहे, त्यांची सूची दिलेली आहे. यामागची थोडी व्यापक भूमिका अशीही आहे की, ज्यांना सदर चरित्रनायकांबाबत अधिक अभ्यास अथवा संशोधक करायचे आहे त्यांना त्याचा उपयोग व्हावा. याच दृष्टीने बहुसंख्य चरित्रनोंदीच्या खाली संदर्भसूची देण्याचा

प्रयत्न झालेला आहे. या संदर्भलेखनात पुढीलप्रमाणे शिस्त पाळण्यात आलेली आहे :

*लेखकाचे नाव, संपादक असल्यास तसा उल्लेख; 'साहित्यकृतीचे नाव', साहित्यकृतीचा प्रकार; प्रकाशक, प्रकाशनस्थळ; आवृत्ती, प्रकाशनवर्ष.*

जर नोंद लेखकाने मासिकातील आणि नियतकालिकातील लेखांचा आपल्या लेखनासाठी संदर्भ म्हणून उपयोग केला असेल तर संदर्भलेखनात पुढीलप्रमाणे शिस्त पाळण्यात आलेली आहे :

*'मासिकाचे अथवा नियतकालिकाचे नाव'; प्रकाशन महिना व वर्ष.*

हाती आलेल्या अपुऱ्या माहितीमुळे अपवादाने काही ठिकाणी सदरची शिस्त पाळता आलेली नाही, हे वाचकांनी ध्यानात घ्यावे.

ज्या ठिकाणी नामोल्लेख नोंद घेण्यात आलेली आहे. तेथे दोन प्रकार संभवतातः

१. जर त्या व्यक्तीची अन्य खंडात मुख्य चरित्रनोद दिलेली असेल तर तर्जनी चिन्हाचा उपयोग करून तेथे 'मुख्य चरित्रनोंद समाजकारण खंड, पत्रकारिता खंड' आदी नमूद करण्यात आलेले आहे.

२. जर त्या व्यक्तीची नोंद याच खंडात अन्यत्र वेगळ्या नावाने दिलेली असेल, तर तर्जनी चिन्हाचा उपयोग करून ज्या नावाने ती नोंद आढळेल ते नाव देण्यात आले आहे.

**चरित्रनायक वर्गीकरण**

हा विषयाधारित कोश असल्यामुळे यात चरित्रनायकांचा त्यांच्या साहित्यविषयक निकषावर समावेश करण्यात आलेला आहे. तसे पाहता नाट्यलेखन हा साहित्यप्रकारच; पण नाटक खंड हा वेगळा होणार असल्यामुळे वाचकांच्या सोयीसाठी ज्या चरित्रनायकांची नाटककार अशी प्रकर्षाने ओळख आहे त्या सर्वांची मुख्य चरित्रनोंद नाटक खंडात घेण्यात आलेली असून प्रस्तुत खंडात त्यांचे नाव नमूद करून तेथे नामोल्लेख नोंद घेण्यात आलेली आहे. अर्थात यालाही काही अपवाद आहेत. काही व्यक्तींनी नाटकासोबत अन्य साहित्यप्रकारही समर्थपणे हाताळले आहेत. त्यामुळे त्यामुळे त्यांची नोंद साहित्यखंडांत येणे अपरिहार्य मानून ती प्रस्तुत खंडात देऊनच नाटक खंडात त्यांची नामोल्लेख नोंद समाविष्ट केलेली आहे. हेच सूत्र ढोबळपणे वापरून पत्रकार, विचारवंत, इतिहास संशोधक, भाषापंडित, भाषावैज्ञानिक, भाषाशास्त्रज्ञ, कोशकार, मुद्रक, प्रकाशक, संपादक या वर्गातील चरित्रनायकांचा विचार करण्यात आलेला आहे. तसाच एक अपवाद म्हणजे काही चरित्रनायकांचे साहित्यविषयक थोडेबहुत योगदान असले तरीही त्यांची नोंद अन्य क्षेत्रातील शिल्पकार म्हणूनच प्रकर्षाने आहे अशांची शून्य नोंद येथे घेण्यात आलेली नाही. हा प्रकल्प विषयाधारित असल्याने खंडाचा विषय ध्यानात घेऊन चरित्रनोंदी पाहणे अपेक्षित आहे. एक अपवाद म्हणजे डॉ. बाबासाहेब आंबेडकरांची टिपणनोंद या खंडात समाविष्ट केलेली आहे. डॉ. बाबासाहेबांच्या प्रेरणेतून आंबेडकरी साहित्य चळवळीचा एक प्रवाह मराठी साहित्यात निर्माण झालेला आहे त्या विचाराची पार्श्वभूमी स्पष्ट व्हावी म्हणून हा अपवाद केलेला आहे.

**अकारविल्हे**

चरित्रकोशातील वर्णमाला, सर्व नावांचा अकारविल्हे स्वरानंतर व्यंजने असा पुढीलप्रमाणे असेल :

अ ॲ आ ऑ इ ई उ ऊ ऋ

ए ऐ ओ औ (ं) अनुस्वार (:) विसर्ग

क ख ग घ ङ

च छ ज झ

ट ठ ड ढ ण

त थ द ध न

प फ ब भ म

य र ल व श

ष स

ह ळ

क्ष ज्ञ

काही व्यक्तीचे नाव अथवा आडनाव हे दोन प्रकारे लिहिले जाते. उदाहरणार्थ वा.रा.कान्त आणि वा.रा.कांत, वि. रा. करन्दीकर आणि वि. रा. करंदीकर. त्यामुळे त्यांची दोन्ही आडनावे समाविष्ट करून एका ठिकाणी नामोल्लेख नोंद तर दुसऱ्या ठिकाणी पूर्ण चरित्रनोंद दिलेली आहे. अर्थात हा अपवाद आहे, हे सूत्र नव्हे म्हणून अन्य ठिकाणी ही कसरत टाळली आहे.कोशात 'अ-ओ' असा स्वरांचा एक विभाग केलेला आहे व पुढे क, ख, ग... असे व्यंजनानुसार विभाग केलेले आहेत. ज्या अक्षराखाली एकही नोंद नाही, ते अक्षर वगळले आहे. वाचकांच्या सोयीसाठी कोशात अनुक्रमणिकेचाही अंतर्भाव केलेला आहे.

**अनुक्रमणिका**

अनुक्रमणिकेची रचना पुढीलप्रमाणे आहे. यात चरित्रनोंदीला अनुक्रमांक न देता पहिल्या स्तंभात चरित्रनायकाचे नाव दिले आहे. या नावाच्या आधी मुख्य चरित्रनोंदीसाठी '●', नामोल्लेख नोंदीसाठी 'O', टिपणनोंदीसाठी '▲'अशा खुणा देण्यात आलेल्या आहेत.चरित्रनायकाच्या नावानंतरच्या स्तंभात या नोंदींचे पृष्ठक्रमांक दिलेले आहेत. या अनुक्रमणिकेतील शेवटचा स्तंभ 'मुख्य नोंद' असा आहे. पृष्ठक्रमांकावर जर नामोल्लेख नोंद असेल व त्या चरित्रनायकाची मुख्य नोंद याच खंडात जेथे असेल तो पृष्ठक्रमांक या स्तंभात दर्शविलेला आहे व त्या चरित्रनायकाची मुख्य नोंद अन्य खंडात असेल तर त्या विशिष्ट खंडाचे नाव या स्तंभात दर्शविले आहे. याआधीचा 'चरित्रनायकाने हाताळलेले साहित्यप्रकार' असा एक मोठा स्तंभ आहे. या स्तंभाचे अनुक्रमे काव्य, कथा, कादंबरी, समीक्षा व ललित असे पाच उपविभाग पाडलेले आहेत. ज्यांना या दोन शतकांतील कवींचा अभ्यास करावयाचा आहे, अथवा कादंबरीकारांचाच अभ्यास करावयाचा आहे अशा वर्गीकरणाचा वाचकांना विशेष उपयोग असा होऊ शकतो. ते अनुक्रमणिका वाचून अभ्यासासाठी वाचनार्थ निवड करू शकतात. या उपप्रकारांव्यतिरिक्त अन्य प्रकारे जर चरित्रनायकांनी आपले साहित्यिक कार्य केले असेल तर त्यांच्या कार्याचे स्वरूप अथवा त्यांचा तो विशिष्ट साहित्यप्रकार त्यापुढच्या सहाव्या उपविभाग स्तंभात लिहिलेला आहे. कोशाबरोबर अनुक्रमणिकेची ही रचनाही वाचकांना उपयोगी ठरेल, असा विश्वास आहे.

**– दीपक हनुमंत जेवणे**
संपादन व निर्मितीप्रमुख

**अनुक्रमणिकेतील संक्षेपांचे स्पष्टीकरण पुढीलप्रमाणे आहे :–**

ललित = *काव्य, कथा, कादंबरी व समीक्षा याखेरीज अन्य साहित्य प्रकारात केलेले लेखन.*

प.ल.सा. = *पत्रकारिता आणि ललितेतर साहित्य खंड*

चरित्र = *चरित्रकार*

संत सा. = *संत साहित्याचे अभ्यासक*

बाल सा. = *बाल साहित्यिक*

लोक सा. = *लोक साहित्याचे अभ्यासक*

भाषा = *भाषा तज्ञ, भाषा अभ्यासक, भाषा शास्त्रज्ञ*

| चरित्रनायकाचे नाव | पृष्ठ | चरित्रनायकाने हाताळलेले साहित्यप्रकार | | | | | | मुख्य नोंद |
|---|---|---|---|---|---|---|---|---|
| ● आपटे हरी नारायण | २६ | – | कथा | कादंबरी | – | ललित | संपादक | |
| ○ आफळे श्याम मनोहर | २९ | – | – | – | – | – | – | पृ. ६१४ |
| ● आफळे सुनीती जयंत | २९ | – | कथा | – | – | – | – | |
| ● आरती प्रभू | ३० | काव्य | कथा | कादंबरी | – | – | नाटक | |
| ● आष्टीकर मधुकर रघुनाथ | ३३ | – | – | – | – | ललित | नाटक | |
| ○ आळेकर सतीश वसंत | ३४ | – | – | – | – | – | – | नाटक |
| ● इंगोले प्रतिमा | ३४ | काव्य | कथा | कादंबरी | – | ललित | – | |
| ● इंदिरा संत | ३५ | काव्य | – | – | – | – | – | |
| ● इनामदार नागनाथ संतराम | ३८ | – | – | कादंबरी | – | – | – | |
| ● इनामदार श्रीनिवास देविदास | ४१ | काव्य | – | – | – | – | – | |
| ● इनामदार हेमंत विष्णू | ४३ | – | – | – | – | ललित | संत सा. | |
| ● उजगरे निरंजन हरिश्चंद्र | ४४ | काव्य | – | – | – | – | संपादक | |
| ● उजळंबकर कृष्ण मुकुंद | ४५ | – | – | कादंबरी | – | – | ग्रंथपाल | |
| ● ऊर्ध्वरेषे प्रभाकर वामन | ४६ | – | – | – | समीक्षा | – | पत्रकार | |
| ○ एलकुंचवार महेश | ४७ | – | – | – | – | – | – | नाटक |
| ● ओक मनोहर शंकर | ४७ | काव्य | – | कादंबरी | – | – | – | |
| ● ओक वामन दाजी | ४७ | काव्य | – | – | – | ललित | संशोधक | |
| ● ओक विनायक कोंडदेव | ४९ | काव्य | – | – | – | ललित | निबंध | |
| ● कणेकर शिरीष | ५१ | – | – | – | – | ललित | विनोद | |
| ● कदम बाबा | ५२ | – | – | कादंबरी | – | – | – | |
| ○ करंदीकर गोविंद विनायक | ५२ | – | – | – | – | – | – | पृ. ५८६ |
| ● करन्दीकर विनायक रामचंद्र | ५२ | – | – | – | समीक्षा | ललित | संत.सा. | |
| ○ कर्णिक द्वारकानाथ भगवंत | ५५ | – | – | – | – | – | पत्रकार | प.ल.सा. |
| ● कर्णिक मधु मंगेश | ५५ | – | कथा | कादंबरी | – | – | – | |
| ● कर्वे इरावती दिनकर | ५८ | – | – | – | – | – | इति.सं. | |
| ● कर्वे चिंतामण गणेश | ६२ | – | – | – | – | ललित | कोशकार | |
| ● कर्वे चिंतामण श्रीधर | ६३ | – | – | – | – | ललित | विज्ञान | |
| ○ कर्वे धोंडो केशव | ६४ | – | – | – | – | – | – | शिक्षण |
| ○ कर्वे रघुनाथ धोंडो | ६४ | – | – | – | – | – | – | आरोग्य |
| ● कवठेकर कुलकर्णी नारायण | ६४ | काव्य | – | – | – | – | – | |
| ● कवठेकर बाळकृष्ण | ६४ | – | – | – | समीक्षा | – | – | |
| ● कसबे रावसाहेब राणोजी | ६६ | – | – | – | समीक्षा | – | – | |
| ○ कांत वामन रामचंद्र | ६८ | – | – | – | – | – | – | पृ. ८० |

| चरित्रनायकाचे नाव | पृष्ठ | चरित्रनायकाने हाताळलेले साहित्यप्रकार | | | | | | मुख्य नोंद |
|---|---|---|---|---|---|---|---|---|
| ● कांबळे अरुण कृष्णाजी | ६८ | काव्य | – | – | समीक्षा | – | – | |
| ● कांबळे नामदेव चंद्रभान | ६९ | – | | कादंबरी | – | – | – | |
| ● कांबळे बेबी | ७१ | – | – | – | – | – | आत्मचरित्र | |
| ● कांबळे शांताबाई कृष्णाजी | ७२ | – | – | – | – | – | आत्मचरित्र | |
| ● काकोडकर चंद्रकांत | ७३ | – | – | कादंबरी | – | – | – | |
| ● काणेकर अनंत आत्माराम | ७५ | काव्य | कथा | – | – | ललित | प्रवासवर्णन | |
| ● कानिटकर काशीबाई गोविंदराव | ७९ | – | कथा | कादंबरी | – | – | अनुवाद | |
| ○ कानेटकर वसंत शंकर | ८० | – | कथा | कादंबरी | – | – | – | नाटक |
| ○ कानेटकर शंकर केशव | ८० | – | – | – | – | – | – | पृ. १६१ |
| ● कान्त वामन रामचन्द्र | ८० | काव्य | – | – | – | – | – | |
| ● कामत अशोक प्रभाकर | ८२ | – | – | – | – | ललित | संत.सा. | |
| ● कार्व्हालो सिसिलिया फ्रान्सिस | ८३ | काव्य | कथा | – | – | – | – | |
| ● कालेलकर काकासाहेब | ८४ | – | – | – | – | ललित | विचारवंत | |
| ○ कालेलकर मधुसूदन रामचंद्र | ८५ | – | – | – | – | – | – | नाटक |
| ● काळे अक्षयकुमार | ८५ | – | – | – | समीक्षा | – | – | |
| ● काळे किशोर शांताबाई | ८६ | काव्य | – | – | – | – | आत्मकथन | |
| ● काळे केशव नारायण | ८७ | काव्य | – | – | समीक्षा | – | नाटक | |
| ● काळे वसंत पुरुषोत्तम | ८८ | – | कथा | कादंबरी | – | – | – | |
| ● काळेले रामचंद्र अनंत | ८९ | काव्य | – | – | समीक्षा | ललित | – | |
| ○ किर्लोस्कर अण्णासाहेब | ९० | – | – | – | – | – | – | नाटक |
| ● किर्लोस्कर आनंदीबाई शंकरराव | ९० | – | कथा | – | – | – | – | |
| ○ किर्लोस्कर बळवंत पांडुरंग | ९१ | – | – | – | – | – | – | नाटक |
| ● किर्लोस्कर शांता मुकुंद | ९१ | – | कथा | कादंबरी | | | संपादक | |
| ● कीर गिरिजा उमाकांत | ९३ | – | कथा | कादंबरी | – | – | बाल.सा. | |
| ● कुंजविहारी | ९४ | काव्य | – | – | – | – | – | |
| ● कुंटे महादेव मोरेश्वर | ९५ | काव्य | – | – | – | – | – | |
| ● कुंटे वामन जनार्दन | ९६ | काव्य | – | – | – | – | अनुवादक | |
| ○ कुरुंदकर नरहर अंबादास | ९७ | – | – | – | – | – | विचारवंत | प.ल.सा. |
| ○ कुलकर्णी गुरुनाथ आबाजी | ९७ | – | – | – | – | – | – | पृ. २१० |
| ● कुलकर्णी गोविंद मल्हार | ९७ | – | – | – | समीक्षा | – | – | |
| ● कुलकर्णी श्रीनिवास विनायक | ९८ | – | – | – | – | ललित | निबंध | |
| ● कुसुमाग्रज | १०० | काव्य | कथा | – | – | ललित | नाटक | |
| ● कुळकर्णी उमा विरुपाक्ष | १०४ | – | – | – | – | – | अनुवादक | |

| चरित्रनायकाचे नाव | पृष्ठ | चरित्रनायकाने हाताळलेले साहित्यप्रकार | | | | | | मुख्य नोंद |
|---|---|---|---|---|---|---|---|---|
| ● कुळकर्णी कृष्णाजी पांडुरंग | १०५ | – | – | – | समीक्षा | ललित | संशोधक | |
| ● कुळकर्णी दत्तात्रय भिकाजी | १०६ | – | – | – | समीक्षा | ललित | – | |
| ○ कुळकर्णी नारायण विनायक | १०९ | – | – | – | – | – | – | पृ. १८० |
| ● कुळकर्णी भीमराव बळवंत | १०९ | – | कथा | – | समीक्षा | ललित | संपादक | |
| ● कुळकर्णी मदन पांडुरंग | १११ | – | – | – | समीक्षा | ललित | संशोधक | |
| ○ कुळकर्णी रघुनाथ भगवान | १११ | – | – | – | – | – | – | पृ. ४५६ |
| ● कुळकर्णी वसंत दिगंबर | ११२ | – | – | – | समीक्षा | – | – | |
| ● कुळकर्णी वामन लक्ष्मण | ११३ | – | – | – | समीक्षा | – | – | |
| ● कुळकर्णी विनायक महादेव | ११५ | काव्य | – | – | – | – | – | |
| ● केचे मधुकर बाबुराव | ११६ | काव्य | – | – | – | ललित | – | |
| ● केतकर गजानन विनायक | ११७ | – | – | – | – | ललित | संशोधक | |
| ● केतकर शीलवती श्रीधर | ११८ | – | – | – | – | ललित | अनुवादक | |
| ○ केतकर श्रीधर व्यंकटेश | ११९ | – | – | – | – | – | – | प.ल.सा. |
| ○ केशवकुमार | ११९ | – | – | – | – | – | – | पृ. १ |
| ● केशवसुत | ११९ | काव्य | – | – | – | – | – | |
| ● केळकर अशोक रामचंद्र | १२२ | – | – | – | समीक्षा | ललित | संशोधक | |
| ● केळकर गिरिजाबाई महादेव | १२३ | – | – | कादंबरी | – | ललित | नाटक | |
| ● केळकर नरसिंह चिंतामण | १२४ | काव्य | कथा | कादंबरी | – | – | नाटक | |
| ○ केळकर भालबा | १२६ | – | – | – | – | – | – | नाटक |
| ● केळकर यशवंत नरसिंह | १२६ | काव्य | – | – | – | ललित | कोशकार | |
| ○ केळुसकर कृष्णराव अर्जुन | १२७ | – | – | – | – | – | – | शिक्षण |
| ● कोंडविलकर माधव | १२७ | काव्य | कथा | कादंबरी | – | – | – | |
| ○ कोगेकर नारायण वासुदेव | १२८ | – | – | – | – | – | – | विज्ञान |
| ○ कोठावळे केशव विष्णू | १२८ | – | – | – | – | – | – | प.ल.सा. |
| ● कोतापल्ले नागनाथ लालूजीराव | १२८ | काव्य | कथा | कादंबरी | समीक्षा | ललित | – | |
| ● कोलटकर अरुण | १३० | काव्य | – | – | – | – | – | |
| ○ कोलते विष्णु भिकाजी | १३१ | – | – | – | – | – | संशोधक | प.ल.सा. |
| ● कोलारकर राम | १३१ | – | – | – | समीक्षा | ललित | संपादक | |
| ○ कोल्हटकर अच्युत बळवंत | १३२ | – | – | – | – | – | – | प.ल.सा. |
| ○ कोल्हटकर चिंतामण गणेश | १३२ | – | – | – | – | – | – | नाटक |
| ○ कोल्हटकर बाळ | १३२ | – | – | – | – | – | – | नाटक |
| ● कोल्हटकर श्रीपाद कृष्ण | १३२ | काव्य | कथा | कादंबरी | समीक्षा | ललित | नाटक | |
| ○ कोसंबी दामोदर धर्मानंद | १३४ | – | – | – | – | – | – | प.ल.सा. |

| चरित्रनायकाचे नाव | पृष्ठ | चरित्रनायकाने हाताळलेले साहित्यप्रकार | | | | | | मुख्य नोंद |
|---|---|---|---|---|---|---|---|---|
| ● खरात शंकरराव रामराव | १३५ | – | कथा | कादंबरी | – | – | – | |
| ○ खरे वासुदेव वामनशास्त्री | १३९ | – | – | – | – | – | – | नाटक |
| ○ खरे सुरेश विनायक | १३९ | – | – | – | – | – | – | नाटक |
| ● खांडेकर विष्णू सखाराम | १३९ | – | कथा | कादंबरी | – | – | निबंध | |
| ● खांबेटे दत्तात्रय पांडुरंग | १४२ | – | कथा | – | – | ललित | अनुवादक | |
| ○ खाडिलकर कृष्णाजी प्रभाकर | १४४ | – | – | – | – | – | – | नाटक |
| ○ खाडिलकर नीळकंठ यशवंत | १४४ | – | – | – | – | – | – | प.ल.सा. |
| ○ खाडिलकर पांडुरंग दत्तात्रेय | १४४ | – | – | – | – | – | – | लोककला |
| ● खानोलकर गंगाधर देवराव | १४४ | – | – | – | – | ललित | कोशकार | |
| ○ खानोलकर चिंतामण त्र्यंबक | १४६ | – | – | – | – | – | – | पृ. ३० |
| ○ खेडगीकर व्यंकटराव भवानराव | १४६ | – | – | – | – | – | – | समाजकारण |
| ● खेर भालचंद्र दत्तात्रय | १४६ | – | कथा | कादंबरी | – | – | पत्रकार | |
| ● खैरमोडे चांगदेव भवानराव | १४७ | – | – | – | – | – | चरित्रकार | |
| ● खोत चंद्रकांत गणपत | १४८ | काव्य | कथा | कादंबरी | – | ललित | संपादक | |
| ● खोले विलास वसंत | १४९ | – | – | – | समीक्षा | ललित | – | |
| ● गजेंद्रगडकर मोनिका | १५१ | – | कथा | – | – | – | – | |
| ○ गडकरी राम गणेश | १५१ | – | – | – | – | – | – | पृ. १७७ |
| ● गणोरकर प्रभा रामचंद्र | १५१ | काव्य | – | – | समीक्षा | – | – | |
| ● गवस राजन गणपती | १५२ | काव्य | | कादंबरी | समीक्षा | – | – | |
| ● गवाणकर वीणा चंद्रकांत | १५३ | – | – | – | – | ललित | चरित्रकार | |
| ○ गस्ती भीमराव | १५४ | – | – | – | – | – | – | समाजकारण |
| ● गाडगीळ गंगाधर गोपाळ | १५४ | – | कथा | कादंबरी | समिक्षा | ललित | चरित्रकार | |
| ● गाडगीळ बाळ | १५८ | – | कथा | कादंबरी | – | ललित | अनुवादक | |
| ● गाडगीळ सदाशिव रामचंद्र | १६० | – | – | – | समीक्षा | – | संशोधक | |
| ● गिरीश | १६१ | काव्य | – | – | – | – | – | |
| ● गुंजीकर रामचंद्र भिकाजी | १६३ | – | – | कादंबरी | समीक्षा | ललित | व्याकरण | |
| ● गुंडी निलीमा | १६४ | – | – | – | समीक्षा | ललित | – | |
| ○ गुप्ते नारायण मुरलीधर | १६५ | – | – | – | – | – | – | पृ. ४५४ |
| ● गुप्ते शांताराम गोपाळ | १६५ | – | – | कादंबरी | – | ललित | नाटक | |
| ● गुर्जर विठ्ठल सीताराम | १६६ | – | कथा | कादंबरी | – | ललित | नाटक | |
| ● गोखले अरविंद विष्णू | १६६ | – | कथा | – | – | ललित | – | |
| ○ गोखले अवंतिकाबाई बबनराव | १७१ | – | – | – | – | – | – | समाजकारण |
| ● गोखले कृष्णाजी केशव | १७१ | – | कथा | कादंबरी | – | – | – | |

| चरित्रनायकाचे नाव | पृष्ठ | चरित्रनायकाने हाताळलेले साहित्यप्रकार | | | | | | मुख्य नोंद |
|---|---|---|---|---|---|---|---|---|
| ● गोखले दत्तात्रय नरसिंह | १७२ | – | – | – | समीक्षा | ललित | चरित्र | |
| ○ गोखले विद्याधर संभाजीराव | १७३ | – | – | – | – | – | – | प.ल.सा. |
| ○ गोडघाटे माणिक सीतारामपंत | १७३ | – | – | – | – | – | – | पृ. १८२ |
| ● गोडबोले परशुराम बल्लाळ | १७४ | काव्य | – | – | – | ललित | – | |
| ● गोडसे विष्णुभट बाळकृष्ण | १७५ | – | – | – | – | – | आत्मवृत्त | |
| ● गोरे नारायण गणेश | १७७ | – | कथा | – | – | ललित | अनुवादक | |
| ● गोविंदाग्रज | १७७ | काव्य | – | – | – | ललित | नाटक | |
| ● गोविंदानुज | १८० | काव्य | – | कादंबरी | समीक्षा | ललित | – | |
| ○ गोळे पद्मावती विष्णू | १८१ | – | – | – | – | – | – | पृ. ३६१ |
| ● ग्रामोपाध्ये गंगाधर बळवंत | १८१ | काव्य | – | – | – | ललित | – | |
| ● ग्रेस | १८२ | काव्य | – | – | – | ललित | – | |
| ● घाटे निरंजन सिंहेंद्र | १८५ | – | कथा | – | – | ललित | विज्ञानकथा | |
| ● घाटे विठ्ठल दत्तात्रेय | १८६ | काव्य | – | – | – | ललित | – | |
| ● चितमपल्ली मारुती भुजंगराव | १८८ | – | कथा | – | – | ललित | – | |
| ○ चित्राव सिध्देश्वरशास्त्री | १९२ | – | – | – | – | – | कोशकार | प.ल.सा. |
| ● चित्रे दिलीप पुरुषोत्तम | १९२ | काव्य | कथा | – | – | ललित | नाटक | |
| ● चिपळूणकर कृष्णशास्त्री हरी | १९३ | – | – | – | – | ललित | अनुवादक | |
| ● चिपळूणकर विष्णुशास्त्री | १९५ | – | – | – | – | ललित | निबंध | |
| ● चिरमुले शरच्चंद्र वासुदेव | १९७ | – | – | कथा | – | – | – | |
| ● चुनेकर सुरेश रामकृष्ण | १९९ | – | – | – | समीक्षा | ललित | संशोधक | |
| ● चेंदवणकर प्रल्हाद नामदेव | १९९ | काव्य | – | – | – | – | – | |
| ● चोरघडे वामन कृष्ण | २०० | – | कथा | – | – | – | – | |
| ● चौधरी बहिणाबाई नथुजी | २०१ | काव्य | – | – | – | – | – | |
| ● चौधरी सोपानदेव नथुजी | २०४ | काव्य | – | – | – | – | – | |
| ● जाधव राजा | २०६ | – | – | – | समीक्षा | ललित | – | |
| ● जाधव रावसाहेब गणपतराव | २०७ | काव्य | कथा | – | समीक्षा | ललित | – | |
| ● जामकर मधू | २०८ | काव्य | – | – | – | – | – | |
| ● जावडेकर सुबोध प्रभाकर | २०९ | – | कथा | कादंबरी | – | ललित | विज्ञानकथा | |
| ● जी. ए. कुलकर्णी | २१० | – | कथा | – | – | ललित | गूढकथा | |
| ● जोग रामचंद्र श्रीपाद | २१४ | काव्य | – | – | समीक्षा | – | – | |
| ● जोग लक्ष्मण गणेश | २१६ | – | कथा | कादंबरी | समीक्षा | ललित | – | |
| ● जोगळेकर गंगाधर नारायण | २१७ | – | – | – | समीक्षा | ललित | – | |
| ○ जोगळेकर ज. द. | २१८ | – | – | – | – | – | – | प.ल.सा. |

| चरित्रनायकाचे नाव | पृष्ठ | चरित्रनायकाने हाताळलेले साहित्यप्रकार | | | | | | मुख्य नोंद |
|---|---|---|---|---|---|---|---|---|
| ● जोगळेकर मृणालिनी परशुराम | २१८ | – | कथा | – | – | ललित | चरित्रकार | |
| ● जोगळेकर योगिनी विश्वनाथ | २१८ | – | कथा | कादंबरी | – | ललित | नाटक | |
| ● जोशी चिंतामण विनायक | २२० | – | कथा | कादंबरी | – | ललित | विनोद | |
| ○ जोशी नरसिंह महादेव | २२२ | – | – | – | – | – | – | प.ल.सा. |
| ○ जोशी नागेश रामचंद्र | २२२ | – | – | – | – | – | – | नाटक |
| ● जोशी नारायण गजानन | २२२ | काव्य | – | – | – | ललित | | |
| ● जोशी प्रल्हाद नरहर | २२३ | – | – | कादंबरी | – | ललित | संत.सा. | |
| ● जोशी महादेवशास्त्री सीताराम | २२४ | – | कथा | कादंबरी | समीक्षा | ललित | कोशकार | |
| ○ जोशी माधवराव नारायण | २२७ | – | – | – | – | – | – | नाटक |
| ● जोशी यशवंत गोपाळ | २२७ | – | कथा | कादंबरी | – | ललित | संपादक | |
| ● जोशी रघुनाथ कृष्ण | २२९ | – | – | – | – | – | – | चित्रकला |
| ● जोशी रामचंद्र भिकाजी | २२९ | – | – | कादंबरी | समीक्षा | ललित | – | |
| ● जोशी लक्ष्मण बाळाजी | २३० | – | – | – | समीक्षा | ललित | कोशकार | |
| ● जोशी वामन मल्हार | २३२ | – | – | कादंबरी | – | – | – | |
| ● जोशी वासुदेव विनायक | २३३ | काव्य | – | – | – | ललित | नाटक | |
| ○ जोशी वीर वामनराव | २३४ | – | – | – | – | – | – | नाटक |
| ● जोशी श्रीकृष्ण जनार्दन | २३४ | – | कथा | कादंबरी | – | ललित | – | |
| ● जोशी श्रीपाद रघुनाथ | २३५ | – | कथा | कादंबरी | – | ललित | कोशकार | |
| ● जोशी सुरेश दामोदर | २३६ | – | – | – | – | ललित | ग्रंथपाल | |
| ● टाकसाळे मुकुंद मोरेश्वर | २३८ | – | – | – | – | ललित | विनोद | |
| ○ टिकेकर रामचंद्र विनायक | २३८ | – | – | – | – | – | – | पृ.३२८ |
| ○ टिपणीस यशवंत नारायण | २३८ | – | – | – | – | – | – | नाटक |
| ● टिळक (रेव्ह.) नारायण वामन | २३८ | काव्य | – | – | – | – | – | |
| ● टिळक कमलाबाई विष्णू | २४१ | – | कथा | – | – | – | – | |
| ○ टिळक बाळ गंगाधर | २४३ | – | – | – | – | – | – | राजकारण |
| ● टिळक लक्ष्मीबाई नारायण | २४३ | काव्य | – | – | – | ललित | आत्मकथा | |
| ○ टेंबे गोविंद सदाशिव | २४५ | – | – | – | – | – | – | संगीत |
| ● टेकाडे आनंद कृष्णाजी | २४५ | काव्य | – | – | – | – | गीतकार | |
| ○ ठाकरे केशव सीताराम | २४८ | – | – | – | – | – | – | समाजकारण |
| ● ठोकळ गजानन लक्ष्मण | २४८ | काव्य | कथा | कादंबरी | – | – | – | |
| ○ ठोमरे त्र्यंबक बापूजी | २४९ | – | – | – | – | – | – | पृ. ४५० |
| ● डहाके वसंत आबाजी | २५० | काव्य | – | – | समीक्षा | – | – | |
| ● डांगळे अर्जुन ठमाजी | २५२ | काव्य | कथा | – | – | ललित | – | |

| चरित्रनायकाचे नाव | पृष्ठ | चरित्रनायकाने हाताळलेले साहित्यप्रकार | | | | | | मुख्य नोंद |
|---|---|---|---|---|---|---|---|---|
| ○ डांगे श्रीपाद अमृत | २५३ | – | – | – | – | – | – | राजकारण |
| ● ढवळे वामन रावजी | २५४ | काव्य | – | – | – | ललित | चरित्र | |
| ● ढसाळ नामदेव लक्ष्मण | २५५ | काव्य | – | कादंबरी | – | – | – | |
| ● ढाले राजा पिराजी | २५७ | काव्य | – | – | – | ललित | – | |
| ● ढेरे अरुणा रामचंद्र | २५८ | काव्य | कथा | – | समीक्षा | ललित | – | |
| ● ढेरे रामचंद्र चिंतामण | २६० | – | – | – | समीक्षा | – | संशोधक | |
| ○ तर्खडकर दादोबा पांडुरंग | २६४ | – | – | – | – | – | – | शिक्षण |
| ● तल्हार मनोहर मारुतीराव | २६४ | – | कथा | कादंबरी | – | – | – | |
| ○ तळवलकर गोविंद श्रीपाद | २६४ | – | – | – | – | – | – | प.ल.सा. |
| ● तांबे भास्कर रामचंद्र | २६५ | काव्य | – | – | – | – | – | – |
| ● तांबोळी लक्ष्मीकांत सखाराम | २६८ | काव्य | – | – | – | – | – | – |
| ● ताम्हनकर नारायण धोंडो | २६९ | – | कथा | – | – | ललित | बाल सा. | – |
| ● तिवारी दुर्गाप्रसाद आसाराम | २७० | काव्य | कथा | – | – | – | – | – |
| ● तुपे उत्तम बंडू | २७१ | – | – | कादंबरी | – | ललित | आत्मकथा | – |
| ● तुळपुळे शंकर गोपाळ | २७२ | – | – | – | – | ललित | संशोधक | – |
| ○ तेंडुलकर प्रिया विजय | २७३ | – | – | – | – | – | – | चित्रपट |
| ● तेंडुलकर रमेश अच्युत | २७३ | काव्य | – | – | समीक्षा | ललित | – | – |
| ● तेंडुलकर विजय धोंडोपंत | २७४ | – | – | कादंबरी | – | ललित | नाटक | – |
| ● तोरो अनंत रामचंद्र | २७७ | – | – | – | समीक्षा | ललित | अनुवादक | – |
| ○ थत्ते यदुनाथ दत्तात्रय | २७८ | – | – | – | – | – | – | प.ल.सा. |
| ● थोरात हरिश्चंद्र गणपत | २७८ | – | – | – | समीक्षा | – | – | |
| ● दडकर जया | २७९ | – | – | – | – | ललित | संपादक | |
| ● दलवाई हमीद उमर | २७९ | – | कथा | कादंबरी | – | | | |
| ● दसनूरकर स्नेहलता दत्तात्रय | २८० | – | कथा | कादंबरी | – | ललित | बाल सा. | |
| ● दळवी जयवंत द्वारकानाथ | २८१ | – | कथा | कादंबरी | – | ललित | नाटक | |
| ● दांडेकर गोपाळ नीळकंठ | २८४ | – | कथा | कादंबरी | – | ललित | आत्मचरित्र | |
| ● दांडेकर मालती माधव | २८७ | – | कथा | कादंबरी | – | ललित | बाल.सा. | |
| ○ दांडेकर शंकर वामन | २८८ | – | – | – | – | – | – | धर्मकारण |
| ● दातार मुकुंद | २८८ | काव्य | – | – | समीक्षा | ललित | – | |
| ○ दाते यशवंत रामकृष्ण | २८९ | – | – | – | – | – | – | प.ल.सा. |
| ○ दाते शंकर गणेश | २८९ | – | – | – | – | – | – | प.ल.सा. |
| ○ दामले कृष्णाजी केशव | २८९ | – | – | – | – | – | – | पृ. ११९ |
| ● दामले सीताराम केशव | २८९ | – | – | कादंबरी | – | ललित | पत्रकार | |

| चरित्रनायकाचे नाव | पृष्ठ | चरित्रनायकाने हाताळलेले साहित्यप्रकार | | | | | | मुख्य नोंद |
|---|---|---|---|---|---|---|---|---|
| ● दावतर वसंत केशव | २९० | – | – | – | समीक्षा | – | – | |
| ● दिघे रघुनाथ वामन | २९१ | – | कथा | कादंबरी | – | – | – | |
| ○ दिवाकर | २९४ | – | – | – | – | – | – | नाटक |
| ● दिवाकर कृष्ण | २९४ | – | कथा | कादंबरी | – | ललित | – | |
| ● दीक्षित मधुकर श्रीधर | २९६ | – | – | – | – | ललित | चरित्र | |
| ● देखणे रामचंद्र अनंत | २९६ | – | कथा | कादंबरी | – | ललित | लोककला | |
| ● देवधर जोत्स्ना केशव | २९७ | – | कथा | कादंबरी | – | ललित | | |
| ● देवस्थळे सुमती | २९८ | – | – | – | – | ललित | चरित्र | |
| ● देशपांडे अच्युत नारायण | ३०० | – | – | कादंबरी | समीक्षा | ललित | विचारवंत | |
| ○ देशपांडे आत्माराम रावजी | ३०१ | – | – | – | – | – | – | पृ. ३ |
| ● देशपांडे कुसुमावती आत्माराम | ३०१ | काव्य | कथा | – | समीक्षा | ललित | – | |
| ○ देशपांडे गोविंद पुरुषोत्तम | ३०३ | – | – | – | – | – | – | नाटक |
| ● देशपांडे गौरी अविनाश | ३०३ | – | कथा | कादंबरी | – | ललित | अनुवादक | |
| ● देशपांडे नागोराव घनश्याम | ३०५ | काव्य | – | – | – | ललित | – | |
| ● देशपांडे निर्मला वसंत | ३०७ | काव्य | कथा | कादंबरी | – | ललित | – | |
| ● देशपांडे पुरुषोत्तम यशवंत | ३०९ | – | – | कादंबरी | – | ललित | तत्त्वचिंतक | |
| ● देशपांडे पुरुषोत्तम लक्ष्मण | ३१० | काव्य | कथा | कादंबरी | – | ललित | विनोदी | |
| ● देशपांडे यशवंत खुशाल | ३१३ | – | – | – | समीक्षा | ललित | संशोधक | |
| ○ देशपांडे सखाराम हरी | ३१४ | – | – | – | – | – | – | प.ल.सा. |
| ● देशपांडे सुनीता पुरुषोत्तम | ३१४ | – | कथा | – | – | ललित | आत्मकथा | |
| ● देशमुख अनंत प्रभाकर | ३१५ | – | – | – | समीक्षा | ललित | | |
| ● देशमुख उषा माधव | ३१७ | – | – | – | | ललित | संत.सा. | |
| ● देशमुख माधव गोपाळ | ३१८ | – | – | – | समीक्षा | ललित | – | |
| ● देशमुख सदानंद नामदेव | ३१९ | – | कथा | कादंबरी | – | ललित | – | |
| ● देसाई कमल गणेश | ३१९ | – | कथा | कादंबरी | – | – | – | |
| ● देसाई माधवी रणजित | ३२१ | काव्य | कथा | कादंबरी | – | – | – | |
| ● देसाई मृणालिनी प्रभाकर | ३२२ | – | कथा | कादंबरी | – | ललित | – | |
| ● देसाई रणजित रामचंद्र | ३२३ | – | कथा | कादंबरी | – | ललित | नाटक | |
| ● देसाई वसंत शांताराम | ३२५ | – | कथा | कादंबरी | समीक्षा | ललित | चरित्र | |
| ● धनुर्धारी | ३२८ | – | – | – | – | – | चरित्र | |
| ● धर्माधिकारी शंकर त्र्यंबक | ३३० | – | – | – | – | ललित | विचारवंत | |
| ● धारप नारायण गोपाळ | ३३१ | – | कथा | कादंबरी | | ललित | रहस्यकथा | |
| ● धोंड मधुकर वासुदेव | ३३३ | – | – | – | समीक्षा | ललित | संशोधक | |

| चरित्रनायकाचे नाव | पृष्ठ | चरित्रनायकाने हाताळलेले साहित्यप्रकार | | | | | | मुख्य नोंद |
|---|---|---|---|---|---|---|---|---|
| ● नगरकर किरण कमलाकर | ३३६ | – | कथा | कादंबरी | – | ललित | नाटक | |
| ○ नरवणे विश्वनाथ दिनकर | ३३७ | – | – | – | – | – | – | प.ल.सा. |
| ● नवरे शंकर नारायण | ३३७ | – | कथा | कादंबरी | – | ललित | नाटक | |
| ○ नाईक राजीव बापुराव | ३३८ | – | – | – | – | – | – | नाटक |
| ● नाडकर्णी ज्ञानेश्वर गणपत | ३३९ | – | कथा | कादंबरी | समीक्षा | ललित | चरित्र | |
| ○ नातू गोपाळ नरहर | ३३९ | – | – | – | – | – | – | पृ. ४९६ |
| ● नातू मनू गंगाधर | ३४० | – | – | – | समीक्षा | ललित | निबंध | |
| ● नाथमाधव | ३४० | – | कथा | कादंबरी | – | – | ऐतिहासिक | |
| ● नायगावकर अशोक | ३४१ | काव्य | | | | ललित | – | |
| ● निंबाळकर वामन सुदामा | ३४२ | काव्य | – | – | – | – | – | |
| ● निकुम्ब कृष्ण बळवंत | ३४३ | काव्य | – | – | – | – | – | |
| ● निरंतर गंगाधर भाऊराव | ३४४ | – | – | कादंबरी | – | ललित | – | |
| ● नेमाडे भालचंद्र वना | ३४५ | काव्य | | कादंबरी | समीक्षा | – | – | |
| ● नेरुरकर प्रभाकर श्रीधर | ३४९ | – | – | – | – | ललित | – | |
| ● पंडित भवानीशंकर श्रीधर | ३५१ | काव्य | – | – | समीक्षा | ललित | – | |
| ▲ पगडी सेतुमाधवराव श्रीनिवास | ३५१ | – | कथा | – | समीक्षा | ललित | इतिहास | प.ल.सा. |
| ○ पटवर्धन माधव त्र्यंबक | ३५४ | – | – | – | – | – | – | पृ. ५१७ |
| ● पटवर्धन वसुंधरा कृष्णाजी | ३५४ | – | कथा | कादंबरी | – | – | प्रवासवर्णन | |
| ● पठाण युसुफखान महंमदखान | ३५५ | – | – | – | – | ललित | संत.सा. | |
| ● पठारे रंगनाथ गबाजी | ३५७ | – | कथा | कादंबरी | – | – | – | |
| ● पत्की विश्वनाथ वामन | ३५९ | | कथा | कादंबरी | समीक्षा | – | – | |
| ● पदकी मंगेश भगवंत | ३५९ | काव्य | कथा | – | – | – | – | |
| ● पदकी सरिता मंगेश | ३६० | काव्य | कथा | – | – | ललित | बाल सा. | |
| ● पद्मा | ३६१ | काव्य | – | – | – | – | – | |
| ● परांजपे जयंत भानुदास | ३६२ | काव्य | – | कादंबरी | समीक्षा | – | संशोधक | |
| ● परांजपे शकुंतला रघुनाथ | ३६२ | – | कथा | कादंबरी | – | – | – | |
| ○ परांजपे शिवराम महादेव | ३६४ | – | – | – | – | – | – | प.ल.सा. |
| ○ परुळेकर गोदावरी शामराव | ३६४ | – | – | – | – | – | – | समाजकारण |
| ● पवार उर्मिला हरिश्चंद्र | ३६४ | – | कथा | – | ललित | – | आत्मचरित्र | |
| ● पवार गोपाळ मारोतीराव | ३६५ | – | – | – | समीक्षा | – | – | |
| ● पवार दया | ३६६ | काव्य | कथा | – | समीक्षा | – | – | |
| ○ पवार प्रज्ञा दया | ३६६ | – | – | – | – | – | – | पृ. ५७२ |
| ○ पांगारकर लक्ष्मण रामचंद्र | ३६७ | – | – | – | – | – | – | धर्मकारण |

| चरित्रनायकाचे नाव | पृष्ठ | चरित्रनायकाने हाताळलेले साहित्यप्रकार | | | | | | मुख्य नोंद |
|---|---|---|---|---|---|---|---|---|
| ● पाटणकर राजाराम भालचंद्र | ३६७ | – | – | – | समीक्षा | ललित | विचारवंत | |
| ● पाटणकर वसंत सीताराम | ३६९ | काव्य | – | – | समीक्षा | – | – | |
| ● पाटील शंकर बाबाजी | ३७० | – | कथा | कादंबरी | – | ललित | पटकथा | |
| ● पाटील अनुराधा कौतिकराव | ३७२ | काव्य | – | – | – | – | – | |
| ● पाटील गंगाधर गणेश | ३७२ | – | – | – | समिक्षा | ललित | संपादक | |
| ● पाटील गणेश हरी | ३७३ | काव्य | – | – | – | – | – | |
| ● पाटील चंद्रकांत नागेशराव | ३७४ | काव्य | – | – | समीक्षा | ललित | – | |
| ● पाटील पुरुषोत्तम श्रीपती | ३७५ | काव्य | – | – | – | ललित | संपादक | |
| ● पाटील मधुकर सुदामा | ३७७ | – | – | – | समीक्षा | – | – | |
| ● पाटील वसुधा पद्माकर | ३७८ | – | कथा | कादंबरी | – | – | – | |
| ● पाटील विश्वास महिपती | ३७९ | – | कथा | कादंबरी | – | ललित | – | |
| ○ पाटोळे अशोक वसंत | ३८२ | – | – | – | – | – | – | नाटक |
| ● पाठक यशवंत त्र्यंबक | ३८२ | – | – | – | – | ललित | – | |
| ● पाडगावकर मंगेश केशव | ३८३ | काव्य | – | – | – | ललित | – | |
| ● पाध्ये कमल प्रभाकर | ३८६ | – | – | – | – | ललित | आत्मचरित्र | |
| ● पाध्ये दिगंबर विठ्ठल | ३८७ | – | – | – | समीक्षा | – | – | |
| ● पाध्ये प्रभाकर आत्माराम | ३८७ | – | कथा | – | समीक्षा | ललित | संपादक | |
| ● पाध्ये प्रभाकर नारायण | ३९० | – | कथा | कादंबरी | – | ललित | पत्रकार | |
| ○ पाध्ये सदाशिव कृष्ण | ३९१ | – | – | – | – | – | – | प.ल.सा. |
| ● पानतावणे गंगाधर विठोबा | ३९१ | – | – | – | समीक्षा | ललित | संपादक | |
| ● पानवलकर श्रीकृष्ण दामोदर | ३९३ | – | कथा | – | – | ललित | – | |
| ● पायगावकर सुमती हरिश्चंद्र | ३९५ | – | कथा | – | – | – | बाल सा. | |
| ● पारगावकर विठ्ठल शंकर | ३९६ | – | कथा | कादंबरी | – | – | – | |
| ● पिंगे रवींद्र रामचंद्र | ३९७ | – | कथा | कादंबरी | – | ललित | प्रवासवर्णन | |
| ○ पितळे द्वारकानाथ माधव | ३९८ | – | – | – | – | – | – | पृ. ३४० |
| ● पुंडलिक विद्याधर गंगाधर | ३९८ | – | कथा | – | समीक्षा | ललित | नाटक | |
| ● पुंडे दत्तात्रय दिनकर | ४०२ | – | – | – | समीक्षा | – | – | |
| ● पुरंदरे बळवंत मोरेश्वर | ४०२ | – | कथा | कादंबरी | – | ललित | शिवचरित्र | |
| ● पुरंदरे माधुरी बळवंत | ४०५ | – | – | – | – | ललित | चरित्र | |
| ○ पुरोहित केशव जगन्नाथ | ४०६ | – | – | – | – | – | – | पृ. ५९८ |
| ○ पेंडसे शंकर दामोदर | ४०६ | – | – | – | – | – | – | धर्मकारण |
| ● पेंडसे श्रीपाद नारायण | ४०६ | – | – | कादंबरी | – | ललित | नाटक | |
| ● पेंढारकर प्रभाकर भालजी | ४०८ | – | कथा | कादंबरी | – | ललित | पटकथा | |

| चरित्रनायकाचे नाव | पृष्ठ | चरित्रनायकाने हाताळलेले साहित्यप्रकार | | | | | | मुख्य नोंद |
|---|---|---|---|---|---|---|---|---|
| ● पेठे मेघना मोरेश्वर | ४०९ | – | कथा | – | – | – | – | |
| ○ पेडणेकर हिराबाई | ४१० | – | – | – | – | – | – | नाटक |
| ● पै शिरिष व्यंकटेश | ४१० | काव्य | कथा | – | – | ललित | संपादक | |
| ● पोतदार अनुराधा बाळकृष्ण | ४११ | काव्य | – | – | – | – | – | |
| ● पोहनेरकर नरहर शेषराव | ४१२ | काव्य | कथा | कादंबरी | – | – | संशोधक | |
| ● प्रधान गणेश प्रभाकर | ४१३ | – | – | – | – | ललित | चरित्र | |
| ● प्रभू मीना | ४१४ | – | – | – | – | ललित | प्रवासवर्णन | |
| ● प्रभुदेसाई विठ्ठल बाबू | ४१५ | – | – | – | – | – | संशोधक | |
| ● प्रियोळकर अनंत काकबा | ४१५ | काव्य | – | – | – | ललित | संशोधक | |
| ● फडके नारायण सीताराम | ४१८ | – | कथा | कादंबरी | समीक्षा | ललित | – | |
| ● फडके भालचंद्र दिनकर | ४२० | – | – | – | समीक्षा | ललित | – | |
| ● फडके यशवंत दिनकर | ४२१ | – | – | समीक्षा | ललित | – | संशोधक | |
| ● फाटक नरहर रघुनाथ | ४२३ | – | – | – | – | ललित | संशोधक | |
| ● फाटक पद्मजा शशिकांत | ४२६ | – | कथा | – | – | ललित | बाल.सा. | |
| ● फुटाणे रामदास दत्तात्रय | ४२७ | काव्य | कथा | – | – | ललित | – | |
| ▲ फुले जोतीराव गोविंदराव | ४२८ | काव्य | – | – | – | ललित | विचारवंत | समाजकारण |
| ○ फुले सावित्रीबाई जोतीराव | ४२८ | – | – | – | – | – | – | शिक्षण |
| ● फेणे वसंत नरहर | ४२९ | – | कथा | कादंबरी | – | – | – | |
| ● फोंडके बाळ | ४३१ | – | कथा | – | – | ललित | विज्ञानकथा | |
| ● बगे आशा अरविंद | ४३२ | – | कथा | कादंबरी | – | – | – | |
| ● बढे राजा नीळकंठ | ४३४ | काव्य | – | – | – | ललित | अनुवादक | |
| ● बनसोडे हिरा | ४३५ | काव्य | – | – | – | – | – | |
| ● बनहट्टी राजेंद्र श्रीनिवास | ४३५ | – | कथा | कादंबरी | – | – | नाटक | |
| ● बनहट्टी श्रीनिवास नारायण | ४३७ | – | – | – | समीक्षा | ललित | संशोधक | |
| ● बर्वे अच्युत महादेव | ४३८ | – | कथा | कादंबरी | – | – | – | |
| ● बर्वे अनिल सदाशिव | ४३८ | – | – | कादंबरी | – | ललित | नाटक | |
| ● बांदिवडेकर चंद्रकांत महादेव | ४३९ | – | – | – | समीक्षा | ललित | – | |
| ○ बांदेकर दत्तू | ४४० | – | – | – | – | – | – | प.ल.सा. |
| ● बागूल देविदास तुकाराम | ४४० | – | कथा | – | – | ललित | – | |
| ● बागूल बाबूराव रामजी | ४४१ | – | कथा | कादंबरी | – | – | – | |
| ● बापट नागेश विनायक | ४४२ | – | – | कादंबरी | – | ललित | चरित्र | |
| ● बापट वसंत | ४४३ | काव्य | – | – | – | ललित | – | |
| ● बाबर सरोजिनी कृष्णराव | ४४६ | काव्य | कथा | – | – | ललित | लोक सा. | |

| चरित्रनायकाचे नाव | पृष्ठ | चरित्रनायकाने हाताळलेले साहित्यप्रकार | | | | | | मुख्य नोंद |
|---|---|---|---|---|---|---|---|---|
| ● बाबा पद्मनजी | ४४८ | – | – | कादंबरी | – | ललित | कोशकार | |
| ● बारलिंगे सुरेंद्र शिवदास | ४४९ | – | कथा | कादंबरी | – | ललित | तत्त्वचिंतक | |
| ● बालकवी | ४५० | काव्य | – | – | समीक्षा | – | – | |
| ○ बाळ फोंडके | ४५३ | – | – | – | – | – | – | पृ. ४३१ |
| ● बाळ विद्या दत्तात्रय | ४५३ | – | कथा | – | – | ललित | संपादक | |
| ○ बाळकराम | ४५४ | – | – | – | – | – | – | पृ. १७७ |
| ○ बाळुताई खरे | ४५४ | – | – | – | – | – | – | पृ. ५९० |
| ● 'बी' | ४५४ | काव्य | – | – | – | ललित | – | |
| ● बी रघुनाथ | ४५६ | काव्य | कथा | कादंबरी | – | – | – | |
| ● बुवा विनायक आदिनाथ | ४५७ | – | कथा | – | – | ललित | विनोद | |
| ● बेंद्रे दत्तात्रय रामचंद्र | ४५८ | काव्य | कथा | – | – | ललित | नाटक | |
| ● बेडेकर दिनकर केशव | ४५९ | – | – | – | समीक्षा | ललित | संपादक | |
| ○ बेडेकर मालती विश्राम | ४६१ | – | – | – | – | – | – | पृ. ५९० |
| ● बेडेकर विश्राम चिंतामणी | ४६१ | – | – | कादंबरी | – | – | नाटक | |
| ○ बेहेरे गणपती वासुदेव | ४६३ | – | – | – | – | – | – | प.ल.सा. |
| ● बोकील मिलिंद श्रीधर | ४६३ | – | कथा | कादंबरी | – | – | समाजशास्त्र | |
| ● बोकील विष्णु विनायक | ४६६ | – | कथा | कादंबरी | – | – | – | |
| ● बोरकर बाळकृष्ण भगवंत | ४६७ | काव्य | कथा | कादंबरी | – | ललित | अनुवादक | |
| ● बोराडे रावसाहेब रंगनाथ | ४७० | – | कथा | कादंबरी | – | ललित | – | |
| ○ भगत दत्ता | ४७१ | – | – | – | – | – | – | नाटक |
| ● भट गोविंद केशव | ४७१ | – | कथा | कादंबरी | – | ललित | नाटक | |
| ● भट सुरेश श्रीधर | ४७२ | काव्य | – | – | – | ललित | गझल | |
| ● भणगे श्रीनिवास जगन्नाथ | ४७४ | – | कथा | – | – | – | नाटक | |
| ● भवाळकर तारा चिंतामण | ४७४ | – | – | – | समीक्षा | – | लोक सा. | |
| ● भांड बाबा साळूबा | ४७५ | – | – | कादंबरी | – | ललित | बाल.सा. | |
| ○ भांडारकर प्रभाकर रामकृष्ण | ४७७ | – | – | – | – | – | – | प.ल.सा. |
| ● भागवत दुर्गा नारायण | ४७७ | – | – | – | – | ललित | लोक.सा. | |
| ● भागवत भास्कर रामचंद्र | ४८० | – | कथा | कादंबरी | – | ललित | बाल.सा. | |
| ○ भागवत राजारामशास्त्री रामकृष्ण | ४८१ | – | – | – | – | – | – | प.ल.सा. |
| ● भागवत लीला भास्कर | ४८१ | – | कथा | – | – | ललित | बाल.सा. | |
| ○ भागवत सखाराम जगन्नाथ | ४८२ | – | – | – | – | – | – | प.ल.सा. |
| ● भातम्ब्रेकर प्रकाश लक्ष्मणराव | ४८२ | – | कथा | – | – | ललित | अनुवादक | |
| ○ भालेराव अमृत नारायण | ४८३ | – | – | – | – | – | – | नाटक |

आलेली दक्षिणा वाटण्याची पद्धती नियंत्रित करून त्याने दानाची रक्कम एक लाख रुपयांवर आणली आणि या लाखातूनच संस्कृत भाषेच्या पद्धतशीर अभ्यासासाठी ६ ऑक्टोबर १८२१ रोजी दसऱ्याच्या मुहूर्तावर हिंदू कॉलेज स्थापन केले. सुरुवातीला कॉलेजात शंभर विद्यार्थी होते व प्रत्येकाला दरमहा ५ रुपये शिष्यवृत्ती मिळे. धर्म, न्याय, ज्योतिष, व्याकरणादी दहा शाखांचा अभ्यास संस्कृतमधून होत असे. शिक्षण केवळ ब्राह्मणवर्गापुरते सीमित ठेवण्याचा एल्फिन्स्टनचा विचार नव्हता. समाजातील सर्वसाधारण लोकांनाही शिक्षण मिळावे अशी त्याची व्यापक दृष्टी होती. आणि त्या दृष्टीने त्याने प्रयत्न केले. आपल्या उदार धोरणात एल्फिन्स्टनने इंग्लंडचा व्यापारी फायदाच पाहिला होता. १८१५ मध्ये आर्चबिशप बार्नेस यांच्या प्रयत्नांनी 'द सोसायटी फॉर प्रमोटिंग द एज्युकेशन ऑफ द पुअर विदिन द गव्हर्नमेंट ऑफ बॉम्बे' या नावाची एक संस्था सुरू झाली. मुंबईतील काही प्रमुख नागरिकांच्या मदतीने या संस्थेची एक शाखा म्हणून शिक्षण घेऊ इच्छिणाऱ्या प्रत्येकाला ती सोय असावी या हेतूने एल्फिन्स्टनने २१ ऑगस्ट १८२२ रोजी 'बॉम्बे नेटिव्ह स्कूल बुक ॲण्ड स्कूल सोसायटी' ही संस्था सुरू केली. या संस्थेलाच 'मुंबईची हैंदशाळा शाळापुस्तक मंडळी' असेही म्हटले जाई. एल्फिन्स्टन हाच या संस्थेचा पहिला अध्यक्ष होता. व्यंकोबा नाईक, सदाशिव काशिनाथ छत्रे, मुल्ला फिरोझ, महमद इब्राहिम मखबा, जगन्नाथ शंकरशेट, धाकजी दादाजी इत्यादी मान्यवर एतद्देशीयांचा या शिक्षणसंस्थेशी संबंध आला. इ. स. १८२७ मध्ये 'बॉम्बे नेटिव्ह स्कूल बुक ॲण्ड स्कूल सोसायटी' या संस्थेचे नामांतर 'बॉम्बे नेटिव्ह एज्युकेशन सोसायटी' असे झाले. लोकांना मातृभाषेतून पाश्चात्त्य ज्ञानाचा परिचय करून द्यावा व त्यांची नैतिक पातळी उंचवावी या दृष्टीने ही संस्था कार्यरत होती.

एकदा राज्य हाती आले असे म्हटल्यावर इंग्रजांनी आपली सत्ता येथे दृढमूल करण्यासाठी जे जे करता येणे शक्य होते ते ते करावयास सुरुवात केली. इंग्रजी शिक्षण देण्यास केलेला आरंभ हे या दिशेने उचललेले पहिले पाऊल होते. इंग्रजांची राजवट येथे आली व तिच्या पाठोपाठ नवी शिक्षणपद्धतीही आली. नव्या शिक्षणपद्धतीद्वारे भारतीय मनाला पश्चिमेचा पहिला सहवास घडला. आणि ही नवी शिक्षणपद्धतीच मुख्यत्वे आधुनिक प्रबोधनास कारण ठरली. तिच्यामुळे नव्या ज्ञानाचे समृद्ध क्षेत्र एतद्देशियांना खुले झाले. इतकेच नव्हे, तर त्या शिक्षणपद्धतीमुळे भारतवासीयांचे अनेक वेगवेगळे फायदे झाले ही गोष्ट वारंवार सांगितली गेली आहे. या संबंधात कालौघामध्ये स्वत: इंग्रजांनी अभिमानपूर्वक याचा उच्चार केला आहे. परंतु इंग्रज येथे येण्यापूर्वी अस्तित्वात असणाऱ्या इथल्या शिक्षणपद्धतीमुळे इंग्लंडमधील गरीब मुलांच्या शिक्षणाला साहाय्य झाले ही बाब मात्र सांगितली जात नाही.*

मराठी राज्य अस्तंगत होण्यापूर्वी मराठी भाषेच्या अध्ययन-अध्यापनाची सुरुवात महाराष्ट्राबाहेर झाली होती. इंग्लंडमधून हिंदुस्थानात नोकरीसाठी येणाऱ्या मुलांना राज्यकारभारयोग्य बनविणारे शिक्षण देण्यासाठी हिंदुस्थानचा

---

* ''They generally ignore the great contribution which was made by India to the spread of education among the poorer classes of England herself. Dr. Bell, the Presidency Chaplain at Madras, was the first Englishman to realise the value of the Indian system of teaching with the help of monitors- a system that prevailed extensively in the indigenous schools. Although the main principle of the system is the use of senior pupils in teaching the juniors, several different forms of it wear in use. ... Dr. Bell realised that the main advantage of the system was to enable the teacher to manage a large number of pupils at a time so that the spread of education could be effected at a very low cost. He, therefore, advocated the adoption of this system in England in a book entitled "An Experiment in Education made at a Male Asylum at Madras, suggesting a system by which a school or a Family may teach itself under the superintendence of the Master or Parent" (1798). This book attracted great attention and eventually the Indian system was almost universally adopted in England. This system, variously described as the Madras system, or the Monitorial system, was the chief method by which England achieved expansion of primary education at a very low cost between 1801 and 1845.'' (नरुला-नाईक, पूर्वोक्त, पृ. १५-१६)

गव्हर्नर जनरल लॉर्ड वेलस्ली याने कलकत्ता येथे ४ मे १८०० रोजी फोर्ट विल्यम कॉलेजची स्थापना केली. सुरुवातीचा वर्षदोनवर्षांचा अनिश्चित काळ सोडल्यास हे कॉलेज २४ जानेवारी १८५४ पर्यंत सुरू राहिले. राज्यकारभारास आवश्यक असणारे ज्ञान, देशभाषांचा परिचय, एतद्देशीय लोकांचे आचारविचार, चालीरीती, वाङ्मय, कायदे इ. विषयांची माहिती अशा प्रकारचा अभ्यासक्रम शिस्तबद्ध रीतीने तीन वर्षांत पुरा व्हावा अशी या कॉलेजची योजना होती. The Pride of their country and the pillars of their empire असे विद्यार्थी घडविणे हा या कॉलेजच्या स्थापनेमागचा हेतू होता. भावी सनदी नोकरांमध्ये देशभाषांची समजूत उत्पन्न होणे आवश्यक असल्याने या अभ्यासक्रमात फारशी, अरबी, संस्कृत, बंगाली, मराठी, कन्नड, तेलुगू इत्यादी भाषांना स्थान लाभले होते. कलकत्त्याप्रमाणे मद्रास येथेही तत्सम कॉलेज स्थापन झाले होते. आणि तेथेही मराठी भाषेचा अभ्यास होत होता. मराठी राज्य लवकरच आपल्या अंमलाखाली येण्याचा विश्वास असल्यामुळे असेल, फोर्ट विल्यम कॉलेजात मराठी भाषा जाणणारे काही सनदी नोकर तयार केले जात होते. देशभाषांचा पद्धतशीर अभ्यास करवून घेण्याच्या हेतूने फोर्ट विल्यम कॉलेजात बंगाली, मराठी आणि संस्कृत या तीनही भाषा उत्तम प्रकारे जाणणाऱ्या विल्यम कॅरे नामक मिशनऱ्याची प्राध्यापक म्हणून व तीन पंडितांची भाषातज्ज्ञ म्हणून नेमणूक झाली. तिघांपैकी वैजनाथ शर्मा व रंगनाथ नामक एक मुनशी या दोघांची नावे ज्ञात आहेत. कोणतीही नवी भाषा शिकायची तर त्या भाषेचे व्याकरण व शब्दकोश साहाय्यकारी ठरत असल्यामुळे कॅरेने आपल्या हाताखालच्या पंडितांच्या मदतीने त्यांची निर्मिती केली. विल्यम कॅरेने वैजनाथच्या मदतीने *मराठी भाषेचे व्याकरण* (१८०५), *मराठी भाषेचा कोश* (१८१०), *सिंहासनबत्तिशी* (१८१४), *हितोपदेश* (१८१५) इत्यादी पुस्तके तयार केली. व्याकरणाखेरीज इतर पुस्तके मोडी लिपीत छापली होती व मोडी टाइप तयार नसल्यामुळे फक्त व्याकरणाचे पुस्तक देवनागरीत छापले होते. परंतु त्याची दुसरी आवृत्ती (१८०८) मोडी लिपीत छापण्यात आली. महाराष्ट्राबाहेर झालेली ही आरंभकालीन मराठी ग्रंथनिर्मिती.

महाराष्ट्रात स्वराज्यलोप होऊन इंग्रजांची सत्ता आल्यानंतर ती पक्की करण्यासाठी लोकशिक्षण हाच एक मार्ग असल्याचे एल्फिन्स्टनप्रमाणे राज्यकर्त्यांपैकी इतरही अधिकाऱ्यांना वाटले आणि त्या दिशेने त्यांचे प्रयत्न सुरू झाले. या प्रयत्नांचे दृश्य रूप म्हणजे पुढे निर्माण झालेले शालोपयोगी वाङ्मय. या वाङ्मयाच्या निर्मितीसाठी प्रयत्नशील असणाऱ्या इंग्रज अधिकाऱ्यांना मराठी भाषेची पूर्वपीठिका ठाऊक नव्हती. मराठी ही बोलीभाषेच्या पातळीवरच आहे, तिच्यात फारसे वाङ्मय नाही आणि ती केवळ व्यापारी व शेतकरी यांचीच भाषा आहे असा त्यांचा समज होता.*

---

* मराठी भाषा व वाङ्मय यासंबंधी मुंबईच्या 'हैंदशाळा शाळापुस्तकमंडळी' या संस्थेने व्यक्त केलेले मत असे आहे – ''The Maratha and Gujarathee languages have always been restricted to the purposes of conversation and business and have never been applied to the cultivation and extension of literature even in its humblest forms.''(कुलकर्णी कृ. भि., पूर्वोक्त, पृ. ३) मराठी भाषेचे कोश सिद्ध करणाऱ्या ले. क. व्हॅन्स केनेडी आणि जेम्स मोल्स्वर्थ या कोशकारांच्या मराठी भाषेविषयीच्या समजुती अशाच प्रकारच्या अपुऱ्या माहितीवर आधारलेल्या होत्या.

व्हॅन्स केनेडीची मराठी भाषेबद्दलची कल्पना अशी होती – ''It must be observed that the Martha is merely a spoken language and that it has never been cultivated or refined by authors either in prose or verse. Its formation took place amongst a people solely engaged in agriculture, and all terms relating to science, law and religion were adopted from another language, and as the vernacular tongue was not employed in composition, it will be obvious that under such circumstances a language could never become copious.''

जेम्स मोल्स्वर्थ मराठी भाषेसंबंधी लिहितो – ''(It is) a language less regular and less definite than the English and ... being only a spoken language, inconceivably less apprehensible and less susceptible of rigid interpretation.''

मोल्स्वर्थच्या कोशावर तत्कालीन सरकारी समितीने दिलेल्या अभिप्रायात लिहिले आहे – ''Cap. Molesworth has himself correctly observed that this language is altogether oral or appears as written only in epistles, a few poetical pieces and about a dozen insignificant histories.'', कुलकर्णी कृ. भि., तत्रैव, पृ. ४)

शिलालेखांतून व ताम्रपटांतून उपलब्ध होणारा गद्य मजकूर, महानुभावी वाङ्मयातील गद्यग्रंथ, *पंचतंत्रा*सारख्या काही कथा, फादर स्टीफन्सने ख्रिस्तपुराणाला जोडलेली गद्य प्रस्तावना, मराठेशाहीतील गद्यात लिहिलेल्या सनदा, निवाडापत्रे, करीने, कैफियती, खासगी पत्रव्यवहार, बातमीदारांची पत्रे आणि बखर वाङ्मय हे एकंदरीत इंग्रजपूर्व कालातील मराठी गद्यवाङ्मय. याखेरीज मराठीतील थोर काव्यग्रंथांविषयी तर ते घोर अज्ञानी होते. परंतु पुस्तकनिर्मितीशी संबंधित इंग्रज अधिकाऱ्यांचा वरील लेखनाशी परिचय असता तर कदाचित त्यांनी केलेल्या पुस्तकनिर्मितीचे स्वरूप वेगळेही झाले असते.

नव्या शिक्षणपद्धतीमध्ये दोन मुख्य दोष होते. एक, भारताचा आर्थिक व औद्योगिक विकास घडण्यात या शिक्षणाने कोणताच हातभार लावला नाही. आणि दुसरा, हे शिक्षण अल्पसंख्यांकांपुरतेच मर्यादित होते. निधीचा तुटवडा आणि इंग्लिश भाषेचा माध्यम म्हणून केलेला स्वीकार यामुळे शिक्षण सर्वसामान्य लोकांपर्यंत पोचू शकत नव्हते. त्यामुळे नवशिक्षित वर्ग आणि सर्वसामान्य लोक यांत एक अंतर उत्पन्न झाले. हा नवा वर्ग शहरी होता. कारण माध्यमिक शाळा व महाविद्यालये ही  शहरात होती व शिकल्यावर नोकऱ्या मिळण्याची ठिकाणेही शहरीच होती. तिसरे म्हणजे हा नवशिक्षित वर्ग उच्चवर्णीय व समाजातील सधन वर्गापैकी एक होता. परिणामत: शिक्षणाच्या नव्या पद्धतीने भारतीय समाजात दोन स्पष्ट वर्ग निर्माण झाले. उच्चशिक्षित पुरुष–स्त्रियांचा अल्पसंख्यांक एक वर्ग, जो उच्च वर्णीय होता आणि दुसरा जवळजवळ अशिक्षित लोकांचा बहुसंख्यांक वर्ग, जो ग्रामीण भागात राहात होता व कनिष्ठ वर्णीय होता. यातून भारतीय शिक्षणपद्धतीत जी दुरिते उत्पन्न झाली व त्यातून समाजात जी दरी निर्माण झाली ती अजूनही पुरती सांधली गेली नाही.

**पाठ्यपुस्तके**

इसवी सन १८१३ मध्ये माउंट स्टुअर्ट एल्फिन्स्टन याने ईस्ट इंडिया कंपनीला शिक्षणविषयक शिफारशी करणारा जो खलिता पाठविला त्यानुसार नव्या पद्धतीच्या शैक्षणिक धोरणाची परिणामकारक अंमलबजावणी करण्यास साहाय्यकारी ठरतील असे ग्रंथ त्या काळी उपलब्ध नव्हते. मुळात तत्कालीन सर्वसामान्य माणसांत वाचनाची फारशी आवड नव्हती आणि शिकण्याची इच्छाशक्तीही नव्हती. देशी भाषांतून नवे ग्रंथ तयार करण्यासाठी लागणारे ग्रंथकार व ते छापण्यासाठी छापखाने यांचाही अभाव होता. अशा परिस्थितीत पाठ्यपुस्तके तयार करणे व ती शिकविणारे शिक्षक निर्माण करणे या दोन्ही दृष्टींनी प्रयत्न सुरू झाले. शालेय पुस्तके तयार करण्याइतकेच ती छापणे हेदेखील अडचणीचे होते. कारण पुस्तके छापण्यासाठी वापरल्या जाणाऱ्या शाईत चरबीचा उपयोग केला जातो असे समजल्यामुळे लोक बिथरले होते व छापील पुस्तकास स्पर्श करण्यास ते राजी नसत. ''रावसाहेब मंडलिक ज्या पोथ्या सोवळ्यांनी वाचीत त्या हस्तलिखित असत'' असे ग. रा. हवालदारकृत मंडलीकचरित्रात नमूद केले आहे. लोकांच्या मनात छापील पुस्तकांविषयी असल्या चमत्कारिक कल्पना व ग्रह असल्यामुळे शालेय पुस्तकांसंबंधी पुष्कळ चर्चा व पत्रव्यवहार झाला. व नंतर पुस्तकांचे मुद्रण झाले. *लिपीधारा*, *अंकलिपी*, *बोधवचन*, *पंचोपाख्यान* व *विदुरनीति* अशी पाच पुस्तके १३ सप्टेंबर १८२३ पर्यंत छापून तयार झाली. ही शालेय पुस्तके गोष्टीची व नीतिसंबद्ध अशी होती. *पंचोपाख्यान* हे संस्कृत पंचतंत्राचे भाषांतर ''सर्वजनास व्यवहारनीतीचे ज्ञान व्हावे आणि भाषणरीतीही कळावी म्हणून हा कथारूप ग्रंथ'' इ. स. १८२२ मध्ये सिद्ध झाला. त्यानंतर *विदुरनीती* (महाभारतातील विदुराने धृतराष्ट्राला जी राजनीती सांगितली ती) हे पुस्तक तयार झाले. या पुस्तकांच्या पुष्कळ प्रती फुकट वाटण्यात आल्या. छापील पुस्तकाचा संबंध महाभारतासारख्या लोकप्रिय ग्रंथाशी जोडल्यामुळे लोकांना त्यांविषयी आत्मीयता तर वाटत होती शिवाय नीतिप्रधानता हे त्याचे प्रमुख वैशिष्ट्य होतेच. नीतिप्रधान पुस्तकांच्या प्रचारामागे तत्कालीन समाजात रूढ असणारे बालविवाह, बालहत्या, लग्नप्रसंगी केलेला प्रचंड खर्च, सतीची चाल, बळी देण्याची पद्धती या सर्व प्रथांचे दुष्परिणाम लोकांच्या मनावर ठसवावे व त्याचबरोबर पश्चिमेकडील विज्ञानविषयक ज्ञानाचा परिचय करून द्यावा असे दोन प्रमुख हेतू होते. ज्ञानप्रसार व नैतिक उन्नती ही दोन ध्येये साध्य होतील याकडे पुस्तके तयार करताना लक्ष दिले पाहिजे असे लोकशिक्षणप्रसाराचा विचार करणाऱ्या एका खास समितीची शिफारस होती. समितीच्या या शिफारशींमागे

‘कलकत्ता स्कूलबुक सोसायटी’ चा आदर्श असावा. या सोसायटीने गणित, लिपीधारा, बंगाली भाषेतील प्राथमिक धडे, गोल्डस्मिथकृत इंग्लंडच्या इतिहासाचे बंगाली भाषांतर, फर्गसनच्या ज्योतिषविषयक पुस्तकाचे भाषांतर, हितोपदेश, गोलाध्याय इत्यादी पुस्तके निर्माण केली असे आढळते. (कुळकर्णी, कृ. भि., तत्रैव, पृ. ३४) मेजर कँडी शाळा तपासनीस असताना शालेय पुस्तकांची कमतरता पाहून त्यांनी बंगाली भाषेतील पुस्तकांची मदत घेऊन मराठीत शालेय पुस्तके तयार करावीत असे सुचविले होते.

मनोरंजन व नीत्युपदेश यांच्याबरोबरीने शिक्षणप्रसार व ज्ञानदान यांकडेही एल्फिन्स्टनचे लक्ष असल्यामुळे पाश्चात्त्य शास्त्रीय ज्ञानाचा लोकांच्या देशभाषांतून परिचय करून देणे हेही उद्दिष्ट सफल करण्याच्या दृष्टीने त्याचे प्रयत्न चालू होते. इ. स. १८२३ मध्ये कॅप्टन जॉर्ज जर्विस याच्या मार्गदर्शनानुसार ‘ए सेमिनरी फॉर द इन्स्ट्रक्शन ऑफ नेटिव्ह्ज इन इंजिनिअरिंग’ या नावाची जी संस्था स्थापन झाली तिच्यामुळे गणित विषयावरील पुस्तकांची निर्मिती झाली. जॉर्ज जर्विसने काही गणितग्रंथ व कोष्टके मातृभाषेत तयार केली. *‘पूर्णांकं’* व *‘अपूर्णांकं’* अशी दोन लहान पुस्तके १८२५–२६ मध्ये तयार झाली. *‘कर्तव्यभूमिती’*, *‘लॉगॅरिथमची कोष्टके’*, *‘आदिकर्ण भूमिती’*, *‘बीजगणित’*, *‘त्रिकोणमिती’*, *‘क्षेत्रफळ घनफळ’* ही गणित विषयावरील सर्व शालेय पुस्तके १८२७–२८ मध्ये तयार झाली. गणिताची ही पुस्तके ‘शिक्षामाला’ या नावाने १८२८ मध्ये प्रसिद्ध झाली. जर्विसच्या या प्रयत्नामुळे गणितविषयक इंग्रजी शब्दांना मराठी पारिभाषिक शब्द तयार होऊ लागले. जरी ती जर्विस याच्या नावाशी जोडली गेली असली तरी ती तयार करण्यात जगन्नाथ शास्त्री क्रमवंत, रामचंद्र भट अधलेकर यांसारख्या शास्त्रीमंडळींचा हात होता. ‘शिल्पशाळे’मुळे जशी गणिताची पुस्तके तयार झाली तशी १८२६ मध्ये मुंबईला सुरू झालेल्या वैद्य शाळेमुळे वैद्यक विषयावरील पुस्तके रचली गेली. जॉन मॅकलेनन या ॲसिस्टंट सर्जनने ‘मेडिकल स्कूल फॉर द इन्स्ट्रक्शन ऑफ द नेटिव्ह प्रॅक्टिशनर्स’ या संस्थेतील विद्यार्थ्यांसाठी *औषधकल्पनाविधी* (१८२८) हा वैद्यक ग्रंथ लिहिला. याचप्रमाणे *निदान* (१८२८) व *शारीर* (१८५२) याही ग्रंथांची त्याने निर्मिती केली. या शास्त्रीय ग्रंथांप्रमाणेच पदार्थविज्ञान व रसायनशास्त्र या विषयांवरही मराठीमध्ये ग्रंथ निर्माण झाले. विल्यम हेन्री बेल याने नारायणशास्त्री जोशी चौलकर यांच्या मदतीने *शिल्पविद्या या विषयाचे निबंध* हा इ. स. १८३५ मध्ये छापलेला ग्रंथ महत्त्वाचा होता. हरि केशवजी पाठारे यांनी *पदार्थविज्ञानशास्त्र विषयक संवाद* (१८३३), *रसायनशास्त्र विषयक संवाद* (१८३७) या दोन ग्रंथांची निर्मिती करून पाश्चात्त्य वैज्ञानिक ग्रंथांत मोलाची भर घातली.

शास्त्रीय ज्ञानप्रसाराबरोबर ज्या देशभाषांतून ज्ञान द्यावयाचे त्या भाषांचा व्याकरणशुद्ध अभ्यास व्हावा या कल्पनेने शाळापुस्तक मंडळीनी काही प्रयत्न केलेले दिसतात. फादर स्टीफन्स व डॉक्टर कॅरे यांच्या व्याकरणांचा उल्लेख येऊन गेला आहे. जगन्नाथशास्त्री क्रमवंत, गंगाधरशास्त्री फडके, बाळशास्त्री घगवे व रामचंद्रशास्त्री जन्हवेकर या चार शास्त्र्यांपैकी तिघांनी मिळून तयार केलेल्या व्याकरणाच्या हस्तलिखित प्रतींवरून १८३६ पर्यंत शालेय विद्यार्थी मराठी भाषेच्या व्याकरणाचा अभ्यास करीत. हे ‘महाराष्ट्र भाषेचे व्याकरण’ पहिले असावे आणि रामचंद्रशास्त्री जन्हवेकर यांनी तयार केलेले संवादात्मक व्याकरण दुसरे असावे. तिघांनी मिळून रचलेल्या व्याकरणाच्या पुस्तकात थोडाफार बदल करून गंगाधर शास्त्री फडके यांचे ‘महाराष्ट्र भाषेचे व्याकरण’ १८३६ मध्ये प्रसिद्ध झाले. याचवर्षी बाळशास्त्री जांभेकर यांचे *बालव्याकरण* व दादोबा पांडुरंग तर्खडकर यांचे *मराठी भाषेचे व्याकरण* ही दोन पुस्तके प्रसिद्ध झाली. व्याकरणाप्रमाणेच या काळात कोशरचनाही झाली. इ. स. १८२९ मध्ये पंडित मंडळाने रचलेला *महाराष्ट्र भाषेचा कोश*, त्याची इ. स. १८३१ मध्ये निघालेली पुरवणी आणि त्याच वर्षी मोल्सवर्थचा *मराठी–इंग्रजी कोश* असे कोश सिद्ध झाले. इतिहासविषयक ग्रंथात ग्रँट डफ याच्या इंग्रजी ग्रंथावरून डेविड केपन यांनी भाषांतरित केलेली *मराठ्यांची बखर* (१८३०) हरि केशवजी यांचा *इंग्लंडचा वृत्तांत* (१८३८) व *इंग्लंड देशाची बखर* (१८३२) ही उल्लेखनीय निर्मिती होय. भूगोलखगोल शास्त्राविषयी १८३२ साली मेनवेअरिंग व रामचंद्र शास्त्री जनव्हेकर यांचे *भूगोल आणि खगोल इत्यादीविषयक संवाद* (१८३२), नाना नारायण यांचे *इंग्लंड देशाचे वर्णन* (१८३५) व बाळशास्त्री जांभेकर यांची *भूगोलविद्या* (१८३६) ही पुस्तके अतिशय उपयुक्त ठरली. जगाची माहिती व्हावी यासाठी प्रसिद्ध देशांचे नकाशे

मुलांसमोर ठेवण्यासाठी दादोबा पांडुरंग व नाना नारायण यांनी १८३६ साली 'नकाशाचे पुस्तक' तयार केले.

मराठीत झालेली पाठ्यपुस्तकांची भाषांतरे ही इंग्रजांच्या शिक्षणविषयक धोरणाची निष्पत्ती होती. १८४७ साली जगन्नाथ शंकरशेठांनी जे इतिवृत्त तयार केले होते (नुरुला-नाईक, पूर्वोक्त, पृ. १४०-१४१) ते वाचताना ध्यानात येते की, त्या काळात त्यांनी प्रादेशिक भाषांचा आग्रही पुरस्कार केला होता. याउलट आज प्रादेशिक भाषांची क्षमता नाही म्हणून इंग्लिश भाषेचा आश्रय केला जात आहे. शिक्षणाचे माध्यम इंग्लिश असावे की मातृभाषा असावे ह्याबद्दलचा वाद तेव्हा चालला होता, आजही तो चाललाच आहे. त्या वेळची परिस्थिती आणि आजची परिस्थिती यांत महदंतर आहे. शिक्षण मातृभाषेतून द्यायचे तर त्यासाठी पुस्तके हवीत. त्यासाठी त्या काळी पुस्तके तयार करण्यासाठी उत्तेजन देण्यात आले. आज दोनशे वर्षे उलटून गेल्यावर पुन्हा चक्र फिरले आहे. जागतिकीकरणाचा फेरा आला आहे आणि इंग्लिश भाषेचे ग्रह उच्चीचे आहत. खेड्यापाड्यांतील विद्यार्थ्यांनाही इंग्लिशचे शिक्षण हवे आहे, ती जागतिक व्यवहाराची भाषा आहे असा युक्तिवाद केला जात आहे. म्हणजे जेव्हा इंग्रजी राज्य येथे आले होते तेव्हा मातृभाषेच्या माध्यमासाठी आग्रह धरला जात होता आणि आता आपले राज्य येऊन साठ वर्षे उलटल्यावर सगळेजण इंग्लिशचा आग्रह धरताहेत. हा विरोध गमतीदार मानायचा की गंभीर?

सदाशिव काशिनाथ छत्रे (१७७८-१८३०) यांनी *सिंहासनबत्तीशी* (१८२४) *इसापनीती कथा* (१८२८), *बाळमित्र* भाग १ (१८२८), *बोधवचने*, *बोधकथा* (१८३०) ही शालोपयोगी पुस्तके तयार केली. यांपैकी *बाळमित्र* हे पुस्तक *बर्क्वीन्स चिल्ड्रन्स फ्रेंड* या फ्रेंच पुस्तकाच्या इंग्रजी भाषांतरावरून मराठीत आणले आहे. या पुस्तकामुळे स. का. ऊर्फ बापू छत्रे यांचे नाव मराठी वाङ्मयाच्या इतिहासात अजरामर झाले. गेस्फोर्ड नावाच्या व्यक्तीने इंग्रजीवरून *बाळमित्र* भाग २ मराठीत आणला. तोही पहिल्या भागाप्रमाणेच सरस आहे. बाळशास्त्री जांभेकरांनी बंगालीवरून मराठीत आणलेल्या *नीतिकथा* (१८३१), 'बोधकथा' व दोन्ही एकत्र करून *नीतिबोधकथा* प्रसिद्ध केल्या.*

या सर्व ग्रंथांच्या निर्मितीस एल्फिन्स्टनचे शैक्षणिक धोरण कारणीभूत ठरले. १८२३ साली एल्फिन्स्टनने इंग्रज सरकारला ज्या सूचना केल्या त्या प्रसिद्ध आहेत. त्यामध्ये शाळांची संख्या वाढावी, नेटिव शाळांतील शिक्षणपद्धतीत सुधारणा करावी, त्यांना शालेय पुस्तके पुरवावीत, युरोपीय विज्ञाने शिकविण्याची सोय असणाऱ्या शाळा स्थापन कराव्यात व उच्च शिक्षणात सुधारणा घडवून आणाव्यात, नीतिशास्त्रे व वैज्ञानिक शास्त्रे यांची देशीभाषांतून पुस्तके तयार करून प्रकाशित करावीत इत्यादी सूचना होत्या. त्याने शिक्षणाचे एकमेव माध्यम म्हणून इंग्लिश भाषेचा आग्रह धरला नाही. इंग्लिश भाषेत शिक्षण घेतलेल्या लोकांनी आपल्या भाषेत जर देशवासियांना शास्त्रज्ञान द्यावयाचे ठरवले तर शास्त्रांचा प्रसार अधिक होईल असा त्याचा अभिप्राय होता. या त्याच्या सूचनेला वॉर्डन या गव्हर्नर कौन्सिलच्या

---

* यांखेरीज 'नीतिदर्पण' (१८३७), 'लघुहितोपदेश' (आवृत्ती २, १८३८), 'बालोपदेश-कथा' (१८३८) ही पुस्तके लिहिली. राघो नारायण देवळे यांचे 'वाटसराची गोष्ट' (१८३८) व रामचंद्र अमृत दुगल यांचे 'जागती जोत' (१८३८) ही पुस्तके ख्रिस्ती धर्मोपदेशक रे. फरार यांच्या मार्गदर्शनानुसार तयार झाली. 'चेंबर्स मॉरल क्लासबुक' चे हरी केशवजी पाठारे (१८०४-१८५८) यांनी केलेले 'शालोपयोगी नीतिग्रंथ' (१८४६) हे भाषांतररूप पुस्तक नमुनेदार होते. कॅप्टन जॉर्ज जर्विस (१७९४-१८५१) यांनी जगन्नाथ शास्त्री यांच्या मदतीने भाषांतरित केलेले 'विद्येचे उद्देश, लाभ आणि संतोष या विषयांचे संवाद' (१८२९) हे भाषांतरविद्याविषयक चर्चा करणारे आहे. शास्त्रीय पुस्तकांत केरो लक्ष्मण छत्रे (१८२४-१८८४) यांची 'पदार्थविज्ञानशास्त्र' (१८५२), 'अंकगणित' (१८६०), 'भूमापन' (१८६३), 'ग्रहसाधनाची कोष्टके' (१९६९), 'पंचांगसाधन कोष्टके' (१८६१) ही पुस्तके उपयुक्त ठरली. विल्यम हेन्री बेल याने नारायणशास्त्री जोशी-चौलकर यांच्या मदतीने तयार केलेले शिल्पविद्या या विषयाचे निबंध (१८५६); गोविंद गंगाधर फडके यांचे 'यंत्रशास्त्राची मूळे' (१८५३), सखाराम रामचंद्र दीक्षित यांनी विष्णू अमृतराव यांच्या मदतीने लिहिलेला 'शास्त्रीय ज्ञानदर्शन' (१८५६); कृष्णशास्त्री भाटवडेकर यांचे 'वर्तमानवाहक विद्युद्यंत्र' (१८५९); गोविंद नारायण माडगावकरकृत 'उद्भिज्जजन्य पदार्थ' (१८५६) इत्यादी ग्रंथ प्रसिद्ध झाले. कृष्णशास्त्री चिपळूणकरांचा 'अनेकविद्यामूलतत्त्वसंग्रह' (१८६१) हा ग्रंथ 'कितीएक इंग्लिश ग्रंथांच्या आधारे' तयार केला गेला. तो यंत्रशास्त्र, रसायनशास्त्र, दर्शनानुशासन, ज्योतिष, प्राणिधर्मविषयक शास्त्र इत्यादी वेगवेगळ्या विषयांची थोडीथोडी माहिती करून देणारा आहे.

सदस्याचा विरोध होता. बंगालमध्ये असणारी भाषिक समस्या वेगळी होती. तिथला संघर्ष अभिजात भारतीय भाषा आणि इंग्रजी असा होता. तर मुंबई इलाख्यात अभिजात भारतीय भाषा आणि आधुनिक भारतीय भाषा या संघर्षाला वावच नव्हता. कारण हा संघर्ष कैक वर्षे आधीच मध्ययुगीन संतांनी सोडवून टाकला होता. सर्वसाधारण समाजाला समजेल अशा देशी भाषेत ग्रंथरचना करण्याचे संतांचे धोरण सर्वश्रुत होते. एल्फिन्स्टनच्या मार्गदर्शनाप्रमाणे इंग्लिश भाषेतील पुस्तकांची मराठीत भाषांतरे होऊ लागल्यामुळेच वर नोंदविलेल्या ग्रंथांचा लाभ मराठी भाषक वाचकांना घेता आला.

भारताच्या या भागात बोलल्या जाणाऱ्या भाषा या बोलीभाषांइतपतच योग्यतेच्या आहेत, त्या ज्ञानभाषा होऊ शकणार नाहीत कारण शास्त्रीय संकल्पना व्यक्त होऊ शकतील अशा प्रकारची क्षमता त्यांच्या ठिकाणी नाही असे जे मत मेकॉलेने व्यक्त केले होते ते वरील पाठ्यपुस्तकांच्या स्वरूपामुळे खोटे ठरले.*

**वृत्तपत्रे**

पाश्चात्त्य ज्ञानाचा प्रसार करावा आणि समाजसुधारणा घडवून आणाव्यात या दृष्टीने मराठीत वर्तमानपत्रांची सुरुवात झाली. वर्तमानपत्रांनी इतकी चांगली कामे केली की १९०२ पर्यंत महत्त्वाच्या सर्व भारतीय भाषांत चांगले नवे साहित्य निर्माण झाले आणि भारतीय वर्तमानपत्रे खूप कार्यक्षमतेने विकसित झाली. वर्तमानपत्रे हा शब्दप्रयोग आज ज्या अर्थाने आपण वापरतो त्या अर्थाने आरंभकालीन नियतकालिके ही वर्तमानपत्रे नव्हती. त्यांत क्वचित आणि कोठेतरी ‘वर्तमान’ असे वा त्याचे ‘सार’ देण्यात येई. उर्वरित भाग मुख्यत्वे ज्ञानसंग्रहाचा वा ज्ञानवितरणाचा असे. या कार्यासाठी लागणारी भाषा विषयाप्रमाणेच प्रौढ व गंभीर असे, बोलीभाषेच्या स्वरूपाची नसे. यामुळे मराठी भाषेच्या विकासाला आपोआपच हातभार लागला. इतकेच नव्हे तर, गंभीर स्वरूपाच्या वृत्तपत्रीय लेखनातून वैचारिक स्वरूपाचा निबंध हळूहळू आकाराला येत गेला. नियतकालिकांचे अग्रलेख, त्यांतील स्फुट लेख, हप्त्याहप्त्याने आलेले विस्तृत लेख व काही वेळा पत्ररूपाने आलेले लेख ही वैचारिक निबंधाचीच भिन्नभिन्न रूपे होती. इंग्रजांच्या आगमनानंतर व मुद्रणाच्या सोयीनंतर मराठीत नियतकालिके सुरू झाली.

*ज्ञानप्रकाश, ज्ञानोदय, ज्ञानप्रसारक, ज्ञानदर्शन, ज्ञानसंग्रह, विविधज्ञानविस्तार* इत्यादी नियतकालिकांच्या नावांवरूनही *ज्ञानार्जन* व *ज्ञानप्रसार* हा या नियतकालिकांच्या निर्मितीमागील प्रमुख हेतू होता हे स्पष्ट होते. *ज्ञानोदय* व *सद्धर्मदीपिका* ही नियतकालिके धर्मप्रसार व धर्मसंरक्षण या हेतूने निघालेली दिसतात. जुनी मराठी कविता छापून प्रसिद्ध करण्याच्या उद्देशाने निघालेले *सर्वसंग्रह* मासिक *कृष्णलीलामृत* यासारखी काव्यप्रकरणे छापणारे *ज्ञानचंद्रोदय*, कायदेविषयक माहिती देणारे *न्यायाश्रम*, स्त्रियांसाठी सुरू झालेली *सुमित्र* आणि *स्त्रीभूषण*, मुलांसाठी *आनंदलहरी* आणि व्यापारासाठी *चंद्रिका* अशी नियतकालिकेही निघत राहिली.

काही नियतकालिकांतून मराठीप्रमाणेच इंग्रजी मजकूरही प्रसिद्ध केला जाई. उदा. बाळशास्त्री जांभेकरांच्या *दर्पण* या पहिल्याच पत्रात आधी इंग्रजी व त्याला जोडून त्याचे मराठी भाषांतर अशी रचना होती. *ज्ञानप्रकाश* व *इंदुप्रकाश* याही पत्रांनी या प्रथेचा काही काळ स्वीकार केला होता. आपल्या लोकांचे मत इंग्रजांपर्यंत पोचविण्यासाठी *नेटिव्ह ओपीनियन* या नावाचे वृत्तपत्र रावसाहेब विश्वनाथ नारायण मंडलिक यांनी १८६४ मध्ये काढले. पहिली दोन वर्षे ते केवळ इंग्रजीत निघत असे परंतु दोन वर्षांनी केवळ मराठी जाणणाऱ्याकरता त्यात मराठी मजकूरही देण्यात येऊ

---

* मेकॉलेचे शब्द असे आहेत - ‘‘All parties seem to be agreed on one point, that the dialects commonly spoken among the natives of this part of India contain neither literary nor scientific information, and are moreover so poor and rude that, until they are enriched from some other quarter, it will not be easy to translate any valuable work into them. It seems to be admitted on all sides, that the intellectual improvement of those classes of the people who have the means of pursuing higher studies can at present be effected only by means of some language not vernacular amongst them.’’ (नुरुला-नाईक, पूर्वोक्त, पृ. १०४-१०५)

लागला. या पत्राची बरीचशी संपादकीय जबाबदारी नारायण महादेव ऊर्फ मामा परमानंद यांच्याकडे होती. हे पत्र १९०६ पर्यंत चालू होते. वृत्तपत्राची निर्मिती झाली होती. *दर्पण* मध्ये वेगवेगळ्या स्वरूपाच्या बातम्या व या देशातील आणि विलायतेतील वर्तमाने द्यावयाची असे ठरवले होते. साप्ताहिके आणि मासिके यांचा उद्देश तात्कालिक अथवा चिरकालिक महत्त्वाच्या विषयांबाबत वाचकांना शहाणे करून सोडावे असा होता. *ज्ञानसिंधू, मित्रोदय, ज्ञानप्रकाश, वर्तमानसंग्रह* यांसारखी नियतकालिके यथाकाल निघत राहिली.

प्रबोधनयुगात ज्या श्रेष्ठ व्यक्ती महाराष्ट्रात निर्माण झाल्या त्यांमध्ये सर्वात अग्रभागी असणारे बाळशास्त्री जांभेकर (१८१२-१८४६) हे मराठी वृत्तपत्रसृष्टीचे जनक होत. त्यांनी *द बॉम्बे दर्पण* हे इंग्रजी-मराठी वर्तमानपत्र ६ जानेवारी १८३२ रोजी सुरू केले. पहिले चार महिने ते पाक्षिक म्हणून प्रसिद्ध झाले आणि मे १८३२ पासून ते साप्ताहिक झाले. सुमारे आठ वर्षे चालल्यानंतर *दर्पण* बंद पडले. या देशाच्या भरभराटीशी संबंधित प्रश्नांवर व या देशातील नागरिकांच्या सुखाच्या प्रश्नांवर जाहीर चर्चा व्हावी म्हणून एक मुक्तक्षेत्र निर्माण करणे हे दर्पणचे मुख्य उद्दिष्ट होते असे दिसते.

अद्वितीय बुद्धिमत्तेचे दर्पणकार बाळशास्त्री जांभेकर यांचा जन्म कोकणातील पोंभुर्ले या गावचे. तेथून ते जन्मस्थानाहून मुंबईस आले. तेथे इंग्रजी शाळेत चार वर्षांत त्यांनी इंग्रजी भाषा आत्मसात केली व तिच्या आधारे शाळेत शिकविले जात नसलेले शास्त्रज्ञान त्यांनी मिळविले. वयाच्या सतराव्या वर्षी मराठी, संस्कृत, इंग्रजी, गुजराती, बंगाली व फारसी या भाषांत, तसेच अंकगणित, बीजगणित, भूमिती या विषयांत त्यांनी नैपुण्य मिळविले. डेप्युटी नेटिव्ह सेक्रेटरी, नेटिव्ह सेक्रेटरी, रॉयल एशिॲटिक सोसायटीच्या पौरस्त्य भाषांतर समितीचे नेटिव्ह सेक्रेटरी अशा पदांवर एकापाठोपाठ एक अशा त्यांच्या नियुक्त्या झाल्या. वयाच्या अवघ्या विसाव्या वर्षी त्यांनी *दर्पण* सुरू केले. शास्त्रज्ञान, भाषाज्ञान, लोकज्ञान असे त्रिविध ज्ञान मिळवून त्याचा उपयोग समाजाच्या सर्वांगीण प्रगतीसाठी करण्याची तीव्र लालसा त्यांच्या ठिकाणी होती. नोव्हेंबर १८३४ मध्ये ते एल्फिन्स्टन प्रोफेसरांचे असिस्टंट व १८४२ मध्ये प्रो. ऑर्लेबर यांच्या जागी ॲक्टिंग प्रोफेसर झाले आणि हिंदुस्थानातले पहिले एतद्देशीय प्रोफेसर होण्याचा सन्मान त्यांनी मिळवला. त्या काळात सरकारी पातळीवर अधिकाधिक जो गौरव होऊ शकत होता तो त्यांचा गौरव सरकारने जे. पी. हे पद देऊन केला. १७ मे १८४६ रोजी ते विषमज्वराने अकाली निधन पावले.

''स्वदेशीय लोकांमध्ये विलायतेतील विद्यांचा अभ्यास अधिक व्हावा, आणि या देशाची समृद्धी व एथील लोकांचे कल्याण यांविषयी स्वतंत्रतेने व उघड रीतीने विचार करायास स्थल व्हावे, या इच्छेने कित्येक मुंबईत राहाणारे लोकांचे मनात आहे की दर्पण या नावाचे एक न्यूसपेपर ह्मणजे वर्तमान पत्र छापून प्रसिद्ध करावे. त्याचा पहिला नंबर तारीख ६ शुक्रवार माहे जायुआरी सन १८३२ ते दिवशी छापला जाईल. या देशचे लोकांत विलायती विद्यांचा अभ्यास वाढावा आणि तेथील ज्ञान प्रसिद्ध व्हावे अशे नात्याने या वर्तमान पत्राचा उद्योग मुख्यत्वे आरंभिला आहे खरा; परंतु जांस इंग्रजी भाषा येत्ये त्यांसमात्र याचा उपयोग असे न व्हावे म्हणोन योजिले आहे की, एकबाजूस इंग्रेजी भाषा येत्ये त्यांसमात्र याचा उपयोग असे न व्हावे म्हणोन योजिले आहे की, एकबाजूस इंग्रेजी व एकबाजूस मराठी असावे; ह्मणजे जे मराठी मात्र जाणतात त्यांसर्वांस ही याचा उपयोग होईल. इंग्रेजीत कोणी काही विषय लिहून पाठविला तर त्याचे मराठीत भाषांतर केले जाईल, आणि मराठी भाषेत पाठविलेले विषयांचे इंग्रेजी केले जाईल, व मूळ विषय आणि भाषांतर ही समोरा समोर छापली जातील. दर्पणांत जाहीर खबरा आणि विलायतचे व बंगालचे पत्रांचे काही काही अंश लिहिले जातील. ...मनोरंजन करणे, चालते काळची वर्तमाने कळवणे, आणि योग्यतेस येण्याचे मार्ग दाखविणे, या गोष्टींची दर्पण छापणारांस मोठी उत्कंठा आहे; ह्मणोन या गोष्टी साध्य होण्याविषयी जितका प्रयत्न करवेल तितका ते करितील. कोणा एकाचा पक्षपात किंवा नीचपणा या दोषांचा मळ दर्पणास लागणार नाही; कारण की दर्पण छापणारांचे लक्ष्य निष्कृत्रिम आहे; ह्मणोन हे वर्तमानपत्र जा रीतीने भले आणि गुणी पुरुषांस मान्य होईल, त्या रीतीने करण्यास ते दृढ निश्चयाने उद्योग करितील.'' (जांभेकर, ग. गं., १९५० , पृ. ३ व ५)

बाळशास्त्री जांभेकर हे पश्चिम भारतातील प्रबोधनाचा पाया घालणारे विचारवंत ठरले. त्यांनी महाराष्ट्रात पत्रकारिता सुरू केली आणि विकासाचा मार्ग म्हणून शिक्षणाकडे पाहावयास सुरुवात केली. लोकांनी नव्या कल्पनांचा स्वीकार

करावा आणि राज्यकर्त्यांच्या विश्वासास पात्र व्हावे अशी कळकळीची विनंती त्यांनी केली.* मराठीमधील या पहिल्या वृत्तपत्राने वृत्तपत्रसंपादनाचा जो आदर्श घालून दिला होता त्यानुसार पुढील वृत्तपत्रे निघावीत अशी अपेक्षा मात्र प्रत्यक्षात फलद्रुप झाली नाही. हे पत्र आठ वर्षांहून अधिककाळ चालून जून १८४० च्या अखेरीस बंद पडले.

त्यानंतर *मुंबई अखबार* (४ जुलै १८४०), *प्रभाकर* (२४ ऑक्टोबर १८४१), *धुमकेतू* (१८५३) अशी नियतकालिके निघत राहिली. गोविंद विठ्ठल कुंटे ऊर्फ भाऊ महाजन हे *प्रभाकर* चे संपादक होते. त्या काळात इंग्लिश शिकलेले विद्वान मुख्यत्वे *प्रभाकर*मधून लिहीत. लोकहितवादींची 'शतपत्रे' *प्रभाकर*मधूनच प्रथम प्रसिद्ध झाली. इंग्लिश राज्यपद्धतीवरील टीकेलाही प्रथम 'प्रभाकर'मध्येच सुरुवात झाली. तत्कालीन पुरोगामी महाराष्ट्रीयांचे ते मुखपत्र होते.

मराठीतील पहिले मासिक *दिग्दर्शन*. या मसिकाचे संपादक रा. ब. राघोबा जनार्दन हे होते.** त्यांनी *दिग्दर्शन*चा पहिला अंक १८४० च्या मे महिन्यात प्रसिद्ध केला. या मासिकासाठी बाळशास्त्री जांभेकर, भाऊ महाजन , हरी केशवजी, प्रो. ओर्लेबार इत्यादी लेखक लेख लिहीत. या लेखांखाली त्यांची नावे नसत. तशी नावे देण्याची त्या वेळची पद्धत नव्हती. मराठीतील दुसरे मासिक *ज्ञानचंद्रोदय* (संपा. पांडुरंग बापू जोशी पावसकर) १८४० च्या डिसेंबरमध्ये निघाले. १८४४ मध्ये मोरभट्ट दांडेकरांच्या संपादकत्वाखाली *उपदेशचंद्रिका* हे तिसरे मासिक निघाले. पुढे *मराठी ज्ञानप्रसारक* (१८५०), *त्रैमासिक ज्ञानदर्शन* (१८५४), *पुणे-पाठशाळापत्रक* (१८६१), *विविधज्ञानविस्तार* (१८६७), *दंभहारक* (१८७१) अशी मासिके निघत राहिली. ज्ञानाचा प्रसार व वितरण करत असतानाच ही वृत्तपत्रे व मासिके तत्कालीन समाजाचे दर्शनही घडवीत होती आणि या माध्यमातून सामाजिक सुधारणेचे कार्यही पार पडले जात होते. इंग्रजी राजवटीवर टीका करणारा व इंग्रजांच्या इंग्लंडातील राज्यपद्धतीनुसार येथेही पार्लमेंटची मागणी करणारा मजकूर नियतकालिकांमुळेच मराठीत अवतरू शकला. नियतकालिके सुरू करणारे व सांभाळणारे संपादक इंग्रजी विद्या आत्मसात केलेले आणि आपल्या बुद्धिमत्तेच्या जोरावर ज्ञानाची नवनवी क्षितिजे पादाक्रांत करणारे विद्वान होते. जे संपादकांविषयी तेच नियतकालिकांत लेखन करणाऱ्या लेखकांविषयी. गोपाळ हरी देशमुख ऊर्फ लोकहितवादी यांनी शतपत्रांसारखे लेखन करावे आणि निद्रिस्त समाजाला टोचून डिवचून जागे करावे हे *दिग्दर्शन* सारख्या मासिकाने साधले. ज्ञानार्जन व ज्ञानप्रसार या प्रेरणांतून मराठीतील आरंभकालीन नियतकालिकांची सुरुवात झाली असे जे म्हटले जाते त्यातले ज्ञान हे आज प्राथमिक स्वरूपाचे वाटू शकेल. पण ते ज्या काळात दिले गेले त्या काळात ते अज्ञानांधकार दूर सारून प्रकाशाने मार्ग उजळून टाकणारे होते यात शंकाच नाही. नियतकालिकांची निर्मिती व प्रसार आणि त्यांची लोकप्रियता व उपयुक्तता ही विशेषेकरून पाश्चिमात्य संस्कृतीचे मराठी सांस्कृतिक विश्वावर उमटलेले संस्कार आहेत. ज्ञानप्रसार आणि वैचारिक प्रबोधन ही कार्ये नियतकालिकांनी अत्यंत जबाबदारीने व परिणामकारकपणे पार पाडली.

दीडशे वर्षांच्या इंग्रजी राजवटीच्या काळात इ. स. १८३५ ते १८५७ या कालखंडात सर चार्ल्स मेटकाफ या तत्कालीन प्रभारी गव्हर्नर जनरलने वृत्तपत्रांना पूर्ण स्वातंत्र्य दिले होते. १८५७ पासून १९४७ पर्यंत पुन्हा वृत्तपत्रांवर वेगवेगळ्या प्रकारची कमीअधिक प्रमाणात नियंत्रणे लादली गेली. बावीस वर्षांच्या या अनपेक्षित वृत्तपत्रस्वातंत्र्याचा

---

* सौम्य प्रकृतीच्या व समतोल विचारसरणीच्या बाळशास्त्रींनी इंग्रज सरकारने मोठ्या सरकारी जागांवर एतद्देशीयांचे गुण लक्षात घेऊन त्यांच्या नेमणूका कराव्यात असेही स्पष्टपणे सुचविले आहे. ते लिहितात -''राज्य कारभारांतील कित्येक खात्यांत, विश्वासाचे, अबरूचे, आणि जोखिमाचे जागांवर या देशचे लोकांस नेमले असतां चांगले राजनीतीस योग्य आहे किंवा नाही, या गोष्टीचा विचार एथील सरकार आणि कोर्ट आफ डरेक्टर याणीं बहुत वेळ केला आहे. ...तथापि आजून या देशांतील लोकांतून कोणाची नेमणूक मोठ्या जागेवर झाली नाही. ...या देशचे सर्व लोकांत बुद्धी, प्रामाणिकपणा, आणि मोठमोठे जोखिमाचे व आबरूचे जागांवर जे गुण पाहिजेत ते नाहीत असे जे कित्येक ह्मणतात, ते अज्ञानपणा मुळे, हलकेपणा मुळे, आणि द्वेषामुळे. ...या देशचे लोकांत बुद्धी, आणि नीति यांचे दाखले बहुत आढळतात.'' (जांभेकर, ग. गं., १९५०, पृ. ३१-३३)

** 'दिग्दर्शन' मासिकाच्या संपादकासंबंधीचा वाद व त्याचा परामर्श गं. दे. खानोलकर यांच्या 'अर्वाचीन मराठी वाङ्मय सेवक' खंड ५, पृ. २४-२५-२६ आणि खंड ६, पृ. ७४-७५-७६ या ठिकाणी आला आहे. तो पाहिल्यावर 'दिग्दर्शन'मासिकाचे श्रेय बाळशास्त्री जांभेकर यांच्याकडे देण्यातील घोटाळा सहज ध्यानात येतो.

मराठी वृत्तपत्रसृष्टीने जेवढा लाभ उठवला तेवढा कदाचित भारतातील अन्य कुठल्याच प्रादेशिक भाषांतील वृत्तपत्रांनी घेतला नसेल. जनतेची सामाजिक आर्थिक राजकीय गाऱ्हाणी सरकार दरबारी पोचवणे आणि निर्भयपणे इंग्रजांच्या वासाहतिक राजवटीची काळी बाजू उजेडात आणणे ही कामे या काळात घडली. ऐतिहासिकदृष्ट्या पाहिले तर या काळात महाराष्ट्र भांबावलेल्या मन:स्थितीत व स्थित्यंतराच्या अवस्थेत होता. पेशव्यांकडून सत्ताग्रहण करण्याची प्रक्रिया तुलनेने सहजपणे पार पडली असली तरी वासाहतिक राजवटीने अटळपणे काही नव्याच शक्ती काळाच्या पडद्यावर आणलेल्या होत्या. एक सर्वसामान्य उदासीनता, आर्थिक दुरवस्थेतून उद्‌भवलेले असमाधान, ख्रिस्ती धर्मगुरूंच्या विविध उलाढाली, इंग्लिश कायदा व प्रशासन आणि नव्या शिक्षणातून येऊ घातलेला बुद्धिवाद आणि मानवतावाद या सगळ्यामुळे एक नवेच सामाजिक व राजकीय भानदेखील अल्पसंख्य नवशिक्षितांमध्ये उत्पन्न होऊ लागले होते. या सगळ्यातूनच प्रबोधनयुगाची सुरुवात झाली व नंतर त्याचा आविष्कार तत्कालीन वृत्तपत्रांतून होऊ लागला.

जांभेकरांचे दर्पण काय किंवा नंतरची अन्य वृत्तपत्रे काय ती वृत्त-पत्रे असण्याऐवजी मत-पत्रे होती. सर्वांच्या हिताच्या दृष्टीने महत्त्वाच्या असणाऱ्या प्रश्नांची चर्चा आणि सामाजिक, राजकीय मतमतांतरे तत्कालीन वृत्तपत्रसृष्टीतून वाचकांस वाचावयास मिळत. त्याने उत्पन्न झालेली पोकळी गोविंद विठ्ठल कुंटे (१८१५-१८९०) ऊर्फ भाऊ महाजन - एल्फिन्स्टन संस्थेतील जांभेकरांचे विद्यार्थी - यांनी आपल्या *प्रभाकर, धुमकेतू*, आणि *ज्ञानदर्शन* या नियतकालिकांनी भरून काढले. *प्रभाकर* हे वृत्तपत्र २४ ऑक्टोबर १८४१ साली सुरू झाले आणि त्याने आपला जनशिक्षणाचा कार्यक्रम प्रभावीपणे राबवला. अन्यायाविरुद्ध दाद मागणारे निर्भय भाऊ महाजन हे १८७४ नंतरच्या विष्णूशास्त्री चिपळूणकर, लोकमान्य टिळक व गोपाळ गणेश आगरकर यांचे खऱ्या अर्थाने पूर्वज होत. काही काळाने त्यांनी *धुमकेतू* (१८५३) हे साप्ताहिक आणि *ज्ञानदर्शन* हे शास्त्रीय विषयाला वाहिलेले त्रैमासिक सुरू केले. देशकल्याण हा भाऊ महाजनांच्या वृत्तपत्रीय जीवनाचा केंद्रबिंदू होता.

सामाजिक, आर्थिक, राजकीय स्वरूपाच्या अन्यायांना वाचा फोडण्याचे काम त्यांनी आपल्या आक्रमक लेखनाद्वारे तसेच इतरांचेही तत्सम लेखन प्रकाशित करून सुरू केले. 'इंग्रजी राज्य हे ईश्वरी वरदान' नाही ही बाब भाऊ महाजनांनी *प्रभाकर* च्या माध्यमातून अत्यंत सुस्पष्टपणे मांडली. भास्कर पांडुरंग तर्खडकर यांनी हिंदू या टोपणनावाने १८४१ मध्ये 'बॉम्बे गॅझेट'मधून ब्रिटिश सत्तेचे 'हिंदुस्थानला मिळालेला सर्वात कडवट शाप' या शब्दांत इंग्रजी राजवटीवर जो हल्ला चढविला होता त्याचा नुसता बचावच नाही तर त्याची पाठराखण भाऊ महाजन (१८१५-१८९०) यांनी केली. सातारच्या राजा प्रतापसिंगांना इंग्रजांकडून जी अन्याय्य अशी वागणूक मिळाली तिचा धिक्कार ''आग लागो तुमच्या इन्साफाला, अशा इन्साफापेक्षा बेइन्साफ परवडला'' अशा शब्दांत भाऊ महाजन यांनी केला आहे. इंग्रजांच्या वसाहतवादी धोरणांवर व कार्यपद्धतीवर त्यांनी टीकास्त्र सोडले. इंग्रजांप्रमाणेच स्वजनांच्या जातीय वर्तनावर व जातिभेद मानण्याच्या प्रवृत्तीवर त्यांनी आघात केले. १८४८ ते १८५० या काळात त्यांनी लोकहितवादींची शतपत्रे प्रसिद्ध केली.

त्यांचे *ज्ञानदर्शन* हे त्रैमासिक *दिग्दर्शन* मासिकाकडून स्फूर्ती घेऊन सुरू झाले. ते डेमी आकाराच्या शंभर पृष्ठांचे असे. विज्ञानविषयाला वाहिलेल्या या त्रैमासिकामधून सामाजिक व वैज्ञानिक क्षेत्रातील नवे शोध व नवनव्या कल्पना यांचा परिचय करून दिला जाई. न्याय, नीती, मानसशास्त्र, रसायनशास्त्र, भूगर्भशास्त्र, राजकीय अर्थशास्त्र, इतिहास व भूगोल या विषयांच्या अनुषंगाने त्यात लेखन प्रसिद्ध झाले. गंमतीची गोष्ट म्हणजे या त्रैमासिकातून महाजनांनी *परागंदा झालेल्या गृहस्थाची कन्या* नावाची एक कादंबरी ऑक्टोबर १८५४ ते एप्रिल १८५६ या कालावधीत क्रमश: प्रसिद्ध केली.*

---

* मराठी कादंबरीच्या इतिहासात *यमुनापर्यटन* (१८५७) ही पहिली सामाजिक कादंबरी मानली जाते. वस्तुत: पहिलेपणाचे श्रेय *परागंदा झालेल्या गृहस्थाची कन्या* या लेखनाकडे जाते असा नाईक यांचा अभिप्राय आहे. ही कादंबरी ज. वि. नाईक यांच्या प्रस्तावनेसह लोकसत्तेच्या २००० सालच्या दिवाळी अंकात संपादित स्वरूपात प्रसिद्ध झाली आहे.

**पालटलेले वातावरण**

नवे शिक्षण सुरू झाल्यानंतर हिंदुस्थानातील वातावरणात होऊ लागलेल्या बदलाचे मॅथ्यू लेदर्ले यांनी रेखाटलेले चित्र मनोज्ञ आहे. नव्या शिक्षणाने सामाजिक आणि धार्मिक बाबतींत मूल्यवान बदल घडविण्यास सुरुवात केली. पाश्चात्त्य ज्ञानाने शिक्षित होणारे भारतीय बहुसंख्येने ख्रिश्चन होतील अशी जी भीती काही हिंदू भारतीयांच्या मनाला सुरुवातीला घेरून राहिली होती ती चुकीची ठरली. हे विशेषत: हिंदू धर्माबाबत अधिक वाटत होते कारण हिंदू समाजास सुधारणांची अधिक आवश्यकता होती आणि हिंदू लोकच अधिक संख्येने नव्या शिक्षणाच्या प्रभावाखाली आले होते. त्यामुळेच हिंदू समाजात जातीसंस्थेचे निर्मूलन करावे, विधवापुनर्विवाह सुरू व्हावेत, उच्च जातींत घटस्फोट सुरू व्हावेत, मुलींच्या लग्नाचे वय वाढवावे, लग्नाला त्यांची संमती असावी, जातीवर अधिष्ठित असणारी खाण्यावरील नियंत्रणे उठवावीत, अस्पृश्यतेचे उच्चाटन करावे, त्यांची आर्थिक स्थिती सुधारावी हे विचार मूळ धरू लागले. शूद्र आणि स्त्रिया यांच्याभोवतीच सगळ्या समस्या व तत्कालीन समाजसुधारणेचे विचार केंद्रित झाले होते कारण स्त्रियांना व शूद्रांना कुठलेही अधिकार नव्हते. सेवा ही एकमेव अपेक्षा त्यांच्याकडून केली जात असे. समाजसुधारणेप्रमाणेच धर्मसुधारणेचेही प्रयत्न सुरू झाले. राजा राममोहन रॉय यांचा ब्राह्म समाज, दयांनद सरस्वतींची आर्यसमाजाची चळवळ आणि रामकृष्ण मिशनची स्थापना हे महत्त्वाचे प्रयत्न होते. सारांश, नव्या शिक्षणपद्धतीमुळे सामाजिक व धार्मिक सुधारणांच्या लाटा उसळू लागल्या.

नव्या शिक्षणपद्धतीचा फार मोठा परिणाम देशातील राजकीय जीवनावर झाला. नव्या शिक्षणपद्धतीच्या सुरुवातीच्या काळात शिक्षित व्यक्तींचे लक्ष समाजसुधारणांकडे चटकन वळले. याला कारण काही अंशी सुधारणा तातडीच्या होत्या हे जसे होते, तसेच ब्रिटिश सरकारचा याला विरोध नव्हता हेही होते. नव्याने शिक्षण घेतलेल्यांपैकी बरेच लोक सरकारी नोकर होते आणि त्यांना राजकीय चळवळींचे आयोजन करण्यापेक्षा समाजसुधारणेचे कार्यक्रम हाती घेणे अधिक सोयीचे होते. त्यामुळे शिकलेल्या बुद्धिवंतांनी राष्ट्रसेवेचा मार्ग सामाजिक व धार्मिक सुधारणांच्या माध्यमातून शोधला. परंतु लवकरच देशात तरुणांचा एक वर्ग असा उत्पन्न झाला, की ज्याला भारताचे पुनर्निमाण सरकारवर राजकीय नियंत्रण मिळविल्याने होईल असे वाटत राहिले. त्यांना अनेक सरकारी धोरणे मंजूर नव्हती आणि त्यांवर त्यांनी खुलेपणाने प्रखर टीका केली.

इंग्रजांच्या राज्यामुळे भारतात ज्या चांगल्या घटना घडल्या त्यांविषयी त्यांच्या मनात कुठलाही भ्रम नव्हता. परंतु अनेक चांगल्या गोष्टी इंग्रजांनी येथे आणल्या हे त्यांना मान्य असले तरी हिंदुस्थानातल्या वाढत्या विपन्नावस्थेकडे ते दुर्लक्ष करू शकत नव्हते. तसेच हिंदुस्थानचे जे आर्थिक शोषण चालले होते त्याकडे कानाडोळा करणेही शक्य नव्हते. इंग्रजांचा राज्यकारभार ज्या साम्राज्यवादी पद्धतीने चालला होता तो लक्षात घेता राजकीय असंतोष वाढणे क्रमप्राप्त होते. अर्थात नव्या शिक्षणामुळे हा विरोध विशेष प्रखर झाला हे सत्य डावलता येत नाही. नव्या शिक्षणपद्धतीमुळे भारतीयांना पाश्चात्त्य राजकीय जीवनातील अंतर्दृष्टी प्राप्त झाली. त्यांच्या ठिकाणी स्वातंत्र्याबद्दलचे प्रेम विशेषत्वाने वाढीला लागले. परकी सत्तेविरुद्ध कोणत्या मार्गाने संघर्ष करावा याचा मार्ग सापडला.

या काळाचा आणखी एक महत्त्वाचा विशेष म्हणजे पौर्वात्य धर्म, तत्त्वज्ञान आणि साहित्य यांच्याकडे पाहाण्याची पाश्चात्त्यांची दृष्टीही बदलली. १८१३ पूर्वी मिशनऱ्यांनी केलेल्या प्रचारावर विसंबून सर्वसामान्य इंग्लिश माणसाला असे वाटत असे की, पौर्वात्य धर्म हे खोटे आहेत आणि पौर्वात्य अभिजात भाषांतील सर्व साहित्य हे निरुपयोगी आहे. ही दृष्टी विशेषत: चार्ल्स ग्रॅण्ट याच्या विधानातून जाणवते. जवळपास हाच दृष्टिकोण १८५४ पर्यंत तसाच होता हे मेकॉलेच्या मिनिट्सवरून बेंटिंक व ऑकलंड यांच्या विचारांवरून दिसून येते. अर्थात वॉरन हेस्टिंग्ज, मिण्टो, विल्सन, प्रिन्सेप व अन्य प्राच्यविद्यांचे जाणकार असे मानत होते की, पौर्वात्य तत्त्वज्ञान, धर्म आणि साहित्य यांचा अधिक काळजीपूर्वक अभ्यास झाला पाहिजे. पण अशी माणसे अल्पसंख्य होती. १८५४ च्या खलित्याने असे मान्य केले की, पौर्वात्य अभिजात भाषांच्या अभ्यासाचे काही फायदे आहेत, या भाषांच्या अभ्यासाला इतिहासाच्या दृष्टीने,

कायद्याच्या दृष्टीने काही स्थान आहे, पण त्याच वेळी त्याने असाही विश्वास व्यक्त केला की, पौर्वात्य शास्त्र व तत्त्वज्ञान यांत गंभीर चुका आहेत. तथापि १८५४ नंतर  हा दृष्टिकोण हळूहळू पालटू लागला.

१८०१-१८०२ मध्ये प्रकाशनाच्या क्षेत्रात एक युगप्रवर्तक घटना घडली. उपनिषदांचे फ्रेंच भाषेतील भाषांतर प्रसिद्ध झाले. ए ड्युपेराँ या फ्रेंच विद्वानाने दाराशुको या औरंगजेबाच्या थोरल्या भावाने पर्शियन भाषेत केलेल्या भाषांतराच्या आधारे हे तयार केले. ते शॉपेनहॉरच्या हाती पडले आणि ते वाचून तो प्रभावित झाला आणि त्याच्यावर पौर्वात्य तत्त्वज्ञानाचा प्रभाव पडला व हळूहळू हा प्रभाव पश्चिमेत वाढू लागला. सर विल्यम जोन्स या संस्कृतच्या विद्वानाने कालिदासाच्या शाकुंतलाचे भाषांतर केले. त्याने तुलनात्मक भाषाशास्त्राचा पाया रचला. परंतु सर्वात मोठे काम एकोणिसाव्या शतकातील प्राच्यविद्या विशारद मॅक्समुल्लर यांचे आहे. वर उल्लेखिलेल्या यंत्रणांनी आधुनिक भारतीय भाषांकडे दुर्लक्ष केले असले तरी अभिजात भाषांना त्यांनी उत्तेजन दिले आणि त्यामुळे अभिजात भाषांचा समीक्षात्मक व शास्त्रीय अभ्यास हे व्हिक्टोरियन युगातील महाविद्यालयीन शिक्षणाचे एक वैशिष्ट्य बनले. रा. गो. भांडारकर, राजेंद्रलाल मित्र, के.टी. तेलंग आणि इतर अशा प्राच्यविद्याविशारदांचा एक गटच तयार झाला. या सर्वांनी केलेल्या कामामुळे हिंदुस्थानातील विद्यापीठांत पौर्वात्य व पाश्चात्त्य संस्कृतींचा संगम घडून आला. या सगळ्या प्रक्रियेतून भारताच्या राष्ट्रीय जीवनात नवे नेतृत्व उभे राहिले. त्यात पंडित ईश्वरचंद्र विद्यासागर, केशवचंद्र सेन, स्वामी विवेकानंद, महादेव गोविंद रानडे, पंडित मदनमोहन मालवीय, दादाभाई नौरोजी, सर सय्यद अहमद खान आणि इतरांचा समावेश होतो. या बदललेल्या वातावरणाचे रा. द. रानडे यांनी तारुण्यसुलभ उत्साहात जे स्वागत केले ते नवधैर्य व नवी प्रेरणा यांचे दर्शन घडविणारे होते. रानडे म्हणाले -

''If India must rise, she will rise in a most peculiar way, not hitherto known to all History. She will combine the virtues of the West and the East, and will rise superior to both. If the West and the East are to meet, they will meet in India, and not in Eurpoe. What a glorious prospect lies before India. I see India flinging away superstition, sloth and intelectual inertia. I see her taking up the scientific spirit, and the energy of  Europe. I see her assimilating the excellence of both the East and the West, and rising in the scale of modern nations, preserving all the while the integrity and the pristine purity of her spiritual self.... ''It is time,'' He continued, ''that India should cease to be polluted by nearly the worse element of western civilization'' India must rise she has a future a destiny!''

भारतीय समाजात जो बदल घडून आला त्या बदलाचे हे सुचिन्ह होते. (लेदर्ले, १९७८, पृ. ४१८)

या नवचैतन्याचा परिणाम साहित्याला फुटलेल्या नव्या शाखांच्या वाढीतून ध्यानात येतो. साहित्याच्या नव्या शाखांच्या वाढीस त्याच वेळी महाराष्ट्रातील मुद्रणकलेचा विकासही कारणीभूत ठरला हेही लक्षात घ्यावे लागते.

**लोकहितवादी**

देशात जसे उदार विचार येत राहिले तसे त्यांनी मानवी व्यक्तित्वाच्या मूल्यावरील विश्वास जागा केला. समाजात व्यक्तीच्या स्वतंत्र अस्तित्वाचा हक्क मुक्त आचरणासाठी, व्यक्तीच्या वेगवेगळ्या गुणांच्या विकासासाठी आणि सर्वांच्या स्वातंत्र्याच्या हक्कासाठी आवश्यक असल्याची भावनाजागृती त्यामुळे निर्माण झाली. भारतीय उदारमतवाद्यांनी राज्याकडे पाहाण्याचा सकारात्मक दृष्टिकोण स्वीकारल्यामुळे व्यक्तिस्वातंत्र्याच्या कल्पनेवर त्यांना भर देता आला. जॉन स्टुअर्ट मिल याचे *ऑन लिबर्टी* आणि *द सब्जेक्शन ऑफ विमेन* हे ग्रंथ बरेच वाचले गेले. या काळात तत्कालीन स्थितीचे रक्षण करू पाहाणाऱ्या प्रतिगामी प्रवाहाविरुद्ध असणारा प्रगतिकारक प्रवाह विकसित झाला. तो उदारमतवादी सुधारणेच्या विचारांनी भारावून गेलेला होता. या प्रगतिवादी विचारप्रवाहाची एक शाखा प्रार्थनासमाजाच्या चळवळीत व त्या वेळी नुकत्याच अस्तित्वात येऊ लागलेल्या सामाजिक स्वातंत्र्यवादाच्या विचारांत परिणत झाली.

गोपाळ हरी देशमुख ऊर्फ लोकहितवादी (१८२३-१८९२) यांनी एल्फिन्स्टन व बाळशास्त्री जांभेकर यांच्या पावलावर पाऊल टाकून उदार कल्पनांचा स्वीकार करून प्रातिनिधिक लोकशाहीवादी सरकारची आधारभूमी तयार केली. त्यांचे उदार राजकीय तत्त्वज्ञान जेरिमी बेन्थॅम व जॉन स्टुअर्ट मिल यांच्या विचारांतून घडले होते. इंग्लंड व हिंदुस्थान यांच्यातील समानत्वाचा दावा त्यांनी १८४८ मध्येच केला. त्यानंतर वर्षभराने त्यांनी स्वदेशी वस्तूंच्या उपयोगाचे महत्त्व सांगितले आणि देशभक्तीच्या भावनेतून हिंदुस्तानचा आपली माता असा निर्देश केला. हॉब्ज आणि मिल यांच्या विचारपरंपरेनुसार व्यक्तीच्या स्वाभाविक दुष्ट प्रवृत्तींकडे असणारा कल रोखण्याची जबाबदारी राज्याची आहे अशी भूमिका त्यांनी घेतली. कुठलीही सवलत न घेता लोकांनी बुद्धिवादी असावे व आधुनिक शिक्षणासाठी त्यांची मने मुक्त असावीत असा उपदेश त्यांनी केला, हा त्यांचा सर्वांत मोठा गुण होय. माणसाचा जन्मजात बुद्धिवाद आणि व्यक्ती म्हणून असणारे त्याचे हक्क यांच्या बाजूने लोकहितवादी सतत उभे राहिले. त्यांनी आपले सर्व लिखाण लोकशिक्षणाच्या उद्देशाने केले. आपल्या बांधवांनी आळस झटकून टाकावा, पुरातन चालीरीतींची आंधळी गुलामगिरी सोडून द्यावी, पाठांतरविद्येचा सोस सोडावा, इंग्लिश भाषेतील नवे ज्ञान संपादावे, समाजातील स्त्रियांची स्थिती सुधारावी यासाठी ते सतत प्रयत्न करत राहिले. ''मानवी आणि विवेकनिष्ठ समाज स्थापन करण्याचे ध्येय गाठण्यासाठी माणसांनी सतत प्रयत्नांची काष्ठा केली पाहिजे, आणि लोकांचे अज्ञान, त्यांचे पूर्वग्रह, त्यांचा निर्बुद्ध परंपरावाद हेच हे उद्दिष्ट गाठण्यातील मुख्य अडथळे आहेत असा मध्यवर्ती बोध त्यांचे लिखाण आणि जीवनकार्य यांतून काढता येतो.'' (रेगे, मे. पुं., २००२, पृ. १७) १८४८ ते १८६६ च्या दरम्यान लोकहितवादींचे विचार सर्व महाराष्ट्रास परिचित झाले. सर्व लोकांमध्ये उदार विचारांचा, कल्पनांचा प्रसार होण्याच्या आड जातीपातींची जोखडे येत होती. उदार विचारांची चळवळ शिक्षित ब्राह्मणवर्गात सुरू झाली. परंतु सुदैवाने जोतीराव गोविंदराव फुले यांनी ब्राह्मणेतरांतही धार्मिक व सामाजिक जागृती उत्पन्न करून त्यांना उदारमतवादी परंपरेत सामावून घेतले.

एकोणिसाव्या शतकाच्या पूर्वार्धात बंगालमध्ये झालेल्या सांस्कृतिक उत्क्रांतीने उरलेल्या हिंदुस्थानात एक पद्धती घालून दिली. भारतातील पहिला आधुनिक पुरुष राजा राममोहन रॉय यांनी ही पद्धती विकसित केली. धर्माची बुद्धिवादी व श्रद्धावादी समज असणाऱ्या या विचारातून सामाजिक व राजकीय सुधारणांचा पाया घातला. धर्म हा वैश्विक मानला गेला. सर्व माणसांचे विश्वबंधुत्व मानले गेले. मुसलमानी सूफीवाद आणि बुद्धिवाद यांनी प्रभावित झालेल्या राममोहन रॉय यांना धर्माचा बुद्धिवादी, एकेश्वरवादी ख्रिश्चन स्वरूपाचा अन्वयार्थ मान्य होता. त्यांनी वेदांचा अधिकार नाकारला नाही परंतु विवेक हा या अधिकाराहून उच्च पातळीवरील मानला आणि वेदांचा प्रतीकात्मक अन्वयार्थ लावण्याचा स्वत:चा हक्कही राखून ठेवला. राममोहन रॉय यांना शिक्षण, राजकारण, अर्थकारण, शेती, सामाजिक चालीरीती व धर्म या सर्व क्षेत्रांत रस होता. त्यांनी ब्राह्मसमाजाची स्थापना केली. हा ब्राह्मसमाज बंगालमधील सामाजिक, धार्मिक सुधारणांचा मीलनबिंदू ठरला. राममोहन रॉय यांच्यानंतर ब्राह्मसमाज ही एक चळवळ म्हणून विकास पावली. त्यावर वेगवेगळ्या गोष्टींचा प्रभाव पडला. समाजकार्याविषयीच्या तीव्र आकांक्षेची त्यात भर पडली आणि त्यातून भारतीय ब्राह्मसमाज आदिब्राह्म समाज आणि साधारण ब्राह्मसमाज अशा समांतर संस्था निर्माण झाल्या. भारताला आधुनिक बनवण्याचा पहिला प्रयत्न करण्याचे श्रेय राजा राममोहनरॉय यांच्याकडे जाते. तत्कालीन भारतातील आधुनिक मनांवर त्यांनी मांडलेल्या विचारांचा व कल्पनांचा फार मोठा परिणाम झाला असे म्हणता येते.

**महाराष्ट्रातील धर्मसुधारणेचे प्रयत्न**

इंग्रजी विद्येच्या अनुषंगाने महाराष्ट्रातील शिक्षित वर्गाच्या मनात समाजसुधारणेचे जे विचार घोळू लागले ते महाराष्ट्रातील समाजसुधारणावादी चळवळीची प्रेरणा ठरले. समाजसुधारणेच्या चळवळीचे एक अंग अटळपणे धर्मसुधारणा हेदेखील होते. कारण सामाजिक सुधारणा जर कायम स्वरूपाच्या व समाजकल्याणास पोषक व्हावयाच्या असतील तर तिचा पाया धार्मिक सुधारणा हा झाला पाहिजे अशी यामागील भूमिका होती. पेशवाईच्या काळात महाराष्ट्रातल्या धर्मविचाराला अतिशय पोथीनिष्ठ असे स्वरूप प्राप्त झाले होते. भटाब्राह्मणांनी प्रमाण मानलेल्या ग्रंथाच्या

आधारे केलेला धर्मनिर्णय हाच, धर्म त्यांनी सुचवलेले कर्मकांड हाच धर्माचार व त्याचा सर्वसामान्य ब्राह्मण व ब्राह्मणेतर प्रजाजनांनी केलेला मूक स्वीकार हेच धर्माचरण, अशी एकंदर परिस्थिती होती. राजा राममोहन रॉय यांच्या प्रयत्नांमुळे सतीबंदीचा कायदा झाला. सुधारकांच्या प्रयत्नांमुळे विधवापुनर्विवाहाचा कायदा झाला. तथापि एकंदर धर्मसंबद्ध व्यवहार रूढीग्रस्तच होते. बंगालमध्ये राजा राममोहन रॉय यांनी या विचारांविरुद्ध बंड करून १८२८ साली ब्राह्मसमाजाची स्थापना केली. परंतु तत्कालीन बंगाली समाजाने ब्राह्मसमाजाच्या अनुयायांशी आपले संबंध तोडून टाकले व त्यांना एकाकी बनवले. चातुर्वर्ण्य हा भारतीय समाजाला ग्रासणारा सर्वात मोठा ग्रह होता. समाजाची एकता भंग करणारा समाजजीवनाचा शत्रू असेच चातुर्वर्ण्याच्या परिणामांमुळे त्याला रूप प्राप्त झाले होते. चातुर्वर्ण्य ही केवळ पारिभाषिक संज्ञा नव्हती तर समाजाचे तुकडे करून टाकणारे ते एक षड्यंत्रच होते. पारंपरिक धर्मविचाराचा चातुर्वर्ण्याला आधार होता. याचप्रमाणे वेगवेगळ्या देवदेवता, त्यांची पूजाअर्चा व संबंधित माणसांचे/समाजाचे होणारे शोषण हाही तत्कालीन धर्मव्यवहाराचा एक घटक होता. शिक्षित वर्गाला व विशेषत: बुद्धिवादी विचारवंतांना ही परिस्थिती बदलून टाकणे अत्यंत आवश्यक वाटत होते. त्यासाठी व्यक्तिगत पातळीवर ज्याने त्याने आपापले मार्ग अनुसरले हे जसे खरे तसेच एकंदर समाजालाच नवी दृष्टी देण्याचे व धर्माचा नव्या दृष्टीने विचार करून पर्यायी धर्मव्यवस्था रूढ करण्याचा प्रयत्न सुरू झाला.

महाराष्ट्रात या दृष्टीने उचलले गेलेले दमदार पाऊल म्हणून ३१ मार्च १८६७ या दिवशी स्थापन झालेल्या प्रार्थनासमाजाचा उल्लेख करावा लागतो. मानवधर्मसभा व परमहंससभा या प्रार्थनासमाजाच्या पूर्वावस्था होत. परमहंससभेची बीजावस्था सुरत येथे स्थापन झालेल्या मानवधर्मसभेमध्ये आढळते. 'खरा हिंदू धर्म भटाभिक्षुकांच्या प्रचलित हिंदू धर्मापेक्षा निराळा आणि व्यापक, उदात्त व उदार आहे' असे दादोबांना सतत जाणवत होते. दादोबा सुरतला ज्या शाळेत काम करीत होते त्या इंग्रजी शाळेचे हेडमास्तर मिस्टर हेन्री ग्रीन हे अज्ञेयवादी व ख्रिस्ती धर्मावर विश्वास नसणारे गृहस्थ होते. त्यांच्याशी होत राहिलेल्या संभाषणांमधून ख्रिस्ती धर्माचीही न्यूने दादोबांच्या ध्यानात आली.

प्रत्येक धर्मामध्ये चांगले तसे वाईटही आहे व 'हंसक्षीर' न्यायाने सगळ्या धर्मांतील चांगले तेवढे ग्रहण करून जर एक मानवधर्म स्थापना केला तर धर्माच्या नावावर आतापर्यंत जो कलह चालला आहे तो बंद पडेल व मानवजातीचे ऐहिक तसे पारमार्थिक कल्याण होईल, अशी त्यांची खात्री झाली. दुर्गाराम मंछाराम हे सुरतेच्या गुजराती शाळेचे साधे मास्तर. त्यांचे इंग्रजी शिक्षण मुळीच झाले नव्हते. इतके असूनही त्यांची सारासारविवेकबुद्धी व नवविचारग्रहणक्षमता विलक्षण होती. (प्रियोळकर, अ. का., १९४७, पृ. २४२-२४३) ह्या दोघांनी आपल्या समानशील मित्रांच्या साहाय्याने 'मानवधर्मसभा' नावाची एक संस्था स्थापन केली. (२२ जून १८४४, पृ. २४४-४५) या चळवळीला प्रेरणा जरी बंगालमधून मिळाली असली तरी तिचे मूळ आणि तिचा पुढला विकास हा स्वत:च्या स्वत: झाला. दादोबा पांडुरंग तर्खडकर  हा बाळशास्त्री जांभेकरांच्या पायाभूत प्रयत्नातील आणि नंतरच्या सुधारणावादी चळवळीतील जिवंत दुवा होते. ते मानवधर्मसभेचे सहसंस्थापक होते. ही संस्था बुद्धिवादावर अधिष्ठित अशा धार्मिक व सामाजिक विश्ववादाचे प्रतिनिधित्व करणारी होती. दादोबांनी परमहंससभेच्या स्थापनेलाही स्फूर्ती दिली. परमहंससभा ही धार्मिक असण्यापेक्षा सामाजिक अधिक होती. आणि दादोबा पांडुरंग हे स्वत: वेदान्ती असले तरी त्यांचा कल बुद्धिवादाकडे आणि इमॅन्युएल स्वीडनबर्ग याच्या आध्यात्मिक लेखनाकडे आकर्षित झाले होते.

**प्रार्थनासमाज**

पश्चिम भारतातील एकेश्वरवादी प्रवाह प्रार्थनासमाजात एकत्र मिळालेले दिसतात. बंगालमधील ब्राह्मसमाजासारखीच महाराष्ट्रात उत्पन्न झालेली प्रार्थनासमाजाची चळवळ कमी नाट्यात्म असली तरी कमी परिणामकारक नव्हती. एकंदरीतपणे हिंदू समाजाच्या बंदिस्त चौकटीत एकात्म स्वरूपात राहिलेली ही चळवळ महाराष्ट्रातील भक्तिपरंपरेला सर्वोच्च महत्त्व देत होती. थिओडर पार्कर  या एकेश्वरवादी सुधारकाच्या व मुक्त चिंतकाच्या

कल्पनांच्या ती बरीच जवळ आली होती. महादेव गोविंद रानडे आणि रामकृष्ण गोपाळ भांडारकर यांचा मुख्यत्वे प्रार्थनासमाजाचा संप्रदाय स्थापन करण्यात पुढाकार होता. रानड्यांच्या विचारपद्धतीवर स्कॉटिश तत्त्वज्ञानाचा प्रभाव होता. ए. सी. फ्रेझर याच्या ईश्वरी अस्तित्वावर श्रद्धा बाळगण्याच्या तत्त्वविचारांशी ते पूर्णपणे सहमत होते. भांडारकरांनी आपली सगळी विद्वत्ता प्रार्थनासमाजाच्या सेवेस वाहिली. केवळ उपनिषदांनीच देवावर श्रद्धा ठेवण्याची शिकवण दिली या विचाराचा त्यांनी प्रतिवाद केला.

'प्रार्थनासमाज' हे जे नाव घेतले त्याविषयी आपली समजूत काय आहे ती रा. ब. माधवराव रानडे ह्यांनी स्पष्ट केली. ते म्हणाले ''तात्त्विक रीतीने विचार करिता प्रार्थनासमाज हे नाव घेण्याचे कारण असे आहे की, प्रार्थना हाच मार्ग परमेश्वराची प्राप्ती होण्यास मुख्य आहे. वरकड जपतप, यज्ञयाग, कर्मतंत्रे, व्रतवैकल्ये, तीर्थयात्रा, दानधर्म, ज्ञानविज्ञान, ध्यानधारणा, यमनियम या व अशाच सर्व साधनांमध्ये प्रार्थना हेच मुख्य रहस्य आहे. प्रार्थनेशिवाय ही सर्व साधने व्यर्थ आहेत. अशा मतांचे जे लोक आहेत त्यांच्या मताचा बोध व्हावा म्हणून हे नाव घेतले आहे. ह्या देशात मुख्य चालू असलेल्या हिंदुधर्मात उपास्य दैवत एक परमेश्वर आहे; तो आत्मस्वरूपी आहे. जीवात्म्याने त्याची प्राप्ती करावी हेच मुख्य श्रेय आहे इ. मतांविषयी सर्व संप्रदायांचे लोकांत भेद नाही. भेद विशेषेकरून साधनसामग्रीत आहे; म्हणून ज्या गोष्टीबद्दल भेद नाही त्या गोष्टी प्रधानपणे नावावरून प्रसिद्ध व्हाव्यात हे अवश्य नाही. साधनविशेषाची भिन्नता प्रकाशित व्हावी हे इष्ट आहे''

प्रार्थनासमाजाचे विशिष्टत्व स्थापन करणारी आणखी एक गोष्ट आहे. प्रार्थनासमाज कोणताही एक ग्रंथ ईश्वरप्रणीत मानीत नाही. प्रार्थनासमाजाची जी धर्मतत्त्वे आहेत ती आपल्या धर्मग्रंथांतील वचनांच्या आधारे प्रतिपादिली असता लोकांस ती रुचतात व पटतात. ''तुकोबासारख्यांचे अभंग व भगवद्गीता, आणि उपनिषदे, यांतील वचने ह्यांच्या आधारे आम्ही उपदेश केला असता तो यावत सर्व हिंदूंस मान्य होतो आणि ते माना डोलावतात आणि असले उपदेश वारंवार ऐकण्याची इच्छा त्यास होते.'' तेव्हा हे एक प्रार्थनासमाजाचे विशिष्टत्व आहे. दुसरे असे आहे की, कोणताही धर्मग्रंथ ईश्वरप्रणीत नाही असे मानिले तरीसुद्धा समाजाचे धर्मपुस्तक कोणते असा प्रश्न आपणापुढे आला असता, ''त्याचे उत्तर 'सर्वधर्म पुस्तक समाजाचे धर्मपुस्तक होय' असे द्यावे'' असे डॉ.रा.गो. भांडारकरांचे मत आहे.

महाराष्ट्रामध्ये जी संतमालिका उदयास आली तिने प्रार्थनासमाजाच्या नित्य कार्याचा मार्ग पुष्कळ सुलभ केला. प्रार्थनासमाज हा ख्रिश्चन धर्माच्या अनुकरणातून आपले व्यवहार करतो असा आक्षेप काही विरोधक घेत असत. या आक्षेपास रानडे, भांडारकर यांसारख्या अध्वर्यूंनी महाराष्ट्रातील भागवतधर्माच्या संतांच्या उपदेशाच्या स्मरणाने चोख उत्तर दिले. ह्या संतांच्या कामगिरीचे फार सुंदर विवेचन भांडारकरांनी केले आहे.*

---

* Then arose the sadhus or the pious men of the medieval period who protested against this artificial religion, reasserted the doctrine of Bhakti with vigour and inculcated purity of heart and the last sadhu in this part of the country was our own Tukaram of Dehu. What the mission of these men was generally may best be seen from an abhanga of Tukaram. -

आम्ही वैकुंठवासी। आलों याचि कारणासी।
बोलिले जे ऋषी। साच भावें वर्ताया।।१।।

झाडूं संतांचे मारग। आडरानें भरलें जग।
उच्छिष्टाचा भाग। शेष उरला तो सेवूं।।२।।

अर्थ लोपलीं पुराणें। नाश केला शब्दज्ञानें
विषयलोभी मन। साधन हें बुडविलें।।३।।

पिटू भक्तीचा डांगोणा। कळिकाळासी दरारा।
तुका म्हणे करा। जयजयकार आनंद।।४।।

**जोतीराव फुले**

अन्यायाबाबत अतिशय संवेदनशील असणारे, व्यापक मनाचे व व्यवहारी असणारे जोतीराव फुले (१८२७-१८९०) हे एक आश्चर्यजनक व्यक्तिमत्त्व होते. ते केवळ चिंतनशील विचारवंत नव्हते तर कृतिशील विचारवंत होते. पुरुष व स्त्री यांत भेदाभेद न करता त्यांना समान सामाजिक दर्जा, समान हक्क व स्वत:ची प्रगती करण्याची समान संधी ज्यामध्ये मिळू शकेल असा समताधिष्ठित समाज निर्माण करण्यासाठी त्यांनी जन्मभर काम केले. ज्ञानाविषयी व शिक्षणाविषयी त्यांना अपरिमित प्रेम होते. ज्ञानामुळेच माणसाला स्वत:ची व जगाची जाणीव होते, आपले समाजातील स्थान समजते व ते प्राप्त करण्यासाठी संघर्ष करण्याचे बळ उत्पन्न होते यावर त्यांची अपार श्रद्धा होती. हिंदू धर्मातील ब्राह्मण या सर्वोच्च जातीने शूद्रातिशूद्रांना ज्ञानापासून वंचित ठेवल्यामुळे ते ब्राह्मणांच्या कायम गुलामगिरीत राहिले, ही परिस्थिती पालटणे नितांत गरजेचे आहे व त्यासाठी सर्वतोपरी प्रयत्न केले पाहिजेत असा त्यांच्या बुद्धीचा निश्चय झाला होता.

त्या काळात मुंबई विद्यापीठ स्थापन व्हावयाचे असल्यामुळे त्यांचे विद्यापीठाच्या पातळीवरचे औपचारिक शिक्षण झाले नसले तरी ख्रिश्चन मिशनरी व इतर पाश्चात्त्य मंडळी यांच्याशी असणाऱ्या संबंधातून त्यांना बराच ज्ञानलाभ घडला. धैर्य व दूरदृष्टी असणाऱ्या फुल्यांनी ब्राह्मणेतरांत शैक्षणिक व सामाजिक कार्य सुरू केले. ते करताना जातीजातींमधले भेद व जातीबाहेरचे लोक असा विचार त्यांनी केला नाही. समाजसुधारणेच्या कार्यक्षेत्रात जोतीराव फुले यांचा उदय होईतो एकोणिसाव्या शतकातील भारतीय प्रबोधन हे मूलत: शिक्षित उच्चभ्रूंपुरतेच मर्यादित होते, तळागाळातील लोकजीवनापासून ते सर्वस्वी दूर होते. फुले यांनी लक्षावधी मूक माणसांच्या हृदयातील दु:ख व असमाधान यांना वाचा फोडली. इंग्रजी राज्यातही स्त्रीशूद्रांच्या शिक्षणाची उपेक्षाच होत आहे हे त्यांनीच प्रथम सर्वांच्या निदर्शनास आणले. शिक्षण हे वरिष्ठ वर्गातून झिरपत झिरपत कनिष्ठ वर्गापर्यंत पोचेल या भूमिकेस त्यांचा विरोध होता. स्त्रीशूद्रांना एकाच दावणीला बांधून रूढीनिष्ठ भारतीय परंपरेने स्त्रियांना शिक्षणापासून वंचित ठेवले होते या वस्तुस्थितीवर आपल्या विचारांनी व प्रत्यक्ष कार्याने जोतीरावांनी प्रखर प्रकाश टाकला.

समाजात सुधारणा झाल्या पाहिजेत अशी पोपटपंची न करता त्यांनी पिण्याचे पाणी घेण्यासाठी त्यांचा खाजगी हौद अस्पृश्यांना खुला केला. त्या काळच्या प्रथेनुसार उच्च जातीतील विधवांच्या पुनर्विवाहास बंदी होती त्यामुळे ज्या तरुण स्त्रिया गरोदर राहिल्याने गर्भपात वा भृणहत्या करीत अशा गरोदर विधवांसाठी त्यांनी १८६३ मध्ये बालहत्या-प्रतिबंधक गृहाची स्थापना केली. अशा विधवांची सावित्रीबाईंच्या मदतीने बाळंतपणाची योग्य व्यवस्था केली. इतकेच नाही, तर त्यांच्याकडे आश्रयाला आलेल्या गरोदर ब्राह्मण बाईचा मुलगा त्यांनी व सावित्रीबाईंनी दत्तक घेतला. यशवंत हे त्याचे नाव. ऑगस्ट १८४८ मध्ये बुधवार पेठेतील भिड्यांच्या वाड्यात जोतीबांनी पहिली शाळा सुरू केली. ती बंद पडलेली पाहून ३ जुलै १८५१ रोजी बुधवार पेठेत चिपळूणकरांच्या वाड्यात, १७ सप्टेंबर १८५१ रोजी रास्ता पेठेत आणि १५ मार्च १८५२ रोजी वेताळ पेठेत अशा तीन शाळा त्यांनी काढल्या. ''विद्येविना मती गेली। मतीविना नीति गेली। नीतीविना गति गेली। गतीविना वित्त गेले। वित्ताविना शुद्र खचले। इतके अनर्थ एका अविद्येने केले।'' हे सर्वांनी लक्षात घेतले पाहिजे असे फुले बजावत. त्यांच्या शिक्षणकार्याचे युगप्रवर्तकत्व

---

साधुसंतांनी भक्तिमार्ग चोखाळला; अंत:करणाच्या पावित्र्यावर जोर दिला; परंतु साधनमार्गामध्ये निषेधपरही काही भाग आहे तो त्यांच्या कार्याच्या क्षेत्रात आला नाही. हे जे साधुसंतांच्या क्षेत्रामध्ये न आलेले कार्य ते करावयाचे हे प्रार्थनासमाजाचे विशिष्टत्व आहे. भांडारकर म्हणतात,

"Though the medieval sadhus taught a purer form of faith, they did not as a general rule set their face against the popular beliefs and modes of worship with sufficient firmness and decision. This appears to me to be the principal reason why their mission was not completely successful. Let us therefore while endeavouring to release their humility and single hearted devotion, attempt to supply this defect." (वैद्य, द्वा. गो., १९२७, पृ. ३१७-३१८)

लक्षात घेऊन तत्कालीन सरकारी विद्याखात्याने मे.कँडी यांच्या अध्यक्षतेखाली १६ नोव्हेंबर १८५२ रोजी फुले यांचा सत्कार केला. त्यानंतर इ. स. १८५५ मध्ये फुल्यांनी कामगारांसाठी पहिली रात्रशाळा सुरू केली. शिक्षणाची सोय समाजातील सर्व थरांपर्यंत पोचावी व शिक्षणापासून सर्वांचा लाभ व्हावा ही फुले यांच्या शिक्षणविषयक कार्याची दिशा होती. समाजातील अडाणी अशिक्षित लोकांची फसवणूक उच्चवर्णीय ब्राह्मणवर्ग करत असतो आणि सर्व अज्ञानी त्यांच्या फसवणुकीचे बळी ठरतात अशी फुले यांची पक्की धारणा होती.

**सत्यशोधक समाज**

१८७३ मध्ये त्यांनी सत्यशोधक समाजाची स्थापना केली आणि पुढे ब्राह्मणेतरांतील सुधारणेच्या चळवळीला मार्गदर्शन केले. २४ सप्टेंबर १८७३ रोजी महाराष्ट्रातील आपले सर्व चाहते आणि अनुयायी यांची त्यांनी पुण्यात एक सभा बोलवली आणि सर्वांच्या विचाराने त्या दिवशी सत्यशोधक समाज ही संस्था स्थापन झाली. समाजसुधारणेची महाराष्ट्रव्यापी अशी ही पहिली चळवळ म्हणता येईल. ''शूद्र आणि अतिशूद्र यांची ब्राह्मण पुरोहितांकडून होणारी पिळवणूक बंद करणे, त्यांना त्यांच्या मानवी हक्कांची, अन अधिकारांची शिकवणूक देणे आणि ब्राह्मणी शास्त्रांच्या मानसिक आणि धार्मिक गुलामगिरीतून मुक्त करणे हे सत्यशोधकाचे ध्येयधोरण होते. ...प्रत्येक सभासदाला पुढीलप्रमाणे प्रतिज्ञा घ्यावी लागे. 'सर्व मानवी प्राणी एकाच देवाची लेकरे आहेत, सबब ती माझी भावंडे आहेत, अशा बुद्धीने मी त्यांच्याशी वागेन. परमेश्वराची पूजा, भक्ती अगर ध्यानधारणा करतेवेळी अगर धार्मिक विधीचे वेळी मी मध्यस्थाची गरज ठेवणार नाही; दुसऱ्यांनाही तसेच वागण्याबद्दल मी उपदेश करीन. मी माझ्या मुलांमुलींना सुशिक्षित करीन. मी नेहमी राजनिष्ठेने वागेन. परमेश्वरास व सत्यरूपी परमेश्वरास साक्ष ठेवून मी ही प्रतिज्ञा करीत आहे. ह्या प्रतिज्ञेप्रमाणे वागण्यास मला सामर्थ येईल अशा प्रकारे आयष्यक्रम गुदरण्यास योग्य प्रकारे मदत तो मला करो.' सत्यशोधक समाजाचे सभासदत्व सर्व जातीतील लोकांना मोकळे ठेवले होते. ब्राह्मण, महार, मांग, ज्यू आणि मुसलमान हे त्या चळवळीच्या आरंभीआरंभी सत्यशोधक समाजाचे सभासद होते.'' (कीर, १९७५, पृ. १४५)

'गुलामगिरी' हा कनिष्ठ वर्गातील लोकांना प्रामुख्याने ब्राह्मणांच्या मानसिक गुलामगिरीतून मुक्त करण्यासाठी लिहिलेला ग्रंथ १८७२ च्या ऑगस्ट-डिसेंबर या काळात पूर्ण केल्यानंतर ते दलित पददलितांच्या मानसिकतेत प्रत्यक्षात बदल घडवून आणण्यासाठी कामाला लागले. १८६३ साली अब्राहम लिंकनने अमेरिकेतील गुलामगिरी नष्ट केली. मानवी स्वातंत्र्याच्या या स्फूर्तिप्रद कामगिरीचा प्रभाव जोतीरावांच्या मनावर फार मोठ्या प्रमाणात पडला होता. महाराष्ट्रातील ब्राह्मण्यवृत्तीवर जोरदार हल्ला चढवून कनिष्ठ वर्गातील लोकांच्या मनात आत्मविश्वास व आत्मसन्मान निर्माण करण्याच्या कार्यास त्यांनी स्वत:ला वाहून घेतले आणि मानवी प्रतिष्ठेच्या आपल्या कल्पना आणि मानवी समानता व आत्मोद्धार याविषयीच्या विचारांचे प्रतिपादन ते करू लागले. 'कोणताही धर्म ईश्वरप्रणीत नाही, कोणताही धर्मग्रंथ देवनिर्मित नाही, या पृथ्वीच्या पृष्ठभागावर जेवढी म्हणून मानवानी निर्मिलेली धर्मपुस्तके आहेत त्यापैकी एकाही पुस्तकात आरंभापासून शेवटपर्यंत सार्वजनिक सत्य नाही, चातुर्वर्ण्य व जातिभेद या संस्था जर देवनिर्मित नाहीत, त्या मनुष्यनिर्मित आहेत' ही सत्ये फुले यांनी धाडसपूर्वक समाजापुढे मांडली. ''सत्यावीण नाही अन्य धर्म'' हा विचार त्यांनी समाजात रुजवण्याचा प्रयत्न केला. 'सार्वजनिक सत्य धर्मपुस्तक' हे जोतीराव फुले यांचे लेखन म्हणजे त्यांच्या विश्वकुटुंबवादाचा जाहीरनामा आहे. भारतीय लोकशाही क्रांतीची मूलभूत तत्त्वे त्यात विशद करून सांगितली आहेत. मूलभूत मानवी हक्क, त्यांवर आधारित विश्वकुटुंबवाद आणि जीवनाचे व विश्वाचे सत्य स्वरूप स्पष्ट करणारा बुद्धिवाद या तीन घटकांचा आविष्कार या ग्रंथात झाला आहे.

शूद्रातिशूद्रांनी शिक्षण घेतलेच पाहिजे व स्वत:ची उन्नती साधली पाहिजे असा जोतीरावांचा आग्रह होता. केवळ अज्ञानामुळे शूद्रातिशूद्रांना लुबाडले जाते हे ध्यानात आणून देण्याचा त्यांनी आटोकाट प्रयत्न केला. आपली लुबाडणूक टाळण्यासाठी तरी शिक्षण अत्यावश्यक आहे हे त्यांनी वेळोवेळी स्पष्ट केले. या दृष्टीने 'सार्वजनिक सत्यधर्म पुस्तका'तील जोतीरावांचे उद्गार द्रष्ट्या भविष्यवेत्त्याच्या पातळीवरचे म्हणावे लागतील. जोतीराव सांगतात,

''आर्यभटांनी नीच मानलेल्या सर्व शूद्रादि अतिशूद्रांसह भिल्ल कोळी वगैरे मानव बांधवांनी आपआपल्या कन्यापुत्रांस शाळेमध्ये पाठवून त्या सर्वांस सत्यज्ञान शिकविण्याचा आरंभ करावा, म्हणजे काही काळाने आपण सर्वांच्या मुलीमुलांस सत्यज्ञान प्राप्त झाल्याबरोबर त्यांतून शूद्र वगैऱ्यांतील एखादा सत्पुरुष आपण सर्वांच्या समाधीवर पुष्पवृष्टी करून, आपण सर्वांच्या नावाने उल्हास करील, असे मी स्वसंतोषाने भविष्य करितो.'' (फडके, य. दि. (संपा.), १९९१, पृ. ५१७ व कीर ध., मालशे, स. गं., १९८०, पृ. ४३०) फुले यांची ही भविष्यवाणी पुढील काळात बाबासाहेब आंबेडकर यांच्या रूपाने सत्य ठरली हे ऐतिहासिक अवलोकन केले असता सहज ध्यानात येते. येथेच एक महत्त्वाचे स्पष्टीकरण करणे आवश्यक आहे. जोतीरावांचा विरोध ब्राह्मण्यवादी वृत्तीला होता व्यक्तिगत ब्राह्मणांना नव्हता. त्यांच्या कार्यात त्यांना सहकार्य करणारे जे मित्र होते त्यांत ब्राह्मण मित्रांचाही समावेश होता. इतकेच नव्हे, तर दयानंद सरस्वती पुण्यात आले असता त्यांच्या विरोधकांनी जेव्हा त्यांच्यावर हल्ला करण्याचा प्रयत्न केला तेव्हा त्यांच्या व महादेव गोविंद रानडे यांच्या रक्षणार्थ जोतीराव धावले होते ही वस्तुस्थिती दृष्टीआड करण्याजोगी नाही.

सत्यशोधक समाजाचे वेगळेपण दलित पददलित वर्गांतील माणसांच्या उद्धारात सामावलेले होते. सत्यशोधक समाजाने सामाजिक गुलामगिरीविरुद्ध आंदोलन सुरू केले आणि सामाजिक न्यायाच्या तत्त्वावर समाजाच्या पुनर्रचनेची मागणी केली. ''सत्यशोधक समाजाचा आवाज ही हिंदुस्थानात अनेक शतके दडपून टाकलेल्या कनिष्ठ समाजाची किंकाळी होय.'' (कीर, तत्रैव, पृ. १४९) ''कृतीत उतरले नाही तर सद्‌विचारांचे मूल्य हे सुखस्वप्नापेक्षा अधिक नाही'' असे जे रोमा रोलाँ यांचे वचन आहे ते जोतीरावांच्या आचरणातून साक्षात प्रतीत होते. भारतीय समाजक्रांतीचे जनक आणि भारतातील सामान्य जनतेच्या नवयुगाचा प्रेषित असे जोतीरावांचे यथार्थ वर्णन करता येईल. जोतीराव हे आधुनिक भारताचे पहिले महात्मा आणि 'सत्यमेव जयते' या प्रेरणादायी तत्त्वाने भारावून गेलेले पहिले सत्यशोधक होते. आपल्या पत्र लिहिण्याच्या कागदावर ते हे ब्रीदवाक्य लिहीत. या संदेशाचा आग्रह धरणारे जोतीराव हे आधुनिक भारतातील पहिले थोर पुरुष होत. जोतीराव या सत्योपासनेचा उपदेश सर्व समाजाला करीत होते तेव्हा महात्मा गांधींचे वय केवळ चार वर्षांचे होते ही वस्तुस्थिती पुढे स्वातंत्र्यानंतर भारताने आपले ब्रीदवाक्य म्हणून 'सत्यमेव जयते'चा स्वीकार केला या वास्तवाच्या संदर्भात अत्यंत अर्थपूर्ण व बोलकी आहे.

### महादेव गोविंद रानडे

महादेव गोविंद रानडे ( १८४२-१९०१)यांनी भारतीय उदारमतवादाला अभिजात असे रूप प्राप्त करून दिले. त्यांची दृष्टी ही उदार होती व मध्यम-सौम्य स्वरूपाचीही होती. पूर्वग्रहांपासून ती दूषित झालेली नव्हती आणि विचारांच्या देवघेवीच्या संदर्भात ती सहकार्यशीलदेखील होती. सामाजिक व धार्मिक सुधारणांच्या बाबतीत त्यांचा दृष्टिकोण सर्वांना बरोबर घेऊन जाण्याचा होता. कोणत्याही सुधारणेत सर्वजण जर सामील होऊ शकले नाहीत तर त्या सुधारणेच्या प्रयत्नाला यश येऊ शकत नाही अशी त्यांची भूमिका होती. चार प्रकारे सुधारणा घडवून आणता येतील असे त्यांचे मत होते. एक, परंपरांचा सुधारणानुकूल अर्थ लावून कालोचित असे बदल घडवून आणणे; दोन, माणसांच्या सद्‌सद्विवेकबुद्धीला आवाहन करून बुद्धिप्रामाण्यवादी विचारांचा आग्रह धरणे; तीन, नवे समाज उभारणे; चार, सामाजिक दुरित दूर करण्यासाठी कायद्याचे साहाय्य घेणे. एकसमयावच्छेदेकरून या चारही पद्धतींचा अवलंब केला तरच सुधारणेच्या प्रयत्नांना यश लाभू शकेल असे त्यांना वाटत होते. रानडे, भांडारकर, वागळे आणि मोडक हे मुंबई विद्यापीठाचे पहिले चार पदवीधर प्रार्थनासमाजाशी संबंधित होते. कोणत्याही सुधारणा या बाहेरून लादून होत नाहीत तर त्याबद्दलची आस्था आतूनच निर्माण करणे अत्यावश्यक असते असे जे रानडे यांचे मत होते, त्या मताशी उरलेले तिघेजण सहमत होते. इमर्सनने म्हटल्याप्रमाणे 'एव्हरी रिफॉर्म इज वन्स अ प्रायव्हेट ओपिनियन' याची जाण रानडे यांना होती. समाजसुधारणेच्या बाबतीत रानडे यांनी राजा राममोहन रॉय यांचे अनुसरण केले आणि महात्मा गांधींच्या विचाराची पूर्वपीठिका तयार केली. त्यांच्या समाजसुधारणाविषयक विचाराचा गाभा समाजात मानवतेची भावना उत्पन्न करणे (ह्यूमनाईज), समता उत्पन्न करणे (इक्लाइज) आणि नीतिप्रधान आध्यात्मिकता निर्माण

करणे (स्पिरिच्युअलाइज) हा होता. भारतात दोन हजार वर्षांपासून चालत आलेल्या व संतांनी आत्मसात केलेल्या भागवतधर्माशी रानडे यांच्या विचारांचे व वर्तनाचे दृढ नाते होते. त्यामुळेच प्रार्थनासमाज व भागवतधर्म यांचा परस्परसंबंध अत्यंत निकटचा आहे हे त्यांनी स्पष्ट केले आहे. रानडे म्हणतात, "The past history of the origin and progress of what has been well described by our saints and prophets for two thousand years and more, as the Bhagwata Dharma, of which the present Samaja movement is only a faint reflection and a humble off-shoot." (Ranade, 1902, p. 199)

### आगरकर, गोखले, वि. रा. शिंदे

गोपाळ गणेश आगरकर (१८५६-१८९५) यांच्यामुळे महाराष्ट्रात निधर्मी विचार ही एक शक्ती बनली. हर्बर्ट स्पेन्सर आणि जॉन स्टुअर्ट मिल यांच्या विचारांचा आगरकरांवर मोठा पगडा होता. त्यांनी स्पेन्सरचे लेखन व विचार साम्रग्याने स्वीकारले. त्यामुळे असे म्हणता येते की, आगरकरांनी केवळ परंपरेतच सुधारणा केल्या असे नाही तर त्यांनी परंपरेविरुद्ध बंडच केले. मार्गदर्शक म्हणून परंपरेच्या जागी तर्काचा स्वीकार केला. या बदलामुळे भारतीय मनाला पाश्चात्त्य जगातील सर्व पालटत्या विचारधारा परिचित झाल्या.

आगरकरांनी सुधारणांची गरज प्रतिपादिली कारण त्यांच्या दृष्टीने उत्क्रांत होत जाणारा प्रत्येक समाज कधीही साचलेला राहू शकत नाही आणि माणसाची बुद्धिवादी शक्ती त्याचा विकास घडवून आणते. सुधारित स्वरूपातील उपयुक्ततावादाचे तत्त्व सुधारणेच्या प्रक्रियेस मार्गदर्शक ठरते. संकेत आणि रूढी ही काही जपणूक करण्याजोगी मूल्ये नाहीत. व्यक्तीच्या स्वातंत्र्याचा मार्ग मोकळा करावयास हवा. स्त्रियांना शिक्षण द्यायला हवे म्हणजे त्यांना समाजातील त्यांची हक्काची जागा मळू शकेल असे विचार आगरकरांनी व्यक्त केले. आगरकरांच्या या सर्व विचारांना आणि तात्त्विक मांडणीला परंपरानुयायी समाजाकडून विरोध होणे अपेक्षितच होते त्याप्रमाणे तो झालाही. तरी त्यांच्या प्रागतिक लेखनाची छाप टिळकांनंतर गांधीजींकडे नेतृत्व जाईपर्यंत कायम राहिलेली दिसते.

उदारमतवादाचे खरे पुरस्कर्ते गोपाळ कृष्ण गोखले (१८६६-१९१५) हे दादाभाई नौरोजी (१८२५-१९१७), फिरोजशहा मेहता (१८४५-१९१५) आणि रानडे यांच्या विचारांनी घडले होते. त्यांच्या मृत्यूपर्यंत ते भारतातील उदारमतवाद्यांचे नेते म्हणून टिकून राहिले. भारतीय राजकीय परिस्थितीत सर्वांना संधीची व वागण्याची समानता मिळावी म्हणून ते धीराने व सोशिकपणे झगडत राहिले. आपल्या तत्त्वदृष्टीत एक अध्यात्मवादी व ध्येयवादी असणारे गोखले यांचे मन आगरकर आणि रानडे यांच्या विचारांमध्ये आंदोलित होत होते. ते धर्माच्या जवळ वळले.

प्रार्थनासमाज व उदारमतवाद या दोन्ही विचारधारा एकवटलेले बुद्धिवंत म्हणून विठ्ठल रामजी शिंदे (१८७३-१९४४) प्रसिद्ध होते. घरातील धार्मिक व भाविक वातावरणात वाढलेले विठ्ठल रामजी आगरकर व इतरांच्या लेखनाच्या प्रभावामुळे काही काळ अज्ञेयवादी बनले होते. भारतीय धर्मशास्त्राचे अभ्यासक असणारे मॅक्समुल्लर यांच्या सान्निध्यात विद्यार्थी म्हणून आल्यानंतर त्यांना धार्मिक प्रश्नांसंबंधी पुन्हा नव्याने रस वाटू लागला. स्कॉलरशिप घेऊन इंग्लंडमध्ये गेल्यानंतर त्यांनी एकेश्वरवादी चळवळीतील अध्यात्मतेचा स्वीकार केला. बरीच वर्षे त्यांनी प्रार्थनासमाजाचे कामही पाहिले. त्यांनी अस्पृश्यांच्या उद्धाराचे कार्यही केले. परंतु नंतर त्यांच्यात व बाबासाहेब आंबेडकर यांच्यात मतभेद निर्माण झाले. समाजाच्या सामाजिक, धार्मिक व राजकीय समस्यांकडे पाहाण्याचा सर्वंकष दृष्टिकोण बाळगणाऱ्या शिंदे यांनी गांधीजींचा मार्ग सुकर केला. अथक परिश्रम करून त्यांनी प्रार्थनासमाजाच्या विचारांचा प्रसार केला आणि जनसामान्यांना सामाजिकदृष्ट्या व राजकीयदृष्ट्या शिक्षित करण्याचे प्रयत्न केले.

### लोकमान्य टिळक

हे नेहमीच लक्षात ठेवावयास हवे की कोणताही समाज आपले व्यक्तिमत्त्व पुसून टाकल्यावाचून भूतकालाबरोबरचे आपले धागे पूर्णपणे तोडू शकत नाही. त्याला आपल्या वाटचालीत सामोऱ्या येणाऱ्या नव्या मूल्यांचा

धाडसाने स्वीकार करावाच लागतो.. महाराष्ट्रातील पुनरुज्जीवनवादाचा इतिहास नव्या कल्पना आत्मसात करण्याच्या प्रक्रियेतील यंत्रणेच्या वेदनांचे दर्शन घडवितो. काही बाबतींत ही प्रक्रिया पुरत्या कालावधीपूर्वीच ताठर झालेली तरी आढळते किंवा आंधळ्या अरुंद रस्त्यांनी तिच्यात अडथळे तरी उत्पन्न होतात आणि काही बाबतींत ती हळूहळू इतर प्रवाहांत विलीन होऊन जाते. आरंभीच्या अवस्थांत भारतीय पुनरुज्जीवनवाद परंपरावादाच्या काळामधून गेला. या वेळी जात, शाकाहार व अहिंसा हे हिंदू धर्माचा गाभा म्हणून सांगितले गेले. आणि अशा प्रकारे ताठर अशा आत्मसंरक्षणाच्या दृष्टीचीच फसवणूक झालेली दिसते.

महाराष्ट्रातील हिंदुत्वाच्या पुनरुज्जीवनाचे काम लोकमान्य बाळ गंगाधर टिळकांनी (१८५६-१९२०) जोमदारपणे केले. त्यांनी आध्यात्मिक अनुभवाचा दावा कधी केला नाही किंवा पाश्चात्त्यांपुढे हिंदुत्व मिरवले नाही. त्यांचे मुख्य कार्यक्षेत्र राजकारण हे होते आणि या क्षेत्राचे नेतृत्व गांधी उदयाला येण्यापूर्वी त्यांनी केले. राजकीय स्वातंत्र्य चळवळीच्या त्यांच्या कार्याचे नैतिक-धार्मिक अधिष्ठान म्हणून त्यांच्या 'गीतारहस्या'चे स्थान महत्त्वाचे आहे. ज्ञानावर उभा असणारा व भक्तीने तोलून धरलेला कर्ममार्ग ही गीतेची मूलभूत शिकवण होय, असे प्रतिपादन टिळकांनी केले. हिंदू समाजाने कार्यशील बनावे आणि भगवद्गीता कर्माचे समर्थन करते अशी भूमिका त्यांनी घेतली. त्यांचे नीतिशास्त्र अद्वैताधिष्ठित आहे. आत्मौपम्य नीतीचे अभिजात असे रूप टिळकांनी विकसित केले. त्यामुळेच जो कोणी समाजाची सेवा करतो तो स्वत:चीच सेवा करतो अशा निष्कर्षाप्रत ते येतात. तत्त्वज्ञानाच्या पातळीवर असणारे गीतारहस्याचे निर्विवाद महत्त्व क्षणभर बाजूला ठेवले तरी आधुनिक भारताच्या स्वातंत्र्यसंग्रामातील गीतारहस्याचे स्थान टिळक हे मोठे मुत्सद्दी होते हे सिद्ध करते. टिळकांच्या या अद्वैती प्रतिपादनाने प्रार्थनासमाजाचा एकेश्वरवाद आणि ख्रिश्चनांचा धर्मप्रसार निष्प्रभ झाला. महादेव गोविंद रानडे आणि गोपाळ गणेश आगरकर यांचा तत्त्वविचारही टिळकांनी नाकारला. प्रत्यक्ष जीवनाशी तत्त्वज्ञानाचा किती साक्षात व प्रगाढ संबंध असतो ते टिळकांच्या गीतारहस्याने आधुनिक महाराष्ट्राला स्पष्टपणे दाखवून दिले. टिळकांच्या नेतृत्वामुळे पुनरुज्जीवनवादी चळवळीला व्यापक आणि समर्थ स्वरूप लाभले. (लेदर्ले, पूर्वोक्त, पृ. ४३०)

विनायक दामोदर सावरकरांचा (१८८३-१९६६) स्वातंत्र्यचळवळीतील सहभाग कमालीचा आक्रमक होता. हिंदू संस्कृती, तत्त्वज्ञान आणि धर्म यांच्याविषयी त्यांना वाटणाऱ्या अभिमानाचे त्यांच्या क्रांतिकारक देशभक्तीशी आंतरिक नाते होते. त्यांच्या सामाजिक व धार्मिक सुधारणावादी कल्पना बुद्धिवादी व उपयुक्ततावादी तत्त्वांतून निर्माण झाल्या होत्या. त्यांचे नीतिशास्त्र अद्वैती व ॲकॉस्मिस्टिक वेदान्तावर उभे होते आणि ते एकप्रकारे टिळकांच्या पुढचे एक पाऊल म्हणता येईल.

पहिल्या महायुद्धानंतर अनेक विचारवंतांना असे वाटले की, परंपरा ही पूर्णपणे नाकारताही येत नाही आणि आहे तशी स्वीकारताही येत नाही. मूल्यांबाबत ते पुनरुज्जीवनवाद्यांपेक्षा अधिक चिकित्सक होते. तथापि उदारमतवाद्यांशी तुलना करता पाश्चात्त्य प्रभावाबाबत ते नुसते सावधच नव्हते तर काकदृष्टीचेही होते.

आधुनिक महाराष्ट्रातला तत्त्वविचार पुन:पुन: माणसाशी संबंधित होत होता. एक नवा मानववाद जो त्याला माणसाशीच बांधत होता आणि त्याच्या दारिद्र्य, रोगराई व निरक्षरता यांच्याशी चाललेल्या संघर्षापासून दूर नेत नव्हता अशा मानववादाने माणसाला धैर्य दिले व त्याच्या कृतींना अर्थपूर्णता दिली. त्याला एक मानवी व्यक्ती म्हणून स्वत:कडे प्रतिष्ठेने पाहाता आले पाहिजे तसेच भौतिक वस्तूंशी असणारे त्याचे सापेक्ष नाते अमूर्ताशी जोडले गेले पाहिजे.

### आधुनिक भारतीय प्रबोधनयुग व सुधारक

भारतीय प्रबोधन असे म्हटल्यानंतर आधुनिक भारतातील सुधारकांची एक लखलखती मालिकाच डोळ्यांपुढे येते. भारतीय प्रबोधन हा जुने दोर कापलेला भारतीय सांस्कृतिक जीवनाचा नवा अवतारच आहे असे जे म्हटले जाते ते काही प्रमाणात खरे आहे. प्रबोधनकालीन भारत हा प्राचीन भारतीय संस्कृतीच्या आधारावर उभा होता.

राजा राममोहन रॉय यांचा ब्राह्मसमाज असो, स्वामी दयानंद सरस्वतींचा आर्यसमाज असो, ॲनी बेझंट यांची थिऑसॉफीची चळवळ असो किंवा स्वामी विवेकानंदांचे रामकृष्ण मिशनचे कार्य असो या सर्व सुधारणावादी चळवळींना पायाभूत असणारी महत्त्वाची गोष्ट म्हणजे प्राचीन भारतीय ग्रंथांत मांडलेले तत्त्वज्ञान. अगदी महात्मा जोतीराव फुले यांचा आर्यांचा वारसा नाकारणारा सत्यशोधक समाज जरी घेतला तरी त्यानेदेखील बळीराजाची प्राचीन मिथ आधाराला घेऊन कनिष्ठ जातीने केलेल्या उच्च वर्णीयांच्या निषेधाची चळवळ सुरू केली. आपल्याच गाभ्यातून वर आल्यावाचून काहीच चांगले लोकांच्या हाती लागत नाही असे जे जर्मन कवी गटे याने म्हटले होते त्याचेच आचरण भारतातल्या जवळजवळ सर्व सुधारकांनी स्वत:च्या मार्गाने जाऊन केलेले आढळते.

एकेश्वरवाद, सर्वोच्च निर्मात्याचे अस्तित्व आणि मूर्तिपूजेस विरोध या तीन महत्त्वाच्या धार्मिक कल्पना राममोहननी आपल्या *तुहफत* या पहिल्या ग्रंथात चर्चेस घेतल्या होत्या. वैश्विक धर्माचा आधार म्हणून त्यांनी सर्व प्रकारच्या श्रद्धांसाठी तीन मूलभूत धर्मतत्त्वे स्वीकारली. सर्वोच्च निर्मात्यावरील विश्वास/श्रद्धा, आत्म्याचे अस्तित्व आणि या विश्वानंतरच्या/या जीवनानंतरच्या विश्वावरील/जीवनावरील विश्वास यापैकी नंतरच्या दोन तत्त्वांचा स्वीकार त्यांना उपयुक्ततावादी मूल्य असल्यामुळे त्यांनी केला आहे. आत्म्याच्या अस्तित्वाचे तत्त्व आणि या जीवनानंतरचे जीवन यांचा स्वीकार केल्याबद्दल मानव जात क्षमेस पात्र आहे. कारण पुढल्या जन्मात शिक्षा मिळू नये म्हणून या जन्मात दुष्कृत्यांपासून दूर राहाणे जरी साधले तरी काही वाईट नाही. धर्मप्रकटीकरणाची कल्पना, द्रष्ट्यांचे कार्य आणि इतर धार्मिक नेते, मूर्तिपूजा अर्थशून्य समारंभ व कर्मकांड यांतून मोक्ष मिळवण्याचे मार्ग हे त्यांनी बुद्धीला व तर्काला न पटणारे व त्यामुळे खोटे म्हणून नाकारले. राजा राममोहन रॉय यांच्या धर्मदृष्टीतील उदारता व त्यांच्या दृष्टीची व्यापकता ही ब्राह्म समाजाच्या तत्त्वांमध्ये प्रतिबिंबित झालेली दिसते. दानधर्मास दिलेले उत्तेजन नीतिमत्ता, दयाळूपणा, परोपकारी वृत्ती, धर्माचरण, ईश्वरनिष्ठा यांचा ब्राह्म समाजाने पुरस्कार केला. वैश्विकता हे राजा राममोहन रॉय यांच्या धर्मविचाराचे बीज होय.

**राष्ट्रवादाचा उदय**

संपूर्ण क्रांतीचा पहिला जोरदार उद्घोष महाराष्ट्रातून झाला. दादोबा पांडुरंग तर्खडकर व भास्कर तर्खडकर यांनी मुंबई शहरात १८४० मध्ये ही कामगिरी केली. बुद्धिवादाच्या आणि समतेच्या पायावर न्याय्य समाजव्यवस्था निर्माण करण्यासाठी त्यांनी धडपड केली. राजकीय, आर्थिक, सामाजिक, धार्मिक अशा सुधारणेच्या सर्व अंगांचा एकसमयावच्छदेकरून पाठपुरावा करावयास हवा अशी भूमिका या सुरुवातीच्या आग्रही राष्ट्रवाद्यांनी घेतली. इंग्रजी राज्य हे ईश्वरी वरदान आहे आणि त्यात भारताचे कल्याण आहे ही भूमिका त्यांनी नाकारली. ब्रिटिशांची वासाहतिक राज्यव्यवस्था त्यांना अमान्य होती वासाहतिक राज्य आणि भारतीयांचे हित यांतील विरोध त्यांनी चटकन जाणला आणि इंग्रजांचे वासाहतिक राज्य हा अत्यंत कडू असा शापच आहे असे त्यांनी ठामपणे मांडले. सर चार्ल्स मेटकाफ याने अल्पकाळ दिलेले वृत्तपत्रीय स्वातंत्र्य उपयोगात आणून इंग्रजांच्या वासाहतिक राजवटीचे सर्व अंगांनी भेदक असे विश्लेषण त्यांनी केले. भास्कर पांडुरंग तर्खडकर (१८१६-१८४७) हे दमनशील इंग्रजी राजवटीच्या टीकाकारांपैकी आदरणीय गृहस्थ होते. 'ए हिंदू' या टोपणनावाने त्यांनी इंग्रजांनी केलेला ढळढळीत अन्याय उघड केला आणि जुलै ते ऑक्टोबर १८४१ या काळात बॉम्बे गॅझेटमधून तो प्रकाशित केला. त्यांच्या सहकार्यांना ते मातृभूमीत राजकीय सत्तांतर घडवू पाहाणारे भारताचे मार्टिन लूथर वाटत होते. देशकल्याणाचे ध्येय बाळगणारे भाऊ महाजन (१८१५-१८९०) हे *प्रभाकर* (१८४१), *धूमकेतू* (१८५३) व *ज्ञानदर्शन* (१८५४) या तीन प्रभावी नियतकालिकांचे संपादक होते. भारतीय इतिहास व राजकीय अर्थकारण यावर १८४३ मध्ये ग्रंथ लिहिणारे रामकृष्ण विश्वनाथ यांनी भास्कर तर्खडकरांनी जी भूमिका घेतली तिला संपूर्ण पाठिंबा दिला.

अर्थात इंग्रजांनी केलेल्या सतीबंदी, बालहत्याप्रतिबंध, ठगांचा बंदोबस्त यांसारख्या चांगल्या मानवतावादी कृत्यांचे भरघोस श्रेयही या टीकाकारांनी दिले. मात्र त्याच वेळी ते असे म्हणाले की, ज्या प्रकारचे राजकीय व आर्थिक क्रौर्य इंग्रजांच्या वागण्यातून प्रकटले आहे ते लक्षात घेता इंग्रजांची उपर्युक्त मानवतावादी वागणूक त्या प्रवाहात

कुठल्याकुठे वाहून जाते. हिंदुस्थानला पूर्ण दरिद्री बनविणारी आर्थिक लूट लक्षता घेता त्याचवेळी केली जाणारी शांततेची व न्यायाची भाषा ही अगदी वरपांगी आहे असे या टीकाकारांनी स्पष्ट म्हटले आहे. दादाभाई नौरोजींनी मांडलेल्या अर्थशास्त्रीय सिद्धांताची ही पूर्वावस्था म्हणता येईल.

या राष्ट्रवादी टीकाकारांचे आणखी एक वैशिष्ट्य म्हणजे कोणत्याही प्रादेशिक वा जातीय पूर्वग्रहापासून ते दूर होते. धर्म, जात, वंश हे भेद लक्षात न घेता सर्व हिंदुस्थानी लोकांच्या वतीने त्यांनी केलेली ही टीका पाहाता ते भारतीय राष्ट्रवादाचे अखिल भारतीय, निधर्मी, वसाहतवादविरोधक आद्य भाष्यकार ठरतात. त्यांनी केवळ दमनशील अशा वासाहतिक राजवटीवरच टीकेचे आसूड ओढले असे नाही तर, भारताच्या अधोगतीस जबाबदार असणाऱ्या शिलीभूत झालेल्या भारताच्या धार्मिक व सामाजिक परंपरेवर त्यांनी त्याहून अधिक कठोर टीका केली. मूठभर परदेशी लोकांनी येथे येऊन सत्ता गाजविण्याबद्दल शोक करण्यापेक्षा स्वत:ला धर्ममार्तंड म्हणविणाऱ्या भटाब्राह्मणांनीच हिंदूंचे राष्ट्रीय स्थान रसातळाला नेले आहे आणि इंग्रजांचा येथे येण्याचा मार्ग सुकर केला आहे याविषयी खंत बाळगली पाहिजे. जातिभेदांनी ग्रस्त असणाऱ्या हिंदू समाजाची सामाजिक गुलामगिरी ही राष्ट्रीय अध:पतनाला व ऱ्हासाला जबाबदार असल्याबद्दल त्यांची खात्री झाली होती. राष्ट्राचे ऐक्य आणि प्रगती साधायची असेल तर देशात सामाजिक सुधारणा झाल्या पाहिजेत याविषयी ते ठाम होते. बुद्धिवादाच्या व समतेच्या पायावर तत्कालीन समाजरचनेत संपूर्ण बदल घडवून आणला पाहिजे असे दादोबा पांडुरंग यांचे मत होते. १८४३ मध्ये त्यांनी *धर्मविवेचन* नावाचे पुस्तक लिहिले व त्याद्वारे त्यांनी धार्मिक व सामाजिक वैश्विकतेचे प्रतिपादन करणारी सात तत्त्वे सांगितली. १) ईश्वर एक आहे, २) प्रेम व सचारित्र्य यावर आधारित ईश्वरभक्ती हाच धर्म, ३) सर्व मानव जातीचा आध्यात्मिक धर्म एक, ४) प्रत्येक व्यक्तीस विचारस्वातंत्र्य हवे, ५) आपले दैनंदिन कामकाज बुद्धिवादाशी सुसंगत हवे, ६) सर्व मानवजात हीच एक जात; व्यक्तीचे समाजातील स्थान गुणांवर ठरवायला हवे जन्मावर नाही. ७) योग्य प्रकारचे ज्ञान सर्वांना दिले जावे ही तत्त्वे दादोबांचा धर्म मूलत: निधर्मी स्वरूपाचा आहे हे स्पष्ट करतात. दादोबांच्या सामाजिक, धार्मिक तत्त्वज्ञानाचा केंद्रबिंदू ईश्वरावरील विश्वास हा होता. आपले धार्मिक व सामाजिक तत्त्वज्ञान कृतीत उतरवण्याच्या दृष्टीने दादोबांनी पश्चिम भारतात सुरतची 'मानवधर्म' सभा (१८४४), आणि मुंबईची 'परमहंस'सभा (१८४७) या संस्था स्थापन केल्या. आपल्या धर्मसुधारणेच्या कार्यासाठी त्यांनी धर्मविवेचनातील तत्त्वे स्वीकारली.

बाळशास्त्री जांभेकर, भाऊ महाजन, लोकहितवादी, जोतीराव फुले, न्यायमूर्ती रानडेप्रभृतींनी सुरू केलेला सामाजिक सुधारणेचा उपक्रम अधिकाधिक विकसित होत असतानाच राष्ट्रवादी विचारसरणीचा उदयही एकीकडे होऊ लागला होता. इंग्रजी राज्य हे ईश्वरी वरदान आहे असे वाटणाऱ्या लोकहितवादी रानडे मंडळींनाही इंग्रजांची राजवट हिंदुस्थानातील संपत्तीची लूट करीत आहे आणि स्वत:ची तिजोरी भरण्याचे वेगवेगळे उपाय योजत आहेत हे समजत होते. इंग्लंडात इंग्रजांचा राज्यकारभार लोकशाही पद्धतीने चालला असला तरी ठिकठिकाणी आपल्या वसाहती निर्माण करणे व अनिर्बंधपणे त्यांचा कारभार पाहाणे ही प्रवृत्ती मुळातच त्यांच्या ठिकाणी होती याची जाणीव या विचारवंतांना सतत टोचणी लावत होती. ब्रिटिशांच्या शिस्तबद्ध कायदेशीर राज्यसत्तेचे कौतुक व ब्रिटिश संस्कृतीतील उदारमतवादी मूल्यांचा उदोउदो आरंभीची काही वर्षे होत राहिला असला तरी हळूहळू आपल्या दु:स्थितीचा सखोल विचार करताना आपला प्राचीन भूतकाळ व दोनअडीचशे वर्षांपूर्वीपर्यंतचा इतिहास पुरेसा वैभवशाली होता याही सत्याचे स्मरण इथल्या काही विचारवंतांना होऊ लागले होते. *आमच्या देशाची स्थिती* हा विष्णुशास्त्री चिपळूणकर यांनी लिहिलेला निबंध आपल्या गतवैभवाची आठवण करून देणारा होता. पेशवाईतल्या दुर्दिनांची समाप्ती झाली असली तरीही तथाकथित राजकीय शांततेच्या छायेत सामान्य जनता दारिद्र्य व दैन्य यांचाच सामना करीत होती. उच्चशिक्षित भारतीयांना पात्रता असूनही सत्ताश्रेणीत सर्वोच्च स्थान लाभू शकत नव्हते. दुष्काळासारख्या वा रोगराईसारख्या नैसर्गिक आपत्तींचा सामना करताना इथल्या प्रजेचे कंबरडे मोडतच होते. ही सगळी परिस्थिती विचारात घेता समाजसुधारणा व्हायच्या तेव्हा होत राहतील आधी आपली स्वत:ची सत्ता येथे उत्पन्न व्हावयास हवी असा विचारप्रवाह जोर धरू लागला.

आधुनिक पाश्चात्त्य संस्कृतीच्या प्रभावाखाली असणारा बुद्धिवादी वर्ग भारताच्या धार्मिक, सामाजिक व सांस्कृतिक परंपरेवर या अवनतीची जबाबदारी टाकत होता. चातुर्वर्ण्य, जातिभेद, व अंध:श्रद्धा यांचा संपूर्ण नायनाट झाल्यावाचून हा देश जबाबदार राज्ययंत्रणेस सक्षम होणार नाही; तेव्हा नुसते ब्रिटिश राज्यकर्ते व त्यांचे कायदेकानू सद्य:स्थितीस जबाबदार धरण्याने काही साधणार नाही त्यासाठी आत्मसंशोधन करून स्वत:त बदल करण्याची तयारी ठेवावयास हवी अशी एक प्रधान विचारधारा या काळात जोर धरून होती. राजा राममोहन रॉय, जोतीराव फुले, सर रामकृष्ण भांडारकर, गोपाळ कृष्ण गोखले इत्यादिकांचा या विचारधारेत समावेश होता. राजकीय सुधारणांइतक्याच सामाजिक सुधारणा महत्त्वाच्या आहेत किंबहुना त्याच आधी व्हावयास हव्यात असा पक्ष घेणारे गोपाळ गणेश आगरकर व त्यांचे अल्पसंख्य अनुयायी यांचे विचारही या काळात बळकट होते. राजकीय स्वातंत्र्य मिळवण्यासाठी सशस्त्र क्रांतीचा मार्ग अवलंबिला पाहिजे अशी कडवी भूमिका घेऊन भगतसिंग, राजगुरू, सावरकरादी क्रांतिकारक प्रयत्नशील होते. सुभाषचंद्र बोसांची 'आझाद हिंद सेना' हा या दिशेने झालेला सर्वात मोठा व व्यापक प्रयत्न म्हणता येईल. परंतु हा मार्ग बहुसंख्य देशवासीयांना आपलासा वाटण्याची शक्यता नव्हती. देशस्वातंत्र्याविषयीची ओढ व ब्रिटिश राजसत्तेविषयीचा क्रोध ज्या बऱ्याच मंडळींच्या मनात धगधगत होता त्यांचा अग्रक्रम आधी सामाजिक की आधी राजकीय या वादात नि:संदिग्धपणे राजकीय राजकीय स्वातंत्र्याचा होता. लोकमान्य बाळ गंगाधर टिळक हे राजकीय स्वातंत्र्याची मागणी करणाऱ्यांचे अध्वर्यू म्हणता येतील. महाविद्यालयीन शिक्षण घेत असतानाच नि:स्वार्थ बुद्धीने आपले आयुष्य देशकार्यासाठी खर्ची घालावयाचे असा त्यांचा (व आगरकरांचादेखील) निर्णय झाला होता. शिक्षण संपताच त्यांच्या जीवनाची वाटचाल त्या दिशेने सुरू झाली.

## ललित साहित्याची निर्मिती

एल्फिन्स्टन-मेकॉले यांच्या धोरणानुसार इंग्रजी शिक्षणाला सुरुवात झाली, १८५७ मध्ये मुंबई विद्यापीठाची स्थापना झाली आणि ब्रिटिश विद्यापीठांकडून अभ्यासविषय होण्यापूर्वीच इंग्लिश वाङ्मयाचा अभ्यास येथील विद्यापीठात सुरू झाला. त्यामुळे इंग्रजी साहित्यावर इथल्या वाचकांची वाङ्मयाभिरुची जोपासली जाऊ लागली. फ्रान्सीस टर्नर पार्लग्रेव याची *गोल्डन ट्रेझरी* मे १८६१ मध्ये प्रथम प्रकाशित झाली. या पुस्तकाने तत्कालीन मराठी कवींवर व काव्यरसिकांवर विलक्षण मोहिनी घातली होती. ज्याप्रमाणे वृत्तपत्रांतील लेखनामधून निबंध हा साहित्यप्रकार मराठीत विकसित होत गेला त्याप्रमाणे इंग्लिश भाषेच्या संपर्कात आल्यानंतर एकंदर साहित्यप्रांतातच नवेपणाचे वेगळे वारे वाहू लागले. मराठीत कथात्म वाङ्मय होते अगदी दृष्टांतपाठापासून किंवा त्याच्याही मागे जाऊन बोलायचे तर उपनिषदातल्या लहानलहान कथांपासून येथे कथासाहित्य होते. रामायण, महाभारत, भागवतादी ग्रंथांमधून लहानलहान गोष्टींपासून दीर्घ पल्ल्याच्या मोठ्या कथा वाचकांना सुपरिचित होत्या. पंडित कवींनी आख्यानकाव्यांच्या रूपाने मोठाले कथाभाग रंगवून सागंण्याची प्रथा पाडली होती. परंतु हे सर्व काही पद्यात होते. अव्वल इंग्रजी काळापासून गद्यभाषेची ताकद लेखकांना नव्याने जाणवली आणि तुलनेने पद्यलेखन करण्यापेक्षा गद्यलेखन करणे सोपे असल्यामुळे लेखकांच्या संख्येतही लक्षणीय वाढ झाली. गद्यलेखनाचे माध्यम नव्या लेखनप्रयोगांसाठी अनुकूल ठरले. साहजिकच इंग्लिश भाषेत असणारे कथा-कादंबरी, चरित्र-आत्मचरित्र इत्यादी निवेदनपर लेखनप्रकार मराठीत आणावेत अशी इच्छा लेखकांच्या मनात प्रबळ होऊन कथाकादंबऱ्यांच्या रूपाने तिचा आविष्कार घडू लागला. ज्या काळात इंग्लिश साहित्याच्या मराठी भाषांतरांवर अधिक भर होता त्या काळात कृष्णशास्त्री चिपळूणकरांनी रासेलस या कादंबरीचे मराठी रूपांतर प्रसिद्ध केले. *अरबी भाषेतील सुरस व चमत्कारिक गोष्टी* त्यांनी प्रसिद्ध केल्या होत्याच. या दोन्ही भाषांतरांना लोकप्रियताही मिळाली होती. अशा प्रकारच्या कथात्म साहित्याच्या निर्मितीची प्रेरणा मराठी साहित्यिकांना यामुळेच लाभली. *यमुनापर्यटन* या कादंबरीमधून हिंदू धर्माच्यायोगे स्त्रियांच्या होणाऱ्या हालअपेष्टा व ख्रिस्ती धर्माच्या स्वीकारामुळे होणारे लाभ अशी द्वंद्वात्मक मांडणी करून पदमनजींनी पक्षपाती वृत्तीने कादंबरी उभी केली. याचा अर्थ असा की, सामाजिक समस्यांना कथात्म साहित्याच्या रूपाने शब्दांत मूर्त करता येते असा एक विश्वास लेखकांत हळूहळू निर्माण झाला. मराठीतील सामाजिक कादंबरीचा मार्ग त्यामुळे मोकळा झाला.

पेशवाईच्या काळात सुस्थित असणाऱ्या समाजघटकांना करमणुकीची व मनोरंजनाची सवय लागली होती. प्रमुख शाहिरांच्या मृत्यूनंतर शाहिरी वाङ्मय, लोकनाट्य, लोकनृत्य, लावण्या व लावण्यांच्या तालावरचे नाच ओहोटले होते. असे झाले असले तरी तत्कालीन व्यक्तींची शृंगाराची, अद्‌भुतरम्यतेची ओढ कमी झालेली नव्हती. स्वराज्य नष्ट झाल्यामुळे पराक्रमाला अवकाश उरला नव्हता. सर्वत्र शांतता प्रस्थापिता झाल्यामुळे त्या काळातील सुखवस्तु लोकांना संसारात नाहीसा झालेला अद्‌भुतपण कादंबऱ्यांत तरी अनुभवावा, असे वाटू लागले होते. त्यामुळे कल्पनारम्य व अद्‌भुतरम्य कादंबऱ्यांची निर्मिती घडू लागली. लक्ष्मणशास्त्री हळबे यांच्या *मुक्तामाला* या कादंबरीने मराठीत अशा प्रकारच्या लेखनाचा पायंडा पाडला.

**अव्वल इंग्रजी कालखंडातील कथात्म साहित्य**

१८०० ते १८७४ या कालखंडातील सर्व वाङ्मय ही परिस्थितिसापेक्ष निर्मिती आहे. राज्यकर्त्यांचे शैक्षणिक धोरण, इंग्लिश साहित्यकृतींचा मराठी रचनांवर पडणारा प्रभाव, नवशिक्षितांची अनुकरणशीलता व सर्वसामान्य वाचकांची रंजननिष्ठ मानसिकता या घटकांचा परिणाम अव्वल इंग्रजी काळातील साहित्यनिर्मितीवर झाला आहे.

अव्वल इंग्रजी कालखंडातील कथात्म साहित्य दोन प्रकारचे आहे. एक, नीतिशिक्षणास उपयुक्त ठरतील अशा बोधकथा आणि दोन, शृंगारकथा.तंजावर येथील सर्फोजी राजे यांनी सक्खन पंडिताकरवी १८०६ साली केलेल्या 'बालबोध-मुक्तावली' या इसापनीतीच्या भाषांतराने अर्वाचीन मराठीतील कथारचनेची सुरुवात झाली. मागे उल्लेखिल्याप्रमाणे *सिंव्हासनबत्तिशी* * (१८२४), *पंचतंत्र* (१८१५), *हितोपदेश* (१८१५) व *राजा प्रतापादित्याचे चरित्र* (१८१६) हे कथात्म साहित्य वैजनाथपंडित या शास्त्रीबुवांनी तयार केले व ते सेरामपूरच्या मिशनच्या छापखान्यात छापून प्रसिद्ध करण्यात आले. एल्फिन्स्टनच्या शैक्षणिक धोरणानुसार धार्मिक शिक्षणाऐवजी नीतिशिक्षणावर भर असल्यामुळे बोधपर कथावाङ्मय प्रकाशित झाले. सदाशिव काशिनाथ ऊर्फ बापू छत्रे यांनी *बोधकथा* (१८२५/ १८२६?, आ. दुसरी, १८३१) नावाचे पुस्तक ताराचंद दत्त यांच्या *प्लिझिंग टेल्स* या पुस्तकाचे भाषांतर या स्वरूपात सिद्ध केले. *बोधकथा* या पुस्तकाचा दुसरा भाग नीतिकथा या नावे प्रथम १८३१ मध्ये बाळशास्त्री जांभेकर यांनी तयार केला. *बोधकथा*खेरीज बापू छत्रे यांनी लिहिलेल्या *इसाप नीतिकथा* (१८२८), *बाळमित्र* भाग १ (१८२८) व *वेताळ पंचविशी* (१८३०) या तीन संग्रहांना त्या काळात विशेष मान्यता होती. बर्किन्सच्या *चिल्ड्रन्स फ्रेंड* या मूळ फ्रेंच ग्रंथाच्या इंग्रजीवरून सरकारी विद्याखात्याने त्याचे दोन भागात रूपांतर करून घेतले त्यांपैकी पहिला भाग छत्रे यांच्या नावावर तर दुसरा भाग गेस्फर्ड याच्या नावावर आहे. हरि केशवजी यांचे *यात्रिक-क्रमण* (१८४१) म्हणजे जॉन बन्यनच्या *पिलग्रिम्स प्रोग्रेस* या धार्मिक रूपककथेचे भाषांतर होय. त्यांनीच 'चेम्बर्सच्या मॉरल क्लास-बुक'चे *नीतिग्रंथ* (१८४६) नामक भाषांतर केले. उपदेशपर व नीतिपर अशा पुस्तकांत उल्लेखनीय म्हणून विष्णुशास्त्री बापट यांची *नीतिदर्पण* (दु.आ. १८३७) आणि *बालोपदेश कथा* (दु.आ. १८३८) यांचा नामनिर्देश करता येईल. 'मिसेस फरार' या बाईंनी ख्रिस्ती धर्मप्रसारार्थ लिहिलेले *यात्रेकऱ्याचा वृत्तांत* (१८३८) हे पुस्तक धार्मिक बाबतीत ढवळाढवळ न करण्याचा तत्कालीन राजसत्तेचा नियम मोडणारे आहे. तथापि ते काही काळ वापरात होते. जेम्स फॅरिश नामक सरकारी अधिकाऱ्याने लिहवून घेतलेली *वाटसराची गोष्ट*(राघो नारायण देवळे : १८३८) व *जागती जोत* (रामचंद्र अनंत दुगल : १८३८) ही दोन पुस्तके तत्कालीन शाळांमधून वापरली जात.

मराठीतील शृंगारकथेचा आरंभ डॉ. रामजी गणोजी (१८१४-१८६२) यांच्या *स्त्रीचरित्र* (१८५४) या ग्रंथाने होतो. रामजी गणोजी हे एकेकाळी सिंद-हैदराबाद येथील राजाच्या तैनातीत होते. सैन्यातील डॉक्टरांच्या हाताखाली काम करताना त्यांनीही औषधोपचाराची विद्या संपादन केली. नोकरी संपल्यानंतर मुंबईस स्वतःचा शिळाछाप छापखाना

---

* हे पुस्तक १८१४ मध्ये सेरामपूर येथे मोडी लिपीत छापले गेले होते. १८२४ मध्ये हे शालेय पुस्तक देवनागरीमध्ये छापले असून या पुस्तकाच्या पहिल्या आवृत्तीला जोडलेल्या शुद्धिपत्रात यकाराऐवजी अकार वापरला आहे. उदा. येके, येक याऐवजी एके, एक अशी दुरुस्ती केली आहे.

काढून त्यांनी स्वत:चे ग्रंथ प्रसिद्ध केले. *स्त्रीचरित्रा*चे एकंदर चार भाग असून त्यांची पृष्ठसंख्या १२०० पेक्षा अधिक आहे. (चौथा भाग १८८७ मध्ये पहिल्यांदा प्रसिद्ध झाला.)

कृष्णशास्त्री चिपळूणकर यांनी भाषांतरित केलेला अरबी भाषेतील सुरस व चमत्कारिक गोष्टी (१८६१-१८६५) हा संग्रह, कृष्णराव माधवराव प्रभू यांनी सात भागात अनुवादिलेले *हातिमताई चरित्र* (१८५४-५५) वि. ना. भागवत यांनी इंग्रजीवरून भाषांतरित केलेली *दुर्दैवी मुराद व दैववान सलाउदीन* ही गोष्ट, *बाहारदानीष* भाग १-२ (१८६६-६७) हा नारो अप्पाजी गोडबोले यांनी प्रकाशित केलेला कथासंग्रह, डेविड हाईम याने रूपांतरित केलेली 'गुल व सनोवर' (१८६९), वि. स. नवलकरकृत *गुलबकावली* (१८७३) आणि गो. भि. पटवर्धन यांची *गलिस्तां* (१८८४) या अरबी, फारसी वळणाच्या कथांचा गट शृंगारापेक्षा अद्‌भुताकडे व कल्पनारम्यतेकडे अधिक झुकणारा आहे. बोकॅशिओच्या शृंगारिक कथांपैकी त्यातल्यात्यात कमी शृंगारिक अशा गोष्टी निवडून रावजी वासुदेव साठे यांनी *रसिकप्रिया अथवा डिकॅमेरॉन* (१८७९) हा संग्रह अनुवादित केला आहे.

१८०० ते १८७४ या कालखंडात ऐतिहासिक कथाकादंबऱ्यांचीही निर्मिती झालेली आढळते. *घाशीराम कोतवाल* (१८६३) हा मोरोबा कान्होबा विजयकर (१८१३-७१) यांनी लिहिलेला कालानुक्रमे पहिला ऐतिहासिक कथासंग्रह होय. जरी कादंबरी या वर्गात या पुस्तकाचा उल्लेख होत असला तरी त्याचे स्वरूप उपयुक्त माहितीपर पुस्तकाचे आहे. रा. भि. गुंजीकर (१८४३-१९०१) यांची *मोचनगड* (१८७१) ही कादंबरी ऐतिहासिकता व अद्‌भुतरम्यता यांच्या मिश्रणातून सिद्ध झाली आहे. याच प्रकारात मोडणाऱ्या *हंबीरराव व पुतळीबाई* (विष्णू जनार्दन पटवर्धन : १८७३), *शिक्षक* (द्वा. ना. रणदिवे : १८८३), *शिलादित्य* (शंकर मोरो रानडे : १८७९-१८८४) या कादंबऱ्या उल्लेखनीय होत.

*मुक्तामाला* (१८६१) आणि *रत्नप्रभा* (१८६६) या लक्ष्मणशास्त्री हळबे (१८३१-१९०५) यांच्या कादंबऱ्यांनी मराठीतील अद्‌भुतरम्य कादंबऱ्यांना सुरुवात केली. नारो सदाशिव रिसबुड यांची *मंजुघोषा* (१८६६), *विश्वासराव* (१८७०), केशव लक्ष्मण जोरवेकर यांची *विचित्रपुरी* (१८७०), जनार्दन सखाराम जोशी आणि दामोदर बापुजी नाईक यांची *सुवर्णमालिनी* (१८७४) या कादंबऱ्या मुक्तामाला-वळणाच्या आहेत. *चंद्रप्रभाविरहवर्णन* (१८७३) या साळूबाई भ्र. भाऊसाहेब तांबवेकर या लेखिकेच्या कादंबरीत अद्‌भुतरम्य शृंगारकथेचा बाज व्यक्त झाला आहे. शृंगारलेखनात साळुबाईंनी पुरुषलेखकाइतकाच मोकळेपणा दाखविला आहे.

बाबा पदमनजी यांची *यमुनापर्यटन* (१८५७) ही मराठीतील पहिली स्वतंत्र कादंबरी. १८५४ साली ख्रिस्ती धर्माचा स्वीकार केल्यानंतर लेखकाने लिहिलेली ही कादंबरी आहे. कादंबरीची नायिका यमुना, तिचा विनायक नावाच्या पुरुषाशी झालेला विवाह, एका अपघातात विनायकाचा झालेला अंत, मरतेसमयी यमुनेने विनायकाला दिलेला बाप्तिस्मा, पुढे यमुनेने शीलवान ख्रिस्ती गृहस्थाशी केलेला पुनर्विवाह अशा घटनाप्रसंगांवर आधारलेली कादंबरी विधवांच्या व धर्मांतराच्या प्रश्नांची सांधेजोड करून पदमनजी यांनी लिहिली आहे. त्यामुळेच तिला ख्रिस्ती प्रचाराचे स्वरूप आले आहे. मात्र प्रचारकी असली तरी या कादंबरीचे कथानक वास्तवदर्शी आहे. विधवादु:स्थितिकथनाचा हेतुपूर्वक केलेला हा प्रयत्न त्या काळी दादोबा पांडुरंग यांनी उचलून धरला होता.

या कालखंडात जे कथात्म साहित्य निर्माण झाले त्यामधून लेखकांनी कथा व कादंबरी यांच्या स्वरूपाची अर्थपूर्ण जाणीव व्यक्त केलेली आढळत नाही. गोष्ट किंवा कथाभाग निवेदन करणे हेच सूत्र प्रामुख्याने यामधून प्रकटलेले दिसते.

**अद्‌भुत कादंबऱ्या**

दादोबांच्या भाषेत सांगावयाचे म्हणजे ''त्या काळी रावबाजीच्या उत्तेजनाने पुणे शहरात व त्या शहराचा वारा लागून जेथे तेथे शिमग्याचे चांदणे वाढत चालले होते. दिवसास ब्राह्मणभोजनाचा थाट आणि रात्री दिव्यात वात पडली नाही तो मंदिरात चवघडे, सणया यांचा मंजुळ घोष; श्रीमंतांच्या व सरदार लोकांच्या वाड्यांत सरकारी ताफ्यांचे

मुजरे; रात्री रस्त्यात आणि बोळात फिरणाऱ्या विलासी लोकांची मने आपणाकडे ओढून घेणारे, चिमणी, साळू, मैना यांच्या मंजूळ कंठात होनाजी बाळाने नुकतेच घातलेले खडे सूर; आणि फौजेकडील शिलेदार, बारगीर, शिपाई आणि शहरांतील सुखवस्तू शिंपी, माळी, सराफ, दुकानदार यांस रिझवण्याकरिता बहिरु, मल्हारी, धोंडू, बापू, सगनभाऊ आणि रामा गोंधळी यांनी सजविलेली डफतुणतुण्यांचे तमाशे आणि कलगीतुऱ्यांची भांडणे; हे सर्व थाट रावबाजीच्या उल्लसित मनोवृत्तीच्या प्रेरणेने पुणे शहरात जेथे तेथे गाजून राहिले होते. मग 'यथा राजा तथा प्रजा' या न्यायाने त्या प्रेरणेचा अंमल सर्व पेशवाईत पसरला नसेल असे संभवत नाही. त्या काळी सर्व गुणीजनांचे आशेने भरलेले डोळे पुणे शहराकडे लागून, त्या शहराने जो कित्ता घातला होता, त्याची नक्कल जेथे तेथे होऊन कित्येक ठिकाणी त्या नकलेवर ताण करणारे उमेदवारही निपजू लागले होते.'' (कुळकर्णी, वि. ह., १९३५, पृ. ७२) अद्‌भुत कादंबऱ्यांच्या सुरुवातीच्या काळात जरी पेशवाई नामशेष झाली होती तरी तिचे थोडेबहुत वैभव व रावबाजीच्या वेळची लोकांची मनोवृत्ती ही मात्र शिल्लक उरली होती. त्या विशिष्ट मनोरचनेला 'मुक्तामाला', 'मंजु-घोषा' इत्यादी कादंबऱ्यांनी चांगले खाद्य पुरविले. त्या वेळचे मराठे संस्थानिक, जहागिरदार, इनामदार व सावकार यांजकडून अशा तऱ्हेच्या कादंबऱ्यांना मागणी असे; व मागणीप्रमाणे पुरवठाही होत असे. वाईचे लक्ष्मणशास्त्री हळबे यांस ह्या कादंबऱ्यांबद्दल खंडेराव गायकवाड ह्यांजकडून वर्षासन चालू होते ही गोष्ट लक्षात ठेवण्यासारखी आहे!

*रत्नप्रभा* (१८६६), *मंजुघोषा* (१८६८), *वसंतमाला* (१८६८), *विश्वासराव* (१८७०), *विचित्रपुरी* (१८७०), *पुष्पमाला* (१८७२), *विदग्धस्त्रीचरित्र* (१८७२), *मधुसूदन व रूपसुंदरी* (१८७२), *वसंतकोकिला* (१८७६), *कस्तूरिका व दीपसेन* (१८७६), *मित्रचंद्र* (१८८०?), व *विचित्रपुरी, किरात, विलासिनी, प्रभव-मालिनी आणि कलावती, चंद्रकला, चंपकमाला, हिरालाल* इत्यादी याच धर्तीच्या अनेक कादंबऱ्या रिसबूड, जोरवेकर, पारखी आदिकरून मंडळींनी लिहिल्या. ''आतांशी नावलांची कीड फार झाली आहे. लहान मुलेबाळेदेखील नावले लिहून पैसे मिळवू लागली आहेत,'' असे मार्मिक निरीक्षण का. बा. मराठे यांनी नोंदविले आहे.

''सांप्रत जी नावले विकत आहेत त्यात जेवढे पुरुष तेवढे मदनाचे पुतळे, जेवढ्या स्त्रिया तेवढ्या तिलोत्तमा; प्रत्येक शोकस्थली मरणासारखा शोक व आनंदस्थली स्वर्गासारखा आनंद, दुसरी उपमाच नाही. नवराबायकोचे भाषण म्हणजे प्रेमाचा लोट! त्यात अभिप्राय, गूढ किंवा गांभीर्य ही बिलकुल नाहीत.'' समकालीन कादंबऱ्यांवर का. बा. मराठे यांनी केलेली ही टीका यथार्थ आहे. लोकप्रिय मराठी कादंबरीतील नायकनायिकांची व्यक्तिरेखाटने व कथानकाचे सोपे सुटसुटीत रूप हे कादंबरीच्या इतिहासात आरंभकालापासून आजतागायत याच प्रकारचे आहे याची जाणीव का. बा. मराठे यांच्या वरील टीकेवरून ध्यानात येते. कादंबऱ्या पुरुषलेखकांच्या असोत, वा स्त्रीलेखकांच्या असोत उपर्युक्त स्वरूपाची स्त्रीपुरुषांची योजना करण्याचा कल मराठी कादंबरीत सर्वकाळ तसाच कायम आहे. प्रस्तुत प्रस्तावनेच्या अखेरच्या भागात लोकप्रिय साहित्याविषयी जे विवेचन आले आहे त्यातही या विशेषाचा निर्देश आढळेल. ह्या सुरुवातीच्या स्वतंत्र कथात्म वाङ्मयाच्या काळातील कादंबऱ्यांत आजच्या दृष्टीला कितीही दोष आढळून आले तरी त्यांनी केलेली मराठी भाषेची सेवा बहुमोल आहे, हे विसरून चालणार नाही. ह्या काळातील कादंबऱ्यांनीच लोकांस वाचनाची सवय लावून कथात्म वाङ्मय लोकप्रिय केले.

१८७५-१८९० या कालावधीत लोकजीवनात धार्मिक, सामाजिक व राष्ट्रीय विचारांचा ऊहापोह होऊन युयुत्सू वृत्तीने वेगवेगळ्या प्रकारचे वाद सुरू झाले होते. 'मुंबई विवाहोत्तेजक मंडळ' (१८६५), 'मुंबई प्रार्थनासमाज' (१८६७), 'मुंबई वक्तृत्वोत्तेजक सभा' (१८६७), 'डेक्कन कॉलेज' (१८६८), 'वक्तृत्वोत्तेजक सभा' पुणे (१८७१), 'सत्यशोधक समाज' (१८७३), 'सार्वजनिक सभा पुणे' (१८७३), 'निबंधमाला' (१८७४), 'थिऑसॉफिकल सोसायटी' मुंबई (१८७५), 'वसंत व्याख्यानमाला' पुणे (१८७५), 'अनाथ बालकाश्रम' पंढरपूर (१८७५), 'आर्यसमाज' मुंबई (१८७५), 'मराठी साहित्य संमेलन' पुणे (१८७८) इत्यादी संस्था कार्यरत झाल्या होत्या आणि त्यांना समाजात प्रतिष्ठेचे स्थान लाभले होते. मुद्रणाचा प्रसार झालेला असल्यामुळे वर्तमानपत्रे व मासिके यांचा प्रसार वाढला होता. *निबंधमाला* (१८७४), *कथाकल्पतरू* (१८७५), *अबलामित्र*-अलिबाग (१८७६), *वेदार्थ-यत्न*

(१८७६), *दीनबंधू* पुणे (१८७७), *काव्येतिहाससंग्रह* (१८७८), *केसरी-मराठा* (१८८१), *निबंधचंद्रिका* रत्नागिरी (१८८२), *केरळकोकिळ* (१८८७), *सुधारक* (१८८८) इत्यादी नियतकालिकांतून वैचारिक मतमतांतरे प्रकट होऊ लागली होती. या वैचारिक मतप्रकटनात इंग्रज सरकारच्या वेगवेगळ्या धोरणांचा व राज्यकारभारपद्धतीचाही समाचार घेतला जाऊ लागला होता. त्यामुळेच १८७८ साली सरकारने वर्तमानपत्रांवर कडक निर्बंध लादणारा कायदा पास केला. समकालीन राजकीय परिस्थितीप्रमाणेच सामाजिक व धार्मिक सुधारणांच्या संदर्भातही जनमानसातील वातावरण तापू लागले होते. या वैचारिक कलहाचे परिणाम मराठी कादंबरी व नाटक या लेखनप्रकारांवर होणे स्वाभाविक होते. श्रीमंत, खुशालचेंडू, निष्क्रिय वाचकांना सुखविणाऱ्या रंजनप्रधान कादंबऱ्यांप्रमाणे समकालीन जीवनवास्तवातील अपप्रवृत्तींचे दर्शन घडविणाऱ्या व त्यात परिवर्तनाची अपेक्षा जागृत करणाऱ्या कादंबऱ्यांची निर्मितीही होऊ लागली. तिचे नेतृत्व हरिभाऊंच्या कादंबऱ्यांमधून केले जाऊ लागले.

आत्मपरीक्षणाचा व आत्मनिंदेचा जोर ओसरून समकालीन समाजात आपल्या पूर्ववैभवाची जाणीव करून देणारे लेखनही नियतकालिकांतून विशेषत: विष्णुशास्त्री चिपळूणकरांच्या निबंधमालेतून प्रसिद्ध होऊ लागले. 'पूर्व दिव्य ज्यांचे त्यांना रम्य भावि काल' हा विचार देशबांधवांच्या मनात रुजवून त्यांना स्वातंत्र्यभावनेने कार्यप्रेरित करण्याचा प्रयत्न सुरू झाला. १८७८ मध्ये क*ाव्येतिहाससंग्रहा*चा जन्म होऊन इतिहाससंशोधनाचा ठसठशीत आरंभ झाला. याच सुमारास महादेव गोविंद रानडे यांच्या प्रेरणेने व साहाय्याने पेशवे दप्तरातील कागदपत्रे प्रसिद्ध करण्याची सुरुवात झाली. डेक्कन व्हर्नाक्युलर ट्रान्सलेशन सोसायटी यांच्या वतीने रावबहादूर दत्तात्रय बळवंत पारसनीस या कामाकडे वळले. इंग्रज सरकारने पेशवे दप्तरातील इतिहासोपयोगी माहिती निवडण्यासाठी रावबहादूर गणेश चिमणाजी वाड यांची नेमणूक केली होती. खुद्द रानडे यांचे पूर्वकालीन मराठ्यांच्या इतिहासाविषयीचे विचार प्रेरणादायीच होते. पुढील काळात विश्वनाथ काशिनाथ राजवाडे यांनी परिश्रमपूर्वक 'मराठ्यांच्या इतिहासाची साधने' प्रसिद्ध करावयास सुरुवात केली. या सगळ्या धडपडीचा एक परिणाम मराठी इतिहासासंबंधी कथात्म स्वरूपात लेखन करण्याची प्रेरणा मिळण्यात झाला. इतिहासकाळातील नेत्रदीपक व्यक्ती, घटना, प्रसंग व वातावरण यांविषयीच्या उत्कट आस्थेमुळे व अभिमानामुळे, तशाच प्रकारचे कार्य करण्याच्या तळमळीने ज्यांची मने भारलेली असतात, अशा व्यक्ती ऐतिहासिक कादंबरीचा चाहता असतो.

प्रस्तुत कालखंडात अद्‌भुतरम्य कादंबरीविषयीचे वेड वाचकांना होतेच. ऐतिहासिक वास्तव व अद्‌भुत यांची सांगड घालून ऐतिहासिक कादंबरी हा प्रकार मराठीत रूढ झाला. इंग्रजी शिक्षणाच्या प्रसारामुळे इंग्लिश भाषेतील कादंबऱ्यांचे वाचन सुरू झाले होते. त्यापैकी रेनॉल्ड्स व स्कॉट यांच्या कादंबऱ्यांचे नमुने मराठी लेखकांना आकर्षक वाटले. रा. भि. गुंजीकर यांची *मोचनगड* (१८७१) ही मराठीतील पहिली स्वतंत्र ऐतिहासिक कादंबरी वरील परिस्थितीचे अपत्य म्हणावे अशी आहे. नागेश विनायक बापट यांनी लोकमानसात उत्पन्न झालेली इतिहासाची आवड लक्षात घेऊन 'चरित्रविषयक कुतूहलाची व कादंबरीतील कल्पकतेची सांगड घालून' *श्रीमंत बाजीराव बल्लाळ ऊर्फ पहिले बाजीरावसाहेब पेशवे* (१८७९), *छत्रपति संभाजी* (१८७९), *चितुरगडचा वेढा* (१८८८) व *पानीपतची मोहिम* (१८९७) या ऐतिहासिक कादंबऱ्या लिहिल्या. विष्णू जनार्दन पटवर्धन यांनी गुंजीकरांच्या पद्धतीने कल्पित पात्रांच्या मध्यवर्ती कल्पनेवर उभारलेली *१८५७ सालचे बंडाची धामधूम किंवा 'हंबीरराव व पुतळाबाई* (१८७३) व बाजीरावाच्या कालावर आधारित *जुनावाडा* (१८८९) या कादंबऱ्या लिहिल्या. सामाजिक कथा व राजकीय घटना यांचे मिश्रण करून *सुशील यमुना अथवा वासुदेव बळवंत फडके यांची बंडाची धामधूम* (१८८७) ही कादंबरी बळवंत मनोहर पंडित यांनी लिहिली. स्वतंत्र ऐतिहासिक कादंबऱ्यांप्रमाणेच ऐतिहासिक कादंबऱ्यांची भाषांतरेही या कालखंडात बरीच झाली. वझे यांची *लालन बैरागीण, बर्वे यांची ठगाची जबानी* (१८८८), गोडबोले यांची *अनाथ पांडुरंग* या सर्व कादंबऱ्या भाषांतरित असल्या तरी त्यांची कथानके एतद्देशीय आहेत. या कालात 'इव्हॅनो' सारख्या परदेशविषयक ऐतिहासिक कादंबऱ्यांची भाषांतरेही पुष्कळ झाली आहेत. निव्वळ नाटककादंबऱ्यांना वाहिलेली अशी मासिके या काळात बरीच निघाली होती. *ऐतिहासिक नाटकमाला* (१८८०), *ऐतिहासिक नाट्यकथावली* (१८८४), *कादंबरी-कलाप-मासिक*

(१८८४) वगैरे मासिके कथात्मक वाङ्मय प्रसिद्ध करण्याचे कारखानेच होते, असे म्हणावयास हरकत नाही. मराठीत लोकप्रिय कथात्म साहित्याची निर्मिती आरंभकालापासून होत होती आणि अशा निर्मितीस तत्कालीन परिचित–अपरिचित मासिके साहाय्यभूत ठरत होती हा इतिहास लक्षात घेण्याजोगा आहे. रंजनाची प्रेरणा व करमणुकीची गरज सर्वसामान्य माणसाला सर्वकाळ असते या सत्याचे आविष्करण अशा तपशिलातून होते.

**वास्तववादी कादंबरी व ऐतिहासिक कादंबरी**

मराठी कादंबरीच्या इतिहासात सर्वात प्रभावी ठरलेला संप्रदाय वास्तववादी कादंबरीचा आहे. अद्भुत व ऐतिहासिक वातावरणात काही काळ चित्त रममाण झाले असले तरी प्रखर दैनंदिन जीवनवास्तवातील साक्षात संघर्ष व कल्पनेने रंगविलेला भूतकालीन संघर्ष यांत फरक होताच. सुजाण, विचारी वाचक वास्तवप्रधान कथात्म साहित्याकडे त्यामुळेच आकृष्ट झाले. मराठी कादंबरीसाहित्यात वास्तववादी प्रवृत्तीच्या कादंबऱ्यांना विशेष प्रतिष्ठा लाभली.

रामचंद्र विनायक टिकेकर ऊर्फ धनुर्धारी यांनी गोल्डस्मिथच्या *व्हिकर ऑफ वेकफिल्ड* चे केलेले रूपांतर *वाईकर भटजी* (१८९८), रहाळकर यांच्या *नारायणराव आणि गोदावरी* (१९७९), विनायक कोंडदेव ओक यांची *शिरस्तेदार* (१८८१) या कादंबऱ्या हरिभाऊपूर्व वास्तववादी कादंबऱ्यांची चुणूक दाखविणाऱ्या आहेत. हरिभाऊंच्या प्रतिभेवर लोकहितवादी, महादेव गोविंद रानडे यांच्यापासून विष्णुशास्त्री चिपळूणकर, बाळ गंगाधर टिळक, गोपाळ गणेश आगरकर यांच्यापर्यंत विविध विचारसरणीच्या मान्यवर व्यक्तींच्या विचारांचा प्रभाव होता. चिपळूणकरांच्या अकाली निधनानंतर हरिभाऊंनी प्रसिद्ध केलेला 'शिष्यजनविलाप' वाचला म्हणजे शास्त्रीबुवांचे व्रत पुढे चालू ठेवण्याची त्यांची प्रतिज्ञा ध्यानात येते. त्या वेळच्या हिंदू समाजात व हिंदू कुटुंबपद्धतीत  जुन्या नव्या मतांचा झालेला एकच काला त्यांच्या स्वतःच्या घरात त्यांच्या नित्य अनुभवास येत होता. हरिभाऊंचे वडील जुन्या मताचे व चुलते महादेव चिमणाजी आपटे कट्टर सुधारक. यामुळे हरिभाऊंच्या वडिलांनी स्वतंत्र बिऱ्हाड केले होते. हरिभाऊंना सावत्र आई होती आणि त्यांचे स्वतःचे लग्न पंधराव्या वर्षीच उरकून घेण्यात आल्यामुळे बालविवाहाचा स्वानुभव त्यांना आला होता. या सगळ्या अनुभवांचा परिणाम त्यांच्या तीक्ष्ण बुद्धीवर, संस्कारक्षम मनावर, हळुवार अंतःकरणावर व विशाल जाणिवेवर झाला. गोविंद वासुदेव कानिटकर व काशिबाई कानिटकर या सुसंस्कृत, सुधारकी विचारसरणीच्या दांपत्याशी जुळलेले स्नेह संबंधही त्यांच्या लेखनास काही प्रमाणात प्रेरक ठरले. गो. वा. कानिटकरांनी जेम्स स्टुअर्ट मिलच्या *सब्जेक्शन ऑफ वुमेन* चे *स्त्रियांची परवशता*  या नावाने भाषांतर केले होते. मिल–स्पेन्सरच्या विचारांचे परिशीलनही हरिभाऊंनी केले होते.  या सगळ्याचा परिणाम म्हणजे त्यांचे सामाजिक कादंबऱ्यांचे लेखन होय. *आजकालच्या गोष्टी* हे त्यांच्या सामाजिक कादंबऱ्यांचे उपनाम सर्वार्थाने सार्थ होते. *मधली स्थिती* (१८८५), *गणपतराव* (१८८७–८८), *पण लक्षात कोण घेतो* (१८९०–९३), *यशवंतराव खरे* (१८९२–९५), *मी* (१८९३–९५), *जग हे असे आहे* (१८९७–९९), *भयंकर दिव्य* (१९०१–०३), *आजच* (१९०४–६), *मायेचा बाजार* (१९१०–१२), *कर्मयोग* (१९१३–१७) या त्यांच्या कादंबऱ्यांतून समकालीन ब्राह्मण कुटुंबातून घडणारे वेगवेगळे प्रसंग व त्यामुळे उठणारी वैचारिक वादळे यांचे प्रभावी चित्रण झाले आहे. वस्तुस्थितिदर्शक लेखनाची हरिभाऊंची उंची मराठीत दीर्घकाळ अबाधित राहिली. आगरकरांना ज्या प्रकारच्या सुधारणा समाजात झाल्या पाहिजेत असे वाटत होते त्या प्रकारच्या सुधारणांची चित्रे हरिभाऊंनी आपल्या कादंबऱ्यांतून मूर्त केली आहेत. विशेषतः तत्कालीन उच्चवर्णीय स्त्रियांच्या वाट्याला अपरिहार्यपणे येणारी दुःखे दूर करण्याचे मार्ग त्यांच्या कादंबऱ्यांतून सूचित झाले आहेत.

*मोचनगड* पासून सुरू झालेल्या मराठी ऐतिहासिक कादंबरीचा परमोत्कर्ष हरि नारायण आपटे यांच्या कादंबरीत पाहावयास मिळतो. पूर्वेतिहासाच्या प्रेमाने प्रेरित होऊन मराठ्यांच्या इतिहासाच्या संशोधनाला जो आरंभ त्या काळात झाला होता त्याची प्रेरणा हरिभाऊंच्या ऐतिहासिक कादंबऱ्यांच्या निर्मितीमागे असावी. *उषःकाल* (१८९६–९७) ही त्यांची पहिली ऐतिहासिक कादंबरी रसाळ आहे. तीनंतर *केवळ स्वराज्यासाठी* (१८९८–९९)  *गड आला पण सिंह गेला* (१९०३), *सूर्योदय* (१९०५–०८), *सूर्यग्रहण*() या शिवसृष्टीवर आधारलेल्या कादंबऱ्या, *मध्यान्ह* (अपूर्ण

१९०६-०८), *म्हैसूरचा वाघ* (१८९०-९१) या पेशवेकाळासंबंधीच्या कादंबऱ्या आणि *रूपनगरची राजकन्या* (१९००-०२), *चंद्रगुप्त* (१९०२-०४), *कालकूट* (अपूर्ण १९०९-११) या प्राचीन भारताच्या व राजपूतांच्या इतिहासकालावरील कादंबऱ्या. *वज्राघात* (१९१३-१५) ही विजयनगरच्या साम्राज्याविषयीची कादंबरी. त्यांची सर्वोत्कृष्ट ऐतिहासिक कादंबरी म्हणून 'वज्राघात' ओळखली जाते. गुंतागुंतीची कथानके, अद्‌भुत प्रसंग, कथानकाला दिलेली उपकथानकांची जोड, रेखीव व्यक्तिचित्रणे, भव्य कालपट या विशेषांनी युक्त असणाऱ्या हरिभाऊंच्या ऐतिहासिक कादंबऱ्या त्या काळात त्यांना उपलब्ध झालेल्या इतिहासविषयक ग्रंथांचे व कागदपत्रांचे वाचन करून लिहिलेल्या आहेत. कल्पकता व कलात्मकता यांचा मनोरम संगम हरिभाऊंच्या कादंबऱ्यांत आढळतो.

वि. सी. गुर्जर, नाथमाधव, ना. ह. आपटे हे हरिभाऊंनंतर कादंबरीलेखन करणारे प्रमुख लेखक. गुर्जरांनी अनेक बंगाली कादंबऱ्यांची भाषांतरे करून प्रभातकुमार मुखर्जी यांचे वाङ्मय मराठीत आणले ही त्यांची कामगिरी महत्त्वाची आहे. त्याखेरीज द्वारकानाथ पितळे ऊर्फ नाथमाधव यांनी *स्वराज्याचा श्रीगणेशा, स्वराज्याचा कारभार, स्वराज्यावरील संकट, स्वराज्याची स्थापना, स्वराज्याचे परिवर्तन*वर कादंबऱ्या लिहून शिवशाहीच्या अनुषंगाने अनेक रोमहर्षक प्रसंग कादंबरीरूपाने सादर केले. *रायक्लब अथवा सोनेरी टोळी, वीरधवल* या त्यांच्या अद्‌भुतरम्य साहसी कादंबऱ्या आणि *देशमुखवाडी, डॉक्टर कादंबरी, विमलेची ग्रहदशा* यांसारख्या त्यांच्या कितीतरी सामाजिक कादंबऱ्यांमधून स्त्रीशिक्षण, विधवाविवाह, प्रौढविवाह असे विषय त्यांनी हाताळले आहेत. नाथमाधव हे दीर्घकाळ लोकप्रिय असणारे कादंबरीकार होत. ना. ह. आपटे यांची *अजिंक्यतारा* ही १९०५ सालची कादंबरी राजारामाच्या निधनानंतर नवी राजधानी स्थापन करण्यासाठी मराठ्यांनी सातारचा अजिंक्यतारा जिंकला या प्रसंगावर आधारित आहे. *रजपुतांचा भीष्म* ही त्यांची दुसरी ऐतिहासिक कादंबरी उदेपूर व मारवाड यांच्यातील वैमनस्यावर उभी आहे. *पहाटेपूर्वीचा काळोख, सुखाचा मूलमंत्र* या त्यांच्या गाजलेल्या कादंबऱ्या बाळबोध स्वरूपाच्या आहेत. विशुद्ध व सोवळे वातावरण उपदेशप्रधान कथानक व सरळ साधी भाषा हे विशेष असणाऱ्या त्यांच्या कादंबऱ्या पातिव्रत्य, सहनशीलता, सद्‌वर्तन, साहस, मातृप्रेम, महत्त्वाकांक्षा इत्यादी गुणांचा गौरव करतात.

मराठी कादंबरीला खऱ्या अर्थाने वैचारिकता प्राप्त करून देण्याचे श्रेय वामन मल्हार जोशी यांच्याकडे जाते. वा. म. जोशी हे प्रथम विचारवंत होते व नंतर कादंबरीकार. निरनिराळ्या संदर्भात त्यांच्यातला विचारवंत प्रथम जागृत होत असे. फ्रेन्ड्स इन कौंसिलच्या धर्तीवर आपण कादंबरी लिहावी असे त्यांच्या मनात आले आणि ते *रागिणी*च्या (१९१५) लेखनास प्रवृत्त झाले. ''*रागिणी*तील व्युत्पन्नतेचे वातावरण हे तिच्या पृथगात्मतेचे प्रमुख कारण आहे... जीवनामध्ये जे नित्य नवे विचारप्रवाह उद्‌भवत होते, नवे आदर्श निर्माण होत होते... वामन मल्हारांनी या विचारप्रवाहांना व आदर्शांना ललित वाङ्मयात प्रथम अभिव्यक्ती दिली.'' (देशपांडे, कु., १८७५, पृ. ) *सुशीलेचा देव* व *इंदु काळे व सरला भोळे* या कादंबऱ्यांत उपस्थित केलेले वैचारिक प्रश्न हे समकालीन युगाचे अर्थपूर्ण प्रश्न आहेत. वैचारिकता ही वामनरावांची साहजिक प्रवृत्ती होती त्यामुळे त्यांचे वस्तुस्थितीवर्णन विचाराच्या वळणानेच चाले. अमूर्त विचार, सुंदरशैलीत मांडण्याचे त्यांचे कौशल्य 'रागिणी' कादंबरीतील वादविवादातून स्पष्ट होते. जी नवी स्त्री महाराष्ट्रात त्यावेळी उदयास येत होती तिचे दर्शन वा. म. जोशी यांच्या कादंबऱ्यांतून घडत होते.

मराठी कादंबरीमध्ये नव्या जाणिवांची उषःप्रभा फाकू लागल्याची चिन्हे १९२६-२७ च्या सुमारास दिसू लागली. ...*मुक्तबंध* (१९२६), *जादूगार रत्नाकर* मासिकात प्रसिद्ध (१९२७) व *बंधनांच्या पलीकडे* (१९२७). महाराष्ट्रातील कौटुंबिक जीवनाचा साचा बदलू लागला, याची या कथांमध्ये सूचना मिळते. ...महाराष्ट्राच्या समाजजीवनावर पाश्चात्य विचारांची पहिली लाट आगरकरांच्या काळी आली. काव्यात केशवसुत व कथावाङ्मयात हरी नारायण आपटे हे त्या नवविचारांचे प्रणेते होते. हरी नारायणांचे गणपतराव हे मिल्ल व स्पेन्सर यांच्या विचारांनी भारून गेले होते. त्या लेखकांच्या ग्रंथांचे मनन करून, त्यांची जीवनदृष्टी आत्मसात केल्यामुळे गणपतरावांना एक नवा दृष्टिकोण लाभला होता. ...गणपतरावांच्या व्यक्तिमत्त्वामध्ये हरी नारायणांच्या स्वतःच्या ध्येयवादी विचारांचे जेवढे स्पष्ट प्रतिबिंब पडले आहे, तितकेच पुरुषोत्तम यशवंतांच्या प्रभाकराच्या व्यक्तित्वात त्याच्या निर्मात्याच्या जीवनदृष्टीचे पडले आहे. ही

जीवनदृष्टी पूर्ववयातील भक्तिमार्गी व ज्ञानमार्गी वाचनाने कमावली गेलेली असेलही. पण तिच्यावर विशेष छाप आंग्लकवी शेले व ब्राउनिंग यांची पडलेली दिसून येते. शेलेचे 'प्रॉमीथ्युअस अन्‌बाउंड' व 'एपिसायकिडिअन' आणि ब्राउनिंगची नाट्यगीते यांच्यातील काव्यगर्भ विचारांचा 'बंधनांच्या पलीकडे' च्या लेखकावर खोल परिणाम झालेला दिसतो. हा परिणाम एखाद्या आपोआप उगवणाऱ्या अंकुरावर सूर्यप्रकाशाचा जसा परिणाम होतो तशा प्रकारचा आहे. ...शेलेची असीम स्वातंत्र्यप्रीती व मानवतेवरील विश्वास, त्याची अंतर्मुखता, ब्राउनिंगची निडर व्यक्तिनिष्ठा व जीवनाच्या अंतिम आध्यात्मकतेवरील श्रद्दा या सर्वांचे लोण पुरुषोत्तम यशवंतांच्या प्रभाकराच्या द्वारे मराठक्ष वाङ्मयात अवतरले. वाचन व जीवनानुभव यांच्या साकल्यातून उदयास आलेली प्रतीती हरी नारायणांच्या नंतर 'बंधनांच्या पलीकडे' या कादंबरीतच इतक्या उत्कटपणे दिसून येते.''(देशपांडे, कुसुमावती आत्माराम, १९७५, पृ. २०७, २१३–२१४)

१८५४ मध्ये चार्ल्स वुड याचा शिक्षणविषयक खलिता आला. अनेक महत्त्वाच्या शिक्षणविषयक प्रश्नांची विस्तृत दखल घेणारा हा सुमारे शंभर परिच्छेदांचा खलिता आहे. त्यानुसार कला, विज्ञान, तत्त्वज्ञान आणि साहित्य यांचे शिक्षण द्यावे असे ठरले. त्याचप्रमाणे लंडन विद्यापीठास अनुसरून कलकत्ता, मुंबई, मद्रास येथे विद्यापीठे उघडण्याचा निर्णय झाला. आणि १९५७ साली ही विद्यापीठे सुरू झाली. मुंबई विद्यापीठातून १८६२ साली बी. ए. च्या परीक्षेस सात विद्यार्थी बसले त्यांपैकी चार उत्तीर्ण झाले. या पहिल्या चार पदवीधरांत दोन पहिल्या वर्गात (महादेव गोविंद रानडे आणि रामकृष्ण गोपाळ भांडारकर) व दोन दुसऱ्या वर्गात (बाळ मंगेश काळे आणि वामन आबाजी मोडक) बी. ए. झाले. हळूहळू विद्यापीठातून बाहेर पडणाऱ्या विद्यार्थ्यांची संख्या वाढू लागली शाळांतून शिकणाऱ्या विद्यार्थ्यांची संख्या वाढत होतीच. हा जो नवशिक्षित वर्ग तयार होत होता त्याच्या अभ्यासक्रमाचा एक भाग म्हणून इंग्लिश भाषेतील साहित्याचा अभ्यास त्याला करावा लागत होता. सुरुवातीच्या काही पिढ्यांवर फ्रान्सिस बेकन, हर्बर्ट स्पेन्सर, जॉन स्टुअर्ट मिल, चार्ल्स डार्विन, अॅडम स्मिथ यांसारख्या विचारवंतांच्या लेखनाचा आणि इंग्रजी भाषांतराच्या रूपाने प्लेटो ॲरिस्टॉटल, नित्शे यांसारख्या तत्त्वज्ञांच्या तत्त्वज्ञानाचा प्रभाव विशेषत्वाने पडलेला आढळतो. बाळशास्त्री जांभेकर, लोकहितवादी, जोतीराव फुले, दादाभाई नौरोजी, महादेव गोविंद रानडे, रामकृष्ण गोपाळ भांडारकर, काशिनाथ त्रिंबक तेलंग, बाळ गंगाधर टिळक, गोपाळ गणेश आगरकर इत्यादिकांनी पाश्चात्त्य तत्त्वज्ञान उत्तम प्रकारे अभ्यासलेले होते. पुढील पिढ्यांपासून इंग्लिशमधील ललित साहित्याचे वाचन अधिक प्रमाणात होऊ लागले. देशकार्यासाठी व समाजकार्यासाठी वाहून घेतलेल्या निवडक पदवीधरांखेरीज इतर सुशिक्षितांमधून साहित्याचा वाचकवर्ग तयार होऊ लागला होता.

एकोणिसाव्या शतकाच्या उत्तरार्धात इंग्लिशमधून मराठीत भाषांतरित स्वरूपात आणि स्वतंत्रपणे कादंबरी एकापाठोपाठ एक येऊ लागली याचे कारण इंग्लिश शिक्षण हेच होय. कादंबरी हा लेखनप्रकार भोवतालच्या जीवनवास्तवाचे मनोहर दर्शन घडवितो, कल्पित अशी सृष्टी निर्माण करतो आणि शिक्षणही देतो याची जाणीव लेखकांना व वाचकांना इंग्लिश वाङ्मय वाचून झाली होती. याचा अर्थ असा की, वासाहतिक संस्कृतीमधून एतद्देशीय संस्कृतीने कादंबरी या साहित्यप्रकाराचा संकेतव्यूह हळूहळू आत्मसात केला. बाबा पदमनजी यांच्या *यमुनापर्यटन*सारखे अगदी कच्च्या स्वरूपातील कादंबरीलेखन असो, *मुक्तामाला*सारखे मन रिझविणारे कल्पनाशील लेखन असो वा *पण लक्ष्यात कोण घेतो* सारखी प्रगल्भ कादंबरीनिर्मिती असो, या सर्वांमागे इंग्लिशमधील कादंबरीकारांचे बेताचे का होईना नमुने होते, हे विसरता येत नाही. याचा उल्लेख राजवाडे यांच्या निबंधात आढळतो. रेनॉल्ड्‌सच्या वेगवेगळ्या कादंबऱ्यांची भाषांतरे व रूपांतरे सन एकोणिसशेपर्यंत सातआठ तरी झालेली होती ती अशी – (१८७७), *Seamstress–वज्रेश्वरी अथवा शिवणकाम करणारी,* (१८८३) *Soldier's wife – वीरपत्नी,* (१८९०, १८९४) *Mysteries of the Court of London लंदनरहस्य. पूर्वार्ध : भा. १, २, ३, ४. उत्तरार्ध : भाग १,२,* (१८९३) *Piscy or Unbaptized Child. बालपिशाच्च,* (१९८७) *Rye House Plot रायवाड्यांतील कट* अथवा *बंडवाल्याची मुलगी. भाग १,* (१८९४–१८९५) *Mysteries of the Court of London. लंदन येथील बड्या लोकांची गुप्त कृत्ये, छेद २, ३, ५.* (हस्तक–कुळकर्णी, १९७३, पृ. ४१८) रेनॉल्ड्‌सची एवढी भाषांतरे मराठीत झाली याचे कारण रेनॉल्ड्‌स हा त्या काळातील इंग्लंडमधील सर्वात लोकप्रिय लेखक होता. *द बुकसेलर* या पत्राने त्याच्यावर

लिहिलेल्या लेखात आमच्या काळातील सर्वात लोकप्रिय लेखक असे उद्‌गार काढले होते.* रेनॉल्ड्‌सखेरीज मेडोज टेलर, वॉल्टर स्कॉट, लॉर्ड लिटन यांच्या कादंबऱ्याही मराठीत अनुवादित झाल्या होत्या. तत्कालीन मराठी कादंबरीकारांसमोर असणाऱ्या नमुनादर्शांचे स्वरूप यावरून स्पष्ट होईल. नियतकालिकांतून क्रमशः कादंबरी प्रकाशित होण्याची पद्धतीही मराठी कादंबरीकारांनी पाश्चात्त्यांकडूनच स्वीकारलेली दिसते.

इंग्रजी अंमलातील शिक्षणविषयक धोरणाचा एक भाग म्हणून इंग्लिशमधील साहित्यकृतींचा अभ्यास विद्यार्थ्यांना करावा लागेल ही त्यांच्या अभ्यासक्रमाची एक बाजू झाली. दुसरी बाजू अशी की, देशी भाषांतील पुस्तके गुणवत्तेच्या निकषावर बेताची असल्यामुळे १८६४ पासून विद्यापीठाच्या अभ्यासक्रमातून देशीभाषांचे उच्चाटन करण्यात आले. महादेव गोविंद रानडे यांनी सीनेटमध्ये केलेल्या सातत्ययुक्त पाठपुराव्यामुळे १९०१ साली एम. ए. च्या परीक्षेसाठी मराठी हा विषय विकल्पाने ठेवण्यात आला. १९२०-१९२१ मध्ये बी.ए. च्या परीक्षेसाठी मराठी या विषयाला मान्यता मिळाली व १९३५ मध्ये मराठीत ऑनर्स घेण्याची सोय उपलब्ध झाली. मराठीत अभ्यसनीय स्वरूपाची पुस्तकेच नाहीत अशी भूमिका घेऊन मराठी विषयाचे संपवण्यात आलेले अस्तित्व म्हणजे मागे मराठी भाषेविषयी मेकॉले, मोल्सवर्थ वगैरेंनी अज्ञानापोटी जे मतप्रदर्शन केले होते त्यातलाच एक प्रकार म्हणता येईल. मराठी विषयाला वैकल्पिक पातळीवरील विषय ठरवण्यामुळे त्याचे गौणत्व आपोआपच सिद्ध होते. शास्त्यांच्या इंग्लिश या ज्ञानभाषेखेरीज व संस्कृत, पर्शियन व अरबी या अभिजात भाषांहून मराठीसारखी देशभाषा ही कनिष्ठ होय असाच याचा स्पष्ट अर्थ होतो. इंग्रजांच्या वसाहतवादी धोरणामुळे मराठी भाषेला असे दुय्यमत्व त्या काळी लाभले कारण इंग्रजी ही त्या काळातील ज्ञानभाषा होती. आज दोनशे वर्षांनी जागतिकीकरणाच्या परिणामामुळेही पुन्हा जागतिक स्तरावर इंग्रजीला महत्त्व लाभले आणि मराठीसारख्या देशभाषांना गौणत्व प्राप्त झाले आहे.

**कविता**

कथात्म साहित्याला ब्रिटिशपूर्व काळात नव्या युगाला साजेशी पूर्वपरंपरा नसली तरी मराठी कवितेच्या बाबतीत तशी परिस्थिती नव्हती. जवळपास पाचशे वर्षांची विविधांगी समृद्ध काव्यपरंपरा या नव्या युगातील कवितेला होती. इतकेच नाही, तर संस्कृत काव्यपरंपरेचा वारसाही मराठी कवितेला लाभलेला होता. अर्थात स्वकीयांची सत्ता संपुष्टात येऊन परकीयांची गुलामी मराठी माणसाच्या वाट्याला आल्यानंतर महाराष्ट्रात वेगवेगळ्या प्रकारची उलथापालथ झाली होती. वैभवशाली पेशवाई पाहिलेले प्रभाकर-परशरामासारखे शाहीर गोंधळून गेले होते. ''विपरीत आला काळ, मेरुला गिळिलें मुंग्यांनीं'' अशा अवस्थेत ''कुंकवावाचून कपाळ! मंगळसूत्रावाचून गळा!'' अशी भावना सैनिकांत व समाजात निर्माण झाली असणे अगदी स्वाभाविक होते. प्रभाकराचा १८४३ मध्ये व परशरामाचा १८४४ मध्ये मृत्यू झाला. नव्या युगाच्या प्रभावात शाहीरी परंपरा शेवटाला लागणे क्रमप्राप्त होते कारण ती मूलतः राजाश्रयावर उभी होती. भक्तिपरंपरेचे मात्र तसे नव्हते. राजकीय स्थित्यंतरामुळे कोणाच्याच व्यक्तिगत भक्तिभावात बदल होण्याचे कारण नव्हते. त्यामुळे निरंजन रघुनाथ यांचे *स्वात्मप्रचीती, साक्षात्कार, आत्मबोध-प्रकाशिनी* इत्यादी आध्यात्मिक ग्रंथ, वेदान्तासारखा गहन विषय सुगम भाषेत मांडणारे नारायण ऊर्फ हंसराज यांचे अकरा ग्रंथ, बाबा उसपकर ऊर्फ पूर्णदास यांचे *पंचीकरण, पूर्णसारा*दी ग्रंथ, गणपत हरिहरराव कुरुंदवाडकर यांचा *गणेशपुराणआर्या* हा काव्यग्रंथ परशराम

*१. "The 'Bookseller' in 1868 stated that Reynolds had written more and sold in far greater numbers than Dickens and in an obituary notice after his death in 1879 the same journal described him as 'the most popular writer of our time." Popular Fiction 100 Years Ago by Margaret Dalziel (हस्तक-कुळकर्णी, तत्रैव, पृ. ४१९ )

२. कालिकामूर्ती (१९०९), विलासमंदिर (१९१२), अधःपात (१९१३), बंधुद्वेष (१९१३), शापविमोचन (१९१५), रहस्यभेद (१९१६) या गो. ना. दातार यांच्या कादंबऱ्या म्हणजे रेनॉल्ड्‌सच्या कादंबऱ्यांची रूपांतरे आहेत. रेनॉल्ड्‌सच्या कादंबऱ्यांचे मर्म जाणून मराठी वाचकांना रेनॉल्ड्‌स ज्या स्वरूपात आवडू शकेल त्या स्वरूपात दातारांनी तो वरील कादंबऱ्यांमार्फत मराठीत आणला. (हस्तक उषा आणि कुळकर्णी, तत्रैव, पृ. ४८६)

बल्लाळ गोडबोले यांची *नामार्थ दीपिका, भास्कर दामोदर पाळंदे* (१८३२-१८७४) यांची *गीतासुधा* व *रत्नमालेतील* स्तोत्रे, विठोबा अण्णा दफ्तरदार (१८१३-१८७३) यांची उत्कट भक्तिगीते अशी रचना या काळात होत राहिली. कर्नल कान्होबा रणछोडदास कीर्तिकर (१८४९-१९१७) यांनी प्रार्थनासमाजासाठी 'भक्तिसुधा' रचली. दादोबा पांडुरंग तर्खडकर यांनीही प्रार्थनासमाजासाठी अभंगांच्या स्वरूपाची काही कविता लिहिली होती.

आधुनिक भक्तिकविता लिहिणारे बहुतेक सर्व कवी संस्कृत व इंग्रजी या दोन्ही भाषांत गती असणारे 'पंडित कवी' होते. परशुरामपंततात्या गोडबोले (१७९९-१८७४) यांनी प्राचीन कवींच्या काव्याचे संपादन करून 'नवनीत' (१८५४) सादर केले. माधव चंद्रोबा डुकले हे प्राचीन कवीच्या कवितेला वाहिलेले जे 'सर्वसंग्रह' मासिक चालवीत त्याचे संपादन परशुरामपंत तात्या करीत. कृष्णशास्त्री राजवाडे यांचे 'ऋतुवर्णन', कृष्णशास्त्री चिपळूणकरांचे 'मेघदूताचे रूपांतर', भामिनीविलासाच्या आधारे त्यांनी रचलेली 'विरहविलाप' तसेच 'अन्योक्तिकलाप' ही सर्व काव्ये मनोरम आहेत. गणेश सदाशिवशास्त्री लेले यांनी *रघुवंश, शिवाजी चरित्र, 'हिंदू लोकांचे सण, गंगाचरित्र, कृष्णाकुमारी, अमरुशतक* ही काव्ये प्रसिद्ध आहेत. काव्यगुणदृष्ट्या ती बेताची असून लेले यांची बहुतेक निर्मिती 'दक्षिणा प्रैज कमिटी' साठी झालेली आहे. 'दक्षिणा प्रैज कमिटी' ही पंडिती पद्धतीच्या काव्यरचनेस प्रेरक ठरली असे म्हणता येते. पांडुरंग गोविंद पारखी (१८४४-१९११) यांच्या *षड्ऋतुवर्णन, कृष्णाकुमारी* व *बोधामृत* या काव्यांपैकी पहिली दोन 'दक्षिणा प्रैज कमिटी' च्या जाहिरातीने रचली गेली आहेत. गोडबोले, चिपळूणकर आणि पारखी तिघेही सरकारच्या विद्याखात्याशी संबंधित असल्यामुळे व त्याच्या धोरणानुसार नीतिशिक्षणाला महत्त्व असल्यामुळे त्यांनी नीतीविषयक कविता लिहिली.

इंग्रजी धर्तीची मराठी काव्यरचना हाही या कालातील एक महत्त्वाचा काव्यविशेष म्हणता येईल. एपिक, नॅरेटिव्ह पोएम, सटायर, लिरिक, एलिजी इत्यादी भिन्नभिन्न काव्यप्रकार मराठीत आणण्याचा नवशिक्षित कवींचा प्रयत्न होता. सृष्टी, राष्ट्र, समाज व दैनंदिन जीवन यांच्याकडे पाहाण्याची इहवादी दृष्टी हा या नव्या कवितेचा विशेष होता. बजाबा रामचंद्र प्रधान (१८३८-१८८६) यांचे सर वॉल्टर स्कॉटच्या द लेडी ऑफ द लेक या ग्रंथाच्या आधारे रचलेले *दैवसेनी* (१८६७) हे २३५ श्लोकांचे पहिले मराठी खंडकाव्य. महादेव मोरेश्वर कुंटे (१८३५-१८८८) यांचे *राजा शिवाजी* (१८६९). पांडुरंग व्यंकटेश चिंतामणिपेठकर (१८५१-१८७९) *गंगावर्णना*, कान्होबा रणछोडदास कीर्तिकर (१८४९-१९१९) यांचे टेनिसनच्या प्रिन्सेसची अनुकृती असणारे *इंदिरा* ही काव्ये विशेष निर्देश करण्याजोगी आहेत. कीर्तिकरांनी आपली दिवंगत पत्नी सोनाबाई हिच्या निधनावर *विलापलहरी* ही दीडशे श्लोकांची व बावीस पद्यांची विलापिका रचली आहे. विष्णू मोरेश्वर महाजनी यांनी इंग्रजी वाङ्मयातील भावगीतांची (लिरिक्स) निवड करून ४१ इंग्रजी स्फुट कवितांची रूपांतरे केली ती विविधज्ञानविस्तारात व नंतर *कुसुमांजली* या नावाने प्रसिद्ध झाली. सर्वच नवशिक्षित कवींसमोर मिल्टन, स्पेन्सर, ड्रायडन, पोप, ग्रे, गोल्डस्मिथ इत्यादी इंग्लिश कवींची कविता होती. महाजनी व कानिटकर यांच्या भावगीतरचनेचा पुढील पिढीतील टिळक केशवसुतांच्या कवितेशी धागा जोडता येतो.

इंग्रजी राजवटीचा मराठी साहित्यविश्वावर झालेला परिणाम सांगणारे एक महत्त्वाचे निरीक्षण भ. श्री. पंडित यांनी नोंदविले आहे. ते लिहितात, ''माळवा, बुंदेलखंड, नागपूर, गुजरात व तंजावर येथील मराठी राज्ये नामोहरम झाली असली, तरी इंग्रजांच्या पंखाखाली त्यांची परतंत्र संस्थाने कायम होती. या परिस्थितीचा दुष्परिणाम असा झाला की, राज्यकारभाराच्या दृष्टीने महाराष्ट्र कायमचा खंडित राहिला. त्यामुळे नव्या इंग्रजी राजवटीत त्याच्या भिन्नभिन्न विभागांचा विकास एकाच छत्राखाली एकाच वेळी एकसारखा झाला नाही. या प्रतिकूल परिस्थितीचा साहित्यावरही विपरीत परिणाम झाला. इंग्रजी राजवटीच्या आरंभाबरोबरच पश्चिम महाराष्ट्रातील आधुनिक कवितेचा प्रारंभ झाला, तर विदर्भातील आधुनिक कवितेचा प्रारंभ, त्यानंतर नागपूरचे संस्थान खालसा झाल्यावर जवळजवळ अर्धशतकाने झाला आणि मराठवाड्यातील आधुनिक कवितेचा तर अगदी अलीकडे म्हणजे गेल्या पाचपन्नास वर्षांत झाला.'' (पंडित, भ. श्री, १९७३, पृ. २६४)

**नाटक**

शं. बा. मुजुमदार या ऐतिहासिकदृष्ट्या महत्त्वाच्या नाट्यसमीक्षकाने महाराष्ट्रीय नाटककारांची जी चरित्रे लिहिली आहेत त्यांत विष्णुदास भावे (१८१९-१९०२) यांचा गौरव 'महाराष्ट्र नाट्यकलेचे भरतमुनी' अशा शब्दांत केला आहे. त्यावरून विष्णुदास हे 'मराठी रंगभूमीचे जनक' होते हा सर्वसामान्य समज  योग्यच आहे. परंतु इतिहाससंशोधक राजवाडे यांचे मत भिन्न आहे. तंजावरास नव्याने उपलब्ध झालल 'लक्ष्मी-नारायण-कल्याण' या नाटकास (लेखनकाल सुमारे इ. स. १६९०) लिहिलेल्या प्रस्तावनेत ते लिहितात, ''सांगलीतील विष्णुदास भाव्यांच्या पूर्वी मराठीत नाटककार ज्ञानदेवांपासून विष्णुदास भाव्यांपर्यंत अनेक झाले आहेत. तुकारामाने स्त्रीचे सोंग घेणाऱ्या नटाचे तोंड पाहू नये, म्हणून उद्‌गार आपल्या अभंगात काढले आहेत. ज्ञानेश्वराने काव्यनाटकांचा मोठ्या आदराने उल्लेख केला आहे. ह्यावरून महाराष्ट्रात नाटके आज सहाशे वर्षे होत आली आहेत, असे दिसते.'' (पटवर्धन, वि. वि., १९७३, पृ. ३३८) अर्थात राजवाडे यांचे हे मत तारतम्यानेच घ्यावे लागते. साकल्याने विचार करून श्री. ना. बनहट्टी यांनी या संदर्भातील नोंदविलेला अभिप्राय अधिक विचारार्ह आहे. बनहट्टी लिहितात, - ''भोसले-राजांची नाटके व त्यांचे प्रयोग केवळ दरबारी होते. तंजावरच्याच का होईना, पण मराठी जनतेने हे नाट्यप्रयोग आपलेसे करून त्यांच्या आधारावर आपली रंगभूमी चालू केली होती, असे म्हणण्यास आधार नाही. काचेच्या घरात लावलेल्या व सुकून गेलेल्या रोपटाप्रमाणे त्यांची स्थिती झाली. म्हणूनच भोसले राजांची नाटके हा मराठी रंगभूमीचा प्रारंभ हे म्हणणे मान्य करिता येत नाही. जिचे विवरण झाले पाहिजे, अशी मराठी नाट्याच्या इतिहासातील ही एक महत्त्वाची गोष्ट आहे हे निर्विवाद. पण ती महाराष्ट्राच्या रंगभूमीची सुरवात नव्हे. तो मान आज तरी विष्णुदास भाव्यांच्या *सीतास्वयंवर* (१८४३) या प्रयोगालाच दिला पाहिजे.''(बनहट्टी, श्री. ना., १९५७, पृ. ४५,) विष्णुदास भावे हे एकाच वेळी नाटककार, पत्रकार, दिग्दर्शक, तालीम मास्तर, कपडेवाला, रंगवाला या सर्वांच्या भूमिका बजावत. हा आद्य मराठी नाटककार स्वत: नट, गायक व वाद्यकारही होता ही गोष्ट महत्त्वाची आहे.

नाटक म्हणून उपलब्ध होणारे सर्वात जुने व छापील असे पहिले पुस्तक म्हणजे *प्रबोधचंद्रोदय.* मूळ संस्कृतातील नाटकाचे हे भाषांतर १८५१ मध्ये प्रसिद्ध झाले. हे छापलेले पहिले मराठी नाटक श्रीकृष्णमिश्र पंडित या अकराव्या शतकाच्या उत्तरार्धात होऊन गेलेल्या लेखकाच्या नाटकाचे सदाशिव बजाबाशास्त्री अमरापुरकर आणि रावजी बापूजीशास्त्री बापट यांनी केलेले भाषांतर आहे. नाटक या स्वतंत्र वाङ्‌मयप्रकाराची ओळख मराठीला पहिल्याप्रथम संस्कृतावरून केलेल्या नाटकाच्या मराठी भाषांतरामुळेच झाली. भाषांतरयुग असा अवहेलनापूर्वक उल्लेख करण्याच्या प्रवृत्तीमुळे भाषांतरस्वरूप मराठी नाटकांकडे दुर्लक्ष करण्याची प्रवृत्ती आहे. परंतु कथा, नाटक, चरित्र, इतिहास इत्यादी साहित्यप्रकारांना मानवेल अशी स्वतंत्र गद्य मराठीशैली अस्तित्वात येण्यासाठी भाषांतरांचे साहाय्य झाले हे विसरता येत  नाही.

महादेवशास्त्री कोल्हटकरांनी (१८२२-१८६५) शेक्सपिअरच्या *ऑथेल्लो*चे केलेले भाषांतर  (१८६७) मो. वि. वाळवेकर यांनी *नीलदर्पण* या बंगाली नाटकाचा केलेले अनुवाद (१८७२) भास्कर दामोदर पाळंदे (१८३२-१८७४) यांनी केलेला कालिदासाच्या *विक्रमोर्वशीय* या नाटकाचा *विक्रमोर्वशी* हा अनुवाद (१८५४), परशुरामपंत बल्लाळ गोडबोले (१७९९-१८७४) यांनी केलेली *वेणीसंहार* (१८५७), *उत्तररामचरीत* (१८५९), *शाकुंतल* (१८६१), *मृच्छकटिक* (१८६२), *नागानंद* (१८६५), *पार्वतीपरिणय* (१८७२) ही भाषांतरे, कृष्णशास्त्री राजवाडे (१८२०-१९००) यांनी केलेली *मालतीमाधव* (१८६१)  *मुद्राराक्षस* (१८६७), *शाकुंतल* (१८६९) *विक्रमोर्वशीय* (१८७४) ही भाषांतरे आणि गणेशशास्त्री लेले (१८२५-१८९८) यांची *जानकीपरिणय* (१८६५), *मालविकाग्निमित्र* (१८६७) यांसारखी संस्कृत नाटकांची अनेक भाषांतरे झाली. संस्कृत पंडितांनीच लक्ष घालून केलेल्या या भाषांतरांमुळे संस्कृत नाट्यसृष्टीचा उत्तम परिचय मराठी रसिकांस झाला. त्यामानाने उपर्युक्त ऑथेल्लोशिवाय काशीनाथ गोविंद नातू यांनी केलेले 'विजयसिंग' (१८७२) हे ज्यूलियस सीझरचे भाषांतर, नीळकंठ जनार्दन कीर्तने यांनी केलेले शेक्सपिअरच्या *द टेंपेस्ट* (१८७५), *रोमकेतुविजया* (१८७०-१८७२ या कालात विविधज्ञानविस्तारात पु. ३ ते ५), कॉमिडी ऑफ एररसचे

*भ्रांतिकृत चमत्कार* हे बजाबा रामचंद्र प्रधानव श्रीराम भिकाजी जठार यांनी केलेले भाषांतर (वि.ज्ञा. विस्तार, पु. ४, अं. ८) अशी मोजकी भाषांतरे सोडल्यास इंग्रजी नाटकांची भाषांतरे झाली नाहीत.

विष्णुदास भाव्यांच्या पौराणिक नाटकांच्या परंपरेत दामोदर कवीचे *अभिमन्यूविवाह* (१८५६), विनायकशास्त्री नातू यांची *नल*-नाटक, *श्रीभिल्लिणी* नाटक ही नाटके, दीक्षितशास्त्री सातारकरांचे *मेधावती-परिणय* (१८६३) व *रुक्मिणी-हरण* (१८६५) ही नाटके, अभ्यंकरशास्त्री यांचे *हरिश्चंद्र-सत्त्वदर्शन* (१८६५), अनंत दीक्षित-जोशी चिपळोणकरकृत *गौरीहर विनोद* (१८७१), बजाबा बाळाजी नेनेकृत *सैरंध्री* (१८७५), नारायण दिनकर गोडबोले यांचे *गोपीचंद* (१८६८), बलवंत पांडुरंग किर्लोस्कर यांचे *शांकरदिग्जय* (१८७४) या पौराणिक नाटकांची निर्मिती झालेली आढळते. या शिवाय जवळपास पंचवीस पौराणिक नाटके या कालखंडात लिहिली गेली. विनायक जनार्दन कीर्तने (१८४०-१८९१) यांचे *थोरले माधवराव पेशवे* नाटक (१८६१), विरेश्वर सदाशिव छत्र्ये यांचे *नारायणराव पेशवे यांचे नाटक* (१८७०), विश्वनाथ मोरेश्वर नाशिककर, नारायण गोपाळ दामले, विनायक हरि शिनकर या लेखकांचे *झांशीच्या राणीचे नाटक* (१८७०), व्यंकटेश रंगो कट्टी मुधोळकरकृत *सवाई माधवरावाचे नाटक* (१८७१), नारायण बापूजी कानिटकरलिखित *श्रीमल्हारराव महाराज नाटक* (१८७५) या ऐतिहासिक नाटकांनी तत्कालीन मराठी नाट्यनिर्मितीत भर घातली. पुस्तकरूपाने प्रकाशित होऊन रंगभूमीवर ज्यांचे प्रयोग होण्यास सुरुवात झाली, अशा नाटकांस *बुकिश* नाटके असे म्हणत; अशा नाटकात *थोरले माधवराव पेशवे नाटक* हे मराठी वाङ्मयातील पुस्तकरूपाने प्रसिद्ध झालेले पहिले स्वतंत्र नाटक असल्यामुळे तेच पहिले बुकिश नाटक ठरले.

*मुक्तामाला, मंजुघोषा, विचित्रपुरी* यांसारख्या अद्भुतरम्य कादंबऱ्या लोकप्रिय झाल्यामुळे कल्पनारम्य नाटकांची निर्मितीही या काळात होऊ लागली. अशा नाटकांच्या वर्गात विनायक जनार्दन कीर्तने यांचे *जयपाळ* (१८६५), धोंडो भिकाजी मराठे यांचे *विलासतरंगिनी नाटक* (१८७१), रावजी मनोहर ताकभातेलिखित *हंसपालिका* (१८७२), कृष्णाजी परशुराम गाडगीळकृत *फटफजितीचा कळस* (१८७४) अशी काही नाटके निर्माण झाली.

या कालखंडात ज्या प्रमाणात पौराणिक, ऐतिहासिक वा कल्पित नाटकांची निर्मिती झाली त्या प्रमाणात सामाजिक नाटके मात्र लिहिली गेली नाहीत. सामाजिक नाटकांचे मूळ प्रहसनात होते. मराठी नाटक हा कलाप्रकार रूढ झाल्यानंतर ज्या प्रकारची प्रहसने आधुनिक मराठी नाट्यसृष्टीत निर्माण होऊ लागली तशा प्रकारची प्रहसने व सामाजिक नाटकांचा मूलाधार हे दोन्ही भिन्न होत. *नारायणराव पेशव्यांच्या वधाचा फार्स*, किंवा *अफझुलखानाच्या मृत्यूचा फार्स* या नावांवरूनही ध्यानात येईल की त्या काळात शोकान्त नाटकांनाही फार्स म्हणण्याची प्रथा होती. *गुलाबछकडीचा फार्स, दामाजीपंताचा फार्स* ही प्रहसने १८८० च्या आसपास छापील स्वरूपात पाहावयास मिळतात. *मनोरमा* (१८७१) हे महादेव बाळकृष्ण चितळे यांचे नाटक,*प्रबोधविद्युत अथवा स्वैरसकेशा* (१८७१) हे रघुनाथ शंकरशास्त्री अभ्यंकर यांचे नाटक अशी सामाजिक स्वरूपाची नाटके निर्माण झाली. परंतु ती उथळ, उच्छृंखल व अश्लील असे शिक्के बसलेली नाटके होती.

एकंदरीत पाहाता आधुनिक मराठी साहित्याच्या आरंभकाली झालेली नाट्यनिर्मिती साहित्यगुणांच्या पातळीवर सामान्य दर्जाची म्हणावी लागते. तथापि कोणतीही पूर्वपरंपरा नसताना निर्माण झालेली ही नाटके कौतुकास्पदच म्हणावी लागतील. महादेव गोविंद रानडे यांनी आपल्या आढाव्यात नाटकांसंबंधी उदार दृष्टिकोण बाळगलेला दिसतो. नाटकांचे स्वागत मराठी रसिक प्रेक्षकांनी चांगल्या प्रकारे केले असे मात्र निर्विवादपणे म्हणता येते.

**निबंध**

एकोणिसाव्या शतकात इंग्लिश साहित्याच्या संपर्कात आल्यामुळे मराठीत जे साहित्यप्रकार नव्याने निर्माण झाले त्यांत निबंध हा एक प्रमुख साहित्यप्रकार होय. तर्कसंगत, विचारप्रधान, विवेचननिष्ठ, खंडनमंडनपर स्वरूपाचे गद्य भाषेतील प्रतिपादनपर लेखन निबंध या नावाने ओळखले जाते. पाश्चिमात्य साहित्यात या लेखनप्रकाराची परंपरा बरीच जुनी आहे. मराठीत अठराव्या शतकापर्यंत पद्यवाङ्मयाचाच सर्वसामान्य प्रघात असल्यामुळे व ऐतिहासिक

स्वरूपाचे आणि अल्प प्रमाणात धार्मिक स्वरूपाचे गद्यलेखन सोडले तर गद्याची रीतच नसल्यामुळे निबंध सुरू झाला नव्हता. कोणत्याही व्यक्तीच्या बाबतीत विचार करण्याची प्रक्रिया ही अगदी नित्याची बाब आहे. जीवनव्यवहारात घडणाऱ्या व वेगवेगळ्या निमित्ताने अनुभवाला येणाऱ्या प्रसंगांच्या अनुषंगाने माणसाच्या मनात प्रतिक्रिया उत्पन्न होतच असतात त्यांचे प्रकटीकरण करावेसे वाटणे हे मनुष्यस्वभावास धरून आहे. ब्रिटिश राजवट आल्यानंतर नवा राज्यकारभार सुरू झाला व नव्या शिक्षणपद्धतीचा परिणाम होऊन येथे नियतकालिके सुरू झाली. या नियतकालिकांतून वेगवेगळ्या समकालीन घटनाप्रसंगांच्या, ग्रंथांच्या, व्यक्तींच्या अनुषंगाने लिहिले जाऊ लागले या वाचकांना विचारप्रवृत्त करणाऱ्या लेखनामधून निबंधाचा उदय झाला. *दर्पण, प्रभाकर, धूमकेतू, दिग्दर्शन, ज्ञानप्रकाश, विविधज्ञानविस्तार, ज्ञानचंद्रिका, मराठी ज्ञानप्रसारक* अशी नियतकालिके निघाली व त्यामधून वेगवेगळ्या विषयांवर वेगवेगळ्या विचारांचे आदानप्रदान सुरू झाले. लोकहितवादींसारख्या लेखकांनी प्रभाकरातून 'शतपत्रे' लिहिली, भाऊ महाजनांसारख्या लेखकाने सातत्याने प्रबोधनप्रेरक लेखन केले. मिसेस फरार किंवा बाबा पदमनजी यांनी ख्रिस्ती धर्मप्रसारार्थ उपदेशपर विचार मांडले. जोतीराव फुले, विश्वनाथ नारायण इत्यादिकांनी छोट्या छोट्या पुस्तिकांच्या स्वरूपात निबंधात्मक गद्य लिहिले, निबंध या साहित्यप्रकारामुळे वैचारिक देवाणघेवाण सुकर झाली. एकमेकांच्या विचारांचा परस्परांशी होऊ शकणारा संपर्क सुलभ झाला. नियतकालिकांतील पत्रांतून इंग्रज राज्यकर्त्यांविषयीच्या असंतोषाची भावना तीव्र शब्दांत व्यक्त झालेली दिसते. भास्कर पांडुरंग तर्खडकर यांनी 'अ हिंदू' या नावाने इंग्रज सरकारवर टीकास्त्र सोडले. लोकहितवादींनी आपल्या समाजातील अनिष्ट चालीरीती व धार्मिक परंपरा यांच्यावर प्रखर हल्ला चढवला.

समकालीन शिक्षणपद्धती व ज्ञानव्यवहार यासंबंधी माहितीपर लेखन केले. 'विविधज्ञानविस्तारा'सारख्या नियतकालिकातून वेगवेगळ्या पुस्तकांची परीक्षणे येऊ लागली. *सुखदायक राज्यप्रकरणी निबंध* या विष्णुबुवा ब्रह्मचारी यांच्या ग्रंथावर संक्षिप्त परंतु परखड परीक्षण आले. आपल्या भाषेची स्थिती वर्णन करणारा निबंधही प्रसिद्ध झाला. या व्यतिरिक्त संस्कृत कवी मोरोपंत इत्यादी विषयांवरही उद्‌बोधक निबंध प्रसिद्ध झाले. पुनर्विवाह, जातिव्यवस्था व त्या अनुषंगाने उलटसुलट विचारांची देवघेव सुरू झाली. रामकृष्ण विश्वनाथ यांनी 'हिंदुस्थानची प्राचीन व सांप्रतची स्थिती व पुढे त्याचा काय परिणाम होणार, याविषयी विचार' या १८४३ साली प्रकाशित झालेल्या दीर्घ निबंधात तत्कालीन भारताच्या राजकीय व आर्थिक परिस्थितीची मीमांसा केली आहे. काशीनाथ बाळकृष्ण मराठे यांनी १८७२ मध्ये प्रकाशित केलेला 'नावल व नाटक ह्यांविषयी निबंध' हा साहित्यचर्चा करणारा या काळातील अपवादात्मक निबंध होय. कारण या काळात साहित्यविषयावर फारशी चर्चा होत नसे.

चिपळूणकर, आगरकर, टिळकादिकांच्या पुढील कालखंडातील निबंधवाङ्‌मयाचे आदिरूप म्हणावे असे हे लेखन आहे. विचारप्रकटीकरण – प्रतिक्रियानिरूपण या भावनिक गरजेसाठी गद्यरूपाचे माध्यम म्हणून उपयोग करणे याची सुरुवात या काळात झाली. गद्यलेखन हे आधुनिक समाजाचे एक व्यवच्छेदक वैशिष्ट्य मानले जाते. गद्यामुळे समाजात विवेकशीलता वाढते आणि अचूक आविष्कार करण्याची सवय लागते. (नेमाडे, भालचंद्र, १९९०, पृ. २५३) सामाजिक व धार्मिक प्रबोधन, राजकीय परिस्थितीविषयीच्या प्रतिक्रिया, नव्या शिक्षणपद्धतीतून निर्माण झालेले नवनवीन विषय, ग्रंथपरीक्षणे, साहित्यचर्चा इत्यादी वेगवेगळ्या विषयांचा परामर्श घेण्याची प्रथा या लेखनातून सिद्ध झाली. अव्वल इंग्रजी काळातील निबंधाचे हे कार्य महत्त्वाचे आहे. कालांतराने वैचारिक साहित्य म्हणून जे गद्यलेखन रूढ झाले आणि *गीतारहस्य* या ग्रंथापासून *आधुनिक भारत* या ग्रंथापर्यंत व *भारतीय संस्कृती* या ग्रंथापासून *महाराष्ट्र संस्कृती* या ग्रंथापर्यंत ज्या लेखनाने वैचारिक साहित्यसृष्टीचे वैभव वाढवले त्या लेखनाची सुरुवात या काळात झाली. श्री. म. माटे यांच्या *विज्ञानबोधाची प्रस्तावना* या वैचारिक ग्रंथाचा गौरव विसाव्या शतकात झाला. त्याचा पायादेखील एकोणिसाव्या शतकातील लेखनामधून घेतला गेला हे विसरता येत नाही. जोतीराव फुले यांचे समकालीन समस्यांची मूलग्राही मांडणी करणारे *शेतकऱ्याचा असूड, गुलामगिरी* हे ग्रंथ तर अत्यंत विचारप्रवर्तक आणि आजही इतक्या वर्षांनीदेखील मार्गदर्शक ठरावेत अशा योग्यतेचे आहेत. या तुलनेने पाहाता विसाव्या शतकाच्या अखेरीस व एकविसाव शतकाच्या आरंभी वैचारिक साहित्याचे दुर्भिक्ष्य जाणवल्यावाचून राहात नाही.

**सकस साहित्यनिर्मितीची पूर्वतयारी**

आता या समग्र कालखंडातील वाङ्मयासंबंधी सूत्ररूपाने काही निरीक्षणे मांडता येतील. आधुनिक मराठी ललित वाङ्मयाची खरी सुरुवात १८८० ते १८९० या दशकात झाली. परंतु तत्पूर्वीची साठेक वर्षे तरी या वाङ्मयाच्या पूर्वतयारीत गेली. या काळात घडलेला इंग्लिश साहित्याचा परिचय मराठीतील साहित्यनिर्मितीला व साहित्याच्या विकासाला निश्चितपणे कारणीभूत ठरला. इ. स. १८५७ पूर्वी म्हणजे मुंबई विद्यापीठाच्या स्थापनेपूर्वी सुरू झालेले इंग्लिश भाषेचे अध्ययन-अध्यापन आणि विद्यापीठाच्या स्थापनेनंतर त्याला लाभलेली शिस्त यामुळे साहित्याची नवनवीन रूपे आणि प्रकार मराठी वाचकांना व विद्यार्थ्यांना नव्याने परिचित झाले. भक्तीच्या, अध्यात्माच्या किंवा पांडित्याच्या व सवंग शृंगाराच्या पद्याविष्काराहून सर्वस्वी भिन्न असणारे महाकाव्य, खंडकाव्य, भावगीत यांसारखे पद्यरचनेचे प्रकार किंवा कथाकादंबरीनाटकादी गद्यरचनाप्रकार व त्यांमधून साकार होणारी लौकिक भावनांची थेट अभिव्यक्ती वाचकवर्गाला स्तिमित करणारी होती.

नव्या शिक्षणपद्धतीच्या स्वीकारानंतर शासकीय पातळीवरून झालेले पाठ्यपुस्तकनिर्मितीचे वा साहित्यनिर्मितीचे प्रयत्न आणि पारितोषिकांच्या प्रलोभनातून साहित्यनिर्मितीला मिळालेले उत्तेजन हा प्रकार अभिनव होता. साहित्याला विशिष्ट वळण देण्याचे शासनाने केलेले प्रयत्न हाही या कालखंडातील साहित्यविश्वाचा महत्त्वाचा विशेष म्हणता येईल. शालेय व शैक्षणिक साहित्याकडे शासनाने जाणीवपूर्वक लक्ष पुरविल्यामुळे मराठी गद्याचा विकास भराभर होऊ लागला. गद्यभाषेची अभिव्यक्तिक्षमता जशी वाढली तशीच सुगमताही वाढली. कोशरचना व व्याकरणग्रंथ यांच्या गंभीरतापूर्वक केलेल्या उपयोजनामुळे प्रमाण मराठी गद्याची प्रस्थापना झपाट्याने होऊ शकली. शासनाप्रमाणेच धर्मप्रसार करणाऱ्या मिशनऱ्यांनीही मराठी भाषेचा विकास साधण्यास हातभार लावला. ख्रिश्चन धर्माचा प्रसार व त्या प्रसाराला केला जाणारा विरोध यांतील आंतरक्रियेतूनही मराठी भाषेची ताकद वाढत गेली. नव्या शिक्षणपद्धतीला अनुसरून इतिहास, भूगोल, गणित, भौतिकविज्ञान, रसायनशास्त्रादी विषयांच्या मांडणीस उपयुक्त ठरणारे गद्यच जीवनव्यवहारातील विचारप्रकटनास, विवेचनास आणि उलटसुलट प्रतिपादनासही साहाय्यकारी होते या गद्यवाङ्मयाच्या सामर्थ्याचा सर्वांना प्रत्यय आला. नव्याने शिकू लागलेल्यांना गद्यवाङ्मय हे ज्ञानार्जनाचे व ज्ञानप्रसाराचे माध्यम होऊ शकते याचा साक्षात अनुभव या काळात येऊ लागला. गद्यलेखन हे सुकर अर्थव्यक्तीचे परिणामकारक माध्यम होय, ते प्रकाशदायी असल्यामुळे उद्‌बोधनासाठी आवश्यक असणारा संपर्क त्यामुळे सुलभ होतो आणि समाजाला योग्य मार्ग दाखवण्यासाठी त्याची उपयुक्तता मोठ्या प्रमाणावर आहे, याचे भान या काळात उत्पन्न झाले. समाजसुधारकांनी, धर्मसुधारकांनी व राजकीय आंदोलकांनी या गद्याचाच आधार घेऊन पुढील काळात आपले कार्य प्रभावीपणे चालविले. नियतकालिकांचा उदय झाल्यामुळे ज्ञानसंपादन व ज्ञानप्रसार तर सोपेपणाने होऊ शकलाच, परंतु मतप्रकटन व लोकशिक्षण घडून येण्यासही त्यांचा फार मोठा उपयोग झाला.

वरवर पाहाता प्राथमिक पातळीवरील ज्ञानदान करणारी पुस्तके या काळात उत्पन्न झाली हे खरे, परंतु असेही काही विषय असतात व त्यातील ज्ञान मानवजातीस उपकारक असते ही जाणीव सर्वांपर्यंत पोचावयास त्यांचे साहाय्य झाले. भाषांतर ही त्या काळात व पुढेही बराच काळ दुय्यम मानली गेलेली प्रक्रिया या कालखंडाचे खरे म्हणजे भूषण होती. वेगवगळ्या भाषांतील साहित्यकृतींची भाषांतरे होत राहिल्यामुळे मराठी भाषेची समृद्धी वाढावयास मदत झाली. विभिन्न संस्कृतींचा व त्यामधील संकेतांचा परिचय झाल्यामुळे मराठी माणसाचे सांस्कृतिक संचित वाढीला लागले. त्यामुळे ''या पाऊणशे वर्षांत एकही अलौकिक किंवा अजरामर ग्रंथ मराठीत झाला नाही. लहानसहान सटरफटर ग्रंथ भाराभर झाले. 'तारागण' पुष्कळच उगवला, पण तमोनाशक चंद्र मात्र कोठेच आढळला नाही!'' हा दत्तो वामन पोतदार यांचा अभिप्राय (१९२२, पृ. ५) अर्धसत्य स्वरूपाचा आहे. सकस मराठी साहित्य निर्माण होण्यासाठी जी पूर्वतयारी आवश्यक होती ती या कालखंडात भरपूर झाली. निबंध, काव्य, नाटक, कादंबरी, कथा हे जे साहित्यप्रकार पुढील कालखंडात बहरले त्या बहरास या कालखंडातील मशागत कामी आली. मुख्य म्हणजे प्रमाण मराठी भाषा रूढ झाली.

आणखी एक महत्त्वाचा उल्लेख करावयास हवा. इंग्रजांच्या आगमनापूर्वी आणि आगमनानंतर सुरुवातीची काही वर्षे विद्यार्जन केवळ ब्राह्मणवर्गापुरते सीमित होते. एल्फिन्स्टनच्या धोरणामुळे व जोतीराव फुले यांच्यासारख्या खंद्या कृतिवीर शिक्षणप्रसारकामुळे सर्व जातीजमातीतल्या लोकांमध्ये विद्येविषयी आस उत्पन्न झाली. माणसे इथूनतिथून सगळी सारखीच, हा समतेचा विचार प्रसृत झाला. स्त्रियांच्या दुरवस्थेविषयीचे भान उत्पन्न झाले. पारंपरिक धर्मविचाराच्या मर्यादा स्पष्ट झाल्या. सामाजिक दुष्प्रवृत्तींची जाणीव झाली. इंग्रजी राज्य हा ईश्वरी प्रसाद नाही तर अर्थलोभाच्या व सत्ताकांक्षेच्या पोटी निर्माण झालेला स्वार्थी व्यवहार आहे हेही हळूहळू कळू लागले. या जागृतीचा परिणाम होऊन येथे धर्मसुधारणेचे, सामाजिक सुधारणांचे, राजकीय चळवळीचे व शैक्षणिक प्रगतीचे प्रयत्न सुरू झाले. या प्रयत्नांचा परिणाम पुढील काळातील साहित्यनिर्मितीवर अपरिहार्यपणे झाला. विचारकलहाला तोंड फुटले आणि विचारकलहाला घाबरू नका कारण विचारच विवेकवान कृतीस प्रेरणा देतो या समाजहितकर सत्याचे प्रतिपादन झाले.

**आधी सामाजिक की राजकीय?**

१८८५ ते १८९५ या दहा वर्षांत महाराष्ट्रात आधी सामाजिक की आधी राजकीय या विषयासंबंधी परस्परांवर कुरघोडी करणारी चर्चेची फार मोठी उलाढाल झाली. आपला प्रत्येक आचारविचार हा बुद्धिवादाच्या व स्वतंत्र विचारशक्तीच्या कसोटीवरच पारखून घेतला पाहिजे आणि शास्त्रप्रामाण्य वा रूढीची पाठराखण यांची पर्वा न करता नव्या तत्त्वाचा स्वीकार केला पाहिजे अशी भूमिका आगरकरांनी घेतली. सुधारणेच्या बाजूने प्रतिपादन करताना बुद्धिवाद व व्यक्तिवाद यांना त्यांनी भौतिकवादाची जोड दिली. शास्त्र, कला, नीती, धर्म, राज्य इत्यादिकांची उभारणी मूलत: इंद्रियजन्य सुखदु:खावरच झालेली असल्यामुळे अशा सुखदु:खांच्या अभावी सर्व भौतिक व सांस्कृतिक जीवनाचे अस्तित्वच धोक्यात येईल अशी भूमिका ठामपणे आगरकरांनी घेतली. त्यांच्यापूर्वी सुधारणेचा पक्ष न्यायमूर्ती रानडे यांनी व्यक्तिस्वातंत्र्य, बुद्धिनिष्ठा, समता व उदारता या मूल्यांच्या आधारे मांडला होता. परंतु परंपरेचे संस्कार व प्रत्यक्ष परिस्थिती आणि रूढ श्रद्धा व नवे विचार यांच्यातील विरोधाचा उलगडा न करता आल्यामुळे रानड्यांच्या मांडणीला विशेष धार येऊ शकली नव्हती.

याउलट ''आमच्या स्मृती आम्ही लिहिणार'' असा आग्रह धरून आगरकरांनी शब्दप्रामाण्यवादी वृत्तीवर टीकेची झोड उठवली. ''जुन्या वेदांतापलीकडे वेदांत नाही, जुन्या गणितापुढे गणित नाही, जुन्या अलंकाराहून अलंकार नाहीत, जुन्या व्याकरणापुढे गती नाही, जुन्या न्यायापेक्षा दुसऱ्या न्यायात अर्थ नाही, असल्या भ्रमामुळे आमचे डोळे बांधल्यासारखे होऊन आज कित्येक शतके तेल्याच्या बैलाप्रमाणे आम्ही जुन्या शास्त्रांच्या आणि पुराणांच्या घाण्याभोवती घिरट्या घालीत आहोत. हे आमचे परिभ्रमण केव्हा संपेल ते संपो, पण यांतून आमची सुटका झाल्याखेरीज कोणत्याही शास्त्रांत किंवा कलेत आमचे पाऊल पुढे पडण्याचा संभव नाही.'' ... आगरकरांनी प्रयोगनिष्ठा व डोळस बुद्धिवाद यांचे निकष मात्र प्रत्येक सुधारणेस लावले पाहिजेत असे सांगितले. (प्रधान, ग. प्र. १९६०, प्रस्तावना पृ. १५)

व्यक्ती आणि समाज यांचे स्वरूप स्पष्ट करताना व्यक्तीसाठी समाज आहे समाजासाठी व्यक्ती नाही, व्यक्ती ही समाजाचा घटक असली तरी ती जिवंत व स्वयंपूर्ण आहे, समाजाला व्यक्तीशिवाय स्वतंत्र अस्तित्व नाही असे आपले स्पष्ट मत आगरकरांनी व्यक्त केले. व्यक्तीच्या हितासाठी सामाजिक नियमांचा अवतार असल्यामुळे ते व्यक्तिविकासाच्या एकमेव उद्दिष्टाने प्रेरित असले पाहिजेत असा अभिप्राय त्यांनी व्यक्त केला. समाज हा स्थितिशील असतो याचे भान असल्यामुळे ''हे आमचे निगरगट्ट तट्टू कायद्याच्या फोकावाचून हलणार नाही'' अशी आक्रमक भूमिका त्यांनी स्वीकारली. सोवळ्याओवळ्यासारख्या क्षुल्लक प्रश्नांपासून जातिभेद व अस्पृश्यता यांसारख्या व्यापक प्रश्नांपर्यंत सर्वच विषयांचा त्यांनी सुयोग्य असा मेळ साधला. विरोधी लोकमताची पर्वा न करता सुधारणावादी विचारांचा पक्ष त्यांनी उचलून धरला.

''आगरकरांनी जे विचार निबंधांतून मांडले त्याचेच वेगळे स्वरूप हरिभाऊ आपट्यांच्या सामाजिक कादंबऱ्यांत आपल्याला पहावयास मिळते. महर्षी अण्णासाहेब कर्व्यांच्या सारख्या समाजसुधारकाला आगरकरांच्या लेखनातून

प्रेरणा मिळाली. नंतरच्या पिढीतील सर्व पुरोगामी लेखक व कार्यकर्ते आगरकरांना आपले स्फूर्तिस्थान मानतात यावरून त्यांच्या कार्याचे महत्त्व लक्षात येईल.'' (प्रधान, ग. प्र., तत्रैव, प्रस्तावना पृ. २०)

आगरकरांच्या सर्व सुधारणांमागे व्यक्तिस्वातंत्र्याची बैठक हा होती. ''समाजाचे कुशल राहून त्यास अधिकाधिक उन्नतावस्था येण्यास जेवढी बंधने अपरिहार्य आहेत तेवढी कायम ठेवून बाकी सर्व गोष्टींत व्यक्तिमात्रास (पुरुषास व स्त्रीस) जितक्या स्वातंत्र्याचा उपभोग घेता येईल तितका द्यावयाचा, हे अर्वाचीन पाश्चिमात्य सुधारणेचे मुख्य तत्त्व आहे, व हे ज्यांच्या अंत:करणात बिंबले असेल त्यांना आमच्या समाजव्यवस्थेत अनेक दोषस्थले दिसणार आहेत, हे उघड आहे. ही दोषस्थळे वारंवार लोकांच्या नजरेस आणावी, ती दूर करण्याचे उपाय सुचवावे, आणि युरोपीय सुधारणेत अनुकरण करण्यासारखे काय आहे ते पुन:पुन: दाखवावे, यास्तव हे सुधारक पत्र काढले आहे'' असे ते आपले धोरण सांगतात. जन्मसिद्ध चातुर्वर्ण्यपद्धती ही या व्यक्तिस्वातंत्र्याच्या तत्त्वाशी विरुद्ध असल्याने त्यांना ती पसंत नव्हती. आपल्या समाजात मनुष्याला त्याच्या जीवितातील बहुतेक महत्त्वाच्या बाबतींत स्वातंत्र्य उपभोगता न येता दास्य करावे लागते. त्याचे धार्मिक व सामाजिक आचार हजारो वर्षांच्या परंपरागत रूढींच्या रूपांनी त्याला जड शृंखलांप्रमाणे बांधून टाकितात, स्त्री-पुरुषांचा विवाह बालपणीच होत असल्याने त्या बाबतीतही त्यांना स्वातंत्र्य उपभोगिता येत नाही आणि चातुर्वर्ण्यही जन्मसिद्ध असले, तर वृत्तीच्या किंवा धंद्याच्या बाबतीतही त्याला स्वातंत्र्य लाभत नाही. तात्पर्य, विचारस्वातंत्र्य, विवाहस्वातंत्र्य आणि व्यवसायस्वातंत्र्य या बाबतींत हिंदुसंस्कृतीतील व्यक्ती सर्व बाजूंनी बांधलेली असते. विचार, विवाह आणि व्यवसाय या बाबतींत व्यक्तीला स्वातंत्र्य असल्याखेरीज व्यक्तीचा विकास होऊन त्याला (पृ.२०५) सुख लागणार नाही हे जितके खरे आहे, तितकेच त्याखेरीज त्या समाजाची उन्नतीही होणार नाही व तो समाज प्रगतिपर राहणार नाही, असे आगरकरांचे मत होते. (जावडेकर, शं.द., १९६८, पृ.२०६)

आगरकरांना तोडीस तोड विरोध करण्याचे काम बाळ गंगाधर टिळक यांनी अत्यंत जबाबदारीने पार पाडले.* सामाजिक आचारविचारांवर तार्किक हल्ले करणे म्हणजे समाजाची मोडतोड करणे असे टिळकांना वाटे. एकंदर समाजजीवनात राजकारणाला त्यांनी अग्रक्रम दिला व राजकीय उपयुक्ततेच्या कसोटीवर सुधारणांची पारख केली. एकदा का राजकीय सत्ता आपल्या हातात आली की सत्तेच्या बळावर आपणाला हव्या त्या सुधारणा सहज घडवून आणता येतील; सुधारणेचा आग्रह धरून समाजात आता दुफळी उत्पन्न करावी ही गोष्ट टिळकांना अनिष्ट वाटली. टिळक म्हणत की एक प्रकारची सामाजिक व धार्मिक जागृती अथवा विचारक्रांती होणे अवश्य असले, तरी ती आपल्या पूर्वपरंपरेस धरून केली तरच लोकांस पटेल. आताच सर्व जाती मोडा, धर्मबंधने तोडा आणि सर्व शुद्ध बुद्धिवादी बना, असे म्हटल्याने लोक तसे होत नाहीत व उगीच मतभेदांचे तट पडून स्वराज्याच्या कार्याची हानी होते. लोकनायकांनी पूर्वपरंपरेवर एकदम हल्ला करून केवळ तार्किक हल्ले समाजावर चढविले, तर त्यात आमचे कोणतेही हित न होता लोकांची शक्ती दुभंगते. राजकीय सुधारकाने एकांतिक धार्मिक व सामाजिक सुधारणेचा पुरस्कार करणे निदान परतंत्र राष्ट्रात तरी योग्य नाही, असे टिळकांना वाटे तर, आगरकरांना यात सत्याशी प्रतारणा होते असे वाटे. ते म्हणत, सीता निरपराधी आहे हे माहीत असून रामचंद्राने केवळ लोकाराधनेसाठी तिचा त्याग केला, तसे वर्तन समाजसुधारणेला दूर लोटण्यात टिळक करीत आहेत. या आगरकरांच्या म्हणण्यात मुळीच तथ्य नव्हते असे नाही; पण राजकारण करताना अशी लोकाराधना करण्यात स्वार्थ किंवा प्रमाद तरी काय आहे, असे टिळकांना वाटे.(जावडेकर, तत्रैव, पृ. २२७) हिंदू कोड बिल लोकसभेत सादर करताना आंबेडकरांनी राम-सीतेचे उदाहरण घेतले होते. त्यावरून मोठा गदारोळ झाला. पंतप्रधान नेहरूदेखील अस्वस्थ झाले आणि त्या प्रसंगी बिल पास होऊ शकले नाही.

---

* परंपरा जतन करू पाहणाऱ्या टिळकांची जहाल राजकीय मते मान्य नसलेले उदारमतवादी सुधारक व टिळकांच्या प्रतिगामी सामाजिक मतामुळे रागावलेले महाराष्ट्रातील समाजवादी यांनी टिळक-आगरकरांच्या संदर्भात लिहिताना आगरकरांना नेहमीच झुकते माप दिले. परिणामत: आगरकरांची हेटाळणी करणारे शब्द फक्त टिळकांनीच काढले, असा एक समज प्रचलित झालेला दिसतो. केसरीचे व सुधारकाचे अंक वाचल्यावर परस्परांची कुचाळी व हेटाळणी करण्यात दोघेही तुल्यबल होते असाच ग्रह होतो. एवढेच नव्हे तर अनेकदा आगरकर प्रथम कुरापत काढीत, मग टिळक स्वसमर्थनार्थ त्याची परतफेड करीत असे लक्षात येते. (फडके, य. दि., १९७७, पृ. ५३)

टिळक व आगरकर यांच्या मनोभूमिकाच भिन्न होत्या.* पहिल्याची भूमिका राजकीय मुत्सद्दीपणाची व राष्ट्रीय पक्षसंघटनेची आणि दुसऱ्याची भूमिका केवळ तत्त्वनिष्ठ सर्वांगीण संस्कृति-सुधारकाची होती. (जावडेकर, तत्रैव, पृ. २२८) टिळकांची विचारपद्धती राजकीय मुत्सद्दीपणाची व राष्ट्रीय पक्ष-संघटनेची होती. तत्त्वनिष्ठ सर्वांगीण संस्कृती-सुधारक होते. आगरकरांची मते इतर सुधारकांहून अधिक तर्कशुद्ध आणि सर्वांगीण क्रांतिवादी आहेत, हे टिळकांना माहीत होते. आगरकर हे रानड्यांपेक्षा सामाजिक व धार्मिक क्षेत्रांत जसे पुरोगामी आहेत, त्याप्रमाणे राजकीय बाबीतही ते जहाल आहेत हेही त्यांना उत्तम ठाऊक होते. धार्मिक-सामाजिक सुधारणांच्या मागे लागून या राष्ट्रातील तरुणांची शक्ती वाया घालविण्याऐवजी आपल्या संस्कृतीच्या अभिमानाच्या बळावर राष्ट्रस्वातंत्र्याचे रणकुंड पेटते ठेवणे त्यांना महत्त्वाचे वाटत होते व तेच त्यांनी केले. सर्वसामान्य समाजातील लाखो लोकांना आगरकरप्रणीत सामाजिक-धार्मिक विचार रुचत-पटत नाहीत हे टिळकांचे निरीक्षण होते. अशा समाजात जर संस्कृतीचा अभिमान उत्पन्न केला तर त्याचा उपयोग स्वराज्यासाठी होईल असा त्यांना विश्वास वाटत होता. एकदा का ते स्वराज्याच्या कार्यासाठी तयार झाले, की त्याच्या मार्गात त्यांना आड येणारे सामाजिक व धार्मिक निर्बंध ते दूर करतील. आमची संस्कृती श्रेष्ठ असताना आमच्या हातांनी आमच्या संस्कृतीचा पाया उखडण्याचे कर्म कशासाठी करायचे असा टिळकांचा सवाल होता. इंग्रज जोवर येथून जात नाहीत तोवर हिंदुस्थानचा अभ्युदय दूरच, अशी त्यांची धारणा असल्यामुळे सामाजिक सुधारणांचा आग्रह धरून आपलीच शक्ती वाया घालविण्यापेक्षा तिचा उपयोग इंग्रजांच्या प्रतिकारार्थ करावा असे त्यांचे धोरण होते.

इंग्रजी राज्यामुळेच भारताला आधुनिक एकराष्ट्रीयत्व प्राप्त होण्याची संधी मिळाली आहे हे टिळक जाणतच होते. ''इंग्रजी राज्यांत आम्हास झालेले फायदे म्हटले म्हणजे १) शांतता, २) कायद्याची सर्वत्र व्यवस्था, ३) अपराधांचा बंदोबस्त, ४) सार्वजनिक आरोग्य, ५) व्यापार समृद्धी, ६) शेतकीसुधारणा, ७) खनिज व उद्भिज संपत्तीची अभिवृद्धी, ८) विद्यादानाच्या अनुपम सोयी, ९) स्वराज्य कारभार यांची प्राप्ती, १०) लेखनस्वातंत्र्य, ११) यंत्रादी सुखसामग्रीचा परिचय आणि १२) स्वातंत्र्याची अभिरुची हे होत.'' (जोशी, लक्ष्मणशास्त्री (संपा.), २००९, पृ. ५२) असे असले तरी भारताचे भयंकर आर्थिक शोषण ब्रिटिश राजवटीमुळे होत आहे (ईस्ट इंडिया कंपनीच्या व्यापारी कारभारामुळे हिंदुस्थानातून दरवर्षी तीन दशलक्ष पौंड इंग्लंडला जातात असा आकडा १८३८ सालीच सांगितला गेला होता.) व ते थांबवण्याचा एकमेव उपाय म्हणजे स्वराज्य, या दादाभाई नौरोजी यांच्या भूमिकेचा पाठपुरावा टिळकांनी केला. अनेक समस्यांचे स्वराज्य हे एकच उत्तर आहे, असे टिळक व्याख्याने देताना समजावून सांगत. विठ्ठल रामजी शिंदे यांच्यासारखा त्यांचा सहकारी 'काँग्रेसने अस्पृश्यता नष्ट करण्याबाबत ठराव करावा' असा आग्रह धरू लागला की, 'पारतंत्र्यात आपणा सर्वांचीच स्थिती अस्पृश्यांसारखी झाली आहे' असे ते जाहीररीत्या सभेत सांगत. टिळकांची ही भूमिका कोणास पटो वा न पटो, एक सोयीचा पवित्रा म्हणून ती त्यांनी घेतली असे वाटत नाही, तर तशी त्यांची प्रामाणिक समजूत होती असाच केसरीचा अंक वाचल्यावर ग्रह होतो. तार्किक दृष्टीनेच हवी तेथे पाडापाड करण्यास उद्युक्त झालेले सुधारक आपल्या उतावळेपणाने समाजव्यवस्थेलाच धोका निर्माण करीत आहेत असे त्यांना वाटत असते. आगरकरांच्या उदारमतवादी सर्वांगीण सुधारणावादावर तुटून पडताना टिळकांनी मूलत: हाच दृष्टिकोण व्यक्त केला आहे. (फडके, य. दि., पूर्वोक्त, पृ. ५९, ६०) मात्र सुधारणावादास विरोध केला तरी टिळक सनातन्यांशी एकरूप होऊ शकले नाहीत कारण जुन्या शास्त्रपरंपरांकडे पाहाण्याची त्यांची दृष्टी भाबड्या श्रद्धावंताची नसून चिकित्सकाची होती.

---

* टिळक व आगरकर यांच्यातील वैचारिक मतभेद तत्कालीन समाजातील वेगवेगळ्या थरांतील व्यक्ती कशा प्रकारे पाहात याचे एक नमुनेदार उदाहरण आपल्याला राम गणेश गडकरी यांच्या 'एकच प्याला' या नाटकातील रामलालच्या तोंडी असलेल्या पुढील उद्गारावरून समजते. रामलाल म्हणतो, ''आगरकर आणखी टिळक या महात्म्यांचा परस्परविरोध म्हणजे आकाशांतल्या नक्षत्रांच्या शर्यती! तुमच्याआमच्यासारख्या पामरांनी भूलोकावरूनच त्यांच्याकडे पाहावं, आणखी त्यांच्या तेजानं आपला मार्ग शोधून काढावा'' (एकच प्याला, अंक २ प्रवेश ३)

आधी सामाजिक की आधी राजकीय या वादात आगरकरांना आलेल्या अपयशाला तत्कालीन सामाजिक परिस्थिती जबाबदार होती. ज्या समाजाला आगरकर सुधारणेचे धडे देत होते त्या समाजात ते पचवण्याची ताकद नव्हती. ज्या इंग्लंडमधील व्यक्तिवादाची तरफदारी आगरकर करीत होते त्या व्यक्तिवादाचा पाया मुख्यत: आर्थिक होता. ॲडम स्मिथ, रिकार्डो, मिल यांसारखे अर्थशास्त्रज्ञ त्याचे प्रवर्तक होते. शास्त्रीय शोध, उत्पादनाची व वाहतुकीची नवी साधने यांच्या साहाय्याने भरपूर संपत्ती मिळवण्याची संधी इंग्रज व्यापाऱ्यांना होती. महाराष्ट्रात अशी संधीच नसल्यामुळे व्यवहारत: आगरकरांच्या व्यक्तिवादाला परंपरेपासून मुक्ती एवढाच अर्थ होता.

**वसाहतवाद**

वसाहतवाद असा शब्दप्रयोग करताना सुरुवातीलाच हे स्पष्ट करावयास हवे की, सामान्यपणे वसाहतवादाच्या संदर्भात वसाहत याचा अर्थ जे सत्ताधीश एखादा परकीय भूप्रदेश सामर्थ्याच्या बळावर काबीज करतात व तेथे जाऊन राहातात ती जागा व ती माणसे असा होतो. या अर्थाने हिंदुस्थान ही इंग्रजांची 'वसाहत' (colony) नव्हती. इंग्रज हे सत्ताधीश होते. त्यांनी मोठ्या हिकमतीने तसेच योजनापूर्वक हिंदुस्थानवर आपले राज्य प्रस्थापित केले परंतु ते काही येथे येऊन कायमचे वस्तीला राहिले नाहीत. त्यांच्या देशापासून साता समुद्रापलीकडे असणाऱ्या एका भूप्रदेशावर ते आपला अंमल गाजवत होते. त्यासाठी त्यांनी येथे इंग्रज अधिकारी व त्यांना आवश्यक असणारा नोकरदारवर्ग हा पाठविला होता. ईस्ट इंडिया कंपनीचे कंपनीसरकार जाऊन इंग्लंडच्या राणीचे सरकार येथे ज्याप्रमाणे हुकूम करील त्याप्रमाणे इथला कारभार चालत असे. कारभारासाठी आलेले बव्हंशी सर्व इंग्रज आपला सेवाकाल संपला की परत आपल्या देशात जात. इंग्रजांच्या हिंदुस्थानखेरीज इतरत्र असणाऱ्या वसाहतींत अशी स्थिती नव्हती. दक्षिण आफ्रिकेमध्ये जाऊन अनेक इंग्रज लोक तिथले रहिवासी झाले होते. अर्थात हा फरक सोडला तर वसाहतवादाचे जे सर्वसामान्य स्वरूप एरवी प्रत्ययाला येते त्याला हिंदुस्थानातील परिस्थिती अपवाद नव्हती. वसाहती राजवट व तिचा कारभार, तीमागील ध्येयधोरणे व त्यांचे परिणाम हा वसाहतवादातील मूलभूत महत्त्वाचा घटक आहे. साम्राज्यवादी परकीय राजसत्ता वसाहतीतील अर्थकारण, राजकारण, न्यायपद्धती इत्यादी मूळ व्यवस्थांत आपल्याला सोयीचे असणारे बदल घडविते, त्यामुळे वसाहती राजवट हा वसाहतवादातील केंद्रवर्ती घटक असतो. वसाहतवादी राजवटीविषयी सकारात्मक बोलायचे ठरवले तरीही ती राजवट वसाहतींचे आर्थिक, राजकीय व मानसिक शोषण करते हे नाकारता येत नाही. याचे मूळ कारण जे जेते असतात त्यांच्या मनात जितांविषयीची एक तुच्छताबुद्धी सातत्याने वास करीत असते. आपण जे काही करू ते जितांनी स्वीकारलेच पाहिजे अशी जेत्यांची भूमिका असते. ही परिस्थिती दीर्घकाळ अशीच चालू राहू शकत नाही आणि सत्ताधीशांविषयीचा जनतेच्या मनातील असंतोष केव्हा ना केव्हातरी उग्र रूप धारण करतो व त्या असंतोषाचा स्फोट होतो.

हिंदुस्थानातही इंग्रजांबद्दलचा राग हळूहळू वाढत गेला आणि स्वातंत्र्याची चळवळ मोठ्या प्रमाणावर वेगवेगळ्या रूपांत सुरू झाली. शस्त्रसाठा जमवून देशातील वेगवेगळ्या भागांत इंग्रज अधिकाऱ्यांवर हल्ले करण्यापासून सशस्त्र क्रांतीचे मनसुबे प्रत्यक्षात आणण्याच्या दृष्टीने केलेल्या हालचालींपर्यंत आणि राष्ट्रजागृती व लोकशिक्षण करणाऱ्या वृत्तपत्रीय लेखनामुळे तुरुंगवासाच्या शिक्षा भोगण्यापासून सविनय कायदेभंग ते 'चले जाव'च्या चळवळीपर्यंत झालेले सर्वांगीण प्रयत्न सुपरिचित आहेत. अशा प्रयत्नांनी त्रस्त झाल्यामुळे उदार व लोकशाहीवादी विचारसरणीचा आव आणणाऱ्या वसाहतवादी इंग्रजांनी हिंदुस्थानातील राजकीय आंदोलकांचा मनोभंग करण्याची संधी तर सोडली नाहीच, शिवाय त्यांचा अत्यंत अमानुष असा छळ केला हे प्रसिद्ध आहे. *माझी जन्मठेप* या आत्मवृत्तातून आपल्यापर्यंत पोचणारा विनायक दामोदर सावरकर यांचा झालेला अपरिमित छळ वसाहतवाद्यांच्या वर्तनाचे प्रातिनिधिक उदाहरण मानता येईल. साने गुरुजींसारख्या कारुण्यमूर्तीलाही तुरुंगात जेलरकडून जी मारहाण सोसावी लागली व ती त्यांनी ज्या कणखरपणाने सोसली ते उदाहरणही राज्यकर्त्यांच्या व देशभक्तांच्या वर्तनावर प्रकाश टाकणारे आहे. अगदी गांधी–नेहरूंपासून सर्वसामान्य आंदोलकांपर्यंत सर्वांना ब्रिटिश राजवटीकडून जी कमालीची मानहानी करणारी वागणूक मिळाली ती वसाहतवाद्यांच्या आचारधर्माचा नमुना म्हणता येईल. भगतसिंग, राजगुरू, चाफेकरबंधू यांसारख्या क्रांतिकारक देशभक्तांना फर्मावण्यात आलेल्या फाशीच्या शिक्षा व राजकीय स्वरूपाच्या जवळपास सगळ्या खटल्यांत इंग्रज न्यायाधीशांनी केलेले पक्षपाती

वर्तन वसाहतवादी मानसिकतेमधील प्रखर स्वामित्वभावनेचे द्योतक म्हणता येईल. वसाहतीकरण करणाऱ्यांची वसाहतींच्या संदर्भातील स्वामित्वभावना इतकी प्रखर असते की, त्यांनी वसाहतींच्या प्रस्थापित केलेल्या व्यवस्थेला ढळ पोचेल अशी कोणतीही कृती त्यांना सहन होत नाही. वसाहतींवरील आपले स्वामित्व एक ना एक दिवस संपुष्टात येणार आहे याची मनोमन खात्री असली, तरी ते स्वामित्वाला इतके कवटाळून बसतात की, त्याला दिल्या गेलेल्या प्रत्येक आव्हानाचा बदला ते राजकीय बंद्यांचा अंगावर काटा उत्पन्न करील अशा प्रकारच्या अमानुष छळाने घेतात. जेणेकरून स्वातंत्र्याच्या मागणीपासून देशवासियांनी परावृत्त व्हावे असा त्यांचा प्रयत्न असतो. वसाहतवाद्यांची वृत्ती राजकीय क्षेत्रात आपले वर्चस्व गाजविण्यापुरती मर्यादित नसते. स्वत:ला फायदेशीर होणारी आर्थिक नियंत्रणे लादणे, अर्थलाभास साहाय्यकारी ठरणारी धोरणे अंगीकारणे, हे तर वसाहतवादी आविष्काराचे ढोबळ रूप झाले. वसाहतीतील संस्कृती, तेथील वाङ्मय, कला या सर्वांच्या बाबतीत त्यांचा आचारविचार स्वत:ला श्रेष्ठ व हिंदुस्थानातील वाङ्मयव्यवहार, तत्त्वज्ञान, कलाक्षेत्र क्षुद्र मानणारा होता. 'आफ्टर ॲम्नेशिया' या गणेश देवींच्या ग्रंथात या मुद्याची सविस्तर चर्चा आली आहे.

इंग्रजांचे साम्राज्यवादी धोरण हिंदुस्थानातील कोट्यवधी व्यक्तींच्या आर्थिक शोषणाचे कारण ठरले होते. इंग्रजी राजवटीला महाराष्ट्रातून मिळालेल्या प्रतिसादात भास्कर तर्खडकर, भाऊ महाजन व रामकृष्ण विश्वनाथ यांनी केलेले मतप्रकटन महत्त्वाचे आहे. इंग्रजांचे वसाहतवादी धोरण हिंदुस्थानच्या आर्थिक अवनतीस कसे जबबादार आहे ते त्यांनी दादाभाई नौरोजी यांच्या आधी नि:संदिग्ध शब्दांत मांडले आहे. १ जुलै १८४१ रोजी *बॉम्बे गॅझेट* या इंग्रजी दैनिकाच्या संपादकाने ज्यांना देशकल्याणात रस असेल अशा विचारी वाचकांना ब्रिटिश सत्तेविरुद्ध आपल्या असणाऱ्या तक्रारी सांगण्याचे आवाहन केले होते.* या प्रसंगी ब्रिटिशांच्या धोरणांवर व त्यामुळे घडणाऱ्या दुष्परिणामांवर परखड प्रतिकूल स्वरूपाची मते मांडणारी पत्रे 'अ फिलँथ्रॉपी', 'अ फेअरहार्ट', 'अ हिंदू', 'अ सेकंड हिंदू', 'अ थर्ड हिंदू' अशा टोपणनावांनी प्रसिद्ध झाली. त्या पत्रांतून इंग्रज सरकारची जुलमी वागणूक उघडकीस आली आणि इंग्रजी राजवट हे ईश्वरी वरदान होय अशी भूमिका घेणाऱ्या तत्कालीन विचारवंतांना त्यातून उत्तर मिळाले. जेम्स मिलसारख्या इतिहासकारांनीही ब्रिटिश सत्ता ही पूर्वेकडील रानटी लोकांना सुसंस्कृत बनविण्याच्या हेतूने येथे आली आहे असा जो विचार प्रसृत केला त्यावरही या पत्रांमुळे घणाघाती आघात झाले. ईस्ट इंडिया कंपनीचा मनमानी कारभार, हिंदुस्थानातील संस्थानिकांशी स्वार्थबुद्धीने घडणारे राजकीय डावपेचाच्या स्वरूपाचे त्यांचे कपटी आचरण, ब्रिटिश राज्यकारभारातील तथाकथित कायदेशीरपणा व त्यामागील न्यायबुद्धी, त्यांचे शिक्षणविषयक धोरण किंवा त्यांनी आणलेला निधर्मीपणाचा आव अशा सगळ्या विषयांवर सप्रमाण, सडेतोड टीका त्यांनी केली. इंग्रजांच्या साम्राज्यवादी वृत्तीचा तर तर्खडकरांनी स्पष्ट निषेध केला. कोणत्याही वासाहतिक राजवटीत कल्याणाचा सद्हेतू असू शकत नाही, किंबहुना कल्याणकारी साम्राज्यवाद हा वदतोव्याघात आहे, अशी भूमिका जाहीरपणे मांडणारे भास्कर तर्खडकर हे बहुधा पहिले भारतीय असावेत. त्यांचे विचारप्रकटन वृत्तपत्रातून होत असल्यामुळे इंग्रजांनी चालवलेल्या भारताच्या शोषणाचा वृत्तांत हा दादाभाई नौरोजींच्या गळतीच्या सिद्धांताइतका पद्धतशीर नसला तरी त्या सिद्धांतासाठी आवश्यक असणाऱ्या सर्व मुद्यांची त्यांनी चर्चा केली. देशातील उद्योगधंद्यांची झालेली घसरण, संपत्तीचे स्थलांतर, अवाजवी कर आकारणी, नागरी व लष्करी उच्चपदांवर भारतीयांची नेमणूक न करणे आणि ब्रिटिश प्रशासनावर खर्च होणारा वारेमाप पैसा या सर्व विषयांचा परामर्श त्यांनी घेतला. १६ जुलै १८४१ च्या पत्रात 'फेअरहार्ट'ने लिहिले आहे ''मराठी सत्तासमाप्तीला जेमतेम चोवीस वर्षे होत नाहीत तोवरच ब्रिटिशांच्या वागण्याने जे राष्ट्र वैभवाच्या व समृद्धीच्या शिखरावर होते ते इतक्या अल्पावधीत दारिद्र्याच्या परिसीमेस पोचावे हे आश्चर्य आहे.'' भास्कर तर्खडकरांनी ब्रिटिश अधिकाऱ्यांना असे आव्हान दिले की, पुढीलपैकी कोणत्याही आरोपांचे त्यांनी खंडन करून दाखववावे – ''१) राजकारणात फसवणूक, २) व्यापारात विश्वासघात/लबाडी, ३) शेतकऱ्यांची पिळवणूक, ४) देशी उद्योगधंद्यांचा

---

* इंग्रजी राजवटीच्या इतिहासात वृत्तपत्र स्वातंत्र्याच्यादृष्टीने सुवर्णकाळ ठरलेला कालखंड १८३५–१८५७ हा होता. या काळात चार्ल्स मेटकाफ याने वृत्तपत्रांना मतप्रकटनाचे पूर्ण स्वातंत्र्य दिले होते. या त्याच्या कृतीबद्दल पुढे इंग्लंडातील सरकारने त्याला जबाबदार धरून त्याची पदोन्नती थांबविली होती. या काळातील वृत्तपत्रस्वातंत्र्याचा पुरेपूर उपयोग भाऊ महाजन यांनी करून घेतला असे एकोणिसाव्या शतकाचा इतिहास सांगतो.

नाश, ५) भारताच्या संपत्तीचे शोषण आणि दरिद्रीकरण, ६) भारतीयांना महत्त्वाच्या हुद्द्यांवर सहभाग नसणे, ७) जातीय भेदाभेद/सापत्नभाव, ८) न्यायदानात पक्षपातीपणा, ९) एतद्देशीयांच्या शिक्षणाबद्दल कमालीची उदासीनता, १०) सातारच्या राजाची अन्याय्य पदच्युती, ११) अफगाणिस्तानाबरोबर अनैतिक युद्ध, १२) चीनवर अनावश्यक लढाई, १३) ब्रिटिश इतिहासकारांकडून भारतीय इतिहासाचा विपर्यास.'' (नाईक, ज. वि., २०००, पृ. २९६)

भाऊ महाजन यांनी ब्रिटिशांकडून केला जाणारा हिंदुस्थानच्या आर्थिक शोषणाविरुद्ध 'प्रभाकर' मधून सातत्याने हल्ला चढवला आणि हिंदुस्थानच्या जीवावर ब्रिटन कसा श्रीमंत होत आहे हे दाखविण्याचा अखंड प्रयत्न केला. व्हिक्टोरिया राणीच्या मुलाच्या नामकरण समारंभात झालेल्या प्रचंड खर्चाचा व संपत्तीच्या प्रदर्शनाचा ठळक वृत्तांत 'प्रभाकर'च्या ३० मार्च १८४२ च्या अंकात प्रसिद्ध केला. ही बेसुमार उधळपट्टी भारतातील संपत्तीच्या जोरावरच शक्य झाली असे त्यांनी स्पष्ट केले. रामकृष्ण विश्वनाथ हे इंग्रजांवर टीकास्त्र सोडणारे एकोणिसाव्या शतकाच्या पूर्वार्धातील तिसरे महत्त्वाचे अभ्यासक. 'हिंदुस्थानची प्राचीन व सांप्रतची स्थिती व पुढे काय त्याचा परिणाम होणार याविषयी विचार' हे त्यांचे पुस्तक १८४३ च्या मे महिन्यात प्रकाशित झाले. रामकृष्ण विश्वनाथांनी ब्रिटिश राज्यकर्त्यांच्या आर्थिक धोरणाचे परीक्षण केले व हिंदुस्थानचे शोषण कशाप्रकारे चालले आहे ते दिग्दर्शित केले. या पुस्तकात हिंदुस्थानचा पूर्वेतिहास सांगून त्याला पूर्ववैभव कशा प्रकारे प्राप्त करून देता येईल ते त्यांनी सुचविले आहे. याखेरीज इतर अनेक विषयांचा परामर्श घेत असताना अतिशय समतोलपणाने इंग्रजांनी या देशातील संपत्तीचा ओघ आपल्या देशाकडे कशा प्रकारे वळविला आहे ते स्पष्ट केले आहे. ते लिहितात, ''असंतुलित व्यापारामुळे ब्रिटनकडे संपत्तीचा एक प्रवाह नियमितपणे वाहत आहे हे सिद्ध करण्यासाठक्ष रामकृष्ण विश्वनाथांनी बॉम्बे चेंबर ऑफ कॉमर्स आणि अशा अनेक संदर्भांचा उल्लेख केला आहे. भारतातून सर्व कच्चा माल इंग्लंडला नेणे आणि पक्का माल आणून जास्त किमतीला विकणे या ब्रिटिशांच्या धोरणावर त्यांनी खूप टीका केली. भारताचा जीवनरस कसा सतत शोषून घेतला जात होता हे सिद्ध करण्यासाठी वस्तुस्थिती आणि आकडेवारी यांच्या आधारे त्यांनी कापूस व इतर कच्च्या मालाच्या निर्यातीविषयी महत्त्वपूर्ण माहिती पुरविली आहे.'' (नाईक ज. वि., तत्रैव, पृ. २९९) 'हिंदुस्थानची प्राचीन व सांप्रतची स्थिती व पुढे काय त्याचा परिणाम होणार याविषयी विचार' या पुस्तकाद्वारे १८५१-१८७१ या वीस वर्षांच्या काळात दादाभाई नौरोजी यांनी हिंदुस्थानच्या द्रव्याचे शोषण कोणकोणत्या प्रकारे चालू आहे आणि त्यामुळे हिंदी जनता किती दरिद्री झाली आहे याचा अचूक अंदाज केला. हे द्रव्यशोषण थांबवल्यावाचून हिंदी जनतेचा उद्धार होणे शक्य नाही असे ठाम प्रतिपादन केले. इ. स. १८७१ साली विलायतेत 'ईस्ट इंडिया फिनॅन्स कमिटी' या नावाची एक कमिटी हिंदुस्थानच्या जमाखर्चाचा विचार करण्यासाठी नेमली होती. तिच्या समोर दादाभाईंनी आपले विचार रोखठोक स्वरूपात मांडले. हिंदी जनतेचे दर माणशी वार्षिक उत्पन्न अवघे वीस रुपये आहे व हे उत्पन्न सरकार तुरुंगातील कैद्यांसाठी दर माणशी जो खर्च करते त्याहूनही कमी आहे, असे त्यांनी सप्रमाण सिद्ध केले. ...हिंदी संपत्तीला ही जी मोठी गळती लागलेली आहे, ...तिचे स्वरूप द्विविध आहे : पहिला प्रकार म्हणजे युरोपियन अधिकारी येथे जो पैसा साठवून विलायतेस पाठवितात तो, विलायतेत व येथे निरनिराळ्या गरजांसाठी जो खर्च करितात तो, इंग्लंडात नेमलेल्या लोकांना जे पगार व पेन्शने मिळतात ती आणि हिंदुस्थान सरकार विलायतेत जो खर्च करते तो. याच गळतीचा दुसरा प्रकार म्हणजे बिनअधिकारी युरोपियन लोक येथे जो पैसा कमावून विलायतेस पाठवितात तो. या गळतीमुळे हिंदुस्थानात भांडवल साठू शकत नसल्यामुळे जे ब्रिटिश; लोक येथून धुऊन नेलेला पैसा पुन: भांडवलरूपाने परत आणितात, त्यांना येथील व्यापाराचा व उद्योगधंद्यांचा जणू काय मक्ताच मिळतो आणि म्हणून या मार्गाने ते हिंदुस्थानच्या द्रव्याचे अधिकच हरण करितात. या सर्वांचा उगम सरकारी द्रव्यापहरणातच आहे.''(जावडेकर, शं. द., १९६८, पृ. ११७) 'इंग्रजी राज्याची उलटी बाजू अथवा आमचे घोर दारिद्र्य' या निबंधात आगरकरांनीही इंग्रजी राजवटीमुळे भारताची जी आर्थिक दूरवस्था होऊन बसली आहे ती स्पष्टपणे मांडली आहे. वसाहतवादाचा नेहमीच वसाहतींच्या अर्थव्यवस्थेवर, राज्यव्यवस्थेवर आणि विविध सांस्कृतिक घटकांवर परिणाम होत असतो. हा वसाहतवादासंबंधीचा सार्वत्रिक सिद्धांत आहे. या विधानाचा प्रतिवाद करणारे असा प्रश्न विचारतात की, इंग्रजी राजवटीमुळे आपला काहीच फायदा झाला नाही का? याचे उत्तर इंग्रजी राजवट येथे आल्यामुळे जीवनविषयक आधुनिक दृष्टिकोण येथे प्रस्थापित झाला, वेगवेगळ्या सुधारणा घडून आल्या, शिस्त व कायदा रूढ झाला अशा अनेक

गाष्टी घडल्या हे खरे परंतु ते झाले याचा अर्थ इंग्रजांनी जे काही केले ते नि:स्वार्थ भावनेने केले असा होत नाही. आपले राज्य सुरळीत चालावे यासाठी त्यांना जे जे आवश्यक ते ते त्यांनी केले. परंतु मुळात हिंदुस्थानात येण्यात त्यांचा हेतू अर्थलाभाचाच होता आणि ते येथून जाईपर्यंत त्यांनी तो कसा घडत राहील या दृष्टिकोणातूनच प्रत्येक पाऊल टाकले.

**महात्मा गांधी व गांधीवाद**

गांधीवाद ही एखादी पुस्तकी प्रणाली नाही. तो एक जीवनधर्म आहे. महात्मा गांधींनी स्वत:च्या सातत्ययुक्त चिंतनातून, मननातून, आचरणातून आणि स्वत:शी व इतरांशी केलेल्या शांततापूर्ण संघर्षातून सिद्ध केलेला आहे. राजकारण, अर्थकारण, धर्मकारण, सामाजिक स्थिती व नीतिमूल्ये या सर्वच विषयांसंबंधी त्यांनी आपले विचार वेळोवेळी मांडले. भारताच्या स्वातंत्र्यासाठी चळवळी करताना स्वातंत्र्य, समता यांसारख्या संकल्पनांसंबंधी असणारी आपली भूमिका त्यांनी स्पष्ट केली. या सगळ्यातून जी विचारप्रणाली निष्पन्न झाली ती गांधीवाद या नावाने ओळखली जाते. सत्य आणि अहिंसा या गांधीजींच्या जीवनदृष्टीतील दोन प्रमुख निष्ठा होत्या. दरिद्री नारायणाची सेवा हे त्यांनी आपले कर्तव्य मानले होते. सत्य आणि अहिंसा यांच्याबद्दल येशू ख्रिस्तापासून, गौतम बुद्धापासून ऊहापोह चालत आलेला होता. सॉक्रेटिसाने तर सत्यासाठी आत्मबलिदान केल्याची हकिकत सुप्रसिद्ध आहे. स्वत: गांधींनी आपण ही तत्त्वे नव्यानेच सांगत आहोत असे कधीही म्हटले नाही. गांधींचे वेगळेपण देशाच्या स्वातंत्र्ययुद्धाची उभारणी या दोन तत्त्वांच्या आधारे करण्यामध्ये आहे. भारतात कौटिल्याने किंवा ग्रीसमध्ये प्लेटोने राज्यव्यवहारात खऱ्या खोट्याची मातब्बरी मानलेली नाही. गांधींचे तसे नाही. त्यांच्या विचारानुसार साध्य आणि साधन या दोन्ही गोष्टी शुभ व शुद्ध असल्या पाहिजेत. त्यांचा अहिंसेचा मार्ग भीरूतेकडे नेणारा नव्हता. गांधी स्वत: अत्यंत निर्भयपणे शत्रूला सामोरे जात आणि आपल्या पाठोपाठ सर्वांनी नि:शस्त्र स्वरूपात तशाच धाडसाने यावे अशी त्यांची अपेक्षा असे.

भारतीय स्वातंत्र्ययुद्धाने सत्याग्रहाचा अवलंब करून अहिंसेच्या मार्गाने लक्षावधी देशसेवकांना गांधींचे नेतृत्व स्वीकारल्याचे जे चित्र दाखवून दिले ते जगात खरोखरी अभूतपूर्व असे होते. एका अर्थी विचार केला तर महात्माजींच्या उपदेशात नवीन असे काही नाही. त्यांचे सत्य, अहिंसा, ब्रह्मचर्य, अस्तेय, वैराग्य वगैरे संयमनाचे नियम प्राचीन काळापासून अनेक पुरुषांनी प्रतिपादिलेले आहेत. पण त्या सर्व नियमांचा उपयोग विशिष्ट काळात कशा तऱ्हेने वागून करून दाखविला पाहिजे याचे उदाहरण गांधींनी स्वत:च्या वर्तनाने घालून दिलेले आहे. जसा ज्याचा गुरू तसा त्याचा शिष्य या न्यायाने ''श्रीकृष्णाला आदर्श समजणारे लोकमान्य एका तऱ्हेचे झाले व बुद्ध, ख्रिस्त, महावीर यांच्या पंथाचे तत्त्व अनुसरणारे महात्माजी दुसऱ्या प्रकारचे झाले हे योग्यच आहे. 'शठंप्रति शाठ्यम्' हा लोकमान्यांचा आचारमार्ग; 'शठंप्रति सत्यम्' हा गांधींचा आचारमार्ग. आपल्या विशिष्ट मार्गामुळेच टिळकांचे ध्येय देशहितापुरतेच संकुचित राहिले; गांधींचे ध्येय त्यांच्या उच्चतर मार्गामुळेच अखिल मानवजातीच्या हिताइतके वाढले. ध्येय जितके वरच्या दर्जाचे तितके ते साध्य होण्याचा संभव कमी. त्याला वेळ जास्त लागेल, त्रास जास्त पडेल पण ते चिरंतन हिताचे ठरेल, सर्वांच्या हिताचे ठरेल. टिळकांचे लक्ष राजकारणापुरतेच संकुचित होते. गांधींचे लक्ष समाजातील सर्व गोष्टींकडे एकसमयावच्छेदेकरून लागून राहिलेले आहे.'' (शेजवलकर, त्र्यं.शं., १९४०, पृ. ६१)

''मनुष्याच्या अंत:करणात असत्यातून सत्याकडे, अज्ञानातून ज्ञानाकडे आणि अपूर्णत्वाकडून पूर्णत्वाकडे जाण्याची जी एक सनातन वृत्ती आहे, ज्या वृत्तीने प्रेरित होऊनच सर्व धार्मिक, सामाजिक किंवा राजकीय सुधारक अथवा क्रांतिकारक लोकनायक, राष्ट्रनिर्माते, साधुसंत अथवा धर्मसंस्थापक आपले व्यवहार करीत असतात, आणि ज्या वृत्तीमुळे मनुष्याची स्वार्थी अहंकारभावना नष्ट होऊन तो परार्थी लोकसेवक बनतो, त्या सनातन मानवी वृत्तीसच महात्मा गांधी हे धर्मवृत्ती अथवा धर्म असे म्हणतात. जगातील सर्व धर्मांचे अंतरंग एकच असून मनुष्याची सतत उन्नती व शुद्ध करणारी ही वृत्ती जागृत व्हावी आणि आपले पारमार्थिक श्रेष्ठ व सत्य स्वरूप त्याने प्रकट करावे, हेच सर्व धर्मांचे सार आहे अशी महात्मा गांधींची शिकवण आहे. सर्वधर्मसहिष्णुता आणि सर्व धर्मांविषयी समबुद्धी हे त्यांच्या सत्याग्रहातील एक अवश्य व्रत आहे; आणि 'सत्यापरता नाही धर्म। सत्य तेचि परब्रह्म' हे त्यांच्या अध्यात्मज्ञानाचे रहस्य आहे. याच अध्यात्माच्या आणि

सर्वव्यापक मानवधर्माच्या अधिष्ठानावर त्यांना आधुनिक भारताची राष्ट्रनिर्मिती करावयाची असल्याने हिंदू, मुसलमान, ख्रिस्ती असले क्षुद्र भेदाभेद त्यांच्या अंत:करणास शिवत नव्हते.'' (जावडेकर शं. द., तत्रैव, पृ. ५०६-५०७)

अहिंसा, सत्य, अस्तेय ब्रह्मचर्य, असंग्रह। शरीरश्रम, अस्वाद, सर्वत्रं भयवर्जन।।
सर्वधर्मीं समानत्व, स्वदेशी, स्पर्शभावना। हीं एकादश सेवावीं नम्रत्वें व्रतनिश्चयें।।

अशी अकरा व्रतांची यादी गांधीवादात आधारभूत मानिली जाते. ''सत्याग्रही निष्ठेचे अंतिम साध्य केवळ लोकशाही समाजवाद हे नसून वर्गहीन समाज व दंडहीन राज्य या नावांनी सूचित होणारे परमेश्वरी साम्राज्य, रामराज्य, अथवा आत्मराज्य हे त्या निष्ठेचे अंतिम ध्येय आहे. ज्यांनी अव्यभिचारी सत्यनिष्ठा आणि निरपवाद अहिंसावृत्ती यांची दीक्षा घेतली असेल, अशा शुद्ध सत्याग्रही लोकसेवकांनी अनासक्त लोकसेवेच्या मार्गाने आत्मोद्धार व समाजोनती यांच्या प्राप्तीसाठी सत्याग्रहाची साधना अखंड करीत राहिली पाहिजे.'' असे महात्मा गांधींना कायम वाटत आले. (जावडेकर शं. द., तत्रैव, पृ. ५३६-५३७)

परंतु ही भूमिका हा गांधींच्या जीवनदृष्टीचा केवळ एक भाग होता. गांधींच्या विचारविश्वात ग्रामराज्याच्या कल्पनेला महत्त्व होते. त्यांच्या कल्पनेतील स्वराज्य ग्रामजीवनाशी आणि परंपरेने चालत आलेल्या व हजारो वर्षे टिकून राहिलेल्या ग्रामसंस्थांशी निगडित होते. प्रत्येक खेडे हे संपूर्ण, सार्वभौम सत्ता असलेले गणराज्य असेल अशी समाजरचना जर आपण केली तर ते आत्मसंरक्षणार्थ सक्षम होईल असे गांधींना वाटत होते. गांधीजींचा स्वातंत्र्यावर प्रगाढ विश्वास होता. प्रत्येक व्यक्ती, प्रत्येक खेडे आणि प्रत्येक राज्य स्वतंत्र असले पाहिजे या ठाम भूमिकेतून त्यांनी भारताच्या स्वातंत्र्यासाठी प्रयत्न केले. प्रत्येक खेड्यातून राजकीय जागृती, आवश्यक त्या सामाजिक सुधारणा आणि ग्रामोद्योगावर उभारलेले आर्थिक जीवन ही कार्ये पार पाडण्यासाठी खेड्याकडे चला असा गांधीजींचा संदेश होता. खादी आणि ग्रामोद्योग हे त्यांनी स्वातंत्र्य आंदोलनाचे घटक मानले होते त्यातून भारताच्या सात लक्ष खेड्यातील लोकांना पोटभर अन्न मिळेल असा त्यांचा विश्वास होता. प्रत्येकाला काम मिळाले पाहिजे व त्याबद्दल त्याला मिळणारा मोबदला न्याय्य व समानच असला पाहिजे अशी त्यांची भूमिका होती. परंतु हे सर्व मिळविण्याची साधने शांततामय आणि अहिंसक असावयास हवी हा त्यांचा आग्रह होता. शेती व उद्योग या दोन्ही क्षेत्रांत तळाच्या शेतकऱ्यांवर व मजूरांवर अन्याय होतो तो दूर झाला पाहिजे त्यासाठी आवश्यक ते बदल करावेत परंतु ते करताना वर्गसंघर्षात कुठेही कटूता येऊ नये, विध्वंस घडू नये व हिंसाही घडू नये असे ते सांगत. मोठ्या जमीनदारांनी व कारखानदारांनी आपली मालमत्ता व मालकाच्या नव्हे तर विश्वस्ताच्या भावनेने सांभाळावी व समाज जेव्हा मागणी करेल तेव्हा समाजाच्या ताब्यात द्यावी असे महात्मा गांधींचे आवाहन होते. कोणत्याही एका राष्ट्राला दुसऱ्याचे शोषण करण्याचा अधिकार नाही. एकमेकांविरुद्ध युद्ध करण्यासाठी उभे ठाकणाऱ्या स्वतंत्र राष्ट्रांपेक्षा आपल्या स्वातंत्र्याचा संकोच करून परस्परांना साहाय्य करणाऱ्या राज्यांचे एक जागतिक संघशासन त्यांना हवे होते. हिंदुस्थान शांततेच्या मार्गानेच स्वातंत्र्य मिळवील व त्यानंतर तो जागतिक शांततेसाठी झटेल असे ते स्पष्ट करत.

हिंदू समाजातील अस्पृश्यता तर त्यांना हजारो वर्षांचे पाप वाटे. आणि या पापाचे परिमार्जन अस्पृश्य मानल्या जाणाऱ्या जमातींना जवळ करून व त्यासाठी हितसंबंधांचा त्याग करून उच्च वर्णियांनी केले पाहिजे असा त्यांचा आग्रह होता. इंग्रज सरकार राजकारणाचा एक डाव म्हणून अस्पृश्यांना जवळ करून हिंदू समाजात फूट पाडण्याचा जो प्रयत्न करीत होते तो त्यांना नामंजूर होता. मानवतेची सर्वव्यापी प्रेरणा त्यांच्या अस्पृश्यताविषयक कार्याच्या मागे होती. अस्पृश्यांप्रमाणे हिंदू समाजात स्त्रियांवरही अन्याय झालेला आहे आणि स्त्रियांना पुरुषांकडून चांगली वागणूक आणि समाजात मानाचे स्थान मिळाले पाहिजे असा त्यांचा आग्रह होता. घर हेच स्त्रीचे कार्यक्षेत्र आहे, उपजीविकेसाठी तिला नोकरी किंवा उद्योगधंदा करावा लागता कामा नये असेही त्यांचे विचार होते.

भारतात सक्तीचे प्राथमिक शिक्षण झाले पाहिजे असे त्यांचे मत होते. परंतु इंग्लिश भाषेचे ज्ञान त्यांना आवश्यक वाटत नसे. चैतन्य, कबीर, नानक, गुरु गोविंदसिंग, शिवाजी आणि राणाप्रताप ही माणसे इंग्लिश शिकलेल्या राजा राममोहन रॉय किंवा लोकमान्य टिळक यासारख्या राजकीय नेत्यांपेक्षा थोर होती. रॉय आणि टिळक या दोघांविषयी त्यांना

आदर होता परंतु इंग्रजीचा अडसर नसता तर रॉय अधिक मोठे सुधारक आणि टिळक अधिक श्रेष्ठ विद्वान झाले असते असे त्यांचे मत होते.

उपर्युक्त सर्व कल्पना आणि विविध विषयांसंबंधीची गांधीजींची मते या सगळ्याला मिळून गांधीवाद असे म्हटले जाते. हिंसेला अहिंसेने आणि दुष्टपणाला प्रेमाने उत्तर द्यावे, ''कुणी एका गालावर मारली तर दुसरा गाल पुढे करू'' हे तत्त्व पायाभूत धरून एका राष्ट्राने आपल्या स्वातंत्र्यासाठी दुसऱ्या राष्ट्राविरुद्ध लढा दिल्याचे दुसरे उदाहरण इतिहासात नाही. महात्मा गांधींची अपूर्वता व त्यांचे अद्वितीयत्व यात साठविले आहे.

**गांधीवाद आणि मराठी साहित्य**

१९२० पासून गांधीजींना भारतीय राजकारणात केंद्रवर्ती स्थान प्राप्त झाले. इंग्रजी अंमल प्रस्थापित होण्याच्या आधीपासून तोवेळपर्यंत राष्ट्रीय पातळीवर महाराष्ट्राला महत्त्वाचे स्थान होते. ते १९२० पासून कमी झाले. खाडिलकर, शि. म. परांजपे यांसारखे पत्रकार पुढारी गांधीजींचे अनुयायी झाले. परंतु त्यांचे महाराष्ट्रातील स्थानही दुय्यमच होते. वा. म. जोशी, श्रीधर व्यंकटेश केतकर, ना. सी. फडके, वि. स. खांडेकर, ग. त्र्यं. माडखोलकर, भा. वि. वरेरकर हे गांधीयुगातील कादंबरीकार. परंतु यांच्या साहित्यनिर्मितीवरही गांधीवादाचा फारसा परिणाम झाला नाही. वा. म. जोशी हे सौम्य प्रकृतीचे विवेकवादी विचारवंत होते. कोणतीही एक विचारसरणी प्रमाण मानून तिचे अनुसरण कादंबऱ्यांमध्ये झाले असे त्यांच्या बाबतीत घडले नाही. 'संशयात्मा' अशीच त्यांची ख्याती होती. केतकर हे समाजशास्त्रज्ञ सामाजिक समस्यांची उकल करणे व त्या अनुषंगाने कादंबऱ्यांची रचना करणे हा त्यांचा लेखनस्वभाव होता. वरेरकर हे प्रचारकी लेखन करणारे समानमनस्क कादंबरीकार त्यांच्या कादंबऱ्यांत येणारे समाजजीवनाचे चित्रण वरवरचे होते. ते स्त्रियांचे पक्षपाती असल्यामुळे त्यांच्या लेखनाला एक प्रकारचा एकांगीपणा आलेला होता. ना. सी. फडके स्वत: राजकीय चळवळीत अल्पकाळ सहभागी झाले होते. गांधीजींच्या असहकाराच्या चळवळीत त्यांचा सहभाग होता. परंतु हा आपला प्रांत नाही हे वेळीच ध्यानात आल्यामुळे ते त्यापासून दूर झाले. माडखोलकर आणि खांडेकर यांपैकी त्यातल्या त्यात खांडेकरांच्या लेखणीवर राजकारणातील गांधीवादी आंदोलनाचे काही संदर्भ येतात. सचोटी, मानवतावाद, स्वातंत्र्यप्रेम, समानता, स्त्रीशिक्षण इत्यादिंविषयीची लेखक खांडेकरांच्या मनात असणारी आस्था त्यांच्या नायक-नायिकांच्या आचारविचारात काही प्रमाणात प्रतिबिंबित झालेली दिसते. प्रेमा कंटक यांच्या *काम आणि कामिनी* (१९३७), *अग्नियान* (१९४२) किंवा बिवलकरांची *सुनीता* (१९४७) या कादंबऱ्यांतून गांधीवादाचे अस्तित्व जाणवते. प्रेमा कंटक ''कादंबरीलेखनाकडे वळल्या त्या मूलत: गांधीजींच्या काही तत्त्वप्रतिपादनासाठी. त्यांचे स्वप्नरंजनही गांधीप्रणीत जीवनाच्या आदर्शाने रंजित झाले आहे.'' साने गुरुजी हे मर्यादित अर्थाने गांधीवादी साहित्यिक. त्यांच्या लेखनावर गांधीवादाची छाप आहे. *भारतीय संस्कृती* हा त्यांचा ग्रंथ सहिष्णू भावनेने भारतीय संस्कृतीचा अन्वयार्थ लावणारा ग्रंथ आहे. त्यांच्या कथाकादंबऱ्यातील प्रमुख पात्रे गांधींची भाषा बोलतात परंतु गांधींना अभिप्रेत असणाऱ्या सत्य, अहिंसाप्रणीत राजकारणाचे सखोल आकलन त्यांना झाले होते असा प्रत्यय त्यांच्या कादंबऱ्यांतून येत नाही. तथापि साने गुरुजींच्या कवितांमधून गांधीवादी मूल्यविचार अधिक प्रभावीपणे व जाणीवपूर्वक व्यक्त होतो असे म्हणता येईल.

''बलसागर भारत होवो विश्वात शोभुनी राहो,
हें कंकण करिं बांधियलें जनसेवे जीवन दिधलें
देशार्थ प्राण हे उरले मी सिद्ध मरायला हो'' आणि

''खरा तो एकची धर्म । जगाला प्रेम अर्पावें।।
जगीं जे हीन अति पतित
जगीं जे दीन पद-दलित
तयां जाऊन उठवावें।। जगाला प्रेम अर्पावें।।'' आणि

''गोकुळें येथलीं गेलीं
विपुलता येथली गेली
अन्नान्नदशा ही आली''

या त्यांच्या सुप्रसिद्ध कविता गांधीवादी विचारांनी प्रेरित आहेत. साने गुरुजींना गांधींप्रमाणेच सत्ता वा संपत्ती यांचा अजिबात मोह नव्हता. शांती, अहिंसा, परस्परसामंजस्य, सर्वधर्मसमभाव, धर्मांतर्गत बंधुभाव त्यांना जन्मभर महत्त्वाचा वाटला. बळाचा वापर करण्याऐवजी आर्जवाचा उपयोग करून आपले विचार समोरच्याला समजावून सांगावे, पटवून द्यावे असा प्रयत्न ते कायम करीत आले. अस्पृश्यता त्यांना कधीच मान्य नव्हती. हिंदुमुसलमानांनी बंधुभावाने राहावे अशी त्यांची उत्कट इच्छा होती. हेच आपले विचार त्यांनी आपल्या साहित्यातूनही मांडले ते मांडताना साहित्यकृतीच्या कलात्मक रूपास बाधा पोचते की काय असा विचार मनात आणला नाही. असे साने गुरुजी गांधींचे अनुयायी होते खरे परंतु पुढे ते समाजवादी पक्षाला जाऊन मिळाले. आपल्या मनीमानसी त्यांनी सदैव जनहीताचीच चिंता वाहिली. साहित्याद्वारे सद्‌भाव, शांती, क्षमा या मूल्यांचा प्रसार त्यांनी केला. असले तरी साने गुरुजींना सर्वार्थाने गांधीवादी लेखक म्हणता येत नाही.

गांधीवाद ही आध्यात्मिक स्वरूपाची राजकीय विचारसरणी होती. आधुनिक महाराष्ट्रात आध्यात्मिकतेपासून फारकत घेऊन बुद्धिवादी पद्धतीने विचार करण्याची सवय रूढ झाली होती. सश्रद्ध वृत्तीविषयी शंका घेऊन तार्किकपणे प्रत्येक भूमिका तपासून घेणे मराठी माणसाला अधिक योग्य वाटत असे. दुसरे असे की, विनोबा, काका कालेलकर, आचार्य धर्माधिकारी असे चिंतक गांधीवादी सोडले तर अगदी नेहरू पटेलांपासून कुठल्याच काँग्रेसवाद्याला गांधीवाद पूर्णपणे पचला नव्हता. याचे कारण प्रत्येकजण व्यवहारी वृत्तीने वागणारा व विचार करणारा होता. प्रसंगी तत्त्वाला मुरड घालून राजकारण यशस्वी करणे हे त्यांचे ध्येय होते आणि ध्येयपूर्तीसाठी गांधीजींप्रमाणे साधनशुचितेची आवश्यकता त्यांना वाटत नव्हती. शं. द. जावडेकर हे गांधींचे चरित्रकार व गांधीवादी दृष्टिकोणातून 'आधुनिक भारता'ची मीमांसा करणारे लेखक खरे गांधीवादी म्हणता येतील.

जसा गांधीवादाचा मराठी साहित्यावर वा साहित्यविचारावर फारसा परिणाम झालेला दिसत नाही त्याप्रमाणेच टिळकांच्या कर्मयोगप्रधान जीवनसरणीचाही परिणाम मराठी लेखकांवर फारसा झाला नाही. राजकीय स्वातंत्र्य हेच एकमेव ध्येय उराशी बाळगून टिळकांनी आपले सारे जीवन व्यतीत केले. असहकाराची, स्वदेशीची, कायदेभंगाची तत्त्वे गांधींच्याही आधी त्यांनी राजकारणात आणली होती.

वैचारिक लेखन हाच टिळकांचा प्रांत होता. केसरीमराठाच्या माध्यमातून त्यांनी आपले बहुतेक सर्व लेखन केले. त्यांचा आदर्श डोळ्यापुढे ठेवून शि. म. परांजपे, खाडिलकर, केळकर प्रभृती, पत्रकार लेखणी चालवीत राहिले हे खरे परंतु निमित्तानिमित्ताने कठोर शब्दांत इंग्रजांवर टीका करणे एवढे एक वैशिष्ट्य सोडले तर टिळकांच्या लेखणीतील बुद्धीची झेप आणि व्यापक आकलन-अवलोकनाचा आवाका यांपैकी कुणातही नव्हता. टिळकांविषयी अभिमान बाळगणे वेगळे आणि टिळकांच्या विचारसरणीचा प्रभाव लेखणीवर व साहित्यकृतींवर असणे वेगळे. तसे पाहिले तर महाराष्ट्रात राजकीय विचारसरणी व तिने प्रभावित झालेले ललित साहित्य असे चित्र कोठेही दिसत नाही. याला जोतीराव फुल्यांच्या सत्यशोधकी विचारसरणीपासून कुठल्याच वैचारिक भूमिकेचा अपवाद नाही. ललित साहित्यातून वैचारिक भूमिका व्यक्त होण्यासाठी गरजेचे असते. ती गरज भागवील असा साहित्यिक एक सावरकरांचा अपवाद वगळता दुसरा आढळत नाही.

**स्वातंत्र्यवीर सावरकर**

स्वातंत्र्यवीर सावरकर हे अगदी तरुणपणापासूनच राष्ट्रस्वातंत्र्याच्या प्रेरणेने झपाटलेले होते. त्यांची प्रत्येक कृती केवळ देशसेवेच्या दिशेनेच घडत असे. त्यांचा प्रत्येक आचारविचार व उच्चार देशस्वातंत्र्याची भाषा बोलत असे. सशस्त्र क्रांतीवाचून देश स्वतंत्र होणार नाही, आपण समर्थ झाले पाहिजे, शस्त्र हाती घेतले पाहिजे व आघातास प्रत्याघात या पद्धतीने वागले पाहिजे तरच इंग्रज येथून जातील अशी त्यांना खात्री वाटत होती. 'अभिनव भारत' या संघटनेची स्थापना त्यांनी त्या

उद्देशानेच केली होती. इंग्लंडात जाऊन बॉम्ब बनविण्याचे शिक्षण घेणे, शस्त्रास्त्रे गोळा करणे, देशासाठी बलिदान करावयास तयार असणारे साथीदार मिळविणे या दृष्टीने ते अखंड कार्यरत होते. त्यांच्या क्रांतिकारक विचाराला व युयुत्सू आचरणाला अटकाव करण्यासाठी त्यांच्यावर राजद्रोहाचा खटला भरून इंग्रज सरकारने जेव्हा त्यांना जन्मठेपेची शिक्षा फर्मावली तेव्हा तुरुंगातल्या सगळ्या हालअपेष्टा सोसून त्यांनी जी अभूतपूर्व काव्यरचना केली आणि 'माझी जन्मठेप' सारखे अनुभवकथन केले त्याला जगाच्या इतिहासात क्वचितच तोड सापडेल. ''हे मातृभूमि ! तुजला मन वाहियेले । वक्तृत्व वाग्विभवही तुज अर्पियेले । तू तेंची अर्पिली नवी कविता रसाला। लेखाप्रती विषय तूची अनन्य झाला ।'' या शब्दांत सावरकरांनी आपले मातृभूमिप्रेम 'माझे मृत्यूपत्र' या कवितेत व्यक्त केले आहे.

राष्ट्रस्वातंत्र्याचे ध्येय हे असिधाराव्रत आहे याची त्यांना जाणीव होती. परंतु ते व्रत त्यांनी पूर्ण जबाबदारीने स्वीकारले होते. आणि देशासाठी हौतात्म्य पत्करण्याची तयारीही त्यांनी ठेवली होती. *माझे मृत्यूपत्र* या कवितेत ते लिहितात, ''कीं घेतले व्रत न हे अम्हि अंधतेनें। लब्ध-प्रकाश इतिहास-निसर्ग-माने। जें दिव्य दाहक म्हणूनी असावयाचें। बुद्ध्याची वाण धरिले करी हें सतीचे।'' तुरुंगवासाची, देहदंडाची, पन्नास वर्षांच्या जन्मठेपेची त्यांना कधीही भीती वाटली नाही. ''तुजसाठी मरण तें जनन /तुजवीण जनन हे मरण /तुज सकल चराचर शरण'' ही त्यांची स्वातंत्र्याप्रतीची भावना 'स्वतंत्रतेचे स्तोत्र' या कवितेत त्यांनी व्यक्त केली आहे. त्यांच्या लेखणीतून आणि वाणीतून सदैव क्षात्रतेज व पुरुषार्थ प्रकटत असे आणि पौरुषाचे व शौर्य धैर्याचे तर ते उपासकच होते. त्यांच्या *उत्तरक्रिया, संन्यस्त खड्ग* या नाटकांचे या ठिकाणी स्मरण होते. मंडालेहून सुटका झाल्यावर आणि रत्नागिरीला स्थानबद्ध झाल्यावर त्यांचा राजकारणातील सहभाग संपुष्टात आला.

परंतु त्यांच्या अंत:करणातील देशप्रेमाची भावना जीवनाच्या अखेरच्या क्षणापर्यंत धगधगतच होती. युद्धात भारतीय सैन्याला विजय मिळाल्याच्या वृत्ताने ते आनंदित झाले होते. कुठल्याच महापुरुषाला त्याच्या जवळपास पोचेल असा वारसदार लाभत नाही हे सार्वत्रिक सत्य सावरकरांच्या बाबतीतही खरे ठरले. ३० जानेवारी १९४८ रोजी दिल्ली येथे नथुराम गोडसेने केलेल्या गांधीवाधाशी संबंध जोडला जाऊन सावरकरांना बरेच काही सोसावे लागले. परंतु ते कुठल्याही परिस्थितीत डगमगले नाहीत. बलशाली भारताचे स्वप्न त्यांच्या दृष्टीसमोर नेहमी तरळत असे आणि ज्या कोणत्या मार्गाने भारत समर्थ होईल त्या मार्गाचा अवलंब करावा अशी त्यांची भूमिका होती. व त्या भूमिकेशी ते अखेरपर्यंत ठाम होते. हिंदुत्ववादी विचारसरणीच्या सावरकरांमध्ये विज्ञाननिष्ठेचा धागा फार बळकट होता. कोणत्याही प्रकारच्या अशास्त्रीय विचारसरणीला त्यांचा कायम विरोध असे. त्यामुळे गाय हा एक उपयुक्त पशू आहे असे म्हणून त्यांनी गोहत्याबंदीला कधीही पाठिंबा दिला नाही. रत्नागिरीस आल्यापासून अस्पृश्यांच्या उद्धाराचे कार्य त्यांनी सुरू केले. त्या कार्याचा एक भाग म्हणून 'पतितपावन मंदिरा'ची त्यांनी स्थापना केली. त्यांच्या या कार्याचीही जेवढी बूज राखली जायला हवी होती तेवढी राखली गेली नाही.

**मार्क्सवाद**

महाराष्ट्रातील उच्चवर्णीय व बुद्धिवंत बऱ्याच प्रमाणात गांधीवादापासून दूर राहिले, त्यांच्या मनाला गांधीवादाचे फार मोठे आकर्षण वाटले नाही. तुलनेने पाहाता महाराष्ट्रातील ब्राह्मणेतरवर्ग व ग्रामीण जनता यांनी गांधींचे अनुयायित्व मोठ्या प्रमाणावर स्वीकारले. तत्कालीन सुशिक्षित मराठी तरुणवर्गाला मार्क्सच्या विचारांनी अधिक प्रभावित केले असे दिसते. भारतातील मार्क्सवादी विचारांचे एक पाठीराखे मानवेंद्रनाथ रॉय यांच्या व्यक्तिमत्त्वाने व विचाराने आकर्षित झालेली तरुण मंडळी दीर्घकाळ त्यांच्याभोवती तर होतीच शिवाय मार्क्सच्या विचारांचा प्रचार प्रसारही करीत होती. श्रीपाद अमृत डांगे, व. भ. कर्णिक, द्वा. भ. कर्णिक, लालजी पेंडसे इत्यादी अभ्यासक व कार्यकर्ते कामगारांच्या प्रश्नांची गंभीरपणाने उकल करण्याचा प्रयत्न करीत होती. पहिले महायुद्ध संपल्यानंतरच्या काळात मार्क्सवादाने हिंदुस्थानात आपले पाय रोवले असे म्हणता येईल. कालदृष्ट्या मार्क्स व एंगल्स हे भाऊ महाजन, लोकहितवादी, दादाभाई नौरोजी, जोतीराव फुले यांचे समकालीन होत. मार्क्सच्या विचारांची हिंदुस्थानात पहिल्याप्रथम ओळख करून दिली ती लोकमान्य टिळक यांनी. *केसरीत* त्यांनी रशियन क्रांतीचे स्वागत केले आणि *मराठा* मधून समाजवादाचा परिचय करून देणारे लेख लिहिले. हा इतिहास ज. वि. नाईक यांनी 'लोकमान्य टिळक ऑन कार्ल मार्क्स ॲण्ड क्लास कॉन्फ्लिक्ट'या इकॉनॉमिक ॲण्ड पोलिटिकल

वीकली' मधील लेखात (खंड ३४ : १-७-१९९९) दिला आहे. टिळक हे डांगे यांचे दैवत होते याचे एक कारण वरील वस्तुस्थितीतदेखील सापडते. 'मार्क्सवाद आणि मराठी साहित्य' या ग्रंथात वि. स. जोग यांनी पहिल्या प्रकरणात मार्क्सवादाचे स्वरूप नेमकेपणाने स्पष्ट केले आहे. मार्क्सवादी भूमिकेचा परिचय करून घेताना त्याचा उपयोग होतो. कार्ल मार्क्स व त्याचा मित्र असणारा सहकारी फ्रीड्रिख एंगल्स या दोघांनी मिळून भांडवलशाहीविरुद्ध जी विचारसरणी प्रसृत केली ती 'मार्क्सवाद' या नावाने ओळखली जाते. या विचारसरणीचे पहिले विवरण १८४८ साली प्रसिद्ध झालेल्या साम्यवादी जाहीरनाम्यात (*द कम्युनिस्ट मॅनिफेस्टोत*) आढळते. हा जाहीरनामा जरी दोघांनी मिळून लिहिला असला तरी त्यात मार्क्सचा सहभाग अधिक प्रमाणावर होता. मार्क्सवाद हा शास्त्रीय समाजसत्तावादाचे अधिष्ठान होय. वस्तुत: मार्क्सपूर्वीदेखील समाजसत्तावादी विचार सुरू झाले होते. औद्योगिक क्रांती झाली आणि वाढत्या उद्योगधंद्यांबरोबर कामगारांची व सामान्य जनतेची आर्थिक स्थिती हलाखीची होऊ लागली. तेव्हा अठराव्या शतकाच्या उत्तरार्धात व एकोणिसाव्या शतकाच्या सुरुवातीला समाजसत्तावादाचा उदय झाला. या विचारसरणीचा पुरस्कार करणाऱ्यांनी समाजसत्तावादी समाजाचे भव्यदिव्य चित्र रेखाटले, परंतु तेथपर्यंत पोचण्याचा शास्त्रशुद्ध मार्ग दाखवला नाही. त्यामुळे ते 'युटोपियन' नावाने ओळखले जातात.

युरोपमधील अनेक देशांत जेव्हा भांडवलशाहीची वाढ झाली तेव्हा कामावर ठेवलेल्या मजुराकडून अल्प मोबदल्यात अधिकात अधिक काम करवून घेणे आणि भरपूर नफा कमावणे ही भांडवलदारांची प्रवृत्ती वाढीस लागली. या प्रवृत्तीमुळे कामगारवर्गाचे शोषण मोठ्या प्रमाणात वाढू लागले. त्याचा परिणाम युरोपमधील अनेक देशांत क्रांतिकारक उठाव होण्यात झाला. १८४८ हे युरोपमधील क्रांतीचे वर्ष. क्रांतिकारक उठावात सामील होण्याचे आवाहन साम्यवादी जाहीरनाम्याने कामगारवर्गाला केले. ''जगातील कामगारांनो, एक व्हा; शृंखलांखेरीज तुमच्याजवळ गमावण्यासारखे असे दुसरे काही नाही'' असे मार्क्सने जाहीरनाम्याच्या अखेरीस लिहिले आहे. आपल्या उत्तरवयात मार्क्सने अनेक अभ्यासपूर्ण पुस्तके व पुस्तिका लिहिल्या. त्यांत वरील विचारांचा विस्तारपूर्वक ऊहापोह केला आहे. (तीन खंडांत त्याने लिहिलेला *कॅपिटल* हा ग्रंथ कामगारवर्गाचे बायबल म्हणून ओळखला जातो. तीन खंडांपैकी पहिला खंड इ. स. १८६७ या वर्षी प्रसिद्ध झाला आणि उर्वरित दोन खंड त्याच्या मृत्यूनंतर एंगल्सने प्रसिद्ध केले.) श्रमाची उत्पादकता वाढवून नफा मिळविण्याचे मार्ग शोधण्याकडे व त्यांचा अवलंब करून अधिकात अधिक संपत्ती मिळवणे हेच भांडवलदाराचे एकमेव उद्दिष्ट असते. आवश्यकतेनुसार नवनवीन यंत्रांचे साहाय्य घेऊन कामगारांची संख्या शक्य तितकी कमी ठेवणे व नफ्याचे प्रमाण वाढविणे ही कारखानदाराची प्रवृत्ती असते. याचाच अर्थ असा की, कामगारांचे व भांडवलदारांचे हितसंबंध अगदी विरोधी स्वरूपाचे होतात. यातूनच 'वर्गकलहा'चा प्रसंग येऊन ठेपतो. मार्क्सवादात वर्गकलहाला महत्त्वाचे स्थान आहे. वर्गकलहातूनच मानवसमाजाचा इतिहास घडत जातो, अशी मार्क्सची धारणा आहे. भांडवलशाही जगात वर्गकलह सातत्याने वाढतच जाणार आणि त्यातूनच क्रांती होऊन समाजवाद निर्माण होणार असे मार्क्सचे सांगणे आहे.

मार्क्सवादी विचारामागील आदितत्त्व वर्गविग्रह हे असून त्या तत्त्वावर अधिष्ठित अशी समाजक्रांती भारतात घडवून आणावी असा तत्कालीन मार्क्सवाद्यांचा विचार होता. (त्यामुळे हिंदुस्थानात सर्वत्र चालू असलेल्या राष्ट्रीय स्वातंत्र्याच्या आंदोलनात व काँग्रेसप्रणीत राजकारणात मार्क्सवादी विचारांची मंडळी समरसून सहभागी झाली नाहीत. काही प्रसंगी तर त्यांनी इंग्रज सरकारशी काँग्रेसविरुद्ध हातमिळवणी केली असा त्यांच्यावर आरोप केला जातो.) युरोपात जमीनदारवर्ग व व्यापारीवर्ग यांच्या वर्गकलहातून युरोपीय लोकशाहीचा जन्म झाला. हाच व्यापारी सावकारवर्ग औद्योगिक क्रांतीनंतर कारखानदार बनला. औद्योगिक क्रांतीमुळे संपत्तीचे प्रमाण वाढले. संपत्तीतील ही वाढ मालकाच्या श्रमाने न होता मजुरांच्या श्रमाने होत असते. परंतु मजुराला काही श्रमांच्या प्रमाणात उत्पन्न मिळत नाही, ते सगळे मालकाच्याच वाट्याला जाते याचा अर्थच मजुराचे आर्थिक शोषण येथे घडते. मार्क्सवादाचे मुख्य ध्येय शोषणमुक्त वर्गविहीन समाजरचना हे आहे. ही समाजव्यवस्था गुलामी, सरंजामी, भांडवलशाही इत्यादी आजपर्यंत होऊन गेलेल्या समाजव्यवस्थांपेक्षा अधिक श्रेष्ठ आहे असे त्यांनी मानले. सर्व दु:खाचे मूळ असलेली संपत्तीची खाजगी मालकी या समाजव्यवस्थेत समूळ नष्ट करण्यात येईल हे त्यांनी सुरुवातीसच स्पष्ट केले. त्याचप्रमाणे जमिनीवरील वैयक्तिक स्वामित्वाचे, वंशपरंपरागत हक्कांचे उच्चाटन करून, तसेच सर्व अधिकोशांचे राष्ट्रीयीकरण करून, दळणवळण, वाहतूक इत्यादींवरील खाजगी मालकी नष्ट करून त्यासंबंधीचे

सर्वाधिकार एका राजसत्तेच्या हाती सोपवून भावी समाजव्यवस्थेचा पाया घातला जाईल असे कम्युनिस्ट मॅनिफेस्टोमध्ये स्पष्ट करण्यात आले आहे. लेनिनने समाजव्यवस्थेच्या दोन अवस्था मानल्या. पहिली भांडवलशाही नष्ट करून लगेच निर्माण झालेली तर दुसरी या अवस्थेतून विकसित आणि प्रगत झालेली. या दोन समाज अवस्थांसाठी त्याने अनुक्रमे सोशियालिझम व कम्युनिझम हे शब्द योजले. उत्पादनसाधनांवर सामूहिक मालकी, योग्यतेनुसार काम, आवश्यकतेनुसार दाम अशी वितरणव्यवस्था, वर्गविहीनता, खाजगी मालमत्तेचा पूर्ण अभाव, राज्यसत्तेचा विलय, भौतिक किंवा वैज्ञानिकीकरणावर पूर्ण भर ही साम्यवादी तत्त्वज्ञानाच्या ध्येयभूत समाजव्यवस्थेची वैशिष्ट्ये म्हणता येतील.

विरोधविकासयुक्त भौतिकवाद हे मार्क्सवादाचे महत्त्वाचे तात्त्विक अंग आहे. विरोधविकासवादाचा गाभा असा सांगता येईल – ''परस्परविरोधी विचारांच्या प्रक्रियेतून नवीन अधिक विकसित विचारतत्त्व उदयाला येणे हे विरोधविकासवादात हेगेलला अभिप्रेत आहे. विचारविकासप्रक्रियेतील नियमबद्धतेचे स्पष्टीकरण विरोधविकासवाद देतो असेही त्याचे म्हणणे आहे. विचार, निसर्ग किंवा समाज यांच्यामधील परस्परविरोध हा भावी प्रगतीकरता अपरिहार्य आहे. दोन वस्तूंच्या परस्परसंघर्षातून किंवा एकाच वस्तूत असलेल्या विरोधी शक्तींच्या संघर्षातून विकास होतो हे विरोधविकासाचे मूळ स्वरूप. हेगेलची विरोधविकासपद्धती मार्क्सने उचलली व एक पाऊल पुढे जाऊन सर्व जड वस्तूंत, तसेच सामाजिक संबंधात आणि मानवी इतिहासात विरोधविकासाचे अस्तित्व त्याने दाखवून दिले. विरोधविकासवाद हे गतीच्या आणि विकासाच्या नियमाचे शास्त्र आहे. त्यानुसार विकास हा विरोधातूनच होत असतो. जगात अशी एकही  वस्तू नाही की, जिची विरोधीतत्त्वात विभागणी करता येणार नाही. तत्त्वत:च संपूर्ण भौतिकविश्व हे परस्परसंबद्ध, एकसंध आहे, त्यातील कोणताही पदार्थ एकाकीपणे विकसित होत नाही. विकासप्रक्रियेत साध्या परिमाणात्मक बदलाचे काही मर्यादेनंतर गुणात्मक बदलात रूपांतर होते असे मार्क्सने सांगितले. एंगल्सने आपल्या *डायलेक्टिक्स ऑफ नेचर* व *ॲण्टी ड्युरिंग* या दोन ग्रंथांत हा सिद्धांत सोदाहरण स्पष्ट केला. विरोधविकासाचा तिसरा नियम विनाशाच्या विनाशाचा (निगेशन ऑफ द निगेशन). कोणत्याही क्षेत्रात स्वत:च्या अस्तित्वाच्या जुन्या स्वरूपांचा नाश केल्याखेरीज विकास होणे शक्यच नसते या शब्दांत मार्क्सने या सिद्धांताचे वैशिष्ट्य सांगितले. परंतु हा नाश म्हणजे रूढार्थाने सर्वनाश नव्हे. हे अधिक उच्चतर अवस्थेकडे जाणाऱ्या गतीचे वैशिष्ट्य होय. विनाशाचा विनाश ही स्थितिशील प्रक्रिया नसून प्रगतिशील गती आहे हे एंगल्सने सोदाहरण स्पष्ट केले. मार्क्स–एंगल्सने विरोधविकासवादाचा साक्षात संबंध साम्यवादी समाजव्यवस्थेच्या निर्मितीशी लावला.

''मार्क्सवाद हे नुसते आर्थिक परिवर्तनाचे तत्त्वज्ञान नव्हते. ते मानवाच्या समग्र परिवर्तनाचे तत्त्वज्ञान होते. ते जागतिक इतिहासाचे तत्त्वज्ञान होते, तसे या इतिहासाच्या केंद्रस्थानी असलेल्या मानवाचे तत्त्वज्ञान होते. ते मानवाच्या दैनंदिन जीवनकलहाचे तत्त्वज्ञान होते तसे ते मानवाच्या सांस्कृतिक संचिताचे आणि परिवर्तनाचे तत्त्वज्ञान होते. ते नुसते भांडवलशाहीच्या भेसूर स्वरूपाचे, त्या समाजरचनेतील अपरिहार्य पिळवणुकीचे, कामगारांच्या दैनंदिन लढ्याचे तत्त्वज्ञान होते असे नव्हे, तर ते समाजाच्या सर्व अंगोपांगांचे, त्याच्या आर्थिक घडामोडीचे, राजकीय प्रवाहांचे, सामाजिक स्थित्यंतराचे, वाङ्मयीन धारांचे, धार्मिक धारणांचे, तात्त्विक विचारप्रणालींचे, मानवी जीवनाच्या सर्व अंगांना सखोल स्पर्श करणारे तत्त्वज्ञान होते. ते मानवाचे तत्त्वज्ञान होते तसे सृष्टीचे होते, व्यक्तीचे होते तसे वर्गाचे होते, राजकीय होते तसे सामाजिक होते, आर्थिक विवंचनांचे होते तसे वैचारिक विभ्रमांचे होते.'' (पाध्ये, प्रभाकर, १९८०, पृ. २६)

मार्क्सवादी विचारसरणीची भरपूर चर्चा मराठीत झाली, मात्र त्या विचारांच्या अनुषंगाने साहित्यकृती उत्पन्न झाल्या असे आढळत नाही. शरच्चंद्र मुक्तिबोध यांच्या कवितांवर या विचारसरणीची छाया आढळते, परंतु तो अपवाद म्हणावा लागेल.

**डॉ. बाबासाहेब आंबेडकर**

महाराष्ट्रातील व भारतातील एकेकाळच्या अस्पृश्य मानल्या गेलेल्या मानवसमूहामध्ये सामाजिक जागृती घडवण्याशी भीमराव रामजी आंबेडकर (१८९१–१९५६) हे नाव कायमचे जोडले गेले आहे. रामजीबुवा व त्यांचे वडील कबीरपंथाचे

अनुयायी होते. भारतातील उदारमतवादी शिक्षणाची परंपरा मुंबईतील ज्या एल्फिन्स्टन हायस्कुलात व एल्फिन्स्टन कॉलेजात त्या काळी सांभाळली गेली होती तेथे आंबेडकरांचे शिक्षण झाले. अमेरिकेतील कोलंबिया विद्यापीठ व इंग्लंडमधील लंडन विद्यापीठ येथे त्यांनी उच्च शिक्षण घेऊन एम. ए., पीएच. डी., डी. एस्सी. या पदव्या मिळविल्या. एवढे शिकल्यानंतरही त्यांच्या वाट्याचे अस्पृश्य असण्यामुळे येणारे कटू अनुभव काही संपले नाहीत. त्यानंतर त्यांनी अस्पृश्योद्धाराच्या कामाकडे आपले लक्ष वळवले. ३१ जानेवारी १९२० मध्ये बाबासाहेबांनी *मूकनायक* नावाचे पाक्षिक काढले. तसेच अस्पृश्य समाजात आपल्यावर होणाऱ्या अन्यायाविषयी व आपल्या हक्कांविषयी जागृती उत्पन्न व्हावी या दृष्टीने अस्पृश्य समाजाच्या परिषदा भरवणे, व्याख्याने, सभा, चर्चा आयोजित करणे असे उपक्रम सुरू केले. माणगाव व नागपूर या ठिकाणी अस्पृश्य समाजाच्या परिषदा त्यांनी भरवल्या आणि अखिल भारतीय पातळीवर आपले नेतृत्व प्रस्थापित केले. ३ एप्रिल १९२७ रोजी *बहिष्कृत भारत* हे पत्र सुरू केले. (नंतरच्या काळातील समता, जनता, प्रबुद्ध भारत ही पत्रे बाबासाहेबांच्या नेतृत्वाखाली त्यांच्या इच्छेनुरूप सुरू झाली परंतु ते त्या पत्रांचे संपादक नव्हते.) महाड येथील चवदार तळ्यावर पाणी भरण्याचा हक्क अस्पृश्यांनाही आहे, ही मागणी करून त्यांनी केलेला सत्याग्रह सर्वत्र गाजला. त्यांच्या या भूमिकेला न्यायालयाचीदेखील मान्यता मिळाली. अस्पृश्य समाजाच्या कल्याणासाठी इंग्रज सरकारने काय केले पाहिजे यासंबंधीचे एक निवेदन इ. स. १९२८ मध्ये भारतात आलेल्या सायमन कमिशनला त्यांनी सादर केले. त्यानंतर दोन वर्षांनी नाशिक येथील काळाराम मंदिरात अस्पृश्यांना प्रवेश मिळावा यासाठी आंबेडकरांनी सत्याग्रह केला. दुसऱ्या गोलमेज परिषदेत अस्पृश्यांना इतर अल्पसंख्यांकांसह स्वतंत्र मतदारसंघ मिळावयास हवेत अशी मागणी केली. ऑगस्ट १९३२ मध्ये ब्रिटिश पंतप्रधान रॅम्से मॅकडोनाल्ड यांनी अस्पृश्यांना स्वतंत्र मतदारसंघ बहाल केले. परंतु या निर्णयाविरुद्ध २० सप्टेंबर १९३२ या दिवशी येवरडा तुरुंगात गांधीजींनी प्राणांतिक उपोषण सुरू केले. हिंदू समाज अविभक्त व एकात्म राहावा यासाठी गांधींचा त्या प्रस्तावाला विरोध होता. काँग्रेसच्या नेत्यांनी पंडित मदनमोहन मालवीय यांच्या नेतृत्वाखाली डॉ. आंबेडकरांशी वाटाघाटी केल्या आणि अखेर २४ सप्टेंबर १९३२ रोजी तडजोड होऊन 'पुणे करार' झाला. स्वतंत्र मतदारसंघाऐवजी अस्पृश्यांसाठी राखीव जागा मान्य करण्यात आल्या.

अस्पृश्य मुलांना सार्वजनिक शाळांतून प्रवेश घेण्याचा आणि सैन्यात भरती होण्याचा हक्क मिळावा म्हणून बाबासाहेबांनी लढा पुकारला. त्यांनी असंख्य व्याख्याने दिली, भरपूर लिहिले व समाजसंघटनेची कामे केली. संपूर्ण समाजाची पुनर्रचना व्हावयास हवी असे त्यांना वाटत होते. परंतु त्यांच्या इच्छेला व प्रयत्नांना प्रतिसाद मिळत नव्हता. हिंदू समाजात अस्पृश्यवर्गास इतर समाजघटकांच्या बरोबरीचे स्थान मिळावे यासाठी त्यांनी अतिशय प्रयत्न केले. शिक्षणाच्या हक्कासाठी अशीच धडपड करावी लागली होती. स्पृश्य हिंदूंप्रमाणे अस्पृश्य व्यक्तींनाही आपल्या पसंतीची वस्त्रे वापरण्याचा आणि भांडी वापरण्याचा हक्क मिळवण्यासाठी त्यांना चळवळ करावी लागली होती.

चवदार तळ्याचा खटला न्यायालयात सुरू असताना एकदा ते महाडला जात होते नदीला पूर आल्यामुळे त्यांना वाटेतच थांबावे लागले. पावसाळ्याचे दिवस होते आणि जेथे ते थांबले होते तेथे जवळपास अस्पृश्यांची घरे नव्हती. पूर ओसरेपर्यंत त्यांना अन्नपाण्यावाचून तडफडावे लागले. ते अस्पृश्य असल्यामुळे स्पृश्य हिंदूंनी त्यांना अन्नपाणी दिले नाही. या सगळ्या प्रकाराचे त्यांना अतिशय दु:ख झाले. गेल्या दहा वर्षांतील चळवळींचा व आगामी राजकीय सुधारणांचा विचार करण्यासाठी व सामाजिक परिस्थितीचा आढावा घेण्यासाठी १३ ऑक्टोबर १९३५ रोजी येवला येथे अस्पृश्य नेत्यांनी परिषद भरवली. ''आपले माणुसकीचे साधे अधिकार मिळविण्यासाठी आणि हिंदू समाजामध्ये समान दर्जा प्राप्त करून घेण्यासाठी ही चळवळ निष्फळ ठरली आहे. त्या चळवळीसाठी व्यतीत केलेला वेळ, काळ आणि पैसा ही वाया गेली आहेत ही मोठी दु:खदायक वस्तुस्थिती आहे'' (कीर, पृ. २८३) अशा प्रकारचे भाषण करून त्यांनी ''दुर्दैवाने मी अस्पृश्य जातीत जन्मास आलो हा काही माझा अपराध नाही, परंतु मरताना मात्र मी हिंदू म्हणून मरणार नाही'' असे जाहीर केले. १५ ऑगस्ट १९३६ रोजी त्यांनी स्वतंत्र मजूर पक्षाची स्थापना केली. त्यानंतर १९-२० जुलै १९४२ या दिवशी त्यांनी 'ऑल इंडिया शेड्युल्ड कास्ट्स फेडरेशन' सुरू केले. अस्पृश्यांना राजकीय स्थान प्राप्त व्हावे म्हणून आंबेडकरांनी अथक परिश्रम केले.

यानंतर मुसलमान, ख्रिश्चन व शीख धर्मांचा त्यांनी स्वीकार करावा यासाठी हालचाली झाल्या. कबीराच्या धर्मकल्पनांच्या प्रभावाखाली असणाऱ्या शीख धर्माचा स्वीकार करावा असे त्यांच्या मनात होते, परंतु नंतर ते बौद्ध धर्माकडे वळले. बाबासाहेबांनी बौद्ध धर्माच्या स्वीकाराचा निर्णय वीस वर्षे विचार केल्यानंतर घेतला आणि १४ ऑक्टोबर १९५६ रोजी बौद्ध धर्माचा स्वीकार केला. त्यांच्याबरोबर तीन लाख अनुयायांनी बौद्ध धर्माचा स्वीकार केला भारतातील ही सर्वात मोठी धर्मक्रांती मानावी अशीच घटना आहे. अस्पृश्यांच्या प्रश्नासंबंधी गांधीजींशी बोलताना बाबासाहेबांनी त्यांना सांगितले होते की 'वेळ येईल तेव्हा मी या देशाला कमीत कमी धोका लागेल असा मार्ग स्वीकारीन' त्यानुसार त्यांनी बौद्ध धर्म स्वीकारून या देशाचे अधिकातअधिक हित जपले. भारतीय संस्कृतीचाच एक घटक असणारा बौद्ध धर्म स्वीकारून या देशाची संस्कृती इतिहास व परंपरा यांना धक्का लागणार नाही याची त्यांनी खबरदारी घेतली. लंडन येथील ब्रिटिश ब्रॉडकास्टिंग कॉर्पोरेशनने त्यांचे 'मला बौद्ध धर्म का आवडतो आणि सद्य:स्थितीत जगाला तो कसा उपयुक्त आहे' या विषयावर त्यांचे भाषण प्रसिद्ध केले. या भाषणात त्यांनी बौद्ध धर्म आवडण्याचे कारण म्हणजे कुठल्याही धर्मात जी तीन तत्त्वे सापडत नाहीत ती प्रज्ञा, करुणा आणि समता ही तत्त्वे फक्त बौद्ध धर्मात सापडतात असे सांगितले. धर्मांतरानंतर दोन महिन्यांच्या आतच ६ डिसेंबर १९५६ रोजी बाबासाहेबांचे रात्री झोपेतच परिनिर्वाण झाले. दादर हिंदू स्मशानभूमीत त्यांच्यावर अंत्यसंस्कार होत असताना बाबासाहेबांची अंतिम इच्छा पुरी करण्यासाठी एक लक्षावर अनुयायांनी त्यांच्या देहासमक्ष बौद्ध धर्माची दीक्षा घेतली.

शिक्षणकालात आणि नंतर उरलेल्या आयुष्यात बाबासाहेब आंबेडकर यांनी प्रचंड वाचन केले. त्यांच्या मनावर महात्मा फुले यांचा फार मोठा परिणाम झाला होता. त्यांच्याकडून मूळ प्रेरणा घेऊनच आंबेडकरांनी बुद्धिवादी उदार मानवतावाद आणि उपयुक्ततावादी नीतिशास्त्र विकसित केले. मार्क्सवादी विचारप्रणालीतील शास्त्रीय मानवतावाद त्यांनी वाचला. शेवटचा निर्णायक प्रभाव बौद्धधर्मातून झाला. त्यामुळे त्यांनी ईश्वराचे अस्तित्व नाकारले. आंबेडकर हे काही अमूर्त विचार करणाऱ्यांपैकी नव्हते. लोकांवर झालेल्या अन्यायातून त्यांच्याकडे नेतृत्व चालत आले होते. त्यामुळे त्यांच्या मनातील कल्पना त्यांनी कृतीत उतरविल्या. त्यांचे तत्त्वज्ञान हे सामाजिक तत्त्वज्ञान होते. ''Positively', he said, 'my social philosophy may be said to be enshrined in the three words : liberty, equality and fraternity.' He regarded equality as the cornerstone of a stable society. The depressed classes must be awakened, must claim and take their rightful place in society as equals. Ambedkar declared that equality implied the right to equal opportunities for all, the freedom from want and fear, the freedom from oppression and dictatorship, whether by individuals, social groups, or nations. His claim to equality is based on the dignity of the human person. He wrote, 'From every point of view the human person is the centre. Manuski, which means human dignity, is one of Ambedkar's key words. He rejected Hindu social philosophy, as he found it, for it is based, he wrote, 'on the Triguna of the Sankhya philosophy, which is... a cruel perversion of the philosophy of Kapila, and which has made the caste system and the system of graded inequality the law of Hindu social life.''"(Ledrle, Matthew, 1978, p. 174)

"तीन महान व्यक्तींचा आंबेडकरांच्या जीवनावर आणि जीवितकार्यावर परिणाम झाला होता. महात्मा बुद्धाचे जीवन, महात्मा कबीराची शिकवण, महात्मा जोतीरावांचे कार्य यांचा परिणाम त्यांच्या जडणघडणीवर झाला. याच तीन महान व्यक्तींनी त्यांना आत्मिक शक्ती दिली. पाश्चिमात्य शिक्षणाने त्यांना शस्त्रे दिली. ज्ञानयोग आणि व्यवहार हे दोन गुण अंगी बाणल्यामुळे आंबेडकर हे रानडे, भांडारकर, टिळक नि तेलंग यांच्या पंक्तीत बसतात. ...आंबेडकर हे व्यासंगी राजकारणी श्रेणीतला शेवटचा दुवा होते." (कीर, पूर्वोक्त, पृ. ५२८) बाबासाहेब आंबेडकर हे हिंदुस्थानातील पददलित समाजामध्ये जन्माला आलेले असामान्य क्रांतिकारक नेते होते. त्यांनी हिंदू धर्माच्या इतिहासात अभुतपूर्व असे क्रांतिपर्व सुरू केले. त्या क्रांतीचे उद्दिष्ट हिंदू समाजाची पुनर्घटना करून त्याचे पुनरुज्जीवन करणे आणि त्याची अवनती व मानहानी

थांबवणे असे होते. आधुनिक भारतात समाजसुधारणांत व धर्मसुधारणांत जी कामगिरी राममोहन रॉय, जोतीराव फुले, स्वामी दयानंद, स्वामी विवेकानंद आणि महादेव गोविंद रानडे यांच्या कार्याच्या पुढे जाणारी आहे. स्वातंत्र्य, समता आणि बंधुभाव या तत्त्वांवर अधिष्ठित अशा प्रकारे हिंदू समाजाची पुनर्रचना व्हावी अशी त्यांची अपेक्षा होती. त्यांच्या मते अस्पृश्यतेचा उगम इ. स. ४०० च्या सुमारास झाला असावा. बौद्ध धर्म नी ब्राह्मण धर्म यांमध्ये श्रेष्ठपणासाठी जो झगडा झाला त्यातून अस्पृश्यता जन्मास आली. हिंदू धर्मातील जातिभेदाचे निर्मूलन करण्याचा त्यांचा प्रयत्न जगभर गाजला. ''कार्ल मार्क्स याचा 'वर्गकलह' हा शब्द जसा जगातील कानाकोपऱ्यात निनादला, तसा 'जातिभेद' हा शब्द आंबेडकरांनी जगात निनादून सोडला.... सहा कोटी अस्पृश्य हिंदूंची सेवा ही जगातील दलितांतीलही पददलितांची सेवा होय, हे लक्षात ठेवले म्हणजे त्यांच्या कार्याची महती कळेल.'' (कीर, तत्रैव, पृ. ५१८)

भारतीय राज्यघटना ही बाबासाहेबांनी भारताला दिलेली सर्वोच्च देणगी आहे. राज्यघटनेच्या गुणांविषयी बोलताना ते म्हणाले होते की, ''राज्यघटना कितीही चांगली वा वाईट असली तरी शेवटी ती चांगली की वाईट हे ठरणे हे राज्यकर्ते तिचा वापर करतील त्यांच्यावरच अवलंबून राहील. ...लोकांनी पहिली गोष्ट केली पाहिजे ती ही की, आपले सामाजिक आणि आर्थिक हेतू साध्य करताना घटनात्मक साधनांचा मार्ग स्वीकारला पाहिजे. असहकाराचे, कायदेभंगाचे नी सत्याग्रहाचे मार्ग त्यांनी सोडून द्यावे कारण घटनाबाह्य मार्ग म्हणजे केवळ अराजकांचे व्याकरण होय. ...एखादा माणूस कितीही थोर असला तरी त्याच्या चरणावर त्यांनी (लोकांनी) आपले स्वातंत्र्य अर्पण करू नये किंवा आपल्या संस्थेचा नाश करण्यास तो समर्थ होईल एवढी मोठी सत्ता त्याच्या स्वाधीन करू नये ...स्वातंत्र्य, समता आणि बंधुभाव ही एक अखंड आणि अभंग अशी त्रिमूर्ती आहे जर सामाजिक समता नसेल तर स्वातंत्र्याचा अर्थ मुठभर जनतेवर राज्य असणे असा होईल तर समता ही स्वातंत्र्यशून्य असेल तर ती व्यक्तीच्या जीवनातील स्वयंप्रेरणा नष्ट करील, जर बंधुभाव नसेल तर स्वातंत्र्य आणि समता याची वाढ साहजिकपणे होणार नाही. ...ज्या जातिभेदामुळे सामाजिक जीवनात तट पडले आहेत आणि जातीजातींत मत्सर आणि शत्रुत्व निर्माण झाले आहे त्या जातिभेदाचा त्याग करून भारतीयांनी सामाजिक आणि भावनिक अर्थाने एक राष्ट्र बनावे'' (कीर, तत्रैव, पृ. ४५८-५९-६०). *कास्ट्स इन इंडिया : देअर मेकॅनिझम, जेनिसीस अँड डेव्हलपमेंट* (१९१६) हा निबंध लिहून भारतीय समाजातील जातिसंस्थेचे विश्लेषण करण्याचा पहिला प्रयत्न त्यांनी केला. १५ मे १९३६ या दिवशी 'ॲनिहिलेशन ऑफ कास्ट्स' हे मूलत: दीर्घभाषण म्हणून तयार केलेला प्रबंध भाषण न झाल्याने पुस्तकरूपाने प्रकाशित केले. त्यांच्या मते जातिसंस्था नष्ट करण्याचा एक महत्त्वाचा मार्ग म्हणजे आंतरजातीय विवाह रूढ करणे होय. यासाठी कोणताही सक्तीचा अथवा कृत्रिम साधनांचा उपयोग न करता प्रत्येक स्त्री-पुरुषाला हिंदू धर्मशास्त्राच्या मानसिक दास्यातून मुक्त केले आणि त्यांच्या मनातील धर्मशास्त्रावर आधारित अपायकारक भावना साफ केल्या की, आंतरजातीय विवाहासाठी आणि सहभोजनासाठी पुढे कोणत्याही प्रकारची सक्ती न करताही या गोष्टी होत राहतील.'' जातिसंस्थेप्रमाणेच वर्णव्यवस्थेवरही भाष्य करणारा *हू वेअर द शूद्राज?* हा ग्रंथ त्यांनी १३ ऑक्टोबर १९४६ रोजी प्रकाशित केला. शूद्र वर्णाची उत्पत्ती सांगताना आंबेडकर लिहितात, ''भारतीय समाजात पूर्वी ब्राह्मण, क्षत्रिय आणि वैश्य हे तीनच वर्ण होते. परंतु पुढे ब्राह्मण आणि क्षत्रिय यांच्यात संघर्ष झाला आणि या संघर्षात ज्या क्षत्रियांनी ब्राह्मणांचे वर्चस्व मान्य केले नाही, त्यांना क्षत्रियत्वासाठी आवश्यक असणारा उपनयनाचा (मौंजी बंधनाचा) अधिकारच ब्राह्मणांनी नाकारला. ज्या क्षत्रियांचे त्यामुळे उपनयन होऊ शकले नाही, ते वर्णव्यवस्थेत दुसऱ्याक्रमांकावरून घरंगळत खाली आले व हिंदू समाजातील चौथा शूद्र वर्ण निर्माण झाला. पुढे अशा पूर्वाश्रमीच्या क्षत्रियांचा समावो शूद्र वर्णातच होऊ लागला.'' वैदिक कालखंडात चातुर्वर्ण्यव्यवस्था नसावी, असे आंबेडकरांचे मत होते.

कोलंबिया विद्यापीठाने आपल्या द्विशतसांवत्सरिक उत्सवाच्यावेळी बाबासाहेबांना 'डॉक्टर ऑफ लॉज' ही बहुमानाची पदवी प्रदान करताना ''भारतीय घटनेचे शिल्पकार, मंत्रिमंडळाचे सदस्य, व राज्यसभेचे सभासद भारतीय नागरिकांपैकी एक प्रमुख नागरिक, एक महान समाजसुधारक आणि मानवी हक्कांचा आधारस्तंभ असणारा एक पराक्रमी पुरुष'' या शब्दांत त्यांचा जो गौरव केला तो किती सार्थ होता ते बाबासाहेबांच्या जीवनकार्यावरून ध्यानात येते. त्यांचा *बुद्ध आणि त्याचा धम्म* हा महत्त्वाचा ग्रंथ त्यांच्या निधनानंतर प्रसिद्ध झाला. हा ग्रंथ एक प्रकारे बाबासाहेबांनी बुद्ध धर्माचा लावलेला

अन्वयार्थ आहे, असे भाष्य या ग्रंथाच्या अनेक अभ्यासकांनी केले आहे. ते एका परीने खरे आहे. एका अस्पृश्य हिंदूचा पुत्र म्हणून जन्माला आलेल्या बाबासाहेबांनी अमर्याद अवहेलना आणि अपमान सोसत या देशाच्या इतिहासात शिक्षणतज्ज्ञ, अर्थशास्त्रज्ञ, ग्रंथकार, देशभक्त, भारतीय राज्यघटनेचा निर्माता, गुलामगिरी नष्ट करणारा, दलितांचा उद्धारकर्ता, धुळीतून शिखराकडे जाणारा, पददलितांचा रक्षणकर्ता व कैवारी असे स्थान मिळविले ही कामगिरी जगाच्या इतिहासात अद्वितीय आहे. त्यांच्या अलौकिक जीवनाने सर्व दलितांना आत्मभान व आत्मविश्वास प्राप्त झाला. त्यांच्या ज्ञानाच्या प्रकाशात आपला मार्ग चालण्याचे धैर्य दिले आणि साहित्यनिर्मितीला असामान्य अशी स्फूर्ती दिली. महाराष्ट्रात उदारमतवादाची सुरुवात बुद्धिवंत ब्राह्मणांत झाली. महात्मा फुले यांच्यामुळे ती ब्राह्मणेतरांत पोचली आणि बाबासाहेब आंबेडकरांमुळे एकेकाळी ज्यांना अस्पृश्य समजले जात होते त्यांना मानवी प्रतिष्ठा आणि समान अधिकार प्राप्त झाले. भारताची जी राज्यघटना त्यांनी सिद्ध केली व २६ जानेवारी १९५० रोजी जी अंमलात आली तीत त्यांना अभिप्रेत असणारी न्याय, स्वातंत्र्य, समता व बंधुता ही तत्त्वे त्यांनी गुंफली. ५ फेब्रुवारी १९५१ रोजी बाबासाहेबांनी संसदेत 'हिंदू कोड बिल' मांडले आणि भारतातल्या स्त्रीवर्गाप्रती असलेले आपले सर्वोच्च कर्तव्य त्यांनी पार पाडले. लोकसभेत या बिलातील तरतुदींना बराच विरोध झाला. आंबेडकरांनी मंत्रिपदाचा राजिनामा दिला वगैरे इतिहास पुढचा आहे.

बाबासाहेबांनी आपल्या समाजबांधवांमध्ये क्रियाशीलतेची ऊर्जा उत्पन्न केली. ''शिका, लढा व संघटित व्हा'' हा मंत्र देऊन त्यांनी समाजबांधवांमध्ये भविष्याला आत्मविश्वासपूर्वक सामोरे जाण्याची प्रेरणा निर्माण केली. जीवनाच्या सर्वच क्षेत्रांप्रमाणे साहित्यातही स्वतंत्र निर्मिती करण्याची आकांक्षा व तिच्या पूर्तीसाठी आवश्यक असणारे बळ लेखकांना आंबेडकरांच्या प्रकाशदायी व्यक्तिमत्त्वाने व विचाराने लाभले. त्यामुळेच दलित साहित्य हे आंबेडकरवादाचे अपत्य आहे. समग्र व सम्यक परिवर्तनाचे स्वप्न साकार करण्याच्या प्रयत्नातून दलित साहित्याला रंगरूप प्राप्त झाले आहे. दलित साहित्याच्या आरंभकाळी त्याला काहीशी उपेक्षा सोसावी लागली हे खरे, तथापि अल्पावधीतच त्याचे जीवनस्पर्शित्व व अस्सलपण समस्त वाचकवर्गाच्या ध्यानात आले. केवळ मराठीच नाही तर सर्व भारतीय पातळीवर दलित साहित्य एक क्रांतिकारक अभिनव निर्मिती म्हणून ओळखले जाऊ लागले. कविता, आत्मकथने, कथात्म साहित्य, नाटक, अशा साहित्यसंबद्ध सर्वच क्षेत्रांत दलित जाणिवेचे प्रभावी अस्तित्व उमटून आले. जो परिणाम गांधीवादाचा होऊ शकला नाही, मार्क्सवादाचा होऊ शकला नाही, तो आंबेडकरवादाचा झाला ही खरोखरीच ऐतिहासिक महत्त्वाची फलश्रुती म्हणता येईल.

**स्वातंत्र्यप्राप्ती**

१५ ऑगस्ट १९४७ रोजी हिंदुस्थानला स्वातंत्र्य मिळाले आणि भारत व पाकिस्तान अशी दोन राष्ट्रे अस्तित्वात आली. स्वतंत्र हिंदुस्थानचा उदय घडून येण्यापूर्वी पाकिस्तान अस्तित्वात आले पाहिजे ही महमदअली जिना यांची बऱ्याच दिवसांपासूनची इच्छा होती. त्यामुळे १४ ऑगस्ट १९४७ रोजी पाकिस्तान अस्तित्वात आले. १५ ऑगस्ट हा दिवस सुरू झाला रात्री. बरोबर १२ वाजून २० मिनिटांनी घटना समितीचे अध्यक्ष राजेंद्रप्रसाद आणि पंतप्रधान जवाहरलाल नेहरू माऊंटबॅटन यांना भेटले. नेहरूंनी माऊंटबॅटन यांना सांगितले, बरोबर बारा वाजता आम्ही सत्तास्वीकार केलेला आहे. अशा प्रकारे हिंदुस्थानचे विभाजन होऊन भारत व पाकिस्तान ही दोन स्वतंत्र सार्वभौम राष्ट्रे अस्तित्वात आली. फाळणी हा नि:संशयपणे विषाद उत्पन्न करणारा प्रसंग होता, तरीही दोन्ही राष्ट्रांनी आपापल्या स्वातंत्र्याचा उत्सव आनंदाने व उत्साहाने साजरा केला. या स्वातंत्र्याचे श्रेय कोणाचे हा विषय नेहमीच मतभेदाचा राहणार. विशेषत: भारतातील प्रत्येक पक्ष श्रेयावर आपला हक्क सांगण्याचा प्रयत्न करणार हे स्वाभाविक आहे. बरोबर बोलायचे तर असे म्हणावे लागेल की, दीडशे वर्षांच्या कालावधीत स्वातंत्र्याची मागणी करणारे व त्यासाठी निष्ठेने आपले आयुष्य स्वातंत्र्यकार्याला वाहून घेणारे जेवढे म्हणून थोर पुरुष व सामान्य स्त्रीपुरुष या देशात झाले त्या सर्वांना स्वातंत्र्याचे श्रेय द्यावयास हवे. आरंभकाळातील अर्जविनंत्यांचा अगदी मवाळ प्रयत्न असो, सनदशीर मार्गाने केलेले राजकीय चळवळींचे प्रयत्न असोत, राष्ट्रीय आकांक्षेला शब्दरूप देणारी राष्ट्रीय काँग्रेस असो, लोकशक्तीच्या बळावर 'स्वराज्य हा माझा जन्मसिद्ध हक्क आहे' असे इंग्रज सरकारला ठणकावून

सांगणारे लोकमान्य टिळक असोत, वासुदेव बळवंतांपासून भगतसिंग-उधमसिंगांपर्यंत केले गेलेले शस्त्रास्त्रांच्या जोरावर स्वातंत्र्य मिळवून देण्याचा बेगुमान प्रयत्न करणारे क्रांतिकारक असोत, 'अभिनव भारत' या संस्थेचे संस्थापक आणि तनमनधनेकरून देशस्वातंत्र्याला आयुष्य वाहाणारे वीर विनायक दामोदर सावरकर असोत, किंवा आझाद हिंद सेनेची स्थापना करणारे सुभाषचंद्र बोस असोत, किंवा राष्ट्रपिता या सर्वोच्च मानाचे मानकरी गांधी असोत, त्यांच्या नेतृत्वाखाली शांततामय मार्गाने सत्य व अहिंसा या तत्त्वांचा स्वीकार करून देशव्यापी आंदोलन उभे करणारा राष्ट्रीय काँग्रेससारखा पक्ष असो, यांपैकी प्रत्येकाच्या प्रयत्नामुळे भारत स्वतंत्र झाला. १४ ऑगस्ट १९४७ च्या मध्यरात्री जवाहरलाल नेहरू यांनी देशाला स्वातंत्र्य मिळाल्यानंतरचे पहिले सुप्रसिद्ध भाषण केले.

नेहरू म्हणाले, "Long years ago we made a tryst with destiny, and now the time comes when we shall redeem our pledge, not wholly or in full measure, but very substantially. At the stroke of the midnight hour, when the world sleeps, India will awake to life and freedom. A moment comes, which comes but rarely in history, when we step out from the old to the new, when an age ends, and when the soul of a nation long suppressed finds utterance. It is fitting that at this solemn moment we take the pledge of dedication to the service of India and her people and to the still larger cause of humanity."(Gopal, Sarvepalli, 1989, p. 178)

या सर्व समारंभापासून व जल्लोषापासून महात्मा गांधी दूर होते. ते नौखालीत चाललेल्या हत्याकांडात शांतता प्रस्थापित करण्याचा प्रयत्न करीत होते. नंतरचा सर्व काळ गांधी अस्वस्थच होते. काश्मिरात युद्ध सुरू झाले होते आणि हा नरसंहार आवरण्याची कुठलीच शक्यता त्यांच्या दृष्टिपथात नव्हती. भारतीय जनतेची सद्सद्विवेकबुद्धी जागविण्यासाठी आणि हिंदू व मुसलमान यांच्यातील संबंध सुरळीत व्हावे यासाठी १३ जानेवारी १९४८ रोजी गांधींनी उपवास सुरू केला. ३० जानेवारी १९४८ रोजी सायंकाळी प्रार्थनास्थळी नथुराम गोडसे या माथेफिरूने गांधीजींची गोळ्या झाडून हत्या केली. या प्रसंगाचा धक्का एवढा प्रचंड होता की सारा देश त्यामुळे ढवळून निघाला. गांधींवर अंत्यसंस्कार करण्याच्या प्रसंगी नेहरूंनी जे भाषण केले तेही अजरामरच झाले आहे.*

गांधीहत्येनंतर महाराष्ट्रात फार मोठी दंगल उसळली. महाराष्ट्रातील वातावरण अगदी कलुषित होऊन गेले. व्यंकटेश माडगूळकर यांच्या *वावटळ* या कादंबरीत या वातावरणाचे प्रातिनिधिक चित्रण झालेले आढळते. स्वातंत्र्याचा आनंद आणि उल्हास ओसरण्याआधीच या भयानक आघाताने जनतेची मने बधीर झाली. फाळणीचे हत्याकांड आणि गांधीवधानंतरची जाळपोळ या घटना मनातून दूर व्हावयास बराच कालावधी जावा लागला. एकंदर जनमानस ढवळून टाकणाऱ्या या घटनांविषयीच्या प्रतिक्रिया ज्या प्रमाणात साहित्यात उमटावयास हव्या होत्या त्या प्रमाणात उमटलेल्या दिसत नाहीत. वर्षदोनवर्षांतच महाराष्ट्रातील राजकारण सत्तास्थानाच्या वाटेने आक्रमक झाले. स्वातंत्र्यासाठी सर्वस्वाचा त्याग केलेले स्वातंत्र्यसैनिक मागे पडले आणि धूर्त राजकारणी राजकीय सत्तेचे लाभ उचलण्यासाठी पुढे सरसावले. या पालटलेल्या परिस्थितीमुळे गांधींच्या कल्पनेतील रामराज्याची स्वप्ने पाहाणाऱ्या साने गुरुजींसारख्या अनेकांचा स्वप्नभंग झाला आणि साने गुरुजींना तर देहत्यागच करावासा वाटला.

---

* नेहरू म्हणाले, "Friends and comrades, the light has gone out of our lives and there is darkness everywhere. ...The light has gone out, I said, and yet I was wrong. For the light that shone in this country was no ordinary light... that light represented something more than the immediate present, it presented the living, the eternal truths, reminding us of the right path, drawing us from error, taking this ancient country to freedom. ...A great disaster is a symbol to us to remember all the big things of life and forget the small things of which we have thought too much. In this death he has reminded us of the big things of life, the living truth, and if we remember that, then it will be well with India. (Gopal, Sarvepalli, ibid, P. 187-188)"

**सत्तापालट : नव्या आकांक्षा, नवी स्वप्ने**

१९५० ते २००० हा कालखंड वर्षांच्या भाषेत पन्नास वर्षांचा कालखंड आहे. १८०० ते १९५० या दीडशे वर्षांच्या तुलनेत दिसायला तो लहान वाटतो. परंतु साहित्याच्या संदर्भात ही पन्नास वर्षे आधीच्या दीडशे वर्षांएवढी, नव्हे, त्याहूनही अधिक फलनिष्पत्तिकारक आहेत असे म्हणावे लागेल. स्वातंत्र्यपूर्व काळात वेगवेगळ्या साहित्यप्रकारांत भरपूर साहित्यनिर्मिती व साहित्यसंबद्ध अन्य उपक्रम होत राहिले हे खरे, तथापि परतंत्र देश स्वतंत्र व्हायला हवा या कार्याला सर्वांचाच अग्रक्रम होता. प्रत्येक कृतीवर मग ती व्यक्तिगत असो वा सामाजिक वा राष्ट्रीय, तीवर पारतंत्र्याची छाया होती. बहुविध स्वरूपाची राजकीय आंदोलने, सतत चालू होती. आर्थिक-सामाजिक-धार्मिक-सांस्कृतिक कोणत्याही क्षेत्रातील प्रत्येक घटना कमीअधिक प्रमाणात स्वातंत्र्याच्या आंदोलनाशी नाते सांगत होती. या देशातील प्रत्येक व्यक्तीच्या मानसिकतेवर पारतंत्र्याचे प्रत्यक्षाप्रत्यक्ष दडपण होते. १५ ऑगस्ट १९४७ रोजी देश स्वतंत्र झाला आणि या देशातील प्रत्येक व्यक्तीच्या स्थानाला स्वातंत्र्याचा स्पर्श लाभला. प्रत्येक जण स्वतंत्र देशाचा स्वतंत्र नागरिक झाला. पारतंत्र्यात जन्मलेल्या व पारतंत्र्याचा अनुभव घेतलेल्यांनाच या वाक्याचा अर्थ कळू शकेल. हा बंधमुक्ततेचा, स्वस्वातंत्र्याच्या साक्षात्काराचा अनुभव होता. याचा अर्थ १४ ऑगस्टच्या आदल्या दिवशीपर्यंत जे गुणावगुण भारतीयांत होते ते एकदम लुप्त झाले आणि सर्व जनता सर्वगुणसंपन्न झाली असे नाही. माणसे तीच होती व तीच राहिली, परंतु काळ पालटला, मनू पालटला, माणसांच्या ठिकाणी नव्या आशा-आकांक्षा पल्लवित झाल्या, नवी उमेद आली, नवी स्वप्ने डोळ्यांपुढे तरळू लागली. नवे हक्क मिळाले (त्याबरोबर कर्तव्येही आली). लोकशाही पद्धतीने निवडलेले सर्वांच्या मनाजोगते इथल्या भूमीतले, इथल्या माणसांचे सरकार आले. सरकारात सामील झालेली माणसे उरलेल्या माणसांची प्रतिनिधी होती. ही परिस्थिती अक्षरश: अपूर्व होती. स्वातंत्र्य, समता, बंधुता हे आता नुसते ऐकू येणारे शब्द नव्हते. ते घटनेचे अविभाज्य अंग होते. कोणीही त्यात बदल करू शकणार नव्हते, करणार नव्हते.

''WE, THE PEOPLE OF INDIA, having solemnly resolved to constitute India into a SOVEREIGN DEMOCRATIC REPUBLIC and to secure to all its citizens :

JUSTICE, social, economic and political

LIBERTY of thought, expression, belief, faith and worship;

EQUALITY of status and opportunity; and to promote among them all

FRATERNITY assuring the dignity of the individual and the unity of the Nation;

IN OUR CONSTITUENT ASSEMBLY this twenty-sixth day of November, 1949, do HEREBY ADOPT, ENACT AND GIVE TO OURSELVES THIS CONSITUTION.''

जोतीराव फुले यांच्यापासून बाबासाहेब आंबेडकरांपर्यंत आणि रानडे-टिळकांपासून गांधी-नेहरू यांच्यापर्यंत हजारो नेते व ३३ कोटी भारतीय जनता यांना हवी असणारी मूलतत्त्वे स्वीकारलेली स्वतंत्र भारताची राज्यघटना अस्तित्वात आली.

या नव्या युगाचा परिणाम देशातल्या प्रत्येक घटनेवर व कृतीवर, योजनेवर व उपक्रमावर, प्रयत्नावर व फलप्राप्तीवर झाला आणि होत राहिला. साहित्यसंस्कृतीचे क्षेत्रही याला अपवाद कसे असणार? ठराविक शहरांतली उच्चवर्णीय, उच्चवर्गीय माणसे जे लिहीत होती ते साहित्य या नावाने ओळखले जात होते. ते चित्र पालटले आणि काही वर्षांतच सर्व गावोगावची, सर्व जातीजमातीतली, सर्व वर्गांतली माणसे लिहू लागली, बोलू लागली. भावप्रकटन करू लागली, विचारप्रकटन करू लागली. साहित्याचे रंगरूप पालटले. साहित्यक्षेत्राची व्याप्ती व साहित्याची निर्मिती वाढली. जो तो लेखक आपापल्या प्रतिभाधर्माला प्रमाण मानून लिहू लागला. स्वाभाविकपणेच कविता-कादंबरी-कथा-नाटक-निबंध-ललितगद्य-निवेदनपर गद्य असे साहित्याचे प्रकार वाढले, विकास पावले. ही प्रक्रिया घडताना इंग्रजीचे साहाय्य होत होते हे खरे, पण आता इंग्रजी ही जेत्यांची भाषा नव्हती. पश्चिमेकडील एक देशभाषा एवढाच

तिचा मर्यादित अर्थ होता. त्यामुळे तिचे साहाय्य हे ऐच्छिक बनले. जीवनव्यवहारातही तिचे स्थान ऐच्छिक झाले. या देशातील भाषांची भरभराट होईल असे वातावरण आपोआप उत्पन्न झाले व त्यांत विपुल साहित्यनिर्मिती होऊ लागली. मराठी भाषाही याला अपवाद नव्हती. महाराष्ट्राच्या कानाकोपऱ्यातले लेखक आणि त्यांचे विविधांगी साहित्य भराभर पुढे येऊ लागले. वेगवेगळ्या जातीधर्मांतील प्रतिभावंत आपापल्या अनुभवांवर आधारित साहित्यनिर्मिती करू लागले. आदिवासी भागातूनही साहित्यनिर्मिती होऊ लागली. किंबहुना सर्व समाजघटकांना आपण लेखन करावे, साहित्यात भर घालावी अशी प्रेरणा लाभली. हा सर्व स्वातंत्र्याच्या प्रकाशाचा परिणाम म्हणता येईल. भारतीय स्वातंत्र्याने हे भान जागे केले. स्वातंत्र्याने प्रत्येकाच्या मनात स्वसामर्थ्याबद्दलचा विश्वास उत्पन्न केला. स्वातंत्र्याच्या प्रकाशाने मराठी भाषेच्या आसमंतातले सगळे काजळीकोपरे उजळून टाकले. साहित्याचा अभ्यास सुरू झाला आणि अभ्यासाच्या वेगवगेळ्या शाखा अस्तित्वात आल्या.

एकेकाळी एक मुंबई विद्यापीठ होते व काही शहरांत महाविद्यालये होती. पुढे पुणे, नागपूर, मराठवाडा, शिवाजी अशी विद्यापीठे निघाली. गेल्या पंचवीस वर्षांत या विद्यापीठांची संख्या दोन आकड्यांत पोचली. आणि महाविद्यालये तर हजारांत मोजावी लागतील एवढी झाली. एवढा शिक्षणाचा प्रसार वाढला. स्वातंत्र्यानंतरचे शैक्षणिक धोरण व घटनात्मक तरतुदी यांचा हा परिणाम आहे. जुन्या अभ्यासक्रमांची जागा नव्या सुधारित अभ्यासक्रमांनी घेतली. मराठीपुरते बोलायचे तर मध्ययुगीन मराठी व अर्वाचीन मराठी यातील ग्रंथांचा व ग्रंथकारांचा अभ्यास, मध्ययुगीन व अर्वाचीन वाङ्मयांचे इतिहास, साहित्यसमीक्षा, भारतीय साहित्यशास्त्र, वेगवेगळ्या साहित्यप्रकारांचे अभ्यास, भाषाशास्त्र व व्याकरण, संशोधन असे अभ्यासक्रम तर सुधारित स्वरूपात सुरू झालेच, शिवाय वेगवेगळ्या ज्येष्ठ अभ्यासकांनी व संशोधकांनी रूढ केलेल्या नव्या अभ्यासशाखा सर्वांच्या परिचयाच्या होऊ लागल्या. त्यांत ऐतिहासिक व वर्णनात्मक भाषाविज्ञान, लोकसाहित्य, सौंदर्यशास्त्र, साहित्याचा समाजशास्त्रीय अभ्यास, सांस्कृतिक अभ्यास मराठी वाङ्मयाची सांस्कृतिक पार्श्वभूमी, दलित साहित्य, ग्रामीण साहित्य, स्त्रीवाद, तुलनात्मक साहित्याभ्यास, भाषांतर मीमांसा, शैलीविज्ञान, संपर्क माध्यमांशी संबंधित भाषा व साहित्य यांचे उपयोजन यांचा अंतर्भाव होतो. याशिवाय साहित्याचा अन्य ज्ञानशाखांच्या दृष्टिकोणातून अभ्यासही सुरू झाला.

वाङ्मयेतिहासरचनाशास्त्र, सूचिशास्त्र, मूर्तिविज्ञान, ललितकलांच्या संदर्भात साहित्याभ्यास, हीही क्षेत्रे हळूहळू अभ्यासक्षेत्रे म्हणून मान्यता पावली. या प्रत्येक क्षेत्रात गेल्या पन्नाससाठ वर्षांत जे काम झालेले आहे त्यासंबंधी लिहायचे तर त्यासाठी सुद्धा संबंधित तज्ज्ञांना एकेका विषयावर असे अनेक ग्रंथ लिहावे लागतील. इत्यर्थ असा की, मराठी भाषेच्या व साहित्याची आणि त्यांच्या अभ्यासांची व्याप्ती आता अतिशय वाढली. विद्यापीठांमधून पीएच. डी. सारख्या पदवीसाठी झालेल्या संशोधनाच्या विषयांची नोंद करण्याच्या प्रयत्नातून एक मोठा सूचीग्रंथ सिद्ध झाला. याचप्रमाणे भाषांतरित साहित्याच्या केवळ नोंदींमधूनही एक ग्रंथराज निर्माण झाला. या जोडीला नियतकालिकांतून प्रसिद्ध झालेल्या साहित्याचा परामर्श घेण्याची पद्धतीही रूढ झाली. अशा वाङ्मयीन स्वरूपाच्या नियतकालिकांची संख्या मोठी व त्यांच्या प्रकाशनांचा एकंदर कालावधी प्रचंड असा व्याप वाढवावा तितका वाढतो आहे.

या सर्व विवेचनाचा एका वाक्यात सारांश सांगायचा तर असे म्हणावे लागते की, स्वातंत्र्योत्तर काळातील मराठी साहित्याशी संबंधित सर्व घटनांची, व्यक्तींची, प्रवाहांची दखल घेणे प्रास्ताविक मजकुराच्या उपलब्ध स्थलमर्यादेत शक्य नाही.

### महाराष्ट्र राज्याची स्थापना

भाषावार प्रांतरचनेचे तत्त्व स्वीकारल्यानंतर झालेली संयुक्त महाराष्ट्राची चळवळ व ती चळवळ यशस्वी होऊन संयुक्त महाराष्ट्र झाल्यानंतर १९६० पासून महाराष्ट्रात नवे राजकीय पर्व सुरू झाले. महाराष्ट्राच्या स्थापनेनंतर तत्कालीन मुख्यमंत्री यशवंतराव चव्हाण यांच्या प्रेरणेने महाराष्ट्र राज्य साहित्य आणि संस्कृती मंडळाची स्थापना झाली. तर्कतीर्थ

लक्ष्मणशास्त्री जोशी या मंडळाचे अध्यक्ष झाले आणि या मंडळाच्या वतीने साहित्यनिर्मितीला उत्तेजन मिळेल असे प्रकल्प सुरू झाले. 'एनसायक्लोपिडिया ब्रिटानिका' च्या धर्तीवर मराठीत विश्वकोशनिर्मितीचा प्रस्तावित एकोणीस खंडांचा महत्त्वाकांक्षी प्रकल्प सुरू झाला. राज्य शासनाच्या वतीने उत्कृष्ट साहित्यनिर्मितीस पुरस्कार देण्याची प्रथा सुरू झाली. राज्य नाट्यस्पर्धा सुरू झाल्या. मराठी चित्रपटनिर्मितीस व नाट्यनिर्मितीस साहाय्य करण्यास सुरुवात झाली. स्वातंत्र्यपूर्व काळात एकराष्ट्रीयत्वाचे जे भान महाराष्ट्रातील जनमानसात अस्तित्वात होते त्याची जागा महाराष्ट्रीयत्वाने घेतली. परंतु चीन व पाकिस्तान या राष्ट्रांशी जी युद्धे झाली त्या वेळी एकत्वाची भावना पुन्हा एकवार लोकांच्या अंत:करणात उचंबळून आली. सुदैवाने भारताच्या सार्वभौमत्वावर झालेला हल्ला प्राणपणाने परतवून लावण्याचे प्रयत्न यशस्वी झाले. या काळात काही समरगीते व काही युद्धकथा यांची निर्मिती झाली. परंतु राष्ट्रीय भावनेचे प्रबळ आविष्कार घडल्याचे चित्र मराठी साहित्यात काही दिसून आले नाही. 'भारत हा कधीकधी माझा देश आहे' या कवितेतील उपरोध सार्थ ठरावा अशीच परिस्थिती विसाव्या शतकाच्या उत्तरार्धात पाहावयास मिळते. साठोत्तर कालखंडात सामाजिक न्याय, समता, समाजातील दुर्बल घटकांचा विकास, समान संधीचे तत्त्व, राखीव जागांची तरतूद, समाजकल्याण, यांसारख्या माणसांच्या मूलभूत हक्कांचे रक्षण करणारी अनेक पावले महाराष्ट्र शासनाकडून उचलली गेली. तथापि मतलबीराजकारण्यांकडून स्वार्थापोटी आपापल्या जातीजमाती व त्यांचे हितरक्षण ज्या प्रमाणात वाढीस लागले त्या प्रमाणात आपला समाज बहुधर्मीय आहे आणि हिंदू, मुसलमान, ख्रिश्चन, शीख, जैन, बौद्ध हे सर्व धर्म गुण्यागोविंदाने शांततापूर्ण सहजीवन उपभोगताहेत व आपले आणि इतरांचे भावनिक आयुष्य समृद्ध करताहेत अशी परिस्थिती निर्माण होण्यात अडचणी येत गेल्या व अजूनही जाताहेत. उद्योग, व्यवसाय वाढीला लागल्यामुळे आणि उच्च शिक्षणातील विकासामुळे व्यक्तिगत प्रगती ज्या प्रमाणात झाली त्या प्रमाणात समाजाची प्रगती झाली का असा प्रश्न विचारवंतांना भेडसावू लागला. शहरीकरणाची प्रक्रिया मोठ्या प्रमाणावर वाढीला लागल्यामुळे खेड्यांचीसुद्धा काही अंशी लहानलहान शहरे होऊ लागली आणि शहरांची महानगरे होऊ लागली आणि महानगराचे सर्व दोष – जीवनाला आलेली असह्य गती, यांत्रिकता, भावनिक शुष्कता, परस्परनात्यातील व्यावहारिकतेला मिळालेले प्राधान्य, वाढती बेपर्वा वृत्ती, अर्थलालसा – सर्वत्र पसरले. या सर्व प्रदूषित पर्यावरणाचे चित्रण मराठी साहित्यात अपरिहार्यपणे होऊ लागले. कारण दैनंदिन मानवी जीवन या पर्यावरणाने ग्रासले गेले आहे.

**अस्सल अनुभवाच्या शोधात : कादंबरी**

सच्चे लेखक मग ते कोणत्याही काळातले असोत, कोणत्याही भाषेतले असोत, त्यांचा अस्सल जीवनानुभवाचा शोध आणि यथोचित रूपाच्या परमोत्कर्षाची त्यांची साधना या दोन्ही गोष्टी अखंड चाललेल्या असतात. अस्सल जीवनानुभव ही ज्याप्रमाणे आत्मप्रत्ययसूचक संज्ञा आहे त्याप्रमाणेच कमअस्सलपणाच्या विरोधी अर्थ सुचवणारीही आहे. अस्सलपणा हा तडजोड नाकारतो, सामान्यीकरण (जनरलायझेशन) नाकारतो. विशिष्ट अनुभवाचे रूप सूक्ष्मातिसूक्ष्मपणे न्याहाळून, सर्वांगाने आकलन करून घेऊन त्यातील सगळ्या अतार्किकतेस विरूपतेसह, विसंगतीसह, अनपेक्षितेसह, धक्कादायकतेसह, कंटाळवाणेपणासह ते रूप मूर्त करण्याचा प्रयत्न करतो. असे रूप मूर्त करणे हा शोध असतो, तसाच संघर्षही असतो. शोध भाषा या द्रव्याचा. भाषेच्या विविध क्षमतांचा. शब्दांच्या शक्तींचा आणि शब्दयोजनेचा, रचनेचा, आकृतिबंधाचा. हा परिपूर्णतेचा शोध असतो. आणि हा शोध संघर्षास प्रेरणा देतो. संघर्ष स्वत:शी, संघर्ष रचनेशी, संघर्ष निर्मितिप्रक्रियेशी. सर्व शक्ती एकवटून, सर्व जीवन पिळवटून अनुभवाचे अस्सलपण शब्दांत जागे करण्यासाठी. हे साधणे हा समाधान देणारा अनुभव असतो. कारण तो वाचकाला काही तरी अत्यंत परिपक्व प्रकाशदायी व प्रेरक वाचल्याचे समाधान देत असतो. तो काही वेळा अस्वस्थ करील तर काही वेळा प्रशांत करील. अशा लेखनाचे प्रयत्न स्वातंत्र्योत्तर काळात विशेषत्वाने झाले. दुसऱ्या महायुद्धाचे दूरगामी स्वरूपाचे परिणाम, फाळणीनंतरच्या हत्याकांडाने दिलेला प्रचंड मानसिक धक्का, यंत्रयुगातील गतिमान जीवनपद्धतीत होत चाललेली घुसमट, स्वातंत्र्यानंतरही सामाजिक वा व्यक्तिगत पातळीवर न सुटलेल्या प्रश्नांचे पर्वत यामुळे संवेदनशील लेखकांना विलक्षण अस्वास्थ्य आले. वरवरचे गोडगोड प्रेम किंवा तथाकथित ध्येयवादी स्वप्ने यांत रमणारे लेखन ना लेखकाला समाधान देऊ शकत होते, ना वाचकाला. तेव्हा हे सर्व बाजूला ठेवून भोवताली जे दिसते आहे ते वास्तव त्यातील सर्व विरूपतेसकट, ओबडधोबडपणासकट मांडले

पाहिजे असा लेखकांचा निश्चय होत होता. मर्ढेकरांनी आपल्या संज्ञाप्रवाही कादंबऱ्यांतून - *रात्रीचा दिवस* (१९४२), *तांबडी माती* (१९४२), *पाणी* (१९४८) - जीवनवास्तवातील विसंगती टिपल्या होत्या. विश्राम बेडेकरांनी त्याही आधी *रणांगण* (१९३९) लिहून जागतिक पातळीवरील राजकारण आणि सामान्य माणसाच्या भावविश्वाची होरपळ यांच्यातील ताण उत्कटपणे शब्दबद्ध केला होता. अशा साहित्यातून लेखकांना एक आश्वासन मिळत होते. व्यक्तिजीवन व समाजजीवन, भावपूर्णता व तटस्थता, वास्तव आणि अतिवास्तव, जाणीव आणि नेणीव, दृश्य जग व मानसिक विश्व अशा द्वंद्वातून आपापल्या प्रतिभेशी संवादी अशा कथासूत्रातून १९५०-१९५५ नंतरची कादंबरी आकाराला आली.

मालतीबाई बेडेकरांच्या *बळी* (१९५०)मधून रामोशी समाजाचे जीवनदर्शन आदिम प्रवृत्तींसह चित्रित झाले. मध्यमवर्गीय चाकोरीबद्ध जिण्यापेक्षा अगदी वेगळ्या आयुष्याचे दर्शन तीद्वारे झाले. प्रगल्भ लेखनाचे सर्व गुण या कादंबरीद्वारे प्रकटले. यानंतरच्या कालखंडात अस्सल जीवनानुभवाच्या शोधात पुढील कादंबऱ्या लिहिल्या गेल्या. *बनगरवाडी* (१९५५) व *वावटळ* (१९६४) - व्यंकटेश माडगूळकर, *माचीवरला बुधा* (१९५५) - गो. नी. दांडेकर), *डोंबाऱ्याचा खेळ* (१९६०), *वैतागवाडी* (१९६४), *बॅरिस्टर अनिरुद्ध धोपेश्वरकर* (१९६७), *होमसिक ब्रिगेड* (१९७४) - भाऊ पाध्ये, *धग* (१९६०)- उद्धव शेळके, *रथचक्र* (१९६२), *ल्व्हाळी* (१९६६) - श्री. ना. पेंडसे, *क्षिप्रा* (१९५४), *सरहद्द* (१९६२), *जन हे वोळतु जेथे* (१९६९) - शरच्चंद्र मुक्तिबोध, *स्वामी* (१९६२) रणजित देसाई, *चक्र* (१९६२) - जयवंत दळवी, *माहीमची खाडी* (१९६९) - *मधु मंगेश कर्णिक, सावित्री* (१९६३), *अवलोकिता* (१९६४) - पु. शि. रेगे., *रात्र काळी घागर काळी* (१९६३), *कोंडुरा* (१९६६) - चिं. त्र्यं. खानोलकर, *कोसला* (१९६३), *बिढार* (१९७५), *जरीला* (१९८५), *झूल* (१९८५) - भालचंद्र नेमाडे, *माणूस* (१९६३) - मनोहर तल्हार, *रात्रंदिन आम्हा युद्धाचा प्रसंग* (१९६४), *इंधन* (१९६४) - हमीद दलवाई , *निष्पर्ण वृक्षाखाली भर दुपारी* (१९६८) - ह. मो. मराठे, *देवाचा शब्द* (१९६८) - मनोहर शहाणे, *काळा सूर्य* (१९६८), *हॅट घालणारी बाई* (१९७०) - कमल देसाई, *काळोखाचे अंग* (१९६६) - ए. वि.जोशी, *अरे संसार संसार* (१९७१) - प्रभाकर पेंढारकर, *सात सक्कं त्रेचाळीस* (१९७४) - किरण नगरकर, *अधोलोक* (१९७५), *प्रतिबद्ध आणि मर्त्य* (१९८१) - वसंत आबाजी डहाके, *एन्कीच्या राज्यात* (१९८३) - विलास सारंग, *पानिपत* (१९८८) - विश्वास पाटील, *बॉनसाय* (१९८८), *अंधारवाटा* (१९७८) - सुभाष भेण्डे , रथ (१९८४), *टोकदार सावलीचे वर्तमान* (१९९१), *ताम्रपट* (१९९४)- रंगनाथ पठारे, *मुंबई दिनांक* (१९७३), *सिंहासन* (१९७७) - अरुण साधू, *मेड इन इंडिया* (१९८७) - पुरुषोत्तम बोरकर, *हे ईश्वरराव.. हे पुरुषोत्तमराव* (१९८३), *कळ* (१९९६) - श्याम मनोहर, *रीटा वेलिणकर* (१९९०) - शांता गोखले, *गौतमची गोष्ट* (१९९८) - अनिल दामले, *तणकट* (१९९८) - राजन गवस, *सत ना गत* (१९९९) - राजन खान, *बखर एका राजाची* (१९७२)- त्र्यं. वि. सरदेशमुख, *एकेक पान गळावया* (१९८०), *तेरूओ आणि कांहि दूरपर्यंत* (१९८५), *मुक्काम* (१९९२), - गौरी देशपांडे, *एका श्वासाचं अंतर* (१९९०) - अंबिका सरकार, *स्थलांतर* (१९९४), *आवर्तन* (१९९६) - सानिया, या नावांत प्रत्येकजण आपापल्या अभिरुचीनुसार आणखीही भर घालू शकेल.

१९०२ साली राजवाडे यांनी आपल्या 'कादंबरी' या निबंधात कादंबरीकारांकडून 'जाज्वल्य मनोवृत्ती या मुख्य गुणाची' अपेक्षा केली होती. वर ज्या विविध प्रवृत्तींच्या कादंबऱ्यांनी मराठी कादंबरीचे क्षेत्र आशयविषयदृष्ट्या व रूपदृष्ट्या विस्तारले त्यांची वेचक नोंद केली. ऐतिहासिक, पौराणिक, चरित्रात्मक, अद्भुतरम्य, वैज्ञानिक, रहस्यमय अशा सर्व प्रकारच्या कादंबऱ्या मराठीत उत्पन्न झाल्या. पत्रात्मक, आत्मचरित्रात्मक, पात्रमुखी अशा वेगवेगळ्या लेखनतंत्रांचा सप्रयोजक अवलंबही कादंबरीकारांनी केला. फडकेप्रणीत तंत्रशरण कादंबरीलेखनाचा काळ संपून वास्तववाद, अतिवास्तववाद, मॅजिक रिॲलिझम अशा वेगवेगळ्या तत्त्वदृष्टींचा प्रभाव मराठी कादंबरीवर पडला. या कादंबऱ्यांनी वसाहतवादाचे जोखड दूर सारले. अंत:प्रामाण्य महत्त्वाचे मानून लेखन केले. त्यामुळेच मराठी जीवनवास्तवातील अस्सलपणाचा विविधांगी बोध मराठी वाचकाला होऊ शकला असे म्हटल्यास अतिशयोक्ती होणार नाही. कादंबरी या साहित्यप्रकाराने मराठी साहित्यविश्वावर शंभरसव्वाशे वर्षे राज्य केले आणि गद्य महाकाव्य या आपल्या गौरवास सार्थ असा प्रतिसाद मिळविला. त्यामुळेच विसाव्या शतकाच्या उत्तरार्धात अन्य साहित्यप्रकारांपेक्षा कादंबरी या साहित्यप्रकाराची

समीक्षा अधिक प्रमाणात होऊ लागली. वेगवेगळ्या दृष्टिकोणातून कादंबरी या साहित्यप्रकाराचा अभ्यास होत राहिला आणि अजूनही होत आहे.

### लघुकथा

एक साहित्यप्रकार म्हणून मराठीमध्ये लघुकथेला अस्तित्व लाभले त्याला केवळ शंभर वर्षे झाली आहेत. पाश्चात्त्यांकडेदेखील या लेखनाचा इतिहास एकोणिसाव्या शतकापासूनचा आहे. लघुकथा (Short story) या शब्दाला Oxford Engilsh Dictionary च्या पुरवणीत प्रवेश मिळाला, तोच मुळी इ.स. १९३३ मध्ये. जर्मनीमध्ये टीक, ब्रेन्टॅनो व हॉफमान यांच्या आकाराने लहान असणाऱ्या कथात्म साहित्याचे स्वागत झाले तो काळ १८०० ते १८१४ असा आहे. दैनंदिन जीवनवास्तवातील गूढ संवेदना जागे करणारे हे लेखन होते. फ्रान्समध्ये कथा प्रस्थापित झाली ती १८२९-३१ च्या दरम्यान. मेरिमे, बाल्झॅक व गोत्ये यांच्या आरंभीच्या निर्मितीचा परिचय फ्रान्समधील मासिकांमधून झाला. पुढे फ्लॉबेरचे काटेकोर आणि वस्तुनिष्ठ लेखन (१८७७) आणि मोपासाँचे असामान्य कथालेखन (१८८०) अधिक प्रतिष्ठा पावले. असाच प्रकार रशियातही झालेला दिसतो. पुश्किनने (१८३०) लहान कथा लिहून आरंभ केला आणि गोगोल (१८२४) व टर्जिनीव्ह (१८४६) यांनी लघुकथांना नेमकी दिशा दिली. ''आम्ही सारेच जण गोगोलच्या 'ओव्हरकोट'खालून बाहेर आलो आहोत'' हे टर्जिनिव्हचे उद्‌गार प्रसिद्ध आहेत. इंग्रजी भाषेत लघुकथांचा आरंभ इंग्रजांनी केला नाही तर अमेरिकनांच्या लिहिण्याने झाला. अमेरिकेतही 'लघुकथा' या पारिभाषिक संज्ञेचा उपयोग १८८० मध्ये झाला, असे 'द डेव्हलप्मेन्ट ऑफ द अमेरिकन शॉर्ट स्टोरी' या समालोचनग्रंथात नमूद केलेले आहे.

आधुनिक मराठी कथानिर्मितीची सुरुवात हरिभाऊंच्या 'स्फुट गोष्टी'पासून होते. इ.स. १८६० मध्ये हरिभाऊंनी 'करमणूक' साप्ताहिक काढले. करमणुकीतून हप्त्याहप्त्याने कादंबरी छापून उरेल त्या जागेत लोकांचे मनोरंजनही होईल व शिकवणही मिळेल अशी प्रकरणे म्हणून 'स्फुट गोष्टी' लिहिल्या. कादंबरी म्हणजे प्रदीर्घ गोष्ट तर 'स्फुट गोष्ट' म्हणजे एकदोन हप्त्यांत संपणारी गोष्ट इतपतच त्या काळातील कथाविषयक समजूत होती. हरिभाऊंच्या गोष्टींचे सहा संग्रह निघाले असले तरी त्यांच्या किमान शंभर स्फुट गोष्टी पुस्तकरूपाने प्रकाशित झाल्या नाहीत याची नोंद करावयास हवी. १९१० च्या सुमारास लिहायला लागलेल्या वि. सी. गुर्जर यांच्याही वाट्याला हेच भाग्य आले. गुर्जरांची कामगिरी म्हणजे 'स्फुट गोष्टीला संपूर्ण गोष्ट बनविले' ही होय. *मनोरंजन* मासिकाच्या मे १९२२ च्या अंकातील *अंगणातील पोपट* या कथेने दिवाकर कृष्णांनी आपल्या कथालेखनाला आरंभ केला आणि त्यांद्वारे मराठी कथेला पहिल्यांदा रूप (Form) प्राप्त झाले. बोध बाजूला सारून भावप्रधान, तरुण स्त्रीपुरुषांतील स्वाभाविक प्रेमाची अभिव्यक्ती करणारी व्यक्तिवादी कथा त्यांनी लिहिली. मराठीतील रोमँटिक कथेचे रूप त्यांनी सिद्ध केले. त्यांच्या कथांच्या द्वारे मराठीत हळव्या-भावुक मनोविश्वाचा प्रवेश झाला.

*मनोरंजन*नंतरची मराठी कथेची सारी वाढ नियतकालिकांनी घडवून आणली. पाश्चात्त्य देशांप्रमाणे येथेही मासिकांनीच कथा हा साहित्यप्रकार जोपासला. *नवयुग, रत्नाकर, यशवंत, किर्लोस्कर, प्रतिभा, पारिजात, वागीश्वरी, ज्योत्स्ना, अभिरुची, सत्यकथा, हंस, वसंत, सुगंध* या आणि अशा अनेक मासिकांनी मराठी कथा भरपूर प्रमाणात प्रसिद्ध केली. रत्नाकर - यशवंत-किर्लोस्कर यांच्याशी ना. सी. फडके यांचे नाव विशेषत्वाने निगडित आहे. ना. सी. फडके यांच्या कथालेखनाला आरंभ झाल्यापासून मराठी कथेचे नवे तंत्रनिष्ठ रूप-गुंतागुंत, निरगाठ, उकल या संकेताशी बांधलेले रूप रूढ झाले. त्यांच्या *प्रतिभासाधन* व *लघुकथा लेखन मंत्र आणि तंत्र* या ग्रंथांनी लेखनसाधनेची संथा दिली आणि मराठी कथा कळत नकळत त्या मंत्रोच्चारानुसार वर्तत राहिली. थेट व. पु. काळे यांच्यापर्यंत फडके यांच्या उत्कंठावर्धक, सुखवादी लेखनाची परंपरा चालू राहिली आहे. ''प्रा. फडके ह्यांनी लघुकथालेखनाला योग्य अशी मराठी भाषेची घडण केली. त्यांनी भाषेतला बोजडपणा व पाल्हाळ काढून टाकला. तिला सुटसुटीत असे स्वरूप दिले. तिचा अलंकारिकपणाचा सोस कमी केला. शाब्दिक चमत्कृतीत घुटमळण्याची सवय मोडली. तिला संयम शिकवला. आणि हुबेहूब व रेखीव चित्रे रेखाटण्याचे सामर्थ्य तिला दिले. प्रा. फडके ह्यांनी भाषेची अशी नवी घडण केली नसती तर मराठी लघुकथेचा विकास

होणेच शक्य नव्हते.'' हे गौरवोद्गार मराठी नवकथेचे प्रवर्तक गंगाधर गाडगीळ (गाडगीळ, १९६६ : पृ. १७७-७८) यांनी काढावे इतकी आपल्या कथानिरूपणशास्त्राची पकड फडके यांनी बसविली होती.

फडके यांच्याच आसपास अनेक लेखक-लेखिकांनी कथानिर्मिती केली. त्यात विभावरी शिरूरकर, लक्ष्मणराव सरदेसाई, खं. सा. दौंडकर, वामन चोरघडे, कुसुमावती देशपांडे, श्री. म. माटे, य. गो. जोशी यांचा निर्देश केला म्हणजे मराठी कथा केवळ फडके वळणाने पुढे गेली नाही हे ध्यानात येते. १९४२-४५ च्या आसपास झालेला मराठी नवकथेचा उदय होण्याला अनुकूल अशी पृष्ठभूमी या सर्वांच्या कथालेखनाने उत्पन्न झाली. गंगाधर गाडगीळ, अरविंद गोखले, पु. भा. भावे, व्यंकटेश माडगूळकर, शांताराम, दि. बा. मोकाशी, सदानंद रेगे इत्यादिकांनी मराठी कथेचे रूपसंवर्धन केले. १९६० नंतरच्या मराठी कथेचा कळसाध्याय लिहिला तो जी. ए. कुलकर्णी यांनी. मानवी जीवनावर असणारी नियतीची पकड, आत्मभानाचा शोध घेण्याची माणसाची केविलवाणी धडपड, अटळ भागध्येयाचा करावा लागणारा मुकाट स्वीकार या आशयविशेषांबरोबरच जीवनाचा अर्थ लावण्याच्या अखंड प्रयत्नातून फँटसी,रूपककथा, प्राक्कथा अशा निरनिराळ्या कथारूपांची केलेली निर्मिती; अर्थसंपन्न प्रतिमासृष्टी, व्यामिश्र जीवनानुभुतीतील वेध लावणारी गूढता ही जी.ए. कुलकर्णी यांच्या कथांची वैशिष्ट्ये. कटाक्षाने समाजापासून अत्यंत अलिप्त राहाण्याच्या व्यक्तिधर्मामुळेही जी.ए. कुलकर्णी या नावाला  मराठी साहित्यात एक असाधारण वलय प्राप्त झाले. मराठी नवकथेला हळूहळू येत गेलेल्या ठराविक रूपबंधाच्या कक्षा उधळून टाकून जी. एं.नी मराठी कथा मुक्त केली. मराठी कथेच्या सामर्थ्यात प्रतिभाधर्मातील वेगळेपणानुसार भर घालण्याचे काम शरच्चंद्र चिरमुले, चिं. त्र्यं.खानोलकर, श्री. दा. पानवलकर, विद्याधर पुंडलिक, दिलीप पुरुषोत्तम चित्रे, आनंद यादव, आनंद विनायक जातेगावकर, विलास सारंग, श्याम मनोहर, भारत सासणे, राजेंद्र बनहट्टी यांनी केले. स्त्रीकथाकारांमध्ये हीच कामगिरी वसुंधरा पटवर्धन, कमल देसाई, विजया राजाध्यक्ष, वसुधा पाटील, तारा वनारसे, जोत्स्ना देवधर,ऊर्मिला सिरूर, अंबिका सरकार, गौरी देशपांडे, सानिया, आशा बगे, प्रिया तेंडुलकर, मेघना पेठे, ऊर्मिला पवार, प्रतिमा इंगोले इत्यादी कथालेखिकांनी बजावली. हा सर्व कथेतिहास विविध तपशिलांसह सर्वपरिचित आहे.

मराठी साहित्यविश्व समृद्ध करणाऱ्या या लेखनप्रकाराविषयी सर्वस्वी वेगळे विचार भालचंद्र नेमाडे यांनी व्यक्त केले आहेत. ते लिहितात, ''लघुकथा हा कमी लांबीचा, चिंचोळा भाषिक अवकाश पुरवणारा, एकसुरी आशयसूत्रातून स्थलकालाचे संकुचित, म्हणून तीव्र, संवेदन देणारा प्रकार आहे. (नेमाडे, १९९०, पृ. १९७) असे कथेचे वर्णन करून भालचंद्र नेमाडे उपहासाने म्हणतात, ''लघुकथा हा निव्वळ मासिकं चालवणारा क्षुद्र वाङ्मयप्रकार आहे असं माझं मत आहे. काही तरी एक-दोन चमत्कृतिपूर्ण माणसं किंवा घटना चोळून चोळून चार-पाच पानं धूर्तपणानं लिहिणाऱ्यांसाठी हा चिटुकला प्रकार ठीक आहे. एक तर लघुकथेच्या तीन-चार पानांत इतका छोटा भाषिक अवकाश अभिप्रेत असतो की कोणाला फारसं काही सांगता येत नाही. छोटेपणामुळे अतिशयोक्तीकडे कल वाढतो. चटपटीतपणा एक गुण होऊन बसतो.... काहीतरी मानसिक, भावुक किंवा अंधुक, जाणूनबुजून फालतू ताण मांडणाऱ्या, ''आभाळ भरून आलं होतं'' किंवा ''बाहेर ऊन मी म्हणत होतं'' अशी सुरुवात करणाऱ्या, धड गद्यही नाही आणि धड पद्यही नाही अशा लघुकथा लिहिणाऱ्यांची मराठीत फार गर्दी झाली आहे. शरीरानं, मनानं आणि बुद्धीनंही निष्क्रिय अशा वर्गाचं हे द्योतक आहे.''(नेमाडे, तत्रैव, पृ. २६९) नेमाडे यांच्या भूमिकेचा प्रतिवाद विलास सारंग, विद्याधर पुंडलीक, गंगाधर गाडगीळ, म. द. हातकणंगलेकर, शांताराम या मंडळींनी केला.

वरील चिकित्सेच्या संदर्भात कथेविषयी काही विचार मांडता येतील. ''कविता, नाटक आणि कादंबरी या तीन साहित्यप्रकारांना साहित्याच्या क्षेत्रात जे सत्तास्थान आहे ते कथेला नाही. कथेचा इतिहास जरी माणसाच्या मौखिक व लिखित साहित्याच्या आरंभकाळापासून सुरू होत असला, आणि महाकाव्यांपर्यंत किंवा वेदोपनिषदांपर्यंत मागे नेता येत असला तरी कथेच्या इतिहासाकडे, कथेच्या स्वरूपाकडे किंवा कथेच्या सामर्थ्याकडे साहित्यविमर्शकांनी फारसे लक्ष दिलेले नाही. काळात 'कथात्म साहित्य' (fiction) या विषयाची पुष्कळ चर्चा झाली असली तरी ती मुख्यत्वे कादंबरीच्या अनुषंगानेच झाली आणि कथेच्या घटकांचा विचारही सर्वसाधारणपणे कादंबरीच्या छायेखालीच

झाला. कथानक, पात्रयोजना, वातावरण, भाषा, निवेदन इत्यादी घटकांचा परामर्श कादंबरीच्या पद्धतीनेच घेतला गेला. कथेला कादंबरीची 'धाकटी बहीण' असेच म्हटले जाते. वस्तुत: संख्येने अगणित असलेल्या या साहित्यप्रकाराने जीवनानुभवांची इतकी वेगवेगळी रूपे प्रकट केली आहेत आणि अभिव्यक्तीचे इतके भिन्न भिन्न प्रकार अस्तित्वात आणले आहेत की, कादंबरीची त्यांच्याशी तुलनाच होऊ शकत नाही. तरीही बऱ्याच समीक्षकांना व वाचकांनाही जो मान कादंबरीला द्यावासा वाटतो तो कथेला द्यावासा वाटलेला नाही. कथेविषयी बोलायचे म्हणजे कादंबरीच्या तुलनेने बोलायचे असादेखील पायंडा पाडलेला आहे.

कादंबरी हा साहित्यप्रकार लांबीने, व्याप्तीने पल्लेदार आहे, फार मोठा स्थलावकाश व कालावकाश व्यापणारा आहे, आणि त्यामुळेच सूक्ष्म, तपशीलवार व समग्र जीवनदर्शन घडविण्याची क्षमता बाळगणारा आहे. गद्य महाकाव्य अशी गौरवशाली मुद्रा कादंबरी मिरवीत आली आहे. असे होण्याचे एक कारण असे की, कथा या मासिकांतून प्रसिद्ध होत आल्या व आजही होतात. सामान्यपणे मासिकाच्या चारपाच किंवा दहाबारा पानांत त्या सामावल्या जातात. शेकडो मासिकांतून दरमहा किंवा मासिकांच्या प्रकाशनाचा जो कुठला कालावधी असेल त्या कालावधीनुसार बहुसंख्येने कथांची निर्मिती व प्रकाशन होत असते. अल्प वेळेत अगदी जाताजाता वाचता येण्याजोगे हे लेखन असल्यामुळे त्यावर फुटकळपणाचा, क्षुल्लक असण्याचा शिक्का फारसा विचार न करताही सहज मारता येतो. दुसरे असे की, मासिके ही केवळ 'साहित्य'प्रकाशनाच्या उदात्त हेतूने गंभीरपणेच चालवली जातात असे नाही. बहुधा ती व्यापारी वृत्तीने चालवली जातात. त्यामुळे गंभीरपणाने लिहूनही मासिकांतून प्रसिद्ध होणाऱ्या कथासाहित्यास कादंबरीची प्रतिष्ठा प्राप्त होत नाही. तिसरे असे की, व्यावसायिक दृष्ट्या कथासंग्रहांच्या प्रकाशनास प्रकाशक फारसे उत्सुक नसतात; व्यावसायिक तडजोड म्हणून कादंबरीकाराचा कथासंग्रह बाजारात आणला गेल्याचे अनुभव अनेक जणांना येत असतात. ही वस्तुस्थिती मराठी साहित्यापुरती मर्यादित नाही, जागतिक पातळीवरील कथासाहित्याबाबत असाच अनुभव असल्याचे वेळोवेळी नमूद झालेले आहे. लघुकथेच्या 'लघुत्वा'कडे याही दृष्टिकोणातून पाहिले गेले आहे याकडे डोळेझाक करता येत नाही. एक स्वतंत्र व स्वायत्त साहित्यप्रकार या अर्थाने लघुकथेची व्याख्या करणे, तिचे विशेष असे नियम सांगणे जवळजवळ अशक्य आहे. याचे कारण लघुकथालेखनाची विविधता ही कादंबरीपेक्षा इतकी विपुल आहे की, ती विशिष्ट व्याख्येत सामावणे शक्यच नाही.

कथा ही भाषेच्या आधारे उभी राहिलेली एक संरचना असते. त्यामुळे कथेचे विश्व हे भाषेने घडवलेले विश्व असते. कथेतील पात्रे, घटना, प्रसंग हे लौकिकातील व्यक्ती, घटना, प्रसंग यांचे विशेष घेऊन अवतरत असतात. मात्र असे असले तरी त्यांची निर्मिती ही कथाकाराने प्रतिभेच्या साहाय्याने केलेली निर्मिती असते. मानवी जीवनव्यवहाराच्या अवलोकनामधून या घटनाप्रसंगांना आणि व्यक्तींना रंगरूप लाभत असते. मानवी जीवनव्यवहाराच्या केंद्रस्थानी माणसांचे परस्परांशी असणारे नातेसंबंध असतात. या संबंधांत मानवी सुखदु:खाचा उगम असतो. नात्यांचे स्वरूप कोणतेही असो, प्रत्येक व्यक्ती ही अंतिमत: एकटी असते. फ्रँक ओ'कोनॉरचा शब्द वापरून सांगायचे तर कथेमधून एकटेपणाचा आवाज (lonely voice) उमटत असतो. भावना व विचार ही कथार्थाची अमूर्त अंगे असतात. कथेतील शब्द, प्रतिमा, प्रतीके, वाक्ये यांतून ती सूचित होत असतात. कथान्तर्गत घटनाप्रसंगांतून स्फुरलेला एखादा विचार, एखादी मन:स्थिती, एखाद्या घटनेच्या निमित्ताने एखादी व्यक्ती वा व्यक्तिसमूह यांच्या प्रकटलेल्या क्रियाप्रतिक्रिया, घटनेतले नाट्य, विशेषणांचा व प्रतिमांचा वापर या साऱ्यांमधून कथार्थाची घडण होत असते. कथा व कादंबरी यांतील प्रमुख व पायाभूत फरक दोहोंमधील कथनाच्या संरचनेचा आहे. जी जीवनदृष्टी कादंबरीच्या आशयाचा आधारभूत सांगाडा असते, ज्यातून पुढे ती आपले रूप धारण करते, ती जीवनदृष्टी अतिशय महत्त्वाची असते. कथेला असा सांगाडा नसतोच. अशा प्रकारचा सांगाडा नसणे व त्यामुळे जीवनदृष्टीच्या आविष्कारात फरक पडणे हे कथा व कादंबरी यांतील वेगळेपण आहे.

कथा ही नेहमीच लवचिक आणि प्रयोगाच्या दृष्टीने कादंबरीपेक्षा खुली म्हणता येईल. कादंबरीकारांपेक्षा कथाकारांना अधिक स्वातंत्र्य असते. शेकडो हजारो माणसांची शेकडो हजारो आयुष्ये त्यांच्यापुढे असतात आणि हवी तेवढी उभी करण्याची मुभा त्यांना असते. कादंबरीतून मात्र एकच प्रमुख व्यक्तिरेखा पुढे येते. कादंबरीकार

भूत-वर्तमान-भविष्य अशा काळाच्या परिप्रेक्ष्यात व्यक्तींना, प्रसंगांना, परिस्थितीला पाहात असतो. लघुकथालेखकाची कला वर्तमानक्षणाशी निगडित असते. लघुकथा पूर्ण झालेला क्षण आपल्यात सामावून घेते.

कथा आपल्या अस्तित्वातून स्वत:चे एक विश्व उत्पन्न करीत असते. कथा वाचताना आपण त्या विश्वात प्रवेश करतो. ज्या श्रेष्ठ कथा असतात त्या त्यांतील घटनाप्रसंगांच्या गुंफणीतून उभे राहाणारे कथानक, पात्रे, वातावरण, कथनरूप व भाषा आणि या सर्व घटकांतून सुचविला जाणारा कथार्थ या सर्व घटकांच्या एकात्मतेमुळे व निर्मितीतील त्यांच्या सीमित उपयोगामुळे आपल्याला आश्चर्यकारक वाटतात. त्या कथेच्या संरचनेत आपण थोडा जरी फेरफार करण्याचे मनात आणले किंवा तिला जरा जरी धक्का लावला तर ती नाजूक रचना लगेच कोसळून पडू शकते. कथेचा हा नाजूक नेटकेपणा आपल्याला परिपूर्णतेची जाणीव देत असतो, आपल्याला कथाघटकांसंबंधी जेवढे म्हणून माहीत असायला हवे तेवढे माहिती करून देतो आणि आपल्या मनात उठणाऱ्या परंतु शब्दांकित करता न येणाऱ्या प्रश्नांची उत्तरेही देत राहातो. अशी ही कलात्मक पूर्णता एकही जादा शब्द कथेत नसल्याची जाणीव करून देते. तसेच काहीही सांगायचे उरले नाही असे आश्वासन देते.

यामुळे लघुकथा ही अन्य सीमावर्ती लेखनप्रकारांहून वेगळी ठरते. वस्तुत: व्यक्तिचित्र, लघुनिबंध, प्रवासलेख असे कथेच्या सीमेवर वावरणारे कथनप्रकार घटना-प्रसंग, वातावरण, पात्रनिर्मिती, निवेदक या कथासंबद्ध घटकांनीच कमीअधिक प्रमाणात युक्त असतात. परंतु आपल्या अनन्य रूपामधून कथा स्वत:चे वेगळेपण दाखवून देते. कथेतील प्रत्येक घटक इतका अनन्यसाधारण, सुसंगत व सहज ओळखू येणाऱ्या तीव्रतेचा असतो की त्या सुसंवादित्वातून समग्रता, सुसंगती व दीप्ती प्रकटते. कथा वाचल्यावर आपल्याला आपण काहीतरी नवे, काहीतरी भक्कम असे वाचले असल्याचा प्रत्यय येतो. कथाघटकांचे एकात्म संघटन प्रथमदर्शनी आपल्याला कथेचे सुटेसुटे विवरण शक्य होणार नाही अशी अनुभूती देते. उदाहरणादाखल एखादी श्रेष्ठ कथा सांगायची ठरवले तर शब्दांमागून शब्द आणि वाक्यामागून वाक्य असे करीत संपूर्ण कथाच सांगावी लागते.तिचा सारांश किंवा नुसता भावार्थ सांगणे शक्य होत नाही. वेगवेगळ्या प्रकारच्या, वेगवेगळ्या काळातल्या, वेगवेगळ्या कथाकारांच्या कथा वाचल्या म्हणजे आंतरिक प्रेरणेने आपल्याला कथेचे सौंदर्य व सामर्थ्य ध्यानात येते. आपल्याला गवसलेले सत्य पिढ्यांमागून पिढ्यांना पोचवीत राहाणारी कथा ही खऱ्या अर्थाने टिकाऊ कथा असते. माणसाच्या कृती त्याला कुठे पोचवू शकतात त्याचे दर्शन घडवण्याचे, त्याचे शिक्षण देण्याचे आणि त्यामुळे जबाबदारपणे वागण्याचे संस्कार कथा अप्रत्यक्षपणे करीत असते. त्यामुळे कथेचे आणि नीतीचे एक अंगभूत नाते असते. श्रेष्ठ साहित्यातून नीतिमूल्ये प्रकटत असतात आणि ती मानवी जीवनाला उन्नत करीत असतात. कथांची निर्मिती जरी माणसाच्या मनावर संस्कार करावेत या उद्देशाने होत नसली तरी वाचकांची मने संस्कारित करण्याचे काम अप्रत्यक्षपणे कथेकडून घडत असते.

कथा आपल्याला माणूस असणे म्हणजे काय त्याचा बोध करून देतात. या जगाचा अनुभव घ्यायचा, समाजात सहभागी व्हायचे, दुसऱ्यांच्या डोळ्यांनी पाहायचे, आपल्या कृतींची जबाबदारी स्वीकारायची, आपल्या इच्छाआकांक्षांना वळण लावायचे, जाणीवपूर्वक स्थलकालाशी समरस व्हायचे आणि दु:खभोग व मृत्यू यांच्याशी जुळवून घ्यायचे म्हणजे माणूस असायचे हे आपण कथेतून शिकतो. सर्व मानवी शक्यतांचा जिवंत साठा कथांत सामावला आहे. अनेक कथांच्या गाभ्याशी कुठलीतरी परीक्षा असते, कुठलेतरी कोडे असते, कुठलातरी प्रश्न असतो आणि त्या त्या क्षणी माणसाने ते सारे समजावून घेण्याचा, स्वत:ची सोडवणूक करण्याचा प्रयत्न केलेला असतो. प्रतिभेच्याद्वारे केल्या जाणाऱ्या नवनिर्मितीच्या स्वरूपाची जाणीव उत्पन्न करणे हे कार्य कथा सहजपणे पार पाडत असते. '' (खोले, विलास, २००८, पृ. चार ते चौदा)

**लघुनियतकालिके**

१९५५ ते १९७० या कालावधीत विद्रोहाचा एक आगळावेगळा आविष्कार मराठी साहित्यविश्वात झाला तो म्हणजे लघुनियतकालिकांचा. हा विद्रोह जसा प्रस्थापित नियतकालिक संस्कृतीच्या विरोधात होता तसाच तो प्रस्थापित मध्यमवर्गीय जीवनजाणिवांच्या लेखकप्रकाशकांविरुद्धही होता. *शब्द* हे मराठीतील पहिले लघुनियतकालिक मानले जाते. ते रमेश

समर्थ यांनी १९५५ मध्ये संपादित केले होते. त्यानंतर अशोक शहाणे यांची *अथर्व* ( १९६०) व *असो* (१९६२) ही नियतकालिके प्रसिद्ध झाली. *अथर्व* व *असो* यांच्या प्रकाशनाने मराठी लघुनियतकालिकांचे स्वरूप निश्चित झाले. लघुनियतकालिक हा शब्द इंग्लिशमधील 'लिटल मॅगझीन' या शब्दाचे भाषांतर आहे. पाश्चात्त्य देशांत लघुनियतकालिकांची चळवळ विसाव्या शतकाच्या आरंभकाळात सुरू झाली. लेखनातील प्रायोगिकतेवर असणारा भर, जोखमीची विनालाभाची कार्यवाही आणि तुलनेने अल्पसंख्य असणारा बुद्धिमान वाचकवर्ग या विशेषांमुळे व्यावसायिक नियतकालिकांच्या व महत्त्वाच्या विद्वत्तापूर्ण समीक्षात्मक लेखांच्या नियतकालिकांपेक्षा लघुनियतकालिके पूर्णत: भिन्न असतात. १९१४ मध्ये 'द लिटल रिव्ह्यू' नावाचे 'लिटल मॅगझीन' अमेरिकेत निघाले. त्यातील 'लिटल' या विशेषणास अनुसरून 'लिटल मॅगझीन' हा शब्द सिद्ध झाला. पाश्चात्त्य जगतातील लघुनियतकालिकांचा इतिहास अनेक वर्षांचा आहे.*

मराठीत लघुनियतकालिकांची निर्मिती झाली तो १९५० ते १९६० च्या दरम्यानचा स्वातंत्र्यानंतरच्या पहिल्या दशकातील कालखंड स्वप्नभंगाचा कालखंड होता. स्वातंत्र्यपूर्व काळातील स्वप्ने व आदर्श हळूहळू अस्ताला जाण्याची प्रक्रिया सुरू झाली होती. नोकरशाहीत व सामाजिक-राजकीय क्षेत्रांत केवळ व्यक्तिगत लाभाच्या व प्रगतीच्या उद्देशाने प्रेरित झालेल्या मंडळींचे पेव फुटले होते. सामान्य माणसाच्या सुखदु:खांशी त्यांना कुठलेही कर्तव्य नव्हते. सत्ताकांक्षा व भरघोस अर्थलाभ  हीच काय ती ध्येये! पाचपंचवीस वर्षांपूर्वीपर्यंत महात्मा गांधींच्या उपदेशाप्रमाणे 'खेड्याकडे चला' हा आदेश स्वीकारून ग्रामीण जीवनाच्या प्रगतीसाठी झटणारे लोकच आता सुखासीन नागरी आयुष्यावर लुब्ध झाले होते.

---

* १८४० मध्ये  प्रकाशित झालेले 'द डायल' (बॉस्टन, १८४०-४१)  हे अमेरिकन लघुनियतकालिक आरंभकालीन लघुनियतकालिकाचे एक उदाहरण म्हणून सांगितले जाते. ते अतीततावादाच्या समालोचनपर लेखनासाठी निघाले होते आणि राल्फ वाल्डो इमर्सन व मार्गारेट फुलर यांनी त्याचे संपादन केले होते. *द यलो बुक* (१८९४-९७) या  प्रभावी इंग्लिश लघुनियतकालिकाने आपल्या अंकातून सौंदर्यवादाची तत्त्वे जाहीर केली होती. ऑस्कर वाईल्ड, हेन्री जेम्स, ऑब्रे बियर्डस्ली यांच्या सहभागाने  त्याला महत्त्व प्राप्त झाले होते. बियर्डस्लीच्या रेखाटनांनी त्या काळात  इलस्ट्रेशन्सची नवी कलात्मक जाणीव उत्पन्न केली. *सॅव्हॉय* (१८९६)  हे इंग्लिश लघुनियतकालिक म्हणजे व्हिक्टोरियन इहवादाविरुद्धच्या क्रांतीचा जाहीरनामाच होता. विसाव्या शतकातील लघुनियतकालिकांची चळवळ इ. स. १९१२ मध्ये सुरू झाली. *पोएट्री : अ मॅगझिन ऑफ व्हर्स* (शिकॅगो, १९१२-    ) हे लघुनियतकालिक एझरा पाऊंड याला परदेशी संपादक म्हणून घेऊन हॅरियट मन्रो त्याचे संपादन करीत असे. दीर्घकाळ चाललेल्या या लघुनियतकालिकास चांगले यश लाभले. *ऱ्हिदम* (१९११-१३), *ब्लास्ट* (१९१४-१५) ही  पहिल्या महायुद्धापूर्वीची उल्लेखनीय लघुनियतकालिके. पहिल्या महायुद्धाच्या काळात इतर अनेक लघुनियतकालिके निघाली. त्यांपैकी *आदर्स* (१९१५-१९) : संपा. आल्फ्रेड क्रेम्बॉर्ग व *द लिटल रिव्ह्यू* (शिकॅगो, सॅनफ्रान्सिस्को, न्यूयॉर्क, पॅरिस, १९१४-२९) : संपा. मार्गारेट अँडरसन ही सर्वात प्रसिद्ध नियतकालिके. *द इगोइस्ट* (लंडन, १९१४-१९) : संपा. डोरा मार्डसन (१९१४) आणि *हॅरिट शॉ वीव्हर* (१९१४-१९) या मासिकातून प्रतिमावाद्यांचे सिद्धांत व व्यवहार मांडले गेले. मरियन मन्रोच्या संपादकत्वाखाली *द डायल* या लघुनियतकालिकाचा पुनरुज्जीवित अवतार इ. स. १९२० मध्ये न्यूयॉर्क येथे प्रकाशित झाला आणि त्या तपाच्या मध्यावर त्याला तीस हजार वाचक लाभले.  'न्यू व्हर्स' (१९३३-३९), 'स्टॅण्ड' (१९५२), 'ॲम्बिट' (१९५९), *अजेंडा* (१९५९), *द रिव्ह्यू* (१९६२), *द न्यू रिव्ह्यू* (१९७४-७९) अशी काही निवडक लघुनियतकालिके सांगता येतील. टी. एस. इलियट, रॉबर्ट फ्रॉस्ट, एझरा पाऊंड, एडगर ली मास्टर्स, हार्ट क्रेन आणि वॅलेस स्टीव्हन्स या कवींना त्यांच्या आरंभकाली जी कीर्ती लाभली तिचे श्रेय लघुनियतकालिकांकडे जाते. जेम्स जॉइसच्या 'युलिसिस' या कादंबरीचे प्रथम प्रकाशन 'द रिव्ह्यू' या लघुनियतकालिकामधून हप्त्याहप्त्याने झाले. त्याचा परिणाम न्यायालयाच्या आदेशानुसार या मासिकावर बंदीहुकूम बजावण्यात येऊन  कालांतराने आर्थिकदृष्ट्या मोडकळीला येण्यात झाला. १९३० नंतरच्या डाव्या विचारसरणीच्या लघुनियतकालिकांची पूर्वसुरी म्हणावीत अशी १९२० पूर्वी निघालेली अनेक लघुनियतकालिके होती. *द मासेस* (न्यूयॉर्क, १९११-१७) त्यांपैकी सर्वात अग्रभागी असणारे लघुनियतकालिक मॅक्स इस्टमन व फ्लॉइड डेल यांच्या मार्गदर्शनानुसार निघत असे. पहिल्या महायुद्धानंतरच्या काळात ''नवी'' साहित्यिक मासिके निघाली. त्यांत *द मॉडर्न रिव्ह्यू* (१९२२-२४) : संपा. फरवुड टार्लटन; *द फ्युजिटिव* (१९२२-२५) : संपा. जॉन क्रो रॅन्सम, ॲलन टेट, डोनाल्ड डेव्हिडसन व रॉबर्ट पेन वॉरन; *व्हॉइसेस* (१९२१-६५) संपा. हॅराल्ड विनल; *सेसेशन* (१९२२-२४) : संपा. गोऱ्हाम मन्सन; *ब्रुम* (१९२१-२४) : संपा. हॅराल्ड लोब व आल्फ्रेड क्रेम्बॉर्ग यांचा समावेश होतो. १९४० च्या आसपास लेखक आणि कवी यांच्या वर्तुळात काही लघुनियतकालिके सुरू झाली. *केन्यॉन रिव्ह्यू* (१९३९ - ) हे त्यांपैकी एक. १९६० च्या अखेरीस तर प्रस्थापित साहित्यिक दृष्टिकोणांस नाकारणारी शेकडो लघुनियतकालिके निघाली परंतु ती अल्पकाळ टिकली. अशा लघुनियतकालिकांत *न्यूयॉर्क क्वार्टर्ली, ॲफ्रा, अ फेमिनिस्ट लिटररी मॅगझिन, द अमेरिकन रिव्ह्यू* यांचा निर्देश करता येईल. प्रस्तुत विषयावरील *द लिटल मॅगझिन* (१९४७) : एफ. हॉफमन एट ऑल आणि *द लिटल मॅगझिन इन अमेरिका* (१९७८) : इ. ॲण्डरसन व एम. किन्झी हे ग्रंथ पाहाण्याजोगे आहेत.

जातिभेदांची तीव्रता वाढल्यामुळे माणसामाणसांतील अंतरही वाढत होते. सर्वसामान्य माणूस निराश व वैफल्यग्रस्त झाला होता. साहित्याच्या पातळीवर वास्तव जीवनातील अनुभव आणि तथाकथित प्रस्थापित लेखकांकडून होणारी साहित्यनिर्मिती यांत कोणतीच संगती नव्हती. *सत्यकथे*सारख्या मासिकातून येणारे साहित्य प्रयोगशील व पारंपरिक, रोमँटिक व वास्तववादी असे संमिश्र स्वरूपाचे असले तरीही सुप्रतिष्ठित मानले जात होते. यामुळे नवे संवेदनशील लेखककवी उद्विग्न झाले होते. सत्यकथाकारांच्या विशिष्ट अभिरुचीनुसार प्रकाशित होणाऱ्या साहित्याला उच्चभ्रू लेखकांच्या व समीक्षकांच्या दृष्टीने महत्त्व प्राप्त होत होते. तत्कालीन *किर्लोस्कर, स्त्री, मनोहर, दीपावली, सुदर्शन* यांसारखी नियतकालिके रूढ विचारांचे-अनुभवांचे-मूल्यांचे रतीब घालीत होती. वेगवेगळ्या साहित्यसंस्थांची *महाराष्ट्र साहित्य पत्रिका, प्रतिष्ठान, युगवाणी* ही नियतकालिकेही परंपरेची जपणूक करीत होती. परंपरेविरुद्ध वा प्रस्थापितांविरुद्ध ब्र काढण्याचीही कोणाची प्राज्ञा नव्हती. मराठी वाङ्मयावर क्ष-किरण टाकणाऱ्या लेखकाबद्दल (अशोक शहाणे, मासिक मनोहर, नोव्हेंबर, डिसेंबर, १९६३) 'हे हात कलम केले पाहिजेत' अशी असमंजस व आक्रस्ताळी भूमिका घेतली जाऊ लागली होती. यानंतरच्या काळात 'हल्ली लेखकाचा लेखकराव होतो तो का' (वाचा अंक २) ही प्रक्रिया समजावून सांगणारा उपहासप्रधान व कोत्या समजुतींची खिल्ली उडवणारा लेख भालचंद्र नेमाडे यांनी लिहिला होता. राजा ढाले यांनी 'सत्यकथेची सत्यकथा' (येरू) सांगितली होती. अशा प्रातिनिधिक लेखनामधून प्रकटणारा उद्रेक हे लघुनियतकालिकातील अभिव्यक्तीचे एक प्रधान वैशिष्ट्य होते. भावनाशील व्यक्तींच्या मनाचा होणारा कोंडमारा आणि त्यांच्या मनोविश्वात दडून बसलेला व तत्कालीन सामाजिक पर्यावरणात दडपून टाकला गेलेला लैंगिक संकोच उफाळून वर येऊ लागला होता. प्रस्थापित व्यवस्थेविरुद्ध लढा देण्यावाचून तरणोपाय नाही असे वाटलेल्या तरुण लेखककवी मंडळींनी आपल्या प्रामाणिक अभिव्यक्तीसाठी आपल्यासारख्याच अभिरुचीच्या व तडफडणाऱ्या समानशील मित्रांच्या लेखनाला प्रसिद्धी देण्यासाठी मराठीत लघुनियतकालिके अस्तित्वात आली. मुख्यत्वे कविता या साहित्यप्रकाराला लघुनियतकालिकांत प्रधान स्थान होते. केवळ पुणे-मुंबईच नव्हे तर महाराष्ट्राच्या सर्व भागांतून वेगवेगळ्या लेखककवींच्या गटांनी आपापली लघुनियतकालिके काढली होती. यातून प्रसिद्ध होणाऱ्या कविता बंधनरहित मुक्त स्वरूपाच्या जशा होत्या तशाच वर उल्लेखिल्याप्रमाणे दडपल्या गेलेल्या कामभावनेचा उत्स्फूर्त आविष्कार करणाऱ्याही होत्या. हा आविष्कार संकेतमुक्त होता. ही संकेतमुक्तता पारंपरिक अभिरुचीला धक्का देणारी होती. या दृष्टीने पाहाता लघुनियतकालिकांतील कवितेचे मर्ढेकरांच्या कवितेशी आंतरिक नाते होते. जसे १९४५ नंतरच्या काळात मर्ढेकरांच्या कवितांनी तत्कालीन समाजाला व रसिकवर्गाला आपल्या काव्यलेखनाने झटके दिले आणि नवे अनुभवविश्व, नवी प्रतिमासृष्टी, नवी शब्दकळा घडवून मराठी कवितेचे एकंदर रूपच पालटून टाकले तसाच प्रकार लघुनियतकालिकांतून अरुण कोलटकर, दिलीप चित्रे, भालचंद्र नेमाडे, रघू दंडवते, अशोक शहाणे, चंद्रकांत खोत, वसंत गुर्जर, मनोहर ओक, वसंत आबाजी डहाके, बाबुराव बागूल, सतीश काळसेकर प्रभृती कवींच्या कवितेने केला. १९५५ ते १९७० या कालखंडात 'शब्द', 'दिशा', 'आत्ता', 'भारूड', 'फक्त', 'येरू', 'वाचा', 'कावळा', 'श्रीशब्द' अशी सुमारे तेवीस लघुनियतकालिके होती.* भाषा, निवेदन व रचनाबंध हे या लघुनियतकालिकातून प्रकटणारे तिन्हीही घटक मूलतः प्रयोगशील होते. सर्व लघुनियतकालिके मुद्रित स्वरूपाचीच होती असेही नाही. काही नियतकालिके संपादकांच्या हस्ताक्षरात प्रसिद्ध होत. या लेखनाला अनुरूप अशी चित्रांची जोडही काही वेळा दिली गेलेली दिसते. अनेकदा रायनर मारिया रिल्के, एझरा पाउंड, पाब्लो नेरुदा यांसारख्या जागतिक कीर्तीच्या, साहित्याला साचलेपणाची आलेली कळा दूर करणाऱ्या पाश्चात्त्य कवींच्या कवितांची भाषांतरे या लघुनियतकालिकांनी प्रकाशित केलेली आढळतात. सभोवतालच्या गर्दीतही वाट्याला येणारे असह्य एकाकीपण, जगताना अनुभवाला येणारा कंटाळा, सातत्याने प्रत्ययाला येणारी नीरसता व रूक्षता, माणसामधल्या क्षुद्रतेचा वाटणारा तिटकारा, स्वार्थ व संपत्तिलालसा यांचा बुजबुजाट अशा अनुभवांची प्रतीती नव्या प्रतिमांच्या व प्रतीकांच्या उपयोजनातून महाराष्ट्रातल्या वेगवेगळ्या भागातल्या कमीअधिक क्षमतेच्या कवींनी सच्चेपणाने

* १९६० ते १९७० हा अशा लघुअनियतकालिकांच्या समृद्धीचा आणि भरभराटीचा कालखंड समजला जातो. मराठीतील अशा कालिकांची काटेकोर संख्या उपलब्ध होणे काहीसे कठीण असले तरी त्यांची संख्या ७५ ते १०० च्या आसपास असावी. वरील कालावधीत खालील लघुअनियतकालिके निघाली. *शब्द, दिशा, नवे लेखन, रूपगंधा, रूप, रंग + ललित रंग, अथर्व, असो, भारूड, हेमा, अक्षरे, फक्त, टिंब, तापसी, येरू, वाचा, कावळा, चक्रवर्ती, स. न. वि.वि., श्री शब्द, अबकडइ, शब्दकार, ऐसा जे, शून्य, अर्णव.*

आणून दिली. या कवितांतून केला गेलेला गद्यलयीचा वापर परिणामकारक ठरला असे गेल्या तीन दशकांतील कविता वाचताना जाणवत राहाते.

लघुनियतकालिकांच्या जडणघडणीत प्रस्थापित व्यवस्थेला विरोध हा केंद्रवर्ती मुद्दा असल्यामुळे लघुनियतकालिकांची चळवळ ही एक सांस्कृतिक चळवळ ठरते. भूत-भविष्याकडे न पाहाता आणि कोणत्याही व्यवस्थेच्या नादी न लागता केवळ वर्तमानकाळात उत्कटपणे व प्रामाणिकपणे जगणाऱ्या, या चळवळीत सहभागी झालेल्या तरुण लेखकांनी व्यक्तीला गौणत्व देणाऱ्या तत्कालीन सर्व सामाजिक मूल्यांना, विविध सामाजिक संस्थांना, संकेतांना विरोध केला. सतीश काळसेकर व वसंत गुर्जर म्हणतात त्याप्रमाणे ''लिटल मॅगझिनची चळवळ ही भविष्यात प्रस्थापित होऊ पाहाणाऱ्यांची नाही किंबहुना अप्रस्थापित आणि अस्थिर राहाणाऱ्यांची ही चळवळ.'' ''काहीतरी वेगळे नवे करून दाखवणे, वेगळ्या गोष्टींचा शोध घेणे हा लघुनियतकालिकांचा गाभा आहे. प्रचलित व्यवस्थेविषयी वेगवेगळ्या प्रकारे संताप, असंतोष व्यक्त करणे, नकार निषेध नोंदविणे, आपला नाकर्तेपणा जगजाहीर करणे अशा मार्गांनी समकालीन समग्र व्यवस्थेला असलेला विरोध स्पष्ट होतो. *शब्द, अथर्व, रूपरंग, रूपगंधा* यांसारखी काही नावे सोडली तर *असो, आता, फक्त, लू, अबकडइ, झौझंझ:, टिंब, स०न०वि०वि०,कावळा, त्रिशंकू, येरू, भारूड* अशी लघुनियतकालिकांनी स्वीकारलेली नावे तोवेळपर्यंतच्या नियतकालिकांच्या रोमँटिक नावांपेक्षा सर्वस्वी भिन्न आहेत. नियतकालिकांच्या निर्मितीसाठी केलेला वेगवेगळ्या रंगाच्या कागदांचा वापर, मलपृष्ठाच्या जागी मुखपृष्ठाची योजना, 'पहिली खेप', 'पहिली सुटका' अशी अंकक्रमांक सुचविणारी शब्दयोजना, अंकातील मजकुराची अगदी वेगवगेळ्या प्रकारे केलेली मांडणी या या मार्गांनीही लघुनियतकालिकांनी आपला प्रस्थापिताला असणारा विरोध सुस्पष्टपणे दर्शविला आहे. ही नियतकालिके नावाप्रमाणे नेहमीच्या नियतकालिकापेक्षा लहान असणे अभिप्रेत आहे. हा लहानपणा दृश्य आकार व पृष्ठसंख्या या दोन्ही बाबतींत आहे. पोस्टकार्ड, आंतर्देशीय पत्रे किंवा लहानशा पुस्तिका अशा आकारांतील प्रसिद्धीमागे नियतकालिकांच्या सांकेतिक स्वरूपाला धक्का देण्याचा हेतू आहे तसेच त्यामागे चमत्कृतिपूर्णतेचे एक आकर्षणही आहे. लघुनियतकालिके ही अनियतकालिके आहेत. त्यांनी आपले अवतारकार्य एकदोन महिन्यांपासून दोनचार वर्षांपर्यंत आटोपलेले दिसते. काहींचे एकदोन अंक, तर काहींचे दहापंधरा वा पंधरावीस अंक निघालेले दिसतात. कोणत्याही चळवळीचा कालावधी ज्याप्रमाणे मर्यादित असावा त्याप्रमाणे वाङ्मयविषयक चळवळ म्हणून अस्तित्वात आलेली लघुनियतकालिके अल्पकाळ चालणे स्वाभाविक आहे. ही चळवळ चालवणाऱ्यांच्या दृष्टीसमोर प्रस्थापिताचे प्रतीक म्हणून मुख्यत: 'सत्यकथा' हे नियतकालिक होते. 'सत्यकथे'ला लाभलेली तथाकथित प्रतिष्ठा, कलावादी मानली जाणारी विशिष्ट वाङ्मयीन भूमिका व नव्याने लेखन करू पाहाणाऱ्या लेखकांच्या मनावर या दोहोंचे असणारे दडपण 'सत्यकथे'ला प्रस्थापित व्यवस्थेचे प्रतीक मानले जाण्यास कारणीभूत झाले. (अर्थात लघुनियकांत लिहिणारे काही कवी 'सत्यकथे'चेही कवी होते.)

प्रस्थापित व्यवस्थेच्या मर्यादा उघड करणे आणि एकंदरच साहित्यव्यवहाराची उलटतपासणी घेणे हे कार्य लघुनियतकालिकांनी केले. लघुनियतकालिकातील लेखनाने साहित्यसंस्कृतीची चिरफाड केली. साहित्याच्या निर्मितीविषयीचे, फलश्रुतीविषयीचे व समीक्षापद्धतीविषयीचे रूढ समज त्यांनी दूर केले. किंबहुना त्या समजांच्या प्रामाण्यालाच लघुनियतकालिकांनी आव्हान दिले. कोणत्याही प्रस्थापित आदेशानुसार वागण्याचे लघुनियतकालिकातील लेखकांनी नाकारले. सुबद्ध, सुनियोजित रचना हा लघुनियतकालिकांच्या आधीच्या लेखनाचा गाभा होता. सुसंगतीत व योजनाबद्ध रीतीत तत्कालीन साहित्यव्यवहार सौंदर्य शोधत होता. लघुनियतकालिकांतील लेखकांनी सौंदर्यात्म आकृतिबंधाची संकल्पनाच संशयास्पद ठरविली. साहित्यव्यवस्थेच्या निकषांपेक्षा स्वतंत्ररीत्या साहित्याचा विचार करता येतो याची खात्री लघुनियतकालिकांनी पटविली. त्यामुळे साहित्यातील उच्चवर्णीय मध्यमवर्गीय जाणिवांच्या मर्यादा स्पष्ट झाल्या. लघुनियतकालिकांच्या व्यवहारात व्यक्ती या संकल्पनेला महत्त्वाचे स्थान आहे. व्यक्तिवादाचा व व्यक्तिस्वातंत्र्याचा इतका आवेगयुक्त आविष्कार यापूर्वी कधीही मराठी साहित्यात आढळला नव्हता. मराठी साहित्याच्या इतिहासाकडे नजर टाकली म्हणजे लघुनियतकालिकानंतरच्या काळात व्यक्तीकडून समष्टीकडे व परंपरेकडे पुन्हा साहित्यविचार वळलेला दिसतो.

लघुनियतकालिकांतील लेखनाची गुणवत्ता एकसारखी नव्हती. लघुनियतकालिकांतून प्रसिद्ध झालेल्या लेखनात जीवनाच्या खऱ्याखुऱ्या अस्सल रूपाला त्या जीवनाच्या भाषेतून भिडण्याचा प्रयत्न झालेला दिसतो. हे लेखन प्रमाणभाषेपासून दूर जाऊन मराठी परंपरेतील संतसाहित्याशी व लोकसाहित्याशी नाते प्रस्थापित करताना दिसते. या लेखनात आशय, भाषा व रूप या पातळ्यांवरील निषिद्धतेच्या सर्व कल्पना झुगारून देण्याकडे कल दिसतो. विशेषत: लैंगिक निषिद्धतेच्या कल्पना नाकारण्याचा प्रयत्न येथे मोठ्या प्रमाणात पाहावयास मिळतो. तसेच थेटपणा, सडेतोडपणा, फटकळपणा, तिरसटपणा, तुच्छतावाद हेही या लेखनाचे काही विशेष म्हणून सांगता येतात. लघुनियतकालिकातील लेखनातून आधुनिकवादाशी व अस्तित्ववादाशी असलेले त्याचे नाते अधोरेखित होते. आधुनिक जीवनातील एकाकीपणा, रिक्तता, व्यक्तित्वलोप, अमानवीपण, मानवी अस्तित्वाची असंबद्धता, अर्थशून्यता, साशंकता, अश्रद्धा इत्यादी आशयसूत्रे येथे प्रभावी असलेली दिसतात. त्यामुळे प्रयोगशील लेखन हे लघुनियतकालिकांचे एक महत्त्वाचे वैशिष्ट्य म्हणावे लागेल. लघुनियतकालिकांच्या संदर्भात आणखी एक उल्लेखनीय बाब म्हणजे त्यांची निर्मिती लेखक वा कलावंत यांनी केलेली आहे. सर्वच चळवळीत असतात तसे अंतर्विरोध लघुनियतकालिकाच्या चळवळीतही होते. व्यवस्थित, पद्धतशीर काही करणे सुसंगत असा विचारव्यूह निर्माण करणे अशी आकांक्षा येथे नव्हतीच, किंबहुना, असे काही करणे हे नियतकालिकांच्या कल्पनेत बसणारेच नव्हते. ज्या रोमँटिसिझमला लघुनियतकालिकांचा विरोध होता तो रोमँटिसिझम येथे मागील दाराने प्रवेश करताना दिसतो किंवा विशिष्ट लेखक-कवींच्या 'लार्जर दॅन लाईफ' प्रतिमाही रंगवल्या गेलेल्या दिसतात. सामान्यपणे पंधरावीस वर्षांचा कालखंड लघुनियतकालिकांचा कालखंड म्हणून वाङ्‌मयेतिहासात उल्लेखिला जातो. अलीकडच्या काळात जी लघुनियतकालिके निघाली त्यांचा आणि या चळवळीचा काही संबंध नाही.''

लघुनियतकालिकांत ज्या काव्याला सर्वाधिक महत्त्व मिळाले त्या काव्यस्वरूपावर लघुनियतकालिकांच्या धुरीणांनी जी भूमिका स्वीकारली होती तिचा प्रभाव नि:संशयपणे आढळतो. *अबकडइ* च्या शेवटच्या अंकात सतीश काळसेकर, वसंत गुर्जर, अरुण खोपकर, मनोहर ओक, विजय कारेकर, चंद्रकांत खोत, रमेश समर्थ, अशोक शहाणे इत्यादींच्या महत्त्वपूर्ण मुलाखती आहेत. त्याचप्रमाणे ही कालिके प्रकाशित करताना संपादकांनी वेळोवेळी जी संपादकीये लिहिली त्यांवरून लघुनियतकालिकांच्या निर्मितीमागील भूमिका स्पष्ट होते.

१९७० नंतर वर उल्लेखिलेली लघुनियतकालिके हळूहळू बंद होत गेली आणि लघुनियतकालिकांच्या प्रकाशनातील जोर कमी झाला. असे जरी झाले तरी प्रत्येक पिढीत नवे कवी जन्माला येतात, ते नव्या वास्तवाला सामोरे जातात, त्यांच्या ठिकाणी नव्या जाणिवा उत्पन्न होतात त्यांची अभिव्यक्ती करण्यासाठी त्यांना नियतकालिकांची गरज भासतेच. अशा गरजेपोटी 'कवितारती'सारखे केवळ कवितेला वाहिलेले नियतकालिक निर्माण झाले. दलित अनुभूतीला प्राधान्य देणार *अस्मितादर्श, समुचित* ही नियतकालिकेही याच काळात जन्माला आली. पुढे 'अनुष्टुभ'चा जन्म झाला. 'समाज प्रबोधन पत्रिका' या त्रैमासिकातही साहित्यचर्चा व समीक्षा येत राहिली. याशिवाय *अभिधानंतर, 'शब्दवेध', 'नवाक्षर दर्शन', 'दर्शन', 'खेळ'* यांसारखी प्रायोगिक स्वरूपाची नियतकालिके निघाली. त्यांनी काही प्रमाणात लघुनियतकालिकांची कामगिरी अंशत: बजावली असे म्हणता येईल.

**दलित साहित्य**

१९६० नंतरच्या कालखंडात मराठी साहित्यक्षेत्राचे चित्र बदलून टाकेल असा दलित साहित्याचा प्रवाह उदय पावला. बाबासाहेब आंबेडकरांच्या विचारांचा वारसा पुढे चालवण्याचा साहित्यिक पातळीवरचा प्रयत्न म्हणजे दलित साहित्याची निर्मिती. कविता, आत्मचरित्र, कथा, कादंबरी, नाटक या प्रकारांत लक्षणीय अशी निर्मिती करून केवळ मराठीच नव्हे, तर एकंदर भारतीय साहित्यसमृद्धीस दलित साहित्याने हातभार लावला आहे. विद्रोहाची प्रेरणा बाबासाहेबांच्या आचारविचारातून दलित बांधवांना मिळाली. त्या प्रेरणेच्या ताकदीनेच पांढरपेशा मध्यमवर्गीय, उच्चवर्णीय लेखकांच्या सामाजिक जाणिवांचे क्षेत्र त्यांनी विस्तारले. माणसाच्या जगण्याच्या विविध परी आणि जगण्यासाठी व टिकून राहाण्यासाठी माणसाला करावी लागणारी धडपड-धावपळ, दलित साहित्यामुळे अधिक स्पष्ट झाली. 'रात्रंदिन आम्हा युद्धाचा प्रसंग' हे शब्द पूर्णार्थाने प्रतीत झाले. *बलुतं* (दया पवार), *तराळ अंतराळ* (शंकरराव खरात), *आठवणींचे पक्षी* (प्र. ई. सोनकांबळे), *उपरा*

(लक्ष्मण माने), *जिणं आमुचं* (बेबी कांबळे), यांसारख्या लेखनामुळे मराठी समाजाची जीवनविषयक समजूत वाढायला मदत झाली. फार पूर्वी केशवसुतांनी 'अंत्यजाच्या मुलाचा पहिला प्रश्न' ही कविता लिहिली होती, त्या कवितेतील वेदना व व्यथा खऱ्या अर्थाने दलित कवींच्या कवितांतून प्रत्ययास येऊ लागली. असे लेखन वाचल्यानंतर मध्यमवर्गीय जीवनातले प्रश्न व त्यापोटी करावे लागणारे संघर्ष यांचे चित्रण वाचकांना सपक वाटल्यास आश्चर्य नाही. जातीपातींच्या पातळीवर चिरफळ्या झालेला समाज हे भारतीय समाजाचे चित्र दीर्घकाळ तसेच आहे.

'दलित साहित्य' हा शब्दप्रयोग १९५४ सालापासून प्रचारात आलेला दिसतो. तत्पूर्वी हा शब्दप्रयोग रूढ नसला तरी अस्पृश्यतेची जाणीव संत चोखामेळा यांच्या अभंगांपासून आढळते. अर्थात ती जाणीव विद्यमान दलित जाणिवेशी संबंधित नाही. दलित साहित्याच्या चळवळीला सामान्यपणे १९६५ नंतर अस्तित्व लाभले. बाबुराव बागूल यांच्या *जेव्हा मी जात चोरली होती, मरण स्वस्त होत आहे* या कथासंग्रहांनी दलितांच्या प्रश्नाकडे खऱ्या अर्थाने वाचकांचे लक्ष गेले. *अस्मितादर्श, आम्ही विद्रोह, समुचित* अशा दलितांनी चालविलेल्या नियतकालिकांमुळे दलित साहित्याला हळूहळू का होईना प्रसिद्धी मिळू लागली. नामदेव ढसाळ, यशवंत मनोहर, केशव मेश्राम या कवींच्या व हिरा बनसोडे, ज्योती लांजेवार, प्रज्ञा पवार या कवयित्रींच्या कवितांनी दलित कवितेचे वेगळेपण स्पष्ट झाले. दलित कविता लिहिणाऱ्या कवींची व कवयित्रींची संख्या फार मोठी आहे. कविता हा प्रकार अभिव्यक्तीच्या दृष्टीने अधिक सोयीचा वाटला असावा. अण्णाभाऊ साठे, शंकरराव खरात, बंधुमाधव, योगिराज वाघमारे, वामन होवाळ, अर्जुन डांगळे, केशव मेश्राम या कथालेखकांनी दलितकथेच्या माध्यमातून, दैन्य, दारिद्र्य, दुःख, दास्य यांनी ग्रस्त दलितांच्या व्यथा, वेदना व भोग चित्रित केले. दलित आत्मकथनांनी मराठी आत्मचरित्राचा प्रांत श्रीमंत केला. *अक्कर माशी* (शरणकुमार लिंबाळे) *उचल्या* (लक्ष्मण गायकवाड) *गबाळ* (दादासाहेब मोरे), *आमचा बाप अन् आम्ही* (नरेंद्र जाधव), *कोल्हाट्याचं पोर* (किशोर शांताबाई काळे), *माज्या जल्माची चित्तरकथा* (शांताबाई कांबळे) *मिटलेली कवाडे* (मुक्ता सर्वगोड), *अंतःस्फोट* (कुमुद पावडे) अशी जवळपास साठपासष्ट तरी आत्मचरित्रे सांगता येतील. कथा, कविता, आत्मकथने या तुलनेने दलित कादंबरी हा साहित्यप्रकार अलक्षित राहिला आहे. *मेलेलं पाणी* (अशोक व्हटकर), *इस्कोट* (भीमसेन देठे), *राघववेळ* (नामदेव कांबळे), *कार्यकर्ता* (मुरलीधर जाधव), *मुक्तिसंग्राम* (हिं. गो. बनसोडे), *युगविधान* (बा. स. हाटे), *शूद्र* (नागनाथ) इत्यादी कादंबऱ्या मुद्दाम उल्लेख कराव्यात अशा आहेत.

ग्रामीण साहित्य आणि दलित साहित्य यांच्या निर्मितीमागील प्रेरणाच भिन्न आहेत. ग्रामीण साहित्य गावागाड्याच्या चित्रणातच रमलेले आहे. वर्णाश्रमधर्माचा, विषमतेचा विचार त्याला स्पर्शही करीत नाही. ग्रामजीवनातील अनुभवांचा साहित्यरूपात आविष्कार करण्यात ग्रामीण साहित्याचे साफल्य साठवलेले आहे. दलित साहित्याचे तसे नाही. आंबेडकरप्रणीत समता, स्वातंत्र्य, बंधुता व विज्ञाननिष्ठा या मूल्यांचा स्वीकार त्याने केला आहे. सामाजिक-सांस्कृतिक परिवर्तनाची आकांक्षा बाळगून फुले-आंबेडकरांचा वैचारिक वारसा पुढे नेणारे हे साहित्य आहे. आंबेडकरांना अभिप्रेत असणारी दुःख, करुणा व प्रज्ञा ही मूल्ये त्यांना महत्त्वाची वाटतात. ग्रामीण साहित्याला अशा प्रकारची वैचारिक बैठक नाही. शहर विरुद्ध खेडे असा विरोध ग्रामीण साहित्याला महत्त्वाचा वाटतो. या देशातील अल्पसंख्य जनता शहरांत व बहुसंख्य जनता खेड्यांत राहाते तरीही खेड्यातील जीवनानुभवांना साहित्यात असावे तेवढे स्थान नाही ही ग्रामीण साहित्याची तक्रार आहे. दलित साहित्याचा विरोध मूलतः चातुर्वर्ण्यप्रधान समाजव्यवस्थेला, जातीपातींच्या उतरंडीला व तज्जन्य शोषणाला आहे. केवळ साहित्यान्तर्गत अनुभवाचे केंद्र कोणते एवढ्यापुरती दलित जाणीव सीमित नाही. ''दलित साहित्य ही एक सामाजिक व सांस्कृतिक घटना होय. काही वर्षे दलित साहित्याची चळवळ ही केवळ मराठी व महाराष्ट्रापुरती मर्यादित होती. परंतु आता ती पसरली आहे. भारतातील गुजराती, कानडी, हिंदी या भाषांत दलितलेखक आता मोठ्या प्रमाणात लिहीत आहेत. मराठीतील दलितलेखनाची भाषांतरेही या भाषांव्यतिरिक्त इंग्रजी व जपानी भाषांत झाली आहेत.'' (कुलकर्णी गो. म., १९९७, पृ. ५३) भारतीय समाजाच्या संदर्भात दलित साहित्याची प्रस्तुतता लक्षात घेण्याजोगी आहे. दलित साहित्य एका नव्या व्यवस्थेचा आदर्शही देऊ पाहाते. ''हा आदर्श आहे विश्वबंधुत्वाचा, मानवतावादाचा, समाजवादाचा. हा समाजवाद प्रस्थापित व्हावा, समाजवादाची मूल्ये प्रस्थापित व्हावीत; समाज, लोकशाहीचे

सांस्कृतिकीकरण-सामाजिकीकरण व्हावे या मामुली अपेक्षा दलित साहित्य व्यक्त करते. या अपेक्षा व्यक्त करीत असताना दलित साहित्य मराठी परंपरा, धर्म, संस्कृती, साहित्य यांचा जेव्हा शोध घेते तेव्हा हाती काहीही लागत नाही. कोणाचा तरी हात धरून, त्याच्या आधारावर पुढे जावे असा हातच मिळत नाही. कारण त्या हाताचीही गोम विषमतेच्या बाजूनेच असते आणि समतेच्या विरोधातच असते. ...ज्यांनी मानवतेच्या मुक्ततेसाठी आणि माणसाच्या महानतेसाठी लढा दिलेला आहे त्यांना आपले आदर्श मानू या, असे दलित साहित्य ठरवते आणि नव्या विश्वबंधुत्वाचा स्वीकार करते.

नकार, विद्रोह, विज्ञाननिष्ठा, विश्वबंधुत्व आणि अखंड वामत्व ही दलित साहित्याची सूत्रे आहेत. ...बाबासाहेबांची बौद्ध धर्माची चळवळ किंवा बौद्ध धर्मसुद्धा एक जातच झालेला आहे. तेव्हा जातच मुळात नष्ट केली पाहिजे. जाती ज्या धर्मावर आधारित आहेत त्या हिंदू धर्माचे तत्त्वज्ञान, तो कर्मवाद, तो पुनर्जन्मवाद आणि त्याच्या पाठीमागे पिळवणुकीचा, जातिभेदाचा पुरस्कार करणारे म्हणून जे जे आहे त्याच्या पाठीमागे पिळवणुकीचा, जातिभेदाचा पुरस्कार करणारे म्हणून जे जे आहे त्याच्या पाठीमागे पिळवणुकीचा, जातिभेदाचा पुरस्कार करणारे म्हणून जे जे आहे ते ते - अगदी ईश्वरापासून सर्व ग्रंथांपर्यंत सर्वच नष्ट केले पाहिजे, नाकारले पाहिजे, भस्म केले पाहिजेत इथपर्यंत हा विद्रोहाचा विचार जातो. केवळ विद्रोहाचा विचार करून चालणार नाही तर विज्ञानाचा, बुद्धिवादाचा पुरस्कार केला पाहिजे, अन्यथा अराजकचा जन्म होऊन यादवी होईल. ...माणसाला सुस्पष्टपणे, चांगलेपणाने आणि माणुसकीने जगता यावे यासाठी बुद्धिवादाचा पुरस्कार केला पाहिजे. ...विज्ञान वाढले तर उद्योगधंदे वाढतील. दीन-दुबळ्या जातीतील लोक कामाला लागतील आणि ते कामाला लागले तर त्यांच्यामधून एक नवा उत्पादक वर्ग तयार होतो. हा नवा उत्पादक वर्ग जातीच्या पलीकडे जातो. हा नवा उत्पादक वर्ग तयार होतो. हा नवा उत्पादक वर्ग जातीच्या पलीकडे जातो. हा नवा उत्पादक वर्ग तयार होण्यासाठी विज्ञानाची-म्हणजेच उद्योगधंद्यांची वाढही व्हायला पाहिजे ...आता महत्त्वाचा मुद्दा म्हणजे 'अखंड वामस्व' हा. सत्ता कुठलीही येवो, जी चालू सत्ता आहे तिने आपल्याला खूप आश्वासने दिली. अगदी पूर्वी म्हणजे स्वातंत्र्यापूर्वीही काँग्रेसने खूप आश्वासने दिली होती. अगदी पूर्वी म्हणजे स्वातंत्र्यापूर्वीही काँग्रेसने खूप आश्वासने दिली होती. पण त्यांची परिपूर्ती झालेली नाही. ...तर दलित साहित्याची घोडणा आहे की ते सतत जनसामान्यांच्या बाजूने राहील. मग ती सत्ता दलित नेत्यांच्या हातात गेली किंवा जनसामान्यांच्या हातात गेली तरीही. ...लेखकाने किंवा कलावंताने नेहमी जनसामान्यांच्या बाजूने उभे राहावे. जनतेची, स्त्रियांची, उपेक्षितांची बाजू घेणे हे त्याचे कर्तव्य आहे. अखंड वामनत्वाचा विचार दलित साहित्याने मांडलेला आहे. ...हा अपमान, ही उपेक्षा गरिबीमुळे झालेली असते. यासाठी गरिबी दूर झाली पाहिजे. त्यासाठी वेगळी व्यवस्था हवी. ही व्यवस्था डॉ. आंबेडकरांनी 'स्टेट अँड मायनॉरिटीज' मध्ये सांगितली आहे. ते म्हणतात, की समग्र जमिनीचे राष्ट्रीयीकरण करा. या जमिनीवर काम करणारा मजूर राष्ट्रीय मजूर असेल. मग त्याला राष्ट्रीय सोयीसवलती मिळतील म्हणजेच त्या शेतकऱ्याला या सवलती मिळतील. उद्योगधंद्यांचेही असेच राष्ट्रीयीकरण करावे. त्याच्यामधून विषमता दूर होईल. अखंड वामत्वासाठी शेतीचे, उद्योधंद्यांचे राष्ट्रीयीकरण व्हावे. विषमता जाऊन सामाजिक समता यावी आणि सारा देश एक व्हावा. याचे उत्कृष्ट उदाहरण म्हणजे केशवसुतांचीच कविता आहे, की मी कुठल्याही पंथाचा नसून अशा एका पंथाचा आहे, जो मांगल्याचा रस्ता पकडतो आहे. दलित साहित्यातही याच मांगल्याची, जनकल्याणाचीच आणि विश्वबंधुत्वाची अपेक्षा करते.'' (कोत्तापल्ले नागनाथ, शिंदे विश्वनाथ, तुकदेव रोहिणी, २००७, पृ. १४६-४७-४८-४९)

दलित साहित्याची मीमांसा करणारे लेखन गेल्या पंचवीस वर्षांत भरपूर झाले आहे. त्यापैकी दलित साहित्य व दलित चळवळ यासंबंधीची वैचारिक भूमिका मांडणाऱ्या लेखकांत म. ना. वानखेडे, रा. ग. जाधव, भालचंद्र फडके, राजा ढाले, जनार्दन वाघमारे, गं. बा. सरदार, रावसाहेब गजबे, यांचा उल्लेख करता येईल. या भाष्यकारांबरोबर नीळकंठ शेरे या अभ्यासकाचा सुद्धा उल्लेख करावयास हवा. त्यांचा *डॉ. बाबासाहेब आंबेडकर आणि दलित वैचारिक वाङ्मय* हा ग्रंथ विशेष उल्लेखनीय आहे. अलीकडे ''दलित-साहित्य या संज्ञेला पर्याय म्हणून 'बौद्ध-साहित्य, 'विद्रोही साहित्य' आणि अगदी अलीकडे 'फुले-आंबेडकरी' प्रेरणेचे साहित्य, 'आंबेडकरवादी साहित्य' अशा संज्ञा वापरल्या गेल्या. तथापि रूढ झालेली एखादी संज्ञा एकदम न बदलता हळूहळू तिचे स्वरूप बदलत असते, हे लक्षात घेतले तर पुढेमागे दलित साहित्य

याऐवजी चर्चित अथवा नवी संज्ञा रूढ होईलही. तूर्ततरी 'दलित साहित्य' अशीच संज्ञा मोठ्या प्रमाणात वापरली जाते आहे.'' (जाधव मनोहर, २००१, पृ.१३)

**ग्रामीण साहित्याची चळवळ**

ग्रामीण साहित्याची चळवळ इ. स. १९७७ पासून सुरू झाली असली तरी 'ग्रामीण' या विशेषणास अनुरूप अशी साहित्यनिर्मिती मराठीत सामान्यपणे १९२५ पासून होऊ लागली. त्या काळात ग्रामीण साहित्याचा उल्लेख 'जानपद साहित्य' या नावाने केला जाई. भारतातील सत्तरऐंशी टक्के जनता त्या काळात खेडेगावातच राहात असे हे ध्यानात घेता ग्रामीण साहित्य व जानपद साहित्य हे शब्दप्रयोग समानार्थी वापरले जाणे स्वाभाविक ठरते. १९४० नंतर 'ग्रामीण साहित्य' असा शब्दप्रयोग विशेषत्वाने केला जाऊ लागला. ''ग्रामीण जीवनातून फुलणारे, ग्रामीण वास्तवातून साकार होणारे साहित्य ते ग्रामीण साहित्य असे थोडक्यात म्हणता येईल.'' (कोत्तापल्ले, नागनाथ, २००७, पृ. ८) ग्रामव्यवस्थेचे विशिष्टत्व सूचित करताना विठ्ठल रामजी शिंदे लिहितात, ''खेड्याचा राजा पाटील... ब्राह्मणापासून ते महारमांगांपर्यंत सर्व जातींचे अलुतेबलुते ऊर्फ कारू नारू याची वासरे ही गावगाड्याची घटना व परिभाषा फार पुरातन आहे.'' (कोत्तापल्ले, तत्रैव, पृ. १०) खेडेगाव, तेथील समाज, तेथील जनसामान्यांची जीवनपद्धती, त्या समाजाची कृषिप्रधान संस्कृती, लहरी पावसावर अवलंबून असणारी शेती, दुष्काळाच्या संकटाच्या छायेने अखंड सचिंत असणारा शेतकरीवर्ग, कराव्या लागणाऱ्या कष्टाच्या तुलनेत हाती येणारे अपुरे उत्पन्न व त्यामुळे येणारे असमाधानीपण, तेथील जीवनपद्धतीवर परिणाम करणारी आर्थिक, सामाजिक, धार्मिक, शैक्षणिक अशी चतुर्विध व्यवस्था व तीमधून निष्पन्न होणाऱ्या समस्या, कृषिजीवनाशी संबंधित जीवनमूल्ये, खेडेगावातील राजकारण व सत्ताकारण, खेड्यातील वैशिष्ट्यपूर्ण निसर्ग, त्या निसर्गाशी व तेथील मातीशी तिथल्या माणसांचे असणारे भावबंध खेड्याच्या मूळ स्वरूपावर औद्योगिकीकरणाचे, शहरीकरणाचे, आसमंतातील राजकीय, सामाजिक घडामोडींचे होणारे परिणाम आणि त्यामुळे तेथील जनसामान्यांच्या मानसिकतेत घडणारे बदल या सर्व घटकांतून वेगवेगळ्या साहित्यरूपांत साकार होणारे शाब्दिक रसायन ग्रामीण साहित्य या संज्ञेने ओळखले जाते. सामान्यपणे ग्रामीण साहित्यात व्यक्ती ही केंद्रस्थानी असते. या व्यक्तीवर कुटुंबाची परंपरा, जातीचे रीतिरिवाज व एकंदर गावगाड्यातील त्या व्यक्तीचे स्थान या घटकांचा प्रभाव पडत असतो.

खेड्यातील पर्यावरणही व्यक्तीच्या जडणघडणीवर व मनोधर्मावर परिणाम करीत असते. महात्मा गांधींनी 'खेड्याकडे चला' असा जो संदेश दिला तेव्हापासून शहरात राहाणाऱ्या व तेथील राहाणीमानाची सवय जडलेल्या संवेदनशील माणसांना खेड्याचे महत्त्व जाणवू लागले. प्रत्यक्ष जीवनापासून दूर असणारे खेडे त्यांच्या विचारविश्वात केंद्रस्थानी आले. दरिद्री नारायणाची सेवा हाच धर्म असे मानणाऱ्या गांधीवादी कार्यकर्त्यांना आणि मार्क्सवादी विचारसरणी व रशियन साहित्य यांच्याशी नाते जडलेल्या कॉम्रेड्सना खेडे महत्त्वाचे वाटू लागले. छत्रपती शाहूमहाराज यांच्या कार्याचाही परिणाम खेड्यांकडे अधिक लक्ष पुरवण्यामध्ये झाला. राजकारणातल्या धोरणी मंडळींना तर आपल्या सत्ताकारणाची आधारभूमी हीच आहे याचा साक्षात्कार झाला. जोतीराव फुले यांचे लेखन शेतकऱ्यांचा व ग्रामस्थांचा कैवार घेणारेच होते. त्यांच्या सत्यशोधक समाजाची चळवळ खेड्यांत पसरली होती या भूतकाळाचे स्मरणही अनेक संबंधितांना ग्रामीण साहित्याची होत चाललेली वाढ व विकास न्याहाळताना झालेले दिसते. १९७० च्या सुमारास ग्रामीण साहित्याची चळवळ सुरू झाली त्या काळात मराठीमधील ग्रामीण साहित्याने बरीच मजल मारली होती.

ग्रामीण साहित्याच्या इतिहासात डोकवायचे तर १८८७ पर्यंत मागे जावे लागते. त्या वर्षी केशवसुतांची *एक खेडे* ही कविता प्रसिद्ध झाली. ती कविता ग्रामीण कवितेचे आदिरूप म्हणता येते. खेड्याविषयीचे आंतरिक ममत्व, ग्रामजीवनाचे सुस्पष्ट वेगळेपण आणि ग्रामजीवनाखेरीज अन्य शहरी जीवनाचा तीळमात्र मोह नसणे हे कवितेतून आढळणारे स्वभावविशेष पाहाता या कवितेतून जी प्रगल्भता व्यक्त होते ती असाधारण म्हणावी लागेल. ह. ना. आपटे यांनी लिहिलेली 'काळ तर मोठा कठीण आला' ही दुष्काळाचे संकट कोसळलेल्या शेतकऱ्याच्या उद्ध्वस्त जीवनाची हकिकत ही कथा सांगते. हाच विषय सदानंद देशमुखांसारख्या कादंबरीकाराला शंभर वर्षे उलटून गेल्यावरही आपल्या कादंबरीचा विषय करावासा वाटतो

यातून या प्रश्नाची उग्रता आता किती वाढली आहे ते ध्यानात येते. कृषिजीवनाशी संबंधित इतके वेगवेगळाले प्रश्न ग्रामीण साहित्याचे विषय होतात याचा अर्थ असा की, स्वातंत्र्याला साठ वर्षे झाल्यानंतरही सर्वसामान्य शेतकरीवर्ग दैन्यदारिद्र्याशी संघर्ष करीत आहे. त्याचे प्रश्न अजूनही सुटलेले नाहीत.

मराठी ग्रामीण साहित्यातून प्रतिबिंबित झालेले अनुभवविश्व विविधांगी आहे. ते माणसाच्या स्वभाववैचित्र्याचे दर्शन घडवते, निसर्ग आणि माणूस यांमधील नाते रंगवते, शेतकरीवर्गावाचून अन्य व्यवसाय करणाऱ्या समाजातील उलथापालथ चित्रित करते, इच्छा असूनही शहरात जाता न येणाऱ्या मंडळींना दुरून देखण्या शहरी जीवनाचा पडणारा मोह साकार करते, फोफावलेल्या सहकारी चळवळीमधील राजकारण व अपप्रवृत्ती स्पष्ट करते. धरणे बांधण्यासारख्या शासकीय योजनांमुळे धरणग्रस्त बनलेल्या गरीब, निराधार शेतकऱ्यांची दैना उभी करते, तरुण मनातील प्रीतिभावाचे मोहक रूप रेखाटते. प्रतिकूल परिस्थितीत व जातीपातींच्या विळख्यात अडकलेल्या माणसांची प्रगतीसाठी चाललेली धडपड मूर्त करते. जात आणि धर्म, पारंपरिक जीवनपद्धती व आधुनिक जीवनपद्धती, निसर्गाच्या लहरी व सत्ताधाऱ्यांच्या तऱ्हा यांमधील ताणतणाव मराठी ग्रामीण साहित्याने मूर्त केले आहेत. कथा, कादंबरी व कविता या तीन वाङ्मयप्रकारांतील ग्रामीण साहित्यनिर्मिती मनोवेधक व उद्बोधक आहे. अधूनमधून ग्रामीण जीवनानुभवाने विनोदी अथवा रंजक रूप धारण केले असले तरी त्यामागील गांभीर्याला ढळ पोचत नाही.

हरिभाऊ ते सदानंद देशमुख यांच्या साहित्यनिर्मितीच्या दरम्यान पुढील उल्लेखनीय साहित्यकृती निर्माण झाल्या आहेत - ग. ल. ठोकळ (*गावगुंड*), र. वा. दिघे (*पाणकळा* व *सराई*), श्री. म. माटे (*उपेक्षितांचे अंतरंग* व *माणुसकीचा गहीवर*), अण्णाभाऊ साठे (*फकीरा*), व्यंकटेश माडगूळकर (*बनगरवाडी, माणदेशी माणसं*), उद्धव शेळके ('धग'), रणजित देसाई (*माझा गाव*), मनोहर तल्हार (*माणूस*), शंकर पाटील (*टारफुला*), हमीद दलवाई (*इंधन*), रा. रं. बोराडे (*पाचोळा*), आनंद यादव (*गोतावळा*), चारुता सागर (*नागीण*), सखा कलाल (*ढग*), बी. रघुनाथ (*आडगावचे चौधरी*), वि. शं. पारगावकर (*कालचक्र*), विठ्ठल वाघ (*काळ्या मातीत मातीत*), इंद्रजित भालेराव (*आम्ही काबाडाचे धनी, पीकपाणी*), महादेव मोरे (*रैत, झोंबडं, वर आभाळ खाली धरती, दवना*), ना.धों. महानोर (*गांधारी, रानातल्या कविता, पानझड*), विश्वास पाटील (*झाडाझडती', 'पांगिरा*), मोहन पाटील (*बस्तान*), वासुदेव मुलाटे (*विषवृक्षाच्या मुळ्या*), भास्कर चंदनशिव (*अंगारमाती, नवी वारुळं, जांभळ ढव*) इत्यादी.

ग्रामीण साहित्याला व्यापक असा परीघ प्राप्त करून देण्याची कामगिरी राजन गवस यांच्या साहित्यनिर्मितीने बजावली आहे. ग्रामीण भागातील राजकारण, सत्ताकारण, साहित्याच्या चळवळीचे क्षेत्र, वेगवेगळ्या गटांचे डावप्रतिडाव, कुटुंबव्यवस्थेला जात चाललेले तडे, नवशिक्षित मुलामुलींच्या महत्त्वाकांक्षांनी ओलांडलेले खेड्यांचे कुंपण, शहरी जीवनाविषयीचे व तेथील सुखस्वप्नांविषयीचे आकर्षण आणि जुनी पिढी व नवी पिढी यांच्यातील ताणात अडकलेल्या मध्यमवयीन संवेदनशील व्यक्तींची चाललेली घुसमट असे चित्रण त्यांच्या कथात्म साहित्याने प्रगल्भ स्वरूपात केले आहे.

सदानंद देशमुख यांचेही कथात्म साहित्य कृषिजीवनाचे अलक्षित पैलू अधोरेखित करते. सर्वस्वी निसर्गाच्या लहरीवर अवलंबून असणाऱ्या शेताने शेतकऱ्यांचा मांडलेला छळवाद आणि मानवी स्वभावातील गुणदोषांची त्यात पडलेली भर साधेसरळ आयुष्य जगू पाहाणाऱ्या माणसाचीही किती ससेहोलपट करू शकते ते देशमुखांच्या साहित्यातून उमगते. जोवर खेड्यातील माणसे अशिक्षित होती किंवा अल्पशिक्षित होती तेव्हा एक प्रकारे ठीक होते. नवी पिढी शिकलीसवरली आणि शहरातल्या शिकलेल्यांचे स्वास्थ्यपूर्ण जीवन आपल्याला हवे ही शेतीवाडी गुरेढोरे नकोत असे त्यांना व त्यांच्याशी लग्न झालेल्या तरुण मुलींना वाटू लागले. यातून जो तिढा उत्पन्न झाला आहे, नियमित उत्पन्नाची अपेक्षा, स्वतंत्रपणे मौजमजेत जगण्याची इच्छा व त्या अभावी उत्पन्न होणारे तीव्र असमाधान या सर्व नवग्रामीणजीवनातील व्यक्तिगत जगण्यातले पेच सदानंद देशमुख प्रभावीपणे उभे करतात.

अशा प्रकारचे साहित्य वाचत असताना ग्रामजीवनातील अनुभवांचा सूक्ष्म वेध घेतला असता ग्रामीण साहित्याची सीमित भासणारी कक्षा वेगवेगळ्या दिशांनी विस्तारू शकते याचे नवे भान उत्पन्न होते.

## कविता

आधुनिक मराठी कवितेचे प्रवर्तक असा जो केशवसुतांचा गौरव केला जातो तो यथार्थआहे. म. मो. कुंटे - वि. मो. महाजनी यांच्यापासून वि. भ. लेंभे - गं. रा. मोगरे यांसारख्या पूर्वकालीन अनेक कवींनी आधुनिक मराठी कवितेची प्राथमिक सुरुवात केली असली तरी आधुनिक कवितेला खरा आरंभ केशवसुतांपासून होतो. त्यांचे काव्यप्रेम, त्यांची प्रयोगशीलता आणि त्यांची जीवनदृष्टी यांमुळे त्यांची स्वत:ची कविता तर नवी व वेगळी झालीच, शिवाय मराठी कवितेचा चेहरामोहरा आमूलाग्र बदलून टाकणाऱ्या व त्यांना अनुसरण्यात आनंद मानणाऱ्या दत्तांपासून बालकवींपर्यंत आणि गोविंदाग्रजांपासून विनायकांपर्यंत विभिन्न प्रतिभाधर्माच्या कवींना प्रेरणा देण्याचे कामही त्यांच्या कवितेने केले.

''ब्राह्मण नाही, हिंदुहि नाही, न मी एक पंथाचा,
ते पतित की जे आखडिती प्रदेश साकल्याचा!...
...जिकडे जावे तिकडे माझी भावंडे आहेत
सर्वत्र खुणा माझ्या घरच्या मजला दिसताहेत''

हा त्या काळाच्या पुढे जाणारा व जातीधर्मभेद न मानणाऱ्या, समतेचा व बंधुतेचा पुरस्कार करणाऱ्या अत्यल्प सुधारकांच्या प्रतिपादनात येणारा विचार केशवसुतांनी कवितेच्या माध्यमातून रुजवला हे त्यांचे कार्य मोलाचे आहे. त्यांच्या कवितेतील प्रयोगशीलतेने तर त्यांच्या काळापुरताच नाही तर, कायमचाच गद्याची भाषा व काव्याची भाषा यांतील भेद संपुष्टात आणला. शंभर वर्षे उलटून गेल्यावर जेव्हा अरुण कोलटकर, दिलीप पुरुषोत्तम चित्रे, नारायण सुर्वे, नामदेव ढसाळ, भालचंद्र नेमाडे इत्यादी कवींची आणि त्याही नंतरच्या अगदी आज समकालीन असणाऱ्या कवींची कविता आपण वाचतो तेव्हा गद्य-काव्यभाषा भेदसमाप्तीच्या केशवसुतांच्या कार्याचे दूरगामी महत्त्व प्रकर्षाने ध्यानात येते. केशवसुतांनी आत्मप्रत्ययवादी कविता लिहिली आणि 'मी' व 'आम्ही' यांना कवितेच्या केंद्रस्थानी आणले. यानेही कवितेच्या क्षेत्रात क्रांती झाली. हेच 'मी' व 'आम्ही' थेट इ. स. २००० पर्यंतची कविता घडवताहेत हे केशवसुतांच्या कार्याचे महत्त्व आहे. आध्यात्मिक जाणीव ही केवढी व्यापक भावना आहे तिचाही प्रत्यय केशवसुतांपासून थेट आतापर्यंतच्या कवितेचा प्रदीर्घ पट पाहिला म्हणजे येतो. केशवसुतांनंतरचे रे. टिळक, बालकवी, गोविंदाग्रज, बी, तांबे, माधव जूलियन, अनिल, कुसुमाग्रज, बोरकर, ना. घ.देशपांडे, पु. शि. रेगे, मर्ढेकर हे सगळे भिन्न प्रकृतिधर्माचे कवी. त्यांच्या काव्यसंपदेतून मराठी कवितेची विभिन्न अंतर्वैशिष्ट्ये तर प्रकटतातच, परंतु त्याचबरोबर आधुनिक मराठी कवितेचे एकात्म रूपही प्रकटते. ही एकात्मता काव्यभानाबाबत आहे, सामाजिक जाणिवेबाबत आहे, अलौकिकाचा वेध घेण्याबाबत आहे.

अनिल, कुसुमाग्रज, बोरकर या कवींच्या काव्यलेखनाला सुरुवात झाली तो काळ पारतंत्र्याचा होता. स्वाभाविकपणेच या कवींच्या कवितेत त्या काळातील स्वातंत्र्याकांक्षेचा यगुधर्म प्रकटला. अनिलांच्या कवितेने रविकिरण मंडळाच्या काळात आशय आणि विषय यांचे निर्माण झालेले आवर्त फोडूनतोडून चिंतनशील व वैचारिक स्वरूपाची क्रांतिसन्मुख कविता लिहिली. मानवतावाद हे त्यांच्या कवितेचे एक अंग होय. ''अन्याय घडो कोठेही चिडून उठू आम्ही'' हा अनिलांच्या समाजाभिमुख कवितेचा मंत्र होता. अनिलांच्या कवितेचे दुसरे तितकेच महत्त्वाचे अंग म्हणजे प्रेमकविता. ''आधुनिक काव्यातील प्रेम ही एक हृदयाची तळमळ आहे, मनोमन जाणीव आहे. हृदयावर चिरकाल टिकणारा संस्कार आहे... ते शरीराची भूक नाही. हृदयाशी समरस, हृदयाशी एक होण्याची धडपड आहे'' असे आपले हृद्गत कवीने *फुलवात* या संग्रहाच्या प्रस्तावनेत कथन केले आहे. अनिलांच्या कवितेतील प्रेम निसर्गप्रतिमांद्वारा व्यक्त होते. त्यांच्या *सांगाती* संग्रहातील कविता व त्यांच्या *दशपदी*तील रचना या विशेषाच्या निदर्शक आहेत. मुक्तछंदाचे पुरस्कर्ते आणि दशपदी या नव्या आकृतिबंधाचे निर्माते म्हणून अनिल प्रसिद्ध आहेत. बा. भ. बोरकर यांची कविता निसर्ग व प्रेम या दोन विषयांना वाहिलेली आहे. गोव्याचा सगळा देखणा आसमंत त्यांच्या कवितेत अवतरला आहे. तेथील निसर्ग त्याच्या रंगासकट त्यांच्या कवितेत उतरतो. निळी झाडे, भगवे आकाश, ढवळेढवळे ढग, हळद लावलेले ऊन, हिरवेगार मळे, काजळरात्र हे त्यांच्या कवितेतले विश्व बालकवींच्या कवितेशी नाते सांगणारे आहे. त्यांच्या कवितेतील रंगाविष्कार व

ध्वनिलावण्य असाधारण स्वरूपाचे आहे. ''सरींवर सरी आल्या ग सचैल गोपी न्हाल्या ग'', ''गडद निळे गडद निळे जलद भरुनि आले'' अशी रचना बोरकर सहज करून जातात. ''या नदीच्या पार वेड्या यौवनाचे झाड आहे अमृताचा चंद्र त्याच्या पालवीच्या आड आहे'' अशी लयबद्ध प्रतिमांकित पदावली बोरकर लीलया लिहितात. भोवतालची कविता बदलताना अनुभवूनही त्यांनी आपल्या काव्यधर्माशी प्रतारणा केली नाही. कवी म्हणून हा त्यांचा महत्त्वाचा विशेष आहे. अनिल बोरकरांबरोबर तिसरे नाव घेतले जाते ते कुसुमाग्रजांचे. *पृथ्वीचे प्रेमगीत, अहि-नकुल, कोलंबसाचे गर्वगीत, क्रांतीचा जयजयकार*, या *विशाखा* संग्रहातील कुसुमाग्रजांच्या कवितांना अमरत्व लाभले आहे. *विशाखा*नंतरचे *किनारा, मराठी माती, स्वगत, हिमरेषा* यांसारखे त्यांचे इतरही काव्यसंग्रह कुसुमाग्रजांच्या कीर्तीत भर घालणारे आहे. कुसुमाग्रजांच्या कवितेतील समाजाभिमुखता व राष्ट्रप्रेम वेगवेगळ्या रूपांत व्यक्त होत गेले आहे. इंदिरा संत, संजीवनी मराठे, पद्मा गोळे, शांता शेळके या कवयित्रींनी स्त्रीमनाचे वेगवेगळे विभ्रम उत्कटपणे व समंजसपणे शब्दांकित केले आहेत आणि एकाच वेळी संतकवयित्रींची कविता, लोककविता व आधुनिक जीवनजाणिवा या सर्वांना कवेत घेणारी कविता लिहिली. अनिल, कुसुमाग्रज, बोरकर, मर्ढेकर व पु. शि. रेगे यांसारख्या कवींच्या काळात काव्यलेखन करूनही या कवयित्रींनी रचनेतील पृथगात्मता अबाधित ठेवली. अत्यंत व्यक्तिगत अनुभूतीचा भावगीतात्म आविष्कार हे या कवयित्रींच्या कवितेचे महत्त्वाचे वैशिष्ट्य आहे. मूलत: प्रकृतीने रोमँटिक असणारी त्यांची कविता काळाच्या ओघात बदलत गेली.

मराठी कवितेत क्रांतिकारक बदल झाला तो मर्ढेकरांपासून. प्रबोधनकालातील मानवकेंद्री जीवनदृष्टीकडे पाठ फिरवून मर्ढेकर कवितेला आधुनिकवादी जीवनदृष्टीत घेऊन गेले. सभोवतालचे विघटित विश्व, या विश्वाला घेरून राहिलेली व क्षणोक्षणी अस्वस्थ करणारी साशंकता, विषमता, शोषण, व्यक्तित्वलोप, परस्परसंवादाचा अभाव, भावनाशून्य निष्प्रेम जीवन अशा अनुभूतींनी मर्ढेकरांचे *काही कविता* व *आणखी काही कविता* हे संग्रह व्यापलेले आहेत. काव्यविषय झालेल्या जीवनानुभवांची सर्वस्वी भिन्नता, त्यांना अनुरूप अशी संकेतांची मोडतोड करून घडवलेली नवी भाषा, सर्वस्वी नूतन प्रतिमासृष्टी आणि लेखनातून प्रकटणारा वैश्विक दृष्टिकोण या विशेषांमुळे मर्ढेकरांची कविता आजही नवीच्या नवी राहिली आहे. गांधीजी गेल्यानंतर मर्ढेकरांनी *फुटेल (होती वेडी आशा)* ही कविता लिहिली. त्यांच्या *फलाटदादा, पिपात मेले ओल्या उंदीर ,पोरसवदा होतीस, गणपत वाणी बिडी पिताना, न्हालेल्या जणू गर्भवतीच्या, मी एक मुंगी हा एक मुंगी, दवांत आलीस* या त्यांच्या कविता कवी म्हणून असणाऱ्या त्यांच्या सामर्थ्याचे द्योतक आहेत. नवीन भावनानिष्ठ समतानता निर्माण करणे म्हणजे नवी कविता लिहिणे असे जे प्रतिपादन त्यांनी आपल्या समीक्षाविचारात केले होते त्याचे प्रात्यक्षिकच त्यांच्या कवितेतून पाहावयास मिळते.

मर्ढेकर हे जर मराठी कवितेचे एक टोक मानले तर तिचे दुसरे टोक म्हणजे पु. शि. रेगे. या कवीची साहित्यनिर्मिती इतकी स्व-तंत्र आहे की तिचे सहज विस्मरण होऊच शकणार नाही. *साधना* या पहिल्या कवितासंग्रहापासून *अनीह* या शेवटच्या कवितासंग्रहापर्यंत झालेला त्यांच्या कवितेचा प्रवास समकालीन मराठी कवितेपेक्षा वेगळ्या वाटेने झालेला आहे. काव्यार्थाची - काव्याशयाची वलये विस्तारत नेणारी प्रसन्न, मुलायम काव्यशैली, अत्यंत ताशीव असे शब्दशिल्प, रेखीव घाट, छंदावरची व तालावरची भक्कम पकड असणारी लयबद्ध रचना, एकाच वेळी वेगवेगळ्या सहसंवेदना व संदर्भ जागे करण्याची क्षमता असे त्यांच्या काव्यनिर्मितीचे कितीतरी विशेष विलोभनीय आहेत. *त्रिधा राधा, मस्तानी, पाहिलें न पाहिलें, मालण, शहनाज* अशा अनेकानेक अविस्मरणीय कविता त्यांच्या प्रतिभेने निर्माण केल्या आहेत.

स्वातंत्र्योत्तर काळात मराठी कविता पूर्वकालीन कवितेपेक्षा इतक्या विविधतेने प्रकटली आहे की, तिच्याविषयी समालोचनात्मक विधाने करणेसुद्धा अवघड आहे. या कवितेची विविधता आशयाच्या, रूपाच्या व भाषेच्या अशा तिन्ही पातळ्यांवर दिसून येते. स्वातंत्र्यानंतर अंगात आलेला कर्तृत्वाचा जोश, आधुनिक यंत्रयुगाच्या सावटाखाली वावरताना व्यक्तीला येणारे एकाकीपण, माणसामाणसांतील विसंवादाच्या परिसीमेमुळे सतत जाणवणारी असुरक्षितता, अनिश्चिततेच्या वावटळीत सापडल्यामुळे येणारे भांबावलेपण अशा अनुभूतींचा आविष्कार हे या कवितेचे एक रूप आहे. दुसरे रूप माणसाच्या अस्तित्वाचा, त्याच्या जगण्याचा, त्याच्या दुभंगलेपणाचा विचार करणारे आहे. बुद्धी व भावना, शरीर व आत्मा, पाप व पुण्य, स्वातंत्र्य व निर्बंध, सत्य व सत्याभास अशा द्वंद्वांनी ग्रासलेले व्यक्तिमन कवितेद्वारे प्रकटते.

कवितेचे तिसरे रूप सामाजिक विषमतेमुळे निर्माण होणाऱ्या अन्यायग्रस्त परिस्थितीचे दर्शन घडवणारे आहे. कवितेचे चौथे रूप भोवतालच्या पर्यावरणातील अशांतता, दहशतवाद, स्त्रियांची अवहेलना, अप्रामाणिकपणा, भ्रष्टाचार असे सामाजिक-राजकीय ऱ्हासाचा थंड व अलिप्तपणाने आलेख काढणारे आहे. पाचवे रूप रोमँटिक कविता नव्या स्वरूपात सादर करणारे आहे. त्यासाठी ही कविता कधी निसर्गाचा आश्रय घेते, कधी व्यक्तिमनातील कोमल प्रेमभावनांच्या रूपात आविष्कृत होते, कधी ऐंद्रिय प्रतिमांच्या मोहक जालात नादमयता गुंफून साकार होते. मराठी कवितेला स्त्रियांच्या कवितेमुळे अगदी स्वतंत्र परिमाण लाभले आहे. ते सातवे रूप म्हणता येईल. कवितेचे आणखी एक रूप कंठाळी सुरात व गझलेच्या भाषेत दणकून अभिव्यक्त होणारे आहे. आणि मराठी कवितेचे अगदी अलीकडले रूप  जागतिकीकरणाने घडविले आहे. आता अशा सर्व रूपांना साकार करणाऱ्या कवींची किती नावे सांगावीत? विंदा करंदीकर, मंगेश पाडगावकर, शंकर वैद्य, अरुण कोलटकर, दिलीप पुरुषोत्तम चित्रे, नारायण सुर्वे, नामदेव ढसाळ, ग्रेस इत्यादींपासून संजीव खांडेकर, हेमंत दिवटे, श्रीधर तिळवे, संतोष पवार, सचिन केतकर, मंगेश काळे, वीरधवल परब, अरुण काळे, सलील वाघ, वर्जेश सोलंकी, मन्या जोशी यांसारख्या कित्येक समकालीन कवींपर्यंत यादी करावी लागेल. आणि कवयित्रींच्या बाबतीत बोलायचे तर इंदिरा संतांपासून सुरुवात करून प्रज्ञा पवार, नीरजा यांच्यापर्यंत यावे लागेल. स्थलाभावी या संपूर्ण काव्यपर्वाचे पर्यालोचन शक्य नाही. मात्र या विवेचनाला पूर्णविराम देण्यापूर्वी कुसुमाग्रजांची एक कविता येथे उद्धृत करावयास हवी. एकोणिसाव्या शतकाच्या सुरुवातीपासून अगदी आजपर्यंत समाजाला लागलेले जातीपातींचे आणि भेदाभेदाचे ग्रहण दूर व्हावे असा प्रयत्न अनेक थोर सुधारकांनी, विचारवंतांनी, नेत्यांनी केला; समता व बंधुता या मूल्यांना शिरोधार्य मानले, परंतु अजूनही तत्यांच्या प्रयत्नांना यश आले नाही. या अपयशाची अनुभूती प्रत्ययकारी शब्दांत व अंत:करणाला तात्काळ भिडेल अशा प्रासादिक पद्धतीने कुसुमाग्रजांनी ‘अखेर कमाई’ या कवितेत मांडली आहे. अभिधा या शक्तीला लक्षणेचे व व्यंजनेचे सामर्थ्य प्रदान करणारी ही कविता आपण दोनशे वर्षांत सुधारलो का आणि सुधारू इच्छितो का असा प्रश्न विचारते आहे. प्रश्नाचे उत्तर ज्याने त्याने आपल्याशी द्यावयाचे आहे. कविता पुढीलप्रमाणे आहे -

मध्यरात्र उलटल्यावर शहरातील पाच पुतळे
एका चौथऱ्यावर बसले
आणि टिपं गाळू लागले.
जोतीबा म्हणाले,
शेवटी मी झालो
फक्त माळ्यांचा
शिवाजीराजे म्हणाले,
मी फक्त मराठ्यांचा
आंबेडकर म्हणाले
मी फक्त बौद्धांचा.
टिळक उद्गारले
मी तर चित्पावन ब्राह्मणांचा.
गांधींनी गळ्यातला गहिंवर आवरला
आणि ते म्हणाले,
तरी तुम्ही भाग्यवान.
एकेक जातजमात तरी

तुमच्या पाठीशी आहे.

माझ्या पाठीशी मात्र

फक्त सरकारी कचेऱ्यांतील भिंत!

**साहित्यविचार व साहित्यसमीक्षा**

व्याकरण हे ज्याप्रमाणे भाषानुगामी असते त्याचप्रमाणे साहित्यविचाराचा क्रमही साहित्यानंतर असणे योग्यच होय. अव्वल इंग्रजी काळात साहित्यविचारासंबंधीचे विशेष भान उत्पन्न झाले होते असे म्हणता येणार नाही. तथापि काही पुस्तकांना लिहिलेल्या प्रस्तावनांमधून तत्कालीन साहित्यविचाराविषयीची जाण ध्यानात येते. *राजा शिवाजी* या काव्यास म. मो. कुंटे यांनी लिहिलेली प्रस्तावना किंवा कीर्तने यांनी *जयपाळ* या नाटकाला लिहिलेली प्रस्तावना या दृष्टीने उल्लेखनीय आहे. मोरोपंतांच्या केकावली वर दादोबा पांडुरंग यांनी लिहिलेली *यशोदापांडुरंगी* ही टीका या काळातील समीक्षेचा नमुना म्हणता येईल. केकावली हे एक स्तोत्र असून त्यातून मोरोपंतांची ईश्वरभक्ती प्रकटली आहे हे सांगताना मोरोपंतांची भक्ती सर्व देवांविषयी आहे तसेच त्यांना साधुसंतांविषयी आदर वाटतो हे दादोबांनी सप्रमाण सांगितले आहे. दादोबांची टीका मल्लिनाथाच्या पद्धतीची असून ती प्रौढ, पांडित्यपूर्ण व विस्तृत आहे. *राजा शिवाजी* या काव्यास कुंटे यांनी लिहिलेल्या प्रस्तावनेत काव्य, काव्याभिरुची, महाकाव्याचे स्वरूप, रोमँटिक व क्लासिकल हे संप्रदाय, कथावस्तू इत्यादींविषयीचे विचार त्यांनी मांडले आहेत. काव्य म्हणजे बुद्धीचा अवमान न करता भावनेला आवाहन करणारे लेखन अशी कुंटे यांची भूमिका आहे.. रोमँटिक व क्लासिकल अशा दोन शैलींचा उल्लेख करून कुंटे यांनी रामायण-महाभारतादी महाकाव्ये, कालिदासाच्या कृती, तुकारामाचे अभंग, रामदासाची रचना यांची गणना रोमँटिक शैलीत केली असून पंचमहाकाव्ये, चंपूकाव्ये, मोरोपंतांच्या आर्या यांना क्लासिकल वर्गाचे मानले आहे. महाकाव्य म्हणजे काय या विषयीदेखील त्यांनी मतप्रकटन केले आहे. राष्ट्राच्या उत्थानाचा, प्रगतीचा आणि ऱ्हासाचा इतिहास हा महाकाव्याचा विषय असतो व महाकाव्यात वत्सल, अद्‌भुत यांसह सर्व रस येतात असे त्यांचे विवेचन आहे. महाकाव्य हे राष्ट्राच्या अस्मितेचे चित्रण करते असा मार्मिक अभिप्राय कुंटे यांनी व्यक्त केला आहे.

मराठी ज्ञानप्रसारक सभेपुढे का. बा. मराठे यांनी *नावल व नाटक* हा निबंध वाचला होता. त्या निबंधात कथाकादंबरी व नाटक यांची स्वरूपचिकित्सा आलेली आहे. निबंधाचा अर्धा भाग नावलविषयक, तर अर्धा भाग नाटकविषयक आहे. 'नाटक म्हणजे हावभावांसह रंगभूमीवर म्हणून दाखविण्याजोगे रसभरित संवादमिश्रित काव्य' अशी नाटकाची व्याख्या त्यांनी केली आहे. कवीची प्रज्वलित बुद्धी, इतिहासकाराचे इतिहासज्ञान, विजातीय चित्रकाराची कला, वक्त्याची विलक्षण मनोवेधकता, नावलकाराचे चातुर्य व तत्त्ववेत्त्याची गहन बुद्धी असे गुण नाटककारास आवश्यक असतात असे त्यांनी म्हटले आहे. चमत्कृतिपूर्णता किंवा अद्‌भुतता हे नावल या प्रकाराचे व्यवच्छेदक लक्षण असून नावलांमध्ये चार वेद, अष्टादशपुराणे व एकंदर काव्ये, त्यांत महाभारत, रामायण, भागवत आणि इतर पुराणे यांचा अंतर्भाव होतो असा विशेष त्यांनी नमूद केला आहे. अद्‌भुताचे महत्त्व विस्ताराने वर्णन करून ते कथाविषयातील रंजकतेस व आकर्षकतेस कारणीभूत ठरते असा त्यांचा अभिप्राय आहे. तथापि अद्‌भुताला सत्याचे अधिष्ठान हवे असेही त्यांनी प्रतिपादन केले आहे. 'कांळ, वेळ, पुरुषस्वभाव आणि स्थळ' यांचे ऐक्य असावे असे म्हणून त्यांनी ॲरिस्टॉटलची ऐक्यत्रयी सूचित केली आहे.

कादंबरी आणि नाटक यांच्या विचाराप्रमाणेच काव्यासंबंधीचा विचारही या काळात झाला तो १८६७ साली निघालेल्या 'विविधज्ञानविस्तार' मासिकाच्या पहिल्या अंकापासून रा. भि. गुंजीकर यांनी लिहिलेल्या काव्यविचार या लेखमालेतून. संस्कृत काव्यविचाराच्या आधारे परंतु स्वतंत्रपणे व आधुनिक पद्धतीने त्यांनी आपला काव्यविचार मांडलेला आहे. विष्णुशास्त्री चिपळूणकरांनी शालापत्रकातून १८७२ सालापासून पाश्चात्त्य विचारांशी संवादी असा काव्यविचार मांडला. अंत:करणाचे स्वाभाविक उद्‌गार ही काव्याची पहिली व अत्युत्तम अवस्था; अंत:करणस्फूर्तीस

बाह्यालंकाराचे साहित्य असते ती दुसरी अवस्था आणि अलंकारादिकांचा भरणा व हृदयद्रावक गुणांची अनुपस्थिती ही तिसरी अवस्था, असे विवेचन त्यांनी केले आहे. या अवस्था इंग्रजी कवितेतही कशा दिसतात ते त्यांनी दुसऱ्या लेखात सांगितले आहे आणि तिसऱ्या लेखात संस्कृत कवी व कविता यांच्याविषयीचे विवेचन येते. शाहिरी कविता हीच खरोखर मराठीची आद्यकविता असे त्यांचे मत विवेचनाच्या ओघात येऊन गेले आहे. तत्त्वविचाराच्या अनुषंगाने झालेल्या साहित्यविचाराबरोबरच नियतकालिकामध्ये प्रसिद्ध झालेल्या काही सुट्या ग्रंथपरीक्षणांच्या अनुषंगानेही साहित्यविचाराची अभिव्यक्ती झालेली दिसते. मराठी नियतकालिकांनी जी महत्त्वाची कार्ये केली त्यांत वेळोवेळी केला गेलेला साहित्यविचार प्रसिद्ध केला हे मराठी साहित्याच्या संदर्भातील मोलाचे कार्य होय.*

१८८५ ते १९२० हा कालखंड मराठी साहित्यसृष्टीतील तेजस्वी कालखंड होय. त्यामुळे या साहित्यनिर्मितीच्या निमित्ताने भरपूर साहित्यचर्चा व्हावी अशी अपेक्षा उत्पन्न होते. महादेव गोविंद रानडे यांनी १८६४ पर्यंत प्रकाशित झालेल्या पुस्तकांची जी सूची सरकारने तयार करविली होती तिच्या आधारे १८६५ मध्ये मराठी वाङ्मयाचे समालोचन केले होते. या समालोचनाचे मूळ नाव *Remarks on the Marathi Protion of the Catalogue* व या सूचीचे नाव 'Catalogue of Native Publications in the Bombay Presidency upto 31st December 1864 Prepared under orders of Government by Sir A. Grant, second Edition, 1867' असे आहे. १८६६ पासून १८९६ पर्यंतच्या तीस वर्षांतील मराठी वाङ्मयाचा जो आढावा म. गो. रानडे यांनी १८९८ साली घेतला त्याचे नाव 'A note on the growth of the Marathi literature' असे आहे. रानडे यांच्या *The Miscellaneous Writings* या ग्रंथांत त्यांचा समावेश झालेला आहे. अत्यंत बुद्धिमान, उच्चविद्याविभूषित, उच्चपदस्थ न्यायाधीशाने तटस्थपणे परंतु आत्मीयता न सोडता मराठी वाङ्मयासंबंधी मांडलेली ही निरीक्षणे आहेत. समग्र मराठी वाङ्मयाच्या परंपरेचे ज्ञान व भान त्यामागे उभे आहे. मराठी वाङ्मयाच्या पूर्वपरंपरेने बजावलेल्या कामगिरीचे स्वरूप या अवलोकनापूर्वीच त्यांच्या मनात तयार आहे. अशा जाणत्या वाचक-समीक्षकाने मराठी साहित्याच्या आरंभकालातील पन्नासपंचावन्न वर्षांतील निर्मितीसंबंधी केलेले हे भाष्य नि:संशय मोलाचे आहे. साहित्याची वर्गवारी करून त्या त्या वर्गातील निर्मितीचे स्वरूप व गुणदोष यासंबंधीचे विवेचन त्यांनी विस्तारपूर्वक आणि अत्यंत जबाबदारीने केले आहे. त्यात स्वकीयांची व्यर्थ भलावण नाही की, निर्मितीमागील विशिष्ट भूमिका व परिस्थिती न जाणता कोणाला दिलेली अवाजवी दूषणे नाहीत. समतोल व समंजस असा हा अभिप्राय आहे. अभ्यासक्रमात पाठ्यपुस्तके म्हणून या पुस्तकांपैकी लावण्याजोगी पुस्तके कोणती याचा विचार रानडे यांनी करावा अशी अपेक्षा होती, ती त्यांनी साक्षेपी वृत्तीने पूर्ण केली आहे.

एकोणिसाव्या शतकाच्या उत्तरार्धात आणि विसाव्या शतकाच्या आरंभकाळी मुंबई विद्यापीठातून पदवीधर झालेले भाषा विषयाचे विद्यार्थी किंवा मुंबई विद्यापीठाच्या कक्षेतील भाषेचे अध्यापन करणारा प्राध्यापक वर्ग यांच्या अध्ययन-अध्यापन प्रक्रियेत ज्या साहित्याला व साहित्यविचाराला केंद्रस्थान होते त्या अनुषंगाने त्या काळातील साहित्यविचार होत होता. साहित्याचे स्वरूप, साहित्याची निर्मितिप्रक्रिया, साहित्याचे प्रयोजन, साहित्याचे कार्य या प्रश्नांशी ही समीक्षा निगडित होती. साहित्यनिर्मितीचा हेतू आणि साहित्याचा परिणाम यांचा विचार या काळात जवळ जवळ प्रत्येक साहित्यविमर्शकांनी केलेला दिसतो. 'काव्य आणि काव्योदय' या निबंधात वा. ब. पटवर्धनांनी काव्यस्वरूप, काव्यनिर्मितीस अनुकूल/प्रतिकूल परिस्थिती आणि मराठी कवितेच्या उत्कर्षाचे दिग्दर्शन अशा स्वरूपाचे विवरण केले आहे. काव्यकारणांचा ऊहापोह करताना ते लिहितात, "काव्याला तालबद्ध व समर्पक शब्दयोजना लागते तशीच सरस शब्दयोजना लागते.

* १८७४ पूर्वीचा साहित्यविचार सामान्यपणे नियतकालिकांतून विखुरलेला आहे. मराठी ज्ञानप्रसारक (१८५०), सर्वसंग्रह (१८६०), विविधज्ञानविस्तार (१८६७), दंभहारक (१८७१), ज्ञानसंग्रह (१८७२), निबंधमाला (१८७४), केरळकोकीळ (१८८६), मासिक मनोरंजन (१८९५) ही नियतकालिके त्या दृष्टीने उल्लेखनीय आहेत. मराठी ज्ञानप्रसारकात पद्यरचना, कविता म्हणजे काय?, मराठी कवी आणि कविता, भाषांतर, निबंध लिहिणे, लिहिण्याची शैली इत्यादी लेख आलेले आहेत. एकोणिसाव्या शतकाच्या मध्यावर साहित्याचा विचार कोणत्या प्रकारे केला जात होता त्याचा अंदाज या लेखांवरून येतो.

शब्दांतील रस हा काव्यातील मनोभावांचा वाहक असतो. मनोभाव आणि रस ही एकाच वस्तूची दोन अंगे म्हणावी किंवा परस्परसाक्षेप जोडी म्हणावी. हृदयाची वृत्ती या नात्याने जो मनोभाव म्हणावयाचा तोच शब्दांतील अर्थ या नात्याने रस होतो. मनुष्यांची हृदये जशी स्वभावतः कोमल, कठोर, सौम्य, शीघ्रक्षोभी, संथ इत्यादि नानाप्रकृतींची असतात तशीच शब्दांची अंतरंगेही नानाप्रकारची असतात आणि हृदयाविर्भाव जसा असेल तसाच शब्दार्थाचा आविर्भाव नसेल तर काव्य साधावयाचे नाही." काव्यप्रकाश, साहित्यदर्पण, ध्वन्यालोक या संस्कृत ग्रंथांचा पगडा अभ्यासक्रमावर असल्यामुळे तत्कालीन साहित्यविचार त्या वर्तुळात फिरत राहाणे स्वाभाविक होते. संस्कृत साहित्यशास्त्राच्या अनुषंगाने साहित्याचे स्वरूप, साहित्याचे प्रयोजन, काव्यानंदमीमांसा आणि रसचर्चा हे विषय या काळातील सर्वाधिक चर्चाविषय होते असे म्हणता येईल.

मुंबई मराठी ग्रंथसंग्रहालयाच्या तेराव्या वार्षिक सभेच्या दिवशी म्हणजे दि. २६ नोव्हेंबर १९११ रोजी 'विदग्ध वाङ्मय' या विषयावर ह. ना. आपटे यांनी जे व्याख्यान दिले त्यात वाङ्मयाची व्याख्या पुढीलप्रमाणे केली -"मनुष्याची सदसद्विवेकबुद्धि जागृत करून त्यास नेहमी सन्मार्गात ठेवण्यास कारण होणारे, त्याच्या विविध मनोवृत्तींचा विकास करून शुद्ध अशा आनंदाचा आस्वाद त्यास देणारे, जे काय अशुद्ध, अपवित्र, दुःखद, नैराश्योत्पादी व क्षणिक - त्यापासून दूर राहाण्याचा प्रत्यक्ष किंवा अप्रत्यक्ष बोध करणारे, नेहमी उदार, रमणीय अशा विचारांचा व कल्पनांचा त्यांच्या मनात उद्भव व संचार करवून सत्याचे ठिकाणी तो सदा लीन होईल असे करणारे, या जीवितसंग्रामात त्यास नेहमी उत्तेजित ठेवून विजयोत्सुक करणारे, सारांश त्यास मनुष्यत्वातून काढून देवत्वाकडे जाण्याबद्दल उत्सुक करून त्या मार्गाला सन्मुख करणारे - असे जे कोणाचेही अंतःस्फूर्तीने शब्दरूप घेऊन मुखावाटे बाहेर पडलेले, किंवा लेखणीने लिहून ठेविलेले विचारोद्गार, त्या सर्वांना समुच्चयाने वाङ्मय ही संज्ञा आहे." "ही व्याख्या फारच गुंतागुंतीची व व्यापक आहे" असे भाष्य त्यांनी स्वतःच केले आणि "वाङ्मय खरोखर जर विश्वव्यापी आहे तर त्याचा अर्थ पक्केपणाने मनात उभा राहाण्यासाठी व्याख्या ठरवू गेल्यास थोडीबहुत गुंतागुंत उत्पन्न होणारच." असे समर्थनही केले. याच व्याख्यानात पुढे टॉलस्टॉयचा संदर्भ देऊन साहित्याच्या प्रयोजनासंबंधी आपले परखड मत त्यांनी मांडले आहे. ते म्हणतात, "विष्णुशर्मा पंडिताने कोल्ह्याकुत्र्यांच्या गोष्टी सांगून, केवळ आनंदच उत्पन्न केला काय ? कालिदासाने काव्ये-नाटके लिहून लोकांस नुसते रमविलेच काय? शेक्सपियरने नाटके लिहिली. त्यांची अजून लोक पारायणे करितात; ती केवळ करमणूक म्हणूनच काय ? या प्रश्नाचे उत्तर "होय" असे कोण देईल ? आनंदोत्पादन, मनोरंजन, करमणूक हा एवढाच हेतू धरून कोण्याही महाकवीने, किंवा नीतिबोधकाराने आपली काव्ये किंवा गोष्टी ही रचिली नाहीत. वाल्मीकीने आपले रामायण, होमरने आपले ईलिअड, विष्णुशर्म्याने आपले पंचतंत्र व इसापाने आपल्या गोष्टी ही काही केवळ मनोरंजक बाडे किंवा गमतीदार चुटके म्हणून निर्माण केली नाहीत, तर मनुष्यास निदान अज्ञ जनांस राजमार्गाने सत्य व सत् यांचे ज्ञान नको म्हणून रंजनाच्या मार्गाने ते त्यांस देण्यासाठी निर्माण केली." कालांतराने १९३४ साली सानेगुरुजी यांनी टॉलस्टॉयच्या ग्रंथाचे 'कला म्हणजे काय?' हे भाषांतर केले आणि त्याच्या प्रस्तावनेत टॉलस्टॉयच्या कल्पनेतील महापुरुषांच्या सर्वस्पर्शी भावनांची अभिव्यक्ती व्हावी अशी अपेक्षा व्यक्त केली आहे. नीत्शेच्या महापुरुषापेक्षा टॉलस्टॉयच्या महापुरुषाचे वेगळेपण सांगताना साने गुरुजी लिहितात, "सर्व मानवांचे ऐक्य व्हावे म्हणून झटणारा, सर्वत्र समता व बंधुभाव हेच ज्याचे ध्येय, ज्याला आपपर नाही, सर्व मानवजातीच्या हितमंगलासाठी जो उभा आहे, ज्याला भेद अमंगळ वाटतात, प्रेम हीच ज्याची शक्ती, त्याग हेच ज्याचे वैभव, जो सर्वांना हात देण्यास तयार, दरिद्री लोकांचा सखा, पडलेल्यांचा उद्धारकर्ता तो टॉलस्टॉयचा महापुरुष होय. केवळ बलवान हा टॉलस्टॉयचा आदर्श नाही."

वाङ्मय म्हणजे काय ? हे स्पष्ट करताना न. चिं. केळकर यांनी "वाङ्मय हे शब्द व अर्थ मिळून होते. त्यामुळे ते साभिप्राय, गुणमंडित व दोषरहित असावे लागते" अशी वाङ्मयविषयक आपली भूमिका स्पष्ट केली. त्याचबरोबर "कलाविलासाच्या मागे हेतुसंशोधनाचा गुप्त पोलीस लावून दिला, तर अनर्थकारक परिणाम झाल्याशिवाय राहाणार नाहीत." असा प्रयोजनविचारही त्यांनी मांडला. पाश्चात्त्यांच्या साहित्यविचाराच्या संदर्भात कलानिर्मितीची प्रक्रिया व साहित्याचा रसिकमनावर होणारा परिणाम यांची विशेष दखल घेतली जात होती, असे तत्कालीन समीक्षात्मक स्वरूपाच्या

लेखनावरून म्हणता येते. आश्चर्य असे वाटते की, इतिहासाचार्य राजवाडे यांनी इ. स. १९०२ मध्ये लिहिलेल्या 'कादंबरी' या निबंधाचा प्रभाव साहित्यविचार, समीक्षेवर वा साहित्यिकांवर पडला नाही. कादंबरीवाङ्मयाचा इतका मूलगामी परामर्श तत्कालीन ज्येष्ठ-श्रेष्ठ साहित्यिकांना व समीक्षकांना आपला आधार का वाटला नाही ? त्याऐवजी तंत्रप्रधान, रंजनवादी वा तथाकथित ध्येयवादी कादंबरीचीच सुमारे पन्नास वर्षे वाढ का होत राहिली ? राजवाडे यांच्यानंतर भालचंद्र नेमाडे यांनी कादंबरीविषयक प्रगल्भ निबंध ('टीकास्वयंवर', साकेत प्रकाशन, प. आ., १९९०) लिहीपर्यंतच्या काळात कादंबरीविचार पुढे का गेला नाही हा एक यक्षप्रश्नच आहे.

ज्ञानकोशकार केतकर यांनी आपले सर्व लेखन समाजशास्त्रीय दृष्टिकोणातून केले. त्यामुळे त्यांच्या समीक्षाविचारात समाजशास्त्रीय अभ्यासाचे फार मोठे प्रतिबिंब आढळते. प्राचीन मराठी कवितेचा अन्वयार्थ त्यांनी समाजशास्त्रीय दृष्टिकोणातून लावला. *महाराष्ट्रीयांचे काव्यपरीक्षण* (१९२८)या त्यांच्या ग्रंथापासून साहित्य व समाजजीवन यांची सांगड घालण्याचा प्रयत्न सुरू झाला. पुढील काळात संस्कृतिसमीक्षेची जी सुरुवात मराठीत झाली तिची सुरुवात केतकरांनी केली.

कला व जीवनवाद या परस्परविरोधी प्रवृत्तींनी जवळपास २०-२५ वर्षे मराठी समीक्षाविश्वात आपले अस्तित्व टिकवून ठेवलेले दिसते. मात्र फडकेप्रणीत कलावाद हा खरोखरी रंजनवादच होता व खांडेकरांचा जीवनवाद स्वप्नातच रंगलेला होता. पुढील काळात प्रभाकर पाध्ये, गंगाधर गाडगीळ, माधव आचवल, विद्याधर पुंडलीक यांनी गंभीरपणे मांडलेली कलावादाची भूमिका आणि फडके यांच्यात कुठलेच नाते नव्हते. तसेच, लालजी पेंडसे, कुसुमावती देशपांडे, दि. के. बेडेकर, शरच्चंद्र मुक्तिबोध या समीक्षकांच्या विचारांशी खांडेकरांच्या तथाकथित जीवनवादाचा संबंध नव्हता. फडके आणि जावडेकर यांच्यात झालेला साहित्याच्या अवतारकार्यासंबंधीचा वाद ही इतिहासात नोंदली गेलेली एक अर्थपूर्ण घटना असली तरी भावी समीक्षाविचारास तिचे फारसे साहाय्य झाले नाही. १९३० ते ५० च्या काळात मार्क्सवाद व फ्रॉइडचे मानसशास्त्र यांचीही चर्चा होत राहिली. गं. बा. सरदार, बा. र. सुंठणकर यांसारखे साम्यवादी विचारांचे लेखक मार्क्सवादी विचारांच्या चौकटीतून विशेष करून संतसाहित्याची चिकित्सा करीत होते. परंतु त्यांच्या विचारांचाही संतसाहित्यचिकित्सेवर प्रभाव पडलेला दिसत नाही. त्यांचे विचार एकांडेच राहिले. तुलनेने कुसुमावती देशपांडे, बेडेकर व शरच्चंद्र मुक्तिबोध यांच्या समीक्षादृष्टीचा परिणाम कमीअधिक प्रमाणात सुमारे पुढील तीस वर्षे तरी टिकून राहिलेला दिसतो.

वाङ्मयीन महात्मतेची चर्चा करणारे जे लेख मर्ढेकरांनी १९३५ पासून लिहिले (आणि जे पुढे त्यांच्या 'सौंदर्य आणि साहित्य' या ग्रंथात समाविष्ट झाले) त्यांचा परिणाम म्हणून १९६५-७० पर्यंत वाङ्मयाच्या घाटाची, साहित्यसौंदर्यांतर्गत लयतत्त्वाची आणि आपल्या अनुभवसृष्टीशी लेखकाने इमान राखण्याची चर्चा होत राहिली. समीक्षेतील मर्ढेकरांचे युग पंचवीस वर्षे जरी टिकले असले तरी मर्ढेकरांच्या पद्धतीने समीक्षा मात्र अत्यल्प झाली. चर्चा अधिक परंतु उपयोजन जवळजवळ नाही असेच चित्र होते. असे असले तरी तोवरच्या सारांशप्रधान आणि विषयांतराकडे झुकणाऱ्या समीक्षेला हळूहळू का होईना नेमकेपणा येऊ लागला हा मर्ढेकरांच्या समीक्षाविचारांचा परिणाम म्हणता येईल.

'सौंदर्यशास्त्र एक भाकड खटाटोप' अशी प्रकट भूमिका गंगाधर गाडगीळ यांनी घेतली. साठच्या दशकात नवकथेचे स्वरूप स्पष्ट करणारे आणि तिच्या अस्तित्वाचे महत्त्व ठाशीव प्रकारे सांगणारे गंगाधर गाडगीळ सौंदर्यशास्त्रावर तुटून पडलेले दिसतात. दरम्यान दलित साहित्य, ग्रामीण साहित्य नव्या जोमाने वर आले आणि या साहित्याची परीक्षा करण्यासाठी दलित साहित्याचे वेगळे सौंदर्यशास्त्र हवे अशी मागणी होऊ लागली. कॉम्रेड शरद पाटील यांनी 'अब्राह्मणी साहित्याचे सौंदर्यशास्त्र' मांडले. दलित साहित्याची चिकित्सा करणारे व दलित साहित्याची भूमिका मांडणारे लेखनही जोमदारपणे केले गेले. हे कार्य करणाऱ्यांत रा. ग. जाधव, बाबुराव बागूल, भालचंद्र फडके, गंगाधर पानतावणे, केशव मेश्राम, यशवंत मनोहर, राजा ढाले प्रभृती आघाडीवर होते.

आनंद यादव यांनी ग्रामीण साहित्याचे वेगळेपण व सामर्थ्य आवर्जून स्पष्ट करणारे समीक्षालेखन केले. याच काळात जनवादी साहित्यविचार स्वतंत्रपणे मांडण्याची गरज य. वा. वडस्कर यांना मुख्यत्वे भासलेली दिसते. याच पद्धतीने

आदिवासी साहित्याचाही विचार करावयास हवा अशीही विचारधारा पुढे आली. समीक्षाविचारातील या दशदिशांमध्ये वेगवेगळ्या चळवळींतून (लघुनियतकालिके, दलितसाहित्य, ग्रामीण जनवादी आदिवासी साहित्य इत्यादी) पारंपरिक साहित्य आणि समीक्षा यांच्या विरोधातील असंतोषाची अभिव्यक्ती होत होती. तसेच नव्या व्यवस्थापनाची, नव्या समीक्षादृष्टीची मागणी होती. १९७५ च्या वर्षापासून स्त्रीवादी विचाराचा नवा प्रवाह साहित्याच्या व समीक्षेच्या प्रांगणात आला. आणि हळूहळू स्त्रीवादी साहित्यसमीक्षा या स्वतंत्र समीक्षाशाखेत परिणत झाला.

पासष्ट-सत्तरच्या आसपासच वेगवेगळ्या समीक्षादृष्टींचा ऊहापोह सुरू झाला. उदा. समाजशास्त्रीय समीक्षादृष्टी, मार्क्सवादी समीक्षादृष्टी, मानसशास्त्रीय समीक्षादृष्टी, संरचनावादी समीक्षादृष्टी इत्यादी. शैलीवैज्ञानिक, विरचनावादी यांसारख्या समीक्षापद्धतींचा विचारही सैद्धांतिक पातळीवर थोड्याफार प्रमाणात झालेला आढळतो. वैज्ञानिक प्रगती व वैज्ञानिक पद्धती यांच्या परिणामातून समीक्षेचे एक सुसंगत शास्त्र जर बनवायचे तर त्यासाठी विवक्षित पद्धतींची आवश्यकता आहे या भावनेतून या वेगवेगळ्या समीक्षापद्धती अस्तित्वात आल्या. पर्यावरणाच्या गंभीर विचारामुळे समीक्षेतही साहित्याच्या पर्यावरणाचा काही वेगळा विचार करावा का अशा प्रयत्नातून रा. ग. जाधवांनी साहित्याचे परिस्थितिविज्ञान विकसित करण्याचा प्रयत्न केला. गंगाधर पाटील, म. सु. पाटील यांनी सुपरिचित करून दिलेली आदिबंधात्मक समीक्षापद्धती हिचादेखील निर्देश करावयास हवा. कथनमीमांसेच्या साहाय्याने मराठीत थोडे सैद्धांतिक व थोडे उपयोजित समीक्षालेखन झाले. संस्कृतिसमीक्षेचा उल्लेखनीय प्रांत गो. म. कुलकर्णी व रा. ग. जाधव यांच्या प्रयत्नांनी आकाराला आला. मूलतः पाश्चात्त्य साहित्यसिद्धांतांच्या आधारावर उभ्या असणाऱ्या समीक्षेपेक्षा आपल्या साहित्यनिर्मितीचे मूल्यमापन करणारे निकष आणि व्यवस्था आपणच घडविली पाहिजे अशी आग्रही व आक्रमक भूमिका भालचंद्र नेमाडे यांनी घेतली. मराठी भूमीत व मराठी भाषेच्या परंपरेत साहित्याचा विचार करत असतानाच आंतरराष्ट्रीय परिप्रेक्ष्यातही साहित्यसमीक्षा करणारे दिलीप पुरुषोत्तम चित्रे व विलास सारंग यांच्या स्वतंत्र व प्रगल्भ समीक्षालेखनाचा आवर्जून उल्लेख करावयास हवा.

साहित्याचे रसग्रहण करणारी व त्यासाठी साहित्यकृतीचा आत्मप्रत्यय प्रमाण मानणारी आस्वादक समीक्षा या शतकात सातत्याने आढळते. किंबहुना समीक्षा म्हणजे साहित्यकृतीला रसिकवृत्तीने दिलेला प्रतिसाद असे समीकरण रूढ झालले दिसते. फडके-खांडेकरांपासून श्री. के. क्षीरसागर, गंगाधर गाडगीळ, माधव आचवल, व. दि. कुलकर्णी, त्र्यं. वि. सरदेशमुख, रा. ग. जाधव, म. द. हातकणंगलेकरप्रभृतींनी या स्वरूपाचे लेखन सातत्याने केले आहे. आस्वादक म्हटल्या जाणाऱ्या या समीक्षेवर रा. भा. पाटणकर यांनी जोरदार हल्ला चढविला आणि आस्वादक समीक्षा अशी काही समीक्षाच असू शकत नाही अशी भूमिका ठामपणे मांडली. मिलिंद मालशे यांनी या भूमिकेस पूरक ठरणारे विवेचन वेळोवेळी केले.

विसाव्या शतकात ग्रंथरूप समीक्षा ज्या प्रमाणात झाली त्यापेक्षा कितीतरी अधिकपट समीक्षा नियतकालिकांच्या माध्यमातून झाली. शतकारंभी विविधज्ञानविस्तार, ज्ञानप्रकाश, मराठी ज्ञानप्रसारक यांपासून ते रत्नाकर, ज्योत्स्ना, नवयुग, अभिरुची, समीक्षक, छंद, साहित्य, सत्यकथा, अस्मितादर्श, भरतशास्त्र, अनुष्टुभ, कवितारती इ. नियतकालिकांनी विसाव्या शतकातील मराठी समीक्षेच्या जडणघडणीस फार मोठ्या प्रमाणात हातभार लावला आहे. ग्रंथपरीक्षणांच्या स्वरूपात तर अक्षरशः अगणित समीक्षालेखन झाले. या शतकातील असंख्य नियतकालिके नसतीच तर समीक्षेसंबंधीचा विचारविनिमय कशाप्रकारे होऊ शकला असता, असा प्रश्न पडावा इतकी मोठी कामगिरी नियतकालिकांनी बजावलेली आहे. आलोचनेसारखे केवळ समीक्षेला वाहिलले नियतकालिक पंचवीस वर्षांहून अधिक काळ खस्ता खात व तोटा सोसत वसंत दावतर यांनी चालविले हीही समीक्षेच्या दृष्टीने महत्त्वाची व लक्षणीय घटना म्हणावी लागेल.

विसाव्या शतकातील मराठी समीक्षेचे चित्र साकल्याने पाहू लागल्यास काय दिसते? साहित्याच्या स्वरूपाविषयीची मतमतांतरे, आनंद की उद्बोधन अशा द्वंद्वात्मक भाषेत व्यक्त होणारा प्रयोजनविचार, अष्टरसांच्या तपशीलवार मांडणीचा रसविमर्श, कलावाद-जीवनवादाचे लटके भांडण, सत्य, सौजन्य व सौंदर्य या मूल्यांची साहित्याकडून केली जाणारी अपेक्षा, वाङ्मय कालनिष्ठ की व्यक्तीनिष्ठ या प्रश्नाचा मागोवा, नवमतवादाची आणि कलानीतीवादाची जुजबी चर्चा यांनी

विसाव्या शतकातील पहिली तीन चार दशके व्यापली आहेत. भारतीय साहित्यशास्त्रातील रससिद्धांत दीर्घकाळ मराठी समीक्षेच्या क्षेत्रात वावरत होता असे इतिहास सांगतो. रससिद्धांताचे उपयोजन करून रा. शं. वाळिंबे यांनी लिहिलेला *ज्ञानेश्वरीतील विदग्ध रसवृत्ती* हा ग्रंथ लिहिला. विसाव्या शतकाच्या उत्तरार्धात मात्र रसचर्चा अडगळीत गेली आणि तिचे स्थान आशय-अभिव्यक्तीच्या एकत्वाने साहित्यातील विविधांगी अनुभवाने आणि व्यामिश्र जीवनदर्शनाने घेतले. द. ग. गोडसे यांच्यामुळे 'पोत', 'शक्तिसौष्ठव' यासारख्या सर्वस्वी भिन्न संकल्पना समीक्षेत अवतरल्या. दुर्गा भागवत, रा. चिं. ढेरे यांच्यामुळे साहित्यातील लोकजीवनाचे अंतरंग न्याहाळण्याचे प्रयत्न झाले. काही काळ साहित्यातील संप्रदायांच्या अनुषंगाने साहित्याचा विचार करण्याची रीत उत्पन्न झाली. अभिजातवाद, स्वच्छंदतावाद, वास्तववाद, अतिवास्तववाद, अस्तित्ववाद अशा साहित्यांतील निरनिराळ्या संप्रदायांनी साहित्यकृतींच्या अंतरंगाशी निश्चिती करण्याचा प्रयत्न झाला. याबाबत स्वच्छंदतावाद, वास्तववाद, अस्तित्ववाद हे तीन संप्रदाय महत्त्वाचे ठरतात.

मर्ढेकरांच्या सौंदर्यविचारातून सुरू झालेल्या प्रश्नांच्या बरोबरीने वाङ्मयविषयक चळवळींमधून उदय पावलेली समीक्षा आक्रमक पवित्र्यात उभी राहिली. पाश्चात्त्य जगतातून आलेल्या अभ्यासशाखांमुळे नवनवीन समीक्षापद्धतींचा उदय झाला आणि तोवर रूढ झालेली आस्वादक या विशेषणाने प्रसार पावलेली समीक्षा संशयास्पद ठरली. साहित्यप्रकारांच्या स्वरूपचर्चेपासून आरंभ पावलेली या शतकातील समीक्षा शतकाच्या अखेरीस सर्वच साहित्यप्रकारांचे व्यवस्थापन करून स्थिरावली. कादंबरी, कविता, कथा, नाटक हे प्रमुख साहित्यप्रकार आणि चरित्र, आत्मचरित्र, प्रवासवर्णने, व्यक्तिचित्र, लघुनिबंध, ललितगद्य, गीतकाव्य, गझल अशा उपप्रकारांना देखील निश्चित रंगरूप लाभले.

**सौंदर्यमीमांसा**

बा. सी. मर्ढेकर यांचे *सौंदर्य आणि साहित्य* हे पुस्तक प्रकाशित झाले आणि तेव्हापासून सुमारे पंचवीसतीस वर्षे मराठी समीक्षेच्या क्षेत्रात सौंदर्यतत्त्वांची चर्चा सुरू झाली. समीक्षा करावयाची तर सौंदर्यशास्त्र अवगत असावयास हवे असा एक समजच मराठी साहित्यक्षेत्रात उत्पन्न झाला. सौंदर्यवाचक विधानांचे स्वरूप या निबंधात मर्ढेकरांनी सौंदर्यविषयक भूमिका मांडली आहे. ''सौंदर्याची प्रतीती हा एक सलग, प्रत्यक्ष आणि जिवंत असा अनुभव असतो. जी घटना किंवा जी वस्तू लयबद्ध संवेदना व्यक्तीत स्फुरविते ती घटना अथवा ती वस्तू सुंदर मग ती घटना वा ती वस्तू निसर्गातील असो किंवा मानवी कृती असो... सौंदर्याचा अनुभव हीच सौंदर्याची फलश्रुती... सौंदर्याची कल्पना ही सत्याच्या कल्पनेप्रमाणे ज्ञानाच्या कल्पनेपेक्षा अधिक मूलभूत आहे. सत्याचा प्रांत ज्ञान हळूहळू अधिकाधिक पादाक्रांत करण्याचे कार्य करते म्हणजेच सत्य अगोदर नंतर ज्ञान तीच गोष्ट सौंदर्याचीही... सौंदर्याचे अस्तित्व अनुभूतीवर अवलंबून नाही. ज्या सौंदर्याबद्दल सौंदर्यवाचक विधान करता येत नाही ते सौंदर्य अस्तित्वातच नाही'' (मर्ढेकर, बा. सी., १९६०, पृ. १६ ते १९) वाङ्मय आणि सौंदर्यशास्त्र या लेखात मर्ढेकरांनी या दोहोंमधला संबंध स्पष्ट करून सांगितला आहे. ते लिहितात ''वाङ्मय आणि सौंदर्यशास्त्र यांचा संबंध परंपरागत रीतीने ज्यांनीज्यांनी विशद केला आहे त्यांनीत्यांनी वाङ्मयाला प्राधान्य देऊन वाङ्मय समीक्षणाच्या अनुरोधाने सौंदर्यशास्त्राचे स्वरूप ठरविण्याचा प्रयत्न केला आहे. ...माझ्या मते वाङ्मयाच्या अनुरोधाने सौंदर्यशास्त्राचे स्वरूप ठरविणे हे धोक्याचे आहे; सौंदर्यशास्त्राच्या अनुरोधाने वाङ्मयाची समीक्षा करणे हे तितके धोक्याचे नाही.'' (मर्ढेकर, तत्रैव, पृ. ९६-९७) वाङ्मय ही एक ललित कला आहे असे गृहीत धरून मर्ढेकर लिहितात, ''ललितकलांत सौंदर्य हे मूल्य अभिप्रेत असते. तेव्हा सौंदर्य हे मूल्य ज्या तत्त्वांवर आधारलेले आहे त्याच तत्त्वांवर ललित लिखाणाचे लालित्य अधिष्ठित असायला हवे. नाहीतर वाङ्मयेतर कलांतील लालित्य हे एका प्रकारच्या तत्त्वानुसार आणि फक्त वाङ्मयाचेच लालित्य हे दुसऱ्याच कुठल्यातरी तत्त्वांनुसार अशी आपत्ती ओढवेल. सर्व ललितकलांचा परामर्श घेऊन सौंदर्याचे स्वरूप आणि त्याची घटनातत्त्वे ठरविण्याचा प्रयत्न सौंदर्यशास्त्र करते.'' (मर्ढेकर, तत्रैव,पृ. १०७) ''कुठल्याही लिखाणाचे लालित्य, ते लिखाण कलाकृती आहे की नाही हे, त्या लिखाणाच्या घाटावर, सुसंघटनेवर, फॉर्मवर अवलंबून असते. ...हा घाट ही सुसंघटना, हा फॉर्म फक्त व्यक्त अशा आशयात भावनानुभूतीतच शोधावयाला हवा. ...या घाटाचे, सुसंघटनेचे, फॉर्मचे चैतन्यतत्त्व म्हणजे लयतत्त्व; आणि वाङ्मय ही एक ललित कला का, तर तिच्यातील घाटाचे,

सुसंघटनेचे, फॉर्मचे जे चैतन्यतत्त्व तेच इतर ललितकलांचे चैतन्यतत्त्व आहे म्हणून.'' (मर्ढेकर, तत्रैव,पृ. १३०) त्यांनी संवादलय, विरोधलय, समतोललय अशी तीन लयतत्त्वे सांगितली आहेत. त्यांच्या मते वाङ्मयाचा सौंदर्यशास्त्राशी येणारा संबंध लयतत्त्वांमार्फत येतो. या लयतत्त्वांच्या आधारे वाङ्मय समीक्षण कसे करावे ते त्यांनी बालकवींच्या 'खेड्यातील रात्र' या कवितेच्या विश्लेषणाच्या आधारे स्पष्ट केले आहे. साहित्यकृतीकडे एक कलाविष्कार म्हणून पाहाण्याची दृष्टी त्यांनी साहित्याच्या आस्वादकाला दिली.

मर्ढेकरांनंतर जवळपास वीस वर्षांनी रा. भा. पाटणकर यांनी आपला *सौंदर्यमीमांसा* हा ग्रंथ लिहिला. केवळ सौंदर्य व कला या संकल्पनांवर लक्ष केंद्रित करण्याऐवजी समीक्षेतील संकल्पनांचे विश्लेषण करून एक संकल्पनात्मक नकाशा तयार करणे आणि स्वत:ची सौंदर्यविषयक भूमिका स्पष्ट करणे या उद्देशाने त्यांनी हा ग्रंथ लिहिला. या ग्रंथात त्यांनी द्विध्रुवात्मकतेचा सिद्धांत मांडला आहे. त्यांच्या मते ''पहिला ध्रुव म्हणजे कला व सौंदर्य यांचे विश्व स्वयंपूर्ण व स्वायत्त आहे ही भूमिका होय. या भूमिकेचा परिपोष कांट व विश्वचैतन्यवादी यांनी केला. ...कांटच्या मते स्वायत्त सौंदर्याचा अनुभव अलौकिक असतो ...तो अनुभव सुखस्वरूप असला तरी त्याच्या सार्वत्रिकतेमुळे तो रोचकतेचा, संवेदनासुखाचा अनुभव नसतो. तो सार्वत्रिक व अपरिहार्य असला तरी त्यात संकल्पनांचा अभाव असल्यामुळे त्याला ज्ञानात्मक किंवा नैतिक अनुभव म्हणता येत नाही. ...विश्वचैतन्यवाद्यांनी आशययुक्त सौंदर्याला आशयरहित केवल रचनेच्या सौंदर्यापेक्षा जास्त महत्त्व दिले'' ''...दुसरा ध्रुव म्हणजे लौकिकतावाद. या मतानुसार सौंदर्यानुभव हा लौकिक पातळीवरचाच अनुभव आहे प्रत्यक्षात अस्तित्वात असलेल्या वस्तूंना जे सत्ताशास्त्रीय स्थान असते ते जरी कलाकृतीला नसले तरी तिच्यामुळे निर्माण होणाऱ्या अनुभवातील आपली एकूण भूमिका लौकिक असते.'' (पृ. ४३३-४३५) अलौकिकतावाद रूपतत्त्वाचा पुरस्कार करतों तर लौकिकतावाद आशयावर भर देतो. पाटणकरांच्या मते बहुतेक कलांमधील हे दोन्ही ध्रुव निदान बीजरूपाने तरी उपस्थित असलेले दिसतात. ''वाङ्मय ही फार मोठ्या प्रमाणात लौकिकतेच्या ध्रुवाकडे झुकलेली कला आहे. पण अर्थात तिच्यात अलौकिकतेचा संपूण अभाव आहे असे नाही. ...वाङ्मयातही अलौकिकत्वाचे बीज आहे हे मान्य करावेच लागते.'' (पृ. ४२८)

पाटणकरांच्या ग्रंथानंतर पाच वर्षांनी प्रभाकर पाध्ये यांचा *सौंदर्यानुभव* हा ग्रंथ प्रसिद्ध झाला. मर्ढेकरांनी जसा लयतत्त्वाचा सिद्धांत मांडला, पाटणकरांनी जसा द्विध्रुवात्मकतेचा सिद्धांत मांडला त्याप्रमाणेच पाध्ये यांनी तीन मेंदूंची कल्पना मांडली. सौंदर्यानुभव हा एक मनोव्यापार आहे, परंतु ''सौंदर्यानुभव म्हणजे मनाचा एक भ्रम नव्हे, त्याला मेंदूच्या रचनेत व व्यापारात भक्कम आधार आहे'' (सौंदर्यानुभव, पृ. १७) असे पाध्ये यांचे प्रतिपादन आहे. तीन मेंदूंच्या निरनिराळ्या भागांना जोडणाऱ्या, तीन प्रकारच्या मनोव्यापारांत देवघेव करणाऱ्या मानसिक शक्तीला पाध्ये 'प्रतिभा' असे म्हणतात. मनोव्यापारातील देवघेवीप्रमाणेच कलात्मक, भावनात्मक आणि तात्त्विक अनुभवव्यापारांत देवघेव करण्याचे कामही प्रतिभा करते. अनुभवातील आणि बोधनक्रियेतील निरनिराळ्या अवस्थांचे संयोजन प्रतिभेकडून केले जाते. पाध्ये यांनी प्रतिभेचे बद्ध प्रतिभा व मुक्त प्रतिभा असे दोन प्रकार केले आहेत. जीवनतृष्णेशी संबंधित ती बद्ध प्रतिभा तर जीवनतृष्णेपासून मुक्त असणारी ती मुक्त प्रतिभा असा व्यवच्छेद पाध्ये कल्पितात. पाध्ये यांच्या मतानुसार मानवी अनुभव तीन प्रकारचे असतात. एक सौंदर्यानुभव, दुसरा व्यावहारिक व नैतिक स्वरूपाचा अनुभव, तिसरा तात्त्विक/वैचारिक स्वरूपाचा अनुभव. या प्रत्येक अनुभवप्रकारामागे अनुभव घेणाऱ्याची दृष्टीच भिन्न भिन्न स्वरूपाची असते, असे पाध्ये यांचे मत आहे. सौंदर्यानुभव हा नेहमीच्या ''व्यावहारिक अनुभवापेक्षा निराळ्या जातीचा असण्याचे मुख्य कारण असे की, नेहमीचा अनुभव ज्ञानेंद्रिये आणि संकल्पनाबुद्धी यांच्या मध्यस्थीने आलेला अनुभव असतो, तर सौंदर्यानुभवात आत्मा अशा अनुभवाला साक्षात भिडत असल्यामुळे तो साक्षात्कारी (Intuitive) बनतो. सौंदर्यानुभवात केवलास्वादवृत्तीचा प्रभाव असतो. म्हणजे अनुभवात स्वरसरंजनात्मक वृत्तीने अगर केवलास्वादवृत्तीने रमून गेल्यामुळे सौंदर्यानुभव निर्माण होतो... नेहमीचा अनुभव आपल्यात जीवनतृष्णेशी निगडित असलेली इच्छा निर्माण करतो. अनुभवाच्या रसरूपरंगगंधनादी कळांत निरपेक्ष वृत्तीने रंगल्यामुळे सौंदर्यानुभव निर्माण होतो.'' पाध्ये यांनी सौंदर्यानुभवाच्या अनुषंगाने सौंदर्यवृत्ती, सौंदर्यास्वाद, स्वरसरंजनात्मकता, प्रतिभा व तीन मेंदूंचे कार्य, आणि

कलेच्या प्रतीतीमुळे विस्तारणाऱ्या अनुभवकक्षा इत्यादींविषयी विस्तारपूर्वक विवेचन केले आहे. ग्रंथ संपविण्यापूर्वी 'आस्वाद आणि समीक्षा' या महत्त्वाच्या विषयाचा परामर्शही त्यांनी घेतला आहे.

*सृष्टी, सौंदर्य आणि साहित्यमूल्य* या ग्रंथात शरच्चंद्र मुक्तिबोधांनी "ललित वाङ्मयाचे प्राणभूततत्त्व रस नव्हे, लय नव्हे; तर कोणते आहे? मानुषता हेच ते तत्त्व होय" (पृ. १५४) असा सिद्धांत मांडला आहे. "मानुषता हे सामाजिक मानवाचे आंतरिक असणे आहे. बदलत्या सामाजिक मूल्यांचे तेच अधिष्ठान आहे. सामाजिक मूल्यात्म जीवन हा मानवी व्यावहारिक अस्तित्वाचा एक पैलू आहे तर मानुषता हा त्याच मानवी अस्तित्वाचा दुसरा पैलू होय. एक परिवर्तनशील आहे तर दुसरा शाश्वत आहे." (पृ. १४८) "...मानुषता ही एक अनुभूती आहे ती मानवासह सृष्टिजाताशी एकात्मतेने, आंतरिकतेने निगडित असण्याचे मानसिक सत्य आहे. ...सकलात्म मानुषता हेच ललितकृतीचे संघटक तत्त्व होय. ...मानुषता हे तत्त्व मानल्याने ललितकृतीचे व्यवच्छेदक लक्षण वेगळे व श्रेष्ठ कनिष्ठतेचा निकष वेगळा ही आपत्ती येऊ शकत नाही, वाङ्मयीन ललितकृतीचे या दृष्टिकोणाच्या आधारे खऱ्या अर्थाने मूल्यमापन करता येऊ शकते" (पृ. १६०) मुक्तिबोधांनी आपल्या भूमिकेत साहित्यकृतीतील आशयाला व आशयसापेक्ष रूपाला महत्त्व दिले आहे. त्यांच्या मते "जीवनसंवादी न्यायाचा प्रत्यय ज्या ललितकृतीमध्ये येत नाही ती वाङ्मयकृती ही ललितकृतीच्या पदवीला प्राप्त होऊ शकत नाही. कारण जीवनसंवादित्व ही ललितकृतीच्या अस्तित्वाची अपरिहार्य अट आहे. ...ललितकृतीचा अनुभव हा व्यावहारिक अनुभवासारखा नसला तरी तो विवक्षित कोटीतील जीवनानुभवच आहे." (पृ. १७०) मुक्तिबोधांच्या या भूमिकेकडे साहित्यमीमांसकांनी ज्या प्रमाणात लक्ष द्यावयास हवे होते त्या प्रमाणात ते दिले नाही ही वस्तुस्थिती आहे.

याखेरीज सौंदर्यचर्चा करणारे उल्लेखनीय लेखन म्हणजे सुरेंद्र बारलिंगे यांचे सौंदर्याचे व्याकरण व नरहर कुरुंदकर यांचे रूपवेध. स्थलाभावी त्यांचा परामर्श येथे शक्य नाही.

**आणीबाणी**

१९७१ साली इंदिरा गांधी भारताच्या पंतप्रधान होत्या. बांगला देशच्या विजयानंतर त्या रणरागिणी, दुर्गा यांसारख्या बिरुदांनी गौरवल्या गेल्या होत्या. परंतु त्यांच्या लोकप्रियतेला सन १९७३ पासून ओहोटी लागली. प्रचंड महागाई, वाढती बेकारी, नित्याच्या गरजेच्या वस्तूंची टंचाई, नोकऱ्यांचे दुर्भिक्ष्य व भीषण दारिद्र्य या सगळ्यामुळे देशात असंतोष वाढत होता. अनेक ठिकाणी संप, मोर्चे यांच्या माध्यमातून या असंतोषाचे स्फोट घडत होते. काँग्रेस सरकारच्या राज्यकारभाराला अपयश येत चालले होते. देशभर उग्र आंदोलने सुरू झाली. गुजरातमध्ये अपयशी ठरलेल्या काँग्रेस सरकारविरुद्ध निदर्शने करण्यासाठी 'नवनिर्माण समिती' ही संघटना स्थापन झाली. मंत्रिमंडळाच्या बरखास्तीची मागणी करून राज्यव्यापी संप झाला. त्या वेळी पोलिसांनी केलेल्या गोळीबारात त्रेचाळीस व्यक्ती मरण पावल्या. अनेक जखमी झाले व हजारो लोकांना अटक झाली. मुख्यमंत्र्यांचा राजीनामा मागणारे चार मंत्री बडतर्फ झाले व मुख्यमंत्र्यांच्या राजीनाम्यानंतर गुजरातमध्ये राष्ट्रपती राजवट सुरू झाली. मार्चमध्ये बिहार पेटले. तिथल्या सरकारविरुद्ध झालेल्या निदर्शनात बारा मृत्यूमुखी व चोपन्न जखमी अशी नोंद झाली. जयप्रकाश नारायण यांनी एक हजार स्वयंसेवकांसह ८ एप्रिल रोजी पाटणा येथे मूकमोर्चा काढला. १८ मे रोजी रेल्वेचा संप सुरू झाला. वीस हजार लोकांना अटक झाली. त्यानंतर जूनमध्ये जयप्रकाश नारायण यांनी संपूर्ण क्रांतीची घोषणा केली. सैन्याने पोलिसांनी व शासकीय कर्मचाऱ्यांनी बेकायदा हुकुमांचे पालन करू नये असे आवाहन त्यांनी केले. तेव्हा हे राष्ट्रव्यापी आंदोलन चिरडून टाकले पाहिजे असे पंतप्रधान इंदिरा गांधी व त्यांचे काही सहकारी यांना वाटले. आणि त्यांनी आणीबाणी पुकारली. जयप्रकाश नारायण, मोरारजी देसाई, चंद्रशेखर, अटलबिहारी वाजपेयी, मधु लिमये, मधु दंडवते आणि हजारो कार्यकर्ते यांना अटक झाली, वृत्तपत्रांवर सेन्सॉरशिप लादली गेली, मुद्रणस्वातंत्र्य नष्ट झाले. या काळात नोकरशाहीला व पोलिसांना अमर्याद अधिकार प्राप्त झाले. सगळीकडेच भीतीचे व दहशतीचे वातावरण पसरले. एका अर्थाने इंग्रज सरकारने केलेल्या अन्यायाच्या व अत्याचाराच्या आठवणी जाग्या होतील असे हे दिवस आले. १८ जानेवारी १९७७ रोजी इंदिरा गांधींनी लोकसभेच्या निवडणुका जाहीर केल्या आणि राजकीय कैदी मुक्त झाले,

वर्तमानपत्रांवरचे निर्बंध दूर झाले, सभांना परवानगी मिळाली, काँग्रेसविरुद्ध काँग्रेसओ, जनसंघ, भारतीय लोकदल व समाजवादी पक्ष या सर्वांनी एकत्र येऊन जनतापक्षाची स्थापना केली. निवडणुकीचे वारे फार जोराने वाहात होते. 'अंधेरेमे एक प्रकाश जयप्रकाश जयप्रकाश' ही घोषणा सबंध भारतात दुमदुमत होती. आणीबाणीच्याच काळात १९७५ मध्ये कऱ्हाड येथे मराठी साहित्य संमेलन झाले या संमेलनाच्या अध्यक्ष या नात्यानी दुर्गा भागवत यांनी केलेल्या भाषणात त्यांनी आणीबाणीवर व शासनावर निर्भयपणे टीका केली व आणीबाणीला कडवेपणाने विरोध केला आणि त्या पोटी कारावासही पत्करला. निवडणुकीत काँग्रेसचा पराभव झाला. राजनारायण यांनी इंदिरा गांधींचा पराभव केला आणि जनता पक्षाचे सरकार बनले. इंदिरा गांधींवर तुरुंगात जाण्याची पाळी आली. आणीबाणीच्या या पर्वाने काँग्रेस पक्षाची पुण्याई धुऊन निघाली. आणीबाणीतल्या दहशतवादी वातावरणाला भिऊन मराठी साहित्यिक व पत्रकार मूग गिळून गप्प बसले. दिलीप पुरुषोत्तम चित्रे यांची 'बहिऱ्या-मुक्यांची दिंडी' ही कविता किंवा याच स्वरूपाचे अत्यल्प लेखन आणि 'जनांचा प्रवाह चालिला' हे विनय हर्डीकर यांचे पुस्तक सोडले तर या काळात आणीबाणीसंबंधी काहीही लिहिले गेले नाही. हा इतिहास या काळातील मराठी लेखकांच्या भीरुतेचे दर्शन घडविणारा आहे. सत्त्वपरीक्षेचे प्रसंग वारंवार येत नाहीत, जेव्हा येतात तेव्हाच ते कसोटी पाहात असतात. यावरून एक अर्थपूर्ण निरीक्षण नोंदविता येण्याजोगे आहे. मराठीत राजकीय घडामोडींना प्रतिसाद देणारे किंवा यासंबंधी अनुकूल प्रतिकूल प्रतिक्रिया व्यक्त करणारे लेखन फारसे झालेले नाही. अगदी स्वातंत्र्यप्राप्तीचा संग्राम असो, संयुक्त महाराष्ट्राची चळवळ असो, चीन, पाकिस्तान यांच्याशी झालेली युद्धे असोत काही कविता एवढीच साहित्यनिर्मिती मराठीत घडलेली आहे. मराठीतील कादंबरीवाङ्मय समृद्ध आहे हे खरे परंतु *साता उत्तरांची कहाणी* , *ताम्रपट* व *होमकुंड* या कादंबऱ्यांचा अपवाद वगळल्यास मराठीत खऱ्या अर्थाने राजकीय कादंबरी नाही. एरवी निर्भयपणावर हक्क सांगणारा बुद्धिवादी मराठी समाज जुजबी प्रतिक्रियांपलीकडे गंभीर विश्लेषणात्मक व उद्‌बोधक अशी राजकीय विषयाला वाहिलेली ललित स्वरूपाची निर्मिती का करीत नाही हा संशोधनाचाच विषय म्हणावा लागेल.

**देशीवाद**

मराठी साहित्यविश्वात भालचंद्र नेमाडे यांच्या देशीवाद या संकल्पनेने बरीच मोठी खळबळ माजविली. 'टीकास्वयंवर' या समीक्षाग्रंथातील 'साहित्यातील देशीयता' या निबंधामुळे मुख्यत्वे देशीवादाची चर्चा सुरू झाली. देशीवादाविषयीचे नेमाडे यांचे प्रतिपादन थोडक्यात असे आहे, ''कोणत्याही साहित्यातून देशी जाणिवा स्वाभाविकत:च व्यक्त व्हाव्या अशी अपेक्षा असते तथापि युरोपी हिकमती लोकांच्या दीर्घकालीन दास्यत्वामुळे विसाव्या शतकाच्या मध्यावर जगातल्या विविध प्रदेशांमधील वसाहतींमध्ये एक खास वसाहतवादी आंतरराष्ट्रीयता निर्माण झाली'' ''...हे विशाल आंतरराष्ट्रीयत्व जोपासण्यासाठी मुलांना मराठी आले नाही तरी चालेल, पण इंग्लिश माध्यमातून शिकविले पाहिजे हेही आपोआपच घडते. नंतर आपल्या विद्वानांनी ज्ञानदेव तुकाराम नाही वाचले तरी विशेष बिघडत नाही पण फालतू इंग्लिश-अमेरिकन लेखक सखोल अभ्यासले पाहिजेत... कारण त्याशिवाय तुम्ही आंतरराष्ट्रीय विशाल जाणिवा कशा जोपासणार'' (नेमाडे, भालचंद्र, १९९० पृ. ७८) प्रत्येक मानवी समूहाची आपली स्वत:ची संस्कृती असते, पृथ्वीवरचा प्रत्येक समाज युरोपी असण्याची शक्यता अर्थातच नाही... माणसाला किंवा साहित्याला आपापल्या भूमीवरच आपापल्या भाषिक समूहातच डौलाने उभे राहाता येते त्याला परदेशी किंवा आंतरराष्ट्रीय आयाम असण्याची खरोखरच गरज नसते. कोणत्याही ग्रंथांचे वाङ्मयीन चळवळींचे साहित्यिकांचे मोल आंतरराष्ट्रीय मूल्यांनी ठरत नसून आपापल्या समाजाच्या आध्यात्मिक उन्नतीपासून भाषिक प्रयोगक्षमतेपर्यंत किती भूमिका ते पार पाडतात ह्यावर त्यांचे मोल ठरत असते. कोणताही थोर साहित्यिक आपापल्या काळापुरता स्वत:च्या समूहाकरता प्राय: लिहितो. आंतरराष्ट्रीय कीर्तीच्या घटना, घडल्याच तर योगायोगाच्या, दुय्यम महत्त्वाच्या असतात. जागतिक ठरलेले दांती-शेक्सपिअर वगैरेसुद्धा मुळात अत्यंत देशी लेखक होते आणि ते जागतिक ठरण्यामागे त्यांच्या समाजाची बलाढ्य साम्राज्ये कारणीभूत आहेत. एरवी कोणत्याही थोर लेखकात निद्रिस्त जागतिक होण्याचे सामर्थ्य असतेच. ...देशी याचा अर्थ त्या त्या भूमीशी जोडलेले असणे असा प्राय: होतो. ...देशी नसलेल्या परक्या, बाहेरून येणाऱ्या अनेक मूल्यांचे, भाषांचे, संस्कृतींचे देशी मूल्यांवर, भाषांवर व संस्कृतींवर जेव्हा आक्रमण होते, तेव्हा स्वत:च्या अस्तित्वासाठी मानवी समूहांना देशीवादी व्हावे लागते. वस्तुत: देशीपणा ही अत्यंत स्वयंभू झाडाझुडुपांसारखी सोशीकपणे आपापल्या

जागेवर उगवणारी व टिकून राहाणारी संकल्पना आहे. परंतु तिलाही आक्रमक व्हावे लागते असे सांस्कृतिक कसोटीचे क्षण येतात त्या वेळी अत्यंत नम्रतेने बोलणाऱ्या ज्ञानेश्वरालासुद्धा ''दाऊ वेल्हाळ देशी नवी'' असे आक्रमक व्हावे लागते. ...देशीवाद या संकल्पनेत त्याच गुणांची लढाऊ वृत्ती, आपल्या अस्तित्वाचा हक्क प्रस्थापित करण्याची आग्रही वृत्ती प्रकट होते. ...साहित्यकृतीच्या वैश्विकतेबद्दल नेहमीच बोलले जाते. ...वैश्विकता ही देशीपणाच्या विरोधी संकल्पना नाही. वैश्विकता म्हणजे भिन्नभिन्न ठिकाणच्या देशी शैलींचा भिन्नभिन्न स्थितींमध्ये आस्वाद घेणे होय. वेगवेगळ्या प्रदेशांमधील कृतींमध्ये एकरूपता नसते. अशी एकरूपता त्यांच्यावर लादणे म्हणजे वैश्विकता नव्हे. ...एखादी साहित्यकृती मुळात देशी असते परंतु ती वैश्विक होऊ शकते... देशी असणे ही कुठल्याही साहित्यकृतीची प्राथमिक गरज आहे....साहित्याच्या परंपरेत देशीकरणाची प्रक्रिया अव्याहत चालू असते. प्रत्येक नव्या साहित्यिकाला आपली मुळे या परिसराभिमुख परंपरेत खोलवर रोवलेली असल्याचे आपोआप जाणवते....युरोपी व अमेरिकन साहित्यातील थोर ग्रंथ हे खऱ्या अर्थाने देशीच आहेत त्यांना जगभर वाचकवर्ग मिळतो ही घटना एका देशी संस्कृतीला इतर देशी संस्कृतींनी दिलेली दाद होय. ...देशी संदर्भ नसलेले पण मुळातच ''आंतरराष्ट्रीय साहित्य'' असे काही स्वतंत्रपणे अस्तित्वात नसते. ...वैश्विक अशा वाङ्मयीन व्यवस्था नसतात ...देशीयताही बहुकेंद्री, वर्णनपर आणि प्रत्यक्ष अशी संकल्पना आहे, तर आंतरराष्ट्रीयता ही कृत्रिम आणि परजीवी संकल्पना आहे. ...देशीयतेचा परिसर किती लहान किंवा किती विशाल असला म्हणजे देशीभान पुरेसे होईल? ...परिसराचा हा प्रश्न त्या त्या लेखकाच्या रोजच्या जगण्यातल्या संवेदनशीलतेच्या आलेखावर ठरेल. ...देशीयतेचे तत्त्व असे सांगते की, आपण निर्माण केलेली प्रमाणके सोडून इतरांच्या प्रमाणकांचा स्वीकार करता कामा नये... जगातल्या सर्वात प्राचीन जिवंत मानवी संस्कृतीचे सभासद ह्या नात्याने तरी देशीयता हे मानवी अस्तित्वासाठी एक आवश्यक आणि मौलिक तत्त्व म्हणून ह्या पृथ्वीवर प्रस्थापित करायला हिंदुस्थानी लोक सर्वाधिक पात्र आहेत, असे मला वाटते.'' (पृ. ७८-९२)

नेमाडे यांच्या देशीवादाविषयीच्या भूमिकेवर हरिश्चंद्र थोरात व रा. भा. पाटणकर यांनी आक्षेप घेतले आहेत. थोरात लिहितात – ''एखादी साहित्यकृती देशी आहे म्हणून ती बरी, चांगली किंवा श्रेष्ठ आहे असा निष्कर्ष काढता येणार नाही. एखादी साहित्यकृती देशी आहे म्हणून ती साहित्यकृती आहे असेही म्हणता येणार नाही. ...देशीपणाच्या संकल्पनेबद्दल नेमाडे यांनी केलेले विवेचन लक्षात घेतले तर साहित्यकृतीच्या समीक्षकाला साहित्याशी निष्ठा आणि देशीपणाशी निष्ठा, अशा दोन भिन्न गोष्टी गृहीत धराव्या लागतील. देशीवाद मूल्ययुक्त नसेल, तर हा तरी खटाटोप कशासाठी करायचा.'' (थोरात, २००५, पृ. १७६) थोरातांनी पुढे असेही लिहिले आहे की, ''साहित्यविषयक आणि संस्कृतीविषयक महत्त्वाचा सिद्धांत म्हणून देशीवादाला खऱ्याअर्थाने जन्माला यायचे असेल आणि अर्थपूर्ण रीतीने टिकून राहायचे असेल तर सध्या उपलब्ध असलेल्या सैद्धांतिक सामग्रीचे जास्तीत जास्त उपयोजन होणे आवश्यक आहे, आणि हे उपयोजन बौद्धिक कसोट्यांवर उतरणारे असणेही आवश्यक आहे. अर्थातच हे देशीवादी म्हणविणाऱ्या समीक्षकांनी करायला हवे. असे काही होते आहे असे आजमितीला तरी दिसत नाही.'' (थोरात, तत्रैव, पृ. १९१-१९२) रा. भा. पाटणकर यांना ''पहिल्या वाचनात नेमाडे यांची भूमिका पटण्यासारखी व परिणामकारक वाटते पण दुसऱ्या वाचनानंतर काही शंका येऊ लागतात. त्यांच्या भूमिकेतील काही घटक परस्परांना छेद देत आहेत असेही वाटू लागते'' ''...देश' या कल्पनेची व्याप्ती फारच मोघम ठेवली आहे... एका ठराविक प्रदेशातील समूहाच्या जाणिवा जगभरच्या एकूण मानवी समाजाचे नेतृत्व कसे करू शकतील एक वर्गीय साहित्यकृतींना समान निकष लावल्याखेरीज हे अशक्य आहे'' (पाटणकर, १९९९, पृ. २६२-२६३) यासारख्या अनेक शंका पाटणकर यांनी उपस्थित केल्या आहेत.

विलास सारंग, दिलीप पुरुषोत्तम चित्रे यांसारख्या मराठी आणि इंग्लिश अशा दोन्ही भाषांत लिहिणाऱ्या लेखकांनीदेखील देशीवादाची संकल्पना स्वीकारलेली नाही. असे असले तरी जागतिकीकरणाच्या आक्रमणानंतर देशीवादाविषयी गंभीरपणे विचार करावयास हवा असे भाषेची व साहित्याची विशेष काळजी करणाऱ्यांच्या मनात आलेले आहे. देशीवाद हे जागतिकीकरणाला एक उत्तर आहे असे मानले जाते. साहित्यविषयक कुठल्याही प्रश्नांबाबत एकास एक असे उत्तर नसते. विशेषत: जागतिकीकरणासारख्या अनेक क्षेत्रांना व्यापणाऱ्या विक्राळ आक्रमणापासून केवळ देशीवाद साहित्याचे, भाषेचे रक्षण करू शकेल ही भूमिका स्वीकारणे अवघड आहे. अर्थात कोणत्याही भूमिकेची

चिकित्सा करताना त्या भूमिकेचे प्राणतत्त्व कोणते, त्या प्राणतत्त्वाचे साहित्यनिर्मितीच्या व साहित्याच्या आकल-मूल्यमापनाच्या संदर्भात कार्य कोणते ते लक्षात घ्यावयास हवे आणि सर्वात महत्त्वाचे म्हणजे देशीवाद हा सिद्धांत म्हणून टिकावयाचा असेल तर समीक्षाव्यापारात त्याचे उपयोजन करणे आवश्यक आहे. तसे होताना मात्र दिसत नाही.

**स्त्रीवाद आणि स्त्रियांचे साहित्य**

जगाची निम्मी लोकसंख्या असलेल्या स्त्रियांना उरलेल्या निम्म्या पुरुष लोकसंख्येने आपल्या सत्तेच्या जोरावर सातत्याने दडपत राहाणे या परिस्थितीविषयीचा अनेक शतके धुमसत असलेला असंतोष स्त्रीवादी चळवळीशी निगडित आहे. वेगवेगळ्या नात्यांनी पुरुषांशी बांधल्या गेलेल्या स्त्रियांची पुरुषसत्तेच्या वर्चस्वापासून सोडवणूक करणे, त्याचे दमन थांबविणे आणि त्यांना त्यांच्या मनासारखे जगतावागता येण्याजोगी परिस्थिती उत्पन्न करणे हे स्त्रीमुक्ती चळवळीचे ध्येय आहे. या चळवळीमागे एक महत्त्वाचे सर्वमान्य गृहीतक आहे. ते म्हणजे आजवर स्त्रियांना गौण लेखून त्यांची सातत्याने अवहेलना होत राहिली, त्यांचे शोषण होत आले; या गौणत्वापासून, अवहेलनेपासून, शोषणापासून जेणेकरून मुक्ती मिळेल अशी काही विचारधारा व तदनुषंगिक राजकारण विकसित करायला हवे. स्त्रियांच्या वाट्याला दुय्यमपण-गौणत्व का आणि कसे आले या व्यापक प्रश्नाचा शोध घेऊन ज्या सामाजिक व सांस्कृतिक प्रक्रियांद्वारे हे दुय्यमपण चालू राहिले त्याचे विश्लेषण करण्याचे काम स्त्रीवादी सामाजिक सिद्धान्त करतात. या दृष्टीने स्त्रीवाद्यांनी कळीचे तीन प्रश्न विचारले. एक, पुरुषी वर्चस्व कशामुळे चालू राहिले? दोन, स्त्री व पुरुष यांमधील लिंगभावभेद कशा प्रकारे केले जातात? आणि तीन, वर्ग, जात वा लैंगिकता या भेदांच्या अनुषंगाने स्त्रियांच्या अनुभवांत जे वैविध्य उत्पन्न होते त्याचा अर्थबोध कसा काय करून घ्यायचा? वर्चस्व, वैधर्म्य व वैविध्य यांचे एकमेकांत गुंतलेले हे प्रश्न स्त्रीवादाचे आस्थाविषय आहेत.

स्त्रीवादी चळवळीचा इतिहास पाश्चिमात्य देशांत इ. स. १७९२ पर्यंत मागे जातो. मेरी वोल्स्टनक्राफ्ट या लेखिकेने *A Vindication of the Rights of Woman* हा ग्रंथ त्या वर्षी लिहिला, स्त्रियांनी आपल्या हक्कांसाठी लढायला हवे असे आवाहन केले, आणि पुरुषप्रधान समाजव्यवस्थेने स्त्रियांनी काय करावे व काय करू नये हे ठरविण्याऐवजी स्वतः स्त्रियांनी आपण कोण आहोत व आपण काय करावे याचा निर्णय घ्यावा अशी भूमिका मांडली. स्त्रिया पुरुषांहून गौण/दुय्यम हे पुरुषसत्ताक गृहीतक स्त्रियांनी नाकारावे, अशा सर्वसामान्य स्वरूपाचा हा विचार होता. जॉन स्टुअर्ट मिल याच्या *Subjection of Women* (१८६९) आणि फ्रेडरिक एंजल्स याच्या *The Origin of the family* (१८८४) या ग्रंथांचाही स्त्रीवादी विचाराच्या जडणघडणीस अल्प का होईना हातभार लागला. इ. स. १९२९ मध्ये व्हर्जिनिया वुल्फने *A Room of One's Own* लिहून आजच्या स्त्रीवादाचा पाया घातला. पुरुषांनी स्त्रियांना कनिष्ठ/निम्नस्तरीय ठरवले आणि स्त्रियांशी तसेच वागणे चालू ठेवले याची तीव्र जाणीव तिने करून दिली. स्त्री असणे म्हणजे काय हे पुरुषच ठरवतात, शिवाय एकंदर राजकीय, आर्थिक, सामाजिक व वाङ्मयीन क्षेत्रांचे नियंत्रणही ते करतात, याची जाणीव वुल्फने करून दिली. आपले कार्यक्षेत्र ठरवण्याचा, आपला व्यवसाय निवडण्याचा व त्यासाठी आवश्यक ते शिक्षण घेण्याचा अधिकार स्त्रीला नसल्यामुळे तिच्या ठायी असणाऱ्या अंगभूत गुणांचा विकासच होत नाही, परिणामतः अंगी गुण असले तरी स्वतःचे असे स्थान नसल्यामुळे स्त्रीच्या वाट्याला अनाम जगणे व मरणे येते, असे प्रतिपादन व्हर्जिनिया वुल्फने केले. सिमॉन द बॉव्हने इ. स. १९४९ मध्ये लिहिलेल्या *The Second Sex* या ग्रंथापासून स्त्रीवादी विचारांनी विशेष उभारी धरली. फ्रेंच समाज व एकंदर पाश्चात्त्य समाज हा पितृसत्ताक आहे, या समाजात 'स्त्री' ही स्त्री असल्यामुळे व ती 'पुरुष' नसल्यामुळे तिला 'दुसरी' - 'द अदर' व्हावे लागते. जिचे अस्तित्व व ज्याचा अन्वयार्थ पुरुष लावतात अशी ती 'वस्तू' बनते. त्यामुळेच पुरुषसत्ताक समाजाचे सारे बंध तोडून टाकून पुरुषाने तिला दिलेले दुय्यम स्थान स्त्रीने उधळून लावावयास हवे; पुरुष सर्वसत्ताधीश आहेत आणि ते सांस्कृतिक परिभाषा व भूमिका ठरवितात, ही घातकी रीत नाकारण्यावाचून स्त्रियांना गत्यंतर नाही, असा क्रांतिकारक विचार सिमॉन द बॉव्हने ठासून मांडला.

अमेरिकेतील स्त्रीमुक्तीची चळवळ १९६० च्या अखेरीस सुरू झाली. नागरी हक्क आणि युद्धविरोधी चळवळी यांच्या उदयाचा तो काळ होता. वेगवेगळ्या देशभर पसरलेल्या वेगवेगळ्या लहान लहान गटांखेरीज राष्ट्रीय पातळीवर कार्य करणारा हा NOW हा एक स्वायत्त गट या वेळी उभा राहिला. शिक्षणक्षेत्रातील अनेक स्त्रिया व लेखिका या चळवळीत सुरुवातीला क्रियाशील होत्या. १९६९ मध्ये केट मिलेटचे *सेक्स्चुअल पॉलिटिक्स* हे पुस्तक प्रसिद्ध झाले आणि स्त्रीवादी चळवळीला जोमदार आवाज लाभला. अर्थव्यवस्था साम्यवादी असो नाहीतर भांडवलशाही असो, स्त्रियांचे शोषण होतच राहाते हे तिने ठासून सांगितले. पितृसत्ताक समाजव्यवस्था हे स्त्रीच्या शोषणाचे मूलकारण असून या समाजव्यवस्थेत स्त्रीबद्दलचे विशिष्ट पूर्वग्रह अबाधित असतात, ही बोचक जाणीव केट मिलेटने करून दिली. अमेरिका, इंग्लंड व फ्रान्स या तीन देशांत तेथील प्रश्नांना व परिस्थितीला अनुसरून स्त्रीवादाच्या तीन स्वतंत्र विचारधारा निर्माण झाल्या. मार्क्सवादी स्त्रीवाद इंग्लंडमध्ये वाढीस लागला, मनोविश्लेषणवादी स्त्रीवाद फ्रान्समध्ये फोफावला, आणि उदारमतवादी स्त्रीवाद व त्याला विरोधी अशा ब्लॅक फेमिनिझम, लेस्बियन फेमिनिझम यांसारख्या चळवळींनी अमेरिकेत मूळ धरले.

स्त्रिया म्हणजे काही अपूर्ण वा निम्नस्तरीय पुरुष नव्हेत, तर त्यांना स्वतःचे स्वतंत्र अस्तित्व आहे; स्वतःचे व्यक्तित्व आहे. स्त्री म्हणजे काही गृहदेवता, पतिव्रता, आज्ञाधारक पत्नी, सुमाता किंवा मोलकरीण, वेश्या वा निर्बुद्ध जीव, असे कोणतेतरी एखादे लेबल नाही वा एखादा साचेबंद नमुना नाही. किंवा स्त्रीवर लादलेल्या भूमिका म्हणजेही काही स्त्री नाही. विकृत दृष्टी सूचित करणाऱ्या या पदावल्या पुरुषसत्ताक समाजव्यवस्थेने स्त्रीवर लादल्या असल्या तरी या भूमिका म्हणजे स्त्री नव्हे. (अशा वेगवेगळ्या नमुन्यांच्या स्पष्टीकरणासाठी पाहा : खोले, विलास, १९९२, पृ. ३४–३५).

महाराष्ट्रातील स्त्रियांची स्थिती व ती सुधारण्याचे झालेले प्रयत्न यांचा इतिहास पश्चिमेकडील देशांपेक्षा वेगळा आहे. ईस्ट इंडिया कंपनीने तेव्हा जे शिक्षणविषयक धोरण अवलंबले त्यात स्त्रीशिक्षणास वाव नव्हता. एल्फिन्स्टनच्या इतिवृत्तात स्त्रीशिक्षणाविषयी कोणतीही शिफारस नाही. भारतातील स्त्रीशिक्षणाला पहिल्यांदा चालना मिळाली ती ११ एप्रिल १८५० रोजी लॉर्ड डलहौसीने काढलेल्या आदेशामुळे. या आदेशातील महत्त्वाचा भाग पुढीलप्रमाणे आहे–

“The Governer General in Council requests that the Council of Education may be informed that it is henceforward to consider its functions as rising the superintendence of native to female education, and that wherever any disposition is shown by the natives to establish female schools it will be its duty to give them all possible encouragement and further their plans in every way that is not inconsistent with the efficiency of the institutions already under management. It is the wish also of the Governer- General in Council that intimation to the same effect should be given to the Chief Civil Officers of the Mofussil calling their attention to the growing disposition among the natives to establish female schools, and dirlarting them to use all means at their disposal for encouraging those institutions and for making it generally known that the Government views them with very great approbation.” (नुरुला–नाईक, १९७०, reprint of fifth edition पृ.९५)

यानंतर निघालेल्या आणि ‘भारतीय शिक्षणाचा मॅग्नाचार्टा’ म्हणून ओळखला जाणाऱ्या १९५४ च्या वुडच्या खलित्यातही स्त्रियांच्या शिक्षणाची शिफारस आहे.

खलित्यातील शब्दप्रयोग पुढीलप्रमाणे आहेत–

The importance of female education in India cannot be overrated, and we have observed with pleasure the evidence which is not afforded if an increased desire on the part of many

of the natives of India to give a good education to their daughters. By this means a far greater proportional impulse is imparted to the educational and moral tone of the people than by the education of men. We have already observed that schools for females are included among those to which grants-in-aid may be given; and we cannot refrain from expressing our cordial sympathy with the efforts which are being made in this direction. Our Governer General in Council has declared, in a communication to the Government of Bengal, that the Government aught to give to the native female education in India its frank and cordial support. (तत्रैव, पृ.१२३)

हंटर कमिशनपुढे साक्ष देताना जोतीराव फुले यांनी १९ ऑक्टोबर १८८२ रोजी "I beg to request the education commission to be kind enough to sanction measures for the spread of female primary education on a more liberal scale" अशी विनंती केली होती हे सुप्रसिद्ध आहे. स्त्रीशिक्षणाचा प्रसार व्हावा याकडे इंग्रज शासन तितकेसे लक्ष पुरवीत नव्हते याची ही साक्ष म्हणता येईल. इंग्रजांची स्त्रीशिक्षणाविषयीची आंरभकालीन उदासीनता आणि नंतरचा इंग्रजी भाषा व साहित्य यांविषयीचा शिक्षणातील भरघोस समावेश यांचा परिणाम स्त्रियांवर झाला असणार असा तर्क करायला भरपूर वाव आहे.

१८८२ साली ताराबाई शिंदे यांनी *स्त्रीपुरुषतुलना* हा विस्तृत निबंध लिहून स्त्रीवादी विचारांचा (आणि स्त्रीवादी साहित्यसमीक्षेचा) आरंभ केला होता. त्यांनी जे प्रश्न उत्पन्न केले होते ते साहित्यासंबंधी मूलगामी विचारणा करणारे होते. दुर्दैवाने १९७५ पर्यंत या महत्त्वपूर्ण लेखनाकडे कसे कोणास ठाऊक पण सर्वांचेच दुर्लक्ष झाले. तत्कालीन महाराष्ट्र स्त्रीशिक्षणासाठी वसाहतवादी इंग्रज सरकारच्या मेहरबानीवर अवलंबून राहिला. स्त्री-पुरुष समानतेसाठीही इंग्रज सरकारच्या मेहरबानीवर अवलंबून राहिला. वस्तुस्थिती अशी आहे की, स्त्री-पुरुष समानतेसाठी इंग्रज समाज काही फारसा प्रसिद्ध नव्हता.

खुद्द इंग्लंडात स्त्रियांची स्थिती पुरुषांबरोबरीची मुळीच नव्हती. तेथे स्त्रियांचे पहिले महाविद्यालय इ. स. १८६९ त निघाले. इ. स. १९२२ पर्यंत स्त्रियांना वकिली करण्याची मुभा तेथे नव्हती. महाराष्ट्रापुरते बोलायचे तर स्त्रियांच्या शिक्षणासाठी व स्त्रीपुरुषसमानतेसाठी जोतीराव फुले यांनी आपले आयुष्य वेचले याचा उल्लेख फुले यांच्या कार्याचा परिचय करून घेताना आला आहे. आगरकरांनीही स्त्रीशिक्षणाचा आग्रह धरला होता हे सुपरिचित आहे. संमतिवयाचा कायदा १९ मार्च १८९१ रोजी झाला.

१४ नोव्हेंबर १८६५ रोजी मुंबईत 'पुनर्विवाहोत्तेजक मंडळी'ची स्थापना झाली. २३ नोव्हेंबर १८६५ रोजी मुंबईत वांद्रे येथे महाराष्ट्रातील पहिला पुनर्विवाह झाला. हळूहळू सुधारक विचारांच्या व्यक्तींचे अल्प प्रमाणात का होईना पुनर्विवाह होऊ लागले. १४ डिसेंबर १८७४ रोजी झालेला विष्णुशास्त्री पंडितांचा पुनर्विवाह, ७ जानेवारी १८७८ रोजी झालेला सदाशिवराव पांडुरंग केळकरांचा पुनर्विवाह, ११ मे १८९१ रोजी डॉ. रा. गो. भांडारकर यांची विधवा कन्या शांताबाई आणि रा. सा. गोपाळ व्यंकटेश पाणंदीकर यांचा झालेला पुनर्विवाह, ११ मार्च १८९३ रोजी झालेला धोंडो केशव कर्वे यांचा पुनर्विवाह आणि प्रा. गोविंद चिमणाजी भाटे यांचे अनुक्रमे ३ जून १८९९ रोजी आणि इ. स. १९१३ मध्ये झालेले पुनर्विवाह 'बोले तैसा चाल' या वृत्तीचे निदर्शक ठरले. स्त्रियांसाठी कर्वे यांनी हिंगणे येथे ऑक्टोबर १८९८ मध्ये 'अनाथ बालिकाश्रमा'ची स्थापना केली. कर्वे यांच्या द्वितीय पत्नी बाया कर्वे यांनी आश्रमाच्या कार्यास वाहून घेतले. कर्वे यांचे सर्वात मोठे कार्य म्हणजे स्त्रियांना उच्च शिक्षणाची संधी उपलब्ध करून देण्याच्या हेतूने इ. स. १९१६ मध्ये 'भारतवर्षीय महिला विद्यापीठ' स्थापन केले.

स्त्रियांच्या प्रश्नांना वाचा फोडणारे साहित्य मराठीत मिसेस फरार यांच्या *स्त्रीधर्मनीती* या पुस्तकापासूनच निर्माण होऊ लागले होते. जोतीराव फुले, ताराबाई शिंदे, पंडिता रमाबाई यांच्या लेखनातून स्त्रीप्रश्नांची चर्चा होत होती. ह.

झाल्या त्यांच्या कल्पित कथा वाचून व त्यांच्याशी तेवढ्यापुरते तादात्म्य पावून काही-एका नीनच आनंदाचा उपभोग तो घेत राहतो. ज्याला स्वत:ला देशोद्धार साधला नाही तो शिवाजीसारख्या स्वराज्यसंस्थापकासंबंधीची एखादी कल्पित कथा वाचून आपल्या अपयशाचे क्लेश विसरतो. ज्याला स्वत:ला देशोद्धार साधला नाही तो शिवाजीसारख्या स्वराज्यसंस्थापकासंबंधीची एखादी कल्पित कथा वाचून आपल्या अपयशाचे क्लेश विसरतो. ज्याला स्वत:ला नामांकित क्रीडापटू होता आले नाही तो रणजितसिंगाच्या पटुत्वाची नवलकथा वाचतो. ज्याला प्रणयाचा उन्मादक अनुभव घेता आला नाही तो आपल्या प्रणयाच्या व पराक्रमाच्या प्रभावाने रतीसारखी सुंदर स्त्री प्राप्त करून घेणाऱ्या नायकाचा वृत्तान्त वाचण्यात तन्मय होतो. सारांश, त्या वेळेपुरता एक लटका संसार करण्यासाठी आपण ललितवाङ्मय वाचतो.'' (फडके, ना. सी., १९७०, पृ. १४-१५) स्त्री, स्त्रीदेह व स्त्रीदेहाच्या सौंदर्याविषयी पुरुषाच्या मनात असणारे आकर्षण या मूलभूत सत्याला रेखीव, सुनियोजित, परिणामकारक रूप देऊन वेगवेगळ्या स्थलकालावकाशाचा, परिसराचा केवळ पार्श्वभूमीदाखल वापर करून त्यांनी एकंदर ८६ कादंबऱ्या लिहिल्या. 'मी माझ्या कादंबऱ्या कशा लिहितो?' असा एक लेखही फडके यांनी लिहिला होता. आणि स्वत:च्या लेखनाचे तंत्र त्यांनी समर्थनाच्या भाषेत समजावून सांगितले होते. जीवनात त्यांनी एकच कादंबरी ८६ वेळा लिहिली अशा प्रकारे त्यांचा उपहास करण्याची रीत मराठी कादंबरीसमीक्षेत पडली असली तरी त्यांच्या कादंबरी लेखनाने मराठी कादंबरीच्या क्षेत्रात तंत्र व मंत्र यांच्या जोरावर लोकप्रिय कादंबरी कशी लिहिता येते याचा वस्तुपाठ सादर केला हे विसरता येत नाही. त्यांचे अनेक लहानमोठे वारसदार लेखक स्त्रीपुरुष अशा दोन्ही वर्गांत उत्पन्न झाले. अर्थात यांपैकी प्रत्येकाने स्वत:च्या कल्पकतेने कादंबऱ्या अधिक आकर्षक कशा होतील याकडे लक्ष पुरवले. चंद्रकांत काकोडकर, व. पु. काळे, ज्योत्स्ना देवधर, कुसुम अभ्यंकर, सुमती क्षेत्रमाडे अशी बरीच नावे लोकप्रिय साहित्यनिर्मिती करणाऱ्यांच्या लेखकवर्गात आपल्याला घालता येतील.

लोकप्रिय साहित्य हे जगात सर्वत्र उत्पन्न होते. उत्पन्न होत आलेले आहे. प्रेमावर लिहिणे हा अत्यंत किफायतशीर धंदा आहे. प्रेमात अडथळे येतात आणि जीवनात संकटे येतात. लोकप्रिय लेखन अडथळ्यांवर मात करणारे, संकटांची तमा न बाळगता आपले ईप्सित यशस्वीपणे साध्य करणारे नायक-नायिका रंगवते. याप्रकारच्या लेखनाचा उल्लेख नेहमी पलायनवादी साहित्य अशा शब्दांत केला जातो हे खरे तथापि ते केवळ पलायनवादीच असते अशा नकारात्मक दृष्टीने त्याकडे पाहिले नाही तर त्याला काही सकारात्मक बाजू आहे असे ध्यानात येते. हे साहित्य खचलेल्या मनाला नवी उमेद देणारे साहित्य आहे, व्यक्तीचा स्वत:च्या क्षमतेवरील विश्वास वाढविणारे साहित्य आहे, आत्मविश्वास उत्पन्न करणारे साहित्य आहे, जीवन हे आनंददायी आहे आणि त्या आनंदासाठी आपण जगले पाहिजे अशी इच्छा पराभूत मनातही उत्पन्न करणारे साहित्य आहे. आशेने निराशेवर केलेली मात, जीवनाने मृत्यूवर केलेली मात असे चित्रण करणारे हे साहित्य वाचकांच्या मनात जीवनाविषयीचे प्रेम वाढवते. या लेखनातील नायकाच तेवढे कर्तृत्ववान असतात असे नाही तर यातील नायिकाही सुपरमॅनप्रमाणे सुपरवूमनचे काही गुण अंगी असणाऱ्या असतात. ही परंपराही मराठीत जुनीच आहे. वरेरकरांच्या *विधवाकुमारी* तील यमुना, *धावता धोटा* मधील बिजली, नाथमाधवांच्या *डॉक्टर कादंबरी*तील डॉक्टर, *लक्ष्मीबाई भ्रतार वासुदेव* मधील लक्ष्मी या स्त्रियांच्या ठिकाणी तडफदारपणा, निर्भयता, व्यवहारचातुर्य, प्रेमळपणा, समजुतदारपणा अशा वेगवेगळ्या गुणांचा आढळ होतो. त्यांच्या या गुणांमुळेच संसारातील संकटे दूर होतात, प्रश्न सुटतात, स्त्रीपुरुषांतील विसंवाद संपुष्टात येतो, जीवनाचा खाचखळग्यांनी भरलेला रस्ता भराभर पार केला जातो आणि पुढील वाटचाल सुखकर होते. हे लेखन जीवनास्तव दृष्टीआड करते आणि रमणीय आकृती धारण करणारे कल्पित साकार करते हे खरे. परंतु आकलनाच्या दृष्टीने सुलभ, परिणामच्या दृष्टीने सुखर आणि जीवनातील गुंतागुंतीचा उलगडा करण्याच्या बाबतीत तत्पर असे त्याचे स्वरूप असते. हेच लोकप्रिय साहित्याचे अंगभूत सामर्थ्य आहे आणि यातच त्याची अभिजात किंवा गंभीर साहित्याच्या तुलनेने मर्यादा साठवलेली आहे. नवनव्या शास्त्रीय शोधांच्या अनुषंगाने निर्माण होणारे वैज्ञानिक कथात्म साहित्य वा फँटसीज असतात, रहस्यकथा व साहसकथा असतात. या वर्गवारीत आणखीही भर घालता येईल. परंतु ते महत्त्वाचे नसून जीवनानुभवांचा वेगवेगळ्या

ना. आपटे, वा. म. जोशी, श्री. व्यं. केतकर,भा. वि. वरेरकर या कादंबरीकारांच्या कादंबऱ्यांतून, विभावरी शिरूरकर, कृष्णाबाई मोटे, गीता साने इत्यादिकांच्या साहित्यातून स्त्रियांना केंद्रस्थान लाभले होते. र. धों. कर्वे, शकुंतला परांजपे यांनी संततिनियमनाच्या संदर्भात केलेले कार्यही स्त्रियांच्या शारीरिक-मानसिक स्थितीचा गंभीरपणे विचार करणारे व तिला अग्रक्रम देणारे होते.

पाश्चात्त्यांच्या प्रभावाने स्त्रीपुरुष समानतेची चळवळ जरी १९७०-७५ मध्ये जगभरात व भारतात सुरू झाली असली तरी तत्पूर्वी अनेक वर्षे येथे सर्वच थोर पुरुषांनी स्त्रियांच्या बहुविध प्रश्नांत लक्ष घातले होते.

उदारमतवादी स्त्रीवादाचा आविष्कार गौरी देशपांडे यांच्या कादंबऱ्यांतून प्रकटला आहे. स्त्रीसाठी त्यांनी स्वतःची अशी जागा-'स्पेस' उत्पन्न केली आहे. स्त्रीने कोणाच्यातरी आश्रयावर, मेहरबानीवर धडपडत जगणे त्यांनी निकालात काढले आहे. त्यासाठी स्वतःची ही जागा त्यांनी मूलतः स्त्रीच्या मनात उत्पन्न केली आहे. तिचे परावलंबी विचार, तिची रूढ मानसिकता दूर सारून स्त्रीला सन्मानपूर्वक जगता येईल अशी समाजरचना आणि सामाजिक - वैयक्तिक दृष्टी जोपासणे ही खरी निकड आहे याचे भान गौरी देशपांडे यांच्या कादंबऱ्या देतात. परिवर्तनवादी मूल्ये त्यांतून व्यक्त होतात. स्त्रीला त्यांनी मुक्त केले - नावाच्या चौकटीतून, रूढ नातेसंबंधातून व पारंपरिक कर्तव्यांतून! कोणत्याही 'इन्हिबिशन्स'ना त्यांनी आपल्या कादंबऱ्यांत जागा ठेवलेली नाही. शांता गोखले यांची रीटा *वेलिणकर* ही कादंबरी स्त्रीवादाच्या संदर्भात विचार करता कादंबरीच्या इतिहासातील सर्वोच्च झेप आहे. एका पातळीवर रूढ व दुसऱ्या पातळीवर विचलनात्मक आचरणाचे दर्शन घडवणारी ही कादंबरी समाजाच्या दृष्टीने चांगले-वाईट आणि व्यक्तीच्या दृष्टीने चांगले-वाईट अशा परस्परांना भिडणाऱ्या दंडकांतील संघर्ष साकार करते. गोखले यांनी निर्माण केलेल्या रीटा, सरस्वती व संगीता या तिघीजणी वेगवेगळ्या स्वभावाच्या, प्रवृत्तीच्या, वयाच्या तर आहेतच शिवाय त्या तिघींचे जीवन व त्यांचे प्रश्न हेही सर्वस्वी भिन्न आहेत. आणि तरीदेखील त्या तिघींतला सुसंवाद अबाधित आहे. वेगवेगळ्या वाटांनी जाणाऱ्या या तिघींनी परस्परांना दिलेली साथ विलक्षण आहे; भगिनीभावाची - 'सिस्टरहूडची' - एका नव्या जीवनदृष्टीची प्रस्थापना करणारी आहे.

स्त्रियांच्या निर्मितिक्षमतेचा संपन्न आविष्कार त्यांच्या कथालेखनातूनही प्रकटतो. शंभराहून अधिक वर्षे केलेल्या लेखनतपस्येतून मराठी लेखिकांनी कथा लिहिण्यात आपण पुरुष लेखकांहून तिळमात्र उणे नसल्याची खात्री पटवली आहे. काशीबाई कानिटकर, गिरिजाबाई केळकर, आनंदीबाई शिर्के, कमलाबाई टिळक या कथालेखिकांच्या प्रभावशाली कर्तृत्वानंतर १९३३ मध्ये प्रसिद्ध झालेल्या विभावरी शिरूरकरांच्या *कळ्यांचे निःश्वास* या संग्रहाने कथासाहित्यात आमूलाग्र परिवर्तन घडून आणले. 'कळ्यांचे निःश्वास'च्या केंद्रस्थानी प्रौढ कुमारिकांच्या सहजीवनविषयक अपेक्षा, त्यांच्या विवाहविषयक समस्या आणि मध्यमवर्गीय समाजातील कौटुंबिक स्थिती असे विषय आहेत. समाजातील दुटप्पी मूल्यव्यवस्थेचे सुस्पष्ट दर्शन ही 'कळ्यांचे निःश्वास'ची फार मोठी जमेची बाजू आहे. आत्मभान येऊ लागलेली परंतु कुटुंबनिरपेक्ष अस्तित्व नसलेली स्त्री 'कळ्यांचे निःश्वास'मध्ये स्वतःच्या व्यक्तिमत्त्वाच्या शोधास प्रवृत्त झाली आहे. ज्या काळात हे लेखन झाले त्या काळाला सवय होती ती स्त्रीविषयक सहानुभूतीची. स्त्रीची दुःखे पुरुषाच्या मनोवृत्तीतून पाहाण्याची घटनाप्रधान कथानकाच्या आधारे रंजन वा बोध घडविण्याच्या काळात साक्षात जीवनाच्या गाभ्याला जाऊन भिडण्याची क्षमता असणाऱ्या या कथांमधून विभावरींनी ठोस असा नैतिक आशय सादर केला.

सामाजिक आचारविचारांच्या चौकटीत बंदिस्त असणाऱ्या स्त्रीला चौकटीबाहेर पडण्याची प्रेरणा देणारी कथा त्यानंतर वसुंधरा पटवर्धन, कमल देसाई, विजया राजाध्यक्ष, गौरी देशपांडे, ऊर्मिला सिरूर, सानिया, अंबिका सरकार, आशा बगे, प्रिया तेंडुलकर, ऊर्मिला पवार, मेघना पेठे, प्रतिमा इंगोले या लेखिकांनी लिहिली. प्रमोदिनी वडके-कवळे, मथू सावंत, ललिता गादगे अशा नावांचीही या यादीत भर घालता येईल. नावांच्या यादीला महत्त्व नाही. स्त्रीजीवनाचा विविध दिशांनी शोध घेण्याचा पृथगात्म प्रयत्न या लेखिकांनी कथेच्या माध्यमातून केला. स्त्रीनिष्ठ अस्सल

व्हावयास हवा अशी भूमिका अनेक पाश्चात्त्य अभ्यासकांनी मांडली आणि जागतिक स्तरावर लोकप्रिय साहित्याचा शिक्षणक्रमात अंतर्भाव झाला त्यावर संशोधन सुरू झाले या विचाराला दिलेला सकारात्मक प्रतिसाद म्हणून मराठीतही लोकप्रिय साहित्याविषयी लेखनाला सुरुवात झाली.

मराठीतील लोकप्रिय साहित्याची परंपरा मुक्तामाला, मंजुघोषा या कादंबऱ्यांपासून सुरू होते. या कादंबऱ्यांच्या त्या काळातही दहा दहा आवृत्त्या निघालेल्या दिसतात. ही परंपरा थेट परवाच निवर्तलेल्या बाबा कदम या लेखकापर्यंत चाललेली होती. मराठी कादंबरीच्या पहिल्या शतकाचे समालोचन करताना कुसुमावती देशपांडे यांनी या साहित्याविषयी काढलेले उद्‍गार मननीय आहेत. कुसुमावती देशपांडे लिहितात, ''केवळ मनोविनोदनासाठी किंवा अप्रत्यक्ष इच्छापूर्तीसाठी लिहिल्या जाणाऱ्या कादंबऱ्या या कादंबरी या नावाला पात्र नव्हत, किंवा त्यांचे काहीच मोल नाही, असे मात्र नाही. जाणत्या टीकाकारांनी त्यांची आजपर्यंत जी उपेक्षा केली ती योग्य नाही. एवढेच नव्हे, ते अहितकारकही आहे. तथाकथित केवळ मनोविनोदनाच्या द्वारेदेखील वाचकांच्या मनावर अगणित व अनाकलनीय संस्कार होतात व ते अजाणतेपणे होतात म्हणूनच कित्येकदा अतिशय प्रभावी होतात. शिवाय बहुसंख्य वाचक याच कादंबऱ्या वाचतात. सामान्य मनाला गुंगवून सोडणारी रहस्यकथा, थरारून सोडणारी प्रणयकथा यांच्या वाचकवर्गाच्या संख्येशी उच्चभ्रू कादंबरीच्या वाचकवर्गाची संख्या सहसा बरोबरी करू शकत नाही. या दृष्टीने पाहता समाजहिताची कळकळ बाळगणाऱ्या व सामाजिक मनोवृत्तींची पारख करून त्यांना वळण लावू पाहणाऱ्या कलावंतांनी तरी या प्रकारांची उपेक्षा करून चालण्यासारखे नाही.'' (देशपांडे, कुसुमावती, १९७५, पृ. ५) लोकप्रिय साहित्याची निर्मिती ही गंभीर स्वरूपाच्या साहित्यापेक्षा मोठ्या प्रमाणावर होत असते. कारण समाजातील फार मोठ्या वाचकवर्गाची ती गरज असते. एकेकाळी संस्थानिक-जमीनदार-श्रीमंतवर्ग अशा लेखनाचा आश्रयदाता होता. असा उल्लेख मागे येऊन गेला आहे. ताराबाई शिंदे यांनी आपल्या 'स्त्रीपुरुषतुलना' या पुस्तकात पुरुषजातीची करमणूक करणाऱ्या 'स्त्रीचरित्र' सारख्या शृंगारप्रधान पुस्तकांचा रोखठोक समाचार घेतला आहे. त्या लिहितात, ''या राज्यांत विद्येचे प्राबल्य व छापखाने झाल्यामुळे मंजुघोषा, मुक्तमाला, मनोरमानाटक असे बरेच लहान लहान ग्रंथ तयार झाले आहेत. प्रत्येक गोष्टींत पुस्तकांत शृंगार, विनोद, शोक, हे तीन गुण असल्यावांचून रस भरत नाही. हे खरे, पण ग्रंथकर्त्यांनी आपण जे काही लिहितो ते घडण्यासारखे किंवा पूर्वी कधीकाळी असे घडून आले होते किंवा नाही याचा आधी विचार करून मग पुढे ग्रंथ रचावा. (खोले, विलास, १९९७, पृ. १२१) गो. ना. दातार, नाथमाधव इत्यादी लेखकांनी अद्‍भुतरम्य व रंजनप्रधान लेखन केले. त्यांच्या कादंबऱ्याही वारंवार मुद्रित झाल्या.

समाजाची रंजनाची गरज 'कलेसाठी कला' या तत्त्वाचा पुरस्कार करीत भागवली ती ना. सी. फडके यांनी. वारंवार दु:खाचे अनुभव येतच असतात ते निदान काही काळ तरी विसरावेत आणि सुखाच्या स्वप्नांच्या जगात रममाण व्हावे ही सवय त्यांनी वाचकांना लावली. सुखाच्या स्वप्नांचे 'जादूगार' असेच त्यांचे वर्णन होऊ शकेल. ललित वाङ्‌मयाचे स्वरूप व कार्य स्पष्ट करताना फडके यांनी आपले या संदर्भातील विचार पुढीलप्रमाणे मांडले आहेत - ''ललितवाङ्‌मयात अशी कोणती जादू आहे? लोकांची अंत:करणे या वाङ्‌मयाकडे का खेचली जातात? याचे एक उत्तर असे की, या संसारात माणसाला यशाचे समाधान फार दुर्लभ आहे म्हणून माणूस ललितवाङ्‌मय वाचतो. मानवी इच्छा, आकांक्षा, वासना तृप्त होत नाहीत म्हणून ललितवाङ्‌मय वाचतो. मानवी इच्छा, आकांक्षा, वासना तृप्त होत नाहीत म्हणून ललितवाङ्‌मयाचे व्यसन मनुष्याला लागते. बौद्धिक किंवा शारीरिक पराक्रम करण्याची लालसा आपल्यापैकी प्रत्येकाच्या ठिकाणी उपजत आहे. विद्वत्ता संपादावी, संपत्ती जोडावी, लढाया जिंकाव्या आणि कीर्तीच्या वैभवशिखरावर बसून साऱ्या जगाचे कुर्निसात घेताना मान उगीच रुबाबाने हालविण्याचे परमसौख्य उपभोगावे, असे प्रत्येकालाच वाटत असते. ...पण संसार असा वैषम्याने भरलेला आहे की, माणसाच्या या आकांक्षा क्वचितच पुऱ्या होतात. ...जगात सुखापेक्षा दु:खच अधिक आहे, यशापेक्षा अपयशच अधिक वाट्याला येते, तृप्तीपेक्षा अतृप्तीचे सुस्कारेच माणसाला नेहमीच सोडावे लागतात. परंतु मनुष्य हा अत्यंत चतुर प्राणी आहे. या वैषम्यातही समाधानाचा मार्ग तो शोधून काढतो. स्वत:च्या आकांक्षा विफल ठरल्या तर ज्या स्त्री-पुरुषांच्या आकांक्षा प्रयत्नांती सफल

झाल्या त्यांच्या कल्पित कथा वाचून व त्यांच्याशी तेवढ्यापुरते तादात्म्य पावून काही-एका नीनच आनंदाचा उपभोग तो घेत राहतो. ज्याला स्वत:ला देशोद्धार साधला नाही तो शिवाजीसारख्या स्वराज्यसंस्थापकासंबंधीची एखादी कल्पित कथा वाचून आपल्या अपयशाचे क्लेश विसरतो. ज्याला स्वत:ला देशोद्धार साधला नाही तो शिवाजीसारख्या स्वराज्यसंस्थापकासंबंधीची एखादी कल्पित कथा वाचून आपल्या अपयशाचे क्लेश विसरतो. ज्याला स्वत:ला नामांकित क्रीडापटू होता आले नाही तो रणजितसिंगाच्या पटुत्वाची नवलकथा वाचतो. ज्याला प्रणयाचा उन्मादक अनुभव घेता आला नाही तो आपल्या प्रणयाच्या व पराक्रमाच्या प्रभावाने रतीसारखी सुंदर स्त्री प्राप्त करून घेणाऱ्या नायकाचा वृत्तान्त वाचण्यात तन्मय होतो. सारांश, त्या वेळेपुरता एक लटका संसार करण्यासाठी आपण ललितवाङ्मय वाचतो.'' (फडके, ना. सी., १९७०, पृ. १४-१५) स्त्री, स्त्रीदेह व स्त्रीदेहाच्या सौंदर्याविषयी पुरुषाच्या मनात असणारे आकर्षण या मूलभूत सत्याला रेखीव, सुनियोजित, परिणामकारक रूप देऊन वेगवेगळ्या स्थलकालावकाशाचा, परिसराचा केवळ पार्श्वभूमीदाखल वापर करून त्यांनी एकंदर ८६ कादंबऱ्या लिहिल्या. 'मी माझ्या कादंबऱ्या कशा लिहितो?' असा एक लेखही फडके यांनी लिहिला होता. आणि स्वत:च्या लेखनाचे तंत्र त्यांनी समर्थनाच्या भाषेत समजावून सांगितले होते. जीवनात त्यांनी एकच कादंबरी ८६ वेळा लिहिली अशा प्रकारे त्यांचा उपहास करण्याची रीत मराठी कादंबरीसमीक्षेत पडली असली तरी त्यांच्या कादंबरी लेखनाने मराठी कादंबरीच्या क्षेत्रात तंत्र व मंत्र यांच्या जोरावर लोकप्रिय कादंबरी कशी लिहिता येते याचा वस्तुपाठ सादर केला हे विसरता येत नाही. त्यांचे अनेक लहानमोठे वारसदार लेखक स्त्रीपुरुष अशा दोन्ही वर्गांत उत्पन्न झाले. अर्थात यांपैकी प्रत्येकाने स्वत:च्या कल्पकतेने कादंबऱ्या अधिक आकर्षक कशा होतील याकडे लक्ष पुरवले. चंद्रकांत काकोडकर, व. पु. काळे, ज्योत्स्ना देवधर, कुसुम अभ्यंकर, सुमती क्षेत्रमाडे अशी बरीच नावे लोकप्रिय साहित्यनिर्मिती करणाऱ्यांच्या लेखकवर्गात आपल्याला घालता येतील.

लोकप्रिय साहित्य हे जगात सर्वत्र उत्पन्न होते. उत्पन्न होत आलेले आहे. प्रेमावर लिहिणे हा अत्यंत किफायतशीर धंदा आहे. प्रेमात अडथळे येतात आणि जीवनात संकटे येतात. लोकप्रिय लेखन अडथळ्यांवर मात करणारे, संकटांची तमा न बाळगता आपले ईप्सित यशस्वीपणे साध्य करणारे नायक-नायिका रंगवते. याप्रकारच्या लेखनाचा उल्लेख नेहमी पलायनवादी साहित्य अशा शब्दांत केला जातो हे खरे तथापि ते केवळ पलायनवादीच असते अशा नकारात्मक दृष्टीने त्याकडे पाहिले नाही तर त्याला काही सकारात्मक बाजू आहे असे ध्यानात येते. हे साहित्य खचलेल्या मनाला नवी उमेद देणारे साहित्य आहे, व्यक्तीचा स्वत:च्या क्षमतेवरील विश्वास वाढविणारे साहित्य आहे, आत्मविश्वास उत्पन्न करणारे साहित्य आहे, जीवन हे आनंददायी आहे आणि त्या आनंदासाठी आपण जगले पाहिजे अशी इच्छा पराभूत मनातही उत्पन्न करणारे साहित्य आहे. आशेने निराशेवर केलेली मात, जीवनाने मृत्यूवर केलेली मात असे चित्रण करणारे हे साहित्य वाचकांच्या मनात जीवनाविषयीचे प्रेम वाढवते. या लेखनातील नायकाच तेवढे कर्तृत्ववान असतात असे नाही तर यातील नायिकाही सुपरमॅनप्रमाणे सुपरवूमनचे काही गुण अंगी असणाऱ्या असतात. ही परंपराही मराठीत जुनीच आहे. वरेरकरांच्या *विधवाकुमारी* तील यमुना, *धावता धोटा* मधील बिजली, नाथमाधवांच्या *डॉक्टर कादंबरी*तील डॉक्टर, *लक्ष्मीबाई भ्रतार वासुदेव* मधील लक्ष्मी या स्त्रियांच्या ठिकाणी तडफदारपणा, निर्भयता, व्यवहारचातुर्य, प्रेमळपणा, समजुतदारपणा अशा वेगवेगळ्या गुणांचा आढळ होतो. त्यांच्या या गुणांमुळेच संसारातील संकटे दूर होतात, प्रश्न सुटतात, स्त्रीपुरुषांतील विसंवाद संपुष्टात येतो, जीवनाचा खाचखळग्यांनी भरलेला रस्ता भराभर पार केला जातो आणि पुढील वाटचाल सुखकर होते. हे लेखन जीवनास्तव दृष्टीआड करते आणि रमणीय आकृती धारण करणारे कल्पित साकार करते हे खरे. परंतु आकलनाच्या दृष्टीने सुलभ, परिणामच्या दृष्टीने सुखर आणि जीवनातील गुंतागुंतीचा उलगडा करण्याच्या बाबतीत तत्पर असे त्याचे स्वरूप असते. हेच लोकप्रिय साहित्याचे अंगभूत सामर्थ्य आहे आणि यातच त्याची अभिजात किंवा गंभीर साहित्याच्या तुलनेने मर्यादा साठवलेली आहे. नवनव्या शास्त्रीय शोधांच्या अनुषंगाने निर्माण होणारे वैज्ञानिक कथात्म साहित्य वा फँटसीज असतात, रहस्यकथा व साहसकथा असतात. या वर्गवारीत आणखीही भर घालता येईल. परंतु ते महत्त्वाचे नसून जीवनानुभवांचा वेगवेगळ्या

अंगाने विचार करण्याचा व पेचप्रसंगांची सोडवणूक करण्याचा सुटसुटीत प्रयत्न करण्याकडे लोकप्रिय साहित्याचा कल असतो.

एक लक्षात ठेवायला हवे की, लोकप्रिय साहित्याचे लेखक समाजासंबंधीचे गंभीर भाष्य लिहीत नाहीत. संभाव्य वाचकांना खूष करण्यासाठी लिहितात. वाचकांना जे आधीच ठाऊक आहे असे वाचकांना वाटते तेच ते लेखनाद्वारे सांगतात. संस्कृतीचे संकेत ते स्वीकारतात आणि स्पष्ट करतात आणि या निर्घृण जगापासून वाचकाची काही काळ तरी सुटका करतात. लोकप्रिय संस्कृतीच्या मिथ्स लोकांमध्ये किती प्रमाणात लोकप्रिय आहेत कोण जाणे, त्यांचा प्रभाव किती आहे कोण जाणे, एक गोष्ट मात्र स्पष्ट आहे ती म्हणजे लोकप्रिय संस्कृती ही लोकप्रिय आहे, ती हळूहळू पसरत गेलेली व जिच्यापासून सुटका नाही अशी गोष्ट आहे. लोकप्रिय साहित्याच्या स्वरूपाची, त्याच्या लोकप्रियतेची, त्याला एकंदर जनमानसात असणाऱ्या स्थानाची आणि पारंपरिक साहित्यक्षेत्रात होणाऱ्या त्याच्या उपेक्षेची चर्चा गेली दहा-पंधरा वर्षे विशेषत्वाने चालली आहे.

ज्या लेखनाने साहित्यविश्वातील निम्म्याहून अधिक जागा व्यापली आहे, अब्जावधी रुपयांचा अर्थव्यवहार ज्या लेखनाद्वारे घडतो आहे आणि जागतिक पातळीवर ज्या लेखनाला सर्वाधिक वाचकवर्ग लाभला आहे त्याकडे दुर्लक्ष करणे योग्य नाही, उलट त्या निर्मितीकडे गंभीरपणे पाहिले पाहिजे, त्याची व्यवस्थित मीमांसा झाली पाहिजे असा विचारप्रवाह आता रूढ होऊ लागला आहे. या अनुषंगाने ग्रंथनिर्मितीही होऊ लागली आहे. वेगवेगळ्या विद्यापीठांत आता लोकप्रिय साहित्याचे अभ्यासक्रम तयार झाले आहेत. एके काळी केवळ थट्टेचा विषय असणाऱ्या या लेखकाकडे शैक्षणिक दृष्टिकोणातून पाहिले जाऊ लागले आहे. उच्चभ्रू संस्कृतीचे प्रतिनिधित्व करणाऱ्या समीक्षकांच्या हेटाळणीचा विषय झालेले हे साहित्य उदासीनतेच्या व उपेक्षेच्या पडद्यांआडून विद्यापीठांच्या अभ्यासक्षेत्रात पदार्पण करू लागले आहे.

**विनोदी साहित्य**

सर्वसामान्य माणसाला रडवणाऱ्या साहित्यापेक्षा हसवणारे साहित्य आवडते. निर्भेळ हास्य हे निरोगीपणाचे लक्षण मानले जाते. असे हास्यकारक म्हणजे विनोदी साहित्य आधुनिक काळातच मराठीत निर्माण झाले. आधुनिक मराठी साहित्यात आजवर जी विनोदनिर्मिती झाली आहे तिला प्राचीन मराठी वाङ्मयातील पूर्वपरंपरेचा म्हणावा असा कोणताही आधार नाही. महानुभाव वाङ्मयात किंवा संत वाङ्मयात, पंडिती काव्यात किंवा शाहिरी काव्यात आढळणारी विनोदस्थळे अभ्यासकांनी प्रसंगोपात्त निर्देशिली असली तरी ती विनोदस्थळे आणि आधुनिक साहित्यातील विनोदी वाङ्मय यांचा सांधा जुळेल असे काही सूत्र दाखविता येत नाही. आधुनिक मराठी वाङ्मयातील कथात्म विनोदी लेखनाची सुरुवात हरिभाऊंच्या आसपास झाली. हरिभाऊपूर्व काळात निबंधवाङ्मयातून आपापल्या विषयाच्या आवेशपूर्ण प्रतिपादनाच्या भरात प्रतिपक्षाच्या विचारांची खिल्ली उडवण्यासाठी जे आक्रमक लेखन झालेले आढळते, त्यातून अधूनमधून काही विनोदाच्या जागा दृष्टिपथात येतात. तथापि अशा स्थळांचा उल्लेख विनोदी वाङ्मयात केला जात नाही. आधुनिक मराठी विनोदाचे जनक म्हणून मान्यता लाभलेले श्रीपाद कृष्ण कोल्हटकर यांच्या 'सुदाम्याच्या पोह्यां'पासून खऱ्या अर्थाने मराठीतील विनोदी वाङ्मयाला आरंभ झाला.

कोल्हटकरांनंतर 'बाळकराम' या नावाने लेखन करणारे राम गणेश गडकरी, न.चिं. केळकर यांच्यापासून प्र.के. अत्रे, पु.ल. देशपांडे यांच्यापर्यंत झालेले लेखन पाहिले असता आढळते ते असे की, हे सर्व लेखन मुख्यत: सामाजिक, धार्मिक, सांस्कृतिक, राजकीय वर्तनव्यवहारातील विशिष्ट अपप्रवृत्ती, विपरीत आचारधर्म आणि तदुत्पन्न व्यक्तिगत व सामूहिक दोषास्पद आचारविचारप्रणाली यांच्या मर्यादा सांगण्यासाठी, दोषदिग्दर्शनासाठी व त्यात परिवर्तन घडवून आणण्यासाठी झालेले आहे. लेखनस्वरूपातील असो, नाट्यस्वरूपातील असो, कथास्वरूपातील असो वा व्यक्तिचित्र किंवा प्रवासवर्णन यांसारख्या रचनाबंधांतून मूर्त होणारा असो, हा सर्व विनोद सर्वसामान्यपणे मध्यमवर्गीय जीवनव्यहारातील विसंगतीचे दर्शन घडविण्यासाठी अवतरला. कल्पनाचमत्कृती, अतिशयोक्ती, कोटीबाजपणा आणि मध्यमवर्गीय समाजधारणा व्यक्त करणारी भाषा यांमधून या विनोदाला अस्तित्व लाभले आहे.

कोणत्याही भाषेतील विनोदाला तीन संदर्भबिंदू असतात. एक, ती भाषा ज्या संस्कृतीचे, सामाजिक संस्थांचे, वैचारिक दृष्टिकोणाचे, जीवनश्रद्धांचे, चालीरीतींचे, वैशिष्ट्यपूर्ण कलादृष्टीचे प्रतिनिधित्व करीत असेल अशी केंद्रशक्ती; दोन, ज्यामधून वैशिष्ट्यपूर्ण रचनाबंध प्रस्तुतिकरणाची पद्धती व ज्याद्वारे विनोदाचा हेतू वा उद्दिष्ट सूचित होते अशी साहित्यकृती. तीन, भाषेतील असे एखादे स्थान, एखादा शब्द वा वाक्प्रचार, की जो विनोदाच्या दृष्टीने केवल अत्यावश्यक होय, ज्यांमधून विनोदाचा स्फोट होतो किंवा ज्यात विनोद साठवला जातो. बऱ्याच वेळा अनेक वाक्यांतून सांगितल्यानंतरही जे वाचणाऱ्या-ऐकणाऱ्यापर्यंत पोचू शकत नाही ते कधीकधी एकेका शब्दापासून अगदी नेमकेपणाने व्यक्त होते. पु. ल. देशपांडे यांच्या 'द्राक्षसंस्कृती' व 'रुद्राक्ष संस्कृती' या सुप्रसिद्ध शब्दांचा या संदर्भात उदाहरणादाखल उल्लेख करण्याजोगा आहे. सोद्देश्य स्वरूपाची विनोदी लेखांची निर्मिती (श्रीपाद कृष्ण, राम गणेश गडकरी, पु. ल. देशपांडे), विनोदामागून विनोद करण्याच्या लेखनरीतीतून घडलेले स्वैर विनोदी लेख (प्र. के. अत्रे, शामराव ओक, अ. वा. वर्टी, बाळ गाडगीळ, वि. आ. बुवा, रमेश मंत्री, सुभाष भेण्डे इ.) वेगवेगळ्या मानसपुत्रांच्या/ व्यक्तिचित्रांच्या माध्यमातून झालेले विनोदी लेखन (श्री. कृ. कोल्हटकर, बाळकराम, पु. ल. देशपांडे, रमेश मंत्री इ.) विविध वाङ्मयीन विडंबने (प्र. के. अत्रे, पु. ल. देशपांडे, जयवंत दळवी, बाळ गाडगीळ इ.) अशा वेगवेगळ्या स्वरूपाच्या कमीअधिक गुणवत्तेच्या विनोदी वाङ्मयाची बरीच मोठी नोंद होऊ शकेल.

मराठी कथेतील नि:संशय पहिले ठसठशीत विनोदरूप चिं. वि. जोशी यांच्या कथांतून प्रकटते. मध्यमवर्गीय जीवनवास्तवाचे सलग व प्रभावी दर्शन अत्यंत खेळकर पद्धतीने त्यांच्या कथांमधून घडते. रावसाहेब चिमणराव स्टेट गेस्ट, स्पष्टवक्तेपणाचे प्रयोग, गुंड्याभाऊचे दुखणे, कालाय तस्मै नम:, सौजन्य सप्ताह, प्रामाणिकपणाविषयी आजीबाई, माझे दत्तक वडील यांसारख्या अनेक कथांची या संदर्भात उदाहरणे घेता येतील. कथेच्या स्वयंपूर्ण रूपात चिमणराव, गुंड्याभाऊ आणि त्यांच्या परिवारातील साऱ्या माणसांचे, त्यांच्या कौटुंबिक जीवनाचे, त्यांच्या ध्येयादर्शांचे, ते ज्या समाजाचे घटक होते, तेथील नीतिसंकेतांचे, अनेकपदरी मानवी संबंधांचे प्रगाढ भान चिं. वि. जोशी यांनी व्यक्त केले आहे. जीवनव्यवस्थेतील असमानतेचा निषेध करण्याचे कार्य ज्याप्रमाणे विनोदामार्फत होत असेत, त्याप्रमाणेच जीवनस्वीकाराचा, परिस्थितीशी मिळतेजुळते घेण्याचा सामोपचाराचा मार्गही विनोदाद्वारे खुला होतो. *शेकडो शंभरातील एका* चिमणरावाच्या कथांमधून सर्व मानवी विसंगतींसह, मर्यादा-दोषांसह जगण्याची क्षमता देणारा विनोद अवतरला आहे. मानवी जीवनपद्धतीविषयी आणि वर्तनव्यवहाराविषयी उत्पन्न होणाऱ्या प्रश्नांवर व तदनुषंगिक युक्तिवादांवर विनोदातून होणाऱ्या भाष्याचे अनेक अवतार आपल्याला या कथांत दृष्टीस पडतात. मर्यादायुक्त माणसांच्या जीवनाची वाटचाल सुखकर व्हावी अशी प्रबल आंतरिक इच्छा चिं. वि. जोशी यांच्या कथांतून ज्याप्रमाणे प्रकटते, त्याप्रमाणेच विकारबहुल व्यक्तिजीवन व समाजव्यवहार सभोवताली असताना निरोगी, संपन्न व सुखी समाजाचे स्वप्नही चिं. वि. जोशी यांच्या कथात्मक विनोदनिर्मितीमधून डोकावत असते.

अत्र्यांनी जे विपुल विनोदी लेखन केले त्यातून त्यांच्या अफाट व्यक्तिमत्त्वाला साजेशी विनोदात्मकता व्यक्त होते. काही अपवाद वगळता अत्रे यांचे कोणतेही लेखन विनोदावाचून साकार होऊ शकत नाही, विनोद हा त्यांच्या एकंदर लेखनाचाच प्रकृतिधर्म आहे. त्यांचे अग्रलेख, त्यांच्या कथा, त्यांची नाटके यांमधून खळखळून हसवणाऱ्या विनोदाचा मुक्त संचार झाला आहे. *गुत्त्यात नारद, ब्रँडीची बाटली, बाजारात तुरी, सार्वजनिक जीवन, पहिले कावळे संमेलन, गांधीवादी पाहुणा* या त्यांच्या स्वतंत्र विनोदी कथा प्रसिद्ध आहेत. या सर्व कथा कथेचा प्रकृतिधर्म सांभाळणाऱ्या आहेत. वेधक आरंभ, कृतिप्रधान प्रसंग, पृथगात्म पात्रनिर्मिती, चित्रदर्शी मांडणी, प्रसंगनिष्ठ व शब्दनिष्ठ विनोदांतील सहजता व कलाटणीपूर्ण अंत अशा स्वरूपात अत्रे यांच्या कथा साकार होतात. शामराव ओक यांचा विनोद मुख्यत्वे मानवी वर्तनातील विसंगती टिपणारा परंतु सौम्य प्रकृतीचा आहे. त्यांच्या *असंभव, दुग्धमंदिरातील प्रेमकथा, पुरुषपार्टी, आझाद मैदानावरची क्रिकेट मॅच, निवृत्तिनिवास, प्राध्यापकाचा मधुचंद्र* या कथा सुरस व चमत्कारिक आहेत. काल्पनिक प्रसंग, अतिशयोक्त वर्णने, विडंबनाकडे वळणारा विनोद ही त्यांच्या कथांची वैशिष्ट्ये म्हणता येतील.

मराठीतील विनोदी कथा वेगळे वळण घेते ती द. मा. मिरासदार यांच्या कथांमधून. मिरासदारांचे लेखन हे मूलत: अस्सल कथारूप घेणारे लेखन आहे. मिरासदारांच्या कथांतून ग्रामजीवनात वावरणाऱ्या तेथील जीवनव्यवहाराशी

एकरूप असणाऱ्या , आपल्या आगळ्या वेगळ्या, तऱ्हेवाईक, बिलंदर वागण्याने किंवा सरळसाध्या, भोळसर वागण्याने लक्ष वेधून घेणारी माणसे भेटतात. त्यांच्या नित्याच्या वागण्यातून, वास्तव जगण्यातून जो विनोद उत्पन्न होतो तो खळखळून हसवतो आणि अंतर्मुखही करतो. *व्यंकूची शिकवणी, माझ्या बापाची पेंड, माझी पहिली चोरी, कोणे एके काळी, मुलाचा जन्म, नव्व्याण्णवबादची एक सफर* यांसारख्या मिरासदारांच्या कथा मराठी विनोदी कथेची समृद्धी वाढविणाऱ्या आहेत. शंकर पाटील यांच्या कथाही मूलत: कथा आहेत. आपले कथापण अबाधित राखून त्या विनोदी आहेत. विनोदामागून विनोद करण्याचा हव्यास न बाळगता ग्रामजीवनावरील वास्तवाचे भेदक चित्रण करणे, ही शंकर पाटील यांची लेखनपद्धती आहे. मानवी मनाचे सूक्ष्म व्यापार, ग्रामीण व्यक्तींच्या स्वभावांतील वेगवेगळे बारकावे, वेगवेगळ्या प्रसंगांच्या निमित्ताने होणाऱ्या क्रियाप्रतिक्रियांविषयीची जाण त्यांना उत्तम आहे. ग्रामीण जीवनानुभवाची नस त्यांनी नेमकेपणाने पकडली आहे. त्या अनुभवांतील सुखे व दु:खेही विनोद कशी निर्माण करतात हे *हिशेब* वाचताना ध्यानात येते. *मिटिंग* ही त्यांची गाजलेली कथा लोकशाही कार्यपद्धतीविषयीची अनास्था उपहासगर्भ पद्धतीने साकार करते. अशाचप्रकारे *धिंड* या कथेतही दारूबंदीच्या अनुषंगाने घडणाऱ्या वर्तनाचे उपहासपूर्ण चित्रण केले गेले आहे. ‘‘नेमानेमी’’ या कथेत बायकोच्या मृत्यूच्या दु:खापेक्षाही तिच्या उत्तरक्रियेची पुरांमुळे होणारी परवड पाहून हसावे की रडावे अशी अवस्था होते.

विशिष्ट व्यक्तीच्या, तिच्या परिवाराच्या अनुषंगाने ज्या विनोदी कथा लिहिल्या गेल्या त्यात गंगाधर गाडगीळांनी लिहिलेल्या बंडूवरील कथा मुद्दाम विचारात घ्याव्या अशा आहेत. सरळमार्गी, धांदरट, काहीसा वेंधळा पण स्वभावाने खेळकर असा बंडू आणि त्याची व्यवहारी असणारी पण व्यवहार न कळणारी ‘‘पेनीवाइज पाउंड फुलिश’’ बायको स्नेहलता यांच्या वैवाहिक जीवनातील अनेक प्रसंगांची कल्पकतापूर्ण निर्मिती करून गाडगीळांनी चांगल्या विनोदी कथा लिहिल्या आहेत. बंडूचा वेंधळेपणा विनोदनिर्मितीसाठी गाडगीळांना अनेकदा उपयोगी पडला आहे. साहित्यनिर्मितीविषयी उदंड उत्साह असणाऱ्या रमेश मंत्री यांनी भरपूर विनोदी लेखन केले असले तरी विनोदी कथेच्या संदर्भात त्यातील अल्प लेखनच उल्लेखनीय म्हणावे लागते. *सह्याद्रीची चोरी, सचिवालयात हत्ती, तुम्ही मांजर व्हा, आमच्या घरी सिंह येतो* यांसारख्या कथा मंत्रींनी फँटसीचा उपयोग करून लिहिल्या आहेत. सुभाष भेण्डे यांच्या विनोदी कथानिर्मितीतून त्यांची सुधारणावादी लेखनदृष्टी सूचित होते. लायन्स क्लब किंवा रोटरी क्लब यांसारख्या क्लबांतील सदस्यांचा तथाकथित समाजसेवेतील पोकळपणा, मोठेपणासाठी व प्रसिद्धीसाठी असणारे त्यांच्या ठिकाणचे हपापलेपण, स्वत:ला ग्रेट मानून वागणाऱ्या माणसांच्या वर्तनातील विसंगती भेण्डे यांच्या कथांतून अधोरेखित होते. विसंगतिदर्शनाखेरीज औचित्यभंग, एकारलेले अतिशयोक्त वागणे-बोलणे, कोट्या, अपेक्षाभंग इत्यादी हास्यकारणांचा विपुल उपयोग करून भेण्डे विनोदनिर्मिती साधतात. स्त्रीव्यक्तिरेखांचा सांकेतिक उपयोगही विनोदासाठी त्यांनी केलेला आहे. स्त्रियांना असणारी फॅशन्सची व नटण्यामुरडण्याची आवड, खरेदीची ओढ, त्यांच्या स्वभावातील संशयी व मत्सरीवृत्ती असे खरे व कल्पित स्त्रीस्वभावविशेष भेण्ड्यांनी हास्यनिर्मितीसाठी उपयोगात आणले आहेत. मंत्री व भेण्डे यांच्या कथांनंतर सर्वस्वी भिन्न प्रकृतीच्या ‘आंब्याची सावली’ या राजेंद्र बनहट्टी यांच्या विनोदी कथांच्या संग्रहाचा निर्देश उचित ठरतो. एरवी गंभीर स्वरूपाचे कसदार कथालेखन करणाऱ्या राजेंद्र बनहट्टी यांच्या काही विनोदी कथा लक्षणीय आहेत. कथात्मता कायम ठेवून रोजच्या आयुष्यात सहज वाट्याला येणारे वास्तव ते विनोदी पद्धतीने मांडतात. दुसऱ्यावर आक्रमण करण्याची माणसातील वृत्ती त्यांच्या कथेत नाना आपत्ती घेऊन येते. आणि या आपत्तींना तोंड देता देता हास्यजनक परिस्थिती आपोआप उत्पन्न होते. माणसे आपल्या वागण्याने दुसऱ्याचे जिणे कसे त्रासदायक करतात, त्याचा अनुभव बनहट्टींच्या कथा वाचताना येतो. सरळ साधे जगू पाहणाऱ्यांच्या मार्गात येणाऱ्या अनपेक्षित अडचणी आणि त्यातून सोडवणूक करून घेता घेता मेटाकुटीला येणारा माणूस *आंब्याची सावली, सदाचाराचा गुरुमंत्र, शुक्लकाष्ठ* या कथांच्या केंद्रस्थानी आहे. *एका चोराची अखेर, माझा पहिला अपघात, सदाचाराचा गुरुमंत्र, शुक्लकाष्ठ* या कथांतून पोलीसी वागण्यातील निर्दय तटस्थता, निर्बुद्ध यांत्रिकपणा व आडमुठा बेरकीपणा त्यांनी ठसठशीतपणे रंगविला आहे. आयुष्यात केव्हाही वाट्याला येऊ शकणारे वेगवेगळाले प्रसंग बनहट्टी सहजतेने उभे करतात.

मुकुंद टाकसाळे यांच्या लेखनाने अगदी सुरुवातीपासून आजतागायत विनोदाचा ताजेपणा टिकवून धरला आहे. *सा रम्या आदिवासीनगरी, नावात काय नाही?, मासिक भविष्य* या कथांतून मराठी माणसाच्या वागण्या-बोलण्याच्या

पद्धती, तथाकथित ध्येयनिष्ठा बाळगण्याची हौस, कर्तव्यनिष्ठेच्या व कर्तव्यपूर्तीच्या कल्पना नवीन व वेगळेच काहीतरी करून पाहण्याची ओढ या विशेषांचा उपहासपूर्ण समाचार घेतला आहे. आचारविचारातील अंतरामुळे व्यक्तिजीवनात व समाजव्यवहारात उत्पन्न होणाऱ्या विसंगती, मध्यमवर्गीय नीतिसंकेतांमागील दांभिकता यांचा उपयोगही टाकसाळे यांनी विनोदनिर्मितीसाठी केला आहे. त्यांच्या लेखनात समकालीन संदर्भ जागे करण्याची क्षमता आहे. उपहास, उपरोध, श्लेष व शाब्दिक कोट्या यांच्या उपयोजनातून प्रकटणारा त्यांचा विनोद इतरांविषयीची वाचकाची सहानुभूती जागी करतो, व वाचकाला आनंदाची अनुभूती देतो. माणसामधील दोषांची, मर्यादांची जाणीव करून देणाऱ्या या विनोदानेच (मराठी) माणसाच्या दोषांवर पांघरूणही घातले आहे. वि. मा. दि. पटवर्धन, ना. धों. ताम्हनकर, वि. वि. बोकील, अ. वा. वर्टी, वि. आ. बुवा, बाळ गाडगीळ, वसंत सबनीस, इंद्रायणी सावकार, वसंत मिरासदार, अनुराधा वैद्य, मंगला गोडबोले, शकुंतला फडणीस, विजय कापडी या लेखकांनीही मराठी विनोदाचे क्षेत्र संपन्न करण्यास हातभार लावला आहे.

**विज्ञानकथा**

१९८० नंतरच्या काळात विज्ञान आणि तंत्रज्ञान या क्षेत्रात लक्षणीय प्रगती झाली. संगणकाचा वेगाने प्रसार झाला. रंगीत दूरचित्रवाणीच्या बहुवाहिनींच्या प्रभावामुळे माहितीच्या क्षेत्रात प्रचंड क्रांती झाली. मोबाईल आणि इंटरनेट यांचा वाढत्या वापरामुळे परस्पर संपर्काची माध्यमे बदलली. जागतिकीकरणामुळे जग जवळ आले. अभूतपूर्व प्रगती अधोरेखित करणारी असंख्य पुस्तके प्रकाशित होऊ लागली. सर्वसामान्य वाचकांना विज्ञान-तंत्रज्ञानाचा मागोवा सहजपणे घेता यावा यासाठी या क्षेत्रातील दिग्गजांनी ललित लेखनाचा आधार घेतला. विज्ञानकथा, कादंबऱ्यांचा नवा प्रवाह मराठी साहित्य क्षेत्रात वाहत राहिला आणि वाङ्मयाच्या कक्षा आणखी रूंदावल्या.

डॉ. जयंत नारळीकर यांनी विज्ञानाची माहिती आणि वैज्ञानिक दृष्टिकोन यांचा प्रसार करण्यासाठी विज्ञानकथा आवर्जून लिहिल्या. 'यक्षांची देणगी', 'आकाशाशी जुळले नाते', 'प्रेषित', 'व्हायरस' या त्यांच्या कथा - कादंबऱ्या रंजक असल्याने वाचकप्रिय झाल्या. विज्ञानाची मूलतत्त्वे आणि तंत्रज्ञानाच्या शक्यता स्पष्ट करणाऱ्या डॉ. बाळ फोंडके आणि निरंजन घाटे यांनी लिहिल्या. वैज्ञानिक प्रगतीच्या अनुषंगाने मानवी भावभावनांचे विश्लेषण करणाऱ्या कथा - कादंबऱ्या सुबोध जावडेकर यांनी लिहिल्या. माधुरी शानभाग यांनी या क्षेत्रात महत्त्वाचे योगदान केले. या साऱ्यांनी विज्ञानकथा या साहित्य प्रकाराला आवश्यक ती प्रतिष्ठा व ऊंची दिली असे म्हटले पाहिजे.

**कोशवाङ्मय**

मराठीत आता कोशरचनाशास्त्र प्रगत झाले आहे. आरंभी इंग्रजांच्या कारभारास उपयोगी पडावे यासाठी झालेले शब्दकोश, नंतरच्या काळात शिक्षणोपयोगी ठरतील असे शब्दकोश आणि कालांतराने 'ज्ञानकोशा'ची झालेली रचना हा इतिहास पहिल्या महत्त्वाच्या प्रयत्नांची नोंद करतो. ज्ञानसंचय व ज्ञानवितरण यांची गरज सर्व काळात, सर्व भाषांत असते. कोशांचा अवतार ज्ञानसंग्रहासाठी असतो. हे ज्ञान शब्दार्थापासून, व्युत्पत्तीपासून ते विशिष्ट विषयासंबंधीच्या साद्यन्त माहितीपर्यंत सर्व प्रकारचे असू शकते. मराठीतील निवडक कोशांचा निर्देश येथे पुढीलप्रमाणे करता येईल -

*महाराष्ट्रीय ज्ञानकोश* (२३ खंड, १९२८- श्रीधर व्यंकटेश केतकर); *मराठी विश्वकोश* (१८ खंड, १९७६-२००९ - संपादक अनुक्रमे - लक्ष्मणशास्त्री जोशी, मे. पुं. रेगे, रा. ग. जाधव, श्रीकांत जिचकार, विजया वाड); *भारतीय संस्कृती कोश* (१० खंड, १९६२ - पंडित महादेवशास्त्री जोशी); *मराठी तत्त्वज्ञान कोश* (३ खंड, १९७४ - दे. द. वाडेकर.); *व्यायाम ज्ञानकोश* (१० खंड, १९३६ ते १९४९ - द. चिं. मुजुमदार); *क्रीडा ज्ञानकोश* (१९८९ - सुरेशचंद्र नाडकर्णी); *Marathi Bible Dictionary* (१९१२ - रेव. कासम महमद); *भारतीय समाजविज्ञानकोश* (६ खंड, १९८६ - स. मा. गर्गे)

*भारतीय प्राचीन ऐतिहासिक कोश* (१८६७ - रघुनाथ भास्कर गोडबोले : २२८४ व्यक्तींची चरित्रे), *भरतखंडाचा अर्वाचीन कोश* (१८८१ - रघुनाथ भास्कर गोडबोले); *संगीत शास्त्रकार व कलावंत यांचा इतिहास* (१९३५ -लक्ष्मण दत्तात्रेय जोशी); *भरतवर्षीय मध्ययुगीन चरित्रकोश* (१९३७), *भरतवर्षीय प्राचीन चरित्रकोश* (१९३९), *भरतवर्षीय अर्वाचीन चरित्रकोश* (१९४६ - तिन्ही कोशांचे कर्ते म. म. सिद्धेश्वरशास्त्री चित्राव); *अर्वाचीन मराठी वाङ्मयसेवक खंड १ ते ७*

(१९३१-१९६७ गं. दे खानोलकर); *शास्त्रज्ञांचा चरित्रकोश* (१९६८), *जागतिक शास्त्रज्ञ कोश* (१९९१- दोन्ही कोशांचे कर्ते प्र. न. जोशी); *विश्वचरित्र कोश खंड १* (२०००) श्रीराम पांडुरंग कामत; *मराठी सारस्वत* (२ खंड, - अनंत लक्ष्मण जोशी)

*महाराष्ट्र शब्दकोश* (१९३२ - य. रा. दाते, चिं. ग. कर्वे, आबा चांदोरकर, चिं. शं. दातार); *ऐतिहासिक शब्दकोश* (२ खंड, १९६२ - य. न. केळकर); *आदर्श मराठी शब्दकोश* (१९७०- प्र. न. जोशी); *अभिनव मराठी-मराठी शब्दकोश* (५ खंड, १९८२-८५ द. ह. अग्निहोत्री); *अ डिक्शनरी ऑफ ओल्ड मराठी* (१९९९ - शं. गो. तुळपुळे व ॲन फेल्डहॉस); *ज्ञानेश्वरीचे शब्दभांडार* (१९५९ - रा. ना. वेलिंगकर)

*फारशी-मराठी कोश* (१९२५ - माधव त्रिंबक पटवर्धन); *बंगाली-मराठी कोश* (१९२५ - वा. गो. आपटे); *भारतीय व्यवहारकोश* (१९६१ - वि. न. नरवणे); *मराठी व्युत्पत्तिकोश* (आ. १ : १९४६, आ. २ : १९६४ - कृ. पां. कुलकर्णी); *मराठी भाषेचे संप्रदाय व म्हणी* - (१९१० - वा. गो. आपटे); *मराठी वाक्प्रचार व म्हणी* (१९१० - वि. वा. भिडे); *महाराष्ट्र वाक्संप्रदायकोश* (विभाग १: १९४२, विभाग २ : १९४७ - य. रा. दाते व चिं. ग. कर्वे)

इ. स. १८०० ते १९५० या कालातील एकंदर ३२००० ग्रंथांची सूची तयार करून शं.ग. दाते यांनी मराठी संशोधनाच्या क्षेत्रातील पायाभूत स्वरूपाचे काम करून ठेवले आहे. (*मराठी-ग्रंथ-सूची* (खंड १ १९४३, खंड २ १९६१) पहिल्या खंडात १८०० ते १९३७ या काळातील व दुसऱ्या खंडात १९३८ ते १९५० या काळातील मराठीतील यच्चयावत उपलब्ध स्वत: दाते यांना प्रत्यक्ष बघावयाला मिळालेल्या पुस्तकांची ग्रंथालय शास्त्रीय काटेकोरपणे केलेली नोंद. असेच महत्त्वाचे दुसरे काम म्हणजे मराठी नियतकालिकांची सूची इ. स. १८०० ते १९८० ही चार खंडांत प्रसिद्ध झाली आहे. या खंडांच्या निर्मितीचे काम मुख्यत्वे दि. वि. काळे, शं. ना. बर्वे, बोरगावकर, व. भि. बेलसरे या ग्रंथपालांनी केले आहे.

मराठीतील कोशकार्यासंबंधी सु. रा. चुनेकर यांनी लिहिलेले लेख अभ्यासकांस व संशोधकांस अत्यंत उपयुक्त आहेत. ते असे - *कोशवाङ्मय* , मराठी विश्वकोश खंड ४, पृ. ३७२ - ३७४; *विश्वकोश (सहकार्याने)*, मराठी विश्वकोश खंड १६ , पृ. ८६१-८८३; *शब्दकोश*, मराठी विश्वकोश खंड १७, पृ. ५९९ - ६०२; *कोशरचना व मराठी कोशवाङ्मय, भाषा व साहित्य संशोधन, खंड १*, संपा. व वसंत स.जोशी, महाराष्ट्र साहित्य परिषद पुणे, १९८१, पृ. ४४२ - ४६०; *सूची : शास्त्र व उपयोग, संशोधन : स्वरूप आणि पद्धती*, शिक्षणप्रसारक संस्था संगमनेर, १९८३, पृ. ९० - ११९; *सूची : स्वरूप शास्त्र व इतिहास*, (प्रस्तावना आनंद साधले) *: साहित्यसूची*, उमा दादेगावकर, मॅजेस्टिक प्रकाशन, मुंबई, १९९० पृ. ११ - ६८; *कोशवाङ्मय*, मराठी वाङ्मयाचा इतिहास खंड ६, भाग २, संपा. गो. म. कुलकर्णी - व. दि. कुलकर्णी, महाराष्ट्र साहित्य परिषद, १९९१, पृ. ३१६-३४३ हे लेख कोशवाङ्मयविषयक सैद्धांतिक चर्चा करणारे तसेच मराठीतील कोशकार्याचा परामर्श घेणारे आहेत. (अन्य कोशांसंबंधीचा तपशील स्थलाभावी देता आला नाही.)

**जागतिकीकरण आणि मराठी साहित्य**

जागतिकीकरण म्हणजे काय हे समजण्याआधीच जागतिकीकरणाची प्रक्रिया आपल्या देशात सुरू झाली. सुमारे पंधरावीस वर्षांपूर्वी गॅट करारापासून या प्रक्रियेला आरंभ झाला असे स्थूल मानाने म्हणता येते आणि गेल्या पाचसात वर्षांत जागतिकीकरणाने खऱ्या अर्थाने आपला सगळा देश व्यापून टाकला आहे. ही प्रक्रिया कमालीची व्यामिश्र आणि अनेक पैलू असणारी आहे. औद्योगिक जागतिकीकरण, आर्थिक जागतिकीकरण, राजकीय जागतिकीकरण, माहितीचे जागतिकीकरण, सांस्कृतिक जागतिकीकरण अशी तिची वेगवेगळी अंगे सांगितली जातात. जागतिकीकरण ही निर्मिती, तिच्या किंमती, रोजंदारी, व्याजदर व लाभ यांच्यात एकत्व आणण्याची जागतिक प्रक्रिया आहे. मानवी स्थलांतर, आंतरराष्ट्रीय व्यापार, भांडवलाच्या वेगवान हालचाली, वित्तसंस्थांचे एकत्रीकरण असे या प्रक्रियेचे चतुर्विध घटक आहेत.

जागतिकीकरण ही पारिभाषिक संज्ञा जरी विसाव्या शतकाच्या उत्तरार्धात सिद्ध केली गेली असली तरी १९८० पर्यंत सर्वसाधारण माणसांच्या जाणीवेत तिची नोंद झालेली नव्हती. वेगवेगळे समाजशास्त्रज्ञ जागतिकीकरणाच्या समकालीन

प्रवाहांचे सातत्य आधीच्या काळाशी असल्याचे दिग्दर्शित करतात. अगदी मोगल साम्राज्यापासून जागतिकीकरण अस्तित्वात होते असे दाखवण्याचा त्यांचा प्रयत्न असतो. युरोपमध्ये सोळाव्या सतराव्या शतकांत जागतिकीकरणाची पहिली पावले पडली होती असे आढळते.

एकोणिसाव्या शतकातील उदारीकरण हे सर्वसामान्यपणे जागतिकीकरणाचे पहिले युग मानले जाते. दुसऱ्या महायुद्धानंतर तंत्रवैज्ञानिक प्रगतीमुळे जागतिकीकरणाच्या प्रक्रियेस वेग आला असे म्हणता येईल. खाजगीकरण, उदारीकरण व जागतिकीकरण या परस्परसंबद्ध अशा संकल्पना आहेत. मुक्त व्यापारावरील नियंत्रणे उठविण्याच्या गॅट कराराच्या कार्यक्रमापासून जागतिकीकरण खऱ्या अर्थाने अस्तित्वात येऊ लागले. जगात असे अनेक प्रश्न आहेत की, जे एकेका देशाने वा राज्याने सोडवता येणार नाहीत उदा. वेगवेगळ्या देशांतील हवा व पाणी यांचे प्रदूषण, समुद्रात चालणारी मासेमारी, नैसर्गिक पर्यावरणात होणारी अन्य हेळसांड, बाह्य अवकाशाचे कायदे, वैश्विक उष्णतामान, आंतरराष्ट्रीय दहशतवादाचे जाळे, वैश्विक व्यापार आणि अर्थव्यवस्था इ. इ. या सर्व प्रश्नांची सोडवणूक करण्यासाठी सहकार्याचे नवे रूप आणि नव्या वैश्विक संस्थांची निर्मिती आवश्यक होय. पर्यावरणीय संशोधन आणि भवितव्याचा अभ्यास करणाऱ्या संघटना जागतिकीकरणाकडे मानवी संस्कृतीची अन्य ग्रहांकडे चाललेल्या वाटचालीची पायरी म्हणून पाहातात. वैश्विक समाजाचे स्वरूप व भवितव्य हे अनिश्चित व विवाद्य मानले जाते. तर अशा जगडव्याळ प्रक्रियेचे आपले आकलन अपुरे असणार यात नवल काहीच नाही.

संगणक, इंटरनेट, इलेक्ट्रॉनिक यंत्रसामग्री, त्वरित संप्रेषणाची विविध साधने, दूरदर्शन, करमणुकीच्या व माहितीच्या साधनांत झालेली अपरिमित वाढ, भौतिक सुखांत नित्य पडत जाणारी भर, चंगळवादाच्या मोहाचा भस्मासूर या सगळ्या गोष्टी म्हणजे जागतिकीकरणाचे वरवरचे रूप आहे. जागतिकीकरणाची जी काही चर्चा होत आहे तिला मुख्यत्वे अर्थशास्त्रीय संदर्भ आहे. परंतु जागतिकीकरणाचे परिणाम मात्र त्या क्षेत्रापुरते मर्यादित नाहीत ते राजकीय क्षेत्रातही होतात व सांस्कृतिक क्षेत्रातही होतात आणि कळतनकळत त्यांचा प्रभाव वाङ्मयविश्वावरही पडल्यावाचून राहात नाही. अर्थव्यवस्था हा कोणत्याही देशाचा वा समाजजीवनाचा पाया असतो हे मार्क्सच्या काळापासून सिद्धांताच्या स्वरूपात सांगितले गेलेले सार्वत्रिक सत्य असले तरी त्याला मानवामानवांतील समाजसंबंधांच्या इतिहासाइतके प्राचीन अस्तित्व आहे. जागतिकीकरणाच्या प्रक्रियेमुळे देशादेशांतील भौगोलिक अंतरे कमी झाली, आंतरराष्ट्रीय व्यापारात वृद्धी झाली, जगात कोठेही तयार होणारी वस्तू एका टोकापासून दुसऱ्या टोकापर्यंत कुठेही उपलब्ध होऊ लागली ही सगळी क्रांती मोहक वाटणारी जरूर आहे परंतु या प्रक्रियेच्या आड दडून राहिलेले व्यक्तित्वलोपाचे संकट चटदिशी ध्यानात येत नाही. त्या त्या माणसांचे, प्रदेशाचे, देशांचे कौशल्य एका ब्रँडखाली सीमित होते आणि त्या कौशल्यामागचा चेहरा गणवेशाने झाकला जातो. त्यामुळे उत्पादन असो, कलाकौशल्य असो, सांस्कृतिक घटना असो, व्यक्तीची ओळख संपते आणि लेबलाची ओळख सुरू होते. या गोष्टी सूक्ष्मपणे घडतात आणि त्यामुळे जागतिकीकरणाचे परिणाम एकदम ध्यानात येत नाहीत. विशेषत: भारतासारख्या देशात तर जेथे अनेक संस्कृती, अनेक जातीजमाती, हजारो वर्षांचा इतिहास व परंपरा वेगवेगळ्या स्वरूपात नांदत आहेत, तेथे तर या जागतिकीकरणामुळे काय होणार? याची उमज खरोखरीच पडत नाही. एक प्रकारचे भांबावलेपण व भ्रांतचित्त अशी अवस्था निर्माण झाली आहे. जग लहान झाले आहे असे म्हटल्यामुळे एक परिणाम असा झाला की, परस्परसंप्रेषणाची भाषा एक हवी, मग ती कोणती असणार? या प्रश्नाचे उत्तर इंग्रजी भाषा असे आहे. मुळातच दीडशे वर्षे या देशावर इंग्रजांनी राज्य केल्यामुळे इंग्रजी येणाऱ्यांचा वरचष्मा इंग्रजी न येणाऱ्यांवर मोठ्या प्रमाणात आहेच. आणि आता तर ती जागतिक भाषा आहे असे म्हटल्यामुळे व तिच्याशिवाय निर्वाह होऊच शकणार नाही असे ठरल्यामुळे देशी भाषांचे व पर्यायाने देशी साहित्याचे व संस्कृतीचे काय होणार हे सांगणे आजतरी अवघड आहे.

यावर इलाज म्हणून काही साहित्यिक विचारवंत देशीवादाचा आग्रह धरतात, तर काही विचारवंत आपल्या आकलनाच्या कक्षा रुंदावण्यासाठी आंतरराष्ट्रीय साहित्यकृतींचा संपर्क वाढविण्याची भाषा करतात. मराठीपुरते बोलायचे तर मराठीबाबतचा न्यूनगंड काढून टाकावा आणि सर्व व्यवहार मराठीतच करावे, असा आग्रह एकीकडे तर, आपण

मराठीचीच कास धरत राहिलो तर आपण मागे पडल्यावाचून राहाणार नाही, असा धोक्याचा इशारा दुसरीकडे! अर्थात ही परिस्थिती मराठी भाषकांपुरती मर्यादित नाही. जगभरातच जागतिकीकरणाच्या प्रक्रियेबद्दल उलटसुलट मतप्रवाह आहेत. आपले आर्थिक व राजकीय वर्चस्व प्रस्थापित करण्याचा मुख्यत: अमेरिकेसारख्या आणि अनुषंगाने इतर युरोपीय देशांचा हा कार्यक्रम आहे असे आरोप केले जात आहेत. यातही नेमके तथ्य किती ते सागंणे अवघड आहे. बरे तथ्य असले तरी आपण काय करणार? अशी प्रकारची एक परवशतेची भावना सर्वच माणसांमध्ये वाढते आहे. संपर्कमाध्यमांच्या भाषेचे त्यांद्वारे होणाऱ्या करमणुकीमागील वृत्तिप्रवृत्तींचे, वेगवेगळ्या वाहिन्यांद्वारा चालवल्या जाणाऱ्या मालिकांचे भाषेवर, साहित्यनिर्मितीवर व लोकांच्या मन:स्थितीवर होणारे जे आक्रमण आहे ते झपाट्याने वाढते आहे. या आक्रमणाचा निप्पात कसा करावा तेही पुरतेपणाने उमगत नाही. असे अनेकानेक पेच आहेत. जागतिकीकरणाचा एक दुष्परिणाम रंगनाथ पठारे यांनी सर्वांच्या निदर्शनास आणला आहे. ते म्हणतात, ''जागतिकीकरणात माणसांसकट साऱ्या सजीव-निर्जीव वस्तूंचे सपाटीकरण होणार. तिथं बदलाला जागाच उरणार नाही. संकराची संधीच नाही. बदलायचं असेल, ते करणं त्यांना आवश्यक असेल तर ते बदलतील. बाकीच्यांनी तो विचार करायचा नाही. निसर्गाच्या व्यवस्थेतला हा आडमाप वा वारेमाप हस्तक्षेप दुनियेला सपाट करून टाकील. उभ्या-आडव्या कोणत्याही अक्षांच्या कल्पनांची गरजच राहणार नाही. दोन इलेक्ट्रॉन घेतले तर ते अगदी एकसारखे असतात. वेगळी ओळख न उरलेले असतात. तसंच माणसांचं. यातून दुनियेत फक्त काही माणसं साऱ्या इतरांवर ताबा मिळवणार. इतर जे आहेत ते सारे एकसारखे. वेगवेगळ्या माणसांनी वेगवगेळ्या प्रकारे विचार करून, विचारविनिमय करून, निके सत्त्व शोधून सत्याच्या निकट जायचे असते. त्यातूनच मानवी संस्कृतीचा विकास होतो असं आजवर आपण म्हणत आलो. अशा विकासात सहभागीहोण्याची संधीच दुनियेतल्या बव्हंशी माणसांकडून काढून घेतली जाईल.'' (पठारे, रंगनाथ, २००३, पृ. २६)

जागतिकीकरणाची प्रक्रिया मूलत: आर्थिक असल्यामुळे तिचा परिणाम एका मर्यादित अर्थाने का होईना प्रत्यक्षाप्रत्यक्षपणे साहित्यावर घडणार यात शंकाच नाही. जगातील कोणतीही साहित्यकृती मग ती कोणत्याही भाषेतली असो तिच्यातून जर अर्थलाभ घडणार असेल तर देशांच्या सीमा ओलांडून व्यावसायिक प्रकाशक एक विक्रीची वस्तू म्हणून तिचा अग्रक्रमाने विचार करू शकतात.

''वाङ्मयविश्वाला बाजारपेठेचे एक परिमाण असते तसेच निखळ वाङ्मयीन मूल्यांचेही परिमाण असते. या दुसऱ्या परिमाणाचे बाजारपेठेशी नेहमीच निकटचे नाते नसते. ...खुल्या बाजारपेठेबरोबरच एक खुली मानसिकता निर्माण होईल या खुल्या मानसिकतेचा निखळ कलात्मक मूल्यांना जपणाऱ्या लेखनाला फायदा होईल... वाङ्मयाच्या सामाजिक परिमाणाविषयी बोलावयाचे तर मराठी वाङ्मयात सामाजिकदृष्ट्या विकेंद्रीकरणाची, अनेककेंद्रीयत्वाची प्रक्रिया सुरू झालीच आहे. ही प्रक्रिया जागतिकीकरणाच्या युगात अधिक वेग घेईल, समाजातल्या वेगवेगळ्या घटकांना अधिक मुक्तता, अधिक अवकाश व निवडस्वातंत्र्य उपलब्ध होईल. एकंदरीतच जागतिकीकरणाचे वाङ्मयीन परिणाम उपकारक होतील. ...वसाहतवादाच्या दीर्घ अनुभवामुळे भारतीय वाङ्मयांना जागतिक संदर्भात दुय्यम स्थान दीर्घकाळ अनुभवावे लागलेले आहे त्याहून आणखी वाईट परिस्थिती काय होणार? ...मराठी पुस्तकांना पाश्चात्त्य बाजारपेठेत (अनुवादाद्वारे) चंचूप्रवेश करण्याची संधी उपलब्ध होईल. ...मराठीबाहेरील निरीक्षक मराठी वाङ्मयावर जेव्हा दृष्टिक्षेप टाकतील तेव्हा त्यांना त्यांच्या दृष्टीने लक्षणीय वाटेल अशा लेखनाचीच ते नोंद घेतील. मराठी मध्यवर्ती संस्कृतीला जे लेखक महत्त्वाचे वाटतात ते बाहेरच्यांनाही वाटतीलच असे नाही. ...परक्यांनी केलेली खुली, स्वतंत्रचिकित्सा व आंतरराष्ट्रीय तौलनिक मूल्यमापन यांना केवळ भारतीय वाङ्मयांना तोंड द्यावे लागेल असे नव्हे, तर पाश्चात्त्य वाङ्मयांनाही तीच परीक्षा पार पाडावी लागेल. सर्व वाङ्मयांचे मूल्यमापन 'मेरीट'वर होण्याची शक्यता वाढेल.'' असे विचार विलास सारंग यांनी मांडले आहेत. (सारंग, विलास, २००७, पृ.५-६-७-८)

जागतिकीकरणाच्या संदर्भात वरील विचारांपेक्षा अगदी वेगळे विचार भालचंद्र नेमाडे यांनी मांडले आहेत. ''जागतिकीकरणाला थोपवून धरणारं देशी परंपरांसारखं दुसरं कोणतंही अमोघ शस्त्र नाही. तुमची परंपरा डोळसपणे चालू

ठेवली ना, की तुम्हाला नाहीसं होण्याचा धोका नाही. तुम्ही जर जुन्या काळाप्रमाणं मुंडासं वापरत असाल तर तुम्हाला नव्या हॅटचा धोका नाही. पण तुम्ही बोडके राहिला तर हॅटचा धोका आहे. कारण हॅट अशा रिकाम्या जागेवर बसू शकते. हॅटच्या ठिकाणी परदेशी संस्कृतीचं कोणतंही एक तत्त्व म्हणून पोशाख-रचनेमधला एक जोड syntagm म्हणून मी हे रूपक सांगितलं. प्रत्येक परंपरेचं असं आहे, तिथे पोकळी निर्माण झाली तर आपोआप आगंतुक परक्या क्रयवस्तूनं ती पोकळी भरून निघेल आणि ती तुमच्या इच्छेशिवाय भरून निघणार. विवाहबाह्य लिंगस्वातंत्र्य आज मुंबईपुण्यापर्यंत, उद्या कोल्हापूरपर्यंत येणार. पेशव्यांसारख्या स्वार्थी राज्यकर्त्यांनी निर्माण केलेली राज्यशासनाची पोकळी आपोआप ईस्ट इंडिया कंपनीच्या उनाड नोकरांनी भरून काढलीच. असा वसाहतवाद पसरत गेला. देशभरातल्या इतक्या हुशार लोकांना चीत करणारी गोष्ट हां हां म्हणता घडलीच की नाही? याचं कारण आपण परक्यांसाठी ती पोकळी करून ठेवली होती. मग इतिहासकार म्हणायला तयारच की इंग्रज असल्यामुळे तर तुम्ही आधुनिक झाला. आणि पुढे हेत्वाभास हा की आधुनिक होण्याचा एकमेव मार्ग म्हणजे पाश्चात्त्यीकरण. आता त्याच वसाहतीकरणाचा विकसित झालेला, आजची पोकळी भरून काढणारा राजमार्ग हा जागतिकीकरणाचा. याला कवच म्हणजे आपापल्या लहान लहान देशी परंपरा वारसा म्हणून वापरणं, हा आपला नैतिक हक्क आहे. तो गाजविण्याचा आपल्याला अधिकार आहे.''

आपल्या अत्यंत जवळची, रोजची, स्थानिक संस्कृती सांभाळून ठेवणं ह्यात आपल्या नैतिक हक्काचं सामर्थ्य अधिक आहे. मोठमोठ्या राष्ट्रीय संस्कृती ह्या त्यांच्या पोटातल्या लहान लहान संस्कृतींमुळेच टिकतात. मराठी वाचवायची मला फिकीर नाही. कारण मराठी अशी लहान लहान बोलींनी टिकवून ठेवली आहे. मी घरात खानदेशी बोलतो, तसं घरात कोकणी बोलणाऱ्यांना मराठी मेल्याची चिंता नाही. कारण कोकणी टिकली तर मराठी टिकेलच आणि मराठी टिकली तर महाराष्ट्र टिकेल, महाराष्ट्र टिकला तर हिंदुस्थान-असा हा सारा व्यूह आहे. ह्या आपल्या हजारो वर्षांपासूनच्या समृद्ध अशा परंपरांना चिकटून राहणं हा आपला नैतिक हक्क आहे. (नेमाडे, भालचंद्र ,२००३, पृ.२०-२१) नेमाडे यांनी आपली पारंपरिक बहुसांस्कृतिकता, बहुभाषिकता टिकवून ठेवण्याची गरज प्रतिपादन केली आहे. एकसांस्कृतिक दृष्टी बाळगली तर ती सर्वनाशाकडे नेते उलट बहुसांस्कृतिकतेमध्ये जागतिकीकरणाला पुरून उरण्याची ताकद आहे असा नेमाडे यांचा अभिप्राय आहे.

शेवटी आपण हेही लक्षात घेतलं पाहिजे, तुम्ही किती जरी विरोध केला तरी जागतिकीकरण व्हायचं असलं तर होईल. एकच भाषा यायची असली तर येईल. इंग्रजी राष्ट्रभाषा व्हायची असली तरी होईल. पण आपला हा नैतिक हक्क आहे, की याला विरोध करणं. आणि एका माणसानं जरी विरोध केला तरी ती साखळी संपते, ती पुढे जात नाही. कोणी माझ्यापर्यंत जागतिकीकरणाचे गोडवे गातील, पण माझ्यानंतर ते गोडवे पुढे जाणार नाहीत. मी मधे ठामपणे उभा राहिलो तर माझ्यापलीकडे मी ते किरण जाऊ देणार नाही, अशी जर प्रत्येकाने परिस्थिती निर्माण केली तर कदाचित आपापल्या देशी भाषा वाचवता येतील आणि छोट्या छोट्या देशी संस्कृती वाचवता येतील. ज्याला आपण बहुसांस्कृतिकता म्हणतो; ते आपलं वैभव आहे, वारसा, परंपरा आहे. मूल्य आहे.

मघाशी मी म्हटल्याप्रमाणे यूनेस्कोनं ह्यूमन राइट्स रेकॉर्डमध्ये हीसुद्धा एक कसोटी घातली पाहिजे. ह्या कलमांमुळेसुद्धा आपला देश इंग्लंड, अमेरिका वगैरेंच्या बराच वर जाईल. परंतु भाषा नाहीशी करणारे नेमके हेच लोक युनेस्कोमध्ये कसोट्या लावणारे आहेत. अशा त्यांना न परवडणाऱ्या कसोट्या घालू देणार नाहीत. ते म्हणतीलच की बहुभाषिकत्वाचा, बहुसांस्कृतिकतेचा मानवी हक्कांशी संबंध काय येतो? जे मरायचे असले ते मरतील! आपण आपली इंग्रजी भाषा रेटत राहायची. आज अतिशय उच्च विद्याविभूषित हिंदुस्थानी इंजिनिअर डॉक्टरलासुद्धा अमेरिकेत जायचं असेल तर त्याला इंग्रजीची परीक्षा द्यावी लागते. त्यांच्यापेक्षा आपण इंग्रजी चांगलं बोलतो असं, आपण म्हणतो. पण ती परीक्षा दिल्याशिवाय शिरू देत नाहीत. इतकं काटेकोर भाषिक धोरण या तथाकथित जागतिकीकरण देणाऱ्या तिकडच्या सर्वच देशांमध्ये सर्रास लावलं जातं आणि आपण जे उदारमतवाद म्हणून या सगळ्या भाषा सांभाळत आहोत, त्यांना वाईट दिवस आले आहेत. (नेमाडे भालचंद्र , २००३, तत्रैव, पृ. १९)

वरील विवेचन काहीशा विस्ताराने केले आहे ते सहजपणे सर्वसामान्य वाचकवर्गाला आता अन्यत्र वाचावयास मिळत नाही म्हणून केले आहे. प्रस्तावनेकडे या दृष्टीने पाहावे आणि जाणकार वाचकांनी प्रस्तावनेतील न्यून पुरते करून घ्यावे, अशी विनंती आहे.

चरित्रकोशाचे दिलीप करंबेळकर व सुपर्णा कुलकर्णी आणि खंड संपादक डॉ. सुभाष भेंडे यांनी ज्या विश्वासाने माझ्यावर हे काम सोपविले तो त्यांचा विश्वास सार्थ ठरला की न ठरला हे त्यांनीच ठरवणे उचित होईल. तूर्त मी ही जबाबदारी सोपविल्याबद्दल त्यांचे आभार मानतो. हे काम करताना माझ्या सहकारी आरती जोशी यांनी मला मनापासून साहाय्य केले याबद्दल मी त्यांचाही आभारी आहे.

**– विलास खोले**

*गीतवसंत, प्लॉट नं. ३७,*
*स्वेदगंगा हाऊसिंग सोसायटी,*
*वारजे, पुणे – ४११०५८*

# संदर्भ सूची


अदवंत, म. ना. (संपा.), १९६४, *हरिभाऊ : विविध दर्शन*, स्कूल अँड कॉलेज बुकस्टॉल, कोल्हापूर

आक्वर्थ, ह्यारी आर्बुथ्नॉट, व
शंकर तुकाराम शालिग्राम, १९११, *इतिहासप्रसिद्ध पुरुषांचे व स्त्रियांचे पोवाडे*, (दु. आ.) आर्यभूषण छापखाना, पुणे

काळे, अक्षयकुमार, १९९९, अर्वाचीन मराठी काव्यदर्शन, पां. ना. बनहट्टी प्रकाशन, नागपूर

कीर, धनंजय, १९७५, *महात्मा जोतीराव फुले आमच्या समाजक्रांतीचे जनक*, (दु. आ.चे पुनर्मुद्रण), पॉप्युलर प्रकाशन मुंबई

कीर, धनंजय, मालशे स. गं., १९८०, महात्मा फुले समग्र वाङ्मय, (दु.आ.) महाराष्ट्र राज्य साहित्य आणि संस्कृती मंडळ, मुंबई

कीर धनंजय, २००८, *डॉ. बाबासाहेब आंबेडकर*, (चौथी सुधारित आवृत्ती, तिसरे पुनर्मुद्रण) पॉप्युलर प्रकाशन, मुंबई

कुळकर्णी, कृ. भि., १९५६, *आधुनिक मराठी गद्याची उत्क्रांती*, मुंबई मराठी ग्रंथसंग्रहालय, कृ. भि. कुळकर्णी, मुंबई

कुळकर्णी, कृ. भि., १९७३, *पाठ्यपुस्तकांची भाषांतरे, मराठी वाङ्मयाचा इतिहास* खंड चौथा, दु. आ., संपा. रा. श्री. जोग, महाराष्ट्र साहित्य परिषद, पुणे

कुलकर्णी गो. म. (संपा.), १९८६, *दलितसाहित्य : प्रवाह आणि प्रतिक्रिया*, ( प्र.आ.) (द्वि.आ. १९९७), –मेहता पब्लिशिंग हाऊस, पुणे,

कुलकर्णी, गो. म.,
कुलकर्णी, व. दि.(संपा.), १९८८, *मराठी वाङ्मयाचा इतिहास* खंड सहावा : भाग पहिला, महाराष्ट्र साहित्य परिषद, पुणे

कुलकर्णी, गो. म., १९९४, *आधुनिक मराठी वाङ्मयाची सांस्कृतिक पार्श्वभूमी* (इ. स. १६८०–१९५०), मेहता पब्लिशिंग हाऊस, पुणे

कुलकर्णी गो. म., १९९५, *गांधीवाद आणि आधुनिक मराठी साहित्य*, प्रतिमा प्रकाशन, पुणे

कुलकर्णी, गो. म., १९९७, *दलितसाहित्य : प्रवाह आणि प्रतिक्रिया*, दु. आ., मेहता पब्लिशिंग हाऊस, पुणे

कुलकर्णी, व. दि.,
कुलकर्णी, गो. म.(संपा.), १९९१, *मराठी वाङ्मयाचा इतिहास* खंड सहावा : भाग दुसरा, महाराष्ट्र साहित्य परिषद, पुणे

कुळकर्णी, वि. ह., १९३५, मराठी कादंबऱ्या, *अर्वाचीन मराठी साहित्य*, (सन १८७५–१९३५), प्रकाशक वि. पां. नेने, बडोदे,

केळकर, न. चिं., १९२२, *मराठे व इंग्रज* (मराठेशाहीचे शतसांवत्सरिक वाङ्मयश्राद्ध), केशव रावजी गोंधळेकर, रावजी श्रीधर गोंधळेकर बुक डेपो, पुणे

कोत्तापल्ले, नागनाथ, २००७, *ग्रामीण साहित्य : स्वरूप आणि शोध,* सुधारित तृतीय आवृत्ती, स्वरूप प्रकाशन, औरंगाबाद

कोत्तापल्ले, नागनाथ;
शिंदे, विश्वनाथ;
तुकदेव रोहिणी (संपा.), २००७, *साहित्य आणि समाज,* प्रतिमा प्रकाशन, पुणे

खरे, वा. वा., १९२२, *उपोद्घात, मराठे व इंग्रज* (मराठेशाहीचे शतसांवत्सरिक वाङ्मयश्राद्ध), तृतीय मुद्रण, केशव रावजी गोंधळेकर, पुणे

खानोलकर, गं. दे, १९४९, *अर्वाचीन मराठी वाङ्मयसेवक* (तृतीय खंड), स्वस्तिक प्रकाशन, मुंबई

खानोलकर, गं. दे, १९६२, *अर्वाचीन मराठी वाङ्मयसेवक* (पंचम खंड), व्हीनस प्रकाशन, पुणे

खानोलकर, गं. दे, १९६७, *अर्वाचीन मराठी वाङ्मयसेवक* (सप्तम खंड), व्हीनस प्रकाशन, पुणे

खानोलकर, गं. दे, शके १८५३, *अर्वाचीन मराठी वाङ्मयसेवक* (प्रथम खंड), एम. एन. कुळकर्णी, भारत गौरव ग्रंथमाला, पुणे

खानोलकर, गं. दे, १९४९, *अर्वाचीन मराठी वाङ्मयसेवक* (द्वितीय खंड), स्वस्तिक पब्लिशिंग, मुंबई

खानोलकर, गं. दे, १९५७, *अर्वाचीन मराठी वाङ्मयसेवक* (चतुर्थ खंड), स्वस्तिक पब्लिशिंग हाऊस, मुंबई

खानोलकर, गं. दे, १९६३, *अर्वाचीन मराठी वाङ्मयसेवक* (षष्ठ खंड), व्हीनस प्रकाशन, पुणे

खानोलकर, गं. दे, शके १८५३, *अर्वाचीन मराठी वाङ्मयसेवक* (प्रथम खंड), एम. एन. कुळकर्णी, भारत गौरव ग्रंथमाला, पुणे

खोले, विलास (संपा.), १९९७, *ताराबाई शिंदे-लिखित स्त्रीपुरुषतुलना,* प्रतिमा प्रकाशन, पुणे

खोले, विलास (संपा.) २००२, *गेल्या अर्धशतकातील मराठी कादंबरी,* लोकवाङ्मय गृह, मुंबई

खोले, विलास (संपा.), २००४, *विसाव्या शतकातील मराठी समीक्षा,* प्रतिमा प्रकाशन, पुणे

खोले विलास (प्रस्तावना), २००८, *शांताराम पारितोषिक कथा,* मॅजेस्टिक प्रकाशन, मुंबई

गर्गे, स. मा.(संपा.), १९९२, *मराठी रियासत* खंड ८, गो. स. सरदेसाई, (दु.आ.), पॉप्युलर प्रकाशन, मुंबई

गर्गे, स. मा. (संपा.), १९९३, *ब्रिटिश रियासत* खंड १, गो. स. सरदेसाई, (ति.आ.), पॉप्युलर प्रकाशन, मुंबई

गर्गे, स. मा. (संपा.), १९९३, *ब्रिटिश रियासत* खंड २, गो. स. सरदेसाई, (दु.आ.), पॉप्युलर प्रकाशन, मुंबई

गडकरी, रा. ग., *एकच प्याला,* नेर्लेकर बुकसेलर्स, पुणे

चुनेकर, सु. रा., १९९५, *सूचींची सूची,* मुंबई विद्यापीठ, मराठी विभाग आणि प्रतिमा प्रकाशन, पुणे

जाधव, मनोहर, २००१, *दलित स्त्रियांचा आत्मकथने : स्वरूप आणि चिकित्सा,* सुविद्या प्रकाशन, पुणे

जावडेकर, शं. द., १९४९, *जीवन-रहस्य (म. गांधी यांचे विस्तृत चरित्र),* देशमुख आणि कंपनी, पुणे

जावडेकर, शं. द., १९६८, *आधुनिक भारत,* ति.आ., सुलभ राष्ट्रीय ग्रंथमाला, पुणे

जांभेकर, ग. गं., १९५०, *पश्चिम भारतांतील नवयुगप्रवर्तक आणि आधुनिक महाराष्ट्राचे जनक आचार्य बाळ गंगाधर शास्त्री जांभेकर (१८१२-४६) यांचे जीवनवृत्त व लेखसंग्रह खंड २,* पुणे

जोग, रा. श्री. जोग (संपा.),१९७३, *मराठी वाड्मयाचा इतिहास,* खंड चौथा, दु.आ., महाराष्ट्र साहित्य परिषद, पुणे

जोग, रा. श्री.(संपा.), १९७३, *मराठी वाङ्मयाचा इतिहास*, खंड पाचवा भाग पहिला, महाराष्ट्र साहित्य परिषद, पुणे

जोग, रा. श्री.(संपा.), १९७३, *मराठी वाङ्मयाचा इतिहास*, खंड पाचवा भाग दुसरा, महाराष्ट्र साहित्य परिषद, पुणे

जोग, वि. स., १९८१, *मार्क्सवाद आणि मराठी साहित्य,* विजय प्रकाशन, नागपूर

जोशी, लक्ष्मणशास्त्री, २००९, *लोकमान्य टिळक लेखसंग्रह* (संपा.) (पुनर्मुद्रण), साहित्य अकादमी, नवी दिल्ली

थोरात, हरिश्चंद्र, २००५, *साहित्याचे संदर्भ,* मराठी विभाग मुंबई विद्यापीठ आणि मौज प्रकाशन गृह, मुंबई

देशपांडे, कुसुमावती, १९७५, *मराठी कादंबरी पहिले शतक,* मुंबई मराठी साहित्य संघ प्रकाशन, मुंबई

देव, सदाशिव, २००२, *कोशवाङ्मय विचार आणि व्यवहार,* सुपर्ण प्रकाशन, पुणे

नाईक ज. वि., २०००, *दादाभाई नवरोजींचे पूर्वसुरी, आधुनिकता आणि परंपरा : एकोणिसाव्या शतकातील महाराष्ट्र,* संपा. राजेंद्र व्होरा, प्रतिमा प्रकाशन, पुणे

नेमाडे, भालचंद्र, १९९०, *टीकास्वयंवर,* साकेत प्रकाशन, औरंगाबाद

नेमाडे भालचंद्र, २००३, *साहित्य, संस्कृती आणि जागतिकीकरण,* लोकवाङ्मय गृह, मुंबई

पंडित, भ. श्री., १९७३, *काव्य,* जोग, रा. श्री. (संपा.), *मराठी वाङ्मयाचा इतिहास* खंड चौथा, महाराष्ट्र साहित्य परिषद, पुणे

पठारे, रंगनाथ, २००३, *जागतिकीकरण आणि देशीवाद,* लोकवाङ्मय गृह, मुंबई

प्रधान, ग. प्र.(संपा.), १९६०, *आगरकर-लेखसंग्रह,* साहित्य अकादेमी, नवी दिल्ली

पाटील, शरद, १९८८, *अब्राह्मणी साहित्यांचे सौंदर्यशास्त्र,* सुगावा प्रकाशन, पुणे

पाटणकर, रा. भा., १९७४, *सौंदर्यमीमांसा,* इस्थेटिक्स सोसायटी, मौज प्रकाशन गृह, मुंबई

पाध्ये, प्रभाकर, १९८०, *मानव आणि मार्क्स,* श्रीविद्या प्रकाशन, पुणे

प्रियोळकर, अ. का., १९४७, *रावबहादूर दादोबा पांडुरंग,* केशव भिकाजी ढवळे, मुंबई

पोतदार द. वा., १९२२, *मराठी गद्याचा इंग्रजी अवतार* अथवा *इंग्रजी अमलांतील मराठी गद्य वाङ्मयाचा निबंधमालेपूर्वीचा इतिहास,* ए. पी. बापट अँड ब्रदर्स, पुणे

फडके, ना. सी., १९७०, *प्रतिभा-साधन,* आ. दहावी, देशमुख आणि कंपनी, पुणे

फडके, य. दि., १९७७, *शोध : बाळ गोपाळांचा,* श्रीविद्या प्रकाशन, पुणे

फडके, य. दि. (संपा.), १९९१, महात्मा फुले समग्र वाङ्मय, सुधारित चौथी आवृत्ती, महाराष्ट्र राज्य साहित्य आणि संस्कृती मंडळ, मुंबई

बनहट्टी, श्री. ना., १९५७, *मराठी रंगभूमीचा इतिहास,* खंड पहिला (इ.स.१८४३-७९), व्हीनस प्रकाशन, पुणे

मर्ढेकर, बा. सी., १९६०, *सौंदर्य आणि साहित्य,* (दु. आ.)मौज प्रकाशन गृह, मुंबई

मराठे, का. बा., १९६२, *नावल व नाटक ह्यांविषयी निबंध*, दु. आ., मॉडर्न बुक डेपो, पुणे

मुक्तिबोध, शरच्चंद्र, --- *सृष्टी, 'सौंदर्य' आणि साहित्यमूल्य*, लोकवाङ्मय गृह, मुंबई (प्रकाशन वर्ष दिलेले नाही)

मेश्राम, केशव,
देशमुख, उषा, (संपा.) १९९७, *दलित साहित्याची स्थितिगती*, मुंबई

रेगे, मे. पुं., १९९५, *गांधीवाद आणि आधुनिक मराठी साहित्य*, (प्रस्तावना) गांधीवाद आणि आधुनिक मराठी साहित्य, संपा. दत्तात्रय पुंडे, प्रतिमा प्रकाशन, पुणे

रेगे, मे. पुं., २००२, *विवेक आणि न्याय : आधुनिक महाराष्ट्रातील प्रबोधनपर्व*, प्रतिमा प्रकाशन, पुणे

वाळिंबे, रा. शं., १९६२, *एकोणिसाव्या शतकांतील महाराष्ट्राची सामाजिक पुनर्घटना* भाग पहिला (१८००-१८४५), प्रकाशक रा. शं. वाळिंबे, पुणे

वैद्य, द्वा. गो., १९२७, *प्रार्थनासमाजाचा इतिहास*, प्रार्थनासमाज, मुंबई

शेजवलकर, त्र्यं. शं. , १९४०, *शेजवलकरांचे लेख*, पुस्तक १ ले, ह. वि. मोटे, दादर, मुंबई,

शेजवलकर, त्र्यं. शं., १९७७, *त्र्यंबक शंकर शेजवलकर, निवडक लेखसंग्रह*, ह. वि. मोटे, मुंबई

शेरे, नीळकंठ, २००५, *डॉ. बाबासाहेब आंबेडकर आणि दलित वैचारिक वाङ्मय*, सुविद्या प्रकाशन, पुणे

सरदेसाई, गो. स., १९९२, *मराठी रियासत* खण्ड ८, (दु. आ.-संपादित आवृत्ती), पॉप्युलर प्रकाशन, मुंबई

सरदेसाई, गो. स., १९९३, *ब्रिटिश रियासत* खंड १, ईस्ट इंडिया कंपनी (पूर्वार्ध), (ति. आ.-संपादित आवृत्ती) पॉप्युलर प्रकाशन, मुंबई

सरदेसाई, गो. स., १९९३, *ब्रिटिश रियासत* खंड २, ईस्ट इंडिया कंपनी (उत्तरार्ध),(दु. आ.-संपादित आवृत्ती) पॉप्युलर प्रकाशन, मुंबई

सारंग, विलास, २००७, *सर्जनशोध आणि लिहिता लेखक*, मौज प्रकाशन गृह, मुंबई

हस्तक, उषा, आणि
कुळकर्णी, वा. ल., १९७३, *मराठी कादंबरी, मराठी वाङ्मयाचा इतिहास* खंड पाचवा, भाग पहिला, संपा.रा. श्री. जोग, महाराष्ट्र साहित्य परिषद, पुणे

व्होरा, राजेंद्र (संपा.), २०००, *आधुनिकता आणि परंपरा एकोणिसाव्या शतकातील महाराष्ट्र*, प्रतिमा प्रकाशन, पुणे

Devy, G. N., 1995, *After Amnesia Tradition and Change in India Literary Criticism*, (Paperback Edition), Orient Longman, Mumbai

Gopal, Sarvepalli, 1989, *Jawaharlal Nehru A Biography*, Oxford University Press, New Delhi

Ledrle, Matthew, 1978, Philosophical Trends In Modern Maharashtra, Popular Prakashan, Mumbai

Nevins, Allan, 1968, *The Gateway to History*, Indian Reprint, Vora & Co., Publishers Private Ltd., Mumbai

Nurullah Syed and
Naik J. P., 1943, *History of Education in India During The British Period*, Macmillan & Co., Ltd, Mumbai

Nurullah Syed and
Naik J. P., 1970, *A Students' History of Education in India (1800-1965)*, Fifth Edition Reprinted, Macmillan & Co., Ltd, Mumbai

Ranade, M. G., 1902, *Religious & Social Reform* A Collection of Essays and Speeches, Gopal Narayen And Co., Booksellers. G. Claridge and Co., Mumbai

Ranade, Ramabai, 1915, *Miscellaneous Writings of the Late Hon'ble Mr. Justice M. G. Ranade*, The Manoranjan Press, Mumbai

✻ ✻ ✻

## अन्य अभ्यासग्रंथ


कुळकर्णी, पु. बा., १९६३, *मामा परमानंद आणि त्यांचा कालखंड*, पु. बा. कुळकर्णी, मुंबई

कुळकर्णी वा. ल., १९६५, *मराठी ज्ञानप्रसारक* इतिहास व वाङ्मयविचार, पॉप्युलर प्रकाशन, मुंबई

कुलकर्णी, व. दि., १९७४, *'सं. सौभद्र' : घटना आणि स्वरूप*, व्हीनस प्रकाशन, पुणे

कुळकर्णी, वा. ल., १९७८, *नाटककार खाडिलकर एक : अभ्यास*, (दु. आ.) पॉप्युलर प्रकाशन, मुंबई

कुलकर्णी अ. अ. (संपा.), १९९८, *प्रदक्षिणा* खंड दुसरा, (दु. आ.)कॉन्टिनेन्टल प्रकाशन, पुणे

गोगटे, शरद, २००८, *मराठी ग्रंथप्रकाशनाची २०० वर्षे*, राजहंस प्रकाशन, पुणे

चित्रे, दिलीप पुरुषोत्तम, २००६, *साहित्य आणि अस्तित्वभान - १*, शब्दालय प्रकाशन, श्रीरामपूर

जाधव, मनोहर, २००१, *समीक्षेतील नव्या संकल्पना*, स्वरूप प्रकाशन, औरंगाबाद

जाधव, रा. ग., २००९, *मराठी वाङ्मयाचा इतिहास, खंड सातवा : १९५० ते २००० भाग पहिला*, महाराष्ट्र साहित्य परिषद, पुणे

जोग, रा. श्री.(संपा.), १९४६, *अर्वाचीन मराठी काव्य*, नवभारत प्रकाशन-संस्था, मुंबई

जोशी, नारायण विष्णु, १९७१, *पुणे शहराचे वर्णन*, साहित्य सहकार संघ प्रकाशन, मुंबई

जोशी, वसंत स., १९८१, *भाषा व साहित्य : संशोधन*, महाराष्ट्र साहित्य परिषद, पुणे

टिकेकर, अरुण, २००७, *ऐसा ज्ञानसागरु* बखर मुंबई विद्यापीठाची, पॉप्युलर प्रकाशन, मुंबई

डहाके, वसंत आबाजी, २००६, *मराठी साहित्य इतिहास आणि संस्कृती*, पॉप्युलर प्रकाशन, मुंबई

तळवलकर, गोविंद, १९८३, *सत्तांतर : १९४७* खंड १, मौज प्रकाशन गृह, मुंबई

तळवलकर, गोविंद, १९८३, *सत्तांतर : १९४७* खंड २, मौज प्रकाशन गृह, मुंबई

थोरात, हरिश्चंद्र, २००६, *कादंबरीविषयी*, पद्मगंधा प्रकाशन, पुणे

दामले, सीताराम केशव, १९२४, *महात्मा गांधी (चरित्र, कामगिरी आणि शिकवण)*, प्रकाशक - पी. एस. भासे (Bhase), मॅनेजर, भारत गौरव ग्रंथ माला, गिरगाव, मुंबई

दावतर, वसंत, १९६६, *केशवसुत गाउनि गेले*, आलोचना प्रकाशनासाठी के.जे. सोमैया कॉलेज विद्याविहार, मुंबई

पाटणकर रा. भा., १९९९, *अपूर्ण क्रांती*, मौज प्रकाशन गृह, मुंबई

पंडित, नलिनी, १९७२, *महाराष्ट्रातील राष्ट्रवादाचा विकास*, (दु. आ.) मॉडर्न बुक डेपो प्रकाशन, पुणे

पटवर्धन सी. पु., १९२८, *महात्माजींचे सत्याचे प्रयोग अथवा आत्मकथा*, सुलभ राष्ट्रीय ग्रंथमाला, धुळे

पानतावणे, गंगाधर, २००९, *डॉ.बाबासाहेब आंबेडकर यांचे निवडक लेख*, प्रतिमा प्रकाशन, पुणे

पाटणकर, वसंत, २००२, *स्वातंत्र्योत्तर मराठी कविता* (१९४५ ते १९६०), साहित्य अकादेमी, न्यू दिल्ली

पाटील चंद्रकांत, १९८८, *आणि म्हणूनच*, प्रतिमा प्रकाशन, पुणे

फाटक, न. र., १९७२, *लोकमान्य*, मौज प्रकाशन गृह, मुंबई

फाटक, न. र., १९६६, *महादेव गोविंद रानडे* यांचे चरित्र, नीलकंठ प्रकाशन, पुणे

भावे, वा. कृ., १९७६, *पेशवेकालीन महाराष्ट्र*, भारतीय इतिहास अनुसन्धान परिषद, नवी दिल्ली

भोळे, भा. ल, आणि बेडकिहाळ किशोर, २००३, *बदलता महाराष्ट्र* (साठोत्तर परिवर्तनाचा मागोवा) डॉ.एन.डी. पाटील गौरव ग्रंथ, डॉ. बाबासाहेब आंबेडकर अकादमी, सातारा

मुळजकर-मोकाटे, नलिनी, १९८९, *आधुनिक मराठी गद्याचे जनक बाळशास्त्री जांभेकर*, सायंटिफिक इलेक्ट्रिकल्स, शालीबंडा, हैद्राबाद (आंध्र)

यादव, आनंद, १९७९, *ग्रामीण साहित्य : स्वरूप आणि समस्या*, मेहता पब्लिशिंग हाऊस, पुर्णे

लेले, रा. के., १९८४, *मराठी वृत्तपत्रांचा इतिहास*, कॉन्टिनेन्टल प्रकाशन, पुणे

शहा, विभा, १९९८, *मराठी ऐतिहासिक कादंबरी : एक अभ्यास*, मेहता पब्लिशिंग हाऊस, पुणे

शेरे, नीळकंठ, २००९, *आंबेडकरवाद*, सुविद्या प्रकाशन, पुणे

सरदार, गं. बा., १९५६, *अर्वाचीन मराठी गद्याची पूर्वपीठिका*, मॉडर्न बुक डेपो प्रकाशन, पुणे

वाळिंबे, वि. स., १९९४, *"१९४७"*, मॅजेस्टिक प्रकाशन, मुंबई

Gandhi, M. K., 1927, *The Story of My Experiments with Truth*, Translated from the orig.inal in Gujarati by Mahadev Desai, Navajivan Press, Ahmedabad

Nanda, B. R., 1965, *Mahatma Gandhi* A Biography, George Allen & Unwin (India) Private Limited, Mumbai


* * *



# निर्माण ग्रुप ऑफ कंपनीज

**"To be among the top 5 builder-developers in India, and among the top 25 in the world while being the leader in the affordable housing segment by creating better lifestyles and better environments through state of the art townships at affordable rates.'**

हे ब्रीदवाक्य घेऊन आज निर्माणची वाटचाल सुरू आहे. १९९५ साली अजित मराठे आणि राजेंद्र सावंत या दोन युवकांनी भागीदारीत सुरू केलेल्या ह्या फर्मचे रूपांतर आता निर्माण रिअल्टर्स ॲन्ड डेव्हलपर्स लि. अशा पब्लिक लिमिटेड कंपनीत झाले आहे. येत्या २ ते ३ वर्षांत या कंपनीचा पब्लिक इश्यू बाजारात येणार आहे आणि आज फक्त एक कंपनी न राहता अनेक कंपन्यांचा हा निर्माण ग्रुप तयार झाला आहे. सतीश गानू हे ग्रुपचे संचालक असून मुख्यत्वे ब्रँडिंग अँड मार्केटिंग स्ट्रॅटेजी या महत्त्वाच्या खात्यांची धुरा ते समर्थपणे सांभाळीत आहेत.

निर्माण रिअल्टर्स ॲन्ड डेव्हलपर्स लिमिटेड कंपनीच्या अंतर्गत मुख्यतः बिल्डर-डेव्हलपर म्हणून विविध ठिकाणी जागा विकत घेऊन तेथे विविध प्रकारचे प्रकल्प, मुख्यतः निवासी प्रकल्प उभे केले जातात. असे ४० प्रकल्प विविध स्तरांवर, विविध ठिकाणी सुरू आहेत. कांदिवली, मालाड, जोगेश्वरी, महालक्ष्मी, पार्ले, गोवंडी, नेरळ, रत्नागिरी, गणपतीपुळे, माणगाव (गोरेगाव), गोवेले या ठिकाणी प्रकल्पांचे काम सुरू आहे. झोपडपट्टी पुनर्विकास, जुन्या चाळींचे पुनर्वसन, बंगलो स्कीम, सेकंड होम प्रोजेक्टस अशा विविध प्रकारांत हे प्रकल्प येतात आणि यांतील ९० टक्के प्रकल्प हे ॲफोरडेबल हाउसिंग या प्रकारात मोडतात. यातील महालक्ष्मीचा प्रोजेक्ट मात्र क्लास हाउसिंग या प्रकारात गणला जातो. मुंबईच्या रेसकोर्ससमोर तसेच महालक्ष्मी स्टेशनजवळ २०३ भाडेकरूंच्या पुनर्वसनाचा हा प्रकल्प आहे.

खऱ्या अर्थाने निर्माण ग्रुपचे नाव झाले ते नेरळ येथील सेकंड होम प्रोजेक्टसमुळे. तेथल्या प्रकल्पाला २००८चे 'बेस्ट सेकंड होम्स प्रोजेक्ट' हे ॲकोमोडेशन टाइम्सचे ॲवॉर्ड मिळाले. आज सेकंड होम प्रोजेक्टमध्ये नेरळ येथे 'निर्माण नगरी' 'निसर्ग निर्माण', तसेच 'माथेरान व्हॅली' हे प्रकल्प उभे राहत आहेत. या सेकंड होम प्रोजेक्टचे नाव खऱ्या अर्थाने सर्वदूर पोचवले ते नेरळ स्टेशनपासून १ कि. मी येथे असलेल्या 'निर्माण नॅनो सिटी' या प्रोजेक्टमुळे. मंदीच्या काळात बांधकाम व्यावसायिक नवीन प्रकल्प सुरू करायला घाबरत असतानाही निर्माण ग्रुपने सर्वसामान्य लोकांना परवडतील अशा चार ते साडे चार लाख रुपये किमतीच्या घरांचा 'निर्माण नॅनो सिटी' हा प्रोजेक्ट जाहीर केला.

'बिल्डरच्या हाताखाली बिल्डर' ही संकल्पना निर्माणने अतिशय उत्तमरीत्या राबवून अधिकाधिक मराठी लोकांनी बांधकाम व्यवसायात यावे या दृष्टीने 'निर्माण ट्रेनिंग ॲकेडमी' प्रयत्न करते. प्रत्येक बुकिंगमागे रु.५०००/- हे 'निर्माण चॅरिटेबल ट्रस्ट'च्या खात्यात जमा होऊन त्यातून माणगावचे १०० विद्यार्थी व मुंबईतील काही अनाथाश्रमांतील विद्यार्थीदेखील या योजनेअंतर्गत दत्तक घेतले आहेत. पर्यटन, संगणक, इंग्रजी संभाषण, कृषीविषयक अभ्यासक्रम आदी अभ्यासक्रमांद्वारे कोकणातील उद्योगधंद्यांना पूरक असे मनुष्यबळ विकसित करण्याकरिता माणगाव जिल्हा रायगड येथील आय.आय.टी. केंद्रात शासनाच्या सहयोगाने नवीन अभ्यासक्रम चालू करण्याचा निर्माणचा मानस आहे. निर्माण ग्रुपच्या प्रेरणेने आणि मा.द.मा. सुकथनकर यांच्या मार्गदर्शनाखाली काही कोकणप्रेमी युवकांनी कोकणच्या विकासासाठी एकत्र येऊन सेव्ह कोकण लॅण्ड लिमिटेड या पब्लिक लिमिटेड कंपनीची स्थापना केली आहे. हा सामाजिक दृष्टिकोन ठेवून 'आधुनिक महाराष्ट्राची जडणघडण ह्व शिल्पकार चरित्रकोश' या प्रकल्पास निर्माण सहकार्य करीत आहे.

# अ ते औ



## अत्रे, प्रल्हाद केशव

**कवी, नाटककार, विनोदकार, चित्रपटकथालेखक, वक्ता, शिक्षणतज्ज्ञ**

**१३ ऑगस्ट १८९८ – १३ जून १९६९**

☞ **मुख्य नोंद – पत्रकारिता आणि ललितेतर साहित्य खंड**

आपल्या सहज विनोदनिर्मितीने मराठीत सर्वांत लोकप्रिय विनोदकार प्रल्हाद केशव अत्रे यांचा जन्म पुणे जिल्ह्यातील सासवडच्या कोटीन या गावी झाला.

१९११ मध्ये अत्रे पुण्याला आले व त्यांचे पुढील शिक्षण पुण्याच्या भावे स्कूलमध्ये झाले. पुण्यातील तत्कालीन वाङ्मय जगताने अत्र्यांच्या व्यक्तिमत्त्वाला वेगळेच वळण दिले. १९१२ साली राम गणेश गडकरी यांच्याशी अत्र्यांची भेट झाली. या भेटीचा व त्यानंतर गडकऱ्यांशी आलेल्या संबंधाचा अत्रे यांच्या साहित्यावर बराच प्रभाव पडला. गडकऱ्यांप्रमाणेच श्रीपाद कृष्ण कोल्हटकर, गोविंद बल्लाळ देवल, नारायण वामन टिळक, बालकवी ठोमरे, इत्यादिकांशी त्यांचा परिचय झाला. केशवसुत, गोविंदाग्रज व बालकवी यांच्या कवितेने ते झपाटले गेले. त्यामुळेच त्यांच्या हातून काव्यरचना घडली.

आपल्या असामान्य लेखनकर्तृत्वाने अत्रे यांनी नाटक, काव्य, पाठ्यपुस्तक निर्मिती, व्यक्तिप्रधान लेखन, विनोदी लेखन, विनोदी कथा, चित्रपट कथा अशा साहित्याच्या क्षेत्रांत अस्सल मराठी वळणाचे सुंदर, प्रासादिक व खुमासदार लेखन करणारे सव्यसाची लेखक म्हणून तर मान्यता मिळवलीच शिवाय आपल्या निर्मितीने नाटकांत व विनोदांत अपूर्व असे मानदंड निर्माण केले.

त्यांच्या एकंदर साहित्यनिर्मितीची केवळ नोंदही प्रचंड ठरेल. ‘अकरावा अवतार’ (१९२०), ‘झेंडूची फुले’ (१९२५), ‘गीतगंगा’ (१९३५), ‘पंचगव्य’ (दत्तू बांदेकरांच्या सहकार्याने १९५८) हे कवितासंग्रह; ‘संगीत गुरुदक्षिणा’ (१९३०), ‘संगीत वीरवचन’ (१९३२), ‘साष्टांग नमस्कार’ (१९३३), ‘घराबाहेर’ (१९३३), ‘भ्रमाचा भोपळा’ (१९३५), ‘उद्याचा संसार’ (१९३६), ‘लग्नाची बेडी’ (१९३६), ‘वंदे मातरम्’ (१९३७), ‘पराचा कावळा’ (१९३८), ‘मी उभा आहे’ (१९३९), ‘जग काय म्हणेल?’ (१९४६), ‘पाणिग्रहण’ (१९४६), ‘कवडीचुंबक’ (१९५१), ‘एकच प्याला’ (गडकऱ्यांच्या ‘एकच प्याला’ या नाटकाचे विडंबन, १९५३), ‘वसंतसेना’ (१९५८), ‘मोरूची मावशी’ (१९६३), ‘बुवा तेथे बाया’ (१९६४), ‘तो मी नव्हेच’ (१९६५), ‘मी मंत्री झालो’ (१९६६), ‘डॉक्टर लागू’ (१९६७), ‘प्रीतिसंगम’ (१९६८), ‘ब्रह्मचारी’ (१९६९), ‘अशी बायको हवी’ (१९६९), ‘सम्राट सिंह’ (शेक्सपिअरच्या ‘किंग लिअर’चा अनुवाद, १९७३), ‘साखरपुडा’ (१९४२), ‘ब्रँडीची बाटली’ (१९४४), ‘वामकुक्षी’ (१९४९), ‘बत्ताशी आणि इतर कथा’ (१९५४), ‘हास्यकथा’ (भाग १, १९५८), ‘हास्यकथा’ (भाग २, १९५९) हे कथा संग्रह; ‘महाराष्ट्र मोहरा’ (१९१४), ‘मोहित्यांचा शाप’ (१९२१), ‘चांगुणा’ (१९५४) या कादंबऱ्या; ‘मी कसा झालो?’ (१९५३), ‘कऱ्हेचे पाणी’ हे आत्मवृत्तात्मक लेखन; ‘चित्रकथा’ (भाग ११ : १९५९) हा चित्रपट कथासंग्रह; ‘अत्रे उवाच’ (१९३७–१९४२), ‘स्वराज्याचा अरुणोदय’ (१९४६), ‘पत्रकार अत्रे’ (१९५३), ‘सूर्यास्त’ (१९६४), ‘सुभाषकथा’ (१९६४), ‘इतका लहान – इतका महान’ (१९६६), ‘समाधीवरील अश्रू’

(१९६९), 'मृत्यूचे चुंबन घेणारा महाकवी' (१९७३), 'क्रांतिकारकांचे कुलपुरुष स्वातंत्र्यवीर सावरकर' (१९८३) 'गडकरी सर्वस्व' (१९८४), 'मी अत्रे बोलतोय' (१९९६) आदी लेखसंग्रह, आणि सुमारे पन्नास पुस्तकांना लिहिलेल्या प्रस्तावना असा अत्रे यांचा विपुल साहित्यसंभार आहे.

**खरीखुरी अतिशयोक्ती**

आपले लेखन करताना अत्रे यांनी काही वेळा 'मकरंद', 'केशवकुमार', 'आनंदकुमार', 'आत्रेय', 'घारूअण्णा घोडनदीकर', 'सत्यहृदय', 'प्रभाकर', 'साहित्य फौजदार', 'वायुपुत्र', 'काकाकुवा', 'अस्सल धुळेकर', 'निकटवर्ती', 'जमदग्नी', 'महाराष्ट्र सेवक' इत्यादी टोपणनावे उपयोगात आणली आहेत. आधुनिक महाराष्ट्रात इतके विविधांगी कर्तृत्व दाखविणारा दुसरा लेखक सांगणे अतिशय अवघड आहे. ही सर्व कामगिरी लक्षात घेऊनच 'आचार्य अत्रे, एक खरीखुरी अतिशयोक्ती' असे गंगाधर गाडगीळ यांना म्हणावेसे वाटले आहे. विनोदी लेखक आाणि वक्ता म्हणून महाराष्ट्रात अत्र्यांना जेवढी लोकप्रियता लाभली, तेवढी दुसऱ्या कोणाच्याही वाट्याला आली नाही. अत्रे यांच्या लेखणीचा प्राणभूत घटक म्हणजे विनोद; तो पंडिती वा कोटिबाज नाही. मानवी वर्तनातील व स्वभावातील विसंगती टिपणारा, काही वेळा बोचकारणारा, बाष्कळ, उच्छृंखल व क्वचित शिवराळ आहे. परंतु त्यातील ताजेपणा व उत्स्फूर्तता मराठीतील दुसऱ्या कुठल्याच विनोदकारामध्ये आढळत नाही. त्यांच्या व्यक्तिमत्त्वातील धाडस व आक्रमकता यांचा त्यांच्या साहित्यातही आविष्कार घडतो आणि तोच त्यांच्या साहित्याला वेगळेपणा बहाल करतो.

१९४२ साली नाशिक येथे भरलेल्या साहित्य संमेलनाचे अत्रे अध्यक्ष होते. आपल्या भाषणात त्यांनी अनेक विषयांविषयी विचार मांडले त्यांत त्यांना विनोदाविषयीही आपले मतप्रतिपादन केले आहे. ते म्हणतात, ''मानवी जीवनात रोग, जरा, मरण, अपघात, हानी, पराभव, निराशा, अपमान, अज्ञान, मूर्खपणा अशी अनंत दुःखे भरलेली आहेत. ह्या दुःखांकडे गांभीर्याने पाहिल्यास ती दुणावल्याखेरीज राहणार नाहीत. म्हणून त्यांच्याकडे खेळकर दृष्टीने बघून जीवन सुखावह करण्यासाठी मनुष्याला विनोदाची देणगी मिळालेली आहे. विविध प्रकारचे दुःख हा विनोदाचा एकमेव विषय आहे. समाजातील अनिष्ट रूढी आाणि सवयी नाहीशा करावयाच्या असतील, तर त्यांच्यामधील अनिष्टपणा आाणि निरर्थकता हे विनोदाच्या साहाय्याने समाजापुढे उघडे करून दाखविले पाहिजे.'' त्यांची हीच विनोदविषयक दृष्टी त्यांच्या साहित्यनिर्मितीतूनही प्रकटली आहे.

'झेंडूची फुले' हा अत्रे यांचा अजरामर ठरलेला विडंबन कवितासंग्रह म्हणजे रविकिरण मंडळाची कवितेच्या अंगाने काव्यभाषेत केलेली समीक्षा आहे. 'मी कसा झालो' हे अत्रे यांचे आत्मचरित्रात्मक लेखन १९५३ पर्यंतच्या काळातील अत्र्यांच्या जीवनाचे प्रत्ययकारी व नाट्यपूर्ण असे दर्शन घडविते. 'कऱ्हेचे पाणी' या आत्मचरित्रात्मक खंडांतून त्यांनी महाराष्ट्राचा ऐतिहासिक, राजकीय, सामाजिक व वाङ्मयीन स्वरूपाचा धावता आलेख रेखाटला आहे. सामान्य माणूस मोठी कामगिरी कशी करू शकतो, हे वाचकांच्या मनावर ठसविण्यासाठी त्यांनी हे लेखन केले आहे. त्यांच्या ठायी असणारे सामर्थ्य आणि काय हवे, काय नको; ते रोखठोकपणे सांगणारी पारदर्शी शैली प्रकटते. 'फुलांची ओंजळ', 'बहिणाबाई चौधरी यांच्या कविता', दि. वि. देव संपादित 'उपहासिनी' या काव्यसंग्रहाची प्रस्तावना, 'संपूर्ण गडकरी' व 'अप्रकाशित गडकरी' या ग्रंथांना लिहिलेल्या प्रस्तावना या दृष्टीने विशेष उल्लेखनीय ठरतात.

'गुत्त्यात नारद', 'ब्रँडीची बाटली', 'बाजारात तुरी', 'सार्वजनिक जीवन', 'पहिले कावळे संमेलन', 'गांधीवादी पाहुणे' यांसारख्या त्यांच्या विनोदी कथा, कथेचा प्रकृतिधर्म सांभाळणाऱ्या आहेत. वेधक आरंभ, कृतिप्रधान प्रसंग, पृथगात्म पात्रनिर्मिती, चित्रदर्शी मांडणी, प्रसंगनिष्ठ व शब्दनिष्ठ विनोदातील सहजता व कलाटणीपूर्ण अंत अशा स्वरूपात अत्रे यांच्या कथा साकार होतात. अत्रे यांनी केलेले व्यक्तिगौरवप्रधान लेखन मराठी साहित्येतिहासात अपवादाभूत म्हणावे लागेल. साने

गुरुजी, बाबासाहेब आंबेडकर, जवाहरलाल नेहरू, लालबहादूर शास्त्री आणि अनेकानेक थोर मराठी संत यांचा अत्रे यांनी केलेला गुणगौरव म्हणजे विलोभनीय शब्दप्रभुत्वाचा सहजोद्रेक म्हणता येईल. पत्रकारिता हे अत्रे यांच्या कर्तृत्वाचे एक महत्त्वाचे क्षेत्र आहे. याखेरीज संयुक्त महाराष्ट्राच्या चळवळीत अत्रे यांनी बजावलेली भूमिका तर केवळ अविस्मरणीय होय.

– प्रा. डॉ. विलास खोले

संदर्भ :

१. *अत्रे प्र. के.; 'मी कसा झालो?'; परचुरे प्रकाशन मंदिर, मुंबई, ९वी आवृत्ती; १९९७.*
२. *पै शिरीष; देशपांडे मीना व अन्य, संपादक; आचार्य अत्रे–प्रतिभा आणि प्रतिमा; प्रेस्टीज प्रकाशन, पुणे ; १९९७.*

## अनंतफंदी

☞ **मुख्य नोंद – लोककला खंड**

## अनिल

***देशपांडे, आत्माराम रावजी***

**कवी**

**११ सप्टेंबर १९०१ – ८ मे १९८२**



मराठी कवितेच्या वाटचालीमध्ये आणि अपारंपरिक शिक्षणक्षेत्रात भरीव योगदान असणारे कवी 'अनिल' उपाख्य आत्माराम रावजी देशपांडे यांचा जन्म विदर्भातल्या अकोला जिल्ह्यातील मूर्तिजापुरातील. अमरावती येथल्या तत्कालीन हिंदू हायस्कुलातून शालेय शिक्षण पूर्ण केल्यानंतर पुढील शिक्षणासाठी ते पुण्याच्या फर्गसन महाविद्यालयात दाखल झाले. वऱ्हाडात त्या काळातल्या पांढरपेशा समाजामध्ये शिक्षणासाठी पुण्याला फर्गसन महाविद्यालयात प्रवेश घेण्याची जणू चढाओढ असे. अनिलांनी मॅट्रिकची परीक्षा (१९१९) अलाहाबाद येथून उत्तीर्ण केली होती. तत्त्वज्ञान हा विषय घेऊन पुण्याहून ते बी.ए. (१९२४) झाले. पुढे त्यांनी कायदे शिक्षणाचे धडे घेतले. मध्यंतरीच्या काळात कोलकाता येथील शांतिनिकेतनात नंदलाल बोस यांच्याकडे भारतीय चित्रकलेचा रीतसर अभ्यास केला. १९२५ साली एल्एल.बी. झाले आणि त्यांनी अमरावतीला वकिली सुरू केली. यातूनच होशंगाबाद (मध्य प्रदेश) येथे सब–जज्ज म्हणून त्यांना नियुक्ती मिळाली. कुसुमावती आणि कवी अनिल यांच्यामधील पत्रव्यवहार 'कुसुमानिल' पुस्तकात प्रसिद्ध झाला असून एक वैशिष्ट्यपूर्ण पुस्तक म्हणून त्यास मराठी साहित्यात स्थान मिळाले आहे. १९३० साली त्यांच्या काव्यलेखनास प्रारंभ झाला. 'फुलवात' हा अनिलांचा पहिला कवितासंग्रह १९३२ साली प्रसिद्ध झाला आणि त्या वेळच्या समस्त मराठी साहित्यविश्वाचे लक्ष 'फुलवात'ने वेधून घेतले. त्या काळात 'रविकिरण मंडळा'तील कवींचा बोलबाला मराठीत विशेषत्वाने होता. पांडित्यपूर्ण, संस्कृतप्रचूर शब्दकळा, प्रसंगोत्पातता, शब्दालंकार, यमकादी बंधनांवर कठोर कटाक्ष यांचा त्यांच्या कवितेमध्ये भर असे. या पार्श्वभूमीवर 'हृदयीं लावियली फुलवात' अशा ओळी घेऊन अनिलांचा 'फुलवात' हा संग्रह बाहेर आला. साधी, सरळ व भावस्पर्शी रचना आणि उत्कट गीतात्मता हे या कवितेचे वेगळेपण आणि वैशिष्ट्य ठरले. त्यानंतर तीनच वर्षांनी अनिलांची 'प्रेम आणि जीवन' ही मुक्तछंदातील कविता रसिकांपुढे आली. पाठोपाठ १९४० साली अनिलांनी 'भग्नमूर्ती' हे आपले चिंतनात्मक खंडकाव्य (१९३५) रसिकांना सादर केले. त्यातून कला आणि संस्कृती यांवर अनिलांनी भाष्य केले आहे. महायुद्ध, भारताचा स्वातंत्र्यलढा, मार्क्सवादाचा पगडा आणि त्याने केलेली एकूणच समाजरचनेची नवी मांडणी, अशा सर्व उठावात्मक चळवळींचा हा काळ. 'भग्नमूर्ती' किंवा 'निर्वासित चिनी मुलास' (१९४३) ह्या रचनांमधून त्यांचे चिंतनात्मक पडसाद दिसून येतात. या रचनांसाठी अनिलांनी वापरलेल्या मुक्तछंदाने मराठी साहित्यविश्वात मोठेच वादळ निर्माण केले. 'मुक्तछंद

म्हणजे गद्यच आणि परस्फूर्त: अतएव मराठी काव्यपरंपरेला विघातक' हा अनिलांवरचा मुख्य आक्षेप होता. अनिलांचा छंदःशास्त्राचा दांडगा अभ्यास होता. या आक्षेपाला उत्तर देताना अनिल म्हणतात, ''मराठी भाषेची मोडणी आणि पंडितपूर्व कवितेची घडण यांच्याशी मेळ ठेवूनच मुक्तछंदाचा वापर मी केला आहे.'' (उदाहरणार्थ 'प्रेम आणि जीवन' ही रचना. यात पाच आणि सहा अक्षरांच्या चरणकांच्या स्वैर जुळणीने सिद्ध होणारा मुक्तछंद योजण्यात आला आहे.)

**सामाजिक जाणिवेची चिंतनात्मकता**

'फुलवात' (१९३२) ते 'पेर्ते व्हा' (१९४७) आणि 'सांगाती' (१९६१) ते 'दशपदी' (१९७६) असे दोन ठळक टप्पे अनिलांच्या कवितेमध्ये दिसून येतात. 'फुलवात'मधून त्यांनी नवथर प्रेमाची जाणीव रेखाटली. 'पेर्ते व्हा'मध्ये त्यातील भावोत्कटता अधिक सघन झालेली असून त्या साघतेने सामाजिक आशयाचे भानही तेवढ्याच उत्कटपणे जपले आहे.

'उद्या! उद्या तुझ्यामधेंच
फाकणार ना उषा?
तुझ्यामधेंच संपणार
ना कधी तरी निशा?

असा प्रश्न 'पेर्ते व्हा' मधून अनिल करतात आणि

उद्या, तुझ्यामधें निवांत
आजचा अशांत मी
उद्या! तुझ्यामुळे जिवंत
आजचा निराश मी!!'

असा निरवानिरवीचा आशावादी सूरही उमटवतात.

'पेर्ते व्हा' या संग्रहातील 'बंड' या कवितेचा शेवट करताना बंडाचा हेतू स्पष्ट करीत अनिल लिहितात,

'धुळीत मिळविण्यास तडाक्यांत
साम्राज्यें अंधारयुगांचीं
स्थापायास अधिराज्य
समतेचे.'

आशयासाठी मुक्तछंदाचा वापर करीत असतानाही परंपरागत छंदोबद्धतेची कास अनिल सोडत नाहीत. अशा वेळी केशवसुतांची त्यांच्या कवितेवरील छाया स्पष्टपणे समोर येते.

'गरीब आणि पावसाळा' या कवितेत कवी अनिल म्हणतात–

'इकडे पाणी, तिकडे पाणी, वरखाली पाणी पाणी
दीनवाणी झोपडी कशीतरि तग धरुनी केविलवाणी
उघडी पोरें–गोजिरवाणी–भिरभिर भेदरल्या नयनीं
दारामध्ये उभी बिलगुनी कुडकुडत्या चिमण्यावाणी..'

समाजाचे हे जे चित्र आहे, ते बदलले पाहिजे याची तीव्र जाणीव 'पेर्ते व्हा' मधून प्रतिबिंबित होते. भारतातील दारिद्र्य आणि पश्चिमेकडील श्रीमंती यांची तुलना मग स्वाभाविकपणेच अनिल करून जातात–

'तिकडेच सारें कांहीं
आज येथें कांहीं नाहीं!
तिकडेच आले ढग
तिकडेच बरसात
तिकडेच सांज खुले
आंत भरल्या रंगांत'

लयबद्ध नादमयता, सौंदर्यानुगामी संयत, सौम्य शब्दकळा आणि सामाजिक जाणिवेची चिंतनात्मकता ही अनिलांच्या कवितेची वैशिष्ट्ये. 'फुलवात'चा अपवाद सोडल्यास 'प्रेम आणि जीवन'पासून 'पेर्ते व्हा'पर्यंतच्या सर्व कवितांमधून ती अधोरेखित होतात.

कवितेसोबतच भारत सरकारच्या समाज शिक्षण खात्याचे संचालक (१९४८–१९५२) म्हणून व नॅशनल फंडामेन्टल एज्युकेशन विभागाचे संचालक (दिल्ली–१९५२ व पुढे) म्हणून देशाच्या शैक्षणिक धोरणातले अनिलांचे योगदान लक्षणीय आहे. युनेस्कोच्या साक्षरता प्रसार तज्ज्ञ समितीवर अनिलांनी भारताचे प्रतिनिधित्व केले. या समितीच्या पॅरिस येथील बैठकीच्या (१९६२) अध्यक्षपदी त्यांची एकमताने निवड झाली होती. केंद्र व राज्य सरकारांच्या अपारंपरिक शिक्षण, प्रौढ शिक्षण, सर्व शिक्षा अभियान इत्यादी उपक्रमांची पाळेमुळे अनिलांच्या मागील पदांवरील कार्यांमध्ये व उपक्रमशीलतेमध्ये शोधता येतात.

श्रावणमेघ

श्रावणमेघ बाहेरी मी अंतरीं भिजलेला
पंखीं लपून चोच एक पाखि भिजलेला
अश्रूंना हृदयभार थेंबथेंब पाझरतो
भिजलेला लांब दिवस [illegible] होत ओसरतो
उथळ उथळ [illegible] सांडून जळ वसते
क्षणजीवी वर्तुळात [illegible] भावनेने
पडते प्रतिबिंब जरा स्थिर राहून थिजताना
बिंदुच्या [illegible] उठतें [illegible] वलय फिरतांना
सीमाहीन ही व्याप्तीस [illegible] लय धरून असे
संमोहन मिटेना [illegible] शब्दांना जाग नसे!

अनिल

(आत्माराम रावजी देशपांडे)

**मराठी जनमानसाचे 'भावनिक ऐक्य'**

'पेर्ते व्हा'नंतर 'सांगाती' (१९६१) व 'दशपदी' (१९७६) हे अनिलांचे दोन महत्त्वाचे संग्रह प्रसिद्ध झाले. मालवण येथे भरलेल्याल्या अखिल भारतीय मराठी साहित्य संमेलनाचे (१९५८) अध्यक्षपद भूषविण्याचा सन्मान त्यांना प्राप्त झाला. याच काळातील शिक्षणाखेरीजची अनिलांची संस्थात्मक कामगिरीही महत्त्वाची आहे. आजचा विदर्भ साहित्य संघ आणि अखिल भारतीय मराठी साहित्य महामंडळ ही त्याची उदाहरणे होत. महाराष्ट्र राज्याच्या निर्मितीच्या (१ मे १९६०) काळातच विदर्भामध्ये स्वतंत्र विदर्भ राज्याच्या मागणीचा जोर होता. लोकनायक बापूजी अणे यांच्यासारख्यांचे वैचारिक अधिष्ठान विदर्भाच्या मागणीमागे होते.

स्वाभाविकपणेच मराठी जनमानसात एक दुभंग निर्माण झाला होता. या पार्श्वभूमीवर महाराष्ट्रात सामील झालेल्या वेगवेगळ्या विभागांतील समग्र मराठी माणसांच्या भावनिक ऐक्याला बळकटी देण्यासाठी विभागीय साहित्य संस्थांना (महाराष्ट्र साहित्य परिषद– पुणे, विदर्भ साहित्य संघ– नागपूर, मुंबई मराठी साहित्य संघ– मुंबई व मराठवाडा साहित्य परिषद– औरंगाबाद) एका छत्रछायेखाली आणण्याचे, त्यासाठी घटना तयार करण्याचे संस्थात्मक कार्य अनिलांचेच! महाराष्ट्राच्या सांस्कृतिक घडणीतील अनिलांचे हे योगदान महत्त्वाचेच आहे.

अनिलांनी एकाच साच्याची कविता कधी लिहिली नाही. कवितेच्या अंतरंगात आणि बाह्यांगात त्यांनी वेगवेगळे प्रयोग प्रत्येक टप्प्यावर केले. 'हृदयीं लावियली फुलवात' (सांगाती : १९६१) म्हणता म्हणता,

'सारेच दीप कसे मंदावले आता
ज्योती विझूं विझूं झाल्या
....
सारी स्वरूपे कुरूप झाली
हुरूप कशाचा नाही चित्ता'

असे अतिशय गंभीर, पोक्त नवेच वळण त्यांच्या कवितेने घेतले.

मं. वि. राजाध्यक्ष म्हणतात, ''बिनसरावाची, वेगळी वाट हा कवी धुंडीत आला.'' कवितेच्या क्षेत्रातील आपली वाट अडचणीची आहे, याचे पूर्ण भान अनिलांना होते. तरीही 'फुटे शब्द अशब्दाला' यावर आणि भारतीय कवि-परंपरेतील ज्ञानेश्वरांवर त्यांची अविचल निष्ठा होती. पिण्डगत वृत्ती मुमुक्षूची! त्यातूनच ज्ञानेश्वरांच्या संजीवन समाधीला छिद्र करावे आणि त्या छिद्रातून लहानसर शक्तिशाली कॅमेरा आत सोडावा व समाधिस्थ ज्ञानेश्वरांचे छायाचित्र घ्यावे, असा प्रयोग मांडण्याचे धाडस त्यांनी केले होते. त्यामुळे सर्वत्र खळबळ उडाली होती.

पुरातत्त्व, शिल्प, संगीत आणि तत्त्वज्ञान हे अनिलांच्या आवडीचे विषय. त्यांच्या भावाविष्कारात ह्या सर्वांची सौंदर्यलक्षी सरमिसळ दिसून येते. त्या आविष्काराला चिंतनाची व एक प्रकारच्या अतृप्ततेची डूब लाभली आहे. सांगती आणि विशेषतः 'दशपदी' ह्या संग्रहातील रचनांमधून ती दिसते. 'सांगाती'मध्ये अनिल 'आज अचानक गाठ पडे' असा सूर धरतात आणि 'दशपदी'मधून त्याचा विस्तार साधतात. या विस्तारात,

'हाती दिवा होता त्याची कधीच विझून गेली वात
कशानेही उजळत नाही अशी काळीकुट्ट रात'

अशी विषादाची भावनाही वितळून गेलेली असते.

**दशपदी : नवा आकृतिबंध**

अनिलांचा 'दशपदी' हा संग्रह १९७६मध्ये प्रसिद्ध झाला. एकूण एकोणचाळीस दशपद्या त्यात आहेत. भारतीय परंपरेतील द्विपदी, पंचपदी, अष्टपदी अशा रचनाबंधांमध्ये अनिलांनी दशपदी ह्या नव्या आकृतिबंधाची भर घातली व ती परंपरा समृद्ध केली. मध्यवर्ती आशयस्थानी एकच एक भावावस्था असलेला दहा ओळींचा सलग सोलीव कंद म्हणजे 'दशपदी'. सयमक मुक्तछंद असेही दशपदीचे वर्णन करता येईल. १९५९पासून त्यांनी हा रचनाबंध हाताळावयास सुरुवात केली. 'विराणी' ही त्यातील पहिली रचना, तर 'तुझ्याविना' ही शेवटची रचना १९७४ मध्ये लिहिली गेली.

असा उशिरा आलेला पाऊस
तळहातावर झेलून घ्यावा
टिपून ल्यावा पापण्यांवरती
कपाळीच्या घामामध्ये मिळवावा

असा धीरदेखील दशपदी देते. अर्थात त्यातलाही विषाद लपून राहत नाही. हा विषाद जेव्हा गडद होतो, तेव्हा अनिल लिहितात,

'कुणि जाल का सांगाल का
सुचवाल का ह्या कोकिळा
रात्री तरी गाऊ नको खुलवू नको अपुला गळा
आधीच सायंकाळची बरसात आहे लांबली
परत जाता चिंब चुंबन देत दारी थांबली
हार पूर्वीचा दिला तो श्वास साहुन वाळला
आताच आभाळातला काळोख मी कुर्वाळला....'

अनिलांच्या अशा दशपद्यांतील आर्त रसिकांना ज्ञानेश्वरांच्या आर्ताचे स्मरण दिल्याशिवाय राहत नाही.

'दशपदी' या संग्रहामध्ये 'दशपदी दर्शन' हे आपले दशपदीसंबंधीचे स्वतंत्र टिपणही अनिलांनी जोडले आहे आणि 'दशपदी'च्या अंतरंगाची व बाह्यरंगाची मांडणी केली आहे. त्याला जोडूनच विजया राजाध्यक्ष यांनी 'पदचर्चा' केली असून ही दोन्ही टिपणे म्हणजे स्वतंत्र काव्यचर्चाच आहे.

मंगेश विठ्ठल राजाध्यक्ष यांच्या मते, ''अनिलांची कविता नेहमीच सौंदर्याचा शोध घेत आली. सौंदर्याचा अर्थ फार व्यापक घ्यायचा....(अनिलांच्या) शेवटच्या दशपद्यांपैकी बहुतेकांत निसर्गाचे नितळ चित्रण आहे. पण ते नुसते वर्णन नाही; निसर्ग आणि कवी एकमेकांशी तादात्म्य झाले आहेत.''

– वामन तेलंग

**संदर्भ :**

*१. पवार पंडित श्याम; 'अनिलांची कविता - स्वरूप आणि आविष्कार'; मोरया प्रकाशन, डोंबिवली, १९९२.*

## अभ्यंकर, कुसुम रामचंद्र

**कादंबरीकार**

**२८ फेब्रुवारी १९३६ - ५ एप्रिल १९८४**



कुसुम अभ्यंकर यांचा जन्म पुणे येथे झाला. त्यांच्या आईचे नाव उमाबाई व वडिलांचे नाव शंकरराव दामले. रत्नागिरीत डॉ. अभ्यंकर यांच्या वैद्यकीय व्यवसायाला पूरक म्हणून कुसुम अभ्यंकर यांनी नर्सिंगचा कोर्स केला. त्या डॉक्टरांना त्यांच्या व्यवसायात मदत करू लागल्या. परंतु मुळातून शिक्षणाकडे ओढा असल्यामुळे रत्नागिरीतील गोगटे महाविद्यालयातून त्यांनी इंग्रजी विषय घेऊन एम.ए.ही पदवी मिळवली. काही काळ महाविद्यालयात अध्यापन केले. शिवाय हिंदी साहित्यरत्न ही पदवीही मिळवली.

१९७० ते १९८४या काळात त्यांच्या लेखनाला बहर आला. त्या आपल्या लालित्यपूर्ण, प्रवाही शब्दकळेने आणि लेखनातल्या सखोल जीवनदर्शनाने थोड्या अवधीत लोकप्रिय झाल्या. त्यांची तेहेतीस पुस्तके प्रकाशित झाली. त्यांतील बहुतांश कादंबऱ्या नायिकाप्रधान आहेत. पुरुषप्रधान कुटुंबव्यवस्था, पारंपरिक नीतिमूल्यांची चौकट, बाईपणामुळे येणाऱ्या मर्यादा यांमध्ये दडपून गेलेल्या स्त्रियांचे चित्रण त्यातून आहे. या नायिका तडफदार आहेत. स्वाभिमानी, करारी, समजूतदार, सेवाभावी आहेत. तशाच स्वप्नाळूही आहेत. स्त्रीची ही विविध रूपे कुसुम अभ्यंकरांनी उठावदारपणे सादर केली आहेत. रंजनप्रधान कथांच्या साच्यात बसणाऱ्या या कादंबऱ्यांपेक्षा वेगळ्या धाटणीचे कादंबरीलेखनही त्यांनी केले. ओघवती भाषा आणि कादंबरीच्या तंत्राची उत्तम समज यांमुळे त्यांच्या कादंबऱ्या लोकप्रिय झाल्या आहेत.

'विघ्नहर्ता', 'झुरते मी अंतरी' (१९७५), 'अश्विनी', 'स्पर्श' (१९७५), 'धर्मात्मा' (१९७७), 'आघात' (१९७५), 'कॅरियर' (१९७८) अशा काही वेगळ्या विषयांवरील कादंबऱ्या आहेत. 'लाल बंगली' या त्यांच्या रहस्यमय कादंबरीवर आधारित नाटकही १९८४ साली रंगभूमीवर आले.

कुसुम अभ्यंकरांची दुसरी ओळख म्हणजे त्या रत्नागिरीच्या मतदारसंघातून १९७८ साली आमदार म्हणून निवडून आल्या. त्या काळात खेडोपाडी फिरून त्यांनी आपल्या मतदारांच्या अडीअडचणींकडे जातीने लक्ष पुरवले. उत्तम वक्तृत्वाची कला त्यांच्याजवळ होती. त्यामुळे माणसांशी संवाद साधून माणसे जोडण्याचे कसब त्यांनी साध्य केले होते.

आपल्या अठ्ठेचाळीस वर्षांच्या मर्यादित आयुष्यात कुसुम अभ्यंकर यांनी मिळवलेले यश उल्लेखनीय आहे.

– मंदाकिनी भारद्वाज

## अमरशेख, मल्लिका

**कवयित्री**

**१६ एप्रिल १९५७**



मल्लिका अमरशेख यांचा जन्म मुंबईत झाला. वडील शेख मेहबूब हसन उर्फ शाहीर अमरशेख हे समाजवादी विचारसरणीचे होते. संयुक्त महाराष्ट्राच्या लढ्यात जनजागरण करणाऱ्यांत अमरशेख यांचा अग्रक्रम होता. कोकणी मुसलमान असलेल्या अमरशेखांनी कुसुम जयकर ह्या हिंदू कन्येशी विवाह करून क्रांतिकारी पाऊल उचलले. कवितांमधून, नाट्यमेळाव्यांमधून नवनिर्मिती करताना स्वतःच्या मुलीवरही पुरोगामी संस्कार केले. त्यामुळे मल्लिकाने शालेय जीवनापासूनच कविता करायला

सुरुवात केली. नृत्य, अभिनय, संगीत ह्या कला जोपासण्याचा प्रयत्न केला. पुढे स्वतंत्र विचारसरणी असलेल्या या कवयित्रीने 'रफ आणि टफ' असणाऱ्या, वेगळे जीवन आणि वेगळा विचार जगणाऱ्या कवी नामदेव ढसाळ यांच्याशी विवाह केला. मॅट्रिकपर्यंतचे शालेय शिक्षण घेऊन विवाहोत्तर जीवनात त्या अनुभव शाळेतच बरेचसे शिकल्या. जे शिकल्या, त्याचे प्रतिबिंब त्यांच्या लेखनात पडले आहे. १९७९ साली 'वाळूचा प्रियकर' नावाचा त्यांचा पहिला कवितासंग्रह प्रसिद्ध झाला. बऱ्याच उशिरा म्हणजे १९९३ मध्ये 'महानगर' कवितासंग्रह प्रकाशात आला. संस्कृतीचा भेदक उपहास करणारी त्यांची कविता प्रामुख्याने स्त्री–मनाच्या जाणिवा व्यक्त करते. स्त्री–वादी कवयित्रींमध्ये मल्लिका अमरशेखांचे नाव ठळकपणे घ्यावे लागते. 'देहऋतु' (१९९९) आणि 'समग्राच्या डोळा भिडवून' (२००७) हे अलीकडचे कवितासंग्रह याची साक्ष देतात. मानवी दुःखे आणि स्त्री यांचे समीकरण का असावे? त्याबद्दल संस्कृतिरक्षक उदासीन का आहेत? असे प्रश्न त्यांना पडतात.

त्यांनी १९९४ साली 'सूर एका वादळाचा' हे शाहीर अमरशेख यांच्याविषयीचे पुस्तक संपादित केले आहे. २००६ साली कथासंग्रहही प्रकाशित केला. मात्र त्यांचे अत्यंत गाजलेले पुस्तक म्हणजे १९८४ साली प्रसिद्ध झालेले आत्मकथन. त्याचे नावच 'मला उद्ध्वस्त व्हायचंय' असे आहे. प्रामाणिक सूर, पारदर्शी आत्मकथन आणि सामान्य मध्यमवर्गीय स्त्रीच्या आयुष्यात घडणाऱ्या घटनांपेक्षा वेगळे अनुभव वाट्याला आलेले. कधी नियतीमुळे, कधी स्वतःच्या निर्णयांमुळे. या साऱ्याचे बेधडक निवेदन यामुळे हे आत्मकथन वैशिष्ट्यपूर्ण ठरले. पती नामदेव ढसाळ राजकारणात असूनही या संदर्भात त्या अलिप्त आहेत. मात्र विद्रोही जाणीव त्यांच्या लेखनातून ठळकपणे जाणवते. कवी नामदेव ढसाळ यांच्यापेक्षा वेगळी, स्वतंत्र, स्त्रीच्या जगण्याशी निगडित अशी त्यांची कविता स्त्री–वादी कवितांमध्ये आपले अढळ स्थान टिकवून राहील.

– प्रा. सुहासिनी कीर्तीकर

संदर्भ :

१. *अमरशेख मल्लिका; 'मला उद्ध्वस्त व्हायचंय'; मॅजेस्टिक बुक स्टॉल, मुंबई; १९८४.*

## अमरशेख – शेख महबूब हसन

☞ **मुख्य नोंद – लोककला खंड**

## अर्जुनवाडकर, कृष्ण श्रीनिवास

**कथाकार, समीक्षक, व्याकरणतज्ज्ञ**

**३१ ऑक्टोबर १९२६**



डॉ. कृ. श्री. अर्जुनवाडकर यांचा जन्म बेळगाव या गावी झाला. १९३९ साली त्यांनी बेळगाव सोडले व पुण्याच्या वेद शास्त्रोत्तेजक सभेची 'अद्वैत वेदान्त कोविद' ही संस्कृतची पदवी मिळवली. मुंबई विद्यापीठाच्या मॅट्रिकच्या परीक्षेतील संस्कृतची मानाची जगन्नाथ शंकरशेट शिष्यवृत्ती त्यांना मिळाली. १९५६ मध्ये पुणे विद्यापीठाच्या एम.ए परीक्षेत ते प्रथम श्रेणीत उत्तीर्ण झाले. १९५५ ते १९६० या काळात ते वाडिया महाविद्यालयात अर्धमागधीचे व संस्कृतचे प्राध्यापक होते. नंतर १९६१ ते १९७९ या काळात सर परशुराम महाविद्यालयात प्राध्यापक म्हणून रुजू झाले. स्वतः नोकरी करून अतिशय खडतर मार्गाने त्यांचे शिक्षण झाले. १९५४ मध्ये लीला देव या विदुषीशी त्यांचा विवाह झाला. त्याही सर परशुराम महाविद्यालयातच संस्कृत व पाली या विषयांच्या प्राध्यापिका होत्या.

मराठी व्याकरणशास्त्राचे चिकित्सक व अचूक दृष्टीचे अभ्यासक व समीक्षक म्हणून त्यांचा लौकिक आहे. संस्कृत साहित्यशास्त्राचे ते साक्षेपी खोल दृष्टीचे अभ्यासक म्हणून प्रसिद्ध आहेत. प्रारंभीच्या काळात त्यांनी कथा, विनोदी कथा असे ललित संशोधनपर लेखन केले. त्यानंतर समीक्षात्मक वैचारिक लेखनाकडे ते

मी मूळचा संस्कृत पाठशाळेत शिकलेला विद्यार्थी, वयाच्या सतराव्या-अठराव्या वर्षी आधुनिक शालेय शिक्षणाकडे वळलेला. संस्कृत शास्त्रांच्या अध्ययनानं माझ्या पुढच्या कार्याचा पाया घातला हे जसं खरं, तसं हेही खरं की आधुनिक शिक्षणातल्या इंग्रजी भाषेनं एक अमर्याद जग माझ्या पुढं खुलं केलं, — जे अजूनही, मी वयाची पंचाहत्तरी ओलांडल्यावरही, एका नव्या दिशेनं विस्तारत आहे. एस.पी. कॉलेजमध्ये शिकवत असताना मी प्रथम १९७३-७४ साली कॅनडात व्हँकूव्हरला ब्रिटिश कोलंबिया युनिव्हर्सिटीत संस्कृत शिकवण्यासाठी एका वर्षासाठी गेलो होतो. या गोष्टीला तीस वर्षं होत आली. पाच सहा वर्षांपूर्वी (१९९९) मी इंग्लंडला गेलो तो लंडनमधल्या एका योगशाळेत आणि तिथून युरोपमधल्या काही देशांत योग तत्त्वज्ञानावर व्याख्यानं देण्यासाठी. यासाठी मी इंग्लंड आणि भारत या देशांमध्ये सुमारे दोन वर्षं जा-ये करीत होतो. यातून एक ग्रंथयोजना साकार होऊन योग विषयावरचा एक अभिनव मांडणीचा माझा इंग्रजी ग्रंथ (Yoga Explained) एप्रिल २००४-च्या अखेरी लंडनमधल्या एका नामवंत प्रकाशनसंस्थेनं (Kyle Cathie Ltd.) प्रकाशित केला. हा ग्रंथ मी मीरा मेहता नावाच्या, पाश्चात्त्य योग जगतात नावाजलेल्या, लंडनमधल्या महिलेच्या सहकार्यानं लिहिला. योग म्हणजे आसनं आणि प्राणायाम ही आज-काळची सार्वत्रिक समजूत दुरुस्त करण्यासाठी नेहमीच्या विषयांबरोबर योग तत्त्वज्ञानाचीही ओळख करून देणारा हा बहुधा पहिलाच ग्रंथ असावा.

(कृष्ण श्रीनिवास अर्जुनवाडकर)

जन्म : बेळगाव (कर्नाटक), दि. ३१-१०-१९२६

व्याकरण ग्रंथात यापूर्वी मांडली गेलेली महत्त्वाची सामग्री वर्गीकृत करून यात ग्रंथाची सांगोपांग चर्चा केली आहे. त्यामुळे त्यांच्या या ग्रंथाला व्याकरणविषयक संदर्भ-ग्रंथाचे व्यापक स्वरूप प्राप्त झाले आहे. त्यात त्यांनी मराठी व्याकरणाकडे बघण्याचा शास्त्रशुद्ध दृष्टिकोन कोणता असू शकतो, याचे विवेचन केले आहे. व्याकरण विषयासारख्या क्लिष्ट विषयावरचा उत्कृष्ट संपादित ग्रंथ या दृष्टीने त्यांचे हे संपादन फार महत्त्वाचे व अभ्यासू ठरले आहे.

'मराठी व्याकरण' (वाद आणि प्रवाद) या त्यांच्या ग्रंथात पारंपरिक व्याकरणाची सडेतोड समीक्षा करून शास्त्रीय दृष्टिकोनातून पुनर्मांडणी कशी करता येईल, याविषयीचे दिग्दर्शन केले आहे. व्याकरणविषयक सखोल अभ्यासामुळे मराठी व्याकरण परंपरेत ते परिमाण मानले जाते, हे त्याचे महत्त्व आहे. त्यांच्या या ग्रंथातील 'दामले व त्यांचे कार्य' याविषयीचा संपादकीय भाग राज्य मराठी

वळले. १९७८ साली त्यांना केंब्रिजचा 'जागतिक कीर्तीचा लेखक' म्हणून मान्यता मिळाली. त्यांनी अनेक विद्यार्थ्यांना संस्कृत विषयातील डॉक्टरेटसाठी मार्गदर्शन केलेले आहे.

त्यांनी प्रा. अरविंद मंगळूरकर यांच्या साहाय्याने 'मराठी घटना, रचना व परंपरा' (१९५८) हा ग्रंथ लिहिला. 'मम्मटकृत काव्यप्रकाश' (१९६२) हा विश्लेषणात्मक ग्रंथ लिहिला. 'शास्त्रीय मराठी व्याकरण' (मोरो केशव दामले, १९७०) ग्रंथाचे तपशीलवार संपादन केले. 'महाराष्ट्र प्रयोग चंद्रिका' (वेंकट माधव, १९७०) हे त्यांचे लेखन विद्वज्जनांत मान्यता पावले.

मोरो केशव दामल्यांच्या व्याकरण ग्रंथाचे संपादन ही मराठी भाषेच्या दृष्टीने मोलाची कामगिरी ठरली. यातील

विकास संस्थेने 'अर्वाचीन महाराष्ट्राची जडणघडण' या मालिकेत 'मोरो केशव दामले: व्यक्ती आणि कार्य' (१९९७,२००५) यात प्रकाशित केला आहे. १९९९ – २००० या काळात त्यांनी लंडनमधील योगसंस्थेत योगावर तत्त्वज्ञानपर व्याख्याने दिली. त्यावर मीरा मेहता यांच्या सहकार्याने त्यांनी योगावर ग्रंथ लिहिला. याची अमेरिकन, जपानी, स्पॅनिश भाषांत रूपांतरे प्रकाशित झाली आहेत. २००६ मध्ये 'ध्वन्यालोक– एक विहंगमावलोकन' हे प्रसिद्ध झाले.

पातंजल योगसूत्रावरच्या १९२५मध्ये प्रकाशित ग्रंथाला योगाची प्रस्तावना लिहून त्यातील राजयोग व हठयोग यांचा साधार चिकित्सक परिचय त्यांनी करून दिला आहे.

अशी चिकित्सक सखोल अभ्यासलेली, संशोधनात्मक, समीक्षात्मक तीस–पस्तीसच्यावर त्यांची पुस्तके आहेत. आज उतारवयातही ते अभ्यासवृत्तीने, सातत्याने आपल्या आवडत्या विषयांवर उत्साहाने लेखन करताना दिसतात. ते संस्कृतचे गाढे अभ्यासक, विद्वान पंडित म्हणून जगात ओळखले जातात.

– रागिणी पुंडलिक

**संदर्भ :**

*१. अकलूजकर, अशोक; 'शिक्षण म्हणजे घास भरवणे नव्हे!'; महाराष्ट्र टाईम्स; ५ सप्टेंबर २००४.*

## अर्नाळकर, बाबूराव

***चव्हाण, चंद्रकांत सखाराम***

**रहस्यकथा लेखक**

**९ जून १९०९ – १९९६**



बाबूराव अर्नाळकर यांचा जन्म ठाणे जिल्ह्यातील अर्नाळा गावी झाला. घरची परिस्थिती यथातथाच असल्याने त्यांच्या मावशीने त्यांना मुंबईला आणले. मॅट्रिकपर्यंत शिक्षण झाल्यावर त्यांनी काही काळ व्यापारी ब्रिटिश कंपनीत नोकरी केली. स्वातंत्र्य चळवळीत हिरिरीने भाग घेतल्यामुळे बाबूरावांना तीन वेळा कारावास भोगावा लागला. 'मराठा' नावाचे एक मासिक त्यांनी काही काळ चालविले. मुंबईत स्वातंत्र्य सैनिक संघाचे ते अध्यक्ष होते. १९४१ पासून १९६४पर्यंत त्यांनी एक चष्म्याचे दुकान चालविले. संदेशकार अच्युत बळवंत कोल्हटकर हे त्यांचे गुरू असून त्यांनीच बाबूरावांना लेखनाची प्रेरणा दिली. एडगर वॉलिस लिखित 'द फोर जन्टलमेन' या कादंबरीचा अर्नाळकरांवर जबरदस्त प्रभाव पडला आणि त्यातून गुप्तहेर कथा लेखनाचा विषय त्यांना मिळाला.

'चौकटची राणी' ही त्यांची पहिली गुप्तहेर कथा १९४२च्या फेब्रुवारीत प्रसिद्ध झाली. नंतर त्यांनी गुप्तहेर कथा लेखनाचा कारखानाच चालवला. त्यांनी या कथांमधून निर्माण केलेल्या धनंजय, छोटू, झुंजार, विजया, चारुहास, काळा पहाड, दर्यासारंग, भीमसेन, कृष्णकुमारी वगैरे नायक/नायिका यांनी अनेक वाचकांना मोहून टाकले. ओघवती भाषा, सुटसुटीत व उत्कंठावर्धक कथानक यांमुळे सर्वसामान्य वाचकवर्गाचे ते आवडते लेखक बनले. १९३६ ते १९८४ या काळात त्यांनी १०९२ रहस्यकथा लिहिल्या. त्यांनी काही लघुकथा व नाटिकाही लिहिल्या.

महाराष्ट्र शासनाने १९६२ साली दहा हजार रुपयांचे मानधन देऊन बाबूरावांचा सन्मान केला. १९६४मध्ये ते जस्टीस ऑफ पीस झाले. त्यांच्या गुप्तहेर कथांनी अनेक वर्षे वाचकांच्या बुद्धीला रुचणारे खाद्य पुरवले आणि त्यांच्या मनावर वर्षानुवर्षे अधिराज्य केले.

रहस्यकथा लेखनाचा विक्रम केल्याबद्दल गिनीज बुक ऑफ वर्ल्ड रेकॉर्ड्‌समध्ये नोंद झालेले बाबूराव अर्नाळकर हे एकच नाव असावे. वाचकवर्गाच्या संख्येचा विक्रमही कदाचित यांचाच असावा.

– वि. ग. जोशी

संदर्भ :

*१. जोशी तर्कतीर्थ लक्ष्मणशास्त्री; 'मराठी विश्वकोश', खंड १; प्रकाशक, 'महाराष्ट्र राज्य साहित्य संस्कृति मंडळ'; मुंबई, १९७६.*

*२. कामत श्रीराम कामत; संपादक, 'मराठी विश्वचरित्र कोश; खंड १; प्रकाशक, विश्वचरित्र संशोधन केंद्र, गोवा, २०००.*

## अवचट, अनिल त्र्यंबक

**पत्रकार, सामाजिक कार्यकर्ते, प्रसिद्ध ललितलेखक**

**२६ ऑगस्ट १९४४**

डॉ.अनिल अवचट यांचा जन्म पुणे येथे रोजी झाला. वडील डॉक्टर होते आणि ओतूर (जिल्हा–पुणे) येथे वास्तव्य करीत असल्याने अवचटांचे आठवीपर्यंतचे शिक्षण ओतूरलाच झाले. पहिला मुलगा असल्याने त्याने डॉक्टर व्हावे ही वडिलांची तीव्र इच्छा होती. ओतूरसारख्या गावात राहून हे जमणे कठीण म्हणून वडिलांनी त्यांना पुण्याच्या मॉडर्न हायस्कूलमध्ये



(वसतिगृहामध्ये) शिक्षणासाठी ठेवले. नंतर १९५९मध्ये मॅट्रिक झाल्यावर फर्गसन महाविद्यालयातून ते इंटर झाले. पुढे बी. जे. मेडिकल महाविद्यालय (पुणे) येथून एम.बी.बी.एस. झाले. याच महाविद्यालयामधील त्यांची मैत्रीण सुनंदा ही लग्नानंतर डॉ. अनिता अनिल अवचट झाली. मुक्ता आणि यशोदा या त्यांच्या दोन मुली होत. सध्या डॉक्टरांचे वास्तव्य पुणे येथे आहे. 'मुक्तांगण'चे कार्य आणि लेखन हेच त्यांचे खरे कार्य आहे, कारण डॉक्टर होऊनही डॉक्टरी न केलेला हा लेखक होय.

**समाजकार्यातून लेखन**

समाजकार्याकडे कल असल्याने वैद्यकीय व्यवसाय न करता, सामाजिक चळवळींमध्ये सहभाग घ्यायला त्यांनी सुरुवात केली. सामाजिक क्षेत्रातील अनुभवांशी निगडित अशा प्रकारचे लेखन 'साधना' साप्ताहिकातील 'वेध' या सदरातून ते सातत्याने लिहीत राहिले. एवढेच नाही तर 'साधना' व 'पुरोगामी सत्यशोधक' या त्रैमासिकांचे संपादनही काही वर्षे त्यांनी केले. आत्तापर्यंत अशा प्रकारची त्यांची अठरा पुस्तके प्रकाशित झाली आहेत.

युक्रांदला अर्पण केलेले 'पूर्णिया' हे बिहारच्या समाजदर्शनाविषयीचे त्यांचे पहिले पुस्तक १९६९मध्ये प्रकाशित झाले. एका समाजवादी निष्ठेच्या तरुणाची प्रतिकारशून्य गुलामगिरीविषयीची प्रतिक्रिया यात व्यक्त झाली आहे.

'वेध' (१९७४), 'हमीद' (१९७७), 'अंधेरनगरी निपाणी' (१९७८), 'छेद' (१९७९), 'माणसं' (१९८०), 'संभ्रम' (१९८१), 'वाघ्यामुरळी' १९८३), 'कोंडमारा' (१९८५), 'गर्द' (१९८५), 'धार्मिक' (१९८९), 'कार्यरत' (१९९७) अशी सारी पुस्तके त्या-त्या संदर्भातील प्रत्यक्ष पाहणीवर आधारलेली वृत्तान्तवजा, तीव्र सामाजिक भानातून लिहिलेली आहेत.

याव्यतिरिक्त 'सृष्टीत गोष्टीत' नुकतेच प्रकाशित झाले आहे. एवढेच नाही तर याला २००८चा राज्य पुरस्कार (साने गुरुजी) मिळाला आहे. 'मजेदार ओरिगामी' आणि 'पुणे हवेसे' ही त्यांची आगामी पुस्तके आहेत.

'वेध'मध्ये सदरलेखनातील ३६ लेख एकत्रित केले आहेत, तर 'छंद'मधील लेख वृत्तान्तकथन स्वरूपाचे आहेत. 'मोर'मध्ये ललितलेखच आहेत. या पुस्तकाला मुंबई मराठी ग्रंथालयाचा पुरस्कार मिळाला आहे.

'स्वत:विषयी' (१९९०), 'आप्त' (१९९७), 'छंदाविषयी' (२०००) यांसारखी पुस्तके ही स्वत:च्या आयुष्यातील घटनांशी निगडित, आत्मपर अशी आहेत.

'पूर्णिमा', 'वेध' आणि 'छेद' या सुरुवातीच्या पुस्तकांतील अवचटांच्या लेखनाचे सर्वप्रथम जाणवणारे वैशिष्ट्य म्हणजे त्यामधून तीव्रपणे प्रकट होणारी तरुण मनाची संवेदनशीलता होय.

**अवचटांची लेखनवैशिष्ट्ये**

भोवतालच्या घटनांकडे आणि वृत्ती-प्रवृत्तींकडे बघण्याची चौकस शोधक नजर, उत्कट सामाजिक जाणीव, पांढरपेशा आणि बुद्धिजीवी वर्गाच्या दांभिकपणाविषयीची चीड, ह्या गोष्टी त्यांच्या लेखनातून वेळोवेळी व्यक्त होताना दिसतात. या सर्वांमागे समाजपरिवर्तनाची आस जाणवते, आणि तरीही हे सारे नेमकेपणाने व्यक्त झालेले दिसते. समाजातील दुबळ्या व उपेक्षित आणि दारिद्र्यात रूढींच्या कचाट्यात व समाजाच्या ओझ्याखाली वाकून जगणाऱ्या सामान्य माणसांचे त्यांच्या अगतिक आयुष्याचे वेगळ्या अशा स्तरांवरचे जीवन जगणाऱ्यांची ओळख करून देणारे लेखन अवचट सातत्याने करताना दिसतात. दुष्काळग्रस्त माणसे, झोपडपट्टीतील माणसे, भटक्या जमातीची माणसे, तसेच विडीकामगारांचे अंधारमय शोषित जीवन या साऱ्यांचे विलक्षण दाहक दर्शन त्यांनी 'माणसं' मधून घडवले आहे.

अवचटांच्या जीवननिष्ठा आणि त्यांचा दृष्टिकोन गंभीर बांधिलकी हे मूल्य मानणारा आहे. त्यामुळे त्यांच्या लेखनातून एक सखोल, संवेदनशील दृष्टिकोन व्यक्त

होतो. ‘धागे आडवे–उभे’ ह्या पुस्तकांत पुण्यामुंबईच्या वेश्यावस्त्या, थिएटर कामगार, तमाशा कलावंत, सांगली हळद कामगार ह्यांचे जीवन यथार्थपणे दर्शवले आहे.

विषय गंभीर असले, तरी लालित्यपूर्ण मांडणीमुळे ते वाचकप्रिय झाले आहेत. सूक्ष्म निरीक्षणे नोंदवीत, सामाजिक प्रश्नांवर भाष्य करणारे अवचटांचे लेखन प्रथमपुरुषी आत्मनिवेदनात्मक वाचकांच्या मनाचा ठाव घेणारे आहे.

एकूणच महाराष्ट्रीय समाजाच्या उपेक्षित स्तरातील जीवनाचा वेध घेणारे असे हे सामाजिक स्तरावरचे लेखन आणि दुसरीकडे स्वत:विषयीचे आत्मपर लेखन अशा दोन स्तरांवर अवचट लेखन करताना दिसतात.

**कलाकार व्यक्तिमत्त्व**

अनिल अवचट हे एक अजब व्यक्तिमत्त्व आहे. ते डॉक्टर आहेत, लेखक आहेत, चित्रकार आहेत. ओरिगामी आणि लाकडातील शिल्प करण्याची त्यांना हौस आहे. छायाचित्रणाचा छंद आहे. बासरीचा नाद आहे आणि वाचनाचे, भ्रमंतीचे वेड आहे. हे कमी की काय तर ते स्वयंपाकघरातही प्रयोगशील आहेत. पदार्थ बनविण्यासाठी लहानसहान सूचना देण्यातही निपुण आहेत.

प्रत्येकाला निसर्गाने कलागुण दिलेले असतात. त्यांच्याकडे बघणे, ते वाढवणे, त्याला अग्रक्रम देणे हे आपल्या हातात आहे. त्याचा निर्भेळ आनंद लुटण्यासाठी, त्याच्यातून पैसा मिळविण्यापासून किंवा कीर्तीच्या विचारापासून दूर राहिले, तर बरेच या वृत्तीने आपण शिकत, प्रयत्न करीत राहिलो तर कोण–कोण गुरू भेटत राहतात आणि कसलीही अपेक्षा न ठेवता महत्त्वाचे असे काही देऊनही जातात. आपणही पुढच्यांना त्याच भावनेने देत राहायचे. या वृत्तीतून निखळ कलानंदातून ते सारे छंद जोपासतात आणि हे सारे अनुभवाचे संचित लेखनातून आपल्यापर्यंत पोचवतात.

या साऱ्याची दखल वेळोवेळी घेतली जातेच. त्यांना अनेक पुरस्कार, सन्मान प्राप्त झाले आहेत.

‘माणसं’, ‘वेध’, ‘पूर्णिमा’ या पुस्तकांना महाराष्ट्र राज्य पुरस्कार. ‘कार्यरत’ला महाराष्ट्र फाउंडेशन पुरस्कार, फाय फाउंडेशन पुरस्कार, कऱ्हाडचा रामशास्त्री प्रभुणे पुरस्कार, लाभसेटवार पुरस्कार, शं.वा. किर्लोस्कर पुरस्कार इत्यादी पुरस्कार मिळाले. या व्यतिरिक्त १९८८मध्ये आयोवा विद्यापीठातर्फे (USA) भरलेल्या आंतरराष्ट्रीय लेखक परिषदेसाठी भारतातर्फे त्यांची निवड झाली होती. समाज व संस्कृती यांवर भाष्य करणारा लेखक अशीच अनिल अवचट यांची प्रतिमा आहे.

– प्रा. मंगला गोखले

**संदर्भ :**

१. *अवचट अनिल त्र्यंबक; ‘स्वत:विषयी’, मौज प्रकाशन गृह; मुंबई; १९९०.*

२. *अवचट अनिल त्र्यंबक; ‘आप्त’; मौज प्रकाशन गृह, मुंबई; १९९७.*

३. *अवचट अनिल त्र्यंबक; ‘छंदाविषयी’, मॅजेस्टिक प्रकाशन, मुंबई; २००१.*

## अळतेकर, माधव दामोदर

**वृत्तपत्रकार, चरित्रकार, निबंधकार, कादंबरीलेखक**
**१८९० – २० ऑगस्ट १९५९**



अळतेकरांचे घराणे जुन्या कोल्हापूर संस्थानातील अळते गावचे. त्यांचा जन्म कोल्हापुरात तसेच शिक्षण कोल्हापुरात आणि पुण्यात, आणि नोकरी मुंबईत झाली. अर्थशास्त्र व इतिहास हे विषय घेऊन १९१७ साली ते मुंबई येथे एम.ए. झाले. राजाराम हायस्कूलमध्ये असल्यापासूनच त्यांना मराठीत लिहायची आवड होती. कोल्हापूरच्या ‘समर्थ’ साप्ताहिकात इंग्रजी तिसरीत असतानाच अळतेकरांचे ‘भारतीय विद्यार्थी’ या विषयावरील चार–पाच लेख प्रसिद्ध झाले होते. वक्तृत्व स्पर्धेत त्यांना अनेक बक्षिसे मिळाली होती.

बी.ए. ला असतानाच त्यांचे तीन-चार इंग्रजी लेख प्रसिद्ध झाले होते, आणि याच सुमारास 'उद्यान' मासिकात 'अपराध कोणाचा' ही एक लहानशी कादंबरीही प्रसिद्ध झाली होती.

अळतेकरांच्या वक्तृत्वाप्रमाणेच त्यांची भाषाशैली ठसकेबाज, ओघवती व ऐटदार होती. स्वभाव विलक्षण आग्रही, आक्रमक होता. त्यांचे भाषण आणि लेखन कितीही जहाल आणि तिखट असले, तरी त्यांचा स्वभाव विधायक सनदशीर होता. स्वभाव निरपेक्ष, निर्लोभी आणि निर्व्यसनी होता. प्रवासाप्रमाणेच लेखन, वाचन, भाषण, संभाषण आणि भोजन या त्यांच्या अत्यंत प्रिय गोष्टी होत्या. गप्पा मारणे आणि गप्पा ऐकणे हा आवडता उद्योग होता.

१९१५मध्ये बी.ए. झाल्यावर ते 'इंदुप्रकाश'चे संस्थापक म्हणून काम करू लागले. तसेच काही महिने चंदारामजी गर्ल्स हायस्कूलमध्ये शिक्षकाचेही काम केले. अशा प्रकारे शाळेचे काम कधीकधी तर इंदुप्रकाशचे काम नित्याचे, असे चालले होते. काही काळ त्यांनी पुण्याच्या 'ज्ञानप्रकाश' या वृत्तपत्रात उपसंपादक म्हणून काम केले. 'न्यू रिव्ह्यू' नावाचे मासिकही त्यांनी काही काळ चालवले. अलाहाबादच्या 'लीडर' पत्राचे ते मुंबईतील वार्ताहर होते. 'टाइम्स ऑफ इंडिया', 'कॅपिटल' इत्यादी वृत्तपत्रांत ते इंग्रजीतून लेखन करीत असत. पुढे काही वर्षे ते 'टेक्सटाइल जर्नल' या अर्थशास्त्रविषयक मासिकाचे उपसंपादक होते. लेखक आणि वृत्तपत्रकार म्हणून त्यांचा सर्वत्र लौकिक झाला होता. १९१३ साली 'विद्याहरण' या खाडिलकरांच्या नाटकावर 'ज्ञानप्रकाश'मधून तीन लेख लिहून कडाडून टीका केली आणि एकदम ते प्रकाशात आले. नंतर मात्र १९२४-१९५१पर्यंत ते मुंबईच्या विल्सन महाविद्यालयात मराठी विभाग प्रमुख म्हणून कार्यरत राहिल्याने त्यांच्या आयुष्याला स्थैर्य आले.

१९३०मध्ये त्यांनी 'गोपाळ गणेश आगरकर-चरित्रात्मक निबंध' हे आगरकरांचे विस्तृत चरित्र लिहिले. याशिवाय आगरकरांच्या पूर्व प्रकाशित दुर्मीळ लेखसंग्रहाचे 'संपूर्ण आगरकर'- भाग १, २, ३ (१९३७-१९४०) असे पुनर्मुद्रण अळतेकरांच्या संपादकत्वाखाली झाले आहेत.

**उलटलेली पाने**

अळतेकरांनी 'अपराध कोणाचा' (१९१५), 'शांताराम' (१९१९), 'मुक्तबंध' (१९२६), 'अंतरंग' (१९४३) इत्यादी कादंबऱ्या लिहिल्या. याशिवाय 'नवे मानसशास्त्र व नवी नीती' (१९३६) 'कालिदासाची सृष्टी' (१९३७), 'पाने व फुले' भाग १, २ (१९३८-१९३९), निबंध, कथा, कविता इत्यादी पुस्तके लिहिली. 'उलटलेली पाने' हे त्यांचे आत्मचरित्रही प्रसिद्ध आहे. 'कालिदासाची सृष्टी' या ग्रंथाला डेक्कन व्हर्न्याकुलर ट्रान्सलेशन सोसायटीचे बक्षीस मिळाले आहे.

विलेपार्ले, मुंबई येथे राहत असताना त्यांनी बडोद्याचे राजकवी चंद्रशेखर यांच्या अध्यक्षतेखाली, १९२९मध्ये उपनगर साहित्य संमेलन भरवले होते. हीच मुंबई उपनगर साहित्य संमेलनाच्या प्रथेची सुरुवात म्हणता येईल. मुंबई शहरावर त्यांचे विलक्षण प्रेम होते.

अळतेकरांच्या मृत्यूनंतर मुंबई महानगरपालिकेने या कर्तृत्ववान आणि एकनिष्ठ नागरिकाविषयी केलेला गौरवाचा ठराव म्हणजे त्यांनी जन्मभर केलेल्या निर्व्याज प्रेमाची मिळालेली कायदेशीर पावतीच होय. २०व्या शतकाच्या पूर्वार्धातील वैचारिक वाङ्मयीन घडणीच्या प्रक्रियेतील एक क्रियाशील घटक म्हणून माधवराव अळतेकरांचे नाव घ्यावे लागेल.

– प्रा. मंगला गोखले

**संदर्भ :**

*१. खानोलकर गं. दे.; 'मराठी वाङ्मयसेवक चरित्रकोश'.*

*२. अळतेकर मा. दा.; 'उलटलेली पाने'; आत्मचरित्र; १९६१.*

## अज्ञातवासी

***केळकर, दिनकर गंगाधर***

**कवी**

**१० जानेवारी १८९६ – १७ एप्रिल १९९०**

केळकर यांचा जन्म करंजगाव येथे झाला. त्यांचे शिक्षण मॅट्रिकपर्यंत झाले. 'अज्ञातवासी' या नावाने



कवितालेखन केले. ‘अज्ञातनाद’ (१९२४) आणि ‘अज्ञातवासींची कविता’ हे त्यांचे दोन काव्यसंग्रह प्रसिद्ध आहेत. ‘अज्ञातवासींची कविता’ दोन भागांत प्रकाशित झाली असून त्यांचे संपादन गोपीनाथ तळवलकर यांनी केले आहे. या कवितांमधून वात्सल्यरस आणि बालकांविषयीचे प्रेम दिसत असले, तरी बहुतांश कविता ही राष्ट्रीय विचारांनी ओतप्रोत भरलेली आहे. इतिहास, ऐतिहासिक वास्तू, पूर्वजांचे पराक्रम, गतवैभव यांचा त्यांना विलक्षण अभिमान वाटे. या विषयांवर त्यांनी विपुल काव्यलेखन केले.

याव्यतिरिक्त त्यांनी १९२३ मध्ये ‘महाराष्ट्र शारदा’ भाग १ चे संपादन केले. भा.रा.तांबे व अत्र्यांचे ‘झेंडूची फुले’ ह्या भागांचे संपादन त्यांनी केले होते. अज्ञातवासींच्या जीवनातील फार मोठा भाग त्यांनी उभ्या केलेल्या ‘राजा दिनकर केळकर’ या संग्रहालयाने व्यापलेला आहे. ‘राजा’ या आपल्या अकाली मरण पावलेल्या मुलाच्या स्मृती जपण्यासाठी त्यांनी आयुष्यभर खपून विविध प्रकारच्या वस्तू जमविल्या. सुरुवातीला स्वतःच्या घरात सुरू केलेल्या या संग्रहालयाने पुढे भव्य रूप धारण केले. अलीकडे या संग्रहालयाला शासनाचे भरघोस अनुदान व सहकार्य लाभले असून सध्या ते भव्य वास्तूत आहे. देशी, परदेशी पर्यटकांचे ते आकर्षण ठरले आहे. वयाच्या ९० वर्षांपर्यंत ते स्वतः तरुणाच्या उत्साहाने विविध वस्तू जमविण्यासाठी देशभर फिरत असत. कमलाबाईंनी त्यांच्या या कार्यात अगदी सुरुवातीपासून सहकार्य करून हे संग्रहालय उभे केले. शासनानेही त्यांच्या या कार्याचे मोल जाणून त्यांना अनेक प्रकारच्या सवलती दिल्या होत्या.

दि.ग.उर्फ काका केळकरांच्या कार्याची दखल घेऊन पुणे विद्यापीठाने त्यांना सन्मानाची डि.लिट. ही पदवी दिली तर १९८० मध्ये भारत सरकारने पद्मश्री देऊन त्यांच्या कार्याचा योग्य गौरव केला. काकांच्या निधनानंतर त्यांचे तीन नातू (प्रभा या त्यांच्या कन्येचे पुत्र) सुरेंद्र, सुधन्वा आणि सुदर्शन रानडे हे ‘राजा दिनकर केळकर’ या संग्रहालयाचे व्यवस्थापन उत्तम रितीने सांभाळत आहेत.

– शशिकला उपाध्ये

**संदर्भ :**

१. *ऐनापुरे विनीता; ‘अज्ञातवासींची बखर’; प्रकाशक – राजा दिनकर केळकर संग्रहालय, पुणे; १३७८.*

## आंबेडकर, भीमराव रामजी

***बाबसाहेब आंबेडकर***

**विचारवंत, घटनाकार, अर्थतज्ज्ञ**

**१४ एप्रिल १८९१ – ०६ डिसेंबर १९५६**

☞ **मुख्य नोंद – समाजकारण खंड**

अफाट बुद्धिमत्ता, सर्वांगीण व्यासंग, असीम ग्रंथप्रेम आणि प्रचंड ज्ञानलालसा यांच्या जोरावर मिळविलेले सर्व यश डॉ. आंबेडकरांनी भारतातील जातिनिर्मूलनाच्या व दलितांच्या उद्धाराच्या कारणी लावले. १९३६ मध्ये त्यांचे ‘ॲनिहिलेशन ऑफ कास्ट्स’ हे न होऊ शकलेले भाषण पुस्तकरूपाने प्रसिद्ध झाले. १३ ऑक्टोबर १९४६ रोजी ‘हू वेअर द शूद्राज?’ हा त्यांचा ग्रंथ प्रसिद्ध झाला.

१४ ऑक्टोबर १९५६ रोजी डॉ. आंबेडकरांनी महास्थवीर चंद्रमणी यांच्या हस्ते बौद्ध धर्माची दीक्षा सपत्नीक घेतली आणि आपल्या लाखो अनुयायांना स्वहस्ते बौद्ध धर्माची दीक्षा देऊन स्वत: तयार केलेल्या बावीस प्रतिज्ञा त्यांच्याकडून वदवून घेतल्या. या घटनेने भारतीय राजकारणाला व समाजकारणाला क्रांतिकारक वळण लागले. दलितांच्या ठिकाणी आत्मसन्मानाची व दलितेतरांच्या ठिकाणी आत्मपरीक्षणाची भावना उत्पन्न झाली. तसेच आपल्या सामाजिक इतिहासाचे वस्तुस्थितिजनक चित्र पाहण्याची निकडही त्यामुळेच समाजधुरीणांना जाणवली. या सर्वांमधूनच आंबेडकरी चळवळ व दलित साहित्य यांचे युग अवतरले. डॉ.आंबेडकर ह्यांचे कार्यकर्तृत्व आणि विचार हेच या

समाजघटकांसाठी साहित्यप्रेरणा बनले. यामुळे दलित साहित्याला आंबेडकरी चळवळीचे साहित्य असेही म्हणता येते.

आपल्या ६५ वर्षांच्या आयुष्यात डॉ. आंबेडकरांनी इतिहास, समाजशास्त्र, मानववंशशास्त्र, अर्थशास्त्र, कायदा ह्या ज्ञानक्षेत्रांतील विविध विषयांवर प्रचंड लेखन केले. त्यांच्या या लेखनातून त्यांच्या प्रगाढ बुद्धिमत्तेचा, सर्वस्पर्शी प्रतिभेचा, अपरंपार समाजविषयक तळमळीचा व लढाऊ राजकीय ध्येयधोरणांचा विस्मयजनक प्रत्यय येतो. भारतीय समाजाच्या पारंपरिक जडणघडणीचे त्यांना असणारे आकलन जसे त्यांच्या वाङ्मयातून प्रकट होते, तसेच कालानुरूप सामाजिक परिवर्तन घडवून आणण्याची त्यांची जिद्दही त्यातून व्यक्त होते. शतकानुशतके केवळ अन्याय व अवहेलना यांचेच धनी असणाऱ्या आपल्या दलित बांधवांच्या उन्नतीसाठी त्यांनी आमरण कष्ट उसपले आणि आपले विचार भाषणांतून व लेखनांतून तळमळीने मांडले. भारताच्या सामाजिक वास्तवाची सूक्ष्म व सखोल जाण असणाऱ्या डॉ. आंबेडकरांना बदलत्या काळानुरूप समाजपरिवर्तन घडवून आणण्याची अनिवार ओढ लागली होती. त्यांचे सर्व लेखन त्या प्रेरणेनेच घडले. डॉ. आंबेडकरांनी इंग्रजी व मराठी या दोन्ही भाषांत लेखन केले. 'प्रॉब्लेम ऑफ दि रूपी' (१९२३), 'थॉट्स ऑन पाकिस्तान' (१९४०), 'दि अनटचेबल्स' (१९४९), 'हू वेअर द शूद्राज' हे ग्रंथ त्यांच्या विद्वत्तेचे व व्यासंगाचे निदर्शक होत. 'दि बुद्धा ॲन्ड हिज धम्मा' (१९५७) हा त्यांचा ग्रंथ बौद्ध धर्माचा स्वतंत्र अन्वयार्थ लावणारा ग्रंथ म्हणून मान्यता पावला आहे. त्यांचे मराठीतील बहुतेक सर्व लेखन 'मूकनायक', 'बहिष्कृत भारत' व 'जनता' या नियतकालिकांतून झाले आहे. त्यांच्या मराठी भाषणांचा संग्रह महाराष्ट्र शासनाने स्वतंत्र खंडांत प्रसिद्ध केला आहे. त्यांच्या लेखनातून मराठी वैचारिक निबंधवाङ्मयाचे समृद्ध असे रूप दृष्टीस पडते.

**समाजपरिवर्तनासाठी साहित्यनिर्मिती**

डॉ. आंबेडकर यांच्या लेखांचा महत्त्वाचा विशेष म्हणजे त्यांची आशयसंपन्नता होय. प्रत्येक लेखात त्यांनी एक मूलभूत विचार मांडला आहे. तो मांडत असताना त्यांची तर्कशुद्ध व सुसूत्र मांडणी ते करतात आणि साधार व सप्रमाण स्वमतप्रतिपादन व परमतखंडन ही लेखनसरणी अवलंबितात. उपरोध व उपहास या अस्त्रांचा सप्रयोजक उपयोग त्यांनी केला आहे. त्यामुळे त्यांचे लेखन आक्रमक, लढाऊ व युक्तिवादपूर्ण होते. त्यांचे लेख विचारसौंदर्याने नटलेले आणि प्रेरणादायी स्वरूपाचे आहेत. त्यामुळे त्यांचा विचार वाचकांच्या अंत:करणाला जाऊन भिडतो. 'ज्यांना पायातली वाहाण म्हणून वागवले जाते त्यांनी, त्या धर्माच्या रक्षणासाठी काय म्हणून मरावे?' 'लोकसंग्रहाचा आग्रह म्हणजेच सत्याग्रह', 'समाज ही नौकाच आहे', 'माणसासाठी धर्म आहे', 'समता हे सामाजिक नीतीचे एक मुख्य तत्त्व आहे', 'हिंदुधर्म हा दगडाचा धर्म आहे', 'स्वाभिमानशून्यतेचे जीवन कंठणे नामर्दपणाचे आहे' अशी त्यांची विधाने अचूक शरसंधान करणारी आहेत. त्यांच्या लेखनात उपमा-रूपकादी अलंकारांचा उचित वापर झाला आहे. 'विचार हा काही एखाद्या ज्वालामुखीप्रमाणे आपोआप पेट घेत नाही', 'उदात्त तत्त्वांच्या मनोराज्यात गढून जाऊन व्यवहाराला विसरणाऱ्या शाळेतील पोराप्रमाणे आम्ही मूर्ख नाही', 'सोळाव्या शतकात साधुसंतांनी सत्यशोधकी कुऱ्हाडीचे कितीतरी घाव घातले, परंतु अस्पृश्यतारूपी फोफावलेला वृक्ष त्यांच्या हातून तोडला गेला नाहीच, पण त्याचे पानसुद्धा त्याच्याने हालले नाही', 'बहिष्कृत भारताच्या झंझावाताने हिंदुसमाजात एक प्रकारचे तुफान आले आहे' अशा विधानांतून वाचकांस त्यांच्या भाषाप्रभुत्वाचा प्रत्यय येतो. आपल्या लेखनातून प्रचलित म्हणी, वाक्प्रचार यांचाही उपयोग आंबेडकर करतात, 'ज्याची तलवार खंबीर तो हंबीर', 'अस्तनीतले निखारे', 'कुऱ्हाडीचा दांडा गोतास काळ', 'शिळ्या कढीला ऊत आणण्याचा प्रयत्न' इत्यादींचा उपयोग सहज केल्यामुळे त्यांच्या शैलीचे अस्सल मराठमोळे वळण लक्षात येते. इतके क्रांतिकारक विचार मांडणाऱ्या व समाजपरिवर्तनाला गती देणाऱ्या साहित्याची साधी दखलही आजवर मराठी वाङ्मयाच्या इतिहासात घेतली

गेली नाही, ही खेदजनक वस्तुस्थिती मान्य करण्यावाचून गत्यंतर नाही. ती चूक यापुढे तरी सुधारावयास हवी.

– प्रा. डॉ. विलास खोले

**संदर्भ :**

१. कीर धनंजय; 'डॉ. बाबासाहेब आंबेडकर'; पॉप्युलर प्रकाशन, मुंबई; २००७.

२. पानतावणे गंगाधर, संपादक; 'डॉ. बाबासाहेब आंबेडकर यांचे निवडक लेख'; प्रतिमा प्रकाशन, पुणे; १९९८.

३. कांबळे अरुण, संपादक; 'जनता' पत्रातील लेख : डॉ. बाबासाहेब आंबेडकर; प्रतिमा प्रकाशन, पुणे; आवृत्ती दुसरी, २००३.

## आगरकर, गोपाळ गणेश

☞ **मुख्य नोंद – समाजकारण खंड**

## आगाशे, गणेश जनार्दन

**अर्थशास्त्राचे अभ्यासक, लेखक, कवी, निबंधकार**

**१८५२ – १३ जुलै १९१९**



आगाशे यांचे मूळ गाव रत्नागिरी जवळ 'कोळंबे' हे असून त्यांचे प्राथमिक शिक्षण आळंदी व सासवड येथे झाले. येथील सरकारी हायस्कूलमध्ये बुद्धिमान विद्यार्थी म्हणून त्यांचे कौतुक होते. १८६९ साली मॅट्रिकच्या परीक्षेत त्यांना जगन्नाथ शंकरशेट शिष्यवृत्ती मिळाली. डेक्कन महाविद्यालयामध्ये त्यांनी बी.ए.चे शिक्षण घेतले. त्या परीक्षेत त्यांना भगवानदास पुरुषोत्तम शिष्यवृत्ती मिळाली. शाळेपासून महाविद्यालयापर्यंत ते प्रथम क्रमांकावर होते.

'अर्थशास्त्र' हा त्यांचा विशेष आवडता विषय होता. 'अर्थशास्त्राची मूलतत्त्वे'(मिसेस फॉसेटकृत इंग्रजी ग्रंथाच्या आधारे स्वैर रूपांतर) १८९१ मध्ये लिहिले. अर्थशास्त्र विवेचनास कोणतीही परिभाषा हाताशी नसताना त्यांनी हा ग्रंथ दक्षतापूर्वक लिहिला. या ग्रंथाला दक्षिणा प्राइझ कमिटीचा विशेष पुरस्कार मिळाला.

आगाशे हे विद्याव्यासंगी व बहुश्रुत होते. अभ्यास, चिंतन व मनन करणे ही त्यांची वृत्ती होती. पुणे, ठाणे, नगर, धुळे इत्यादी ठिकाणी त्यांनी शिक्षकाची नोकरी केली. निवृत्तीपूर्वी मुख्याध्यापक, पर्यवेक्षक या पदांवरही काम केले. निवृत्तीनंतर काही काळ डेक्कन महाविद्यालयात इंग्रजीचे प्राध्यापक म्हणून सरकारकडून नेमणूक झाली होती.

आगाशे हे शीघ्र कवी होते. मराठी, संस्कृत, इंग्रजी ह्या भाषांत ते सहज कविता करत असत. त्यांच्या कविता तत्कालीन 'विविधज्ञानविस्तार', 'काव्यरत्नावलि' अशा नियतकालिकांत प्रसिद्ध होत. समकालीन व उत्तरकालीन काव्यसमीक्षकांनी आगाशेंच्या काव्याची दखल घेतली. 'बिरुदावली' (१९०१) आणि 'राज्यारोहण' (१९१२) ही त्यांची विशेष काव्ये होत. यांतील 'बिरुदावली' ही कविता त्यांचे गुरू न्यायमूर्ती रावसाहेब रानडे यांच्यावर केलेली आहे. स्वतःच्या मुलाच्या मृत्यूमुळे आगाशेंनी 'बाष्पांजली' (१९१६) काव्य लिहिले. या काव्यसंग्रहाची समीक्षा करताना समीक्षकांनी हे काव्य म्हणजे सरस, नवीन वळणाचे व अत्यंत प्रभावी असल्याचे म्हटले आहे. या ३३५ श्लोकांच्या काव्यातून आगाशेंनी अकाली मृत्यू आलेल्या आपल्या मुलाशी भावोत्कट संवाद साधला आहे.

'सीमा कोठे अवनितलि या पुत्रशोकास नाही' अशा पद्धतीने काव्यातील करुणच्छटा रेखाटल्या आहेत. या काव्यात शोकभावनेतून तत्त्वविचारांकडे व तत्त्वविचारांपासून शांतिरसापर्यंत असा विलापिकेचा प्रवास होताना दिसतो.

'सुंदरेची संक्रांत', 'सद्‌गुणमंजरी', 'राज्यारोहण', 'तीन हरिभाऊ', 'एडवर्ड बादशहा', 'यंदाचा हिवाळा' इत्यादी कवितांप्रमाणे 'उपनिषदे', 'भगवद्‌गीता', 'अजविलाप', 'इनमेमोरियम' या काव्यात आत्म्याच्या मरणोत्तर गतीविषयी आलेल्या कल्पनांचा उपयोग केला आहे. तत्कालीन नवशिक्षितांमधील सरकारदरबारी व

सुशिक्षितांच्या मेळाव्यात आगाशे हे मान्यता पावलेले कवी होते.

मराठीतील प्रारंभकालीन ‘अर्थशास्त्रीय लेखक’ म्हणूनही आगाशेंची कीर्ती झाली. ‘अर्थशास्त्र वाचन पाठमाला’ या शीर्षकाखाली त्यांचे काही संवादात्मक लेख ‘विविधज्ञानविस्तार’मधून प्रसिद्ध झाले होते. त्यांच्या शिक्षणविषयक व्यासंगात बालशिक्षणालाही त्यांनी महत्त्व दिले. त्याविषयीचे त्यांचे लेख तत्कालीन नियतकालिकांतून प्रसिद्ध होत.

‘महाराष्ट्र वाङ्मयाचे पर्यालोचन’ (१९०२) आणि ‘महाराष्ट्र वाङ्मय’ (१९०३) हे त्यांचे निबंध उल्लेखनीय होते. निबंधकार, टीकाकार असलेले आगाशे यांनी इंदूर येथे भरलेल्या महाराष्ट्र साहित्य संमेलनाचे अध्यक्षपद (१९१७) भूषविले. तत्कालीन साहित्यव्यवहार, ग्रंथनिर्मिती, भाषाव्यवहार याबद्दल विद्वत्तापूर्ण भाषण करून साहित्यविचाराला प्रेरणा दिली आणि मार्गदर्शन केले यांबद्दल आगाशे यांची साहित्यप्रांतात वाहवा झाली.

– डॉ. रजनी अपसिंगेकर

**संदर्भ :**

१. *खानोलकर गं. दे; ‘अर्वाचीन मराठी वाङ्मयसेवक’ खंड ३, भाग १; स्वस्तिक पब्लिशिंग हाउस, मुंबई ४.*

२. *जोग रा. श्री., संपादक; ‘मराठी वाङ्मयाचा इतिहास’, खंड ५, भाग १,२; मराठी साहित्य परिषद, पुणे.*

३. *कुलकर्णी अनिरुद्ध अनंत; ‘प्रदक्षिणा’, खंड १; कॉन्टिनेन्टल प्रकाशन, पुणे.*

## आचवल, माधव भास्कर

**समीक्षक, ललित लेखक**

**३ नोव्हेंबर १९२६ – २१ जानेवारी १९८०**

माधव आचवल यांचे शालेय शिक्षण विल्सन हायस्कूल मुंबई येथे झाले. त्यांनी ज. जी. कला महाविद्यालयातून १९४५ मध्ये वास्तुशास्त्रात पदवी प्राप्त केली. आचवल बडोदा येथे एम. एस. विद्यापीठात प्राध्यापक होते.



आचवलांचे ललित लेखन १९५५च्या सुमारास ‘सत्यकथा’ मासिकामधून प्रसिद्ध होऊ लागले. त्यांचे ललित लेखन ‘किमया’ (१९६१) तसेच ‘पत्र’ (१९९२) या दोन संग्रहांमधून प्रकाशित झालेले आहे. आचवलांची वैशिष्ट्य-पूर्णता या दोन्ही संग्रहांमधून लक्षात येते. ‘आनंद आणि सुख याच मुळी आधी मानवी कल्पना आहेत. त्यांचा थोडा जरी अभ्यास केला, तरी हे पटावे की सुख हे संवेदनांत नाही, संवेदनांची मन जी रचना करते त्यांत आहे. अनुभवापासून दूर जाऊन त्याकडे बघण्यात आहे. ती स्वभावतःच एक मानसिक प्रक्रिया आहे त्यामुळे हे स्पष्ट आहे की मन हे जितके तरल व तीक्ष्ण, आठवणी साठवण्याची शक्ती आणि कल्पनेची झेप जेवढी मोठी, तितके सुख मोठे’... (पृष्ठ १२६) त्यांच्या ललित लेखनामागची दृष्टी या अवतरणातून स्पष्ट होते.

निसर्गातील तसेच मानवनिर्मित कलाकृतींचा आस्वाद घेणारे रसिक मन, जगण्यातील चैतन्याला कवेत घेणारी संवेदनशीलता, सौंदर्यासक्त आनंदी वृत्तीचा प्रत्यय त्यांच्या ललित लेखनामधून येतो. उत्कटता, सळसळता उत्साह यांच्यासह जगण्याची ऊर्मी, प्रसन्नता, निरागस खेळकरपणा हे गुण त्यांच्या ललित लेखनामध्ये जाणवतात. कलाकृतींमधील सौंदर्याचा मनावर एकत्रित होणारा परिणाम तसेच कलाकृतीतील चैतन्याचा वेध घेण्याचा प्रयत्न त्यांनी ललित लेखनामधून केला. चिंतनशीलता, कठोर विश्लेषण आणि जगण्यातले मार्दव, कारुण्य यांची जोपासना अशा दोन अंगांनी झालेला विकास त्यांच्या ललित लेखनामधून स्पष्ट होतो.

‘जास्वंद’ (१९७४) ह्या ग्रंथातून त्यांनी गंगाधर गाडगीळ, इंदिरा संत, पु. शि. रेगे, चिं. त्र्यं. खानोलकर, जी. ए. कुलकर्णी यांच्या साहित्यकृतींवर केलेली समीक्षा प्रसिद्ध आहे. ‘रसास्वाद: वाङ्मय आणि कला’ (१९७२) हा ‘जास्वंद’च्या आधी प्रसिद्ध झालेला

समीक्षापर ग्रंथ. यात 'रणांगण' या विश्राम बेडेकर यांच्या कादंबरीचे व 'ताजमहाल' या जगप्रसिद्ध वास्तुशिल्पाचे रसग्रहण केलेले आहे.

बा. सी. मर्ढेकर यांच्या समीक्षेने कलाकृतीची स्वायत्तता, तिचे अनन्यसाधारण असणे, आत्मनिष्ठा या मूल्यांवर विशेष भर दिला. कलाकृतीच्या आकृतिबंधाची जडणघडण, तिच्यामध्ये असलेले आशय आणि अभिव्यक्तीचे अद्वैत व त्या अंगाने येणारे शैलीविशेष यांना मर्ढेकरांच्या समीक्षेमध्ये महत्त्व दिले गेले. साहित्यकृतीचा रसास्वाद कसा घ्यावा, साहित्य आणि इतर ललित कलांमधील साम्यभेद विशद करणारे लेखन मर्ढेकर आणि त्यानंतरच्या नवसमीक्षेने केले. मर्ढेकरांच्या नंतरच्या काळातील नवसमीक्षेच्या प्रवाहातील समीक्षक म्हणून माधव आचवल परिचित आहेत.

ललितकृतींमधून जाणवणारे चैतन्य म्हणजे प्रत्यक्ष जीवनात जाणवणाऱ्या चैतन्याचा आभास असतो. हे प्रत्यक्ष जीवनातील चैतन्यापेक्षा निराळे असते. ते त्या विशिष्ट कला-आकृतीमुळे जाणवलेले असते. कलाकृतीत जीवनचैतन्याचा आभास तिच्यातील भावनात्मक आशयामुळे होतो. कलाकृतीत जाणवणारे चैतन्य व तिच्यामधून व्यक्त होऊ पाहणारे चैतन्य यांना सोयीकरता निराळे करून त्यांचा परस्परांशी असलेला संबंध तपासता येतो. कलाकृतीचे घटक व यांचे स्वतंत्रपणे विश्लेषण करून कलाकृतीचा भाग झाल्यामुळे त्यांच्यावर झालेले परिणाम पाहणे हे आचवल यांच्या समीक्षेचे थोडक्यात सार म्हणता येईल. 'डार्करूम आणि इतर एकांकिका' (१९७५), 'चिता आणि इतर एकांकिका' (१९७६) हे माधव आचवल यांचे निवडक एकांकिका संग्रह प्रसिद्ध झाले आहेत. 'अमेरिकन चित्रकला' (१९६४) हे त्यांचे अनुवादित पुस्तक होय.

– प्रा. रूपाली शिंदे

**संदर्भ :**

*१. आचवल माधव; 'किमया'; मौज प्रकाशन गृह, मुंबई; १९६१.*
*२. 'प्रदक्षिणा' खंड २; कॉन्टिनेन्टल प्रकाशन, पुणे; १९९८.*

## आचार्य अत्रे

☞ **अत्रे, प्रल्हाद केशव**

## आजगांवकर, जगन्नाथ रघुनाथ

**चरित्रकार**

**१६ ऑगस्ट १८७८ – २७ ऑगस्ट १९५५**



संत कवींचे चरित्रकार श्री.आजगांवकर यांचा जन्म आजगांव, जिल्हा रत्नागिरी येथे झाला. प्राथमिक चौथीनंतर इंग्रजी शिक्षणासाठी आजगांवकर १८९३साली कोकणातून कोल्हापुरात गेले. मधली एक-दोन वर्षे सोडल्यास ते सुमारे ५७ वर्षे जन्मभूमीच्या बाहेरच होते. एवढ्या काळात कोल्हापूर, कराची, पुणे, मुंबई वगैरे ठिकाणी त्यांचे वास्तव्य झाले. प्रवासही पुष्कळ झाला. महाराष्ट्रातील जुन्या पिढीतील बहुतेक सर्व प्रसिद्ध व्यक्तींशी त्यांचा परिचय होता. चालू पिढीतलेही बरेचसे लेखक त्यांच्या चांगल्या परिचयाचे होते.

**महाराष्ट्र कवि-चरित्रकार**

महाराष्ट्र भाषाभूषण ज.र. आजगांवकरांनी आयुष्याची ५०वर्षे खपून २००पेक्षा अधिक प्राचीन मराठी संत कवींच्या चरित्रांची व काव्यांची ओळख मराठी वाचकांना करून दिली आहे. त्यांनी एकूण २४पेक्षा अधिक ग्रंथ लिहिले आहेत. संपादक, प्रभावी वक्ते, संशोधक म्हणून ते प्रसिद्ध होते. पण त्यांच्या कवि-चरित्रांमुळे मराठी सारस्वतांतील त्यांचे स्थान निश्चित झाले आहे. महाराष्ट्र कवि चरित्रकार म्हणजे महाराष्ट्र भाषाभूषण आजगांवकर असे समीकरणच होऊन बसले आहे. १९०७ ते १९४७ या कालखंडात आजगांवकरांनी महाराष्ट्र कवि-चरित्रांचे ११ भाग प्रसिद्ध केले होते. ह्याच्यापूर्वीच लिहिलेल्या कवि-चरित्रांच्या गेल्या ५० वर्षांत उपलब्ध झालेल्या सर्व नव्या व अद्ययावत माहितीचा उपयोग करून नवी सुधारलेली आवृत्ती काढण्यासाठी ५ वर्षे अविश्रांत श्रम

करून १ ला खंड १९५४ साली पूर्ण केला. तो प्रसिद्ध होण्यापूर्वीच त्यांचे दुःखद निधन झाले. महाराष्ट्रातील कवींच्या चरित्राचे व काव्याचे मार्मिक व संकलित रितीने समालोचन करणारा मराठी भाषेतील हा पहिलाच प्रयत्न होय. मराठी साहित्याचा अभ्यास करणारे विद्यार्थी व प्राध्यापक यांची वर्दळ त्यांच्या घरी नेहमी असायची. लहानपणापासून मराठी साहित्याकडे त्यांचा ओढा होता. वाचन व लेखन अखंड चालू असे. 'मनोरंजन'कार काशीनाथ रघुनाथ मित्र हे तर आजगांवकरांना आपले बंधूच मानीत. मराठी भाषेवर प्रभुत्व असणाऱ्या आजगांवकरांची भाषा प्रासादिक, रसाळ, अर्थमधुर व वाक्ये सुटसुटीत असत. या वैशिष्ट्यांमुळेच शि. म. परांजपे यांच्या शिफारशीवरून डॉ. कूर्तकोटी शंकराचार्यांनी त्यांना 'महाराष्ट्र भाषाभूषण' ही सार्थ पदवी दिली. पीएच. डी. चे विद्यार्थीसुद्धा त्यांचे मार्गदर्शन घेत असत.

नाटक आणि नाटक मंडळ्या ह्या विषयांवर १९४७पूर्वी मुंबई नभोवाणीवर त्यांनी केलेली सहा भाषणे उद्‌बोधक व रोचक होती. याच विषयावर त्यांनी 'विहार' मासिकात लेखन केले होते. 'प्राचीन मराठी संत कवी: खंड पहिला व दुसरा' या ग्रंथांना जोडलेल्या दीर्घ प्रस्तावनांतूनही आजगांवकरांनी आत्मकथन केले आहे. संत कवींच्या चरित्रातील चमत्कारांवर त्यांचा डोळस विश्वास होता. ते स्वतः पदवीधर नसताना नागपूर व मुंबई विद्यापीठांच्या बी. ए., एम. ए. परीक्षांचे परीक्षक म्हणून त्यांची नियुक्ती झाली होती. त्यांनी अनेक ग्रंथांना प्रस्तावना लिहिल्या होत्या. अनेक राष्ट्रपुरुषांशी त्यांचे निकटचे, जिव्हाळ्याचे संबंध होते. आजगांवकरांचे वडील रघुनाथ मुरारी प्रभू आजगांवकर बहुश्रुत व संत वाङ्मयाचे भोक्ते होते. वडिलांचे छत्र लवकर हिरावले गेल्याने शिक्षणाची परवड झाली. चरितार्थासाठी त्यांनी अनेक नोकऱ्या केल्या. लॉर्ड रे म्युझिअममध्ये त्यांनी क्युरेटरची नोकरी केली.

**निर्भीड लेखन**

मुंबईच्या 'गुराखी' दैनिकात त्यांचे काही लेख प्रसिद्ध झाले होते. मुंबईच्या 'इंदुप्रकाश'चे संपादन करीत असताना त्यांनी 'ज्ञानांजन' हे स्वतःचे मासिक सुरू केले. काही काळ ते 'संदेश' व 'रणगर्जना'ह्यांचेही ही संपादक होते. लौकिक अर्थाने त्यांचे जीवन खडतर व जिकिरीचे असूनही त्यांनी कोणाची खुशमस्करी करण्यासाठी, लाचारीसाठी आपली लेखणी चालवली नाही. ते कुटुंबवत्सल, संतसेवक होते आणि चोखंदळ व सत्यप्रिय संशोधक होते. दीनदुबळ्यांची कणव करणाऱ्या संत एकनाथांचे समानधर्मी आजगांवकर वादकुशल व कठोर टीकाकारही होते. कोल्हापुरात 'दीनबंधू'चे संपादन करताना त्यांनी आपला 'रामशास्त्री' बाणा दाखविला. वाणी व लेखणी ह्यांचे पावित्र्य राखून सत्याची बाजूच उजेडात आणली. पुण्याच्या 'सुधारक' पत्रात अहमदनगरचे भारदे यांनी 'आळंदीचा ज्ञानेश्वर ज्ञानेश्वरीचा कर्ता नव्हे' अशी लेखमाला लिहून विचारवतांत खळबळ उडवून दिली. आजगांवकरांनी जुन्या कवितांच्या आधारे त्याला लिहिलेले समर्पक उत्तर 'केसरी'मध्ये अग्रलेखाच्या शेजारी छापून आले व भारदे चारी मुंड्या चीत झाले. आजगांवकरांचे शिक्षण, वाचन, व्यासंग, लेखन-कौशल्य वगैरे अगदी बेताचे असूनही 'हा कोण संप्रति नवा पुरुषावतार' असा हलकल्लोळ त्या वेळी उडाला. या लेखामुळे लोकमान्य टिळकांशी आजगांवकरांचा अकृत्रिम स्नेह जमला. श्री. अ. का. प्रियोळकरांनी मुक्तेश्वरी महाभारताची सुधारित आवृत्ती काढली. त्यात मुक्तेश्वरांवर झालेला अन्याय, प्रियोळकरांचे मित्र असूनही, आजगांवकरांना सहन झाला नाही. त्यांनी लेखनमाला सुरू करून प्रियोळकरी संशोधनाचे वाभाडे काढले. ''तुम्हां महाराष्ट्रीयांचे माझ्याविषयी काय मत आहे?'' असे महात्मा गांधींनी त्यांना विचारले. त्यावर आजगांवकर म्हणाले, ''एक थोर सत्पुरुष या नात्याने आपल्याविषयी सर्व महाराष्ट्रीयांच्या मनात आदरबुद्धीच वसत आहे. परंतु आपले राजकारण आमच्या लोकांस तितकेसे आवडत नाही. आम्हां महाराष्ट्रीयांस आक्रमक राजकारणाची सवय, त्यामुळे आपले राजकारण आम्हांला थोडेसे मिळमिळीत वाटते.'' गांधींसारख्या राष्ट्रनेत्याला न आवडणाऱ्या गोष्टी तोंडावर

सांगणे, हे येरागबाळ्याचे काम नव्हते. निर्भीड आजगांवकरांना ते सहजसुलभ असे. आजगांवकरांच्या कविचरित्राच्या पहिल्या भागावर केसरीत स्वतः टिळकांनी एक स्फुट लिहून त्यांना प्रोत्साहन दिले. देवदेवता व संत हे त्यांचे श्रद्धाविषय. ते संतसेवक होते, अंधश्रद्धाळू नव्हते ते धार्मिक होते, पण धर्मवेडे नव्हते. सनातनी कर्मठपणा त्यांना बिलकूल मान्य नव्हते. त्यांच्याएवढीच साहित्यसेवा केलेला पण त्यांच्याएवढाच नम्र साहित्यसेवक विरळा. त्यांना यशाचा अहंकार नव्हता. त्यांची रसिकता जिवंत व जातिवंत होती. ''आपली साहित्यसेवा ही इतरांच्या कृपाप्रसादाचे व केवळ योगायोगाचे श्रेय आहे,'' असे ते म्हणत. त्यांची गप्पांची बैठकही नेहमी रंगत असे. जुने नट, गायक, विद्वान, अनुभव, पुढारी, कविता, संगीत, शास्त्र वगैरे विषयांची उजळणी त्या बैठकीत सारख्याच तल्लीनतेने होई. त्यात चटकदारपणा असे. कुणाची कुचेष्टा, निंदा नसे. प्रा. न. र. फाटक म्हणतात, ''त्यांनी कित्येक अप्रसिद्ध कवींना उजेडात आणले... त्यांनी आपल्या बालपणापासूनच्या जुन्या मराठी साहित्याच्या गोडीला संशोधनाची व चर्चेची जोड देऊन ती वाढविली. त्यांची धारणा व स्मरणशक्ती वाखाणण्यासारखी असल्याने ज्ञानेश्वर, नामदेव...मोरोपंत या ठळक मंडळींच्या वाङ्मयातील विवेचनोपयोगी निवडक वेचे ते तोंडाने भराभर म्हणत.'' प्रा. फाटक त्यांच्या योगदानाविषयी लिहितात, ''मराठी भाषेच्या अध्यापकांना भावे-पांगारकरांप्रमाणेच श्री. आजगांवकरांचे लेखन मार्गदर्शक ठरते व ठरणारे आहे.''

'कवन-कुतूहल काव्य' (१९०१), 'भरतपूरचा वेढा' (इतिहास) (१९०५), 'नेपाळ वर्णन' (१९०६), 'भूतविद्येचे चमत्कार' (१९१८), 'मुकुंदराजांचा सार्थ' परमामृत (गद्य भाषांतरासह) (१९३१), श्री. कृ. कोल्हटकरांच्या 'मतिविकार' नाटकावर टीका, 'हरिभजनामृत भाग १-२-३' (१९१६ ते १९१८), 'नित्यपाठ भजनमाला' (१९१९), 'महाराष्ट्र कवि-चरित्र भाग १ ते ८१', पृष्ठसंख्या सुमारे २५००, 'महाराष्ट्र संत-कवयित्री', असे त्यांचे प्रकाशित साहित्य आहे.

– वि. ग. जोशी

**संदर्भ :**

१. *आजगावकर गुं. फ.; 'प्रसिद्ध पुरुषांच्या अप्रसिद्ध गोष्टी'; ज. र. आजगावकरांच्या शतसंवत्सरीच्या निमित्ताने प्रसिद्ध संदर्भ ग्रंथ; १९७८.*
२. *खानोलकर गं. दे.; 'मराठी वाङ्मयसेवक चरित्रकोश', खंड पहिला; 'अथेना पब्लिकेशर्स', मुंबई; २००३.*
३. *जोशी तर्कतीर्थ लक्ष्मणशास्त्री; 'मराठी विश्वकोश', खंड १; प्रकाशक, महाराष्ट्र राज्य साहित्य संस्कृति मंडळ, मुंबई; १९७६.*

## आठल्ये, कृष्णाजी नारायण

**संपादक, चित्रकार, टीकाकार, निबंधकार, कवी**
**३ जानेवारी १८५३ – २९ नोव्हेंबर १९२६**

कृष्णाजी यांचे वडील दशग्रंथी वैदिक असल्याने त्यांनाही तेच शिक्षण मिळाले. कऱ्हाड येथे त्यांचे थोडेसे मराठी शिक्षण झाले. पुण्याच्या ट्रेनिंग महाविद्यालयामध्ये राहून त्यांनी शिक्षण पूर्ण केले. सातारा जिल्ह्यात पाच वर्षे शिक्षकाची नोकरी केली. नंतर मुंबईच्या जे. जे. स्कूल ऑफ आर्ट्सचे ३ वर्षे शिक्षण घेतले. तेथे तैलचित्राचे विशेष ज्ञान संपादन केले. बडोदा येथे एका हायस्कूलमध्ये आठल्यांनी रंगकलेवर व्याख्यान दिले. योगायोगाने बडोद्याचे दिवाण सर टी. माधवराव व्याख्यानाला उपस्थित होते आणि व्याख्यानाने प्रभावित होऊन त्यांनी आठल्यांकडून अनेक तैलचित्रे काढून घेतली. मलबारमधील कोचीन येथे आठल्यांचे एक बंधू नोकरी करीत होते. ते आजारी पडल्याने त्यांना भेटायला म्हणून कृष्णाजी कोचीनला आले, ते २०वर्षे तेथेच राहिले. तेथे त्यांनी 'केरळकोकिळ' नावाचे मासिक सुरू करून (१८८६) ते सुमारे २५ वर्षे चालवले. त्याद्वारे त्यांनी तत्कालीन मराठी वाचकांत वाङ्मयाची आवड निर्माण केली.

पहिली ५ वर्षे हे मासिक कोचीनहून निघत असे. त्यातील 'पुस्तक परीक्षणे', 'लोकोत्तर चमत्कारांचे

कथन', 'कविता', 'कूटप्रश्न', 'कलमबहादुरांस शेलापागोटे' इत्यादी आकर्षक सदरांमुळे व सडेतोड लेखनामुळे ते फार लोकप्रिय झाले.

आठल्यांनी अनेक ग्रंथ लिहिले. केरळमध्ये असताना त्यांनी नामावृत्तांतील 'गीतापद्यमुक्ताहार' हे पहिले पुस्तक प्रकाशित केले (१८८४). त्यानंतर त्यांनी तिसांहून अधिक पुस्तके लिहिली. निर्णयसागर छापखान्याने ती प्रसिद्ध केली. छापखान्याच्या मालकानी १२ तोळ्यांचे सोन्याचे कडे बक्षीस देऊन त्यांचा गौरव केला. त्यांचे बरेचसे लेखन अनुवादात्मक आहे. त्यात स्वामी विवेकानंदांवरील 'राजयोग', 'भक्तियोग' आणि 'कर्मयोग' हे अनुवाद विशेष प्रसिद्ध आहेत. याशिवाय 'माझे गुरुस्थान', 'सार्थ दासबोध', 'समर्थांचे सामर्थ्य', 'सार्थ ज्ञानेश्वरी', 'सुलभ वेदान्त', 'आर्याबद्ध गीता', 'वसंत पूजा', 'फाकडे तलवार बहाद्दर', 'नरदेहाची रचना', 'विवेकानंद जीवन', 'ज्ञानेश्वरांचे गौडबंगाल', 'पंचतंत्रामृत' हे ग्रंथ 'सुश्लोक लाघव', 'सासरची पाठवणी', 'माहेरचे मूळ', 'शृंगार तिलकादर्श', 'मुलीचा समाचार' ह्या काव्यरचना आणि 'मुले थोर कशी करावीत?', 'नजरबंद शिक्षक', 'ग्रहदशेचा फटका', 'मथुरा गणेश सौभाग्य' वगैरे गद्यरचना आकर्षक भाषाशैलीमुळे व पद्य प्रासादिक, आलंकारिक शैलीमुळे लोकप्रिय झाले. शृंगेरी मठाच्या शंकराचार्यांनी त्यांना 'महाराष्ट्र भाषा चित्रमयूर' ही पदवी दिली होती.

'आत्मरहस्य' (१९१९), 'The English Teacher भाग १ व २' (१९२३), 'कोकिळाचे बोल' (निवडक लेख) (१९२६), 'रामकृष्ण परमहंस' (१९२९) या आठल्यांच्या रचना होत.

– वि. ग. जोशी

**संदर्भ :**

१. *जोशी तर्कतीर्थ लक्ष्मणशास्त्री, संपादक; 'मराठी विश्वकोश', खंड १'; प्रकाशक, महाराष्ट्र राज्य साहित्य संस्कृति मंडळ, मुंबई; १९७६.*

२. *भिडे गणेश रंगो; 'अभिनव मराठी ज्ञानकोश', भाग पहिला; अभिनव मराठी ज्ञानकोश कार्यालय, कोल्हापूर; १९६३.*

३. *देशपांडे, अ. ना.; 'आधुनिक मराठी वाङ्मयाचा इतिहास', भाग पहिला; व्हीनस प्रकाशन, पुणे; १९७४.*

४. *खानोलकर गं. दे; 'मराठी वाङ्मयसेवक चरित्रकोश', खंड पहिला, अथेना पब्लिकेशर्स, मुंबई; २००३.*

## आठवले, शांताराम गोविंद

**कवी, चित्रपट गीतकार**

**२१ जानेवारी १९१० – २ मे १९७५**



शांताराम आठवले यांचे मॅट्रिकपर्यंतचे शिक्षण पुण्याच्या भावे हायस्कूलमध्ये झाले. पितृछत्र लवकर हरपल्याने उच्च शिक्षण घेता आले नाही. उलट पुणे सोडून आईबरोबर त्यांना कोलवाडी या त्यांच्या वतनी खेडेगावात राहावे लागले.

त्यांचे वडील सरदार शितोळे यांच्या पुणे प्रांतातील जहागिरीचे व्यवस्थापक होते. शितोळ्यांच्या वाड्यात वारंवार होणाऱ्या तमाशाच्या बैठकीमुळे त्यांना लावणीचा अस्सल मराठमोळा ढंग लहान वयात ऐकायला मिळाला. तसेच त्या वेळेच्या गाजलेल्या नाटक कंपन्या- गंधर्व, महाराष्ट्र यांची नाटके पाहायला मिळाली.

कोलवाडीच्या शांत, निरामय जीवनात रमले. तिथे वारकरी भजनी परंपरेशी ओळख झाली. तेथील नैसर्गिक सौंदर्यामुळे त्यांना काव्यरचना करण्याची प्रेरणा मिळाली. ते काव्यलेखन करू लागले. पण चरितार्थ कसा चालवावा, हा प्रश्न आ वासून उभा होता. योगायोग असा की, पत्रव्यवहारामुळे ओळख झालेल्या ना. ह. आपटे यांनी शांतारामला त्यांचा छापखाना व 'मधुकर' मासिक ह्यांची व्यवस्था पाहण्यास बोलाविले नि प्रश्न सुटला. आपटे यांच्या 'भाग्यश्री' कादंबरीवर प्रभात कंपनीने 'अमृतमंथन' हा चित्रपट काढण्याचे ठरविले. तेव्हा आपट्यांनी गीत-लेखक म्हणून शांताराम आठवले ह्यांचे म्हणून नाव सुचविले. त्यांचा प्रभातमध्ये प्रवेश झाला. तिथे ते नुसते स्थिरावलेच नाहीत तर यशाचा

मार्ग चालतच गेले. 'कुंकू', 'गोपालकृष्ण', 'तुकाराम' आदी चित्रपटांसाठी गीत-लेखन केले. त्यांची गीते सुरेल, सजीव व सौंदर्यसंपन्न होती. म्हणूनच एक उत्कृष्ट गीतकार म्हणून त्यांना नावलौकिक मिळाला. प्रभात सोडल्यानंतर त्यांनी 'वहिनीच्या बांगड्या', 'शेवग्याच्या शेंगा', 'वावटळ' या चित्रपटांचे दिग्दर्शन स्वतंत्रपणे केले. 'वावटळ' या चित्रपटाला सर्वोत्कृष्ट चित्रपट म्हणून पुरस्कार मिळाला. १९६६ नंतर ते या क्षेत्रातून निवृत्त झाले. त्यानंतर त्यांची लेखणी अध्यात्म, भारतीय तत्त्वज्ञान, गूढविद्या या विषयांकडे वळली. त्यांच्या पद्यरचनेचे 'एकले बीज' (१९३८), 'बीजांकुर' (१९४०), 'चंदेरी लहरी' (१९४७), 'सुमन फळे' असे चार संग्रह प्रसिद्ध आहेत. प्रारंभीची त्यांची कविता जातिवृत्तातील, अनलंकृत होती. चित्रपट गीतलेखनानंतर तिचे स्वरूप पालटले. 'संत तुकाराम' चित्रपटातील 'आधी बीज एकले' हे त्यांचे गीत तुकारामांच्या अभंगाशी इतके मिळतेजुळते होते की अनेकांनी त्या गीताचा शोध तुकाराम गाथेत घेतला.

त्यांचे गद्यलेखन बरेच आहे. प्रभात कंपनीत काम करीत असताना, त्यांनी कलेचे जे जग अनुभवले, तिथे ज्याचे-ज्याचे निरीक्षण केले, ज्या व्यक्तींच्या सहवासात ते आले; त्या सर्वांचे तटस्थ वृत्तीने, जाणिवेच्या पातळीवर रेखाटलेले 'प्रभातकाळ' (१९५०) हे विलक्षण हृद्य व चित्ररूप आत्मकथन आहे. आंतरिक जिव्हाळ्यामुळे ही कहाणी रसिक मनाची पकड घेते. अन्य लेखन परविद्येच्या साधन, संशोधन या विषयाशी निगडित आहे. प्रभात कंपनीसंबंधी त्यांनी नोंदविलेल्या तपशिलाला ऐतिहासिक महत्त्व प्राप्त झालेले आहे.

– शैलजा पुरोहित

## आपटे, नारायण हरी

**कादंबरीकार, कथाकार**

**११ जुलै १८८९ – १५ नोव्हेंबर १९७१**

'सामान्य वाचकाचे सामान्य लेखक ही बिरुदावली मिरवण्यात धन्यता मानणारे वाचकप्रिय' आपटे यांचा



जन्म समडोली, जि. सातारा येथे झाला. प्राथमिक शिक्षणही याच गावी झाले. हायस्कूल शिक्षणाकरता साताऱ्याच्या न्यू इंग्लिश स्कूलमध्ये त्यांनी प्रवेश घेतला. या काळातच हरिभाऊ आपटेंच्या कादंबऱ्यांचा त्यांच्यावर विलक्षण प्रभाव पडला. ध्येयवादाचे बीज मनात रुजू लागले. तशातच शिवरामपंत परांजपे ह्यांच्या 'काळ' या पत्रातील जहाल विचारसरणीच्या परिणामाने स्वातंत्र्य चळवळीकडे त्यांचे मन ओढले गेले. या मनोवस्थेमध्येच त्यांनी पायी देशाटन करण्याचा निर्णय घेतला आणि १९०४ साली घर सोडले.

दौलताबाद, वेरूळ, खानदेश, उत्तर प्रदेश, बंगाल अशी हजारो मैलांची पदयात्रा घडल्यामुळे परिस्थितीचे त्यांना बारकाईने दर्शन घडले. अनेक थोर व्यक्तींचे विचार ऐकण्याची संधी प्राप्त झाली. हिंदी व बंगाली या भाषांचा परिचय झाला. प्रवासाच्या शेवटच्या टप्प्यात त्यांचे जयपूर येथे बराच काळ वास्तव्य घडले. या वास्तव्यात त्यांनी उर्दू आणि संस्कृत ह्या भाषांची ओळख करून घेतली व राजपुतांचा इतिहासही अभ्यासला. त्यातून त्यांचा ध्येयवादी दृष्टिकोन बळावला. त्याचीच परिणती म्हणून, १८व्या शतकातील महाराष्ट्राच्या राजकीय जीवनाचे चित्र रेखाटणारी 'अजिंक्यतारा' ही कादंबरी त्यांनी १९०७ साली जयपूरमध्येच लिहून १९०९ मध्ये प्रसिद्ध केली. १९०४ ते १९१२ असा आठ वर्षांचा त्यांचा काळ प्रवासातच गेला. या कालावधीत बराच काळ त्यांना एका ख्रिस्ती कुटुंबात आश्रय लाभला होता. तेथे मिळालेल्या जिव्हाळ्यामुळे त्यांची दृष्टी व्यापक झाली.

१९१२ मध्ये ते आपल्या गावी परतले. पुढे १९१७ साली साताऱ्याजवळच्या कोरेगावात ते स्थायिक झाले. 'किर्लोस्कर' मासिकाच्या सुरुवातीच्या काळात त्यांनी



नारायण हरी आपटे ह्यांची स्वाक्षरी.

संपादनात साहाय्य केले. कोरेगावला स्वतःचा छापखाना काढून काही काळ 'मधुकर' नावाचे मासिक आणि 'आल्हाद' नावाचे साप्ताहिक त्यांनी चालविले. स्वतःचे प्रकाशनही काढले. पण भांडवलाअभावी हा व्यवसाय बंद करावा लागला. कादंबरी लेखन आणि कथा लेखन हे ब्रीद मात्र त्यांनी राखले. सामाजिक, ऐतिहासिक, अद्‌भुतरम्य अशा वैविध्यपूर्ण विषयांवरच्या व वेगवेगळ्या तंत्रशैलीच्या सुमारे पंचेचाळीस कादंबऱ्या त्यांनी लिहिल्या. 'कपटजाल' (१९१३), 'पिशाच्च साधने अथवा असुरी संपत्तीचा प्रभाव' (१९२०), 'रत्नगुंफा' (१९३३), 'अजरामर' (१९४६), या त्यांच्या कादंबऱ्यांतील अद्‌भुताची नवीन सृष्टी पाहून वाचक लुब्ध झाले. 'लांछित चंद्रमा' (१९१३), 'राजपुतांचा भीष्म' (१९१९), 'संधिकाल' (१९२२), या राजपुतांच्या इतिहासावर आधारलेल्या वीर पुरुषांच्या कादंबऱ्यांमधून त्यांनी स्वदेशाभिमानाला जागविले.

आपल्या सामाजिक कादंबऱ्यांमधून मध्यमवर्गीयांच्या जीवनचित्रणाला हात घातला. सासू-सुनांचा कलह रेखाटणारी 'वंदावे की निंदावे' (१९१३), विलायतेत शिक्षण घेणाऱ्या तरुण पिढीच्या वृत्ति-प्रवृत्तींचे दर्शन घडविणारी 'दुरंगी दुनियेत' (१९२२), फसवून वृद्धाशी विवाह झाल्यामुळे तरुणीच्या वाट्याला आलेल्या भेसूर जीवनाचे करुण चित्रण करणारी 'न पटणारी गोष्ट' (१९२३) – या कादंबरीवर आधारित 'प्रभात'चा 'कुंकू' चित्रपट त्या काळात अतिशय गाजला – शिक्षणाने व संस्कारांनी सुजाण बनलेल्या तरुणाच्या हळुवार मनाचा वेध घेणारी 'पहाटेपूर्वीचा काळोख' (१९२६), या त्यांच्या कादंबऱ्या मनाचा ठाव घेणाऱ्या आहेत. 'उमज पडेल तर' (१९३४), 'अपेक्षा' (१९४१), या कादंबऱ्या संसाराचा आदर्श कसा निर्माण करावा, हा संदेश देतात तर 'जाऊबाई' (१९५०) ही कादंबरी एकत्र कुटुंबातील थोरल्या जावेचे मनोज्ञ दर्शन घडविते. 'कोणी कोणाचे नव्हे' (१९५९) या कादंबरीतून आपटे यांनी जी तडफदार तरुणी शब्दबद्ध केली आहे, तिला तोड नाही. 'त्या अबला होत्या' (१९२८), 'संगदोष' (१९४३) या सामाजिक समस्यांचा ऊहापोह करणाऱ्या कादंबऱ्या त्यांच्या समाजचिंतनाची साक्ष देतात. 'आम्ही दोघे' या त्यांच्या कादंबरीत कथानकाची प्रमाणबद्धता, सुंदर भाषाशैली, उपमांमधून व प्रतिमांमधून व्यक्त होणारी सहजता व दोघांच्या आंतरिक संघर्षाचे प्रत्ययकारी चित्रण यांचा समन्वय झाल्याने, त्यांच्यातल्या अस्सल कलावंताचे दर्शन घडते. असे त्यांचे कादंबरी लेखन विपुल, वैविध्यपूर्ण व तंत्रकुशल आहे. चार-दोन रेषांच्या फटकाऱ्यांनी स्वभावचित्र रेखाटणे, वाचकांना आत्मीयता वाटेल अशा पद्धतीने जीवन चित्रण करणे, बोधवादी दृष्टी ठेवूनही कथानकाचा सांधा बिघडू न देणे, सहज व ओघवती भाषाशैली व परिणामकारक निवेदन करण्याची हातोटी, मध्यमवर्गाच्या ज्ञात-अज्ञात कंगोऱ्यांना आत्मीयतेने उलगडण्याची क्षमता व त्याला उभारी देण्याची वृत्ती, या सर्व गुणांनी त्यांची कादंबरी लक्ष वेधून घेते.

त्यांचे कथालेखनही मध्यमवर्गीयांच्या जिव्हाळ्याने ओतप्रोत भरलेले आहे. कथालेखक हा वाचकाचा सन्मित्र असावा, ही त्यांची भूमिका असल्याने त्यांच्या कथांवर बोधवादाची दाट छाया पडलेली आहे. पण मध्यमवर्गीय जीवनाच्या विविध छटा आपल्या कथांमधून रंगवून सांगण्याच्या त्यांच्या प्रवृत्तीमुळे व वास्तवावर आधारित जीवन चित्रणामुळे त्यांच्या कथाही परिणामकारक झालेल्या आहेत. 'बनारसी बोरें', 'आराम-विराम', 'हसा किंवा रुसा', 'कोंडकणी' हे त्यांचे कथासंग्रह लोकप्रिय आहेत. 'नाव नसलेली गोष्ट', 'तान्हेली कैदी', 'सुमती', 'कल्पनेची भरारी' यांसारख्या कथा त्यांच्या शैलीचे आगळे दर्शन घडवितात. प्रदीर्घ काळ कादंबरी लेखन करणारे व बोधवादाची पालखी

खांद्यावर घेऊनही, लोकप्रियतेचा ध्वज कायम फडकवीत ठेवणारे यशस्वी कादंबरीकार, कथाकार म्हणून आपटे यांचे कायम स्मरण राहील.

– डॉ. संजय देशमुख

**संदर्भ :**

१. *देशपांडे कुसुमावती; 'मराठी कादंबरी पहिले शतक' १८५०–१९५०; मुंबई मराठी साहित्य संघ प्रकाशन.*

२. *'मराठी वाङ्मयाचा इतिहास', खंड ५, भाग १; महाराष्ट्र साहित्य परिषद, पुणे.*

३. *कुरुंदकर नरहर; 'धार आणि काठ'; देशमुख आणि कंपनी, पुणे.*

## आपटे, वामन शिवराम

**कथाकार, लघुनिबंधकार, अनुवादक**

**२ जुलै १९१६ – २५ मे १९९८**



कल्याण येथे वास्तव्य केलेल्या वामनरावांनी एम.ए., बी.टी.पर्यंत शिक्षण घेऊन उल्हासनगर (जि. ठाणे) येथील तलरेजा महाविद्यालयात मराठी विषयाचे अध्यापन केले. किशोर व युवक ह्यांच्यासाठी प्रा. आपटे यांनी कथा व लघुनिबंधवजा अनेक संस्कारक्षम पुस्तके प्रकाशित केली. 'मित्र कसे जोडावेत' (१९७४) हे सांगून त्यांनी 'सदैव जायचे पुढे' अशी प्रेरणा देताना 'ध्येय कसे गाठाल?' (१९७६) याचे उत्तम मार्गदर्शन केले. आपटे म्हणतात, ''व्यवसाय हे जीवनाचे एक साधन आहे. साध्य किंवा ध्येय निराळे असते. ध्येय म्हणजे ज्याचा नेहमी ध्यास घ्यायचा, ज्याचे नेहमी चिंतन करावयाचे ते. ध्येयाचे अनुकरण, आचरण समाजातच व्हायचे आहे. समाजाला सोडून जीवनच नाही.'' जे–जे चांगले मनात येते, ते–ते सर्वांना सांगणे; हे आपटे यांचे 'ध्येय' होते. हिंदीतील व इंग्रजीतील काही लोकप्रिय पुस्तकांचे अनुवादही त्यांनी केले. सहा ते साठ वर्षांच्या सर्व व्यक्तींना त्यांचे जीवित कार्य अधिक क्षमतेने पार पाडता यायला मदत होईल अशा विश्वासाने त्यांनी 'स्मरणशक्ती कशी वाढवावी' याचा व्यावहारिक मंत्र दिला. आपटे यांनी 'चिंता का करता?' असा प्रश्न विचारून चिंतेचे मानसशास्त्र व शास्त्रज्ञांनी तत्संबंधी केलेले विश्लेषण सांगून चिंतानिवारणाचे उपाय सुचविले. आपटे यांची ही पुस्तके वाचकांना आवडली.

अकरा वर्षांच्या अखंड मेहनतीने शेक्सपिअरच्या ३७ पैकी ३४ नाटकांचे सुरस, सुबोध व नेटके भाषांतर करून वामनरावांनी मराठी भाषेची मोठी सेवा केली. 'शेक्सपिअर जसा आहे तसा' सादर करण्याचा त्यांचा प्रयत्न यशस्वी झाला. विविध पात्रांची भाषा ही नेहमीची व्यवहारात असलेली भाषा असून आपटे यांनी नाटकातल्या पद्याचा अनुवाद गद्यच ठेवला आहे. या ग्रंथाची अभ्यासपूर्ण प्रदीर्घ प्रस्तावनादेखील त्यांच्या कार्याचे उल्लेखनीय वैशिष्ट्य आहे.

– वि. ग. जोशी

**संदर्भ :**

१. *खानोलकर गं. दे.; 'मराठी वाङ्मयसेवक चरित्रकोश', खंड १; अथेना पब्लिशर्स, मुंबई; २००३.*

## आपटे, वासुदेव गोविंद

**निबंधकार, कोशकार, अनुवादक, बालवाङ्मयकार**

**१२ एप्रिल १८७१ – २ फेब्रुवारी १९३०**



बालवाङ्मयाचे लेखक, बालमासिकाचे संपादक, निबंधकार, कोशकार, टीकाकार, अनुवादक म्हणून ख्याती असलेल्या वा. गो. आपटे यांचा जन्म धरणगाव; जिल्हा जळगाव येथे झाला. त्यांचे माध्यमिक शिक्षण धुळे येथे तर उच्चशिक्षण इंदूर व नागपूर येथे झाले. इ. स. १८९३ मध्ये त्यांनी कोलकाता विद्यापीठाची बी. ए. पदवी संपादन केली. त्यानंतर पुणे येथून नूतन मराठी विद्यालयात ते शिक्षक म्हणून रुजू झाले.

कोलकाता विद्यापीठातून पदवी घेत असताना त्यांचा संबंध बंगाली भाषेशी आला, भाषाभ्यासाची आवड असल्याने बंगाली भाषा शिकून त्यावर प्रभुत्व मिळविले. त्याशिवाय हिंदी, गुजराती, कानडी, तेलगू, तमीळ इत्यादी प्रादेशिक भाषाही त्यांना अवगत होत्या. उर्दू, फ्रेंच, पाली इत्यादी अन्य भाषांचाही त्यांनी अभ्यास केला. मराठी तर त्यांची मातृभाषा, त्यामुळे या सर्व भाषाभ्यासाचा उपयोग त्यांना त्यांच्या लेखनात, अध्ययनात व अध्यापनात झाला. चरितार्थव्यवसाय निमित्ताने त्यांची मुंबई, इंदूर, अलाहाबाद, पुणे पुन्हा इंदूर अशी भ्रमंती चालू होती. इंदूरच्या राणीसाहेबांच्या आमंत्रणावरून राजकन्यांचे शिक्षक म्हणून त्यांनी काही वर्षे अलाहाबाद येथे वास्तव्य केले. तेथे त्यांचा 'मॉडर्न रिव्ह्यू'चे संपादक रामानंद चटोपाध्याय यांच्याशी परिचय झाला आणि त्यांचा सांगण्यावरून वा. गो. आपटे यांनी त्यांच्या 'मॉडर्न रिव्ह्यू' पत्रात मराठी पुस्तकांवर परीक्षणे लिहिली.

बंगाली भाषेचा आणि बंगाली ग्रंथांचा अभ्यास असल्याने बंकिमचंद्र चटर्जी यांच्या ऐतिहासिक, अद्‌भुतरम्य, सामाजिक कादंबर्‍यांचे अनुवाद त्यांनी केले. 'भारत गौरव ग्रंथमाले'तर्फे चार खंडांत (१९२३ ते १९२५) हे अनुवाद प्रसिद्ध झाले. बंकिमचंद्र चटर्जी यांच्या 'इंदिरा', 'दुर्गेशनंदिनी', 'कपालकुंडला', 'मृणालिनी', 'आनंदमठ' 'देवी चौधुराणी', 'कृष्णकांतांचे मृत्युपत्र' इत्यादी चौदा कादंबर्‍यांचा त्यात समावेश आहे. आंतरभारतीच्या आणि मराठी भाषेच्या दृष्टीने आपटे यांचे कार्य अत्यंत मोलाचे आहे.

'वाल्मीकीचा जय' ही कादंबरी बंगालीतून मराठीत अनुवादित केली. 'श्री. हरनाथ ठाकूर यांची अपूर्व पत्रावली' खंड– १ (१९२४) व खंड २ (१९२५) हेही त्यांनी अनुवादित केले.

सामाजिक सुधारणांच्या इष्टानिष्टते विषयीच्या चर्चांना भरपूर वाव देणारी ऐतिहासिक कलाकृती 'मूर्तिमंत देशाभिमान' त्यांनी १९०७मध्ये प्रकाशित केली. 'नवयुग' ही स्वतंत्र सामाजिक कादंबरी (१९०३) लिहिली. काही सामाजिक लघुकथांचे त्यांनी लेखन केले. त्यात 'त्रिवेणी' कथा 'अवगुंठिता' या बंगाली कथेवरून तर 'मोतीमिनार' कथा अकबरकालीन गोष्टीवर आधारित होती. वा. गो. आपटे यांनी त्यांना आवडलेल्या इंग्रजी कादंबर्‍यांचा मराठीत अनुवाद केला. त्यात मिसेस हेन्रीवूडच्या 'इस्टलीन' कादंबरीचे 'माणिकबाग' (१९१४), तसेच 'मिसेस हॅल्बिर्टसन्स ट्रबल्स' या कादंबरीचा 'दुःखा अंती सुख' (१९१४) या अनुवादित कादंबर्‍यांचा समावेश आहे. त्यांच्या सरस भाषांतरांतून मराठी वाङ्मय वाचकांची दृष्टी अधिकाधिक व्यापक होण्यास मदत झाली. वा. गो. आपटे यांनी भाषांतरित, रूपांतरित कादंबर्‍यांच्या प्रवाहाला चालना देण्याचे महत्त्वाचे काम केले.

**'मराठी शब्दरत्नाकर'कार**

भाषाभ्यासाची विविध अंगे लक्षात घेऊन कोशसदृश पुस्तकांचे लेखनही त्यांनी केले. 'बंगाली–मराठी कोश' आणि 'मराठी–बंगाली शिक्षक' हे ग्रंथ लिहिले. 'मराठी भाषेचे संप्रदाय व म्हणी' (१९१०) हा महत्त्वाचा ग्रंथ त्यांनी लिहिला. त्यात सुमारे चार हजार वाक्संप्रदाय आहेत. 'संप्रदाय व त्यांची व्याप्ती' पहिल्या प्रकरणात सांगून पुढे संप्रदायांचे वर्गीकरण केले आहे. पुस्तकाची २०८ पाने वाक्संप्रदायांनी व्यापली आहेत. पुढे ५८ पाने म्हणींची व्याख्या व पद्धतशीर वर्गीकरण केले आहे. 'म्हणी'ही दिल्या आहेत. आजही हा कोश अभ्यासकांना उपयोगी पडत आहे. पाच ते सात वर्षे सातत्याने परिश्रम घेऊन तयार केलेला 'मराठी शब्दरत्नाकर' अथवा 'मराठी शब्दांचा मराठीत अर्थ देणारा कोश, १९२२मध्ये प्रकाशित झाला. हा कोश लिहिताना त्यांना पोथ्या, कागदपत्रे इत्यादी ऐतिहासिक ऐवज पाहावयास मिळाला. त्यांचा अभ्यास करताना त्यात काही अपपाठ व चुकीचे अर्थ त्यांना आढळले. त्यांची दुरुस्ती करून ते शब्द त्यांनी या कोशात समाविष्ट केले आहेत.

कोशवाङ्मयाच्या प्रारंभीच्या पर्वातील एक अत्यंत महत्त्वाचा कोश म्हणून या कोशाचे मराठी वाङ्मयात स्थान आहे. 'मराठी भाषेची शब्दसंपत्ती' (१९२२), 'लेखनकला व लेखनव्यवसाय' (१९२५), 'सौंदर्य व

ललितकला' (१९१९) याशिवाय वा. गो. आपटे यांनी 'अशोक अथवा आर्यावर्ताचा पहिला चक्रवर्ति राजा' याचे चरित्र (१८९९) अशी त्यांची ग्रंथसंपदा आहे. त्यांचा 'अशोक'हा ग्रंथ विष्णू गो. विजापूरकर यांच्या 'ग्रंथमाला' या मासिकातून प्रसिद्ध झाला होता. 'जैनधर्म' (१९०४) आणि 'बौद्धपर्व' अथवा 'बौद्धधर्माचा साद्यंत इतिहास' (१९१४) हे ग्रंथ लिहिले. 'ज्ञानदीप', 'भारतकन्या' ही पुस्तकेही लिहिली. एकूण चोवीसच्यावर ग्रंथ त्यांनी लिहिले.

वा. गो. आपटे यांची मराठी वाङ्मयाविषयीची आवड निर्माण होण्यास त्यांची बुद्धिमत्ता कारणीभूत होती, त्याचप्रमाणे त्यांना त्यांच्या उमेदीच्या काळात लेखक मोती बुलासा आणि प्राचार्य. वा. ब. पटवर्धन यांची मैत्री लाभली. तसेच कादंबरीकार हरिभाऊ आपटे यांचा सहवास लाभला होता. हरिभाऊ हे त्यांचे स्फूर्तिदाते व मार्गदर्शक होते.

**'आनंद' मासिकाचे उद्गाते**

त्यांनी १९१० मध्ये चंद्रावती महिला विद्यालय, इंदूर येथे नोकरी केली. या काळात इंदूर सरकारने 'मल्हारीमार्तंड' ह्या पत्राचे संपादकत्व त्यांना दिले. पाच वर्षे त्यांनी ते काम केले. याशिवाय 'ज्ञानप्रकाश'चे संपादकपद तसेच 'विचारसाधना'चे संपादकपदही काही काळ संभाळले. संपादक, कोशकार, अनुवादक, लेखक असा साहित्याच्या सर्वांगाला स्पर्श करत असताना त्यांच्या बालवाङ्मयविषयक कार्यामुळे ते अधिकाधिक लोकांपर्यंत पोहोचले. बालसाहित्यासाठीचे त्यांचे योगदान लक्षणीय आहे. १९०६ मध्ये वा. गो. आपटे यांनी 'आनंद' हे मासिक मुलांकरिता सुरू केले. ते आजही नियमितपणे चालू आहे. या मासिकाचे विशेष म्हणजे यात मुलांचे लेखन छापले जाई. चुटके, कोडी, कविता, गमतीजमती, मजेदार गोष्टी असा रंजक व प्रबोधनपर मजकूर यात असल्यामुळे हे मासिक बालवाचकांना प्रिय झाले. १९२५ पासून या मासिकात 'प्रौढ विद्यार्थी व स्त्रिया' यांच्यासाठी सुरू केलेल्या पुरवणीत देशातील सामाजिक, राजकीय, धार्मिक घडामोडींच्या दोनही बाजू वाचकांना कळाव्यात व पक्षाभिमान किंवा दुराग्रह याला बळी न पडता त्या विषयांची सर्वांगीण माहिती त्यांना व्हावी, असा त्यांचा उद्देश होता. त्याला अत्यंत चांगला प्रतिसाद मिळाला. 'आनंद' मासिकाव्यतिरिक्त इतर बालवाङ्मय त्यांनी लिहिले. 'मनी आणि मोत्या', 'वीरांच्या कथा', 'एका दिवसाच्या सुट्टीत', 'मुलांचे अरेबिअन नाइट्स' इत्यादी कथात्मक पुस्तके तसेच 'बालरामायण', 'बालमहाभारत', 'का व कसे?' इत्यादी उद्‌बोधक अशी एकूण ५३ पुस्तके त्यांनी मुलांसाठी लिहिली.

महाराष्ट्र साहित्य परिषदेच्या घटनेचा पहिला मसुदा वा.गो. आपटे यांनी लिहिला. महाराष्ट्र साहित्य परिषदेच्या आद्य चिटणिसांपैकी ते एक होते. त्यांनी दहा वर्षे चिटणीसपद भूषविले.

– डॉ. रजनी अपसिंगेकर

**संदर्भ :**


१. *डॉ. देशपांडे अ.ना.; 'आधुनिक मराठी वाङ्मयाचा इतिहास' १८७४ ते १९२० भाग १; व्हीनस प्रकाशन, पुणे.*
२. *खानोलकर गं. दे.; 'अर्वाचीन मराठी वाङ्मयसेवक' खंड १; स्वस्तिक पब्लिशिंग हाउस, मुंबई.*
३. *जोग रा. श्री.; 'मराठी वाङ्मयाचा इतिहास' १८७५ ते १९२० खंड ५- भाग-१,२; महाराष्ट्र राज्य साहित्य संस्कृती मंडळ.*
४. *कानडे रा.गो.; 'मराठी नियतकालिकांचा इतिहास' १८३२ ते १९३७; कर्नाटक पब्लिशिंग हाउस, मुंबई.*


## आपटे, हरी नारायण

**कथाकार, कादंबरीकार, विदग्ध वाङ्मयकार, कुशल संपादक**

**८ मार्च १८६४ – ३ मार्च १९१९**

हरि नारायण आपटे यांचा जन्म जळगाव जिल्ह्यातील पारोळे येथे झाला. वडील नारायणराव मुंबईला पोस्टात नोकरी करीत होते. हरिभाऊंचे प्राथमिक व माध्यमिक शिक्षण मुंबईतील नाना शंकरशेटची शाळा व बिशप हायस्कूलमध्ये झाले. १८७८ साली ७० कुटुंबाचे स्थलांतर पुणे येथे झाल्यामुळे हरिभाऊंचे पुढील शिक्षण पुण्याच्या सरकारी हायस्कुलात झाले. माध्यमिक शिक्षण



घेताना एका संस्कृत शास्त्र्यांच्या खासगी मार्गदर्शनाखाली हरिभाऊंचा संस्कृत भाषेचा अभ्यास झाला. याशिवाय इंग्रजी साहित्याचे विपुल वाचन त्यांनी त्या वेळी केले. त्यांच्या शिक्षकवर्गात विष्णुशास्त्री चिपळूणकर, बाळ गंगाधर टिळक, गोपाळ गणेश आगरकर, वासुदेवशास्त्री खरे, वा. शि. आपटे यांच्यासारखे व्यासंगी मान्यवर होते. विष्णुशास्त्री चिपळूणकरांच्या निबंधमालेचे वाचन हरिभाऊंनी मनःपूर्वक केले. परिणाम स्वरूप स्वभाषा, स्वधर्म व स्वदेश ह्यासंबंधींचा हरिभाऊंचा अभिमान वाढीस लागला. विष्णुशास्त्री चिपळूणकरांच्या अकाली निधनामुळे व्यथित झालेल्या हरिभाऊंनी 'शिष्यजनविलाप' हे ८४ श्लोकांचे वृत्तबद्ध काव्य लिहिले. १८८३ साली मॅट्रिक झाल्यावर त्यांनी डेक्कन महाविद्यालयामध्ये प्रवेश घेतला. गणित विषय कच्चा असल्यामुळे पहिल्या परीक्षेत अपयश आले. पुढे फर्गसन कॉलेजमध्ये प्रवेश घेतल्यावरही हरिभाऊ पदवी परीक्षेत उत्तीर्ण होऊ शकले नाहीत. मात्र विद्याव्यासंगी शिक्षक-प्राध्यापकांचे मार्गदर्शन आणि संस्कृत-मराठी-इंग्रजी भाषांतील ग्रंथांच्या वाचनामुळे त्यांच्या व्यक्तिमत्त्व विकासाला चालना मिळाली. हरिभाऊंचा आगरकरांच्या 'विकारविलसित' ह्या नाटकावरील ७२ पानी विस्तृत सडेतोड टीकालेख 'निबंध- चंद्रिके'त १९८२ साली प्रसिद्ध झाला. याच काळात 'आर्योद्धारक नाटक मंडळी'त हरिभाऊंचे बसणे, उठणे सुरू झाले. त्याचा लाभ पुढे नाटके लिहिताना त्यांना झाला. १८७८ साली पुण्यात आल्यापासून १८८८ साली डेक्कन महाविद्यालय सोडेपर्यंत त्यांचा दहा वर्षांचा कालखंड साहित्यिक घडणीचा काळ होता. ह्या काळात हरिभाऊ हे चिपळूणकरांच्या शैलीचे आणि त्यांच्या पूर्ववैभवाच्या शिकवणुकीचे भक्त बनले होते. लेखन-वाचनाची हरिभाऊंची आवड लक्षात घेऊन त्यांचे चुलते महादेव चिमणाजी आपटे यांनी त्यांना पुस्तक प्रकाशनाचा व्यवसाय करावा, असे सुचवले. त्यासाठी छापखान्याच्या कामाचे स्वरूप जाणून घ्यावे, म्हणून मुंबईच्या 'जगदीश्वर' छापखान्यात सहा महिने उमेदवारी केली. पुतण्याला लेखन -वाचन निर्वेधपणे करता यावे, म्हणून महादेव चिमणाजींनी एक - दोन लाख रुपये खर्च करून इमारत बांधून दिली आणि तिथेच 'आनंदाश्रम' संस्थेची स्थापना केली. प्राचीन ग्रंथाचे रक्षण-प्रकाशन व्हावे, ह्या हेतूने सुरू केलेल्या संस्थेत हरिभाऊंची व्यवस्थापक म्हणून नेमणूक केली गेली. त्या पदामुळे हरिभाऊंना बरेच अर्थिक स्थैर्य लाभले आणि त्यांनी आयुष्याच्या अखेरपर्यंत साहित्यविषयक भरीव कार्य केले.

१८९० साली विजयादशमीच्या मुहूर्तावर हरिभाऊंनी 'करमणूक' साप्ताहिकाचा नमुना अंक प्रसिद्ध केला. 'लहानांपासून थोरांपर्यंत सर्व स्त्री-पुरुषांचे मनोरंजन करून ज्ञानदान देणारे पत्र' अशी टीप सुरुवातीला दिली होती. 'करमणूक'मध्ये हरिभाऊंच्या कादंबऱ्या क्रमशः प्रसिद्ध झाल्या; त्यांच्या स्फुट कथा व अन्य लेखकांचे साहित्य प्रसिद्ध झाले. 'मासिक मनोरंजन', 'निबंध-चंद्रिका' ह्या नियतकालिकांत आधी स्फुट लेखन करणाऱ्या हरिभाऊंनी पुढे स्वतंत्रपणे दीर्घ लेखनाला प्रारंभ केला. 'मिस्टरीज ऑफ ओल्ड लंडन'च्या धर्तीवरील 'मधली स्थिती' ही कादंबरी 'पुणे वैभव' साप्ताहिकाची पुरवणी म्हणून प्रसिद्ध झाली. 'मधली स्थिती'चा जनमानसावरील प्रभाव जाणवल्यावर कादंबरी हा वाङ्मयप्रकार जनजागृती, उद्‌बोधन आणि समाजाला मार्गदर्शन करण्याच्या दृष्टीने उपयुक्त ठरेल; अशी हरिभाऊंची भावना झाली. समाज-स्थितीचे सूक्ष्म अवलोकन, वाङ्मय आणि इतिहासावरील ग्रंथांचे भरपूर वाचन, मनोरंजनाबरोबर येणाऱ्या बोधपरतेची आकांक्षा, समाजहिताची आंतरिक तळमळ आणि वर्तमानातील व भूतकाळातील वास्तवाचे प्रत्ययकारीपणे दर्शन घडविण्यासाठी आवश्यक असणारी प्रतिभेची देणगी या गुणांमुळे हरिभाऊंनी स्फुट गोष्टी, सामाजिक आणि ऐतिहासिक विषयांवरील कादंबऱ्या,

नाटक असे विविधांगी लेखन केले. 'करमणूक'चे अठ्ठावीस वर्षे निष्ठापूर्वक संपादन केले. हरिभाऊंचा व्यासंग केवळ साहित्य आणि तत्संबंधी विषयांपुरता मर्यादित नव्हता. जगाचा राजकीय, आर्थिक, सामाजिक, धार्मिक, वैज्ञानिक, सांस्कृतिक इतिहास त्यांनी नजरेखालून घातला होता.

**मराठी कथेला वास्तववादी वळण**

आपल्या 'स्फुट गोष्टीं'नी हरिभाऊ आपटे यांनी मराठी कथेचा पाया घातला. वास्तववादी सामाजिक कादंबऱ्या लिहून आधुनिक कादंबरीचे जनक आणि आशयसंपन्न ऐतिहासिक कादंबरीचे प्रवर्तक म्हणून मान्यता मिळवली. 'संगीत संत सखू' (१९११), 'संगीत सती पिंगळा' ही दोन स्वतंत्र नाटके त्यांनी लिहिली. मराठी 'वाङ्मयाचा इतिहास' (१९०३), 'विदग्ध वाङ्मय' (१९११), 'मराठी – इट्स सोअर्सिस ॲन्ड डेव्हलपमेन्ट' भाषाशास्त्रविषयक व्याख्यान आदींवरून हरिभाऊंच्या वाङ्मयविषयक भूमिकेची आणि सखोल अभ्यासाची साक्ष पटते. 'करमणुकी'त प्रसिद्ध होणाऱ्या स्फुट कथांनी तत्कालीन कल्पनारम्य वातावरणात रमलेल्या मराठी कथेला जीवनातील वास्तव शोधण्यास शिकवले. 'काळ तर मोठा कठीण आला', 'कसे दिवस गेले', 'डिस्पेप्शिया', 'पुरी हौस फिटली' ह्यांसारख्या त्यांच्या स्फुटगोष्टींत वा दीर्घकथांत साधी घरगुती भाषा, उत्कृष्ट स्वभाव रेखाटन, वास्तव चित्रण व चटकदार निवेदन हे लेखन–विशेष आढळून येतात. 'स्फुट गोष्टी: भाग १–४' (१९१५) ह्या संग्रहात हरिभाऊंच्या स्फुट कथांचा समावेश आहे.

'पण लक्ष्यांत कोण घेतो' (१८९०–१८९३) ह्या कादंबरीनंतर हरिभाऊंनी पुढील सात सामाजिक कादंबऱ्या लिहिल्या : 'गणपतराव' (१८८६–१८९३), 'यशवंतराव खरे' (१८९२–१८९५), 'मी' (१८९३–१८९५), 'जग हे असें आहे' (१९९७–१९९९), 'भयंकर दिव्य' (१९०१–१९०३), 'आजच' (१९०४–१९०६, अपूर्ण), 'मायेचा बाजार' (१९१०–१९१२), 'कर्मयोग' (१९१३–१९१७, अपूर्ण); ह्या सर्व कादंबऱ्या 'करमणुकी'त आधी क्रमशः प्रसिद्ध झाल्या आणि नंतर त्या पुस्तकरूपात प्रसिद्ध करण्यात आल्या.

सामाजिक कादंबऱ्यांप्रमाणे हरिभाऊंनी पुढील ऐतिहासिक कादंबऱ्या लिहिल्या – 'म्हैसूरचा वाघ' (अपूर्ण) ही मेडोज टेलरच्या 'टिपू सुलतान' ह्या कादंबरीवर आधारित हरिभाऊंची पहिली ऐतिहासिक कादंबरी १८९५ साली प्रसिद्ध झाली. 'उषःकाल' (१८९५–१८९७), 'केवळ स्वराज्यासाठी' (१८९८–१८९९), 'रूपनगरची राजकन्या' (१९००–१९०२), 'चंद्रगुप्त' (१९०२–१९०५), 'गड आला पण सिंह गेला' (१९०३–१९०४), 'सूर्योदय' (१९०५–१९०६), 'मध्यान्ह' (अपूर्ण, १९०६–१९०८); 'सूर्यग्रहण' (अपूर्ण, १९०८–१९०९), 'कालकूट' (अपूर्ण, १९०९–१९११), 'वज्राघात अथवा विजयनगरचा विनाशकाल' (१९१३–१९१५).

**युगप्रवर्तक कादंबरी**

हरिभाऊंच्या 'करमणूक'मध्ये क्रमशः प्रसिद्ध झालेल्या कादंबऱ्या ग्रंथरूपात आल्यावर त्यांच्या अनेक आवृत्त्या निघाल्या. हरिभाऊंचा पिंड आदर्शवादी सुधारकाचा होता. वृत्ती सात्त्विक आणि सौजन्यशील होती. आपल्या कादंबऱ्यांतून त्यांनी 'सत्'चे चित्रण केले. त्यांच्या कादंबऱ्यांतील जग हे मध्यमवर्गीयांचे जग आहे; या समाजघटकातील स्त्री–पुरुषांच्या, प्रामुख्याने स्त्रियांच्या समस्या त्यांनी मांडल्या. हरिभाऊ केवळ वास्तवाचे रेखाटन करणारे कादंबरीकार नव्हते. भोवतीच्या समाजस्थितीचे चित्र समाजापुढे मांडून त्यातील गुणदोषांकडे वाचकांचे लक्ष वेधले आणि साद्यःस्थितीतून उत्क्रांती करण्यासाठी, ध्येयसिद्धी करण्यासाठी काय केले पाहिजे; याचे दिग्दर्शन त्यांनी कादंबऱ्यांतून केले. 'पण लक्ष्यांत कोण घेतो' आणि 'मी' ह्या हरिभाऊंच्या दोन कादंबऱ्या मराठीतील लक्षणीय सामाजिक कादंबऱ्या आहेत. रूढीबद्ध मध्यमवर्गीय सनातनी कौटुंबिक जीवनाच्या सूक्ष्म निरीक्षणातून निर्माण झालेली 'पण लक्ष्यांत कोण घेतो' ही वास्तववादी कथेतून सामाजिक

प्रमेय सिद्ध करणारी मराठीतील पहिलीच आत्मकथनात्मक कादंबरी आहे. या कादंबरीने हरिभाऊंना मराठी कादंबरी क्षेत्रात युगप्रवर्तकाचा मान मिळवून दिला.

पाश्चात्त्य सामाजिक कादंबऱ्यांप्रमाणेच सर वॉल्टर स्कॉट, व्हिक्टर ह्यूगो, ड्यूमा व टॉलस्टॉय या लेखकांच्या कादंबऱ्या हरिभाऊंनी आवडीने वाचल्या होत्या. सर वॉल्टर स्कॉटच्या कादंबऱ्यांची त्यांनी अनेक पारायणे केली होती. शिवाय शिवाजी व शिवकाला यांसंबंधी उपलब्ध साधने, बखरींची इंग्रजीतील भाषांतरे, काव्येतिहास संग्रह, पोवाडे, म्हल्हारराव चिटणीस लिखित सप्तप्रकरणात्मक 'चरित्र' ही बखर आदींचे वाचन त्यांनी केले होते. महाराष्ट्राच्या इतिहासावरील साधने उपलब्ध नसतानाही हरिभाऊंनी दर्जेदार ऐतिहासिक कादंबऱ्या लिहिल्या. कादंबऱ्या रंजक व्हाव्यात म्हणून त्यांनी काही कल्पित पात्रांचीही योजना केली. कादंबऱ्यांतून उत्कंठावर्धक कथानकांची मांडणी केली. विजयनगरच्या इतिहासावरील भरपूर साधने उपलब्ध नव्हती. तरीही 'वज्राघात'सारखी भाषावैभवाच्या दृष्टीने सरस असणारी; नाजुकपणा, कौशल्य, रेखीवपणा ही वैशिष्ट्ये असाणारी कादंबरी म्हणजे हरिभाऊंच्या प्रतिभाशक्तीची किमया आहे. हरिभाऊंच्या कादंबरीवर पाल्हाळिक, रसभंग करणारी, गोपनीयतेचा अतिरेक करणारी असे दोषारोप केले गेले हे दोष मान्य केले, तरी त्यांनी शब्दांकित केलेले सामाजिक आणि ऐतिहासिक जीवनाचे विविधरंगी रूप आजही चोखंदळ वाचकांना आकृष्ट करते.

हरिभाऊंनी आपल्या ललित लेखनातून समाजप्रबोधनपर विचार मांडले. त्याप्रमाणे राजकीय–सामाजिक कार्यातही सक्रियतेने भाग घेतला. 'आनंदाश्रम' संस्थेद्वारे संस्कृत विद्येचे पुनरुज्जीवन केले. १९१२ साली अकोला येथे भरलेल्या 'अखिल भारतीय मराठी साहित्य संमेलना'च्या अध्यक्षीय भाषणात त्यांनी मराठी माध्यमाचा आणि पदवी अभ्यासक्रमात मराठी विषयाच्या स्वीकृतीचा पुरस्कार केला तसेच विविध भाषांतील परिभाषिक शब्दकोशांचा आग्रह धरला.

– वि. शं. चौघुले

**संदर्भ :**

१. *अदवंत, म. ना; 'हरिभाऊ: विविधदर्शन'; स्कूल अ‍ॅन्ड कॉलेज बुक स्टॉल, कोल्हापूर; १९६४.*

२. *भगारे, ल. म; 'हरिभाऊ'; स्कूल अ‍ॅन्ड कॉलेज बुक स्टॉल, कोल्हापूर; १९५६.*

३. *पानसे, वेणूताई; 'हरि नारायण आपटे (चरित्र आणि वाङ्मय विवेचन)'; बालोद्यान प्रेस, पुणे; १९३१.*

## आफळे, श्याम मनोहर

☞ **श्याम मनोहर**

## आफळे, सुनीती जयंत

**कथाकार**

**१२ एप्रिल १९४२**



सुनीती आफळे यांचा जन्म नाशिक येथे झाला. महाविद्यालयीन शिक्षण एच.पी.टी. महाविद्यालय, नाशिक येथे झाले. बी.ए.ला व एम.ए.ला संस्कृत व अर्धमागधी हे विषय घेऊन त्यांना प्रथम श्रेणी प्राप्त झाली.

'आद्य शंकराचार्यांच्या भाषाशैलीची वैशिष्ट्ये' या विषयातील संशोधनासाठी नागपूर विद्यापीठाची 'डॉक्टरेट' प्राप्त झाली. 'ब्रह्मसूत्रशंकरभाष्य' या संशोधनासाठी विद्यापीठ अनुदान मंडळाची 'फेलोशिप' मिळाली.

बिटको चांडक महाविद्यालय, नाशिक रोड व सेन्ट जॉर्ज स्कूल, फरिदाबाद, हरियाणा येथे अध्यापन केले. त्याचप्रमाणे नागपूर विद्यापीठाच्या संस्कृत विभागात ८ वर्षे रिसर्च फेलो म्हणून त्यांनी काम केले.

सुनीती यांनी कथा, कादंबरी, ललित लेखन तसेच वैचारिक व संशोधनात्मक लेखन केले आहे. बालवाङ्मय, काव्य आणि आकाशवाणीसाठी नभोनाट्य लेखनही केले आहे. 'कुंपणापलीकडील बकुळी बाभळी', 'अतिथी', 'रिकामी', 'अनाथ', 'केवडा', हे

कथासंग्रह; ‘एक दाणा एक उखाणा’, ‘चकवा’, ‘डबक्यातले आकाश’, ‘पिंपळपान’ ह्या कादंबऱ्या; ‘दक्षिणा’ हा दीर्घकथासंग्रह; ‘अव्यक्ता’ हा संस्कृत नाटकातील नायिकांवर ललित लेखसंग्रह; ‘श्रीसंत गुलाबराव महाराज’ हे बालवाङ्मय अशी त्यांची १४ पुस्तके प्रकाशित झाली आहेत.

‘शंकराचार्य हे प्रच्छन्न बौद्ध होते काय?’, ‘जागतिक वाङ्मयातील पहिले अंगाईगीत’, ‘ॐकाराच्या अर्थाचा विकास’, ‘कौटिलीय अर्थशास्त्रातील राजाची कल्पना’, ‘ऋग्वेदातील मंडूकसूक्त’, ‘शंकराचार्यांच्या मायावादाचे व्यावहारिक स्वरूप’, ‘शाकुंतलचा गर्भितार्थ’ हे संशोधनात्मक लेखनही केले आहे.

सुनीती यांच्या सुरुवातीच्या कथा या अस्वस्थ करणाऱ्या सामाजिक अनुभवातून व स्वानुभवकथनातून साकारल्या आहेत. जीवनातील बऱ्यावाईट घटनांना कारणीभूत होणारे मानवी मन, त्याचा शोध, आधुनिक स्त्रीचे जगणे, स्त्रीत्वातून उमलणारे अनुभव ह्या त्यांच्या लेखनामागील प्रेरणा आहेत.

अंतरंग वेधून घेणारी सूक्ष्म मनोविश्लेषणात्मक, नेमक्या शब्दांत आशय व्यक्त करणारी शैली, प्रत्ययकारी भाषा आणि कलात्मक अलिप्तता यांमुळे त्यांच्या कथा समृद्ध झाल्या आहेत.

सुनीती यांच्या अनेक कथांचे कानडी, गुजराती, हिंदी, तेलगू, इंग्रजी ह्या भाषांत अनुवाद झाले आहेत. ‘बाहुल्या’ ही कथा आंतरराष्ट्रीय नियतकालिक ‘सर्ज’मध्ये प्रसिद्ध झाली. तिचे इंग्रजी, फ्रेंच, जर्मन ह्या भाषांत अनुवाद झाले आहेत.

याबरोबरच ‘ज्योतिषशास्त्री’ परीक्षाही त्या प्रथम श्रेणीत उत्तीर्ण झाल्या आहेत. कथाकथनाचे कार्यक्रम महाराष्ट्र व अन्य राज्यांत केले आहेत. अनेक नाटिकांचे लेखन व दिग्दर्शन हिंदीतूनही केले आहे. वेदान्ताच्या अभ्यासामुळे त्यांच्या लेखनात एक अलिप्तता दिसते.

– प्रा. संध्या टेंबे

**संदर्भ :**

*१. ललित, ऑगस्ट १९८४.*

*२. अक्षरवैदर्भी, दिवाळी अंक १९८४.*

*३. किर्लोस्कर कथा-कथाकार विशेषांक, फेब्रुवारी १९८५.*

*४. डॉ. शेवडे इंदुमती; ‘मराठी लघुकथा-स्त्री लेखिका’.*

## आरती प्रभू

***खानोलकर, चिंतामण त्र्यंबक***

**कवी, नाटककार, कादंबरीकार, कथाकार**

**८ मार्च १९३० – २६ एप्रिल १९७६**



विचारपूर्वक, अभ्यासपूर्वक आणि प्रयत्नपूर्वक लेखन करणारे कवी/लेखक अनेक असतात. आपापल्या परीने ते मोठेही असतात. पण ‘प्रतिभा’ ही निसर्गदत्त/ईश्वरदत्त देणगी असते, असे म्हणायला लावणारे काही मोजकेच कवी/लेखक असतात. आरती प्रभू (चिंतामणी त्र्यंबक खानोलकर) हे अशा मोजक्या साहित्यिकांपैकी एक. ‘मी मातीचे ऋण फेडाया देवाघरून आलो’ असे त्यांनी आपल्या एका कवितेत म्हटले आहे आणि त्यांचे लेखनकर्तृत्व पाहता या ओळीची सत्यता प्रतीत होते.

खानोलकर यांचा जन्म बागलांची राई, तेंडोली, ता. वेंगुर्ले, जि. सिंधुदुर्ग येथे झाला. त्र्यंबक विश्राम प्रभुखानोलकर आणि सुंदराबाई या दांपत्याचे हे सहावे अपत्य होते. बागलांची राई येथे चिदानंदस्वामींचा मठ आहे. आपल्याला लाभलेले प्रतिभेचे देणे हा चिदानंदस्वामींचा कृपाप्रसाद आहे, असे खानोलकर मानीत असत. नवीन लेखनाला प्रारंभ करण्यापूर्वी ‘श्रीचिदानंदस्वामी प्रसन्न’ असे ते लिहीत असत. त्यांच्या लेखनात हा मठ आणि त्याचा परिसर याचे चित्रण विविध स्वरूपांमध्ये आलेले आहे.

**साहित्याशी जोडलेला श्वास**

तेंडोली, वेंगुर्ले, सावंतवाडी, मुंबई, कुडाळ अशा अनेक ठिकाणी स्थलांतर होत-होत खानोलकरांचे बालपण व्यतीत झाले. कुडाळ हायस्कूलच्या ‘बालार्क’

या वार्षिकांकात खानोलकारांची ‘भवितव्य’ ही कविता व ‘मोगऱ्याची वेणी’ ही कथा प्रसिद्ध झाली. यानंतर वर्षभरातच, १९५१ मध्ये त्यांची ‘जाणीव’ ही कथा सत्यकथेत प्रसिद्ध झाली. सावंतवाडीतील ‘वैनतेय’ या साप्ताहिकातून त्यांच्या काही कविता प्रसिद्ध झाल्या असल्या, तरी सत्यकथेत कविता प्रसिद्ध होण्यास काहीसा विलंब झाला. ‘आरती प्रभू’ या टोपणनावाने पाठविलेली त्यांची ‘शून्य शृंगारते’ ही कविता १९५४ मध्ये प्रसिद्ध झाली. या स्त्रीनामसदृश टोपणनावाचे कुतूहलही काही काळ साहित्यविश्वात होते, मात्र लवकरच सर्वांना योग्य तो खुलासा झाला. कवितालेखनासाठी ‘आरती प्रभू’ हे टोपणनाव मात्र कायम राहिले.

खानोलकरांनी किशोरवयापासून साहित्यप्रेम जपले आणि या साहित्यप्रेमाने त्यांची संगत अखेरच्या दिवसापर्यंत सोडली नाही. मृत्यूपूर्वी आठवडाभर, ते काही काळ शुद्धीवर आले असता, त्यांच्यावर उपचार करणाऱ्या डॉ. देवल यांच्या आग्रहाखातर त्यांनी ‘अखेरच्या वळणावर यावा। मंद सुगंधी असा फुलोरा। थकले पाउल सहज उठावे। आणि सरावा प्रवास सारा’ ही आपली अखेरची कविता म्हटली. त्यांचा प्रत्येक श्वास जणू साहित्याशी जोडला गेला होता.

सेहेचाळीस वर्षांच्या आयुष्यात खानोलकरांनी जी विपुल साहित्यनिर्मिती केली, ती थक्क करणारी आहे. ‘खानोलकरांचा लिहिण्याचा वेग व निकड एवढी होती की, त्यांच्या लेखनाच्या झपाट्याला एक प्रकाशनसंस्था पुरी पडणे कठीणच होते’ अशी नोंद त्यांचे प्रमुख प्रकाशक श्री.पु.भागवत यांनी केलेली आहे. व्यक्तिगत आयुष्यात फार मोठे चढउतार खानोलकरांच्या वाट्याला आले. गर्भावस्थेत असताना त्यांच्या मातेवर गर्भपातासाठी झालेला एका ‘मुळी’चा प्रयोग, वडिलांकडून सतत दुजाभाव, शिक्षणाची परवड, पुढे व्यावसायिक अस्थैर्य, समकालीनांकडून झालेला उपहास, मुलाचा अकालमृत्यू, काही मित्रांच्या मदतीने मुंबईत लाभलेली नोकरी, नोकरीतही अस्थिरता, शारीरिक व्याधी अशा खाचखळग्यांनी त्यांचे आयुष्य भरलेले होते. हे लौकिक अनुभव आणि कलावंत म्हणून घेतलेले भावानुभव यांची प्रतिक्रिया खानोलकरांच्या लेखनात अपरिहार्यपणे उमटली.

**नाटककार खानोलकर**

‘जोगवा’(१९५९), ‘दिवेलागण’(१९६२) आणि ‘नक्षत्रांचे देणे’(१९७५) या आरती प्रभूंच्या तीनही कवितासंग्रहांना महाराष्ट्र राज्य पुरस्कार लाभले. ‘नक्षत्रांचे देणे’ला साहित्य अकादमी पुरस्कार मरणोत्तर जाहीर झाला. त्यांच्या असंग्रहित आणि अप्रकाशित कवितांची संख्याही बरीच मोठी आहे. ‘सनई’ (१९६४), ‘राखी पाखरू’(१९७१), ‘चाफा आणि देवाची आई’ (१९७५), व ‘बाप’ हे खानोलकरांचे चार कथासंग्रह प्रसिद्ध आहेत. त्यांच्या तेरा कादंबऱ्या प्रसिद्ध झाल्या. ‘कोंडुरा’ (१९६६), ‘रात्र काळी घागर काळी’(१९६२), ‘अजगर’ (१९६५), ‘पाषाणपालवी’ (१९७६), ‘भागधेय’ या त्यांतील प्रमुख कादंबऱ्या होत. पुस्तकरूपात प्रसिद्ध न झालेल्या आणखीही तीन कादंबऱ्या त्यांनी लिहिल्या. सर्व साहित्यप्रकारांपैकी सर्वाधिक लेखन त्यांनी नाटकांचे केलेले आहे. दहा प्रकाशित आणि एकोणतीस अप्रकाशित अशी एकोणचाळीस नाटके त्यांनी लिहिली. यांपैकी ‘एक शून्य बाजीराव’ (१९६६), ‘अवध्य’ (१९७२), आणि ‘कालाय तस्मै नमः’ (१९७२) या नाटकांनी खानोलकरांना नाटककार म्हणून नावलौकिक मिळवून दिला. ‘हयवदन’ आणि ‘अजब न्याय वर्तुळाचा’(१९७४) या त्यांनी रूपांतरित केलेल्या नाटकांचाही बराच बोलबाला झाला. काही एकांकिका, ‘गोपाळ गाणी’ हा बालगीतांचा संग्रह तसेच ‘वारा वाजे रुणझुणा’ आणि ‘दीपमाळ’ हे ललित गद्यलेखनही खानोलकरांनी केले.

स्वतःच्या प्रकृतिधर्माविषयी खानोलकरांनी बरेच चिंतन केलेले होते. ‘प्रत्येक अनुभव म्हणजे चकवा असतो चकवा. त्या चकव्यातून बाहेर पडून तो अनुभव गुलाबाच्या ताटव्यासारखा किंवा मशालीसारखा बाहेर घेऊन येता–येता खूप मोठं दान प्रत्येक कलावंताला द्यावं लागतं. हरवलेली गोष्ट फार मोठी असते, पण



ये रे घना

ये रे घना
ये रे घना
न्हाऊ घाल
माझ्या मना
फुले माझी
अळुमाळू
वारा बघे
चुरगाळू
नको नको
म्हणताना
गंध गेला
रानावना
ये रे घना
ये रे घना
न्हाऊ घाल
माझ्या मना

१२-८-५८

आरती प्रभु
(चिं. त्र्यं. खानोलकर)

सापडलेला अनुभवही त्याहून मोठा असतो,' असे त्यांनी स्वतःच लिहिले आहे. खानोलकरांच्या कविता, कादंबऱ्या, नाटके अशा सर्वच लेखनामधून हे विधान प्रत्ययाला येते.

'खानोलकर हे मूलतः कवीच आणि ह्या कविपिंडानेच त्यांच्या कथा, कादंबऱ्या आणि नाटके हे इतर आविष्कारही भारले गेले आहेत' असे समीक्षक माधव आचवल यांनी खानोलकरांविषयी लिहिले आहे. खानोलकर कशाचा शोध घेत आहेत, याविषयी याच ओघात आचवल लिहितात, 'अस्तित्वाच्या मुळापाशी असलेल्या कोणत्यातरी रहस्याशी ते झुंज घेत असतात. कोणत्या? मला वाटते 'फेट' आणि 'फ्रीविल'– माणसाच्या आशाआकांक्षांपासून पूर्णपणे अलिप्त असलेली, पूर्वनियोजित, स्वयंभू अशी नियती आणि आपले आयुष्य आपल्याला हवे तसे स्वेच्छेने घडविता येण्याचे माणसाचे स्वातंत्र्य (ज्याला आपण 'आत्मस्वातंत्र्य' म्हणू) या दोहोंतले नाते खरोखर काय असते या प्रश्नाशी, या रहस्याशी ते झुंज घेतात.' या विधानाच्या आधारे खानोलकरांच्या बहुतेक सर्व साहित्याची संगती लावता येते. आचवलांनी 'जास्वंद'मधील आपल्या लेखात खानोलकरांच्या कादंबऱ्यांपुरती ही संगती लावलीही आहे.

**भावनेचा ओलावा**

खानोलकरांच्या एकूणच लेखनात बौद्धिकतेचा बडिवार नाही. भावनेला ते महत्त्वाचे स्थान देतात. भावनेचा ओलावा जपत ते अनुभवाला न्याहाळतात. त्यांच्या या वैशिष्ट्याची नोंद त्यांच्या कवितांच्या आणि नाटकांच्या आधारे स्वतंत्रपणे घेता येते. त्यांना 'विपरिताची चाहूल' सतत जाणवत असे. जन्मत्या जीवाला जो दुःखयोग आयुष्यभर सोसायचा असतो, त्याची कृष्णछाया त्यांना जिवाच्या जन्मक्षणापासून दिसू लागते. 'नियती ही सर्वसाक्षी आणि सर्वभक्षी. आपण तिच्या खेळातले केवळ एक पात्र' ही जाणीव त्यांना प्रारंभापासून होती आणि तरीही, नियतीशी झुंज घेणे त्यांना अमान्य नव्हते. खरे-खोटे, पाप-पुण्य, योग्य-अयोग्य यांच्या सीमारेषांचा शोध घेण्याचा प्रयत्न त्यांनी सतत केला.

आरती प्रभूंची प्रकृती भावकवीची होती. परिस्थिती, निराशादायक अनुभव, त्यातून अपरिहार्यपणे आलेली गतानुगतिकता, मागितलेले मागणे आणि मिळालेले दान यांतील तफावत अशा अनेक बाबींमुळे

त्यांच्यातला भावकवी झाकोळत गेला. कधीकधी विलक्षण कोरडा झाला. तरीही मनाच्या तळाशी असलेला आशावाद, सुस्थिर जीवनाची ओढ व 'प्रकृती'विषयीचे ममत्व यांच्या खुणा त्यांच्या कवितांमध्ये, नाटकांमध्ये अवश्य राहिल्या.

'नक्षत्रांचे देणे'मधील आरती प्रभूंचा उद्‍गार व नाटकांमधून येणारा चिं.त्र्यं.खानोलकरांचा उद्‍गार हा 'समष्टीतील एका'चा उद्‍गार आहे. 'समष्टीतील एका'चा उद्‍गार कुसुमाग्रजांचा होता व काही प्रमाणात मर्ढेकरांचाही होता. पण या दोहोंच्या उद्‍गारांहून आरती प्रभूंचा उद्‍गार वेगळा आहे व या वेगळेपणाची बीजे आरती प्रभूंच्या वेगळ्या अशा वाङ्‍मयीन व्यक्तिमत्त्वात आहेत. 'आपण माणसे गर्दीत आलो की थोडी खोटी होतो व खोलीत आलो की खरी होतो' असे ते मानीत. त्यांनी एकांतातील आपल्या व्याकुळतेला कवितारूप दिले, त्यामुळे कवितेत सखोल आत्मपरता अवतरली. नाटक लिहिताना त्यांनी गर्दीतील सुरक्षितता स्वीकारली, त्यामुळे आत्मपरता काहीशी उणावली.

'बोले अखेरचे तो, आलो इथे रिकामा
सप्रेम द्या निरोप, बहरून जात आहे'

असे म्हणत-म्हणत ह्या भावकवीने २६ एप्रिल १९७६ रोजी या जगाचा अकालीच निरोप घेतला.

आरती प्रभूंच्या स्मरणार्थ सावंतवाडीच्या चिंतामणी साहित्य सहयोग या संस्थेने 'आरती' या नावाचे वाङ्‍मयीन मासिक सुरू केले. पंचवीसहून अधिक वर्षे हे मासिक प्रसिद्ध होत आहे. कुडाळ येथे कुडाळ हायस्कूलच्या रंगमंचाला आरती प्रभूंचे नाव दिलेले आहे. तेथे नाट्यविषयक अनेक उपक्रम चालतात. आरती प्रभूंची समग्र वाङ्‍मयसूची जया दडकर यांच्या 'चिं. त्र्यं. खानोलकरांच्या शोधात' या पुस्तकात समाविष्ट आहे.

– डॉ. विद्याधर करंदीकर

**संदर्भ :**

*१. आचवल, माधव; 'जास्वंद' मौज प्रकाशन, मुंबई; १९७४.*

*२. खानोलकर, चिं. त्र्यं.; 'मी लेखक कसा झालो?' ललित, जानेवारी १९७४.*

*३. खानोलकर,चिं. त्र्यं.; 'रात्र काळी घागर काळी' या पुस्तकाच्या दुसऱ्या आवृत्तीचे प्रारंभिक निवेदन : भागवत, श्री. पु., मौज प्रकाशन, मुंबई; १९६२.*

*४. खानोलकर, चिं. त्र्यं.; 'वारा वाजे रुणझुणा'.*

## आष्टीकर, मधुकर रघुनाथ

**लेखक, नाटककार**

**१ जानेवारी १९२९ – २२ मे १९९८**



डॉ. मधुकर आष्टीकर साहित्य क्षेत्रातील ज्येष्ठ लेखक, नाटककार, निबंधसंग्रह लेखक म्हणून सुपरिचित. यांचा जन्म विदर्भातील अमरावती येथे झाला. संस्कृतमधून एम.ए., पीएच.डी. केली. नागपूर विद्यापीठात कलाशाखेचे डीन, कार्यकारिणी सदस्य, संस्कृत अभ्यास मंडळाचे अध्यक्ष, मराठी व संस्कृत अभ्यास मंडळाचे अध्यक्ष, मराठी व संस्कृत अभ्यास पाठ्यपुस्तक निर्मिती समितीचे अध्यक्ष अशा विविध महत्त्वाच्या पदांवर काम केले आहे. मराठी साहित्य महामंडळाचे अध्यक्षपद तसेच विदर्भ साहित्य संमेलनाध्यक्षपद, ग्रंथालय परिषदेचे अध्यक्षपद अशी पदे भूषविली. याशिवाय साहित्य अकादमी (नवी दिल्ली), साहित्य संस्कृती मंडळ (महाराष्ट्र) या संस्थांच्याही जबाबदाऱ्या सांभाळल्या आहेत. पेशाने प्राध्यापक, तसेच नागपूर विद्यापीठात संस्कृत विभाग प्रमुख म्हणून काम केले.

विविध प्रकारचे लेखन हे आष्टीकरांचे वैशिष्ट्य होय. यामध्ये 'आणखी गडकरी' (१९८१) हे गडकऱ्यांच्या अप्रकाशित वाङ्‍मयाचे संकलन आणि भाष्य आहे; 'एका फांदीचे पक्षी' हा निबंधसंग्रह, दोन एकांकिका आणि 'प्रत्येकालाच जोडा चावतो' हे नाटक यांचाही समावेश यात होतो. 'ध्वनिसिद्धान्त' – (हिंदुधर्म संस्कृती

साहित्य म्हणजे सामाजिक चित्तशक्तीचे प्रत्ययकारी प्रस्फुरण असते. त्या प्रस्फुरणाला प्रयोगाच्या कृत्रिम चौकटी चढवता येणार नाहीत. कारण त्या चित्तशक्तीचा तो स्वाभाविक उद्रेक हाच एक महान प्रयोग असतो. तो स्वयंभू असतो. तोही त्या प्रस्फुरणाबरोबरच स्फुरलेला असतो. ठेच लागली की मनुष्य स्वाभाविकपणेच शहाणा होतो पण म्हणून शहाणे होण्यासाठी धोंडा उचलून पाय ठेचण्याचे प्रयोग शहाणपणाचे ठरतील का? प्रायोगिक हूस निर्माण करून तीत चित्तशक्तीचे प्रस्फुरण कोंडित करणे अनुचित होय. केवळ नाविन्याची आणि आपला आगळेपणा मिरविण्याची धडपड ह्या प्रयोगशीलतेच्या मुळाशी असते पण नाविन्य म्हणून किंवा आपला आगळेपणा दाखविण्यासाठी म्हणून शिवधनुष्य तोडणाऱ्या दिग्विजयी धनुर्धराने आकाशातील इन्द्रधनुष्य तोडण्याचा कधी प्रयत्न करावा का? शिवाय प्रयोगशीलतेत प्रयत्नांची पराकाष्ठा करावी लागते कारण प्रयोग म्हणजे जाणीवपूर्वक केलेली जुळवाजुळव पण साहित्याच्या स्वाभाविक प्रस्फुरणाचे वेळी चित्तैकतानता आपोआपच साधलेली असते. आणि प्रयोगातील जाणीवासिद्ध जुळवाजुळवीने चित्तविक्षेप तेवढा होतो प्रतिभाही विचलित होते आणि कलेला अवकळा येण्याची भीती साधार वाटू लागते.

मधुकर रघुनाथ आष्टीकर

१२।१।१९८१

जन्म ता. – १-१-१९२८
अमरावती
(विदर्भ)

मंदिर – नागपूर) यातून संस्कृत काव्यशास्त्रातील ध्वनितत्त्वाचे विवेचन त्यांनी केले आहे. ‘भगवान महावीर आणि विश्वमानवाची संकल्पना’ यावरती लेखन केले आहे. ‘मधुघट’ हा अनुबंधसंग्रह, ‘माझा ज्ञानियाचा राजा’ हे नाटक, चरित्रलेखनही केले आहे. संपादित ग्रंथात कोलते गौरव ग्रंथ, संस्कृत व मराठी पाठ्यपुस्तके यांचा समावेश आहे.

नाटक, निबंधसंग्रह, एकांकिका, अनुबंधसंग्रह या साहित्य प्रकारांत त्यांच्या नावावर विपुल लेखन आहे. विपुल असले तरी दर्जेदार कसदार साहित्य निर्मिती केली.

साहित्याव्यतिरिक्त नट, दिग्दर्शक, चित्रपट कथालेखक म्हणूनही उल्लेखनीय कामगिरी केली. सहजता हा त्यांच्या साहित्याचा विशेष होय.

विदर्भ साहित्य क्षेत्रातील आवर्जून घेतल्या जाणाऱ्या प्रमुख नावांपैकी एक नाव होय. साहित्य क्षेत्रात उल्लेखनीय असे योगदान केले.

– जयंत भिडे

## आळेकर, सतीश वसंत

☞ **मुख्य नोंद – नाटक खंड**

## इंगोले, प्रतिमा पंजाबराव

**ग्रामीण कथाकार, कवयित्री**

**१० ऑक्टोबर १९५३**

डॉ. प्रतिमा पंजाबराव इंगोले यांचा जन्म एका शेतकरी कुळात झाला. त्यांच्या वडिलांचे नाव दादाराव हिंमतराव कुकडे आणि आईचे नाव विमलाबाई कुकडे. पित्याच्या



छत्राला अगदी लहानपणीच मुकल्याने त्यांचे संगोपन त्यांच्या आईने आपल्या वडिलांच्या साहाय्याने केले. सातपुड्याच्या पायथ्याशी वसलेल्या दानापूर खेड्यात आणि नंतर अकोला येथे शालेय शिक्षण झाले. अमरावती येथे महाविद्यालयात बी.ए.ला शिकत असताना, त्यांचा विवाह ॲड. पंजाबराव इंगोले यांच्याशी झाला. शिक्षणाबद्दलच्या तळमळीमुळे विवाह झाल्यानंतरदेखील त्यांनी शिक्षण चालू ठेवले. एम.ए.नंतर पीएच.डी.साठी त्यांना त्यांचा ग्रामीण लोकगीते गोळा करण्याचा छंद उपयोगी पडला. 'वऱ्हाडी लोकगीतांचा चिकित्सक अभ्यास' या विषयावर त्यांनी पीएच.डी.ही पदवी मिळवली.

त्यांनी आपल्या लालित्यपूर्ण शैलीदार लेखनातून विदर्भातील लोकसंस्कृतीचे, वऱ्हाडी भाषेचे दर्शन मराठी साहित्यात ठळकपणे घडवले. विनोदी, गंभीर, वैचारिक, बालांसाठी, शैक्षणिक असे विविधांगी लेखन त्यांनी केले. पूर्णपणे निखळ वऱ्हाडी भाषेत लेखन, हे त्यांचे वैशिष्ट्य.

विविध विषयांवर वैचारिक लेखन आणि कथा, कविता, कादंबरी इत्यादी ललित लेखनाबरोबरच प्रतिमा इंगोले यांनी कथाकथनाचेही खूप कार्यक्रम केले.

आजवर त्यांची ४१ पुस्तके प्रसिद्ध झाली आहेत. त्यांपैकी वैदर्भी भाषेचा प्रभावी वापर केलेल्या 'हजारी बेलपान' (१९८४– कथा), 'अकसिदीचे दाने' (१९८६ – कथा), 'बुढाई' (कादंबरी – १९९९) ही त्यांची काही प्रसिद्ध आणि पुरस्कारप्राप्त पुस्तके आहेत.

त्यांनी विविध सामाजिक संस्थांमधून वेगवेगळ्या पदांवर काम केले आहे. अशा संस्थांची संख्या लक्षणीय आहे. त्यात साहित्य संस्था, महिला मंडळ, वाचनालये, कला अकादमी, वैदर्भीय लेखिका मंडळ, काही शासकीय संस्था यांचा समावेश आहे. सामाजिक, शैक्षणिक आणि वाङ्मयीन ह्या क्षेत्रांत चौफेर आणि भरीव कामगिरी करणाऱ्या प्रतिमा इंगोले यांनी अनेक पुरस्कार मिळवले आहेत.

त्यांना प्राप्त झालेल्या ३६ पुरस्कारांपैकी यशवंतराव चव्हाण वाङ्मय पुरस्कार, महाराष्ट्र राज्य पुरस्कार, विदर्भभूषण पुरस्कार असे काही महत्त्वाचे पुरस्कार आहेत.

सामाजिक भान असलेल्या, ग्रामीण वैदर्भीय लोकजीवनाची फार जवळून ओळख असलेल्या प्रतिमा इंगोले यांनी मराठी वाङ्मयात –विशेष करून– वैदर्भीय संस्कृतीच्या संदर्भात मोलाची भर घातली आहे.

– मंदाकिनी भारद्वाज

## इंदिरा संत

***संत, इंदिरा नारायण***

**कवयित्री**

**४ जानेवारी १९१४ – १३ जुलै २०००**



इंदिरा नारायण संत या पूर्वाश्रमीच्या इंदिरा गोपाळराव दीक्षित. विजापूर जिल्ह्यातील 'इंडी' या तालुक्याच्या गावी दीक्षितांच्या कुळात जन्म झाला. त्यांचे वडील गोपाळ सीताराम दीक्षित हे प्रशासकीय सेवेत मामलेदार होते. वडिलांची गावोगावी बदली झाल्याने कानडी मुळाक्षरे व थोडेसे लेखन–वाचन त्यांनी घरीच केले. 'तवंदी' हे त्यांच्या वडिलांचे मूळ गाव होते. घरच्या वाङ्मयीन वातावरणामुळे इंदिराबाईंच्या मनात कवितालेखनाची आवड बालपणातच निर्माण झाली. घरी 'रामायण' व 'महाभारत' यांसारखे ग्रंथ; भारतगौरव ग्रंथमालेच्या कादंबऱ्या; मनोरंजन, उद्यान इत्यादी मासिकांचे अंक यांसारखे खूप साहित्य होते. या वाचनाने या पुस्तकांतून भेटणाऱ्या लालित्याचा, भावात्मकतेचा खोल ठसा त्यांच्या अंतःकरणावर उमटला आणि याचा परिणाम

म्हणजे त्यांना कवितालेखनाचा छंद जडला. त्यांच्या घरचे सात्त्विक संस्कार त्यांच्या व्यक्तिमत्त्वाची जडणघडण होण्याकरिता उपयोगी पडले.

**निसर्गाशी नाते**

घरात धार्मिक वातावरण असल्यामुळे रोज सकाळी आणि संध्याकाळी स्तोत्रे म्हणण्याची पद्धत होती. त्यामुळे काव्यछंदात्मक असते, याची त्यांना जाणीव झाली. घरी पोथ्या–पुराणे, संतवाङ्मय तसेच मोरोपंत, वामन पंडित, यांचे आख्यानकाव्य यांचे वाचन होत असल्याने प्राचीन मराठी कवितेचा संस्कार बालपणीच यांच्या मनावर झाला. तसेच त्यांची आई त्यांच्याकडून भूपाळ्या व तुळशीपूजा म्हणवून घेत असे. अशा प्रकारे आई–वडिलांचे, घराण्याचे सुसंस्कार लहान वयातच झाल्यामुळे त्यांची काव्याविषयीची गोडी अधिकच वाढली. या संस्काराचा परिणाम त्यांच्या व्यक्तिमत्त्वावर आणि त्यांच्या काव्यावरही झाला. ‘बाहुल्या’ (१९७२) या संग्रहातील ‘सोन्याची कोयरी’ या कवितेत त्यांनी या सुसंस्कारांची जाणीव व्यक्तही केली. त्या सहा–सात वर्षांच्या असतानाच १९२० साली गदग येथे त्यांच्या वडिलांचा मृत्यू झाला. त्यानंतर त्यांना ‘तवंदी’ येथे काकांकडेच राहावे लागले.

इंदिरा संतांचे बालपण ‘तवंदी’ या खेड्यात गेल्यामुळे या खेड्यातील निसर्गदृश्ये त्यांच्या अंतःकरणात ठसवली गेली. निसर्ग–सौंदर्याचा खरा आस्वाद इंदिराबाईंनी बालवयातच घेतला. त्यामुळे बालपणीच्या अनुभवांना विशेष महत्त्व आहे. बालपणापासून स्पर्श, रस, रंग, गंध, रूप आणि वृत्ती इत्यादी संवेदनाअनुभवांचे रसपान करीतच त्यांच्या काव्यात्म व्यक्तिमत्त्वाची जडणघडण झाली.

इंदिराबाईंना लहानपणापासूनच मातीची ओढही आहे. त्या एकाच वेळेस निसर्गकन्या व भूमिकन्या आहेत. ‘मृण्मयी’ या कवितेतूनच त्यांची ही ओढ व्यक्त होते. सारा निसर्ग त्या विद्युत्कणाने असा काही जवळ केला की कवितेतील पहाड, तिरपा पाऊस, ते हिरवेपण, ते आभाळ या सर्वांना त्या प्राणानेच जीवकळा लाभली. तो निसर्ग जणू एखाद्या सतारीसारखाच त्यांच्या मनात उभा राहिला आणि त्यावर भाववृत्ती झंकारल्या. या निसर्गाचा परिणाम त्यांच्या बाह्य व अंतर्गत व्यक्तिमत्त्वावर अतिशय खोलवर गेलेले आहे.

इंदिराबाईंना बालपणापासूनच ओव्यांचे आकर्षण होते. ओव्या गोळा करण्याचा छंद होता. या स्त्री–गीतांचा परिणाम असल्यामुळे वृत्त, जाती, राग यांचा स्वीकार न करता, ओव्यांमधील नादलय व स्वरलय आवडल्यामुळे त्या ओवी वृत्तातच कविता लिहीत. ओवी म्हणजे त्यांना उत्कृष्ट भावकविता वाटायची. शब्दांचा साधेपणा, वृत्तीचा बाळबोध नितळपणा व मोठा आशय थोडक्यात सांगण्याची शक्ती हे सारे ओवीतले गुण त्यांच्या कवितांत रुजले. एकूणच बेळगाव व तवंदी या दोन्ही गावांच्या अनुभवांनी त्यांची कविता समृद्ध झाली. शालेय शिक्षणातच त्यांच्या कविताप्रेमाला खतपाणी मिळाले. इंदिराबाईंचे दहावीपर्यंतचे शिक्षण बेळगावलाच झाले. त्यांनी वि.स.खांडेकर, ना.सी.फडके यांच्या कादंबऱ्या; बालकवींची कविता, इंग्रजी पुस्तके हे सारे शालेय जीवनातच वाचले. एकाकीपणाची जाणीवही याच काळात झाली. ‘सहवास’ या पहिल्या संग्रहातली ‘अनाथ’ ही कविता याचे दर्शन घडवते. मनातील भाव कवितेत उतरवावेत ही जाणीव त्यांना या कवितेपासून झाली. पण घरातल्या कडक शिस्तीत कवितेचे अंकुर जळून गेले. एकीकडे कटू वास्तवता व दुसऱ्या बाजूला कवितेतील स्वप्नसृष्टी! त्यामुळे त्यांच्या स्वभावाची घडण गांभीर्याकडे झुकली. महाविद्यालयीन शिक्षण पुण्याच्या फर्गसन महाविद्यालयात आणि कोल्हापूरच्या राजाराम महाविद्यालयात झाले. याच वेळी मित्रमैत्रिणींच्या सहवासात कवितेची आवड पुन्हा निर्माण झाली. याच काळात महाविद्यालयामधले प्रसिद्ध लघुनिबंधकार नारायण माधव संत यांच्याशी इंदिराबाईंचा परिचय झाला. समानशीलत्वामुळे त्या परिचयाचे रूपांतर प्रीतीत झाले. जीवनातील खऱ्या काव्याची ओळख झाली. दोन्हीकडच्या विरोधी परिस्थितीतही १९३५ साली जूनमध्ये इंदिराबाई व संत विवाहबद्ध झाले. स्वप्न साकार झाल्याचे समाधान त्यांना वयाच्या २१व्या वर्षी मिळाले.

लग्नानंतर त्यांच्या सुखी संसाराचे, संतृप्त वृत्तीचे चित्रण त्यांच्या काव्यातूनही जाणवते.

संसार, मुले, मधूनमधून नोकरी यांत रममाण होताना कवितेकडे लक्ष नव्हते. १९३६ पासून म्हणजे लग्नानंतर इंदिराबाईंनी पुणे, बेळगाव, मुंबई या ठिकाणी नोकरीनिमित्त वास्तव्य केले. सुखी संसाराच्या या दशकानंतर त्यांचे दुःखपर्व सुरू झाले. १९४६ साली, ना. मा. संतांच्या मृत्यूनंतर इंदिराबाई दुःखात पार बुडाल्या. या दुःखाचे चित्रण त्यांनी अनेक कवितांतून उत्कटपणे केले. 'कातरवेळेला' या कवितेतून हे दुःख विशेषतः व्यक्त झाले आहे. सफल प्रीतीपेक्षा जीवघेण्या दुःखाचे चित्रण त्यांच्या काव्यातून प्रतिबिंबित झाले.

**विशुद्ध भावकविता**

मराठी काव्याच्या इतिहासात इंदिरा संत ह्या 'विशुद्ध भावकविता लिहिणाऱ्या कवयित्री' म्हणून विख्यात आहेत. दुसऱ्या महायुद्धानंतर सुरू झालेल्या आधुनिक मराठी कवितेच्या युगाचे प्रणेते मर्ढेकर हे सर्वश्रुत आहेत. मागच्या कवितेचा ठसा पुसून टाकून त्यांनी नवीन वाट तयार केली. इंदिरा संतांनी ही वाट पूर्णतः स्वीकारली नसली, तरी मर्ढेकरांच्या नवकाव्याचे, प्रतिमांचे संस्कार त्यांच्या कवितेवर होत गेले. समकालीन कवयित्री पद्मा गोळे, संजीवनी मराठे, सरिता पदकी यांच्यापेक्षा इंदिराबाईंची कविता निराळी आहे. जात्यावरच्या ओव्या, लोकगीते आणि मर्ढेकरी काव्याचा नवीन प्रवाह या त्रयींनी इंदिरा संतांचे काव्य वेगळे झाले. इंदिराबाईंचे काव्य निसर्गावर आहे. तो त्यांच्या कवितेत पूर्णपणे भिनला आहे. सुखासीन पातळीवरून इंदिराबाईंच्या आयुष्यातून प्रा.संत निघून गेल्यामुळे त्यांची झालेली मानसिक व शारीरिक फरफट हे सर्वार्थानेच अचानक झालेले. त्यांच्या जीवनातील हे परिवर्तन काव्यवळणाच्या वाटा बदलवण्यासाठी कारणीभूत झाले.

'सहवास' (१९४१), 'शेला' (१९५१), 'मेंदी' (१९५५), 'मृगजळ' (१९५७), 'रंगबावरी' (१९६४), 'बाहुल्या' (१९७२) 'मृण्मयी' (संपादित रमेश तेंडुलकर), 'गर्भ रेशीम' (१९८२), 'चित्कळा' (१९८९), 'वंशकुसुम' (१९९४), 'निराकार' (२०००) असा त्यांचा काव्यप्रवास आहे.

अजून नाही जागी राधा
—x—

अजून नाही जागी राधा
अजून नाही जागे गोकुळ
अशा अवेळी पैल तिरावर
आज घुमे का पावा मंजुळ!

मावळतीवर चंद्र केशरी
पहाटवारा भवती भणभण
अर्ध्या झोपेमध्ये उभी ती
निजेत राहुन आतुर तनमन!

विश्वच अवघे ओठा लावुन
कुणा प्याली तो मुरलीरव
ओठांमधुनी थेंब सुरांचे
हे माझ्यास्तव, हे माझ्यास्तव.
—x—
— इंदिरा

१९४१ साली निघालेला 'सहवास' हा एकच संग्रह; सफल प्रीतीच्या नंतर 'शेला', 'मेंदी', 'मृगजळ', 'रंगबावरी' हे दुसरे वळण आणि 'बाहुल्या', 'गर्भरेशीम', 'चित्कळा', 'वंशकुसुम' आणि 'निराकार' हे तिसरे! या शेवटच्या संग्रहातून त्यांचे चिंतनपर वर्तुळ पूर्ण होते व पुन्हा त्याचे टोक पहिल्या वळणावर मिळते, असे शेवटचे स्थित्यंतर!

अर्वाचीन मराठी प्रेमकवितेच्या संदर्भात इंदिराबाईंविषयी वा. ल. कुलकर्णी म्हणतात, ''मराठी भावकवितेमधील खरीखुरी जिवंत प्रेमकविता ही इंदिरा संताचीच आहे. तिच्यात भडकपणाचा लवलेशही नाही. खऱ्या अर्थाने ती भावकविता आहे.''

शुद्धकलानिर्मिती करणे हे विशुद्ध भावकवितेचे कार्य इंदिराबाईंच्या प्रेमकवितेने केले आहे. ही कविता

समाजविन्मुख असली, तरी तिने आपली वाट स्वतःच्या पद्धतीने शोधली आहे. प्रेम आणि विरह यांची ही एकच वाट आहे. इंदिराबाईंची प्रेमकविता ही एकाच आशयाभोवती फिरणारी असूनही विलक्षण सामर्थ्यवान व उत्कट आहे. 'गर्भरेशीम', 'चित्कळा' यांतील कविता याची साक्ष देतात.

**प्रतिमांचा वापर**

रमेश तेंडुलकर म्हणतात त्याप्रमाणे त्यांच्या प्रेमकवितेत अभिजात रसिकमन प्रकट होते. 'सहवास'नंतर 'शेला', 'मेंदी', 'मृगजळ', 'रंगबावरी' यांत प्रेमकविता अधिक आहेत. तर 'बाहुल्या', 'गर्भरेशीम' यांत त्यांची कविता भोवताली बघू लागलेली आणि 'चित्कळा' 'वंशकुसुम' व 'निराकार' यांत ती अंतर्मुख होऊन चिंतनपरतेकडे वळलेली दिसते. इंदिराबाईंच्या या काव्यप्रवासात प्रतिमांना आणि रंगांना विशेष स्थान आहे. इंदिराबाईंच्या कवितेतील आत्मनिष्ठाच आशय-अभिव्यक्तीचे एकरूप दर्शवते. सारे प्रतिमाविश्व निसर्गरूपातून आले आहे. चिकाच्या पडद्याआडून जितके दिसते, तितके पण आपल्या प्रतिमांचे सुबक दर्शन तर व्हावे अशा प्रतिमांचा वापर इंदिराबाई कुशलतेने करतात. तसेच 'माती' हे त्यांचे आवडते प्रतीक असून 'राधा' व 'मोर' हे त्यांचे आवडते घटक आहेत. दृश्य, स्वाद, नाद यांच्या एकात्मतेचा अनुभव यांच्या प्रतिमा देतात.

लाल, जांभळा, निळा, काळा अशा रंगप्रतिमा हे यांच्या काव्याचे वैशिष्ट्य आहे. तर टिंबे, उद्‌गारवाचक चिन्हे, अपसारण चिन्हे व रिकाम्या जागा यांनाही इंदिराबाईंच्या कवितेत विशेष प्राधान्य आहे. शब्दप्रतिमा योजून इंदिराबाई त्यांच्या कवितेला बांध घालतात आणि त्या अनुभवाला मूर्त करतात. शाश्वत व सनातन असलेल्या सृष्टीतील प्रतिमांचा वापर त्या करतात आणि आशय-अभिव्यक्तीचा एक सुरम्य आविष्कार त्यांच्या कवितेतून सादर होतो.

कवितेव्यतिरिक्त इंदिराबाईंचे 'शामली' (१९५२), 'कदली' (१९५५) व 'चैतू' (१९५७) असे तीन कथासंग्रह, 'मृद्‌गंध' आणि 'फुलवेल' ही आत्मकथनपर ललितबंधांची पुस्तके प्रसिद्ध आहेत. बालमनाची तरलता नेमक्या शब्दांत पकडून काही यशस्वी बालगीते त्यांनी लिहिलेली आहेत. 'गवतफुला', 'मामाचा वाडा', 'अंगतपंगत' हे तीन बालसंग्रह आहेत. तसेच 'मालनगाथा' खंड १- घुंगुरवाळा - लेखन संपादन आणि 'ना. सी. फडके व्यक्ती आणि लेखक' (प्रल्हाद वडेर यांच्या सहकार्याने) चे संपादन.

इंदिराबाईंच्या 'शेला'-१९५१, 'मेंदी'-१९५५, 'रंगबावरी'-१९६४ या संग्रहांना महाराष्ट्र राज्य शासनाचे पुरस्कार लाभले आहेत. 'गर्भरेशीम' या काव्यसंग्रहाला सन्माननीय पुरस्कार १९८३ मध्ये मिळाला. १९९५मधल्या जनस्थान पुरस्काराच्या (नाशिक १९९५) मानकरी ठरल्या.

१९७८ मध्ये कऱ्हाड येथे महाराष्ट्र राज्य कवयित्री संमेलनाच्या त्या अध्यक्षा होत्या. वयाच्या ८६व्या वर्षी बेळगाव येथे त्यांचे निधन झाले.

– डॉ. सुलभा हेर्लेकर

**संदर्भ :**

*१. कुलकर्णी, वा. ल.; 'मराठी कविता जुनी आणि नवी', मुंबई १९८०.*

*२. गाडगीळ गंगाधर; 'खडक आणि पाणी'; १९६६.*

*३. हेर्लेकर, सुलभा; 'प्रीती आणि प्रतिमा'; प्रतिमा प्रकाशन; १९९९.*

## इनामदार, नागनाथ संतराम

**ऐतिहासिक कादंबरीकार**

**२३ नोव्हेंबर १९२३ – १६ ऑक्टोबर २००२**

इनामदार यांचा जन्म गोमेवाडी (जि. सांगली) येथे झाला. त्यांच्या वडिलांचे नाव संतराम विष्णू इनामदार-गोसावी, आईचे नाव आनंदीबाई होते. वतनाचे गाव सातारा जिल्ह्यात खटाव तालुक्यातल्या येरळा नदीकाठचे येरकाळवाडी हे होते.

बालपणाचा बराचसा काळ 'गोमेवाडी' या जन्मगावाच्या सान्निध्यात गेला. शालेय जीवनातच राष्ट्रीय स्वयंसेवक संघाकडे आकर्षित होऊन त्याचे कार्यकर्ते



झाले. मॅट्रिक उत्तीर्ण होण्यापूर्वी संघाच्या ऑफिसर्स ट्रेनिंग कॅम्पचे (संघ शिक्षा वर्गाचे) तीन वर्गांचे शिक्षण त्यांनी पूर्ण केले. संघप्रचारक बाबूराव मोरे यांचा त्यांच्या वागणुकीवर उल्लेखनीय प्रभाव पडला. 'माझ्या जडण–घडणीमध्ये संघाचा भाग महत्त्वाचा आहे, हे मला मान्य करायला हवं' असे ते सांगत.

इनामदारांचे प्राथमिक शिक्षण पुण्याच्या नवीन मराठी प्राथमिक शाळेत झाले, नंतर अहमदनगरच्या सोसायटी हायस्कूलमध्ये माध्यमिक शिक्षण झाले. तेथे त्यांनी वाचनाची हौस मनमुराद भागवली. 'दुष्काळातून उठलेल्या अधाशी माणसाप्रमाणे मी त्या वेळी किती पुस्तके वाचली असतील, ह्याची गणती ठेवलेली नाही.' असे ते म्हणत असत. इंग्रजी पुस्तके, रहस्यकथा, चित्रकला, वास्तुकला, संगीत, कृषी, वैद्यक, अर्थशास्त्र, विज्ञान, इत्यादी विविध विषयांची पुस्तके नगर व औंध येथील ग्रंथालयांतून मिळवून त्यांनी अफाट वाचन केले.

याच काळात त्यांच्यावर पंडित सातवळेकर, गो.नी.दांडेकर यांचाही प्रभाव पडला. बनारस हिंदू विश्वविद्यालय व अलिगढ विद्यापीठ ह्यांच्या परीक्षा देऊन ते पदवीधर झाले. त्यासाठी औंधच्या यमाई हायस्कूलमध्ये शिक्षकाची नोकरीही केली.

अर्थशास्त्राची एम.ए.पदवी घेतलेले इनामदार 'सकाळ', 'केसरी' या वृत्तपत्रांत लेखन करू लागले. ''माझ्या व्यक्तिमत्त्वाला हा (साहित्यनिर्मितीचा) सुडौल आकार पुण्याने दिला होता.'' असे त्यांनी म्हटले होते. नोकरीत बढतीसाठी दिलेल्या परीक्षेविषयी ते लिहितात, ''त्या वेळच्या मुंबई राज्यातून आलेल्या सर्व उमेदवारांत मी सरकारी परीक्षेत पहिल्या क्रमांकानं पास झालो होतो.''

'चांदराती रंगल्या' या आत्मकथा : दोनमध्ये 'हे सारस्वताचे झाड' या अगदी छोट्या प्रस्तावनेत ते लिहितात, ''जीवनाच्या वाटेवर सारस्वताचं हे झाड दिसलं. त्याच्या शेजारी मी प्रथम विसावलो तो औंधात. त्यानंतर अर्धशतकापर्यंत मी या सारस्वताच्या वनामध्ये विहार करतो आहे. ....या प्रवासातल्या कष्ट–साहसाच्या समयीच्या सोबत्यांना, मार्गदर्शकांना, सहप्रवाशांना मी आठवतो आहे.''

'स्वराज्य'चे मो.स. साठे (संपादक) यांची आणि त्यांची भेट हा त्यांच्या साहित्यिक आयुष्यातला एक महत्त्वाचा टप्पा म्हणता येईल. 'झेप' (१९६३), 'झुंज' (१९६६), 'मंत्रावेगळा' (१९६९), 'राऊ' (१९७२), 'शहेनशहा' (१९७६), 'शिकस्त' (१९८३) आणि 'राजेश्री' या एकूण सात ऐतिहासिक कादंबऱ्यांमध्ये मराठी राज्याच्या सुरुवातीच्या काळापासून ते अस्ताच्या काळापर्यंत विस्तृत कालखंड येऊन गेला. पहिल्या तीन कादंबऱ्यांत पेशवाईच्या पडत्या काळातल्या त्रिंबकजी डेंगळे, यशवंतराव होळकर, दुसरे बाजीराव पेशवे या महत्त्वाच्या व्यक्तींचा जीवनपट त्यांनी उलगडून दाखवला आहे. 'राऊ'मध्ये बाजीराव–मस्तानीचे नाजूक प्रेम प्रकरण आहे. 'शहेनशहा'त औरंगजेबाचे व्यक्तिदर्शन, 'शिकस्त' मध्ये पानिपतचे सेनापती सदाशिवरावभाऊंची दुर्दैवी पत्नी पार्वतीबाई नायिका आहे, तर 'राजेश्री' मध्ये शिवाजी महाराजांच्या मनःस्थितीचे वर्णन आहे.

इनामदारांनी आत्मकथेत नमूद केले आहे, ''माझ्या आयुष्याची झळाळती बाजू इतिहासाकडे वळलेली आहे. मी जातो तिथं एक ऐतिहासिक कादंबरीकार म्हणून ओळखला जातो. सुमारे तीन तपं इतिहासाच्या विविध अंगांत मी रमलेलो आहे... मी लेखक असल्यामुळे पात्रांचे स्वभाव सहानुभूतीनं समजून घ्यावेत, ही माझी मूळचीच प्रतिज्ञा आहे.''

त्यांच्या वडिलांनी सर्व्हे किंवा लॅन्ड रेकॉर्ड्स या सरकारी खात्यात पूर्ण ३५ वर्षे इमानाने सेवा केली. त्याच खात्यात मोठ्या शासकीय सेवेचे उपलब्ध असलेले सर्वोच्च स्थान भूषवून ना. सं. इनामदार ३३ वर्षांनी (३० नोव्हेंबर १९८१) सेवानिवृत्त झाले. सर्व्हे खात्यातल्या या सनदी अधिकाऱ्याला त्या वेळच्या मुंबई

ना. सं. इनामदार

'झुंज' पान २९५-२९६

"पारसनीसपंत, तुमच्या शब्दांनी आम्हाला क्षणभर भूल पडते." श्रीमंत बोटातली हिऱ्याची अंगठी काढून तिच्यातला लखलखणारा हिरा निरखून पहात म्हणाले. "एकवेळ असंही वाटतं की यशवंतराव होळकर बोलतात ते सारं खरंही असेल. त्यांच्या मनात कदाचित मराठी दौलतीचा अभिमानही असेल. कदाचित त्यांना आमच्याबद्दल रागही नसेल; त्यांच्या मनात कपटही नसेल. पण पंत, या मुत्सद्दे-गिरीच्या डावात आम्ही मागे एकदा गुंतलेल्या गोष्टीत आलो होतो. ही तुमची मुत्सद्दीगिरी पाहिली की आम्हाला नाना फडणीसांची आठवण येते. तेही असंच सरकार-पेशव्यांशी नम्रतेनं बोलत असत. आम्हाला खावंद, स्वामी, मालक असंच संबोधत असत. पण करीत असत काय माहीत आहे!"

श्रीमंतांनी पारसनीसपंतांकडे रोखून पाहिलं. पंत दीन मुद्रेनं उभे होते. ते काही बोलले नाहीत.

प्रांतात कच्छ, सौराष्ट्रपासून दक्षिणेत कर्नाटकापर्यंत पसरलेल्या कधी वैराण तर कधी सुपीक तर कधी दुर्गम भागांत कामाच्या निमित्ताने वैविध्याचे अनुभव गाठी बांधता आले.

पंधरा वर्षे त्यांचा पट्टेवाला (शिपाई) म्हणून काम करणारा किसन हा इनामदारांच्या स्वभावाविषयी कर्मचाऱ्यांपुढे मनोगत व्यक्त करतो, "इनामदार साहेबांच्या बरोबर माझ्यासारख्या फाटक्या माणसानं परधानासारखी सेवा बजावली. जिथं जाईन तिथं त्यांच्या खालोखाल लोकांनी मला मान दिला. ते राज्य त्यांच्याबरोबरच गेलं. त्यांनी मला भावासारखं वागवून घेतलं. आता काही खरं नाही......"

सेवानिवृत्तीच्या सोहळ्यानंतर आपल्या साहेबांना जीपमधून घरी पोचवताना ड्रायव्हर म्हणाला, "चार्ज दिला म्हणून काय झालं साहेब? आमच्या दृष्टीने तुम्ही अखेरपर्यंत साहेबच राहणार आहात!"

सेवकांच्या या उत्स्फूर्त उद्‍गारांत इनामदारांच्यातल्या संवेदनशील, सुसंस्कृत, सुशिक्षित, सभ्य व्यक्तित्वाचे दर्शन होते. 'झेप'नंतरच्या सहा कादंबऱ्यांचे लेखन त्यांच्या स्वतःच्या वनश्रीने नटलेल्या 'झेप' बंगलीत झाले. तेथेच त्यांचे इष्टमित्र, चाहते, प्रकाशक व अन्य लोक भेटायला यायचे. 'मंत्रावेगळा' या कादंबरीची प्रस्तावना मोठी आहे, तर 'राजेश्री'ची प्रस्तावना ग्रंथाच्या शेवटी आहे.

राज्यशासन पारितोषिक 'झेप'ला (१९६४) आणि 'झुंज'ला (१९६८) मिळाले. 'झुंज'ला मराठी साहित्य परिषदेचा 'हरिभाऊ आपटे कादंबरी पुरस्कार'ही मिळाला. त्यांच्या कादंबऱ्यांना वाचकांचा प्रचंड प्रतिसाद मिळाला.

१९९७ मध्ये अहमदनगर येथे आयोजित अखिल भारतीय मराठी साहित्य संमेलनाचे अध्यक्षपद इनामदारांना देऊन त्यांचा गौरव करण्यात आला.

इनामदारांनी लिहिलेल्या आत्मकथा तीन भागांत वेगवेगळ्या शीर्षकाअंतर्गत २६ जानेवारी १९९२ रोजी प्रकाशित झाल्या. 'वाळल्या फुलात' आत्मकथा तीनच्या 'स्वरूपी पाहता' या अगदी संक्षिप्त प्रस्तावनेत इनामदारांनी घेतलेला मागोवा त्यांच्याच शब्दात, ''आता वळून स्वतःकडे पाहतो आहे. चार पुरुषार्थांपैकी अर्थाचं माझ्या आयुष्यातलं अस्तित्व 'स्वप्नांच्या आठवणी'त मी रसिकांना सांगितलं. 'रंगलेल्या चांदराती'त साहित्य धर्माची पूजा तुमच्यासमोर मांडली. आता उरलेल्या अर्थाच्या समजुतीसाठी काही उलगडा करतो. त्यासाठी हाताळतो आहे ही फुलं, काही चुरगळलेली, सुकलेली आणि वाळलेलीही तरी त्यात गंध आहे.'' त्यांचा पिंड 'सहजासहजी समोर येईल त्यावर विश्वास न ठेवता त्या गोष्टी खोलवर तपासून पाहणाऱ्याचा आहे,' याचे प्रत्यंतर वाचकाला जागोजागी येत जाते. त्यातून त्यांच्या नावाचा, गावाचा, परिसराचा परिचय घडत जातो.

– वि. ग. जोशी

**संदर्भ :**

*१. खानोलकर गं. दे; संपादक, 'मराठी वाङ्मय सेवक चरित्र कोश', खंड पहिला; अथेना पब्लिकेशर्स, मुंबई; २००३.*

*२. कुलकर्णी अनंतराव, संपादक; 'लेखकाचे घर'; मॅजेस्टिक प्रकाशन; ऑक्टोबर, १९९७.*

*३. इनामदार ना. सं.; आत्मकथा एक – 'त्या स्वप्नांच्या आठवणी', दोन – 'चांदराती रंगल्या', तीन – 'वाळल्या फुलात'; सन पब्लिकेशन, पुणे; १९९२.*

## इनामदार, श्रीनिवास दिगंबर

**कवी**

**५ फेब्रुवारी १९२८**

श्रीनिवास इनामदार हे बालकवींच्या निसर्ग-चित्रात्मक कवितांचा वारसा जपणारे कवी. लातूर या त्यांच्या मूळ गावी देशपांडे गल्लीत त्यांचे बालपण गेले. त्यांच्या



घराण्यात होऊन गेलेल्या 'सखाराम महाराज' या सत्पुरुषाचा आध्यात्मिक वारसा त्यांच्या आई-वडिलांनी म्हणजे दिगंबरराव रंगराव इनामदार व यशोदाबाई दिगंबरराव इनामदार यांनी जोपासला होता. त्यामुळे सखाराम महाराजांची समाधी असलेल्या वाड्यात वारकरी नेहमी येत. त्यातूनच संत वाङ्मयाचे संस्कार त्यांना बालपणापासून लाभले. तशातच वयाच्या बाराव्या वर्षी वडिलांनी त्यांना पंढरपूरला नेले. तेथे दासगणू महाराजांची भेट झाली. दासगणू महाराजांनी त्यांना आपल्या कीर्तन-आख्यानांची दोन पुस्तके आशीर्वाद म्हणून दिली. ती त्यांनी झपाटल्यागत वाचून काढली. त्यातून आपणही कविता लिहावी, असे त्यांना वाटू लागले. वयाच्या चौदाव्या वर्षी त्यांनी पहिली कविता लिहिली.

पुढे मेळ्यांसाठी गाणीही लिहिली. ती लातूरच्या रा. श्री. दिवाण व बाबासाहेब परांजपे यांना खूप आवडली. त्यांनी इनामदारांना खूप प्रोत्साहन दिले. मग इनामदारांनी मागे वळून पाहिले नाही. स्टेट बँक ऑफ हैद्राबाद या बँकेची प्रशासकीय अधिकारी पदावरची नोकरीही त्यांच्या काव्यलेखनाआड आली नाही. वयाच्या चौदाव्या वर्षापासून सुरू झालेले काव्यलेखन अजूनही तेवढ्याच उत्साहाने चालू आहे. त्यांचे आत्तापर्यंत एकोणीस कवितासंग्रह, दोन बालगीत संग्रह, एक नाटक प्रसिद्ध झालेले आहे व अकरा कवितासंग्रह प्रकाशनाच्या वाटेवर आहेत.

'शिवगान' (१९८२), 'फूल फुलता राहिना' (१९८८), 'नभ मातीच्या कुशीत' (१९८९), 'दिंडी जाय दिगंतरा' (१९९३), 'निळ्या सूर्याची सावली' (२००६), 'प्रकाशयात्री' (२००७), 'मोर पंखात मावेना' (२००७), 'नादब्रह्म जेथे राहे' (२००७) आदी काव्यरचना रसिकमान्य झाली आहे. 'सत्यं वद

जिथून गेली संत पाऊले
वर श्रद्धेचे डोळे झरले
त्या ओल्या मातीचे मळवट
मी कवितेच्या भाळी भरले

• घट धन्य झाला

मराठीच्या मुक्तरत्नांचा
माती करुनिया गोळा
चार गाणाच्या हातांनी
माझा कुंभ घडविला

रित्या माझिया घटात
होते आधीच आभाळ
मराठीने ठेवियली
त्यात नक्षत्रांची माळ

माझा घट धन्य झाला
झाले त्यावर कुबेर
उतरंड धन्य झाली
झाला श्रीमंत कुंभार

श्री. दि. इनामदार.

श्री. दि. इनामदार

जन्मतारीख ५/२/१९२८
जन्मस्थळ · लातूर
स्थायिक : औरंगाबाद

गोदावरी’ (१९९४) हे नाटकही त्यांनी आणि विद्याधर करन्दीकर यांनी मिळून लिहिले आहे.

निसर्ग ही त्यांच्या कवितेची गंगोत्री आहे, तसेच दिव्यत्वाचे आकर्षण, रमणीयतेचा ध्यास, मायभूमीचे आंतरिक प्रेम, संतांविषयीचा आत्यंतिक आदरभाव या प्रेरणांमधूनही त्यांची कविता स्फुरते.

निसर्ग त्यांच्या प्रतिभेला खुणावतो. त्याच्याशी नाते जुळणारी संवेदनशीलता आणि निसर्गाच्या तरलतेला पेलणारे शब्दसामर्थ्य त्यांच्याजवळ उपजतच असल्याने त्यांच्या कवितेतील निसर्ग-प्रतिमा आपल्याशी बोलू लागतात. मनःपटलावर उमटलेले निसर्गचित्र ते आपल्या भावोर्मीसह अर्थगर्भ अशा शब्दांनी अतिशय उत्कटतेने रेखाटतात. त्यांचे मन निसर्गात असे रममाण होऊन गेल्याने, निसर्गाशी त्यांचे आंतरिक नाते जोडले जाते. ह्या नात्याचाही प्रत्यय त्यांच्या कवितेमधून येतो. श्री. दि. यांची अशी तरल उत्कटतेने भारलेली कविता, बालकवींची आठवण करून देते.

**मराठवाड्याचे ‘गदिमा’**

निसर्गाप्रमाणेच दिव्य विभूतिमत्त्वांचे त्यांना आकर्षण आहे. त्यातूनच छत्रपती शिवाजी महाराजांच्या देदीप्यमान जीवन चरित्रावरचे तेजस्वी ‘शिवगान’, संत ज्ञानेश्वरांचे हृदयस्पर्शी जीवन-दर्शन घडविणारे ‘कैवल्याचे लेणे’ हे लघु-खंडकाव्य, प्रासादिक वाणीत व प्रसन्न शैलीत रेखाटलेले ‘अपरिग्रहाचा महामेरू’ हे भगवान महावीरांवरील कथा-काव्य, संवेदनाशील मनाने टिपलेला, कलात्म आणि भावात्म अनुभव देणारा ‘निळ्या सूर्याची सावली’ हा भारतरत्न डॉ. बाबासाहेब आंबेडकरांच्या जीवनसंग्रामावरील कवितासंग्रह असे उत्तमोत्तम कथा-काव्यसंग्रह त्यांच्या सिद्धहस्त लेखणीतून साकार झाले आहेत.

एकीकडे निसर्गाच्या निसर्गपणाची जाणीव मूर्तिमंतपणे साकारणारी त्यांची शब्दकळा लावण्यवती आहे, हळुवार आहे, शालीन वळण जपणारी आहे, प्रासादिक आहे, लयबद्ध व तालबद्ध आहे तर दुसरीकडे महामानवांच्या जीवनातील वादळांना शब्दबद्ध करण्याचे सामर्थ्यही तिच्यात आहे. अष्टाक्षरी छंदावर त्यांची हुकमत आहे. त्यातूनच सुश्राव्य अशा गीतासारखा प्रत्यय त्यांची कविता देते. त्यामुळेच तिला रसिकमान्यता लाभलेली आहे. ‘मराठवाड्याचे गदिमा’, ‘कवि-कुलशेखर’ अशा पदव्या

रसिकांच्या दरबारात त्यांना प्राप्त झाल्या आहेत, तसेच कै. नरहर कुरुंदकर स्मृती पुरस्कार, कै. यशवंतराव चव्हाण स्मृती पुरस्कार, स्वामी रामानंदतीर्थ मराठवाडा भूषण पुरस्कार, राष्ट्रीय सेवाभावी पुरस्कार, इत्यादी पुरस्कारांनी ते सन्मानित आहेत.

– डॉ. संजय देशमुख

**संदर्भ :**

*१. इनामदार श्री. दि.; 'दिवे सोडिले प्रवाही' कवितासंग्रह; प्रस्तावना, प्राचार्य राम शेवाळकर; कीर्ती प्रकाशन, औरंगाबाद; प्रथमावृत्ती – १९९५.*

*२. इनामदार श्री. दि.; 'फूल फुलता राहिना' कवितासंग्रह; प्रस्तावना; डॉ. सुधीर रसाळ; कीर्ती प्रकाशन, औरंगाबाद; १८९८.*

*३. इनामदार श्री. दि.; 'निळ्या सूर्याची सावली' कवितासंग्रह; प्रस्तावना, डॉ. गंगाधर पानतावणे; रजत प्रकाशन, औरंगाबाद; २००६.*

*४. इनामदार श्री. दि.; 'शिवगान' कवितासंग्रह; प्रस्तावना, शिवशाहीर बाबासाहेब पुरंदरे; कीर्ती प्रकाशन; १९८२.*

## इनामदार, हेमंत विष्णू

**संतसाहित्याचे अभ्यासक**

**३ नोव्हेंबर १९२५ – २३ जून २००५**



संत साहित्याचे अभ्यासक डॉ. हेमंत विष्णू इनामदार यांचा जन्म सातारा जिल्ह्यातील खटाव गावी झाला. वडील विष्णू हरी उर्फ तात्या प्रशिक्षित प्राथमिक शिक्षक होते आणि विविध विषयांचे व्यासंगी, प्राचीन काव्याचे अभ्यासक होते. त्यांच्या सहवासात वाङ्मयाच्या आवडीचे बीज हेमंत यांच्या बालमनात नकळत रुजले. आई रुक्मिणीबाई यांनाही कविता करण्याचा छंद होता. त्यांचे अक्षर सुंदर, टपोरे आणि मोत्यासारखे होते. आपल्या मुलाच्या (हेमंताच्या) काही पुस्तकांच्या सुरेख मुद्रणप्रती त्या हौसेने लिहून द्यायच्या. आईवडिलांचे उत्तम संस्कार घेऊनच हेमंतरावांनी आपले व्यक्तिमत्त्व घडवले. त्यांचे बालपण निसर्गरम्य कोकण भूमीतील रेवदंडा येथे आत्या यशोदा आचार्य यांच्या मायेच्या छायेत सुखासमाधानाने गेले. आत्याचे यजमान गणेश माधव उर्फ आबा आचार्य हे रेवदंडा हायस्कूलचे शालाप्रमुख होते. आबा हे विवेकी, विचारी, शिस्तप्रिय आणि हाडाचे शिक्षक होते. शिक्षक आर. जी. जोशी यांनी राष्ट्रभक्तीचे धडे स्वआचरणातून दिले. मराठीचे अभंग सर, इंग्रजीचे दामले सर, हे इनामदारांचे विशेष आवडते शिक्षक होते. या साऱ्यांच्या सहवासात जीवनातील सात वर्षे जडणघडणीची गेली. ह. भ. प. बुवा नवरे यांनी रात्री झोपताना रामायण-महाभारतातील कथा, संतकथा नेमाने सांगितल्या. मनाच्या श्लोकांमुळे उत्तम श्रवणसंस्कार झाले. रेवदंडा हे त्यांच्या आयुष्यातील आनंदमय स्मृतिस्थळ बनले. स्वकष्टांनी आणि अभ्यासू वृत्तीने त्यांनी शिक्षणात एम. ए., एल. एल. बी., पीएच. डी. पर्यंत मजल मारली.

संत साहित्य आणि संत विचार यांचा वेध घेताना ते खोलवर, मुळापर्यंत जाऊन भिडले. संत साहित्यात अखंड अवगाहन करत राहिले. संत साहित्याचे अध्ययन-अध्यापन, संकलन, संपादन, मार्गदर्शन यांत ते सदैव कार्यमग्न राहिले. त्यांच्या लेखनात सहजता, सुबोधता, प्रासादिकता आणि मुख्य म्हणजे अर्थपूर्ण प्रवाहिता नेमकेपणाने उतरली. त्यांची ग्रंथसंपदा विपुल आहे. 'संत नामदेव' (नामा म्हणे), 'भागवत धर्माची मंगल प्रभात', 'संत सावता दर्शन, (१९७०), 'श्रीज्ञानेश्वर व संतमंडळ', 'ज्ञानदेवे रचिला पाया', 'एकनाथकालीन मराठी साहित्य', (१९८३) 'श्रीनामदेव चरित्र', 'काव्य आणि कार्य', 'आश्रमहरिणीचे अंतरंग', 'मराठेशाहीचा उत्तरकाळ' अशी अकरा स्वतंत्र पुस्तके, संपादित सोळा ग्रंथ, नियतकालिकांचे संपादन (महाराष्ट्र साहित्य पुस्तिका, धर्मभास्कर, अबोली) याशिवाय विशेष प्रसंगी लेख, विविधांगी लेखनसंपदा म्हणजे त्यांच्या भरघोस साहित्य योगदानाची साक्ष होय. सकळ संत व्यासपीठ, गीता धर्म मंडळ, या संस्थांच्या कार्यातही

त्यांनी मोलाची साथ दिली. भक्तिमंदिरातील नंदादीप, वेध ज्ञानेशाचा, अभंग नवनीत, आस्वाद ज्ञानेश्वरीचा, नामा म्हणे हे ग्रंथ विशेष गाजले.

डॉ. हेमंत इनामदार म्हणजे जणू देवाने प्रसन्नतेची पावती दिलेला माणूस होय. त्यांनी गुणी, अभ्यासू मित्रांची मांदियाळी उभी केली. ऋजुता, सात्त्विकता आणि विनम्रता या गुणांमुळे त्यांचा मित्रपरिवार वाढला. मात्यापित्यांचे प्रेमळ छत्रही त्यांना सुदैवाने पुष्कळ काळ लाभले. प्रापंचिकदृष्ट्याही ते पूर्ण समाधानी होते.

'हा तो चैतन्याचा ठावो' (डॉ. शशिकांत मिरजकर), 'सच्चा ज्ञानोपासक' (ललिता कुंभोजकर), 'एक लोभसवाणे व्यक्तिमत्त्व' (डॉ. वि. रा. करंदीकर), 'निरंतर लेखनशील अभ्यासक' (डॉ.अशोक कामत) असे गौरवोद्गार ज्यांच्याबद्दल विचारवंतांनी वेळोवेळी काढले, ते डॉ. हेमंत विष्णू इनामदार (भाऊराव) प्राचीन साहित्याभ्यासकांच्या श्रेयनामावलीतील सर्वमान्य नाममुद्रा आहे. महाराष्ट्राच्या साहित्यिक, शैक्षणिक, सामाजिक, सांस्कृतिक जीवनात त्यांनी आपल्या प्रदीर्घ कार्यकर्तृत्वाने आगळा-वेगळा ठसा उमटवला आहे. यशस्वी प्राचार्य, कुशल अध्यापक, प्रभावशाली वक्ता, चिंतनशील अभ्यासक आणि विचारांची बांधिलकी जपणारा अभ्यासू लेखक म्हणून त्यांची खास ओळख आहे.

– डॉ. ललिता गुप्ते

**संदर्भ –**

*१. 'साहित्यसूची', दिवाळी १९९६.*
*२. 'साहित्यसूची', दिवाळी १९९७.*
*३. 'रसिक', दिवाळी १९९५.*

## उजगरे, निरंजन हरिश्चंद्र

**कवी, संपादक**

**६ ऑक्टोबर १९४९ – १२ डिसेंबर २००४**

निरंजन उजगरे यांचा जन्म उषा आणि हरिश्चंद्र उजगरे यांच्या पोटी भुसावळ येथे झाला. त्यांचे वडील पोलीस अधिकारी होते. त्यामुळे वडील त्यांच्या वाट्याला फारसे आले नाहीत. मात्र आई आणि आजी सोनूबाई



(वडिलांची आई) यांच्या सहवासात त्यांचे व्यक्तिमत्त्व फुलत गेले. त्यांच्या कुटुंबात साहित्याचा वारसा त्यांच्या आजीआजोबांपासून चालत आलेला आहे. शिक्षकी पेशातले त्यांचे आजोबा भास्करराव हे कवी होते. ते रेव्हरन्ड नारायण वामन टिळक यांच्या कवितासंग्रहाचे साक्षेपी संपादक आणि प्रकाशक म्हणून प्रख्यात आहेत. 'टिळकांची कविता भाग-१' (१९१४) व 'टिळकांची कविता भाग-२' (अभंगांजली) हा संग्रहही त्यांनी संपादित केलेला आहे. हरिपंत केळकर (अलिबाग) हे निरंजनचे पणजोबा (वडिलांचे आजोबा). हेही शिक्षक, सामाजिक कार्यकर्ते, लेखक आणि कवी होते.

निरंजन उजगरेंचे थोरले काका विभाकर आणि विजयानंद हे दोघेही लेखक आणि कवी होते. निरंजनच्या आईचे 'एकेक वेस ओलांडताना' हे प्रवासवर्णन प्रसिद्ध आहे तर त्यांची आत्या यशोदा पाडगावकर यांचे 'कुणास्तव कुणातरी' (२००३) हे आत्मचरित्र महत्त्वाचे ठरले आहे.

शालेय जीवनात निरंजन त्यांच्या ताईआत्या, यशोदा पाडगावकर यांच्याकडे जात. कवी मंगेश पाडगावकरांच्या संग्रहातील उत्तमोत्तम पुस्तके ते वाचत असत.

शिक्षण गिरगावातील चंदावरकर शाळा आणि विल्सन हायस्कूल येथे मराठी माध्यमाच्या शाळेमध्ये झाले. माध्यमिक शिक्षण सांताक्रूज येथील आनंदीलाल पोद्दार हायस्कूलमध्ये झाले. पार्ले महाविद्यालयात इंटर सायन्स पूर्ण केल्यावर व्ही. जे. टी. आय. येथे त्यांनी अभियांत्रिकी पदवी प्राप्त केली. डिसेंबर १९७३ पासून ठाण्यातील वागळे इस्टेट येथे त्यांनी 'निरंजन इंजिनिअरिंग वर्क्स' सुरू केले. चारचाकी गाड्यांना लागणाऱ्या सुट्या भागांचे उत्पादन करीत असतानाच 'अनब्रेकेबल वॉल हुक्स'च्या उत्पादनास त्यांनी सुरुवात केली. त्याबद्दल महाराष्ट्र राज्य सरकारकडून त्यांना रौप्यपदक प्राप्त झाले होते.

इंजिनिअरिंगचा व्यवसाय सांभाळून त्यांनी आपली संवेदनशीलताही जपली होती. अनेक कविता त्यांनी या काळात लिहिल्या. पूर्ण वेळ साहित्यिक कार्य करण्यासाठी त्यांनी आपल्या व्यवसायातून निवृत्ती घेतली. रोटरिअन म्हणूनही त्यांनी कार्य केले होते. तेथेही त्यांनी राजीनामा दिला, आणि साहित्यिक कार्यासाठी स्वतःला वाहून घेतले.

निरंजन उजगरे यांनी पहिली कविता वयाच्या नवव्या वर्षी लिहिली (१० जुलै १९५९). सुरुवातीच्या कवितांना अनुरूप चित्रे ते स्वतः काढीत असत. कधी मासिकांतील चित्रांचे कात्रण करून लावत. आपल्या शंभर कवितांची पहिली वही त्यांनी नेहरूंना अर्पण केलेली आहे. आरंभीच्या काळात गद्यलेखन करताना ‘किरण’ हे नाव त्यांनी घेतले. पण पुढे ते निरंजन उजगरे या नावानेच लेखन करू लागले. या दोन्ही नावांतील ‘प्रकाश’ मात्र आपले लक्ष वेधून घेतो.

पॉप्युलर प्रकाशनामध्ये प्रमुख संपादकाची नोकरी त्यांनी स्वीकारली होती (ऑगस्ट २००४). पण त्यानंतर अवघ्या चार महिन्यांनी त्यांचे निधन झाले.

‘दिनार’ हा त्यांचा कवितासंग्रह अरब देशातील त्यांच्या वास्तव्यातील अनुभवांचे प्रतिबिंब आहे, तर ‘दीपवा’ कविता संग्रहातील कविता या त्यांच्या डोळ्यावर झालेल्या शल्यचिकित्सेच्या काळातील उजेडाचे कवडसे आहेत. निरंजन उजगऱ्यांच्या प्रकाशित साहित्यामध्ये प्रामुख्याने ‘नवे घर’, ‘दिनार’, ‘प्रहर’, ‘दीपवा’, ‘तत्कालीन’ आदी कवितासंग्रह तर ‘सोव्हिएत भावकविता’, ‘विणू लागली आजी’, ‘हिरोशिमाच्या कविता’, ‘फाळणीच्या कविता’ हे अनुवादित कवितासंग्रह प्रसिद्ध होत. ‘काळोखातील कवडसे’, ‘उगवतीचे रंग’, ‘महाराष्ट्राबाहेरील मराठी’, ‘कांगारूंचे मराठी आप्त’ हे संपादित ग्रंथ आहेत आणि ‘जायंट व्हील’ ही कादंबरी आहे.

उजगरे यांच्या पत्नी डॉ. अनुपमा उजगरे यांच्या कथा, कविता आणि संशोधनपर लेखन व ललित लेखन प्रसिद्ध आहे.

कधी येतोस
कफल्लकाच्या झोळीमध्ये
अचानक पडणाऱ्या रत्नासारखा ;
कधी बसतोस
निष्पर्ण झाडावर गाणाऱ्या
वैभवी पक्ष्यासारखा .

जेव्हा माझ्या गळ्यातून
आतल्या घटनांचे बोल पाझरतात
आणि माझे हात
मनातच उंचावत जातात,
अशा वेळी तू कुठे असतोस ?

निरंजन उजगरे

मराठी साहित्यात भरीव लेखन करणाऱ्या निरंजन उजगरेंना ‘सोव्हिएत लँड नेहरू पुरस्कार’ (१९८९), ‘महाराष्ट्र फाउंडेशन पुरस्कार’ (२००२) यांसह मानाचे अनेक पुरस्कार प्राप्त झाले.

– डॉ. सिसिलिया कार्व्हालो

## उजळंबकर, कृष्ण मुकुंद

**कादंबरीकार, ग्रंथालयशास्त्राचे तज्ज्ञ**

**१५ डिसेंबर १९२४**

कृष्ण मुकुंद उजळंबकर मूळचे मराठवाड्यातील पण नोकरीनिमित्त त्यांचे वास्तव्य नागपुरात होते. एम.ए., एलएल. बी., एम. लीब. असलेले उजळंबकर यांनी सुरुवातीला निजाम कॉलेज व केंद्रीय सचिवालय, हैद्राबाद येथे ग्रंथपाल म्हणून काम केले.



नंतर मुंबईतील सचिवालय ग्रंथालयात विशेष अधिकारी व नंतर केंद्रीय ग्रंथालय, नागपूर येथे मुख्य ग्रंथपाल म्हणून काम केले. ग्रंथ व ग्रंथालयाविषयीच्या आस्थे–मुळे महाराष्ट्रातील व भारतातील ग्रंथालय चळ–वळीत सहभागी होऊन त्यांनी मोलाचे कार्य केले आहे. त्यांचे ग्रंथालयविषयक लेखन हे त्या विषयाच्या त्यांच्या सखोल अभ्यासाचे व प्रत्यक्ष अनुभवाचे फलित आहे. तसेच ते वाङ्मयप्रेमी अभ्यासक व अंतःस्फूर्तीने लेखन करणारे ललितलेखकही आहेत. 'नवोन्मेष' (१९४६) ही आझाद हिंद सेनेच्या पार्श्वभूमीवरची त्यांची पहिली कादंबरी होय. त्यानंतरच्या काळात त्यांनी आठ–नऊ कादंबऱ्या लिहिल्या. 'अभय', 'सखूचा संसार' या त्यांच्या आरंभीच्या कादंबऱ्या आहेत.

'अभय' ही किशोरांच्या जीवनावर आधारलेली संस्कारक्षम कादंबरी तर 'धूर' (१९८२) ही सामाजिक वास्तववादी कादंबरी लिहिली. 'धोंडी' ही दलित जीवनावर आधारित कादंबरी तर 'मायेचे कढ' ही कौटुंबिक वळणाची कादंबरी त्यांनी लिहिली. याशिवाय 'जयप्रकाश नारायण' हे चरित्र, 'रक्तिमा' हा काव्यसंग्रह व 'त्रिवेणी' हा एकांकिका संग्रह हे सारे प्रसिद्ध झाले आहे. असे वैविध्यपूर्ण लेखन त्यांनी केले. 'आम्ही असे लढलो' (१९५९) व 'आम्ही लढाई जिंकली' (१९६०) या स्वातंत्र्य–लढ्याच्या पार्श्वभूमीवर लिहिलेल्या दोन राजकीय कादंबऱ्यांमुळे उजळंबकरांना कादंबरीकार म्हणून लौकिक प्राप्त झाला. या कादंबऱ्यांतून अनुक्रमे विदर्भातील व मराठवाड्यातील स्वातंत्र्य–लढ्याचा रोमहर्षक इतिहास परिणामकारकतेने त्यांनी चित्रित केला आहे. महाभारताच्या पौराणिक पार्श्वभूमीवर लिहिलेली 'पाचामुखी परमेश्वर' ही कादंबरी पूर्वार्ध (१९७७), उत्तरार्ध (१९७८) अशा दोन भागांत प्रकाशित करण्यात आली.

एकूणच त्यांचे कादंबरी लेखन ध्येयप्रधान आहे; राजकारणाला दिलेल्या ऐतिहासिक बैठकीमुळे उजळंबकरांची कादंबरी ही समकालीन राजकीय कादंबरीहून वेगळी दिसते.

– प्रा. मंगला गोखले

**संदर्भ :**

*१. उजळंबकर कृष्ण मुकुंद; 'आम्ही असे लढलो'; द्वितीय आवृत्ती, १९७२.*

## ऊर्ध्वरेषे, प्रभाकर वामन

**पत्रकार, समीक्षक, मार्क्सवादी विचारवंत**

**९ जानेवारी १९१८ – १० जुलै १९८९**



प्रभाकर उर्ध्वरेषे यांचा जन्म इंदूर येथे झाला. १९३३ साली मॅट्रिक झाल्यावर त्यांनी विज्ञान शाखेकडे जायचे ठरविले. त्याप्रमाणे इंदूरच्या होळकर महाविद्यालयातून ते इंटर सायन्स झाले. पण विज्ञान विषयात गोडी वाटेना. लहानपणापासून वाचनाची आवड होती. इंग्रजी विषय घेऊन बी. ए. झाले.

धर्म व राजकारण या विषयांचा अभ्यास होताच नोकरीच्या शोधात ते ब्रह्मदेशात गेले. त्याच वेळी १९३९ मध्ये दुसरे महायुद्ध सुरू झाले आणि ते संकटात सापडले. चारशे मैलांचा पायी प्रवास करून भारतात परत आले. १९४१ साली इंग्रजी घेऊन एम. ए. झाले. वडील मराठीचे शिक्षक तर ते नागपूर विद्यापीठात इंग्रजीचे रीडर. इंग्लिश ट्रेनिंग टिचिंग–भाषाशास्त्र शिकवीत. मराठी भाषेवर चांगले प्रभुत्व होते. 'प्रतिभा' आणि 'किर्लोस्कर' यांमधून लेखनास सुरुवात झाली. १९४२ मध्ये 'किर्लोस्कर' मधून 'आम्ही हिंदू आहोत का?' हा पहिला लेख लिहिला.

‘प्राध्यापकांनो, शिक्षक व्हा’ हा लेख त्या काळी गाजला होता.

इंदूर-माळवा भागात त्या वेळी कम्युनिस्टांचा जोर होता. त्या काळात साम्यवादाचा सुशिक्षितांवर पगडा असायचा. त्यामुळे ऐन उमेदीत कार्यकर्ते म्हणून कम्युनिस्ट पार्टीत शिरले. पत्नी उषाताई व ते स्वतः असे दोघेही सात वर्षे कम्युनिस्ट पक्षाचे काम करीत होते. ‘हरवलेले दिवस’ या आत्मचरित्रात ब्रह्मदेशातून परतीच्या प्रवासाचे वर्णन आहे.

तसेच मुंबई येथे कम्युनमध्ये राहताना तेथे आलेले अनुभव, कम्युनिस्टांची कार्यप्रणाली, त्यांची मुखपत्रे, त्यातील लेखनप्रक्रिया, स्वतःचा झालेला कोंडमारा, मानसिक त्रास, स्वतःचा भ्रमनिरास इत्यादी गोष्टींचे इत्थंभूत वर्णन व प्रत्यक्ष घडलेल्या गोष्टींचे सविस्तर चित्रण केलेले आहे. मराठीतील एक वाचनीय असे ते आत्मचरित्र आहे. कोणी दुखावले, जातील या भीतीमुळे आत्मचरित्रामध्ये खऱ्या घटना लिहिणे, ही फार कठीण गोष्ट असते. अतिशय नितळ व पारदर्शी व्यक्तिमत्त्वाने ते लिहिल्याचे जाणवते. ‘समृद्धीच्या मार्गावरः टाटा उद्योग समूहाची यशोगाथा’ ह्या आर. एन. लालांच्या पुस्तकाचा अनुवाद ऊर्ध्वरेषेंनी केलेला आहे.

अनेकविध चिनी व रशियन पुस्तकांचे त्यांनी अनुवाद केले. माओ, स्टालिन, पुश्कीन, गॉर्की यांच्या ग्रंथांचे तसेच रशियन आणि युक्रेनियन लोककथांचे अनुवाद त्यांनी केले.

सुस्वभावी, विद्यार्थिप्रिय, उत्साही आणि इंग्रजीचे निष्णात प्राध्यापक म्हणून प्रभाकर ऊर्ध्वरेषे ओळखले जात. एक मार्क्सवादी विचारवंत, चांगल्यापैकी समीक्षक, पत्रकार, रशियन साहित्याचे अनुवादक अशीही त्यांची ओळख होती.

– डॉ. उषा कोटबागी

## एलकुंचवार, महेश बळीराम

☞ **मुख्य नोंद – नाटक खंड**

## ओक, मनोहर शंकर

**कवी, कादंबरीकार**

**२७ मे १९३३ – १ मार्च १९९३**

मनोहर ओक यांचे वास्तव्य मुंबईत होते. त्यांचे शालेय शिक्षण एस.एस.सी.पर्यंत झाले. तसेच ते अनियतकालिकांच्या चळवळीतील प्रमुख लेखक म्हणून प्रसिद्ध होते.

मनोहर ओक यांनी आयुष्यात कधीही तडजोडी केल्या नाहीत. बंधने मानली नाहीत. नातीगोती, घरसंसार अशा कसल्याही बंधनात स्वत:ला गुरफटून घेतले नाही. कवितेतच जगणे थाटणाऱ्या या कलंदर कवीने प्रस्थापित कवितेचा चेहरामोहराही बुद्धिपुरस्सर टाळला आणि आपल्याच अटींवर कविता लिहिल्या.

मुंबई महानगरीत जगण्याचा सर्वस्पर्शी अनुभव मनोहर ओकांच्या साहित्यातून व्यक्त होतो. त्यांनी समकालीन वास्तवाचा वेध आधुनिक संवेदनशीलतेने घेतला आहे. एकाकीपण, नैराश्य, उदासीनता, आयुष्याची निरर्थकता ही त्यांच्या कवितेची मुख्य आशयसूत्रे असून कवितेची शैली अनियंत्रित वाटली, तरी तिचा आशय धारदारपणे संक्रमित करणारी आहे. प्रतिमासृष्टीही समृद्ध आहे.

‘आयत्या कविता’ हा काव्यसंग्रह ‘अंतर्वेधी’ (१९७९) आणि ‘चरसी’ या दोन कादंबऱ्या प्रकाशित झाल्या आहेत. त्यांच्या मृत्यूनंतर ‘मनोहर ओकच्या ऐंशी कविता’ (१९९६) या संग्रहाचे संपादन चंद्रकांत पाटील आणि तुलसी परब यांनी केले आहे. हा संग्रह त्यांच्या अप्रकाशित कवितांपैकी काही निवडक कवितांचा आहे.

– प्रा. मंगला गोखले

## ओक, वामन दाजी

**कवी, इतिहास संशोधक**

**१८४५ – १३ जून १८९७**

वामन दाजी ओक यांचा जन्म हेदवी येथे झाला. प्राचीन मराठी काव्याचे व्यासंगी अभ्यासक व संशोधक होते. १८७० साली रत्नागिरी हायस्कूलमधून मॅट्रिकला ‘जगन्नाथ शंकरशेट शिष्यवृत्ती’ प्रथम संपादन करण्याचा



मान त्यांनी मिळवला. मुंबईच्या प्रख्यात विल्सन महाविद्यालयात उच्च शिक्षणासाठी ते गेले, परंतु आर्थिक बाबीमुळे पदवीपर्यंत पोचू शकले नाहीत. पुढे त्यांना शिक्षकाची नोकरी करण्यासाठी मध्य प्रांतात वऱ्हाड येथे जावे लागले. नागपूरच्या नॉर्मल स्कूलचे ते सुपरिटेन्डेन्ट होते. अखेरच्या काळात रायपूरच्या शाळेत ते मुख्याध्यापक पदावर होते.

इंग्रजी, मराठी, संस्कृत या तीनही भाषांतील साहित्याचे त्यांनी चौफेर वाचन केले. नागपूरचे त्यांचे स्नेही व समानधर्मी श्री. हरी माधव पंडित हे १८७५–७६ मध्ये ‘विविधज्ञानविस्तार’चे संपादक झाल्यामुळे ओकांचा लेखक या नात्याने संबंध आला. मोरोपंतांच्या काव्याविषयी निबंधमालाकार विष्णुशास्त्र्यांशी त्यांची जी चर्चा झाली, त्यावरून मराठी काव्याचे त्यांचे सूक्ष्म व साक्षेपी अध्ययन प्रकट झाले. ‘‘त्यांच्या अध्ययनाचे पद्धतशीर व तौलनिक स्वरूप होते. ही अध्ययन पद्धती ओकांनी काव्यसंग्रहाच्याद्वारे अखिल महाराष्ट्रास शिकवली.’’ असे नी. ब. भवाळकर म्हणतात.

‘काव्यसंग्रह’ मासिकात त्यांनी मुक्तेश्वर, वामन पंडित, मोरोपंत, अनंत, वगैरे अनेक प्राचीन मराठी कवींची कविता चिकित्सकपणे संपादिली. अर्वाचीन मराठी कवितेतील उत्तम वेच्यांचा संग्रह ‘काव्यमाधुर्य’ (१८८४) मध्ये प्रसिद्ध केला. ‘काव्येतिहासिक संग्रह’मध्ये नागपूरकर भोसल्यांची बखर आणि इतर कागदपत्र प्रसिद्ध केले. उच्च प्रतीच्या वाङ्मविषयक लेखांच्या प्रकाशनाबाबत विविधज्ञानविस्ताराने जो लौकिक मिळविला तो मिळवून देण्याच्या श्रेयाचे एक वाटेकरी वामनरावजी आहेत. जानेवारी १८९० पासून सुरू झालेल्या ‘काव्यसंग्रह’ मासिकाचे संपादक जनार्दन बाळाजी मोडक काही महिन्यांतच निवर्तले. त्यामुळे निर्णयसागर छापखान्याच्या मालकांनी मासिकाची जबाबदारी ओक यांच्यावर निश्चिंतपणे सोपविली. ओकांनी सात वर्षे संपादनकार्य करून १८९१ पासून त्यांनी आनंदतनय, अमृतराय, मुक्तेश्वर, अनंत, वामन पंडित, मोरोपंत, विठ्ठल, देवनाथ महाराज व अनेक कविकृत कविता साहित्यशास्त्रविषयक व अवांतर माहितीच्या टिपा देऊन संपादित केली. त्यांनी प्राचीन मराठी कवितेचे मौल्यवान भांडार सहज उपलब्ध करून दिले. वामनराव स्वत: कवी व इतिहास संशोधकही होते.

सार्वजनिक काका (गणेश वासुदेव जोशी) यांच्यावर १८८० मध्ये ‘गणपति निधन विलाप’ व १८८३ मध्ये ‘मन्माधव नृपतिनिधन’ अशी दोन विलाप–काव्ये लिहिली. ‘काव्यरत्नावलि’ या काव्यविषयक मासिकाच्या परीक्षक मंडळात ओक होते.

१८८४ ते १८८९ या काळात त्यांनी ‘लॉर्ड बेकन’, ‘बाबा नानक’ ही चरित्रे, व कादंबरी–‘मुद्राराक्षस–वासवदत्ता: कथासार’ ही छोटी–छोटी पुस्तकेही प्रसिद्ध केली. ‘महाराष्ट्र ग्रंथोत्तेजन’ हा त्यांचा प्रदीर्घ लेख विविधज्ञानविस्तारच्या मार्च १८९८च्या अंकात प्रसिद्ध झाला. मराठी वाङ्मयाची त्यांची बहुविध सेवा ही मोलाची व चिरस्मरणीय आहे.

वामन दाजी ओकांच्याच हेदवी गावी त्यांच्यापूर्वी ५ वर्षे जन्मलेले विनायक कोंडदेव ओक आपल्या ‘बालबोध’ मासिकात वामनरावांचे कर्तृत्व पुढीलप्रमाणे शब्दबद्ध करतात–

‘वामनरावांपुढे मराठी भाषा अगदी हात जोडून उभी होती. मनातला कोणताहि अर्थ अगदी बरोबर रितीने व्यक्त करण्यास त्यांस मुळीच प्रयास पडत नसत. असें असून भाषा शुद्ध, सरळ, गोड, रसाळ आणि मोठी भारदस्त अशी असे. त्यातहि पुस्तकपरीक्षणाविषयी त्यांचा हातखंडा असे. पुस्तकांतील गुण आणि दोष हे दोन्ही समूह त्यांच्यासमोर जसे एकमेकांवर उड्या घेत असत आणि ते त्यावर चर्चा मोठ्या उदार बुद्धीने व नि:पक्षपातीपणे करीत असत.’

– वि. ग. जोशी

**संदर्भ :**

*१. खानोलकर, गं. दे.; 'मराठी वाङ्मयसेवक चरित्रकोश' खंड १; अथेना पब्लिशर्स, मुंबई; २००३.*

*२. देशपांडे अ. ना.; 'आधुनिक मराठी वाङ्मयाचा इतिहास' भाग पहिला.*

## ओक, विनायक कोंडदेव

**कवी, चरित्रकार, निबंधकार, बालवाङ्मयाचे जनक**

**२५ फेब्रुवारी १८४० – ९ ऑक्टोबर १९१४**



विनायक कोंडदेव ओक यांचे घराणे मूळ गुहागरचे (जिल्हा-रत्नागिरी), जन्म हेदवी येथे झाला. लहानपणीच आई-वडिलांचे निधन झाल्याने बालपण कष्टात गेले. शिक्षणाची आबाळ झाली. काहीतरी करून शिकण्याची जिद्द त्यांना स्वस्थ बसू देत नव्हती. इंग्रजी तीन इयत्तांपर्यंतचे शालेय शिक्षण घेतल्यानंतर त्यांनी इंग्रजीचे अध्ययन केले. पाश्चात्त्य विद्येने संस्कारित झालेल्या सुरुवातीच्या या पिढीत अनेक कर्तृत्ववान माणसे निर्माण झाली. त्यात वि. कों. ओक यांचे नाव घेतले जाते. ओक यांनी शिक्षक म्हणून सरकारी शिक्षण खात्यात नोकरीस प्रारंभ केला, आणि 'ॲडिशनल डेप्युटी एज्युकेशन इन्स्पेक्टर' या पदावरून ते निवृत्त झाले.

शिक्षण खात्यात काम करत असल्याने १८६१ ते १८९५या काळात शालेय क्रमिक पुस्तके व इतर बालपुस्तके मेजर कँडी यांच्या सूचनेनुसार लिहिली. त्यात 'हिंदुस्थान कथारस', 'हिंदुस्थानातील योद्ध्यांची थोरवी' अशी ऐतिहासिक पुस्तके तर 'महन्मणिमाला' हे चरित्र, 'मुलास उत्तम बक्षीस', 'मुलांचे कल्याण', 'मुलास थोडासा बोध', 'इसापनीती' इत्यादी शैक्षणिकदृष्ट्या जवळ-जवळ ५० पुस्तके त्यांनी लिहिली. ही पुस्तके लिहिताना मुलांना बोध, करमणूक व वाचनाची आवड निर्माण व्हावी यासाठी मुलांच्या प्रवृत्तीकडे, त्यांच्या ग्रहणक्षमतेकडे आवर्जून लक्ष दिले. भाषांतरित पुस्तकेही त्यांनी लिहिली.

१८६६ मध्ये प्रकाशित झालेले 'लघुनिबंधमाला' हे त्यांचे इंग्रजी निबंधांवर आधारित असलेले पहिले पुस्तक होय. १८५१ मध्ये 'दक्षिणा प्राइझ कमिटी'ची स्थापना झाली होती. कमिटीच्या प्रोत्साहनाने ग्रंथलेखन, मुद्रणप्रसार ह्यांना गती आली आणि मराठी भाषेत अनेक उपयुक्त ग्रंथांची भर पडत गेली. इंग्रजीतील उत्कृष्ट ग्रंथांची भाषांतरे करवून घ्यावयाची आणि भाषांतरकारांना योग्य बक्षीस द्यायचे, ही कमिटीची कल्पना होती. त्यातूनच 'लघुनिबंधमाला' या पुस्तकासही बक्षीस मिळाले. इतिहास विषयावरही त्यांनी अनेक पुस्तके लिहिली. त्यांतील उल्लेखनीय पुस्तके म्हणजे जगातील प्रसिद्ध राष्ट्रांचा इतिहास सांगणारे 'इतिहासतरंगिणी' (१९७८). 'हिंदुस्थानचा संक्षिप्त इतिहास' (१८७०), 'फ्रान्स देशातील राज्यक्रांतीचा इतिहास' (१८७६), याशिवाय काही थोर पुरुषांची चरित्रे त्यांनी लिहिली. 'पीटर दी ग्रेट' (१८७४), 'शिकंदर बादशहा' (१८७५), 'ड्यूक ऑफ वेलिंग्टन' (१८७६), 'आल्फ्रेड दी ग्रेट' (१८८२), 'अब्राहम लिंकन' (१८९०), 'ग्लॅडस्टन' (१९०३), 'डॉ. जॉन्सन' इत्यादींची चरित्रे त्यांनी लिहिली.

**श्रेष्ठ दर्जाचे चरित्रकार**

''१८७५ ते १८८५ या कालखंडातील 'डॉ. जॉन्सन' हे आधुनिक मराठीतील पहिले खरेखुरे चरित्र आहे'', असे श्री. बनहट्टी यांनी म्हटले आहे. (संदर्भ- अर्वाचीन म. वा. इतिहास भाग १- १८७४ ते १९२०- अ. ना. देशपांडे) वि. कों. ओक हे एक श्रेष्ठ दर्जाचे चरित्रकार असल्याचे त्यांनी त्यात म्हटले आहे. पाश्चात्त्य थोर नामवंत पुरुषांच्या चरित्राप्रमाणे 'जावजी दादाजी चौधरी' (१८९२), 'रावराजे सर दिनकर राजवाडे' (१८९७) यांचीही चरित्रे त्यांनी लिहिली. या चरित्रांमध्ये काही भाषांतरित आहेत तर काही स्वतंत्रपणे आहेत. चरित्रलेखन

करताना 'नायकाचे गुण तेवढे दाखवावेत, दोषांविषयी बोलू नये' असे त्यांचे धोरण होते.

'शिरस्तेदार' (१८८१) या लहानशा स्वतंत्र कादंबरीत लाच खाण्यापासून होणाऱ्या दुष्परिणामांचे अत्यंत वेधक वर्णन केले आहे. ही सामाजिक कादंबरी त्या काळात लोकप्रिय झाली. इंग्रजी कथेवर आधारित 'आनंदराव'चे लेखन त्यांनी केले. हे त्यांचे ललितलेखन! 'पुष्पवाटिका' नावाचा वेचक दहा कवितांचा संग्रह (१८७१) त्यांनी पुस्तक स्वरूपात प्रसिद्ध केला. त्यातील कविता काही संस्कृत तर काही इंग्रजी कवितांच्या आधारावर लिहिलेल्या आहेत. 'रामशास्त्र्याची निःस्पृहता' तसेच 'प्रेमबंधन' या ओकांच्या स्वतंत्रपणे लिहिलेल्या उल्लेखनीय कविता होत. 'मधुमक्षिका' हा त्यांचा काव्यसंग्रहही प्रसिद्ध आहे. ओक हे मोरोपंतांच्या कवितेचे भोक्ते होते.

ओक यांची भाषा साधी, सरळ, सोपी होती. त्यांच्या लेखनगुणांमुळे मुंबईच्या 'ख्रिश्चन लिटरेचर सोसायटी'ने त्यांच्याकडून मुलांसाठी डझनभर पुस्तके लिहवून घेतली होती. ख्रिस्ती धर्मप्रचार हाच या पुस्तकांचा हेतू होता. राजनिष्ठेपोटी ओक यांनी हे कार्य केले. त्यांच्या नावावर ४८ पुस्तकांची नोंद आढळते. 'कारंजे आणि ढग', 'लांडग्याची गोष्ट', 'राणीची गोष्ट' यांसारखी सातपासून सोळा पृष्ठांपर्यंतच्या दहा-अकरा चोपड्याही आहेत. ती सर्व मेथॉडिस्ट ख्रिस्ती लिटररी सोसायटीने प्रसिद्ध केली आहेत.

**बालवाङ्मयाचे जनक**

ओक यांनी त्यांच्या साहित्यविषयक कारकिर्दीत 'बालबोध' हे पहिले खरेखुरे मराठी वळणाचे मासिक (१८८१) सुरू केले आणि बालसाहित्यात नवे दालन खुले झाले. मुलांसाठी असलेल्या या मासिकात 'संपादकीया'मध्ये ते मुलांना उद्देशून म्हणतात– 'शाळेत कळत नाहीत पण तुम्हांस कळल्या तर पाहिजेत अशा लक्षावधी गोष्टी आहेत. त्यांतल्या थोड्या-थोड्या आम्ही दर खेपेस तुम्हांला अगदी तुमच्या साध्या भाषेत सांगू; तुमच्या मनाला करमणूक व्हावी, तुमच्या अंगचे सद्गुण वाढावेत यासाठी हा आमचा प्रयत्न आहे.' असा प्रयत्न ओकांनी मासिकाच्या माध्यमातून पुढे सलग चौतीस वर्षे नेटाने केला. लहान मुलांप्रमाणे मोठ्यांनाही त्यांनी वाचक बनवले. 'बालबोध'मधील लेखन एकट्या ओकांनीच केले. एवढ्या मोठ्या प्रमाणावर उद्बोधक, रंजक वाटेल असे नानाविध स्वरूपाचे लेखन आधुनिक मराठीत ओक यांनीच प्रथम केले. मासिकाची वर्गणी बारा आणे ठेवून वर्गणीदार वाढवले व मासिक खेडोपाडी पोचवले. आपल्या संपादकीय कारकिर्दीत ओकांनी 'बालबोध'मधून ४०२ चरित्रे, ४०२ कविता, ४०२ निबंध, ३७१ शास्त्रीय निबंधांवरील माहिती व इतर ८५० विषय एवढे प्रचंड लेखन केले. म्हणूनच त्यांना 'बालवाङ्मयाचे जनक' असे म्हटले आहे.

– डॉ. रजनी अपसिंगेकर

* * *

# क



## कणेकर, शिरीष
**विनोदकार**
**६ जून १९४३**



क्रिकेट व हिंदी चित्रपट या विषयांवर अधिकाराने, माहितीपूर्ण परंतु रंजनाच्या वळणाने लिहिण्याची शैली असलेले शिरीष कणेकर हे एक लोकप्रिय लेखक आहेत.

त्यांचा जन्म ६ जून १९४३ रोजी झाला. बी.ए., एल.एल.बी. या पदव्या संपादन केल्यावर त्यांनी इंडियन एक्सप्रेस, डेली फ्री प्रेस जर्नल, लोकसत्ता, महाराष्ट्र टाइम्स या वृत्तपत्रांतून सातत्याने लेखन केले.

विनोदी, रंजक, खिल्ली उडवणारे म्हणून लोकप्रिय होणारे लेखन करण्यात ते पटाईत आहेत. चित्रपट विषयावर त्यांनी लिहिलेली 'माझी फिल्लमबाजी' (१९८२), 'सिनेमा डॉट कॉम', 'नट बोल्ट बोलपट', 'यादों की बारात' (१९८५), 'पुन्हा यादों की बारात', 'गाये चला जा' ही पुस्तके गाजली. क्रिकेट विषयावर टोलेबाजी करणारी 'फटकेबाजी', 'क्रिकेटवेध' (१९८३) ही पुस्तके सर्व वयांतील वाचकांची वाहवा मिळवून गेली.

'मेतकूट', 'चहाटळकी', 'चापटपोळी', 'खटलं आणि खटला', 'मखलाशी', 'नानकटाई', 'मनमुराद', 'डॉ. कणेकरांचा मुलगा', 'लगाव बत्ती', 'गोली मार भेजे मे', 'गोतावळा', 'डॉलरच्या देशा', 'इरसालकी', 'साखरफुटाणे', 'सूरपारंब्या', 'कणेकरी', 'वेचक शिरीष कणेकर', 'एकला बोला रे', 'चापलुसकी', 'ते साठ दिवस', 'रहस्यवल्ली', 'शिरिषासन', 'पुन्हा शिरिषासन', 'कणेकरायन' या त्यांच्या पुस्तकांतून त्यांनी नर्म विनोदी जीवनदर्शन घडविले आहे. आपल्याशी ते गप्पा मारताहेत, अशी त्यांची भाषाशैली आहे.

क्रिकेट हे शिरीष कणेकरांचे पहिले प्रेम आहे. आजही ते तेवढ्याच तीव्रतेने टिकून आहे. वाचनीयता, निर्भीडपणा, प्रांजलपणा, प्रसन्नता, नर्म विनोद, सूक्ष्म निरीक्षण व विषयाचे प्रेम ही त्यांच्या ओघवत्या 'कणेकरी' शैलीची वैशिष्ट्ये होत. व्यक्तिचित्रे रेखाटणे ही त्यांची खासियत. 'एकला बोलो रे' हा त्यांचा 'स्टँडिंग टॉक शो' स्वरूपाचा कार्यक्रम अतिशय लोकप्रिय झाला.

भेटलेल्या इरसाल व्यक्तींबद्दल ते म्हणतात– 'देवानं नामी नग जन्माला घातलेत. मला त्यांचा आणि त्यांना माझा सहवास घडवून देवानं आमच्यावर अनंत उपकार केलेत. आम्ही सगळे मिळून जगात धुमाकूळ घालीत असू. देवाच्या सर्कशीतले आम्ही विदूषक आहोत. आम्ही हसवतो. आम्हांला हसतात. आम्ही अश्रूंना पापण्यांवर रोखून धरतो. घुसखोरी करू देत नाही. आम्हांला इरसाल म्हणा, वाह्यात म्हणा, नग म्हणा... आयुष्याचं ओझं वाहण्यासाठी असे साथीदार हवेत.' त्यांच्या या शब्दांतून कणेकरी वृत्ती प्रतीत होते.

– श्याम भुर्के

**संदर्भ :**

*१. कणेकर, शिरीष; 'कणेकरी'.*
*२. कणेकर, शिरीष; 'वेचक शिरीष कणेकर'.*
*३. कणेकर, शिरीष; 'शिरिषासन'.*

## कदम, बाबा

*कदम, वीरसेन आनंदराव*

**कादंबरीकार**

**४ मे १९२९ – २१ ऑक्टोबर २००९**



बाबा कदम यांचा जन्म अक्कलकोट येथे झाला. १९५२ मध्ये बी.ए झाले आणि १९५४ मध्ये पुणे विद्यापीठातून एलएल.बी. झाले.

१९५४ ते १९५८ या ४ वर्षांत फौजदारी कोर्टात वकिली केली. १९५९ पासून पोलीस प्रॉसिक्यूटर म्हणून ३१ वर्षे नोकरी केली.

वकिलीच्या व नोकरीच्या निमित्ताने आलेल्या अनुभवांतून ९१ कादंबऱ्या (सर्व सत्य घटनांवर आधारित) लिहिल्या आहेत. बहुतेक सर्व कादंबऱ्यांच्या अनेक आवृत्त्या निघाल्या असून वाचकांचा उदंड प्रतिसादही कादंबऱ्यांना लाभला आहे. शास्त्रीय संगीत ऐकणे, शिकार करणे आणि चित्रकला हे त्यांचे छंद असून त्यांनी सुमारे ८०० उत्तम चित्रे केलेली आहेत.

काही गाजलेल्या कादंबऱ्यांत – 'डोंगरची मैना', 'चौफेर', 'कॉकटेल सर्किट', 'सभा', 'बलिदान', 'स्टार विटनेस', 'जोहार', 'इस्टेट मॅनेजर', 'नजर कैद', 'निराधार', 'मानस कन्या', 'परमानंद', 'एक होती बेगम', 'बॉम्बे पोलीस', 'वाळवंटातील फूल', 'निष्पाप बळी', 'आमराई', 'मिनिस्टर', 'राजलक्ष्मी', 'बिनधास्त', 'निष्कलंक', 'ज्वालामुखी' इत्यादींचा उल्लेख करावा लागेल. वाचकांचे रंजन करणे हे प्रमुख उद्दिष्ट डोळ्यांसमोर ठेवून त्यांना गुन्हेगारी जगाचे जवळून दर्शन घडवले. वेगवान कथानक, वाचकांना खिळवून ठेवणारी शैली यांमुळे त्यांच्या कादंबऱ्या अत्यंत लोकप्रिय झाल्या.

आठ मराठी चित्रपटांचे पटकथा व संवादलेखन त्यांनी केले. 'भालू', 'जोतिबाचा नवस', 'दगा', 'पाच नाजूक बोटं', 'देवाशपथ खरं सांगेन', 'प्रलय', 'उनाड मैना', 'सभा' हे चित्रपट त्यांच्या कादंबऱ्यांवर आधारित आहेत. या व्यतिरिक्त 'बूमरँग' या कादंबरीवरून 'कलंदर' हे नाटक त्यांनी लिहिले. तेविसावा महाराष्ट्र राज्य मराठी चित्रपट महोत्सव १९८५-१९८६ मध्ये 'देवाशपथ खरं सांगेन' या चित्रपटासाठी उत्कृष्ट कथेचे पारितोषिक त्यांना प्राप्त झाले.

करवीर भूषण पुरस्कार २०००, करवीर जीवन गौरव पुरस्कार २००३, पुण्याच्या पुलोत्सवात चित्रकर्मी पुरस्कार २००८, कोल्हापूरचा मृत्युंजय पुरस्कार २००५ हे त्यांना मिळालेले प्रमुख पुरस्कार होत. औरंगाबाद येथील साहित्य संमेलनातील प्रकट मुलाखतीला श्रोत्यांकडून त्यांना मनःपूर्वक प्रतिसाद मिळाला. या बहुप्रसव कादंबरीकाराला वाचकांचे उदंड प्रेम लाभले, तरी समीक्षकांनी त्यांच्या साहित्याची फारशी दखल घेतली नाही.

– शशिकला उपाध्ये

**संदर्भ –**

१. *कदम बाबा; 'मी कादंबरीकार कसा झालो'; साहित्य सूची, दिवाळी अंक १९९७.*

२. *कोनकर, शशिकांत; बाबा कदमांच्या सहवासातील सायंकाळ; स्नेहप्रभा, एप्रिल १९८४.*

## करंदीकर, गोविंद विनायक

☞ **विंदा करंदीकर**

## करन्दीकर, विनायक रामचंद्र

**संतवाङ्मय अभ्यासक**

**२७ ऑगस्ट १९१९**

विनायक करंदीकर यांचा जन्म कोल्हापूर येथे झाला. मिरज येथील १९३५ मध्ये ते मॅट्रिक झाले. विलिंग्डन महाविद्यालयातून १९४७ साली मराठी हा विषय घेऊन मुंबई विद्यापीठाची बी. ए. ची परीक्षा ते प्रथम वर्गात उत्तीर्ण झाले. १९५० साली मराठी व संस्कृत या विषयांत पहिल्या वर्गात प्रथम क्रमांक व सर्व पारितोषिके मिळवून पुणे विद्यापीठाची एम. ए. ही पदवी त्यांनी



संपादन केली. वामन पंडितांच्या ‘यथार्थदीपिका’ या ग्रंथाचा एक गीताभाष्य या दृष्टीने चिकित्सक अभ्यास करून १९५७ साली पुणे विद्यापीठाची पीएच.डी. ही पदवी त्यांनी मिळवली. विलिंग्डन महाविद्यालय, सांगली व फर्गसन महाविद्यालय, पुणे येथे मराठीचे प्राध्यापक व विभागप्रमुख म्हणून त्यांनी काम पाहिले. डेक्कन एज्युकेशन सोसायटीचे आजीव सदस्य या नात्याने सोसायटीचे सचिव म्हणून काम करताना त्यांनी आपल्या कार्यक्षमतेचा व निःपक्षपाती कार्यपद्धतीचा ठसा उमटविला. महाराष्ट्र राज्य साहित्य संस्कृती मंडळाच्या वतीने सिद्ध व्हावयाच्या मराठी शब्दकोशाचे प्रमुख संपादक या पदावर ते चार वर्षे कार्यरत होते. १९८८ मध्ये पुणे विद्यापीठात स्थापन झालेल्या ज्ञानदेव अध्यासनाचे प्राध्यापक म्हणून त्यांना निमंत्रित करण्यात आले. सुमारे साडेतीन वर्षे त्यांनी ते काम केले.

**तत्त्वज्ञानी करन्दीकर**

‘वामन पंडितांची यथार्थदीपिका’ (१९६३), ‘भगवद्‍गीतेचे तीन टीकाकार’ (१९७४), ‘ग्रंथवेध’ (१९७८), ‘रामकृष्ण संघः एक शतकाची वाटचाल’ (१९८९), ‘ज्ञानेश्वरीदर्शन’ (१९९२), ‘वेध ऋणानुबंधांचा’ (१९९३), ‘ज्ञानदेवांचा गीतासंवाद’ (१९९४), ‘ज्ञानदेव : विवेकानंद’ (१९९६), ‘तीन सरसंघचालक’ (१९९९), ‘विश्वमानव स्वामी विवेकानंद खण्ड एक ते तीन’ (२००१), ‘रामकृष्णविवेकानंद आणि गुरुबंधू’ (२००२), ‘ख्रिस्त, बुद्ध आणि श्रीकृष्ण’ (२००८), हे करन्दीकर यांचे ग्रंथलेखन आहे. ‘समर्थ रामदास विवेकदर्शन’ हे रामदासांच्या निवडक साहित्याचे साहित्य अकादेमीसाठी त्यांनी संपादन केले. यांखेरीज आकाशवाणीवरुन ज्ञानेश्वर, एकनाथ व रामदास यांच्या साहित्यातील निवडक वेचांचे विवरण करणारे भाष्य त्यांनी अन्यांच्या सहकार्याने सिद्ध केले. त्यामधून ‘एक तरी ओवी ज्ञानेशांची’ (हे. वि. इनामदार यांच्या सहकार्याने १९९२), ‘साक्षेप समर्थांचा’ (कल्याणी नामजोशी यांच्या सहकार्याने १९९४), ‘एका जनार्दनी’ (कल्याणी नामजोशी यांच्या सहकार्याने १९९७) अशी तीन पुस्तके तयार झाली. त्यांच्या ‘रामकृष्ण आणि विवेकानंद’, ‘रामकृष्ण संघ : एक शतकाची वाटचाल’ व ‘तीन सरसंघचालक’ या ग्रंथांची इंग्रजीत भाषांतरे अनुक्रमे म. द. हातकणंगलेकर (१९९१), पी. एस. सबनीस (२००३) यांनी केली आणि ‘समर्थ रामदास’ या पुस्तकाचे कन्नडमध्ये भाषांतर झाले आहे. दे. द. वाडेकर संपादित ‘मराठी तत्त्वज्ञानकोश’, रा. श्री. जोग संपादित ‘मराठी वाङमयाचा इतिहास, खंड ३’ आणि ‘मराठी विश्वकोश’ या ग्रंथात करन्दीकरांनी मराठी वाङमय, तत्त्वज्ञान आणि भाष्यग्रंथ यांवर विस्तृत स्वरुपाचे लेख लिहिले आहेत. त्यांचे ‘विदेशसंचार आणि मुक्त चिंतन’ (१९९८) हे प्रवासवर्ण इंग्लंड व अमेरिका या देशांत घडलेल्या प्रवासावर आधारित आहे. ‘कुणा यात्रिकाचा जीवनसंवाद’ (२००३) हे करन्दीकरांचे साडेसहाशे पृष्ठांचे आत्मचरित्र त्यांच्या आयुष्यातील बहुतेक सर्व महत्त्वाच्या प्रसंगांची हकीगत विस्ताराने नोंदवते. ही नोंद करन्दीकरांचा स्वतःकडे व त्यांच्या आयुष्यात आलेल्या संबंधित इतरेजनांकडे पाहाण्याच्या दृष्टिकोण प्रतिबिंबीत करते.

**संतसाहित्याचे अभ्यासक**

गीताभाष्ये, संत साहित्य, रामकृष्ण - विवेकानंद आणि भारतीय तत्त्वज्ञान व संस्कृती हे चार प्रमुख विषय करन्दीकरांच्या उपर्युक्त लेखनाच्या केंद्रस्थानी आहेत. ‘वामन पंडितांची यथार्थदीपिका’ या ग्रंथात वामनांनी गीतेचा यथार्थ स्पष्ट करण्याच्या भूमिकेतून कर्म, ज्ञान, योग आणि भक्ती या उपविषयांचे जे विवरण केले आहे त्याची साद्यन्त चर्चा करन्दीकरांनी केली आहे. वामनांनी लावलेल्या गीतेच्या भक्तिपर अर्थाचे विश्लेषण व मूल्यमापन करन्दीकर करतात. ‘गीतेचे तीन टीकाकार’ या ग्रंथात ज्ञानेश्वर, वामन पंडित व लोकमान्य टिळक या तिघांच्या गीताभाष्यांचा तौलनिक अभ्यास त्यांनी सविस्तरपणे मांडला आहे. करन्दीकरांनी केलेल्या

ज्ञानेश्वरविषयक लेखनात 'ज्ञानेश्वरी' व 'अमृतानुभव' या दोन ग्रंथांचा चिकित्सक अभ्यास त्यांनी मांडला आहे. ज्ञान, कर्म, भक्ती, योग, सगुणनिर्गुण, क्षराक्षर, उत्तम पुरुष या सर्वांची संगती ज्ञानेश्वरांनी कशा प्रकारे लावली आहे, सांख्य – योग – वेदान्त ही दर्शने आणि भगवद्‌गीता यांच्या संदर्भात ज्ञानेश्वरांचे तत्त्वज्ञान व त्यांचे वेगळेपण कशा प्रकारे समजावून घेता येते ते करन्दीकरांनी सविस्तर स्पष्ट केले आहे. 'ज्ञानेश्वरी' हा विशाल सामाजिक पातळीवरून केलेला श्रोतृसंवाद, 'चांगदेवपासष्टी' हा व्यक्तिगत पातळीवरून साधलेला मित्रसंवाद, तर 'अनुभवामृत' हा ज्ञानदेवांचा आत्मसंवाद अशी करन्दीकरांची या कृतींकडे पाहाण्याची दृष्टी आहे. जनकल्याणाच्या भावनेने सर्वसामान्यांनाही समजावे अशा स्वरुपात ज्ञानेश्वरांनी गीतेतील तत्त्वज्ञान ज्ञानेश्वरीत विशद केले आहे, ज्ञानेश्वरीच्या तुलनेने 'अमृतानुभवा' चे स्वरूप मात्र वेगळे आहे हे करन्दीकरांनी आपल्या ग्रंथात सप्रमाण मांडले आहे. अमृतानुभवाचे आकलन वाचकांना यथामूल व्हावे, असा करन्दीकरांचा प्रयत्न आहे.

या विश्वात ओतप्रोत भरून राहिलेले जे एकले एक स्वप्रकाश, स्वसंवेद्य असे वस्तुतत्त्व आहे, जेथे दुजेपणाची कोणतीच कल्पना टिकू शकत नाही, सत्, चित् वा आनंद ही लक्षणे जेथे पोचू शकत नाहीत, अज्ञान आणि ज्ञान या दोहोंच्या अतीत निखळ ज्ञानमात्र व केवळ असणेपणाने युक्त आहे अशा आत्मतत्त्वाचा ज्ञानदेवांना आलेला प्रत्यय 'अमृतानुभवा'मधून ज्ञानेश्वरांनी सलगपणे उलगडून दाखविला आहे, असा 'अमृतानुभवा'चा करन्दीकरकृत अन्वयार्थ आहे. अन्य संतांपेक्षा रामदासांच्या साहित्याचे व कार्याचे वेगळेपण यथार्थपणे व्यक्त करणारे नॅशनल बुक ट्रस्टसाठी लिहिलेले 'रामदासचरित्र', विवेकसंबद्ध विचारांना केंद्रवर्ती ठेवून रामदासांच्या निवडक वेच्यांचे केलेले संपादन व समर्थांच्या साक्षेपी व्यक्तिमत्त्वाचा परिचय करून देणारी 'आकाशभाषित' ही करन्दीकरांची निर्मिती त्यांच्या संत साहित्याच्या सूक्ष्म अभ्यासातून घडली आहे.

**व्याख्यानातून ग्रंथनिर्मिती**

करन्दीकरांचा 'सांस्कृतिक संचित' हा ग्रंथ महाराष्ट्राची धार्मिक परंपरा, मराठी संत मंडळाचे कार्य, मराठीतील तत्त्वविचार जोपासणारे वाङमय, मराठी समाजाचे एकंदर विचारविश्व आणि जीवनविषयक दृष्टिकोण, भारतीयांची नीतिकल्पना आणि जीवनादर्श यांचा सविस्तर व मर्मग्राही ऊहापोह करीत असतानाच पारंपरिक अध्यात्मविचार आणि आधुनिक वैज्ञानिक दृष्टिकोण यांची तौलनिक मीमांसा करणारा आहे. 'रामकृष्ण आणि विवेकानंद' हा त्यांचा ग्रंथ ख्यातनाम गुरुशिष्यांच्या व्यक्तिमत्त्वाचा आाणि कार्याचा साधार परिचय करून देणारा आहे. विवेकानंदांचे त्रिखंडात्मक चरित्र सिद्ध करण्यापूर्वी करन्दीकरांनी विवेकानंदांसंबंधीचे सर्व महत्त्वाचे साहित्य अभ्यासले, विवेकानंद ज्या ज्या ठिकाणी गेले ती सर्व स्थाने पाहिली, आणि चरित्राला प्रामाण्य लभेल याकडे लक्ष पुरविले. रामकृष्णसंघ व संस्थेसंबंधी लिहिलेल्या ग्रंथात करन्दीकरांनी 'रामकृष्ण मिशन'च्या स्थापनेपासून शंभर वर्षांत संपूर्ण जगभर मिशनने जे कार्य केले त्याचा इतिहास आणि त्या कार्याचे मर्म तपशीलवारपणे स्पष्ट केले आहे. करन्दीकर प्रभावी वक्ते म्हणून सर्व महाराष्ट्रभर प्रसिद्ध आहेत. करन्दीकरांचे अनेक महत्त्वाचे ग्रंथ हे त्यांनी संबंधित विषयावर दिलेल्या व्याख्यानातून निर्माण झाले आहेत. एक नामवंत वक्ता आणि व्यासंगी लेखक अशी त्यांची प्रतिमा आहे.

समीक्षक या नात्याने 'ग्रंथवेध' आणि 'ग्रंथशोध' या दोन पुस्तकांत त्यांनी केलेली विस्तृत परीक्षणे आली आहेत. ही परीक्षणे त्यांच्या साहित्यविषयक आकलनाची, निर्भीड प्रतिपादनाची व समतोल मूल्यमापनशक्तीची द्योतक म्हणता येतील. यांपैकी काही परीक्षणलेखांतून न. र. फाटक, रा. चिं. ढेरे, म. वा. धोंड यांसारख्या नामवंत अभ्यासकांच्या विचारांचा परखड परामर्श त्यांनी घेतला आहे आणि तटस्थ अवलोकनातून हाती येणाऱ्या निष्कर्षांची सुसंगत व समतोल मांडणी त्यांनी केली आहे. 'राष्ट्रीय स्वयंसेवक संघ' हे करन्दीकरांच्या आयुष्यातील महत्त्वाचे कार्यक्षेत्र होय. अगदी तरूण वयापासून ते

जवळपास पंचाहत्तरीपर्यंत करन्दीकर संघाशी संबंधित होते. संघाचे प्रचारक म्हणूनही त्यांनी काम केले आहे. त्यामुळेच 'तीन सरसंघचालक' हा डॉ. हेडगेवार, गोळवलकर गुरुजी आणि बाळासाहेब देवरस यांच्या कार्याचे समालोचन करणारा त्यांचा ग्रंथ महत्त्वपूर्ण आहे. करन्दीकरांच्या ग्रंथांना महाराष्ट्र शासनाची आठ पारितोषिके मिळाली आहेत परंतु त्याहीपेक्षा महत्त्वाचे असे अखिल भारतीय दोन सन्मान त्यांना लाभले आहेत. त्यांपैकी एक 'श्रीगुरुजी पुरस्कार' आणि दुसरा रामकृष्ण मिशनच्या वतीने दिला जाणारा 'विवेकानंद पुरस्कार' होय.

येशू ख्रिस्त, गौतम बुद्ध आणि भगवान श्रीकृष्ण या तीन विभूतींच्या व्यक्तिमत्त्वाचा व कार्याचा परिचय परस्परांच्या प्रकाशात करून देणारा 'ख्रिस्त, बुद्ध आणि श्रीकृष्ण' हा त्यांचा शेवटचा ग्रंथ त्यांच्या जिज्ञासू वृत्तीचे व प्रासादिक लेखनशैलीचे नमुनेदार दर्शन घडविणारा म्हणता येईल. या ग्रंथानंतर वयाच्या नव्वदाव्या वर्षी त्यांनी आपले लेखन थांबवले आहे. कोणतेही लेखन विस्ताराने करावे हा त्यांचा लेखनस्वभाव आहे त्यामुळेच त्यांच्या आजवरच्या साहित्यनिर्मितीची पृष्ठसंख्या साडेनऊ हजारांच्या आसपास पोचली आहे.

– डॉ. विलास खोले

**संदर्भ :**

१. *खोले विलास; 'वि.रा.करन्दीकर–सफल जीवन यात्रिक'; ललित दिवाळी; २००८.*

## कर्णिक, द्वारकानाथ भगवंत

☞ **मुख्य नोंद – पत्रकारिता आणि ललितेतर साहित्य खंड**

## कर्णिक, मधू मंगेश

**कथाकार, कादंबरीकार**

**२८ एप्रिल १९३३**

सिंधुदुर्ग जिल्ह्यातील करूळ (ता. कणकवली) या गावात जन्मलेल्या मधू मंगेश कर्णिक यांनी शाळकरी वयातच साहित्य निर्मिती सुरू केली.



१९५६ ते १९६६ या काळात कर्णिकांनी कारकून म्हणून एस.टी.मध्ये नोकरी केली. १९६६ ते १९६९ काळात राज्यसरकारचे प्रकाशन अधिकारी म्हणून गोव्यात होते. १९६९ ते १९७३ या काळात मुंबईतील सचिवालयात प्रसिद्धी संचालक व मुख्यमंत्र्यांचे जनसंपर्क अधिकारी म्हणून त्यांनी सेवा केली. १९८१ ते १९८३ या काळात ते महाराष्ट्र लघुउद्योग विकास महामंडळात महाव्यवस्थापक पद भूषवीत होते. १९८३मध्ये वयाच्या ५०व्या वर्षी त्यांनी पूर्ण वेळ लेखनासाठी स्वेच्छानिवृत्ती स्वीकारली. त्यानंतर लेखनाबरोबर मौलिक समाजकार्य केले.

लौकिक शिक्षण कमी असल्याने सुरुवातीला त्यांना एस.टी.त नोकरी करावी लागली. पण आपल्या जन्मदत्त प्रतिभेमुळे पुढे अनेक महत्त्वाची पदे त्यांनी भूषविली. वाङ्‌मयीन, सांस्कृतिक, औद्योगिक, विकासात्मक आणि प्रशासन या क्षेत्रांत त्यांचा चैतन्यशील सर्वसंचार अनेकांना प्रेरणादायी ठरला.

**वास्तवदर्शी कादंबरीकार**

मधू मंगेश कर्णिक उर्फ मधुभाई हे मुख्यतः कथाकार आणि कादंबरीकार म्हणून ओळखले जातात. १९५४ साली 'सत्यवादी'च्या दिवाळी अंकात त्यांची 'सुभद्रा' ही पहिली कथा प्रकाशित झाली. १९५८ साली मालवण येथे भरलेल्या अखिल भारतीय मराठी साहित्य संमेलनात त्यांचा पहिला कथासंग्रह 'कोंकणी ग वस्तीऽऽ' प्रकाशित झाला. त्यानंतर आजपर्यंतच्या काळात त्यांचे ३३ कथासंग्रह प्रकाशित झाले. १९६० नंतरच्या कालखंडातील मराठी लघुकथेच्या क्षेत्रामधील एक प्रमुख लोकप्रिय कथाकार म्हणून त्यांचे नाव आदराने घेतले जाते. विविध भारतीय भाषांमध्ये त्यांच्या कथांचे अनुवाद झालेले आहेत. 'तोरण' (१९६३) व 'तहान' (१९६६) या कथासंग्रहांना उत्कृष्ट साहित्याची पारितोषिके लाभली.

मधुभाईंची पहिली कादंबरी 'देवकी' १९६२ मध्ये प्रकाशित झाली. तिला 'मॅजेस्टिक पुरस्कार' लाभला. आजवरच्या १० कादंबऱ्यांमधून मानवी नातेसंबंधांतील गुंतागुंत, समाजजीवनातील दुःख, दैन्य, दारिद्र्य, नियतीचे अतर्क्य खेळ, राजकीय सत्तास्पर्धा, औद्योगिक आणि नोकरशाही जगातील निर्दयता आणि दंभ यांबरोबरच मानवी मनातील सात्त्विकता, सत्य आणि न्याय यांसाठी लढणारी माणसे कर्णिकांनी सहृदय अलिप्ततेने उलगडून दाखवली. 'माहीमची खाडी' (१९६९) या त्यांच्या कादंबरीला मराठी साहित्यातील 'मैलाचा दगड' मानले जाते. महानगरीय झोपडपट्ट्यांचे पहिल्यांदाच वास्तव चित्रण करणारी ही कादंबरी 'नॅशनल बुक ट्रस्ट'तर्फे अन्य भारतीय भाषांतून लाखो वाचकांपर्यंत पोहोचवली गेली. 'देवकी' (१९६२), 'सूर्यफूल', 'भाकरी आणि फूल', 'वारूळ' (१९८८), जुईली या कादंबऱ्यांवर दूरदर्शन मालिका झाल्या. 'संधिकाल' (२००१) ही त्यांची अलीकडील कादंबरी. १०० वर्षांच्या प्रदीर्घ कालपटावर तीन पिढ्यांचे बदलते जीवनचित्रण या कादंबरीत करताना मधू मंगेश कर्णिक यांची प्रतिभा पूर्ण विकसित झाल्याचे दिसते.

कथा-कादंबऱ्यांबरोबरच कर्णिक यांनी वेधक ललित लेखन केले आहे. आई, वडील, बहीण अशा जवळच्या नात्यांतील माणसांची 'लागेबांधे'मधील हृदयंगम व्यक्तिचित्रे वाचकांना आजही भूल घालतात. 'जिवाभावाचा गोवा'मधील ललित लेख म्हणजेच एखाद्या सिद्धहस्त चित्रकाराने जिवंत रंगांनी रेखाटलेली निसर्गचित्रे आणि पोर्ट्रेट्स आहेत. या पुस्तकाला अनंत काणेकर पुरस्कार लाभला. 'सोबत', 'अबीर गुलाल', 'माझा गाव माझा मुलूख', 'नारळपाणी' हे त्यांचे ललितलेख-संग्रहही वाचकप्रिय झाले.

**काव्यसंपदा**

'बालसन्मित्र'च्या १९४५च्या अंकात वयाच्या १२व्या वर्षी मधू मंगेश यांची पहिली कविता प्रसिद्ध झाली. 'जगन्नाथ आणि कंपनी' व 'शाळेबाहेरील सौंगडी' ही त्यांनी बालवाचकांना दिलेली खास भेट होय. कर्णिकांचे साहित्य शालेय स्तरावरील पाठ्यपुस्तकांपासून विश्वविद्यालयीन पुस्तकांपर्यंत अभ्यासाप्रीत्यर्थ लावण्यात आलेले आहे.

'देवकी' (मराठी नाटक), 'केला तुका...झाला माका' (मालवणी नाटक), 'घुंगरू' (हिंदी चित्रपट कथा) या विविध साहित्यप्रांतांमधून कर्णिकांनी मुशाफिरी केली. १९८९ मध्ये भरलेल्या 'जागतिक मराठी परिषदे'च्या विद्यमाने प्रसिद्ध झालेल्या, 'मराठी जगत' या वैशिष्ट्यपूर्ण ठरलेल्या ग्रंथाचे संपादन त्यांनी केले. इंग्रजी भाषेमध्ये 'आन्त्रप्रिनरशिप डेव्हलपमेन्ट' या ग्रंथाचे संपादनही त्यांनी केले आहे. कवी केशवसुतांपासून नामदेव ढसाळ यांच्यापर्यंत १०० वर्षांची मराठी कविता परंपरा अधोरेखित करणारा, मधू मंगेश कर्णिक यांनी संपादित केलेला 'आधुनिक मराठी काव्यसंपदा' हा काव्यग्रंथ अलीकडेच प्रकाशित झाला आहे.

मधू मंगेश कर्णिक यांच्या कविता 'मौज', 'साधना', 'दीपावली' आदी दर्जेदार दिवाळी अंकांमधून अधून-मधून वाचायला मिळत असत. पण 'कविता हे आपले खासगी शेत आहे' असे ते म्हणत असत. अखेर रसिकांच्या आग्रहावरून 'मॅजेस्टिक'तर्फे 'शब्दांनो, मागुते या' हा त्यांचा कवितासंग्रह प्रकाशित झाला. विलोभनीय निसर्गचित्रे, उत्कट शृंगाररंग, तरल प्रीतीचे मुग्ध लावण्य, गावाकडील माणसांची सुखदुःखे, मानवी जीवनातील श्रेयस आणि प्रेयस यांचा चिंतनपर शोध; अशा विविध स्तरांवर हा कवितासंग्रह लक्षणीय ठरला आहे. ही कविता पारंपरिक वळणाची असली, तरी तिच्यातील मुरलेला काव्यरस, रसिकांची तहान वाढवत नेतो.

मधू मंगेश कर्णिक यांनी 'साहित्य अकादमी', 'महाराष्ट्र राज्य साहित्य आणि संस्कृती मंडळ', 'महाराष्ट्र राज्य रंगभूमी परिनिरीक्षण मंडळ', 'नॅशनल बुक ट्रस्ट' आदी संस्थांचे सदस्य सल्लागार म्हणून काम पाहिले. शासनाच्या मराठी भाषा उच्चाधिकार समितीचे ते सदस्य होते. सध्या ते महाराष्ट्र राज्य साहित्य आणि संस्कृती मंडळाचे अध्यक्ष आहेत.

श्रावण..

श्रावण आला. श्रावण म्हणजे आषाढाची झड संपली. आकाशातील काळ्या ढगांच्या पखाली नाहीशा झाल्या. गडगडणारे आवाज बंद झाले. विजांचे चमकणे अंतर्धान पावले. आता ऊन्हे दिसू लागली. पावसाच्या रिमझिम धारांतून मंद [illegible] प्रकाशाच्या [illegible] लोभस ऊन्हे आणि पुन्हाही पडू लागली. वाऱ्याच्या थांबून राहिलेल्या हलक्या झुळुका आता लवलव करू लागल्या. सर्वत्र सुगंध दरवळू लागला; आणि पक्षी आपले भिजलेले पंख वाळवू लागले. निळ्या मोठ्या आभाळातून ते पूर्वीसारखे उडू लागले. पंख झटकून भिरभिर उडू लागले.

मुंबई-४०००५३
दि० १०, ८, १९९४

(मधू मंगेश कर्णिक)

मधू मंगेश कर्णिक यांनी आपल्या मिठ्ठास वाणीने विविध क्षेत्रांतील अनेक माणसे जोडून घेतली. संघटन आणि प्रशासन कौशल्याने शैक्षणिक, सामाजिक व सांस्कृतिक संस्थांची स्थापना केली. आपल्या जन्मगावी, करूळ येथे माध्यमिक विद्यालय काढले. अलीकडेच 'शुभदा कर्णिक ग्रंथालय आणि मुक्त वाचनालय' स्वतःची जमीन देऊन उघडले. 'बॅ.नाथ पै वनराई ट्रस्ट'ची स्थापना करूळ इथे करून हजारो झाडे लावली. या वनराईचे संवर्धन आणि जतन करण्यासाठी त्यांनी देणगीदारांसाठी, 'We will not print the advertisement, We will plant the advertisement' ही अभिनव घोषणा दिली.

कणकवली येथे 'कै. वसंतराव आचरेकर सांस्कृतिक प्रतिष्ठान'ची स्थापना करून कोकणातील नव्या रंगकर्मींना आणि संगीत कलावंतांना एक हक्काचे व्यासपीठ त्यांनी मिळवून दिले. या संस्थेच्या वतीने गेली अनेक वर्षे राज्य स्तरावरील एकांकिका स्पर्धा आणि संगीत महोत्सव आयोजित केले जातात. कोकणातील लोककलांना उठाव देण्यासाठी 'कोकण कला अकादमी'ची स्थापना कर्णिक यांनी केली. दशावतार, चित्रकथी, ललित, नमन खेळे, जाकडी नृत्य, कोळी नृत्य, तारपा, आगरी लोकगीते, वारली लोककला या सगळ्या कोकणकलांचा संगम साधून देशाच्या राजधानीपर्यंत कोकणचा लोक आवाज पोहोचवला अकादमीच्या माध्यमातून चित्रकार, शिल्पकार, मूर्तिकार आणि लोककलाकार यांच्यात कलाविचारांचे आदान-प्रदान केले.

मधू मंगेश कर्णिक यांनी महात्मा गांधी आंतरराष्ट्रीय हिंदी विश्वविद्यालयांच्या ॲकेडेमिक कौन्सिलचे सन्माननीय सदस्य म्हणून तीन वर्षे मौलिक योगदान दिले.

भारत सरकारचा 'पद्मश्री' हा पद्मपुरस्कार त्यांनी भारताच्या राष्ट्रपतींच्या हस्ते स्वीकारला.

**'कोमसाप': अभिजात महाकादंबरी**

१९९० मध्ये रत्नागिरी इथे झालेल्या ६४व्या अखिल भारतीय मराठी साहित्य संमेलनाच्या अध्यक्षपदी मधुभाई निवडून आले. आपण 'कोकण मराठी साहित्य परिषदे'ची स्थापना करत असल्याची घोषणा त्यांनी या अध्यक्षपदावरून केली. या 'कोमसाप'साठी गेली १८ वर्षे त्यांनी तनमनधनाने अविश्रांत मेहनत करून वाङ्‌मयीन क्षेत्रात एक अद्‌भूतपूर्व इतिहास घडवला. रत्नागिरी, सिंधुदुर्ग, रायगड, मुंबई, नवी मुंबई आणि ठाणे या सहा जिल्ह्यांमध्ये अनेक दौरे आणि कार्यक्रम करून हजारो निष्ठावान कार्यकर्त्यांचे प्रचंड मोहोळ निर्माण केले. निरलस सेवाभाव, चोख आर्थिक व्यवहार, सुयोग्य नियोजन आणि वाङ्‌मयीन चैतन्य हे आपल्या व्यक्तिमत्त्वातील गुण त्यांनी संस्थेच्या दुसऱ्या फळीतील कार्यकर्त्यांकडे संक्रमित केले. खेड्यापाड्यांतील शेवटच्या माणसापर्यंत साहित्य विचार कसा पोहचवावा, याचे एक आदर्श उदाहरण आपल्या कृतिशीलतेने मधुभाईंनी महाराष्ट्राला घालून दिले.

'कोमसाप' ही मधू मंगेश कर्णिक यांनी स्थापन केलेली संस्था म्हणजे एक अभिजात महाकादंबरी आहे, असे वाङ्‌मयीन बुजुर्ग म्हणतात. या संस्थेच्या ५० शाखांच्या जाळ्यातून सांस्कृतिक उपक्रम सतत चाललेले असतात. मधुभाईंच्या मार्गदर्शनाखाली 'झपूर्झा' हे संस्थेचे द्वैमासिक निघते. गेल्या १८ वर्षांत ५०पेक्षा अधिक जिल्हा साहित्य संमेलने आणि ११ मुख्य साहित्य संमेलने 'कोमसाप'तर्फे आयोजित करण्यात मधुभाईंनी पुढाकार घेतला. केवळ कोकणातलेच नव्हे तर महाराष्ट्रातील व महाराष्ट्राबाहेरील थोर साहित्यिकांनी या संमेलनांमधून सहभागी होऊन मधुभाईंच्या सर्वस्पर्शित्वाला दाद दिली.

आधुनिक मराठी कवितेचे जनक कविवर्य केशवसुत यांच्या मालगुंड या जन्मग्रामी त्यांचे स्मारक उभारून मधू मंगेश कर्णिक यांनी ऐतिहासिक कार्य केले. १९९३ साली निर्माण झालेले हे महाराष्ट्रातील पहिलेच आणि एकमेव कविस्मारक आहे. मराठी भाषिकांचे ते 'काव्यतीर्थ' झालेले आहे. भारतातील असंख्य मराठी प्रेमी दरवर्षी हजारोंच्या संख्येने या स्मारकाला भेट देतात. कवी केशवसुतांचे १८६६ पूर्वीचे जन्मघर, तत्कालीन वस्तूंचे प्रदर्शन, स्मारकाची भव्य वास्तू, आधुनिक मराठी कवितेतील नामवंतांची माहिती करून देणारे प्रशस्त काव्यदालन, खुला रंगमंच, कविता संदर्भ ग्रंथालय व अभ्यासिका, केशवसुत उद्यान व काव्यशिल्पे हे सारे पाहून मधू मंगेशांच्या कलात्मक दूरदृष्टीला मराठीप्रेमी दाद देतात.

अखंड उद्यमशीलता, सौजन्यशील स्वभाव, अथक कार्यक्षमता, संघटन कुशलता आणि वाङ्‌मयीन सर्जनशीलता या गुणसमुच्चयाने 'मधू मंगेश कर्णिक' ही आता केवळ सही राहिलेली नाही. ती एक अमीट नाममुद्रा झाली आहे.

– डॉ. महेश केळुसकर

**संदर्भ :**

१. *'आरती'; एप्रिल-मे २००१.*
२. *'ललित'; दिवाळी १९८७.*
३. *'ललित'; जुलै १९९४.*
४. *'कार्तिक'; दिवाळी १९९९.*

## कर्वे, इरावती दिनकर

**ललित निबंधकार, मानववंश शास्त्रज्ञ, समाजशास्त्राच्या संशोधक**

**१५ डिसेंबर, १९०५ ते ११ ऑगस्ट, १९७०**

इरावती बाईंचा जन्म ब्रह्मदेशात 'Myingin' येथे झाला. वडिलांचे नाव हरी गणेश करमरकर व आईचे नाव भागीरथीबाई. त्यांना पाच भाऊ होते, बहीण नव्हती. त्यांचे मूळ नाव 'गंगा' होते नंतर इरावती ठेवले. पण घरामध्ये सर्व जण 'माई' म्हणत. वयाच्या सातव्या वर्षीच त्या पुण्याच्या हुजूरपागा या शाळेत शिक्षणासाठी आल्या. १९२२ साली मॅट्रिक व १९२६ साली फर्गसन महाविद्यालयातून तत्त्वज्ञान हा विषय घेऊन प्रथम



क्रमांकाने बी.ए. झाल्या. शालेय व महाविद्यालयीन जीवनातील बराचसा काळ इरावती बाई त्या वेळचे फर्गसनचे प्राचार्य रँगलर र.पु. उर्फ अप्पासाहेब परांजपे यांच्याकडे राहत होत्या. त्यांच्या घरातील वातावरण सांस्कृतिक पण त्याच वेळी आधुनिक, उच्च दर्जाचे व वाङ्मयीन अभिरुचीला खतपाणी घालणारे होते. काव्य-शास्त्रविनोदाला अत्यंत अनुकूल अशा घरात इरावतींचे लहानपण व तरुणपण गेले. संस्कारक्षम वयात योग्य ती शिस्त लावून वाङ्मयीन अभिरुचीची जाण इरावतींमध्ये निर्माण केली गेली. त्याचा परिणाम त्यांच्या पुढील आयुष्यावर झालेला दिसतो. अप्पासाहेबांचे पंजाबी मित्र बाळकराम यांच्यामुळे त्यांना वाचनाचे प्रेम जडले. वडिलांच्या (ज्यांना त्या काका म्हणत) फिरतीच्या नोकरीमुळे फिरण्याची व निरीक्षणाची आवड निर्माण झाली.

**स्वानुभव गर्भित ललितकथा**

लालवट गोरा रंग, साडेपाच फूट उंची, धिप्पाड बांधा, निळे चमकदार डोळे, डोळ्यांत हुशारीचे तेज व किंचित किनरा आवाज, कोणालातरी बजावून सांगावे असे बोलणे, चालण्यात चपळपणा व एक प्रकारचा आत्मविश्वास असे इरावतींचे लोभनीय रूप होते. आकर्षक व पुरोगामी व्यक्तिमत्त्वाबरोबरच अंगभूत बौद्धिक हुशारी होती. १९२६ साली त्या वेळचे फर्गसन महाविद्यालयामधील प्रो. दिनकर धोंडो कर्वे यांच्याशी त्यांचा प्रेमविवाह झाला. १९२८ साली मुंबई विद्यापीठातून एम.ए. झाल्यावर पीएच.डी. करायला जर्मनीला जाण्यासाठी त्यांना सासऱ्यांचा पाठिंबा, आशीर्वाद नव्हता. परंतु पीएच.डी. साठी जर्मनीला जाणे निश्चित केले. १९३० साली मानववंशशास्त्रामध्ये A Symmoctry of the human skull 'मनुष्याच्या डोक्याच्या कवटीची अरूप प्रमाणता' ह्या विषयावर पूर्ण केली. जर्मनीहून आल्यानंतर त्यांना कर्वे विद्यापीठाच्या कुलसचिवपदी काम करावे लागले (१९३१ ते १९३९). त्यानंतर १९३९ मध्ये डेक्कन महाविद्यालयामध्ये रुजू होऊन स्वतःला आवडलेली व पटलेली संशोधनाची वाट त्यांनी चोखाळली.

डेक्कन महाविद्यालयामध्ये रुजू झाल्यानंतर संशोधनानिमित्त झालेल्या प्रवासातून त्या सर्व भारतभर व जगभर फिरल्यामुळे त्यांची जशी संशोधकीय पुस्तके तयार झाली, तशीच त्यांची 'परिपूर्ती', 'भोवरा' व 'गंगाजळ' (मृत्यूनंतर प्रसिद्ध) ही ललित गद्यात्मक पुस्तकेही निर्माण झाली. त्यांच्या बहुतेक लेखांतून ललितरीत्या स्वानुभवच अवतरला. त्यामुळे स्वानुभव गर्भितता ह्या मूलभूत प्रेरणेचा विचार करून ह्या तिन्ही पुस्तकांतील ललितकथांचा विचार एकत्रितपणे करता येतो.

इरावतींच्या ललितलेखांचे आस्वादक, चिंतनपर, प्रवासवर्णनपर, व्यक्तिचित्रणात्मक, कविता असे अनेक उपविभाग होऊ शकतात. मात्र हे लेखन अमुक एक प्रकारेच लिहायचे, असे ठरवून झालेले नाही. त्या लिहीत गेल्या व ललित-गद्यातल्या अनेक उपप्रकारांना जन्म मिळाला. त्यात मुद्दाम असा सजावटीचा भाग नाही. ललित-गद्याच्या संक्रमण अवस्थेत ललितगद्याला नवीन, हवाहवासा, आकृतिबंध देणाऱ्या त्या मानाच्या शिलेदार ठरतात. ललितगद्याच्या उगमापाशी इरावती पाय रोवून डौलाने उभ्या आहेत. इरवतींचे नाव मराठीच्या साहित्यविश्वामध्ये सर्वतोमुखी होण्याचे कारण 'परिपूर्ती' हे होय.

'जन्मांतरीची भेट' आणि 'वाटचाल' ह्या लेखांमुळे त्यांची साहित्यिक उंची सर्वांच्या नजरेत भरली. माणसाचा 'माणूस' म्हणून त्या शोध घेत असतात. ह्यापूर्वीही अप्पासाहेब परांजपे यांचे 'दुसरे मामंजी' तसेच महर्षी कर्वे यांचे 'आजोबा' ही व्यक्तिचित्रे अशीच सरस उतरली आहेत. 'युगान्त'ने त्यावर कळस चढविला. इरावतींचे 'अभिरुची'मधील सुरुवातीचे लेखन 'क' ह्या टोपण नावाने होते.

## स्त्रीस्वातंत्र्याची अभिव्यक्ती

'युगान्त' पुस्तकाला १९६७ साली एक दर्जेदार लेखक म्हणून ललित मासिकाचा पुरस्कार मिळाला. महाराष्ट्र सरकारचा व साहित्य अकादमीचा असे दोन्ही पुरस्कार त्यांना १९६७ साली मिळाले. एक ललितकृती म्हणून तर 'युगान्त' श्रेष्ठ आहेच. त्यातील व्यक्तिरेखा वास्तवाला न सोडताही विलोभनीय आहेत. त्याखेरीज त्यातून घडवणारे इतिहास-दर्शन व समाजशास्त्रीय आकलन सामान्यांच्या ज्ञानात भर टाकणारे आहे. श्रेष्ठ टीका ही एक तऱ्हेची नवनिर्मिती असते, हे 'युगान्त' वाचल्यावर जाणवते. 'युगान्त'मधील स्त्री-पुरुष चित्रणे हे युगान्तचे वैभव आहे. इरावतींची मूल्यकल्पना, न्याय-अन्याय विचार, स्त्री-जातीचा कळवळा याचे दर्शन वाचकाला होते. व्यापक अनुभवविश्व, आत्मपरता, ललितलेखांना आत्मचरित्रात्मक मूल्य, स्त्री व स्त्रीविषयक प्रश्नांचा सतत अनुबंध, लेखनावर उदारमतवादाचा परिणाम ही इरावतींच्या लेखनाची वैशिष्ट्ये म्हणता येतील. ''स्त्रियांची चळवळ ही काही स्वतंत्र चळवळ नाही. सामाजिक अन्यायाखाली दडपलेल्या बहुसंख्य मानवांच्या सुटकेसाठी जी चळवळ चालली आहे, त्याचाच एक भाग म्हणून त्याच्याकडे बघायला हवे.'' अशी त्यांची व्यापक विचारसरणी होती. जातीविषयक अनेक जातीजमातींचे, आदिवासींचे अनुभव आणि जगप्रवासामुळे वैश्विक अनुभव इरावतींकडे जमा होते. इंग्लंड, अमेरिका बघून त्या हुरळल्या नाहीत. भारतीय संस्कृती, श्रद्धा यांचा डोळसपणे विचार करणाऱ्या त्या विदुषी होत्या. स्त्रीस्वातंत्र्याच्या भारतातील मर्यादा बघून त्या दुःखी होत. त्याच्या अत्यंत कडवट प्रतिक्रिया त्यांच्याकडून उमटत. बिहारमधील स्त्रियांबद्दल, तसेच ''महाराष्ट्रात मुंडन केलेली विधवा म्हणजे एक जिवंत प्रेत वावरत असते.'' अशा जागा हेच दर्शवितात. महानुभावीय पंथामध्ये मुलींना लहान वयातच संन्यास देतात; तसेच जैन समाजामध्ये मुलाच्या आठव्या, दहाव्या किंवा अकराव्या वर्षी त्याला साधूपणाची दीक्षा देतात; यांबद्दल इरावती नापसंती दर्शवतात.

## मानववंशशास्त्रज्ञ आणि समाजशास्त्रज्ञ

इरावतींनी मानववंशशास्त्र व समाजशास्त्र यांमध्ये जे संशोधनपर काम आयुष्यभर केले, त्याचे लिखित पुनःस्वरूप म्हणजे त्यांची वेगवेगळी संशोधनपर पुस्तके होत. आधी संशोधन, मग त्या संशोधनाविषयी व्याख्याने व त्यानंतर त्याचे पुस्तकात रूपांतर हा क्रम दिसतो. ह्याव्यतिरिक्त अभ्यासाच्या आधारे लिहिलेले १०१ निबंध, काही असंग्रहित लेख, 'मराठी लोकांची संस्कृती', 'आमची संस्कृती', 'संस्कृती', 'धर्म' ह्या पुस्तिका; अशी त्यांची धर्म व संस्कृतीविषयक पुस्तके आहेत.

एक मानववंशशास्त्रज्ञ व समाजशास्त्रज्ञ म्हणून तर हे लेखन विचार करण्यासारखे आहेच, पण त्याहीपेक्षा महत्त्वाची गोष्ट म्हणजे त्या विषयाबद्दल मनात असलेली खोल आस्था त्यांच्या लेखनातून सतत दिसते. त्यामुळे ते लेखन म्हणजे कोरडा संशोधनविषय न राहता एका हृदयशोधाचे रूप घेते. इरावतींच्या संस्कृतीविषयक लेखनाचा विचार वैचारिक वाङ्मय म्हणून तर करता येतोच, पण महाराष्ट्राच्या संस्कृतिविचारांची भावधारा संपन्न करणारे वाङ्मय म्हणूनही करता येतो.

'हिंदू समाजरचना' (१९६४), 'हिंदू समाजः एक अन्वयार्थ' भाषांतर : Hindu Society : An Interpretation; Kinship Organization In India (1953) भाषांतर: भारतमे बंधुत्व संघटन; 'महाराष्ट्र: एक अभ्यास' भाषांतर : Maharashtra And Its People; ही इरावतींची वैचारिक व संशोधनपर पुस्तके आहेत. व्यक्ती, कुटुंब, समाज, प्रदेश व तेथील लोक यांबद्दलची ही पुस्तके आहेत. मानववंशशास्त्र हा त्यांचा आवडता विषय होता. इरावतींना आपण ललितलेखिका म्हणून ओळखले जाण्यापेक्षा एक मानववंशशास्त्रज्ञ म्हणून ओळखले जाणे हवे होते.

नातेदारी संघटनेविषयीच्या (Kinship Organization In India) त्यांच्या पुस्तकाने त्यांना आंतरराष्ट्रीय कीर्ती मिळवून दिली. नातेवाचक शब्द स्पष्ट करताना इरावतींचा शब्दांचा व भाषेचा अभ्यास, त्या

अनुषंगाने स्त्रीचे स्थान; असा अभ्यास ग्रंथभर दिसतो. एकाच वेळी संशोधक आणि ललितलेखिका या दोन्ही भूमिका त्या बजावत होत्या. त्यामुळेच ललितलेखनात संशोधकीय प्रज्ञा, सत्यान्वेषी पिंड दिसतो व संशोधकीय लेखनात भावगर्भता येते. १९३९ ते १९७० ह्या काळात मानववंशशास्त्र व साहित्य ह्या दोन्ही क्षेत्रांत इरावतीबाईंनी प्रगतीची शिखरे पादाक्रांत केलेली दिसतात. त्यांचे हे पुस्तक अमेरिकेतील विद्यापीठात पाठ्यपुस्तक म्हणून लावले गेले होते. सदर पुस्तकाला मानववंशशास्त्रातील तज्ज्ञ श्री. हट्टन यांची प्रस्तावना आहे.

**काळापुढती चार पाउले**

भारत सरकारने हिंदूकोडबाबत त्यांचे मत आजमावले होते. पुरुषांच्या द्वितीय विवाहाचे समर्थन करणारा त्यांचा लेख, गांधीहत्येनंतर प्रक्षोभाबद्दलचा त्यांचा लेख; ही त्यांच्या स्पष्टवक्तेपणाची उदाहरणे आहेत. १९५८ साल हे महर्षी कर्वे यांचे शताब्दी वर्ष. त्या वेळी मत विचारले असता, 'स्त्रियांसाठी स्वतंत्र विद्यापीठाची जरुरी नाही' असे मूलगामी व प्रांजळ मत त्यांनी नोंदविले. कोणतेही संशोधन पूर्ण झाले असे त्या मानीत नसत. त्या विषयीचे पुस्तक लिहून पूर्ण झाले, तरी त्या विषयात नवीन काय मिळते, याबद्दल त्यांचा शोध चालू असे. दुसऱ्या आवृत्तीच्या वेळी त्या माहितीचा अंतर्भाव पुस्तकात केला जाई. एकीकडे वेगवेगळ्या जातींचा अभ्यास, तीन हजार ग्रामनामांचा अभ्यास, एकूण एकोणीस विद्यार्थ्यांना पीएच.डी.चे मार्गदर्शन ही कामेसुद्धा सुरू होती.

१९४७ साली दिल्ली सायन्स काँग्रेसमध्ये मानववंशशास्त्र विभागाच्या त्या अध्यक्षा होत्या. प्रागैतिहासाच्या आफ्रिका काँग्रेसमध्ये भारत सरकारचे प्रतिनिधित्व, कॅलिफोर्निया विद्यापीठातर्फे मानवंशास्त्रातील संशोधनामुळे लंडन विद्यापीठामध्ये आमंत्रित व्याख्यात्या, बर्कले येथेही व्याख्यात्या असे सन्मान त्यांना मिळाले. त्यांच्या स्मरणार्थ डेक्कन महाविद्यालयाने ग्रंथालयामध्ये एक संदर्भविभाग ठेवला आहे. तेथे त्यांना मिळालेली प्रशस्तिपत्रके व पारितोषिके बघायला मिळतात. १९७३ मध्ये डेक्कन महाविद्यालयाने एक स्मृतिग्रंथ काढला होता. त्यात काकासाहेब कालेलकरांनी त्यांच्या समग्र कार्याचा आढावा घेणारा गौरवास्पद लेख लिहिला आहे. २००५ साली डेक्कन महाविद्यालयाने त्यांची जन्मशताब्दी साजरी केली. पुणे विद्यापीठाने त्यांच्या स्मरणार्थ समाजशास्त्र विभागाजवळ मानववंशशास्त्र वस्तुसंग्रहालय उभारले आहे. १९९१ मध्ये प्रदर्शन भरवले व १९९३ मध्ये संग्रहालयाला त्यांचे नाव देण्यात आले. येथील आदिवासी काळाविषयीचे दालन, लग्नखांब, मानवी उत्क्रांतीमधील टप्पे वगैरे अनेक गोष्टी अभ्यसनीय व आकर्षक आहेत.

इरावतीबाईंनी ५०-६० वर्षांपूर्वी केलेले अंदाज म्हणजे आजची प्रत्यक्ष परिस्थिती आहे. त्यांच्या समाजशास्त्रीय, संशोधकीय लेखांचा सगळ्यांत प्रथम दर्जाचा मोठेपणा सांगावयाचा म्हणजे त्यांनी ५० वर्षांपूर्वी केलेले अंदाज तंतोतंत खरे ठरलेले आहेत. त्याबाबतीत एक-दोन विषयांचा उल्लेखही पुरेसा ठरेल. पहिली गोष्ट लोकसंख्या वाढीबाबत 'प्रजासंकोचच अपरिहार्य' हे त्यांचे मत होतेच. कुटुंबनियोजनाचे पुण्यातील पहिले केंद्र के.ई.एम. रुग्णालयामध्ये त्यांनी काढायला लावले होते. महाराष्ट्राची वास्तव व्याख्या, ''ज्या देशातील लोक पंढरपूरच्या वारीला येतात, तो महाराष्ट्र'' अशी होय व महाराष्ट्र समजून घ्यायचा असेल तर गुजरात, कर्नाटक आणि संपूर्ण देश समजून घ्यायला हवा आणि आदिवासी समजल्याखेरीज आपला देश समजू शकत नाही. आदिवासींना वेगळे ठेवून फोडा व झोडा या ब्रिटिशांच्या नीतीची, फुटीरतेची त्यांना तेव्हाच कल्पना आलेली होती. आजचे आसाम-ओरिसातील दंगे पहिले की, 'काळापुढती चार पाउले' विचार करणाऱ्या इरावतींचे द्रष्टेपण कळते. शेवटच्या दिवसापर्यंत कार्यमग्न असतानाच ११ ऑगस्ट १९७० रोजी त्यांचे निधन झाले.

– डॉ. उषा कोटबागी

**संदर्भ :**

*१. कर्वे, इरावती; 'व्यक्ती आणि वाङ्मय', पद्मगंधा प्रकाशन, २००५.*

## कर्वे, चिंतामण गणेश

**ग्रंथकार, मराठी कोशकार, लेखक**

**४ फेब्रुवारी १८९३ - १६ डिसेंबर १९६०**



चिंतोपंत कर्वे यांचा जन्म बडोद्यास झाला. तथापि त्यांचे शिक्षण पुणे येथे न्यू इंग्लिश स्कूल व फर्गसन महाविद्यालयात झाले. १९१७ मध्ये ते गणित विषय घेऊन पदवीधर झाले. कर्वे यांच्या आप्तांची एक शाखा बेंगळुरू येथे होती व तिच्या संपर्कामुळे चिंतोपंतांना कानडी भाषा अवगत होती.

डॉ. श्री. व्यं. केतकर यांनी मराठी ज्ञानकोशाची योजना सिद्ध करण्यासाठी उभारलेल्या कंपनीत कर्वे दाखल झाले, तसेच य. रा. दाते हेही सहभागी झाले. केतकरांच्या हाताखाली कर्वे यांना ज्ञानाचे संकलन करण्याची कला अवगत झाली, भरपूर वाचन झाले व अभ्यास घडला. कोशविद्येचे मर्म हाती आले. नियमितपणे परिश्रम करण्याची सवय लागली. या जोडीने केतकरी खाक्यात काम करण्यास लागणारे धैर्य व चिकाटी दाखवली म्हणूनच नेटाने काम करून ते 'कोशकार' झाले. कर्वे यांचा प्रपंच कसाबसा चालला, परंतु त्यांनी कधी तोंड वेंगाडले नाही किंवा आपल्या कामात उणेपणा येऊ दिला नाही.

केतकरांच्या ज्ञानकोशात काम करून, अनुभवाची शिदोरी घेऊन कर्वे-दाते यांनी आणखी दोन सहकाऱ्यांना घेऊन 'महाराष्ट्र शब्दकोशा'ची एक योजना तयार केली व 'महाराष्ट्र कोश मंडळ लि.' नावाची कंपनी काढली. महाराष्ट्र शब्दकोश सिद्ध केल्यानंतर कर्वे-दाते जोडीने 'मराठी वाक्संप्रदाय कोश' हाती घेऊन पुरा केला. या तीन कोशांच्या कामात त्यांची २५ वर्षे खर्ची पडली. त्यानंतर ही जोडी वेगळी झाली. य. गो. जोशी यांनाही अशा प्रकारच्या कामाचा हव्यास व त्यासाठी लागणारी धडाडी होती. कर्वे यांच्या सहकार्याने त्यांनी 'महाराष्ट्र परिचय' या ग्रंथाची योजना केली. महाराष्ट्र संस्कृती संदर्भातील हा एक उत्कृष्ट व उपयुक्त ग्रंथ आहे. कोशकार्याखेरीज कर्वे यांनी 'मानवी संस्कृतीचा इतिहास' (१९३१), 'प्राच्य आणि पाश्चात्त्य नीतिध्येये' (१९३७), 'आनंदीबाई पेशवे' (१९४०), 'मराठी साहित्यातील उपेक्षित मानकरी' (१९५७), 'कोशकार केतकर' (य. रा. दाते ह्यांच्या सहकार्याने, १९५९) यांसारखी पुस्तके लिहिली. शिवाय निरनिराळ्या नियतकालिकांतून भाषा, वाङ्मय, इतिहास, संस्कृती आदी विषयांवर चारशेहून अधिक लेख लिहिले. कर्वे यांच्या लेखनात माहितीचा अचूकपणा, मांडणीचा नेटकेपणा जाणवतो. दुर्मीळ परंतु अभ्यासकांना उपयुक्त वाटणारा वा. शि. आपटे यांचा संस्कृत-इंग्रजी कोश पुनर्मुद्रित करण्याच्या कामी कर्वे-दाते यांनी डॉ. परशुरामपंत गोडे या संस्कृत पंडिताचे साहाय्य मिळविले. नवीन भर घालून हा कोश त्यांनी प्रकाशित केला. त्याप्रमाणे आपटे यांचाच इंग्रजी-संस्कृत कोश पुनर्मुद्रित करण्याचा कर्वे यांचा हेतू होता परंतु कर्वे यांच्या निधनामुळे तो संकल्प यशस्वी होऊ शकला नाही. 'कोशकार्य सर्वसमावेशक दृष्टी ठेवून अनाग्रही बुद्धीने करावे लागते' ही डॉ. केतकरांची भूमिका कर्वे यांच्या कार्यातून प्रत्ययास येते.

महाराष्ट्राचे सांस्कृतिक जीवन उंचावणाऱ्या अनेक कार्यांत कर्वे आपुलकीने लक्ष घालीत. महाराष्ट्र साहित्य परिषदेची धुरा त्यांनी अनेक वर्षे संभाळली. महाराष्ट्र साहित्य परिषदेच्या चिटणीस पदावरही ते होते. भारत इतिहास संशोधक मंडळाचे कर्वे हे दहा वर्षे चिटणीस होते. पुणे विद्यापीठाच्या सदस्य मंडळावर ते होते. ग्रंथ प्रकाशन आणि प्रकाशन अनुदान समितीत ते कार्यरत होते. सरकारच्या पेशवे दप्तर समितीचे सदस्यही ते होते. काम पत्करले की त्या-त्या संस्थांच्या सभांना नियमितपणे हजर राहून ते त्यात आपला वाटा उचलत. कर्वे यांनी अनेक लेखकांना मार्गदर्शन करून त्यांना उत्तेजन दिले. कित्येक ग्रंथांना त्यांनी प्रस्तावना लिहिलेल्या आहेत. कर्वे यांच्यावर लिहिलेल्या

'ओळख'वजा मृत्युलेखात म. म. दत्तो वामन पोतदार म्हणतात, 'ते (कर्वे) सहसा आजारी पडत नसत आणि त्यांचे वय जरी ६५च्या पलीकडे होते, तरी वृद्धत्वाची छाया त्यांच्यावर पडलेली दिसत नव्हती.... कर्वे फारसे बोलत नसत; पण बोलत, तेव्हा थोडेच परंतु मुद्द्याचे बोलत. त्यांना कामाचा उरक मोठा होता. स्वभावाने शांत, मनमिळाऊ आणि निगर्वी होते... आपल्या कोशांच्या रूपाने कर्वे महाराष्ट्रात सर्वत्र दिसत राहतील.'

– वि. ग. जोशी

**संदर्भ :**

१. *पोतदार द. वा.; 'ओळख'; व्हीनस बुक स्टॉल, पुणे; १९६१.*

२. *जोशी तर्कतीर्थ लक्ष्मणशास्त्री; 'मराठी विश्वकोश', खंड ३; महाराष्ट्र राज्य साहित्य संस्कृती मंडळ, मुंबई; १९७६.*

३. *कामत श्रीराम पांडुरंग; 'मराठी विश्वचरित्र कोश', खंड १; विश्वचरित्र संशोधन केंद्र, गोवा; २०००.*

## कर्वे, चिंतामण श्रीधर

**विज्ञानलेखक**

**२५ डिसेंबर १९१४**

विज्ञानविषयावर मौलिक लेखन करणाऱ्या कर्वे यांनी भौतिकशास्त्रातील एम.एससी. व पीएच. डी. या पदव्या संपादन केल्या. शालेय शिक्षण मुंबईत, उच्च शिक्षण फर्गसन महाविद्यालय, पुणे येथे झाले. पुणे व मुंबई येथील महाविद्यालयांतून शास्त्रविषयाचे अध्यापन केले. प्राध्यापक म्हणून लौकिक मिळवला. विज्ञानविषयावर लेखन करण्याची त्या काळात फारशी रूढी नसताना त्यांनी विज्ञान-लेखनास सुरुवात केली. तो काळ मराठीत ललित लेखनासाठी अनुकूल काळ होता. मात्र लेखनासाठी त्यांनी आपल्या आवडीचे क्षेत्र निवडले. महायुद्धोत्तर काळात कर्वे यांना विज्ञानविषयावर लेखन करण्याची प्रेरणा मिळाली, त्यामागची घटना अघटित होती. १९४५ मध्ये जपान येथे झालेल्या अणूबॉम्बच्या स्फोटामुळे जग हादरून गेले, भयभीत झाले. या विनाशक, अणूबॉम्बची माहिती सर्वसाधारण माणसाला व्हावी यासाठी कर्वे यांनी व्याख्याने दिली. लोकजागरणाचाच तो प्रयत्न होता. विज्ञानविषयावर व्याख्याने देता-देता ते लेखनही करू लागले. सुरुवातीचे त्यांचे लेख 'किर्लोस्कर', 'हंस', 'नवल' इत्यादी मासिकांतून येऊ लागले. 'केसरी', 'लोकसत्ता' इत्यादी वृत्तपत्रांनीही ते प्रसिद्ध केले. त्यांना उत्तम वाचकप्रतिसाद मिळाला. विज्ञानविषयक विविध माहिती मिळावी यासाठी सर्वसामान्य लोक आसुसलेले होते. कर्वे यांनी सुबोध भाषेत ती सांगितली व त्यास शब्दरूपही दिले. हे त्यांनी मराठी साहित्याला दिलेले मोठेच योगदान होते. अणुशक्तीचे सामर्थ्य, तिचे फायदे-तोटे, अंतराळ, अंतराळ प्रवास अशा अनेक विषयांवरची सुबोध माहितीपूर्ण आणि रंजक अशी कितीतरी पुस्तके त्यांनी लिहिली. उदाहरणार्थ 'निळे आकाश' (१९५७), 'बालचंद्र' (१९६०), 'अणुशक्ती शाप की वरदान?' (१९६०), 'नवविज्ञानाच्या परिसरात' भाग १ व २ (१९५९), 'चला चंद्राकडे' (१९६१), 'अणूतून अनंताकडे' (१९६२), 'अग्निबाण' (१९६९) इत्यादी विषयांवर त्यांनी पुस्तके लिहून प्रसिद्ध केली. अनेक लेख लिहिले.

कर्वे यांनी इंग्रजीतील अनेक विज्ञानग्रंथांचे मराठीत नेटके अनुवाद केले आहेत. उदाहरणार्थ 'विज्ञानाचे विधाते', भाग १ व २ (१९६३), 'वैज्ञानिकांची चरित्रे' (मूळ लेखक फिलिप फेन), 'तारकांची नवलनगरी' (१९६४-मूळ लेखक ॲन व्हाइट), 'ज्वालामुखी आणि भूकंप' (१९६५- मूळ लेखक फेडरिक), 'जीवनविज्ञान आणि तत्त्वज्ञान' (१९६५- मूळ लेखक अल्फ्रेड व्हाइटहेड), 'विराट विश्वाची निर्मिती' (१९६६- मूळ लेखक जॉर्ज गॅमाव). या लेखनाकरिता राज्यशासनाचे अनेक पुरस्कार त्यांना प्राप्त झाले आहेत. मराठी विज्ञान परिषदेने त्यांना सन्माननीय विज्ञानलेखक म्हणून गौरविले (१९७१). मराठीत विज्ञान-लेखनाच्या प्रवाहात कर्वे यांचे योगदान संस्मरणीय आहे. विज्ञानकथेचा व विज्ञानविषयक माहितीचा प्रवाह घरोघरी नेण्याची महत्त्वाची कामगिरी कर्वे यांनी बजावली. आज

विज्ञानसाहित्य अधिकाधिक लोकप्रिय होत आहे आणि मानवी जीवनातील विज्ञानाचे स्थान लोकांना समजू लागले आहे. या दृष्टीने कर्वे यांनी प्रारंभीच्या काळात केलेले काम मौलिक आहे, असे म्हणता येईल.

– संपादक मंडळ

## कर्वे, धोंडो केशव

☞ **मुख्य नोंद – शिक्षण खंड**

## कर्वे, रघुनाथ धोंडो

☞ **मुख्य नोंद – आरोग्य खंड**

## कवठेकर कुळकर्णी, नारायण

**कवी**

**३० सप्टेंबर १९५१**

नारायण कवठेकर कुळकर्णी ह्यांचा जन्म कवठा (खुर्द), ता. रिसोड, जि. वाशिम येथे पिढीजात शेतकरी कुटुंबात झाला. घराणे सांपत्तिकदृष्ट्या सुखवस्तू व सामाजिकदृष्ट्या प्रतिष्ठित होते. मराठी विषयात पदव्युत्तर व शिक्षणशास्त्राची स्नातक पदवी संपादन केली. कवठा ग्रामपंचायतीचे सदस्य (४ वर्षे) होते, कवठा सेवा सहकारी सोसायटीचे अध्यक्ष (६ वर्षे) होते.

प्रारंभी त्यांनी शेतीव्यवसाय केला. १९८० पासून अध्यापनाच्या क्षेत्रात कार्यरत झाले. श्री. कृ. कोल्हटकर महाविद्यालय, जळगाव (जामोद), जि. बुलढाणा, आणि अकोला येथील श्रीशिवाजी महाविद्यालयातून मराठी विषयाचे अध्यापन केले. अलीकडेच स्वेच्छानिवृत्ती घेतली. कवठेकरांचा मूळ पिंड कवीचा. १९७० च्या आसपास वेगवेगळ्या नियतकालिकांतून काव्यलेखनास प्रारंभ केला. १९८० मध्ये ग्रंथाली वाचक चळवळीने प्रसिद्ध केलेल्या 'कविता दशकाची' या प्रातिनिधिक काव्यसंग्रहात त्यांच्या दहा कवितांचा समावेश आहे. त्यानंतर 'हे माझ्या गवताच्या पात्या' (१९८२) आणि 'मागील पानावरून पुढे सुरू' (१९९७) हे त्यांचे दोन कवितासंग्रह प्रसिद्ध झाले. अनुभवाला सरळपणे सामोरी जाणारी कविता आहे. स्वातंत्र्योत्तर समाजजीवन, ग्रामजीवन व राजकारण यांचे प्रतिबिंब कवितेत पडले आहे. तरुण पिढीच्या स्पंदनांचा, विचार-भावनांचा कवितेतून जाहीर उच्चार दिसतो. स्वातंत्र्योत्तर काळातील समाजवास्तवाचे कठोर दर्शन घडविणारी कविता आहे. महानगरातील मध्यमवर्गीय माणसांच्या समस्यांप्रमाणे ग्रामीण भागातील शेतकरी, कष्टकरी माणसांच्या समस्यांचा वेध कवितेतून घेतला. व्यक्तीतून समष्टीत व समष्टीतून व्यक्तीत विलीन होण्याची प्रक्रिया सहजतेने घडविणे, हे या कवितेचे महत्त्वाचे वैशिष्ट्य आहे.

अनेक कवितांचे हिंदी, तेलगू, तामीळ, गुजराती, राजस्थानी, पंजाबी, कन्नड व इंग्रजी इत्यादी भाषांतून अनुवाद झाले. महाराष्ट्र व महाराष्ट्राबाहेरील अनेक विद्यापीठांतील मराठीच्या अभ्यासक्रमात बऱ्याच कवितांचा समावेश झाला आहे. महाराष्ट्र शासनाच्या उत्कृष्ट वाङ्मय निर्मिती पुरस्कारासह प्रतिष्ठेचे अनेक वाङ्मयीन पुरस्कार त्यांना मिळाले. 'युगवाणी' ह्या विदर्भ साहित्य संघाच्या वाङ्मयीन मुखपत्राचे ते संपादकही होते. बदलत्या सामाजिक, राजकीय व सांस्कृतिक वास्तवाचे भान राखून दारुण वास्तवात सामर्थ्याने उभे राहून संघर्ष करणाऱ्या सामान्य माणसाच्या जगण्यातील दुःख, निराशा व अस्वस्थता यांचा गांभीर्याने वेध घेणारा १९८० च्या दशकातील एक महत्त्वाचा कवी म्हणून समकालीन कवितेला त्यांचे विशेष योगदान आहे.

– डॉ. शोभा रोकडे

**संदर्भ :**

*१. सहस्रबुद्धे अविनाश; 'दशकातील साहित्यिक: नारायण कुळकर्णी कवठेकर'; ललित; जून १९९१.*

*२. सावेंकर कैलास; 'मराठी ग्रामीण कवितेचा इतिहास'; मेहता पब्लिकेशन हाउस, पुणे; पहिली आवृत्ती, १९९१.*

## कवठेकर, बाळकृष्ण गणपतराव

**५ जुलै १९४३**

समकालीन वाङ्मयव्यवहारातील प्रवृत्तीविशेषांचा वाङ्मयानिष्ठ व व्यक्तिनिरपेक्ष जाणीवेने शोध घेऊ पाहणारे

समीक्षक. उस्मानाबाद जिल्ह्यातील तुळजापूर या गावी जन्म. महाविद्यालयीन शिक्षण शासकीय कला व विज्ञान महाविद्यालय, औरंगाबाद येथे. मराठवाडा विद्यापीठात पदव्युत्तर शिक्षण. बी.ए. व एम.ए.च्या वर्गांत विद्यापीठातून सर्वप्रथम. बी.ए.ला विद्यापीठाच्या गुणवत्ता शिष्यवृत्तीसाठी पात्र. एम.ए.साठी महाराष्ट्र शासनाची प्रतिष्ठेची समजली जाणारी दक्षिणा फेलोशिप. महाविद्यालयीन जीवनात न्यायमूर्ती रानडे वादविवाद स्पर्धा, डॉ.आंबेडकर वादविवाद स्पर्धा या महाराष्ट्राच्या पातळीवर महत्त्वपूर्ण समजल्या जाणाऱ्या स्पर्धात प्रथम पारितोषिक.

नागपूर, कोल्हापूर, औरंगाबाद येथील शासकीय महाविद्यालयांत मराठीचे अधिव्याख्याता म्हणून तीस वर्षे कार्यरत. त्यानंतर डॉ.बाबासाहेब आंबेडकर मराठवाडा विद्यापीठाच्या मराठी विभागात प्रपाठक म्हणून नियुक्ती. तेथेच विभागप्रमुख या पदावरून सेवानिवृत्त. दरम्यानच्या काळात पीएच.डी.च्या आठ व एम.फिल.च्या चार विद्यार्थ्यांना संशोधकार्यासाठी मार्गदर्शन. चाळीस वर्षांच्या प्रदीर्घ सेवाकाळात एक अध्यापनकुशल, शिस्तप्रिय, व्यासंगी आणि विद्यार्थीप्रिय प्राध्यापक म्हणून सर्वज्ञात.

१९९२ ते १९९० या काळात मराठवाडा साहित्य परिषदेच्या ‘प्रतिष्ठान’ या नियतकालिकाचे संपादक. महाराष्ट्र शासनाच्या ‘बालभारती’च्या मराठी अभ्यासक्रम समितीचे निमंत्रक म्हणून उल्लेखनीय कार्य. त्यांच्या कार्यकाळातील कुमारभारती व युवकभारतीची पुस्तके गुणवत्तेच्या व दर्जाच्या दृष्टीने वाखाणण्याजोगी. त्याबरोबरच केंद्र शासनाने पुरस्कृत केलेल्या राष्ट्रीय मुक्त विद्यालयाच्या मराठी अभ्यासक्रम निर्मिती व पाठ्यपुस्तक समितीचे अध्यक्ष म्हणून कार्य.

अखिल भारतीय मराठी साहित्य महामंडळ, ऑपरेशन ब्लॅक बोर्ड आदी मंडळांवर सदस्य म्हणून कामकाज. महाराष्ट्र शासनाच्या शिक्षणाचे सार्वत्रिकीकरण समितीच्या अहवाल-लेखन विभागाचे प्रमुख. काही काळ मराठवाडा साहित्य परिषदेचे उपाध्यक्ष आणि १४ व १५ ऑक्टोबर २००० मध्ये वाशी, नवी मुंबई येथे झालेल्या तिसऱ्या समरसता साहित्य संमेलनाचे अध्यक्ष.

प्रकाशित पुस्तके : ‘वाङ्मयीन चर्चा आणि चिकित्सा’, ‘दलितसाहित्य: एक आकलन’, ‘प्रतिसाद’, ‘स्वातंत्र्यवीर सावरकर : साहित्य आणि जीवननिष्ठा’ या समीक्षात्मक ग्रंथांचे लेखन. तर ‘हैदराबादचा मुक्तिसंग्राम: एक उपेक्षित संघर्षगाथा’, ‘श्लोककेकावली’ व ‘दशपदी समरसतेची’ या ग्रंथांचे संपादन. ‘दलित साहित्य: एक आकलन’ हे पुस्तक महाराष्ट्रभर बहुचर्चित. या पुस्तकास महाराष्ट्र शासनाचा १९८४ सालचा उत्कृष्ट समीक्षा ग्रंथ म्हणून पुरस्कार. त्याबरोबरच शिवाजी विद्यापीठ, कोल्हापूरचा पुरस्कारदेखील मिळाला. अशा या पुरस्कारप्राप्त व महत्त्वपूर्ण समीक्षाग्रंथांतील काही लेखांचे हिंदी, कानडी, गुजराती व इंग्लिश भाषांत अनुवाद.

साठोत्तरी काळात वाङ्मयीन व्यवहारासंबंधी ताटस्थ्याने व साक्षेपाने लेखन करणारे आणि समीक्षक म्हणून आपली स्वतंत्र मुद्रा उमटविणारे व्यक्तिमत्त्व. नव्या वाङ्मयीन प्रवाहासंदर्भात स्वागतशील भूमिकेबरोबरच वाङ्मयीन अंगाने त्यांचे मूल्यमापन करून त्यांना आत्मभान देऊ पाहणारा समीक्षक आणि विद्यार्थ्यांवर अध्यापनाद्वारे वाङ्मयाच्या थोरवीचे संस्कार करू पाहणारा व्यासंगी प्राध्यापक या नात्याने मराठी वाङ्मयाविश्वावर आपला ठसा उमटवणाऱ्या बाळकृष्ण कवठेकर यांच्या कार्याचा गौरव करण्यासाठी त्यांच्या विद्यार्थ्यांनी व रसिक चाहत्यांनी ‘मूल्यसंकल्पना व साहित्यविचार’ हा गौरवग्रंथ प्रकाशित केला.

कवठेकरांनी संख्येने अल्प, परंतु गुणात्मकदृष्ट्या मोलाचे व मूल्यात्म समीक्षालेखन केले. त्यांच्या वाङ्मयनिष्ठ भूमिकेचा प्रत्यय या लेखनातून येतो. वृत्तीगांभीर्य, चिंतनशील प्रवृत्ती, वाचनाभिमुखता,

वैचारिक पूर्वतयारी आणि निश्चित अशी तात्त्विक बैठक आदी बाबींचा प्रत्यय त्यांच्या लेखन-व्यक्तिमत्त्वाद्वारा येतो.

साहित्याचा 'साहित्य' म्हणून विचार करण्यावर त्यांचा भर दिसतो. साहित्यकृतीचा विचार करताना तिच्यातून सामाजिक जाणीव प्रकट होते की नाही, हा तिच्या मूल्यमापनाचा निकष होऊ शकत नाही; तर तिच्यातून प्रकट होणारी जाणीव - ती सामाजिक असली तरीही, ती कलारूप धारण करू शकलेली आहे की नाही, हा तिच्या मूल्यमापनाचा खराखुरा निकष असतो; ही भूमिका घेऊन त्यांनी समीक्षात्मक लेखन. 'नकार देऊन मूल्ये नाहीशी होत नाहीत, आपण मात्र त्या मूल्यचिकित्सेला पारखे होतो. त्याउलट स्वीकारात्मक दृष्टिकोनातून जीवनाकडे पाहू लागलेले दलित साहित्य अधिक साहित्यगुणसंपन्न व आशावादी होण्याची शक्यता अधिक.' अशी दलितसाहित्यविषयक भूमिका महाराष्ट्रभर चांगलीच चर्चेत राहिली व त्यासंदर्भात उलटसुलट चर्चादेखील झाली.

कवठेकरांनी स्वातंत्र्यवीर सावरकरांच्या साहित्याचे व त्यांच्या जीवनकार्याचे मूल्यांकन सारासार विवेकनिष्ठ भूमिकेने केले.

एखाद्या मुद्द्यासंबंधी स्वतःच प्रश्न उपस्थित करून त्या प्रश्नाच्या अनुषंगाने सोडवणूक करतात वा त्या मुद्द्याची चहुअंगांनी तपासणी करून आपली भूमिका वाचकांसमोर ठेवतात. तर्कनिष्ठ विचारपद्धती व विचारांची स्पष्टता यांवर भर. एकूणच समकालीन वाङ्मयव्यवहारातील नवे प्रवाह, नवप्रवृत्ती, प्रेरणा आणि प्रश्न यांना कवठेकरांनी आपल्या लेखनात विशेष महत्त्व दिले. कवठेकरांची समीक्षा केवळ वाङ्मयीन तपशीलापेक्षा वाङ्मयविश्वातील प्रवृत्तिविशेषांचा शोध घेत सिद्धान्तन करू पाहणारी आहे.

- डॉ. केशव तुपे

**संदर्भ :**

१. *कवठेकर बाळकृष्ण, संपादक; 'दशपदी समरसतेची'; जनशक्ती बुक्स अँड पब्लिकेशन प्रा.लि., औरंगाबाद; २००८ .*

## कसबे, रावसाहेब राणोजी
**समीक्षक, दलित साहित्यविषयक लेखक**
**१२ नोव्हेंबर १९४४**



प्रज्ञाशील विचारवंत रावसाहेब कसबे यांचा जन्म औरंगपूर ता. अकोले जि. अहमदनगर येथे झाला. त्यांचे वडील राणोजी व आई दगडाबाई. वडील गावातील एक प्रतिष्ठित गृहस्थ होते. ते गवंडी काम करत. अस्पृश्य वर्गातील असूनही स्पृश्य वस्तीतील स्त्री-पुरुष त्यांना मान देत. ते गावातील निवाडे करत, तंटे सोडवत. परिणामी गावातील साऱ्याच समाजाचे लोक त्यांचा आदर करत. पण राणोजी अस्पृश्य असल्यामुळे त्यांना दुरूनच पाणी देत. वेगळे जेवण वाढत.

कौटुंबिक परिस्थिती अत्यंत गरिबीची असल्यामुळे मॅट्रिक (एस.एस.सी.) होताच रावसाहेबांची नोकरीसाठी धडपड सुरू झाली. काही दिवस सिद्धार्थ विद्यालय, संगमनेर येथे शिक्षकाची नोकरी केली. संगमनेर महाविद्यालयातून ते पदवीधर झाले व डॉ. बाबासाहेब आंबेडकर मराठवाडा विद्यापीठ, औरंगाबाद येथे एम.ए. साठी प्रवेश घेतला. याच कालावधीत त्यांचे भाचे पद्मश्री दया पवार यांच्या शिफारसीमुळे मातोश्री रमाबाई आंबेडकर विद्यालयात त्यांना नोकरी मिळाली. नोकरी करत एम.ए. चा अभ्यास करू लागले. याच दरम्यान १९६५ साली नगरला बौद्ध साहित्य संमेलन झाले. घनश्याम तळवटकर त्याचे अध्यक्ष, कुसुमाग्रज उद्घाटक तर रावसाहेब कसबे स्वागताध्यक्ष होते. त्यांनी अत्यंत प्रभावी भाषण केले. त्यांच्या भाषणामुळे ते कौतुकाचा विषय ठरले. त्या वेळी त्यांचे वय पंचवीस वर्षे होते.

१९७२ साली मराठवाडा विद्यापीठातून गुणानुक्रमे प्रथम आले व एम.ए. होताच संगमनेर महाविद्यालयात प्राध्यापक म्हणून रुजू झाले. पुढे १९८७ साली पुणे विद्यापीठातून पीएच.डी. झाले. निवृत्त होईपर्यंत इथेच

प्रपाठक, प्राध्यापक अशी पदे संभाळली. निवृत्तीनंतर डॉ.आंबेडकर अध्यासन, पुणे विद्यापीठ येथे पुण्याचे प्रमुख प्राध्यापक म्हणून कार्यरत आहेत.

विद्यार्थीदशेपासूनच त्यांना वाचन, लेखन, व्याख्यान यांत रुची होती. सखोल व चतुरस्र वाचन, चिंतन; चिकित्सक प्रवृत्ती; इंग्रजी, मराठी, संस्कृत, पाली ह्या भाषांचे उत्तम ज्ञान यांमुळे त्यांच्याकडून समृद्ध ग्रंथरचना झाली व साऱ्या महाराष्ट्रात एक प्रज्ञाशील विचारवंत म्हणून त्यांचा लौकिक पसरला. आजपर्यंत त्यांचे सहा मौलिक ग्रंथ प्रसिद्ध झाले, ते असे–

'झोत' (१९७८), 'डॉ.आंबेडकर आणि भारतीय राज्यघटना' (१९७८), 'आंबेडकर आणि मार्क्स' (१९८५), 'आंबेडकरवाद : तत्त्व आणि व्यवहार' (१९८९), 'हिंदू-मुस्लीम प्रश्न व सावरकरांचा हिंदू राष्ट्रवाद' (१९७३), 'मानव आणि धर्मचिंतन' (१९९६). याशिवाय काही पुस्तिका लिहिल्या व संपादनेही केली. महाराष्ट्रभर अनेक कार्यशाळांमध्ये ते सहभागी झाले. नामांतराच्या चळवळीत सक्रिय सहभाग घेऊन त्यांनी तुरुंगवासही भोगला.

डॉ.कसबेंवर बाबासाहेबांचा जबरदस्त वैचारिक प्रभाव आहे. ती त्यांची निष्ठा आहे. पण ते आंधळे भक्त नाहीत, तर डोळस चिंतक आहेत. रावसाहेबांच्या विचारांचे परिशीलन करताना बाबासाहेबांच्या विधानाची प्रचिती येते. म्हणूनच ते व्यक्तिपूजक न राहता त्या विचारांची हंसक्षीर न्यायाने मांडणी करतात. त्यांच्या जवळपास सर्वच ग्रंथांतून आंबेडकरी विचारांची प्रस्फुरणे उठतात. डॉ.आंबेडकरांचा राष्ट्रवाद, त्यांची समतावादी मूल्ये, त्यांच्या संकल्पनेतील लोकशाही, भारतीय समाजव्यवस्थेच्या पार्श्वभूमीवर लोकशाहीचे भवितव्य, लोकशाही समाजवाद, राज्य समाजवादी अर्थव्यवस्था, धर्मांतर, त्यांच्या आंदोलनांचे संदर्भ, सामाजिक व राजकीय चळवळींची बांधणी व या सर्वांतून त्यांनी फुंकलेले मानवमुक्तीचे रणशिंग अशा अनेकानेक संदर्भांची दखल घेत बदलत्या काळानुरूप आंबेडकरी विचारांच्या तत्त्वांची व व्यवहाराची मांडणी करतात. धर्म व धम्म या दोन्ही संकल्पना भिन्न अर्थांच्या कशा आहेत, हे तर समजावून सांगतातच पण समाज-परिवर्तनाच्या धम्माचे दृष्टीने असलेले धम्माचे मोलही प्रतिपादन करतात. राजकीय क्रांतीसाठी, सामाजिक व धार्मिक क्रांती किती महत्त्वाची असते, हे आंबेडकरी विचारांच्या अनुषंगाने डॉ.कसबे यांनी अत्यंत प्रभावीपणे व संयमशीलपणे मांडले. रावसाहेब कसबे गेली साडेतीन तपे दलित चळवळीचेच नव्हे तर, एकूणच परिवर्तनवादी चळवळीचे दिशादर्शक राहिले आहेत.

**भारतीय राज्यघटनेचे समीक्षक**

भारतीय राज्यघटनेची समीक्षा आजपर्यंत अनेकांनी केली. आपापल्या ताकदीप्रमाणे व मानसिकतेनुसार केली. डॉ.आंबेडकर हे घटनेचे शिल्पकार म्हणून तर त्यांच्या श्रद्धेपोटी अनेकांनी तिचे आंधळे गुणगान गाइले. त्यातील त्रुटींकडे आणि घटनेची निर्मिती होत असताना बाबासाहेबांच्या सातत्याने होणाऱ्या कोंडीकडे मात्र कोणी लक्ष दिले नाही. या जाणिवेतूनच डॉ.रावसाहेब कसबे यांनी घटनेची डोळस चिकित्सा केली आणि ''बाबासाहेबांना अभिप्रेत असणारी लोकशाही आणि सध्याच्या राज्यघटनेने उभा केलेला लोकशाहीचा राजकीय सांगाडा हे एक नव्हेत'', असे ठामपणे सांगत ''बाबासाहेबांना अभिप्रेत असणाऱ्या लोकशाही राज्यघटनेत समाजवादी अर्थव्यवस्थेचा समावेश तर असावाच परंतु देशाची अर्थव्यवस्था कोणत्याही एका वर्गाच्या हातात जाणार नाही, त्याच्या तरतुदीही असाव्यात.'' असे आग्रही प्रतिपादन करतात.

हिंदू-मुस्लीम मूलतत्त्ववादी हे समाजात दुहीचे बीज कसे पेरत आहेत, त्याची परखड चिकित्सा रावसाहेबांनी केली आहे. परिणामी कठोर टीकाही झाली. त्या टीकेस त्यांनी शांतपणे उत्तरे दिली. लोकशाही व समाजवादी मूल्यांवर निष्ठा असणाऱ्या सर्व विचारवंतांनी हिंदू राष्ट्रवादाचे आक्रमक रूप पाहून त्यास आव्हान देण्यासाठी सुसंघटित झाले पाहिजे, अशी त्यांची विचारसरणी आहे.

रावसाहेबांचे व्यक्तिमत्त्व धीरगंभीर व अत्यंत संयमशील आहे. आक्रस्ताळेपणाचा व नाहक बडेजावाचा त्यात मागमूसही नाही. अनेक आंबेडकरी विचारवंत मार्क्स

नाकारतात; पण रावसाहेब त्या विचारांचा समन्वय साधतात. प्रगतीच्या दिशेने जाणाऱ्या समाजवादी भारताला मार्क्स नाकारून चालणार नाही. प्रत्यक्ष बाबासाहेबांनीही तो नाकारला नाही. अशा स्थितीत मानवमुक्तीचा युटोपियाच ठरलेल्या या विचारात समन्वयाची किमया रावसाहेबांनी साधली आहे. ''तुम्हांला मार्क्सवादी म्हणायचे की आंबेडकरवादी की समाजवादी?'' या प्रश्नाला ते शांतपणे उत्तर देताना ''कोणीही माणूस पूर्णपणे मार्क्सवादी, आंबेडकरवादी किंवा समाजवादी असण्याची सूतराम शक्यता नाही... तुम्ही फक्त मला रावसाहेब कसबे या नावाने संबोधा,'' असे नम्रपणे सांगतात.

आदर्श शिक्षक पुरस्कार (१९९१), युगांतर प्रतिष्ठान नाशिकचा जीवन गौरव पुरस्कार (१९९९), सत्यशोधक दिनकरराव जवळकर पुरस्कार पुणे (२०००), ना.मे.लोखंडे पुरस्कार, पुणे (२०००), दलित साहित्य अकादमी, दिल्लीचा पुरस्कार आणि याशिवाय अनेक पुरस्कार त्यांना मिळाले आहेत.

– वासुदेव डहाके

**संदर्भ :**

१. कांबळे, उत्तम; 'रावसाहेब कसबे यांचे क्रांतिकारी चिंतन', पुणे; २००६.
२. कसबे, रावसाहेब; 'आंबेडकरवाद : तत्त्व आणि व्यवहार', पुणे; प्र.आ. १९८९.
३. गायकवाड, सुधाकर; डॉ.रावसाहेब कसबे : एक मूल्यमापन', पुणे; २००७.
४. कसबे, रावसाहेब; 'डॉ. आंबेडकर आणि भारतीय राज्यघटना' नागपूर; प्र.आ. १९७७.
५. कसबे, रावसाहेब; 'झोत', पुणे; चौथी आवृत्ती १९८२.
६. कसबे, रावसाहेब; 'मानव आणि धर्मचिंतन', पुणे; १९९६.
७. कसबे, रावसाहेब; 'डॉ.आंबेडकर आणि कार्ल मार्क्स'; पुणे; १९८०.
८. कसबे, रावसाहेब; 'हिंदू-मुस्लीम प्रश्न व सावरकरांचा हिंदू राष्ट्रवाद'; १९९०.

## कांत, वामन रामचंद्र

☞ **कान्त वामन रामचंद्र**

## कांबळे, अरुण कृष्णाजी

**कवी, दलित साहित्याचे अभ्यासक**

**१४ मार्च १९५३**



करगणी (जि. सांगली) येथे जन्मलेल्या अरुण कांबळे यांनी सांगलीच्या विलिंग्डन महाविद्यालयातून बी.ए. व मुंबई विद्यापीठातून एम.ए. केले. प्रथम डॉ. आंबेडकर वाणिज्य व अर्थशास्त्र महाविद्यालय व कीर्ती महाविद्यालय येथे व त्यानंतर मुंबई विद्यापीठ येथे मराठीचे अध्यापन केले. २००२ ते २००५ या काळात ते विद्यापीठात विभाग प्रमुख होते. सध्या ते मुंबई विद्यापीठाच्या फुले-आंबेडकर अध्यासनाचे प्रमुख आहेत. पदव्युत्तर अध्यापक व पीएच.डी.चे मार्गदर्शक आहेत.

दलित साहित्य अखिल भारतीय स्तरावर तसेच जागतिक स्तरावर नेण्याचे काम करणे हीच जीवननिष्ठा, असे मानणारे ते धडाडीचे लेखक आणि कवी आहेत. मुंबई आणि हैद्राबाद या दोन्ही उच्च न्यायालयांनी संशोधन ग्रंथ म्हणून मान्यता दिलेल्या 'रामायणातील संस्कृती संघर्ष' (१९८२) या ग्रंथांच्या तीन आवृत्त्या प्रसिद्ध झाल्या. या ग्रंथाचे भाषांतर गुजराती, हिंदी आणि इंग्रजी या तीन भाषांत करण्यात आले. 'जनता पत्रातील लेख' (१९९३), 'धर्मांतराची भीमगर्जना' (१९९६), 'चीवर', 'युगप्रवर्तक डॉ. आंबेडकर', 'चळवळींचे दिवस', 'वाद-संवाद' या त्यांच्या साहित्यकृतींनी मराठी साहित्यात वेगळा ठसा उमटवला. 'अरुण कृष्णाजी कांबळे' (१९८३), तसेच 'मुद्रा' (२००८) हे त्यांचे कविता संग्रहही लक्ष्यवेधी ठरले. त्यांच्या कविता हिंदी, इंग्रजी, गुजराती, उर्दू तसेच जर्मन व फ्रेंच या भाषांमध्ये भाषांतरित झाल्या. मिशिगन युनिव्हर्सिटी जर्नलमध्ये त्यांची कविता मुखपृष्ठावर प्रसिद्ध होण्याचाही मान त्यांना मिळाला.

विविध विषयांवर १५०हून अधिक लेख देशी-विदेशी नियतकालिकांतून प्रसिद्ध झाले आहेत. १९९६

साली वर्धा येथे झालेल्या तिसऱ्या अखिल भारतीय आंबेडकरी साहित्य संमेलनाचे ते अध्यक्ष होते. पहिल्या जागतिक बुद्ध-फुले-आंबेडकर साहित्य संमेलनाचेही (कल्याण २००२) ते अध्यक्ष होते, २००२ साली झालेल्या 'वर्ल्ड बुद्धिस्ट कॉन्फरन्स'चेही अध्यक्षपद त्यांना लाभले. 'दलित पँथर'चे राष्ट्रीय संस्थापक अध्यक्ष असलेल्या अरुण कांबळे यांना राष्ट्रीय एकता संघाचा 'धम्मकीर्ती' हा पुरस्कार लाभला. 'अरुण कृष्णाजी कांबळे' या कवितासंग्रहाला महाराष्ट्र साहित्य परिषदेचे सर्वोत्कृष्ट कविता संग्रहाचे पारितोषिक मिळाले. धम्मभूमी देहूरोड, पुणे यांच्या वतीने दिला जाणारा 'प्रबुद्ध रत्न' हा राष्ट्रीय पुरस्कारही त्यांना २००३ साली मिळाला.

'ॲन अँथॉलॉजी ऑफ दलित लिटरेचर' (संपादक मुल्कराज आनंद व डॉ. एलेना), 'मॉडर्न इंडिअन पोएट्री' (प्रीतीश नंदी), तसेच 'सुडेशिअन' (जर्मनी) यांमधेही कविता समाविष्ट असण्याचा बहुमान त्यांना मिळाला. प्रखर आंबेडकरनिष्ठा व अन्यायाविरुद्ध बंड करण्याची वृत्ती हे त्यांचे वैशिष्ट्य आहे.

– सुहास बारटक्के

## कांबळे, नामदेव चंद्रभान

**कादंबरीकार**

**१ जानेवारी १९४८**



आपल्या विपुल व विविध साहित्य निर्मितीने अल्पावधीत साहित्य-रसिकांपर्यंत पोचणारे नामदेव कांबळे यांचा जन्म वाशिम जिल्ह्यातील शिरपूर (जैत) येथे झाला. तेथेच शालेय शिक्षण घेऊन १९६७ साली शालान्त परीक्षा उत्तीर्ण झाल्यानंतर त्यांनी नागपूरच्या शासकीय विज्ञानसंस्थेतून प्रथम वर्षापर्यंतचे शिक्षण घेतले. पुढे १९६९ ते १९७१ या कालावधीत नागपूरच्या वैद्यकीय महाविद्यालयात त्यांनी प्रवेश घेतला, परंतु ते शिक्षण न जमल्यामुळे त्यांनी ते अर्धवट सोडले. कालांतराने बहि:स्थ विद्यार्थी म्हणून परीक्षा देऊन ते १९७७ साली बी.ए. झाले व १९७९ साली अकोल्याच्या अध्यापक महाविद्यालयातून बी.एड. झाले. १९७४ ते १९७६ या काळात चौकीदार म्हणून, पुढे दोन वर्षे प्रयोगशाळा साहाय्यक म्हणून कांबळे काम करीत होते. नंतर १९७९ पासून त्यांनी पूर्वमाध्यमिक व माध्यमिक स्तरांवर अध्यापन केले. १९८० च्या जवळपास त्यांच्या एकांकिका, ललित लेख व कथा असे बहुविध लेखन 'वाङ्मयशोभा', 'हंस', 'अक्षरवैदर्भी' इत्यादी नियतकालिकांतून प्रसिद्ध झाले. 'अकल्पित'(१९८९), 'प्रत्यय'(१९९७), 'तो: ती अन्वयार्थ' (२०००), 'गहिवर' (२००८) हे कवितासंग्रह; 'अस्पर्श'(१९९०) ही कादंबरी; 'परतीबंद'(१९९४) हा कथासंग्रह; 'स्मरण विस्मरण'(१९९८) हा ललितलेखसंग्रह असे त्यांचे लेखन प्रकाशित होत राहिले.

घरची परिस्थिती अत्यंत प्रतिकूल असल्यामुळे क्लेशकारक व कष्टदायक वातावरणात कांबळे यांना आपली शैक्षणिक व साहित्यिक प्रगती प्रयत्नपूर्वक करावी लागली. व्यक्तिगत आयुष्यात आलेल्या खडतर व विपरीत अनुभवांचा संस्कार त्यांच्या लेखनावर काही प्रमाणात होणे अपरिहार्य म्हणता येईल.

मराठी वाचकवर्गास कांबळे ह्यांचा खऱ्या अर्थाने परिचय झाला तो त्यांच्या 'राघववेळ' (१९९३) या कादंबरीस १९९५ मध्ये साहित्य अकादमीचे पारितोषिक मिळाल्यानंतर. 'राघववेळ' व त्यानंतर लिहिलेल्या 'ऊनसावली'(१९९७), व 'सांजरंग'(१९९९) अशा तीन कादंबऱ्या मिळून एक कादंबरीत्रय पुरे होते. दलित कादंबरीच्या इतिहासातील हे पहिलेच कादंबरीत्रय. तरुणपणीच वाट्याला आलेले वैधव्य व अठराविसे दारिद्र्य यांचा कष्टपूर्वक व जिद्दीने सामना करीत वालंबी नावाच्या अशिक्षित व असाहाय्य मातंग स्त्रीने जीवनात यशस्वीपणे केलेली वाटचाल, मुलांना दिलेले शिक्षण व मुलीचे केलेले लग्न अशी जाधव कुटुंबाची हकिगत या

कादंबऱ्यांतून लेखकाने सलगपणे निवेदन केली आहे. अस्तित्व टिकवण्यासाठी वालंबीला करावा लागलेला संघर्ष व सगळ्या अडचणींवर मात करत-करत पतीला दिलेल्या वचनाची मृत्युपूर्वी केलेली पूर्तता; हा तिचा प्रवास विदारक सामाजिक वास्तवावर प्रखर प्रकाशझोत टाकणारा आहे. ज्या भाऊबंदांनी व संबंधितांनी मदत तर सोडाच, साधे सहकार्यही दिले नाही; त्यांच्याविषयीदेखील कटुता न बाळगता उलट शक्य असेल तेव्हा त्यांनाच मदत करणारी समंजस व प्रगल्भ नायिका या तीन कादंबऱ्यांच्या मालेमधून वाचकांपुढे उभी राहते.

माणसाच्या आयुष्यात दुरित वेगवेगळ्या रूपांनी प्रविष्ट होत असते; त्याला सोशिकपणे, न डगमगता सामोरे जाणे यावाचून अन्य गती नसते, याची जाणीव वालंबीच्या कणखर व्यक्तिदर्शनातून कांबळे यांनी घडविली आहे. असाहाय्य स्त्रीचे शोषण कुठल्याही समाजात नेहमीच होत आलेले आहे. वालंबीचा अनुभवही वेगळा नाही. तरुण विधवा स्त्रीचा देह हीच तिच्या बाबतीतली आपत्ती असते, याची जाणीव वालंबीला आलेल्या अनुभवांनी उद्‌बोधक ठरते. भूक, मग ती अन्नाची असो वा शरीराची, माणसाला हतबल करून सोडत असते, तरीही आत्मसंयमाने व निर्धाराने पुढेच जायचे असते, आपल्या ध्येयापासून व निश्चयापासून विचलित व्हायचे नसते; याचे भान वालंबीच्या व्यक्तिरेखेमुळे जागे होते. वालंबीच्या परिश्रमांना यश आले. तिची दोन्ही मुले शिकली. ‘राघववेळ’च्या अखेरीस रघू शालान्त परीक्षा उत्तीर्ण झाला, ‘ऊनसावली’च्या शेवटी पदवीधर झाला व त्याचे लग्न ठरले. ‘सांजरंग’मध्ये त्याचा भाऊ सीताराम शिकून नोकरीला लागला, त्याचेही लग्न झाले आणि वालंबीची मुलगी कौसा लग्नानंतर सासूने केलेला छळ सोसत हळूहळू संसारात स्थिरावली. तिच्या मुलाला रघूने शिक्षणासाठी स्वत:बरोबर पुसदला नेले व शिक्षणाचा वारसा पुढे चालत राहिला. एकेकाळच्या झोपडीच्या जागी नवे घर उभे राहिले. वालंबीचे जीवन दिवसेंदिवस यशस्वी होत गेले. सर्व दिशांनी अंधाराने घेरले असताना धीराने वाटचाल करणाऱ्या या नायिकेचा अंत जीवनाच्या संध्याकाळी उतरत्या प्रकाशात समाधानकारकपणे व्हावा, हे कादंबरीकाराच्या सकारात्मक जीवनदृष्टीचे निदर्शक आहे. विशेषतः दोन घासांची भ्रांत पडलेल्या परिस्थितीत, शीलाशी कोणतीही तडजोड न करता, नायिकेने दाखविलेला निग्रह अपवादभूत आहे. सभोवतालच्या अरिष्टांना सामोरे जात, विचलित न होता वाटचाल करीत राहणे सोपे नाही. कांबळे यांच्या कादंबऱ्या वाचताना स्त्रीजीवनातील दु:खभोग हा त्यांच्या आस्थेचा विषय आहे, हे ध्यानात येते. त्यांच्या पूर्वकालीन जीवनाचा संस्कार आणि समकालीन जीवनातील सामाजिक परिस्थिती या आस्थेस विशेषत्वाने कारणीभूत ठरली असावी.

एकाच वेळी दलित व ग्रामीण अनुभवविश्व साकार करणाऱ्या या कादंबऱ्यांची निर्मिती करणारे कांबळे हे समर्थ लेखक म्हणावयास हवेत. या कादंबऱ्यांच्या माध्यमातून मांग समाजाच्या दारुण दु:खांचा व भयावह समस्यांचा कादंबरीकाराने घेतलेला वेध ज्याप्रमाणे आंतरिक तळमळीतून साकार झाला आहे, त्याप्रमाणे स्त्रीच्या वाट्याला येणाऱ्या दु:खभोगाची तीव्रता, ॲसिडच्या थेंबाप्रमाणे पडेल तेथे भाजून टाकील अशा, परिणामकारक पद्धतीने मूर्त केली आहे. बोलीभाषेच्या सप्रयोजक अवलंबामुळे त्यांच्या कादंबऱ्यांना विशिष्ट प्रदेशाचे रूप आपोआप प्राप्त होते. ‘राघववेळ’, ‘ऊनसावली’ व ‘सांजरंग’ ही दिनचक्रनिदर्शक अर्थपूर्ण शीर्षके कादंबऱ्यांना देऊन त्या शीर्षकांचा कादंबरीच्या नायिकेच्या जीवनातील समांतर अशा अनुभवांशी मेळ घालण्याचा लेखकाचा प्रयोग यशस्वी झाला आहे. ‘मोराचे पाय’(१९९७), ‘सेलझाडा’ (२००१), व ‘कृष्णार्पण’ (२००८) या त्यांच्या पुढल्या कादंबऱ्यादेखील विदर्भातील ग्रामजीवनाची सुखदु:खे चित्रित करतात. खेड्यांतील कादंबऱ्यांना आधारभूत असणारी बलुतेदारीची पद्धती औद्योगिकीकरणपूर्व समाजव्यवस्थेचे दर्शन घडविते; हे जरी बरोबर असले,

तरी या कादंबऱ्यांचे लेखन झाले, तेव्हा जागतिकीकरण आपल्या उंबरठ्यावर उभे होते, त्याचेही काही परिणाम ग्रामजीवनावर घडत होते. अशा वेळी या व्यवस्थेची प्रस्तुतता किती, यासंबंधीचे काही सूचन कादंबऱ्यांतून का घडू नये, असा प्रश्न उपस्थित होतो. भरपूर साहित्यनिर्मिती करूनही कांबळे यांच्याकडे मराठी समीक्षेचे फारसे लक्ष का गेलेले नाही, त्याचा उलगडा होत नाही.

गद्यलेखनात बहिर्मुख वृत्तीने लिहिणारे कांबळे कवितेत मात्र बऱ्याच प्रमाणात अंतर्मुख झाले आहेत. त्यांची काव्याभिव्यक्ती प्रासादिक परंतु अर्थबहुल आहे. त्यांची कविता अंतर्मुख होऊन स्वत:ला ज्याप्रमाणे न्याहाळते, त्याचप्रमाणे वेगवेगळ्या सामाजिक घटनाप्रसंगांचा व सामाजिक स्थित्यंतरांमधील चढउतार रेखाटते. सामाजिक जाणिवेची त्यांची कविता समाजातील गुंतागुंतीच्या प्रश्नांकडे अंगुलिनिर्देश करते. जीवनानुभवांतला धगधगता अंगार विझल्यानंतर प्रौढपणी येणारे निखळ शहाणपण त्यांच्या कवितेत ठिकठिकाणी उमटवलेले आहे (उदा. ‘शिशिर माळून/गेला सावकाश/कोंब हरळीस/आज नवा’). कालप्रवाहाबरोबर घडलेली अटळ स्थित्यंतरे तटस्थपणे न्याहाळणारे (उदाहरणार्थ ‘गाव पार माझा/बदलून गेला/कात टाकलेला/जैसा नाग’), जुने जाणे व नवे येणे या सनातन सत्याचा अनुभव घेणारे, जीवनातल्या कटू अनुभवांचा मूक स्वीकार करून ते मागे टाकत पुढील वाटचाल समजूतदारपणे करणारे व्यक्तिमन या कवितांतून उभे राहते.

सर्जनशील साहित्याची निर्मिती करणाऱ्या या लेखकाने ‘समरसता साहित्य: स्वरूप व समीक्षा’ (२००८) हे समरसतेची संकल्पना स्पष्ट करणारे पुस्तक लिहिले आहे. त्यात समरसता साहित्याची व्याख्या, समता-समानता-समरसता, प्रवर्तन-परिवर्तन व समरसता, समरसतेची प्रेरणा यांसारख्या विषयांवरील कांबळे यांचे स्वतंत्र मतप्रतिपादन आढळते. ‘शब्दांच्या गावा जावे’ (२००९) हा त्यांच्या वेळोवेळी केलेल्या भाषणांचा संग्रह आहे. त्यामधून शिवाजी महाराज, संत तुकाराम, स्त्री-दशा आणि दिशा, शेतकरी आत्महत्या: शोध आणि बोध, ओबीसीना आरक्षण हवे इत्यादी विषयांच्या संदर्भात कांबळे यांनी केलेले विचारमंथन सर्व वाचकवर्गाला उपलब्ध करून दिले आहे. हा संग्रह त्यांच्या विचारविश्वाचा दिशादर्शक आहे. उपर्युक्त ‘परतीबंद’ या कथासंग्रहातून ग्रामीण दलित समाजाप्रमाणेच प्रस्थापित समाजातील व्यक्तींचे जीवनानुभवही कथांचा विषय बनले आहेत. रूढ दलित साहित्याच्या आक्रमक आविष्कारापेक्षा काहीशा सौम्य सुरात आविष्कृत होणारी कांबळे यांची साहित्यनिर्मिती मूलभूत मानवतावादाच्या जवळ जाणारी आहे. जातीपातींच्या उतरंडीपेक्षाही माणसाचे या ना त्या निमित्ताने होणारे शोषण या लेखकाला बोचत राहते. त्यामुळेच केवळ दलित्वाच्या व वंचनेच्या संघर्षापेक्षाही माणसाचा माणूस म्हणून जगण्याचा हक्क त्यांना अधिक मोलाचा वाटतो. हे भिन्न वळण त्यांच्या साहित्यविषयक भूमिकेचे द्योतक म्हणता येईल.

– डॉ. विलास खोले

## कांबळे, बेबी

**आत्मचरित्रकार**

**जन्म अंदाजे १९३० च्या सुमारास**



बेबीताई यांचा जन्म पुरंदर तालुक्यातील वीरगाव नावाच्या खेड्यातील काकडे कुटुंबात झाला. युरोपिअन साहेबांचे बटलर असलेले बेबीताईंचे आजोबा दरमहा दहा रुपये पाठवीत. त्या काळात एवढ्या रकमेत त्यांचे घर खाऊन-पिऊन सुखी होते. बेबीताईंचे वडील पंढरीनाथ हे ठेकेदार असल्याने नेहमी बाहेरगावी असत. ते नावाप्रमाणे मायाळू असून त्यांना फक्त माणसाचे जीवन सुखी करण्याची आस होती. ते नेहमी जगाचे चांगले करीत राहिले. त्यांना

धनापेक्षा माणसे प्रिय होती. परिणामी त्यांचे आपल्या पत्नीशी कधी पटले नाही. लेखिकेचे बालपण आजोळी गेले. त्यांच्या आत्मचरित्रात महार शब्द जिथे-तिथे आला आहे. त्याविषयी त्या म्हणतात, ''महार या शब्दाला आजची सुधारलेली मंडळी लाजत आहेत. पण यात लाजण्यासारखे आहे तरी काय? उलट हा शब्द आपली मान उंचावतो.... कारण आजही हे राष्ट्र आमच्या नावावरच चाललेले आहे... मला हा शब्द प्रिय असून माझ्या नसानसांतून सत्य संघर्षाची जाणीव करून देणारा आहे.'' डॉ. आंबेडकरांविषयी त्या कृतज्ञतेने भरभरून लिहिताना म्हणतात, ''भीमामुळे आम्ही आज सोन्याच्या लंकेत नांदत आहोत.''

पश्चिम महाराष्ट्रातल्या एका खेडेगावातल्या महार समाजाचे चित्र हा पुस्तकाचा खरा गाभा आहे. दलित स्त्रीचे मराठीतले पहिले आत्मचरित्र म्हणून बेबीताईंच्या पुस्तकाला ऐतिहासिक महत्त्व आहे. समाजशास्त्रज्ञाचा पिंड असलेल्या लेखिकेला लहानपणापासून समाजजीवनाचे निरीक्षण बारकाईने करण्याचा नाद होता. त्यांनी या पुस्तकात महार स्त्री-जीवनाचे चित्र, पाच-सहा वर्षांच्या मुलींची लग्ने, सासरी होणारा त्यांचा छळ, वयात आलेल्या सून-मुलगा यांच्यात दुरावा राहावा म्हणून सासूबाई करीत असलेले अनन्वित प्रकार, पळून गेलेल्या सुनेला परत आणून तिच्या पायात खोडा घालणे, काही वेळा तिचे नाक कापण्याचा क्रूरपणा यांसारख्या गोष्टींचे वर्णन बेबीताईंनी तपशीलवार केले आहे. या वर्णनात आत्मीयतेसोबत तटस्थताही आहे.

आंबेडकरांच्या चळवळीने 'भीमाचं वारं' झोपडी-झोपडीत शिरले. त्यामुळे 'आपल्या पोराबाळांना शिकवल्याखेरीज या नरकातून आपण बाहेर पडणार नाही' याची प्रखर जाणीव या समाजाला होऊ लागली. पंढरीनाथांनी आपल्या कन्येला फलटणच्या शाळेत घातले. बेबी कांबळे स्वतः शिकल्या, विवाहानंतर त्यांनी आपल्या मुलांनाही शिक्षण दिले.

बेबी कांबळे यांचे 'जिणं आमुचं' हे आत्मचरित्र वास्तवावर आधारित व प्रभावी आहे. त्यांच्या या पुस्तकाला महाराष्ट्र राज्य साहित्य संस्कृती मंडळाचे अनुदान लाभले आहे.

– वि. ग. जोशी

**संदर्भ :**

*१. कांबळे, बेबी; 'जिणं आमुचं', प्रकाशक: रचना, रवींद्र कुलकर्णी, पुणे.*

## कांबळे, शांताबाई कृष्णाजी

**आत्मकथनकार**

**१ मार्च १९२३**



पूर्वाश्रमीच्या नाजुका (नाजाबाई) सखाराम बाबर यांचा जन्म सांगली जिल्ह्यातील (तालुका आटपाडी, मु. पो. करगणी) महूद या गावी झाला. या ठिकाणीच प्राथमिक शिक्षण घेतले. नंतर पुणे येथे प्राथमिक शिक्षिका प्रशिक्षणाची २ वर्षे पूर्ण करून १९५२मध्ये त्या उत्तीर्ण झाल्या.

प्राथमिक शिक्षिका म्हणून कुर्डूवाडी, आटपाडी, दिघंची, करगणी येथे अध्यापन केले. पुढे मुख्याध्यापिका, शिक्षणाधिकारी या पदापर्यंत प्रवास झाला.

दलित स्त्रीचे मराठी साहित्यातील पहिले आत्मकथन 'माज्या जल्माची चित्तरकथा' त्यांनी लिहिले. या आत्मकथनाची भाषांतरे इंग्रजी, फ्रेंच, कानडी, हिंदी या भाषांमध्ये झाली. दुसऱ्या आवृत्तीचा प्रकाशन सोहळा विश्वनाथ प्रताप सिंग यांच्या हस्ते शनिवार वाड्यात संपन्न झाला. या आत्मकथनावर आधारित 'नाजुका' नावाची मालिका मुंबई दूरदर्शनवर सादर करण्यात झाली.

'पूर्वा' मासिकातून मार्च १९८३ पासून हे लेखन क्रमशः प्रसिद्ध होऊ लागले आणि १९८६ मध्ये पुस्तकरूपाने आले. ती केवळ दुःखाची गाथा नसून उत्कर्षाचीही कहाणी आहे. एका मनस्वी व्यक्तिमत्त्वाची ओळख यातून होते. नाजुका संवेदनशील आहे.

समाजातील असमानतेचे दर्शन तिला लहानपणीच घडते. ‘ए, महाराच्या पोरे-- शिवशील.’ या शब्दांनी दुःख झाले असले, तरी त्याचा बडिवार माजवलेला नाही. ‘पंढरपूरला गेलो पण देवदर्शन घेतले नाही’ अशा काही गोष्टी तटस्थतेने येतात. पण पुढे-पुढे वागण्यात कणखरपणा आणि संयम यांचा समतोल त्यांनी दाखवला आहे. पतीला सोडायचे हा निर्धार त्या पाळतात, पण वेळ येताच सवतीच्या मुलांनाही आपलेसे करून त्यांची जबाबदारी उचलतात. आपल्या माहेरच्या व सासरच्या नातलगांची काळजी आपलेच कर्तव्य समजून मनापासून घेतात.

शिक्षिका झाल्यानंतर अर्थार्जनाचे साधन म्हणून नोकरीकडे न पाहता कर्तृत्व दाखवण्याची संधी हा आजच्या आधुनिक युगाच्या तरुणांचा विचार त्यांच्यात रुजला. त्यामुळे शाळेचा निकाल १०० टक्के लागावा, प्रौढ साक्षरता वर्ग चालवावे, शाळा जास्तीत जास्त चांगली, मोठी व अधिक सुविधा असणारी असावी, या दृष्टीने त्या प्रयत्नशील राहिल्या. पुढे ‘शिक्षण विस्ताराधिकारी’ झाल्यावर आपल्या अनुभवांचा फायदा त्या इतरांना देतात. छोटे-छोटे बदल करूनही आपण काय-काय करू शकतो, त्याची जाणीव करून देतात.

सुरुवातीच्या काळातल्या हाल-अपेष्टा, जातीनुसार आलेल्या कामांचे, देव-देवरुषी यांच्यावरील अंधश्रद्धेमुळे झालेल्या नुकसानीचे वेदनादायक चित्रण त्यांच्या आत्मकथनात येते. पण सहानुभूती मिळावी ही अपेक्षा न ठेवता मोजक्या रेषांनी काढलेली ती अनुभवांची चित्रे वाटतात. आजारात कोंबडा उतरवून टाकण्याऐवजी डॉक्टरी मदत घेण्याचे निर्णय शिक्षणामुळेच ठामपणे घेता आले. त्यात त्या यशस्वी झाल्या आणि त्यांनी इतरांसमोर आदर्श ठेवले. अशा लहान-सहान प्रसंगांद्वारेच त्या स्वतःच्या मानसिक आणि बौद्धिक उन्नयनाची जाणीव करून देतात.

१९३० ते १९५० ह्या सुमाराचे ग्रामीण जग कसे होते, त्याचे ठसठशीत दर्शन हे या पुस्तकाचे वैशिष्ट्य होय. समाजाचा गाडा कसा चालतो, देव-देवरुषी यांचा पगडा, तुलनेने स्वस्ताई असूनही अन्नाच्या दाण्या-दाण्याला पारखा झालेला गोर-गरीब, ढोरफाडीचे नियम, त्यातली हिस्सेदारी, पोलिसांची अरेरावी, जातीच्या-गावाच्या न्यायपद्धती, देवळात प्रवेश नसूनही विठ्ठलाची ओढ, त्याच्या वारीला यथाशक्य जाणे, मुसलमानांच्या पिराला नवस बोलणे, गरिबांच्या घरांच्या रचना, त्यातले सामान, पावसाळ्यात त्यांच्या वाढणाऱ्या हालअपेष्टा, जातीयतेचे दृश्य स्वरूप, विद्यार्थी गळतीचे कारण, रोगराई, पिराला मलिदा देणे अशा सर्व तऱ्हांच्या विषयांना प्रसंगानुरूप स्पर्श करून त्या काळाचे कोरीव चित्र शांताबाईंनी साकार केले आहे, तेही अल्पाक्षरी शैलीत, संयमाने.

शिक्षणाचे महत्त्व पटल्यामुळे हृदय कमजोर असूनही त्या नोकरीचा राजीनामा देत नाहीत आणि आपल्या तिन्ही मुलांना उत्तम शिक्षण देतात. मुलेही कष्टाचे चीज करतात. मोठा मुलगा धाकट्यांच्या शिक्षणाला मदत करतो. पतीचे चित्रणही ‘चरित्र’ म्हणून न येता ओघाओघात जसे आले तसे केले आहे. पतीच्या सुरुवातीच्या वागणुकीबद्दल अतिशय तटस्थपणे बाई बोलतात. पण पुढे त्यांचा सहभाग, त्यांचे कलावंतपण तितक्याच सहजपणे सांगतात.

आत्मकथनातील सुरुवातीचे निवेदन त्यांच्या बोली भाषेत असले, तरी पुढे त्यांनी प्रमाण बोलीचा वापर केला आहे. विलक्षण साधी, निरलंकृत आणि अल्पाक्षरी शैली आहे. याबद्दल पु. ल. देशपांडे म्हणतात, ‘‘लिळाचरित्रासारख्या महानुभावांच्या ग्रंथातल्या शैलीशी जुळणारी वाटते.’’

– प्रा. मीना गुर्जर

## काकोडकर, चंद्रकांत कल्याणदास

**कादंबरीकार**

**२१ मार्च १९२१ – २३ नोव्हेंबर १९८८**

चंद्रकांत काकोडकर यांचा जन्म काकोडे, गोवा येथे झाला. त्यांचे सुरुवातीचे शिक्षण गोव्यात व नंतरचे अत्यंत खडतर, कष्टमय परिस्थितीत मुंबईच्या ओरिएन्ट व चिकित्सक हायस्कूलमध्ये करून ते १९४३ साली



मॅट्रिक झाले. साइझिंग मटेरियल्स या एकाच कंपनीत त्यांनी १९७० पर्यंत नोकरी केली. सुरुवातीला सानेगुरुजी, वि. स. खांडेकर, ना. सी. फडके यांच्या साहित्याचा व नंतरच्या काळात प्रसिद्ध बंगाली लेखक शरच्चंद्र चटर्जींच्या लेखनाचा त्यांच्यावर विशेष प्रभाव पडला. गांधीजींच्या राजकीय विचारसरणीचाही प्रभाव काकोडकरांवर होता. ललित लेखकाचा पिंड, सळसळते रक्त, विशिष्ट वाचकवर्ग नजरेसमोर ठेवून रंजन करण्याची चिकाटी यांमुळे त्यांची लेखननिष्ठा अभंग राहिली. त्यांच्या कथावस्तूंमध्ये सुशिक्षित मध्यमवर्गीय संस्कृती, संगीत, चित्रकला, काव्य इत्यादी कलांचे क्षेत्र चित्रित आहे. त्यांचे नायक जसे जिद्दीचे, गुणी, कर्तबगार, मनस्वी व प्रेमातल्या निष्ठेवर जीव ओवाळून टाकणारे आढळतात; तशाच नायिकाही सुस्वरूप, देखण्या, व नायकांच्याच तोडीच्या वाटतात. कुशल आविष्कार करणारे लेखन असले, तरी विशिष्ट चाकोरीतच ते फिरत राहते, त्यामुळे नंतर कंटाळवाणे होऊ लागते. त्यांचे साहित्य उत्तम स्वप्नरंजन करते.

एखाद्या राजकीय समस्येच्या सूत्राशी सामाजिक कथा गुंफण्याचा लेखकाचा प्रयत्न 'निसर्गाकडे' (१९४४) 'कुणाच्या स्वातंत्र्यासाठी' (१९४८) व 'गोमांतका जागा हो' (१९५०) या कादंबऱ्यांतून प्रतीत होतो. यांतील शेवटच्या कथेत गोमांतकाच्या स्वातंत्र्याचा प्रश्न व देवदासींचा प्रश्न हे दोन्ही त्यांनी नायक व नायिका ह्यांच्या प्रेमकथेच्या माध्यमातून मांडले आहेत. प्रेमकथेला प्राधान्य मिळाल्याने प्रश्न गौण बनले व त्यांना अपेक्षित उठाव मिळाला नाही. त्यांच्या कादंबऱ्यांतून प्रेमभावनेची मोकळेपणाने केलेली वर्णने आहेत. यौवनमत्त शरीरसौंदर्याच्या उत्तान वर्णनात काकोडकर कसबी आहेत. त्यात तोचतोपणा जाणवतो व कलात्मक सौंदर्य जाणवत नाही. त्यांच्या लेखनाची लोकप्रियता अमान्य करता येत नाही. प्रीतीला केंद्र कल्पून त्यांची कल्पक प्रतिभा जगातील विविधता टिपते व कथेत जीवनाचा हवा तसा उपयोग करून कादंबरी पूर्णत्वास नेते. वाचकांचा अनुनय ते कुशलतेने साध्य करतात.

'अनुराग', 'अनिता', 'अबोल झालीस का?', 'अमरप्रेम', 'आधार', 'आनंदभैरवी', 'गुंतता हृदय हे', 'दैव जाणिले कुणी', 'प्रीत रंगली ग', 'देवाघरचे ज्ञात कुणाला', 'संकेत मीलनाचा' इत्यादी कादंबऱ्यांची शीर्षके त्यांच्या अंतरंगाची सूचक आहेत. झपाटलेल्या गतीने ते लेखन करतात.

१९४४ ते १९६० या काळात 'पुनर्मीलन', 'प्रीतीची ओढ', 'कीर्तिमंदिर', 'अग्निदिव्य', 'क्षण आला भाग्याचा' इत्यादी सुमारे तीस कादंबऱ्या त्यांनी लिहिल्या. नंतरच्या काळात कादंबऱ्यांव्यतिरिक्त 'अरेबिअन नाइट्स' या कथांचे नीटस भाषांतर (भाग १ ते ५) त्यांनी केले. शरच्चंद्रांचा अभ्यास करून त्यांचेच नाव घेऊन 'सुचिता' ही बंगाली कादंबरी प्रसिद्ध केली व हे गुपित नंतर फोडले. त्यांच्या 'श्यामा'(१९६३) कादंबरीने अश्लीलतेच्या विषयावर खळबळ माजवली. प्रकरण सर्वोच्च न्यायालयापर्यंत गेले व काकोडकरांच्या बाजूने निकाल झाला. त्याच कादंबरीच्या १९७१ च्या आवृत्तीत त्यांनी या खटल्याचे साद्यंत वर्णन दिले आहे. काकोडकरांच्या 'नीलांबरी' कादंबरीवर निघालेला 'दो रास्ते' हा हिंदी चित्रपट गाजला. कथालेखनाचे पारितोषिक त्यांना मिळाले. 'कीर्तिमंदिर'ला 'गोमांतक साहित्य संमेलना'चे पारितोषिक मिळून तिचे हिंदीत भाषांतरही झाले. गोमंतक साहित्य संमेलनाचे अध्यक्षपदही त्यांना मिळाले. शालेय जीवनातच लेखनाचा शुभारंभ करणाऱ्या काकोडकरांनी काही कथाही लिहिल्या होत्या. काही कादंबऱ्यांच्या अनेक आवृत्त्याही निघाल्या, यावरून त्यांची लोकप्रियता ध्यानात येते.

काहीशी एककल्ली व एकमार्गी प्रवृत्ती असलेल्या काकोडकरांनी ३०० हून अधिक कादंबऱ्या मराठी वाङ्मयाला दिल्या. इतक्या संख्येने कादंबऱ्या लिहिणारा लेखक मराठीत दुसरा नाही. तरीही

साहित्यिकांच्या कुठल्याही मेळाव्यात त्यांनी कधीही हजेरी लावल्याचे ऐकीवात नाही. त्यांनी १९६० नंतर आपल्या लेखनाचा वेग वाढवला. एकत्रित चार-पाच कादंबऱ्या देणारे 'चंद्रकांत' व 'काकोडकर' हे दिवाळी अंक उल्लेखनीय आहेत.

– वि. ग. जोशी

**संदर्भ :**

*१. खानोलकर गं. दे.;'मराठी वाङ्मयसेवक चरित्रकोश', अथेना पब्लिशर्स, मुंबई; २००३.*
*२. देशपांडे अ. ना.; 'आधुनिक मराठी साहित्य-भाग दुसरा'; व्हीनस प्रकाशन, पुणे; १९७०.*

## काणेकर, अनंत आत्माराम

**प्रवासवर्णनकार, लघुनिबंधकार, कवी, कथाकार, अनुवादक**

**२ डिसेंबर १९०५ – १४ मे १९८०**



अनंत काणेकर यांचा जन्म मुंबईला झाला. मुंबईतील गिरगावच्या चिकित्सक समूह हायस्कूलमधून ते मॅट्रिक परीक्षा उत्तीर्ण झाले (१९२२). सेंट झेवियर महाविद्यालयामधून संस्कृत विषयात बी.ए.पदवी संपादन केली (१९२७), आणि १९३०-३२ मध्ये वकिलीची सनद घेतल्यानंतर त्यांनी मुंबईत वकिली सुरू केली. ती जेमतेम २-३ वर्षे केल्यावर अन्य व्यवसाय-वाटचालीसमवेत त्यांनी साहित्याच्या प्रांतात मुशाफिरी केल्याचे दिसते.

महाविद्यालयीन दिवसात 'चांदरात आणि इतर कविता' या त्यांच्या कवितासंग्रहातल्या काही कविता काणेकरांनी लिहिल्या होत्या. त्याच वेळी सुटीतल्या दोन-अडीच महिन्यांत 'डॉल्स हाउस' या इब्सेनच्या नाटकाचा मराठी अनुवाद त्यांनी केला. दुसरी गोष्ट त्या आठ-दहा दिवसांत करून टाकली ती म्हणजे हस्तलिखितात पडलेल्या 'चांदरात'मधल्या बऱ्याच कवितांपैकी तीस-बत्तीस कवितांचा इंग्रजी अनुवाद करून टाकला (१९२७).

साधारण १९३० ते १९३५ या कालखंडात मराठी नाट्यक्षेत्रात नवे वारे वाहू लागले. वा.वा.भोळे यांचे 'सरलादेवी', वर्तकांचे १९३३ मधले 'आंधळ्यांची शाळा', १९३४ मधले अत्र्यांचे 'घराबाहेर' ही नाटके नव्या प्रवाहाची निदर्शक म्हणून नमूद करण्यासारखी आहेत. याच काळात अनंत काणेकरांनी इब्सेनच्या 'डॉल्स हाउस'चे 'घरकुल' या नावाने मराठी रूपांतर केले. त्याला प्रसिद्धीचा प्रकाश मात्र १९४१ साली दिसला. काणेकरांनी जे नाट्यलेखन केले, ते मुख्यतः रूपांतरित स्वरूपाचे असून 'निशिकांताची नवरी' (गोल्डस्मिथ- १९३८), 'फास' (डब्ल्यू. ओ. सोमिन- १९५०), 'पतंगाची दोरी' (जेम्स बॅरी- १९५१), 'झुंज' (जॉन गॉल्सवर्दी- १९७४) ही त्यांची 'घरकुल'खेरीज इतर रूपांतरित नाटके होत. प्रसंगनिष्ठ विनोदाने रसिकांचे मनोरंजन करणारे बाळबोध वळणाचे 'निशिकांताची नवरी' हे नाटक व 'पतंगाची दोरी'मधील प्रमुख व्यक्तिचित्रण सरस साधले आहे. 'फास'मध्ये दोनच पात्रे असून त्यातील उत्कंठा अखेरपर्यंत कायम ठेवण्याचे त्यांचे कसब निःसंशय कौतुकास्पद आहे, असा अभिप्राय डॉ.अ.ना.देशपांडे (आधुनिक मराठी वाङ्मयाचा इतिहास) यांनी नोंदविला आहे.

काणेकरांनी एकांकिका लेखनाच्या क्षेत्रातही रूपांतराचा प्रयत्न केला. 'धूर आणि इतर एकांकिका' (१९४१) या संग्रहातील 'सैंपाकणी', 'धूर', 'श्री शिवाजी शहाजी भोसले', 'पैजार' आणि 'बांदिवलीत डॉक्टर' या एकांकिका स्वतंत्र स्वरूपाच्या तर 'आत्महत्या', 'बांदिवलीच्या मास्तरणी' व 'संप' या रूपांतरित आहेत. 'डिक्टेटर' ही मात्र भाषांतरित आहे.

**भावगीतकार काणेकर**

'घरकुल'च्या प्रसिद्धीचे १९४१ हे वर्ष मराठी नाट्यवाङ्मयाच्या इतिहासात आणखी एका दृष्टीने महत्त्वपूर्ण आहे. १९४० च्या सुमारास मराठी रंगभूमी अगदी मोडकळीस आली होती. १९३३ ते १९४० या काळात मराठी रंगभूमीला ज्यांच्यामुळे प्रगतीची आणि

वैभवाची अवस्था प्राप्त झाली त्या ‘नाट्यमन्वंतर’ आणि ‘बालमोहन’ या नाटक कंपन्यांच्या कर्तृत्वाचा बहर या कालखंडाच्या अखेरीस बराचसा ओसरून गेला होता. अत्र्यांना रंगभूमीपेक्षा रजतपटाचे आकर्षण अधिक वाटू लागले. १९४० च्या आसपास मराठी रंगभूमी चैतन्यहीन झाली होती. बोलपटांचा वाढता प्रभाव, नाट्यकला निर्वासित होण्यास कारणीभूत ठरत होता. १९४१ च्या सुमारास मो.ग.रांगणेकरांनी वृत्तपत्रसृष्टीचा त्याग करून नाट्यसृष्टीत पदार्पण केले. ‘नाट्यनिकेतन’मधून नव्या नाटकांचे आगमन होऊ लागले. त्यात संस्थापनेपासून अनंत काणेकरांचा सहभाग होता. अनंत काणेकरांच्या ‘चांदरात’मधल्या काही कवितांचा समावेश रांगणेकरांच्या नाटकात झाला आहे. ज्योत्स्ना भोळे यांनी ही गीते समरसून गाइली आणि ती अत्यंत लोकप्रिय झाली. विशेषतः ‘आला खुशीत समिंदर’, ‘चल ग सखे रानामधे, चाफ्याचं फूल तुझ्या कानामधे’ अशा कविता फार लोकप्रिय झाल्या. ‘तू माझी अन् तुझा मीच’, ‘एकलेपणाची आग’ अशी काणेकरांची भावगीते वर्तकांनी हौसेने आपल्या नाटकात घातली. भावगीतकार म्हणून काणेकरांची महाराष्ट्रभर कीर्तीही झाली आणि ‘आता कशाला उद्याची बात’ या गाण्याने तर पुढे लोकप्रियतेचा कळस गाठला. ‘प्रभात’ कंपनीच्या ‘माणूस’ चित्रपटाची पटकथा काणेकरांनी लिहिली, आणि रंगभूमीबरोबरच रजतपटामध्येही काणेकरांचे नाव झाले.

यापूर्वीच्या काणेकरांच्या ‘चांदरात’ १९३३ मधील कवितांनी तोवर मराठी काव्याच्या प्रांतात सर्वांचे लक्ष वेधले होते. प्रचलित कवितेची धाटणी बदलून तिची ‘चाल’ आधुनिक आकर्षक आणि वास्तवाभिमुख होण्याच्या पाऊलखुणा ‘चांदरात’मध्ये आहेत. माधवराव पटवर्धनांनी म्हटल्याप्रमाणे या कवितेत आशेचे उद्‌गार, निराशेचे निःश्वास, विनोदाचा विलास आणि विडंबनविहारही आहे. विविध रुचीच्या रसिकांना रंगविण्याचे त्यात भरपूर सामर्थ्य आहे. अतिरिक्त व विसंगत कल्पना आणि शैली यांची विडंबने (विशेषतः रविकिरण मंडळाच्या काळातील कवितांबाबत) विनोदप्रिय रसिकांना मार्मिक वाटण्याजोगी आहेत आणि प्रेमगीते चाहणाऱ्या रसिकांची हौस पुरविण्याचे भरपूर सामर्थ्य या कवितेत आहे. ‘कवने’, ‘दोन भक्त’ यांमधील कविकल्पनेचे तत्कालीन समीक्षकांनी कौतुक केले. काणेकरांनी ‘मराठी कवितेच्या क्षेत्रात नव्या मनूच्या पताका फडकविल्या’ असे के. नारायण काळे या त्यांच्या समकालीन समीक्षकाच्या दृष्टीतून दिसते.

नव्या वस्तुनिष्ठ भावना, कल्पना यथार्थतेने व्यक्त करण्याच्या दृष्टीने काव्यातील परंपरागत संकेत अपुरे पडतात, असा अनुभव आल्यामुळे आणि त्या अनुभवाशी एकनिष्ठ राहण्याचे काणेकरांनी ठरविल्यामुळे त्यांनी १९३१ नंतर काव्यलेखन कमी केले. ‘चांदरात’च्या दुसऱ्या आवृत्तीच्या प्रस्तावनेत काणेकरांनी याचा उल्लेख केला आहे. ते म्हणतात, “आजूबाजूच्या जगाकडे पाहिल्यानंतर ज्या वस्तुनिष्ठ भावना किंवा कल्पना माझ्या मनात उत्पन्न होतात, त्या गद्यात मी चांगल्या तऱ्हेने व्यक्त करू शकेन किंवा त्यांपैकी ज्या काव्यात व्यक्त करण्यासारख्या असतील, त्या व्यक्त करण्याचे नवीन माध्यम मला अजून सापडत नसेल.” स्वतःच्या प्रतिभेच्या वैशिष्ट्यांशी आणि मर्यादांशी एकनिष्ठ राहण्याची काणेकरांची ही वृत्ती निःसंशय अभिनंदनीय आहे. तसेच बदलत्या काळाची व व्यक्तित्वाची हाक ओळखण्याची त्यांची कुशलताही लक्षणीय आहे. ‘चौकोनी आकाश’मधून (१९७४) त्यांच्या संपादित कवितांच्या प्रा.रमेश तेंडुलकर यांच्या निरीक्षणातून ही बाब पुनः अधोरेखित झाली आहे.

कथाकार काणेकरांचा एक वेगळा दृष्टिकोन त्यांच्या कथासंग्रहातून प्रत्ययाला येतो. ना.सी.फडके, वि.स.खांडेकर, य.गो.जोशी, वि.वि.बोकील, द.र.कवठेकर इत्यादी लेखकांच्या कथावाङ्मयापासून काणेकरांची कथा बहुधा अलिप्त राहिलेली आहे. अतिरेकी भावव्याकुलता, योगायोग इत्यादीपासून ती दूर आहे. वर उल्लेखिलेली बदललेली भूमिका बहुधा कथालेखनाबाबतही कार्यरत झाली असावी. कारण त्यांच्या कथालेखनात भावना व बुद्धी या दोन्ही शक्तींच्या

विकासाला यथाप्रमाण वाव मिळालेला आहे. सुरुवातीच्या म्हणजे १९२५-३० पर्यंतच्या कथांत सौंदर्यात सत्य पाहण्याची वृत्ती आहे. पुढील कथांत मात्र सत्यात सौंदर्य शोधण्याचा प्रयत्न आहे. सुरुवातीला कल्पनावादात रमणारी त्यांची लेखणी पुढे यथार्थदर्शन घडवू लागली आहे. 'रक्ताची खूण' (१९२५) पेक्षा 'प्रेमाचा मोसम' (१९३६) मधील व्यक्तिदर्शन वास्तवतेच्या संभाव्य अपेक्षा पूर्ण करणारे आहे.

**लघुनिबंधकार काणेकर**

काणेकरांचे लघुनिबंध हे त्यांच्या साहित्यविश्वाचे आणखी एक आणि अनोखे लक्षणीय दालन आहे. आपल्या विचारांची मांडणी ते आटोपशीर, आकर्षक आणि ठसठशीतपणे करतात. ना.सी.फडके, वि.स.खांडेकर अशा लघुनिबंधलेखकांपेक्षा त्यांचा लघुनिबंध तंत्रशरणतेला दूर करून आणि तत्त्वजडतेला बाजूस सारून मोकळाढाकळा, मिस्कील, स्वतंत्र आणि गप्पिष्ट असूनही मनात विचारांचे सहज आरोपण करणारा आहे. त्यांच्या स्वभावाप्रमाणेच त्यांचा लघुनिबंधही हवेहवेसे चित्र निर्माण करणारा, वास्तव अनुभवांशी सलगी करणारा आहे तरी त्यात कल्पकता आहे. धक्का देऊन विषयाची नवी बाजू प्रकाशात आणणारा, रसिकाला सहभागी करून घेणारा आहे. काणेकरांची स्पष्ट आणि परखड विचारसरणी त्यातून प्रकट होते. दृष्टी प्रगतिशील असून सामाजिक विषमता तिला अगदी अमान्य आहे. 'पिकली पाने' (१९३४), 'शिंपले आणि मोती' (१९३६), 'तुटलेले तारे' (१९३८), 'उघड्या खिडक्या' (१९४५), 'नवे किरण' (१९४७), 'विजेची वेल' (१९५६), 'पांढरी शिडे' (१९५७) व 'खिडकीतले तारे' (१९६४) हे त्यांचे लघुनिबंध संग्रह त्यांचे वाङ्मयीन व्यक्तिमत्त्व आपल्यासमोर उभे करतात. हे व्यक्तिमत्त्व लौकिक जीवनाशी समन्वय साधणारे आहे. संकेतप्रियता आणि रूढ समजुतींना धक्के देण्याची त्यांची पद्धत खेळकर असूनही इच्छित परिणाम साधते. सामाजिक टीकाकाराची भूमिका घेऊनही मिस्कील, सहज, हळुवार अशी ही टीका रसिकास भावते.



'घड्याळाचे गुलाम', 'झोपेचे फायदे' अशा सहज आठवण्यासारख्या लघुनिबंधांतून त्यांच्या अनौपचारिक लेखनशैलीचा प्रत्यय वाचकांना येतो.

या संदर्भात त्यांनी निर्माण केलेले 'गणूकाका' हे पात्र विरोधी भूमिकेसाठी आणि संघर्षासाठी आले आहे. त्यांच्या स्वतःच्या स्वभावधर्माप्रमाणे त्याची अखेर समन्वयात होते. आख्यायिका, दंतकथा, चुटके इत्यादींचा वापर, उपहास विनोद यांच्याद्वारा दांभिकतेचा आणि प्रतिगामी वृत्तीचा हसत-खेळत घेतलेला परामर्श, यामुळे हे लघुनिबंध आकर्षक आणि विचारांना चालना देणारे ठरतात. या लघुनिबंधांचे खरे बळ भावनात्मकतेत किंवा कल्पनाविलासात नसून खेळकरवृत्तीची जोड असलेल्या प्रगमनशील स्वरूपाच्या मार्मिक वैचारिकतेत आहे आणि त्यांच्या विचारांच्या स्वतंत्रतेत आहे.

१९३५ ते १९४१ या काळात 'चित्रा' साप्ताहिकाचे संपादक म्हणून काणेकरांचा वृत्तपत्रसृष्टीशी निकटचा संबंध आला. त्यात समकालीन प्रचलित नाट्यसृष्टीची, सिनेसृष्टीची चाहूल, यथार्थवादी विचार इत्यादींचा परामर्श येतो.

काणेकरांनी 'अनन्तिका' (१९७९-१९८१) या त्यांच्या आत्मकथनात्मक लेखांच्या संकलनपर स्मृतिलहरींतून त्यांची जीवनसरिता (म्हणजे अनन्तिका)

प्रकाशित केली. या आठवणी त्यांनी अत्यंत तन्मयतेने सांगितल्या आहेत. काणेकरांनी वाङ्मयीन प्रयोग केले, असे लोक म्हणतात त्यावर काणेकरांचे म्हणणे असे की, मी साहित्यामध्ये प्रयोग करण्याऐवजी साहित्यानेच माझ्यावर प्रयोग केले आहेत! 'अनन्तिके'तून अनंत काणेकर व्यक्ती आणि सन्माननीय साहित्यिक यांची वळणे सुबोध शैलीत प्रकट झाली आहेत. त्यांची स्मरणे चित्रदर्शी आहेत. आठवणी नेमक्या व तपशील समूर्त करणाऱ्या आहेत. स्वतःचे मूल्यमापन तटस्थपणे करण्याची त्यांची पद्धती आत्मलेखनाला एक विश्वसनीयता व उंची प्राप्त करून देते.

**धुक्यातून लाल ताऱ्याकडे**

१९३१च्या दरम्यान काणेकरांचा कल कम्युनिस्ट विचारसरणीकडे जाऊ लागला होता. पुढे रशियाचा प्रवास वगैरे करून आल्यानंतर 'धुक्यातून लाल ताऱ्याकडे' (१९४०-१९६७-१९७१), 'आमची माती आमचे आकाश' (१९५०) अशी नव्या प्रकारची प्रवासवर्णने काणेकरांनी लिहिली. मराठीतील प्रवासवृत्तलेखन आधुनिक अभिरुचीच्या दिशेने वाटचाल करू लागल्याची स्पष्ट चिन्हे अनंत काणेकरांच्या पुस्तकात उमटली आहेत. पहिल्यात युरोपच्या व दुसऱ्यात रशियाच्या प्रवासाचा वृत्तान्त आलेला आहे. चित्रकार दलालांबरोबर जो आनंद त्यांनी लुटला, तो 'आमची माती---' मध्ये शब्दबद्ध करून ठेवला आहे. या प्रवासवर्णनांवर काणेकरांच्या व्यक्तित्वाची व त्यांच्या मर्मस्पर्शी रसिकतेची छाप पडली आहे. भटकंतीची आवड त्यांना अखेरपर्यंत होती.

'निळे डोंगर तांबडी माती' (१९५७), 'रक्ताची फुले' (१९५९), 'खडक कोरतात आकाश' (१९६४), 'लाल ताऱ्यांच्या प्रकाशात' (१९६७), 'राखेतील निखारे' (१९४०), 'बोलका ढलप्या' (१९५९), 'हिरवे कंदील' (१९४४), 'पाण्यावरल्या रेषा' (१९६३), 'निवडक गणूकाका' (१९६४), 'प्रकाशाची दारे' (१९७०), 'निळ्या ठिणग्या' (१९७२) ही पुस्तके त्यांच्या व्यासंगी आणि रसिक व्यक्तिमत्त्वाची साक्ष देतात. आयुष्यात निरंतर, अखेरपर्यंत लेखनरत राहणारा साहित्यिक म्हणून त्यांची आठवण मराठी रसिकांना आहे.

अनेकविध उपक्रमांत रमून जाण्याची काणेकरांना आवड होती. तो त्यांचा स्वभाव होता. सभा, संमेलने, अध्यक्षपदे, प्रकाशने, व्याख्याने, पुस्तकांना प्रस्तावना, नवोदितांना उत्तेजन अशा साहित्याशी संलग्न उपक्रमांनी त्यांचे अखेरचे वीस वर्षांचे जीवन आनंदात गेले.

औरंगाबादच्या ३९व्या अखिल भारतीय मराठी साहित्य संमेलनाच्या अध्यक्षपदाने ते सन्मानित झाले, त्या वेळी विशिष्ट वाङ्मयीन व इतर प्रश्नांबद्दलची आपली मते त्यांनी इतरांचा विरोध असतानाही ठणकावून मांडली. विशेषतः संयुक्त महाराष्ट्रासंबंधी!

काणेकरांना विविध मानसन्मान प्राप्त झाले. १९६५मध्ये शासनाद्वारा 'पद्मश्री' या पदवीने ते सन्मानित झाले. विश्वकोशनिर्मिती मंडळाचे ते सदस्य होते. १९५७ ते १९६५ या काळात ते साहित्य अकादमीचे सदस्य होते. साहित्य, संस्कृती आणि शिक्षण या क्षेत्रांत त्यांनी घेतलेला हा सहभाग निःसंशय मोलाचा होता.

वि. स. खांडेकर म्हणतात त्याप्रमाणे 'एका तरुण राहिलेल्या शहाण्या माणसाचा हा जीवनप्रवास आनंददायी होता.' अखेरपर्यंत त्यांची वाटचाल स्वतंत्र वृत्तीने झाली. वृत्ती टवटवीत, ताजी राहिली. स्वतःतील 'कॉमन मॅन' त्यांनी कायम ठेवला. ७४ वर्षे आनंदाचे झाड फुलवीत त्यांनी कालक्रमणा केली.

अनंत काणेकर यांची मराठी साहित्यातील थोरवी फार मोठी आहे. पण आपली साहित्यातील थोरवी इतरांना जाणवू न देता वागण्याचा नि बोलण्याचा त्यांचा स्वभाव होता. त्यांच्या गप्पा तर खूप रंगायच्या, कारण त्यांना अहंतेचा स्पर्श नसायचा. दुसऱ्याला अवघड वाटेल असे वागण्याचा त्यांचा स्वभावच नव्हता. एक समंजस माणूस, असे त्यांचे थोडक्यात वर्णन करता येईल. 'समंजस माणूस स्वतःच्या मर्यादा जाणतोच; पण इतरांच्या मर्यादांविषयी क्षमाशील असतो. म्हणूनच काणेकर सर्वांना हवेहवेसे वाटायचे.' असे डॉ. स. गं. मालशे त्यांच्यासंबंधी म्हणतात.

मराठी साहित्याचे समीक्षक आणि अभ्यासक प्रा. स. गं. मालशे यांच्या वरील अवतरणातून अनंत काणेकरांची समंजस मूर्ती डोळ्यांसमोर उभी राहते. 'रूपेरी वाळू आणि तिची भावंडे' या काणेकरांच्या पुस्तकाच्या सुरुवातीला प्रास्ताविकात मालशे यांनी वरील उद्‌गार नोंदले आहेत (१९८४), ते वेगळ्या संदर्भात. म्हणजे काणेकरांच्या 'मी महाकवी' या लेखाबाबत काणेकरांचा जन्मजात मिस्किलपणा आणि साध्या विषयात तत्त्वसुंदर आशय पाहण्याची हातोटी यांमुळे मराठी समीक्षकांची त्यांनी घेतलेली मजेदार फिरकी (खलील जिब्रान आणि त्याचे साहित्य या संदर्भात) या ओघात हे निरीक्षण आले असले, तरी अनंत काणेकरांच्या स्वभावधर्माचा ते चपखल परिचय करून देणारे आहे.

– प्रा. अनुराधा साळवेकर

**संदर्भ :**

*१. केळकर अविनाश, संपादक; 'अनंत काणेकर : व्यक्ती आणि वाङ्मय'.*
*२. डॉ. देशपांडे अ.ना; 'आधुनिक मराठी वाङ्मयाचा इतिहास'.*

## कानिटकर, काशीबाई गोविंदराव

**कथाकार, कादंबरीकार, अनुवादक**

**१८६१ – ३० जानेवारी १९४८**



कृष्णराव बापट या वकिलाच्या घरात काशीबाईंचा जन्म झाला. वयाच्या नवव्या वर्षी त्यांचे लग्न गोविंदराव कानिटकरांशी झाले. गोविंदरावांचे चुलते नारायण बापुजी कानिटकर हे कट्टर टिळकपंथीय होते. सनातन्यांच्या बाजूने सुधारकांवर टीका करण्याची संधी ते सोडत नसत. मात्र गोविंदरावांचा कल सुधारकांकडे राहिला. 'आपल्या पत्नीने शिकायला हवे' हा विचार ते तेव्हा बोलून दाखवत असत आणि प्रत्यक्ष लग्न झाल्यावर त्यांनी काशीबाईंना शिकवलेही. त्या काळात पति-पत्नी घरच्या वडीलधाऱ्या मंडळींना न सांगता 'प्रार्थना समाजा'च्या वा 'मराठी ज्ञानप्रसारक सभे'च्या व्याख्यानांना जात असत. गोविंदराव कानिटकर मुन्सफ होते, त्यामुळे त्यांच्याबरोबर काशीबाईंना सभासंमेलनांना जावे लागे. रमाबाई रानडे, पंडिता रमाबाई यांच्याशी काशीबाईंचा स्नेह राहिला. रमाबाई रानडे यांनी त्यांना शिक्षण घेण्यासाठी आणि पुढे सार्वजनिक कार्यात सहभागी होण्यासाठी उत्तेजन दिले. गोविंदरावांना इंग्रजी व मराठी साहित्यात रस होता.

**समानधर्मीयांची भेट**

तरुण हरि नारायण आपटेंशी ओळख झाल्यावर गोविंदरावांना समानधर्मी भेटल्याचा आनंद झाला. त्यांच्या वाङ्मयीन गप्पांमध्ये काशीबाईंना स्थान मिळू लागले. त्यांनी तिघांनी मिळून 'मनोरंजन आणि निबंधचंद्रिका' नावाचे नियतकालिक सुरू केले. काशीबाईंचे लेखन तिथे सुरू झाले. काशीबाई-गोविंदराव-हरिभाऊ हे परस्परांचे जवळचे स्नेही झाले. हरिभाऊंच्या 'स्फुट गोष्टी' आणि कादंबऱ्या 'करमणूक'मधून प्रसिद्ध होत होत्या. गोविंदरावांबरोबर हरिभाऊही काशीबाईंना लेखनाला उत्तेजन देत होते. 'शेवट तर गोड झाला' (१८८९) हा त्यांचा पहिला कथासंग्रह होय. त्यानंतर 'चांदण्यातील गप्पा' (१९२१) हा कथासंग्रह लक्ष्मणशास्त्री लेले यांच्या प्रस्तावनेसह प्रसिद्ध झाला. 'शिळोप्याच्या गोष्टी' हा तिसरा कथासंग्रह १९२८ साली प्रकाशित झाला. 'रंगराव' (१९०३), 'पालखीचा गोंडा' (१९२८) या कादंबऱ्या त्यांनी लिहिल्या. भारतातून अमेरिकेस जाऊन एम.डी.होऊन परत आलेल्या पहिल्या स्त्री-डॉक्टर आनंदीबाई जोशी यांचे १८८८ साली पुण्यात दुर्दैवाने निधन झाले. आनंदीबाईंची अमेरिकेतील मैत्रीण 'कॅरोलिन डाल' हिने 'द लाइफ ऑफ डॉ.आनंदीबाई जोशी' या नावाचे चरित्र इंग्रजीत लिहिले, ते लगेच १८८९ साली प्रसिद्ध झाले. चरित्रलेखनाची कोणतीही माहिती काशीबाईंना नसताना गोविंदरावांच्या आग्रहापुढे व मार्गदर्शनाखाली त्यांनी 'डॉ. आनंदीबाई जोशी: चरित्र व

पत्रे' हे चरित्र १८९१ साली लिहिले, तेव्हा त्या नेवाशाला राहत होत्या. त्यांना माहिती पुरवण्याकरिता स्वत: गोपाळराव जोशी त्यांच्याकडे येऊन राहिले होते.

काशीबाईंनी त्या काळातील मुंबईतील एक मातब्बर मासिक 'मनोरंजन'मध्येही लेखन केले. १९१८ साली गोविंदरावांचे तर १९१९ साली हरिभाऊंचे निधन झाले. पण त्याआधी काही वर्षे कानिटकर दांपत्य आणि हरिभाऊ यांचे संबंध दुरावले होते. तत्कालीन सुशिक्षित नवतरुणी म्हणून हरिभाऊ काशीबाईंकडे पाहत. त्यांच्यात स्नेहभाव होता. हरिभाऊंच्या लिहिण्याच्या टेबलावर काशीबाईंचा फोटो होता व 'आपल्या पत्नीने शिकावे म्हणून तिला चार शब्द सांगावेत', असे हरिभाऊ काशीबाईंना नेहमी सांगत असत. त्या दोघांत पत्रव्यवहारही होता. काशीबाईंनी 'हरिभाऊंची पत्रे' (१९२९) या शीर्षकाने ती पत्रे संपादितही केली होती. हरिभाऊ आणि काशीबाई यांनी एकमेकांत करार केला होता. त्यांच्यापैकी जो कोणी आधी जाईल त्याच्यावर दुसऱ्याने मृत्युलेख लिहायचा. १९१९ साली हरिभाऊ गेले. त्याआधी ते आजारी असल्याचे काशीबाईंना कळलेही नाही. परंतु हरिभाऊंच्या मृत्यूनंतर काशीबाईंनी आपला शब्द पाळला. त्यांनी हरिभाऊंवर अप्रतिम मृत्युलेख लिहिला. काशीबाईंच्या कौटुंबिक जीवनात मात्र परिस्थितीचे घाले पडले. त्यांची लाडकी मुलगी ऐन तारुण्यात मृत्युमुखी पडली. गोविंदरावांशीही त्यांचे तितके पटेनासे झाले. त्यातच त्यांच्यावर जे. कृष्णमूर्तींच्या विचारांचा प्रभाव होता. त्यांनी त्यांच्या 'ॲट द फीट ऑफ द मास्टर' या पुस्तकाचा 'गुरुपदेश'(साधनचतुष्टय) या शीर्षकाने अनुवादही केला होता.

पुढे काशीबाईंचा मुलगा वाराणशीला गेला. स्वाभाविकच काशीबाईंना त्याच्याबरोबर महाराष्ट्रापासून दूर वाराणशीला जावे लागले. तिथे राहूनही त्यांनी वेळोवेळी लेखन केले. इकडील नियतकालिकांमध्ये ते प्रकाशितही होत राहिले. ते प्राय: आजही असंग्रहित स्वरूपात नियतकालिकांच्या फायलींमध्ये पडून राहिले आहे. वाराणशीला त्यांनी विद्यापीठामध्ये अध्यापनाचे कामही केले. आपल्या उतारवयात त्यांनी आत्मचरित्र लिहायला घेतले होते. १९०९ पर्यंतच्या घटनांची नोंद दिसते. ते अपुऱ्या अवस्थेत राहिले होते. डॉ. सरोजिनी वैद्य यांच्याकडे त्यांच्या आप्तांनी ते सुपूर्त केल्यावर १९८० साली सरोजिनी बाईंनी १९०९ नंतरचे १९४८ पर्यंतचे म्हणजे काशीबाईंच्या मृत्यूपर्यंतचे चरित्र लिहून ते 'कै. काशीबाई कानिटकर: आत्मचरित्र व चरित्र (१८६१ ते १९४८)' या शीर्षकाने प्रकाशित केले.

अव्वल इंग्रजीच्या काळात स्त्री-शिक्षणाची सुविधा प्राप्त झाली असली, तरी स्त्रिया फार मोठ्या प्रमाणात शिकत होत्या असा भाग नव्हता. काशीबाईंना गोविंदरावांनी शिकवले आणि त्या काळातील एक सुशिक्षित, बुद्धिमान स्त्री आणि लेखिका म्हणून त्यांच्याकडे समाज तेव्हा व नंतरही आदराने पाहत आला आहे. १९०४ साली पुणे येथे झालेल्या साहित्य संमेलनात त्या एकमेव स्त्री उपस्थित होत्या.

– सुखदा कोरडे

**संदर्भ :**

१. *वैद्य सरोजिनी, संपादक; 'काशिबाई कानिटकर : आत्मचरित्र व चरित्र'; पॉप्युलर प्रकाशन, मुंबई.*

२. *गोपुजकर प्रतिभा; 'कर्तृत्वशालिनी'; श्रीविद्या प्रकाशन, पुणे.*

## कानेटकर, वसंत शंकर

☞ **मुख्य नोंद – नाटक खंड**

## कानेटकर, शंकर केशव

☞ **गिरीश**

## कान्त, वामन रामचंद्र

**कवी**

**६ ऑक्टोबर १९१३ – ८ सप्टेंबर १९९१**

वा. रा. कांत ह्यांचा जन्म नांदेड येथे झाला. तिथेच त्यांचे प्राथमिक व माध्यमिक शिक्षण झाले. पुढील शिक्षणासाठी ते हैद्राबाद येथे गेले, पण इंटरनंतर त्यांना शिक्षण सोडून द्यावे लागले.



त्यानंतर 'विहंगमाला' या नियतकालिकाचे संपादन करत असतानाच 'विहंग' प्रेसचे व्यवस्थापनही वा. रा. कांत यांनी केले (१९२८). निजाम सरकारच्या शेतकी खात्यात लिपिक म्हणून नोकरी केल्यानंतर (१९३३-१९४५) निजाम सरकारच्याच हैद्राबाद व औरंगाबाद येथील आकाशवाणी केंद्रांमध्ये मराठी विभागप्रमुख म्हणून (१९४५-१९६०) आणि भारतीय आकाशवाणीच्या विविध केंद्रांवरही मराठी विभागप्रमुख म्हणून त्यांनी काम केले (१९६०-१९७०).

वा. रा. कांत यांनी १९२५ पासून काव्यलेखनास सुरुवात केली. 'बाई कालिके' ही त्यांची प्रसिद्ध झालेली पहिली कविता (मंदारमाला, १९२८). 'पहाटतारा' हा त्यांचा पहिला कविता संग्रह (१९३०), त्यानंतर 'फटत्कार' (१९३३), 'रुद्रवीणा' (१९४७), 'शततारका' (१९५०), 'वेलांटी' (१९६२), 'वाजली विजेची टाळी' (१९६५), 'मरणगंध' (१९७६), 'दोनुली' (१९७९) आणि 'मावळते शब्द' (१९८८) हे त्यांचे काव्यसंग्रह प्रकाशित झाले.

वा. रा. कांत ह्यांना उर्दू भाषा आणि साहित्य ह्यांचा वारसा वडिलांकडून मिळाला होता. शालेय शिक्षणाचे त्यांचे माध्यम उर्दू होते. त्यामुळे उर्दू व हिंदी या भाषांवर तसेच इंग्रजीवरही त्यांचे प्रभुत्व होते. त्यांनी केलेले अनुवाद नोंद घेण्यासारखे ठरले. 'रझिया सुल्ताना' (लेखक रफिक झकेरिया, इंग्रजी कादंबरी १९७१), 'मनुष्याची रूपं' (लेखक यशपाल शर्मा, हिंदी कादंबरी १९७५), 'कालचे लखनौ' (लेखक मौलाना अब्दुल हलीमर्शरीफ, उर्दू कादंबरी १९७६), 'मिर्जा गलिब चरित्र व काव्य' (श्री. हैदर, इंग्रजी, १९८०), 'वेमना' (ले. व्ही. आर. नाली, इंग्रजी १९८१), 'एक चादर मैलीसी' (डॉ. राजेंद्रसिंह बेदी, १९८७), 'मध्यस्थ' (ए. डी. गोरवाला, कादंबरी, मौज दिवाळी अंक), 'कागद

शब्दांपाशी शब्द

शब्दांपाशी. शब्द संपुरा, दिवास
काय अनुभवास अर्थ आला ?
केवळ शब्दांच्या आत गुणाकार
फक्त आकार नेपथ्याची
तरंगांची माळा उठते जळात
पाण्याचा तो अर्थ म्हणो ये का ?
अंधारात ठेवले स्वप्न मानून
नसल्याची खूण उमगाया
अर्थ प्रकाशाचा भोगाया जाऊन
सुखे उजळून ज्योतीमध्ये.

—

वा. रा. कांत
१२/५/७८

आणि कॅन्व्हास' (अमृता प्रीतम, हिंदी, अप्रकाशित) शोक सांबर झालेल्या मुलाचा: अज्ञाताच्या दाराशी (फेरेन्स जूहास, The boy changed into a stage clamours at the gate of secrets, दीर्घकाव्य, अप्रकाशित)

याशिवाय मिर्जा गालिबच्या निवडक गजला, रवींद्रनाथ टागोरांचे 'मालिनी' आणि गजानन मुक्तिबोध यांच्या निवडक कविता यांचे अनुवाद कांत यांनी केले.

भोवतालच्या जगातील अन्याय आणि विषमता पाहून कांत क्षुब्ध होतात. स्वातंत्र्य, समता यांचे ते गुणगान करतात. त्यासाठी त्याग, बलिदान, रक्तरंजित क्रांती यांची गरज असल्याचे त्यांची कविता सांगते. रुद्रवीणेतील विशुद्ध प्रेमकविता त्यांच्या प्रतिभेचे मनोज्ञ दर्शन घडवते.

सांगीतिकेपेक्षा भिन्न, गाण्याचे अंग नसलेला, व्यक्तिचित्रण आणि संवादशैली यांच्या एकत्रीकरणातून

जीवनविषयक दृष्टिकोन साकारणारा 'नाट्यकाव्य' नामक एक नवा, वेगळा प्रकार मराठी साहित्यात रुजवण्याचे श्रेय कांत यांना जाते. 'दुमार', 'पाषाणावरील तीळ', 'आशिया', 'चुंबन', 'सूर्याचं वाळवंट' आदी १६ नाट्यकाव्ये त्यांनी लिहिली. त्यांतली काही आकाशवाणी केंद्रावर गाजली. वा.रा.कांत ह्यांच्या नावावर २९ समीक्षात्मक लेख, २१ ललित लेख, 'अभिजीत' किंवा 'रसाळ वामन' या टोपण नावांनी लिहिलेले ७ ललित लेख असे वाङ्मय आहे. काही कवितासंग्रहांसाठी त्यांनी प्रस्तावनाही लिहिल्या आहेत.

मराठवाडा साहित्य संमेलनात (१९५३) आणि मराठवाडा संमेलनात कवितासंमेलनांचे अध्यक्षपद कांत यांनी भूषवले. त्यांच्या चार काव्यसंग्रहांना राज्यपुरस्कार लाभले. महाराष्ट्र राज्य साहित्य संकृती मंडळातर्फे गौरववृत्ती (१९८९), महाराष्ट्र साहित्य परिषद पुणे व आंध्र प्रदेश, हैद्राबाद ह्यांच्यातर्फे उत्कृष्ट वाङ्मयसेवा सन्मान (१९८८ व १९८९) त्यांना लाभले.

– डॉ. अनुपमा उजगरे

**संदर्भ :**


१. *कांत वा.रा.; 'वेलांटी', काव्यसंग्रह; द्वितीय आवृत्ती, जून २००७.*

२. *कांत वा.रा.; 'रुद्रवीणा', काव्यसंग्रह; द्वितीय आवृत्ती, जून १९९७.*

३. *कांत वा.रा.; 'दोनुली', काव्यसंग्रह; मौज प्रकाशन; १९७९.*


## कामत अशोक प्रभाकर

**संत साहित्याचे अभ्यासक**

**१० जानेवारी १९४२**

हिंदी व मराठी अशा दोन्ही भाषांमध्ये एम.ए., पीएच.डी. आणि विपुल ग्रंथलेखन करणाऱ्या बोटावर मोजण्याएवढ्या मराठी लेखकांमध्ये डॉ.अशोक कामत हे एक प्रमुख लेखक आहेत. पुणे विद्यापीठातील संत नामदेव अध्यासनाचे प्रमुख प्राध्यापक म्हणून अनेक वर्षे कार्य करून ते निवृत्त झालेले आहेत. 'महाराष्ट्र के नाथपंथिय कवियोंका हिंदी काव्य' या विषयावर त्यांनी



हिंदीत प्रबंध लिहून पीएच.डी. पदवी मिळविलेली आहे. त्यांना डॉ.न.चिं. जोगळेकर यांचे गाइड म्हणून मार्गदर्शन लाभले. मथुरा येथील जवाहर पुस्तकालयाने हा प्रबंध ग्रंथरूपाने (१९७६) प्रकाशित केला आहे. डॉ. कामत यांनी 'नामदेवांचे जीवन व त्यांचे हिंदी मराठी काव्य यांचा पुनर्विचार' या विषयावर मराठीत प्रबंध लिहिला व १९८४ साली दुसरी पीएच.डी. पदवी संपादन केली.

डॉ. कामत यांची 'संत रोहिदास' (१९६६), 'आपला देश आपली माणसे', 'कबीर (१९६८) नॅशनल बुक ट्रस्ट, 'स्वामी म्हणे माझा नाथसंप्रदाय, 'श्री नामदेव : एक विजययात्रा' (१९७०), 'ज्ञानदेव भगिनी मुक्ताबाई', 'गोस्वामी तुलसीदास' (१९७८), 'संत आणि समाज', 'सुभाषमय दिवस', 'संत कथा', 'संत नामदेव आणि गुरु नानकदेव', 'सिक्ख गुरुचरित्र' (२ खंड), 'संत नामदेव आणि संत एकनाथ', 'पसायदान', 'शाहू महाराज', 'मातृहृदयी सानेगुरुजी', 'शिवविचार, 'ऐसी हे समर्थ पदवी' (गोकूळ मासिक प्रकाशन), 'भक्त भारती', 'महात्मा बसवेश्वर' (सत्संग प्रतिष्ठान), 'ईश्वरनिष्ठांची मांदियाळी' (गोकूळ मासिक प्रकाशन) अशी साहित्यसंपदा आहे.

स्वतंत्र ग्रंथलेखनाबरोबरच त्यांनी अनेक ग्रंथांचे स्वतंत्र व सहयोग्यांसह संपादन केलेले आहे. 'वीरशैव संतसाहित्य', 'मना सज्जना', 'एक तरी ओवी अनुभवावी', 'संत एकनाथ : एक समग्र अभ्यास' हे त्यांपैकी काही प्रमुख ग्रंथ आहेत. त्याशिवाय संत लक्ष्मण महाराजांसह अनेक संतांच्या अभंग गाथांचे त्यांनी संशोधन संपादन व प्रकाशन केलेले आहे.

डॉ. कामत यांचे हिंदीत 'मानपुरी पदावली' (१९६६), 'भक्तकवी ठाकूर' (१९६७), 'महाराष्ट्र के नाथपंथिय कवियोंका हिंदी काव्य'(१९७६), 'आचार्य

दामोदर पंडित' (१९७६), (प्रकाशक : जवाहर पुस्तकालय मथुरा), 'समर्थ रामदास' (१९८८), 'महायात्री नामदेव', 'महाराष्ट्र और राष्ट्रभाषा', 'जीवनधारा' हे प्रमुख ग्रंथ असून इतर अनेक छोटी संपादने व प्रासंगिक स्फुट लेखन (२०० लेख) त्यांच्या नावावर आहे.

डॉ. कामत यांच्या ग्रंथांना भारत सरकार अहिंदी लेखक पुरस्कार, कुमार साहित्य पुरस्कार, राष्ट्रमित्र पुरस्कार, वि.भि. कोलते पुरस्कार, महाराष्ट्र ग्रंथोत्तेजक पुरस्कार, महाराष्ट्र साहित्य परिषद पुरस्कार, महाराष्ट्र राज्य ग्रंथ पुरस्कार, यासह असंख्य प्रतिष्ठित व मानाचे पुरस्कार मिळालेले आहेत.

त्यांच्या मार्गदर्शनाखाली संत नामदेव अध्यासनात २० पेक्षा अधिक विद्यार्थ्यांनी पीएच.डी.साठी संशोधन-प्रबंध लेखन करून पदवी संपादन केलेली आहे व ७० पेक्षा अधिक प्रबंधिका लिहिल्या गेल्या आहेत. सतत अध्ययन व लेखन हेच त्यांचे जीवन आहे. त्यामुळे हा परिचय प्रकाशित होईपर्यंत त्यांच्या नावावर आणखी काही ग्रंथांची नोंद होईल अशी त्यांची लेखनगती आहे.

हिंदी पाठ्य पुस्तक समिती (महाराष्ट्र राज्य पाठ्य पुरस्कार), महाराष्ट्र साहित्य परिषद, भारतीय श्रीराम कोश मंडळ; भारतीय विद्याभवन महाविद्यालयीन समिती, महाराष्ट्र राष्ट्रसभा सभा, टिळक महाराष्ट्र विद्यापीठ मराठी परीक्षा समिती अशा अनेक समित्यांवर त्यांनी सदस्य म्हणून कार्य केलेले आहे. सध्या ते 'सत्संग प्रतिष्ठान'द्वारे संतसाहित्य प्रचाराचे कार्य करीत आहेत.

— विद्याधर ताठे

## कार्व्हालो, सिसिलिया फ्रान्सिस

**कवयित्री, कथाकार**

**२३ एप्रिल १९५६**

मराठी भाषक ख्रिस्ती समाजातील सिसिलिया कार्व्हालो यांचा जन्म वसईतील बरामपूर या गावी झाला. मेरी तिरेजा आणि फ्रान्सिस जॉन कार्व्हालो हे त्यांचे आईवडील असून वडिलांच्या शेतकरी



कुटुंबातल्या अनेक पिढ्यांनी शाळा पाहिलेली नव्हती. मात्र आईवडिलांना शिक्षणाचे महत्त्व पटल्यामुळे त्यांनी मुलांना शाळेत घातले. सिसिलिया मराठी व मानसशास्त्र ह्या विषयातील मुंबई विद्यापीठाची बी. ए. परीक्षा प्रथम वर्गात उत्तीर्ण झाल्या (१९७७). त्यानंतर मराठी विषयात एम. ए. पूर्ण केले (१९७९). १९८० मध्ये अप्पासाहेब वर्तक कनिष्ठ महाविद्यालयात अध्यापनाला सुरुवात केली.

१९९२ पासून आजपर्यंत वसईतील संत गोन्सालीस गार्सिया महाविद्यालयात अध्यापनाची नोकरी चालू आहे. दरम्यान १९८९ साली 'पंडिता रमाबाईंचे साहित्य' या विषयावर डॉ. सरोजिनी वैद्य यांच्या मार्गदर्शनाखाली एम. फिल. पूर्ण केले आणि १९९८ साली डॉ. उषा देशमुखांच्या मार्गदर्शनाखाली 'ज्ञानोदयमधील निबंध : निबंध वाङ्मयाचा पूर्वरंग (१८४२-१८७४)' हा प्रबंध पूर्ण करून पीएच.डी.ची पदवी प्राप्त केली. मराठीचे अध्यापन केल्यामुळे आणि मराठी व अन्य भाषांतील साहित्य अभ्यासल्यामुळे त्यांच्या जाणिवा समृद्ध होत गेल्या. यातून विविध वाङ्मय प्रकारांतील उदंड लेखन त्यांच्या हातून घडले. पहिले पुस्तक, 'अंतर्यामी' हा कवितासंग्रह १९८५ साली प्रसिद्ध झाला. आजपावेतो ५ कवितासंग्रह, ३ ललित लेखसंग्रह, २ कथासंग्रह, २ संशोधनात्मक, ३ समीक्षासंग्रह, १ बालवाङ्मय, १ चरित्र, १ अनुवाद आणि २ संपादने अशी २० पुस्तके त्यांच्या नावावर आहेत. त्यांच्या तीन पुस्तकांना महाराष्ट्र शासनाचे पुरस्कार मिळाले, ती अशी : 'मोगऱ्याचा मांडव' (ललित गद्य २०००), 'मुठीतले आकाश' (ललित गद्य २००५) आणि 'चांदणे निर्मळ शुभ्र' (आस्वादनपर ग्रंथ २००८) याशिवाय १८ साहित्य पुरस्कार विविध संस्थांकडून मिळाले आहेत.

डॉ. सिसिलिया कार्व्हालो यांच्या कविता स्त्री-जीवनाचा वेध घेणाऱ्या असल्याने त्या थेट काळजाला भिडतात. त्यांच्या कथांमध्ये काव्यात्मकता डोकावते. कथांमध्ये येणारा निसर्ग कथावस्तू जिवंत करतो, तसेच कथांमधील पात्रांच्या तोंडी लोकभाषा येत असल्याने त्या वास्तवाचा प्रत्यय देतात. लेखनाशिवाय चित्रकला व संगीत यांची ही त्यांना आवड आहे. स्त्रियांच्या प्रश्नांसंबंधी कळकळ असल्यामुळे महिला विकास समुपदेशन केंद्र चालवतात आणि स्त्रियांसंबंधीच्या विषयांवर त्यांनी हजारांवर व्याख्याने महाराष्ट्रभर दिली आहेत. यातून संवेदनशील लेखिका म्हणून त्यांचे वेगळेपण लक्षात येते.

– अशोक बेंडखळे

**संदर्भ :**

*१. दामोदर तृप्ती, कुटिन्हो बर्था, संपादक; 'शब्दसेवा'; डिम्पल प्रकाशन, वसई.*

## कालेलकर, काकासाहेब

***कालेलकर, दत्तात्रेय बाळकृष्ण***

**निबंधलेखक, प्रवासवर्णनकार, शिक्षणतज्ज्ञ, गांधीवादी विचारवंत**

**१ डिसेंबर १८८५ – २१ ऑगस्ट १९८१**



काकासाहेब कालेलकरांना ९६ वर्षांचे प्रदीर्घ आयुष्य लाभले. टिळक-आगरकरांच्या कालखंडापासून इंदिरा गांधींच्या कारकिर्दीच्या अनुभवापर्यंत! त्यांचे घराणे बेळगुंदीचे पण जन्म साताऱ्याला. फर्गसन महाविद्यालयातून ते १९०७ मध्ये बी.ए. झाले आणि एलएल.बी.चे पहिले वर्ष पूर्ण केले. त्यांच्या मनावर आधी सावरकरांच्या क्रांतिकारी विचारांचा प्रभाव, पण पुढे महात्मा गांधींच्या तत्त्वज्ञानाचा संस्कार होऊन ते पूर्णपणे गांधीवादी झाले. 'राष्ट्रमत' नावाच्या दैनिकात ते काम करीत. १९१७ साली ते अहमदाबादच्या गांधीजींच्या साबरमती आश्रमात गेले. १९३७मध्ये वर्धा-सेवाग्रामला आले. गांधीजींच्या 'नवजीवन' साप्ताहिकात ते लिहीत. गुजराती भाषा आत्मसात करून ते गुजरातीमधले नामवंत साहित्यिक झाले.

**लालित्याच्या उगम प्रवासातून**

स्वातंत्र्याच्या आंदोलनात सतत भाग घेऊन त्यांनी बरेचदा कारावास सोसला. स्वातंत्र्यप्राप्तीनंतर त्यांची दोन वेळा राज्यसभेत नियुक्ती झाली. अनुसूचित जमातींच्या आयोगाचे अध्यक्ष म्हणून नेमले गेले. गुजराती साहित्य परिषदेचे अध्यक्ष तसेच हिंदी विश्वकोश समितीचे ते सदस्य होते. त्यांना भारत सरकारची 'पद्मविभूषण', 'साहित्य अकादमी'चे पारितोषिक व फेलोशिप असे बहुमानही मिळाले. त्याशिवाय अनेक विद्यापीठांनी त्यांना सन्मान्य अशी 'डी.लिट.'ची पदवीही अर्पण केली. त्यांना प्रवासाची विलक्षण हौस होती. हिमालय, ब्रह्मदेश, जपान, पूर्व आफ्रिका आणि संपूर्ण भारतभर त्यांनी प्रवास केला आणि गुजराती भाषेत त्या प्रवासांची रसाळ आणि काव्यात्म वर्णने करून गुजराती साहित्यात प्रवासवर्णनांचे दालन समृद्ध केले. गुजराती भाषेतला पहिला शब्दकोश 'जोडणी-कोश' त्यांनीच तयार केला. तुरुंगात असतानाच त्यांनी 'उत्तरेकडील भिंती' (१९२३) नावाचे पुस्तक लिहिले.

त्याशिवाय 'हिंडलग्याचा प्रसाद'(१९३४), 'वनशोभा'(१९४४), 'खेळकर पाने'(१९६४) ही ललितगद्यपर पुस्तके लिहिली. रवींद्रनाथ टागोरांच्या 'गीतांजली'चा प्रभाव त्यांच्या मनावर होता व त्यातूनच 'रवींद्रमनन'सारखे पुस्तक निर्माण झाले. विष्णुभट गोडसे ह्यांचे 'माझा प्रवास'(१८५७ सालच्या बंडाची हकिकत) हे प्रवासाच्या हौसेमधूनच त्यांनी वाचले. ते वाचल्यावर त्यांना ते काल्पनिक पुस्तक -कादंबरी आहे, असे वाटले आणि त्यांनी इतिहासाचार्य चिं. वि. वैद्य ह्यांना पत्र लिहून तसे विचारले. ह्याचे कारण त्या पुस्तकाची भाषा हेही होते. त्यांच्या प्रवासवर्णनांची मराठीत भाषांतरे झाली व मराठी साहित्यात भाषांतरित प्रवासवर्णनांचे दालन खुले

झाले. (अपवाद म्हणजे १८६७ साली भास्कर हरी भागवतांनी 'इंग्लंडातील प्रवास' नावाचे प्रवासवर्णन करसनदास मूळजी ह्यांच्या 'मारा इंग्लंडना प्रवास' ह्या गुजराती भाषेतील प्रवासवर्णन मराठीत भाषांतर करून प्रसिद्ध केले होते.) कालेलकरांची 'आमच्या देशाचे दर्शन' अनुवाद : वामन चोरघडे (१९४३) , 'ब्रह्मदेशचा प्रवास' अनुवाद : श्रीपाद जोशी (१९४३), 'भक्तिकुसुमे' अनुवाद : वामन चोरघडे (१९४५), 'लाटांचे तांडव' अनुवाद : वामन चोरघडे (१९४६) ही प्रवासवर्णने मराठीत आली. 'लोकमाता'(१९३८) भारतातील नद्यांचे वर्णनही मराठीत आले होते.

त्यांच्या अगोदरच्या प्रवासवर्णनांचा अनुवाद नरेश मंत्र्यांनी करून 'जीवनलीला' (१९५८) प्रसिद्ध केले. त्याचप्रमाणे त्यांच्या प्रवासवर्णनांतून निवडक प्रवासलेखांचे संस्कारित पुनर्मुद्रण 'भारत दर्शन' ह्या नावाने सहा भागांत प्रसिद्ध झाले. रवींद्र केळेकर ह्या सहा भागांचे संपादक असून 'महाराष्ट्र भूमी', 'दक्षिण भारत', 'मध्य व उत्तर भारत', 'हिमशिखरांच्या सान्निध्यात', 'अर्णवाचे आमंत्रण' (सागरदर्शन), 'जीवनाचा कायोत्सर्ग' (प्रतापदर्शन) अशी सहा पुस्तके आहेत. ती १९७० साली प्रसिद्ध झाली.

ह्याशिवाय त्यांची 'रामतीर्थ चरित्र' (१९०७), 'साहित्याचे मूलधन' (१९३८), 'साहित्याची कामगिरी' (१९४८), 'वासरी' (१९७३) ही पुस्तकेही प्रसिद्ध आहेत. लेखक सतत लिहिता राहावा, हे कालेलकरांच्या संदर्भात सत्य ठरते.

– डॉ. चंद्रकांत वर्तक

**संदर्भ :**

१. *कालेलकर काका; 'स्मरणयात्रा'; देशमुख आणि कंपनी, पुणे; १९४९.*
२. *देशपांडे अ. ना.; 'आधुनिक मराठी वाङ्मयाचा इतिहास भाग दुसरा'; व्हीनस प्रकाशन, पुणे; पुनर्मुद्रण १९७०.*
३. *आचार्य काका कालेलकरांचे जीवन चिंतन; संपादक, ग. ना. जोशी, मॅजेस्टिक प्रकाशन, मुंबई; १९९१.*
४. *विश्रब्ध शारदा : खंड पहिला; ह. वि. मोटे प्रकाशन, मुंबई, १९९३.*

## कालेलकर, मधुसूदन रामचंद्र

☞ मुख्य नोंद – नाटक खंड

## काळे, अक्षयकुमार मल्हारराव

**समीक्षक**

**२७ जुलै १९५३**



आधुनिक मराठी कवितेचे एकनिष्ठ अभ्यासक म्हणून महाराष्ट्राला सुपरिचित असणारे अक्षयकुमार काळे यांचा जन्म अमरावती जिल्ह्यातील वरूड या गावी झाला. १९६८ मध्ये शालान्त परीक्षा व १९७२ मध्ये बी.ए. एवढे शिक्षण वरूड येथेच घेतल्यानंतर १९७४ मध्ये ते नागपूर विद्यापीठातून एम.ए.ची परीक्षा प्रथम क्रमांकाने उत्तीर्ण झाले. १९७५ साली पीएच.डी. पदवीचा अभ्यास करण्यासाठी त्यांना विद्यापीठ अनुदान आयोगाची संशोधन शिष्यवृत्ती मिळाली. स्वातंत्र्योत्तर मराठी काव्यातील प्रवाह या विषयावर प्रबंध सादर करून १९८० मध्ये ते पीएच.डी. झाले. 'अर्वाचीन मराठी काव्यदर्शन' या ग्रंथामुळे त्यांना १९९९ मध्ये नागपूर विद्यापीठाची डी.लिट. ही सर्वोच्च पदवी मिळाली. धरमपेठ महाविद्यालय नागपूर येथे बरीच वर्षे मराठीचे अध्यापन केल्यानंतर ते नागपूर विद्यापीठाच्या मराठी विभागात प्रपाठक म्हणून काम करू लागले आणि तेथेच जुलै २००२ पासून त्यांनी मराठी विभागप्रमुख म्हणून काम करावयास सुरुवात केली. 'सूक्तसंदर्भ' (१९८५), 'गोविंदाग्रज-समीक्षा' (संपादित १९८५), 'कविता कुसुमाग्रजांची' (१९८७), 'अर्वाचीन मराठी काव्यदर्शन' (१९९९), 'मर्ढेकरांची कविता – आकलन, आस्वाद आणि चिकित्सा' (२००६), 'राष्ट्रसंत तुकडोजी महाराज – व्यक्ती आणि वाङ्मय' (संपादित २००८), 'ग्रेसविषयी' (२००९) ही अक्षयकुमार काळे यांची ग्रंथरचना. यांखेरीज त्यांनी निरनिराळ्या नियतकालिकांतून भरपूर समीक्षालेखन केले आहे. 'अर्वाचीन मराठी

काव्यदर्शन' या ८१५ पृष्ठांच्या ग्रंथात १८८५ ते १९९५ या ११० वर्षांच्या प्रदीर्घ कालखंडातील समग्र मराठी काव्यनिर्मितीचा सशास्त्र वेध घेतलेला आहे. समतोल व साधार चिकित्सा आणि रसिकवृत्तीने टिपलेली विविध काव्यसौंदर्यस्थळे हे या ग्रंथाचे महत्त्वाचे विशेष होत. मर्ढेकरांच्या कवितेवरील त्यांचा ग्रंथ मर्ढेकरांचे लौकिक व वाङ्मयीन व्यक्तिमत्त्व ज्याप्रमाणे सुस्पष्ट करतो, त्याप्रमाणे मर्ढेकरांच्या समग्र कवितेची सूक्ष्म चिकित्साही करतो. या ग्रंथाचा उत्तरार्ध मर्ढेकरांच्या सर्वच्या सर्व कवितांचे अर्थनिरूपण, आस्वाद आणि चिकित्सा यांना वाहिलेला आहे.

मर्ढेकरांच्या प्रत्येक कवितेचे विवरण करणारा हा मराठीतील एकमेव ग्रंथ आहे. या ग्रंथास महाराष्ट्र शासनाचा 'नरहर कुरुंदकर पुरस्कार' लाभला आहे. 'अर्वाचीन मराठी काव्यदर्शन' या ग्रंथाचा गौरव महाराष्ट्र साहित्य परिषदेच्या 'रा. श्री. जोग पुरस्कारा'ने झाला आहे. विदर्भ साहित्य संघाच्या साकोली येथे भरलेल्या चौथ्या जनसाहित्य संमेलनाचे, तसेच भंडारा येथे झालेल्या नागपूर विद्यापीठ मराठी प्राध्यापक परिषदेच्या चौदाव्या अधिवेशनाचे ते अध्यक्ष होते. वि. भि. कोलते यांच्या जन्मशताब्दीनिमित्त चंद्रपूर येथील लोकसेवा आणि विकास संस्थेने विशेष पुरस्कार देऊनही त्यांचा गौरव केला आहे.

– प्रा. डॉ. विलास खोले

**संदर्भ :**

*१. काळे, अक्षयकुमार; 'अर्वाचीन मराठी काव्यदर्शन'; पां. ना. बनहट्टी प्रकाशन, नागपूर; १९९९.*

*२. काळे, अक्षयकुमार; 'मर्ढेकरांची कविता – आकलन, आस्वाद आणि चिकित्सा'; विजय प्रकाशन, नागपूर; २००६.*

## काळे, किशोर शांताबाई

**आत्मकथाकार, कवी**

**१ जून १९६८ – २० फेब्रुवारी २००७**

डॉ. किशोर शांताबाई काळे यांचा जन्म नेरले (ता. करमाळे, जिल्हा सोलापूर) येथे झाला. अंबाजोगाई



महाविद्यालयात बारावी झाल्यावर किशोर काळे मुंबईला आले आणि १९९४ मध्ये एम. बी. बी. एस. झाले. नवी मुंबई नेरूळ येथील तेरणा मेडिकल महाविद्यालयात त्यांची नियुक्ती झाली. 'उचल्या'कार लक्ष्मण गायकवाड यांची मुलगी संगीता हिच्याशी त्यांचा विवाह झाला.

गावोगावी नाचगाणी, सर्वसामान्य प्रेक्षकांचे मनोरंजन करणे हा कोल्हाटी समाजाचा व्यवसाय असून कुटुंब पोसण्याची जबाबदारी स्त्रियांना उचलावी लागते. वेळप्रसंगी कोल्हाटणीला शरीरविक्रय करावा लागतो. पुरुषप्रधान संस्कृतीत वाट्याला येणारे सर्व भोग स्त्रियांना मुकाट्याने सोसावे लागतात. किशोर काळे हे कोल्हाटी समाजातील शांताबाई नामक महिलेच्या पोटी जन्माला आले. जन्मदाता कोण हे ठाऊक असले, तरी त्याचे नाव लावण्यास मात्र प्रतिबंध होता. प्रस्थापित समाजाकडून अवहेलना सहन करावी लागते. समाजातील स्त्रियांचा उभा जन्म दुःख, यातना सोसण्यात संपून जातो. तारुण्य ओसरल्यावर स्त्रीला पशूसमान वागणूक मिळते. संवेदनशील किशोर काळे यांना या समाजात राहताना विदारक अनुभव आले. काळीज पिळवटून टाकणाऱ्या अनुभवांना सामोरे जावे लागले.

आपल्या या खडतर जीवनाची कहाणी त्यांनी 'कोल्हाट्याचं पोर' या आत्मचरित्रात तपशीलवार लिहिली आहे. १९९४ मध्ये प्रसिद्ध होऊन गाजलेल्या या आत्मकथनात समाजातील एका दुर्लक्षित भागाचे, दुखऱ्या नशीचे, अंगावर काटा उभा करणारे तपशीलवार चित्रण साकार झाले आहे. वडिलांच्या जागी आईचे नाव लावून एम. बी. बी. एस. पर्यंतचे शिक्षण घेणाऱ्या डॉ. किशोर काळे यांच्या 'कोल्हाट्याचं पोर'मध्ये या समाजाचे प्रातिनिधिक चित्र प्रथमच उभे राहिले आहे.

पुढल्या वर्षी म्हणजे १९९५ साली किशोर काळे यांच्या आत्मकथनाचा दुसरा भाग 'मी डॉक्टर झालो' प्रसिद्ध झाला. भटक्या जमातीत जन्मलेल्या पण शिक्षणासाठी एके ठिकाणी स्थिर राहिलेल्या डॉ. किशोर काळेंचा वैद्यकीय पदवी प्राप्त होईपर्यंतचा प्रवास दाहक आणि खडतर आहे. मानलेल्या आईजवळ राहून, रात्री बेरात्री शेतावर जाऊन पडेल ती कामे करून, दिवसरात्र श्रम करून किशोर काळे यांनी कोल्हाटी समाजात जन्मलेला पहिला डॉक्टर हे श्रेय मिळवले. तृतीय पुरुषी जमातीच्या जीवनाचे दर्शन घडविणारा 'हिजडा एक मर्द' हे त्यांचे नाटक १९९७ मध्ये प्रसिद्ध झाले. 'आई तुझे लेकरू' हा त्यांच्या निवडक कवितांचा संग्रह प्रसिद्ध आहे. समाजातील उपेक्षित वर्गाच्या यातनामय जीवनाचे पारदर्शी चित्रण त्यांच्या लेखनात घडते. राजकारणी, समाजकारणी, लब्धप्रतिष्ठित माणसांना या समाजाची फरफट दिसत असली, तरी त्यांची दखल घेण्यास कोणालाच सवड नाही; याचे तीव्र दुःख डॉक्टर किशोर काळे यांनी उराशी बाळगले. समाजासाठी काही करावे, यासाठी अथक धडपड चालू असताना दुर्दैवाने किशोर काळे यांचे अपघातात अवघ्या ३९व्या वर्षी निधन झाले.

– डॉ. सुभाष भेण्डे

## काळे, केशव नारायण

**कवी, नाट्यसमीक्षक, नाटककार, संपादक**

**२४ एप्रिल १९०४ – २० फेब्रुवारी १९७४**

केशव काळे १९२२ साली मॅट्रिकची परीक्षा, १९२८ मध्ये बी. ए.ची परीक्षा व १९३३ साली कायद्याची परीक्षा उत्तीर्ण झाले. पन्नास वर्षे त्यांनी वाङ्मय, नाट्य आणि चित्रपट ह्या क्षेत्रांत स्पृहणीय कामगिरी बजावली. आकर्षक व रुबाबदार व्यक्तिमत्त्व लाभलेल्या काळे यांनी इंग्रजीवर व संस्कृतवर प्रभुत्व मिळवले होते आणि मराठी तसेच ग्रीक व युरोपिअन रंगभूमीचा सखोल व व्यासंगी अभ्यास केला होता.

य. गो. जोशी आपल्या अनौपचारिक मुलाखतीत म्हणतात की, के. ना. काळे दिसावयाला दांभिक आणि



अहंमन्य वाटतात, पण अनुभवाने मात्र ते निराळे आहेत हे पटते. काळे सतत चिंतन करत असत. ते म्हणाले, ''विज्ञानाने मनुष्याला सृष्टीतील शक्तींवर प्रभुत्व दिले, तर कलांनी त्याच्या जीवनात सौंदर्य, सरसता आणि उत्साह यांची भरती केली. त्यामुळे ज्ञानाइतकीच कला हेही मानवी जीवनाचे एक अंग समजणे भाग आहे. म्हणून कलेचे पावित्र्य सांभाळणे, हे प्रत्येकाचे कर्तव्य आहे.'' काळे हे 'प्रतिभा' पाक्षिकाच्या संपादक मंडळापैकी एक होते.

आपल्या 'स्मरणगंध' या ग्रंथात डॉ. वि. भा. देशपांडे यांनी के. ना. काळे यांचा 'मनस्वी नाट्यविमर्शक, एक जबरदस्त नृत्य समीक्षक, अतिशय मितभाषी, मनस्वी' असा उल्लेख केला आहे. १ जुलै १९३३ रोजी त्यांनी 'ग्वांटलेट'चे मराठी भाषांतर 'आंधळ्यांची शाळा' या नावाने रंगभूमीवर आणले. मराठी प्रायोगिक रंगभूमीची मुहूर्तमेढ या नाटकाने रोवली. १९८३ मध्ये 'नाट्यमन्वंतर'ला ५० वर्षे पूर्ण झाली. त्यांनी लिहिलेला प्रदीर्घ लेख एक दस्तऐवज ठरला. रंगभूमीला नवे वळण देणारी संस्था फार काळ टिकली नाही हे दुःख त्यांच्या मनात खोल रुतले होते. तशी संस्था, तसे वेगळे कार्य पुण्यात पुन्हा सुरू व्हावे; असे काळे यांना मनोमन वाटे. महाराष्ट्र साहित्य परिषदेच्या कार्यकारिणीवर काळे आले. प्रभातच्या वातावरणात त्यांचा राबता होता. पु.लं.च्या 'अंमलदार' चित्रपटाचे दिग्दर्शन काळे यांनीच केले होते. 'धर्मात्मा' चित्रपट चालला नसला, तरी काळे यांच्या अभिनयाची झलक त्यात दिसून आली. त्यांनी 'म्युनिसिपालिटी' ह्या चित्रपटाची निर्मिती केली आणि आठ चित्रपटांत कामे केली. त्यांना अभिनय, दिग्दर्शन, नाटक, चित्रपटनिर्मिती आणि त्यामागील सिद्धान्त या साऱ्यांची पुरेपूर जाण होती. 'नाट्यविमर्श' हा त्यांचा ग्रंथ मानला जातो. रशियन लेखक स्टॅनिस्लाव्हस्की याचे दोन

ग्रंथ त्यांनी मराठीत आणले. 'अभिनयसाधना' आणि 'भूमिकाशिल्प' हे ग्रंथ जागतिक स्तरावर मान्यता पावलेले आहेत. नाट्यसंहिता आणि नाट्यप्रयोग यांचे भान एकत्रितपणे राखले पाहिजे, असा त्यांचा आग्रह असे. कला तत्त्वचिंतक, समालोचक व पुरोगामी विचारवंत म्हणून त्यांची प्रसिद्धी होती. त्यांनी 'रत्नाकर' (१९२९), 'महाराष्ट्र साहित्य पत्रिका' (१९४० – १९४२) व (१९४६ – १९७०) या पत्रिकांचे संपादनही केले. काळे यांचा 'प्रतिमारूप आणि रंग' हा ग्रंथ त्यांच्या निधनानंतर प्रकाशित झाला.

– वि. ग. जोशी

**संदर्भ :**

*१. 'अनौपचारिक मुलाखती'; प्रसाद, रौप्य महात्सवी प्रकाशन, १९७२.*
*२. डॉ. देशपांडे वि.भा.; 'स्मरणगंध'; निशिगंध प्रकाशन, पुणे; जुलै २००४.*

## काळे, वसंत पुरुषोत्तम

**कथाकार, कादंबरीकार, कथाकथनकार**

**२२ मार्च १९३२– २६ जून २००१**



व. पु. काळे यांनी एस.एस्.सी.नंतर आर्किटेक्चरचा अभ्यासक्रम पूर्ण केला. त्यांना चित्रकला व छायाचित्रकला यांची मनापासून आवड होती. त्यांचे हस्ताक्षर वाचकांना आकर्षित करणारे होते. व.पुं.ची पत्रे 'प्लेझर बॉक्स'मध्ये त्यांच्यासह इतरांना आनंद देणारी आहेत. ती 'वपुर्झा' म्हणून गौरवली आहेत. एक कथाकार असण्यापेक्षा व. पुं. ना कथाकथनकार म्हणून राहणे पसंत होते. त्यांची निवेदन शैली वाचकप्रिय नसून श्रोतेप्रिय आहे. त्यांनी कथाकथनात स्वतःचा ठसा उमटवला आहे. कथाकथनाबरोबरच त्यांनी कथालेखनही तितक्याच प्रभावीपणे केले. त्यांच्या कथेचे हे कार्य वाङ्मयीन नसून सांस्कृतिक आहे. कथेपेक्षा वाचकाशी संवाद करण्याच्या निमित्ताने त्यांनी 'आपण सारे अर्जुन' नावाचे आगळे–वेगळे चिंतन करणारे पुस्तक लिहिले, पण त्यातही वाचकांपेक्षा श्रोत्यांनाच दाद मिळते. आपली महानगरपालिकेतील नोकरी सोडून त्यांनी कथाकथनाचा व्यवसाय केला. मुंबईसारख्या महानगरीतील उच्च मध्यमवर्गीय माणसांचे चित्रण हा त्यांच्या कथेचा व कथानकाचा कणा आहे. 'लोंबकळणारी माणसं' (१९६०), 'पण माझ्या हातांनी' (१९६२), 'मी, माझी सौ आणि तिचा प्रियकर' (१९६४), 'मायाबाजार' (१९७७) इत्यादी कथासंग्रहांमध्ये त्यांची वरील वैशिष्ट्ये प्रतिबिंबित झालेली आहेत. 'ही वाट एकटीची' (१९८१) ही कादंबरी अशी वैशिष्ट्ये वागवते. 'पुन्हा प्रपंच' आणि 'गजरा' ही दूरदर्शनवरील व आकाशवाणीवरील नाट्ये व. पुं. ना भरपूर प्रसिद्धी देऊन गेली. चटकदार संवाद, आकर्षक निवेदनशैली यांमुळे आजही त्यांची कथा वाचकप्रिय आहे. एक हरहुन्नरी व्यक्तिमत्त्व म्हणून व. पुं. चा गौरव केला जातो.

**कलासक्ती व रसिकता**

व.पुं.चे वडील नाट्यसृष्टीतील एक नावाजलेले नेपथ्यकार होते. त्यांचा प्रभाव व.पुं.च्या व्यक्तिमत्त्वावर व कथारचनेवर पडलेला दिसतो. नाट्य, संगीत व शिल्प ही कलेची क्षेत्रे व. पुं. ची मर्मबंधने आहेत. व. पुं. चे जगणे ही एक मैफल होती. ही मैफल कलेशी बांधिलकी घेऊन रसिकांना भरपूर दाद देत असे. व.पुं.नी दाद देण्याची ही किमया आपल्या आयुष्याच्या अंतिम क्षणापर्यंत जपून ठेवली होती. कलासक्ती आणि रसिकता ही त्यांची कवचकुंडलेच होती. व. पुं. नी जी कथा लिहिली आणि सांगितली. ती जुन्यात नवी व नव्यात जुनी होती. या कथेने मराठी कथेच्या वाटचालीतला प्रारंभ, मध्य आणि त्यानंतरचा वाहता प्रवाह अजमावून त्यांतली स्वतःची अशी खास वाट ठळकपणे समोर ठेवली आहे. त्यांनी आपला खास रसिकवर्गही निर्माण केला होता. रविकिरण मंडळाने जशी मराठी कविता वाचकसन्मुख केली, तशी व. पुं. नी मराठी कथा घराघरांत लोकप्रिय केली. कथाकथनातही कथा 'चिअर्स' मिळवणारी आहे. त्यांची संवादप्रिय कथा रसिकांना 'वपुर्झा' बहाल करते. नव्याने 'झपूर्झा'ची अवस्था

प्राप्त करून देते. या कथेतला आशय हलका-फुलका, तडजोडीचा, सवंग लोकप्रियतेचा असला, तरी त्यामागचे व.पुं.चे व्यक्तिमत्त्व, रसिकत्व, कवित्व पुढे परतत्त्वाकडे जाणारेच आहे. ह्या दृष्टीने त्यांचा 'टेकाडे भाऊजी' पुन्हापुन्हा आठवून पाहावा. रंजनाचे सूत्रही 'प्लेझर बॉक्स'मध्ये चिरंतन ठेवा ठेवून जाते. व.पुं.च्या कथेचे हे सार आहे. कलाक्षेत्रातला व.पुं.सारखा बहुरंगी प्रवासी समेवरच्या रंगदार मैफलीत रसिकरंजन करत आपल्या मैफलीची नजाकत आकर्षित करतो, हे विशेष आहे.

**फँटसीचा मनसोक्त उपयोग**

'वाट पाहणारे घर' हा कविता संग्रह त्यांच्या पत्नीची वेगळी आठवण जागवून देतो. व.पु.काळे हे डिसेंबर १९९९ मध्ये मुंबई महानगर साहित्य संमेलनाचे अध्यक्ष होते. या संमेलनास त्यांनी रसिक संमेलन असे म्हटले आहे. यात त्यांनी अध्यक्षीय भाषणाऐवजी रसिकांच्या गप्पा आयोजित केल्या होत्या. कथेत त्यांनी फँटसीचा मनसोक्त उपयोग केला. या दृष्टीने त्यांची 'भदे' ही गाजलेली कथा पाहता येईल. त्यांच्या कथेत फँटसीने एक नवी वाट निर्माण केली. त्यांची कथा विनोद आणि कारुण्य यांचे कलात्मक मिश्रण असते. त्यांनी मराठी वाचकांना 'श्रवणीय कथा' दिली. लोकप्रियतेच्या पातळीवर त्यांच्या कथासंग्रहांच्या अनेक आवृत्त्या निघूनही ही लोकप्रियता सवंग नाही.

पुढे त्यांनी आपल्या 'पार्टनर' कादंबरीचे नाट्यांबरीत रूपांतर करूनही ती सवंग झाली नाही. व.पुं.नी वाचकांशी सतत बांधिलकी ठेवून कथा लिहिली. टीकाकारांनी उपेक्षित ठेवलेला हा कथाकार लोकप्रियतेत मात्र मागे राहिला नाही. याचे कारण पुढच्या श्रोत्यास किंवा वाचकास ते कथा सांगत नाहीत तर कथा जगावयास शिकवतात. यात आर्किटेक्चर, इंटिरिअर डेकोरेशन, चित्रकला, फोटोग्राफी, संगीत अशा विविध सांस्कृतिक वळणांचे दर्शन घडते. त्यामुळे ही कथा समाजाभिमुख होत संस्कृतीचे वेगळे दर्शन घडवते.

— मधू जामकर

**संदर्भ :**

*२. जामकर, मधु; 'व. पुं.ची मुलाखत' (ग्रंथोपजीविये)*

*३. 'व. पु. ८५' प्रस्तावना; मेहता प्रकाशन, पुणे.*

## काळेले, रामचंद्र अनंत

**कवी, काव्यसमीक्षक**

**२२ फेब्रुवारी १९१० - १२ जून १९८१**

रामचंद्र काळेले यांचा जन्म सेंधवा या गावी झाला. ते बी.ए., एलूएल.बी., संस्कृत काव्यतीर्थ झाले. मूळ गाव जुन्नर परंतु नोकरीनिमित्त इंदूरला स्थायिक झाले. पोलीस प्रॉसिक्यूटर म्हणून नोकरी केली. शिस्तप्रिय, प्रामाणिक आणि चारित्र्यसंपन्न म्हणून नोकरीत दबदबा होता. इंदूर संस्थानात राजकवी म्हणून त्यांना मान्यता मिळाली.

चित्रकार होण्याचे त्यांचे स्वप्न होते. सुट्टीच्या दिवशी गावाबाहेर जाऊन जलरंगात निसर्गचित्रे रंगविण्याचा छंद आयुष्यभर जोपासला. मित्रमंडळींनी ही चित्रे फ्रेम करून घरात जपली. काही ब्रिटिश मित्रांनी ती परदेशीही नेली. पुठ्ठ्याची घरे बनविण्याचाही छंद त्यांनी जपला. देखण्या घरांच्या प्रतिकृती बनवण्यातला आगळा आनंद त्यांना मिळत असे. त्यांच्या 'वाग्वसंत' (१९३४), 'भावपूर्णा' (१९४३), 'ओळखीचे सूर' (१९४१) या सुरुवातीच्या कवितासंग्रहांतील कवितांवर भा.रा.तांबे आणि रविकिरण मंडळातील कवींचा प्रभाव स्पष्ट दिसतो. 'वाग्वसंत' या काव्यसंग्रहातील मोठा भाग हा प्रणय, शृंगार, प्रेमविषयक कविता यांचा आहे. या संग्रहाला कविवर्य भा. रा. तांबे यांची प्रस्तावना लाभली आहे. तांब्यांच्या कवितेचा सखोल अभ्यास करून त्यांनी या काव्यसंग्रहातील कविता सौंदर्यपूर्ण प्रतिमांच्या भाषेत मांडल्या गेल्या. 'तांबे एक अध्ययन' हे समीक्षात्मक पुस्तकही लिहिले. 'रूपवती' आणि महात्मा गांधींवरील 'गीत निर्वाण' ही त्यांची काव्ये प्रसिद्ध आहेत. 'हिमअंगार' आणि 'नवे अलंकार' ही पुस्तकेही वाचकप्रिय ठरली. 'तांबे एक अध्ययन' हा भा.रा.तांबे यांच्या कवितेचे मूल्यमापन करणारा त्यांचा ग्रंथ महत्त्वाचा आहे.

काळेले हे नवकवींच्या मागच्या पिढीतले असूनही त्यांनी नवकवितेचे स्वागत केले व हे वळण आत्मसातही केले. त्यांची सुरुवातीची कविता गेय होती. त्यांना अतिशय देखणे व्यक्तिमत्त्व लाभले होते. ते उत्तम काव्यगायन सादर करीत. अनेक कविसंमेलनांतून त्यांनी

काव्यगायन केले. त्यांची उत्तरकालीन कविता मुक्तछंदात्मक होती. त्यांत दलितोद्धाराची तळमळ दिसते. संस्कृत भाषेचे आणि काव्याचे विलक्षण प्रेम होते. त्यातूनच 'विक्रमोर्वशीय' या संस्कृत काव्याचे मराठीत रूपांतर केले.

म. ना. अदवंत यांच्या मतानुसार कुसुमाग्रज, वा. रा. कांत, बा. भ. बोरकर, श्रीकृष्ण पोवळे आणि रा. अ. काळेले हे पाच कवी म्हणजे आधुनिक कविपंचक आहे.

काळेले यांच्या बाबतीत एक विशेष नोंद म्हणजे पुढे मराठी कवितेच्या प्रांतात नाव मिळविलेल्या या कवीला बालपणी नीट मराठी बोलताही येत नव्हते. वडिलांमुळे त्यांच्यावर इंग्रजीचाच प्रभाव होता. पुढे मात्र त्यांनी मराठी व संस्कृत भाषांवर प्रभुत्व मिळवले. त्यांच्या पत्नी प्रतिभा स्वत: कविता करत असत. 'मनपाखरू पाखरू' हा त्यांचा कवितासंग्रह प्रकाशित झाला आहे.

– शशिकला उपाध्ये

**संदर्भ :**

*१. देशपांडे अ.ना.; 'आधुनिक मराठी वाङ्मयाचा इतिहास' १९२० ते १९५० भाग २; व्हीनस प्रकाशन, पुणे.*

## किर्लोस्कर, अण्णासाहेब

***किर्लोस्कर, बळवंत पांडुरंग***

☞ **मुख्य नोंद – नाटक खंड**

## किर्लोस्कर, आनंदीबाई शंकरराव

***अज्ञाता***

**कथालेखिका**

**१९०५ – १६ सप्टेंबर १९४२**

आनंदीबाई किर्लोस्करांनी 'अज्ञाता' या नावाने कथालेखन केले. 'प्रतिबिंब' (१९४१), 'अंतरंग' (१९४२), 'ज्योती' (१९४४) हे कथासंग्रह आणि 'नव्या वाटा' हे नाटक प्रकाशित. आनंदीबाई मूळच्या पुण्याच्या वैद्य. अध्यापनशास्त्रातले शिक्षण पूर्ण झाल्यावर किर्लोस्करवाडीत अध्यापनाचे कार्य. साहित्यात रस



असल्याने 'किर्लोस्कर' मासिकाच्या कार्यात आणि लेखनात सहभाग. १९३२ सालात संपादक शंकरराव किर्लोस्कर यांच्याशी विवाह. दोघांचाही हा पुनर्विवाह होता, पण समाजाची टीका आनंदीबाईंनाच सहन करावी लागली. स्वतःच्या दुःखातून त्यांनी इतर स्त्रियांची दुःखे जाणून घेऊन त्यांच्या दुःखाला वाचा फोडणारे कथालेखन केले. विवाहानंतर 'स्त्री' मासिकाचे संपादन केले. संबंधित लेखक आणि चित्रकार यांच्याशी चर्चा करून दिवाळी अंकाचे नियोजन करीत असत. वेश्यांच्या वेदनेची आणि अगतिकतेची कल्पना असल्यामुळे प्रत्यक्ष वेश्यावस्तीत जाऊन त्यांचे प्रश्न त्यांनी समजून घेतले. त्या अनुभवांवर आधारित असा 'मगरीच्या मगरमिठीतून सुटका' नावाचा लेख लिहिला. शोधक पत्रकारितेचे हे एक महत्त्वाचे उदाहरण!

आनंदीबाईंचे आजूबाजूच्या समाजाचे निरीक्षण सूक्ष्म आणि नेमके आहे. मनाचे डोळे उघडे ठेवून समाजात होणारे स्त्रियांचे शोषण त्या पाहतात. स्त्रियांची वंचना आणि दुर्दशा त्यांना पाहवत नाही. संसारातल्या लहान-लहान गोष्टीही स्त्रियांच्या अस्मितेवर आघात करतात, हे त्या आजूबाजूला रोजच पाहत होत्या. सुशिक्षित स्त्रियांना स्वतंत्र व्यक्तिमत्त्वाची जाणीव होऊनही जुन्या-पुराण्या रुढिनियमांमुळे तिची होत असलेली परवड पाहून त्या व्यथित होतात. पतीच्या अहंकारामुळे पत्नीचे स्वतंत्र व्यक्तिमत्त्व चिरडून जाते, याचे त्यांना फार दुःख होई. संसारातल्या अशा प्रसंगांवर आनंदीबाईंनी कथा लिहिल्या. स्त्रियांच्या मनातल्या निरनिराळ्या भावनांचा वेध नाजूकपणे घेतला. आपल्या कथेतून मध्यमवर्गीय जाणिवा प्रभावीपणे व्यक्त केल्या. स्त्रीजीवनाचे व मध्यमवर्गाचे अंतरंग उलगडून दाखवले.

त्यांच्या बहुतेक कथा स्त्री-पुरुषांच्या नातेसंबंधांतून निर्माण होणाऱ्या गुंतागुंतीचा वेध घेतात. उदा.

अशोकचे पत्नीवर प्रेम आहे, पण चित्र काढण्यासाठी ती हेमकांताकडे जायला लागताच संशयाचे भूत त्याच्या मानगुटीवर बसते. मूल व्हावे म्हणून देवकी नवऱ्याचे दुसरे लग्न करून देते, तर ती नवी बायको देवकीलाच घराबाहेर काढते. सुलोचनाच्या लिखाणाला प्रोत्साहन देणारा तिचा नवरा तिला प्रसिद्धी मिळताच घटस्फोट देतो. दणकट स्वतंत्र व्यवसाय करणाऱ्या जाईसारख्या विधवेला गावातल्या गुंडाशी पाट लावावा लागतो आणि त्याच्या जाचाने ती खंगून मरून जाते. अर्धवट शिक्षण घेतलेल्या अंबूच्या आयुष्याचे मातेरे होते. समाजाच्या दांभिकपणाला वैतागून कालिंदी पुनर्विवाहाला नकार देते. मुलाच्या घरी आश्रितासारखी पडून राहण्याची वेळ मावशीवर येते. मामाच्या लोभापायी पुष्पलतेला चित्रपटातला उच्छृंखलपणा सहन करावा लागतो. प्रौढकुमारिकेच्या प्रश्नाभोवतीही आनंदीबाईंनी कथा लिहिल्या. वेश्यांबद्दल त्यांना अपार सहानुभूती वाटे. बापूसाहेबांसारख्या लोकप्रिय नेत्याच्या तारुण्यातल्या भितरेपणामुळे मंजुळेला शेवटी वेश्या व्हावे लागते. तारा नावाची वेश्या श्यामबरोबर पत्नीसारखी राहत असते, पण श्यामच्या पत्नीच्या हातून चूक घडताच तिला माफ करून 'तिचा स्वीकार कर' असे सांगून ती निघून जाते. समाजाच्या चालीरीतींवर त्या उपरोधाचे शस्त्र चालवतात. विद्याधरला एका जमीनदार विधवेशी लग्न करायचे असते, पण समाजाला उघड लग्न मान्य नाही, मात्र चोरटे संबंध मात्र चालतात. गरीब बायजाबाई कर्ज काढून शाळेतल्या नृत्यासाठी चंद्राला कपडे शिवून देते, पण नेत्याच्या लांबलचक भाषणामुळे नृत्य रद्द होते. श्रीमंत अक्कासाहेबांना गाणे अजिबात येत नसूनसुद्धा त्यांना दिगंबरला गाणे शिकवावे लागते, अन् गाणे येत असलेल्या रखमीला भिकारीण झाल्याचे पाहावे लागते.

आनंदीबाई किर्लोस्कर म्हणजे एका निरलस व्यक्तिमत्त्वाचे प्रतीक होय. स्त्रियांच्या प्रश्नावरील या कथा मात्र जुळवलेल्या व रचलेल्या वाटतात. मूलभूत मानवी भावभावनांवर या कथा आधारित नाहीत म्हणून रूढींवरच्या या कथा कालातीत होत नाहीत. पण आनंदीबाईंची तळमळ सच्ची असल्यामुळे या कथा मनाला स्पर्शून जातात. स्त्री-मनाचे आकलन दमदार असल्यामुळे स्त्रीचे स्त्रीत्व, तिचे सत्त्व आणि तिचे अस्तित्व हा त्यांच्या प्रत्येक कथेचा केंद्रबिंदू आहे. मेंदूच्या विकाराने त्यांचे अकाली निधन झाले.

– डॉ. अपर्णा लव्हेकर

## किर्लोस्कर, बळवंत पांडुरंग

***किर्लोस्कर, अण्णासाहेब***

☞ **मुख्य नोंद – नाटक खंड**

## किर्लोस्कर, शांता मुकुंद

**कथाकार, कादंबरीकार, संपादक**

**५ एप्रिल १९२३**



मनमोकळा स्वभाव, बोलण्यात चातुर्य, वयाच्या मानाने अधिक समज असलेल्या शांता किर्लोस्कर ह्या किर्लोस्करवाडीच्या शाळेतील विधवा शिक्षिका आनंदीबाई वैद्य यांची मुलगी असल्याने, शंकरराव किर्लोस्करांच्या घरी त्यांच्या मालती या मुलीची समवयस्क गट्टीची मैत्रीण या नात्याने खेळत. त्यांचे प्राथमिक शिक्षण त्यांच्या आजोळी पुणे नगरपालिकेच्या शाळेत आणि माध्यमिक शिक्षण कन्याशाळेमध्ये व भावे स्कूलमध्ये होऊन १९३९ साली त्या मॅट्रिक उत्तीर्ण झाल्या. त्यांनी बी.ए.ची पदवी सांगलीच्या विलिंग्डन महाविद्यालयातून मिळविली. १९६७मध्ये त्या वृत्तविद्यापदविकेच्या परीक्षेला बसून उत्तम तऱ्हेने उत्तीर्ण झाल्या, परंतु पदवीनंतर प्रदीर्घ काळ लोटल्याने पदविकेचा सन्मान मिळू शकला नाही.

मध्यंतरी शंकररावांनी आनंदीबाईंशी विवाह केला (१९३८). आनंदीबाईंना साहित्याचे अंग असल्याने

शाळेत नोकरी करून त्या मासिकांसाठीही लेख निवडीचे काम करीत. शंकररावांचे सुपुत्र मुकुंदराव बी.ए. होऊन मासिकाच्या कचेरीत पूर्णवेळ काम करीत. १९४३ साली शांता-मुकुंद यांचा विवाह झाला. १९५९ मध्ये पुण्यात राहायला आल्यावर त्या शहरी जीवनाचा त्यांच्या दिनचर्येवर परिणाम झाला.

मुलांना शाळेच्या बसमध्ये बसवून, जेवणाचा डबा घेऊन शांताताई किर्लोस्कर प्रेसमध्ये पोचून सायंकाळपर्यंत मुकुंदरावांबरोबर काम करून पति-पत्नी संध्याकाळी घरी येत असत. १९५७-५८ मध्ये मुकुंदराव अमेरिकेत गेल्यापासून परत येईपर्यंत शांताताईंनीच मासिकांचे काम नियमितपणे व दर्जा आणि परंपरेप्रमाणे चालविले. उल्लेखनीय म्हणजे मासिकाच्या संपादकांनी ठिकठिकाणी लेखक, वाचक, स्थानीय नामवंत इत्यादींची शिबिरे व सहली आयोजित करून जिव्हाळा निर्माण केला. संस्थांचे रौप्य अथवा सुवर्ण महोत्सव, शिक्षण, खेळ, कला, साहित्य, संस्कृती, राजकारण, पानशेतसारखी घटना आदी सर्व विषयांना ही मासिके स्पर्श करून वाचकांना मेजवानी देत. अनेकांच्या मुलाखती प्रसिद्ध करीत.

कोयना भूकंप, अपोलो यान, ऑलिम्पिक स्पर्धा, साहित्य संमेलने, कुटुंब नियोजन, कृषी व अन्य विज्ञाने, बालक वर्ष, स्त्री वर्ष, स्त्रियांच्या जीवनातील वेगवेगळ्या अवस्था, व्यवसाय मार्गदर्शन, पाठ्यपुस्तके, दलित चळवळ, मतिमंद मुले, संप अशा विविध प्रसंगांची व घटनांची अभ्यासपूर्ण माहिती या मासिकांनी परिश्रमपूर्वक वाचकांना पुरविली. अंधश्रद्धा, बुवाबाजी, धार्मिक रूढी बुद्धीच्या कसोटीवर तपासून त्यांतील दंभ उघड करण्याचे प्रयत्न या मासिकांनी ध्येयासक्तीने केले. या मासिकांच्या गुणवत्तेमुळे त्यांना नेहमीच उदंड प्रतिसाद मिळाला. ख्यातनाम साहित्यिक पु.ल.देशपांडे यांचा अभिप्राय बोलका आहे, ‘‘किर्लोस्कर, स्त्री, मनोहर अशी सामाजिक, राजकीय, सांस्कृतिक विचारांची तीन व्यासपीठे ही त्यांची मराठी माणसाला मिळालेली मोठी देणगी आहे.’’

पालक-शिक्षक समन्वयाची चळवळ त्यांनी अनेक वर्षे चालविली. ऑक्टोबर १९५७मध्ये दादरला मराठी लेखिकांच्या पहिल्या संमेलनात ‘स्त्रियांचे लेखन’ या परिसंवादात भाग घेऊन इंदूर, मांडवगड, उज्जैन, देवास, ग्वाल्हेर, भोपाळ येथे दौरा करून त्यांनी ‘इंदूर माळवा’ विशेषांकाची तयारी केली. ‘रेवा पार’ या नावाचे दोन लेख लिहिले. त्याच वर्षी पुणे सेवासदन संस्थेचा सुवर्ण महोत्सव होता. संस्था चालकांना भेटून त्यांनी विशेष पुरवणी प्रसिद्ध केली. १९५९मध्ये तुळजापूरच्या मराठवाडा साहित्य संमेलनात हजर राहून नंतर त्यांनी बीड, मोमिनाबाद, उस्मानाबाद, लातूर, नांदेड, परभणी, शेलू व औरंगाबाद असे हिंडून तेथील वाचक, लेखक, महिलामंडळ कार्यकर्त्या यांना भेटून माहिती घेतली आणि कलापूर्ण सजावट, वेधक साहित्य यांनी नटलेला ‘मराठवाडा’ अंक सादर केला. १९६८ मध्ये बिहारचा दौरा करून असेच उपयुक्त काम केले. ‘किस्त्रीम’ने महाराष्ट्राच्या वैचारिक घडणीत केवढा मोठा व महत्त्वाचा वाटा उचलला होता, याचे प्रत्यंतर देणारा ग्रंथ म्हणजे शांताताई किर्लोस्कर संपादित ‘गोष्ट पासष्टीची’ हा होय.

स्फुट लेखनाव्यतिरिक्त त्यांची ग्रंथसंपदा पुढीलप्रमाणे आहे : कथासंग्रह ‘डाक्क्याची साडी’ (१९६१), ‘शोध’ (१९७६), क्षमा राव यांच्या इंग्रजी कथांचा अनुवाद ‘देणगी’ (१९६०), सीमॉन द बोव्हा यांच्या ‘द सेकन्ड सेक्स’ या विख्यात ग्रंथाचा सारानुवाद ‘बायकांचा जन्म’ (१९७५), कादंबरी- ‘भातुकली’ (१९९८) याशिवाय ‘लालन-पालन’ (१९७०), ‘कसं ग माझं सोन’ (१९७९), ‘प्रकाशाचा वेध’ (१९८३) ही पुस्तके प्रसिद्ध आहेत.

– वि. ग. जोशी

**संदर्भ :**

*१. ‘किर्लोस्कर शंकरराव; ‘शंवाकीय’ आत्मचरित्र, किर्लोस्कर प्रेस प्रकाशन, पुणे; १९७४.*

*२. किर्लोस्कर शांता; ‘गोष्ट पासष्टीची’, किर्लोस्कर प्रेस प्रकाशन, पुणे; १९९०.*

## कीर, गिरिजा उमाकांत

**कथाकार, कादंबरीकार, बालसाहित्यिक**

**५ फेब्रुवारी १९३३**



संवेदनशील साहित्यिक गिरिजा कीर यांचा जन्म धारवाड येथे झाला. गिरिजाताई पूर्वाश्रमीच्या रमा नारायणराव मुदवेडकर. त्यांना लहान-पणापासून लेखनात आणि वाचनात अभिरुची होती. मुंबई विद्यापीठाची बी.ए. ही पदवी त्यांनी मिळवली. स्वातंत्र्योत्तर काळात स्त्रियांच्या नियतकालिकांची संख्या बरीच होती. त्यात स्त्रियांचे अधिकाधिक लेखन प्रसिद्ध केले जाई. त्या काळात गिरिजाताईंनी कथालेखन करण्यास प्रारंभ केला. त्यांच्या कथा 'माहेर', 'मानिनी', 'ललना', 'अनुराधा', 'प्रपंच' या मासिकांतून प्रसिद्ध झाल्या. वि. स. खांडेकर यांच्या लेखनाचा प्रभाव त्यांच्या लेखनावर असल्याचे जाणवते.

१९६८ ते १९७८ या काळात त्यांनी 'अनुराधा' मासिकाच्या साहाय्यक संपादिका म्हणून काम केले. बालसाहित्यात कुमारगटासाठी लेखन करणाऱ्या महत्त्वाच्या लेखकांमधील त्या एक होत. 'वेताळनगरी आणि साहसी हेमचंद्र', 'परीकथांच्या तोंडवळ्याची कथा', 'चंद्रावर सफर', 'उंटा उंटा कवडी दे' या कथासंग्रहांप्रमाणे 'खूप खूप गोष्टी', 'देणारे हात', 'साहसकथा', 'शूरांच्या कथा,' 'नीलाराणीचा दरबार', 'कुमारांच्या कथा' इत्यादी कुमार साहित्य त्यांनी लिहिले. 'झालाच पाहिजे व इतर नाटिका', 'ए बम्बै की राणी देखो आणि इतर नाटिका' ही नाटिकांची पुस्तकेही त्यांनी लिहिली. रंजन व प्रबोधनपर लेखन करताना गिरिजाताईंनी चरित्रपर पुस्तकात 'देवी अहल्याबाई होळकर, राजा राममोहन रॉय, महात्मा जोतिबा फुले' इत्यादी समाजकार्य-कर्तृत्व असलेल्यांचा आलेख गोष्टीरूपांतून मांडला.

प्रवासवर्णन लिहिताना 'प्रवासवर्णन' या शीर्षकाचेच पुस्तक १९८९ मध्ये प्रकाशित झाले. त्याचप्रमाणे 'तसूभर जमीन मनभर आकाश' हेही प्रवासवर्णनावर आधारित पुस्तक लक्षवेधी आहे. सत्तरच्या दशकात त्यांचे अनेक कथासंग्रह प्रसिद्ध झाले. त्यात 'चांदण्यांचं झाड', 'देवखुणा', 'गिरकी', 'चाहूल', 'गिरिबन', 'अनिकेत' इत्यादींचा उल्लेख करता येईल. 'पूर्णपुरुष' (१९७०), 'चक्रवेध' (१९७७), 'स्वप्नात चंद्र ज्याच्या' (१९७८), 'आभाळमाया' (१९८५), 'आत्मकथा' (१९९१), 'झपाटलेला' (१९९४), 'चाहूल' (१९७९), 'अभिशाप' (१९७९) इत्यादी कादंबऱ्यांत रोजच्या जीवनातील घटनाप्रसंगांवर आधारित कथानक आहे. वास्तवाचे आदर्श चित्रण करणे गिरिजा कीर यांना आवडते.

'गाभाऱ्यातील माणसं' (१९७२) या पुस्तकातील व्यक्तिचित्रे कथात्मक आहेत. सामाजिक प्रश्नांसंबंधीची तळमळ असल्याने प्रत्यक्ष आदिवासी भागात जाऊन, कुष्ठरोगी वस्तीत जाऊन, त्यांची सुख-दुःखे जाणून मग त्यावर लेखन केले आहे. 'अनोळखी ओळख' या पुस्तकात त्यांनी अनुताई वाघ यांचे हृद्य चित्रण रेखाटलेले आहे. त्याचप्रमाणे 'डायरेक्टर जनरल ऑफ पोलीस' सूर्यकांत जोग तसेच जेलर जे. एस. कुर्डुकर यांचे काम जाणून घेऊन त्यांच्या कार्यकुशलतेचे, समग्र व्यक्तिमत्त्वाचे चित्रण या पुस्तकांत आहे. 'कलावंत' (१९९९) या पुस्तकात कलाकारांच्या मुलाखती आहेत. कलावंताचे घर, त्याचे जगणे-वागणे, कृती-भावना याचे बारकाईने चित्रण करून त्या-त्या कलेची, कलाकारांच्या, सर्वांगीण व्यक्तिमत्त्वांची ओळख त्यांनी करून दिली आहे. त्यात सुमती गुप्ते-जोगळेकर, लीला चिटणीस इत्यादी अभिनेत्रींप्रमाणेच मेकअपमन, पटकथाकार, पडद्यामागे काम करणारी कलावंत मंडळी यांची व्यक्तिचित्रणेही या पुस्तकात आहेत. 'साहित्य सहवास' (१९९७) या पुस्तकात साहित्यिकांची ओळख करून देताना दुर्गा भागवत, विंदा करंदीकर अशा दिग्गज साहित्यिकांचे व्यक्तिचित्रण यात आहे. मुलाखत घेताना लेखिका मनाच्या तळापर्यंत जाऊन त्या व्यक्तीला

बोलते करतात आणि त्यातून त्यांचे लेखन अधिक वास्तवदर्शी अन् बोलके झाल्याचे दिसते.

विविध वाङ्मय-प्रकारांत लेखन करत आजपर्यंत त्यांची ७८ पुस्तके प्रकाशित झाली आहेत. विविध साहित्य संमेलनांत, चर्चात्मक कार्यक्रमांत, साहित्यविषयक सभा-संमेलनांत त्यांचा विशेष सहभाग असतो.

आजपर्यंत मिळालेल्या पुरस्कारांत महाराष्ट्र साहित्य परिषदेचा 'ह. ना. आपटे पुरस्कार' (१९८०) 'अनिकेत' या कादंबरीला मिळाला. त्यांच्या साहित्यविषयक कामगिरीसाठी त्यांना 'महाराष्ट्र राज्य साहित्य मंडळाचा विशेष पुरस्कार' (१९९७) मिळाला.

– डॉ. रजनी अपसिंगेकर

**संदर्भ :**

*१. ढेरे, खांडगे, इ. संपादक ; 'स्त्री साहित्याचा मागोवा' खंड २; प्रतिमा प्रकाशन, पुणे.*

## कुंजविहारी

***कुलकर्णी, हरिहर गुरुनाथ***

**कवी**

**१० नोव्हेंबर १८९६ – १ नोव्हेंबर १९७८**



कुंजविहारी यांचा जन्म अक्कलकोट, जिल्हा सोलापूर येथे झाला. त्यांच्या बालपणीच त्यांचे वडील वारले. वडील हैद्राबाद संस्थानात महसूल खात्यात दुय्यम अधिकारी होते. १९१० साली ते सोलापुरात आले. तेथे नगरपालिकेच्या हायस्कुलात दोन वर्षे शिकले. या दोन वर्षांत श्रीधरपंत काकडे यांच्या 'सूर्योदय' प्रेसमध्ये ट्रेडल मशीन चालवले, वार लावून शिक्षण घेतले. सातवी उत्तीर्ण झाल्यावर १९१२ साली 'लक्ष्मी मिल'मध्ये कापडावर नंबर टाकण्याचे म्हणजे 'पीस मार्कर'चे, मजुराचे काम केले.

१९२० हे साल त्यांच्या जीवनात परिवर्तनकारी ठरले. त्या वर्षी मुंबई प्रांतिक परिषद सोलापूरला भरली होती व लोकमान्य टिळक उपस्थित होते. या प्रसंगी भावुक हरिहरला देशभक्तीची चेतना मिळाली. त्याने राष्ट्रीय स्वातंत्र्य लढ्यात स्वतःला झोकून दिले. स्वातंत्र्य चळवळीत भाग घेतल्यामुळे त्यांची नोकरी गेली (१९२८). त्या वेळी ४० रुपयांवर ते कारकुनी करत होते.

१९२० ते १९३१ या काळात स्वातंत्र्य लढ्यात, १९३२ ते १९३५ या काळात राष्ट्रीय शिक्षण शाळेच्या प्रयोगात व पुढील सारे जीवन (१९७८ पर्यंत) विविध सामाजिक व साहित्यिक संस्थांतून लोकराज्याला आवश्यक सामंजस्य व समाजमन अनुकूल करण्यात त्यांनी व्यतीत केले.

जन जागरणासाठी कवीने कविता केल्या व उत्सव, मेळे, सभा यांमधून खड्या, तालबद्ध आवाजात गाइल्या. या कविता देशप्रेम, वीरश्री व उत्साह ह्यांनी ओथंबलेल्या होत्या. आरंभी 'हरिहर' व 'त्रिशूल' या टोपणनावाने ते लेखन करीत. वरेरकरांचे 'कुंजविहारी' नाटक पाहून त्यांनी ते नाव टोपणनाव म्हणून स्वीकारले. अशा तऱ्हेने हरिहर आता 'कुंजविहारी' बनले. कुंजविहारींनी स्वातंत्र्यपूर्व काळात इतिहासातील थोर पुरुषांना काव्यविषय बनवून ज्वलंत राष्ट्रीय कविता लिहिल्या. तानाजींच्या पराक्रमावर रचलेले 'मराठा गडी यशाचा धनी' हे त्याचेच एक उदाहरण. 'तुज सांगतसे शपथ घेऊनी आई, मरणाला भ्यालो नाही' असे निर्धाराने म्हणत राष्ट्रकार्यासाठी 'भेटेन नऊ महिन्यांनी' असे आईला वचन देत फाशी जाणारा धैर्यशाली क्रांतिवीर त्यांनी रंगविला. १९२१च्या मुळशी सत्याग्रहावर त्यांनी 'मुळशीचा पाळणा' लिहिला. त्यांच्या सुबोध, गेय व प्रत्ययकारी कवितांनी वाचकांना वेड लावले होते. स्वातंत्र्योत्तर 'चिरंजीव होवो जगी लोकशाही', 'उद्याचा देव कसा असावा' अशा समयोचित कविता कुंजविहारींनी लिहिल्या. 'सैन्य चालले पुढे' ही गोवा मुक्ती संग्रामावरची, 'बंडखोर स्फूर्ती' ही १८५७ संबंधी, 'मंगल आरती' ही महर्षी कर्वे यांच्या जन्मशताब्दी प्रसंगीची व 'रणावीण स्वातंत्र्य कोणा मिळाले' ह्या

कवितेसारखाच भाव तसेच ओज दाखवणारी 'स्वातंत्र्याची नौका जाते रक्त नदीतुनि पैलतिरी' ही आणि अशी आणखी काही उदाहरणे देता येतील.

मार्शल लॉच्या काळात कवीला एक वर्ष सक्तमजुरीची सजा व ५०० रुपये दंड झाला होता. त्यांच्या किराणामालाच्या दुकानाचा लिलाव करून दंडाच्या अर्धी रक्कमही उभी राहू शकली नाही. यानंतर त्यांचे जीवन विसकळीत झाले. कुंजविहारी नळदुर्गजवळ खुदावाडी येथे राष्ट्रीय शाळेत गेले. देशभक्त तरुण कार्यकर्ते तेथून बाहेर पडू लागले. हैद्राबाद संस्थान व परकीय सरकारने अनेक राष्ट्रीय शाळा बंद पाडल्या. कवी पुन्हा सोलापूरला आले व आपले कार्य चालू ठेवले. त्यांनी अनेक उपक्रमांचे, चळवळींचे संयोजन केले. स्वत:ला नेहमी स्वयंसेवक मानून त्यांनी निष्ठेने कार्य केले. मराठी साहित्य परिषद सोलापूर शाखा, कवी मंडळ, साहित्य मंडळ, ओनामा मंदिर, हरी जागर व्याख्यानमाला, राज्यश्री वाचनालय, सर्वधर्म परिषद, विमा एजंट संघटना, बालमेळा, शारदोत्सव व्याख्यानमाला आदी अनेक संस्थांचे जनकत्व त्यांच्याकडे जाते. विविध संस्थांच्या माध्यमातून लोकशाहीला पोषक सहकार, सहजीवन, समता, ममता, स्वातंत्र्य, विकसनशील विधायक प्रवृत्ती हे सारे रुजविण्याचे संस्कार ते करीत राहिले. 'नवतरुणांस', 'तुळशी वृंदावन', 'लोकमित्र मी मंत्र म्हणा', 'धर्म आणि दुर्योधन', 'सांग सूर्यनारायणा' ह्या त्यांच्या कविताही उल्लेखनीय आहेत. त्यांच्या गीतांत दुर्दम्य आशावाद, ईश्वरावर नितांत श्रद्धा, देशाच्या उज्ज्वल भविष्यावर दृढ विश्वास यांचा प्रत्यय येतो. 'नोकरशाहीची आरती' या त्यांच्या कवितेस शि. म. परांजपे यांनी 'वस्तुस्थितिदर्शक' असे शिफारसपत्र दिले. कुंजविहारींनी कन्नड कवी द. रा. बेंद्रे यांच्या काही कवितांचा भावानुवाद केला. 'स्वातंत्र्य सैनिक' म्हणून १९७२ साली त्यांचा गौरव केला गेला. कुंजविहारींचा 'गीत गुंजारव' हा पहिला काव्यसंग्रह १९२६ मध्ये प्रकाशित झाला व त्याची सुधारीत आवृत्ती १९४७ मध्ये प्रकाशात आली. 'आहुती'मध्ये (१९७२) त्यांच्या निवडक कविता संकलित आहेत.

कवी कुंजविहारी जन्मशताब्दी समिती, सोलापूरने या प्रसंगाचे औचित्य साधून 'समग्र कुंजविहारी'चे प्रकाशन केले.

– वि. ग. जोशी

## कुंटे, महादेव मोरेश्वर

**कवी, प्राचीन वाङ्मयाचे अभ्यासक**

**२९ नोव्हेंबर १८३५ – ८ ऑक्टोबर १८८८**



ऐतिहासिक काव्य रचण्याची प्रथा सुरू करणारे महादेव कुंटे हे कृष्णेच्या काठी माहुली येथे जन्मले. लहानपणीच त्याचे पितृछत्र हरपल्याने व गरिबीमुळे कोल्हापुरात माधुकरी मागून त्यांचे शिक्षण झाले. मुंबईत नशीब काढण्यासाठी पोचलेले कुंटे १८५९ मध्ये विल्सन हायस्कूलमधून मॅट्रिक व एल्फिन्स्टन महाविद्यालयामधून बी.ए. झाले. मुंबई सरकारच्या शिक्षण खात्यात नोकरी करताना त्यांची बदली कराची, पुणे, कोल्हापूर येथे प्रमुख अध्यापक म्हणून झाली. कोल्हापूर येथे त्यांनी जुन्या पद्धतीप्रमाणे संस्कृतचा सखोल व व्यापक अभ्यास केला होता. मुंबई व अहमदाबाद येथील सरकारी महाविद्यालयात काही काळ ते संस्कृतचे प्राध्यापक होते.

मराठी शिवाय इंग्रजी, संस्कृत, सिंधी, गुजराती या भाषांवर प्रभुत्व असल्यामुळे ते त्या भाषांतून अस्खलित भाषण करीत. ग्रीक, पर्शियन व लॅटिन भाषांचेही ते जाणकार होते.

कुंटे यांची ख्याती 'राजा शिवाजी' या रचनेच्या दृष्टीने अपूर्ण पण अभिव्यक्तीदृष्ट्या अपूर्व काव्यामुळे विशेष झाली. इंग्रजी 'हिरॉइक एपिक' मराठीत आणणे एवढेच त्यांना अभिप्रेत नव्हते. या काव्याच्या इंग्रजी प्रस्तावनेत

त्यांचा हेतू स्पष्ट झाला आहे. ‘अशिक्षित व सुशिक्षित यांना राष्ट्रहितासाठी एकत्र आणले पाहिजे. यासाठी सर्वांना समजेल व आवडेल अशा सरळ व नित्य व्यवहारातील भाषेचा प्रयोग केला पाहिजे.’ संस्कृतनिष्ठ भाषाभिमानी पुणेरी पंडितांचा आदर्श मोडल्यामुळे कुंटे यांच्यावर खूप टीका झाली होती. उच्चारानुसारी भाषेची ही ‘छान तर्वार उप्सून’ आलेल्या त्यांच्या ‘राजा शिवाजी’चा सामना ‘मराठी भाषेच्या शिवाजी’शी झाला. स्वतंत्र काव्यदृष्टीने जाणीवपूर्वक ‘रोमँटिक स्टाइल’मध्ये काव्य लिहिणारा त्या काळातील हा एकमेव कवी होय. कुंटे यांनी ‘राजा शिवाजी’वर सोप्या भाषेत महाकाव्य लिहिण्याचा अभिनव प्रयोग केला. या काव्याचे भाग १ ते ३ (१८६९) व भाग ४ ते ६ (१८७१) प्रसिद्ध झाले. कुंटे यांचा व्यासंग व पांडित्य त्यांच्या ‘षडदर्शन चिंतनिका’ १८७७ ते १८८२ या काळात मासिकरूपाने प्रसिद्ध झालेल्या ग्रंथात तसेच ‘व्हिसिसिट्यूड्स ऑफ आर्यन सिव्हिलायझेशन इन इंडिया’ यांमध्ये दिसते. यातल्या पहिल्या ग्रंथाची पृष्ठसंख्या (डेमी आकार) २७७५ आहे.

कुंटे यांच्या मृत्यूमुळे हा ग्रंथ अपूर्ण राहिला. दुसरा ग्रंथ ६०० पृष्ठांचा असून तो १८८० मध्ये प्रकाशित झाला. भ. श्री. पंडित म्हणतात, ‘‘कुंट्यांची काव्ये सरस नसली व त्यांत अनेक दोष असले, तरी त्यांनी काव्याच्या क्षेत्रात उलथापालथ घडवून आणली... जुनापुराणा काव्यविषयक दृष्टिकोन पालटला.’’ कुंटे यांनी ‘मन’ ह्या नावाचे २५५ श्लोकांचे काव्य रचून १८७२ साली प्रसिद्ध केले होते. तसेच ‘ऋषी’ नावाचे ७७० ओळींचे काव्य इंग्रजीत लिहून १८७८ मध्ये प्रसिद्ध केले. अनाथ झालेल्या वामन शिवराम आपटे यांना त्यांनी मदत केली. कुंटे यांच्या काळात तरी त्यांच्या तोलाचा चिकित्सक व व्यासंगी पंडित महाराष्ट्रात झाला नाही.

– वि. ग. जोशी

**संदर्भ :**

*१. ठकार निशिकांत; ‘मराठी कविता: स्वरूप आणि विवेचन’; स्वाध्याय महाविद्यालय प्रकाशन, पुणे; नोव्हेंबर १९७७.*

## कुंटे, वामन जनार्दन

**कवी, अनुवादक**

**नोव्हेंबर १८९२ – २० सप्टेंबर १९७७**

वामन जनार्दन कुंटे हे बी.ई. (सिव्हिल), आर्किटेक्ट व इंजिनिअर होते. त्यांचे वास्तव्य सांगली, फलटण व जमखिंडी येथे झाले. याव्यतिरिक्त कवी आणि अनुवादक म्हणून ते ओळखले जातात.

कुंटे ह्यांची वाङ्मयविषयक सर्वांत महत्त्वाची कामगिरी म्हणजे; काव्यविषयक काही नवे प्रयोग करूनही काहीसे उपेक्षित राहिलेले कवी रेंदाळकर यांच्या कवितांचे दोन खंडात संकलन करून क्रमशः १९२४ व १९२८ मध्ये ते स्वखर्चाने प्रसिद्ध केले, ही होय. दुसऱ्या खंडांत कुंटे यांनी कवी चरित्रासोबत ‘रेंदाळकरांचे निंदक’ हा नागेश गणेश नवरे यांचा लेख समाविष्ट केला आहे. मन लावून शांतपणे काम करीत राहणे हा कुंटे यांचा स्वभावधर्म होता. विनोबाजींनी प्रसिद्ध केलेले ‘गुरुबोध’ म्हणजे श्रीशंकराचार्यांच्या ‘स्तोत्रे आणि प्रकरण’ ह्या ग्रंथातील निवडक वेच्यांचा संग्रह असून तो संस्कृतमध्ये आहे. त्याची प्रस्तावना हिंदीत व मराठीत आहे. अनेकांनी या पुस्तकाच्या मराठी भाषांतराची मागणी केली होती. अति व्यग्रतेमुळे स्वत: विनोबाजी ते करू शकले नाहीत. प्रकाशकांनी हे काम वामनराव कुंटे यांच्यावर सोपविले. त्यांनी ते काम आनंदाने स्वीकारून पूर्ण केले. तत्पूर्वी त्यांनी जाणकारांशी चर्चा केली व विनोबाजींशीही चर्चा केली. याविषयी कुंटे म्हणतात, ‘‘मी काही मोठा संस्कृतज्ञ नाही किंवा अध्यात्मशास्त्रात प्रवीण नाही.’’ त्यांनी पूर्ण मेहनतीने हे भाषांतर प्रसिद्ध केले. १९११ साली प्रसिद्ध झालेले ‘सरला’ खंडकाव्य ही त्यांची पहिली साहित्यकृती. मूळ बंगालीवरून त्यांनी मराठीत ‘सुशीला की विमला आणि इतर गोष्टी’ (१९३१) लिहून प्रसिद्ध केल्या. टॉलस्टॉयच्या ‘इव्हन द फूल’ या प्रदीर्घ कथेचे स्वैर रूपांतर ‘भोळ्या रामजींचे साम्राज्य’ या नावाने प्रसिद्ध केले. ‘अपरोक्षानुभूति’ (१९५४), ‘प्रबोध सुधाकर’ (१९६१), ‘ओडिसाच्या जगन्नाथदासाचा भागवत एकादश स्कंध’, ‘भागवत सार‘, ‘कबिराचे

बोल' (१९६२) ही त्यांची अध्यात्मविषयक भाषांतरे होत. 'थोरोचे श्रमजीवन' (१९५१) आणि 'मालकीची मीमांसा' (१९५५) हे दोन अनुवाद उल्लेखनीय आहेत. 'विनोबा वाङ्मय दर्शन'मध्ये कुंटे यांनी विनोबांच्या वाङ्मयाचा परिचय करून दिला आहे. वरील उल्लेखांवरून अध्यात्म व तत्त्वज्ञान ह्या विषयांकडे लेखकाची विशेष रुची दिसून येते.

– वि. ग. जोशी

**संदर्भ :**

१. *खानोलकर गं. दे.; 'मराठी वाङ्मयसेवक चरित्रकोश खंड पहिला'; अथेना पब्लिशर्स, मुंबई; २००३.*

२. *भावे आचार्य विनोबा; 'गुरुबोध'; मराठी अनुवाद, कुंटे वामन जनार्दन; प्रकाशक, परंधाम विद्यापीठ, पवनार; १९५८.*

## कुरुंदकर, नरहर अंबादास

☞ **मुख्य नोंद – पत्रकारिता आणि ललितेतर साहित्य खंड**

## कुलकर्णी, गुरुनाथ आबाजी

☞ **जी. ए. कुलकर्णी**

## कुलकर्णी, गोविंद मल्हार

**समीक्षक**

**२१ डिसेंबर १९१४ – १ एप्रिल २००१**

गो.म.कुलकर्णी ह्यांचे शालेय शिक्षण इचलकरंजी व उच्चशिक्षण सांगली येथे झाले. पुणे येथे मराठी-संस्कृत विषय घेऊन एम.ए.ची पदवी 'तर्खडकर' सुवर्णपदकासह त्यांनी प्राप्त केली होती. १९४६ पासून १९७४ पर्यंत विजय महाविद्यालय विजापूर येथे मराठीचे प्राध्यापक म्हणून ते कार्यरत होते. १९६९ पासून कर्नाटक विद्यापीठात पीएच.डी.चे ते मार्गदर्शक होते. १९७४ मध्ये सेवानिवृत्त झाल्यानंतर कराडच्या संत गाडगे महाराज महाविद्यालयामध्ये मराठी विभाग प्रमुख म्हणून त्यांनी जबाबदारी पार पाडली. १९७५ मध्ये शिवाजी विद्यापीठातही ते पीएच.डी.चे मार्गदर्शक होते.



'प्राची' या काव्यसंग्रहाद्वारे त्यांनी साहित्यविश्वात पाऊल टाकले. पण पुढे मात्र आयुष्यभर त्यांनी समीक्षा-लेखनाचाच ध्यास घेतला. 'रसग्रहण: कला आणि स्वरूप' (१९५२), 'खंडन-मंडन' (१९६८), 'साद-पडसाद' (१९७५), 'वाटा आणि वळणे' (१९७५), 'मराठी साहित्यातील स्पंदने' (१९८५) हे समीक्षा लेखनावरचे मर्मग्राही ग्रंथ त्यांच्या चिकित्सक दृष्टीतून साकार झाले. या ग्रंथांमधून साहित्यातील विविध विषयांचा परामर्श त्यांनी घेतला आहे. त्यामुळे या ग्रंथांतील समीक्षा स्फुट स्वरूपाची असली, तरी ती सर्वसमावेशक झाली आहे. याशिवाय 'झपूर्झा' (१९६२), 'हृदयशारदा' (१९६९), 'चांदणवेल' (१९७२) या ग्रंथांमधून अनुक्रमे केशवसुत, गोविंदाग्रज, बोरकर यांच्या निवडक कवितांचे सहसंपादन त्यांनी केले; तेही या कवींच्या अभ्यासकाला वेगळी दृष्टी प्रदान करणारे आहे. 'अभिरुची ग्रामीण आणि नागर' (१९७६) आणि 'नवसमीक्षा' (१९८२) हे अन्य सहसंपादित ग्रंथही त्यातील नेमक्या विवेचनामुळे उल्लेखनीय आहेत. प्रा.द.गो.कर्वे लिखित 'न्यायमूर्ती रानडे' यांच्या इंग्रजीतील चरित्रग्रंथाचा त्यांनी 'भारताचे द्रष्टे न्यायमूर्ती रानडे' (१९४२) या नावाने केलेला मराठी अनुवादही आदर्श वस्तुपाठ देणारा अनुवाद आहे.

**वाङ्मयीन वृत्तिवेध**

प्राचीन संतवाङ्मयापासून ते आधुनिक साहित्यातील दलित-ग्रामीण साहित्य चळवळीपर्यंत सर्वच साहित्य प्रकारांचा व त्यांतील-वृत्ती प्रवृत्तींचा वेध त्यांनी आपल्या समीक्षा-लेखनामधून घेतला आहे. संत-साहित्याचा विचार करताना केवळ राजकीय, सामाजिक वा वाङ्मयीन दृष्टिकोन पत्करून चालणार नाही तर शुद्ध आध्यात्मिक भूमिकेवरूनच संत-साहित्याकडे पाहिले पाहिजे, हे त्यांनी दाखवून दिले. इ.स.१६८० ते १८२० या कालखंडातील साहित्याचा वेध घेताना या काळातील

पौराणिक आख्यानांमधून तत्कालीन चालीरीती मिसळण्याची प्रवृत्ती एका बाजूने बळावत असतानाच दुसऱ्या बाजूने बखर वाङ्मयासारखे इतिहासाधिष्ठित वाङ्मय पुराणवलयांकित करण्याचाही प्रयत्न कसा होत होता, हे त्यांनी साक्षेपाने नोंदविले आहे. अव्वल इंग्रजी राजवटीतील मराठी वाङ्मयाचे विवेचन करताना ब्रिटिश राजवटीमुळे साऱ्या भारतीय जीवनाचे स्थित्यंतर कसे घडून आले व त्यामुळे जीवनाच्या राजकीय, धार्मिक, आर्थिक, सांस्कृतिक अंगांकडे पाहण्याचा एक नवा दृष्टिकोन विकसित होऊन त्याचा प्रभाव वाङ्मयनिर्मितीवर कसा पडला, हे त्यांनी नेमकेपणाने उलगडून दाखविले आहे. केशवसुतांपासून मर्ढेकरांपर्यंतच्या मराठी कवितेत सौंदर्यस्फुरणापेक्षा विचार-चिंतनाला अग्रक्रम मिळाला आहे, असे स्पष्टपणे सांगून सौंदर्यसंवेदनांच्या दृष्टीने बालकवी, तांबे, बोरकर, पु.शि.रेगे, आरती प्रभू, ग्रेस, महानोर या कवींचे महत्त्वही ते प्रतिपादन करतात. पण एकंदर आधुनिक कवितेचा किंवा नवकवितेचा तोंडवळा संसृतिटीकात्मक तरी आहे किंवा बौद्धिक स्वरूपाच्या प्रयोगप्रवणतेकडे तरी तो झुकतो; असे कटाक्षाने ते नोंदवितात. दलित साहित्य व ग्रामीण साहित्य यांविषयीचे त्यांचे चिंतनही असेच मर्मग्राही आहे. दलित साहित्याने आधुनिक मराठी साहित्यविश्वात जाणिवेचा एक नवा प्रवाह आणून सोडला, हे स्पष्ट करतानाच या साहित्यासाठी वेगळ्या साहित्यशास्त्राची मागणी तर्कसंगत आहे, हेही त्यांनी मान्य केले आहे तर ग्रामीण साहित्याच्या यशस्वितेचा आढावा घेऊन ते एका आवर्तात कसे सापडले आहे, याचे स्पष्ट दिशा-दिग्दर्शन त्यांनी केले आहे. हे सगळे लक्षात घेतले म्हणजे गो.म.कुलकर्णी यांनी मराठी वाङ्मयविश्वाच्या वृत्ति-प्रवृत्तीचा वेध किती चिकित्सकपणे पण आस्था न ढळू देता घेतला आहे, हे लक्षात येते. समीक्षेला शोधयात्रा मानून मोठ्या ध्येयनिष्ठेने त्यांनी आयुष्यभर ही शोधयात्रा केली आणि समीक्षा-विचार प्रगल्भ केला. मराठी समीक्षा क्षेत्राला समन्वयाची दृष्टी बहाल करणारा समीक्षक म्हणून त्यांचे नाव अग्रस्थानी राहील यात शंका नाही.

मराठी समीक्षा जगतात कोणतीही एकांगी भूमिका न घेता वाङ्मयप्रेमी रसास्वादाच्या भूमिकेतून पण अतिशय डोळसपणे समीक्षा लेखन करणारे थोर समीक्षक म्हणजे गो.म.कुलकर्णी होत.

– डॉ.संजय देशमुख

**संदर्भ :**

१. *'खंडन-मंडन'; १९६८.*
२. *'वाटा आणि वळणे'; नवसाहित्य प्रकाशन, बेळगाव,१९७५.*
३. *'मराठी साहित्यातील स्पंदने'; सुवर्ण प्रकाशन, पुणे, १९८५.*
४. *शिरवाडकर वि. वा., कुलकर्णी गो. म., संपादक; 'चांदणवेल', प्रस्तावना; कॉन्टिनेन्टल प्रकाशन, पुणे, १९७२.*
५. *'मराठी वाङ्मयाचा इतिहास' खंड ४; महाराष्ट्र साहित्य परिषद पुणे; दुसरी आवृत्ती १९७३.*

## कुलकर्णी, श्रीनिवास विनायक

**ललित निबंधकार**

**२० नोव्हेंबर १९३६**



श्रीनिवास कुलकर्णी यांचा जन्म कृष्णाकाठच्या सांगली जिल्ह्यातील औदुंबर या गावी झाला. प्राथमिक शिक्षण औदुंबरमध्येच झाले, तर सातवीपर्यंतचे शिक्षण अंकल-खोप येथे झाले. त्यापुढील शिक्षण सांगलीच्या 'अनाथ विद्यार्थी आश्रम' या संस्थेत राहून पूर्ण केले. आजोबा व वडील दोघेही चित्रकार होते. या दोघांच्या सान्निध्यात होणारे कलेचे संस्कार आणि तितकेच महत्त्वाचे म्हणजे, औदुंबरच्या परिसराचा, सभोवतालच्या वातावरणाचा परिणाम यांमधून श्रीनिवास कुलकर्णी यांचे संस्कारशील, संवेदनक्षम मन तयार झाले. लेखकाच्या शब्दांत सांगायचे तर, ''अक्षर घटवावे, चित्रे काढावीत, वाचन करावे, सर्व समजून घेत असावे आणि स्वतःच्या मर्यादाही ओळखाव्यात हे शिक्षण घरातूनच मिळाले. प्रत्येक शंकेला उत्तर मिळे. निर्माण होणाऱ्या प्रत्येक उत्सुकतेला समाधान

देणारे– त्यातून पुढचा प्रश्न– त्यावर पुढचे उत्तर– यांतून दिसणाऱ्या व न दिसता जाणवणाऱ्या गोष्टींच्या तळापर्यंत जाण्याचा छंद.'' (ललित, एप्रिल, १९६६) शिक्षण संपल्यावर प्रथम दोन वर्षे साइन बोर्ड पेंटिंगचा व्यवसाय व नंतर ओगलेवाडी येथील काचकारखान्यात हिशोब खात्यात नोकरी. त्यानंतर आजतागायत 'मौज' या नियतकालिकाच्या संपादन विभागात काम.

बालवयापासून बराच काळ कवितालेखन. कवितेवर आत्यंतिक प्रेम. पहिली कविता मराठी चौथीत असताना, पां. ना. मिसाळ यांच्या 'बालसन्मित्र'मध्ये प्रसिद्ध. पहिली गोष्ट का. रा. पालवणकरांच्या 'खेळगडी'च्या शेवटच्या बाललेखांकात प्रसिद्ध. नंतर कविता–लेखनावरच भर. बहुतेक कविता लहान–मोठ्या नियतकालिकांमधून छापून आल्या. कवितालेखन थांबल्याबद्दल नेहमीच खंत, पण कवितेवर नितांत श्रद्धा.

मात्र श्रीनिवास विनायक कुलकर्णी यांची खरी ओळख आहे, ती ललितलेखक म्हणून. त्यांचा पहिला ललित लेख 'मनातल्या उन्हात' हा १९६० मध्ये 'सत्यकथे'त प्रसिद्ध झाला. येथून पुढे त्यांचा ललितलेखनाचा प्रवास सुरू झाला. त्यांचे ललितलेखन पुढीलप्रमाणे आहे. 'डोह' (१९६५), 'सोन्याचा पिंपळ' (१९७५), 'पाण्याचे पंख' (१९८७) आणि 'कोरडी भिक्षा' (२०००). हे सर्व संग्रह 'मौज' प्रकाशनातर्फे प्रसिद्ध झाले आहेत आणि त्यांमधील सर्व लेख प्रथम 'सत्यकथा' आणि 'मौज' या नियतकालिकांमधून प्रसिद्ध झाले आहेत.

**कोवळे भावविश्व**

'मनातल्या उन्हात' हा पहिला लेख सत्यकथेच्या ऑगस्ट १९६०च्या अंकात प्रसिद्ध झाला आणि त्यानंतर १९६५मध्ये प्रसिद्ध झालेला 'डोह' हा पहिला ललितलेखसंग्रह यांनी वाचकांना ललितलेखनाचा वेगळाच आविष्कार घडविला. 'डोह'मध्ये लेखकाच्या बालपणाच्या आठवणी चित्रित झाल्या आहेत. बालवयातील सोनेरी अनुभव येथे साकार होतात. औदुंबरचा परिसर, तेथील निसर्ग – झाडे, पक्षी, कृष्णा नदी, डोह, सुसरी– यांच्या पार्श्वभूमीवर हे लेखन एक वेगळाच रंग घेऊन अवतरते. लेखांच्या शीर्षकांपासूनच हे वेगळेपण जाणवायला लागते. उदाहरणार्थ 'आम्ही वानरांच्या फौजा', 'मृगजळाच्या यक्षघराला', 'मनातल्या उन्हात', 'शब्दांच्या संध्याकाळी' इत्यादी. ही शीर्षके कधी बोलकी होतात, तर कधी ती गूढ होऊन वाचकांची उत्सुकता वाढवितात. या सर्व लेखांमधून लहान मुलांचे जे निखळ भाव–विचार–विश्व उभे राहते, ते विलोभनीय आहे. प्रौढ मनाने बालवयात शिरून बालकाच्या कोवळ्या नजरेने टिपलेले हे विश्व कोणालाही मोह घालणारे, हवेहवेसे वाटणारे, स्वप्नवत असे आहे; पण तरीही हे स्वप्नरंजन मात्र नाही.

'सोन्याचा पिंपळ'मधील लेखांमधून साकार होणारे विश्व 'डोह'पेक्षा अगदी वेगळे आहे. प्रौढ मनाला जाणवणारे, प्रत्ययाला येणारे काही गूढ, येथे अतींद्रिय अनुभव शब्दबद्ध होतात. 'आस्तिक–आस्तिक'मधील सापांचे विविध अनुभव, 'धनानि भूमौ'मधील गुप्त धनासंबंधीचे अनुभव, 'रूपांतर'मधील देहातीततेची जाणीव; असे एक वेगळेच अनुभवविश्व वाचकांसमोर येते. 'सोन्याचा पिंपळ' हा लेखही वेगळ्याच पातळीवर घेऊन जाणारा आहे. 'काळोख चहूकडे' आणि 'तळ्याकाठी संध्याकाळी' हे लेख आकाराने विस्तृत व काहीसे कथेच्या अंगाने गूढरम्य अनुभव सांगणारे आहेत. 'घंटीवाला' या लेखात आपल्या छोट्या भावाचा मृत्यूपर्यंत होणारा प्रवास लेखकाने सांगितला आहे. तो वाचताना एकाच वेळी त्रयस्थ, तटस्थ आणि तरीही आत्मनिष्ठ अशा भावनांचा प्रत्यय येतो. 'डोह' आणि 'सोन्याचा पिंपळ' या दोन्ही संग्रहांचा एक वेगळेपणा म्हणजे यांतील लेखांमधून साकारणारे लेखकाचे वडील आणि स्वतः लेखक यांच्यामधील बाप–लेकाचे प्रगल्भ नाते.

'पाण्याचे पंख' या संग्रहात घरात आणि सभोवती असणाऱ्या, वावरणाऱ्या लहान मुलांचे भावविश्व साकारले आहे. 'अलोक', 'पदम', 'मनू', 'मिकी' इत्यादी लहान

मुलांचे हसणे, खेळणे, बागडणे हे लेखकाच्या नजरेतून टिपताना आपल्या सभोवतालच्या लहान मुलांच्या जगाशी त्यांचे नाते जुळलेले दिसते.

'कोरडी भिक्षा' या संग्रहात अनेक व्यक्तिचित्रे आली आहेत, आणि त्यांच्या चित्रणातून पुन्हा वेगळे अनुभव वाचकांसमोर उलगडले जातात.

या सर्व लेखनाला जोड मिळाली आहे, ती लेखकाच्या चित्रदर्शी शब्दकलेची. चित्रकलेच्या संस्कारातून येणारी दृश्यमयता, निसर्गाच्या सूक्ष्म निरीक्षणामधून वर्णनात येणारा बारकावा आणि अनुभवाचा तळ गाठणारी पारदर्शी लेखनशैली यांमुळे लेखांमधील आशय एक वेगळीच उंची गाठतो. ललित लेखनाला एक वेगळेच परिमाण देऊन हे लेखन समृद्ध करणारा लेखक म्हणून श्रीनिवास विनायक कुलकर्णी यांचे नाव निश्चितच अग्रक्रमाने घ्यावे लागेल.

– डॉ. नंदा आपटे

**संदर्भ :**

*१. ललित, एप्रिल १९६६.*

## कुसुमाग्रज

***शिरवाडकर, विष्णू वामन, तात्यासाहेब शिरवाडकर***

**कवी, नाटककार, कथाकार**

**२७ फेब्रुवारी १९१२ – १० मार्च १९९९**

वि. वा. शिरवाडकरांचा जन्म पुणे येथे झाला. त्यांचे वडील गजानन रंगनाथ शिरवाडकर हे नाशिक जिल्ह्यातील पिंपळगाव, बसवंत येथे वकिली करीत असत. शिरवाडे येथील चुलत घराण्यात दत्तक विधान झाल्यावर त्यांचे नामांतर विष्णू वामन शिरवाडकर असे झाले. त्यांनी काव्यलेखनासाठी कुसुमाग्रज हे नाव स्वीकारले. त्यांचे प्राथमिक शिक्षण पिंपळगाव आणि नाशिक येथील न्यू इंग्लिश स्कूल (आत्ताच्या रुंगठा हायस्कूल) येथे झाले.

याच काळात नाटकातली पहिली भूमिका त्यांनी केली. देवदत्त नारायण टिळक यांच्या संपादनाखाली प्रसिद्ध होणाऱ्या 'बालबोधमेवा'मध्ये त्यांनी कविता



लेखनास आणि गद्य लेखनास सुरुवात केली. १९२९ साली मॅट्रिकची परीक्षा उत्तीर्ण झाल्यावर त्यांनी हं. प्रा. ठा. महाविद्यालयात प्रवेश घेतला. १९३३ मध्ये 'ध्रुवमंडळा'ची स्थापना केली. त्याच सुमारास 'रत्नाकर' मासिकात कविता लिहिल्या आणि 'नवा मनू' या वृत्तपत्रात वृत्तपत्रीय लेखन केले. १९३४ साली बी.ए. होण्यापूर्वी शिरवाडकरांनी आपल्या 'जीवनलहरी' ह्या काव्यसंग्रहाचे प्रकाशन 'ध्रुवमंडळा'तर्फे केले. १९३६-१९३८ या काळात 'गोदावरी सिनेटोन' ह्या चित्रपट संस्थेत प्रवेश करून त्यांनी 'सती सुलोचना' चित्रपटाचे कथा-लेखन केले आणि त्याच चित्रपटात लक्ष्मणाची भूमिका केली.

१९३८-१९४६ या सात वर्षांत 'साप्ताहिक प्रभा', 'दैनिक प्रभात', 'सारथी', 'धनुर्धारी', 'नवयुग' या नियतकालिकांत काम केले. १९४४ साली गंगूबाई सोनवणी यांच्याशी त्यांचा विवाह झाला. पत्नीचे सासरचे नाव 'मनोरमा' असे ठेवले. शिरवाडकरांनी नंतरची दोन वर्षे 'स्वदेश'चे संपादक म्हणून काम केले. १९४२ साली वि.स.खांडेकरांनी कुसुमाग्रजांचा 'विशाखा' कवितासंग्रह प्रस्तावनेसह प्रसिद्ध केला. १९४६ साली 'वैष्णव' ही पहिली कादंबरी आणि 'दूरचे दिवे' हे पहिले नाटक प्रसिद्ध झाले. त्यानंतर मात्र अन्य कोणतीही नोकरी न स्वीकारता फक्त साहित्य निर्मिती आणि शालेय पुस्तकांचे संपादन यांत त्यांनी उर्वरित काल व्यतीत केला. त्याच दरम्यान नाशिक 'लोकहितवादी मंडळा'ची स्थापना केली. या संस्थेद्वारे आणि अन्य उपक्रमांत सहभागी होऊन आपल्या व्यक्तिमत्त्वाचा ठसा नाशिकच्या सामाजिक, वाङ्मयीन, सांस्कृतिक कार्यावर ठसठशीतपणे उमटवला.

१९५९ मध्ये संयुक्त महाराष्ट्र आंदोलनातील सहभाग, १९६४ मधील मडगाव येथील 'अखिल भारतीय मराठी साहित्य संमेलना'चे अध्यक्षपद, 'नटसम्राट'

नाटकाला १९७४ साली मिळालेला साहित्य अकादमी पुरस्कार ह्या कुसुमाग्रजांच्या १९७० पूर्वीच्या आयुष्यातील ठळक घटना आहेत. १९७२ साली पत्नीचे– मनोरमाबाईंचे निधन ही त्यांना एकाकी करणारी घटना होती.

अनेक मानसन्मानांनी कुसुमाग्रजांना गौरवण्यात आले. २ नोव्हेंबर १९८५मध्ये पुणे विद्यापीठाची डी. लिट. ही प्रतिष्ठेची पदवी; २० डिसेंबर १९८७ मध्ये महाराष्ट्र राज्य साहित्य संस्कृती मंडळाची गौरववृत्ती; ११ ऑगस्ट १९८९ मध्ये मुंबई येथील पहिल्या जागतिक मराठी साहित्य परिषदेचे अध्यक्षपद; १९९२ पासून नाशिकच्या यशवंतराव चव्हाण मुक्त विद्यापीठातर्फे कुसुमाग्रजांच्या गौरवार्थ प्रतिवर्षी नवोदितांच्या काव्यसंग्रहांस 'विशाखा पुरस्कार' देण्यास प्रारंभ. याशिवाय कुसुमाग्रजांच्या 'मराठी माती' (१९६०) 'स्वगत' (१९६२), 'हिमरेषा' (१९६४) या काव्यसंग्रहास आणि 'ययाती आणि देवयानी' (१९६६), 'वीज म्हणाली धरतीला' या नाटकांना राज्यपुरस्कार मिळाले आहेत.

मुंबई येथे ११ मार्च १९८९ रोजी शानदार समारंभात कुसुमाग्रजांना राष्ट्रीय पातळीवरील 'ज्ञानपीठ पुरस्कारा'ने सन्मानित करण्यात आले. वि. स. खांडेकरांनंतर राष्ट्रीय पातळीवर गौरवण्यात आलेले कुसुमाग्रज हे दुसरे मराठी भाषक साहित्यिक आहेत. त्यांच्यासारख्या सत्त्वशील, तत्त्वनिष्ठ आणि अभिजात कवीला भारतीय पातळीवर लाभलेल्या सन्मानामुळे नाशिकलाच नव्हे तर संपूर्ण महाराष्ट्राला आनंदाचे उधाण आले.

कुसुमाग्रजांच्या विपुल साहित्यकृतींची संक्षेपाने नोंद घ्यायला हवी. १३ कवितासंग्रह (त्यात एक संस्कृत 'मेघदूत' या खंडकाव्याचा अनुवाद), १९ नाटके, ३ एकांकिका संग्रह, ३ नाटके, ६ कथासंग्रह, ६ लघुनिबंध/ ललित संग्रह, काही बालकविता, बालसाहित्याचे संग्रह, निवडक साहित्यविषयक पुस्तके आणि संपादने इत्यादी. तसेच कुसुमाग्रजांच्या कविता, कथा, बालकविता या वाङ्मय प्रकारांतील इतर अभ्यासकांनी केलेली संपादने प्रकाशित झाली आहेत. ती अशी – 'रसयात्रा' (संपादक : बा. भ. बोरकर, शंकर वैद्य), 'प्रवासी पक्षी' (संपादक : शंकर वैद्य), 'माधवी' (संपादक : शांता शेळके), 'कुसुमाग्रजांच्या बारा कथा' (संपादक : बा. वा. दातार), 'वि. वा. शिरवाडकर : निवडक कथा' शांता शेळके, 'बालबोध मेव्यातील कुसुमाग्रज' पद्मा मोरजे; अशी आहे. कविवर्य कुसुमाग्रजांनी शालेय विद्यार्थ्यांसाठी 'काव्यवाहिनी' खंड पहिला, दुसरा, तिसरा व चौथा ही संपादने रा. श्री. जोग यांच्या सहकार्याने तयार केली आहेत. 'सुवर्णनौका' व 'साहित्य सुवर्ण' ही संपादने वा. रा. ढवळे यांच्या सहकार्याने सिद्ध केली आहेत. कुसुमाग्रजांच्या साहित्य निर्मितीवर अनेक लेख प्रसंगपरत्वे आणि साठीपंचाहत्तरीच्या निमित्ताने विविध नियतकालिकांत प्रसिद्ध झाले आहेत; पाच अभ्यासकांनी त्यांच्या साहित्यावर पी.एचडी.साठी प्रबंध सादर केले आहेत. रंगमंचावर कवितांचे सादरीकरण करण्यात आले आहे. 'प्रवासपक्षी' हा अनुबोधपट यशवंतराव चव्हाण प्रतिष्ठानतर्फे नाट्यदिग्दर्शक जब्बार पटेल यांनी तयार केला आहे.

'जीवनलहरी' (१९३३), 'विशाखा' (१९४२), 'मराठी माती' (१९६०), 'स्वगत' (१९६२), 'हिमरेषा' (१९६४), 'मुक्तायन' (१९८४), 'दूरचे दिवे' (१९४६), 'दुसरा पेशवा' (१९४७), 'कौंतेय' (१९५३), 'राजमुकुट' (१९५४), 'ऑथेल्लो' (१९६१), 'ययाती देवयानी' (१९६६), 'वीज म्हणाली धरतीला' (१९७०), 'नटसम्राट' (१९७१)च्या पहिल्या आवृत्तीनंतर १९९६ पर्यंत चौदा आवृत्त्या प्रकाशित); ही नाटके आणि ह्या एकांकिका. 'दिवाणी दावा' (१९५४), 'नाटक बसते आहे' (१९६१); 'वैष्णव' (१९४६), 'जान्हवी' (१९५२), 'कल्पनेच्या तीरावर' (१९५६); 'फूलवाली' (१९५०), 'सतारीचे बोल' (१९५२); 'आहे आणि नाही' (१९५७), 'विरामचिन्हे' (१९७०), 'एकाकी तारा' (१९८२).

**बालवाङ्मय**

'जाईचा कुंज' (१९३६), 'जादूची होडी' (१९४२), 'छोटे आणि मोठे' (१९५३); 'श्रावण' (१९८५).

**काव्यसंग्रह**

शिरवाडकरांच्या विविध आयामी लेखनात महत्त्वाचे ठरणारे मराठी साहित्याचे स्वयंपूर्ण स्थान असलेले लेखन म्हणजे कुसुमाग्रज ह्या नामनिर्देशाखालील त्यांचे काव्यलेखन 'जीवन लहरी' (१९३३) आणि 'विशाखा (१९४२) ते 'मारवा' (१९९९) या काव्यसंग्रहापर्यंतचा त्यांचा काव्यलेखनप्रवास हा विकसनशील प्रवास आहे. तीव्र आणि प्रखर सामाजिक जाणीव, असीम ध्येयनिष्ठा आणि आदर्शवादाची जोपासना करणारी कुसुमाग्रजांची कविता उत्तरोत्तर अधिक जीवनसन्मुख, मानवकल्याणाची आकांक्षा बाळगणारी आणि चिंतनात्मक झाली. 'जीवनलहरी', 'विशाखा', 'क्रांतीचा जयजयकार', 'स्वप्नाची समाप्ती', 'पृथ्वीचे प्रेमगीत', 'स्मृती' या रसिकप्रिय कवितांमुळे 'विशाखा म्हणजे कुसुमाग्रज आणि कुसुमाग्रज म्हणजे विशाखा' असे समीकरण तयार झाले. त्यांचा 'विशाखा' हा काव्यसंग्रह मराठी काव्यप्रवाहातील एक वाङ्मयीन लक्षणीय घटना आहे. या संग्रहाने एकाच वेळी मराठी कवितेला समाजसन्मुख करण्याचा आणि समाजाला काव्यसन्मुख करण्याचा अलौकिक विक्रम केला. सामाजिकतेचे अधिष्ठान असलेल्या कवितांप्रमाणे प्रेमभावना प्रकट करणाऱ्या कविता कुसुमाग्रजांनी लिहिल्या आहेत. 'विशाखा' संग्रहापासून 'पाथेय' पर्यंत कुसुमाग्रजांनी बऱ्याच प्रेमकविता लिहिल्या आहेत. त्यांची कविता पुढे अधिकाधिक निर्मोहाकडे गेली आहे.

'प्रेमयोग' ह्या कवितेत त्यांनी प्रेमाचे व्यापक तत्त्वज्ञान सांगितले आहे. ते प्रेमाकडे विशाल दृष्टिकोनातून पाहतात. प्रेमभावनेची संकुचित कक्षा ओलांडून जातात. जगासकट जगदीश्वराला, अवघ्या ब्रह्मांडाला ते प्रेमप्रदेशात सामावून घेतात. कुसुमाग्रजांची बरीचशी कविता आरंभापासून आजतागायत सामाजिक जाणीव व्यक्त करणारी कविता म्हणून अवतरली आहे. केशवसुतांच्या कवितेशी नाते जोडणारी ही कविता केशवसुतांच्याही पुढे गेली आहे. तसेच मराठीतील उत्तरकालीन कवितेचे ती प्रेरणास्रोत ठरली आहे. सामाजिक- राजकीय जीवनातील विसंगतीवर परखडपणे भाष्य करणारी कुसुमाग्रजांची कविता 'जीवननिष्ठ' कविता आहे. समग्र जीवनशोध हा त्यांच्या कवितेचा विशेष आहे.

**नाटक व एकांकिका**

१९४६ ते १९९६ या पाच दशकांच्या कालावधीत शिरवाडकरांनी नाटकांचे योगदान दिले आहे. स्वतंत्र, भाषांतरित, रूपांतरित, आधारित अशा नाटकांमध्ये गडकरी-खाडिलकरी पद्धतीची नाटके सादर करून मराठी नाट्यपरंपरेतील सत्त्व आणि स्वत्व त्यांनी टिकवून ठेवले. भाषांतरित वा रूपांतरित नाट्यलेखनातही त्यांची स्वतःची अशी दृष्टी आहे. भाषांतराबाबतची त्यांची दृष्टी व्यावसायिकाची नाही, केवळ हौशी नाटककाराची नाही. ती नाटक ह्या वाङ्मयप्रकारावर अंतर्मनातून प्रेम करणाऱ्या अस्सल कलावंताची आहे, अभिजात आहे. 'दूरचे दिवे', 'दुसरा पेशवा', 'कौंतेय', 'ऑथेल्लो' 'ययाती आणि देवयानी' आणि 'नटसम्राट' ह्या त्यांच्या नाटकांचा निर्देश प्रातिनिधिक नाटके म्हणून करता येईल. शिरवाडकरांच्या सर्व नाटकांतील अधिक प्रयोग झालेले, महाराष्ट्रभर नव्हे तर अन्यत्रही गाजलेले बहुचर्चित नाटक म्हणजे 'नटसम्राट'. विशेष म्हणजे प्रेक्षक, नट, दिग्दर्शक, समीक्षक यांनाही या नाटकाचे आकर्षण वाटत आले आहे. श्रीराम लागूंप्रमाणेच दत्ता भट, चंद्रकांत गोखले, सतीश दुभाषी, मधुसूदन कोल्हटकर, यशवंत दत्त आणि उपेंद्र दाते आदी नामवंत अभिनेत्यांनी त्यांना काकासाहेब गणपतराव बेलवलकरांची नटसम्राटमधील भूमिका व अभिनय सर्वस्व पणाला लावून केली आहे. मराठीतील नाट्यसमीक्षकांनी आणि साहित्यसमीक्षकांनी 'नटसम्राट' नाटकाचे मूल्यमापन आपापल्या परीने केले आहे; मतमतांतरांना, अनुकूल-प्रतिकूल प्रतिक्रियांना अवसर अनेक प्रश्न निर्माण करणारे, प्रयोगनिर्मितीसंबंधी पुनर्विचार करायला लावणारे नाटक म्हणून 'नटसम्राट'ची नोंद

उद्याच्या वाङ्मयेतिहासात व नाट्यसृष्टीच्या इतिहासात अभिमानपूर्वक घेतली जाणार आहे.

**कथा, कादंबरी व ललितगद्य**

कथाकार आणि ललितगद्य लेखक म्हणून शिरवाडकरांचे योगदान महत्त्वाचे आहे. त्यांच्या कविता आणि नाट्यलेखनाला जशी स्वानुभवाची पार्श्वभूमी आहे, तसेच स्फुट लेखनाला आहे. त्यांचे ललितगद्य लेखन भाष्यपर आहे. त्याला चिंतनशीलतेची डूब मिळाली आहे. शिरवाडकर निसर्गसौंदर्याचा शोध तन्मयतेने घेतात. बालकवी, विनोबा भावे, बाबा आमटे ह्यांच्यासारख्या मान्यवरांविषयी असलेली आस्था त्यांच्या गद्यलेखनात व्यक्त होते. साहित्यातील सौंदर्य, साहित्यातील वैफल्य, विकृती, साहित्य आणि नीतिमत्ता, साहित्यातील संस्कारशीलता अशा साहित्यविषयक पैलूंवर त्यांनी ललित-लेखनात प्रतिक्रिया व्यक्त केल्या आहेत.

शिरवाडकरांनी उमेदीच्या काळात काही वर्षे पत्रकारिता केली. पुण्याला 'प्रभात'मध्ये नोकरीस असताना त्यांनी रात्रपाळीच्या धबडग्यात 'गर्जा जयजयकार' ही कविता लिहिली. 'सकाळ'चे नानासाहेब परुळेकर, 'प्रभात'चे वालचंद्र कोठारी, 'सारथी'चे खंडेराव दौंडकर, 'धनुर्धारी'चे प्रभाकर पाध्ये आणि अ.सी. केळूसकर यांच्या मार्गदर्शनाखाली शिरवाडकरांनी वृत्तपत्रविद्येचे धडे गिरवले. वृत्तपत्रात लिहिणे त्यांनी दुय्यम मानले नाही. वृत्तपत्र ही एका कलावंतासारखी समाधान देणारी निर्मिती आहे, असा अभिप्राय व्यक्त करणाऱ्या वि.वा. शिरवाडकरांनी अल्पकाळातच वृत्तपत्रसृष्टी सोडली आणि स्वतंत्रपणे लेखन करण्याचा निर्णय घेतला.

शिरवाडकरांजवळ निर्मत्सरी, निरहंकारी, निर्मळ आणि विशुद्ध माणुसकी मानणारे प्रगल्भ मन होते. माणुसकी, प्रेम, सत्य, सौंदर्य, शिवम् या चिरंतन मूल्यांशी त्यांची बांधीलकी होती. सत्कार समारंभ, गौरव आणि मानसन्मान यांपासून नेहमीच दूर राहणाऱ्या शिरवाडकरांची स्मृती चिरंतन राहावी म्हणून नाशिक परिसरातील त्यांच्या सुहृदांनी, चाहत्यांनी २६ मार्च १९९० रोजी 'कुसुमाग्रज प्रतिष्ठान'ची स्थापना केली. गरीब-श्रीमंत, जात-पात, धर्म यांच्या भिंती ओलांडून सर्व समाजजीवनाची उंची वाढावी, साहित्य-भाषा, विज्ञान-शिक्षण, वैद्यक, नाट्य-संगीतादी क्षेत्रांतील कार्यास, तत्संबंधी व्यक्तीस प्रोत्साहन मिळावे हा 'कुसुमाग्रज प्रतिष्ठाना'मागील हेतू आहे. 'जनस्थान पुरस्कार', 'गोदावरी गौरव पुरस्कार', आदिवासी साहाय्य, क्रीडा, वाचनालय, बालमहोत्सव, प्रबोधनपर शिबिरे, अंधश्रद्धा निर्मूलन, शेतकरी मेळावे आदी उपक्रम प्रतिष्ठानातर्फे राबवले जातात. मराठी भाषे आणि साहित्याबद्दल आस्था आणि आवड निर्माण व्हावी म्हणून 'साहित्यभूषण' ह्या उच्चस्तरीय परीक्षेचे आयोजन केले जाते. कुसुमाग्रजांच्या स्मृत्यर्थ २७ फेब्रुवारी हा दिवस महाराष्ट्रभर 'मराठी राजभाषा दिन' म्हणून दरवर्षी साजरा केला जातो.



देणं :

आकाशपण
हटता हटत नाही
मातीपण
मिटता मिटत नाही
आकाशमातीच्या
या संघर्षात
माझं जगणंच देणं
मिटता मिटत नाही.

कुसुमाग्रज

'कुसुमाग्रजांच्या प्रतिभेला त्या काळातल्या समीक्षकांनी धगधगत्या यज्ञकुंडातून प्रकटणाऱ्या असुरसंहारिणी दुर्गेच्या स्वरूपातच पाहिले. वास्तविक, ती उमेसारखी विविधरूपधारिणी आहे. तिला क्रांतिकारकांनी केलेल्या सर्वस्वाच्या होमाइतकीच 'माजघरातल्या मंद दिव्याच्या

वातीची ओढ' आहे. जीवितं हे समुद्रासारखे आहे. ते केवळ सुंदर नाही आणि भीषण नाही, ते तिला ठाऊक आहे. जीवनाचा कुंभ हाती देणाऱ्या कुंभाराची चौकशी करण्यात आयुष्य दवडण्यापेक्षा 'आमंत्री बाहू पसरून ही यक्षकन्या गुणी' म्हणणारे कुसुमाग्रज एकाच सुराने आळवीत बसले नाहीत. इथेच त्यांच्या प्रतिभेला लाभलेले चिरतारुण्य आहे... आज मागे पाहतच कृतार्थ अशीच कुसुमाग्रजांची साहित्य-साधना आहे. काव्य, कथा, निबंध, कादंबरी आणि नाटक या क्षेत्रांतही पुढे जाताना त्यांनी मागे सुंदर कुसुमेच ठेवली आहे. त्यांनी चोखळलेली वाट सुगंधी झाली आहे. रंग वैभवाने नटवली आहे. म्हणूनच महाराष्ट्राच्या अनेक पिढ्यांना कुसुमाग्रज आपले वाटत आहेत'. अशा औचित्यपूर्ण समर्पक शब्दांत मराठीतील दुसरे भाषाप्रभू पु.ल. देशपांडे यांनी कविवर्य कुसुमाग्रजांच्या बहुआयामी लेखनाचा गौरव केला आहे.

कृती, उक्ती आणि लेखन यांतून समाजाशी नाते जोडणाऱ्या कुसुमाग्रज तथा शिरवाडकरांचे नाशिक येथे निधन झाले.

– वि. शं. चौघुले

**संदर्भ :**

*१. म. ना. अदवंत, संपादक; 'कुसुमाग्रजांच्या प्रतिभेचा उगम आणि विकास'; प्रतिमा प्रकाशन, पुणे; १९८७.*

## कुळकर्णी, उमा विरूपाक्ष

**अनुवादक**

**१ ऑक्टोबर १९५०**

उमा विरूपाक्ष कुलकर्णी यांचा जन्म बेळगावला झाला. प्राथमिक शिक्षण बेळगावच्या सरस्वती मंदिरात, माध्यमिक शिक्षण ठळकवाडी हायस्कुलात, महाविद्यालयीन शिक्षण राणी पार्वतीबाई महाविद्यालयात झाले. पुण्याच्या एस.एन.डी.टी. विद्यापीठातून १९८३ मध्ये त्या एम.ए. (आर्ट अ‍ॅन्ड पेन्टिंग) झाल्या व 'भारतीय मंदिर शिल्प शास्त्रातील द्रविड शैलीची उत्क्रांती, विकास आणि तिची कलात्मक वैशिष्ट्ये' या



विषयावर प्रबंध लिहून त्यांनी पीएच.डी. पदवी संपादन केली.

ज्ञानपीठसारख्या सर्वश्रेष्ठ साहित्यिक पुरस्काराच्या मानकरी असणाऱ्या कन्नड-मधील श्रेष्ठ कृतींचा व इतर दर्जेदार साहित्याचा मराठीत अनुवाद करून मराठी सारस्वतात भरघोस भर घालणाऱ्या उमा विरूपाक्ष कुलकर्णी यांनी आत्तापर्यंत २१ कादंबऱ्या, ३ कथासंग्रह, ५ नाटके, २ आत्मचरित्रे ह्यांचा अनुवाद केला असून सध्या कन्नड लेखक अग्नी श्रीधर यांच्या 'जिगर' व एस.एन. भैरप्पा यांच्या 'आवरण' ह्या पुस्तकांच्या अनुवादाची भर त्या घालीत आहेत. याखेरीज त्यांचे स्वतंत्र लेखन प्रकाशित झाले असून आकाशवाणीवर व दूरदर्शनवर प्रसारणासाठीही लेखन चालू आहे. श्रेष्ठ कन्नड साहित्याचा मराठी अनुवाद करून उमाताई त्यांच्या लोकप्रियतेचे क्षेत्र वाढविण्यासोबत राष्ट्रीय एकात्मतेची कामगिरीसुद्धा करीत आहेत. 'कुणाशीही मोकळेपणाने, आपलेपणाने बोलणाऱ्या' उमाताईंचे घर 'साधे, स्वच्छ, सुंदर' आहे, असे त्यांची मुलाखत घेणाऱ्या आशाताई साठे म्हणतात.

बेळगावच्या सुषमा भगवंतराव कुलकर्णी ह्या विवाहानंतर उमा विरूपाक्ष कुलकर्णी झाल्या व परिणामी पति-पत्नी परस्पर साहाय्याने मराठी-कानडी अनुवादाचे उपयुक्त कार्य करीत आहेत. उमाताईंच्या वीणा मिरजे नावाच्या मैत्रिणीला फक्त कानडी येत असे. तिच्याशी बोलून-बोलून उमाताईंचा कानडीचा सराव झाला, समज वाढली, आत्मविश्वासही येऊ लागला. एक्सप्लोसिव्ह फॅक्टरीत काम करणारे पती विरूपाक्ष इंजिनिअर असून उत्तम वाचक आहेत. कानडीतील उत्तम साहित्याच्या वाचनाबरोबरच ते उमाताईंनी लिहिलेल्या कथाही वाचत. पति-पत्नींमध्ये साहित्यिक संवाद होत असे आणि त्यातूनच उमाताईंचा अनुवादाच्या दालनात प्रवेश झाला.

१९७८-१९७९ पर्यंत कानडीतल्या साहित्याला तीन वेळा तर मराठीतल्या साहित्याला एकदा ज्ञानपीठ पारितोषिक मिळाले होते. विरूपाक्ष वाचन करीत व उमाताई अनुवाद करीत! दोघांना एकत्र आणणारा हा विषय रमणीयता वाढवीत गेला. १९८० साली दोघांच्या सहकारातून शिवराम कारंथांच्या 'तनमनाच्या भोवऱ्यात' कादंबरीच्या मराठी अनुवादाच्या प्रकाशनाचा शुभारंभ झाला आणि अनुवादाची वाटचाल सुरू झाली. आयुष्याच्या गुंतागुंतीची उकल करणाऱ्या, प्रगत विचार मांडणाऱ्या साहित्यकृतींची निवड दोघांच्या सहमतीने झाली. विरूपाक्ष हेही अनुवादपटू आहेत.

उमा कुलकर्णी यांनी 'एका वेगळ्या लग्नाची गोष्ट', 'मावशीचा सल्ला', 'केतकर वहिनी' ही स्वतंत्र ग्रंथनिर्मिती केली आहे. त्यांना मिळालेल्या पुरस्कारांमध्ये 'साहित्य अकादमी अनुवाद पुरस्कार', 'महाराष्ट्र गौरव पुरस्कार', 'महाराष्ट्र साहित्य परिषद, पुणे यांचा पुरस्कार', महाराष्ट्र राज्य साहित्य पुरस्कारांपैकी 'तर्कतीर्थ लक्ष्मणशास्त्री जोशी पुरस्कार' यांचा प्रामुख्याने उल्लेख करावा लागेल.

अनुवादित ग्रंथसंपदा (कादंबऱ्या) अशी आहे -

'तनमनाच्या भोवऱ्यात' (डॉ. शिवराम कारंथ), 'वंशवृक्ष', 'पर्व' (डॉ. एस. एन. भैरप्पा), 'कर्वालो आणि गूढ माणसं' 'चिदंबर रहस्य' (पूर्णचंद्र तेजस्वी), 'महाश्वेता' (सुधा मूर्ती), 'अवस्था' (यू. आर. अनंतमूर्ती), 'फ्लॉरिस्टन बंगला' (नरसिंह मळगी) इत्यादी. कथासंग्रहांमध्ये 'अनंतमूर्ती यांच्या कथा' (यू. आर.अनंतमूर्ती), 'अंतरीची पाने' (वैदेही), व इतर उल्लेखनीय आहेत. गिरीश कर्नाड लिखित 'नागमंडल', 'ययाती' व इतर नाटके; 'गानयोगी मल्लिकार्जुन मन्सूर' आणि 'माझं नाव भैरप्पा' ही आत्मचरित्रे; 'वंशवृक्ष' नभोनाट्य-१४ भाग व इतर लेखन त्यांच्या नावावर जमा आहे.

– वि. ग. जोशी

**संदर्भ :**

*१. साठे, आशा; 'अनुवादी सहजीवन'; मिळून साऱ्याजणी, मे २००८.*

## कुलकर्णी, कृष्णाजी पांडुरंग

**समीक्षक, भाषाशास्त्रज्ञ, संशोधक**

**५ जानेवारी १८९२ – १२ जून १९६४**



मराठी भाषेतील व्युत्पत्ती शास्त्रांचे शिल्पकार समजले जाणारे ज्येष्ठ समीक्षक कृ. पां. कुलकर्णी या नावाने मराठी साहित्य विश्वात ओळखले जातात. सातारा जिल्ह्यातील कराड तालुक्यातील ओंड हे त्यांचे मूळ गाव होय. घरची परिस्थिती अत्यंत हलाखीची असल्याने त्यांच्या शिक्षणात खूप अडथळे आले. इस्लामपूर, आत्ताच्या सांगली जिल्ह्यात त्यांचा जन्म झाला. पण शिक्षण मात्र निगडी, फलटण, नाशिक, कोल्हापूर अशा वेगवेगळ्या ठिकाणी झाले. त्यासाठी त्यांना अनेकांनी आश्रय आणि आधार दिला. कोल्हापुरात शिष्यवृत्ती मिळाल्याने ते तेथूनच १९११ साली मॅट्रिक्युलेशनची परीक्षा उत्तीर्ण झाले. महाविद्यालयीन शिक्षण राजाराम महाविद्यालय, कोल्हापूर व फर्गसन महाविद्यालय, पुणे येथे झाले. १९१६ साली बी.ए. झाल्यावर लगेच त्यांना पुण्याच्या न्यू इंग्लिश स्कूलमध्ये शिक्षकाची नोकरी मिळाली. पुढच्याच वर्षी त्यांना सरकारी शाळेत नोकरी मिळाली. त्यासाठी त्यांना धुळे येथे जावे लागले. कालांतराने त्यांची सातारा येथे बदली झाली. साताऱ्च्या वास्तव्यात त्यांनी नोकरी करीत एम.ए.चा अभ्यास केला. पदवी प्राप्त होताच मुंबई येथे जाऊन त्यांनी त्या वेळची शिक्षण खात्यातली बी.टी. पदवी संपादन केली. या वेळी प्र. के. अत्रे व वि. द. घाटे हे पुढच्या काळात ख्यातनाम झालेले मराठी साहित्यिक त्यांचे सहाध्यायी होते.

प्रारंभीच्या काळात शिक्षणासाठी व नोकरीसाठी अनेक ठिकाणी फिरावे लागलेल्या कुलकर्णी यांना १९२०च्या सुमारास अहमदाबादच्या गुजरात महाविद्यालयामध्ये संस्कृतचे प्राध्यापक म्हणून नोकरी मिळाली व त्यांच्या


भाषेच्या उत्पत्तीविषयीं आजवर निरनिराळ्या विद्वानांनी निरनिराळ्या उपपत्ति सांगितल्या आहेत. कोणी भाषा ही अनुकरण ह्या मानवी जातिक वृत्तीपासून निर्माण झाली असे म्हणतो तर दुसरा कोणी भावनिक किंवा उद्गारवृत्तीपासून निर्माण झाली असे म्हणतो. कोणी भाषेच्या मुळाशीं प्रेमाची वृत्ति असलेली मानतो तर दुसरा कोणी क्रीडासक्ति ही वृत्ति तिच्या मुळाशीं ठेवतो. ह्या सर्व वृत्ति जर तपासून पाहिल्या तर त्या सर्वांचा संबंध आत्मनिवेदन व आत्मप्रकटीकरण ह्या दोन भाषेच्या मूळ हेतूंशी असल्याचे आढळून येते

[illegible]

१८-५-५८ कृ. पां. कुळकर्णी.

जीवनात काहीसे स्थैर्य आले. १९२९ साली त्यांची नेमणूक रियासतकार गो. स. सरदेसाई यांचे मदतनीस म्हणून झाल्यावर ते इतिहास संशोधनाकडे वळले. मात्र तत्पूर्वीच त्यांची साहित्यिक व भाषाशास्त्रज्ञ म्हणून ओळख झाली होती. १९२५ साली ‘भाषाशास्त्र व मराठी भाषा’ हा त्यांचा पहिला समीक्षात्मक व संशोधनात्मक ग्रंथ प्रसिद्ध झाला. त्यानंतर ‘संस्कृत नाटक व नाटककार’ (१९२६), ‘मराठी भाषा: उद्गम व विकास’ (१९२९) या ग्रंथांचे लेखन त्यांनी केले. १९३३ मध्ये पेशवे दप्तराचे काम संपल्यावर पुन्हा ते अध्यापनाकडे वळले. मुंबई येथील एल्फिन्स्टन महाविद्यालयामध्ये त्यांची खास नेमणूक झाली. १९३७ ते १९४९ अशी बारा वर्षे प्राध्यापक म्हणून काम केल्यावर ते ५८व्या वर्षी शासकीय सेवेतून निवृत्त झाले. त्यानंतरही त्यांनी मुलुंडच्या टोपीवाला महाविद्यालयाचे प्राचार्य म्हणून व रुपारेल महाविद्यालयामध्ये मराठीचे प्राध्यापक म्हणून काम केले. १९५९ मध्ये त्यांनी पूर्ण निवृत्ती स्वीकारली.

दरम्यानच्या काळात व्याकरण, समीक्षा, संशोधन, भाषाशास्त्र इत्यादी क्षेत्रांत त्यांचे मोठे नाव झाले होते. मराठीतील दीपस्तंभ ठरावा असे त्यांचे काम म्हणजे ‘व्युत्पत्तिकोश’ हे होय. या कोशाच्या माध्यमातून त्यांनी हजारो मराठी शब्दांची व्युत्पत्ती सांगून त्यांचा अर्थ स्पष्ट केला. आजही त्यांचा ‘मराठी व्युत्पत्तिकोश’ या क्षेत्रातला पायाभूत ग्रंथ मानला जातो. या कामामुळे त्यांना ‘मराठी भाषेतील पाणिनी’ असे काहींनी गौरवाने संबोधले. ‘वाग्यज्ञ’, ‘विवेकसिंधू’, ‘महाराष्ट्रगाथा’ हे त्यांचे आणखी काही गाजलेले ग्रंथ होत. ‘कृष्णाकाठची माती’ हे त्यांचे आत्मचरित्र प्रांजळ कथन, साहित्यसमृद्धीसाठी त्यांनी घेतलेले अपार परिश्रम आणि मराठी भाषेची सेवा यांसाठी प्रसिद्ध आहे.

१९५२ साली अमळनेर येथे झालेल्या ३५व्या मराठी साहित्य संमेलनाच्या अध्यक्षपदावरून बोलताना त्यांनी भाषिक प्रांत-रचनेचा जोरदार पुरस्कार केला. ते म्हणाले, ‘‘प्रांताचा सर्व कारभार मराठीतच झाला पाहिजे. ज्ञानाच्या सर्व क्षेत्रांत लक्ष घातले पाहिजे. मराठी भाषा व वाङ्मय ह्यांच्या संरक्षणासाठीच नव्हे तर ती वाढविण्यासाठी वाङ्मयीन संस्था व सरकार यांनी उत्तेजन दिले पाहिजे. असे झाले तरच आपण ‘आपण’ म्हणून राहू.’’

आचार्य अत्रे यांनी समकालीन लेखकांवर टीका केली. मात्र कृ. पां. कुलकर्णी यांचा ज्ञानाच्या क्षेत्रातील अधिकार अत्र्यांनी मान्य केला होता. मराठी विश्वकोशात फारच थोड्या व्यक्तींवर स्वतंत्र नोंद असून त्यात कृ.पां.कुलकर्णी यांचा समावेश आहे. विश्वचरित्र कोशातही त्यांच्यावर नोंद आहे.

– मधू नेने

**संदर्भ :**

१. *कानिटकर रा.प्र.; ‘साठ संमेलनाध्यक्ष: परिचय आणि विचार’ उत्कर्ष प्रकाशन, पुणे; १९८८.*

२. *कामत श्रीराम पांडुरंग; मराठी विश्वकोश खंड ४ व १२; विश्वचरित्रकोश, पर्वरी, गोवा; खंड १.*

## कुळकर्णी, दत्तात्रेय भिकाजी

**समीक्षक, ललितलेखक**

**२५ जुलै १९३४**

दत्तात्रेय भिकाजी कुळकर्णी यांचा जन्म भिकाजी व सरस्वतीबाई ह्या दांपत्यांच्या पोटी गुरुपौर्णिमेला नागपुरात झाला. प्राथमिक शिक्षण हम्पयार्ड प्राथमिक शाळा, घाटे शाळा, सुळे शाळा येथे तर माध्यमिक व उच्चमाध्यमिक



शिक्षण कुर्वेज न्यू मॉडेल हायस्कूल येथे पूर्ण झाले. बी.ए.पर्यंतचे पदवी शिक्षण धनवटे नॅशनल कॉलेज, नागपूर येथे १९५५ साली पूर्ण करून त्यानंतर १९५९ मध्ये नागपूर विद्यापीठाची एम.ए. (मराठी) पदवी त्यांनी बेहरे सुवर्णपदकासह प्राप्त केली. पुढील शैक्षणिक प्रवासात १९६७ मध्ये 'महाकाव्य' या विषयावर प्रा. भ. श्री. पंडित यांच्या मार्गदर्शनाखाली. नागपूर विद्यापीठाची पीएच.डी. उपाधी त्यांना मिळाली. १९७६ मध्ये रशियन भाषा पदविकाही त्यांनी प्राप्त केली. १९८३मध्ये विदर्भ साहित्य संघ नागपूरच्या परीक्षा समितीने डी.लिट. समकक्ष 'साहित्य वाचस्पती' ही उपाधी देऊन त्यांच्या उत्तुंग वाङ्मयसंशोधन कार्याचा गौरव केला. १९६४ ते १९९४ अशी ३१ वर्षे नागपूर विद्यापीठाच्या पदव्युत्तर मराठी विभागात त्यांनी अध्यापनाचे कार्य केले. तत्पूर्वी नागपूरला व मुंबईला पब्लिसिटी विभागात सहसंपादक; विकास नाइट कॉलेज, नागपूर येथे शिक्षक म्हणून कार्यरत होते. १९६० ते १९६४ या काळात कोल्हापूरच्या गोखले महाविद्यालयात अधिव्याख्याता म्हणून काम बघितले व नंतर अध्यापनकार्य आणि समीक्षालेखन यांचा परस्परानुकुल घनिष्ठ अनुबंध कुलकर्णींच्या संदर्भात महत्त्वाचा ठरतो. या परस्परजीवी अनुबंधाचे अधिष्ठान त्यांच्या व्यासंगी, व्रतस्थ साहित्यसमीक्षेला व त्यांच्या एकूण व्यक्तिमत्त्वाच्या जडणघडणीला लाभले आहे. ५५ च्या सुमारास यशवंत, जूलियन व केशवसुत यांच्या आईविषयक कवितांवरील 'आई: दोन कविता' तुलनात्मक टिपण त्यांनी वयाच्या विशीत, नाइट कॉलेजमध्ये इंटरला अध्यापनकार्य करताना लिहिले. पुढे रेग्यांच्या 'छंद'मध्ये प्रकाशित हा दभिंचा पहिला समीक्षालेख.

**दभिंच्या घडणीचा आलेख**

समीक्षा लेखनापूर्वीच शालेय जीवनप्रवासात लघुनिबंध, कथा आणि कविता या माध्यमांतून त्यांच्या वाङ्मयसेवेला सुरुवात झाली होती. १९५३मध्ये वयाच्या केवळ १९व्या वर्षी एका आंतरराष्ट्रीय लघुकथा स्पर्धेत त्यांच्या 'रेक्वियम' या कथेला प्रथम पुरस्कार प्राप्त झाला. त्याच काळात विविध नियतकालिकांतून त्यांच्या कथा व कविता प्रसिद्ध होत होत्या. ६०च्या सुमारास सत्यकथा, महाराष्ट्र साहित्य परिषद, प्रतिष्ठान या वाङ्मयीन नियतकालिकांतून महत्त्वपूर्ण समीक्षालेख प्रसिद्ध होऊ लागले व दभिंना समीक्षक म्हणून मान्यता मिळू लागली. आपल्या वाङ्मयीन जडणघडणीचा सुस्पष्ट आणि सुंदर आलेख दभिंनी त्यांच्या 'अपार्थिवाचे चांदणे' या ललित निबंधसंग्रहात काढला आहे. अत्यंत काटेकोर, वस्तुनिष्ठ, शुद्ध वाङ्मयीन, कलाकृतिनिष्ठ, सुगम, लालित्यपूर्ण अशा समीक्षेने अल्पावधीतच त्यांचे नाव मराठी समीक्षेच्या प्रांतात मान्यता पावले. प्राचीन व अर्वाचीन वाङ्मयातील विविध प्रवृत्ती-प्रवाहांवर त्यांनी सारख्याच आस्थेने व व्यासंगपूर्ण पद्धतीने टीकालेखन केले. प्रारंभी 'टिपण-टीकाकार' असाही त्यांच्या समीक्षेचा निर्देश (ठणठणपाळ- जयवंत दळवी) करण्यात आला होता. या संदर्भात त्यांचे नाते वा. ल. कुलकर्णी यांच्याशी जुळते. अध्यापन व समीक्षा समांतरपणे होत जाणे, हा दुवा या समानतेमागे असावा. त्यांचे पहिले वाङ्मयीन प्रकाशन १९५९ मध्ये 'रेक्वियम' या कथासंग्रहाच्या रूपात (नवलेखन प्रकाशन, नागपूर) झाले. त्यांच्या आजवर प्रकाशित ललित साहित्यात 'मेघ, मोर आणि मैथिली'(१९७८, विजय प्रकाशन, नागपूर), 'अपार्थिवाचे चांदणे' (१९९९, पद्मगंधा प्रकाशन, पुणे), 'पस्तुरी' (२००२, पद्मगंधा प्रकाशन, पुणे) व 'स्फटिकगृहीचे दीप'(२००८, पॉप्युलर प्रकाशन, मुंबई) हे चार ललित निबंधसंग्रह व 'मेरसोलचा सूर्य' (२००४, आकांक्षा, नागपूर) हा काव्यसंग्रह समाविष्ट आहेत. 'आठवणी-अनुभव', 'लघुनिबंध', 'व्यक्तिचित्रे' आणि 'ललितलेख' ह्या चार प्रकारात त्यांनी उल्लेखनीय असे ललित निबंध-लेखन केले आहे. समीक्षक या उपाधीप्रमाणेच 'ललित निबंधकार' हीसुद्धा दभिंची ओळख बनावी असे सकस,

समृद्ध व पृथक शैलीचे ललितगद्य त्यांनी लिहिले आहे. 'बैरागी हृदयनाथ', 'रवींद्रनाथ', 'खांडेकर', 'जयवंत दळवी', 'व्यंकटेश माडगूळकर', 'म.मु.देशपांडे' इत्यादींची दभिंनी रेखाटलेली व्यक्तिशब्दचित्रे अत्यंत पृथगात्म, मनोज्ञ व अल्पाक्षर रमणीय अशी वठली आहेत. 'स्फटिकगृहीचे दीप'मधील लघुललितलेखही आशयघन निर्मितीची साक्ष ठरतात.

**समीक्षालेखनाचा व्यापक पैस**

दभिंचा पहिला समीक्षा लेखसंग्रह 'दुसरी परंपरा' १९७४मध्ये नागपूरच्या प्रभा प्रकाशनाने प्रकाशित केला. त्यानंतर आजवर 'महाकाव्य स्वरूप व समीक्षा'(१९७५), 'ज्ञानेश्वरांचे श्रोतृसंवाद'(१९७६), 'पहिली परंपरा'(१९७६), 'तिसऱ्यांदा रणांगण'(१९७६), 'चार शोधनिबंध'(१९७७), 'पार्थिवतेचे उदयास्त'(१९७७), 'नाट्यवेध'(१९७८), 'मर्ढेकरांचे सौंदर्यशास्त्र पुनःस्थापना'(१९८२), 'प्रतीतिविश्रांती'(१९९२), 'दोन परंपरा'(१९९३), 'युगास्त्र'(१९९३), 'द्विदल'(१९९४), 'हिमवंतीची सरोवरे'(१९९६), 'पहिल्यांदा रणांगण'(१९९९), 'महाकाव्य स्वरूप व समीक्षा'(परिष्कृत आ.२००१), 'कादंबरी स्वरूप व समीक्षा'(२००३), 'समीक्षेची सरहद्द'(२००५), 'सुरेश भट नवे आकलन'(२००५), 'प्रतीतिभेद'(२००७), 'प्रतीतिविश्रांती ज्ञानदेवांची'(२००८), 'महाकथा जीएंची'(२००८), 'समीक्षेची वल्कले'(२००८), 'नाटक स्वरूप व समीक्षा'(२००८) हे त्यांचे समीक्षाग्रंथ प्रकाशित झाले आहेत. यांपैकी 'महाकाव्य', 'दोन परंपरा', 'प्रतीतिविश्रांती' ही नवी परिष्करणे, 'महाकथा जीएंची' हे जीएंसंबंधित संकलन तर 'हिमवंतीची सरोवरे' हे समीक्षा लेखांचे प्रातिनिधिक संकलन आहे. याशिवाय काही संपादनेही त्यांच्या नावावर आहेत. 'हिमवंतीची सरोवरे' या पुस्तकात त्यांच्या अन्यत्र प्रकाशित ५००हून अधिक स्फुट लेखांची सूची दिली आहे. 'समीक्षेची सरहद्द' व 'प्रतीतिभेद' ही समीक्षेची मानली जाणारी पुस्तके समीक्षेची सरहद्दही ओलांडून ललितनिबंधाच्या (व्यक्तिचित्रण इत्यादी) प्रदेशात शिरली आहेत. दभिंच्या एकूणच लेखनात मीत्वप्रधान, ललितनिबंध आणि विषयवस्तुप्रधान मूल्यमापनात्मक समीक्षा यांची सरमिसळ झालेली दिसते. दभिंच्या आजवरच्या समीक्षा लेखनाचा व्यापक पैस स्तिमित करणारा आहे. प्राचीन ते अर्वाचीन, आधुनिक ते नव, नव ते साठोत्तरी, साठोत्तरी ते आजचे ताजे मराठी साहित्य असा तो पसरलेला आहे. दभिंच्या समीक्षा-संप्रदायाचे वर्णन 'कलावादी', 'अलौकिकतावादी', 'आध्यात्मिक जीवनवादी', 'नवअलौकिकतावादी', 'कलावाद-जीवनवाद यांचा समन्वय', अशा विविध शब्दांनी आजवर केले गेले आहे. परंपरेचा आणि नवतेचा वाङ्मयीन सौंदर्यनिष्ठ असा सम्यक समन्वय दभिंच्या समीक्षाव्यापारात दिसतो. भारतीय साहित्यशास्त्रातील वाङ्मयविषयक भूमिकेचे अधिष्ठान दभिंच्या समीक्षेला लाभले आहे. संत ज्ञानेश्वर व ज्ञानेश्वरी, भारतीय साहित्यशास्त्र, महाकाव्य, मर्ढेकर व त्यांचे सौंदर्यशास्त्र, जी.एंची कथा, संपूर्ण आधुनिक मराठी कविता हे त्यांचे खास ध्यासविषय आहेत. निष्ठायुक्त व्यासंग, मर्मग्राही चिकित्सक वृत्ती, सौंदर्यशोधक अभिजात रसिकता, विशुद्ध वाङ्मयनिष्ठा, वाद-विचार-प्रणाली निरपेक्षता, नव्या प्रतिभांतील नवसर्जनाचे रूप हेरण्याचे कौशल्य, नवचिंतनाची गंभीर मांडणी, आधुनिकतेचे भान आणि परंपरेची जाण, वाङ्मयीन तत्त्वचिंतनाची पक्की बैठक आणि ललितरम्य सुगठित सुबोध शैली इत्यादी गुणवैशिष्ट्यांनी दभिंची समीक्षा संपृक्त आहे. म.द.हातकणंगलेकरांनी दभिंना मर्ढेकर आणि दि.के.बेडेकर ह्यांच्या नंतरचे महत्त्वाचे समीक्षक मानले आहे, तसेच मर्ढेकर, बेडेकर आणि वा.ल.कुलकर्णी ह्या तिघांच्या समीक्षागुणांचा संगम त्यांच्या समीक्षादृष्टीत आहे. आपल्या वैशिष्ट्यपूर्ण समीक्षेने त्यांनी मराठी वाङ्मयविश्वातील चैतन्य जपण्याचा आणि मराठी साहित्य जगत समृद्ध करण्याचा सातत्याने प्रयत्न केला. त्यांच्या समीक्षेची प्राचीन आणि अर्वाचीन, सैद्धान्तिक आणि उपयोजित, संशोधनपर आणि आस्वादक अशी विभागणी करता येते. त्याच प्रकारे

वाङ्मयकारनिष्ठ (ज्ञानेश्वर, मर्ढेकर, जी.ए, सुरेश भट), वाङ्मयकृतिनिष्ठ (रणांगण, ज्ञानेश्वरी व अनेक समीक्षणात्मक लेख), प्रवृत्ती-प्रवाह-संप्रदायनिष्ठ (दोन परंपरा, पार्थिवतेचे उदयास्त) आणि वाङ्मयप्रकारनिष्ठ (महाकाव्य, कादंबरी, नाट्यवेध, नाटक स्वरूप व समीक्षा, दोन परंपरा) इत्यादी प्रकारांनीही त्यांच्या समीक्षालेखनाचा आलेख मांडता येतो.

दभिंना आजवर विविध पुरस्कार व सन्मान प्राप्त झाले आहेत. काही ग्रंथांना महाराष्ट्र शासनाचे व अन्य संस्थांचे साहित्यपुरस्कार प्राप्त झाले आहेत. १९९७मध्ये मा.दीनानाथ स्मृती प्रतिष्ठानचा ५० हजार रुपयांचा पुरस्कार, १९९७लाच महाराष्ट्र शासनाचा समाजव्रती पुरस्कार, आदर्श शिक्षक पुरस्कार इत्यादी सन्मान त्यांना मिळाले. विदर्भ साहित्य संमेलन, १९८६ अभिजात साहित्य संमेलन, १९९४; नागपूर जिल्हा साहित्य व नाट्यसंमेलन, १९८१ नागपूर विद्यापीठ, मराठी प्राध्यापक परिषद, १९९१ अमरावती विद्यापीठ, मराठी प्राध्यापक परिषद, १९९० या संमेलनांची व परिषदांची अध्यक्षस्थाने त्यांनी भूषविली.

१९८५ साली 'समकालीन साहित्य प्रवृत्ती आणि प्रवाह' व २००८मध्ये 'समीक्षेची क्षितिजे' अशा दोन गौरवग्रंथांचे भाग्य दभिंच्या वाट्याला आले आहे. त्यांच्या मार्गदर्शनाखाली २६ विद्यार्थ्यांना पीएच.डी पदवी प्राप्त झाली आहे. अनेक वर्षे नागपुरात वास्तव्याला असलेले द.भि. गेल्या काही वर्षांपासून पुण्याला स्थायिक झाले आहेत. त्यांच्या दोन्ही गौरवग्रंथांतून दभिंच्या वाङ्मयीन कर्तृत्वाचा उत्तुंग आलेख पाहायला मिळतो.

– डॉ. राजेंद्र नाईकवाडे

**संदर्भ :**

१. *पाटील, लांजेवार, धनकर संपादक; 'समकालीन साहित्य: प्रवृत्ती आणि प्रवाह', (द.भि.अभिनंदन ग्रंथ); विजय प्रकाशन, नागपूर; १९८५.*

२. *मुजुमदार श्यामला; 'समीक्षेची क्षितिजे', (डॉ. द. भि. कुलकर्णी अमृतमहोत्सवी गौरव ग्रंथ); विजय प्रकाशन, नागपूर; २००८.*

३. *कुलकर्णी द. भि.; 'अपार्थिवाचे चांदणे'; पद्मगंधा प्रकाशन, पुणे. १९९९.*

४. *कुलकर्णी द. भि.; 'स्फटिक गृहीचे दीप'; पॉप्युलर प्रकाशन, मुंबई; २००८.*

## कुळकर्णी, नारायण विनायक

☞ **गोविंदानुज**

## कुलकर्णी, भीमराव बळवंत

**कथालेखक, संपादक, समीक्षक**

**४ नोव्हेंबर १९३३ – २७ सप्टेंबर १९८७**



डॉ. भीमराव कुलकर्णी (एम. ए., पीएच. डी.) या सर्वपरिचित नावाने साहित्य वर्तुळात माहीत असणारे भीमराव हे बहुरंगी कर्तृत्ववान असणारे साहित्यिक होते. मराठी कथा, कादंबरी, समीक्षा आणि संपादन या चार विषयांत त्यांचे वैशिष्ट्यपूर्ण लेखन आहे.

स. प. महाविद्यालय (पुणे), मॉडर्न महाविद्यालय विभाग प्रमुख (१३ वर्षे, पुणे) आणि नाथीबाई दामोदर ठाकरसी विद्यापीठ, मुंबई या ठिकाणी त्यांनी अध्यापनाचे काम केले आणि ते करता-करता १५-१६ छोटे-मोठे ग्रंथही लिहिले. डॉ. भीमराव यांचे दुसरे वैशिष्ट्य म्हणजे साहित्य-संस्थात्मक कार्याची त्यांना प्रचंड आवड होती. जवळ-जवळ १५-१६ वर्षे त्यांनी महाराष्ट्र साहित्य परिषद, पुणे आणि मुंबई मराठी साहित्य संघ, गिरगाव या दोन साहित्य-संस्थांची मनोभावे सेवा केली. अखिल भारतीय मराठी साहित्य संमेलनांनाही त्यांचे नेहमी सहकार्य असे.

महाराष्ट्र साहित्य परिषदेचे कार्यवाह (१९७०-७३), कार्याध्यक्ष (१९७३-७६) आणि महाराष्ट्र साहित्य पत्रिका या त्रैमासिकाचे संपादक (१९८२-८५), म्हणजे पदाधिकारी या नात्याने त्यांचा विविध साहित्य संस्थांशी

१५ वर्षे जिव्हाळ्याचा संबंध होता. १९८६-८७ या काळात ना.दा.ठा.विद्यापीठात (मुंबई) अध्यापकाची नोकरी धरल्यामुळे साहाजिकच ते मुंबई मराठी संघाच्या कार्यात रस घेऊ लागले. प्रा. गंगाधर गाडगीळ (अध्यक्ष) आणि भीमराव कार्यवाह अशी उत्तम जोडी त्या काळात जमली होती. ऑक्टोबर १९८६ मध्ये मुंबईला जे साठावे अखिल भारतीय मराठी साहित्य संमेलन (अध्यक्ष विश्राम बेडेकर) भरले होते, ते मुख्यतः गंगाधर गाडगीळ आणि भीमराव या दोघांच्याच कर्तृत्वाने! या संमेलनाच्या यशस्वीतेसाठी भीमराव खूप राबले होते. आपल्या देहात कॅन्सरने प्रवेश केला आहे, याचेसुद्धा भान त्यांना राहिले नाही. या संमेलनानंतर वर्षभरातच त्यांना मृत्यूने गाठले. त्यांचा स्वभाव महत्त्वाकांक्षी आणि विलक्षण धडपड्या होता. भीमरावांना शेवटी अखिल भारतीय मराठी साहित्य महामंडळाचे अध्यक्ष व्हायचे होते. त्याचप्रमाणे ते झालेही, पण मंडळाच्या पहिल्या सभेलाच त्यांना प्रकृती अस्वास्थ्यामुळे सावरत आणावे लागले. त्यानंतर आठवड्याने ते मृत्यू पावले, खरे तर त्यांनी मृत्यू ओढवून घेतला.

डॉ.भीमराव यांच्या नावावर १५-१६ लहानमोठे ग्रंथ आहेत. त्यांतील बहुतेक ग्रंथ हे संपादनात्मक असून 'मराठी फार्स (१९८७) -१९वे शतक' हा तर संकलनात्मक आहे. मराठी साहित्य संमेलनाध्यक्षांची भाषणे (खंड १ ते ३) हा ग्रंथसुद्धा संकलनात्मकच आहे. त्याला ना आवश्यक प्रस्तावना ना टिपा! 'साहित्य पत्रिकेतील लेखनाची सूची' हा ग्रंथ त्यांनी पुणे विद्यापीठाच्या मराठी विभागाच्या साहाय्याने सिद्ध केला. १९७० मध्ये साहित्य परिषदेच्या हीरकमहोत्सवाच्या प्रसंगी त्यांनी जी स्वतंत्र सचित्र स्मरणिका संपादन केली, ती उत्तम आणि संग्राह्य आहे. डॉ. भीमराव यांना अनेक विषयांत रस होता. भाषा, व्याकरण, शुद्धलेखन या विषयांतही त्यांना गती होती. वक्तृत्वकला आणि शिकविण्याची हातोटी या दोन गुणांमुळे विद्यार्थीवर्ग त्यांच्यावर खूश असे. त्यांची एकमेव व स्वतंत्र अशी कलाकृती म्हणजे 'हरि नारायण' ही हरिभाऊ आपटे यांच्या जीवनावर लिहिलेली कादंबरी होय. चरित्रात्मक कादंबरी लिहिण्याचा त्यांचा प्रयोग यशस्वी ठरला, यात शंकाच नाही. स्वामी विवेकानंद व डॉ. बाबासाहेब आंबेडकर ही दोन चरित्रे स्वतंत्र असली, तरी ती मुख्यतः कुमार वाचकांसाठी लिहिलेली वाटतात. 'मराठी गद्याचा पूर्वरंग' आणि 'शास्त्रीय मराठी व्याकरण' हे त्यांच्या नावावरील ग्रंथ, प्रायः जुन्या ग्रंथांचे पुनर्मुद्रण आहे. प्रा. कृ. श्री. अर्जुनवाडकर यांनी 'शास्त्रीय मराठी व्याकरण'चे विस्तृत प्रस्तावनेसह पुनर्मुद्रण केले आहे.

डॉ. भीमराव यांचे खरे सामर्थ्य स्वतंत्र लेखनात नव्हते, संपादनात होते. या क्षेत्रात ते खरोखरी वाघ होते. अच्युत बळवंत कोल्हटकरः वाङ्मय दर्शन (१९६२), वाङ्मयीन रसास्वाद (१९६५), सं.सौभद्र, आमचे जीवन आमच्या स्मृती (१९६६), भाऊसाहेबांची बखर (१९६६), श्रीशिवाजी महाराज यांचे सप्तप्रकरणात्मक चरित्र (१९६७), संपूर्ण वाग्वैजयंती (१९८५), वामन पंडितांची सुधाकाव्ये (१९८५), मराठी वाङ्मय चर्चा आणि चिकित्सा (समीक्षा) अशी त्यांची उत्तम संपादने आहेत. जुन्या-नव्या ग्रंथांच्या संपादनात ते निश्चितच यशस्वी ठरले. पण इतके सारे ग्रंथलेखन आणि संपादन करून डॉ.भीमराव यांचे मराठी साहित्यात नेमके स्थान कोणते, हे ठामपणे सांगणे कठीण आहे. त्यांचे खरे बळ संपादनात होते आणि त्या खालोखाल समीक्षेत होते.

डॉ. भीमराव कुलकर्णी साहित्यक्षेत्रातले मोठे कार्यकर्ते होते आणि यातच त्यांचे मोठेपण होते. संस्थात्मक कार्य करताना त्यांनी बहुविध लेखन-संपादन केले ही कौतुकास्पद व अभिमानास्पद गोष्ट आहे. पण त्यांनी मांड ठोकून गंभीरपणे अशी रचना केली नाही. संस्थात्मक कार्यातच ते अधिक रमले. भीमरावांसारखे वाहून घेणारे कार्यकर्ते असतात, म्हणून साहित्यसंस्था चालत असतात. अन्यथा संस्था अकार्यक्षम तरी होतात नाहीतर बंद तरी पडतात. कार्यकर्ता आणि साहित्यिक या दोन्ही नात्यांनी त्यांचे कार्य आदर्शवत होते.

— म. श्री. दीक्षित

**संदर्भ :**

१. *कुलकर्णी भीमराव; 'अच्युत बळवंत कोल्हटकर; वाङ्मय दर्शन'; १९६२.*

२. *कुलकर्णी भीमराव; स्वामी विवेकानंद चरित्र, १९६४.*

३. *कुलकर्णी भीमराव; बाबासाहेब आंबेडकर चरित्र, १९६६.*

४. *कुलकर्णी भीमराव; वाङ्मयीन रसास्वाद, १९६५.*

## कुलकर्णी, मदन पांडुरंग

**समीक्षक, संशोधक**

**२६ जून १९४२**



डॉ. मदन कुलकर्णी यांचा जन्म महाराष्ट्रात, सातारा जिल्ह्यातल्या कऱ्हाड तालुक्यातील कापील गावी झाला. त्यांचे शिक्षण भिवापूर (जि. नागपूर) व नागपूर येथे झाले. बिंझाणी नगर महाविद्यालयातून ते १९६२ साली बी.ए. झाले. बहि:शाल विद्यार्थी म्हणून त्यांनी मराठी विषय व राज्यशास्त्र विषय घेऊन अनुक्रमे १९६५ व १९६७ मध्ये एम. ए. पदवी संपादन केली.

ज्या शाळेत त्यांचे शिक्षण झाले, त्याच भिवापूर एज्युकेशन सोसायटीच्या शाळेत तीन वर्षे त्यांनी शिक्षक म्हणून काम केले व नंतर श्री. बिंझाणी नगर महाविद्यालयात ते प्राध्यापकी करीत असताना १९८० साली मराठी विषयात पीएच. डी. व १९९३ मध्ये त्याच विषयात डी. लिट.चे मानकरी झाले. अध्यापन काळातील ३१ वर्षे पदवी वर्गाचे, २० वर्षे स्नातकोत्तर वर्गाचे व १६ वर्षे एम. फिल.च्या वर्गाचे अध्यापन केले. श्री. कुलकर्णी पदव्युत्तर विभाग प्रमुख पदावर नागपूर विद्यापीठात सहा वर्षे कार्यरत होते. त्यांच्या मार्गदर्शनाखाली २० विद्यार्थ्यांना पीएच. डी. प्राप्त झाली. डॉ. कुलकर्णी यांनी एम. फिल. च्या शोध प्रबंधासाठी ४५ जणांना मार्गदर्शन केले. ३० जून २००२ रोजी ते निवृत्त झाले.

डॉ. मदन कुलकर्णी यांच्या स्वतंत्र ग्रंथलेखनातील 'मराठी प्रादेशिक कादंबरी' (१९८४), 'मुक्तिबोधाची कविता' (१९९२), 'दलित जाणिवेच्या कवितेतील सूर्यप्रतिमा' (१९९३), 'यल्लमाच्या जोगतिणी', 'श्रीचक्रधर निरूपित श्रीकृष्ण चरित्र: एक अभ्यास' (१९९४), 'निवडक पु. ल.: एक आकलन' (२०००), 'कविताव्रती' (२००१), 'देशीयता ते जागतिकीकरण' (२००८) यांचा उल्लेख प्रामुख्याने करावा लागेल.

त्यांच्या संपादित ग्रंथामध्ये ज्ञानेश्वरी:अध्याय १ (१९७५), अध्याय ९ (१९९१), अध्याय १६ (१९९३), अध्याय १२ (२००२), संगीत सौभद्र (१९८१), वसंत वैभव (कै. वसंत कृष्ण वऱ्हाडपांडे स्मृतिग्रंथ १९९३), महदंबेचे धवळे (१९९८), लीळाचरित्र: एकांक (२००२), अमृतानुभव (२००७), चांगदेवपासष्टी आणि हरिपाठाचे अभंग (२००७), बी. कॉम. साठी पाठ्यपुस्तक आदींचा समावेश आहे.

डॉ. कुलकर्णी यांनी 'मराठीतील व हिंदीतील प्रादेशिक कादंबऱ्यांचा तुलनात्मक अभ्यास' या विषयावर विद्यापीठीय अनुदान आयोगाने मंजूर केलेल्या (२००१ पासून २००४ पर्यंत) प्रमुख प्रकल्पाचे काम पूर्ण केले. त्यांच्या 'देशीयता ते जागतिकीकरण' या ग्रंथाला महाराष्ट्र शासनाचा २००८ चा 'वा. ल. कुलकर्णी समीक्षा पुरस्कार' मिळाला. डॉ. मदन कुलकर्णी यांनी संपादित केलेले ग्रंथ केवळ परिचयात्मक नसून त्यांमागे त्यांचा संशोधनविषयक दृष्टिकोन प्रामुख्याने दिसून येतो. कविता आणि कादंबरी यांवरील समीक्षण, दलित साहित्यावरील समीक्षण, महानुभाव पंथाचा अभ्यास यांपासून ते जागतिकीकरणापर्यंतचा प्रवासही त्यांच्या लेखनात दिसून येतो.

– वि. ग. जोशी

## कुळकर्णी, रघुनाथ भगवान

☞ **बी रघुनाथ**

## कुलकर्णी, वसंत दिगंबर

**समीक्षक**

**२३ ऑगस्ट १९२३ – २५ ऑगस्ट २००१**



वसंत दिगंबर कुलकर्णी यांचा जन्म उस्मानाबाद जिल्ह्यातील वडजी येथे झाला. शिक्षण बार्शी व पुणे येथे झाले. प्रथम बी. एससी. होण्याचा प्रयत्न होता. त्या दरम्यान 'महाराष्ट्र साहित्य परिषदे'च्या मराठीच्या परीक्षा त्यांनी दिल्या. एस.पी.महाविद्यालयांमधून बी.ए. व एम.ए. झाले. या काळात प्रा.रा.श्री. जोग, प्रा.पु.ग. सहस्रबुद्धे, प्रा.गं.बा. सरदार, के.ना.वाटवे यांच्या संपर्कात आले. महानुभाव वाङ्मय, संतसाहित्य, समीक्षा, संशोधन, नाटक व रंगभूमी, नियतकालिकांचा अभ्यास या विविध विषयांमध्ये त्यांना रस राहिला.

प्रारंभी कौटुंबिक परिस्थितीमुळे रहितमपूर, पुणे, कराची, हैद्राबाद, माळीनगर अशा ठिकाणी त्यांनी माध्यमिक शाळांमधून अध्यापनाचे काम केले. १९५६ साली पुण्याच्या एस.पी.महाविद्यालयात मराठी-संस्कृतचे प्राध्यापक म्हणून त्यांची नेमणूक झाली. विलेपार्ल्याच्या पार्ले महाविद्यालयामध्ये (आता साठे महाविद्यालय) यामध्ये ते मराठीचे प्राध्यापक म्हणून १९५९ साली नेमले गेले. मुंबई विद्यापीठाच्या मराठी विभागात प्रपाठक म्हणून त्यांची नेमणूक झाली. १९७१च्या जूनमध्ये त्यांनी पदभार स्वीकारला. यथावकाश ते प्राध्यापक व विभाग प्रमुख झाले. १९८४च्या २०एप्रिलला ते निवृत्त झाले.

'गॅलिलिओ' (१९४८) हे त्यांचे पहिले पुस्तक, त्यानंतर 'लीळाचरित्र: एक अभ्यास' (१९६७), 'केशवसुतांचे अंतरंग' (१९७३), 'संगीत सौभद्र: घटना आणि स्वरूप' (१९७४), 'अर्वाचीन मराठी सारस्वतकार' (१९७५), 'साहित्य: रूप आणि गंध' (१९७६), 'ज्ञानेश्वर: काव्य आणि काव्यविचार' (१९७७), 'संत साहित्याची संकल्पना' (१९८९), 'पसायदान' (१९९१), 'श्रीज्ञानेश्वर: तत्त्वज्ञ, संत आणि कवी' (१९९३), 'ज्ञानेश्वरांचे काव्यशास्त्र'(१९९३), 'संत सारस्वत: आकलन आणि आस्वाद'(१९९४), 'मराठी साहित्य: विमर्श आणि विमर्शक', 'काव्य आणि काव्यास्वाद', 'गोदातटीचा अश्वत्थ,' 'पोएट बोरकर,' 'स्वातंत्र्यवीर सावरकर: एक चिंतन'(शेवटची पाच पुस्तके २००१ सालातली) ही पुस्तके प्रसिद्ध झाली. याशिवाय त्यांचे अन्य लेखनही आहे.

**अभ्यासू वक्ता**

अभ्यासू वक्ता म्हणून त्यांनी ख्याती संपादन केली होती. शिवाजी विद्यापीठ, गोवा येथील पदव्युत्तर मराठी विभागामध्ये त्यांनी अभ्यागत प्राध्यापक म्हणून अध्यापनाचे काम केले. ते विविध साहित्य संस्थांवर पदाधिकारी म्हणून कार्यरत होते. महाराष्ट्र राज्य पाठ्यपुस्तक मंडळ, महाराष्ट्र राज्य ग्रंथपुरस्कार समिती यांसारख्या सरकारी समित्यांवर त्यांची नेमणूक झाली होती. त्यांची दृष्टी उदार, मोकळी होती. त्यांना पाश्चात्त्य साहित्य सिद्धान्त समजून घेण्यातही रस असायचा. प्रा.गंगाधर पाटील यांच्यामुळे ते आपण समजून घेऊ शकलो, म्हणून त्यांनी कृतज्ञतापूर्वक उल्लेख केला आहे.

'आलोचना' मासिकातून 'संगीत सौभद्र'विषयी त्यांनी लेखमाला लिहिली. पुढे त्याचे पुस्तक झाले. सदर पुस्तक संशोधन म्हणून त्यांनी मुंबई विद्यापीठाला सादर केले व त्यावर त्यांनी पीएच.डी. मिळवली.

त्यांचा 'मुंबई मराठी साहित्य संघ', 'मुंबई मराठी ग्रंथसंग्रहालय' या संस्थांशी निकटचा संबंध राहिला. मुंबई विद्यापीठाच्या मराठी विभागातर्फे, मुंबई मराठी साहित्य संघातर्फे त्यांनी अनेक परिसंवाद, चर्चासत्रे व कार्यशाळा आयोजित केल्या. ते आकाशवाणीच्या पु.मं.लाड स्मारक व्याख्यानमालेचे वक्ते होते. वेगवेगळ्या ठिकाणच्या नामवंत व्याख्यानमालांमधून त्यांनी आपली व्याख्याने दिली. ज्ञानेश्वर आणि त्यांचे लेखन हा प्रायः त्यांचा आवडीचा व जिव्हाळ्याचा विषय राहिल्याने त्यांतील एकेका विषयावर ते व्याख्यानमाला गुंफत असत आणि पुढे त्यातून त्यांची ग्रंथसिद्धी होत असे.

मुंबई विद्यापीठातून निवृत्त होण्यापूर्वी त्यांनी तिथे ‘वाङ्मयीन नियतकालिकांचा अभ्यास’ हा प्रकार विभागातील सहकारी व विद्यार्थी यांच्या साहाय्याने राबवला. त्यांनी ‘साहित्यचिंतन’ नावाचे संशोधनपर लेखांच्या पुस्तकाचे संपादनही केले.

महाराष्ट्र साहित्य परिषद, पुणे या संस्थेने मराठी वाङ्मयाच्या इतिहास लेखनाचे काम अंगीकारले होते. त्यातील खंड क्र.६च्या भाग १ व भाग २ ह्यांचे त्यांनी प्रा. गो. म. कुलकर्णी यांच्या सहकार्याने संपादन केले होते.

त्यांनी वीर सावरकरांच्या जीवनावर नाटिकाही लिहिली होती. निवृत्तीनंतर ते पुण्याला स्थलांतरित झाले. त्या काळात त्यांचा कल हळूहळू अहमदनगरच्या क्षीरसागर महाराजांकडे राहिला. प्रारंभापासूनच त्यांना अध्यात्मविषयक व संत साहित्यविषयक रुची राहिली. त्यानंतर बाबामहाराज आर्वीकर यांच्या ‘दिव्यामृतधारा’मुळे त्यांची बैठक सिद्ध व्हायला मदतच झाली. पुण्याच्या ‘रामकृष्ण मठा’तही त्यांनी त्या अनुषंगाने व्याख्याने दिली. क्षीरसागर महाराजांच्या सहवासात आल्यावर महाराजांच्या सूचनेवरून तिथल्या ‘श्रीगुरुसेवा’ या त्रैमासिक पत्रिकेचे संपादन व लेखन ते करीतच राहिले.

कुलकर्णींनी ‘मराठी कविता: प्राचीन कालखंड (११५० ते १८४०) (१९६९), ‘एकांकिका वाटचाल’ (सहकार्याने १९६९), ‘आख्यानक कविता’ (सहकार्याने १९९३), ‘अप्रकाशित तांबे’ (सहकार्याने १९७४), ‘विज्ञान: साहित्य आणि संकल्पना’ (सहकार्याने १९९०) व ‘कथाविहार’(सहकार्याने), ‘कविता फुलते अशी’ (सहकार्याने १९५७), ‘अज्ञात लीला’ (सहकार्याने १९८६) अशी संपादने केली. ‘उत्तम’ या दिवाळी वार्षिकाचे त्यांनी १९६९, १९७० व १९७१ अशी तीन वर्षे वा. रा. ढवळे यांच्याबरोबर संपादन केले.

‘मराठी साहित्य समीक्षा’ हा त्यांचा एक प्रिय विषय होता. त्यावर ते आयुष्यभर लिहीत राहिले. त्यांच्या मृत्यूनंतरही त्या विषयावरील त्यांचे लेखन ग्रंथरूपाने प्रकाशित होत राहिले. कलावाद, जीवनवाद असे समीक्षेत अटीतटीचे वाद होताना व त्यामध्ये त्यांचे पूर्वकालीन व समकलीन समीक्षक हिरिरीने सहभागी होताना, त्यांची भूमिका मात्र मध्यम क्रमवादी राहिली. साहित्यकृतीच्या रचना सौंदर्याचा विचार त्यांना जसा हवासा वाटत असे, तसाच तिच्यातून आविष्कृत होणाऱ्या जीवनसमस्यांचे सूक्ष्म भान त्यांना अपेक्षित असे. साहित्यकृतीच्या वाचनाने वाचकाच्या जाणिवा विस्तारल्या पाहिजेत आणि त्यामुळे मानवी जीवन समजायला मदत व्हायला हवी, अशी त्यांची धारणा होती.

– सुखदा कोरडे

**संदर्भ :**

१. *कुलकर्णी, व. दि.; ‘धुळाक्षरातून मुळाक्षराकडे माझे विद्याजीवन’; सोहम् प्रकाशन, पुणे; १९९४.*
२. *कुलकर्णी, व. दि.; ‘सुमित्रा-संवाद’; स्नेहवर्धन प्रकाशन, पुणे; १९९५.*

## कुलकर्णी, वामन लक्ष्मण

**समीक्षक**

**७ एप्रिल १९११ – २५ डिसेंबर १९९१**



वा. ल. कुलकर्णी यांचा जन्म खानदेशात चोपडे येथे झाला. त्यांचे इंटरमीजिएटपर्यंतचे शिक्षण नाशिक येथे झाले आणि पदवी व पदव्युत्तर परीक्षांचे शिक्षण मुंबईच्या विल्सन महाविद्यालयात पार पडले. १९३३ मध्ये ते बी. ए. (इंग्रजी) तर १९३५ मध्ये एम. ए. (मराठी) उत्तीर्ण झाले. एम.ए.च्या परीक्षेत मराठी विषयात प्रथम आल्यामुळे त्यांना ‘चिपळूणकर मराठी पारितोषिक’ मिळाले. ते मुंबईच्या छबिलदास हायस्कूलमध्ये शिक्षक होते. १९३६ पासून १९४४ पर्यंत त्यांनी विल्सन हायस्कूलमध्ये अध्यापन केले. १९४४ पासून

१९५९ पर्यंत विल्सन महाविद्यालयात प्राध्यापकी करून त्यानंतर मराठवाडा विद्यापीठ व मुंबई विद्यापीठ येथे प्राध्यापक पदावर आणि विभाग प्रमुख पदावर काम करून १९७६ साली ते सेवानिवृत्त झाले.

१९४० साली 'समीक्षक'चे संपादक असलेल्या कुलकर्णींनी 'अभिरुची', 'सत्यकथा', 'छंद' यांसारख्या वाङ्मयीन नियतकालिकांतूनही सातत्याने समीक्षा-लेखन केले. समीक्षात्मक लेखनाचे त्यांचे एकूण आठ संग्रह आहेत. शिवाय श्री. कृ. कोल्हटकर, ह. ना. आपटे, न. चिं. केळकर यांच्या वाङ्मयासंबंधी स्वतंत्र ग्रंथ लिहिले. 'वाङ्मयातील वादस्थळे' (१९४६), 'वाङ्मयीन मते आणि मतभेद' (१९४९), 'वाङ्मयीन टिपा आणि टिप्पणी', 'वाङ्मयीन दृष्टी आणि दृष्टिकोन' (१९५९), 'साहित्य आणि समीक्षा' (१९६३), 'साहित्य : शोध आणि बोध' (१९६७), 'साहित्य: स्वरूप आणि समीक्षा' (१९७५), 'मराठी कविता: जुनी आणि नवी' (१९८०) अशा लेखनातून त्यांच्या गंभीर, सखोल व चिकित्सक दृष्टीचा प्रत्यय येतो. वामन मल्हार जोशी यांच्या 'वाङ्मय दर्शन'चे अतिशय महत्त्वपूर्ण काम त्यांनी केले आहे. डॉ. एम. फॉर्स्टर यांच्या समीक्षेने आपल्या समीक्षावृत्तीला दिशा गवसल्याचे कुलकर्णींनी नमूद केले आहे.

### तात्त्विक समीक्षेचा पहिला टीकाकार

'आमच्या पिढीवर त्यांच्या समीक्षेचा प्रत्यक्ष अप्रत्यक्ष संस्कार तर मोठा आहेच, पण एकूणच मराठी समीक्षेला वा. लं. च्या समीक्षेने नवी दृष्टी दिली' असे प्रा. रमेश तेंडुलकरांनी म्हटले आहे. 'तात्त्विक स्वरूपाची गंभीरपणे समीक्षा लिहिणारे मराठीतले पहिले टीकाकार' असे वा. लं. विषयी श्री. पु. भागवत यांनी प्रशंसोद्गार काढले आहेत. अध्यापन आणि समीक्षा या दोन क्षेत्रांची सांगड घालणाऱ्या कुलकर्णींनी समीक्षेला स्वतंत्र ज्ञानशाखा म्हणून प्रतिष्ठा प्राप्त करून दिली यात शंका नाही. सौंदर्यग्राही रसिक, चिंतक अशा या समीक्षकात एक शिस्त, टापटीप असे आणि समीक्षा हा एक विकसनशील परिवर्तनीय असा साहित्य प्रकार आहे, याची जाण असे.

नव्या आविष्काराचे स्वागत करून त्याचे स्वरूप लक्षात घेणारे कुलकर्णी हे मर्ढेकरांच्या 'वाङ्मयीन महात्मता' लेखमालेतील मीमांसेने अस्वस्थ होत. कुलकर्णींनी इंग्रजी व मराठी विषयांचा, त्यांच्या भिन्न परंपरांचा अभ्यास केला होता. कुलकर्णींचे बंधू वास्तुकला-विशारद होते व स्वतः कुलकर्णींना चित्रकला आणि मूर्तिकला याची आवड होती. वाङ्मय ज्या विविध रूपांतून अवतरते, त्या रूपांशी संबंध असलेल्या प्रश्नांचा विचार त्यांना अतिशय जिव्हाळ्याचा वाटे. समीक्षात्मक आणि सर्जनशील अशा दोन्ही प्रकारच्या ग्रंथांचे वाचन समीक्षकाने केले पाहिजे, असा त्यांचा आग्रह होता. आशय व अभिव्यक्ती यांची एकरूपता त्यांनी हिरिरीने प्रतिपादित केली. आकृतीवादी समीक्षेचा त्यांनी स्वीकार केला नाही, तथापि कलेसंबंधीच्या अनेकविध संकल्पनांची चिकित्सा करून त्या अनुषंगाने कलावंताचे चारित्र्य, श्लील-अश्लीलतेचा प्रश्न, सत्य-शिव-सुंदर या संकल्पना व श्रेष्ठ साहित्यकृतीचे स्वरूप यांचा विचार व्हावा, अशी कुलकर्णींची वाङ्मयीन भूमिका होती. तात्त्विक, ऐतिहासिक आणि उपयोजित अशा समीक्षेच्या त्रिविध अंगांबाबत त्यांना सारखाच रस होता. नवसाहित्याच्या समीक्षेच्या संदर्भात कुलकर्णींची कामगिरी प्रेरक आणि मोलाची आहे.

सुधीर रसाळ, सरोजिनी वैद्य, विजया राजाध्यक्ष ही त्यांच्या हाताखाली पीएच. डी. केलेल्यांची नावे आहेत. विजया राजाध्यक्ष यांनी 'संवाद' या ग्रंथात कुलकर्णींची प्रदीर्घ मुलाखत प्रसिद्ध केली आहे. लेखकाप्रमाणेच समीक्षकालाही त्याच्या काळाची संवेदनशीलता लाभते. म्हणून तो नंतरच्या पिढीविषयी समरसतेने लिहू शकत नाही, असे त्यांचे मत होते. वाचन करताना स्वतःसाठी काढलेली त्यांची टिपणे मुळात सुलेखन आणि सौंदर्यदृष्टी यांचा एक अप्रतिम नमुना आहे. ३९ व्या महाराष्ट्र साहित्य संमेलनात टीका शाखेचे अध्यक्ष (१९५७), तसेच ४० व्या संमेलनात कथा शाखेचे अध्यक्ष (१९५८) व हैद्राबाद येथे भरलेल्या महाराष्ट्र साहित्य संमेलनाचे अध्यक्षपद त्यांनी भूषविले. महाराष्ट्र राज्य

साहित्य आणि संस्कृती मंडळाचे सदस्य म्हणून त्यांची निवड झाली होती. अमेरिकन सरकारच्या निमंत्रणावरून कुलकर्णींनी अमेरिकेतील विद्यापीठे, नाट्यसंस्था, कलाकेंद्रे इत्यादींना भेट देण्यासाठी प्रवास केला (१९६५).

उत्कृष्ट समीक्षा ग्रंथ म्हणून त्यांच्या 'वाङ्मयीन टिपा आणि टिप्पणी' व 'श्रीपाद कृष्ण वाङ्मयदर्शन' या कृतींना महाराष्ट्र शासनाची पारितोषिके मिळाली आहेत.

२५ डिसेंबर १९९१ रोजी मुंबई येथे त्यांचे निधन झाले.

– वि. ग. जोशी

**संदर्भ :**

*१. भागवत श्री. पु., रसाळ सुधीर, संपादक; 'साहित्य : अध्यापन आणि प्रकार'; पॉप्युलर प्रकाशन, मुंबई; १९८७.*

*२. कुलकर्णी वा. ल.; 'वा. ल. कुलकर्णी यांच्या डायऱ्यांतील टिपणे', भाग १ ला, मराठी संशोधन मंडळ, मुंबई; १९८७.*

## कुलकर्णी, विनायक महादेव

**कवी**

**७ ऑक्टोबर १९१७**



विनायक महादेव कुलकर्णी यांचा जन्म तासगाव तालुक्यातील मणेराजुरी येथे झाला. शालेय शिक्षण तेथेच झाले तर महाविद्यालयीन शिक्षण पुण्यातून. मुंबई विद्यापीठाची पीएच.डी. बेळगाव व सोलापूर येथे अध्यापनाचे काम. कविता, कथा, कादंबरी, बालसाहित्य, असे विविध साहित्यप्रकार हाताळले. पुढील पुस्तके प्रसिद्ध– 'विसर्जन' (खंडकाव्य १९४३), 'पहाटवारा' (१९४९), 'कमळवेल' (१९५२), 'अश्विनी' (१९५७), 'भाववीणा' (१९६०), 'प्रसादरामायण' (१९६७), 'पाऊलखुणा' (१९६७), 'मृगधारा' (१९८३) हे कवितासंग्रह. 'फुलवेल' (१९४९), 'ललकार' (१९५८), 'चंद्राची गाडी', 'अंगतपंगत', 'रंगपंचमी' (१९७७), 'गाडी आली झुक झुक झुक' (१९८३), 'नवी स्फूर्तिगीते' (१९८६) हे बालगीतसंग्रह. 'न्याहारी' (१९३९) हा कथासंग्रह. ग्रामजीवनावर आधारित 'आहुती' (१९४१) ही कादंबरी. 'साहित्यदर्शन' (१९४८), 'वृत्ते व अलंकार' (१९७०), 'रामजोशीकृत लावण्या' (संपादन १९७३), 'मुक्तेश्वरकृत सभापर्व' (संपादन) ही त्यांची इतर काही पुस्तके. शालेय जीवनापासून कवितालेखनाने त्यांच्या लेखनाची सुरुवात झाली. सुरुवातीच्या 'विसर्जन' या प्रदीर्घ विरहगीतातून त्यांच्या काव्यलेखनावर रविकिरण मंडळाचा विशेष प्रभाव जाणवतो. नवथर प्रेमातील कोवळीक, संसाराच्या माध्यान्हीला अनुभवायला येणारी तृप्ती आणि प्रगल्भता, आणि आयुष्याच्या उत्तरकाळात विरक्तीकडे झुकलेली वृत्ती त्यांच्या कवितेमधून प्रकट होते. प्रेमाचे उदात्तीकरण, मातृत्वाचा गौरव, ईश्वरनिष्ठा आणि निखळ निसर्ग-प्रतिमा हे त्यांचे जिव्हाळ्याचे विषय होते. ईश्वरावरच्या निस्सीम भक्तीमुळे त्यांनी 'प्रसादरामायण' हा रामाचे चरित्र सांगणारा गीतसंग्रह लिहिला. समाजातील दैन्य, शोषण यांमुळे येणारी अस्वस्थता, यातून येणारी असाहाय्यतेची भावना त्यांच्या 'लमाणांचा तांडा', 'अणुस्फोट', 'वेसण', 'भट्टी' यांसारख्या निवडक कवितांमधून व्यक्त झाली आहे. मुलांविषयी वाटणारे प्रेम आणि त्यांच्या भावविश्वाशी एकरूप होऊन जगाकडे पाहायची दृष्टी त्यांच्याकडे असल्यामुळे मुलांचा व्रात्यपणा, त्यामागचा निरागसपणा ते नेमकेपणाने आपल्या बालसाहित्यात मांडू शकले आहेत.

कुलकर्णी यांच्या कवितांचे रसग्रहण करताना डॉ. अक्षयकुमार काळे म्हणतात– 'कुटुंबवत्सल प्रसन्नचित्त व्यक्तिमत्त्वाचा प्रासादिक असा आविष्कार वि. म. कुलकर्णी यांच्या सर्वच कवितांत झाला आहे. त्यांची शैली साधी, प्रसन्न व सुगम आहे. तिरकसपणाचे जात्याच तिला वावडे असल्यामुळे आपली प्रासादिकता ती कुठेच गमावत नाही. त्यामुळे शैलीचा बाळबोधपणा हेच त्यांच्या कवितेचे बलस्थान आहे.'

संसारातल्या लहानमोठ्या अनुभवांत रमलेली त्यांची कविता प्रासादिक सौंदर्यामुळे मनात रेंगाळत राहत असली, तरी अनुभवाची वैश्विक पातळी मात्र गाठू शकत नाही.

– मृणालिनी चितळे

**संदर्भ :**

*१. डॉ. काळे अक्षयकुमार; 'अर्वाचीन मराठी काव्यदर्शन'; पां. ना. बनहट्टी प्रकाशन; १९९९.*

## केचे, मधुकर बाबूराव
### कवी, ललित निबंधकार
### १८ जानेवारी १९३२ – २५ मार्च १९९३



मधुकर केचे यांचा जन्म वर्धा जिल्ह्यातील अंतोरा येथे झाला. एम. ए. ची पदवी प्राप्त करून मराठीचे प्राध्यापक म्हणून काम करणारे मधुकरराव कवी आणि ललित निबंधकारही होते. 'एक घोडचूक' या लेखसंग्रहात ते म्हणतात, 'व्यक्तिचित्रे, प्रवासवर्णने वगैरे लिहीत असतानाच काही प्रकारचा उपद्व्याप मी अधूनमधून केला. आपल्यातल्याच काहींनी त्या प्रकाराला वात्रट लेखन हे नाव दिले. या लेखनाचा स्वभाव जरा निराळा म्हणजे नुसता गमती आहे'. श्री. मा. गो वैद्यांच्या मते– 'केचे यांची एक खास शैली आहे. एक खास बैठक आहे. तीत विनोद आहे पण विखार नाही. तो खुसखुशीत आहे पण ठिसूळ नाही. श्लेष आहे पण क्लिष्टता नाही'. त्यांचे तीन कवितासंग्रह महाराष्ट्र सरकारची बक्षिसे लागोपाठ पटकावून गेले. 'वंदे वंदनम्' या त्यांच्या लेखसंग्रहातील पैसा कसा खावा, माझे मंत्रिमंडळ, मुंबईतील बशी, वंदे मास्तरम् हे लेख विनोदी व रोजच्या अनुभवविश्वातले असून वाचकाचे सहज मनोरंजन करतात.

त्यांच्या कवितेवर मर्ढेकरांचा प्रभाव असला, तरी केचे यांची कविता दुर्बोध व जटिल नसून साधी,



सौम्य व सहज आहे. ओवी, अभंग या पारंपरिक छंदांचाही त्यांनी वापर केला आहे. विदर्भातील गावे, माणसे आणि तिथल्या परिसराचे मार्मिक निरीक्षण खास वैदर्भी बोलीतून प्रस्तुत केले आहे. 'पुनवेचा थेंब' व 'आसवांचा ठेवा' यांतील कवितांमध्ये प्रतिमांचे नावीन्य आहे.

'दिंडी गेली पुढे' (१९५९) हा पहिला कवितासंग्रह होय. संतांच्या कवितेचे संस्कार असूनही त्यांच्या कवितेत आधुनिक मानवाची निराशा, ईश्वराविषयी शंकाकुलता, ऐहित प्रेरणांशी चालेलला संघर्ष या गोष्टी अधोरेखित होतात. 'पालखीच्या संगे' (१९६५), 'आखर आंगण' (१९६७), 'एक भटकंती' (१९६८), 'एक घोडचूक' (१९७३), 'वंदे वंदनम्' (१९७९) हे ललित निबंधसंग्रह; 'चेहरेमोहरे' (१९६९), 'वेगळे कुटुंब' (१९६५) हे व्यक्तिचित्रसंग्रह; 'झोपलेले गाव' (१९७८), 'माझी काही गावं' ही प्रवासवर्णने, आणि 'मोती ज्यांच्या पोटी' ही कादंबरी असे साहित्य त्यांच्या नावावर आहे.

– वि. ग. जोशी

**संदर्भ :**

*१. केचे मधुकर; 'वंदे वंदन'; संतोष साहित्य, मुंबई; १९७९.*

*२. केचे मधुकर; 'एक घोडचूक'; प्रभा प्रकाशन, नागपूर; १९७३.*

## केतकर, गजानन विश्वनाथ

**निबंधकार, विचारवंत, गीतेचे अभ्यासक, ध्येयवादी पत्रकार**

**८ ऑगस्ट १८९८ – १५ जुलै १९८०**



विचारवंत ग. वि. केतकर यांचा जन्म पुणे येथे झाला. पुणे येथे १९१४ साली मॅट्रिक उत्तीर्ण झाल्यानंतर बडोद्याच्या महाविद्यालयातून इतिहास व अर्थशास्त्र हे विषय घेऊन ते १९१९ साली बी.ए. व पुढे एलएल.बी झाले आणि केसरी–मराठा संस्थेत संपादकीय विभागात त्यांनी कामास सुरुवात केली.

१९३० साली ते मिठाच्या सत्याग्रहात सहभागी झाल्याने त्यांना ९ महिने सक्तमजुरीची शिक्षा झाली होती. अनेक शैक्षणिक, सामाजिक संस्थांच्या व स्वराज्य पक्ष, हिंदू महासभा या राजकीय पक्षांच्या कार्याशी ते निगडित होते.

केतकरांनी लोकमान्य टिळकांच्या भाषाशैलीचे वर्णन करताना लिहिले होते, ''टिळकांची भाषाशैली ही त्यांच्या स्वभावाप्रमाणेच सरळ, अकृत्रिम, निर्भीड व प्रामाणिक बनली आहे. त्यांच्या दृढ निश्चयामुळे तिच्यात निस्संदिग्धपणा आला आहे. त्यांच्या लेखांचे गाजलेले मथळेही महत्त्वपूर्ण ठरतात.''

या वर्णनातील बरेचसे गुण केतकरांच्या लेखनात उतरण्याचे कारण केतकरांची आई ही लोकमान्यांची कन्या व त्यांचे वडील आणि आजोबा व्यवसायाने वकील होते, हे होय.

प्राधान्याने 'युक्तिवाद' चातुर्याचाच आश्रय करून आपले विवेचन वाचकांना पटविण्याचे सामर्थ्य असलेल्या थोड्या लेखकांत ग. वि. केतकरांचे स्थान आहे' असे श्री अ.ना.देशपांडे म्हणतात. त्यांच्या लेखणीच्या मर्मभेदाची चुणूक त्यांचे संघबंदीवरील तीन लेख दाखवतात. इतर अनेक अनुयायांचा कोठल्या ना कोठल्या तरी मुद्द्यावर टिळकांशी थोडातरी मतभेद असेल, पण केतकरांना टिळकांची राजकीय, धार्मिक, सामाजिक, आर्थिक, शिक्षणविषयक सर्वच्या सर्व मते संपूर्णपणे निरपवाद मान्य होती. 'स्मरणगाठ' या नावाचे सदर विविध निमित्तांनी लिहून त्यांनी समाजप्रबोधनाचे महान कार्य प्रभावीपणे करताना हिंदूंच्या भावविश्वातील उणिवांवर नेमके बोट ठेवून त्यांना समयोचित मार्गदर्शन केले.

लोकमान्य टिळक व सावरकर यांच्या विचारसरणीचे अनुयायी व प्रतिपादक असणारे केतकर, पत्रकारिता हा ध्येयवाद मानून त्याची जपणूक करणारे होते. १९३६ ते १९४२ या काळात ते 'मराठा' ह्या इंग्रजी साप्ताहिकाचे व १९४७ ते १९५० या काळात 'दैनिक केसरी'चे मुख्य संपादक होते. गांधीहत्येनंतर सरकार व राष्ट्रीय स्वयंसेवक संघ यांच्यात निर्माण झालेली मोठी दरी दूर करून सामंजस्य निर्माण करण्यासाठी मध्यस्थाची महत्त्वाची भूमिका केतकरांनी बजावली. त्यांचे हिंदूपण विचाराधिष्ठित असून त्यात कर्मकांडाना, अवडंबराला स्थान नव्हते. केतकरांना गांधीच्या खुनाच्या कटाची माहिती असून त्यांनी ती सरकारला बुद्धिपुरस्सर दिली नाही, असा आरोप ठेवून त्यांचेवर खटला भरला गेला, जो देशभर गाजला. केतकर या खटल्यातून सर्वथा निर्दोष म्हणून मुक्त झाले. त्या वेळी त्यांचे वय ७८ होते. त्यांच्या सहवासात आलेली एक विदेशी महिला त्यांच्या साधेपणावर प्रभावित होऊन, धर्मपरिवर्तनाने हिंदू होऊन त्यांची द्वितीय धर्मचारिणी बनली. परिणामी त्यांना केसरीचे संपादकपद व विश्वस्तपद सोडावे लागले. पण त्यांनी त्या प्रसंगी जराही कटुता उत्पन्न होऊ दिली नाही. १९५७ ते १९६४ या काळात केतकर पुण्याच्या 'तरुण भारत'चे संपादक होते. अभ्यासू, व्यासंगी, निर्भीड संपादकाची – देशहिताची, समाजहिताची कळकळ असणारी परंपरा– त्यांनी जाणीवपूर्वक सांभाळली.

द्विखंड भारताबद्दलचे मनस्वी दुःख व्यक्त करणारा त्यांचा 'भग्नमूर्तीचे षोडशोपचार' हा लेख मर्मभेदक आहे. टिळक व गांधी यांच्या विचारसरणीतील फरक स्पष्ट करण्यासाठी 'साध्यानुकूल साधनाविवेक' या

शीर्षकाखाली लिहिलेल्या चार लेखांत त्यांची सूक्ष्म विवेचक दृष्टी दिसते.

त्यांच्या ग्रंथसंपदेत ‘गीताबीज’ (१९२४), ‘हिंदुत्वाची राष्ट्रीय मीमांसा’ (१९४४), ‘मर्मभेद’ (१९४७ ते १९५० या काळातील निवडक लेखसंग्रह), ‘गीतार्थ चर्चा’ (१९६३), लाला लजपतराय यांचे चरित्र, डॉ. पां. स. खानखोजे यांचे ‘रणझुंजार’ हे चरित्र (१९६६), ‘ख्रिस्तधर्म’ (१९६९) यांचाही उल्लेख करावा लागेल. याशिवाय त्यांनी देशकालदर्शी हिंदुधर्मशास्त्र, ज्ञानकोशकारांचे हिंदुत्वदर्शन, भारतातील सर्वधर्मसमन्वय, हिंदूंचे कुराणवाचन या लेखमाला लिहिल्या.

ध्येयवादी पत्रकार, हिंदुत्वाच्या विचारसरणीचा पुरस्कर्ता व गीतेचा अभ्यासक असणाऱ्या अशा या साध्या राहणीच्या व ‘सुखदुःखे समे कृत्वा’ असा निर्भय आदर्श पत्रकारांसमोर ठेवणाऱ्या केतकरांची कामगिरी प्रेरक होती, केसरीच्या परंपरेला साजेशी होती; यात शंका नाही.

– वि. ग. जोशी

**संदर्भ :**

*१. देशपांडे अ. ना.; आधुनिक मराठी वाङ्मयाचा इतिहास, भाग – २.*

*२. लेले ना. बा.; ‘स्मरणगाठ’; भारतीय विचार साधना, पुणे; २००१.*

## केतकर, शीलवती श्रीधर

**अनुवादक**

**१८८७ – २२ नोव्हेंबर १९७९**

शीलवती केतकर ह्या मूळच्या जर्मन ज्यू असून ईडिथ व्हिक्टोरिया कोहन हे त्यांचे माहेरचे नाव होय. त्यांचे शिक्षण जेना विद्यापीठातून झाले. स्कॉटलन्डमधील सेन्ट अॅन्ड्र्यूज विद्यापीठातून ‘कम्पॅरिटिव्ह रिलिजन्स’ या विषयात त्यांनी पदवी संपादन केली.

शीलवतीबाईंचे वडील मिस्टर कोहन हे व्यापारी होते. ते कुठलाही धर्म, जात-पात न मानणारे होते. शीलवतीबाईंची



आईदेखील निरीश्वरवादी होती. अशा पुरोगामी वातावरणात शीलवती-बाईंचे बालपण गेले. त्यांच्या वडिलांनी इंग्लंडमध्ये राहत असताना त्यांच्या-सारख्याच काही बुद्धिवादी इंग्रज लोकांच्या साहाय्याने ‘द नोबडीज क्लब’ स्थापन केला. शीलवतीबाई ह्या क्लबच्या चिटणीस होत्या. याच काळात श्रीधर व्यंकटेश केतकर शिक्षणासाठी इंग्लंडमध्ये स्थायिक होते. ह्या क्लबमध्ये ते कायम येत असत. तिथेच त्यांचा आणि शीलवतीबाईंचा परिचय झाला. काही काळाने केतकर हिंदुस्थानात परतले, तरीही शीलवतीबाई आणि केतकर ह्यांचा पत्रव्यवहार चालू राहिला होता.

केतकरांचे ज्ञानकोशाचे कार्य वेगाने पुढे जात होते. त्यांना परकीय भाषेतील ग्रंथांची भाषांतरे करून ते ग्रंथ मातृभाषेत आणण्याची गरज भासू लागली. त्यांनी शीलवतीबाईंना विंटरनिटझ्च्या ‘हिस्टरी ऑफ संस्कृत लिटरेचर’ ह्या ग्रंथाचे भाषांतर करण्याची विनंती केली. त्यांच्या विनंतीनुसार शीलवतीबाईंनी लंडनमध्ये असतानाच ह्या ग्रंथाचे भाषांतर पूर्ण केले. भाषांतराच्या गरजेपोटी तसेच कोशकार्याच्या ओढीने १९१९ मध्ये शीलवतीबाई भारतात आल्या. १९२० मध्ये व्रात्यस्तोम पद्धतीने त्या हिंदू झाल्या आणि नंतर त्यांचा व केतकरांचा विवाह झाला. शीलवतीबाईंना हिंदू धर्माबद्दल आत्यंतिक अभिमान होता. तो त्यांच्या आत्मकथेतून स्पष्टपणे जाणवतो. त्या काळात केतकर दांपत्याने दोन मुले दत्तक घेतली होती.

भारतीय केंद्र सरकारने शीलवतीबाईंची अनुवादक समितीवर नेमणूक केली. वनस्पतिशास्त्र, पदार्थविज्ञान, रसायनशास्त्र, मानवशास्त्र अशा विविध विषयांसंबंधाने शीलवतीबाईंनी अनुवाद केले.

१९३७ साली केतकरांचे निधन झाले. त्यानंतर चाळीसहून अधिक वर्षे शीलवतीबाईंना आयुष्य लाभले.

केतकरांची पुस्तके त्यांनी प्रकाशित केली. १९६९ मध्ये त्यांनी 'मीच हे सांगितले पाहिजे' हे आत्मचरित्र लिहिले. ह्या आत्मचरित्राच्या निवेदनामध्ये त्यांनी त्यामागची भूमिका स्पष्ट केली आहे. केतकर पति-पत्नींच्या बाबतीत समाजात बरेच समज-गैरसमज होते. केतकरांचे पारदर्शी व्यक्तिमत्त्व लोकांसमोर आणण्याच्या उद्देशाने आत्मचरित्र लिहिले, असे त्यांनी निवेदनात सांगितले आहे. मूळ इंग्रजीत असलेले हे आत्मचरित्र रा. य. ओलतीकर ह्यांनी मराठीत आणले.

– अंजली जोशी

**संदर्भ :**


१. *केतकर शीलवती, 'मीच हे सांगितले पाहिजे'; ह. वि.मोटे प्रकाशन, १९६९.*

२. *प्रतिभा; केतकर विशेषांक, जुलै १९३७.*


## केतकर, श्रीधर व्यंकटेश

☞ **मुख्य नोंद – पत्रकारिता आणि ललितेतर साहित्य खंड**

## केशवकुमार

☞ **अत्रे प्रल्हाद केशव**

## केशवसुत

***दामले कृष्णाजी केशव***

**कवी**

**७ ऑक्टोबर १८६६ – ७ नोव्हेंबर १९०५**

कोकणातील रत्नागिरी जिल्ह्यातील 'मालगुंड' या लहानशा निसर्गरम्य गावात केशवसुतांचा जन्म झाला. त्यांच्या आईचे नाव अन्नपूर्णाबाई. केशवसुतांचे वडील केशव विठ्ठल दामले हे शाळाखात्यात शिक्षक होते. केशवसुतांचा जन्मदिनांक १५ मार्च १८६६ आहे की, ७ ऑक्टोबर १८६६ याविषयी वाद आहे. दामले कुटुंबीयांनी एकमुखाने सुचविलेली ७ ऑक्टोबर ही तारीख सोयीची मानून 'केशवसुत जन्मशताब्दी समारोह समिती' या तारखेपासूनच जन्मशताब्दी समारंभ साजरा केला होता. केशवसुत आपल्या जन्मगावी फार काळ राहिले नाहीत.



दापोली तालुक्यातील वळणे या गावी त्यांचे बरेचसे बालपण गेले. 'गोष्टी घराकडील' व 'एक खेडे' या कवितांमध्ये या 'वळणे' गावाचे सुंदर वर्णन आले आहे. 'नैर्ऋत्येकडील वारा' या कवितेत 'मालगुंड'चा 'माल्यकूट' असा उल्लेख त्यांनी केला आहे. खेड, बडोदे, वर्धा, नागपूर, पुणे इत्यादी ठिकाणी टप्प्याटप्प्याने त्यांचे शिक्षण झाले. शालेय जीवनात त्यांना चित्रकलेची विशेष आवड होती असे दिसते. १८८९ मध्ये ते मॅट्रिक्युलेशनची परीक्षा उत्तीर्ण झाले. १८९० ते १९०५ या काळात त्यांनी मुंबई, सावंतवाडी, भडगाव, फैजपूर व धारवाड येथे नोकरी केली. त्यांचा यापैकी बराचसा काळ शिक्षकी पेशात गेला. प्लेगच्या साथीच्या भयाने त्यांनी नोकरीची ठिकाणे बदलली.

**नवे गीत गाण्याची महत्त्वाकांक्षा**

रेव्हरंड ना. वा. टिळक, हरी नारायण आपटे, कवी माधवानुज (डॉ. काशीनाथ हरी मोडक), गोविंद वासुदेव कानिटकर, काशीबाई कानिटकर, काशीनाथ रघुनाथ मित्र, कवी विनायक, नरहर शंकर रहाळकर आणि भा. रा. तांबे यांसारख्यांची मैत्री केशवसुतांना लाभली. या सर्वांचा सहवास आणि त्यांच्याशी झालेल्या काव्यचर्चा या गोष्टी केशवसुतांसाठी उपयुक्त ठरल्या. वर्डस्वर्थ, कीट्स, शेले, एडगर ॲलन पो आणि रॅल्फ वाल्डोइमर्सन या इंग्रजी कवींच्या कवितांचा प्रभाव केशवसुतांच्या कवितेवर पडला.

नारायण नरसिंह फडणीस हे खानदेशामधून 'काव्यरत्नावली' या नियतकालिकाचे संपादन करीत असत. त्यांनी केशवसुतांच्या कविता 'केशवसुत' या कविनामाने प्रसिद्ध करण्यास सुरुवात केली. तत्पूर्वी त्या 'कृ. के. दामले' या नावाने प्रसिद्ध होत असत. पुढे 'केशवसुत' हेच नाव प्रचलित व प्रख्यात झाले.

केशवसुतांना फार कमी आयुष्य लाभले. वयाच्या अवघ्या चाळिसाव्या वर्षी, हुबळी येथे ७ नोव्हेंबर



तुतारी.

एक तुतारी द्या मज आणुनि!
फुंकिन जी मी स्वप्राणानें,
भेदुनि टाकिन सगळीं गगनें
दीर्घ जिच्या त्या किंकाळीनें,
अशी तुतारी द्या मजलागुनि! १
अवकाशाच्या ओसाडींतिल
पडसाद मुके जे आजवरी,
होतिल ते वाचाल सत्वरी
फुंक मारितां जीला जबरी,
कोण तुतारी ती मज देइल? २
सारंगी, ती सतार सुन्दर,
वीणा, बीनहि, मृदंग, बाजा,
सूरहि, सनई, अलगुज, — माझ्या —
कसचीं हीं हो पडतिल काजा? ३
एक तुतारी द्या तर सत्वर!
रूढी जुलूम यांचीं दुर्मद
सन्तानें राक्षसी — हंत हा! —
खाद्दाउ तुम्हां खातात पहा!
जल्शाचा का समय असे हा?
तुतारिनें या व्हा तर सावध! ४
अवडम्बरलीं ढगें कितीतरि;
रविकिरणांचा चूर होतसे,
मोहोर सगळा गळुनि जातसे,
कीड पिकांवरि सर्वत्र दिसे:
गाफीलगिरी तरिहि जगावरि! ५

१९०५ रोजी केशवसुतांचे निधन झाले. ‘केशवसुत यांची कविता’ हा केशवसुतांच्या कवितांचा संग्रह त्यांच्या मृत्यूनंतर १९१७ साली हरी नारायण आपटे यांनी संपादित केला.

केशवसुतांना जे आयुष्य लाभले, ते सुस्थिर होते असे म्हणता येणार नाही. शिक्षणासाठी भटकंती, पोटापाण्यासाठी भटकंती आणि पुढे निवासस्थानापासून दूरवरच्या प्रदेशात प्लेगने झालेला मृत्यू. हे सर्व पाहिल्यावर असे लक्षात येते की, संपूर्ण आयुष्यात सतत त्यांची ओढाताणच होत राहिली.

असे असूनही त्यांनी मनाशी सदैव ‘नवे गीत गाण्या’ची महत्त्वाकांक्षा जपली. आपल्या दुर्मुखलेल्या मुखामधून भावी काळात ‘सदा सरस’ असा ‘वाङ्‌निष्यन्द’ बाहेर पडणार आहे हे त्यांनी आपल्या शालेय जीवनातच ओळखले होते.

**आधुनिक मराठी कवितेचे जनक**

एकोणिसावे शतक आणि विसावे शतक यांचा संधिकाल (इ.स. १८९० ते १९१० हा काळ) महाराष्ट्राच्या दृष्टीने फार महत्त्वाचा कालखंड होता. इंग्रजी राजवट सुस्थिर झाली होती. ह्या राजवटीच्या विरोधात जनमत तयार होऊ लागले होते. लोकमान्य टिळकांनी स्वराज्याचा मंत्र दिला होता आणि लोक या मंत्राने भारले जात होते. असे असले, तरी इंग्रजी राजवटीचे जे काही सुपरिणाम झाले; ते लोकांना जाणवत होते. सामाजिक सुधारणांविषयीचे विचारमंथन सुरू झाले होते. राजकीय स्वातंत्र्य आधी की सामाजिक सुधारणा आधी, याविषयीचे वाद हिरिरीने लढवले जात होते आणि तरीही या दोन्ही आघाड्यांवर महाराष्ट्राची प्रगती आश्चर्यकारक वाटेल अशीच होती. १८९५ साली आगरकरांचे अकाली निधन झाले हे खरे, पण त्यांचे विचार पुढच्या पिढीपर्यंत पोहोचले होते. त्यांनी आखून दिलेल्या मार्गाने महाराष्ट्र पुढे जात राहिला.

इंग्रजी वाङ्‌मयाच्या अभ्यासाचा प्रभाव कळतनकळत मराठी साहित्यावर पडत होता. आधी येऊन गेलेल्या भाषांतरयुगामुळे इंग्रजी साहित्य हे शिक्षित समाजाला परिचित झाले होते. निबंधमाला, केसरी, सुधारक या नियतकालिकांनी महाराष्ट्राला वाचनाची गोडी लावली होती. नाटके आणि वाङ्‌मयीन नियतकालिके यांच्यामधून महाराष्ट्राचा अभिजनवर्ग घडत होता. मराठी वाङ्‌मयामध्ये आधुनिकता येण्याच्या दृष्टीने हा अत्यंत पोषक असा कालखंड होता.

केशवसुतांची कविता जन्मली आणि बहरली ती नेमकी याच कालखंडात. केशवसुतांच्या कवितेचा

आशय आणि घाट या दोन्हींमध्ये अपूर्वता होती. स्वतःचा संप्रदाय निर्माण करण्याची ताकद त्यांच्या कवितेत होती. विसावे शतक संपले आणि एकविसावे शतक सुरू झाले, तरी केशवसुतांच्या कवितेचा प्रभाव संपला नाही. केशवसुत 'आधुनिक मराठी कवितेचे जनक' ठरले.

समता, स्वातंत्र्य आणि विश्वबंधुत्व यांचा उद्‌घोष केशवसुतांनी कवितेमधून केला. बदलत्या काळाचे आणि समाजसुधारणेचे भान त्यांना होते. आपल्या शब्दांना शस्त्र बनावे लागेल, याची जाण त्यांना होती. जे युद्ध केशवसुतांना लढावयाचे होते, ते मुलायम शब्दांनी लढणे शक्य नव्हते. तेथे ओबडधोबड शब्दच कामी येणार होते. नवे शब्दही घडवावे लागणार होते. ते घडविण्याचे सामर्थ्य केशवसुतांकडे होते. 'शब्दांनो, मागुते या' असे आवाहन करण्याचे सामर्थ्य केशवसुतांजवळ होते.

**क्रांतिकारक कवी**

केशवसुतांच्या काही कविता वैयक्तिक स्वरूपाच्या; आईवडील, जन्मभूमी यांच्यावरील प्रेम अभिव्यक्त करणाऱ्या आहेत (गोष्टी घराकडील, नैर्ऋत्येकडील वारा इत्यादी). काही कविता काव्यविषयक विचार प्रकट करणाऱ्या आहेत (शब्दांनो, मागुते या, आम्ही कोण). काही प्रीतिविषयक कविता आहेत (थकलेल्या भटकणाऱ्याचे गाणे, प्रीती इत्यादी). काही निसर्गपर कविताही आहेत. (एक खेडे, अढळ सौंदर्य इत्यादी). सामाजिक कविता तर आहेतच – किंबहुना केशवसुतांची सर्वाधिक प्रसिद्धी त्यांच्या या समाजसुधारणाविषयक कवितांसाठी आहे (अंत्यजांच्या मुलाचा पहिला प्रश्न, तुतारी, स्फूर्ती, नवा शिपाई इत्यादी.) काही तत्त्वचिंतनात्मक कविताही आहेत. 'हरपले श्रेय' आणि 'तुझे नाम मुखी' या केशवसुतांच्या अखेरच्या दोन्ही कविता तत्त्वचिंतनात्मक आहेत. केशवसुत हे उत्तम शिक्षक होते, याची साक्ष त्यांच्या 'विद्यार्थ्यांप्रत' आणि 'उत्तेजनाचे दोन शब्द' या कविता देतात.

*नव्या मनूतिल नव्या दमाचा शूर शिपाई आहे*
*कोण मला वठणीला आणू शकतो ते मी पाहे*
*ब्राह्मण नाही, हिंदुहि नाही, न मी एक पंथाचा*
*तेच पतित की जे आखडती प्रदेश साकल्याचा*
*खादाड असे माझी भूक*
*चतकोराने मला न सुख*
*कूपातिल मी नच मंडूक*
*मळ्यास माझ्या कुंपण पडणे अगदी न मला साहे*
*कोण मला वठणीला आणू शकतो ते मी पाहे*

या प्रातिनिधिक काव्यपंक्ती केशवसुत प्रवृत्तीचे दर्शन घडविणाऱ्या आहेत. केशवसुतांच्या पूर्वीची मराठी कविता मुख्यतः पारलौकिकाशी निगडित होती. केशवसुतांची कविता व त्यांच्यानंतरची एकूण कविता ऐहिकाशी आणि मानवी मनाशी जोडली गेली. मराठी कवितेतील ही क्रांती मूलभूत स्वरूपाची होती. केशवसुतांना 'क्रांतिकारक कवी' म्हणायचे, ते त्यासाठीच.

''कविता म्हणजे आकाशीची वीज आहे. ती धरू पाहणारे शेकडा नव्याण्णव आपणास होरपळून मात्र घेतात. मी अशा नव्याण्णवांपैकीच एक आहे.'' अशी लोकविलक्षण काव्यधारणा असलेले केशवसुत आपल्या साहित्यकर्तृत्वामुळे अवघ्या मराठी विश्वाचे आप्त ठरले, पुढीलांचे मार्गदर्शक ठरले.

कोकण मराठी साहित्य परिषदेचे संस्थापक-अध्यक्ष श्री. मधू मंगेश कर्णिक यांच्या कल्पक आणि सक्रिय नेतृत्वाच्या प्रेरणेमुळे या संस्थेने केशवसुतांचे भव्य स्मारक मालगुंड येथे उभारले आहे. ८ मे १९९४ रोजी कविवर्य कुसुमाग्रजांच्या हस्ते केशवसुत स्मारकाचे समारंभपूर्वक उद्‌घाटन झाले.

स्मारक संकुलामध्ये केशवसुतांच्या जन्मघराचे जतन करण्यात आलेले आहे. या जन्मघराची दुरुस्ती करतानाही या घराचा कोकणी बाज प्रयत्नपूर्वक जपलेला आहे. हे स्मारक अल्पकाळातच महाराष्ट्राचे काव्यतीर्थ, मराठी कवितेची राजधानी ठरले, ही केशवसुतांच्या कवितेची पुण्याई आहे, असेही म्हणता येईल.

– डॉ. विद्याधर करंदीकर

**संदर्भ :**

*१. पंडित भ. श्री., संपादक; 'समग्र केशवसुत'.*
*२. जोग रा. श्री., संपादक; 'हरपले श्रेय'.*
*३. बेडेकर दि. के.; 'केशवसुतांची काव्यदृष्टी'.*
*४. पंडित भ. श्री.; 'केशवसुत पाच चिंतनिका'.*
*५. क्षीरसागर शकुंतला, संपादिका; 'संपूर्ण केशवसुत'.*

## केळकर, अशोक रामचंद्र

**भाषा वैज्ञानिक, वाङ्मय विद्याभ्यासक, साहित्य मीमांसक**

**२२ एप्रिल १९२९**



अशोक केळकर यांचा जन्म पुणे येथे झाला. १९५० साली पुणे विद्यापीठातून इंग्लिश विषयात एम.ए. पदवी मिळाल्यानंतर त्यांनी रॉकफेलर प्रतिष्ठानची मानाची शिष्यवृत्ती मिळवली. त्यायोगे ते अमेरिकेतील प्रसिद्ध कॉर्नेल विद्यापीठात १९५६ पासून १९५८ पर्यंत राहिले. भाषाविज्ञान या त्यांच्या आवडीच्या विषयाचा विशेष अभ्यास करून त्यांनी पीएच.डी. पदवी मिळवली. मराठी रचनाव्यवस्था आणि पदव्यवस्था हा विषय प्रबंधासाठी घेऊन, तौलनिक साहित्य व समीक्षा यांचाही अभ्यास केला. भारतात परतल्यावर पुण्याच्या डेक्कन महाविद्यालयामध्ये त्यांनी प्राध्यापक या नात्याने काम केले.

भाषा, शिक्षण आणि साहित्य यांसंबंधी अनेक शोधनिबंध, लेख व परीक्षणे इंग्रजी आणि मराठी या दोन्ही भाषांत त्यांनी प्रसिद्ध केली. 'चांगला साहित्य समीक्षक हा शेवटी चांगला जीवन समीक्षकही असतो', असे प्रतिपादन करून ते लिहितात, 'विविध विज्ञान, हस्तकला, तत्त्वज्ञान, वैचारिक कसदारपणा ह्या गोष्टी मराठी माणसाच्या संस्कृतीतच आढळत नाहीत. मग त्या मराठी साहित्य समीक्षेत कुठून येणार?' भाषाविज्ञानाची अभ्यासपद्धती साहित्यक्षेत्रात वापरली गेली, तर साहित्याच्या अभ्यासाला वेगळे परिमाण लाभू शकेल, असा विश्वास व्यक्त करून केळकर म्हणतात, 'सर्वांत महत्त्वाची गोष्ट म्हणजे साहित्य कसे शिकवावे, साहित्याबद्दलच्या मर्मदृष्टीचा विद्यार्थ्यांत कसा विकास करावा, ह्याबाबत भाषाविज्ञान मौलिक मदत करू शकते'.

आग्रा विद्यापीठात १९५८ पासून १९६२ पर्यंत व नंतर डेक्कन महाविद्यालयात व पुणे विद्यापीठात अध्यापन करून १९८९ साली केळकर प्राध्यापकपदावरून निवृत्त झाले. आधुनिक भाषाविज्ञानाचे व्यासंगी असणाऱ्या डॉ. केळकरांची भारतातील मोजक्या भाषा वैज्ञानिकांमध्ये गणना होते. मौलिक चिंतन, व्यापक आणि सखोल दृष्टी यांमुळे केळकरांची विद्वत्ता केवळ पुस्तकी, एकसुरी व बोजड झाली नाही. विद्यापीठीय, सरकारी व आंतरराष्ट्रीय स्तरांवर भाषाविज्ञानविषयक अनेक समित्या व परिषदा यांत त्यांनी भाग घेतला. आपल्या समृद्ध ज्ञानाचा व अनुभवाचा फायदा करून दिला.

मराठी भाषेची सर्वांगीण अभिवृद्धी होऊन तिचे सार्वदेशिक महत्त्व व सामर्थ्य वाढावे, ह्यासाठी तपस्व्याच्या निष्ठेने तिच्या सेवेत रत राहणाऱ्या काही थोड्या साहित्यसेवकांपैकी केळकर हे एक आहेत. १ जानेवारी १९८२ रोजी त्यांनी 'मराठी अभ्यास परिषद' स्थापन करून समविचारी व्यक्तींच्या मदतीने आणि परिषदेच्या वतीने जुलै १९८३ पासून 'भाषा आणि जीवन' नावाचे एक त्रैमासिक सुरू केले. या त्रैमासिकाचे उद्दिष्ट अत्यंत व्यापक तसेच दूरदृष्टीचे आहे. सरकारने 'पद्मश्री' ही पदवी देऊन त्यांचा गौरव केला.

केळकरांची ग्रंथसंपदा पुढीलप्रमाणे असून त्याव्यतिरिक्त नियतकालिकांतून त्यांनी अनेक लेख प्रसिद्ध केले. 'मराठी भाषेचा आर्थिक संसार' (१९७७), 'प्राचीन भारतीय साहित्य मीमांसा : एक आकलन' (१९७९), 'वैखरी: भाषा आणि भाषा व्यवहार' (१९८३) 'भेद विलोपन: एक आकलन' (१९९५), 'मध्यमा: भाषा आणि भाषा व्यवहार' (१९९६), 'स्टडीज इन हिंदी-उर्दू इन्ट्रोडक्शन ॲन्ड वर्ल्ड

फोनॉलॉजी' (१९६८) हा ग्रंथ विशेष प्रसिद्ध आहे. स्वत:च्या काही पुस्तकांचे त्यांनी हिंदीत, गुजरातीत अनुवाद केले आहेत.

– वि. ग. जोशी

**संदर्भ :**


१. *परांजपे प्र. ना.; 'आजचे समीक्षक : डॉ. अशोक रा. केळकर''; ललित-मे १९८०.*

२. *मुंडले आशा; 'पद्मश्री डॉ. अशोक रामचंद्र केळकर'; स्त्री-एप्रिल, २००२.*

३. *संवाद-डॉ. अशोक केळकरांशी; आपला परममित्र, ऑक्टोबर ते डिसेंबर दिवाळी २००२.*


## केळकर, गिरिजाबाई महादेव

**कादंबरीकार, नाटककार**

**१६ ऑक्टोबर १८८६ – २५ फेब्रुवारी १९८०**



स्त्री-जीवनातील समस्या, तिची दु:खे मांडणाऱ्या पहिल्या गद्य लेखिकांपैकी एक म्हणून महत्त्वाच्या ठरलेल्या गिरिजाबाई केळकर यांचा जन्म मुंबईला झाला. त्यांचे माहेरचे नाव द्रौपदी बर्वे होते. त्यांचे वडील बर्वे यांची नोकरी सौराष्ट्रात असल्याने द्रौपदीचे बालपण व शिक्षण गुजरातमध्ये झाले, परंतु न. चिं. केळकर यांचे धाकटे बंधू महादेवराव केळकरांशी द्रौपदीचा विवाह १९०१ साली झाला त्या गिरिजा महादेव केळकर झाल्या व महाराष्ट्रात आल्या. विवाहानंतर त्या मराठी भाषा शिकल्या व मराठीत प्रावीण्य संपादन केले. केळकरांच्या घरच्यांनी गिरिजाबाईंच्या लेखनाला प्रोत्साहन दिल्यामुळे त्या लिहू लागल्या. त्यांनी विपुल व विविध लेखन करून चांगली मान्यता मिळवलीच, शिवाय उत्तम वक्त्या म्हणूनही लौकिक संपादन केला.

त्यांनी १९३१ मध्ये लिहिलेल्या 'संसार सोपान' ह्या पुस्तकाच्या प्रास्ताविक प्रकरणाचा आरंभ 'गृहिणी गृहाची शोभा। गृहिणी सुखाचा गाभा। गृहिणी आनंदाचा ठेवा। ऐशी गृहिणी लाभे तो भाग्यवंत देवा।।' या हृद्य काव्यपंक्तींनी केला आहे. त्यांच्या कथा-नाटकांतले अनुभवाचे विश्व रोजच्या जीवनातले व कौटुंबिक आणि घरगुती स्वरूपाचे आहे. नव्या-जुन्याचा संगम माणसाला पुढे नेतो, अशी त्यांची धारणा होती. त्याचबरोबर सुगृहिणी व सुगरण बनविण्याकडे त्यांचा कल दिसून येतो. शरीरसंवर्धन व पोषण अन्नावर अवलंबून असते, असे प्रतिपादन करून त्या म्हणतात, 'ज्या सॅनिटेशनच्या नावाने तुम्ही इतके ओरडता, त्या सॅनिटेशनच्या तत्त्वावर रचलेली आमची हिंदू राहणी आहे.' संसारी स्त्रियांना मार्गदर्शक व बोधपर असे विपुल स्फुट लेखनही गिरिजाबाईंनी केले आहे. 'नाही निर्मळ जीवन काय करील साबण?' असे त्या मार्मिकपणे विचारतात.

जुन्यातले चांगले ते जोपासण्याकडे गिरिजाबाईंची वृत्ती दिसते. त्यांची एकंदर वृत्ती सात्त्विक आहे, हे त्यांच्या लिखाणातून जाणवते. त्यांच्या लेखनगुणांत उत्तरोत्तर वाढ झाली व तत्कालीन संस्कारशील मध्यमवर्गीयांचे प्रातिनिधिक ठरू शकेल, असे लेखन त्यांनी केले. 'मनोरंजन', 'ज्ञानप्रकाश', 'खानदेशवैभव' इत्यादी नियतकालिकांतून त्यांचे लेख प्रसिद्ध झाले. 'पुस्तकी शीक नि व्यवहाराची भीक' (१९१४), 'पुरी हौस फिटली' (१९१६) या कादंबऱ्या; 'अंगठीचा प्रभाव' (१९२७) ही दीर्घ सामाजिक कथा; 'स्वभावचित्रे', भाग १ (१९२३), भाग २ (१९३४), 'केवळ विश्रांतीसाठी' (१९२६) कथासंग्रह; 'पुरुषाचे बंड' (१९१३), 'आयेषा' (१९२१), 'राजकुंवर' (शिरकाणाचा सूड) (१९४१), 'हीच मुलीची आई' (१९३२), 'मंदोदरी' (१९५७) ही नाटके त्यांनी लिहिली. त्यांच्या काही पुस्तकांच्या अनेक आवृत्त्या निघाल्या, यावरून त्यांच्या लिखाणाची लोकप्रियता ध्यानी येते. 'गृहिणी भूषण' (१९१२), 'पुष्पहार' (१९२१), 'स्त्रियांचा स्वर्ग' (१९२१) ही त्यांची आणखी काही पुस्तके. त्यांचे 'द्रौपदीची थाळी' (१९५९) हे आत्मवृत्त असून स्त्री-शिक्षणाचे महत्त्व

सांगणारे आणि पतिपरायण संसारी स्त्रीचे साधेसुधे जिव्हाळ्याने भरलेले हे आत्मनिवेदन आहे.

उल्लेखनीय बाब म्हणजे १९२८ साली मुंबईत भरलेल्या नाट्य संमेलनाचे अध्यक्षपद गिरिजाबाईंना देऊन त्यांचा गौरव करण्यात आला होता.

– वि. ग. जोशी.

**संदर्भः**

*१. खानोलकर गं. दे.; 'मराठी वाङ्मय सेवक', खंड १.*

## केळकर, नरसिंह चिंतामण

**कवी, नाटककार, कथाकार, कादंबरीकार**

**२४ ऑगस्ट १८७२ – १४ ऑक्टोबर १९४७**



'साहित्यसम्राट' या विशेषणाने निरपवादपणे गौरविले गेलेले मराठीतील एकमेव साहित्यिक नरसिंह केळकर यांचा जन्म पंढरपूरजवळ मोडलिंब येथे झाला. केळकरांचे शालेय शिक्षण मिरज येथे झाले. १८८८मध्ये ते मॅट्रिक झाले. कोल्हापूर व पुणे येथे महाविद्यालयीन शिक्षण घेऊन १८९१मध्ये ते बी.ए. झाले व १८९५ साली एलएल.बी होऊन त्यांनी सातारा जिल्ह्यात वकिलीची सनद घेतली. १८९६च्या मार्चमध्ये लोकमान्य टिळकांच्या बोलावण्यावरून केळकर त्यांच्या कार्यात त्यांना साहाय्य करू लागले.

'साहित्यसम्राट' या बिरुदास शोभेल असाच केळकरांचा साहित्यक्षेत्रातील संचार होता. त्यांच्या लेखणीला कुठलाच अविषय नव्हता. वृत्तपत्रीय लेखन, नाट्यलेखन, कादंबरी–लेखन, कविता–लेखन, इतकेच नव्हे तर चित्रपट कथालेखनापर्यंत अनेक प्रकारची लेखनक्रीडा त्यांनी उत्साहाने केली. त्यांच्या लेखणीचे सामर्थ्य व सौंदर्य व्यक्त करणारा साहित्य प्रकार म्हणजे निबंध होय. हा निबंध तर्क–अनुमान–प्रमाणादिंनी निबद्ध आहे. ज्ञानलालसा, बहुश्रुतता, युक्तिवादकौशल्य, विनोदबुद्धी, भाषाप्रभुत्व आणि समाजशिक्षणाची ओढ या गुणांमुळे निबंधकार म्हणताच केळकर डोळ्यांपुढे येतात. राजकारण, सामाजिक सुधारणा, आर्थिक प्रश्न, नवनवीन कायदे, प्रासंगिक घडामोडी इत्यादींसंबंधी केळकरांनी जे–जे लिहिले, ते–ते वाचताना केळकर हे आदर्श लोकशिक्षक होते, हे जाणवत राहते. त्यांच्या लेखणीत निर्भयता होती परंतु बेतालपणा नव्हता. त्यांच्या वृत्तपत्रीय निबंधांतून औचित्य, सदभिरुची व प्रमाणबद्धता या गुणांचा विकास घडला. वृत्तपत्रकार म्हणून केळकरांना मिळालेल्या यशाचे रहस्य त्यांच्या सुपूर्त व समर्पक बहुश्रुतपणात आणि प्रवाही व प्रत्युत्पन्न लेखणीत सामावलेले आहे. 'संस्कृत विद्येचे पुनरुज्जीवन', 'कौन्सिलातील शकुन्तलाख्यान', 'स्वराज्यद्रोही छत्रपती', 'भविष्यकथन', 'कलियुगातील पंधरावी कला', 'लोकमताने कुस्ती जिंकली', 'मुरलीधर की गारुडी' यांसारखे बहुविध विषयांवरचे केळकरांचे लेखन अभिजात सौंदर्याने नटलेले आहे. त्यांची भाषा प्रासादिक व उपमा–दृष्टान्तांनी नटलेली होती.

टागोरांच्या 'सरोजिनी' या नाटकाचे भाषांतर आणि शेरिडनच्या 'टू रायव्हल्स' या नाटकाचा अनुवाद करून केळकरांनी आपल्या नाट्यलेखनाला सुरुवात केली. 'तोतयाचे बंड' (१९१२), 'कृष्णार्जुनयुद्ध' (१९१५), 'वीरविडम्बन' (१९१९), 'संत भानुदास' (१९१९) ही त्यांची चार स्वतंत्र नाटके, याशिवाय 'चंद्रगुप्त' (१९१३) व 'अमात्यमाधव' (१९१५) अशी एकूण सहा नाटके प्रयोगरूपाने रंगभूमीवर आली. याशिवाय 'नवरदेवाची जोडगोळी' (१८९८) व 'पतीची निवड' (१९५०) हीही नाटके त्यांनी लिहिली. कथानकाच्या वळणाने येणाऱ्या संवादांवाचून त्यांच्या नाट्यकृतींत फारसे काही हाती लागत नाही. मराठी नाट्येतिहासात केळकरांची नाट्यनिर्मिती फारशी प्रभावी ठरली नाही. 'तोतयाचे बंड' एवढेच त्यांचे नाटक उल्लेखनीय म्हणता येईल. 'नवलपूरचा संस्थानिक' (१९३४), 'बलिदान' (१९३७), 'कावळा व ढापी' (१९४०), 'कोकणचा पोर' (१९४२), 'जगाची रीत' (१९४३) या पाच पूर्ण

कादंबऱ्या आणि 'अंधारवड', 'दिवाण झिप्री' व 'प्रमिला' या तीन अपूर्ण कादंबऱ्या केळकरांनी लिहिल्या आहेत. 'माझी आगगाडी कशी चुकली', 'कपड्यांची अदलाबदल', 'दुधाची धार अथवा गुप्तदान', 'अलिगड किल्ल्यातील एक रहस्य' या कथा आणि तथाकथित कथात्मक लेखन त्यांनी केले आहे. परंतु कथात्म साहित्याविषयीची त्यांची समजूत प्राथमिक स्वरूपाची होती. 'आयर्लंडचा इतिहास' (१९१०), 'मराठे व इंग्रज' (१९१८), 'फ्रेंच राज्यक्रांती' (१९३५) हे त्यांचे इतिहासविषयक ग्रंथ विविध ऐतिहासिक साधनांचा उचित उपयोग करून सिद्ध केलेले आहेत. 'भारतीय तत्त्वज्ञान' (१९३४) हे त्यांचे पुस्तक तत्त्वज्ञानपर संग्रहग्रंथाच्या स्वरूपाचे आहे.

'राज्यशास्त्र' (१९३२), 'तिरंगी नवमतवादी' (१९३७), 'संस्थानी राजकारण' (१९२९), 'हिंदी स्वराज्याची कैफियत' (१९१९), 'केस फॉर इंडियन होमरूल' (१९१७) हे त्यांचे राजकारणविषयक लेखन प्रौढ व अनुभवी पत्रकारास साजेसे आहे. 'गॅरीबाल्डीचे चरित्र' (१९०१), 'त्रिखंडात्मक लोकमान्य टिळक चरित्र' (१९२३, १९२८), 'फ्रान्सची झाशीवाली' (१९४०) या नावाने लिहिलेले जोन ऑफ आर्कचे चरित्र, आयर्लंडचा इतिहास या ग्रंथाच्या शेवटी लिहिलेली आठ आयरिश देशभक्तांची छोटी चरित्रे हे केळकरांचे चरित्रलेखन होय. टिळकचरित्र २००० पृष्ठांचे आहे. परंतु त्याला एकसंधपणा नाही. तसेच त्यात नियोजन व मांडणी यांचा अभावही आढळतो. 'मी लिहिले ते मुख्यत: घडलेला इतिहास संगतवार सांगण्याच्या दृष्टीनेच लिहिले आहे' ही या चरित्रलेखनामागची केळकरांची भूमिका होती.

बडोदा येथे भरलेल्या दहाव्या साहित्य संमेलनाचे केळकर अध्यक्ष होते. या प्रसंगी त्यांनी 'खरी सविकल्प समाधी उत्पन्न करू शकते ते वाङ्मय' अशी भूमिका मांडली. ही उपपत्ती मराठी साहित्यविचारात दीर्घकाळ चर्चेचा विषय ठरली. 'प्रत्येक पिढीची अभिरुची व स्मरणशक्ती या दोन चाळण्याच होत. या जोडचाळणीतून प्रत्येक पिढीत काही लेख सरस्वतीच्या गंगाजळीत पडतात व हे सर्व गाळीव लेख मिळून जो संग्रह होतो त्याचेच नाव वाङ्मय,' हा त्यांचा वाङ्मयविचार अभिजात वाङ्मयाच्या चर्चेकडे वळतो. 'कलाविलासाच्या मागे हेतुसंशोधनाचा गुप्त पोलीस लावून दिला तर अनर्थकारक परिणाम झाल्याशिवाय राहणार नाहीत' असाही नि:संदिग्ध इशारा याच भाषणात केळकरांनी दिला. तो केळकरांची कलावादी भूमिका सुचवितो. 'सुभाषित आणि विनोद' (१९११) व 'हास्यविनोदमीमांसा' (१९३७) ही हास्यकारण व विनोदस्वरूप यांची चर्चा करणारी पुस्तके केळकरांनी लिहिली आहेत.

'विलायतेच्या प्रवासाचे वर्णन' (१९१९), 'सिमला येथील छोटी हजेरी' (१९२४), 'माझा सरहद्दीकडील दौरा' (१९२९), 'पूर्व बंगालची सफर' (१९२९), 'माझी म्हैसूरकडील प्रवासयात्रा' (१९३७) ही केळकरलिखित प्रवासवर्णने व स्थलवर्णने वाचनीय आहेत. केळकरांनी अनेक ग्रंथांना लिहिलेल्या प्रस्तावनांपैकी सदाशिवराव बापट यांनी संपादिलेल्या 'लोकमान्य टिळक यांच्या आठवणी व आख्यायिका' या संग्रहाला लिहिलेली प्रस्तावना चरित्राच्या संदर्भात आठवणी आणि आख्यायिका यांना कोणते स्थान असते, याची मार्मिक चर्चा करणारी आहे. अतिशय समाधानी व प्रसन्न वृत्तीच्या या साहित्यसम्राटाचे निधन १४ ऑक्टोबर १९४७ रोजी पहाटे झाले. दि. १३ रोजी त्यांच्या टेबलावर उघडे फाउंटन पेन व चष्मा होता आणि त्याखाली 'दिसों लागे मृत्यू परि न भिववूं तो मज शके / तयाच्या भेटीचें असत मजला ज्ञानचि निकें...' या ओळींनी सुरू होणारी त्यांची कविता होती.

– डॉ. विलास खोले

**संदर्भ:**

१. *'केळकर जन्मशताब्दी महोत्सव ग्रंथ'; केसरी प्रकाशन, पुणे; १९७२.*

२. *कुलकर्णी वा. ल.; 'न. चिं. केळकर वाङ्मयदर्शन'; पॉप्युलर प्रकाशन, मुंबई; १९७३.*

## केळकर भालबा

*केळकर भालचंद्र वामन*

☞ मुख्य नोंद – नाटक खंड

## केळकर, यशवंत नरसिंह

**कवी, कोशकार, इतिहास संशोधक व इतिहासलेखक**

**१९ जुलै १९०२ – १४ फेब्रुवारी १९९४**



ग्रंथवाङ्मय व इतिहास या दोन्हींच्या भोक्त्यांस अनेक दृष्टींनी अपूर्व वाटेल अशा 'ऐतिहासिक पोवाडे' (मराठ्यांचा काव्यमय इतिहास) या ग्रंथाचे कर्ते यशवंतराव केळकर हे शाहिरी वाङ्मयाचे संग्राहक, संपादक व प्रकाशक म्हणूनही नावाजले गेले आहेत. पुणे येथे जन्मलेल्या केळकर यांनी टिळक महाराष्ट्र विद्यापीठाची वाङ्मयविशारद ही पदवी १९२२मध्ये संपादन करून सुमारे दीड वर्ष सातारा येथील कन्याशाळेत शिक्षकाचे काम केले. नंतर पुण्याच्या भारत इतिहास संशोधक मंडळात अव्वल दर्जाच्या इतिहास संशोधकांच्या सहवासात काम करताना केळकरांची इतिहासविषयक संशोधनाची व लेखनाची आवड वाढत गेली, आणि सतत दोन वर्षे परिश्रम करून १९२८मध्ये त्यांनी ग्रंथनिर्मिती केली. विद्वानांकडून त्यांची वाखाणणी झाली.

मूळ मोडी लिपीतल्या पोवाड्यांचे मराठी बाळबोधीत लिप्यंतर करण्याच्या कामी त्यांनी घेतलेले परिश्रम व दाखवलेली सूक्ष्मता, काटेकोरपणा यापूर्वीच्या कोणाही पोवाडे संग्राहकाकडून दाखवले गेलेले नाही. 'ऐतिहासिक पोवाडे'चे आणखी दोन खंड पुढे प्रसिद्ध झाले (१९४४ व १९६९). या ग्रंथाच्या पुरस्कारात महामहोपाध्याय द.वा.पोतदार म्हणतात, 'ऐतिहासिक पोवाडे निवडून त्यांच्या पाठांची मोठ्या परिश्रमाने आणि कौशल्याने चिकित्सा करून अर्थबोधक व अवांतर टिपा जोडून वगैरे अनेक रितींनी ग्रंथ होईल तेवढा उपयुक्त करण्याचा प्रयत्न केळकर यांनी मोठ्या कसोशीने केला आहे.' विस्तृत प्रस्तावना हे या ग्रंथाचे आणखी एक वैशिष्ट्य होय.

रियासतकार सरदेसाईंनी पेशवे दप्तराच्या संशोधन कार्यात साहाय्यक या नात्याने केळकरांना बोलावून घेतले. केळकरांनी तेथे तीन वर्षे काम करताना हजारो पत्रे वाचली. त्यातून मराठेशाहीच्या इतिहासातील अत्यंत अभिमानास्पद अशा चिमाजीआप्पांच्या कर्तबगारीची त्यांच्यावर विलक्षण छाप पडली. या प्रेरक घटनेतून 'वसईची मोहीम' हा ग्रंथ साकार झाला असे नाही, तर अभ्यासकांना व इतिहासप्रेमींना अत्यंत उपयोगी असा 'ऐतिहासिक शब्दकोश' ही (१९६२) साकार झाला. या कोशात पंधरा हजार ऐतिहासिक शब्दांचा समावेश आहे व ही एकट्या केळकरांची कामगिरी आहे.

उत्साही, बुद्धिमान, कष्टाळू व चिकित्सक केळकरांनी १९३५ ते १९५६ या काळात 'केसरी'मध्ये साहाय्यक संपादक म्हणून काम केले. या काळात ऐतिहासिक ग्रंथ परीक्षणात्मक व इतरही स्फुट लेखन त्यांनी केले. इतिहास संशोधक व कवी असल्याने त्यांचे लिखाण सरस व नेटके असल्यास नवल नाही. वरील स्फुट लेखनाच्या संग्रहांखेरीज 'साष्टी-वसईची मुशाफरी', 'म्हैसूरकडील प्रेक्षणीय स्थळांचे दर्शन'; 'गीत द्विदल' (१९२५), 'गीत गुंफा' (१९३२), 'मनाचा मोहर' (१९७०) हे तीन पद्यसंग्रह असून 'विनोदलहरी' (१९३२) हा विनोदी लेखांचा संग्रह आहे. 'अंधारातील लावण्या' (१९५९) हा लावणीसंग्रह, 'मराठी शाहीर व शाहिरी वाङ्मय' (१९७४) हा विवेचक ग्रंथ आहे. 'चित्रमय शिवाजी' (१९३५) तसेच 'म्हणी अनुभवाच्या खाणी' (१९६२) असे ग्रंथ प्रकाशित झाले. संपादित ग्रंथांमध्ये 'होळकरांची कैफियत' (१९५४), 'केळकर कुलवृन्तात' (१९५२), 'केळकरांचा खासगी पत्रव्यवहार' (१०५०) यांचा समावेश आहे. साहित्यसम्राट नरसिंह चिंतामण केळकरांचे सुपुत्र यशवंतराव यांनी शिवपूर्वकाळापासून मराठेशाहीच्या

अंतापर्यंतच्या विशाल पटाचे दर्शन वाचकांना घडवून ऐतिहासिक स्वरूपाचीच कामगिरी केली आहे.

– वि. ग. जोशी

**संदर्भ :**

*१. खानोलकर गं. दे; 'मराठी वाङ्मयसेवक चरित्रकोश खंड पहिला'; अथेना पब्लिशर्स, मुंबई; २००३.*

*२. केळकर य. न.; 'ऐतिहासिक पोवाडे – मराठ्यांचा काव्यमय इतिहास', डायमंड पब्लिकेशन, पुणे; २००८.*

## केळुसकर, कृष्णराव अर्जुन

☞ **मुख्य चरित्रनोंद – शिक्षण खंड**

## कोंडविलकर माधव

***कोंडविलकर, महादेव गुणाजी***

**कवी, कथाकार, कादंबरीकार**

**१५ जुलै १९४१**



माधव कोंडविलकर यांचा जन्म सोगमवाडी, मौजे देवाचे गोठणे, ता. राजापूर, जि. रत्नागिरी येथे झाला असून देवाचे गोठणे गावात कोंडविलकरांचे घर हे एकुलते एक चांभाराचे घर असून आई-वडील स्वभावाने व परिस्थितीनेही अत्यंत गरीब हिंदू चांभार होते. स्वातंत्र्यानंतरही खेड्यापाड्यांत जातिभेदाची कुंपणे किती काटेरी आहेत, हे या परिवाराने अनुभवले व याच 'वेदनांचे वेद' त्यांच्या साहित्यात रचले गेले.

सोगमवाडीत चौथीपर्यंत शिकल्यावर, राजापूरच्या पडवे गावी पाचवी-सहावी करून कोंडविलकर मुंबईत आले, रात्रशाळेत आठवी-नववीचे शिक्षण घेतले; पण पुढे शिक्षण अर्धवट सोडावे लागले. १९६८ला एस.एस.सी.ला बाहेरून बसले. मधल्या काळात अध्यापन शास्त्र, सुतार काम ह्यांचे शिक्षण घेतले. महाराष्ट्र साहित्य परिषदेची 'साहित्य प्राज्ञ' परीक्षा उत्तीर्ण झाले. साहित्य विशारदचाही अभ्यास केला. परंतु औपचारिक शिक्षणापेक्षा जीवन जगत असताना सामाजिक, राजकीय, साहित्यिक वातावरणातून जे अनौपचारिक शिक्षण अवगत केले, ते अधिक महत्त्वाचे ठरले.

कोकणातल्या लोकल बोर्डाच्या व जिल्हा परिषदेच्या शाळेत शिक्षक म्हणून काम केले. २९ वर्षे नोकरी केल्यावर १९९०ला स्वेच्छानिवृत्ती स्वीकारली.

**वेदनांचे वेद**

१९६८ सालापासूनच ते कथा, कविता, स्फुट लेख, बालकथा, बालकविता लिहू लागले. शालेय जीवनापासूनच रोजनिशी लिहिण्याची सवय असल्याने १९७७साली ज्येष्ठ साहित्यिक मधु मंगेश कर्णिकांच्या आग्रहावरून १९६९पासूनच्या रोजनीशीचे पुनर्लेखन करून 'मुक्काम पोस्ट देवाचे गोठणे' हे आत्मचरित्र लिहिले. हे मधु मंगेशांच्या 'तन्मय' मासिकात छापून आले. संपूर्ण मराठी समाजात या पुस्तकाने खळबळ उत्पन्न केली. दलित आत्मचरित्रात्मक कादंबरी म्हणून 'देवाचे गोठणे'ला अक्षर वाङ्मयात गौरवाचे स्थान लाभले. अनलंकृत भाषा, सत्यदर्शन, रेखीव, स्पष्ट चित्रदर्शी वास्तव हे या पुस्तकाचे विशेष म्हणता येतील. 'वेदनांचे वेद' हे विशेषण या पुस्तकाला बहाल केले गेले.

१९७२पासून २००५पर्यंत कोंडविलकरांनी दिवाळी अंकांसाठी कथा, कविता, कादंबऱ्या, बालकथा, बालकविता लिहिल्या. त्यांची आत्तापर्यंत एकूण सेहेचाळीस पुस्तके प्रकाशित झाली आहेत. 'मुक्काम पोस्ट देवाचे गोठणे', 'अजून उजाडायचं आहे', 'कळा त्या काळच्या', 'डाळं', 'अंधारातून प्रकाशाकडे', 'शापीत', 'हाताची घडी तोंडावर बोट', 'भूमिपुत्र', 'वेध', 'एक होती कातळवाडी', 'गुरुंसि आले अपारपण', 'देवदासी', 'काहिली' इत्यादी कादंबऱ्या, कथासंग्रह, लेख व 'छान छान गोष्टी', 'देशोदेशींच्या कथा', 'गौतमबुद्ध', 'महात्मा गांधी', 'महात्मा फुले', 'डॉ. बाबासाहेब आंबेडकर', 'स्वामी स्वरूपानंद', 'सम्राट अशोक', 'भारत आमचा देश आहे' ही मुलांसाठीची पुस्तके उल्लेखनीय आहेत.

‘मुक्काम पोस्ट देवाचे गोठणे’, ‘डाळं’, ‘हाताची घडी तोंडावर बोट’ या कादंबऱ्यांना महाराष्ट्र शासनाचा ‘सर्वोत्कृष्ट वाङ्मय’ पुरस्कार लाभला. ‘हाताची घडी तोंडावर बोट’ला महाराष्ट्र साहित्य परिषदेचा ‘दि.बा.मोकाशी’ पुरस्कार, ‘कळा त्या काळच्या’ या आत्मचरित्रात्मक कादंबरीला मुंबई मराठी ग्रंथ संग्रहालयाचा ‘कै.प्रा.वि.ह. कुलकर्णी’ पुरस्कार मिळाला.

‘मुक्काम पोस्ट देवाचे गोठणे’ या नाटकाला १९९४ ते २००३ या दहा वर्षांतल्या प्रकाशित झालेल्या सर्वोत्कृष्ट नाटकाचा पुरस्कार मिळाला व महानुभाव ग्रंथोत्तेजक पुरस्कारही मिळाला.

‘मुक्काम पोस्ट देवाचे गोठणे’ पुस्तकाचा फ्रेंच व हिंदी भाषांमध्ये अनुवाद प्रसिद्ध झाला आहे. हे पुस्तक व यातील काही उतारे महाराष्ट्र, गुजरात, गोवा, कर्नाटक राज्यांत शाळा व महाविद्यालये यांच्या अभ्यासक्रमांमध्ये लावले आहे. कोंडविलकरांच्या काही कथांचे व कवितांचे फ्रेंच, इंग्लिश, हिंदी, तामीळ, उर्दू भाषांमध्ये अनुवाद झाले आहेत. कोंडविलकरांच्या साहित्यावर बुलढाणा, औरंगाबाद, सांगली, कोल्हापूर, पुणे, लांजे येथील प्राध्यापकांनी प्रबंध लिहिले आहेत.

कोंडविलकरांनी ‘एक गाव एक पाणवठा’, ‘दलित चळवळ’, ‘दलित साहित्य चळवळ’ यांत सक्रिय सहभाग घेतला आहे. राजापूर तालुक्यातील अनेक गावांत पायपीट करून समाजपरिवर्तनाचे काम केले आहे. प्रतिकूल परिस्थितीतही मानसिक, सामाजिक, कौटुंबिक, आर्थिक स्तरांवर संघर्ष करून जीवनात यशस्वी कसे होता येते, याचे मौलिक उदाहरण म्हणजे कोंडविलकर होत.

– प्रा. संध्या टेंबे

**संदर्भ :**

*१. कोंडविलकर माधव; ‘कळा त्या काळच्या’; ग्लोरीया प्रकाशन, देवरूख; १९९०.*

*२. कोंडविलकर माधव; ‘मुक्काम पोस्ट देवाचे गोठणे’; मॅजेस्टिक बुक स्टॉल, मुंबई; १९७९.*

## कोगेकर, नारायण वासुदेव

☞ **मुख्य नोंद – विज्ञान खंड**

## कोठावळे केशव विष्णू

☞ **मुख्य नोंद – पत्रकारिता आणि ललितेतर साहित्य खंड**

## कोत्तापल्ले, नागनाथ लालूजीराव

**समीक्षक, कथाकार, कादंबरीकार**

**२९ मार्च १९४८**



१९६० नंतरच्या काळातील महत्त्वाचे मराठी साहित्यिक. कविता, कथा, दीर्घकथा, कादंबरी, ललित गद्य आणि समीक्षा अशा विविध वाङ्मयप्रकारांत दर्जेदार वाङ्मयनिर्मिती करणाऱ्या नागनाथ कोत्तापल्ले यांचा जन्म नांदेड जिल्ह्यातील मुखेड या गावी झाला. महाविद्यालयीन शिक्षण देगलूर येथे झाले. पदव्युत्तर शिक्षण मराठवाडा विद्यापीठ, औरंगाबाद, येथे झाले. बी.ए. आणि एम.ए. या दोन्ही परीक्षांत विद्यापीठात प्रथम क्रमांकाने उत्तीर्ण झाले. त्यासाठी अनुक्रमे डॉ.नांदापूरकर आणि कविवर्य मायदेव प्रतिष्ठाप्राप्त पुरस्कार मिळाले. एम.ए (मराठी) परीक्षेत विद्यापीठात सर्वप्रथम. कुलपतींच्या सुवर्णपदकाने सन्मानित. ‘शंकर पाटील यांच्या साहित्याचा चिकित्सक अभ्यास’ या विषयावर शोधप्रबंध लिहून १९८० साली पीएच.डी. पदवी संपादन केली.

१९७१ ते १९७७ या काळात बीड येथील महाविद्यालयात मराठीचे अधिव्याख्याता म्हणून काम केल्यानंतर डॉ.बाबासाहेब आंबेडकर मराठवाडा विद्यापीठाच्या प्रथम अधिव्याख्याता आणि नंतर प्रपाठक या पदांवर १९७७ ते १९९६ या काळात काम केले. १९९६ ते २००५ या कालावधीत पुणे विद्यापीठाच्या मराठी विभागात प्राध्यापक आणि विभाग प्रमुख म्हणून काम केले. २००५ सालापासून डॉ.बाबासाहेब

आंबेडकर मराठवाडा विद्यापीठाचे कुलगुरू झाले. व्यासंगी, अध्यापनकुशल, उपक्रमशील आणि विद्यार्थिप्रिय प्राध्यापक म्हणून लौकिक मिळवला.

डॉ. बाबासाहेब आंबेडकर मराठवाडा विद्यापीठाच्या विद्यार्थी कल्याण मंडळाचे संचालक आणि पुणे विद्यापीठाच्या डॉ. बाबासाहेब आंबेडकर अध्यासनाचे समन्वयक या पदांवरून त्यांनी उल्लेखनीय कार्य केले.

महाराष्ट्र राज्य मराठी विकास संस्था (मुंबई) आणि साहित्य अकादमी (दिल्ली) ह्या संस्थांच्या विविध समित्यांचे सदस्य म्हणून काम पाहिले. महाराष्ट्र राज्य साहित्य पुरस्कार समितीचे अध्यक्ष (१९८८-१९८९), महाराष्ट्र राज्य माध्यमिक आणि उच्च माध्यमिक शिक्षण मंडळाच्या मराठी अभ्यास मंडळाचे अध्यक्ष (१९९५-१९९७), पुणे विद्यापीठ, मुंबई विद्यापीठ, श्रीमती नाथीबाई दामोदर ठाकरसी विद्यापीठ, धारवाड, बनारस हिंदू विद्यापीठ, म.स.वि.वडोदरा इत्यादी विद्यापीठांच्या मराठी अभ्यास मंडळांचे सदस्य होते.

मराठवाडा साहित्य परिषदेचे (औरंगाबाद) कार्याध्यक्ष (१९८८-१९९५) महाराष्ट्र साहित्य परिषद, पुणे ह्या संस्थेचे २००१ पासून उपाध्यक्ष, महाराष्ट्रातील अनेक नामांकित साहित्यिक आणि शैक्षणिक संस्थांचे सदस्य, पदाधिकारी, अध्यक्ष या नात्याने कार्य केले. श्रीगोंदा येथे १९९९ साली झालेल्या ग्रामीण साहित्य संमेलनाचे आणि २००५ साली जालना येथे झालेल्या मराठवाडा साहित्य संमेलनाचे ते अध्यक्ष होते.

‘मूड्स’ हा कवितासंग्रह; ‘कर्फ्यू आणि इतर कथा’, ‘रक्त आणि पाऊस’, ‘संदर्भ’, ‘कवीची गोष्ट’, ‘सावित्रीचा निर्णय’, ‘देवाचे डोळे’ हे कथासंग्रह; ‘राजधानी’ हा दीर्घकथांचा संग्रह; ‘मध्यरात्र’, ‘गांधारीचे डोळे’, ‘प्रभाव’ या कादंबऱ्या; ‘पापुद्रे’, ‘ग्रामीण साहित्य: स्वरूप आणि बोध’, ‘नवकथाकार शंकर पाटील’, साहित्याचा अन्वयार्थ’, ‘मराठी कविता: एक दृष्टिक्षेप’, ‘साहित्याचा अवकाश’ हे समीक्षात्मक ग्रंथ प्रकाशित. याशिवाय ‘गावात फुले चांदणे’ (प्रौढ नवसाक्षरांसाठी लघुकादंबरी), ‘मराठी साहित्यसंमेलने आणि सांस्कृतिक संघर्ष’, ‘उद्याच्या सुंदर दिवसासाठी’ (ललित गद्य), ‘जोतीपर्व’ आणि काही अनुवादीत पुस्तकेही प्रकाशित झाली आहेत. ‘स्त्री-पुरुष तुलना’, ‘शेतकऱ्यांचा असूड’, ‘पाचोळा आणि दहा समीक्षक’, ‘निवडक बी रघुनाथ’ इत्यादी पुस्तकांचे संपादन केले आहे.

कोत्तापल्ले यांच्या पाच पुस्तकांना महाराष्ट्र शासनाचे पुरस्कार मिळाले. कोत्तापल्ले यांच्या साहित्यातून त्यांचे संवेदनशील, चिंतनशील, सामाजिक बांधीलकी मानणारे, परिवर्तनवादी व्यक्तिमत्त्व प्रकट होते. जीवनाच्या सर्वच क्षेत्रांतील मूल्यऱ्हासाच्या जाणिवेने व्यथित होणारे कोत्तापल्ले मूल्याधिष्ठित अशी पुरोगामी सामाजिक जाणीव प्रकट करणारे लेखन जसे करतात, तसेच व्यक्तिमनात निर्माण होणाऱ्या सुखदु:खात्मक भावतरंगांचे उत्कट आणि हळुवार चित्रण करणारे लेखनही करतात. सामाजिक, राजकीय, आर्थिक स्थित्यंतरांतून निर्माण झालेले प्रश्न आणि त्यांतून निर्माण होणाऱ्या कधी सफल तर बहुतेक वेळा विफल ठरणाऱ्या संघर्षांचे समर्थपणे केलेले वास्तवदर्शी चित्रण हाही कोत्तापल्ले यांच्या कथात्मक लेखनाचा उल्लेखनीय विशेष आहे. सामाजिक वास्तवाचे सजग भान असणारा हा लेखक त्यामुळेच समकालीन समाजजीवनाचे अस्वस्थ आणि अंतर्मुख करणारे प्रत्ययकारी चित्रण करण्यात यशस्वी ठरलेला आहे. कोत्तापल्ले यांच्या समीक्षालेखनातही या सामाजिक जाणिवेतून केल्या जाणाऱ्या विश्लेषणाला महत्त्वाचे स्थान मिळालेले आहे. प्रचलित परिभाषेत सांगावयाचे झाल्यास ‘साहित्यकृती कलात्मकतेचे भान ढळू न देता जीवनवादी भूमिकेतून समीक्षात्मक लेखन करणारा समीक्षक’ असे त्यांचे वर्णन करणे योग्य ठरेल.

– प्रा. डॉ. बाळकृष्ण कवठेकर

**संदर्भ :**

१. *परसावळे, भ. मा.; ‘नागनाथ कोतापल्ले’ ललित ऑगस्ट १९८३ .*
२. *कोतापल्ले नागनाथ; ‘आजोबा आणि काका’; तरंग-दिवाळी अंक १९९७.*

## कोलटकर, अरुण
**कवी**
**१ नोव्हेंबर १९३१ - २५ सप्टेंबर २००४**



अरुण कोलटकर यांचा जन्म कोल्हापूर येथे झाला. तेथेच मॅट्रिकपर्यंतचे शिक्षण झाले. पुढे मुंबईत आल्यावर त्यांनी चित्रकलेचे शिक्षण घेतले. जाहिरात क्षेत्रात नाव मिळविले. आजच्या मराठी कवींमधले महत्त्वाचे, ठळक नाव म्हणजे अरुण कोलटकर होय. मर्ढेकरांना गंगाधर गाडगिळांनी 'दुसरा केशवसुत' म्हटले, त्याप्रमाणे कोलटकरांना 'दुसरा मर्ढेकर' म्हणता येईल इतकी त्यांची कविता सातत्याने प्रयोगशील राहिली. इंग्रजी आणि मराठी अशा दोन्ही भाषांतून त्यांनी वैश्विक साहित्यातील आधुनिक प्रवाह जोडून घेतले. मराठीत अतिवास्तववाद तसा प्रयोगापुरताच राहिलेला आहे. मात्र कोलटकरांच्या कवितेत तो मानसिक गुंतागुंत घेऊन प्रकट होतो.

आजच्या जगण्यातली अर्थशून्यता, अमानुषता, वेदना, क्रौर्य, बेतालपणा, विरोधाभास भयावह आहे. या भयावहतेचे ठोक चित्रण कोलटकरांच्या कवितेत येते. अमानुष अशा महानगरी संस्कृतीत माणूस अधिकाधिक असुरक्षित होत जातो, त्याच्यावर निर्जीव वस्तूंचे सतत, चहूबाजूंनी आक्रमण होत असते, ही जाणीव कोलटकर विलक्षण प्रतिमांमधून व्यक्त करतात. तरसासारखे स्टूल, रानडुकरासारखी मुसंडी मारत येणारा रेडिओ, झडप घालणारे डोंगर, टोळासारखे धुणे वाळत घालायचे चिमटे, अशा प्रकारे अतिवास्तववादी प्रतिमांमधून एक गोठवून टाकणारे भय ते व्यक्त करतात. यंत्रयुग, माणसाच्या मूल भावनांचा झगडा (कामप्रेरणा, अस्तित्ववाद, नातेसंस्कार आणि विकृतींचे प्राबल्य आदी), मृत्यु-संकल्पना आणि अनुभूती यांच्या सीमारेषेवर चिरफाळलेले मन, नेणिवेच्या जगातील स्वप्नवत वाटणारे भासमय अनुभव या साऱ्याचे मूलभूत स्वरूप त्यांच्या कवितेत प्रकट होते. त्यांच्या कवितेची मांडणी सहज, सरल वाटत असतानाच जाणवते की त्यातला आशय भेदक आणि विलक्षण आहे. म्हणूनच त्यांची कविता आजच्या कवितेपेक्षा अधिक थेट, पृथगात्म आणि वैश्विक पातळीवर जाणारी अभंग आहे.

कोलटकरांच्या कवितेत काही विकृत वाटणारे शब्द किंवा अनागरी, अशिष्ट शब्द येतात; पण बहुतेक कवितांतून नागरी जीवनाचा भेदक वेध घेतलेला दिसतो. प्रामुख्याने मुंबई शहरातील व्यावहारिक बोलीभाषेतून तो घेतलेला आहे. त्यांची कविता ही स्वयंभू होती. मर्ढेकरोत्तर काळातील एक नवे वेगळेपण स्वीकारणारी त्यांची कविता सामान्य मराठी माणसांकडून अलक्षित राहिली, तरी त्यातील प्रयोगशीलतेने समीक्षकांना आणि विचारवंतांना आकर्षून घेतले. 'जेजुरी' हा त्यांचा इंग्रजी कवितांचा संग्रह आहे. त्याला कॉमनवेल्थ राष्ट्रकुल पुरस्कार लाभला. मराठी कवी वैश्विक पातळीवर पोहोचणे ही दुर्मीळ गोष्ट यामुळे घडली.

'भिजकी वही' (२००३) हा त्यांचा मराठी कवितासंग्रह असून या कवितांमधली प्रतिमासृष्टी मानवाच्या यंत्रजड आयुष्यात डोकावणारी आहे. शब्दांचे विरूपीकरण आणि भेदक प्रतिमासृष्टी यांमुळे ही 'भिजकी वही' रेखीव कवितांना शब्दरूप अक्षरपण देणारी ठरते. या 'भिजकी वही'ला साहित्य अकादमी पुरस्कार लाभला. २००३ मध्ये त्यांचा 'चिरीमिरी' हा कवितासंग्रह प्रसिद्ध झाला. काळाघोडा फेस्टिवलवर आधारीत 'कालाघोडा पोएम्स' आणि 'सर्पसत्र' (२००३) हे त्यांचे आणखी लक्षणीय संग्रह होत. 'प्रास प्रकाशन' संस्थेने कोलटकरांच्या कवितेला प्रकाश दाखवला. या कवितांचे संकलन 'द्रोण'मध्ये आहे. त्यांच्या मृत्यूनंतर लोकवाङ्मय गृहाने 'अरुण कोलटकरच्या कविता' ह्या संग्रहात त्यांच्या कविता एकत्रितपणे प्रसिद्ध केल्या.

– प्रा. सुहासिनी कीर्तीकर

**संदर्भ :**

१. *खानोलकर गं. दे (संपादक); 'मराठी वाङ्मयसेवक चरित्रकोश, खंड दुसरा', मराठी ग्रंथकार, अथेना पब्लिशर्स १०३९-१९४०.*

## कोलते, विष्णू भिकाजी

☞ मुख्य नोंद – पत्रकारिता आणि ललितेतर साहित्य खंड

## कोलारकर, रामचंद्र बाळकृष्ण

**संशोधक, संपादक, अनुवादक, कथासमीक्षक, कथासंकलक**

**१५ जून १९३७**



राम कोलारकर यांचा जन्म कोसरसार (तालुका वरोरा, जिल्हा चांदा) येथे झाला. शालेय शिक्षण वर्धा, हिंगणघाट व नागपूरच्या सदर भागातील वसतिगृह असलेल्या मिशनरी शाळेत झाले. कोलारकरांचे घराणे विदर्भातल्या श्रीमंत, मालगुजार घराण्यांपैकी एक समजले जाते. नागपूरच्या मॉरिस महाविद्यालयामधून इंटर आर्ट्स झाल्यावर त्यांनी काही काळ पत्रकार म्हणून काम केले. 'समाचार भारती'च्या नागपूर शाखेच्या– मराठी विभागाचे ते मुख्य उपसंपादक होते. 'सुषमा', 'नवलेखन' इत्यादी काही मासिकांचेही संपादन त्यांनी केले. नागपूरहून पुण्यात आल्यावर काही काळ त्यांनी 'विश्वमोहिनी' प्रकाशनाचे संपादक म्हणून काम केले.

कोलारकरांनी काही कथा, कविता, 'पुन्हा आज रात्री' (१९५९) ही अनुवादित कादंबरी, समीक्षात्मक व इतर वृत्तपत्रीय लेखन केले असले, तरी मराठी साहित्यविश्वातील सर्वोत्कृष्ट कथांचे, अनेक खंडांचे संकलक म्हणूनच ते परिचित आहेत. यासाठी मराठी कथा साहित्याचे, अन्य वाङ्मयाचे त्यांनी अखंड वाचन केले. इंग्रजी साहित्य वाचनाची गोडी त्यांना मिशनरी स्कूलमध्ये असताना निर्माण झाली होती.

मराठीतील सर्वोत्कृष्ट कथांचे संकलन खंड स्वरूपात करण्याची प्रेरणा त्यांना ब्रिटिश व अमेरिकन सर्वोत्कृष्ट कथांची वार्षिके संपादणाऱ्या एडवर्ट जे. ओब्रायन या संकलकामुळे मिळाली. त्यातही पुन्हा या प्रकल्पासाठी समीक्षक वा. ल. कुळकर्णी व पॉप्युलर प्रकाशनाचे रामदास भटकळ ह्यांच्याकडून योग्य दिशादर्शन मिळाले. दांडगे, सखोल वाचन करून आणि मूल्यमापनाचे स्वतःचे काही निष्कर्ष चोखंदळ दृष्टीने ठरवून त्यांनी उत्कृष्ट कथांची निवड केली. कथा साहित्याच्या या मंथनातूनच त्यांचे 'ऐतिहासिक', 'विनोदी', 'जागतिक' असे अनेक कथासंग्रह–खंड तयार झाले. 'सर्वोत्कृष्ट मराठी कथा' खंड पहिला १९६८ मध्ये, व खंड सोळावा १९८६ मध्ये प्रसिद्ध झाला. 'जगातील सर्वोत्कृष्ट कथा' खंड–१ (१९९३), 'सर्वोत्कृष्ट मराठी ऐतिहासिक कथा', खंड १ ते १० (१९८४–१९८८), सर्वोत्कृष्ट मराठी विनोदी कथा खंड १ ते २० (१९८५–१९८८).

याशिवाय त्यांनी गोपाळ गंगाधर लिमये (१९७०), चिंतामणी यशवंत मराठे (१९७५), कमलाबाई टिळक (१९७५) या तीन कथाकारांच्या निवडक कथांचे संकलन केले आहे. प्र. के. अत्रे, ना. सी. फडके, ग. दि. माडगूळकर इत्यादी मराठीतील नामवंत कथालेखकांच्या निवडक कथा; 'किर्लोस्कर', 'हंस' मासिकांतील वेचक कथा यांचेही संग्रह त्यांनी संपादित केले आहेत. हे सारेच कार्य त्यांनी त्या विशिष्ट वाङ्मय प्रकाराच्या कलात्मकतेचे भान ठेवून चोखंदळ समीक्षकाच्या भूमिकेतून केले आहे. या संकलन–संशोधनातून त्यांनी काही निष्कर्ष काढले आहेत. उदाहरणार्थ मराठीतील विनोदी कथेच्या यशस्वितेची कमान १८९८ पासून वर चढत गेली आहे. या प्रकल्पाच्या पहिल्या टप्प्यावर सुमारे २०० निवडक कथा रसिक वाचकांसाठी त्यांनी उपलब्ध करून दिल्या आहेत. सातत्याने गंभीर कथा लिहिणाऱ्यांच्या विनोदी कथा क्वचित दुर्लक्षित राहिल्या, अशाही लेखकांच्या विनोदी कथा या प्रकल्पामुळे रसिक वाचकांपुढे आल्या आहेत हे विशेष. काळाच्या वाटचालीप्रमाणे कथा व कथालेखक यांचा क्रम त्यांनी कथासंकलन करताना ठेवला. कोलारकरांचे हे निवडक कथांच्या संकलनाचे कार्य मराठी वाङ्मयेतिहासाच्या दृष्टीने अत्यंत मोलाचे आहे.

– प्रा. मंगला गोखले

**संदर्भ :**

१. बांदेकर, नारायण मुला :; *'जागतिक दर्जाचा एक ही कथाकार मराठीत झालेला नाही' ; नवशक्ति-२७ ऑक्टोबर १९८५.*

## कोल्हटकर, अच्युत बळवंत

☞ **मुख्य नोंद – पत्रकारिता आणि ललितेतर साहित्य खंड**

## कोल्हटकर, चिंतामण गणेश

☞ **मुख्य नोंद – नाटक खंड**

## कोल्हटकर, बाळ

*बाळकृष्ण हरी*

☞ **मुख्य नोंद – नाटक खंड**

## कोल्हटकर, श्रीपाद कृष्ण

**कवी, कथाकार, नाटककार, विनोदकार, समीक्षक**

**२९ जून १८७१ – १ जून १९३४**



श्रीपाद कृष्ण कोल्हटकराचा जन्म बुलढाणा येथे झाला. अकोला व पुणे या ठिकाणी बी.ए.(१८९१), एलएल.बी. (१८९७)पर्यंतचे शिक्षण घेतले आणि खामगाव, तेल्हारा, जळगाव, जामोद येथे त्यांनी वकिली केली.

इ.स. १८८८ मध्ये त्यांनी 'सुखमालिका' हे पहिले नाटक लिहिले. इ.स.१८९२ मध्ये त्यांनी 'विक्रमशशिकला' या नाटकाचे परीक्षण करणारा पहिला टीकालेख लिहिला. इ.स.१९०२मध्ये त्यांनी 'साक्षीदार' हा पहिला विनोदी लेख लिहिला. तो 'विविधज्ञानविस्तार'मधून प्रसिद्ध झाला. 'वीरतनय'(१८८४), 'मूकनायक' (१८९७), 'गुप्तमंजुषा' (१८९८-९९), 'मतिविकार' (१८९९), 'प्रेमशोधन' (१९०८), 'वधूपरीक्षा' (१९१२), 'सहचारिणी'(१९१७) 'परिवर्तन' (१९१७), 'जन्मरहस्य' (१९१८), 'शिवपावित्र्य' (१९२१), 'श्रमसाफल्य' (१९२८), 'मायाविवाह' (१९२८) ही नाटके त्यांनी लिहिली.

'तो दिन' ही त्यांची पहिली कविता प्रथम विविधज्ञानविस्तारामधून आणि नंतर मासिक मनोरंजनमधून प्रसिद्ध झाली. त्यानंतर मनोरंजनमधून त्यांच्या 'अनुपम सुख', 'खरी भाऊबीज', 'तुळशीचे लग्न', 'छत्रीचे उपकार', 'भयंकर जागृती', 'एका स्त्रीची पर्जन्यविषयक कल्पना', 'मृत अपत्याचे शेवटचे चुंबन', 'सुखकर जागृती', 'स्थित्यंतर', 'विलक्षण न्यायसभा' इत्यादी कविता प्रसिद्ध झाल्या.

१९१० साली त्यांनी 'गाणारे यंत्र' ही पहिली कथा लिहिली. पुढे बऱ्याच कालावधीनंतर त्यांनी 'बबीची तयारी' (१९३२), 'मोत्याचा पापा' (१९३३), 'आजोबांचे काम' (१९३४) या कथा लिहिल्या. त्यांच्या 'श्यामसुंदर' आणि 'दुटप्पी की दुहेरी' या कादंबऱ्यांचे प्रकाशन १९२५ मध्ये झाले. त्यांनी १९०२मध्ये साक्षीदार हा पहिला विनोदी लेख लिहिला. १९१०मध्ये 'अठरा धान्यांचे कडबोळे' आणि 'सुदाम्याचे पोहे' हे त्यांचे विनोदी लेखन प्रसिद्ध झाले. विनोदी लेखनाची परंपरा मराठी साहित्यात श्रीपाद कृष्ण कोल्हटकरांपासून सुरू झाली, असे मानले जाते. याच परंपरेत पुढे राम गणेश गडकरी, आणि नंतरच्या काळात चिं.वि. जोशी, आचार्य अत्रे, पु.ल. देशपांडे हे विनोदी लेखक आले. श्रीपाद कृष्ण कोल्हटकरांचे विनोदी लेखन 'विविधज्ञानविस्तार' आणि 'मनोरंजन' यांमधून प्रसिद्ध झाले. आपल्या उपहासगर्भ लेखनासाठी त्यांनी सुदामा, पांडुतात्या व बंडूनानन ही पात्रे निर्माण केली.

विनोदी लेखक म्हणून श्रीपाद कृष्ण कोल्हटकरांना आद्य स्थान आहे. नाटककार म्हणूनही त्यांची कारकिर्द लक्षणीय आहे. डेक्कन महाविद्यालयामध्ये शिकत असताना त्यांनी 'मृच्छकटिक' या संस्कृत नाटकात शकाराच्या विटाची भूमिका केली होती. त्या वेळी सुरू असलेल्या पारशी नाटकमंडळींच्या नाट्यप्रयोगाचे आणि त्यातल्या संगीताचे त्यांना आकर्षण वाटू लागले आणि

तसे नाट्य मराठी रंगभूमीवर आणावे, अशी इच्छा त्यांच्या मनात निर्माण झाली. ते पदवीधर विद्वान होते, लेखक आणि टीकाकार म्हणून त्यांना प्रसिद्धी मिळू लागली होती. भाषेवर त्यांचे प्रभुत्व होते. त्यांच्याजवळ शैक्षणिक पदवी होती, आणि व्यवसायिक प्रतिष्ठाही होती. या साऱ्यांच्या आधारावर त्यांचा किर्लोस्कर नाटक मंडळीत प्रवेश झाला. १९०० ते १९१० या दशकात विशी-पंचविशीतल्या तरुण विद्यार्थांना आणि वाङ्मयप्रेमी लोकांना नाटकांबद्दल विलक्षण आकर्षण होते. किर्लोस्करांच्या मृत्यूनंतर त्यांच्या नाटकमंडळीची धुरा वाहिली ती प्रामुख्याने देवल आणि श्रीपाद कृष्ण कोल्हटकर यांनी! आगरकरांच्या समाजसुधारणाविषयक विचारसरणीचे दर्शन कोल्हटकरांनी आपल्या नाटकांमधून घडवले. परंतु त्यांना नाटकाच्या संविधानकात गुंतागुंत निर्माण करण्याची हौस होती. त्यामुळे त्यांच्या नाटकांना रहस्यमय, चमत्कृतिजन्य असे स्वरूप मिळाले. एकीकडे या नाटकांमध्ये वेषांतर, नामांतर, प्रतिज्ञा या गोष्टी होत्या. तर दुसरीकडे आगरकरांच्या सुधारणावादाच्या प्रभावातून केशवपन, भ्रूणहत्या, पुनर्विवाह, अस्पृश्यता निवारण, जातिभेद-निवारण, घटस्फोट या गोष्टीही आल्या होत्या.

त्यांच्या 'प्रेमशोधन' या नाटकात राजाराणीचे कथानक होते, तर 'मूकनायक' नाटकात कल्पनारम्यतेचा आभास होता. 'मतिविकार' या नाटकातून त्यांनी मध्यमवर्गीयांचे चित्रण केले, 'जन्मरहस्य' नाटकात प्रतिलोम विवाह, प्रीतिविवाह, पुनर्विवाह यांचा विचार मांडला. 'शिवपावित्र्य' हे एकुलते एक ऐतिहासिक नाटक त्यांनी लिहिले. 'सहचारिणी' हे प्रहसन लिहिताना दोन बायकांचा दादला आणि त्यांची मुले यांची कथा रंगवली. एकीकडे चमत्कृतीजन्य कथानके रंगवताना कोल्हटकरांनी स्त्रीशिक्षण, भ्रूणहत्या, मद्यपान निषेध या सुधारणावादी विचारांना आपल्या नाटकांत स्थान दिले. नाटककार म्हणून श्रीपाद कृष्ण कोल्हटकरांचे नाव आदराने घेतले जाते.

समीक्षक म्हणूनही त्यांचे कर्तृत्व लक्षणीय आहे. समीक्षा-लेखनाने त्यांच्या लेखनाचा श्रीगणेशा झाला. १८९३ मध्ये 'विविधज्ञानविस्तार' मधून त्यांचा 'विक्रमशशिकला' या नाटकावरील टीकालेख प्रसिद्ध झाला. तसेच १९१२ साली 'मराठी कथात्मक वाङ्मय' या लेखात हरिभाऊंच्या कथालेखनाचा त्यांनी विस्ताराने परामर्श घेतला. त्यांचे साहित्यविषयक विचार चार प्रकारांनी व्यक्त झाले. १. पुस्तक परीक्षणे २. स्वतंत्र निबंध ३. संमेलनांमधून त्यांनी केलेली विविध भाषणे ४. काही पुस्तकांच्या प्रस्तावना. 'कोल्हटकरांचा लेखसंग्रह' यात त्यांचे एकवीस टीकालेख आहेत. नाटक, कथा, चरित्र यांवरील टीका तसेच काही वाङ्मयविषयक निबंध यांचा त्यात समावेश आहे. काही प्रस्तावनाही त्यामध्ये अहेत. परखडपणा, परिश्रमशीलता आणि इतर कलाविषयक विचार, वाङ्मय आणि मानवी जीवनाचे चिंतन ही त्यांच्या समीक्षा-लेखनाची वैशिष्ट्ये आहेत. मनोविकारास भावना म्हणतात. त्यांचा रसिकांच्या दृष्टीने विचार केल्यावर रस ही संज्ञा प्राप्त होते. श्रीपाद कृष्ण कोल्हटकरांनी आपल्या टीकालेखनातून हा रसविचार अधिक बारकाईने मांडला.

कोल्हटकरांनी समाजजीवनाचे अवलोकन आणि चिंतन अनेक अंगांनी केले होते. त्याला त्यांच्या विनोदबुद्धीची जोड मिळाली होती. त्यामुळेच त्यांचे उपहासप्रधान लेखन फार श्रेष्ठ दर्जाचे झाले. समाजात प्रचलित असलेले अनेक धार्मिक आचारविचार, गैरसमजुती कसे हस्यास्पद आहेत, हे त्यांनी दाखवून दिले. सुदाम्याच्या रूपातून सनातनी धर्माच्या अभिमान्यांचे, बंडूनानाच्या रूपातून अंधश्रद्धाळूपणाचे आणि भित्रेपणाचे दर्शन त्यांनी घडवले, तर समाजातल्या ना सनातनी ना सुधारकी अशा वृत्तींचे प्रतिनिधित्व पांडूतात्यांच्या पात्राने केले. ही पात्रे वाचकांना आपलीशी वाटू लागली. मनुष्यस्वभावातल्या विविध दौर्बल्यांचे दर्शनही त्यांनी सुदाम्याच्या रूपातून घडवले. कोट्या करणे हेही त्यांच्या लेखनाचे वैशिष्ट्य होते. 'साहित्यबत्तिशी' आणि 'सुदाम्याचे पोहे' हे त्यांचे विनोदी

लेखन मराठी साहित्यातला मानदंड ठरले. पाश्चात्त्य देशातील व्हॉल्टेअर, मोलिअर, स्टर्न, मार्क ट्वेन, पास्कल इत्यादी अनेक विनोदी लेखकांच्या साहित्याचा आभ्यास कोल्हटकरांनी केला होता. आणि त्यांचा प्रभावही कोल्हटकरांवर होता. जेरोम के. आणि मार्क ट्वेन यांच्यासारखे लेखन आपणही करावे, या हेतूने आपण १९०१ मध्ये 'साक्षीदार' हा पहिला विनोदी लेख लिहिला, असे त्यांनी 'आत्मवृत्त' या आपल्या आत्मकथनात म्हटले आहे.

महाराष्ट्र, महाराष्ट्राचा इतिहास आणि मराठी भाषा यांच्याविषयी कोल्हटकरांना अपार अभिमान होता. 'बहु असोत सुंदर संपन्न की महा। प्रिय आमुचा एक महाराष्ट्र देश हा' हे त्यांनी लिहिलेले महाराष्ट्र-गीत अजरामर झाले आहे. आजही आनेक सार्वजनिक कार्यक्रमांमधून ते अभिमानाने गायले जाते. हे गीत 'किर्लोस्कर' मासिकातून १९२६ च्या सुमारास प्रसिद्ध झाले.

संगीत आणि ज्योतिष हे त्यांच्या आवडीचे विषय होते. लहानपणी पक्षघाताचा झटका आल्यावर शरीर बेडौल आणि अनाकर्षक झाले. अशा वेळी वाचन, संगीत आणि ज्योतिषाचा अभ्यास हाच त्यांचा विरंगुळा बनला. १९०६ साली त्यांनी ज्योतिषशास्त्रविषयक ग्रंथाचे लेखन सुरू केले. ज्योतिषाला गणिताच्या अध्ययनाची जोड मिळाली आणि त्यांचा 'भारतीय ज्योतिर्गणित' हा निबंध दामोदर सावळाराम यंदे यांच्या ग्रंथमालेतून १९१३ साली प्रसिद्ध झाला. या ग्रंथामुळे ज्योतिषाच्या अभ्यासकांमध्ये त्यांना महत्त्वाचे स्थान प्राप्त झाले. आणि १९२० साली सांगली येथे भरलेल्या तिसऱ्या ज्योतिष संमेलनाचे अध्यक्षपद त्यांना मिळाले. यानिमित्ताने त्यांच्या ज्योतिष विषयक व्यासंगाचा आणि लेखनाचा गौरव झाला. १९२७ साली पुणे येथे भरलेल्या बाराव्या महाराष्ट्र साहित्य संमेलनाचे ते अध्यक्ष होते.

मार्मिक निरीक्षणशक्ती आणि डोळस वाचन असणाऱ्या श्रीपाद कृष्ण कोल्हटकरांनी समीक्षेच्या आणि विनोदी साहित्याच्या क्षेत्रात जी पायवाट निर्माण केली, तिचाच पुढे राजरस्ता झाला.

– डॉ. जोत्स्ना कोल्हटकर

**संदर्भ :**

१. *कुलकर्णी वा. ल.; 'श्रीपाद कृष्ण वाङ्मयदर्शन' ; पॉप्युलर बुक डेपो; १९५९.*
२. *खानोलकर गं. दे.; 'साहित्य सिंह'; भारत गौरव ग्रंथमाला, १९७२.*
३. *जोग रा. श्री., संपादक; 'मराठी वाङ्मयाचा इतिहास' महाराष्ट्र राज्य साहित्य खंड ५ भाग, १ व २ – संस्कृती प्रकाशन; १९७३.*
४. *मराठी विश्वकोश खंड ४; महाराष्ट्र राज्य मराठी विश्वकोश निर्मिती मंडळ; १९७६.*

## कोसंबी, दामोदर धर्मानंद

☞ **मुख्य नोंद – पत्रकारिता आणि ललितेतर साहित्य खंड**

* * *

# ख





## खरात, शंकरराव रामा

**कथाकार, कादंबरीकार**

**१८ जुलै १९२१ - ९ एप्रिल २००१**



शंकरराव खरातांचा जन्म सांगली जिल्ह्यातील आटपाडी या खेडेगावात झाला. ते हिंदू धर्मातील अस्पृश्य जातीतील. त्यांचे वडील लाकूडफोड्या रामा महार म्हणून गावाला परिचित होते. ग्रामव्यवस्थेतील ते वतनी महार. विषमतेच्या वातावरणाशी सामना करीत, अस्पृश्यतेचे चटके खात प्राथमिक शाळेत (जी कलेश्वराच्या देवळात होती) ते शिकू लागले. येथूनच ते चौथी उत्तीर्ण झाले. त्यानंतर मॅट्रिकपर्यंतचे शिक्षण औंध येथे झाले, तर फर्गसन महाविद्यालय पुणे येथून बी.ए. झाले. त्यानंतर १९४७-४८ साली वकिलीची परीक्षा उत्तीर्ण होऊन, वकिली व्यवसायास प्रारंभ केला. याच सुमारास १९५५ साली त्यांचा विवाह झाला. त्यांच्या पत्नी डॉक्टर आहेत.

शंकरराव खरातांचा वकिलीचा व्यवसाय होता. तो व्यवसाय त्यांनी सामाजिक जाणिवेतूनच निवडला व समाजऋण म्हणून आयुष्यभर निष्ठापूर्वक जोपासला. दलित जीवनाच्या भयंकर झळा त्यांनी प्रत्यक्ष भोगल्या होत्या. त्या भोगत असतानाच महारांवर लावल्या जाणाऱ्या चॅप्टर केसेसमुळे ते हैराण झाले. चॅप्टर केस लढविण्यासाठी महारांजवळ वकिलास देण्यासाठी पैसा नसायचा; परिणामी महारांचा पराभव अटळ असे. आपल्या बांधवांना या खटल्यांतून न्याय मिळवून देण्याच्या उच्च हेतूने खरातांनी वकिलीची परीक्षा दिली व वकिली व्यवसायास प्रारंभ केला. बाबासाहेब आंबेडकरांच्या वैचारिक प्रभावामुळेही त्यांना हा व्यवसाय अधिक महत्त्वाचा वाटला. वकिली करत असताना दलितांप्रमाणे विमुक्त-भटक्या जमातींशीही त्यांचे संबंध आले. त्यांच्यावर लादले जाणारे खोटे गुन्हे व त्यांची आत्यंतिक दैन्यावस्था पाहून ते अत्यल्प मोबदल्यात अथवा विनामूल्य मार्गदर्शन करायचे. त्यामुळे उपेक्षितांच्या प्रश्नांची सोडवणूक करण्यास मोठा हातभार लागला व खरातांविषयी त्यांच्या मनात विश्वासाची व आदराची भावना निर्माण झाली. शेड्युल्ड कास्ट फेडरेशनपासून ते विमुक्त भटक्यांच्या संघटना व सक्रिय सहभागापर्यंत त्यांची कार्यकक्षा विस्तारत गेली.

खरातांच्या जीवनविषयक जडणघडणीत बाबासाहेब त्यांचे त्यांचे दिव्याप्रमाणे मार्गदर्शक ठरले... त्यामुळेच ते बाबासाहेबांच्या विचारांचा प्रसार करणारे एक कार्यकर्ते बनले. उपेक्षित जगाला न्याय मिळवून देण्याच्या व्रतस्थपणातून त्याचा प्रत्यय येतो. विद्यार्थी असतानाच त्यांना सामाजिक कार्याची आवड होती. वकिली व्यवसायामुळे ती फलद्रूप झाली. याच कालावधीत त्यांनी जबाबदारीची विविध पदेही सांभाळली.

१९४२च्या भारत छोडो आंदोलनात भूमिगत कार्यकर्त्यांना सायक्लोस्टाइल केलेली पत्रके ठरलेल्या खासगी जागी पोहोचवण्याचे काम त्यांनी केले. १९५४साली मुंबई, नायगाव येथील पुरंदरे स्टेडिअमवर दलित फेडरेशन कार्यकर्त्यांच्या मेळाव्यात ते सहभागी झाले. १९५४पासून शेडयुल्ड कास्ट फेडरेशनचे ते संघटक कार्यवाह झाले. १९५८-५९ मध्ये 'प्रबुद्ध भारत'चे संपादक, पी. एन. राजभोज यांच्या 'दलितबंधू'चे ते सहसंपादक झाले. १९५२पासून

कामगार चळवळीत त्यांचा प्रवेश झाला. त्याचे कार्यवाह म्हणूनही त्यांनी काम सांभाळले. याशिवाय महाराष्ट्र साहित्य परिषद, पुणे ह्या संस्थेच्या कार्यकारिणीचे सदस्य, डायरेक्टर, बँक ऑफ इंडिया ऑफिसर्स सिलेक्शन कमिटी, बँक ऑफ महाराष्ट्राचे अध्यक्ष, रेल्वे सर्व्हिस कमिशन, मुंबई या संस्थेचे अध्यक्ष पुणे विद्यापीठाचे सदस्य इत्यादी महत्त्वाची पदे त्यांनी भूषविली. त्यांच्या कामगिरीचा गौरव म्हणून १० जानेवारी १९७५ला मराठवाडा विद्यापीठाचे कुलगुरू म्हणून त्यांची नियुक्ती झाली. १९८४ साली जळगाव येथे झालेल्या अखिल भारतीय मराठी साहित्य संमेलनाचे अध्यक्षपद त्यांनी भूषविले.

अशा विविध सामाजिक कार्यांशी निगडित असतानाच त्यांचा व्यासंगही वाढत गेला. तथाकथित लेखकांच्या दलित जीवनावरील कथा-कादंबऱ्या वाचनात येऊ लागल्या; पण त्या उपऱ्या, कृत्रिम अनुभवांवर आधारित असल्याचे जाणवू लागले. म्हणून आपणच आपले अनुभव लोकांपुढे मांडण्याचा निर्धार त्यांनी केला. या जाणिवेतूनच खरातांनी लेखन सुरू केले व १९५६-५७ च्या 'नवयुग' दिवाळी अंकात 'सतूची पडीत जमीन' ही पहिली कथा प्रसिद्ध झाली. तर १९५७-५८च्या दिवाळी अंकात 'माणुसकीची हाक' ही कादंबरी प्रसिद्ध झाली. तेव्हापासून शेवटच्या क्षणापर्यंत त्यांची साहित्यसाधना अखंडपणे चालू राहिली. प्रतिनिधित्वाच्या काळात आचार्य अत्रे ह्यांनी त्यांना सतत प्रोत्साहन दिले. आचार्य अत्रेंच्या प्रोत्साहनाने अंकुरलेल्या साहित्यबीजाचा आता वटवृक्ष झाला व कथा, कादंबरी, वैचारिक, सामाजिक, ललित, समीक्षात्मक, चरित्रात्मक, आत्मकथनात्मक, ऐतिहासिक अशा बहुरूपी फळाफुलांनी तो बहरत राहिला.

**उपेक्षितांच्या वेदनेचे भाष्यकार**

शंकरराव खरात सर्वार्थाने उपेक्षितांच्या वेदनेचे भाष्यकार होते. त्यासाठीच त्यांची प्रतिभा फुलली, बहरली. त्यामुळे मराठी कथा समृद्ध करण्याचे मोठे श्रेय त्यांना आहे. 'बारा बलुतेदार' हा त्यांचा कथासंग्रह १९५९ साली प्रसिद्ध झाला. या कालावधीत ग्रामीण साहित्याची चळवळ बहरू लागली होती. माडगूळकरादिक कथा-कादंबरीकार ग्रामीण जीवनाचे चित्रण करीत होते. मराठी प्रतिभावंतांना नवे आकाश गवसल्याची साक्ष पटत होती. पण सारे आकाश अजून त्यात प्रतिबिंबित झाले नव्हते. गावगाड्यातील गावकुसाबाहेरील व उघड्या आकाशाखालील पठारी जीवन अजून त्यापासून कोसो अंतरावर होते. जे होते ते लेखनपूर्व आत्मनिष्ठेच्या अभावाचे अपत्य. काही महत्त्वाची नावे सोडल्यास बहुतांश लेखन असेच. पण याच सुमारास खरात, अण्णाभाऊ, गाडगीळ, माडगूळकर, गोखले यांसारख्या काही समकालीन लेखकांनी मराठी वाङ्मयाचा कायाकल्प करून टाकला. अण्णाभाऊंनी व खरातांनी तर आपल्या प्रत्यक्ष अनुभवातून लेखन-प्रपंच सुरू केला नि ग्रामीण कथेला खऱ्या अर्थाने व्याप्तीचे वेध लागले.

१९५९ पासून १९८७ पर्यंत खरातांचे अकरा कथासंग्रह प्रसिद्ध झाले होते. ते सर्वच उपेक्षितांच्या जीवनाला, त्यांच्या अन्यायाला, वेदनेला, गुन्हेगारीला अन् गुन्हेगारी प्रवृत्तीला हात घालतात. त्यांच्या वेदनेचे अंतरंग उलगडण्याचे यशस्वी प्रयत्न करतात.

समाजव्यवस्थेचे बळी ठरलेले गाव कामगार, त्यांची अवस्था, परंपरेच्या जाचाखाली चिरडले जात असताना नि दारिद्र्याचा शाप भोगताना भुईसपाट झालेल्या तरीही परिस्थितीला शरण जाऊन अंधारवाटेचे निमूट बळी झालेल्या मानव समूहांच्या या कथा आहेत. त्या साकार करताना भयाणभूत वास्तवाचा प्रत्यय आपल्याला येतो. खरात आपली मते पात्रांवर लादत नाहीत. त्यांना बोलू देतात, मन मोकळे करू देतात. तशी कथा खुलत जाते आणि फुलत जाते. परिणामी कथेची आशयघनता शब्दागणिक वाढत जाऊन आगळ्या वेदनांच्या अनुभवाने वाचक भारावून जातो. ही कथा मनाला सारखी टोचणी लावते. बेचैन करते. या संदर्भात डॉ. इंदुमती शेवडे म्हणतात, ''त्यांची कथा संदेश देते. विदारक भाष्य करते. ती नेटकी, आटोपशीर व एकेरी बांधणीची असते,

मथळ्यापासून अखेरपर्यंतचे संवाद सुटसुटीत व नेमके असतात व एकूणच कथा कलात्मक असते.'' तर वा.ल कुळकर्णी यांनी खरातांच्या कथेवर प्रकाश टाकताना म्हटले आहे की, ''खरातांच्या कथेत प्रामाणिकपणा आहे, वास्तवाची विलक्षण कदर आहे, वर्णनाचा बारकावा आहे, अनुभूतीची धार आहे.''

**व्यापक आणि संयमी चित्रणी**

शंकरराव खरात विद्यार्थी असतानाच डॉ. बाबासाहेब आंबेडकरांच्या विचारांनी झपाटले गेले. पुढे त्यांचा प्रदीर्घ सहवासही त्यांना लाभला. त्यामुळे खरातांची वाङ्मयीन जाण परिपक्व बनली. परिणामी फक्त गावकुसाबाहेरील अस्पृश्यांची व्यथा चितारीत न बसता गाव शिवेपलीकडे गुन्हेगार व भटक्या जमातींचे जीवनही साकार करू लागले. बारा बलुतेदारांच्या जीवनाचा वेध घेताना मांग, महार, रामोशी, कुंभार, चांभार, कोळी, परीट, न्हावी, सुतार, लोहार सोनार, गुरव या ग्रामसंस्थेशी बांधलेल्या; पाटील, पांडे, सवर्ण या उच्चवर्णीयांच्या जाचाने त्रस्त झालेल्या; दारिद्रय, अंधश्रद्धा अज्ञान, अशिक्षितपणा यांनी नखशिखांत नागविलेल्या मानवसमाजाप्रमाणेच उचल्या, वैदू, माकडवाला, बेलदार, कैकाडी, मांगगारुडी, भामटी, गारुडी, पारधी अशा कितीतरी उपेक्षित गुन्हेगार जातींच्या वेदनेला ते मूर्तरूप देतात. स्वातंत्र्य मिळाले, प्रत्येकाला प्रगतीच्या वाटा मोकळ्या झाल्या; तरी आजही अनेक जीव प्रगतीपासून दूरच आहेत. त्यांच्या भाळावर कोरलेला गुन्हेगारीचा शिक्का अजूनही पुसला गेला नाही. कुटुंबाची वाताहत, तुरुंगाच्या वाऱ्या, पोलिसी अत्याचाराने येणारे अपंगत्व, बायका-मुलांचा आक्रोश हे सारे खरातांच्या कथेत ओतप्रोत भरले आहे. त्यांची वेदना शब्दबद्ध करताना खरातांची लेखणी गतिमान होत जाते व ती विलक्षण तेजाने तळपत असल्याची साक्ष पटते. अन्यायग्रस्त दलितांच्या व भटक्या स्त्री यांच्या त्यांनी चितारलेल्या जीवनसंघर्षाने तर वाचक मंत्रमुग्ध होतो. लाचारगती जीवनामुळे शरीरविक्रय करणारी व त्याच्याविरुद्ध संघर्ष करत पुढे जाणारी प्रौढा नि कुस्करल्या जाणाऱ्या अगतिक कळ्या म्हणजे वाचकांना सुन्न करणारी कथा. पण खरातांचा संयम ढळत नाही. त्यांच्या कथेत कुठेही उघडे-नागडे चित्रण नाही. अतिरंजित संवाद नाहीत. शिवराळपणा नाही की आक्रस्ताळेपणा नाही. अधूनमधून विद्रोहाच्या ठिणग्या उठतात पण त्यांचा प्रत्यय सररास येत नाही. खरातांच्या संयमी व्यक्तिमत्त्वाचा तो प्रभाव असावा.

ग्रामीण साहित्याची चळवळ भरभराटीत असतानाच खरातांनी लेखनकार्यास प्रारंभ केला. याच दरम्यान म्हणजे १९६० च्या सुमारास दलित साहित्याची चळवळही नावारूपास आली. डॉ. आंबेडकरांच्या युयुत्सू विचारातून प्रेरणा घेऊन दलित साहित्य उदय पावले. त्याच्या देदीप्यमान रूपाने मराठी विश्व चकित झाले. त्यातील आकांताने आणि विद्रोहाने तर मराठी साहित्याला नावीन्य बहाल केले. समता, स्वातंत्र्य, बंधुता व न्याय या तत्त्वांचा पुरस्कार करीत मराठी साहित्याच्या विचारपीठावर ते रुजू झाले व उपेक्षितांच्या अनुभवांना साद घालू लागले. या वाङ्मयीन चळवळीपासून स्फूर्ती घेऊन उपेक्षित जगातील अनेक लेखक आपले विदारक अनुभव अभिव्यक्त करू लागले.

**समन्वयाची कामगिरी**

दलित साहित्याच्या जन्मापूर्वीच खरातांच्या लेखन-प्रवासास प्रारंभ झाला होता. त्यामुळे ग्रामीण व प्रादेशिक साहित्याशी त्यांच्या साहित्याची तुलना होऊ लागली. तसेच अस्पृश्य वर्गातील व आंबेडकरी प्रभावातील असल्यामुळे दलित साहित्याशीही त्यांचे नाते जोडले गेले. पण खरातांनी समीक्षकांना संभ्रमात टाकले. कारण कुण्या एका प्रवाहाशी त्यांचे साहित्य बांधील राहिले नाही. ग्रामीण कथेचा बाज राखीत, दलित साहित्याच्या कथा विस्तारत त्यांचे साहित्य सर्वार्थाने आंबेडकरी विचारांचे पाईक होऊ लागले. त्यामुळे 'या दोन्ही वाङ्मयीन प्रवाहांशी समन्वय साधून त्यांच्यातील दुवा सांधण्याची मौलिक कामगिरी खरातांनी केली.' या विधानाची साक्ष त्यांची कथा पटविते.

नवयुग १९५७-५८ च्या दिवाळी अंकात 'माणुसकीची हाक' ही कादंबरी प्रसिद्ध झाली आणि

शंकरराव खरात
ब्लॉक नं. २२, विजय हौसिंग सोसायटी
विद्यापीठ रोड, पुणे १६

"रामानं दोंडीची हाळी दिली. त्याबरोबर डफड्याचा डबऽडबऽऽ डबऽऽऽ असा गंभीर आवाज झाला. दोंडीनं वातावरणात अधिकच उदासी भरली. टिटवी चिरकल्यागत आवाज गगनाला भेदून गेला. दोंडीनं गल्लीबोळातील माणसं जागवली. आपापल्या घरातून उंबऱ्यात आली. कुणी दारात आले. कुणी चिंताग्रस्त चेहऱ्याने रामाच्या हाळीच्या रोखाने एक टक पाहू लागले." (दोंडी)

खरातांच्या कादंबरीलेखनाची मुहूर्तमेढ रोवली गेली. तेव्हापासून अखेरपर्यंत त्यांचे कादंबरीलेखन अव्याहत सुरू होते. त्यांच्या कादंबऱ्यांचे विषयही उपेक्षित समाज, भटके, गुन्हेगार, झोपडपट्टी व वकिली व्यवसाय ह्यांवर आधारित असेच आहेत. आजपर्यंत त्यांच्या दहा कादंबऱ्या प्रसिद्ध झाल्या आहेत व विपुल कादंबरीलेखन त्यांनी केले.

१९८१ साली खरातांचे 'तराळ-अंतराळ' हे स्वकथन प्रसिद्ध झाले; तेव्हा त्यांच्या वयाला साठ वर्षे पूर्ण झाली होती. साठ वर्षांच्या प्रदीर्घ अनुभवांचा हा आलेख. अस्पृश्य जीवनाच्या अनुभवजन्य चित्रणापासून सामाजिक जीवनापर्यंत आणि प्रगतीच्या व मानसन्मानाच्या अत्युच्चपदावर पोहोचेपर्यंतच्या, वाचकांना बेचैन करणाऱ्या प्रवासाचा तो शब्दरूप आविष्कार! बाबासाहेबांपासून प्रेरणा घेऊन प्रकाशाच्या वाटेने निघालेल्या मानवसमूहाची काहाणी! स्वतःची जीवनकथा सांगता-सांगता आपल्या समाजाचीच, अस्पृश्य जीवनाचीच कथा त्यांनी सांगितली. परिणामी ती 'स्टोरी ऑफ दी अनटचेबल्स' झाली. याचा प्रत्यय प्रस्तुत स्वकथनातून तर येतोच; पण एक अस्पृश्य-तरळाचा पोर संधी मिळाल्यास कुलगुरुपदाच्या अंतराळापर्यंत झेपावू शकतो, याचीही ती कहाणी आहे. म्हणूनच 'तराळ-अंतराळ'ने मराठी विश्वात प्रतिष्ठेचे स्थान निर्माण केले; व विविध पुरस्कारांनी त्याचा गौरव केला. समीक्षकांनीही त्याचे भरघोस स्वागत केले. 'तराळ-अंतराळ'मधून सुटलेले दुवे सांधण्याचा प्रयत्न म्हणजे १९८९ साली प्रसिद्ध झालेले 'जागल्या' हे पुस्तक होय.

खरातांनी विपुल वाङ्मय-निर्मिती केली. त्यांचे चरित्रबंधात्मक लिखाण म्हणजे 'डॉ. बाबासाहेब आंबेडकरांच्या सहवासात' (१९८२), 'डॉ. बाबासाहेब आंबेडकर यांची आत्मकथा' (१९८७) हे ग्रंथ होत. बाबासाहेबांचे युयुत्सू व्यक्तिमत्त्व, त्यांची समाजनिष्ठा, समता-स्वातंत्र्य मूल्यावरील विश्वास, त्यांचे मानव-मुक्तीचे प्रयत्न यांचा वेध यातून घेतला आहे. तर 'अस्पृश्यांचा मुक्तिसंग्राम', 'डॉ. बाबासाहेब आंबेडकरांचे धर्मांतर', 'आज इथं उद्या तिथं', 'दलित साहित्याचे वेगळेपण', 'महारांचा इतिहास', 'भटक्या-विमुक्त जमाती व त्यांचे प्रश्न' असे दर्जेदार वैचारिक लेखनही त्यांनी केले. यामागे सखोल अनुभवांचा आधार आहे, सामाजिक तळमळ आहे. त्या तळमळीतून व आंबेडकरी निष्ठेतून बाबासाहेबांच्या पत्रांचे संपादनही त्यांनी केले.

असे हे विविध आयामी व्यक्तिमत्त्व, अनुभवी कार्यकर्ता, सच्चा आंबेडकरवादी प्रतिभावंत, संयमशील कलाकृतीचा सर्जक. 'स्वातंत्र्योत्तर कालखंडातील एक बहुपैलू, साहित्यिक विचारवंत व सामाजिक कार्यकर्ता' अशा शब्दांत रा. ग. जाधवांनी त्यांचा उचित गौरव केला. अशा उपेक्षितांच्या वेदनांचा हा भाष्यकार वृद्धापकाळाने ९ एप्रिल २००१ रोजी कालवश झाला.

– डॉ. वासुदेव डहाके

**संदर्भ :**

१. *खरात शंकरराव 'तराळ-अंतराळ'; कॉंटिनेन्टल प्रकाशन; १९८१.*

२. *'गावकी भावकी गावशिवार'; इंद्रायणी साहित्य प्रकाशन, पुणे; २००२.*

## खरे, वासुदेव वामनशास्त्री

☞ **मुख्य नोंद – नाटक खंड**

## खरे, सुरेश विनायक

☞ **मुख्य नोंद – नाटक खंड**

## खांडेकर, विष्णू सखाराम

**कादंबरीकार, कथाकार, लघुनिबंधकार**

**११ जानेवारी १८९८ – २ सप्टेंबर १९७६**



सांगली येथे जन्मलेल्या खांडेकरांचे मूळ नाव गणेश आत्माराम खांडेकर होय. १९११ साली सांगली संस्थानात मुन्सफ असलेल्या त्यांच्या वडिलांचे निधन झाले. कुटुंबाची आर्थिक परिस्थिती खालावल्याने कोकणातील चुलत चुलत्यांनी, सखाराम रामचंद्र खांडेकरांनी दत्तक घेतल्यामुळे त्यांचे नामकरण वि. स. खांडेकर असे झाले.

१९१३ साली मॅट्रिकच्या परीक्षेत आठव्या क्रमांकाने उत्तीर्ण झाल्यावर महाविद्यालयीन शिक्षण घेण्यासाठी ते पुण्यास फर्गसन महाविद्यालयामध्ये दाखल झाले. पुण्यास त्यांचा राम गणेश गडकऱ्यांशी परिचय झाला. बा. ब. पटवर्धन, डॉ. गुणे यांच्यासारख्या शिक्षकांनी त्यांच्यातील साहित्यप्रेम वाढीस लावले. शिवाय बालकवी, गणपतराव बोडस, अच्युतराव कोल्हटकर, का. र. मित्र या साहित्य व नाट्य क्षेत्रांतील मान्यवरांशी त्यांची ओळख झाली.

दत्तक संपत्तीचा वारसा मिळूनही खांडेकरांना आर्थिक लाभ झाला नाही. प्रकृती अस्वास्थ्यामुळे ते इंटरपर्यंतच शिक्षण घेऊ शकले. दत्तक पित्याला खांडेकरांविषयी फारसे प्रेम नव्हते. बहिणीच्या मायेमुळे खांडेकर कोकणात सावंतवाडीला राहू लागले. १९२० नंतर खांडेकरांचे लेखन सुरू झाले. राम गणेश गडकरी यांच्या प्रथम स्मृतिदिनी खांडेकरांचा 'हा हन्त हन्त' हा लेख 'नवयुग'मध्ये प्रसिद्ध झाला. १९२० साली खांडेकर 'ट्युटोरियल इंग्लिश स्कूल' या शिरोड्याच्या शाळेत शिक्षक म्हणून रुजू झाले. खांडेकरांच्या आयुष्यात आता नवे पर्व सुरू झाले. १९३८ पर्यंत म्हणजे अठरा वर्षे खांडेकरांनी प्रथम शिक्षक आणि नंतर मुख्याध्यापक म्हणून काम केले. मागासलेल्या खेड्याची प्रगती घडवावी आणि गोरगरीब मुलांना शिकवून त्यांच्या व्यक्तिमत्त्वाचा विकास करावा, ह्या हेतूने शिरोड्यास आलेल्या खांडेकरांनी कष्टकरी, खालच्या वर्गातील मुलांकडे सहानुभूतीने, प्रेमाने आणि करुणेच्या भावनेने पाहिले.

**लेखन बहरले**

१९२० ते १९३८ हा वीस वर्षांचा काळ खांडेकरांच्या लेखनातील बहराचा काळ होता. श्रीपाद कृष्ण कोल्हटकरांच्या मार्गदर्शनाखाली त्यांनी गंभीर लेख, विनोदी लेख, कविता, पुस्तक परीक्षणे या स्वरूपाचे लेखन 'नवयुग', 'उद्यान' व 'महाराष्ट्र साहित्य' या नियतकालिकांसाठी केले. तसेच त्या काळात 'वैनतेय' साप्ताहिकाच्या संपादनात मे. द. शिरोडकरांना खांडेकर साहाय्य करू लागले. 'वैनतेय'मध्येच त्यांचा पहिला लेख प्रसिद्ध झाला. गं. दे. खानोलकरांच्या प्रेरणेने खांडेकरांनी याच सुमारास 'रंकाचे राज्य' हे संगीत नाटक, 'हृदयाची हाक' ही पहिली कादंबरी ह्यांचे लेखन केले.

१९३५ साली त्यांच्या साहित्यिक जीवनात अनपेक्षित परिवर्तन घडले. विनायक कर्नाटकी आणि बाबूराव पेंटर यांनी सुरू केलेल्या 'हंस पिक्चर्स' ह्या संस्थेसाठी चित्रपटांच्या पटकथा लिहून द्यायला खांडेकरांनी सुरुवात केली. शिरोडे येथील अध्यापन व्यवसाय सोडून खांडेकर लेखनासाठी कोल्हापूरला आले आणि स्थायिक झाले. शिक्षक म्हणून काम करीत असताना त्यांचे इंग्रजी व मराठी वाचन सातत्याने सुरू होते. जीवनातील दारुण अनुभवांना भिडण्याची ताकद, सूक्ष्म निरीक्षणशक्ती, अंगभूत ध्येयवाद, भाषेची लाभलेली देणगी, मानवतावादी समाजप्रवण भूमिका या गुणांमुळे खांडेकरांनी कथा,

रूपककथा, लघुनिबंध, कादंबरी, पटकथा, वैचारिक आणि समीक्षापर लेख असे विविध प्रकारचे लेखन केले.

१९३० पासून खांडेकर कादंबरीलेखनाकडे वळले. 'हृदयाची हाक' (१९३०), 'कांचनमृग' (१९३१), 'उल्का' (१९३३), 'दोन-ध्रुव' (१९३४), 'हिरवा चाफा' (१९३८), 'दोन मने' (१९३८), 'रिकामा देव्हारा' (१९३९), 'पांढरे ढग' (१९३९), 'सुखाचा शोध' (१९३९), 'पहिले प्रेम' (१९४०), 'जळलेला मोहर' (१९४१), 'क्रौंचवध' (१९४२), 'अश्रु' (१९५३), 'ययाति' (१९३९), 'अमृतवेल' (१९६७), 'सोनेरी स्वप्ने भंगलेली' (१९७७) अशा कादंबऱ्या लिहिल्या.

१९३६ ते १९६१ या काळात खांडेकरांचे १२ लघुनिबंधसंग्रह प्रसिद्ध झाले. ते पुढीलप्रमाणे आहेत. 'वायुलहरी' (१९३६), 'चांदण्यात' (१९३८), 'अविनाश' (१९४१), 'मंजिऱ्या' (१९४४), 'गोकर्णीची फुले' (१९४४), 'कल्पलता' (१९४६), 'हिरवळ' (१९४७), 'तिसरा प्रहर' (१९४८), 'मंझधार' (१९५९), 'रिमझिम' (१९६१), 'रंग आणि गंध' (१९६१), 'रेषा आणि रंग' (१९६१).

खांडेकरांनी कथा आणि रूपककथासुद्धा लिहिल्या; व्यक्तिचित्रणात्मक लेखन केले; पुस्तकांना प्रस्तावना लिहिल्या. त्यांचे हे लेखन पुढील पुस्तकांत समाविष्ट आहे. 'वनभोजन' (१९३५), 'धुंधुर्मास' (१९४०), 'फुले आणि काटे' (१९४४), 'जीवनकला' (१९४४), 'गोफ आणि गोफण' (१९४६), 'इंद्रधनुष्य' (१९५८), 'रेषा आणि रंग'(१९६१), 'ते दिवस ती माणसे' (१९६१), 'अभिषेक' वेगवेगळ्या संमेलनांच्या अध्यक्षपदांवरून केलेल्या भाषणांचा संग्रह (१९६३).

**तत्त्वप्रधान चित्रपटकथा**

मराठीत मोठ्या प्रमाणावर रूपककथा लिहिणारे खांडेकर हे एकमेव लेखक आहेत. श्रेष्ठ रूपककथाकार खलील जिब्रानप्रमाणे रवींद्रनाथ टागोरांचाही प्रभाव खांडेकरांवर पडला आहे. त्यांनी १५० हून अधिक रूपककथा लिहिल्या आहेत. त्यातील बऱ्याच रूपक कथा 'कलिका' (१९४३), 'मृगजळातील कळ्या' (१९४४), 'सोनेरी सावल्या' (१९४६), 'वनदेवता' (१९६०) ह्या संग्रहांत समाविष्ट केल्या आहेत. खांडेकरांनी मराठी चित्रपटसृष्टीला दिलेली देणगी म्हणजे सतरा चित्रपट कथा. १९३६ साली त्यांच्या 'छाया' ह्या चित्रपटाला उत्कृष्ट चित्रपटकथा लेखनाचे सुवर्णपदक मिळाले. 'महाराष्ट्रीय चित्रपटसृष्टीला वास्तवतापूर्ण तत्त्वप्रधान कथा देणारे तेजस्वी लेखक' या शब्दांत दिग्दर्शक विनायकांनी खांडेकरांचा गौरव केला आहे. 'ज्वाला', 'अमृत', 'सुखाचा शोध', 'लग्न पाहावे करून', 'सरकारी पाहुणे', 'संगम', 'धर्मपत्नी', 'माझं बाळ', 'बडी माँ', 'सुभद्रा', 'माणसाला पंख असतात' ह्या त्यांच्या विशेष उल्लेखनीय चित्रपट कथा आहेत.

खांडेकरांनी 'स्वराज्याचे ताट' (१९२५), 'रंकाचे राज्य' (१९२७), 'शीलशोधन', 'मोहनमाळ', 'शांतिदेवता', 'मृगलांछन' (१९२९-१९३२) इत्यादी नाटके लिहिली. 'रंकाचे राज्य' नाटकाचे काही प्रयोग 'नाट्यकला प्रसारक मंडळी'ने सादर केले. त्या नाटकाचा अपवाद वगळता खांडेकरांना नाटककार म्हणून यश लाभले नाही.

खांडेकरांनी बरेच समीक्षापर लेखन केले आहे. स्वतंत्र समीक्षापर ग्रंथ, पुस्तकांच्या प्रस्तावना, स्फुट वैचारिक चिंतनपर लेख असे-'गडकरी: व्यक्ती आणि वाङ्मय' (१९३२), 'मराठीचा नाट्यसंसार' (१९४३), 'आगरकर: व्यक्ती आणि विचार' (१९४९), 'केशवसुत काव्य: आणि कला' (१९५९), 'वा. म. जोशी: व्यक्ती आणि विचार' (१९४८) आदर्श समीक्षकाला भूषणीय असे उदारमनस्कता, सहानुभूती, गुणग्राहकता, उत्कट रसिकता, विश्लेषणपरता, चिंतनशीलता हे गुण खांडेकरांच्या टीकालेखनात आढळून येतात.

**वैचारिक उद्‌बोधन**

खांडेकरांच्या ललित आणि वैचारिक लेखनात त्यांच्या व्यक्तिमत्त्वाचे प्रतिबिंब पडले आहे. माणूस आणि माणसाचे भवितव्य हा त्यांचा चिंतनाचा मुख्य विषय होता. आजूबाजूची पीडित, शोषित, दारिद्र्याने गांजलेली,



साहित्यप्रकारांचा अंगीकार केला. माणुसकी हाच आपला धर्म असे मानणाऱ्या खांडेकरांचे मानवजातीवर खरेखुरे नि उत्कट प्रेम होते. विशिष्ट जीवनदृष्टीचा स्वीकार केल्यामुळे त्यांच्या लेखनाला काही मर्यादा पाडल्या, अलंकारिक सुभाषितवजा भाषेचा आणि तत्त्वसमर्थनाचा मोह त्यांना टाळता आला नाही, तरी त्यांचे समग्र लेखन हे श्रेष्ठ दर्जाचे लेखन ठरते. त्यांना साहित्य व्यवहार आणि वाङ्मयीन संस्कृतीविषयी असणारी आस्था, त्यांची अस्वादक वृत्ती आणि मर्मदृष्टी या गुणांचा तसेच

अशिक्षित, भुकेने पछाडलेली माणसे त्यांच्या कुतूहलाचा आणि लेखनाचा केंद्रबिंदू होता. टॉलस्टॉय, महात्मा गांधी, आगरकर, केशवसुत, आदींचा प्रभाव खांडेकरांच्या विचारसृष्टीवर पडलेला होता. भोवतालच्या मानवी जीवनाचे निरीक्षण, परीक्षण व विश्लेषण सतत करीत राहून समाजाला सांगावेसे वाटले ते त्यांनी कविता, कादंबऱ्या, लघुकथा, रुपककथा, चित्रपट कथा, नाटके, साहित्य समीक्षा, साहित्य रसग्रहण, साहित्य विचार, संवाद-संभाषणे, पत्रे, आठवणी आदींद्वारे सांगितले.

समाजाचे वैचारिक उद्‌बोधन करणे हे त्यांनी आपले ध्येय मानले होते. आपले लेखन हे त्या ध्येयांच्या पूर्तीचे साधन आहे, असे त्यांनी मानले होते. शिक्षकी पेशा पत्करून त्यांनी आपली वैयक्तिक ध्येयपूर्ती केली. त्यांनी लेखनाकरिता लेखन केले नाही. माणसाचे जे जीवन त्यांनी पाहिले आणि स्वतःच्या जीवनात जे अनुभवले, ते लालित्यपूर्ण भाषेत स्वतःच्या मनावर झालेल्या प्रतिक्रियांसकट व्यक्त केले. वैयक्तिक सुखदुःखे, आशा-निराशा त्यांच्या लेखनातून क्वचितच व्यक्त होतात. सर्वसामान्यांची सुख-दुःखे, आशा-निराशा, सफल किंवा विफल आकांक्षा ह्यांचे वर्णन विश्लेषण, विवेचन व चिंतन आयुष्याच्या आखेरपर्यंत त्यांच्याकडून होत राहिले. त्याच्या प्रकटनार्थ त्यांनी वेगवेगळ्या

लेखनसातत्याचा गौरव म्हणून १९६८ साली त्यांच्या 'ययाति' ह्या पौराणिक विषयावरील कादंबरीला ज्ञानपीठ पुरस्कार देऊन गौरवण्यात आले. या बहुमोल सन्मानाचे मराठीतील पहिले मानकरी वि.स.खांडेकर ठरले. भारत सरकारने 'पद्मभूषण पुरस्कार' आणि राष्ट्रिय फेलोशिप देऊन त्यांच्या समग्र कार्याचा गौरव केला. १९७६ साली शिवाजी विद्यापीठाने डी. लिट. चा बहुमान त्यांना प्रदान केला.

वि.स.खांडेकर हे केवळ मराठीतीलच मान्यताप्राप्त लेखक नव्हते. अन्य भारतीय भाषांत त्यांच्या अनेक साहित्यकृतींचे अनुवाद झाले आहेत. त्यांच्या कथाकदंबऱ्यांना गुजराती, हिंदी, तमिळ भाषांतही फार मोठ्या प्रमाणात प्रसिद्धी मिळाली. गुजराती भाषकांना तर ते गुजराती भाषेतील लेखक आहेत, असे वाटे. याशिवाय सिंधी, कानडी, मल्याळी ह्या भाषांतही त्यांच्या कादंबऱ्यांचे अनुवाद झाले आहेत.

वि. स. खांडेकरांनी अर्धशतकाहून आधिक काळ साहित्याची जी श्रेष्ठ सेवा निरपेक्ष भावनेने केली, त्याबद्दल महाराष्ट्र शासन, महाराष्ट्रातील साहित्यिक, सामाजिक व सांस्कृतिक संस्थांकडून जो गौरव झाला त्याची नोंद अशी- १९३५ अध्यक्ष, गोमंतक साहित्य संमेलन, मडगाव; १९३५ अध्यक्ष शारदोपासक साहित्य

संमेलन, आधिवेशन दुसरे; १९३९ – अध्यक्ष : महाराष्ट्र मंडळ, उज्जैन; १९४१ अध्यक्ष : अखिल भारतीय मराठी साहित्य संमेलन, सोलापूर; १९५५– अध्यक्ष : मुंबई उपनगर साहित्य संमेलन, डोंबिवली; १९५९ – अध्यक्ष : मराठी साहित्य संमेलन, ४१ वे अधिवेशन, मिरज; याशिवाय अनेक वाङ्‌मयीन उपक्रमांत खांडेकरांचा सक्रीय सहभाग होता. महाराष्ट्रात आणि महाराष्ट्राबाहेरील प्रमुख शहरांत सामाजिक–साहित्यिक संस्थांच्या व्यासपीठावरून अध्यक्ष म्हणून खांडेकरांनी अनेक व्याख्याने दिली. त्या वेळी त्यांनी 'जीवनाकरिता कला' ह्या वाङ्‌मयविषयक सिद्धान्ताचे सोदाहरण स्पष्टीकरण केले. या स्वरूपाच्या कार्यक्रमांच्या निमित्तानेही त्यांचा सन्मान करण्यात आला.

खांडेकरांनी किती प्रचंड लेखन केले होते, याची कल्पना त्यांच्या साहित्यावर झालेल्या समीक्षात्मक आणि वैचारिक लेखनावरून येते. त्यांच्या वाङ्‌मयाची चिकित्सा करणारे अनेक ग्रंथ आणि प्रबंध प्रकाशित झाले आहेत. 'खांडेकर: सचित्र चरित्रपट' ह्या जया दडकरांनी संपादित केलेल्या पुस्तकात लेखकाने खांडेकरांच्या जीवनाचा आणि वाङ्‌मयदृष्टीचा परिचय करून दिला आहे.

प्रकृती साथ देत नसूनही खांडेकरांनी दीर्घकाळ बहुआयामी लेखन केले. राष्ट्रीय पातळीवरील या मानवतावादी लेखकाचा प्रभाव नंतरच्या मराठी साहित्यावर अप्रत्यक्षपणे पडत राहिला. महायुद्धोत्तर काळात कलावाद, जीवनवाद ह्या प्रणाली बाजूला पडल्या. साहित्यातील वास्तववादाचे स्वरूप बदलले. खांडेकरांच्या काळातील आदर्शवादी मूल्ये उरली नसली, तरी जीवनातील वास्तवाचा वेध घेण्याची लेखकांची प्रवृत्ती वाढली. अशा तऱ्हेने खांडेकरांच्या साहित्याचा अनुबंध पुढील साहित्यात राखला गेला. वि. स. खांडेकरांचे मराठी साहित्याला मिळालेले हे मौलिक योगदान म्हणावे लागेल.

मराठीतील बहुप्रसव अशा ह्या ज्येष्ठ लेखकाचे कोल्हापूर येथे वार्धक्यामुळे निधन झाले.

– वि. शं. चौघुले

**संदर्भ :**


१. *देशपांडे मा. का.; 'खांडेकर चरित्र आणि वाङ्‌मय', स्कूल अ‍ॅण्ड कॉलेज बुक स्टॉल, कोल्हापूर; १९३१.*
२. *कानडे मु. श्री., भालचंद्र फडके, संपादक; 'गाभारा' (वि. स. खांडेकर: वाङ्‌मय समालोचन), अनमोल प्रकाशन, पुणे; १९७८.*
३. *भोसले एस. एस.; 'खांडेकर: व्यक्ती आणि साहित्य', मोघे प्रकाशन, कोल्हापूर; १९७५.*
४. *भोसले एस. एस.; 'साहित्यिक खांडेकर'; अजब पुस्तकालय, कोल्हापूर; १९८०.*


## खांबेटे, दत्तात्रेय पांडुरंग

***सोमाजी गोमाजी कापशे***

**पत्रकार, कथाकार, विनोदकार, अनुवादक**

**५ जुलै १९१२ – ६ ऑगस्ट १९८३**



दत्तात्रेय पांडुरंग खांबेटे यांचा जन्म वेंगुर्ला येथे झाला. त्यांचे शालेय शिक्षण व उच्च शिक्षण अनुक्रमे चिपळूण, वेंगुर्ल्याचे मिशन स्कूल व सांगली येथील विलिंग्डन महाविद्यालय येथे झाले. ते १९३६ मध्ये बी. ए., १९४१ मध्ये एम.ए. झाले. सुरुवातीला काही काळ शिक्षक म्हणून काम केले. नंतर १९४७ मध्ये 'लोकमान्य' दैनिकात त्यांनी उपसंपादक म्हणून काम केले. १९६०–१९६५ मध्ये 'मार्मिक'च्या संपादकीय विभागात होते. अनेक टोपणनावांनी चुरचुरीत, विनोदी व राजकीय विषयांवर मर्मभेदक लेखन करण्यात त्यांचा हातखंडा होता. इंग्रजी व मराठी भाषांवर त्यांचे प्रभुत्व होते. त्यांचे वाचनही दांडगे होते.

महाविद्यालयात असताना, १९३५ साली नव्यानेच निघालेल्या 'मनोहर' मासिकात त्यांची पहिली विनोदी कथा प्रसिद्ध झाली. त्यानंतर 'मनोहर', 'किर्लोस्कर' मासिकांत, 'मार्मिक' साप्ताहिकात त्यांचे लेखन प्रसिद्ध होऊ लागले. 'ग्रंथ कीटक' या टोपणनावाने 'नवनीत'

मासिकाच्या सदरातील लेखांचे संकलन असलेले त्यांचे पुस्तक आहे. अनेक नियतकालिकांतून विज्ञान विषयावर त्यांनी जे लेख लिहिले, त्यांतील निवडक लेखांचा संग्रह 'मोठ्या माणसांच्या गमतीदार गोष्टी' (संभाषण चतुरांचा सोबती) हा आहे. 'पन्नास-एक वर्षांत मुंबई समुद्रात बुडेल' या पुस्तकात विज्ञानाच्या विविध क्षेत्रांतील चित्ताकर्षक व रोमहर्षक अशा अनेक हकिकती खांबेटे यांनी सांगितल्या आहेत.

खांबेटे यांनी विज्ञान कथा, काल्पनिक कथा आणि अद्भुत कथा लिहिल्या त्या 'शामकांत सामंत' या टोपणनावाने. विज्ञान कथा हा प्रकार मराठीत प्रथम खांबेटे यांनी आणला. पहिला भयकथासंग्रह 'भीतीच्या छाया' (१९४८) हादेखील त्यांच्याच नावावर आहे. जगातील गाजलेल्या स्त्री-पुरुष गुप्तहेरांवर त्यांनी रंजक व माहितीपूर्ण लेख लिहिले आहेत.

खांबेटे यांच्या गुप्तहेर कथा, युद्ध कथा, गुन्हेगार कथा, अतिंद्रियशक्ती असलेल्या सिद्ध मांत्रिकांच्या कथा, बंडलबाजीच्या कथा असे विविध प्रकारचे सत्यकथांचे आठ संग्रह प्रकाशित झाले आहेत.

'दैनिक लोकमान्य'ची रविवारची आवृत्ती, 'साप्ताहिक मार्मिक', 'नवल', 'नवनीत' इत्यादी मासिके, नियतकालिके ह्यांतून खांबेटे यांनी विपुल लेखन केले आहे. १९६६ ते १९७१ या कालावधीत 'नवनीत' मासिकात दर महिन्याला खांबेटे किमान पाच लेख लिहीत असत. त्यातील एका लेखावर त्यांचे नाव असे. बाकीचे लेख ते विविध टोपणनावांनी लिहीत असत. उदाहरणार्थ सोमाजी गोमाजी कापशे, मंडणमिश्र, के. दत्त, दत्ता मराठे, प्रज्ञानंद, गोष्टीवेल्हाळ, निसर्गप्रेमी, चंद्रहास, संतदास, शामकांत सामंत, मुरारी वेंगुर्लेकर अशी ही विविध टोपणनावे.

महाविद्यालयात असताना खांबेटे यांनी रामकृष्ण परमहंस व स्वामी विवेकानंद यांची चरित्रे वाचली होती. ते त्यांचे अनन्य भक्त बनले होते. विवेकानंदांची बरीच तेजस्वी भाषणे त्यांना अगदी मुखोद्गत होती. आधी आपण नास्तिकच होतो, पण स्वामी विवेकानंदांनी आपले संतांविषयीचे गैरसमज पूर्णपणे दूर केले, असे ते म्हणत. नंतर त्यांना संतचरित्रे व संतांची शिकवण या वाचनाची गोडीच लागली. 'नवनीत' मासिकात खांबेटे यांनी सतत पाच वर्षे 'तरुणांचे स्फूर्तिदाते संत' या विषयावर लेखन केले. यांपैकी काही लेख 'संतांनी सांगितलेली सुखाची साधना' या पुस्तकात तर बाकीचे लेख 'चिरंतन सुखाचे मार्गदर्शन' या पुस्तकात प्रसिद्ध झाले.

याव्यतिरिक्त 'उपहास' (१९७०), 'माझे नाव रमाकान्त वालावलकर' (१९६०-१९८५), 'नवऱ्याचे संगोपन' (१९७१), 'प्रेमाची देणीघेणी' (१९७६) असे अनेक कथासंग्रहही प्रसिद्ध आहेत. पण त्यातही त्यांचे विनोदी कथालेखन अग्रस्थानी आहे. मराठी माणसांच्या दैनंदिन जीवनातील साध्यासुध्या घटनांतून खळाळत्या हास्यनिर्मितीचा आविष्कार साधण्याचे विलक्षण कौशल्य लक्षणीय आहे. त्यांच्या अनेक कथा 'हंस', 'मोहिनी' ह्या मासिकांत प्रसिद्ध झाल्या.

मानसशास्त्र या विषयावरही त्यांनी जे अभ्यासपूर्ण सुबोध लेखन केले, तेही वाचकप्रिय ठरले. 'हसत खेळत मनाची ओळख' (१९६०), 'स्वयंसूचना' (१९६०), 'मनाच्या संशोधनाची सुरस कथा' (१९७०), 'आजारीपणाचे मानसशास्त्र' (१९७४) इत्यादी 'न्यूनगंड' हे मानसशास्त्रीय पुस्तक हे त्यांचे शेवटचे लेखन होय.

केरळमधील कान्हनगड येथील आनंदाश्रमाचे श्रीस्वामी रामदास हे खांबेटे यांचे आध्यात्मिक गुरू होते. त्यांच्या 'In Quest of God' आणि 'श्रीमाताजी कृष्णाबाई' या दोन इंग्रजी पुस्तकांचे त्यांनी मराठीत अनुवाद केले आहेत. तसेच धनंजय कीर लिखित 'वीर सावरकर' या इंग्लिश चरित्राचा खांबेटे यांनी केलेला 'स्वातंत्र्यवीर सावरकर' (१९७२) हा अनुवादही उत्कृष्ट आहे.

– प्रा. मंगला गोखले

**संदर्भ :**

*१. खानोलकर गं. दे., टाकळकर उषा, संपादक; 'मराठी वाङ्मयसेवक चरित्रकोश', खंड दुसरा.*

ख

## खाडिलकर, कृष्णाजी प्रभाकर

☞ मुख्य नोंद – नाटक खंड

## खाडिलकर, नीळकंठ यशवंत

☞ मुख्य नोंद – पत्रकारिता आणि ललितेतर साहित्य खंड

## खाडिलकर, पांडुरंग दत्तात्रेय

☞ मुख्य नोंद – लोककला खंड

## खानोलकर, गंगाधर देवराव

*पिनाकी, रवींद्र शिष्य, साहित्यप्रिय*

**चरित्रकार, कोशकार**

**१९ ऑगस्ट १९०३ – ३० सप्टेंबर १९९२**



वडिलांच्या व्यावसायिक बदल्यांमुळे गंगाधररावांचे बालपण भ्रमंतीत गेले. प्राथमिक शिक्षण घरीच झाले. मॅट्रिकपर्यंतचे शिक्षण सावंतवाडी व मालवण येथे टोपीवाला हायस्कुलमध्ये झाले. असहकार चळवळीत सहभागी झाल्याने मॅट्रिक परीक्षेस बसले नाहीत. पिता ज्ञानपिपासू, ग्रंथप्रेमी व माणुसकी हा एकच धर्म मानणारा आणि आई स्वाभिमानी, स्वावलंबी व त्यागी. या उभयतांचे दृढ संस्कार होऊन १९२० ते १९२३ या काळात गंगाधररावांनी रवींद्रनाथांच्या शांतिनिकेतनमधील विश्वभारती विद्यापीठात, निसर्गाच्या मोकळ्या वातावरणात वाङ्मयाचा विद्यार्थी म्हणून प्रविष्ट होऊन अनेक थोर विद्वानांचे व गुरू या नात्याने रवींद्रनाथांचे मार्गदर्शन प्राप्त केले. खूप वाचन, चिंतन-मननाची सवय लावून घेतली. येथील निखळ ज्ञानसाधकी शैक्षणिक संस्कारांची शिदोरी त्यांनी आयुष्यभर केलेल्या साहित्य सेवेत त्यांना सतत प्रेरणा देत राहिली.

त्यानंतर अमळनेर तत्त्वज्ञान मंदिरात शिष्यवृत्ती घेऊन दोन वर्षे तत्त्वज्ञानाचा सखोल अभ्यास करून काही काळ तळेगावच्या राष्ट्रीय विचाराच्या समर्थ विद्यालयात शिक्षक या नात्याने काम केले. त्यानंतर ते मुंबईच्या वृत्तपत्राच्या दुनियेत ‘लोकहित’, ‘विविधवृत्त’, ‘प्रगती’, ‘रणगर्जना साप्ताहिक’ इत्यादी वृत्तपत्रांचे संपादक झाले. १९२६ च्या सुमारास मुंबईत स्थिर झाल्यावर ते वाङ्मयीन चळवळीशी बद्ध झाले. त्यांनी स्वतः अनुभवलेली संदर्भ-साहित्याची अडचण व उणीव दूर करण्यासाठी संशोधन क्षेत्रातील साधन साहित्याचा संग्रह सुरू केला आणि कोशकार, विश्लेषक, चरित्रलेखक, ग्रंथसंपादक म्हणून मराठी वाङ्मयाच्या इतिहासात अविस्मरणीय अशी कामगिरी करून आपल्या व्यक्तिमत्त्वाचा व कर्तृत्वाचा ठसा उमटवला व पुढील पिढ्यांसाठी एक आदर्श निर्माण केला.

### चरित्रकोशाचा शुभारंभ

त्यांनी काही नोकऱ्या केल्या, त्याही मुद्रण-प्रकाशन संस्थेतच. १९३१ मध्ये त्यांनी ‘अर्वाचीन मराठी वाङ्मय सेवक’ चरित्रकोशाच्या लेखनाचा शुभारंभ केला. जानेवारी १९३३ मध्ये सुरू केलेल्या ‘प्रतिभा’ पाक्षिकाचा उद्देश होता ‘महाराष्ट्रातील व महाराष्ट्राबाहेरील वाङ्मयविषयक चळवळींची माहिती प्रसिद्ध करणे, प्रसिद्ध होणाऱ्या वाङ्मयाची चर्चा, ग्रंथलेखन, ग्रंथप्रकाशन, ग्रंथमुद्रण याविषयींचे विचार प्रसिद्ध करणे व मराठी वाङ्मयाच्या एकंदर प्रगतीस साहाय्यक होईल असा मतप्रचार करणे.’ पुढे ८ एप्रिल १९४० पासून ‘समीक्षक’ पाक्षिक व ३१ ऑक्टोबर १९४८ पासून ‘रविकिरण’ साप्ताहिक चालू केले. मराठीतील पूर्णतया वाङ्मयीन स्वरूप असलेल्या पहिल्यावहिल्या (प्रतिभा) नियतकालिकाच्या संपादनात के. ना. काळे व वि. ह. कुलकर्णी यांचा सहभाग होता. यासोबत ‘प्रतिभा प्रकाशन मंडळ’ निघून त्या उत्साही वातावरणात माधवराव पटवर्धन, गिरीश, यशवंत, श्री. बा. रानडे. खं. सा. दौंडकर, माडखोलकर, खांडेकर, श्री. के. क्षीरसागर अशांशी सहवास व विचारांची देवाणघेवाण होऊन साहित्याची जाण परिपक्व झाली व परिणामी उपकारक ठरली.

यानंतरच्या 'रविवार' साप्ताहिकात सर्वसामान्यांसाठी आकर्षक अशा विविध विषयांचा समावेश असे. प्रत्येक नियतकालिक भिन्न प्रकृत्तीचे पण दर्जेदार असे व अभिरुचिसंपन्न असे. आर्थिक समस्येमुळे पहिली दोन नियतकालिके अन्य चालकांकडे द्यावी लागली. तिसरे सव्वा वर्ष चालले.

वयाच्या १८ व्या वर्षी त्यांनी लेखनाला सुरुवात केली. नामांकित नियतकालिकांतून कथा, वाङ्मयविषयक लेख प्रकाशित केले. श्रीपाद कृष्ण कोल्हटकर हे त्यांचे लेखन-क्षेत्रातले गुरू. रम्य भावाविष्काराच्या त्यांच्या कथा 'प्रेम आणि विद्वत्ता व इतर कथा ' (१९३२) या संग्रहात समाविष्ट आहेत. त्यांचे दैवत असणाऱ्या श्री. कृ. कोल्हटकर, वि. गो. विजापूरकर व वि. का. राजवाडे यांच्या क्रमशः १९२७, १९२८ व १९३३ ह्या वर्षी लिहिलेल्या छोटेखानी चरित्रांत चरित्रनायकांची समर्पक ओळख पटविणारी कामगिरी ही विश्वसनीय असल्याची छाप पडते, कारण त्यांचे लेखन निष्ठेने व अस्सल कागदपत्रांच्या आधारे केलेले असे. "एक वालचंद चरित्र सोडले तर मी लिहिलेल्या सर्व चरित्रांचे संकल्पन, संयोजन, पूर्वनियोजन प्रत्यक्ष लेखनाआधी कितीतरी काळ झालेले असते." हे त्यांचे म्हणणे वाचकाला प्रतीती आणून देते ह्यात शंका नाही. 'माधव जूलिअन जीवनकथा' (१९५१, १९६८) हा चरित्रलेखनाच्या दृष्टीने चरित्रवाङ्मयात आदर्शवत असा मराठीतील पहिलाच चरित्रग्रंथ होय. 'रवींद्रनाथ जीवनकथा' (१९६१), 'वालचंद हिराचंद: व्यक्ती, काल व कर्तृत्व' (१९६५), 'साहित्यसिंह' (श्री. कृ. कोल्हटकर) 'जीवनगाथा' (१९७२); यांपैकी 'वालचंद हिराचंद' हे औद्योगिक क्षेत्रातले खंदे शिल्पकार.

प्रत्येक चरित्रनायकाच्या जीवनानुसार वळणे व कार्यकर्तृत्व दाखवीत वेगळा व स्वतंत्र घाट प्राप्त करून देण्याचे कसब खानोलकरांच्या साक्षेपी, कुशल लेखनाने साधले आहे, असे चरित्र वाचताना वाटते.

खानोलकरांच्या जडणघडणीच्या काळातील (१९२५-१९३५) 'महाराष्ट्र रसवंती पद्य : भाग १ ते ३' व 'मराठी गद्य वैभव: भाग १ ते ३' ही १९३५ ची संपादने उत्कृष्ट पाठ्यपुस्तकांच्या कसोटीला उतरली. चरित्रलेखक खानोलकरांच्या यशाचे मूल्यमापन करताना समीक्षक द. न. गोखले 'चरित्रचिंतन' मध्ये म्हणतात, "जे चरित्र ऐतिहासिक सत्याचा कोठेही नि केव्हाही अपलाप करत नाही व तरीही ललित रूप धारण करते, अशा चरित्राच्या मूल्यमापनाची पद्धती मराठीत अजून पुरेशी विकसित झालेली नाही. त्यामुळे काही टीकाकारांना 'ऐतिहासिक ललित चरित्र' आणि 'कल्पना रंजित ललित चरित्र' यांतील भेद बहुधा समजलाच नाही."

**यशस्वी चरित्रलेखक**

खानोलकरांच्या गुणसमुच्चयामुळे यशस्वी चरित्रलेखक म्हणून त्यांची कीर्ती उत्तरोत्तर उज्ज्वल होत गेली. ४५ वर्षांपूर्वी लिहिलेल्या श्री. कृ. कोल्हटकरांच्या छोट्या चरित्राला साडेसहाशे 'डेमी' पृष्ठांचे स्वरूप प्राप्त करून दिले. खानोलकरांनी सतत २० वर्षे परिश्रमाने संग्रहीत केलेल्या साधनसामग्रीच्या आधाराने दोन-तीन वर्षे लेखन करून हे साध्य झाले. चरित्र लेखनात त्यांचे स्व-तंत्र होते. वाङ्मयातील ऐतिहासिक चरित्र लेखकाला वास्तव सत्याच्या अलीकडे किंवा पलीकडे केव्हाही जाता येत नाही. आटोकाट परिश्रमाने जी साधनसामग्री उपलब्ध झाली असेल, तिच्यावर त्याला निर्वाह करावा लागतो; या मर्यादा असल्या, तरी ललित चरित्राची स्वतःची बलस्थाने आहेत. वाचकाची निखळ ऐतिहासिक वास्तव सत्याची जबरी भूक भागवणे हेच त्याचे बळ असते. असे ऐतिहासिक चरित्र वाचकाला वास्तव सत्याच्या आनंदाबरोबर आणखी काही प्रिय वाटणाऱ्या गुणधर्मांनी युक्त असावे लागते. मुळात साधनसामग्री जमवणे हे कष्टकारक काम आहे. त्याच्या आधारावर उत्कृष्ट चरित्र निर्माण करणे हे मुख्यतः कलेचे काम आहे. या कामात खानोलकर निश्चितच यशस्वी झाले आहेत. ऐतिहासिक ललित चरित्रात त्यांनी जणू काही 'मी खरे तेच सांगेन नि खरे तेवढेच सांगेन; खोटे (काल्पनिक) सांगणार नाही,'

अशी प्रतिज्ञा करून लेखणी हातात घेतली. त्यांनी वयाच्या सत्तरीच्या सुमारास मराठी वाङ्मय कोशाची चार खंडांत विभागलेली एक विस्तृत योजना तयार करून तिच्या संपादनाची धुरा स्वीकारली (१९६९-१९८२). अशी योजना कोणत्याही भारतीय भाषेत संकल्पिली गेली नव्हती हे तिचे वेगळेपण समग्र वाङ्मय व्यापार चरित्रांच्या अनुषंगाने ललित-अललित समाविष्ट व्हावा ही अपेक्षा होती.

कोशनिर्मितीच्या प्रचंड व किचकट परंतु अत्यंत उपयोगी कामासाठी संपादकापाशी चिवट कार्यशक्ती, पूर्वग्रहविमुक्त दृष्टी, चौफेर व्यासंग, रसास्वाद वृत्ती, इतिहासाची सूक्ष्म जाण आणि कामातील शिस्त, पद्धतशीरपणा, योजकता इत्यादी विविध गुण असावे लागतात. ते गुण दृढव्रती खानोलकरांपाशी असल्यामुळे, त्यांनी अपार परिश्रमाने साधनसामग्री जमवणे कोशनिर्मिती करणे अशी दुहेरी जबाबदारी अभ्यासक व वाङ्मयसेवक या भूमिकांतून उत्तम तऱ्हेने पार पाडली. सत्यनिष्ठता व कलात्मकता यांचा सुरेख संगम खानोलकरांमध्ये आढळतो.

त्यांनी लिहिलेली चरित्रे वाचकांच्या पसंतीस उतरली व त्यांनी कल्पनेचे मिश्रण न करता चरित्रातील साम्य-विरोध, मर्मस्थाने, नाट्य, गूढता, उदात्तता, हीनता वगैरेंवर सूचक भाष्य केले. कधी हकिकत सांगितली, कालक्रमानुसार जीवनाचे बदलते रागरंग उलगडून दाखवले, आवश्यक तेथे प्रास्ताविक केले, चपखल उतारे निवडून त्यांचा काळजीपूर्वक वापर केला.

अभिव्यक्तीचे नवे तंत्र मराठी चरित्र-वाङ्मयात आणून घटना, प्रसंग, लेख, व्यक्तिविशेष, जीवनविशेष यांचे वर्णन स्वतः न करता, कोणाचा तरी नेमका उतारा देऊन ते त्याचा ताजेपणा वाचकांपर्यंत पोचवत. अशा उताऱ्यांमुळे निरनिराळ्या व्यक्तींच्या डोळ्यांनी (दृष्टिकोनांतून) वाचक चरित्र-विषयाकडे बघू शकतो, त्याचे आकलन वाढते, त्याला रुचिवैविध्य लाभते. उताऱ्यांचे विविध उपयोग अभिव्यक्तीसाठी वापरले, म्हणून खानोलकरांचे अभिनंदन करणे इष्ट होईल. जीवनभर मराठी वाङ्मयाची सेवा करून त्यांनी अभ्यासक, संशोधक, संपादक, संग्राहकांसाठी एक आदर्श निर्माण केला, ही वस्तुस्थिती पुसली जाणार नाही.

– वि. ग. जोशी

**संदर्भ :**


१. *खानोलकर-टाकळकर, संपादक; मराठी वाङ्मयसेवक चरित्रकोश : खंड २.*

२. *गोखले, द. न.; 'चरित्र-चिंतन'; मौज प्रकाशन, २६ जानेवारी २०००.*


## खानोलकर, चिंतामण त्र्यंबक

☞ **आरती प्रभू**

## खेडगीकर, व्यंकटराव भवानराव

***स्वामी रामानंदतीर्थ***

☞ **मुख्य नोंद – समाजकारण खंड**

## खेर, भालचंद्र दत्तात्रेय

**कादंबरीकार**

**१२ जून १९१७**



भालचंद्र खेर यांचा जन्म अहमदनगर जिल्ह्यातील कर्जत या गावी झाला. बालपण, शालेय शिक्षण कर्जत, नगर येथे झाले. मॅट्रिक आणि बी. ए. मात्र पुण्यातील स. प. महाविद्यालयातून झाले.

वकिली घराणे म्हणून एलएल. बी. केले. परंतु व्यवसायासाठी आवश्यक असलेली स. प. महाविद्यालयाची परीक्षा मात्र दिली नाही. मूळ पिंड साहित्यिकाचाच ! स. प. महाविद्यालयात शिक्षण घेत असताना श्री.म. माटे यांच्यासारखे गुरू लाभले. त्यांची भेट सलग १७ वर्षे रोज होत असे. साहित्य प्रवाह, साहित्यविषयक चर्चा, वाचन हे सारे नित्यनेमाने होत असे.

२२ वर्षे 'केसरी'चे सहसंपादक म्हणून काम केले. १० वर्षे सह्याद्रीचे संपादक म्हणून काम पाहिले. त्यांच्या पत्नी संजीवनीबाई या मुंबई आकाशवाणीवर गायिका म्हणून काम करीत. वैवाहिक जीवनात त्यांची एकमेकांना सुरेल साथ लाभली.

मूळ लेखनाचा गाभा क्रांतिकारी विषय हाताळण्याचा असला, तरी खेर यांनी सर्व साहित्य आकृतिबंध हाताळले. 'नादलहरी' कथासंग्रह (३ सप्टेंबर १८३९), पानशेत पुरावरची 'नंदादीप' (१९६२), 'आनंद जन्मला' (१९६५) ही पुस्तके व समाजातील त्या-त्या वेळच्या महत्त्वाच्या विषयांना स्पर्श करणारे लेखन त्यांनी केले आहे.

वि. स. खांडेकर हे त्यांचे मामेभाऊ होत. त्यांच्याबरोबर अनेकदा साहित्यविषयक चर्चा व्हायच्या. काहीतरी वेगळे करण्याची ऊर्मी घेऊन १९६८ साली 'यज्ञ' ही सावरकरांवरची त्यांची कादंबरी प्रथम प्रकाशित झाली. त्या काळात 'यज्ञ'च्या अकरा हजार प्रतींची प्रकाशनपूर्व नोंदणी झाली. इथूनच चरित्रात्मक कादंबरीकार म्हणून त्यांना सूर गवसला.

'चाणक्य', 'हसरे दुःख', 'आनंदभुवन'(क्रांतिवीर चाफेकर), 'समर सौदामिनी' (राणी लक्ष्मीबाई), 'अमृतपुत्र' (लाल बहादूर शास्त्री) असे विविध विषयांवरचे चरित्रग्रंथ प्रकाशित झाले आणि त्यांना रसिकमान्यता मिळाली.

१९८४ साली युनेस्को वर्ल्डपीस सेंटरच्या संयुक्त विद्यमाने प्रकाशित झालेली 'हिरोशिमा' ही क्रांतिकारी ठरली. ह्या कादंबरीच्या आवृत्त्या अनेक भाषांमध्ये निघाल्या. हिरोशिमाच्या मेयरने जगातील ग्रंथसंग्रहासाठी सन्मानपूर्वक जतन केलेली ही कादंबरी होय. बालगंधर्वांवरच्या 'गंधर्वगाथा'चे लेखन भा. द. खेर यांच्या कलासक्त मनाची साक्ष देते.

सर्वस्पर्शी लेखन करणाऱ्या खेर ह्यांची ११७ पुस्तके प्रकाशित झाली आहेत. 'आनंदभुवन' आणि 'हिरोशिमा' यांना आंतरराष्ट्रीय स्तरावरची पारितोषिके मिळालेली आहेत. त्यांच्या 'हसरे दुःख'ला न. चिं. केळकर पुरस्कार मिळाला, 'हिरोशिमा'ला महाराष्ट्र राज्य पुरस्कारसुद्धा मिळाला.

– विनया देसाई

**संदर्भ :**

१. *कर्दळे, आशा; 'स्वतःच्या ग्रंथाची पालखी न काढणारे भा. द. खेर'; लोकसत्ता-३० जून १९९९.*
२. *खेर, भा. द., 'दिवाळी ७५ वर्षांपूर्वीची!'; साहित्य मैफल- दिवाळी १९९७.*

## खैरमोडे, चांगदेव भवानराव

**चरित्रकार**

**१५ जुलै १९०४ – १८ नोव्हेंबर १९७१**



चांगदेव भवानराव उर्फ आबासाहेब खैरमोडे यांचा जन्म पाचवड, तालुका खटाव, जिल्हा सातारा येथे झाला. शालेय शिक्षण साताराच्या न्यू इंग्लिश स्कूलमध्ये झाले. १९२९ मध्ये ते बी.ए. झाले. एम.ए.आाणि एलएल.बी.चे शिक्षण त्यांनी घेतले, परंतु सचिवालयात नोकरी मिळाल्याने ते परीक्षेस बसले नाहीत.

त्यांचे सामाजिक चळवळीवरील लेख व कविता हे लेखन १९२३ ते १९६४ या काळात अनेक नियतकालिकांतून प्रसिद्ध झाले. १९२८ मध्ये 'पाटील प्रताप' व १९२९ मध्ये 'अमृतनाक' ही खैरमोडे यांची दोन सामाजिक खंडकाव्ये प्रसिद्ध झाली होती. 'युनिव्हर्सिटी ऑफ बुस्कानसन' (अमेरिका) येथील रॉबर्ट मिलर यांचा 'Button Button Great Tradition. Little Tradition Whose Tradition?' या शीर्षकाचा लेख ३० जानेवारी १९६६ रोजी प्रसिद्ध झाला. त्यात 'अमृतनाक' या खंडकाव्याबद्दल गौरवोद्गार काढले आहेत.

बाबासाहेब आंबेडकरांच्या प्रेरणेने लेखन करणाऱ्या खैरमोडे यांनी बाबासाहेबांच्या 'शूद्र पूर्वी कोण होते?',

'हिन्दू स्त्रियांची उन्नती व अवनती' या लेखांचे अनुवाद केले; ते प्रसिद्ध झाले आहेत. तसेच 'घटनेवरील तीन भाषणे' इत्यादी भाषांतरित लेखनही प्रकाशित झाले आहे. 'समाजप्रबोधन', 'अस्पृश्यता निवारण', 'हिंदुधर्म', 'हिंदुसमाज' अशा विविध विषयांवरचे स्फुट लेखही प्रसिद्ध झाले होते. महारांच्या लढाऊ परंपरेविषयी, महार पलटणीच्या शौर्याची कहाणी सांगणारे 'अस्पृश्यांचा लष्करी पेशा' हे पुस्तक प्रसिद्ध आहे. या विषयाचे महत्त्व लक्षात घेऊन महाराष्ट्र राज्य साहित्य संस्कृती मंडळाने डिसेंबर १९८७मध्ये डॉ. आंबेडकर चरित्राच्या नवव्या खंडातील मुळातले आठवे प्रकरण स्वतंत्र पुस्तक म्हणून प्रसिद्ध केले आहे.

पण चरित्रकार खैरमोडे यांचे सर्वांत मोठे, महत्त्वपूर्ण लेखन आहे ते डॉ. आंबेडकर यांचे 'बृहद्चरित्र' लेखन. यासाठी त्यांनी प्रचंड मेहनत घेतली. नोकरीनिमित्त मुंबईमध्ये आल्यावर खैरमोडे यांना डॉ. बाबासाहेब आंबेडकरांचा सहवास घडला. तो त्यांच्या वैचारिक जडणघडणीस आणि वैयक्तिक विकासास पोषक ठरला.

त्यांच्या सहवासात आल्यापासून बाबासाहेबांचे चरित्र लिहिण्याच्या दृष्टीने त्यांनी प्रचंड सामग्री जमा करून चरित्राचे अठरा खंड प्रसिद्ध करण्याचा संकल्प केला होता. यांपैकी ६, ७, ८ हे खंड अत्यंत महत्त्वाचे असून बाबासाहेब आणि त्यांच्या कार्याविषयी महत्त्वाची माहिती या खंडात आहे तर ९ ते १५ या अप्रकाशित भागांत बाबासाहेबांचे उत्तुंग व्यक्तिमत्त्व व त्यांचे प्रचंड कार्य यांचा सविस्तर आढावा आहे. अस्पृश्यांच्या उद्धारासाठी डॉ. बाबासाहेबांनी दिलेला राजकीय व सामाजिक लढा, त्यासाठी उभी केलेली व्यापक चळवळ मुद्यापुराव्यांनिशी जगापुढे मांडण्यासाठी ९००० पृष्ठांचे एक दस्तऐवज स्वरूपातील हे चरित्र लिहिण्याचे फार मोठे कार्य खैरमोडे यांनी केले आहे. आंबेडकर चरित्रासाठी उपलब्ध पत्रव्यवहार जतन करणे आणि इतरांचा मिळवणे, हे काम सोपे नाही. पण हे जिकिरीचे काम खैरमोडे यांनी केले आहे.

१९५२ पासून १९६८ पर्यंत पाच खंड प्रसिद्ध झाले. ६ वा खंड छापत असतानाच म्हणजे १८ नोव्हेंबर १९७१ ह्या दिवशी त्यांचा मृत्यू झाला. पुढील खंड महाराष्ट्र राज्य साहित्य संस्कृती मंडळाने काम हाती घेतल्यानेच पूर्ण झाले. डॉ. आंबेडकर चरित्रखंडाचे हे प्रचंड कार्य, हीच खैरमोडे यांच्या लेखनाची खरी ओळख आहे.

– प्रा. मंगला गोखले

**संदर्भ :**

*१. रणपिसे, अप्पा; 'चांगदेव भवानराव तथा आबासाहेब खैरमोडे'; नवशक्ति ४ जानेवारी १९७६.*

## खोत, चंद्रकांत गणपत

**कवी, कथाकार, कादंबरीकार, संपादक**

**७ सप्टेंबर १९४०**



चंद्रकांत खोत यांचा जन्म रत्नागिरी जिल्ह्यातील देवगड येथे झाला. त्यांचे शिक्षण मुंबई येथे झाले. मराठी विषय घेऊन मुंबई विद्यापीठातून ते एम. ए. झाले. १९६० नंतरच्या 'लघुनियतकालिके'च्या चळवळीतून खोत वाचकांसमोर आले. पाश्चात्त्य संगीतात बिटल्स ग्रुपने बंड केले, त्याप्रमाणे मराठी साहित्यात 'लिटल मॅगेझिन'वाल्यांनी बंड केले.

१९९३ साली प्रकाशित झालेल्या 'बिंब-प्रतिबिंब' कादंबरीत त्यांनी स्वतःच्या लेखन-प्रवासाचे उल्लेखनीय टप्पे नमूद केले आहेत. त्यात त्यांचे स्वतःचेही प्रतिबिंब स्पष्ट उमटले आहे. 'मूलतः कवी' असलेले खोत म्हणतात, ''माझी लढाई माझ्याशीच आहे. ही लढाई कधीही संपू नये असं मला वाटतं.'' त्यांनी कथाही लिहिल्या, कादंबऱ्याही लिहिल्या. खोतांच्या शब्दांत, ''कथाकार म्हणून मला फारसं कुणी ओळखत नाही. कादंबरीकार म्हणून लोक मला थोडंफार ओळखतात,

झालं.'' चाकोरीबाहेरचे लेखनच त्यांना अधिक भावते. त्यामुळे त्यांची पहिली कादंबरी 'उभयान्वयी अव्यय' खूप गाजली. काहींना ती विकृत, काहींना अश्लील वाटली तर काहींना ती तशी वाटली नाही. दि.के.बेडेकर, पं.महादेवशास्त्री जोशी, पु.ल.देशपांडे यांनी खोतांच्या लिखाणाला दाद दिली. कुरुंदकरांनी म्हटले, ''तुमच्या साहित्यातलं हे वळण वेगळं आहे.'' त्यांनी १९७७ साली 'उभयान्वयी अव्यय' ही कादंबरी लिहिली व १९९३ मध्ये 'बिंब-प्रतिबिंब'. दोन्हींमध्ये बऱ्याच वर्षांचा काळ लोटला. दोन्ही कादंबऱ्यांचे विषय भिन्न, तरी दोन्ही चाकोरीबाहेरच्या. अवघ्या दीनदलितांसाठी तळमळत राहिलेले 'विवेकानंद', हा विषय त्यांनी 'बिंब-प्रतिबिंब'मध्ये घेतला. या कादंबरीचे नाव त्यांना ज्ञानेश्वरीच्या अठराव्या अध्यायातील 'उटूनि दोन्ही आरसे' या ओवीवरून सुचले.

खोत स्पष्ट शब्दांत लिहितात, 'एवढेच सांगतो 'बिंब-प्रतिबिंब' ही विवेकानंदांच्या जीवनकार्यावरील आत्मचरित्रात्मक कादंबरी आहे. हळूच सांगतो: 'बिंब-प्रतिबिंब' ही अनोखी कादंबरी मी लिहिली नाही. 'तुमची सुखाची कल्पना काय?' असा जर कुणी मला प्रश्न विचारला, तर मी उत्तर देईन.... 'बिंब-प्रतिबिंब' या कादंबरीची निर्मिती!'

समीक्षेविषयी ते परखडपणे म्हणतात, ''समीक्षेत असायला हवं ते हे की, लेखकानं जो विषय हाताळला तो किती समर्थपणे हाताळला? त्यानं विषयाला किती न्याय दिला? त्याची ती कृती किती खोलवर वाचकाच्या मनाला जाऊन भिडली. हे जर मान्य केलं तर 'उभयान्वयी अव्यय' आणि 'बिंब-प्रतिबिंब' यांची समीक्षा करायला बसताना मार्ग स्वच्छ होतात.''

'मर्तीक' (१९६९), 'अपभ्रंश' (१९७३) हे कवितासंग्रह; 'बिनधास्त' (१९७२), 'दुरेघी' (पूर्वी लिहिलेल्या दोन लघु कादंबऱ्यांचे एक पुस्तक, १९८१) ही चंद्रकांत खोत यांची महत्त्वपूर्ण ग्रंथसंपदा.

– वि. ग. जोशी

## खोले, विलास वसंत

**समीक्षक**

**५ डिसेंबर १९४४**



विलास खोले यांचा जन्म पुणे येथे झाला. नूतन मराठी विद्यालय प्रशाला या शाळेतून १९६१ साली एस.एस.सी.ची परीक्षा उत्तीर्ण झाल्यावर १९६६ साली मराठी, संस्कृत हे विषय घेऊन फर्गसन महाविद्यालयातून ते बी.ए. झाले. १९६८ साली एम.ए.च्या परीक्षेस बसलेल्या सर्व विषयांच्या विद्यार्थ्यांत पहिल्या क्रमांकाने व कुलपती सुवर्णपदकासह सर्व पारितोषिके मिळवून पुणे विद्यापीठातून उत्तीर्ण झाले. 'शोकांतिकेची संकल्पना व काही मराठी नाटके' या विषयावर प्रबंध लिहून १९८० मध्ये त्यांनी पुणे विद्यापीठाची पीएच.डी. पदवी संपादन केली. यशवंतराव चव्हाण महाविद्यालय, खटाव येथे एक वर्ष (१९६८) अधिव्याख्याता म्हणून नोकरी केल्यानंतर त्यांची निवड महाराष्ट्र लोकसेवा आयोगाच्या वतीने मुंबई येथील इस्माईल यूसुफ महाविद्यालयात झाली. १९७५च्या जुलै महिन्यात ते श्रीमती नाथीबाई दामोदर ठाकरसी महिला विद्यापीठाच्या पुणे येथील मराठी विभागात रुजू झाले आणि ३१ डिसेंबर २००४ रोजी विद्यापीठाच्या मुंबई व पुणे येथील मराठी विभागांचे प्रमुख व पुणे परिसरातील पदव्युत्तर अध्ययन व संशोधन विभागाचे प्रशासकीय समन्वयक या पदावरून निवृत्त झाले. २००५ ते २००७ या कालावधीत विद्यापीठ अनुदान आयोगाचे 'एमिरिटस फेलो' व २००७ ते २००९ या कालावधीत भारत सरकारच्या सांस्कृतिक खात्याचे 'सीनिअर फेलो' म्हणून ते कार्यरत होते.

'शोकांतिकेचा उदय'(१९९२) हे त्यांचे पुस्तक ग्रीक शोकांतिकेच्या उदयाची मीमांसा करणारे आहे. 'बाप ज्ञानेश्वर समाधिस्थ'(१९९६) या पुस्तकात त्यांनी नामदेवकृत ज्ञानदेवांच्या समाधीच्या अभंगांचा तपशीलवार ऊहापोह केला असून ज्ञानेश्वरांच्या समाधीसंबंधीच्या सर्व

मतमतांतरांची चर्चा केली आहे. 'भक्तिशोभा'(२००७) हा मध्ययुगीन मराठीतील भक्तिसाहित्याचा परामर्श घेणारा लेखसंग्रह आहे. प्रामुख्याने ज्ञानदेव व नामदेव या संतांविषयीची चर्चा करणाऱ्या लेखांबरोबरच संत कवयित्रींच्या काव्याचे विस्तृत पर्यालोचन हा या लेखसंग्रहाचा उल्लेखनीय विशेष म्हणता येईल.

'अमेरिका व्हाया लंडन'(२००८) हे त्यांचे प्रवासवर्णन त्यांच्या सौंदर्यग्राही वृत्तीतून व संशोधकीय नजरेतून साकार झाले आहे. नायगारा धबधबा पाहिल्यानंतरची, भोवतालच्या स्थिरचराचे भान विसरायला लावणारी लेखकाची मन:स्थिती, अमेरिकेच्या आरंभकालीन अध्यक्षांच्या कार्याचा व त्यांच्या स्मारकांचा त्यांनी घेतलेला वेध, लंडन पाहताना त्यांच्या मनात उठलेले विचारतरंग आणि अमेरिकेतील ग्रंथालयांची समृद्धी यासारखा मजकूर प्रवासवर्णनाचे वेगळेपण मनावर ठसविणारा आहे. नोबेल पारितोषिक प्राप्त झालेल्या लेखिकांसंबंधी त्यांनी 'ललित' या नियतकालिकात लिहिलेल्या एकंदर अकरा लेखांची मालिका हे जागतिक पातळीवरील लेखिकांसंबंधीचे मराठीतील पहिलेवहिले सप्रमाण विवेचन आहे. तौलनिक साहित्याभ्यासाच्या दृष्टीने या लेखनाचे महत्त्व विशेष आहे.

म. द. हातकणंगलेकर, के. ज. पुरोहित, वि. रा. करन्दीकर, पु. ग. सहस्रबुद्धे, माधव मोहोळकर, वा. म .जोशी, श्री. ना. बनहट्टी, साहित्यिक यशवंतराव यांसारखी चौदा-पंधरा वेधक व्यक्तिचित्रे त्यांच्या लेखणीतून उतरली आहेत. यांखेरीज विविध नियतकालिकांतून वेगवेगळ्या विषयांवर त्यांनी अनेकानेक समीक्षालेख लिहिले आहेत. त्यांची समीक्षादृष्टी चिकित्सक व मर्मग्राही आहे. कथा, कादंबरी आणि कविता यांचे सौंदर्य नेमक्या शब्दांत उलगडून दाखवितात. आस्वादक समीक्षेचा वस्तुपाठच त्यांच्या समीक्षेत जाणवतो.

अनेक साक्षेपी व वैशिष्ट्यपूर्ण संपादने हे खोले यांचे महत्त्वाचे साहित्यिक कार्य म्हणता येईल. 'अगस्तीचे अंगण' (२००९) हे प्रभाकर पाध्ये यांच्या साहित्याचे (रेखा इनामदार-साने यांच्या सहकार्याने) त्यांनी केलेले संपादन प्रभाकर पाध्ये यांच्या व्यक्तित्वाचा व वाङ्मयाचा शोधक दृष्टिकोनातून साधार परामर्श घेणारे आहे. 'स्त्री-पुरुष तुलना' (१९९७) या ताराबाई शिंदेलिखित पुस्तकाचे संपादन एकोणिसाव्या शतकातील स्त्रियांच्या परिस्थितीवर प्रखर प्रकाशझोत टाकणारे आहे. महाराष्ट्र फाउंडेशनच्या ग्रंथपुरस्काराने त्याचा सन्मान झाला आहे. 'गेल्या अर्धशतकातील मराठी कादंबरी' (२००२) या संपादनातून १९५१ ते २००० या कालखंडातील मराठी कादंबरीचा वेध घेण्यात आला आहे. या पुस्तकास महाराष्ट्र शासनाचा वि. भि. कोलते पुरस्कार लाभला आहे. 'विसाव्या शतकातील मराठी समीक्षा' (२००४) हा ग्रंथ विसाव्या शतकातील मराठी समीक्षेचे यथोचित समालोचन करणारा आहे. 'चौकट' (१९९१) या स्त्रियांच्या कथांच्या संपादनाला लिहिलेली विस्तृत प्रस्तावना स्त्रीवादी साहित्यसमीक्षेचा नमुनेदार वस्तुपाठ म्हणता येईल.

कथासाहित्याचा व्यासंग असणाऱ्या विलास खोले यांनी केलेली 'राजेन्द्र बनहट्टी यांच्या निवडक दीर्घकथा' (१९९८), 'शांताराम कथा' (१९९८), 'दंडकारण्यातील प्रणयिनी' (१९८७), 'शांताराम पारितोषिक कथा' (२००८) ही प्रकाशने त्यांचे कथासाहित्याचे आकलन व तद्‌विषयक दृष्टी यांचे दर्शन घडवितात. यांखेरीज 'साने गुरुजींचे निवडक निबंध' (१९९९), 'आज्ञापत्र' (२००७), 'केशवराव कोठावळे पारितोषिक ग्रंथ' (२००९), 'लव्हाळी: काही दृष्टिक्षेप' (२००५), 'महाराष्ट्रातील राजकारणाचे साहित्यातील प्रतिबिंब' (१९९८), 'भक्तिगंगेच्या वाटेवर' (हे. वि. इनामदार यांच्या सहकार्याने १९८८), 'अध्यात्म आणि विज्ञान' (१९८४), 'सूर्यबिंबाचा शोध' (१९८४), 'वा.म.जोशी : जीवनदृष्टी आणि साहित्यविचार' (१९८३) ह्या त्यांच्या महत्त्वपूर्ण संपादनांवरून डॉ. खोले यांच्या व्यापक वाङ्मयीन विचारांचा पैस अधोरेखित होतो.

– प्रा. डॉ. सुभाष भेण्डे

**संदर्भ :**

*१. खोले विलास; 'भक्तिशोभा'; प्रतिमा प्रकाशन; २००७.*

* * *

**ग**





## गजेंद्रगडकर, मोनिका अभिजित

**कथाकार**

**९ ऑक्टोबर १९६५**



मोनिका गजेंद्रगडकर यांचा जन्म पुण्याला झाला. शिक्षणही पुणे येथेच झाले. समाजशास्त्र विषयात बी.ए. परीक्षेत व मराठी घेऊन एम.ए. परीक्षेत त्या प्रथम श्रेणीत उत्तीर्ण झाल्या. ख्यातनाम कथाकार विद्याधर पुंडलिक यांच्या त्या कन्या आहेत. मुक्त पत्रकारितेपासून त्यांनी लेखनाला प्रारंभ केला. 'वेचलेले जीवन' ही पहिली कथा १९९३ च्या 'स्पंदन' दिवाळी अंकात प्रसिद्ध झाली. त्यानंतर त्यांच्या अनेक कथा व दीर्घकथा 'मौज', 'दीपावली', 'अक्षर', 'कालनिर्णय' आदी दिवाळी अंकांतून प्रसिद्ध झाल्या, 'मौज प्रकाशन'तर्फे त्यांचे 'भूप' (२००४) आणि 'आर्त' (२००८) हे दोन कथासंग्रह प्रकाशित झाले. चोखंदळ समीक्षकांनी त्यांच्या कथालेखनाचे स्वागत केले.

वडिलांकडून लेखन-वाचनाचा संपन्न वारसा घेतलेल्या मोनिका गजेंद्रगडकरांनी कथालेखिकांच्या मांदियाळीत स्वतःचे वेगळे स्थान अल्पकाळात निर्माण केले. मध्यमवर्गीय कुटुंबात निर्माण होणारे ताणतणाव, त्यामुळे उद्भवणारा नातेसंबंधातील दुरावा, व्यक्तिव्यक्तींतील स्वभाववैशिष्ट्यांमुळे संबंधितांची झालेली होरपळ हे सारे लेखिका प्रत्ययकारी पद्धतीने शब्दबद्ध करते. 'आधार'सारख्या कथेत लेखिकेने समलिंगी संबंध धीटपणे व्यक्त केलेले दिसतात. सतारवादनात कुशल असलेल्या या लेखिकेचे संगीताच्या सूक्ष्म अभ्यासाचे प्रतिबिंब 'भूप'सारख्या कथेत उमटलेले दिसते.

कथालेखनाबद्दल लेखिकेला अनेक मानसन्मान प्राप्त झाले आहेत. नाथीबाई दामोदर ठाकरसी विद्यापीठाची डॉ. स.गं.मालशे संशोधनवृत्ती, विदर्भ साहित्य संघाचा कथाकार शांताराम पुरस्कार, अण्णाभाऊ साठे 'साहित्यरत्न' पुरस्कार, महाराष्ट्र शासनाचा वाङ्मय पुरस्कार हे काही महत्त्वाचे पुरस्कार होत. त्यांच्या कथांचे कोकणी, इंग्रजी, गुजराती ह्या भाषांमध्ये अनुवाद झाले आहेत.

१९९२ पासून मौज प्रकाशनगृहासाठी श्री. पु. भागवत यांना संपादनकार्यात साहाय्यक म्हणून काम करणाऱ्या मोनिका गजेंद्रगडकर २००८ पासून 'मौज' दिवाळी अंकाच्या संपादकपदाची जबाबदारी सांभाळत आहेत.

– डॉ. सुभाष भेण्डे

**संदर्भ :**

*१. खोले विलास, संपादक; 'शांताराम कथापारितोषिक कथासंग्रह', मॅजेस्टिक प्रकाशन, मुंबई; २००८.*

## गडकरी, राम गणेश

☞ **गोविंदाग्रज**

## गणोरकर, प्रभा रामचंद्र

**कवयित्री, समीक्षक**

**८ जानेवारी १९४५**

प्रभा गणोरकर यांचा जन्म शिरजगाव बंड (जि.अमरावती) येथे झाला. बालपण तिथेच गेले. महाविद्यालयीन शिक्षण विदर्भ महाविद्यालय, अमरावती येथे झाले. एम.ए.नंतर त्यांनी 'चि.त्र्यं. खानोलकर यांच्या



वाङ्मयातील शोकात्म भाव' या विषयावर प्रबंध सादर करून पीएच.डी. पदवी मिळवली. प्रथम विदर्भ महाविद्यालयात आणि पुढे मुंबईच्या एल्फिन्स्टन महाविद्यालयात अध्यापन केले. त्यांनी १९६६ नंतर महत्त्वाच्या वाङ्मयीन नियतकालिकांमधून कवितालेखन तसेच समीक्षात्मक लेखन केले. त्यांचा पहिला कवितासंग्रह 'व्यतीत' १९७४ मध्ये प्रसिद्ध झाला, आणि दुसरा कवितासंग्रह 'विवर्त' १९८४ मध्ये काव्यरसिकांसमोर आला. साहित्य अकादमीच्या 'भारतीय साहित्याचे निर्माते' या मालिके अंतर्गत 'कविवर्य बा.भ.बोरकर' या पुस्तकातून बोरकरांच्या काव्याचा आलेख त्यांनी मांडला (१९८७). त्याशिवाय 'बोरकरांची निवडक कविता' (१९९०), 'गंगाधर गाडगीळ : व्यक्ती आणि सृष्टी' (१९९७), 'किनारे मनाचे' (१९९८), 'शांता शेळके यांची निवडक कविता', 'संक्षिप्त मराठी वाङ्मय कोश' (१९९८, सहकार्याने संपादन), 'एकेकाची कथा' (२०००, गाडगिळांची स्त्रीविषयक कथा) ही पुस्तके त्यांनी संपादित केली आहेत. 'कादंबरी : एक साहित्य प्रकार' व 'निबंध: एक साहित्यप्रकार' ही पुस्तके त्यांनी विद्यापीठीय अभ्यासक्रमासाठी लिहिली आहेत.

गणोरकरांच्या 'व्यतीत' या पहिल्या काव्यसंग्रहातून स्त्रीच्या अंतर्मनाचे मनोज्ञ दर्शन तर 'विवर्त'मधून नेणिवेतील स्त्रीमन व्यक्त होते. महानगरीय संवेदनांचा खोल ठसा त्यांच्या कवितेवर असून त्यातून गर्दीतील एकटेपणा, मानवी समूहाची हिंस्रता, अनोळख यांचा प्रत्यय येतो. बोरकरांच्या निवडक कवितेच्या संपादनात बोरकरांची काव्यप्रकृती व नेमकी वैशिष्ट्ये सांगितली आहेत तर शांता शेळके यांच्यावरील ग्रंथात त्यांच्या कवितेचा सहृदय व अभ्यासपूर्ण वेध घेतलेला आहे. गाडगिळांवरील पुस्तकात गाडगीळ एक व्यक्ती, अर्थतज्ज्ञ, विचारवंत व सर्जनशील लेखक म्हणून त्यांचे वेगळेपण अधोरेखित करणाऱ्या लेखांचे संपादन केले आहे. 'गंगाधर गाडगीळ : व्यक्ती आणि सृष्टी' या ग्रंथाच्या संपादनाबद्दल त्यांना महाराष्ट्र शासनाचा पुरस्कार लाभला. स्त्रियांच्या कवितेतील आशयाचे क्षेत्र व्यापक करणारे कविता लेखन आणि अभ्यासपूर्ण संपादने, ही गणोरकरांची वैशिष्ट्ये होत.

नामवंत कवी वसंत आबाजी डहाके, हे त्यांचे पती आहेत.

– अशोक बेंडखळे

**संदर्भ :**

*१. डॉ. खांडगे मंदा व अन्य; 'स्त्री साहित्याचा मागोवा', खंड २.*

## गवस, राजन गणपती

**कवी, कादंबरीकार, समीक्षक**

**२१ नोव्हेंबर १९५९**



सेवादलाचे व पुढे युवक क्रांती दलाचे संस्कार घेऊन उपेक्षितांसाठी काम करणाऱ्या राजन गवस यांचे साहित्यही उपेक्षितांच्या वेदना, ताणतणाव उत्कटपणे प्रकट करते. 'तणकट' या त्यांच्या कादंबरीला २००१ साली साहित्य अकादमीचे पारितोषिक मिळाले. दलित चळवळीतील अंतर्विरोध स्पष्ट करणारी 'तणकट' (१९९८), देवदासींच्या जीवनावरची 'चौंडकं'(१९८५), जोगत्यांच्या प्रश्नासंबंधीची 'भंडारभोग' व साहित्यक्षेत्राशी संबंधित 'कळप'(१९९७) या त्यांच्या गाजलेल्या कादंबऱ्या आहेत.

गडहिंग्लज तालुक्यातील अत्याळ येथे जन्मलेल्या गवस यांचे मूळ गाव करंबळी (जि. कोल्हापूर) आहे. गडहिंग्लज येथून बी.ए.ची पदवी घेऊन शिवाजी विद्यापीठातून १९८२ साली एम.ए. केले. भाऊ पाध्ये यांच्या लेखनावर त्यांनी पीएच.डी. केली.

महाविद्यालयीन काळातच लेखनास सुरुवात करून ‘हुंदका’ हा काव्यसंग्रह प्रकाशित केला. पुढे ते कादंबरीलेखनाकडे वळले. ‘देवदासी’ तसेच ‘माकडवाला संघटना’ या दोन चळवळींत सक्रिय सहभाग घेणाऱ्या गवस यांनी देवदासी व माकडवाला यांच्या जीवनाचे जवळून निरीक्षण केले व तेच त्यांच्या साहित्यातून साकारले. ‘तिरकसपणातील सरळता’ हे रंगनाथ पठारे यांच्या कादंबऱ्यांचे विवेचन (१९९५), ‘मराठीचे आशययुक्त अध्यापन’ (१९९२) ही त्यांची इतर पुस्तके होत.

साहित्य अकादमीसहित अन्य मानाचे पुरस्कारही त्यांना लाभले. ‘महाराष्ट्र फाउंडेशन’ पुरस्कार, ‘भैरू रतन दमाणी’ पुरस्कार यांचेही ते मानकरी ठरले. ‘चौंडकं’, ‘भंडारभोग’, ‘धिंगाणा’, ‘चांगदेव चतुष्टय’ या त्यांच्या पुस्तकांना राज्य पुरस्कार लाभले. १९९२ साली संस्कृती प्रतिष्ठान नवी दिल्ली यांच्यातर्फे दिला जाणारा ‘संस्कृती प्रतिष्ठान’ पुरस्कार त्यांना मिळाला. मॉरीशस विद्यापीठाच्या ‘महात्मा गांधी इन्स्टिट्यूट ऑफ इंडियन लँग्वेज’ या समितीवर ३ वर्षे मराठी भाषेचे परीक्षक म्हणून त्यांनी काम केले. ‘रिवणावायली मुंगी’(२००१), ‘आपण माणसात जमा नाही’ (२००९) हे त्यांचे अलीकडे प्रकाशित झालेले कथासंग्रह असून भालचंद्र नेमाडे यांच्या चार कादंबऱ्यांवरील परीक्षणांचे निवडक लेखही त्यांनी संपादित केले आहेत.

– सुहास बारटक्के

**संदर्भ :**

*१. काळसेकर, सतीश; ‘जगण्यापासून लिहिण्यापर्यंत’ युगांतर - दिवाळी अंक, २००३.*

*२. गवस राजन; ‘राजन गवस’; ललित दिवाळी अंक १९८७*

## गवाणकर, वीणा चंद्रकांत

**चरित्रकार**

**६ मे १९४३**

वीणा गवाणकर यांचा जन्म लोणी, काळभोर, येथे झाला. चौल, मनमाड, इंदापूर, खेड (राजगुरुनगर) येथील शाळांमध्ये वीणाताईंचे शिक्षण झाले. पुढे फर्गसन



महाविद्यालयामधून वीणाताईंनी आपले पदवीपर्यंतचे शिक्षण पूर्ण केले. पुणे विद्यापीठातून ग्रंथपाल म्हणून पदवी प्राप्त केली व १९६४मध्ये त्या मिलिंद महाविद्यालय, औरंगाबाद येथे ग्रंथपाल म्हणून रुजू झाल्या. लहानपणापासून असलेली वाचनाची आवड, शिक्षकांकडून मिळालेले प्रोत्साहन आणि आता ग्रंथपाल म्हणून नोकरी, यामुळे विविध वाङ्मय प्रकारांतील पुस्तकांबरोबरच विविध भाषा आणि जगभरातील पुस्तके यांचा परिचय होत गेला. पुस्तके व वाचन यांच्या आवडीमुळे मुंबईतील पदपथावरील पुस्तकांत त्यांना ‘कार्व्हर’वरील पुस्तक सापडले. त्याला पूरक संदर्भग्रंथ त्यांना एशियाटिक सोसायटी आणि प्राचार्य पु. द. कोडोलीकर यांच्याकडून मिळाले आणि जॉर्ज वॉशिंग्टन कार्व्हरचे चरित्र मराठीत प्रकाशित झाले. या पुस्तकाने इतिहास घडवला. त्याच्या २९ आवृत्त्या निघालेल्या आहेत.

वीणाताईंनी मराठी साहित्यात चरित्रलेखनाची मोलाची भर घातलेली आहे. जन्माने गुलाम असलेल्या अनाथ कृष्णवर्णीय अमेरिकन कृषिशास्त्रज्ञाच्या धडपडीची, मानवी जीवनाचे मोल वाढवणाऱ्या त्याच्या प्रयत्नांचा वेध घेणारी चरित्र कहाणी ‘एक होता कार्व्हर’ (१९८१) यामधून घडवली आहे. मानवी जीवनाची सेवा करण्यासाठी, भारतातील ग्रामीण आरोग्याचा स्तर उंचावण्यासाठी आपले ज्ञान वापरणाऱ्या कर्तव्यनिष्ठ अमेरिकन महिला डॉक्टरची जीवनकथा ‘डॉ. आयडा स्कडर’ मधून (१९८४) चित्रित केलेली आहे. ‘सर्पतज्ज्ञ डॉ. रेमंड डिटमार्स ’(१९८७) यामधून साप पाळण्याच्या छंदापासून जागतिक कीर्तीचा सर्पतज्ज्ञ होण्यापर्यंतचा एक मुलखावेगळा प्रवास खास किशोर वाचकांसाठी वीणाताईंनी रेखाटलेला आहे. ‘पक्षितज्ज्ञ डॉ. सलीम अली’ (१९९०) हे चरित्र भारतीय पक्षी विज्ञानाला

सालिम अलींच्या ज्ञानाचा मोठेपणा हा की ते ज्ञान हस्तिदंती मनोऱ्यातलं नव्हतं. त्या ज्ञानाला कृतिशीलतेची जोड होती. ही पृथ्वी, तिच्यावरचं पर्यावरण सजीवांना जगण्यालायक राखण्यासाठी लोकजागृती झाली पाहिजे याचं भान त्यांना होतं. आणि त्यासाठी ते प्रयत्नशीलही होते. अगदी शेवटच्या क्षणापर्यंत.

[ डॉ. सालिम अली, (मनोगत - मधून) वीणा गवाणकर.

जागतिक स्तरावर मान्यता प्राप्त करून देणाऱ्या आंतरराष्ट्रीय कीर्तीच्या पक्षितज्ज्ञाच्या जीवनकार्याचा वेध घेणारे आहे. 'डॉ. खानखोजे : नाही चिरा नाही पणती' (१९९७) या चरित्रग्रंथात महान क्रांतिकारक आणि श्रेष्ठ कृषितज्ज्ञ, स्वातंत्र्यसंग्रामात परागंदा व्हावे लागलेल्या भारतीय सुपुत्राचा अस्सल पुराव्यांच्या आधारे घेतलेला शोध आहे.

नोबेल पुरस्कारासाठी 'लीझ माइटनर' यांचे नाव पंधरा वेळा सुचवले गेले. हिटलरच्या जर्मनीला प्रयत्न करूनही जिचे पायाभूत संशोधन दडपता आले नाही, अशा एका ऑस्ट्रिअन अणुशास्त्रज्ञ स्त्रीची कहाणी 'लीझ मायटनर' (२००३) या चरित्रात आहे. 'भगीरथाचे वारस : विलासराव साळुंखे' (२००५) हे चरित्र म्हणजे 'पाणी ही एक राष्ट्रीय संपत्ती आहे. ती वैयक्तिक असूच शकत नाही. भूमिहीनांचाही तिच्यावर हक्क आहे.' असे ठणकावून सांगणाऱ्या आणि जलव्यवस्थापनाचा व जलनियोजनाचा नवा विचार मांडून त्याच्या प्रसारासाठी आयुष्यभर कटिबद्ध राहिलेल्या एका मनस्वी अभियंत्याच्या प्रयत्नांना अक्षरबद्ध केलेली साक्ष आहे.

याखेरीज 'ली आयकोला', 'विन्नी मंडेला', 'एमेलिन पॅखहर्स्ट', 'जोन ऑफ आर्क', असे ३० चरित्रपर लेख वीणाताईंनी विविध दिवाळी अंकांतून लिहिले आहेत. एखाद्या व्यक्तित्वाच्या सखोल अभ्यासाने, साऱ्या कंगोऱ्यांसह प्रत्येक चरित्र वीणाताई आपल्यासमोर साक्षात सादर करतात. डॉ. आयडा स्कडरची जीवनकहाणी तपासण्यासाठी त्या केरळ येथे काही दिवस जाऊन राहिल्या. डॉ. खानखोजेंच्या कार्याचे दुवे शोधण्यासाठी त्या दिल्ली आणि कोलकाता येथे जाऊन आल्या.

चरित्रलेखनाबरोबरच वीणाताईंनी 'लोकसत्ता'च्या रविवार पुरवणीतील 'किशोरकुंज'चे (१९८९-१९९१) संपादन केले. 'एक होता कार्व्हर' (१९८५); पक्षीतज्ज्ञ डॉ. सलिम अली-(१९९०); डॉ. खानखोजे, नाही चिरा नाही पणती' (१९९७) ह्या त्यांच्या पुस्तकांना उत्कृष्ट वाङ्मयनिर्मितीबद्दल महाराष्ट्र शासनाचे पुरस्कार मिळाले आहेत.

– डॉ. सिसिलिया कार्व्हालो

## गस्ती भीमराव

☞ **मुख्य चरित्रनोंद – समाजकारण खंड**

## गाडगीळ, गंगाधर गोपाळ

**कथाकार, कादंबरीकार**

**२५ ऑगस्ट १९२३ – १५ सप्टेंबर २००८**

सौ. सत्यभामा व श्री. गोपाळ कृष्ण गाडगीळ यांचे ज्येष्ठ पुत्र गंगाधर गाडगीळ यांचा जन्म मुंबई येथे झाला.



आर्यन एज्युकेशन सोसायटीची शाळा, गिरगाव मुंबई येथून १९३८ साली मॅट्रिक झाले. १९४४ साली मुंबई विद्यापीठाच्या विल्सन महाविद्यालयातून एम. ए.ची इतिहास, राज्यशास्त्र व अर्थशास्त्र या विषयात पदवी प्राप्त केली. १९४८ साली वासंती खटखटे यांच्याशी ते विवाहबद्ध झाले. १९४६ साली किकाभाई महाविद्यालय, सूरत; पोद्दार महाविद्यालय, व सिडनहॅम महाविद्यालय, मुंबई १९५९, रुपारेल महाविद्यालय, मुंबई येथे प्राध्यापक म्हणून कार्यरत होते. १९४६ पासून १९७१ पर्यंत त्यांनी नरसी मोनजी वाणिज्य महाविद्यालय, मुंबई ह्या महाविद्यालयाचे प्राचार्यपद भूषविले. आपटे उद्योग समूह, मुंबई व वालचंद उद्योग समूह ह्यांचे ते आर्थिक सल्लागार होते.

**मराठी नवकथेचे शिल्पकार**

१९४१ साली 'प्रिया आणि मांजर' ही पहिली कथा 'वाङ्मयशोभा' मासिकात प्रकाशित झाली. तेव्हापासून २००८ पर्यंत सातत्यपूर्ण अशी प्रदीर्घ साहित्यिक कारकिर्द. गाडगिळांना लेखक म्हणून आपल्या स्वत्वाची व सामर्थ्याची खूण प्रारंभकाळातच उमगली. १९४९मध्ये 'कडू आणि गोड' कथेला 'अभिरुची' मासिकाचे पारितोषिक, १९५४ साली 'भिनलेले विष' कथेला न्यूयॉर्क हेरल्ड ट्रायब्यून पारितोषिक तसेच 'तलावातले चांदणे' (१९५४), 'ओले उन्ह' (१९५७) या कथासंग्रहांना मुंबई राज्य पारितोषिके– अशी मान्यता यांच्या कथालेखनाला मिळाली. १९४५ ते १९६० हा कथाक्षेत्रावरील त्यांच्या अधिराज्याचा कालखंड ठरला.

१९४० नंतरच्या दशकात बा. सी. मर्ढेकरांनी कवितेच्या क्षेत्रात आणि गाडगिळांनी कथाक्षेत्रात मन्वंतर घडवून आणले. प्रस्थापित साहित्यपरंपरेला नकार व धक्का देणाऱ्या त्यांच्या साहित्यातून नवसंवेदनशीलता, नवी कलादृष्टी मूर्त झाली. पाश्चात्त्य साहित्य व समीक्षा यांतील नव्या प्रवाहांची प्रेरणा या प्रवर्तनामागे निश्चितच होती, परंतु तीच केवळ नव्हे. विसाव्या शतकातील झपाट्याने व अंतर्बाह्य बदलत गेलेले जीवनवास्तव, नवनवे ज्ञानव्यूह, नवे संशोधन, त्यातून उपजलेली नवी परिप्रेक्ष्ये आणि नवे जीवनदर्शन हे सारे साहित्यातील नवतेच्या प्रवर्तनाला प्रेरक ठरले. त्यातून नव्या कलासंकेतांचा व्यूह अपरिहार्यपणे आकाराला आला. गाडगिळांच्या नवकथेतूनही याची प्रचिती येते.

**निषेधगंडापासून मुक्ती**

आधुनिक नागर संवेदनशीलता हा त्यांच्या कथेतील अनुभवविश्व घडवणारा एक मूलभूत घटक आहे. महायुद्धोत्तर यंत्रयुगीन जीवनातील गर्दीच्या संस्कृतीचा, विघटनाच्या प्रक्रियेचा अर्थ शोधू पाहणारी ही कथा आहे. मुंबई नगरीचे संवेदन ती साक्षात करते. पांढरपेशा मध्यमवर्गीयांची जीवनप्रणाली, त्यांचे अनुभवविश्व, ते नियंत्रित करणारा मूल्यव्यूह यांचे चित्रण ती बहुधा करते; पण महत्त्वाची गोष्ट ही की त्यापलीकडे जाऊन मानवी मन व जीवन यांच्या व्यामिश्र स्वरूपाची, त्यांतले अंतर्विरोध व अतर्क्यता यांची प्रतीती ती घडवते. माणसाचे सनातन एकाकीपण, जीवनातील असंगतता यांचा वेध घेणाऱ्या गाडगिळांच्या या कथेतील जीवनार्थाचा संदर्भ व्यापक आहे. त्याला अनेक पातळ्या व परिमाणे आहेत. अनुभवविश्वाच्या अशा अपारंपरिक, नव स्वरूपामुळे गाडगिळांना मुळात कथा या साहित्यप्रकाराची संकल्पना नव्याने घडवणे, ती अधिक खुली करणे अपरिहार्य ठरले. कथानक, पात्र, निवेदक इत्यादी कथाघटक आणि त्यांच्या संघटनेमागची तत्त्वे यांच्या स्वरूपात त्यांनी मूलगामी परिवर्तन घडवून आणले. त्यातूनच मराठी 'नवकथा' निर्माण झाली. पु. भा. भावे, अरविंद गोखले, व्यंकटेश माडगूळकर प्रभृती कथाकार या काळात गाडगिळांचे सहप्रवासी होते.

कलावंतांचे अनुभव घेण्यामधले स्वातंत्र्य हे मूल्य गाडगिळांच्या नवनिर्मितीमागची एक महत्त्वाची प्रेरणा होती. साहित्यक्षेत्रात त्या काळी प्रचलित असलेल्या निषेधगंडापासून मुक्तता; साहित्याची शुचिता व सुंदरता

याविषयीच्या प्रगल्भ, आधुनिक कलाजाणिवा यांचे या स्वातंत्र्याच्या मूल्याशी नाते जुळते. गाडगिळांमधल्या कलावंतांची अशी साहसी, प्रयोगशील वृत्ती त्यांच्या इतर साहित्यप्रकारांतल्या लेखनातूनही व्यक्त होते. 'लिलीचे फूल' (लघुकादंबरी, १९५५), 'साता समुद्रापलीकडे' (प्रवासलेखन, १९५९– मुंबई राज्य पारितोषिक) तसेच 'ज्योत्स्ना आणि ज्योती' (नाटक, १९६४) ही त्याची ठळक उदाहरणे होत. गाडगिळांनी प्रवासलेखन ('गोपुरांच्या प्रदेशात' १९५२) त्या आधी आणि नंतरही केले ('चीन : एक अपूर्व अनुभव' १९९३; 'नायगाराचं नादब्रह्म' ११९४; 'हिममय अलास्का' २००० इत्यादी). 'साता समुद्रापलीकडे'मधून मात्र त्यांनी प्रवासलेखनातील नवनिर्मितीच्या विविध शक्यता प्रत्यक्षात आणून एक नवा मानदंड निर्माण केला. 'वेड्यांचा चौकोन' (१९५२) ह्या नाटकामधून त्यांनी मराठी रंगभूमीला त्या काळात तशा अनोख्या असलेल्या आधुनिक फार्सचा नमुना सादर केला. याखेरीज १९४१ ते १९७० या पहिल्या पर्वात गाडगिळांनी गंभीर कथांच्या जोडीने विनोदी कथाही लिहिल्या तसेच श्रुतिका / एकांकिका, बालसाहित्य व समीक्षा या प्रकारचे लेखनही केले.

**नव्या वाटांचा शोध**

'दुर्दम्य' (१९७१) या लोकमान्य टिळकांच्या जीवनावरील चरित्रात्मक कादंबरीपासून गाडगिळांच्या साहित्यिक कारकिर्दीचे उत्तरपर्व सुरू होते. त्यांच्या लेखनाने इथे एक वेगळे वळण घेतले. तोपर्यंतच्या आपल्या लेखनातून ते मुख्यतः थांग घेत राहिले तो आंतर वास्तवाचा, माणसाच्या अंतर्विश्वाच्या बाह्य वास्तवाचा संदर्भ तिथे अर्थपूर्ण होताच, पण परोक्षपणे मुख्यतः कथेसारखा स्फुट साहित्यप्रकार त्यांनी हाताळला आणि सर्वसामान्य माणसांच्या, त्यांच्या जीवनव्यवहाराच्या चित्रणातून म्हणजे सर्वसामान्यत्वातून जीवनार्थाची निर्मिती केली, वीरनायकाच्या प्रतिमेला तिथे स्थान नव्हते. लेखनाच्या दुसऱ्या पर्वात त्यांनी कादंबरीसारखा मोठा अवकाश असलेला साहित्यप्रकार निवडला. 'दुर्दम्य' आणि 'प्रारंभ' (२००२) या बृहद् कादंबऱ्यांतून त्यांनी अनुक्रमे लोकमान्य टिळक आणि जगन्नाथ शंकरशेट या लोकोत्तर पुरुषांच्या, त्यांच्या जीवनकार्याच्या चित्रणातून ऐतिहासिक वास्तवाची पुनर्निर्मिती केली. राष्ट्रातील सामाजिक–राजकीय उत्थानाची प्रक्रिया, जुलमी परकीय राजवटीशी दिलेला लढा ('दुर्दम्य') आणि मुंबईनगरीच्या उत्क्रमणाचा, जडणघडणीचा पट, आधुनिक संस्कृतीच्या प्रवाहात तो सामावत जाण्याचा घटनाक्रम ('प्रारंभ') असे व्यापक जीवनक्षेत्र त्यांतून चित्रित झाले. 'गंधर्वयुग' (२००५ बालगंधर्व), 'भरारी' (२००६ रा. ब. विश्वनाथ ना. मंडलीक) अशा कादंबऱ्यांचा आवाका वरील बृहद् कादंबऱ्यांशी तुलनीय नसला, तरी त्यांची जातकुळी तीच आहे.

या सर्वच कादंबऱ्यांना बहुमुखी वाचकप्रतिसाद मिळाला. विशेष अभिज्ञ अशा वाचकांसह वाचकांची इतर वर्तुळेही गाडगिळांच्या वाचकवर्गात सामावून गेली.

ही गोष्ट त्यांच्या या काळातल्या इतर ललिलेखनाबाबतही खरी आहे. उदाहरणार्थ 'फिरक्या' (१९७६) व अन्य संग्रह, 'आर्थिक नवलकथा' (१९८२ व १९८५), तसेच 'मुंबई आणि मुंबईकर' (१९७०) व 'मुंबईच्या नवलकथा' (१९९६) इत्यादी. प्रत्यक्षातील अनुभवांना कल्पिताची डूब देत विनोदी ललितलेखाचा एक नवा मुक्त बाज गाडगिळांनी 'फिरक्या'च्या रूपाने घडवला. याखेरीज मुंबईच्या सामाजिक– सांस्कृतिक इतिहासातून निपजलेले, एकोणिसाव्या शतकातल्या मुंबईतील जीवनाचा खास स्वाद देणारे लेखन हीदेखील अस्सल 'मुंबईकर' लेखक असलेल्या गाडगिळांची आणखी एक वेधक निर्मिती आहे. 'Crazy Bombay' (१९९१) या इंग्रजी पुस्तकाचाही या अनुषंगाने आवर्जून उल्लेख केला पाहिजे, त्यातील बहुरंगी विनोदाचा उल्लेख होणेही अपरिहार्य आहे.

गाडगिळांनी नव्या वाटांचा शोध घेतला तो विनोदाच्या क्षेत्रातही. त्यांचे विनोदी लेखन कथा, एकांकिका, फार्स, ललित लेख, प्रवासलेखन असे विविध

साहित्यप्रकारांतील आहे. मराठीतील प्रस्थापित व लोकप्रिय अशा उपहासप्रधान, विडंबनपर विनोदपरंपरेचाच मागोवा घेत न राहता त्यांनी आपला रोख वळवला तो केवल/विशुद्ध विनोदाच्या विविध रूपांचा शोध घेण्याकडे. सौम्य व सूक्ष्म प्रकृतीच्या विनोदाच्या अनेकविध रुची व तऱ्हा त्यांनी नव्यानेच मराठीत आणल्या. त्यांनी फँटसीचा मेळ विनोदाशी साधला. तसेच उन्मुक्त, अवखळ, प्रहसनात्मक विनोदाची नानाविध रूपे साकारली. चिं. वि. जोशी यांच्या चिमणरावाप्रमाणे गाडगिळांचा बंडू, त्याची पत्नी स्नेहलता आणि त्यांचे जग हे वाचकाच्या भावविश्वाचा एक अविभाज्य घटक होऊन राहिले. ('खरं सांगायचं म्हणजे....', १९५४, 'बंडू' १९५७) त्यांच्या विनोदी लेखनाने मराठी विनोदाभिरुचीला अधिक मुक्त, चौरस तसेच सूक्ष्मतरल होण्याचे आवाहन सातत्याने केलेले आहे.

'एका मुंगीचे महाभारत' हे गाडगिळांचे आत्मचरित्र (१९९३ साली प्रसिद्ध), (१९९६ साली साहित्य अकादमी पुरस्कार) ही उत्तरार्धातील त्यांची आणखी एक महत्त्वाची अशी बृहद् संहिता आहे. निर्मितिप्रक्रियेचे रहस्य आणि आपला विशिष्ट प्रतिभाधर्म यांचा शोध घेऊ पाहणाऱ्या लेखकाची ही गोष्ट आहे. कलावंत म्हणून घेतलेला आत्मशोध आणि अनुषंगाने स्वतःच्या साहित्याची केलेली पुनरालोचना हे या आत्मचरित्राचे खास वैशिष्ट्य आहे. एक माणूस आणि एक लेखक या आपल्या व्यक्तिमत्त्वाच्या दोन रूपांतल्या परस्पर अनुबंधांचा मागोवा घेण्याची प्रक्रियाही यातून दिसून येते. समकालीन वाङ्मयीन, सामाजिक-सांस्कृतिक कालखंडाची पुनर्निर्मिती हा या संहितेत सामावलेला एक महत्त्वाचा दस्तऐवज आहे. या आत्मचरित्राला पूरक असा 'आठवणींच्या गंधरेखा' (१९९३) हा व्यक्तिचित्रांचा संग्रह गाडगिळांच्या आत्मकथनपर स्फुट लेखनाचा एक दर्जेदार नमुना आहे.

एक लेखक म्हणून अनेक गोष्टी करून पाहण्याचा पिंडधर्म असलेले गाडगीळ बालसाहित्यातही रमले. सुरुवातीच्या काळापासून ('लखूची रोजनिशी'- कथा १९५४; 'शहाणी मुले'- एकांकिका, १९६१ इत्यादी) ते अगदी अखेरपर्यंत ('अश्रूंचे झाले हिरे', 'गरुडाचा उतरला गर्व'- कथा, २००८ इत्यादी) त्यांनी मुलांसाठी लिहिले. मुलांच्या मुक्त, निरंकुश मनोव्यापारांविषयी त्यांना असलेली त्यांना असलेली ओढ आणि समज तसेच मुलांकडे रोमँटिक दृष्टिकोनातून न पाहता, तीदेखील लहान वयातली पण गुणदोषयुक्त अशी माणसेच, ही त्यांची जाण हे विशेषही त्यांच्या बालसाहित्याला धार्जिणे ठरले. 'धाडसी चंदू' (१९५१) हा मार्क ट्वेनच्या 'टॉम सॉयर'चा त्यांनी केलेला संक्षिप्त, स्वैर अनुवाददेखील मुलांना आपलासा वाटला.

**समीक्षक गाडगीळ**

नवसाहित्याचे समर्थक, प्रवक्ते म्हणून गाडगीळ प्रथम समीक्षेकडे वळले. पुढेही वेळोवेळी प्रसंगानिमित्ताने त्यांनी साहित्यिक वादांत झुंज दिली. गाडगिळांचे समीक्षालेखन तात्त्विक आणि प्रत्यक्ष (practical) असे दोन्ही प्रकारचे आहे. आधुनिक साहित्याची जी प्रत्यक्ष समीक्षा त्यांनी केली, तिला 'आस्वादक समीक्षा' असे म्हणत; तथापि ती भारावून जाऊन लिहिलेली संस्कारवादी समीक्षा नाही. तिला निश्चित अशी तात्त्विक बैठक आहे, वैचारिक शिस्त आहे. तसेच गाडगिळांची सूक्ष्मतरल सौंदर्यदृष्टी, अभिजात रसिकता यांचा प्रत्यय घडवणारी अशी ती आहे. त्यांची साहित्यविषयक भूमिका स्वायत्ततावादी म्हणता येईल, मात्र ती एकारलेली नाही; संतुलित, समग्रतेचे भान ठेवणारी अशी आहे. 'खडक आणि पाणी'(१९६०), 'साहित्याचे मानदंड' (१९६२), 'पाण्यावरची अक्षरे' (१९८०, न. चिं. केळकर पारितोषिक, पुणे), 'आजकालचे साहित्यिक' (१९८०, रा. श्री. जोग पारितोषिक, पुणे), 'प्रतिभेच्या सहवासात' (१९८५) हे त्यांचे काही महत्त्वाचे समीक्षाग्रंथ होत. 'Indian Literature : Issues and Explorations' (१९९५) हा भारतीय

साहित्याचा परामर्श घेणारा इंग्रजी ग्रंथही त्यांनी लिहिला आहे.

समीक्षेखेरीज अन्य वैचारिक लेखनही गाडगिळांनी केलेले आहे. ('आर्थिक प्रश्न आणि अर्थव्यवस्था', १९८५; 'आर्थिक प्रश्न : काल, आज आणि उद्या', १९९७) अर्थशास्त्र चारचौघांच्या भाषेत मांडणे आवश्यक आहे, ते सर्वसामान्य नागरिकाला उमगले पाहिजे, असे त्यांचे म्हणणे असे. 'आर्थिक नवलकथां'तूनही त्यांना हेच साधायचे होते. समाजवादी विचारप्रणालीच्या अधिराज्याच्या काळात गाडगिळांनी त्यातील पोथीनिष्ठता, एकरलेले दृष्टिकोन व धोरणे यांच्या संभाव्य धोक्यांबाबत सावधगिरीचा इशारा दिला; मुक्त अर्थयंत्रणेचा पुरस्कार केला, बराचसा एकाकीपणे. संकल्पना, मग त्या कोणत्याही क्षेत्रातील असोत, साधनांसारख्या असतात, स्वयंभू नव्हेत. त्यांचा वापर केला तरी त्यांचे गुलाम होऊ नये आणि आवश्यकतेनुसार त्यांची चौकट लवचीक केली पाहिजे, अशी त्यांची धारणा होती.

गाडगिळांच्या साहित्याचे इंग्रजीत आणि हिंदी, गुजराती अशा इतर भारतीय भाषांत अनुवाद झालेले आहेत. ('बस का टिकट', १९९१; 'खिचाइयाँ', २००१; केटलीक वर्ताओ, गुजराती; 'The Beginning', २००६ इत्यादी त्यांतील काही इंग्रजी अनुवाद त्यांनी स्वतः केलेले आहेत. ('The Throttled street and other stories; १९९४ इत्यादी) संस्थात्मक कार्य हेदेखील गाडगिळांच्या कर्तृत्वाचे अंग आहे. सचिव, ऑल इंडिया रायटर्स कॉन्फरन्स (१९६२), अध्यक्ष मुंबई, मराठी साहित्य संघ (१९८३-२००४) अध्यक्ष, मुंबई मराठी साहित्य महामंडळ काही काळ उपाध्यक्ष, साहित्य अकादमी (१९८८-९३) इत्यादी पदांवरून त्यांनी महत्त्वपूर्ण कामगिरी बजावली. मुंबई ग्राहक पंचायतीचे अध्यक्ष (१९८४-२००७) म्हणून त्यांनी केलेले पायाभूत स्वरूपाचे कार्य त्यांच्या साहित्येतर संस्थात्मक कार्याचे एक उल्लेखनीय उदाहरण होय.

मराठी साहित्यपरंपरेला नवसंजीवनी व समृद्धी देणारे लेखक म्हणून गाडगिळांची कामगिरी ऐतिहासिक महत्त्वाची आहे. अखिल भारतीय मराठी साहित्य संमेलनाचे अध्यक्षपद (५६ वे अधिवेशन, रायपूर, मध्यप्रदेश, १९८१), 'जनस्थान पुरस्कार'(कुसुमाग्रज प्रतिष्ठान, नाशिक १९९७), 'अनंत लाभसेटवार पुरस्कार' (२००३) असे महत्त्वाचे सन्मान प्राप्त झाले. अखेरपर्यंत लिहिते राहिलेले गाडगीळ मराठी साहित्यविश्वात सदैव प्रस्तुत राहिले.

– सुधा जोशी

**संदर्भ :**


१. *जोशी सुधा; 'गंगाधर गाडगीळ: वाङ्मयसूची'; १९८७.*

२. *वडेर प्रल्हाद संपादक; 'प्रा. गंगाधर गाडगीळ यांचे साहित्य'; १९९७.*

३. *गणोरकर प्रभा, संपादक; 'गंगाधर गाडगीळ : व्यक्ती आणि सृष्टी'; १९९७.*

४. *जोशी सुधा; 'कथा: संकल्पना आणि समीक्षा'; २०००.*


## गाडगीळ, बाळ

***गाडगीळ, पांडुरंग लक्ष्मण***

**विनोदी कथाकार, कादंबरीकार, अनुवादक**

**२९ मार्च १९२६**



जवळपास पन्नास वर्षे प्राधान्याने विनोदी कथालेखन करणारे बाळ गाडगीळ यांचा जन्म रत्नागिरी जिल्ह्यातील हुर्से या गावी झाला. कौटुंबिक आर्थिक परिस्थिती हलाखीची असल्याने स्वतःच्या पायावर उभे राहत पुढील सर्व उच्च शिक्षण घेतले. मुंबई विद्यापीठात अर्थशास्त्रात पदव्युत्तर पदवी घेऊन भारतीय प्रशासनिक सेवा (आय.ए.एस) आणि मध्यवर्ती सेवा परीक्षा उत्तीर्ण (१९५१) झाले. अमेरिकेतील विस्कॉन्सिन विद्यापीठात (१९६३) शिक्षण व नोकरी केली. अर्थशास्त्राचे प्राध्यापक म्हणून

मुंबई, पुणे, सांगली येथे काम केले. सांगलीच्या बृहन्महाराष्ट्र कॉमर्स व पुण्याच्या फर्गसन महाविद्यालयाचे प्राचार्य म्हणून दीर्घकाळ काम करीत असताना प्रशासनाचाही मोठा अनुभव मिळाला. शिक्षण क्षेत्रातील वेगळा प्रयोग म्हणून ओळखल्या जाणाऱ्या 'सिम्बॉयसीस' या शिक्षणसंस्थेचे प्रथम शिक्षण सल्लागार, विद्यमान उपाध्यक्षपदी कार्यरत आहेत.

गाडगिळांचा अध्ययन व अध्यापन याचा विषय अर्थशास्त्र हा असल्याने या विषयावर त्यांनी क्रमिक पुस्तके लिहिली असून अर्थशास्त्रविषयक राष्ट्रीय व जागतिक नियतकालिकांमधूनही विपुल लेखन केले आहे. अर्थशास्त्रविषयक अनेक परिषदांमध्येही ते सहभागी झाले आहेत. उत्तम वक्ते, कथाकार, कादंबरीकार, प्रवासवर्णनकार म्हणून प्रसिद्ध असलेल्या गाडगिळांनी 'वळचणीचे पाणी' (२००१) हे आत्मचरित्र लिहिले असून त्यात कोकणातील दारिद्र्य आणि त्यावर मात करून स्वत:चे स्वतंत्र विश्व निर्माण करणाऱ्या पांढरपेशा वर्गाचे दर्शन घडते. अनेक अनुकूल-प्रतिकूल वाटा, वळणांचा शोध घेत हे वळचणीचे पाणी कसे प्रवाहित राहिले, त्याचा प्रवाही वेध गाडगीळ यांच्या या आत्मचरित्रातून घेतलेला जाणवतो. बऱ्यावाईट अनुभवांबरोबरच यातून काही व्यक्तिचित्रे (विशेषतः त्यांच्या आईचे) चांगल्या रितीने साकारली आहेत.

गाडगीळ यांनी मराठी साहित्यसृष्टीत विनोदी कथाकार म्हणून स्वतःची वेगळी ओळख निर्माण केली आहे. त्यांच्या या कथा बहुशः मध्यमवर्गीय मानसिकतेवर बेतल्या असल्या आणि चिं. वि. जोशी यांचा प्रभाव त्या कथांवर जाणवत असला; तरी वेगळी शैली, अनुभवांचे वैविध्य, रोचक भाषा यांमुळे त्या स्वतंत्र अंगाच्या, वेगळ्या ढंगाच्या झाल्या आहेत. समाजातील व्यथा, वेदना, विसंगती, कारुण्य, स्वार्थ अशा अनेक गोष्टींना गाडगिळांच्या कथालेखनातून नेमकेपणाने स्थान मिळाले आहे.

'लोटांगण' (१९६१) या त्यांच्या विनोदी लेखनाला १९६१ सालचा महाराष्ट्र शासनाचा 'उत्कृष्ट विनोदी लेखनाचा' पहिला पुरस्कार ख्यातनाम विनोदी लेखक पु. ल. देशपांडे यांच्या 'अपूर्वाई' या पुस्तकाच्या बरोबरीने विभागून मिळाला. पुढेही त्यांना शासनाची व अन्य संस्थांची पारितोषिके मिळाली. 'माशाचे अश्रू' (१९५८), 'गबाळ ग्रंथ' (१९६२), 'चोर आणि मोर' (१९६७), 'बंडल' (१९९१) असे त्यांचे अनेक विनोदी कथासंग्रह प्रसिद्ध झाले असून त्यांची संख्या तीसच्या पुढे आहे. 'रेखा', 'आकार रेषा' या कथासंग्रहांतूनही गाडगीळ यांची कथालेखनातील स्वतंत्र वाटचाल निदर्शनास येते. विनोदी आणि ललित शैलींतील त्यांचे काही निबंध आणि वृत्तपत्रीय सदरलेखनही प्रसिद्ध आणि वाचकप्रिय आहे. त्यामध्ये 'म्यां, माझा बाप आणि ह्येचा बाप' याचा विशेष उल्लेख करता येईल. 'विनोद तत्त्वज्ञान' या ग्रंथातून गाडगिळांनी विनोद या साहित्य प्रकाराचे मूलगामी तत्त्वनिष्ठ आणि या आकृतिबंधाचे श्रेष्ठत्व व वेगळेपण दाखविणारे विवेचन केले आहे. 'विनोद केवळ हसण्यावारी नेण्याची गोष्ट नाही. त्यामागे एक जीवनदृष्टी आहे', अशी भूमिका घेऊन त्यांनी सर्व अंगांनी विनोद विवेचन केले असून इतर विनोदी साहित्याबद्दल गाडगिळांचा दृष्टिकोन स्वागतशील आहे. गाडगिळांच्या बहुतेक पुस्तकांना त्या-त्या वेळच्या मान्यवर समीक्षकांच्या आस्वादक प्रस्तावना आहेत. त्यांत वा. ल. कुलकर्णी, म. द. हातकणंगलेकर यांचा समावेश आहे.

'सिगारेट आणि वसंतऋतु' या वेगळ्या प्रकारच्या प्रवासवर्णनातून अमेरिकेचे खेळकर, प्रसन्न आणि तरीही चिंतनशील दर्शन घडते. 'दुपारच्या सावल्या'मधून त्यांनी लिहिलेली वेचक व वेधक व्यक्तिचित्रे समोर येतात. 'आदर्श शिक्षक' पुरस्कारासह अनेक पुरस्कार त्यांना मिळाले असून साहित्य संमेलनांची अध्यक्षपदे त्यांनी भूषविली आहेत. प्रा. हातकणंगलेकर यांनी 'प्रसन्न शैली आणि हृद्य, खुबीदार, निर्विष विनोदबुद्धी' अशा शब्दांत गाडगिळांबद्दल लिहिले आहे.

– मधू नेने

ग

**संदर्भ :**

*१. गाडगीळ पांडुरंग लक्ष्मण; 'वळचणीचे पाणी' ,आत्मचरित्र; महाराष्ट्र साहित्या पत्रिका, पुणे; २००१.*

*२. 'मराठी वाङ्मयाचा इतिहास' खंड ७, भाग १; महाराष्ट्र साहित्य पत्रिका; पुणे, २८ मे २००९.*

## गाडगीळ, सदाशिव रामचंद्र

**संशोधक, समीक्षक**

**८ ऑगस्ट १९१६ – ९ ऑक्टोबर २००८**



सदाशिव रामचंद्र गाडगीळ यांचा जन्म कुरुंदवाड या संस्थानी गावी झाला. त्यांचे प्राथमिक व माध्यमिक शिक्षण कुरुंदवाडलाच झाले. पुढे त्यांनी बी.ए. व एम.ए. या पदव्या मुंबई विद्यापीठातून घेतल्या. ते १९७३ साली मराठवाडा विद्यापीठातून पीएच.डी. झाले. त्यांच्या प्रबंधाचा विषय होता. 'वैदिक यज्ञ, मध्ययुगीन तंत्रसाधना आणि ज्ञानेश्वरप्रणित भक्तियोग'.

नांदेडच्या पीपल्स महाविद्यालयात त्यांनी १९५० ते १९७७ या काळात मराठीचे प्राध्यापक हे पद भूषविले. १९७३ ते १९७७ ते नांदेडच्या महाविद्यालयात प्राचार्यपदावर रुजू झाले. १९७३ साली विद्यापीठाच्या मानव्य विभागावर 'डीन' म्हणून त्यांची निवड झाली.

'हॅम्लेट (विकार-विलसित) – एक चिकित्सक अभ्यास' हे पुस्तक १९५२ मध्ये विशेष गाजले. 'सवाई माधवरावाचा मृत्यू – एक चिकित्सक अभ्यास' हे पुस्तक १९५३ च्या प्रारंभीच्या लेखनानंतर 'काव्यशास्त्र प्रदीप' (१९५५) याची सहावी आवृत्ती निघून त्यांच्या चिकित्सक व खोलवर विचार करण्याच्या त्यांच्या प्रवृत्तीने हा ग्रंथ विशेष करून गाजला. आजही त्याकडे विशेषत्वाच्या दृष्टिकोनातून बघितले जाते. या ग्रंथात भारतीय व पाश्चात्त्य साहित्य विचारांचा तौलनिक व चिकित्सक दृष्टीने केलेला अभ्यास मांडलेला आहे.

'वैदिक यज्ञ, मध्ययुगीन तंत्रसाधना आणि ज्ञानेश्वरांचा भक्तियोग' याला तर्कतीर्थ लक्ष्मणशास्त्री जोशी यांची प्रदीर्घ, टोकदार प्रस्तावना लाभलेली आहे. त्यात ते स. रा. गाडगिळांचा व्यासंग व स्वतंत्रतेची प्रज्ञा यांच्या विचारांवर गौरवपूर्ण भाष्य करतात. 'आधुनिक भारताचे शिल्पकार – पंडित जवाहरलाल नेहरू' या ग्रंथातून त्यांची खोलवर विचार करण्याची चिकित्सक दृष्टी व अभ्यासपूर्वक विचार करण्याची ताकद दिसून येते.

लोकायत– देवीप्रसाद चट्टोपाध्याय यांच्या 'लोकायत' या ग्रंथावर आधारित त्यांनी आपल्या प्रदीर्घ चिंतनातून सखोल दृष्टीने ग्रंथ लिहिला.

**शोकात्मिकेचे विश्वरूपदर्शन**

'कवयित्री इंदिरा संत यांचे काव्यसौंदर्य– मराठी काव्यांगणातील इंद्रधनू' यावरही त्यांनी आपल्या चिकित्सक अभ्यासू वृत्तीने एक समीक्षा ग्रंथ लिहिला.

'शोकात्म विश्वरूपदर्शन' (२०००) या ग्रंथात ग्रीक, शेक्सपिअरिअन, इब्सेनिअन शोकात्मिकेचे मूळ स्वरूप, तिची उत्क्रांती, तिच्यातून झालेली निरनिराळी परिवर्तने असे व्यापक क्षेत्र कवेत घेऊन शोकात्मिकेपासूनही आनंद का घेता येतो, या विषयासंबंधी त्यांनी मूलगामी चर्चा केली आहे. या ग्रंथाची अनेक वैशिष्ट्ये आहेत. त्यातील एक वैशिष्ट्य म्हणजे 'महाभारत' या भारतीय महाकाव्यातील शोकात्मतेचे अंतःसूत्र शोधून काढण्याचाही त्यांनी जाणीवपूर्वक प्रयत्न केला आहे.

पाश्चात्त्य साहित्यातील शोकात्मिकेसंबंधीचा विचार काही महत्त्वपूर्ण शोकांतिकांची निवड करून त्यावर सविस्तर विवेचनात्मक लेखन केले आहे. १) ग्रंथातील शोकात्म विश्वरूपदर्शन, २) शोकात्म नाट्याचे अंतरंग, ३) कॅथॉर्सिस आणि शोकात्मिकेचा भावनात्मक परिणाम, ४) शोकात्म नाट्याचा वाचक, ५) ग्रीक शोकात्म नाटक, ६) ग्रीक शोकात्म नाट्यातील कलात्मक सौंदर्य आणि वैचारिक मौलिकता, सॉफक्लीज, अँटिगनी, राजा इडिपस, यूरीपीडिज, हिप्पोलिटस, ७) शेक्सपीरिअन शोकात्मिका – मॅकबेथ, लिअर, हॅम्लेट, ८) इब्सेन युग, ९) महाभारत १०) शोकात्म विश्वरूपदर्शन अशा

दहा प्रकरणांत त्यांनी विभागून केलेले आहे. याही ग्रंथातून त्यांची वैचारिक, अभ्यासू, तौलनिक दृष्टी दिसून येते. सर्वांगीण विवेचन करणारा असा मराठीतला पहिला व अत्यंत महत्त्वपूर्ण असा हा ग्रंथ मानला जातो. त्यांना साहित्यातील अनेक महत्त्वाचे ग्रंथ पुरस्कार मिळालेले आहेत.

त्यांच्या अभ्यासू प्रवृत्तीला, सखोल विचारांना, 'वैदिक यज्ञ, मध्ययुगीन तंत्रसाधना आणि ज्ञानेश्वरांचा भक्तियोग' याला साहित्य परिषद चिपळूणकर पुरस्कार, राजाजी पुरस्कार, संत वाङ्मय पुरस्कार देऊन गौरविण्यात आले आहे. शोकात्म विश्वरूप दर्शनालाही रा.श्री.जोग, महाराष्ट्र फाउंडेशन, मराठवाडा पुरस्कार देऊन मानाचे पान मानले आहे. 'विचारमंथना'लाही लोकहितवादी पुरस्कार मिळाला. शोकात्मिकेचे मूळ स्वरूप, तिची उत्क्रांती, तिच्यात झालेली परिवर्तने असे साहित्यक्षेत्रातील व्यापक क्षेत्र निवडून त्याचा बारकाव्याने अभ्यास करून यातून आपल्याला आनंद कसा घेता येतो? का घेता येतो? याच मूलगामी वैचारिक लेखन करून मराठी साहित्यात वैशिष्ट्यपूर्ण कामगिरी केली आहे, असे म्हणावे लागेल.

– रागिणी पुंडलिक

**संदर्भ :**

*१. कोतापल्ले नागनाथ; 'व्रतस्थ ज्ञानयोगी विचारवंत : डॉ. स. रा. गाडगीळ; 'अक्षर प्रतिष्ठा'; दिवाळी अंक, २००१.*

## गिरीश

***कानेटकर, शंकर केशव***

**कवी**

**२८ ऑक्टोबर १८९३ – ४ डिसेंबर १९७३**

रविकिरण मंडळातील ज्येष्ठ सदस्य व प्रमुख आधारस्तंभ म्हणून माधव जूलियन, यशवंत यांच्या बरोबरीने शंकर केशव कानेटकर उर्फ गिरीश यांचे नाव घ्यावे लागेल. त्यांचा जन्म सातारा जिल्ह्यातील फत्यापूर येथे झाला. न्यू इंग्लिश स्कूल सातारा व नानावाडा (न्यू इंग्लिश स्कूल, पुणे) येथे त्यांचे शालेय शिक्षण झाले. १९११मध्ये ते मॅट्रिक झाले. घरातील अणीबाणीच्या



प्रसंगी त्यांना पाच वर्षे एकट्याने झगडावे लागले व थोरला मुलगा या नात्याने कुटुंबाचा सर्व भार सांभाळावा लागला, त्यामुळे इच्छा असूनही त्यांना विद्यापीठीय शिक्षण सलग घेता आले नाही. आर्थिक गरजेपोटी त्यांनी न्यू इंग्लिश स्कूल, पुणे येथे शिक्षक म्हणून नोकरीस सुरुवात केली, शिकवण्या केल्या व मोकळ्या वेळात इंग्रजी, संस्कृत, मराठी भाषांतील नव्या-जुन्या वाङ्मयाचे वाचन केले. १९२२ साली इंग्लिश ऑनर्स व मराठी हे विषय घेऊन ते बी. ए. व १९३० साली एम. ए. झाले. डेक्कन एज्युकेशन सोसायटीचे प्रतिनिधी म्हणून त्यांनी मुधोजी हायस्कूल, फलटण येथे १९३४पर्यंत मुख्याध्यापक या नात्याने काम पाहिले आणि शाळा नावारूपाला आणली. १९४०मध्ये ते विलिंग्डन महाविद्यालयात मराठीचे प्राध्यापक झाले आणि १९५४ साली विलिंग्डनमधून निवृत्त होईपर्यंत, त्यांनी असे काम केले की तेथे मराठीचे एक संस्कारकेंद्रच उभे राहिले. त्यांचे कौशल्य लक्षात घेऊन फलटणच्या अधिपतींनी त्यांना मुधोजी हायस्कूलमध्ये मुख्याध्यापक म्हणून निमंत्रित केले. ते काम त्यांनी १९५९ पर्यंत अतिशय प्रभावीपणे केले.

'नदीतटाकचा सायंकाळचा देखावा' ही गिरीशांची पहिली कविता हरिभाऊ आपटे यांनी 'करमणूक' साप्ताहिकात, 'दिल्ली दरबार' खास अंकात प्रसिद्ध केली. गिरीशांनी ही कविता 'एक रहिमतपूरवासीय' या टोपणनावाने प्रसिद्ध केली होती. कारण आपल्या मूळ नावाने कविता प्रसिद्ध करण्याइतका आत्मविश्वास त्यांच्यापाशी नव्हता. 'केशवसुत', 'गोविंदाग्रज', 'बालकवी', 'बी' यांसारखी कवींची टोपणनावे ते ऐकून होते. सुरुवातीला एकदोन वर्षे त्यांनी निरनिराळ्या नावांनी कविता प्रसिद्ध केल्या परंतु, १९१३ साली स्वतःच्या नावाशी सुसंगत असलेले 'गिरीश' हे टोपणनाव घेऊन

त्यांनी निर्मितीला प्रारंभ केला आणि शेवटपर्यंत तेच नाव उपयोगात आणले. १९११ ते १९२० या दशकात त्यांनी अनेक कविता लिहिल्या, त्यांपैकी काही ‘चित्रमय जगत’, ‘काव्यरत्नावली’, ‘करमणूक’, ‘उद्यान’, ‘मनोरंजन’ या नियतकालिकांतून यथाकाल प्रसिद्ध झाल्या. परंतु त्या पुस्तकरूपाने संग्रहित झाल्या नाहीत. या काळात त्यांनी इंग्रजी व संस्कृत कविताही लिहिल्या होत्या, परंतु त्या त्यांच्याच पसंतीला न उतरल्यामुळे त्यांनी फाडून टाकल्या व केवळ मराठीतील काव्यलेखन चालू ठेवले. त्यांच्या घडणीच्या काळात गोविंदाग्रज व बालकवी यांच्याशी त्यांचा परिचय झाला व थोडाफार सहवासही घडला. १९२०मध्ये प्र. के. अत्रे, अज्ञातवासी, अरविंद व गिरीश यांनी ‘अनंततनय’ उर्फ दत्तात्रेय अनंत आपटे यांच्या मदतीने पुण्यात ‘श्री महाराष्ट्र शारदामंदिर’ ही संस्था स्थापन केली. मंदिराच्या साप्ताहिक बैठकीत चर्चा, निबंधवाचन, काव्यगायन, काव्यवाचन वगैरे कार्यक्रम होत. यातूनच पुढे १९२३ साली ‘रविकिरण मंडळ’ स्थापन झाले. मंडळातील कवींच्या सहवासामुळे त्यांच्या कलादृष्टीवर काहीसा परिणाम झाला. सामाजिक सुधारणेला प्रोत्साहन देणारे विचार काव्यातून प्रसृत करणे, हे रविकिरण मंडळाचे एक ध्येय गिरीशांनी आपल्या काव्यात उतरवले.

**आधुनिक सामाजिक खंडकाव्याचे प्रवर्तक**

‘वीणा झंकार’ हा यशवंतांच्या सहकार्याने प्रकाशित झालेला गिरीशांचा पहिला कवितासंग्रह. तथापि यातील सर्व कविता त्यांच्या पुढील काव्यसंग्रहात समाविष्ट झाल्या आहेत. १९२३ सालीच ‘अभागी कमल’ हे खंडकाव्य त्यांनी पुरे केले व ‘मनोरंजन’ मासिकातून ते क्रमशः प्रसिद्ध केले. त्यानंतर त्यांची ‘कला’ (१९२६), ‘आम्बराई’ (१९२८), ‘अनिकेत’ (रूपांतरित, १९५४) ही खंडकाव्ये प्रकाशित झाली. आधी खंडकाव्ये व नंतर स्फुट कविता असा गिरीशांच्या काव्य प्रसिद्धीचा क्रम आहे. ‘कांचनगंगा’ (१९३०), ‘फलभार’ (१९३४), ‘मानसमेघ’ (१९४३), ‘चंद्रलेखा’ हे त्यांचे स्फुट कवितांचे संग्रह आहेत. याशिवाय त्यांनी ‘काव्यकला’ (१९३६) हा टीकालेखांचा संग्रह, ‘मराठी नाट्यछटा’ (१९३७), ‘स्वप्नभूमी’ (माधव जूलियन यांचे चरित्र, १९६५) अशी इतरही ग्रंथरचना केली. प्र.के.अत्रे यांच्या सहकार्याने त्यांनी ‘अरुण वाचनमाला’ या लोकप्रिय शालेय पाठ्यपुस्तकाचे संपादन केले. त्या वाचनमालेला महाराष्ट्रातील शालेय जगतात उत्तम प्रतिसाद मिळाला. १९५९ साली उत्तम माध्यमिक शिक्षक म्हणून मिळालेल्या पहिल्या राष्ट्रपती पारितोषिकाने त्यांच्या शिक्षणक्षेत्रातील कार्याचा सन्मान झाला.

‘अभागी कमल’ या खंडकाव्यामुळे ‘आधुनिक सामाजिक खंडकाव्याचा प्रवर्तक’ असा गिरीशांचा सार्थ गौरव केला जातो. या काव्यात एका तरुण विधवेची करुण कहाणी गिरीशांनी सांगितली आहे. विधवा कमलेचा सासू आणि नणंद यांच्याकडून झालेला असह्य छळ व त्यामुळे तिने स्वतः करून घेतलेली जीवनसमाप्ती असा कथाभाग १९०० ओळींच्या या खंडकाव्यात आला आहे. नदीच्या पुरात आत्महत्या करणाऱ्या नायिकेला वाचवण्यात अयशस्वी ठरलेला नायक शुद्धीवर आल्यानंतर विधवांची दुःखे निवारण करण्याचे व त्यासाठी ब्रह्मचर्य स्वीकारण्याचे शपथपूर्वक निश्चित करतो. त्याचे हे वर्तन कवीच्या मध्यममार्गी, समतोल वृत्तीशी संवादी असल्याची प्रतिक्रिया त्या काळी व्यक्त झाली होती. आगरकरांच्या सुधारणावादी विचारांचा प्रभाव गिरीशांच्या या लेखनावर आहे. ‘क्रांतिकारक विचार आणि अत्युत्कट भावना यांची सापेक्ष उणीव त्यांनी रचनासाक्षेपाने भरून काढली आहे.’ अशा सौम्य शब्दांत रा.श्री.जोग यांनी गिरीशांच्या काव्यरचनेची मर्यादा सूचित केली आहे.

त्यांचे ‘कला’ हे दीर्घकाव्य प्रतिलोम विवाहाच्या समस्येवर आधारित कल्पनारम्य प्रेमकथा आहे. चित्रकला व काव्यकला यांत निपुण असलेली कला आणि सारंगीवादनात प्रवीण असलेला तिचा प्रियकर मोहन यांच्या उत्कट परंतु अयशस्वी प्रेमाची शोकान्त कथा या दुसऱ्या खंडकाव्यात सांगितली आहे. गिरीशांच्या तिसऱ्या

खंडकाव्याविषयी त्यांच्याच शब्दात सांगायचे तर, ‘आम्बराई हे काव्य म्हणजे शेतकरीवर्गाच्या स्थितीवर लिहिलेली एक संसार कथा आहे.’ संपत्ती व स्वातंत्र्य अवेळी हाती आल्यामुळे त्यांचे खरे महत्त्व न समजलेल्या, कृष्णाकाठच्या वातावरणातील एका ग्रामीण, तरुण, सधन शेतकऱ्याचा व्यसनापायी झालेला अधःपात आणि कालांतराने आपल्या वागण्याचा पश्चात्ताप होऊन त्याने शेतात केलेले कष्ट व पुन्हा आलेले आनंदाचे दिवस अशी आनंदपर्यवसायी रचना गिरीशांनी केली आहे. ‘कला’ हे खंडकाव्य कल्पनारम्य आहे, तर उरलेली दोन खंडकाव्ये जीवनवास्तवाच्या जवळ जाणारी आहेत.

**जिव्हाळा आणि वात्सल्य**

गिरीशांच्या स्फुट कवितेत विषयांची विविधता आहे. कौटुंबिक भावना, प्रेमभावना, ग्रामजीवनातील भाववैचित्र्य, सामाजिक आशय, निसर्गचित्रे इत्यादी विषयांच्या अनुषंगाने त्यांनी सुनीते, उद्देशिका, भावगीते अशा काव्यप्रकारांतून त्यांनी आपली रचना केली आहे. ‘भलरी’, ‘मावळ्याचे गाणे’, ‘दौल्याची दिवाळी’ यांसारखी जानपदगीते; ‘सारंगीवाला’, ‘सूरसंगिनी’ यांसारखी प्रेमगीते; ‘शांतिस्थान’, ‘सुंदर हिरवे माळ’, ‘मानसमेघ’ यांसारख्या निसर्गकविता; ‘परित्यक्ता, ‘पाय घसरला तर’ यांसारख्या सामाजिक आशयाच्या रचना ‘तव भास अंतरा झाला’ सारखे भावगीत, ‘कृतज्ञता’ सारखे करुणगीत यांची आवर्जून नोंद करावी लागते. श्री. के. क्षीरसागर गिरीशांना उद्देशून ‘गृहस्थाश्रमी कवी’ असा उल्लेख केला आहे, तो किती यथार्थ आहे ते त्यांच्या ‘नरक चतुर्दशी’, ‘पितृस्मृती’, ‘विसरलेला नमस्कार’, ‘ताईचं प्रेम’, ‘जीवितेश्वरीस’, ‘आईचा आशीर्वाद’, ‘आवाहन’, ‘आजीबाई’ या कविता वाचल्यावर ध्यानात येते. गिरीशांच्या अंतरंगातील अपरिमित जिव्हाळा व वात्सल्य यांचा प्रत्यय अशा कवितांतून येतो.

‘गोपाळ कृष्ण गोखले’, ‘प्रिय सुहृद माधवराव पटवर्धन’, ‘सेनापतीस’ ही त्यांची सुनीते; ‘गुरुदेव रवींद्र’, ‘बालगंधर्व’, ‘महर्षी कर्वे’, ‘कविवर्य भास्करराव तांबे’ या त्यांच्या व्यक्तिगौरवपर कविता रचनादृष्ट्या निर्दोष व रसपरिपूर्ण आहेत. विलिंग्डन महाविद्यालय, फर्गसन महाविद्यालय, न्यू इंग्लिश स्कूल यांसारख्या त्यांना प्रिय असणाऱ्या संस्थांवर त्यांनी रचलेली कवने संबंधित संस्थांबद्दलची गिरीशांच्या मनातील आत्मीयता प्रकट करतात. ‘क्षणाचाच विलंब’, ‘दोन पातकी’, ‘अंधारातील बाण’, ‘दोन रमणी’, ‘बकुळा’, ‘दौल्याची दिवाळी’ या त्यांच्या कथाकाव्यातील निवेदनपद्धती, प्रसंगचित्रण व व्यक्तिरेखाटन परिणामकारक आहे. ‘कृतज्ञता’ ही त्यांची कविता मराठीतील अल्पसंख्य शोकान्तगीतांत अत्यंत उल्लेखनीय आहे. या कवितेतील मृत्युमुखी पडलेल्या अनाथ मुलाचे कारुण्यमय चित्र हृदयस्पर्शी आहे.

श्रुतिसुभगता, रचनासौष्ठव, शब्दांचा नाद, त्यांचे वजन, शब्दात सामावलेली अर्थवलये आणि त्यांचे कवितेतील सापेक्ष स्थान ही गिरीशांच्या काव्यरचनेची वैशिष्ट्ये होत. संयमित भावाविष्कार करणारी, जीवनानुभवातून स्फुरलेली, तत्कालीन मध्यमवर्गीय जीवन-जाणिवांशी प्रामाणिक असणारी, आशावादी दृष्टी देणारी कविता गिरीशांनी लिहिली.

– प्रा. डॉ. विलास खोले

**संदर्भ :**


१. *रुद्रवाणी; ‘किर्लोस्कर जीवन’; जन्मशताब्दी विशेषांक, पुणे; १९९३.*

२. *गिरीश अमृत महोत्सव स्मरणिका; सांगली; १९६९.*

३. *काळे अक्षयकुमार; ‘अर्वाचीन मराठी काव्यदर्शन’; पां. ना. बनहट्टी प्रकाशन, नागपूर; १९९९.*


## गुंजीकर, रामचंद्र भिकाजी

**व्याकरणकार, निबंधकार, कादंबरीकार, संपादक, समीक्षक**

**३० एप्रिल १८४३ – १८ जून १९०१**

रा. भि. गुंजीकर म्हणजेच रामभाऊ यांचा जन्म जांबोरी (जिल्हा बेळगाव) येथे झाला. त्यांच्या वडिलांनी त्यांचा संस्कृत भाषेचा अभ्यास घरीच करून घेतला



होता. मराठी प्राथमिक शिक्षण जन्मगावी तर इंग्रजी शिक्षण बेळगाव येथे झाले. १८६० साली ते पब्लिक सर्व्हिस परीक्षा उत्तीर्ण झाले व पुढील शिक्षणासाठी मुंबईला गेले. एल्फिन्स्टन हायस्कूलमधून १८६४ मध्ये ते प्रवेश परीक्षा उत्तीर्ण झाले. महाविद्यालीन शिक्षणासाठी त्यांनी नाव नोंदविले, परंतु परिस्थितीमुळे ते उच्च शिक्षणापासून वंचित राहिले.

ज्या एल्फिन्स्टन हायस्कुलात ते शिकले, तेथेच १८६६ पासून २२ वर्षे त्यांनी अध्यापक म्हणून काम केले. पदोन्नती करीत रामभाऊ असिस्टन्ट डेप्युटी एज्युकेशन इन्स्पेक्टर झाले. मराठी, संस्कृत, इंग्रजी यांखेरीज बंगाली, उर्दू, कानडी व गुजराती ह्या भाषाही त्यांना चांगल्या अवगत होत्या. स्वभाषा-सेवा हीच स्वधर्मसेवा, असे ते मानत. 'मित्रोदय' वर्तमानपत्रात ते लिहीत. 'विविधज्ञानविस्तार' मासिक १८६७ मध्ये निघाले. श्री. नाडकर्णी हे त्याचे जाहीर संपादक असले, तरी पहिली सात वर्षे गुंजीकर हेच त्याचे संपादन करीत.

डेक्कन महाविद्यालयातील रघुनाथ बाळकृष्ण राजाध्यक्ष या विद्यार्थ्याने गोल्डस्मिथच्या 'गुडनेचर्ड मॅन'चे 'सुशील गृहस्थ' या नावाचे केलेले भाषांतर गुंजीकरांनी वाचून त्यात योग्य त्या सुधारणा केल्या. इंग्रजी शिक्षित तरुण उत्कृष्ट परदेशी वाङ्मयकृतींचे मराठीत भाषांतर करीत, तेव्हा गुंजीकर, म. गो. रानडे प्रभृती त्यांना प्रोत्साहन देत. श्री बा. ना. देव म्हणतात, 'गुंजीकरांच्या मित्रमंडळींत मराठी वाङ्मयाचे अनेक रसिक भक्त, भोक्ते, वाचक व लेखक होते. त्यांच्यात कित्येकदा अनेक लौकिक विषय, प्रचलित लोककार्ये, सार्वजनिक संस्था, सभा, व्याख्याने, वादविवाद ह्यांवर विचारविनिमय होऊन काही उपयुक्त कार्ये निपजली. त्यांतील एक 'दंभहारक' हे मासिक होय.' गुंजीकरांच्या कर्तृत्वाविषयी, 'गुंजीकरांच्या वाङ्मयावरून, त्यांच्यामध्ये विविधतेप्रमाणे अपूर्वता, स्वाभिमानाबरोबर सत्यप्रेम, शास्त्रीय संशोधक दृष्टी, तशीच आकर्षक सुबोधता, संयमाबरोबर निर्भीडपणा वगैरे गुण आपल्याला दिसून येतात.' हा अ. का. प्रियोळकरांचा अभिप्राय पुरेसा बोलका आहे.

'सरस्वतिमंडळ' या पुस्तकात गुंजीकरांनी महाराष्ट्रातील चित्पावन ब्राह्मणांवर तिखट टीका केली होती. या पुस्तकाने खूप खळबळ उडवून दिली होती.

निबंधमालाकार चिपळूणकरांनी गुंजीकरांच्या लेखांची प्रशंसा केली होती. गुंजीकरांनी मराठी भाषिकाला 'लाघवी लिपी किंवा अतित्वरेने लिहिण्याची युक्ती' (१८७४) हे पुस्तक लिहून लघुलेखनाची ओळख करून दिली. गुंजीकरांची प्रमुख ग्रंथसंपदा पुढीलप्रमाणे आहे. 'मोचनगड' (कादंबरी १८७१), 'अभिज्ञानशाकुंतल' (भाषांतर १८७०), 'रोमकेतू विजय' (शेक्सपिअरच्या 'रोमियो ज्युलिएट'चे भाषांतर १८६९), 'कौमुदी महोत्साह' (१८७८-१८७९), 'सरस्वतिमंडळ' व 'भ्रमनिरास' (१८८४), 'सौभाग्यरत्नमाला' (१८८६), 'विद्यावृद्धीच्या कामी आमची अनास्था' (व्याख्यान, १८८७), 'सुबोधचंद्रिका' (भगवद्गीता टीका, मूळ व भाषांतर), 'बंगाली व्याकरण', 'कानडी भाषा' (लेख) व इतर अनेक स्फुट लेख, ग्रंथ परीक्षणे.

स्वभाषेची सेवा हीच स्वधर्मसेवा असे मानणाऱ्या मराठी वाङ्मयसेवकांपैकी रा. भि. गुंजीकर हे एक होत.

– वि. ग. जोशी

**संदर्भ :**


१. *प्रियोळकर अ. का.; 'विश्रब्ध शारदा', डॉ. भाऊ दाजी लाड- लेखक.*

२. *कीर, धनंजय; महात्मा जोतीराव फुले; १९७३.*


## गुंडी, नीलिमा माधव

**समीक्षक**

**१४ ऑक्टोबर १९५२**

नीलिमा गुंडी यांचे पूर्वाश्रमीचे नाव नीलिमा राम वैद्य. शिक्षण एम.ए., पीच.डी., डी. एच. ई. हे सारे मुंबई येथे झाले. बी.ए.च्या परीक्षेत मुंबई विद्यापीठात सर्व विषयांमध्ये



सर्वप्रथम येऊन त्यांनी नवा उच्चांक प्रस्थापित केला. एम.ए.लाही मुंबई विद्यापीठात त्या मराठी विषयात सर्वप्रथम आल्या. या दोन्ही वर्षी विद्यापीठातील विविध पारितोषिकांबरोबर त्या सुवर्णपदकाच्याही मानकरी ठरल्या. 'काव्य आणि काव्यविचार' हा त्यांच्या पीएच.डी.च्या प्रबंधाचा विषय होता.

सध्या त्या स.प.महाविद्यालय, पुणे येथे अध्यापनाचे कार्य करीत आहेत. मराठीत बालसाहित्य जरी विपुल प्रमाणात लिहिले गेले असले, तरी मुलांच्या भावविश्वात त्यांच्या कल्पना मांडणारे आणि त्यातून त्यांना नवे अनुभव देणारे साहित्य अपवादातून दिसते. डॉ. गुंडी यांचे साहित्य वाचताना याचा प्रत्यय येतो. मात्र केवळ बालसाहित्यापुरतेच त्यांचे कार्यक्षेत्र मर्यादित नाही तर काव्य, काव्यसमीक्षा, ललितगद्य, पुस्तक परीक्षण, व्याख्यान, निबंधलेखन आणि विविध पुस्तकांचे, ग्रंथांचे संपादन असे वाङ्मयविषयक विपुल कार्य त्यांनी केले आहे. त्यांचे 'आभाळाचा फळा', 'कानामात्रा', 'रंगांचा थवा', 'दुधाचे दात' इत्यादी बालकवितासंग्रह व 'वाऱ्यावर स्वार', 'देवमासा' इत्यादी बालकथा प्रकाशित झाल्या आहेत. 'स्पर्शरिषा', 'प्रकाशाचे अंग' हे काव्यसंग्रहही प्रसिद्ध आहेत. याखेरीज 'शब्दांची पहाट', 'अक्षरस्पंदन' व 'भाषाभान' या ललित लेखसंग्रहांतून त्यांनी भाषा, साहित्य व संस्कृती यांविषयी मार्मिक निरीक्षणे नोंदवली आहेत.

काव्य हा त्यांच्या आवडीचा विषय आहे आणि त्यामुळेच 'लाटांचे मनोगत' हा काव्यविषयक लेखसंग्रह त्यांनी स्वतंत्रपणे संपादित केला. या संग्रहातून १९५० ते २००० ह्या कालावधीतील स्त्रियांच्या काव्याचा चिकित्सक व अभ्यासपूर्ण आढावा त्यांनी घेतला आहे. याखेरीज 'कविता विसाव्या शतकाची' 'चैतन्यवेल' असे काव्यविषयक ग्रंथही त्यांनी संपादित केले आहेत.

'सकाळ', 'साप्ताहिक सकाळ', 'अंतर्नाद' इत्यादी नियतकालिकांतून पाचशेहून अधिक पुस्तक-परीक्षणेही त्यांनी लिहिली आहेत. अनेक दर्जेदार नियतकालिकांतून कथा, कविता, ललित इत्यादी समीक्षणात्मक लेखनही त्यांनी केले.

याखेरीज 'मराठी वाङ्मय कोश', 'अक्षरवेल' 'युवकभारती' इत्यादींच्या संपादनात मोलाचे साहाय्य त्यांनी केले आहे. 'भाषा आणि जीवन' या त्रैमासिकाच्या संपादक मंडळावरही त्या कार्यरत आहेत. मराठी अभ्यास परिषदेच्या त्या कार्यवाह आहेत.

डॉ. गुंडी यांना विदर्भ साहित्य संघातर्फे 'वि. स. खांडेकर' पुरस्कार, कल्याण महानगर पालिकेकडून 'कल्याणभूषण' पुरस्कार व रुईया महाविद्यालयाकडून 'विद्याभूषण' पुरस्कार असे पुरस्कार मिळाले आहेत.

– वैखरी वैद्य

**संदर्भ :**


१. *डॉ. खांडवे मंदा, संपादक; 'भारतीय भाषांतील स्त्रीसाहित्याचा मागोवा' खंड ३; साहित्यप्रेमी भगिनी मंडळ, पुणे; २००७.*
२. *डॉ. गुंडी नीलिमा, संपादक; 'कविता विसाव्या शतकाची', उत्कर्ष प्रकाशन, पुणे; २०००.*


## गुप्ते, नारायण मुरलीधर

☞ **बी**

## गुप्ते, शांताराम गोपाळ

**कादंबरीकार, नाटककार**

**१९०७ – ११ जानेवारी १९६४**

शांताराम गो. गुप्ते यांचे वडील सातारा येथे पोस्ट खात्यात नोकरीस होते. त्यामुळे त्यांचे मॅट्रिकपर्यंतचे शिक्षण सातारा येथेच झाले. घरची आर्थिक परिस्थिती फारशी चांगली नसल्यामुळे त्यांना उच्च शिक्षण घेणे शक्य झाले नाही. त्यामुळे त्यांनी शाळेत शिक्षकाची नोकरी पत्करली. देशाला स्वातंत्र्य मिळाल्यानंतर त्यांना महाराष्ट्र सरकारचे प्रसिद्धी अधिकारी असे मानाचे पद लाभले.



गुप्ते यांना शाळकरी वयापासून नाटक लिहिण्याची तीव्र इच्छा होती. त्यामुळे इंग्रजी पाचवी–सातवीत असतानाच त्यांनी, महाराणा प्रतापच्या जीवनावर 'रक्त ध्वज' आणि तानाजी मालुसरे यांच्या वीरमरणावर आधारित 'हिरा हरपला' अशी दोन ऐतिहासिक नाटके लिहिली.

'गणेश नाटक मंडळी' या नाट्यसंस्थेने 'हिरा हरपला' हे नाटक पुण्याच्या किर्लोस्कर नाट्यगृहात ११ डिसेंबर १९२० रोजी सादर केले. लोकमान्य टिळकांच्या दुःखद निधनाचा तो काळ त्या दुःखी पार्श्वभूमीवर हे नाटक त्या काळात चांगलेच गाजले.

शां.गो.गुप्ते यांना नाटककार म्हणून या पहिल्या नाटकापासूनच मान्यता मिळाली. त्यापुढचा पंचवीस वर्षांचा काळ नाटककार म्हणून त्यांचा संबंध मराठी रंगभूमीशी सतत राहिला.

गुप्ते यांनी 'संगीत वेणुनाद' (१९२३), 'संधिसंग्राम' (१९३२) ही दोन पौराणिक नाटके लिहिली. 'तंट्या भिल्ल' (१९३७), 'संगीत दख्खनचा मोहरा' (१९४९) अशी ऐतिहासिक आणि 'सीमान्तपूजन' (१९४४), 'उपेक्षित' (१९६२) ही सामाजिक नाटके लिहिली. त्याशिवाय सुभाषबाबूंच्या जीवनावर 'जयहिंद' (१९४८) ही कादंबरी त्यांनी लिहिली होती.

त्या काळात रंगभूमीवर ज्या वेगवेगळ्या नाटकमंडळ्या तग धरून होत्या; त्यांनी गुप्ते यांच्या पौराणिक आणि ऐतिहासिक नाटकांचे प्रयोग केले आणि गाजविले. झाशीच्या राणीच्या जीवनावरील त्यांच्या 'रणरागिणी' या नाटकावर, त्यातल्या जहाल विषयामुळे, इंग्रज सरकारने बंदी घातली होती; एवढे ते नाटक प्रभावी होते.

स्वातंत्र्याच्या आकांक्षेने भारावून गेलेल्या जनतेने गुप्ते यांच्या ऐतिहासिक नाटकांचे उत्स्फूर्त स्वागत केले.

गुप्ते यांच्या नाटकांचा भर मुख्यत्वेकरून रंजकतेवर असायचा. त्यामुळे त्यात पदेही असायची. ऐतिहासिक म्हटली तरी नाटकात बराच कल्पनाविलासच असे. तरीही त्या काळात, काळाला अनुसरून योग्य विषय निवडून, प्रेक्षकांच्या मनातले मर्म ओळखून गुप्ते यांनी जी नाटके लिहिली, त्यांची मराठी रंगभूमीला सावरण्यात बरीच मदत झाली असेच दिसून येते.

– मंदाकिनी भारद्वाज

**संदर्भ :**

*१. महाराष्ट्र टाईम्स, २३-०२-१९६४.*

## गुर्जर, विठ्ठल सीताराम

**कथाकार, नाटककार, रूपांतरकार**

**१० मे १८८५ – १९ सप्टेंबर १९६२**



बंगाली भाषेतील कथा–कादंबऱ्यांचे अनुवादक म्हणून परिचित असलेल्या वि. सी. गुर्जर यांचा जन्म रत्नागिरी जिल्ह्यातील कशेळी ह्या छोट्या खेड्यात झाला. तिथेच त्यांचे प्राथमिक शिक्षण झाले. गुर्जरांचे जन्मवर्ष मराठी साहित्याच्या इतिहासात अनेक दृष्टींनी महत्त्वाचे आहे. याच वर्षी मराठीतील सुप्रसिद्ध कवी, नाटककार व विनोदकार राम गणेश गडकरी यांचा जन्म झाला. मराठी काव्याला नवे वळण लावणाऱ्या कवी केशवसुतांची पहिली कविता याच साली प्रकाशित झाली. मराठी वास्तववादी कादंबरीचे जनक हरिभाऊ आपटे यांची 'मधली स्थिती' ही पहिली कादंबरी याच वर्षी प्रसिद्ध झाली. वि. सी. गुर्जरांचे वडील सीतारामपंत गुर्जर हे जुन्या पिढीतील एक नामांकित वकील होते. नाटक, कादंबरी आणि कविता ह्या तीनही वाङ्मय प्रकारांत सीतारामपंतांनी विपुल लेखन केले होते. 'उदार दामोदर' व 'संगीत रत्नावलि' ही दोन नाटके व 'सीता' ह्या कादंबरीचे लेखन केले. लहानपणापासून वाचनाची आवड असलेल्या वि.सी.गुर्जरांना आपल्या साहित्यप्रेमी लेखक–वडिलांचा वारसा प्रेरणादायी ठरला.

कशेळी येथे प्राथमिक शिक्षण पूर्ण केल्यावर गुर्जर पुढील शिक्षणासाठी मुंबईला आले. एल्फिन्स्टन हायस्कूलमधून प्रवेश-परीक्षा उत्तीर्ण झाल्यावर ते एल्फिन्स्टन महाविद्यालयामध्ये पुढील शिक्षण घेऊ लागले. परंतु प्रकृतिअस्वास्थ्यामुळे त्यांना बी. ए. ची पदवी मिळू शकली नाही. विद्यार्थिदशेत काव्यलेखनाला प्रारंभ करणारे गुर्जर त्या काळातील लोकप्रिय कवी बाळकृष्ण अनंत भिडे यांच्या प्रभावाखाली होते. गिरगावातील फणसवाडीत जगन्नाथाच्या चाळीत राहत असताना मासिक 'मनोरंजन'चा अंक योगायोगाने गुर्जरांना मिळाला. आपली कविता मासिक 'मनोरंजन'मध्ये छापून यावी, या उत्कट इच्छेने 'होई परी मजवरी अनुरक्त ना ती' ही कविता 'एल्फिन्स्टोनियन' ह्या नावाने संपादकाकडे पाठवून दिली. सव्वा वर्षाने जून १९०३ च्या 'मनोरंजन'मध्ये ती कविता प्रसिद्ध झाली. त्याच वेळी गुर्जरांच्या साहित्यविषयक जीवनाला वेगळी कलाटणी मिळाली. मासिक 'मनोरंजन'चे संपादक का. र. मित्र हे गुर्जरांचे निकटचे स्नेही झाले. त्यांनी गुर्जरांचे लक्ष अन्य लेखनाकडे वळवले. कथालेखन आणि इतर भाषांतील साहित्याचा अनुवाद किंवा भाषांतर करावे, असे गुर्जरांना सुचवले. मार्क ट्वेनच्या एका कथेचा 'प्रायव्हेट सेक्रेटरी' ह्या नावाने केलेला पहिला अनुवाद 'मनोरंजन'च्या ऑगस्ट १९०६ च्या अंकात प्रसिद्ध झाला.

बंगाली भाषेचे अभ्यासक असलेल्या का. र. मित्र यांनी काही बंगाली कादंबऱ्यांचे अनुवाद 'मनोरंजन'मध्ये प्रसिद्ध केले होते. त्याचा प्रभाव गुर्जरांवर इतका पडला की, ते बंगाली भाषा शिकले. बंगाली कथांचे, कादंबऱ्यांचे विपुल वाचन गुर्जरांनी केले. गुर्जरांना अधिक प्रभावित केले ते प्रभातकुमार मुखर्जी ह्यांच्या वाङ्मयाने. त्यांनी मुखर्जींच्या काही कादंबऱ्यांचे व कथांचे अनुवाद मासिक 'मनोरंजन'साठी मराठीत केले. प्रभातकुमारांचे चरित्र मराठीत लिहिले. हरी नारायण आपट्यांच्या सोप्या हृदयंगम लेखनपद्धतीचा परिणाम गुर्जरांच्या मनावर झाला होता. बंगाली-मराठीतील श्रेष्ठ लेखकांच्या लेखनगुणांवर लुब्ध झालेल्या गुर्जरांनी अनेक कथांप्रमाणे प्रभात कुमार मुखर्जींच्या 'रत्नदीप' (पौर्णिमेचा चंद्र), 'नवीन संन्यासी' (संसार असार), 'स्वप्नभंग' अशा काही आधारित कादंबऱ्या लिहिल्या.

### गुर्जर कालखंड

१९०५ ते १९६२ ह्या प्रदीर्घ कालखंडात गुर्जरांनी सातत्याने कथालेखन केले असले, तरी त्यांच्या साहित्याची छाप 'मनोरंजन'च्या कालखंडात मराठी कथा-वाङ्मयावर स्पष्टपणे उमटलेली दिसते. म्हणूनच मराठी कथेच्या इतिहासात हा कालखंड 'गुर्जर कालखंड' म्हणून ओळखला जातो. तंत्रवादापेक्षा रसवत्ता आणि रंजकता यांना गुर्जर अधिक महत्त्व देत. तत्त्वबोध, उपदेशपरता, समाजहिताची धारणा या गुणांपेक्षा रंजकता, सौंदर्याचा आविष्कार, रसनिष्पत्तीला प्राधान्य देणाऱ्या गुर्जरांची कथा मराठी कथाविश्वातील 'प्रसन्न' कथा आहे. हरी नारायण आपटे यांची अखेर आणि ना. सी. फडके यांचा उदय या मधल्या काळात गुर्जरांच्या कथेचे मराठी कथेवर प्रभुत्व होते. स्वतंत्र आणि रूपांतरित अशा दोन्ही प्रकारच्या कथा लिहिणाऱ्या गुर्जरांचे अनुवाद-कौशल्य वादातीत आहे. बंगाली भाषेचे सूक्ष्म आकलन, कलावंताकडून अपेक्षित असणारी समरसता आणि सहृदयता, भावाविष्काराचे सामर्थ्य या गुणांमुळे गुर्जरांच्या अनुवादित कथांना स्वतंत्र कथांचा दर्जा प्राप्त झाला आहे. केवळ प्रभातकुमार मुखर्जींच्याच कथांचे, कादंबऱ्यांचे अनुवाद गुर्जरांनी केले नाहीत. रवींद्रनाथ ठाकूर, शरच्चंद्र चटर्जी, रमेशचंद्र दत्त, राखालदास बानर्जी, कालिप्रसन्न दासगुप्ता इत्यादी बंगालीतील लोकप्रिय लेखकांच्या कादंबऱ्यांचे अनुवाद केले. गुर्जरांच्या व्यक्तिमत्त्व स्पर्शामुळे त्यांचे कथांचे, कादंबऱ्यांचे अनुवाद शाब्दिक भाषांतरापेक्षा स्वतंत्र रूपांतराकडे झुकतात. १९१२ पासून 'मनोरंजन'चे सहसंपादक म्हणून वि. सी. गुर्जरांनी काम केले. प्रकृतीच्या कारणास्तव १९२० साली मुंबई सोडून ते कशेळी या आपल्या मूळ गावी स्थायिक झाले. पुढे जीवनाच्या अखेरपर्यंत म्हणजे चाळीस वर्षे तिथे राहून

'धनुर्धारी'चा खास अंक निघाला काय? श्री. पाध्ये यांच्या विनंतीवरून मी त्यासाठी गोष्ट पाठविली आहे. पाच आठवडे लोटले [illegible] त्यांचे पत्र नाहीं! अंकही अद्यापि नाहीं व जाहिरातही त्याची [illegible] कुठें दिसली नाहीं. [illegible] आपलें [illegible] [illegible] चौकशी करून मला कळविल्यास बरें होईल. विशेष गरज पडल्यास [illegible] ही विनंती रद्द समजावी.

स्नेहांकित

अप्पा गुर्जर

त्यांनी लेखन, वाचन सुरू ठेवले. वेगवेगळ्या नियतकालिकांसाठी भाषांतरे व कथालेखन केले. मनोरंजन, चित्तविनोद कथामाला, नवयुग, विविधवृत्त, सत्यकथा, वसंत आदी प्रमुख नियतकालिकांत आणि इतर समकालीन मासिकांत प्रसिद्ध झालेल्या गुर्जरांच्या कथांची संख्या ८०० पेक्षा अधिक भरेल. २४ कादंबऱ्यांचे अनुवाद, ९ नाटके, संग्रह, १ विनोदी लेखसंग्रह अशी विपुल साहित्यनिर्मिती करणाऱ्या गुर्जरांचा 'द्राक्षांचे घोस' हा एकमेव कथासंग्रह पुण्याच्या मॉडर्न बुक डेपो ह्या प्रकाशन संस्थेने १९२६ साली आणि भीमराव कुलकर्णी संपादित 'गुर्जर कथा' हा संग्रह १९८५ साली पुण्याच्याच रविराज प्रकाशनाने प्रसिद्ध केला. मराठीत स्वतंत्र आणि अनुवादित कथांची लक्षणीय भर घालणाऱ्या गुर्जरांच्या कथांना ग्रंथरूप प्राप्त न होणे, ही दुर्दैवी वस्तुस्थिती आहे. त्यामुळे त्यांच्या कथा ७०-८० नियतकालिकांत विखुरलेल्या राहिल्या.

वि. सी. गुर्जरांनी कीर्तीसाठी किंवा ध्येयासाठी कथालेखन केले नाही. मनोरंजनातच लेखन-साफल्य मानणाऱ्या गुर्जरांनी बिननावाने, टोपणनावाने लेखन केले. 'माझ्या सर्वच लेखनाचे श्रेय मला न देता टीकाकारांनी ते दुसऱ्याला दिले, तरी मला यत्किंचितही विषाद वाटणार नाही,' अशी प्रतिक्रिया त्यांनी 'द्राक्षांचे घोस'च्या प्रस्तावनेत व्यक्त केली आहे.

१९०५ पासून त्यांचा वावर श्रीपाद कृष्ण कोल्हटकर, राम गणेश गडकरी, मामा वरेरकर ह्या नाटककारांमध्ये होता. श्रीपाद कृष्ण कोल्हटकरांना गुर्जर गुरुस्थानी मानत. त्यांच्या एका नाटकाची काही पदे आणि राम गणेश गडकरी यांच्या 'एकच प्याला' ह्या गाजलेल्या नाटकाची पदे गुर्जरांनी लिहिली. 'नंदकुमार' व 'राजलक्ष्मी' ही संगीत नाटके लिहिली. श्री. कृ. कोल्हटकरांचे विनोदी लेखन आवडल्याने 'सोमेश्वर शास्त्र्यांचे पुराण' हे गुर्जरांचे लेखनही अज्ञातच राहिले.

'कथा हा वि. सी. गुर्जरांच्या प्रतिभेला विशेष मानवलेला प्रकार. या क्षेत्रात त्यांनी केलेले कार्य मराठीत अविस्मरणीय ठरले आहे. रूपांतरापासून त्यांनी लेखनाला सुरुवात केली असली, तरी त्याला स्वतंत्र कलात्मक रूप देण्याचे कार्य गुर्जरांच्या कथेनेच प्रामुख्याने केले... विशेषतः इ. स. १९१० ते १९३० या कालखंडात

मराठी कथेला वळण लावण्याचे व त्याला एक वाङ्मयप्रकार म्हणून प्रतिष्ठा मिळवून देण्याचे कार्य प्रामुख्याने गुर्जरांच्या 'संपूर्ण गोष्टी'ने केले,' या शब्दांत मराठी कथेचे ज्येष्ठ अभ्यासक म. ना. अदवंत यांनी गुर्जरांचा गौरव केला आहे.

१९०२ ते १९६२ ह्या साठ वर्षांच्या प्रदीर्घ कालखंडात गुर्जरांनी काव्य, नाटक, कादंबरी, विनोदी लेख व काही प्रमाणात समीक्षा ह्या साहित्याच्या विविध क्षेत्रांत विहार केला. प्रारंभी मुंबईत आणि अखेरीस कशेळीसारख्या आडवळणी खेड्यात राहून त्यांनी साहित्यसाधना केली. विपुल लेखन करूनही आपल्या लेखनाचा दर्जा त्यांनी निश्चितपणे सांभाळला. रसिकांचे निर्भेळ रंजन करण्याची आणि साहित्याशी एकनिष्ठ राहण्याची भूमिका शेवटपर्यंत निभावली. त्यामुळेच मराठी कथेच्या इतिहासात वि. सी. गुर्जरांच्या प्रसन्न कथेची मुद्रा विशिष्ट कालखंडात ठळकपणे उमटत राहिली.

– वि. शं. चौघुले

**संदर्भ :**


१. *अदवंत म. ना; 'भारतीय साहित्याचे निर्माते– विठ्ठल सीताराम गुर्जर'; साहित्य अकादमी, नवी दिल्ली; १९८९.*


## गोखले, अरविंद विष्णू

**कथाकार**

**१९ फेब्रुवारी १९१९ ते २४ ऑक्टोबर १९९२**



अरविंद गोखले हे आधुनिक मराठी कथासृष्टीतील प्रस्थापित नाव आहे. सतत पन्नास वर्षे एका अव्यभिचारी निष्ठेने गोखल्यांनी कथालेखन केले. एकान्तिक तपस्व्याच्या मनोभूमिकेतून अनन्यपणे असे कथालेखन करणारा त्यांच्यासारखा लेखक विरळा! या तपश्चर्येतून ३५ लघुकथा संग्रह, ५ लघुतम कथा संग्रह, ६ दीर्घकथा संग्रह, १० ललित लेखसंग्रह इतकी विपुल साहित्य निर्मिती त्यांनी केली. या निर्मितीमागे एक विशिष्ट व वैशिष्ट्यपूर्ण कथादृष्टी असल्याचा प्रत्यय येतो. कथेच्या क्षेत्रात विविध प्रयोग करत असतानाही आपल्या कथेची कांती सतत सतेज ठेवण्याचा व तिला विविध परिमाणांनी समृद्ध करण्याचा त्यांनी प्रयत्न केला. या असाधारण प्रयत्नांमुळे समग्र मराठी कथासृष्टीवर त्यांची प्रसन्न मुद्रा उमटली आहे.

गोखले घराणे मूळचे कोकणातल्या चिपळूणजवळच्या बल्लाळेश्वर गावचे. त्यांचे वडील विष्णू नारायण गोखले हे लंडन विद्यापीठाचे पीएच.डी होते तर आई सुमती ही रविकिरण मंडळातील श्री.बा.रानडे सुप्रसिद्ध कवीची बहीण! अशा उच्च विद्याविभूषित दाम्पत्याच्या पोटी अरविंद गोखले यांचा जन्म इस्लामपूरला आजोळी झाला. मातुल घराण्यातून प्राप्त झालेली वंशदत्त सर्जनशील वाङ्मयीन परंपरा आणि गोखल्यांच्या घरातील सुधारक व सुसंपन्न वातावरण यांमुळे गोखल्यांचा वाङ्मयीन पिंड घडला. अर्थात गोखल्यांच्या वडिलांना त्यांनी वाङ्मयात रमावे हे रुचणारे नव्हते. मुलाने डॉक्टर किंवा इंजिनिअर व्हावे ही त्यांची इच्छा! पण वैद्यकीय महाविद्यालयमध्ये प्रवेश न मिळाल्याने ते बी.एस्सी. झाले. बी.एस्सी.ला विद्यापीठात प्रथम श्रेणीत प्रथम येऊन त्यांनी सुवर्णपदक पटकावले. नंतर दिल्लीच्या इंपिरिअल अ‍ॅग्रिकल्चर युनिव्हर्सिटीमध्ये सायटो जेनेटिक्स व प्लान्ट ब्रीडिंगवर त्यांनी संशोधन केले. या काळात अरुणा असफअल्ली ह्यांच्या प्रेरणेने त्यांनी एक गुप्त रोडिओस्टेशन चालवून स्वातंत्र्याच्या चळवळीत आपला सहभाग नोंदवला. १९४३ मध्ये पुण्याच्या शेतकी महाविद्यालयात ते रुजू झाले. १९५७–५८ मध्ये उच्चशिक्षणासाठी ते अमेरिकेत गेले. १९६३ मध्ये सरकारी नोकरी सोडून ते मुंबईला खासगी आस्थापनेत रुजू झाले.

अगदी बालवयात गोखल्यांनी कथालेखनाला सुरुवात केली. शाळेच्या हस्तलिखितात व सर परशुरामभाऊ महाविद्यालयाच्या वार्षिकात त्यांच्या कथा प्रकाशित झाल्या. दिल्लीला शिक्षणासाठी असतानाही त्यांच्या ७–८ कथा प्रकाशित झाल्या. १९४५ मध्ये सत्यकथेच्या

कथाविशेषांकात त्यांची 'कोकराची कथा' नावाची कथा प्रकाशित झाली. पूर्वापार चालत आलेले कथेचे साचे मोडीत काढत, आशय आणि अभिव्यक्ती ह्यांच्या पूर्णतः नवीन वाटा या कथेत गोखल्यांना गवसल्या; व आघाडीचे नवकथाकार म्हणून त्यांना मान्यता मिळाली. एखाद्या पात्राच्या मनात शिरून तेथील आंदोलने टिपत योग्य प्रतिमांचा वापर करून गोखले कथा लिहू लागले. एका पात्राच्या दृष्टिकोनातून कथेचे निवेदन करणे हा कथालेखनाचा प्रकार रुजविण्याचे श्रेय फार मोठ्या प्रमाणात गोखल्यांचेच आहे. त्यांचे समकालीन नवकथाकार गंगाधर गाडगीळ, पु. भा. भावे आणि व्यंकटेश माडगूळकर ह्यांच्या कथांपेक्षा त्यांची कथा वेगळी आहे.

आपल्या वासनांना पवित्र मानत जपू पाहणारी, पर्यायाने माणसातील पशुत्व नाकारू पाहणारी 'मंजुळा' ही कथा त्या काळात खूपच गाजली. नवनिर्मितीसाठी आसुसलेला, स्वतःसारखी एक मुलगी हवी असलेला पण त्यासाठी 'वासनांचे वाफे' बांधायची तयारी नसणारा एक 'नर' त्यांनी कथांकित केला व स्त्री-पुरुष संबंधांच्या एका वेगळ्याच पैलूचे दर्शन वाचकांना घडविले. एका दीड खणी खोलीत राहणाऱ्या ७-८ माणसांमधील - त्यांच्या ताणतणावांचे चित्रण एका 'आरामखुर्ची'च्या माध्यमातून करत त्यांनी कथालेखनाला एक नवा आयाम दिला. तारुण्यातील प्रेमभावनेचे पार्थिव व अपार्थिव स्वरूप स्पष्ट करणाऱ्या 'कमळण', 'गिलावा', 'मिथिला', 'डाग', 'अधर्म', 'उमा' या त्यांचे प्रेमविषयक तत्त्वज्ञान स्पष्ट करणाऱ्या काही कथा. 'विघ्नहर्ता' या त्यांच्या गाजलेल्या कथेत त्यांनी एका चमत्कृतीपूर्ण अनुभवास कथारूप दिले आहे.

गोखल्यांची प्रतिभा सतत नावीन्याच्या शोधात असे. कथालेखनच करायचे हे ठरवून त्यांनी कथा लिहिल्या. परंतु त्यात विविध प्रयोगही केले. लघुतम कथा, दीर्घकथा हे कथेच्या आकारावरून पडलेले प्रकार. साखळी कथा हा तीच पात्रे पुन्हा पुन्हा घेऊन लिहिलेल्या सहा कथांचा संग्रह 'उजेडाचं वेड' नावाने प्रसिद्ध झाला. एकाच अनुभवाच्या दोन बाजू दाखवणाऱ्या जुळ्या कथांचा संग्रह 'जोडाक्षर' तर एकाच अनुभवाच्या तीन बाजू दाखविणारा 'त्रिधा' आणि शेवटी 'कथाष्टक'. त्यांच्या 'त्रेपन्न पत्ते' या कथा संग्रहात एकाच अनुभवावर लिहिलेल्या ५ ते ७ लघुतम कथा एकत्र आहेत.

१९५० ते १९५७ हा कालावधी गोखल्यांच्या कथालेखनाच्या दृष्टीने अत्यंत बहराचा होता. १९५७-५८ ला ते उच्च शिक्षणासाठी अमेरिकेत गेले होते. त्यांनी विस्कॉन्सिन विद्यापीठातून एम.एस्.सी. पदवी घेतली. १९५९ ला भारतात परतल्यावर त्यांनी नव्या जोमाने कथालेखनाला सुरुवात केली. त्या काळातच त्यांनी लघुतम कथा लिहिल्या. त्यांच्या जोडीलाच लघुकथाही लिहिल्या. १९७५ मध्ये गोखले दीर्घकथा लेखनाकडे वळले. त्यांनी या वेळी पंधरा दीर्घकथा लिहिल्या. अनुभवाची एकापेक्षा जास्त केंद्रे, अनुभवातील व्यामिश्रता, काळाचा अवकाश, कथानकाचा विस्तार हे घटक लक्षात घेतले, तर यांतील अनेक दीर्घकथा या कथा नसून लघुकादंबऱ्या आहेत, हे सहज लक्षात येते. परंतु कथा या वाङ्मय प्रकारावरील आपली अव्यभिचारी निष्ठा प्रकट करण्यासाठी गोखले त्यांना दीर्घकथाच म्हणत.

माणसा-माणसांतील संबंधांच्या अनेक परींचा शोध गोखले या दीर्घकथांमधून घेतात. जीवनाबद्दल व वेगवेगळ्या माणसांबद्दल त्यांना प्रचंड कुतूहल होते. व्यक्तिमनातील सूक्ष्म ताणतणाव ते बारकाईने टिपतात. विषयातील विविधता हा गोखल्यांचा विशेष या कथांमध्येही जाणवतो.

गोखले यांना प्राप्त झालेले महाराष्ट्र राज्य सरकारचे पुरस्कार -

१) आशियाई, आफ्रिकी, अरबी कथा स्पर्धा एन्काउंटर मासिक, लंडन- प्रथम पारितोषिक, 'गंधवार्ता' या कथेला १९६०.

२) केंद्र सरकार सांस्कृतिक मंत्रालय - एमिरेटस फेलोशीप १९८४ ते १९८६

३) महाराष्ट्र राज्य साहित्य परिषद - सुदीर्घ वाङ्मय सेवेबद्दल विशेष पुरस्कार १९९१.

२४ ऑक्टोबर १९९२ मध्ये एका छोट्याशा अपघाताचे निमित्त होऊन त्यांचे पुणे येथे निधन झाले.

– डॉ. छाया नाईक

**संदर्भ :**


१. *डॉ. नाईक, छाया; 'अरविंद गोखले यांच्या कथा वाङ्मयाचा चिकित्सक अभ्यास', नागपूर विद्यापीठाला पी.एच.डी.साठी सादर करण्यात आलेला प्रबंध, १९९३.*

२. *डॉ. नाईक, छाया; 'एकान्ताचा अंतर्नाद', विकेता प्रकाशन, नागपूर १९९९.*


## गोखले अवंतिकाबाई बबनराव

☞ **मुख्य नोंद – समाजकारण खंड**

## गोखले, कृष्णाजी केशव

**कथाकार, कादंबरीकार**

**१८८६ – २५ सप्टेंबर १९२७**



जत संस्थानात न्यायाधीश व काही काळ कारभारी म्हणून कृष्णाजी केशव गोखले यांनी काम केले होते. मराठी कथा व कादंबरी यांना आपल्या वैशिष्ट्यपूर्ण लेखन दृष्टीने वेगळेपण प्रदान करणाऱ्या हरी नारायण आपटे यांचा व गोखले यांचा खूप स्नेह होता. आपटे यांच्या सुधारणावादी दृष्टिकोनाची छापही त्यांच्यावर पडलेली होती. आपटे यांच्या स्नेहपरिवारात त्यांचा राबता असल्यामुळे वाचन/लेखनाची आवड त्यांच्यात निर्माण झाली व त्यातून त्यांनी गोष्टी लिहिण्यास प्रारंभ केला. त्यांच्या अनेक गोष्टी 'मनोरंजन' व 'करमणूक' या मासिकांतून प्रसिद्ध झाल्या. १९११ साली त्यांनी 'काय केलीत सूनबाई' या नावाचा एक कथासंग्रह प्रसिद्ध केला. त्याला प्रस्तावना लिहिताना 'फुरसतीच्या वेळी आपल्या मनाची करमणूक व्हावी व त्यातल्या त्यात मराठी भाषेची सेवा घडावी, अशा दुहेरी हेतूंनी ह्या प्रथम लिहिल्या,' असा आपल्या कथालेखनाचा हेतू त्यांनी स्पष्ट केलेला आहे आणि सार्थही करून दाखविला आहे.

त्यांनी आपल्या कथालेखनाचे एक तंत्रच सिद्ध केले होते. स्ट्रॅन्ड, लंडन, पिअर्सन्स मंथली या नियतकालिकांमध्ये आलेल्या पाश्चिमात्य साहित्यिकांच्या कथा तत्कालीन सुशिक्षित मंडळी मोठ्या आवडीने वाचत असत. ही तत्कालीन सुशिक्षितांची अभिरुची लक्षात घेऊन अशा नियतकालिकांमध्ये आलेली व त्यांना आवडलेली कथा मनोरंजनाचा हेतू समोर ठेवून ते रूपांतरित करीत. असे रूपांतरण घडवून आणताना इंग्रजी कथेतील मध्यवर्ती कल्पना तशीच ठेवून तिला मराठी पेहराव अशा पद्धतीने देत की, एकीकडे इंग्रजी कथेतील मध्यवर्ती कल्पना स्वीकारल्यामुळे तत्कालीन सुशिक्षितांना ती अभिरुचीपूर्ण वाटे व दुसरीकडे तिच्या बेमालूम रूपांतरणामुळे मराठमोळीही वाटत असे. 'बालक', 'दो दिवसांची बायको', 'मैनाबाईचा राघू', 'मंतरलेले पाणी', 'थोडासा मेंदूचा विकार' या कथांकडून त्यांचे लेखन–कौशल्य विशेषत्वाने प्रकट झालेले आहे.

लहानशा प्रसंगाभोवती कथासूत्र गुंफणे, त्यात मधून–मधून नर्म विनोदाची पेरणी करतो, रहस्याची गुंफण करून वाचकाची उत्कंठा वाढवीत नेणे आणि शेवटी त्याची परिणामकारक पद्धतीने सोडवणूक करून वाचकाला आनंद होईल अशी योजना करणे, कधी कथेतील पात्राच्या भोळ्याभाबड्या स्वभावाने मर्म गमतीदारपणे मांडून वाचकाला त्यातील मजा अनुभवता येईल अशा पद्धतीने कथेची रचना करणे आणि या सगळ्या वैशिष्ट्यांना पेलून धरणारी सहजसुंदर, ओघवती भाषाशैली हे विशेष त्यांच्या कथांमध्ये आढळतात. त्यांच्या कथा–लेखनातील हे विशेष कथा–लेखक म्हणून त्यांचे वेगळेपण स्पष्ट करणारे आहेत. म्हणूनच 'मनोरंजन' काळातील प्रमुख लेखक म्हणून अभ्यासकांनी त्यांचा गौरव केला आहे.

'काय केलीत सूनबाई' हा कथासंग्रह प्रसिद्ध झाल्यानंतर त्यांनी आपली दृष्टी कादंबरी लेखनाकडे वळविली. त्यातूनच 'आजपासून पन्नास वर्षांनी' हे जेन

ऑस्टीन हिच्या 'प्राइड अ‍ॅन्ड प्रेज्युडिस'चे रूपांतर (१९१३), 'स्वर्गीय प्रेम' मेरी कॉरेली हिच्या 'ट्रेझर ऑफ हेवन'चे स्वैर रूपांतर (१९१५), 'मूर्तिमंत गुलामगिरी' या नावाने 'अंकल टॉम्स कॅबीन' ह्या विश्वविख्यात कादंबरीचा अनुवाद (१९२०) इत्यादी लेखन त्यांनी केले. तसेच सामाजिक प्रबोधन घडावे हा हेतू समोर ठेवून 'तिलोत्तमा' व 'एकत्र की विभक्त' या दोन स्वतंत्र कादंबऱ्याही त्यांनी लिहिल्या. त्यातून सामाजिक सुधारणा घडवून आणण्यासाठी तळमळणाऱ्या एका सुधारकाच्या मनाचा प्रत्यय आपल्याला येतो.

कथा, कादंबरी लेखनाबरोबर मराठी भाषेचा विचारही त्यांनी तात्त्विक दृष्टीने आपल्या काही लेखांमधून मांडलेला आहे. 'भाषांतर, रूपांतर की स्वतंत्र?', 'मराठी भाषेतील काही दोष व त्यांची मीमांसा' हे 'विविधज्ञानविस्तार' या मासिकामधील लेख त्यांच्या मराठी भाषेविषयी असणाऱ्या सच्च्या प्रेमाचे प्रतीक आहेत.

ते न्यायाधीश पदावर होते. त्यामुळे सारासार दृष्टीने व स्वतंत्र विचारसरणीने एखाद्या विषयाकडे पाहण्याची दृष्टी त्यांना लाभलेली होती. त्यातूनच हिंदू कायद्यामध्ये वारसा हक्काच्या संदर्भात स्त्रियांवर कसा अन्याय झालेला आहे, हे त्यांना जाणवले व मोठ्या पोटतिडकीने त्यांनी या प्रश्नावर जागृती व्हावी म्हणून 'मनोरंजन' मासिकामधून 'हिंदू स्त्रियांची दुर्दशा' ही लेखमाला लिहिली. 'स्त्रियांचे शिक्षण', 'त्यांचे कायदेशीर हक्क' व 'स्त्री-स्वातंत्र्य' या विषयांवरही त्यांनी समाजाचे लक्ष वेधले.

मराठी कथा वाचकप्रिय करणारे कथाकार, इंग्रजी कादंबऱ्यांचे मराठीत शैलीदारपणे रूपांतर करणारे कादंबरीकार, स्त्रियांच्या प्रश्नांना वाचा फोडणारे विचारवंत आणि मराठी भाषेचा विचार तात्त्विक बाजूने करणारे मराठी भाषाप्रेमी म्हणून कृ. के. गोखले कायम स्मरणात राहतील.

– डॉ. संजय देशमुख

**संदर्भ :**


१. *'मराठी वाङ्मयाचा इतिहास'; खंड ५, भाग १; महाराष्ट्र साहित्य परिषद, पुणे; १९७३.*

२. *'यशवंत' मासिक; एप्रिल-मे १९३०.*

३. *'मराठी वाङ्मयाचा इतिहास', खंड चौथा; महाराष्ट्र साहित्य परिषद, पुणे ३०.*

४. *'प्रदक्षिणा'; कॉन्टिनेन्टल प्रकाशन, पुणे; पाचवी आवृत्ती; १९७२.*


## गोखले, दत्तात्रेय नरसिंह

**चरित्रकार, शिक्षणतज्ज्ञ, समीक्षक**

**२० सप्टेंबर १९२२ – २७ जून २०००**



दत्तात्रेय नरसिंह गोखले यांचा जन्म बिरवाडी (जि. रायगड) येथे झाला. कुरुंदवाड हायस्कूलमधून १९४० मध्ये मॅट्रिक व १९५२ मध्ये 'डॉ. केतकर: व्यक्ती व वाङ्मय' हा प्रबंध सादर करून पुणे विद्यापीठातून त्यांनी पीएच. डी. पदवी संपादन केली. त्यांना या विद्यापीठाचे न. चिं. केळकर पारितोषिक मिळाले. पुढच्याच वर्षी ते टिळक कॉलेज ऑफ एज्यूकेशनमधून बी. टी. परीक्षा पहिल्या वर्गात उत्तीर्ण झाले. अनुदानसंहिता सुधारण्यासाठी १९६० साली नेमलेल्या समितीचे सदस्य या नात्याने गोखल्यांनी महाराष्ट्र शासनास अनेक सुधारणा सुचविल्या. पुढच्याच वर्षी फुलब्राइट शिष्यवृत्ती मिळवून अमेरिकेत गेलेल्या या कुशाग्र बुद्धीच्या गृहस्थाने हार्वर्ड व अन्य विद्यापीठांत जाऊन माध्यमिक शाळांचा सखोल अभ्यास केला आणि 'अमेरिकेतील माध्यमिक शाळा' नावाचे पुस्तक लिहिले. एक आदर्श शिक्षक म्हणून त्यांना राष्ट्रीय पुरस्कार लाभला व राष्ट्रपतींच्या हस्ते त्यांचा गौरव केला गेला (१९६९). डेक्कन एज्यूकेशन सोसायटीच्या पुणे व सातारा येथील हायस्कूलमध्ये त्यांनी १४ वर्षे मुख्याध्यापकपद भूषविले व नंतर पुण्याच्या फर्गसन महाविद्यालयामध्ये आणि मुंबईच्या कीर्ती महाविद्यालयामध्ये मराठी विषयाचे प्राध्यापक म्हणून कार्य केले.

कुरुंदवाड व सांगली येथे शिक्षण घेत असताना त्यांची जडणघडण राष्ट्रीय स्वयंसेवक संघाच्या प्रभावात झाली.

सांगली येथेच त्यांनी बाबाराव सावरकर यांची जीवनकथा त्यांच्याच तोंडून कित्येक महिने ऐकली, तिची टिपणे केली, बराच प्रवास केला, सुमारे १०० सहकाऱ्यांच्या व परिचितांच्या भेटीगाठी घेऊन त्यांच्याशी झालेल्या संभाषणांतून बाबारावांच्या जीवनाचे अनेक पैलू त्यांना समजले. या परिश्रमांतून १९४७मध्ये गोखले लिखित 'क्रांतिवीर बाबाराव सावरकर' हा ग्रंथ हा साकारला. राष्ट्रोद्धारार्थ जीवन अर्पण करणारे नेपोलिअन, गॅरिबाल्डी, मॅझिनी अशा थोर व्यक्तींची चरित्रे गोखले यांनी वाचली होती. अभ्यास, चिंतन, भाषा, मांडणी ह्या दृष्टीने दर्जेदार अशी अनेक चरित्रे गोखले यांनी मराठीस भेट दिली. 'स्वातंत्र्यवीर सावरकर: एक रहस्य' याविषयी गोखले म्हणतात, ''सावरकरांच्या व्यक्तिमत्त्वाचे मला दिसलेले स्वरूप आजवरच्या सावरकर अभ्यासकांना दिसलेल्या स्वरूपापेक्षा काहीतरी वेगळे आहे, अशी माझी भावना होती. तेव्हा चरित्रापेक्षा व्यक्तिविमर्श लिहिणे मला सोईचे वाटले. व्यक्तिमत्त्वाचे विश्लेषण नी संश्लेषण म्हणजे सत्यशोधनच असते.'' 'चरित्र तीन अंगांनी बनते', असे सांगून गोखले नमूद करतात की, व्यक्तित्व मुळात अमूर्त असते. जीवनक्रम नि परिस्थिती यांचा व्यक्तित्वाशी जो संबंध आहे, तो चरित्रकाराने नेमका हेरला पाहिजे. चरित्रात व्यक्तित्वाला जे महत्त्व आहे, ते साहित्यदृष्टीने आहे. ऐतिहासिकदृष्टीने ते व्यक्तित्व वास्तव असावे, हे ओघानेच येते.

''डॉ. गोखले यांनी उभे केलेले केतकर-चरित्र अनेक दृष्टींनी संस्मरणीय आहे... या चरित्राचा एक मोठा गुण म्हणजे डॉ. गोखले यांनी कल्पनेतून काहीही निर्माण केले नाही.'' हा डॉ. प्र. न. जोशी यांचा अभिप्राय बोलका आहे.

''ललित निर्मिती म्हणजे शब्द-स्पर्श-रूप-रस-गंध ह्यांनी गोचर होणारी आणि वाचकांना एकदम भिडणारी, समूर्त नि सजीव कलाकृती, हा अर्थ मला अभिप्रेत आहे.'' असे डॉ. गोखले म्हणत.

डॉ. द. न. गोखले यांच्या डॉ. केतकर (१९५९) चरित्राला, डॉ. पटवर्धन उर्फ माधव जूलियन (१९७८) चरित्राला, स्वातंत्र्यवीर सावरकर: एक रहस्य (१९८९) या व्यक्तिविमर्शाला; गांधीजी: मानव नि महामानव (१९९६) ह्या व्यक्तिविमर्शाला आणि शुद्धलेखन विवेक (१९९३) या शास्त्र विवरणाला महाराष्ट्र राज्य पुरस्कार, साहित्य अकादमी पुरस्कार, महाराष्ट्र साहित्य परिषद पुरस्कार, महाराष्ट्र ग्रंथोत्तेजक पुरस्कार, न. चिं. केळकर पुरस्कार इत्यादी पुरस्कार लाभलेले आहेत.

वरीलखेरीज त्यांच्या ग्रंथलेखनात 'डॉ. केतकरांच्या कादंबऱ्या', 'परीक्षांची सुधारणा/Reform of Examinations', 'एका चरित्राचे चरित्र', 'सुलभ शुद्धलेखन', 'चरित्र चिंतन' यांचा समावेश आहे. त्यांच्या संपादित ग्रंथांमध्ये 'गाळीव रत्ने' चिं. वि. जोशी, 'दुधाच्या धारा' य. गो. जोशी; 'कमल फुले' साने गुरुजी, प्रा. रा. श्री. जोग गौरवग्रंथ (सहकार्याने), 'हिंदुत्व दर्शन'- वि.दा. सावरकर, वाङ्मय विमर्श- रा. श्री. जोग - या ग्रंथांचाही समावेश आहे.

'चरित्रचिंतन' या ग्रंथाची प्रस्तावना उल्लेखनीय आहे कारण डॉ. जयंत वष्ट, स. का. धानोरकर आणि श्री. ब. ल. वष्ट या त्यांच्या मित्रांनी चरित्रविषयक अनेक प्रश्न उपस्थित करून डॉ. द. न. गोखले यांच्याशी केलेली चर्चा प्रश्नोत्तर रूपाने प्रस्तुत केली आहे. यातून गोखले यांचे व्यापक व सखोल चिंतन आणि चरित्र-आत्मचरित्राच्या समीक्षेचे मापदंड उपलब्ध होऊ शकले आहेत, जे अभ्यासकांसाठी उपयोगी सिद्ध होतील.

– वि. ग. जोशी

**संदर्भ :**

*१. गोखले द. न.; 'चरित्र-चिंतन'; मौज प्रकाशन; २०००.*

## गोखले, विद्याधर संभाजीराव

☞ **मुख्य नोंद – पत्रकारिता आणि ललितेतर साहित्य खंड**

## गोडघाटे, माणिक सीतारामपंत

☞ **ग्रेस**

## गोडबोले, परशुराम बल्लाळ

**कवी, छंदशास्त्रज्ञ, अनुवादक**

**इ. स. १७९९ – ३ सप्टेंबर १८७४**



परशुराम उर्फ तात्या गोडबोले यांचा जन्म १७९९ मध्ये वाई (जिल्हा सातारा) येथे झाला. गोडबोले मूळचे रत्नागिरी जिल्ह्यातील पावसगोळण या गावचे; पण त्यांचे खापर–पणजोबा गाव सोडून वाई येथे सरदार रास्त्यांच्या आश्रयास येऊन राहिले. 'नवनीत'कार गोडबोले यांचा विद्याभ्यास, विशेषतः संस्कृत भाषेचा अभ्यास, वाई येथे नारायणशास्त्री देव यांच्याकडे झाला. पुण्यास आल्यावर ते त्यांच्या मामाच्या पेढीवर कारकुनी करू लागले. त्यांचे मोडी अक्षर सुरेख होते. जमाखर्चाचीही चांगली माहिती होती.

त्यांचे भाऊ दाजिबा यांच्यामुळे त्यांना मोरोपंतांदी जुन्या मराठी कवींच्या कवितेची गोडी निर्माण झाली. त्यांनी पाठांतरही खूप केले. मुंबईच्या 'शाळा पुस्तक मंडळी'ने 'मराठी भाषेचा कोश' तयार करण्याचे कार्य इ. स. १८२४ च्या सुमारास जेव्हा हाती घेतले, तेव्हा हा अभ्यास लक्षात घेऊन त्यांचा समावेश संपादक मंडळात करण्यात आला. हा कोश इ.स. १८२९ मध्ये प्रसिद्ध झाला. १८३१ मध्ये या कोशाची पुरवणी प्रसिद्ध झाली. हा कोश 'पंडित मंडळींचा महाराष्ट्र भाषेचा कोश' म्हणून त्या काळी ओळखला जात असे. मराठी भाषेची व्याख्या, मराठी भाषेच्या कोशाची आवश्यकता, कोशात उपयोजिलेल्या शब्दांची व्याप्ती इत्यादींची सविस्तर चर्चा यात केली आहे.

कोश प्रसिद्ध झाला, त्या सुमारास १८४७ मध्ये पुण्यात विश्रामबाग वाड्यात सरकारी छापखाना सुरू झाला. मेजर थॉमस कॅण्डी यांची त्यासाठी मराठी ट्रान्सलेटर व रेफरी म्हणून नेमणूक झाली. परशुरामपंत उर्फ तात्यांचा मराठी भाषेचा व्यासंग लक्षात घेऊन, मेजर कॅण्डी यांनी त्यांना आपल्या हाताखाली पंडित म्हणून नेमून घेतले. या कॅण्डीचा ते उजवा हात होते. या जागेवर तात्या अखेरपर्यंत कार्यरत होते. त्या वेळच्या मराठी क्रमिक पुस्तकांतील सगळ्या कविता तात्यांच्या लेखणीतून उतरलेल्या आहेत. सरकारी काम सांभाळून तात्यांनी अनेक मराठी ग्रंथ रचले. संस्कृतमधून मराठीत भाषांतरित केलेल्या ग्रंथांत – 'शाकुंतल', 'वेणीसंहार', 'नाग नेर', 'उत्तररामचरित्र', 'मृच्छकटिक' ही नाटके प्रमुख आहेत. शब्दशः केलेले भाषांतर नव्हे तर रसपरिपोषासह केलेले रसाळ भाषांतर, हे तात्यांच्या लेखनाचे खास वैशिष्ट्य आहे. जुन्या कवींच्या काव्यांच्या संग्रहात 'केकादर्श', 'नवनीत' इत्यादींचा समावेश आहे. रामदास, तुकाराम, श्रीधर, मोरोपंत, वामन पंडित इत्यादींच्या साहित्याचा परिचय 'नवनीत'मध्ये करून दिला आहे, तर दादोबा पांडुरंग तर्खडकरांचा 'यशोदा पांडुरंगी' हा ग्रंथ सामान्य लोकांना सहज समजावा म्हणून त्यांनी 'केकादर्श' हा ग्रंथ सहजशैलीत लिहिला.

नवीन ग्रंथातील 'मराठ्यांच्या इतिहासावर लहान मुलांकरिता सोपी कविता' (१८६४), 'संक्षिप्त भूगोलवर्णन' (१८६५), 'बालबोधामृत' (१८७४), 'वृत्तदर्पण' (१८६७– याच्या २९ आवृत्त्या निघाल्या.), 'श्रीमच्छंकराचार्यकृत श्रीपांडुरंग स्तोत्राची टीका' मराठी गद्यात्मक (१८०५) ही त्यांची पुस्तके म्हणजे वाचकांसाठी एक फार मोठा ज्ञानलाभ आहे. हे सारे ग्रंथ म्हणजे मूळातील रस कायम राखून, सुंदर शब्दयोजना करून, कविता कशी रचावी? गूढार्थ सुलभ कसा करावा? याची मूर्तिमंत उदाहरणे आहेत. अशा प्रकारे मराठी भाषेची निष्ठापूर्वक विपुल सेवा त्यांनी केली. प्राचीन मराठी कवितेचा त्यांचा प्रगाढ व्यासंग होता. अव्वल दर्जाचा रसिक व मार्मिक पंडित म्हणून त्यांचा लौकिक महाराष्ट्रभर होता. स्वभावाने गोड मनमिळाऊ असलेले तात्या सर्व थरांतील मंडळीत प्रिय होते. महाराष्ट्रात शिक्षणाचा प्रसार होण्याच्या दृष्टीने त्यांचे लेखन हे एकोणिसाव्या शतकात 'प्रबोधनयुग' म्हणून महत्त्वपूर्ण ठरते.

– प्रा. मंगला गोखले

**संदर्भ :**

*१. डॉ. खानोलकर गं. दे.; 'मराठी वाङ्मय चरित्रकोश'.*

## गोडसे, विष्णुभट बाळकृष्ण (वरसईकर)

**आत्मवृत्तकार**

**१८२७ – १९०७**

विष्णुभट गोडसे हे कुलाबा (आता रायगड) जिल्ह्यातील पेण तालुक्यात वसलेल्या वरसई गावचे स्थायिक होते. वडिलोपार्जित घरात एकत्र कुटुंबात ते राहत होते. भिक्षुकी व यजमानाघरची धर्मकृत्ये करणे, हाच त्यांचा जन्मभरचा व्यवसाय होता. वरसईलाच, वेदशास्त्रनिपुण व याज्ञिकात केवळ प्रतिसूर्यच असा लौकिक असलेल्या विद्वान विनायकशास्त्री जोशींकडे गोडसे भटजी रूपावली, समासचक्र, अमरकोश, काव्याचे काही सर्ग हे सारे शिकले आणि नंतर धर्मशास्त्र, नारायणभट्टी, निर्णयसिंधू, प्रयोगपारिजात, स्मृत्यर्थसार इत्यादी ग्रंथांचे अध्ययन करून विद्वान झाले. गरिबीने टोचण्या लावल्यामुळे त्यांनी रात्रंदिवस शिकण्याचा वसाच घेतला होता. त्यांच्या लहानपणापासूनच दारिद्र्य मागील दारी, पुढील दारी फुगड्या घालीत होतेच; म्हणून द्रव्यप्राप्तीसाठी ते याज्ञिकी करू लागले.

**चौकस बुद्धीचे गोडसेभटजी**

गोडसेभटजी गोरेपान, उंच, भव्य, तेजस्वी होते. स्वभावाने तापट, दरारा वाटावा असे होते. दृढनिश्चयी, धीट, रोखठोक, हजरजबाबी असले तरी काहीसे भोळसरही होते. धर्मशास्त्रात पारंगत असले, तरी पारमार्थिक दृष्टी नसलेले, प्रवृत्तिमार्गाचाच कल असलेले होते. चौकस होते म्हणूनच बंडाच्या धामधुमीत सापडले, तेव्हा बंडवाल्यांकडून बंडाच्या हकिकतींची सविस्तर माहिती मिळवली. असे जरी असले, तरी त्यांना बंडामागे कोणते राजकारण आहे, हे जाणण्याची दृष्टी व समज नव्हती. प्रवासात वाटेत आलेली तीर्थक्षेत्रे, धार्मिक अनुष्ठाने व त्यानिमित्त झालेली भोजने ह्यांचे ते इत्थंभूत आणि चवीने वर्णन करतात. शास्त्रिवैदिकांबद्दल सांगतात पण राजकीय व्यक्ती, शहरे, किल्ले यांच्याबद्दल काही सांगत नाहीत. (अपवाद : झाशी शहर, झाशीचा किल्ला आणि राणी लक्ष्मीबाई ह्यांचा). बायकांबद्दल पुष्कळ गोष्टी वर्णन करतात; ह्याचे कारण त्यांचा भिक्षुकीचा व्यवसाय होय.

आयुष्याखेरी, त्यांच्या कर्तृत्ववान मुलामुळे (वेदशास्त्र संपन्न नरहरशास्त्री गोडशांमुळे – गीतेवर गुजराती भाषेत मुंबईला प्रवचने करून त्यांनी लौकिक मिळवला होता.) त्यांना चांगले दिवस आले, पण त्यांचा अंत मात्र करुणाजनक झाला. त्यांनी उत्तरवयात क्षेत्रसंन्यास घेतला होता. पण नातू आजारी पडला– अत्यवस्थ झाला, तेव्हा त्याचा मृत्यू पाहावा लागणार या शंकेने देवळातल्या देवाची पूजा आटपून तडक घरातल्या देवघरात गेले आणि देवाशी नातवाच्या अवस्थेबद्दल भांडू लागले. नंतर देवापुढचे हळदीकुंकू घेऊन सुनेला मुलाच्या (नातवाच्या) कपाळी ते लावायला सांगितले– म्हणाले, ‘‘घाबरायचे कारण नाही, मुलगा बरा होईल.’’ नातू बरा झाल. त्याला आजोळी पाठवून दिले. पण इकडे भटजींना अतिशय थकवा वाटू लागला आणि त्यांनी जे अंथरूण धरले, ते शेवटपर्यंत सोडले नाही. इष्टदेवाचे ध्यान करीतकरीतच त्यांचे प्राणोत्क्रमण झाले.

ग्वाल्हेरच्या बायजाबाई शिंदे मथुरेला ‘सर्वतोमुख’ यज्ञ करणार होत्या– ७/८ लाख रुपये धर्मादाय करणार होत्या. त्या यज्ञात भाग घ्यावा, म्हणजे काही धनप्राप्ती होईल अशा हेतूने ते व रामभटकाका उत्तर हिंदुस्थानात गेले. (त्याच वेळी वरसईतील आणखी काही ब्राह्मण मंडळीही यज्ञानिमित्त गेली होती.) दोघेही बंडात सापडले. त्यांच्यावर अनेक संकटे कोसळली. चोरांनी लुबाडले. मृत्यूच्या भयाने झाशीला लपून बसण्याचा भयंकर प्रसंग ओढवला.

गोडसे भटजी प्रवासामध्ये आलेल्या विशेष अनुभवांची टिपणे जेव्हाची तेव्हा करून ठेवणारे होते. त्यांना बंडाबाबतची वस्तुस्थिती जशीच्या तशी कळावी, अशी तीव्र इच्छा होती. परंतु २६ वर्षांनी लिहायला बसल्यामुळे सारी टिपणे जवळ राहिली नव्हती, असेही झाले आहे. त्यांनी हे लेखन करण्याचे कारण म्हणजे आपल्या वंशजांना झाला प्रकार समजण्याचे साधन उपलब्ध व्हावे. सुना, लेकी, मुले मोठे झाले की त्यांना आपण लिहिलेला मजकूर गोडसे भटजी वाचून दाखवत असत. हा क्रम जवळपास सहा महिने चालू होता.

तारीख ३० मार्च १८५७ ह्या दिवशी गोडसे भटजी व त्यांचे काका ह्यांनी उत्तर हिंदुस्थानच्या प्रवासाला सुरुवात केली. महू-उज्जैन-धार, पुन्हा उज्जैन-ग्वाल्हेर असे ते पहिल्या टप्प्यात गेले. २३ ऑक्टोबर १८५७ रोजी ते ग्वाल्हेरहून झाशीला जायला निघाले ते १८२१ नोव्हेंबर, ५७ रोजी झाशीला पोहोचले. मार्च १८५८ अखेर ते झाशीत होते. सर ह्यू रोजची इंग्रजी फौज २१ मार्च १८५८ ते १० एप्रिल १८५८ झाशीच्या लढाईत गुंतली होती. ४ एप्रिल १८५८ ला झाशीचा किल्ला आणि ६ एप्रिल १८५८ रोजी झाशी शहर इंग्रजांनी जिंकले, गोडसे भटजींनी किल्ल्याची अकरा दिवसांची लढाई आणि त्याचबरोबर इंग्रजांनी झाशीत केलेले बीजन (कत्तल) व लूटही प्रत्यक्ष अनुभवली ह्याचे चक्षुर्वैसत्यं असे त्यांनी वर्णन केले आहे. इंग्रजीतील ऐतिहासिक कागदपत्रांशी ताडून पाहता गोडशांचे वर्णन अचूक असून मराठी भाषेतील 'इतिहासा'चा पक्का दस्तऐवज म्हणून ते महत्त्वपूर्ण आहे. गोडसे झाशी सोडून काल्पीला सरकले, ते २३ मे १८५८ रोजी तेथे पोहोचले. ह्या वाटेवर असतानाच एका सकाळी राणी लक्ष्मीबाईसाहेब भेटल्या. ते वर्णन असे :

**झाशीच्या राणीची भेट**

''...झुंजूमुंजूचे सुमारास एका विहिरीवर पाणी काढून शौचमुखमार्जन करण्यास बसलो तो पाच-चार स्वार विहिरीवरून जात होते. त्यात झाशीवाली दृष्टीस पडली. तिने सर्व पठाणी पोशाख केला होता व सर्व अंग धुळीने माखले होते. तोंड किंचित आरक्त असून म्लान व उदास दिसत होते. तिला तृषा फार लागली असल्यामुळे घोड्यावरूनच आम्हांस तिने तुम्ही कोण आहा असा प्रश्न केला. तेव्हा आम्ही पुढे होऊन हात जोडून विनंती केली की आम्ही ब्राह्मण आहो, आपणास तृषा लागली असल्यास पाणी काढून देतो. बाईसाहेबांस ओळख पटली व खाली उतरल्या. मी रसी व मडके घेऊन लागलीच विहिरीत सोडणार, तो बाईसाहेब म्हणाल्या की तुम्ही विद्वान ब्राह्मण, तुम्ही मजकरता पाणी काढू नका, मीच काढून घेते. हे तिचे उदारपणाचे शब्द ऐकून मला फार वाईट वाटले, परंतु निरुपायास्तव रसी व मडके खाली ठेवले. बाईसाहेबांनी पाणी काढून, त्या मृण्मय पात्रातून ओंजळीने पाणी पिऊन तृषा हरण केली. दैवगती मोठी विचित्र आहे. नंतर मोठ्या निराश मुद्रेने बोलल्या की मी आर्धा शेर तांदुळाची धनीन, मजला रांडमुंडेस विधवाधर्म सोडून हा उद्योग करण्याची काही जरूर नव्हती. परंतु हिंदुधर्माचा अभिमान धरून या कर्मास प्रवृत्त झाले व याजकरिता वित्ताची, जीविताची सर्वांची आशा सोडली. आमच्या पदरी पातकच फार म्हणून आम्हांस ईश्वर यश देत नाही... काल्पीवरही इंग्रज चालून येत आहेत, तेथे थोडक्यातच जंग होईल; जे अदृष्टात लिहिले असेल ते होईल, असे म्हणून बाईसाहेब उठल्या. आम्हीही उभे राहिलो...''

काल्पीहून ते ब्रह्मावर्त- चित्रकूट (येथे नानासाहेब पेशवे होते. त्यांच्याकडून काही द्रव्य मिळेल ह्या आशेने गेले. चित्रकूटवरही इंग्रजांची धाड आली.) -बांदा- ब्रह्मावर्त-सूर्ययंत्रक्षेत्र- ग्वाल्हेर पुन्हा ब्रह्मावर्त (नोव्हेंबर १८५८ मध्ये)- बेलासिया- कानपूर- लखनौ- आयोध्या (रामनवमीला ११ एप्रिल १८५९)- काशी- प्रयाग (५ जुलै १८५९) - मध्ये विंध्यवासिनी उरकले, पुन्हा ब्रह्मावर्त- ग्वाल्हेर- झाशी- सागर- शांडिल्याश्रय- हुशंगाबाद (ऑक्टोबर १८५९)- इंदूर- सप्तश्रृंगीदर्शन (वणी) - नाशिक - त्र्यंबकेश्वर - पुणे- वरसई अशी त्यांची भ्रमंती (खरे तर फरफटच) झाली. वरसईला ते जानेवारी १८६० मध्ये परत आले म्हणजे ३० मार्च १८५७ ते जानेवारी १८६० जवळ-जवळ तीन वर्षे त्यांचा पायी प्रवास झाला.

त्यांच्या 'माझा प्रवास'मध्ये आयुष्याच्या ३३ वर्षांचे इतिवृत्त येते, त्यात ही तीन वर्षे अतिशय महत्त्वाची आहेत. ते लेखक नव्हते, इतिहासकारही नव्हते; पण त्यांच्या हातून आपातत: मौलिक स्वरूपाचे लेखन नियतीने करून घेतले, हा अमृतयोगच होता. सर्व लेखन मोडी लिपीत केलेले असून एकोणिसाव्या शतकाच्या उत्तरार्धात प्रचलित असलेल्या मराठी भाषेचे त्यातून दर्शन घडते.

– डॉ. चंद्रकांत वर्तक

**संदर्भ :**

१. *फाटक न.र., संपादक; 'माझा प्रवास' (सन १८५७ सालच्या बंडाची हकिकत)- वरसईकर विष्णुभटजी गोडसे; चित्रशाळा प्रकाशन, पुणे; तिसरी आवृत्ती- १९६१.*

२. *पोतदार दत्तो वामन, संपादक; 'माझा प्रवास' (१८५७ सालच्या बंडाची हकिकत) वरसईकर विष्णुभटजी गोडसे; व्हीनस प्रकाशन, पुणे; चौथी आवृत्ती..*

## गोरे नानासाहेब

***गोरे, नारायण गणेश***

**ललितलेखक, निबंधकार, कथाकार, भाषांतरकार**

**१५ जून १९०७ - १ मे १९९३**



नारायण गणेश गोरे यांचा जन्म रत्नागिरी जिल्ह्यातील हिंदळे गावात झाला. ते पुण्यातून बी.ए.,एल्एल.बी. झाले. नानासाहेब प्रत्यक्ष राजकारणात दीर्घकाळ सक्रिय राहिले, तरीदेखील त्यांचा पिंड मूलतः सामाजिक राजकीय विचार-वंताचा होता. सामाजिक, वैचारिक लेखनाबरोबरच त्यांनी विपुल ललित लेखनही केले. संपादक या नात्यानेही त्यांची कामगिरी उल्लेखनीय ठरली. निर्भीड राजकीय विचारवंत, असा लौकिक त्यांनी संपादन केला. महाराष्ट्रात समाजवादी विचारसरणी रुजविण्याचे कार्य त्यांनी केले. यासाठी प्रत्यक्ष कृतिशीलतेबरोबरच शब्दांचा आणि विचारांचा आधार त्यांनी घेतला. १९४८ मध्ये त्यांनी लिहिलेले 'समाजवादच का?' हे पुस्तक या संदर्भात उल्लेखनीय आहे. वस्तुतः नानासाहेबांच्या लेखनाचा प्रारंभ १९४२च्या कारावासात झाला. गुलबर्ग्याच्या तुरुंगात असताना त्यांनी केलेले दैनंदिनीसदृश्य लेखन 'कारागृहाच्या भिंती' या शीर्षकाने प्रसिद्ध झाले. याशिवाय 'भारताची पूर्व सरहद्द' (१९५३), 'तापू लागलेला हिमालय' (१९५३) ही त्यांची राजकीय-वैचारिक पुस्तके उल्लेखनीय ठरली. पंडित जवाहरलाल नेहरूंच्या आत्मचरित्राचे त्यांनी मराठीत भाषांतर केले.

नानासाहेबांकडे सौंदर्यदृष्टी होती आणि संवेदनशील मनही होते. त्यांच्या ललित स्वरूपाच्या लेखनातून हे स्पष्ट होते. 'सीतेचे पोहे' हा त्यांचा पहिला ललित लेखसंग्रह १९५३मध्ये प्रकाशित झाला. त्यानंतर 'डाली' (१९५६), 'गुलबर्गा' (१९५९), 'शंख आणि शिंपले' (१९६४) हे त्यांचे ललित लेखसंग्रह रसिकांसमोर आले. 'चिनारच्या छायेत' (१९६९) व 'काही पाने काही फुले' (१९८३) या त्यांच्या पुस्तकांमधून त्यांच्या सहज शैलीचे व संवेदनशीलतेचे प्रत्यंतर येते. नानासाहेबांच्या रसिक मनाची साक्ष त्यांनी १९५६मध्ये कलिदासाच्या मूळ संस्कृत भाषेतील 'मेघदूत' या काव्याच्या केलेल्या मराठी अनुवादातून पटते. त्यांची २५पेक्षा अधिक पुस्तके आहेत. त्यांनी 'साधना' साप्ताहिकाचे संपादन १९७९ ते १९८३ या काळात केले. याशिवाय 'जनवाणी', 'रचना', 'जनता' आदी नियतकालिकांचे संपादक म्हणूनही त्यांनी काम पाहिले. मराठी साहित्य क्षेत्रातील महत्त्वाच्या आणि आद्य मानल्या जाणाऱ्या 'महाराष्ट्र साहित्य परिषद' या संस्थेच्या अध्यक्षपदाची सूत्रे नानासाहेबांनी १९७० ते १९७३ या काळात सांभाळली.

– मनोहर सोनवणे

## गोविंदाग्रज

***गडकरी, राम गणेश***

**नाटककार, कवी, विनोदी लेखक**

**२६ मे १८८५ - २३ मे १९१९**

राम गणेश गडकरी यांचा जन्म गणदेवी (ता. नवसारी) गुजरात येथे झाला. वास्तव्य व शिक्षण दामनगर (सौराष्ट्र), पुणे आणि कर्जत येथे झाले. १८९६-१८९७ या काळात 'मित्रप्रिती' (अनुपाठबंध) या नाटकाचे लेखन केले. १९०४ साली मॅट्रिकची परीक्षा उत्तीर्ण होऊन १९०५मध्ये पुण्याच्या फर्गसन महाविद्यालयामध्ये दाखल झाले. १९०६-१९०७ साली श्रीपाद कृष्ण कोल्हटकरांशी ओळख झाली व त्यांचा स्नेह वाढला. त्यांच्या नाटकाचा व विनोदी लेखनाचा गडकऱ्यांवर प्रभाव



पडून गडकऱ्यांनी त्यांना गुरू मानले. १९०६ साली काही काळ त्यांनी किर्लोस्कर नाटक कंपनीच्या कर्मचाऱ्यांचे मास्तर म्हणून काम केले. पुण्याच्या ज्ञानप्रकाशात उपसंपादक म्हणून काम पाहिले त्यानंतर पुण्याच्या न्यू इंग्लिश स्कूलमध्ये काही काळ ते शिक्षक म्हणून कार्यरत होते. १९१० मध्ये नाटकातील पदे रचण्याच्या निमित्ताने किर्लोस्कर नाटक मंडळींशी पुन्हा संबंध आला. दरम्यानच्या काळात 'गर्वनिर्वाण' या पौराणिक नाटकाचे लेखन केले. रंगभूमीसाठी 'सवाई नाटकी' या टोपणनावाने लेखन केले. याच मासिकामधून 'वेड्यांचा बाजार' (अपूर्ण) हे नाटक प्रसिद्ध झाले. मासिक 'मनोरंजन'मधून त्यांची 'अल्लड प्रेमास' ही पहिली कविता (१९०९) प्रसिद्ध झाली. त्यानंतर चरितार्थासाठी लेखन हाच व्यवसाय स्वीकारला. १९१३ साली 'तुतारी मंडळ'ची स्थापना. १९०९ ते १९१८ हा त्यांच्या काव्यलेखनाचा कालखंड म्हणता येईल. त्यांनी 'गोविंदाग्रज' या टोपण नावाने कविता-लेखन केले. विनोदी लेखनासाठी 'बाळकराम' हे नाव स्वीकारले.

१९१०-१९११ या काळात गडकऱ्यांनी 'प्रेमसंन्यास' व 'तोड ही माळ' या नाटकांचे लेखन केले. १९१२ साली 'प्रेमसंन्यास' हे नाटक महाराष्ट्र नाटक मंडळी या सुप्रसिद्ध नाट्यसंस्थेने स्वीकारले. १९१२ साली रंगभूमीवर आले. त्यानंतर 'पुण्यप्रभाव' या नाटकाचा पहिला प्रयोग आणि प्रकाशन १९१६ झाले. 'एकच प्याला' या नाटकाचा प्रथम प्रयोग आणि प्रकाशन १९१९ मध्ये झाले. 'राजसंन्यास' (अपूर्ण) ह्या नाटकाचे प्रकाशन १९१९ मध्ये झाले. 'भावबंधन' हे त्यांचे अखेरचे नाटक होय. 'भावबंधन' आणि 'राजसंन्यास' यांचे प्रयोग गडकऱ्यांच्या मृत्यूनंतर १९२० साली झाले.

१९०९-१९१८ या काळात गडकऱ्यांनी 'गोविंदाग्रज' या टोपणनावाने काव्यलेखन केले. सुमारे १५०-१६० कविता त्यांनी लिहिल्या. 'वाग्वैजयंती' हा त्यांचा काव्यसंग्रह त्यांच्या निधनानंतर १९२१ मध्ये प्रसिद्ध झाला. गोविंदाग्रजांनी केशवसुतांना काव्यगुरू मानले होते. केशवसुतांच्या 'तुतारी', 'हरपले श्रेय' या बंडखोर आशय मांडणाऱ्या कवितांचा तसेच गूढगुंजनपर कवितांचा प्रभाव गोविंदाग्रजांवर होता. गोविंदाग्रजांनी अनेक विषयांवर कविता केल्या. काव्य, निसर्ग, प्रेम, गूढगुंजन, विनोद, समाज इत्यादी अनेक विषयांवर कविता केल्या. परंतु खऱ्या अर्थाने त्यांच्यातील कवीचे दर्शन प्रेमकविता, त्यातही पुन्हा विफल प्रेमकवितांमधून घडते.

**सामाजिक आशय**

रसिकांचा अनुनय करण्यासाठी शब्द आणि प्रास यांची जुळणी करणे म्हणजे काव्य नव्हे. अर्थावाचून आलेले शब्द म्हणजे केवळ शृंगारलेल्या प्रेताप्रमाणे आहेत. 'काव्य कराया जित्या जिवाचे जातिवंत करणेच हवे' ही गोविंदाग्रजांची काव्यदृष्टी आहे. उत्कट भावनांचा आविष्कार, उत्तुंग कल्पनाशक्ती, कल्पनाचमत्कृती, असामान्य शब्दशक्ती ही गोविंदाग्रजांच्या कवितेची सामर्थ्य स्थळे आहेत.

'दसरा', 'स्मशानातले गाणे', 'घुबडास' या कवितांमधून गोविंदाग्रजांनी सामाजिक आशय मांडला. 'दसरा' या कवितेच्या प्रारंभी ''हे गाणे केशवसुतांच्या 'तुतारी'चे वेडेवाकडे रूप आहे. सुधारणा पाहिजे या म्हणण्यापलीकडे या गाण्यात काहीच राम नाही'' अशी प्रांजळ कबुली गोविंदाग्रजांनी दिलेली आहे. शिणलेल्या रसिकांची मने पुन्हा ताजी करणारी गोविंदाग्रजांची रसवंती सामाजिक आशय केवळ विचारांच्या व बुद्धीच्या पातळीवर स्वीकारते. त्यामुळे उत्कटतेचा स्पर्श सामाजिक कवितांना होत नाही. परिणामी या कविता कल्पनाविलास करणाऱ्या, पाल्हाळीक, निर्जीव होतात.

'चिन्तातुर जन्तू', 'विहिणींचा कलकलाट', 'एक समस्या', 'काय करावे'? या त्यांच्या विनोदी कविता होत. उपहास व विडंबन हे विनोदाचे दोन विशेष या कवितांमधून व्यक्त झालेले आहेत. 'अचरटपणापलीकडे

या काव्यांची फारशी किंमत नाही' असे मार्मिक मत गोविंदाग्रजांनी स्वतःच मांडले आहे. अतिशयोक्ती, उपहास ही त्यांच्या विनोदी लेखनाची वैशिष्ट्ये या कवितांमध्येही दिसतात. परंतु कल्पनाशक्तीचे संस्कार विनोदी कवितांवर झालेले दिसत नाहीत.

केशवसुतांच्या प्रभावामुळे गोविंदाग्रजांनी गूढगुंजनपर कविताही लिहिल्या. 'फुटकी तपेली', 'घुबडास', कलगीचे गाणे' या महत्त्वाच्या गूढगुंजनपर कविता. आध्यात्मिक आशय, आत्मानुभूतीखेरीज मांडल्यामुळे या कविता केवळ शब्दांच्या, रचनेच्या पातळीवर उतरल्या आहेत. अध्यात्म व तत्त्वज्ञान हे विषय कवी गोविंदाग्रजांच्या प्रतिभेला मानवणारे नव्हेत, असे या कवितांमधून जाणवते.

**प्रेम कविता**

'प्रेमशोधन' आणि 'विफलप्रेम' या दोन विषयांवर गोविंदाग्रजांनी लिहिलेल्या कविता वैशिष्ट्यपूर्ण आहेत. प्रेमभावनेतील आर्तता, उत्कटता, आकर्षण, दारुण निराशा, तन्मयता, निरपेक्ष प्रेमभावना अशा अनेक भावच्छटा त्यांच्या कवितांमधून व्यक्त झालेल्या दिसतात. 'गुलाबी कोडे', 'पहिले चुंबन' या कवितांमधून शारीर आकर्षण व्यक्त होते. परंतु हा अनुभव काल्पनिक पातळीवर असल्यामुळे त्यात हृदयस्पर्शाचा अनुभव व्यक्त होत नाही. 'फुले वेचली पण?' या कवितेत फुले वेचली पण ती कुणाला द्यावी? या प्रश्नातून अंतरंगातले खोलवर झालेले दुःख कवीने व्यक्त केले आहे. 'जगावाचूनी लाभतीस तरी जग मी केले असते। तुझ्यावाचुनी जग हे आता असून झाले नसते।' अशी दारुण प्रेमव्यथा गोविंदाग्रजांनी व्यक्त केली आहे. 'निर्दय बालेस' या कवितेत कवीचे हृदय तुडवून निघून गेलेल्या निर्दय बालेस बोल लावणे, अंतःकरणातील आशानिराशेचा हिंदोळा ही वैशिष्ट्ये जाणवतात. ही कविता वाचल्यानंतर उत्कटता हाच त्यांच्या वृत्तीचा सहजधर्म असल्यामुळे तिचे दुसरे टोक म्हणजे दुबळेपण आणि पराकोटीचे आत्मप्रेम गोविंदाग्रजांच्या प्रेमकवितेत व्यक्त झाले आहे, असे वाटते.

याशिवाय 'कृष्णाकाठी कुंडल', 'पानपताचा फटका' या दीर्घ कविता त्यांनी लिहिल्या. या दोन्ही कवितांना ऐतिहासिक पार्श्वभूमी लाभलेली आहे. त्यामागे स्मरणरंजनाची प्रेरणा असल्याचे जाणवते. काही नाट्यगीतांची रचनाही गोविंदाग्रजांनी केली. परंतु त्यांच्या हृदयाची आंतरिक हाक त्यांच्या प्रेमकवितांमधून व्यक्त झाली.

**नाटककार**

नाटककार गडकऱ्यांनी श्रीपाद कृष्ण कोल्हटकरांना गुरू मानले होते. परंतु कोल्हटकरांच्या नाटकांना यश अतिशय कमी प्रमाणात लाभले. गडकऱ्यांच्या व्यक्तिमत्त्वातील विनोदी लेखक, त्यांच्यातील कवी या दोन पैलूंना कवेत घेऊन, नाटककार गडकऱ्यांची घडण झालेली दिसते.

नाटकाचे प्रयोग डोळ्यांसमोर ठेवून त्यांनी लेखन केले नाही. नाटककारामधील लेखकाचे अंग, कल्पनाशक्तीचा विलास या दोन घटकांना त्यांनी नाट्यलेखनामध्ये महत्त्व दिल्याचे जाणवते. त्यांच्या नाटकांमध्ये दृश्यापेक्षा शब्दांना अधिक महत्त्व दिलेले दिसते. त्यांची नाटके लांबलचक, पल्लेदार आहेत. 'पुण्यप्रभाव' या नाटकामधून त्यांनी पतिव्रतेची पुण्याई मांडली. 'राजसंन्यास' या नाटकामध्ये संभाजीचा नुसता पराक्रम दाखवायचा नव्हता. संभाजीचे रोमॅन्टिक प्रेम त्यांनी 'राजसंन्यास'मध्ये दाखवले. 'वेड्यांच्या बाजार' हे त्यांनी लिहिलेले शुद्ध प्रहसन (फार्स) होय. प्र. के. अत्र्यांचे 'साष्टांग नमस्कार' हे नाटक वाचताना गडकऱ्यांचे 'वेड्यांचा बाजार' हे नाटक आठवते. प्र. के. अत्र्यांनी गडकऱ्यांना गुरुस्थानी मानले होते.

'प्रेमसंन्यास', 'एकच प्याला', 'भावबंधन' ही नाटके लिहिताना त्यांच्यासमोर आपल्या काळातले सामाजिक प्रश्न होते. नाटक वाचताना तसे जाणवते. परंतु माणसांची जुळणारी-तुटणारी नाती व त्यांतले नाट्य गडकऱ्यांना नाटकामधून मांडावेसे वाटले. 'एकच प्याला' या नाटकामध्ये कर्तबगार, स्वाभिमानी माणसाची शोकांतिका त्यांना दाखवायची होती. या नाटकातला 'तळीराम' आणि त्याचे विनोद विशेष गाजले.

ग

**भावबंधन**

'भावबंधन' हे गडकऱ्यांचे अखेरचे नाटक. त्यांनी हे नाटक मृत्युशय्येवर असताना पूर्ण केले. एका खलनायकाच्या तावडीत एक म्हातारा सापडला तर काय होईल, या कल्पनेभोवती वरवर पाहता विनोदाच्या अंगाने जाणारी शोकांतिका गडकऱ्यांनी लिहिली. या नाटकातील घनश्याम हा गडकऱ्यांनी उभा केलेला शेवटचा खलनायक होय. गडकऱ्यांच्या एकूण नाटकांतील खलनायकांचे चित्रण अतिशय भडक, एकांगी खलनायक, खलनायकाचा 'माणूस' म्हणून विचार आणि अतिशय शांत डोक्याने आपल्याला जे करायचे आहे, ते करणारा खलनायक अशा दृष्टीकोनांतून झालेले दिसते.

'भावबंधन' मध्ये हिणकस प्रेम, अनुकरण करणारे खोटे प्रेम, प्रेमातले वैयक्तिक सुख-दुःख, प्रेमाविषयीची गौरवभावना या साऱ्या भावच्छटा ओलांडून तटस्थ मानवी जीवनाचे निरीक्षण करणारा माणूस त्यांनी दाखवला. म्हणूनच या नाटकाला केवळ सुखांतिका किंवा केवळ शोकांतिका असे म्हणता येत नाही; या दोन्हींची संमिश्र जाणीव या नाटकातून होते. सुख-दुःखाची संमिश्रता हेच खऱ्या जगण्याचे सार असल्याचे नाटकामधून व्यक्त होते. नाटककार गडकऱ्यांच्या नाटकामध्ये कृत्रिम विनोद, वेषांतरासारख्या क्लृप्त्यांचा उपयोग, विडंबनाचा अतिरेक असे काही दोषही आढळतात. परंतु नाटककार गडकऱ्यांचे लेखन विकसनशील होते, हेही लक्षात घेतले पाहिजे.

'बाळकराम' या टोपणनावाने त्यांनी केलेले विनोदी लेखन मासिक मनोरंजनातून १९१३-१९१५ ह्या काळात छापून आले; पुढे ते 'रिकामपणाची कामगिरी' (१९२१) या पुस्तकरूपाने प्रसिद्ध झाले. १९२५ साली त्यांचे समग्र विनोदी लेखन 'संपूर्ण बाळकराम' मध्ये संग्रहित झाले. अतिशयोक्ती, उपहास, शाब्दिक कोटी, शब्दविपर्यय, विरोधाभासातून होणारा अपेक्षाभंग; अतिशय गंभीर, प्रौढ व भारदस्त भाषाशैलीद्वारे साधलेला विनोद, ही त्यांच्या विनोदी लेखनाची वैशिष्ट्ये होती. 'वधूपरीक्षा', 'लग्नाच्या मोहिमेची पूर्व तयारी', 'ठकीचं लग्न' असे विषय घेऊन समाजातील मागासलेल्या रूढी-परंपरा, बुरसटलेले समाजमन, लग्न जमविणे या प्रकारामध्ये होणारे माणसांच्या स्वभावाचे दर्शन यांवर त्यांनी विनोदी लेखन केले. त्यांचे अप्रकाशित राहिलेले साहित्य 'अप्रकाशित गडकरी' या नावाने १९६२ साली प्रसिद्ध झाले.

– प्रा. रूपाली शिंदे

**संदर्भ :**


१. *अधिकारी गो. गो.; 'गडकरी यांचे चरित्र'; गडकरी प्र. सी.; मुंबई; १९२८.*

२. *क्षीरसागर पांडुरंग गणेश; 'गडकऱ्यांचा वाग्विलास'; क्षीरसागर पां. ग.; पुणे; १९३०.*

३. *खांडेकर विष्णु सखाराम; 'गडकरी व्यक्ती आणि वाङ्मय'; भारत गौरव ग्रंथमाला, मुंबई; १९३२.*


## गोविंदानुज

***कुळकर्णी, नारायण विनायक***

**नाटककार, कादंबरीकार, पटकथाकार, कवी**

**२४ जुलै १८९२ – १२ जानेवारी १९४८**



नारायण विनायक कुळकर्णी यांचा जन्म सातारा जिल्ह्यातील सुरली या गावी झाला.

कुळकर्णी हे गरीब कुटुंबातले होते. वयाच्या पंचविसाव्या वर्षी त्यांनी मॅट्रिकपर्यंत मजल मारली; परंतु ती परीक्षा ते उत्तीर्ण होऊ शकले नाहीत. त्या काळात तशा परिस्थितीतही त्यांनी 'लेखन' हेच आपल्या उदरनिर्वाहाचे साधन असावे, असे ठरविले.

कुळकर्णी हे कथाकार, कादंबरीकार, नाटककार आणि कवीही होते. 'गोविंदानुज' या नावाने त्यांनी वयाच्या अठराव्या वर्षापासून कविता लिहायला सुरुवात केली.

गद्यलेखनाच्या सुरुवातीला कुळकर्णी यांनी नाटके लिहिली. त्यांची एकूण सात नाटके रंगभूमीवर आली.

नाटकांच्या चलतीच्या काळात त्यांपैकी 'संगीत पार्थप्रतिज्ञा' हे नाटक १९१७ साली रंगभूमीवर आले. 'माईसाहेब' हे १९२९ साली सादर झालेले नाटक प्रेक्षकांनी अतिशय उचलून धरल्यामुळे गाजले. 'माईसाहेब'चा विषय कौटुंबिक असा, सर्वसामान्य प्रेक्षकांना भावणारा होता. सावत्रपणासारखा प्रेक्षकांच्या मनाला हात घालणारा विषय, त्याला साजून दिसतील असे समर्पक संवाद आणि नाटकातील पात्रांचे वास्तव चित्रण यांमुळे नाटकाने प्रेक्षकांच्या मनाची पकड घेतली.

कुळकर्णी यांनी 'शाहूनगरवासी' या नाटकमंडळीसाठी 'डाव जिंकला' (१९२२) आणि गंधर्व नाटकमंडळीसाठी 'संत कान्होपात्रा' (१९३१) अशी दोन पौराणिक नाटके लिहिली. या दोन्ही नाटककंपन्या त्या काळी खूप नावाजलेल्या होत्या. तरीही ही दोन्ही नाटके व्यावसायिक दृष्टीने फारशी यशस्वी ठरली नाहीत.

याच काळात चित्रपटांचे युग हळूहळू सुरू होत होते. नाट्यव्यवसायावर त्याचा परिणाम होणे अपरिहार्य होते. नाटककंपन्या मोडकळीस येऊ लागल्या आणि केवळ लेखणीवर उदरनिर्वाह करणाऱ्या ना. वि. कुळकर्णी यांना लेखनाचा अन्य मार्ग शोधावा लागला. १९२४ साली त्यांनी 'महाराष्ट्र कुटुंबमाला' चालू केली. 'कसे दिवस जातील' (१९२५), 'न्याय' (१९२६), 'मजूर' (१९२५), नयनबाण (१९३८) अशा सुमारे बारा कादंबऱ्या आणि कथाही लिहिल्या.

'महाराष्ट्र कुटुंबमाले'तील त्यांच्या कथांचे नंतर दोन संग्रहही निघाले.

काळाबरोबर चालणाऱ्या कुळकर्णी यांनी नंतर चित्रपट लेखनाचाही यशस्वी प्रयत्न केला. 'अयोध्येचा राजा' (१९३१), 'मायामच्छिंद्र' (१९३२) यांच्या कथा त्यांनी लिहिल्या. याशिवाय 'कर्ण', 'मेनका', 'कान्होपात्रा', 'मायाबाजार', अशा बोलपटांच्या श्रेयनामावलीत पटकथाकार म्हणूनही त्यांचे नाव झळकले.

सांगली येथे १९४३ साली भरलेल्या नाट्यसंमेलनाचे अध्यक्षपद त्यांना लाभले. जीवनभर केवळ लेखनाचेच व्रत घेतलेल्या ना. वि. कुळकर्णी यांचा तो यथोचित गौरव म्हणावा लागेल.

– मंदाकिनी भारद्वाज

ग

## गोळे, पद्मावती विष्णू

☞ पद्मा

## ग्रामोपाध्ये, गंगाधर बळवंत

**संतकाव्याचे व भाषाशास्त्राचे अभ्यासक**

**११ डिसेंबर १९०९ – १८ ऑक्टोबर २००२**



प्राचीन आणि आधुनिक मराठी साहित्याचे अध्यापक ही डॉ. गंगाधर बळवंत ग्रामोपाध्ये यांची ओळख म्हणता येईल. मूळचे अक्कलकोटचे असलेल्या ग्रामोपाध्ये यांनी लिंगराज महाविद्यालय, बेळगाव; खालसा महाविद्यालय, मुंबई व विल्सन महाविद्यालय, मुंबई येथे दीर्घकाळ मराठीचे अध्यापन केले. त्यानंतर ते गोव्यात पदव्युत्तर अभ्यास केंद्राचे मराठी विभाग प्रमुख म्हणून रुजू झाले. गोव्यातील मराठी भाषेच्या कार्याला त्यांचे सातत्यपूर्ण मार्गदर्शन लाभले.

'सत्यकथा' आणि 'यशवंत' या नियतकालिकांमधून त्यांनी लेखन केले. नवकाव्याविषयी त्यांना आस्था होती. य. द. भावे यांच्या 'आर्द्रा' या कवितासंग्रहाला लिहिलेल्या प्रस्तावनेतून नवकवितेविषयी त्यांची आस्था प्रकट झाली.

डॉ. ग्रामोपाध्ये हे कवीही होते. 'निळावंती' हा त्यांचा कवितासंग्रह प्रकाशित झाला होता. वर्तमान समाजाचे भान आणि शाश्वत मूल्यांचा आग्रह ही त्यांच्या कवितांची वैशिष्ट्ये असल्याचे जाणकारांनी नोंदवून ठेवलेले आहेत.

'संतकाव्य समालोचन' (१९३९), 'वाङ्मयमूल्ये आणि जीवनमूल्ये' (१९५०), 'निळावंती' (काव्यसंग्रह, १९५४), 'भाषाविचार आणि मराठी भाषा' (१९६४),

'वाङ्मय विचार' (१९६८), 'मराठी आख्यानक कविता' (१९७०), इत्यादी, महत्त्वपूर्ण पुस्तके प्रकाशित झाली असून 'मराठी बखर गद्य' (१९५८), 'एका पिढीचे आत्मकथन' (सहकार्याने १९७५), 'इ.स. १६८० ते १८१८ या वाङ्मयीन कालखंडाचा अभ्यास' (१९६८) ही महत्वपूर्ण संपादने आहेत. त्यांची ग्रंथसंपदा अभ्यासकांना आजही उपयुक्त ठरते.

आयुष्याच्या उत्तरार्धात ते गोव्यात स्थायिक झाले. तेथेच त्यांचे वयाच्या ९३ व्या वर्षी निधन झाले.

– नरेंद्र बोडके

**संदर्भ :**


१. *कोमरपंत सोमनाथ; सहृदय आणि स्वागतशील मनाचे गुरुवर्य; वसंत-दिवाळी अंक २०००.*

२. *वडेर प्रल्हाद; 'ज्येष्ठ भाषाशास्त्रज्ञ डॉ. गं. ब. ग्रामोपाध्ये; भाषा आणि जीवन-जुलै-सप्टेंबर २००३.*


## ग्रेस

***गोडघाटे, माणिक सीताराम***

**कवी, ललित लेखक**

**१० मे १९३७**



कवी ग्रेस यांचा जन्म नागपूरमध्ये झाला. त्यांच्या आईचे नाव सुमित्रा. ग्रेस यांचे शिक्षण एम. ए. पर्यंत (मराठी) झाले. ज्यात ते प्रथम श्रेणीत सर्वप्रथम हा सन्मान मिळवून उत्तीर्ण झाले (१९६६). आधी धनवटे नॅशनल कॉलेज आणि नंतर नागपूर येथील शासकीय महाविद्यालयात ते मराठीचे प्राध्यापक म्हणून काम करीत होते. विदर्भ साहित्य संघाचे मुखपत्र 'युगवाणी'चे तीन वर्षे (१९७१ ते १९७४) संपादन करून त्यांनी त्या मासिकाला नवा चेहरा प्राप्त करून दिला. रायटर्स सेन्टरतर्फे निघणाऱ्या 'संदर्भ' ह्या द्वैमासिकाचे संपादन त्यांनी १९७५-१९७६ ह्या काळात केले. त्यांचे काव्यलेखन आणि ललित गद्य निर्मिती १९५८ पासून आजतागायत अविश्रांत सुरू आहे. सुरुवातीला 'छंद', 'सत्यकथा' या नियतकालिकांतून त्यांच्या कविता प्रसिद्ध झाल्या. वृत्तबद्धता, नादानुसारी आणि लयसंपन्न आकृतिबंध हे त्यांचे काव्यविशेष होत. त्यांची कविता जितकी गूढ आणि व्यामिश्र तितकीच अनुभूतीच्या विविध पातळ्यांना स्पर्श करणारी, जाणीवनेणिवेच्या कक्षा आणि भावावेग यांच्या अनोख्या संश्लेषणातून प्रकटणारी आहे. तीत दुर्बोधता आहे तरीही ईश्वर, स्त्री, मृत्यू, दुःख ह्या आशयसूत्रांची ओढ आणि निसर्गप्रतिमा, पुराणप्रतिमा आणि स्वानुभूत प्रतीकांचे आकर्षण आणि संमोहित करणारे अर्थबहुल तरीही गूढ असे विश्व त्यांत सामावलेले आहे.

**पृथगात्म वरदान**

'संध्याकाळच्या कविता' (१९६७) हा त्यांचा पहिला कवितासंग्रह आहे. संध्याकाळीच कवीच्या 'बाळमुठीला', 'आसवांचा तळ' त्या क्षणी गवसलेला आहे, हीच त्याची चिरतरुण अशी अनुभव-श्रीमंती आहे. 'राजपुत्र आणि डार्लिंग' (१९७४), 'चंद्रमाधवीचे प्रदेश' (१९७७), 'सांध्यपर्वातील वैष्णवी' (१९९५) आणि 'सांजभयाच्या साजणी' (२००६) असे त्यांचे पाच कवितासंग्रह प्रसिद्ध आहेत.

ग्रेस यांनी मराठी कवितेला पृथगात्म असे वरदान दिलेले आहे. त्यांच्या कवितेचा आस्वाद घेताना आस्वादकालाही आपली योग्यता वाढवावी लागते. आपल्या कवितेत ग्रेस मंत्रभारलेपणा, अपूर्व निर्मितिक्षमता, प्रार्थनांचे वैभव आणि आत्म्याचा आवाजच जणू पेरतात. सौंदर्यानुभवाची अस्सलता जपण्यासाठी निखळ संवेदनांची एक वेगळी शैली तेथे अवतरते. ग्रेस स्वतःला 'द्वैती' म्हणतात, म्हणूनच लौकिक-अलौकिक संवेदनांच्या मंथनातून त्यांच्या खोल मनातला ताण आणि आकांत त्यात प्रकटतो. ते स्वतःच म्हणतात, त्याप्रमाणे 'Creativity is my life, and its conviction is my character.'

हा रंग सौंदर्यशोधकाचा आहे. मूल्यगर्भी, गूढात्म चिंतनवेध त्यांच्या ललितबंधातही आहे. त्यांच्या

अनुभवकेंद्राबद्दल आणि ग्रहणप्रक्रियेसंबंधीच्या त्या नोंदी आहेत. ते म्हणतात तशी 'ही मुळातच अनवट बीजसंभवाची निर्मिती आहे.' याचे महत्त्वाचे कारण म्हणजे त्या निर्मितीत कार्यकारणभावाची जपणूक किंवा तार्किक भान नाही, ती अंतःप्रेरणेची भाषा आहे; जी काहीशी गूढ असणारच. त्यासाठी विश्लेषण नको, संश्लेषणच हवे. तीत आत्मसत्त्व, आत्मशोध आणि अप्रकट मनाची गुंतागुंत प्रकटते. हा नेणिवेचा उच्चार 'तू माझी कुलस्वामिनी धनवती' असाच आहे. झिरझिरीत पडद्यामागच्या सौंदर्यदर्शनाची हुरहुर त्यांच्या निर्मितीत आहे. ती जितकी शब्दवेल्हाळ आहे तितकी अर्थकाहूर आहे. त्यांचे ललितबंधही त्यापासून वेगळे नाहीत.

**दुर्बोधतेची बेसरबिंदी**

'माझ्या कवितेच्या नाकात दुर्बोधतेची बेसरबिंदी जन्मापासूनच टोचलेली आहे', असे ते म्हणतात. 'संध्याकाळच्या कविता'मध्ये संध्यावेळाशी जडलेल्या मनाचा वेध, 'राजपुत्र आणि डार्लिंग'मध्ये एक अखंड स्वगतासारखा संवाद, 'चंद्रमाधवीचे प्रदेश'मध्ये 'आई:१', 'आई : २', 'आई: ३', 'आईचे गाणे', 'चंद्रमाधवीच्या तीन कविता', 'चंद्रमाधवीच्या कविता: २' अशा कविता आहेत. 'सांध्यपर्वातील वैष्णवी'मध्ये 'प्रार्थनापर्व', 'सांध्यपर्व' आणि 'दृष्टान्तपर्व' अशी विभागणी आहे. 'एकांतकृष्ण' व 'कृष्णएकांत' अशा द्विदल कवितेबरोबर 'त्रिदल' कविताही आहे. 'वेरावळीय समुद्राचे दृष्टांत' मधून नव्या प्रतिमा घडवून साधलेला परिणाम दिसतो, आणि 'सांजभयाच्या साजणी'मध्ये 'साऊलगाणी', 'संध्येचे अर्थान्तरन्यास' अशा वेगळ्या वाटाही भेटतात.

त्यांच्या ललितबंधात 'मुक्त गद्य' नव्हे तर मुक्त असे काव्यच प्रकटते. तेथेही त्यांनी स्वतःवर प्रकाशाची तिरीप टाकलेली आहे. 'परंतु माझ्या मनाला एक वाईट खोड आहे. वस्तूंचे आणि व्यक्तींचे संबंध एका भावस्थितीत गुंफून मी जाणिवांच्या दुसऱ्या वर्तुळात उभा असतो.' 'चर्चबेल'मध्ये (१९७४) निबंध आणि काव्य यांच्या सीमारेषेवरील लेखन आहे तर 'मितवा' मध्ये (१९८७) आत्मपरतेच्या अंगाने ते कवीच्या आत्मशोधाकडे झुकलेले आहेत. 'संध्यामग्न पुरुषाची लक्षणे' मध्ये (२०००) आत्ममग्नता, भाववृत्तींची प्रबलता आणि गूढ धूसर प्रत्ययातून प्रतिमांचा संकर झालेला दिसतो. 'मृगजळाचे बांधकाम' मध्ये (२००३) निर्मितिप्रक्रियेचा शोध घेण्याची अनावर ऊर्मी दिसते. निसर्गसत्ता आणि जीवनसत्ता यांचे विश्लेषण करून सौंदर्यसत्तेची मांडणी करणारा सिद्धान्त मांडणारे ग्रेस इथे आहेत.

ग्रेस रूढ अर्थाने जुनी, नवी किंवा रूढ परंपरा स्वीकारत नाहीत, ते त्यांचे संचित मानतात. मांडणीत येणारी दुर्बोधता ही अनुभवांच्या व्यामिश्रतेने आणि भाषेची काव्यनिष्ठ व संगीताभिमुख पुनर्घटना करताना येते, असे त्यांनी मुलाखतीत सांगितले आहे. त्यांचा अलीकडचा 'वाऱ्याने हलते रान' (२००८) हा ललितबंधसंग्रह म्हणजे जणू ग्रेस यांना लागलेला 'मृगजळाच्या काही विलक्षण, सुलक्षण डोहांचा तळसुगावा' आहे. प्रतिभेच्या अनावर वळणांमागील 'आत्मकेंद्राच्या पाठीपोटाशी असलेल्या, विश्वकेंद्राच्या अनुभूतीचे करुणामूल्य, कलामूल्यच... ' इथे शोधले जाते आहे. हे ललितबंध पुराणकथा, दंतकथा, लोककथा, परीकथा, स्मरणकथा यांतून निर्मिती आणि तिची प्रक्रिया यांचा शोध घेतात. वीणा आलासे म्हणतात त्याप्रमाणे ग्रेस यांच्या दृष्टीतून उमगणारे तत्त्व हे 'कला ही जीवनाची पुनर्निर्मिती आहे' हेच मांडणारे आहे. हे कवितेने हललेले ललितबंधलेखन आहे आणि एक अनोखा आत्मसंवाद आहे.

**'आई'**

'आई' ही ग्रेस यांच्या काव्यातील महत्त्वाची संकल्पना आहे, ज्याबद्दल ग्रेस म्हणतात – 'She stands in my poetry as a supreme symbol of entire womanhood.' आईबद्दल बोलताना त्यांनी 'स्त्री–देहाच्या शक्तीचे अंतिम भयाण केंद्र माझी आई – माझे क्रौर्य आणि माझी आई – माझी करुणा.' इथे आई ह्या प्रतिमेतील देहनिष्ठ भावना, इच्छा, वासना

यांचे सूचनही होते. डॉ. जयंत परांजपे यांना 'मातृविषयक गंडाच्या उपपत्तीविषयी' हा अंगुलिनिर्देश वाटतो. (ग्रेस आणि दुर्बोधता, पृष्ठ १८३)

'संध्याकाळच्या कविता', 'चर्चबेल', 'चंद्रमाधवीचे प्रदेश', 'राजपुत्र आणि डार्लिंग' ह्या पुस्तकांना महाराष्ट्र शासनाचा पुरस्कार प्राप्त झालेला आहे. 'मितवा' ह्या ललित लेखसंग्रहाला मारवाडी संमेलन, मुंबईचा पुरस्कार, 'संध्यामग्न पुरुषाची लक्षणे' ह्या ललित लेखसंग्रहाला सोलापूर येथील दमाणी पुरस्कार, विदर्भ साहित्य संघ, नागपूर ह्या संस्थेचा 'जीवनव्रती' पुरस्कार (१९९७) तर माणिकलाल गांधी स्मृतीप्रीत्यर्थ 'विदर्भगौरव' पुरस्कार (२००३) असे पुरस्कार मिळाले.

दीनानाथ मंगेशकर प्रतिष्ठान, पुणे यांचा वाग्विलासिनी पुरस्कार हा गौरवही त्यांना प्राप्त झाला; तर महाराष्ट्र राज्य साहित्य संस्कृती मंडळाची (मुंबई) गौरववृत्तीही त्यांना लाभलेली आहे.

त्यांच्या 'चर्चबेल' ह्या ललितबंधांचा, निवडक कवितांचा आणि 'मितवा' ह्या ललितबंधाचा गुजराती भाषेत अनुवाद झालेला आहे. सदस्य, सल्लागार समिती (मराठी), भारतीय साहित्य अकादमी, दिल्ली येथे सदस्य, विश्वकोशनिर्मिती मंडळ, मुंबई (१९८२-८६) हे सन्मानही त्यांना लाभले.

कवी ग्रेस यांचे मराठी साहित्यातील स्थान हे असे अनन्य आहे. त्यांच्या कवितेचे मूलात्म स्वरूपच पृथगात्म आहे. त्यांची कविता आणि ललितबंध आपल्याला एक विलक्षण, अतार्किक अनुभव देतात. म्हणूनच त्यांची निर्मिती आपल्याला अनुभव, काव्यभाषा, शैली ह्यांचा पुनर्विचार करायला भाग पाडते ही तिची विलक्षणताच मानावी लागेल !

– डॉ. आशा सावदेकर

**संदर्भ :**


१. *वसेकर विश्वास; 'ग्रेसपर्व'; अक्षर प्रतिष्ठा दिवाळी अंक - १९९८.*
२. *कहू चारुदत्त; 'मंत्रासम गुणगुण करतो इथलाच जुन रहिवासी'; लोकसत्ता- १३ फेब्रुवारी २००५.*


* * *

# घ





## घाटे, निरंजन सिंहेंद्र

*देवेनकौशिक*

**विज्ञान कथालेखक**

**१० जानेवारी १९४६**



निरंजन घाटे यांचा जन्म मुंबई, गिरगाव येथे झाला. यांचे शालेय व महाविद्यालयीन शिक्षण पुणे येथे झाले. पुणे विद्यापीठातून भूशास्त्रातील एम. एस्सी. ही पदवी त्यांनी संपादन केली. १९६८ ते १९७७ या काळात त्यांनी पुणे विद्यापीठाच्या भूशास्त्र विभागात प्राध्यापकीदेखील केली. मात्र नंतर ते आकाशवाणीकडे वळले. १९७७ ते १९८३ या काळात यांनी आकाशवाणीच्या नागपूर, जळगाव, सांगली या केंद्रांवर अधिकारी म्हणून काम केले. या काळात आकाशवाणीवर रूपके, एकांकिका, संवाद, भाषणे अशा विविध स्वरूपांचे सुमारे ६०० कार्यक्रम त्यांनी सादर केले. त्यांपैकी अनेक कार्यक्रम विज्ञानाशी संबंधित होते. १९८१ ते १९९३ या काळात पुण्यातील महात्मा फुले वस्तू संग्रहालयात आधी उपसंचालक व नंतर संचालक म्हणून ते कार्यरत होते. या नंतरच्या काळात मात्र त्यांनी स्वतःला पूर्ण वेळ लेखनाला वाहून घेतले. घाटे यांनी विज्ञानप्रसाराचा वसा आपल्या कार्यक्षेत्रात व लिखाणात जपलेला आहे.

घाटे हे विज्ञान लेखक म्हणून महाराष्ट्राला परिचित आहेत. शास्त्रीय ग्रंथ, शास्त्रीय नियतकालिके आणि पाठ्यपुस्तके ह्यांमधील विज्ञानाच्या विविध शाखांमधील ज्ञान बाहेर काढून साध्या सोप्या भाषेतून सर्वसामान्यांपर्यंत पोहोचवण्याचे काम त्यांनी आपल्या विपुल लेखनाद्वारे केले आहे. वैज्ञानिक सत्य आणि कल्पनाशक्ती यांचा मेळ घालून त्यांनी जशा विज्ञान कथा लिहिल्या आहेत, तसेच विज्ञानाचे अंतरंग उलगडणारे अनेक लेख पुस्तके लिहिली आहेत. त्यांनी एकूण १५० पुस्तके लिहिली आहेत. त्यांपैकी १३० पुस्तके विज्ञानविषयक आहेत.

घाटे यांच्या वाङ्मयीन लेखनाची सुरुवात सामाजिक आशयाच्या कथांपासून झाली, तरी लवकरच ते विज्ञान कथांकडे वळले. १९६५ पासून विविध विषयांवर वर्तमानपत्रांमधून व नियतकालिकांमधून स्फुट लेखनास त्यांनी सुरुवात केली. १९७१, १९७२ व १९७४ अशी तीन वर्षे त्यांच्या विज्ञान कथांना मराठी विज्ञान परिषदेचे पुरस्कार लाभले. त्यांच्या १० विज्ञान कादंबऱ्या व १७ विज्ञान कथासंग्रह प्रकाशित झाले आहेत. ‘पॉप्युलर सायन्स’ वर त्यांनी ७८ पुस्तके लिहिली आहेत. त्यांच्या ‘वसुंधरा’ या पुस्तकाला १९७८-१९७९ या वर्षाचा राज्य शासनाचा पुरस्कार मिळाला. याशिवाय ‘स्पेस जॅक’ (१९८५-१९८६), ‘एकविसावे शतक’ (१९९७-१९९८) या त्यांच्या विज्ञानविषयक पुस्तकांना राज्य पुरस्कार मिळाले. घाटे यांनी विज्ञान कथांबरोबरच युद्धकथा, गुप्तहेर कथा, साहस कथा लिहिल्या आहेत. युद्धशास्त्र व युद्धकथांवर त्यांची १२ पुस्तके प्रकाशित झाली आहेत. याशिवाय त्यांनी बालवाङ्मयही विपुल प्रमाणात लिहिले आहे. बालवाङ्मयातील त्यांच्या विविध पुस्तकांना राज्यस्तरीय पुरस्कार मिळाले आहेत. त्यांनी विनोदी साहित्यही लिहिले आहे.

घाटे यांची संपादक म्हणूनही कारकिर्द घडली आहे. १९८३ ते १९९४ या काळात सृष्टिज्ञान, बुवा, पैंजण,

अद्‍भुत, कादंबरी, ज्ञानविकास, किर्लोस्कर या नियतकालिकांचे संपादन त्यांनी केले. नव्या लेखकांचा शोध घेऊन त्यांनी त्यांना लिहिते केले. विज्ञान लोकप्रिय करण्याच्या उद्देशाने त्यांनी विज्ञान लेखकांचे मेळावे, वासंतिक शास्त्रीय व्याख्यानमाला, शारदीय शास्त्रीय व्याख्यानमाला, शालेय मुलांसाठी विज्ञानवर्ग असे अनेकविध उपक्रम राबवले. घाटे यांचा वाचनाचा व्यासंग दांडगा आहे. त्यांचा ग्रंथसंग्रह मोठा आहे. मोठ्या मेहनतीने आणि चोखंदळपणाने त्यांनी विविध विषयांवरती इंग्रजी, मराठी पुस्तके संग्रहित केली आहेत. 'जे जे आपणासि ठावे। ते इतरांसि सांगावे। शहाणे करुनि सोडावे। सकल जन।।' या वृत्तीने त्यांनी वाङ्मयीन कार्य केले आहे.

– मनोहर सोनवणे

**संदर्भ :**


*१. घाटे, निरंजन; 'माझे विज्ञान आणि विज्ञानेतर स्तंभलेखन'; साहित्यसूची-दिवाळी १९९६; ८९ पृष्ठ.*


## घाटे, विठ्ठल दत्तात्रेय

**कवी, ललितलेखक, शिक्षणतज्ज्ञ**

**१८ जानेवारी १८८५ – ३१ मे १९७८**



विठ्ठल दत्तात्रेय घाटे यांचा जन्म नगर जिल्ह्यातील घोसपुरी या गावी झाला. प्रसिद्ध कवी दत्त (दत्तात्रय घाटे) हे त्यांचे वडील होत. वयाच्या नवव्या वर्षापर्यंत ते नगरमध्येच होते. तेथेच त्यांचे प्राथमिक शिक्षण झाले. मात्र माध्यमिक व उच्च शिक्षण गुजरातमधील अंकलेश्वर, बडोदा; मध्य प्रदेशातील इंदोर, ग्वाल्हेर येथे झाले. १९१८ मध्ये त्यांनी तत्त्वज्ञान हा विषय घेऊन अलाहाबाद विद्यापीठातून एम.ए.ची पदवी प्राप्त केली. मुंबई व लंडन येथून टी.डी. सारख्या शिक्षणशास्त्रातील पदव्या प्राप्त केल्या. तेव्हाच्या मुंबई इलाख्यात दीर्घकाळपर्यंत ते शिक्षण खात्यात अधिकारी म्हणून कार्यरत होते. त्याच काळात रत्नागिरी येथे 'डेप्यूटी एज्युकेशनल इन्स्पेक्टर' असताना ते बी.टी. झाले. अखेरीस 'डेप्यूटी डायरेक्टर ऑफ पब्लिक इन्स्ट्रक्शन' या पदावरून ते सेवानिवृत्त झाले.

महाराष्ट्र, माळवा (मध्य प्रदेश), गुजरात, कर्नाटक अशा विविध राज्यांत व परदेशांतही वास्तव्य केल्यामुळे घाटे यांचे व्यक्तित्व बहुरंगी, बहुढंगी व बहुआयामी बनले होते. गाठीशी असलेल्या प्रदीर्घ अनुभवांमुळे त्यांच्या लेखनातून जीवनविषयक व्यापक आणि समृद्ध जाणिवांचा प्रत्यय येतो. कवी असलेल्या वडिलांमुळे साहित्याचा वारसा त्यांच्याकडे जणू रक्तातूनच मिळाला होता.

१९२० मध्ये 'दत्तांची कविता' या नावाने त्यांनी वडिलांच्या, कवी दत्त यांच्या कवितांचे संकलन प्रकाशित करून त्यांनी आपली वाङ्मयीन कारकिर्द सुरू केली. त्या काळातील प्रसिद्ध कवी चंद्रशेखर, माधवराव पटवर्धन (माधव ज्यूलियन), रा. वि. मराठे, नामदेव भाटे हे त्यांचे साहित्यिक मित्र होते. चंद्रशेखर कवींमुळे त्यांना कवितेची गोडी लागली. १९२३ साली स्थापन झालेल्या 'रविकिरण मंडळा'चे ते सदस्य होते. 'मधुकर' या उपनावाने त्यांनी कवितालेखन सुरू केले. १९२४ साली माधव ज्यूलियन यांच्यासह लिहिलेला त्यांचा 'मधुमाधव' हा कवितासंग्रह प्रकाशित झाला. हा संग्रह त्यांनी कवी चंद्रशेखर यांना श्रद्धापूर्वक अर्पण केला. त्यांनी लिहिलेल्या कवितांपैकी 'आई', 'नवलाख दिवे हे तुझ्या घरी', 'आलात ते कशाला', 'गा यशवंता आनंदाने', 'आळंदीची पालखी', 'प्रेमाचे अद्वैत' यांसारख्या कविता त्या काळी विशेष गाजल्या होत्या.

**समाजजीवनाचे दर्शन**

घाटे यांच्या साहित्यसंपदेत कविता, व्यक्तिचित्रे, ललितनिबंध, नाट्यप्रवेश, नाटके, क्रमिक पुस्तके, विद्यार्थ्यांसाठीची पुस्तके, इतिहासावरील पुस्तके अशा विविध वाङ्मय प्रकारांचा समावेश होतो. 'काही म्हातारे व एक म्हातारी' (१९३१) 'पांढरे केस हिरवी मने' (१९५९), या दोन्ही व्यक्तिचित्र-संग्रहांतील 'पांढऱ्या केसांचे म्हातारे' म्हणजे चिरतरुण, ध्येयवादी व सतत

कार्यरत असणाऱ्या व्यक्ती होत. पैकी 'काही म्हातारे व एक म्हातारी' या संग्रहाच्या एकूण आठ आवृत्त्या निघाल्या. 'मनोगते' (१९६६) हा ललित निबंधसंग्रह, 'विचार विलासिते' (१९७३) हा ललित-वैचारिक निबंधसंग्रह; 'टीचिंग ऑफ हिस्टरी' (१९३६), 'इतिहास- शास्त्र व कला' (१९५८) ही इतिहास अध्यापनासंबंधीची पुस्तके; 'यशवंतराव होळकर' (१९६४) हे नाटक; 'बाजी व डॅडी' (१९६४) ही नाटिका; 'नाट्यरूप महाराष्ट्र' (१९४४) हा ऐतिहासिक नाट्य-प्रवेशांचा संग्रह, 'नाना देशांतील नाना लोक' (१९३३), 'भारताची कहाणी', 'तांबडं फुटल' (१९६९) ही विद्यार्थ्यांसाठी लिहिलेली माहितीपूर्ण पुस्तके अशी त्यांची बहुविध ग्रंथसंपदा आहे. त्यांनी 'दिवस असे होते' (१९६१) हे आत्मचरित्र अशी बहुविध ग्रंथसंपदा आहे. या आत्मचरित्रात त्यांनी व्यक्तिगत आयुष्याच्या कथनापेक्षा सामाजिक जीवनाचे दर्शन अधिक घडविल्याने ते अभ्यसनीय झाले आहे. महाराष्ट्रातील सर्वसमस्यांना त्यात उत्तर सापडते, असे म्हटले गेले आहे.

**'माणूस'केंद्री निरीक्षण**

या बहुविध साहित्यसंपदेमधून त्यांच्या लेखनातील काव्यात्मता, नाट्यात्मता, सौंदर्यदृष्टी, इतिहासप्रेम, जीवनाविषयीची आंतरिक ओढ, अभिजात रसिकता या गोष्टी प्रकर्षाने जाणवतात. त्यांची गद्यशैली सुटसुटीत, रसपूर्ण व लयदार होती. साहित्यामधून त्यांचे उत्कट व दिलखुलास व्यक्तिमत्त्वच प्रकट होते. आत्मपरता हा जसा त्यांच्या वाङ्मयीन व्यक्तिमत्त्वाचा ठळक गुण होता, तसेच आगळेवेगळे जीवन जगणाऱ्या विविध क्षेत्रांतील विविध माणसांविषयीचे प्रेम हाही एक अनोखा गुण होता. माणूस हा त्यांच्या निरीक्षणाचा आणि अभ्यासाचा विषय होता. माणसातील वेगळेपण जाणून घेऊन इतरांना ते रंगतदार शैलीत सांगण्याचा विलक्षण छंद घाटे यांना होता.



आचार्य अत्रे यांच्या सहकार्याने 'अत्रे-घाटे नवयुग वाचनमाला' ही मराठीची क्रमिक पुस्तके तयार करून महाराष्ट्रात क्रमिक पुस्तकांचे नवयुग निर्माण केले. शिक्षकांची आर्थिक स्थिती सुधारण्यासाठी 'घाटे-परुळेकर समिती'च्या माध्यमातून शिक्षकांची वेतनश्रेणी निश्चित करण्याचे महत्त्वाचे कार्य केले.

१९५३ मध्ये अहमदाबाद येथे भरलेल्या अखिल भारतीय मराठी साहित्य संमेलनाचे ते अध्यक्ष होते. १९५२ ते १९५५ या चार वर्षांत 'मुंबई राज्य विधानसभेचे' ते सदस्य होते. मराठी साहित्य परिषदेच्या साहित्य प्रचार-प्रसार कार्यात त्यांचा सक्रिय सहभाग होता, तसेच परिषदेचे 'माधवराव पटवर्धन सभागृह' बांधण्याच्या कामातही त्यांचे मोलाचे सहकार्य होते.

१९५० मध्ये सेवानिवृत्त झाल्यावर ते पूर्णपणे पुणेकर बनले व उर्वरित आयुष्य वाचन, चिंतन, ज्ञानसाधना व मित्रपरिवारात घालवले.

कवी 'दत्त' यांच्याकडून वि. द. घाटे यांच्याकडे आलेला साहित्याचा वारसा त्यांची कन्या प्रसिद्ध कवयित्री प्रा. अनुराधा पोतदार यांच्याकडे व त्यांच्याकडून त्यांची कन्या कवयित्री यशोधरा यांच्याकडे संक्रमित झाला आहे.

– प्रा. सविता टांकसाळे

**संदर्भ :**

१. *जोशी रा. भि.; 'पिकले पर्ण', ललित दिवाळी अंक १९७७ : १२१ पृष्ठ.*

* * *

# च





## चितमपल्ली, मारुती भुजंगराव

**निसर्ग निरीक्षक-लेखक**

**५ नोव्हेंबर १९३२**



निसर्ग लेखक चितमपल्ली यांचे जन्मगाव सोलापूर असून येथेच त्यांचे शालेय व महाविद्यालयीन शिक्षण झाले. सोलापूरच्या दयानंद महाविद्यालयामधून आपले शिक्षण पूर्ण करून पुढील व्यावसायिक शिक्षण त्यांनी कोइमतूर फॉरेस्ट कॉलेज, बंगलोर, दिल्ली, कान्हा राष्ट्रीय उद्यान (मध्य प्रदेश) डेहराडून वगैरे ठिकाणच्या वने आणि वन्यजीवविषयक संस्थांतून घेतले. वनाधिकारी म्हणून काम करताना त्यांना या शिक्षणाची आवश्यकता होती.

नांदेड येथील यज्ञेश्वरशास्त्री कस्तुरे यांच्या संस्कृत पाठशाळेत, तसेच पुण्यातील देवळेशास्त्री, पनवेल येथील पंडित गजाननशास्त्री जोशी, परशुरामशास्त्री भातखंडे, वैद्य, वि. पु. धामणकरशास्त्री यांच्याकडे परंपरागत पद्धतीने त्यांनी संस्कृत साहित्याचे अध्ययन केले; ते त्यांना त्यांच्या पक्षीविषयक लेखनासाठी विशेष साह्यभूत झाले. त्यांनी निर्मिलेला 'पक्षिकोश' (२०००) मराठी साहित्यासाठी लक्षणीय आहे.

### आनंददायी 'वनवास'

चितमपल्लींनी महाराष्ट्र सरकारच्या वनविभागात अनेक महत्त्वाच्या पदांवर कार्य केले. १९९० साली ते निवृत्त झाले. कर्नाळा पक्षी अभयारण्य, नवेगाव राष्ट्रीय उद्यान, नागझिरा अभयारण्य, आणि मेळघाट व्याघ्रप्रकल्प यांच्या विकासात त्यांनी भरीव योगदान केले.

यासाठी चितमपल्लींच्या बहुभाषिकत्वाचा त्यांना फार उपयोग झाला. मराठी, संस्कृत यांबरोबरच त्यांनी जर्मन, रशियन या भाषांचे अध्ययन केले आणि माहितीचा खजिना निर्माण केला. वननिरीक्षण, वनभ्रमण यांतून पक्षितज्ज्ञ म्हणून ख्याती प्राप्त केली. वन्यजीव व्यवस्थापन, वने, वन्यप्राणी आणि पक्षीजगत यांविषयी उल्लेखनीय संशोधन केले. आंतरराष्ट्रीय परिषदांमध्ये सहभाग घेतला आणि निबंधवाचन केले.

वनविभागातील सेवाकाळ आणि निवृत्तीनंतर अनेक संस्था, समित्यांत सक्रिय सहभाग घेतला. डॉ. सलीम अली वन्यप्राणी संस्थेचे ते संस्थापक सचिव आहेत. राज्य वन्य संरक्षण सल्लागार समिती, मराठी अभ्यासक्रम समिती (औरंगाबाद), या समित्यांचे ते सदस्य होते. त्याचप्रमाणे त्यांनी महाराष्ट्र राज्य पर्यटन विकास महामंडळाच्या संचालकपदी कार्य पाहिले.

वनविभागातली नोकरी ही संधी मानून ते निसर्गजीवनाशी समरस झाले. त्यांचे लौकिक व्यक्तित्व आणि वाङ्मयीन व्यक्तिमत्त्व अशा दोन पैलूंतून दर्शन घडते. ते पैलू परस्परांशी संलग्न, विरोधी अथवा तटस्थही असू शकतात. चितमपल्लींच्या लौकिक व्यक्तित्वासोबत त्यांचे वाङ्मयीन व्यक्तिमत्त्व समरस झाले आहे, याचा प्रत्यय त्यांच्या ललित लेखनातून येतो.

चितमपल्लींच्या लेखनात त्यामुळे अनुभवाचा अस्सलपणा आहे. संशोधनाच्या निमित्ताने जवळपास तीन तपांहूनही अधिक काळ त्यांनी 'वनवास' भोगला आहे. त्या जीवनाचा आणि वनाचा आनंदानुभव घेतला आहे. या ललित लेखकाचे संपूर्ण भावविश्व जंगलप्रेमाने भरून गेले आहे. अरण्यानुभवांचे घबाड त्यांना लाभले आहे. त्यांचे सर्व लेखन अशा अनुभवसंपृक्ततेतून निर्माण झाले आहे.

चितमपल्लींच्या लेखनामागचे चार टप्पे किंवा पैलू सांगता येतील. एक म्हणजे माहिती, दुसरा म्हणजे संशोधन आणि तिसरा म्हणजे अनुवाद! प्राचीन ग्रंथांचा व भाषांचा अभ्यास आणि चौथा म्हणजे ललित गद्य लेखन होय! शास्त्रीय लेखनाने आपल्या लेखनाची सुरुवात करून तत्संबंधित अनुवादवाटेने त्यांनी आपले अरण्यप्रेम बहुदेशी केले. संस्कृत, मराठी, तेलगू (आईकडून आलेली), इंग्रजी, रशियन, जर्मन, बंगाली, जपानी भाषांशी स्नेह जोडला आणि ललित गद्य लेखनाची वाट चोखाळली. त्यांची अभ्यासूवृत्ती कामातील चिकाटी आणि आत्मीयता यांमुळे त्यांचे लेखन सातत्याने होत गेले.

**रानवाटांची 'माहेरओढ'**

चितमपल्लींच्या ललित गद्य लेखनाचा एक गुण असा की, अरण्यविद्येतून मिळालेली शास्त्रीय माहिती अतिशय लालित्यपूर्ण आणि रुचिर शैलीत त्यांनी मांडली. तिला अलंकृत भाषेची, भावपरतेची जोड दिली. याबाबतीत जी.ए. कुलकर्णी या कथालेखकाने व्यक्त केलेला अभिप्राय बोलका आहे. ते म्हणतात, ''तुमच्या लेखातील ताजेपणा व निरीक्षणातील नेमकेपणा मला फार आकर्षक वाटला. साधारणपणे अशा प्रसंगी लॅटिन क्लासिफिकेशन सांगून शास्त्रीय नेमकेपणा देत वाङ्मयीन गुणांकडे दुर्लक्ष करण्याची वृत्ती दिसते. (तशी तुमची नाही.) शिवाय मराठीत केवढी शब्दसंपत्ती आहे, याचेही दर्शन तुमच्या लेखातून घडते. निरनिराळी झाडे, पाखरे, वेगवेगळे प्राणी यांची इतकी नवी, जिवंतपणे रुजलेली नावे तुमच्या लेखनात दिसतात की आपणाला मराठी येते का? याबद्दलच मला साशंकता वाटू लागते. याचे कारण म्हणजे केवळ व्यवसाय अथवा शास्त्रीय संकलन यापलीकडे जाणारी आतड्याची एक ओढ तुमच्यात आहे. तुमच्या पावलांना रानवाटांची एक माहेर ओढ आहे.'' गंगाधर गाडगीळ यांनीही असाच उल्लेख त्यांच्या अभिप्रायात केला आहे. ते म्हणतात, ''मारुती चितमपल्ली हे माझे आवडते लेखक आहेत. त्यांच्या विषयाचे ज्ञान तर त्यांना आहेच, पण त्याबरोबर विषय रोचक व रसपूर्ण पद्धतीने मांडण्याची हातोटीही त्यांच्याजवळ आहे.''

चितमपल्लींची सुमारे अठरा-वीस पुस्तके आजवर प्रसिद्ध झाली. त्यात साहित्य प्रसार केंद्र, नागपूर यांचा सहभाग अधिक आहे. 'पक्षी जाय दिगंतरा' (१९८३), 'जंगलचं देणं' (१९८५), 'रानवाटा' (१९९१), 'शब्दांचं धन' (१९९३), 'रातवा' (१९९३) 'मृगपक्षिशास्त्र' (१९९३ अनुवादित), 'घरट्यापलीकडे' (१९९५) 'पाखरमाया' (२०००), 'निसर्गवाचन' (२०००), 'सुवर्णगरुड' (२०००), 'आपल्या भारतातील साप' (२०००, इंग्रजी; मराठी अनुवादित), 'आनंददायी बगळे' (संस्कृत साहित्यातील काही पक्षी २०००), 'पक्षिकोश', 'निष्ठावंती' (२०००), 'चैत्रपालवी' (२०००), 'चकवा चांदणं एक वनोपनिषद' (आत्मकथन २००५) 'केशराचा पाऊस' (२००५) अशा साहित्यकृतींतून अरण्यानुभवांचे व वनविद्येचे अचंबा वाटावे असे कलापूर्ण चित्रण आले आहे, त्या त्यांच्या साहित्यसंपदेने मराठी साहित्यातील अनुभवाचे क्षितिज विस्तारले. या अनुभवसमृद्ध लेखनाने मराठी साहित्यसृष्टीला एक नवे आभाळ मिळाले. याशिवाय आगामी लेखनासाठी 'नवेगावबांध', 'श्यैनिकशास्त्र' आणि 'चित्रकंठ' या पुस्तकांची योजना आहेच.

चितमपल्लींच्या साहित्यास अनेक पुरस्कार मिळाले. 'जंगलचं देणं' (१९८९), 'रानवाटा' (१९९१) व 'रातवा' या पुस्तकांना महाराष्ट्र राज्य साहित्य पुरस्कार मिळाले. विदर्भ साहित्य संघ पुरस्कार (जंगलचं देणं, १९९१), भैरूरतन दमाणी साहित्य पुरस्कार (रानवाटा १९९१), मृण्मयी साहित्य पुरस्कार (रानवाटा, १९९१) हे पुरस्कार जाहीर झाले. त्याबरोबरच फाय फाउंडेशन इचलकरंजी या प्रतिष्ठानद्वारा १९९१च्या राष्ट्रीय पुरस्काराने ते सन्मानित झाले. साहित्य सेवेच्या स्मरणार्थ १४ जानेवारी १९९९ रोजी विदर्भ साहित्य संघ, नागपूर यांच्याकडून 'साहित्य-वाचस्पती' पुरस्कार प्राप्त झाला. शिवगिरिजा प्रतिष्ठान पुरस्कार, कुर्डूवाडी (पक्षिकोश) व

विदर्भ साहित्य संघाचा जीवनव्रती पुरस्कार यांनी ते सन्मानित झाले. महाराष्ट्र सेवा संघ मुलुंड सु.ल. गद्रे मातोश्री पुरस्कार, महाराष्ट्र फाउंडेशन पुरस्कार, पुणे मराठी ग्रंथालय सन्मान व साहित्य पुरस्कार, सारथी संस्था नागपूर, यांच्याकडून उत्कृष्ट निसर्ग साहित्याबद्दल स्क्रोल ऑफ ऑनर, शंकरराव मोहिते पाटील प्रतिष्ठान (सहकार महर्षी) यांच्यातर्फे जीवनगौरव पुरस्कार असे अनेकानेक पुरस्कार चितमपल्लींना प्राप्त झाले आहेत. या त्यांना मिळालेल्या विविध सन्मानांनी त्याच्या कार्याची थोरवी सर्वदूर गेली आहे.

च

विविध प्रकारची सन्माननीय अध्यक्षपदे त्यांनी भूषविली. सोलापूर येथे झालेल्या ७९व्या अखिल भारतीय मराठी साहित्य संमेलनाचे अध्यक्ष (२००६), औंदुबर येथील ५७व्या साहित्य संमेलनाचे अध्यक्ष (१४ जानेवारी २०००), विदर्भ साहित्य संमेलन उमरखेड येथील ५१ व्या अधिवेशनाचे अध्यक्ष (२०००) असे सन्मान त्यांच्या नावावर आहेत.

**निसर्ग जीवन दर्शन**

पक्षी आणि निसर्ग ह्यांविषयी गेली ३५ वर्षे सतत निरीक्षण करून त्यांनी अनेक पुस्तके लिहिली. आणि मराठी साहित्य विश्वाला एक नवे परिमाण प्राप्त करून दिल्याबद्दल अखिल भारतीय मराठी विज्ञान परिषद आणि मराठी विज्ञान महासंघ यांच्याकडून सन्मानपत्र (१९९६) प्राप्त झाले असून विदर्भ साहित्य संघाचे सन्माननीय सदस्यपद त्यांना बहाल करण्यात आले आहे.

चितमपल्लींचे लेखन कला-जाणिवेने समृद्ध आहे. 'केशराचा पाऊस'मधील (२००५) दहा कथा, ललित गद्य कथा, आत्मकथन, व्यक्तिचित्रे, अनुवाद असे विविध प्रकारचे साहित्य त्यांनी निर्माण केले आहे. पक्षिशास्त्रज्ञ म्हणून जसे ते ओळखले जातात, तसे ते 'ग्रंथपुण्यसंपत्ती' जपणारा ग्रंथवेडा माणूस म्हणूनही सुपरिचित आहेत. आपल्या निसर्गानुभवाला अधिक समृद्ध करण्यासाठी देशोदेशीच्या लेखकांचे कसदार साहित्य त्यांनी मनस्वीपणे आस्वादले आहे. अन्य भाषांमधील, निसर्गानुभवावर आधारलेल्या अनुभवास मराठीत आणण्याची जबाबदारी घेतली. त्यासाठी अनुवाद प्रपंच केला. त्यात 'भारतातील साप', 'मृगपक्षिशावक' अशा महत्त्वपूर्ण ग्रंथांचा समावेश होतो.

आज मराठी साहित्यसृष्टीला निसर्ग साहित्याचे नवनवे धुमारे फुटत आहेत. निसर्ग जीवनाचे सम्यक दर्शन त्यातून घडत आहे. मराठी साहित्याचे वनमित्र चितमपल्ली यांच्या ललित प्रतिभेचे हे देणे म्हणावे लागेल. निसर्गाची अनुपम देणगी असणारी वने, भोवतालच्या प्रदेशाला पाचूचे वैभव देणारे जलस्रोत, अमर्याद सागर, आकाशाची निळाई, सुजलसुफळ सस्यश्यामल धरणी तिच्या अंगाखांद्यावर वाढणारी अद्‌भुत जीवसृष्टी, विविध आकार आणि स्वभावाची वनचरे, नाना रंग व बोलींचे पक्षी, त्यांचे सहजीवन, ऋतुचक्रांची बदलत जाणारी वैशिष्ट्ये, सृष्टीचे मनोहर विभ्रम आणि जनन-मरण सोहळे या सर्वांशी अभिन्न असे नाते असलेला निसर्ग-निर्भर माणूस आणि त्याची वनविद्या असे अनोखे जग चितमपल्लींच्या साहित्यातून सजीवपणे प्रकटले आहे.

ज्या-ज्या प्रदेशातील अरण्यात ते राहिले, तिथले मूळ रहिवासी गोंड, आदिवासी, कोरकू, आदी जंगलवासींशी त्यांचे मैत्र झाले. त्यांची त्यांनी लोभस व्यक्तिचित्रे रेखाटली. लोकसाहित्याशी त्यांच्या लेखनाचा असलेला अतूट धागा हा त्यांच्या लेखनाचा एक आगळा आविष्कार आहे.

मराठी साहित्याला निसर्ग हा काही नवीन नव्हता. मानवी भावभावनांनी आरोपित असा निसर्ग, पार्श्वभूमी किंवा परिणामद्रव्य म्हणून येणारा निसर्ग, मराठी साहित्याला परिचित होता. आपल्या अनुभवदर्शनासाठी ललित लेखकांनी निसर्गाचा असा कलात्मक जाणिवेतून उपयोग करून घेतला होता.

एक ललित लेखक म्हणून निसर्गाकडे पाहण्याचा चितमपल्ली यांचा दृष्टिकोन याहून भिन्न आहे. निसर्ग चैतन्यमय आहे. आपल्या अंगभूत वैशिष्ट्यांनी तो समृद्ध आहे. त्याला स्वतंत्र असे व्यक्तिमत्त्व आहे. त्याचे रसवैभव नित्यनूतन आहे आणि हे चैतन्यमय निसर्गजीवन अखंड वाहते आहे. या जीवनाशी माणसाचा निकटचा

संबंध आहे. नव्हे, तो या जीवनाचा एक अविभाज्य भाग आहे. हे निसर्गभान आणि व्यापक असे जीवनभान त्यांच्या निसर्गानुभवामागे आहे. ते त्यांच्या साहित्यातही प्रतिबिंबित झाले आहे. चितमपल्ली हे निसर्ग आणि मानव यांचे नाते ओळखणारे वनमहर्षी आहेत. जंगलाविषयीच्या गाढ अनुभवातून हे जीवनसूत्र त्यांना गवसले आहे. त्यामुळे त्यांचे सर्व साहित्य निसर्ग आणि माणूस यांच्या अन्वय स्थळांचे उत्तम दर्शन घडवते. चितमपल्लींचा हा दृष्टिकोन त्यांच्या साहित्याला वेगळेपण प्राप्त करून देतो.

त्यांची भाषाशैली निरलंकृत, सरळ व सुबोध आहे. त्यांच्या चिंतनशील वृत्तीचे प्रतिबिंब त्यांच्या या सुगम निवेदनात स्पष्टपणे पडते. त्यांच्या ललित लेखनाची भाषा काव्यात्म आहे. स्वभावतःच सुंदर, एका अर्थाने जंगलचे देणे आहे, ती निसर्गबोली आहे. निसर्गानुभवाच्या आश्रयाने ती व्यक्त होते. वन्यजीवनाशी संबंधित कितीतरी नवीन शब्द, नावे येतात. भाषेला अर्थवाही करण्यातही त्यांची ही शैली, त्यातले अर्थवाहकत्व मनाला भिडते. त्यामागल्या कथा निसर्गाचा वेगळा अन्वय लावून दाखवतात. पर्यावरण प्रबोधनाच्या जाणिवाही चितमपल्लींच्या लेखनातून कधी अगदी थेट तर कधी सूचकतेने व्यक्त झाल्या आहेत.

**वनोपनिषद**

आपल्या ललित लेखनातून अद्भुत, रंजक आणि ज्ञानवर्धक अशी निरीक्षणे ते नोंदवतात. त्याला संशोधनाचा, सूक्ष्म निरीक्षणाचा आधार असतो. ‘पक्षिकोश’, ‘आनंददायी बगळे’, ‘रातवा’, ‘पाखरमाया’ यांमधील अनेक विलक्षण नोंदी याचा प्रत्यय देतात. चितमपल्लींचे लेखन हे एका अर्थाने ‘निसर्गाचे लीलाचरित्र’ होय, असे डॉ. सुहास पुजारी म्हणतात ते सार्थच होय.

आपले समकालीन लेखक व्यंकटेश माडगूळकर, रेखाचित्रकार, आणि निरीक्षक, समीक्षक यांच्याशी चितमपल्लींचे मित्रत्वाचे नाते होते.

‘चकवा चांदणं: एक वनोपनिषद’ हे त्यांचे आत्मकथन वेगळ्या वाटेवरचे आगळ्या पद्धतीचे आत्मकथन आहे. त्यात ते म्हणतात, “वनविभागातली नोकरी काही मी ठरवून स्वीकारलेली नव्हती. चुकून आडवाटेच्या रानात आलो आणि चालत असताना मला आयुष्याची सुंदर वाट सापडली.” याच वेगळ्या जीवन सौंदर्याचे दर्शन या आत्मचरित्रातून लेखक घडवतो.

चितमपल्ली यांनी मराठी साहित्यात आपल्या निसर्ग–लेखनाने अधिक समृद्ध बनवले. अनुभव आणि आविष्कार या दोन्ही पातळ्यांवर हे समृद्धपण दिले. त्यात नावीन्य आहे, ताजेपण आहे, जीवनाकडे पाहण्याची निकोप दृष्टी या निसर्गदृश्यातून लाभते. चितमपल्ली यांच्या ह्या सर्व लेखनामुळे मराठी साहित्यात निसर्ग–चित्रणाची ‘हिरवी वाट’ निर्माण झाली. त्यांच्या निसर्गपर लेखनाने मराठी साहित्यात निसर्गसाहित्याची ही पहाट झाली आहे, असे निश्चितपणे म्हणता येईल.

निसर्गाची विविध रूपे आदिम काळापासून मानवी प्रतिभेला आवाहन करीत राहिली आहेत. कलावंताच्या सर्जनशील मनालाही विविधरूपिणी सृष्टीची रूपचित्रे रेखाटण्याचा मोह पुन्हा–पुन्हा होत राहिला आहे. मराठी साहित्यात, विशेषतः कविता, कादंबरी, कथा या साहित्यप्रकारांत कितीतरी निसर्गचित्रे त्यातून चित्रित झालेली आहेत. निसर्ग–लेखक चितमपल्ली यांनी अशा लेखनातून आपल्या नावाची ठसठशीत मुद्रा मराठी साहित्यात उमटवलेली आहे.

गेल्या तीन दशकांपासून चितमपल्ली यांनी सातत्याने निसर्ग–लेखन केले आहे. निसर्गानुभवांना मुखरित करणे ही त्यांची एकमेव अशी लेखन प्रेरणा आहे. अशी निसर्गनिष्ठा ही मराठी साहित्यात एकमेव द्वितीय म्हणावी लागेल.

– प्रा. अनुराधा साळवेकर

**संदर्भ :**

१. *चितमपल्ली मारुती; ‘चकवाचांदण – एकवनोपनिषद’; मौज प्रकाशन गृह, मुंबई.*

२. *पुजारी सुहास; ‘रानावनातला माणूस’; पद्मगंधा प्रकाशन, पुणे; २००६.*

च

## चित्राव, सिद्धेश्वरशास्त्री विष्णुशास्त्री

☞ मुख्य नोंद – पत्रकारिता आणि ललितेतर साहित्य खंड

## चित्रे, दिलीप पुरुषोत्तम

**कथाकार, नाटककार, अनुवादक, कवी**

**१७ सप्टेंबर १९३८**



दिलीप चित्रे यांचा जन्म बडोदा येथे अभिरुची नियतकालिक चालविणाऱ्या पुरुषोत्तम चित्र्यांच्या घराण्यात झाला. प्राथमिक शिक्षण बडोदा येथे झाले. १९५१ पासून चित्र्यांचे वास्तव्य मुंबईत होते. पुढे रुईया महाविद्यालयामधून १९५८ मध्ये कला शाखेतील पदवी शिक्षण पूर्ण केले. १९६० ते १९६३ ह्या काळात इथियोपियात नोकरी केली. १९६४ मध्ये मुंबईला परतल्यावर जाहिरात क्षेत्रात नोकरी आणि पत्रकारिता करीत, माध्यमांच्या विश्वात वावरले. 'ॲन ॲन्थॉलॉजी ऑफ मराठी पोएट्री' (१९६७), 'आर्फियस' (१९६८) हा कथा संग्रह; 'शिबा राणीच्या शोधात' (१९७१) आत्मचरित्रात्मक प्रवासवर्णन लिहिले. 'आधुनिक कवितेला सात छेद' या नावाने रॅम्बो, हॉपकिन्स, रिल्के, एझरा पाउंड, हार्ट क्रेन आदी कवींच्या काव्यविश्वाचा मराठी वाचकांना परिचय करून देणारी त्यांची लेखमाला सत्यकथेतून प्रसिद्ध झाली. क्रेस्ट, न्यू क्रेस्ट, इंडियन एक्सप्रेस, टाइम्स ऑफ इंडिया, थॉट, सेमिनार, इलस्ट्रेटेड वीकली अशा नियतकालिकांतून त्यांनी राजकीय, सामाजिक आणि सांस्कृतिक विषयांवर इंग्रजीत भरपूर स्फुट लेखन केले. 'चाव्या' (१९८२), 'तिरकस आणि चौकस' (१९९०), 'शतकाचा संधिकाल' ही चित्र्यांची सामाजिक आणि राजकीय स्थितिगतीवरील भाष्ये आहेत. 'मिठू मिठू पोपट' (१९८९), 'सुतक' (१९८९) ही त्यांची नाटके आहे. 'चतुरंग' (१९९५) हे चार लघुकादंबऱ्यांचे संकलन आहे. चित्रकलेविषयी भरपूर लेखन आणि 'गोदाम' (१९७८) या चित्रपटाचे कथालेखन–दिग्दर्शन व संगीत दिग्दर्शनही त्यांनी केलेले आहे. चित्र्यांनी पुढील काळात ज्ञानेश्वरांच्या अमृतानुभवाचा अनुवाद केला आणि 'पुन्हा तुकाराम' (१९९०) तसेच 'सेज तुका' असे मराठी–इंग्रजी भाषांतून त्यांनी तुकारामांच्या कवितेचे मर्म उलगडून दाखविले.

**संतपरंपरेशी नाळ जोडणारी कविता**

घराण्यात वाङ्मयाचा वारसा असल्याने. बालवयातच काव्यलेखनाला प्रारंभ झाला. पहिली कविता 'सत्यकथे'च्या १९५४ च्या दिवाळी अंकातून प्रकाशित झाली. सत्यकथा – मौजेचे कवी म्हणून लौकिक. १९५४ मध्येच त्यांनी 'शब्द' हे लघुनियतकालिक काढून लघुपत्रिका चळवळीची मुहूर्तमेढ रोवली. नेमाडे–अशोक शहाणे आदी कवी–लेखकांसोबत लघुपत्रिका चळवळीला वाङ्मयीन निर्मितीचा सकस पाया देण्यात चित्र्यांचे मोठे योगदान राहिले. दिलीप चित्रे यांना बा. सी. मर्ढेकरांच्या नवकवितेचे पुढल्या काळातील वारसदार मानले जाते. मर्ढेकरांच्या आणि युरोपिअन कवींच्या प्रभावात त्यांचे काव्यलेखन झालेले असले, तरी पुढे मात्र संत तुकारामांच्या कवितेचा त्यांच्या काव्यलेखनावर प्रभाव जाणवतो. ह्या प्रभावाखाली त्यांनी संतपरंपरेशी नाळ जोडून काव्यनिर्मितीला देशीय काव्यपरंपरेचे भान दिले. 'कविता' (१९६१), 'कवितेनंतरच्या कविता' ( १९७८), 'ट्रॅव्हलिंग इन अ केज' (१९८०), 'दहा बाय दहा' (१९८३), 'एकूण कविता – १' (१९९२), 'एकूण कविता – २' (१९९६) असे प्रचंड काव्यलेखन केलेले आहे.

चित्रे हे लघुपत्रिका चळवळीतले सक्रिय कार्यकर्ता आणि सिद्धहस्त कवी होत. कविता, कथा, समीक्षा आणि इंग्रजी स्फुट तसेच अनुवाद असे लेखन त्यांनी केले. प्रचंड प्रतिभा–सामर्थ्य आणि लघुपत्रिकावाल्या कवींमध्ये वावरत, सर्वाधिक काव्यलेखन करणारा हा संवेदनशील आणि देशीय संस्कृतीचा सूक्ष्म विचार करणारा लेखक–कवी होय. जुन्या मराठी देशीय

कवितेपासून तर आधुनिक युरोपिअन कवितेपर्यंतच्या विस्तृत काव्यविश्वाला गवसणी घालून सर्जनशील काव्यनिर्मिती करणारा हा संवेदनशील कवी आहे. खास शब्दकळा वापरून इंद्रियगम्य अनुभवांच्या आधारे संभोग-जन्ममृत्यू-काळ आणि जगणे- माणसाचे अस्तित्वभान-एकाकीपण-परात्मता- संस्कृतीचा शोध अशा अंगानी चित्र्यांच्या काव्यलेखनाचा आणि अनुवादाचाही प्रवास राहिलेला आहे.

परखड आणि तिरकस अशी चिकित्सक दृष्टी लाभलेल्या ह्या लेखक-कवीने जगाकडे, जीवनाकडे सकारात्मक पाहत विविध प्रवाहांशी आपले नाते तपासत शेवटी संत तुकारामांच्या आणि संत ज्ञानेश्वरांच्या अस्सल देशीय काव्यपरंपरेशी आपल्याला जोडून घेतले. संत तुकारामांच्या काव्याभ्यासातून काव्यलेखनातील मुक्तीचा आनंद अनुभवत त्यांनी संत तुकारामांच्या कवितेचा इंग्रजी अनुवाद करून, तुकोबांच्या काव्याचा परिचय जगाला करून दिला.

पुन्हा तुकाराम ही मराठी साहित्य व्यवहारात कोपर्निकन क्रांती करणारी कृती आहे. मराठी काव्यविश्वाच्या केंद्रस्थानी तुकाराम आणि इतर कवी परिघावर अशी एक प्रकारची उत्पाती उलटापालट दिलिप चित्रे यांनी घडवून आणली. 'पुन्हा तुकाराम'मध्ये चित्र्यांनी तुकाराम हे मराठी वाङ्मयाच्या केंद्रस्थानी, असा सिद्धान्त मानून त्यानुसार आता मराठीचे स्वतंत्र पण वैश्विक संदर्भात मांडण्याजोगे काव्यशास्त्र दृग्गोचर करण्याचा प्रयत्न केला आहे, हे डॉ. सदानंद मोरे यांचे आकलन चित्र्यांच्या उत्तरार्धातील काव्याभ्यासाचे आणि काव्यलेखनाचे गमक मानता येईल.

चित्र्यांचे व्यक्तिमत्त्व त्यांचे काव्यगुरू मर्ढेकरांसारखे दुभंगलेले आढळते. मर्ढेकर 'शिशिरागम'मध्ये सापडत नाहीत तर पुढे 'काही कविता', 'आणखी काही कविता' ह्या कवितांमध्ये देशीय बाण्यातून हाती लागतात. मर्ढेकरांना ज्ञानोबा-तुकोबा काव्यकुलाशी नाते जोडल्यावरच ईश्वरशरणता व्यक्त करीत शक्ती आणि मुक्तीचा अनुभव घेता आला. हेच भागधेय चित्र्यांच्याही वाट्याला आले. चित्रेही पूर्वार्धातील कवितेतून हाती लागत नाहीत. उत्तरार्धात जेव्हा त्यांनी संतकाव्य परंपरेचा शोध घेतला, तेव्हाच त्यांना विठ्ठलशरणता व्यक्त करीत, तुकारामांच्या भक्ति-परंपरेचा वारसा स्वीकारत 'पुन्हा तुकाराम' मांडून, आपल्या काव्य जाणिवांना संतकाव्याच्या देशीय मुळांशी जुळवून घेतल्यावरच मुक्ती आणि शक्तीचा अनुभव घेता-देता आला.

– डॉ. किशोर सानप

**संदर्भ :**


*१. सानप किशोर; 'लघुपत्रिकेतील कविताः प्रेरणा व स्वरूप'; स्वरूप प्रकाशन, औरंगाबाद; २००६.*


## चिपळूणकर, कृष्णशास्त्री हरी

**भाषांतरकार, पंडित**

**१८२४ – २० मे १८७८**



अर्वाचीन मराठी वाङ्मयाच्या पूर्वतयारीच्या कालखंडात, मराठी भाषेला आपल्या भाषांतर प्रभुत्वामुळे डौलदार वळण प्रदान करणारे तसेच मराठी भाषा, व्याकरण, निबंध यांविषयी मौलिक विवेचन करून; मराठी भाषेच्या जडणघडणीस दिशा देणारे भाषाप्रभू म्हणून कृष्णशास्त्री चिपळूणकरांचे नाव अग्रक्रमाने घ्यावे लागते. त्यांचा जन्म पुण्यात झाला. पुणे पाठशाळा व पूना कॉलेजमध्ये त्यांचे अध्ययन झाले. अलंकार, न्याय, धर्म, अर्थशास्त्र, मानसशास्त्र, या विषयांच्या सखोल अध्ययनाबरोबरच मराठी, इंग्रजी, संस्कृत या तीनही भाषांचा त्यांचा दांडगा व्यासंग होता. त्यामुळेच पुणे पाठशाळेचे उपप्राध्यापक, ट्रेनिंग कॉलेजचे प्राचार्य, दक्षिणा प्राईज कमिटीचे चिटणीस अशी महत्त्वाची पदे त्यांच्याकडे चालत आली व ती त्यांनी आपल्या अजोड कार्यशैलीमुळे झळाळून टाकली.

मराठी 'शालापत्रक' व 'विचारलहरी' या नियतकालिकांचे संपादक म्हणूनही त्यांनी काही काळ

कार्य केले. मात्र तत्कालीन परिस्थितीच्या रेट्यामुळे अंगी क्षमता असूनही स्वतंत्र ग्रंथलेखन त्यांच्या हातून घडले नाही. परंतु त्यांच्यातला भाषांतरकार, रसिक पंडित, तत्त्वचिंतक, समाजधुरीण त्यांना स्वस्थ बसू देत नव्हता. त्यामुळे वयाच्या २८व्या वर्षी म्हणजे १८५२ मध्ये त्यांनी 'विचारलहरी' नावाचे पाक्षिक काढून त्याद्वारे आपल्या धर्मविषयक चिंतनाला प्रथम वाट करून दिली. तत्कालीन मिशनऱ्यांच्या ख्रिस्ती धर्मप्रचाराच्या चळवळीला त्यामुळे शह बसला.

**विदेशी साहित्य अनुवाद**

त्यांनी १८५२ मध्येच प्रख्यात ग्रीक विचारवंत सॉक्रेटिस याच्या चरित्राचा अनुवाद मराठीत केला. पुढे तीनच वर्षांनी जॉन स्टुअर्ट मिलच्या 'प्रिन्सिपल्स ऑफ पॉलिटिकल इकॉनॉमी' या इंग्रजी ग्रंथाचेही भाषांतर त्यांनी मराठीत केले व 'अर्थशास्त्र परिभाषा प्रकरण पहिले' या नावाने काही भाग प्रसिद्ध केला. त्यांच्या या प्रयत्नामुळे अर्थशास्त्रासारख्या महत्त्वाच्या विषयाची परिभाषा त्या काळात समाजापर्यंत पोचली. पण इंग्रजी ग्रंथांच्या परिचयामुळे तत्कालीन सुशिक्षित वर्गाची ज्ञानभूक वाढत होती आणि आपल्या मातृभाषेत इंग्रजी भाषेतील ग्रंथांप्रमाणे ग्रंथ असावेत असे वाटू लागले होते. त्यातूनच चिपळूणकरांनी अनेक इंग्रजी ग्रंथांचा आधार घेऊन १८६१ मध्ये 'अनेकविद्यामूलक तत्त्वसंग्रह' हा पदार्थविज्ञान, गणित, ज्योतिष, साहित्य, कला, नीती, अशा विविध विषयांची सहज, सोप्या शब्दांत माहिती करून देणारा ग्रंथ प्रकाशित केला व अशा विषयांवर मराठीत लेखन करता येऊ शकते, हे सर्वांना दाखवून दिले.

याच वर्षी त्यांनी अरबी भाषेतील सुरस व चमत्कारिक गोष्टींचे मराठीत भाषांतर करून, लोकांची मनोरंजनाची भूक भागविली. या ग्रंथामधून आलेले अद्भुत घटनांचे व प्रसंगांचे वर्णन वाचले म्हणजे चिपळूणकरांची भाषाशैली प्रसंगाला अनुसरून कसे चपखल रूप धारण करते व मनाचा ठाव घेते, याचा प्रत्यय येतो.

**संस्कृत साहित्य अनुवाद**

संस्कृत काव्य नाटकांचे मराठी भाषांतर करण्यात तर त्यांचा हातखंडा होता. १८६५मध्ये प्रसिद्ध झालेल्या 'पद्यरत्नावली'मध्ये त्यांनी केलेले मेघदूताचे भाषांतर समाविष्ट आहे. त्याचे परिशीलन केले म्हणजे त्यांची काव्यरचनाही किती रेखीव, रसाळ व रमणीय आहे, याचे प्रत्यंतर येते. कालिदासाचे मेघदूत करुण अशा 'मंदाक्रांता' वृत्तात आहे. पण भाषांतर करताना चिपळूणकरांनी साकीसारखा प्राकृत छंद वापरूनही मूळच्या कारुण्याला व सौंदर्याला अजिबात धक्का लागू दिला नाही. जगन्नाथ पंडिताच्या भामिनीविलासाच्या आधाराने 'विरहिविलाप' या काव्याची त्यांनी केलेली रचना मूळ काव्यापेक्षाही अधिक सुंदर झाली आहे. 'अन्योक्तिकलाप' या नावाने त्यांनी कालिदास, भवभूती, बिल्हण, श्रीहर्ष इत्यादी संस्कृत कवींच्या काव्याचा मराठीत करून दिलेला परिचयही असाच रसाळ आहे. संस्कृत भाषेप्रमाणे इंग्रजी भाषेवरही त्यांचे प्रभुत्व असल्याने डॉ. जॉन्सनच्या 'रासलेस' या तात्त्विक कादंबरीचा त्यांनी केलेला मराठी अनुवाद तेवढाच परिणामकारक व सकस आहे. ते केवळ भाषांतरातच गढून गेले नाहीत तर मराठी भाषेच्या विकासाच्या दृष्टीने महत्त्वाच्या ठरणाऱ्या विषयांकडे त्यांनी मोठ्या बारकाईने लक्ष घातले. दादोबा पांडुरंग तर्खडकर यांनी लिहिलेल्या व्याकरणाची नुसती प्रशंसा करून ते थांबले नाहीत तर 'पुणे पाठशाळा पत्रक' (१९६४) या मासिकामध्ये त्यांनी या ग्रंथावर पंचवीस निबंध खंडशः प्रकाशित केले व नवीन परिभाषा योजून व्याकरणविषयक विचारात मौलिक भर घातली. संस्कृत पुस्तकांचे मराठीत भाषांतर का करायचे, याविषयीचा त्यांचा दृष्टिकोनही असाच वेगळा होता. संस्कृत नाटकांमध्ये बालभाषा असते. तिच्या सखोल अभ्यासातून मराठी, गुजराती वगैरे भाषा कशा निर्माण झाल्या हे कळू शकते. तसेच ज्ञानेश्वरीसारखे जुने ग्रंथ व जुने लेखही समजून घेता येऊ शकतात. असे मर्मग्राही प्रतिपादन त्यांनी केले. पुणे पाठशाळा पत्रकातून 'व्यसनाविषयी', 'वाचनाविषयी', 'कलेविषयी', 'मराठी

भाषेविषयी' अशा विविध विषयांवर त्यांनी स्फुट निबंध लिहून मराठी निबंधाला शास्त्रीय व लालित्यपूर्ण रूप प्रदान केले. अप्रस्तुत प्रशंसेसाठी 'अन्योक्ती' हा काव्यप्रकार त्यांनीच मराठीत रूढ केला.

ज्ञानेश्वरांची ओवी, तुकारामांचा अभंग, मोरोपंतांची आर्या, वामनाचा श्लोक हे सारे जसे प्रसिद्ध आहे, तशीच शास्त्रीबुवांची साकी प्रसिद्ध आहे. अव्वल इंग्रजी कालखंडात कृष्णशास्त्री चिपळूणकर यांनी मराठी भाषेविषयी केलेले कार्य दीपस्तंभाप्रमाणे मार्गदर्शक आहे. ते कधीही विस्मृतीत जाऊ शकत नाही.

– डॉ. संजय देशमुख

**संदर्भ :**


१. *'मराठी वाङ्मयाचा इतिहास' खंड चौथा; महाराष्ट्र साहित्य परिषद, पुणे.*

२. *जोग रा. श्री.; संपादक, प्रदक्षिणा; 'कॉन्टिनेन्टल प्रकाशन, पुणे.*

३. *कुरुंदकर नरहर; 'धार आणि काठ'; देशमुख आणि कंपनी, पुणे.*


## चिपळूणकर, विष्णुशास्त्री कृष्णशास्त्री

**वृत्तपत्रकार, चरित्रकार, निबंधकार**

**२० मे १८५० – १७ मार्च १८८२**

विष्णुशास्त्री कृष्णशास्त्री चिपळूणकर यांचे घराणे रत्नागिरी जिल्ह्यातील पावस या गावचे. परंतु त्यांचे आजोबा हरिपंत चिपळूणकर हे पेशव्यांच्या नोकरीत असल्याने, १८व्या शतकाच्या अखेरीस हे घराणे पुण्यात स्थायिक झाले. हरिपंतांचे थोरले चिरंजीव कृष्णशास्त्री चिपळूणकर यांचे थोरले चिरंजीव म्हणजे विष्णुशास्त्री चिपळूणकर. त्यांचा जन्म पुण्यात झाला. पुणे ही परंपरेने महाराष्ट्राची सांस्कृतिक राजधानी. हा सांस्कृतिक वारसा, पुण्याने ज्या मौलिक परंपरेने कायम केला, त्यात ऐतिहासिक महत्त्वाच्या विविध भौतिक संपदांचा आणि राजकीय व सामाजिक घटनांचा लौकिक अर्थाने समावेश होतो. त्यांच्या बालमनावर झालेले परिस्थितीजन्य घरंदाज संस्कार व पुण्याच्या ऐतिहासिक बाबींचे अध्ययन



करण्याच्या त्यांच्या विजिगीषू वृत्तीमुळे त्यांचे सामाजिक व राजकीय विचारप्रवण चारित्र्य घडले. आज २०व्या शतकातही त्यांचे वाङ्मयीन भाषासौंदर्य व त्यांचे सामाजिक व राजकीय विचार, भलेही कालौघात विभावितदृष्ट्या विपर्यस्त वाटत असले; तरी चिंतन, मनन व संशोधन या संदर्भात विचारप्रवर्तक वाटतात.

विष्णुशास्त्री चिपळूणकरांच्या व्यक्तिमत्त्वाची पुण्यातील ज्या भौतिक व अभौतिक उपलब्धींमुळे जडणघडण झाली, त्यात त्यांचे वास्तव्य असलेला कर्वेवाडा व पेशवाईचे वतनवाडी वैभव सांगणारा नाना फडणविसांचा वाडा आणि विविध ऐतिहासिक खलबतांचे केंद्र ठरलेला शनिवारवाडा इत्यादी वास्तुशिल्पांचे त्यांनी तत्कालीन श्रेष्ठींकडून ज्ञात केलेले माहात्म्य, तसेच आजोबांचे संस्कार इत्यादी बाबी महत्त्वाच्या आहेत. याशिवाय त्यांची वेदाभ्यासातील रुची, त्यांचे तीर्थरूप कृष्णशास्त्री यांच्याकडून त्यांनी गिरविलेले साक्षेपी तथा समीक्षणात्मक संस्कृत व इंग्रजी साहित्याचे पाठ आणि हरिशास्त्री पंडित या संस्कृत विद्वानाकडून त्यांनी ऐकलेला मराठ्यांचा इतिहास व मनोगम्य शौर्यकथा इत्यादींमुळे ज्ञानलालसा, प्रखर राष्ट्राभिमान, जाज्वल्य राष्ट्रभक्ती, आणि स्वसंकृतीचे रक्षण या शाश्वत राष्ट्रीय गुणांची त्यांच्या मनात अत्यल्प वयातच रुजवण झाली. परिणामी, स्वदेश, स्वभाषा, स्वसंस्कृती, स्वराज्यवट व स्वराजधर्म या स्वत्त्वगुणांचे अग्रगामी अभियाचक म्हणून महाविद्यालयीन प्रवेशापूर्वीच ते अनेकांना ज्ञात झाले.

पुणे हायस्कूलमधून १८६५ मध्ये मॅट्रिकची परीक्षा उत्तीर्ण झाल्यानंतर, त्यांनी पुण्याच्या डेक्कन महाविद्यालयात प्रवेश घेतला. या महाविद्यालयाचे तत्कालीन प्राचार्य इंग्लंडमधील प्रसिद्ध कवी वर्डस्वर्थ यांचे नातू विल्यम वर्डस्वर्थ हे होते, जे स्वतः साहित्य व इतिहास शिकवीत. या प्राचार्यांच्या व प्रा. फांझ किलहर्न

यांच्या स्वदेशाभिमानी आचरणाचा विष्णुशास्त्र्यांवर प्रचंड प्रभाव होता. त्यांच्या सल्ल्यामुळेच त्यांना अभ्यासक्रमाच्या नेमस्त पुस्तकांव्यतिरिक्त अन्य पुस्तके वाचण्याचा छंद जडला. पाच वर्षे महाविद्यालयात राहूनही, त्यांना बी.ए.ची पदवी खासगीरीत्या प्राप्त करावी लागली असली, तरी महाविद्यालयातील शिक्षणकाळात त्यांनी तेथील ग्रंथालयातील बहुतेक सर्व पुस्तके वाचून काढली. परिणामी, प्रदीर्घ वाचन व त्यायोगे जिगरी भिनणाऱ्या जालीम लिखाण–कौशल्यासाठी अभिप्रेत असलेल्या असामान्य प्रतिभेचा संचार त्यांच्यात झाला. त्यांच्या या असामान्य प्रतिभेच्या आविष्काराची अनुभूती, १८६८ ते १८७५ या काळात त्यांनी प्रकाशित केलेल्या सरकारी 'शालापत्रक' या मासिकातून जाणवली. 'शालापत्रक' या मासिकातून त्यांची भवभूती, कालिदास या प्राचीन संस्कृत कवींच्या काव्यात राज्य व धर्म या बाबींचे कोटकल्याणार्थ पथदर्शी हितगुज असल्याचे समीक्षण केले. त्याची वाङ्मयीन जाण पुढे जहाल तेजस्वी रूप धारण करू लागली. त्यांच्या या लिखाण–कौशल्याची प्रचिती खऱ्या अर्थी त्यांच्या निबंधमालेतून आली; कारण निबंधमालेतील प्रत्येक लेखाचे विश्लेषण करणे म्हणजे वाचकांची कसोटीच होती.

**निबंधमालाकार**

विष्णुशास्त्र्यांची 'निबंधमाला' ही विशिष्ट काळातील त्यांची अनुभूतिसापेक्ष वैचारिक अभिव्यक्ती म्हणता येईल. त्यांच्या निबंधमालेचा पहिला अंक २५ जानेवारी, १८७४ रोजी प्रकाशित झाला. या निबंधमालेत जे लेख त्यांनी लिहिले, त्यात सतत चर्चेत राहिलेले लेख कोणते? ही क्रमवारी लावणे त्यातील विचारांच्या दृष्टीने अशक्यच आहे. तथापि 'डॉ. जॉन्सन', 'लोकहितवादी', 'फुले', 'लोकभ्रम', 'दयानंदांवरील टीका' व 'आमच्या देशाची स्थिती' हे लेख लक्षवेधी ठरले; कारण या लेखांत त्यांनी विशिष्टांना विशिष्ट पद्धतीने लक्ष्य केल्याचे जाणवते.

निबंधमालेच्या आरंभापूर्वी महाराष्ट्रातील अनेक विचारवंत ब्रिटिश राजवटीचे स्तुतिपाठक असल्याचे दिसत होते; कारण त्यांचे लक्ष्य राजकीय स्वातंत्र्यापेक्षा सामाजिक सुधारणांकडे अधिक होते असे त्यांच्या विचारप्रबोधनातून जाणवते. परंतु निबंधमालेच्या आरंभाने 'राजकीय स्वातंत्र्य आधी की समाजसुधारणा आधी?' अशी दोन विचारप्रवर्तने सुरू झाली. विष्णुशास्त्री या विचारद्वंद्वात राजकीय स्वातंत्र्याचे पुरस्कर्ते होते. त्यांच्या निबंधमालेमुळे १९व्या शतकात महाराष्ट्रात नवीन विचारयुग सुरू झाले. निबंधमालेच्या माध्यमातून विष्णुशास्त्र्यांनी भारतातील धर्म, संस्कृती, भाषा, परंपरा तथा रूढी यांची तरफदारी केली. एवढेच नव्हे, तर आपली सामाजिक व धार्मिक व्यवस्था उत्तम असल्याने, तत्कालीन स्थितीत त्यात परिवर्तन आणण्याचे प्रयोजन नाही; आपले प्रमुख लक्ष्य राजकीय स्वातंत्र्य मिळवणे हेच असले पाहिजे; स्वातंत्र्योत्तर काळनिहाय सामाजिक सुधारणा क्रमाक्रमाने घडून येतील, हा त्यांचा युक्तिवाद होता.

परिणामस्वरूप, आपल्या देशात सुशिक्षितांमध्ये रुजलेल्या व्यसनप्रवण अशा पाश्चात्त्य संस्कृतीच्या अंधानुकरणास आळा घालणे व आपल्या मूल्यव्यवस्थेचे रक्षण करणे आणि देशाच्या अधोगतीला कारण ठरलेली ब्रिटिशांची जुलमी राजवट झुगारून देणे; ही उद्दिष्टे साध्य करण्यासाठी विष्णुशास्त्र्यांनी सामाजिक परंपरावाद व राजकीय जहालवाद पुरस्कृत केला. लेखन व भाषण स्वातंत्र्याच्या प्रतिबंधात्मक काळात, त्यांनी जोखीम पत्करून 'निबंधमाला' व 'केसरी' यांमध्ये केलेले जालीम व मार्मिक लिखाण म्हणजे संबंधितांसाठी शाब्दिक घायाळपर्वच ठरले. त्यांच्या परंपरावादी विचारांवर पाश्चात्त्य विचारवंत एडमंड बर्क यांच्या राजकीय व सामाजिक समन्वयात्मक परंपरावादातील विचारपरिवर्तनाचा प्रभाव जाणवतो. त्यांनी आत्मसात केलेल्या जहाल व प्रबुद्ध विचारशैलीवर व विद्वत्ताप्रचुर भाषाशैलीवर हटवादी राष्ट्राभिमानी व इंग्रजी भाषेचे विकासप्रवर्तक सॅम्युअल जॉन्सन, पाश्चात्त्य लेखकद्वय जुनिअस व ॲडिसन आणि इतिहासकार मेकॉले ह्यांचा प्रभाव असल्याचे लक्षात येते.

विष्णुशास्त्र्यांनी निबंधमालेत लिहिलेल्या ८४ लेखांतून व केसरीतील विपुल लिखाणातून स्वातंत्र्याच्या मार्गात येणाऱ्या कृती व प्रवृत्ती यांवर शाब्दिक शरसंधान साधणे आणि स्वातंत्र्यासाठी जनजागृती करण्यापोटी जनप्रक्षोभ तीव्र करणे ही दोन्ही कामे एकाच वेळी केली. त्यांच्या जहाल विचारांचा प्रभाव लोकमान्य टिळकांवरही पडल्याचे स्पष्ट दिसते, कारण 'स्वातंत्र्य म्हणजे स्वराज्य' हे घोषवाक्य त्यांनी विष्णुशास्त्र्यांच्या प्रेरणेतूनच स्वीकारल्याचे जाणवते. 'काळ'कर्ते शि.म.परांजपे यांचे अंतर्मुख करणारे जहाल लिखाणदेखील प्रत्यक्षाप्रत्यक्ष विष्णुशास्त्र्यांच्या त्यांच्यावरील प्रभावाचा परिणाम म्हणता येईल. 'केसरी' व 'निबंधमाला' वगळता, त्यांचे इतर लिखाण मराठी वाङ्मयातील प्रतिभा व प्रतिमा यांना अप्रतिम भाषासौंदर्याने सालंकृत करणारे आहे.

असा हा प्रतिभासंपन्न भाषाप्रभू, सामाजिक परंपरावादाचा व जहालवादाचा जनक, जनतेला स्वातंत्र्याचा प्रक्षोभी मूलमंत्र देऊन १७मार्च, १८८२ रोजी अनंतात विलीन झाला.

काही विचारवंतांनी त्यांचा गौरवोल्लेख केला तो असा –पु.पा.गोखले यांनी विष्णुशास्त्र्यांची निबंधमाला म्हणजे 'राष्ट्रवादी जहाल पक्षाचा जाहीरनामा होय' असे विधान केले, तर वि.मो.महाजनी यांनी त्यांना 'महाराष्ट्राचे राष्ट्रगुरू' संबोधले. गो.ग.आगरकरांनी त्यांना 'फ्रान्समधील क्रांतिकारक वाल्टेअर' म्हटल्याचा उल्लेख माडखोलकरांनी केला आहे.

खरोखरच, विष्णुशास्त्री कृष्णशास्त्री चिपळूणकर म्हणजे एकोणिसाव्या शतकातील मराठी भाषेचे स्वयंसिद्ध शिवाजी होते.

– प्रा. सुधाकर दे. देशपांडे

**संदर्भ :**


१. *बेलसरे खं.भि; 'निबंधमालाकार विष्णुशास्त्री चिपळूणकर यांच्या चरित्राचे व लेखांचे साधारण स्वरूप; १८९१.*
२. *चिपळूणकर ल.कृ. 'विष्णुशास्त्री चिपळूणकर यांचे चरित्र'; १८९४.*
३. *पांगारकर ल.रा., 'निबंधमालेचे स्वरूप व कार्य' ; १९०४.*
४. *गोखले वा.दा.;'मराठी भाषेचे शिवाजी';१९५०.*
५. *सहस्रबुद्धे पु. ग.; 'केसरीची त्रिमूर्ती'; १९७४.*
६. *फडके य. दि.;'विष्णुशास्त्री चिपळूणकर';१९८२*
७. *चिपळूणकर वि. कृ.; 'निबंधमाला',१९३३.*
८. *बकाणे छाया सुरेश; 'विष्णुशास्त्री चिपळूणकर–महाराष्ट्रातील परंपरावादी व जहाल विचारसरणीचे जनक.'*


च

## चिरमुले, शरच्चंद्र वासुदेव

**कथाकार**

**१५ जानेवारी १९३१ – २७ मार्च १९९२**



शरच्चंद्र चिरमुले हे प्रभाकर श्रीपत शेणोलीकर यांचे चिरंजीव. वडिलांचे मामा वासुदेव गणेश उर्फ अण्णासाहेब चिरमुले यांना ते दत्तक गेले. शिक्षण एम.ए.पर्यंत झाले. पुण्याच्या गरवारे ऑफ कॉमर्समध्ये ते अर्थशास्त्र विषयाचे प्राध्यापक होते. नंतर त्यांनी प्राचार्यपदही भूषविले.

चिरमुले मराठी कथासाहित्यात साठोत्तरी कथाकारांमधील एक लक्षणीय कथाकार होत. जी.ए.कुलकर्णी, चि.त्र्यं.खानोलकर, विद्याधर पुंडलिक, आनंद विनायक जातेगावकर हे चिरमुले यांचे समकालीन कथाकार होत.

मोजकेच पण गांभीर्याने कथालेखन करणाऱ्या चिरमुले यांचे १९६६ ते १९९२ या काळात पाच कथासंग्रह प्रसिद्ध झाले – 'श्री शिल्लक' (१९६७), 'कॉग्ज' (१९७३), 'एका जन्मातल्या गाठी' (१९८५), 'पूल' (१९९०), 'पार्थिवाचे रंग' (१९९१).

त्यांच्या कथा लेखनाचा कालखंड १९६६ ते १९९२ असा असला, तरी उमेदवारीचा कालखंड १९४९पासूनच सुरू झालेला दिसतो. 'कामरूपचा कलावंत' ही पहिली कथा 'वाङ्मयशोभा'मध्ये (१९४९) प्रसिद्ध झाली. ही कथा र. वा. दिघे यांच्या

वाङ्मयीन प्रभावातून व बरीचशी अनुकरणातून लिहिली गेल्यामुळे १९६७ साली प्रकाशित झालेली, स्वतःचा सूर गवसलेली 'श्री शिल्लक' ही त्यांची पहिली महत्त्वाची कथा ठरली.

कवी गिरीश हे चिरमुले यांचे मामा असल्यामुळे बालवयातच त्यांच्यावर कवित्वाचे संस्कार घडले. मामांमुळे घरी येणाऱ्या साहित्यिकांच्या गप्पांतून, काव्यवाचनातून, वाङ्मयीन वातावरणातून कवितेचा छंद जडला. 'अभिरुची' मासिकातून काही कविता प्रकाशितही झाल्या. याच काळात त्यांना शरच्चंद्र चतर्जींच्या साहित्याने झपाटून टाकले आणि कवितालेखनापेक्षा आपला लेखनपिंड कथेला अधिक अनुकूल आहे या जाणिवेने ते कथा लेखनाकडे वळले.

'श्री शिल्लक' ते 'पार्थिवाचे रंग' या पाच कथासंग्रहांव्यतिरिक्त त्यांनी आत्मवृत्तात्मक ('वास्तुपुरुष' – १९८६) आणि ललित निबंध लेखन ('जीवितधागे' – १९९२) केले.

चिरमुले यांचे लौकिक व्यक्तिमत्त्वही समृद्ध होते. कवी गिरीश यांचा सहवास, नंतरच्या आयुष्यात कुमार गंधर्वांसारखे सुहृद लाभले. चिरमुले हार्मोनिअम उत्तम वाजवीत. पत्नी शुभदा कुमारांच्या शिष्या असल्यामुळे घरात संगीत साधना सदैव होत असे. लौकिक जीवनातील साहित्य, संगीत व निसर्गसान्निध्य यांची आवड हे घटक लेखनकृतीत ठळकपणे प्रत्ययास येतात. 'वास्तुपुरुष' या ललित लेखन संग्रहातील निम्मे लेख संगीतकारांवर आहेत.

चिरमुले यांचे कथागत अनुभवक्षेत्र प्रामुख्याने नागर जीवनाशी निगडित होते. त्यामुळे ग्रामीण अनुभव 'पारध'सारख्या कथेतून क्वचितच डोकावताना दिसतो. त्यांच्या प्रारंभीच्या कथा पात्रांच्या व्यक्तिगत सुखदुखाःचा पट मांडता–मांडता हळूहळू सामाजिक विषयांकडे प्रवास करतात. मध्यमवर्गीय कौटुंबिक वातावरणाच्या परिघात त्यांची कथा वावरते. अनाकलनीय वाटणारा माणूस व त्याचा मानसिक पातळीवरून घेतलेला शोध, ही त्यांच्या लेखनाची प्रबळ प्रेरणा होय.

माणसाचे मन, त्याचे एकाकीपण, मृत्यू, मानवी जीवनातील रहस्यतत्त्व अशा आशयसूत्रांतून गंभीरपणे पाहणारे चिरमुले जीवनाकडे मिस्कीलपणेही जीवनाकडे पाहतात आणि त्यातून निखळ शुद्ध विनोदाचे दर्शन घडविणाऱ्या विनोदी कथांचे दालन उघडले जाते. अर्थात अशा विनोदी कथा मोजक्याच पण दर्जेदार आहेत. 'पोलोनिअसचे पिशाच' ही त्यांची पहिली विनोदी कथा १९८६ मध्ये लिहिली गेली. 'पुनरुत्थान आणीबाणीचे', 'सत्तावीस नक्षत्रांचे देणे' इत्यादी कथा चिं. वि.जोशी यांच्या विनोदी परंपरेशी नाते सांगणाऱ्या आहेत.

थोडक्यात चिरमुले यांनी कथालेखनाची वेगळी व स्वतंत्र पायवाट निर्माण केली. नवकथेतून कथालेखनाला बळ घेतले, पण अंधानुकरण केले नाही. फार मोठी प्रायोगिकता आणली नसली, तरी कथाप्रवाहावर स्वतःच्या कथालेखनाचा स्वतंत्र ठसा उमटवला. गंगाधर गाडगीळ, अरविंद गोखले यांच्या कथाजाणिवेशी त्यांचे जवळचे नाते आहे. कलावाद–जीवनवाद या वादचर्चेच्या अधीन न जाता व कथाविषयक कलात्मक जाणिवेचे भान गांभीर्याने ठेवून चिरमुले यांच्या कथेने मराठी कथेला वैविध्यपूर्ण आणि समृद्ध बनविले आहे.

त्यांना 'श्री शिल्लक' या कथासंग्रहासाठी १९६८ साली ललित पारितोषिक मिळाले तर 'कॉग्ज' या कथासंग्रहासाठी १९७४–७५ साली महाराष्ट्र शासनाचे पारितोषिक मिळाले. 'एका जन्मातल्या गाठी' ह्या कथासंग्रहासाठी केशवराव कोठावळे पुरस्कार १९८६ साली तर 'वास्तुपुरुष' लेखसंग्रहासाठी कै. प्रा. वि. ह. कुलकर्णी पारितोषिक १९८८ साली त्यांना मिळाले.

– प्रा. रेखा मैड

**संदर्भ :**


१. *पाध्ये प्रभाकर ; 'आस्वाद' मॅजेस्टिक बुक स्टॉल, मुंबई; १९७७.*

२. *अदवंत म. ना.; 'मराठीतील काही कथाकार'; अनमोल प्रकाशन, पुणे; १९७७.*

३. *साठे आशा; 'अम्लान कथा'; 'श्री शिल्लक'; कथाश्री, ऑक्टोबर १९९९.*

४. *कुंभोजकर रा. अ.; 'गप्पागोष्टी चिरमुल्यांशी', मुलाखत; ललित, जुलै १९८६.*

५. *शांता शेळके; 'प्रगल्भ जाणिवेचा कथाकार शरच्चंद्र चिरमुले'; मुलाखत; कथाश्री, मे १९९९.*

६. *ब्रह्मे मीनाक्षी; 'शरच्चंद्र चिरमुले यांचे कथासाहित्य'; एक चिकित्सक अभ्यास' पी.एच.डी. प्रबंध, मुंबई विद्यापीठ, नोव्हेंबर २००१.*


## चुनेकर, सुरेश रामकृष्ण

**संशोधक, समीक्षक**

**२७ एप्रिल १९३६**



सुरेश रामकृष्ण चुनेकर यांचा जन्म पुणे येथे झाला. शिक्षण पुणे व सातारा येथे झाले. १९६८ ते १९७३ या काळात त्यांनी मराठी संशोधन मंडळ, मुंबई येथे प्रपाठक व उपसंचालक म्हणून काम केले. १९७९ ते १९८४ ह्या काळात संगमनेर महाविद्यालयात मराठीचे अध्यापन केले व त्यानंतर १९८५ साली ते पुणे विद्यापीठात प्रपाठक म्हणून रुजू झाले. १९९६ साली ते पुणे विद्यापीठाचे मराठी विभाग प्रमुख झाले. एम. ए., पीएच. डी. असल्याने चुनेकर यांनी पुणे विद्यापीठातून विद्यार्थ्यांना, अभ्यासकांना विद्यार्थ्यांना, अभ्यासकांना पीएच. डी.साठी मार्गदर्शन केले.

१९६८ ते १९७९ ह्या काळात त्यांनी 'मराठी संशोधन पत्रिकेचे' संपादन केले. याच काळात त्यांनी महत्त्वाच्या सूची बनविण्याचे कामही केले. 'बाळकृष्ण अनंत भिडे ह्यांच्या कवितांची सूची' (१९५९), 'भिडे ह्यांच्या समग्र वाङ्मयाची वर्णनात्मक सूची' (१९६९), 'अ. का. प्रियोळकर यांच्या वाङ्मयाची सूची' (१९७९) अशा सूच्या त्यांनी तयार केल्या. मराठी संशोधन पत्रिकेतून प्रसिद्ध झालेल्या साहित्याचे ४, ५, ६, ७ हे खंड संपादित केले. 'माधवराव पटवर्धन वाङ्मयदर्शन' हा त्यांचा ग्रंथ १९७३ साली मौजतर्फे प्रकाशित झाला. १९८० साली त्यांनी 'माधव जूलियन' हा ग्रंथ साहित्य अकादमीसाठी लिहिला. समग्र माधव जूलियन खंड १ - स्फुट काव्य, खंड २-खंडकाव्य या दोन ग्रंथांचे त्यांनी सहसंपादन केले. माधवराव पटवर्धन यांच्या अभ्यासकांसाठी हे लेखन अतिशय मोलाचे मानले जाते. 'सूचींची सूची' (१९९५), 'अंतरंग' (१९९६), 'जयवंत दळवी यांची नाटके' (१९९५) ही पुस्तके त्यांनी लिहिली. १९८१ साली त्यांनी जी. ए. कुलकर्णी यांच्या 'सोनपावले' या कथासंग्रहाचे संपादन केले. वि. द. घाटे ह्यांच्या 'काही म्हातारे व एक म्हातारी' ह्या व्यक्तिचित्रात्मक पुस्तकाचेही (तृतीयावृत्ती) संपादन केले. महाराष्ट्र साहित्य परिषदेच्या मराठी वाङ्मयाचा इतिहास ह्या ग्रंथात समीक्षेच्या इतिहासाचे लेखन केले. त्यांची समीक्षा काटेकोर व शिस्तबद्ध असते.

– नरेंद्र बोडके

## चेंदवणकर, प्रल्हाद नामदेव

**कवी**

**१५ जुलै १९३७ – १६ जुलै २००६**



प्रल्हाद चेंदवणकर यांचा जन्म माझगाव येथे झाला. वडील नामदेव व आई जनाबाई होय. चेंदवणकरांचे मूळ गाव नागेवाडी (जिल्हा सातारा), प्राथमिक शिक्षण माझगाव जुना बाजार शाळेत, माध्यमिक शिक्षण युनिअन हायस्कूल खेतवाडी येथे झाले. शालान्त परीक्षा १९५७ साली, बी. कॉम. १९६७ साली, एल.एल. बी. २००० साली, माझगाव डॉक या आस्थापनेतून संयुक्त वित्त प्रबंधक पदावरून निवृत्त (१९९५).

प्रल्हाद चेंदवणकर यांचे लेखन 'चित्रा' या साप्ताहिकातून सुरू झाले. 'ऑडिट' (१९७६), 'ऑर्डर... ऑर्डर' (१९८४), 'ऑगस्ट' (१९९२),

हे तीन कवितासंग्रह व 'टांच' हे आत्मकथन १९९४ साली प्रकाशित झाले. प्रकाशनापूर्वी या आत्मकथनाचे अभिवाचन बावन्न भागांत आकाशवाणीवरून झाले.



दलित पँथर चळवळीत चेंदवणकर सक्रिय होते. त्या काळात त्यांनी लिहिलेल्या कवितांचा 'ऑडिट' हा कवितासंग्रह होय. चळवळ चालू असताना चळवळीसाठी लिहिलेल्या कविता, हे या कवितेचे वैशिष्ट्य असून ती साधी सोपी व आवेशपूर्ण आहे. चेंदवणकर हे सामाजिक बांधीलकी मानणारे कवी आहेत. त्यांच्या कवितांतून या विचारांचे प्रकटीकरण होताना दिसते. दलितांच्या वाट्याला परंपरेने येत राहिलेल्या दुःखाची झळ व त्यातून निर्माण झालेल्या विद्रोहाला चेंदवणकरांनी शब्दरूप दिले.

१९७६ साली प्रकाशित झालेल्या 'ऑडिट' या काव्यसंग्रहास महाराष्ट्र शासनाचा १९७६-१९७७ चे प्रथम प्रकाशन उत्कृष्ट ग्रंथ पुरस्कार, महाराष्ट्र साहित्य परिषदेचे १९७६-१९७७ चे कवी स. रा. गोखले पारितोषिक, माझगाव डॉक लिमिटेडच्या वतीने विशेष पुरस्कार प्राप्त झाले.

'ऑर्डर ऑर्डर' या काव्यसंग्रहास महाराष्ट्र शासनाचा १९८४-१९८५ सालचा कवी केशवसुत पुरस्कार, तर्कतीर्थ लक्ष्मणशास्त्री जोशी यांच्या हस्ते प्रदान करण्यात आला. 'ऑगस्ट' या कविता संग्रहास माझगाव डॉकचा पुरस्कार. १९९९ साली औरंगाबाद येथे झालेल्या दुसऱ्या समरसता साहित्य संमेलनाचे निमंत्रक म्हणून प्रल्हाद चेंदवणकर यांनी काम पाहिले. सामाजिक समरसता मंचातर्फे दिला जाणारा संतसेवायोगी गाडगेमहाराज समरसता पुरस्कार मंगेश पाडगावकर यांच्या हस्ते प्रदान करण्यात आला.

दलित साहित्यातील व चळवळीतील मधल्या पिढीचे एक महत्त्वाचे कवी व कार्यकर्ते म्हणून चेंदवणकर यांचे स्थान महत्त्वाचे आहे.

– रवींद्र गोळे

## चोरघडे, वामन कृष्ण

**कथाकार**

**१६ जुलै १९१४ – १ डिसेंबर १९९५**



वामनराव यांचा जन्म नागपूर जिल्ह्यातील नरखेड गावी झाला. नागपूरच्या पटवर्धन विद्यालयातून १९३२ मध्ये वामनराव मॅट्रिक झाले. मॉरिस कॉलेज, नागपूरला १९३६ मध्ये त्यांनी कला शाखेत बी. ए. केले. अर्थशास्त्र या विषयात त्यांनी पदव्युत्तर शिक्षण पूर्ण केले. पुढे काही काळ त्यांनी शिक्षा मंडळ, वर्धा येथील गोविंदराम सेक्सारिया वाणिज्य महाविद्यालयात अर्थशास्त्राचे प्राध्यापक म्हणून कार्य केले. पुढे नागपूरच्या गोविंदराम सेक्सारिया अर्थवाणिज्य महाविद्यालयात वामनराव उपप्राचार्य होते. १९३० पासून त्यांनी महात्मा गांधीच्या असहकार आंदोलनात सहभाग घेतला. १९४२ च्या चळवळीत भाग घेतल्यामुळे त्यांना तुरुंगवासही भोगावा लागला.

ह्या दरम्यान त्यांचा महात्मा गांधी, काका कालेलकर, दादा धर्माधिकारी, विनोबा भावे ह्या गांधीवादी महात्म्यांशी जवळून संबंध आला. वामनरावांच्या मनावर गांधी-विनोबांच्या तत्त्वज्ञानाचा मोठा प्रभाव होता. महाविद्यालयीन शिक्षण घेतानाच त्यांनी आपल्या अभिजात संस्कारशील कथालेखनाला सुरुवात केली. सामाजिक आणि राजकीय चळवळीत काम करताना वामनराव समाजाच्या उच्च स्तरांपासून निम्न स्तरांपर्यंत सर्वत्र वावरले, जीवनानुभव घेतले आणि त्यातूनच त्यांच्या कथानिर्मितीची वाट दिवसेंदिवस फुलत गेली. वामनरावांची कथा समाजाचे वास्तव मांडताना जीवनाभिमुख आणि समाजाभिमुख राहिली. वामनरावांच्या कथांवर लोकभाषा आणि लोकसंस्कृतीचा मोठा प्रभाव होता.

समाजाला अंतर्मुख करून भावनेचा ओलावा देणाऱ्या आणि मानवी जीवनातील मांगल्य, सद्भाव आणि

मानवतावादी मूल्यांचे संस्कार करणाऱ्या कथा वामनरावांनी लिहिल्या. त्यांचा पहिला कथासंग्रह ‘सुषमा’ (१९३६), ‘हवन’ (१९३८), ‘यौवन’ (१९४१), ‘प्रस्थान’ (१९४५), ‘पाथेय’ (१९४६), ‘संस्कार’ (१९५०), ‘नागवेल’ (१९५७), ‘मजल’ (१९६३), ‘बेला’ (१९६४), ‘ख्याल’ (१९७३), ‘ओला दिवस’ असे जीवनातील वास्तवाचे आणि मांगल्याचे जीवन दर्शन घडविणारे कथासंग्रह त्यांच्या खाती जमा आहेत. सुगम, सौम्य, मृदू आणि लयदार भाषिक अभिव्यक्तीमुळे त्यांच्या कथा वाचनीय आणि चिंतनीय ठरल्या. प्रवाही निवेदनशैली आणि कथनवस्तूच्या दमदारपणामुळे वामनरावांनी मराठी कथाविश्वाला मौलिक योगदान दिले. जवळपास चाळीस वर्ष वामनरावांनी कथालेखन केले. नवकथापूर्व काळातील लोकप्रिय कथाकार म्हणून वामनरावांची उंची अनन्यसाधारण आहे.

**सात्त्विक मूल्यांचे उपासक**

वामनराव प्रतिभावंत कथाकार होते. कथालेखनाशिवाय त्यांनी इतर कथन प्रकार असलेले कादंबरी-नाटकादी वाङ्मय प्रकारांत लेखन केलेले नाही. ‘साने गुरुजींचे ओझरते जीवन दर्शन’ (१९४६), ‘अहिंसेची साधना’ (१९४५), ‘अहिंसा विवेचन’ (१९४९), ‘भारताचा आधुनिक आर्थिक इतिहास’ (१९५३) ह्या कथेतर लेखनातून-ग्रंथांतून वामनरावांनी आपल्या व्यक्तिमत्त्वावर प्रभाव टाकणाऱ्या व्यक्तींचे आणि तत्त्वज्ञानाचे मार्मिक विवेचन केलेले आहे. वामनराव पुढे गांधीवादी लेखक म्हणूनही ओळखले जायचे. १९७९ मध्ये विदर्भातील चंद्रपुरात संपन्न झालेल्या अखिल भारतीय मराठी साहित्य संमेलनाचे अध्यक्षपद वामनरावांनी भूषविले. आचार्य कालेलकरांच्या गुजरातीतील प्रवासवर्णनांची भाषांतरे त्यांनी मराठी भाषेत केली.

मराठी कथा-वाङ्मयात मध्यमवर्गीय जीवनजाणिवांच्या चित्रणाला महत्त्व दिले गेले. कथेच्या रूपबंधात बदल करीत, प्रयोग करीत मराठी कथा नवी-नवी वळणे घेऊ लागली. परंतु कथेतले कथन मात्र पुढे-पुढे हरवत गेले. आशयाची मध्यमवर्गीय वळणे गिरवणारी कथा मध्यमवर्गीय कथाकारांनी गिरवली. वामनरावांनी आपले आयुष्य ग्रामीण भागातल्या गोंड, गवारी, मजूर, विविध जातीजमातीचे लोक यांच्या सहवासात घालविले. अनुभवांना वास्तवाची किनार दिली. गांधी-विनोबा-साने गुरुजी यांच्या संस्कार-विचार यांत त्यांची जडणघडण झाली. माणसांना त्यांच्या मुळांसह समजून घेत, त्यांच्या कथांनी समाजात मानवी मूल्यांची प्रतिष्ठापना केली. संस्कृतीच्या कळवळ्यातून मानवी जीवनातील सात्त्विक मूल्यांची उपासना त्यांच्या कथांनी केली. मराठीत आजही वामनरावांची कथा वाचली जाते. मूल्यनिर्मितीचे कार्य करणारे वामनराव मराठी कथेचे वैभव होते, असे म्हणता येईल.

– डॉ. किशोर सानप



## चौधरी, बहिणाबाई नथूजी

**कवयित्री**

**१८८० – ३ डिसेंबर १९५१**



जळगाव जिल्ह्यातील आसोदा या गावी नागपंचमीच्या दिवशी बहिणाबाईंचा जन्म झाला. त्यांचे वडील उखाजी महाजन आणि आई भीमाई. बहिणाबाईंना तीन भाऊ आणि तीन बहिणी होत्या. संपन्न अशा लेवापाटीदार एकत्र कुटुंबात त्यांचे बालपण गेले. जळगाव येथील वतनदार चौधरी ह्यांच्या वाड्यात खंडेराव चौधरी ह्यांची सून म्हणून बहिणाबाई आल्या. त्या वेळी त्याचे वय १३ वर्षे होते. नथूजी चौधरी हे बहिणाबाईंचे पती. सासरीदेखील मोठे एकत्र कुटुंब होते. माहेरी व सासरी घरकाम आणि शेतीची कामे यांनीच त्यांचे जीवन व्यापलेले होते. वयाची तिशी उलटण्याच्या आतच बहिणाबाईंच्या पतीचे आकस्मिक निधन झाले. त्यांच्या आयुष्याचा आधार

तुटला. पदरी तीन लहान मुले– ॐकार, सोपान आणि काशी. त्या काळच्या रितीप्रमाणे काशीबाईंचे लहान वयातच लग्न झाले होते. मोठा मुलगा ॐकार प्लेगमुळे अपंग झाला. त्यातच पूर्वीचे कर्जही डोक्यावर होते. कुटुंबप्रमुख म्हणून आर्थिक बाबींसह सगळ्या गोष्टींची घडी व्यवस्थित बसविण्याची जबाबदारी आता बहिणाबाईंचीच होती. हे आव्हान त्यांनी धैर्याने पेलले.

कुटुंबाचा उदरनिर्वाह करायचा म्हणून शेतात राबणे, हे बहिणाबाईंनी आपल्या जीवनाचे सूत्र मानले. दुष्काळाच्या काळात तर खडी फोडण्याचे काम करण्याची वेळही त्यांच्यावर आली. कष्टकरी ग्रामीण स्त्रीचे सामान्य जीवन त्यांच्या वाट्यास आले. त्या अशिक्षित होत्या. औपचारिक शिक्षणाचा त्यांच्या जीवनाला अजिबात स्पर्श झालेला नव्हता. असोदा, जळगाव याच परिसरात त्यांचे बहुतांश जीवन गेले. शेती, शेतकरी जीवन, गावगाडा, ग्रामसंस्कृती अशा परिसरात बहिणाबाई वावरल्या, जगल्या.

**निसर्गरूपांचे काव्य**

बहिणाबाईंचे कर्तृत्व आहे ते मराठी कवितेच्या क्षेत्रात. त्यांचे चिरंजीव सोपानदेव यांनी आपल्या आईच्या निधनानंतर आचार्य अत्रे यांच्या पुढाकाराने आईच्या कविता 'बहिणाईची गाणी' (डिसेंबर १९५२) या नावाने पुस्तकरूपाने प्रसिद्ध केल्या. खानदेशातील एका शेतकऱ्याच्या कुटुंबातील कवयित्रीने निर्माण केलेले हे काव्य आहे. कृषिजीवनकेंद्री, स्त्रीसुलभ भावनेतून समकालीन वास्तवाला अभिव्यक्त करणारी, जीवनविषयक गहन तत्त्वज्ञान मांडणारी आणि अस्सल खानदेशी वऱ्हाडी बोलीचे सामर्थ्य जाणणारी ही कविता आहे.

बहिणाबाईंचे जगणे आणि त्यांची कविता कृषिजीवनकेंद्री असल्याने निसर्गाची विविध रूपे, हे त्यांच्या कवितेचे एक प्रधान वैशिष्ट्य ठरते. ही निसर्गरूपे शेतकरी जीवनाशी संबंधित आहेत. शेतकऱ्याच्या कष्टातून शेतात डोलणारी पिके, फुलणारा हिरवा निसर्ग हे पाहून बहिणाबाईंचे चिंतनशील कविमन निसर्गाच्या सुजलाम-सुफलाम शक्तीला सहजतेने प्रणाम करते. साधा पाऊस आला, तरी त्यांच्या काव्यप्रतिभेला बहर येतो. वाढत्या पावसामुळे दिसणारी निसर्गाची विविध रूपे 'आला पाऊस' या कवितेतून त्यांनी उत्कटपणे साकारली आहेत. उगवत्या पिकाला पाहूनही बहिणाबाईंना काव्य सुचते– 'एका एका कोंबातून। पर्गटले दोन पानं। जसे हात जोडीसन। टाया वाजवती पानं'।

निसर्गातील पशुजीवन बहिणाबाईंच्या 'गाडी जोडी', 'रगडनी', 'पोया' या कवितांमधून येते. बैलाचे सामर्थ्य व त्याच्याविषयीची कृतज्ञतेची भावना त्यांतून व्यक्त होते. बहिणाबाईंची कविता ही शेतकरी जीवनाबरोबर प्रवास करीत असल्याचे सतत जाणवते. 'पेरनी', 'कापनी', 'रगडनी', 'उपननी', 'शेतीची साधने' या साऱ्या कविता कृषकजीवनाचे दर्शन घडविणाऱ्या आहेत. 'धरत्रीले दंडवत' ही काळ्या आईवरील उत्कट श्रद्धा व्यक्त करणारी कविता आहे.

**संसाराचे मर्म**

शेती हा मुख्य व्यवसाय, एकत्र कुटुंबपद्धती, एकमेकांना धरून राहणे, भाऊबंदांच्या रितीभाती पाळणे, सण-उत्सव, स्त्री-जीवन, सासर-माहेर, जातीची उतरंड अशी समकालीन वास्तवाची भिन्न-भिन्न रूपे बहिणाबाईंच्या कवितेतून प्रत्ययास येतात. त्यात आपल्या माहेराचे वर्णन करणाऱ्या त्यांच्या काही स्वतंत्र कविता आहेत. काही कवितांमध्ये माहेरी मिळणारे प्रेम, माहेरची माणसे यांचाही उल्लेख आलेला आहे. परंतु 'माझं माहेर माहेर' म्हणत सासरची कष्टमय काट्या-कुट्यांची वाट चालत राहायची, हेच बहिणाबाई आपल्या कवितेतून सांगतात. त्यांनी माहेर-सासरची गाणी गात-गात, सुखाला नकार आणि दुःखाला होकार देत संसार केला. संसाराचे मर्म आपल्या कवितेतून त्यांनी सांगितले. चुलीवर तवा आणि हाताला चटके यांशिवाय भाकर मिळायची नाही, तसा संसारही व्हायचा नाही. ओढाळ ढोर पळून जाऊ नये म्हणून त्याच्या गळ्यात लाकडाचा ओंडका-लोढणे बांधतात. पति-पत्नी एकमेकांना वरताना गळ्यात घातलेला हार फुलांचा असतो, त्याचे स्मरण

असले, म्हणजे ते लोढणे वाटणार नाही. असा एक सुरेख विचार बहिणाबाईंच्या स्त्रीसुलभ प्रतिभेने या कवितेत उलगडून दाखवला आहे.

बहिणाबाईंनी नकळतपणे घरोट्याशी-जात्याशी जोडलेले जीवाभावाचे नाते, हे त्यांच्या कवितेचा एक लक्षणीय विशेष आहे. जात्याची लयबद्ध घरघर ऐकता-ऐकता बहिणाबाईंचे मन अंतर्मुख होत जाऊन स्वतःशी, जात्याशी, जीवनातल्या अनुभवांशी आणि हे सारे निर्माण करणाऱ्या ईश्वराशी केव्हा हितगुज करू लागते, हे कळतही नाही. घरोट्याशी बोलता-बोलता त्या स्वतःमधल्या वाटसरूला धीर देतात- संसाराची वाट बिकट जरी असली, तरी 'जानचं पडीन रे। तुले लोकायच्यासाठी। वाटंच्या वाटसरा। वाट बिकट मोठी?' वास्तवाची डोळस जाणीव ठेवून, जगण्यातील चढ-उतारांना खंबीरपणे सामोरे जाण्याची बहिणाबाईंची विजिगीषू वृत्ती स्तिमित करणारी आहे.

**मानवी जीवनाचे रहस्य**

बहिणाबाईंच्या कविमनाने समाजव्यवहाराचे सूक्ष्म निरीक्षण केले आणि त्यासंबंधीच्या त्यांच्या संवेदनशील मनाच्या प्रतिक्रिया काव्यरूपात प्रकट झाल्या. समाजातील जातींची उतरंड आणि त्यातून अस्पृश्यांच्या वाट्याला आलेली पिळवणूक याचे मार्मिक वर्णन बहिणाबाई कवितेतून करतात. दारूच्या भट्टीजवळच्या दुनियेचे आणि मुसलमान वाड्याचे चित्र रेखाटून तेथील भीषण, विदारक वास्तवाचे दर्शनही बहिणाबाईंची कविता घडविते. श्रीमंत व गरीब यांच्यातील आर्थिक व सामाजिक दरीही बहिणाबाईंची काव्यप्रतिभा नेमकेपणाने टिपते- 'अरे, बालाजी इठोबा। दोन्ही एकज रे देव। सम्रीतीनं गरिबीनं। केला केला दुजाभाव।।', 'अनागोंदी कारभार' ही त्यांची कविता अशीच; पण बदलत्या समाजवास्तवाची नोंद मिस्कीलपणे घेणारी आहे.

जे काही जीवनाचे तत्त्वज्ञान बहिणाबाईंच्या कवितेतून आपल्याला मिळते, ते त्यांनी प्रथम स्वतःसाठी, स्वतःला सांगितले आहे. 'योगी आणि सासुरवाशीण' ही स्त्रीजीवनाचे तत्त्वज्ञान सांगणारी त्यांची एक हृदयस्पर्शी कविता आहे. 'लेकीच्या माहेरासाठी। माय सासरी नांदते।' या शब्दांतून स्त्रीजीवनाचे निरंतर सत्य बहिणाबाईंनी अत्यंत सहजपणे सांगून टाकले आहे. जगण्याचे तत्त्वज्ञान त्यांना फार स्पष्टपणे उमगले होते. हे माझ्या जीवा, जीवन क्षणभंगुर आहे; हे कधीच विसरू नकोस आणि हेही लक्षात ठेव की, जगात करण्यासारखे खूप काम आहे. ते करता-करता त्यातच देवाजीचे रूप पाहा, असे त्या सांगतात. ही कवयित्री श्रद्धाळू, ईश्वरपरायण आहे; पण दैववादी अजिबात नाही. दुःखाचे आघात सहन करूनही ती हळवी असाहाय्य बनली नाही. उलट जीवनविषयक शहाणपण ती बाळगून होती. 'लपे करमाची रेखा' या कवितेतून याचा प्रत्यय येतो. पतिनिधनानंतर 'आता माझा माले जीव' असे स्वतःला त्यांनी समजावले. जीवनाकडे तटस्थपणे पाहण्याचे सामर्थ्य बहिणाबाईंना लाभले होते. अशा दृष्टीला सुगरणीच्या खोप्याचे रहस्य कळावे, यात नवल नाही. जीवनाकडे विलक्षण दृष्टीने बघण्याची बहिणाबाईंची वृत्ती प्रत्येक गोष्टीत काही नवाच शोध लावत जाते. माणसातला देव क्वचितच सापडून जातो, परंतु अनेकदा माणसातला माणूस हरवलेला असतो, हीच व्यथा बहिणाबाईंच्या कवितेतून ऐकायला मिळते. बहिणाबाईंनी माणसातच देव पाहिला. त्यांचा जीवनाकडे पाहण्याचा दृष्टिकोन अत्यंत आशावादी, वास्तवाचे भान बाळगणारा व परखड होता.

**माणुसकीच्या मूल्यांची कविता**

बहिणाबाईंच्या काव्याचे सगळे विषय त्यांच्या दैनंदिन जीवनातील आहेत. म्हणूनच या काव्यविश्वात कसलीही कृत्रिमता, कसलाही उपचार सापडणार नाही. प्रांजळ आविष्कार आणि कल्पक प्रतिभा, अचूक शब्दांची निवड, त्यांतील लडिवाळपणा, कारुण्य व हास्य या कलागुणांइतकेच बहिणाबाईंचे जीवनविषयक तत्त्वज्ञानही महत्त्वाचे आहे. वृत्त-अलंकार जुळवून जाणीवपूर्वक केलेले हे काव्य नाही. अष्टाक्षरी रचनेतील सफाईदारपणा, हे या कवितेचे एक प्रधान वैशिष्ट्य ठरते. प्रत्येक कवितेत संपूर्ण घटना किंवा विचार आहे. कवितेचा प्रारंभ

आणि शेवट परिणामाच्या दृष्टीने नाट्यात्मक व्हावा याबद्दलची जागरूकता जाणवते. खानदेशी वऱ्हाडी बोलीमुळे या काव्याची लज्जत अधिकच वाढली आहे. स्त्रियांच्या भाषेच्या स्पष्ट खुणाही या कवितेत स्पष्टपणे जाणवतात. या साऱ्याच कविता तालबद्ध व लयबद्ध आहेत. काव्यगुणांनी समृद्ध म्हणून त्या कविता तर आहेतच; परंतु त्याहून ती गाणी आहेत. म्हणूनच बहिणाबाईंच्या कविता-संग्रहाला 'बहिणाईची गाणी' असेच नाव दिलेले आहे.

बहिणाबाईंची कविता एका बाजूला सनातन माणुसकीच्या मूल्यांशी जोडली गेलेली, संतकाव्याच्या परंपरेशी जवळचे नाते सांगणारी आहे, तर दुसऱ्या बाजूला दैनंदिन लौकिक वास्तवातूनच जन्मास आलेली, जगण्याचे शहाणपण देणारी कविता आहे.

– आशुतोष पाटील

**संदर्भ :**


१. *चौधरी स्नेहलता - 'भूमिकन्या बहिणाबाई चौधरी; एक चिंतन'; कॉंटिनेंटल प्रकाशन; १९९४.*

२. *चित्रे ऋता; 'बहिणाबाईंची गाणी : एक अभ्यास', महाराष्ट्र राज्य साहित्य संस्कृती मंडळ, मुंबई; १९८३.*

३. *भरुड प्रमिला; 'बहिणाबाईंची गाणी : एक अभ्यास'; व्यंकटेश प्रकाशन, जळगाव; २०००.*


## चौधरी, सोपानदेव नथुजी

**कवी**

**१६ ऑक्टोबर १९०७ – ४ ऑक्टोबर १९८२**

त्यांची कविता 'रविकिरण मंडळा'च्या कवितेला – माधव जूलियन, यशवंत, गिरीश, वि. द. घाटे ह्यांच्या कवितेला; नंतरच्या काळात तांबे, कुसुमाग्रज, बोरकर ह्यांच्या कवितेला; पुढे मर्ढेकर, मुक्तिबोध ह्यांच्या कवितेला; आणि नंतर विंदा करंदीकर, बापट, पाडगांवकर ह्यांच्या कवितेला समांतर राहिली. ह्या कवितांबरोबर वावरतानाच ती स्वतःचा ठसा उमटवून गेली. ते महाकवी नसतील, पण त्यांची कविता रसिकाला काही उत्कट क्षणांचा आनंद नक्की देते, इतकी अस्सल आहे.



नाशिकला आकाशवाणीचे केंद्र नसताना १९६१-१९६२ साली आकाश-वाणीने मुद्दाम एक खास कविसंमेलन आयोजित केले होते. त्या वेळी सोपानदेव ह्यांनी त्यांच्या स्वतःच्या कविता तर म्हटल्याच पण रेव्हरन्ड टिळकांची 'पाखरा, येशील का परतून?' ही कविता अत्यंत सुरेल आवाजात आवर्जून गायली होती. त्यांचा आवाज अतिशय स्वच्छ, अजिबात खर नसलेला, अत्यंत वजनदार, दाणेदार होता. पहाडी-थिएटर भरून टाकणाऱ्या आवाजातील त्यांचे गाणे (कविता) ऐकताना श्रोता गुंग, मुग्ध होऊन जाई. (नाशिकला तेव्हा नाट्यगृह नव्हते.)

**काव्यरचनेचा संस्कार**

पंडित विष्णू दिगंबर पलुस्करांच्या गायकीचे सूक्ष्म, खोल असे संस्कार त्यांच्या गळ्यावर झाले होते. पलुस्करांच्या गांधर्व संगीत महाविद्यालयात त्यांनी संगीताचे शिक्षण घेतले आणि पुढे तेथेच संगीताचे अध्यापनही केले. संगीताचा वारसा आणि वसा घेतल्यामुळे त्यांच्या काव्यगायनाला इतर कवींच्या तुलनेत आपोआपच एक विशिष्ट परिमाण प्राप्त होत असे. साऱ्या महाराष्ट्रात (मराठी साहित्य संमेलनांसह) ह्या सुरेल काव्यगायनामुळे त्यांना प्रचंड प्रसिद्धी लाभली आणि ते लोकप्रिय झाले.

कवितेचा- काव्यरचनेचा संस्कार त्यांच्यावर त्यांच्या घरातच झाला. त्यांची आई म्हणजे बहिणाबाई चौधरी. त्या शिकलेल्या नव्हत्या, पण दारिद्र्यात जगण्याचा त्यांचा जीवनानुभवच त्यांच्या कवितेला प्रेरक ठरला. त्या वेळचे जळगाव शहर मोठे नव्हते, खेड्यातच जमा होणारे होते. सततच वाट्याला आलेले, शेतीतले काबाडकष्ट शेतीतील पेरणी, कापणी, मळणी, उपाणणी हे सारे करताना बहिणाबाईंना कविता सुचू लागल्या. दळण-कांडण करताना त्या सुचू लागल्या. निसर्ग तर त्यांचा सखासोबतीच होता. त्यामुळे त्यांच्या कवितेत निसर्गाची, माणसाच्या

सुखदुःखाची स्पंदने अनिवारपणे आविष्कृत होतात. त्या कविता गात असत. बहुतेक कविता ओवी-अष्टाक्षरी छंदातल्या असल्यामुळे त्यांना स्वाभाविक लयही प्राप्त व्हायची. कविता ऐकत राहावी असे वाटायचे, म्हणून सोपानदेवांनी एक केले; आई कविता म्हणू लागली की ते ती कविता उतरून घेत. अशी कवितांची वहीच तयार झाली. आचार्य अत्र्यांना त्या कविता अत्यंत आवडल्या. सोपानदेवांच्या ते मागे लागले आणि 'बहिणाबाईंची गाणी' हा संग्रह तयार झाला. सोपानदेवांच्या प्रतिभेवर हा संस्कार संगीताच्या संस्काराइतकाच गडद असा झाला.

लक्ष्मीबाई टिळकांना (रेव्हरन्ड नारायण वामन टिळकांच्या पत्नी) सोपानदेव आई मानायचे. लक्ष्मीबाईंची 'स्मृतिचित्रे' म्हणजे अक्षरशिल्पेच- शब्दशिल्पेच! त्यांचाही सोपानदेवांवर संस्कार झाला.

एका अर्थाने ते 'बालकवी'ही होते. शाळेत शिकत असतानाच त्यांनी 'गोकुळीचा कान्हा माझा, कुणी कधी पाहिला काय ग' ही कविता केली. ती कविता महाराष्ट्रभर गाजली आणि आजही अनेकांच्या ओठांवर ती रुळत असते, रुंजी घालत असते. 'प्रतापी प्रतापसिंह', 'पुण्यश्लोक महात्मा' (महात्मा गांधींवरचा पोवाडा) ह्या रचनांप्रमाणेच अहिराणी बोलीतही त्यांनी कविता रचली आहे. लहानपणी त्यांचा वावर खानदेशात होता आणि अहिराणी बोली रोजच्या भाषिक व्यवहारात प्रचलित होती. 'काय सांगू माइया मोऱ्याची बल्हारी', 'आडाचं पाणी लई खोल ग' यासारख्या त्यांच्या कविता लोकांच्या ओठी रुळल्या. त्यांची सारी कविताच नादानुकूल, संगीत अंगी वागणारी होती. 'आली कुठूनशी कानी / टाळ मृदंगाची धून / नाद विठ्ठल विठ्ठल / उठे रोमारोमांतून' कुणी विसरू शकेल? केव्हाही ऐकली की मन मोहून, गुंजून जाते. कान शब्द साठवू लागतात.

नादानुकूल कवितेवर प्रेम होते म्हणूनच सोपानदेवांना मुक्तछंद अजिबात पसंत नसे. मुक्तछंद म्हणजे त्यांना बेदिली- अस्ताव्यस्तपणा वाटायचा. नवकाव्यावरही ते रुष्ट असत. 'मी ताक पितो', 'पाटा-वरवंटा', 'सिगारेट', 'वगैरे-वगैरे' सारख्या कविता नवकाव्याचे विडंबन म्हणून त्यांनी रचल्या. 'मी ताक पितो' ही कविता (१९५४-१९५५) 'विवेक' साप्ताहिकाच्या विजयादशमी विशेषांकात प्रसिद्ध झाली होती. 'काव्यकेतकी' (१९३२), 'अनुपमा' (१९४९) हे त्यांचे काव्यसंग्रह प्रसिद्ध झाले. 'छंद लीलावती' हे छंदरचनेचे महत्त्व सांगणारे पुस्तक त्यांनी लिहिले आणि त्या पुस्तकाला विद्याधर गोखल्यांची प्रस्तावना आहे.

**साहित्य सहवास**

तल्लख स्मरणशक्ती, निसर्ग, समाज ह्यांचे सूक्ष्म निरीक्षण तसेच उपजत विनोदबुद्धी ही त्यांची वैशिष्ट्ये होती. ते चपखल व प्रज्ञादर्शी कोटिबाजही होते.

नाशिकला जॅक्सन गार्डनच्या बाजूला असलेल्या कान्हेरेवाडीत त्यांचे घर होते, तेथेच ते राहत. देवदत्त नारायण टिळक आणि बालकवींची समग्र कविता संपादित करणारे प्राचार्य भा. ल. पाटणकर (श्रीपाद कृष्ण कोल्हटकरांचे जावई आणि सौंदर्य मीमांसक प्रा. रा. भा. पाटणकरांचे वडील) ह्यांची घरेही जवळच होती. हा साहित्य सहवास होता. नाशिकला असले की ते नेहमी देवदत्तांकडे जात असत, आणि मुंबईला असले की आचार्य अत्र्यांकडे जात असत. टिळक आणि अत्रे हे सोपानदेव ह्यांचे आधार होते. भरपूर उंची लाभलेले आणि बळकट शरीरयष्टी लाभलेले सोपानदेव प्रकृतीने निरोगी होते. पण १९७४च्या आगेमागे ते खूप आजारी पडले. कॅन्सरचे निदान झाले. आठवड्यापुरतेच आयुष्य उरले आहे, असे डॉक्टर म्हणू लागले. पण त्यातून ते सावरले. कॅन्सर जणू पळालाच. नंतर त्यांना आणखी आठ वर्षांचे आयुष्य लाभले. हा एक चमत्कार होता.

ते आयुष्यभर खऱ्या अर्थाने कविता-गाणे जगले.

— डॉ. चंद्रकांत वर्तक

**संदर्भ :**


१. *'कविवर्य सोपानदेव चौधरी'; रुद्रवाणी - दिवाळी अंक, १९८२.*
२. *केचे मधुकर; 'हेही सोपानदेवच'; नवे जग - दिवाळी अंक, १९६५.*


* * *

ज





## जाधव, राजा सखाराम

**समीक्षक, दलित साहित्याचे अभ्यासक**

**३१ जानेवारी १९४८ – १९ डिसेंबर २००८**



राजा जाधव यांचा जन्म वाटक–खंडळा, ता. जि. रत्नागिरी येथे झाला. एम. ए. व पत्रकारितेतील पदविका असे शिक्षण राजा जाधव यांनी प्राप्त केले.

बौद्धजन पंचायत समितीचे सरचिटणीस, मालाड दलित शिक्षण संस्थेचे विश्वस्त ही पदे त्यांनी भूषविली. राजा जाधव यांची चिंतन, कोकणातील दलित चळवळ, सामाजिक सांस्कृतिक विषयांवरील 'डॉ. बाबासाहेब आंबेडकर आणि स्वातंत्र्य चळवळ', '६ डिसेंबर १९५६ आणि त्यानंतर', 'आंबेडकरी साहित्य विचारसौंदर्य', 'प्रबोधनाचे शिल्पकार', 'दलित साहित्य समीक्षा', 'साहित्यातील समाजजीवन', 'शतकातील क्रांती– महाड चवदार तळ्याचा सत्याग्रह', 'डॉ. बाबासाहेब आंबेडकर सम्यक आकलनाची दिशा' इत्यादी पुस्तके प्रकाशित आहेत.

महाराष्ट्र टाइम्स, लोकसत्ता, सकाळ, नवा काळ, साप्ताहिक विवेक, सामाजिक समरसता मंच पत्रिका यांतून राजा जाधव यांनी विपुल लेखन केले असून दलित समस्यांची उकल आणि समतेचा आग्रह ही राजा जाधव यांच्या लेखनाची वैशिष्ट्ये होती.

राजा जाधव यांच्या '६ डिसेंबर १९५६ आणि त्यानंतर' या पुस्तकाला शासनाचा 'अण्णाभाऊ साठे पुरस्कार' लाभला. त्याचप्रमाणे मुंबई मराठी पत्रलेखकाचा 'समाजसेवा पुरस्कार', मराठी वृत्तपत्र लेखक संघाचा 'समीक्षक पुरस्कार', सामाजिक समरसता मंचाचा 'संत गाडगेबाबा पुरस्कार', कोकण परिषदेचा 'समीक्षक पुरस्कार' असे लाभले आहेत.

२००५ साली पणजी, गोवा येथे झालेल्या समरसता साहित्य संमेलनाचे अध्यक्षपद राजा जाधव यांनी भूषविले. साहित्य आणि समाज यांचे नाते हे समाजाला दिशा देणारे असावे, 'भवतु सब्ब मंगलम्' या वचनाचा आधार घेत साहित्याने समाजातील व्यथा वेदना मांडाव्यात; पण त्या दूर करण्याचाही प्रयत्न करावा, अशा प्रेरणा जागवणारे लेखन राजा जाधव यांनी केले. आपल्या लेखनाबद्दल ते म्हणतात, ''साहित्यातले समाज–दर्शन सर्वच सत्य असते असे नाही. तो सत्याचा आभास असतो. पण सत्याचा आभास निर्माण करताना वास्तव जीवनातील मूलतत्त्वे चित्रित झाली पाहिजेत. परात्मता ही एक संकल्पना रूढ होत आहे. दुसऱ्यांच्या जीवनात घडणाऱ्या घटनांचे मूळ घटक शोधण्याचे काम परात्मतेने करणे आवश्यक ठरते.'' याचाच अर्थ राजा जाधव समरस साहित्यासाठी आग्रही होते. प्रामुख्याने दलित चळवळीतील सक्रिय सहभाग, दलित साहित्याचे आणि समाजाचे चिंतन अशी राजा जाधव यांची ओळख आहे. राजा जाधव यांच्या साहित्याचे आणि समीक्षेचे वैशिष्ट्य म्हणजे त्यांची समन्वयवादी भूमिका. सामाजिक विद्वेष, जातिप्रथांचे समर्थन आणि दुराग्रह यांपासून राजा जाधव दूर राहून सामाजिक ऐक्याच्या प्रेरणा जागवणारे साहित्य निर्माण करतात. त्यांच्या समीक्षेचेही तेच बलस्थान असते.

– रवींद्र गोळे

**संदर्भ :**

१. *अध्यक्षीय भाषण, ७ वे समरसता साहित्य संमेलन – समरसता साहित्य परिषद; २००५.*

२. *जाधव राजा; 'साहित्यातील समाजजीवन'; संदेश प्रकाशन; २००७.*

## जाधव, रावसाहेब गणपत
**समीक्षक**
**२४ ऑगस्ट १९३२**



रावसाहेब जाधवांचे घराणे ऐतिहासिक असून ते सातारा जिल्ह्यातील काशीळ इथले आहे. जाधवांचे वडील गणपतराव बडोदा संस्थानात फडणीस होते. रावसाहेब यांचा जन्म बडोदा येथे झाला. त्यांचा बालपणीचा काळ पुण्यात गेला. १९४९ साली ते मॅट्रिक झाले. त्याच वर्षी पुण्याच्या महाराष्ट्र साहित्य परिषदेतर्फे घेतल्या जात असलेल्या 'साहित्य विशारद' या परीक्षेत ते महाराष्ट्रात पहिले आले. लगेचच त्यांना महाराष्ट्र राज्य मार्ग परिवहन मंडळात नोकरी लागली. स्वारगेट (पुणे), संगमनेर, नाशिक या ठिकाणी त्यांनी सुमारे दहा वर्षे काम केले. याच काळात त्यांनी बाहेरून मराठी विषयात एम. ए. केले (१९५८). पुण्याच्या वास्तव्यातच ते साहित्याकडे आकर्षित झाले होते. साप्ताहिक स्वराज्यमध्ये आईवर लिहिलेली 'न बिघडणारे यंत्र' ही पहिली कथा प्रसिद्ध झाली. त्यानंतर 'प्रसाद', 'सह्याद्री', 'यशवंत', 'हंस', 'वाङ्मयशोभा', 'छंद' इत्यादी मासिकांतून त्यांच्या कथा प्रारंभीच्या काळात प्रसिद्ध होत गेल्या. एकांकिका, कविता व दीर्घकविताही त्यांनी लिहिल्या. एक नाटकही त्यांनी लिहिले होते; पण ते प्रसिद्ध झाले नाही.

नंतर विदर्भ महाविद्यालय अमरावती, एल्फिन्स्टन महाविद्यालय मुंबई आणि मिलिंद महाविद्यालय औरंगाबाद येथे १९७० पर्यंत त्यांनी सुमारे दहा वर्षे मराठीचे अध्यापन केले. १९७० ते १९९० ही वीस वर्षे महाराष्ट्र शासनाच्या वाई येथील 'मराठी विश्वकोशा'च्या मानव्य विद्या विभागाचे विभाग संपादक म्हणून त्यांनी काम केले. पुढे 'मराठी विश्वकोश मंडळा'चे अध्यक्ष आणि प्रमुख संपादक म्हणून त्यांनी २०००–२००१ या काळात जबाबदारी स्वीकारून कोशाचे काम बरेच पुढे नेले. निवृत्तीनंतर पुण्यात आल्यावर त्यांनी मराठी साहित्य क्षेत्रात मोलाचे काम केले. दरम्यान प्राध्यापकी आणि विश्वकोश संपादन चालू असताना त्यांच्यातील सर्जनशील लेखक मागे पडला आणि जवळपास अर्धशतक त्यांनी मराठी वाङ्मय विश्वाला समीक्षक हीच ओळख आहे. समीक्षेकडे वळण्याचे कारण सांगताना ते म्हणतात, '....आमच्या अंतर्बाह्य वाङ्मयीन गोवणुकीचा तो कालखंड होता. या साहित्याचे तर्कसंगत विश्लेषण करणे गरजेचे होते. या साहित्याशी समरस होऊन त्याची समीक्षा करू लागलो. ....आमचे भाग्य असे की, साहित्याच्या बहरलेल्या कालखंडात आम्ही उभे होतो. साहित्यकृती स्वान्तः सुखाय समजून घेतली, त्याचीच समीक्षा झाली.'

'वियोगब्रह्म' (१९९५) या कवितासंग्रहात पत्नीच्या निधनानंतर मनाच्या भावाकूल, विषण्ण अवस्थेत लिहिलेल्या कविता आहेत. या मधून संवेदनशील असे वेगळेच जाधव दिसतात. 'मावळतीच्या कविता' मध्येही (१९६६) चिंतनशीलतेने जीवनानुभवाकडे पाहणारे कविमन प्रकटले आहे.

**सर्वक्षेत्रीय समीक्षा**

त्यांच्या समीक्षेला साहित्यातील कोणतेही क्षेत्र वर्ज्य नाही. आत्तापर्यंत पस्तीसच्या पुढे त्यांचे समीक्षा ग्रंथ प्रसिद्ध झाले असून त्यात संतसाहित्यापासून मराठी कथा, कविता, कादंबरी, नाटक, निबंध इत्यादी सर्व प्रकारांच्या बरोबरच चित्रपट समीक्षेचाही अंतर्भाव आहे. 'आनंदाचा डोह' मधून (१९७३) त्यांनी संत तुकारामांच्या अभंगांची वस्तुनिष्ठ आणि कालसापेक्ष समीक्षा केली आहे. 'निळी पहाट' (१९७८), 'निळी क्षितिजे' (१९८२) यांमधून त्यांनी साठोत्तरी दलित साहित्याचा साक्षेपी वेध घेतला

> "कवित्व म्हणजे व्यक्तिधर्माची सुंदर भावप्रतिमा. मानवी संस्कृतीच्या प्रदीर्घकालीन परंपरेत व्यक्तिधर्माचे संगोपन आणि संवर्धन निर्विवादपणे व निर्णायकपणे फक्त काव्यानेच केले आहे..."
>
> [रा.ग. जाधव]

आहे. 'निळे पाणी'मध्ये वामन चोरघडे, पु. भा. भावे, अरविंद गोखले, गंगाधर गाडगीळ, पु.शि.रेगे, शंकर पाटील, बाबूराव बागूल इत्यादी भिन्न प्रकृतीच्या परंतु वाचकप्रिय कथाकारांच्या कथांची मर्मग्राही समीक्षा केली आहे. 'पंचवटी' (१९८५), 'अश्वत्थाची सळसळ' (१९८५), 'सांस्कृतिक मूल्यवेध' (१९९२), 'आधुनिक मराठी कवयित्रींची कविता' (१९९६), 'प्र.के.अत्रे साहित्यदृष्टी व साहित्यविचार' (१९९७), 'आगळीवेगळी नाट्यरूपे' (१९९८), 'वागर्थ' (२०००), 'वासंतिक पर्व' (२००९), 'निवडक समीक्षा' ही त्यांची समीक्षेतील आणखी काही पुस्तके. जाधवांची समीक्षा उपहासगर्भ नाही. ती साक्षेपी, समतोल, आस्वादक आणि प्रेरकही आहे.

२००४ साली औरंगाबाद येथे झालेल्या ७७ व्या अखिल भारतीय मराठी साहित्य संमेलनाचे अध्यक्ष म्हणून त्यांची बिनविरोध निवड झाली. त्या वेळच्या जवळपास छप्पन्न छापील पृष्ठांच्या अध्यक्षीय भाषणातील विचारांचे सर्वदूर स्वागत झाले. 'अध्यक्षीय तत्त्वचिंतन', 'ज्ञानोपासकाचा समाजधर्म' अशा शीर्षकांचे अग्रलेख मान्यवर मराठी वृत्तपत्रांतून प्रसिद्ध झाले. या भाषणात त्यांनी मराठी वाङ्मयाचा आणि भाषेचा समग्र आढावा घेतला. ते म्हणतात, 'मराठी ही ज्ञानभाषा म्हणून ज्ञानेश्वरांच्या ज्ञानेश्वरीपासूनच हळूहळू घडत आली आहे आणि घडतही राहणार आहे. आपल्या समाजातील ज्ञानोपासनेचे निकोप पर्यावरण निर्माण करीत राहणे यासाठी इष्ट ठरते. प्रा. जाधव यांच्यावर 'संमेलनाध्यक्ष प्रा. रा. ग. जाधव' हा सुमारे ४०० पेक्षा जास्त पृष्ठांचा समग्र ग्रंथ (२००४) सिद्ध झाला असून ते वैशिष्ट्य आहे. 'मराठी वाङ्मयाचा इतिहास खंड', ७ (२००९) आणि 'निवडक साधना', खंड ८ (२००७) याचे ते संपादक आहेत.

– मधू नेने

**संदर्भ :**


१. *'भारूड' स्मरणिका, २००४.*

२. *औरंगाबाद संमेलन अध्यक्षीय भाषण, औरंगाबाद ७७ वे अखिल भारतीय मराठी साहित्य संमेलन, २००४.*


## जामकर, मधू

***जोशी, मधुकर सीताराम***

**कवी**

**५ एप्रिल १९४२**



गुरुवर्य कुरुंदकर ज्या गावी जन्मले त्याच कन्हेरगाव, (जि. परभणी) आता जिल्हा हिंगोली येथे मधुकर सीताराम जोशी ह्यांचा जन्म झाला. पुढे त्यांनी मधु जामकर हे नाव धारण केले. हैद्राबादच्या उस्मानिया विद्यापीठाच्या एम. ए. (मराठी) परीक्षेत १९६६ साली प्रथम क्रमांकाने उत्तीर्ण होताना कै. ना. गो. नांदापूरकर सुवर्ण पदकाचे ते पहिले मानकरी ठरले. शिक्षण घेत असतानाच विवेकवर्धिनी प्रशालेत १९६१ ते १९६७ या काळात अध्यापक म्हणून काम केले. त्यानंतर एक वर्ष मराठवाडा विद्यापीठात संशोधक साहाय्यक राहिल्यानंतर १९६९ ते २००२ (निवृत्तीपर्यंत) सलग ३३ वर्षे परळी वैजनाथ येथील वैद्यनाथ महाविद्यालयात मराठी

विभाग प्रमुख या नात्याने अध्यापन केले. महाराष्ट्रातील गेल्या पिढीतील चतुरस्र विचारवंत नरहर कुरुंदकर यांचे शिष्यत्व बाळगल्याचा अभिमान मनात जागविणारे अनेक जण आहेत. मात्र स्वतः कुरुंदकरांनी ज्यांच्यावर शिष्यवत प्रेम केले, असे जे मोजके साहित्यिक आहेत, त्यांच्यापैकी एक प्रमुख नाव आहे प्रा. मधु जामकर. कुरुंदकरांप्रमाणेच ना. गो. नांदापूरकर, प्राचार्य राम शेवाळकर, कवी बी. रघुनाथ, दाजी पणशीकर आदी अनेक ज्येष्ठ साहित्यिकांचा सुहृद सहवास जामकरांना लाभला आहे.

‘क्षितिजा’ हा जामकरांचा पहिला काव्यसंग्रह आहे. त्यानंतर कविता, ललित लेख, समीक्षा, व्यक्तिचित्रण इत्यादी साहित्य प्रकारातील १७ पुस्तके आजवर प्रकाशित झाली आहेत. याशिवाय आकाशवाणीच्या विविध केंद्रांवरून कवितावाचन, विविध दिवाळी अंकांमधून तसेच वाङ्मयविषयक नियतकालिकांतून नियमित लेखन आणि संत साहित्यासह विविध विषयांवर महाराष्ट्राच्या सर्व भागांतील व्याख्यानमालांमध्ये व्याख्याने असे साहित्यिक कर्तृत्व जामकरांच्या गाठीशी आहे. महाराष्ट्र शासनाचा उत्कृष्ट वाङ्मय निर्मितीचा पुरस्कार, बेळगावचा (शब्दगंध) प्रथम काव्य समीक्षा पुरस्कार, पुणे नगर वाचन मंदिराचा कै. श्री. ज. जोशी पुरस्कार, कै. भालचंद्र कहाळेकर समीक्षा पुरस्कार, समाजभूषण पुरस्कार, अशा अनेक पुरस्कारांचे ते मानकरी ठरले. १९८४ साली अंबाजोगाई येथे झालेल्या अखिल भारतीय मराठी साहित्य संमेलनाचे कार्यवाह म्हणून काम केले.

जामकर निवृत्तीनंतरही वाङ्मयीन चळवळीत कार्यरत आहेत. समरसता साहित्य परिषद या संस्थेचे ते महाराष्ट्र प्रदेशाचे उपाध्यक्ष म्हणून कार्यरत आहेत.

– अरुण करमरकर

## जावडेकर, सुबोध प्रभाकर

**विज्ञान कथाकार**

**१६ सप्टेंबर १९४८**

सुबोध जावडेकर यांचा जन्म मुंबई येथे झाला. प्राथमिक शिक्षण इस्लामपूर नवीन मराठी शाळा, हायस्कूल येथे



झाले. मॅट्रिक शिक्षण चिकुर्डे, ता. वाळवे येथे झाले. त्यांचे महाविद्यालयीन शिक्षण बी. टेक. केमिकल इंजिनिअरिंग आय. आय. टी. मुंबई येथे झाले. १९७० मध्ये ते वसुधा पंडित यांच्याशी विवाहबद्ध झाले.

जेकॉब्ज इंजिनिअरिंग, इंडिया ह्या इंजिनिअरिंग कन्सल्टन्सी कंपनीत नोकरी करून ते निवृत्त झाले. आज विज्ञानकथा लिहिणाऱ्या लेखकांमध्ये सुबोध जावडेकर हे प्रमुख नाव घेतले जाते. कोणत्याही साहित्यात शेवटी स्वतःचा शोध प्रमुख असतो. फक्त परिस्थितीनुसार विचारव्यूह बदलतात. आजची विज्ञानकथा मुख्य प्रवाहात मिसळून जाण्याची शक्यता, जावडेकर अजमावून पाहतात. याबरोबरच औद्योगिक क्षेत्रातील अन्य कथाही त्यांनी लिहिल्या आहेत. जावडेकरांच्या विज्ञानकथांचा रोख अखेर माणसामाणसांमधील नातेसंबंधांवर अवलंबून असतो.

‘गुगली’ हा त्यांचा पहिला कथासंग्रह १९९१ साली प्रसिद्ध झाला. ‘वामनाचे चौथे पाऊल’ विज्ञानकथासंग्रह (१९९४) तर ‘आकांत’ ही भोपाळ दुर्घटनेवर आधारित कादंबरी (१९८८) ग्रंथालीने प्रकाशित केली.

‘हसरं विज्ञान’ हा विज्ञानावर विनोदी अंगाने लिहिलेला ललित लेखसंग्रह; ही त्यांची प्रमुख पुस्तके होत. ‘प्लॅस्टिक’ या विषयावर माहितीपूर्ण चार पुस्तके लिहिली. त्यांनी मोजकेच लेखन केले आहे. त्यांचे लेखन नेटके व संयत असते. विज्ञानावर लेखन असूनही शैली ललित अंगाने जाते, त्यामुळे वाचताना औत्सुक्य वाटत राहते. जीवनातील भावपूर्ण नाट्यात्मतेचे त्यांना भान आहे. शिवाय त्याला नर्म विनोदाचा एक हलकासा अंतःस्तर असतो. त्यामुळे वाङ्मय क्रीडेसारखा एक पुसटसा आनंद ते वाचकांना मिळवून देतात व त्यातूनच ते जीवनविषयक प्रश्न वाचकांच्या मनात उभे करून वाचकांना विचार करण्यास उद्युक्त करतात. ‘संगणकाची

सावली' (१९९७), 'विज्ञानाच्या नव्या वाटा' (१९९२), 'विज्ञानाची नवी क्षितिजे' (१९९२), 'आकाशभाकिते' (२०००) ही त्यांनी लिहिलेली आणखी काही पुस्तके आहेत. त्यांच्या कथांमध्ये यंत्रामुळे येणाऱ्या परात्मतेचे भान आहे. संगणकाच्या आणि यंत्रमानवाच्या ताब्यात गेले की कामात गणिती बिनचूकपणा येतो. त्यामुळे अपूर्णतेमधील अनपेक्षित गंमत हरवते. याबद्दल कधीकधी ते खंतही व्यक्त करतात. त्यांच्या दोन पुस्तकांना राज्य शासनाची पारितोषिके मिळाली, तसेच कथासंग्रहास केशवराव कोठावळे पुरस्कार मिळाला. 'आकांत' कादंबरीचा मल्याळममध्ये अनुवाद झाला. पंचवीस कथांचे अनुवाद इंग्रजी, उर्दू, कन्नड, मल्याळम, बंगाली, इटालियन, स्पॅनिश इत्यादी भाषांमध्ये झाले. विविध पाठ्यपुस्तकांतून, अभ्यासक्रमांतून त्यांच्या लेखांची व कथांची निवड झाली आहे.

त्यांच्या लेखनात हेवेदावे, अहंकार अशा पातळीवर वावरणारी माणसे, एका विशिष्ट क्षणी साक्षात्कार व्हावा तशी अंतरीच्या प्रकाशाने उजळून निघतात. जावडेकरांना मानवी जीवन, त्यातली धडपड यांतली वैय्यर्थता कळून आहे हे जाणवते.

– रागिणी पुंडलिक

**संदर्भ :**


१. *जावडेकर सुबोध; 'आय आय टी चे दिवस'; आर्तनाद दिवाळी २००१.*

२. *जावडेकर सुबोध; 'विझवून दीप सारे चाललो मी निजाया'; यक्ष; दिवाळी २००२.*

३. *घारे दीपक; 'दशकातील साहित्यिक'; ललित; जुलै २०००.*


## जी. ए. कुलकर्णी

***कुलकर्णी, गुरुनाथ आबाजी***

**कथाकार**

**१० जुलै १९२३ – ११ डिसेंबर १९८७**

गुरुनाथ आबाजी कुलकर्णी यांचा जन्म बेळगाव मुक्कामी झाला. त्यांचे वडील कोर्टात कारकून होते. जी. ए. लहान



असतानाच ते वारले. जी. ए. शाळेत जाऊ लागल्यानंतर त्यांच्या आईचेही निधन झाले. बहिणीदेखील अकाली वारल्या. त्यांचे अंतःकरण विदीर्ण झाले. त्यांना भाऊ नव्हता, ते स्वतः अविवाहित राहिले. आपल्या मावशीच्या (सोनू मावशी) कुटुंबावर त्यांचा फार जीव होता. तिच्या मृत्यूनंतर तिच्या नंदा व प्रभावती या दोन मुलींचा संभाळ जी.एं.नी केला. शाळकरी वयात ते आपल्या श्री. पु. मामाकडे बेळगावातच राहत.

१९३९ साली ते मॅट्रिकची परीक्षा उत्तीर्ण झाले आणि इंग्रजी विषय घेऊन त्यांनी लिंगराज महाविद्यालयात प्रवेश घेतला. बी. ए. झाल्यांनतर पदव्युत्तर शिक्षण इंग्रजी विषय घेऊनच चालू ठेवले व एम. ए. झाले. नंतर काही काळ ते मुंबईस सरकारी कचेरीत नोकरी करत होते. १९४७ला ते बेळगावला परत आले आणि एका हायस्कूलमध्ये शिक्षकाची नोकरी स्वीकारली. नंतर त्यांनी कुमठा, विजापूर येथे प्राध्यापक म्हणून काम केले आणि नंतर धारवाडला जनता शिक्षण संस्थेच्या महाविद्यालयात त्यांनी इंग्रजी विषयाचे प्राध्यापक, विभाग प्रमुख व वसतिगृह प्रमुख म्हणून १९५० पासून १९७९ पर्यंत काम केले. उच्च शिक्षणासाठी परदेशात जाण्याची संधी त्यांना देण्यात आली होती. पण भगिनी प्रभावती गंभीर आजारी झाल्याने ही संधी त्यांना स्वीकारता आली नाही. ते धूम्रपान करीत. त्यांना खमंग सामीष भोजन आवडत असे. पत्त्यांचा रमी हा डाव त्यांना अत्यंत प्रिय होता. इंग्रजी चित्रपट पाहण्याचा व बागकाम करण्याचा, त्यांना छंद होता. त्यांचे वाचन अफाट होते. पाश्चात्त्य लेखकांची दुर्मीळ पुस्तके ते प्रयासाने मिळवून वाचत. अनेक ग्रंथालयांचे ते सदस्य होते. चित्रकला, संगीत या कलांत ते रस घेत. ब्रिटिश काळात स्थापन झालेल्या धारवाड जिमखान्याचे ते निष्ठावंत सदस्य होते. इंग्रज गृहस्थासारखे त्यांचे वागणे होते. ते अलिप्तपणे वावरत.

त्यांची विनोदबुद्धी वैशिष्ट्यपूर्ण होती. १९८५ साली ते पुण्यास बहिणीकडे राहावयास गेले. त्या अगोदर दोन वर्षे ते पोटदुखीने आजारी होते. जुजबी औषधोपचार घेत होते, पण फार खर्चीक उपचार आपल्याला परवडणार नाहीत असे त्यांना वाटे. या संदर्भात मित्रांचे साहाय्य घ्यायचे नाही, असे त्यांनी ठरविले होते. प्रभावतीवर ते सर्वस्वी अवलंबून होते. आपले ओझे कुणावर टाकावे, याचा ते निग्रहाने विरोध करत होते. पुणे मुक्कामी वयाच्या ६३व्या वर्षी ११ डिसेंबर १९८७ मध्ये त्यांचे निधन झाले.

जी.एं.चे अकरा कथासंग्रह, इंग्रजीतून मराठीत अनुवादीत केलेली बारा पुस्तके आणि मनमोकळ्या आठवणींचे एक पुस्तक, इंग्रजी-मराठी भाषेत मित्रांना, परिचितांना, साहित्यिकांना लिहिलेली शेकडो पत्रे; ती मौज प्रकाशनाने चार खंडांत प्रसिद्ध केली आहेत. मुलांना सांगितलेल्या कथांचे दोन संग्रह, त्यांच्या लेखनावरची समीक्षेची चौदा पुस्तके प्रसिद्ध आहेत. पदव्युत्तर स्तरावर त्यांच्या कथांचा अभ्यास झालेला आहे.

पुरातन संस्कृतीचा त्यांनी अभ्यास केला होता. इजिप्त व दक्षिण अमेरिकन संस्कृतीबद्दल त्यांना अधिक कुतूहल होते. तसेच रिचर्ड बर्टनबद्दलही होते. असांकेतिक, अनोख्या, आक्षेपार्ह मानवी व्यवहारासंबंधी त्यांना प्रचंड कुतूहल होते, काहीसे अनैसर्गिकदेखील. त्याचप्रमाणे काही अमानुष सिद्धी, शक्ती साध्य करण्यासाठी जी साधना काही माणसे गुप्तपणे करतात, तिची माहिती मिळवणे हादेखील त्यांच्या कुतूहलाचा भाग होता. ही माहिती त्यांचा महाविद्यालयामधला गडी तिरकाप्पा त्यांना देत असे. कर्नाटकाच्या काही भागात जारणमारण ही अघोरी विद्या आजमितीसदेखील प्रचलित आहे. जी.एं.च्या 'अंजन', 'तळपट' यांसारख्या कथा त्याचे स्मरण देतात. पारंपरिक धर्माचरण, अध्यात्म यावर जी.एं.चा विश्वास नव्हता. धार्मिक ग्रंथांचा उल्लेख त्यांच्या कथांत आढळत नाही. उलट अंधश्रद्धेतून क्रौर्यच निर्माण होते, असे त्यांची 'अमांसी'सारखी कथा सुचवते. आपल्या प्रभावती या बहिणीला मात्र ते मंदिराकडे नेत असत. रक्ताचे नातेसंबंध मात्र त्यांनी धार्मिक निष्ठेने जपले होते. त्यांची 'स्वामी'सारखी कथा मात्र लोकविलक्षण आध्यात्मिक अनुभूतीचे दर्शन घडविते. पुनर्जन्मावर त्यांचा कदाचित विश्वास असावा, असे 'पुनरपि' या कथेवरून ध्यानात येते. आदिम संस्कृतीतल्या माणसाचे अनुभव आणि व्यवहार अभ्यासले, तर या संदर्भातील काही सत्य कदाचित हाती लागेल असे काही वेळा त्यांना वाटत असावे. पण तोही एक भ्रमच अशीही त्यांची धारणा होती. ज्याला नियती म्हटले जाते, तीच माणसांची आयुष्ये निर्धारित करते; हा सारा कळसूत्राचा खेळ आहे. लौकिक अर्थाने याला योगायोग म्हटले जाते, पण हे नियतिदानच होय.



जी.एं.च्या कथांना महाकाव्याची प्रतिष्ठा आणि व्याप्ती आहे, असे काही समीक्षकांना वाटते; तर काही दुसऱ्या समीक्षकांना त्यांनी कथेसारख्या दुय्यम दर्जाच्या वाङ्मय प्रकारात गुंतून न पडता कादंबरीकडे वळायला हवे होते असे वाटते. याबद्दल स्वतः जी.ए. यांनी एक महत्त्वाचा लेख लिहिला. त्यात ते म्हणतात, ''मी केवळ कथा लिहिल्या, कारण हा साहित्य प्रकार मला आव्हानात्मक वाटतो. कथा-लेखन हा कादंबरी-लेखनासाठी केलेला रियाज आहे, असे समजण्यात येते. अनेक कथाकारांच्या कर्तृत्वाचा विचार केला, तर हा समज गैर ठरतो. कथेला प्रतिष्ठा प्राप्त झाली आहे. लघुकथेच्या लघुत्वामुळे ती लघुकथा बनत नाही. ती दीर्घ होऊ शकते. तिच्या अंतर्गत लहानमोठी वर्तुळे आणि तिरप्या तिरकस रेषा असू शकतात आणि तरी कोळ्याने विणलेल्या जाळ्याला जसा केंद्रबिंदू असतो, त्याचप्रमाणे लघुकथेलाही एक सेंद्रिय स्वरूपाचे केंद्र असते. नदीचा उगम आणि अंत निश्चित झाले की मध्यंतरी ती कुठेही वाहू शकते. प्रवाहाची गती वाढते, कमी होते, रंगही बदलतो, चिंतनमग्न होतो, स्थिरावतो. कादंबरी नदीप्रमाणे विशाल होते. पण लघुकथेलाही एक झगमगणारा केंद्रबिंदू असतो. त्यामुळे तिची जडणघडण स्पष्ट होते. याचा अर्थ असा नव्हे की, लघुकथा हा कादंबरीपेक्षा श्रेष्ठ साहित्य प्रकार आहे. लघुकथेची प्रतिज्ञा आणि स्वरूप वेगळे

असते. केवळ रंजन करणे लघुकथेचे प्रयोजन असत नाही. हे अगदी मामुली प्रयोजन होय. त्यापेक्षा गहिरे असे प्रयोजन लघुकथा मानते. स्थलकाळात असणारी मानवी आयुष्याची सुख-दुःखे आणि त्यांच्या तळाशी असणारे अविनाशी सत्य त्याचे दर्शन घडवण्याचा, वेध घेण्याचा प्रयत्न गंभीर प्रकृतीचा कथाकार करीत असतो.'



जी.एं.नी चार प्रकारच्या कथा लिहिल्या १) पारंपरिक पद्धतीच्या कौटुंबिक कथा ज्यांचा दुःखान्त शेवट असतो. २) मानवी व्यवहारात काही घटना व संघर्ष मूलभूत स्वरूपाचे असतात, त्यांच्या कथा. ३) आधुनिक काळाशी संदर्भित रूपक कथा अगर बोधकथा. ४) ग्रीक अगर पाश्चिमात्य साहित्यातील गाजलेल्या कथांचा आधुनिक काळाशी सुसंगत अर्थ व्यक्त करणाऱ्या कथा.

'माणूस नावाचा बेटा' या कथेमुळे जी.एं.नी वाचकांचे लक्ष वेधून घेतले. जी.एं.चे कथामन समजून घेण्यासाठी ही कथा बीजभूत आहे. त्यांचे चिंतन, वाचन व त्यांची प्रकृती हे सारे त्यांनी या कथेत भरभरून ओतले आहे.

इंजिनिअर होण्याची आकांक्षा धरणारा दत्तू एका बुरसट शाळेत शिक्षक म्हणून चिकटतो. आपल्या सभोवती पसरलेल्या ढिगातून अर्थ शोधण्याचा प्रयत्न करतो. चारचौघांसारखा सकल संसार त्याला नको होता. त्याच्या समोरची कार्टी मोठी होणार होती. आपल्यासारखी पोरं जगावर सोडणार होती, या साऱ्यांना टचाटचा चिरडून टाकावे असे दत्तूला वाटले. त्यांपैकी दोघा-तिघांनाच आपण रंगून शिकवलेली 'औदुंबर' ही कविता कळणार, बाकी सारे काडेचिराहीत -

शाळेच्या जंजाळातून बाहेर पडून दत्तू संध्याकाळच्या तरल पिवळ्या प्रकाशात उतरला आणि सुखद अलिप्ततेची छाया त्याच्या मनावर पसरली. तो विचार करू लागला, काय आहे हे? आणि हे पाहत असलेला दत्तू तरी कोण? तो हे पाहत आहे हे कुणीतरी पाहत आहे, आणि तो हे पाहत आहे, हे कुणीतरी पाहत आहे हे पाहणारे आणखी कुणी- पण ही त्याची भावना फार वेळ टिकली नाही. वाऱ्याने दूर गेलेले ओलसर वस्त्र पुन्हा येऊन अंगाला चिकटावे, तसे त्याचे सारे जीवन त्याला चिकटले. त्या गुंतवळ्यात तो सापडला. हॉटेलात बकाबका खाणाऱ्या लोकांकडे पाहून त्याला वाटले काय साम्य आहे आपल्यात आणि त्यांच्यात, निवळ ऐंद्रिय आवडीनिवडीतही सारखेपणा नाही. एक जण थुलथुलीत ढिसाळ बाईकडे पाहून विरघळतो, तर दुसऱ्याला तिच्यामुळे वैराग्य वाटू लागते.

आपल्याकडील थोर माणसांची चरित्रे म्हणजे नुसती रद्दी. जिवंत माणसांचा साक्षात्कार त्यात नाही. निवळ वासनेचे शरीर कधीच जळले नाही. रागाच्या भरात शब्द गेल्याने अगदी जिव्हाळ्याच्या जागी कधी जखम झाली नाही, वा पश्चात्तापाने मन कधी कुरतडले गेले नाही. कधी मोहाने, कधी महत्त्वाकांक्षेने कुणाचा तरी विश्वासघात करून आयुष्यभर वणवण करण्याची कुणावर पाळी आली नाही. आपली चरित्रे म्हणजे वाङ्मयात मांडून ठेवलेली एकसाची सहस्रलिंगे. त्यात कानकाप्या व्हनगॉग, जुगारी डोस्टोव्हस्की, लिंगपिसाट मोपसाँ आहेत कोठे? आपल्या जीवनावर विलासाची कळा कधी आलीच नाही.

दत्तूला दिसत होते की, एकट्याची या जगात फसवणूक चाललेली असते. फर्स्ट क्लास म्हणून दिलेले कलिंगड ॲनिमिया झालेले निघते. कुठले तरी पदक मिळालेला राष्ट्रीय चित्रपट भिकार, शेंबडा ठरतो. तासापूर्वी आणलेला बल्ब लावताच पटकन खल्लास होतो. भारतीचा ताप उतरेल म्हणून ऐटीत डॉक्टर सांगतात व नंतर पंधरा दिवसांतच तिचे डोळे मिटतात. खेळायला म्हणून दिलेले आठ आण्याचे नाणे तिच्या मुठीत तसेच असते. सगळीकडून फसवणूक, फसणारा मात्र एकटा.

खरेच माणसाची आयुष्ये म्हणजे पिसलेले पत्ते, त्यातून आकृती तरी काय काढायची? एखादी वेडी पतीच्या मृत्यूने छातीत सुरी खुपसून घेते तर दुसरी चेंगरलेल्या स्तनांमध्ये लॉकेट रुतवून घेते. एक जण तारुण्याच्या आठवणीवर आयुष्याला धार लावीत बसतो तर दुसरा पत्नीच्या मृत्यूनंतर १४व्या दिवशी बोहल्यावर चढतो. मालकंसाचा भव्य विस्तार, मोटरखालची

जी. ए. कुलकर्णी
जनता कॉलेज,
धारवाड.

प्रिय केळकर, ता. ७/२/६०

आपण (निळासांवळाचे परीक्षण असलेला) पाठवलेला प्रजासत्ताक अंक मिळाला. परीक्षण अतिशय Generous आहे, व त्याबद्दल मी "श. म. शास्त्री"चा फार आभारी आहे. विशेषतः त्यांनी कोरीव लेण्याची जी उपमा वापरली, ती मला आवडली. कारण माझ्या कथा अत्यंत यशस्वी तऱ्हेने कोरीव लेण्यांप्रमाणे झाल्या आहेत म्हणून नव्हे, तर माझा तसा प्रयत्न मुद्दाम आहे म्हणून. भावना किंवा चित्र खांबावर कोरलेल्या पद्मचित्राप्रमाणे स्पष्ट, उठावदार, व हात फिरवल्यावर हाताला जिवंत लागावे, ही एक माझी इच्छा. विजयनगरची जुनी राजधानी हंपी येथे एक स्थावर, जो भाग कुणाला दिसणारही नाही अशा जागी एक छोटी मण्यांची माळ कोरली आहे. तो भाग मोकळाच ठेवली असती तर कुणाच्या ध्यानातही आले नसते. पण जणू लोकच भाग दर्शनी असल्याप्रमाणे त्या अज्ञात कलाकाराने मण्यांवरील वळण न वळण आत्मीयतेने पूर्ण केले आहे! हे मला अत्यंत आकर्षक वाटले. यामुळेच माझ्यांत दिसणारा प्रतिभेचा अतिरिक्त सोस. त्यामुळे टीकाकारांकडून मी खात असलेला मार, व आणि खासगी आनंद सांगू? यामुळेच लेखनातील आनंद!)

आपला
जी. ए. कुलकर्णी

कुणाला मिळावेत यासाठी कवड्या खुळखुळाविणारे पहारेकरी ही सारी माणसेच! या साऱ्याच बिंदूंना घेऊन जाणारे वर्तुळ ते कोणते? सगळा आंधळा सिक्वेन्स न देणारा वेडा डाव! आपण सारेच एक अनिवार्य शिक्षा भोगणारे गुन्हेगार आहोत. सगळा नुसता वांझोट्या, म्हाताऱ्या प्रश्नांचा जनानखाना, त्यात त्याचे दुबळे मन कचुंकीप्रमाणे निष्फळ हिंडत असे. या सगळ्याचा निर्माता एखाद्या क्षुद्र आयुष्यात डोकावितो, माणसाच्या खऱ्याखोट्या गोष्टी नोंदून घेतो व त्याप्रमाणे शिक्षा, बक्षिसे वाटत बसतो! यावर आपले नीती, धर्म आधारलेले. सगळीकडे नुसता शून्यांचा बुजबुजाट. अर्थ असलेला आकडा कुठेतरी लपून राहतो आणि आपल्या स्पंदनाने शून्याचे बुडबुडे उडवून फोडीत बसतो. असल्या अर्थशून्य जीवनात साफल्य शोधायचे कुठे? हा जी. एं.च्या कथांतील नियतीवाद व शून्यार्थ!



किंकाळी, बाळंत होत असतानाचा आक्रोश, विमान हल्ल्याचा मन फाडणारा आवाज, प्रेत बाहेर नेत असतानाची कालवाकालव हे सारे जीवनाचे भागच आणि ती भोगणारी सारी माणसेच. बेलसेनमध्ये कैद्यांना जाळणारी माणसेच आणि हिरोशिमामध्ये अपंग झालेली हजारो माणसेच व तो प्रसंग त्यांच्यावर आणणारीही! आपले मांस कपोतांना देणारा शिबी आणि नररुंडांचा गोपूर रचणारा तैमूर, क्रूसावर हातापायांत खिळे ठोकल्यावर वेदनेने 'देवा त्यांना क्षमा कर!' असे उद्‌गार काढणारा ख्रिस्त आणि त्याच क्रूसाखाली त्याचे कपडे

'निळासावळा' (१९५९), 'पारवा' (१९६०), 'हिरवे रावे' (१९६२), 'रक्तचंदन' (१९६६), 'काजळमाया' (१९७२), 'सांज शकून' (१९७५), 'रमलखुणा' (१९७५), 'पिंगळावेळ' (१९७७), 'कुसुमगुंजा' (१९८९), 'आकाशफुले' (१९९०), 'सोनपावलं' (१९९१), 'बखर किमची' (१९८६), 'मुग्धाची रंगीत गोष्ट' (१९८६), 'माणसे आरभाट आणि चिल्लर' (मृत्यूनंतर प्रसिद्ध झाले) हे जी. एं.चे कथासंग्रह व इतर पुस्तके होत.

जी. एं. ना आपल्या मित्रांना, चाहत्यांना पत्रे लिहिण्याचा अनिवार छंद होता. ते त्यांचे सिगरेटसारखे व्यसनच होते. त्यांच्या देहावसानानंतर त्यांच्या या

प्रचंड पत्रव्यवहाराचे जतन करावे व तो रसिकांसाठी व अभ्यासकांसाठी उपलब्ध करून द्यावा या हेतूने कै. पु. ल. देशपांडे, सौ. सुनीता देशपांडे, श्री. श्री. पु. भागवत, श्री. रामदास भटकळ व प्रा. म. द. हातकणंगलेकर यांची एक समिती स्थापन झाली. ज्या लेखक, वाचक, प्रकाशक यांच्याकडे जी. एं. ची पत्रे असतील आणि ज्यांना या कामाचे महत्त्व पटले असेल, त्यांनी आपल्याकडील पत्रे प्रसिद्धीसाठी समितीकडे पाठवावीत असे समितीने आवाहन केले. त्यानुसार अनेक पत्रे जमली. त्यात सुनीताबाई, श्री. पु., माधव आचवल, ग्रेस आणि अन्य मित्र म. द. हातकणंगलेकर, जयवंत दळवी यांना लिहिलेली पत्रे होती. या पत्रांचे चार खंड प्रसिद्ध झाले आहेत. ते श्री. पु. भागवत, म. द. हातकणंगलेकर, सुरेश चुनेकर, विजय पाडळकर यांनी संपादित केले. जी. ए. जनसंपर्कापासून, साहित्यिक मंडळांपासून, मित्रांच्या मेळाव्यांपासून दूरच राहिले. त्यामुळे साहित्यिक जगातल्या सांकेतिक मानसन्मानांपासून ते दूरच राहिले. दोन सन्मान त्यांना मिळाले. एक इचलकरंजीच्या 'फाय फाउंडेशन'चा व दुसरा 'साहित्य अकादमीचा'. अकादमीचे पारितोषिक त्यांना त्यांच्या 'काजळमाया' या कथासंग्रहाला मिळाले. ते त्यांनी स्वीकारले पण दुर्दैवाने ते त्यांना काही तांत्रिक कारणासाठी परत करावे लागले.

आधुनिक मराठी लघुकथेच्या क्षेत्रात जी. ए. यांनी कथाकार म्हणून अतुलनीय निर्मिती केली आहे. कै. गंगाधर गाडगीळ या मराठी नवकथेच्या प्रणेत्याला मान्य नव्हते. जी. ए. कुलकर्णी हे प्रतिभावंत कथाकार होते, पण ते भोवऱ्यात सापडलेले प्रतिभावंत होते, असे त्यांनी म्हटले होते. जी. ए. कुलकर्णी हे हर तऱ्हतऱ्हेच्या सतरंज्या तयार करून बाजार काबीज करण्याची ईर्षा बाळगणारे लोकप्रिय कथाकार नव्हते. तर मंद दिव्याच्या प्रकाशात एकेक टाका घालून अभिजात गुणवत्तेचे गालिचे विणणारे कलावंत होते. या गालिच्यांचे मूल्य कालातीत असते. विशिष्ट कालखंडातच गाजावाजा होऊन विसरले जाणारे नव्हते. त्यामुळे अनेक समीक्षकांनी व अभ्यासकांनी त्यांच्या कथेचे विश्लेषण व गुणगान करण्यात धन्यता मानली. डॉ. द. भि. कुलकर्णी, त्र्यं. वि. सरदेशमुख, एस. डी. इनामदार, प्रा. रा. ग. जाधव, डॉ. सं. त्र्या. कुल्ली., म. द. हातकणंगलेकर, धों. व. देशपांडे, माधव आचवल, पंडित आवळीकर, धनंजय आचार्य आणि अन्य वाचक-अभ्यासक यांनी जी. एं. च्या कथांवर अनेक अंगांनी आपला अभ्यास, रसग्रहणे मांडली. त्यांच्या देहावसनानंतर जी. ए. भक्तांची अनेक मंडळे ठिकठिकाणी स्थापन झाली. त्यांची जयंती आणि मयंती भक्तिभावाने साजरी होते.

– म. द. हातकणंगलेकर

**संदर्भ :**


*१. चितमपल्ली मारुती; 'जी. ए.', हंस दिवाळी, १९८८.*

*२. देशपांडे सुनिती; 'सप्रेम नमस्कार'; हंस दिवाळी, १९८८.*

*३. भटकळ रामदास; 'जी. ए. एक ओळख'; अक्षर दिवाळी, १९८७.*

*४. अवचट सुभाष; 'जी. ए. एक पोर्ट्रेट'; मौज प्रकाशन, १९८८.*


## जोग, रामचंद्र श्रीपाद

**समीक्षक, कवी**

**१५ मे १९०३ – २१ फेब्रुवारी १९७७**



रामचंद्र श्रीपाद जोग यांचा जन्म गडहिंग्लज (जिल्हा कोल्हापूर) येथे झाला. शालेय व महाविद्यालयीन शिक्षण पुणे येथे संपन्न झाले. तर एम.ए.ची पदवी मुंबई विद्यापीठातून प्राप्त झाली. साहित्य सेवेला काव्य-लेखनाने प्रारंभ झाला. सुरुवातीला 'निशिगंध' या नावाने त्यांनी काव्य रचना केली. 'ज्योत्स्नागीत' (१९२६), 'निशागीत' (१९२८), 'साराच वेडेपणा' हे त्यांचे कवितासंग्रह प्रसिद्ध आहेत.

जोगांचा खरा परिचय साहित्यक्षेत्राला झाला तो त्यांच्या 'अभिनव काव्यप्रकाश' (१९३०) या ग्रंथामुळे होय. या ग्रंथात जोगांनी इंग्रजी साहित्य, इंग्रजी साहित्यशास्त्र व मानसशास्त्र यांची जोड देऊन जुन्या संस्कृत-साहित्यशास्त्राचे संस्करण केले व अर्वाचीन वाङ्मयनिर्मितीच्या रसग्रहणाला आणि मूल्यमापनाला समर्थ ठरेल अशी अभिनवता साहित्य-विचाराला प्रदान केली. या ग्रंथामुळे मराठी साहित्य विचाराचा पाया घातला गेला. संस्कृत आणि पाश्चिमात्त्य साहित्यशास्त्राचे मंथन करताना जोगांनी कसल्याही प्रकारचा अभिनिवेश न बाळगता, समतोल दृष्टी ठेवून निष्कर्ष काढले. त्यामुळेच चिकित्सेनंतर योग्य म्हणून 'वाक्यं रसात्मकं काव्यं' हे विश्वनाथाने केलेले काव्यलक्षण किंवा 'ल्हादैकमयता' हे मम्मटाने मानलेले काव्यप्रयोजन यांचा त्यांनी स्वीकार केला. रससंकल्पनेचा जोरदार पुरस्कार करताना, रससंख्येच्या बाबतीत आग्रह धरणे मात्र त्यांनी अनाठायी ठरविले. संस्कृत साहित्यशास्त्राचा प्रगाढ व्यासंग असतानाही त्यात सारे काही आहे, असा हट्टाग्रह त्यांनी कधी बाळगला नाही.

जुन्या काव्यशास्त्राचे अवगाहन करताना, साहित्य आणि ललित कला यांच्यामधील भर्तृहरी, दंडी, अभिनवगुप्त यांसारख्या विद्वानांच्या ध्यानी आली असली, तरी साहित्य आणि ललित कला यांचा एकत्र असा सर्वांगीण विचार आपल्याकडे अजून झालेला नाही, ही जाणीव जोगांना झाली. त्यातूनच 'सौंदर्यशोध आणि आनंदबोध' हा त्यांचा ग्रंथ सिद्ध झाला. 'ललित वाङ्मय अथवा साहित्य ही एक ललित कला आहे. इतर ललित कलांचा आद्य हेतू ज्याप्रमाणे सौंदर्यशोधन, सौंदर्यदर्शन व सौंदर्यवर्णन असा आहे, तसाच तो साहित्याचाही आहे. इतर ललित कलांमधून जे काही सौंदर्यविषयक सामान्य सिद्धान्त प्रत्ययास येतात, तेच साहित्य-कलेमध्येही या ना त्या स्वरूपात दिसून येतात.' असे अर्वाचीन साहित्यशास्त्राला मान्य असलेले प्रतिपादन त्यांनी या ग्रंथातून केले आहे. त्यांच्या विचारामध्ये सौंदर्यसाधनेला अग्रस्थान आहे. सत्य आणि शिव या मूल्यांचा विचार सौंदर्योपासनेच्या संदर्भातच केला पाहिजे, असे आग्रही मत त्यांनी मांडले. 'वाङ्मयामध्ये आरुष बोलांपेक्षा आणि उघड्यानागड्या अभिव्यक्तीपेक्षा रसिक अक्षरांना मी अधिक महत्त्व देतो हे कबूल केलेच पाहिजे,' असे म्हणून 'सत्यं ब्रुयात ललितं ब्रुयात' या भूमिकेचा त्यांनी पुरस्कार केला. कलेचे स्वातंत्र्य मान्य करून खरा काव्यानंद निःस्वार्थ, अपार्थिव व म्हणून उदात्त स्वरूपाचा असतो आणि त्याकरताच या आनंदाचा आस्वाद घेतला पाहिजे; असे त्यांनी निःसंदिग्धपणे सांगितले.

'काव्यविभ्रम' (१९५१) या ग्रंथातील अलंकारावरील त्यांचे विवेचन स्वतंत्र प्रज्ञेचे द्योतक आहे. त्यांनी अलंकारांना काव्यशरीरावरील उपरे, बाह्यपदार्थ न मानता काव्यशरीरावरचे ते विभ्रम कसे आहेत, ते सप्रमाण पटवून दिले. 'मराठी वाङ्मयाभिरुचीचे विहंगमावलोकन' (१९५९) या त्यांच्या व्याख्यानमालेत त्यांनी सहाशे-सातशे वर्षांतील मराठी वाङ्मयाचे विहंगमावलोकन केले. त्यात संस्कृत काव्यशास्त्राला अभिप्रेत असलेल्या औचित्यविचाराचा दंडक त्यांनी वापरला. 'वाङ्मयात मी रसाला महत्त्व देतो व त्याबद्दलचा ज्ञानेश्वरकाळातील आग्रह पुढील काळात सुटला म्हणून वाङ्मयाभिरुचीची पदवी खाली आली' असा निष्कर्ष त्यांनी मांडला. 'अर्वाचीन मराठी काव्य' (१९४६), 'केशवसुत काव्यदर्शन' (१९४७), 'चर्वणा' (१९६०), 'मराठी कविता' (१९४५-१९६०), 'दक्षिणा' (१९६७), 'विचक्षणा' (१९६३), 'समग्र माधव जूलियन' (संपादन १९७७) हे त्यांचे इतर ग्रंथही महत्त्वाचे आहेत.

मराठी साहित्य परिषदेच्या वाङ्मयेतिहासाचे तीन खंड त्यांनी संपादित केले (खंड क्र. ३, ४ व ५). एवढेच नव्हे तर या कार्यासाठी स्वतः पाच हजार रुपयांचे अनुदानही त्यांनी दिले. शं.ग.दाते सूचिमंडळाच्या अध्यक्षपदाची धुरा सांभाळून त्यांनी सूचिकार शंकर गणेश दाते यांच्या अर्धवट कार्याची पूर्तता केली, तसेच

१९६० सालच्या ठाणे येथे झालेल्या अखिल भारतीय मराठी साहित्य संमेलनाचे अध्यक्षपदही त्यांनी भूषविले होते.

संस्कृत साहित्यशास्त्राच्या प्रगाढ व्यासंगातून साहित्य व इतर ललित कलांचा अनुबंध तपासून, शुद्ध वाङ्मयीन भूमिकेतून साहित्यातील सौंदर्याचा वेध घेणारे, साहित्यातून प्राप्त होणाऱ्या आनंदाची मीमांसा करणारे, मर्मज्ञ समीक्षक म्हणून रा. श्री. जोग यांचे स्थान साहित्यविचारक्षेत्रात अढळ आहे.

– डॉ. संजय देशमुख

**संदर्भ :**


१. *'मराठी वाङ्मयाचा इतिहास', खंड चौथा.*
२. *कुलकर्णी गो. म.; 'वाटा आणि वळणे'.*
३. *जोशी तर्कतीर्थ लक्ष्मणशास्त्री; 'आधुनिक मराठी साहित्याची समीक्षा व रससिद्धांत'.*
४. *गोखले, द. न. संपा; प्रा. रा. श्री. जोग गौरवग्रंथ; व्हीनस प्रकाशन पुणे; १९६४.*
५. *कुलकर्णी, व. दि.; 'गुरुवर्य रा. श्री. जोग'; ललित, जून १९७७.*


## जोग, लक्ष्मण गणेश

**कथाकार, कादंबरीकार, समीक्षक**

**७ जुलै १९२३ – २५ जून १९८०**



लक्ष्मणराव जोगांचा जन्म देवरूख (जि. रत्नागिरी) येथे झाला. त्यांचे शालेय शिक्षण रत्नागिरी येथे व महाविद्यालयीन शिक्षण मुंबईत झाले. विद्यार्थिदशेत त्यांच्यावर प्राध्यापक न. र. फाटक व समीक्षक वा. ल. कुलकर्णी यांचा खूप प्रभाव पडला. आरंभी गिरगावातील शारदासदन येथे शिक्षक व नंतर राणी पार्वती देवी महाविद्यालय बेळगाव, नॅशनल महाविद्यालय वांद्रे आणि रुपारेल महाविद्यालय मुंबई येथे मराठी विषयाचे प्राध्यापक म्हणून त्यांनी कार्य केले.

'आभाळाचा रंग निळा' या जोगांच्या कादंबरीत एका सुसंस्कृत मनाचे व्यापार जसेच्या तसे व्यक्त झाले असून त्यापूर्वीच्या त्यांच्या 'काळोख आणि किरण' या पहिल्या कादंबरीत त्यांचे अनुभव बोलके झाले आहेत. 'मी जे महाविद्यालयीन जीवन अनुभवले त्यातूनच ही कलाकृती जन्मली' असे ते म्हणतात. विद्यापीठीय स्तरावर निस्संशय साहाय्यभूत ठरेल असे 'दीपस्तंभ' व 'दीपदर्शन' हे समीक्षाग्रंथ त्यांनी लिहिले. 'साहित्यात जे-जे नवे काही घडत असते, त्याचा शोध घ्यावा ही माझ्या साहित्यप्रेमी मनाची आवड आहे' असे त्यांनी म्हटले आहे. 'तेंडुलकरांना सभ्यतापूर्ण जीवनाहून वेगळे जीवन दाखवायचे आहे' असे विधान करून जोग लिहितात, 'सखाराम वा घाशीराम यांचे लेखन लेखकाचे प्रचंड सामर्थ्य प्रत्ययाला आणून देते. हे सामर्थ्य सर्वस्पर्शी न होणे ही फार मोठी वाङ्मयीन शोकांतिका ठरेल.' जोगांनी तत्कालीन गाजलेल्या नवीन नाटक, कादंबऱ्या, काव्यसंग्रह, कथा ह्यांविषयी समीक्षकाच्या दृष्टीने आपले अभिप्राय व्यक्त केले आहेत. 'दीपस्तंभ' मध्ये व्यक्त झालेल्या जोगांच्या विचारानुसार 'समीक्षा हीपण एक साधनाच असते... निर्भयपणा, कलाकृतीच्या निर्मितीच्या स्वरूपाची जाण, भावजीवनाविषयी सहानुभूती हे गुण समीक्षकापाशी असले, तर लेखक त्याच्या मताची कदर करायला तयार असतात... सदोष कलाकृतीही चांगल्या असू शकतात. गेल्या १०-१२ वर्षांत (सुमारे १९५८-१९७०) मराठी साहित्यात किती बदल झाला आहे; नवे कसे, कोणते अवतरले आहे; याचा अस्पष्ट आलेख छोट्या समीक्षाग्रंथांत आढळू शकेल.'

'श्रेष्ठ कलाकृतीचा एक निकषच असा असतो की, प्रत्येक वाचनाचे वेळी त्यातून नवे विचारधन व सौंदर्यकण मिळत जातात.' असे जोगांचे मत आहे. उपरोक्त पुस्तकांव्यतिरिक्त 'लावण्य क्षितिजे' (१९८१), 'अरूपाचे रूप' (१९७८) व 'संत नामदेव' (१९७०) ही पुस्तकेही जोग यांनी लिहिली आहेत.

– वि. ग. जोशी

**संदर्भ :**
१. *ढवळे वा. रा.; 'सात्विक शाखोपासक प्रा. ल. ग. जोग १९२३-८०.*
२. *धर्मभास्कर-दिवाळी अंक १९८०.*
३. *बांदिवडेकर लीला; 'प्रा. ल. ग. जोग - एक संस्मरण'; पूर्वा- ऑगस्ट, १९८०.*

## जोगळेकर, गंगाधर नारायण

**समीक्षक**

**२ जून १९३५ - १४ ऑगस्ट २००७**



गंगाधर जोगळेकर यांचा जन्म जमखंडी येथे झाला. जन्मगावी मॅट्रिकपर्यंत शिक्षण घेतल्यावर सातारा व सांगली येथे त्यांचे पदवीपर्यंतचे शिक्षण झाले. पुणे विद्यापीठातून १९६२ साली ते एम. ए. झाले. त्यानंतर १९९५ साली निवृत्त होईपर्यंत त्यांनी फर्गसन महाविद्यालयामध्ये अध्यापन केले. तेथे ते मराठी विभाग प्रमुख होते. मध्यंतरी १९७४ ते १९७८ पर्यंत त्यांनी सांगलीच्या विलिंग्डन महाविद्यालयात अध्यापन केले.

'अभिनव भाषा विज्ञान', 'मराठी भाषेचा इतिहास' यानंतर ऑगस्ट २००८ मध्ये 'महाराष्ट्र व मराठी भाषा' हे त्यांचे पुस्तक प्रसिद्ध झाले. या पुस्तकात भाषेसंबंधी काही विचार त्यांनी अभ्यासकांसमोर मांडले आहेत. ते म्हणतात, 'भाषेचा अभ्यास ही एक कठीण गोष्ट आहे अशी भावना होण्याचे वस्तुतः काही कारण नाही; पण प्रत्यक्षात भाषा आणि व्याकरण हे फार किचकट विषय आहेत अशी समजूत झालेली दिसून येते. भाषेच्या अभ्यासाचे मुख्य साधन निसर्गाने प्रत्येकाला दिले आहे. मुखातील अवयवांचे 'बोलणे' हे मुख्य कार्य नव्हे.' महाराष्ट्रात मराठीच्या स्थितीसंबंधी त्यांनी लक्षवेधी प्रश्न विचारला आहे - 'कर्नाटकात कन्नड हितरक्षण नावाचे खाते आहे आणि या खात्याचा कॅबिनेट मंत्री असतो, हे किती मराठी मंत्र्यांना माहीत आहे?' दिवाकर मोहनी यांनी शुद्धलेखनाच्या नियमांविषयी व सत्त्वशीला सामंत यांनी मराठी व्याकरणाविषयी घेतलेल्या आवेशपूर्ण आक्षेपांना उत्तर देण्याचा प्रयत्न जोगळेकरांनी त्यांच्या या पुस्तकात केला आहे. विशेष उल्लेखनीय म्हणजे मराठी भाषेच्या सध्याच्या दुरवस्थेबद्दल सर्वत्र चिंता व्यक्त होत असतानाच जोगळेकरांनी मराठी भाषेचा आणि संस्कृतीचा सांगोपांग विचार मांडणारा हा ग्रंथ प्रकाशित केला आहे. मराठी भाषेच्या वाटचालीतील विविध टप्पे आणि त्या भाषेवर होत गेलेली राजकीय व सांस्कृतिक आक्रमणे यांचेही विश्लेषण लेखकाने प्रस्तुत केले आहे.



जोगळेकरांनी संपादित केलेल्या 'मराठी वाङ्मयाचा अभिनव इतिहास' (काही लेखक, काही साहित्य कृती) या पुस्तकात १९२० ते १९६० या कालखंडातील अनेक चळवळी, स्त्री-उन्नती, युवक संघटना, शिक्षण प्रसार, संयुक्त महाराष्ट्र पर्व, वाङ्मयीन स्थित्यंतरे, विविध वाद अशा पैलूंवर प्रकाश टाकला आहे. पुणे विद्यापीठासाठी तसेच विद्यापीठाच्या दूरशिक्षण विभागासाठी त्यांनी अनेक पुस्तकांचे संपादन केले. महाराष्ट्र साहित्य परिषदेच्या कामात सुमारे ३० वर्षे ते सक्रिय होते व त्यांपैकी ६ वर्षे ते कार्याध्यक्ष होते. प्रारंभापासून त्यांच्या निधनापर्यंत भरलेल्या सर्व अखिल भारतीय मराठी साहित्य संमेलनांचा तपशील त्यांना मुखोद्गत होता. परिषदेतर्फे प्रकाशित झालेल्या खंड १ व ५ मधील प्रकरणांचे लेखन त्यांनी केले. जोगळेकर हे वक्ते म्हणूनही प्रसिद्ध होते. त्यांनी 'मराठी टीकाकार' (१९७९) व 'साहित्य समीक्षा : स्वरूप व विकास' (१९८०) ही पुस्तके सहकार्याने प्रसिद्ध केली. 'मराठी भाषेचे ठळक विशेष' हे पुस्तक मुक्त विद्यापीठातर्फे प्रकाशित झाले आहे.

- वि. ग. जोशी

**संदर्भ :**
१. *जोगळेकर गं. ना.; 'महाराष्ट्र आणि मराठी भाषा'; श्रीविद्या प्रकाशन, पुणे; २००८.*
२. *जोगळेकर गं. ना., संपादक; 'मराठी वाङ्मयाचा अभिनव इतिहास'; स्नेहवर्धन पब्लिशिंग हाउस, पुणे; १९९३.*

## जोगळेकर, ज. द.

☞ **मुख्य नोंद – पत्रकारिता आणि ललितेतर साहित्य खंड**

## जोगळेकर, मृणालिनी परशुराम

**कथाकार, चरित्रकार**

**१७ जुलै १९३६ – ३१ मार्च २००७**



मृणालिनी जोगळेकरांचा जन्म पुणे येथे झाला. एम.ए., बी.एड. झाल्यानंतर त्या अध्यापनाचे काम करीत होत्या. पतिराजांच्या बदलीच्या नोकरीमुळे भारतात निरनिराळ्या ठिकाणी फिरणे झाले. त्यामुळे अनुभवविश्व रुंदावण्यास मदत झाली. त्यांनी टाटा समाज विज्ञान संस्था, मुंबई यांच्या ‘स्त्री मुक्तीच्या पाऊलखुणा’ प्रकल्पात तीन शोधचरित्रांचे लेखन केलेले आहे. पॉप्युलर प्रकाशनने ‘स्त्रीमुक्तीच्या महाराष्ट्रातील पाऊलखुणा’ (१९९१) व ‘स्त्री–अस्मितेचा आविष्कार’(१९९१) ही पुस्तके आणि मेनका प्रकाशनने ‘स्त्री मुक्तीच्या उद्गात्या’ (१९९६) हे पुस्तक प्रसिद्ध केले. साहित्य प्रेमी भगिनी मंडळ, पुणे संपादित ‘स्त्री–साहित्याचा मागोवा’ खंड १ मधील चरित्र या वाङ्मय प्रकाराचा स्वतंत्र शोध मृणालिनी ह्यांनी घेतला आहे. याशिवाय ‘ताराक्का शिंदे’ व ‘जनाक्का शिंदे’ ही पॉप्युलरने प्रसिद्ध केलेली चरित्रे आणि ‘रमाबाई रानडे’, ‘पंडिता रमाबाई’, ‘आचार्य कालेलकर : व्यक्ती आणि कार्य’ अशा महत्त्वाच्या व्यक्तींवरील त्यांचे चरित्र ग्रंथ प्रसिद्ध आहेत. विशेषतः मराठा समाजातल्या कार्यकर्त्या ‘जनाक्का शिंदे’ यांच्या कर्तृत्वावर प्रकाश टाकणारे हे पहिलेच लेखन होय. स्त्रियांच्या व्यक्तित्वांतील फरक, त्यामागची कारणे आणि त्यांच्यामुळे स्त्रीमुक्तीचा मार्ग कसा मोकळा होतो, हे मृणालिनी जोगळेकरांच्या संशोधनातून स्पष्ट होत जाते. या संशोधनकार्याखेरीज त्यांचे तीन कथासंग्रह प्रसिद्ध आहेत. त्यांपैकी एकाला राज्य पुरस्कार मिळालेला आहे.

स्वतःला अलिप्त ठेवून अप्रत्यक्ष रीतीने आपले मत प्रकट करण्यास कथेचे माध्यम आत्माविष्काराच्या दृष्टीने सोयीचे ठरलेले आहे. कथेतून मांडलेले परिणामही बोधवादी न वाटता नैसर्गिक वाटतात. ‘फ्रेंच स्नेहयात्री’ हे पुस्तक ग्रंथालीने प्रसिद्ध केले आहे. ‘संध्याकाळचा चेहरा’, ‘मनवेळा’, ‘मृगतृष्णा’ (२००८) हे त्यांचे कथासंग्रह रसिकमान्य आहेत. मृणालिनींच्या साऱ्या कथा मुख्यतः शहरी मध्यमवर्गीय कुटुंबातील माणसांच्या नात्यांभोवती फिरत राहतात. हे विश्व मर्यादित असले; तरी नात्यांकडे बघण्यात चौरस तरलता आहे, विषयांचे वेगळेपण आहे, आणि वेगळाच शांतसा समंजसपणा आहे; असे मृणालिनींच्या कथांबाबत विद्या बाळ यांचे विचार आहेत.

– डॉ. उषा कोटबागी

**संदर्भ :**

१. *‘स्त्री साहित्याचा मागोवा’, खंड १; साहित्य प्रेमी भगिनी मंडळ, पुणे.*

## जोगळेकर, योगिनी विश्वनाथ

**कादंबरीकार, कथाकार, नाटककार**

**६ ऑगस्ट १९२५ ते १ नोव्हेंबर २००५**



योगिनी जोगळेकर यांच्यावर बालपणापासून विविध कलांचे संस्कार झाले. पुण्याच्या हुजूरपागा शाळेत मॅट्रिकपर्यंत शिक्षण झाले. वयाच्या केवळ आठव्या वर्षी त्यांची कवितेशी भातुकली सुरू झाली. पहिली कविता शाळेच्या ‘बालिका–दर्शन’मध्ये छापून आली. शालेय जीवनात ‘निशिकांतची नवरी’ ह्या नाटकात त्यांनी भूमिका केली. त्या वेळी गणपतराव बोडस, पेंढारकर या दिग्गजांचे मार्गदर्शन लाभले. ‘ललितकलादर्श’च्या त्या महिला नाटककार झाल्या. शिक्षण घेत असताना संगीत, लेखन, अभिनय, वक्तृत्व, चित्रकला अशा अनेक अंगांनी त्यांचे व्यक्तिमत्त्व बहरत गेले. संस्कृत आणि मराठी घेऊन त्या

स.प.महाविद्यालयातून बी.ए.ला पहिल्या आल्या. त्या वेळी त्यांना 'यशोदा चिंतामणी', 'कुसुम वाघ', 'विंझे' ही तीन मानाची पारितोषिके मिळाली. १९४८ ते १९५३ या काळात पुण्यातील सरस्वतीमंदिरात शिक्षिका म्हणून त्यांनी काम केले. महाविद्यालयात असताना तंबोरा बक्षीस मिळाले आणि पुढे त्या गायिका झाल्या. एच.एम.व्हीने त्यांच्या ध्वनिमुद्रिका काढल्या. सर्व केंद्रांतून आणि भारताच्या सर्व संगीत मंडळांतून त्या गाऊ लागल्या. 'रंगात रंगला श्रीरंग' या संगीत नाटकाच्या रौप्यमहोत्सवी प्रयोगाचे वेळी पुण्याच्या बालगंधर्व रंगमंदिरात संगीत दिग्दर्शक केशवराव भोळे गौरव करताना म्हणाले, ''उद्याची मोठी स्त्री-नाटककार होशील.''

योगिनीबाईंचा मूळचा पिंड साहित्यात रमणारा होता. त्यांनी चाळीस कादंबऱ्या, बावीस कथासंग्रह, चार कवितासंग्रह, बारा बालवाङ्मयसंग्रह, तीन नाटके, एक चरित्र अशी विपुल साहित्य-सेवा केली.

त्यांचे लेखन बहुढंगी असले, तरी प्रामुख्याने कुटुंब, कुटुंबातील व नाते-संबंधांतील ताण-तणाव, संघर्ष यांना वेढून असणारे होते, त्यामुळे त्याला अतिशय लोकप्रियता लाभली. त्यांचे लेखन वाचकांना आपले, जिव्हाळ्याचे वाटले. त्यांच्या कथा-कादंबऱ्या मध्यमवर्गीय कुटुंबाच्या खांडेकरी वळणाच्या! त्यामुळे बदलत्या उच्चभ्रू वर्गाच्या पैसाकेंद्री समाजव्यवस्थेविरुद्ध त्या अत्यंत तीव्रतेने विरोध दर्शवितात. त्यांच्या कथेत सुष्ट आणि दुष्ट प्रवृत्तींचा संघर्ष दिसतो. बहुतेक कथांतील स्त्रिया सोशिक, सात्त्विक, प्रेमळ व भाबड्या, हसतमुख आणि त्यागमूर्ती दिसतात. त्यांच्यातील कवयित्रीचे प्रतिबिंब त्यांच्या कथा-कादंबऱ्यांतून दिसून येते. काही कथांमध्ये त्यांनी कविताही लिहिल्या आहेत. त्यांच्या काव्यात्मवृत्तीचा मनोहर आविष्कार कथांतून झालेला आढळतो.

त्यांनी आपला पहिला कथासंग्रह 'झुंजूमुंजु' आईला आणि वडिलांना अर्पण केला, कारण तेच त्याचे पहिले वाचक आणि समीक्षक! त्यांचे 'उलट-सुलट', 'श्रावण', 'शर्यत', 'प्रतीक', 'ओटी', 'प्राची', 'उर्मी', 'पाझर', 'शिलगंण', 'आविष्कार', 'देणगी', 'उपहार', 'जाण', 'मौन', 'अप्रूप' इत्यादी कथासंग्रह विशेष उल्लेखनीय! एका खासगी कथाकथन कार्यक्रमात 'शिलांगण' ही कथा ऐकताना प्रसिद्ध लेखक पु.भा.भावे यांचे डोळे ओलावले. ही कथेला मिळालेली पावतीच होय. 'नन्या आईसफ्रुटवाला' या कथेसाठी आचार्य अत्रे यांनी त्यांची पाठ थोपटली.

त्यांच्या कादंबऱ्यातील व्यक्तिरेखांनी जीवनसंघर्ष करायला अनेकांना उद्युक्त केले, तर कोणाला जीवन जगायला शिकवले. सोलापूरची एक तरुणी छळाला कंटाळली होती, पण 'गुलबक्षी' कादंबरीतील नायिकेने तिला सावरले. 'वादळफूल', 'नादब्रह्म', 'प्राजक्ता', 'द्विदल', 'हार-जीत', 'पूर्ती', 'कसरत', 'तिढा', 'झुला', 'शह', 'कुणासाठी कुणीतरी', 'बावन्नकशी', 'चढ-उतार', 'निरागस', 'घरोघरी', 'सांगाती' इत्यादी कादंबऱ्या लक्षणीय!- त्यांचे 'रिमझिम', 'सूरगंधा', 'आंबट-चिंबट', 'आलापिनी' हे चार कवितासंग्रह 'रामप्रहर' हे चरित्रलेखन तर 'गुरुशिष्य', 'तिळगुळ', 'खंडू खोडसाळे', 'फुलांचे झेले', 'वाकडी काकडी', इत्यादी कुमार वाङ्मय प्रसिद्ध आहे. 'मागील दार', 'तिसरी घंटा', 'तिघांच्या तीन तऱ्हा', 'रंगात रंगला श्रीरंग' ही नाटके त्यांनी लिहिली.

किल्ले रायगडाच्या पायथ्याशी त्यांच्या कवितेच्या दोन सुंदर ओळी संगमरवरात लिहिल्या आहेत. त्या ओळी त्यांचे अजरामर स्मारकच म्हणावे.

''सूर्याआधी नमस्कार पूर्व दिशेला असावा
शिवाआधी दंडवत जिजामातेस असावा.''

डॉ.भालेराव स्मृती पुरस्कार (मुंबई मराठी साहित्यसंघ), अमृत महोत्सवी (७५ वे) अखिल भारतीय मराठी साहित्य संमेलन - स्त्री-लेखिका पुरस्कार; हे त्यांना मिळालेले महत्त्वाचे पुरस्कार होत.

– वि. ग. जोशी

**संदर्भ :**

*१. जोगळेकर योगिनी; 'मांदियाळी'; माहेर-मे २००१.*

*२. जोगळेकर योगिनी; 'आठवांच्या पारंब्या'; साहित्यसूची-ऑगस्ट १९८७.*

## जोशी, चिंतामण विनायक

**विनोदी लेखक**

**१९ जानेवारी १८९२ – २१ नोव्हेंबर १९६३**



चिंतामण विनायक जोशी यांचा जन्म पुणे येथे झाला. पुण्यातील नूतन मराठी विद्यालयामधून १९०९ मध्ये मॅट्रिक व १९१३ मध्ये फर्गसन महाविद्यालयातून तत्त्वज्ञान हा विषय घेऊन ते बी. ए. झाले. दोन वर्षांनी पाली व इंग्रजी हे विषय घेऊन ते एम.ए. झाले. पालीचे गाढे विद्वान प्राध्यापक धर्मानंद कोसंबी यांचे विद्यार्थी असणाऱ्या जोशी यांच्यावर त्यांच्या विचारांचा फार मोठा प्रभाव होता. पालीच्या अभ्यासाद्वारे बौद्ध धर्माचाही परिणाम त्यांच्या मनावर झाला होता. जोशी यांचे वडील विनायकराव हे चौदा वर्षे 'सुधारक' पत्राचे संपादक होते. 'सुधारक' पत्र कर्जबाजारी झाले, त्या वेळी पत्नीचे दागिने विकून त्यांनी काही कर्ज फेडले होते. जोशींच्या मालकीच्या वडिलार्जित विष्णुमंदिरात लहानपणी जोशी यांनी बरीच कीर्तने ऐकली. कीर्तनांमुळे पुराण कथांशी व प्राचीन वाङ्मयाशी त्यांचा परिचय झाला. त्यांना वाचनाची अनावर आवड होती.

कथाकार गो. गं. लिमये व ना. गं. लिमये या दोन मामांच्या साहाय्याने जोशींनी १९०५ साली 'तरवार' नावाचे हस्तलिखित वर्तमानपत्र काढले व तीन वर्षे चालविले. त्यात गोष्टी, चुटके वगैरे मनोरंजक विभाग लिहिण्याचे काम जोशींकडे असे. इंग्रजी पाचवीत असताना 'संपादन व न्हावी' या नावाचा गमतीदार लेख त्यांनी लिहिला. तो पुढे पाच वर्षांनी महाविद्यालयाच्या त्रैमासिकात प्रसिद्ध झाला. १९२६ पर्यंत गंभीर व विनोदी अशा दोन्ही प्रकारचे लेखन करणाऱ्या जोशींनी मासिकांकडून विनोदी लेखांचीच मागणी सातत्याने येत राहिल्यामुळे विनोदी साहित्य निर्मिती केली. मूळ गंभीर प्रकृतीचे जोशी वयपरत्वे अधिक गंभीर होत गेले, तरी त्यांच्या विनोदी लेखनाच्या निर्मितीत खंड पडला नाही. असामान्य प्रतिभेचे, विशाल मनोवृत्तीचे व अस्सल मराठी गद्याचे निर्माते जोशी हे अहमदाबाद येथे झालेल्या साहित्य संमेलनाच्या अध्यक्षीय निवडणुकीत वि.द.घाटे यांच्याकडून ते पराभूत झाले.

जोशी यांच्या व्यावसायिक जीवनाची सुरुवात अमरावतीला शिक्षक म्हणून झाली. १९१८ साली ते रत्नागिरी हायस्कूलमध्ये गेले. १९२० मध्ये बडोदा येथील महाविद्यालयात आरंभी इंग्रजीचे–मराठीचे व नंतर पालीचे अध्यापन ते करू लागले. १९२८ पासून बडोदा सरकारने त्यांची नेमणूक राजदप्तरदार (डायरेक्टर ऑफ अर्काइव्हज) म्हणून केली. महाविद्यालयात पूर्णवेळ शिकविणारे जोशी १९२९ नंतर मात्र फक्त बी. ए., एम. ए. च्या विद्यार्थ्यांना पाली शिकवीत. १९४९ साली सेवानिवृत्त होऊन ते पुण्यास परतले. पाली भाषेच्या अभ्यासातून त्यांनी काही ग्रंथरचना केली, शिवाय परदेशातील नियतकालिकांतूनही त्यांचे लेख प्रसिद्ध झाले. पालीतील पुराण ग्रंथांचे संशोधन व संकलन करणारे व्यासंगी अभ्यासक म्हणूनही त्यांना कीर्ती लाभली. 'जातकातील निवडक गोष्टी' किंवा 'मॅन्युअल ऑफ पाली' अशी परिचयात्मक पुस्तके त्यांनी लिहिली. 'शाक्यमुनी गौतम' (१९३५), 'बुद्ध संप्रदाय व शिकवण' (१९६३) हे ग्रंथ व 'सयाजीराव महाराज गायकवाड' यांचे चरित्र यांनी लिहिले.

वडिलांच्या निधनामुळे अपुरी राहिलेली 'प्रवरा' ही कादंबरी त्यांनी पुरी केली. याखेरीज 'कर्मवीर परशुराम' (१९४५), 'चित्रकार पिंपळखरे' (१९५९) ही चरित्रे; 'बालयोगी' (१९६४) ही कादंबरी; 'वडाची साल पिंपळाला' (१९५७), व 'त्रिसुपर्ण' (१९६२) ही नाटके; 'देवनगरच्या पंचक्रोशीत' (१९३६) हे स्थलवर्णन अशी वैविध्यपूर्ण साहित्य निर्मिती त्यांनी केली असली, तरी जोशी हे नाव समस्त मराठी वाचकांना विनोदी लेखक म्हणूनच सुपरिचित आहे. 'सत्याचे प्रयोग', 'लग्न पहावं करून', 'सरकारी पाहुणे' हे त्यांचे हास्यरसप्रधान बोलपट गाजले आहेत. १९४२

जलसा

कुठच्या मनुष्य जलसा जाहीर करतो. 'लता मंगेशकर' व 'महंमद रफी' यांचा जलसा. दोन माणसें लता व रफी यांच्यासारखे पोषाख करतात व रेकार्ड लावतात. तोतयी माणसें गाण्याचा आविर्भाव करतात. तोतया लताचा बाप येतो व तिला चापतो. जलसा उधळून जातो.

साली त्यांनी उज्जैनी येथील मध्यभारत साहित्य संमेलनाचे अध्यक्षपद भूषविले.

'एरंडाचे गुऱ्हाळ' (१९३०), 'चिमणरावाचे चऱ्हाट' (१९३३), 'वायफळाचा मळा' (१९३४), 'आणखी चिमणराव' (१९४०), 'नवे भारूड' (१९४२), 'स्टेशन मास्तर' (१९४३), 'मोरू आणि मैना' (१९४३), 'नटश्रेष्ठ' (१९४४), 'संचार' (१९४५), 'लंकावैभव' (१९४७), 'गुंड्याभाऊ' (१९४७), 'द्वादशी' (१९४८), 'गुदगुल्या' (१९४८), 'संशयाचे जाळे' (१९४९), 'आमचा पण गाव' (१९५२), 'तिसऱ्यांदा चिमणराव' (१९५२), 'राहाट गाडगं' (१९५५), 'गाळीव रत्ने' (१९५५), 'ओसाडवाडीचे देव' (१९५५), 'पाल्हाळ' (१९५६), 'हापूसपायरी' (१९५६), 'प्रवरा' (१९५७), 'बाबाचा बगीचा' (१९५७), 'चौथे चिमणराव' (१९५८), 'आरसा' (१९५९), 'थोडे कडू थोडे गोड' (१९६०), 'हास्यचिंतामणी' (१९६१), 'मेषपात्रे' (१९६१), 'बोरी बाभळी' (१९६२), 'बायकोचा मुलगा' (१९६२), 'वैकुंठाचे द्वारी' (१९६३), 'घरबशे व पळपुटे' (१९६४), 'विनोद चिंतामणी' (१९८०) ही त्यांची विनोदी पुस्तके सर्व परिचित आहेत.

**हास्यविनोद मीमांसा**

'हास्यचिंतामणी' या आपल्या पंचवीस निवडक कथांच्या स्वसंपादित संग्रहाला प्रस्तावना लिहिताना जोशी यांनी हास्य व विनोद यांच्यासंबंधी मांडलेले विचार महत्त्वाचे आहेत. त्यांच्या मतानुसार विनोदाचा संबंध हास्याशी आहे. विनोदामुळे हास्य उत्पन्न होते, परंतु विनोदाशिवाय दुसऱ्याही अनेक कारणांनी हास्योत्पत्ती होते. कृत्रिम कारणांनी आणले जाणारे हसू, शारीरिक विकारांमुळे येणारे हसू, आनंदजन्य हास्य व कृत्रिम हास्य असे हास्याचे चार प्रकार ते करतात. हास्यभावना ही बुद्धीबरोबर उगम पावते, याचा अर्थ प्रत्येक बुद्धिमंताला परिणत हास्यभावना असतेच असे मात्र नाही, ती नैसर्गिक देणगी आहे. अहंमन्यांची घसरगुंडी हा एक महत्त्वाचा हास्यविषय आहे.

विनोद हे हास्याचे कारण असते. अभावित आणि भावित असे त्याचे दोन भेद आहेत. मुद्दाम कृतीने, बोलण्याने किंवा लिहिण्याने जो केलेला नसतो पण योगायोगाने हास्यकारक प्रसंग निर्माण होतो त्या हास्यकारणाला 'अभावित विनोद' असे नाव आहे. जसा विनोद आपोआप निर्माण होऊ शकतो तसा तो मुद्दामही निर्माण करता येतो. 'विनोद करणे' हा शब्दप्रयोग जुना आहे. कायिक, शाब्दिक, प्रसंगनिष्ठ, बुद्धिनिष्ठ, भावनिष्ठ, स्वभावनिष्ठ असे विनोदाचे विविध प्रकार त्यांनी सांगितले आहेत. भावनिष्ठ विनोदाची पायरी बुद्धिनिष्ठ विनोदापेक्षा वरची आहे. भावनिष्ठ विनोदात स्वभावनिष्ठ विनोदाचा अंतर्भाव करता येईल. भंपकपणा, विसंगतिदर्शन, पर्यायवचन, विरोधदर्शन, अतिशयोक्ती यांमुळेही हास्योत्पत्ती होते. भोळी माणसे हा विनोदाचा लोकप्रिय विषय होय, या स्वरूपाची हास्यविनोदाविषयीच्या विचारांची मांडणी जोशी करतात.

ही हास्यविनोदमीमांसा करणाऱ्या जोशी यांच्या कथांतून मराठी कथेतील पहिले ठसठशीत विनोदरूप प्रकटते. कोल्हटकरांनी आणि गडकऱ्यांनी बंडूनाना, पांडूतात्या, बाळकराम ही व्यक्तिचित्रे निर्माण केली, त्याप्रमाणे जोशी यांनी 'चिमणराव' हा त्यांचा 'शेकडो शंभरातला एक' असा मानसपुत्र निर्माण केला. भालचंद्र नेमाडे म्हणतात त्याप्रमाणे 'चिं. वि. जोशी यांनी अत्यंत गंभीर प्रकृतीचा आशय मांडणाऱ्या विनोदातून नवा

प्रतिनायक निर्माण केला आणि मराठी गद्यात लुप्त झालेली प्रसन्न निवेदनपद्धती रूढ केली. त्यांच्या चिमणरावांसारखा जबरदस्त अँटिहिरो मराठीत झालाच नाही.' 'चिमणरावाचे चऱ्हाट' हे त्यांचे विनोदी लेखन मराठी साहित्यातील मानदंडाच्या स्वरूपात स्वीकारले गेले आहे. 'चिमणरावाचे चऱ्हाट' ही विनोदी प्रसंगमालिका की विनोदी नाट्य-कथामाला की व्यक्तिविशिष्ट विनोदी कादंबरी याचा निर्णय करणे अवघड आहे.

ज

चिमणराव हा सामान्य तरीही असामान्य आहे, त्याचे व्यक्तिमत्त्व सदैव ताजे, टवटवीत राहणारे आहे. मध्यमवर्गीय जीवन वास्तवाचे सलग व प्रभावी दर्शन अत्यंत खेळकर पद्धतीने जोशी यांच्या साहित्य विश्वातून घडते. 'रावसाहेब चिमणराव स्टेट गेस्ट', 'स्पष्टवक्तेपणाचे प्रयोग', 'गुंड्याभाऊचे दुखणे', 'कालाय तस्मै नमः', 'सौजन्य सप्ताह', 'प्रामाणिकपणाविषयी आजीबाई', 'माझे दत्तक वडील' यांसारख्या अनेक कथा या संदर्भात आठवतात. कथेच्या स्वयंपूर्ण रूपात चिमणराव, गुंड्याभाऊ आणि त्यांच्या परिवारातील साऱ्या माणसांचे, त्यांच्या कौटुंबिक जीवनाचे, त्यांच्या ध्येयादर्शांचे, ते ज्या समाजाचे घटक होते, त्यातील नीतिसंकेतांचे, अनेक पदरी मानवी संबंधांचे प्रगाढ भान जोशी यांनी व्यक्त केले आहे.

जीवन व्यवस्थेतील असमानतेचा निषेध करण्याचे कार्य ज्याप्रमाणे विनोदामार्फत होत असते, त्याप्रमाणे जीवन स्वीकाराचा, परिस्थितीशी मिळतेजुळते घेण्याचा, सामोपचाराचा मार्गही विनोदाद्वारे खुला होतो. चिमणरावाच्या कथांमधून सर्व मानवी विसंगतींसह, मर्यादा-दोषांसह जगण्याची क्षमता देणारा विनोद अवतरला आहे. मानवी स्वभावातील विसंगती सूक्ष्मपणे हेरण्याची वृत्ती, घरगुती भाषा आणि सर्वसामान्यांच्या आयुष्यात हरघडी दिसेल अशी हास्यास्पदता सहज रितीने दाखवून देण्याची हातोटी या वैशिष्ट्यांमुळे जोशी यांचा विनोद लोकप्रिय ठरला. खास महाराष्ट्रीय मध्यमवर्गीय समाज व संस्कृती यांच्या मार्मिक निरीक्षणातून निर्माण झालेल्या अस्सल विनोदाची देणगी जोशी यांनी मराठी साहित्याला दिली. मर्यादायुक्त माणसांच्या जीवनाची वाटचाल सुखकर व्हावी, अशी प्रबल आंतरिक इच्छा आणि निरोगी, संपन्न व सुखी समाजाचे स्वप्न हे दोन्ही जोशी यांच्या कथात्मक साहित्यातून प्रकटतात.

– प्रा. डॉ. विलास खोले

**संदर्भ :**


१. *जोशी चिं. वि.; 'हास्यचिंतामणी'; कॉन्टिनेन्टल प्रकाशन, दुसरी आवृत्ती, १९६५.*

२. *वैद्य विद्युल्लता; 'अक्षर हास्य- चिं. वि. जोशी' ; कॉन्टिनेन्टल प्रकाशन, पुणे; १९८५.*


## जोशी, नरसिंह महादेव

***न. म. जोशी***

☞ **मुख्य नोंद – पत्रकारिता आणि ललितेतर साहित्य खंड**

## जोशी, नागेश रामचंद्र

☞ **मुख्य नोंद – नाटक खंड**

## जोशी, नारायण गजानन

**कवी, छंदःशास्त्राचे अभ्यासक**

**४ ऑक्टोबर १९११ – ८ सप्टेंबर १९८६**



नारायण जोशी यांनी टीकाकार व मार्मिक काव्य-परीक्षक म्हणून लौकिक मिळविलाच, पण विशाल दृष्टीचे विचारवंत कवी म्हणूनही त्यांचे कर्तृत्व वाखाणण्याजोगे आहे. आंजर्ले या जन्मगावच्या रम्य निसर्गाचा व तिथल्या चालीरीती, तिथले सण, उत्सव व व्रतवैकल्ये, आजीची गीते आणि सांस्कृतिक पार्श्वभूमी ह्यांचा त्यांच्यावर बालपणी चांगलाच ठसा उमटला. बालपणापासून असलेली संगीताची आवड त्यांनी व्यासंगाने जोपासली.

महाड येथील वास्तव्यात जोशींनी खूप वाचन केले. १९२९ साली त्यांची बाबाराव सावरकरांची व

१९३० साली मॅट्रिकच्या अभ्यासाच्या काळात स्वातंत्र्यवीर सावरकरांची भेट झाली, आणि त्यांच्या प्रभावी लेखनप्रणालीचा व लोकमान्यांच्या विचारप्रणालीचा प्रभाव जोशींवर पडला. महाड सोडून सौराष्ट्रातील भावनगरच्या शामळदास महाविद्यालयामध्ये त्यांनी १९३१ मध्ये पदार्पण केले. पहिल्या वर्षी त्यांना संस्कृत विषयातील 'विद्याराम शिष्यवृत्ती' व इंटरला 'ग्रेडेशन स्कॉलरशिप' मिळाली. इंग्लिश विषय घेऊन ते बी. ए. (ऑनर्स) झाले. १९३७ साली ते इंग्लिश व संस्कृत विषय घेऊन एम.ए. झाले. नंतरच्या काळात बडोदा विद्यापीठात ते मराठी व इंग्लिश ह्या विषयांचे अध्यापन करीत. १९३८ साली गुजरातीतील 'मानसी' मासिकात 'महाराष्ट्रना दिदेरो: ज्ञानकोशकार केतकर' हा लेख त्यांनी लिहिला. महाविद्यालयात असतानाच त्यांनी स्फुट काव्यरचना केली. त्यांचे 'जीवनयोग' नावाचे देशभक्तिपर खंडकाव्य १९४२ साली प्रसिद्ध झाले. चिंतनात्मक काव्याचा हा एक चांगला नमुना आहे. 'कविता' (१९४७) या भावगीतात्मक कवितांच्या संग्रहातील शेवटची अभंगात्मक गीते वातावरण निर्माण करतात. १९५० साली प्रसिद्ध झालेल्या त्यांच्या 'विश्वमानव'मध्ये त्यांच्या तत्त्वचिंतनशील प्रतिभेची झेप दिसून येते. यामध्ये भावात्मकता व चिंतनशीलता हातात हात घालून प्रकट होतात. मुक्तछंद व मुक्तशैली यांचे प्रयोग लक्ष वेधून घेतात. १९५९ मध्ये त्यांनी संपादित केलेल्या 'प्राचीन गीत भांडार'मध्ये मध्ययुगीन मराठी गीतांचा संग्रह असून त्याला वेधक अशी प्रस्तावना आहे. 'मराठी छंदोरचना' (१९५४) ह्या ग्रंथातून माधवराव पटवर्धनांच्या 'छंदोरचना'चा मागोवा घेत त्यांनी छंदोरचनेचा लयदृष्ट्या पुनर्विचार मांडला आहे. या ग्रंथावरच जोशींना डॉक्टरेटची पदवी मिळाली. 'मराठी छंदोरचनेचा विकास' (१९५७) ह्या ग्रंथात त्यांनी मराठी पद्यरचनेचा ऐतिहासिक विकास दर्शविला आहे व वैशिष्ट्यपूर्ण नमुने सादर केले आहेत.

पांडित्य प्रदर्शनामुळे त्यांचे काव्य काही ठिकाणी क्लिष्ट व दुर्बोध झाले आहे, पण कवी अनिलांची मानवतावादी निबंधकाव्य लिहिण्याची परंपरा जोशींनी परिणत अवस्थेला नेली. 'माझ्या राजाला नाव कुणी ठेवू नका' सारखी सरस गीतेही ते लिहू शकले. मर्मज्ञ व साक्षेपी काव्यचिकित्सक जोशी यांचा 'साहित्य विवेचन' (१९६९) हा समीक्षात्मक ग्रंथ होय. याशिवाय 'आमच्या बा' (कस्तुरबा गांधी चरित्र, १९४६) व 'बापू माझी आई' (१९४८) हे दोन गुजरातीतून मराठीमध्ये केलेले त्यांचे अनुवाद-ग्रंथ होत. सद्भिरुचिसंपन्न ना. ग. जोशी हे स्वतःच्या निर्मितीशी प्रामाणिक होते व काव्यातील नव्या प्रवाहांचे स्वागत करण्याच्या वृत्तीचे होते. अहमदाबाद येथील आठ वर्षांच्या वास्तव्यात जोशी यांनी तेथील महाराष्ट्र समाजाच्या पत्रिकेच्या संपादनाची धुरा वाहिली.

– वि. ग. जोशी

**संदर्भ :**

*१. कामत श्रीराम पांडुरंग, संपादक; 'मराठी विश्वचरित्र कोश', खंड २; गोवा.*

ज

## जोशी, प्रल्हाद नरहर

**संत वाङ्मयाचे गाढे अभ्यासक, कादंबरीकार**

**२४ एप्रिल १९२४ – ५ जून २००४**



प्रल्हाद नरहर जोशी यांचा जन्म सातारा जिल्ह्यातील खरशी येथे झाला. त्यांचे वडील नरहरशास्त्री हे उत्तम प्रवचनकार व संतवाङ्मयाचे अभ्यासक होते. घरात धार्मिक, आध्यात्मिक वातावरणाचे बाळकडू त्यांना लहानपणापासून मिळाले. ज्ञानेश्वर, एकनाथ, तुकाराम यांच्या वाङ्मयाचे संस्कार त्यांच्यावर झाले. माहूरचे सत्कवी श्रीविष्णुदास हे नरहरशास्त्रींचे मामा होते. 'विष्णुदासचरितामृत' हा तीन खंडांतील ग्रंथ नरहरशास्त्रींनी लिहिला.

जोशी यांचे वाई व फलटण येथे माध्यमिक शिक्षण झाल्यावर पुण्याच्या सर परशुरामभाऊ महाविद्यालयातून

बी.ए. पदवी घेतली. पुढे मुंबई विद्यापीठातून मराठी विषयात एम.ए. पदवी प्राप्त केली. हिंदी विषयाच्या अभ्यासातही आवड असल्याने बनारस विद्यापीठाची एम.ए. (हिंदी) पदवी संपादन केली. व्यासंगी अभ्यासक असल्याने 'मराठी साहित्यातली मधुराभक्ती' हा विषय घेऊन त्यांनी पीएच.डी.साठी संशोधन केले. सामाजिक, धार्मिक, वैज्ञानिक, सांस्कृतिक विषयांच्या अभ्यासातून त्यांची विपुल ग्रंथसंपदा प्रकाशित झाली आहे. शिक्षणक्षेत्रात कामे करण्याची आवड असल्याने त्यांनी पुण्यातील नूतन मराठी विद्यालयात १५ वर्षे अध्यापन व प्रशासन केले. त्यानंतर काही वर्षे सर परशुरामभाऊ महाविद्यालयात अध्यापन केले.

त्यांच्या संग्रही प्रचंड ग्रंथसंपदा होती. चिकित्सक अभ्यासू वृत्तीतून त्यांनी वाल्मीकी रामायणाचा संपूर्ण मराठी अनुवाद केला, श्रीगोंदवलेकर महाराज, विष्णुदास, स्वामी रामतीर्थ इत्यादींची चरित्रे लिहिली. अठरा पुराणांची आणि दहा उपपुराणांची मराठी रूपांतरे केली. त्यात १० कादंबऱ्या, १५ विज्ञानविषयक ग्रंथ त्यांनी लिहिले. 'सर्वज्ञ' (१९८१) ही महानुभाव पंथाचे संस्थापक चक्रधर यांच्या चरित्रावर आधारित कादंबरी होय. 'भारतीय संत' भाग १, २ हे १९६४-१९६५ मध्ये प्रकाशित झाले. 'प्रेरणा' ग्रंथाचे ३ भाग १९७१ मध्ये 'थोरांच्या माता' १९७२, 'शरच्चंद्र चट्टोपाध्याय' (१९५५) 'शरदबाबू : व्यक्ती आणि कला' (१९७६), 'सार्थ तुकाराम गाथा' भाग १-२ (१९६८), 'श्रीदत्तात्रय ज्ञानकोश' (१९०४), 'नाथसंप्रदाय उदय व विस्तार' (१९७७) या ग्रंथांचे लेखन केले.

प्र. न. जोशी यांनी संत साहित्याप्रमाणे आधुनिक मराठी वाङ्मयाविषयी लेखन केले. 'मराठी वाङ्मयाचा विवेचक इतिहास', 'प्राचीन खंड (१९७२) तर 'अर्वाचीन खंड' (१९७९), 'मराठी व्याकरण' (१९६३), सुबोध भाषाशास्त्र (१९७३), या ग्रंथांशिवाय इतर अनेक ग्रंथ त्यांनी संपादित केले. संकीर्ण लेखनामध्ये 'रंग आणि रेखा' (१९६३) यासारखे वस्तुसंग्रहालयाची माहिती देणारे लेखन केले. भौगोलिक साहस कथा, नवलनगरी असे विविध प्रकारचे लेखन त्यांनी केले. जोशी यांच्या मृत्यूनंतर त्यांचे घर विद्यार्थ्यांसाठी अभ्यासिका व ग्रंथालय म्हणून उपलब्ध करून दिले गेले आहे ते त्यांचे उचित स्मारकच आहे.

– डॉ. रजनी अपसिंगेकर

**संदर्भ :**

*१. जोशी प्रल्हाद नरहर; 'माझे ग्रंथोपजीवन'; रसिक दिवाळी अंक : १९८५.*

## जोशी, महादेवशास्त्री सीताराम

**कथाकार, चरित्रकार, कोशकार, प्रवासवर्णनकार**

**१३ जानेवारी १९०६ – ११ डिसेंबर १९९२**



पंडित महादेवशास्त्री जोशी हे इ.स.१९४० नंतर उदयाला आलेले बहुआयामी गोमंतकीय लेखक होत. कथा-लेखक, यशस्वी पटकथा लेखक, प्रवासवर्णनकार, बाल-लेखक चरित्रकार आणि कोशकार अशी शास्त्रीबुवांची विविध रूपे रसिकमनावर विरजमान आहेत. खुद्द शास्त्रीबुवांना मात्र आपल्या 'कथाकार' रूपाचेच अप्रूप होते. मराठी रसिक वाचकांच्या मनावर आपले नाव कथाकार या नात्यानेच कोरलेले राहावे अशी त्यांची अंतरिक ओढ होती.

शास्त्रीबुवांचा जन्म गोव्याच्या सत्तरी प्रांतातल्या आंबेडे ह्या खेड्यात झाला. जोश्यांचे घराणे हे विद्याव्यासंगी, ज्ञानोपासक आणि शेतकी पेशाचे असून पिढीजात पुराणिकाचा व्यवसाय करणारे असल्याने खरंतर शास्त्रीबुवांचे आयुष्य तोच व्यवसाय करण्यात जावयाचे; पण नियतीची इच्छा वेगळीच होती. ते याज्ञिकी शिकले असल्याने, गोव्यात भिक्षुकीला काही कमी पडणार नव्हते. जोडीला कुळागर होतेच. पण शास्त्रीबुवांची आजी, सीतारामपंतांची आई त्यांच्या आयुष्याला कलाटणी द्यायला कारणीभूत झाली. महादेव तीन

महिन्यांचा असतानाच सीतारामपंतांचा देहान्त नरसोबाच्या वाडी येथे पटकीमुळे झाला होता. पोरका महादेव आई-आजीने तळहाताच्या फोडासारखा जपला होता. आजीने महादेवाला सांगलीच्या पाठशाळेत शिकायला पाठवले. इ.स. १९२२ ते १९२७ या कालावधीत पाठशाळेत शिकून महादेव बाहेर पडला अन् इ.स. १९२८ मध्ये पंडित महादेवशास्त्री बनून आंबेड्याला परतला.

**कथालेखनाचा मार्ग**

येताना नवी दृष्टी घेऊन आलेल्या महादेवशास्त्रींनी इ.स. १९३० मध्ये 'सत्तरी शिक्षण प्रसारक संस्था' स्थापून आंबेड्याच्या सातेरीच्या देवळात शाळा सुरू केली. शाळेसाठी वर्गणी जमवण्याकरता त्यांनी 'अभिमन्यू चक्रव्यूहभेद' हा पोवाडा रचला. शाहीर बनून गावोगावी भटकंती केली. 'जयद्रथ' हा दुसरा पोवाडा रचला दोन्हींच्या पुस्तिका छापून त्यांची विक्री केली. प्रपंचासाठी कथा-कीर्तन-पुराणिकाचा व्यवसाय केला, पण त्यात मन रमेना. सांगलीच्या वास्तव्यात पाठशाळे जवळच्या सार्वजनिक वाचनालयात नियमितपणे जाणाऱ्या शास्त्रीबुवांनी एक दिवस वि.स. खांडेकरांची 'गंगावन' ही कथा वाचली. ती त्यांच्या मनाला भिडली. त्याच वेळी 'आपण कथालेखक व्हायचे' असा निश्चय त्यांनी केला.

१२ वर्षांच्या संसारानंतर शास्त्रीबुवांची पत्नी उमा हिचे देहावसान झाले. तिने उमा व लीला या आपल्या दोन मुलींना शास्त्रीबुवांच्या पदरात टाकले होते. धक्क्यातून सावरल्यावर त्यांनी प्रियोळच्या दत्तूभट फडके यांच्या सुधाबरोबर (गोवामुक्ती संग्रामात नंतर रणरागिणी म्हणून प्रसिद्ध पावलेल्या सौ. सुधाताई जोशी) विवाह करून पुनश्च नवा डाव मांडला. वर्षभरातच आंबेडे सोडून त्यांनी पणजीला प्रस्थान केले. पण तेथे त्यांच्या सद्विवेकबुद्धीला 'ज्योतिषातून भिक्षुकी आणि भिक्षुकीतून पुन्हा ज्योतिष' हा व्यवहार पटेना. साहजिकच ज्योतिषाचा व्यवसाय न जमल्याने ते पुन्हा आंबेड्याला परतले. पणजीच्या त्यांच्या या वास्तव्याचा, मराठी वाचकांच्या दृष्टीने एक महत्त्वाचा फायदा झाला. तो हा की, शास्त्रीबुवांचा कथालेखक व्हायचा निर्णय प्रकर्षाने जागा झाला. त्यासाठी 'पुण्याला जायला हवे' हा ध्यास त्यांना लागला. अशा विमनस्क अवस्थेत असतानाच राष्ट्रीय कीर्तनकार कोल्हटकरबुवा यांचे निमंत्रण त्यांच्या हातात पडले. कोल्हटकरांच्या 'चैतन्य' मासिकाच्या संपादकपदाची धुरा संभाळण्याचे हे निमंत्रण होते. या काडीमात्र आधारावर मागचापुढचा विचार न करता शास्त्रीबुवांनी इ.स. १९३५ साली पुणे गाठले. म्हणजे नियतीनेच त्यांच्या कथालेखनाचा मार्ग मोकळा केला.

**गोव्यातील समाजचित्रण**

चैतन्याचे काम संभाळतच त्यांनी कथालेखनाला प्रारंभ केला. त्याच वेळी प्रपंचाला हातभार लावण्यासाठी पुराण, प्रवचन हेही चालू ठेवले. 'कायदा आणि माणुसकी' ही त्यांची पहिली कथा 'चैतन्य'च्या मार्च १९३६ च्या अंकात प्रसिद्ध झाली. त्यानंतर कितीही अडचणी आल्या, तरी शास्त्रीबुवांनी आपले कथालेखन नेटाने चालू ठेवलं. प्रारंभी त्यांनी 'गोव्यातील सत्तरीचे राणे' यांच्या बंडावरील प्रसंगांच्या कथा लिहिल्या. सत्तरी हे गोव्यात सर्वार्थाने उपेक्षित होते, हे लक्षात घेऊन त्यांनी तेथील प्रसंग-घटनांच्या, लोकांच्या कथा लिहायचे ठरवले. अशा प्रकारे शास्त्रीबुवांनी जाणूनबुजून गोमंतकीय जीवनाचे अधिष्ठान निवडले. साहजिकच त्यांच्या कथा प्रादेशिक आहेत. कथांतून आलेले गोमंतकीय जीवन, निसर्ग इत्यादी कथाविषयाशी इतके एकरूप झाले की, ते कथांतून अलग काढताच येत नाही. त्यामुळेच 'महादेवशास्त्री जोशी सहसा गोव्याबाहेर येत नाहीत.' असा आरोप त्यांच्यावर झाला. आपल्या या मर्यादित क्षेत्रातच आपण खूप खोलवर जावे अन् तिथली राहणी, सामाजिक अर्थिक अडचणी, निसर्गसंकेत, चालीरीती या सगळ्यांचाच कलात्मक आविष्कार कथेद्वारे करावा, असे शास्त्रीबुवांचे मत होते. त्यामुळेच स्वतःच्या या मर्यादित विश्वात त्यांच्या प्रतिभेने अगदी मोकळेपणाने संचार केला.

इ.स. १९३५ ते १९५६ या वीस वर्षांच्या कालावधीत 'वेलविस्तार', 'खडकातले पाझर',

‘विराणी’, ‘मोहनवेल’, ‘कल्पित आणि सत्य’, ‘भावबळ’, ‘प्रतिमा’, ‘घररिघी’, ‘पुत्रवती’ आणि ‘कन्यादान’ हे दहा कथासंग्रह आणि या संग्रहातून समाविष्ट न झालेल्या ३०-३५ असंकलित कथा, अशी विपुल कथानिर्मिती केली. ऐन प्रसिद्धीच्या झोतात असतानाच, वाचकांकडून नवनवीन कथांची मागणी होत होती, तरीही शास्त्रीबुवांनी कथालेखनाचा संन्यास घेतला. आणि १९५७साली भारतीय सांस्कृतिक मंडळाची स्थापना करून त्यांनी स्वतःला कोशाच्या कामासाठी वाहून घेतले.



अधुनिक यंत्रयुगीन संस्कृतीपूर्वीच्या माणुसकीवर आधारलेल्या, आपल्या हृदयाच्या गाभ्यात जपलेल्या गोमंतकीय समाजजीवनाचे चित्रण त्यांनी कथांतून केले. ‘पंडित महादेवशास्त्री जोशी’ ह्या आपल्या भारदस्त नावानिशी त्यांनी लघुकथेच्या दालनात पाऊल टाकले, ते उदात्त जीवनमूल्यांवरील दृढ श्रद्धेचे पाथेय घेऊनच. प्रापंचिक अडचणींतही कौटुंबिक जिव्हाळा आणि शांत-समाधानी वृत्ती ढासळू न देणाऱ्या व्यक्ती त्यांच्या कथांत दिसतात. शहरी जीवनातून लुप्त होत जाणारे मांगल्य त्यांना प्रतीत झाले होते. प्रादेशिक गोमंतकीय कथांना लागलेले वैषयिक ग्रहण दूर करत शास्त्रीबुवांनी निसर्गाच्या सान्निध्यातील गोमंतकीय जीवनाचे सात्त्विक दर्शन घडवीत उमललेल्या आपल्या कथांनी मराठी सारस्वताचे कथाभांडार समृद्ध केले.

**रसरशीत व्यक्तिचित्रणे**

त्यांनी रंगवलेले कनिष्ठ मध्यमवर्गीय ब्राह्मणाचे गृहस्थजीवन अतिशय मनोरम झाले आहे. गरिबीतही टिकवलेला गृहस्थधर्म, कणखरपणा, सडेतोडवृत्ती, स्वत्वाची बूज, माणुसकी, पावित्र्य आणि सर्जनता अशा गुणसमुच्चयांनी ते समृद्ध झाले आहे. माता, गृहिणी, भगिनी, प्रेयसी, सखी आणि पत्नी आशा विविध रूपांतील स्त्रियांप्रमाणेच पती, पिता, सासरा, पुत्र, जावई, शेजारी, बंधू, सखा, मित्ररूपातील आणि शत्रुरूपातील पुरुषही त्यांच्या कथांतून आपल्याला भेटतात. तेही निखळ वास्तववादाच्या चौकटीतून आणि कलेच्या माध्यमातून. लोप पावत चाललेल्या मध्यमवर्गीय गोमंतकीय ब्राह्मणी संस्कृतीचे साहित्यरूपाने केलेले जतन अतिशय मोलाचे आहे. शास्त्रीबुवांच्या मनाचा कल स्त्री-मनाचे, जीवनाचे दर्शन घडवण्याकडे आहे. हे स्त्री-दर्शन बहुढंगी, बहुरंगी आहे. प्रेमळ मातांच्या जोडीला विक्षिप्त माता; अज्ञाधारक, पीळदार मनाच्या सुकन्या, बहीण बालमैत्रीण; निष्ठावंत सहचारिणी; खाष्ट तशीच प्रेमळ सासवा; कुलवती मर्यादाशील सून; प्रौढ कुमारिका तशाच नैराश्याने वेढलेल्या विधवा; परित्यक्ता, अभिसारिका, निखंडिता अशा विविध भूमिकांतील स्त्रीच्या संवेदना मनोवेदना, वेदना, तिच्या भावना नि मनाची होणारी परोपरीची आंदोलने त्यांनी सहृदयतेने रंगवली आहेत. त्यांच्या अंगी मानीपणा, सात्त्विकता, करारीपणा, निग्रह, धाडस, पतिनिष्ठा, पावित्र्य, सोशिकता, नि साधेपणा इत्यादी गुण आहेत. तशीच त्यांची स्खलनशीलता आणि दुबळेपणाही त्यांनी लपवला नाही.

कमालीचे जीवंत अन् रसरशीत व्यक्तिचित्रण हा त्यांच्या कथेचा विशेष आहे. बाह्यवर्णन, कृती हावभाव-वर्णन, निवेदकाचे भाष्य आणि लेखकाचे भाष्य, सत्याचे अधिष्ठान यांच्या जोडीने अंतरंग, शब्द आणि कृती यांची एकसंधता यांमुळे व्यक्तिचित्रणे मनोज्ञ झाली आहेत. ह्यांच्या काही कथांवर आधारलेले ‘मानिनी’, ‘वैशाखवणवा’, ‘कन्यादान’ यांसारखे काही चित्रपटही वैशिष्ट्यपूर्ण ठरले.

**भारतीय संस्कृति कोश**

त्यांनी ज्ञानराज प्रकाशन सुरू केले व त्याद्वारे बाल-किशोर वाचकांसाठी चरित्रे, प्रवासवर्णने, कथा आणि कोश इत्यादी विपुल साहित्य निर्माण केले. आईच्या आठवणी भाग १ ते ३, प्राचीन सुरस गोष्टीमाला खंड १ ते १०, कथा कल्पलतामाला १० खंड, जनपद कथामाला, लोककथाकुंज, भारती उपकथामाला, कथा कौमुदीमाला यांप्रमाणे ‘इतर कथा’, ‘मुलांचा नित्यपाठ’, ‘नवनीत रामायण’, ‘भारताचे कंठमणी’ अशांसारखी पुस्तके लिहून मुलांच्या हातात कशा

प्रकारची पुस्तके द्यावीत, हा पालकांचा प्रश्न सोडवला.

बाल-कुमारांसाठी लिहिलेल्या या पुस्तकांचे रंजकता, शाप-उःशापांची पखरण, अद्‌भुतता, अशक्यप्रायता, उद्‌बोधन हे विशेष आहेत. त्यातून त्यांनी अस्पृश्यता निवारण्याची शिकवण दिली. पौराणिक व्यक्तींचे केलेले मानुषीकरण बालवाचकांना भावते. इ.स.१९६२मध्ये कोशाचा पहिला खंड प्रसिद्ध झाला आणि शेवटचा १०वा खंड इ.स.१९७९मध्ये प्रसिद्ध झाला.

भारतातील सर्व धर्म, परंपरा, भाषा, देवदेवता, कला वाङ्मय, राज्ये, धार्मिक आणि ऐतिहासिक स्थळे, व्यक्ती वगैरे तेरा हजार विषयांचा समावेश असलेले दहाही खंड शास्त्रीबुवांच्या खास प्रासादिक, रसाळ आणि ओघवत्या भाषेमुळे वाचनीय झाले आहेत. कोशात सुमारे दहा हजार चित्रांचा वापर केल्याने त्याला वेगळा उठाव आला आहे.

कोश वाङ्मयाद्वारे आपल्या समृद्ध संस्कृतीची ओळख करून देणाऱ्या शास्त्रीबुवांनी वाचकांना आलाम, मणिपूर, बंगाल आदी पुस्तकांद्वारे संपूर्ण भारतदर्शन घडवले. भारतीय मूर्तिकला, मूल्यवान गोष्टी, संस्कृतीची प्रतिके, दैवते, बालसंवर्धन, पूजाविधान वगैरे पुस्तकांतून वेगवेगळे विषय समर्थपणे आणि सहजपणे हाताळणाऱ्या शास्त्रीबुवांनी मराठी चरित्रवाङ्मयातही वैशिष्ट्यपूर्ण भर टाकली ती आद्यगुरू शंकराचार्य व एकनाथ ह्यांच्या रसाळ चरित्रांनी; बालवाचकांसाठी लिहिलेल्या चरित्रकथांनी. त्यांची दोन आत्मचरित्रे ‘आत्मपुराण’ आणि ‘आमचा वानप्रस्थाश्रम’ बहुसंख्य रसिकांची दाद मिळवून गेली आहेत.

जीवनातील संकटांना तोंड देत-देत मराठी साहित्यात अशी मोलाची भर टाकणारा हा साहित्यिक मनाचा अतिशय स्वच्छ, प्रांजळ अन् हळवा होता. २६ऑक्टोबर१९९२ रोजी पत्नी सौ.सुधाताई जोशी यांचे कर्करोगाने निधन झाल्यावर शास्त्रीबुवा अंतर्बाह्य उन्मळून पडले. ‘आता कशासाठी जगू’ हा मंत्र जपून, प्रायोपवेशन करून, ह्या हळव्या साहित्यिकाने ११डिसेंबर१९९२ला आपला देह ठेवला.

– डॉ. शुभलक्ष्मी जोशी

**संदर्भ :**

*१. जोशी महादेवशास्त्री; ‘आत्मपुराण’, आनंद प्रकाशन; १९८५.*
*२. जोशी महादेवशास्त्री; ‘आमचा वानप्रस्थाश्रम’, कॉन्टिनेन्टल प्रकाशन; १९८३.*
*३. जोशी शुभलक्ष्मी; ‘कथाकार पंडित महादेवशास्त्री जोशी’; अनमोल प्रकाशन; २००५.*

ज

## जोशी, माधवराव नारायण

***जोशी, महादेव नारायण***

☞ **मुख्य नोंद – नाटक खंड**

## जोशी, यशवंत गोपाळ

**कथाकार, संपादक**

**१७ डिसेंबर १९०१ – ७ नोव्हेंबर १९६३**



यशवंत गोपाळ जोशी यांचा जन्म भिगवण (जि.पुणे) येथे झाला. त्यांना बिकट आर्थिक परिस्थितीमुळे पाचव्या इयत्तेत शाळेस मुकावे लागले. त्यांनी काही काळ येरवडा कारागृहामध्ये व मिलिटरी अकाउन्ट्समध्ये नोकरी केली.

जोशी यांचे १९३२ ते १९४३ या काळात लिहिलेल्या कथांचे ‘पुनर्भेट’ या संग्रहाचे सात खंड, ‘तुळशीपत्रे आणि इतर कथा’ (१९३७), ‘रेघोट्यांचे दैवत’ (१९४७), ‘मायेच्या सावल्या’ (१९४७), ‘जाईजुई’ (१९४९), ‘तरंग’ (१९५०) हे कथासंग्रह. ‘पडसाद’ (१९३८), ‘श्रीकांत’ (१९३७), ‘त्रिदोष’ (१९३७), ‘होमकुंड’ (१९३६), इत्यादी कादंबऱ्या. ‘दुधाची घागर’ (१९७२) हे आईच्या आठवणी सांगणारे पुस्तकही गाजले आहे. तसेच ‘अनौपचारिक मुलाखती’ (१९४२) हे त्यांचे आगळे-वेगळे पुस्तकही गाजले आहे. त्यांच्या ‘शेवग्याच्या शेंगा’, ‘वहिनीच्या बांगड्या’, ‘दुधावरची साय’ या कथा महाराष्ट्रभर



ज्ञानवंत

स्वतःच्या देहाच्या सुखासाठी जो कंजूषपणाचा आव ठेवून राहतो तर दानधर्मात तो कधीही उणा पडत नाही!

तो ज्ञानवंत दिसायला दरिद्री दिसतो, देहाचे [illegible] सोडून केल्यामुळे तो दिसायला निःसत्त्व दिसतो पण अंतरंगात मात्र [illegible] असतो. दान देण्यांत तर तो ज्ञानवंत कल्पतरू इतका उदार असतो!

यशवंत गोपाळ जोशी

### प्रयोगक्षम कथालेखन

य. गो. जोशी यांच्या संपादनाखाली १९४७ साली 'प्रसाद'चा पहिला अंक प्रसिद्ध झाला. १९७२ साली प्रसादचा रौप्य महोत्सव मोठ्या थाटात साजरा झाला आणि १९९७ साली साजरा झालेला 'प्रसाद'चा सुवर्ण महोत्सवसद्धा उल्लेखनीय आहे. फडके-खांडेकर ह्यांच्या कथांचा उदोउदो होत असताना, मराठी कथा तंत्रमंत्राच्या साच्यात अडकलेली असताना मराठी कथेला यातून बाहेर काढण्यासाठी य. गो. जोशींनी जाणीवपूर्वक प्रयत्न केला. त्यांनी आपली कथा प्रयोगक्षम केली. मराठी वाचकांच्या नव्या अभिरुचीला प्रोत्साहन देणाऱ्या नव्या कथा लिहिल्या. आशय आणि अभिव्यक्ती ह्यांचे नवे तंत्र निर्माण केले. ही नवी कथा जोशी यांचे 'नवे विलायती विचार टिपायचे आणि नव्या मनूची भगवद्गीता म्हणून विकत सुटायचे' या परभृततेवर शरसंधान करणारे विचार सांगून जाते. त्यातील नवता व आधुनिकता ते डोळसपणे टिपतात. कथेतील कागदी फुले त्यांना नकोशी वाटतात व ताज्या सुगंधी फुलांचे ताटवे ते आपल्या कथेच्या बागेत फुलवतात आणि या कागदी फुलांपेक्षा ही फुले रसगंधात कशी वेगळी आहेत, ते रसिकांना दाखवून देतात.

दुसरी एक विशेष गोष्ट य. गों. नी कथेच्या प्रांतात केली; ती म्हणजे हास्यास्पद आणि खुरट्या वाङ्मयीन प्रवृत्तीची आपल्या कथेतून त्यांनी खिल्ली उडवली. आपल्या उपहासपर कथांतून ते हे कार्य पार पाडतात. कल्पनेचा फुगा खूप फुगवत न्यायचा आणि त्याला टचकन टोचायचे की झाले आपले काम! कुटुंब कथेचे प्रणेते म्हणून य. गों. चा गौरव केला जातो. प्रकाशन व्यवसायाला त्यांनी साधनशुचिता आणून दिली. ते स्वतः साहित्यिक असल्यामुळे या व्यवसायाला त्यांनी एक

गाजल्या. या कथांवरचे चित्रपटही गाजले. जोशी यांना पुणे संस्कृतीचे आकर्षण होते. तिथल्या सदाशिव पेठी संस्कृतीचे जतन करणाऱ्या व नवे तंत्र आणि 'देशीकार लेणे' धारण करणाऱ्या त्यांच्या कथा आहेत. फडके-खांडेकर तंत्रबद्ध कथेच्या पार्श्वभूमीवर आपल्या नव्या वाटेने त्या अधिक उठून दिसतात.

य. गो. जोशी यांची 'प्रकाशक' म्हणून ख्याती होती. १९३८ ते १९४१ या काळात त्यांनी 'वाद विवेचन माला' म्हणून १३ पुस्तके प्रकाशित केली. त्यांतील फॅसिझम व समाजवाद ह्यांना वैचारिक पार्श्वभूमी देणारे त्यांचे तात्त्विक अधिष्ठान आजही स्मरणात राहणारे आहे. जोशी यांच्या व्यक्तिमत्त्वावर वारकरी संप्रदायातील सोनोपंत दांडेकरांचा विशेष प्रभाव होता. त्यांच्या प्रभावामुळे जोशी यांनी लिहिलेली 'सुबोध ज्ञानेश्वरी' ज्या गद्य-कथामालेतून अवतरते ती सात्त्विक-रसिक वाचकांस नवा विरंगुळा देऊन जाते.

नैतिक अधिष्ठान प्राप्त करून दिले. 'प्रसाद' प्रकाशनाची परंपरा आणि नवता हे तत्त्व जपून आहे. सारांश 'प्रसाद' मासिकाचे व प्रकाशनाचे साक्षेपी संपादक, वेगळ्या वळणाच्या 'स्व'तंत्र मराठी कौटुंबिक कथेचे भाष्यकार, सुबोध ज्ञानेश्वरीचे उद्‌गाते आणि अस्सल देशीकार लेणे मराठी साहित्याला बहाल करणारे श्रेष्ठ साहित्यिक म्हणून य. गों. जोशी चिरस्मरणीय आहेत.

– मधू जामकर

**संदर्भ :**

*१. 'प्रसाद' दिवाळी अंक, २००८.*
*२. जामकर मधू; 'मराठी साहित्य रंग आणि अंग'.*

## जोशी, रघुनाथ कृष्ण

☞ **मुख्य नोंद – चित्रकला खंड**

## जोशी, रामचंद्र भिकाजी

**प्रवासवर्णनकार, समीक्षक**

**१० जुलै १९०३ – नोव्हेंबर १९९१**



हैद्राबादच्या एका सुसंस्कृत ब्राह्मण कुटुंबात जन्मलेल्या रामचंद्र भिकाजी जोशी यांचे बालपण व सुरुवातीचे शिक्षण तेथेच झाले. बाळबोध आणि संस्कृतसोबत उर्दूचे 'कित्ते' गिरवल्यामुळे या दोन्ही भाषांच्या प्रवृत्ती त्यांच्या व्यक्तित्वात एकजीव झाल्या. उर्दू व हिंदी साहित्याचे वाचन त्यांनी सतत चालू ठेवले. 'उर्दूतील साहित्य व साहित्यिक यांच्याविषयी माहिती व लेख हवा असल्यास जोशींची हमखास आठवण येत असे व तेही मागणी पुरी करीत,' असे गोविंदराव तळवलकरांनी 'पुष्पांजली' खंड २ मध्ये नमूद करून ठेवले आहे. जोशींचे नंतरचे शिक्षण इंदूरला झाले. नोकरीनिमित्त काही वर्षे दिल्लीला आकाशवाणीवर त्यांनी वृत्तनिवेदकाचे काम केले. मराठी, उर्दू यांबरोबरच इंग्रजी भाषेच्या साहित्यावर त्यांचे अत्यंत प्रेम होते. प्रवासाची आवड असल्याने त्यांचे मन कायम ताजेतवाने राहिले.

'लग्नाच्या वेळी भाऊंजवळ एक बी.ए.ची पदवी सोडली, तर दुसरे काही नव्हते. आईवडील नव्हते, घरदार नव्हते, आरोग्य नव्हते, नोकरी जेमतेमच होती. लेखक म्हणून नाव होते असेही नाही,' असे सांगून त्यांची एकुलती एक कन्या नीलिमा भावे म्हणतात, 'आम्ही कोकणस्थ होतो पण नावापुरतेच. म्हणजे घरात पूजा-अर्चा, देव, व्रतवैकल्ये... काहीच नव्हते. ताई (आई) तेव्हादेखील पाचवारी पातळे नेसायची, मंगळसूत्र घालीत नसे. भाऊंचा एकेरी उल्लेख करायची.' जोशी कुटुंब दादरच्या पोर्तुगीज चर्चजवळच्या, विजेचे दिवेही नसलेल्या, भाज्यांचे वाफे असलेल्या, विहिरीवर मोटा चालणाऱ्या भागातील वेलणकर चाळीतल्या शेवटच्या मजल्यावर भाड्याच्या खोलीत २५ वर्षे राहिले. समुद्रावरचा वारा थेट घरात यायचा. त्या वाऱ्याच्या मार्गात आरामखुर्चीत बसून जोशी यांचे लेखन झाले.

इंग्रजी विषयाचे व्यासंगी प्राध्यापक म्हणून त्यांचा लौकिक होता. जोशींच्या साहित्यात प्रमाणबद्धता, शिष्टता, संयम, अभिरुची व अलिप्तता आढळते. त्याचा प्रत्यक्ष व अप्रत्यक्ष संबंध इंग्रजी व्यासंगात असावा. संस्कृत, उर्दू व इंग्रजी या तिन्ही भाषांचे संस्कार त्यांच्या लेखनावर झाले. 'या तिन्ही भाषांच्या उत्तम संस्कारांतून एक विशिष्ट तोल जोशी यांच्या शैलीला, जीवनविषयक दृष्टीला आणि व्यक्तित्वालाही लाभला आहे,' असे मत प्रा. रमेश तेंडुलकरांनी व्यक्त केले आहे.

जोशींच्या पत्नी सुधाबाईही साहित्याचा मनापासून आस्वाद घेणाऱ्या व घरे बदलणाऱ्या, आवडीने प्रवास करणाऱ्या लेखिका होत्या. 'सुधाबाईंची मनापासूनची इच्छा भाऊंनी भरपूर लिहावे, भरीव लिहावे, नाव मिळवावे आणि तो आनंद आपण उपभोगावा अशी असायची' असे त्यांची कन्या म्हणते. सुधाबाईंच्या निधनानंतर (२९ सप्टेंबर १९९१) भाऊंना आलेल्या

सांत्वनपर पत्रांतून ‘जुन्या पिढीतले एक आधुनिक विचारांचे सुसंस्कृत दांपत्य हीच ओळख आधोरेखित झाली.

साहित्याची आवड असली, तरी साहित्य संस्थांतील अधिकारपदे अडवून बसण्याची हौस जोशींना कधीच नव्हती. साहित्यविषयक मेळाव्यांत मात्र ते हमखास असत. ‘त्यांच्या प्रवासवर्णनात गैरवाजवी तपशील नाही, आणि उगाच आणलेली भावुकताही नाही. काका कालेलकरांची प्रवासवर्णने जोशींना आवडत.’ असे तळवलकरांनी नमूद करून म्हटले आहे, ‘मराठीतील वैशिष्ट्यपूर्ण प्रवासवर्णनांत जोशी यांच्या प्रवासवर्णनांचा समावेश होतो. अनेक ठिकाणांच्या इतिहासाची जोड त्यांच्या प्रवासविषयक लेखांत असल्यामुळे वर्तमानाबरोबर भूतकाळाची माहिती होते आणि वर्तमानाचा संदर्भ समजतो... चिंतनशीलतेची जोड या प्रवासवर्णनाला मिळालेली होती.’ महाडच्या महाविद्यालयामध्ये प्राचार्य पदावर असताना जोशींनी निष्ठेने काम केले. ग्रामीण भागातील महाविद्यालयांच्या प्रश्नांविषयी त्यांचा दृष्टिकोन सहानुभूतीचा होता. अभिजात, सुसंस्कृत आणि चोखंदळ सौंदर्यदृष्टी असलेल्या जोशींच्या बोलण्यात अगत्य व कळकळ, पसंतीत, नापसंतीत तशीच स्पष्टता असे. प्रा. रमेश तेंडुलकरांच्या अभिप्रायाप्रमाणे ‘एखाद्या व्यक्तीच्या सुखदुःखात रमण्यापेक्षा एखादे स्थळ, तेथील समाज, तेथील निसर्ग आणि संस्कृती यांनी माणसांच्या मनात भरलेले विविध रंग न्याहाळणाऱ्या जोशींची लेखणी अधिक समरस होते... ‘अनोळखी वाटा’मध्ये आघाडीच्या उर्दू कथाकारांबरोबर उर्दू कथालेखिकांच्या साहित्याचाही परिचय करून दिला आहे.’

‘काचेचे कवच’ (१९४९) व ‘झम्मन’ (१९५७) हे त्यांचे कथासंग्रह; ‘वाताहत’ (१९४८) ही कादंबरी; ‘मजल दरमजल’ (१९६१), ‘वाटचाल’ (१९७०), ‘उथव’ (१९७८), ‘घाट शिळेवरी उभी’ (१९८४) ही त्यांची इतर पुस्तके प्रसिद्ध आहेत.

– वि. ग. जोशी

## जोशी, लक्ष्मणशास्त्री

***जोशी, लक्ष्मण बाळाजी, तर्कतीर्थ***

**तत्त्ववेत्ते, विश्वकोशाचे संपादक**

**२७ जानेवारी १९०१ – २७ मे १९९४**



विसाव्या शतकातील गाढे विद्वान, प्रबोधनकार, लेखक व वक्ते म्हणून तर्कतीर्थ लक्ष्मणशास्त्री जोशी ओळखले जातात. शास्त्रीजी हे त्यांचे रूढ नाव. वडील बाळाजी व आई चंद्रभागा. शास्त्रीजींचा जन्म धुळे जिल्ह्यातील पिंपळनेर येथे झाला. प्रारंभीचे शिक्षण तिथेच झाल्यानंतर वयाच्या चौदाव्या वर्षी शास्त्रीजी वाई (जि. सातारा) येथील प्राज्ञ पाठशाळेत शास्त्राध्ययनासाठी दाखल झाले. तेथील केवलानंद सरस्वती हे त्यांचे गुरू. प्राज्ञ पाठशाळा पारंपरिक पठडीतील पण काहीशा आधुनिक दृष्टीची व राष्ट्रीय बाण्याची होती. या पाठशाळेत काही काळ आचार्य विनोबा भावे हेदेखील. अध्ययनासाठी राहिले होते. त्यांच्याकडूनच शास्त्रीजी इंग्रजी भाषा शिकले व पुढे इंग्रजी वाचन-लेखनात त्यांनी प्रभुत्वही मिळविले. परंपरागत शास्त्री-पठडी व इंग्रजीप्रधान आधुनिकता यांचा सर्जनशील मेळा शास्त्रीजी घालू शकले. शास्त्रीजींनी सुमारे बारा वर्षे या पाठशाळेत न्याय-वेदान्तादी प्राचीन शास्त्रांचे अध्ययन केले. कोलकाताच्या शासकीय संस्कृत महाविद्यालयातून त्यांनी पुढे तर्कतीर्थ ही पदवी संपादन केली (१९२३). त्यानंतर ते आमरण वाई येथेच राहिले व प्राज्ञ पाठशाळेचे कार्य त्यांनी पुढे चालविले. १९२७ साली त्यांचा विवाह झाला. पत्नीचे नाव सत्यवती. त्यांना दोन मुलगे व दोन मुली होत्या. महाबळेश्वर येथे तर्कतीर्थांचे निधन झाले.

महात्मा गांधीच्या नेतृत्वाखालील कायदेभंगाच्या चळवळीत त्यांनी १९३० व १९३२ साली भाग घेतला व सहा-सहा महिन्यांचा कारावासही भोगला. नंतर मानवेंद्रनाथ राय यांच्या रॅडिकल डेमोक्रॅटिक पार्टीचे ते

क्रियाशील सदस्य झाले (१९३६-१९४८). त्यानंतर मात्र ते काँग्रेस पक्षाशी अनौपचारिक पद्धतीने हयातभर संबंधित होते. प्राचीन व आधुनिक ज्ञानपरंपरांचा समतोल समन्वय साधणाऱ्या शास्त्रीजींच्या सखोल व्यासंगाला उद्देशूनच मानवेंद्रनाथ राय यांनी 'भारतीय प्रबोधनाचे सर्वोत्कृष्ट अपत्य' (द बेस्ट प्रॉडक्ट ऑफ इंडियन रेनेसान्स) अशा शब्दांत शास्त्रीजींचा गौरव केला.

महाराष्ट्र शासनाच्या साहित्य संस्कृती मंडळाचे शास्त्रीजी हे पहिले अध्यक्ष होत. १९८० पासून पुढे निधन होईपर्यंत ते राज्यशासनाच्याच मराठी विश्वकोश मंडळाचे अध्यक्ष व मुख्य संपादक होते.

**चालता बोलता ज्ञानकोश**

शास्त्रीजी धर्मसुधारणावादी होते. कुकुरमुंडे येथील सनातन धर्मपरिषदेत धर्मसुधारणेचे सप्रमाण समर्थन करण्याची संधी त्यांना लाभली (१९२५). त्याच वर्षी वाराणसी येथील संस्कृत पंडित संमेलनातही त्यांनी धर्मसुधारणेची बाजू मांडली. भारताच्या राज्यघटनेचे संस्कृतमध्ये भाषांतर करण्याचे कार्यही त्यांनी केले. सोरटी सोमनाथ मंदिराच्या जीर्णोद्धारप्रसंगी पौरोहित्य करण्याचा मान शास्त्रीजींना लाभला (१९५१).

दिल्ली येथील अखिल भारतीय मराठी साहित्य संमेलनाचे अध्यक्षपद शास्त्रीजींनी भूषविले (१९५४). त्यांच्या 'वैदिक संस्कृतीचा विकास' या ग्रंथास साहित्य अकादमीचा व मराठीतील पहिलाच असा पुरस्कार मिळाला (१९५५). संस्कृत पंडित (१९७३), पद्मभूषण (१९७६) व नंतर पद्मविभूषण अशा सन्मान्य पदव्याही त्यांना लाभल्या.

प्राज्ञ पाठशाळेचा धर्मकोशाचा बृहत्प्रकल्प व राज्यशासनाचा सर्वविषयसंग्राहक मराठी विश्वकोशाचा महाप्रकल्प यांचे नियोजन, संपादन तथा मार्गदर्शन हे शास्त्रीजींचे अत्यंत महत्त्वाचे ज्ञानकार्य होय. धर्मकोशाची पाच कांडे (संकल्पित अकरा) व एकवीस खंड (संकल्पित चाळीस) आजपर्यंत प्रकाशित झाले आहेत. हिंदू धर्माच्या सर्व ज्ञानविषयांवरील प्राचीन प्रमाणग्रंथांतील वचने धर्मकोशात विषयावर संकलित केलेली आहेत. मराठी विश्वकोशाचे पहिले सतरा खंड व एक परिभाषासंग्रह प्रसिद्ध झाले आहेत. आधुनिक तथा प्राचीन ज्ञानविज्ञानक्षेत्रांतील महत्त्वाच्या सर्व विषयांवर मराठी विश्वकोशात तज्ज्ञ अभ्यासकांनी नोंदी लिहिलेल्या आहेत. शास्त्रीजींचे हे दुहेरी कोशकार्य मराठी भाषा, संस्कृत भाषा, हिंदू धर्म व मराठी ज्ञानविज्ञानवाङ्मय यांच्या दृष्टीने मोलाचे, मार्गदर्शक व ऐतिहासिक महत्त्वाचे आहे.

ज

शास्त्रीजींचा पिंड आचार्याचा, शिक्षकाचा होता. ते स्वभावधर्माने वक्ते, प्रबोधनकार होते. स्वातंत्र्योत्तर काळात त्यांनी महाराष्ट्रभर व बाहेरही अखंडपणे शेकडो भाषणे दिली व व्याख्यानमाला गुंफल्या. त्यांची बहुतेक पुस्तके ही मुळातही व्याख्याने वा व्याख्यानमाला आहेत. सर्वविषयप्रतिवादक असा चालता-बोलता 'ज्ञानकोश', असेच त्यांचे वर्णन करावे लागेल. एखादा अवघडसा गुंतागुंतीचा विषय सुबोधपणे स्पष्ट करणारे त्यांचे वक्तृत्व मोठे विचारप्रवर्तक असे. स्वातंत्र्योत्तर काळातील महाराष्ट्राच्या सांस्कृतिक क्षेत्रात शास्त्रीजी गुरुस्थानी होते.

शास्त्रीजींची प्रकाशित ग्रंथसंपदा अशी:

'शुद्धिसर्वस्वम्' (संस्कृत,१९३४), 'आनंदमीमांसा' (१९३८), 'हिंदू धर्माची समीक्षा व सर्वधर्मसमीक्षा' (१९४१-१९८५), 'जडवाद' (१९४१), 'जोतिनिबंध' (१९४७) 'वैदिक संस्कृतीचा विकास' (१९५१) 'आधुनिक मराठी साहित्याची समीक्षा व रससिद्धान्त' (१९७३), 'विचारशिल्प' (निवडक लेख, संपादक प्रा. रा. ग. जाधव), 'राजवाडे लेखसंग्रह' (संपादित, १९६४), 'लोकमान्य टिळक लेखसंग्रह' (संपादित, १९६९), 'लेखसंग्रह-खंड पहिला' (१९८२-१९९४), 'आद्य शंकराचार्य : जीवन आणि विचार' (संपादन-अरुंधती खंडकर, १९९७).

'वैदिक संस्कृतीचा विकास' (तिसरी आवृत्ती) या सुमारे सहाशे पृष्ठांच्या बृहद् ग्रंथात सहा व्याख्यानांची सहा प्रकरणे आहेत. वेदकालीन संस्कृतीपासून आधुनिक भारतातील सांस्कृतिक आंदोलनापर्यंत या मीमांसेचा व्यापक पट आहे. इतिहास-पुराणे, रामायण, बौद्ध व जैन यांचा धर्मविजय हे महत्त्वाचे सांस्कृतिक टप्पे त्यात

आहेत. या ग्रंथाच्या दुसऱ्या आवृत्तीत शास्त्रीजींनी खूप भरही घातली आहे. 'विद्यमान भारतीय संस्कृतीच्या वैचारिक सामर्थ्याचे मूळ अधिष्ठान वैदिक संस्कृती आहे,' हे या ग्रंथातील मुख्य प्रमेय आहे. या ग्रंथाचा इंग्रजी अनुवादही झाला आहे.

**प्रबोधन युगाचे सर्वश्रेष्ठ अपत्य**

शास्त्रीजींनी मार्क्सवादी चिकित्सापद्धतीने १९४१ साली हिंदू धर्माची समीक्षा केली. पण त्या चिकित्सापद्धतीच्या मर्यादा लक्षात आल्यानंतर मग स्वतंत्रपणे व्यापक दृष्टीने वैदिक संस्कृतीची मीमांसा केली. 'हिंदुधर्मसमीक्षा व सर्वधर्मसमीक्षा' (१९८५) या पुस्तकात शास्त्रीजींच्या दृष्टिकोनातील बदलाचे दर्शन घडते. शास्त्रीजींनी करून दिलेली जडवादाची ओळख, आद्य शंकराचार्यांच्या जीवनकार्याचे स्वतंत्रपणे व समतोलपणे घडवलेले दर्शन आणि रससिद्धान्ताविषयीचे विचार या सर्वांतून शास्त्रीजींचे समतोल, समन्वयशील व ऐतिहासिक मर्मदृष्टीशी सुसंगत असे विशाल सांस्कृतिक परिप्रेक्ष्य लक्षात येते. इतिहासाचार्य राजवाडे व लोकमान्य टिळक यांच्या लेखसंग्रहांच्या प्रस्तावना म्हणजे प्रज्ञावंत सांस्कृतिक धुरीण. त्यांचा कालखंड व त्यांचे कार्य यांना समन्वितपणे व समग्रपणे कसे समजावून घ्यावे व द्यावे, याचा वस्तुपाठच आहेत. शास्त्रीजींच्या पुरोगामी विवेकबुद्धीची प्रचिती त्यांच्या 'जोतिनिबंधां'तून येऊ शकते.

'लेखसंग्रह'- खंड पहिला (पृष्ठे ५९०-१९८२) हा ग्रंथराज शास्त्रीजींच्या विशाल सर्वांगीण ज्ञानसंचिताचे विस्मित करणारे दर्शन घडवतो. वैज्ञानिक व ऐतिहासिक भौतिकवाद, भारतीय संदर्भातील धर्म व समाज आणि भारतीय तत्त्वज्ञान अशा तीन विभागांतील या लेखसंग्रहात एकूण ६७ लहानमोठे विवेचक लेख आहेत. यातील अनेक लेख मुळात विश्वकोशासाठी म्हणून लिहिलेले आहेत. आधुनिक पश्चिमी संस्कृतीच्या अधिष्ठानी असलेला भौतिकवाद व भारतीय संस्कृतीच्या अधिष्ठानावर असलेला अध्यात्मवाद या दोन ध्रुवांमधील मनुष्यसंस्कृतीच्या अवकाशातील सगळे प्रश्नोपप्रश्न शास्त्रीजींनी इथे चिकित्सापूर्वक स्पष्ट केले आहेत. या प्रज्ञावंत मीमांसकाच्या अवघ्या ज्ञानोपासनेचे मुख्य विधान म्हणजे हा लेखसंग्रह होय.

शास्त्रीजींची भाषाशैली सुबोध पण सप्रमाण विचारप्रतिपादन ठामपणे करणारी आहे. त्या शैलीला प्रचंड बौद्धिक व्यासंगाची व आत्मविश्वासाची बैठक आहे. मराठी गद्यातील विचारसौंदर्याचा तो एक नमुना होय.

शास्त्रीजी हे आधुनिक भारताच्या अभूतपूर्व प्रबोधनयुगाचे सर्वोत्कृष्ट अपत्य होतेच होते; पण त्याचबरोबर ते स्वतंत्र नवभारताच्या सांस्कृतिक पुनर्रचनेचे एक द्रष्टे भाष्यकारही होते.

म्हणूनच आजउद्याच्या प्रत्येक नव्या पिढीने शास्त्रीजींच्या ग्रंथरूप वारशाचे वाचन-मनन केले पाहिजे, कारण त्यांच्या ग्रंथरूप वाग्यज्ञाची प्रस्तुतता कायम टिकणारी आहे.

– रा. ग. जाधव

**संदर्भ :**


१. *'जाधव रा. ग.; 'शास्त्रीजी'; १९९४.*
२. *खंडकर अरुंधती, 'तर्कतीर्थ : एक प्रज्ञाप्रवाह'; १९९५.*
३. *'तर्कतीर्थ लक्ष्मणशास्त्री जोशी : कार्य आणि विचार'; नवभारत मासिकाचा विशेषांक, १९८१;*


## जोशी, वामन मल्हार

**कादंबरीकार**

**२१ जानेवारी १८८२ – १९४३**

वामन मल्हार जोशी यांचा जन्म आजोळी, तळे या गावी झाला. वडील जोशीपण, याज्ञिकी करीत. वामनरावांचे प्राथमिक शिक्षण कोकणातील गोरेगाव येथे झाले. पुढील शिक्षण पुणे व अहमदनगर येथे झाले. एम.ए.च्या अभ्यासक्रमात त्यांनी तत्त्वज्ञान व तर्कशास्त्र हे विषय अभ्यासले. त्यानंतर कोल्हापूर येथील समर्थ विद्यालयात ते शिकवू लागले. ध्येयनिष्ठ गुरू म्हणून त्यांचा नावलौकिक झाला.

'विश्ववृत्त' मासिकाचे ते संपादक झाले. ब्रिटिशांच्या विरुद्ध स्वातंत्र्य लढ्यात त्यांनी भाग घेतला. त्याबद्दल त्यांना ३ वर्षे शिक्षा भोगावी लागली. महर्षी धोंडो केशव



कर्वे यांच्या हिंगणे येथील पाठशाळेत त्यांनी प्राध्यापक म्हणून काम केले.

'रागिणी उर्फ काव्यशास्त्रविनोद' ही त्यांची पहिली कादंबरी. स्त्री-स्वातंत्र्य, स्त्री-शिक्षण, द्विपतीकत्व, स्त्रियांचा सामाजिक दर्जा, ज्ञानाची श्रेष्ठता, ईश्वराचे अस्तित्व या विषयांचा ऊहापोह त्यांच्या 'आश्रमहरिणी', 'नलिनी' या कादंबऱ्यामधून केलेला आढळतो. 'सुशीलेचा देव' या कादंबरीत नव्या काळातील स्त्रीचे प्रगल्भ चित्र त्यांनी रेखाटले. 'इंदू काळे सरला भोळे' या कादंबरीत नीती, ध्येयप्रवणता, घटस्फोट याविषयीची त्यांची सुधारक मते व्यक्त होतात. पत्रात्म कादंबरीचा नवा प्रयोग त्यांनी या कादंबरीत केला.

'विस्तवाशी खेळ' हे नाटक आणि 'नवपुष्पकरंडक' हा कथासंग्रह त्यांनी लिहिला. अध्यात्मशास्त्राचा ऊहापोह 'नीतिशास्त्रप्रवेश' या ग्रंथातून केला. 'विचारविलास', 'विचारलहरी', 'विचारविहार' या ग्रंथांतून त्यांनी वाङ्मयविषयक विचार मांडले आहेत. 'सॉक्रिटीसाचे संवाद' या अनुवादित पुस्तकातून त्यांची चिंतनशीलता प्रत्ययास येते. 'तात्त्विक कादंबरीचे जनक म्हणजे वामनराव' असे गौरवोद्गार श्रीपाद कृष्ण कोल्हटकर यांनी काढले. वामनरावांची वाङ्मयीन भूमिका ही एकांगी नाही. ती व्यापक, उदार, सर्वसमावेशक आहे. १९३० मध्ये मडगाव येथे झालेल्या अखिल भारतीय मराठी साहित्य संमेलनाचे ते अध्यक्ष होते. ''वाङ्मयाचा उगम सत्यसंशोधन, सौजन्यबोध आणि सौंदर्यमीमांसा करण्याच्या लेखकाच्या ऊर्मीमध्ये असतो,'' हे त्यांचे विचार साहित्य जगताला अनुकरणीय आहेत. कादंबऱ्यांच्या माध्यमातून वा. म. जोशी यांनी आपले नीतीविषयक विचार प्रकट केले. विवाहसंस्था, घटस्फोट यांसंबंधीचे त्यांनी व्यक्त केलेले विचार आजच्या काळातही पुरोगामी वाटतात.

— श्याम भुर्के

**संदर्भ :**

*१. जोशी, वामन मल्हार; 'आश्रमहरिणी'.*

*२. जोशी वामन मल्हार; 'वाङ्मयमाला'.*

## जोशी, वासुदेव विनायक

**कादंबरीकार, नाटककार, निबंधकार**

**७ जानेवारी १८९४ - १९ मे १९६५**

'फरारी' (१९४५) या आपल्या लघुकथासंग्रहाच्या प्रस्तावनेत, वासुदेव जोशी म्हणतात 'मी लघुकथा लिहितो ते केवळ हौस, करमणूक म्हणून. लोकरंजन हीच लघुकथेची अखेरची कसोटी आहे. लघुकथेच्या प्रकाराप्रमाणे, हेतूप्रमाणे, लोकपरिस्थितीप्रमाणे वेळोवेळी, स्थळीकाळी लघुकथेचे तंत्र बदलत असते, आणि म्हणूनच मराठी लघुकथांच्या भोवती भिंती उभारू नयेत.'

'नाट्यनिबंध' (१९४२) हा त्यांचा नाट्यविषयासंबंधी लिहिलेल्या लेखांचा संग्रह आहे. नाटकातील संगीत, रस आणि राग यांचा संबंध भावगीत, कीर्तन, साधे गाणे, बोलपट, संगीताचे मराठीकरण या विविध विषयांवरील माहिती या लेखांतून त्यांनी मांडली आहे. १९२० पासून त्यांनी स्त्री-पुरुष प्रेमाचे केवळ स्वप्नाळू वृत्तीने वर्णन न करता, यातील अडचणी, फसगती यांकडे लक्ष वेधणारे विषय घेऊन कादंबरी लेखन केले. 'रोहिणी उर्फ कठीण कसोटी' (१९२९), 'जन्माचा बंदिवास' (१९३१), 'पराधीन' (१९३५), 'ओघळलेले मोती' (१९३७), 'न सुटलेले कोडे' (१९३९), 'अंतर' (१९४१), 'सूड' (१९४४), 'दुराचारी' (१९४६) इत्यादी कादंबऱ्यांतून त्यांनी स्त्रियांचा आर्थिक कोंडमारा, अनौरस संततीचे प्रश्न, मिश्रविवाह, घटस्फोटाची आवश्यकता, लैंगिक समस्या, दांपत्यातील विजोडपणा, परित्यक्तांचा प्रश्न इत्यादी अनेक कौटुंबिक, सामाजिक प्रश्न मांडले आहेत.

'स्त्रियांचे हक्क व सुधारणा' (१९३८), 'विवाहितांचे नंदनवन' (१९३८), 'अविवाहितांचे प्रश्न (१९४०), 'बदसूर जोडपी' (१९४२), 'वैषयिक जीवन' (१९४७) असे समाजशास्त्रीय स्वरूपाचे लेखनही त्यांनी

केले आहे. १९२८ साली जोशींनी 'हिंदू स्त्रियांच्या कायदेशीर हक्कांबद्दल' जागृती उत्पन्न करणारा ग्रंथ लिहिला. एवढेच नव्हे तर या विषयाचा सतत पाठपुरवाही केला. 'सनत्कुमार' (१९३५) हे पौराणिक नाटक त्यांनी लिहिले. 'रेशमी चिमटे' (१९३६) हा विनोदी लेखसंग्रह, आणि 'नरमगरम' (१९३८), 'म्हातारपणच्या उलाढाली' (१९४६) हे विनोदी लेखनही त्यांनी केले आहे.

कौटुंबिक, सामाजिक प्रश्न, तसेच लघुकथा, कादंबरी, नाटक, विनोदी लेखन अशा साहित्याच्या विविध प्रकारांत जोशी यांनी चौफेर मुशाफिरी केलेली दिसते.

– प्रा. मंगला गोखले

**संदर्भ :**


१. *जोशी वा. वि; 'फरारी';१९४५.*
२. *जोशी वा. वि.; 'नाट्यनिबंध'; १९४२.*
३. *कै. वासुकाकांच्या पुण्य स्मृतीस प्रणाम; ध्रुव-जानेवारी १९४४ : २४० पृष्ठ.*
४. *कै. वासुकाकांच्या पुण्यस्मृतीस वाहिलेले श्रद्धांजली; ध्रुव – फेब्रुवारी १९४४ : २७४ पृष्ठ.*
५. *कानिटकर, रा. प्र.; 'कर्मयोगी स्थित प्रज्ञ'; ध्रुव-जानेवारी १९४५; २८८ पृष्ठ. '*


## जोशी, वीर वामनराव

***जोशी, वामन गोपाळ***

☞ **मुख्य नोंद – पत्रकारिता आणि ललितेतर साहित्य खंड**

## जोशी, श्रीकृष्ण जनार्दन

**कथाकार, कादंबरीकार, ललित लेखक**

**१ ऑगस्ट १९१५ – १३ जानेवारी १९८९**

श्रीकृष्ण जनार्दन जोशी यांचा जन्म पुणे येथे झाला. प्राथमिक व माध्यमिक शिक्षण नूतन मराठी विद्यालयात झाले. '१९३८ साली मराठी विषय घेऊन तिसऱ्या वर्गात बी.ए. झालो' असा उल्लेख आपल्या 'पुणेरी' या पुस्तकात करून ते म्हणतात की, घराण्यातील पहिला पदवीधर मीच! नोकऱ्यांचा दुष्काळच होता. त्यांनी फुटकळ नोकऱ्या केल्या. दुसरे महायुद्ध सुरू झाल्यामुळे पुण्याच्या आसपास



निघालेल्या लष्करी डेपोकडे बेकारांची रीघ लागली. वानवडीच्या मिलिटरी अकाउन्ट्स ऑफिसमध्ये कारकून हुद्द्यावर जोशींना नोकरी लागली व ३२ वर्षांनी ते तिथूनच निवृत्त झाले. नोकरी लागण्यापूर्वी त्यांच्या अनेक कथा किर्लोस्कर मासिकात प्रसिद्ध झाल्या होत्या.

श्री.म.वि.गोखले यांच्या सहकार्याने तीन भागांत प्रकाशित केलेल्या 'ऐलमा पैलमा'च्या भूमिकेत जोशी लिहितात की, 'आंतरराष्ट्रीय महिलावर्षाच्या निमित्तानं मराठी स्त्रीच्या जीवनावर प्रकाश पाडणारं पुस्तक लिहिण्याची कल्पना सुचली.' १८६० ते १९६० या शंभर वर्षांच्या काळात सहा पिढ्या होऊन गेल्या असे गृहीत धरून मराठी स्त्रीच्या जीवनात कसे-कसे बदल होत गेले, याचा त्यांनी धांडोळा घेतला आहे. एकाच मध्यमवर्गीय कुटुंबाभोवती हा शंभर वर्षांचा इतिहास लेखक द्वयाने गुंफला आहे.

जोशींच्या 'पुणेरी' या पुस्तकातील लेख नुसतेच ललित नसून त्यांमध्ये काही सामाजिक आणि ऐतिहासिक आशय आहे, असा उत्कट प्रत्यय वाचकाला येतो. 'काळ' या दैनिकात जोशी यांनी 'किसन' या टोपणनावाने ब्रिटिश सरकार, स्वातंत्र्योत्तर काँग्रेस सरकार, गांधीजी, जीना, चर्चिल वगैरेंवर टीकास्त्र चालवले होते. 'चर्चिल मेडिकल कॉलेज' हा लेख खूपच गाजला. त्या लेखाबद्दल सरकारने 'काळ'कडून दोन हजार रुपयांचा जमीनही घेतला होता. लेखप्रकाशनाच्या बाबतीत 'काळ'कर्ते मामा दाते यांनी टिळकांचा बाणा दाखवला. 'किसन' म्हणजे कोण, याचा पत्ता लागू दिला नाही. दाते तुरुंगात गेले. जोशींचा कारावास वाचला व नोकरीही शाबूत राहिली. श्री. पु. भागवत त्यांना म्हणाले, ''तुमचे लेख फार चांगले असतात.'' मोरारजी देसाईंनी दाते यांना सांगितले, ''युवर किसन हॅज अ पॉयझनस पेन !''

'मी पुण्याहून लिहितो की....' ही जोशी यांची लेखमाला, महाराष्ट्र टाइम्समध्ये वर्षभर येत होती. जोशींच्या 'आनंदीगोपाळ' कादंबरीने चरित्रात्मक कादंबरीचा प्रवाह मराठीत आणला. गोपाळरावांच्या हटवादी स्वभावामुळे डॉक्टर होण्यासाठी परदेशी गेलेल्या कोवळ्या वयाच्या आनंदीबाईंची झालेली फरफट जोशींनी प्रवाही भाषेत चित्रित केली आहे. ही कादंबरी खूप लोकप्रिय झाली. त्या कादंबरीवर जोशींनी पुढे नाटकही लिहिले. काशीनाथ घाणेकरांच्या भूमिकेमुळे ते रंगभूमीवर चांगलेच गाजले. जोशींनी लिहिलेली 'रघुनाथाची बखर' (श्री. र. धों. कर्वे यांच्यावर लिहिलेली) ही कादंबरी चर्चेचा व टीकेचा विषय झाली.

श्री. ज. जोशींचे एकूण ३५ कथासंग्रह प्रकाशित झाले. 'पांढरपेशांचे जग' (१९४४), 'सुलभा' (१९५६), 'मामाचा वाडा' (१९६२), 'ओलेता दिवस' (१९६५), 'अनुभव' (१९७५) हे त्यांतील काही, वर उल्लेख केलेल्या दोन कादंबऱ्यांव्यतिरिक्त 'धूमकेतू' (१९७६), 'काचपात्र' (१९८५) अशा इतरही कादंबऱ्या प्रकाशित झाल्या. मनोहर माळगावकर व आर. के. नारायण यांच्या कादंबऱ्यांचे अनुवाद श्री. जं. नी केले. ललित लेखनात 'पुणेरी' (१९७८), 'सूर्यापोटी' (१९७१), 'सुचलं तसं लिहिलं', 'जोशी पुराण' इत्यादींचा समावेश होतो.

– वि. ग. जोशी

**संदर्भ :**


१. *जोशी श्री.ज., गोखले म.वि.; 'ऐलमा पैलमा' भाग १,२,३; निर्मल प्रकाशन, पुणे; १९७८.*

२. *जोशी श्री.ज.; 'पुणेरी'; श्रीविद्या प्रकाशन, पुणे; १९७८.*


## जोशी, श्रीपाद रघुनाथ

**कथाकार, कादंबरीकार, अनुवादकार, कोशकार**

**२३ जानेवारी १९२० – २४ सप्टेंबर २००२**

श्रीपाद जोशी यांचे रूढ शिक्षण मॅट्रिकपर्यंतच झाले. पण ग्रहणशील मन आणि सुशिक्षित, सुसंस्कृत माणसांचा सहवास यांमुळे त्यांचे व्यक्तिमत्त्व विचारी आणि विवेकी



बनले. आचार्य काका कालेलकरांकडे आठ वर्षे राहून ते हिंदी, गुजराती, बंगाली या भाषा शिकले. दिल्लीत एक वर्ष राहून त्यांनी उर्दू साहित्याचा अभ्यास रसिकतेने केला. १९४२ सालच्या 'छोडो भारत' चळवळीत सरकारविरोधी पत्रके वाटल्याबद्दल त्यांना कारावासाची शिक्षा झाली. कारावासातच त्यांनी कथा, कादंबरी, अनुवाद अशा स्वरूपाचे लेखन केले. पुढे गांधीजींच्या 'हिंदुस्थानी प्रचार सभा' संस्थेत दोन वर्षे चिटणीस आणि नंतर गारगोटी येथील मौनी विद्यापीठात चार वर्षे, तसेच पुण्याच्या गोखले अर्थशास्त्र संस्थेत पंधरा वर्षे त्यांनी काम केले.

जोशी यांनी लहान-मोठी सुमारे दीडशे पुस्तके लिहिली. त्यांपैकी काही महत्त्वाच्या पुस्तकांचा परिचय इथे दिला आहे.

रामानंद सागर लिखित 'और इन्सान मर गया' या हिंदी कादंबरीचे मराठी भाषांतर 'आणि माणसाचा मुडदा पडला' हे आहे. भारताच्या फाळणीच्या वेळी हिंदू-मुसलमानांमधील द्वेष किती पराकोटीला गेला होता, आणि त्यामुळे केवढा भीषण रक्तपात झाला, याचे थरारक दर्शन ही कादंबरी घडविते.

'विस्कटलेलं घरटं' ही जोशींची स्वतंत्र कादंबरी होय. महाराष्ट्रातील ब्राह्मण-ब्राह्मणेतर वाद, स्पृश्यास्पृश्य वाद, खेडे-शहर, कूळ-जमीनमालक अशा वर्तमानकालीन द्वंद्वांवर ही कादंबरी प्रकाश टाकते. जेव्हा या द्वंद्वांशी संबंधित लोक, राजकीय पुढारी या वादांवर निर्मळ मनाने विचार करतील, तेव्हाच या वादांना मूठमाती मिळेल; असे लेखकाचे म्हणणे आहे.

'भारतीय मुसलमान: काल, आज, उद्या' हे लेखकाचे एक महत्त्वाचे पुस्तक. मुसलमानांच्या परिस्थितीची वस्तुनिष्ठ चर्चा करून लेखक असा निष्कर्ष काढतात की, जुना इतिहास विसरून मुसलमान या

भारतभूमीशी एकरूप झाले, तर इतर जातींप्रमाणे त्यांचेही भवितव्य उज्ज्वल होईल. मात्र ज्यांना भारतीय राज्यघटनेची चौकट मान्य नाही, त्यांना या देशात स्थान नाही. असे आपले परखड मत लेखकाने नोंदविलेले आहे.

'खलील जिब्रान' हा लेबॅनॉनमधील स्वतंत्र विचारांचा लेखक, कवी आणि चित्रकार होय. तो ख्रिश्चन होता. पण त्याची जीवनमूल्ये फारच उच्च आणि प्रचलित ख्रिस्ती विचारांना धक्का देणारी होती. मराठी वाचकांना खलील जिब्रान कळावा म्हणून त्यांची सात पुस्तके लेखकाने मराठीत अनुवादित केलेली आहेत.

'जा जरा पूर्वेकडे' ह्या पुस्तकात जपानमधील प्रवासाचे वर्णन आहे. जपानमध्ये पौर्वात्य आणि पाश्चात्त्य जीवनपद्धतींचा संगम आढळतो. तो पाहावा आणि त्याचबरोबर जपानी लोकांना भारतीय समाजाची तोंडओळख करून द्यावी, अशा उद्देशाने लेखकाने जपानचा प्रवास केला.

'चिनारच्या छायेत' हे लेखकाने काश्मीरमध्ये केलेल्या प्रवासाचे वर्णन करणारे पुस्तक आहे.

'उलगा उलग' हे लेखकाचे आत्मचरित्र आहे. ज्या काळात लेखक वावरला, तो 'मंतरलेला' काळ होता. पण तो आता पुसट झालेला आहे. म्हणून तो या आत्मचरित्रात स्पष्ट करून मांडलेला आहे. तसेच लेखकाने स्वतःचे केलेले परीक्षणही येथे वाचायला मिळते.

'महात्मा गांधी: जीवन आणि शिक्षण' या पुस्तकात गांधीजींचे संदेश आणि त्याला पूरक अशा गांधीजींच्या जीवनातील घटना वाचावयास मिळतात.

एकंदरीत जोशींच्या पुस्तकांमधून त्यांचे गांधीवादी, समाजवादी विचार आणि त्यांचे समतोल, उदार मनही कळते.

'उर्दू-मराठी शब्दकोश' लिहून जोशी यांनी मराठी, उर्दू अभ्यासकांची फार मोठी सोय करून ठेवली आहे.

– शशिकांत मांडके

## जोशी, सुरेश दामोदर
**ललितलेखक, संपादक**
**३१ मे १९४४**



सुरेश दामोदर जोशी यांचे मूळ गाव निपाणी, जिल्हा बेळगाव हे महाराष्ट्र-कर्नाटक सीमा प्रांतातील असल्यामुळे मराठीबरोबरच कन्नड भाषेचेही संस्कार त्यांच्यावर झाले. एम.ए. (मराठी) आणि बी.लिब. ह्या पदव्या मिळविल्यानंतर त्यांनी धारवाड विद्यापीठामध्ये गुरुवर्य गो.म. कुलकर्णी यांच्या मार्गदर्शनाखाली 'आधुनिक मराठी गद्यशैली'विषयक संशोधन करून पीएच.डी. ही पदवी संपादित केली.

प्रारंभी काही काळ त्यांनी 'ग्रंथपाल' म्हणून काम केले. तेथून घेतलेला ग्रंथप्रेमाचा वसा त्यांनी आयुष्यभर जपला आहे. देवरूख येथील आठल्ये-सप्रे महाविद्यालयामध्ये आधी मराठीचे प्राध्यापक, नंतर विभागप्रमुख आणि अखेरीस प्राचार्य म्हणून त्यांनी काम पाहिले. या काळात त्यांच्या मार्गदर्शनाखाली पाच विद्यार्थ्यांनी वाङ्मय संशोधन करून पीएच.डी. ही पदवी मिळविली. यांतील दोन विद्यार्थ्यांना मुंबई विद्यापीठाचे सर्वोत्कृष्ट मराठी प्रबंधासाठीचे प्रा. अ. का. प्रियोळकर पारितोषिक लाभले.

विविध वाङ्मयीन नियतकालिकांमधून डॉ. जोशी यांचे सुमारे दीडशे लेख आजवर प्रसिद्ध झालेले आहेत. आळंदी ते पंढरपूर या आषाढी वारीच्या अनुभवांवर आधारित 'पंढरीची वारी' हे त्यांचे पुस्तक त्यांच्यामधील 'अभक्ता'च्या डोळस निरीक्षणांमुळे वेगळे ठरले आहे. आकाशवाणी रत्नागिरी केंद्रावरून कोकणातील साहित्यिकांचा परिचय करून देणारी मालिका 'ऐसी अक्षरे रसिके' या शीर्षकाखाली प्रसारित झाली होती. या मालिकेचे संहितालेखन डॉ. जोशी यांनी केले होते. वाङ्मयेतिहासातील दस्तऐवज म्हणून हे लेखन महत्त्वाचे आहे.

'वाङ्मयीन वाद: संकल्पना आणि स्वरूप' या गो. म. कुलकर्णी गौरवग्रंथाच्या संपादक मंडळात डॉ. जोशी यांचा समावेश होता. कोकण मराठी साहित्य परिषदेच्या 'झपूर्झा' या त्रैमासिक मुखपत्राचे ते पहिले मुख्य संपादक होते. कोकण मराठी साहित्य परिषदेचे पहिले कार्यवाह म्हणूनही त्यांनी उत्तम संघटनात्मक कार्य केले. अ. आ. देसाई गुरुवर्य पुरस्काराने सन्मानित डॉ. जोशी आपल्या व्याख्यानांमधून समाजजागृतीचे कार्य सतत करीत असतात.

देवरूख, जिल्हा रत्नागिरी येथील त्यांचे 'मानसी' हे निवासस्थान वाङ्मयप्रेमींसाठी एक आधाराचे स्थान बनलेले आहे.

अत्यंत शिस्तबद्ध रितीने स्वतः वाङ्मय संशोधन करून तो वारसा आपल्या विद्यार्थ्यांकडे संक्रमित करणारे डॉ. जोशी यांचे वर्णन गुरु-शिष्य परंपरेतील 'एक समर्थ दुवा' असे करता येईल.

– डॉ. विद्याधर करंदीकर

✻ ✻ ✻

# ट





## टाकसाळे, मुकुंद मोरेश्वर
**विनोदकार**
**४ ऑक्टोबर १९५१**



मुकुंद मोरेश्वर टाकसाळे यांचा जन्म बारामती येथे झाला. प्राथमिक आणि माध्यमिक शिक्षण नीरा येथे झाले. बारामतीच्या तुळजाराम चतुरचंद महाविद्यालयातून ते बी. ए. झाले. पुणे विद्यापीठातून पत्रकारिता पदवी प्राप्त केली.

'मनोहर' साप्ताहिकातून त्यांनी लिखाणास प्रारंभ केला. त्यांनी 'मेलोऽमेलोऽमेलो ड्रामा' हे विडंबन नाट्य; 'टाकसाळीतील नाणी', 'हसंबद्ध', 'हास्यमुद्रा' हे विनोदी कथासंग्रह; 'नाही मनोहर तरी', 'गमत गमतीत', 'आणखी गमतीगमतीत', 'मिस्किलाट', 'सक्काळी सक्काळी', 'स(द)र मिसळ' हे विनोदी लेखसंग्रह लिहिले. 'पु.ल. नावाचे गारुड' हा पु.ल. देशपांडे यांच्यावरील लेखांचा ग्रंथ त्यांनी संपादित केला. 'भटकबहाद्दर बोकोबा', 'बेगमगुलाबो', 'मावशी आणि तिचे फुगे' हे बालकथासंग्रह लिहिले.

अनेक नामवंत दिवाळी अंकांमध्ये त्यांचे विनोदी लेख सातत्याने प्रकाशित होतात. अनेक दैनिकांमध्ये आणि नियतकालिकांमध्ये खुसखुशीत सदर लेखन केले. दूरदर्शन मालिकांसाठी लेखन केले.

महाराष्ट्र राज्य शासन, महाराष्ट्र साहित्य परिषद, मुंबई मराठी पत्रकार संघ, सार्वजनिक वाचनालय, नाशिक, यांनी त्यांना मानाचे साहित्य पुरस्कार प्रदान केले. प्रसंगनिष्ठ, चतुर व खुसखुशीत स्वरूपाचा विनोद हे टाकसाळे यांच्या साहित्याचे वैशिष्ट्य होय.

समकालीन स्थितीचे सूक्ष्म अवलोकन करून ते शब्दांमध्ये चित्रित करणे, हे त्याचे कसब आहे. समाजातील गैरवर्तणुकीचे वास्तव दर्शन उपरोधात्मक शैलीत त्यांनी केले आहे. स्पर्धेच्या युगात मध्यमवर्गीयांची धावपळ वाढली आहे. त्यामुळे तणाव वाढले आहेत. हा तणाव सुसह्य करण्याचे काम टाकसाळे यांच्या विनोदाने केले आहे. वाचकाला आपलेच चित्रण खुसखुशीत पद्धतीने केलेले पाहायला आवडते; तसे वर्णन करून फार न झोंबणारे चिमटे टाकसाळे यांनी विनोदाच्या माध्यमातून काढले आहेत. वाचकांच्या चेहऱ्यावरचे हास्य हे त्यांच्या लेखनाला मिळालेले मोठे बक्षीस आहे.

– श्याम भुर्के

## टिकेकर, रामचंद्र विनायक
☞ धनुर्धारी

## टिपणीस, यशवंत नारायण
☞ मुख्य नोंद – नाटक खंड

## टिळक, नारायण वामन
*रेव्हरंड*
**कवी**
**६ डिसेंबर १८६१ – ९ मे १९१९**

नारायण वामन टिळक जन्मापासून वयाच्या नवव्या वर्षापर्यंत कोकणात आजोळी करजगावला राहत होते.



शिकण्यासाठी ते कल्याणला आणि नाशिकला आले. पहिल्या चार इयत्ता व इंग्रजीचे थोडे शिक्षण पार पडल्यावर त्यांनी नाशिक येथील गणेश शास्त्र्यांकडे संस्कृतचे शिक्षण आठ वर्षे घेतले. गणेशशास्त्री लेले व्युत्पन्न पंडित होते. कालिदासाच्या मालविकाग्निमित्र, विक्रमोर्वशीय नाटकांची मराठी भाषांतरे त्यांनी केली होती. काव्यशास्त्र पुस्तक लिहिले होते. सरदार विंचुरकरांनी केलेल्या तीर्थयात्रांच्या टिपणांच्या व डायऱ्यांच्या आधाराने लेल्यांनी 'तीर्थयात्राप्रबंध' नावाचे प्रवासवर्णन मराठी भाषेत विंचुरकरांसाठी लिहिले होते. त्यांनी टिळकांना जुन्या परंपरागत पद्धतीने संस्कृत शिकवले. व्याकरण, काव्य, नाटक, धातुरूपावली, अमरकोश इ. पण त्याचा टिळकांवर इतका खोलवर संस्कार झाला की टिळक काव्यात रमू लागले.

वयाच्या १८व्या वर्षी (१८७९) टिळकांचे लग्न झाले आणि त्यांचा स्वतःच्या पायावर उभे राहण्याचा प्रयत्न सुरू झाला. त्यांनी नाशिक सोडले आणि खानदेश, वऱ्हाड, पुणे, मुंबई, कल्याणजवळचे मुरबाड, नाशिकजवळ वणी (सप्तशृंगीचे ठिकाण) ह्या ठिकाणी पुराणिक प्रवचनकार, कीर्तनकार, शिक्षक असे व्यवसाय करून उदरनिर्वाह केला. ह्या भटकंतीतच त्यांना लोकांचा विविध तऱ्हेचा अनुभव आला. समाजाच्या वृत्ति–प्रवृत्तींचे जवळून दर्शन झाले. १८९१ मध्ये, वयाच्या तिशीत त्यांच्या आयुष्यात एक निराळाच योग आला. नागपूरच्या सरदार बुटींनी त्यांना बोलावले ते वेद, उपनिषदे इत्यादी संस्कृत ग्रंथांचे संशोधन आणि संपादन करण्यासाठी! इथेच ते सरदार बुटींसमोर वेदान्तविचाराचे निरूपण व विश्लेषण करू लागले. त्याच वेळी 'ऋषी' या नियतकालिकाचे संपादन करून त्यात ते लेखनही करीत असत. त्याच वेळी केशवसुतही नागपूरला होते. टिळकांचा संबंध त्यांच्याशी आला. दोघेही काव्याचे भोक्ते! केशवसुतांच्या वाचनात 'दि गोल्डन ट्रेझरी' असे. काव्य, काव्यनिर्मिती त्यांवर दोघांचे बोलणे होई. दोघेही कविता करू लागले होते, त्यामुळे दोघांनाही एकमेकांच्या कवितेसाठी हा सहवास प्रेरक ठरला. केशवसुतांवर टिळकांच्या विचारांचा, रचनेचा थोडासा प्रभावही पडला. टिळक पुढे नोकरीसाठी नागपूर सोडून राजनांदगावला आले. तिथे जात असताना प्रवासात एका ख्रिस्ती धर्मोपदेशकाशी गाठ पडली. बोलताना त्या धर्मोपदेशकाने ख्रिस्ती धर्माबद्दल विचार मांडले. टिळकांच्या मनात नवधर्माच्या स्थापनेबद्दल जे विचार होते, ते त्यांनी बोलण्याच्या ओघात मांडले. ते ऐकून 'तुम्ही लवकरच ख्रिस्ती होणार' हे भाकीत त्या धर्मोपदेशकाने मांडले. पण टिळकांनी स्वच्छ नकार दिला; वादविवाद, विरोध केला. पण अंतरी मात्र ते बोलणे घोळत राहिले. त्यांनी ख्रिस्ती धर्माचा अभ्यास सुरू केला. मन, विचार पालटू लागले आणि १८९५ मध्ये मनाशी संघर्ष करता–करता अखेरीस त्यांनी ख्रिश्चन धर्माचा स्वीकार केला. राजनांदगावहून ते निघाले. १८९५ ते १९१७ ह्या काळात त्यांनी अहमदनगर येथे वास्तव्य केले. त्यांच्या पत्नी लक्ष्मीबाई १९०० मध्ये ख्रिश्चन झाल्या. १८८५ ते १९०० ह्या पाच वर्षांच्या कालावधीत ते विभक्त राहिले होते. १९१७ ते १९१९ टिळक धर्मगुरू झाले. १९१९ मध्ये त्यांचा मृत्यू झाला.

रेव्हरंड टिळक आणि काव्य निर्मिती यांचे नाते अतूट असे होते. त्यांनी गद्यलेखन केलेले असले, तरी काव्यरचना हा त्यांचा स्थायिभाव होता. टिळकांची कविता भाग १ आणि भाग २ मध्ये संग्रहित केलेली आहे. त्याशिवाय त्यांनी 'अभंगांजली' निर्मिली. गोल्डस्मिथच्या 'डेझर्टेड व्हिलेज'वरून 'माझा ओसाड पडलेला गाव' रचले. भजने रचली. ख्रिस्त जयंती, वर्षप्रतिपदा ह्यांवर गीते केली. 'ख्रिस्तायना'ची रचना करायला प्रारंभ केला. पण 'ख्रिस्तायन' काव्य म्हणून उभे राहण्यात कमी पडू लागले. अनेक वर्षांच्या परिश्रमांतून त्यांनी ११ अध्यायांची रचना कशीबशी पूर्ण केली आणि त्यांना मृत्यू आला. (लक्ष्मीबाईंनी 'ख्रिस्तायन' जवळपास

पूर्ण केले तरी शेवटचा अध्याय त्यांचा मुलगा देवदत्त नारायण टिळक ह्यांनी रचला व 'ख्रिस्तायन' पूर्ण झाले.) 'ब्रिटानिया' हे खंडकाव्य, 'शीलं परं भूषणम्' ही नाटिका, 'आनंदीबाई', 'आमच्या विधवा' अशीही त्यांची आणखी रचना आहे.

टिळकांच्या कवितेची भाषा साधीसुधी असली, तरी ती प्रसाद आणि माधुर्य ह्या गुणांनी ओतप्रोत भरलेली आहे. त्यांच्या संस्कृतमधल्या व्यासंगाचा त्या कवितेवर प्रभाव आहे. अलौकिक प्रतिभा, मानुषता, सामाजिक सुधारणेची आंतरिक तळमळ ह्यांबरोबरच निसर्गावरचे उदंड प्रेम, स्त्रीबद्दलची उदार दृष्टी, प्रेमभावनेचा आत्मनिष्ठ आविष्कार, क्वचित गूढगुंजन अशी त्यांच्या काव्याची वैशिष्ट्ये सांगता येतात. त्यांच्या कवितांपैकी केशवसुतांवर त्यांनी केलेल्या तीन कविता; 'माझी भार्या'सारखी पत्नीला– लक्ष्मीबाईंना उद्देशून केलेली कविता (त्या काळात अशी कविता प्रथमच केली गेली.); 'माझ्या जन्मभूमीचे नाव' ही भारताविषयीच्या अनन्य प्रेमाने आणि भक्तीने ओथंबून आलेली कविता; 'पाखरा, येशिल कधी परतून?' ही बालकवींना उद्देशून केलेली कविता; 'केवढे हे क्रौर्य' ही क्रौंचवधावेळच्या 'मा निषांद प्रतिष्ठां' उद्‌गारांची आठवण जागी करून देणारी पक्षिणीच्या मरणाची उदास करून टाकणारी 'क्षणोक्षणी पडे, उठे परी बळे', 'मातीत जे पसरले अतिरम्य पंख। केले उदर वरी पांडुर निष्कलंक। चंचू तशीच उघडी पद लांबविले। निष्प्राण देह गमला श्रमही निमाले।' ही करुणरम्य कविता; 'कुणास्तव कुणीतरी' ही पति-पत्नीची प्रेमकविता; 'अभंगांजली'तील तुकारामाची आठवण करून देणारे 'दंभस्फोटाचे अभंग', 'पर्वतारोहण' कविप्रतिभेसंबंधीची रूपकाश्रयी कविता; 'रानात पडलेले फूल', 'रणशिंग', 'माझी ताई', 'वनवासी फूल' ह्या कवितांची आठवण कधीच कोमेजून जाणार नाही. त्या कविता नित्य ताज्या टवटवीत अशा आहेत; अस्सल, उत्कट आहेत. 'वनवासी फूल' हे दीर्घकाव्य फूल आणि कवी ह्यांच्या संवादाच्या निमित्ताने प्रवृत्ती आणि निवृत्ती ह्यांमधील सनातन संघर्ष रेखाटते. कविता तत्त्वज्ञानपर चर्चा असूनही अजिबात नीरस नाही. कवी आणि फूल ह्यांची व्यक्तित्वे चित्रदर्शीपणे रेखाटणारी अशी आहेत. निसर्गप्रीती, जनसेवा, सांसारिकाची लोलुपता, संसारातील हर्षामर्ष असे कितीतरी विषय ह्या दीर्घकाव्यात आविष्कृत झालेले आहेत. रेव्हरंड टिळकांचे व्यक्तिमत्त्व थेटपणे ह्या कवितेत उतरले आहे. आत्मनिष्ठ कवितेचे रूप धारण केले गेले आहे. विषय वेगळा असूनही! भारतावर प्रेम करणारे टिळक ख्रिश्चन झाले असले आणि 'बापाचे अश्रू'सारखी विलापिका सिद्ध करूनही, त्यांच्या बाबतीत तरी 'धर्मांतर म्हणजे देशांतर' नव्हे ह्याची प्रचिती येते.

रेव्हरंड टिळक पिंडाप्रकृतीने बंडखोर नव्हते. जातीपाती, रूढी ह्यांमुळे प्रत्यही घडणाऱ्या सामाजिक जाणिवेने ते कष्टी होत, पण केशवसुतांसारखे आक्रमक होत नसत. ज्यांच्यावर अन्याय होतो, त्यांच्यावर प्रेम करणे, त्यांची सेवा करणे हा त्यांचा मार्ग होता. रोग्याची शुश्रूषा करणे ही त्यांची वृत्ती होती. 'प्रेम नाम जगदीश' ही त्यांची धारणा होती. दया, सेवा, करुणा त्यांच्या ठायी एकवटल्या होत्या. ते आस्तिक व डोळस श्रद्धाळू होते तरीही त्यांच्या सामाजिक जाणिवा खोट्या नव्हत्या. त्यांच्या मनात नवा धर्म स्थापन करण्याची संकल्पना उगवली होती. ते पैशाच्या आणि प्रतिष्ठेच्या लोभाने ख्रिश्चन झाले नव्हते. आत्मशांतीसाठी ते ख्रिश्चन झाले होते. त्यांच्या दृष्टीने 'प्रेम आणि देव हा एक विश्वास। कसा तो विश्वास दूर मानी। दूर तरी विश्वनाथ दूरी। काय सांगू वैरी मीच त्याचा।।' असे होते. त्यांनी ख्रिस्ती धर्मामध्ये स्वतःच्या काव्यरचनेतून अभंग-ओवीचा प्रवेश करून दिला. उपासनेच्या पद्धतीत भारतीयत्व आणले. मराठी भाषेविषयी आत्मीयता निर्माण केली. दुखवट्याचा काळा रंग वर्ज्य केला. शुभ्र वस्त्रांचा वापर सुरू केला. स्वतःबाबत दफनाऐवजी दहन करून अस्थी ठेवणार त्या स्थानावरील दगडावर मराठी नाव लिहायला सांगितले. देशप्रेम इतके उत्कट की भारत न आवडणाऱ्यांना 'चालते व्हा' असे सांगितले.

अर्वाचीन मराठी कवितेच्या जनकत्वाचा मान निर्विवादपणे केशवसुतांकडेच जातो. पण अर्वाचीन

कवींमध्ये जे पाच कवी (केशवसुत, रेव्हरंड टिळक, विनायक, गोविंदाग्रज, बालकवी) 'कविपंचक' म्हणून मान्यता पावले, त्यांमध्ये रेव्हरंड टिळक वयाने सगळ्यांमध्ये मोठे आणि बालकवी ठोंमरे सर्वांत लहान होते आणि दोघांमध्ये पिता-पुत्रासारखे नाते निर्माण झाले होते. रेव्हरंड टिळकांनी बालकवींना सांभाळले होते. त्यांच्या कवित्वावर रेव्हरन्ड टिळकांना अतिशय आत्मीयता वाटत होती. केशवसुत मात्र टिळकांचे समकालीन होते. रेव्हरंड टिळकांचा जन्म १८६१चा तर केशवसुतांचा १८६६मधील. केशवसुत १९०५मध्ये जग सोडून गेले, तर टिळकांचे निधन १९१९मध्ये झाले. बालकवी मात्र त्यांच्याआधी १९१८ मध्ये अपघातात वारले. १९१९ मध्ये गोविंदाग्रज मृत्यू पावले. विनायक १९०९मध्ये वयाच्या ३६ व्या वर्षी, गोविंदाग्रज ३४ व्या वर्षी, बालकवी २८ व्या वर्षी असे गेले. केशवसुत ३९ वर्षे जगले आणि रेव्हरंड टिळकांना ह्या सर्वांच्या तुलनेत अधिक, म्हणजे ५८ वर्षांचे आयुष्य लाभले. गोविंदाग्रजांचा अपवाद वगळता रेव्हरंड टिळकांची कविता व इतर लेखन तुलनेने विपुल आहे, ह्याचे कारण म्हणजे त्यांना लाभलेले आयुष्य हे आहे.

– डॉ. चंद्रकांत वर्तक

**संदर्भ :**

१. *'मराठी वाङ्मयाचा इतिहास' खंड ५, भाग १, काव्य हे प्रकरण, कृ. ब. निकुम्ब; मराठी साहित्य परिषद, पुणे.*
२. *जोग रा. श्री.; 'मराठी विश्वकोश' खंड ६; महाराष्ट्र राज्य साहित्य मंडळ; १९७३.*
३. *डॉ. कुलकर्णी व. दि; 'अर्वाचीन मराठी सारस्वतकार'; मॅजेस्टिक प्रकाशन, मुंबई.*

## टिळक, कमलाबाई विष्णू

**कथाकार**

**२६ जून १९०५ – १० जून १९८९**

पूर्वाश्रमीच्या कमला अनंत उकिडवे. मॅट्रिकला मुलींत पहिली आली. संस्कृतसाठी जगन्नाथ शंकरशेठ शिष्यवृत्ती, चॅटफिल्ड, तसेच यमुनाबाई दळवी पारितोषिक मिळाले.



इंग्रजी साहित्य घेऊन एम.ए. प्रथम वर्गात उत्तीर्ण व त्यानंतर हुजूरपागेच्या मुलींच्या महाविद्यालयाच्या प्राचार्या म्हणून कार्यरत होत्या. त्याचप्रमाणे बनारस येथे मुलींच्या महाविद्यालयात इंग्रजीच्या प्राध्यापक आणि नंतर प्राचार्या म्हणून नियुक्ती झाली. निवृत्तीनंतर फिल्म सेन्सॉर बोर्डाच्या सल्लागार समितीचे काम आठ वर्षे केले.

त्यांचे 'हृदयशारदा' (१९३२), 'आकाशगंगा' (१९४४), 'अश्विनी' (१९६३), 'सोन्याची नगरी' (१९८५) हे कथासंग्रह; तर 'शुभमंगल सावधान' (१९७५) ही कादंबरी; शिवाय वैचारिक लेखनामध्ये 'स्त्री-जीवन विषयक काही प्रश्न' (१९४१), 'स्त्री-जीवनाची नवी क्षितिजे' (१९६५), 'युधिष्ठिर' (१९७१) इत्यादी. १९७५नंतर बालवाङ्मय आणि एकांकिका असे लेखन केले.

'रत्नाकर', 'मनोहर', 'यशवंत', 'स्त्री' या मासिकांमधून सुरुवातीच्या काळात त्यांनी कथालेखन केले. त्यांच्या कथांना दर्जेदार म्हणून अनेक नामवंतांनी नावाजले. वा.ना. देशपांडे यांनी, 'प्रसंगांचा चटकदारपणा, चरित्र-चित्रणाचा मार्मिकपणा तंत्रावरील प्रभुत्व व भाषेचे सहज सौंदर्य...' या त्यांच्या गुणांचा निर्देश केला आहे. 'कमलाबाईंनी आपल्या गोष्टींतून स्त्रीहृदय आणि स्त्री-जीवन जास्त समरसतेने रेखाटले आहे...' असे शांता माडखोलकरांनी म्हटले आहे ('प्रतिभा' ३०-०१-१९३३) 'त्यांच्या कथांतील चिंतनशीलता हा दुर्मीळ विशेष आहे...' असे वि.स.खांडेकर यांनी गौरविले आहे. (३०-०५-१९७०)

**स्त्री-विश्वाचे चित्रण**

याआधी पुरुष आपल्या कल्पनेने स्त्रीच्या भावभावना रेखाटत होते. पण कमलाबाईंनी स्त्रीला जाणवलेली भिन्नभिन्न स्त्री-रूपे रेखाटली आहेत. त्यांतील वेगवेगळ्या छटा, गुंतागुंत हे उलगडून दाखविले. तेसुद्धा अगदी

अकृत्रिमपणे आणि तटस्थपणेही. ना त्यात स्त्री-कैवार होता; ना स्त्री-द्वेष्टेपणा आणि तरीही कथेची कलात्मक बाजू त्या कधी विसरल्या नाहीत.

स्त्रिया नव्याने शिकू लागल्या, आपल्या आयुष्याबद्दल विचार करू लागल्या; पण त्यातूनही काही प्रश्न निर्माण झाले आणि मग दुविधा! मनातील या खळबळीचा वेध अतिशय तरलपणे त्यांनी 'हृदयशारदा' या कथेत घेतला आहे. सरल आणि नलिनी यांचे हृद्गत आणि त्यानंतर नलिनीच्या मनातील सूक्ष्मातिसूक्ष्म भावना त्यांनी छान चित्रित केल्या आहेत. घर-संसार गृहिणीपण, तिचे सौंदर्य महत्त्वाचे की पतीच्या सर्जनशीलतेला समजून घेण्याची बौद्धिकता, शिक्षणामुळे आलेली परिपक्वता महत्त्वाची आहे का? हा प्रश्न जरी नलिनीला पडलेला असला, तरी तो तत्कालीन शिकणाऱ्या मुलींच्या मनाचेच प्रतिनिधित्व करणारा आहे. हे सूक्ष्म विश्लेषण हा यासारख्या कथांचा महत्त्वाचा विशेष!

'बाहुल्या' मध्येही (१९३१) तिला बाहुल्यांशी खेळायचे असताना; तिने काळानुसार शिक्षणाला महत्त्व द्यावे म्हणून भोवतालची माणसे तिच्यावर दबाव आणतात. 'प्रेमाचा वाटा'मधील (१९३०) नायिका निर्मला हिला आपल्या आयुष्यात आलेले दोघेही आवडतात आणि तिला निवड करणे अशक्य झाले आहे आणि त्यामुळे तिची झालेली उलघाल असा वेगळाच धक्कादायक विचार आहे. तर 'शांती'मध्ये (१९३४) ज्या मुलावर सगळ्या आशा केंद्रित केल्या, तो आपल्या नवऱ्याकडे अधिक ओढ घेतो म्हणून मुलाबद्दल तिटकारा वाटणारी आई आहे.

'वरयोजना'मध्ये (१९३१) मध्यमवर्गीय मुलींच्या विवाहाची समस्या हलक्या-फुलक्या पद्धतीने मांडली असली, तरी तिची तीक्ष्णता जाणवते. जसा विषय, जशी समस्या; तशी त्यांची भाषाशैली वळण घेते. 'पतिव्रता' (१९३२) या कथेत व्यसनी, गुन्हेगार पतीला, कुटुंबाच्या भल्याचा विचार करून, लक्ष्मी घराबाहेर काढते.

काही कथांची बीजे उदाहरणार्थ 'कोकणी वहाणा' (१९३१), 'माझी बाग' (१९३१), त्यांच्या स्वानुभवात आहेत; तर काहींची बीजे भोवतालचे निरीक्षण, मैत्रिणींच्या, कुटुंबांतील स्त्रियांच्या मानसिकतेत आहेत.

**अनुभवांची श्रीमंती**

त्या काळच्या स्त्रियांच्या मानाने त्यांच्या द्विपदवीचे शिक्षण, बनारस, बडोदा, पुणे, मुंबई अशा वेगवेगळ्या ठिकाणचे वास्तव्य, बालपणीच आई-वडिलांचे निधन आणि आजीने संभाळणे, भल्या थोरल्या वाड्यातून लहानशा जागेत राहणे; असे त्यांचे अनुभवविश्व वेगळे आणि समृद्ध होते. शिक्षणाने तोलामोलाच्या पतीची तितकीच समजूतदार साथ, प्राध्यापिका-प्राचार्या अशा पदांवर काम करण्यातून त्यांचे आयुष्य समृद्ध होत गेले आणि त्या अनुभवांची श्रीमंती त्यांच्या कथा-लेखनातून दिसते. समाजाकडे पाहण्याची सूक्ष्म निरीक्षण शक्ती, स्वतःची वैचारिक भूमिका यांतून 'स्त्री-जीवनविषयक प्रश्न' आणि 'स्त्री-जीवनाची नवी क्षितिजे' या पुस्तकांची निर्मिती झाली. शतकानुशतके स्थितिमान असलेली भारतीय स्त्रीशिक्षणामुळे कसकशी बदलली आणि आता तिच्यापुढे कसे प्रश्न उभे राहिले आहेत? कोणते? का? त्यांवर काय उपाय करता येतील? वैयक्तिकदृष्ट्या आणि राजकीयदृष्ट्या या प्रश्नांचा त्या समग्र आणि सखोल विचार करतात. विचारप्रवर्तक आणि प्रेरणादायी अशीच ही पुस्तके आहेत. तरीही शैली भारदस्त असून सुगम आहे. 'युधिष्ठिर'मधील (१९७०) सर्वच व्यक्तिरेखा लक्षवेधी आहेत.

त्यांची विनोदबुद्धी लखलखीत होती. आपल्याला फारसे रूप नाही, याची त्यांना जाणीव होती. त्यांची आणि बालगंधर्वांची जन्मतारीख एकच म्हणजे '२६ जून' तेव्हा त्या थट्टेने म्हणत, ''त्या तारखेचे रूपसौंदर्य बालगंधर्वांनी घेतले. माझ्या वाटणीला काही उरलेच नाही.'' त्यांची ही वृत्ती, कडू-गोड आठवणी, शिक्षणाने मिळालेली समृद्धी, वैचारिकता, सहृदयतेने स्त्रियांच्या मानसिकतेकडे पाहणे, प्रश्नांच्या सर्व पैलूंना स्पर्श करण्याची परिपक्वता, अंतर्मनाच्या गाभ्याला भिडण्याची क्षमता हे सारे त्यांच्या सर्व तऱ्हांच्या लेखनातून जाणवते.

– प्रा. मीना गुर्जर

**संदर्भ :**


*१. भिडे माधुरी; 'कमला कमलपत्रवत्'; प्रपंच प्रकाशन, पुणे; १९८०.*

*२. टिळक लक्ष्मीबाई नारायण; 'उन पाऊस'; साहित्यसेवा.*


## टिळक, बाळ गंगाधर

***लोकमान्य***

☞ **मुख्य नोंद – पत्रकारिता आणि ललितेतर साहित्य खंड**

## टिळक, लक्ष्मीबाई

**कवयित्री, आत्मचरित्रकार**

**१ जून १८६६ – २४ फेब्रुवारी १९३६**



लक्ष्मीबाई टिळक ह्यांच्या आईचे नाव राधाबाई व वडिलांचे नाव नारायण गंगाधर गोखले. लक्ष्मीबाईंचे बालपण त्यांच्या आत्या रखमाबाई गोविंद खांबेटे ह्यांच्या घरी गेले. नारायण वामन टिळक यांच्याशी विवाह झाल्यावर मनकर्णिका हे नाव बदलले गेले आणि लक्ष्मीबाई नारायण टिळक म्हणून त्या ओळखल्या जाऊ लागल्या.

कवी टिळकांनी 'माझी भार्या' ह्या कवितेत वर्णन केल्याप्रमाणे लक्ष्मीबाई रूपाने सामान्य होत्या. ८ जुलै १९०० रोजी ख्रिस्ती धर्माचा स्वीकार केल्यानंतर त्यांनी वेशभूषा बदलली नाही. त्या अखेरपर्यंत नऊवारी नेसत होत्या. 'ख्रिस्ती धर्माचा कुंकू न लावण्याचा काही संबंध येत नाही, तेव्हा नेहमीप्रमाणे कुंकू लावण्यास काहीच हरकत नाही,' असे ख्रिस्ती धर्मगुरू असलेल्या टिळकांनी सांगितले होते. तरी, एका मडमेला वचन दिले होते म्हणून लक्ष्मीबाईंनी कुंकू लावणे सोडून दिले होते. त्यांच्या अंगावर दागिना नसे कारण पैसा हातात आला की टिळकांकडून तो लगेच खर्च होई. लक्ष्मीबाई हाती आलेला पैसा जपून वापरत.

टिळकांच्या विक्षिप्त आणि उदार स्वभावापायी लक्ष्मीबाईंना अनेकदा मनस्ताप सोसावा लागला. तरीही त्या कधी कुढत बसल्या नाहीत. तशाही परिस्थितीत त्या आनंदी आणि उत्साही असत. स्वतः विनोद करीत व दुसऱ्याने केलेल्या विनोदावर 'हसण्याचा रोग' असावा इतक्या अनावर हसत.

**कवितेची 'भरली घागर'**

लक्ष्मीबाईंच्या माहेरी शिक्षणाचे वातावरण नव्हते. लग्नानंतर टिळकांनी त्यांना शिकवायला सुरुवात केली. कै आणि खै, क्ष आणि ज्ञ, ड आणि ढ अशा अक्षरांचा क्रम बोटे मोडल्याशिवाय त्यांना आठवत नसे. जोडाक्षरे लिहिणेही त्यांना जमत नसे. १९१३ च्या सुमारास बाईंनी कीर्तनकलेचे व ईश्वरविद्येचे शिक्षण घेतले.

याच काळात लक्ष्मीबाईंनी सामाजिक कादंबरी लिहिण्याचा प्रयत्न केला होता. टिळक धर्मांतर करणार, ही बातमी कानावर येताच लक्ष्मीबाई कासावीस झाल्या आणि 'म्हणे जातो सोडून नाथ माझा, अता कवणाला बाहू देवराजा....' ही चार ओळींची कविता लिहिली. हे बाईंचे पहिले काव्यलेखन. लक्ष्मीबाईंच्या कविता टिळक दुरुस्त करत व प्रसिद्धीला पाठवत. लोकांना कवी टिळक परिचित होते. टिळकच पत्नीला कविता लिहून देतात, असा काहींचा समज होता. 'मासिक मनोरंजन'मध्ये प्रसिद्ध झालेली 'करंज्यातला मोदक' ही कविता वाचून पंढरपूरच्या एका बाईने लक्ष्मीबाईंकडे तसा खुलासा मागितला होता. बाईंना रात्री कविता सुचत. मग जमिनीवर आगपेटीच्या काडीने किंवा खडूने किंवा कोळशानेही त्या लिहून काढीत. एकदा तर पावणे तीनशे ओळींची कविता त्यांनी अशी लिहिली होती. बालकवींनी नंतर ती कागदावर लिहून काढली. लक्ष्मीबाईंच्या कवितांचा 'भरली घागर' हा कवितासंग्रह त्यांचा पुत्र देवदत्त नंतर प्रकाशित केला.

टिळकांनी सुरू केलेल्या 'अभंगांजलि' ह्या 'ज्ञानोदय'मधील सदरात टिळकांच्या निधनानंतर लक्ष्मीबाईंनी अभंगलेखनही केले. टिळकांच्या हातून अपूर्ण राहिलेल्या 'ख्रिस्तायन' ह्या काव्याचे चौसष्ट


चाल, भक्तीगवेणी॥
भारतभूचे॥ हे स्तंभ पुढे ज्ञानाचे॥ धृ॥
[illegible] पाऊल नाचे॥
त्यावरुनी हे जाणा पुढचे॥
बोल बोबडे जरी बाळाचे॥
अर्थ पूर्ण परी शब्द ही ज्याचे॥
हस्त कळा ही मुद्रीत भासे॥
चित्र कळा जणु बघताहांसे॥
अंतरंग मन मोहीत [illegible] से॥
अशा परी मी [illegible] ये से॥
देवा करी तू वृधी त्यांची॥
कळा [illegible] त्या [illegible] ची॥
राखो आमुच्या भारतभूची॥
शोभा जी त्या मुगुटावरची॥
कृ. ना. टिळक

बाईंची ही पहिली आणि शेवटची नोकरी ठरली.

टिळक पति-पत्नींच्या एकूणच व्यक्तिमत्त्वात फार फरक होता. त्यांचे एकमत व्हायचे, ते फक्त परोपकाराबाबत. हौशी, दया, चिकी या मुलींना त्यांनी घर दिले आणि ताराला तर आपले आडनावही दिले. टिळक दाम्पत्याची दोन अपत्ये- विद्यानंद आणि नर्मदा ही बालपणीच निधन पावली. देवदत्त हे तिसरे अपत्य. १८९६च्या दुष्काळात बोर्डिंगच्या बावीस मुलांना आश्रय देताना लक्ष्मीबाईंनी आपल्या एकुलत्या एका मुलाचे वेगळे लाड केले नाहीत. एखाद्याच्या आजाराची बातमी कळताच ह्या 'नाशिकच्या आजीबाई' आपला बटवा घेऊन स्वतःहून जात आणि आजारी व्यक्तींची शुश्रूषा करीत.

अध्याय सहज, सोप्या, रसाळ शैलीत लिहून लक्ष्मीबाईंनी 'ख्रिस्तायन' पूर्ण केले. शेवटचा अध्याय देवदत्त टिळकांनी लिहिला.

नाशिक येथे १६ सप्टेंबर १९३३ रोजी माधव जूलियन यांच्या अध्यक्षतेखाली झालेल्या कविसंमेलनाच्या स्वागताध्यक्ष लक्ष्मीबाई होत्या. ह्याच वर्षी २८ डिसेंबर रोजी नागपूर येथे झालेल्या चौथ्या ख्रिस्ती साहित्य संमेलनाचे अध्यक्षपदही त्यांनी भूषवले. ख्रिस्ती साहित्य संमेलनाच्या त्या पहिल्या स्त्री-अध्यक्ष होत. शाळेची पायरी कधीही न चढलेल्या लक्ष्मीबाई टिळकांनी साहित्य संमेलनाच्या अध्यक्षपदाला शोभेल असे भाषण केले.

टिळकांच्या निधनानंतर बिसेलबाईंनी मुंबईत भायखळा येथील मुलींच्या वसतिगृहावर मेट्रन म्हणून लक्ष्मीबाईंची नियुक्ती केली. समुद्रभरतीत वसतिगृहातील अकरा मुली व एक मुलगा असे बारा बळी गेले, त्यामुळे

**स्मृतिचित्रे**

मुळात टिळकांच्या आठवणी देवदत्त लिहिणार होते आणि त्यासाठी लागणारा कच्चा माल लक्ष्मीबाई पुरवणार होत्या. लक्ष्मीबाईंची वर्णनशैली इतकी अपूर्व होती की, पन्नास वर्षांपूर्वीचा प्रसंग प्रत्यक्षात घडतो आहे, असे ऐकणाऱ्याला वाटावे. त्यामुळे देवदत्तांनी टिळकांचे चरित्र लिहिण्याची कामगिरी लक्ष्मीबाईंवर सोपवली. लक्ष्मीबाईंनी सांगितलेल्या...घटना त्या स्वतः लिहीत. त्या नातवंडांना शिकवता-शिकवता स्वतः अक्षरे गिरवत. त्या जशा बोलत, तशाच लिहीत. तोंडी-लेखी भाषेतला फरक त्यांना कळत नसे. त्यांचे लिखाण दुसऱ्याला वाचता आले नाही, तरी त्या स्वतः उत्तम रितीने वाचून दाखवत.

'स्मृतिचित्रे'मधला कालखंड साधारण १८५७पासून सुरू होतो. त्या वेळची राजकीय व सामाजिक परिस्थिती फार ढवळून निघाली होती, तरी त्याचे प्रतिबिंब स्मृतिचित्रात फारसे पडलेले आढळत नाही. कारण

टिळकांच्या आठवणी सांगणे, हाच एक हेतू 'स्मृतिचित्रे' लिहिण्यामागे होता. आपल्या पतीची विद्वत्ता आणि कवित्व ह्यांविषयी लक्ष्मीबाईंच्या मनात अतिशय आदर होता. टिळकांवर त्यांचे फार प्रेम होते. त्यामुळेच, टिळकांच्या स्वभावापायी दारिद्र्यात दिवस काढावे लागले, तरी त्यांनी त्याची कटुता लेखनात येऊ दिली नाही. टिळक होते तसे वाचकांपुढे उभे करताना त्यांनी टिळकांना कोठेही कमीपणा येऊ दिला नाही. तसेच स्वदोषांवरही पांघरूण घातले नाही. महादेवशास्त्री जोशी यांनी म्हटल्याप्रमाणे ''लक्ष्मीबाईंचा विचार करताना महाराष्ट्रातील, किंबहुना भारतीय नारीजात लक्षात घ्यायला हवी. त्यांचा सुटा विचार करता कामा नये. परंपरागत संस्कारांचे ओझे त्यांच्या मनावर होते. नारीचे सगळे गुणदोष त्यांच्यात होते. म्हणून त्या मराठी मनाला श्रद्धेय ठरल्या.''

'स्मृतिचित्रे'च्या तिसऱ्या भागाच्या प्रकाशनाच्या वेळी आचार्य अत्रे म्हणाले, ''रणांगणातून घायाळ परंतु विजयी होऊन परत आलेल्या वीराकडे पाहून त्याच्या अंगावरील जखमा मोजताना स्वकीयांना जो आदर वाटतो, तोच आदर 'स्मृतिचित्रे' वाचून श्रीमती लक्ष्मीबाईंबद्दल वाटतो.''

'स्मृतिचित्रे'च्या चार भागांपैकी तीन भाग टिळकचरित्राने व्यापले आहेत. 'स्मृतिचित्रे'चा तिसरा खंड १५ डिसेंबर १९३५ रोजी आचार्य अत्रे यांच्या उपस्थितीत प्रकाशित झाला. त्यानंतर २४ फेब्रुवारी १९३६ रोजी लक्ष्मीबाईंचे निधन झाले. टिळकांच्या जीवनातील चढउतार, स्थित्यंतरे आणि उत्तरोत्तर शांत होत गेलेल्या स्वभावाचा आलेख बारकाव्यांनिशी लक्ष्मीबाईंनी रेखाटला आहे. टिळकांना यातून वजा केले, तर लक्ष्मीबाई निष्प्रभ ठरतात, असे अजिबात होत नाही. एरवी 'अत्मचरित्रा'मध्ये आत्मकथनाच्या अनुषंगाने इतर गोष्टी येतात. इथे टिळक हा केंद्रबिंदू मानून त्या आसाभोवती लक्ष्मीबाईंची स्मृतिचित्रे फिरताना दिसतात. 'स्मृतिचित्रे' हे टिळकांचे चरित्र आहे, तसेच लक्ष्मीबाईंचे आत्मचरित्रही आहे.

'बाबा पद्मनजींचे 'अरुणोदय' व कै. रमाबाई रानडे यांचे 'आमच्या आयुष्यातील आठवणी' यांत घरगुती, साधी भाषा असली, तरी पहिल्यात विनोद व चटकदारपणा नाही आणि दुसऱ्यात तुलनेने मनमोकळेपणा कमी आहे. म्हणून 'स्मृतिचित्रां'ना मराठी वाङ्मयात अनन्यसाधारण स्थान असल्याचे प्रा. र. श्री. जोगळेकर यांनी लक्ष्मीबाईंच्या सत्कार समारंभप्रसंगी म्हटले होते. आपले चरित्र लिहायचे झाल्यास आपण होतो तसे लिहिले जावे, अशी इच्छा टिळकांनी व्यक्त केली. लक्ष्मीबाईंनी सांगितलेल्या आठवणी मधुसूदन गोखले, इंदिरा त्रिभुवन आणि माधव मनोहर लिहून घेत. कधी लक्ष्मीबाई स्वतः लिहीत.

'स्मृतिचित्रे'मधून मोकळेपणाने निर्भीडपणाने सत्य सांगताना मार्मिक विनोदाची पेरणी करत, खुसखुशीत शैलीत प्रसंग रंगवत, जिवंत वाटावीत अशी व्यक्तिचित्रे रेखाटली आहेत. त्यामुळे गतशतकातली महत्त्वपूर्ण आत्मचरित्र-चरित्रग्रंथ म्हणून 'स्मृतिचित्रे'ची नोंद केली जाते.

लक्ष्मीबाईंचे अशुद्धलेखन सर्वपरिचित होते. एकदा त्यांनी 'पिसाप वेस' असा शब्द लिहिला. बाईंचे अशुद्धलेखन शुद्ध करून वाचण्यात माधव मनोहर पटाईत. त्यांनी ताडले की, बाईंना 'प्रिन्स ऑफ वेल्स' असे म्हणावयाचे आहे. माधव मनोहर म्हणतात, ''प्रिन्स ऑफ वेल्स, हा शब्द शुद्ध लिहिणारे अनेक असतील पण 'स्मृतिचित्रे' लिहिणारे किती असतील?''

– डॉ. अनुपमा उजगरे

**संदर्भ :**

*१. टिळक लक्ष्मीबाई; 'स्मृतीचित्रे.'*

## टेंबे, गोविंद सदाशिव

☞ **मुख्य नोंद – संगीत खंड**

## टेकाडे, आनंदराव कृष्णाजी

**कवी, गीतकार**

**५ एप्रिल १८९० – १६ फेब्रुवारी १९६४**

आनंदराव टेकाडे ह्यांच्या घराण्याचे मूळ गाव नागपूर जिल्ह्यातील मोहपा; पण कवीचा जन्म धापेवाडा (जिल्हा

ट



नागपूर) येथे कृष्णाजी व काशीबाई ह्या दाम्पत्याच्या पोटी, आईच्या मातुलगृही झाला. वयाच्या सहाव्या वर्षी वडील निवर्तल्यानंतर मामांनी त्यांचे संगोपन केले. सहाव्या वर्षानंतर आजारपणामुळे शिक्षण सोडले आणि पुढे ते अपूर्णच राहिले. त्यामुळे आनंदरावांनी स्वतःच आत्मनिवेदनात 'भाषा-निरक्षर' म्हटले आहे.



कथा-कीर्तने, पुराणे, आख्याने इत्यादींच्या संस्कारांतून त्यांना भारतीय इतिहासाची व परंपरेची ओळख झाली व त्या संदर्भाचा अत्यंत प्रभावी उपयोग त्यांनी आपल्या काळातील प्रतिमा-प्रतीकांच्या योजनेसाठी केला. १९१० सालच्या सुमारास, वयाच्या विशीतच त्यांनी राष्ट्रीय जाणिवांच्या प्रभावी काव्यलेखनास सुरुवात केली. गोपाळ कृष्ण गोखले यांच्या मृत्यूनंतर त्यांनी त्या संदर्भात आपली पहिली कविता लिहिली. 'शारदा देवी' या शीर्षकाची कविता सर्वप्रथम वासुदेवराव आपटे यांच्या 'आनंद' मासिकात १९११ साली प्रसिद्ध झाली. त्यांच्या प्रारंभीच्या कविता 'खेळगडी', 'लोकमित्र', 'चित्रमय जगत' व हरिभाऊ आपट्यांचे 'करमणूक' हे नियतकालिक यांत प्रसिद्ध झाल्या. १९१३ सालच्या 'करमणूक'च्या अंकात त्यांची 'चंद्रसेना' ही कविता हरिभाऊंनी प्रसिद्ध केली व सोबतच पत्र पाठवून कवीचे कौतुकही केले. आनंदरावांच्या काव्यलेखनामागे लोकमान्य टिळकांच्या जहाल राष्ट्रवादी विचारांची प्रेरणा प्रामुख्याने होती. १९१४ सालच्या सुमारास जाहीर कार्यक्रमामध्ये राष्ट्रीय कविता गाऊन सादर करण्याच्या प्रयोगाला सुरुवात झाली. तेव्हापासून स्वातंत्र्याच्या चळवळीनिमित्त महाराष्ट्रात आणि विशेषतः नागपुरात आनंदरावांचे देशभक्तिगीतगायन हा एक अविभाज्य भागच बनला होता.

स्वातंत्र्याकांक्षेने भारलेल्या राष्ट्रीय काव्याच्या ऐन भराच्या त्या कालखंडाचा एक महत्त्वपूर्ण काव्यारव टेकाड्यांचा होता. माडखोलकरांनी म्हटल्याप्रमाणे, ''ही कविता तत्कालीन चळवळीचा एकपरीने काव्यमय प्रतिध्वनी असून तिच्यात पूर्ववैभवाची स्मृती, प्रचलित राजकीय कल्पना आणि चळवळीच्या प्रवर्तकाविषयीचा आदर यांच्या छटांची सरमिसळ झालेली आहे.''

राष्ट्रभक्तीप्रमाणेच राधाकृष्णभक्ती हासुद्धा त्यांच्या कवितेचा एक प्रधान विषय आहे. दोन्ही भक्तींचा उत्कट प्रत्यय टेकाड्यांच्या काव्यातून येतो. त्यांची सर्वाधिक गाजलेली कविता, 'आनंदकंद ऐसा, हा हिंद देश माझा, सत्यास ठाव देई, वृत्तीस ठेवी न्यायी, स्वत्वास माळी राजा, हा हिंद देश माझा। जगी त्याविना कुणीही, स्मरणीय अन्य नाही, थोरांत थोर समजा, हा हिंद देश माझा' (आनंदगीत भाग-२); २६ ऑगस्ट, १९२१ रोजी त्यांनी लिहिली. परंतु, राष्ट्रीय जाणिवांप्रमाणे प्रणयविषयक व निसर्गविषयक जाणिवांचीही प्रभावी अभिव्यक्ती आनंदरावांनी विपुल प्रमाणात केली.

काव्यविषयाचा एकसुरीपणाचा गैरसमज टेकाड्यांविषयी पसरलेला दिसतो; परंतु तो खोटा ठरवणारी विविधता आणि विपुलता आनंदरावांच्या काव्यात प्रत्ययाला येते. 'गा गा प्रेमाचे गाणे। प्रेमावाचुनि सर्व सुने' असे म्हणणाऱ्या टेकाड्यांनी प्रतिमा, प्रतीके आणि राधा-कृष्ण रूपक ह्यांच्या साहाय्याने कुणाही आधुनिक कवीइतकीच उत्कट प्रेमकविता लिहिल्याचे दिसून येते.

स्वातंत्र्यपूर्ण साहित्यप्रेरणा व जीवनप्रेरणा आणि भारतीय परंपरा-प्रभाव ह्यांमुळे प्रणयाभिव्यक्तीची प्राचीन मराठीपासून चालत आलेली रूपकप्रधान रीत त्यांनीही अंगीकारलेली दिसते. आशयाप्रमाणेच अभिव्यक्ति-वैशिष्ट्यांमध्येही भरपूर विविधता दिसते. विविध वृत्ते आणि रचना प्रकारांचा त्यांनी उपयोग केला. भावकविता आणि गीतरचना ह्यांच्या सीमारेषेवर झुलणाऱ्या आणि गीत-प्रकाराकडे झुकणाऱ्या गेय, प्रासादिक अभिव्यक्तीमुळे टेकाड्यांची कविता सर्वसामान्य रसिकांमध्ये प्रचंड लोकप्रिय झाली. राष्ट्रीय चळवळीचा एक भाग झाल्याने ती कालसापेक्ष परिघात अधिक

अडकली, तरी ह्या कवीचे मराठी काव्यप्रवाहातील, राष्ट्रीय काव्यविश्वातील आणि गीतपरंपरेतील स्थान ऐतिहासिक महत्त्वाचे ठरते.

तत्कालीन कविसंमेलने अन् साहित्यसंमेलने हमखास गाजविणारे ते एक केंद्रवर्ती कवि-व्यक्तिमत्त्व होते. गायनाचे कुठलेही पारंपरिक व शास्त्रीय शिक्षण न घेताही भावनानुकुल काव्यगायनाचे ते एक आदर्श ठरले होते. हिंदी परंपरेसारखा त्यांचा हा विशेष, मराठी काव्यपरंपरेत खास उठून दिसतो.

त्यांच्या कवितेचा सूर सर्वसाधारणपणे सकारात्मक, आशावादी आणि आनंदी राहिला. आनंदवादी भारतीय तत्त्वज्ञान परंपरेचे ते एक पाईक असल्याने, आपला हा स्थायी सूर त्यांनी अखेरपर्यंत जाणीवपूर्वक जपलेला दिसतो. 'आनंदगीत' ह्या एका शीर्षकाखाली त्यांच्या काव्याचे चार भाग १९२०, १९२४, १९२८ व १९६४ असे कालानुक्रमे प्रसिद्ध झालेले आहेत. ह्या चारही भागांत त्यांची बहुतांश कविता संग्रहित करण्यात आलेली आहे.

सुरुवातीला त्यांनी नाट्यलेखनाचाही प्रयत्न केलेला दिसतो. 'संगीत मथुरा' (१९१२) व 'संगीत मधुमिलन' (१९२२) ही नाटके त्यांच्या नावावर आहेत. त्यांच्या व्यक्तिमत्त्वाचा आणि कवित्वाचा वेध घेणारा 'आनंदकंद: आनंदराव टेकाडे' हा स्मृतिग्रंथ त्यांच्या कन्या सौ. मंदाकिनी घासकडबी, व प्रा. वसंत घासकडबी व वा. रा. सोनार ह्यांनी संपादित केला असून जनशताब्दीच्या निमित्ताने तो १९९१ साली चेत्रश्री प्रकाशन, अंमळनेरतर्फे प्रकाशित करण्यात आला.

– राजेंद्र नाईकवाडे

**संदर्भ :**


*१. सोनार, वा. रा., 'आनंदकंद : आनंदराव टेकाडे'; (संपादक; मंदाकिनी घासकडबी इत्यादी); चैत्रश्री प्रकाशन, अंमळनेर; १९९१.*

*२. नाईकवाडे, डॉ. जगन्नाथ; 'राष्ट्रवाद आणि आधुनिक मराठी कविता', साहित्यप्रसार केंद्र, नागपूर; १९८९.*


* * *

ट

# ठ





## ठाकरे, केशव सीताराम

☞ मुख्य नोंद – पत्रकारिता आणि ललितेतर साहित्य खंड

## ठोकळ, गजानन लक्ष्मण

**कथाकार, कादंबरीकार, कवी**

**२६ मे १९०९– २२ जुलै १९८४**



अहमदनगर जिल्ह्यातले कामरगाव हे गजानन लक्ष्मण ठोकळ यांचे मूळ गाव असून त्यांचे आई-वडील शिक्षक होते. बी.ए., बी.टी. पर्यंत शिक्षण घेतल्यानंतर त्यांनी काही काळ नोकरी केली, पण पुढे पुण्यामध्ये येऊन लेखन-वाचन भांडार या नावाने ग्रंथविक्रीचे दुकान काढून पुस्तक प्रकाशनाचा व्यवसाय स्वीकारला व त्यात चांगला जम बसविला. कवी म्हणून त्यांच्या लेखनसेवेला प्रारंभ झाला. रविकिरण मंडळातील गिरीश-यशवंत या कवींनी सुरू केलेली ग्रामीण गीतांची परंपरा ग्रामीण भाषेचा चपखल उपयोग करून ठोकळांनी लक्षवेधक केली व या प्रकारच्या इतर कवींच्या कवितांचा संग्रह 'सुगी' या नावाने त्यांनी १९३४ साली संपादित केला.

रवींद्रनाथ टागोरांनी जपानी 'टाका' काव्यप्रकाराप्रमाणे 'कणिका' हा नवीन काव्यप्रकार बंगाली भाषेमध्ये रूढ केला होता. त्या रचना प्रकारानुसार ठोकळांनीही बऱ्याच कणिका लिहिल्या. १९३८ मध्ये 'मीठ भाकर' हा जानपदगीतांचा आणखी एक संग्रह त्यांनी प्रसिद्ध केला. ग्रामीण गीत रचनेमध्ये त्यांनी आपला वेगळा असा ठसा उमटविला असला, तरी रसिकांनी त्यांच्या कथालेखनाला सर्वाधिक प्रतिसाद दिला. 'कडू साखर' (१९४३), 'सुगंध' (१९४५), 'ठोकळ गोष्टी' भाग १ ते ५ (१९५९ ते १९६७), 'कोंदण' (१९६८), 'क्षितिजाच्या पलीकडे' (१९७०), 'मत्स्यकन्या' (१९८३), या कथासंग्रहांतील कथांनी रसिकांच्या मनाचा ठाव घेतला. ग्रामीण जीवन व ते जगणाऱ्या व्यक्ती यांचे यथार्थ आकलन त्यांना असल्यामुळे आपल्या कथांमधून ग्रामीण जीवनाचे अतिशय प्रत्ययकारी चित्रण ते करतात.

**चित्रमय भाषाशैली**

'कडू साखर' या कथासंग्रहातील कोल्हाट्यांच्या खेळाचे वर्णन, 'गोफणगुंड्या'मधील गोफणीच्या लढाईचे वर्णन, 'दौलतजादा'मधील बकुळीच्या तमाशाचे वर्णन त्यांनी कमालीच्या जिवंतपणे शब्दबद्ध केले आहे. बकुळा, साखरी, तुळशी अशी कितीतरी व्यक्तिचित्रे ते मूर्तिमंतपणे आपल्यासमोर साकार करतात. चाकोरीबाहेरचे जीवन जगणाऱ्या, बेदरकार व्यक्तीही ते आपल्या कथांमधून तेवढ्याच सजीवपणे साकारतात. 'निळे डोळे'मधील अफूच्या नशेत गर्क असणारे व्यंकटेश सरदेशमुख, स्वतःचा जीव धोक्यात घालून मालकाचा जीव वाचविणारा ड्रायव्हर 'मामू', गोंड आदिवासी जीवनाचे प्रत्ययकारी दर्शन घडवणारी 'रानगावची राणी', संशयाने त्रस्त होऊन बायकोचा खून करणारा आणि साळसूदपणे वावरणारा 'असा मी वेडा' या कथेतील गृहस्थ, 'एका मित्राची गोष्ट'मधील पतंगरावाच्या जीवनात पुनर्जन्माच्या कल्पनेतून निर्माण झालेला प्रश्न, अशा कितीतरी थक्क करून सोडणाऱ्या व्यक्ती व घटना त्यांच्या कथांमधून आपल्याला भेटतात. आपल्या चित्रमय भाषाशैलीत ते प्रसंग अशा पद्धतीने

रेखाटतात की त्या घटनेविषयी उत्कंठा वाढत जाते आणि शेवटी अचानक कलाटणी देऊन ते वेगळेच सत्य आपल्यासमोर मांडतात. त्यांच्या या वैशिष्ट्यपूर्ण शब्दशैलीमुळे वाचकाला एखाद्या दृकश्राव्य माध्यमासारखी अनुभूती प्राप्त होते. म्हणूनच त्यांच्या कथासंग्रहांच्या अनेक आवृत्त्या निघाल्या.

त्यांचे कादंबरीलेखनही असेच प्रत्ययकारी आहे. 'गावगुंड', 'ठिणगी', 'टेंभा' या कादंबऱ्या त्यांनी लिहिल्या. त्यात 'गावगुंड' या कादंबरीला विपुल लोकप्रियता लाभली. या कादंबरीच्या अनेक आवृत्त्या निघाल्या. शिवाजी विद्यापीठाच्या बी.ए.च्या अभ्यासक्रमात तिचा समावेश होता. या कादंबरीवर आधारित चित्रपटही काढण्याचा प्रयत्न झाला. १९४५ पूर्वीच्या साताऱ्याकडील दहशतवादी जीवनाची पार्श्वभूमी लाभलेली ही कादंबरी, त्यातील बेदरकार पात्रांमुळे, अद्‌भुत घटनाप्रसंगांमुळे व चित्रमय भाषाशैलीमुळे खूपच लोकप्रिय ठरली. मुसळगावचा धसमुसळ्या म्हणून वावरणारा जयाजी, दरोडेखोरासारखी कृष्णकृत्ये करणारा धनाजी, त्याची बायको पारू, पिसाळ फौजदाराची मुलगी लीला, धनाजीचा साथीदार राणू या पात्रांचे त्यांनी कादंबरीतून घडविलेले जीवनदर्शन प्रत्ययकारी आहे. 'ठिणगी' ही त्यांची कादंबरी संस्थानिक जीवनावर आधारलेली आहे तर 'टेंभा' ही ग्रामीण जीवनावरील वास्तव कादंबरी आहे. १९५० पूर्वीच्या अहमदनगर जिल्ह्याच्या दुष्काळी भागातील जिरायती शेतीवर गुजराण करणाऱ्या शेतकऱ्याच्या जीवनावर ही कादंबरी आहे. या कादंबरीचे वैशिष्ट्य म्हणजे ती अमेरिकन लेखक अलेक्स हेली यांच्या 'Roots' या कादंबरीची प्रेरणा घेऊन लिहिलेली कादंबरी आहे व लेखकाच्या स्वतःच्या जीवनावर ती आधारलेली आहे. शेतकरी कुटुंबात वाढलेले 'काका' संपूर्ण जिल्ह्यात शिक्षणाचा प्रसार कसा करतात आणि त्यासाठी किती आणि कशा खस्ता खातात, हे 'टेंभा' या कादंबरीतून ठोकळांनी दाखविले आहे. या कादंबरीतील अहमदनगरकडची ग्रामीण बोलीभाषा आणि पात्रांचे वास्तव दर्शन अंतःकरणाला भिडणारे आहे.

ग्रामीण जीवनाकडे आपल्या कथा, कादंबरी व जानपद गीते यांद्वारे रसिकांचे व प्रतिभावंतांचे लक्ष वेधणारे कथाकार, कादंबरीकार व कवी म्हणून ग. ल. ठोकळ यांची कामगिरी महत्त्वपूर्ण आहे.

– डॉ. संजय देशमुख

**संदर्भ :**

१. *कुलकर्णी अनिरुद्ध, संपादक; 'प्रदक्षिणा'; कॉन्टिनेन्टल प्रकाशन, पुणे ३०.*

२. *'मराठी वाङ्‌मयाचा इतिहास', खंड ५ भाग १; महाराष्ट्र साहित्य परिषद, पुणे.*

३. *हातकणंगलेकर म. द.; 'मराठी कथा : रूप आणि परिसर'; सुवर्ण प्रकाशन, पुणे; प्रथमावृत्ती १९८६.*

## ठोमरे त्र्यंबक बापूजी

☞ **बालकवी**

* * *

ठ

# ड





## डहाके, वसंत आबाजी

**कवी, समीक्षक**

**३० मार्च १९४२**



१९७० नंतरच्या समकालीन समाजवास्तवावर भाष्य करणारी कविता लिहिणारे प्रभावी कवी, कादंबरीकार, समीक्षक आणि विचारवंत म्हणून वसंत आबाजी डहाके यांनी मराठी साहित्यविश्वावर तेजस्वी मुद्रा उमटवली आहे. पूर्वसुरींचा व्यासंग आणि आधुनिक मराठी वाङ्मयाचे प्रगल्भ आकलन आणि पृथगात्म चिंतनशील भाष्य हे त्यांच्या समीक्षात्मक लेखनाचे गुणवैशिष्ट्य आहे.

वसंत आबाजी डहाके यांचा जन्म यवतमाळ जिल्ह्यातील बेलोऱ्यास झाला. त्यांचे वडील त्या गावचे पाटील होते. बेलोऱ्यास त्यांचे घर आणि शेती होती. डहाके दहा वर्षांचे होईपर्यंत बेलोऱ्यास राहिले. त्यांचे प्राथमिक शिक्षण बेलोऱ्यास झाले. माध्यमिक शिक्षणासाठी ते चंद्रपूरला गेले. पाचवीपासून बी. ए.होईपर्यंत ते चंद्रपूरला राहिले. बी. ए.च्या पहिल्या वर्षाला असताना त्यांची 'एक आगळा पक्षी' ही कविता 'सत्यकथा' मासिकात प्रसिद्ध झाली. १९६५ पासून त्यांनी मराठीच्या अध्यापनास प्रारंभ केला. वर्धा जिल्ह्यातील आर्वी येथे त्यांनी अध्यापन केले. १९६७ मध्ये वर्धा जिल्ह्यातील हिंगणघाट येथे त्यांनी मराठीचा व्याख्याता म्हणून काम पाहिले. त्यांनी १९७० मध्ये चंद्रपूर येथे मराठीचे अध्यापन केले. १९७१ मध्ये अमरावतीच्या शासकीय महाविद्यालयात ते मराठीचे व्याख्याते होते. याच काळात त्यांनी 'त्रिशंकू' या लघु नियतकालिकाचे सहसंपादन केले. १९८२ पासून मुंबईच्या एल्फिन्स्टन या नामांकित महाविद्यालयामध्ये त्यांनी मराठीचे अध्यापन केले. १९९४ मध्ये 'राज्य मराठी विकास संस्थे'त त्यांनी उपसंचालक म्हणून धुरा सांभाळली.

**समाजवास्तवाचे दर्शन**

कवितेच्या क्षेत्रात नव्या पाऊलखुणा उमटविण्यात डहाके यांच्या कवितेने महत्त्वपूर्ण वाटा उचललेला आहे. त्यांच्या जाणिवेचा अवकाश अत्यंत व्यापक आहे. जागतिक महत्त्वाच्या घटनांचा, समकालीन विचारप्रवाहाचा आणि वाङ्मय प्रकारात घडलेल्या नव्या परिवर्तनांचा संस्कार त्यांनी मनात मुरवून घेतलेला आहे. साऱ्या मंथनप्रक्रियेतून डहाके यांची कविता नवी प्रतिमासृष्टी घेऊन जन्मास येत होती. समकालीन कवींच्या समानधर्मीपणाशी ती संवाद साधत होती. आयुष्यामध्ये वेगवेगळ्या कारणांसाठी झालेली स्थलांतरे त्यांच्या अनुभवविश्वात नवी भर टाकत होती. त्यांच्या चित्तातील अस्वस्थता भावात्मक आणि सर्जनात्मक अनुभूतींना नवी प्रेरणा देत होती.

'सत्यकथा' मासिकाच्या मे १९६६ च्या अंकात त्यांची 'योगभ्रष्ट' ही प्रदीर्घ कविता प्रसिद्ध झाली. 'योगभ्रष्ट' हा त्यांचा पहिला कवितासंग्रह १९७२ मध्ये प्रसिद्ध झाला. त्यातील सर्व कविता १९६६ ते १९७१ या काळातील आहेत. त्यांच्या कवितांतून आणि रेखाटलेल्या चित्रांतून त्यांच्या अंतर्मनातील तीव्र तडफड, अस्वस्थता आणि उद्रेक हे सारे अत्यंत पारदर्शी शब्दांत प्रकट झाले आहे. मनातील भावकोमल मृदू स्वर या कवितेत समांतरपणे मुखर झाले आहेत. प्रेमविषयक

अनुभूती त्यांनी उत्कटतेने व्यक्त केली आहे. समकालीन समाज-वास्तवाचा सारा दाह आणि व्यक्तिमनातील प्रक्षोभ, उद्वेग त्यांच्या 'योगभ्रष्ट' या संग्रहातील कवितेतून व्यक्त होतो.

१९८७ मध्ये त्यांचा 'शुभवर्तमान' हा दुसरा कवितासंग्रह प्रसिद्ध झाला. १९७५च्या अणीबाणीनंतर देशातील स्थितीत आमूलाग्र बदल जाणवायला लागला. बौद्धिक क्षेत्रात असुरक्षिततेचे वातावरण निर्माण झाले. विचारांचे, भावभावनांचे आणि संवेदनांचे बराकीकरण करण्याची प्रक्रिया राज्यकर्त्यांकडून घडली. या सामाजिक आणि सांस्कृतिक पार्श्वभूमीवर जनतेच्या मनात निर्माण झालेला थरकाप, किंकर्तव्यमूढता आणि अस्तित्वशून्यता यांचे विदारक चित्रण 'शुभवर्तमान' मधील 'नखे', 'नटासाठी पार्श्वसूचना' , 'मोर्चा', 'क्रान्ती', 'मीठ महाग झालं की उंदीर मारण्याचं औषध', 'विचार झालाच पाहिजे', 'अमानुष सत्तेचे दिवस', 'वृत्तपत्र' व 'वाचकांचा पत्रव्यवहार' या कवितांमधून डहाके यांनी केलेले आहे. सामाजिक संवेदनशीलतेचे उत्कट आणि प्रगल्भ रूप 'शुभवर्तमान'मधील कवितांतून आढळून येते. 'शुनःशेप'मध्ये या जीवनचिंतनाला वेगळी मिती प्राप्त झालेली आहे. देशातील राजकीय परिस्थितीवरील आणि प्रवृत्तीवरील भाष्य करणाऱ्या कवितांचा समावेश या संग्रहात झालेला आहे. 'अधोलोक' ही त्यांची पहिली कादंबरी १९७५ मध्ये प्रसिद्ध झाली. ती एक गंभीर शोकात्मिका आहे. भीती, अपराध, लाचारी, क्षुधा, व्यक्तित्वहीनता आणि असंबद्धता, आणि या सगळ्यांवर आपले वर्चस्व गाजविणारी विराट सत्ता आणि तिच्या टाचेखाली चिरडून पराभूत झालेल्या एका माणसाची कथा या कादंबरीत गुंफली आहे. 'प्रतिबद्ध' आणि 'मर्त्य' या डहाके यांच्या लघु-कादंबऱ्या आहेत. या दोन्ही कादंबऱ्यांत प्रयोगशीलता आहे. लघु-कवितेसारखी मिताक्षरी रचना आहे. जीवनातील गतिमान प्रवाहाला कवेत घेण्याचे सामर्थ्य डहाके यांच्या भाषाशैलीत आहे. मुखपृष्ठावर, मलपृष्ठावर आणि अंतर्भागात काढलेली मोजकीच रेखाचित्रे आशयसूत्रांना पुष्टी देतात.

ते अव्वल दर्जाचे समीक्षक आहेत. काव्यधर्माला जवळचे म्हणून त्यांनी काव्यसमीक्षा आधिक्याने लिहिली. 'कवितेविषयी' या डहाके यांच्या समीक्षाग्रंथामुळे मराठी काव्यविश्वाशी गेली चाळीस-पंचेचाळीस वर्षे निगडित असलेल्या एका महत्त्वाच्या सर्जनशील कवीच्या चिंतनाद्वारे कवितेची समज वाढायला मौलिक साहाय्य झालेले आहे.

**मराठी साहित्याचा इतिहास**

यशवंतराव चव्हाण मुक्त विद्यापीठासाठी त्यांनी 'कविता म्हणजे काय?' (१९९१), 'समकालीन साहित्य' (१९९२), 'नवसाहित्य आणि नवसाहित्योत्तर साहित्य' (२००१) हे समीक्षाग्रंथ प्रसिद्ध केले आहेत. शिवाय 'निवडक कविता' (१९९१) हे पुस्तक संपादित केले आहे. मुंबई विद्यापीठाच्या दूर शिक्षण संस्था अभ्यासक्रमास अनुसरून त्यांनी 'उपयोजित समीक्षा' (१९९२) हा ग्रंथ लिहिला आहे. साहित्य अकादमीने त्यांचे 'निवडक सदानंद रेगे' हे पुस्तक प्रसिद्ध केले आहे.

त्यांनी सहकार्याने संपादित केलेल्या महत्त्वपूर्ण ग्रंथांत 'शालेय मराठी शब्दकोश' (१९९७), 'संक्षिप्त मराठी वाङ्मयकोश', भाग १ (१९९८), 'कविता विसाव्या शतकाची' (२०००), 'वाङ्मयीन संज्ञा-संकल्पनाकोश' (२००१), 'संक्षिप्त मराठी वाङ्मयकोश' भाग २ (२००४), यांचा समावेश आहे. 'संक्षिप्त मराठी वाङ्मयकोशा'ला आणि 'वाङ्मयीन संज्ञा-संकल्पना' कोशाला त्यांनी लिहिलेल्या अभ्यासपूर्ण आणि प्रदीर्घ स्वरूपाच्या विवेचक प्रस्तावना उल्लेखनीय आहेत. त्यांची मांडणी वाङ्मयाचा वृत्तिगांभीर्याने अभ्यास करणाऱ्या आणि संस्कृतिशोध घेणाऱ्या प्रज्ञावंताची आहे. इतिहासाचाही त्यांनी मर्मस्पर्शी वेध घेतलेला आहे. याच संकल्पनांचा विस्तार करून त्यांनी 'मराठी साहित्य: इतिहास आणि संस्कृती' हा बृहद्ग्रंथ लिहिला आहे. मराठी साहित्यसृष्टी प्रारंभकालापासून आत्तापर्यंतच्या प्रवाहांचे आणि अंतःप्रवाहांचे, वृत्ति-प्रवृत्तींचे विहंगमावलोकन या ग्रंथात आहे. निखळ वाङ्मयीन दृष्टीने आणि साक्षेपी वृत्तीने लिहिलेला हा

महत्त्वपूर्ण ग्रंथ आहे. डहाके हे समकालीन मराठी साहित्य विश्वाविषयीच्या गंभीर लेखनात, चिंतनात सतत मग्न असतात. ज्ञानकोशकार्यात त्यांनी मोलाची निर्मिती केलेली आहे. प्रज्ञा, प्रतिभा आणि परिश्रम या त्रयीचे सुमधुर नवनीत म्हणजे प्रस्तुत ग्रंथ होय. मराठी माणसाची जीवनशैली आणि त्याने केलेली साहित्य-निर्मिती यांमधील अनुबंध त्यांनी दाखवून दिलेला आहे. त्यांतून त्यांची संशोधक वृत्ती आणि मर्मदृष्टी प्रत्ययास येते.

डहाके यांचे वाङ्मयीन व्यक्तिमत्त्व संपन्न आहे. ते उत्कृष्ट चित्रकार आहेत. निसर्गाविषयी त्यांना ओढ वाटते. आदिम संस्कृतीविषयी त्यांना अत्यंत ममत्व वाटते. 'अधिवासशास्त्रीय साहित्य समीक्षा आणि मराठी कविता' यांमधील अनुबंध तपासण्याचा त्यांनी प्रयत्न केलेला आहे. नव्या-नव्या विचारप्रवाहांविषयी त्यांना नित्य कुतूहल वाटते. 'यात्रा : अंतर्यात्रा' ह्या डहाके यांच्या पुस्तकात आत्मपर आणि चिंतनपर लेख समाविष्ट केलेले आहेत. लौकिक जीवनप्रवासाचा आणि त्यांच्या कवित्वशक्तीच्या आतून विकास होण्याच्या प्रक्रियेचा त्यांनी मनोवेधक आलेख रेखाटला आहे. त्यांच्या समग्र व्यक्तिमत्त्वाची वीण कशी जुळत गेली, याचे हृदयंगम दर्शन या पुस्तकात घडते.

डहाके यांना आजवर अनेक वाङ्मयीन पुरस्कार प्राप्त झालेले आहेत. त्यांच्या 'शुभवर्तमान' या कवितासंग्रहाला महाराष्ट्र शासनाचा केशवसुत पुरस्कार प्राप्त झाला (१९८७). त्यांच्या 'शुनःशेप' या कवितासंग्रहाला महाराष्ट्र शासनाचा विशेष पुरस्कार प्राप्त झाला. त्यांच्या 'योगभ्रष्ट' या पहिल्या कवितासंग्रहाचा The Terrorist of the Spirit या नावाने अनुवाद प्रसिद्ध झाला. 'आविष्कार' या संस्थेने 'स्वागत कोसळत्या शतकाचे' या त्यांच्या कवितांचे नाट्यात्म दर्शन घडविले. अमोल पालेकरांनी दिग्दर्शित केलेल्या जी. ए. कुलकर्णी यांच्या 'कैरी' या दीर्घकथेवर आधारलेल्या चित्रपटात डहाके यांनी अभिनय केला आहे.

– डॉ. सोमनाथ कोमरपंत

**संदर्भ :**


*१. डहाके वसंत आबाजी; 'यात्रा – अंतर्यात्रा'; शब्द प्रकाशन, सातारा ;१९९९.*

*२. डहाके वसंत आबाजी; 'कवितेविषयी'; स्वरूप प्रकाशन, औरंगाबाद ;१९९९.*


## डांगळे, अर्जुन ठमाजी

**कवी, कथाकार, सामाजिक कार्यकर्ते**

**१५ जून १९४५**



अर्जुन ठमाजी डांगळे यांचा जन्म मुंबई येथील माटुंगा लेबर कँप येथे झाला. 'छावणी हालते आहे' हा त्यांचा पहिला कविता संग्रह. त्याचबरोबर 'ही बांधावरची माणसं' हा कथासंग्रह, 'दलित विद्रोह', 'आंबेडकरी चळवळीचे अंतरंग', 'मैदानातील माणसे', 'निळे अधोरेखित' हे लेखसंग्रह प्रकाशित झाले आहेत. 'छावणी हालते आहे' या कविता संग्रहाआधी १९६७ साली 'आकार' या प्रातिनिधिक कवितासंग्रहात अर्जुन डांगळे यांची कविता समाविष्ट करण्यात आली होती. 'दलित पँथर' या संघटनेच्या संस्थापक सदस्यांपैकी एक असलेल्या अर्जुन डांगळेंच्या कवितेचे वर्णन करताना दया पवार म्हणतात, ''अर्जुनची कविता म्हणजे दलित पँथरच्या चळवळीची ओळख आहे. तत्कालीन मराठी कवितेच्या प्रभावाखाली न येता अर्जुनने आपली स्वतंत्र वाट चोखाळली आहे.''

अर्जुन डांगळे यांच्या कथेसंबंधी राजन गवस लिहितात, ''वर्तमानाला थेट प्रतिक्रिया देणाऱ्या या कथा रूढ समीक्षा दृष्टीने चिमटीत सापडणे केवळ अशक्य. त्यामुळे समीक्षेचे कानून बदलण्याची धीट मागणी ही कथा करते. दलित चळवळीच्या बहराच्या काळातील गुंते, निर्माण होणारे प्रश्न वाचकासमोर ठेवून विचार करायला भाग पडते.'' अर्जुन डांगळे यांनी 'दलित साहित्य : एक अभ्यास', 'लोकशाहीर अण्णाभाऊ साठे :

निवडक वाङ्मय', 'कर्मवीर दादासाहेब गायकवाड : काळ आणि कर्तृत्व', 'डॉ. बाबासाहेब आंबेडकर गौरव ग्रंथ', 'पॉयझन्ड ब्रेड' (इंग्रजी) इत्यादी पुस्तकांचे संपादन केले आहे.

'छावणी हालते आहे' या कवितासंग्रहास १९७८ साली राज्य शासनाचा पुरस्कार मिळाला. त्याच वर्षी प्रजासत्ताक दिनानिमित्त आकाशवाणीवरून सादर झालेल्या राष्ट्रीय कविसंमेलनात मराठीचे प्रतिनिधित्वही अर्जुन डांगळे यांनी केले. मुंबई मराठी साहित्य संघाच्या वतीने दिला जाणारा 'दिवंगत लालजी पेंडसे समाजवादी विचारवंत पुरस्कार' अर्जुन डांगळे यांना मिळाला आहे. मुंबई विद्यापीठात अर्जुन डांगळे यांच्या ग्रंथांचा वापर संदर्भग्रंथ म्हणून होत असतो. 'पॉयझन्ड ब्रेड' या इंग्रजी ग्रंथाला आंतरराष्ट्रीय पातळीवर प्रचंड प्रतिसाद मिळाला आहे.

अर्जुन डांगळे कवी आहेत तसे कार्यकर्तेही आहेत. ते साने गुरुजी राष्ट्रीय स्मारक ट्रस्टचे अध्यक्ष, महाराष्ट्र फाउंडेशनचे सल्लागार, कॉ. आर. बी. मोरे मेमोरिअल फाउंडेशनचे उपाध्यक्ष, प्रा. डी. डी. कोसंबी एज्युकेशनल ट्रस्टचे कार्यकारी विश्वस्त अशा विविध जबाबदाऱ्या पार पाडत आहेत.

अर्जुन डांगळे यांच्या एकूण लिखाणाचे वैशिष्ट्य शोधता आपल्या लक्षात येते की, त्यांच्या साहित्यात गतकाळातील यातनांचे फारसे चित्रण नाही, कारण वर्तमानकाळातील यातनाही सनातन आहेत. अनेक व्याधींनी ग्रासलेल्या समाजाचे शब्दचित्र डांगळे साकारतात. जीवनाच्या मूळ प्रश्नांबाबत या लेखकाला आस्था आहे. दैन्य, शोषण इत्यादींचे चित्रण करणारी कथा केवळ दलितांची असू शकत नाही; तिचे मूळ जागतिक असते, याचे भान देणारी सर्वस्पर्शी कथा-कविता अर्जुन डांगळे यांनी लिहिली.

कवी अर्जुन डांगळे हे राजकीय आणि सामाजिक क्षेत्रात कार्य करतात. कवीला दूरदृष्टी असते. पुढच्या काळाच्या पाऊलखुणा त्याला दिसतात. चळवळीची वाताहत होते, तेव्हा अर्जुन डांगळे लिहितात,

एकाच गावाला जायला निघालेले हे वाटसरू,
वेगवेगळ्या वाटेने गेले आहेत दूरदूर...

अर्जुन डांगळे यांनी ७०च्या दशकात केलेले हे भाकित आज खरे ठरले आहे.

– रवींद्र गोळे

**संदर्भ :**

*१. डांगळे अर्जुन उमाजी; 'ही बांधावरची माणसं'; भाष्य प्रकाशन, दुसरी आवृत्ती, २००६.*

## डांगे, श्रीपाद अमृत

☞ **मुख्य नोंद – राजकारण खंड**

* * *

# ढ





## ढवळे, वामन रावजी

**कवी, संपादक, चरित्रकार**

**२ फेब्रुवारी १९०८ - ३० जून १९८४**



वामन रावजी ढवळे यांचा जन्म उरणजवळ (जि. रायगड) मुळेखंड येथे झाला. त्यांचे प्राथमिक शिक्षण आधी करोळी येथे आणि नंतर राजापूर येथील विश्वनाथ विद्यालयात झाले. शालेय जीवनातच त्यांनी 'बालशाहीर' या नावाने काव्यलेखनाला सुरुवात केली. सेन्ट झेविअर्स महा-विद्यालयातून ढवळे यांनी बी. ए. ची पदवी संपादन केली.

ते स्वतः साहित्यनिर्मिती करीत असले, तरी वाङ्मय क्षेत्रातले त्यांचे चिरस्थायी स्वरूपाचे काम दोन प्रकारचे आहे. एक म्हणजे मर्मज्ञ संपादक म्हणून आणि दुसरे साहित्य संस्थेतला तळमळीचा कार्यकर्ता म्हणून.

'लोकमान्य' (१९३०-३३), 'पारिजात' (१९३४-रघुवीर सामंतांसह), 'पखरण' (१९३५), ज्योत्स्ना (१९३६ ते १९४१), 'समीक्षक' (१९४१), 'रागिणी' (१९४४-१९४५), 'साहित्य' (१९४७ ते १९५२), 'महाराष्ट्र साहित्य पत्रिका' (१९५५ ते १९६१) अशा नियतकालिकांचे संपादन करताना ढवळे यांची स्वागत-शील, खुली, बदलत्या वाङ्मयीन-सांस्कृतिक पर्यावरणाला सुजाणपणे सामोरे जाण्याची वृत्ती उपयोगी पडली. साहित्याच्या नव्या प्रवाहांचे महत्त्व जाणून त्यांनी त्यांना उचित प्रसिद्धी देण्याची संपादकीय भूमिका घेतली.

अनेक ग्रंथांचे संपादन त्यांनी केले. 'कविवर्य तांबे-साहित्यविचार' (१९७४), 'एका पिढीचे आत्मकथन' (संयुक्त संपादन) (१९७५), 'मराठी रंगभूमी-मराठी नाटक' (संयुक्त संपादन) (१९७१) 'कविता फुलते अशी' (संयुक्त संपादन) (१९७८), 'मराठी कविता' (१९२०-१९५०), 'मराठी कविता-प्राचीन कालखंड' (११५०-१८४०) अशा अनेक महत्त्वाच्या संपादित ग्रंथांबरोबर ढवळे यांची 'रेषा' (कविता), 'डी. जी. तेंडुलकर चरित्रकार', 'खांडेकर- मित्र आणि माणूस' ही स्वतःची पुस्तकेही प्रकाशित झाली.

विविध कारणांनी मासिकांचे विशेषांक काढण्याची प्रथा त्यांनी सुरू केली; आणि उत्तम मानपत्रांचे लेखन वेळोवेळी करून 'मानपत्र' या लेखनप्रकाराला प्रतिष्ठित रूप मिळवून दिले.

संपादनाखेरीज आणखी एक कार्य एखाद्या व्रतासारखे ढवळे यांनी केले, ते म्हणजे 'मुंबई मराठी साहित्य संघा'चे कार्यवाह, कार्याध्यक्ष, संपादक (साहित्य), वाङ्मय व भाषा वर्गांचे संचालक अशा विविध रूपांत त्यांनी साहित्य संघाची धुरा ५० पेक्षा अधिक वर्षे सांभाळली.

उपक्रमशीलता हा त्यांचा आणखी एक विशेष. साहित्य क्षेत्रातील वादविवाद, संमेलनातील भाषणे इत्यादींची नोंद संपादक म्हणून ते मासिकातून आवर्जून घेत.

वाङ्मय क्षेत्रात चोखंदळ, रसज्ञ संपादक तसेच निरलस आणि निरपेक्ष कार्यकर्ता कसा असावा, याचा धडा वा. रा. ढवळे यांनी घालून दिला आहे.

साहित्य संस्कृतीच्या संवर्धनाच्या कार्याचा वसा घेऊन तो जन्मभर निष्ठेने पाळणारे वामन रावजी ढवळे यांचे नाव संपादन आणि संस्थात्मक कार्यात सुपरिचित आहे.

**- मंदाकिनी भारद्वाज**

**संदर्भ :**

*१. जोशी सुधा ; 'ललित' दिवाळी २००८.*

## ढसाळ, नामदेव लक्ष्मण

**कवी, विचारवंत**

**१५ फेब्रुवारी १९४९**



नामदेव साळूबाई ढसाळ आणि नामदेव लक्ष्मण ढसाळ अशी दोन पूर्ण नावे ढसाळ यांनी दिली आहेत. सर्वसाधारणतः नामदेव ढसाळ या नावाने ते परिचित आहेत. यांचा जन्म पुणे जिल्ह्यातील राजगुरुनगर (पूर्वीचा खेड) तालुक्यातील कनेसरपूर नावाने ओळखल्या जाणाऱ्या जोडगावातील 'पूर' या गावात झाला. वडिलांची मुंबईच्या कत्तलखान्यांशी संबंधित नोकरी असल्याने, इयत्ता चौथीपर्यंतचे शिक्षण गावी घेतल्यावर पुढल्या शिक्षणासाठी मुंबईत भायखळा हेन्स रोडला प्रवेश. कामाठीपुरा किंवा गोलपिठा या मुंबईतल्या 'रेडलाइट' म्हणून ओळखल्या जाणाऱ्या परिसरात आरंभीचा काळ. त्या काळच्या एस.एस.सी.पर्यंतच्या शिक्षणानंतर काही काळ टॅक्सी चालवली. काही काळ पाटबंधारे खात्यात शिपायाची नोकरी केली. याच काळातल्या आणि गोलपिठ्याच्या अनुभवविश्वाशी संबंधित कवितांचा पहिला संग्रह 'गोलपिठा' (१९७२) प्रकाशित झाला. या संग्रहाच्या आरंभी विजय तेंडुलकर लिहितात, ''पांढरपेशा जगाच्या सीमा संपून पांढरपेशा हिशेबांनी 'नो मॅन्स लॅन्ड'- निर्मनुष्य प्रदेश जेथून सुरू होतो, तेथून नामदेव ढसाळ याच्या कवितेचे मुंबईतील, 'गोलपिठा' नावाने ओळखले जाणारे जग सुरू होते.''

'गोलपिठा' या पहिल्याच संग्रहातून नामदेव ढसाळ यांनी त्यांच्या पूर्वकालीन आणि समकालीन कविता-व्यवहारातले भाषिक संकेत, विषयांचे संकेत आणि कविता-मांडणीचेही संकेत पार उद्ध्वस्त केले. त्या काळात 'रसाळ नामदेव ते ढसाळ नामदेव' असा त्यांचा अधिक्षेपही करण्यात आला. 'गोलपिठा' (१९७२) ते 'तुझे बोट धरून चाललो आहे मी' (२००६) या काळात त्यांचे मराठी कवितांचे एकूण नऊ संग्रह प्रकाशित झाले आहेत.

**शोषणव्यवस्थेला सुरूंग**

ढसाळांच्या कवितेने आरंभीच 'गोलपिठा' या संग्रहात प्रस्थापित कविता-संकेतांना जसे उद्ध्वस्त केले, तसेच त्या पुढच्या स्वतःच्या प्रत्येक नव्या संग्रहात स्वतःच्या कवितांच्या संकेतसमूहांनाही सातत्याने उद्ध्वस्त केले आहे. मात्र हे सर्व होत असताना एक सूत्र त्यांनी सातत्याने आपल्या कवितेत जपले आहे, अधोरेखित केले आहे. ते सूत्र 'गोलपिठा'च्या आरंभीच असे व्यक्त झाले आहे : 'सर्वसामान्य माणसाला सत्ता-संपत्ती-प्रतिष्ठा यांपासून वंचित ठेवणाऱ्या शोषण व्यवस्थेला सुरुंग' लावण्याचे. या सूत्राची अभिव्यक्ती 'गोलपिठा' या संग्रहातील 'माणसाने' या दीर्घ कवितेत अशी झाली आहे: ''माण्साने पहिल्याप्रथम स्वतःला। पूर्ण अंशाने उद्ध्वस्त करून घ्यावे।'' पुढे जाऊन या उद्ध्वस्त होण्याच्या करण्याच्या अनेक परी खास ढसाळांच्या शब्दशैलीत पाहाव्यात अशा आहेत. ''हे सारे सारे विश्वव्यापू गळूप्रमाणे फुगू द्यावे। अनाम वेळी फुटू द्यावे रिचू द्यावे।'' असे म्हणत, 'एक तीळ सर्वांनी करंडून खावा। माण्सावरच सूक्त रचावे। माण्साचेच गाणे गावे माण्साने।'

नामदेव ढसाळांची आजवरची कविता ही त्यांच्या स्वतःच्या प्रातिभिक सामर्थ्याची साक्ष तर आहेच, पण त्याबरोबर ती तिच्या निर्मितीकाळाशी अभिन्नपणे निगडित आहे. काळाचे सर्व चढउतार तिने पाहिले आहेत, पचवले आहेत आणि कवितेत सर्वार्थाने रिचविले आहेत. 'गोलपिठा'चे प्रकाशनवर्ष १९७२ असले, तरी कवितालेखनाचा काळ साठीच्या दशकाचा आहे. डॉ.बाबासाहेब आंबेडकरांच्या विचारांचा आणि कृतीचा आधार घेत उभे राहिलेले पूर्वाश्रमीचे महार आणि महारेतर अस्पृश्य; धर्मांतरानंतरचे बौद्ध समाजातील

नवशिक्षित यांच्या विद्रोही उठावाचा काळ आहे. याच प्रेरणेतून मराठी साहित्यात, विशेषतः आणि काही प्रमाणात भारतीय साहित्यातही आणि नंतरच्या काळात जागतिक साहित्यातही 'दलित साहित्य' ही संकल्पना विचाराच्या पातळीवर रूढ झाली आहे. इथे हेही नमूद करणे गरजेचे आहे की बाबूराव बागूल, दया पवार, प्र.ई.सोनकांबळे, नामदेव ढसाळ, अर्जुन डांगळे, यशवंत मनोहर, प्रकाश जाधव, भुजंग मेश्राम, अरुण काळे, प्रज्ञा दया पवार आणि यांच्यासोबत लिहिणाऱ्या खणखणीत नाण्यासारख्या मराठी भाषक साहित्यिकांना केवळ 'दलित साहित्यिक' अशा राखीव बिरुदावलीत समाविष्ट करणे, मराठी साहित्य परंपरेतील संतकवी मंडळींचे योगदान विचारात घेता, अन्यायकारक आहे.

ढ

ढसाळांनी 'या सत्तेत जीव रमत नाही' (१९९५) यात डॉ.आंबेडकरांना संबोधित करत म्हटले आहे – ''आज आमचे जे काही आहे। ते सर्व तुझेच आहे। हे जगणे आणि मरणे। हे शब्द आणि ही जीभ। हे सुख आणि दुःख। हे स्वप्न आणि वास्तव। ही भूक आणि तहान। सर्व पुण्याई तुझीच आहे।'' ढसाळांच्या लेखनामागे डॉ.बाबासाहेब आंबेडकरांच्या विचारांचा आणि कृतींचा पाया आहे, हे निर्विवाद आहे. किंबहुना १९६० नंतरच्या अनियतकालिकांच्या उठावालाही बळ देण्यात इतर परिमाणांबरोबर हेही एक परिमाण आहे. हे बळ नसते, तर बहुजनांतले कितीतरी आवाज मुके राहिले असते. हे आवाज साहित्याच्या प्रस्थापित वर्तुळातून बाहेर तरी फेकले गेले असते किंवा प्रस्थापित साहित्यव्यवस्थेत त्यांच्याही नकळत सामावले गेले असते. ढसाळांच्या लेखनाचा विचार करताना हे विशेषत्वाने नोंदवायला हवे. कारण त्यांनी त्याचा उच्चार वेळोवेळी जाहीरपणे केला आहे. डॉ.बाबासाहेब आंबेडकरांच्या सोबतच गौतम बुद्ध, चार्वाक, महात्मा फुले, सावित्रीबाई फुले, कार्ल मार्क्स, जेनी मार्क्स, रमाबाई आंबेडकर, लेनिन, हो चि मिन्ह, माओ त्से तुंग, फिडेल कॅस्ट्रो, चे गेव्हारा, मार्टिन ल्यूथर किंग, नेल्सन मंडेला या आणि अशा शोषणाविरुद्ध लढणाऱ्या भारतातल्या आणि जगभरातल्या माणसांचा उच्चार त्यांच्या लेखनात आहे. त्यांच्या कवितासंग्रहांच्या अर्पणपत्रिका आणि कविता याची साक्ष देतात.

'मूर्ख म्हाताऱ्याने डोंगर हालविले' (१९९५) या संग्रहाला 'माझी भूमिका' असे प्रस्तावनावजा लेखन आरंभी आहे. तो त्यांचा लेखनविषयक 'जाहिरनामा'च आहे. ''माझ्या कवितेची जमीन ही सर्व हारावर्गाची आहे... मी आणि माझी कविता माझ्या वर्गाच्या जीवननिष्ठांशी प्रामाणिक आणि एकरूप आहे... माझी राजकीय कविता मी कष्टकरी जनतेच्या हाती देत आहे.''

**अविरत ऊर्जा**

'दलित पॅन्थर' स्थापन करण्यात पुढाकार. पॅन्थरच्या स्थापनेपासूनच सामाजिक व राजकीय चळवळीत अतिशय सक्रिय सहभाग. एकूणच साहित्य व साहित्यबाह्य जीवनात प्रखर विद्रोहाची भूमिका.

नामदेव ढसाळांची कविता आणि त्यांचे खासगी व राजकीय चरित्र ह्या परस्परांत गुंतलेल्या गोष्टी आहेत. त्यातून प्रवास करणे आणि त्यांना समजून घेणे सोपे नाही. 'अनुष्टुभ्' जुलै–ऑगस्ट १९७७ च्या नामदेव ढसाळ विशेषांकात तसा प्रयत्न झाला आहे; पण तो पुरेसा नाही. त्यांच्या आजवरच्या कवितांच्या संकलन–संपादनाचा एक प्रयत्न 'मी भयंकराच्या दरवाजात उभा आहे' (फेब्रुवारी २००७), हा त्यांच्या कवितेला खूप न्याय देणारा आहे. सातत्याने कवितालेखन, अखंड चणचण आणि त्यासाठी करायची धावपळ, राजकीय आयुष्यातल्या उलथापालथी, दलित पॅन्थरचा उदयास्त, खासगी आयुष्यातले ताणतणाव हे सगळे पेलत त्यांची कविता ताज्या दमाने उसळी घेताना दिसते. प्रदीर्घ काळ 'मायस्थेनिया ग्राव्हिस' या दुर्धर आजाराने ग्रासले असतानाही त्यांची ऊर्जा ताज्या दमाने उसळी घेताना दिसते. स्वतःला आणि भोवतालाला तपासत पुढे जाताना दिसते.

त्यांची ही अविरत ऊर्जा त्यांच्या गद्यलेखनातही पाहता येते. सामना, आज दिनांक या वृत्तपत्रांतले सदरलेखन, राजकीय गरजेचे लेखन, कादंबरीलेखन हे तर आहेच. शिवाय 'विद्रोह', 'सत्यता' अशा

अनियतकालिकांचे प्रकाशन, आंतरराष्ट्रीय साहित्योत्सव फेब्रुवारी-२००७ आणि फेब्रुवारी-२००८ यांचे आयोजन अशा उपक्रमांतूनही ही ऊर्जा प्रत्ययास येते.

नामदेव ढसाळांच्या कवितेचा प्रभाव मराठी कवितेवर अटळच आहे. पण तो भारतीय भाषांतूनही आहे. जर्मन भूमीवर त्यांना कविता-वाचनासाठी निमंत्रित करण्यात आले (बर्लिन फेस्टिव्हल, जून २००१), १९९९ साली त्यांना पद्मश्री पुरस्काराने सन्मानित करण्यात आले. २००४ साली साहित्य अकादमीने सुवर्ण महोत्सवी वर्षानिमित्त सगळ्या भाषांतून एकाच कवीची निवड विशेष पुरस्कारासाठी केली; ती नामदेव ढसाळ यांची होती. 'The Poet of Underworld' हा त्यांच्या कविताच्या इंग्रजी अनुवादाचा ग्रंथ (अनुवाद दिलीप पुरुषोत्तम चित्रे, छायाचित्रे : Henning Stegmuller) चेन्नईच्या एस. आनंद नावायन प्रकाशनातर्फे आला आणि त्या प्रकाशनाला ब्रिटिश कौन्सिलचा २००७चा पुरस्कार मिळाला. मराठी भाषेतले बहुतेक सगळे महत्त्वाचे पुरस्कार त्यांना मिळालेले आहेत.

'गोलपिठा' (१९७२), 'मूर्ख म्हाताऱ्याने डोंगर हालविले' (१९७५), 'आमच्या इतिहासातील एक अपरिहार्य पात्र प्रियदर्शनी' (१९७६), 'तुही इयत्ता कंची तुही इयत्ता' (१९८१), 'खेळ' (१९८३), 'गांडू बगिचा' (१९८६), 'या सत्तेत जीव रमत नाही' (१९९५), 'मी मारले सूर्याच्या रथाचे सात घोडे' (२००५), 'तुझे बोट धरून चाललो आहे मी' (२००६), 'मी भयंकराच्या दरवाजात उभा आहे' (निवडक कवितांचे संकलन) : संपादन : सतीश कळसेकर, प्रज्ञा दया पवार (२००७).

त्यांची प्रकाशित पुस्तके अशी आहेत :

'हाडकी हाडवळा' (१९८१), 'निगेटिव्ह स्पेस' (१९८७), 'आंधळे शतक' (१९९५), 'सर्व काही समष्टीसाठी'ख (२००६).

तसेच त्यांच्या नावावर पुढील पुस्तिका जमा आहेत :

'दलित पॅन्थरचा जाहिरनामा', 'बुद्ध धर्म आणि शेष प्रश्न', 'इतिहासाची चक्रे उलटी फिरवू नका, नाहीतर खड्ड्यात जाल', 'जातीयवाद विरोधी परिषद, १९९०च्या निमित्ताने पुस्तिका', 'अध्यक्षीय भाषण, आठवे कामगार साहित्य संमेलन, जून १९९९', 'आंबेडकरी चळवळ आणि सोशलिस्ट, कम्युनिस्ट' (२००१).

– डॉ. सतीश काळसेकर

## ढाले, राजाराम पिराजी

**कवी, संपादक, विचारवंत**

**३० सप्टेंबर १९४०**

राजाराम ढाले यांचे प्राथमिक शिक्षण वरळीच्या (मुंबई) शाळेत, बी.ए.पदवीपर्यंतचे शिक्षण सिद्धार्थ महाविद्यालयात (१९६८) व एम.ए.या स्नातकोत्तर पदवीचे शिक्षण मुंबई विद्यापीठात झाले (१९७२). विद्यार्थिदशेतच ढाले यांचा संबंध महाराष्ट्र बौद्ध साहित्य परिषदेशी आला. 'साधना' साप्ताहिकातील त्यांच्या लेखाने दलित समाजातील दुःख आणि दैन्य यांना वाट करून दिली. १९७३ साली ते दलित पँथरचे अध्यक्ष झाले. १९७७ साली त्यांनी 'मास मूव्हमेंट' या संघटनेची स्थापना केली. २००४ सालची लोकसभा निवडणूक त्यांनी लढवली होती. महाविद्यालयीन शिक्षणापूर्वीपासूनच ते लघुनियतकालिक चळवळीशी संबद्ध असून आता 'येरू', 'तापसी' ही लघुनियतकालिके व 'चक्रवर्ती' (दैनिक) चालू करणाऱ्यांपैकी ते एक होते. १९७१ सालच्या जानेवारीत प्रकाशित झालेल्या 'विद्रोह' या अनियतकालिकात त्यांनी लेखन केले होते. प्रस्थापित साहित्य व साहित्य व्यवहार ह्यांना त्यांनी कसून विरोध केला. चाकोरीबाहेरची वाटचाल करण्याची वाङ्मयीन जाण हा ढाले यांच्या व्यक्तिमत्त्वाचा विशेष होय. मोजके, नेटके परंतु धारदार शैलीचे त्यांचे लेखन अनियतकालिकांना वेगळी दिशा दाखवणारे ठरले. नंतर दलित पँथर चळवळीत ओढले गेल्याने त्यांचे सामाजिक व राजकीय कार्य चमकले. 'अस्तित्वाच्या रेषा' हा त्यांचा स्फुट लेखांचा संग्रह (१९९०) प्रकाशित झाला. 'स्थितीच्या कविता' हा त्यांचा लहानसा संग्रह आहे.

ढाले यांनी १९७६ साली प्रसिद्ध झालेल्या 'नाकेबंदी' या ज. वि. पवारांच्या पहिल्याच काव्यसंग्रहाला 'लाल कंदील' शीर्षकाखाली लिहिलेली प्रस्तावना अत्यंत सडेतोड, दलित साहित्याच्या उगमाचा व वाटचालीचा साक्षेपी मागोवा घेणारी, भविष्याचे संकेत देणारी असून मननीय आहे यात शंका नाही. 'दलित साहित्य' ऐवजी 'बौद्ध साहित्य' असे नाव सुचवून त्यांनी असे प्रतिपादन केले की, बौद्ध हा नवा संस्कार आहे, नवा जीवनमार्ग आहे, ते नवे जीवनमूल्य आहे. दलितांना शोषित, पीडित न म्हणता 'बौद्ध' म्हणून स्वीकारावे. त्यातच आंबेडकरी विचारांचा वारसा आहे. हा वारसा जोपासला तरच खरे दलित साहित्य निर्माण होईल, असा ढाले यांचा विश्वास आहे. ते दलित साहित्याकडे सामाजिक व सांस्कृतिक दृष्टिकोनातून पाहतात. आधी लेखन आणि मग सिद्धान्त येतो. वस्तुस्थितीवरून तिचा सिद्धान्त बांधला जातो, सिद्धान्तावरून वस्तुस्थिती नव्हे असे मत प्रदर्शित करून ढाले म्हणतात, ''दलित शब्दाची व्याख्या केवळ बौद्ध अथवा मागासवर्गीय नव्हे तर जे-जे पिळले गेलेले असे श्रमजीवी आहेत, ते सर्व दलित या व्याख्येत समाविष्ट होतात.'' दलित साहित्य हा प्रश्न ऐरणीवर असणाऱ्या त्या संवेदनशील काळात ढाले सर्वांना समजावून सांगतात, ''आपल्याला सांस्कृतिक बदल घडविण्यासाठी आपल्या मनावर नवे संस्कार घडवावे लागतील. त्यासाठी साहित्य हे एकच जिवंत माध्यम आपणाजवळ आहे. सांस्कृतिक बदलापेक्षा संस्कारातला बदल अधिक मूलगामी असतो. नवा जीवनमार्ग स्वीकारणे हेच कार्य आपल्या लढ्याचे आणि पर्यायाने आपल्या साहित्याचेही आहे....नव्या संस्कृतीत स्वत:ला आणि समाजाला झोकून देण्यासाठी आपले साहित्य सतत प्रवाहित राहिले पाहिजे.'' 'नाकेबंदी' विषयी ढाले यांचा अभिप्राय बोलका आहे, ''कित्येकांना नेमके काय नाकारायचे हेच कळलेले नाही, ते नेमके या कवीला (ज. वि. पवार) कळले आहे. किंबहुना तीच या कवितेची बलस्थाने आहेत.''

महाराष्ट्र बौद्ध साहित्य परिषदेने आपल्या मुंबई येथे भरलेल्या १४ व्या साहित्य संमेलनाचे अध्यक्षपद ढाले यांना दिले होते. अध्यक्षीय भाषणात दलित साहित्याचा प्रवाह बौद्ध साहित्याकडेच राहिला पाहिजे, हे त्यांनी स्पष्ट केले. 'आमचा लढा समतेसाठी आहे. समता जिथे-जिथे असेल, तिथे-तिथे आम्ही असू. आम्हांला बौद्ध म्हणवून घ्यायची हाव नाही. समता मिळवण्याची आणि ती टिकवण्याची हाव आहे... समता मिळवणे म्हणजेच बौद्ध होणे. समतेशिवाय बौद्धधर्म आणखी काय वेगळा आहे?... आमच्या चळवळीचे मूळ समतेत आहे. अस्पृश्यतेत नाही, आणि म्हणूनच समतात्मक समाजरचना निर्माण करण्याचे काम आमचे आहे. तसेच आमच्या साहित्याचे आहे. म्हणूनच ते काम अंगीकारणारे आमचे साहित्य महान, अक्षय आणि उदात्त आहे...बौद्ध साहित्याचे अविकसित रूप दलित साहित्य आहे.''

– संपादक मंडळ

**संदर्भ :**

*१. पवार. ज. वि; 'नाकेबंदी'; विजय प्रकाशन, नागपूर; २००३.*

## ढेरे, अरुणा रामचंद्र

**कवयित्री, कथालेखिका, समीक्षक**

**२ फेब्रुवारी, १९५७**



मराठी साहित्यविश्वात स्वत:चे स्वतंत्र स्थान असलेल्या डॉ. अरुणा रामचंद्र ढेरे या सुप्रसिद्ध संशोधक आणि लोकसाहित्याचे गाढे अभ्यासक डॉ. रामचंद्र चिंतामणी ढेरे व इंदुबाला रामचंद्र ढेरे यांच्या ज्येष्ठ कन्या होत.

डॉ. अरुणा ढेरे यांचे शालेय व महाविद्यालयीन शिक्षण पुण्यात नूतन मराठी विद्यालय, हुजूरपागा, गरवारे व सर परशुरामभाऊ महाविद्यालय येथे झाले. १९७७ साली त्या बी.ए.ला, मराठी विषयात, पुणे विद्यापीठात सर्वप्रथम आल्या आणि त्यांनी सुवर्णपदकासहित अकरा पारितोषिके मिळवली. १९७९ साली एम.ए.लाही मराठी विषयात, पुणे विद्यापीठात सर्वप्रथम येण्याचा मान

ढ

त्यांनी मिळवला आणि तेरा पारितोषिके पटकावली. १९७७ साली त्यांनी भारतीय विद्यापदविका प्राप्त केली, तीही टिळक विद्यापीठात सर्वप्रथम येऊन आणि यशवंतराव चव्हाण पारितोषिक मिळवून. १९८६ साली पुणे विद्यापीठात, डॉ. भालचंद्र फडके यांच्या मार्गदर्शनाखाली 'स्वातंत्र्योत्तर मराठी कथा-कादंबऱ्यांचा आदिबंधात्मक अभ्यास' (जी. ए. कुलकर्णी आणि चिं. त्र्यं. खानोलकर यांच्या विशेष संदर्भात) या विषयावर प्रबंधलेखन करून त्यांनी विद्यावाचस्पती (पीएच.डी.) ही पदवी मिळविली.

१९८३ ते १९८८ या काळात, पुणे विद्यापीठाच्या शैक्षणिक माध्यम संशोधन केंद्रात अध्यापक-निर्माती म्हणून त्यांनी काम केले. १९८९ ते १९९१ दरम्यान राज्य शिक्षणशास्त्र संस्थेत साहित्य-विभागप्रमुख आणि 'पसाय' या मासिकाची संपादिका म्हणून काम केले. त्यानंतर मात्र आजतागायत, त्या पूर्णवेळ लेखन आणि संशोधनकार्य करीत आहेत.

१९८३ साली माध्यम संशोधन केंद्रातर्फे त्यांनी जपानचा अभ्यासदौरा केला, तर १९८६ साली अमेरिकेत तीन महिन्यांचा कम्युनिकेशन स्टडीजचा अभ्यासक्रम पूर्ण केला.

डॉ. अरुणा ढेरे यांचे लौकिक आणि वाङ्मयीन व्यक्तिमत्त्व संस्कारित करण्यात, त्यांना शालेय जीवनात मिळालेल्या शिक्षकांचा वाटा आहे आणि आई-वडील, आत्या यांचे तर अपार ऋण आहे. लेखन-संशोधन हेच जीवितकार्य मानणाऱ्या, व्रतस्थ वृत्तीच्या वडिलांनी त्यांना घरातच पुस्तकांचे ज्ञानभांडार लहान वयापासून दाखवले. त्यांच्या मूळच्या कविवृत्तीचे, रसिकतेचे, ज्ञानजिज्ञासेचे भरणपोषण केले. वडिलांबरोबर त्यांनी भारतभर प्रवास केला; त्यातून अनुभवाचे क्षितिज व्यापक होत गेले. सामाजिक, सांस्कृतिक भान आले. त्यांच्या वडिलांना घरी अनेक लोककलावंत भेटायला येत असत. त्यांचे अनुभवकथन, चर्चा ऐकून लोकसंस्कृतीचा उत्तम परिचय होत गेला. भारतीय संस्कृतीच्या मुळाशी जाण्याची ओढ निर्माण झाली. समाजशास्त्र, मानसशास्त्र इत्यादी साहित्याशी निगडित शास्त्रांचा आवश्यक तो अभ्यास त्यांनी केला, तसेच वेद, उपनिषदे, रामायण, महाभारत, जैन, बौद्ध, ख्रिस्ती धर्मग्रंथ यांच्याशीही ओळख करून घेतली. दंतकथा, मिथके यांचेही महत्त्व जाणले.

आपली स्वतंत्र प्रज्ञा आणि प्रतिभा यांच्या बळावर त्यांनी काव्य, कथा, कादंबरी इत्यादी सर्व लेखनातून परंपरेतील सत्त्व आणि नवतेतील सामर्थ्य प्रकट केलेले दिसते. त्यांचा मूळ पिंड कवयित्रीचा असला, तरी कवितेबरोबरच कथा, कादंबरी, ललित लेख, अनुवाद, समीक्षा, लोकसाहित्यविषयक, सामाजिक इतिहासपर, किशोरांसाठी व कुमारांसाठी लेखन असे सर्व वाङ्मय प्रकार त्यांनी हाताळले आहेत. संपादनेही केलेली आहेत.

'प्रारंभ'(१९८६), 'यक्षरात्र' (१९८७), 'मंत्राक्षर' (१९९०), 'निरंजन' (१९९४), 'पानावरचे थेंब' (१९९५), 'जावे जन्माकडे' (१९९८), 'निळ्या पारदर्शक अंधारात' (२००४) हे त्यांचे काव्यसंग्रह होत. 'स्त्री आणि तिचे भावजीवन' हा त्यांच्या सर्वच लेखनाचा केंद्रबिंदू असला तरीही, कविता या माध्यमातून तो प्रकर्षाने जाणवतो. स्त्रीच्या जीवनातील विविध अवस्था, तिची मानसिक आंदोलने, तिने जोडलेले भिन्नस्तरीय नातेसंबंध या सर्वांचे चित्रण अरुणा ढेरे मोठ्या ताकदीने करतात. पौराणिक व्यक्तिरेखांचा, कथांचा त्यांच्या मनावरील प्रभाव मोठा असल्याने, बहुतेक कथाबीजे ही त्यातूनच उचलली आहेत. 'भगव्या वाटा' (१९९१), 'कृष्णकिनारा' (१९९२), 'नागमंडल' (१९८७), 'अज्ञात झऱ्यावर रात्री' (१९९५) अशा कथांमधून मानवी जीवनातील विविध नातेसंबंध आणि मानवी वर्तन यांमागची मानसिकता उलगडून दाखविताना त्यांची चिंतनशीलता दिसून येते.

'रूपोत्सव' (१९८७), 'मनातलं आभाळ' (१९९४), 'लावण्ययात्रा' (१९८७), 'काळोख आणि पाणी' (१९९१) यांसारख्या ललित लेखसंग्रहांतून सृष्टीच्या निर्मितीची, जीवनसृष्टीच्या आविष्काराची संवेदनात्मकता जाणवते. माणसाला मातीची असणारी ओढ त्यांनी 'वेगळी माती वेगळा

ढ

वास' (२००२), 'माणूस आणि माती' (२००४) यांतून टिपली आहे.

अरुणा ढेरेंच्या संशोधनाचा विषय आदिबंधात्मक समीक्षा असल्याने त्यांनी चिं. त्र्यं. खानोलकर यांच्यासारख्या समर्थ साहित्यकारांच्या कलाकृतींची समीक्षा केली. 'काळोख आणि पाणी' (१९९१), 'काळोखाचे कवडसे' (१९८७) हे समीक्षादृष्टीचे सविस्तर विवेचन करणारे लेखन होय. याशिवाय, त्यांच्या संशोधनात्मक वृत्तीची साक्ष पटवणारे 'विस्मृती चित्रे' (१९९८) हे पुस्तक होय.

मृदू मनाच्या, उत्कट भाववृत्तीच्या या कवयित्रीने महाविद्यालयीन शिक्षण घेत असतानाच, १९७६ साली, अणीबाणीच्या काळात, लेखन आणि सत्याग्रह यांमुळे पावणेतीन महिन्यांच्या तुरुंगवासही सोसला.

ढ

महाराष्ट्र शासनाचे, तसेच विविध मान्यवर संस्थांचे अनेक पुरस्कार डॉ. अरुणा ढेरे यांना मिळालेले आहेत. त्यांमध्ये 'लावण्ययात्रा'ला (१९८८-८९) मिळालेला महाराष्ट्र शासनाचा पुरस्कार, 'मंत्राक्षर'ला मिळालेला 'बालकवी' पुरस्कार (१९९०-९१) तसेच महाराष्ट्र साहित्य परिषदेतर्फे मिळालेले कवी 'यशवंत' (१९८७) व 'ह. श्री. शेणोलीकर' (१९८८) पारितोषिक, पुणे मराठी एकूण वाङ्मयीन कार्याकरिता मिळालेले पारितोषिक (२००२), 'सुंदर हे जग'ला मिळालेला (१९९९) राष्ट्रीय पुरस्कार, हे उल्लेखनीय पुरस्कार होत.

– डॉ. मेधा सिधये

**संदर्भ :**


१. *'तनिष्का', ऑक्टोबर २००८*

२. *'स्रग्धरा', दिवाळी २००२.*

३. *'ललित', जुलै १९९९.*


## ढेरे, रामचंद्र चिंतामण

**संशोधक, समीक्षक**

**२१ जुलै १९३०**

रामचंद्र चिंतामण ढेरे यांचा जन्म पुणे जिल्ह्यातील मावळ तालुक्यातील निगडे या छोट्याशा खेडेगावात



आजोळी झाला. चिंतामण गंगाधर ढेरे हे त्यांचे वडील व शारदा या त्यांच्या आई होय. ढेरे यांच्या वयाच्या पाचव्या वर्षी (१९३५) त्यांच्या वडिलांचे निधन उर्से धामणे या मावळातील गावी झाले. आई व पाठची बहीण प्रमिला यांच्यासह त्यांना लगेच आजोळी जावे लागले. वडिलांच्या तेराव्या दिवशी आईने प्रायोपवेशन करून प्राणत्याग केला. थोरले व धाकटे मामा व वृद्ध आजी यांनी या दोन्ही भावंडांचे पालकत्व स्वीकारले. वयाच्या १४ व्या वर्षी आजी, मामा व धाकटी बहीण यांच्यासह ढेरे पुणे मुक्कामी आले व म्यनिसिपल शाळेतून व्हर्नाक्युलर फायनल या परीक्षेत सर्वप्रथम आले. पुढे उपजीविकेसाठी जमतील तशी अर्धवेळ विविध कामे (शिक्षक, मुद्रित शोधक, ग्रंथपाल इत्यादी) करीत रात्रशाळेत शिक्षण घेत शालान्त परीक्षा देत असतानाच राष्ट्रभाषा 'प्रवीण', 'साहित्य विशारद' अशाही परीक्षा दिल्या. पुढे बहि:स्थ पद्धतीने पुणे विद्यापीठात बी.ए. झाले. एम.ए.ची परीक्षा तांत्रिक अडचणींमुळे देता आली नाही. पण एकीकडे स्वतंत्र संशोधनपर ग्रंथ प्रकाशित झाले होते. १९७५ मध्ये 'षट्स्थल: एक अध्ययन' या संशोधनपर प्रबंधासाठी पुणे विद्यापीठाची पीएच.डी. (विद्यावाचस्पती) ही पदवी प्राप्त झाली. १९८० मध्ये 'लज्जागौरी', 'चक्रपाणि', 'महाराष्ट्राचा देव्हारा' आणि 'संतसाहित्य आणि लोकसाहित्य: काही अनुबंध' या ग्रंथांसाठी पुणे विद्यापीठाची डी.लिट. ही सर्वोच्च पदवी प्राप्त झाली. २००४ मध्ये डेक्कन महाविद्यालय पदव्युत्तर आणि संशोधन संस्थेच्या अभिमत विद्यापीठ पुणे यांनी सन्माननीय डी.लिट. (डॉक्टर ऑफ लेटर्स) ही पदवी दिली. औपचारिक पदवीप्राप्तीसाठी प्रयत्न न करता ह्या सर्व सन्मानांनी ढेरे यांच्या ज्ञाननिष्ठेचा आणि संशोधन कार्याचा गौरव केला आहे.

'श्रीविठ्ठल: एक महासमन्वय', 'लज्जागौरी', 'दक्षिणेचा लोकदेव श्रीखंडोबा', 'नाथ संप्रदायाचा इतिहास' या ग्रंथांची कन्नड भाषेत भाषांतरे झाली असून 'दत्त संप्रदायाचा इतिहास', 'विसोबा खेचर विरचित षट्स्थल', 'शिखर शिंगणापूरचा श्रीशंभूमहादेव' अनुवादित होत आहेत. 'श्रीविठ्ठल' व 'लज्जागौरी' या ग्रंथांचे इंग्रजी अनुवाद प्रकाशनाच्या वाटेवर आहेत.

**काव्यात्म शैली**

ढेरे यांच्या संशोधनाची जातकुळी प्रतिभा-प्रज्ञावंताची आहे. कविता, कथा, कादंबरी लेखकांबाबतच प्रतिभेचा विचार बहुधा केला जातो. परंतु कुठल्याही क्षेत्रातील संशोधक मुळात प्रतिभासंपन्न असावा लागतो. त्याला प्रज्ञेची जोड मिळाल्यानंतरच खऱ्या अर्थाने नवनिर्मिती होते. ढेरे यांचे सर्व संशोधन समाज आणि संस्कृती यांच्या अनुबंधातून झाले आहे. ते एखाद्या प्रतिभासंपन्न कवीच्या निर्मितीप्रमाणे आहे. कारण ढेरे यांचा मूळ पिंड हा कवीचाच आहे. ऐन उमेदीच्या काळात ढेरे यांच्या साहित्य निर्मितीचा प्रारंभ त्यांच्या गावच्या भजनी मंडळे आणि विशेषतः शहरी परंपरेतले मित्र यांच्यासाठी रचना करीत झाला. पुढील काळातील त्यांचे लेखन पाहिले तर कधी काळी तमासगीर मित्रांसाठी त्यांनी पोवाडे, लावण्या ह्यांची रचना केली असेल, यावर विश्वास बसू नये. पण १९५३ ते १९६० या काळात पुण्याच्या व मुंबईच्या आकाशवाणीसाठी त्यांनी पाच संगीतिका लिहिल्या होत्या. 'कांचनमृग', 'प्रेमयोगिनी मीरा', 'यक्षप्रिया' या शीर्षकांवरून त्यांच्या स्वरूपाची कल्पना येते. याखेरीज अप्रकाशित काही स्फुट कविताही आहेत. वाच्यार्थाने पुढे कविता मागे पडली असली, तरी त्यांच्या ग्रंथांची काव्यात्म पण अन्वर्थक शीर्षके आणि अत्यंत संवेदनशील विषयांवरील लेखनाची काव्यात्म शैली यांतून त्यांच्या कविप्रकृतीची कल्पना येते. कविप्रकृतीला वस्तुनिष्ठ पुरावे, तर्क आणि अभ्यासपूर्ण मांडणी यांची साथ असल्याने रसिकसमुद्रा आणि तर्कमुद्रा यांचा मनोज्ञ संगम त्यांच्या सर्व ग्रंथांतून प्रत्ययास येतो. त्यासाठी अंतरज्ञानशाखीय अभ्यासाचा भक्कम पाया आहे.

कविता, स्फुट लेख, चरित्रे, संत साहित्यासंबंधीचे संशोधन, सहसा अलक्षित अशा मुसलमान मराठी संत कवींवरचे संशोधन किंवा वारकरी संत साहित्याप्रमाणे नाथ संप्रदाय, देवी (स्त्री देवता) संप्रदाय, महानुभाव संप्रदाय, आधुनिक कवींची संपादने आणि नाट्योदय मीमांसा अशा अनेक विषयांचा धांडोळा ढेरे यांनी घेतला आहे. त्याचा केवळ अल्पसा परिचयच येथे शक्य आहे.

**महाराष्ट्रीय संस्कृतीचा शोध**

ढेरे हे प्रामुख्याने प्राचीन व मध्ययुगीन मराठी साहित्याचे संशोधक, संत साहित्याचे अभ्यासक, लोकसंस्कृती व लोकसाहित्याचा एकूण जीवनानुबंध शोधणारे संशोधक आहेत. भारतीय संदर्भात महाराष्ट्रातील संस्कृतीचा शोध घेणारे साक्षेपी संशोधक आहेत. हा त्यांचा संशोधक म्हणून परिचय फार पृष्ठस्तरीय ठरावा एवढा सूक्ष्म, सखोल, संख्यात्मकदृष्ट्याही विपुल आणि ऐतिहासिक व भौगोलिकदृष्ट्या विस्तृत स्तरावरच्या त्यांच्या संशोधनाचा व्याप थक्क करणारा आहे.

भौतिकदृष्ट्या अत्यंत प्रतिकूल परिस्थितीत विद्यार्थीदशेतच लेखन-संशोधनाला प्रारंभ करून त्याच प्रतिकूलतेशी झगडत गेल्या साठ-पासष्ट वर्षांत त्यांची एकूण ग्रंथसंख्या शंभरी ओलांडून गेली आहे. सन्माननीय डी.लिट.पासून साहित्य अकादमी पुरस्कारांसह लहानमोठे सुमारे पन्नासहून अधिक पुरस्कार प्राप्त झाले आहेत. अनेक ग्रंथांची विविध भाषांत भाषांतरे झाली आहेत. तीन गौरवग्रंथांतून त्यांच्या संशोधन कर्तृत्वाचा आढावा घेतला गेला आहे. एखाद्या संशोधन संस्थेला साजेसे शोधकार्य ढेरे यांनी निर्माण केले आहे. त्यासाठी स्वतःचा प्रचंड, विविधांगी व सर्वार्थाने अमूल्य ग्रंथसंग्रहही प्रतिकूलतेवर मात करीत सिद्ध केला आहे.

प्राचीन व मध्ययुगीन मराठी साहित्याचा समाज-सांस्कृतिक अभ्यास हा त्यांच्या सर्वच संशोधनाचा पाया

आहे. भारतीय संदर्भात महाराष्ट्रातील संस्कृतीचा शोध घेण्याचा हा प्रयत्न आहे. भारतीय संस्कृतीच्या मुळांचा शोध म्हटले की, सामान्यपणे वेदांपासून प्रारंभ होतो आणि संस्कृत साहित्याचे आधारच प्रमाण मानले जातात. परंतु ढेरे संस्कृतीच्या गाभ्यातील लोकसांस्कृतिक साधनांचा शोध साक्षेपाने घेतात. एम. एन. श्रीनिवासन याबाबतीत त्यांचे पथप्रदर्शक ठरतात. श्रीनिवासन यांच्याप्रमाणेच त्यांच्या मते अभिजन व लोक या संस्कृतींचे परस्पराभिसरण होत असते. त्यातही प्रामुख्याने लोकसंस्कृतीमधील अनेक घटकांचे 'संस्कृतिकरण' होण्याची प्रक्रिया अधिक प्रबळपणे दिसते. कोणत्याही समाजातील देव-देवता, यांच्या मुळाशी असलेल्या श्रद्धा, उपासना, चालीरीती-रूढी, अगदी भाषासुद्धा यांचे 'नागरी'करण होण्याची प्रक्रिया सतत घडत असते.

डॉ. ढेरे यांच्या अगदी प्रारंभिक 'दत्त संप्रदायाचा इतिहास' (१९५८) पासून पुढे 'खंडोबा' (१९६१), 'चक्रपाणि' (१९७७), 'महाराष्ट्राचा देव्हारा' (१९७८), पुणे विद्यापीठातील कै. न. चिं. केळकर व्याख्यान मालेतील व्याख्याने, 'लज्जागौरी' (१९७८) (मातृदेवतांच्या उपासनेवर गंभीर प्रकाश टाकणारा प्रबंध), 'श्री विठ्ठल: एक महासमन्वय' (१९८४) (दक्षिणेतील गोपजनांच्या एका लोकप्रिय देवाच्या वैष्णवीकरणाची आणि उन्नयनाची शोधकथा), 'महामाया' (१९८८) (दक्षिणेतील मध्यकालीन काव्यनाटकांतून कैकाडी स्त्रीच्या रूपात प्रकटलेल्या महामायेचे रहस्य उलगडण्याच्या निमित्ताने समाज, धर्म आणि कला यांच्या परस्परसंबंधांचा शोध डॉ. तारा भवाळकर यांच्या सहयोगाने), 'शिखर शिंगणापूरचा शंभू महादेव' (२००१) या डॉ. ढेरे यांच्या अतिमहत्त्वाच्या व अन्य सर्वच ग्रंथांत ढेरे यांच्या संशोधनदृष्टीचा प्रत्यय येतो.

**ग्रंथसंपदा**

या अतिमहत्त्वाच्या स्वतंत्र संशोधन ग्रंथांखेरीज त्यांनी केलेली संपादने महत्त्वाची आहेत. त्यातील काही हस्तलिखितांचा प्रयत्नपूर्वक शोध घेऊन ती मुद्रित स्वरूपात आणली आहेत. या ग्रंथांच्या विस्तृत प्रस्तावना आणि टिपा यांमधून ढेरे यांची स्वयंप्रज्ञ प्रातिभ दृष्टी व्यक्त होते. पूर्वप्रकाशित व पुनःसंपादित ग्रंथांवर नवा प्रकाश टाकला आहे. अशा संपादनांपैकी 'आज्ञापत्र' (रामचंद्रपंत अमात्यप्रणीत स्वराज्यनीती १९६०), 'श्रीशिवशान्त स्तोत्र तिलकम्' (१९६०), (प्र. शं. जोशी सहयोगाने), 'निरंजन माधव-विरचित सुभद्रा स्वयंवर' (१९६७), 'संतांच्या आत्मकथा' (१९६७, १९६९-दुसरी आवृत्ती), 'संतांच्या चरित्रकथा' (१९६७), 'मानपुरी पदावली' (१९६७), 'श्री आदिनाथ भैरव-विरचित नाथलीलामृत' (१९७२), 'श्री चक्रधर-निरूपित श्रीकृष्ण चरित्र' (१९७३), 'महिकावतीची बखर' (१९७३), 'मुरारिमल्ल - विरचित बाळक्रीडा' (१९७७), 'बोरकरांची प्रेमकविता' (१९८७), 'विसोबा खेचर - विरचित षट्स्थल' (१९८९) या काही ग्रंथांच्या निवडक शीर्षकांवरही ऐतिहासिक, पौराणिक, सामाजिक, आधुनिक कविता, आदी अनेकविध विषय डॉ. ढेरे यांच्या शोधविषयांचा व्याप दाखवतात. याखेरीज 'सरदार वल्लभभाई पटेल' (१९५०) या त्यांच्या पहिल्या पुस्तकापासून संतचरित्रे, 'विवेकानंद, शारदामाता आणि रामकृष्ण परमहंसां'पासून ते 'मुसलमान मराठी संत कवी' (१९६७) अनेक लहानमोठे चरित्रग्रंथ हे ढेरे यांच्या ग्रंथनिर्मितीचे एक स्वतंत्र दालन आहे तर 'अमृतकन्या' (१९५९), 'विविधा' (१९६७), 'लोकसंस्कृतीची क्षितिजे' (१९७१), 'विराग आणि अनुराग' (१९७५), 'लौकिक आणि अलौकिक' (१९७६),'कल्पवेळ' (१९७६), 'लोकसंस्कृतीचे उपासक' (१९६४) असे कितीतरी स्फुट लेखसंग्रह आहेत. खेरीज 'लोकदेवतांचे विश्व' (१९९६) आणि अगदीच वेगळ्या स्वरूपाचा 'भारतीय रंगभूमीच्या शोधात' (१९९६) असे ग्रंथही आहेत. याखेरीज 'इंद्रायणी' नावाच्या नियतकालिकाचे द. र. कोपर्डेकर (पुणे) यांच्यासह चौदा अंकांचे

(१९६२-१९६३) संपादन त्यांनी केले होते. याखेरीज अद्यापही ग्रंथरूपात न आलेले असंख्य स्फुट लेख काही मुलाखती आहेत.

'लज्जागौरीचा' पुढचा टप्पा म्हणून 'आनंदनायकी' (२००२), 'तुळजाभवानी' यांनंतर 'कोल्हापूरच्या महालक्ष्मी'च्या शोधकार्यात ढेरे सध्या मग्न आहेत. या सर्व स्त्री-देवतांच्या निमित्ताने भारतातील-महाराष्ट्रातील मातृदेवतांवर नवीन प्रकाश पडेलच; पण येथील स्त्री-जीवनाच्या स्थितिगतीचा एक विशाल पट लोकसांस्कृतिक प्रकाशात स्पष्ट होईल.

– डॉ. तारा भवाळकर

**संदर्भ :**


१. *डॉ. कुलकर्णी गो. म., शेटे वि. त्र्यं; 'महाराष्ट्राची सत्त्वधारा'; दास्ताने रामचंद्र आणि कंपनी, पुणे; पहिली आवृत्ती (१९८१).*

२. *डॉ. ढेरे अरुणा, गजेंद्रगडकर वर्षा; 'लोकसंस्कृतीचे प्रतिभादर्शन'; पद्मगंधा प्रकाशन, पहिली आवृत्ती (२०००).*

३. *डॉ. भवाळकर तारा, 'संस्कृतीची शोधयात्रा- डॉ. रा. चिं. ढेरे : व्यक्ती आणि संशोधन'; पद्मगंधा प्रकाशन, पहिली आवृत्ती २००५.*


* * *

ढ

# त





## तर्खडकर, दादोबा पांडुरंग

☞ मुख्य चरित्रनोंद – शिक्षण खंड

## तल्हार, मनोहर मारोतीराव

**कादंबरीकार, कथाकार**

**१४ ऑक्टोबर १९३२**

मनोहर मारोती तल्हार यांचा जन्म अमरावती येथे झाला. त्यांचे प्राथमिक शिक्षण महानगरपालिकेच्या शाळेत व माध्यमिक शिक्षण आय.इ.एम. शाळा व समर्थ हायस्कूलमध्ये झाले. १९५० मध्ये शालान्त परीक्षा उत्तीर्ण झाल्यावर अमरावतीच्या शिवाजी महाविद्यालयात त्यांनी प्रवेश घेतला, पण ते शिक्षण पूर्ण करू शकले नाहीत.

१९४९ पासून चित्रपटासंबंधी लेखनाला त्यांनी सुरुवात केली. नंतर १९५५ पासून त्यांनी कथा, कादंबरी लेखनाला सुरुवात केली. 'बुढीचं खाटलं' (१९५८), 'तोलरेघ' हा दहा निवडक कथांचा संग्रह (१९६५), 'गोरीमोरी' (१९६६), 'निःसंग' (१९७८), 'कॅन्सल' हा पंधरा कथांचा संग्रह (१९९३), व 'दुजा शोक वाहे' (२०००) असे त्यांचे कथासंग्रह प्रसिद्ध झाले आहेत.

१९९५ मध्ये त्यांचा 'श्वेतांबरी' हा कवितासंग्रह प्रसिद्ध झाला. 'अप्रिया' (१९६६), 'अफलातून' (१९८६), 'शुक्रथेंब' (१९९४), 'अशरीरी' (१९९४) 'अशरीर' (१९९४) आणि 'माणूस' (१९६२) या त्यांच्या कादंबऱ्या प्रकाशित झाल्या. यांपैकी 'माणूस' ही त्यांची अतिशय गाजलेली कादंबरी होय.

१९५८ ते १९६७ या काळात वऱ्हाडमधील जनवादी कादंबरी– विशेषतः उद्धव शेळके, मनोहर तल्हार, वामन इंगळे यांच्या पहिल्या कादंबऱ्या प्रकाशित झाल्या. या कादंबरीमधून समाजातील श्रमजीवी, साधनवंचित, शोषित वर्गाचे चित्रण करण्यात आले आहे. हे आधुनिक वैदर्भी जनवादी कादंबरीचे वैशिष्ट्य होय.

तल्हार हे अशाच एका श्रमजीवी (शिंपी) जातीत जन्म घेतलेले लेखक आहेत. पदवीपर्यंतचे शिक्षण घेऊन, ते सरकारी नोकरी शिरले, ते शहरात स्थायिक झाले असले, तरी त्यांचे जन्मजातीशी असलेले नाते ते विसरू शकले नाहीत. तल्हारांनी नेहमी स्वतःच्या अनुभवांशी प्रामाणिक राहून लेखन केले. त्यामुळे काळ अधिक लागला तरी चालेल, परंतु लोकप्रियतेशी तडजोड करून त्यांनी कधीही लेखन केले नाही. दीर्घकालावधीतले त्यांचे मोजके पण वैशिष्ट्यपूर्ण लेखन प्रसिद्ध झाले.

श्रमजीवी वर्गाबद्दलचा त्यांचा अनुभव अस्सल होता आणि त्याचेच प्रामाणिक चित्रण ते 'माणूस' कादंबरीत करतात. या कादंबरीतील प्रमुख पात्र शंकर हा रिक्षावाला आहे. त्याच्या जीवनातील बदलामुळे ना तो गावचा आणि ना शहराचा अशा असुरक्षित भावनेचे सावट घेऊन जगतो आहे. 'माणूस'मधील नागर श्रमजीवी समाजाचे चित्रण आपल्याला हादरवून टाकते, अस्वस्थ करून सोडते.

तल्हार यांचे सारे लेखन हे स्वतःच्या अनुभूतीशी प्रामाणिक राहूनच केले आहे, हे विशेष .

– प्रा. मंगला गोखले

**संदर्भ :**

*१. तल्हार मनोहर; 'माणूस' दुसरी आवृत्ती, १९८१.*

## तळवलकर, गोविंद श्रीपाद

☞ मुख्य नोंद – पत्रकारिता आणि ललितेतर साहित्य खंड

## तांबे, भास्कर रामचंद्र

**कवी**

**२७ नोव्हेंबर १८७३ - ७ जानेवारी १९४१**



भास्कर रामचंद्र तांबे यांचा जन्म झाशीजवळच्या मुंगावली (ग्वाल्हेर) गावात झाला. त्यांचे वडील रामचंद्र गंगाधर तांबे आणि आई यमुनाबाई, ज्या देवासच्या डोंगरे यांच्या कन्या होय. तांबे यांचे शिक्षण माळव्यात झाले. देवासच्या हायस्कूलमधून १८९३ साली ते अलाहाबादच्या मॅट्रिक परीक्षेस बसले व पहिल्या वर्गात उत्तीर्ण झाले. नंतर देवासचे राजपुत्र खासेसाहेब पवार यांचे शिक्षक म्हणून त्यांची नेमणूक झाली. 'चिवचिव चिमणी छतात' हे तांब्यांचे बालगीत खासेराव आणि त्यांच्या भावंडांसाठीच निर्माण झाले होते आणि त्यांच्यासाठीच रॉबर्ट ब्राउनिंगच्या 'पाइड पायपर ऑफ हेमेलिन'चा 'पुंगीवाला' हा अनुवाद त्यांनी केला. आपल्या सुरुवातीच्या लेखनात प्रतिभेचा अभाव जाणवल्यामुळे त्यांनी आपल्या काही कविता जाळून टाकल्या. १८९७ साली रतलाम येथील त्र्यंबकराव जावडेकर यांच्या वारूबाई नावाच्या कन्येबरोबर त्यांचा विवाह झाला.

इंदोरला वास्तव्य असताना तांबे यांनी होळकर महाविद्यालय, डेली महाविद्यालय येथील ग्रंथालयांत अभ्यास केला. संस्कृत काव्याचे आणि नाटकांचे त्यांनी अध्ययन केले, आणि इंग्रजी कविताही भरपूर वाचल्या. टेनिसनच्या काव्यातील संगीत आणि ब्राउनिंगच्या नाट्यगीतातील पात्रविविधता व मनोलेखनाचे खूप आकर्षण त्यांना वाटले होते. त्याचा प्रभाव तांब्यांच्या काव्यसृष्टीवर पडलेला दिसतो. कवी तांब्यांनी 'भयंकर प्रमाद' नावाचे अपूर्ण नाटक लिहिल्याचा तसेच 'वियोगिनी' नावाचे ऐतिहासिक काव्य आणि 'सरोवर आणि कमळे' ह्या प्रेमगीतसंग्रहाचा उल्लेख आढळतो, पण ते लेखन अनुपलब्ध आहे.

### चिकित्सक कवी

तांब्याच्या कवितेचा संग्रह काढण्याची कल्पना सर्वांत आधी प्रा. वासुदेव गोविंद मायदेव यांच्या मनात आली आणि ती साकार झाली. त्यानंतरचा तांब्यांच्या कवितेचा दुसरा भाग दि. गं. केळकर म्हणजेच 'अज्ञातवासी' यांनी काढला. कवी तांबे यांच्या एकसष्टीनिमित्त अनेक विशेषांक निघाले त्याच वेळी कवी माधव जूलियन म्हणजेच माधवराव पटवर्धन यांनी 'तांबे यांची समग्र कविता' या शीर्षकाने तांब्यांची एकंदर पूर्ण कविता संपादित केली आणि नंतर काही वर्षांनी प्रा. रा. श्री. जोग यांच्या दीर्घ प्रस्तावनेसह तांब्यांची समग्र कविता रसिकांपुढे आली. ग्वाल्हेरच्या 'तांबे वाढदिवस मंडळाने' 'तांबे: व्यक्ती आणि कला' हा ग्रंथ १९३४ साली प्रकाशित केला. ग्वाल्हेरचे अधिपती जिवाजीराव शिंदे ह्यांनी कवी तांब्यांना 'राजकवी' ही पदवी बहाल केली आणि तांब्यांचे शिष्य, देवासच्या छोट्या पातीचे राजे खासेसाहेब पवार ह्यांनी तांब्यांची नेमणूक करून घेतली. तांब्यांची खासियत म्हणजे आपल्या काव्याचे सादरीकरण करता-करता अनेक कवींच्या काव्याची चिकित्सा करीत-करीत काव्यानंद द्विगुणित करीत असत, असे सांगितले जाते. प्राच्य आणि पाश्चात्त्य काव्याचे वाचन, अध्ययन केलेल्या तांब्यांना आपल्या भाषेचा अभिमान होता आणि संस्कृत कवितेचा दर्जा इंग्रजीपेक्षा कमी नाही, असेच ते म्हणत.

तांबे यांच्या विचारात आनंद हाच कलेचा उद्देश आहे. चित्र, संगीत, काव्य ह्या कला एकमेकींच्या हातांत हात घालून चालतात अशी त्यांची धारणा होती. सश्रद्ध तांब्यांना कलासाधना हा परमेश्वरी प्रसाद वाटे. त्यांची दृष्टी, श्रद्धा, मांगल्य, आनंद यांना महत्त्व देणारी होती आणि प्रेम ही तिची पायाभूमी होती. हे जग जणू अपूर्व सुंदर नाटक आहे, असे त्यांना वाटे. त्यामुळे त्यांनी कवितेतून सजीव भावभावनांची, अस्सल जगतानाची चित्रे रेखाटली. त्यांची कविता नाट्यगीते, प्रेमगीते, गूढगीते, निसर्गगीते आळवते. त्यांच्या प्रेमगीतांमध्ये वास्तव आणि कल्पना यांचा संगम आहे. तांब्यांची

तरुणांस संदेश.

(वृत्त—मंदारमाला; राग—भूप; यतींचा क्रम संगीतानुकूल ठेविला आहे.)

होतास येजें, स्वगोत्रांपुढें जें, त्या वर्तमाना करा साजिरें;
हेटाळुनी त्या अदृष्या भविष्यामधें बांधतां कां वृथा मंदिरें?
जी आज आली धरा, माउली ती 'उद्याची' स्वकर्मी झटा रंगुनी;
प्रासाद निर्मा स्वताच्या उद्याचा इथें कर्मभूमीवरी जन्मुनी. १

जो पाडि धोंडा अशक्ता, बली त्यावरी पाय रोवी, चढे तो वरी;
निःसत्व गाई करंटाच गाणीं स्वताच्या स्थितीचीं, बहाणे करी.
हातीं विटा या, चुना तोच, भव्य स्वयें ताज यांचा कुणी तो करी;
कोणा न साधे कुटी ही; भविष्या रचाया हवें सत्व, कारागिरी. २

—×—

सदर कवितेची 'प्रेस कॉपी' वेगळी करावी लागेल. कृपाकरून 'मनोहरच्या' संपादकांनी तेवढे श्रम घ्यावे.

पुष्कळशे तरुण मजकडे हस्ताक्षर लिहून घ्यावें म्हणून येतात तेव्हां 'कांहीं संदेश लिहून द्या' असें म्हणतात. कांहीं हितकर आणि पथ्यकर बोध यांच्या पदरीं पडावा यासाठीं ही कविता लिहिली आहे.

चि. सौभाग्यवती लीलाताई व गणपतराव यांस आशीर्वाद.

कळावें, लोभ असावा, हे विनंति.

आपला
भा. रा. तांबे.

त

कविता वैणिक (lyrical) आहे. म्हणून आत्मनिष्ठ आणि नाट्यात्मक काव्य त्यांनी निर्माण केले. ज्या माळव्यात तांबे राहिले तेथील संगीतमयतेचा प्रभाव त्यांच्यावर होता. माधवराव पटवर्धनांना लिहिलेल्या एका पत्रात त्यांनी काव्य आणि संगीत यांच्या परस्पर प्रभावाची मीमांसा केलेली आहे.

'कित्येक ठिकाणी सोळा मात्रांच्या जागी मी चौदा मात्राच ठेविल्या आहेत. त्या का? तेथे संगीत कलेचा संबंध येतो. ....संगीताचा आणि काव्याचा किती निकट संबंध आहे, आणि संगीतामुळे काव्यातील भावना किती उठावदार होतात, आणि या दोन जुळ्या बहिणी कला एकमेकींस भेटल्या व खेळीमेळीने सहकार्य करू

लागल्या, तर ह्या दुःखमय पृथ्वीवर स्वर्गलोक कसा भरभर उतरून येतो, हे मी तुम्हांला सप्रयोग सिद्ध करून दाखविले असते.' (१३/४/१९३५, सह्याद्री, फेब्रुवारी १९४२)

**कल्पनाचित्रे**

तांब्यांच्या धारणा आणि काव्यक्षमता ह्या मध्य प्रदेश भागातल्या संस्थानी वातावरणाने घडवलेल्या होत्या. म्हणूनच त्यांच्या चाली स्त्रीगीतांच्या, लोकगीतांच्या, हरिदासी पद्धतीच्या आणि तत्कालीन नाट्यगीतांच्या आहेत. त्यांची सौंदर्यदृष्टी इंद्रिय संवेदनांच्या पल्याड जाऊन भावनाट्यनिर्मिती करते. त्यांच्या कवितेतील विवाहोत्तर प्रेमात 'अन्तरः कोऽपि हेतुः'ची छटा नाही असे माधवराव पटवर्धन म्हणाले होते. त्यावर तांबे पत्रात म्हणतात, 'त्या वेळची समाजस्थिती कशी होती? 'अष्टवर्षात् भवेत् कन्या' हा प्रकार होता. प्रेमयाचनेला अवकाशच नव्हता. ....माझ्या रजपूत अद्‌भुतरम्य कवितांचे जनन याच जाणिवेत आहे.' (राजकवी तांबे यांचा साहित्यविषयक पत्रव्यवहार, संपादक ना. बा. पराडकर, ग्वाल्हेर १९४९, पृष्ठ १०७)

तांबे यांचे वैशिष्ट्य असे की, कवितेतून त्यांनी रूपसंवेदक कल्पनाचित्रे आणि शब्दसंवेदक कल्पनाचित्रे रेखाटून दृष्टिश्रवणस्पर्शरसगंधयुक्त संवेदना चितारल्या. सौंदर्यवादी विशेषांमध्ये त्यांच्या कवितेचे प्राणतत्त्व आहे, पण कवितेचा आत्मा अस्सल भारतीय आहे. त्या सुंदरतेच्या प्राणतत्त्वात आधुनिक धीटपणाचा प्रत्यय मिसळला जातो. तांब्यांबाबत असे म्हणता येईल की, ते काव्यातील व्यक्तींच्या भावभावना, संवेदना, रक्तवाहिन्या आणि मेंदूही धारण करतात आणि आपले स्वत्व राखून एका नव्या अस्तित्वाला जन्म देतात. म्हणूनच त्यांच्या नाट्यगीतांनी मराठी कवितेत एक नवे दालन उघडले आहे ज्यामध्ये निवेदन, आत्मनिवेदन, संवाद, विरोधी लयतत्त्वे असे सारे काही असते. याबाबत प्रा. श्री. के. क्षीरसागर म्हणाले होते- 'निर्भेळ समतेपेक्षा परिमित विषमतेत...गोडी आहे, हे रोमँटिक संप्रदायाने ओळखलेले रहस्य... जुन्या मराठी कवींत ज्ञानेश्वरांनी व आधुनिकांता तांब्यांनी हेरले आहे, तेवढे दुसऱ्या कोणीही हेरलेले नाही.' ('टीकाविवेक') तांब्यांच्या कवितेत भाऊ-बहीण, पति-पत्नी, प्रियकर-प्रेयसी, मुशाफीर-राजकन्या, राजकन्या-दासी, पहारेकरी-राजकन्या, माळीण-गिऱ्हाईक, वंचिता, विधवा-मुले असे बहुविध परस्परसंबंध आहेत. कधी निवेदन-संवाद असे मिश्रणही आढळते; तर काही फक्त मनोगते आहेत. तांब्यांना आत्मौपम्य वृत्तीने अशी विविधता टिपता आलेली आहे.

**अनंताची ओढ**

तांब्यांच्या कवितेतील गूढगीतांमध्ये जी अनंताची ओढ आहे ती मूळचीच आहे. म्हणून ते म्हणाले होते 'I have always been a mystic'. प्रेम आणि विश्वास यांतून ते प्रेमश्रद्धेचा संदेशच देत होते, दृश्य जगाच्या खोलीचा वेध घेऊ पाहत होते, म्हणूनच ते खऱ्या अर्थाने प्रेमप्रतीतिधर्मी (love mystic) कवी ठरतात. तांब्यांची ही प्रेमश्रद्ध वृत्ती त्यांच्या गूढगीतांमध्ये प्रकटलेली आहे, जिला संतांच्या विराण्यांचा स्पर्श आहे आणि कबीर, तुलसीदास आणि मीरा यांच्या वृत्तीचा स्पर्श आहे. ह्या अपार्थिवाच्या स्पर्शाने पार्थिव जीवनच बदलले; मनाची समजूत घालू लागले की 'मना वृथा का भीशी मरणा, दार सुखाचे ते हरि-करुणा', मग मृत्यूला सामोरे जाण्याची वृत्ती आलेली आहे; ज्यात पूर्ण ज्ञानाने आलेली विस्मितता आहे. मग गूढताही मूर्त होते कारण तिच्यात सूचकता आहे. जगाच्या चक्राची घरघर थांबून आणि आत्मज्ञानानंतरची अवस्था असे दोन प्रवाह त्यांच्या गूढगीतांत दिसतात. ही प्रक्रिया विश्लेषणात्मक नाही, ते भावनात्मक संश्लेषण आहे. मग तिथे ईश्वर, माणूस आणि निसर्ग यांची मिसळण होते आणि नवी, वेगळी भूमिका प्रकटते; ज्यात आत्मज्ञानाची अंतःप्रतीती प्रकट होते. आता सौंदर्यशोध हा शिवत्वाचा शोध बनतो आणि अंतिम सौंदर्यात पूर्णतः आत्मविसर्जन करण्याची प्रेरणा बळावते; जी भारतीय परंपरेत ज्ञानेश्वर, रवींद्रनाथ आणि अरविंदबाबू यांच्या अनुभूतिविश्वात होती; तीच तांबे यांच्या कवितेत साधकापासून परिणतप्रज्ञेपर्यंतचा प्रवास

त

करताना दिसते. म्हणूनच तांब्यांच्या कवितेत निसर्ग हा केवळ पृष्ठभूमी म्हणून येत नाही तर तो कवितेत वावरतो. रंग, रूप, गंध होऊन प्रतीत होतो. मग एखादी दूध काढणारी गवळण पाहताना दुधात स्वप्नभूमी बिंबून गोड झालेल्या दुधाची तृप्ती अनुभवास येऊ शकते.

**अद्‌भुत भावरम्य रसायन**

कवी तांबे यांची काव्यशैली प्रश्नात्मकता आणि विरामचिन्हांच्या सजग जाणिवेने अद्‌भुत, भावरम्य रसायन बनून वावरते. त्यात शब्द नादाच्या जाणिवेने उमलतात आणि अर्थ प्रसरणशील बनवीत जातात. तांब्यांच्या कवितेतील 'विधवागीते' ही तत्कालीन वैधव्यदर्शनातून अनेक अनुभवांची चित्रे बनतात. कधी ते एखाद्या विधवेचे स्वप्न असते, ज्यातून जागच येऊ नये असे वाटते; कधी एखादीच्या अंगुलीचा फोड, शाईचा डाग, मनाबरोबर शरीराचे पोळणे दाखविते; तर कधी 'बघुनि तया मज होत कसेसे' असे म्हणत ती मनाचे धुमसलेपण व्यक्त करते. 'हिंदु विधवेचे मन' या कवितेत समाजभीतीने 'बहीण होईन, दासी होईन...' असे म्हणत ती स्वतःची समजूत काढते, तर 'नदीतीरी उभी ती...' मध्ये वैधव्यानंतरच्या सासुरवासामुळे ती जीव द्यायला जाते पण मुलांच्या हाकेने परतते, तर कधी 'ते कांत यापुढे' मधून ती जुलमाला आग लावणारी बंडखोर पुनर्विवाहोत्सुक अशा रूपात दिसते. तांब्यांचे समाजभान इथे पूर्ण जागे दिसते. संस्थानात राहणे, पारतंत्र्य अशा दुहेरी बेड्यांमध्ये राहूनही त्यांनी आपली प्रतिभा स्वतंत्र राखली.

तांबे हे स्वतः संगीताचे अभ्यासक होते. माधवराव पटवर्धनांनी तांब्यांची कविता संपादित करताना राग बदलले, पण रागांमधून संगीताने अर्थ वर्धमान करण्याची तांबेक्षमता नाहीशी करून टाकली; शब्द बदलले आणि तांबेपण नाहीसे केले. विरामचिन्हे काढून टाकून भावस्पर्श कमी केला आणि शीर्षके बदलून अर्थवत्तेला ढळ पोहोचवला. आजही जी रा. श्री. जोग प्रत उपलब्ध आहे, तीत ती शबलित झालेली कविताच नव्या पिढीपर्यंत येत आहे.

थोडक्यात, तांबे यांनी अनेकानेक काव्यप्रकार हाताळले– भावगीते, नाट्यगीते, मुक्तके, सुनीते (ode), स्तोत्रे, शोकगीते (elegy), इत्यादी. बाह्य सौंदर्यापेक्षा अंतरंगाचे सौंदर्य महत्त्वाचे मानले, दुःखाशी झगडून प्राप्त केलेल्या आनंदाला महत्त्वपूर्ण मानले, संगीताला भावनेची आंतरसंगती मानून काव्य केले, बालकवितेने नवा प्रदेश उजळून टाकला आणि टणक-अकाव्यात्मक शब्द योजून अनुभवाचे सौंदर्य महत्त्वाचे असल्याचा प्रत्यय दिला. तांबे यांच्या काव्यक्षेत्रातील पृथगात्मतेचे स्वरूप हे असे आहे. आधुनिकतेच्या संदर्भात तांबे यांची काव्यदृष्टी नव्याने न्याहाळणे, हेच त्यांच्या कवितेला न्याय देणे ठरावे. त्यांचे निधन ग्वाल्हेर येथे झाले.

– डॉ. आशा सावदेकर

## तांबोळी, लक्ष्मीकांत सखाराम

**कवी**

**२१ सप्टेंबर १९३९**



लक्ष्मीकांत सखाराम तांबोळी यांचे मूळ गाव जिंतूर असून संत घराण्यात त्यांचा जन्म झाला. त्यांच्यावर धार्मिक, सांस्कृतिक संस्कार लहानपणापासून झाले. हैद्राबादला एम.ए. पर्यंत त्यांचे शिक्षण झाले.

उर्दू भाषेचा आणि उर्दू साहित्याचा प्रभाव त्यांच्यावर आहे. त्याच्या जडणघडणीमध्ये मराठवाडा भूमीचा फार मोठा वाटा आहे. ते उत्कृष्ट वक्ते आणि प्राध्यापक आहेत. देगलूर महाविद्यालयातून मराठी विभाग प्रमुख म्हणून निवृत्त झाले. 'हुंकार', 'अस्वस्थ सूर्यास्त' आणि 'मी धात्री मी धरित्री' हे तीन काव्यसंग्रह; 'दूर गेलेले घर', 'अंबा', 'गंधकाली' आणि 'कृष्णकमळ' ह्या चार कादंबऱ्या; 'तवंग' आणि 'सलामसाब' हे दोन कथासंग्रह, अशी पुस्तके लिहिली. 'काव्यप्रवृत्ती आणि प्रवृत्ती','कबीराचा शेला', 'सायंसावल्या' हे ललित

लेखन केले असून 'गोकुळवाटा' ही गीतमालिका लिहिली.

तांबोळी मुख्यतः कवी म्हणून प्रसिद्ध आहेत. भोवतीचे भयप्रद आणि संभ्रमित करणारे वास्तव पकडू पाहतात. 'हुंकार' या काव्यसंग्रहात व्यक्तीकडून समष्टीकडे जाण्याचा प्रयत्न आहे. दुःखाची अनंत रूपे आहेत याची जाण, दांभिकतेची चीड, बेगडीपणाबद्दल तिटकारा आणि तिरस्कार हे त्यांच्या कवितेतून व्यक्त होते. त्या काव्यसंग्रहाला इंदिरा संतांची प्रस्तावना लाभली. 'अस्वस्थ सूर्यास्त' हा दुसरा कवितासंग्रह असून नारायण सुर्वे आणि विंदा करंदीकरांचा प्रभाव त्यावर आहे.

तांबोळींना रितेपणाची खंत वाटते. ती खंतच वेदना बनून कवितेतून व्यक्त होते. नंतर एक प्रकारची निरिच्छता जन्माला येते आणि त्यातून उपहास प्रकट होतो. 'बरे झाले आम्ही आमचे, आधीच आत्मे विकून टाकले, नसता बिचारे उगीचच, जागच्या जागी सडले असते,' असे ते उपहासाने म्हणतात.

मानवी जीवनातील वंश-सातत्याच्या चिरंतन ओढीबद्दल तांबोळी म्हणतात 'अनावर उमाळ्यानं तिने त्याला मांडीवर घेतलं, तिचा अवघा देहच पाळणा होऊन झुलू लागला, आणि तिच्या काळजातील अभंग जाऊन अंगाईला कोंब फुटला, माझ्या आईला पणतू झाला.' 'मी धात्री, मी धरित्री' हा काव्यसंग्रह म्हणजे आपल्याला जन्म दिलेल्या मातीची आत्मकथा आहे. यातल्या कवितांमधून जीवनातली निराशा, अपेक्षाभंग, मूल्यहीनता, व्यावहारिकता, स्वार्थांधता आणि भ्रष्टाचार या कारणांमुळे कवी जखमी आणि विव्हल होतो, पण शेवटी प्रखर कडवट वास्तव स्वीकारण्याशिवाय गत्यंतर नाही, हे मान्य करतो.

'दूर गेलेले घर' ही राज्य सरकार पुरस्कार प्राप्त गाजलेली कादंबरी आहे. मानसिक संघर्ष हा कादंबरीचा आत्मा आहे. 'ही कादंबरी म्हणजे मराठवाड्यातील विशिष्ट कालखंडाचा दस्तऐवज म्हणता येईल. शैक्षणिक, सामाजिक, आर्थिक आणि सांस्कृतिक स्थित्यंतरे कशी झाली, ते या कादंबरीतून दिसून येते,' सदा कऱ्हाडे असे म्हणतात.

'कृष्णकमळ'मध्ये अगतिक, हतबल झालेल्या स्त्रीची वेदना चित्रित केली असून 'अंबा' आणि 'गंधकालीं' यांमधून पौराणिक पात्रांच्या वृत्ति-प्रवृत्तीचा शोध घेतला आहे. 'काव्यप्रवृत्ती आणि प्रवृत्ती'मध्ये आस्वादक समीक्षकाच्या भूमिकेतून साहित्यविचार केला आहे. 'कबीराचा शेला' हे आत्मनिष्ठ, काव्यात्म, भावनेची डूब असलेले, अंतर्मुख करणारे ललित लेखन आहे. 'सय सावल्या'मध्ये राम शेवाळकर, धुंडामहाराज देगलूरकर, वा. ल. कुलकर्णी, ए. वि. जोशी, अनंत भालेराव इत्यादींच्या व्यक्तिमत्त्वाचा शोध घेण्याचा प्रयत्न केला आहे. 'गोकुळवाटा' ही एक गीतमालिका असून तीमध्ये राधाकृष्णाच्या नात्यातील गूढ समजून घेण्याचा ध्यास आहे, आणि त्यातूनच गवसलेल्या या गोकूळवाटा आहेत. तांबोळी यांना उत्कृष्ट वाङ्मयनिर्मितीसाठी महाराष्ट्र राज्य पुरस्कार, नरहर कुरुंदकर पुरस्कार, यशवंतराव चव्हाण पुरस्कार आणि महाकवी विष्णुदास पुरस्कार मिळाले आहेत.

– डॉ. अपर्णा लव्हेकर

**संदर्भ :**


*१. कासराळीकर दीपक; 'अंतर्वेध'; साहित्यसेवा प्रकाशन*

*२. आलोचना; ललित; एप्रिल १९७१.*

*३. माणूस; १० एप्रिल १९७१.*

*४. सत्यकथा; एप्रिल १९७१.*

*५. पंचधारा; जानेवारी १९९२.*


## ताम्हनकर, नारायण धोंडो

**विनोदकार, बालसाहित्यिक**

**३१ ऑगस्ट १८९३ – ५ जानेवारी १९६१**

'दाजी' आणि 'गोट्या' या दोन सदाबहार व्यक्तिरेखाटनांमुळे नारायण धोंडो ताम्हनकर यांनी मराठी वाङ्मयात मानाचे स्थान मिळवले आहे. मॅट्रिक झाल्यावर काही काळ कारकूनाची व शिक्षकाची नोकरी केली. नंतर 'किर्लोस्कर' या मासिकात उपसंपादक पदावर काम करताना शंकरराव किर्लोस्करांच्या पुरोगामी विचारांचा

त



प्रभाव लेखनावर पडला. 'ब्रह्मर्षी' (१९११) हे त्यांचे पहिले नाटक असून त्यानंतर 'उसना नवरा' (१९३३), 'गोड गोंधळ' (१९३५), 'बच्चा नवरा' (१९४०), 'दाजी धडपडे' (१९५०) ही नाटके व अनेक एकांकिका लिहिल्या. त्यांमधून स्त्रिया, मुले आणि कामकरी जीवन यांचे प्रश्न हाताळले. नाटकाची रचना प्रहसनात्मक करण्याकडे त्यांचा कल होता. साहजिकच कथावस्तू विनोदी अंगाने उलगडत जायची. त्यांची नाटके खळखळून हसवत नसली, तरी विनोदाची पखरण त्यामध्ये असते.

**आदर्श जीवनमूल्यांचा पुरस्कार**

'दाजी' हा त्यांचा साहित्यिक मानसपुत्र. ही मालिका किर्लोस्करमधून क्रमशः प्रसिद्ध झाली. समाजातील अन्याय्य रूढी, परंपरा, अंधश्रद्धा यांविरुद्ध लढायला उभा ठाकलेला आणि नवसमाजाच्या निर्मितीसाठी धडपडणारा दाजी हा तरुणांपुढचा आदर्श ठरला. दाजीच्या रूपाने त्यांनी समाजजीवनातील हास्यास्पदता आणि विसंगती नेमकेपणाने टिपली आहे. त्यांचे लेखन मध्यमवर्गीय माणसासंबंधीचे असले, तरी आदर्श जीवनमूल्यांचा पुरस्कार करणारे आहे. त्यांच्या 'निवाडे' या कथासंग्रहात वीस वेगवेगळ्या व्यक्तींचा यमाबरोबर मृत्यूपूर्वी झालेला संवाद रंगवला आहे. 'चकमकी' (१९४३), 'अनेक आशीर्वाद' (१९४४), 'आमचे हे' (१९४५) या पुस्तकांमधून कौटुंबिक प्रश्नांची चर्चा केली आहे. 'ग्यानबा तुकाराम' हा ग्रामीण स्त्रिया व खेडूत यांच्यासाठी असलेला पत्रसंग्रह प्रसिद्ध आहे. 'तात्या' (१९४१), 'मामा' (१९४२), 'गुजाताई' (१९४७) या त्यांच्या अन्य काही कादंबऱ्या होत.

ताम्हनकरांनी मुलांसाठी 'खेळगडी' या मासिकातून सातत्याने लेखन केले. त्यातील 'गोट्या' (भाग १ ते ३,१९४३) आणि 'चिंगी' या पुस्तकांनी मुलांच्या मनावर अधिराज्य गाजवले. मुलांचे मानसशास्त्र आणि भावविश्व समजून घेत मुलांची कल्पकता, चौकस वृत्ती आणि त्यांच्या व्रात्यपणामागचे तर्कशास्त्र उलगडून दाखवण्यात ते यशस्वी झाले. ताम्हनकरांपूर्वी लिहिल्या गेलेल्या बालसाहित्यातील बहुतेक कथानायक हे सर्वगुणसंपन्न असत. त्या पार्श्वभूमीवर गोट्याचा खोडकरपणा, त्याच्या हातून कळतनकळत घडणाऱ्या चुका, त्या दुरुस्त करताना होणारे घोटाळे यांमुळे गोट्या सगळ्यांनाच आपला वाटला. मनोरंजन आणि संस्कार याचा सुरेख मेळ त्यांनी गोट्याच्या रूपाने घातला आहे. गोट्याच्या दुसऱ्या व तिसऱ्या भागांमध्ये मात्र तो आदर्शवादाकडे झुकल्यामुळे त्या व्यक्तिरेखेतील जिवंतपणा थोडा कमी झाल्यासारखा वाटतो.

ताम्हनकरांच्या सर्व प्रकारच्या लेखनातून सामाजिक जाणिवेचा आविष्कार घडविण्याची तळमळ सतत प्रतीत होत राहते.

– मृणालिनी चितळे

**संदर्भ :**

१. *कुलकर्णी गो.म., कुलकर्णी व. दि., संपादक; 'मराठी वाङ्मयाचा इतिहास' - खंड ६.*

## तिवारी, दुर्गाप्रसाद आसाराम

**कवी, कथाकार**

**१६ सप्टेंबर १८८७ – २१ ऑक्टोबर १९३९**

खानदेशात राहणाऱ्या दुर्गाप्रसाद आसाराम तिवारी यांचे घराणे उत्तर हिंदुस्थानातले होय. रजपूत व मराठे यांच्या पराक्रमाने भारून गेलेल्या तिवारींनी देशभक्ती आणि वीरशक्ती यांचा गौरव करणारी स्फूर्तीपर गीते लिहिली.

'काव्यकुसुमांजली' (१९१६) व 'काव्यरत्नमाला' (१९२०) या स्फुट कविता. यांव्यतिरिक्त तिवारींनी 'मराठ्यांची संग्राम गीते' (१९२०), 'मनोहरलीला' (१९२०), 'ऐतिहासिक खंडकाव्य' (१९२०), 'काव्यतुषार', (१९२३, राष्ट्रीय कविता) 'चंडीशतक' (१९२७) अशी विविध प्रकारची दीर्घकाव्येही लिहिली. शौर्य, वीर्य, स्वातंत्र्य अशा भावनांची



उत्कटता त्यांच्या काव्यात अवतरते. त्यासाठी झुंजलेल्या वीरांचा त्यांना अभिमान वाटे. 'झाशीची संग्रामदेवता' (१९२५) या काव्यसंग्रहात झाशीची राणी लक्ष्मीबाई हिच्या पराक्रमाचे वर्णन येते. 'मेरी झाँसी नही दूंगी' या प्रतिज्ञेपासून तिच्या बलिदानापर्यंतच्या पराक्रमावर त्यांनी दहा कवने लिहिली आहेत.

पूर्वसूरींच्या पराक्रमाची आठवण देऊन वाचकाला अंतर्मुख करणारे त्यांचे आणखी एक ओजस्वी खंडकाव्य 'महाराणा प्रतापसिंह' (१९२६) हे फार गाजले.

'मनोहरलीला', 'मान्यांची यमुना' (१९२६) आणि 'नंदिनी' (१९३०) ही अद्‌भुतरम्य कल्पित व इतिहास यांचे मिश्रण असलेली खंडकाव्ये आहेत. 'पूर्वदिव्य ज्यांचे त्यांना रम्य भाविकाल' असे प्रतिपादन करण्यासाठी या पराक्रमाची कवने निर्माण झाली असे दिसते.

शिवकालीन हिंदी कवी भूषण यांच्या 'शिवबावनी', 'शिवप्रताप', 'शिवराजभूषण' या काव्यांची मराठी रूपांतरेही त्यांनी केली. मायभूमीसाठी प्राणाची बाजी लावणाऱ्या वीर पुरुषांचा सातत्याने जयजयकार करणाऱ्या तिवारींचे मराठी काव्यसृष्टीत वैशिष्ट्यपूर्ण स्थान आहे.

– संपादक मंडळ

**संदर्भ :**

*१. काळे अक्षयकुमार; 'दुर्गाप्रसाद आसाराम तिवारी'; युगवाणी; ऑक्टो.नोव्हें.डिसें. १९८७.*

## तुपे, उत्तम बंडू

**कादंबरीकार, आत्मचरित्रकार**

**१ जानेवारी १९४८**

मातंग समाजातील केवळ तिसरीपर्यंत शिकलेल्या उत्तम बंडू तुपे यांचे सर्व साहित्य गावरान, रांगड्या भाषेत लिहिलेले असून त्याला मातंग, ग्रामीण समाजातील बोलीभाषेची डूब आहे.



तुपे अशा अशिक्षित कुटुंबात जन्मले की त्यांची जन्मतारीखही कुठे नोंदवलेली नाही. त्यांच्या आईच्या, कोंडाबाईच्या सांगण्यानुसार, 'गांधीबाबाला भटा-बामणांनी गोळ्या घातल्या त्या वक्ताला दंगलीचा होमकुंड पेटलेला तवा ह्यो हिरा जन्माला आला.' त्यामुळे सोयीसाठी म्हणून १ जानेवारी १९४८ ही त्यांची जन्मतारीख मानली गेली आहे. अहमदनगर जिल्ह्यातील, श्रीगोंदे तालुक्यातील बेलवंडीजवळील घायपातवाडी या ठिकाणी त्यांचा जन्म झाला. केकताड म्हणजे घायपात पाण्यात भिजत ठेवून, त्याचा वाख तयार करून दोरखंड वळणे हा त्यांच्या आई-वडिलांचा पोटापाण्याचा व्यवसाय. लहानपणापासून हे काम पाहत असताना त्यांना प्रश्न पडला व त्यांनी आईला विचारले, ''काटकिंजाळ केकताडाचा ह्यो पांढराफेक वाख कसा ग हुतो आए?'' त्यावर आईने उत्तर दिले, ''बाळा, पाण्याच्या पोटात केकताडाची आग थंड हुती न त्येचाच रेसमागत, मऊलूस वाख हुतोया.'' ह्या वाखाच्या संगतीत, दोरखंड वळण्यासाठी किंवा शेतमजुरी करण्यासाठी आई- बापांना मदत करण्यात, गावोगाव हिंडण्यात त्यांचे बालपण गेले. गावांतल्या शाळांमधून अनेक प्रकारे उपेक्षा सहन करीत तीसरीपर्यंत कसेबसे शिक्षण झाले.

**स्वयंभू लेखक**

घरी अठराविसे दारिद्र्य, वडील-बंडू भैरू तुपे, आई-कोंडाबाई, ४ बहिणी, २ भाऊ व स्वतः उत्तम अशा ९ जणांचे कुटुंब! पोटासाठी गावोगावी भटकंती, प्रतिकूल सामाजिक स्थिती यांमुळे या कुटुंबातील मुलांवर शिक्षणाचे संस्कार झालेच नाहीत. मात्र अस्पृश्यतेचे विदारक अनुभव बरेच काही शिकवून गेले. समाजातील अशा पददलित स्तरातील माणसाला जगण्यासाठी पोटासाठी किती तीव्र आणि जीवघेणा झगडा करावा लागतो, याचा प्रत्यय त्यांच्या सगळ्या लेखनातून प्रत्यही

त

येतो. जन्मभर पोटासाठी झगडा, धडपड हेच त्यांचे ध्येय, हेच त्यांचे जीवन होते. शिक्षण नाही, वाचन नाही तरी केवळ आंतरिक ऊर्मीतून त्यांना लेखनाचा छंद जडला. सुरुवातीला त्यांनी काही लावण्या रचल्याचा उल्लेख आढळतो. पुस्तके मिळवताना आणि ती वाचण्यासाठी सवड मिळवतानाही त्यांना अनंत अडचणी येत. त्यांनी लिहिलेले आत्मीयतेने वाचून त्यांना दिशा दाखवणारेही कोणी नव्हते. त्यामुळे वाचलेल्या पुस्तकांद्वारे अनेक मराठी लेखकांच्या साहित्याचे वेडेवाकडे परिणाम त्यांच्या साहित्यावर झालेले दिसतात. जवळ असलेला अनुभवांचा समृद्ध साठा, निसर्गतः लाभलेली ग्रामीण शैली आणि प्रतिभावंताची कल्पकता यांच्या बळावर सुरुवातीला बऱ्याच ग्रामीण कथा लिहिल्या. त्यांतील काही सुरुवातीला मासिकांमधून प्रसिद्ध झाल्या. ‘कुनी सांगायला न्हाई आन वाचायला दिलं तर ते वाचायला कुनाला टाइम बी न्हाई. माझा मीच सुचंल ते, टाइम मिळंल तवा लिहितो.’ असा हा स्वनिर्मित, स्वयंभू लेखक आहे.

**अनघड भाषेतले आत्मकथन**

साहित्य जगतात खऱ्या अर्थाने ‘उत्तम बंडू तुपे’ हे नाव परिचित झाले ते त्यांच्या आत्मकथनामुळे, ‘काट्यावरची पोटं’मुळे. अत्यंत प्रांजल, सच्चे, गावरान, रोजच्या बोलीभाषेत लिहिलेले हे आत्मनिवेदन एका समग्र सामाजिक आणि कौटुंबिक वास्तवाचे दर्शन घडविते. प्रसिद्ध लेखक आनंद यादव यांची प्रस्तावना या आत्मवृत्ताला लाभली आहे. लेखकाचा गौरव करताना आनंद यादव म्हणतात, ‘‘या आत्मनिवेदनाचा कस अव्वल दर्जाचा वाटतो. सोयीस्कर छुपा अप्रामाणिकपणा दाखवणारी कोणतीही प्रछन्न चतुराई यात नाही. त्यामुळेच एका अनघड माणसाने अनघड भाषेत केलेले हे आत्मनिवेदन वाचकाच्या मनाचा कब्जा घेते.’’

‘इजाळ’ ही त्यांची पहिली कादंबरी (१९८४). ग्रामीण भागात पसरलेले विजेचे जाळे व त्यात अडकलेला, त्याचे चांगले-वाईट परिणाम भोगणारा गरीब शेतकरी हा ‘इजाळ’चा विषय आहे. ‘झुलवा’ (१९८६) ह्या कादंबरीचा विषय आहे जोगतिणीचे उपेक्षित जिणे. ह्याच कादंबरीवरून ‘झुलवा’ हे नाटक रंगभूमीवरील क्रांतिकारक नाटक म्हणून खूप गाजले. ह्या कादंबरीमुळे व नाटकामुळे शहरी, पांढरपेशा वर्गाला जोगतिणीच्या उपेक्षित, लाजिरवाण्या जीवनाची ओळख झाली. ‘कळासी’ (१९८८) ही ग्रामीण भागातल्या शेतमजुरांच्या दारिद्र्याची आणि दुर्दैवाची हृदयस्पर्शी कहाणी असलेली कादंबरी. तुपे यांच्या खास ग्रामीण भाषेची, रसरशीत अनुभवांची डूब असलेली ही कादंबरी वाचकांच्या हृदयाचा ठाव घेते. याशिवाय ‘आंदण’, ‘कळा’, ‘कोंबार’ (कादंबरी), ‘खाई’ (कादंबरी), ‘खुळी’ (कादंबरी), ‘चिपाड’, ‘सावळं’, ‘नाक्षारी’, ‘पिंड’, ‘भस्म’, ‘माती आणि माणसं’ (कथा) ‘लांबलेल्या सावल्या’, ‘शेवती’. अशी मोठी साहित्यसंपदा केवळ अक्षरओळख झालेल्या या कल्पक प्रतिभावंत लेखकाने निर्माण केली आहे. शिक्षणासाठी आणि पोटासाठी माळी, वॉचमन, बिगारी, शिपाई, मजूर, हमाल अशी हलकी कामे त्यांनी केली आहेत आणि पोटासाठी अविरत धडपडत हा लेखक लिहीत राहिला आहे. त्यांच्या लक्षणीय, अनोख्या अनुभवांतून निर्माण झालेल्या रसिकप्रिय साहित्यामुळेच साठोत्तरी ग्रामीण, दलित साहित्यिकांत त्यांचा समावेश झाला आहे.

– सविता टाकसाळे

## तुळपुळे, शंकर गोपाळ

**संशोधक, अभ्यासक**

**५ फेब्रुवारी १९१४ – १० ऑगस्ट १९९४**

डॉ. शंकर गोपाळ तुळपुळे यांचा जन्म पुणे येथे झाला. एम. ए. पदवी प्राप्त झाल्यावर त्यांनी बेळगाव, धारवाड आणि सोलापूर येथे मराठीचे अध्यापन केले. ‘यादवकालीन मराठी भाषा’ या विषयावरील प्रबंधास त्यांना पीएच. डी. मिळाली. पुणे विद्यापीठात ते मराठी विभाग प्रमुख होते. जर्मनीतील हायडलबर्ग विद्यापीठाचे अभ्यागत प्राध्यापक हा सन्मान त्यांना प्राप्त झाला. प्राचीन मराठी भाषेच्या संदर्भात तुळपुळे



यांनी केलेले संशोधन वाङ्मयाच्या इतिहासात अत्यंत मोलाचे ठरते.

'पांच संतकवी', 'प्राचीन मराठी गद्य', 'प्राचीन मराठी कोरीव लेख', 'मराठी ग्रंथनिर्मितीची वाटचाल', 'महानुभाव पंथ आणि त्याचे वाङ्मय', 'भक्तीचा मळा', 'महानुभाव पद्य', हे ग्रंथ त्यांनी लिहिले. गुरुदेव रानडे उर्फ रा. द. रानडे हे त्यांचे गुरू होते. त्यांच्यासंबंधी त्यांनी 'गुरुदेव रानडे: चरित्र आणि तत्त्वज्ञान' हा ग्रंथ लिहिला.

'लीळाचरित्र', 'दृष्टान्तपाठ', 'ऋद्धिपूरवर्णन', 'श्रीकृष्णचरित्र', 'मराठी निबंधाची वाटचाल', 'माधवस्वामीकृत योगवासिष्ठ' या ग्रंथाचे टिपा, शब्दसंग्रह, प्रस्तावना यांसह संपादन केले. महानुभाव वाङ्मयाचा त्यांचा सखोल अभ्यास होता.

साहित्य परिषदेच्या 'मराठी वाङ्मयाचा इतिहास: खंड : १' या ग्रंथाचे त्यांनी संपादन केले. डॉ. अ‍ॅन फेल्डहाउस यांच्या सहकार्याने त्यांनी प्राचीन मराठी शब्दकोशाचे अवघड काम पूर्णत्वास नेले. सुमारे ६००० प्राचीन मराठी शब्दांचा कोश तयार केला. त्यात ज्ञानेश्वरी-अनुभवामृत, नामदेवांचे अभंग, महानुभाव-कालीन वाङ्मय, संतसाहित्यातील मराठी शब्दांची व्युत्पत्ती, सुबोध मराठीत तसेच इंग्रजीत अर्थ, लिप्यंतर, स्पष्टीकरणार्थ अवतरणे यांचा समावेश केला. संशोधन वृत्ती, आध्यात्मिक ओढ, प्रखर बुद्धिमत्ता, कार्यप्रवणता, मराठी भाषेचे प्रेम या गुणांनी ते संपन्न होते. पंचवीस मौल्यवान ग्रंथ हे त्यांचे संस्मरणीय योगदान आहे.

**– श्याम भुर्के**

**संदर्भ :**

*१. तुळपुळे शं. गो.; 'अभंगवाणीतील पंथराज'.*

## तेंडुलकर, प्रिया विजय

☞ **मुख्य नोंद – चित्रपट खंड**

## तेंडुलकर, रमेश अच्युत

**कवी, समीक्षक**

**१८ डिसेंबर १९३० – १९ मे १९९९**



रमेश अच्युत तेंडुलकर यांचा जन्म अलिबागजवळच्या वैश्वी या गावी झाला. प्राथमिक व माध्यमिक शालेय शिक्षण अलिबागला झाल्यानंतर महाविद्यालयीन शिक्षणासाठी व नोकरीसाठी १९४७-१९४८ मध्ये ते मुंबईत आले. सिद्धार्थ महाविद्यालय, मुंबईमधून बी. ए. ची पदवी तर्खडकर सुवर्णपदकासह प्राप्त केली. १९५४ मध्ये मराठी विषयात एम. ए.ची पदवी मुंबई विद्यापीठातून न. चिं. केळकर सुवर्णपदकासह प्राप्त केली. १९४८ ते १९५४ या काळात नोकरी करता-करता शिक्षण घेतले. काही काळ पोलीस विभागातही काम केले.

याच दरम्यान महाविद्यालयीन जीवनक्रमात काव्य-लेखनाला व समीक्षा-लेखनाला प्रारंभ झाला. कुसुमाग्रजांच्या कवितांचा व व्यक्तिमत्त्वाचा त्यांच्यावर खूप प्रभाव पडला. तेंडुलकरांनी १९४८ साली याच प्रभावातून काव्य-लेखनाला सुरुवात केली. त्यांनी बी. ए.च्या वर्गात असताना दादरच्या छबीलदास शाळेच्या गच्चीत प्रा. माधव मनोहर ह्यांच्या उपस्थितीत कुसुमाग्रजांवर व्याख्याने दिली. हा एक प्रकारे काव्य समीक्षेचा प्रारंभबिंदू ठरला. पहिला समीक्षा लेख जानेवारी १९५२च्या 'साहित्य' या द्वैमासिकात 'इंदू तूच तुझ्यापरीः माधव जूलियनः विरहतरंग' या शीर्षकाने प्रकाशित झाला. 'कुसुमाग्रज : कालचे आणि आजचे' या 'हंस' १९५५ च्या अंकातील लेखाने तेंडुलकरांचे नाव साहित्यविश्वापुढे आले. बोरकर, पाडगावकर, करंदीकर इत्यादी तत्कालीन कवींच्या प्रभावामुळे 'कविता' या वाङ्मय प्रकाराकडे विशेष ओढा होता. 'सत्यकथा' या प्रतिष्ठित वाङ्मयीन नियतकालिकामधून १९५५ पासून नियमितपणे कविता प्रसिद्ध होऊ लागल्या. १९५४ ते

१९५७ या काळात ‘मौज’ साप्ताहिकातून विविध पुस्तकांवर त्यांनी परीक्षणे लिहिली.

दरम्यान १९५५ मध्येच सिद्धार्थ महाविद्यालयामध्ये मराठी विषयाचे अधिव्याख्याता म्हणून ते रुजू झाले व त्यांच्या प्रदीर्घ अध्यापन सेवेची सुरुवात झाली. १९६७मध्ये मुंबईच्याच कीर्ती महाविद्यालयामध्ये मराठी विभाग प्रमुख पदावर रुजू झाले. पुढे १९९०मध्ये सेवानिवृत्त होईपर्यंत तिथेच त्यांनी मराठी साहित्याच्या व भाषेच्या अध्ययन-अध्यापनाचे कार्य निष्ठापूर्वक केले. १९६९मध्ये मराठी संशोधन मंडळाचे संचालक म्हणूनही महत्त्वपूर्ण जबाबदारी त्यांनी सांभाळली. मुंबई मराठी साहित्य संघाच्या अमराठी भाषकांसाठी चालणाऱ्या भाषा साहित्य वर्गांसाठी त्यांनी जवळजवळ तीन दशके अध्यापनाचे कार्य केले. मराठी वाङ्मयाच्या कोशकार्यातही ते सक्रिय सहभागी राहिले.

त

**रोमँटिसिझमची चिकित्सा**

त्यांचे पहिले समीक्षा लेखांचे पुस्तक ‘गीतभान’च्या रूपाने १९८२ मध्ये प्रकाशित झाले. यातील भा.रा.तांबे, पु. शि. रेगे, अनंत काणेकर, इंदिरा संत, बा. भ. बोरकर, ग. दि. माडगूळकर इत्यादींविषयीची त्यांची काव्य-समीक्षा त्यांच्या सूक्ष्म, मर्मग्राही, रसिकतापूर्ण आणि प्रसन्न समीक्षाशैलीचा प्रत्यय देते. ‘मराठी रोमँटिक काव्यप्रतिभा’ (१९९९) व ‘बालकवींची कविता: तीन संदर्भ’ (१९९९) ही दोन पुस्तकेही मराठी काव्य-समीक्षेत मोलाची ठरतात. आधुनिक मराठी काव्यातील रोमँटिसिझमच्या प्रभावाची तेंडुलकरांनी केलेली चिकित्सा मराठी समीक्षेत दुर्मीळ ठरते. त्याचप्रमाणे केशवसुत, गोविंदाग्रज आणि मर्ढेकर यांच्याशी असलेला बालकवींच्या काव्यजाणिवेचा अंतरंग-संबंध तीन स्वतंत्र शोधलेखांतून त्यांनी उपरोल्लिखित पुस्तकात प्रभावीपणे उलगडून दाखविला आहे.

समीक्षकाप्रमाणेच त्यांच्या संशोधक वृत्तीचा प्रत्यय त्यांच्या काही साक्षेपी संपादनांमधूनही आपल्याला येतो. या संपादित ग्रंथांमध्ये ‘चौकोनी आकाश’ (अनंत काणेकरांच्या कविता, १९७४), ‘कविता दशकाची’ (८०च्या दशकातील दहा प्रातिनिधिक कवी, १९८०), ‘मृण्मयी’ (इंदिरा संत यांच्या निवडक कविता, १९८१) ‘आठवणीतल्या कविता’, भाग १ ते ४ (१९८९, १९९३, १९९५), ‘मराठी संशोधन’ खंड १३ व १४ (१९८१), ‘काव्यसरिता’ (१९५०), या ग्रथांचा समावेश होतो. तेंडुलकरांनी प्रारंभीपासून लिहिलेल्या कवितांचा ‘मानस-लहरी’ हा संग्रह त्यांच्या निधनानंतर असस प्रकाशन (त्यांच्या चिरंजीवाने काढलेली प्रकाशन संस्था) तर्फे प्रकाशित झाला. त्यांचे मराठी कवितेवरील व्यासंगपूर्व समीक्षालेखन विविध नियतकालिकांतून वेळोवेळी प्रकाशित झाले. त्यांनी ‘साहित्य: अध्यापन आणि प्रकार’ या ग्रंथात लिहिलेला कविता या वाङ्मय प्रकारातील दीर्घ लेख एकूणच मराठी काव्य-समीक्षेच्या प्रांतात मौलिक व ऐतिहासिक ठरावा असा आहे.

प्रसिद्धीपराङ्मुख वृत्तीच्या तेंडुलकरांना ‘सचिन तेंडुलकर’ या त्यांच्या जगप्रसिद्ध क्रिकेटपटू पुत्रामुळे उत्तरायुष्यात प्रसिद्धी मिळाली, तरी त्यांच्या निरलस, सोज्ज्वळ आणि साध्या व्यक्तित्वपैलूंच्या खुणा त्यांच्या संपूर्ण जीवनक्रमात उठून दिसतात. तेंडुलकरांच्या ‘गीतभान’ला महाराष्ट्र राज्याचा उत्कृष्ट वाङ्मनिर्मितीचा पुरस्कार प्राप्त झाला. २ मे १९९९ ला अनंत काणेकरांच्या स्मृतिप्रीत्यर्थ ‘लोकसत्ता’ दैनिकात लिहिलेला लेख हा त्यांचा अखेरचा लेख ठरला.

– डॉ. राजेंद्र नाईकवाडे

**संदर्भ :**

१. *कर्णिक प्रदीप, संपादक; ‘सहवासातील साहित्यिक’, व्यक्तिचित्रसंग्रह; प्रभात प्रकाशन, मुंबई; २०००.*

## तेंडुलकर, विजय धोंडोपंत

**कादंबरीकार, नाटककार, ललित लेखक**

**६ जानेवारी १९२८ – १९ मे २००८**

विजय तेंडुलकरांचे शिक्षण मॅट्रिकपर्यंत झाले. प्रारंभीचा बराचसा काळ पुणे, मुंबई येथे गेला. त्यांना आर्थिक अडचणींमुळे महाविद्यालयीन शिक्षण घेता आले नाही.



प्रारंभीच्या काळात अर्थार्जनासाठी नवभारत, मराठा, लोकसत्ता या दैनिकांत व नवयुग साप्ताहिकात पत्रकारिता केली. ‘वसुधा’ मासिकाचे त्यांनी काही काळ संपादन केले.

तेंडुलकरांची नाटके हा मराठी रंगभूमीवरचा एक स्वतंत्र प्रकार आहे. प्रायोगिक, व्यावसायिक अशा दोन प्रकारांत मराठी नाटक दुभंगले असता तेंडुलकरांनी या दोन्ही प्रकारांचा मध्य गाठणारा ‘तेंडुलकरी नाटक’ नावाचा नवा प्रकार अस्तित्वात आणला. तेंडुलकरांची नाटके कोणत्याही चौकटीत बसवता येत नाहीत, कारण प्रचलित चौकटी झुगारून ती लिहिलेली आहेत. नाटकाकडे पाहण्याच्या त्यांच्या चाकोरीबाह्य दृष्टिकोनाचे चोखंदळ मराठी प्रेक्षकांनी/समीक्षकांनी स्वागत आणि कौतुक केले. सनातनी वर्गाला तेंडुलकर मूर्तिभंजक वाटले. त्यांनी तेंडुलकरांच्या नाटकांवर वेळोवेळी हल्ले चढविले. ओरडा करून त्यांच्यापैकी काहींनी तेंडुलकरांच्या नाटकांवर बंदी घालायची मागणी केली. तेंडुलकरांच्या नाटकावरची या वर्गाची ही प्रतिक्रिया नैसर्गिक होती.

वसंत कानेटकर, मधुसूदन कालेलकर, बाळ कोल्हटकर, जयवंत दळवी ही मंडळी नाट्यवेड्या मराठी मनावर राज्य करत होती. अशा वेळी वर्गात मागच्या बाकावरच्या एखाद्या व्रात्य पोराने आवाज देऊन वर्गाची शिस्त बिघडवून टाकावी, तसा तेंडुलकरांचा मराठी रंगभूमीवरचा प्रवेश होता. प्रेक्षकानुनयी नाटकाने मराठी रंगभूमीला आणलेल्या मरगळीवर तेंडुलकरांची नाटके हा जहाल उतारा होता. विषय, रचना आणि आशयात्मक विधान ह्या तिन्ही बाबतींत तेंडुलकरांनी केलेले नाट्यात्मक प्रयोग रंगभूमीला हादरून सोडणारे होते. एकूण २७ नाटके, २५ एकांकिका तेंडुलकरांनी लिहिल्या. याखेरीज आठ–दहा बालनाट्ये लिहिली.

समाजाला धक्का देण्यासाठी तेंडुलकर मुद्दामच काहीतरी खळबळजनक (सेन्सेशनल) लिहितात, असा आरोप काही परंपरावादी करत. तेंडुलकरांच्या नाट्यसंपदेचे हे यथार्थ वर्णन आहे. तेंडुलकरांच्या नाटकातून दिलेले धक्के हे केवळ समाजाला नव्हते तर मराठी रंगभूमीच्या परंपरेला होते. ‘गिधाडे’, ‘बेबी’, ‘सखाराम बाईंडर’, ‘घाशीराम कोतवाल’ या नाटकांतून तेंडुलकरांनी मराठी रंगमंचावर ‘अँटी हिरो’ आणले. त्यांच्या नाटकात समाजातल्या सांस्कृतिक दांभिकतेवर हल्ले असायचे. ‘घाशीराम कोतवाल’मध्ये पेशवेकालीन ब्राह्मणवर्गाचे जे चित्रण तेंडुलकरांनी केले, त्यामुळे ब्राह्मणवर्ग खवळला; पण आपल्याकडल्या ब्राह्मणवर्गाचे वैशिष्ट्य असे की, त्यात जसे सनातनी आहेत तसे पुरोगामीही आहेत. या पुरोगामी वर्गाने हे नाटक उचलून धरले. ‘घाशीराम..’मध्ये काम करणारे कलावंत तर बव्हंशी ब्राह्मणच होते.

‘कन्यादान’मधल्या दलित तरुणाच्या चित्रणाने दलितवर्ग नाराज झाला. लोकानुनय हा शब्द तेंडुलकरांच्या शब्दाकोशात नसल्याने तेंडुलकरांनी विरोधाला न जुमानता समाजातल्या बऱ्यावाईट वृत्तींवर आघात करणे चालूच ठेवले.

‘शांतता कोर्ट चालू आहे’ या नाटकाचे इंग्रजीसह अनेक भाषांत भाषांतर झाले. नंतर गाजलेल्या इतर नाटकांचीही विविध भाषांत भाषांतरे होत गेली. ‘शांतता कोर्ट चालू आहे’ आणि ‘घाशिराम कोतवाल’ या नाटकांमुळे तेंडुलकरांचे नाव राष्ट्रीय पातळीवर गेले.

‘सामना’, ‘सिंहासन’, ‘उंबरठा’ या मराठी चित्रपटांबरोबरच श्याम बेनेगल, गोविंद निहलानी यांच्या चित्रपटांसाठी तेंडुलकरांनी पटकथा लिहिल्या. त्यातून ते अमराठी वर्गाला परिचित झाले. ‘गृहस्थ’ हे पहिले नाटक तेंडुलकरांनी विशीत लिहिले. त्यांचे अखेरचे नाटक २००४ सालचे आहे आणि ते इंग्रजी आहे– ‘हिज फिफ्थ वुमन’.

या दरम्यान ‘श्रीमंत’, ‘मी जिंकलो मी हरलो’, ‘एक हट्टी मुलगी’, ‘अशी पाखरे येती’, ‘गिधाडे’, ‘पाहिजे जातीचे’, ‘कन्यादान’, ‘कमला’ यांसारखी समाजवास्तवावर भाष्य करणारी एकाहून एक भेदक नाटके तेंडुलकरांनी रंगभूमीवर आणली. प्रत्येक नाटकाचा विषय वेगळा, आविष्काराची



शैली वेगळी. सत्तरीनंतरची पिढी तेंडुलकरांच्या नाट्यक्षेत्रातल्या या विलक्षण कामगिरीने भारून गेली.

नाट्यक्षेत्रातल्या यशाशी तुलना करता ललित वाङ्मय क्षेत्रातल्या तेंडुलकरांच्या कामगिरीकडे मात्र काहीसे दुर्लक्ष झाले, असे म्हणावे लागेल. 'कोवळी उन्हे' हे त्यांचे सदर मराठीतल्या ललित लेखनाचा अजोड नमुना आहे. 'कोवळी उन्हे' एवढे एकच पुस्तक तेंडुलकरांनी लिहिले असते, तरी ते श्रेष्ठ साहित्यिक म्हणून मान्यता पावले असते, असे म्हटले जाते. 'रातराणी' हा दुसरा लेखसंग्रहदेखील त्याच तोलामोलाचा आहे. 'रामप्रहर' हा अलीकडील संग्रह सत्तरीतही तेंडुलकरांची या माध्यमावर किती पकड होती, हे दाखवून देतो. 'कादंबरी-एक' आणि 'कादंबरी-दोन' या शीर्षकांच्या दोन कादंबऱ्यांत त्यांनी मराठी कादंबरी विश्वाला अपरिचित विषय हाताळले. मात्र नाटककार तेंडुलकर या वादळी व्यक्तिमत्त्वाने ललित लेखक तेंडुलकरांचे व्यक्तिमत्त्व झाकोळले. टेनेसी विल्यमच्या बहुचर्चित 'स्ट्रीट कार नेम्ड डिझायर' आणि मार्क डोरेनच्या 'लास्ट डेज ऑफ लिंकन' या नाटकांचे त्यांनी केलेले 'वासनाचक्र' आणि 'लिंकनचे अखेरचे दिवस' हे अनुवाद वाचक/प्रेक्षकांसमोर नीटपणे आले नाहीत. मोहन राकेशांचे 'आधे-अधुरे' आणि गिरीश कर्नाडांचे 'तुघलक' या दोन नाटकांचे तेंडुलकरांनी केलेले अनुवाद तेवढे मराठी रंगभूमीवर चांगल्या प्रकारे सादर झाले.

चित्रपट हे नाटकापेक्षा अधिक व्यापक प्रेक्षकवर्ग असलेले माध्यम आहे. त्याही क्षेत्रात तेंडुलकरांचे खास योगदान आहे. पण टीकाकारांनी त्याची फारशी दखल घेतलेली नाही. 'उंबरठा', 'मंथन', 'आक्रोश', 'निशांत', 'अर्धसत्य' यांसारख्या महत्त्वपूर्ण चित्रपटांच्या पटकथा तेंडुलकरांच्या आहेत. त्यांच्यापैकी काही पटकथा पुरस्कारप्राप्त ठरल्या. केतन मेहतांनी सरदार पटेलांच्या जीवनावर काढलेल्या 'सरदार' या चित्रपटाची तेंडुलकरांनी लिहिलेली पटकथा हा आदर्श पटकथेचा नमुना मानला जातो. स्वतः तेंडुलकरांना मात्र त्यांच्या पटकथेवर फार बोलायला आवडत नसे. त्यात बहुधा त्यांना मोकळेपणाने वावरता येत नसावे. दिग्दर्शकांशी, निर्मात्यांशी झालेल्या खडाजंगी वादानंतर झालेल्या तडजोडीतून त्यांच्या पटकथा आकाराला येत. ''माझी एकही पटकथा अजून पडद्यावर आलेली नाही,'' असे ते काहीशा उपरोधाने म्हणत.

नाटक, ललित लेख, चित्रपटाच्या पटकथा या दरम्यानही तेंडुलकर वेळात वेळ काढून फिल्म सोसायटीच्या चित्रपटांना हजेरी लावत, नव्या तरुण पोरांची नाटके पाहत, नव्या लेखक मंडळींची पुस्तके वाचत; त्यांना उत्तेजनपर प्रस्तावना लिहून देत. त्यांच्या पुस्तक प्रकाशनांसाठी वक्ते म्हणून उपस्थित राहत.

अखेरच्या दोन दशकांत त्यांच्यावर पुरस्कारांचा, सन्मानांचा वर्षाव झाला. त्या वेळी त्यांनी व्यक्त केलेल्या मनोगतांनाही साहित्यिक मूल्य आहे. तरुण मित्रांना त्यांनी वेळोवेळी लिहिलेल्या दोन-चार ओळींच्या पत्रांतूनही त्यांच्या तल्लख बुद्धीची कल्पना येते. तेंडुलकरांनी लिहिलेल्या या चिठ्ठ्या-चपाट्या पुस्तक रूपाने प्रकाशित झाल्या, तर तेंडुलकरांच्या साहित्यिक व्यक्तिमत्त्वाच्या वेगळ्या पैलूवर प्रकाश पडेल, यात शंका नाही.

त्यांना अनेक महत्त्वपूर्ण पुरस्कार लाभले. 'पद्मविभूषण' किताब देऊन केंद्र सरकारने त्यांचा गौरव केला. महाराष्ट्र शासनाचे तीन पुरस्कार, सरस्वती सन्मान, संगीत नाटक अकादमी पुरस्कार, कमलादेवी चट्टोपाध्याय पुरस्कार, महाराष्ट्र गौरव पुरस्कार हे महत्त्वाचे पुरस्कार होत.

– अवधूत परळकर

**संदर्भ :**

१. *मुळ्ये, प्रदीप संपा; नाईक राजीव संपा; ''ते आणि आम्ही''; आविष्कार प्रकाशन, पुणे; १९९२.*

## तोरो, अनंत रामचंद्र
**अनुवादक, अध्यापक**
**५ मे १९३० - ७ सप्टेंबर २००७**



अनुवादक डॉ. अ. रा. तोरो यांचा जन्म मेनापूर (कर्नाटक) येथे झाला. सोलापूरच्या दयानंद महाविद्यालयामध्ये त्यांचे एम. ए.पर्यंतचे शिक्षण झाले. 'मराठी प्रादेशिक कांदबरी' या विषयावर त्यांनी १९७४ साली पीएच. डी. प्राप्त केली. प्रा. अनंत तोरो यांनी वारणानगर, आजरा, पुणे येथील विविध महाविद्यालयांतून मराठी विभाग प्रमुख म्हणून जबाबदारी पार पाडली व ते प्राचार्य म्हणून निवृत्त झाले.

अनंत तोरो यांनी 'कन्नड नवकथा', 'पु.ल. व्यक्ती आणि विचार', 'कन्नड शिकू या', 'महाराष्ट्र-कर्नाटक सांस्कृतिक अनुबंध', 'कन्नड साहित्य: काही निरीक्षणे' इत्यादी पुस्तके लिहिली असून मराठी-कन्नड साहित्याचा सेतू बांधण्याचा त्यांनी प्रयत्न केला आहे. मराठी, कन्नड, कोकणी या भाषा एकमेकांना पूरक अशी साहित्य-निर्मिती करू शकतात. या भाषाभगिनींचे संवर्धन करण्यासाठी अनंत तोरो यांनी सतत काम केले. त्यांच्या प्रयत्नांतून कोकणी, कन्नड आणि मराठी या तिन्ही भाषांचे 'कोकम' साहित्य संमेलन शिवराय कारंथ व गंगाधर गाडगीळ यांच्या उपस्थितीत ठाणे येथे झाले. या संमेलनाचे कार्याध्यक्षपद प्रा. अनंत तोरो यांनी भूषवले होते.

मराठी-कन्नड भाषांचा स्नेहबंध अधिक घट्ट व्हावा यासाठी मराठी साहित्याचे कन्नडमध्ये व कन्नड साहित्याचे मराठीमध्ये अनुवाद व्हावेत, नवे अनुवादक तयार व्हावेत यासाठी 'मराठी-कन्नड स्नेहवर्धन केंद्र' पुण्यात सुरू झाले. त्याचे ते अध्यक्ष होते. साहित्य अकादमीने आयोजित केलेल्या 'अनुवादसाहित्य' या चर्चासत्रात अनंत तोरो यांनी सहभाग घेतला. दिल्ली येथे झालेल्या कन्नड साहित्य संमेलनात कवी अनिल यांच्या कवितांचे कन्नडमध्ये अनुवादित केलेल्या कवितांचे वाचन अनंत तोरो यांनी केले.

प्रा. अनंत तोरो यांना महाराष्ट्र साहित्य परिषद, पुणे ह्या संस्थेच्या वतीने डॉ. वि. कृ. गोकाक पुरस्कार (२०००) प्राप्त झाला. त्याचप्रमाणे डिसेंबर २००१ मध्ये सोलापूर येथे झालेल्या चौथ्या समरसता साहित्य संमेलनाचे अध्यक्षपदही त्यांनी भूषवले. या संमेलनाचा विषय 'अनुवादित साहित्य आणि समरसता' असा होता. प्रा. अनंत तोरो हे समरसता साहित्य परिषदेचे संस्थापक अध्यक्ष होते. त्यांच्या नेतृत्वाखाली संस्थेची वैचारिक व संघटनात्मक बांधणी झाली. २००४ साली ते समरसता साहित्य परिषदेच्या अध्यक्षपदातून मुक्त झाले.

अनुवादाची गरज प्रतिपादन करताना प्रा. अनंत तोरो म्हणतात, ''एक भाषा, एक संस्कृती हा पाश्चात्त्य विचार आहे. तर अनेक भाषा एक संस्कृती हा भारतीय विचार आहे. काश्मीरपासून कन्याकुमारीपर्यंत भाषा भिन्न-भिन्न असतील, पण त्यांचा आत्मभाव एकच आहे. याचा प्रत्यय पुनः एकदा नव्याने या देशाला करून देण्याची आवश्यकता आहे. भाषेमुळे आपण एकमेकांजवळ येण्याऐवजी दूरदूर जात आहोत की काय, असे वाटू लागले आहे. त्यामुळे शेजारच्या भाषांतील साहित्याचे अनुवाद व्हावेत व नव्या तरुण पिढीला आपल्या भाषेबरोबर सारा भारत कळावा यासाठी अनुवादाची आवश्यकता आहे.''

प्रा. अनंत तोरो यांनी अध्यापन, अध्ययन आणि अनुवाद या क्षेत्रांत कार्य केले. तोरो यांच्या लेखनामुळे पु. ल. देशपांड्यांचा मराठी विनोद कन्नड भाषेत अनुवादित झाला.

— रवींद्र गोळे

**संदर्भ :**


१. *'चौथे समरसता साहित्य संमेलन- अध्यक्षीय भाषण', समरसता साहित्य परिषद.*

२. *अत्रे श्याम, अरुण करमरक; 'समरसतेचा नंदादीप'; समरसता साहित्य परिषद.*


* * *

त

# थ





## थत्ते, यदुनाथ दत्तात्रेय

☞ **मुख्य नोंद – पत्रकारिता आणि ललितेतर साहित्य खंड**

## थोरात, हरिश्चंद्र गणपत

**समीक्षक**

**२६ एप्रिल १९५२**



हरिश्चंद्र थोरात यांचा जन्म तेजेवाडी (ता. जुन्नर, जि. पुणे) येथे झाला. त्यांच्या आईचे नाव हौसाबाई. शालेय शिक्षणासाठी काही काळ तेजेवाडी येथे राहिल्यावर उर्वरित शिक्षण मुंबई येथून पूर्ण केले. सिद्धार्थ महाविद्यालय आणि कीर्ती महाविद्यालय, मुंबई येथून बी. ए. पर्यंतचे शिक्षण पूर्ण केले. १९७७ साली बी. ए. पूर्ण झाल्यावर मराठी या विषयातून १९७९ साली मुंबई विद्यापीठातून प्रथम वर्गात एम. ए. पूर्ण केले. पुढे १९९५ साली प्रा. रमेश तेंडुलकर व प्रा. सुभाष सोमण यांच्या मार्गदर्शनाखाली 'कादंबरी : एक साहित्यप्रकार' या विषयात पी.एच.डी. मिळवली.

कीर्ती महाविद्यालय मुंबई येथे १७ वर्षे तसेच मुंबई विद्यापीठातील मराठी विभागात ६ वर्षे मराठीचे अध्यापन केले. नोव्हेंबर २००८ पासून गुरुदेव टागोर तौलनिक अध्यासन केंद्राचे काम पाहतात. सैद्धान्तिक समीक्षा, साहित्याचे समाजशास्त्र हे त्यांचे विशेष अभ्यासाचे विषय आहेत. समकालीन पाश्चात्त्य समीक्षेचा विशेष अभ्यास केला आहे. विविध नियतकालिकांमधून ५० लेख प्रकाशित झाले आहेत. मराठी वाङ्मयकोश, समाजविज्ञान कोश, एन्सायक्लोपीडीया ऑफ इंडियन पोएटिक्स अशा विविध कोशांसाठी लेखन केले आहे.

डॉ. थोरातांनी 'कादंबरीविषयी' पद्मगंधा प्रकाशन, पुणे (२०००) या पुस्तकातून कादंबरी या साहित्य प्रकाराविषयीचे तात्त्विक विवेचन व उपयोजन मांडले आहे. तर 'साहित्याचे संदर्भ', मौज प्रकाशन, मुंबई (२००६) या पुस्तकातून पाश्चात्त्य विचारवंत बाख्तिन व देरिदा यांच्या विचारांची व संकल्पनांची ओळख करून दिली आहे. 'हे ईश्वरराव, हे पुरुषोत्तमराव' हे त्यांचे आगामी पुस्तक होय. वैशिष्ट्यपूर्ण समीक्षादृष्टी असलेल्या डॉ. थोरातांना मुंबई मराठी साहित्य संघातर्फे दिला जाणारा उत्कृष्ट समीक्षक पुरस्कार (२००५) मिळाला आहे. तसेच महाराष्ट्र शासनातर्फे 'साहित्याचे संदर्भ' या साहित्यकृतीला वा. ल. कुलकर्णी पुरस्कार २००९ साली प्राप्त झाला आहे.

– सुपर्णा कुलकर्णी

* * *

# द



## दडकर, जया
***दडकर, जयवंत केशव***
**संपादक, लेखक**
**३१ मे १९३५**



जयवंत केशव दडकर यांचा जन्म शिरोडे या गावी झाला. त्यांचे शालान्त परीक्षेपर्यंतचे शिक्षण शिरोड्यालाच झाले. पुढे सिद्धार्थ महाविद्यालयामधून ते बी.ए. (१९५६) झाले. इतिहास हा त्यांचा विषय होता. १९५५ पासून १९८७ पर्यंत त्यांनी एका ब्रिटिश फर्ममध्ये नोकरी केली. वयाच्या ५२ व्या वर्षी ते स्वखुशीने सेवानिवृत्त झाले.

'एक लेखक आणि एक खेडे' हे त्यांचे पहिले पुस्तक १९७३ मध्ये प्रसिद्ध झाले. वि.स.खांडेकर यांची साहित्यिक म्हणून जी जडणघडण झाली, त्यात शिरोडे या गावाचा कसा वाटा आहे; याचे तपशीलवार चित्रण या पुस्तकात दडकरांनी केले आहे. पुढे २००१ साली त्यांनी खांडेकरांच्या जीवनचरित्राचा वेध घेऊन 'सचित्र चरित्रपट' ग्रंथ लिहिला. चिं.त्र्यं.खानोलकर हे दडकरांसाठी आणखी एक आदरणीय व्यक्तिमत्त्व होय. त्यांच्यासंबंधी त्यांनी अभ्यासू वृत्तीने सखोल संशोधन करून 'खानोलकरांच्या शोधात' (१९८३) हे पुस्तक लिहिले. या ग्रंथात त्यांनी लेखकाचे लौकिक चरित्र आणि मानस या दोघांचा व खानोलकरांच्या साहित्यिक व्यक्तिमत्त्वाचा अन्वयार्थ शोधण्याचा केलेला वैशिष्ट्यपूर्ण प्रयत्न वाखाणण्याजोगा आहे. खांडेकर आणि खानोलकर यांच्या व्यक्ती वैशिष्ट्याने दडकर झपाटून गेल्याचे दोन्ही ग्रंथांवरून जाणवते. त्याचप्रमाणे 'वि.स. खांडेकर वाङ्मयसूची' (१९८५), 'काय वाट्टेल ते / कीचकवधाचा तमाशा' ही त्यांची पुस्तके प्रकाशित झाली आहेत. लघुनियतकालिकांच्या चळवळीत लेखनाच्या रूपाने ते सहभागी झाले होते. संक्षिप्त मराठी वाङ्मयकोशाच्या संपादनात त्यांचा महत्त्वाचा सहभाग आहे. याशिवाय, संपादित साहित्यात 'श्री.दा. पानवलकर' (१९८७), निवडक पत्रे : नरहर कुरुंदकर (१९९२), प्रकाशक रा.ज. देशमुख (१९९५) या पुस्तकांचा समावेश आहे.

खांडेकरांच्या चरित्रपटावरून त्यांचा छायाचित्रणाचाही छंद कलापूर्ण दृष्टीचा आहे, हे जाणवते. त्यांनी अनेक लेखकांना आपल्या छायाचित्रांच्या चौकटीत पकडले आहे. त्यांचा हा छायाचित्रणाचा छंद व मोजकेच पण दर्जेदार आगळ्यावेगळ्या स्वरूपाचे साहित्य यांसाठी ते साहित्यक्षेत्रात प्रसिद्ध आहेत.

– संपादक मंडळ

द

## दलवाई, हमीद उमर
**कथाकार, कादंबरीकार**
**२९ सप्टेंबर १९३२ – ३ मे १९७७**

हमीद दलवाई यांचा जन्म कोकणातील मिरजोळी येथे मध्यमवर्गीय मुस्लीम कुटुंबात झाला. कोकणी मुस्लीम म्हणून मराठी भाषेतून शिक्षण झाले. पुढे मेहरुन्निसा खान यांच्याशी लग्न झाले. त्यांची भाषा उर्दू तरीही स्वतःच्या दोन्ही मुलींना मराठीतूनच शिक्षण देण्याचा आग्रह धरला. राष्ट्र सेवा दल, 'साधना' परिवार, साने गुरुजी आणि राम नारायण लोहिया यांचे त्यांच्यावर संस्कार झाले. त्यामुळे मुस्लीम धर्मातील कर्मकांडावर विचार करावासा त्यांना



वाटू लागला. नुसता विचारच नव्हे, तर आचारही त्यांनी केला हे विशेष. ते पुरोगामी विचारांचे होते. स्वतःचे लग्न हुंडा न देता, न घेता नोंदणी पद्धतीने केले. कुटुंबनियोजन केले. 'मुसलमानांची आर्थिक स्थिती सुधारली, तर जातीय तणाव खूप कमी होतील' हे त्यांचे मत होते. मुस्लीम समाज आणि संस्कृती यांचा अभ्यास करण्यासाठी ते भारतभर फिरले आणि २२ जून १९७० मध्ये विचारांती त्यांनी 'मुस्लीम सत्यशोधक समाजा'ची क्रांतिकारी स्थापना केली. सार्वजनिक क्षेत्रातील धर्माचे महत्त्व कमी केले पाहिजे, जबानी तलाक रद्द झाला पाहिजे, सवत बंदी कायदा हवा, समान नागरी कायदा हवा असे म्हणत त्यांनी या संस्थेतर्फे मुल्लांचा धिक्कार केला. त्यासाठी मुस्लीम महिलांचा पहिला ऐतिहासिक मोर्चा हमीद यांच्या नेतृत्वाखाली आयोजित झाला.

'इंडियन सेक्युलर सोसायटी'चेही ते उपाध्यक्ष झाले. १९७३ मध्ये तलाकपीडित मुस्लीम स्त्रियांची त्यांनी पुण्यात परिषद घेतली. 'मुस्लीम सोशल रिफॉर्म्स'च्या सभा घेतल्या. 'बोले तैसा चाले' ही त्यांची वृत्ती असल्यामुळे शेवटच्या दुखण्यात त्यांनी मृत्युपत्र केले. त्यात 'माझ्या शरीराचं दफन वा दहन करू नये. विद्युतदाहिनीत ते नष्ट करावं. कोणताही विधी करू नये,' आदी पुरोगामी (सुधारणावादी) सूचना होत्या. 'मुस्लीम समाजातील गोपाळ गणेश आगरकर' असे त्यांचे सार्थ वर्णन करता येईल.

ते स्वतः लेखक, कलाकार होते. त्यांच्या विचारांचे प्रतिबिंब त्यांच्या लिखाणात पडले आहे. काही काळ त्यांनी 'मराठा'मध्ये पत्रकारिता केली. 'रेल्वे'त सेवा केली. पुढे त्यांनी संपूर्ण वेळ समाजकार्याला वाहून घेत त्या संदर्भात त्यांनी लिखाण केले. 'मुस्लीम पॉलिटिक्स इन इंडिया' हे इंग्रजी पुस्तक त्यांनी लिहिले. १९६५ मध्ये लिहिलेली त्यांची 'इंधन' कादंबरी अनेक संदर्भांत गाजली. महाराष्ट्र शासनाचा पुरस्कार मिळवणाऱ्या या पुस्तकाला मुस्लीम समाजाने फार विरोध केला. या पुस्तकाआधी त्यांनी १९६१ मध्ये 'लाट' हा कथासंग्रह काढला. खेड्यातील मानसिकता, अंधश्रद्धा, रूढी यांचे प्रभावी आणि विचार करायला लावणारे चित्रण या कथांतून त्यांनी केले. मराठी-मुस्लीम बोलीचा खास वापर असलेले त्यांचे लेखन आगळेवेगळे ठरले. 'मुस्लीम जातीयतेचे स्वरूप, कारणे आणि उपाय' (१९७८), 'इस्लामचे भारतीय चित्र' (१९८२) अशी वैचारिक पुस्तकेही त्यांच्या नावावर आहेत. त्यांना त्यांच्या कार्याबद्दल 'फाय फाउंडेशन' चा सन्माननीय पुरस्कार लाभला.

आपल्या सर्व कौटुंबिक जबाबदाऱ्या (भाऊ-बहीण यांचे पोषण) पार पाडत त्यांनी लेखक, विचारवंत म्हणून ऐतिहासिक कार्य, प्रबोधन व जागरण केले. 'आम्ही दुसरा हमीद दलवाई उभा करू शकलो नाही हे दुर्दैव' असे त्यांच्या पत्नी मेहरुन्निसा यांनी आत्मकथनात म्हटले आहे; ते खरेच आहे. ते होणे गरजेचे आहे; इतकी हमीद दलवाई ही व्यक्ती महत्त्वाची होती.

– प्रा. सुहासिनी कीर्तिकर

**संदर्भ :**


१. *दलवाई मेहरुन्निसा; 'मी भरून पावले आहे'; साधना प्रकाशन.*

२. *दलवाई हमीद; 'इंधन'; मौज प्रकाशन.*

३. *'दलवाईंचे पाकिस्तानवरील लेख' मराठा; १९६२,१९६३.*

४. *दलवाई हमीद; 'हमीद'; नीलकंठ प्रकाशन, पुणे; १९७७.*


## दसनूरकर, स्नेहलता

**कथाकार, कादंबरीकार, बालसाहित्यकार**

**७ मार्च १९१८ – ३ जुलै २००३**

स्नेहलता दसनूरकर यांचा जन्म पुणे येथे झाला. एम. ए., बी. टी. (मराठी साहित्य विशारद) एम. ए. (हिंदी राष्ट्रभाषा कोविद) इतके शिक्षण झाले. स्नेहलतताईंचा विवाह १९३९ साली द. गो. दसनूरकर यांच्याशी झाला. त्यांचा जीवनप्रवास लेखिका-शिक्षिका-प्राध्यापिका-प्राचार्य असा झाला आहे. १९५५ पर्यंत त्यांनी पुना

द



इंग्लिश स्कूल येथे नोकरी केली व १९५६ साली गारगोटी येथील मौनी विद्यापीठात दाखल झाल्या. त्या विद्यापीठातून १९७८ साली प्राचार्य पदावरून त्या निवृत्त झाल्या.

स्नेहलता यांचे पहिले पुस्तक 'राणी दुर्गावती' (चरित्र) १९४५ साली प्रकाशित झाले. त्यांचे ५३ कथासंग्रह, ३ कादंबऱ्या, १ लघुचरित्र, ३ ललित लेख अशी एकूण ६० पुस्तके प्रकाशित असून त्यात ग्रामीण जीवन व सामाजिक प्रश्न यांवरील ४९० कथा व ८१ लेखांचा समावेश आहे. त्यांचे लेखन 'स्त्री', 'मनोहर', 'माहेर', 'मेनका', 'वसंत', 'वाङ्मयशोभा', 'लोकसत्ता' इत्यादी मासिक-साप्ताहिकांच्या दिवाळी अंकांतून प्रसिद्ध झाले आहे.

स्नेहलता यांच्या काही कथांचे हिंदी, गुजराती, तेलगू भाषांत अनुवाद झाले आहेत. १९५२ साली प्रसाद कथा स्पर्धेत त्यांना पारितोषिक प्राप्त झाले. त्यांच्या 'व्रजदीप' या कथेवर 'शापीत' हा मराठी चित्रपट तयार झाला. त्या चित्रपटाच्या कथेस महाराष्ट्र शासनाचा सर्वोत्कृष्ट कथेचा प्रथम पुरस्कार मिळाला. १९९३ साली 'मानिनी' मासिकाने 'स्नेहलता दसनूरकर विशेषांक' प्रकाशित करून त्यांचा गौरव केला.

स्नेहलता दसनूरकर यांच्या एकूणच साहित्यातून सामाजिक जाणिवांचे दर्शन होते. साहित्यातून त्या सामाजिक बांधीलकीची जपणूक करतात. त्यांच्या कथांच्या नायिका या उदात्त, समाजाला दिशादर्शक, स्त्रीचे मन अधिक उन्नत करणाऱ्या आणि कर्तबगार आहेत. समाजहितैषी पात्रनिर्मितीची भरीव व टिकाऊ कामगिरी त्या अखंड करत राहिल्या. त्यांच्या 'अवंतिका' या कथेवर आधारित 'अवंतिका' ही दूरदर्शन मालिका प्रचंड गाजली, ती त्या कथेतील सशक्त कथाबिजामुळेच.

साहित्यलेखनाबरोबरच स्नेहलता यांनी इयत्ता १० वीच्या उच्च मराठी पाठ्यपुस्तकाच्या संपादनाचे काम केले. पत्रव्यवहार प्रशिक्षण अभ्यासक्रमाच्या हिंदी पुस्तकाचे डी.एड. साठी लेखन केले. गारगोटी येथे प्रदीर्घ काळ वास्तव्य आणि अध्यापन करणाऱ्या स्नेहलताताईंनी नेत्रोपचार शिबिरे, कुटुंब नियोजन शिबिरे, साक्षरता प्रसार यांच्या माध्यमांतून समाजसेवा केली.

१९७८ साली सेवानिवृत्त झालेल्या स्नेहलता मुंबईत स्थायिक झाल्या. १९७८ ते २००३ या काळात सुमारे ३५ कथासंग्रह प्रकाशित झाले. स्नेहलताताई यांच्या या साहित्य कामगिरीमुळे त्यांना अविरत झरणारी लेखणी म्हटले, तर वावगे ठरणार नाही. 'दोन भिंती' (१९६६), 'रेशमी पदर' (१९७०), 'स्नेहकथा' (१९७४), 'स्वामिनी' (१९७४), 'सुजाता' (१९७८), 'मॅटीनी' (१९७८), 'प्रतिष्ठा' (१९८३), 'भोगशिळा' (१९८९), 'अजातशत्रू' (१९९१), 'उमर कैद' (१९९३), 'अवंतिका' (१९९३), 'युगधर्म' (१९९९) हे त्यांचे गाजलेले कथासंग्रह आहेत.

– रवींद्र गोळे

**संदर्भ :**

१. *करमरकर अरुण, संपादक; 'समरसता साहित्य पत्रिका'; दिवाळी २००३.*

## दळवी, जयवंत द्वारकानाथ

***ठणठणपाळ***

**कथाकार, कादंबरीकार, नाटककार**

**१४ ऑगस्ट १९२५ – १६ सप्टेंबर १९९४**

जयवंत दळवी यांचा जन्म गोव्यातील हडफडे गावी झाला. दळवी वेंगुर्ल्यापासून आठ-नऊ किलोमीटर अंतरावर असलेल्या समुद्रकिनाऱ्यावरील आरवली गावचे. जवळच्या शिरोडे गावी त्यांनी पाचवीपर्यंतचे शिक्षण घेतले. नंतर ते मुंबईला आले आणि घरच्या दडपणामुळे मॅट्रिक झाल्यावर मुंबईच्या व्ही.जे.टी.आय.मध्ये टेक्स्टाइल इंजिनिअरिंगचा डिप्लोमा घेण्यासाठी अभ्यास करू लागले. पण डिप्लोमा अर्धवट टाकून मुंबईच्या 'प्रभात' दैनिकात ते रुजू झाले. तेथून ते 'लोकमान्य'मध्ये गेले. एम.ए.साठी त्यांनी 'इमोशन अ‍ॅन्ड

द



इमॅजिनेशन अॅन्ड देअर प्लेस इन लिटरेचर' या विषयावर संशोधन करून प्रबंध सादर केला. अमेरिकन सरकारच्या मुंबई येथील माहिती खात्यात (युसिस) त्यांनी नोकरी स्वीकारली. लेखनासाठी पूर्ण वेळ मिळावा म्हणून त्यांनी वयाच्या पन्नासाव्या वर्षी १९७५ साली स्वेच्छानिवृत्ती स्वीकारली.

बालपणी त्यांच्यावर राष्ट्र सेवा दलाचे संस्कार झाले होते. श्रमदान मोहिमेत ते उत्साहाने भाग घेत. त्यांची पहिली कथा 'दातार मास्तर' १९४८ मध्ये 'नवा काळ' दैनिकात प्रसिद्ध झाली. त्यानंतर त्यांच्या लेखणीला बहर आला आणि विविध साहित्य प्रकार त्यांनी समर्थपणे हाताळले. 'गहिवर' (१९५६), 'एदीन' (१९५८), 'रुक्मिणी' (१९६५), 'स्पर्श' (१९७४) आदी १५ कथासंग्रह; 'चक्र' (१९६३), 'स्वगत' (१९६८), 'महानंदा' (१९७०), 'अथांग' (१९७७), 'अल्बम' (१९८३) आदी २१ कादंबऱ्या; 'संध्याछाया' (१९७४), 'बॅरिस्टर' (१९७७), 'सूर्यास्त' (१९७८), 'महासागर' (१९८०), 'पुरुष' (१९८३), 'नातीगोती' (१९९१) आदी १९ नाटके दळवींनी लिहिली आणि त्यातील बहुतेक पुस्तके गाजली. 'लोक आणि लौकिक' हे प्रवासवर्णन आणि 'सारे प्रवासी घडीचे' हे कोकणातील विलक्षण व्यक्तींचे आणि त्यांच्या जगा वेगळ्या कर्तृत्वाचे, विक्षिप्तपणाचे चित्रण करणारे विनोदी पुस्तक वाचकप्रिय ठरले.

दळवींची 'चक्र' ही पहिलीच कादंबरी मराठी कादंबरीच्या अनुभवक्षेत्राची कक्षा वाढविणारी आणि प्रादेशिकतेची कोंडी फोडणारी अगदी वेगळ्या विषयावरची कादंबरी म्हणून वाखाणली गेली. मुंबईतील झोपडपट्टीमधील गलिच्छ जीवन, तेथे वस्ती करणाऱ्यांचे उघडेनागडे आयुष्य चितारताना पत्रकारितेच्या काळात आलेले जिवंत अनुभव दळवींना उपयोगी ठरले. बकाल परिसरात पशुतुल्य आयुष्य जगणाऱ्या तेथील व्यक्तींच्या स्वप्नांचा, जीवनमूल्यांचा वेध दळवी घेतात. मध्यमवर्गीयांना सर्वस्वी अपरिचित असलेल्या चित्रविचित्र संघर्षाचे प्रत्ययकारी चित्रण ते करतात. कादंबरीला कथानक नाही, पण त्यातील व्यक्तिचित्रे महत्त्वाची आहेत आणि ती दळवींनी प्रभावीपणे उभी केली आहेत. मराठीतील एक अभूतपूर्व कादंबरी म्हणून 'चक्र'चा उल्लेख केला जातो.

दळवींच्या सर्वच लेखनात विकार-वासनांच्या आवर्तात भोवंडून जाणारी माणसे पदोपदी भेटतात. दळवींचे बालपण तीस-चाळीस माणसांच्या एकत्र कुटुंबात गेले. जुन्या परंपरा प्राणपणाने जपणारे ते कुटुंब होते. कुटुंबाचा लवाजमा मोठा होता. त्यात विकेशा विधवा होत्या, वेडगळ व्यक्ती होत्या, वेगवेगळ्या वृत्तींची-विकारांची माणसे होती. संस्कारक्षम वयात दळवींचा संपर्क अशा माणसांशी आला. मध्यरात्री माजघरातून बाहेर येणारे दबलेले उसासे आणि हुंदके त्यांनी ऐकले, वेडसर माणसांचा आयुष्यक्रम त्यांनी न्याहाळला. माणसाच्या आयुष्यातील भोगवट्याचे, अतृप्त वासनांचे, सुखदुःखांचे दशावतार त्यांच्या कथा, कादंबरी, नाटक यांत दिसतात. आदिम कामेच्छांचे अस्वस्थ करणारे चित्र त्यांच्या साहित्यात आढळते. वेडी, अर्धवट पात्रे त्यांच्या साहित्यकृतींतून डोकावतात. माणसाचे उघडेनागडे दुःख, व्यावहारिक जीवनाच्या धबडग्यात त्याची होणारी कोंडी आणि त्यातून अपरिहार्यपणे माणसाच्या वाट्याला येणारे एकाकीपण यांचा मन सुन्न करणारा आविष्कार त्यांच्या 'संध्याछाया', 'सूर्यास्त', यांसारख्या नाटकांत झालेला दिसतो. 'चक्र', 'स्वगत', 'धर्मानंद', 'अल्बम' यांसारख्या कादंबऱ्यांत आणि 'बॅरिस्टर', 'पुरुष', 'महासागर', 'लग्न' यांसारखा नाटकांत त्यांनी लैंगिक वासनेतून निर्माण होणाऱ्या विकृतीच्या, वासनेच्या तळाशी असलेल्या क्रूर प्रवृत्ती यांची धगधगती चित्रे रंगविलेली आहेत. दळवींच्या सर्वच लेखनात सहजपणा आहे, वाचकांना खिळवून ठेवण्याची ताकद आहे.

पण गुरुजींनीं माझे वीस रुपये मोडून खाल्ले असते, तरी ते आणखी दहा दिवस जगले असते. त्या दहा दिवसात कदाचित त्यांना सॉलिसिटर दाभोळकरा-सारखा दुसरा कुणी तरी भेटला असता. आणि ते जगले असते. जगले असते खरं! पण असं जगून तरी काय होणार? जगण्याची उमेद कुठाय? ---उद्यां माझा असं काही करावं लागलं तर... एकदम मनगटावरली लव उठून उभी राहिली.... तसं काही झालं तर कोणी इथं ओळख पटवायला सुद्धा येणार नाही. कोण येईल? आणि कशाला? आम्ही जगण्यापेक्षां मरण्यासाठी जन्माला आलेली माणसं. पुरा कोंडमारा होईपर्यन्त आम्ही वाट बघायची!

('स्व-गत' कादंबरीतून, पृ.१८९)

वाट्याला आलेल्या विलक्षण, व्यामिश्र अनुभवांनी अंतर्यामी उदास असणाऱ्या माणसांच्या व्यथा-वेदनांचे खिन्न करणारे चित्रण करणाऱ्या या प्रतिभावंताने एक मुखवटा धारण केला होता. त्याचे नाव 'ठणठणपाळ'! लौकिक जगात दिसणारे दळवींचे रूप प्रसन्न, विनोदी, मिस्कील बोलणारे, चेष्टा करणारे, दुसऱ्यांच्या विनोदाला खळखळून हसून दाद देणारे असे होते. 'सारे प्रवासी घडीचे'मध्ये अस्सल कोकणी माणसांची व्यक्तिचित्रे दळवींनी रंगवली. वरून भोळीभाबडी वाटणारी पण मोठी बिलंदर माणसे दळवींनी या पुस्तकात उभी केली आहेत. 'ठणठणपाळ' हे टोपणनाव धारण करून 'ललित' मासिकात त्यांनी 'घटका गेली पळे गेली' हे सदर वीस वर्षे चालविले. अत्यंत मार्मिक आणि तरल विनोदाचा वस्तुपाठच त्यांनी जाणत्या वाचकांसमोर ठेवला. मराठी वाङ्मयातील, वाङ्मयसमीक्षेतील आणि एकंदर वाङ्मयव्यवहारातील अनिष्ट, अर्थशून्य आणि वाङ्मयविकासाला मारक ठरणाऱ्या अनेकविध प्रवृत्तींचे फुगे त्यांनी हसत-हसत फोडून टाकले. 'ठणठणपाळ'-विषयी ज्ञानपीठकार विंदा करंदीकर यांनी म्हटले आहे, 'ठणठणपाळच्या भूमिकेतून दळवींनी केलेल्या लिखाणाला व कार्याला तोड नाही. इतकी जागरूकता, इतके शहाणपण, इतका जिव्हाळा आणि इतका परखडपणा मराठी समीक्षात्मक विभागाला अजूनपर्यंत भेटलेला नव्हता.' गंभीर कथालेखनाबरोबर दळवींनी विनोदी लेख व कथा लिहिल्या. फॅन्टसीच्या दिशेने जाणाऱ्या विक्षिप्त कथा लिहिल्या. मात्र 'विनोदी लेखक' म्हणून आपल्यावर शिक्का पडावा, असे त्यांना कधीच वाटले नाही. सर्वसाधारणपणे लेखन गंभीर हवे आणि अधूनमधून विनोद यायला हवा हे पथ्य त्यांनी नेहमीच पाळले.

दळवी माणसांत रमणारे असले, तरी वृत्तीने एकाकी होते. महाराष्ट्र शासनाचे, नाट्य परिषदेचे अनेक पुरस्कार

त्यांना मिळाले. पण गर्दीपासून ते दूर राहिले. सार्वजनिक सभांत त्यांनी सक्रिय भाग घेतला नाही. सभा संमेलने टाळली. 'अखिल भारतीय साहित्य संमेलना'चे अध्यक्षपद त्यांनी नाकारले. दळवी चतुरस्र प्रतिभेचे लेखक होते. मराठी साहित्याला त्यांनी केलेले योगदान फार महत्त्वाचे आहे.

– डॉ. सुभाष भेण्डे

**संदर्भ :**


*१. भेण्डे सुभाष; 'बेस्ट ऑफ जयवंत दळवी'; मॅजेस्टिक प्रकाशन, मुंबई.*

*२. आठलेकर मंगला; 'जयवंत दळवींविषयी'; राजहंस प्रकाशन, पुणे.*


## दांडेकर, गोपाळ नीळकंठ

**कादंबरीकार, कथाकार, आत्मचरित्रकार**

**८ जुलै १९१६ – १ जून १९९८**



गोपाळ दांडेकर यांचा जन्म विदर्भाच्या अमरावती जिल्ह्यातील परतवाडा या गावी झाला. तिथेच चौथीपर्यंत प्राथमिक शिक्षण झाल्यावर १४ व्या वर्षी त्यांनी घरातून पलायन केले. पुढे संत गाडगेमहाराजांची भेट झाल्यावर गोपाळबुवा जोशी ह्या नावाने कीर्तने करण्यात त्यांनी काही काळ घालवला. त्या सुमारास ज्ञानेश्वरी व तुकाराम गाथा ह्यांचा अभ्यास केला. श्रीधरशास्त्री पाठक यांच्याकडे वेदान्ताचा अभ्यास केला. २४व्या वर्षी नर्मदा परिक्रमा केली. १९४१–१९४५ या काळात त्यांनी राष्ट्रीय स्वयंसेवक संघाचे प्रचारक म्हणून काम केले. याच काळात शरच्चंद्रांच्या साहित्याचे वाचन केले. विवाहानंतर (१९४५) औंध येथील पंडित सातवळेकरांच्या 'पुरुषार्थ' मासिकाचे सहसंपादक म्हणून आणि 'वैदिक धर्म' ह्या हिंदी नियतकालिकाचे संपादक म्हणून काम केले. १९५० नंतर पुण्याजवळील तळेगाव येथे कायमचे वास्तव्य करून आयुष्याच्या अखेरपर्यंत केवळ लेखनावर उपजीविका केली.

दुर्गभ्रमण, चित्रपाषाण जमवणे, छायाचित्रण हे दांडेकरांचे छंद होते. महाराष्ट्रातील अनेक युवक–युवतींना दांडेकरांनी शिवशाहीर बाबासाहेब पुरंदरे यांच्या समवेत गिरिभ्रमणाचे धडे दिले. परिवारात ते 'आप्पा' या नावाने ओळखले जात. १९४५ साली 'आमचे राष्ट्रपुरुष' हे पहिले पुस्तक प्रकाशित झाले. दांडेकरांनी ५० वर्षे सातत्याने विपुल लेखन केले. २६ कादंबऱ्या, १० नाटके, १२ ललित–प्रवास–प्रासंगिक व इतर पुस्तके, २ कथासंग्रह, ११ धार्मिक व चरित्रपर पुस्तके, १७ बाल–किशोर साहित्याची, आत्मचरित्र अशी दांडेकरांची विपुल ग्रंथसंपदा आहे. याशिवाय 'पवनाकाठचा धोंडी', 'जैत रे जैत', 'देवकीनंदन गोपाळा' ह्या चित्रपटकथा दांडेकरांनी लिहिल्या आहेत. त्यांच्या नऊ पुस्तकांचे हिंदी, सिंधी व गुजराती या भाषांत अनुवाद केले गेले आहेत.

'बिंदूची कथा' (१९४७) ही नौखालीच्या हत्याकांडावरील कादंबरी लिहून दांडेकरांनी कादंबरीच्या क्षेत्रात पदार्पण केले. आशय–अभिव्यक्तीच्या दृष्टीने त्यांच्या कादंबऱ्यांत वैविध्य आहे. उदाहरणार्थ प्रादेशिक कादंबऱ्या 'शितू' (१९५३), 'पडघवली' (१९५५); 'माचीवरला बुधा' (१९५८), 'जैत रे जैत' (१९६५), 'रानभुली' (१९७८), 'वाघरू' (१९७९), 'मृण्मयी' (१९७०), 'पवनाकाठचा धोंडी' (१९५५) 'पूर्णामायची लेकरं' (१९५८), 'तांबडफुटी' (१९८२) या दहा कादंबऱ्या लिहून दांडेकरांनी प्रादेशिक कादंबरी लेखकांमध्ये आपले वैशिष्ट्यपूर्ण स्थान निर्माण केले आहे. या कादंबऱ्यांतील जीवनदर्शनाला वास्तवाचा आणि लेखकाच्या स्वानुभवाचा आधार आहे. 'मी लिहिलेल्या बहुतेक कादंबऱ्या ह्या माझे आत्मचरित्रच आहेत,' ह्या त्यांच्या विधानाचा प्रत्यय प्रादेशिक विषयावरील कादंबऱ्या वाचताना येतो. प्रादेशिक कादंबरी लिहिताना ते प्रमुख व्यक्तिरेखेप्रमाणेच दुय्यम व्यक्तिरेखाही समर्थपणे उभ्या करतात. रेखीव आणि विविधरूपी निसर्गदर्शन, विविध प्रादेशिक बोलींचा वापर, नाट्यपूर्ण घटनांची

निर्मिती, ठसठशीत स्त्री-चित्रण ही दांडेकरांच्या प्रादेशिक विषयावरील लेखनाची वैशिष्ट्ये आहेत. दांडेकरांच्या प्रादेशिक कादंबऱ्यांतील 'माचीवरला बुधा', 'जैत रे जैत', 'पवनाकाठचा धोंडी', 'शितू', 'पडघवली', 'पूर्णामायची लेकरं' ह्या कादंबऱ्या आशय-अभिव्यक्तीच्या दृष्टीने वेगळ्या आहेत. 'माचीवरला बुधा' ही निसर्गावर प्रेम करणाऱ्या, निसर्गाचा भाग होऊन राहिलेल्या निसर्गवेड्या मनस्वी माणसाची कहाणी आहे. 'पवनाकाठचा धोंडी', 'रानभुली' व 'वाघरू' ह्या कादंबऱ्या 'बुधा'च्या परंपरेतील कादंबऱ्या आहेत.

'शितू' आणि 'पडघवली' या दोन कादंबऱ्यांना कोकणाची पार्श्वभूमी आहे. कोकणातील दैवते, कथा-दंतकथा (Myths) हे कोकणचे महत्त्वाचे प्रादेशिक वैशिष्ट्य आहे. अर्थात निसर्ग हाही तिथल्या जीवनाचा अविभाज्य घटक आहे. 'शितू' कादंबरी म्हणजे दांडेकरांच्या शब्दांत 'एक हळवी प्रेमकथा' किंवा 'प्रेमकाव्य' आहे. 'शितू' कादंबरीत दांडेकरांनी कोकणचा परिसर आणि कोकणची भाषा एकत्र आणून पात्रनिर्मितीद्वारे कथानकाचा विकास साधला आहे.

**पडघवली**

कोकणच्या पार्श्वभूमीवरील 'पडघवली' ही कादंबरी मराठी प्रादेशिक कादंबरीच्या विकासक्रमातील एक महत्त्वाची कादंबरी ठरते. ती कथाविषयाच्या वेगळ्या हाताळणीमुळे आणि समूहचित्रणामुळे, 'पडघवली' कादंबरीतील लहानातली लहान व्यक्तिरेखादेखील दांडेकरांनी कलात्मक पातळीवर उभी केली आहे. अंबूवहिनी, व्यंकू, अक्का, शारदा, भिऊआबा आणि इतर व्यक्तिरेखांना घनता लाभलेली आहे; कादंबरीतील एकही पात्र अनाठायी आलेले नाही. एकही घटना उपेक्षणीय नाही. पात्राच्या तोंडचे प्रत्येक वाक्य कथेची गती उत्तरोत्तर वाढवणारे आहे. जणू पडघवलीच विविध मुखांनी बोलते आहे. पडघवलीतील निसर्ग पडघवलीशी एकरूप झालेला आहे. पडघवलीतील केकताड, कातळ, करवंदी, माड, पोफळी, पऱ्ह्या-नाले यांची वर्णने दांडेकरांनी सूक्ष्म तपशिलांसह केली आहेत. कोकणच्या प्रादेशिक जीवनावर लिहिलेल्या कादंबऱ्यांतील सर्वांत अधिक कलात्मक पातळीवर जाणारी कादंबरी म्हणून 'पडघवली'चाच निर्देश करावा लागतो. कोकणाच्या पार्श्वभूमीवर लिहिलेली 'मृण्मयी' ही दांडेकरांची स्त्री-व्यक्तिरेखाप्रधान कादंबरी आहे. दांडेकरांच्या सर्जनशीलतेचे वैशिष्ट्य म्हणजे ते महाराष्ट्राच्या कोणत्याही भूप्रदेशातील संस्कृतीशी सहजपणे एकरूप होतात. 'पूर्णामायची लेकरं' ह्या कादंबरीमध्ये दांडेकरांनी अभिव्यक्तीसाठी विदर्भ भूमी निवडली आणि प्रादेशिकतेची वेगळी वाट चोखाळली.

**ऐतिहासिक कादंबरी**

'बया दार उघड' (१९६७) 'हरहर महादेव' (१९६८), 'दर्याभवानी' (१९६९), 'झुंजार माची' (१९७२), 'हे तो श्रींची इच्छा' (१९७४) ह्या ऐतिहासिक विषयावरील पाच कादंबऱ्यांत गो. नी. दांडेकरांनी 'शिवकाल' उभा केला आहे. मराठीतील ऐतिहासिक कादंबरी-लेखनाच्या प्रवाहात दांडेकरांच्या कादंबऱ्या वेगळ्या ठरतात त्या त्यांच्यातील कालप्रधानता आणि समाजदर्शन या वैशिष्ट्यांमुळे.



दांडेकरांच्या कादंबऱ्यांचे चरित्रात्मक आत्मचरित्रात्मक कादंबऱ्या आणि प्रासंगिक व अन्य कादंबऱ्या असेही वर्गीकरण केले जाते. ज्ञानेश्वर, तुकाराम, रामदास या संतांच्या जीवनावरील त्यांच्या कादंबऱ्या आणि 'कुणा एकाची भ्रमणगाथा' (१९५७) ही नर्मदा परिक्रमेवरील आत्मपर कादंबरी हे लेखन म्हणजे दांडेकरांच्या लेखनाची वेगळी वाट आहे. वयाच्या तिसाव्या वर्षापर्यंतचे जीवनचरित्र स्मरणगाथेत आले आहे. दांडग्या स्मरणशक्तीमुळे ते आपल्या आयुष्यातील बारीकसारीक प्रसंगांचे तपशीलवार कथन करू शकले. 'स्मरणगाथा' (१९५३) हे आत्मचरित्र आणि 'कुणा एकाची भ्रमणगाथा' (१९५७) ही आत्मचरित्रात्मक कादंबरी यांत लेखकाच्या जीवनातील घटना-प्रसंगांची सरमिसळ झाली आहे. 'स्मरणगाथा' म्हणजे दांडेकरांनी भोगलेल्या दुःखांची आणि यातनांची 'गाथा' आहे. 'स्मरणगाथे'तील अनुभव हे वेदनादायी अनुभव आहेत. प्रवासवर्णनाचा



तळेगांव	श्रीशंवन्दे	२६.१२.६०

"आंग्रेजांना संपूर्ण भारत जिंकण्यापूर्वी शेवटची लढाई इथल्याच डोंगऱ्या काळसर मावळ्यांशी खेळावी लागली. ती युद्धश्री, ती रग, तो आवेश अजूनही मावळला नाही. कधी मावळेलसेंही दिसत नाही. हा गुण डोंगरावरून वाहात येणाऱ्या भराटवाऱ्याचा आहे. कृष्णा-कोयना-पवना-भीमांच्या पाण्याचा आहे —"

गोपाळ नीलकंठ

आर्थिक गरजेपोटी लेखन केले असले, तरी जीवनमूल्यांशी फारकत घेतली नाही. त्यांचे अनुभवविश्व भावनेने भारावलेले होते. रसाळ ओघवती भाषा आणि भारतीय तत्त्वज्ञानाच्या अभ्यासाचा पाया यांमुळे त्यांच्या कादंबऱ्या वैशिष्ट्यपूर्ण ठरतात. दांडेकरांनी आपल्या सर्वच कादंबऱ्यांमध्ये मूल्यगर्भ व जगणे यांविषयी श्रद्धा असलेल्या व्यक्तिरेखा उभ्या केल्या आहेत. सहृदय मन आणि अध्यात्माचा स्पर्श त्यांच्या लेखनातून सतत जाणवत असतो. आधुनिक वास्तवातील समस्यांपासून त्यांच्या व्यक्तिरेखा जरी दूर असल्या, तरी जनसमूह जिवंत करण्याचे कौशल्य त्यांच्यापाशी निश्चित होते. अंगभूत

द

स्पर्श असलेली 'कुणा एकाची भ्रमणगाथा' ही मराठीतील एक लक्षणीय कादंबरी आहे.

**सांस्कृतिक मूल्ये**

भारतीय संस्कृतीत आणि परंपरेत मुळे रुजलेल्या दांडेकरांनी 'श्रीकृष्णायन' (१९५९), 'श्रीरामायण' (१९५८), 'भावार्थ ज्ञानेश्वरी' (१९६३), 'भक्तिमार्गप्रदीप' (१९६७) अशी धार्मिक पुस्तके लिहिली. 'श्रीसंत गाडगेबाबा' (१९७६) हे चरित्र लिहिले. याशिवाय स्थलवर्णने, प्रवासवर्णने, तल्लख ऐंद्रिय संवेदना, छंद जोपासण्याची वृत्ती, रसिकता, बहुश्रुतता यांची डूब असलेले स्फुटलेखन केले. 'छंद माझे वेगळे' (१९७९), 'दुर्गदर्शन' (१९६९), 'दुर्गभ्रमणगाथा' (१९८४), 'मावळतीचे गहिरे रंग' (अमेरिकेच्या प्रवासवर्णनाची दैनंदिनी १९८८) अशी वाचनीय पुस्तके लिहिली. 'आईची देणगी' (१९४५-१९४८) आणि 'शिवबाचे शिलेदार' (१९५७) ही पुस्तके दांडेकरांनी कुमारांसाठी लिहिली.

दांडेकर हे मराठीतील एक बहुप्रसव लेखक होते. आयुष्यभर लेखनावर उपजीविका करणाऱ्या दांडेकरांनी

आत्मीयता, माणसांविषयी असणारी कळकळ, सत्संस्कारांची आणि भारतीय संतविचार व तत्त्वदर्शनाची तीव्र ओढ या गुणांमुळे दांडेकरांचे लेखन वाचकप्रिय झाले आहे. प्रादेशिक जीवनदर्शनातील सूक्ष्मता, इतिहासाचा भव्य पट उभा करण्याची शक्ती, निसर्गाच्या विभ्रमांचे हृद्य रेखाटन, पशुप्राणी सृष्टीविषयी असलेले आकर्षण, स्त्रियांच्या दुःखाविषयी असणारी अतीव कणव ह्या दांडेकरांच्या व्यक्तिमत्त्व विशेषांमुळे दांडेकरांनी मराठी साहित्यात गुणवान साहित्यकृतींची भर घातली आहे.

दांडेकरांना अनेक पुरस्कारांनी वेळोवेळी सन्मानित करण्यात आले आहे. 'स्मरणगाथे'ला साहित्य अकादमी पुरस्कार, न.चिं.केळकर पारितोषिक आणि आचार्य अत्रे पारितोषिक या पुरस्कारांनी गौरविण्यात आले आहे. महाराष्ट्र राज्य शासनाचे उत्कृष्ट वाङ्मयनिर्मितीचे पुरस्कार 'शितू', 'पडघवली' आणि 'कुणा एकाची भ्रमणगाथा' या पुस्तकांना प्राप्त झाले आहेत. 'मोगरा फुलला' ह्या कादंबरीला सोनोपंत दांडेकर पुरस्कार व शंकरजी नारायण पुरस्कार मिळाले आहेत. दक्षिण महाराष्ट्र साहित्य संमेलन, इंदूर; वाङ्मयपरिषद, बडोदा; शारदोत्सव,

ग्वाल्हेर; औदुंबर साहित्य संमेलन, औदुंबर ह्या संमेलनांचे अध्यक्षपद भूषवणाऱ्या दांडेकरांची १९८१ साली अकोला येथे आयोजित केलेल्या अखिल भारतीय साहित्य संमेलनाच्या अध्यक्षपदी निवड करण्यात आली होती. याशिवाय, महाराष्ट्र शासनाचा गौरव पुरस्कार (१९९०), नागपूर येथील छत्रपती प्रतिष्ठानचा जिजामाता पुरस्कार (१९९०), नारळकर प्रतिष्ठानाचा विद्वत्ता पुरस्कार (१९९२), तळेगाव-दाभाडे नगरभूषण, द्वारकापीठाची साहित्य वाचस्पती आणि पुणे विद्यापीठाची डी. लिट. अशा विविध पुरस्कारांनी, सन्मानांनी आणि पदव्यांनी सन्मानित करण्यात आले.

व्यक्ती आणि लेखक म्हणून महाराष्ट्राच्या संस्कृतीशी पूर्णतः एकरूप झालेल्या दांडेकरांचे निधन पुणे येथे झाले.

– वि. शं. चौधुले

**संदर्भ :**


१. *गोरे दादा; 'गो. नी दांडेकरांची कादंबरी'; प्रतिमा प्रकाशन, पुणे; १९९८.*

२. *बांदिवडेकर चंद्रकांत; 'मराठी कादंबरी चिंतन आणि समीक्षा'; मेहता पब्लिशिंग हाउस, पुणे; १९९६.*

३. *दांडेकर गो. नी.; 'कहाणी मागची कहाणी'; मृण्मयी प्रकाशन, पुणे; २०००.*

४. *देव वीणा; 'आशक मस्त फकीर'; मृण्मयी प्रकाशन, पुणे.*


## दांडेकर, मालती माधव

**कथाकार, कादंबरीकार**

**१३ एप्रिल १९१५ – १४ जानेवारी १९८६**

मालतीबाई दांडेकर या नावाने बहुतेक सर्व लेखन करणाऱ्या या माहेरच्या अंबू बळवंत निजसुरे, मूळच्या धुळ्याच्या होत. त्यांचा जन्म धुळे येथे झाला. लग्नानंतर त्या बुधगाव येथे स्थायिक झाल्या. तत्कालीन परिस्थितीमुळे फक्त इंग्रजी चौथीपर्यंत शिक्षण घेतलेल्या मालतीबाईंनी वयाच्या एकोणिसाव्या वर्षी (१९३०) लेखनास सुरुवात करून पुढच्या पाच दशकांत विविध प्रकारची विपुल साहित्यनिर्मिती केली. त्यांचे सुमारे वीसच्या आसपास कथासंग्रह असून त्यांनी अनेक



कादंबऱ्याही लिहिलेल्या आहेत. त्यांनी बालवाङ्मयही मोठ्या प्रमाणावर लिहिलेले असून, १९७७ साली जळगाव येथे भरलेल्या 'बालकुमार साहित्य संमेलना'च्या त्या अध्यक्षाही होत्या. लोकवाङ्मयाचाही त्यांचा व्यासंग असून त्यांनी १९५२ साली 'लोकसाहित्याचे लेणे' या नावाने स्त्रियांच्या अनेक प्रसंगांवरील ओव्या व गीते संकलित व संपादित केलेली आहेत.

मालतीबाईंच्या कथांमधून सुरुवातीला मोठ्या प्रमाणावर आदर्शवाद दिसून येतो. नंतरच्या कथांमधून विविध विषय हाताळताना त्यांनी आपल्या कथांची अखेर प्रायः सुखाच्या प्रसंगांनी केलेली दिसते. 'मातृमंदिर' (१९४१), 'तेजस्विनी' (१९४३), 'कृष्णरजनी' (१९४७), 'दुभंगलेले जग' (१९६३), 'वास्तू' (१९६५), 'तपश्चर्या' (१९६९), 'भिंगरी' (१९७०), 'अमरप्रीती' (१९८०), 'चक्रवर्ती' (१९८१) या त्यांच्या काही प्रसिद्ध कादंबऱ्या.

त्यांच्या कादंबऱ्या प्रामुख्याने प्रणयप्रधान असल्या, तरी जुन्यानव्याचा समतोल सांभाळणाऱ्या आहेत. त्यांच्या नायिका काळानुरूप बदलणाऱ्या आहेत. त्यांच्या पिढीतील स्त्रियांच्या अनेक प्रश्नांचा मागोवा त्या ताकदीने घेतात. त्यांनी काही नाटकेही लिहिली असून त्यांत 'ज्योती' (१९५५), 'पर्वकाळ ये नवा' (१९६४), 'संगीत संस्कार' (१९६४), 'मावशी दी ग्रेट' (१९८२) ही प्रमुख आहेत. 'ज्योती' हे केवळ स्त्रियांचे असलेले असे नाटक असून त्यातली नायिका ज्योती ही स्वतंत्र विचारांची, सुशिक्षित, कर्तबगार आहे. 'मावशी दी ग्रेट' हे संगीत नाटक असून त्यात सोनू मावशी व देवयानी ही दुहेरी भूमिका असून अशा प्रकारचे स्त्रीने लिहिलेले ते पहिले विनोदी नाटक आहे. त्यांनी साकार केलेल्या 'मराठी कादंबरीतील अष्टनायिका' (१९६१) हे पुस्तकही

द

महत्त्वपूर्ण असून त्यांची अन्य काही पुस्तकेही वेगळेपणासाठी प्रसिद्ध आहेत.

त्यांनी बालकुमारांसाठी ११५ पुस्तके लिहिली असून 'बालमनाला स्पर्श करणारी व त्यांच्या जीवनावर सुसंस्कार करणारी स्फूर्तिदायक रचना म्हणजे बालवाङ्मय' ही त्यांनी केलेली व्याख्या व्यापक आहे.

– मधू नेने

**संदर्भ :**


१. *'मराठी वाङ्मयाचा इतिहास' खंड ७ भाग; महाराष्ट्र साहित्य परिषद, पुणे; २००१.*

२. *जोशी अनंत लक्ष्मण, संपादक; 'मराठी सारस्वत', खंड १; रसिक साहित्य, पुणे.*


## दांडेकर, शंकर वामन

☞ **मुख्य नोंद – धर्मकारण खंड**

द

## दातार, मुकुंद रघुनाथ

**समीक्षक, संपादक, कवी, संतसाहित्याचे अभ्यासक**

**२ सप्टेंबर १९४३**



चार उत्कृष्ट समीक्षा ग्रंथ, चार दर्जेदार संपादन ग्रंथ, एक कविता संग्रह आणि अनेक अभ्यासपूर्ण लेख ज्यांच्या नावावर आहेत व ज्यांची नाममुद्रा सांगली आकाश-वाणीवरील निरूपणात्मक कार्यक्रमाने घरोघर पोचलेली आहे, असे डॉ. मुकुंद रघुनाथ दातार वारणानगर महाविद्यालयामध्ये ३४ वर्षे प्राध्यापक व ३ वर्षे प्राचार्य म्हणून कार्य करून सेवानिवृत्त झाले. सध्या त्यांचे वास्तव्य पुण्यात असून गीता धर्म मंडळाच्या मासिकाचे संपादक म्हणून कार्यरत आहेत.

कोल्हापूर विद्यापीठातून त्यांनी 'एकनाथाची काव्यसृष्टी एक अभ्यास' या विषयावर प्रबंध लिहून १९८१ साली पीएच.डी. पदवी प्राप्त केली. संतसाहित्याचे थोर अभ्यासक प्रा. पां. ना. कुलकर्णी यांचे त्यांना मार्गदर्शन लाभले. हा प्रबंध समीक्षाग्रंथ रूपात प्रकाशितही झालेला आहे. संत एकनाथांच्या भक्तिरसाविष्काराचे स्वरूप व भक्तीविषयक संकल्पना यांचे मधुसूदन सरस्वती व रूप गोस्वामी यांच्या विवेचनाशी कोणते साम्य आहे व नाही याचा साधार शोध डॉ. दातार यांनी आपल्या पीएच.डी. प्रबंधात घेतलेला आहे.

'संतकवी एकनाथ', 'तुका म्हणे', 'स्मरण केशवसुतांचे' आणि 'वारकरी संप्रदायाची प्रस्थानत्रयी' हे चार समीक्षा ग्रंथ तसेच 'ज्ञानेश्वरी १२वा अध्याय', 'कवी सुधांशु यांची कविता', 'वेचक एकनाथी अभंग' आणि 'मध्ययुगीन धर्मसंप्रदायी वाङ्मय' असे ४ दर्जेदार संपादन ग्रंथ आणि 'भावमुद्रा' नावाचा कविता-संग्रह अशी डॉ. दातार यांची ग्रंथसंपदा आहे.

डॉ. दातार यांना त्यांच्या विविध ग्रंथलेखनाबद्दल व वक्तृत्वाबद्दल ज्ञान प्रबोधिनीचा मातृमंदिर पुरस्कार, पुणे नगरवाचन मंदिराचा उत्कृष्ट ग्रंथ पुरस्कार, पु. भा. भावे स्मृती वक्तृत्व पुरस्कार, समर्थ रामदास स्वामी पुरस्कार (सांगली) आणि नाथदास पुरस्कार (पुणे) असे पुरस्कार मिळालेले आहेत.

डॉ. दातार यांच्या मार्गदर्शनाखाली ३ विद्यार्थ्यांनी पीएच.डी.साठी प्रबंध-लेखन केले असून तिघांनाही पीएच.डी. मिळालेली आहे. पैकी दोघांचे प्रबंध ग्रंथरूपाने प्रकाशितही झालेले आहेत.

वारणानगर परिसराचा कायापालट करणारे सहकार महर्षी कै. तात्यासाहेब कोरे यांच्या 'मी एक कार्यकर्ता' या आत्मकथनाचे सुरेख शब्दांकन डॉ. दातार यांनी केलेले आहे. वारणानगरच्या शैक्षणिक-सांस्कृतिक कार्यात यांचा सक्रिय सहभाग आहे. अध्ययन, अध्यापन, समीक्षण, संशोधन, मार्गदर्शन अशा विविध अंगांनी त्यांनी मराठी साहित्याची भरघोस सेवा केलेली आहे.

त्यांच्या ग्रंथांना डॉ. हे. वि. इनामदार, प्रा. पां. ना. कुलकर्णी, कवयित्री शांताबाई शेळके, डॉ. सदानंद मोरे या मान्यवरांच्या सुंदर प्रस्तावना लाभलेल्या आहेत.

''व्यासंगातून येणारी वस्तुनिष्ठ दृष्टी आणि सहृदयतेतून लाभणारी समरसता हे डॉ. दातारांचे स्पृहणीय विशेष आहेत'', अशा शब्दांत डॉ. इनामदारांनी दातारांच्या संपादनाविषयी आपले मत व्यक्त केलेले आहे तर डॉ. सदानंद मोरे म्हणतात, ''आस्वादक समीक्षेत सहृदयता आणि चिकित्सा यांचा समन्वय असावा लागतो. डॉ. दातारांच्या लेखनात तो आहे.''

– विद्याधर मा. ताठे

## दाते, यशवंत रामकृष्ण

☞ **मुख्य नोंद – पत्रकारिता आणि ललितेतर साहित्य खंड**

## दाते, शंकर गणेश

☞ **मुख्य नोंद – पत्रकारिता आणि ललितेतर साहित्य खंड**

## दामले, कृष्णाजी केशव

☞ **केशवसुत**

## दामले, सीताराम केशव

**पत्रकार, कादंबरीकार**

**१८७८ – १९२७**



सीताराम केशव दामले यांचा जन्म रत्नागिरी जिल्ह्यातील खेड येथे झाला. सुप्रसिद्ध कवी केशवसुत व व्याकरणकार मोरो केशव दामले यांचे हे बंधू होत. हे मुंबईच्या विल्सन महाविद्यालयातून बी. ए. झाल्यावर 'फेलो' या नात्याने तेथेच काम करीत होते. याच काळात त्यांनी एल्‌एल. बी. चा अभ्यास केला. पुण्याच्या फर्गसन महाविद्यालयात काही दिवस प्राध्यापक म्हणून काम केल्यानंतर ते 'ज्ञानप्रकाश'च्या संपादक मंडळात प्रविष्ट झाले. वंगभंग चळवळीने राष्ट्रभर चैतन्य पसरविले होते. लोकभावना सतत जागृत व उत्तेजित राखण्यासाठी मुंबईसारख्या शहरी एखादे दैनिक असावे, असे राष्ट्रीय पक्षाला वाटत होते. लोकमान्य टिळकांना या गोष्टीची पुरेशी जाण असल्याने त्यांनी या नव्या दैनिकाची धुरा दामलेंवर सोपवली व १९०८ साली मुंबई येथे 'राष्ट्रमत' दैनिकाचे काम सुरू झाले. सरकारी दडपशाहीमुळे हे दैनिक दोन वर्षांनी बंद पडले. या अल्पकाळातही 'राष्ट्रमता'ने आपली कामगिरी कौतुकास्पद रितीने पार पाडली. यानंतर दामले पुण्यास गेले व वकिली करू लागले. 'राष्ट्रोदय' नावाचे मासिकही त्यांनी काही काळ चालविले. ते 'चित्रमयजगत'मध्ये 'महायुद्धाची स्थित्यंतरे' या सदरात माहितीपूर्ण लेख लिहीत.

दामले यांनी 'जग हे त्रिविध आहे' व 'न्याय की अन्याय' या सामाजिक आणि 'दोनशे वर्षांपूर्वी' व 'वसईचा रणसंग्राम' या ऐतिहासिक कादंबऱ्या लिहिल्या. त्यांच्या या लेखनावर टिळकपंथीय सामाजिक व राजकीय विचारसरणीची चांगली छाप आहे. राजकारणाची आवड असणारे दामले क्रियाशील असल्याने त्यांनी 'राजकारण' हे साप्ताहिक १९१८ साली पुण्यात काढले. असहकारितेच्या चळवळीत या साप्ताहिकाने चांगलीच कामगिरी बजावली. पुढे मुळशी सत्याग्रहात सहभागी झाल्याने त्यांना कारावास भोगावा लागला आणि हे साप्ताहिक बंद पडले. कारावासातील श्रम त्यांना झेपत नसत. त्यांची प्रकृती नंतर खालावत गेली व १९२७ साली पुणे येथे त्यांचे निधन झाले. दामले यांनी प्रसंगोपात काव्यदेवीचीही उपासना केली. त्यांच्या विनोदी वृत्तीचा नमुना 'वाचाळरावाचे विचित्र अनुभव' (१९१२) या पुस्तकात मिळतो.

याशिवाय दामले यांनी 'टॉम्स् कार्लाईल' (१९०३), 'तुरुंगाचे कोठडीतून' (१९२३), 'महात्मा गांधी' (१९२४), 'सभा, अध्यक्ष व सभासद' (१९२७), 'घरचा कायदा' (१९२७), 'पुराव्याचा ॲक्ट' अशी पुस्तके लिहिली.

– वि. ग. जोशी

**संदर्भ :**
१. *खानोलकर गं. दे.; 'अर्वाचीन मराठी वाङ्मयसेवक', खंड-२; १९३८.*
२. *नेने वि. पां.; प्रकाशक; 'अर्वाचीन मराठी साहित्य', १८७५ ते १९३५.*

## दावतर वसंत केशव

**समीक्षक**

**२७ ऑगस्ट १९२५ - १८ मार्च २००४**



वसंत केशव दावतर यांचा जन्म कोकणात मालवण जवळील मालडी येथे झाला. मुंबईच्या रुईया महाविद्यालया-मधून बी.ए., पुढे एम.ए. केले. प्रा. न. र. फाटक यांचे ते विद्यार्थी होते. प्रारंभीच्या काळात 'मौज' साप्ताहिकात काही लेखन केले. 'मृत्यूतील अज्ञातवास' (१९५०) व 'रंग ओला आहे' (१९४९, साहाय्यक ज. द. देवकुळे) अशा रहस्यकथा लेखनाने सुरुवात झाली. 'रहस्यरंजन'शी निगडित होते. नंतर त्यांनी १९६२ साली 'आलोचना' या केवळ समीक्षेला वाहिलेल्या मासिकाचे संपादन केले (सप्टेंबर १९६२ ते ऑगस्ट १९९१). असे असले तरी पहिल्या वर्षी ललित व अनुवादित लेखन प्रसिद्ध केले आहे.

मुंबई मराठी साहित्य संघाचे 'साहित्य' हे नियतकालिक (१९४७ ते १९५२, संपादक वा. रा. ढवळे) बंद पडले होते. ते १९५६ व १९५७ साली त्यांनी वार्षिक विशेषांकांच्या स्वरूपात प्रसिद्ध केले व तत्कालीन कथा, कादंबरी, कविता, समीक्षा इत्यादी विषयांवर मान्यवरांचे लेख तेव्हा मिळवून प्रकाशित केले होते. के. जे. सोमय्या कला, विज्ञान महाविद्यालयात मराठीचे प्राध्यापक आणि विभाग प्रमुख म्हणून त्यांनी दीर्घकाळ काम केले. १९८५ साली ते त्या पदावरून निवृत्त झाले.

**आलोचना**

मराठी साहित्य समीक्षेत 'आलोचना' मासिकाचे लक्षणीय योगदान आहे. तसे प्रा. स. शि. भावे यांनी स्पष्टपणे बोलूनही दाखवले होते. ग्रंथसमीक्षा, वाङ्मयेतिहास लेखन, नाट्यसमीक्षा, संशोधन, भाषा व व्याकरणविषयक लेखन, नियतकालिक विचार, ज्ञानपीठ पारितोषिके अशा विविध विषयांसंबंधी त्यांना आस्था होती. महाविद्यालयीन व विद्यापीठीय पातळीवरील मराठी विषयाच्या अध्यापनासंबंधी व अभ्यासक्रमासंबंधी त्यांनी 'आलोचना'तून लेखन प्रसिद्ध केले आहे. 'आलोचना'च्या ५व्या, १०व्या, १५व्या आणि २०व्या वर्षानिमित्ताने त्यांनी 'संवादिता' प्रसिद्ध केल्या होत्या. वेगवेगळ्या विषयांवर आलोचनाचे विशेषांकही त्यांनी प्रसिद्ध केले होते. साहित्यकलांकडे पाहण्याची त्यांची भूमिका कला-स्वातंत्र्यवादी होती. बा. सी. मर्ढेकर यांच्या सौंदर्यवादी भूमिकेचा पुरस्कार ते करीत. कमल देसाई, विजय तेंडुलकर व गंगाधर गाडगीळ यांच्या काही कृतींची त्यांनी विस्तृत परीक्षणे लिहिली होती.

समीक्षेइतकाच त्यांना भाषाविज्ञानात व व्याकरणात रस होता. 'फर्दिन द सस्यूर' या प्रख्यात भाषावैज्ञानिकाच्या विचारांचा त्यांनी सूक्ष्मतेने अभ्यास केला होता. प्रत्यक्ष लेखनाबरोबरच वाङ्मयीन स्वरूपाची चर्चासत्रे घडवून आणण्यात त्यांना विलक्षण आस्था होती. अशाच एका चर्चासत्रातून त्यांनी 'मराठी टीका' (१९६६) हे पुस्तक संपादन करून प्रसिद्ध केले होते. केशवसुतांच्या जन्मशताब्दीच्या निमित्ताने 'केशवसुत गाउनि गेले' (१९६६) हे संपादन केले. खेरीज 'गीतकाव्य' (१९७१) या विशिष्ट काव्य प्रकारावरील पुस्तकही त्यांनी संपादित केले होते. महाविद्यालयीन प्राध्यापकांना, विद्यार्थ्यांना व जिज्ञासू अभ्यासकांना उपयुक्त ठरावे अशा वेगवेगळ्या विषयांवर त्यांनी 'आलोचना'चे विशेषांकही प्रसिद्ध केले आहेत. 'कुसुमाग्रज' (मे १९६४), 'केशवसुत' (ऑक्टोबर-डिसेंबर १९६६), 'श्री. कृ. कोल्हटकर' (नोव्हेंबर-डिसेंबर १९७१), 'पु. भा. भावे' (नोव्हेंबर १९७७),

द

'श्री. म. माटे' (ऑगस्ट १९८७), 'गीतकाव्य' (सप्टेंबर- ऑक्टोबर-नोव्हेंबर १९६९), 'वारकरी' (फेब्रुवारी-मार्च १९७१) 'शोकसंवेदन नाटक' (मार्च-एप्रिल १९७२), 'लघुकथा' (ऑक्टोबर-नोव्हेंबर १९७३) 'रंजनिका' (मार्च १९७५), 'कविता' (ऑगस्ट १९९०), विद्यापीठ स्तरावर 'मराठीचा अभ्यासक्रम', 'बालवाङ्मय', 'महाराष्ट्र आणि मराठी विशेषांक', 'ज्ञानपीठ पारितोषिके व जागतिक कविता उत्सव' हे ते विशेषांक होत. याशिवाय 'टिळक आणि आगरकर' या नाटकावर चर्चा करणारे तीन लेख त्यांनी एकत्र प्रसिद्ध करून एक स्वतंत्र अंकही प्रकाशित केला होता.

'संहिता, समीक्षा आणि पारिभाषिक संज्ञा' (१९९४), 'मराठीचे शिक्षण' (१९९४), 'मराठी शुद्धलेखन' (१९९४), 'तेंडुलकरांची नाट्यप्रतिभा' (२००४) ही त्यांची पुस्तके त्यांचा वेगवेगळ्या विषयांचा अभ्यास व त्यातील जाणकारी स्पष्ट करणारी आहेत.

शेवटची काही वर्षे त्यांनी 'मराठी संशोधन मंडळा'चे संचालक म्हणून काम पाहिले. तेव्हाही मध्ययुगीन मराठी साहित्यावर त्यांनी परिसंवाद आयोजित केला आणि आपल्या परीने 'मराठी संशोधन पत्रिका' ह्या नियतकालिकाला आकार देण्याचा प्रयत्न केला. अ. का. प्रियोळकर यांच्या जन्मशताब्दीनिमित्ताने 'संशोधन मंडळा'च्या विद्यमाने त्यांनी संशोधनपर विषयांवर तज्ज्ञांची व्याख्याने वर्षभर आयोजित केली.

'नवशक्ती'मध्ये त्यांनी चालवलेल्या 'निर्विवाद' या सदरातील लेखन त्यातील युक्तिवादपटुत्वामुळे व विषयावरील निःसंदिग्ध प्रभुत्वामुळे महत्त्वाचे ठरले होते.

– सुखदा कोरडे

**संदर्भ :**

*१. पाध्ये दिगंबर; 'सकाळ'; २८ मार्च २००४.*
*२. खोले विलास; 'ललित'; एप्रिल २००४.*
*३. वडेर प्रल्हाद; 'नवशक्ती'; २८ मार्च २००४.*
*४. पुंडे द. दि; 'लोकसत्ता'; २१ मार्च २००४.*
*५. बांदिवडेकर चंद्रकांत; 'तरुण भारत'; ४ एप्रिल २००४.*

## दिघे, रघुनाथ वामन

**कादंबरीकार, कथाकार**

**२४ एप्रिल १८९६ – ४ जुलै १९८०**



रघुनाथ वामन दिघे यांचा जन्म कल्याण शहरात झाला. वडिलांची फिरतीची नोकरी असल्यामुळे कर्जत, खोपोली, जळगाव, चाळीसगाव, सोलापूर, अहमदनगर, रत्नागिरी अशा विविध शहरांत त्यांचे प्राथमिक व माध्यमिक शिक्षण झाले. १९२२ मध्ये पुणे येथून त्यांनी बी. ए. ची पदवी मिळवली. १९२५ साली ते पुण्याहून एलएल. बी. झाले. वकिलीची सनद घेऊन त्यांनी वकिलीचा व्यवसाय सुरू केला. पण या व्यवसायात ते फार काळ रमले नाहीत. वकिली सोडून शेती करण्यासाठी खोपोलीजवळच्या विहारी या आपल्या गावी ते गेले. १९४३ नंतरचे त्यांचे सारे लेखन त्यांच्या शेती व्यवसायाशीच संबंधित असल्याचे जाणवते. आयुष्यभर एका हातात लेखणी व दुसऱ्या हातात नांगर घेऊनच हा लेखक जगला.

१९०७च्या जळगाव साहित्य संमेलनात 'बालकवी' म्हणून त्र्यं. बा. ठोंबरे यांचा गौरव झालेला पाहिला, तेव्हापासून दिघ्यांना कविता करण्याचा छंद जडला; पण तेव्हा केलेल्या कवितांना त्यांनी प्रसिद्धी दिली नाही. १९३९ साली प्रसिद्ध झालेली 'पाणकळा' ही त्यांची पहिली कादंबरी; मात्र त्यापूर्वी त्यांच्या काही कथा 'किर्लोस्कर' मासिकातून प्रसिद्ध झाल्या होत्या. 'पाणकळा' प्रसिद्ध झाली तो काळ फडके, खांडेकर, माडखोलकर यांच्या लोकप्रियतेचा काळ होता. त्यांच्या कादंबऱ्या प्रामुख्याने मध्यमवर्गीय समाजाशी संबंधित होत्या. अशा काळात मध्यमवर्गाची कोंडी फोडीत लेखन करण्याची जिद्द बाळगून दिघ्यांनी 'पाणकळा' लिहिली. सद्वर्तनी भुजबा व दुर्वर्तनी रंभाजी यांच्यातील संघर्षात शेवटी भुजबाचा नैतिक विजय होतो, ही या कादंबरीची मध्यवर्ती कल्पना होती. पण

द

तिला प्रकाशक मिळेना तेव्हा दिघ्यांनी स्वतःच्या पैशांनी ती प्रकाशित केली.

बालकवी, बहिणाबाई चौधरी, गोविंदाग्रज हे त्यांचे आवडते कवी होते. पुण्यात त्यांची बालकवी आणि गोविंदाग्रज यांच्याशी गट्टी जमली होती. त्यातूनच त्यांना लेखनाची आवड निर्माण झाली. ग. ल. ठोकळ हे त्यांचे जवळचे मित्र आणि प्रकाशकही होते. १९०९ साली त्यांनी टेनिसनच्या 'बर्डीज' या कवितेचा 'सानपाखरे' या नावाने केलेला अनुवाद उपलब्ध आहे. दिघे यांच्या एकूण ९ कादंबऱ्या प्रकाशित झाल्या. त्यांची दहावी कादंबरी अपूर्ण होती, ती त्यांच्या मुलींनी नंतर पूर्ण केली. याशिवाय कथा, नाटक या प्रकारांतही त्यांनी लेखन केले. १९४० मध्ये लिहिलेली 'वसंतराव आणि चाळीस चोर' ही त्यांची गुप्त पोलीस चातुर्यकथांवर आधारित कादंबरी होय. यापूर्वी मराठीतील गुप्त पोलीस चातुर्यकथा प्रामुख्याने भाषांतरित असत. दिघ्यांनी मात्र या कादंबरीची रचना स्वतंत्रपणे केली होती. पुणे येथे फौजदारी वकिली करीत असताना आलेल्या एका अनुभवातून कादंबरीचे लेखन झाले.

१९४३ सालची 'सराई' ही दिघ्यांची सर्वाधिक लोकप्रिय कादंबरी. ग्रामीण वास्तव आणि कल्पनारम्यता यांचे अपूर्व मिश्रण यात आहे. त्यांच्या विहारीतील वास्तव्यात ह्या व ह्यानंतरच्या कादंबऱ्यांचे लेखन झाले. जमीनदार बाप्पाजी- त्यांचे कुळांशी असलेले संबंध, त्यांच्या शहरात शिकणाऱ्या मुलाचे- मनोहरचे गावातील लाडी या तरुणीवर असलेले प्रेम व त्याला बाप्पाजींचा विरोध- ही या कादंबरीची मध्यवर्ती कल्पना आहे. १९४६ सालची 'निसर्गकन्या रानजाई' ही कादंबरी पूर्णपणे कल्पित आहे. संस्कृत आणि काव्यांचे रचनाविशेष व वर्णसंकेत स्वीकारून ही कादंबरी त्यांनी लिहिली. अद्‌भुतरम्य घटनांचा वापर करून या कादंबरीची रहस्यमयता दिघ्यांनी वाढविली आहे. १९४७ साली लिहिलेल्या 'गानलुब्धा मृगनयना' या कादंबरीचे स्वरूप 'हिस्टॉरिकल रोमान्स'सारखे आहे. इतिहासाचा नाममात्र आधार घेऊन रचलेली कल्पित कथा असे तिचे स्वरूप आहे. ग्वाल्हेर, महुवाचा निसर्गरम्य परिसर कादंबरीची खुलावट वाढवतो. तोमर राजा मानसिंह व त्याची प्रेयसी मृगनयना यांची प्रणयकथा म्हणजे ही कादंबरी होय. 'आई आहे शेतात' ही १९५६ मधली कादंबरी ग्रामीण जीवनातील बदलते वास्तव दाखवते. गावातील एक शेत 'साखरपट्टी' हीच या कादंबरीचा केंद्रबिंदू आहे. माणसाचे व निसर्गाचे प्रेमाचे तसेच वैराचेही नाते, हळूहळू उद्‌ध्वस्त होत चाललेली ग्रामीण समाजरचना, यांच्या संदर्भात नानू सातपुते, भिमा, दादाजी, अंजना अशा अनेक व्यक्तींच्या आयुष्याचे प्रवाह दाखवीत जाणारी ही कादंबरी आहे. १९५० सालच्या 'पड रे पाण्या' या कादंबरीत संतू मगर ह्या संतसंगतीत रमणाऱ्या शेतकऱ्याचे जीवन-दर्शन घडते. संतूवर सातत्याने कोसळणारी संकटे, गावातील खलपुरुषाकडून होणारी छळणूक, जीवनसंघर्षात प्रतिकूल शक्तींशी झगडत ताठ मानेने उभे राहण्याचा त्याचा प्रयत्न, यांबरोबरच निसर्गाशी होणाऱ्या संघर्षाचे वास्तव चित्रण आणि निसर्ग व मानव यांच्यातील सनातन संघर्षाची ही कथा होय.

'कार्तिकी' ही दिघ्यांची १९६६ मधली कादंबरी असून डॉ. आंबेडकरांनी दलितांच्या जीवनात जो चैतन्यप्रवाह खेळविला, धर्मांतराचा जो जीवनमंत्र दिला त्या पार्श्वभूमीवर दलितांच्या जाणिवा, त्यांची मनःस्थिती, त्यांच्यावर होणारे अन्याय व अत्याचार यांचे चित्रण या कादंबरीत आहे. १९७८ मधील 'सोनकी' ही आदिवासी जीवनाची पार्श्वभूमी असलेली कादंबरी कातकर व ठाकर जमातींच्या जीवनाचे चित्रण करते. त्याचबरोबर यंत्रयुगामुळे होणारे प्रदूषण, शहरी संस्कृतीचा वन्यजीवनावर होणारा प्रतिकूल परिणाम यांचे प्रत्ययकारी चित्रण या कादंबरीत दिघ्यांनी केले आहे.

या कादंबऱ्यांखेरीज दिघे यांचे ७ कथासंग्रह प्रसिद्ध झाले असून त्यांपैकी 'पूर्तता' (१९४४), 'रम्य रात्री' (१९४४), 'ताजमहाल', 'आसरा', 'पावसाचे पाखरू' हे गाजलेले कथासंग्रह आहेत. याशिवाय १९४४ साली त्यांनी 'माझा सबूद' हे नाटक व १९४९ साली 'गातात न् नाचतात धरतीची लेकरं' हा काव्यसंग्रह प्रकाशित केला.

द

**निसर्ग सहवास**

दिघे यांनी आपल्या साहित्यातून ग्रामीण जीवन व त्यातील प्रश्न हाताळताना चित्तथरारक प्रसंगांना ग्रामीण निसर्गाच्या प्रत्ययकारी चित्रणाची जोड दिली. पकड घेणारा संघर्ष व रसरशीत शरीरप्रणय यामुळे त्यांच्या कादंबऱ्या आकर्षक ठरल्या. त्यांच्या साहित्यातील सर्वच व्यक्तिरेखांना कृषिसंस्कृतीचा अस्सल स्पर्श आहे. डोंगरदऱ्या, पहाड, वनराई, शेती यांच्यात मनाने व शरीराने गुंतून असणारी गावरान माणसे त्यांच्या कादंबऱ्यांत जिवंत होतात. कोरडवाहू जमिनीतील शेती, खेड्यातील अस्पृश्यतेचा प्रश्न, कूळकायद्यानंतर जमीनदार व कुळे यांच्यातील बिघडलेले संबंध, हे विषय दिघ्यांनी मनःपूर्वक, समरसून हाताळले आहेत. दिघ्यांची जीवनदृष्टी काहीशी स्वप्नाळू, स्वच्छंदतावादी-रोमँटिक आहे. त्यामुळे वास्तव, यथातथ्य चित्रण करतानाही त्या वास्तवतेकडे ते काव्यपूर्ण दृष्टीने पाहतात, त्यामुळे त्यांचे लेखन एकाच वेळी वास्तववादी आणि स्वप्नरंजनात्मकही आहे.

एकांतात रमणे हा दिघ्यांचा स्वभावधर्म असल्यामुळे ते चाळीसहून अधिक वर्षे शेतीत व निसर्ग सहवासात रमले. साहित्यिक वर्तुळात, सभा-संमेलनांत ते फारसे रमत नसत. त्यांनी स्वतःला कोणत्याही साहित्यिक प्रवाहाशी जोडून घेतले नव्हते. ग्रामीण जीवनातील वास्तव, शेतीच्या सर्व अवस्थांचे तपशील यांवर त्यांची पक्की पकड होती. सुष्ट आणि दुष्ट यांच्यातील नाट्यपूर्ण संघर्ष, भुरळ घालणारे सौंदर्य यांचे त्यांना विलक्षण आकर्षण होते. डिकन्सच्या विश्वाप्रमाणे त्यांचे जग माणसांनी गजबजलेले असले, तरी निसर्गाच्या सान्निध्यात एकट्याने बेहोषीत भटकण्याचा आनंदही ते वाचकांना देत. वाचकाला भुरळ घालण्याचे, धुंद करून टाकण्याचे सामर्थ्य त्यांच्या लेखनात होते. त्यांच्या कथानक रचनेत प्रसंगवर्णनाला महत्त्वाचे स्थान होते. कथानक मनोरंजक व्हावे म्हणून सुंदर नायक-नायिका, चित्ताकर्षक समर प्रसंग, प्रणय प्रसंग यांची अचूक योजना त्यांच्या कादंबऱ्यांतून आढळते. लाडी, मृगनयना, सोनकी, गोजरा या त्यांच्या साऱ्या नायिका लावण्यसंपन्न आहेत. ग्रामीण जीवन ज्यांना अपरिचित आहे, अशा वाचकांसाठी आपले लेखन आहे, ही जाणीव त्यांच्या मनात सतत जागी होती. त्यामुळे कथानक या घटकास त्यांच्या कादंबरीत केंद्रवर्ती स्थान प्राप्त झालेले दिसते. तसेच सुष्टांना काव्यात्म न्याय दिलेला त्यांच्या बहुतेक कादंबऱ्यांतून दिसतो.

व्यक्तिगत जीवनात दिघे यांना गायन-वादन ऐकणे, पोहणे, शिकार करणे, पक्षी निरीक्षण, आकाश निरीक्षण, निसर्ग निरीक्षण करीत भटकंती करणे, हे त्यांचे छंद होते. अद्‌भुत किस्से व कथा सांगणे त्यांना आवडे. प्रसिद्धीपराङ्मुख असल्यामुळे ते प्रत्यक्ष लोकांसमोर फारसे येत नसत.

चाळीस हून अधिक वर्षे शेतीत रमल्यामुळे त्यांचा सर्व गौरव शेतीमुळेच झाला. सुधारित शेती करून ‘प्रगतिशील शेतकरी’ हा नावलौकिक त्यांनी मिळवला होता. ‘अधिक धान्य पिकवा’ मोहिमेस त्यांनी सक्रिय साहाय्य केले म्हणून १९५२, १९५३, १९५४, १९५५ अशी ओळीने चार वर्षे कुलाबा जिल्ह्यातर्फे त्यांचा गौरव झाला होता. खोपोली परिसरात अस्पृश्यता निवारण, साक्षरता प्रसार या सामाजिक कार्यांत त्यांचा महत्त्वाचा सहभाग असे.

त्यांनी एके ठिकाणी स्वतःविषयी लिहिले आहे, ‘मी स्वतः मोठा साहित्यिक नाही, पण जन्मभूचे ऋण थोड्याबहुत प्रमाणात फेडण्याचा मी प्रयत्न केला आहे. मी ‘वेडेवाकुडे’ गायिलो पण माझ्या जिवलग महाराष्ट्रा मी स्वतंत्र मराठ्याचा बाणा दाखवीत तुझाच म्हणवीत आलो.’

ग्रामीण कादंबरीच्या इतिहासात दिघ्यांचे स्थान निर्विवादपणे महत्त्वाचे आहे. मराठी कथात्मक साहित्यात ग्रामीण व प्रादेशिक साहित्यनिर्मितीचा नवा आणि समृद्ध प्रवाह निर्माण करण्याचे श्रेय दिघ्यांच्या ग्रामीण कादंबऱ्यांकडेच निःसंशयपणे जाते. आज दिघे हयात नसले, तरी त्यांचे साहित्य अनेक पिढ्यांना भुरळ घालीत राहील हे निश्चित.

दिघे यांच्या कादंबऱ्यांवर मराठी व हिंदी या दोन्ही भाषांमध्ये चित्रपट निर्माण झाले आहेत. 'पाणकळा' कादंबरीवर 'मदहोश' हा हिंदी, 'धरतीची लेकरं' हा मराठी व 'कार्तिकी कादंबरीवर 'कार्तिकी' हा मराठी असे चित्रपट निघाले असून 'कार्तिकी' चित्रपटास भारत सरकारचे उत्कृष्ट निर्मितीचे पारितोषिक मिळाले आहे.

– सविता टांकसाळे

**संदर्भ :**

*१. गाडगीळ गंगाधर; महाराष्ट्र टाइम्स; १३ जुलै १९८०.*

## दिवाकर

***गर्गे, शंकर काशीनाथ***

☞ **मुख्य नोंद – नाटक खंड**

## दिवाकर कृष्ण

***केळकर, दिवाकर कृष्ण***

**कथाकार, ज्योतिषी**

**१९ ऑक्टोबर १९०२ – ३१ मे १९७३**



मूळ गाव मिरजेजवळ गणेशवाडी. वडील वैदिक पंडित व ज्योतिषी. वडील तरुण वयात हैद्राबादमध्ये स्थायिक झाले होते. त्यांना निजाम सरकारकडून 'विद्वान शास्त्री' म्हणून तनखा मिळत होता. दिवाकर कृष्णांचे इंग्रजी पाचवीपर्यंतचे शिक्षण हैद्राबादच्या 'वैदिक धर्म प्रकाशिका' या खासगी शाळेत झाले. पुढे सांगलीला येऊन १९२० साली सांगली हायस्कूलमधून मॅट्रिक झाले. १९२४ साली पुण्याच्या 'न्यू पूना कॉलेज'मधून (एस.पी. महाविद्यालयामधून) संस्कृत विषयाची बी.ए.ची पदवी मिळवली. १९३० साली पुण्याच्या विधी महाविद्यालयामधून एलएल.बी. झाले. पुढे हैद्राबादला येऊन वकिलीचा व्यवसाय सुरू केला. १९४४ पासून १९५६ पर्यंत हैद्राबाद नगरपालिकेचे कायदेविषयक सल्लागार म्हणून काम केले. निजामाच्या संस्थानात वास्तव्य असल्याने उर्दू व हिंदी भाषा उत्तम अवगत. संस्कृत भाषा व साहित्य यांचा चांगला अभ्यास. इंग्रजी व फ्रेंच या भाषांतील कादंबऱ्या, इंग्रजी रोमँटिक कविता, टागोर, प्रेमचंद, टॉलस्टॉय यांचे साहित्य व बंगाली कादंबऱ्या यांचाही त्यांच्यावर प्रभाव पडला होता. त्यांच्या कथालेखनात यांचे ठसे उमटलेले दिसतात. दिवाकर कृष्णांनी १९५० साली मुंबई येथे भरलेल्या तेहेतिसाव्या महाराष्ट्र साहित्य संमेलनातील, शाखा–संमेलनातील कथा–शाखा संमेलनाचे अध्यक्षपद, तसेच १९५४ च्या लातूरच्या मराठवाडा संमेलनाचे अध्यक्षपद भूषविले होते. त्यांचे प्रमुख साहित्य अशा प्रकारे आहे कथा संग्रह: 'समाधी व इतर सहा गोष्टी' (१९२७), 'रूपगर्विता आणि सहा गोष्टी' (१९४१), 'महाराणी आणि इतर कथा' (१९५५) या तीन कथासंग्रहांत एकूण २१ कथा आहेत. कादंबरी: 'किशोरीचे हृदय' (१९३४) व 'विद्या आणि वारुणी' (१९४४) आणि नाटक : 'तोड ही माळ अर्थात गंगालहरी' (१९३४) तसेच दोन अध्यक्षीय भाषणे व काही समीक्षात्मक लेख.

**नवे वळण**

दिवाकर कृष्णांनी कथा, कादंबरी, नाटक हे तीनही वाङ्मयप्रकार हाताळले असले, तरी त्यांची खरी प्रसिद्धी कथालेखक म्हणूनच आहे. ही कथा आशय आणि अभिव्यक्ती या दोन्ही अंगांनी मराठी कथेला नवे परिमाण मिळवून देणारी आणि मराठी कथेला नवे वळण देणारी ठरली. हरिभाऊ आपटे यांच्या 'स्फुट गोष्टी'च्या रूपाने मराठी कथा अवतरली. आपल्या 'करमणूक'मधून त्यांनी आपल्याच 'आजकालच्या गोष्टी'बरोबर, त्या प्रसिद्ध करण्यास सुरुवात केली. या गोष्टी आकाराने त्यांच्या कादंबरीपेक्षा लहान असल्या, तरी कादंबरीपासून त्यांची नाळ पूर्णपणे तुटलेली नव्हती. सामाजिक आणि बोधवादी अशी ही कथा, पुढे नारायण हरी आपटे यांनी त्याच मार्गावरून पुढे नेली. वि.सी. गुर्जर यांनी मोठ्या प्रमाणात कथालेखन केले. त्यांची कथा बोधवादापेक्षा निखळ रंजन करण्याच्या

हेतूने लिहिलेली आहे. त्यांच्या कथांची रचना हलकीफुलकी आहे. मात्र ही कथाही आधीच्या मराठी कथेप्रमाणेच ऐसपैस, काहीशी पाल्हाळीक आहे.

या पार्श्वभूमीवर दिवाकर कृष्णांची कथा, अगदी वेगळी ठरते. चटकन दिसणारा फरक म्हणजे, कथेची लांबी. त्यांची कथा आकाराने अगदी छोटी. पूर्वकथाकारांचे संस्कार त्यांच्या कथेवर कुठेही दिसत नाहीत. आशयातील आत्मनिष्ठता आणि अभिव्यक्तीमधील तंत्रशुद्धता त्यांच्या कथेत प्रथम दिसते. तत्कालीन रोमँटिक प्रवृत्तीचा प्रभाव त्यांच्या कथेमध्ये जाणवतो. आपल्या अनुभवविश्वातून स्फुरलेली, आत्ममग्न अशी ही कथा आहे. एककेंद्री अनुभव त्यांच्या कथेत प्रथम अभिव्यक्त झाला. सौंदर्यासक्ती, सौंदर्याची दाहकता, एकाकी मनाचे कढ, मनाची शोकात्म प्रवृत्ती, मृत्यूचे गूढ आकर्षण हे त्यांच्या कथानायक-नायिकांचे स्वभावविशेष आहेत. अशा व्यक्तींचे चित्रण करताना त्याला अनुरूप अशा मोजक्या घटनाप्रसंगांची निवड व योजना आणि साधी व परिणामकारक निवेदनशैली त्यांच्या कथेमध्ये येते. शब्दांचा मितव्यय हे त्यांच्या कथेतील संवादांचे वैशिष्ट्य आहे. दिवाकर कृष्णांचे आपल्या कथेबद्दलचे विचार घेण्याजोगे आहेत. ते म्हणतात, ''माझ्या कथा सर्वच्या सर्व मौलिक, ओरिजनल होत्या..., मनोव्यापार प्रथम माझ्या कथेत आला..., फापटपसाऱ्याऐवजी व्यक्तीच्या आंतरिक व्यापारावर भर असून कथेमध्ये, कोणताही 'उद्देश' नव्हता..., सामाजिक दृष्टी आहे, पण सामाजिक टीकेचे आकर्षण नाही. विशेष आकर्षण व्यक्तीच्या आंतरिक जीवनाचे..., ठरवून वेगळ्या पद्धतीने कथा लिहिल्या नाहीत. माझ्या पद्धतीने मी लिहीत होतो. प्रसिद्ध झाल्यावर, त्या इतरांना वेगळ्या वाटल्या.'' (ललित, ऑगस्ट १९७१)

दिवाकर कृष्णांची पहिली कथा 'अंगणातला पोपट'. १९२१ साली, त्यांच्या वयाच्या एकोणिसाव्या वर्षी, 'मासिक मनोरंजन'मधून ही कथा प्रसिद्ध झाली आणि याच मासिकातून त्यांचे कथालेखन सुरू झाले. तसेच 'यशवंत', 'नवयुग' यांतूनही त्यांच्या कथा प्रसिद्ध झाल्या. पहिला कथासंग्रह 'समाधी व इतर सहा गोष्टी' १९२७ साली प्रसिद्ध झाला. त्यानंतर 'रूपगर्विता आणि सहा गोष्टी' (१९४१) आणि 'महाराणी व इतर कथा' (१९५५) हे दोन कथासंग्रह प्रकाशित झाले. या संग्रहांमधून एकूण २१ कथा प्रसिद्ध झाल्या. संख्येने अल्प, पण गुणांनी समृद्ध अशा या कथा आहेत. 'लिहावसं वाटलं तर लिहावं' एवढीच दृष्टी असल्याने मोजक्याच कथा लिहिल्या गेल्या.

**नायिकाप्रधान कथा**

त्यांच्या बहुसंख्य कथा नायिकाप्रधान आहेत. या नायिका त्या काळच्या मानाने सुशिक्षित, विचार करण्याची कुवत असलेल्या, आत्ममग्न व मनस्वी आहेत. त्यांना स्वतंत्र व्यक्तिमत्त्व आहे. स्वप्नाळूपणा, काव्यात्म वृत्ती, व्यवहारी जगाचा तिटकारा हे त्यांचे स्वभावविशेष आहेत. मनाविरुद्ध जगत राहण्यापेक्षा मृत्यू पत्करण्याची त्यांची तयारी आहे. त्यामुळे बहुतेक कथा शोकात्म व शोकान्त आहेत. बरेचसे कथानायकही कथानायिकांच्या या मनःप्रवृत्तीला पूरक असेच आहेत. असफल प्रेमाचे दर्शन त्यांच्या कथांमधून घडते. 'मृणालिनीचे लावण्य', 'समाधी', 'संकष्ट-चतुर्थी' इत्यादी कथांमधून त्याचा प्रत्यय येतो. 'अंगणातला पोपट'मधील छोटा मुलगा पोपट याचे पित्याच्या प्रेमाला आसुसलेले व हिरमुसलेले मन आजही वाचकाचे हृदय हेलावणारे आहे. 'लोकनंदिनेचा व्रतभंग', 'जगायचंय मला' या कथांमधील आशयाचे रूपही अगदी वेगळे आहे. दिवाकर कृष्णांच्या कथेच्या या वैशिष्ट्यांमुळेच त्यांची कथा बरेचदा शोकात्म भाव सतत व्यक्त करणारी, एकसुरी बनते. त्यांच्या कथा भावविवशतेच्या पातळीवर जातात. त्यामुळे बरेचदा व्यक्तिचित्रणालाही मर्यादा पडतात. तरीही मराठी कथेची प्रकृती व प्रवृत्ती बदलून कथेला वेगळे रूप देण्याचे सामर्थ्य त्यांच्या कथेत असल्याने ती तितकीच महत्त्वाची ठरते. त्यांच्या दोन कादंबऱ्या व एक नाटक हे खास दखल घ्यावी, असे नाही.

- डॉ. नंदा आपटे

**संदर्भ :**

*१. निवडक दिवाकर कृष्ण, दुसरी आवृत्ती, जोशी ब्रदर्स, औरंगाबाद, हैद्राबाद, १९७२ (वि. स. खांडेकर यांची प्रस्तावना).*

*२. 'ललित'; ऑगस्ट, १९७१.*

## दीक्षित, मधुकर श्रीधर

**चरित्रकार, संपादक**

**१६ मे १९२४**



मधुकर श्रीधर दीक्षित यांचा जन्म पुणे जिल्ह्यातील खेड येथे झाला. इंटर आर्ट्सपर्यंत नागपूर येथे शिक्षण झाले. प्रथम खेड कोर्टात सात महिने नोकरी केली. नंतर पुणे येथे मिलिटरी अकाउन्टस खात्यात नोकरी केली. त्यानंतर महाराष्ट्र साहित्य परिषदेत कार्यालय अधीक्षक या पदावर २४ वर्षे कार्यरत होते. तेथेच कार्यवाह, कोषाध्यक्ष, कार्यकारी विश्वस्त या पदांवरही कार्य केले.

वृत्तपत्रे आणि नियतकालिके यांमधून प्रासंगिक, ऐतिहासिक आणि चरित्रात्मक लेखन केले. शंभरावर पुस्तकांची परीक्षणे लिहिली. व्यक्तिचित्रात्मक अशी ३० लहानमोठी पुस्तके लिहिली. त्यांतील प्रमुख अशी 'जिजामाता', 'अहल्याबाई होळकर', 'सत्तावन्नचे सप्तर्षी', 'तात्या टोपे', 'प्रतापी बाजीराव', 'नेपोलियन', 'व्यक्तिविशेष', 'बाळाजी विश्वनाथ', 'साहित्यिक सांगाती', 'आम्ही चित्पावन' ही होत. जुन्या पुण्याचे दर्शन घडविणारे 'असे होते पुणे' हे पुस्तक वाचकप्रिय झाले. 'मी म. श्री.' हे आत्मचरित्र समकालीन जीवनाचे रेखाटन करते. 'इतिहासातील भ्रमंती' हे साऱ्यांनाच आवडणारे त्यांचे पुस्तक होय.

समाजकार्याची आवड असल्याने वसंत व्याख्यानमालेचे ते कार्यवाह होते. पुणे नगर वाचन मंदिराचे ते दहा वर्षे अध्यक्ष होते. पुणे सार्वजनिक सभा, थोरले बाजीराव पुतळा समिती, पुणे ऐतिहासिक वास्तुस्मृती, श्रीशिवाजी रायगड स्मारक मंडळ, महाराष्ट्र ग्रंथोत्तेजक संस्था, भारत इतिहास संशोधन मंडळ, महाराष्ट्र चित्तपावन संस्था, बालगंधर्व संगीत रसिक मंडळ, श्रीसमर्थ रामदास अध्यासन या संस्थांमध्ये त्यांनी कार्य केले.

साहित्य आणि समाजकार्य यांमुळे त्यांना अनेक पुरस्कार प्राप्त झाले. शासकीय साहित्य पुरस्कार तीन वेळा मिळाला. 'भीमराव कुलकर्णी साहित्य कार्यकर्ता' पुरस्काराचे ते मानकरी आहेत. पुण्याचा चालता-बोलता इतिहास म्हणजे म. श्री. दीक्षित.

– श्याम भुर्के

**संदर्भ :**

*१. प्रतिनिधी; 'एक साहित्यप्रेमी, कार्यकर्ता'; माणूस – ५ मे १९८४.*

*२. 'आठवांच्या पारंब्या'; साहित्य सूची; मे १९८४.*

## देखणे, रामचंद्र अनंत

**कथाकार, कादंबरीकार, लोककलांचे अभ्यासक**

**१२ एप्रिल १९५६**



रामचंद्र अनंत देखणे यांचा जन्म पुणे जिल्ह्यातील कोरेगाव येथे झाला. प्राथमिक शिक्षण कोरेगाव येथील प्राथमिक शाळेत तर माध्यमिक शिक्षण शिरूर या तालुक्याच्या गावी विद्याधाम प्रशालेत झाले. शाळेत सतत प्रथम क्रमांकाने उत्तीर्ण झाले. विज्ञान शाखेत पुण्याच्या सर परशुरामभाऊ (एस. पी.) महाविद्यालयात प्रवेश घेऊन त्यांनी बी. एस्सी. पदवी प्राप्त केली. त्यानंतर पिंपरी-चिंचवडमधील कारखान्यात नोकरी केली. वर्षभरातच प्रदूषण मंडळात त्यांना नोकरी मिळाली. दरम्यान अर्थशास्त्र, राज्यशास्त्र, समाजशास्त्र, तत्त्वज्ञान हे विषय घेऊन त्यांनी एम. ए. ही पदवी प्रथम श्रेणीत मिळवली.

पाठोपाठ पिंपरी-चिंचवड महानगरपालिकेत जनसंपर्क व प्रसिद्धी अधिकारी म्हणून ते रुजू झाले व तीच त्यांची कर्मभूमी झाली.

'भारूड वाङ्मयातील तत्त्वज्ञान' या विषयावर संशोधन करून १९८५ मध्ये पुणे विद्यापीठातून त्यांनी पीएच. डी. पदवी प्राप्त केली. कुटुंबातच वारकरी परंपरा व लोकसाहित्याची आवड असल्यामुळे देखणे यांच्याकडेही तो वारसा आला होता. वयाच्या पाचव्या वर्षी वासुदेवाचे सोंग घेऊन पहिले भारूड सादर केले. १९७२-१९७३ मधील दुष्काळात काही काळ शिक्षण सोडून ते आपल्या गावी परत आले असता घरच्या गायी पांजरपोळात नेल्या गेल्या, परंतु रात्रीतून त्या तेथून सुटून परत घरी आल्या. या प्रसंगातून त्यांना कथाबीज मिळाले व 'जितराब' ही पहिली कथा त्यांनी लिहिली. त्या वेळी त्यांचे वय केवळ १७ वर्षांचे होते.

त्यानंतर त्यांनी केलेली उल्लेखनीय वाङ्मयसेवा सर्वपरिचित आहे. 'हौशी लख्याची', 'येरवाळीचं येणं', 'गोरज', 'साठवणीच्या गोष्टी' हे कथासंग्रह; 'भूमिपुत्र', 'गोपा-निनाद' या कादंबऱ्या लिहिल्या. 'भारूड वाङ्मयातील तत्त्वज्ञान', 'बहुरूपी महाराष्ट्र', 'बहुरंगी भारूड', 'लागे शाहिरी गर्जाया', 'महाराष्ट्राची सांस्कृतिक लोककला', 'महाराष्ट्राचा लोकदेव खंडोबा', 'भारूड आणि लोकशिक्षण', 'गोंधळ परंपरा, स्वरूप आणि आविष्कार', 'आनंद तरंग', असे संशोधित साहित्य लिहिले. संतसाहित्य, चिंतनात्मक व चरित्रात्मक वाङ्मयात 'संत साहित्यातील पर्यावरण विचार', 'तुका म्हणे जागा हिता', 'ज्ञानदीप लावू जगी', 'लोकशिक्षक गाडगेबाबा', 'जीवनयोगी साने गुरुजी', 'एकचि टाळी झाली', 'कर्मयोगाचे नीतिशास्त्र', 'जीवनाची सुंदरता', 'वारी-परंपरा व स्वरूप', 'आनंदाचे डोही' हे लिखाण केले. 'श्री ज्ञानेश्वरी चिंतन व चर्चा', 'नरसिंह', 'पर्यावरण बोध' हे साहित्य संपादित केले. देखणे यांचा लेखनयज्ञ अव्याहतपणे चालू असतो. त्याचबरोबर अखिल भारतीय कीर्तन कुल, पिंपरी-चिंचवड शाखेचे अध्यक्ष, ऑक्टोबर २००४ मध्ये राळेगण सिद्धी येथे झालेल्या पहिल्या ग्रामजागर साहित्य संमेलनाचे अध्यक्ष यांसारखे सन्मान त्यांना प्राप्त झाले.

महाराष्ट्र शासनाचा २००३चा सांस्कृतिक राज्य पुरस्कार, महाराष्ट्र शासनाचा उत्कृष्ट ग्रंथनिर्मिती पुरस्कार, आचार्य अत्रे उत्कृष्ट कलावंत पुरस्कार, गदिमा पुरस्कार इत्यादी पुरस्कार डॉ. देखणे यांना मिळालेले आहेत.

– सविता टांकसाळे

**संदर्भ :**

१. *'साहित्य सूची'; दिवाळी १९९९.*
२. *'मेनका'; मार्च १९९२.*

## देवधर, ज्योत्स्ना केशव

**कादंबरीकार, कथाकार**
**२७ फेब्रुवारी १९२६**



ज्योत्स्ना केशव देवधर पूर्वाश्रमीच्या कुसुम थत्ते यांचा जन्म राजस्थानातील जोधपूर येथे झाला. एम. ए. (हिंदी) पुणे विद्यापीठातून केले. विवाहपूर्व वास्तव्य महाराष्ट्राबाहेर झाल्याने प्रारंभी हिंदी भाषेतून कथा-लेखन केले. १९६० ते १९७० या दशकाच्या उत्तरार्धात मराठीत ज्या स्त्रीलेखिका पुढे आल्या त्यांमध्ये ज्योत्स्ना देवधर हे नाव महत्त्वाचे आहे. 'तरुण भारत' (पुणे) ह्या दिवाळी अंकात ज्योत्स्नाबाईंची 'घर गंगेच्या काठी' ही पहिली मराठी कादंबरी आली. पुढे लगेचच (१९६७) ती पुस्तकरूपाने प्रसिद्ध झाली आणि कादंबरीकार म्हणून त्यांची स्वतंत्र नाममुद्रा उमटली. पुढच्याच वर्षी १९६८ मध्ये त्यांची 'कल्याणी' ही कादंबरी प्रसिद्धीच्या झोतात आली. त्यांच्या अन्य लेखनाप्रमाणेच या दोन्ही कादंबऱ्यांचे विषय कौटुंबिक विशेषतः एकत्र कुटुंब पद्धती आणि तिच्यामधील स्त्री हेच होते. या कुटुंब पद्धतीचे गुण-दोष आणि मर्यादाही त्यांच्या लेखनातून स्पष्ट होतात. आपल्या कादंबऱ्या व कथा लेखनाच्या

विषयांसंदर्भात लिहिताना त्या स्वतः म्हणतात, ‘‘कोवळ्या, अजाण, अपरिपक्व अशा वयात कौटुंबिक कारणांनी मी करपून गेले. काळजी, जागरण, आजारपण, कष्ट यांत आयुष्याची सोनेरी वर्षे खर्ची पडली. मला वाटते, माझ्या लेखणीला करुणेचा घास मिळाला व त्याची रुजवात या कठीण परीक्षेच्या, मनस्तापाच्या, दुःख-यातनांच्या, कष्टाच्या काळात झाली असावी. एकत्र कुटुंबातील ऊन-पाऊस अंगावर घेत असल्यामुळे माझ्या लेखनाला कौटुंबिक चौकट आपोआप मिळाली.’’

‘कल्याणी’ ही एक दुःखी, दुर्दैवी विधवा. तिच्या जीवनाची झालेली फरफट याच शीर्षकाच्या कादंबरीतून ज्योत्स्ना बाईंनी रेखाटली आहे. ही कादंबरी जास्त गाजली. तिचे चित्रपट-नाटकात जसे रूपांतर झाले, तशी मालिकेच्या रूपानेही ती घराघरात पोचली. जुन्या काळातली उद्ध्वस्त होत चाललेली कुटुंब-व्यवस्था जोत्स्नाबाईंच्या मनाला टोचते, पण त्याचबरोबर कालानुरूप बदलायलाही हवे, असे वाटणे अशा कालद्वंद्वात त्यांची कादंबरी वा कथा घुसमटल्यासारखी वाटते.

**चित्रमय शैली**

ज्योत्स्नाबाईंची भाषा साधी, सोपी, घराघरात वापरली जाणारी आहे. त्यामुळे शब्दांच्या जंजाळात फारशी अडकत नाही. डॉ. विनया डोंगरे त्यांचा गौरव ‘चित्रमय शैलीच्या कादंबरीकार’ असा करतात तर डॉ. कल्याणी हर्डीकर, त्यांच्या एकूणच लेखनाचा आढावा घेताना त्यांना ‘स्वयंप्रज्ञ लेखिका’ म्हणतात. त्यांची वर्णने साधी पण ती वाचकांच्या नजरेसमोर उभी राहणारी असतात. व्यक्तिचित्रणात्मक कादंबऱ्यांतही ज्योत्स्नाबाई वेगळेपण राखून आहेत. दोन भिन्न व्यक्तिमत्त्वांच्या जीवनावरच्या दोन कादंबऱ्या त्या तितक्याच ताकदीने सादर करतात. महायोगी अरविंद आणि पंडिता रमाबाई काहीशी समकालीन व्यक्तिमत्त्वे. भाषा-प्रांत-पार्श्वभूमी वेगळी पण या दोन्ही व्यक्तिमत्त्वांचा भावपूर्ण आणि तरीही साक्षेपी वेध त्यांनी अनुक्रमे ‘उत्तरयोगी’ (१९७३) आणि ‘रमाबाई’ (१९८९) या कादंबऱ्यांमधून घेतला आहे. त्यांच्या अनेक कादंबऱ्यांबरोबर वीस कथासंग्रह प्रसिद्ध झाले असून त्यात ‘गाऱ्या-गाऱ्या भिंगोऱ्या’ (१९६९) ते ‘याचिजन्मी’ (१९९९) या प्रदीर्घ काळखंडातील त्यांचा कथाविषयक लेखनप्रवास समोर येतो. त्यांच्या पुस्तकांचे अन्य भाषांत अनुवाद झाले असून त्यांनी स्वतः हिंदीतून विपुल लेखन केले आहे. अनेक पुरस्कार विजेत्या ठरलेल्या ज्योत्स्ना बाईंना केंद्र सरकारचा ‘अहिंदी भाषा-भाषी लेखक’ पुरस्कारही मिळाला आहे.

‘एरियल’ या अन्वर्थक नावाचे त्यांचे आत्मकथनात्मक पुस्तक आहे. ‘आकाशवाणी’मधील दोन तपांच्या वाटचालीचा तो प्रवास व्यक्तिगत त्यांच्याबरोबर मराठी समाजजीवन आणि साहित्यजीवनाचाही प्रवास आहे.

– मधू नेने

## देवस्थळे, सुमती

**चरित्रकार**

**२७ डिसेंबर १९२७ – २२ जानेवारी १९८२**



सुमती देवस्थळे मूळच्या पुण्याच्या असून माहेरचे आडनाव परांडे होते. त्यांचे शिक्षण हुजूरपागेत झाले. विवाहानंतर त्या मुंबईला गेल्या. बी. ए., एम. ए., बी. एड आणि एम. एड. शिक्षण घेतले. सिडनहॅम कॉलेजमध्ये नोकरी करत असताना असाध्य अशा हृदयरोगाने त्यांना ग्रासले. नंतर त्यांचे मन लिखाणाकडे वळले आणि त्यांनी चरित्र-लेखनाला सुरुवात केली. परकीय जगताचा अफाट व्यासंग करून कसदार व्यक्तिमत्त्वांचा सर्वांगसुंदर शोध घेऊन अथक परिश्रम करून प्रचंड माहिती मिळवली आणि मराठी चरित्रग्रंथांत मोलाची भर टाकली. ‘टॉलस्टॉयः एक माणूस’, ‘अल्बर्ट श्वाईट्झर’, ‘मॅक्झिम गॉर्की’, ‘कार्ल मार्क्स’ आणि ‘ज्योती आणि छाया’ हे पाच चरित्रग्रंथ लिहिले. ही सगळी चरित्रे लिहिताना

सुमतीबाईंची भूमिका विभूतिपूजकाची नसून अभिनिवेशरहित अशा जिज्ञासूची आहे.

टॉलस्टॉय हा विलक्षण प्रतिभेचा लेखक आणि प्रचंड आणि प्रगाढ असा तत्त्वज्ञ असला, तरी प्रथम तो एक माणूस होता. त्याच्या साऱ्या अंतर्विरोधासह त्याच्या व्यामिश्र व्यक्तिमत्त्वाचा शोध घेण्याचा बाईंचा प्रयत्न यशस्वी झाला. वैवाहिक जीवनात सतत येणारी निराशा, तत्त्वज्ञ वाटणाऱ्या या महापुरुषाची कामुक आसक्ती आणि सोन्याची असूया, संशय, द्वेष, मत्सर आणि स्वामित्व गाजवण्याची इच्छा यांमुळे घरातच युद्धकांड सुरू झाले. या युद्धकांडातले जीवघेणे चढउतार निःपक्षपातीपणाने हाताळले. 'टॉलस्टॉयच्या अतिरेकी आत्म्याची आंतरिक ओढाताण, आत्मशोधनाची आर्त ओढ, प्रयोगशील जीवनाची अवघड घालमेल, जीवनसंग्रामाच्या दाहक ज्वाळा, विश्वाची क्षितिजे न्याहाळणाऱ्या नजरेचे विलक्षण विभ्रम, तत्त्वचिंतनाची तरल धडपड, धर्मपरिवर्तनाची अस्वस्थ प्रेरणा, संवेदनशीलतेचे अबोध उन्मेष आणि सर्जनशीलतेची विश्रब्ध स्पंदने या साऱ्यांचा आलेख काढण्याची विलक्षण ताकद सुमतीबाईंच्या लेखणीत आहे'. प्रभाकर पाध्ये यांचे हे निरीक्षण आहे.

वर्ण्य विषयाच्या अंतरंगात शिरण्याची जबरदस्त ताकद असल्याने सुमतीबाईंच्या लेखनाला दुर्मीळ सचोटी प्राप्त झाली आहे. 'अल्बर्ट श्वाइट्झर'सारख्या अष्टपैलू व्यक्तिमत्त्वाचे प्रत्ययकारी चित्रण त्यांनी केले. धर्मशास्त्राचा व्याख्याता असूनही दीनदुबळ्यांची सेवा करण्यासाठी मेडिकलच्या पहिल्या वर्षात प्रवेश घेतला. डॉक्टर झाल्यावर आफ्रिकेच्या लॅम्बरीन गावात, प्रतिकूल हवामान, हिंस्र प्राणी, सर्वांत पसरलेली अंधश्रद्धा, टोकाच्या भ्रामक समजुती आणि जादूटोणा अशा दुर्धर संकटांशी झगडून इस्पितळ काढले. आदिवासींची सेवा केली. आदिवासींचीही त्याच्यावर अगाध श्रद्धा बसली. तो गाजलेला संगीतज्ञ आणि पियानो दुरुस्त करणारा होता. आफ्रिकेच्या जंगलात आपल्या संगीत साधनेने तो आपल्या कार्याप्रतीची श्रद्धा बळकट करी. उत्तुंग ध्येय आणि उदात्त कल्पना त्याला जागवीत आणि जगवीत असत. सबंध विश्वामध्ये असलेले चैतन्य म्हणजे आपल्यातल्या चिन्मय अंशाचा आविष्कार अशी त्याची श्रद्धा होती. मानवी जीवनाला सत्प्रवृत्तीची प्रेरणा देणारा अभिजात सुसंस्कृत तत्त्वज्ञ अशी त्याची प्रतिमा होती. सुमतीबाईंनी ओघवती, सुबोध, सूचक, काव्यात्म आणि रसाळ भाषेत अल्बर्टचा परिचय मराठी वाचकाला करून दिला. वाचक अल्बर्टच्या जगाशी तद्रूप होऊन अफाट जगात विहार करू लागतो, हे यश लेखिकेचे होय.

'कार्ल मार्क्स'चे चरित्र लिहिताना सुमतीबाईंनी तत्कालीन सामाजिक आणि राजकीय परिस्थितीचे धारदार विश्लेषण केले आहे. रशियन राज्यक्रांतीचा सखोल अभ्यास करून तो पूर्ण इतिहास आपल्या डोळ्यांसमोर जिवंत केला आहे. मार्क्सचे विचार म्हणजे टाइम बॉम्ब होता. कम्युनिस्ट पार्टीची स्थापना विश्वविशाल अशा करुणेच्या जाणिवेतून झाली होती. मजुरांना प्रचंड सहानुभूतीची गरज आहे आणि त्यांच्या दुःखाचे रूपांतर सुखात आपणच केले पाहिजे, अशी त्याची धारणा होती. मजुरांची संघटना बांधून, श्रमशक्तीची जाणीव करून देऊन, त्याने सशस्त्र क्रांतीची दीक्षा दिली. अशा या थोर तत्त्वज्ञाचे कौटुंबिक आयुष्य मात्र दैन्यावस्थेत गेले. जगातल्या बादशहांना चळाचळा कापायला लावणाऱ्या मार्क्सच्या घरी मुलांना प्यायला दूध मिळत नसे. संपूर्ण जगाच्या राजकारणाला एक नवी दिशा दाखवणारा 'दास कॅपिटल' हा ग्रंथ त्याने लिहिला. पण ग्रंथ लिहिताना त्याने जितक्या सिगरेटी ओढल्या त्याची किंमतही या ग्रंथाच्या मानधनातून वसूल झाली नाही. मार्क्ससारख्या प्रखर विचारवंताला आणि त्याच्यावर जिवापाड प्रेम करणाऱ्या जेनीला सुमतीबाईंनी समजून घेतले आहे आणि त्याच्यासारखा एकाच वेळी हरणारा आणि जिंकणारा माणूस आपल्यासमोर उभा केला आहे.

सुमतीबाईंनी अतिशय जिव्हाळ्याने मॅक्झिम गॉर्कीच्या आयुष्याचा शोध घेतला आहे. त्याच्या आयुष्यातील चढउतार, त्याची आंतरिक अस्वस्थता, जिवावर उदार

द

होऊन त्याने केलेले प्रयत्न, उघड्या डोळ्यांनी पाहावी लागणारी त्या प्रयत्नांची निष्फलता, तरीही माणुसकीच्या आचेने त्याने जिवाच्या अंतापर्यंत केलेली धडपड, याचा आलेख सुमतीबाईंनी मोठ्या ताकदीने काढला आहे. आई, कन्फेशन आणि त्याचे आत्मचरित्र यांमागची प्रेरणा, जाणीव आणि उद्देश शोधून त्याच्या अंतरंगापर्यंत पोचण्यात त्या यशस्वी झाल्या आहेत. लेनिनची मैत्री आणि लेनिनच्या राज्ययंत्रणेने त्याचा करून घेतलेला उपयोग, नंतर त्याची केलेली शिकार ही दारुण शोकांतिकाही रंगवली आहे. या महामानवांची चरित्रे लिहून मराठी वाचकाला अस्वस्थ आणि अंतर्मुख करण्यात त्या यशस्वी झाल्या आहेत.

'छाया आणि ज्योती' या पुस्तकात कसदार अशा स्त्री-व्यक्तिमत्त्वांची ओळख करून देण्यात आली आहे. परकीय जगाचा अफाट व्यासंग आणि त्याची लालित्यपूर्ण मांडणी, हे सुमतीबाईंचे विशेष आहे. यातल्या काही स्त्रिया महापुरुषांच्या छाया होत्या तर काही स्त्रिया स्वतःच तळपणाऱ्या ज्योती होत्या. मेरी टॉड लिंकन आणि सोन्या टॉलस्टॉय ह्यांनी आपल्या पतीच्या जीवनात जे उत्पात घडवले, तेही दाखवले आणि साधना आमटे आणि जेनी मार्क्स ह्यांनी अत्यंत कठीण प्रसंगीही पतीला दिलेली साथ याचे वर्णनही केले आहे. एमिली पँखहर्स्ट, एमिली ब्राँटे, हॅरियट ब्रोचर स्टो आणि जेन अ‍ॅडम्सच्या स्वकर्तृत्वाचा सुमतीबाईंनी वेध घेतला आहे. आवेगपूर्ण, आवेशपूर्ण आणि सहानुभूतीने ओतप्रोत भरलेल्या भाषेतून जिद्दी आणि लढाऊ स्त्रियांच्या जीवनात निरनिराळे रंग भरले आहेत तर ख्रिस्तिना झरीना या सम्राज्ञीची दारुण शोकांतिकाही रंगविली आहे.

– डॉ. अपर्णा लव्हेकर

**संदर्भ :**


१. *'सत्यकथा'; जानेवारी १९७६.*
२. *'ललित'; ऑगस्ट १९७५.*
३. *'माणूस'; १४ डिसेंबर १९७४.*
४. *'साहित्यसूची'; ऑगस्ट १९९३.*
५. *'साधना'; १५ ऑगस्ट १९८२.*


द

## देशपांडे, अच्युत नारायण

**वाङ्मयेतिहासकार, तत्त्वचिंतक, समीक्षक**

**१२ मार्च १९१५ – १४ ऑक्टोबर १९९०**



अच्युत नारायण देशपांडे यांचा जन्म विदर्भातील चांदूर तालुक्यातील कळाशी येथे झाला. मॅट्रिकपर्यंतचे शिक्षण प्रथम मोर्शी व नंतर अमरावतीला झाले. १९४० साली नागपूरच्या मॉरिस महाविद्यालयामधून भाषा विषयातून (सर्व भाषांच्या विद्यार्थ्यांमधून) प्रथम श्रेणीत, प्रथम आले. दोन सुवर्ण-पदकांचे ते मानकरी ठरले.

१९४१ साली त्यांचा विवाह झाला. अमरावतीच्या हिंदू हायस्कूलमध्ये शिक्षक म्हणून रुजू झाले. १९४२ साली खानदेशातील जळगावला प्रायमरी ट्रेनिंग स्कूलमध्ये शिक्षक म्हणून लागले. १९४४ मध्ये खासगीरीत्या नागपूर विद्यापीठाच्या एम.ए. परीक्षेत सुवर्णपदकाचे मानकरी ठरून धवल यश प्राप्त केले. १९४५ साली नागपूरच्या हिस्लॉप महाविद्यालयामध्ये प्राध्यापक म्हणून रुजू झाले.

१९५० सालापासून मराठी भाषेच्या वाङ्मयेतिहासाचा प्रकल्प त्यांनी हाती घेतला व १९८८ पर्यंत ७ खंडांचे हे प्रचंड कार्य अथक परिश्रमातून पूर्णत्वास नेले. त्यांच्या वाङ्मयेतिहासात ग्रंथ व ग्रंथकार यांच्याविषयी भरपूर माहिती, उपलब्ध झालेले प्रत्येक पुस्तक चाळून त्यासंबंधी मतप्रदर्शन, सूची यांमुळे त्यांनी लिहिलेले वाङ्मयेतिहासाचे खंड अभ्यासकांना उपयुक्त ठरले आहेत. त्यांचा कल अध्यात्माकडे होता. भारतीय संस्कृतीतील अध्यात्माचे महत्त्व ते जाणून होते. संतकार्याबद्दल त्यांना आदरभाव होता व त्याचे मूर्त प्रतिबिंब त्यांच्या वाङ्मयेतिहासात आपणास पाहावयास मिळते.

युगकर्त्या लेखकांविषयी व उत्कृष्ट वाङ्मयाविषयी चिकित्सक मर्मदृष्टीही त्यांच्यापाशी होती. आधुनिक काळातील बा.सी.मर्ढेकर व विभावरी शिरूरकर यांच्या

वाङ्मयाचे त्यांनी केलेले परिशीलन त्याची साक्ष पटविते.

'केशवसुत नवे दर्शन', 'प्लेटोचे साहित्यशास्त्र', 'मराठी संत', 'महानुभव संतांची सामाजिक आणि वाङ्मयीन कामगिरी', 'विदर्भाचे मानकरी', 'नवे मनाचे श्लोक', 'अवतार मेहेरबाबा' ही त्यांची स्वतंत्र निर्मिती होय.

'चिपळूणकर दर्शन', 'साहित्यातील विवेक- वा. म. जोशी', 'प्रमेयाची उद्याने', 'विनोबांची साहित्यदृष्टी', 'ज्ञानेश्वरी अध्याय ९ वा', 'प्राचीन मराठी वाङ्मयकोश'; 'डॉ. शं. दा. पेंडसे गौरवग्रंथ', 'हरिश्चंद्राख्यान' इत्यादी अकरा ग्रंथ संपादित केले. याव्यतिरिक्त अनेक ग्रंथांना प्रस्तावना, वृत्तपत्रे व नियतकालिके यांमधून विपुल स्फुटलेखन प्रसिद्ध झाले आहे.

साहित्याची सेवा करणारी ही व्यक्ती साध्या राहणीने आयुष्यभर कार्यरत राहिली. नागपूर विद्यापीठाने आचार्य पदवी देऊन त्यांना गौरविले. संपूर्ण मराठी वाङ्मयाच्या इतिहासाचा पाच हजार पृष्ठांचा भव्य प्रकल्प सिद्धीस नेणारे वाङ्मयेतिहासकार, रसज्ञ, मर्मज्ञ, जीवनवादी समीक्षक, सत्त्वशील, सौजन्यशील, प्रसन्नवृत्तीचे, खेळकर शैलीचे आदर्श प्राध्यापक, ज्ञानेश्वरीचे रसाळ प्रवचनकार, प्रभावी वक्ते, निर्भीड विचारवंत असे त्यांचे बहुआयामी व्यक्तिमत्त्व होते.

– संध्या टेंबे

## देशपांडे, आत्माराम रावजी

☞ **अनिल**

## देशपांडे, कुसुमावती आत्माराम

**कथाकार, ललित निबंध लेखिका, समीक्षक, कवी**

**१० नोव्हेंबर १९०४ – १७ नोव्हेंबर १९६१**

कुसुमावती आत्माराम देशपांडे यांचा जन्म कोल्हापूर संस्थानातील जलालपूर येथे झाला. शिक्षण गर्ल्स हायस्कूल उमरावती, पुढे हुजूरपागा, पुणे येथे झाले. १९२१ साली फर्गसन महाविद्यालयात प्रवेश. १९२६ मध्ये नागपूर विद्यापीठातून प्रथम क्रमांकाने बी.ए. झाल्या. १९२७ साली



मध्य प्रदेश व विदर्भ सरकारची खास शिष्यवृत्ती मिळवून लंडन येथील वेस्टा फिल्ड कॉलेजमध्ये शिक्षण घेतले. १९२९ साली 'इंग्रजी साहित्य' हा विषय घेऊन तिथेही बी.ए. (ऑनर्स) पदवी प्राप्त केली.

नागपूरच्या मॉरिस महा-विद्यालयामध्ये इंग्रजीच्या प्राध्यापिका म्हणून १९३१ साली नेमणूक झाली. १९५६ साली नागपूर आकाशवाणी केंद्रात तर १९५७ साली दिल्ली आकाशवाणी संचनालयात चीफ प्रोड्यूसर म्हणून कार्यरत होत्या. विदर्भातील प्रख्यात वकील रा. ब. रामकृष्ण रावजी जयवंत यांच्या त्या कन्या असून मुळातच बुद्धिमान होत्या. फर्गसन महाविद्यालयात असताना १९२२ साली आत्माराम रावजी देशपांडे (कवी अनिल) यांच्याशी परिचय झाला. त्याचे रूपांतर प्रेमात झाले. आंतरजातीय विवाहाला घरातून प्रखर विरोध झाला. १९२९ साली लंडनहून परतल्यावर त्यांचा विवाह झाला; तो तेव्हा गाजला होता.

१९३१ सालच्या सप्टेंबर महिन्याच्या 'किर्लोस्कर'मध्ये त्यांची 'मृगाचा पाऊस' ही कथा प्रसिद्ध झाली. ती त्यांची पहिली कथा होय. त्यांनी एकूण ४८ कथा लिहिल्या. 'दमडी', 'चिंधी', 'कला धोबिणीचे वैधव्य', 'लहरी', 'गवताचे पाते' अशा त्यांच्या काही कथा आहेत. 'प्रतिभा', 'ज्योत्स्ना', 'अभिरुची' व 'सत्यकथा' या नियतकालिकांशी त्यांचा संबंध राहिला. त्यांच्या कथांमधून तत्कालीन सामाजिक वास्तवाचे व विशेषतः सर्वसामान्यांच्या आयुष्यातील घटना-प्रसंगांचे अल्पाक्षरी पण चित्रमय शैलीत वेधक चित्रण आढळते. मध्यमवर्गीय जीवनाचीही चित्रे त्यांनी समर्थपणे रंगवली. 'दमडी'मध्ये तर संज्ञाप्रवाहाचा सुंदर वापर त्यांनी केला आहे. चिंतनशीलता, काव्यात्मता, अर्थपूर्णता हे त्यांच्या कथांचे विशेष दिसतात. त्यांच्या कथांचा स्वतंत्र असा संग्रह प्रसिद्ध झाला नाही. १९५८ साली रा. ज. देशमुख

द

प्रकाशनाने त्यांच्या निवडक ३१ कथांचा संग्रह 'दीपमाळ' या शीर्षकाने प्रकाशित केला होता व त्याला वि. स. खांडेकर यांची विस्तृत प्रस्तावना लाभली होती. त्यांच्या कथांमध्ये नवकथेची बीजे आढळतात असे समीक्षकांचे निरीक्षण आहे.

ना. सी. फडके, वि. स. खांडेकर व अनंत काणेकर ज्या काळात लघुनिबंध लिहीत होते, त्याच काळात त्यांनी 'माध्यान्ह', 'मध्यरात्र', 'मोळी', 'चंद्रास्त' व 'एक संध्याकाळ-चिंतनिका' असे पाच ललित निबंध लिहिले आहेत. त्यांची प्रकृती गंभीर असून या लेखांमधून त्यांच्या रसिक व व्यासंगी व्यक्तित्त्वाचा; अंतर्मुख, चिंतनशील व काव्यात्म लेखनाचा प्रत्यय येतो. पुढे दुर्गा भागवत व इरावती कर्वे यांनी याच मार्गावरून संख्यात्म व गुणात्मदृष्ट्या लक्षणीय लेखन केल्याचे दिसते.

कुसुमावती मूलतः जीवनवादी होत्या. त्यांच्या प्रारंभीच्या लेखनावर मार्क्सवादाची सौम्य छाया दिसते. पण पुढे त्यांना साहित्यकृतीतील जीवन समस्यांइतकीच तिच्यातून आविष्कृत होणाऱ्या सौंदर्याचीही महती पटली. या अर्थाने त्या समन्वयवादी होत्या, असे म्हणता येते. तथापि त्यांचा आग्रह राहिला तो लेखकाच्या जीवनसमस्यांविषयक बांधीलकीशी. 'वाङ्मयाचा आस्वाद', 'वाङ्मयीन समीक्षेचे निकष', 'वाङ्मयीन समीक्षा: सौंदर्याची नवप्रतीती', 'नवसाहित्याचे काही प्रश्न' हे त्यांचे महत्त्वाचे समीक्षा लेख होत. 'कवींची काव्यदृष्टी', 'नवा शिपाई', 'आम्ही कोण?' व 'केशवसुतांच्या काव्यदृष्टीतील उत्क्रांतिमार्ग' हे त्यांनी लिहिलेले उपयोजित वा आस्वादक समीक्षा-लेख म्हणता येतात. 'दीपकळी' (१९३५), 'दीपदान' (१९४१) व 'मोळी' (१९४६) या त्यांच्या संग्रहांमध्ये कथा, ललित निबंध व समीक्षा लेख यांचा अंतर्भाव करण्यात आला आहे. केवळ समीक्षा-लेखांचा संग्रह म्हणून 'पासंग' (१९५४) प्रसिद्ध झाला. पुढे त्यात भर घालून प्रथम १९६१ व नंतर १९७१ साली त्याच्या पुढील आवृत्त्या प्रकाशित करण्यात आल्या.

कुसुमावती 'मुंबई मराठी साहित्य संघाच्या' वामन मल्हार जोशी स्मृती व्याख्यानमालेच्या १९४८ व १९५१ सालांच्या महनीय प्रवक्त्या होत्या. त्यांनी तेव्हा तिथे दिलेल्या व्याख्यानांवरून 'मराठी कादंबरी : पहिले शतक' हा ग्रंथ दोन भागांत प्रकाशित झाला. (पहिला भाग: १९५३ व दुसरा भाग: १९५६, पुढे दोन्ही भाग एकत्र: १९७५) त्यात मराठी कादंबरीच्या प्रारंभापासून १९५० पर्यंत म्हणजे विभावरी शिरूरकर यांच्या 'बळी' कादंबरीपर्यंतच्या मराठी कादंबऱ्यांच्या स्थितिगतीचा, चढउतारांचा त्यांनी आलेख काढला आहे. मराठी कादंबऱ्यांचा मानदंड म्हणून त्यांनी हरिभाऊ आपटे यांच्या 'पण लक्ष्यात कोण घेतो?' या कादंबरीचा उल्लेख केला आहे. समाजसन्मुखता व मानवतापूर्ण दृष्टिकोन हे दोन महत्त्वाचे निकष त्यांनी तिथे नोंदवले आहेत. श्रेष्ठ प्रकारच्या साहित्याच्या वाचनाने वाचकाच्या जाणिवांच्या कक्षा रुंदावतात, कलात्मक सौंदर्याची त्याला प्रतीती येते; हे त्यांच्या साहित्यविचाराचे सूत्रही त्यांनी तिथे प्रारंभी विशद करून मराठी कादंबरीचा लेखाजोखा मांडला आहे.

१९२२ ते १९२७ दरम्यान त्यांचा आणि अनिलांचा पत्रव्यवहार झाला होता. महाविद्यालयीन तरुणांची प्रेमपत्रे, त्यांच्या तत्कालीन भावना, घरचा विरोध आणि त्याला न जुमानता वर उसळी मारून येणारी भावोत्कट प्रेमवृत्ती, त्याचे तरल व काव्यपूर्ण शब्दांतील चित्रण म्हणून सामाजिक दस्तऐवज या दृष्टीने ही पत्रे महत्त्वपूर्ण भूमिका बजावतात. ह. वि. मोटे प्रकाशनाने त्यांच्या व अनिलांच्या अशा निवडक पत्रांचा संग्रह 'कुसुमानिल' शीर्षकाने १९७२ साली प्रकाशित केला.

त्यांनी लिहिलेले 'थेंबांचा खेळ' हे बालगीत Childrens' Book Trust तर्फे प्रकाशित झाले आहे तर रमाबाई रानडे यांच्या 'आमच्या आयुष्यातील आठवणी' या आत्मचरित्राचा त्यांनी इंग्रजीत अनुवाद केला. शिवाय साहित्य अकादमीने १९६६ साली त्यांचे 'Marathi Sahitya' या शीर्षकाने मराठी साहित्याचा आढावा घेणारे इंग्रजीतील पुस्तक प्रकाशित केले.

द

साहित्य अकादमीच्या सल्लागार मंडळाच्या त्या निमंत्रक सदस्य होत्या.

मराठी वाङ्मय परिषद, बडोदे यांनी आयोजित केलेल्या 'बडोदे साहित्य संमेलन, १९४८'च्या त्या अध्यक्षा होत्या. १९५८ साली गोरेगाव, मुंबई येथे झालेल्या 'मुंबई उपनगर साहित्य संमेलना'चे अध्यक्षपदही त्यांनी भूषविले होते. तर १९६१ साली ग्वाल्हेर येथे झालेल्या ४३व्या 'अखिल भारतीय मराठी साहित्य संमेलना'चे अध्यक्षपद हा सर्वोच्च मानसन्मान लाभलेल्या त्या पहिल्या विदुषी ठरल्या. अध्यक्षीय भाषणातील त्यांचे विचार रसिकांचे नि जाणकारांचे चर्चाविषय झालेले असतानाच त्यांचे अनपेक्षितरीत्या हृदयविकाराने निधन झाले.

– डॉ. अनंत देशमुख

**संदर्भ :**

*१. भागवत श्री. पु.; 'कुसुमावती देशपांडे: साहित्याची भूमी'; ग्रंथाली प्रकाशन.*

*२. पोतदार अनुराधा; 'कुसुमावती: प्रस्तावना वाङ्मयदर्शन'; कॉन्टिनेन्टल प्रकाशन, पुणे; १९७५.*

## देशपांडे, गोविंद पुरुषोत्तम

☞ **मुख्य नोंद – नाटक खंड**

## देशपांडे, गौरी अविनाश

**कथाकार, कादंबरीकार, अनुवादक, ललित लेखक**

**११ फेब्रुवारी १९४२ – १ मार्च २००३**

गौरी देशपांडे या दिनकर धोंडो कर्वे व इरावती कर्वे यांच्या कन्या असून त्यांचे शिक्षण पुण्यात झाले. इंग्रजी वाङ्मयात एम. ए. पीएच. डी. प्राप्त केली. 'दि इमेज ऑफ द सेन्ट इन मॉडर्न इंग्लिश लिटरेचर' हा त्यांच्या प्रबंधाचा विषय होता. अठराव्या वर्षी विवाह झाला. घटस्फोट घेतल्यानंतर त्या मुंबईत आल्या. 'इलस्ट्रेटेड वीकली'मध्ये संपादन खात्यात त्यांनी काम केले. सुरुवातीला इंग्रजीमधून काव्यलेखन केले. १९७० साली 'कावळा चिमणीची गोष्ट'



ही त्यांची पहिली कथा 'सत्यकथे'त प्रसिद्ध झाली. १९७४मध्ये 'कारावासातून पत्रे' ही पहिली लघुकादंबरी लिहिली. कादंबरी-लेखनामुळे कथा-लेखन मागे पडले खरे, परंतु कथा या वाङ्मय प्रकारातही त्यांनी खूप प्रयोग केले. १९७५ ते १९८४ या काळात त्यांनी 'अरेबिअन नाइट्स'च्या सोळा खंडांच्या अनुवादाचे प्रचंड काम हातावेगळे केले.

त्यांचे 'एकेक पान गळावया' (१९८०) हा कथासंग्रह, 'आहे हे असं आहे' (१९८६) हा कथासंग्रह, 'तेरुओ' आणि 'काही दूरपर्यंत' (१९८५), 'निरगाठी' आणि 'चंद्रिके ग, सारिके !' (१९८७), 'दुस्तर हा घाट' आणि 'थांग' (१९८९) ह्या लघुकादंबऱ्या तर 'मुक्काम' (१९९२), 'गोफ' (१९९९), 'उत्खनन' (२००२) ह्या कादंबऱ्या आणि 'विंचुर्णीचे धडे' हे आत्मकथनपर पुस्तक प्रसिद्ध झाले आहे. 'अरेबिअन नाइट्स', 'आहे मनोहर तरी' (सुनीता देशपांडे), 'तराळ अंतराळ' (शंकरराव खरात), 'अस्वस्थ दशकाची डायरी' (अविनाश धर्माधिकारी), 'महानिर्वाण' (सतीश आळेकर), 'माता द्रौपदी' (विद्याधर पुंडलिक) या पुस्तकांचे अनुवाद त्यांनी केले.

'गौरी देशपांडे' ही नाममुद्रा सर्वसाधारणपणे साठोत्तरी मराठी साहित्यातील आधुनिकतेची, अत्याधुनिक जीवनदृष्टीची आणि साहित्यगत प्रयोगशीलवृत्तीचीच स्वत्वखूण आहे, असे म्हणता येईल. गौरी देशपांडे ह्यांनी निर्माण केलेल्या साहित्याने एकूण मराठी साहित्याला नवा संस्कार, नवी मूल्यदृष्टी-विचारदृष्टी तर दिलीच; पण मराठी साहित्यात जो आशयात्मक आवर्त निर्माण झाला होता, तो भेदण्याचे काहीसे क्रांतिसदृश कार्यही त्यांच्या साहित्यकृतींनी केले. साठोत्तरी साहित्याचा एक विशेष म्हणजे त्यातून व्यक्त होणारी सामाजिक परिवर्तनाची अपेक्षा-आकांक्षा करणारी 'बंडखोरी' होय. जीवनाच्या

(वैयक्तिक आणि सामाजिक-सांस्कृतिक) पूर्वसिद्ध वाङ्मयीन आशय-अभिव्यक्तिरूपांना नकार देणारी जी साहित्यरूपे साठोत्तरी काळात उदयाला आली, आणि ज्या साहित्यकृतींनी रूढ मराठी विचाराचे परिप्रेक्ष्य बदलण्याची आत्यंतिक निकड व्यक्त केली, अशा साहित्यकृतींमध्ये गौरी देशपांडे ह्यांच्या साहित्यकृतींचा समावेश अग्रत्वाने होतो. लोकप्रिय आणि लोकानुयायी साहित्यनिर्मितीच्या रुळलेल्या वाटांवरून प्रवास करण्याला नकार देणारी लेखनदृष्टी दूर सारण्याची भूमिका घेणारी असंख्य वाङ्मयकुळे अस्तित्वात असताना ज्या लेखकांनी निष्ठेने वेगळे मार्ग स्वीकारले, त्यांत गौरी देशपांडे यांचा समावेश सहजच होतो.

मराठी साहित्यातील स्त्रियांचे वाङ्मयीन योगदान अत्यंत लक्षणीय स्वरूपाचे आहे. रूढ वाङ्मयरूपांना आणि सामाजिक-सांस्कृतिक आशयरूपांना ठाम नकार देणारे स्त्रीनिर्मित साहित्यही संख्येने दखल घेण्याएवढे आहे. स्त्रीनिर्मित साहित्यात एक महत्त्वाचा टप्पा निर्माण करणाऱ्या विभावरी शिरूरकर यांच्या बहुचर्चित साहित्यानंतरचा परिवर्तनाचा अध्याय गौरी देशपांडे यांच्या अखेरच्या साहित्यकृतीपर्यंत (उत्खनन) सामर्थ्याने सरूप झाला, असे स्पष्टपणे जाणवते. स्त्रीसाहित्याला आशय, अभिव्यक्ती, अंतिम परिणाम, प्रभावशीलता, प्रभावक्षमता आणि वेगवेगळ्या साहित्यगत आणि जीवनगत जीवनदृष्टीची जोपासना करण्याचे नवे आयाम गौरी देशपांडे यांच्या साहित्याने दिले, हे निःसंशयपणे मान्य करावे लागते.

गौरी देशपांडे यांच्या सर्व साहित्यकृतींमधील पात्रे बहुविध प्रकारची आहेत. त्या पात्रांच्या जगण्याचा वेध घेताना लग्नसंस्था, कुटुंबसंस्था, शिक्षणसंस्था आणि अन्य संस्थाव्यवस्थांचा त्या वेध घेतात. त्यांचे तुरुंगमय स्वरूप त्या स्पष्टपणे साकारतात. संस्थाव्यवस्थांनी निर्माण केलेल्या जाचक बंधनांची स्वत्व आणि सत्त्वहीन केलेल्या पात्रप्रतिमा उभारून देशपांडे यांनी सर्वंकष जीवनवास्तवाला मुखरीत केले आहे. 'एकेक पान गळावया'पासून 'उत्खनन'पर्यंत या वास्तवाचे बहुमुखी, बहुस्तरीय तांडव त्या व्यक्त करतात. या विशिष्ट वास्तवाचा आपपतः भाग झालेल्या आणि रूढ अरूढ नात्यांनी एकमेकांशी बांधल्या गेलेल्या पात्रांचे परस्परसंबंध अतिशय संवेदनशील-समंजसशील वृत्तीने त्या व्यक्त करतात. देशपांडे यांच्या सर्व निर्मितीत ही जाणकारी सहजभावाने व्यक्त झालेली आहे. गौरी देशपांडे यांच्या सर्व साहित्यकृतींमधील 'निवेदक-पात्रे' स्त्रीरूपांत प्रकटली असून या पात्रांना व्यक्ती, समाज, मानवीसंबंध आदी सर्व घटकांबद्दल अनन्य आस्था, कुतूहल आणि ममत्व असलेले जाणवते. ही निवेदक-पात्रे निर्मात्याची प्रवक्ती-पात्रे नाहीत. ती केवळ 'कागदी पात्रे' न राहता जीवनाचा सूक्ष्म विचार करणारी 'लिव्हिंग कॅरेक्टर्स' झाली आहेत. ही पात्रे स्वायत्त-स्वतंत्र आहेत; पण त्यांच्याठायी गौरी देशपांडे यांची मानसिकता व त्यांचे विचार जणू आनुवंशिकतेने संक्रमित झाले आहेत. त्यांची निवेदक-पात्रे स्त्रीदेहधारी आणि स्त्रीमनधारी आहेत. लग्न-कुटुंब-लैंगिकजीवन-नात्यांची व्यामिश्रता- त्यातील जटिलता- जीवनातील श्रेयप्रेयस कल्पना-'स्व'चे होणारे शोषण, संघटन-विघटन-'पर'शी येणारा संबंध, समाजसंस्कृती, भाषासंस्कृती तसेच माणसाचा आदिमतेशी असलेला अव्याहत संबंध या सर्वांचे स्त्रीच्या जीवनप्रेरणेतून 'निकट वाचन' आणि बहुस्तरीय अर्थशोधन त्यांनी केले आहे.

गौरी देशपांडे यांनी आपल्या लेखनाद्वारे विचार व आशय या पातळ्यांवर महत्तम असे वाङ्मयीन कार्य केलेले आहेच, पण त्याचबरोबर कथारचनेच्या पातळीवरही त्या एक प्रयोगशील लेखक आहेत. आत्मनिवेदन, तृतीयपुरुषी निवेदन याबरोबर निवेदनाच्या विविध तऱ्हा त्यांनी उपयोजिलेल्या आहेत. उदाहरणार्थ 'कावळ्याचिमणी'च्या बालकथेच्या उपयोजनापासून पत्रात्मक निवेदन (कारावासातून पत्रे), डायरी व पत्रे यांचा संमिश्र वापर (तेरुओ), दोन निवेदक पात्रांचे निवेदन (गोफ) इत्यादींचा खास उल्लेख करायला हवा. कोणता विचार व आशय कसा सांगावा, याची अतिसूक्ष्म जाण गौरी देशपांडे यांच्या लेखनातून वारंवार व्यक्त झालेली दिसते.

'विंचुर्णीचे धडे' या आत्मकथनात्मक पुस्तकात खेड्यातील जीवनाचे, तेथे भेटणाऱ्या व्यक्तींचे त्यांनी मिस्कील शैलीत वर्णन केले आहे.

देशपांडे यांच्या अनुवादित कार्याकडे एक दृष्टिक्षेप टाकला, तर समकालाच्या कक्षा ओलांडून जाण्याचे, बहुस्तरीय अर्थच्छटा प्रकटण्याचे सामर्थ्य असलेल्या आणि रचनात्मक पातळीवर प्रयोग करून पाहणाऱ्या साहित्यकृतींचीच निवड त्यांनी केली, हे लक्षणीयच ठरावे.

–डॉ. पुष्पलता राजापुरे–तापस

**संदर्भ :**


१. *राजहंस मेधा, संपादक; 'गौरी मनातली', उन्मेष प्रकाशन, पुणे; २००५.*

२. *बाळ विद्या, गीताली वि. मं.; संपादक; 'कथा गौरीची'; मौज प्रकाशन गृह, मुंबई; २००८.*


## देशपांडे, नागोराव घनश्याम

**कवी**

**२१ ऑगस्ट १९०९ – १० मे २०००**



'रानारानांत गेलि बाइ शीळ!' या सुप्रसिद्ध गीताचे निर्माते नागोराव देशपांडे यांचा जन्म त्यांच्या आजोळी सेंदुरजन, ता. सिंदखेडराजा येथे झाला. त्यांचे वडील साखरखेर्डा परगण्याचे (तालुका मेहकर) वतनदार देशपांडे होते. ते राजकारणी व परमार्थमार्गातले होते आणि त्यांनी धार्मिक व राजकीय स्वरूपाची बरीच रचना केली होती. नागोराव यांचे शालेय शिक्षण मेहकर येथे आणि महाविद्यालयीन शिक्षण नागपूरच्या मॉरिस महाविद्यालयात झाले. त्यांना गणिताची आवड असल्यामुळे त्यांनी आधी बी. एस्सी.साठी प्रवेश घेतला परंतु नंतर स्वतःची खरी प्रवृत्ती जाणून ते बी. ए.कडे गेले. बी. ए.नंतर एम. ए.कडे ते वळले खरे, तथापि विषमज्वर होऊन पोटाची व्याधी जडल्यामुळे ते तसेच अर्धवट सोडून पुढे ते एलूएल. बी. झाले. अर्थार्जनासाठी त्यांनी मेहकर (जिल्हा बुलढाणा) येथे वकिली केली.

१९२९ साली देशपांडे बी. ए. ला असताना एके रात्री नागपूरला धनतोलीवरून बर्डीकडे पुलावरून येताना 'शीळ' या कवितेचा जन्म झाला. टिपूर चांदणे पडले होते, नदीतले पाणी झळकत होते त्याच वेळी बाजूच्या मैदानाकडून बासरीचा घुमणारा आवाज ऐकू येत होता. या वातावरणात मनात ताल उत्पन्न झाला व दहा–पंधरा मिनिटांत 'शीळ' कविता झाली,' अशी या कवितेची जन्मकथा त्यांनी सांगितली आहे. जी. एन. जोशी यांनी ही कविता गायनाच्या बैठकीत म्हणावयास सुरुवात केली, त्या गाण्याची ध्वनिमुद्रिका निघाली व कवी म्हणून ना.घ.देशपांडे प्रकाशात आले. व्यावसायिक गायकाने कवितेला चाल लावून तिची ध्वनिमुद्रिका होण्याचा हा पहिला प्रयोग. 'शीळ' (१९५४), 'अभिसार' (१९६३), 'खूणगाठी' (१९८५) हे त्यांचे प्रसिद्ध कवितासंग्रह आहेत. १९८५ नंतरची त्यांची कविता 'गुंफण' (१९९६) या संग्रहात आणि 'कंचनीचा महाल', 'गिरिजेचा संसार', 'निःश्वास गीतावली' व 'जुईची कळी' या बऱ्याच पूर्वी लिहिलेल्या चार दीर्घकविता 'कंचनीचा महाल' (१९९६) या संग्रहात संकलित केल्या आहेत. त्यांचे आत्मपर ललितलेखन 'फूल आणि काटे' (१९९०) या पुस्तकात ग्रंथित झाले आहे.

**प्रेमकविता**

ना. घ. देशपांडे यांनी निःसंकोचपणे प्रेमकविता लिहिली. निर्भरता आणि धुंदी हे या प्रेमकवितेचे अंगभूत विशेष आहेत. स्त्रीपुरुषांना परस्परांविषयी वाटणारी नैसर्गिक ओढ, प्रेमातील उन्माद व व्याकूळता त्यांनी प्रत्ययकारी शब्दांत व्यक्त केली. त्यांना आपल्या कवितेमधून कुठलेही समाजप्रबोधन करावयाचे नाही किंवा कोणत्याही समस्याग्रस्त स्त्रीचित्रणासाठी कवितेचा वापर करावयाचा नाही. या कवितेतून प्रकटणारे प्रेम सर्वस्वी लौकिक, असांकेतिक व उत्कट आहे. 'झाले

द

जगाचे कडे माझ्यातुझ्याएवढे' असे प्रेमातच सर्व विश्व पाहणारी स्त्री त्यांच्या कवितेच्या केंद्रस्थानी आहे. 'कायदा येथील न्यारा ये। करूं वेडाच सौदा प्रेम दे। अन् प्रेम घे अन् यौवनाची ही नव्हाळी' हा ना. घ. देशपांडे यांच्या कवितेचा मंत्रच म्हणता येईल. 'नजरेचे जुगार। तुझ्यामाझ्यांत गऽ!' अशी प्रीतिभावना त्यांच्या कवितेतून व्यक्त होते. 'फार नको वाकू। जरी उंच बांधा। फार नको झाकू। तुझा गौर खांदा.... श्वास तुझेमाझे। जसा रानवारा। प्रीत तुझीमाझी। जशी सांजतारा' अशी मनमोकळी, अकृत्रिम प्रेमाभिव्यक्ती हा ना. घ. देशपांडे यांच्या प्रेमकवितेचा स्थायिभाव आहे. धीट प्रणयानुभूती, चित्रमयता आणि नाद यांचा सुमेळ साधणारी गीतात्म रचना आणि भाव व भाषा यांच्यातील परस्परपूरकता हे विशेष त्यांच्या काव्यात एकवटलेले दिसतात. 'मन पिसाट माझे अडले रे (पिसाट मन), अंतरीच्या गूढ गर्भी (आता), नदी किनारी, नदी किनारी, नदी किनारी, गऽ (नदी किनारी), घर दिव्यात मंद तरी। बघ, अजून जळते वात (अजून)' अशा त्यांच्या अनेक कविता मराठीमधील गीते म्हणून प्रसिद्धी पावल्या.

**स्त्रीविषयक वेगळा दृष्टिकोन**

ना. घ. देशपांडे यांचा स्त्रीविषयक दृष्टिकोन मराठीतील अन्य कवींपेक्षा वेगळा आहे. 'या विश्वाच्या प्रक्रियेत स्त्री हा एक मूलभूत महत्त्वाचा घटक आहे, अशी माझी निष्ठा आहे... ती एक सर्जनाची महत् शक्ती तर आहेच, पण जीवनात आकर्षण उत्पन्न करणारी एक मंगलमय प्रेरणाही आहे. माझ्या कवितांत स्त्रीविषयक कविता जास्त आहेत, असे काही लोक म्हणतात व ते खरेही आहे. ही उणीव आहे असे मला वाटत नाही. हे नैसर्गिक व काही अंशी आवश्यक आहे. हे आकर्षण जिवंत ठेवण्यासाठीच पार्वतीचे पुरातन नर्तन झाले होते. विश्वमनात या आकर्षणाचे स्पंदन सुरू आहे' या शब्दांत त्यांनी आपली काव्यांर्गत स्त्रीविषयीची भूमिका, 'खूणगाठी'च्या प्रस्तावनेत मांडली आहे. आपली काव्यनिर्मितीची प्रक्रिया कशी घडते, ते स्पष्ट करताना ना. घ. देशपांडे लिहितात 'रात्रीच्या गहन अंधारात काळ्यानिळ्या ढगांत एकच एक वीज झळकून जावी व एक सुंदर सोहळा एकच क्षण उभा राहावा असे कविता येताना मनात होते. सारे मन प्रकाशित व पुलकित होते. या झळकीची ओढ व आठवण अट्टाहास मनाला पकडते. हा सोहळा चिरंतन व्हावा अशी प्रेरणा होते. काही आकार, काही विकार, काही रंग, काही गंध, काही स्पर्श, काही स्वर, काही भूत, काही भविष्य, काही वर्तमान एकमेळ होऊन मनाच्या आकाशात शब्द होऊन उचल घेतात. मनातला चितारी त्यांची गुंफण करतो. ती कविता असे मला वाटते. ही झळक का व केव्हा येते, हे सांगणे फार कठीण आहे.'('खूणगाठी', प्रस्तावना,)

नायिकांची प्रणयातुरता व मुक्त प्रेमजीवनाविषयीची आसक्ती त्यांच्या कवितांतून अनेकवार व्यक्त होते. 'अभिसार' हे शीर्षक या दृष्टीने सूचक आहे. त्यांच्या प्रेमकवितेने शारीरिकता टाळली नसली, तरी मनोमीलनावाचून त्यांच्या प्रेमभावनेला पूर्णता लाभत नाही. किंबहुना, मनोमीलनानंतर शरीरमीलन असा क्रम त्यांच्या अनेक कवितांतून प्रतीत होतो. आपल्या कवितेतील भावाभिव्यक्ती करण्यासाठी काही वेळा ना. घ. देशपांडे निसर्गाचे साहाय्य घेतात. या दृष्टीने 'अभिसार' संग्रहातील त्यांच्या कविता पाहण्याजोग्या आहेत. नायिकेचे एकटेपण, सळसळणारे वारे, लुकलुकणारे तारे, फुलांचे हार माळून उभी असलेली जाई, झिंगलेले रान, किर्र रात्र, सर्व विश्वावर चढलेली विलक्षण धुंदी, या निसर्गाच्या पार्श्वभूमीवर 'अभिसार' कवितेतील नायिकेच्या मनातील उत्कट प्रीतिभावना रम्याद्‌भुत स्वरूपात प्रकटली आहे. निसर्गानुभूतींचे चित्रण करताना त्यांची कविता रंगसंवेदनांचा उपयोग अटळपणे मनमुराद करते.

**दीर्घकविता**

ना. घ. देशपांडे यांच्या दीर्घकविता रचनादृष्ट्या व आशयदृष्ट्या संपन्न म्हणाव्यात अशा आहेत. 'निःश्वास गीतावली' ही आईच्या निधनावरील विलापिका होय. ती सुमंदारमाला या पल्लेदार वृत्तात लिहिली आहे. या सबंध विलापिकेला मातृनिधनाने उचंबळून आलेल्या हृदयातील

अनिवार भावनांची गती लाभली आहे. 'तुझे भास होतात कित्येक आता अहोरात्र येते स्मृती अंतरी। हळू फाटणाऱ्या ढगांतून काळ्या जशी पाझरे चंद्रिका पांढरी' या शब्दांत आईच्या आठवणीने व्याकूळ झालेले कवीचे हृदय बोलते केले आहे.

'कंचनीचा महाल' ही दीर्घकविता एका दंतकथेवर आधारलेली आहे. 'मेहकरच्या उत्तरेला पैनगंगेच्या काठी अर्धगोल टेकडीच्या एका भागात एक जुनी वास्तू आहे. तिला 'कंचनीचा महाल' म्हणतात..... तेथे एक कंचनी राहत होती. तिला लोणार येथील सरोवरापाशी असलेल्या कमलजा देवीच्या मंदिराचा दिवा तिच्या महालातूनच बघायचा होता. तिने मजल्यावर मजले बांधत सात मजले बांधले व दिवा पाहिला. मात्र दिवा पाहिल्याबरोबर ती शिळा होऊन महालासमोर पडली. आत्ता आत्तापर्यंत तो शिळेचा दगड कायम होता. आता ही वस्तू भग्नावस्थेत असून पूर्वेकडून वर जाण्याच्या काही पायऱ्या शिल्लक आहेत.' ('कंचनीचा महाल', प्रस्तावना)

'गिरिजेचा संसार' ही एका कुमार्गी लागलेल्या तरुणीसंबंधीची कविता आहे. 'जुईची कळी' या कवितेत सबायतीचा उपयोग केला आहे. 'मराठीत प्लुतात 'अ' मिळवून कवितेत उपयोजितात. या कवितेत 'अगोट्' वृत्त वापरून उच्चारातील प्लुत कायम ठेवले आहेत.' (तत्रैव, प्रस्तावना)

काळाच्या ओघात त्यांची कविता छंदोबद्धतेकडून मुक्ततेकडे वळली. या 'गद्यघोषा'बद्दल ते स्वतः समाधानी होते. कारण 'या नव्या पद्धतीत कमी स्वरसंख्येत जास्त अर्थ येतो, म्हणजे कवितेची भाषा जास्त सकस होते.... शिवाय निरनिराळे भाव व्यक्त करण्याला आवश्यक व निवडक शब्दांचा उपयोग व भावानुकूल शब्दक्रम करायलाही मदत होते' असे स्पष्टीकरण 'खूणगाठी'च्या प्रस्तावनेत त्यांनी दिले आहे. स्वतःचा प्रकृतिधर्म ओळखून त्यानुसार काव्यरचना करणारा मराठीतील गुणवान गीतकाव्याचा निर्माता म्हणून ना.घ.देशपांडे यांचे मराठी कवितेतील स्थान अढळ आहे.

– प्रा. डॉ.विलास खोले

**संदर्भ :**


*१. काळे अक्षयकुमार; 'अर्वाचीन मराठी काव्यदर्शन'; पां. ना.बनहट्टी प्रकाशन, नागपूर; १९९९.*

*२. देशपांडे ना. घ.; 'शीळ'; मौज प्रकाशन, मुंबई; चौथी आवृत्ती, १९९३.*

*३. देशपांडे ना. घ.; 'खूणगाठी'; मौज प्रकाशन, मुंबई; दुसरी आवृत्ती, २००२.*


## देशपांडे, निर्मला वसंत

**कवयित्री, कादंबरीकार**

**२७ डिसेंबर १९१७ – १ फेब्रुवारी २००६**



निर्मला वसंत देशपांडे यांचा जन्म बडोदा येथे झाला. त्यांचे पूर्वाश्रमीचे नाव लीला फडणीस होय. त्यांच्या लेखनाचे एक ठळक वैशिष्ट्य जाणवते ते म्हणजे त्या स्त्रीच्या अंतर्मनाचा वेध घेतात. स्व-अनुभवच अनेक ठिकाणी कलारूप धारण करतो. त्यामुळे त्यांच्या लेखनाला जिवंतपणा प्राप्त होतो.

त्यांचे बालपण देवास, बडोदा, इंदोर, ग्वाल्हेर येथे गेल्यामुळे त्यांच्या लेखनाला बऱ्याचदा संस्थानची पार्श्वभूमी लाभते. ऐसपैस वाडे-बंगले, पाठीपुढे अंगण, गच्ची असलेली घरे, प्रत्येकाला भरपूर भावंडे असणे, मोठ्या मुलाने जबाबदारी कर्तव्य म्हणून स्वीकारणे, कौटुंबिक नात्यांनी बांधली गेलेली माणसे, मोठ्यांची घरातील वागणूक त्यांचे नीतिनियम, त्यांचा धाक-दरारा, मुलांवरचे संस्कार या साऱ्यांचे त्या काळातील दर्शन घडते. प्रत्यक्ष आईवडिलांपेक्षाही त्यांचे आजी, काकी, मामी, आत्या अशांशीही असलेले प्रगाढ नाते; याचे कालानुरूप दर्शन त्यांच्या लेखनातून घडते.

'टिकली येवढं तळं', 'बन्सी काहे को बजायी', 'कथा एका बकुळची', 'सलत सूर सनईचा' आदी कादंबऱ्या; 'मर्ल' हा कथासंग्रह; 'गंधखुळी', 'हा छंद सुटत नाही' हे काव्यसंग्रह; 'मातीची गाय', 'पौर्णिमेचा

चंद्र', 'चिव चिव चिमणी', 'उंटावरचा शहाणा' हे बालवाङ्मय; 'भाळी गोंदण चांदणे' हे आत्मचरित्र अशी त्यांची ग्रंथसंपदा आहे. त्यांच्या 'टिकली येवढं तळं', 'कथा एका बकुळची' या कादंबऱ्यांना आणि 'मातीची गाय', चिव चिव चिमणी' या बालसाहित्याला महाराष्ट्र शासनाचे पुरस्कार लाभले आहेत. 'भाळी गोंदण चांदण' या त्यांच्या आत्मचरित्रातून तत्कालीन संस्कृती सतत दिसते. पहिल्यांदाच लुगडे नेसण्याचा सोहळा, अनंताच्या पूजेचे नेम-नियम, दागिन्यांचे वेगळे-वेगळे जाडजूड प्रकार, श्रावण्या-अभिषेक, लग्नानंतर गोंधळ घालणे हे आहेच पण खास 'सीकेपी'च्या रितीभाती, वेगवेगळी पक्वान्ने, सामीष आणि इतर पदार्थ यांचीही ओळख होते.

या आत्मचरित्रात त्यांनी कुठलाही आव न आणता नम्र भूमिका घेतली आहे. आपल्या या आत्मपर लेखनाला 'आत्मचरित्र' असे भारदस्त नाव देणे त्यांना पटत नाही. त्यांच्या पतीचे- वसंत देशपांडे यांचे सहजीवनातला जोडीदार म्हणून चित्रण झाले आहे. 'स्व'ला अधिक महत्त्व आहे, पण 'माझ्यावर सतत अन्याय केला गेला' असा सूर नाही. आपल्या मतांमध्ये विचारांमध्ये झालेले बदल, आपला त्रागा, चिडचिड, मुंबईत आल्यावर सुरुवातीला आलेले कावरे-बावरेपण, पतीचा अलिप्तपणा, पण माहेरच्यांना त्यांनी सहजपणे दिलेला आधार, नातूंशी असलेली त्यांची मैत्री, त्यांचा मृदू उबदार स्नेह, त्या स्नेहाची देशपांड्यांना असणारी जाणीव, महत्त्वाचे म्हणजे या मैत्रीमुळे पति-पत्नीमध्ये थोडाही तणाव नाही हा पतीचा समजूतदारपणा, त्यांच्या विवाहाचा गाढ विश्वास आणि प्रगाढ माया त्या साध्या सोप्या शब्दांत मांडतात.

कपाळावरचे गोंदण काही पुसता येत नाही, तसेच आयुष्यातील दुःखही वजा करता येत नाही; पण सुखाचे चांदणे फुलवणे तर आपल्या हातात असते. निर्मला बाईंनी हेच केले; त्यांनी आयुष्यातून चांदणे शोधले... फुलवले.

'टिकली येवढं तळं' या कादंबरीत तेच वातावरण, सर्जनक्षमता असणारी नायिका, तिला प्रोत्साहन देणारे निशिकांत, त्यांच्यात निर्माण झालेला एक तरल अनुबंध यांचे चित्रण आहे. नायिकेबरोबरीनेच 'रामप्यारी'सारख्या एका कामवालीचे चित्रणही त्या सुरेख करतात. त्यासाठी बुंदेलखंडी लोकगीतांच्या वापर केल्यामुळे एक वेगळाच पोत त्या व्यक्तिरेखेला प्राप्त होतो. कणखरपणा, जीवनविषयक तत्त्वज्ञान, जीवनात काहीच न मिळूनही हसत-खेळत जगण्याची वृत्ती हे सारे त्या व्यक्तिरेखेतून रेखाटले आहे. आपल्याकडे काम करणाऱ्या गंगा देवकी यांचेही चित्रण त्यांनी आपल्या आत्मचरित्रामधून केले आहे.

साहित्यिकांच्या सहवासामुळेही त्यांचे आयुष्य सधन झालेले दिसते. त्यांच्या काव्यवेडाला खतपाणी घालणारे 'जाँ निसार अख्तर', 'शिवमंगल सिंह-सुमन' हे कवी महाविद्यालयीन काळात तर पुढे ग्रेस, जयवंत दळवी, श्री. दा. पानवलकर, मधुकर केचे, शिरीष पै, सोपानदेव चौधरी, रामदास भटकळ यांची मैत्री पोषक ठरली.

'बन्सी काहेको बजायी' ह्या त्यांच्या कादंबरीबद्दल डॉ. द. भि. कुलकर्णी म्हणतात, 'अतिशय निरलंकृत शैलीतील, व्यक्तिमनातून सामाजिक नेणिवेचा आविष्कार करणारे ऋजू अंतःकरणाचे ललित साहित्य मधुर तरीही वास्तव, एककेंद्री तरीही बहुमुखी अनुभूती देणारी मानवी मनाचे-जीवनाचे निरुपम चित्रण लेखिकेला साधले आहे.'

'मर्ल' या त्यांच्या कथासंग्रहाबद्दल 'निवेदनशैलीत फसवा साधेपणा, नाट्यपूर्ण घटनांची चोखंदळ आणि कसबी रचना त्यांची कथा म्हणजे मऱ्हाटी संस्कृतीचाच एक विविधतापूर्ण 'पोट्रेट' आहे,' अशा शब्दांनी ज्ञानेश्वर नाडकर्णी यांनी गौरवले आहे.

'मर्ल', 'उज्ज्वला बर्वे', 'निथळगौर', 'बन्नाबन्नी', 'मेरी हॅड अ लिटिल लँब' या कथाही अतिशय वाचनीय आहेत. त्यांच्या बालकवितांमध्येही मुलांना आवडतील अशा चमकदार कल्पना आढळतात.

– प्रा. मीना गुर्जर

**संदर्भ :**


१. *पाटील रमाकांत; 'निर्मल नेतृत्वाची पदयात्रा'; नवशक्ती ६ ऑक्टोबर १९७४.*

## देशपांडे, पुरुषोत्तम यशवंत
**कादंबरीकार, तत्त्वचिंतक**
**११ डिसेंबर १८९९ – २६ जुलै १९८६**



पुरोगामी वृत्तीचे व कृतीचे पुरुषोत्तम यशवंत देशपांडे यांचा जन्म अमरावतीला झाला. त्यांनी १९२५ साली मुंबई विद्या-पीठाची एम.ए. व पुढच्याच वर्षी नागपूर विद्यापीठाची एलएल.बी. पदवी संपादन केली. १९२५च्या मे महिन्यात देशपांडे ह्यांचा विवाह विमल दिगंबर कोल्हटकर ह्यांच्याशी झाला. त्या वेळी झालेला हा प्रीतिविवाह भरपूर गाजला. डॉ. श्रीधर व्यंकटेश केतकर यांनीही अभिनंदन केले होते. जीवनातील घटनांचा ज्यांच्या मनावर मूलगामी परिणाम होऊन आपल्याला आलेल्या अनुभवांचे स्वतंत्र दृष्टिकोनातून मूल्यमापन करून त्यांचा मुक्तपणे आविष्कार करण्यास प्रवृत्त झालेल्या त्या वेळच्या नूतन लेखकांपैकी पु. य. देशपांडे हे एक होते. १९२७ साली लिहिलेल्या 'बंधनाच्या पलीकडे' या त्यांच्या पहिल्या कादंबरीत एक उत्कट, आत्मनिष्ठ पण विचारशील व्यक्तिमन व ठरावीक सामाजिक आदर्श ह्यांमधील संघर्षाचे चित्रण आहे. त्यांचे समकालीन लेखक श्री. के. नारायण काळे यांनी 'ज्ञानप्रकाश'मध्ये या कादंबरीवर मार्मिक, वस्तुस्थितीचा यत्किंचितही विपर्यास न करणारे परीक्षण लिहिले.

'पी. वाय. ह्यांच्याशी काही बाबतीत मतैक्य झाले नाही, तरी जातिभेद नाहीसा करणे, प्रेमविवाहाला उत्तेजन देणे, समाजातील दुष्ट रूढी, अंधश्रद्धा व भलत्या समजुती शक्यतो गोडीने पण अशक्य तेथे बंड करूनही नाहीशा करणे, स्त्रियांची जी भयंकर हीन स्थिती झाली आहे, ती दूर करणे इत्यादी अत्यंत महत्त्वाच्या सामाजिक सुधारणा प्रत्येकाने यथाशक्ति आचरणात आणल्या पाहिजेत, हे त्यांचे मत मलाही पूर्णपणे मान्य आहे', असे विदर्भातील एका समकालीन तरुण चिकित्सकाचे मत देशपांडे यांच्या कामगिरीवर प्रकाश पाडणारे आहे.

'असहकारा'च्या (१९२१) व 'छोडो भारत'च्या (१९४२) चळवळीत भाग घेऊन देशपांडे यांनी कारावास भोगला होता. वऱ्हाडच्या यूथ लीगचे ते अध्यक्ष होते (१९३१). नंतर प्रांतिक काँग्रेस कमिटीचे चिटणीस झाले. १९४८-१९५२ या काळात देशपांडे मध्य प्रदेशच्या इंटक शाखेचे अध्यक्ष होते. १९३३ ते १९४२ या काळात त्यांच्यावर मार्क्सवादाचा प्रभाव असूनही त्यांची गांधीजींवरील निष्ठा कमी झाली नाही. 'भवितव्य' साप्ताहिकाचे संपादन, वकिलीचा व्यवसाय करता-करता त्यांनी वैदिक वाङ्मयाचा व विशेषतः बौद्ध साहित्याचा व्यासंग जोपासला होता. विद्यार्थिदशेत रामकृष्ण परमहंस, स्वामी रामतीर्थ व स्वामी विवेकानंद यांच्या वाङ्मयाचा त्यांच्या मनावर चांगलाच ठसा उमटला.

आधुनिक विचारप्रणालीच्या व्यासंगी देशपांड्यांची वृत्ती अंतर्मुख असून चिंतनशीलता हा त्यांचा स्वभाव होता. 'गांधीजीच का?' (१९४४) या ग्रंथात त्यांनी गांधीजींच्या माहात्म्याची मीमांसा केली आहे. 'सुकलेले फूल' व 'सदाफुली' या त्यांच्या कादंबऱ्या विशेष महत्त्वाच्या आहेत.

'अनामिकाची चिंतनिका'मध्ये जीवनविषयक चिंतन आहे. या पुस्तकाला साहित्य अकादमीचे (१९६२) पारितोषिक मिळाले. एक प्रकारची बंडखोर पण चिंतनशील स्वच्छंदतावादी प्रवृत्ती त्यांच्या सर्व कादंबऱ्यांत प्रत्ययाला येते. देशपांडे यांचे वाङ्मयविषयक विचार वाङ्मय मंडळांतून, साहित्य संमेलनांतून केलेल्या भाषणांत तसेच 'नवी मूल्ये' या निबंधसंग्रहात व्यक्त झाले आहेत. 'अनुभवामृत रसरहस्य' तीन खंड (१९६२-१९६५) हे संत ज्ञानेश्वरांच्या अमृतानुभववर लिहिलेले निरूपण आहे. 'द ऑथेंटिक योग'मध्ये पतंजलीच्या योगसूत्रांवर एक अभिनव भाष्य आहे. याचा जर्मन अनुवाद १९७६ साली जर्मनीत प्रसिद्ध झाला. शिवाय 'भारतीय संस्कृतीला आव्हान' व 'सोव्हिएट रशिया आणि हिंदुस्थान' हे ग्रंथ उल्लेखनीय आहेत.

पॅरिस येथे १९५२मध्ये 'इंटरनॅशनल कॉन्फरन्स फॉर कल्चरल फ्रीडम' या बैठकीला भारतीय संस्कृती मंडळाचे

प्रतिनिधी या नात्याने देशपांडे उपस्थित होते. भारतीय प्रतिनिधी म्हणून ते ताश्कंद येथे झालेल्या आफ्रो-आशियाई लेखक परिषदेला गेले होते. विदर्भ साहित्य संघ व इतरही वाङ्मयीन संस्थांचे अध्यक्षपद त्यांना लाभले होते.

– वि. ग. जोशी

**संदर्भ :**


*१. जोशी तर्कतीर्थ लक्ष्मणशास्त्री; 'मराठी विश्वकोश', खंड ७; महाराष्ट्र राज्य साहित्य संस्कृती मंडळ, मुंबई; १९७६.*

*२. मोटे, ह. वि.; संपादक 'विश्रब्ध शारदा', खंड पहिला; ह. वि. मोटे प्रकाशन; दुसरी आवृत्ती, १९९३.*

*३. कुलकर्णी न. मा., संपादक, 'मी का लिहितो?'; प्रतिभा प्रकाशन, औरंगाबाद; १९४९.*

*४. देशपांडे, पु.य; 'अनामिकाची चिंतनिका'; नागपूर प्रकाशन, नागपूर; १९६१.*


## देशपांडे, पुरुषोत्तम लक्ष्मण

**नाटककार, विनोदीलेखक, संगीतकार, प्रवासवर्णनकार**

**८ नोव्हेंबर १९१९ – १२ जून २०००**



अवघ्या महाराष्ट्राचे लाडके व्यक्तिमत्त्व बनून जवळजवळ अर्धशतक महाराष्ट्राला रिझवणाऱ्या पुरुषोत्तम लक्ष्मण देशपांडे उर्फ 'पुल' ह्यांचा जन्म ८ नोव्हेंबर १९१९ गावदेवी इथल्या कृपाळ हेमराज चाळीमध्ये झाला. त्यांचे वडील लक्ष्मणराव देशपांडे उर्फ आबा बेळगावच्या चंदगड गावचे. आपल्या ओढग्रस्तीच्या कुटुंबजीवनात त्यांनी संगीतप्रेम जपले, जे पुढे पुलंमध्येही आले. पुलंचे आजोबा (आईचे वडील) म्हणजे कारवारचे वामन मंगेश दुभाषी. त्यांनी ऋग्वेदी या टोपण नावाने ग्रंथ लिहिले. त्यांचा 'आर्यांच्या सणांचा इतिहास' हा ग्रंथ, त्यांनी केलेले टागोरांच्या 'गीतांजली'चे भाषांतर हे त्यांच्या व्युत्पन्नतेचे द्योतक आहेत. त्यांच्या कन्या कमल (सौ. लक्ष्मीबाई) ह्या पुलंच्या मातोश्री. गोड गळा आणि पेटीवादनाची आवड ही त्यांची वैशिष्ट्येही वंशपरंपरेने पुलंमध्ये आली. आई-वडील, आजी-आजोबा, शेजारी राहणारे मातुल कुटुंब यांच्या निगराणीत पुलंच बालपण अगोदर जोगेश्वरी व नंतर विलेपार्ले येथे आनंदात गेले.

नकला करणे, गाणे म्हणणे, पेटी वाजवणे, नाटके लिहिणे-बसवणे, त्यांत भूमिका करणे, उत्तमोत्तम भाषणे ऐकणे आणि स्वतः करणे अशा अनेक उपक्रमांमधून पुलंचे व्यक्तिमत्त्व विकसित होत होते. उत्तम निरीक्षण, उत्तम भाषाप्रभुत्व आणि हरहुन्नरीपणा ह्यांच्यामुळे त्यांचा नावलौकिक होत होता. पुलंनी १९३६ साली मॅट्रिक, १९३८ साली इंटर आणि १९४१ साली एलूएल.बी पूर्ण केले. (या काळात इंटरच्या परीक्षेनंतर थेट एलूएल.बी होता येत असे.) पण १९४१ साली वडिलांचे आकस्मिक निधन झाल्यामुळे पुलंना त्यांचे मुंबईचे बिऱ्हाड आवरून पुण्याला स्थलांतरित व्हावे लागले. कष्टी आई आणि उमेदीच्या वयातली भावंडे (बंधू उमाकांत, रमाकांत आणि बहीण मीरा) यांना वडीलकीचा आधार द्यावा लागला. १९४२ साली पुण्याच्या फर्गसन महाविद्यालयामध्ये बी.ए.साठी नाव नोंदवणे, चरितार्थासाठी भावगीतांचे कार्यक्रम करणे अशी धडपड सुरू झाली. १९५० मध्ये सांगलीच्या विलिंग्डन महाविद्यालयातून ते एम.ए. झाले. त्यानंतर बेळगावच्या राणी पर्वतीदेवी महाविद्यालयात, मुंबईच्या कीर्ती महाविद्यालयात आणि मालेगाव शिक्षण संस्थेत त्यांनी अध्यापनाचे काम केले. १९४३ साली बडोद्याच्या 'अभिरुची' मासिकामध्ये पुलंनी लिहिलेले अण्णा वाडगावकर हे व्यक्तिचित्र प्रसिद्ध झाले. तिथून त्यांची अर्धशतकी लेखकीय कारकिर्द सुरू झाली.

१९४४ साली बी.ए. झाल्यावर दादरच्या ओरिएन्ट हायस्कूलमध्ये ते शिक्षकाची नोकरी करू लागले. रत्नागिरीच्या ठाकूर वकिलांची कन्या सुनीता ह्या सहशिक्षिका तेथे त्यांना भेटल्या. १२ जून १९४६ रोजी रत्नागिरी येथे नोंदणी विवाह करून दोघांनी ५४ वर्षांचे समृद्ध दांपत्यजीवन अनुभवले.

**नाटककार खेळीया**

चिंतामणराव कोल्हटकरांच्या ललितकलादर्शनाच्या नाटकानंतर मो. ग. रांगणेकर ह्यांच्या नाट्यनिकेतन कंपनीच्या नाटकांमध्ये पुल काम करीत असत. रांगणेकर लिखित-दिग्दर्शित 'कुबेर' या चित्रपटात पुलंनी नायकाच्या धाकट्या भावाची भूमिका केली. 'जा जा ग सखी, जाऊन सांग मुकुंदा' हे गीतही गायले. इथून त्यांची मराठी चित्रपटसृष्टीतील झगमगती कारकिर्द सुरू झाली. १९४७ सालच्या 'कुबेर'पासून १९५४ सालच्या 'गुळाचा गणपती'पर्यंत एकूण २४ मराठी चित्रपटांत कथा, पटकथा, संवाद, संगीत, भूमिका, दिग्दर्शन अशा विविध क्षेत्रांमध्ये पुलंची कामगिरी घडली.

'तुका म्हणे आता' हे मंचस्थ झालेले पुलंचे पहिले नाटक. ८ नोव्हेंबर १९४८ रोजी त्याचा पहिला प्रयोग पुण्यात झाला. यश मिळाले नाही, पण रंगभूमीवरचे प्रेम दृढ झाले. डिसेंबर १९५५ मध्ये आकाशवाणीच्या सेवेत, पुणे केंद्रावर ते रुजू झाले. १९५९ ते १९६१ या काळात भारतातल्या दूरदर्शनचे पहिले निर्माते म्हणून दिल्लीत आकाराला आलेली कारकिर्द ही त्यांच्या प्रसारमाध्यमातल्या जाणकारीची द्योतक ठरली. १९५७-५८ हा काळ त्यांच्या जीवनात अनेक अर्थांनी संस्मरणीय ठरला. २६ जानेवारी १९५७ रोजी 'तुझे आहे तुजपाशी' हे त्यांचे सामाजिक नाटक रंगभूमीवर आले. ते मराठी नाट्यसृष्टीतील मैलाचा दगड मानले जाते.

याच काळात जनवाणी, साधना, दीपावली, शिरीष, विविध वृत्त वगैरे नियतकालिकांमधून बटाट्याच्या चाळीतल्या सामूहिक घडामोडी विनोदी अंगाने रंगवणारे त्यांचे लेख प्रसिद्ध झाले. ते खूप गाजले. १९५८ साली मौज प्रकाशन गृहाने त्यांचे 'बटाट्याची चाळ' हे पुस्तक प्रसिद्ध केले. २० ऑगस्ट १९५८ ला पुलंनी युनेस्कोच्या शिष्यवृत्तीवर मिडिया ऑफ मास एज्युकेशनचा अभ्यास करण्यासाठी लंडन गाठले. इंग्लंडमधल्या त्या वास्तव्यावर, एकूण प्रवासावर आधारलेले 'अपूर्वाई' हे त्यांचे प्रवासवर्णन अगोदर किर्लोस्कर मासिकात क्रमशः प्रसिद्ध झाले. नोव्हेंबर १९६० मध्ये ते पुस्तकरूपाने आले. लंडनमधल्या मुक्कामातच 'बटाट्याची चाळ'मधल्या निवडक अंशांचे जाहीर अभिवाचन त्यांनी केले, जी पुढे विलक्षण गाजलेल्या एकपात्री खेळाची नांदी होती. अशा प्रकारे नाटककार पुल, प्रवासवर्णनकार पुल आणि खेळीया पु.ल. हे तिघेही १९५७-५८ मध्ये उदयाला आले.

**विनोदाची पखरण**

पु.लंच्या या सर्व आविष्कारांमध्ये विनोदाची सुखद पखरण होती. शिवाय स्वतंत्रपणे विनोदी साहित्यही त्यांनी विपुल प्रमाणात लिहिले. त्यामुळे त्यांच्या बहुआयामी व्यक्तिमत्त्वामधला विनोदकार हाच बहुसंख्य लोकांच्या स्मरणात राहिला, जवळचा वाटला. स्वतःच्या रोजच्या, सामान्य जीवनाकडे बघण्याची एक उमेदी निकोप जीवनदृष्टी त्यांना पुलंनी दिली. पुलंपर्यंतच्या गाजलेल्या मराठी विनोदकारांनी मानसपुत्र निर्माण केले.

पुलंनी बटाट्याची चाळ मधून साठ बिऱ्हाडांचा एक मानस-समूह निर्माण केला आणि त्यांच्या दैनंदिन जगण्यातून मध्यमवर्गीय जीवनसरणीची मार्मिक उलटतपासणी केली. सूक्ष्म निरीक्षण, भाषेवर विलक्षण हुकमत, उपरोध-उपहास-विडंबन ह्यांचा सहज वापर, विविध क्षेत्रांमधील संदर्भांची समृद्धी, सहृदयता आणि तारतम्याचे भान ह्यांमुळे पुलंचा विनोद सहजसुंदर झाला. निर्विष झाला.

जगातल्या दोन महायुद्धांनी हादरलेली, देशाच्या पारतंत्र्याने पिचलेली, महागाई-टंचाई-कुचंबणा-कोतेपणा ह्यांनी गांजलेली वेळोवेळी येणाऱ्या साम्यवाद-समाजवाद-स्त्रीवाद ह्या नवविचारांचा अर्थ लावताना गांगरलेली, जीवनाचा उपभोग घेताना अपराधगंडाने पछाडलेली अशी माणसे ही पुलंचे लक्ष्य होती. त्यांना पुलंनी आपल्या व्यक्तित्वाने, कर्तृत्वाने, वक्तृत्वाने मोकळेढाकळे केले. जीवनोन्मुख केले. 'खोगीरभरती', 'नसती उठाठेव', 'गोळाबेरीज', 'हसवणूक', 'खिल्ली', 'मराठी वाङ्मयाचा गाळीव इतिहास' ह्या त्यांच्या विनोदी लेखसंग्रहांनी लोकप्रियतेचा कळस गाठला. तर

'वाऱ्यावरची वरात', 'असा मी असा मी', 'हसवण्याचा माझा धंदा', 'वटवट' इत्यादी बहुरूपी कार्यक्रमांचे शेकडो प्रयोग मराठी प्रेक्षकांनी डोक्यावर घेतले. अपूर्वाईनंतर 'पूर्वरंग', 'जावे त्याच्या देशा', 'वंगचित्रे' इत्यादी प्रवासवर्णनपर लेखनातून मराठी माणसाला बोटाला धरून त्यांनी जगभर फिरवले, त्यांची क्षितिजे विस्तारली. 'सारं कसं शांत शांत', 'विठ्ठल तो आला आला', 'पूर्वज, सांत्वन', 'मोठे मासे छोटे मासे' इत्यादी एकांकिकांमधून मराठी मनाला हसतखेळत चिमटे काढले. पुलंनी विनोद लिहिला, अभिनित केला, उत्तम वक्तृत्वाने तो लोकांपर्यंत पोहोचवला, सिनेमा-नाटकांतून तो दाखवला. इतक्या दीर्घ काळ मुक्तहस्ताने विनोदाची चौफेर उधळण करणारा दुसरा विनोदकार मराठी समाजाला मिळाला नाही. मात्र पुल केवळ विनोदकार नव्हते.

**गुणग्राही कलावंत**

द

१९७७ मध्ये देशात अणीबाणी जाहीर झाली आणि पुलंमधला विवेकवादी स्वातंत्र्यप्रेमी लोकांसमोर आला. सेवादलाचे, गांधीजी व सावरकर यांच्या विचारांचे, पुढे लोहियाप्रणीत समाजवादाचे संस्कार घेतलेले पुलंचे मन तेव्हाच्या राजकारण्यांतल्या मनमानीमुळे व्यथित झाले. आणि काही काळ त्यांनी विदूषकाचा पोशाख उतरवून लेखणीचे शस्त्र हाती घेतले. अणीबाणीच्या विरोधातली पुलंची जाहीर भाषणे, 'खिल्ली' ह्या पुस्तकात संग्रहित झालेले राजकीय उपहासपर लेख, जयप्रकाशजींच्या डायरीचा अनुवाद यांतून वेगळेच पुल लोकांना ऐकायला-वाचायला मिळाले.

पुलंमधली गुणग्राहकता, मूल्यविवेक, उत्कट भव्यतेची आस आणि क्षुद्रतेचा तिटकारा हे सारे त्यांना नुसते रंजनपर लेखक राहू देत नव्हते. देशपरदेशांत जिथे काही चांगले काम होत असेल त्याची नोंद घेणे, ते करणाऱ्यांना मानाचा मुजरा करणे ही त्यांची आंतरिक गरज होती. तिच्यापोटी त्यांनी अत्यंत प्रभावी व्यक्तिचित्रे लिहिली जी पुढे 'व्यक्ती आणि वल्ली', 'गणगोत' 'गुण गाईन आवडी', 'मैत्र' इत्यादी पुस्तकांमध्ये संग्रहित झाली. ह्या गुणग्राहकतेचा वेगळा आविष्कार म्हणजे त्यांनी केलेली भाषांतरे-रूपांतरे 'सुंदर मी होणार', 'तीन पैशाचा तमाशा', 'राजा आयदिपौस', 'एक झुंज वाऱ्याशी', 'ती फुलराणी' ही त्यांची नाटके गाजलेल्या पाश्चात्त्य कलाकृतींवर आधारलेली होती. हेमिंग्वेच्या 'ओल्ड मॅन ॲन्ड द सी' ह्या कादंबरीचा 'एका कोळियाने' हा त्यांनी केलेला अनुवादही लक्षणीय होता. ह्याखेरीज दाद देण्याचा एक वेगळा उपक्रम पुलंनी सपत्नीक केला. तो म्हणजे बा.सी. मर्ढेकर, बा.भ. बोरकर, आरती प्रभू इत्यादी ज्येष्ठ कवींच्या कवितावाचनाचे जाहीर कार्यक्रम करणे. एका कलावंताने दुसऱ्या कलावंतांना अशी जाहीर दाद देणे, त्याच्यासाठी परिश्रम घेणे हे दुर्मीळच म्हणावे लागेल.

पुलंच्या सामाजिक जाणिवेचा ढळढळीत आविष्कार म्हणजे त्यांनी १९६६ साली स्थापन केलेले पु.ल. देशपांडे प्रतिष्ठान 'जोडोनिया धन उत्तम व्यवहारे। उदास विचारे वेच करी।।' हे ब्रीदवाक्य असणाऱ्या या सामाजिक विश्वस्त निधीतून पुलंनी विविध शैक्षणिक-सांस्कृतिक संस्थांना आपल्या हयातीत सुमारे एक कोटी रुपयांचे अर्थसाहाय्य केले.

ह्या प्रदीर्घ आणि झगमगत्या कारकिर्दीत पुलंना अनेक मानसन्मान मिळाले. अध्यक्षपदे, पारितोषिके, सत्कार ह्यांनी उत्तरायुष्य गजबजून गेले. उत्कृष्ट वाङ्मय निर्मितीचे महाराष्ट्र शासनाचे पुरस्कार १९५८ ते १९६६ ही सहा वर्षे त्यांच्या सहा पुस्तकांना ओळीने मिळाले. ती पुस्तके म्हणजे 'तुझे आहे तुजपाशी', 'बटाट्याची चाळ', 'अपूर्वाई', 'व्यक्ती आणि वल्ली' आणि 'पूर्वरंग'. यांपैकी 'व्यक्ती आणि वल्ली' पुस्तकाला १९६६ चा साहित्य अकादमी पुरस्कारही प्राप्त झाला, याच वर्षी भारत सरकारतर्फे 'पद्मश्री' दिली गेली. १९९० मध्ये पद्मभूषण हा किताब मिळाला.

याखेरीज मध्य प्रदेश शासनाचा कालिदास सन्मान, बालगंधर्व स्मृतिगौरव मानचिन्ह, ग.दि.मा पुरस्कार, गडकरी पुरस्कार, महाराष्ट्र गौरव पुरस्कार, पुण्यभूषण पुरस्कार, रवींद्र विद्यापीठ, कोलकाता यांच्यातर्फे 'साहित्याचार्य' (म्हणजेच डी. लिट) पुणे विद्यापीठ-

टिळक महाराष्ट्र विद्यापीठ यांच्या तर्फे डी. लिट, अखिल भारतीय मराठी साहित्य संमेलन, नाट्यसंमेलन, तमाशा परिषद यांची अध्यक्षपदे, पहिल्या जागतिक मराठी परिषदेतर्फे गौरव असे अनेक मानसन्मान पुलंकडे चालत आले. ह्या सर्वांचे एक कायमस्वरूपी प्रदर्शन विलेपार्ले इथल्या लोकमान्य सेवा संघामध्ये योजलेले आहे. तो एका व्यक्तीचा जीवनपट आहे. तसेच महाराष्ट्राच्या एका सांस्कृतिक कालखंडाचा तो धावता आढावाही आहे.

– मंगला गोडबोले

**संदर्भ :**

१. *देशपांडे स.ह., गोडबोले मंगला; 'अमृतसिद्धी' पु.ल. समग्रदर्शन; राजहंस प्रकाशन, पुणे; १९९५.*

## देशपांडे, यशवंत खुशाल

**संशोधक**

**१४ जुलै १८८४ – २० नोव्हेंबर १९७०**



महानुभाव वाङ्मयाचे अभ्यासक यशवंत खुशाल देशपांडे यांचा जन्म अमरावती जिल्ह्यातील पापळ या गावी झाला. प्राथमिक शिक्षण घनज येथे तर माध्यमिक व महाविद्यालयीन शिक्षण अनुक्रमे अमरावती व मुंबई येथे झाले. १९०६ साली ते एम.ए झाले. एलएल.बी. झाले. यवतमाळमध्ये वकिली सुरू केली व १९४० मध्ये व्यवसायातून निवृत्त झाले. १९०७मध्ये त्यांची 'माझी शांती' ही कादंबरी प्रसिद्ध झाली.

डॉ. भांडारकर व इतिहासाचार्य राजवाडे यांच्या संशोधन कार्याने प्रभावित झाल्यामुळे, त्यांना संशोधन कार्याची आवड उत्पन्न झाली. हिंदुस्थानभर हिंडून संस्कृत व मराठी ग्रंथ, ऐतिहासिक कागदपत्रे, शिलालेख, ताम्रपट, नाणी, मूर्ती, छायाचित्रे या दुर्मीळ गोष्टी ह्यांचा संग्रह त्यांनी केला.

१९२६ मध्ये यवतमाळ येथे 'शारदाश्रमची' स्थापना केली. त्याच्यातर्फे प्रकाशित होणाऱ्या 'शारदाश्रम' (१९३३) या वार्षिकाचे संपादनही केले. 'थिऑसॉफिकल सोसायटी', 'प्राच्यविद्या परिषद' यांच्या कार्यात त्यांचा सहभाग होता. १९३९ मध्ये झुरिक येथे भरलेल्या जागतिक इतिहास परिषदेत त्यांनी भारताचे प्रतिनिधित्व केले. ब्रुसेल्स येथे झालेल्या प्राच्यविद्या परिषदेलाही ते उपस्थित होते. 'रॉयल सोसायटी ऑफ ग्रेटब्रिटन'च्या सदस्यत्वाचा बहुमान त्यांना मिळाला होता.

मराठी साहित्याच्या दृष्टीने देशपांडे यांचे बहुमोल कार्य म्हणजे महानुभाव वाङ्मयाचा त्यांनी करून दिलेला परिचय होय. यासाठी त्यांनी उभा महाराष्ट्र, पंजाब, पेशावरपर्यंत भ्रमंती केली. कित्येक महानुभाव मठांना त्यांनी भेटी दिल्या. तिथल्या महंतांशी चर्चा केल्या. माहिती संग्रहित केली. अनेक ग्रंथांचे वाचन केले. त्यानंतर त्यांनी 'महानुभावीय मराठी वाङ्मय' (१९२६) हा ग्रंथ सिद्ध केला. याशिवाय 'ऋद्धिपूरवर्णन' (१९२९), 'श्रीचक्रपाणी चरित्र' (१९३६), 'पंडित भीष्माचार्य संकलित निरुक्तशेष (१९६१) या ग्रंथांचे संपादन केले. सुंदरीलिपीमध्ये लिहिलेल्या 'भीष्माचार्य पाठ', 'वाइन्देशकार पाठ', 'विराट पाठ' अशा विविध पाठांच्या आधारे, संशोधनपूर्वक संपादन केलेला मराठी वाङ्मयातील गद्यचरित्र ग्रंथ म्हणजे 'श्रीचक्रपाणी चरित्र'. या प्राचीन चरित्रग्रंथाचे महत्त्व केवळ भाषेच्याच दृष्टीने नसून, १३ व्या शतकाच्या पूर्वार्धातील चालीरिती, संस्कार इत्यादींची माहिती या ग्रंथातून होते. तत्कालीन हस्तलिखित पोथीवरून हे चरित्र लिहिले आहे. वऱ्हाडची प्राचीन राजधानी एलिचपूर या शहराचा इतिहास कथारूपाने देण्याचा प्रयत्न 'एलिचपूर– वऱ्हाडची जुनी राजधानी' (१९३४) या पुस्तकात केला आहे.

– प्रा. मंगला गोखले

**संदर्भ :**

१. *'संशोधन महर्षींचे देहावसान'; महाराष्ट्र साहित्य पत्रिका– ऑक्टो.नोव्हे.डिसें. १९७०.*

२. *फडणीस विजया; 'आठवणी य. खुं.च्या' साहित्यसूची; ऑगस्ट १९८९.*

द

## देशपांडे, सखाराम हरी

☞ मुख्य नोंद – पत्रकारिता आणि ललितेतर साहित्य खंड

## देशपांडे, सुनीता पुरुषोत्तम

**ललित लेखिका, आत्मकथनकार**

**३ जुलै १९२६ – ७ नोव्हेंबर २००९**



सुनीता पुरुषोत्तम देशपांडे यांचा जन्म रत्नागिरीत झाला. वडील सदानंद ठाकूर हे रत्नागिरीतील निष्णात फौजदारी वकील होते. ते मूळचे धामापूरचे. काँग्रेसमध्ये असलेले सुनीताबाईंचे मामेमामा राजा पाटेकर यांनी अण्णासाहेब सहस्रबुद्धे ह्यांच्याशी सुनीताबाईंचा परिचय करून दिला. त्यांनी १९४२ साली भूमिगत रेडिओ सुरू करण्याची जबाबदारी सुनीताबाईंवर सोपवली; पण ते काम कधीच सुरू झाले नाही.

१९४२ सालच्या लढ्याला सशस्त्र क्रांतीचे वळण लागल्यामुळे हत्यारे, दारूगोळा इत्यादी वस्तूंची ने-आण करण्यासाठी पुरुषांपेक्षा स्त्रियांना अधिक उपयुक्त मानले जात होते. सुनीताबाईंकडे टाइम बॉम्ब बनविण्याचे काम आले. बॉम्ब बनविण्याची कृती पुस्तकात देताना त्रुटी राहिल्यामुळे अपेक्षित परिणाम मिळेपर्यंत रात्री दोन-अडीचपर्यंत बाईंनी चिकाटीने प्रयत्न केले. अपेक्षित परिणाम मिळाला; पण तो अनपेक्षित, आणि भलत्याच वेळी! महाविद्यालयामध्ये असताना निघालेल्या मोर्चाचे नेतृत्व करताना बंद छत्रीला तिरंगा लावून तो उंचावत, बाई बंदुका रोखून येणाऱ्या मिलिटरीच्या गाड्यांच्या ताफ्याला सामोऱ्या गेल्या होत्या!

राष्ट्रसेवादलात काम करताना आपला खर्च आपण करायचा, वडिलांकडे काही मागायचे नाही, असा बाणेदारपणा बाईंनी दाखवला. स्वतःच्या आवडीने आणि निर्णयाने कोणतेही कार्यक्षेत्र व्यक्तीला निवडता आले पाहिजे आणि हाती घेतलेले कोणतेही काम तडीस जाईपर्यंत चिकाटी सोडू नये, ही तत्त्वे त्यांनी कायम जपली. कामसू, काटेकोर, काटकसरी स्वभावाच्या सुनीताबाईंना कपडालत्ता आणि दागिने यांचे आकर्षण कधीही वाटले नाही. साध्या, घरगुती गोष्टी निगुतीने, पद्धतशीरपणे केल्यास वेळेची आणि खर्चाची बचत होते. कांदा कापण्यासारख्या कामातही शिस्त आणि सौंदर्य ह्यांचा मेळ घालून त्याची उपयुक्तता वाढते, हे सांगणाऱ्या सुनीताबाईंनी पुलंचे कपडे शिवणे, गाडी चालविणे, गाडीची जुजबी दुरुस्ती करणे ह्याही गोष्टी आपल्या उमेदीच्या काळात केल्या. बंगाली आणि उर्दू भाषांच्या अभ्यासातही त्यांनी बऱ्यापैकी प्रगती साधली होती.

लग्न हे कृत्रिम बंधन वाटत असतानाही पु.ल. देशपांडे या बिजवराशी सुनीताबाईंनी १९४६ साली प्रेमविवाह केला. आठ-दहा महिन्यांनंतर प्रथमच डोहाळे सुरू झाले असताना कौटुंबिक जबाबदाऱ्या संपेपर्यंत स्वतःवर दुसरी कोणतीही जबाबदारी नको, असा विचारपूर्वक निर्णय दोघांनीही घेतला. जनता विद्यालय, पुणे या मोफत शिक्षण देणाऱ्या मुलींच्या शाळेत सुनीताबाईंनी सेवाभावी वृत्तीने अध्यापनकार्य करायला सुरुवात केली. शिक्षणक्षेत्रात काम करायचे तर शिक्षणशास्त्राचा अभ्यासही हवा, तो त्यांनी सुरू केला. भाऊसाहेब हिरे यांच्या मालेगाव येथील शिक्षणसंस्थेत काम करण्यासाठी त्यांनी पार्ले टिळक विद्यालयातील नोकरी सोडली.

सुनीताबाई आणि पुल ह्या दोघांनाही कवितांची आवड होती. त्यांना अनेक कविता पाठ होत्या. ह्या आवडीतून त्यांनी मर्ढेकर, आरती प्रभू आणि बोरकर यांच्या कवितांचे केलेले जाहीर कार्यक्रम खूप गाजले. कार्यक्रमाच्या रंगमंचाची व्यवस्था, तिकिटाचे दर यांविषयी सुनीताबाई फार आग्रही असत. 'बटाट्याची चाळ'च्या तिकिटांचे दर १५ ते २० रुपये चालू शकले असते पण त्यांनी ते २ ते ७ रुपये असेच ठेवले. पुरेशा सोयी नसलेल्या ठिकाणी कलाकारांना किंवा प्रेक्षकांना त्रास होणार असेल, तर मोठी बिदागी मिळत असूनही त्यांनी प्रयोगाचे आमंत्रण स्वीकारले नाही.

प्रयोग चांगले चालत असूनही ते ५० प्रयोगांनंतर बंद करण्याचा निर्णय त्यांनी घेतला. हा निर्णय इतरांना कठोर आणि चुकीचा वाटला, तरी प्रयोग बंद झाल्यामुळेच पुलंकडून 'वाऱ्यावरची वरात' हे प्रहसन लिहून झाले. मग पुन्हा 'बटाट्याची चाळ'चे प्रयोग सुरू केले गेले. ५० प्रयोगांनंतर ते पुन्हा बंद केले गेले. 'असा मी असामी', 'वटवट' ह्यांचे लेखन पुलंनी ह्या 'बंद'च्या काळात केले. पुढे, वाढत्या वयामुळे पुलंची स्मरणशक्ती, त्यांचा अभिनय व श्वास यांवर विपरीत परिणाम होऊ लागल्याचे लक्षात येताच बाईंनी सर्व प्रयोग थांबवले. कलेबाबत तडजोड अमान्य केल्यामुळे त्यांना रोषाचे आणि दोषाचेही धनी व्हावे लागले.

सत्पात्री दान पडावे म्हणून 'ट्रस्ट'ची स्थापना करणे, 'अनामिका' ही नाटक कंपनी सुरू करणे, लेख पुनर्मुद्रित करण्यापूर्वी लेखकाची परवानगी घेणे, लेखकाच्या परवानगीशिवाय त्यात फेरफार करू नयेत म्हणून लढा देणे, अशा गोष्टी सुनीताबाईंनी केल्या. 'सुंदर मी होणार'मध्ये दीदीराजे, 'राजेमास्तर'मधली म्हातारी मोलकरीण, 'वटवट'मधील मालवणी म्हातारी या सुनीताबाईंच्या गाजलेल्या भूमिका होत. 'आहे मनोहर तरी' हे त्यांचे प्रांजळ आणि परखड आत्मचरित्र बरेच गाजले. पुलंच्या व्यक्तिमत्त्वाची वेगळी बाजू त्यात वाचकांना जाणवली.

'पिंगळावेळ'च्या निमित्ताने सुनीताबाईंचा जी.ए. कुलकर्णी यांच्याशी पत्रव्यवहार सुरू झाला आणि १९७७ ते १९८४ ह्या आठ वर्षांच्या काळात जीएंनी सुनीताबाईंना लिहिलेल्या निवडक पत्रांचा तीनशेहून अधिक पृष्ठांचा संपादित ग्रंथ १९९५ साली प्रसिद्ध झाला. सुनीताबाईंनी जीएंना लिहिलेली पत्रे बाईंच्या संमतीने 'मौज' प्रकाशने 'प्रिय जी.ए.' ह्या पुस्तकाद्वारे ११ डिसेंबर, २००३ रोजी प्रकाशित केली. ह्या दोन्ही पत्रसंग्रहांतून जीएंच्या वाङ्मयविचारांची आणि जीवनचिंतनाची श्रीमंती कळते, तसेच सुनीताबाईंच्या स्वतंत्र, समृद्ध, समर्थ आणि स्नेहशील व्यक्तिमत्त्वाचे दर्शन घडते. वसंतराव देशपांडे, मल्लिकार्जुन मन्सूर, कुमार गंधर्व, माधव आचवल यांची शब्दचित्रे त्यांनी 'सोयरे सकळ की सफळ' (१९९८) या पुस्तकात रेखाटली आहेत. कविता, संगीत यांविषयी त्यांना विलक्षण आकर्षण होते. त्याचबरोबर, चिंतनशीलतेमुळे त्यांचे लेखन दर्जेदार झाले आहे.

– अनुपमा उजगरे

**संदर्भ :**

१. *देशपांडे सुनीता; 'आहे मनोहर तरी'; मौज प्रकाशन गृह, मुंबई; १९९०.*

२. *औरंगाबादकर अनुराधा; 'सुनीता पुरुषोत्तम देशपांडे' वत्सलफूल; माहेर–ऑक्टोबर १९९९.*

## देशमुख, अनंत प्रभाकर

**समीक्षक**

**१ जुलै १९४८**



अनंत प्रभाकर देशमुख यांचा जन्म रायगड जिल्ह्यातील अलिबाग तालुक्यातील बागदांडे इथे झाला. रत्नागिरीच्या आर. पी. गोगटे महाविद्यालयामधून, अलिबागच्या जे. एस. एम. महाविद्यालयातून महा– विद्यालयीन शिक्षण (१९६९), मुंबई विद्यापीठाच्या मराठी विभागातून एम. ए. (१९७२) केले. पीएच. डी.साठी (१९७८) 'कुसुमावती देशपांडे यांच्या वाङ्मयाचा चिकित्सक अभ्यास' हा प्रबंधाचा विषय होता. प्रा. डॉ. व. दि. कुलकर्णी यांनी मार्गदर्शन केले.

मराठी नाटकाचा आणि रंगभूमीचा मूलारंभाचा शोध घेण्यासाठी संशोधनात्मक लेखन केले. १७७० ते १८४० दरम्यानचे 'द बॉम्बे ॲमॅच्यूअर्स थिएटर' हे आपले प्रेरणा केंद्र, आणि एल्फिन्स्टन महाविद्यालय, मुंबई व डेक्कन महाविद्यालय, पुणे येथील इंग्रजी, संस्कृत नाटकांच्या व नाट्यतंत्रांच्या अभ्यासातून आपल्याला नाट्यलेखनाची प्रेरणा मिळाली, ही जाणीव होऊन तत्कालीन नाटकासंबंधीचे, रंगभूमीसंबंधीचे त्यांचे लेखन

द

'नाट्यविचार' (१९८८) ह्या ग्रंथात ग्रथित झाले आहे. राम गणेश गडकऱ्यांच्या प्रमेयात्मक व प्रहसनात्मक प्रतिभाधर्माचे स्वरूप लक्षात घेऊन 'गडकरी: पुनर्विचार' हे दीर्घलेखन केले. 'संगीत सौभद्र'मध्ये इंग्रजी धर्तीच्या रसांबरोबर भारतीय नाट्यपरंपरांचे संकेत दिसत असतानाच लोकनाट्याचे काही रंग त्यात मिसळले आहेत, हे 'संगीत सौभद्र: एक दर्शन'मध्ये दाखविण्याचा त्यांनी प्रयत्न केला आहे. 'नवनाट्य विचार' (१९९२) ह्या ग्रंथात मराठीतील भाषांतरित व रूपांतरित नाटकांचा आलेख त्यांनी काढला आहे तर 'निळावंती: वग आणि नाटक', 'माता द्रौपदी आणि चक्र', 'नटसम्राट' , 'तनमाजोरी' अशा भिन्न-भिन्न नाट्यकृतींचा बारकाईने अभ्यास केला आहे. 'कुसुमाग्रज/शिरवाडकर' (१९९८) ह्या ग्रंथात वि. वा. शिरवाडकरांच्या वेगवेगळ्या साहित्यकृतींसंबंधी व त्यांच्या प्रकृतिधर्माविषयी चाकोरीबाहेरील विचार मांडला आहे. कुसुमाग्रजांच्या 'विशाखा' या काव्यसंग्रहातील कवितांसंबंधीचे त्यांचे संशोधन व समीक्षालेखन 'विशाखाभोवती' या पुस्तकात प्रकाशित झाले आहे (२००२). 'संधिकाल' (२००५) ह्या ग्रंथात एकोणिसाव्या शतकातील सामाजिक-सांस्कृतिक जीवन व मराठी वाङ्मय यांचा परस्परसंबंध त्यांनी स्पष्ट केला आहे.

द

मिसेस फेरार या बाईने १८३८ साली लिहिलेले 'यात्रेकऱ्याचा वृत्तांत' हे मराठीतील पहिले कादंबरीसदृश लेखन असल्याचे त्यांचे मत असून विचक्षण वाचकांना ते पारखून घेता यावे म्हणून त्यांनी ते संपादित केले आहे (२००५). 'सत्यकथा' पर्वातील एक कथाकार व कवी आ. ना. पेडणेकर यांच्या कवितांचे संपादन 'आ. ना. पेडणेकरांची कविता' या शीर्षकाने त्यांनी केले आहे.

संततिनियमनाचे पहिले पुरस्कर्ते र. धों. कर्वे यांच्यासंबंधीचा प्रकल्प त्यांनी पूर्ण केला असून तो नजीकच्या काळात प्रकाशित होत आहे. त्यात 'समाजस्वास्थ्यकार' हे रघुनाथरावांचे नव्या माहितीच्या प्रकाशात लिहिलेले चरित्र, 'असंग्रहित र. धों. कर्वे' यात समाजस्वास्थ्य मासिकाबाहेर अन्य नियतकालिकांत रघुनाथरावांनी केलेले लेखन, 'बुद्धिप्रामाण्यवाद' हा रघुनाथरावांच्या इंग्रजी लेखांचा मधुकर तोरडमल यांनी केलेला अनुवाद, 'गाय द मोपांसा' यांच्या कथांचा रघुनाथरावांनी केलेला भावानुवाद, 'शारदेची निवडक पत्रे' व 'समाजस्वास्थ्यातील निवडक लेख' हे रघुनाथरावांचे लेख, 'र. धों. कर्वे: मते आणि मतांतरे' हे रघुनाथरावांवर अन्य लेखकांनी केलेले लेखन, रघुनाथरावांना लेखन-सहकार्य करणाऱ्या भास्करराव जाधव, माधवराव बागल, दुर्गा भागवत, सहृद, महाड इत्यादी लेखकांचे विविध विषयांवरील लेख 'शेष समाजस्वास्थ्य' या नावाने अशी एकूण ७ संपादित पुस्तके, र. धों. कर्वे यांच्यावरच्या अभ्यासाला चालना देणारी ठरावीत.

त्यांनी 'गंगाधर गाडगीळ:व्यक्ती आणि सृष्टी' (संपादक: डॉ. प्रभा गणोरकर), 'वसंत कानेटकरांची नाटके' (संपादक: डॉ. वृंदा भार्गवे), 'रंगयात्रा' (संपादक: डॉ. वि. भा. देशपांडे), वसंत सबनीस गौरव ग्रंथ 'जमलेली पाने' (संपादक: डॉ. शुभा शेळके), 'वाङ्मयाचे आकलन' (संपादक: डॉ. द. दि. पुंडे व डॉ. वा. पु. गिंडे), 'एस. एल. भैरप्पा यांच्या कादंबऱ्या' (डॉ. मृणालिनी शहा), 'कादंबरी रसास्वाद यात्रा' (संपादक: डॉ. विजया राजाध्यक्ष, २००८) इत्यादी ग्रंथांमध्ये लेखन केले आहे.

'आलोचना', 'ललित', 'साहित्य' व 'धर्मभास्कर' या मासिकांमधून त्यांनी सातत्याने लेखन केले आहे. 'सत्यकाम' व 'लक्षवेधी पुस्तके' (ललित), 'व्यक्तिरंग' (नवशक्ती), 'उत्खनन' (सकाळ) असे त्यांनी सदर-लेखनही केलेले आहे. 'उत्खनन' हे एकोणिसाव्या शतकातील सामाजिक, सांस्कृतिक व वाङ्मयीन व्यक्ति-प्रवृत्ती-घडामोडींचा वेध घेणारे संशोधनपर लेखन होते. तर 'मुक्तछंद' हे सामनामधील सदर-लेखन (आता त्याचे पुस्तक झाले आहे, २००८) ललित गद्यात्म स्वरूपाचे आहे. 'श्रीधर बळवंत टिळक: चरित्र आणि लेखसंग्रह' हे लोकमान्य टिळकांच्या दुसऱ्या चिरंजीवांचे चरित्र (२००८) प्रकाशित झाले आहे.

२००५ चा रायगड जिल्हा परिषदेचा राजा राजवाडे पुरस्कार, २००६ चा ठाणे महानगरपालिकेचा जनकवी पी. सावळाराम पुरस्कार त्यांना प्राप्त झाले आहेत.

– सुखदा कोरडे

## देशमुख, उषा माधव
**संतसाहित्य अभ्यासक**
**१६ जून १९३६**



डॉ. उषा माधव देशमुख यांचा जन्म जळगाव जिल्ह्यातील अंमळनेर येथे झाला. १९५२ मध्ये अंमळनेर येथूनच त्या मॅट्रिकची परीक्षा उत्तीर्ण झाल्या. समीक्षक म्हणून सुपरिचित असणाऱ्या मा. गो. देशमुख यांच्याशी विवाह झाल्यानंतर ही खानदेशी कन्या विदर्भाची सून झाली. मा. गो. देशमुखांसारख्या सुस्वभावी व शिक्षणाची आवड असणाऱ्या साहित्यिकाच्या सहवासात उषाताईंना पुढील शिक्षणाची प्रेरणा मिळाली व त्यांनी १९६२ मध्ये नागपूर विद्यापीठातून बी.ए. ची पदवी रौप्यपदकासह प्राप्त केली. १९६४ मध्ये त्या मराठवाडा विद्यापीठातून एम. ए. ची परीक्षा प्रथम श्रेणीत उत्तीर्ण झाल्या. शिक्षणाची घोडदौड अशीच सुरू असतानाच पीएच. डी. करण्याचे ठरविले आणि नागपूर विद्यापीठात प्रबंध सादर केला. १९७३ मध्ये नागपूर विद्यापीठाने डॉक्टरेट पदवी प्रदान केली.

उषाताईंना अध्यापनाचा अनुभवही भरपूर प्रमाणात आहे. जवळपास चाळीस वर्षे त्यांनी अध्यापनाचे कार्य केले आहे. एम. फिल. आणि पीएच. डी. च्या विद्यार्थ्यांसाठी मार्गदर्शक म्हणून कार्य केले आहे. मुंबई विद्यापीठामध्ये मराठी अभ्यास मंडळाच्या अध्यक्षपदाचा कार्यभार त्यांनी काही वर्षे सांभाळला आहे. सयाजीराव विद्यापीठ, बडोदे येथील मराठी अभ्यास मंडळाच्या सभासद म्हणून त्यांनी कार्य केले आहे. नागपूर व बनारस विद्यापीठातही सभासद म्हणून त्यांनी कार्य केले आहे. तसेच मुंबई विद्यापीठाच्या विद्वत सभेच्या त्या सभासद होत्या. १९७२ पासून त्या मुंबई विद्यापीठात अधिव्याख्याता म्हणून कार्य करीत होत्या. मुंबई विद्यापीठातून मराठी विभाग प्रमुख ह्या पदावरून त्या निवृत्त झाल्या.

प्राचीन मराठी साहित्याचा अभ्यास, साहित्य संशोधन आणि साहित्य समीक्षा हे त्यांचे अभ्यासक्षेत्र असले, तरी आधुनिक मराठी कवितेचा अभ्यास हे त्यांचे विशेष आवडीचे अभ्यासक्षेत्र आहे. संशोधन विद्या आणि पाठ संशोधन शास्त्र तसेच कोशवाङ्मय या अभ्यासक्षेत्रांचाही त्यांचा व्यासंग आहे.

प्राचीन व अर्वाचीन वाङ्मय, संत साहित्य, संशोधन, समीक्षा अशा अनेक साहित्य प्रकारांत त्यांनी लेखन केले असून 'मराठीचे साहित्यशास्त्र; रामदास ते रामजोशी' (१९७६), 'साहित्यरंग' (१९७४), 'दीपमाळ' (१९८२), 'मराठी साहित्याचे आदिबंध' (१९८२), 'काव्यदिंडी' (१९८७), 'साहित्य शोधणी' (१९८९), 'कुसुमाग्रज साहित्यदर्शन' (१९८९), 'साहित्यमुद्रा' (१९९०), 'मराठी संशोधन विद्या' (१९८४), 'ज्ञानेश्वरी एक शोध' (१९९०) 'रामायणाचा आधुनिक साहित्यावरील प्रभाव' (१९९५) अशी त्यांची अनेक पुस्तके प्रकाशित आहेत. त्याचप्रमाणे 'वाङ्मयीन व्यक्ती', 'साहित्य तोलन', 'ज्ञानेश्वरी जागरण', 'दलित साहित्य स्थितिगती', 'मराठी नियतकालिकांचा वाङ्मयीन अभ्यास' अशी काही पुस्तके त्यांनी संपादित केली आहेत.

संतसाहित्य हा मराठी वाङ्मयाला लाभलेला अनमोल ठेवा आहे. उषा देशमुख यांनी संतसाहित्याच्या अभ्यासातून व विवेचनात्मक लेखनातून या साहित्यातील मर्म उलगडण्याचा प्रयत्न केला आहे. त्यामुळे संतांची लोकशिक्षणविषयक भूमिका, त्यांचा भक्तीविषयक दृष्टिकोन, संतांची शिकवण या सर्व गोष्टी संतसाहित्याच्या अभ्यासासाठी पूरक होण्यास मदत होते.

डॉ. उषा देशमुख यांनी महाराष्ट्रातीलच नव्हे तर मॉरिशस, युरोप यांसारख्या देशांमध्ये भरलेल्या मराठी

साहित्य संमेलनांमध्ये व अधिवेशनांमध्ये कधी अध्यक्ष म्हणून तर कधी सभासद म्हणून कार्य केले आहे. जागतिक मराठी परिषदेचे पहिले अधिवेशन (१९८९), मॉरिशस येथील दुसरे अधिवेशन(१९९१) तर जेरुसलेम (इस्रायल) येथील चौथे अधिवेशन यांत त्या सहभागी झाल्या होता. १९८९मध्ये पुसद येथे भरलेल्या विदर्भ साहित्य संमेलनाच्या त्या अध्यक्ष होत्या. १९८४ मध्ये झालेल्या वैदर्भीय लेखिका साहित्य संमेलनाचे अध्यक्षपद त्यांनी भूषविले होते.

साहित्यक्षेत्रातील अनेक साहित्य संस्थांच्या त्या आजीव सभासद आहेत. विदर्भ साहित्य संघ, नागपूर; साहित्य परिषद, पुणे; मराठवाडा साहित्य परिषद, औरंगाबाद; मुंबई मराठी साहित्य संघ, मुंबई; अशा काही संस्थांचा नामोल्लेख करता येईल. अखिल भारतीय मराठी साहित्य संमेलन, नवलेखन अनुदान समिती, महाराष्ट्र राज्य साहित्य व संस्कृती मंडळ ह्या ठिकाणी त्यांनी सभासद म्हणून कार्य केले आहे.

उषाताई यांना महाराष्ट्र शासनाची पारितोषिके प्राप्त झाली आहेत. त्यांना पुणे विद्यापीठाचाही पुरस्कार मिळाला आहे. कांचीपीठ शंकराचार्य पुरस्कारही त्यांना प्राप्त झाला आहे. विदर्भ साहित्य संघाची 'साहित्य वाचस्पती' ही पदवी त्यांना प्राप्त झाली आहे.

– डॉ. संध्या पवार

## देशमुख, माधव गोपाळ
**समीक्षक**
**१० मार्च १९१३ – २४ जून १९७१**

माधव देशमुखांचा जन्म विठ्ठूळ (तालुका पुसद, जिल्हा यवतमाळ) येथे झाला. त्यांचे प्राथमिक शिक्षण दौलतखान येथील ए.व्ही.स्कूल, पुसद येथे झाले. १९३४मध्ये ते नागपूर विद्यापीठातून बी.ए., १९३५मध्ये एलूएल.बी. व १९३६मध्ये एम.ए. उत्तीर्ण झाले. नागपूर विद्यापीठातून पीएच.डी. व एल.ए.डी. झाले. १९४५ ते १९५० या दरम्यान अमरावती येथील विदर्भ महाविद्यालयात प्राध्यापक म्हणून ते कार्यरत होते. तर पुढे १९५९मध्ये विभाग प्रमुख झाले. आर्ट्ससायन्स कॉलेज, औरंगाबाद (१९५९ ते १९६४), नागपूर महाविद्यालय (१९६४ ते १९६९) येथे त्यांनी प्राचार्यपद भूषविले. १९६९ ते १९७१ या काळात मुंबई विद्यापीठाच्या मराठी विभागाचे पहिले प्रमुखपद त्यांनी भूषविले. भारतीय राज्यघटनेचे मराठी भाषांतर करणाऱ्या समितीवर देशमुखांची नेमणूक करण्यात आली. पुढे साहित्य अकादमीचे सदस्य म्हणून त्यांची नेमणूक झाली.



'मराठीचे साहित्यशास्त्र' (१९४०) हा त्यांचा प्रबंध गाजला. 'प्राचीन संत कवींनी आपल्या काव्यातून संस्कृत साहित्यशास्त्राप्रमाणेच स्वतंत्र साहित्यशास्त्र लिहिले', हे त्यांच्या प्रबंधामागचे महत्त्वाचे प्रमेय होते. देशमुखांनी अनेक समीक्षात्मक लेख लिहिले. त्यांतील 'भावगंध' (१९५५), 'साहित्यतोलन' (१९७४) संपादक डॉ. उषा देशमुख, 'वाङ्मयीन व्यक्ती' संपादक डॉ. उषा देशमुख, हे त्यांचे लेख विद्वज्जनात मान्यता पावले. त्यांनी 'नामदेव'मध्ये (१९७०) साहित्य अकादमीसाठी लिहिलेला बृहद्लेखही प्रसिद्ध आहे.

एखाद्या विषयासाठी स्वतंत्र दृष्टिकोनातून खुमासदार शैलीत आणि वेगळ्या वैचारिक भूमिकेतून देशमुखांचे लेखन होत असल्यामुळे ते वैशिष्ट्यपूर्ण ठरत असे. 'नागेशकृत सीतास्वयंवर' (१९४१), 'एकावली' (श्री.ना.बनहट्टी यांच्या लेखांचा संग्रह १९४१), 'नवे पान' (कविवर्य, दत्त यांची समग्र कविता), 'ज्ञानेश्वरीतील ४था अध्याय' (१९६७) ही त्यांची महत्त्वपूर्ण संपादने होत.

देशमुखांचे वक्तृत्व फार आकर्षक होते. रसिकवृत्ती, मर्मग्राही बुद्धी यांमुळे त्यांचे लेखन वाचनीय होई. संस्कृत व मराठी साहित्याचा डोळस अभ्यास असल्याने त्याचा ठसा लेखनातून जाणवत असे. त्यांच्या बोलण्यात व लेखनात मिस्कील विनोदबुद्धी होती. आदर्श शिक्षकापाशी

असणारी विषयप्रतिपादनाची सुयोग्य दृष्टी होती. कविता कोणाचीही असो केशवसुतांची, कवी दत्तांची, नामदेवाचे-मुक्ताबाईचे अभंग असोत, ते त्यांचे विश्लेषण समरस होऊन करीत. विद्वत्ता व रसिकता यांमुळे त्यांचे व्यक्तिमत्त्व विलोभनीय वाटे.

– रागिणी पुंडलिक

## देशमुख, सदानंद नामदेव

***देशमुख, षडासन नामदेव***

**कथाकार, कादंबरीकार**

**३० जुलै १९५९**



सदानंद देशमुखांचे प्राथमिक शिक्षण व बालपण अमदापूर (जि. बुलढाणा) या त्यांच्या जन्मगावी झाले. महाविद्यालयीन शिक्षणासाठी ते चिखली येथील शिवाजी महाविद्यालयात दाखल झाले. प्रथम श्रेणीत एम.ए. पदवी प्राप्त करून ते प्राध्यापक झाले. ग्रामीण शेतकऱ्याच्या कुटुंबात जन्म झाल्याने त्या जीवनातील दारिद्र्य, दुःख व अभाव यांचे भयावह वास्तव त्यांच्या कथांतून चित्रित होत असते.

१९९८ साली प्रसिद्ध झालेली व लोकप्रिय ठरलेली त्यांची 'तहान' कादंबरी 'शेतकऱ्यांच्या मुलांना अर्पण' केलेली असून ते लिहितात, 'मूल्यहीन समाजव्यवस्थेत आपली जीवनमूल्ये जपणाऱ्यांना एक अटळ संघर्ष करावा लागत आहे. तणावग्रस्त अवस्थेत जगणारी राघोजी शेवाळेची व्यक्तिरेखा मला अस्वस्थ करून गेली. गेल्या चार-पाच वर्षांपासून मी या कादंबरीची मांडामांड करण्यात आणि लेखनात गुंतून गेलो होतो.' आजचे खरे खेडे साहित्यातून अंकित करण्याची जागरूकता त्यांच्यात असून ग्रामीण समाजाच्या पडझडीचे आशयविश्व शब्दबद्ध करण्याचा त्यांना ध्यास आहे. ग्रामीण भागातच वास्तव्य असल्याने तिथल्या सामान्य स्त्री-पुरुषांच्या भाव-विचारविश्वाचे ते निष्ठेने वास्तववादी चित्र उभे करतात. त्यांच्या भाषाशैलीचा एक नमुना पाहा – 'आपुन काई एवढ्या वाळल्या नाई. नवराबी चांगला जाडाच्या जाडा हाये. मंगसन्या ही पोरगी कावून अशी झिंगळ्या वाणाची पैदा झाली आशीनं? वाळल्या बोंबिलाच्या कांडीवाडी दिसते... दिवस असताना तुपली आबळ झाली आसंल' (रगडा). अनेक साप्ताहिकांतून व नियतकालिकांतून देशमुखांचे साहित्य प्रकाशित झाले.

'लचांड' (१९९३), 'उठावण' (१९९४), 'महालूट' (१९९५) हे कथासंग्रह आहेत. 'बारोमास' या त्यांच्या कादंबरीला साहित्य अकादमी पुरस्कार मिळाला. वर्षातील बारा महिने दुष्काळाच्या खाईत होरपळणाऱ्या असहाय, ग्रामीण कुटुंबाच्या अपेक्षाभंगाचे अस्वस्थ करणारे चित्रण, कादंबरीत आहे.

– वि. ग. जोशी

**संदर्भ :**


*१. देशमुख सदानंद; 'रगडा', कथासंग्रह; २००६.*

*२. देशमुख सदानंद; 'तहान', कादंबरी; १९९८.*


द

## देसाई, कमल गणेश

**कथाकार, कादंबरीकार**

**१० नोव्हेंबर १९२८**



कमल गणेश देसाई यांचा जन्म यमनकडी (जि. बेळगाव) येथे झाला. अहमदाबाद, धुळे, निपाणी, मिरज, भिवंडी, कागल इत्यादी ठिकाणी त्यांनी मराठीचे अध्यापन केले. १९६२मध्ये प्रसिद्ध झालेल्या 'रंग' या कथासंग्रहात पहिल्या लघुकथासंग्रहातील निवडक कथा 'सत्यकथा' मासिकातून प्रसिद्ध झाल्या होत्या. 'रात्रंदिन आम्हा' ही कादंबरी १९६४ साली प्रसिद्ध झाली तर 'काळासूर्य' आणि 'हॅट घालणारी बाई' या दोन लघुकादंबऱ्या अनुक्रमे 'सत्य', 'सत्यकथा' १९६८ आणि 'मौज' दिवाळी अंक १९७० यांमध्ये प्रसिद्ध झाल्या.

कमल देसाई यांचा 'रंग २' हा कथासंग्रह १९९८ साली प्रसिद्ध झाला. 'थ्री लेक्चर्स ऑन इस्थेटिक' या पुस्तकाचा 'सौंदर्य शास्त्रावरील तीन व्याख्याने' (१९८३) हा अनुवादही त्यांनी केला आहे. कमल देसाईंच्या कथाविश्वाचा रा.भा.पाटणकरांनी स्वतंत्रपणे केलेला विचार पुस्तकरूपाने प्रसिद्ध झाला आहे. भालचंद्र नेमाडे यांनी कमल देसाईंच्या कथांना खऱ्या अर्थाने 'आधुनिक' असे म्हटले आहे. स्वतंत्र आशय नवनवीन पद्धतीने मांडणाऱ्या कमल देसाईंचे कथा लेखन नव्या व वेगळ्या वळणाचे आहे. प्रयोगशील कथाकार म्हणता येईल अशा कथा त्यांनी लिहिल्या आहेत. व्यक्तिविशिष्टता, मानवी मनाचे गुंतागुंतीचे व्यवहार, माणसांचे परस्परसंबंध तटस्थपणे न्याहाळणे ही दोन प्रमुख वैशिष्ट्ये 'रंग' कथासंग्रहात जाणवतात. मानवी मनात खोलवर डोकावण्याचे धाडस करून स्वतःला शोधणारी तसेच मानवी मनातील दुःख, एकाकीपण, तुटलेपणा, स्वार्थ, हिंसा यांचे उग्र दर्शन टिपणारी, तीव्र निरीक्षणशक्ती असलेली पात्रे त्यांच्या कथांमध्ये आढळतात.

व्यक्तिविशिष्ट असणाऱ्या त्यांच्या कथा आत्मकेंद्रित होत नाहीत. कारण व्यक्तीने स्वतःभोवती विणलेला कोश आणि त्यातून व्यक्तिमत्त्व बंदिस्त होण्याची प्रक्रिया त्यांच्या कथांमधून व्यक्त होते. व्यक्तीचा खरा चेहरा आणि तिने स्वतःला विशिष्ट प्रतिमेमध्ये कोंडून घेतल्यामुळे आकाराला येणारी तिची 'कृतक प्रतिमा' यांचे चित्रण त्यांच्या कथांमध्ये आढळते.

गतिमान मानवी मन, षड्विचार, त्यांचा मानवी आचरणातून होणारा आविष्कार, त्यांमधील संवेदना, भावना, विचार या घटकांचे कमी-जास्त प्रमाणात व्यक्त होणे यांना कमल देसाईंच्या कथांमध्ये महत्त्व प्राप्त होते. मानवी आचरणातील उत्स्फूर्तता, अनिश्चितता, मनोव्यापार आणि गतिमान कालप्रवाह यांचा परस्परसंबंध रेखाटण्यावर त्यांच्या कथेमध्ये भर व्यक्तीच्या अस्तित्वामध्ये व्यक्तीचे व्यक्तिमत्त्व आकाराला येण्यामध्ये तिचे वैशिष्ट्यपूर्ण शरीर, मनातील स्मृती, तिचे इतरांशी जुळलेले अनेकविध नात्यांचे जाळे या सर्वांचे नेमके स्थान काय? असा प्रश्न त्यांच्या कथांमधून उपस्थित होतो.

'रंग - २' या त्यांच्या दुसऱ्या कथासंग्रहातील कथा दीर्घकथा आहेत. या कथांमधून स्वातंत्र्योत्तर काळात भारताचा सर्व पातळ्यांवर झालेला ऱ्हास, अवमूल्यन हा आशय व्यक्त होतो. स्वातंत्र्य लढ्यानंतर मिळालेले स्वातंत्र्य, आधुनिकता, शहरीकरण, विकास, निसर्ग-माणूस यांच्यातील परस्परसंबंध यांचा व्यक्तिजीवनाशी असलेला संबंध, त्यांतील विसंगती टिपण्याचा प्रयत्न हे सारे त्यांच्या कथांमधून व्यक्त होते. मनोविश्लेषणप्रधान कथा लिहिणाऱ्या कमल देसाईंच्या कथा सामाजिक, आर्थिक, राजकीय क्षेत्रांतील बदलांचा पर्यावरणाचा होणारा ऱ्हास या अंगांनी 'रंग - २'मध्ये विस्तारलेल्या दिसतात. स्त्री-पुरुष नातेसंबंध, स्त्री-जीवनाची गुंतागुंत उलगडण्याचा प्रयत्न या कथांमधून झालेला दिसतो.

'रात्रंदिन आम्हा' या कादंबरिकेमध्ये अज्ञाताचा शोध आणि मानवी आकलनाच्या मर्यादा हा आशय मांडलेला दिसतो. मृत्यूचा अर्थ काय? जगण्याचा अर्थ काय? हे प्रश्न या कादंबरिकेमधून उपस्थित केले आहेत. 'काळासूर्य'मध्ये पाप-पुण्य, प्रतिष्ठा, तसेच स्त्रीत्व या मूल्यांच्या संदर्भातील रूढ संकल्पनांचा प्रस्थापित शोध घेणाऱ्या नायिकेचे चित्रण आलेले आहे. प्रस्थापित रूढ धार्मिक, सांस्कृतिक, सामाजिक संकेतव्यवस्थेतील स्त्रीचे दुय्यम स्थान नाकारणारी बंडखोर स्त्री हे या लघुकादंबरीचे वैशिष्ट्य आहे. अश्वरथ, काळासूर्य, विरंची ह्या मिथकांमुळे ही लघुकादंबरी वैशिष्ट्यपूर्ण वाटते.

'हॅट घालणारी बाई' या लघुकादंबरीमधून स्त्रीचा आत्मशोध, स्मृतींचा व्यक्तिजीवनाशी असलेला संबंध, जगण्यातील श्रेयस आणि श्रेयस प्राप्तीला असणारा अर्थ काय? सर्जनाचे स्त्रीच्या जगण्यातील स्थान आणि सर्जन व विनाश यांचा गतिमान कालप्रवाह आणि माणूस असण्याच्या मर्यादा यांच्यासह अर्थ कसा लावायचा? असे अनेक प्रश्न या लघुकादंबरीतून कमल देसाई यांनी उपस्थित केले आहेत. कमल देसाईंच्या साहित्यकृतींमधून

द

स्वतंत्र प्रज्ञा असलेली, निर्णयस्वातंत्र्य राबवणारी, जगण्याचा अर्थ शोधणारी चिंतनशील स्त्री-प्रतिमा उभी राहते.

– प्रा. रूपाली शिंदे

**संदर्भ :**


१. *देसाई कमल; 'एका मनस्विनीचं अवकाश'; मिळून साऱ्याजणी, दिवाळी अंक, १९९९.*

२. *भागवत दुर्गा; 'कमल देसाई एक सदेह फँटसी', मुंबई रविवार दिनांक - दिवाळी अंक - १९९४.*


## देसाई, माधवी रणजित

**कवयित्री, कथा-कादंबरीकार**

**२१ जुलै १९३३**



विविध प्रकारचे लेखन केलेल्या माधवी रणजीत देसाई या मराठी चित्रपटसृष्टीतील मान्यवर व्यक्ती असलेल्या भालजी पेंढारकर यांच्या कन्या. त्यांचा जन्म कोल्हापूर येथे झाला. त्यांचे सर्व शिक्षण कोल्हापूर येथे झाले. राजाराम महाविद्यालयातून त्या बी.ए. झाल्या. मराठी व इतिहास हे विषय घेऊन पदवीधर झाल्याने त्यांना या दोन्ही विषयांची आवड होतीच. वडिलांच्या सान्निध्यामुळे त्यांचा तत्कालीन अनेक दिग्गजांशी परिचय झाला आणि भालजींमुळे त्यांना धर्म, इतिहास इत्यादींविषयी लहानपणापासूनच आवड निर्माण झाली व वाचनाची गोडी लागली. त्यांनी लहान वयातच  तत्कालीन विविध नामवंत साहित्यिकांचे साहित्य वाचलेले होते. त्यांचा पहिला विवाह काटकर यांच्याशी झाला होता; पण ते अल्पायुषी ठरल्याने १९७५ साली त्यांनी सुप्रसिद्ध साहित्यिक रणजित देसाईंशी पुनर्विवाह केला; पण १९८७ साली त्यांना घटस्फोट घ्यावा लागला.

१९५३ साली, विवाहोत्तर गोव्यात आल्यावर त्यांनी मुक्तिसंग्रामात भाग घेतला व पुढे त्यांना सत्याग्रहात तुरुंगवासही भोगावा लागला. सुमारे सतरा वर्षे त्यांनी मुंबईत अध्यापनही केले. कविता-लेखनाने त्यांच्यातील साहित्यिकाचा जन्म झाला. त्यांचे स्वतःचे जीवन कादंबरीसदृशच झाल्याने त्यांनी आपल्या कथा-कादंबऱ्यांमधून भोवतीच्या स्त्रियांच्या दुःखांना, त्यांच्या जगण्याला शब्दरूप दिले. त्यांचे 'सायली', 'चकवा', 'घर माणसांचे' हे कवितासंग्रह प्रसिद्ध असून 'असं म्हणू नकोस', 'सागर', 'कथा सावलीची', 'शुक्रचांदणी', 'किनारा' इ. कथासंग्रह प्रसिद्ध आहेत. नामवंत हिंदी लेखिका अमृता प्रीतम यांच्या कथांचे अनुवादही त्यांनी प्रसिद्ध केलेला आहेत. कादंबरीकार म्हणूनही त्यांना मान्यता मिळालेली असून गोव्याच्या पार्श्वभूमीवरील 'प्रार्थना' ही त्यांची कादंबरी गाजली. गायिका अंजनी मालपेकर यांच्यावरची 'कांचनगंगा' ही त्यांची प्रसिद्ध कादंबरी. त्यांच्या 'मंजिरी', 'नियती', 'सगुणी' याही कादंबऱ्यांमधून त्यांनी स्त्री-जीवनातले वास्तव मांडलेले आहे. 'धुमारे' या ललित लेखसंग्रहातूनही त्यांचा जीवनविषयक दृष्टिकोन, निसर्गाची नावीन्यपूर्ण रूपे यांची काव्यमय शैलीतली दर्शने वाचकाला खिळवून ठेवतात.

त्यांचे एक महत्त्वाचे कार्य म्हणजे त्यांनी १८०० ते २००९ या दोन शतकांतील गोव्यातील ६४ कर्तृत्वसंपन्न स्त्रियांची 'गोमंत सौदामिनी' या पुस्तकात रेखाटलेली, वाचनीय संदर्भमूल्य लाभलेली शब्दचित्रे.

'नाच ग घुमा' या आत्मचरित्रातून त्यांनी स्वतःची कहाणी प्रांजळपणाने सांगितली आहे. एका प्रतिभावंत साहित्यिकाशी विवाह झाल्यानंतर अनेक कारणांनी वाट्याला आलेला अपेक्षाभंग आणि त्यानंतर अपरिहार्यपणे सामोरे आलेले एकाकीपण यांचे हृदयस्पर्शी चित्रण त्यांच्या आत्मचरित्रात आहे.

– मधू नेने

**संदर्भ :**


१. *देसाई माधवी; 'नाच गं घुमा', आत्मचरित्र, चंद्रकला प्रकाशन, पुणे; १९८८.*

२. *कामत श्रीराम, संपादक; 'मराठी विश्वचरित्रकोश' खंड २, गोवा.*


द

## देसाई, मृणालिनी प्रभाकर

**कादंबरीकार**

**७ ऑक्टोबर १९२७ – २९ नोव्हेंबर १९९४**



मृणालिनी प्रभाकर देसाई या पूर्वाश्रमीच्या मृणालिनी धनेश्वर. त्यांचा जन्म मुंबईत झाला. आई सर्वांवर प्रेम करणारी प्रेमळ गृहिणी होती. वडील 'नाना' नावानेच घरात, परिसरात प्रसिद्ध होते. स्वातंत्र्यापूर्वीच्या त्या काळात देशाच्या स्वातंत्र्यासाठी झटणारी बरीच माणसे आवतीभोवती होती. मनामध्ये इंग्रजांविषयी राग-द्वेषाची भावना होती. विदेशी मालावर बहिष्कार आणि स्वदेशीचा विशेषतः खादीचा पुरस्कार यासाठी सामान्य जनातही संघटित झाली होती. विदेशी माल भरलेल्या लॉरीसमोर अडवा होऊन देशासाठी आत्मबलिदानालाही बाबू गेनू तयार झाला होता. विदेशी मालाची होळी पेटवली गेली होती अन् हे सारे भीषण वास्तव वयाच्या अवघ्या तिसऱ्या वर्षी मृणालिनीने अनुभवले होते. वडील-नाना यांच्याकडून मिळालेल्या माहितीमुळे देशप्रेमाचे, स्वदेशीचे बीज कुठेतरी नकळत मनात रुजले. त्या लहान वयातही आपला विलायती फ्रॉक तिने त्या पेटत्या होळीत सहज टाकला.

बालपणापासूनच त्यांची वृत्ती अभ्यासू होती. हिंदी, गुजराती, मराठी भाषांच्या त्या चांगल्या जाणकार होत्या. नानांमुळे त्यांना पुस्तकवाचनाची गोडी लागली. त्या संस्कृत भाषेच्याही खास अभ्यासक होत्या. लहानपणापासून त्यांच्या मनात मीरेविषयी अतर्क्य ओढ होती. यातूनच पुढे 'योगिनी' ही मीराबाईंच्या जीवनावरील कादंबरी त्यांनी लिहिली. मनात आलेले विचार प्रभावीपणे आणि सुसंगतपणे मांडणे, हा त्यांचा खास गुण होता. त्यांनी एम.ए. पदवी संपादन केली होती.

त्यांनी आपली लेखणी जाणीवपूर्वक उचलली आणि कथा, कादंबरी, प्रवासवर्णन, चरित्र असे साहित्यातील विविध प्रकार हाताळले. लिखाणातील नेमकेनेटकेपणामुळे आणि विषयांमधील वैविध्यामुळे विविध स्तरांतील वाचकांना त्यांनी नकळत आकर्षून घेतले. त्यांच्या ज्ञानाबद्दल, अभ्यासू वृत्तीबद्दल विश्वास असल्यामुळे जाणकारांनी त्यांच्याकडे (काही वेळा) लिखाणाची खास जबाबदारीही सोपवली. 'वेदबोलिता अनंत' याची मूळ संहिता विष्णुदेव पंडित यांची असून या मूळ गुजराती पुस्तकाला त्यांनी मराठीत अनुवादित केले. महाराष्ट्र राज्य साहित्य मंडळाने यासाठी खास योगदान दिले.

स्वातंत्र्यलढ्यात त्यांनी सक्रिय सहभाग घेतला होता; आणि त्यासाठी त्यांना तुरुंगवासही भोगावा लागला होता. त्या ध्येयवादी, विचारवंत आणि लढाऊ वृत्तीच्या होत्या. चरित्रपर पुस्तके लिहिण्याकडे प्रारंभी त्यांचा कल होता. त्यांच्या नावावर पुढील ग्रंथसंपदा आहे. 'गीतगोविंदकार जयदेव' (१९५७), 'अलौकिक शिल्पकार मायकेल एंजलो' (१९५९), 'मेधाणी जीवनसरिता' (१९६४), 'सरस्वतिचंद्र' (१९७३), सॉक्रेटिस (१९७३), 'दीपनिर्माण' (अनुवाद) (१९८३), 'बिंदी' (कथासंग्रह १९७७), 'आनंदयात्रा' (१९७३), 'रुसवा' (१९७६), 'सोसलेले घाव' (१९७६) या कथासंग्रहांबरोबरच त्यांच्या जवळजवळ वीस कादंबऱ्या प्रकाशित झाल्या. स्वजीवनावर आधारित 'निशिगंध' हे आत्मवृत्त त्यांनी १९६८ साली लिहिले. त्यांच्या कादंबऱ्यांतून त्यांनी ऐतिहासिक, पौराणिक, सामाजिक विषय मांडले आणि मुक्तचिंतनातून काही प्रश्न, घटना, प्रसंग, चरित्रे यांच्यावर प्रकाशझोत टाकला. 'कान्होजी आंग्रे' (ऐतिहासिक), 'परशुराम' (पौराणिक) (१९७०), 'बिलवदल' (१९७५) (अहिल्याबाई यांच्या जीवनावर आधारित), 'इनामदार' (सामाजिक १९९४), 'विराणी' हे १९६७ मध्ये प्रकाशित झालेले प्रवासवर्णनपर पुस्तक आहे.

महात्मा गांधी यांच्या विचारांचा आणि तत्त्वांचा पगडा त्यांच्या संपूर्ण जीवनावर होता. किंबहुना स्वातंत्र्यलढ्यात त्या स्वयंप्रेरणेने सहभागी झाल्या असल्या, तरी त्यामागे गांधी विचारधारा, तत्त्वनिष्ठा यांची प्रेरणा होती. महात्मा गांधीच्या अलौकिक चरित्राचा ठसा त्यांच्या

आचारविचारांवर, वृत्ती-प्रवृत्तींवर खोलवर उमटला होता. गांधी जन्मशताब्दीच्या निमित्ताने मृणालिनीताईंनी वाचकांसमोर 'पुत्र मानवाचा' (१९६८) ही अभ्यासपूर्ण कादंबरी ठेवली. अहिंसेच्या मार्गाने स्वातंत्र्य मिळवून ज्यांनी अखिल जगताला स्तिमित केले, त्या महामानवाची चरित्रगाथा मांडून लोकशक्तिजागर व्हावा, हा त्यांच्या या लिखाणामागील अंतर्गत हेतू असावा. 'पुत्र मानवाचा' हे त्यांचे लिखाण आवडल्याची पोचपावती महिलांकडून मिळाली. 'पुत्र मानवाचा' ही कादंबरी संदर्भ म्हणून मान्यता पावली. २९ नोव्हेंबर १९९४ रोजी मृणालिनीताईंनी आपली जीवनयात्रा संपवली. गुजराती असूनही सर्व लेखन मराठी भाषेत केले, हे त्यांचे अत्यंत आगळे असे वैशिष्ट्य होय.

– डॉ. ललिता गुप्ते

**संदर्भ :**

१. *'ललित'; १८ जून १९७३.*
२. *'धर्मभास्कर'; दिवाळी १९८१.*

## देसाई, रणजीत रामचंद्र

**कथाकार, कादंबरीकार, नाटककार**

**८ एप्रिल १९२८ – ७ मार्च १९९२**



देसाईंचा जन्म कोल्हापूर जिल्ह्यातील कोवाड ह्या गावी इनामदार घराण्यात झाला. त्यांचे वडील रामचंद्रराव रसिक संगीतप्रेमी होते. रणजीत देसाईंच्या लहानपणीच आईचा मृत्यू झाल्यामुळे कोल्हापूरला आजीकडे राहायला गेले. राजाराम महाविद्यालयामध्ये इंटरपर्यंत शिक्षण झालेल्या देसाईंना ग.बा.जोशी नावाचे शिक्षक, फडके-खांडेकरांसारखे ज्येष्ठ लेखक, प्राचार्य बॅरिस्टर खर्डेकर, सदाशिव अय्यर हे प्राध्यापक या सर्वांकडून लेखनासाठी प्रेरणा मिळाली. शिवाय कोवाड या खेड्यातील बालपण, आजीचे घरातील संस्कार, रामायण, महाभारत, संतसाहित्य यांबरोबरच आधुनिक मराठी-इंग्रजी साहित्याचे वाचन आदींचा परिणाम रणजीत देसाईंच्या घडणीवर झाला आहे. वाचनाचे वेड, संगीताची आवड, संवेदनशील वृत्ती यांना निरीक्षणाची, मनन-चिंतनाची, उत्कटतेची आणि उदात्ततेची जोड मिळाल्यामुळे रणजीत देसाईंचे लेखक म्हणून 'स्वतंत्र' व्यक्तिमत्त्व घडत गेले.

राजाराम महाविद्यालयात शिकत असताना त्यांची 'रूपमहाल' ही कथा 'राजारामीय' ह्या वार्षिकांकात प्रसिद्ध झाली. १९४७ साली 'प्रसाद' मासिकाने आयोजिलेल्या कथास्पर्धेत त्यांच्या 'भैरव' या कथेला पारितोषिक मिळाले. कोल्हापूरच्या 'महाद्वार' मासिकात कथालेखनाला चांगला प्रतिसाद मिळाल्यामुळे देसाईंनी सुरुवातीच्या काळात जोमाने कथा लेखन केले. १९५२ साली प्रसिद्ध झालेल्या 'रूपमहाल' ह्या पहिल्या कथासंग्रहापासून १९९१ पर्यंत त्यांचे १६ कथासंग्रह प्रसिद्ध झाले. त्यात 'कणव' (१९६०), 'जाण' (१९६५), 'गंधाली' (१९७१), 'मधुमती' (१९८२), 'मोरपंखी सावल्या' (१९९१) हे विशेष उल्लेखनीय कथासंग्रह आहेत.

याच काळात रणजीत देसाईंनी कादंबरी लेखनाला सुरुवात केली. 'बारी' (१९५९), 'माझा गाव' (१९६०) ह्या त्यांच्या सुरुवातीच्या कादंबऱ्यांत ग्रामीण जीवनाचे चित्रण केले आहे. आपल्या लेखनाच्या प्रारंभीच्या काळात कथाकादंबऱ्यांतून ग्रामजीवनाचे चित्रण करणाऱ्या देसाईंनी माधवराव पेशवे व त्यांची पत्नी रमाबाई यांच्या सहजीवनावरील 'स्वामी' ही कादंबरी लिहिली आणि मराठी कादंबरीच्या क्षेत्रात इतिहास घडवला. मराठीतील समीक्षक आणि वाङ्मयेतिहासकारांनी देसाईंच्या ग्रामीण पार्श्वभूमीवरील कथांची फारशी दखल घेतली नसली, तरी 'स्वामी' कादंबरी ही मराठीतील बहुचर्चित आणि वाचकप्रिय ऐतिहासिक कादंबरी ठरली. १९६२ साली प्रसिद्ध झालेल्या 'स्वामी'नंतर देसाईंनी 'श्रीमान योगी' (१९६८), 'राधेय' (१९७३), 'समिधा' (१९७९), 'लक्ष्यवेध' (१९८०), 'पावनखिंड' (१९८१), 'राजा

रविवर्मा' (१९८४), 'अभोगी' (१९८७), 'प्रतीक्षा' (१९९४), 'शेकरा' (१९९६) या कादंबऱ्या लिहिल्या. पुराणकथेवर आधारलेली, प्रत्येकाच्या मनात स्थिरावलेल्या कर्णाच्या जीवनाचा शोध घेणारी 'राधेय' ही देसाई यांची एकमेव पौराणिक कादंबरी आहे. कलावंतांविषयी त्यांना वाटणारी आस्था, कुतूहल आणि जिव्हाळा 'राजा रविवर्मा' आणि 'अभोगी' ह्या दोन कादंबऱ्यांत व्यक्त झाला आहे. 'शेकरा' या शेवटच्या कादंबरीत देसाई यांनी वन्यजीवनाचे चित्रण केले आहे. देसाई यांच्या हयातीत प्रसिद्ध झालेल्या 'अभोगी' ह्या कादंबरीत नाट्यपूर्ण घटन-प्रसंगांची आणि योगायोगांची योजना, प्रेमाचा गुंतागुंतीचा त्रिकोण, भावपूर्ण वातावरण, निसर्गरम्य स्थलदर्शन, रेखीव व्यक्तिरेखाटन, शेवटी कथानकाला मिळालेली कलाटणी व गोड शेवट अशी ११ वैशिष्ट्ये आढळून येतात. त्यामुळे कादंबरी एक चित्रपटकथाच ठरते. देसाई यांनी एकूण बारा कादंबऱ्या लिहिल्या. आशयाच्या दृष्टीने सामाजिक, ऐतिहासिक, पौराणिक, चरित्रपर अशा विविधता त्यांच्या कादंबऱ्यांत आहे.

देसाई यांनी चार चित्रपटकथा लिहिल्या आहेत; 'रंगल्या रात्री अशा' (१९६२), 'संगोळी राय्याण्णा' (कन्नड) १९६३, 'सवाल माझा ऐका' (१९६४) व 'नागीण' (१९८१). मोजक्याच चित्रपटकथा लिहिणाऱ्या देसाईंचे 'रंगल्या रात्री अशा' आणि 'सवाल माझा ऐका' ह्या कथांवरील चित्रपट महाराष्ट्रातील प्रेक्षकांच्या पसंतीस उतरले. अस्सल ग्रामीण वातावरणाची पार्श्वभूमी, नाट्यपूर्ण प्रसंगांची निर्मिती, खटकेबाज संवादांची योजना या ठळक वैशिष्ट्यांमुळे मराठी चित्रपटांतील तमाशाप्रधान चित्रपटांच्या मालिकेत या दोन चित्रपटांना बरेच वरचे स्थान प्राप्त झाले आहे.

कथा-कादंबरी ह्या दोन वाङ्मय प्रकारांच्या तुलनेत देसाई यांचे नाट्यलेखन प्रभावी ठरले नाही. 'वारसा' ह्या (१९७२) पहिल्या नाटकापासून 'पंख जाहले वैरी' (२०००) हे नाटक आणि शेवटचे 'पांगुळगाडा' हे अप्रकाशित नाटक धरून देसाईंनी एकूण बारा नाटके लिहिली. नाटककार वसंत कानेटकर यांच्या सहकार्याने लिहिलेल्या 'गरुडझेप' ह्या नाटकाला वाचक-प्रेक्षक-समीक्षकांचा चांगला प्रतिसाद मिळाला. 'हे बंध रेशमाचे' यासारखे नाटक वगळता त्यांची अन्य नाटके उपेक्षितच ठरली. 'स्वामी', 'श्रीमान योगी' ह्या स्वतःच्या कादंबऱ्यांची त्यांनी केलेली नाट्यरूपांतरेही लक्षवेधी ठरली नाहीत.

देसाई हे प्रामुख्याने मराठीतील वाचकप्रिय कादंबरीकार होते; कष्टाळू ललित लेखक होते; समीक्षक नव्हते तथापि साहित्य संमेलने आणि साहित्यविषयक अन्य कार्यक्रमांतून त्यांनी आपली साहित्यविषयक भूमिका आणि मते प्रकट केली आहेत. साहित्याचे स्वरूप, त्याचे प्रयोजन, त्याचा परिणाम आणि साहित्यविषयक आदर्शवादी मते मांडणारे देसाई परंपराभिमानी होते. लेखकाची सर्जनशीलता ही प्रतिभा-सामर्थ्यावर अवलंबून असते; केवळ सन्मान, कीर्ती, अर्थप्राप्ती हीच उद्दिष्टे लेखकाने डोळ्यांसमोर ठेवू नयेत. लेखकामध्ये प्रतिभा-सामर्थ्याबरोबर जीवनाची व्यापक जाण आणि प्रामाणिकपणाची आवश्यकता असते. साहित्यचळवळींचा हेतू चांगला असला, तरी साहित्याचा विकास लेखकाच्या कुवतीमुळे होतो; या प्रकारची मते त्यांनी मांडली आहेत. त्यांच्या लेखनावरील रंजनपरतेचा प्रभाव जाणवत असला, तरी आनंदप्राप्ती हे साहित्याचे प्रयोजन त्यांनी स्वीकारले होते. त्यानुसार त्यांनी साहित्यनिर्मिती केली.

मराठी वाङ्मयाच्या विकासक्रमात प्रामुख्याने कथाकार आणि कादंबरीकार म्हणून देसाई यांच्या व्यक्तिमत्त्वाचा ठसा उमटला आहे. मनाची विशालता, मानवी प्रतिष्ठा, दया-त्याग-क्षमाशीलता, औदार्य-माणुसकी ह्या गुणांचा पुरस्कार रणजीत देसाई यांनी लेखनात केला. रंजनपरता आणि संस्कारशीलता या उद्दिष्टांना त्यांनी स्वतःच्या लेखनात महत्त्व दिले. एक रसिक वाचक आणि निष्ठावान साहित्यिक म्हणून वाटचाल करण्यात त्यांनी धन्यता मानली. 'स्वामी' आणि 'श्रीमान योगी' ह्या दोन कादंबऱ्यांनी मराठी साहित्यविश्वातील त्यांचे स्वतःचे

स्थान सिद्ध केले. त्यामागे देसाई यांची वाचक सन्मुख भूमिका होती.

तीन तपे अविरतपणे विविधांगी लेखन करणाऱ्या देसाई यांचा अनेक पुरस्कारांनी गौरव करण्यात आला. महाराष्ट्र राज्य स्पर्धेत १९६२ साली 'स्वामी' कादंबरीला गौरवण्यात आले. १९६४ साली 'स्वामी'ला साहित्य अकादमीचाही पुरस्कार मिळाला. १९७३ साली भारत सरकारतर्फे त्यांना पद्मश्री प्रदान करण्यात आली. महाराष्ट्र शासनातर्फे १९९० साली देसाईंना महाराष्ट्र गौरव पुरस्काराने सन्मानित करण्यात आले. महाराष्ट्र राज्य नाट्यस्पर्धेत, तसेच दिल्ली येथील नाट्यस्पर्धेत 'कांचनमृग' नाटक गौरवास पात्र ठरले. १९७४ साली इचलकरंजी येथे आयोजित करण्यात आलेल्या अखिल भारतीय मराठी साहित्य संमेलनाच्या स्वागताध्यक्षपदाचा बहुमान देसाईंना मिळाला. याशिवाय कोल्हापूर येथील शिवाजी विद्यापीठाच्या सिनेटचे सदस्य, दिल्ली येथील साहित्य अकादमीचे सदस्य म्हणून त्यांनी काम केले. बडोदे (१९६५), औदुंबर (१९६९), कल्याण (१९७२), गोरेगाव-मुंबई (१९७७), कोल्हापूर (१९८३), इस्लामपूर (१९८४), आजरा (१९८५), चंदगड (१९८९) ह्या शहरांत भरवण्यात आलेल्या साहित्य-नाट्य- ग्रामीण साहित्य संमेलनांचे अध्यक्षपद भूषवण्याचा बहुमान देसाई यांना मिळाला.

या सर्व मानसन्मान-पुरस्कारांतून, कादंबऱ्यांच्या अनुवादांतून त्यांची वाचकप्रियता आणि समाजमान्यता सूचित होते. देसाई यांच्या काही कादंबऱ्यांचे अन्य भारतीय भाषांत अनुवाद करण्यात आले आहेत. 'स्वामी' (गुजराती, हिंदी, कन्नड); 'श्रीमान योगी' (हिंदी, इंग्लिश); 'राजा रविवर्मा' (मल्याळी, हिंदी, कन्नड); राधेय (हिंदी) ह्या त्या कादंबऱ्या होत. सातत्याने केलेले लेखन, वाचन, चिंतन, मनन, प्रवास यांमुळे देसाईंचे प्रकृतीकडे दुर्लक्ष झाले. मानसिक ताणतणावांचा परिणाम प्रकृतीवर झाल्यामुळे मधुमेह, रक्तदाब हे विकार बळावत गेले. वयाच्या ६४ व्या वर्षी त्यांचे निधन झाले. 'शेकरा' ह्या त्यांच्या शेवटच्या कादंबरीच्या संदर्भात आनंद यादवांनी लिहिले, 'दादा गेले आणि त्यांचं एक हिरवंगार हृदय जंगल जळून खाक झालं.'

– वि. शं. चौघुले

**संदर्भ :**


१. *घांडगे मीरा, संपादन; 'स्वामी: एक शोध', मेहता पब्लिशिंग हाऊस; पुणे २००१.*

२. *माळी जी. पी.; 'रणजीत देसाई जीवन साहित्य'; शब्दवेल प्रकाशन, कोल्हापूर; २००१.*


## देसाई, वसंत शांताराम

**नाटककार, समीक्षक, कादंबरीकार, चरित्रकार**

**२७ डिसेंबर १९०४ – २३ जून १९९४**



वसंतरावांचा इंदूर येथे जन्म झाला. नागरी जीवनापासून दूर राहिल्यामुळे वयाच्या नवव्या वर्षापर्यंत वसंतरावांनी सर्कस, नाटक, सिनेमा हे शब्द व टिळक, चाफेकर, सावरकर ही नावे ऐकलीसुद्धा नव्हती; तसेच वृत्तपत्रे, मासिके यांचे अस्तित्वही त्यांना माहीत नव्हते. ते दहा वर्षांचे असतानाच त्यांच्या वडिलांचे अकस्मात निधन झाले. कष्टाळू, काटकसरी, स्वाभिमानी आईचे सर्व मुलांत त्यांच्यावर जास्त प्रेम होते.

वडिलांच्या निधनानंतर त्यांच्या मामांचा (राजाराम जगन्नाथ पाटकर) सहवास हाच मोठा आधार होता. जून १९१३ मध्ये मामांच्या सायकलवरून इंदूरच्या सिटी हायस्कूलमध्ये वसंतराव दाखल झाले. त्यांना बालसाहित्य वाचनाचा छंद होता आणि गणिताखेरीज सर्व विषय आवडीचे होते. मामांमुळे त्यांना बाह्य जगाची ओळख झाली.

**न्यायाचा लढा**

वसंतरावांनी बी.ए.नंतर मुंबई व पुणे येथे कायद्याचा अभ्यास करून पुण्यातून वकिलीची सनद मिळवली. ते म्हणतात, ''माझी स्मरणशक्ती चांगली आणि परीक्षकाला

द

पसंत पडेल अशा रितीने प्रश्नांची उत्तरे लिहिण्याची कला मला साधली होती.''

ते कोर्टात अपिलाची कामे करू लागले. त्यासाठी मोडी लेखनाचे इंग्रजीत भाषांतर करावे लागे. म्हणून मामांकडून मोडी शिकले. त्यांनी २६ वर्षे न्यायखात्यात नोकरी केली. त्यासाठी त्यांना जळगाव, पिंपळगाव, जुन्नर, वडगाव इत्यादी ठिकाणी राहावे लागले. न्यायाधीशाचे काम कसे करावे, हे जळगाव व जुन्नर येथे शिकले. 'लहानसहान गोष्टींत आनंद घेणे ही दैनंदिन जीवनातली सुखाची गुरुकिल्ली आहे, हे पिंपळगावच्या मुक्कामात शिकलो,' असे त्यांनी म्हटले आहे. त्यांनी 'Indian Limitation Act' वर पुस्तिका लिहिली.

१४ नोव्हेंबर, १९२९ मध्ये वकिलांचे व न्यायाधीशांचे पहिले संमेलन झाले. त्यात त्यांनी 'The Civil Court Fees Act' ची पुस्तिका छापून वाटली. त्यामुळे मोठे वादळ उठले. परंतु २० मार्च, १९३१ला सुनावणी होऊन पुस्तिकेला शोभेल असा निकाल झाला. बार कौन्सिल खंबीरपणे त्यांच्या पाठीशी उभे राहिले. या खात्यातून २७ डिसेंबर, १९५७ रोजी देसाई सेवानिवृत्त झाले. त्या प्रसंगी न्यायमूर्ती व्ही. ए. नाईक म्हणाले, ''बढत्या मिळवण्याच्या स्पर्धेपासून देसाई हे नेहमी दूर राहिले. ते असिस्टन्ट जज का झाले नाहीत, याचे मला आश्चर्य वाटते.'' १९५३ साली त्यांनी 'The Kolhapur Inam Law' लिहून कोल्हापूरच्या इनामी कायद्यांचा ऊहापोह केला. त्याला न्यायमूर्ती गजेंद्रगडकरांनी प्रस्तावना लिहिली. न्यायमूर्ती नाणावटी हे देसाईंचे एकमेव आदर्श होते.

''साहित्य, संगीत, रंगभूमी आणि आकाशवाणी यांच्याबरोबर न्यायमंदिराशी निकटचा संबंध जडल्यामुळे माझ्या अनुभवांना इंद्रधनुष्याची काहीशी छटा प्राप्त झाली आहे.'' असे यथार्थ उद्‌गार त्यांनी आपल्या आत्मचरित्रात काढले आहेत.

**रंगभूमीचा चालताबोलता कोश**

ते कीर्तने ऐकत असत. 'दासगणूंचे कीर्तन' म्हणजे मूर्तिमंत तन्मयता आणि भक्तिभाव, असे त्यांना वाटे 'तुकाराम' नाटक पाहून संगीतामुळे नाटकाची रंजकता वाढते, असे त्यांचे मत झाले.

नाटककार, समीक्षक, कादंबरीकार, चरित्रलेखक इत्यादी साहित्याच्या प्रांतांत त्यांनी भरीव कामगिरी केली असून त्यांना मराठी रंगभूमीचा चालताबोलता कोशच म्हटले जाई.

नाटक कसे असते, त्यातले देखावे कसे असतात, पुरुषाची स्त्रीभूमिका कशी असते, या प्रश्नांची उत्तरे त्यांना गडकऱ्यांचे 'पुण्यप्रभाव' नाटक पाहून मिळाली, तर 'एकच प्याला' नाटक वाचून नाटककाराच्या लेखणीच्या सामर्थ्याचा साक्षात्कार त्यांना झाला. यातूनच नाटकांचे वाचन सुरू झाले. 'पुण्यप्रभावा'तील नानासाहेब फाटकांची वृंदावनची भूमिका म्हणजे मराठी रंगभूमीवरील एक अविस्मरणीय भूमिका होती, असे त्यांचे मत होते.

१९२७ मध्ये देसाईंनी 'श्री' व 'कीचकवध' ह्या नाटकांवर परीक्षण लिहिले. त्याच वर्षी बालगंधर्वांनी त्यांना म्हटले, ''देवा, तसं नाटक तुम्ही आम्हांला लिहून दिलं पाहिजे. तुम्ही चांगलं नाटक लिहाल, असा माझा विश्वास आहे.'' 'विधिलिखित' नाटक लिहून देसाई हे गंधर्व मंडळीचे नाटककार झाले. वकील वर्गाने या नाटकाबद्दल देसाईंचे अभिनंदन केले. देसाई लिहितात, ''बालगंधर्वांच्या एका लहरीमुळे माझे नाटक त्यांच्या रंगभूमीवर येऊन माझ्यावर जो प्रकाश पडला, त्याचा मला जन्मभर उपयोग झाला. ''माझे नाटक रंगभूमीवर आल्यानंतर खाडीलकर हे किती मोठे नाटककार आहेत, ते मला समजले.''

देसाईंनी गंधर्व मंडळीला दिलेले दुसरे नाटक 'अमृतसिद्धी' (१९३३). रंगभूमीशी झालेली त्यांची समरसता किती उत्कट होती, याचा परिचय त्यांच्या पुढील अवतरणात स्पष्ट जाणवतो. ''माझ्या विचारांचा आणि भावनांचा पिंड जणू काय मराठी रंगभूमीच्या कुशीत वाढला होता. तिच्या मध्यस्तीनेच गायनाभिनयाच्या कलेचा, मराठीतील उत्तम साहित्याचा, मानवी जीवनातील मूल्यांचा आणि माझा दाट परिचय झाला होता. गंधर्व मंडळीचे विसर्जन झाले, त्या वेळी

द

माझ्या जीवनात एक प्रकारची पोकळी निर्माण झाल्यासारखे वाटते.'' म्हणूनच 'सुख हे गावाच्या विस्तारावर किंवा सुखसोयींवर अवलंबून नसून मोकळ्या मनाच्या आणि आनंदी वृत्तीच्या माणसांच्या सहवासावर अवलंबून असते' हे त्यांचे म्हणणे सहज पटते.

१ मे १९२८ रोजी वसंत देसाईंचा विवाह मालवणच्या डॉक्टर आजगावकरांच्या कन्येशी झाला.

कलावंतांच्या कलेसंबंधी आणि स्वभावासंबंधी लेखन मराठी साहित्यात त्यांच्यापूर्वी क्वचितच केले गेले. हिराबाई बडोदेकरांसाठी त्यांनी अनेक पदे केली व ती सर्व ध्वनिमुद्रित झाली. त्यांपैकी 'उपवनि गात कोकिला', 'हितगुज मनीचे', 'धन्य जन्म जाहला', 'ही कोण मधुरानना' वगैरे पदे नाटकातल्या इतकीच लोकप्रिय झाली. 'शिवनेरीच्या शिवराया' हे पद १९६० साली महाराष्ट्र राज्य स्थापनेच्या दिवशी शिवनेरीवरच्याच अविस्मरणीय समारंभात लक्ष दीड लक्ष श्रोत्यांसमोर हिराबाईंनी गायले.

देसाईंनी टोपणनावाने दोस्त राष्ट्रांच्या बाजूने युद्धकाळात 'विविधवृत्ता'त अनेक लेख लिहिले. पुणे आकाशवाणीवरून अनेक भाषणे, श्रुतिका लेखन-दिग्दर्शन केले, रंगभूमीवरील स्थित्यंतरे दाखवणारा कार्यक्रम रचला, नाटककार देवलांच्या जन्मशताब्दी महोत्सवासाठी कार्यक्रम तयार केला (१८-११-१९५५). गडकऱ्यांच्या पुण्यतिथीला 'एकच प्याला'वर आधारित नभोनाटिका सादर केली. (२३-१-१९५६) खाडीलकरांच्या पुण्यतिथीप्रसंगी 'स्वगते आणि संगीत' यांचे कलात्मक आणि रसपूर्ण मिश्रण करून सादर केले. (३०-८-१९५६) केले. कविवर्य बोरकरांच्या 'संजीवनी' नामक संगीतिकेचे दिग्दर्शन (१३-१-१९५६). १९५८ ते १९६१ या काळात केसरीच्या 'स्वैरसंचार' या सदरात लेखन करून त्यांनी बालगंधर्व (१९५९) व विन्स्टन चर्चिल (१९६१) यांचे चरित्र लिहिले.

देसाईंची साहित्य-संपदा पुढीलप्रमाणे आहे- 'कुलीन स्त्रिया आणि रंगभूमी' (१९३४), 'कलेचे कटाक्ष' (१९४५), मखमलीचा पडदा (१९४७), 'नट, नाटक आणि नाटककार' (१९५६), 'विद्याहरणाचे अंतरंग' (१९४९), 'खाडीलकरांची नाट्यसृष्टी' (१९७२), 'किर्लोस्कर आणि देवल', (१९७५), 'गडकऱ्यांची नाट्यसृष्टी' (१९८२), 'रागरंग' (१९६०) बर्लिनच्या बातम्या (कादंबरी). 'विश्रब्ध शारदा' खंड दुसरा- संगीत विभाग (संपादकीय टिपणे).

- वि. ग. जोशी

* * *

# ध



## धनुर्धारी

*टिकेकर, रामचंद्र विनायक*

**कादंबरीकार, चरित्रकार, निबंधकार**

**१८६२ - १९०७**



रामचंद्र विनायक टिकेकर यांचे रत्नागिरी जिल्ह्यातील टिके हे मूळ गाव होय. त्यांनी 'किरात' व इतरही काही टोपणनावे घेऊन लेखनाला सुरुवात केली, परंतु 'धनुर्धारी' या नावाने 'केसरी'मधून त्यांनी जे लेख लिहायला आरंभ केला, ते लेख अतिशय लोकप्रिय झाले त्यामुळे लेखक म्हणून त्यांनी 'धनुर्धारी' हेच नाव कायम ठेवले. आयुष्याच्या अखेरच्या वर्षांत त्यांच्या मनात विरक्तीची भावना उत्पन्न झाली आणि लातूरजवळ तडवळ येथे रामदासी संप्रदायाची दीक्षा घेण्याचे त्यांच्या मनात आले. तेव्हा 'राघवानंद' या टोपणनावाने त्यांनी त्या पंथाची देवळे व मठ यांचे पुनरुज्जीवन करावे म्हणून वर्तमानपत्रातून काही लेख लिहिले. 'राघवानंद' हा 'धनुर्धारी' यांचा शेवटचा अवतार होय. 'कलम कदमी' नामक रोजनिशी हे त्यांचे अखेरचे लेखन असून या रोजनिशीवरून आज अज्ञात असणाऱ्या अनेक तत्कालीन गोष्टींवर प्रकाश पडू शकला असता, परंतु त्यांच्या एका जवळच्या नातेवाइकाने हेतुतः ही रोजनिशी नष्ट केली व तीमधील सर्व नोंदी काळाच्या पडद्याआड गेल्या.

टिकेकर यांचे शिक्षण इंग्रजी सहा इयत्ता इतकेच झाले होते. घरची गरिबी व स्वतः वडीलभाऊ असल्यामुळे त्यांना मध्येच शाळा सोडून नोकरी धरावी लागली. धारवाड येथील शाळेत असताना भाषा व इतिहास या विषयांचे त्यांनी भरपूर वाचन केले. या वाचनाचा त्यांच्या लेखनासाठी पुढील काळात उपयोग झाला. 'सदर्न मराठा रेल्वे'च्या धारवाड येथील अकान्ट्स ऑफिसात त्यांची पहिली नोकरी झाली. त्यानंतर अक्कलकोट, सोलापूर, बार्शी इत्यादी वेगवेगळ्या ठिकाणी निरनिराळ्या प्रकारच्या नोकऱ्या त्यांनी केल्या. उदरनिर्वाहासाठी त्यांनी अडत-भुसार-किराणा- स्टेशनरी इत्यादी दुकाने चालविली, शिकवण्या केल्या व जेणेकरून अर्थप्राप्ती होईल अशा लहानमोठ्या उलाढालीही केल्या. मात्र उपजीविकेसाठी जेथे-जेथे त्यांना जावे लागले, तेथे-तेथे त्यांनी समाजोपयोगी कार्य केले. उदाहरणार्थ अक्कलकोट संस्थानात 'द अक्कलकोट अॅग्रिकल्चरल सिंडिकेट' नामक संस्था काढून शेतकऱ्यांची गाऱ्हाणी दूर करण्याचा प्रयत्न केला, सोलापूरमध्ये मोडकळीस आलेला विणकऱ्यांचा धंदा मार्गी लावण्यासाठी 'वीव्हर्स गिल्ड' स्थापन करून धावत्या धोट्याचे माग बनवून कापडाच्या जीन्स विणण्याची योजना आखली, बार्शी येथे कापडाच्या गिरण्या सुरू केल्या. अर्थात असे उद्योग केले तरी लक्ष्मी त्यांच्यावर कधी प्रसन्न झाली नाही. ते गरीबच राहिले. अनेकदा त्यांच्या प्रयत्नांतून केवळ अपयश आणि कर्ज तेवढे वाट्याला आले.

'धनुर्धारी' यांनी आपल्या पंचेचाळीस वर्षांच्या आयुष्यात विपुल लेखन केले. 'जवानमर्द ब्राह्मणभाई', भाग १-२ (१८९१), 'मराठ्यांच्या मर्दुमकी', भाग १-२ (१८९१) , 'वीरस्नुषा राधाबाई' (१८९१), 'आपणांवरील जबाबदारी' (१८९२), 'आजोबाने नातवास सांगितलेल्या गोष्टी' (१८९२), 'तंट्या भिल्ल'

(१८९१), 'हरिपंत फडके' (१८९२), 'शूर अबला' (१८९२), 'पैसा कसा मिळेल?' (१८९२), 'नाना फडणवीस' (१८९३), 'मराठ्यांचा पत्रबद्ध इतिहास' (१८९३), 'अहिल्याबाई होळकरीण' (१८९५), 'पानपतचा मोहरा' (१८९३), 'प्रौढ प्रतापनिधी माधवराव' (१८९७), 'उमाबाई दाभाडे' (१८९७), 'वाईकर भटजी' (१८९८), 'बाळकृष्ण आत्माराम गुप्ते' (१८९८), 'पिराजी पाटील' (१९०३), 'उपाशी महाराष्ट्राला उद्योग' (१९०३), 'गुरुभक्ती' (१९०४), 'ब्रह्म' (१९०४), 'भक्ती' (१९०४), 'अभ्यास', 'आमची गळिताची धान्ये', 'व्यापारी भूगोल', 'नीतिधर्मपाठ', 'अलिजाबहादुर शिंदे', 'आर्यधर्माचा इतिहास', 'मरेन पण ख्रिस्ती होणार नाही', 'हिंदु लोकांचा कैवारी' असे अक्षरशः नानाविध विषयांसंबंधीचे सुबोध व उद्बोधक लेखन टिकेकर यांनी केले आहे. याशिवाय 'कुलवधूंचा ज्ञानकोश', 'लहान मुलांचे पुस्तकालय', 'शेत-शेतकी आणि शेतकरी', 'व्यापार-उदीम' अशीही साहित्य निर्मिती त्यांच्या नावावर आहे. तत्कालीन समाजस्थितीशी निगडित अनेक विषयांचा परामर्श त्यांनी घेतला. त्यामधून स्वानुभवाची प्रतीती व परोपकाराची आकांक्षा यांचे दर्शन घडते.

**समाजोद्धाराची तळमळ**

स्वदेशाविषयीचे आत्यंतिक प्रेम आणि समाजोद्धाराची तळमळ हे त्यांच्या साहित्य निर्मितीचे प्रमुख अधिष्ठान आहे. उपमा, उत्प्रेक्षा, अतिशयोक्ती इत्यादी शब्दालंकार व रम्य कल्पना यांनी युक्त अशी त्यांची भाषा आहे. उदाहरणार्थ 'फूल चुरगळले तरी ते बहारदार वास देते' या शब्दांत त्यांनी अहिल्याबाईंच्या कर्तृत्वाची काव्यपूर्ण नोंद केली आहे. पेशवाई आणि नाना फडणीस यांच्या मर्यादांसंबंधी लिहिताना त्यांच्या लेखणीत त्वेष उतरतो. 'धनुर्धारीं'ची भाषा घरगुती असली, तरी रंजक आहे. अवतरणे, सुभाषिते, म्हणी, दृष्टान्त, अर्थांतरन्यास यांनी ती नटलेली असली तरी तिच्यात नटवेपणा नाही. 'आपल्या इतिहासासंबंधाने पराकाष्ठेचे औदासीन्य दिसते.' ही वस्तुस्थिती लक्षात घेऊन सर्वसामान्यांना इतिहासाची गोडी लागावी या भावनेने त्यांनी आपले ऐतिहासिक स्वरूपाचे लेखन केले.

व्यापार, उदीम, अर्थशास्त्र या विषयांसंबंधी लिहिताना 'डॉ. वॅट याचा कोश', 'स्टेट्समन इयर बुक', 'सार्वजनिक सभा'चे त्रैमासिक इत्यादींचा साधार उपयोग त्यांनी केला आणि अर्थशास्त्रासारख्या रूक्ष विषयावरही मनोरम व सुगम पद्धतीने लिहिले. 'वास्तविक पाहता या आमच्या नीचतर दैनेचे मुख्य कारण अपरिहार्य अशी परदेशाच्या व्यापारउदम्यांची आम्हांबरोबर लागलेली झटापट, आणि त्यांच्याशी सामना देण्याला अवश्य असणाऱ्या साधनांची अनुकूलता हेच होय;' 'आमचे राज्यकर्ते आमच्या देशाच्या नैतिक उन्नतीविषयी जितकी कळकळ दाखवितात तितकीच किंवा त्याच्या दशांश कळकळ ते आमच्या आधिभौतिक सुस्थितीविषयी दाखवीत नाहीत यातच आमच्या नष्टचर्याचे सारे बीज आहे.' या शब्दांत त्यांनी भारतातील दैन्याचे व देशाच्या परागतीचे निदान केले आहे. 'ज्ञान आणि उद्योग हे सध्याच्या काळी असेच नव्हे तर सर्वदा कल्पवृक्ष होत. परवशतेला ज्ञान आणि दारिद्र्याला उद्योग अमृतसंजीवनी होय,' अशा स्वरूपाचे 'धनुर्धारी' यांचे विचार देशवासीयांना कायम प्रेरक ठरावेत असे आहेत.

**वाईकर भटजी**

नाना विषयांवर लिहिले असले, तरी 'धनुर्धारी' हे नाव विशेष प्रसिद्ध आहे ते त्यांच्या 'वाईकर भटजी' या कादंबरीसाठी. ऑलिव्हर गोल्डस्मिथच्या 'द विकार ऑफ वेकफील्ड' या कादंबरीचे हे रूपांतर आहे. जॉर्ज इलियटच्या 'सीन्स फ्रॉम क्लेरिकल लाइफ' या कादंबरीशीही तिचे साम्य आहे. या कादंबरीतून एके काळच्या भिक्षुकी गृहस्थितीचे नमुनेदार चित्र पाहावयास मिळते. केवळ समकालीन नव्हे तर उत्तरकालीन वाचकांनाही विचारप्रवृत्त करणारे विवाहविषयक मतप्रतिपादन धनुर्धारींनी निर्भीडपणे केले आहे. विवाहाप्रमाणेच धर्मश्रद्धा, धर्मांतर, मैत्री, सुख, सौंदर्य,

ध

लक्ष्मी, आत्महत्या, झोप, सत्ता, कर्ज इत्यादी बाबतींतही त्यांनी आपली मते कादंबरीतील विवेचनामधून मांडली आहेत. स्वभाव वर्णनाचे कौशल्य हा या कादंबरीचा एक महत्त्वाचा विशेष म्हणावा लागेल. खुद्द वाईकर भटजी, त्यांचे कुटुंब व स्नेही मोरोबा यांपैकी प्रत्येकाचे कादंबरीतील व्यक्तिचित्रण स्वाभाविक, परस्परभिन्न व वैशिष्ट्यपूर्ण आहे. स्त्री-स्वभावातील खाचाखोचांचे त्यांनी केलेले निरीक्षण भटजींच्या पत्नीच्या व्यक्तिचित्रणातून प्रकटते. 'वाईकर भटजी' ह्या कादंबरीपासून मराठीतील रूपांतरित कादंबऱ्यांचा प्रवाह क्रमशः विकसित होत गेला.

**पिराजी पाटील**

शेतकऱ्यांची गाऱ्हाणी व त्यांच्या अनुकंपनीय हालअपेष्टा जगजाहीर करण्यासाठी धनुर्धारी यांनी 'पिराजी पाटील' ही कादंबरी लिहिली. ही कादंबरी हा वास्तविक पाहता कादंबरी लेखनाचा त्या काळातील एक नवा प्रयोग म्हणता येईल. सर्वसामान्यपणे कादंबरीला एक कथानक असावे असा संकेत रूढ होता, 'पिराजी पाटील'मध्ये मात्र वेगवेगळ्या कथांचे मिश्रण करून त्याला त्यांनी कादंबरीचे रूप दिले आहे. महाराष्ट्रातील ग्रामीण समाज, इंग्रज अधिकाऱ्यांची बेपर्वाई वृत्ती, राज्यव्यवस्थेची नवीन पद्धती, निसर्गाची अवकृपा, दुष्काळामुळे पसरणारी अवकळा इत्यादी मानवी व अतिमानवी कारणांमुळे खेड्यातील जीवन किती दुःखद व कष्टप्रद होते, त्याचे आत्मीयतेने केलेले चित्रण आढळते. लोभी माणसे, स्त्रियांची केविलवाणी दशा इत्यादींचे चित्रणही त्यांनी आस्थापूर्वक केले आहे. कादंबरीतील पात्रांच्या जीवनाशी, त्यांच्या सुखदुःखांशी व आशानिराशेच्या वेगवेगळ्या प्रसंगांशी कादंबरीकार समरस होतो.

'धनुर्धारी' यांचे लेखन प्रसंगोपात्त असो वा विषयनिष्ठ असो, त्यामागे त्यांना आपल्या समाजाविषयी वाटणारे प्रेम व समाजाविषयीची कळकळ प्रतीत होते. लेखन हे जनसेवेचे एक साधन आहे, अशी त्यांची धारणा होती. 'समशेरीने लेखणीस साम्राज्य ओपिले हे मात्र विसरू नका; आणि त्याप्रमाणे हातून होईल तेवढी धर्मसेवा, देशसेवा, भाषासेवा करा, हे माझे विनयपूर्वक मागणे आहे.' असे त्यांनी लिहून ठेवले आहे. त्यांच्या आचारविचारांतून व कार्यातून त्यांचा हाच दृष्टिकोन प्रकट झाला आहे.

– प्रा. डॉ. विलास खोले

**संदर्भ :**

१. *गं. दे. खानोलकर; 'अर्वाचीन मराठी वाङ्मयसेवक', द्वितीय खंड; स्वस्तिक पब्लिशिंग हाउस, मुंबई; १९३८.*

## धर्माधिकारी, शंकर त्र्यंबक

*आचार्य दादा धर्माधिकारी*

**स्फुट लेखक, निबंधकार, सर्वोदयी विचारवंत**

**१८ जून १८९९ – १ डिसेंबर १९८५**



महात्मा गांधींनी चालविलेल्या स्वातंत्र्याच्या आंदोलनात महाराष्ट्रातील जे अनेक नामवंत सहभागी झाले होते, त्यांपैकी एक म्हणजे शंकर त्र्यंबक उर्फ आचार्य दादा धर्माधिकारी हे विदर्भातील थोर नेते होत. त्यांचा जन्म त्या वेळच्या मध्य प्रांतात मूलतापी या गावी झाला. धर्माधिकारी यांचे घराणे मुलताई (जि. बैतुल, मध्य प्रांत) येथील प्रतिष्ठित घराणे होते. त्यांचे वडील त्र्यंबक धुंडिराज एलएल.बी. असून सरकारी मुन्सफ या पदावर काम करीत. सरकारी नोकरीतील नियमांनुसार त्यांच्या बदल्या वारंवार होत. त्यामुळे दादा धर्माधिकारी यांच्यावर त्यांचे चुलते भाऊसाहेब धर्माधिकारी यांचा अधिक प्रभाव होता. विशेषतः भगवद्गीता व ज्ञानेश्वरी यांचा सांगोपांग अभ्यास त्यांनी भाऊसाहेबांच्या जवळ बसून केला. लोकमान्य टिळक हयात असतानाच १९१८च्या आसपास देशस्वातंत्र्यासाठी काम करण्याची प्रतिज्ञा त्यांनी केली होती. भारतीय तत्त्वज्ञान, हिंदू धर्म व संस्कृती यांविषयीचे सखोल मनन-चिंतन त्यांनी याच काळात सुरू

केले. महात्मा गांधींचे शिष्य व सुप्रसिद्ध विचारवंत विनोबा भावे यांच्याशी त्यांचा अखंड पत्रव्यवहार चाले. पारतंत्र्याच्या काळात तत्कालीन मोठे नेते ज्या प्रकारचा आचारधर्म पाळत त्याच्या अनुकरणातून गांधी व विनोबा यांच्याशी त्यांचे गोत्र अधिक प्रमाणात जुळले. त्यामुळेच महाविद्यालयीन शिक्षण मध्येच सोडून देऊन गांधींच्या प्रखर स्वतंत्रतावादी तरीही शांतता व अहिंसा यांच्या मार्गाने जाणाऱ्या राष्ट्रकार्यात ते हिरिरीने उतरले. त्यांना वेळोवेळी तुरुंगवासही भोगावा लागला. त्यानंतर उर्वरित आयुष्यात त्यांनी स्वत:ला गांधीवादी विचारसरणीला वाहून घेतले.

दादा धर्माधिकारी यांनी भरपूर स्फुट-लेखन केलेले आहे आणि त्या सर्व लेखनावर गांधी व विनोबा यांच्या विचारांची छाप आहे. 'अहिंसेची साधना' (१९४५) या पुस्तकानंतर 'सर्वतोमुखी क्रांतिकारक' व 'भारतीय जीवनाचे प्रयोगी प्रतिनिधी' या त्यांच्या दोन लेखांचे मिळून 'गांधीजी एक दर्शन' (१९४६) हे पुस्तक प्रकाशित झाले. 'पाकिस्तानी वृत्तीचा प्रतिकार' हा त्यांच्या निवडक लेखांचा, वामन चोरघडे यांनी संपादित केलेला लेखसंग्रह १९४८ मध्ये प्रसिद्ध झाला. त्यातील 'जात-जमातवाद', 'धार्मिक कलह', 'अहिंदू आणि गोवधबंदी', 'हिंदुत्ववाद की शबल राष्ट्रवाद', 'मानवतेचा मानदंड' इत्यादी लेखांमधून त्यांच्या विचार-विश्वाचा परिचय घडतो. राजकारण, स्त्रीशिक्षण यांसारख्या क्षेत्रांत मूलभूत स्वरूपाचे बदल व्हावयास हवे, असा त्यांचा आग्रह होता. या दृष्टीने त्यांनी केलेली मांडणी १९४८ मध्ये प्रकाशित झालेल्या 'क्रांतिनिष्ठा' या लेखसंग्रहात आढळते.

दादा धर्माधिकारी हे घटनापरिषदेचे एक सदस्य होते. त्यांनी 'आपल्या गणराज्याची घडण' हे घटनापरिषदेचे व तिच्या कार्यपद्धतीचे विवेचन करणारे पत्रात्मक लेखांचे पुस्तक १९५१ मध्ये सिद्ध केले. यांखेरीज 'अंतरीचे उमाळे' (१९५३), 'साम्ययोगाच्या मार्गावर' (१९५५), 'क्रांतीचे पुढचे पाऊल' (१९५६) ही त्यांची पुस्तके विशेष उल्लेखनीय आहेत. महाराष्ट्रात स्त्रीवादी चळवळीचा आरंभ होण्यापूर्वीच आधुनिक सुधारक विचारवंतांनी स्त्री-सुधारणेविषयी जे विचार मांडले होते, त्यापेक्षा वेगळे विचार मांडून स्त्री-पुरुष परस्परसंबंधांविषयी, कुटुंबसंस्थेविषयी नवे भान उत्पन्न करणारे 'स्त्री-पुरुष सहजीवन' (१९७३) हे पुस्तक त्यांनी लिहिले. स्त्रियांच्या स्थितीविषयी व समस्यांविषयी त्यांच्या मनात अतिशय कळवळा होता. स्त्रीचे महत्त्व व विशिष्टत्व त्यांनी आपल्या लेखनातून वारंवार सुस्पष्ट केले आहे.

विनोबा भावे यांच्या सर्वोदयवादी विचारसरणीचे अधिकारी भाष्यकार म्हणून धर्माधिकारी ख्यातनाम आहेत. 'सर्वोदयदर्शन' (१९५७) हा त्यांच्या व्याख्यानांचा संग्रह सर्वोदयाची विचारसरणी स्पष्ट करणारा आहे. आपल्या व्याख्यानांतून त्यांनी हिंदू समाजातील वेगवेगळे दोष आणि जातिव्यवस्थेमुळे निर्माण झालेले प्रश्न त्यांनी सुस्पष्ट केले आहेत. त्या काळातल्या सगळ्याच विचारवंतांप्रमाणे दादांनीही मार्क्स वाचलेला होता, तथापि गांधींच्या विचारांनी ते इतके भारावलेले होते की, ते विचार मार्क्सच्याही पुढे जाणारे आहेत याविषयी ते नि:शंक होते. त्यांच्या लेखनाला विनोबांच्या लेखनाप्रमाणेच एक आध्यात्मिक व विधायक अंग आहे. त्यांची भाषा प्रासादिक व परिणामकारक आहे. मराठीतील वैचारिक स्वरूपाच्या निबंधवाङ्मयात दादा धर्माधिकारी यांच्या लेखनामुळे मोलाची भर पडली आहे. त्यांचे व्यक्तिमत्त्व ऋजू, त्यागी, तपस्वी व मायाळू होते. कोणत्याही सत्तेचा मोह नसल्यामुळे ते स्वातंत्र्यानंतरच्या काळात सक्रिय राजकारणात सहभागी झाले नाहीत.

– प्रा. डॉ. विलास खोले

## धारप, नारायण गोपाळ

**गूढकथाकार, भयकथाकार,**

**२७ ऑगस्ट १९२५ – १८ ऑगस्ट २००८**

नारायण गोपाळ धारप यांचा जन्म पुणे येथे झाला. त्यांनी मुंबई विद्यापीठातून रसायनशास्त्रात पदवी घेतल्यानंतर रसायन तंत्रज्ञानात पदव्युत्तर बी. एस्सी. (टेक) ही दुसरी पदवी मिळवली. काही काळ त्यांनी भारतात

ध



नोकरी केल्यावर नोकरीच्या निमित्ताने ते आफ्रिकेत गेले. तिथून परतल्यावर त्यांनी नागपूर येथे व्यवसाय करण्याचा प्रयत्न केला, पण पुढे नागपूर सोडून ते पुण्याला परतले; आणि बदलीच्या निमित्ताने किंवा शिकायला पुण्यात आल्यावर लोकांना जे सामान अत्यावश्यक वाटते अशा वस्तू किमान भाड्याने देण्याचा व्यवसाय त्यांनी सुरू केला. कॉट, खुर्च्या, टीपॉय आणि छोटी कपाटे ह्या गोष्टी ते भाड्याने देत. अर्थात त्यांच्या या पोटापाण्याच्या व्यवसायासाठी धारप प्रसिद्ध नव्हते.

नागपूर येथे असतानाच धारप यांनी विज्ञानकथा–लेखनास प्रारंभ केला. मात्र त्या काळात मराठीमध्ये विज्ञान–साहित्यास फारसा वाचक नव्हता. तरीही केवळ कादंबऱ्याची आणि कथासंग्रहांची संख्या बघता, नारायण धारपांची गणना आघाडीच्या विज्ञान कथा–लेखकांत करावी लागते.

धारपांनी १९५१मध्ये लेखनाला सुरुवात केली आणि पन्नास वर्षांहून अधिक काळ लिहीत राहिले. सुरुवातीच्या काळात त्यांच्या भयकथा, विज्ञानकथा यांची उपेक्षाच झाली. परंतु पुढे मात्र त्यांची ओळख निर्माण झाली. त्यांच्या लेखनाचा वाचकवर्ग तयार झाला. त्यांनी शंभरहून अधिक पुस्तके लिहिली आहेत. ‘अनोळखी दिशा’ हा त्यांचा पहिला कथासंग्रह. ‘चंद्राची सावली’, ‘लुचाई’, ‘वेडा विश्वनाथ’, ‘दुहेरी धार’, ‘पानघंटी’, ‘४४० चंदनवाडी’, ‘देवाज्ञा’, ‘आनंद महल’, ‘संक्रमण’, ‘नवे दैवत’, ‘स्वाहा’, ‘चेटकीण’ अशा कादंबऱ्या; ‘चंद्रहास आणि इतर विलक्षण माणसं’, ‘समर्थांचिया सेवका’, ‘अनोळखी दिशा’चे ३ खंड, असे काही कथासंग्रह; पंधरा विज्ञान कादंबऱ्या; आणि तीन विज्ञान कथासंग्रह त्यांच्या नावावर जमा आहेत; म्हणजे त्यांच्या विज्ञान कादंबऱ्यांची संख्या इतर कुठल्याही विज्ञान साहित्यिकांच्या विज्ञान कादंबऱ्यांपेक्षाही जास्त आहे. विज्ञान साहित्यात वाचकांचा आणि त्याहीपेक्षा संपादकाचा, प्रकाशकांचा हवा तसा प्रतिसाद मिळत नाही, हे लक्षात येताच धारपांनी त्यांचे लक्ष गूढकथा, या भयकथा यांवर केंद्रित केले.

जरी धारपांनी त्यांचे लक्ष गूढकथांवर भयकथांवर केंद्रित केले, तरी सुरुवातीच्या काळात त्यांनी चार आणि उत्तरायुष्यात एक अशा पाच सामाजिक कादंबऱ्या लिहिल्या. त्या कादंबऱ्यांनाही वाचकांचा फारसा प्रतिसाद मिळाला नव्हता. याचे कारण धारपांची खास लेखनशैली ही गूढ व भय कथांसाठी योग्य असली तरी ती सामाजिक कादंबऱ्यांसाठी योग्य नव्हती, असेच म्हणावे लागते. संथपणे उत्सुकता वाढवत नेणारे त्यांचे लेखन सामाजिक कादंबऱ्यांत अनपेक्षित धक्का देणारे प्रसंग नसल्यामुळे सपक वाटते.

धारपांनी आणखी एक प्रयोग केला. एका प्रकाशकाच्या आग्रहाला बळी पडून त्यांनी दर महिन्यास एक अशा सहा रहस्य–कथांचे लेखन केले. चक्रवर्ती चेतन हा त्यांच्या रहस्य–कथांचा नायक होता. लेसली शार्तरीज रहस्य कथा लेखकाच्या कथांचे हे भारतियीकरण होते. त्या काळात गुरुनाथ नाईक, शरच्चंद्र वाळिंबे यांच्यासारखे रहस्यकथाकार प्रचंड लोकप्रिय होते. दिवाकर नेमाडे हे रहस्य कथा क्षेत्रात आघाडीवर होते. हे सर्व रहस्य कथा लेखक जनसामान्यांच्या भाषाशैलीत वाचकांना विचार करायला वेळ मिळणार नाही, अशा झपाट्याने घडणाऱ्या घटनांची मालिका वाचकांपुढे ठेवत असत. शिवाय त्यांच्या लेखनाचा झपाटा दांडगा होता. दर महिन्याला त्यांच्या वेगळ्या नायकांच्या कर्तृत्वाच्या कहाण्या लिहीत. धारपांना हा वेग पेलवणारा नव्हता. सहाव्या कथेनंतर ते या शर्यतीतून बाहेर पडले.

‘छाया’, ‘उत्तररंग’ यांसारख्या कौटुंबिक कादंबऱ्या; ‘एक पापणी लवली’, ‘विज्ञानकथा यात्रा’ यांसारखे विज्ञानकथा संग्रह लिहिले; या संग्रहाला विज्ञानकथेची समज असणारी सुजाण प्रस्तावना आहे. अवकाश–प्रवास, काल–प्रवास, संगणक, समांतर विश्व, वेगळ्या

मिती, यंत्रमानव, वेगवेगळे ग्रह, असीमित अवकाश आणि अनंतकाळ अशा वेगवेगळ्या विषयांमुळे त्यांच्या विज्ञानकथेत विविधता आली आहेच, पण अनाकलनीय वाटणाऱ्या घटनाही ते शास्त्राच्या चौकटीत बसवून दाखवतात.

भयकथाकार म्हणून तर त्यांनी जनमानसावर गारुड केले आहे. ओसाड जागा, तळघरे, झपाटलेल्या भग्न वा भव्य वास्तू, निसर्गातली भयप्रद स्थळे, अतिप्राचीन अघोरी शक्ती, नकळतपणे वा लालसेने त्यांची केलेली उपासना, त्यांना हवा असणारा त्यांचा वाटा, अंतहीन नैवेद्य यांनी त्यांची कथासृष्टी गजबजलेली आहे. चक्काचूर, आशा, अपुऱ्या इच्छा (खिडकी); भंगलेली स्वप्ने (पिसाट) सतत येणारे अपयश– नकार, दुसऱ्यांकडून मन–शरीर चुरमडून जाईल असा छळ, असफल प्रेमाचे दारुण दुःख, अन्यायाची परिसीमा, अपत्य सुखाची लालसा वा त्यांच्यात जीव गुंतवणारे पाश, मृत्यूचा घाला या साऱ्यांतून काही आकार जन्माला येतात. कधी ते विनाशकारी बनतात, कधी त्याच आवर्तात अडकून पडतात (दार उघड ना ग आई, ज्वालेत उभी ती). यावर धारप लिहितात, ‘आणि मग या अशुभाच्या विरोधात मंगलशक्ती उभ्या ठाकतात.’ शुभाशुभाच्या संघर्षाचे मायाजाल ते विणतात. ते म्हणतात, ‘धनाला ऋण बाजू असते तशीच शुभाला कृष्ण असते.’ पण धारप नेहमीच मांगल्याचा जय होताना दाखवतात.

कधी जागवलेल्या अघोरी शक्ती (‘बशीभर दूध’, ‘बलात्कारित जनीचा सूड’, ‘चल रानात सजणा’), अघोरी जबरदस्तीला अमानवी शक्तीचे उत्तर, कधी अपराधी मनानेच स्वतःला दिलेल्या शिक्षा (‘प्रायश्चित्त’, ‘सोबत’, ‘पानगळ’), श्रद्धेचे महत्त्व आणि परिणाम ‘श्रद्धा’ या कथेमधून व ‘देवाज्ञा’ या कादंबरीतून मृत्यूचा दाहक स्पर्श झालेल्या लोकांचे अनुभव आणि शक्ती ते रंगवतात.

धारप साक्षात दृश्यचित्रात्मक प्रसंग उभे करतातच. पण गंध, नाद, वेग, आणि स्पर्श ह्यांच्या अतितरल संवेदनेपासून अतितीव्रतेची खोल जाणीव घडवतात. तरीही त्यांचे खरे सामर्थ्य हे आहे की, अमानवी, असंभवनीय वाटणाऱ्या घटनाही पूर्णतः खऱ्या वाटतात. कारण त्या वातावरणाची निर्मिती तसूतसूने, वीटवीट रचत वास्तूची चिरेबंदी घडण ते करतात. बारीक–बारीक तपशिलांनी जाळे विणतात आणि भयाची विविध रूपे दाखवतात.

नोकरी करणारे, सर्वसाधारण मध्यमवर्गीय, त्यांचा कोमट दिनक्रम, मध्यम शहरं, गावं, बसचा प्रवास असे सगळे सुरळीत चालू असतानाच भीतीने चुरगळून टाकणारे अनुभव अकल्पितपणे पुढे ठाकतात. वाचक त्यामुळे अधिक दचकतो. कधी अनपेक्षित कलाटणी येते (दुहेरी घार). अशा तऱ्हेच्या कथा–कादंबऱ्यांतूनही ते काही ठोस संस्मरणीय विधाने करतात.

त्यांनी गूढ कादंबऱ्या आणि कथासंग्रह मिळून सुमारे शंभर पुस्तकांची निर्मिती केली. ‘समर्थकथा’ लिहून ते वाचकांच्या गळ्यातले ताईत बनले. पण पुढे त्यांनी ‘समर्थकथा’ लिहिणे थांबवले. जयदेव आणि कृष्णचंद्र हे त्यांचे आणखी दोन नायक! याशिवाय ‘चंद्रविलास’, ‘नवदैवत’, ‘मृत्युद्वार’ अशा कादंबऱ्यांत त्यांनी नवनवे प्रयोग केले. अखेरच्या दिवसापर्यंत धारप लिहीत होते. २००८च्या दिवाळी अंकासाठीचे लेखन पूर्ण करून मगच त्यांनी चिरविश्रांती घेतली.

– प्रा. मीना गुर्जर

## धोंड, मधुकर वासुदेव

**संशोधक, समीक्षक**

**४ ऑक्टोबर १९१४ – ५ डिसेंबर २००७**

संशोधक समीक्षक म.वा. धोंड यांचा जन्म मुंबईत झाला. त्यांचे शिक्षण मुंबईत राममोहन हायस्कूल आणि विल्सन महाविद्यालय येथे झाले.

प्रारंभी १९३७ ते १९४५ या काळात मुंबईच्या चिकित्सक समूहाच्या शिरोळकर हायस्कूलमध्ये ते शिक्षक होते. त्यानंतर शासकीय महाविद्यालयात त्यांनी प्राध्यापक–पद स्वीकारले. धारवाडचे कर्नाटक कॉलेज, मुंबईचे इस्माइल युसूफ महाविद्यालय आणि एल्फिन्स्टन महा–

ध



विद्यालय या शिक्षण संस्थांत मराठी विषयाचे ते प्राध्यापक आणि विभाग प्रमुख होते. १९७२ मध्ये निवृत्त झाल्यावर 'मराठी संशोधन मंडळ' ह्या संस्थेत संचालक म्हणून त्यांनी काम पाहिले. संगीताइतकाच त्यांना रोखे बाजारातील उलाढालीत रस होता. या दोन्ही क्षेत्रांतील बारकाव्यांचे त्यांना अचूक ज्ञान होते.

१९४८ साली त्यांचे 'काव्याची भूषणे' हे पहिले पुस्तक प्रसिद्ध झाले. अलंकार आणि अलंकार शास्त्र यासंबंधी विस्तृत चर्चा करणाऱ्या या पुस्तकाचे जाणकारांनी स्वागत केले. त्यानंतर त्यांचे 'मऱ्हाटी लावणी' (१९५६) हे लावणी वाङ्मयाचा मागोवा घेणारे आणि त्यासंबंधी सखोल विवेचन करणारे संशोधनपर पुस्तक प्रकाशित झाले आणि भरपूर गाजले. लावणीचा उगम आणि विकास यांचा मूलगामी विचार करताना आणि त्यातील काव्य उलगडून दाखविताना त्या वेळची राजकीय, सामाजिक आणि धार्मिक स्थिती काय होती, याचा तपशीलवार आढावा प्रा. धोंड यांनी घेतलेला आहे. १९८८ साली निघालेल्या दुसऱ्या आवृत्तीत त्यांनी लावणीचे कुल आणि शील स्पष्ट करणारी महत्त्वाची माहिती समाविष्ट केली. निवडक एकसष्ट लावण्यांची पुरवणीही जोडली. 'लावणी' या काव्यप्रकाराचे त्यांनी केलेले सांगोपांग विवेचन अभ्यासकांच्या दृष्टीने अतिशय महत्त्वपूर्ण ठरणारे आहे.

प्रा. म. वा. धोंड केवळ समीक्षक नव्हते, त्यांच्या समीक्षेला मूलगामी संशोधनाची जोड होती. एखाद्या विषयाचा परामर्श घेताना प्रा. धोंड त्याच्या मुळापाशी पोचत. एखाद्या साहित्यकृतीचे परिशीलन करताना त्यांच्या चौकस मनाला अनेक प्रश्न पडत. त्या प्रश्नांची उकल होईपर्यंत ते समग्र ज्ञात-अज्ञात संदर्भांचा धांडोळा घेत. 'ज्ञानेश्वरी'मधील नाण्याचे उल्लेख तपासून पाहण्यासाठी जागतिक नाणेशास्त्राचा इतिहास त्यांनी वाचून काढला आणि ज्ञानेश्वरीतील लौकिक सृष्टीचे विश्लेषण करण्यापूर्वी वनस्पतिशास्त्राचा बारकाईने अभ्यास केला. रणजीत देसाईंच्या 'स्वामी' कादंबरीतील भाषेच्या ढंगाचा विचार करताना प्रा. धोंड पेशवेकालीन पत्रव्यवहार, बखरी, होळकरांच्या कैफियती, लावण्या, पोवाडे यांच्या अथांग सागराच्या तळाशी पोचतात आणि कादंबरीतील संवाद कसे कृत्रिम व पाश्चात्त्य धर्तीचे आहेत, हे सोदाहरण दाखवतात. इतकेच नव्हे तर बखरीतील पेशवेकालीन पत्रव्यवहारातील भाषिक ढंगाचा निर्वाळा देऊन 'स्वामी'तील संवाद कसे असायला हवे होते, याचेही विवेचन करतात.

बालकवींची 'औदुंबर' कविता, बी. कवींची 'चाफा' कविता, श्री. ज. जोशी यांच्या 'आनंदी गोपाळ' आणि 'रघुनाथची बखर' या कादंबऱ्या यांवरील त्यांची संशोधनात्मक समीक्षा विलक्षण गाजली; ती त्यांच्या विशिष्ट विश्लेषण शैलीमुळेच. 'ज्ञानेश्वरी' ग्रंथाचे नवे आकलन मांडणारे 'ज्ञानेश्वरी: स्वरूप, तत्त्वज्ञान आणि काव्य' (१९८०) हे त्यांचे पुस्तक संपन्न रसाळ भाषेमुळे वरची उंची गाठते. राम गणेश गडकरींच्या नाट्यलेखनावर नव्या दृष्टिकोनातून प्रकाश टाकणारे त्यांचे 'चंद्र चवथिचा' (१९८७) हे पुस्तक 'एकच प्याला' नाटकाचा पूर्णतया वेगळ्या पद्धतीने परामर्श घेते. 'ज्ञानेश्वरीतील लौकिक सृष्टी' (१९९१) ह्या पुस्तकामध्ये त्यांच्या प्रगल्भ, चिंतनशील वृत्तीचा प्रत्यय येतो. तत्कालीन परिसराचे ज्ञानेश्वरीत येणारे अनेक उल्लेख प्रा. धोंडांचे कुतूहल जागृत करतात आणि त्यांचा शोध घेताना त्यांना लौकिक सृष्टीविषयी वाटणारे कुतूहल वाचकांना समृद्ध अनुभव देऊन जाते.

आयुष्याच्या उत्तरार्धात प्रा. धोंड यांना मर्ढेकरांच्या कवितेने झपाटलेले दिसते. अन्य समीक्षकांनी मर्ढेकरांच्या कवितेचा लावलेला अन्वयार्थ त्यांना मान्य नाही. इतकेच नव्हे तर 'पिपात मेले ओल्या उंदिर' या कवितेवर आधी केलेले भाष्य त्यांनी नंतरच्या काळात खोडून काढले आणि त्या कवितेचा अर्थ नव्याने विशद केला. ऑगस्ट १९६७च्या 'सत्यकथे'च्या अंकात

त्यांनी 'दंभहारक' या नियतकालिकाच्या १८७५च्या अंकातील उंदीर मारण्याची काहीशी गुंतागुंतीची युक्ती सांगणारा एक लेख उद्धृत देऊन त्या गुंतवळ्यातून मर्ढेकरांच्या त्या कवितेतील रूपक उलगडण्याची खटपट केली होती. या कवितेवरील नव्या भाष्यवजा लेखात प्रा. धोंड यांनी आपले पूर्वीचे भाष्य खोडून टाकले आणि रॉबर्ट बर्न्सची 'टू अ माउस' ही कविता, स्टाइनबेकची 'ऑफ माइस अँड मेन' ही कादंबरी, 'रॅट रेस' ह शब्दप्रयोग आणि 'बॅरल अ वेट' या इंग्रजी शब्दांचे लाक्षणिक अर्थ यांच्या आधारे कवितेचा अर्थ नव्याने उलगडून दाखविला आहे. याच पद्धतीने त्यांनी 'तरीही येतो बहर फुलांना', 'बन बांबूचे पिवळ्या गाते' यांसारख्या कवितांवर भाष्य केले आहे. प्रा. धोंड यांनी बहुविध संदर्भांचा विशिष्ट कवितेशी जोडलेला संबंध काही टीकाकारांना बादरायणी वाटला, तरी स्वतः धोंड मात्र त्याबाबत ठाम राहिले.

समीक्षाक्षेत्रात एकमेवाद्वितीय असलेल्या या संशोधक समीक्षकाची प्रसन्न, प्रासादिक शैली, संपन्न रसाळ भाषा यांमुळे त्यांचे लेखन अतिशय वाचनीय होते.

त्यांच्या 'जाळीतील चंद्र' ह्या पुस्तकास 'साहित्य अकादमी'ने पुरस्कार देऊन गौरविले.

– डॉ. सुभाष भेण्डे

**संदर्भ :**

*१. भेण्डे सुभाष; 'साहित्य संस्कृती'; श्रीविद्या प्रकाशन, पुणे; १९९९.*

* * *

ध



न

## नगरकर, किरण कमलाकर
**कादंबरीकार, कथाकार, नाटककार**
**२ एप्रिल १९४२**



किरण कमलाकर नगरकर यांचा जन्म मुंबईत झाला. त्यांचे प्राथमिक शिक्षण मुंबईच्या किंग जॉर्ज शाळेत व माध्यमिक शिक्षण पुणे येथील सेन्ट व्हिन्सेन्ट हायस्कूल व मुंबईतील डॉन बॉस्को या शाळांत झाले. मुंबईचे सेन्ट झेविअर्स महाविद्यालय व पुण्याचे फर्गसन महाविद्यालय येथे महाविद्यालयीन शिक्षण घेतल्यावर त्यांनी मुंबई विद्यापीठातून इंग्लिश या विषयातील एम.ए.ची पदवी घेतली. 'अभिरुची'मधील कथांनी त्यांच्या लेखनाला सुरुवात झाली असली, तरी 'सात सक्कं त्रेचाळीस' (१९७४) या पहिल्याच कादंबरीमुळे मराठी साहित्यविश्वात एक गंभीर लेखक म्हणून मराठी वाचक त्यांना ओळखू लागले. त्यानंतर 'बेडटाइम स्टोरी' (१९७८), 'कबिराचं काय करायचं' (१९९४) ही नाटके त्यांनी लिहिली. 'रावण अ‍ॅन्ड एडी' (१९९५), 'ककोल्ड' (१९९७) आणि 'गॉड्स लिटिल सोल्जर' या इंग्लिश कादंबऱ्या त्यांनी लिहिल्या. २००२मध्ये 'द आर्सोनिस्ट' हे संतकवी कबिराचे सर्जनशील पुनर्कल्पन त्यांनी केले. पटकथालेखनासाठी प्रसिद्ध असणाऱ्या नगरकरांनी 'द कॉंपिटिशिन' (१९९१), 'द परफेक्ट सर्कल' (१९९७), 'द जी गँग' (२००१), 'द ट्यूलीप' (२००२) या पटकथा लिहिल्या. रॉकेफेलर फेलोशिपचे (१९९१, २००२) ते मानकरी आहेत. 'ककोल्ड' या त्यांच्या कादंबरीला साहित्य अकादमीचा पुरस्कार (२०००) मिळाला आहे. 'सात सक्कं त्रेचाळीस' या कादंबरीला प्रथम लिहिलेली सर्वोत्कृष्ट कादंबरी म्हणून महाराष्ट्र शासनाचा हरि नारायण आपटे पुरस्कार (१९७५) मिळाला आणि १९९६मध्ये लेखनातून सामाजिक सुसंवाद निर्माण केल्याबद्दल दालमिया पारितोषिक देऊन त्यांचा गौरव करण्यात आला.

'सात सक्कं त्रेचाळीस' ही नगरकरांची कादंबरी मराठी कादंबरीच्या इतिहासातील अत्यंत अपारंपरिक असे लेखन म्हणता येईल. कुशंक या नायकाच्या रूपाने आपले जीवन अत्यंत नेकीने जगण्याचा प्रयत्न करणाऱ्या माणसाची ही कथा आहे. असंबद्धता व मृत्यूची छाया यांना सोबत घेऊन जगताना वाट्याला येणारी वेदना कादंबरीकाराने वेगवेगळ्या लेखनतंत्रांचा उपयोग करून सादर केली आहे. या कादंबरीला रूढार्थाने कथानक नाही, मात्र तीत अनेक व्यक्तिरेखा आहेत. त्या व्यक्ती, त्यांची कुटुंबे, त्यांच्या विभिन्न जीवनसरणी यांचे व्यामिश्र दर्शन या कादंबरीतून घडते. कालक्रमभंग करून वेगवेगळे प्रसंग एकमेकांत मिसळून कादंबरीकाराने विभिन्न भावस्थितीतून उत्पन्न होणारे ताण कादंबरीच्या माध्यमातून प्रकट केले आहेत. उत्कट प्रेमातून, रतिकर्मातून व शारीर दु:खभोगातून वाट्याला येणारे जिणे किती यातनामय असते, त्याचा प्रत्यय ही कादंबरी वाचताना येतो. अतिशय गुंतागुंतीच्या घटनाप्रसंगांनी युक्त असणाऱ्या, आधुनिक व उत्तराधुनिक जीवनदृष्टी व्यक्त करणाऱ्या तरीही इथल्याच मातीतील अनुभवांवर इथल्याच संमिश्र भाषेत लिहिलेल्या, सर्वसामान्य वाचकाची मती गुंग करणाऱ्या या कादंबरीने मध्यमवर्गीय अभिरुची व वास्तवतावादी साहित्य यांना सरावलेल्या मराठी

वाचकवर्गाला मोठाच धक्का दिला. त्यामुळे या कादंबरीच्या गुणवत्तेबाबत मराठी जगतात वेगवेगळ्या उलटसुलट प्रतिक्रिया निर्माण झाल्या.

'बेडटाइम स्टोरी' हे त्यांचे अप्रकाशित नाटक अस्पृश्य, आदिवासी आणि स्त्रिया यांच्या दृष्टिकोनातून महाभारताचा सर्वस्वी भिन्न अन्वयार्थ लावते. या नाटकाचा पहिला प्रयोग १९९५ मध्ये झाला. त्यानंतर अगदी मोजके प्रयोग होऊन राजकीय शक्तीच्या दबावामुळे व कायद्याच्या कटकटींमुळे ते बंद पाडले गेले. नाटकाच्या विवाद्य आशयामुळे या नाटकाची संहिता प्रकाशित होऊ शकली नाही. 'कबिराचं काय करायचं' हे १९९३ च्या हिंदू-मुसलमान दंगलीनंतर लिहिले गेलेले नाटक जमातवादी दंगलीचे वातावरण साकार करते. १९९५ मध्ये या नाटकाचे वाचन व सादरीकरण झाले तथापि तेही प्रकाशित झाले नाही.

नगरकरांच्या 'रावण ॲन्ड एडी' या कादंबरीचा अनुवाद (१९९६) करणाऱ्या रेखा सबनीस यांनी 'ककोल्ड' या कादंबरीचा 'प्रतिस्पर्धी' या नावाने २००८ साली अनुवाद केला. या अनुवादास कमल देसाई यांनी प्रस्तावना लिहून 'ककोल्ड' या कादंबरीच्या अंतरंगसामर्थ्याचे स्वरूप स्पष्ट केले आहे. 'प्रतिस्पर्धी' या कादंबरीचे कथानक जरी सोळाव्या शतकातले असले, तरी तिचे आवाहन मात्र कालातीत आहे. त्या काळातील वास्तव जिवंत करत असतानाच मेवाडच्या राजघराण्यातील अंतर्गत कलह आणि मानसिकता यांचे नगरकरांनी केलेले चित्रण हा कादंबरीचा गाभा आहे. स्त्री-पुरुषांचे शारीरिक अथवा नैतिक संबंध, राजकीय महत्त्वाकांक्षा, हेवेदावे, युद्ध आणि जयपराजय, भक्ती व धर्म, तसेच विविध कला या सर्वांचा आपल्या जीवनाशी संबंध जोडणारी ही कादंबरी गतिमान आहे. माणसाच्या अस्तित्वाची खूण पटवणाऱ्या, परवड करणाऱ्या आणि माणसाला फरपटत नेणाऱ्या युद्ध आणि प्रेम या क्रूर खेळाचे मिथक म्हणजे किरण नगरकर यांची 'प्रतिस्पर्धी' ही कादंबरी. स्वत: लेखकानेच मुलाखतीत सांगितल्यानुसार 'प्राधान्याने इंग्रजी भाषेचाच विचारासाठी व व्यवहारासाठी उपयोग करणाऱ्या, आंग्लाळलेल्या प्रार्थनासमाजिस्ट घरात जन्माला आलेल्या या लेखकाची साहित्यनिर्मिती आशयदृष्ट्या व रूपदृष्ट्या मराठीत तरी अपवादात्मक म्हणता येईल.' इंग्लिशमध्ये लिहिणारे जे भारतीय लेखक आहेत त्यांत किरण नगरकर यांना फार वरचे स्थान दिले जाते.

– प्रा. डॉ. विलास खोले

**संदर्भ :**

*१. नगरकर किरण कमलाकर; 'सात सक्कं त्रेचाळीस', दुसरी आवृत्ती; प्रतिमा प्रकाशन, पुणे; २००४.*

## नरवणे, विश्वनाथ दिनकर

☞ **मुख्य नोंद – पत्रकारिता आणि ललितेतर साहित्य खंड**

## नवरे, शंकर नारायण

**कथाकार, कादंबरीकार, नाटककार**

**२१ नोव्हेंबर १९२७**



आपल्या लेखनातून मानवी मनाचा आणि दैनंदिन जीवनाचा वेध घेणाऱ्या शंकर नारायण नवरे यांनी बी.एस्सी. पर्यंत शिक्षण घेतले. ते शासकीय अधिकारी होते. महाराष्ट्र शासनाच्या भाषा उपसंचालक या पदावरून त्यांनी स्वेच्छानिवृत्ती घेतली. कथा, कादंबरी, ललित लेखन, नाटक या सर्व प्रकारचे लेखन करणाऱ्या शंकर नवरे यांनी दूरदर्शन, आकाशवाणी, चित्रपट आणि वृत्तपत्रे यांसाठी लेखन केले. जीवनातील नाट्यमय, मानवी संबंधांतील हृदयाचा ठाव घेणारे रंजनपर लेखन, ही नवऱ्यांच्या लेखनाची वैशिष्ट्ये होत.

त्यांचे 'तिळा उघड', 'बेला', 'शहाणी सकाळ', 'बिलोरी', 'मार्जिनाच्या फुल्या', 'कस्तुरी', 'पाऊस' आदी कथासंग्रह प्रसिद्ध आहेत. 'सर्वोत्कृष्ट शंन्ना' हा कथासंग्रह त्यांच्या निवडक कथांचा परामर्श घेतो.

त्यांनी 'सुरुंग', 'दिवसेंदिवस', 'आनंदाचं झाड' आदी कादंबऱ्यांचे लेखन केले. तसेच त्यांचे वृत्तपत्रांतून ललित लेखन प्रसिद्ध झाले, ते 'कवडसे' (महाराष्ट्र टाइम्स), 'ऊनसावल्या' (सकाळ), 'ओलीसुकी' (लोकसत्ता) या संग्रहांतून वाचकांसमोर आले.

'चार एकांकिका', 'आणखी चार एकांकिका', 'खेळीमेळी' या एकांकिकांचे लेखन त्यांनी केले. आकाशवाणीसाठी 'ययाती', 'उपहार', 'विप्रदास', 'महानंदा' इत्यादी श्रुतिकांचे लेखन त्यांनी केले. तसेच 'प्रपंच' मालिकेतल्या सुरुवातीच्या काही भागांचे लेखनही केले. दूरदर्शनसाठी त्यांनी 'शहाणी सकाळ', 'निंबोणीचं झाड', 'शब्द आकाश' या नाटिकांचे, 'नो प्रॉब्लेम', 'ग्रॅन्ड रिडक्शन सेल', 'दोन घडीचा डाव', 'दिनमान', 'राजाराणी संसारगाणी', 'नूपुर' या मालिकांचे आणि 'उद्याची गोष्ट', 'काटा रुते कुणाला', 'पाठलाग', 'संकेत' आदी टेलिफिल्म्सचे लेखन त्यांनी केले.

त्यांचे अन्य संकीर्ण लेखन म्हणजे 'अघळपघळ', 'असे विख्यात संशोधक असे त्यांचे शोध', 'आगबोटीची कूळकथा' तसेच 'निकोला टेस्लाचे चरित्र' ही पुस्तकेही त्यांनी लिहिली आहेत. अनेक चित्रपटांचे कथा-पटकथा-संवाद त्यांनी लिहिले. त्यांतील काही चित्रपट म्हणजे 'घरकुल', 'पसंत आहे मुलगी', 'कळत-नकळत', 'जन्मदाता', 'निवडुंग', 'सवत माझी लाडकी', 'तू तिथं मी', 'एक उनाड दिवस', 'बिरबल माय ब्रदर' (इंग्रजी) आणि 'असंभव' (हिंदी) हे होत.

नवरे यांचे नाट्यलेखनही विपुल आहे. एकूण ३१ नाटके त्यांनी लिहिली. त्यांपैकी गाजलेली महत्त्वाची नाटके 'एक असतो राजा', 'मन पाखरू पाखरू', 'धुक्यात हरवली वाट', 'ग्रॅन्ड रिडक्शन सेल', 'सुरुंग', 'धुम्मस', 'सूर राहू दे', 'गुंतता हृदय हे', 'गहिरे रंग', 'देवदास' ही होत. 'गुंतता हृदय हे' हे जयवंत दळवी यांच्या 'महानंदा' कादंबरीवर आधारित होते. त्यांच्या 'शहाणी सकाळ' या कथासंग्रहास आणि 'कवडसे' या लेखसंग्रहाला महाराष्ट्र शासनाचा पुरस्कार मिळाला. अल्फा मराठी पुरस्कार, महाराष्ट्र टाइम्स पुरस्कार, नाट्यदर्पणाचा नाट्यगौरव पुरस्कार, सु. ल. गद्रे मातोश्री पुरस्कार, पु. भा. भावे स्मृती समितीचा साहित्य सेवा पुरस्कार, गदिमा पुरस्कार, पुलोत्सव २००९ चा जीवन गौरव पुरस्कार इत्यादी अनेक पुरस्कार त्यांना मिळाले. २००४ साली झालेल्या अखिल भारतीय नाट्यसंमेलनाचे अध्यक्षपद आणि कोकण मराठी साहित्य परिषदेच्या साहित्यसंमेलनाचे अध्यक्षपद त्यांनी भूषविले.

नवरे हे कथा, कादंबरी, नाटक आणि ललित लेखन या सर्वच क्षेत्रांतील सिद्धहस्त व्यक्तिमत्त्व आहे. जीवनाकडे डोळसपणे पाहून, खेळकर शैलीत घेतलेला जीवनाचा वेध हे त्यांच्या लेखनाचे वैशिष्ट्य आहे. दैनंदिन जीवनातले अनुभव त्यातून व्यक्त होतात. विविध नात्यांचे आणि भावभावनांचे चित्रण त्यातून घडते. निरीक्षणाला चिंतनाची जोड मिळाली असल्याने या लेखनाला परिणामकारकता प्राप्त होते. आयुष्यातल्या कितीतरी लहानसहान प्रसंगांवर, हकिकतींवर आधारित त्यांचे लेखन वाचकांच्या पसंतीस उतरले. कथांची शैली रंजक व सर्वसामान्य वाचकांना खिळवून ठेवणारी असल्याने ते वाचकप्रिय लेखक आहेत असे म्हणता येईल. त्यांच्या नाटकांतले संवाद सुटसुटीत, प्रासादिक, प्रसन्न शैलीतले आहेत. नाटकांचे विषय प्रामुख्याने कौटुंबिक आहेत. तर काही सामाजिक विषयांना स्पर्श करणारे आहेत. हलकेफुलके विनोद त्यांच्या काही नाटकांचा स्थायिभाव आहे. नाट्यलेखनाला कथालेखन, कादंबरी-ललितलेखन, नाट्यलेखन, चित्रपटकथालेखन अशा सर्वच क्षेत्रांत त्यांनी स्वतःचा ठसा उमटविला आहे.

– डॉ. ज्योत्स्ना कोल्हटकर

**संदर्भ :**

*१. जोशी अनंत, संपादक; 'महाराष्ट्र सारस्वत'; अनमोल प्रकाशन; १९८६.*

*२. देशपांडे वि. भा.; 'नाट्यकोश', निशांत प्रकाशन.*

*३. देशपांडे वि.भा.; 'मराठी नाटक-नाटककार'; दिलिपराज प्रकाशन.*

## नाईक, राजीव बापूराव

☞ **मुख्य नोंद – नाटक खंड**

## नाडकर्णी, ज्ञानेश्वर गणपत

*तुकाराम शेंगदाणे*

**कथाकार, कांदबरीकार, चरित्रकार, कला समीक्षक**

**२१ मे १९२८**



कला क्षेत्रातील मौलिक समीक्षेबद्दलचा सन्मान म्हणून फ्रेंच सरकारतर्फे ‘कला-साहित्य क्षेत्राचा शिलेदार’ ही पदवी मिळवणारे ज्ञानेश्वर नाडकर्णी साहित्याचे आणि कलांचे जाणकार समीक्षक म्हणून मराठी साहित्यात प्रसिद्ध आहेत.

ज्ञानेश्वर गणपत नाडकर्णी यांचा जन्म जोगेश्वरी, मुंबई येथे झाला. प्राथमिक शिक्षण सर नारायण चंदावरकर शाळा, माध्यमिक शिक्षण राम मनोहर व चिकित्सक समूह या शाळांतून झाले. एलफिन्स्टन आणि विल्सन महाविद्यालयात एम.ए.पर्यंतचे (इंग्रजी) शिक्षण. लेखनाची आवड शाळेपासून. १९४९ पासून ‘मौज’ साप्ताहिक आणि ‘सत्यकथा’ यांतून स्फुटलेखन, ‘तुकाराम शेंगदाणे’ या टोपण नावाने.

१९५१ ते १९५३ या काळात भारतीय हाय कमिशनरच्या परराष्ट्र खात्यात नोकरीनिमित्त इंग्लंडमध्ये वास्तव्य. काही वर्षे शिल्पी या जाहिरात संस्थेत आणि फ्री प्रेस जर्नल, फिनान्शिअल एक्सप्रेस यांमध्ये सहसंपादक म्हणून काम पाहिले.

ज्ञानेश्वर नाडकर्णींचे नाव मराठी साहित्यात प्रामुख्याने घेतले जाते, ते त्यांच्या चोखंदळ आणि मार्मिक अशा साहित्य आणि नाट्य, चित्रपट आणि चित्रकला या क्षेत्रांतल्या समीक्षेसाठी. ‘मराठी नाटक आणि रंगभूमी’ (१९६३), ‘भारतीय चित्रपट सृष्टीतले नवे प्रवाह’ (१९७४), ‘पिकासो’ (१९८६), ‘हिचकॉक’ (१९९०), ‘अश्वत्थाची सळसळ’ (१९८८), ‘प्रतिभेच्या पाऊलवाटा’ (२००३) अशा पुस्तकांतून त्यांनी भारतीय आणि पाश्चात्त्य साहित्य, रंगभूमी, चित्रपट आणि चित्रकला ह्या क्षेत्रांतल्या नामवंतांचा आणि त्यांच्या कलांचा समर्पक परिचय देऊन त्यांच्या कलेची सखोल समीक्षा करून समीक्षा क्षेत्रात आपला ठसा उमटवला आहे.

त्याचबरोबर ‘Balgandharva and the Marathi Theater’ आणि ‘Gaitonde’ ही दोन समीक्षात्मक पुस्तके इंग्लिशमध्ये लिहिली आहेत.

‘दोन बहिणी’ (१९५६), ‘कोंडी’ (१९५८), ‘चरित्र’ (१९८९), ‘नजरबंद’ (१९९१), ‘वलयांकित’ (१९९६) या त्यांच्या कादंबऱ्या आणि ‘चिद्घोष’ (१९६६), ‘प्रस्थान’ (१९८८) हे काही कथासंग्रह प्रसिद्ध आहेत.

परदेश वास्तव्यातील वेगळे आणि समृद्ध अनुभव, तिथल्या कलाक्षेत्रातली सूक्ष्म निरीक्षणे, पारशी, ख्रिस्ती अशा वेगळ्या समाजांतील उच्चभ्रू वर्गाच्या बहुरंगी जीवनाची जवळून ओळख, त्या जगातल्या अनुभवांवर आधारित कथा व कादंबरी लेखन हे वेगळे आणि वैशिष्ट्यपूर्ण आहे, वाचकांचे कुतूहल वाढवणारे आहे. ललित लेखन करण्याची क्षमता असूनही नाडकर्णींचा ओढा समीक्षेकडे अधिक असल्याचे जाणवते.

फ्रेंच सरकारच्या पदवी व्यतिरिक्त नाडकर्णींना संगीत नाटक अकादमीची शिष्यवृत्ती, मराठी नाट्यपरिषदेचे वि.स.खांडेकर पारितोषिक, ‘चिद्घोष’- (कथा) ललित पारितोषिक, ‘प्रस्थान’- (कथा) केशवराव कोठावळे पारितोषिक, ललितकला अकादमी आणि फिल्मसेन्सार बोर्डाचे सदस्यत्व; असे बरेच सन्मान आणि पुरस्कार लाभले आहेत.

ज्ञानेश्वर नाडकर्णी हा कलासमीक्षेच्या क्षेत्रातला परवलीचा शब्द ठरला आहे.

– मंदाकिनी भारद्वाज

**संदर्भ :**

*१. मराठी सारस्वत - प्रथम खंड भाग-२.*
*२. ‘प्रतिभेच्या पाऊलवाटा’ - डिसेंबर २००३.*

## नातू, गोपाळ नरहर

☞ **मनमोहन**

न

## नातू, मनू गंगाधर

**समीक्षक, निबंधकार, संपादिका**

**११ नोव्हेंबर १९१९ – २ एप्रिल १९८८**

मनूताई नातू यांचा जन्म वाशीम येथे झाला. मनूताईंच्या वडिलांची फिरतीची नोकरी असल्याने त्यांचे माध्यमिक शिक्षण वाई, परतवाडा अशा विविध ठिकाणी झाले. मराठी विषय घेऊन त्या नागपूर येथून एम. ए. झाल्या आणि १९४६ पासून १९७७ पर्यंत त्या अमरावती येथे विदर्भ महाविद्यालयात प्राध्यापिका होत्या.

बालवयात त्यांच्यावर झालेल्या उत्तम संस्कारांचा उत्कट परिचय 'अमृत' या मामा क्षीरसागर यांच्या 'अमृत महोत्सवा'निमित्त प्रकाशित ग्रंथातील 'जरि माह्येरे श्रीमंते होंति। तुम्हां ऐसी' या लेखातून होतो. त्यांच्या जडणघडणीत मामांची अविस्मरणीय भूमिका असल्याचा उल्लेख मनुताई कृतज्ञतापूर्वक करतात. 'ज्ञानेश्वरीतील आक्षेप: एक चिंतन' ह्या मनूताईंच्या लेखाचा पाठपुरावा मामांनी केला होता.

विदुषी व ख्यातनाम वक्त्या म्हणून प्रसिद्ध असलेल्या मनूताईंच्या लेखनाचा शुभारंभ १९४७ साली 'नवभारत'मधील लेखाने झाला. चिं. त्र्यं. खानोलकरांच्या प्रतिभेचे आगळेपण मनूताईंनी सहृदयतेने, संवेदनशीलतेने 'वेदनेचा वेध: खानोलकरांची कादंबरी– एक आकलन' या पुस्तकातून कुशलतेने प्रत्ययास आणून दिले आहे. लेखिकेने केलेले मार्मिक विश्लेषण अत्यंत प्रभावी आहे. आगरकरांच्या विचारांची व शैलीची छाप मनूताईंच्या 'विवेकाची गोठी' (१९७७) या निबंधसंग्रहावर असल्याचे जाणवते. गोपाळ गणेश आगरकर यांच्या समग्र लेखनाचे तीन खंड प्रा. दि. य. देशपांडे यांच्या सहकार्याने मनूताईंनी प्रसिद्ध केले (१९७४–१९७६).

मनूताईंनी लेखनातून व व्याख्यानातून आगरकरांच्या विवेकवादी विचारसरणीचा पुरस्कार आयुष्यभर केला.

– वि. ग. जोशी

**संदर्भ :**


१. *नातू म. गं.; 'वेदनेचा वेध : खानोलकरांची कादंबरी – एक आकलन'; अभिनव प्रकाशन, मुंबई; १९७८.*

२. *अकोलकर ग. वि.;'अमृत'; मामा क्षीरसागर अमृत महोत्सव समिती; १९७८.*


## नाथमाधव

*पितळे, द्वारकानाथ माधव*

**ऐतिहासिक कादंबरीकार**

**३ एप्रिल १८८२ – २१ जून १९२८**



मराठीतील ऐतिहासिक कादंबरीकार म्हणून प्रसिद्ध असलेले नाथमाधव मुंबईचे. त्यांचे शिक्षण मुंबईत झाले. पण शिक्षणापेक्षा त्यांचा ओढा खेळण्याकडे जास्त असल्यामुळे त्यांना मॅट्रिकच्या परीक्षेत यश मिळू शकले नाही. शिक्षणाचा नाद सोडून त्यांनी कुलाबा, मुंबई येथील गन करेज फॅक्टरीमध्ये नोकरी स्वीकारली. ही नोकरी नेमबाजी या त्यांच्या आवडीच्या विषयाची असल्यामुळे नोकरीच्या निमित्ताने यात प्रावीण्य मिळवले. नेमबाजीच्या आवडीमुळे पितळे यांना शिकारीचा नाद लागला. १९०५ साली एकदा शिकारीसाठी सिंहगड परिसरात ते गेले असताना, गडाच्या कड्यावरून पडून ते अपघातग्रस्त झाले व त्यांचा कमरेखालचा भाग लुळा झाला. या घटनेनंतर त्यांना बराच काळ इस्पितळात वास्तव्य करावे लागले. याच काळात त्यांना वाचनाची गोडी लागली व पुढे हळूहळू ते लेखनाकडे वळले. प्रारंभीचे त्यांचे लेखन पुण्याच्या ससून हॉस्पीटलमधील आणि एकूणच त्यांना झालेल्या अपघातासंबंधीचे होते. त्यांचे इंग्रजी चांगले असल्याने, त्याच भाषेत लिहून ते त्यांनी पुण्याच्या 'डेक्कन हेरॉल्ड' या वृत्तपत्राकडे पाठविले व ते प्रसिद्धही झाले. पुढे औषधोपचारासाठी त्यांना पनवेल येथे नेण्यात आले. तिथे प्रबोधनकार केशव सिताराम ठाकरे आणि 'केरळकोकीळ'चे संपादक कृष्णाजी नारायण आठल्ये या दोन लेखक-पत्रकारांशी त्यांचा संपर्क आला. त्यांच्या प्रेरणेतून पनवेलच्या मुक्कामात त्यांनी कथा-कादंबरीसारख्या

ललित लेखनाकडे आपली लेखणी वळवली आणि पुढच्या आयुष्यात मागे वळून न पाहता मराठीतील एक अव्वल दर्जाचे कादंबरीकार म्हणून नाव कमावले.

'केरळकोकीळ'मध्ये त्यांनी 'विविध' या सदरातून संतचरित्रमाला, 'स्वामिशिष्यसंवाद' असे लेखन केले. काही कथाही त्यांनी लिहिल्या. 'सायंकाळची करमणूक' हे त्यांचे पहिले पुस्तक १९०५ साली प्रकाशित झाले. तर 'प्रेमवेळा' ही त्यांची पहिली कादंबरी १९०८ साली प्रकाशित झाली. त्यानंतर त्यांनी एकूण ३६ कादंबऱ्या लिहिल्या. पण त्यांतील काही अपूर्ण राहिल्या. त्याशिवाय नाटके, कविता, नाट्यसमीक्षा, चरित्र लेखन, धर्मोपदेशवर लेखन असे साहित्याचे विविध आकृतिबंध त्यांनी यशस्वीपणे हाताळले; तरी एक कादंबरीकार म्हणूनच त्यांची ओळख राहिली. त्यांच्या कादंबऱ्यांत नीति-अनीतीच्या कल्पनांमधून नीतिपरतेला जास्त प्राधान्य देण्याचा प्रयत्न ते करीत. त्यांच्या सामाजिक कादंबऱ्यांपैकी 'देशमुखवाडी' (१९१६), 'डॉक्टर' भाग १ ते ३ या प्रमुख मानल्या जातात. १९१७ साली लिहिलेल्या 'विमलेची ग्रहदशा' या कादंबरीतून एका मुलीला तिच्या मनाविरुद्ध ख्रिश्चन धर्म स्वीकारावा लागल्याची तत्कालीन सामाजिक परिस्थिती त्यांनी विषद केली. तत्कालीन पद्धतीप्रमाणे त्यांच्या कादंबऱ्या काहीशा अद्‌भुततेकडे झुकणाऱ्या आणि अकल्पिताप्रमाणे असल्याने लोकप्रिय झाल्या. त्यांच्या अद्‌भुतरम्य कादंबरीत सगळ्यांत जास्त वाचकप्रिय कादंबरी म्हणजे 'वीरधवल'. ही कादंबरी तत्कालीन प्रसिद्ध इंग्लिश कादंबरीकार रेनॉल्डस यांच्या 'केनेथ' या कादंबरीवरून लिहिली असून तसा उल्लेख प्रस्तावनेत केला आहे. ही कादंबरी आकाराने खूप मोठी असून तिच्या आत्तापर्यंत अनेक आवृत्त्या प्रसिद्ध झाल्या आहेत. वीरधवल, ललितप्रभा, चंद्रसेना, दुर्जातमणी, उन्मत्तमणी ही यातील प्रमुख पात्रे आहेत. अनेक अद्‌भुतरम्य प्रसंग घडून शेवटी वीरधवल व ललितप्रभा यांचे लग्न लागते. त्यांच्या 'डॉक्टर' या कादंबरीवरून पुढे 'शिकलेली बायको' हा मराठी चित्रपट काढण्यात आला होता आणि तोही खूप लोकप्रिय ठरला. एकूणच सामाजिक कादंबऱ्यांमधून त्यांनी तत्कालीन प्रश्न, प्रथा यांचे प्रभावी दर्शन घडविल, त्यामुळे त्या लोकप्रिय ठरल्या.

स्वतःच्या नावातील नाथ आणि वडिलांचे नाव माधव यातून त्यांनी 'नाथमाधव' या टोपणनावाने बहुतेक लेखन केले. त्यांच्या काही ऐतिहासिक कादंबऱ्या वाईहून प्रसिद्ध होणाऱ्या नरहर नारायण पटवर्धन यांच्या कादंबरीला वाहिलेल्या 'मकरंद' या मासिकमालेतून प्रसिद्ध झाल्या होत्या. छत्रपती शिवाजी महाराज यांच्या जीवनावरील छत्तीस कादंबऱ्यांच्या माध्यमातून संपूर्ण शिवकाल उभा करण्याचा त्यांचा संकल्प होता; पण त्यांच्याकडून दुर्दैवाने सातच कादंबऱ्या लिहिल्या गेल्या. 'श्रीशिवाजी महाराजांचे आरमार अथवा सावळ्या तांडेल' (१९०९) ही त्यांची या मालिकेतील पहिली कादंबरी. आरमाराचे खरे रक्षणकर्ते तांडेल, त्यांच्या पराक्रमाची ही गाथा लोकप्रिय ठरली; त्याचे कारण एकदम वेगळा विषय. पुढे स्वराज्याच्या संकल्पनेवर 'स्वराज्याचा श्रीगणेशा' (१९२१), 'स्वराज्याची स्थापना' (१९२२), 'स्वराज्याचा घटना', (१९२३), 'स्वराज्याचा कारभार' (१९२३), 'स्वराज्यावरील संकट' (१९२३), 'स्वराज्याचे परिवर्तन' (१९२५), 'स्वराज्यातील दुफळी' (१९२८) या कादंबऱ्या त्यांनी लिहिल्या. या कादंबऱ्यांच्या माध्यमातून लोकांना इतिहासाकडे पाहण्याचा एक वेगळा दृष्टिकोन दिला. अपंग असूनही त्यांनी भटकंती करून ऐतिहासिक ठिकाणे पाहूनच ऐतिहासिक कादंबऱ्या लिहिल्या. स्वातंत्र्यपूर्व काळात स्वराज्याविषयी निष्ठा जागविण्याचे महत्त्वाचे कार्य त्यांनी अपंगावस्थेत अवघ्या ४६ वर्षांच्या आयुष्यात केले.

– मधू नेने

न

## नायगावकर, अशोक वसंत

**हास्यव्यंगकवी, विडंबनकार**

**२९ डिसेंबर १९४७**

अशोक वसंत नायगावकरांचा जन्म सातारा जिल्ह्यातील वाई येथे झाला. तेथे आणि मनमाड येथे



त्यांचे माध्यमिक शिक्षण झाले. वाईच्या किसनवीर महाविद्यालयातून वाणिज्य शाखेची पदवी घेतल्यानंतर त्यांना 'बँक ऑफ बडोदा'मध्ये नोकरी लागली. तेथे इमानेइतबारे एकतीस वर्षे काम करून त्यांनी स्वेच्छानिवृत्ती स्वीकारली. नोकरीत असल्यापासूनच ते कवी म्हणून मान्यता पावलेले होते.

नायगावकरांचे नंतरचे सारे आयुष्य शहरात गेले असले, तरी त्यांच्यातला 'गावाकडचा माणूस' त्या झुपकेबाज मिश्यांसह 'मी तुम्हांला सांगतो...' या वाक्यातून अजूनही तसाच वास करून आहे. मराठीत विनोदी कविता तशी कमीच आणि जी आहे ती प्राधान्याने विडंबनकाव्याकडे झुकलेली. या पार्श्वभूमीवर नायगावकरांनी स्वत:ची स्वतंत्र अशी शैली जोपासत समाजातील विसंगतींवर उपरोधिक भाष्य करणारी कविता लिहिली आणि भाष्यासह सादरीकरणाच्याही वैविध्यपूर्ण शैलीने ती लोकप्रिय केली.

न

त्यांचा 'वाटेवरच्या कविता' (१९९२) हा संग्रह प्रसिद्ध असून 'कवितांच्या गावा जावे' या समकालीन मराठी कवींच्या महेश केळूसकर संपादित संग्रहात नायगावकरांच्या पंधरा कवितांचा समावेश आहे.

सजगता आणि सामाजिकता हा कवीचा आणि खास करून व्यंगकवीचा प्राण असतो. नायगावकरांनी त्याचा वापर नेमकेपणाने करून उपहास, उपरोध यांच्या साहाय्याने समाजाच्या जाणिवा वेधण्याचा जाणीवपूर्वक प्रयत्न केला आहे. 'कवितांच्या गावा जावे', 'हृदयधारा' इत्यादी कार्यक्रमांतून आणि श्राव्यमाध्यमातून त्यांची कविता मराठी माणसापर्यंत सर्वदूर पोहोचली आहे. 'लोकसत्ता'च्या 'हास्यरंग' पुरवणीच्या संपादनात त्यांचे सहकार्य असून त्यातून त्यांनी विनोदी गद्यलेखनही विपुल केले आहे. 'प्रिय लालूस', 'अनंत अपराधी' या नावांनी त्यांनी लिहिलेली पत्रे ललित आणि विनोद यांचे मनोहारी मिश्रण आहे. रविवार 'लोकसत्ता'मधून 'काकाचा कट्टा' सदरातून नायगावकर काका वाचकांच्या प्रश्नांना मार्मिक, मिस्कील आणि तिरकस उत्तरे देतात.

नायगावकरांना त्यांच्या कवितासंग्रहासाठी महाराष्ट्र शासनाचा कविवर्य केशवसुत पुरस्कार, यशवंतराव चव्हाण मुक्त विद्यापीठाचा विशाखा पुरस्कार, महाराष्ट्र साहित्य परिषद (पुणे) ह्या संस्थेचा उत्कृष्ट काव्य पुरस्कार असे प्रतिष्ठित पुरस्कार मिळाले आहेत. या तीन प्रतिष्ठित पुरस्कारांसह त्यांना अनेक सन्मान मिळाले आहेत. भारतीय ज्ञानपीठाच्या 'भारतीय कविताऐं' या संग्रहात नायगावकरांच्या कवितांची दोन वेळा निवड झाली असून अखिल भारतीय व अन्य मराठी साहित्य संमेलनांत त्यांनी अध्यक्ष, सूत्रसंचालक व काव्यवाचक या नात्यांनी अनेक वेळा भाग घेतला आहे. झी मराठी वाहिनीच्या 'हास्यसम्राट' मालिकेत परीक्षक म्हणून त्यांनी काम केले आहे.

अशोक नायगावकरांनी आपल्या उपरोधिक शैलीचा वापर सामाजिक आशय व्यक्त करण्यासाठी जाणकारीने केला आहे.

– मधू नेने

**संदर्भ :**


*१. डॉ. महेश केळूसकर, संपादक; 'कवितांच्या गावा जावे'; डिंपल पब्लिकेशन्स, ठाणे; २००१.*

*२. बोजेवार श्रीकांत;'नवा माणूस', दिवाळी अंक २००५.*


## निंबाळकर, वामन सुदामा

**कवी**

**१३ मार्च १९४३**

विद्यार्थी चळवळ आणि सामाजिक चळवळ यांत भाग घेणारे दलित कवी, 'अस्मितादर्श' व 'लोकायतन' यांच्या संपादक वामन निंबाळकर होय. विद्रोही भावनांचे भावोत्कट दर्शन त्यांच्या कवितेतून घडते. त्यांची कविता भावनाप्रधान आहे. विचारांच्या प्रखरतेपेक्षा अनुभूतीतील वेदना ते अधिक प्रभावीपणे मांडतात.



'गावकुसाबाहेरील कविता' १९७३ व १९७९ या निंबाळकरांच्या पहिल्या काव्यसंग्रहालाच वाचकांनी, मान्यवर समीक्षकांनी मनापासून दाद दिली. याच्या दोन आवृत्त्या निघाल्या. शालेय आणि महाविद्यालयीन अभ्यासक्रमातील पुस्तकातून यातील काही कवितांचा समावेश झाला आहे. इंग्रजी, हिंदी, गुजराती, तेलगू इत्यादी भाषांमध्येही काही कवितांची भाषांतरे झाली आहेत. 'माय' या कवितेने तर अनेकांना अंतर्मुख केले, रडविले. 'गावकुसाबाहेरील कविता' हा दलित साहित्याचा एक महत्त्वाचा टप्पा आहे.

यानंतरचा त्यांचा दुसरा संग्रह आहे 'महायुद्ध'. या संग्रहातील कविता मराठीतील वाङ्मयीन व कवितेला वाहिलेल्या दर्जेदार नियतकालिकातून यापूर्वी प्रकाशित झाल्या आहेत.

'महाकवी डॉ. आंबेडकर' (१९९२) हा आंबेडकरांचा राष्ट्रवाद, निरीश्वरवाद, शिक्षणविषयक विचार, सामाजिक विचार, बौद्ध संस्कारांचा स्वीकार इत्यादीचा अतिशय थोडक्यात परिचय करून देणारा हा लेखसंग्रह आहे.

'गावकुसाबाहेरील कविता' (१९७३), 'दलित साहित्य: स्वरूप व भूमिका' (समीक्षा), 'आंबेडकरी विचारांची दिशा', 'अस्मितादर्शची नऊ वर्षे', 'दलित साहित्य– एक वाङ्मयीन चळवळ' अशी निंबाळकरांची ग्रंथसंपदा आहे. त्यांच्या 'महायुद्ध' (१९८७) या काव्यसंग्रहाला राज्य पुरस्कार मिळाला. 'सामाजिक लोकशाहीचे प्रणेते – डॉ.बाबासाहेब आंबेडकर', 'अखिल भारतीय दलित साहित्य संमेलन, अध्यक्षीय भाषणे', 'दलितांचे विद्रोही वाङ्मय', 'भीमसंदेश', 'प्रबोधन', 'लोकायत', 'अस्मितादर्श', 'समुचित' इत्यादी नियतकालिकांचे आणि विशेषांकांचे संपादन त्यांनी केले.

निंबाळकर एका अविचल काव्यनिष्ठेने आणि सखोल सामाजिक जाणिवेने काव्यलेखन करतात. त्यांची कविता एका परिपक्व व एका समृद्ध मनाचा आविष्कार आहे. या कवितेत विद्रोह आहे, बेचैनी आहे. प्रतिकूलतेतून वाट काढण्याचे सामर्थ्य आहे. गावकुसाबाहेरील दुःखाचे प्रतिनिधित्व करणाऱ्या त्यांच्या कवितेची भाषा स्वतंत्र आहे.

प्रस्थापित शब्दप्रभूंना ही कविता विचार करायला लावताना म्हणते –

'या गावकुसाबाहेरचे वाळलेले,
चिरडलेले जीवनविषय झालाच नाही,
तुमच्या कवितेचा...'

निंबाळकर यांनी मांडलेले वास्तव दाहक आहे, कठोर आहे आणि विशेष म्हणजे मराठी कवितेला हे नवे आहे.

– प्रा. मंगला गोखले

**संदर्भ :**

*१. निंबाळकर वामन; 'महायुद्ध', कवितासंग्रह; १९८७.*
*२. निंबाळकर वामन; 'गावकुसाबाहेरील कविता'; कवितासंग्रह; १९७३.*
*३. निंबाळकर वामन; 'महाकवी डॉ.आंबेडकर'; लेखसंग्रह; १९९२.*



## निकुम्ब, कृष्ण बलवंत

**कवी**

**९ ऑगस्ट १९२० – ३० जून १९९९**

कृष्ण बलवंत निकुम्ब यांचे शालेय शिक्षण सरकारी हायस्कूल, नाशिक येथे झाले आणि महाविद्यालयीन शिक्षण हंसराज प्रागजी ठाकरसी महाविद्यालय नाशिक येथे झाले. मुंबई विद्यापीठातून ते एम.ए.ची परीक्षा प्रथम वर्गात प्रथम क्रमांकाने उत्तीर्ण झाले. कर्नाटक महाविद्यालयात प्राध्यापक म्हणून आणि लिंगराज महाविद्यालय, बेळगाव येथे मराठी विभाग प्रमुख म्हणून त्यांनी काम केले. तसेच कर्नाटक विद्यापीठाच्या मराठी पदव्युत्तर केंद्रात निवृत्त मानसेवी प्रमुख प्राध्यापक म्हणून त्यांची नेमणूक झाली होती.



'ऊर्मिला' (१९४४), 'उज्ज्वला' (१९४५), 'अनुबन्ध' (१९६५), 'अभ्र' (१९७५) हे त्यांचे काव्यसंग्रह प्रसिद्ध झाले आहेत. 'पत्रं पुष्पम्' हे मराठी कवितांचे संकलन व संपादन त्यांनी केले आहे. त्याचप्रमाणे 'फणसाचं पान' या गोविंदाग्रजांच्या निवडक कवितांचे, आणि 'साहित्य पराग' हे अर्वाचीन मराठी कवितांचे संकलन व संपादन त्यांनी केले आहे. 'साहित्यसमीक्षा' हे समीक्षालेखन त्यांनी केलेले आहे. 'पारख' या समीक्षात्मक ग्रंथात त्यांनी संत नामदेव, संत तुकाराम, मोरोपंत, केशवसुत, बालकवी, गोविंदाग्रज, बी, इत्यादी कवींच्या काव्याचे मूल्यमापन केले आहे. हा ग्रंथ १९७३ साली प्रसिद्ध झाला आहे. 'पावसाचं घर' आणि 'सायसाखर' (१९५४) हे त्यांचे बालगीतसंग्रह असून 'मृगावर्त' (१९७०) या खंडकाव्याचे लेखनही त्यांनी केले आहे.

कृ.ब.निकुम्ब यांना साहित्याबरोबरच चित्रकला, आणि संगीत ह्या कलामध्ये रुची होती. केशवसुतांपासून बदललेल्या मराठी कवितेच्या परंपरेत निकुम्बांची कविता अवतरली. भावगीत रचनेचे, काव्यरचनेचे विविध प्रकार कणिका, सुनीते, गझल या साऱ्यांचा समावेश त्यांच्या रचनांमध्ये होता. अपुऱ्या आकांक्षा आणि भग्न ध्येये हे त्यांच्या कवितेचे विषय झाले. सौम्य आणि शांत प्रकृती हे त्यांच्या कवितेचे प्रमुख वैशिष्ट्य होते. जीवनात जे-जे उदात्त आणि कोमल आहे त्याचे वर्णन त्यांनी आपल्या कवितेतून केले. निसर्गाची अनेक भावमधुर रूपे त्यांच्या कवितेतून साकारली. तसेच मानवी भावभावनांचा तरल आविष्कार त्यांच्या कवितेतून झाला. उत्तरोत्तर त्यांची कविता अधिकाधिक सूक्ष्म चिंतनशील होत गेली. तसेच वैयक्तिक अनुभूतींचे कलात्मक आविष्करण त्यांच्या कवितेतून होत गेले.

'घाल घाल पिंगा वाऱ्या' हे त्यांचे गीत अजूनही आवडीने ऐकले जाते. लोकान्तापेक्षा एकान्तात रमणारा काव्यप्रेमी, स्वप्नाळू, सौंदर्यासक्त कवी म्हणून निकुम्ब ओळखले जातात. अनेक संतकवींच्या, आधुनिक कवींच्या काव्याची आस्वादक समीक्षा करून त्यांनी या काव्यांचे मोठेपण रसिकांना जाणवून दिले आहे.

'अंतःकरणातील भावना काव्यरूपात प्रकट होणे, म्हणजे उंबराला फूल येणे' अशी त्यांनी व्यक्त केलेली भावना त्यांच्या काव्यविषयक दृष्टिकोनाचा प्रत्यय आणून देते.

– डॉ. ज्योत्स्ना कोल्हटकर

**संदर्भ :**

१. *शेळके शांता; 'लेखक आणि लेखने'; मेहता पब्लिकेशन; प्रथम आवृत्ती; १९९६.*

२. *पाठक वा. भा; 'आधुनिक मराठी काव्याचे अंतःप्रवाह'; ठोकळ प्रकाशन; १९६४.*

३. *जोशी अनंत; 'मराठी सारस्वत', खंड२; अनमोल प्रकाशन; १९८६.*

न

## निरंतर, गंगाधर भाऊराव
**कादंबरीकार, ललित लेखक**
**१५ जून १९०६ – १३ मार्च १९५९**



गंगाधर भाऊराव निरंतर यांचा जन्म गरीब कुटुंबात झाला. वडिलांच्या गरिबीमुळे गंगाधर व त्यांचे मोठे बंधू या दोघांचे शिक्षण पुण्यात वार लावून झाले. अशा प्रतिकूल परिस्थितीत एम.ए.पर्यंतचे शिक्षण पूर्ण करून त्यांनी काही दिवस 'ज्ञानप्रकाश' ह्या वृत्तपत्रात नोकरी केली. त्यांनी सेवासदनमध्ये पुष्कळ वर्षे काढली, शिकवण्या केल्या व नंतर गांधी ट्रेनिंग कॉलेजमध्ये अध्यापन केले. 'विवेकानंदांचा सामर्थ्यवान संदेश', 'हिंदू धर्मावरील कलंक', 'स्वराज्य शिष्टाई', 'रशियाचे गांधी' अशी काही स्वतंत्र, काही रूपांतरित, काही भाषांतरित पुस्तके लिहून त्यांनी एक-एक परीक्षा दिली. 'त्या-त्या पुस्तकांनी नाव

मिळवायचे नव्हते, फक्त पैसे मिळवायचे होते, ते माझ्या अडचणीच्या कुवतीप्रमाणे मिळाले' असे त्यांनी नमूद केले आहे.

'अंधारातील दिवे' (१९३७) ही एक मास्तर व त्याची तरुण मुले यांची ओळख करून देणारी एक वेगळी कादंबरी वगळल्यास, निरंतरांच्या बाकीच्या 'सौ.मालती' (१९३४), 'जीवन मृत्यू' (१९३७), 'अर्धांगी' (१९४०) व 'भूकंप'(१९४७) या कादंबऱ्या प्राधान्याने वैवाहिक जीवनात उत्पन्न होणारे प्रश्न व त्यांचे स्वरूप यांच्याशी संबद्ध आहे. अरुण व उषा यांच्या सहवासोत्तर विवाहानंतर अरुणच्या मनात अन्य विवाहित स्त्री (सुमित्राबद्दल) उत्पन्न झालेला मोह म्हणजेच 'भूकंप' ही कादंबरी होय. त्यांच्या काही कादंबऱ्यांतून स्त्री-पुरुष संबंधाविषयी जी पारंपरिक नैतिक मूल्ये आहेत त्याविषयी प्रतिकूल स्वरूपाची प्रतिक्रिया व्यक्त झालेली दिसते.

'मनमोकळेपणाचे वेड, वेडापेक्षाही भयंकर आहे' असा ठसठशीत इशारा देणाऱ्या निरंतरांच्या 'साखरझोप' या संग्रहात रसिकांसमोर आपले मन मोकळे करणाऱ्या लघुनिबंधांची संख्या बरीच कमी आहे. सभोवारच्या नित्याच्या व्यवहाराकडे पाहून या लेखकाने मार्मिक विचारमंथन करताना विविध साहित्य-सर्जनही केले आहे. 'ॲक्चुअरी ग.स.मराठे' चरित्र, 'टॉलस्टॉय' (रशियाचे गांधी), 'इब्सेन' ही पुस्तके प्रसिद्ध झाली आहेत. प्राचीन काळातील तसेच १८१८ ते १८७४ या अर्वाचीन कालखंडातील मराठी वाङ्मयाचे स्थूल, रूपरेषात्मक दर्शन त्यांनी 'मराठी वाङ्मयाचा परामर्श' (१९४९) ह्या ग्रंथामध्ये घडविले आहे. निरंतरांनी 'ग्रंथांच्या सहवासात' (१९४५), 'अपुरा डाव' ही पुस्तक परीक्षणे केली. 'गांधी आणि गांधीवाद' हे बी.पट्टाभिसितारामय्या यांच्या पुस्तकाचे सारांशात्मक अनुवादरूप आहे. 'नागरिकशास्त्र' (भाग १ ते ७), 'नाट्यरूप पेशवाई', 'रामायण व महाभारत यांच्या गोष्टी' (भाग १ व २) ही मुलांसाठी पुस्तकेही त्यांनी लिहिली.

– वि. ग. जोशी

**संदर्भ :**

*१. जोशी य.गो.; 'अनौपचारिक मुलाखती'; प्रसाद रौप्य महोत्सवी प्रकाशन; १९७२.*

## नेमाडे, भालचंद्र वना

**कादंबरीकार, कवी, टीकालेखक, समीक्षक**

**२७ मे १९३५**



भालचंद्र वना नेमाडे यांचा जन्म जळगाव जिल्ह्यातील सांगवी या गावी झाला. आई गिरिजाबाई आणि वडील वना हे नेमाडेंच्या आत्म विष्कारात्मक लेखनाचे स्रोत आहेत. नेमाडेंनी सन १९५५ मध्ये भालोदच्या न्यू इंग्लिश स्कूलमध्ये एस.एस.सी. केले. पुण्याच्या फर्गसन महाविद्यालयातून १९५९ मध्ये बी.ए. केले. पुण्याच्या डेक्कन महाविद्यालयातून भाषाविज्ञान या विषयात सन १९६१ मध्ये एम.ए. केले. सन १९६४ मध्ये मुंबई विद्यापीठातून एम.ए. (इंग्रजी) केले. सन १९८१ मध्ये औरंगाबादच्या मराठवाडा विद्यापीठातून पीएच.डी केली. सन १९९३ मध्ये जळगावच्या उत्तर महाराष्ट्र विद्यापीठाने त्यांना मानद डी.लिट प्रदान करून सन्मान केला. सन १९६४ पासून १९९८ पर्यंत अहमदनगर-धुळे-औरंगाबाद-लंडन-गोवा-मुंबई असा त्यांच्या अध्यापकीय पेशाचा प्रवास आहे. इंग्रजी भाषा आणि साहित्य, वाङ्मय प्रकार, भाषाविज्ञान, शैलीविज्ञान, भाषांतर, तौलनिक साहित्य, भारतीय साहित्य, मराठी भाषा आणि साहित्य हे त्यांच्या अध्यापनाचे आणि संशोधनाचे विषय.

**साहित्यविश्वात मूल्यभावांचे सर्जन**

नेमाडे हे मातृभाषा मराठीचा देशीयवादी पुरस्कार करणारे लेखक असल्यामुळे त्यांची बहुतांश ग्रंथरचना मराठी भाषेतच झालेली आहे. 'मेलडी' (१९७०) हा त्यांचा पहिला कवितासंग्रह, 'देखणी' (१९९१) हा दुसरा कवितासंग्रह, 'कोसला' (१९६३), 'बिढार'

न

(१९७५), 'हूल' (बिढारचा दुसरा भाग २०००), 'जरीला' (१९७७), 'झूल' (१९७९) ह्या कादंबऱ्या. 'साहित्याची भाषा' (१९८७), 'टीकास्वयंवर' (१९९०), 'तुकाराम' (इंग्रजी १९८०), 'दी इंफ्ल्यूअन्स ऑफ इंग्लिश ऑन मराठी : अ सोशिओलिंग्विस्टिक अँड स्टाइलिस्टिक स्टडी' (इंग्रजी १९९०) हे समीक्षाग्रंथ.

कोसला या कादंबरीचे हिंदी, गुजराती, कन्नड, असामिया, पंजाबी, उर्दू, उडिया, इंग्लिश, बंगाली आदी भाषांमध्ये भाषांतरे प्रकाशित. नेमाडेंच्या वाङ्मयीन कारकिर्दीत साहित्य अकादमी पुरस्कार (१९९१), कुसुमाग्रज पुरस्कार (१९९१), साहित्यातील योगदानाबद्दल महाराष्ट्र फाउंडेशन संस्थेचा जीवन गौरव पुरस्कार (२००१) असे विविध मानसन्मान नेमाडेंना प्राप्त झालेले आहेत.

भालचंद्र नेमाडे हे विसाव्या शतकातील साठोत्तर कालखंडात गाजलेले आणि मराठी साहित्यविश्वात क्रांती करणारे गुणवंत आणि नामवंत असे देशीय मराठी साहित्यिक आहेत. सम्यक वास्तववाद, देशीयत, लेखकाची नैतिकता, नवनैतिकता, जीवन आणि साहित्याचा एकास एक संबंध; अशा मूल्याभावांचा प्रसार आणि प्रचार आपल्या व्रतस्थ चौकस आणि तिरकस परंतु स्वयंभू लेखनशैलीने करून, मराठी साहित्यविश्वात मूल्यभावांचे सर्जन करणारा सर्जनशील लेखक, कवी, कादंबरीकार, समीक्षक म्हणून त्यांची ओळख आहे.

नेमाडेंच्या लेखनातील टोकदारपणा, तिरकसपणा, आकर्षक शैली, परंपरेची मोडतोड करणारी ऐतिहासिक पद्धती, थोरामोठ्यांचा तुच्छतापूर्वक ससंदर्भ उल्लेख, कोणत्याही विधानामागे त्यांची असलेली विचक्षण चिकित्सक दृष्टी, ऐतिहासिक परिप्रेक्षात त्यांनी मांडलेला मूल्यविचार; अशा अनेक वैशिष्ट्यांसह नेमाडे गेल्या पन्नास वर्षांपासून साहित्यविश्वात अत्यंत लोकप्रिय असलेले वाङ्मयीन व्यक्तिमत्त्व आहे. त्यांची कोसला ही कादंबरी आजही जागतिक वाङ्मयात चर्चेत आहे.



**स्वयंभू लयीची कविता**

नेमाडेंचा मूळ पिंड हा कवीचा आहे. नेमाडेंच्या वाङ्मयीन कारकिर्दीची सुरुवात फेब्रुवारी १९५६ पासून झाल्याचे दिसते. 'निळे मनोरे' ही त्यांची पहिली कविता फर्गसन महाविद्यालयाच्या नियतकालिकात प्रथम प्रकाशित झाली. नंतर १९५८ ते १९६८ च्या दरम्यान छंद, रूप, अथर्व, रहस्यरंजन, प्रतिष्ठान, मराठवाडा, युगवाणी अशा महत्त्वाच्या वाङ्मयीन नियतकालिकांतून नेमाडेंच्या कविता प्रकाशित झाल्या. वाचा प्रकाशनातर्फे १९७० मध्ये 'मेलडी' हा पहिला कवितासंग्रह प्रकाशित झाला. लघुपत्रिका चळवळीची सैद्धान्तिक पायाभरणी करणारे चळवळे म्हणून, अशोक शहाणे आणि भालचंद्र नेमाडे हे लेखक मुख्य मानले जातात. पुन्हा वीस वर्षांच्या कालावधीनंतर १९८७ पासून १९९१ पर्यंतच्या काळातील एकूण २० कविता नेमाडेंनी गोव्याच्या वास्तव्यात लिहिल्या. कोकणातील पोर्तुगीज संपर्कातून त्या निर्माण झाल्यामुळे तिथल्याच संस्कृतीचे प्रतीक मानल्या जाणाऱ्या 'देखणी' या शीर्षकाने त्यांनी ह्याच कवितासंग्रहात समाविष्ट केल्या. कवितेच्या भाषेच्या अमली द्रव्याखाली आपले सगळे व्यक्तिमत्त्व अटीतटीने उभे करून नेमाडेंनी ह्या कविता लिहिल्या आहेत. जगण्याचे मूल्य हे सर्वोच्च मूल्य आहे असे नेमाडे मानतात. तोच मूल्यविचार आपल्या देशीय भाषिक परंपरेतून नेमाडेंनी काव्यात मांडला आहे. देशीय भाषेच्या आणि शैलीच्या प्रयोगांमुळे त्यांच्या कवितांना स्वयंभू लय सापडली. नेमाडेंची कविता संत लोकपरंपरेशी रक्ताचे नाते जोडताना दिसते.

**कोसला**

नेमाडे ओळखले जातात ते त्यांच्या १९६३ मध्ये प्रकाशित झालेल्या 'कोसला' कादंबरीमुळे. कोसला कादंबरीतून महाविद्यालयीन तरुणाचे भावविश्व समर्थपणे चितारल्यामुळे आणि शिकणाऱ्या प्रत्येकाच्या आयुष्यात कोसलातील नायक पांडुरंग सांगवीकरचे प्रतिबिंब आढळत असल्यामुळे, कोसला कादंबरी अत्यंत लोकप्रिय ठरली. काळाच्या सीमाही त्यांनी पुसून

झाड खुणेचे हरवून बसलो पहात
फांद्या धुंडत फिरलो रान. कोठे
दिसेनाच मधाचे पोळे. होती
धूळपाऊलेच, होते सावल्यांचा फेर
(पहाणेच)

झाड हरवले आणि
हत्ती झुलला तुझ्यापुढे
अंबारीवर डसले मोहळ
गुणगुण गेली हत्तीमागोमाग
हत्ती वळून वळून चालत गेला वाट
चुकला... पाऊल पाऊल सनईचा ठेका
सर्व रानात चुकले सूर
गेली अंबारी
गेली वाजतगाजत रानाआड पानाआड
डोळ्याआड

काढल्या. आजही कोसलातील पांडुरंग सांगवीकर तरुणांना आपलाच युवा नायक वाटतो. कोसला ही आपल्याच आयुष्याचे प्रतिबिंब असल्याचे प्रत्येक युवकाला वाटते.

कोसलाची एकूण शैली ही भाषिकदृष्ट्या आणि आशयदृष्ट्या साठोत्तर कालखंडापासून तर आजतागायत संमोहित करणारी ठरली आहे. कोसलाचे मराठी वाचकांना आणि लेखकांना इतके आकर्षण निर्माण झाले की, तरुण कादंबरीकारांच्या पुढील पिढीने कोसलासदृश्य कादंबरीची एक स्वतंत्र परंपराच मराठीत निर्माण केली. नेमाडेंची लेखनातील कुवत कोसलाने सिद्ध केली. मराठी अभिरुची आणि संस्कृती ह्यांसाठी कोसला ही एक मानदंड ठरली. कोसलाने केवळ मराठी मनेच भारावली नाही, तर अनेक भारतीय आणि इंग्रजी भाषांतही कोसलाच्या आवृत्त्या निघाल्या. भाषांतरे झाली. 'कोसला म्हणजे नेमाडे' अशी ख्याती आहे.

नेमाडेंनी कोसलाची निर्मिती केली ती वयाच्या चोविसाव्या-पंचविसाव्या वर्षी. कादंबरीचा रूढ पारंपरिक साचा टाळून देशीय-महानुभाव, संत, शाहिरी, चिपळुणकरी-फुले अशा जुन्या-नव्या शैलींचा आकर्षक वापर त्यांनी कोसलामध्ये केला. कादंबरीच्या रूपबंधाबाबत संभ्रम निर्माण झाल्याच्या काळात कोसला आल्यामुळे अनेक मान्यवर समीक्षकांनी- पु.ल. देशपांड्यांपासून ते नरहर कुरुंदकरांपर्यंत सर्वांनीच कोसलाची बरी-वाईट दखल घेतली.

कोसलानंतर तब्बल १२ वर्षांनी, १९७५ मध्ये नेमाडेंनी जाहीर केलेल्या कादंबरी चतुष्ट्यातील पहिली कादंबरी 'बिढार' प्रकाशित झाली. लगेच १९७७ मध्ये 'जरीला' आणि १९७९ मध्ये 'झूल' ह्या दोन कादंबऱ्या प्रकाशित झाल्या. ह्या तिन्ही कादंबऱ्या म्हणजे नेमाडेंच्या आयुष्यातील अनुभवांचा आणि आत्मविष्कारांचा प्रचंड तपशील होय. नेमाडेंनी कोसलाचे वळण टाळून पुन्हा देशीय शैलीव्यवस्थेतूनच नव्यानव्या शैलींचा शोध घेतला आणि अस्तित्ववाद, वास्तववाद, जीवनवाद, सौंदर्यवाद, अतिवास्तववाद, वसाहतवाद वगैरे आधुनिक परंतु इंग्रजी साहित्यातूनच मराठीत आलेल्या वाङ्मयीन मूल्यांना देशीय शैलींचा आणि देशीय जीवन-जाणिवांचा संदर्भ देत कादंबरीलेखन केले.

तरुणपण, बेकारी, सर्वत्र आढळणारी खराबी, कारेपण, प्रेमाकर्षण, भोवतालच्या समाजाचे सूक्ष्म निरीक्षण, समाजातील मूल्यऱ्हास, अस्तित्वाला हादरवून

टाकणाऱ्या जाणिवा, नोकरीतील आणि शिक्षणक्षेत्रातील कमालीची बकाली, समाजातील आणि नात्यातील गुंतागुंत आणि त्यातून स्वतःचा समांतर मार्ग निवडून भोवतालच्या सर्व माणसांना तपासत फिरणारा भटक्या नायक चांगदेव पाटील; नेमाडेंनी समर्थपणे उभा केला. शेवटच्या 'झूल' कादंबरीत चांगदेव पाटील सृष्टीच्या सानिध्यात आपले जीवसत्त्व शोधण्याचा प्रयत्न करतो. त्याची स्थितीही चक्रधरासारखी होते. आपले दहा-बारा वर्षांचे संन्यस्त आणि तटस्थ जीवन-निरीक्षण मांडत-मांडत चांगदेव पाटील झूलच्या शेवटी एका थांब्यावर विसावतो. याच कादंबरीत चांगदेवाचा सहप्रवासी परंतु चांगदेवापेक्षा अधिक चळवळ्या आणि सामाजिक असलेला नायक नामदेव भोळे प्रवेश करतो. नेमाडेंची हिंदू ही महाकादंबरी प्रकाशनाच्या वाटेवर आहे.

**टीकालेखन व समीक्षा**

नेमाडे जसे द्रष्टे कादंबरीकार आहेत तसेच ते द्रष्टे समीक्षकही आहेत. 'टीकास्वयंवर' या ग्रंथातील विविध समीक्षालेखांतून त्याचा प्रत्यय येतो. त्यांचा पहिला सडेतोड लेख 'निरस्तपादपे देशे: श्री.के. क्षीरसागर यांचा वादसंवाद' हा रहस्यरंजनच्या ऑक्टोबर १९६१ च्या अंकात प्रसिद्ध झाला. एका पोरसवदा लेखकाने मराठीतल्या दिग्गज असलेल्या समीक्षकालाच उखडावे, ही बाब चिंतनीय ठरली. लघुपत्रिका चळवळीचाही तो प्रारंभ होता. लघुपत्रिकावाल्यांनी अनेक वाङ्‌मयीन महात्मे पहिल्या चेंडूतच बाद करण्याचा जोरदार सपाटा सुरू केला. नेमाडेंनी दुसरा बॉम्ब टाकला, तो आपल्याच 'वाचा' या लघुपत्रिकेत- 'हल्ली लेखकाचा लेखकराव होतो तो का?' या समीक्षा लेखात. त्यांनी मराठीतील लहानमोठ्या सर्वच लेखकांच्या ननैतिक वाङ्‌मयीन व्यवहारांवर परखडपणे टीका केली. ती अनेकांना खानदेशी मिरचीसारखी झोंबली. एकूण १९६० पासून १९९० पर्यंतच्या तीस वर्षांत नेमाडेंनी जे काही स्फुट स्वरूपात टीकालेखन केले, त्याचा गंभीर परिणाम विसाव्या शतकातील साठोत्तर मराठी वाङ्‌मयीन संस्कृतीवर झाला आणि नेमाड्यांच्या मूल्यांच्या आणि शैलीच्या प्रभावातच टीकालेखनाची पुढे एक मोठी परंपरा मराठीत निर्माण झाली. इतिहासाचार्य राजवाड्यांच्या कठोर आणि आक्रमक शैलीचा जोरदार प्रभाव नेमाडेंच्या टीकाशैलीवर दिसून येतो.

कादंबरीविषयीचा मूल्यविचार, देशीय भाषाविषयक मूल्यविचार, साहित्यातील देशीयता, लेखकाची नैतिकता आणि बांधिलकी, लेखकाच्या सांस्कृतिक संवर्धनाचे आणि उत्तरदायित्वाचे विश्लेषण, वारकऱ्यांची शैली चिकित्सा, इंग्रजीचा मराठीवरील प्रभाव, दलित साहित्यविषयक विवादास्पद मते, भारतीयांचे इंग्रजी लेखन, अनुवादित कविता आणि अनुवादकांचे दुभंगलेले व्यक्तिमत्त्व अशा अनेक विषयांसह नेमाडेंनी दिलीप चित्रे, अरुण कोलटकर, ना. धों. महानोर, नारायण सुर्वे, विंदा करंदीकर, इंदिरा संत, पुं. शि. रेगे अशा अनेक मोठ्या दिग्गजांवर आणि आपल्या समकालीनांवर परखडपणे टीका-लेखन केले. मराठीत समीक्षाही नाही आणि सौंदर्यशास्त्रही नाही आणि जे समीक्षक आहेत, ते शेंबडे आहेत; अशीही टोकदार टीका नेमाडेंनी ह्याच ग्रंथात केलेली आहे. शिवाय प्रसारमाध्यमे ही निर्बुद्ध लोकांच्या हाती असून त्यांना आपल्या कर्तव्याचे भान नसल्याचेही नेमाड्यांना वाटते. मराठीतील लघुकथा हा केवळ वर्तमानपत्रांचे आणि मासिकांचे रकाने भरणारा एक क्षुद्र वाङ्‌मयप्रकार आहे, असे नेमाडेंचे मत प्रसिद्ध आहे. उपयोजित आणि सैद्धान्तिक अशा दोन्ही पातळ्यांवर मराठी साहित्याची चौकस आणि चिकित्सात्मक मीमांसा करणारा एक अत्यंत महत्त्वाचा समीक्षाग्रंथ म्हणून टीकास्वयंवरचा उल्लेख करावा लागतो.

गेल्या पन्नास वर्षांपासून व्रतस्थपणे कविता-लेखन, समीक्षा-लेखन, कादंबरी-लेखन, साहित्याची-भाषा-शैली यांविषयक लेखन करीत असतानाच; नेमाडेंना राष्ट्रीय स्तरावर शैक्षणिक आणि वाङ्‌मयीन क्षेत्रांतील दिग्गज आणि तज्ज्ञ, विद्वान आणि द्रष्टा मानले जाते. जर्नल ऑफ कन्टेम्परररी थॉट-इलिनॉय या त्रैमासिकाच्या विन्टर २००० च्या अंकात तसेच वर्ल्ड लिटरेचर टुडे या त्रैमासिकाच्या १९९८ च्या समर अंकात जॉन

ऑलिव्हर पेरी या समीक्षकाने गेल्या पन्नास वर्षांत भारतातून नवे वैचारिक काय आले आहे, याचा निर्देश करताना, देशीवाद आणि भालचंद्र नेमाडे एवढाच सुस्पष्ट निर्देश केला आहे. मराठी साहित्यविश्वात वाङ्मयीन क्रांती करणारा समकालीन लेखक म्हणून नेमाडेंचा विचार केला जातो.

– डॉ. किशोर सानप

**संदर्भ :**

१. सानप किशोर; *'भालचंद्र नेमाडे यांची कादंबरी'*, साकेत प्रकाशन; औरंगाबाद, १९९६.
२. सानप किशोर; *'भालचंद्र नेमाडे यांची कविता'*, साकेत प्रकाशन; औरंगाबाद, २००४.
३. सानप किशोर; *'भालचंद्र नेमाडे यांची समीक्षा'*, साकेत प्रकाशन; औरंगाबाद, २००५.
४. पठारे रंगनाथ; *'जागतिकीकरण आणि देशीवाद'*, लोकवाङ्मय गृह; मुंबई, २००३.

## नेरूरकर, प्रभाकर श्रीधर

**ललित लेखक**

**१४ फेब्रुवारी १९२२ – २९ जून १९९८**



प्रभाकर श्रीधर नेरूरकर यांचा जन्म नेरूर येथे झाला. त्यांचे शिक्षण सलग एका ठिकाणी झाले नाही. वडील मिलिटरीत होते. प्राथमिक शिक्षण पुण्यात व मराठी पाचवीनंतरचे शिक्षण वालावल (बेळगाव) येथे झाले. कुडाळच्या हायस्कूलमधून ते १९४० साली मॅट्रिक झाले व काही काळ त्यांनी महाविद्यालयीन शिक्षण घेतले. नंतर राष्ट्र सेवा दलात प्रवेश केला. १९४१च्या सुमारास मुंबईत आल्यावर नियतकालिकांतून लेखन केले. १९४४ पासून १९४८ पर्यंत छबिलदास हायस्कुलात नंतर नेरूर, कुडाळ, बांदा येथे शिक्षकाची नोकरी करून १९६२ साली त्यांचे मुंबईत पुन्हा आगमन झाले. अनंत कदम यांच्या 'किडे' या कादंबरीवर नेरूरकरांनी 'ब्लिट्झ' या साप्ताहिकात परीक्षण लिहिले होते. चिं.त्र्यं.खानोलकर (आरती प्रभू) यांच्या निधनानंतर त्यांच्यावर नेरूरकरांनी एका मासिकात 'चाफा बोलेना' नावाचा लेख लिहिला होता. चिं.त्र्यं.खानोलकर हा कुडाळच्या शाळेतला त्यांचा लाडका विद्यार्थी. नेरूरकरांनीच आरती प्रभूंच्या कवितेच्या चोपड्या सर्वप्रथम 'मौज'च्या स्वाधीन केल्या होत्या.

नेरूरकर लिखित 'माझ्या आजोळची वाट' हा ललित संग्रह वाचताना शिरीष पै यांनी नमूद केले आहे, 'लेखकापेक्षाही हा माणूस एक व्यक्ती म्हणून अधिक अभ्यसनीय आहे. त्यांच्यामधला तीव्र संवेदनांनी गदगदलेला तत्त्वचिंतक या छोट्याशा लेखसंग्रहात अगदी ठसठशीत नितळपणे जाणवला. त्यांच्यातला सहृदय माणूस ओळीओळींतून डोकावतो; जुन्या आठवणीत रममाण झालेले नेरूरकर त्यांच्या मनातल्या निसर्गाच्या गाढ ओढीचे साक्षात दर्शन देतात. झाडांशी संलग्न झालेल्या आठवणी त्यांनी अतीव कोमलतेने, हळुवारपणे सांगितल्या आहेत. त्यातून त्यांच्यातला सौंदर्यवादी कवी सहज प्रकट होतो. वाचकाला सहज पटते की ते खूप काही पाहिलेले, सोसलेले आणि भोगलेले गृहस्थ आहेत.'

नेरूरकरांनी निग्रो कवींचे मराठी अनुवाद केले आणि सामाजिक बांधीलकीच्या मराठी कवितांची इंग्रजी भाषांतरे केली. त्यांनी मुंबईत चेकॉव्हच्या साहित्याचा विमर्श घेण्यासाठी चेकॉव्ह क्लब काढला होता. कोकण मराठी साहित्य परिषदेने 'कोकण साहित्यभूषण' हा श्रेष्ठ पुरस्कार त्यांना सन्मानाने सावंतवाडी येथे अर्पण केला.

१९४८ पासून १९६२ पर्यंत नेरूरकर गोवामुक्ती आंदोलनात मग्न असल्याने त्यांचे लेखन थांबले होते. मॉरिशसमधल्या मराठी मंडळींबरोबर सुसंवाद प्रस्थापित करण्याचे श्रेय नेरूरकरांना आहे. त्यांनी विपुल लेखन केले.

'अनवाणी चाल' हा त्यांचा पहिला लघुनिबंध संग्रह होय. 'प्रवासिनी' (१९७३), 'रोम्बाट' (१९८८), 'बेट नावाचे माणूस' (१९८८) हे कथासंग्रह;

न

'किरिस्ताव' (१९७१), 'कॉकटेल' (१९७९), 'कोण्या एका देशात कोणे काळी' (१९८६) 'अजून इंद्रायणी वाहतच आहे' (१९९५) या कादंबऱ्या; 'मॉरिशस डायरी' (१९८५) हे प्रवास वर्णन; 'बकुळीची फुले' (१९८५), 'समुद्रस्पर्श' (१९९३) हे ललितलेखसंग्रह; 'फुले-आंबेडकर दलित साहित्य' (१९९६) ही समीक्षा; 'ऑन द पेव्हमेन्ट ऑफ लाइफ' (१९७३) हा नारायण सुर्व्यांच्या काव्याचा इंग्रजी अनुवाद त्यांनी केला.

'नेरूरकरांचा अवघा प्राण कायम साहित्यात गुंतलेला होता. त्यातल्यात्यात सामाजिक परिवर्तनाची आर्त साद घालणारे साहित्य हा त्यांचा कलिजा होता' असे रवींद्र पिंगे सांगतात. यासोबत 'ध्येयवादी मूल्य मानणारा, परोपकारी, कनवाळू, सावली देणारा साहित्यसेवक' असा त्यांचा परिचय आपुलकीने देऊन कौतुकाने उल्लेख करतात की 'प्रल्हाद चेंदवणकरांपासून हिरा बनसोडे, ऊर्मीला पवारांपर्यंत सर्वांना नेरूरकरांचा आत्मिक आधार होता.' नेरूरकरांनी दुर्गा भागवत, सदानंद रेगे आणि विजय तेंडुलकर यांच्या घेतलेल्या मुलाखती केवळ अमोल आहेत. नाटक वगळता नेरूरकरांनी हाताळला नाही असा एकही वाङ्मय प्रकार नाही.

– वि. ग. जोशी

**संदर्भ :**


१. *नेरूरकर प्र.श्री.; 'माझ्या आजोळची वाट'; अभिनव प्रकाशन, मुंबई; १९७५.*

२. *पिंगे रवींद्र; 'जिवलग सारे'; ज्ञानदा पब्लिकेशन्स प्रा. लि., पुणे; २०००.*


* * *

न

# प



## पंडित, भवानीशंकर श्रीधर

**कवी, समीक्षक**

**२८ एप्रिल १९०६ - २१ जानेवारी १९७८**



भवानीशंकर पंडित यांचा जन्म वाई येथे झाला. त्यांचे सर्व शिक्षण नागपूरला येथे झाले. नागपूर व चंद्रपूरला शिक्षक आणि नंतर हिस्लॉप कॉलेज, विदर्भ महाविद्यालय, अमरावती आणि नागपूर विद्यापीठ येथे मराठीचे प्राध्यापक व नागपूर विद्यापीठाचे पाहिले मराठी विभाग प्रमुख म्हणून त्यांनी शिक्षणक्षेत्रात भरीव कामगिरी केली. त्यांची शैक्षणिक क्षेत्रातील सर्व कारकिर्द विदर्भातच झाली.

समीक्षक म्हणून मराठी समीक्षाक्षेत्रात भवानीशंकर पंडितांचे नाव महत्त्वाचे आहे, ते एका विशिष्ट परिप्रेक्षात. आधुनिक मराठी काव्य हा त्यांच्या कुतूहलाचा आणि चिंतनाचा विषय होता. 'आधुनिक मराठी कविता' (१९५२), 'समग्र केशवसुत' (१९६१), 'केशवसुत पाच चिंतनिका' (१९६१), 'संत समागम' (१९६१), 'संचय' (१९६९) असे त्यांचे समीक्षा ग्रंथ आहेत. 'महाराष्ट्राच्या जीवनातील स्थित्यंतरे' हा समीक्षाग्रंथ विशेष महत्त्वपूर्ण आहे. तसाच 'आधुनिक कवितेचे प्रणेते' (भाग १,२) हा समीक्षाग्रंथही प्रसिद्ध आहे. 'पिचलेला पावा' (१९३३), 'उन्मेष आणि उद्रेक' (१९५०), 'सुवास आणि रस' (१९५३) हे त्यांचे काव्यसंग्रह रसिकांसाठी तर 'बीजेची कोर', 'पूर्णिमेचे चांदणे', 'सदाफुली' हे काव्यसंग्रह त्यांनी लहान मुलांसाठी लिहिले.

१९५२ साली खामगाव (विदर्भ) येथे भरलेल्या विदर्भ साहित्य संमेलनाचे अध्यक्षपद भूषवलेल्या भवानीशंकर पंडित यांचे नाव टीकाशास्त्रज्ञांत अतिशय महत्त्वाचे आहे. समीक्षेइतकेच त्यांचे काव्यप्रेम आणि कवितारचना हे महत्त्वाचे घटक आहेत.

– डॉ. सुवर्णा दिवेकर

## पगडी, सेतुमाधवराव श्रीनिवास

**इतिहासकार**

**२७ ऑगस्ट १९१० - १४ ऑक्टोबर १९९४**

☞ **मुख्य नोंद - पत्रकारिता आणि ललितेतर साहित्य खंड**

महाराष्ट्रातील इतिहासकार, उर्दू-फारसी भाषांचे जाणकार आणि उत्तम प्रशासक म्हणून नावलौकिक प्राप्त झालेले सेतुमाधवराव पगडी हे श्रीनिवास व कृष्णाबाई या दांपत्याचे चिरंजीव. त्यांचा जन्म बेदर (आता उस्मानाबाद) जिल्ह्यात निलंगा या गावी झाला. साताऱ्याजवळचे वाई हे त्यांचे मूळ गाव. त्यांचे पूर्वज एकनाथ उर्फ नाथोपंत हे वाईचे. पेशवाईत कर्नाटकात जमिनी इनाम मिळाल्याने त्यांच्या चार पिढ्या तिकडेच गेल्या. नोकरीच्या निमित्ताने सेतुमाधवरावांचे आजोबा हैद्राबाद राज्यात आले. पगडी यांचे घराणे माध्व संप्रदायी वैष्णव होते. त्यांचे वडील निलंग्याच्या मामलेदार कचेरीत पेश्कार म्हणजे अव्वल कारकून होते. त्यांनी आपल्या मुलांच्या शिक्षणासाठी शक्य तेवढे अर्थसाहाय्य केले. परंतु त्यांच्या निवृत्तीनंतर घरची परिस्थिती हलाखीचीच बनली. सेतुमाधवराव १९२५ साली पुण्यातून मॅट्रिकची परीक्षा उत्तीर्ण झाले आणि त्यानंतर बी.ए. होण्यासाठी बनारसला गेले. तेथून ते राज्यशास्त्र व इतिहास हे विषय घेऊन १९३० साली

बी.ए. झाले. व १९३२ साली अलाहाबाद विद्यापीठातून राज्यशास्त्र या विषयात त्यांनी एम.ए.ची पदवी संपादन केली. वयाच्या एकविसाव्या वर्षी त्यांनी आय.सी.एस. होण्याचा प्रयत्न केला परंतु अनेक अडचणींमुळे तो यशस्वी होऊ शकला नाही. मार्च १९३३ मध्ये हैद्राबाद सिव्हिल सर्व्हिसमधून त्यांची तहसीलदार या पदावर नेमणूक झाली. १९५० साली दिल्लीहून आलेल्या फेडरल पब्लिक सर्व्हिस कमिशनने हैद्राबादच्या ज्या निवडक अधिकाऱ्यांना इंडियन अ‍ॅडमिनिस्ट्रेटिव्ह सर्व्हिस मध्ये (आय.ए.एस.) घेतले, त्यांत सेतुमाधवरावांचीही आय.ए.एस. अधिकारी म्हणून निवड झाली आणि १७ मे १९५१ रोजी ते औरंगाबादला कलेक्टर म्हणून आले. त्यानंतर १९५२च्या जूनमध्ये ते हैद्राबाद येथील रेव्हेन्यू बोर्डाचे सेक्रेटरी झाले व अखेरीस १९५६पासून त्यांची उर्वरित नोकरी मुंबईला झाली. १९६०मध्ये महाराष्ट्र जिल्हा गॅझेटिअर्सचे कार्यकारी संपादक म्हणून त्यांची नेमणूक झाली. ३ सप्टेंबर १९६९ रोजी ते सेवानिवृत्त झाले. चरित्राच्या या त्रोटक तपशिलांवरूनदेखील असे ध्यानात येते की, सेतुमाधवराव पगडी यांची शिक्षणानिमित्त व नोकरीनिमित्त भरपूर भ्रमंती झाली. वेगवेगळ्या स्वभावाच्या, वृत्तिप्रवृत्तीच्या भाषकांशी त्यांचे संबंध आले आणि त्यामुळे त्यांच्या अनुभवात खूपच भर पडली. त्यांच्यावर तेलुगू, कन्नड, मराठी, उर्दू, फारसी व इंग्लिश या भाषांचे विशेष संस्कार झाले. पुण्यात न्यू इंग्लिश स्कूलमध्ये शिकत असताना डॉ.माधवराव पटवर्धन त्यांचे शिक्षक होते, त्यांच्याबद्दल त्यांना अतिशय आदर व प्रेम वाटत असे. त्यांच्या कविप्रकृतीचा व रसिक स्वभावाचा सेतुमाधवरावांवर चांगला परिणाम झाला. त्याचप्रमाणे त्यांचे श्वशुर प्राध्यापक पुणतांबेकर यांचाही त्यांच्यावर बराच प्रभाव पडला. महाविद्यालयात असल्यापासून वेगवेगळ्या वक्तृत्वस्पर्धांत ते सहभागी झाले होते आणि त्यांचा तो वक्तृत्वगुण अखेरपर्यंत कायम टिकून होता. अस्खलित बोलणे, अपवादात्मक स्मरणशक्ती, प्रचंड वाचन व सूक्ष्म अभ्यास यांच्या जोरावर त्यांनी उत्तम वक्ता म्हणून चांगले यश मिळविले.

प

सेतुमाधवराव पगडी यांनी विपुल व विविध प्रकारचे लेखन केले आहे. कथाकार, समीक्षक, संपादक, इतिहासकार, आणि रसिक व बहुश्रुत वाङ्मयसेवक असे त्यांच्या व्यक्तिमत्त्वाचे अनेक पैलू त्यांच्या लेखनातून प्रकट होतात. ‘उषा’ हा त्यांचा पहिला लघुकथासंग्रह १९३८मध्ये प्रसिद्ध झाला. त्यानंतर त्यांचे ‘अलकनंदा’ (१९४०), ‘अशोकाची पाने’ (१९४१), ‘गोंडवनातील कथा’ (१९६१), ‘नयन तुझे जादूगार’ (१९७१), ‘नेसोनि शालू हिरवा’ (१९८४), हे कथात्म/ललित लेखन प्रकाशित झाले. हे लेखन त्यांनी केले असले, तरी, सेतुमाधवरावांची मराठी साहित्यविश्वात प्राधान्याने असणारी प्रतिमा (उर्दू-फारसी साधनांच्या साहाय्याने त्यांनी केलेल्या इतिहासग्रंथांमुळे) एक इतिहासकार अशीच ठसली आहे. ‘सुफी संप्रदाय, तत्त्वज्ञान आणि कार्य’ (१९५३), ‘मिर्जा गालिब व त्याच्या उर्दू गजला’ (१९५८), ‘मणिकांचन’ (१९६१), ‘उर्दू काव्याचा परिचय’ (१९६१), ‘पानिपतचा संग्राम’ (न. र. फाटक यांच्या सहकार्याने १९६१), ‘मराठ्यांचे स्वातंत्र्ययुद्ध’ (१९६२), ‘मोगल आणि मराठे’ (१९६३), ‘मराठे व औरंगजेब’ (१९६३), ‘मोगल मराठा संघर्ष’ (१९६४), ‘हिंदवी स्वराज्य आणि मोगल’ (१९६६), ‘सुंदरा मनामधि भरली’ (१९६६), तसेच ‘शिवचरित्र: एक अभ्यास’ (१९७१), ‘छत्रपती नि त्यांची प्रभावळ’ (१९७६), ‘प्रीति परी’ (१९७९), ‘इक्बालच्या निवडक कविता’ (१९८२), ‘श्रीसमर्थ आणि समर्थ संप्रदाय’ (१९८५), ‘मराठ्यांचे स्वातंत्र्ययुद्ध खाफीखानाचा साधनग्रंथ’, ‘महाराष्ट्र आणि मराठे’, ‘मराठवाड्यातील आधुनिक कविता’, ‘मराठवाड्यातील गद्य वाङ्मय’, ‘त्रिलिंग देशातील दैनंदिनी’, ‘वरंगळचे काकतीय राजे’, ‘तारीखे दिलखुश’, फिरदौसीच्या कथा भाग १ व २’, ‘इतिहासाचा मागोवा’, ‘हिंदवी स्वराज्य आणि मोगल’, ‘शिवचरित्र एक अभ्यास’, ‘हैद्राबादेतील स्वातंत्र्य चळवळीचा

इतिहास' आणि 'मराठे व निजाम' हा ऐतिहासिक लेखसंग्रह असे त्यांचे अनेक ग्रंथ त्यांच्या इतिहासप्रेमाची व जिज्ञासू रसिकवृत्तीची साक्ष देणारे आहेत. मराठीखेरीज इंग्लिश भाषेतही त्यांनी ग्रंथरचना केली आहे. 'अमंग द गोंड्स ऑफ आदिलाबाद', 'ग्रामर ऑफ द कोलामी लँग्वेज', 'ट्रायबल वेलफेअर इन आदिलाबाद', 'हिस्ट्री ऑफ फ्रिडम स्ट्रगल इन हैद्राबाद (३ खंड)', 'एटीन्थ सेंच्युरी डेक्कन', 'मराठा मुगल रिलेशन्स' (१६०८ ते १७०७), 'छत्रपती शिवाजी' (१९७४) या त्यांच्या ग्रंथांना विद्वन्मान्यता लाभली आहे. १७५८ मध्ये मराठ्यांनी जेव्हा लाहोर घेतले, तेव्हा लाहोरचे दरवाजे उघडून देणारा अफगाणांचा अधिकारी तहमासखान याच्या फारसी आत्मचरित्राचा समग्र इंग्रजी अनुवाद 'तहमासनामा' या नावाने सेतुमाधवरावांनी केला आहे. पगडींना गोंड जमातीच्या जीवनात जेवढा रस होता, तेवढाच सुफींच्या गूढ परंपरेतही. जवळपास ४० फारसी इतिहासकारांचा आणि त्यांच्या साधनग्रंथांचा पगडी यांनी मराठी अभ्यासकांस परिचय करून दिला आहे. या ग्रंथांची पृष्ठसंख्या पाच हजारांच्या वर जाईल. उर्दू कवी, मुशाइरे, मैफली, लखनौचा नबाब वाजद अली शहा आणि उर्दू रंगभूमी, निजाम घराण्यातील राजपुत्र, उर्दू कादंबरीकार, लघुकथालेखक, टीकाकार, विनोदी लेखक आणि त्यांचे साहित्य, यांच्याविषयी पगडी यांनी सहा वर्षे बावडेकर यांच्या 'आलमगीर'मधून सुमारे २०० लेख लिहिले. यांपैकी काही लेखांची 'विडा रंगतो असा', 'सुंदरा मनामधे भरली' यांसारखी पुस्तके सिद्ध झाली. 'जीवनसेतू' (१९६९) हे त्यांचे आत्मचरित्र ग्रंथरूपात प्रसिद्ध होण्याआधी ते 'आलमगीर' आणि 'धनुर्धारी' यांमधून क्रमश: लेखरूपाने प्रसिद्ध झाले आणि नंतर कॉन्टिनेन्टल प्रकाशनाच्या अनंतराव कुलकर्णी यांनी ग्रंथरूपाने प्रसिद्ध केले. मराठीतील आत्मचरित्र वाङ्मयात 'जीवनसेतू'ने चांगली भर पडली आहे. त्यांच्या जन्मापासून त्यांच्या सेवानिवृत्तीपर्यंतचा साठ वर्षांचा जीवनवृत्तान्त त्यांनी अतिशय विस्ताराने या आत्मचरित्रात सांगितला आहे. त्यांचे बालपण, वेगवेगळ्या ठिकाणी झालेले शिक्षण, त्या काळात त्यांना चांगल्या-वाईट माणसांचे आलेले अनुभव, त्यांचा विवाह व वैवाहिक जीवनाचे तपशील, तसेच नोकरी व तीमधील वैविध्यपूर्ण घडामोडी हे सारे सेतुमाधवरावांनी समरसून सांगितले आहे. अनेक रसिक व रंगेल माणसांच्या त्यांनी सांगितलेल्या हकिकती रंजक व उद्बोधक स्वरूपाच्या आहेत. हैद्राबाद येथे त्यांची बरीच नोकरी झाली. या काळात हैद्राबादमधील राजकीय वातावरण, रजाकारांची चळवळ, हैद्राबाद संस्थानचे विलीनीकरण, ते होताना घडलेल्या घटनांचा बहुतेक तपशील सेतुमाधवरावांनी आत्मवृत्तात नमूद केला आहे. त्यांच्या लेखनाची शैली इतिहासकाराची आहे, त्यामुळेच काही वेळा आत्मचरित्र पाल्हाळीक स्वरूपाचे झाले आहे. अर्थात असे असले; तरी समकालीन सामाजिक, धार्मिक, शैक्षणिक, राजकीय परिस्थिती ह्यांचे ज्ञान होण्याच्या दृष्टीने या आत्मचरित्राचे महत्त्व निश्चितच आहे. आत्मसमर्थनाची वा अकारण आत्मगौरवाची बाधा होऊ न देणारे हे आत्मचरित्र सेतुमाधव या व्यक्तीच्या जडणघडणीचा प्रत्ययकारी आलेख रेखाटते. त्यांनी केलेली स्वत:च्या वाचनाची, अभ्यासाची व समकालीन व्यक्तींच्या कार्यकर्तृत्वची नोंद उल्लेखनीय आहे.

प

गणित व शास्त्र या विषयांत गती नसल्यामुळे त्यांना मॅट्रिकच्या परीक्षेत एकदा अपयश आले. परंतु पुढे बी.ए. व एम.ए. या दोन्ही परीक्षांत त्यांनी प्रथम वर्ग व प्रथम क्रमांक संपादन केला, हे लक्षात घेण्याजोगे आहे. त्यांच्या आत्मवृत्तातून प्रकटणारे त्यांचे व्यक्तिमत्त्व एका बुद्धिमान, व्यासंगी, कर्तृत्ववान, प्रांजल, समाधानी व प्रसन्न वृत्तीच्या सद्गृहस्थाचे आहे हे जाणवत राहते. आत्मचरित्राच्या अखेरीस त्यांनी असे म्हटले आहे की, कुंडलीप्रमाणे त्यांचे आयुष्य चौसष्ट वर्षांचे आहे; परंतु प्रत्यक्षात त्यांना चौऱ्याऐंशी वर्षांचे सफल जीवन लाभले.

– प्रा. डॉ. विलास खोले

**संदर्भ :**

*१. पगडी सेतुमाधवराव; 'जीवनसेतु'; कॉन्टिनेन्टल प्रकाशन, पुणे; १९६९.*

## पटवर्धन, माधव त्र्यंबक

☞ माधव जूलियन

## पटवर्धन, वसुंधरा कृष्णाजी

**कथाकार, कादंबरीकार, नाटककार, प्रवासवर्णनकार**

**१८ एप्रिल १९१७**



कथा क्षेत्रात आपला खास ठसा उमटविणाऱ्या वसुंधरा पटवर्धन या मागील पिढीतील वाचकप्रिय ज्येष्ठ लेखिका आहेत. त्या पूर्वाश्रमीच्या वसुधादेवी काशीनाथ खानविलकर असून त्यांचा जन्म मुंबईत गिरगावात झाला. आई इंदिराबाई ह्या कामसू, चटपटीत, शिस्तप्रिय आणि सेवापरायण अशा होत्या. वडील काशीनाथ (खानसाहेब) बुद्धिमान होते. ते लेकीवर जास्त माया करत असत. ते ब्राह्मणसभेचे काम करत असत. आई-वडील दोघांनाही वाचनाची आवड होती. वडिलांनी वसुधाकडून बालपणी 'वाईकर भटजी' ही कादंबरी दोनदा वाचून घेतली होती. वसुंधराताईंवर वडिलांचे जास्त संस्कार झाले. नाथीबाई दामोदर ठाकरसी शाळेत त्यांचे सुरुवातीचे शिक्षण झाले. मराठी सातवी (फायनल), इंग्रजी ४थी इतके शिक्षण त्यांनी घेतले. त्या साहित्यविशारदही झाल्या. लहानपणा-पासूनच त्यांना लेखन-वाचनाची आवड होती. लहानपणी शाळेतल्या बाई इतर मुलींना वसुधादेवीचे निबंध आवर्जून वाचून दाखवायच्या. वडिलांमुळे त्यांच्या व्यक्तिमत्त्वाला पैलू पडले. वडिलांनी त्यांना गाणे गायची प्रेरणा दिली. त्या पेटीही वाजवायला शिकल्या. घरी सुबत्ता होती. आई सुगरण होती. वडील लाड करायचे. त्यामुळे त्यांचे बालपण आनंदात गेले. पंधराव्या वर्षी लग्न झाले अन् वसुंधरा कृष्णाजी पटवर्धन अशी त्यांची नवी ओळख झाली.

वसुंधराताईंना स्वतंत्र विचार करण्याची आवड पूर्वीपासूनच होती. कीर्तन, प्रवचन, भाषणे ऐकण्याची संधी त्यांना मिळाली. श्रवणामुळे कानाबरोबरच मनही तयार झाले. अनुभवविश्व नकळत समृद्ध झाले. माणूस वाचायची सवय लागली अन् घटना-प्रसंगांतून चिंतन सुरू झाले. अंगी असलेली कल्पकता लिखाणाला साथ देऊ लागली. अंतर्मुख करणारे संवेदनशील मन लाभल्याने जे अनुभवले, त्यातील जे वेधक, ते त्यांनी टिपले अन् मग ते सारे त्यांच्या लेखणीतून सहजतेने झरू लागले. लेखन ही सहजस्फूर्त कला आहे, हे त्यांना अनुभवाने पटले. आसपासचे वातावरण, स्त्रियांचे प्रश्न, त्यांच्या जीवनातील घडामोडी हे सारे पाहता-अनुभवता त्यांना उत्तम कथा-बीजे मिळाली. त्यांच्या लेखनाच्या केंद्रस्थानी स्त्रीजीवनविषयक उत्कट अनुभूती आहे. कथाकादंबरी लिहिताना स्वभावचित्र रेखाटनाला त्यांनी विशेष प्राधान्य दिले. वसुंधराताईंचे लेखन नीटनेटके, सरल आहे. सहजता हा विशेष गुण असल्याने त्यांचे लिहिणे नेहमीच अनलंकृत पण आकर्षक राहिले.

मालतीबाई बेडेकर, इरावती कर्वे, दुर्गा भागवत यांचे लेखन त्यांना विशेष आवडायचे. कमलाबाई फडके, महादेवशास्त्री जोशी, बाळ गाडगीळ, अरविंद गोखले, सरिताताई पदकी या लेखक-लेखिकांचे त्या वेळी एक मंडळ होते. ही सगळी साहित्यिक मंडळी महिन्यातून एकदा जमत. एकमेकांनी लिहिलेले वाचत, ऐकत, त्यावर चर्चा करत. रेडिओवर कार्यक्रम होत. लेखन-प्रक्रियेबद्दल अनुभवकथन होत असे. विख्यात समीक्षक सरोजिनी वैद्य यांच्याशी वसुंधराताईंची चाळीस वर्षांची मैत्री होती.

'संसारशोभा' हा वसुंधराताईंचा पहिला कथासंग्रह १९५१ साली प्रकाशित झाला. लेखनाच्या स्वतंत्र गुणवत्तेमुळे त्यांना खूप लोकप्रियता लाभली. 'शोध' (१९५४), 'चेहरा' (१९५८), 'पिपाणी' (१९६१), 'अंतरपाट' (१९६२), 'प्रतिबिंब' (१९६३), 'उपासना' (१९६९), 'पैठणी' (१९७९) असे त्यांचे कथासंग्रह प्रसिद्ध झाले. 'प्रीतीची हाक' (१९५१), 'नेत्रा' (१९८७) या कादंबऱ्या खूप गाजल्या. १९५४ मध्ये 'हिरकणी' हे नाटक, १९५९ मध्ये 'मी भटकते आहे' (लघुनिबंध), १९८४ मध्ये 'ऋणानुबंध' हे व्यक्तिचित्र

ही पुस्तके प्रकाशित झाली. ‘हाऽऽय’ हे प्रवासवर्णन आहे. ‘जयंताच्या गोष्टी’ हे बालसाहित्य आहे. वसुंधराताईंनी जवळजवळ २५० कथा लिहिल्या. त्यांच्या कथांवर कथाकार पु.भा.भावे ह्यांचा काहीसा प्रभाव जाणवतो. त्यांच्या कथा हिंदी-गुजरातीत अनुवादित झाल्या. ‘मधूची आई’ या त्यांच्या कथेवरून ‘एकटी’ हा चित्रपट निघाला अन् तो खूप गाजला. ‘नावेतील पाणी’ या कथेवरून ‘हिरकणी’ हे नाटक लिहिले. मो.ग.रांगणेकर यांनी या नाटकाचे प्रयोगही केले. त्यांचे ‘संघर्ष’ हे पुस्तक आध्यात्मिक अनुभव आणि त्या तऱ्हेच्या विचारांवर आधारित आहे. त्या पुस्तकाला प्रा.राम शेवाळकर यांची प्रस्तावना आहे.

– ललिता गुप्ते

**संदर्भ :**


*१. ‘माहेर’, ४ जाने १९८६.*

*२. ‘माहेर’, १० सप्टेंबर १९९२.*

*३. ‘ललित’, ३१ जुलै १९९२.*


## पठाण, युसुफ महंमद

**संतसाहित्याचे गाढे अभ्यासक**

**९ मार्च १९३०**



युसुफ महंमद पठाण यांचा जन्म सोलापूर जिल्ह्यातील करमाळा या तालुक्याच्या गावी झाला. त्यांच्या वडिलांचे नाव महंमदखान पठाण आणि आईचे नाव फातेमा होय. त्यांचे वडील पुणे विद्यापीठातून इंग्लिश ऑनर्स घेऊन पदवीधर झाले होते. इंग्लिश लिटरेचर हा त्यांच्या आवडीचा विषय होता आणि त्यांना वाचनाचा विलक्षण छंद होता. त्यामुळे डॉ. पठाणांना इंग्रजी साहित्याने बाळकडू घरातच मिळाले. त्यांचे आई-वडील उभयता धार्मिक प्रवृत्तीचे असून अध्यात्माकडे त्यांचा कल होता. महंमदसाहेब यांना लोक रावसाहेब म्हणून ओळखत असत. ते महसूल, खात्यातील बडे अधिकारी होते. त्यांच्या वडिलांच्या सतत बदल्या होत असल्याने त्यांना आपले प्राथमिक व विद्यालयीन शिक्षण बदलीच्या गावांतून व तेथे उपलब्ध असणाऱ्या शैक्षणिक संस्थांमधून पूर्ण करावे लागले. शिक्षणासाठी भटकंती आणि अनेक गावांतील वास्तव्य यांनी त्यांचा पूर्वार्ध सांस्कृतिकदृष्ट्या व सामाजिकदृष्ट्या संपन्न झालेला आढळतो. त्या निमित्ताने करमाळा, धुळे, नाशिक, रावेर, सांगोला, सातारा, सोलापूर आदी ठिकाणी त्यांना वास्तव्य करावे लागले.

त्यांचे महाविद्यालयीन शिक्षण सोलापूरच्या दयानंद महाविद्यालयात झाले. पठाणांनी मराठी भाषेचा व साहित्याचा अभ्यास हेच आपले उद्दिष्ट निश्चित करून त्यामध्ये पदवी तथा पदव्युत्तर पदवी मिळविली. शिक्षकी पेशाला आवश्यक असणारी अध्यापनातील पदवीही त्यांनी मिळविली आणि दयानंद महाविद्यालयातच मराठीचे प्राध्यापक म्हणून ते रुजू झाले. प्राध्यापकी चालू असतानाच १९५८ मध्ये पुणे विद्यापीठातील संशोधक प्राध्यापक डॉ.शं.गो.तुळपुळे यांच्या मार्गदर्शनाखाली ‘मराठी बखरीतील फार्सीचे स्वरूप’ या विषयातील पीएच.डी. पदवी संपादन केली. नंतर त्यांनी ‘महाराष्ट्र के महानुभाव साहित्यकारों का हिंदी साहित्य को योगदान’ या विषयावर मराठवाडा विद्यापीठातून दुसरी पीएच.डी. पदवी संपादन केली. संशोधनक्षेत्रातील डी.लिट. या अंतिम पदवीसाठी त्यांनी १९७७ मध्ये रांची विश्वविद्यालयाला ‘महाराष्ट्रातील धर्मसंप्रदायांचा चिकित्सक अभ्यास’ हा प्रबंध सादर केला आणि विद्यापीठाने त्यांना डी.लिट. पदवी देऊन त्यांच्या प्रबंधाचा यथोचित गौरव केला.

१९६० मध्ये ते सोलापूरच्या दयानंद महाविद्यालयातून मराठवाडा विद्यापीठाच्या मराठी विभागात अधिव्याख्याता म्हणून रुजू झाले. १९७३ मध्ये ते याच विभागात प्राध्यापक व विभाग प्रमुख झाले. मार्च १९९० मध्ये म्हणजे निवृत्त होईपर्यंत ते त्याच पदावर कार्यरत होते. दरम्यानच्या काळात त्यांना ‘आदर्श शिक्षकाचा महाराष्ट्र शासनाचा पुरस्कार’ प्राप्त झाला. सेवेतील प्रदीर्घ काळ

प

म्हणजे ३० वर्षांच्या काळाकरिता ते एकाच विभागात राहिल्याने आणि २७ वर्षांकरिता विभाग प्रमुख या जबाबदारीच्या पदावर असल्याने ते विभागाचा नियोजनबद्ध विकास करू शकले आणि त्यांच्या अथक प्रयत्नांतून विभागाचा आंतरराष्ट्रीय पातळीवर नावलौकिक झाला.

मराठवाड्यातील तथा महाराष्ट्रातील संतांची भाषा व साहित्य जगभरातील संशोधकांना परिचित व्हावे म्हणून त्यांनी तत्कालीन हस्तलिखितांचा संग्रह करण्यास सुरुवात केली. लवकरच त्यांच्या प्रयत्नांना यश लाभले व त्यांच्या विभागात ६००० हस्तलिखिते ते जमा करू शकले. भारतातील कोणत्याच विद्यापीठात हस्तलिखितांचा एवढा प्रचंड संग्रह असल्याचे ऐकिवात नाही. ही हस्तलिखिते जमा करण्यासाठी त्यांनी महाराष्ट्राचा कानाकोपरा पिंजून काढला. त्यामुळे संशोधक म्हणून विशेषतः संतसाहित्याचे गाढे अभ्यासक म्हणून त्यांचे नाव सर्वतोमुखी झाले. आपले हस्तलिखित पठाणांकडे सुरक्षित राहू शकते, असा लोकविश्वास ते निर्माण करू शकले.

हस्तलिखिते जमा करणे सोपे असते, पण ते जतन करणे आणि अभ्यासकाला ते उपलब्ध करून देणे अतिशय कष्टाचे असते. कारण त्याची कालनिहाय, आशयनिहाय विषयसूची करणे, त्याच्या जीर्ण झालेल्या शरीराला नूतन झळाळी प्राप्त करून देणे, त्याची वर्गवारी करून ते अभ्यासकांना विहित नमुन्यात उपलब्ध करून देणे अत्यंत जटिल व वेळखाऊपणाचे काम असते. त्याला चिकाटी तर लागतेच शिवाय दांडगी स्मरणशक्ती लागते. महाराष्ट्राच्या अनेक वस्तुसंग्रहालयांत अशा प्रकारची हस्तलिखिते शेकडोने पडून आहेत; कारण त्यांचे वर्गीकरण राहिले आहे. तथापि या विभागाने त्याचे उत्तम जतन करून ठेवले आहे आणि विशेष अभिमानाची बाब म्हणजे त्याच्या अभ्यासासाठी देश-विदेशांतून अभ्यासक येणारे विभागाला भेटी देत असतात.

पठाणांच्या संशोधनाची दिशाच मुळात अज्ञात असे संतसाहित्य प्रकाशात आणण्याची असल्याने त्यांनी महानुभाव, वीरशैव, जैन आणि सुफी या काहीशा दुर्लक्षित संप्रदायांच्या साहित्याच्या संशोधनाचा प्रकल्प आपल्या विद्यापीठीय कारकिर्दीमध्ये राबविला आणि अद्यापही त्यावरील संशोधन चालू आहे, ही विशेष कौतुकास्पद बाब आहे. वास्तविक एक कथालेखक म्हणून त्यांनी आपल्या साहित्यिक प्रवासाला आरंभ केला. पण नियतीला हे मान्य नसल्याने ते कथा-कादंबरी या लोकप्रिय लेखनापासून दूर गेले आणि संतसाहित्यावर भाष्य करणारे आधुनिक भाष्यकार झाले.

त्यांनी संतसाहित्यावर प्रचंड लिखाण केले, संपादन केले आणि विद्यार्थ्यांवरही याचा भार टाकला. त्यांनी आज पावेतो ३४ ग्रंथांचे लेखन/संपादन केले आहे, पैकी १७ ग्रंथ संतसाहित्यावर आहेत. 'भाऊसाहेबांची बखर' (१९५९), 'मराठवाड्यातील लोककथा' (१९६२), 'नवरस नारायणकृत शल्यपर्व' (१९६४), 'गोपाळदासकृत शुक्रदेव चरित्र' (१९६५), 'कवि डिंभकृत ऋद्धिपूर माहात्म्य' (१९६७), 'परमानंदांचे अभंग' (१९६८), 'महानुभाव साहित्य संशोधन खंड-१' (१९७३) इत्यादी संशोधनपर संपादित ग्रंथ प्रकाशित झाले आहेत. 'संतसाहित्यचिंतन' (१९८३), 'शोधणी' (१९७५), 'आठव ज्ञानदेवांचा...ज्ञानदेवीचा' (१९९२), 'अजून आठवतं' (१९९८) असे लेखसंग्रह प्रकाशित आहेत. शिवाय त्यांचे हिंदी-इंग्रजीमध्ये काही ग्रंथ आहेतच. त्यांचे लेखन विपुल असून साहित्याच्या सर्व घटक अंगांना स्पर्श करणारे आहे. वर्तमानपत्रातील स्तंभलेखनात त्यांनी उच्चांक प्रस्थापित केला आहे. वानगीदाखल काही नोंदी- सत्संग (सकाळ) अर्था-अर्थी (महाराष्ट्र टाइम्स), अभंगवाणी तुकयाची, तथा नामयाची अभंगवाणी (पुढारी), वाणी संत कवयित्रींची (पुढारी), स्पंदन (तरुणभारत), स्मृतिस्थळ (लोकसत्ता). बालभारती मराठीचे ते २० वर्षे संपादक व काही काळ त्या समितीचे अध्यक्ष होते. त्यांचे ललित लेखनही विस्तृत आहे. त्यामध्ये प्रवासवर्णने, व्यक्तिरेखाटने, कथा, ललित लेख इत्यादींचा अंतर्भाव होतो. राज्यस्तरीय प्रतिष्ठित मंडळांचे ते सदस्य तथा अध्यक्ष राहिले आहेत. राज्य

प्रौढ शिक्षण मंडळ, मराठी भाषा उच्चाधिकार समिती, दार्शनिका विभाग, लोकसाहित्य समिती, महाराष्ट्र राज्य साहित्य सांस्कृतिक मंडळ, डॉ. आंबेडकर, महात्मा फुले चरित्र साधने संपादन-समिती ही यांपैकी काही मंडळे होत. सोळाव्या मराठवाडा साहित्य संमेलनाचे (१९८८) ते अध्यक्ष होते. त्रेसष्टाव्या अखिल भारतीय मराठी साहित्य संमेलनाचे ते अध्यक्ष होते (जाने १९९०). अनेक देशांना भेटी देऊन आपले संशोधन लोकाभिमुख केले आहे. १९७२ मध्ये चेकोस्लोव्हाकियास अतिथी प्राध्यापक म्हणून भेट व व्याख्याने, १९८२ मध्ये पश्चिम जर्मनीत संपन्न झालेल्या जागतिक भक्तिसाहित्य परिषदेत सहभाग, तथा कोलन आकाशवाणीवरून परिषदेचे समालोचन, ब्रिटनमध्ये व्हिजिटिंग फेलो या नात्याने लंडन विद्यापीठात संशोधन, लंडनच्या महाराष्ट्र मंडळात संतसाहित्यावर व्याख्याने, बी.बी.सी. वरून दोन मुलाखती ध्वनिक्षेपित, १९८८मध्ये नेदरलँड तर १९८८मध्ये केम्ब्रिज येथे भरलेल्या जागतिक भक्ती संमेलनात सहभाग, १९९५मध्ये झिम्बाब्वेस भेट, २००८मध्ये लंडनच्या महाराष्ट्र मंडळाच्या अमृतमहोत्सवाचे निमंत्रण व जीवन-गौरव पुरस्कार प्रदान असा त्यांचा कार्यपट आहे. महाराष्ट्र शासनाच्या महान्यूज स्थळावरील संतपरंपरा सदराचे २००८ पासून लेखन करत आहेत. आत्तापर्यंत या स्थळाला १० लाख वाचकांनी भेटी दिल्या. २००४मध्ये राष्ट्रीय भाषा पंडित आणि २००७ मध्ये पद्मश्री पुरस्कार देऊन त्यांना गौरविण्यात आले.

– डॉ. रा. श्री. मोरवंचीकर

## पठारे, रंगनाथ गबाजी

**कथाकार, कादंबरीकार**

**१ जून १९५०**

रंगनाथ गबाजी पठारे यांचा जन्म अहमदनगर जिल्ह्यातील पारनेर तालुक्याच्या जावळे या लहानशा खेडेगावी शेतकरी कुटुंबात झाला. अहमदनगरच्याच महाविद्यालयातून त्यांनी बी. एससी. पदवीपर्यंतचे शिक्षण



घेतले. पुढे पुणे विद्यापीठातून त्यांनी भौतिकशास्त्र विषयात एम. एस्सी. व एम. फिल. असे पदव्युत्तर शिक्षण पूर्ण केले. संगमनेरच्या महाविद्यालयात ते भौतिकशास्त्राचे प्राध्यापक आहेत.

पठारे यांच्या कथा-कादंबरी लेखनाला विसाव्या शतकातील शेवटच्या दोन दशकांत प्रारंभ झाला. सत्यकथेतून त्यांच्या लेखनाला सुरुवात झाली. 'दिवे गेलेले दिवस' (१९८२), 'रथ' (१९८४), 'चक्रव्यूह' (१९८९), 'हारण' ( १९९०), 'टोकदार सावलीचे वर्तमान' (१९९१), 'ताम्रपट' (१९९४), 'दुःखाचे श्वापद' (१९९५), 'नामुष्कीचे स्वगत' (१९९९), 'त्रिधा' (२००४), 'कुंठेचा लोलक' (२००६), 'भर चौकातील अरण्यरुदन' (२००८) ह्या त्यांच्या बहुपेडी आणि बहुचर्चित कादंबऱ्या. 'अनुभव विकणे आहेत' (१९८३), 'स्पष्टवक्तेपणाचे प्रयोग' (१९९२), 'ईश्वर मृतात्म्यास शांती देवो' (१९९६), 'गाभ्यातील प्रकाश' (१९९८), 'चित्रमय चतकोर' (२०००), 'तीव्र कोमल दुःखाचे प्रकरण' (२०००), 'शंखातला माणूस' (२००८) हे त्यांचे कथासंग्रह जीवनातील विविध समस्यांचा सूक्ष्म शोध घेणारे आहेत. 'सत्त्वाची भाषा' (१९९७), 'आस्थेचे प्रश्न' (२०००), 'छत्तीसगड', 'नियोगींचे आंदोलन आणि सद्यःस्थिती (२००३), 'प्रश्नांकित विशेष' (२००८), हे त्यांचे वैचारिक आणि संशोधनात्मक समीक्षा-लेखन. 'कवीचे अखेरचे दिवस आणि निरागस इरेंदिरा' (२०००) हा अनुवाद; असे विविधांगी लेखन करणाऱ्या पठारेंनी समकालीन मराठी साहित्यात सर्जनशील असे लेखन करीत आपली स्वतंत्र अस्मिता आणि लेखनशैली सिद्ध केली.

मानवी जीवनातील सनातन समस्यांच्या मुळाशी जाऊन त्या समस्यांची मांडणी पठारे स्वतंत्र लेखन शैलीने कथा- कादंबऱ्यांच्या वैशिष्ट्यपूर्ण रूपबंधात

प

करतात. भारतातील अणीबाणी आणि राजकीय प्रश्न, महाराष्ट्रातील मराठा राजकारण, ब्राह्मण-ब्राह्मणेतर वाद, मराठीतील वाङ्‌मयीन चळवळी, विद्याक्षेत्रातील प्रश्न, वंशसातत्य आणि जैविक गुणसूत्रांचा शोध, समाजातील माणसांचे विविध पातळ्यांवरील जगणे आणि त्यांच्या अंतर्विश्वाचा शोध घेणे, पुराण मिथकांची नवीन मांडणी, ग्लोबल व्हिलेजमध्ये जगणाऱ्या मध्यमवर्गीय जीवनातील कोलाहल आणि विज्ञानतंत्रज्ञानाच्या प्रगतीमुळे मानवी जीवनात आलेली सुखे आणि त्यांतूनच उद्‌भवणारी जीवघेणी दुःखे असा समाजाच्या अंतःस्तराचा शोध घेण्याचा पठरे यांच्या एकूण लेखनाचा स्वभाव राहिला आहे. मराठीत प्रयोग करणारे अनेक लेखक आहेत. परंतु प्रयोगातील आपले स्वाभाविकपण टिकवून ठेवण्यात जसे श्याम मनोहरांना यश आले, तसेच ते पठारे यांनाही ते प्राप्त झालेले आहे. दोघेही शैलीनिष्ठ लेखक आहेत. दोघांचीही शैली ही स्वतः कमावलेली आहे. ‘नामुष्कीचे स्वगत’ ही अशीच एक शैलीनिष्ठ, प्रयोगशील आणि वाङ्‌मयीन रूपासबंधीच्या बाबतीतही परिवर्तन स्वीकारणारी एक चिंतनशील लेखनकृती आहे.

प

पठारेंच्या लेखनात एक प्रोटॅगॉनिस्ट किंवा निवेदक असतो. त्याला एक स्वतंत्र आणि एक लेखकसापेक्ष अशी वेगळी अस्तित्वे आहेत. लेखकाच्या प्रभावी मांडणीचा साक्षीदार म्हणून पठारे यांच्यातील ‘प्रोटॅगॉनिस्ट’ लेखनकृतीत कार्य करताना दिसतो. पूर्ण लेखनस्वातंत्र्य उपभोगता यावे म्हणूनच पठारे प्रोटॅगॉनिस्टची निर्मिती करतात. त्यांच्या लेखनातील तिरकसता आणि चौकसता ह्या निवेदकाच्या माध्यमातून साहित्यकृतीत अवतरली आहे. जीवनाचा आणि साहित्याचा एकास एक संबंध मानणारा हा लेखक आहे. १९९९ मध्ये त्यांच्या ताम्रपट कादंबरीला साहित्य अकादमीचा सर्वोच्च पुरस्कार मिळाला. त्यांच्या अन्य ग्रंथांनाही आजवर राज्य शासनाच्या उत्कृष्ट वाङ्‌मय निर्मिती पुरस्कारासह प्रियदर्शनी अकादमी पुरस्कार, महाराष्ट्र साहित्य परिषद, पुणे पुरस्कार, बी. रघुनाथ वाङ्‌मय पुरस्कार, पद्मश्री विखे पाटील पुरस्कार, भैरू रतन दमाणी पुरस्कार, नगर वाचन मंदिर, पुणे यांचा पुरस्कार, वि. स. खांडेकर पुरस्कार, श्री. दा. पानवलकर पुरस्कार, महाराष्ट्र फाउंडेशन पुरस्कार मिळालेले आहेत.

‘तिरकसपणातील सरळता’ (१९९५) या ग्रंथातून डॉ. राजन गवस या लेखकाने पठारे यांच्या लेखनाचा साक्षेपी परामर्श घेतला आहे. त्यांच्या गाजलेल्या ‘नामुष्कीचे स्वगत’ (२००८) या कादंबरीवरील प्रातिनिधिक समीक्षाग्रंथही प्रकाशित झाला. खरे तर संवेदनशील आणि भावविवश असणाऱ्या तसेच जगाकडे सजगपणे आणि कारुण्याने पाहणाऱ्या प्रत्येक माणसाच्या वाट्याला आलेले एक अटळ असे सत्य पठारे यांनी आपल्या लेखनातून मांडले आहे. पठारे यांनी ते मांडले म्हणून ते ह्या जातीच्या माणसांचे एक सच्चे प्रतिनिधी ठरले आहेत.

एकविसाव्या शतकाचे जगाला वेध लागले असताना विसाव्या शतकातल्या माणसाचे एकूणच ह्या शतकाविषयीचे आकलन आणि त्याविषयीच्या त्याच्या प्रतिक्रिया काय? हा प्रश्न वर्तमानात महत्त्वाचाच होता. मनुष्य वर्तमान जगत असतो, भूतकाळाच्या रम्य आठवणीत तो रमतो. भूतकाळातले काळबदल टिपत-टिपत तो वर्तमानात बोलतो आणि भविष्याचे स्वप्न रंगवण्याचेही साधन भूतकाळातून उगम पावूनच वर्तमानात स्थिरावते. वर्तमान हा काही पिढ्यांचा साक्षीदार असतो. काळ बदलाच्या आणि मानवी बदलाच्या अखंड अशा सजीव प्रतिक्रियांचा एक मोठा आलेख पठारे यांनी आपल्या कथा-कादंबऱ्यांतून मांडलेला आहे. मराठी साहित्यामधला एक वैशिष्ट्यपूर्ण लेखक म्हणून त्यांचे स्थान लक्षणीय आहे.

– डॉ. किशोर सानप

**संदर्भ :**

१. *सानप किशोर; ‘मराठी कादंबरीतील नैतिकता’ बजाज; पब्लिकेशन्स, अमरावती; १९९८*

२. *सानप किशोर; ‘मराठी कादंबरी नव्या दिशा’; निर्मल प्रकाशन, नांदेड; २००५.*

## पत्की, विश्वनाथ वामन

**कादंबरीकार, कथाकार, समीक्षक**

**१२ नोव्हेंबर १९१२ – २७ एप्रिल १९२२**



विश्वनाथ वामन पत्की यांचा जन्म रत्नागिरी जिल्ह्यातील देवडे या गावी झाला. साखरपे, जंजिरा, बेळगाव, रत्नागिरी आणि कोल्हापूर या वेगवेगळ्या गावांतून शालेय पासून पदवीपर्यंतचे त्यांचे शिक्षण झाले. एम.ए.ची पदवी त्यांनी मुंबई विद्यापीठातून घेतली आहे. पत्रकारितेतील पदविका त्यांनी लंडन येथे मिळवली. नोकरीच्या सुरुवातीच्या काळातल्या शिक्षकी पेशानंतर त्यांनी महाराष्ट्र शासनाचे प्रसिद्धी अधिकारी म्हणून काम पाहिले. नंतर ते जनसंपर्क अधिकारीही झाले. जनसंपर्क, वृत्तपत्रविद्या, जाहिरातकला या विषयांचे अध्यापनही ते करीत असत.

लेखनाची मनस्वी आवड असल्याने पत्की यांनी, 'आंधळा न्याय' (१९३६), 'साक्षात्कार' (१९६४), 'लक्ष्मणरेषा' (१९६५), 'शोभेची बाहुली' (१९७९) अशा काही कादंबऱ्या आणि 'आराधना' (१९५५) 'तुझं सुख ते माझं सुख' (१९७६) इत्यादी कथासंग्रह प्रसिद्ध केले.

'पश्चिमवारे' हे प्रवासवर्णन त्यांनी लिहिले. याशिवाय लघुनिबंध हा वेगळा प्रकार त्यांनी हाताळला. त्यांचे लघुनिबंधांचे, 'खरं सांगू तुम्हांला?' आणि 'वेळी-अवेळी' हे दोन संग्रह प्रकाशित झाले.

पत्की यांच्या लेखनावर सुप्रसिद्ध लेखक ना.सी.फडके यांच्या लेखनाचा प्रभाव जाणवतो. ओघवते निवेदन, समर्पक शब्दकळा आणि ललित लेखनाच्या तंत्राची चांगली जाणकारी; अशी फडके यांची लेखन-वैशिष्ट्ये, पत्की यांच्या लेखनात जाणवतात.

'युगप्रवर्तक फडके'(१९६७) हा फडके यांच्या साहित्याचे मर्म उकलून दाखवणारा समीक्षात्मक ग्रंथ, पत्की यांनी, शि.न.केळकर यांच्या सहकाऱ्याने लिहिला.

कथा, कादंबरी, समीक्षा, चरित्रलेखन, प्रवासवर्णन आणि ललित निबंध अशा साहित्याच्या अनेक प्रांतांत विश्वनाथ वामन पत्की यांच्या लेखणीने चौफेर संचार केला. तरीही त्यांचे नाव मुख्यतः लक्षात राहते, ते त्यांनी केलेल्या काही सरस अनुवादांमुळे. भारताचे माजी उपराष्ट्रपती न्यायमूर्ती एम.सी.छगला यांचे 'रोझेस इन डिसेंबर', भारताचे माजी अर्थमंत्री चिंतामणराव देशमुख यांचे, 'द कोर्स ऑफ माय लाइफ' आणि भारताच्या माजी पंतप्रधान इंदिरा गांधी यांच्या आत्मचरित्रांचा अनुक्रमे- 'शिशिरातील गुलाब', 'माझा जीवन प्रवाह' आणि 'स्वप्नसिद्धीची दहा वर्षे' अशा नावांनी पत्की यांनी सुरस अनुवाद केले आहेत, ते वाचकांच्या विशेष पसंतीस उतरले आहेत.

'दीपगृह' (१९८३) वि.स.खांडेकर यांच्या खासगी पत्रांचे संपादन त्यांनी केले.

सरस अनुवाद आणि ना.सी.फडके यांच्या साहित्याचा घेतलेला मौलिक परामर्श या दृष्टीने वि.वा.पत्की यांचे लेखन लक्षात घेण्याजोगे आहे.

– मंदाकिनी भारद्वाज

प

## पदकी, मंगेश भगवंत

**कवी, कथाकार**

**२७ मार्च १९२३ – १८ ऑक्टोबर १९९९**



दुसऱ्या पिढीतील नवकवी, नवकथाकार म्हणून ओळखले जाणारे मंगेश भगवंत पदकी मूळचे कारवारचे. चंद्रभागा व भगवंत पदकी हे त्यांचे आईवडील. लहानपणीच आईवडील निवर्तल्यावर पदकी मोठ्या बहिणीसह मावशीकडे वाढले. या मोठ्या बहिणीने व चुलत बहिणीने पदकींना शिक्षण घेण्यास खूपच मदत केली. मॅट्रिकपर्यंतचे शिक्षण कारवारला झाल्यानंतर, मावसभावाने (केशव पदकी) नोकरी-निमित्त अहमदाबादला बिऱ्हाड

केल्यामुळे पदकींचे पुढील बी.कॉमपर्यंतचे शिक्षण अहमदाबादला झाले. पुढे मुंबईत येऊन नोकरी करत त्यांनी अर्थशास्त्र विषय घेऊन एम्.कॉम. केले व पुण्यात गोखले इन्स्टिट्यूटमध्ये नोकरी करून तेथेच डॉक्टरेट पूर्ण केली.

पदकींची पत्नीपुर्वाश्रमीची शांता गणेश कुलकर्णी (एम्.ए. संस्कृत) स्वतः कवयित्री, लेखिका. पदकी सारस्वत तर शांताबाई देशस्थ ब्राह्मण. पुण्यात बा.भ.बोरकरांकडे दोघांचा परिचय झाला. दोघेही 'सत्यकथा'मध्ये कविता लिहीत असत. परिचयातून २५ जून १९५२ रोजी त्यांचा विवाह झाला. पुढे सरिता पदकी या नावाने त्यांनी कविता व अन्य लेखन केले.

'खारीची पिल्ले' हा दीर्घकथासंग्रह (नाग विदर्भ प्रकाशन, अमरावती) १९६३, 'काराभट' ही कादंबरी (मेहता पब्लिशिंग हाऊस, पुणे) १९५७ / १९९९; 'अवतार व इतर कथा' (२००२); 'यक्षगान' (१९६३) आणि 'विभूत' (१९७०) हे कथासंग्रह; 'उद्धव' (१९६०). आणि 'राव जगदेव मार्तंड' (१९७३) ही नाटके असे मंगेश पदकींचे प्रकाशित साहित्य आहे. नऊ अप्रकाशित नाटके, अनेक अप्रकाशित कथा हस्तलिखित स्वरूपात आहेत. कविता-लेखन विपुल केलेल्या पदकींचा कविता-संग्रह मात्र प्रसिद्ध झाला नाही. त्यांच्या 'उद्धव' (नाटक) या साहित्यकृतीला राज्य पुरस्कार (१९६०) प्राप्त झाला होता. तसेच हे नाटक विजया मेहतांनी दिग्दर्शितही केले होते. 'राव जगदेव मार्तंड' हे त्यांचे नाटक अमोल पालेकरांनी दिग्दर्शित केले होते आणि डॉ.श्रीराम लागूंनी त्यात अभिनय केला होता.

बहुभाषक पदकींना गुजराती, कानडी, कोकणी यांसह इंग्रजी भाषा उत्तम अवगत होती. इंग्रजी साहित्य वाचनाचा तसेच भाषांतर करण्याचा छंद पदकींना होता. श्री.ज.जोशींच्या एका कथेचा इंग्रजी अनुवाद त्यांनी केला. त्याला 'Guest' या मासिकाचा पुरस्कार प्राप्त झाला.

उत्तम साहित्याचे वाचन करण्याची आणि कवी, लेखक, नाट्यक्षेत्रातील मंडळी ह्यांच्याशी गप्पांची मैफल जमविण्याची त्यांना विलक्षण आवड होती. निसर्ग चित्रे काढण्याचाही छंद होता. दि.बा.मोकाशी, रणजित देसाई, रंगा मराठे ही मित्रमंडळी कायम त्यांच्या घरी येत.

१९७५ साली हृदयविकाराचा झटका आल्यानंतर प्रकृती-अस्वास्थ्य आणि नैराश्य यांमुळे पदकी साहित्यविश्वापासून थोडे दूरच राहिले. साहित्य निर्मिती झाली, तरी त्याला फारशी प्रसिद्धी मिळाली नाही.

– शशिकला उपाध्ये

## पदकी, सरिता मंगेश

**कवयित्री, कथालेखिका, बालसाहित्यकार, नाटककार आणि अनुवादिका**

**१३ डिसेंबर १९२८**



सरिता पदकी या पूर्वाश्रमीच्या शांता कुलकर्णी होत. त्यांचे शिक्षण पुणे इथे झाले. त्यांनी संस्कृत विषयात एम.ए. केले आणि त्यानंतर काही काळ डेक्कन महाविद्यालय पुणे येथे संस्कृतचे अध्यापन केले. 'अर्थविज्ञानवर्धिनी भारतीय शिक्षण संस्था' येथेही काही काळ काम केले. सरिता पदकी यांनी कविता, कथा, बालवाङ्मय, नाटक व अनुवाद अशा विविध स्वरूपाचे लेखन केले. आरंभी त्यांनी कविता आणि कथा लिहिल्या. त्यांचा पहिला कवितासंग्रह 'चैत्रपुष्प' (१९६१) आणि त्यानंतर दुसरा कवितासंग्रह २००६ साली प्रसिद्ध झाला. त्यांची प्रारंभीची कविता सहजस्फूर्त, भावमधुर स्वरूपाची आणि स्वभावतःच सौम्य भाषेची आहे तर पुढची कविता साऱ्याच सुखदुःखांचा समंजसपणे स्वीकार करणारी आणि पुन्हा अस्तित्वाच्या लयीत स्वतःला झोकून देणारी आहे.

पदकी यांनी १९६०च्या काळात लक्ष वेधून घेणाऱ्या कथा लिहिल्या. 'बारारामाचं देऊळ'

(१९६६), 'घुम्मट' (१९८०) हे त्यांचे दोन कथासंग्रह प्रसिद्ध झाले. 'बारारामाचं देऊळ'मधील काही कथा ललितलेखांच्या अंगाने जाणाऱ्या आहेत. त्यांमध्ये कथानकांपेक्षा क्षणमात्र मनात उमटणारी भाववृत्ती अधिक प्रभावी ठरते. 'घुम्मट' हे दुसऱ्या संग्रहाचे शीर्षक स्त्रियांच्या अवस्थेचे निदर्शक म्हणून बोलके आहे. त्यांच्या एकूण कथा स्त्री दुःखाच्या अनेक छटा दर्शवितात आणि नकळत दुःख स्वीकारायची भूमिका घेतात. जीवनविषयक जाणिवेची प्रगल्भता व त्याचे वास्तव चित्रण त्यात दिसते.

लहान मुलांसाठी त्यांनी कविता व कथा लिहिल्या. 'गुटर्र गूंऽ गुटर्र गूंऽ' व 'नाच पोरी नाच' हे त्यांचे बालकवितांचे संग्रह व 'गंमत टपूटिल्लूची' (१९७९) हा कथासंग्रह आहे. त्यांच्या बालगीतांतील ओवी लय आणि ताल साधतात; तर बडबडगीते नाद व ताल त्याबरोबर सूर आणि लय यामुळे भावतात. सहजता, जिव्हाळा आणि कल्पकता यांमुळे त्यांचे बालसाहित्य उल्लेखनीय ठरते.

'बाधा' (१९५७), 'खून पाहावा करून' (१९६८) आणि 'सीता' (१९७७) ही त्यांची तीन नाटकेही वैशिष्ट्यपूर्ण आहेत. त्यांची अनुवादक म्हणून कामगिरी महत्त्वाची आहे. करोलिना मारिया डिजीझस याच्या 'चाइल्ड ऑफ द डार्क' या ब्राझीलमधील झोपडपट्टीत राहणाऱ्या निग्रो स्त्रीच्या आत्मनिवेदनाचा त्यांनी केलेला अनुवाद 'काळोखाची लेक' (१९८६) तसेच युजीन ओनीलच्या नाटकाचा अनुवाद 'पांथस्थ' वेस्टिंग हाउसच्या चरित्राचा अनुवाद 'संशोधक जादूगार' व 'सात रंगांची कमान माझ्या पापण्यांवर' हा जपानी भाषेतील काव्याचा अनुवाद ही त्यांची अनुवादित पुस्तके होत.

– अशोक बेंडखळे

**संदर्भ :**

१. *खांडगे मंदा व अन्य; 'स्त्री साहित्याचा मागोवा', खंड २; भारतीय विद्यापीठ अभिमत विश्वविद्यालय आणि साहित्यप्रेमी भगिनी मंडळ, पुणे ;२००२, २००३.*

**पद्मा**

***गोळे, पद्मावती विष्णू***

**कवयित्री**

**१० जुलै १९१३ – १२ फेब्रुवारी १९९८**



पूर्वाश्रमीच्या पद्मावती परशुराम पटवर्धन म्हणजेच कवयित्री पद्मा गोळे ह्यांचा जन्म तासगाव येथे झाला. लेखनाची सुरुवात शाळेत असताना नाटकापासून झाली. पुढील आयुष्यात मात्र सातत्याने काव्यलेखन केले. 'प्रीतिपथावर' (१९४७), 'नीहार' (१९५४), 'स्वप्नजा' (१९६२), 'आकाशवेडी' (१९६८), व 'श्रावणमेघ' (१९८८) हे काव्यसंग्रह 'नवी जाणीव', 'रायगडावरील एक रात्र', 'एक स्वप्न' या नाटिका; आणि 'वाळवंटातील वाट' (सामूहिक लेखन १९७०) ही कादंबरी; अशी लेखनसंपदा त्यांच्या नावावर जमा आहे.

निसर्गातील प्रतिमांचा वापर करत प्रेमातील उत्कटता, स्वप्नाळूपणा, असफल प्रेमातील आर्तता नि समजूतदारपणा त्यांच्या कवितांमधून व्यक्त होतो. घराची सुरक्षित चौकट त्यांना हवी आहे, पण घरात जखडून ठेवणारी बंधने नको आहेत; हे सांगताना त्या म्हणतात, 'हवे मला प्रिय गृहमंदिर, नको परी ती बंदिशाला' (प्रीतिपथावर). पुराणकथांमधून उभ्या केलेल्या आदर्शाविषयी त्यांना अभिमान आहे, पण त्यांतील यथार्थता तपासून पाहायची त्यांची कुवत आहे. 'परी कधी हे पुरुषा! अदया! रामस्वरूपी तुला बघावे, भूमिगता सीताच होउनी, एकाकीपणि तुज रडवावे' असे लिहिणाऱ्या पद्माताई 'नाही मी नुसती नार, पेजेसाठी लाचार, शेजेसाठी आसुसणार, नाही मी नुसती मादी मी माणूस माणूस आधी' (नीहार) असेही निःसंदिग्धपणे सांगतात.

अर्थार्जनासाठी बाहेर पडलेल्या स्त्रीची होणारी कोंडी आणि घुसमट सांगताना पुराणकथेचा वापर कल्पकतेने करतात. 'आमच्यापुढे दाही दिशा लक्ष्मणरेषा,

प

ओलांडाव्याच लागतात, रावणांना सामोरी जावेच लागते! एवढेच कमी असते. कुशीत घेत नाही भुई दुभंगून!' (आकाशवेडी). सुरुवातीला आत्ममग्न असलेली त्यांची कविता स्त्री-जीवनातील वेदना नेमकेपणाने समजून घेते. 'आताशी मी नसतेच इथे, तशी माझी ये जा असली तरी' (आकाशवेडी) असे म्हणत स्वविषयी अधिक खोलवर जाऊन विचार करताना माणसाच्या अस्तित्वाचा शोध घेण्याइतकी त्यांची कविता परिपक्व होते. 'नीहार' व 'स्वप्नजा' या काव्यसंग्रहाला महाराष्ट्र राज्य पुरस्कार मिळाला.

– मृणालिनी चितळे

**संदर्भ :**


*१. खांडगे मंदा व अन्य, संपादक; 'स्त्री साहित्याचा मागोवा'; साहित्यप्रेमी भगिनी मंडळ, पुणे.*

*२. फडके भालचंद्र; 'मराठी लेखिका : चिंता आणि चिंतन'; श्रीविद्या प्रकाशन.*

*३. काळे अक्षयकुमार; 'अर्वाचीन मराठी काव्यदर्शन'.*


## परांजपे, जयंत भानुदास

**समीक्षक, संशोधक, कादंबरीकार, कवी**

**३१ मे १९४५ – १६ जून २००२**



जयंत भानुदास परांजपे यांच्या व्यक्तिमत्त्वात व्यासंग व प्रतिभा एकत्र नांदत होत्या. त्यांचे आजोबा श्रीधरपंत परांजपे व वडील भानुदास श्रीधरपंत परांजपे यांचा समृद्ध वारसा त्यांना लाभला. श्रीधरपंतांनी केकावलीवर टीका लिहिली व संस्कृत वेद, उपनिषद यांचे अध्ययन केले. भा. श्री. परांजपे यांनी कथाकार, संपादक, समीक्षक या नात्याने कार्य केले आणि 'मराठी समीक्षेचे आदिपर्व' या समीक्षाग्रंथातून यांनी चिपळूणकरांच्या समीक्षेची आलोचना केली होती.

जयंत परांजपे यांनी १९६८ साली नागपूर विद्यापीठातून एम.ए. केले व १९७५ साली तेथून पीएच.डी. पदवी घेतली. त्यांनी इंग्रजी साहित्याचे अध्ययन व अध्यापन आयुष्यभर केले. 'सेंटर फॉर लिटररी स्टडीज ॲन्ड रिसर्च' ही संस्था त्यांनी नागपूर येथे स्थापन केली. नागपूर विद्यापीठाच्या मानव्यविद्या विभागाचे काही वर्ष ते प्रमुख होते. नागपूर विद्यापीठाची 'डॉक्टर ऑफ लिटरेचर' ही पदवी मिळविणारे ते पहिले संशोधक होते. 'अर्थ काय अंधाराला' (१९७८) ही त्यांची कादंबरी आणि 'पाऊलखुणा' (१९८२) हा कवितासंग्रह जाणकारांचे लक्ष वेधून गेला.

या नवकवितेविषयी मौलिक समीक्षा परांजपे यांनी लिहिली. त्यात 'पु. शि. रेगे' (१९६९), 'ग्रेस आणि दुर्बोधता' (१९८६) ह्या ग्रंथांचा समावेश आहे. श्री. ना. पेंडसे ह्यांच्या कादंबऱ्यांच्या परिष्करणासंबंधीचे 'श्री. ना. पेंडसे हस्तलिखित आणि परिष्करणे' (१९८३) हे पुस्तक तौलनिक साहित्याभ्यासाच्या दृष्टीने अत्यंत मोलाचे आहे. त्यांनी इंग्रजीतही समीक्षा लिहिली. 'ओल्ड लॅम्प फॉर द न्यू'(१९८२) आणि 'न्यू डायमेन्शन्स'(१९८५) हे त्यांचे इंग्रजी ग्रंथ लक्षवेधक ठरले आहेत.

– नरेंद्र बोडके

## परांजपे, शकुंतला रघुनाथ

**कथाकार, कादंबरीकार**

**१७ जानेवारी १९०६ – ३ मे २०००**



शकुंतला रघुनाथ परांजपे यांचा जन्म पुणे येथे झाला. प्रारंभीचे शिक्षण घरी व नंतर माध्यमिक शिक्षण पुण्याच्या हुजूरपागा हायस्कूलमध्ये झाले. १६ व्या वर्षी मॅट्रिक. १९२६ साली मुंबई विद्यापीठाची बी.एस्सी.ची परीक्षा प्रथम वर्गात उत्तीर्ण. पुढील अभ्यासक्रम विलायतेत पूर्ण करण्यासाठी हिंदुस्थान सरकारची शिष्यवृत्ती. १९२९ साली केंब्रिजमधील गणिताची ट्रायपॉस उत्तीर्ण.

जिनिव्हाला इंटरनॅशनल लेबर ऑर्गनायझेशनमध्ये काही वर्षे नोकरी. जिनिव्हामध्ये युरा स्लेप्ट ऑफ श्वेत-रशिअन गृहस्थाशी विवाह झाला. १९ मार्च १९३६ रोजी मुलीचा (सई परांजपे) जन्म झाला. आपल्या आजीचे सई हे नाव मुलीला ठेवले. १९३७ साली स्वित्झर्लंडच्या कायद्याप्रमाणे घटस्फोट घेऊन मुलीसह त्या हिंदुस्थानात परतल्या. त्या दोघींचेही वास्तव्य वडील रँग्लर रघुनाथ पुरुषोत्तम परांजपे यांच्याकडे होते.

शकुंतला परांजपे हिंदुस्थानात परतल्यावर त्यांनी संततिनियमनाच्या प्रचाराचे कार्य पुष्कळ वर्षे हिरिरीने केले. या कामातील त्यांचे स्फूर्तिस्थान म्हणजे महर्षी कर्वे यांचे चिरंजीव व शकुंतला बाईंचे भाऊ आणि संतती नियमनाच्या कार्याचे प्रवर्तक रघुनाथ धोंडो कर्वे हे होत. या कामासाठी शकुंतला परांजपे यांनी काही काळ पुणे महानगरपालिकेच्या दवाखान्यात नोकरी केली. १९५८ साली राज्य सरकारने त्यांची नियुक्ती विधानसभेवर केली. त्यानंतर १९६४ साली, राज्यसभेवरही सहा वर्षांसाठी त्यांची नेमणूक झाली. १९९१ साली पद्मविभूषण. संततिनियमनाच्या संदर्भात 'पाळणा लांबवायचा की, थांबवायचा?' हे पुस्तक आणि र. धों. कर्वे यांच्या 'समाजस्वास्थ्या'तून काही लेखन केले. 'काही आंबट काही गोड' या पुस्तकातील 'राष्ट्रपती नियुक्तीची सहा वर्षे' या लेखातही या कार्यासंबंधीचे अनुभव आले आहेत.

साहित्य ललित गद्य : 'भिल्लिणीची बोरे' (१९४४), 'माझी प्रेतयात्रा' (१९५७), 'काही आंबट काही गोड' (१९७९), कादंबरी : 'घराचा मालक' (१९४८) नाटक : 'चढाओढ' (१९३६) व 'सोयरीक' (१९३६) ही फ्रेंचमधील प्रहसनांची रूपांतरे, 'प्रेमाची परीक्षा' (१९४१), पांघरलेली कातडी (१९४२), किशोर कादंबरी: सवाई सहांची कोकणातील करामत (१९७२), सवाई सहांची मुंबईची मोहीम (१९७५), सवाई सहांची दर्याची राणी (१९८१), इंग्रजीतील लेखन : Three years in Australia आणि Sense and Sensibility (1970).

**ललितलेखन**

शकुंतला परांजपे यांचे ललितगद्य, कादंबरी आणि नाटक या तीनही साहित्यप्रकारांतील लेखन वेधक आहे. ललितगद्यामधील पहिला संग्रह 'भिल्लिणीची बोरे' (१९४४). हा संग्रह हरी नारायण आपटे यांना अर्पण केला असून त्या अर्पणपत्रिकेतून लेखिकेला हरिभाऊंबद्दल वाटणारा नितांत आदर व्यक्त होतो. या संग्रहातील लेखांमधून रोजच्या आयुष्यात घडणारे विविध अनुभव खेळकर शैलीत व्यक्त झाले आहेत.

त्यांचा दुसरा ललितलेखसंग्रह 'माझी प्रेतयात्रा' (१९५७). या पुस्तकाची प्रस्तावना शकुंतला परांजपे यांची कन्या सई परांजपे हिची आहे. 'लहान तोंडी मोठा घास घेताना' सई परांजपे यांनी म्हटल्याप्रमाणे शकुंतलाबाईंचा स्पष्टवक्तेपणा यातील लेखनातही उतरला आहे. लेखांची भाषा साधी, घरगुती असून मोकळ्या विनोदामुळे लेख बोधप्रद असूनही बोध देणारे वाटत नाहीत. यातील काही लेख व्यक्तिचित्रणात्मक (कोकणातली आजी, थोर की पोर?) काही लेख किस्से सांगणारे (राहिलेला बेत, मंडईची बस), काही विनोदी शैलीत टीका करणारे (उधार उसनवार, शुभमंगल) आहेत. 'अण्णांना मुलगी झाली असती तर?' हा महर्षी कर्वे यांच्यावरील लेख स्वभावचित्रणाचा वेगळाच नमुना आहे. 'माझी प्रेतयात्रा'मध्ये उत्तम कल्पनाविलास असून त्याला वास्तव समाजप्रवृत्तीची बैठक आहे.

त्यांचा तिसरा संग्रह 'काही आंबट काही गोड' (१९७९). यांतील बहुसंख्य लेख आठवणीवजा आत्मचरित्रात्मक असून या लेखांमधून हळूहळू साकारणारे खुद्द लेखिका आणि तिचे वडील रँग्लर परांजपे यांचे चित्र हृद्य आहे. समाजाकडे आणि स्वतःकडे बघण्याची मिस्कील दृष्टी, नर्म विनोद, हलकी-फुलकी, खुसखुशीत लेखनशैली या वैशिष्ट्यांमुळे सर्वच ललितलेखन लोकप्रिय ठरणारे आहेत.

'घराचा मालक'ही कादंबरी बालमानसशास्त्रावर आधारलेली असून पित्याची लाडकी असलेल्या

आईवेगळ्या लहान मुलीची कथा यात रंगविली आहे. लेखिकेच्या आयुष्याचे प्रतिबिंब यात उमटलेले दिसते.

'चढाओढ' आणि 'सोयरीक' (१९३६) ही फ्रेंचमधून मराठीत घेतलेली दोन प्रहसने असून; 'प्रेमाची परीक्षा'(१९४१) आणि 'पांघरलेली कातडी' (१९४२) ही दोन स्वतंत्र नाटके आहेत. 'प्रेमाची परीक्षा' हे चार अंकी प्रहसन पुरुषपात्रविरहित असून ते महर्षी कर्वे यांच्या ऐंशीव्या वाढदिवसानिमित्त लिहिलेले आहे. एकमेकांच्या प्रेमाची परीक्षा पाहणाऱ्या गौरी व शंकर यांची कथा यात रंगविली आहे. 'पांघरलेली कातडी' हे पाच अंकी संगीत नाटक आहे. हे नाटक लिहिण्याच्या चार वर्षे आधी एका सभेत लेखिकेने मराठी नाटकावर टीका केली असता, दाजीसाहेब तुळजापूरकर यांनी संगीत नाटक लिहून दाखवण्याचे आव्हान दिल्यावरून हे नाटक लेखिकेने लिहिले. भूमिकांची अदलाबदल करून प्रेमाची परीक्षा पाहणारी पात्रे यात रंगविली आहेत.

– डॉ. नंदा आपटे

**संदर्भ :**

१. *'रँग्लर परांजपे रघुनाथ पुरुषोत्तम : नाबाद ८९'; नॅशनल बुक ट्रस्ट ऑफ इंडिया, नवी दिल्ली, १९६५.*

प

## परांजपे, शिवराम महादेव

☞ **मुख्य नोंद – पत्रकारिता आणि ललितेतर साहित्य खंड**

## परुळेकर, गोदावरी श्यामराव

☞ **मुख्य नोंद – समाजकारण खंड**

## पवार, ऊर्मिला हरिश्चंद्र

**कथाकार, आत्मचरित्रकार**

**७ मे १९४५**

ऊर्मिला हरिश्चंद्र पवार यांचा जन्म रत्नागिरी येथे झाला. त्यांच्या शब्दांतून साकार झालेले शिल्प 'आयदान' हे आत्मपर चरित्र आधुनिक मराठी साहित्याचे एक लेणे ठरेल इतके संवेदनशील आणि कोरीव आहे. फणसवळेपासून रत्नागिरीपर्यंतच्या 'घाटी-डोंगरातून उरी पोटी ओझी वाहून पोट जाळणाऱ्या' त्या 'गावाकडच्या बायकांनी' त्यांना कडेहीखांद्यावर घेऊन त्यांचे बाळपण साजरे केले होते. 'आयदान'मध्ये त्या बायकांच्या बरोबरच तिथल्या तत्कालीन जीवनाला व राहणीला लेखिकेने सजीव व साकार केले आहे. 'दलित' शब्दाची दलित साहित्यिकांनी केलेली नवी व्याख्या सर्वमान्य झालेली आहे. 'समाजव्यवस्थेखाली चिरडलेला, भरडलेला उपेक्षित आणि त्या शोषणाच्या विरोधात उभा राहिलेला विज्ञानवादी, मानवतावादी माणूस तो दलित' हे आत्मभान महत्त्वाचे आहे.



ऊर्मिला पवार यांचे माहेरचे नाव विमल अर्जुन पवार हे होय. वडील सहावीपर्यंत शिकलेले, हरहुन्नरी व कष्टाळू होते. नोकरीच्या जोडीला घराण्यात चालत आलेली भटगिरी ते करीत. ऊर्मिलाची आई त्यांना संसाराचा गाडा ओढण्यासाठी चांगली मदत करी. ती बांबूच्या टोपल्या, करंडे, खुराडे, सुपे, रोवळ्या, दुरड्या, परड्या, हाताऱ्या, पाळणे असे काहीही विणायची. या सर्व वस्तूंचे सामान्यरूप म्हणजे 'आयदान'. भटक्या-विमुक्त जातीचा हा पोट भरण्याचा व्यवसाय आहे.

ऊर्मिला यांचे शिक्षण त्यांच्या जन्मगावी रत्नागिरी येथे झाले. १९६३मध्ये एस.एस.सी. झाल्यानंतर, विवाह होऊन त्या मुंबईला आल्या. येथील सिद्धार्थ महाविद्यालयातून १९८३ साली त्या एम.ए. झाल्या. आपल्या बालपणासंबंधीचे लेखन त्यांनी 'अबब हत्ती' या मुलांसाठीच्या दिवाळी अंकात प्रथम १९८९मध्ये व पुढेही ३-४ वर्षे प्रसिद्ध केले. त्यांच्या कथा आणि वैचारिक लेख 'स्त्री उवाच', 'लोकसत्ता', 'मिळून साऱ्या जणी' ह्यांमधून प्रसिद्ध झाले. 'आम्हीही इतिहास घडवला' (१९८९), (सहलेखिका मीनाक्षी मून) हे संशोधनात्मक लेखन असून 'उदान' (१९८९) हे बौद्ध वाङ्मयातील तत्त्वज्ञान मराठीतून सांगणारे पुस्तक आहे.

'मॉरिशस एक प्रवास' (१९९४), 'मुक्ती' व 'इलास पावण्या तू बसा बसा' हे दोन एकांकिका संग्रह आहेत. 'एका एका इयत्तेने' हे आत्मचरित्रात्मक लेखन लोकप्रिय झाले आहे. ऊर्मिला यांच्या लेखनातला व त्यांच्या आईच्या हातात अखंड फिरणाऱ्या आयदानातल्या वेदनेचा धागा एक आहे, हे जसे जाणवते; तसेच त्यांच्यातला 'चिवट व जिवट' स्वभाव आणि प्रखर आशावादही जाणवतो.

– वि. ग. जोशी

**संदर्भ :**

*१. पवार ऊर्मिला; 'आयदान'; ग्रंथाली प्रकाशन, मुंबई; २००३.*

## पवार, गोपाळ मारुती

**समीक्षक**

**१३ मे १९३२**



गोपाळ मारुती पवार मूळचे सोलापूर जिल्ह्यातील झाला. त्यांचा जन्म याच जिल्ह्यातील पानगाव येथे झाला. वडील नरखेड येथे राहत. पवारांचे माध्यमिक शिक्षण सोलापुरातच तर महाविद्यालयीन शिक्षण पुण्याच्या सर परशुरामभाऊ महाविद्यालयात झाले. तेथून १९५५ साली बी.ए.ची पदवी प्राप्त करून १९५८ साली ते पुणे विद्यापीठातून एम.ए. झाले. पुण्यात शिक्षण चालू असतानाच त्यांनी काही काळ पुणे महानगरपालिकेत नोकरी केली. पदव्युत्तर शिक्षण झाल्यावर आवडीच्या अध्यापन विषयाकडे वळले. १९५९ साली अमरावतीच्या विदर्भ महाविद्यालयात मराठी विषयाचे प्राध्यापक म्हणून रुजू झाले. त्यानंतर काही काळ औरंगाबादच्या शासकीय महाविद्यालयात अध्यापन केले. पुढे मराठवाडा विद्यापीठात आणि शिवाजी विद्यापीठात मराठीचे प्राध्यापक झाले. १९९२ साली सेवानिवृत्त झाले. दरम्यान १९७६ साली 'विनोदाचा औपपत्तिक विचार' या विषयावर विद्यावाचस्पती (पीएच. डी.) पदवी प्राप्त झाली. सध्या वास्तव्य सोलापूर येथे आहे.

समीक्षक म्हणून पवार यांची प्रसिद्धी असली, तरी प्रारंभीच्या काळात त्यांनी कथा, कविता लिहिल्या. शालेय जीवनापासूनच त्यांना साहित्यवाचनाची आणि लेखनाची आवड होती. त्यांच्या कथा-कविता 'प्रसाद', 'हंस-चेतना' इत्यादी मासिकांमध्ये प्रसिद्ध होत असत. 'रविवार सकाळ'मध्येही ते लिहीत असत. स.प.महाविद्यालयात प्रा.रा.श्री.जोग यांच्यामुळे साहित्याची व खास करून समीक्षेची गोडी लागली. 'कुसुमाग्रजांच्या रूपकात्मक कविता' या अभ्यासपूर्ण आणि व्यासंगपूर्ण लेखनाने १९६३ साली पवार यांची समीक्षक म्हणून ओळख मराठी साहित्यसृष्टीला झाली व ती आजही कायम आहे. पुढे पु.ल.देशपांडे, आनंद यादव यांच्या लेखनाची त्यांनी केलेली समीक्षा वैशिष्ट्यपूर्ण ठरली. 'विवेकनिष्ठ जीवनदृष्टी' हे पवारांचे पहिले पुस्तक १९६८ साली प्रसिद्ध झाले. त्यामध्ये जीवनविषयक जाणिवांचा वेध पवारांनी साक्षेपाने घेतला आहे. बहुतेक नामवंत समकालीन मराठी साहित्यिकांच्या साहित्याची समीक्षा त्यांनी केली आहे. व्यंकटेश माडगूळकर, गंगाधर गाडगीळ यांच्या निवडक कथांचे संपादन करून त्या संग्रहांना त्यांनी विस्तृत आणि साधार, साक्षेपी विवेचक प्रस्तावना लिहिल्या आहेत. 'मराठी साहित्य: प्रेरणा व स्वरूप' हा समीक्षा ग्रंथ त्यांनी समीक्षक प्रा.म.द.हातकणंगलेकर यांच्या सहकार्याने संपादित केला असून तो १९८६ साली पुस्तकरूपाने प्रसिद्ध झाला. १९५० ते १९७५ या पाव शतकाच्या काळात मराठी वाङ्मयाच्या विविध दालनांत (कथा, कादंबरी, नाटक, काव्य, दलित वाङ्मय, समीक्षा, आत्मचरित्र इत्यादी) निर्माण झालेल्या साहित्यामागच्या प्रेरणा कोणत्या आहेत आणि त्यांचे स्वरूप काय आहे, याचे अभ्यासपूर्ण विवेचन या ग्रंथात विविध मान्यवरांनी केले असून त्यात 'विनोदी वाङ्मय' या विषयावर पवारांनी लिहिले आहे.

महर्षी विठ्ठल रामजी शिंदे हा पवारांच्या अभ्यासाचा खास विषय होय. महर्षींचे चरित्र 'महर्षी विठ्ठल रामजी

प

शिंदे' या नावाने त्यांनी लिहिले असून त्याला २००८ साली साहित्य अकादमी पुरस्कार मिळाला आहे. 'निवडक वि.दा.शिंदे' (१९९९), 'शिंदे शेष निहूणे' (१९७९), 'म.वि.दा.शिंदे जीवन व कार्य' (२००४) ही त्यांची महर्षी शिंदे विषयक अन्य संपादित व स्वतंत्र पुस्तके आहेत. त्यांच्या अन्य पुस्तकांत 'साहित्यमूल्य आणि अभिरुची' (१९९४), 'विनोद: तत्त्व व स्वरूप' (२००४) यांचा समावेश असून विनोदावरील त्यांच्या ग्रंथाला महाराष्ट्र साहित्य परिषद, पुणे यांचा २००८चा रा.श्री.जोग पुरस्कार मिळाला आहे. विनोदाची सर्वांगीण, तात्त्विक आणि साक्षेपी समीक्षा करणारा अलीकडच्या काळातील हा एक मान्यवर ग्रंथ असून विनोदी वाङ्मयाच्या अभ्यासकांसाठी आणि विनोदी लेखनासाठी हा ग्रंथ मार्गदर्शक ठरेल, अशा आशयाचा अभिप्राय अनेकांनी नोंदविला आहे. पवारांनी महाराष्ट्र साहित्य पत्रिका आणि अन्य साहित्य समीक्षा संबंधित नियतकालिकांमधून तसेच मराठी वृत्तपत्रांमधून विपुल आणि वैविध्यपूर्ण लेखन केले आहे. पवार हे महाराष्ट्र साहित्य परिषदेचे विद्यमान उपाध्यक्ष (२००८) आहेत.

– मधू नेने

प

**संदर्भ :**

*१. पवार गो.मा.; 'विनोद तत्त्व व स्वरूप'; मौज प्रकाशन गृह; २००६.*

## पवार, प्रज्ञा दया

☞ **लोखंडे, प्रज्ञा**

## पवार, दया

***पवार, दगडू मारुती***

**कवी, कथाकार, समीक्षक**

**१५ सप्टेंबर १९३५ – २० सप्टेंबर १९९६**

दया पवार यांचा जन्म धामणगाव ता. अकोले, जि. अहमदनगर येथे झाला. एस.एस.सी.पर्यंतचे शिक्षण अकोले– संगमनेर येथे झाले. पुढे नोकरीसाठी मुंबईत प्रयाण केले. मुंबईत आल्यावर कामाठीपुरा येथे वास्तव्य



होते. तेथेच महाराष्ट्र बौद्ध साहित्य सभा, प्रगत साहित्य सभा यांच्याशी संबंध आला. या संस्थांच्या संबंधांमुळे १९६८पासून दलित साहित्य चळवळीत सहभाग घेऊ लागले. मुंबई–परळ येथील पशुवैद्यकीय महाविद्यालयात प्रयोगशाळा साहाय्यक म्हणून काम करत पुढील शिक्षण घेतले व पश्चिम रेल्वेच्या कार्यालयात ऑडिटर म्हणून नियुक्ती झाली. १९९० साली भारत सरकारचा 'पद्मश्री' हा मानाचा पुरस्कार लाभला तर १९८८ ते १९९६ या काळात बालभारती पाठ्यपुस्तक समितीचे सभासद म्हणून काम पाहिले. महाराष्ट्र राज्य नाट्य परीक्षण मंडळाचे अध्यक्षपद १९९३ साली लाभले. 'कोंडवाडा' कवितासंग्रह (१९७४), 'बलुतं' आत्मकथन (१९७८), 'विटाळ' कथासंग्रह (१९८३), 'चावडी' (१९८३), 'कल्लपा यशवंत टाळे यांची दुर्मीळ डायरी' (१९८५), 'बलुतं एक वादळ' (१९८७), 'धम्मपद' कवितासंग्रह (१९९१), 'पासंग' लेखसंग्रह (१९९५) ही पवारांची साहित्यसंपदा आहे. १९८२ साली फोर्ड फाउंडेशनची पाठ्यवृत्ती मिळाली. दया पवार यांच्या पहिल्याच 'कोंडवाडा' या कवितासंग्रहाला राज्य शासनाचा पुरस्कार प्राप्त झाला. त्यानंतर आलेल्या 'बलुतं' या आत्मकथनाचा गुजराती, हिंदी, जपानी, जर्मन, फ्रेंच आदी भाषांत अनुवाद झाला. 'बलुतं'मुळे दया पवार यांचे नाव सर्वदूर पोहोचले. १९८४ साली फ्रँकफर्ट येथील साहित्य मेळाव्यात दया पवार सहभागी झाले. 'बलुतं' या आत्मकथनाच्या सहा आवृत्त्या आणि १९ पुनर्मुद्रणे प्रकाशित झाली. एन.एफ.डी.सी.च्या वतीने 'बलुतं'वर 'अत्याचार' नावाचा चित्रपट तयार करण्यात आला. त्यास पटकथेचा प्रथम पुरस्कार मिळाला. मात्र तो प्रदर्शित झाला नाही. दया पवार यांनी महाराष्ट्र राज्य साहित्य संस्कृती मंडळ; महाराष्ट्र राज्य पाठ्यपुस्तक

मंडळ, पुणे; एस. एन. डी. टी. विद्यापीठ, सिन्नर; पश्चिम विभागीय सांस्कृतिक केंद्र, उदयपूर; डॉ. बाबासाहेब आंबेडकर चरित्र साधने प्रकाशन समिती, इत्यादी संस्थांचे सदस्यत्व स्वीकारून कामे केली.

दलित जीवनातील दाहक दुःख-भोगांचे शब्दांकन करताना पवार केवळ विद्रोहाची आक्रस्ताळी भूमिका घेत नाहीत. त्यांच्या लेखनातील व्यासंग, विश्लेषणपरता, चिंतनशीलता, परखडपणा, संवेदनशीलता हे गुण सर्वांना अंतर्मुख करतात. आपल्या साहित्य-निर्मितीच्या प्रक्रियेकडे गंभीरपणे पाहणारे दया पवार मनाच्या अवस्थेतून, बेचैनीतून लेखन करतात. कल्पकतेला, स्वप्नरंजनाला तिथे मुळीच वाव नसतो. म्हणूनच पवार यांचे लेखन कृतिशीलतेला प्रेरणा देणारे ठरते. आपल्या लेखनासंबंधी दया पवार लिहितात, ‘लेखन किंवा कविता लिहिण्यापूर्वी तशी कोणतीही भूमिका मनात नसते. एवढेच काय, अनुभवाला कोणता आकार येणार आहे, याची पुसटशी कल्पना नसते. एकमात्र खरे की एखादी घटना, एखादे वाक्य, किंवा दैनंदिन घटनांचा कार्यकारण भाव ह्यांतून लेखन सुचते. सतत बेचैन असणे, कोणत्याही भौतिक सुखात आनंद न घेता येणे, झुंडीत असूनही मनाने झुंडीबाहेर राहणे हा माझा स्थायिभाव. तसा व्यवहारात मी कमालीचा नॉर्मल, चीड-संताप चेहऱ्यावर उमटत नाही. आपण मुकाटपणे कसे जगतो, एवढे नेभळट कसे हाही प्रश्न पडला. व्यवस्थेत झालेला अपमानाचा बोध मन सतत बेचैन करणारा ठरतो.’

आपल्या लेखनाच्या वाटचालीविषयी दया पवारांनी लिहीले आहे, ‘१९६७ सालापासून त्याच्या आगेमागे असेल कदाचित, मनात अंकुरत होते. त्याला खतपाणी मिळून दलित साहित्याची महाराष्ट्रातील चळवळ, निग्रो साहित्य, वेगवेगळ्या साहित्यिक ग्रुपशी विचाराच्या पातळीवर संघर्ष, कलावादी मंडळींतील चर्चा, ह्या सर्वांचा उपयोग कोंडी फोडण्यासाठी होत होता. अलीकडे वाटू लागते की ‘कोंडमारा’ हा कवितासंग्रह लिहून झाला नसता, तर ‘बलुतं’ लिहिता आले असते की नाही ह्यांची शंका वाटते.’

दया पवार यांनी फिल्म्स डिव्हिजनच्या वतीने निघालेल्या डॉ. आंबेडकर यांच्यावरील चरित्रपटाचे पटकथा-लेखन केले. त्याचप्रमाणे ए. एन. डी. सी. च्या वतीने तयार करण्यात आलेल्या डॉ. आंबेडकरांवरील चित्रपटाच्या पटकथा लेखकांपैकी एक लेखक म्हणून पवारांनी काम पाहिले.

– रवींद्र गोळे

**संदर्भ :**

*१. पवार दया; ‘बलुतं’; ग्रंथाली प्रकाशन, मुंबई; २००८.*

*२. पवार दया; ‘माझे लेखन ॲक्शन सारखे’ ललित; जुलै २००१.*

## पांगारकर, लक्ष्मण रामचंद्र

☞ **मुख्य चरित्रनोंद – धर्मकारण खंड**

## पाटणकर, राजाराम भालचंद्र

**सौंदर्यमीमांसक, समीक्षक, विचारवंत**

**९ जानेवारी १९२७ – २४ मे २००४**



राजाराम पाटणकर यांचा जन्म खामगाव येथे झाला. मराठीतील ख्यातनाम साहित्यिक श्रीपाद कृष्ण कोल्हटकर हे पाटणकरांचे आईकडून आजोबा होत. बालकवींच्या समग्र कवितांचे सर्वप्रथम संपादन करणारे इंग्रजीचे प्राध्यापक, प्राचार्य भा. ल. पाटणकर हे त्यांचे वडील होत. रा. भा. पाटणकरांचे शालेय व महाविद्यालयीन शिक्षण नाशिक येथे झाले. ते इंग्रजी व मराठी हे विषय घेऊन १९४९ मध्ये बी. ए. आणि इंग्रजी विषय घेऊन १९५१ मध्ये एम. ए. झाले. त्यांच्या ‘कम्युनिकेशन इन लिटरेचर’ या विषयावरील प्रबंधाला पीएच. डी. ची पदवी (१९६०) मिळाली. १९५१ ते १९६४ या काळात भावनगर, अहमदाबाद, भूज, अमरावती येथील शासकीय महाविद्यालयांमध्ये इंग्रजीचे प्राध्यापक, १९६४ ते १९८७

प

या काळात मुंबई विद्यापीठात प्रथम इंग्रजीचे प्रपाठक आणि नंतर प्राध्यापक, १९७८ पासून निवृत्तीपर्यंत मुंबई विद्यापीठात इंग्रजी विभागाचे प्रमुख असे कार्य केले.

रा. भा. पाटणकर यांनी आपल्या लेखनाच्या आरंभीच्या काळात, साधारणपणे विशीच्या आसपास 'एरिअल' या टोपणनावाने तुरळक कथा-कविता लिहिल्या. नंतर मात्र त्यांनी सर्जनशील लेखन केले नाही. त्यांचे आरंभीचे समीक्षात्मक व सौंदर्यशास्त्रीय लेखन मुख्यतः इंग्रजीमध्येच होते. 'इस्थेटिक्स अँड लिटररी क्रिटिसिझम' (१९६९) हे त्यांचे सौंदर्यशास्त्रावरील इंग्रजी पुस्तक होय. साधारणपणे १९७० नंतरचे लेखन त्यांनी प्रामुख्याने मराठीमध्येच केले. त्यांचा 'सौंदर्यमीमांसा' (१९७४) हा स्वतंत्र ग्रंथ आणि 'क्रोचेचे सौंदर्यशास्त्र: एक भाष्य' (१९७४), 'कान्टची सौंदर्यमीमांसा' (१९७७), 'कॉलिंगवुडची कलामीमांसा' (१९७५) हे त्यांचे भाष्यपर ग्रंथ सौंदर्यशास्त्राशी संबंधित आहेत. 'साहित्यविचार आणि सौंदर्यशास्त्र' (२००१) हा सौंदर्यशास्त्रावरील लेखसंग्रह, 'कमल देसाई यांचे कथाविश्व' (१९८४), 'मुक्तिबोधांचे साहित्य' (१९८६), 'कथाकार शांताराम' (१९८८), 'वसंत कानेटकरांची नाटकेः वैविध्य आणि ध्रुवीकरण' (२००२) हे त्यांचे प्रत्यक्ष साहित्यसमीक्षा करणारे ग्रंथ. 'अपूर्ण क्रांती' (१९९८) हा त्याच्या संस्कृतिसमीक्षेवरील महत्त्वाचा ग्रंथ होय. याखेरीज आपल्या 'अपूर्ण क्रांती' या ग्रंथातील प्रमेयाचा पाठपुरावा करणारी लेखमाला 'अनुष्टुभ' या नियतकालिकात प्रसिद्ध झाली. 'सौंदर्यमीमांसा' या ग्रंथाची हिंदी, गुजराती भाषांमध्ये भाषांतरे झाली आहेत.

रा. भा. पाटणकरांना त्यांच्या सौंदर्यशास्त्रीय, समीक्षात्मक लेखनासाठी अनेक पुरस्कार मिळाले. 'सौंदर्यमीमांसा' या ग्रंथाला साहित्य अकादमीचा प्रतिष्ठेचा पुरस्कार प्राप्त झाला. अनेक ग्रंथांना महाराष्ट्र राज्य पुरस्कार व अन्यही अनेक पुरस्कार मिळाले. एकूण समीक्षात्मक कार्यासाठी महाराष्ट्र फाउंडेशनचा जीवनगौरव पुरस्कार प्राप्त झाला.

**द्विध्रुवात्मकतेचा सिद्धान्त**

'सौंदर्यमीमांसा' या ग्रंथात पाटणकरांनी आपला कलेच्या द्विध्रुवात्मकतेचा सिद्धान्त मांडताना पाश्चात्त्य सौंदर्यविचाराचा एक व्यापक नकाशा मराठी वाचकांसमोर ठेवला. त्यांच्या मते 'कला' वा 'साहित्य' ही अनेकांगी व्यामिश्र संकल्पना असल्यामुळे तिची एकच एक व्याख्या देता येत नाही. या संकल्पनेच्या व्यामिश्रतेमुळेच तिच्यासंबंधी विविध सिद्धान्त निर्माण होतात. या सिद्धान्तांचे स्वाभाविकपणे दोन गटांत विभाजन होते, आणि त्यातून दोन परस्परविरोधी संकल्पनाव्यूह उभे राहतात. स्वायत्तवाद / अलौकिकतावाद / कलावाद व लौकिकतावाद / जीवनवाद हे ते दोन व्यूह आहेत. ज्यात लौकिक जीवनाचा संबंध जवळपास नसतो. असे अर्थरहित संगीत स्वायत्ततेच्या ध्रुवाकडे, तर आशयावर भर देणारी साहित्यासारखी कला लौकिकतेच्या ध्रुवाकडे झुकलेली असते. परंतु कोणतीही कला निर्भेळपणे एका ध्रुवाचे उदाहरण म्हणून घेता येत नाही. कारण बहुतेक कलांमध्ये हे दोन्ही ध्रुव निदान बीजरूपाने तरी अस्तित्वात असतात. हा पाटणकरांचा द्विध्रुवात्मकतेचा सिद्धान्त होय.

पाटणकरांनी द्विध्रुवात्मकतेच्या सिद्धान्ताच्या आधारे साहित्य या कलेचा विचार केला आहे. साहित्याच्या आशयसापेक्ष प्रकृतीमुळे त्याच्या संदर्भात रूपात्मक निकषांबरोबरीनेच ज्ञानात्मक आणि नैतिक निकषांचा, म्हणजेच अनेक-निकषतेचा अवलंब करणे अपरिहार्य कसे ठरते, हे त्यांनी दाखविले आहे. पाटणकरांच्या मते कलाकृती अलौकिक ठरण्यासाठी तिची घडण केवळ सौंदर्यात्मक/कलात्मक तत्त्वांनी व्हावयास हवी. ती ज्ञानात्मक व नैतिक तत्त्वानुसार व्हावयास नको. परंतु साहित्यासारख्या आशययुक्त कलांमध्ये ती अपरिहार्यपणे ज्ञानात्मक व नैतिक तत्त्वांनुसारच होते, आणि त्यामुळे आस्वादामध्ये अगदी स्वाभाविकपणेच ज्ञानात्मक व व्यवहारात्मक भूमिका जागृत होते. साहित्यासारखी कला अप्रत्यक्षपणे नैतिकतेचा परिपोष कसा करते, ते त्यांनी दाखविले आहे. याबरोबरीनेच त्यांनी कला कोणत्या प्रकारे ज्ञान देते, तिच्या ज्ञानात्मकतेवर व वैचारिकतेवर तिचे मूल्य कसे अवलंबून असते, याचीही चर्चा केली आहे. पाटणकरांचे हे सौंदर्यशास्त्रीय लेखन तार्किक व

प

तत्त्वज्ञानात्मक शिस्तीने केले गेले आहे. याबरोबरीनेच ते ससंदर्भही आहे. त्यामुळे मराठीतील सौंदर्यशास्त्रीय लेखनाच्या परंपरेत हे लेखन वेगळे व वैशिष्ट्यपूर्ण ठरले आहे.

पाटणकरांनी प्रत्यक्ष साहित्यसमीक्षा करणाऱ्या आपल्या ग्रंथांमध्येही त्या-त्या लेखकाच्या समग्र साहित्याचे अनेक निकषांच्या आणि विविध समीक्षापद्धतींच्या साहाय्याने विश्लेषण, मूल्यमापन केले आहे. मराठीमधील आस्वादक आणि चरित्रात्मक समीक्षापद्धती नाकारून विश्लेषणात्मक, मूल्यमापनात्मक अशा समीक्षेचा त्यांनी पुरस्कार केला. त्यांच्या मते समीक्षा ही साहित्यकृतीलक्ष्यी असायला हवी. अर्थात, साहित्यकृती ही विशिष्ट साहित्यिक व सांस्कृतिक परंपरेत निर्माण होते. साहित्यकृतीचे अस्तित्व व स्वरूप या परंपरांवर अवलंबून असल्यामुळे तिचे विश्लेषण व मूल्यमापन या संदर्भातच करावयास हवे. साहित्यकृतीची अशी सर्वांगीण चिकित्सा करणाऱ्या समीक्षापद्धतीला ते ‘विदग्ध समीक्षापद्धती’ असे म्हणतात. त्यांची ही समीक्षा साहित्यकृतीची व्यामिश्रता, तिची अनेक अंगे लक्षात घेऊन तिचा विचार करणारी आहे. पाटणकरांच्या कमल देसाई, मुक्तिबोध व शांताराम ह्यांच्यावरील लेखनात एक सूत्र कायम आहे. ते म्हणजे आधुनिक मराठी साहित्यात महत्त्वाची बीजे विखुरलेली सापडतात; परंतु या बीजांमधून एखादा भरगच्च वृक्ष निर्माण झालेला दिसत नाही. असे का झाले, आणि यावर उपाय काय, हा पाटणकरांचा एक चिंतनाचा विषय राहिला.

‘अपूर्ण क्रांती’ या आपल्या ग्रंथामध्ये पाटणकर भारतीय, विशेषतः मराठी संस्कृतीची चिकित्सा करतात. आज आपली ज्ञानेच्छा व विचारेच्छा कमी का झाली आहे, या प्रश्नाचा शोध त्यांनी या पुस्तकात घेतला आहे. आपला हा अभ्यास त्यांनी आर्थिक, शैक्षणिक व साहित्यिक अशा तीन भागांमध्ये मांडलेला आहे. इंग्रजांनी वेगवेगळ्या प्रकारे आपले आर्थिक शोषण केलेले असले, तरी त्यांनी शिक्षण व साहित्य या व्यवस्था आर्थिक शोषणाला पूरक यंत्रणा म्हणून उभारल्या, याला कोणताच पुरावा दिसत नाही; असे या ग्रंथातील प्रतिपादन आहे. त्यांचे हे प्रतिपादन आज प्रचलित व लोकप्रिय असलेल्या वसाहतवादाच्या चर्चेच्या विरोधात आहे. पाटणकरांनी आपल्या प्रमेयाच्या पुष्ट्यर्थ अर्थशास्त्र, इतिहास, शिक्षण, साहित्य अशा अनेक ज्ञानविषयांमधील भरपूर पुरावे सादर केले आहेत.

रा. भा. पाटणकरांनी सौंदर्यशास्त्रीय लेखनाच्या संदर्भात वेगळ्या सिद्धान्ताची मांडणी करून मराठी सौंदर्यशास्त्रीय लेखनामध्ये मोलाची भर घातली आहे. याचप्रमाणे त्यांनी प्रत्यक्ष साहित्यसमीक्षेतही अनेक अंगांनी साहित्यकृतींचा विचार केला आहे. भक्कम सैद्धान्तिक भूमिका, साहित्यिक व सांस्कृतिक परंपरा यांचे सुस्पष्ट भान, सविस्तर व सूक्ष्म चिकित्सा आणि सजग अशी संवेदनक्षमता यांमुळे त्यांची प्रत्यक्ष साहित्यसमीक्षाही मराठी परंपरेत वैशिष्ट्यपूर्ण ठरली आहे.

– डॉ. वसंत पाटणकर

**संदर्भ :**


१. *रानडे अशोक; ‘चौकशा : रा. भा. पाटणकर यांच्या’; ललित मार्च, १९७६ : १६ पृ.*

२. *पुरोहित के.ज; ‘मित्रास्त’; सकाळ – ३० मे २००४; पुर.*




## पाटणकर, वसंत सीताराम

**कवी, समीक्षक**

**२० जानेवारी १९५१**

वसंत सीताराम पाटणकरांचा जन्म रत्नागिरी जिल्ह्यातल्या खेड तालुक्यात झाला. त्यांच्या आईचे नाव सरस्वती. पाटणकरांचे बालपण मुंबईमध्ये गेले. मुंबईच्या किंग जॉर्ज शाळेतून ते एस. एस. सी. झाले. सायनच्या एस. आय. ई. एस महाविद्यालयातून बी. ए. झाल्यानंतर मुंबई विद्यापीठातून ते एम. ए. झाले. १९८९ साली त्यांना ‘मराठी साहित्यविचारातील जीवनवादाचा चिकित्सक अभ्यास’ या विषयावरील प्रबंधासाठी मुंबई विद्यापीठाची पीएच. डी. पदवी प्राप्त झाली.

वसंत पाटणकरांनी त्यांची पहिली कविता महाविद्यालयीन काळात लिहिली. ‘आलोचना’,



'सत्यकथा', 'अनुष्टुभ', 'कवितारती' इत्यादी नियतकालिकांतून त्यांनी समीक्षापर लेखनही केले. १९८३ साली त्यांचा 'विजनांतील कविता' हा काव्यसंग्रह प्रकाशित झाला. 'विजनांतील कविता' या काव्यसंग्रहाच्या शीर्षकातूनच कवीच्या काव्यानुभूतीच्या विषयाची ओळख होते. आधुनिकीकरणाच्या जबरदस्त यांत्रिक रेट्यात, महानगरी जीवनात होणारी संवेदनशील मनाची घुसमट व कोंडी. त्यातून भोवतालच्या परिस्थितीशी नाळ न जुळल्यामुळे अपरिहार्यपणे येणारी वास्तवापासूनच्या तुटलेपणाची जाणीव आणि या परकेपणाच्या जाणिवेमुळे कवीच्या वाट्याला येणारे अटळ एकाकीपणा कवीने या काव्यसंग्रहातून व्यक्त केले आहे. कवीच्या वाट्याला आलेला हा विजनवास, हे एकाकीपण जरी कवीच्या वैयक्तिक मनोवृत्तीचा भाग म्हणून येत असले, तरी ते आधुनिकीकरणामुळे अस्ताव्यस्त वाढलेल्या महानगरात प्रत्येक संवेदनशील व्यक्तीच्या वाट्याला येणाऱ्या एकाकीपणाचे प्रातिनिधिक रूप ठरते. वसंत पाटणकरांच्या कवितेचे हे वैशिष्ट्य म्हणता येईल.

प

१९९५ मध्ये वसंत पाटणकरांचे 'कविता: संकल्पना, निर्मिती आणि समीक्षा' हे पुस्तक प्रकाशित झाले. या पुस्तकातून काव्यासंबंधीच्या संकल्पनात्मक, तात्त्विक स्वरूपाच्या प्रश्नांची मांडणी केलेली आढळते. मराठी कवितेच्या अभ्यासकांना एकंदरीत 'कविते'ची संकल्पना तसेच कवितेच्या संदर्भातील काव्यनिर्मितिप्रक्रिया, काव्यातील तंत्र, काव्यसमीक्षा यांसारख्या संकल्पनात्मक आणि तात्त्विक गोष्टी समजून घेण्यासाठी प्रस्तुत पुस्तक उपयोगी आहे. २००६ साली वसंत पाटणकरांचे 'साहित्यशास्त्र: स्वरूप आणि समस्या' हे पुस्तक प्रकाशित झाले. मराठी साहित्यात एम.ए. करणाऱ्या विद्यार्थ्यांना 'साहित्य' या संकल्पनेची व्यामिश्रता व वादग्रस्तता लक्षात यावी, तसेच साहित्याच्या संदर्भात निर्माण होणाऱ्या विविध प्रश्नांचे, वादांचे भान त्यांच्यामध्ये निर्माण व्हावे, हा या पुस्तकलेखनामागील हेतू आहे.

याशिवाय डॉ. वसंत पाटणकरांनी 'सर्वोत्कृष्ट मराठी एकांकिका' (१९७९), 'वाङ्मयीन महत्ता' (१९९०), 'टी.एस. एलियट आणि मराठी नवकाव्य व समीक्षा (१९९२) 'ग.स.भाटे : एक वाङ्मयसमीक्षक' (१९९५), 'द.ग.गोडसे यांची कलामीमांसा' (१९९७) 'अरुण कोलटकरांची कविता: काही दृष्टिक्षेप' (१९९८) या ग्रंथांचे संपादनही केले आहे. 'स्वातंत्र्योत्तर मराठी कविता: भाग १' (२००२) हा त्यांनी संपादित केलेला ग्रंथ साहित्य अकादमीकडून (दिल्ली) प्रकाशित झाला आहे.

वसंत पाटणकरांना 'विजनांतील कविता' (१९८३) या काव्यसंग्रहासाठी १९८४-८५ चा महाराष्ट्र राज्य पुरस्कार मिळाला आहे. याच काव्यसंग्रहालय १९८६ सालचा बा.सी. मर्ढेकर पुरस्कारही मिळाला आहे. मराठी समीक्षेच्या क्षेत्रातल्या त्यांच्या योगदानासाठी मुंबई मराठी साहित्य संघातर्फे देण्यात येणारा २००४ सालचा 'साहित्य समीक्षक पुरस्कार'ही त्यांना प्राप्त झालेला आहे.

– डॉ. दुलारी देशपांडे

## पाटील, शंकर बाबाजी

**कथाकार, कादंबरीकार, चित्रपट कथा-लेखक**
**८ ऑगस्ट १९२६ – १८ ऑक्टोबर १९९८**

शंकर बाबाजी पाटील यांचा जन्म कोल्हापूर जिल्ह्यातील पट्टण-कोडोली येथे झाला. त्यांचे सुरुवातीचे शिक्षण हातकणंगले तालुक्यातील तारदाळ गावी व गडहिंग्लज येथे झाले. कोल्हापूरच्या राजाराम महाविद्यालयामध्ये बी.ए. (ऑनर्स) संपादन करून, पुढे बी.टी.ची पदवी मिळवली. रयत शिक्षण संस्थेच्या शाळेत ते मुख्याध्यापक होते. समकालीन प्रसिद्ध साहित्यिकांशी त्यांचा सहवास होता. त्यांच्याशी दर्जेदार पुस्तकांविषयी चर्चा होई. इंग्रजी साहित्याचाही अभ्यास



पाटील यांनी केला. 'सत्यकथा', 'अभिरुची', 'साहित्य' यांसारख्या नियतकालिकांमुळे नववाङ्मयाच्या त्या सुरुवातीच्या काळात त्यांची वाङ्मयीन अभिरुची प्रगल्भ झाली.

ग. वि. अकोलकर, ग. प्र. प्रधान यांच्या सहकार्याने त्यांनी इयत्ता ८वी ते १०वी ह्या इयत्तांसाठी 'साहित्य सरिता' या वाचनमालेचे संपादन केले (१९६८). १९७२पासून मराठी आणि अन्य सहा भाषांतील पाठ्यपुस्तकांसाठी विद्यासचिव म्हणून त्यांची नियुक्ती झाली.

शंकर पाटील यांच्या कथांचे भारतीय व पाश्चात्त्य भाषांत अनुवाद झाले. ते आपल्या कथांतून व्यक्तिमनाचा पदर न पदर सहजपणे उलगडतात. त्यांची भाषा ही त्या कथांतून होणाऱ्या अनुभवांची भाषा आहे. कथा-लेखनात ते सतत प्रयोग करीत राहिले, त्यामुळे त्यांच्या कथेतील चैतन्य नेहमीच टिकून राहिले. १९४७पासून कथा-लेखनाला आरंभ करून जवळजवळ १७ वर्षांनी ते कादंबरीलेखनाकडे वळले. 'टारफुला'चा अपवाद वगळता पाटील यांनी निष्ठेने कथा-लेखनच केले.

१९६४ साली प्रसिद्ध झालेल्या 'टारफुला' कादंबरीचे लेखन तत्पूर्वी २-३ वर्ष ते करत असले पाहिजेत. 'धग' या कादंबरीचे परीक्षण करताना त्यांनी स्पष्ट व निर्भीडपणे म्हटले आहे, '१९६० सालातील मराठी कादंबरी लाज आणणारी आहे'. या विधानातील असमाधान 'टारफुलां'च्या मुळाशी असले पाहिजे. 'बनगरवाडी, फकीरा, धग' ह्यांसारख्या मोजक्या रचना सोडल्या, तर इतर कादंबऱ्या नावीन्यामध्ये किंवा स्वप्नरंजनामध्ये हरवून गेल्या होत्या. नागनाथ कोतापल्ले यांच्या मते 'टारफुलामध्ये कुठलीही एखादी व्यक्ती केंद्रस्थानी नाही. किंवा तिला नायक नाही... ते (लेखक) जाणीवपूर्वक व्यक्ती बदलत जातात, वातावरण बदलत जातात. परंतु गाव तेच आहे आणि संघर्षही सुरुवातीपासून शेवटपर्यंत तोच आहे... केंद्रस्थानी कोण आहे, हे समजून न घेतल्यामुळे समकालीन समीक्षक घोटाळले. पाटलांना एका संपूर्ण खेड्याचे चित्रण करावयाचे आहे. संपूर्ण खेडे हे केंद्रस्थानी आहे. येथे सत्तासंघर्ष आहे.' पाटलांचा प्रश्न आहे की सत्ता टिकवण्यासाठी अन्याय करणे हेच सत्तेचे रूप आहे का? सत्ता ही कल्याणकारी राहूच शकणार नाही का? तिने 'टारफुला'च झाले पाहिजे का?

पाटलांच्या निवेदनशैलीतील ग्रामीण बोली सशक्त आशय पेलून धरते. या शैलीतून ते पात्रांच्या अंतर्विश्वाचा वेध घेतात. गांभीर्य व विनोद हे दोन्ही त्यांच्या निवेदनशैलीचे विशेष आहेत.

'कथा अकलेच्या कांद्याची' (१९८५), 'लवंगी मिरची कोल्हापूरची' (१९८५) आणि 'गल्ली ते दिल्ली' ही तीन वगनाट्ये, 'पाऊलवाटा' हा त्यांचा ललित लेखसंग्रह तर 'सत्याग्रही' हे त्यांचे नाटक आहे. त्यांच्या 'वळीव' (१९५८) या कथासंग्रहाला महाराष्ट्र शासनाचा पुरस्कार लाभला. हा त्यांचा पहिला कथासंग्रह होता. नंतर 'भेटीगाठी' (१९६०), 'बावरी शेंग' (१९६३), 'खुळ्याची चावडी' (१९६४), 'पाहुणी' (१९६७) हे कथासंग्रह आहेत तर 'फक्कड गोष्टी' (१९७३), 'खेळखंडोबा' (१९७४), 'ताजमहालामध्ये सरपंच' (१९७७) हे विनोदी लेखन आहे. पाटील यांच्या लेखनात स्त्री-चित्रणाला प्राधान्य लाभलेले आहे. लोकप्रिय व गाजलेल्या अनेक मराठी चित्रपटांचे संवाद-लेखन व पटकथा-लेखन पाटील यांनी केले आहे. व्यंकटेश माडगूळकर व द. मा. मिरासदार यांच्यासह गावोगावी जाऊन त्यांनी कथाकथनाचे कार्यक्रम केले आणि ग्रामीण कथा सर्वत्र पोचवली.

पाटील यांनी महाराष्ट्र राज्य पाठ्यपुस्तक निर्मिती मंडळ आणि अभ्यासक्रम संशोधन मंडळ ह्या संस्थांमध्ये मोलाचे योगदान दिले. नांदेड येथे झालेल्या अखिल भारतीय साहित्य संमेलनाचे ते अध्यक्ष होते.

– वि. ग. जोशी

प

## पाटील, अनुराधा कौतिकराव

**कवयित्री**

**५ एप्रिल १९५४**



अनुराधा कौतिकराव पाटील यांचा जन्म पहूर जि. जळगाव येथे झाला. शालान्त परीक्षेपर्यंत शिकलेल्या अनुराधा यांचे १९८१ पासून १९९२ पर्यंत 'दिगंत', 'तरीही' आणि 'दिवसेंदिवस' हे तीन कवितासंग्रह प्रकाशित झाले आहेत. जीवनाच्या विविध अनुभवांचे उत्कट चित्रण त्यांनी सहज, सोप्या भाषेत केले आहे. हे चित्रण वाचताना त्यांच्या जीवघेण्या प्रवासाचे, भयावह वास्तवाचे, एकाकी व असुरक्षित स्त्री-जीवनाचे आविष्कार वाचकाला होतात. त्यांच्या कवितांत चैतन्य आहे, मनस्वीपणा आहे. नकोशा झालेल्या जिण्याची संगती लावण्याच्या प्रामाणिक प्रयत्नात होरपळलेल्या हृदयाचे निःश्वास असणे, अगदी स्वाभाविक वाटते. इतके असूनही त्या म्हणतात,

'तशी खंत काही नाही<br>
कुठूनही मी एकटीच<br>
परतत आलेय.<br>
कालांतरानं मी हे सारं विसरून जाईन,<br>
कोवळ्या स्वप्नांचे हे रुणझुणते दिवस.'

त्यांच्या कवितेच्या उल्लेखनीय बाबी अनेक आहेत. कोणत्याही कवितेला नाव नाही. तिच्यात उत्तम कवितेचे गुण आहेत. सहजता, सुबोधता असून दुःखी किंवा पराभूत, परागंदा झाल्याचा आक्रोश नाही, उपहास नाही की विद्रोहाचा स्वर नाही. त्यांचा दुर्दम्य आशावाद व आत्मविश्वास आणि अस्सलपणा व प्रामाणिकपणा मनाला भिडतो. निसर्ग व परिसर यांच्याशी एकरूप झालेले जीवन बदलणारे ऋतू, ओंजळभर काजवे, विझून गेलेल्या शेकोट्या, आभाळाची निस्संगता, फुललेले पळस, नदी, ओढे, जंगल या साऱ्यांना वेचते. कवयित्रीची जाण व त्यांचे भान मार्मिक, तरल आहे. त्या म्हणतात, 'जिथं आपल्यासाठी फुलं उमलतील, अशी जागा सगळ्यांनाच सापडत नाही', पण त्यांची समृद्धी अशी की,

'कवितेशिवाय जवळ काही नाही.<br>
ओसंडून वाहणाऱ्या या चैतन्याची<br>
मनस्वी कविता<br>
कुठंतरी माझ्या आतच आकार घेतेय'

'इतरांच्या स्वप्नांमध्ये अर्थ भरता भरता' कवयित्रीची स्वतःची स्वप्ने तशीच राहून जातात, या गोष्टीची तिला खंत नाही व खेदही नाही. लहान मुलांसारखे भाबडे, कोमल, निर्मळ मन त्यांच्या निसर्गाशी एकजीव झालेल्या जीवनातून वारंवार डोकावते. अनुभवलेल्या गतकाळाची चित्रे, वर्तमानाच्या चिवट व यथार्थ भूमीवर राहून रेखाटताना त्यांना एक विराट संदर्भ लाभला आहे. त्या जेव्हा म्हणतात,

'माझ्या हृदयात गोठल्या आहेत<br>
वर्षानुवर्ष अशाच कितीतरी गोष्टी<br>
आणि वाळूवर सांडणाऱ्या पाण्यासारखं<br>
आयुष्य झिरपून जातंय ओंजळीतून'

तेव्हा वाटते की हे त्यांचे एकट्याचे जीवन नव्हे, त्यांच्यासारख्या असंख्य स्त्रियांचे हे विदारक दर्शन होय. अनुराधाताईंची सहनशीलता आणि सहृदयता पृथ्वीसारखीच आहे. भारतीय ग्रामीण संस्कृतीच्या संदर्भांनी आणि अनोख्या प्रतिमासृष्टीने ही कविता सुंदर व समृद्ध झाली आहे.

– वि. ग. जोशी

**संदर्भ :**

१. *पाटील अनुराधा; 'तरीही'; कुशा प्रकाशन, औरंगाबाद; प्रथम आवृत्ती; १९८५.*

## पाटील, गंगाधर गणेश

**समीक्षक, संपादक**

**६ एप्रिल १९३१**

गंगाधर गणेश पाटील यांचा जन्म खिडकी, तालुका अलिबाग येथे झाला. प्राथमिक शिक्षण लोकल स्कूल



बोर्ड, चरी-अलिबाग येथील मराठी शाळेतून झाले. माध्यमिक शिक्षण अलिबागच्या कोकण एज्युकेशन सोसायटीच्या इंडस्ट्रिअल हायस्कूलमध्ये झाले. १९४९ मध्ये शालान्त परीक्षा उत्तीर्ण झाल्यावर पुढील शिक्षणासाठी ते मुंबईतील रुईया महाविद्यालयात दाखल झाले. १९५९ मध्ये मुंबई विद्यापीठातून ते एम. ए. झाले.

१९६० ते १९८२ या काळात मुंबईच्या के. सी. महाविद्यालयात मराठी विभाग प्रमुख; १९८२ मध्ये मुंबई विद्यापीठात प्रपाठक; १९८९ मध्ये निवृत्त झाले.

पाटील यांचे सर्व लेखन समीक्षात्मक आहे. १९६६ मध्ये त्यांनी 'आलोचना' मासिकातून लेखनाला सुरुवात केली. १९७८ पासून 'अनुष्टुभ' मधून 'रेखेची वाहाणी' हे साहित्यशास्त्र समीक्षाविषयक सदर नियमितपणे लिहीत होते. हे सदर प्रथम ते 'सुहृद' या नावाने लिहीत. पण १९८० नंतर मात्र स्वतःच्याच नावाने लिहू लागले. तत्पूर्वी आदिबंधात्मक समीक्षापद्धतीचा अवलंब करून, त्यांनी पु. शि. रेगे यांच्या काव्यविश्वाचा शोध घेणारा प्रदीर्घ निबंध लिहिला.

'अनुष्टुभ', 'चिन्हमीमांसा', 'कथनमीमांसा', 'वि-रचना', 'वाचक प्रतिसादमुखी समीक्षा सिद्धान्त', 'रशियन रूपवाद' इत्यादी साहित्य समीक्षेच्या सिद्धान्तांचा आमूलाग्र परिचय घडवून देणारे लेखही त्यांनी लिहिले. 'अनुष्टुभ' मासिकाला विशिष्ट अशा वाङ्मय-समीक्षात्मक नियतकालिकाचा दर्जा आणून देण्यात त्यांचा मोठा वाटा आहे. 'अनुष्टुभ' प्रतिष्ठानचे ते सभासद, विश्वस्त व अध्यक्ष होते. तसेच १९९८ ते २००१ या काळात संपादकही होते.

समीक्षा-व्यापार हा एक ज्ञानगर्भ व मूल्यगर्भ व्यवहार असून तो प्रत्यक्षात येण्यासाठी जे निकष, संकल्पना, नियम, संकेत व नमुनादर्श ह्यांची आवश्यकता असते, त्या सर्वांची गांभीर्याने चर्चा करून, भरीव अशी सामग्री त्यांनी मराठी वाचकांना व अभ्यासकांना उपलब्ध करून दिली आहे.

पु. शि. रेगे यांच्या निवडक कवितांचे त्यांनी केलेले संपादन विस्तृत प्रस्तावनेसह 'सुहृदगाथा' हे १९७५ मध्ये प्रसिद्ध झाले. १९८१ मध्ये त्यांच्या निवडक समीक्षालेखांचा संग्रह 'समीक्षेची नवी रूपे' प्रकाशित झाला. या पुस्तकात कविता, कादंबरी व नाटक असे तीन विभाग आहेत. या तीन विभागांत साहित्य-विचारात्मक आणि समीक्षात्मक असे एकूण बारा लेख समाविष्ट केले आहेत. या पुस्तकातील सर्व लेख आलोचना, मौज, अनुष्टुभ, उत्तम, पाऊलवाट इत्यादी नियतकालिकांतून पूर्वप्रकाशित झाले आहेत.

दुसऱ्या महायुद्धानंतर पाश्चात्त्य सौंदर्यमीमांसेच्या विश्वात घटितार्थ शास्त्रीय, अस्तित्ववादी, संरचनावादी, नवमार्क्सवादी, आदिबंधात्मक इत्यादी सौंदर्यविचारांचे व समीक्षेचे नवे प्रवाह प्रवर्तित झाले. त्या-त्या साहित्यकृतीच्या व साहित्याच्या प्रकृतीप्रमाणे व गरजेप्रमाणे त्या-त्या समीक्षापद्धतीचा व वाङ्मयीन दृष्टीचा अवलंब करणे गरजेचे असते. या नवीन सौंदर्यविचारांच्या व समीक्षेच्या दृष्टीतून साहित्यविषयक प्रश्नांचा विचार या पुस्तकात पाटील यांनी केला आहे. त्यामुळेच मराठी समीक्षेला आकृतीवादाच्या व सौंदर्यवादाच्या चर्चेच्या आवर्तातून बाहेर काढण्याचे श्रेय पाटील यांना दिले जाते.

– प्रा. मंगला गोखले

**संदर्भ :**

*१. पाटील गंगाधर; 'समीक्षेची नवी रूपे'; १९८१.*

## पाटील, गणेश हरी

**कवी**

**१९ ऑगस्ट १९०६ – १ जुलै १९८९**

रसिकांच्या दीर्घकाळ स्मरणात राहिलेल्या 'रानजाई' काव्यसंग्रहाचे कवी गणेश हरी पाटील यांचे जन्मगाव

प



जुन्नर तालुक्यातील पिंपळवाडी आहे. पुणे येथील न्यू इंग्लिश स्कूलमध्ये शालेय शिक्षण, त्यानंतर महाविद्यालयीन शिक्षण घेऊन बी.ए. पदवी धारण केलेले पाटील मुंबईच्या एल्फिन्स्टन महाविद्यालयामधून बी.टी. झाले. शिवाजी मराठा हायस्कूलमध्ये नोकरी केल्यानंतर ते जळगाव, धुळे, बोर्डी, पुणे येथील ट्रेनिंग कॉलेज फॉर मेन ह्या संस्थेचे प्राचार्य होते. काही काळ शिक्षण अधिकारी पद भूषविल्यानंतर १९६२ साली ते निवृत्त झाले. अनेक शैक्षणिक समित्यांवर त्यांना नियुक्त केले होते. पाठ्यपुस्तकातून समाविष्ट झालेल्या त्यांच्या बालकविता गेल्या तीन पिढ्यांना मुखोद्‌गत होत्या. पाटील यांच्या सर्वच कविता वृत्तबद्ध आहेत.

'रानजाई'तल्या कविता शांताबाई शेळके यांना खूप आवडल्या, कारण त्यांतल्या अनेक कवितांमध्ये पाटलांनी रंगवलेला निसर्ग हा माझ्या भोवतालचा, माझ्या ओळखीचा होता. ती सोनावळीची फुले, ती खुळखुळे वाजवणारी तरवड बाळे..... या साऱ्याची पाटलांनी आपल्या कवितेतून रेखाटलेली शब्दचित्रे पाहून मी मुग्ध होऊन गेले. या शब्दांत दाद देऊन त्या स्पष्ट करतात की, त्यांच्या 'कवितेमधून हा निसर्ग जेव्हा मला भेटला, तेव्हा त्याचे साधे रूप किती वेधक आहे; हे मनाला खोलपणे उमगले. इतकेच नव्हे, तर आपलीच एक नवी ओळख स्वतःला पटावी तसे काहीसे मला वाटले. पाटलांच्या कवितेशी शांताबाईंचे जिव्हाळ्याचे नाते जडले कारण दोघांचे गाव एकच.

रविकिरण मंडळाच्या कवींचा व तांबे यांच्या काव्याचाही दाट प्रभाव पाटलांवर पडला असून निखळ प्रांजलपणा हे पाटलांच्या कवितेचे ठळक वैशिष्ट्य आहे. प्रांजळपणाच्या जोडीला तिच्यात सहजता, अकृत्रिमता व सहजसुंदर बालभाव आहे. आपल्या अनुभवविश्वाशी इमान राखल्यामुळे ही गुणसंपदा तिला लाभलेली आहे. कृत्रिम, संकरभाषेचा वापर न करताही जानपद भाव व्यक्त करता येतो, हे पाटलांनी दाखवून दिले.

पाटलांच्या कवितेत साहित्य हेच एकमेव प्रयोजन जाणवते. त्यात कसलाही आव व उमाळा नाही. 'रानजाई' हा त्यांच्या कवितेचा अत्यंत समर्पक प्रतीक ठरतो.

पाटील यांची जानपदगीते अथवा भलरी गीतेही लोकप्रिय झाली होती. 'नागरभाषा न वापरता केलेले प्रत्ययकारी चित्रण, हे त्यांच्या कवितेचे वैशिष्ट्य. त्यामुळे समकालीन कवींमध्ये त्यांची कविता उठून दिसली', असा त्यांच्या कन्या मंदा खांडगे यांचा अभिप्राय आहे. पाटील यांच्या 'गस्तवाल्याच्या गीतां'भोवती एक अद्‌भुततेचे वलय आहे. मराठीत अशा प्रकारची कविता फार थोड्या कवींनी रचली आहे. रसाळ आणि प्रासादिक असे शे-सव्वाशे अभंगही त्यांनी रचले. 'पाखरांची शाळा' (१९६०) या संग्रहात अवीट गोडीच्या बालकविता आहेत. त्यांतील निवडक बालगीतांची ध्वनिफितही प्रकाशित झाली आहे.

'रानजाई'ला महाराष्ट्र ग्रंथोत्तेजक सभा पुरस्कार, 'लिंबोळ्या' ला (१९६१) राज्य सरकार तर 'पाखरांच्या शाळेला' राज्य सरकार व केंद्र सरकार ह्यांचे पुरस्कार लाभले आहेत. १९८९ साली बालकुमार साहित्य संमेलनातर्फे पाटील यांचा गौरव करण्यात आला.

'पदविका शिक्षण व अध्ययन', 'एका कर्मवीराची कहाणी', 'आधुनिक शिक्षणशास्त्र', 'भाषेचा अभ्यास', 'वाङ्‌मय लेखन', 'नवीन सोपे मोडी वाचन' ही त्यांची इतर ग्रंथसंपदा आहे.

– वि. ग. जोशी

## पाटील, चंद्रकांत नागेश

**कवी, समीक्षक**

**३ सप्टेंबर १९४४**

चंद्रकांत नागेश पाटील यांचा जन्म आंबाजोगाई येथे झाला. शिक्षण औरंगाबाद येथे झाले. मराठवाडा विद्यापीठातून १९६५मध्ये वनस्पतिशास्त्रात एम.एस्सी.



प



पदवी प्राप्त केली. महाविद्यालयात व विद्यापीठात विज्ञान विषय शिकविणाऱ्या आणि वनस्पतिशास्त्र व जीवशास्त्र या विषयांवर इंग्रजी व मराठी भाषांतून पुस्तके लिहिणाऱ्या पाटील यांचा प्रथमपासून ओढा होता तो कवितेकडे.

१९६० नंतरच्या पिढीच्या महत्त्वाच्या कवींमध्ये आज पाटील यांचा समावेश केला जातो. बदलत्या वाङ्मयविश्वाची दखल घेऊन त्याचा मागोवा घेणारा व अनुवाद मार्गानेही मराठी वाङ्मयाची समृद्धी वाढविणारा हातभार चंद्रकांत पाटील यांनी दिला आहे.

'पुन्हा कविता' (१९६५) या १९६०नंतरच्या कवितेचे प्रातिनिधिक दर्शन घडविण्याचे व महत्त्वपूर्ण संकलनाचे संपादन व त्यांची विश्लेषक अभ्यासपूर्ण प्रस्तावना यांतून साठनंतरच्या कवितेविषयीचा त्यांचा वैशिष्ट्यपूर्ण दृष्टिकोन स्पष्टपणे दिसतो. कवितांचे संपादन करताना त्यांनी ना. धों. महानोर यांचे साहाय्य घेतले. याच प्रकारचे संपादन त्यांनी 'पुन्हा एकदा कविता' (१९८२) या संग्रहाच्या रूपाने प्रकाशित केले. 'निस्संदर्भ' (१९७३), 'इत्थंभूत' (१९९२), 'बायका आणि इतर कविता' (१९९३) या संग्रहांतील कवितांमुळे त्यांचे नाव रसिकांपुढे व समीक्षकांपुढे ठळकपणे आले.

पाटील यांच्या कवितेत परंपरावादी काव्यात दिसणारा हळवेपणा नाही. सामाजिक जाणिवेत व राजकीय वास्तवतेत ते नेमकेपणाने टीकाटिप्पणी शब्दांकित करतात. मानवी अस्तित्वाचा, सर्जनाचा त्यांचा शोध अथकपणे चालू असताना दिसतो. 'बायका आणि इतर कविता' या संग्रहात स्त्री-पुरुषांतील नातेसंबंधांचा त्यांनी धांडोळा घेतला आहे. स्त्रीमुक्ती कालखंडातल्या एकूणच कवितांमध्ये हा संग्रह त्यामुळे वैशिष्ट्यपूर्ण ठरला आहे.

एक चिकित्सक अनुवादक म्हणून पाटील यांचे योगदान लक्षणीय आहे. त्यांनी मराठी कवितेच्या हिंदी अनुवादाचे आणि हिंदीतल्या महत्त्वाच्या कवितांचे व नाटकांचे मराठीत अनुवाद करण्याचे काम केले आहे.

'रसगंधर्व' (नाटक १९७९), 'भूखंड तापू लागलाय' (कविता १९८३), 'सूरज के वंशधर' (मराठी दलित कवितेच्या हिंदी अनुवादाचे संपादन १९८२), 'मगध आणि नंतरच्या कविता' (१९९५), 'तमस' (कादंबरी १९८९), 'समकालीन हिंदी कविता' (१९७१), 'तरी एकाकीच' (कविता १९९३), तीन पंजाबी नाटके (१९९७), 'तिची स्वप्ने' (संपादन व अनुवाद १९९७), असे अत्यंत महत्त्वपूर्ण अनुवाद व संपादने त्यांनी केली आहेत.

अनुवाद हे नवसर्जन कसे होऊ शकते, याचा वस्तुपाठ त्यांच्या कृतीतून दिसतो. हिंदी भाषेवर असलेले त्यांचे विलक्षण प्रभुत्व त्यांच्या अनुवादातून प्रत्ययास येते. भालचंद्र नेमाडे लिखित 'तुकाराम'चा त्यांनी केलेला अनुवाद त्यादृष्टीने पाहण्यासारखा आहे.

'आणि म्हणूनच' (१९८८), 'विषयांतर' हे समीक्षात्मक लेखन तसेच 'चौकटीबाहेरचे चेहरे' (१९९०) हा व्यक्तिचित्रांचा संग्रह त्यांच्या बहुआयामी लेखनाचा प्रत्यय देतो.

– संपादक मंडळ

**संदर्भ :**

१. *नेमाडे, भालचंद्र; 'चंद्रकांत पाटील'; ललित, एप्रिल १९७६.*

२. *वैद्य दासू; 'कवितेतून आत्मचरित्र नाही तर स्वतःशी होणारा संघर्ष मांडतो; अक्षर प्रतिष्ठा – दिवाळी अंक १९९९.*

## पाटील, पुरुषोत्तम श्रीपती

**कवी व संपादक**

**३ मार्च १९२८**

पुरुषोत्तम पाटील यांचे मूळ गाव ढेकू (ता. अमळनेर, जिल्हा जळगाव). त्यांचा जन्म जळगाव जिल्ह्यातील बहादरपूर (ता. पारोळा) या मामाच्या गावी झाला. त्यांचे वडील प्राथमिक शिक्षक होते. मराठी सातवीपर्यंतचे त्यांचे शिक्षण बहादरपूरला झाले. त्यानंतर अमळनेरच्या प्रताप

प



हायस्कूलमधून १९४६ साली मॅट्रिकची त्यानंतर प्रताप महाविद्यालयातून १९४९ साली इंटरची परीक्षा ते उत्तीर्ण झाले. याच काळात ते कविता लिहू लागले. इंटरनंतर पुढील शिक्षणासाठी ते पुण्याला गेले. फर्गसन महाविद्यालयात प्रवेश घेतला. त्या काळच्या पुण्यातील समृद्ध वाङ्मयीन पर्यावरणामुळे त्यांच्या काव्यलेखनाला अनुकूल वातावरण लाभले. त्यांच्या कविता 'सत्यकथे'तून प्रकाशित होऊ लागल्या.

फर्गसनमधील 'साहित्य सहकार' या वाङ्मयीन मंडळाचे चिटणीस म्हणून काम करताना वाङ्मयीन चर्चा-चिकित्सा करण्याची सवय त्यांना लागली. एक नवोदित कवी म्हणून त्यांची ओळख निर्माण होऊ लागली. परंतु कवितेत रमल्यामुळे शैक्षणिक अपयश त्यांच्या पदरी आले. त्यातून स्वतःला सावरण्यासाठी कवी बा.भ.बोरकर यांचा आधार त्यांना लाभला. १९४८-१९५२ या काळात बोरकरांचे लेखनिक व सचिव म्हणून काम करतानाचा काळ त्यांच्या वाङ्मयीन जडणघडणीच्या बाबतीत महत्त्वाचा ठरला.

१९५३ साली मुंबईला 'दैनिक नवशक्ती'मध्ये संपादक प्रभाकर पाध्ये यांच्या हाताखाली उपसंपादक म्हणून काम करण्याची संधी, पाटील यांना मिळाली. परंतु दैनिकाच्या रूक्ष व साचेबंद कामात त्यांचे मन फारसे रमले नाही. 'नवशक्ती'मधील नोकरी त्यांनी सोडली आणि बहादरपूरच्या रा.का.मिश्र विद्यालयात उपशिक्षकाची नोकरी पत्करली. दरम्यानच्या काळात ते बी.ए. (१९५४) झाले. शिक्षकाची नोकरी टिकवायची म्हणून बी.टी.ची. पदवी मिळवणे क्रमप्राप्त होते, म्हणून त्यांनी कोल्हापूरच्या एम.ए.टिचर्स ट्रेनिंग कॉलेजमध्ये प्रवेश घेऊन १९५५ साली बी.टी.ची पदवी प्राप्त केली. १९५८ साली पुणे विद्यापीठातून ते एम.ए. झाले. त्यानंतर जळगाव जिल्ह्यातील चिंचोली, हातेड येथील विद्यालयांमध्ये मुख्याध्यापक म्हणून त्यांनी काम (१९५९-१९६१) केले. १९६१ साली धुळे येथील श्रीशिवाजी विद्याप्रसारक संस्थेच्या महाविद्यालयात मराठी विषयाच्या प्राध्यापकाची नोकरी त्यांना मिळाली आणि त्याच महाविद्यालयातून मराठी विभागप्रमुख म्हणून ते १९८८ साली निवृत्त झाले. मधल्या १९७४-१९७६ या काळात दोंडाईचा (जि. धुळे) येथील नवीन महाविद्यालयाचे प्राचार्यपददेखील त्यांनी संभाळले.

**सौंदर्यवादी काव्यलेखन**

१९४७ पासून काव्यलेखन करणाऱ्या पाटील यांचा पहिला कवितासंग्रह 'तळ्यातल्या साउल्या' १९७८ मध्ये प्रकाशित झाला. त्यानंतर 'परिदान' हा दुसरा कवितासंग्रह १९९८ साली प्रकाशित झाला. या दोन्ही कवितासंग्रहांमधील कवितांतून प्रामुख्याने दोन मनांतील नाजूक भावबंधांचा अत्यंत हळुवार आविष्कार जाणवतो. संयत खानदानी प्रेमभावनेचा ग्रामीण पातळीवरील आविष्कार, स्त्री-पुरुषांतील प्रौढ आणि संयमी अशा अर्थपूर्ण नात्याचा शोध ही या कवितेची प्रमुख वैशिष्ट्ये आहेत. शब्द, भावना यांचा मितव्यय, शब्दांची चोखंदळ निवड, स्वतः शब्द घडविणे अशी मराठी कवितेची सौंदर्यवादी परंपरा समृद्ध करणारी ही कविता आहे.

कवितेसोबतच संपादनाच्या क्षेत्रातही त्यांचे कर्तृत्व लक्षणीय आहे. 'अनुष्टुभ' (प्रारंभ १९७७) या वाङ्मयीन नियतकालिकाचे संपादक म्हणून त्यांनी १९७८ ते १९८३ अशी साडेपाच वर्षे काम केले. कविता या वाङ्मयप्रकारासाठी एक स्वतंत्र नियतकालिक असावे, असा विचार करून 'कविता-रती' (प्रारंभ १९८५) हे द्वैमासिक त्यांनी सुरू केले. ते आजतागायत सुरू आहे.

पाटील यांनी दैनिक लोकमत, देशदूत, केसरी यांतून साहित्यिक व सामाजिक विषयांवर उल्लेखनीय सदरलेखनही केलेले आहे. समकालीन घटना-घडामोडी यांवर ओघवत्या शैलीत मर्मभेदक भाष्य करणारे 'तुकारामाची काठी' आणि निवडक मराठी कवितांचे मर्म

उलगडून दाखविणारे 'अमृताच्या ओळी' ही त्यांची दोन पुस्तके अशा सदरलेखनातून तयार झालेली आहेत.

त्यांच्या 'तळ्यातल्या साउल्या' या कवितासंग्रहाला महाराष्ट्र शासनाचा 'केशवसुत पुरस्कार' आणि 'परिदान' या संग्रहाला शासनाचाच 'बालकवी पुरस्कार' असे सन्मान प्राप्त झाले. साहित्य अकादमीचे मराठी सल्लागार मंडळ, अखिल भारतीय मराठी साहित्य महामंडळ आणि महाराष्ट्र राज्य साहित्य व संस्कृती मंडळ यांचे ते सदस्य होते. १९८५ साली प्रजासत्ताक दिनी अखिल भारतीय बहुभाषिक कविसंमेलनात त्यांनी महाराष्ट्राचे प्रतिनिधित्व केले. महाराष्ट्र राज्य साहित्य व संस्कृती मंडळाने सन २००३ मध्ये गौरववृत्ती देऊन त्यांचा सन्मान केला.

– आशुतोष पाटील

## पाटील, मधुकर सुदामा

**समीक्षक**

**१९ जुलै १९३१**



पाटील मधुकर सुदामा यांचा जन्म रायगड जिल्ह्यातील धामणपाडा (शहाबाज) या गावी अभावग्रस्त कुटुंबात झाला. आई लक्ष्मीबाई आणि वडील सुदामा नागू पाटील. प्राथमिक व माध्यमिक शिक्षण गावी झाले. अकरावीच्या वर्गात रात्रशाळेतून पहिला येण्याचा मान मिळाला. मुंबई विद्यापीठातून मराठी–संस्कृत पदवी शिक्षण आणि ह्याच विषयात पदव्युत्तर शिक्षणात १९६१ मध्ये मुंबई विद्यापीठातून प्रथम श्रेणीत प्रथम आले. १९४६ पासून १९५१ पर्यंत मुंबईच्या हिंद मिल्समध्ये नंबर मार्कर तर १९५१ पासून १९५९ पर्यंत मुंबईच्या विक्रिकर विभागात कारकून म्हणून काम केले. १९५९ पासून १९६१ पर्यंत के.एम.एस.परेल हायस्कुलात शिक्षक म्हणून तर मालेगावच्या एम.एस.जी. कॉलेजमध्ये १९६१ पासून १९६९ पर्यंत प्राध्यापक व विभाग प्रमुख म्हणून नोकरी केली. पुढे १९६९ पासून १९८९ पर्यंत मनमाडच्या कला व वाणिज्य महाविद्यालयात प्राचार्यपदाची धुरा सांभाळली. नंबर मार्कर – कारकून – शिक्षक – प्राध्यापक – प्राचार्य म्हणून कार्यरत असताना शिक्षण आणि लेखन ह्या दोन्ही गोष्टींत पाटील यांनी प्रगती केली.

पाटील यांनी १९६९ पासून आजतागायत समीक्षा–लेखन करून मराठी समीक्षेच्या दिशा उजळ केल्या. नव्या पिढीतील समीक्षकांसमोर समीक्षेचा वस्तुपाठ त्यांनी परिश्रमपूर्वक उभा केला. समीक्षासुद्धा समीक्षकाच्या अस्तित्वाशी एकजीव होणारी आणि सर्जनशील अशी प्रक्रिया असल्याचे उदाहरण त्यांनी आपल्या मूल्यनिष्ठ समीक्षा–लेखनातून मराठी भाषेला आणि संस्कृतीला दिले. संतपरंपरेचा अभ्यास करून ज्ञानदेव–तुकाराम यांच्या संदर्भात सिद्ध केलेल्या 'कविमन: स्वरूप व शोध' या विषयावरील शोधप्रबंधासाठी पुणे विद्यापीठाने १९७८ मध्ये आचार्य पदवी प्रदान केली. १९७८–१९७९ या वर्षांतील मराठीतील सर्वोत्कृष्ट प्रबंध म्हणून यशवंत विठ्ठल परांजपे हा पुरस्कार पाटील यांना मिळाला.

भारतीय साहित्यशास्त्र आणि पाश्चात्त्य साहित्यशास्त्र यांच्या अभ्यासांतून त्यांनी ज्ञानेश्वर ते तुकाराम यांचा अंतर्लक्ष्यी काव्याभ्यास केला. एकूणच संतकाव्याचे पुनर्वाचन, अर्थनिर्णयन आणि पुनर्मांडणी करणारा शोधाभ्यास; पाटील यांनी 'ज्ञानेश्वरीचा तृष्णाबंध', 'तुकाराम: अंतर्बाह्य संघर्षाची अनुभवरूपे', 'ज्ञानेश्वरीचा काव्यबंध' या मौलिक समीक्षाग्रंथांतून मांडला. याच अभ्यासाचे फलस्वरूप म्हणून त्यांनी संत कविमनाचा शोध घेत, आदिबंधात्मक तृष्णाबंधाचा नवीन समीक्षा मूल्यविचार मांडला. त्यांच्या समीक्षा शैलीचा तो मूळ स्वभाव म्हणून पाहता येतो.

मराठी भाषेचा आणि संस्कृतीचा अचूक वेध घेणाऱ्या अनुष्टुभ या द्वैमासिकाचा जन्म जुलै १९७७ साली मनमाड येथील पाटील यांच्या घरूनच झाला. जुलै १९९५ पासून १९९७ डिसेंबरपर्यंत अनुष्टुभचे संपादन आणि २००६ पर्यंत अनुष्टुभची धुरा सांभाळली. शहाबाजपासून मनमाडपर्यंत १९६२ ते २००३ ह्या काळात सार्वजनिक

प

वाचनालय व ग्रंथालय चळवळ चालवून वाचन संस्कृतीच्या विकासात मोलाचे योगदान दिले.

१९६९ पासून ते आजतागायत प्रतिष्ठान, सत्यकथा, अस्मितादर्श, कवितारती, अनुष्टुभ, नवभारत, आलोचना, मराठी संशोधन पत्रिका, अभिधा, स्रग्धरा, अक्षरवैदर्भी, झपूर्झा आदी मान्यवर नियतकालिकांतून मराठी समीक्षेला नवे परिमाण देणारे सकस समीक्षा-लेखन केले. अनेक चर्चासत्रांतून आणि साहित्य संमेलनांतून आपल्या सर्जनशील समीक्षा-विचारांवर भाष्य केले. महाराष्ट्र राज्य साहित्य संस्कृती मंडळाच्या 'समीक्षा संज्ञा कोशा'त समीक्षा नोंदी लिहिल्या.

पाटील यांनी आजतागायत मराठी भाषेचा आणि संस्कृतीच्या संवर्धनासाठी मराठी समीक्षेला वैविध्यपूर्ण आणि नवनवोन्मेषशाली आयाम देत जवळपास चौदा समीक्षा-ग्रंथ सिद्ध केले. 'दलित कविता' (१९८१), 'अक्षरवाटा' (१९८२), 'बालकवींचे काव्यविश्व' (१९८९), 'सदानंद रेगे यांचे काव्यविश्व' (१९८९), 'आदिबंधात्मक समीक्षा' (१९८९), 'भारतीयांचा साहित्यविचार' (१९९०), 'कवितेचा रूपशोध' (१९९९), 'साहित्याचे सामाजिक व सांस्कृतिक अनुबंध' (२००१), 'इंदिरा यांचे काव्यविश्व' (२००१), 'प्रभाकर पाध्ये: वाङ्मयदर्शन' (१९९३) ही त्यांची महत्त्वाची पुस्तके आहेत. पाटील यांची ही समीक्षा-संपदा म्हणजे संत-कविता ते आधुनिक कविता तसेच साहित्य विचारांचा साक्षेपी आंतरशोधातून घेतलेल्या समीक्षामूल्यांचा नवशोध आहे.

ज्ञानदेव ते तुकाराम यांच्या काव्यविश्वातील अनुभवरूपांचा शोध घेताना त्यांच्या हाती लागलेले आदिबंधात्मक तृष्णाबंधाचे नवनीत म्हणजे मराठी समीक्षेची श्रीमंती होय. आदिबंधाचे अनुबंध आणि ज्ञानदेव-तुकाराम यांच्या काव्यविश्वाचा तृष्णाबंधातून घेतलेला अंतर्शोध आणि त्यातून केलेली संत कवितेची आदिबंधात्मक मांडणी आणि तृष्णाबंधांचा उलगडा म्हणजे देशीय मराठी समीक्षेची पाटील यांनी जणू पायाभरणीच केली आहे.

महाराष्ट्र फाउंडेशनचा पुरस्कार, भैरू रतन दमाणी पुरस्कार, शासनाचा श्री. के. क्षीरसागर पुरस्कार, मराठी साहित्य परिषदेचा ह.श्री.शेणोलीकर पुरस्कार, मुंबई मराठी साहित्य संघाचा ज्येष्ठ समीक्षक पुरस्कार आदी मान्यवर पुरस्कारांनी त्यांची समीक्षा-संपदा गौरवान्वित झालेली आहे. त्यांनी मराठी समीक्षेला तृष्णाबंधात्मक आणि आदिबंधात्मक समीक्षेची नवी दृष्टी दिली. मराठी समीक्षेला मूल्यनिष्ठांचे अधिष्ठान दिले.

मराठी भाषेला आणि संस्कृतीला देशीय काव्य-समीक्षेची द्रष्टादृष्टी पाटील यांनी दिलेली आहे. 'तुकाराम: अंतर्बाह्य संघर्षाची अनुभवरूपे' या संत तुकारामांच्या मूलभूत काव्य समीक्ष-ग्रंथाच्या प्रस्तावनेत डॉ.रमेश वरखेडे म्हणतात, 'भोक्ते मन स्रष्टे झाले की काव्य जन्माला येते, आणि स्रष्टे मन द्रष्टे झाले की पर्यायी सृष्टिचित्र (युटोपिया) रेखाटले जाते. कविमनाचे उत्क्रमण कसे होत जाते, याची प्रक्रिया मांडताना एक आदर्श संस्कृतिचित्र कसे पुढे येते, याचे विहंगम दर्शन घडविणारी ही संस्कृति-समीक्षा मराठीत समीक्षेची वाट प्रशस्त करणारी द्रष्टी समीक्षा आहे.'

– डॉ. किशोर सानप

**संदर्भ :**

*१. पाटील म. सु.; 'तुकाराम: अंतर्बाह्य संघर्षाची अनुभवरूपे; शाब्दल प्रकाशन, मुंबई; २००४.*

## पाटील, वसुधा पद्माकर

**कथाकार, कादंबरीकार**

**१५ डिसेंबर १९३०**

वसुधा पद्माकर पाटील यांचा जन्म मुंबईत झाला. (प्राथमिक चौथीपर्यंतचे शिक्षण म्युनिसिपल शाळेत व माध्यमिक इयत्ता तिसरीपर्यंतचे शिक्षण गोरेगावच्या अ.भि.गोरेगावकर हायस्कुलात तर चौथीपासून सातवीपर्यंतचे (आत्ताची आठवी ते दहावी) शिक्षण पार्ले येथे पार्ले टिळक विद्यालयात झाले. मॅट्रिकला त्या शाळेत पहिल्या आल्या होत्या. मुंबईच्या नाथीबाई दामोदर ठाकरसी विद्यापीठातून एम.ए., बी.एड. झाल्या. बी.ए.ला

पाटील, विश्वास

प



त्यांचे विषय इतिहास व मराठी तर एम.ए. बी.एडसाठी पेंटिंग हा विषय घेतला होता. जे.जे.स्कूल ऑफ आर्ट्सर्समधून त्यांनी आर्ट मास्टर ही पदवी संपादन केली. त्यांच्या कुटुंबात बहुतेक सर्व जण चित्रकलेत कुशल होते. वडिलांना वाचनाचा खूप छंद होता त्या वेळची सर्व प्रसिद्ध मराठी मासिके ते विकत घेत. घरी नियमाने रोज एक तास सार्वजनिक वाचन होई. मुलांसाठी ते गोष्टींची व पौराणिक पुस्तकेही खरेदी करीत. त्या वेळी गोरेगावला जंगलच असल्यामुळे वृक्षवेली व वनचरे ही वसुधाताईंची सोयरीच होती. वसुधाताईंच्या वयाच्या आठव्या वर्षी (१९३८) वडिलांचे निधन झाले आणि त्या बारा वर्षांच्या (१९४२) असताना आईचे निधन झाले. घरची बरीच कामे त्यांच्यावर पडली, तरी त्यांनी चिकाटीने शिक्षण पूर्ण केले.

१९४८ साली मॅट्रिक होताच त्या. अ.भि.गोरेगावकर हायस्कूलमध्ये शिक्षिका झाल्या व १९८१ साली प्रकृती अस्वास्थ्यामुळे निवृत्त झाल्या. नोकरी करीत असताना त्यांनी महाविद्यालयीन शिक्षण घेतले. विपुल वाचनातून त्यांना लेखनाची प्रेरणा मिळत राहिली व त्यांची पहिली कथा ‘वसुधा’ (१९५६) मासिकात तर पहिली एकांकिका १९६६च्या सुमारास ‘सत्यकथा’ मासिकात प्रसिद्ध झाली. आत्तापर्यंत त्यांचे ३० कथासंग्रह, ३ कादंबऱ्या, ४ एकांकिका संग्रह, १ ललित-लेखन असे साहित्य संग्रह प्रसिद्ध झाले असून १ नाटक, १ कवितासंग्रह, २ नाट्यछटासंग्रह व २ कथासंग्रह हे ही साहित्य प्रकाशित झाले आहे. मराठी दूरदर्शनवर एक तासाची पहिली रंगीत कथा लिहिण्याचा मान वसुधाताईंना मिळाला आहे. युद्धभूमी विषयावर आधारित त्यांच्या एकांकिकेला बक्षीस मिळाले होते व श्री.वि.द घाटे यांनी त्यांचे कौतुकही केले होते. साचेबंद, ठरावीक नसणाऱ्या विषयांची नाट्यमय मांडणी, पकड घेणारे संवाद व उत्कृष्ट वातावरणनिर्मिती ही त्यांच्या एकांकिका-लेखनाची वैशिष्ट्ये होत. ‘सरहद्द’, ‘उत्खनन’ या एकांकिका व ‘वृद्धाश्रम’ हे नाटक रंगभूमीवर गाजले. कौटुंबिक व सामान्यतः हाताळल्या जाणाऱ्या विषयांच्या पलीकडे जाऊन जीवनाच्या विविधांगी समस्यांचा भावस्पर्शी वेध घेणारी लेखिका म्हणून वसुधाताई यांनी मराठी साहित्यात आपले स्वत:चे स्थान निर्माण केले आहे. नाटक व एकांकिका या साहित्यप्रकारांत स्त्रियांनी विशेष लेखन केले नसल्याने या क्षेत्रात स्वतःचे स्थान निर्माण करणारी लेखिका म्हणून वसुधाताईंना मान मिळतो.

वसुधाताईंच्या ‘जमुना के तीर’ (१९६८), ‘वंशाचा दिवा’ (१९८६) आणि ‘वेगळी’ या तीन कथासंग्रहांना तसेच ‘पक्षितीर्थ’, ‘दीपगृह’, ‘समुद्रपक्षी’ या एकांकिका संग्रहांना महाराष्ट्र शासनाचे उत्कृष्ट साहित्य निर्मितीचे पुरस्कार लाभले आहेत.

वसुधाताई यांच्या विपुल लेखनात ‘मालवून टाक दीप’, ‘निस्सार’, ‘अगतिक’ या कादंबऱ्या; ‘सारीपाट’, ‘भेट’, ‘अश्रद्धा’, ‘उडालेले रंग’, ‘पुरुष’, ‘सनई’, ‘हाडवैरी’, ‘शर्वरी’, ‘आक्की’, ‘अमृता’, ‘पंथ’, ‘नामर्द’ हे कथासंग्रह; ‘महाभारत’, ‘पियानो व इतर एकांकिका’ इत्यादींचा समावेश आहे.

– संपादक मंडळ



## पाटील, विश्वास महिपती

**कथाकार, कादंबरीकार**

**२८ नोव्हेंबर १९५९**

विश्वास महिपती पाटील यांचा जन्म कोल्हापूर जिल्ह्यातील नेर्ले ह्या छोट्या खेड्यात झाला. त्यांचे आई-वडील नेर्ल्याला शेती करीत. वडील शेतकरी कामगार पक्षाचे कार्यकर्ते होते व क्रांतिसिंह नाना पाटलांशी त्यांचा चांगला परिचय होता. नेर्ले येथे जिल्हा परिषदेच्या प्राथमिक शाळेत शिक्षण घेतल्यावर विश्वास पाटलांनी दहावीपर्यंतचे शिक्षण सांगली जिल्ह्यातील कोकरूड या गावी झाले. लहानपणापासूनच त्यांना वाचनाची आवड होती. खांडेकर, अत्रे, कुसुमाग्रज हे त्यांचे आवडते लेखक होते. इतिहासात



त्यांना विशेष रुची होती. ग्रामसंस्कृतीचे सूक्ष्म निरीक्षण, तमाशासारख्या लोककलेचा बालपणी झालेला परिचय आणि संवेदनशीलता व निर्मितीक्षमता ह्यांची देणगी ह्यांमुळे दहावीत असतानाच विश्वास पाटलांनी कथा-लेखनाला सुरुवात केली. त्याच वेळी 'तरुण भारत'च्या वासंतिक अंकातील त्यांच्या 'कायदा' ह्या कथेला पारितोषिक मिळाले. कोल्हापूरच्या न्यू कॉलेजमधून बारावीपासून बी.ए.पर्यंतचे शिक्षण पूर्ण झाल्यावर पाटील १९८२ साली शिवाजी विद्यापीठातून इंग्रजी विषय घेऊन एम.ए. झाले. १९८६ साली एलएल.बी. झाले. १९८३ पासून महाराष्ट्र शासनाच्या सेवेत उपजिल्हाधिकारी म्हणून त्यांनी नोकरीस प्रारंभ केला. पुढे आय.ए.एस श्रेणीत त्यांना बढती मिळाली. महाराष्ट्र शासनाने नंतर मुंबईच्या गोरेगाव येथील चित्रनगरीचे साहाय्यक उपमहाव्यवस्थापक म्हणून पाटलांची नेमणूक केली. रायगड जिल्ह्याचे मुख्य प्रशासकीय अधिकारी म्हणून कार्यरत असताना विश्वास पाटलांनी मलनिस्सारण मोहीम यशस्वीपणे राबवली. सध्या विश्वास पाटील मुंबईचे (उपनगर) जिल्हाधिकारी म्हणून काम करीत आहेत.

शिक्षण घेत असताना पाटलांनी कथा-लेखन केले. 'मराठा', 'बिल्वदल' आदी नियतकालिकांत त्यांनी कथा लिहिल्या. १९८० साली त्यांचा 'कलाल चौक' हा पहिला कथासंग्रह प्रकाशित झाला. 'क्रांतिसूर्य' (१९८४), 'अंबी' (२००४) ह्या कादंबऱ्या प्रसिद्ध झाल्यावर पाटलांना कादंबरीकार म्हणून आपल्या लेखनाची नस सापडली. ऐतिहासिक, सामाजिक, ग्रामीण, राजकीय अशा विविध विषयांवर त्यांनी परिश्रमपूर्वक कसदार आणि वैशिष्ट्यपूर्ण कादंबरीलेखन केले. त्यांच्या एकूण साहित्यकृती आहेत- 'पानिपत' (१९८८), 'पांगिरा' (१९९०), 'झाडाझडती' (१९९१), 'महानायक' (१९९८), 'चंद्रमुखी' (२००४), 'संभाजी' (२००५) या आहेत. याशिवाय 'पानिपत' कादंबरीच्या कथावस्तूवर आधारित 'रणांगण' (२०००) हे नाटक लिहिले. 'नॉट गॉन विथ द विंड' (२००८) हे मराठी-इंग्रजी-हिंदी चित्रपटांवरील आस्वादक समीक्षा-लेखांचे पुस्तकही प्रसिद्ध झाले आहे.

पेशव्यांचे राजकारण आणि पानिपतच्या युद्धाची पार्श्वभूमी असलेल्या पानिपत कादंबरीने पाटलांना महाराष्ट्रात प्रचंड लोकप्रियता मिळवून दिली. १७६१ साली मराठे आणि अफगाण यांच्यामध्ये झालेल्या युद्धात एक लाख मराठे धारातीर्थी पडले. भाऊसाहेब, विश्वासराव, नजिबखान रोहिला, अहमदशहा अब्दाली, दत्ताजी शिंदे आणि मल्हारराव होळकर ह्या मराठे सरदारांची ठसठशीत व्यक्तिचित्रे, नाट्यपूर्ण प्रसंगांची निर्मिती आणि प्रवाही भाषा ही 'पानिपत'ची ठळक लेखनवैशिष्ट्ये आहेत.

'पांगिरा' आणि 'झाडाझडती' ह्या दोन कादंबऱ्यांचे विषय महाराष्ट्राच्या ग्रामीण जीवनाशी निगडित आहेत. प्रेमचंदांच्या 'गोदान' कादंबरीशी तुलना करण्यात आलेल्या 'पांगिरा'मध्ये पाटलांनी बदलत्या राजकीय परिस्थितीचे, औद्योगिकीकरणाच्या प्रभावाचे, पंचायत राज्यातील ग्रामव्यवस्थेचे प्रत्ययकारी चित्रण केले आहे. महाराष्ट्रातील सहकारी सोसायट्यांचा खेड्यांतील उद्योग-व्यवसायांवर, कृषिसंस्कृतीवर कसा विपरीत परिणाम होतो, याचे दर्शन घडणाऱ्या 'पांगिरा'ची तुलना फणीश्वरनाथ रेणू यांच्या 'मैला आँचल' ह्या गाजलेल्या कादंबरीशीही केली जाते. 'झाडाझडती' ही धरणग्रस्तांच्या विपन्नावस्थेचे, त्यांच्या हलाखीचे नि वेदनेचे चित्रण करणारी कादंबरी आहे. महाराष्ट्र शासनातर्फे अधिकारी म्हणून धरणग्रस्तांच्या पुनर्वसनाचे काम करीत असता पाटलांना 'झाडाझडती'चा विषय सापडला. 'धरण म्हणजे मरण' ह्या शब्दांत धरणग्रस्तांच्या हालअपेष्टांचे वर्णन करणारे पाटील धरणग्रस्तांमध्ये राहिले. एका संवेदनशील प्रशासकीय अधिकाऱ्याने शब्दांकित केलेल्या 'झाडाझडती'ला साहित्य अकादमीचा पुरस्कार मिळाला. समग्र भारतीय कादंबऱ्यांत 'झाडाझडती' ही श्रेष्ठ दर्जाची कादंबरी म्हणून उल्लेखिली जाते.

'महानायक' ही १९९८ साली प्रसिद्ध झालेली कादंबरी नेताजी सुभाषचंद्र बोस यांच्या नाट्यमय आणि संघर्षपूर्ण जीवनावर आधारलेली कादंबरी आहे. महात्मा गांधी, नेताजी सुभाषचंद्र बोस आणि पंडित जवाहरलाल नेहरू यांचे परस्पर संबंध, त्या वेळेची राष्ट्रीय व आंतरराष्ट्रीय परिस्थिती, भारतीय स्वातंत्र्य लढा, आझाद हिंद सेनेतील नेताजींच्या सहकाऱ्यांनी केलेला त्याग, तत्कालीन वास्तवाला असलेले विविध आयाम, सुभाषबाबूंची मानसिक, भावनिक आणि वैचारिक आंदोलने, त्यांचा दारुण अन्त आदींचे तपशीलवार कथन ही 'महानायक' कादंबरीची ठळक वैशिष्ट्ये आहेत. १४ भारतीय भाषांत अनुवादित झालेल्या १००० पृष्ठांच्या या कादंबरीच्या निर्मितीसाठी पाटलांनी प्रचंड मेहनत घेतली आहे. शेकडो हस्तलिखितांचे व मराठी, हिंदी, बंगाली, इंग्रजी भाषांतील ग्रंथांचे वाचन; नेताजींच्या जपानमधील सहकाऱ्यांच्या मुलाखती; ब्रह्मदेश, जपान, जर्मनी, फ्रान्स, इटली, इंग्लंड, थायलंड येथील प्रवास ह्या सामग्रीच्या आधारे सिद्ध झालेल्या 'महानायक'चा गौरव बंगालीमधील श्रेष्ठ कादंबरीकार सुनील गंगोपाध्याय यांनी मुक्तकंठाने केला आहे.

शिवछत्रपतींचे पुत्र संभाजीराजे यांचे जीवन वादग्रस्त ठरले आहे. महाराष्ट्रातील अनेक इतिहास संशोधकांनी, बखरकारांनी आणि लेखक-नाटककारांनी संभाजीराजांच्या व्यक्तिमत्त्वाचा आपापल्यापरीने शोध घेण्याचा प्रयत्न केला आहे. त्यांच्यातील बऱ्याच जणांनी संभाजीराजांची व्यक्तिरेखा कल्पित, मलिन आणि विपर्यस्त बनवली असल्यामुळे अस्सल ऐतिहासिक पुराव्यांच्या आधारे संभाजीराजांच्या कार्यकर्तृत्वाला वस्तुनिष्ठपणे न्याय देण्याचा प्रयत्न पाटलांनी केला आहे. संभाजी राजांचा व्यसनीपणा, रंगेलपणा, त्यांच्या जीवनातील कलुषाचे स्थान, संभाजीराजांचा शोकान्त आणि त्यांची वीरवृत्ती यांसंबंधी तटस्थ भूमिकेतून अभ्यास करून पाटलांनी संभाजी-चरित्र वाचकांसमोर ठेवले आहे. त्यासाठी प्रमुख व दुय्यम व्यक्तिरेखांचे सूक्ष्म चित्रण रोमहर्षक, नाट्यपूर्ण प्रसंगांची व परिणामकारक वातावरणाची निर्मिती पाटलांनी केली आहे. संभाजीराजांच्या आयुष्यावर आजपर्यंत झालेल्या लेखनापेक्षा संभाजीराजांवरील ह्या कादंबरीचा वेगळेपणा मनावर निश्चितपणे उमटतो.

तमाशा आणि लोककला हे पाटलांच्या कुतूहलाचे आणि आवडीचे विषय आहेत. महाराष्ट्राचे प्रचलित राजकारण त्यांनी जवळून पाहिले आहे. त्यातून 'चंद्रमुखी' ही तमाशातील कलावतीच्या जीवनावरील कादंबरी आकारास आली. चंद्रमुखी, बॅरिस्टर दौलतराव देशमाने, सासवडकर, दमयंती, सुचेता पंडित (पंतप्रधान), बत्ताशा, लालन, बांगडी शेठ, नाखवा शेठ ह्या विविधधर्मी पात्रांची निर्मिती तमाशा व लावण्यांचे सादरीकरण नाट्यपूर्ण क्वचित चमत्कृतिपूर्ण घटनांची निर्मिती आणि स्वत: लेखकाने लिहिलेल्या लावण्यांचा समावेश यांमुळे 'चंद्रमुखी' ही लोककलाकारांच्या जीवनाची परवड आणि दैन्य चित्रित करणारी एक वाचनीय कादंबरी ठरली आहे.

पानिपत युद्धावरील प्रसंग ८०० पृष्ठांत शब्दांकित करणाऱ्या पाटलांनी 'रणांगण' या दोन अंकी नाटकाच्या माध्यमातून सादर करून आपले नाट्य-लेखन कौशल्य सिद्ध केले आहे. 'रणांगण'चा विषय ऐतिहासिक असला तरी पाटलांनी नाटकाच्या आधारे विद्यमान राजकीय वास्तवावर सूचक भाष्य केले आहे.

चित्रपट आणि इंग्रजी कादंबऱ्यांचा मागोवा घेणाऱ्या लेखांचे 'नॉट गॉन विथ द विंड' पाटील यांचे पुस्तक आहे. या पुस्तकात लेखकाचा इंग्रजी, हिंदी आणि मराठी चित्रपटविषयक व्यासंग दिसून येते. 'क्राईम ॲन्ड पनिशमेन्ट', 'गॉन विथ द विंड', 'ॲना कॅरोलिना', 'ऑथेल्लो', 'शिंडलर्स लिस्ट', 'द गुड अर्थ', 'ग्रेप्स ऑफ रॉथ', 'मुघल-ए-आझम', 'सामना' आदी गाजलेल्या चित्रपटांचा आस्वादक परिचय घडवून देणाऱ्या पाटलांनी मूळ साहित्यकृती कादंबरी वा नाटक यांचे चित्रपटात 'माध्यमांतर' कसे होते; याचे रसपूर्ण विवेचन ह्या पुस्तकातील लेखांत केले आहे.

ऐतिहासिक, राजकीय व ग्रामीण कोणताही विषय असो पाटील आपल्या व्युत्पन्नतेची आणि बहुश्रुतपणाची

प

जोड त्याला देतात. निरनिराळ्या विषयांची आव्हाने स्वीकारणाऱ्या पाटलांना निर्मितीबरोबरच कल्पकतेची साथ लाभली आहे. प्रशासन सेवेतील जबाबदारीचे काम करताना गेल्या पंचवीस वर्षांत कादंबरीसारख्या कथनात्मक वाङ्मय प्रकारात मौलिक भर घालणारे विश्वास पाटील मराठीतील आघाडीचे वाचकप्रिय लेखक आहेत. त्यांनी भारतीय पातळीवरही स्वत:चे स्थान निर्माण केले आहे.

– वि. शं. चौघुले

**संदर्भ :**

१. *कर्णिक प्रदीप; 'कोणाच्याही दावणीला बांधता न येणारा माणूस'; ललित-दिवाळी अंक १९९१.*

२. *मुकुंद शैला; 'विश्वास पाटील - पांगिरा ते रंगभूमी एक प्रवास'; माहेर-दिवाळी अंक २०००.*

## पाटोळे, अशोक वसंत

☞ **मुख्य नोंद – नाटक खंड**

## पाठक, यशवंत त्र्यंबक

**ललित लेखक**

**२६ नोव्हेंबर १९४८**



यशवंत त्र्यंबक पाठक यांचा जन्म पिंपळनेर, ता. साक्री, जि. धुळे येथे झाला. प्राथमिक शिक्षण ग्रामपंचायतीच्या शाळेत झाले. नाशिकच्या पेठे विद्यालयातून ते एस.एस्सी. (१९६४), हंसराज प्रागजी महाविद्यालयातून १९७० मध्ये एम.ए. झाले आणि 'मराठी कीर्तन परंपरा व मराठी वाङ्मय' या अनोख्या विषयावर अत्यंत परिश्रमपूर्वक प्रबंध लिहून पुणे विद्यापीठाची पीएच.डी, पदवी संपादन केली.

'अंगणातले आभाळ' या पाठक यांच्या आत्मकथात्म लेखनात घरातील कुळधर्म, कुळाचार व बाळबोध वातावरणापासून तो त्यांनी पीएच.डी. करण्यापर्यंतच्या वाटचालीचे यथार्थ वर्णन आहे. आंतरिक जिव्हाळ्यातून निर्मित सहजस्पर्शी लेखनातून लोककला व लोकसंस्कृती यांचे हृदय चित्रण झालेले आहे. त्यांचे कुटुंब एकत्र व मोठे होते. त्यांचे वडील त्र्यंबकराव (भाऊ) प्रख्यात कीर्तनकार होते, त्यामुळे ते फिरतीवर असत व मधूनमधून पिंपळनेरला, म्हणजे घरी मुक्काम करीत. ते जातिवंत स्वातंत्र्यसैनिक होते. त्यांनी प्रपंचाचा विचार केला नाही. देशाच्या स्वातंत्र्यासाठी त्यांनी कीर्तनकाराचा पेशा पत्करला. त्यासाठी संगीताचे व संस्कृत भाषेचे धडे घेतले. १९३० च्या जंगल सत्याग्रहासाठी धुळ्यातून त्यांनी पाच हजार तरुण नेले, तर १९४२ च्या चलेजाव चळवळीसाठी खानदेशातून अकरा हजार कार्यकर्ते तयार केले. त्यांच्या ओळखी दांडग्या होत्या. अशा कर्तबगार भाऊंची अत्यंत उत्कट इच्छा यशवंताने कीर्तनकारच व्हावे, अशी होती. भाऊ अतिशय तापट स्वभावाचे होते. यशवंताची आईदेखील कीर्तने करी, परंतु तिची इच्छा मुलाने उत्तम शिकावे व नोकरीस लागावे अशी होती. भाऊंनी मुलाला प्राथमिक शिक्षण मंदिरातून काढून पंचवटीच्या संस्कृत पाठशाळेत घातले. त्याचबरोबर संध्याकाळी तो गांधर्व संगीत विद्यालयात जाऊन तबला शिकू लागला. पाठक म्हणतात, ''माझ्या गोदाकाठच्या 'अंगणाने' मला भलतेच 'आभाळ' दाखवले.''

शाळेत व महाविद्यालयात यशवंत हे वक्तृत्व, निबंध व तबला ह्या स्पर्धांत नेहमी भाग घेत व बक्षिसे मिळवत. त्यांचे शिक्षण शिष्यवृत्तीवर झाले. शिक्षण शिक्षकांनी व हितचिंतकांनी शिक्षण शुल्क भरले. शिष्यवृत्तीच्या पैशातूनच त्यांनी सायकल घेतली, कारण घरी अठराविसे दारिद्र्यच होते. शाळेत व महाविद्यालयात शिकताना यशवंत (नाना) यांना भाऊंच्या कीर्तनात तबलावादन करावे लागे. आईची ओढाताण पाहून यशवंतांचे मन तीळतीळ तुटे. होईल तितकी पैशाची मदत तो आईला करी. किराणा दुकानात नोकरी केली, भिक्षुकी केली, सुट्टीच्या

दिवसांत किरकोळ कामे केली. यशवंतांचे पाठांतरही उत्तम होते. नाशिकला तात्यासाहेब शिरवाडकरांकडे नामवंत साहित्यिक येत. त्यांचा सहवास यशवंतांना मिळे. 'तात्यांचा फार सहवास घडला. त्याचा परिणाम माझ्यावर असा झाला की, अडचणींवर ठामपणे उभे राहण्याइतका आत्मविश्वास माझ्यात निर्माण झाला. तात्यांचे माझ्या अभ्यासावर, बाकीच्या विविध सांस्कृतिक कार्यावर फार बारीक लक्ष होते. काही वेळा काही पुस्तके ते माझ्यासाठी राखून ठेवीत. तात्यांकडे गेले की परतताना नवा जन्म घेतल्यासारखं वाटे.' असे यशवंत पाठक यांनी तात्यासाहेब शिरवाडकरांबद्दल म्हटले आहे.

भाऊ मुंबईला कीर्तनासाठी जात. एकदा ते यशवंतांना श्री. रा. टिकेकर यांच्या घरी घेऊन गेले. टिकेकरांनी भाऊंना सांगितले, 'तुम्ही त्याला सक्तीने ढकलू नका. त्याचं त्याला ठरवू दे.' पाठक नमूद करतात, 'एखाद्या पालकाप्रमाणे त्यांनी माझ्यावर जी सावली केली ती अखेरपर्यंत सोडली नाही... इतक्या विलक्षण अभ्यासयोगी व रसरशीत माणसाच्या सहवासात मी आलो. मीही त्यांच्या कुटुंबातला एक झालो.'

बी. ए. ला ऑनर्स मिळवून पेठे हायस्कुलात तीन महिने टाइपिस्टची नोकरी केली. एम. ए. ला उत्तम गुण मिळाल्यामुळे ते प्राध्यापक म्हणून महाविद्यालयात रुजू झाले.

यशवंत पाठक यांच्या विविध प्रकारच्या लेखनात 'नाचू कीर्तनाचे रंगी' (१९७९), 'नक्षत्रांची नाती' (व्यक्तिचित्रे, १९८७), 'ब्रह्मगिरीची सावली' (ललित लेख, १९८८), 'मातीचं देणं' (१९९०), 'स्पंदने श्रीसमर्थांची' (१९९५) ही समीक्षात्मक पुस्तके, 'आभाळाचे अनुष्ठान' (२०००) हा काव्यसंग्रह आणि 'अंगणातले आभाळ' (१९८५) यांचा समावेश आहे.

– वि. ग. जोशी

**संदर्भ :**

*१. पाठक यशवंत; 'अंगणातले आभाळ'; ग्रंथाली वाचक चळवळ, मुंबई; १९८५.*

## पाडगावकर, मंगेश केशव
**कवी**
**१० मार्च १९२९**



मंगेश केशव पाडगावकरांचा जन्म वेंगुर्ले येथे झाला. त्यांच्या वडिलांचे नाव केशव आत्माराम पाडगावकर. मंगेश पाडगावकरांच्या आई रखमाबाई त्यांना केशवसुत, बालकवी, गोविंदाग्रज ह्यांच्या कविता वाचून दाखवत असत. त्यामुळे बालवयातच पाडगावकरांना लय, छंद, वृत्त यांची जाण नकळत येत गेली. आपला मुलगा मोठा कवी व्हावा, असे आईचे स्वप्न होते. आईच्या काव्यप्रेमाची परिणती नवव्या-दहाव्या वर्षात पाडगावकरांच्या काव्यलेखनात झाली. पुढे मुंबईत त्यांचे माध्यमिक व उच्च शिक्षण विल्सन हायस्कूलमध्ये व विल्सन कॉलेजमध्ये झाले. वा. ल. कुलकर्णींच्या अध्यापनाचा आणि सहवासाचा परिणाम संवेदनशील पाडगावकरांवर झाला. त्याचप्रमाणे भा. रा. तांबे, कुसुमाग्रज, बा. भ. बोरकर या सौंदर्यवादी कवींच्या काव्याचा प्रभाव पाडगावकरांवर पडला. १९४९ साली पुण्यात झालेल्या महाराष्ट्र साहित्य संमेलनात त्यांनी सादर केलेली 'करि माझ्या दीप युगाचा रे' ही कविता ऐकून विठ्ठलराव घाटे यांनी 'उद्याचा कवी' ह्या शब्दांत पाडगावकरांची प्रशंसा केली. मुंबई विद्यापीठाच्या बी. ए. आणि एम. ए. परीक्षेत मराठी-संस्कृत विषयात सर्वप्रथम येऊन पाडगावकर अनुक्रमे तर्खडकर सुवर्णपदकाचे आणि चिपळूणकर सुवर्णपदकाचे मानकरी ठरले.

मुंबईच्या विल्सन हायस्कूलमध्ये शिक्षक (१९५०); 'साधना' साप्ताहिकाचे कार्यकारी संपादक (१९५३); कीर्ती महाविद्यालयामध्ये फेलो (१९५७); आकाशवाणी मुंबई केंद्रावर मराठी कार्यक्रमाचे निर्माते (१९५७-१९६०/ १९६४-१९७०); मध्यंतरी सोमय्या आणि मातुःश्री मिठीबाई महाविद्यालयात मराठी विभाग प्रमुख

प

(१९६०-१९६४); युनायटेड स्टेट इन्फर्मेशन सर्व्हिस (युसिस) येथे मराठी विभाग प्रमुख (१९७०-१९९०); अशा प्रकारे वेगवेगळ्या आस्थापनांत नोकऱ्या केल्यानंतर १९९१ पासून पूर्णवेळ लेखन-व्यवसाय त्यांनी स्वीकारला.

पाडगावकरांचा 'धारानृत्य' हा पहिला संग्रह १९५० साली प्रसिद्ध झाला. त्यानंतर आजतागायत पाडगावकरांची एकूण ४२ पुस्तके प्रसिद्ध झाली आहेत. पाडगावकरांच्या स्वतंत्र काव्य निर्मितीला खरी सुरुवात 'जिप्सी' (१९५३) या संग्रहापासून झाली. पाडगावकरांच्या समग्र कवितेचे प्रामुख्याने भावकविता, राजकीय-सामाजिक विषयांवरील कविता व गीतकाव्य असे तीन टप्पे होतात. याशिवाय नाट्यकविता, बालकविता, उपहासपर कविता (वात्रटिका), गझल या स्वरूपाची काव्य रचना पाडगावकरांनी केली आहे.

'निंबोणीच्या झाडामागे' (१९५६) ह्या पाडगावकरांच्या एकमेव लघुनिबंध-संग्रहातील लघुनिबंध काव्यानुभवाच्या जवळ जाणारे आहेत. एखादी निसर्गस्थिती किंवा मनोवस्था जेव्हा पाडगावकरांच्या हृदयाचा कब्जा घेते, तेव्हा त्यांची उदास, व्याकूळ आणि काव्यात्म भाववृत्ती लघुनिबंधातून प्रकट होते. पाडगावकरांनी काव्यात्म वृत्तीने व संवेदनशीलपणे केलेले लघुनिबंध-लेखन भावविवश, भाबडे वा कृत्रिम होत नाही.

साठ वर्षांहून अधिक काळ काव्य लेखन करणाऱ्या पाडगावकरांच्या काव्य-लेखनाचा प्रवास आजही सुरू आहे. 'धारानृत्य' (१९५०) ह्या त्यांच्या पहिल्या काव्यसंग्रहावर असलेला पूर्वसुरींचा प्रभाव कालांतराने कमी होत गेला. पुढे मंगेश पाडगावकरांच्या कवितेचा बहुआयामी विकास झाला. सौंदर्यवेधी पाडगावकरांनी स्वतःला वेगवेगळ्या रचनाप्रकारांतून व्यक्त केले. पाडगावकर सश्रद्ध आणि आशावादी कवी आहेत, याचा प्रत्यय त्यांच्या आरंभीच्या कवितांतून येतो. निसर्गदृश्याची विविध चित्रे रेखाटण्याची त्यांची असोशी आहे. त्यांच्या कवितेत भावानुभूतीचा आणि निसर्गसुंदरतेचा अपूर्व संगम झाला आहे. 'जिप्सी' (१९५३), 'छोरी' (१९५७), 'उत्सव' (१९६२) या संग्रहांत या समन्वयाचे प्रत्यंतर येते. 'छोरी' आणि 'उत्सव' यांमध्ये प्रामुख्याने प्रेमकवितांचाच समावेश केला आहे. कवी जितक्या तरलतेने प्रेमानुभव अनुभवतो, तेवढ्याच तरलतेने तो कवितेत व्यक्त होतो. भा. रा. तांब्यांपासून सुरू झालेला गीतकाव्याचा विकास नंतर बोरकर-पाडगांवकरांनी केला. पाडगावकरांची भावप्रकृती मुळातच गीतानुकूल आहे. पाडगांवकरांच्या अनेक भावकविता स्वररचनेत गाता येऊ शकणाऱ्या असल्या, तरी त्यांच्या गीतांचा स्वतंत्रपणे विचार करता येतो. आधी भावकवी आणि नंतर गीतकार असे स्थित्यंतर झाल्यामुळे कवीचे हळुवार, तरल, संवेदनशील मन रस-रंग-नाद-गंध-स्पर्शयुक्त शब्दांच्या आधारे संगीतानुकूल झाले. 'दिवस तुझे हे फुलायचे', 'असा बेभान हा वारा', 'भेट तुझी माझी स्मरते', 'श्रावणात घन निळा बरसला' ह्या पाडगांवकरांच्या गीतांनी रसिकांच्या मनात कायमचे स्थान निर्माण करून ठेवले आहे. 'तुझे गीत गाण्यासाठी' (१९८६) या गीतसंग्रहाप्रमाणेच पाडगावकरांचा 'गझल' हा संग्रहही उल्लेखनीय आहे. गझल हा काव्यप्रकार हाताळताना उर्दूतील रचनासंकेत पाडगावकरांनी स्वीकारले असले, तरी त्यांची गझल-निर्मिती एक बंधयुक्त आविष्कार ठरते. म्हणूनच ती पाडगावकरांची भावगीत सदृश रचनाही ठरते. गेय रचनांशी नाते असणारी पाडगावकरांची बोलगाणी म्हणजे त्यांच्या प्रयोगशीलतेचे आणखी एक उदाहरण आहे. 'बोलगाणी' (१९९०) ह्या संग्रहातील मुक्तरचना बाल-कुमारांसाठी आहेत, असे वरकरणी वाटत असले तरी प्रत्यक्षात बोलगाणी प्रौढांच्या जीवनातील रटाळ, खोचक, मिस्कील अनुभूतींचा आविष्कार ठरली आहेत.

बालकविता हा काव्यप्रकारही पाडगावकरांनी आत्मसात करून मुलांसाठी प्रामुख्याने गेय बालगीते लिहिली आहेत- 'भोलानाथ' (१९६४), 'बबलगम' (१९६७), 'चांदोमामा' (१९९२), 'सुट्टी एके सुट्टी' (१९९२), 'वेडं कोकरू' (१९९२), 'आता खेळा नाचा' (१९९२), 'झुले बाई झुला' (१९९२), 'अफाटराव' (२०००).

प

पाडगावकरांच्या १९६६ साली प्रसिद्ध झालेल्या एका काव्यसंग्रहाचे नाव आहे ‘विदूषक’. निसर्गाचे विभ्रम टिपणाऱ्या, सौंदर्यलोलुप पाडगावकरांमध्ये जीवनाकडे तिरकसपणे पाहणारा, आयुष्यातील विरोध-विसंगती न्याहाळणारा, राजकीय-सामाजिक जीवनातील सोंगाढोंगांवर प्रहार करणारा तत्त्वचिंतक ‘भाष्यकार’ आहे. ‘वात्रटिका’ मधून (१९६३) श्रोत्यांचा हास्यपूर्ण प्रतिसाद मिळवणाऱ्या पाडगावकरांनी ‘उदासबोध’च्या (१९९४) रूपाने सद्यःकालीन वास्तवावर खोचकपणे टीका-टिप्पणी केली आहे. अणीबाणीनंतर १९७८ साली प्रसिद्ध झालेल्या ‘सलाम’ ह्या काव्यसंग्रहाने पाडगावकरांची भावकवी म्हणून रूढ झालेली प्रतिमा पुसून टाकली. सौंदर्यजीवी असलेले कविमन समाजकारण व राजकारण यांच्या जंजाळात अडकलेल्या जनसामान्यांच्या वेदना पाहून व्यथित झाले आणि ‘सलाम’च्या रूपाने त्या व्यथेला अवसर मिळाला. राजकीय आणि सामाजिक जाणिवांचा आविष्कार करणारी आपली कविता कोणताही पक्ष, इझम किंवा झेंडा घेऊन उभी नसून ही कविता म्हणजे आपल्या जीवनविषयक दारुण अनुभवांबद्दलचे प्रांजळ चिंतन आहे, या कवीच्याच भूमिकेचा प्रत्यय देणारी ‘सलाम’मधील उपहासपर कविता लोकप्रिय ठरली.

केवळ शब्दांशी बांधील राहून काव्यलेखन करणाऱ्या पाडगावकरांनी ‘निंबोणीच्या झाडामागे’ ह्या लघुनिबंधसंग्रहाखेरीज गद्यलेखन केले नाही. मात्र संतसाहित्य, धर्म आणि तत्त्वज्ञान यांत रस असलेल्या पाडगावकरांनी मीरा, कबीर, सूरदास ह्या मध्ययुगीन संत कवि-कवयित्रींच्या रचनांचे अनुवाद केले आहेत. वस्तुतः कवितेचा अनुवाद करणे बरेच अवघड असते. पण मीरेच्या आणि कबिरांच्या मूळ पदांचे अनुवाद पाडगावकरांनी मूळ आशयाला बाधा न आणता केले आहे. हे काव्यानुवाद व शेक्सपिअरच्या ‘द टेम्पेस्ट’, ‘ज्युलिअस सीझर’ व ‘रोमिओ ॲन्ड ज्यूलिअेट’ ह्या नाटकांच्या अनुवादांना पाडगावकरांनी लिहिलेल्या विस्तृत प्रस्तावना त्यांच्या व्यासंगाची आणि परिश्रमशीलतेची साक्ष पटवतात. ‘बायबल: नवा करार’ (भाषांतर व मुक्त चिंतन) ह्या अनुवादात पाडगावकरांनी येशूच्या चरित्रकारांच्या लेखनाची वैशिष्ट्ये स्पष्ट करताना स्वतःच्या स्वतंत्र चिंतनाची आणि मर्मदृष्टीची जोड दिली आहे. पाडगावकरांची ‘बोरकरांची कविता’ (१९६०), ‘संहिता’ (विंदा करंदीकरांची निवडक कविता) ही दोन महत्त्वाची संपादने आहेत. १९४७-१९४८ च्या सुमारास प्रारंभ झालेले पाडगावकरांचे काव्यलेखन ‘आनंदऋतू’ (२००४), ‘सूर आनंदघन’ (२००४), ‘मुखवटे’ (२००६), ‘गिरकी’ (२००८) या संग्रहांद्वारे पुढे सुरू राहिले. उत्तरकाळातील काव्याने त्यांचा हा नवा प्रवासही अभिजात प्रतिभेचे दर्शन घडवणारा ठरला. मराठी नवकवितेच्या प्रवाहातील पाडगावकरांच्या कवितेचे स्थान स्वतंत्र राहिले. त्यांच्या आगेमागे कवितालेखन करणाऱ्या पु.शि.रेगे, इंदिरा संत, विंदा करंदीकर, वसंत बापट, नारायण सुर्वे या कवि-कवयित्रींच्या काव्यापेक्षा प्रयोगशील पाडगावकर आपल्या भावमधुर गीतरचना व प्रभावी काव्यवाचनामुळे ‘रसिकांचे कवी’ ठरले; अनेक सन्मान-पुरस्कार-गौरव यांचे मानकरी झाले.

महाराष्ट्र राज्य शासनाचे सर्वोत्कृष्ट ग्रंथ निर्मितीचे पुरस्कार पाडगावकरांच्या ‘जिप्सी’ (१९५३), ‘छोरी’ (१९५७), ‘बबलगम’ (बालगीत संग्रह), (१९६७) या काव्यसंग्रहांना लाभले आहेत. पाडगावकरांना १९९० साली ‘महाराष्ट्र गौरव पुरस्काराने’ तर २००८ साली ‘महाराष्ट्र भूषण’ ह्या सर्वोच्च सन्मानाने गौरवण्यात आले. याशिवाय त्यांना दीनानाथ स्मृती प्रतिष्ठानातर्फे प्रदीर्घ साहित्यसेवेबद्दल ‘लता मंगेशकर पुरस्कार’ (१९९४), ‘भैरूरतन दामाणी पुरस्कार’ सोलापूर (१९९४), कुसुमाग्रज प्रतिष्ठानातर्फे ‘जनस्थान पुरस्कार’ (२००३), ‘सलाम’ काव्यसंग्रहाला ‘साहित्य अकादमी पुरस्कार’ (१९८०) असे विविध पुरस्कार मिळाले. आपले कविमित्र विंदा करंदीकर आणि वसंत बापट यांच्या समवेत ते महाराष्ट्राच्या कानाकोपऱ्यांत काव्यवाचनाच्या निमित्ताने फिरले आणि त्यांनी मराठी गेय कविता सर्वसामान्य रसिकांपर्यंत पोहोचवली. त्यासाठी त्यांनी परदेश प्रवासही केला. पहिल्या कोकण मराठी साहित्य

परिषदेचे (चिपळूण, १९९८) अध्यक्ष पाडगावकर होते. वयाच्या दहाव्या वर्षापासून काव्यलेखनाला सुरुवात करून नुकत्याच साजऱ्या झालेल्या ऐंशीव्या वाढदिवसापर्यंत म्हणजे जवळजवळ पासष्ट-सत्तर वर्षे पाडगावकरांनी निष्ठेने काव्यसाधना केली; 'शब्दांशी आणि गाण्याशी सतत इमान' राखले. मंगेश पाडगावकरांचे मराठी काव्यदालनातील हे लक्षणीय योगदान आहे.

– वि. शं. चौघुले

**संदर्भ :**


१. *दुसाने सुलभा रत्नाकर; 'मंगेश पाडगावकरांची कविता: स्वरूप आणि अभिव्यक्ती'; कैलाश पब्लिकेशन्स, औरंगाबाद; २०००.*

२. *पाडगावकर कांचन; 'आनंदयात्री पाडगावकर'; पद्मगंधा प्रकाशन, पुणे; २००५.*


## पाध्ये, कमल प्रभाकर

**आत्मचरित्रकार, सामाजिक कार्यकर्त्या**

**८ ऑक्टोबर १९२० – १९ जून १९९६**



कमल प्रभाकर पाध्ये या मुंबईतल्या विनायक भटजी गोठोस्करांच्या कन्या. ब्रीच कँडीच्या फणसवाडी शाळेतून त्या व्हर्न्याक्यूलर फायनल उत्तीर्ण पास झाल्या. १९४० साली कमलाताईंचा विवाह प्रभाकर पाध्ये यांच्याशी झाला. १९४३ साली त्या बी.ए. झाल्या.

हरिभाऊ मोटे यांनी तसेच इंदिराबाई संत यांनी कमलताईंना 'तुम्ही लिहा' असा खास आग्रह केला. शिवाय समाज कार्यकर्त्यांच्या प्रकल्पात कमलताई शिबिरांचे आयोजन करीत. अशा शिबिरांत महाराष्ट्रातील सर्व थरांतल्या हजार-दीड हजार स्त्रियांचे विचार ऐकण्याची संधी त्यांना मिळाली. 'माणूस म्हणून न वागल्यान होणारा तुमचा मनोभंग चव्हाट्यावरून मांडा' असा सल्ला कमलताई त्या स्त्रियांना देत. लग्नापूर्वी कमलताईंनी विभावरी शिरूरकरांचे 'कळ्यांचे निःश्वास' हे पुस्तक वाचले होते. 'स्त्री-मनाच्या व्यथा अतिशय संवेदनशील मनाने टिपणारे ते पुस्तक मला फार भावून गेलं होतं' असे त्या म्हणतात. १९७६ मध्ये कृष्णाबाई मोटे यांच 'काळाची पाउले' प्रसिद्ध झाले. ह्या पुस्तकाविषयी कमलताईंनी अभिप्रायवजा लेख जानेवारी १९७७ च्या 'माणूस' साप्ताहिकात लिहिला होता.

स्वतःच्या 'बंध-अनुबंध' आत्मकथनाविषयी त्या लिहितात, हे पुस्तक केवळ स्त्री-प्रश्नांपुरते मर्यादित नाही. माणसांच्या प्राथमिक गरजांप्रमाणे वात्सल्य, प्रेम आणि स्नेह ह्याही त्यांच्या महत्त्वाच्या भावनिक गरजा आहेत. त्यातून निर्माण होणारे भावभावनांचे आणि नात्यागोत्यांचे गुंतागुंतीचे बंध-अनुबंध आणि त्यांतून उद्‌भवणाऱ्या समस्या तितक्याच उत्कटतेनं मला भावलेल्या आहेत. या सर्वांबद्दलचे माझे विचार मी या पुस्तकात व्यक्त केले आहेत. शेवटी माझ्या बुद्धीच्या कुवतीनं केलेलं माझं हे चिंतन आहे. त्याच्या शास्त्रशुद्धतेची जाण मला नाही. पण अनुभव मात्र सत्य आहेत आणि ते मी अत्यंत प्रामाणिकपणे मांडले आहेत.

कमलताईंचे आदिवासी प्रकल्पाचे काम पालघर-मनोर रस्त्यावरच्या मासवण आणि आजूबाजूच्या परिसरात होते. जातिभेद, अंधश्रद्धा, स्त्रीमुक्ती, समानता हे कमलताईंच्या व्याख्यानांचे विषय असत.

'मैत्रीच्या पलीकडे' या नियतकालिकाच्या संपादक म्हणूनही त्यांनी काही वर्षे काम केले. समाजवादी महिला सभेचे काम करताना महिलांचे प्रशिक्षण करणाऱ्या अनेक पुस्तिका त्यांनी लिहिल्या. स्त्रियांच्या प्रश्नांसंबंधी अनेक स्फुट लेखही प्रसिद्ध केले. मानवेंद्रनाथ रॉय यांच्या 'वुमनहुड ऑफ इंडिया' या पुस्तकाचा कमलाताईंनी अनुवाद केला.

'पाध्यांची ३, कमलबाग'चे लेखक विक्रम भागवत लिहितात, '३ कमलबागेत तुम्ही कधीही जा. तुम्हांला ती नेहमीच व्यवस्थित, टापटीप आणि कलात्मक सौंदर्याला जपताना दिसेल. याला पाध्यांची आणि कमलताईंची

सौंदर्यदृष्टी आणि श्रम कारणीभूत आहेत..... या घराला पाध्यांच्या व्यक्तिमत्त्वाचे जसे एक परिमाण लाभले आहे, तितकेच कमलताईंच्या व्यक्तिमत्त्वाचेही ठसठशीत परिमाण लाभले आहे. एकीकडे पाध्यांची उत्कटता, वैचारिकता, आणि दुसरीकडे कमलताईंची सदैव जागृत असलेली सामाजिक जाणीव, स्त्रीमुक्तीचा त्यांनी जितका व्यावहारिक विचार केला, तितकाच तात्त्विक अभ्यासही केला. त्यांचे व्यक्तिमत्त्वही पाध्यांच्या इतकेच प्रखर. या दोन स्वतंत्र व्यक्तिमत्त्वांचा कमलबागेत सुरेख संगम झालेला आढळतो.'

– वि. ग. जोशी

**संदर्भ :**


१. *पाध्ये कमल; 'बंध-अनुबंध' मौज प्रकाशनगृह, मुंबई १९५५.*

२. *कोठावळे अशोक; 'लेखकाचे घर'; प्रकाशक संपादक, कोठावळे अशोक केशव, मुंबई; १९९७.*


## पाध्ये, दिगंबर विठ्ठल

**समीक्षक**

**२४ जून १९३९**



विठ्ठल व लक्ष्मीबाई यांच्या पोटी दिगंबर पाध्ये यांचा जन्म पाथर्डी (ता. चिपळूण, जि. रत्नागिरी) येथे झाला. शालेय शिक्षण मुंबईला राम मोहन इंग्लिश शाळेतून पूर्ण केले व महाविद्यालयीन शिक्षण रुपारेल महाविद्यालय माटुंगा येथे झाले. मराठी व संस्कृत विषयांत बी.ए.ला प्रथम वर्गात तर एम.ए.ला मराठी विषयात प्रथम वर्ग प्राप्त झाला. दादोबा पांडुरंग. के. पी. जोग व न. चि. केळकर सुवर्णपदकाचे ते मानकरी होते. १९७१पासून १९९९पर्यंत साठ्ये महाविद्यालय विलेपार्ले, मुंबई येथे प्राध्यापक म्हणून कार्यरत होते तर १९९० ते १९९९ ह्या काळात ते मराठीचे विभागप्रमुख म्हणून कार्यरत होते.

ललित लेखनापेक्षा समीक्षेच्या प्रांगणात रमणारे प्रा.पाध्ये यांचे लेखन गाजले ते त्यांच्या स्वतंत्र व चिकित्सा दृष्टीमुळे. विशेषतः साहित्य, समाज आणि संस्कृती यांचे विशिष्ट दृष्टिकोनातून केलेले लेखन हे वैशिष्ट्यपूर्ण ठरणारे आहे. साहित्याचा कला म्हणून येणारा अनुभव मोठा तर आहेच परंतु साहित्याचे सामाजिक व सांस्कृतिक स्वरूपही तेवढेच मोठे आहे, अशी तात्त्विक मांडणी त्यांच्या 'साहित्य समाज संस्कृती' या ग्रंथातून झाली आहे. 'नारायण सुर्वे यांची कविता' या समीक्षात्मक ग्रंथातून सुर्व्यांच्या कवितांची सुसंगत, तार्किक व काटेकोर मांडणी केली आहे.

समीक्षात्मक दृष्टिकोनाविषयीच्या, दृढमूल विचारांच्या प्रभावाचे श्रेय ते ज्येष्ठ साहित्यिक वसंत दावतर यांच्याशी आलेल्या वैचारिक घनिष्ठ संबंधांना देतात. १९६७पासून 'आलोचना' या मासिकाच्या सहकारी संपादकाची भूमिका बजावली. महाराष्ट्र साहित्य पत्रिका, समाज प्रबोधन पत्रिका, युगवाणी इत्यादी पत्रिकांतून लेखन केलेल्या पाध्येंना पुरस्कारापासून दूर राहायला आवडते. महाराष्ट्र साहित्य परिषदेच्या समीक्षेचा इतिहास (१९५०–१९५५) या कालखंडाचे लिखाणाचे काम चालू आहे. तसेच 'आधुनिक मराठी साहित्याचे समाजशास्त्र' या ग्रंथावरील लिखाण तयार आहे.

– सुपर्णा कुलकर्णी



## पाध्ये, प्रभाकर आत्माराम

**संपादक, साहित्यिक, सौंदर्यमीमांसक, समीक्षक**

**४ जानेवारी १९०९ – २२ मार्च १९८४**

प्रभाकर आत्माराम पाध्ये यांचा जन्म रत्नागिरी जिल्ह्यातील लांजे या गावी झाला आणि त्यांचे देहावसान पुणे येथे झाले. आपल्या पंचाहत्तर वर्षांच्या आयुष्यात त्यांनी जवळपास पन्नास वर्षे वृत्तपत्रीय लेखनाबरोबर कथात्म साहित्य, प्रवासवर्णने, व्यक्तिचित्रे, ललित गद्य, समीक्षा व सौंदर्यमीमांसा अशी निर्मिती अखंडपणे केली. प्रभाकर पाध्ये हे त्यांच्या आईवडिलांच्या सहा मुलांपैकी दुसऱ्या क्रमांकाचे अपत्य. त्यांचे मूळ नाव प्रल्हाद, ते पुढे



केव्हातरी प्रभाकर झाले. त्यांचे शालेय शिक्षण रत्नागिरी, पुणे, मुंबई येथे झाले. १९२७ साली ते मॅट्रिक झाले व १९३२ साली एल्फिन्स्टन महाविद्यालय, मुंबई येथून अर्थशास्त्र व इतिहास हे विषय घेऊन बी.ए. झाले. एम.ए. होण्यासाठी ते पुण्याला गोखले अर्थशास्त्र संस्थेत दाखल झाले परंतु एम.ए. न होताच मुंबईस परतले व नोकरीला लागले. मुद्रणशोधनाची कामे, हरिभाऊ मोटे यांच्या 'प्रतिभा' पाक्षिकात लेखन अशी त्यांच्या अर्थार्जनाची सुरुवात झाली. ते करता-करता योगायोगाने त्यांची पत्रकारिता सुरू झाली. याच काळात 'आजकालचा महाराष्ट्र- वैचारिक प्रगती' (१९३५) हा महाराष्ट्राच्या इतिहासाचा वेध घेणारा ग्रंथ त्यांनी श्री.रा. टिकेकर यांच्या सहकार्याने सिद्ध केला. ग्रंथाच्या अखेरीस दिलेला १७९९ ते १९३४ या प्रदीर्घ कालखंडातील प्रमुख घटनांचा कालपट हा या ग्रंथाचा सर्वांत उल्लेखनीय विशेष. अशा प्रकारे मराठी ग्रंथांमध्ये कालपट देण्याची सुरुवात या ग्रंथापासून झाली.

'प्रतिभे'त लिहीत असतानाच मो.ग. रांगणेकर यांनी त्यांना 'चित्रा' या साप्ताहिकात नेले. 'चित्रा'ने त्यांना पत्रकार बनविले. 'चित्रा'तून ते 'धनुर्धारी'त आले. 'धनुर्धारी'त असतानाच प्रभाकर पाध्ये यांचा संसार सुरू झाला. ४ जानेवारी १९४० रोजी कमल गोठोस्कर यांच्याशी त्यांचा विवाह झाला. 'धनुर्धारी'ला पाध्यांनी साहित्यदृष्ट्या वरच्या पातळीवर नेले. बी.ए. झाल्यानंतरचे पाध्ये मार्क्सच्या विचाराने भारावून गेलेले पाध्ये होते. १९३५-४० पासून घडत गेलेल्या घटना, दुसरे महायुद्ध आणि महायुद्धोत्तर कालखंड या दिवसांत साम्यवादी राष्ट्रांत ज्या घडामोडी घडल्या आणि मार्क्सवादी विचारांना क्रमशः जी वळणे लागली, त्यांमुळे पाध्ये मार्क्सवादाचे कट्टर विरोधक बनले.

पत्रकार म्हणून नावलौकिक संपादन केलेले पाध्ये ३० नोव्हेंबर १९४५ रोजी 'नवशक्ती'चे संपादक झाले. 'नवशक्ती'चा जेमतेम ९०० असणारा खप, पाध्यांनी प्रयत्नपूर्वक मोठमोठ्या लेखकांना लिहायला लावून आणि वृत्तपत्राविषयीच्या आपल्या अभिनव कल्पना राबवून प्रचंड वाढवला. 'नवशक्ती' हे वृत्तपत्र पाध्ये यांच्या नावाने ओळखले जाऊ लागले. कालांतराने व्यवस्थापनाशी झालेल्या तात्त्विक मतभेदांमुळे पाध्ये यांनी १८ मार्च १९५३ रोजी 'नवशक्ती' हे वृत्तपत्र सोडले. २२ मार्च १९५३ रोजी ते 'द इंडियन कमिटी फॉर कल्चरल फ्रीडम' या संस्थेचे चिटणीस झाले. नंतर दोन वर्षांनी जून १९५५ मध्ये 'काँग्रेस फॉर कल्चरल फ्रीडम' या आंतरराष्ट्रीय संस्थेचे आशिया खंडाचे चिटणीस-सेक्रेटरी जनरल म्हणून ते दिल्लीला गेले. दिल्लीला गेल्यापासून सुमारे एक तप पाध्ये आंतरराष्ट्रीय पातळीवरील सांस्कृतिक घटनांशी निगडित होते. त्यांच्या विद्याव्यासंगी आणि सर्व प्रकारची जिज्ञासा बाळगणाऱ्या पत्रकाराच्या व्यक्तिमत्त्वाला या संधीमुळे नवनवे पैलू प्राप्त झाले. जगभरातल्या मोठमोठ्या व्यक्तींना भेटण्याचे, त्यांच्याशी संवाद साधण्याचे, त्यांचे जवळून अवलोकन करण्याचे अनेक प्रसंग त्यांच्या आयुष्यात आले आणि ते प्रसंग पाध्ये यांचे अंतरंग समृद्ध करून गेले.

'व्याधाची चांदणी' (१९४४), 'कृष्णकमळीची वेल' (१९४५), 'अर्धवर्तुळे' (१९५१), 'अंधारातील सावल्या' (१९६५) हे पाध्ये यांचे चार कथासंग्रह. या चार कथासंग्रहांतील सर्व कथा एकत्र करून 'निळे दिवस' (१९७६) हा कथासंग्रह सिद्ध झाला आहे. पाध्ये यांच्या कथांतून प्रकटणारी मूल्ये ही सांकेतिक भासत असली तरी मूलतः दुर्बल असणाऱ्या माणसाला समजावून घेण्याचा कथाकाराचा प्रयत्न त्यांच्या कथांना समृद्ध करतो. 'त्रिसुपर्ण' (१९८३) हा त्यांचा तीन दृष्टान्तकथांचा संग्रह कथानिर्मितीचा एक वेगळा प्रयोग म्हणून लक्षणीय आहे. सत्याचा शोध हे बीज असणाऱ्या या दृष्टान्तकथा दृष्य विश्व आणि आत्मतत्त्व यांचे वेगळेपण व त्यांचे एकत्व यांचा बोध घडवितात.

'मैत्रीण' (१९६१) ही पाध्ये यांनी लिहिलेली कादंबरिका. तीमधून आदर्शाचा, ईप्सिताचा, नीतिमत्तेचा शोध घेण्याचा प्रयत्न पाध्ये यांनी केला आहे. 'नवे जग : नवी क्षितिजे' (१९५४), 'अगस्तीच्या अंगणात' (१९५७), 'उडता गालिचा' (१९५९), 'तोकोनोमा' (१९६१), 'हिरवी उने' (१९६४) ही पाध्ये यांची प्रवासवर्णने म्हणजे भारतात, युरोपात, अमेरिकेत, जपानमध्ये जिथे-जिथे म्हणून पाध्ये गेले, ज्या-ज्या व्यक्तींना भेटले, ज्या-ज्या घटनाप्रसंगात ते सामील झाले; त्या-त्या प्रसंगी लेखकाच्या चित्तात उमटलेल्या स्पंदनांचे आलेख आहेत. 'प्रकाशातील व्यक्ती' (१९४१), 'तीन तपस्वी' (१९४६), 'व्यक्तिवेध' (१९७३), 'आगळी माणसे' (१९७९) हे बहुविध व्यक्तिचित्रांचे त्यांचे संग्रह व्यक्तीच्या बाह्यरूपवर्णनापेक्षा तिच्या अंतरंगदर्शनावर भर देणारे आहेत. 'चिवारीची फुले' (१९७८), 'आभाळातील अभ्रे' (१९८४) आणि 'सायंकाळच्या सावल्या' (१९८४) हे स्फुट लेखांचे संग्रह लेखकाची काव्यात्म वृत्ती, त्याचे निसर्गप्रेम, त्याची रसिकता, त्यांचा व्यासंग, त्यांची वैशिष्ट्यपूर्ण शब्दकळा, त्यांचे सौंदर्यशोधक व्यक्तिमत्त्व यांचे दर्शन घडवते.

'पाकिस्तान की पन्नास टक्के?' (१९४१) हे डॉ. बाबासाहेब आंबेडकर यांच्या 'द थॉट्स ऑन पाकिस्तान' या पुस्तकावरील परीक्षणातून निर्माण झालेले पाध्ये यांचे पुस्तक, तर 'युगोस्लाविया : द लॅन्ड ऑफ न्यू होरायझन्स' (१९५३) हे त्यांनी युगोस्लावियाला दिलेल्या भेटीवर आधारित पुस्तक. 'विचारधारा' (१९७९) हा त्यांच्या निवडक वैचारिक लेखांचा संग्रह म. द. हातकणंगलेकर यांनी संपादित केला आहे. 'मानव आणि मार्क्स' (१९८०) या ग्रंथाद्वारे पाध्ये यांनी मार्क्सचे तत्त्वज्ञान सुसंगतपणे स्पष्ट करून मार्क्सचे ऋण फेडले आहे. जगाच्या विचारधनात मार्क्सने टाकलेली भर व तिच्या मर्यादा सुव्यवस्थितपणे मांडून दाखविणारे हे लेखन आहे.

१९६५ साली पाध्ये यांचा एकुलता एक मुलगा प्रशांत याचे अपघाती निधन झाले. या घटनेचा त्यांच्या मनावर मोठा आघात झाला. त्यानंतर ते दिल्ली सोडून पुण्याला आले. स्वत:चे मनोबल एकवटून आणि सुहृदांच्या स्नेहाच्या आधारावर त्यांनी आपले पुढले आयुष्य सौंदर्यशास्त्राच्या अभ्यासाला, त्यांच्या आवडत्या विचारविनिमयाला व विविधांगी लेखनाला दिले. 'मर्ढेकरांची सौंदर्यमीमांसा' (१९७०), 'पाटणकरांची सौंदर्यमीमांसा' (१९७७) आणि 'सौंदर्यानुभव' (१९७९) हे पाध्ये यांचे सौंदर्यशास्त्रविषयक महत्त्वपूर्ण ग्रंथ. गेल्या तीसपस्तीस वर्षांत प्रभाकर पाध्ये मुख्यत्वे ओळखले जातात ते त्यांच्या सौंदर्यमीमांसेमुळे. यांपैकी 'सौंदर्यानुभव'ला १९८२चे साहित्य अकादमीचे पारितोषिक लाभले. या ग्रंथातून पाध्ये यांची सौंदर्यशास्त्रविषयक स्वतंत्र भूमिका वाचकांसमोर येते. मानवी अनुभव तीन प्रकारचे असतात; एक सौंदर्यानुभव, दुसरा व्यावहारिक व नैतिक स्वरूपाचा अनुभव, तिसरा तात्त्विक/वैचारिक स्वरूपाचा अनुभव. या प्रत्येक अनुभवप्रकारामागे अनुभव घेणाऱ्याची दृष्टी भिन्न-भिन्न स्वरूपाची असते. ''सौंदर्यानुभव म्हणजे मनाचा एक भ्रम नव्हे, त्याला मेंदूच्या रचनेत व व्यापारात भक्कम आधार आहे.'' असे पाध्ये यांचे प्रतिपादन आहे. सौंदर्यानुभवाच्या अनुषंगाने पाध्ये यांनी सौंदर्यवृत्ती, सौंदर्यास्वाद, स्वरसरंजनात्मकता, प्रतिभा व तीन मेंदूंचे कार्य, आणि कलेच्या प्रतीतीमुळे विस्तारणाऱ्या अनुभवकक्षा इत्यादींविषयी मानसशास्त्रीय विचारांच्या आधारे विस्तारपूर्वक विवेचन केले आहे.

'कलेची क्षितिजे' हे पाध्ये यांचे डिसेंबर १९४२मध्ये प्रसिद्ध झालेले समीक्षालेखांचे पहिले पुस्तक. कला आणि जीवन, कला आणि मतप्रचार, कलानिर्मितीचे मानसशास्त्र, यांसारखे एकंदर अकरा समीक्षालेख या संग्रहात आहेत. ''हे लेख निरनिराळ्या वेळी आणि प्रसंगांनी लिहिलेले असले तरी ते तितकेसे स्वयंपूर्ण नाहीत'' ही या लेखांची मर्यादा स्वत: लेखकाने पुस्तकाच्या आरंभी प्रास्ताविक मजकुरातल्या पहिल्याच वाक्यात सांगितली आहे. 'वामन मल्हार आणि विचारसौंदर्य' (१९७८) हा ग्रंथ मुंबई मराठी साहित्य

प

संघात 'वा. म. जोशी स्मारक व्याख्यानमाले'त पाध्ये यांनी दिलेल्या तीन व्याख्यानांतून सिद्ध झाला आहे. या ग्रंथात त्यांनी विचारसौंदर्य या संकल्पनेचा अभ्यासपूर्वक उलगडा केला आहे. या ग्रंथात त्यांनी मांडलेली 'स्वरसरंजनात्मकते'ची संकल्पना ही मराठी समीक्षेला मिळालेली देणगी म्हणता येईल. 'कादंबरीकार खानोलकर' (१९७७) या पुस्तकात त्यांनी कथासूत्र, वातावरण, व्यक्तिरेखा, कथानक, नाट्यमयता, काव्यमयता आणि रचना अशा वेगवेगळ्या घटकांच्या आधारे खानोलकरांच्या दहा कादंबऱ्यांची चिकित्सा केली आहे. 'आस्वाद' (१९७७) हा त्यांच्या समीक्षालेखांचा संग्रह वेगवेगळ्या साहित्यकृतींची/कलाकृतींची सूक्ष्म चर्चा करतो. याखेरीज पाध्ये यांनी इंग्लिशमध्ये लिहिलेला 'प्रिन्सिपल्स ऑफ जर्नलिझम' (१९९१) हा ग्रंथ 'पत्रकारितेची मूलतत्त्वे' (१९९१) या नावाने प्र.ना.परांजपे व वसुधा परांजपे यांनी अनुवादित केला आहे.

आयुष्यभर केलेली सातत्ययुक्त ज्ञानसाधना, चर्चा व विचारमंथन यांतील निरंतर निमग्नता आणि बहुविध साहित्यनिर्मितीची क्षमता हे प्रभाकर पाध्ये यांच्या व्यक्तिमत्त्वाचे सारभूत विशेष म्हणता येतील.

– प्रा. डॉ. विलास खोले

**संदर्भ:**

*१. साने-इनामदार रेखा, खोले विलास, संपादक; 'अगस्तीचे अंगण'; मौज प्रकाशन गृह, मुंबई; २००१.*

## पाध्ये, भाऊ

***पाध्ये, प्रभाकर नारायण***

**कथाकार, कादंबरीकार, पत्रकार**

**१६ नोव्हेंबर १९२६ – ३० ऑक्टोबर १९९६**

भाऊ पाध्ये यांचा जन्म मुंबईत झाला. महाविद्यालयीन शिक्षण मुंबईच्या रुईया महाविद्यालयातून पूर्ण केले. सुरुवातीला एलआयसीमध्ये नोकरी करताना कामगार चळवळीत सक्रिय झाले. 'हिंदू मजदूर संघटने'त त्यांनी काम केले. पत्रकारितेच्या प्रवासाला सुरुवातही याच



दरम्यान झाली. 'नवा काळ', 'नवशक्ती' ह्या वृत्तपत्रांतून लेखन केले. चित्रपट सृष्टीच्या पत्रकारितेमध्ये स्वतःची अशी स्वतंत्र शैली निर्माण केली.

कामगार चळवळ त्यांनी जवळून अनुभवल्याने पहिल्या कादंबरीचे बीज याच विषयाशी संबंधित असल्याचे दिसते. 'वासुनाका' (१९६५) ही पहिली कादंबरी होय. त्यानंतरच्या 'वैतागवाडी' (१९६५), 'बॅ. अनिरुद्ध धोपेश्वरकर' (१९६७), 'अग्रेसर' (१९६८), 'राडा' (१९७५), 'ब्रिगेड' (१९७४) 'जेलबर्ड्स' (१९८२), 'वणवा' (१९७६), 'वॉर्ड नं. ७' (१९८०) या कादंबऱ्या आणि 'एक सुनेरा ख्वाब (१९८०), 'थोडी सी जो पी लो' (१९८६), 'मुरगी' (१९८१), 'थालीपीठ' (१९८४) हे त्यांचे कथासंग्रह प्रसिद्ध झाले.

भाऊ पाध्ये यांनी लेखनाची रूढ चौकट मोडून आपली स्वतंत्र शैली निर्माण केली. त्यांचे लेखन समकालीनांपेक्षा दोन पावले पुढेच होते, त्यामुळेच समाजमानसाला आणि साहित्याविश्वालाही धक्का देणारे होते. आपल्या कादंबरीतून त्यांनी समाज जीवनातील भीषण वास्तवाचा शोध घेतला. तळागाळातील समाजाचे जिणे जसे आहे, तसेच अगदी त्याच भाषेत साहित्यातून मांडताना त्यांची लेखणी कचरली नाही. आपल्या मांडणीवरून झालेल्या वादालाही ते सामोरे गेले. त्यांनी वाचकांना ज्या साहित्याचा परिचय घडवला, तसे लिखाण आज आधुनिकतेच्या परिभाषेत मांडले जात आहे; त्याची बीजे पाध्ये यांच्या लिखाणात सुप्त आहेत, असे म्हटले पाहिजे. आहे तसे जीवन त्याच भाषेत रेखाटल्यामुळे रूढ लेखनपरंपरेला भाऊ पाध्ये यांनी हादरा दिला. 'वासुगिरी' हा टगेगिरीला प्रतिशब्द म्हणून वापरला जातो, तो 'वासूनाका' कादंबरीतील पाध्ये यांच्या भाषावैशिष्ट्यांमुळेच! भाऊंचे 'ऑपरेशन धक्का' (१९६९) हे नाटक प्रकाशित झाल्यानंतरही त्यांना

वादाला सामोरे जावे लागले होते. त्यांचे लेखन असे वादाचा विषय बनल्यामुळे 'भाऊ पाध्ये' हे नाव साहित्यविश्वात सतत चर्चेत राहिले.

– संपादक मंडळ

**संदर्भ :**

१. *पाध्ये प्रभाकर; 'पुण्याचे ते दिवस', विशाखा दिवाळी अंक – १९८३.*

२. *चिरमुले शरदचंद्र; 'माझे ज्येष्ठ सुहृद प्रभाकर पाध्ये' ; हंस – दिवाळी अंक १९८४.*

## पाध्ये, सदाशिव कृष्ण

☞ **मुख्य नोंद – पत्रकारिता आणि ललितेतर साहित्य खंड**

## पानतावणे, गंगाधर विठोबाजी

**समीक्षक, संपादक**

**२८ जून १९३७**



वैचारिक आणि संशोधनपर लेखन करणारे गंगाधर विठोबाजी पानतावणे यांचा जन्म नागपूर येथे झाला. त्यांचे वडील गिरणीमध्ये कामगार होते. मात्र त्यांना एक शैक्षणिक दृष्टी होती. आपल्या मुलांनी शिकले पाहिजे असे त्यांना वाटत होते. वडिलांप्रमाणेच पानतावणे यांच्या शिक्षकांनीही त्यांच्या मनात शिक्षणाविषयीची जिज्ञासा उत्पन्न केली आणि ते संस्कार त्यांच्या पुढील वाटचालीस उपयोगी ठरले. लहानपणी बाबासाहेबांनी स्थापन केलेल्या समता सैनिक दलात पानतावणे जात होते. अंगावर लाल सदरा, खाकी पँट आणि हातात निळा झेंडा घेऊन त्यांनी संचलन केले आहे, तसेच मैदानावर कवायतही केली आहे. त्यांचे प्राथमिक शिक्षण नागपूरच्या डी.सी.मिशन स्कूलमध्ये व माध्यमिक शिक्षण नवयुग विद्यालय व पटवर्धन हायस्कूल, नागपूर या ठिकाणी झाले. १९५६मध्ये ते मॅट्रिक झाले. १९६०साली बी.ए. व १९६२ साली एम.ए. या पदव्या त्यांनी नागपूर विद्यापीठातून संपादन केल्या. एम.ए. झाल्यानंतर म.ना.वानखेडे यांच्या सल्ल्यानुसार पानतावणे यांनी औरंगाबादच्या मिलिंद महाविद्यालयात मराठीचे अध्यापन केले. तेथेच 'अस्मितादर्श' या नियतकालिकाच्या निर्मितीची बीजे आहेत. १९८० या वर्षी 'डॉ. बाबासाहेब आंबेडकर यांच्या मराठी वृत्तपत्रीय लेखनाचा चिकित्सक अभ्यास' या विषयावर प्रबंध लिहून ते त्या वेळच्या मराठवाडा विद्यापीठातून पीएच.डी. झाले. कालांतराने त्याच विद्यापीठाच्या मराठी विभागात त्यांनी अध्यापन केले आणि मराठी विभागाचे विभागप्रमुख म्हणून ते निवृत्त झाले.

१९५५-५६च्या सुमारास पानतावणे यांनी काव्यलेखन केले. 'सुषमा', 'वीणा', 'प्रतिष्ठान', 'युगवाणी' यांसारख्या नियतकालिकांतून त्यांच्या कविता प्रकाशित झाल्या. नंतर ते लोकसाहित्याकडे वळलेले दिसतात. १९५७ सालच्या 'लोकसत्ते'च्या दिवाळी अंकात त्यांचा लोकसाहित्यासंबंधीचा लेख प्रकाशित झाला. 'युगवाणी', 'वसंत', 'रोहिणी' या मासिकांतूनही त्यांचे लोकसाहित्यविषयक लेख प्रसिद्ध झाले. याच काळात त्यांनी कथालेखनही केले. १९५७मध्ये 'माणुसकीचं बंड' या नावाचे नाटक त्यांनी लिहिले. या नाटकामध्ये समाजजीवनाला वाहून घेणाऱ्या एका त्यागी पुरुषाची कथा रंगविली आहे. या नाटकाचे सहा प्रयोग झाल्यानंतर ते बंद झाले, कारण त्यात प्रक्षोभ आहे; अशी बरीच चर्चा झाली. त्यांच्या साहित्यनिर्मितीची सुरुवात जरी ललितसाहित्याने झाली असली, तरी त्यांना मान्यता मिळवून दिली ती वैचारिक व संशोधनपर लेखनाने. साहित्याबरोबरच समाज व संस्कृती या विषयांच्या अभ्यासात व चिंतनात ते रमले. त्यांनी केलेले 'मूल्यवेध' (१९७६), 'विद्रोहाचे पाणी पेटले आहे' (१९७६), 'दलितांचे प्रबोधन' (१९७८), 'वादळाचे वंशज' (१९८२), 'प्रबोधनाच्या दिशा' (१९८४), 'चैत्य' (१९९०), 'साहित्य: प्रकृती आणि प्रवृत्ती' (१९९९), 'साहित्य: शोध आणि संवाद' (२००५),

'लेणी' हे त्यांचे समीक्षात्मक लेखन आणि 'दलित वैचारिक वाङ्मय' हे त्यांचे संशोधनपर लेखन त्यांच्या समीक्षादृष्टीचा व संशोधकीय क्षमतेचा परिचय करून देणारे आहे. 'हलगी' हा लेखसंग्रह, 'स्मृतिशेष' हा व्यक्तिविषयक लेखांचा संग्रह आणि 'मूकनायक' (डॉ. बाबासाहेब आंबेडकर चरित्र) व 'पत्रकार डॉ. बाबासाहेब आंबेडकर' ही आंबेडकरविषयक पुस्तके नावाजली गेली. त्यांची संपादित ग्रंथसंपदा मोठी आहे. 'दलित आत्मकथन', 'दलित कथा', 'विचारयुगाचे प्रणेते : डॉ. बाबासाहेब आंबेडकर', 'लोकचळवळींचे प्रणेते: महात्मा जोतीबा फुले', 'महारांचा सांस्कृतिक इतिहास', 'लोकरंग', 'स्त्री आत्मकथन', 'धर्मचर्चा', 'दलित साहित्य: चर्चा आणि चिंतन', 'डॉ. बाबासाहेब आंबेडकर यांचे निवडक लेख' (१९९८) इत्यादींचा तीत समावेश होतो.

विपुल ग्रंथसंपदेप्रमाणेच पानतावणे हे नाव महाराष्ट्राला सर्वपरिचित आहे ते 'अस्मितादर्श' या नियतकालिकाच्या संपादनकार्यामुळे. दलित साहित्याच्या चळवळीला वैचारिक अधिष्ठान प्राप्त करून देण्याच्या दृष्टीने 'अस्मितादर्श' या नियतकालिकाची सुरुवात, त्याची जोपासना व प्रस्थापना हे ऐतिहासिक स्वरूपाचे कार्य होय. दलित साहित्याच्या सौंदर्यशास्त्राची चर्चा सबंध महाराष्ट्रात 'अस्मितादर्श'च्या माध्यमातूनच झाली. 'अस्मितादर्श' म्हणजे अस्मितेचा आरसा. या अस्मितेचा संबंध इतिहासाशी तसेच वर्तमानाशी आहे. परिवर्तनाच्या चळवळीशी बांधील असणारे सर्व जण 'अस्मितादर्श'च्या विचारमंचाशी निगडित आहेत. या नियतकालिकामधून अनेक तरुण दलित लेखकांच्या वाटचालीला पानतावणे यांनी प्रोत्साहन दिले. अनेक उदयोन्मुख लेखक-कवींना हेरून, उत्तेजन देऊन त्यांनी दलित लेखक घडवले. 'अस्मितादर्श' या नियतकालिकाने नवलेखकांना प्रशिक्षित केले. साहित्याचा विचार समग्र जीवनाच्या संदर्भात करणे गरजेचे असते, याची जाणीव त्यांच्या ठिकाणी उत्पन्न केली. दलित साहित्याची सातत्याने अभ्यासपूर्वक पाठराखण करून दलित साहित्याला व चळवळीला योग्य दिशा दाखवण्याचे, तिच्यासंबंधीचे गैरसमज दूर करण्याचे काम पानतावणे यांनी निष्ठापूर्वक पार पाडले. विद्रोह, नकार आणि निषेध ही त्रिसूत्री पानतावणे यांनी दलित लेखकांच्या मनात रुजविली. 'अस्मितादर्श'चे सातत्याने भरलेले मेळावे ही महाराष्ट्रातील फार मोठी सांस्कृतिक घटना ठरली.

डॉ. बाबासाहेब आंबेडकरांचा विचार गौतम बुद्ध व महात्मा फुले यांच्या विचारांवर अधिष्ठित आहे, मानवी प्रतिष्ठेची प्रस्थापना हे त्याचे उद्दिष्ट आहे आणि वैज्ञानिकता व वस्तुनिष्ठानुभुती हे या विचाराचे पोषणद्रव्य आहे, ही पानतावणे यांच्या विचारांची दिशा आहे. दलित संस्कृती ही सर्वहारासंस्कृती आहे व आत्मशोधाच्या बळातून या संस्कृतीला नवे परिमाण लाभले आहे, ही भूमिका पानतावणे यांच्या वैचारिक मांडणीतून व्यक्त होते. 'मूल्यवेध' हा त्यांचा ग्रंथ जीवनाकडे व साहित्याकडे पाहण्याचा त्यांचा समग्र दृष्टिकोन व्यक्त करतो. 'मूकनायक' हे लहानसे चरित्र डॉ. बाबासाहेब आंबेडकरांचा जीवनपट उलगडून दाखवते. 'वादळाचे वंशज'मधून त्यांनी आंबेडकरपूर्व काळातील दलितांच्या मुक्तीसाठी ज्या-ज्या दलित व्यक्तींनी आपले आयुष्य खर्ची घातले, त्या-त्या व्यक्तींच्या व्यक्तिमत्त्वांचा गौरव केला आहे. 'विद्रोहाचे पाणी पेटले आहे' ह्या ग्रंथातून स्वातंत्र्य, समता, बंधुता व सामाजिक न्याय या तत्त्वांवर नवा समाज निर्माण करावयाचा असेल, तर विषमतेविरुद्ध विद्रोह पुकारावाच लागेल, असे विचारप्रतिपादन पानतावणे यांनी केले आहे. 'पत्रकार डॉ. बाबासाहेब आंबेडकर' हा त्यांचा ग्रंथ पीएच. डी. पदवीसाठी लिहिलेल्या प्रबंधावर आधारित ग्रंथ आहे. तो ग्रंथ पत्रकारितेच्या क्षेत्रातील बाबासाहेबांच्या कामाचा उलगडा करतो. आपल्या प्रबंधातून पानतावणे यांनी बाबासाहेब हे थोर ध्येयवादी पत्रकार कसे होते, ते त्यांच्या पत्रकारितेचे वेगवेगळे पैलू सुस्पष्ट करून सांगितले आहे. साहित्य, संस्कृती, धर्म, इतिहास, मानववंशशास्त्र हे सर्व पानतावणे यांच्या विचारविश्वातील विषय आहेत त्यामुळे त्यांच्या लेखनातून समृद्ध अशी साहित्यमीमांसा केली गेली आहे.

दलित साहित्यप्रवाहाचा उदय, या प्रवाहास प्रस्थापितांनी केलेला विरोध, या विरोधाला पानतावणे यांनी दिलेली तर्कशुद्ध उत्तरे, आंबेडकरी विचारव्यूहाचा उपयोग करून दलित साहित्याला त्यांनी मिळवून दिलेली प्रतिष्ठा हे पानतावणे यांचे कार्य अत्यंत मोलाचे आहे.

दलित साहित्यासंबंधी मीमांसा करताना त्यांच्या दृष्टीपुढे मराठी साहित्याचा संपूर्ण परिप्रेक्ष्य उभा असतो. त्यांची वाङ्मयीन निरीक्षणे मार्मिक असतात. साडेसातशे वर्षांचा मराठी साहित्याचा इतिहास ते अगदी वेगळ्या दृष्टिकोनातून पाहतात. ''कधी हे साहित्य नियतीच्या भोवऱ्यात अडकले तर कधी टाळ मृदंगाच्या घोषात स्वत्व विसरून गेले, कधी या साहित्याने 'ब्रह्मविद्येचा सुकाळ' करण्यात धन्यता मानली, तर कधी परभृतता आणि परपुष्टतेत आत्मानंद व्यक्त केला. अघळपघळ होत असला तरी पश्चिमी डगला अंगावर चढवून कधी अस्सलपणाचा खोटा आनंद मिळवला तर कधी जीवनाच्या मूलभूत आशयाला पाठमोरे होऊन बद्द नाणेही कलदार म्हणून जयघोष करू लागले. पायात चाळ बांधून लावण्यवतीच्या कमरेला बिलगणारे साहित्य जसे इथे निर्माण झाले तसे कमरेखालचे साहित्यही दिमाखाने पदक्षेप करू लागले.'' पानतावणे यांच्या या भाष्यासंबंधी मतभेद होऊ शकतील, परंतु त्यामधील स्वतंत्र वैचारिकतेची प्रभावी शक्ती नाकारता येत नाही.

पानतावणे यांनी दलित साहित्याची पाठराखण अधिकारवाणीने केली आहे. ''दलित साहित्याने अंधार नाकारला आहे कलंकित भूतकाळ नाकारला आहे, मानसिक गुलामगिरीतून दलित मुक्त होऊ पाहत आहेत आणि डॉ. बाबासाहेब आंबेडकर यांच्या तत्त्वज्ञानातून ते तेजस्वी होत आहेत.'' असे प्रतिपादन पानतावणे करतात. समूहनिष्ठता हे दलित साहित्याचे अपूर्वत्व असल्याचे त्यांनी आवर्जून सांगितले आहे. त्याचप्रमाणे दलित साहित्यावरील नकारात्मकतेचा आक्षेप त्यांनी धुडकावून लावला आहे. दलित साहित्य हे पुराणव्यवस्थेला, तदुद्भुत मानसिकतेला व विचारांना नकार देते, ही क्रांती आहे. हे भान त्यांनी समाजमनात उत्पन्न केले. माणसामाणसांतील सौहार्द, सामाजिक न्यायोचितता, मानवी स्वातंत्र्य आणि प्रतिष्ठा यांचा दलित साहित्याने केलेला पुरस्कार ही नकाराची सकारात्मक बाजू आहे

पानतावणे यांनी केलेल्या कार्याचा भारतरत्न डॉ. बाबासाहेब आंबेडकर आंतरराष्ट्रीय पुरस्कार (लंडन), दिल्लीच्या अखिल भारतीय दलित साहित्य अकादमीचा पुरस्कार, इचलकरंजी येथील फाय फाउंडेशनचा राष्ट्रीय पुरस्कार, महाराष्ट्र राज्य साहित्य- संस्कृती मंडळाची गौरववृत्ती इत्यादी वेगवेगळ्या पुरस्कारांनी सन्मान झाला आहे. त्यांचे ग्रंथ महाराष्ट्र शासनाच्या राज्य पुरस्कारांनी गौरविले गेले आहेत. अभिव्यक्ती मराठवाडा साहित्य संमेलन, विदर्भ साहित्य संमेलन, चंद्रपूर येथील आंबेडकरवादी साहित्य संमेलन, मराठवाडा साहित्य संमेलन, अमेरिकेत अयोजित केलेले पहिले विश्वमराठी साहित्य संमेलन (फेब्रुवारी २००९) अशा अनेकानेक साहित्य संमेलनांचे अध्यक्षपद त्यांनी भूषविले आहे. वेगवेगळ्या व्याख्यानमाला त्यांनी गुंफल्या आहेत आणि समाजप्रबोधनाचे व विचारपरिवर्तनाचे त्यांचे कार्य तर अखंड सुरू आहे.

– प्रा. डॉ. विलास खोले

**संदर्भ :**


१. *जाधव मनोहर, देशमुख केशव, कांबळे हृषीकेश, संपादक; 'साहित्य, समाज आणि संस्कृती'; सुविद्या प्रकाशन, पुणे; २००६.*

२. *जाधव मनोहर, संपादक; 'साहित्य: शोध आणि संवाद'; सुविद्या प्रकाशन, पुणे; २०००.*


## पानवलकर, श्रीकृष्ण दामोदर

**कथाकार**

**१३ फेब्रुवारी १९२६ – १९ ऑगस्ट १९८५**

जिंदादिल व्यक्तिमत्त्व असणारे श्रीकृष्ण दामोदर पानवलकर हे १९६० ते १९८५ या पाव शतकातले महत्त्वाचे आणि जबरदस्त सामर्थ्याचे कथाकार होते. बेछूट, मर्दानी, देखणे व्यक्तीमत्त्व असलेल्या पानवलकरांच्या कथेतील व्यक्तिमत्त्वे ही तशीच दणकट,



रांगडी आणि मर्दानी होती. त्यांची भाषा तप्त लोखंडासारखी असली, तरी त्यांतील तरल, सखोल काव्यात्मकता दुर्लक्षिता येत नाही.

पानवलकरांचा जन्म सांगलीत, संस्थानी वातावरणात एका सुखवस्तू ब्राह्मण कुटुंबात झाला. त्यांचे वडील संस्थानच्या सेवेत मुलकी अधिकारी होते. त्यांचे सर्व शिक्षण सांगलीतच झाले. तेथील सिटी हायस्कूलमधून मॅट्रिकला असताना त्यांच्या संस्कृतमधील प्रावीण्यामुळे त्यांची जगन्नाथ शंकरशेठ शिष्यवृत्तीसाठी शिक्षकांनी तयारी करून घेतली होती. पण त्याच वर्षी वडिलांच्या अनपेक्षित निधनामुळे त्यांचा क्रमांक दुसरा आला व 'अकबरनवीस' ही दुसऱ्या क्रमांकाची शिष्यवृत्ती त्यांना मिळाली.

वडिलांच्या मृत्यूमुळे कौटुंबिक जबाबदाऱ्या त्यांच्यावर येऊन पडल्या. त्यामुळे उच्च शिक्षणापासून त्यांना वंचित राहावे लागले. मामांच्या मदतीने त्यांनी छोट्या-मोठ्या नोकऱ्या केल्या, नंतर ते मुंबईला कस्टम्समध्ये भरती झाले आणि तेथेच सुपरिंटेंडेन्ट पदापर्यंत त्यांना बढती मिळाली. याच काळात त्यांची साहित्यनिर्मिती सुरू झाली.

पानवलकरांनी प्रामुख्याने कथालेखन केले. मुंबईत आल्यावर त्यांची ओळख विजय तेंडुलकरांशी झाली व तिचे रूपांतर पुढे दाट मैत्रीत झाले. वसुधा, सत्यकथा, ललित, अभिरुची, हंस, किर्लोस्कर यांसारख्या दर्जेदार मासिकांतून त्यांच्या कथा प्रसिद्ध होऊ लागल्या. अपरिचिताचा वेध घेणाऱ्या त्यांच्या दमदार कथांचे एकूण सहा संग्रह प्रकाशित झाले. 'गजगा' (१९६३) हा त्यांचा पहिला कथासंग्रह. त्यानंतर 'औदुंबर' (१९६३), 'सूर्य' (१९६८), 'चिनाब' (१९७८) या कथासंग्रहांना महाराष्ट्र राज्य शासनाचे पुरस्कार मिळाले. 'एका नृत्याचा जन्म' (१९७५) आणि 'जांभूळ' (१९८१) हे त्यांचे अन्य कथासंग्रह होत.

या सहा संग्रहांव्यतिरिक्त विविध मासिकांतून प्रकाशित झालेल्या परंतु संग्रहित न झालेल्या १४-१५ कथा त्यांच्या नावावर आहेत. विविध नियतकालिकांमधून प्रकाशित झालेले पण असंग्रहित असलेले वीस लेखही त्यांनी लिहिले आहेत.

त्यांच्या मृत्यूनंतर १९९६ मध्ये त्यांच्या लेखांचे पुस्तक 'संजारी' ह्या शीर्षकाने प्रसिद्ध झाले आहे. 'खबर' ही त्यांनी लिहिलेली एकमेव एकांकिका 'सत्यकथा' (फेब्रुवारी १९७१) मासिकात प्रसिद्ध झाली होती. याशिवाय 'महंत' आणि 'नाना फडणवीस' अशी दोन अप्रकाशित नाटकेही त्यांनी लिहिली आहेत.

त्यांच्या 'सूर्य' कथासंग्रहातील 'सूर्य' कथेवर १९८३ मध्ये तेंडुलकरांनी लिहिलेला 'अर्धसत्य' हा अत्यंत गाजलेला हिंदी चित्रपट तयार झाला होता. या चित्रपटाच्या चित्रीकरणावर आधारित रोजनिशी स्वरूपाचे त्यांनी लिहिलेले 'शूटिंग' शीर्षकाचे पुस्तक प्रकाशित झाले आहे.

कौटुंबिक जीवनाचे सुख मात्र पानवलकरांना कधीच मिळाले नाही. भावा-बहिणींचे शिक्षण, त्यांचे विवाह यातच बराच काळ गेल्यामुळे ते शेवटपर्यंत अविवाहितच राहिले. मात्र त्यांना कौटुंबिक वातावरणाची, मुलांमध्ये रमण्याची मनस्वी हौस होती. म्हणूनच तेंडुलकर, मोमीन यांसारख्या मित्रांच्या पारिवारिक समारंभांत ते आनंदाने सहभागी होत आणि त्यात रंगून जात. सुग्रास जेवण, मुलांशी लाडाने वागणे आणि आपले सुरस चमत्कारिक अनुभव ऐकणारा हक्काचा श्रोतृवर्ग मिळणे या त्यांच्या कौटुंबिक सुखाच्या माफक अपेक्षा होत्या. मित्रांच्या घरी हक्काने जाऊन, त्यांच्या कुटुंबीयांत मिसळून ते आपल्या अपेक्षा पूर्ण करून घेत. त्यांच्या अविवाहित राहण्यामुळेच कदाचित त्यांच्या अखेरच्या दिवसांत शुष्कपणा आला होता.

चित्रमय शैलीचे दर्शन आपल्या कथांमधून घडविणाऱ्या या लेखकाने तथाकथित प्रायोगिकतेपासून स्वतःला नेहमी दूर ठेवले होते. त्यांनी मोजक्याच कथा लिहिल्या परंतु त्यांची कथासृष्टी थक्क करणारी होती.

प

'भाषा गोटीबंद असावी लागते, ती कमवावी लागते, नेमक्या शब्दांत तिचं वजन पकडायला लागतं' हे त्यांचे भाषेविषयीचे विचार ते नेहमी बोलून दाखवीत. पु. भा. भावे., जी. ए. कुलकर्णी यांच्या प्रमाणेच पानवलकरांनी मराठी कथेला नवी शक्ती दिली, नवीन परिमाण दिले, मराठी कथा समृद्ध केली. त्यांना अद्‌भुताची भूक जात्याच होती. जसे घडले तसे दाखवणे, हे त्यांच्या अनुभवसमृद्ध लेखनाचे खास वैशिष्ट्य होते.

कस्टम्सच्या नोकरीमुळे सर्वस्वी अकल्पित असे एक नवेच जग त्यांच्या अनुभवाच्या पट्ट्यात आले. त्या अनुभवांवर आधारित 'कैवल्य', 'सर्च', 'बगळा' यांसारख्या त्यांच्या कथा विशेष गाजल्या.

त्यांचे साहित्य म्हणजे शोधाची सर्जनशील साहसयात्रा होती. मानवी जीवनातील अपरिचिताचा वेध घेत वास्तवाच्या तपशिलातून उभे राहणाऱ्या पानवलकरांच्या कथा या प्रामुख्याने पुरुषांच्या कथा असल्याचे लक्षात येते. त्यांच्या कथांमध्ये स्त्रिया येतात त्या विशिष्ट काळात, त्या पुरुषांच्या आयुष्यात रस निर्माण करण्यासाठीच. पानवलकरांची निरीक्षण शक्ती, वेगवेगळ्या अनुभवांना सामोरे जाण्याची उत्सुकता, अनुभवातील कारुण्य, नाट्यमयता आणणारी जीवनशैली, विनोद व उपहास यांची पखरण या वैशिष्ट्यांमुळे त्यांच्या कथा वाचनीय व रंजक झाल्या आहेत. त्यांच्या कथेचा प्रवास म्हणजे त्यांचाच आंतरिक प्रवास होता. लेखनाची भाषा, शैली, शुद्धता यांबाबत ते अत्यंत चोखंदळ होते.

त्यांच्या गाजलेल्या कथांपैकी विषयांचे वैविध्य असणाऱ्या कथा मुळातूनच वाचण्यासारख्या आहेत. 'वायलर' ही टांग्याच्या घोड्याची कथा, 'सुंदर' ही हत्तीची कथा, 'मोतीचूर' ही पाखरांवरची कथा तर 'औदुंबर' ही संसार न मांडलेल्या व एकटेपणाचा शाप भोगत आयुष्याच्या संधिकालात पोचलेल्या नायकाची म्हणजे जणू त्यांचीच कथा. याशिवाय 'श्रीमंतीचा वस्तरा', 'पुंडू', 'आडवा बोळ', 'उन्हाची रात्र' या अशाच वेगवेगळ्या विषयांवरच्या त्यांच्या कथा गाजलेल्या आहेत.

विषयातील नाट्य हेरून, त्यांची मांडणी करताना तपशिलाचा, शब्दाशब्दांचा प्रपंच कसा करावा, आरंभ-अंत कसे रचावेत, व्यक्तिरेखेगणिक संवादाचे पोत कसे बदलावेत, या सर्वांचे भान राखीत त्यांचे कथालेखन झाले होते. अस्सल, जीवनरसाने रसरसलेल्या, मातीचा वास असलेल्या व्यक्तिरेखांना आपल्या कथांच्या केंद्रस्थानी ठेवून चोखंदळ वाचकांच्या पसंतीस उतरलेले पानवलकर म्हणजे प्रसिद्धी, बक्षिसे यांच्या मागे कधीच न लागलेला एक आत्ममग्न हळवा माणूस आणि आगळा लेखक होता हे नाकारताच येणार नाही.

'सूर्य' या कथेवर आधारलेल्या 'अर्धसत्य' या हिंदी चित्रपटासाठी त्यांना फिल्मफेअर ॲवॉर्ड मिळाले. त्याचप्रमाणे 'सारिका' या हिंदी मासिकातर्फे १९८२ मध्ये सर्वभाषिक कथा-स्पर्धेत त्यांच्या कथेला दुसरे पारितोषिक मिळाले.

– सविता टांकसाळे

**संदर्भ :**

१. *चित्रे पु. आ.; 'अभिरुची'; दिवाळी १९८५.*

२. *दडकर जया, संपादक; हातकणंगलेकर म.द.संपादक; 'श्री. दा. पानवलकर'; अंतरकर आनंद, पुणे; १९८७.*

प

## पायगावकर, सुमती हरिश्चंद्र

**बालसाहित्य लेखिका**

**७ जून १९१० – ६ मे १९९५**

सुमती हरिश्चंद्र पायगावकर यांचा जन्म नागपूर येथे झाला. त्यांच्या वडिलांच्या सततच्या बदल्यांमुळे सुमतीबाईंचे प्राथमिक शिक्षण प्रथम दिल्ली व नंतर इंदूर येथे झाले. शिक्षणाचे माध्यम उर्दू व हिंदी होते. इंदूर येथे माध्यमिक शिक्षण झाल्यावर महाविद्यालयीन शिक्षण त्यांनी मुंबईत एल्फिन्स्टन महाविद्यालयात घेतले. बी.ए.बी.टी. ही पदवी संपादन करून त्या शिक्षिका झाल्या व नंतर शिक्षण-निरीक्षक पदावर कार्यरत असताना त्या सेवानिवृत्त झाल्या.

शालेय काळात त्यांनी लेखन सुरू केले. त्यांची छोटी कादंबरी 'सरोज' प्रकाशित झाली. त्यानंतर त्या बालसाहित्याकडे वळल्या. इंग्रजी साहित्यात त्यांना रस



होता. त्या भाषेतील बाल-वाङ्मयाने त्यांना आकर्षित केले. 'देशोदेशींच्या कथा' (१९९१) ह्या पुस्तकामध्ये त्या बाळगोपाळांना उद्देशून लिहितात, 'या तुमच्यासाठी, तुम्हांला आवडतील अशा पद्धतीने मुद्दाम लिहून काढलेल्या आपल्या देशातल्या अन् परदेशातल्या काही छानदार कथा. निवडक म्हणजे काय? ज्या कथांत तुमच्यासारख्या चुणचुणीत नायकांनी काही विशेष केले आहे, किंवा ज्या कथांत नायकांच्या लक्षात आधीच आलेल्या काही विशेष गोष्टी अनुभवाने नंतर लक्षात आल्याचे सांगितले आहे; किंवा ज्या कथा अतिशय रम्य आहेत; अशांना मी निवडक कथा म्हणते.'

केंद्रशासन आणि राज्यशासन यांनी बक्षिसे देऊन गौरविलेली पुस्तके 'उत्कृष्ट बालसाहित्य संच' या मथळ्याखाली प्रकाशित झाली. ही पुस्तके त्यांतील आकर्षक व कथाप्रसंगानुरून चित्रांमुळे व मोहक मांडणीमुळे बालजगतात खूप लोकप्रिय झाली. गोष्टींची शीर्षकेच कुतूहलवर्धक आहेत.

'स्वप्नरेखा' भाग १, 'चाफ्याची फुले', 'पोपटदादाचे लग्न' 'सोनपंखी' भाग १, 'रानगावची आगगाडी'; याखेरीज 'यमाशी पैज', 'छोटा देवदूत', 'भुंगळे घर' इत्यादी पुस्तके उल्लेखनीय आहेत. इंग्रजीतील पारंपरिक कथांचा त्यांनी सुटसुटीत, सुबोध शैलीत अनुवाद केला. मुलांसाठी लिहिणाऱ्या मोजक्या लेखकांमध्ये सुमती पायगावकर यांचे स्थान आहे.

– वि. ग. जोशी

**संदर्भ :**


१. *पायगावकर सुमती; 'देशोदेशींच्या निवडक कथा'; मोरया प्रकाशन, डोंबिवली; १९९१*

२. *पायगावकर सुमती; 'स्वप्नरेखा भाग १', 'रानगावची आगगाडी', 'चाफ्याची फुले': अतुल बुक एजन्सी पुणे; डिसेंबर १९८८ ते २६ जानेवारी १९८९.*


प

## पारगावकर, विठ्ठल शंकर

**कथाकार, कादंबरीकार**

**१४ नोव्हेंबर १९२६ – ४ जुलै १९८९**



विठ्ठल शंकर पारगावकर यांचा जन्म पारगाव (घुमरा), ता. पाटोदा, जिल्हा बीड येथे झाला. त्यांचे शिक्षण इंटर आर्ट्सपर्यंत झाले. १९४७मध्ये पुण्यात स्थायिक झाल्यावर फर्गसन महाविद्यालयात ग्रंथपाल म्हणून ते नोकरीला लागले. १९७६ पासून याच महाविद्यालयात मुख्य कार्यालयात काम सुरू केले ते निवृत्तीपर्यंत.

पारगावकरांनी कथा आणि कादंबरी या वाङ्मय प्रकारांत विपुल लेखन केले. गंगाधर गाडगीळ आणि अरविंद गोखले या नवकथाकारांच्या नंतरच्या पिढीतील नवकथाकार म्हणून पारगावकर मराठी वाचकांना सुपरिचित आहेत. मराठी साहित्य जगतात 'विशं' या नावाने ओळखल्या जाणाऱ्या पारगावकरांनी मराठी साहित्यात मराठवाड्याचे प्रतिनिधित्व उत्तमरीत्या केले.

'ललाट' (१९६२), 'निगूडा' (१९६२), (१९८९), 'वैशाखातील वावटळ' (१९६३), 'एक होता राजा' (१९६५), 'कालचक्र' (१९६७), (१९९८) आदी कादंबऱ्या; 'पंचरंगी स्वप्न' (१९६०), 'मरवा' (१९६२), 'केळफूल' (१९६४), 'आविष्कार' (निवडक कथा १९८५), 'उजळती लकेर' (निवडक १९९८) आदी कथासंग्रह; 'संध्यामेघ' (१९६६), 'जुनागड ते काश्मीर' (१९६६), 'पूर्वदर्शन' (१९६७), 'जगापुढील प्रश्न' (१९६७) ही राजकीय विषयांवरील पुस्तके; 'आस्वाद आणि समीक्षा' (१९८९) ही समीक्षा त्यांच्या नावावर आहे.

शीर्षकाने त्यांच्या 'वि. शं. पारगावकर की कहानियाँ' या हिंदीत कथा (१९९०) प्रा. डॉ. राजमल बोरा यांनी अनुवादित केल्या. 'एक होता राजा'ला महाराष्ट्र राज्य शासनाचा पुरस्कार (१९६५) लाभला. 'वि. शं.

पारगावकर की कहानियाँ' या पुस्तकाला महाराष्ट्र राज्य हिंदी अकादमीचा अनुवादाचा पुरस्कार (१९९१-१९९२) मिळाला.

मध्यमवर्गीय मराठी कुटुंबाची प्रातिनिधिक सुखदुःखे सांगणाऱ्या पारगावकरांच्या कथा-कादंबऱ्यांना वाचकांचा उदंड प्रतिसाद लाभला.

— शशिकला उपाध्ये

**संदर्भ :**

*१. पारगावकर वि. शं.; 'अंतरिमा'; प्रतिमा प्रकाशन, पुणे.*

*२. गाडगीळ बाळ; 'वि.शं.पारगावकर'; ललित-सप्टेंबर १९८९.*

## पिंगे, रवींद्र रामचंद्र

**कथाकार, कादंबरीकार, ललितलेखक, प्रवासवर्णनकार**

**१३ मार्च १९२६ - १७ ऑक्टोबर २००८**



रवींद्र रामचंद्र पिंगे यांची खरी ओळख आहे ती एक उत्कृष्ट ललितलेखक म्हणून. पिंगे कुटुंब मूळचे विजयदुर्गजवळच्या 'उपळं' खेड्यातले, पण रवींद्र पिंगे यांची सारी हयात मुंबईतच गेली. त्यांचा जन्म गुढी पाडव्याच्या दिवशी, मुंबईच्या गिरगावातील कांदेवाडीतील केशवजी नाईकच्या चाळीत झाला. वडील रामचंद्र परशुराम पिंगे आणि आई सुभद्राबाई दोघेही मुंबई नगरपालिकेत प्राथमिक शिक्षक म्हणून काम करीत असत. पुढे ते मुख्याध्यापक म्हणून निवृत्त झाले. विद्येचे बाळबोध वातावरण घरात होते. रवींद्र गिंगे यांना, लहानपणापासूनच वाचनाची आवड होती. गिरगावातील चिकित्सक शाळेत शिकत असतानाच त्यांनी हस्तलिखित मासिकाचे लेखन, संपादन केले होते. ते कवितेच्या वाटेवर जाऊन मागे फिरले.

१९४५ मध्ये पिंगे विल्सन महाविद्यालयात दाखल झाले आणि तेथील ग्रंथालयात वाचनाचा मनमुराद आनंद लुटला. वाचता वाचता स्फुटलेखन, वाङ्मयीन घटनांचे वृत्तान्तलेखन, पुस्तकावर अभिप्राय लिहिणे, परिचयपर मजकूर लिहिणे. असा लेखनप्रवास सुरू झाला. एकीकडे ग्रंथसंग्रहही वाढू लागला.

१९५५ मध्ये 'मौज' साप्ताहिकात युसुफ मेहेरअलींची व्यक्तिरेखा लिहून पिंग्यांनी लेखनाचा श्रीगणेशा गिरवला, आणि पुढे सतत पन्नास वर्षे पिंगे लिहीत होते. ४० ग्रंथांची निर्मिती त्यांच्या नावे जमा झाली आहे. चपखल लेखशीर्षके; अचूक; व नेमकी शब्दयोजना ललित्यपूर्ण, एकात्म, एकसंध, बंदिस्त भाषाशैली हे पिंग्यांचे खास वैशिष्ट्य होय. मौज, साधना, माणूस, वीणा, नवशक्ती, सकाळ, केसरी, महाराष्ट्र टाइम्स, सत्यकथा, ललित इत्यादींमधून त्यांचे लेखन प्रसिद्ध होऊ लागले.

नौदलाच्या हिशोब खात्यात, रेशनिंग कार्यालयामध्ये नोकरी करीतच, अर्थशास्त्र विषय घेऊन ते बी. ए. झाले. त्यानंतर त्यांना मंत्रालयात नोकरी मिळाली. तेथे पंधरा वर्षे नोकरी केल्यानंतर १९६५ मध्ये ते आकाशवाणीच्या मुंबई केंद्रात साहाय्यक निर्माता म्हणून रुजू झाले आणि एका चैतन्यमय सृष्टीत दाखल झाल्याचा आनंद निवृत्तीपर्यंत-शेवटपर्यंत त्यांना मिळाला.

याअगोदर १९५५ मध्ये अखिल भारतीय स्तरावरच्या नभोनाट्य लेखन स्पर्धेत त्यांच्या 'महापूर' या नभोनाट्याला पारितोषिक मिळाले. हे नभोनाट्य अनेक भाषांत अनुवादित झाले. 'दीपावली'च्या रौप्यमहोत्सवानिमित्त आयोजिलेल्या कादंबरी लेखन स्पर्धेत पिंगे यांच्या 'परशुरामाची सावली' या कादंबरीला पुरस्कार मिळाला. त्यानंतर आकाशवाणीसाठी त्यांनी डझनावारी नाटिका लिहिल्या.

'श्रीअरविंदांच्या पाँडेचरीत' हा लेख सप्टेंबर १९५७च्या 'सत्यकथा'च्या अंकात प्रसिद्ध झाला आणि पिंगे यांचे नाव वाचकांसमोर ठळकपणे आले. 'महाराष्ट्र टाइम्स', 'माणूस', 'वीणा' ह्यांमध्ये विविध विषयांवर त्यांनी स्तंभलेखन केले. वि. स. खांडेकर, गो. नि. दांडेकर, मंगेश पाडगांवकर ह्यांनीही त्याला पसंतीची दाद दिली. 'बकुल फुल', 'शतपावली' (१९७४),

प

'देवाघरचा पाऊस' (१९७५), 'दिवे लक्ष्मण दिवे' (१९८४), 'अत्तर आणि गुलाबपाणी' (१९९६) हे लेखसंग्रह; 'आनंदाच्या दाही दिशा' (१९७४), 'आनंदव्रत' (१९८३), 'दुसरी पौर्णिमा' (१९९६) ही प्रवासवर्णने; 'पश्चिमेचा पुत्र' (१९७२), 'पिंपळपान' (१९८६), 'हिरवीगार पानं' (१९९२) ही पाश्चात्त्य साहित्याचा परिचय करून देणारी पुस्तके; 'परशुरामाची सावली' (१९७०) ही कादंबरी; 'प्राजक्ताची फांदी' (१९७८), व 'सुखाचं फूल' (१९८१) हे कथासंग्रह; असे विविध स्वरूपाचे लेखन पिंगे यांनी केले. विशेष म्हणजे त्यांचे सुमारे दोनशे ललितलेख 'माणूस' साप्ताहिकातून सतत पाच वर्षांच्या प्रसिद्ध कालावधीत झाले. 'साहित्यसूची'चे ते लेखक आणि संपादकीय सल्लागार होते. 'सर्वोत्तम रवींद्र पिंगे', तीनशे भारतीयांची व्यक्तिचित्रे, पाश्चात्त्य साहित्यसेवकांचे दोनशे परिचय, शंभर प्रवासवर्णने, हजारो पुस्तक परीक्षणे, साठ मानपत्रे, पाच-सहाशे ललितलेख, पन्नास कथा आणि तितकेच अनुवाद ही पिंगे यांची लेखनसंपत्ती होय. पिंगे यांच्या लेखनाला वाचकांनी भरभरून प्रेम दिले, दाद दिली.

'परशुरामाची सावली'ला राज्यपुरस्कार मिळाला. त्यानंतर त्यांना 'कोकण साहित्यभूषण पुरस्कार', सोलापूरचा 'दमाणी पुरस्कार', गुणसमृद्ध लेखन दीर्घकाळ सातत्याने केल्याबद्दल पुण्याच्या साहित्य परिषदेनेही त्यांना खास पुरस्कार दिला. त्यांच्या इंग्रजीत भाषांतर झालेल्या कथेला 'दिल्लीच्या कथा' वार्षिकाचेही पारितोषिक मिळाले.

रवींद्र पिंगे यांचा पिंड आध्यात्मिक होता. पुट्टपूर्तीचे संत सत्यसाई हे त्यांच्या परमश्रद्धेचे विषय होते. 'दुसऱ्या पिढीचे आत्मकथन' (नोव्हेंबर २००८) या ग्रंथामधील त्यांनी केलेले स्वकथन हा पिंगे यांचा शेवटचा लेख आहे.

– प्रा. मंगला गोखले

**संदर्भ :**

१. *गोखले मंगला; 'ललित'; ललितलेख विशेषांक; ऑगस्ट १९८८.*

२. *'साहित्यसूची'; रवींद्र पिंगे विशेषांक; जानेवारी २००९.*

प

## पितळे, द्वारकानाथ माधव

☞ **नाथमाधव**

## पुंडलिक, विद्याधर गंगाधर

**कथाकार, नाटककार, समीक्षक**

**१३ डिसेंबर १९२४ – ९ ऑक्टोबर १९८९**



विद्याधर पुंडलिक यांचा जन्म जळगाव येथे झाला. ते एम.ए. (समाजशास्त्र१९५१), पीएच. डी. होते. 'Religion in the life of college teachers in Poona' हा प्रबंधाचा विषय (डॉ. इरावती कर्वे यांच्या मार्गदर्शनाखाली) घेतला. (पुणे विद्यापीठ १९७२) प्रारंभी काही शाळांमध्ये शिक्षक, पुढे समाजशास्त्राचे प्राध्यापक, विजय महाविद्यालय, विजापूर (१९५३-१९५४), सिद्धार्थ महाविद्यालय, मुंबई (१९५४-१९६१) व समाजशास्त्र विभाग, पुणे विद्यापीठ (१९६०-१९८४), शेवटी प्रपाठक म्हणून निवृत्त झाले.

त्यांनी जवळपास ६० कथा, ५ एकांकिका, 'माता द्रौपदी' (१९७२) व 'चार्वाक' (१९७९) ही दोन प्रकाशित व दोन अप्रकाशित नाटके इत्यादींचे लेखन केले. याव्यतिरिक्त 'आवडलेली माणसे', (१९७६) हे व्यक्तिचित्रण व 'शाश्वताचे रंग' (१९८६) हे समीक्षालेखन प्रसिद्ध आहे. त्याचबरोबर समाजशास्त्रीय आणि अनुवादित लेखन त्यांच्या नावावर आहे. तथापि कथाकार आणि एकांकिकाकार म्हणून त्यांनी त्या-त्या प्रकारावर आपल्या व्यक्तिमत्त्वाचा ठसा उमटविला आहे. 'बारा वर्षांनंतर' ही त्यांची पहिली कथा 'सत्यकथा' मासिकाच्या १९५१च्या अंकात प्रसिद्ध झाली. 'वॉर्ड नं. ७' या त्यांच्या कथेने त्यांना कथाकार म्हणून नाव मिळवून दिले. 'या कथेत माझा आदिस्वर मला सापडला' असे त्यांनी म्हटले आहे. 'जिथे जाईन तिथे मी चमकेन' या अनावर आकांक्षेतून त्यांचे लेखन झाले.

डॉ. पु. ग. सहस्रबुद्धे, डॉ. के. ना. वाटवे, प्रा. रा. रा. मालेगावकर या प्राध्यापकांच्या अध्यापनातून मुळातील साहित्यविषयक आस्थेला खतपाणी मिळाले. श्री. पु. भागवत व राम पटवर्धन यांच्या चिकित्सक संपादकदृष्टीने त्यांची कथा संस्कारित झाली. गंगाधर गाडगीळ, अरविंद गोखले, पु. भा. भावे यांच्या नवकथेच्या भराच्या काळात त्यांना कथालेखनाची प्रेरणा आणि आदर्श गवसले. 'मराठी नवकथेने आणि नवकवितेने उंच डोंगरमाथ्यावरील भणाणत्या वाऱ्यासारखे स्वातंत्र्याचे आणि प्रयोगशीलतेचे एक उन्मेषशाली वातावरण त्या काळात निर्माण केले. कथेच्या आशयावर, भाषेवर, तंत्रावर, घडणीवर कसलेच बंधन नाही. कोणत्याही – अक्षरशः कोणत्याही विषयाला कथा कोणत्याही तंत्राने गवसणी घालू शकते– ही कलेतील स्वातंत्र्याची प्रेरणा आणि प्रचिती हे नवकथेचे खरे देणे होय', असे त्यांचे नवकथेसंबंधीचे आकलन स्पष्ट व स्वच्छ होते.

'पोपटी चौकट' (१९६२), 'टेकडीवरचे पीस' (१९६९), 'माळ' हे कथासंग्रह, 'देवचाफा' (१९७९) पाच दीर्घकथांचा संग्रह, 'फॅन्टशिया' (१९९४) हा फॅन्टसीजच्या अंगाने जाणाऱ्या कथांचा संग्रह हे सारे त्यांचे कथात्म लेखन आहे. यातून 'वेचक पुंडलिक' (१९८५) हा त्यांच्या निवडक कथांचा संग्रह सिद्ध झाला आहे.

त्यांच्या कथांमधून लहान मुलांना आवर्जून स्थान मिळाले आहे; जवळजवळ एक तृतीयांश कथा लहान मुलांसंबंधी आहेत. 'आजी शरण येते', 'त्याला मिळाला वनमाळी', 'मी आणि पेंडसे' या कथांमधून म्हातारे–म्हाताऱ्यांची चित्रे आली आहेत. 'प्रवास', 'वाटा', 'वेडीवाकडी लालरेषा', 'सती' या कथांची बीजे काही ख्यातनाम राजकारणी व्यक्तींच्या जीवनातील आहेत. 'वॉर्ड नं. ७', 'हाडशीर', 'एका मांजरीची कथा', 'ठिबका', 'मी आणि पेंडसे', 'पुत्र', 'गाय' व 'ऐलतीर' या कथांमधून मृत्यूचे चित्रण आढळते. हिंदू संस्कृती–परंपरांचे 'माळ', 'त्याला मिळाला वनमाळी', 'विपरीत काही झालं नाही', 'दवणा', 'अपार' व 'अर्धूक' या कथांतून चित्र येते. 'दवणा'मध्ये तर लोककथेचा सुंदर वापर त्यांनी केला आहे तर कानांवर काही ऐकण्यात आलेले, कुठेतरी ग्रंथांमध्ये वा वृत्तपत्रात वाचलेले असे काही विषय त्यांच्या कथांचे विषय झाले आहेत.

आगगाडीच्या प्रवासात कुणीतरी बाईने मुलाला दिलेला जन्म या वृत्तपत्रातल्या बातमीवर त्यांनी 'प्रवास' ही कथा लिहिली. एका महाविद्यालयाच्या प्राचार्यांचा खून करण्याची जबाबदारी ज्यांच्यावर आहे, असे नक्षलवादी तरुण त्या अपत्यजन्मप्रसंगी आगगाडीच्या डब्यात असतात; अशी विरोध नाट्यात्म जोड त्यांनी त्या बातमीला दिली. बी. ए. पर्यंत शिक्षण झालेल्या बुद्धिमान तरुणाला हॉकी खेळताना मार लागतो आणि गुडघ्याची वाटी कायमची कामातून गेल्याने अपंगत्व येते. त्या तरुणाचे आणि त्याच्यावर प्रेम करणाऱ्या तरुणीचे अनोखे, काव्यपूर्ण तरीही कारुण्यजन्य चित्रण हा 'सामोरी'चा विषय आहे.

कथाकार म्हणून पुंडलिकांची दोन सामर्थ्ये जाणवतात. एक: अर्थपूर्ण अनुभवांची निवड व स्वीकृत अनुभवांना हळवेपणा, भावविवशता व कमालीचा एकांगीपणा येऊ न देण्याचे भान; समाजशास्त्राच्या व्यासंगाने व तत्त्वज्ञानाची बैठक लाभल्याने अनुभवांना गहिरी अर्थवत्ता कशी प्राप्त होईल, यावर असलेला कटाक्ष; यांमुळे त्यांचे लेखन क्वचित कोरडे वाटण्याची शक्यता असते. पण या कोरडेपणात कलाप्रकाराविषयीची एक अभिजात नि प्रौढ तात्त्विक जाणीव कार्यरत असते. त्यांच्या कथांतून दिसून येणारी तरल पारदर्शकता, जीवनविषयक अनुभवांचे सहज सुंदर आविष्करण, व्यक्तींमधील नात्याच्या अन्वयार्थाने सूक्ष्म व मृदू विश्लेषण, कथान्तर्गत व्यक्तींच्या स्वभावांचे चैतन्यपूर्ण कंगोरे, कथारचनेच्या संदर्भातील डोळस प्रायोगिकता, कथावस्तूचा झुळझुळणारा प्रवाहीपणा, विशिष्टलक्षी, अर्थगर्भ, प्रत्ययकारक शब्दशैली, मर्मस्पर्शी, भेदक व संयमी निवेदन–पद्धती व सर्वांत महत्त्वाची म्हणजे त्यांची मनःपूर्वकता यामुळे त्यांचे लेखन लक्षणीय ठरते.

प

१९६० नंतर मराठी साहित्यिकांना महाभारताचे प्रलोभन पडले. दुर्गा भागवत (व्यासपर्व), इरावती कर्वे (युगान्त) हे त्यांपैकी काही लेखक. दुर्गाबाईंचा दृष्टिकोन भावात्मक तर इरावतींचा बुद्धिनिष्ठ. 'युगान्त'चे लेखन होताना इरावतीबाई आपला सहकारी आणि विद्यार्थी विद्याधर पुंडलिक यांच्याशी चर्चा करीत असणारच. त्याचा परिणाम असा झाला की, पुंडलिकांनी 'अखेरची रात्र' ही कथा महाभारतातील अंतिम युद्धाच्या आदल्या रात्री कृष्ण-कुंती-कर्ण यांच्या संबंधांवर प्रकाश टाकण्यासाठी व त्यांना गवसलेल्या या प्रसंगाचा अन्वय स्पष्ट करण्यासाठी लिहिली. इतकेच नव्हे तर पुढे 'सुडाचे हे चक्र कुणीतरी आपला हात घालून थांबवायला हवे होते' ही द्रौपदीला जाणीव होते याचे चित्रण करणारी 'चक्र' ही एकांकिका त्यांनी लिहिली. एकांकिकेच्या छोट्याशा अवकाशात पुंडलिकांनी शांततेचे व मानवतेचे एक महत्त्वाचे सूत्रच जणू मांडले, आणि एकांकिकाकार- समर्थ एकांकिकार म्हणून त्यांचे नाव झाले. त्यानंतर त्यांनी 'प्रार्थना', 'पैल तो गे काऊ', 'रंग' व 'अललऽऽडूर' या चार एकांकिका लिहिल्या. त्या 'चौफुला' (१९७६) संग्रहात एकत्र प्रसिद्ध करण्यात आल्या आहेत. यांतील प्रत्येक एकांकिका लक्षणीय आहे, पण त्यातही 'रंग' ही एक असाधारण एकांकिका आहे. आयुष्यभर रंगभूमीवर नट म्हणून वावरणाऱ्या आणि नेहमीच दुय्यम भूमिका कराव्या लागणाऱ्या व अव्वल दर्जाची भूमिका लाभल्यावर आपल्या अभिनयाच्या मर्यादा जाणवल्याने पराभूत नि व्यथित झालेल्या नटाचे दुःख, ही एकांकिका विलक्षण ताकदीने मांडते.

आता क्षितिजावर सूर्यबिंब टेकले होते. हळूहळू ते बुडू लागले. मृत मानवांच्या [illegible] जसा निर्जीवपणे [illegible] [illegible] तो लाल लाल निर्जीव [illegible] क्षितिजरेषेजवळ जात होता. क्षितिजरेषेच्या [illegible] रक्तासारखा एक विलक्षण तांबडा [illegible] होता, [illegible] [illegible] होते. [illegible] हळूहळू [illegible] एक पणतीच्या ज्योतीएवढी [illegible] उरली अन् अखेर तीही [illegible] गेली.

[illegible]

— विद्याधर पुंडलिक.

पुंडलिकांनी मोजकीच नाटके लिहिली. 'माता द्रौपदी' (१९७२), 'चार्वाक' (१९७९) ही त्यांची प्रसिद्ध नाटके आहेत तर 'श्रद्धा' (२०००), 'कुणीकडून कुणीकडे' (२०००), 'दिवस फार चांगले आहेत' व 'धन्य मी' ही अप्रसिद्ध नाटके आहेत. त्यांपैकी शेवटचे स्वातंत्र्यवीर सावरकरांच्या जीवनावरील एकपात्री प्रयोगासारखे डॉ. श्रीराम लागू यांच्या सूचनेवरून त्यांनी लिहिले. 'चक्र' या एकांकिकेच्या यशानंतर पुंडलिकांना या अनुभवाने बेचैन केले. त्याचा परिणाम असा झाला की जिचे पाचही पुत्र अश्वत्थामाने सुडाने मारले त्या द्रौपदीच्या वंचित मातृत्वाचे दुःख आणि एकूणच मानवी संहारातील दाहकतेची द्रौपदीला झालेली जाणीव व

त्यातून अश्वत्थाम्याच्या भळभळणाऱ्या जखमेत त्याची वेदना शांत व्हावी म्हणून तिने तेल घालणे इतक्या तिच्या जाणिवांचे विस्तारलेले क्षितिज चित्रित करून पुंडलिकांनी मानवी दुःख आणि त्याची जाणीव यासंबंधात व्यक्त केलेली संवेदनशीलता मोलाची होती. 'एकांकिके'चे नाटक करण्याचा व वाङ्मयप्रकारांतील अनुभवांतराचा त्यांनी केलेला हा प्रयोग होता. समीक्षकांना तो फारसा आवडला नाही. 'श्रद्धा' हे अणीबाणीच्या पार्श्वभूमीवर दोन पिढ्यांतील संघर्षाचे चित्रण समर्थपणे करणारे नाटक अलक्षितच राहिले. भारतीय तत्त्वज्ञानातील चार्वाकदर्शन हे नास्तिक समजले जाते. पुंडलिकांच्या प्रारंभीच्या काळात एकदा आचार्य अत्रे यांनी या विषयावर लेखन व्हायला हवे असे म्हटले होते. चार्वाक तत्त्वज्ञानाची उपलब्ध सुक्ते आणि सदाशिव आठवले यांनी लिहिलेले त्यावरील एक पुस्तक एवढेच मराठीत उपलब्ध लेखन असताना पुंडलिकांनी चार्वाक ही एक व्यक्ती होती आणि तिचे बंडखोर विचार तत्कालीन समाजाला पटले नाहीत, यातून तिची शोकांतिका झाली या सूत्रावर नाटक लिहिले होते. त्यांनी ज्या काळात नाटके लिहिली, तो काळ प्रायोगिक आणि व्यावसायिक रंगभूमीचा भराचा काळ होता. प्रायोगिकतेचे व यशाचे प्रलोभन त्यांना पडले नाही.

पु.ग.सहस्रबुद्धे, इरावती कर्वे, अनंत काणेकर, श्री.पु. भागवत, प्राचार्य नारळकर, सानेगुरुजी, त्र्यंबक शंकर शेजवलकर, वि.दा. सावरकर इत्यादी अकरा जणांवर त्यांनी 'आवडलेली माणसे' (१९७६) या पुस्तकात लेखन केले आहे. या साऱ्या माणसांचा या ना त्या कारणाने पुंडलिकांना सहवास लाभला. त्यांच्यातील लहान-सहान सवयी-लकबी, विचारप्रणाली, इतरांशी वागणूक इत्यादी विषयींची पुंडलिकांची सूक्ष्म निरीक्षणे प्रत्ययकारी ढंगात व्यक्त झाली आहेत. 'व्यक्तिचित्रे' या प्रकारातील एक वैशिष्ट्यपूर्ण पुस्तक म्हणून त्यांच्या या पुस्तकाकडे पाहिले जाते.

'दोन अखेरचे निरोप', 'प्रिय आना', 'प्रिय पराया', 'गुडबाय मि. चिप्स', 'क्राईम अॅन्ड पनिशमेन्ट', 'डार्लिंग' 'प्रिय डॉक्टर' असे आस्वादक ललितलेखन त्यांनी 'शाश्वताचे रंग'मध्ये एकत्र केले आहेत. त्यात प्राय: भिन्न-भिन्न पाश्चात्त्य साहित्यकृतींचा त्यांनी घेतलेला आस्वाद आहे. मराठीतल्या आस्वादक समीक्षकांमध्ये पुंडलिकांचे नाव त्यामुळे घेतले जाते.

'हरी नारायण आपटे', (१९९२), 'दलित साहित्य: सामाजिक-सांस्कृतिक अभ्यास' (सहकार्याने) अशी संपादने त्यांनी केली आहेत. त्यांनी 'माझी सखी' (१९६९) व 'दोन शहरांची गोष्ट' (१९९६) ही ललित तर 'अमेरिकन भांडवलशाही' व 'अमेरिकेची राजकीय पद्धती' ही वैचारिक पुस्तके अनुवादित केली आहेत.

उत्तम कथेचे सत्यकथा पारितोषिक (१९५७) 'आजी शरण येते' या कथेला, महाराष्ट्र शासनाचा (१९६३) उत्तम कथासंग्रहाचा पुरस्कार 'पोपटी चौकट'ला, सोव्हिएट लॅन्ड नेहरू पारितोषिक 'चक्र' या एकांकिकेला (१९६६) 'माळ' या कथेला कॅप्टन गो. गं लिमये पुरस्कार (१९७०), 'देवचाफा'ला (१९७६) वामन व रेणू देशपांडे पुरस्कार व 'आवडलेली माणसे' या व्यक्तिसंग्रहास (१९८०) महाराष्ट्र शासनाचा पुरस्कार असे पुरस्कार त्यांना लाभले होते. साहित्यलेखनात विद्याधर पुंडलिक यांची वाट स्वतंत्र राहिली.

– प्रा. अनंत देशमुख

**संदर्भ :**


१. *देशपांडे स. ह.; 'विद्याधर पुंडलिक'; साहित्य अकादमी, १९९६ (इंग्लिश).*
२. *पुंडलिक विद्याधर; 'बहर' उन्मेष प्रकाशन.*
३. *पुंडलिक विद्याधर; 'देवचाफा'; मौज प्रकाशन, मुंबई; १९७९.*
४. *देशमुख अनंत; 'आलोचना'; नोव्हेंबर १९८३.*
५. *देशमुख अनंत; 'आजचे नाटककार'; संपादक : डॉ. द. दि पुंडे, डॉ. स्नेहल तावरे; स्नेहवर्धन पब्लिशिंग हाउस, पुणे; १९९५.*
६. *देशमुख अनंत; 'वाङ्मयाचे अध्यापन'; संपादक : डॉ. वा. पु. गिंडे, डॉ. द. दि. पुंडे; मेहता पब्लिशिंग हाउस; पुणे; १९९४.*


प

## पुंडे, दत्तात्रय दिनकर
**समीक्षक**
**२६ डिसेंबर १९३८**



मराठी वाङ्मयाच्या इतिहासात एक जाणकार समीक्षक दत्तात्रय पुंडे यांनी पुणे विद्यापीठाची बी.ए. (१९६५), मुंबई विद्यापीठाची एम.ए. (१९६९) आणि पुणे विद्यापीठाची पीएच.डी. (१९८०) या पदव्या मिळविलेल्या आहेत. १९५८ ते १९६४ या काळात शासकीय कर्मचारी म्हणून नोकरी केली होती. त्यानंतर १९७० ते १९७२ या काळात पुणे कॉलेज येथे व १९७२ ते १९८५ या काळात पुण्याच्या मॉडर्न महाविद्यालयामध्ये मराठीचे अध्यापन केले.

पुंडे यांचे सर्व लेखन समीक्षापर आहे. 'कुसुमाग्रज-शिरवाडकर एक शोध', 'वाङ्मयीन निरीक्षणे', 'मन्थन - एक वैचारिक आलेख', 'निबंध कसा लिहावा', 'भारताचा सांस्कृतिक वारसा आणि स्वामी विवेकानंद', 'सुलभ भाषाविज्ञान', 'कुसुमाग्रजांच्या प्रतिभेचा उगम आणि विकास', 'वाङ्मयीन अवलोकन' या पुस्तकांबरोबरच काही पुस्तकांचे सहलेखनही त्यांनी केलेले आहे.

'लोकवाचन', 'व्यावहारिक मराठी', 'भाषाविज्ञान परिचय', 'वाङ्मयेतिहास: सद्यःस्थिती आणि अपेक्षा' (सहलेखक- गो. म. कुलकर्णी), 'पुन्हा वामन मल्हार' (सहलेखक- गो. म. कुलकर्णी), 'भयंकर सुंदर मराठी'. ही त्यांची साहित्यसंपदा असून 'वाङ्मयेतिहासाची संकल्पना', 'त्रिदल', 'गांधीवाद आणि आधुनिक मराठी साहित्य', 'उजळती लकेर' (वि.शं.पारगावकर यांच्या निवडक कथा) ही त्यांनी संपादन केलेली उल्लेखनीय ग्रंथसंपदा आहे. 'त्रिदल' या काव्यविषयक संपादित पुस्तकाच्या एकूण सोळा आवृत्त्या निघालेल्या आहेत.

'अक्षर दिवाळी' (१९८५), 'महाराष्ट्रातील जातिसंस्थाविषयक विचार', 'वाङ्मयीन वाद', 'वाङ्मयाचे अध्यापन', 'साहित्यविचार', 'आजचे नाटककार', 'सयाजी नगरीतील साहित्यविचार' इत्यादी पुस्तकांच्या संपादनातही त्यांचा सहभाग आहे.

एकूणच भाषाविज्ञान, व्याकरण, ललितगद्य, साहित्यविचार या विविध विषयांवर त्यांचे अभ्यासपूर्ण लेखन आहे. 'भयंकर सुंदर मराठी' हे पुस्तक भाषेच्या संदर्भातील ललित-गद्य आहे. मराठी बोली भाषेतील गंमती-जमती त्यामध्ये कलात्मकरीतीने रेखाटल्या आहेत.

मराठीतील वाङ्मयेतिहाची संकल्पना आणि समीक्षा हे त्यांच्या आवडीचे आणि अभ्यासाचे विषय आहेत. त्यादृष्टीने वाङ्मयेतिहास आणि समीक्षा यांच्या संदर्भातील सखोल चिंतन आणि मनन पुंडे यांच्या लेखनामधून दिसते. मराठी वाङ्मयाच्या इतिहासात त्यांचे हे योगदान मोलाचे आहे.

– संपादक मंडळ

**संदर्भ :**

*१. 'त्रिदल', संपादित; स्नेहवर्धन पब्लिशिंग हाउस, पुणे; प्रथमावृत्ती, एप्रिल १९९३.*

## पुरंदरे, बळवंत मोरेश्वर
**कथाकार, कादंबरीकार, शिवचरित्रकार**
**२९ जुलै १९२२**

शिवशाहीर म्हणून उभ्या महाराष्ट्राला परिचित असलेले आणि आज २१ व्या शतकातही शिवकालातच रमणारे बाबासाहेब पुरंदरे तथा बळवंत मोरेश्वर पुरंदरे यांचा जन्म पुण्यात झाला. त्यांचे वडील मोरेश्वर पुरंदरे हे पुण्यातच भावे शाळेत चित्रकला शिक्षक होते. त्याच शाळेत बाबासाहेबांचे शालेय शिक्षण पूर्ण झाले. त्यानंतर पुण्यातच सर परशुरामभाऊ महाविद्यालयामध्ये त्यांनी ज्युनिअर बी.ए. पर्यंतचे शिक्षण घेतले. बालपणापासूनच इतिहासाचे असलेले प्रेम उत्तरोत्तर वाढतच गेले. वयाच्या १६ व्या वर्षापासून शिवाजी महाराजांच्या चरित्राचे, महाराष्ट्राच्या इतिहासाचे, उज्ज्वल परंपरेचे अभ्यासपूर्ण संशोधन करण्यास



प



त्यांनी सुरुवात केली. रम्य गतकाळाचे स्मरणरंजन करण्याच्या ध्यासाने त्यांना पछाडले आणि एका आधुनिक इतिहासकाराचा जन्म झाला.

त्यांच्याविषयी पु.ल. म्हणतात, 'देशस्थी रंगाचा, कायस्थी अंगाचा, लेंगा व शर्ट घालणारा, हसतमुख माणूस इतिहासकार आहे यावर माझा प्रथमदर्शनी विश्वासच बसला नाही. बळवंत मोरेश्वर पुरंदरे असे भारदस्त, साक्षात कुठल्याही ऐतिहासिक अष्टप्रधान मंडळात सहजी खपून जाईल ऐसे नाव धारण करणारे हे इतिहासकार प्रथमदर्शनी इतिहासकार वाटतच नाहीत.'

बाबासाहेबांनी वयाच्या १२व्या वर्षी नारायणराव पेशवे यांच्या जीवनावर एक ऐतिहासिक कादंबरी लिहिली होती. अर्थात ती प्रसिद्ध झाली नाही. शालेय आणि महाविद्यालयीन जीवनात त्यांनी काही कविताही लिहिल्या होत्या. त्या 'केसरी'मध्ये प्रसिद्ध झाल्या होत्या. १९४६ साली 'जळत्या ठिणग्या' हा शिवकालीन कथांचा संग्रह त्यांनी वयाच्या २४व्या वर्षी प्रसिद्ध केला. इतिहास संशोधक ऋषितुल्य ग. ह. खरे हे त्यांचे गुरू, मित्र, आप्त सर्व काही होते. त्यांच्याच सहवासामुळे ते इतिहास-संशोधनात रमले. जगण्यासाठी सर्वांत महत्त्वाची गोष्ट म्हणजे 'जगण्याचे प्रयोजन' ते त्यांना इतिहास-संशोधनाच्या रूपात लवकर सापडले. इतिहास-संशोधन हे एक शास्त्र आहे याची जाणीव त्यांच्या मनात पक्की होती आणि म्हणूनच आधाराशिवाय विधान करायचे नाही, हे व्रत त्यांनी आजवर स्वीकारले आहे.

बाबासाहेबांची एकूण ३६ पुस्तके प्रकाशित झाली असून ती शिवचरित्राशी व इतिहासाशी संबंधित आहेत. 'जळत्या ठिणग्या' (१९४६) हा शिवकालीन कथांचा संग्रह ही त्यांची प्रथम निर्मिती होय. याशिवाय 'मुजऱ्याचे मानकरी', 'दख्खनची दौलत', 'शनिवारवाड्यातील शमादान', 'पुरंदराच्या बुरुजावरून', 'पुरंदराचा नौबत', 'पुरंदराचा सरकारवाडा', 'महाराज' असे ऐतिहासिक कथासंग्रह त्यांच्या नावावर आहेत. याशिवाय 'माझे नाव रायगड' 'माझे नाव आग्रा' 'माझे नाव पन्हाळगड' 'माझे नाव प्रतापगड' 'माझे नाव पुरंदर' ह्या व अन्य गडांचा ओजस्वी भाषेत आत्मकथनात्मक परिचय करून देणारी त्यांची पुस्तकेही लोकप्रिय आहेत. १९७६ साली 'शेलारखिंड' व १९६२ साली 'शिलंगणाचे सोने' ह्या ऐतिहासिक कादंबऱ्यांचे लेखनही त्यांनी केले आहे.

त्यांची सर्वांत गाजलेली साहित्यकृती म्हणजे 'राजा शिवछत्रपती' हे शिवचरित्र होय. ह्या चरित्रलेखनास त्यांनी १९५२मध्ये वयाच्या ३०व्या वर्षी सुरुवात केली आणि १९५६मध्ये ते प्रकाशित झाले. शिवाजी महाराजांच्या उत्तुंग, द्रष्ट्या व महान व्यक्तिमत्त्वाचे बारीकसारीक पैलूंसह दर्शन घडविणारे हे चरित्र आहे. बाबासाहेबांच्या ठायी असणारा महाराजांविषयीचा भक्तिभाव, मराठ्यांच्या कर्तृत्वाविषयी असणारी आत्मीयता व तो काळ बारकाव्यांसह जिवंत करणारी ओजस्वी, ओघवती व प्रासादिक शैली यांमुळे हे चरित्र आज महाराष्ट्रातील घराघरांत धार्मिक पोथीसारखे पूज्य व संग्राह्य ठरले आहे. ह्या पुस्तकाच्या १५ आवृत्त्या निघूनही प्रत्येक आवृत्तीच्या वेळी भरगच्च प्रकाशनपूर्व नोंदणी होते. 'सुदिन, सुवेळ मी शिवरायांच्या जन्माचं आख्यान मांडलंय- आई तुळजाभवानी तू ऐकायला ये' अशी तुळजाभवानीला हाक घालूनच त्यांनी शिवचरित्र लिहायला सुरुवात केली. या ग्रंथाची पारायणे करणारे लोक महाराष्ट्रात कमी नाहीत.

या लेखनसंपदेबरोबरच आपल्या ओजस्वी वाणीने शिवकालीन भाषेतच शिवचरित्रावर त्यांची १५००० पेक्षा जास्त व्याख्याने महाराष्ट्रात, देशात आणि परदेशांतही झाली आहेत. त्यांच्या व्याख्यानात श्रोते देहभान विसरून त्यांच्यासह शिवकालात शिरतात. व्याख्यानासाठी मंचावर उभे राहिल्यावर बाबासाहेब कोणाचेही कुणीही नसतात. व्याख्यानातला रसरशीतपणा, चढउतार, ओघवती-ओजस्वी वाणी, हावभाव, हृदयस्पर्शीत्व श्रोत्यांना मंत्रमुग्ध करते.

गेल्या दोन दशकांपासून ते ‘जाणता राजा’ ह्या शिवचरित्र कथेच्या रूपात सादर होणाऱ्या दृक-श्राव्य कार्यक्रमाची भव्य निर्मिती करून त्याचे प्रयोग देशभर करीत आहेत. ह्या अतिशय भव्य-दिव्य कार्यक्रमाच्या रूपाने त्यांनी आपल्या मनातील ‘शिवचरित्रा’ला अभिनयाचे रंग, दृश्यांचे रूप आणि आशयाचे रस घेऊन एक सामूहिक नाट्य १००पेक्षा अधिक कलाकारांसह सादर करण्याचे शिवधनुष्य पेलले. ह्या कार्यक्रमातील ‘शिवराज्याभिषेक सोहळा’ केवळ अवर्णनीयच आहे. घोडदळ, पायदळ, तोफा, हत्ती ह्यांसह भव्य दरबार ते प्रत्यक्षात मंचावर उभारतात. या कार्यक्रमाचे सुमारे ९०० प्रयोग झाले असून यातील संवादांचे इंग्रजी व हिंदी ह्या भाषांत अनुवाद झाले आहेत. याशिवाय गुजराती, तमीळ, बंगाली एवढेच नव्हे तर फ्रेंच भाषेतही अनुवाद करून या कार्यक्रमाचे प्रयोग युरोपातही करण्याचा आपला मानस त्यांनी अकलूज येथील जानेवारी २००९च्या प्रयोगाच्या वेळी व्यक्त केला.

छत्रपतींच्या ३००व्या राज्याभिषेक दिनानिमित्त त्यांनी १९७४ मध्ये दादर येथे दृश्य माध्यमातून ‘शिवसृष्टी’ उभी केली. ती पाहण्यासाठी समाजाच्या सर्व स्तरांतील लक्षावधी लोक येऊन गेले.

पाश्चात्त्य देशात इतिहास, ऐतिहासिक स्मारके, कागदपत्रे, वास्तू यांची जशी आणि जितकी कदर केली जाते; त्यांचे राष्ट्रीय संपत्ती म्हणून जतन केले जाते, तसे आपल्याकडे होत नाही. शिवकालीन कागदपत्रे वाळवीच्या भक्षस्थानी पडत आहेत, ऐतिहासिक वास्तूंची दुरवस्था लाजिरवाणी आहे; हे पु. लं.शी झालेल्या चर्चेतून बाबासाहेबांना प्रकर्षाने जाणवले. त्यामुळे शिवस्मृती म्हणून जे-जे आहे ते-ते जपण्यासाठी त्यांनी ‘शिवप्रतिष्ठान’ची स्थापना केली. त्याच्या माध्यमातून शिवकाल जपण्याचे त्यांचे प्रयत्न अव्याहतपणे चालू आहेत.

व्याख्यानांतून त्यांना मिळणाऱ्या मानधनावर महाराष्ट्र शासनाने कर लावला. असा कर भरणारे बाबासाहेब हे एकमेव उदाहरण आहेत. पण व्याख्यानापोटी मिळालेले सुमारे अडीच कोटी रुपये त्यांनी विविध संस्थांना देणगीच्या रूपात दिले. शिवाय आपल्या खासगी मिळकतीचा ‘पुरंदरे ट्रस्ट’ निर्माण करून, त्यातून व्यक्तिगत लाभांश मुळीच न घेता सर्व पैसे ते जनकल्याणार्थ खर्च करतात. अनेक रुग्णालयांना या ट्रस्टतर्फे मदत मिळाली आहे. ‘वक्ता दशसहस्रेषु, दाता दशलक्षेषु’ असे त्यांचे सार्थ वर्णन होईल.

१९५४च्या गोवा मुक्ती लढ्यातील संग्रामात एक शिलेदार म्हणून ते हाती शस्त्र घेऊन नगरहवेलीला झुंजायलाही गेले होते. फेब्रुवारी २००९ मध्ये राजमाचीला होणाऱ्या पहिल्या दुर्गसंमेलनाचे अध्यक्ष म्हणून त्यांची निवड झाली होती. त्यांच्या ‘शेलारखिंड’ या कादंबरीवर प्रख्यात अभिनेते व निर्माते रमेश देव यांनी ‘सर्जा’ ह्या चित्रपटाची निर्मिती केली.

इतिहास संशोधक असूनही त्यांचे वाचन केवळ इतिहासापुरते मर्यादित नाही. ललित वाङ्मयाशी त्यांचा घरोबा कायम आहे. शिवाय उत्कृष्ट देशी-विदेशी चित्रपट पाहणे, शास्त्रीय संगीताच्या मैफलींबरोबर लावणीसारख्या लोकसंगीतातही रस घेणे त्यांना भावते. तेवढीच रुची त्यांना क्रिकेटचा स्कोअर ऐकण्यातही आहे. खऱ्या अर्थाने हा रसिक इतिहासकार आहे.

‘निराधार विधानं करायची नाहीत’ अशी प्रतिज्ञा करून डोळसपणे, अभ्यासू वृत्तीने त्यांनी संशोधन व लेखन केले. त्यांच्या अंतःकरणातच एक कवी असल्यामुळे मोहोरबंद, गोंडेदार व काव्यात्म भाषा ते सहजपणे लिहून जातात पण हातातला इतिहासाचा लगाम कधी सुटू देत नाहीत. तपशिलावरची त्यांची पकड भलतीच घट्ट असून स्मरणशक्ती विलक्षण आहे. ३००-३५० वर्षांपूर्वीच्या सर्व घटना तिथी, तारखांसह त्यांना पाठ आहेत. शिवचरित्राचे गायन हा त्यांच्या जीवनाचा श्वास आहे, ध्यास आहे; पण शिवचरित्र सांगत असताना ते कधीच मुसलमानांचा, किंवा परधर्मीयांचा उल्लेख कुचेष्टेने करीत नाहीत. ‘अभ्यासोनी प्रकटावे’ या उक्तीनुसार शिवाजी महाराजांची पावले जिथे-जिथे उमटली तिथे-तिथे ते अनेकदा जातात. गडागडांवरील दगडादगडाला ते जिवंत

प

करतात. ऐतिहासिक कागदपत्रे मिळवण्यासाठी इराण, फ्रान्स, इंग्लंड येथेही जाण्याची त्यांची तयारी आहे.

वाटता येईल तेवढे शिवचरित्राचे धन अवघ्या मराठी मनाला त्यांनी वाटून टाकले आहे, आजही वाटीत आहेत. ते करीत असताना त्यांना कोठेही अहंतेचा स्पर्श झाला नाही किंवा स्वतःविषयी बडेजाव, विद्वत्तेचा डामडौलही त्यांनी दाखविला नाही. निःस्पृहतेत ते रामशास्त्री प्रभुण्यांचे अवतारच आहेत. ते कधीही, कोणाकडूनही पैशाची अपेक्षा करीत नाहीत. ते नेहमी म्हणतात, 'इतिहास ही माझी एकट्याची मिरास नाही. ते साऱ्यांचं धन आहे. त्यात कुठे हीण आलं तर ते पाखडून, फेकून द्यायला हवं. शिवचरित्राबाबत जसजशी नवीन माहिती मिळेल, तसतशी शिवचरित्रात भर घालण्याचे काम मी करीन.'

आपल्या ८६-८७ वर्षांच्या आयुष्यात शिवशाहिरांना अनेक मानसन्मान प्राप्त झाले आहेत. त्यांपैकी महत्त्वाचे म्हणजे त्यांच्या 'राजा शिवछत्रपती' या ग्रंथाला राज्यशासनाचा पुरस्कार मिळाला आहे. पुण्याच्या त्रिदल संस्थेतर्फे दिला जाणारा मानाचा 'पुण्यभूषण' हा पुरस्कार त्यांना मिळाला आहे चतुरंग प्रतिष्ठानतर्फे दिल्या जाणाऱ्या 'जीवन गौरव' पुरस्काराचेही ते मानकरी आहेत. पण ह्या सर्वांपेक्षा त्यांना महत्त्वाचा वाटणारा पुरस्कार म्हणजे १९६३ मध्ये साताऱ्याच्या राजमाता सुमित्राराजे भोसले यांनी बहाल केलेली 'शिवशाहीर' ही पदवी होय.

जे-जे सत्य, शिव आणि सुंदर आहे, त्या सर्वांबद्दल बाबासाहेबांना आस्था आहे आणि अभिरुचीही आहे. शिवाय त्यांचे लेखन भोवतालची ओजहीन, जिद्द नसलेली, मरगळलेली समाजस्थिती पाहून ठसठसणाऱ्या वेदनेतून झाले आहे; म्हणून त्यांच्या संशोधनाने साहित्यक्षेत्रात मानाचे स्थान मिळवले आहे.

– सविता टांकसाळे

**संदर्भ :**

१. *'साहित्य सूची ' दिवाळी अंक ; २००१.*
२. *'संगम संस्कृती ', दिवाळी अंक ; १९९५.*
३. *'धनुर्धारी', एप्रिल; १९७३.*

## पुरंदरे, माधुरी बळवंत

**भाषांतरकार, चरित्रकार, संपादक**

**२९ एप्रिल १९५२**



माधुरी बळवंत पुरंदरे यांचा जन्म व शिक्षण पुणे येथे झाले. शिवचरित्राचे प्रसिद्ध लेखक व इतिहासकार बाबासाहेब पुरंदरे यांच्या त्या कन्या असल्या, तरी चित्रकलेची विशेष आवड असल्याने मुंबई व पॅरिस येथे त्यांनी त्या कलेचे शिक्षण घेतले. त्या फ्रेंच भाषेचे अध्यापन करतात. संगीत व अभिनय यांतही त्यांनी नाव कमावले आहे. वाचनातून ज्ञान व माहिती मिळते, पण कधी न संपणारा आनंदही मिळतो, असे त्यांचे मत असून त्या आनंदात इतरांना सहभागी करण्याची त्या धडपड करतात. त्यांची मैत्रीण नंदिता वागळे यांच्या सहकार्याने त्यांनी बालजगतासाठी 'वाचू आनंदे'चे चार भागांत संपादन केले. शिवाय ग्रामीण भागातील शिक्षक, विद्यार्थ्यांसाठी 'वनस्थळी' या नियतकालिकाचे संपादन त्यांनी अनेक वर्षे केले. परकीय कलाकृती मराठीत आणून मराठीला समृद्ध करण्याबरोबरच त्यांनी दया पवार यांच्या 'बलुतं'चे फ्रेंचमध्ये भाषांतर केले.

थिएटर ॲकेडेमी या पुणेस्थित नाट्यसंस्थेशी माधुरीताई १९७५ पासून संबद्ध आहेत. १९९४ ते १९९८ या काळात त्या संस्थेच्या उपाध्यक्षा होत्या. 'पिकासो' चरित्र (१९८६), आयर्विंग स्टोनच्या लस्ट फॉर लाइफ वर आधारित 'व्हिन्सेंट व्हॉन गॉग' ही कादंबरी, सॅम्युअल बेकेट यांचे नाटक 'वेटिंग फॉर गोदो' (१९९५), मोलिएरच्या डॉन जुआन या नाटकाचे रूपांतर, ज्याँ जिओनोच्या लघुकादंबरीचे 'झाडे लावणारा माणूस' (२००१) हे भाषांतर इत्यादी माधुरीताईंची साहित्यसेवा आहे. अंतर्मुख व गंभीर वृत्ती, अनेक कलामाध्यमांची समज व त्यावर

प

पकड, सातत्याने जोपासलेली प्रयोगशीलता हे त्यांच्या व्यक्तिमत्त्वाचे विशेष आहेत.

– वि. ग. जोशी

**संदर्भ :**


१. *पुरंदरे माधुरी–वागळे नंदिता; 'वाचू आनंदे', बालगट: एक ते चार; ज्योत्स्ना प्रकाशन व राज्य मराठी विकास संस्था, पुणे, २००१.*


## पुरोहित, केशव जगन्नाथ

☞ **शांताराम**

## पेंडसे, शंकर दामोदर

☞ **मुख्य नोंद – धर्मकारण खंड**

## पेंडसे, श्रीपाद नारायण

**कादंबरीकार, नाटककार, आत्मचरित्रकार**

**५ जानेवारी १९१३ – २२ मार्च २००७**



श्रीपाद नारायण पेंडसे यांचा जन्म मुर्डी (जि. रत्नागिरी) येथे झाला. बी.एस्.सीपर्यंतचे शिक्षण मुंबईला पार पडले. मुंबईच्या बेस्टमध्ये जनसंपर्क अधिकारी म्हणून त्यांनी काम केले. १९६८ पासून निवृत्तीपर्यंत ते तेथेच कार्यरत होते. स्वातंत्र्योत्तर मराठी कादंबरीप्रांतातील एक महत्त्वाचे कादंबरीकार. फडके–खांडेकर–माडखोलकर या कादंबरीकारांनी मराठी कादंबरी लोकप्रिय आणि रसिकप्रिय करण्याचे महत्त्वाचे कार्य केले. साधारणतः १९२० ते १९४५ या पाव शतकात या कादंबरीकारांनी आपल्या प्रतिभेने मराठी वाचकांवर अधिराज्य गाजविले. पण हे अधिराज्य गाजवताना आणि कादंबरी या वाङ्मय प्रकाराला अपूर्व लोकप्रियता मिळवून देताना ह्या कादंबरीकारांनी कादंबरीला साचेबंदपणाच्या आणि कृत्रिमतेच्या चौकटीत नेऊन बसविले. प्रस्तुत दोन दोषांमध्ये ही कादंबरी अडकल्यामुळे आणि कलावादाच्या व जीर्वनवादाच्या चर्चेत तिची घुसमट झाल्यामुळे या काळातील कादंबरी निर्जीव आणि नि:सत्त्व होत गेली. या पार्श्वभूमीवर श्री.ना.पेंडसेंचे कादंबरीलेखन मराठी कादंबरीविश्वाला नव्या दिशा देणारे ठरले.

मराठी कादंबरीविश्वात 'प्रादेशिकता' ही संकल्पना ठाशीवपणे समोर आली ती श्री.ना.पेंडसे यांच्या 'एल्गार' या पहिल्याच कादंबरीमुळे. १९२० ते १९४५ या काळातील मराठी कादंबरीचा एकूण परिघ आणि तिची आंतर्बाह्य प्रकृती लक्षात घेऊन आपली कादंबरी कशी असावी, यापेक्षा ती कशी नसावी; याची खूणगाठ त्यांनी आपल्या मनाशी बांधून 'एल्गार'ची निर्मिती केली होती. त्यामुळे ही कादंबरी जाणकारांच्या–समीक्षकांच्या पसंतीस उतरली आणि या कादंबरीसोबतच मराठी प्रादेशिक कादंबरीची संकल्पनाही रूढ झाली.

'एल्गार'पूर्वी 'खडकावरील हिरवळ' हे पेंडसेंचे व्यक्तिचित्रणात्मक पुस्तक १९४१ मध्ये प्रसिद्ध झाले होते. पेंडसेंच्या कादंबरीलेखनप्रवासाच्या दृष्टीने विचार केला, तर 'खडकावरील हिरवळ' या पुस्तकाला विशेष महत्त्व द्यावे लागेल. कारण पेंडसेंनी पुढे ज्या कादंबऱ्या लिहिल्या, त्यांतील मध्यवर्ती व्यक्तिरेखा या पुस्तकातीलच आहेत. आपल्या अवतीभवतीच्या माणसांचा, त्यांच्या भावविश्वाचा सतत शोध घेत राहणे, ही मुळात पेंडसेंची प्रकृती असल्यामुळे त्यांच्या समग्र कादंबरीविश्वाचा आधार म्हणून 'खडकावरील हिरवळ' या पुस्तकाचे महत्त्व नाकारता येत नाही.

१९४९ मध्ये 'एल्गार' प्रकाशित झाली आणि त्यानंतर लागोपाठ सकस आणि सरस कादंबऱ्या लिहून पेंडसेंनी मराठी साहित्यविश्वात कादंबरीकार म्हणून आपली नाममुद्रा अधिक ठळक केली. 'एल्गार' (१९४९), 'हद्दपार' (१९५०), 'गारंबीचा बापू' (१९५२), 'हत्या' (१९५४), 'यशोदा' (१९५७), 'कलंदर' (१९५९), 'रथचक्र' (१९६२), 'लव्हाळी' (१९६६), 'ऑक्टोपस' (१९७२), 'तुंबाडचे खोत' (१९८७), 'गारंबीची राधा' (१९९३), 'एक होती आजी'

(१९९५), 'कामेरू' (१९९७), 'घागर रिकामी रे, रंगमाळी' (२००२), 'हाक आभाळाची' (२००७) या कादंबऱ्या लिहून मराठीतील अग्रेसर कादंबरीकाराचा मान पटकावला.

पेंडसेंच्या या कादंबरीविश्वाचा मूळ आधार आहे तो कोकणप्रांत. कोकणचा निसर्गरम्य परिसर, तिथल्या माणसांचे जगणे, तिथले दारिद्र्य, तिथल्या निसर्गाचा मानवी जीवनावर झालेला दूरगामी परिणाम, तिथल्या देव-दैवतांच्या संकल्पना आणि माणसांची मानसिकता यांचे अतूट नाते इत्यादी घटक या कादंबरीविश्वाचे मूलस्रोत आहेत. या मूलस्रोतांचा अधिक परिणामकारक उपयोग श्री. ना. पेंडसेंनी आपल्या कादंबरीलेखनात करून एक नवे, अनोखे विश्व उभे करण्याचे कार्य केले आहे. पेंडसेंच्या कादंबऱ्यांमधील हा निसर्ग वाचकांना झपाटून टाकणारा, त्यांच्यावर जणू चेटूक करणारा आहे, हे सिद्ध झालेले आहे. विशेषःतहे चेटूक 'गारंबीचा बापू'ने अधिक अमीट स्वरूपाचे केलेले आहे.

प्रादेशिकता हे कलाकृतीचे स्वायत्त मूल्य आहे का? वाङ्मयीन निकषांवर प्रादेशिकता ही संज्ञा कितपत टिकू शकते? इत्यादी प्रश्न पेंडसे यांच्या कादंबऱ्यांनी निर्माण केले. त्यावर खुद्द श्री. ना. पेंडसेंनी दिलेले उत्तर अधिक महत्त्वाचे व माननीय असे आहे. ते म्हणतात- ''एखादा प्रदेश कितीही जिवंत केला, अन्य पात्रांच्या बरोबरीने तो वावरत आहे, असा प्रत्यय वाचकाला आला; तरी अखेरच्या विश्लेषणात या वैशिष्ट्याला स्थान राहत नाही. शहरी बायांच्या मेळाव्यात घट्ट कासोट्याच्या कोळिणीने धिटाईने प्रवेश केला, तर ती ज्याप्रमाणे सर्वांचे लक्ष आपल्याकडे खेचून घेईल असं काहीतरी प्रादेशिक कादंबरीच्या बाबतीत होतं. लक्ष वेधून घेण्यापर्यंत ठीक, पण सौंदर्याच्या स्पर्धेत तिच्याकरिता वेगळ्या कसोट्या असू शकत नाहीत. माझ्या कादंबऱ्यांकडे पाहताना त्या प्रादेशिक आहेत, याची मी दखलही घेत नाही. मला जे जाणवतं ते सर्जनाचा विषय होण्याला पात्र आहे का? जीवनाचा किती खोलवर मी ठाव घेतो आहे? माझ्या निर्मितीत व्यापक सत्याचा अंश आहे का? मी माणसं निर्माण करतो की ठोकळे? या निकषांवर माझी कादंबरी लटपटणार असेल, तर प्रादेशिकतेचं पलिस्तर तिचं संरक्षण काय करणार?'' (रथचक्र: चौथी आवृत्ती: प्रस्तावना: पृ.१३) प्रस्तुत विवेचनावरून कादंबरीची महत्ता कशात आहे, हे स्पष्ट होते आणि त्या दृष्टीने विचार केला, तर पेंडसेंच्या कादंबऱ्या वाङ्मयीन गुणवत्तेतही श्रेष्ठ असल्याचे जाणवते.

कादंबरी लेखनासोबतच पेंडसेंनी नाट्यलेखनही केलेले आहे. पेंडसेंची बहुतेक नाटके त्यांच्याच कादंबऱ्यांवर आधारित आहेत. त्यांपैकी 'राजेमास्तर' (हद्दपार), 'यशोदा' (यशोदा), 'गारंबीचा बापू' (गारंबीचा बापू), 'असं झालं आणि उजाडलं' (लव्हाळी), 'रथचक्र' (रथचक्र) या नाटकांचा उल्लेख करता येईल. त्याशिवाय स्वतंत्र नाटके म्हणून 'महापूर', 'चक्रव्यूह', 'संभूसांच्या चाळीत', 'शोनार बांगला', 'पंडित! आता तरी शहाणे व्हा!', 'डॉ. हुद्दार' इत्यादी नाटकांचा उल्लेख करावा लागेल. पेंडसेंनी आपल्या कादंबऱ्यांची यशस्वी नाट्यरूपांतरे करून कलांतराचा सुंदर वस्तुपाठच वाचकांपुढे ठेवला, असे म्हणता येईल.

कादंबरीलेखन आणि नाट्यलेखन ह्यांच्या सोबतच काही स्फुटलेखनही पेंडसेंनी केले. त्यात मुख्यतः कादंबरी आणि अवतीभवतीच्या माणसांचा, समाजाचा चिंतनाच्या पातळीवर शोध होता. 'एक मुक्त संवाद- उद्याच्या कादंबरीकारांशी', 'अज्ञाताचा शोध', 'एक दुर्लभ स्नेह', 'बेस्ट उपक्रमाची कथा' यांचा या संदर्भात विचार करता येईल. याशिवाय पेंडसेंनी 'श्री. ना. पेंडसे: लेखक आणि माणूस' हे आत्मचरित्रही लिहिले. प्रस्तुत आत्मचरित्र हा मराठी आत्मचरित्र वाङ्मयातील एक वेगळा प्रयोग होता. एक मित्र श्री. ना. पेंडसे यांचे चरित्र लिहितो आहे, या शैलीतील हे आत्मचरित्र अधिक तटस्थ आणि प्रांजळ अशा स्वरूपाचे झालेले आहे.

व्यक्तिचित्रे, कादंबरी, नाटक, आत्मचरित्र, स्फुट अशा विविध स्वरूपाचे लेखन करताना पेंडसेंनी कथा (जुम्मन) आणि अनुवाद (प्रायश्चित्त: स्कार्लेट लेटर) याही प्रांतांत आपले पाऊल ठेवलेले आहे; पण हे सगळे करताना

प

पेंडसेंच्या वाङ्मयीन व्यक्तिमत्त्वाची खरी ओळख आणि त्यांचे वाङ्मयीन मोठेपण व्यक्त होते ते कादंबरी वाङ्मयातूनच!

पेंडसे यांच्या कादंबऱ्यांचे अनुवादही भारतीय आणि जागतिक भाषांमध्ये झालेले आहेत. त्यांपैकी गुजरातीमध्ये 'हद्दपार', 'गारंबीचा बापू', 'हत्या', 'कलंदर', 'रथचक्र'; हिंदीमध्ये 'गारंबीचा बापू', 'रथचक्र', 'तेलगूत 'जुम्मन', 'रामशरणची गोष्ट'; इंग्रजीत गारंबीचा बापू (Wild Bapoo of Garambi- भाषांतर : इएन रेसाईड, युनेस्को प्रकाशन) हद्दपार (Sky is the limit भाषांतर: ज्ञानेश्वर नाडकर्णी; अप्रकाशित) या पुस्तकांचा उल्लेख करता येईल. त्यांच्या पुस्तकांना जे पुरस्कार प्राप्त झाले, त्यांचा उल्लेख पुढीलप्रमाणे करता येईल. नॅशनल लायब्ररी (नागपूर) पारितोषिक (एल्गार), महाराष्ट्र राज्य पुरस्कार (हद्दपार, हत्या, कलंदर, संभूसाच्या चाळीत, चक्रव्यूह) महाराष्ट्र राज्य नाट्यस्पर्धा पुरस्कार (संभूसाच्या चाळीत), साहित्य अकादमीचा पुरस्कार (रथचक्र), प्रियदर्शनी पुरस्कार (तुंबाडचे खोत)

श्री. ना. पेंडसे यांच्या एकूणच वाङ्मयीन कर्तृत्वाचा सन्मान करणारे बहुमानही त्यांना बहाल करण्यात आले आहेत. कुसुमाग्रज प्रतिष्ठानचा जनस्थान पुरस्कार (१९९३), महाराष्ट्र फाउंडेशनचा जीवनगौरव पुरस्कार (१९९६), अमेरिकेतील डॉ. लाभसेटवार प्रतिष्ठानचा लाभसेटवार साहित्य सन्मान पुरस्कार (१९९९) या मोठ्या प्रतिष्ठेच्या पुरस्कारांनी त्यांच्या वाङ्मयीन कर्तृत्वाचा सन्मान करण्यात आला. १९५५ मध्ये रॉकेफेलर फाउंडेशनची जगाच्या प्रवासासाठी ट्रॅव्हलिंग फेलोशिप त्यांना प्राप्त झाली होती.

मित्रपरिवारात आणि कौटुंबिक वर्तुळात श्री. ना. पेंडसे शिरूभाऊ या नावाने ओळखले जायचे. त्यांच्या वाङ्मयीन कार्यकर्तृत्वाच्या संदर्भातही 'श्री.ना.पेंडसे'ऐवजी 'शिरूभाऊ' हेच नाव अधिकतर रूढ झाले होते. मराठीच्या कादंबरीविश्वाचा समग्र धांडोळा घेताना आणि मराठी कादंबरीच्या विकासक्रमाचे टप्पे सांगताना हरिभाऊ ते शिरूभाऊ असाही उल्लेख केला जातो, त्यावरून मराठी कादंबरी विश्वातील श्री. ना. पेंडसेंचे स्थान किती महत्त्वाचे आहे, ते जाणवते.

– डॉ. रवींद्र शोभणे

## पेंढारकर, प्रभाकर भालजी

**कादंबरीकार, चित्रपट लेखक, निर्माते**

**८ सप्टेंबर १९३३**



प्रभाकर पेंढारकरांचा जन्म कोल्हापूरला झाला. तेथेच विद्यापीठ हायस्कूलमध्ये मॅट्रिकपर्यंतचे शिक्षण झाले. नंतर राजाराम महाविद्यालयामधून त्यांनी बी.ए. ही पदवी संपादन केली. त्यांनी आपले वडील, सुप्रसिद्ध दिग्दर्शक भालजी, यांच्या हाताखाली चित्रपट व्यवसायात प्रवेश केला. पुढे मुंबईला 'राजकमल'मध्ये नोकरी केली, परंतु १९६२ मध्ये चित्रपटक्षेत्र सोडून ते फिल्म्स डिव्हिजनमध्ये नोकरीला लागले. दरम्यान त्यांनी आपल्या लेखनाला 'दीपावली' मासिकातून सुरुवात केली. त्यांच्या 'प्रतीक्षा' दीर्घकथेस पुरस्कार मिळाला. 'अरे संसार संसार' ही त्यांची पहिली कादंबरी. त्यांच्या वैशिष्ट्यपूर्ण व ओघवती भाषाशैलीने ती विशेष गाजली. यात अनेक वैयक्तिक अनुभव-कथन आहे. 'रारंगढांग' ही कादंबरी अगदी वेगळ्या विषयामुळे व त्यातील भाषासौंदर्यामुळे गाजली. 'मौज' प्रकाशनाने ती प्रसिद्ध केली. हिमालयातील अति उंचीवरील उभे कडे फोडून तेथे रस्ते बांधणीची अति अवघड कामगिरी भारतीय सैन्याला पार पाडावी लागली. या आगळ्या विषयावरच्या अनुभवांवर त्यांनी ही कादंबरी लिहिली. माणसे, त्यांचे अनुभव, त्यांची स्वभाववैशिष्ट्ये त्यांनी न्याहाळली. माणूस आणि निसर्ग यांच्यातल्या द्वंद्वाच्या चित्रणांमुळे ती विशेष गाजली.

फिल्म्स डिव्हिजनच्या कामातून त्यांना अनेक अनुभव आले. निरनिराळी स्थळे पाहताना १९७७ मध्ये आंध्र प्रदेशमध्ये महाभयंकर वादळे झाली. या चक्रीवादळातील

अनुभवांवर त्यांनी त्याच नावाचे पुस्तक लिहिले. मोजके पण तरीही वेगळ्या विषयांवर लक्षणीय लेखन करणारा लेखक, अशी त्यांची प्रसिद्धी आहे. त्यांच्या भाषेचा बाजही त्या विषयाला साजेसा व आकर्षक शैलीचा असतो.

त्यांनी 'प्रतीक्षा', 'हरवलेला मधुचंद्र', 'आज अचानक गाठ पडे' या आपल्या दीर्घकथांवर चित्रपटही काढले. 'फोर्ट्स अ‍ॅन्ड द मॅन' या महाराष्ट्रातील किल्ल्यांवर काढलेल्या अनुबोधपटास (१९६३-१९६४) राष्ट्रीय पारितोषिक; हिमालयातील माउंटेनिअरिंग कोर्स-स्टेअर टू डिरस्काय या अनुबोधपटास फ्रान्सचे अ‍ॅवॉर्ड; खाडी पोहून जाणारा तारानाथ शेणॉय यांवरील चित्रपटास राष्ट्रीय पारितोषिक; 'व्हिव्ह मी सम फ्लॉवर' या अनुबोधपटास केंद्र सरकारचे पारितोषिक; भालजी पेंढारकरांवर काढलेल्या चरित्र चित्रपटाला राष्ट्रीय पारितोषिक अशी अनेक महत्त्वाची पारितोषिके त्यांनी मिळवलेली आहेत.

लोकेशन, बोलका कॅमेरा, त्याची पटकथा यांचे अभ्यासपूर्वक बारकाईने केलेले निरीक्षण ही त्यांची वैशिष्ट्ये होत. त्यांच्या अनेक फिल्म्स व्यवस्थापनावरही आहेत. यासाठी त्यांनी फ्रान्स व अमेरिका येथे वास्तव्य करून त्याचे प्रशिक्षण घेतले. त्यांच्या 'बालशिवाजी' या चित्रपटाची पटकथा त्यांनीच अभ्यासपूर्वक व मोठ्या मेहनतीने लिहिली आहे. त्यालाही इंटरनॅशनल ब्यूरोचा पुरस्कार मिळाला.

– रागिणी पुंडलिक

## पेठे, मेघना मोरेश्वर

**कथाकार**

**४ डिसेंबर १९५८**

मेघना मोरेश्वर पेठे यांचा जन्म मुंबईत झाला. वडील मुंबईच्या झेविअर्स महाविद्यालयात मराठीचे प्राध्यापक होते. आई जर्मन भाषातज्ज्ञ होती.

शालेय शिक्षण दादरच्या बालमोहन विद्यामंदिरात आणि महाविद्यालयीन शिक्षण सेन्ट झेविअर्स महाविद्यालयात झाले. १९७९ साली बी.ए. ही पदवी संपादन केली. रिझर्व बँक ऑफ इंडियात त्या नोकरी करतात.



सर्वसामान्य वाचकाला त्यांची ओळख कथाकार, कादंबरीकार म्हणूनच आहे. मात्र त्याहीपूर्वी त्या प्रयोगशील व सकस कवितालेखन करीत. 'मेघनाच्या कविता' नावाचे स्वतःच्या सुंदर हस्ताक्षरात लिहिलेले पुस्तक (हस्तलिखित) त्यांनी स्वतःच प्रकाशित केले. १९७४ ते १९८५ सालातील या कविता आहेत. 'जगण्याला अर्थ आणि निमित्त देणारी कविता ही एक प्रेरणा आहे. पण तिच्याशिवायही जगणे असतेच. जगणे कवितेपेक्षा मोठे आहे' असे त्या या पुस्तकाच्या प्रस्तावनेत म्हणतात. 'दहा जानेवारी एकोणीसशे पंच्याऐंशीनंतर मी काही लिहिले नाही' असे त्यांचे निवेदन आहे. 'हंस अकेला' हा त्यांचा कथासंग्रह १९९७मध्ये प्रकाशित झाला. कुठे थांबायचे, याचे पूर्ण भान या लेखिकेला आहे, हे विशेष. त्यांच्या कविता वाचल्यावर कथा-कादंबरीच्या आशयाचा मूळ गाभा कवितांच्या काही ओळींत वा विचारात असलेला जाणवतो. उदाहरणार्थ-

'टुमदार घराच्या काचेतून,
दूरवर कोसळणाऱ्या दरडी पाहाव्या,
तसे काल आपण समोरासमोर उभे राहून,
शांतपणे एकमेकांचा निरोप घेतला, आता पुन्हा आपण भेटणार नाही,
पुन्हा कधी भेटलो तरी!'

त्यांच्या 'नातिचरामि' कादंबरीचे (२००४ साली प्रकाशित) मूळ रूप या कवितेत असल्याचे जाणवते. त्यांचा 'हंस अकेला' (१९९७) कथासंग्रह खूप गाजला, तो कथांच्या वेगळेपणामुळे. 'आंधळ्यांच्या गायी' (२०००) हा दुसरा कथासंग्रहही वैशिष्ट्यपूर्ण ठरला. समाज, कुटुंबरचना, संस्कृतिमूल्ये, नैतिकता आणि

प

व्यक्तिमन यांत गुरफटणारे, धडपडणारे नातेसंबंध वेगवेगळ्या पार्श्वभूमीवर त्यांच्या कथांत येतात. हे संबंध थेट आणि धीटपणे त्या मांडतात. संडासाच्या (शौचकूपात) भांड्यात अडकलेले चिमणीचे पिल्लू यासारख्या प्रतिमा घेऊन, दैनंदिन व्यवहारातील मध्यमवर्गीय जीवनाचे तपशील घेऊन, त्या व्यक्तिमनाचा आणि जगण्याचा घटनापट कथा-कादंबरीतून मांडतात. 'आई'पणाचे आदर्शत्व झुगारून एखादी स्त्री आपल्या मुलीच्या लैंगिक सुखाचा हेवा करते. असे सांस्कृतिक धक्के आणि मनवर्तनाचे वास्तव त्यांच्या कथा-कादंबऱ्यांत बंदिस्तपणे उभे राहते. एकविसाव्या शतकाच्या सुरुवातीची ही एक प्रभावशाली लेखिका आहे. त्यांना 'प्रियदर्शनी' पुरस्कार प्राप्त झाला आहे.

– प्रा. सुहासिनी कीर्तिकर

## पेडणेकर, हिराबाई

☞ **मुख्य नोंद – नाटक खंड**

## पै, शिरीष व्यंकटेश

**कथाकार, कवयित्री, संपादक**

**१५ नोव्हेंबर १९२९**



पुणे येथे जन्मलेल्या शिरीष पै यांना बी.ए., एल्.एल.बी. असे शिक्षण घेतले. आचार्य अत्रे यांची ज्येष्ठ कन्या असणाऱ्या या लेखिकेने वयाच्या ९व्या वर्षापासून कथालेखनाला प्रारंभ केला. चित्रपट, प्रवासवर्णन, अनुवाद, नाट्यलेखन, कथा, कविता अशा सर्व साहित्यप्रकारांत विपुल लेखन केले आहे. 'हायकू' हा जपानी काव्यप्रकार मराठीत आणल्याबद्दल शिरीष पै यांचे नाव प्रामुख्याने घेतले जाते. अतिशय तरल भाव प्रकट करणारा आणि रचायला काहीसा अवघड असा तीन ओळींचा हा काव्यप्रकार शिरीष पै यांनी 'हायकू', 'ध्रुवा', 'हायकूंचे दिवस', 'माझे हायकू', 'मनातले हायकू', 'पुन्हा हायकू' या पुस्तकांद्वारे मराठीत आणला.

त्यांची साहित्यसेवा गेली ५० वर्ष सुरू असून २००८ सालीही त्यांची 'पुन्हा हायकू', 'जुनं ते सोनं' ही दोन पुस्तके प्रकाशित झाली. 'हायकू' या पुस्तकाला महाराष्ट्र साहित्य परिषदेचा पुरस्कार मिळाला. 'कविता एका पावसाची' व 'ऋतुचित्रे' (१९९१) या दोन पुस्तकांना राज्य पुरस्कार मिळाले. 'वडिलांचे सेवेसी' व 'मी माझे मला' या दोन पुस्तकांनाही राज्य पुरस्कार मिळाले. 'अखेरचे पान' (अमेरिकन कथांचा अनुवाद), 'माझे नाव आराम' या अनुवादित कथा पुस्तकांसह ओशो यांची ८ पुस्तके त्यांनी मराठीत अनुवादित केली.

'कळी एकदा खुलली होती' (१९७४), 'हा खेळ सावल्यांचा' (१९६८), 'झपाटलेली' (१९७५) या तीन नाटकांद्वारे त्यांनी नाट्यलेखनातही आघाडी घेतली. 'अज्ञात रेषा' (रुबाया), 'हापूसचे आंबे', 'दुःखाचे रंग', 'कांचन गंगा' (१९९६), 'हृदयरंग', 'प्रेमरोग' , 'कमलपत्र' (१९८८), 'रानपाखरे' (१९९८), 'भवसागर' असे कथासंग्रह; 'मुके सोबती', 'रानातले

दिवस', 'हाती शिल्लक', 'सय', 'आतला आवाज', 'आजचा दिवस', 'मैलोन्‌मैल कुणीच नाही', 'अनुभवांती', 'आकाशगंगा' इत्यादी ललित लेखसंग्रह; 'बागेतील जमती', 'आईची गाणी' असे बालवाङ्मय अशी विपुल ग्रंथसंपदा त्यांच्या नावावर आहे.

महाराष्ट्र टाइम्स (सय), नवशक्ती (खायच्या गोष्टी), चित्रलेखा (मर्मबंध) मधून त्यांनी सदरलेखनही केले १३जून १९६९ ते १५ नव्हेंबर १९७६पर्यंत त्यांनी दैनिक, संपादकपद भूषविले होते व पुढे त्या मराठाच्या संपादकही झाल्या. १९५३ पासून 'नवयुग'च्या संपादन विभागात काम करणाऱ्या शिरीष पै यांनी १९६२ला 'नवयुग' बंद झाल्यावर दैनिक 'मराठा'च्या रविवार पुरवणीचे काम पाहायला सुरुवात केली. नारायण सुर्वे, बाबूराव बागूल यांसारख्या सामाजिक जाणिवेतून लेखन करणाऱ्यांना त्यांनी उत्तेजन देऊन पुढे आणले, हे विशेष!

– सुहास बारटक्के

**संदर्भ :**


*१. 'ऋतुरंग'; दिवाळी, १९९६ पृ. ३४.*

*२. 'ऋतुरंग'; दिवाळी, १९९५ पृ. २२.*

*३. 'भूषण'; ४ ऑगस्ट, १९७५.*


## पोतदार, अनुराधा बाळकृष्ण

**कवयित्री**

**१५ डिसेंबर १९२७ – १५ डिसेंबर १९७८**

अनुराधा बाळकृष्ण पोतदार यांचा जन्म अहमदनगर येथे झाला. ज्येष्ठ साहित्यिक आणि शिक्षण अधिकारी वि. द. घाटे यांच्या त्या कन्या, तर विख्यात दत्तकवी हे अनुराधाबाईंचे आजोबा होय.

शिक्षण कोल्हापूर व पुणे येथे झाले. एम. ए., पीएच. डी. पदवी संपादन केली. संशोधनात्मक कामासाठी त्यांनी 'मराठीचा अर्थविचार' हा फारसा न हाताळता गेलेला विषय निवडला. डॉ.शं.गो. तुळपुळे यांच्या मार्गदर्शनाखाली प्रबंध-लेखन केले. वर्गमित्र असलेल्या बाळकृष्ण विष्णू पोतदार यांच्याशी परिचयोत्तर प्रीतिबंध निर्माण झाले. जातिभिन्नतेमुळे होणारा प्रचंड विरोध पत्करूनच उभयता



विवाहबद्ध झाले. पोतदार हे राजाराम महाविद्यालयामध्ये इंग्रजीचे प्राध्यापक तर कोल्हापूरच्याच शाहू महाविद्यालयात अनुराधाबाई मराठीच्या प्राध्यापिका म्हणून रुजू झाल्या. पुढे पुण्याच्या सर परशुरामभाऊ महाविद्यालय-मध्ये मराठीच्या प्राध्यापिका म्हणून २५ वर्षे काम पाहिले. काही काळ मराठी विभाग प्रमुख म्हणूनही काम केले.

अनुराधाबाईंचा मूळचा पिंड काव्यलेखनाचा होय. मनाला भावलेले आणि त्या-त्या वेळेच्या सामाजिक स्थितीनुसार काव्यलेखनासाठी विविध विषय हाताळले गेले. प्रीती, वेदना, दुःख ह्या भावना त्यांनी तरलपणे काव्यातून मांडल्या आहेत. त्यांनी चळवळीच्या, क्रांतिकारी लढ्यांच्या काळात देशप्रेमाचे विषय काव्यातून हाताळले.

'कॅक्टस फ्लॉवर', 'मंजधार', 'आवर्त' अशा काव्यसंग्रहांतून अनुराधाबाईंची संयत, ऋजू, पण वास्तवता दाखविणारी काव्यप्रतिभा विलक्षण आनंद देते. स्त्री-जीवनातील दुःख, वेदना दर्शविणारी त्यांची कविता आहे. लहानशा घटनेला काव्यात गुंफून वास्तवात काय घडते आहे, हे स्पष्टपणे अधोरेखित करण्याचे सामर्थ्य अनुराधाबाईंच्या कवितेत निश्चितपणे आहे.

अनुराधाबाईंनी संपादित केलेले मान्यवर कवींच्या कवितांवर आधारित असलेले काव्यग्रंथ अजूनही विद्यापीठात अभ्यासले जातात. 'पद्मपत्र' (कवयित्री संजीवनी मराठे), 'मृगधार' (वि. म. कुलकर्णी), कुसुमावतींच्या काव्य व इतर लेखनावर आधारित ग्रंथांचे साहित्य अकादमीसाठी अनुराधाबाईंनी संपादन केलेले आहे.

अनुभवातून तरलस्पर्शी आकलन, आस्वादन आणि मग प्रकटन अशा पद्धतीचा काव्य-लेखनाचा ढाचा असलेल्या कवयित्री म्हणजे डॉ. अनुराधा बाळकृष्ण पोतदार. संवेदनशील, कविमनाच्या, ऋजू व्यक्तिमत्त्वाच्या

प

शिक्षिका म्हणूनही अनुराधाबाईंनी समाजमनात आपला वेगळा ठसा उमटवलेला आहे.

– विनया देसाई

**संदर्भ :**


१. *पोतदार, अनुराधा; 'आठवांच्या पारंब्या'; साहित्यसूची– डिसेंबर १९८९.*

२. *पाटील, रंगराव; 'माझे कोल्हापूरचे दिवस'; रविवार सकाळ, कोल्हापूर–१२ जानेवारी १९९२.*


## पोहनेरकर, नरहर शेषराव

### कवी, कथाकार, कादंबरीकार, संशोधक

### ३ ऑक्टोबर १९०७ – २ सप्टेंबर १९९०



नरहर शेषराव पोहनेरकर यांचा जन्म परळी–वैजनाथ येथे झाला. जुन्या काळच्या रितीप्रमाणे बाराव्या वर्षीच त्यांचे लग्न झाले. दारिद्र्य साथीला असल्यामुळे शिक्षणाची वाटचाल त्यांना स्वतःची स्वतःच करावी लागली. हैद्राबाद येथील वास्तव्यात मॅट्रिकची परीक्षा अनेकदा देऊनही ते उत्तीर्ण झाले नाहीत. त्यांनी मराठी भाषेचा स्वतंत्र अभ्यास सुरू केला. पोहनेरकरांचा जीवनक्रम सरळ मार्गाने गेला नाही. नांदेड जिल्ह्यात मुखेड येथे त्यांनी पिठाची गिरणी चालविली. येथपासून त्यांनी अनेक खटपटी केल्या. मराठीचे स्वयंभू आणि स्वयंसिद्ध उपासक असलेल्या पोहनेरकरांना माणसे गोळा करणे, मराठीच्या उपासनेसाठी त्यांना प्रेरित करणे आणि मराठीच्या सर्व दालनांत सोयीनुसार खेळ मांडणे ह्याची अखंड हौस होती. स्वामी रामानंदांच्या हिप्परग्याच्या राष्ट्रीय शाळेतही ते होते.

निजामाच्या मुसलमानी राज्यातील राजधानी हैद्राबाद येथे राहून पोहनेरकर मराठी भाषेच्या परीक्षांची केंद्रे चालवीत असत. हैद्राबाद संस्थानातील ज्या भाड्याच्या जागेत ते राहत होते, तेथे मित्र आणि विद्यार्थी ह्यांची अखंड वर्दळ असल्यामुळे त्या जागेला लोकांनीच 'मराठवाडी' नाव दिले. त्याचेच व्यापक रूप म्हणजे आजची 'मराठवाडा साहित्य परिषद' होय. डावरे हायस्कूलचे मुख्याध्यापक म्हणून कार्य करताना पोहनेरकरांनी 'प्रोफेसर' नावाचे हस्तलिखित सुरू केले. चरितार्थासाठी एकीकडे विविध उद्योगांत त्यांनी हात घातला. गडकऱ्यांचे 'राजसंन्यास' नाटक पूर्ण करून त्याचे यशस्वी प्रयोग केले. हैद्राबादहून १९३० पासून 'निजामविजय' नावाचे एकमेव साप्ताहिक निघत असे. पोहनेरकरांनी त्यात लेख लिहिले. प्रा. नरहर कुरुंदकरांच्या शब्दांत, 'पोहनेरकर प्रामुख्याने मराठी सारस्वताचे व अनुवंशाने सगळ्याच प्राचीन इतिहासाचे संशोधक आहेत. त्यात प्राचीन प्रकाशित साहित्याचे संपादन, संशोधन आहे. त्याप्रमाणे ताम्रपट, शिलालेखांचेही संशोधन, संपादन आहे.' मराठवाडा गुलामगिरीतून मुक्त झाल्यावर शासनाने पोहनेरकरांची नियुक्ती विधानसभेचे ग्रंथपाल म्हणून झाली. १९५६ साली त्यांना औरंगाबादच्या पुरातत्त्व खात्यात नोकरी मिळाली.

'दासोपंत पासोडीचे प्रकाशन आणि भावार्थ रामायणाच्या चिकित्सक प्रतीची सिद्धता' ही त्यांची भरीव व महत्त्वपूर्ण कामगिरी होय. संशोधनाबरोबरच त्यांनी व्यक्तिरेखा, पोवाडे, कविता, निबंध, लघुकथा लिहिल्या. 'कैलासाचा कलावंत' या उतारवयात लिहिलेल्या कादंबरीत पोहनेरकरांनी इतिहास आणि स्वप्नरंजन यांच्या सीमेवर वावरणारी कथा आपल्या समृद्ध आणि सहज प्रासादिक भाषेत सादर केली आहे. 'बागशाही' हा त्यांचा कवितासंग्रह आहे. 'विरलेल्या गारा' या संग्रहातील व्यक्तिचित्रे त्या काळी गाजली.

१९६१ मध्ये ज्या नवव्या मराठवाडा साहित्य संमेलनाचे अध्यक्ष पोहनेरकरांना केले होते, त्यातली एक बाब इतकी खास होती की ती दुसऱ्या कोणत्याही संमेलनात घडली नाही. संमेलनाध्यक्ष पोहनेरकर उद्घाटन वेळेच्या पूर्ण दोन तास आधी मंडपात आले होते आणि सतरंज्या टाकण्यापासून कार्यक्रमपत्रिका तयार करेपर्यंत सारी कामे ते करीत होते. तत्पूर्वी १९५५ मध्ये परळी–

वैजनाथ येथे भरलेल्या ग्रंथालय शाखा संमेलनाचे ते अध्यक्ष होते. पुरातत्त्व खात्यात असताना ते संपूर्ण मराठवाडा पायी फिरले. त्यांनी ताम्रपट, शिलालेख, दानपत्रे, ऐतिहासिक कागदपत्रे, हकिकतनामे, संहिता मिळविल्या. इतरांना कटकटीचे व जिकिरीचे वाटणारे हे काम त्यांनी चिकाटीने, निष्ठेने व हौसेने केले हेच त्यांचे कौतुक!

– वि. ग. जोशी

**संदर्भ :**

*१. पोहनेरकर न. शे.; 'कैलासचा कलावंत'; कुलकर्णी ग्रंथागार, पुणे; १९७२.*

## प्रधान, गणेश प्रभाकर

**चरित्रकार, विचारवंत**

**२६ ऑगस्ट १९२२**



इंग्रजीचे नामवंत प्राध्यापक, प्रभावी वक्ते, हाडाचे समाजवादी, एक समतोल विचारवंत आणि ललित व ललितेतर असे इंग्रजीत व मराठीत लेखन करणाऱ्या गणेश प्रभाकर प्रधानांचा जन्म पुणे येथे एका सुसंस्कृत, सुशिक्षित मध्यमवर्गीय कुटुंबात झाला. सुरुवातीचे शिक्षण पुणे येथेच झाल्यावर ते मुंबई विद्यापीठातून इंग्रजी विषय घेऊन एम.ए. झाले.

१९४५ ते १९६५ या काळात पुण्यातील प्रसिद्ध अशा फर्गसन महाविद्यालयात त्यांनी इंग्रजीचे प्राध्यापक म्हणून काम केले. 'प्रधानमास्तर' या आपुलकीच्या संबोधनाने ते शिक्षक व विद्यार्थी यांच्या परिवारात ओळखले जातात. त्यांच्यावर सानेगुरुजींच्या व्यक्तिमत्त्वाचा व विचारांचा प्रभाव होता. त्यातूनच त्यांनी स्वतःला स्वातंत्र्यचळवळीत झोकून दिले. १९६५मध्ये प्राध्यापक पदावरून स्वेच्छानिवृत्ती घेतल्यानंतर त्यांनी सामाजिक कार्यात उर्वरित आयुष्य व्यतीत केले. स्वातंत्र्याच्या चळवळीत त्यांनी तुरुंगवास भोगला. तेथे आचार्य स. ज. भागवत व आचार्य शं. द. जावडेकर यांच्या व्याख्यानांतून त्यांच्यावर भारतीय धर्म व तत्त्वज्ञान यांचे संस्कार झाले. स्वेच्छानिवृत्तीनंतर महाराष्ट्र विधान परिषदेत त्यांनी शिक्षकांचे प्रतिनिधित्व केले व तिथे १९६६ ते १९८४ पर्यंत एम. एल. सी. म्हणून आपला ठसा उमटविला. दोन वर्षे ते विधान परिषदेत विरोधी पक्ष नेतेही होते. त्यांच्या आयुष्यात कसोटी पाहणारे व प्रलोभनाचे अनेक प्रसंग आले. पण त्यातून तावून सुलाखून ते बाहेर पडले. प्रधानमंत्री इंदिरा गांधींनी १९७५मध्ये देशात अणीबाणी जाहीर केली तेव्हा तीविरुद्ध सत्याग्रह करून त्यांनी १८ महिने तुरुंगवास भोगला. आपली डॉक्टर पत्नी वारल्यावर त्यांनी आपले स्वतःचे राहते घर साधना ट्रस्टला देणगीदाखल देऊन पुण्यातच हडपसर येथील वृद्धाश्रमात राहू लागले. भारतीय संस्कृतीतील चार आश्रमांपैकी त्यांनी आता खऱ्या अर्थाने वानप्रस्थाश्रम स्वीकारला आहे. तेथे ते लेखन, वाचन करीत आहेत.

त्यांचे लेखन बहुभाषी असून बहुविध स्वरूपाचेही आहे. ललित व ललितेतर अशा दोन्ही प्रकारच्या इंग्रजी व मराठी लेखनासाठी त्यांना अनेक मानसन्मान व पुरस्कार मिळाले. त्यात 'भारतीय भाषा पुरस्कार' व महाराष्ट्र राज्य शासनाचे उत्कृष्ट वाङ्मयनिर्मितीबद्दलचे तीन पुरस्कार, 'लोकमान्य टिळक' (१९८९), 'साने गुरुजी' (१९९०), व 'राम गणेश गडकरी' (१९९४) ही साक्षेपी व विवेचक चरित्रे व 'स्वातंत्र्य संग्रामाचे महाभारत' (१९८७) हा इतिहास यांचा त्यात समावेश आहे. यांनी प्रा. अ. के. भागवत यांच्या सहकार्याने इंग्रजीत लिहिलेल्या टिळक चरित्राला टिळक जन्मशताब्दी वर्षात अखिल भारतीय टिळक चरित्राच्या स्पर्धेत पुरस्कार लाभला आहे. त्यांनी मुलांसाठीही महात्मा गांधीचे चरित्र इंग्रजीत लिहिले आहे. स्वतःच्या आत्मचरित्राचा त्यांनी इंग्रजीत अनुवाद केला आहे. त्याशिवाय त्यांच्या नावावर अनेक संपादनेही आहेत. 'हाजीपीर' हे प्रवासवर्णनही आहे.

ललित व ललितेतर यांच्या सीमारेषांवर लिहिलेल्या 'साता उत्तराची कहाणी' व 'आठा उत्तराची कहाणी' यांपैकी 'साता उत्तराची कहाणी' मध्ये भारतीय स्वातंत्र्याची चळवळ, प्रजासत्ताक ह्यांपासून १९८० पर्यंतची भारतीय लोकशाहीची वाटचाल आली आहे. या संपूर्ण कालखंडातील अनेक महत्त्वपूर्ण घटना, प्रमुख नेते व कार्यकर्ते, त्यांची कुटुंबे व चळवळी, विद्यार्थी, लेखक, पत्रकार यांच्या दृष्टिकोनांतून त्यांनी हा आढावा घेतला आहे. अनेक राजकीय प्रवाह, विचारप्रणाली व त्यांचे वैयक्तिक व सामाजिक जीवनावर होणारे परिणाम त्यातून व्यक्त होतात. त्या नंतरच्या काळातील म्हणजे १९८० ते २००७ या कालखंडातील सामाजिक, राजकीय चळवळीचा प्रवास 'आठा उत्तराची कहाणी' (२००७) ह्या लेखनातून प्रधानांनी चित्रित केला आहे. काँग्रेस, भाजप, मार्क्सवादी, समाजवादी रिपब्लिकन पार्टी या पाच प्रमुख राजकीय पक्षांचे कार्यकर्ते व सर्वोदयी कार्यकर्ते ह्यांच्या मुलाखती व मनोगत यांतून त्या-त्या पक्षाचा इतिहास, बदलती ध्येये व धोरणे, त्यांनी घेतलेल्या भूमिका आणि त्यामागचे विचारप्रवाह यांचा हा आढावा आहे. हे विविध टप्पे उलगडताना कधी आत्मकथने, पत्रे, अहवाल यांच्या आधारे १७ प्रश्नांच्या उत्तरांतून ही आठा उत्तराची कहाणी वैशिष्ट्यपूर्ण रितीने व्यक्त होते. त्यात १९४८ ते १९८० नंतर २००७ पर्यंतच्या राजकीय पार्श्वभूमीच्या प्रवासातून अनेकांचे खरे चेहरे व त्यांचे मुखवटे स्पष्ट होतात. राजकीय प्रश्नांबरोबरच भारतीय मुस्लीम स्त्री व तिचे प्रश्न, समस्या व उत्तरे शोधण्याचाही प्रधानांनी प्रयत्न केला आहे. लेखकाने हे पुस्तक कुणा एका राजकीय व्यक्तीला अर्पण केलेले नसून प्रतिकूल राजकीय परिस्थितीत विचारांच्या आधारे ध्येयवादी वृत्तीने कार्य करणाऱ्या तरुण राजकीय कार्यकर्त्यांना अर्पण केले आहे.

अगदी अलीकडे त्यांनी प्रसिद्ध रशियन विचारवंत व कादंबरीकार टॉलस्टॉय यांना लिहिलेल्या १६ पत्रांतून त्यांचे जीवन, विचार व साहित्य यांचा साक्षेपी व रसिकतेने परामर्श घेतला आहे. प्रधानांच्या लेखनात त्यांच्या व्यक्तिमत्त्वाप्रमाणेच त्यांच्यातील समृद्ध व समतोल विचारसरणीच्या थोर सच्च्या समाजवाद्याचे दर्शन घडते.

– डॉ. प्रल्हाद वडेर

## प्रभू, मीना सुधाकर

**प्रवासवर्णनकार**

**२७ ऑगस्ट १९३९**



मीना सुधाकर प्रभू यांनी पुणे येथे वैद्यकीय शिक्षण (एम.बी.बी.एस.) पूर्ण केले. मुंबई व लंडन येथे पदव्युत्तर शिक्षण घेतले. लंडन येथे दीर्घकाळ वास्तव्य केले.

अत्यंत उत्कट, भावस्पर्शी आणि तितक्याच रोमहर्षक प्रवासानुभवाने वाचकांना मीना प्रभू आपल्यासोबत निरनिराळ्या देशांची भटकंती घडवून आणतात. त्यांनी 'प्रवासवर्णन' या साहित्यप्रकाराचे प्रवासानुभवात रूपांतर करीत तब्बल १२ पुस्तके लिहून मराठी साहित्यात आपला वेगळा ठसा उमटवला.

जे प्रत्यक्ष विदेशी जाऊ शकत नाहीत, ते मीनाताईंची पुस्तके वाचून पर्यटनाचा आनंद मिळवतात आणि जे विदेशी जातात तेसुद्धा ही पुस्तके सोबत घेऊनच जातात. मीना प्रभू यांच्या 'माझं लंडन', 'दक्षिणरंग', 'मेक्सिकोपर्व', 'चिनी माती', 'इजिप्तायन', 'तुर्कनामा', 'ग्रीकांजली', 'गाथा ईराणी', 'रोम राज्य' या पुस्तकांतून परदेशातील प्रेक्षणीय स्थळांची अभ्यासपूर्ण व तपशीलवार वर्णने वाचायला मिळतात.

'माझं लंडन' या त्यांच्या पहिल्याच पुस्तकाला वाचकांनी भरभरून प्रतिसाद दिला. या पुस्तकाच्या ७ आवृत्त्या निघाल्या. या पुस्तकाचे अंधळ्या व्यक्तींसाठी ब्रेल लिप्यांतरही झाले. भारताचे तत्कालीन संरक्षण मंत्री शरद पवार यांच्या हस्ते 'कुकरी' हे मानचिन्ह देऊन या पुरस्काराचा गौरव करण्यात आला. 'मेक्सिकोपर्व',

प

'इजिप्तायन' या पुस्तकांना महाराष्ट्र शासनाचा राज्य पुरस्कार तर 'दक्षिणरंग', 'चिनीमाती' या पुस्तकांनाही अनेक पुरस्कार मिळाले.

गोवा येथील महिला साहित्यसंमेलनाचे अध्यक्षपद भूषवणाऱ्या मीना प्रभू यांची बहुतांश पुस्तके 'नॅब'ने (National Association for Blind) 'टॉकींग बुक्स' म्हणून तयार केली आहेत. लोकसत्ता, महाराष्ट्र टाइम्स, तरुण भारत, लोकमत या वृत्तपत्रांतून तसेच अनेक दिवाळी अंकांतून, मासिकांतून त्यांची विपुल लेखन केले आहे. प्रवासवर्णनाखेरीज 'सुखनिधि तुझा माझा' हे कवितांचे पुस्तक तसेच 'मुखवट्याआडचे चेहेरे' हे प्रिन्स चार्ल्स व डायना यांच्यावरील पुस्तकही प्रसिद्ध झाले आहे. मीना प्रभू यांच्या लेखनामागची प्रेरणा श्री. ना. पेंडसे व बाबासाहेब पुरंदरे यांची आहे.

लेखिकेने संगणक लेखनाचा प्रयोग मराठीत पहिल्यांदा (१९९० साली) केला व हे, सारे लेखन संगणकावरच केले, हे विशेष!

– सुहास बारटक्के

## प्रभुदेसाई, विठ्ठल बाबू
**संशोधक**
**१४ जानेवारी १९३२**



डॉ. विठ्ठल बाबू प्रभुदेसाई यांचा जन्म गोमंतकातील काणकोण जिल्ह्यातील खरगाळी गावी झाला. मूळचे ते त्याच गावचे. प्रारंभीचे शिक्षण पोर्तुगीजमध्ये झाल्यानंतर पुढे कारवार येथून ते मॅट्रिक झाले व नागपूरच्या हिस्लॉप कॉलेजात पदवी घेतल्यावर नागपूर विद्यापीठाची एम. ए. पदवी त्यांनी प्राप्त केली. मुंबईला राहून त्यांनी ज्येष्ठ संशोधक अ. का. प्रियोळकर यांच्या मार्गदर्शनाखाली 'सतराव्या शतकातील गोमंतकी बोली' या विषयावर पीएच. डी. चा प्रबंध लिहिला. जेजुइतांनी सतराव्या शतकात लिहिलेल्या मराठीच्या गोमंतक बोलीतील वाङ्मयाचे चिकित्सक विश्लेषण त्यांनी प्रबंधात केले आहे. हा प्रबंध पुस्तक रूपाने छापून झाल्यावर त्याला महाराष्ट्र शासनाचा पुरस्कार मिळाला.

मडगावच्या चौगुले महाविद्यालयात मराठी विभाग-प्रमुख म्हणून दोन वर्षे काम केल्यावर ते नागपूर विद्यापीठात प्रपाठक म्हणून रुजू झाले आणि त्याच विद्यापीठातून मराठी विभाग-प्रमुख पदावरून १९९२ मध्ये निवृत्त झाले.

त्याचे संशोधन मुख्यत्वेकरून पोर्तुगीज साहित्यिकांनी मराठीत केलेली वाङ्मयरचना आणि भारतीय प्राचीन ग्रंथ यांचे समीक्षात्मक टीकाटिप्पणी करणारे आहे. ख्रिस्ताच्या वधस्तंभारोहण प्रसंगीचे (१९७१), पाद्री मिंगेल द आल्मैद कृत वानवळ्यांचो मळो (१९७४), शांतानंद शिष्य विरचित क्रिस्ताचे यातनागीत (१९९०), कविनंदनविरचित उषाहरण कथा (१९६५), विप्रविश्वनाथविरचित अभिमन्यु विवाहो (१९७२) आदी ग्रंथ त्यांनी संपादीत केले. मराठी संशोधन मंडळातील सूक्ष्मपटांची सूची त्यांनी १९७८ मध्ये तयार केली. गोवा शासनाने त्यांना २००९ मध्ये जीवनगौरव पुरस्कार दिला.

– डॉ. सुभाष भेण्डे

**संदर्भ :**

*१. तडकोडकर सु. म.; 'वाङ्मय विचारात बुडालेला संशोधक'; महाराष्ट्र टाइम्स- २४ नोव्हेंबर, १९९६.*

## प्रियोळकर, अनंत काकबा
**संशोधक, लेखक**
**५ सप्टेंबर १८९५ – १३ एप्रिल १९७३**

मराठी भाषेतील 'पाठचिकित्साशास्त्रा'चे आद्य प्रणेते म्हणून ओळखले जाणारे अनंत प्रियोळकर मूळचे गोव्यातील फोंडा तालुक्यातील प्रियोळ या गावी जन्मले. त्या काळात गोव्यात मराठी शाळा नव्हत्या. त्यांचे प्रारंभीचे प्राथमिक शिक्षण घरीच झाले. प्रियोळ व असमोडे येथे त्यांचे चौथीपर्यंतचे मराठी शिक्षण झाले. पुढे माध्यमिक

प



शिक्षण फोंडा येथील सरकारी शाळेत झाले. अल्मैद महाविद्यालयातून १९१८ साली ते मॅट्रिक झाले. त्यानंतर ज्युनिअर बी.ए.पर्यंतचे शिक्षण धारवाड कर्नाटक महाविद्यालय व पुढे सांगलीच्या विलिंग्डन महा–विद्यालयातून १९२३ मध्ये साली ते बी.ए. झाले.

महाविद्यालयीन जीवनापासूनच त्यांच्यात लेखनाची आवड आणि ऊर्मी होती. त्या वेळच्या 'विविधज्ञानविस्तार' या प्रतिष्ठित मासिकात त्यांचे लेखन प्रसिद्ध होत असे. प्रारंभीच्या काळात 'अरुणोदय, बी.ए.' या टोपणनावाने त्यांनी काही कविताही केल्या होत्या. या कविता 'नवयुग', 'स्वयंसेवक' या मासिकांमधून प्रसिद्ध झाल्या होत्या. पदवी प्राप्त झाल्यावर काही काळ त्यांनी कोकणातील वेंगुर्ला येथे 'जॉर्ज इंग्लिश स्कूल'मध्ये शिक्षक म्हणून काम केले. या काळातही त्यांचा लेखन–अध्ययन–संशोधनाचा व्यासंग सुरूच होता. याच काळात ते मुंबई येथे गेले असताना 'विविधज्ञानविस्तार' च्या कचेरीत गेले होते. त्यांची लेखनातील गती आणि संशोधनवृत्ती पाहून सदर मासिकाच्या संपादकांनी त्यांच्याकडे त्या मासिकाचे सहसंपादक होण्याची विचारणा केली आणि ही मोठी संधी उपलब्ध होत असल्याचे पाहून त्यांनी वेंगुर्ल्याची शिक्षकाची नोकरी सोडून मुंबईतच वास्तव्य करण्याचा निर्णय घेतला. त्याच सुमारास त्यांना मुंबई कॉर्पोरेशनच्या स्कूल कमिटीतही नोकरी मिळाली. त्यामुळे आवडीच्या दोन्ही क्षेत्रांत आणि तीही मुंबईत संधी मिळाल्याने प्रियोळकरांच्या हातून मोठे काम होऊ शकले. १९२६ ते १९४७ अशी एकवीस वर्षे त्यांनी नोकरी करून १९४७ मध्ये सेवानिवृत्ती स्वीकारली.

दरम्यानच्या काळात त्यांच्या लेखन, संपादन, संशोधन ह्यांना खूपच गती मिळाली आणि मराठी भाषेला एक खंदा संशोधक मिळाला. 'नलदमयंती स्वयंवर' या १९३५ साली प्रसिद्ध झालेल्या त्यांच्या पहिल्या ग्रंथाने मराठी साहित्यक्षेत्रात संशोधक म्हणून त्यांचे नाव प्रसिद्ध झाले. हा ग्रंथ अशा प्रकारचा पहिला पाठचिकित्सात्मक ग्रंथ होता. या ग्रंथाला मुंबई विद्यापीठाचे पारितोषिक मिळाल्याने 'प्रियोळकर' या नावाला एक वलय मिळाले. पुढे त्यांनी भाषाशास्त्रीय दृष्टिकोनातून मराठी व कोकणी भाषांचा अभ्यास सुरू केला व त्यातूनच ख्रिश्चन धर्मोपदेशकांच्या मराठी साहित्याकडे त्यांचे लक्ष गेले. 'ख्रिस्तपुराण' व अन्य मराठी ग्रंथांच्या चिकित्सक, संशोधनात्मक अभ्यासातून प्रियोळकरांनी 'सांतु अंतोनीची जीवित्वकथा', 'गोमंतकाची सरस्वती', 'हिंदुस्थानचे दोन दरवाजे', 'मुक्तेश्वर महाभारत', 'दोलामुद्रिते', 'मुंबईचा वारसा' इत्यादी संशोधनमूल्य असलेल्या अनेक ग्रंथांची निर्मिती केली. संशोधन क्षेत्रात त्यांनी 'प्रियोळकर युग' निर्माण केले.

प्रियोळकरांनी अत्यंत परिश्रमाने जुनी हस्तलिखिते, दुर्मीळ ग्रंथ जमा करून त्यांचे संशोधन करून ती प्रसिद्ध केली. दादोबा पांडुरंग डॉ. भाऊ दाजी यांची आत्मचरित्रे त्यांनी प्रसिद्ध केली. लोकहितवादी गोपाळ हरी देशमुख व गोविंद नारायण माडगावकर यांचे लेख, परशुराम तात्या गोडबोले संपादित 'नवनीत'ची शताब्दी आवृत्ती इत्यादींचे त्यांनी संपादन व प्रकाशन केले. मुंबई मराठी ग्रंथ संग्रहालयाच्या 'मराठी संशोधन मंडळा'चे प्रमुख म्हणून त्यांनी १९४८ ते १९६६ एवढा प्रदीर्घ काळ काम केले. या संस्थेच्याच 'मराठी संशोधन पत्रिके'तही त्यांनी स्वतःचे व इतर अनेकांचे संशोधित लेखन प्रसिद्ध केले. कारवार येथे १९५१ साली भरलेल्या ३४ व्या मराठी साहित्य संमेलनाच्या अध्यक्षपदावरून त्यांनी मराठी साहित्याच्या संशोधनाला दिशा देणारे भाषण करून दुर्मीळ हस्तलिखिते, भाषा यांच्या संशोधनावर भर दिला.

प्रियोळकरांनी संशोधनाला शिस्त लावली, पुराव्याशिवाय कोणतेही विधान करायचे नाही, यावर

त्यांचा कटाक्ष असे. त्यांच्या संशोधनाबद्दल भीमराव कुलकर्णी म्हणतात, 'थोडक्यात सांगायचे म्हणजे, त्यांनी 'Age of chronicles' मधून 'Age of documents' मध्ये मराठीचे संशोधन आणून ठेवले', प्रियोळकर संशोधक असले तरी ते चित्रकार, कवी होते. त्यांचे ललित लेखनही शैलीदार होते. त्यांची 'गोंडवनातील गावगुंड' ही कादंबरी डॉ. श्री. व्यं. केतकरांनाही उत्तर देणारी होती.

– मधू नेने

**संदर्भ :**


*१. कानिटकर रा. प्र.; 'साठ संमेलनाध्यक्ष'; उत्कर्ष प्रकाशन, पुणे; १९८८.*
*२. कुलकर्णी भीमराव; 'देवाची माणसं'; उत्कर्ष प्रकाशन, पुणे; १९८१.*
*३. जोशी लक्ष्मणशास्त्री; 'मराठी विश्वकोश', खंड १०, १२; महाराष्ट्र राज्य साहित्य संस्कृती मंडळ, मुंबई ; १९७६.*
*४. जाधव रा. ग.; 'मराठी साहित्याचा इतिहास', खंड ७, भाग १; महाराष्ट्र साहित्य परिषद, पुणे; २००९.*


* * *

प

# फ



## फडके, नारायण सीताराम

**कादंबरीकार, कथाकार, लघुनिबंधकार, समीक्षक**

**४ ऑगस्ट १८९४ – २४ ऑक्टोबर १९७८**



तर्कशास्त्र व तत्त्वज्ञान या विषयांचे नामवंत प्राध्यापक असलेल्या, मराठीप्रमाणे इंग्रजीतही लेखन करणाऱ्या, अनेक कला व क्रीडा प्रकारांत रस घेणाऱ्या नारायण सीताराम फडके यांचा जन्म ४ ऑगस्ट १८९४ रोजी कर्जत, जि. अहमदनगर, महाराष्ट्र येथे झाला. वडिलांची फिरतीची सरकारी नोकरी असल्याने निफाड, बार्शी इत्यादी ठिकाणी प्राथमिक शिक्षण. इ. स. १९०४मध्ये वडिलांची पुण्यात बदली झाल्यावर नूतन मराठी विद्यालयामधून शालान्त परीक्षा (मॅट्रिक) व फर्गसन महाविद्यालयात बी.ए. व एम.ए. न्यू पुना कॉलेजात प्राध्यापक म्हणून १९१६मध्ये दाखल झाले त्यांचा पहिला विवाह १९२०मध्ये झाला. महात्मा गांधींच्या आवाहनानुसार स्वातंत्र्याच्या आंदोलनात भाग घेण्यासाठी प्राध्यापकीचा त्याग. नंतर सेन्ट स्टीफन्स महाविद्यालय, दिल्ली, सिंध, हैद्राबाद व नागपूर येथील महाविद्यालयांत काम केले. काही काळ सक्तीची बेकारी. त्यामुळे अस्थिरता आली. मात्र कोल्हापूर येथील राजाराम महाविद्यालयात इ. स. १९२६मध्ये रूजू झाल्यानंतर तेव्हापासून स्थिरता व १९५१मध्ये निवृत्ती घेतली. १९५१पासून पुण्यात कायमचे स्थायिक झाले. अंजली वार्षिकाचे व प्रकाशन, झंकार साप्ताहिकाचे संपादन इत्यादी विविध प्रकारचे कार्य त्यांनी केले.

फडके यांच्या वाङ्मयीन व्यक्तिमत्त्वाचा विचार करता, ते काहीसे स्वतःतच रंगलेले व स्थिर झालेले असून त्यात नंतर फारसा बदल झालेला दिसत नाही. जीवनाकडे, कलेकडे व साहित्याकडे पाहण्याचा त्यांचा दृष्टिकोन स्थिर नव्हे तर अधिकच दृढ झाला. त्यांच्यामध्ये व तत्कालीन महत्त्वाचे कादंबरीकार वि. स. खांडेकर यांच्यात प्रदीर्घकाळ चाललेल्या ‘कलेसाठी कला की जीवनासाठी कला’ या वादात त्यांनी कलेची एक बाजू सतत लावून धरली. त्यामुळे तत्कालीन भारतातील साहित्यावरचे साम्यवादी विचारसरणीचे सावट काहीसे दूर होऊन मराठी साहित्य व कलाप्रांतातील वातावरण मुक्त व मोकळे राहण्यास मदत झाली. कलेच्या स्वायत्ततेच्या कल्पनेच्या संदर्भात त्यांनी साहित्यात राजकीय व्यक्ती नकोत हा आग्रहही धरला व कोल्हापूर येथे १९३२ मध्ये भरलेल्या साहित्यसंमेलनाचे अध्यक्ष बडोद्याचे सयाजीराव गायकवाड असल्याने त्यावर बहिष्कारही घातला. आज साहित्यक्षेत्रावर राजकारण्यांची जी कुरघोडी दिसते, त्या पार्श्वभूमीवर फडके यांचा बाणेदारपणा उठून दिसतो. अशीच भूमिका संततीनियमनाच्या आचाराबाबत त्यांनी घेतली व तत्त्वासाठी नोकरीचा त्याग करून काही काळ सक्तीची बेकारी पत्करली.

### युगप्रवर्तक कादंबरीकार

फडके यांनी सर्वच वाङ्मय प्रकारांत विपुल लेखन केले. कादंबरीमध्ये ‘फडके–खांडेकर यांचे युग’ असा एक अर्थपूर्ण प्रयोग केला जातो. हरिभाऊंच्या पाल्हाळीक, काहीशा बोजड भाषेतल्या व शैलीतल्या मराठी कादंबरीला त्यांनी बांधेसूद, आधुनिक व तंत्रशुद्ध रूप दिले. विशेषतः बोलीभाषेला जवळची असणारी सुटसुटीत, सोपी भाषा दिली. त्यांच्या कादंबऱ्यांचीच संख्या ७४ आहे. या

फ

कादंबऱ्यांतून त्यांनी भारतातील सामाजिक, राजकीय चळवळी व घटना यांना स्थान दिले. गांधीप्रणित स्वातंत्र्याची चळवळ ते काश्मीर, हैद्राबाद, सुभाषबाबू व सावरकर विचारप्रणाली या सर्वांवर त्यांनी 'प्रवासी', 'निरंजन' ह्या कादंबऱ्या व काँग्रेसच्या विचारप्रणालीवर 'शोनान', 'तुफान', 'अस्मान' या आझाद हिंद चळवळीवरील कादंबऱ्या लिहिल्या. साहित्याप्रमाणेच संगीत, क्रिकेट, चित्रकला, शिल्पकला इत्यादी ललित कलांचाही त्यांनी व्यासंग केला व मराठी वाचकांना वेळोवेळी पाश्चात्त्य साहित्यकृतींचा व अन्य कलांचा परिचय करून देऊन त्यांची अभिरुची समृद्ध करण्याचा प्रयत्न केला.

१९२५ मध्ये त्यांची 'कुलाब्याची दांडी' ही पहिली कादंबरी पुस्तकरूपाने प्रसिद्ध झाली आणि १९७८ च्या दिवाळी अंकात त्यांची अखेरची ७४ वी कादंबरी 'हेमू भूपाली' प्रकाशित झाली. १९२५ ते १९४४ हा पहिला कालखंड कादंबरीच्या विकासाचा होता. त्यात त्यांनी विषयाचे, रचनेचे अनेक प्रयोग केले. तत्कालीन कालखंडातील राजकीय व सामाजिक घडामोडी, यांबरोबरच त्यांनी मानसशास्त्रीय समस्यांचाही उपयोग केला. त्यातून त्यांचा 'उद्धार', 'इंद्रधनुष्य', 'खेळणी' इत्यादी कादंबऱ्यांचे लेखन झाले. त्यांनी आपल्या कादंबरी. तत्कालीन कादंबरीकार खांडेकर व माडखोलकर यांनाही लोकप्रियतेत मागे टाकले व आपल्या तंत्राचा व रचना-कौशल्याचा तत्कालीन कादंबरीवर प्रभाव टाकला. कादंबरी म्हणजे फडक्यांचीच असे एक समीकरण त्यांनी निर्माण केले.

त्यांच्या कादंबरीच्या दुसऱ्या कालखंडात (१९४४ ते १९७८) त्यांच्या कादंबरीचा केवळ विस्तार झाला. या कालखंडातही विषयाचे नावीन्या त्यांनी जपले. फडक्यांच्या कादंबरी-लेखनात विषयाचे नावीन्य, तंत्राची विविधता, प्रयोग व भाषेतील उत्तरोत्तर वाढत गेलेली सफाई इत्यादी गुण असूनही तिचा या कालखंडात संख्यात्मक विस्तार झाला, मात्र गुणात्मक विस्तार फारसा झाला नाही. पण फडके यांचे लेखन त्यांच्या पूर्वीच्या सर्व वैशिष्ट्यांसह अखेरपर्यंत चालू राहिले.

फडके यांनी कथालेखनही विपुल प्रमाणात केले 'मेणाचा ठसा' ही त्यांची पहिली कथा (१९१२). १९२५ ते १९४० हा त्यांचा बहराचा काळ. 'प्रतिभासाधन'मध्ये त्यांनी लघुकथेचे मंत्र व तंत्र उलगडून दाखवले व त्यानुसार स्वतः कथालेखनही केले. प्रारंभी 'रत्नाकर', 'यशवंत' व नंतर 'किर्लोस्कर' वगैरे नियतकालिकांतून त्यांनी मराठी कथेचे पाल्हाळीक, संपूर्ण सचित्र गोष्टीचे स्वरूप बदलून तिला इंग्रजीतील पो, मोपांसा, ओ. हेन्री इत्यादी कथालेखकांच्या परिशीलनातून एक आधुनिक व रेखीव स्वरूप देण्याचा यशस्वी प्रयत्न केला. कादंबरीप्रमाणेच तिची खेळकर, सुटसुटीत भाषा व शैली त्यांनी घडवली. आधुनिक मराठी लघुकथेचे श्रेय खांडेकरांपेक्षा फडक्यांनाच दिले पाहिजे, असे गंगाधर गाडगीळांनी म्हटले. मात्र हे श्रेय देत असतानाच वाचकांची खुशामत करण्याची व तिचे जीवनानुभव मर्यादित करण्याचे अपश्रेयही त्यांनाच दिले पाहिजे असेही नमूद केले. फडके यांची कथा ही 'Sleek American Magazine story' होती व जीवनातील खोल दुःखे व अनुभव व्यक्त करण्याचे तिने टाळले व दोन घटका वाचकांचे हलक्या-फुलक्या मनोरंजन करण्याचे माफक ध्येय तिने डोळ्यासमोर ठेवले. मात्र त्यांच्या सुरुवातीच्या 'माणूस जगतो कशासाठी? सारख्या काही कथा याला अपवाद आहेत. मराठीतील संपूर्ण सचित्र गोष्टीपासून आधुनिक लघुकथेपर्यंतच्या विकासाच्या प्रवासात फडके यांचा वाटा लक्षणीय आहे.

लघुकथेबरोबरच लघुनिबंधाचा 'गुजगोष्टी' हा वेगळा वाङ्मयप्रकार त्यांनी इंग्रजीतील 'रॉबर्ट लिंड', ई.व्ही.ल्यूकस, चेस्टरटन वगैरेंच्या लघुनिबंधांच्या धर्तीवर मराठीत आणला व त्याची पुढे खांडेकर, कणेकर, ते ना.मा. संतांपर्यंत एक परंपरा निर्माण झाली. पुढे मात्र व्यक्तिदर्शनापेक्षा त्यात प्रदर्शन वाढल्याने तो प्रकार अस्तंगत झाला.

'प्रतिभासाधन', 'प्रतिभाविलास', 'लघुकथालेखन मंत्र व तंत्र', इत्यादी समीक्षाग्रंथांतून त्यांचे समीक्षा-विचार व्यक्त झाला आहे. त्याचा प्रभाव समकालिनांवर व पुढच्या

फ

दोन पिढ्यांवर तरी पडला. मात्र त्यांची टीका 'प्रतिभासाधना'च्या वेळी बनलेल्या वाङ्मयीन व्यक्तिमत्त्वाच्या व आवडीनिवडीच्या वर्तुळातच फिरत राहिली. त्यांनी अन्य वाङ्मयप्रकार हाताळले असले, तरी कादंबरीकार म्हणूनच त्यांना सर्वाधिक लोकप्रियता मिळाली व यश लाभले. प्रा. कुसुमावती देशपांडे यांनी म्हटल्याप्रमाणे 'त्यांचे प्रेमविषयक चिंतन उथळ व ठरावीक ठशाचे असले, तरी त्यात खांडेकरांच्या चित्रणातील अवास्तवता व अतिरंजितपणा नाही किंवा माडखोलकरांची उग्र शारीरिकता नाही. त्यांच्या शैलीची सहजता व रुचिर सौंदर्यदृष्टी यांमुळे हे चित्रण विशेष आकर्षक होते.' 'उद्बोधन आणि मनोरंजन ही दोन सूत्रे फडके-पूर्व साहित्यामागे होती, त्यात पहिल्यांदाच बदल करून तिला केवळ मनोरंजनाच्या वाटेने नेण्याचे व तिच्यावरील सर्व प्रकारची बंधने झुगारून देण्याचे महत्त्वाचे ऐतिहासिक कार्य फडके यांनी केले व मराठी कादंबरीच्या विकासाचा मार्ग मोकळा केला. मात्र त्यामुळे तंत्रवादालाच महत्त्व मिळाले व कलेसाठी कला नव्हे तर शेवटी 'कलेसाठी जीवन' या भूमिकेत तिची परिणती झाली, हेही तेवढेच खरे.

महाराष्ट्रातील गेल्या पन्नास वर्षांतील महत्त्वाच्या घटना, चळवळी व विचारप्रणाली यांचा त्यांनी आपल्या कादंबरी-लेखनासाठी उपयोग केला व स्वतःला काळाच्या मागे पडू दिले नाही. लघुनिबंध या वाङ्मय प्रकाराचे विलायती रोपटे त्यांनी जाणीवपूर्वक मराठीत रुजवले व वाढवले. एकीकडून हरीभाऊ आपटे व दुसरीकडून बा. सी. मर्ढेकर यांच्यामधील मोक्याच्या टप्प्यावर फडके उभे असून, त्यांनी मराठी साहित्याला नवी दिशा देण्याचा यशस्वी प्रयत्न केला. त्यांची तंत्रशुद्धता, आधुनिकता, अद्ययावतपणा, बांधेसूदपणा, विलोभनीय भाषा व शैली यांमुळे त्यांच्या नावाने मराठी साहित्यातील एक कालखंड नेहमीच ओळखला जाईल व हेच त्यांचे मराठी साहित्याला योगदान म्हणता येईल. त्यांना मिळालेल्या अनेक मानसन्मानांत रत्नागिरी येथील साहित्य सम्मेलनाचे अध्यक्षपद (१९४०), 'पद्मभूषण' (१९६२) हे प्रमुख आहेत.

– डॉ. प्रल्हाद वडेर

फ

**संदर्भ :**


*१. देशपांडे कुसुमावती; 'मराठी कादंबरी पहिले शतक'; १९५३.*

*२. देशपांडे मा. का.; 'कादंबरीकार फडके' १९५६*

*३. पत्की वि. वा., कोल्हटकर शि. न.; युगप्रवर्तक फडके १९६७.*

*४. वडेर प्रल्हाद; 'ना. सी. फडके : एक चिकित्सक अभ्यास' १९९०.*


## फडके, भालचंद्र दिनकर

**समीक्षक**

**१३ मे १९२५ – १७ सप्टेंबर २००४**



धारवाड येथे जन्मलेले भालचंद्र दिनकर फडके सोलापूरचे असून त्यांचे माध्यमिक शिक्षण जैन गुरुकुल व हरिभाई देवकरण प्रशाला, सोलापूर येथे झाले. सोलापूरच्याच दयानंद महाविद्यालयामधून पदवी परीक्षा उत्तीर्ण झाल्यावर ते पुणे विद्यापीठातून मराठी घेऊन एम.ए. झाले. मराठी कथा या विषयावर त्यांनी विद्यावाचस्पती (पीएच.डी) पदवी संपादन केली. पुढेही त्यांचा 'मराठी कथा' हा काही प्रमाणात अभ्यासाचा विषय राहिला.

ह.भ.प.दिनकरबुवा फडके यांचे ते चिरंजीव. वडील राष्ट्रीय कीर्तनकार म्हणून प्रख्यात होते, हिंदू महासभेच्या विचारांचे होते. मात्र त्यांची मुले सुधारणावादी, प्रायः साम्यवादी समाजवादी अशा डाव्या विचारसरणीकडे झुकणारी होती. भालचंद्र फडकेही त्याला अपवाद नाहीत.

सुरुवातीस काही काळ भारतीय युद्ध खात्यात नोकरी केल्यानंतर निवृत्तीपर्यंत फडके यांनी अध्यापन हाच पेशा निवडला. १९४५ ते १९५५ असे एक दशक माध्यमिक शिक्षक म्हणून त्यांनी काम केले. त्यानंतर मिलिंद महाविद्यालय, औरंगाबाद आणि शासकीय महाविद्यालय येथे मराठीचे अध्यापन केले. हा सगळा

काळ चौदा वर्षांचा होता. १९६९ साली ते पुणे विद्यापीठात रुजू झाले. प्रथम अधिव्याख्याता आणि १९७८ साली प्रपाठक झाले. १९८५ साली निरंतर प्रौढ शिक्षण संचालक म्हणून ते निवृत्त झाले.

फडके मराठीतील ख्यातनाम समीक्षक होते त्यांची समीक्षेवरील अनेक पुस्तके आहेत, त्यांपैकी 'कथाकार खानोलकर' (१९६९), 'दलित साहित्य: वेदना आणि विद्रोह' (१९७७), 'मराठी लेखिका: चिंता आणि चिंतन' (१९८०) ही काही प्रसिद्ध पुस्तके असून त्यामुळे त्यांच्यावर 'समीक्षक' ही मुद्रा उमटली. त्यांची समीक्षा मर्मग्राही, सामाजिक भान जागे करणारी आणि काही प्रमाणात प्रेरणा देणारी होती. दलित साहित्याचा त्यांनी वेळोवेळी घेतलेला धांडोळा साक्षेपी समीक्षेचा एक चांगला प्रकार होता.

त्यांनी अरविंद गोखले यांच्या कथा संपादित केल्या आहेत आणि कथांची अन्य संपादित पुस्तके ही त्यांच्या नावावर आहेत. डॉ. आंबेडकरांवर त्यांनी चरित्रपर लेखन केले. १९७३ ते १९७६ या काळात मराठी साहित्य पत्रिकाचे (पुणे) ते संपादक होते. त्या काळातील नामवंत समीक्षकांचे लेखन प्रसिद्ध करून त्यांनी पत्रिकेचा दर्जा उंचावला. त्यांची संपादकीय व समीक्षकीय दृष्टी चिकित्सक होती.

– मधू नेने

**संदर्भ :**

१. *'महाराष्ट्र साहित्य पत्रिका'; एप्रिल १९७३ ते मार्च १९७६.*

## फडके, यशवंत दिनकर

**चरित्रकार, इतिहासकार, संशोधक**

**३ जानेवारी १९३१ – १ जानेवारी २००८**

यशवंत दिनकर फडके यांचा जन्म सोलापूरला झाला. त्यांचे वडील राष्ट्रीय कीर्तनकार होते. वडिलांचे कुटुंबाकडे व मुलांकडे लक्ष नव्हते. मुलांची आबाळच झाली. जोडीला कठीण आर्थिक स्थिती असल्यामुळे लहानपणी दारिद्र्याचे चटके सहन करावे लागले. त्यामुळे अतिशय धडपड करून फडक्यांना शिक्षण घ्यावे लागले.



प्राथमिक, माध्यमिक आणि महाविद्यालयीन शिक्षण त्यांनी सोलापूर येथेच घेतले. शालेय शिक्षण घेत असतानाच य. दि. फडके यांनी द्वा. भ. कर्णिक यांच्या 'संग्राम' या वृत्तपत्रात लेखन सुरू केले होते. १९४७ साली मॅट्रिक, १९५१ साली बी.ए. (राज्यशास्त्र विषय घेऊन) आणि १९५३ साली राज्यशास्त्र विषय घेऊन ते एम. ए .झाले. तल्लख बुद्धी असल्याने त्यांना शासकीय महाविद्यालयात अध्यापनाची संधी मिळाली.

अभ्यासाचा–व्यासंगाचा विषय राज्यशास्त्र हा असल्याने फडक्यांना अवतीभवतीच्या राजकीय स्थितिगती, घटनांचे बारकाईने अवलोकन व चिंतन करण्याची सवय लागली. महाविद्यालयात राज्यशास्त्राचे अध्यापन करताना ह्या स्थितिगती–घटनांचे ते सूक्ष्म विश्लेषण करीत असत. हे विश्लेषण करताना वस्तुस्थिती, पुरावे ह्यांचा भक्कम आधार ते घेत असत. जोडीला भेदक, तिखट पण नेमकी वक्तृत्वशैली त्यांना लाभलेली असल्याने सर्व विश्लेषण सर्जक होत असे.

त्यांचा महाविद्यालयातील अध्यापनाचा काळ संयुक्त महाराष्ट्राच्या ऐन आंदोलनाचा होता. त्यामुळे त्यांचे अवघे लक्ष ह्या आंदोलनाचा बारकाईने अभ्यास करण्याकडे लागले होते. तोच त्यांच्या प्रबंधाचा विषय झाला. 'संयुक्त महाराष्ट्र चळवळ आणि काँग्रेस पक्ष' ह्या विषयावर प्रबंध लिहून त्यांनी मुंबई विद्यापीठाची पीएच.डी. ही पदवी १९७३ साली मिळवली. मुंबई विद्यापीठाच्या राज्यशास्त्र विभागात, प्रथम अधिव्याख्याता नंतर प्रपाठक (रीडर) म्हणून; पुढे पुणे विद्यापीठात 'महात्मा गांधी अध्यासनाचे' प्राध्यापक म्हणून; नंतर मुंबईच्या 'टाटा इन्स्टिट्यूट ऑफ सोशल सायन्सेस' ह्या संस्थेत सामाजिक शास्त्रांचे प्राध्यापक म्हणून अध्यापन केले. जवळपास पस्तीस वर्षे त्यांनी अध्यापनाचे काम केले.

फ

संयुक्त महाराष्ट्र चळवळीला काही फक्त राजकीयच अंग नव्हते- ते तर होतेच पण त्याशिवाय त्या चळवळीला सामाजिक, ऐतिहासिक, आर्थिक आणि सांस्कृतिक परिमिती होत्या. महाराष्ट्राच्या अवघ्या जीवनाच्या धमन्यांतूनच ही चळवळ वाहत होती. फडक्यांनी प्रबंधलेखन करताना ह्या सर्व परिमितींचा धांडोळा सूक्ष्मपणे घेतला आहे. त्यांचा प्रबंध हा सर्जनशीलतेचा वस्तुपाठच झाला आहे.

ह्या अभ्यासामुळेच ते विसाव्या शतकातील महाराष्ट्राच्या राजकीय इतिहासाकडे वळले. स्वतःच्या आयुष्याशी समांतर वाहणाऱ्या काळाचे सम्यक- वस्तुनिष्ठ आकलन होणे हे अत्यंत कठीण असते. फडक्यांना ते आकलन सर्वांगांनी झाले होते. त्या राजकीय इतिहासाचे आठ खंड १९०१ पासून १९६३पर्यंत त्यांनी लिहिले. 'सासवड आश्रम ट्रस्ट'च्या वतीने त्यांनी हे काम जवळपास बारा-चौदा वर्षे केले. एखाद्या योग्यासारखीच ही तपश्चर्या होती. त्यांचे निधन झाले नसते, तर त्यांनी इ.स.२०००पर्यंतचा राजकीय इतिहास पूर्ण केला असता. म्हणजे आणखी तीन-चार खंड झाले असते. हे कार्य खरे तर एकट्या-दुकट्याचे नव्हे -अनेक अभ्यासकांनी करण्याचे आहे- तेही अनेक वर्षे चिकाटीने-जिद्दीने! तसा प्रयत्न फडक्यांनी केला होता, पण तो यशस्वी झाला नाही. म्हणून ते स्वतः एक हाती ह्या कामामागे अहर्निश लागले होते. त्यात अनेक धोके व मर्यादा असतात, त्या गृहीत धरून जेवढे जमेल, तेवढे करावे असे ठरवून त्यांनी काम सुरू केले. राजकीय जीवनावर शेतकरी, शेतमजूर, जमीनदार, व्यापारी, कारखानदार, कामगार, बुद्धिजीवी वर्ग, मध्यम वर्ग - ह्या सर्वांचे आर्थिक संबंध, विविध धर्म-जातींमुळे उत्पन्न होणारे दैनंदिन संघर्ष, पारतंत्र्यावस्था, स्वातंत्र्यप्राप्ती, शहरांची औद्योगिक वाढ, दुष्काळ, भूकंप, वादळे, अतिवृष्टी, दलित आंदोलने, जागतिक महायुद्धांची लागलेली झळ; नेते, शासन, नोकरशाही अशा गोष्टींचा परिणाम होत असतो - ह्या व्यामिश्र चक्रव्यूहाचे भान फडक्यांना कसे अचूक होते; ते त्यांनी ह्या खंडांना ज्या प्रस्तावना लिहिल्या आहेत, त्यावरून कळून येते.

फडके हे संशोधनाच्या क्षेत्रात न.र.फाटक ह्यांच्या पठडीतले होते. फाटकांनीच फडक्यांना आगरकरांचे चरित्र लिहिण्याची जाहीर सूचना केली होती. इतकेच नव्हे तर त्यांच्या स्वतःच्या संग्रहातील आगरकरांचा खासगी पत्रव्यवहार आणि काही दुर्मीळ ग्रंथ त्यांनी फडक्यांना ह्या चरित्रलेखनासाठी दिले मार्गदर्शनही केले होते. 'समाजस्वास्थ्यकार र.धों. कर्वे ह्यांचे चरित्र लिहा' असे फाटकांनीच फडक्यांना सुचवले होते. दुर्गा भागवतांनी फडक्यांना र.धों.कर्व्यांनी लिहिलेल्या पत्रांचा एक जुडगाच चरित्रलेखनासाठी देऊन टाकला होता. ही सर्व पत्रे कर्व्यांनी गोव्याच्या रवींद्र केळेकरांना लिहिलेली होती. फडके फाटकांप्रमाणेच भक्कम आधाराच्या साहाय्याने परखड लिहीत असत. फाटकलिखित 'आदर्श भारतसेवक' (१९६७, गोपाळ कृष्ण गोखल्यांचे चरित्र) ह्यात फाटकांनी किती गफलती केल्या आहेत, हे फडके तपशीलवार दाखवतात आणि फाटकांच्या पदरात सर्व दोषांचे माप घालतात; आणि फडके लिहितात - 'होमरही कधी-कधी पेंगतो' अशा अर्थाची एक इंग्रजी म्हण आहे. तसे कधी-कधी प्रा.फाटकांचे झाले आहे.

एखादे पुस्तक लिहिताना फडके किती बारकाईने खोलवर संशोधन करतात त्याचे नमुने पाहण्यासाठी 'शोध सावरकरांचा', 'र.धों.कर्वे' ही पुस्तके मुद्दाम पाहावीत. स्वातंत्र्यवीर सावरकर आणि १९८१ बाबाराव सावरकर त्यांच्यासंबंधीच्या सर्व कागदपत्रांचा महाराष्ट्र शासनाच्या मुंबई येथील अभिलेखागाराच्या कार्यालयात दिवस न् दिवस बसून धांडोळा घेतला त्यांची टिपणे काढली. सावरकरांवरील पुस्तकासाठी त्यांनी १९ इंग्रजी पुस्तके; ७ हिंदी पुस्तके; ३६ मराठी पुस्तके सावरकरबंधूंबद्दलच्या माहितीसाठी वाचली होती. 'र.धों.कर्वे' चरित्रासाठी असेच अनेक तपशील पाहिले होते. 'समाजस्वास्थ्य'चे सर्व वर्षांचे अंक वाचून काढले. इतर तेरा इंग्रजी-मराठी ग्रंथांचा संदर्भ-साहित्य म्हणून अभ्यास केला. डॉ. आंबेडकर आणि त्यांचे कार्य हाही

फ

त्यांच्या अभ्यासाचा विषय होता. 'Worshipping False Gods' ह्या अरुण शौरी लिखित पुस्तकाचा त्यांनी भेदक परामर्श 'डॉ. आंबेडकरांचे मारेकरी: अरुण शौरी' (१९९९) ह्या पुस्तकात घेतला आहे. 'डॉ.आंबेडकर आणि काळाराम मंदिर सत्याग्रह' (१९८६); 'डॉ. आंबेडकर आणि इंडियन नॅशनल काँग्रेस' (१९८६) अशी पुस्तके फडक्यांनी लिहिली आहेत.

चरित्रकार आणि इतिहासकार अशा दोन अंगांनी फडके प्रसिद्ध होते. 'शोध बाळगोपाळांचा'(१९७७), 'केशवराव जेधे' (१९८२), 'अण्णासाहेब लठ्ठे'(१९९०), 'कहाणी सुभाषचंद्रांची' (१९८६) इत्यादी पुस्तके त्यांनी लिहिली. वस्तुनिष्ठ, आणि निःपक्षपाती, स्पष्ट, परखड असे त्यांच्या लेखनाचे स्वरूप असे. त्याबरोबरच ते निर्भीड असे. स्वा.सावरकर, सेनापती बापट, बाबाराव सावरकर ह्यांची देशभक्ती आणि त्याग ह्या वैशिष्ट्यांमुळे त्यांच्यासंबंधीचे लेखन त्यांनी केले. त्यांनी लिहिलेले 'आगरकर' हे चरित्र उत्कृष्ट चरित्राचा आदर्श आहे.

त्यांनी केलेले ललितलेखनही लक्षणीय आहे. 'दृष्टादृष्ट'(१९९२), 'शोधता शोधता' (१९९५), 'व्यक्तिरेखा' (१९९८), 'नाही चिरा, नाही पणती' (२०००), 'स्मरणरेखा' (१९९८) ही त्यांची ललित पुस्तके प्रसिद्ध आहेत.

'चरित्रात्मक कादंबरी' ही संकल्पना त्यांच्या दृष्टीने भोंगळ होती. गंगाधर गाडगीळांची 'दुर्दम्य' ही कादंबरी नसून ते 'टिळक चरित्र' आहे त्यांचा ठाम आग्रह होता. अलीकडे श्री. अशोक टिळक (रेव्हरन्ड नारायण वामन टिळक ह्यांचे नातू) ह्यांनी लिहिलेली 'चालता बोलता चमत्कार' ही कादंबरी नसून ते 'रेन्हरन्ड टिळकांचे चरित्र' आहे, हे त्यांनी त्या पुस्तकाच्या (२०००) प्रकाशनप्रसंगी स्पष्टपणे बजावले होते. हे बजावतानाही त्यांच्या स्वभावातील कोणत्याही गोष्टीकडे वस्तुनिष्ठपणे पाहण्याचे वैशिष्ट्यच व्यक्त झाले होते. सावरकरांवर विश्राम बेडेकर पटकथा लिहीत होते, तेव्हा ते फडक्यांना भेटले होते. फडक्यांनी त्यांना सावरकरांबद्दल कितीतरी संदर्भ पुरवले होते, पण त्याबद्दलचा उल्लेखही बेडेकरांनी कुठे केला नाही ह्याचा त्यांना खेद वाटला होता. डॉ. स. गं. मालशांशी लोकहितवादींच्या संदर्भात त्यांचा थोडाफार वाद झाला होता.

'महाराष्ट्र राज्य साहित्य आणि संस्कृती मंडळा'चे ते काही वर्षे अध्यक्ष होते. त्यांच्या कारकीर्दीतच 'महात्मा फुले समग्र वाङ्मय' ह्या ग्रंथाच्या सुधारित चौथी आवृत्ती – १४ एप्रिल, १९९१ (१००००प्रती) आणि सुधारित पाचवी आवृत्ती,– २८ नोव्हेंबर, १९९१ (१००००प्रती) अशा दोन आवृत्त्या केवळ सहा महिन्यांत प्रसिद्ध होऊन अल्पावधीतच विकल्या गेल्या. हा एक विक्रमच होता.

२००० साली बेळगाव येथे जे अखिल भारतीय मराठी साहित्य संमेलन झाले, त्याचे ते बिनविरोध निवडून आलेले अध्यक्ष होते. त्यांच्या भाषणात सीमावादाचा ऊहापोह त्यांनी केला होता. एशियाटिक सोसायटी, मुंबई ह्या संस्थेने त्यांना सन्माननीय सदस्यत्व दिले होते.

संशोधक, व्यासंगी, विश्लेषक, निःस्पृह असे त्यांचे विशेष होते.

– डॉ. चंद्रकांत वर्तक

**संदर्भ :**

*१. उपाध्ये नीला; 'संशोधक य. दि. फडके'; रंगनाथ कुलकर्णी, मुंबई; १९९७.*

फ

## फाटक, नरहर रघुनाथ

**संशोधक, चरित्रकार**

**१५ एप्रिल १८८३ – २१ डिसेंबर १९७९**

शहाणव वर्षांचे प्रदीर्घ आयुष्य लाभलेल्या नरहर रघुनाथ फाटकांनी १९व्या शतकाची सरती १७ वर्षे आणि २०व्या शतकाची, सततच्या राजकीय, सामाजिक घडामोडींची जवळपास ८० वर्षे पाहिली आणि अनुभवली. समजू लागल्यापासून त्यांनी २०व्या शतकाकडे डोळसपणे आणि चिकित्सक बुद्धीने पाहिले.



त्या शतकातील घडामोडींचे चढउतार अनुभवले, कारण ते वृत्तपत्रसृष्टी आणि शैक्षणिक विश्वात कायमच वावरले. तसेच साहित्याच्या प्रांतात स्वतःची नाममुद्रा उमटवणाऱ्या दर्जाचे लेखन त्यांनी अखंडपणे केले.

त्या वेळच्या भोर संस्थानातील जांभळी गावात त्यांचा जन्म झाला. मूळ घराणे कोकणात कनोदचे, पण आजोबा भोर संस्थानचे कारभारी होते म्हणून तेथे स्थायिक झाले. वडील उत्तर हिंदुस्थानात सरकारी अधिकारी असल्याने नेहमी त्यांच्या बदल्या होत असत. त्यामुळे फाटकांचे शिक्षण भोरप्रमाणे पुणे, अजमेर, इंदूर, अलाहाबाद येथेही झाले. १९१७ साली तत्त्वज्ञान विषय घेऊन ते अलाहाबाद विद्यापीठातून बी. ए. झाले. अर्थशास्त्र व राज्यशास्त्र ह्यांचेही ते विद्यार्थी होते. पुढल्या काळात त्यांचे वास्तव्य प्रामुख्याने मुंबईत झाले आणि उमेदीच्या काळात त्यांचा वृत्तपत्रांशी जवळचा संबंध आला. वयाच्या पन्नाशीत ते शैक्षणिक क्षेत्रात आले. १९३५ ते १९३७ ह्या कालावधीत ते एस.एन.डी.टी. वुमेन्स युनिव्हर्सिटीत आणि नंतर १९३८ ते १९५७ माटुंग्याच्या रामनारायण रुईया महाविद्यालयात मराठीचे प्रमुख प्राध्यापक होते. पत्रकार हाही एकापरीने समाजाचा शिक्षकच असतो. त्यांची पत्रकारिता जागरूक होती आणि समकालीन राजकीय सामाजिक जीवनाचे व त्या-त्या क्षेत्रातील व्यक्तींच्या कार्याचे ते डोळस निरीक्षक व चिकित्सक भाष्यकार होते. त्यांच्या व्यक्तिमत्त्वाला आणखीही पैलू होते वि.का. राजवाडे यांच्या इतिहास संशोधनाचा संस्कार त्यांच्यावर झाला आणि इतिहास-संशोधन हे त्यांचे क्षेत्र झाले. इतिहास-संशोधनात राजवाडे कधीकधी ज्या अनैतिहासिक व अवास्तव कल्पना करीत, त्यांचा विसर फाटकांना कधी पडला नाही. ते सदैव सत्यान्वेषीच राहिले.

फाटकांना इंग्रजी, संस्कृत, हिंदी, गुजराती, उर्दू ह्या भाषा नुसत्याच अवगत होत्या असे नव्हे, तर त्या-त्या भाषांमधील साहित्याचा व्यासंग त्यांनी केला होता. शिवाय पंडित विष्णू दिगंबर पलुस्करांकडे त्यांनी शास्त्रीय संगीताचे धडे गिरवले होते. चित्रकलेच्या परीक्षाही त्यांनी दिल्या होत्या. त्यांचे व्यक्तिमत्त्व प्रखरच होते. ते विचाराने मूर्तिभंजक, वृत्तीने वादप्रिय (वाद ओढवून घेणारेही), आपल्या व्यासंगाचा आणि अभ्यासाचा अभिमान बाळगणारे तसेच व्यासंग नसलेल्या माणसांबद्दल तुच्छता बाळगणारे होते. मात्र खऱ्याखुऱ्या ज्ञानी व विभूतिमत्त्व असलेल्या माणसापुढे नम्र, निदान मवाळ होणारे होते. ज्ञानाच्या हेतूशिवाय अन्य कशासाठी म्हणून अफाटवाचन केले नाही. ते अखंड ज्ञानव्रती होते.

वृत्तपत्र क्षेत्रात वावरताना त्यांचा नाट्याचार्य कृष्णा प्रभाकर खाडीलकरांशी संबंध आला. उत्तरोत्तर तो संबंध वाढत गेला आणि ‘नवा काळ’चे ते नुसतेच सहसंपादक झाले नाहीत तर एक जबाबदार घटक होऊन गेले. पुढे १९३९मध्ये ‘संध्यादैनिक’ सुरू झाले, तेव्हाही त्याचे पालनपोषण, जतन त्यांनी केले. १९२९ साली खाडीलकरांना तुरुंगवासाची शिक्षा झाली, ती फाटकांनी लिहिलेल्या अग्रलेखामुळे. फाटक काही काळ ‘इंदुप्रकाश’चे संपादक होते, पण त्या वृत्तपत्रात त्यांनी सतत लेखन केले. अगदी प्रारंभापासून! ‘सुबोधपत्रिका’, ‘विविधवृत्त’ (रा. का. तटणीस), ‘आलमगीर’ (चं. वि. बावडेकर) ह्या वृत्तपत्रांमध्येही ते लिहीत. ‘विविधवृत्ता’तील अग्रलेख, ‘अंतर्भेदी’ ह्या नावाने प्रख्यात व्यक्तींची निःस्पृहपणे रेखाटलेली व्यक्तिचित्रांची लेखमाला, ‘आलमगीर’च्या अंकातील ‘मंगलचिंतन’ हा लेख; हे सर्व फाटकांनीच लिहिले होते. ‘सत्यान्वेषी’, ‘फरिश्ता’ ह्या टोपणनावांनीही त्यांनी लिहिले. त्यांना तोंडाने मजकूर सांगून लिहवून घेणे कधी जमले नाही आणि रुचलेही नाही. कागद, पेने, पेन्सिली इत्यादी लेखनसाहित्याच्या नावीन्याची आणि विविधतेची त्यांना अतिशय हौस होती.

काळ मग तो इतिहास काळ असो किंवा प्रचलित वर्तमानकाळ असो. फाटकांचे त्याच्याशी एक अतूट नाते बांधले गेले होते. हा काळ त्यांनी आपल्या लेखनातून नेहमी जिवंतपणे उभा केला. एखाद्या ग्रंथाचे लेखन

फ

करावयाचे असले की त्यातील विषयांशी संबंधित सर्व पुस्तके एकत्र करून ते ती अगदी हाताशी ठेवीत आणि ते ग्रंथलेखन झाले की ती पुस्तके आपापल्या जागी ठेवली जात. त्यामुळेच त्यांनी अफाट असा ग्रंथसंग्रह केला होता. उत्तर आयुष्यात त्यांनी हा ग्रंथसंग्रह रुईया महाविद्यालयाचे ग्रंथालय, मुंबई मराठी ग्रंथसंग्रहालय इत्यादी संस्थांना अर्पण केला. ह्या लेखनाबाबत एक गोष्ट सांगायची म्हणजे त्यांची स्मरणशक्ती अत्यंत तीव्र होती. लेण्यात ज्याप्रमाणे शिल्पे चिरकाल असतात, त्याप्रमाणे त्यांच्या स्मरणात वाचलेले सारे कायम साठवले जायचे - अगदी वज्रलेप! टिपणे कधीकधी संक्षिप्त स्वरूपात करायचे. पण त्यावाचून त्यांचे अडले नाही. हे स्मरणच त्यांच्या वृत्तपत्रीय, प्राध्यापकीय जीवनात त्यांच्या साथसोबतीला आले.

इतिहास काळाशी निगडित अशा संतांच्या वाङ्मयाचा अभ्यास त्यांनी केला आणि त्यातूनच 'श्रीज्ञानेश्वर आणि ज्ञानेश्वरी' (१९४९), 'श्रीएकनाथ-वाङ्मय आणि कार्य' (१९५०), 'श्रीरामदास - वाङ्मय आणि कार्य' (१९५३ आणि १९७०), 'श्रीज्ञानेश्वर - वाङ्मय आणि कार्य' (१९५४) अशी ग्रंथरचना त्यांनी केली. त्यात भक्तीचा भाबडेपणा नव्हता. विश्लेषण, चिकित्सा, समालोचन, आस्वाद, मूल्यमापन ह्यांबरोबरच ते वाङ्मय म्हणजे सामाजिक, सांस्कृतिक इतिहासाचे एक महत्त्वपूर्ण साधन आहे. ही स्वच्छ दृष्टी होते. 'मराठेशाहीचा इतिहास', 'नारायणरावाचा खून की आत्महत्या?', (नवा काळमधली लेखमाला), '१८५७ची शिपाईगर्दी' (१९५८), 'यशवंतराव होळकरांचे चरित्र' अशी पुस्तके त्यांनी लिहिली.

'रामदास-शिवाजी' ह्यांची पहिली भेट खरोखरी केव्हा झाली? ह्यासंबंधी त्यांचे इतिहास संशोधकांबरोबर दीर्घ वाद झाले. समर्थ रामदासांनी 'दासबोधा'त योजिलेला राजकारण हा शब्द आजच्या प्रचलित अर्थानुसार म्हणजे पॉलिटिक्स - राजनीती ह्या अर्थाने योजिलेला नसून चातुर्य, शहाणपण, तीक्ष्ण बुद्धी, युक्ती असे अर्थ समर्थांना अभिप्रेत होते - असे त्यांचे प्रतिपादन असे. '१८५७ शिपाईगर्दी' असे म्हणताना त्या गर्दीच्या म्होरक्यांना राष्ट्रवाद इत्यादी काहीही माहिती नव्हते. त्याची कल्पनाच त्यांना नव्हती, हे ते स्पष्ट करीत. "मैं कभी झाँशी नही दूँगी" असे म्हणणाऱ्या राणी लक्ष्मीबाईंनाही त्याची कल्पना नव्हती, असे ते म्हणत. ह्यामुळे त्यांच्यावर टीकेचे वादळ उठले. अन्यांनी त्यांना 'नराधम' म्हटले आणि टीकेचे आसूड ओढले. ह्याच १८५७ च्या बंडाच्या काळात वरसईचे विष्णुभट गोडसे उत्तर हिंदुस्थानात पायी प्रवास करीत होते. 'झांशीला इंग्रजांशी झालेल्या लढाईत झाशीच्या किल्ल्यात अकरा दिवस ते राहिले होते. इंग्रजांनी केलेली झांशी शहरातील लूट त्यांच्या डोळ्यांदेखत झाली होती. गोडसे भटजींनी ह्या बंडाची हकिकत त्यांच्या 'माझा प्रवास'मध्ये सांगितली आहे. इतिहासाचार्य चिंतामणरावांनी- वैद्यांनी ते पुस्तक संपादित केले. फाटकांनी त्या पुस्तकाच्या नंतरच्या आवृत्तीत वैद्यांच्या संपादनातील ढिसाळपणा, गफलती तसेच मूळ मजकूर गाळणे किंवा त्या जागी स्वतःचा मजकूर घुसडणे अशा गफलतींबद्दल प्रस्तावनेत वैद्यांना धारेवर धरले आहे. फाटकांनी मूळ मजकूर कोणता होता हे स्वतंत्र परिशिष्टात दाखवले आहे.

'न्यायमूर्ती महादेव गोविंद रानडे', 'आदर्श भारत सेवक'- गोपाळ कृष्ण गोखले, 'लोकमान्य' (टिळक), 'नाट्याचार्य कृष्णाजी प्रभाकर खाडीलकर' ह्यांची चरित्रेही त्यांनी लिहिली. गोखल्यांच्या चरित्राबद्दल फाटकांना साहित्य अकादमीचा पुरस्कार मिळाला. न्यायमूर्ती रानडे आणि नामदार गोखले ह्यांची विचारसरणी त्यांना सर्वार्थाने मान्य होती आणि टिळकांबद्दल त्यांच्या मनात अढी होती आणि राग होता; पण टिळकांचा व्यासंग, विद्वत्ता, गीतारहस्याची निर्मिती, स्वराज्यप्राप्तीसाठीचा अहर्निश उद्योग, सोसलेले तुरुंगवास ह्या गोष्टींनी फाटकांना जिंकले होते ह्याचा स्वच्छ प्रत्यय 'लोकमान्य'मध्ये येतो. नरसिंह चिंतामण केळकरांनी लोकमान्य टिळकांचे चरित्र तीन खंडांमध्ये लिहिले. ह्या चरित्रात केळकरांनी सांगितलेल्या घटना, व्यक्तीविषयक निर्देश ह्यांत चुका आणि कालविपर्यास कसा झाला आहे, हे 'विविधज्ञानविस्तारा'त अनेक परीक्षणात्मक लेख लिहून फाटक केळकरांची हजेरी घेत परखडपणे दाखवतात. त्यांनी आयुष्याच्या उत्तरावस्थेत

फ

'मुंबई शहराचा इतिहास' लिहिला. 'अर्वाचीन महाराष्ट्रातील सहा थोर पुरुष' (१९४९) हे लोकहितवादी, जोतिबा फुले ह्यांचे महत्त्व सांगणारे पुस्तकही लिहिले.

प्राध्यापक म्हणून त्यांचे वैशिष्ट्य असे की, वाङ्मयाभ्यास करताना त्याचे सामाजिक व सांस्कृतिक संदर्भ सांगण्यावर त्यांचा नेहमी भर असे. ललित वाङ्मयकृतीची मात्र ते कधी रसिकतेने समीक्षा करीत नसत. ललित वाङ्मयकृतीकडे अलिप्तपणे कोरडेपणानेच पाहत.

आयुष्याच्या उत्तरार्धात त्यांनी चीनचा व रशियाचा प्रवास केला होता. 'रशियाचे संक्षिप्त दर्शन' (१९५५) नामक प्रवासवर्णनही लिहिले होते.

भारत इतिहास संशोधन मंडळ; प्राज्ञ पाठशाळा मंडळ, वाई; मुंबई मराठी साहित्य संघ; महाराष्ट्र राज्य साहित्य आणि संस्कृती मंडळ; अशासारख्या संस्थांचे ते सदस्य व पदाधिकारी होते.

फाटकांचे व्यक्तिमत्त्व असे चतुरस्र आणि बावनकशी होते.

– डॉ. चंद्रकांत वर्तक

**संदर्भ :**


१. *लेले रा. के.; 'मराठी वृत्तपत्रांचा इतिहास'; कॉन्टिनेन्टल प्रकाशन, पुणे; १९८५.*
२. *भागवत श्री. पु.; 'साहित्याची भूमी', १९९७-१९९८ ग्रंथाली प्रकाशन.*
३. *वर्तक चंद्रकांत; 'वळणावरचे साकव'; राजहंस प्रकाशन, पुणे; १९९६.*


फ

## फाटक, पद्मजा शशिकांत

**कथाकार, चरित्रकार,**
**ललित लेखिका, बालसाहित्यकार**
**१४ नोव्हेंबर १९४३**

प्रसन्न शैलीत ललितलेखन करणाऱ्या पद्मजा शशिकांत फाटक यांचा जन्म नागपूर येथे झाला. अठराव्या वर्षी त्यांचे लग्न झाले. त्यांची जडणघडण आईपेक्षा बाबांच्या मुशीतून अधिक झाली. वडिलांनी खूप चिकाटीने परंतु मैत्रीच्या



जिव्हाळ्याने त्यांना 'संगोपनात मोडणाऱ्या लहानमोठ्या गोष्टी' शिकवल्या. वडिलांनी माणुसकी अधोरेखित केली. या त्यांच्या पद्मोदय घरात बालसन्मानाला महत्त्व होते. मुलीला एन. सी. सी. चे शिक्षण, कुठल्याही पाण्यात पोहणे, एकटीने सिनेमाला जाणे, बोटिंग, ग्लायडिंग आशा गोष्टींनाही प्रोत्साहन देणाऱ्या बाबांनी बौद्धिक प्रामाणिकता, सुसंगती, समानुभूती, निरीश्वरवाद ह्यांचे संस्कार केले. मानवजातीविषयी अपार करुणा ही वडिलांचीच देणगी होती.

गुजरातेतून महाराष्ट्रात आल्यावरही बाबांची नाळ प्रादेशिकतेशी जरी जोडली गेली नाही, तरी पद्मजाताईंना इरावती कर्वे, दुर्गाबाई भागवत, मौज, सत्यकथा इत्यादींची साहित्य-खाण सापडली. वडील देशाटन करू शकले नाहीत, पद्मजाताईंनी विश्वपर्यटन केले व आपल्या अनुभवांची व्याप्ती वाढवली.

पद्मजा यांनी आत्तापर्यंत विविध प्रकारचे लेखन केले आहे. त्यात 'शिक्षणतज्ज्ञ ताराबाई मोडक' (१९८१) हा चरित्रग्रंथ, 'हसरी किडनी' (२०००) हे अनुभवकथन, 'अमेरिकन समाजाची ओळख करून देणारी 'आवाजो' आणि 'हॅपी नेटवर्क टु यू' ही पुस्तके, 'राही' हा कथासंग्रह, 'गर्भश्रीमंतीचं झाड' (१९७९) व 'सोनेलु मियेर' (१९८६) हे ललितलेखसंग्रह, 'चिमुकली चांदणी' (१९७२), 'चमंगख चण्टीगो' (खमंग गोष्टी- १९७८), 'हिंदविजय सोसायटीतले पगडी आजोबा' (१९८०), 'पैशांचं झाड' (१९७५) या बालसाहित्याचा समावेश आहे. 'लिहायचं असेल, तर काय करायचं ते नीटपणे कर अन्यथा करूच नकोस, हे वडिलांचे आत्मीयतेचे परंतु सक्रिय भरीव संस्कार पद्मजाताईंनी मनापासून जोपासले आहेत, ते विशेषतः त्यांनी ताराबाई मोडकांचे चरित्र लिहून प्रत्ययास आणून दिले आहे.

आधुनिक, पुरोगामी प्रवृत्तीच्या लेखिका पद्मजाताई यांच्या मनमोकळ्या प्रसन्न शैलीमुळे, विचारपरिप्लुत व आशयसमृद्धी यांमुळे वेगळेपणा ठसवणारे त्यांचे लेखन लोकप्रिय ठरलेले आहे. एम.ए. झालेल्या पद्मजाताईंनी, दीपा गोवारीकर व विद्या विद्वांस यांच्या सहकार्याने संपादित केलेल्या 'बापलेकी'मध्ये आपल्या वडिलांच्या आवडीनिवडींच्या सवयींच्या उल्लेखासोबत त्यांनी केलेल्या संस्कारांचे उत्तम व साक्षेपी दर्शन घडविले आहे.

– वि. ग. जोशी

**संदर्भ :**

*१. फाटक पद्मजा; 'बापलेकी'; मौज प्रकाशन गृह, मुंबई; २००४.*

## फुटाणे, रामदास दत्तात्रेय

**कवी, कथालेखक, चित्रपट निर्माते, दिग्दर्शक**

**१४ एप्रिल १९४३**



रामदास दत्तात्रेय फुटाणे यांचा जन्म अहमदनगर जिल्ह्यातील जामखेड येथे झाला. १९५९ साली ते एस.एस.एसी. झाले. प्रारंभी १९६१ ते १९७३ या काळात ते चित्रकला शिक्षक होते. नंतर चित्रपट-निर्मिती, लेखन व दिग्दर्शन ह्यांकडे वळले. 'सामना' (१९७५) या चित्रपटाचे ते निर्माते होते. 'सर्वसाक्षी' (१९७९) या चित्रपटाचे कथालेखन व दिग्दर्शन त्यांनी केले. 'सुर्वंता' (१९९४) हा त्यांनी दिग्दर्शित केलेला आणखी एक चित्रपट होय. त्यांच्या ह्या तीनही चित्रपटांना राज्य, राष्ट्रीय व आंतरराष्ट्रीय पातळ्यांवरचे विविध पुरस्कार लाभले.

फुटाण्यांचा मूळ पिंड एका सर्जनशील कवीचा असून 'विडंबन काव्य' हा त्यांचा विशेष आवडीचा काव्यप्रकार आहे. आत्तापर्यंत त्यांचे 'कटपीस' (१९६९), 'सफेद टोपी लाल बत्ती' (१९८६), 'चांगभलं' (१९९०), 'भारत कधी कधी माझा देश आहे' (१९९७) आणि 'फोडणी' (२०००) असे पाच कवितासंग्रह प्रसिद्ध झाले आहेत.

मराठी विडंबन काव्यपरंपरेतील ही कविता लोकगीते-लोकनाट्य, तुकोबा-रामदास, मर्ढेकर-अत्रे-बांदेकर-पुल इत्यादींच्या विडंबन प्रवृत्तीशी नाते सांगणारी आहे. परंतु, पूर्वपरंपरेपेक्षा फुटाण्यांचे विडंबनीय द्रव्य वेगळे आहे. ते संभ्रमित जीवनमूल्यांच्या चौकटीत अडकलेले आहे. ही कविता म्हणजे समकालीन वास्तवाचा मर्मभेदक ऐवज म्हणता येईल. समकालीन वास्तवातील सांस्कृतिक पर्यावरणाच्या मूल्यसंभ्रमाचे अधोरेखन आणि चित्रदर्शित्व व कोटिक्रमाचे झळझळीत दर्शन ही या कवितेची महत्त्वाची वैशिष्ट्ये आहेत.

फुटाण्यांनी आजवर अनेक महत्त्वाची पदे भूषविलेली आहेत. त्यात अखिल भारतीय मराठी चित्रपट महामंडळाचे अध्यक्षपद (१९८०-१९९४), पुणे येथील महाराष्ट्र साहित्य परिषदेचे उपाध्यक्षपद (१९९५-१९९७), महाराष्ट्र विधान परिषदेचे सदस्यदत्व (१४ एप्रिल १९९६ पासून २००० पर्यंत), जागतिक मराठी परिषदेचे अध्यक्षपद ह्या काही उल्लेखनीय पदांचा उल्लेख करता येईल आहेत.

याबरोबरच मराठी कलाकार व साहित्यिकांना प्रोत्साहन देण्यासाठी त्यांनी विविध पुरस्कार योजनांची आखणी केली. बृहन्महाराष्ट्र व महाराष्ट्रातील ग्रामीण भागात मराठी कविताकथनाचे कार्यक्रम करून मराठी कवितेच्या प्रचार-प्रसारासाठी व अभिवृद्धीसाठी जाणीवपूर्वक प्रयत्न केले. अनेक नव्या कवींना प्रोत्साहन देण्यात त्यांनी पुढाकार घेतला.

फुटाणे मराठीतील एक विडंबन-भाष्य कवी म्हणून सर्वदूर परिचित आहेत.

– डॉ. शोभा रोकडे

**संदर्भ :**

*१. जाधव रा.ग.; 'फोडणी' काव्यसंग्रह, प्रस्तावना; ग्रंथाली, मुंबई; २००४.*

*२. कुळकर्णी अनिरुद्ध, संपादक; 'प्रदक्षिणा'; कॉन्टिनेन्टल प्रकाशन, पुणे; २०००.*

फ

## फुले, सावित्रीबाई जोतीराव

☞ मुख्य नोंद – शिक्षण खंड

## फुले, जोतीराव गोविंदराव

*महात्मा*

**समाजसुधारक, ग्रंथकार, विचारवंत, कवी, शिक्षण तज्ज्ञ**

**११ एप्रिल १८२७ – २८ नोव्हेंबर १८९०**

☞ मुख्य नोंद – पत्रकारिता आणि ललितेतर साहित्य खंड

एकोणिसाव्या शतकातील थोर समाजसुधारक व सत्यशोधक समाजाचे संस्थापक जोतीराव गोविंदराव फुले यांनी 'तृतीय रत्न' हे नाटक १८५५ साली लिहिले. मराठी रंगभूमीचा उषःकाल अजून व्हावयाचा असताना, 'शारदा'सारखे बालाजरठविवाहदर्शन घडविणारे समस्याप्रधान नाटक अजून दूर असताना, माळ्याकुणब्याच्या स्त्रीला दिवस गेले आहेत, हे पाहून ब्राह्मण जोशाची स्वारी तिला भूलथापा देऊन तिच्या नवऱ्याला कसे लुबाडतो, यासारखा तत्कालीन समाजातील एक ज्वलंत प्रश्न घेऊन जोतीरावांनी नाट्यरचना केली. ही घटनाच क्रांतिकारक आहे.

१८६९ मध्ये जोतीरावांनी 'छत्रपती शिवाजीराजे भोसले यांचा पवाडा' ह्याची रचना केली. ती ''कुणबी, माळी, महार, मांग वगैरे पाताळी घातलेल्या क्षेत्र्यांच्या उपयोगी पडावा'' या हेतूने केली आहे. या पोवाड्यात कमालीच्या भावपूर्ण शब्दांत शिवाजीराजांचा गौरव केला आहे. त्यांनी केलेली 'अखंडां'ची रचना तुकारामांच्या अभंगवाणीचे स्मरण करून देणारी आहे. समाजजीवनातील विसंगतींचे दर्शन, मानवी वृत्तिप्रवृत्तींवरील मार्मिक भाष्य, ''सत्यावीण जगीं नाहीं अन्य धर्म'' या सत्यधर्माचा सातत्यपूर्ण उद्घोष असे अनेक विशेष 'अखंड'रचनेस ठसठशीत रूप देतात. १८६९ मध्ये त्यांनी 'ब्राह्मणांचे कसब' हे पुस्तक प्रसिद्ध केले. या काव्यसंग्रहात अडाणी व देवभोळे शेतकरी यांची भटाभिक्षुकांच्या सांगण्यामुळे कशी पिळवणूक होते, ते वेगवेगळ्या पद्यांत वर्णन करून सांगितले आहे. १८७३ साली त्यांनी 'गुलामगिरी' हा ग्रंथ लिहिला. ''ज्या दिवशी मनुष्य दास होतो, त्या दिवशी त्याचा अर्धा सद्गुण जातो'' या होमरच्या वाक्याने या ग्रंथाचा प्रारंभ झाला आहे. हा ग्रंथ प्रश्नोत्तररूप असून त्यात सोळा प्रकरणे आहेत. ''ब्राह्मण लोक तुम्हांला लुटून खात आहेत हे माझ्या शूद्र बांधवांना सांगण्याच्या हेतूने मी हा प्रस्तुत ग्रंथ लिहीत आहे'', असे 'गुलामगिरी' या ग्रंथाचे प्रयोजन फुले यांनी स्पष्ट केले आहे. या ग्रंथात त्यांनी बळिराजाचे मिथक निर्माण करून शूद्र संस्कृतीचा गौरव केला आहे.

फुले यांची वैचारिक जडणघडण एकीकडे थॉमस पेनच्या 'राइट्स ऑफ मॅन'सारख्या अमेरिकन विचारविश्वातून झाली, दुसरीकडे 'मानवधर्मसभा', 'परमहंससभा' यांसारख्या सभांशी संबद्ध विचारांतून झाली. तर तिसरीकडे संतांच्या सामाजिक विचारधनामधून झाली. शूद्रांना व अतिशूद्रांना नागरी हक्क जाणीव व अधिकारांची शिकवणूक व ब्राह्मणी शास्त्रांच्या धार्मिक व मानसिक गुलामगिरीतून मुक्तता करण्याच्या दृष्टीने त्यांनी १८७३ मध्ये 'सत्यशोधक' समाजाची स्थापना केली. समाजाचे सभासदत्व सर्व जातींतील लोकांना मुक्त होते. सत्यशोधक समाजाचा जातिव्यवस्थेप्रमाणे चातुर्वर्ण्यावरही विश्वास नव्हता.

१८७३ ते १८८३ अशी जवळपास दहा वर्षे अन्य सामाजिक कार्यांत घालवल्यानंतर फुले यांनी १८८३ मध्ये 'शेतकऱ्याचा असूड' हे पुस्तक लिहिले. कृषिप्रधान भारत देशात शेतकऱ्याचीच दुर्दशा आहे आणि ती दूर झालीच पाहिजे, यासाठी फुले सातत्याने प्रयत्नशील राहिले. शेतकऱ्याला केंद्रस्थानी ठेवून दररोजच्या व्यवहारातले शब्द योजून त्यांनी या पुस्तकाची रचना केली आहे. शेतकऱ्यांसंबंधीचा इतका अभ्यासपूर्ण व समग्र विचार मांडणारा दुसरा ग्रंथ मराठीत त्या काळात झाला नाही. ''विद्येविना मती गली; मतीविना नीती गेली; नीतीविना गती गेली । गतीविना वित्त गेले, वित्ताविना शूद्र खचले, इतके अनर्थ एका अविद्येने केले'' या लयबद्ध विधानाने सुरू होणारे 'शेतकऱ्याचा असूड'चे लेखन ही मराठी गद्यसाहित्यात पडलेली मोलाची भर आहे.

फ

१८८५ मध्ये फुले यांनी 'सत्सार' नावाचे नियतकालिक काढले. त्याच्या उपलब्ध दोन अंकांतून ('सत्सार -१', आणि 'सत्सार - २') त्यांनी पंडिता रमाबाई आणि ताराबाई शिंदे या दोघींचा गौरव केला आहे. याच वर्षी न्यायमूर्ती रानडे यांच्या शेतकऱ्यांविषयीच्या मताचा प्रतिवाद करणारे व शेतकऱ्यांच्या भयावह दु:स्थितीचे दर्शन घडविणारे 'इशारा' नावाचे पुस्तक त्यांनी लिहिले; त्याचप्रमाणे न्यायमूर्ती रानड्यांनी पुढाकार घेऊन भरविलेल्या 'दुसऱ्या मराठी ग्रंथकार सभे'स उपस्थित राहण्यास नकार देणारे अर्थपूर्ण पत्र जोतीराव फुल्यांनी पाठविले. ११ मे १८८८ रोजी जोतीरावांना वयाची साठ वर्षे पूर्ण झाल्यानिमित्ताने त्यांचा जाहीर सत्कार करण्यात आला, आणि या प्रसंगी दलित समाजाची प्रदीर्घ सेवा केल्याबद्दल त्यांना 'महात्मा' ही पदवी आदरपूर्वक अर्पण करण्यात आली. जुलै १८८८ पासून फुले अर्धांगवायूने आजारी झाले. १८८९ मध्ये मृत्यूपूर्वी काही दिवस विकलांग शारीर अवस्थेत त्यांनी 'सार्वजनिक सत्यधर्म' हा आपला शेवटचा ग्रंथ लिहून पूरा केला. तो ग्रंथ त्यांचे दत्तकपुत्र यशवंतराव फुले यांनी १८९१ मध्ये प्रसिद्ध केला. या ग्रंथातून फुले यांच्या मानवतावादी भूमिकेचे व्यापकत्व आणि ब्राह्मण विरोधामागची तळमळ यांचे दर्शन घडते.

– प्रा. डॉ. विलास खोले

**संदर्भ :**

१. *'महात्मा फुले समग्र वाङ्मय'; महाराष्ट्र राज्य साहित्य आणि संस्कृती मंडळ, मुंबई; १९९१.*

## फेणे, वसंत नरहर

**कथाकार, कादंबरीकार**

**२८ एप्रिल १९२८**

वसंत नरहर फेणे यांचा जन्म आणि शिक्षण मुंबईत झाले. मुंबई विद्यापीठाची विज्ञान शाखेची आणि नंतर पुणे विद्यापीठाची कला शाखेची पदवी त्यांनी संपादन केली. त्यांनी सुरुवातीला महाराष्ट्र राज्य परिवहन खाते



येथे आणि नंतर गृहनिर्माण मंडळात नोकरी केली.

'मी पुरुष-पूर्ण पुरुष' (१९७३) हे नाटक, 'वैताग वानोळा' (१९८०) विनोदी लेख, 'साम्यवाद : एक अभ्यास' हा अनुवाद असे प्रकार त्यांनी हाताळले असले, तरी कथाकार आणि कादंबरीकार म्हणून ते ओळखले जातात.

'काना आणि मात्रा' (१९७२), 'पाण्यातली लेणी' (१९७८), 'सावल्यांची लिपी' (१९८१), 'निर्वासित नाती' (१९९७), 'पिता-पुत्र' (१९९५), 'नरजन्म' (१९८९), 'ज्याचा-त्याचा क्रुस'(१९९५), 'मुळे आणि पाळे' (१९९९), 'शतकान्तिका' (१९९९), 'मावळतीचे मृद्‌गंध' (२००१) असे त्यांचे कथा-संग्रह आहेत.

'हे झाड जगावेगळे' (१९७९), 'पहिला अध्याय' (१९८०), 'सेंट्रल बस स्टेशन ' (१९८०), 'अजोड' (१९८३), 'संदर्भ' (१९८४), 'ऱ्हासपर्व'(१९८४), 'विश्वंभरे बोलविले' इत्यादी कादंबऱ्या असे त्यांचे लेखन आहे.

माणसाच्या मनाचा व मानवी संबंधांचा खोलवर जाऊन वेध घेणाऱ्या त्यांच्या कथा 'दीपावली', 'सत्यकथा', 'किस्त्रीम', 'केसरी', 'प्रतिष्ठान', 'मराठवाडा' इत्यादी अंकांतून प्रसिद्ध झाल्या. 'निर्वासित नाती'मध्ये 'नाती' हे एकच सूत्र खेळवले असले, तरी इतर कथांमधूनही रक्ताची नाती, प्रीती-मैत्री, नीती, मूल्य, जन्मभू आणि 'स्व'शी असलेली नाती ते प्रकाशझोतात आणतात. कधी त्या नात्यांमधली समृद्धी दिसते तर कधी त्यातले वैफल्य.

**मध्यवर्गीय जाणीवांचा विस्तीर्ण परीघ**

त्यांच्या कथांमध्ये मध्यमवर्गीय जीवन जास्त असले, तरी त्यांच्या अनुभवविश्वाचा परीघ विस्तीर्ण आहेच. माणसाच्या मनाच्या समुद्रात खोलवर अवगाहन करतात.

फ

मानवी नात्यातली निरर्थकता-अर्थपूर्णता, दुरावा-जवळीक, मोहकता-कुरूपता अशी दोन्ही रूपे ते रंगवितात; त्यामुळे एकांगी होत नाही. तुटत, विरत, विटत जाणारी नाती तर कधी नात्याला प्राप्त झालेली श्रीमंती ते दाखवतात. 'वाघाचे पंजे'मधील 'ती' ज्याच्यावर प्रेम केले, ज्याच्यासाठी आई-वडील, करिअर हे सोडले त्याच्याच शेवटच्या श्वासाची कामना करते आणि हा प्रवास लेखक भेदकपणे मांडतो. तर 'घनाची गोष्ट'मध्ये बायको हाकलते तरी पुनः पुनः तिच्याकडे याचना करत राहणारा घनश्याम, 'करविता धनी'मधील रहिमतबी-खुशरू-धरमाप्पा आणि त्यांचे संबंध, 'आकाशपुष्प'मधील संजीवीच्या एका नकाराने सगळे आयुष्य उद्ध्वस्त करून घेतलेला गुणाकर, त्याचे इंजिनिअरिंगमधील सर्वोच्च यश, केवळ तिच्यासाठी केलेली संगीतातली कारकिर्द, मातीमोल होऊन एक वेडा गोळा बनून राहतो.

'पिता-पुत्र' संग्रहात हेच एक सूत्र घेतलेल्या कथा आहेत. बाप-मुलाच्या नात्याला असणारी अनेक परिमाणे त्यातून दिसतात. कारखान्यातला संप, युनिअनची हुल्लडबाजी, धमक्या, पैशाचा अभाव; या तणावांनी बाप-लेकाचे नाते कसाला लागलेले आहे. यातून मार्ग काढताना बाप-लेकाची होणारी कुतरओढ आणि नात्याला विरताना पाहणे क्लेशदायक आहे. तर 'बाप-लेक'मधला बाप, श्रीमंत असूनही कुठलीही जबाबदारी न घेणाऱ्या मुलाकडे अधिक ओढ घेतो. आणि खस्ता खाणारा मुलगा-सून सालस असूनही त्यांच्याबद्दल आकस बाळगतो. यातलेही सुरुवातीचे दीर-भावजयीचे गोड नाते, भांडणे नसतानाही हळूहळू कोमेजून जाते.

'संसार' कथेतला आश्रित, कळकट बाबू, हुशारीच्या जोरावर प्राचार्य बनतो आणि पूर्वी आपल्याला तुच्छतेने वागवणाऱ्या नलूशीत लग्न करून मग तिच्या छळाची किळसवाणी पद्धत शोधून काढतो. ''मला अंधारात तुझा प्रियकर समज'', असे बोलून तिच्यावर तर सूड उगवतोच; पण जो सर्वकाही विसरून आपल्या संसारात रमलाय, त्यालाही हे सांगून आसुरी आनंद मिळवतो. हे कुजलेले नातेही फेणे वाचकाला जाणवून देतात.

**मानवी दु:खाची अनेकांगे**

कधी जीवनात घुसमट निर्माण करणारी परिस्थिती, आर्थिक कोंडी, नात्यातले वैय्यर्थ, नात्यातली वीण, अंधाऱ्या-कोऱ्या जागा, तिथे नेमके काय कोरले गेले; याच्याकडे ते प्रकाशझोत टाकतात. वार्धक्य, जगण्यातला पोकळपणा, व्यवस्थेबद्दलचा तिटकारा, महानगरी संस्कृतीचे भयावह आक्रमण, स्वार्थी अन् क्षुद्र वृत्तींचे दर्शन या कथांतून घडते. 'अंधारकडा'मध्ये विदेशामधील वातावरण, 'मावळतीचे मृद्‌गंध'मध्ये तर वृद्धाश्रम, 'धर्मसंकट'मध्ये राजकीय आणि मुस्लीमधर्मीय वातावरण, कधी ग्रामीण तर कधी शहरी वातावरणाची विविधता आहे. बाह्यजग अनाकलनीय असेल, तर अंतर्गत जीवन त्याहून अधिक गूढ आणि अतर्क्य आहे. याचा ते वेध घेतात. शतकाअखेरीच्या स्त्रीच्या मनोवस्थेचे विविधांगी चित्रण 'शतकांतिका'मध्ये आहे. 'सिंगल मदर', 'डिंक कपल', 'घटस्फोटिता', 'पुनर्विवाह' असे सर्व निर्णय स्वतः घेऊनही आज सुशिक्षित स्त्रीचीही कशी घुसमट होत आहे ते धारिणी, मेघना, रागिणी, यांच्या एकाकीपणातून जाणवते. प्रश्नांची उत्तरे मिळवू पाहताना प्रश्न तसेच शिल्लक आहेत याची क्लेशकारक विदारक जाणीव, तत्त्वज्ञानातील फोलपणाकडे निर्देश करतात.

'पहिला अध्याय'ला १९५०च्या ग्रामीण राजकारणाची पार्श्वभूमी असून पारध्यांची वर येण्याची धडपड दिसते. 'सेंट्रल बस स्टेशन' ही कादंबरी वरवर फक्त नाशिकच्या बस स्टेशनवरची वाटली, तरी तिच्यातून भेटणारी वरिष्ठ पदावरील कुचकामी माणसे, प्रतिष्ठेची ओंगळ हाव, पदाचा दुरुपयोग, दुसऱ्यांची अस्मिता ठेचून मिळणारा आनंद दांभिकपणा ह्यांच्या चित्रणामुळे स्क्रू पिळून आणखी खोलखोल गाभ्यापर्यंत जावे, तसे ते जातात. इवल्याशा माणसांचे इवलेसे जग आणि त्यांची छोटीशी स्वप्ने त्यांनी अप्रतिम रंगविली आहेत. कुऱ्हाडीचे धारदार पाते लख्खन चमकून जावे, तशी त्यांची शैली माणसागणिक बदलतेच; पण कथेप्रमाणे वेगळे रूप धारण करते. 'जखमी रुसवा', 'विचारगर्भ

फ

क्षण', 'कंगोरेदार द्वैत', 'दीड वर्षांची विधवा' असा विशेषणांचा अतिसुंदर वापर दिसतो, तर कधी उपरोध, छद्म यांचा आधार घेतलेला दिसतो. एकूणच मानवी दुःखांना अनेक अंगांनी स्पर्श करणारे असे त्यांचे लेखन आहे.

– प्रा. मीना गुर्जर

**संदर्भ :**

*१. 'महाराष्ट्र एस.टी. समाचार'; २ जाने.फेब्रु.मार्च १९७३.*
*२. 'ललित'; १७ एप्रिल १९७३.*

## फोंडके, बाळ

***फोंडके, गजानन पुरुषोत्तम***

**विज्ञानकथा लेखक, संशोधक**

**२२ एप्रिल १९३९**



आण्विक भौतिकी विषयात मुंबई विद्यापीठाची स्नातकोत्तर पदवी १९६० मध्ये घेतल्यानंतर १९६० ते १९८३ अशी २३ वर्षे मुंबईच्या भाभा अणुसंशोधन केंद्राच्या जीव-वैद्यकीय (बायोमेडिकल) विभागात व्यावसायिक शास्त्रज्ञ म्हणून डॉ. बाळ फोंडके नोकरीस होते. १९६७ मध्ये त्यांना जीवभौतिकी (बायोफिजिक्स) विषयात लंडन विद्यापीठाची पीएच. डी. मिळाली.

लंडनमधील चेस्टर बिट्टी इन्स्टिट्यूट ऑफ कॅन्सर रिसर्च संस्थेत त्यांनी अभ्यागत शास्त्रज्ञ म्हणून व अमेरिकेतील कॅन्सस विद्यापीठाच्या आरोग्यकेंद्रात अभ्यागत प्राध्यापक म्हणून काम केले. त्यांचे १०० शास्त्रीय शोध निबंध प्रसिद्ध झाले आहेत. वैज्ञानिक सदरे व स्तंभलेखन ते सातत्याने करतात.

व्यावसायिक शास्त्रज्ञ, वैज्ञानिक सदरे व स्तंभ, विज्ञानविषयक लेख, विज्ञानकथा, वैज्ञानिक विषयावरील पुस्तके व वैज्ञानिक शोध निबंधांचे नामांकित लेखक, वैज्ञानिक नियतकालिकांचे संपादक असे डॉ. बाळ फोंडके यांचे मौल्यवान कार्य आहे.

फोंडके यांच्या १६५ विज्ञानरंजन कथा व १० नाटके प्रसिद्ध झाली आहेत. 'चिरंजीव' या त्यांच्या कथासंग्रहाला महाराष्ट्र शासनाचा १९९० चा पुरस्कार लाभला. 'आपण असे का वागतो', 'प्रकाशाची किमया', 'उद्याचे वैद्यक', 'अमानुष', 'युरेका', 'विज्ञान परिक्रमा', 'विज्ञान संवादिनी', 'गुडबाय अर्थ', 'कॉम्प्युटरच्या करामती', 'शापित वरदान आणि विमाने अदृश्य होतात', 'गोलमाल', 'अखेरचा प्रयोग', '(वि) चित्र विज्ञान', 'खिडकीलाही डोळे असतात', 'विज्ञान विशेष' अशी त्यांची काही पुस्तके प्रसिद्ध आहेत.

'उद्याचे वैद्यक' व 'ढ कॉम्प्युटरच्या करामती' या त्यांच्या पुस्तकांना महाराष्ट्र शासनाचे पुरस्कार मिळाले. विज्ञान लोकप्रिय करणाऱ्यांना देण्यात येणारे इन्साचे इंदिरा गांधी पारितोषिकही त्यांना देण्यात आले.

नॅशनल इन्स्टिट्यूट ऑफ सायन्स कम्युनिकेशनचे संचालक व प्रमुख संपादक म्हणून ते १९८९ पासून कार्यरत होते. मराठी विज्ञान परिषद पत्रिकेचे संपादनही ते करतात.

महाराष्ट्र साहित्य परिषदेचा व इंडियन सायन्स काँग्रेसचा पुरस्कार, वीर सावरकर पुरस्कार, एन.सी.एस.टी.सी.चा राष्ट्रीय पुरस्कार असे विविध पुरस्कार त्यांना प्राप्त झाले आहेत. मराठी विज्ञान परिषदेच्या १९९८ च्या संमेलनाचे ते अध्यक्ष होते. कोकण मराठी साहित्य संमेलनाचे २००४ मध्ये ते अध्यक्ष होते.

विविध विषयांचे व्यासंगी, सुबोध मराठी लेखक म्हणून विज्ञानकथा लेखनाच्या नव्या दालनात डॉ. फोंडके यांनी स्वतःचे वेगळे स्थान निर्माण केले आहे.

– श्याम भुर्के

* * *

फ

ब



## बगे, आशा अरविंद

**कथाकार, कादंबरीकार**

**जन्म २८ जुलै १९३९**



मराठी साहित्यात कथा-वाङ्‌मयात आशा बगे यांचे नाव एका वेगळ्या परिमाणाच्या कथा लिहिणाऱ्या लेखिका म्हणून स्थिर झाले आहे. आशा बगे यांचा जन्म नागपूर येथे झाला. त्यांचे पूर्वाश्रमीचे नाव आशा वामन देशपांडे व त्यांच्या आईचे नाव कुसुम होते. आशाताईंचे शालेय व महाविद्यालयीन शिक्षण नागपूर येथील 'न्यू इंग्लिश हायस्कूल (महाल) येथून तर महाविद्यालयीत शिक्षण लेडी अमृतबाई डागा कॉलेज येथे झाले. त्यांनी एम.ए.(मराठी) व एम.ए (संगीत) अशी पदवी प्राप्त केली आहे. उच्चमध्यमवर्गीय ब्राह्मण कुटुंबात जन्म घेतलेल्या आशाताईंवर त्यांच्या आईचे व आजीचे विशेष लेखनाचे संस्कार झाले आहेत. त्यांच्याकडे नाटकाचे, कीर्तनाचे, संगीताचे वातावरण होते. संगीताचीही विशेष रुची असल्यामुळे आशाताई लहानपणापासून नाटकात काम करणे, एकांकिका सादर करणे, आकाशवाणीसाठी लिहिणे अशा गोष्टी करत. त्यामुळेच त्यांना लेखनासाठी नृत्य, नाट्य, संगीत याचा फायदा मिळाला. शिवाय संत वाङ्‌मयाचा अभ्यास आणि पंत काव्याचाही अभ्यास यांमुळे कथेची शैली घडत गेली. कविता ही त्यांची पहिली आवड आहे. कीर्तने, नाटके संगीत, माहेरी असणारी नोकर माणसे, वाडा यांतील माणसे भारतीय परंपरेतील सणवार यांच्या आसपासचे घडलेले अनुभव अधिक व्यक्त झाले आहेत.

ब

आशा बगे यांचे आत्तापर्यंत एकूण १२ कथा-संग्रह आणि ७ कादंबऱ्या प्रसिद्ध आहेत. 'मारवा' (१९८४), 'अत्तर' (१९८६), 'पूजा' (१९८९), 'चंदन' (१९९३), 'मांडव' (१९९३), 'अनंत' (१९९४), 'दर्पण' (१९९७), 'निसटलेले' (१९९९), 'ऋतूवेगळे' (१९९९), 'पाणी' (२००३), 'पाऊलवाटेवरलं गावं' (२००५), 'प्रतिद्वंद्वी' (२००५), 'माझ्या कथा माझी निवड' हे कथा-संग्रह आणि- 'मनस्विनी' (१९७९) 'झुंबर' (१९८४), 'त्रिदल' (१९९४) 'धर्मक्षेत्रे-कुरुक्षेत्रे' (१९९६), 'सेतू' (२०००), 'भूमी' (२००४), 'उत्सव' (१९९४).

१९६० नंतरची कथा ही नवकथेच्या वाटेनेच जाणारी आहे. याच काळात एक नवेच सामर्थ्य घेऊन आशा बगे यांची कथा पुढे आली. 'मारवा'(१९८४) या पहिल्याच संग्रहाने सर्वांचे लक्ष आकर्षित करून घेतले. समकालीन लेखिकांपेक्षा आशा बगे यांचे लेखन निराळे आहे. एका नव्या अस्तित्वाचे भान त्यांची कथा देते. आशय, अभिव्यक्ती आणि संगीताचे माध्यम या तिन्ही गोष्टींच्या एकसंध रसायनाने बगे यांचे अनुभवविश्व म्हणजे भारतीय परंपरेला समर्पित झालेल्या स्त्रीचे समृद्ध अनुभवविश्व आहे. भारतीय जीवनातले कर्मकांड, व्रतवैकल्ये, सण, उत्सव, कीर्तनादी गोष्टींचे भरपूर ज्ञान वारसापरंपरेने त्यांना लाभले आहे. भारतीय परंपरेचे निकोप रूप, ताजे व नूतन होऊन कसे अवतरू शकते, याची प्रचिती आशा बगे यांची कथा देते. सुखमय जीवनातही काट्यासारखे रुतणारे प्रसंग साकार करण्यात, तसेच निर्माण होऊन क्षीण होत जाणारे व लुप्त होणारे स्नेहबंध विलक्षण सूक्ष्मतेने

चित्रांकित करण्याची किमया त्यांना साध्य झालेली आहे. जनाबाईच्या अभंगासारखी सहज निर्मळ शैली आणि काव्यात्मकतेतून उमटलेला निसर्ग, संगीतातून बुडून निघालेल्या स्वरअर्थाची उंची आणि खोली व्यक्तवणारे सहजार्थी शब्द यांना बगे यांची कथा गर्भश्रीमंत झाली आहे.

'मारवा' या सुरुवातीच्याच कथेने 'एक माणूस' शोधण्याचा प्रयत्न केला आहे. माणसामाणसांतील नात्यांचा शोध घेण्याचा प्रयत्न सर्वत्रच दिसून येतो. भावनिकपणा व संघर्ष या कथेने मुक्तपणे टिपले आहे. ह्या कथाविश्वातील माणसांचे त्यांच्या जीवन मूल्यांवर आणि श्रद्धेवर अपरंपार प्रेम आहे. ही माणसे आत्यंतिक प्रवृत्तीची आणि मानवी जीवनमूल्यांचा घट्ट धरून ठेवणारी आहेत, म्हणूनच कथेचे वेगळेपण नजरेत भरणे.

**स्त्री प्रतिमांचे विस्तारित क्षितिज**

कुठलीही विशिष्ट स्थिती घेऊन किंवा बैठक घेऊन बगे लिहीत नाहीत. अनुभवाच्या मागणीप्रमाणे लेखन, कधी लघुकथा, तर कधी दीर्घकथेकडे वळले. बगे ह्यांच्या कथांतील संवेदनशीलता पारंपरिक सांस्कृतिक व्यूहाचा एक घटक असल्यासारखीच आहे. अशा मूल्यव्यूहाशी व नैतिक आदर्शाशी एकरूप होऊन त्यांनी लेखन केले आहे. मात्र त्यांच्या कथेत पारंपरिक आदर्श स्त्री-प्रतिमेच्या गौरवाची, पूजनाचीच भूमिका आहे, असेही नाही. या कथानकाला स्त्रिया स्वतःची एक ओळख घेऊन एक अस्तित्व म्हणूनच समोर येतात. त्यामध्ये स्त्रीपूजनाची वा गौरवाची भावना नाही. स्त्री-प्रतिमा या पारंपरिक वाटल्या, तरी पुढे त्यांच्या नायिका जाणीवपूर्वक बुद्धिमान, बंडखोर व खंबीर आणि तरीही, स्त्रीत्वाच्या मर्यादा न ओलांडणाऱ्या दिसतात. बगे यांची विस्तारत जाणारी क्षितिजे व संस्कार यांतूनच त्या स्त्री-प्रतिमा निर्माण झाल्या आहेत. भारतीय संस्कृतीची नीतिमूल्ये सांभाळणारी ही कथा करमणूक करत नाही तर एक स्थायी स्वरूपाचा विचार देते. शेवटी मूल्यांना जपणे किती महत्त्वाचे आहे, हे पुन्हा-पुन्हा वाचकांच्या मनावर त्यांची कथा ठसवत जाते. मूल्यांना धक्का बसू नये अशी सतत धडपड असते. अनेक विसंगतींशी एक सुसंगत रूपच बघण्याचा त्यांचा कल हे त्यांच्या कथेचे सामर्थ्य आहे. बगे यांची कथा केवळ स्त्रीत्वाच्या अनुषंगाने जाणारी नाही. पुरुषाच्या मनातील सुहृदयता, त्यांचे अहंमन्य पुरुषी व्यक्तिमत्व, यांच्यातील सोशिकता, त्यांच्यातील संगीत-नाटकादी कलांतील गूढ चातुर्य या साऱ्या अंगांनी स्त्रीबरोबरच पुरुषाच्या अंतर्यामीचा शोध बगे यांची कथा घेते. विशेष म्हणजे गाढ जिव्हाळ्याची उत्कट साक्ष पटेल असा मोकळेपणा, आणि कथेतील अनुभवांशी असलेले नाते जिव्हाळ्याचे आहे. स्वत्वापाशी घेऊन जाणाऱ्या, सहज सुंदर भावप्रवाहात अंतर्मुख रणाऱ्या बगे यांच्या कथा म्हणूनच मराठी कथेवर वेगळी मुद्रा उमटवून जातात.

बगे यांचे सामर्थ्य केवळ व्यक्तिचित्रणापुरतेच मर्यादित नाही, तर व्यक्तीच्या जीवनदर्शनाकडून अनंत अशा प्रश्नांचा वाटा शोधणारी त्यांची दृष्टीच खरी महत्त्वाची आहे. त्यांच्या चित्रणात कुठलाही अभिनिवेश नसतो. सुरांच्या आणि रंगांच्या माध्यमातून आलेल्या या कथा मानवी मनाच्या सुक्ष्मता पातळीला स्पर्श करणाऱ्या आणि अभिव्यक्तीच्या एका अत्यंत हळुवार, तरल, तलम अशा भाषाशैलीचाही तो आविष्कार आहे.

**बहुआयामी कथालेखन**

बगे यांच्या कथा वाचकाला अस्वस्थ करतात. याचाच अर्थ ती कथा बहुआयामी व प्रसरणशील शोध आहे. बगे यांचा एकूणच कथेतील अनुभव हा बहिर्मुख प्रकृतीच्या नसून अंतर्मुख प्रकृतीचा आहे. एकूणच मराठी कथेत आशा बगे यांचे स्थान एका उंचीवर आहे. कथांमधील व्यक्ती, त्यांच्या अंतर्गत सुखदुःख भावभावना सकृतदर्शनी वैयक्तिक स्वरूपाच्या दिसत असल्या; तरी त्यांना सामाजिक परिमाण लाभले आहे.

आशा बगे यांच्या कथांप्रमाणेच त्यांच्या कादंबऱ्याही व्यक्तिनिष्ठ आहेत. मोठ्या कॅनव्हासवर परिस्थिती, मानवी स्वभाव यांच्या क्रिया प्रतिक्रियांतून बदलत जाणाऱ्या पात्रांच्या आयुष्याचे त्यातल्या गुंतागुंतीचे

ब

चित्रण त्या-त्या नायिका व नायक यांच्या व्यक्तिरेखांत दिसून येते. 'भूमी'ची नायिका मैथिली हिचा बाह्य भौगोलिक प्रवासापेक्षा आंतरिक जाणिवेचा प्रवासच बगे यांना महत्त्वाचा वाटतो. अंतःस्थ स्वरूप आणि सर्जनशक्ती आणि एका अनाथ हट्टी मुलीचे, अत्यंत बुद्धीमान प्रतिभावंत, समंजस आणि आयुष्याला समजून घेणाऱ्या एका प्रगल्भ व्यक्तीमध्ये रूपांतर होते, व्यक्तीचे भावविश्व कौटुंबिक सामाजिक वास्तव आणि जीवनाचे अंतिम स्वरूप या अंगांना सामावून घेणारी चिंतनशील कलात्म जीवनदर्शन 'भूमीत' होते.

'मारवा', 'अत्तर', 'मांडव' हे कथासंग्रह आणि 'झुंबर' ही कादंबरी ह्या पुस्तकांना महाराष्ट्र राज्य शासनाचे पुरस्कार लाभले आहेत.

महाराष्ट्र फाउंडेशनचा पुरस्कार 'भूमी' या कादंबरीला मिळाला. तसेच २००६ मध्ये साहित्य अकादमीचा पुरस्कार सुद्धा मिळाला. राष्ट्रीय पातळीवर खास कथेचा पुरस्कार 'तुफान' या कथेला १९९२ मध्ये आणि 'पंख' याला १९९५ मध्ये 'Meet the Author' या कार्यक्रमात साहित्य अकादमीतर्फे सन्मान करण्यास आला. (२००४) विदर्भ साहित्य संघाच्या पहिल्या लेखिका संमेलनाचे अध्यक्षस्थान त्यांनी १९९१ साली भूषविले. त्यांच्या काही कथांचे अनुवाद तामिळ, तेलगू, कन्नड, मल्याळम, गुजराती, बंगाली, इंग्लिश या भाषांतून प्रसिद्ध झाले आहेत.

– डॉ. सुलभा हेर्लेकर

**संदर्भ :**

१. हेर्लेकर सुलभा; *'आशा बगे : नवे अस्तित्व'; १९९७.*

२. हेर्लेकर सुलभा; *'आशा बगे – मागे वळून बघताना'; सकाळ दीर्घलेख, २००८.*

## बढे, राजा नीलकंठ

**कवी, गीतकार, संपादक, अनुवादक**

**१ फेब्रुवारी १९१२ – ८ एप्रिल १९७५**

राजा नीलकंठ बढे यांचा जन्म नागपूरला व प्राथमिक शिक्षण छिंदवाडा येथे झाले. पंजाब विद्यापीठातून मॅट्रिक



तसेच नागपूरच्या मॉरीस कॉलेजमधून पदवीपूर्व शिक्षण पूर्ण केले. 'कोंडिबा' या नावाने हलक्याफुलक्या शैलीत केलेले स्तंभलेखन खूप गाजले. 'सकाळ', 'महाराष्ट्र', 'वागीश्वरी' या नियतकालिकांचे संपादनही त्यांनी केले. राजा बढे यांचा कल मुख्यतः कवित्वाकडे झुकणारा असल्याने त्यांच्या कविता आणि गीते अवीट गोडीची, मधुर शब्दांची पेरणी असल्याने सरस ठरली. 'माझिया माहेरा जा' (१९४२), 'हसले मनी चांदणे' (१९४८), 'क्रांतिमाला' (१९५२), 'मखमल' (१९७६) इत्यादी गीतसंग्रह प्रसिद्ध आहेत. याबरोबरच 'रायगडाचा राजबंदी' या माहितीपटाची निर्मितीही त्यांनी केली.

राजा बढेंच्या कवीमनाची साक्ष आपल्याला प्रामुख्याने त्यांनी केलेल्या अनुवादात पटते. जयदेवांच्या 'गीतगोविंद' या काव्याचे 'शृंगार श्रीरंग' या नावाने, महाकवी बिहारी यांच्या 'सतसई' या हिंदी काव्याचे 'रसलीना' या नावाने तर सातवाहनकालीन हाल राजाने संपादित केलेल्या 'गाथासप्तशती'चे 'शेफालिका' या नावाने मराठीत अनुवाद केले आहेत. सौंदर्य व लालित्य ह्यामुळे हे अनुवाद आनंददायी ठरले आहेत, तसेच भाषांतर करताना मूळ वाङ्मयाचे सौंदर्य अबाधित ठेवले आहे. प्रतिभेच्या जोरावर त्या गाथांचे रूपांतर मनोहारी ठरले आहे.

बढे एक कुशल चित्रकारही होते. विशेषतः नखचित्रे अतिशय सुरेख काढीत. चित्राप्रमाणेच ते काव्यातही रस, गंध, स्पर्श, नादमयता कायम ठेवीत.

– संपादक मंडळ

**संदर्भ :**

१. बढे राजा, अनुवादक; *'शेफालिका'; महाराष्ट्र राज्य साहित्य आणि संस्कृती मंडळ, मंत्रालय, मुंबई; प्रथम आवृत्ती, १९८४.*

ब

## बनसोडे, हिरा
**कवयित्री**
**१ ऑक्टोबर १९३९**



पूर्वाश्रमीच्या हिरा पुनाजी कांबळे यांचा जन्म तालुका पुरंदर, जिल्हा पुणे येथील गराडे गावी झाला. त्यांचे वडील मिस्त्री काम करीत. वडिलांच्या मुंबईतील वास्तव्यामुळे शिक्षण मुंबईत झाले. त्या १९६२ साली एस.एस.सी आणि मधल्या प्रदीर्घ कालावधीनंतर १९८४मध्ये त्यांनी मुंबई विद्यापीठाची एम.ए.ची पदवी संपादन केली. काही काळ मध्य रेल्वेत नोकरी करून त्यांनी स्वेच्छानिवृत्ती स्वीकारली.

दलित असल्यामुळे त्या जीवनाचा जवळून अनुभव असल्याने त्यांची वैचारिकता फुले-आंबेडकर विचार आणि त्या चळवळीतील साहित्य यांवर पोसली गेली. विषमतेबद्दलचा हुंकार त्यांच्या कवितेतून प्रकटला. सुशिक्षित व लिहिणाऱ्या दलित स्त्रियांतील पहिल्या पिढीच्या प्रतिनिधी म्हणून त्यांचे स्थान निश्चितच मोठे आहे. त्यांची जडणघडण प्राधान्याने कवयित्री म्हणूनच झाली आहे. प्रारंभीच्या काळात 'अस्मितादर्श', 'सुगावा', 'युगवाणी' इत्यादी दलित चळवळीला वाहिलेल्या नियतकालिकांमध्ये त्यांच्या कविता प्रसिद्ध झाल्या. त्यांचे कवितालेखनातील सातत्य कौतुकास्पद आहे.

'पौर्णिमा' आणि 'फिर्याद' या अनुक्रमे १९७० व १९८४ साली प्रसिद्ध झालेल्या त्यांच्या काव्यसंग्रहांतून एकूणच दलित स्त्रीचे वास्तव व्यक्तिमत्त्व साकार झाले आहे. त्यांच्या कवितेत प्रस्थापित सामाजिक व्यवस्थेविरुद्ध प्रक्षोभ असला, तरी त्यांनी आपल्या न्याय्य हक्कांची मागणी करताना दलित स्त्रीच्या भावभावना नेमकेपणाने व्यक्त केल्या आहेत. नुसते काही मागायचे नाही, तर आपल्यालाही काही करायला हवे ही जाणीवही त्यांच्या कवितेतून प्रकटते. 'सूर्य उजळू देत' या १९८७ सालच्या कवितेत त्या म्हणतात, 'जिथे जिथे सांडलेत तुझ्या रक्ताचे थेंब, तिथल्या मंगलभूमीत मी लावीत एकेक कविता, तुझ्या मुक्तीलढ्याची' ही दुःखयात्रा संपवायलाच हवी, असा आत्मविश्वासपूर्वक उद्‌गार काढून त्या म्हणतात, 'तुझ्या क्रांतिगीताचा पडघम वाजू लागलाय, आता आभाळाच्या नगाऱ्यावर'.

त्यांची कविता वास्तवापासून दूर न जाणारी, परिवर्तनाच्या दिशेने जाणारी आणि समतेच्या नव्या समाजाला आवाहन करणारी आणि वंचितांना आश्वासन देणारी आहे. त्यांच्या कविता अन्य भारतीय आणि जागतिक भाषांत प्रसिद्ध झाल्या असून 'डॉटर्स ऑफ महाराष्ट्र'मध्ये त्यांच्या नावाची नोंद आहे.

– मधू नेने

**संदर्भ :**

*१. 'दलित साहित्य विशेषांक'; महाराष्ट्र साहित्य पत्रिका- ऑक्टोबर-डिसेंबर १९८७.*

*२. बनसोडे, हिरा; 'फिर्याद' (काव्यसंग्रह)*

## बनहट्टी, राजेंद्र श्रीनिवास
**कथाकार, कादंबरीकार, नाटककार**
**१४ जानेवारी १९३८**



राजेंद्र श्रीनिवास बनहट्टी यांचा जन्म नागपूर येथे झाला. नागपूर विद्यापीठातून इंग्रजी विषयात आणि पुणे विद्यापीठातून मानसशास्त्र विषयात त्यांनी एम.ए. केले आहे. सुविचार प्रकाशन मंडळ, पुणे याचे संचालक व 'रसिक' दिवाळी अंकाचे ते संपादक आहेत.

कथा, दीर्घकथा, कादंबरी, नाटक, प्रवासवर्णन अशा अनेक साहित्यप्रकारांत त्यांनी लेखन केले आहे. शाळेत असल्यापासूनच बनहट्टींनी गोष्टी लिहायला प्रारंभ केला. हस्तलिखित मासिकातून, महाविद्यालयीन

ब

नियतकालिकांतून त्यांचे लेखन सुरुवातीला प्रसिद्ध झाले. १९५६ मध्ये नागपूरच्या राजाराम वाचनालयाने भरविलेल्या कथास्पर्धेसाठी लिहिलेल्या 'पिता' या कथेपासून त्यांच्या कथालेखनाला खरी सुरुवात झाली. या स्पर्धेत या कथेला पहिले पारितोषिक मिळाले व ती कथा नागपूरच्या 'तरुण भारत'मध्ये प्रसिद्ध झाली. त्यानंतर 'हसणारी मुलगी', 'पहाट', 'इमारत', 'हरवलेले बालपण' अशा अनेक कथा त्यांनी लिहिल्या आणि आजपर्यंत सातत्याने त्यांचे कथालेखन सुरूच आहे.

'समानधर्मा' हा त्यांचा पहिला कथासंग्रह सप्टेंबर १९७१मध्ये प्रसिद्ध झाला. त्यानंतर 'खेळ', 'आंब्याची सावली' (१९७८), 'गंगार्पण' (१९८४), 'अवेळ' (१९८५), 'कृष्णजन्म' (१९८८), 'लांडगा' (१९८९), 'युद्धपर्व' (१९९२), 'प्रेक्षक', 'मध्यंतर' (१९९४) इत्यादी संग्रह प्रसिद्ध झाले.

'शंभूराव' हा व्यक्तिरेखांचा संग्रह, तसेच 'नवलाई' (१९९५) हे ऑस्ट्रेलियाच्या प्रवासातील अनुभवांवरील पुस्तकही प्रकाशित झाले आहे.

'अपूर्णा' (१९६५), 'अखेरचे आत्मचरित्र' (१९८२), 'मरणानंतरचे मरण' (१९८५) या कादंबऱ्या व 'जीवन त्यांना कळले हो।' आणि 'माणूस म्हणतो माझे घर' ही दोन नाटके त्यांनी लिहिली आहेत.

'सत्यकथा', 'ललित', 'किस्रिम', 'केसरी', 'अक्षर', 'मेनका', 'दीपावली', 'हंस' अशा अनेक मासिकांतून आणि 'तरुण भारत', 'स्वराज्य', 'सकाळ', 'महाराष्ट्र टाइम्स', 'साप्ताहिक सकाळ' अशा विविध दैनिकांतून व साप्ताहिकांतून त्यांनी सातत्याने दर्जेदार कथालेखन केले आहे.

अकरा कथासंग्रहांतील ८२ कथा आणि इतर अप्रकाशित कथा असे विपुल कथालेखन त्यांनी केले आहे. त्यांच्या अधिकाधिक कथा आणि दीर्घकथा 'हंस'मधून प्रकाशित झाल्या आहेत.

'समंध' ही त्यांची दीर्घकथा १९८२मधली आहे; पण १९८५पासून त्यांनी 'शेजारी', 'कृष्णजन्म', 'युद्धपर्व', 'भीष्माची बायको', 'लग्न', 'लांडगा' यांसारख्या अनेक दीर्घकथा लिहिल्या. 'कृष्णजन्म' या त्यांच्या गाजलेल्या संग्रहात तीन दीर्घकथा आहेत. याशिवाय 'निवडक लघुकथासंग्रह' व 'निवडक दीर्घकथासंग्रह' प्रकाशित झाले आहेत. या दीर्घकथा म्हणजे बनहट्टींच्या पृथगात्म व वैशिष्ट्यसंपन्न लेखन प्रतिभेचा मनोरम आविष्कार आहे.

मराठीतील इतर दीर्घकथांपेक्षा बनहट्टींच्या दीर्घकथा अगदी वेगळ्या आहेत. त्यांच्या कथा मूलतः व्यक्तिकेंद्री आहेत. दीर्घकथांतील अनुभवक्षेत्रही वेगळे आहे. माणसाच्या मनाची सारी सूक्ष्मातिसूक्ष्म आंदोलने टिपणारी उत्कंठावर्धक निवेदनपद्धती हा त्यांच्या लेखनाचा विशेष आहे.

'कृष्णजन्म', 'अखेरचे आत्मचरित्र' (कादंबरी) आणि 'खेळ', 'सुरुवात', 'शेजारी' यांसारख्या कथांचे इंग्रजी, गुजराती, हिंदी भाषांमध्ये अनुवाद प्रसिद्ध झाले आहेत.

त्यांनी अनेक सन्माननीय पदे भूषविली आहेत– महाराष्ट्र साहित्य परिषद, पुणे येथे ते १९८५ ते १९९२ या काळात कार्याध्यक्ष व १९९५ ते १९९८ ह्या काळात अध्यक्ष होते. अखिल भारतीय मराठी साहित्य मंडळाचे ते १९८८ ते १९९२ या कालावधीत अध्यक्ष होते. १९९० मध्ये ते साहित्यसभा, इंदूर शारदोत्सव व अमृत महोत्सव ह्या समारंभाचे ते अध्यक्ष होते. तसेच तिसरे कोथरूड उपनगर साहित्य संमेलन, पुणे (१९९५) याचे अध्यक्षपद त्यांनी भूषविले आहे. २००२ मध्ये पुणे येथे झालेल्या अखिल भारतीय मराठी साहित्य संमेलनाचे ते अध्यक्ष होते.

'अखेरचे आत्मचरित्र'ला १९८२चा सर्वोत्कृष्ट कादंबरीचा महाराष्ट्र राज्य पुरस्कार, 'गंगार्पण'ला १९८४चा सर्वोत्कृष्ट कथासंग्रहाचा महाराष्ट्र राज्य पुरस्कार, 'कृष्णजन्म'ला १९८८चा सर्वोत्कृष्ट कथासंग्रहाचा महाराष्ट्र राज्य पुरस्कार आणि शंकर पाटील कथा पारितोषिक, महाराष्ट्र साहित्य परिषद, पुणे (१९८८) व ग.रा.बाळ पारितोषिकही मिळाले आहे. 'मध्यंतर'ला १९९४मध्ये पानवलकर स्मृती प्रतिष्ठानचा श्री.दा.पानवलकर पुरस्कार व १९८९ मध्ये 'लांडगा'ला

सर्वोत्कृष्ट कथासंग्रहाचा महाराष्ट्र राज्य पुरस्काराने आणि आनंदीबाई शिर्के पारितोषिकाने (महाराष्ट्र साहित्य परिषदेतर्फे दिला जाणारा) सन्मानित करण्यात आले.

सखोल जीवनानुभवाची अभिव्यक्ती, मनोविश्लेषणात्मक, संयत भावाविष्कार, सहज स्वाभाविक लेखनशैली हे बनहट्टींच्या कथालेखनाचे विशेष आहेत.

– प्रा. मंगला गोखले

**संदर्भ :**

*१. खोले विलास, संपादक; 'राजेंद्र बनहट्टी यांच्या निवडक दीर्घकथा'; प्रतिमा प्रकाशन, पुणे; १९९८.*

## बनहट्टी, श्रीनिवास नारायण

**संशोधक, समीक्षक, संपादक**

**६ मार्च १९०१ – २२ एप्रिल १९७५**



श्रीनिवास नारायण बनहट्टींचा जन्म पुण्यात झाला. १९१७मध्ये ते मॅट्रिक परीक्षा उत्तीर्ण झाले. पुण्याच्या डेक्कन महाविद्यालयामधून ते संस्कृत व मराठी विषयात एम.ए नंतर एलएल.बी. झाले. सुरुवातीस एल्फिन्स्टन महाविद्यालयात व्याख्याते म्हणून रुजू झाले. १९२७ साली नागपूरच्या मॉरीस कॉलेजात मराठीचे पहिले प्राध्यापक म्हणून त्यांची नेमणूक झाली. याच काळात त्यांनी आपल्या लेखनास सुरुवात केली. 'रत्नाकर' मासिक, 'मनोरंजन', 'लोकशिक्षण', 'प्रतिभा' इत्यादी तत्कालीन महत्त्वाची नियतकालिके यांतून त्यांनी लेखन केले. १९३१मध्ये 'नवभारत ग्रंथमाला' व १९३४मध्ये 'सुविचार प्रकाशन मंडळ' या आपल्या प्रकाशन संस्थेची त्यांनी स्थापना केली. नवभारत ग्रंथमालेतर्फे त्यांनी वि.रा.शिंदे, केतकर, मिराशी, पेंडसे, कोसंबी अशा अनेक लेखकांचे ग्रंथ प्रसिद्ध केले. १९३४ ते १९३८ या काळात 'विहंगम' मासिक आणि १९४८ ते १९५१ या काळात 'समाधान' साप्ताहिक ह्यांचे त्यांनी संपादन केले. त्यांचे लेखन चतुरस्र स्वरूपाचे असून ज्ञानाच्या विविध शाखांत त्यांनी बहुमोल भर घातली.

लोकमान्य टिळकांची धर्मविषयक मते' हा निबंध वयाच्या तेविसाव्या वर्षी लिहून 'टिळक स्वराज्य संघा'तर्फे १९२४ साली त्यांनी तिसरे बक्षीस मिळविले. ब्रिटिश साहित्यकार जेम्स मॅथ्यू, रॉबर्ट लुई स्टिव्हन्सन यांच्यावर चरित्रपर लेखन करून उत्तम साहित्यनिर्मिती केली.

आगरकर यांच्याविषयी सखोल अभ्यासपूर्ण लेखन त्यांनी केले तर 'मराठी नाटक व रंगभूमी' याविषयीचे खोल वैचारिक संशोधनात्मक लेखन त्यांनी सातत्याने केले. ज्ञानेश्वरीविषयीचे संशोधन आणि काही प्राचीन ग्रंथांची संपादने त्यांनी परिश्रमपूर्वक हातावेगळी केली.

'मयूर काव्यविवेचन' (१९२६) हा त्यांचा पहिला ग्रंथ, 'ज्ञानोपासना व भारतीयांचे कर्तव्य' (१९३१), 'टिळक आणि आगरकर' (१९५७), 'मराठी रंगभूमीचा इतिहास' खंड १ व २, 'मराठी नाट्यकला व नाट्यवाङ्मय' (१९५९) 'नाट्याचार्य देवल', 'नाट्यवाङ्मयातील नवे प्रवाह', 'नाट्यकलेचा नवोदय' 'नाट्यवाङ्मयाचा विकास', 'मराठी रंगभूमीचा उत्कर्ष' असे नाट्यकलाविषयक संशोधनात्मक ग्रंथ त्यांनी लिहिले. त्यांची चौफेर दृष्टीने विचार करण्याची ताकद त्यांच्या लेखनातून प्रतीत होते. आजही हे ग्रंथ अभ्यासकांना मौलिक आधार देणारे ग्रंथ म्हणून मानले जातात.

'श्लोक केकावली' (१९५३), 'आज्ञापत्र' (१९६५), 'नलदमयंती स्वयंवराख्यान', 'विष्णुपती' (चिपळूणकरांच्या निवडक लेखांचे संपादन) अशी महत्त्वपूर्ण संपादने त्यांनी केली. याबरोबरच ज्ञानेश्वरीच्या पहिल्या, सातव्या व बाराव्या अध्यायांचे संपादन व प्रस्तावना यावरून त्यांच्या चिकित्सक लेखनाचा प्रत्यय येतो.

इतके चतुर्विध लेखन करीत असताना १९४५मध्ये आपली नोकरी सोडून ते गांधींच्या चळवळीत शिरले.

ब

स्वातंत्र्योत्तर काळात त्यांनी भारतीय राज्य घटनेच्या भाषांतर समितीचे व भारतीय परिभाषा समितीचे सदस्य म्हणून कार्य केले.

१९६२ मध्ये त्यांची आकाशवाणीवरची व्याख्याने गाजली. १९७४मध्ये जोडयात्रा हे त्यांचे खुसखुशीत व नेटके प्रवासवर्णन प्रसिद्ध झाले. 'आदरांजली' (१९५७) या वैचारिक लेखसंग्रहात त्यांनी लोकमान्य टिळक, न.चिं.केळकर, महर्षि कर्वे, महात्मा फुले, पांगारकर, केशवसुत आदी महत्त्वपूर्ण लेखकांच्या कर्तृत्वाची ओळख करून दिली आहे.

श्री.ना.बनहट्टी हे मराठी वाङ्मयातील मराठी भाषेचे एक अधिकारी विद्वान, यशस्वी प्राध्यापक, साहित्याचे रसज्ञ समीक्षक, नाट्यवाङ्मयाचे मर्मज्ञ विमर्शकार म्हणून मानले जातात. विदर्भ साहित्य संघ उभा करण्यात आणि युगवाणी या संघाच्या मुखपत्राची जडणघडण करण्यात त्यांनी मोलाचे योगदान केले.

– रागिणी पुंडलिक

**संदर्भ :**


१. *खोले विलास; 'सत्वस्थ ज्ञानयोगी'; महाराष्ट्र टाइम्स – ४ मार्च २००१ : ९ पृ. पुरवणी;*

२. *बनहट्टी श्री. ना.; 'श्रेष्ठ ज्ञानोपासक : युगवाणी – एप्रिल-मे १९७५ : १ पृ.*


ब

## बर्वे, अच्युत महादेव

**कथाकार, कादंबरीकार**

**३ फेब्रुवारी १९२७ – १६ एप्रिल १९८२**



अच्युत महादेव बर्वे यांचा जन्म मुंबईला झाला. ते मुंबईच्या विल्सन महाविद्यालयातून बी.एस्सी. झाले. दापोलीला शिक्षकपदावर नोकरी केली. नंतर अहमदाबाद येथे साराभाई उद्योगसमूहात १९५२ पर्यंत नोकरी केली. पुढे ३० वर्षे शिल्पी ॲडव्हर्टायझिंग कंपनीत ते कार्यरत होते. त्यांना चेअरमन पदापर्यंत पदोन्नती मिळाली.

'आंबट गोड' (१९५१), 'चंदनाचा उंबरठा' (१९५६), 'झोका' (१९५९), 'कोंबड्याची पात' (१९६१), 'पाठमोरी' (१९७२), 'हँगओव्हर' हे त्यांचे महत्त्वाचे कथासंग्रह आहेत. 'मातीचा वास' (१९६२) ही त्यांची पहिली कादंबरी असून 'कॅलिडिओस्कोप' (१९७४) ही आचार्य अत्रे यांच्या व्यक्तिमत्त्वाचा वेध घेणारी कादंबरी विशेष गाजली. यानंतर आपल्या मुक्या आणि बहिऱ्या मुलीवर आधारलेली त्यांची 'सुखदा' ही कादंबरी वाचकांच्या मनाला स्पर्श करणारी व वाचकांचे मन हेलावून टाकणारी ठरली.

त्यांच्या कथालेखनावर ना. सी. फडके यांच्या रंजक शैलीची आणि 'रोमँटिक' प्रवृत्तीची छाप असल्याचे जाणवते. हलक्या-फुलक्या शैलीत लिहिलेल्या त्यांच्या कथा वाचकांना रिझवतात. मात्र 'सुखदा'सारख्या कादंबरीत जेव्हा वाचकाला कठोर वास्तवाला सामोरे जावे लागते, तेव्हा वाचकाला जीवनाचे विदारक दर्शन घडते.

– रागिणी पुंडलिक

## बर्वे, अनिल सदाशिव

**नाटककार, कादंबरीकार**

**१७ जुलै १९४८ – ६ डिसेंबर १९८८**



साहित्य आणि पत्रकारिता या दोन्ही क्षेत्रांना अल्प कारकिर्दीत आपल्या लेखनाचे नवे परिमाण देणाऱ्या अनिल सदाशिव बर्वे यांचा जन्म नाशिक येथे झाला. त्यांचे शालेय शिक्षण बीड, जालना, औरंगाबाद येथे झाले. अर्थशास्त्र हा विषय घेऊन ते बी.ए. झाले. शालेय जीवनापासूनच त्यांना लेखनाचे विलक्षण वेड होते. १९६७पासून त्यांनी लेख लिहिण्यास सुरुवात केली. आपल्या परखड आणि स्वतंत्र विचारांना मुक्त व्यासपीठ

मिळण्यासाठी त्यांनी १९६७मध्ये 'संग्राम' तर १९७३मध्ये 'रणांगण' नावाचे पाक्षिक काढले आणि त्यातून शोषित पीडितांच्या अन्यायाला समाजाच्या वेशीवर टांगले. १९७०मध्ये 'फुलवा' नावाचे सिनेसाप्ताहिक काढले.

१९७३ साली त्यांची 'थँक्यू मिस्टर ग्लाड' ही कादंबरी प्रकाशित झाली. 'थँक्यू मिस्टर ग्लाड' ते 'फाशी गेट' १९७५पासून १९८७पर्यंत त्यांच्या एकूण आठ कादंबऱ्या प्रकाशित झाल्या. त्यांच्या जवळ-जवळ सर्वच कादंबऱ्या समकालीन वास्तव घटनेतून साकारल्या आहेत. 'अकरा कोटी गॅलन पाणी' चासना येथील कोळसा खाणीतील हादरवून टाकणाऱ्या घटनेच्या संदर्भातून तर 'आतंक' तुरुंगातील एका कैद्याच्या भेटीतून अपरिचित अशा विषयांची मांडणी वाचकांसमोर ठेवते. समकालीन कादंबरीकार भालचंद्र नेमाडे, श्री.ना.पेंडसे, भाऊ पाध्ये ह्यांच्या साहित्यापेक्षा बर्वे यांची कादंबरी पूर्णतः वेगळी आणि वैशिष्ट्यपूर्ण आहे, याचा प्रत्यय येतो. अनिल बर्वे यांचे साहित्य गुजराती, हिंदी, उडिया, तेलगू, मल्याळम, उर्दू, पंजाबी इत्यादी भाषांमध्ये अनुवादित झालेले आहे. त्यांच्या अनुवादित नाटकांचे रंगभूमीवर अनेक प्रयोग यशस्वी झालेले आहेत.

पत्रकार बर्वेही ललित लेखनाइतकेच सामर्थ्यवान होते. आंध्रमधील नक्षलवादी चळवळ, बांगला देश युद्ध, चासनाला कोळसा खाण अपघात इत्यादी विषयांवरच्या त्यांच्या लेखमाला अतिशय गाजल्या. रिपोर्टाज लेखन प्रकाराचा एक आदर्श वस्तुपाठ म्हणूनही या लेखमालांचे विश्लेषण केले गेले. या सर्व लेखनावर मार्क्सवादाचा प्रभाव आहे. भाषासौंदर्यामुळे, वस्तुनिष्ठ आणि परखड भूमिकेमुळे हे लेखन दर्जेदार उतरले आहे.

'रोखलेल्या बंदुका आणि उठलेली जनता' ते 'चर्मणावती चंबळ' या १९७२ ते १९८६ कालखंडातील एकूण पाच लेखमाला म्हणजे केवळ वृत्तान्त नसून ते इतिहासाचे दस्तऐवज आहेत.

नाटक, कादंबरी आणि रिपोर्टाज या क्षेत्रांत अनिल बर्वे यांनी एक नवा मापदंड निर्माण केला आणि साठोत्तरी मराठी साहित्याला अधिक समृद्ध आणि सधन केले. मुंबई येथे त्यांचे वयाच्या अवघ्या ४०व्या वर्षी निधन झाले.

– रेखा मैड

**संदर्भ :**

१. *निमकर सदानंद; 'मला दिसलेले अनिल बर्वे'; नाट्य दर्पण; एप्रिल १९७७.*
२. *घारे दीपक; 'आजची मराठी कादंबरी'; १९७५ ते १९८५. महाराष्ट्र साहित्य पत्रिका; एप्रिल/जून १९८७.*

## बांदिवडेकर, चंद्रकांत महादेव

**समीक्षक**

**४ नोव्हेंबर १९३२**



डॉ. चंद्रकांत बांदिवडेकर यांचा जन्म रत्नागिरी जिल्ह्यातील भालवली या गावी झाला. प्राथमिक शिक्षण रत्नागिरीच्या नगरपालिकेच्या शाळेत झाले. नंतरचे माध्यमिक शिक्षण पटवर्धन हायस्कूलमध्ये झाले. मॅट्रिकच्या परीक्षेत त्यांना हिंदीमधील 'सागरमल खेतान' स्कॉलरशिप मिळाली. गोगटे महाविद्यालयातून बी.ए. (१९५४) व मुंबईच्या रुईया महाविद्यालयातून एम.ए. (१९५६) झाले. शिकत असताना एकीकडे ओरिएन्ट हायस्कूलमध्ये त्यांनी मराठी व संस्कृत शिक्षकाची नोकरी केली. एम.ए. नंतर डॉ.जगदीशचंद्र जैन यांच्या मार्गदर्शनाखाली 'हिंदी-मराठी उपन्यासों का तुलनात्मक अध्ययन' (१९६४) या विषयात पीएच.डी. पदवी मिळवली. मुंबईच्या एस.आय.इ.एस. महाविद्यालयात हिंदीचे अध्यापक म्हणून ते रुजू झाले. मुंबई विद्यापीठातील 'टागोर अध्यासनाच्या तौलनिक अध्यासना'चे काम त्यांनी १९८४ ते १९८८ या काळात पाहिले. पुढे १९८८ ते १९९२ या काळात मुंबई विद्यापीठात ते हिंदी विभागाचे प्रमुख होते. 'एमेरिट्स फेलो' हे विद्यापीठ अनुदान आयोगातर्फे सन्माननीय पद भूषविले.

त्यांनी हिंदी-मराठी साहित्याचा तौलनिक अभ्यासातून शोध व वेध घेण्याचा प्रयत्न केला. 'आपले जीवन अत्यंत व्यापक तत्त्व आहे' या उदार, व्यापक व समीक्षा-दृष्टिकोनातून ते लेखन करतात.

मराठी-हिंदी साहित्याचे ते गाढे अभ्यासक, अनुवादक, समीक्षक, विचारवंत व उत्तम वाचक आहेत. विद्यार्थ्यांवर भारतीय साहित्य समीक्षेचे उत्तम संस्कार करणारे ते नामवंत प्राध्यापक म्हणून शिक्षणक्षेत्रात ज्ञात आहेत. गुरूपेक्षा शिष्य मोठा व्हावा, यात मनोमन आनंद मानणारे ते एक सत्त्वशील, प्रामाणिक, विद्वान अध्यापक आहेत. हिंदी-मराठी साहित्यकृतींचा विद्यार्थ्यांकडून उत्तम अनुवाद करवून घेणारे व त्यांना श्रेष्ठता मिळवून देणारे गुरुश्रेष्ठ शिक्षक म्हणून ते प्रसिद्ध आहेत.

हिंदी वाङ्मयातून भारतीयत्वासारख्या एखाद्या महान संकल्पनेचा विचार विविध बाजूंनी, वेगवेगळ्या पातळ्यांवर करण्याची सूत्रबद्ध संकल्पना व संपादनाची ओळख वाचकांना करून देणे, हे त्यांच्या विश्लेषक समीक्षेचे वैशिष्ट्य म्हणता येईल.

'मराठी कादंबरी चिंतन आणि समीक्षा' (१९८३), 'प्रेमचंद व्यक्ती आणि वाङ्मय' (१९८३), 'मराठी कादंबरीचा इतिहास' (१९८४), 'स्वभाषेत खरी प्रगती' (२०००) ही त्यांची मराठीतील गाजलेली विशेष पुस्तके. कुसुमाग्रजांच्या कविता, रा.भा.पाटणकरांचा 'सौंदर्य मीमांसा', 'चानी' या मराठीतील प्रसिद्ध ग्रंथांचे त्यांनी हिंदीत अनुवाद केले आहेत.

अज्ञेय, जैनेंद्र (चंद्रकांत देवताळे), गोविंद मित्र, धर्मवीर भारती या नामवंत लेखकांच्या वाङ्मयीन व्यक्तिमत्त्वाचा त्यांनी परिचय करून दिला. त्यांच्या अनेक पुस्तकांना पुरस्कार मिळाले. 'मराठी कादंबरी: चिंतन व समीक्षा' या ग्रंथास महाराष्ट्र सरकारचा राज्य पुरस्कार मिळाला. १९९० मध्ये उत्तर प्रदेश 'सौहार्द पुरस्कार', 'माता कुसुमकुमारी आंतरराष्ट्रीय पुरस्कार' 'संत ज्ञानेश्वर गौरव कार्य', 'महाराष्ट्र राज्य हिंदी अकादमी' १९९६, असे अनेक मानाचे वीस पुरस्कार त्यांना लाभले आहेत. त्यांच्या पत्नी शीला बांदिवडेकर ह्या हिंदीच्या प्राध्यापिका होत्या. त्यांनी हिंदी कादंबऱ्यांचे मराठीत अनुवाद केलेले आहेत.

– रागिणी पुंडलिक

**संदर्भ :**


*१. बांदिवडेकर चंद्रकांत; 'मराठी कादंबरीचा इतिहास '१९२०-१९४७; मेहता पब्लिशिंग हाउस, पुणे; १९८९.*


## बांदेकर, दत्तू

***बांदेकर, दत्तात्रेय तुकाराम***

☞ **मुख्य नोंद – पत्रकारिता आणि ललितेतर साहित्य खंड**

## बागूल, देवीदास तुकाराम

**लेखक, छायाचित्रकार, कथाकार**

**२८ डिसेंबर १९३१**

देवीदास बागूल यांचा जन्म नाशिक जिल्ह्यातील सटाणे तालुक्यात झाला. शिक्षण नाशिक येथे झाले. एच.पी.टी. महाविद्यालयातून त्यांनी १९५८ साली एम.ए.ची पदवी प्राप्त केली. त्यानंतर पुण्याच्या फर्गसन व बृहन्महाराष्ट्र कॉमर्स कॉलेजात त्यांनी मराठीचे अध्यापन केले. पुढे अध्यापन सोडून त्यांनी पत्रकारितेत प्रवेश केला. 'साधना' साप्ताहिकात काही काळ उपसंपादक म्हणून काम पाहिले. पुस्तकाची मांडणी करण्यातील तज्ज्ञ व उत्तम छायाचित्रकार म्हणून त्यांना अमाप प्रसिद्धी मिळाली. पॉप्युलर, ओरिएन्ट लाँगमन्स या प्रकाशन संस्थांत त्यांनी डिझायनर म्हणून काम केले.

'आस्तिक नास्तिक' (१९७२), 'लौकिक ज्ञानेश्वरी' (१९७७), 'नवे बालसंगोपन' (१९८९), 'माझी छायाचित्रकला' (१९८५) अशा विविध विषयांवरील त्यांची वीस-एक पुस्तके आहेत. बालवाङ्मयाचा आढावा घेणारे त्यांचे 'बालवाङ्मय' (१९६०) हे पुस्तक महत्त्वाचे म्हणता येईल. देवीदास बागूल यांनी लिहिलेली 'शैशवदूत' (१९४९), 'मोहोरणारी झाडे' (१९६०) ही बालवाङ्मयाची पुस्तके शैलीच्या दृष्टीने वैशिष्ट्यपूर्ण अशीच आहेत.

– संपादक मंडळ

ब

## बागूल, बाबूराव रामचंद्र

**कथालेखक, कादंबरीकार**

**१७ जुलै १९३१ – २६ मार्च २००८**



आंबेडकरी परंपरेतील एक धगधगणारे, भावनाव्याकूळ झालेले, दुःखाने तडफडणारे व विद्रोहाने झपाटलेले जिते-जागते विद्यापीठ म्हणजे बाबूराव बागूल. दलित साहित्यातच नव्हे, तर संपूर्ण मराठी साहित्यातच मानवी जीवन खऱ्या अर्थाने रेखाटणारा बागूलांसारखा दुसरा कुठलाही कथाकार नाही. अशा या दलित कथेत वादळ ठरलेल्या बाबूराव बागूलांचे पूर्ण नाव श्री. बाबूराव रामचंद्र बागूल असून या बहुमुखी प्रतिभेच्या लेखकाचा जन्म एका अशिक्षित, गरीब कुटुंबात, नाशिकजवळील 'विहितगाव' येथे झाला, असे ते आपल्या ग्रंथात म्हणतात. परंतु, ते आपल्या जन्मसंदर्भासंबंधी साशंकच आहेत. कारण, नेमके वर्ष त्यांना सांगता आलेले नाही. ते लिहितात, ''आई शिकलेली नाही. तीस, एकतीस, बत्तीस या तिनांपैकी काहीही असू शकेल.'' बागूलांच्या या विधानात जरी संदिग्धता असली, तरी १७-०७-१९३१ हाच त्यांचा जन्मदिवस आहे, असे स्वतः त्यांनी व मान्यवर दलित साहित्यिकांनी अधिकृतपणे सांगितले, आहे.

बाबूराव बागूल यांचे आई-वडील परिस्थितीला इतके बळी पडले होते, की त्यांना आपल्या अपत्याच्या जन्माची तारीख लक्षात ठेवावी किंवा लिहून ठेवावी, हेसुद्धा कळले नाही. त्यांना एकूण चार स्त्रियांचे मातृत्व लाभले; कारण त्यांच्या आईची मुले वाचत नव्हती, म्हणून तिने ते मूल वाचावे याकरिता ते एका मांग स्त्रीच्या ओटीत टाकले. तिने ते मुसलमान बाईच्या ओटीत टाकल्यानंतर पुढे शेवटी त्यांच्या मावशीने त्यांचा संभाळ केला.

वडील शेतीसोबत बैलाचा धंदा करीत व आई भाजी किंवा केळी विकत असे. असे आर्थिक ओढाताणीचे जीवन हे बागूल जगत होते. लहानपणी ते सर्दी, खोकला, हिवताप, डोळे येणे, खरूज यांनी सतत आजारी असत. त्यामुळे ते तब्येतीने अतिशय किरकोळ होते. बारकी मान आणि मोठे डोळे असल्यामुळे मुले त्यांना 'डोकमासा' म्हणून चिडवीत असत. मास्तरांच्या छडीमुळे व आईच्या लाडकौतुकामुळे बालपणी त्यांची शाळा झालीच नाही.

मराठी चौथीत असतानाच शेजारच्या 'शेजवल' मास्तरांच्या प्रेरणेने त्यांनी कविता – गाणे लिहिण्याचा प्रयत्न केला. याच काळात डॉ. आंबेडकर दलितांच्या न्याय्य हक्कांसाठी लढत होते. त्यांच्या कार्याने प्रेरित होऊन बालवयात ते काव्य करू लागले. ही काव्यलेखनाची भूक भागवण्यासाठी शालेय स्कॉलरशिप मिळाली की, ते पुस्तके घेऊन वाचनात मग्न होत असत. ते फक्त एस. एस. सी. पर्यंत शिकले.

पुढे मावशीने त्यांना मुंबईतील माटुंगा येथील 'लेबरकॅम्प' येथे शिक्षणासाठी नेले. माटुंगा येथील लेबरकॅम्पमधील गलिच्छ वातावरणात; मारामाऱ्या, शिव्या, भांडणे अशा गजबजलेल्या वातावरणात; त्यांचा उदय होत होता. साधारणतः, १९३६ ते १९३८ हा लेबरकॅम्पमधील काळ असावा, असे ते सांगतात. ह्या काळात हिटलर, स्टॅलीन, लेनिन, कम्युनिस्ट पार्टी ही नावे त्यांच्या कानावर नेहमी येत. ह्याच काळात डॉ. आंबेडकरांचेही सामाजिक कार्य व क्रांती, हे उत्तुंग शिखरावर पोहोचले होते. म्हणून एकूणच समाज त्यातून ढवळून निघत होता. त्याचा परिणाम होणाऱ्यांपैकी बाबूराव बागूल एक होते.

साधारणतः १९४४ साली ते बारा ते चौदा वर्षांचे असतानाच, लहान वयात त्यांच्या मामाच्या पाच ते सहा वर्षांच्या मुलीबरोबर त्यांचा विवाह झाला.

लेबरकॅम्पला कम्युनिस्ट पार्टीचे कार्यालय होते. म्हणून तेथे येणे-जाणे असल्यामुळे वाचनात मार्क्स-लेनिन आणि कम्युनिस्ट पार्टी हे वाङ्मय वाचण्याकडे त्यांचा कल झाला. पुढे त्यांच्या व्यक्तित्वाला निरनिराळे धुमारे फुटू लागले व 'युवक संगर पथक' नावाच्या संघटनेचे ते

ब

नेते झाले. ते खूप वाचन करत असल्यामुळे त्यांच्या कवितेतून मनाला अस्वस्थ करणारे प्रश्न ते कवितेत व्यक्त करायचे.

सामाजिक परिवर्तनवादी वातावरणामुळे आपण खूप लिहावे, असे त्यांना वाटू लागले. नाटके, कविता, कादंबऱ्या ह्यांचे लेखन करावे; भाषणे करावीत; सशस्त्र क्रांती करावी; खूप काही करावे, असे त्यांना वाटत होते. म्हणून त्यांनी आपली वाटचाल कवितेकडून कादंबरीकडे वळवली व 'कोंडी' नावाची पहिली कादंबरी लिहिली. त्यानंतर त्यांना कविता हे क्षेत्र लहान वाटू लागल्यामुळे भोगलेल्या विचारांना मूर्तरूप देण्यासाठी पुढे-पुढे ते कथा लिहू लागले.

'जेव्हा मी जात चोरली होती' (१९६३) व 'मरण स्वस्त होत आहे' (१९६९) अशा प्रकारच्या जीवनसत्य व वाङ्मयीनदृष्ट्यासुद्धा उत्कृष्ट अशा कथा ते लिहू लागले. त्यांच्या बहुसंख्य कथा एका व्यक्तीभोवती गुंफलेल्या असतात. या व्यक्ती चारचौघांसारख्या मुळीच नसतात, त्या मनस्वी असतात. त्यांना 'भुका' असतात व आपली भूक तृप्त करण्यासाठी ते रूढ मार्ग कधीच आचरत नाहीत.

बागूलांच्या मते, ''भगवान बुद्ध म्हणजे; माणसातील परमोच्च माणूस. मला भगवान बुद्ध अत्यंत आदरणीय वाटतात; कारण माणसांबद्दल आत्यंतिक करुणा आणि माणसांचे प्रश्न सोडविण्याची प्रखर बुद्धिमत्ता त्यांच्याजवळ होती.'' बागूल हे 'मार्क्सवादी' आहेत, असे साहित्यिक विश्वात म्हटले जाते. मात्र, ते आंबेडकरवादीच आहेत, हे त्यांच्या 'डॉ. आंबेडकर भारत, भाग-१' या चरित्रकथेवरून लक्षात येते.

त्यांना 'फाय फाउण्डेशनची गौरववृत्ती' प्राप्त झाली होती तसेच 'जनस्थान' पुरस्कारही प्राप्त झाला होता. त्यांना महाराष्ट्र राज्य साहित्य संस्कृती मंडळाची गौरववृत्ती मिळाली होती. १९७१ साली महाराष्ट्र बौद्ध साहित्य सभेच्या संमेलनाचे ते अध्यक्ष होते. १९९० साली मार्च महिन्यात कल्याण येथे झालेल्या दहाव्या अखिल भारतीय दलित साहित्य संमेलनाचे ते अध्यक्ष होते. फेब्रुवारी १९९३ मध्ये, नागपूर येथे झालेल्या नवव्या अखिल भारतीय दलित साहित्य संमेलनाचे ते अध्यक्ष होते.

'अस्मितादर्श', 'मायमाउली', 'सिंहगर्जना', 'नवयुग', 'पर्वा', 'आम्ही' इत्यादी मासिकांत त्यांच्या कथा प्रकाशित झालेल्या आहेत. ते 'आम्ही' या मासिकाचे संस्थापक-संपादक होते.

स्त्रियांविषयी त्यांना अतिशय कळवळा आहे. म्हणून ते म्हणतात की, ''स्त्रीला प्राप्त झालेले मादीपण व सुंदरता हे तिच्या सर्वनाशाचे कारण होय; हे कोणीही नाकबूल करणार नाही.''

भालचंद्र फडके बागूलांविषयी लिहितात, ''दलित कथेची जडण-घडण होत असताना, तिला मानाचे स्थान मिळवून देणारे दलित कथेचे शिल्पकार म्हणजे श्री. बाबूराव बागूल होत.''

अशा या अष्टपैलू व्यक्तिमत्त्व असणाऱ्या थोर साहित्यरूपी हिऱ्याची जीवनज्योत मालवली, तेव्हा दलित साहित्यक्षेत्राची अपरिमित हानी झाली यात शंका नाही.

– डॉ. ज्योती लांजेवार

**संदर्भ :**

*१. लांजेवार ज्योती; 'दलित कादंबरीतील स्त्री-चित्रण'; २००८.*

## बापट, नागेश विनायक

**चरित्रकार, कादंबरीकार**

**३१ जुलै १८३९ – मार्च १९०२**

एकोणिसाव्या शतकात स्वधर्म, स्वभाषा व स्वदेश ह्यांविषयी महाराष्ट्रात मोठ्या प्रमाणात जनजागृती झाली आणि त्याचे प्रतिबिंब साहित्यात उमटलेले आढळते. स्वधर्म, स्वभाषा व स्वदेश ह्या विचारांनी भारावलेल्या प्रथितयश साहित्यिकांत नागेश विनायक बापट हे अग्रभागी होते.

बापटांचा जन्म वाई येथे वेदशास्त्रसंपन्न कुटुंबात झाला. त्यांचे शिक्षण सातारा, वाई व पुणे येथे त्यांचे वडील विनायकशास्त्री व चंपूकार विठोबा अण्णा दप्तरदार यांच्याकडे झाले. त्यांनी सन १८५७ मध्ये महाविद्यालयीन शिक्षण पुना कॉलेज येथून पूर्ण केले. मुंबई प्रांतातील

ब



बेळगाव व धारवाड जिल्ह्यात त्यांनी डेप्युटी एज्युकेशनल इन्स्पेक्टर म्हणून काम केले. त्या वेळच्या ब्रिटिश शासनाशी त्यांचा वाद झाल्याने पुढे त्यांनी बडोदे संस्थानात नोकरी केली व तेथून सन १९०१ मध्ये ते निवृत्त झाले.

बडोदे संस्थानचे अधिपती, महाराज सयाजीराव गायकवाड, हे गुणग्राही राजे होते. बापटांचे भाषेवरील प्रभुत्व लक्षात घेऊन महाराज आपल्या प्रवासात बापटांना घेऊन जात असत व त्या प्रवासाचे सविस्तर वर्णन बापटांना लिहून ठेवण्यास सांगत. प्रबोधनकार ठाकरे यांनी म्हणूनच बापटांचे वर्णन शब्दचित्रकार असे केले आहे. महाराजांनी दिलेल्या प्रोत्साहनामुळे बडोद्याच्या वास्तव्यात बापटांकडून सकस साहित्य निर्माण झाले. सन १८७६ ते १९०१ ह्या काळात त्यांनी अकरा पुस्तके लिहिली. ऐतिहासिक विषयावर त्यांनी चरित्रे व कादंबऱ्या लिहिल्या. ते बहुभाषिक होते. त्यांना मराठी, इंग्रजी, गुजराती, कानडी व हिंदुस्थानी या भाषा येत आणि त्याचा उपयोग त्यांना समाजाभिमुक लिखाण करण्यासाठी निश्चितच झाला. पेशवाईचा अंत झाला होता व इंग्रजांचे बलाढ्य पण परके राज्य प्रस्थापित झालेले होते. लोकांचा आत्मसन्मान नाहीसा झाला होता. बापटांना प्रामाणिकपणे वाटे की आपल्याला प्रदीर्घ व प्रेरणादायी इतिहास आहे आणि त्यापासून आपण आपले आत्मबल वाढवले पाहिजे. आपली मातृभाषा समृद्ध आहे व त्या भाषेत लिखाण करून आपण लोकांना जागृत केले पाहिजे. देशभरचा प्रवास, विस्तृत वाचन आणि भाषेवरील प्रभुत्व यांमुळे त्यांना विश्वास वाटे की, आपण लोकजागृती करू शकू.

'पहिले बाजीराव पेशवे' (१८७८), 'सरसवाक्यरत्नावली' (१८८०), 'दादोजी कोंडदेव' (१८८२), 'छत्रपति संभाजी महाराज' (१८८४), 'सुभद्राहरण' (१८९२), 'टिटवी' (१८९४), 'वक्तृत्व' (१८९५), 'लिकलेअरचे चरित्र' (१८९६), 'चितूरगडचा वेढा' (१८९७), 'पानिपतची मोहिम' (१८९८), 'महाराणी जमनाबाई गायकवाड' (१९०१) ही त्यांनी लिहिलेली पुस्तके त्यांचा आत्मविश्वास किती यथार्थ होता, हेच दर्शवतात. ही सर्वच पुस्तके लोकप्रिय झाली व त्यांच्या अनेक आवृत्या निघाल्या. त्या काळातील लोकमान्य समाजधुरिणांच्या प्रस्तावना व उत्तम अभिप्राय त्यांच्या पुस्तकांना मिळाले. लोकमान्य टिळक, न्यायमूर्ती रानडे, प्रोफेसर भानु, कवठेकर इत्यादींचे उत्तम अभिप्राय त्यांना मिळाले. ऋग्वेदासारख्या प्राचीन ग्रंथाच्या संपादनात त्यांनी निर्णयसागर प्रेसला साहाय्य केले होते.

– डॉ. नीलकंठ बापट

## बापट, वसंत

***बापट, विश्वनाथ वामन***

**कवी, ललित गद्यलेखक,**

**प्रवासवर्णनकार, स्वातंत्र्यशाहीर**

**२५ जुलै १९२२ – १७ सप्टेंबर २००२**



स्वातंत्र्योत्तर काळातील एक महत्त्वाचे कवी म्हणून ख्यातकीर्त असलेल्या वसंत बापट यांच्या व्यक्तिमत्त्वाला अनेक पैलू होते. कवी, ललित गद्यलेखक, प्रवासवर्णनकार, गीतकार, स्वातंत्र्यशाहीर, स्वातंत्र्यसैनिक, वक्ता, प्राध्यापक, अभिनेता, पत्रकार, संपादक, राष्ट्र सेवा दलाच्या कलापथकाचा संस्थापक-संवर्धक, कार्यक्रमाचे सूत्रसंचालक-निवेदक या नात्यांनी परिचित असलेल्या वसंत बापट यांचे मूळ नाव विश्वनाथ वामन बापट. त्यांचा जन्म सातारा जिल्ह्यातील कऱ्हाड येथे झाला. त्यांचे वडील वामनराव उर्फ रावसाहेब बापट हे न्यायाधीश होते. ते जगन्नाथ शंकरशेट शिष्यवृत्ती मिळवणारे संस्कृतचे व्यासंगी अभ्यासक होते.

वसंत बापटांचे प्राथमिक शिक्षण बेळगाव येथील शाळेत, माध्यमिक शिक्षण पुण्याच्या नूतन मराठी

ब

विद्यालयात आणि महाविद्यालयीन शिक्षण सर परशुरामभाऊ महाविद्यालयात झाले. बापट सीनिअर बी.ए.च्या वर्गात असताना महात्मा गांधींचे 'चले जाव आंदोलन' सुरू झाले. उसळत्या रक्ताच्या तरुण स्वातंत्र्यप्रेमी बापटांनी महाविद्यालयीन शिक्षण सोडून दिले आणि भारताच्या स्वातंत्र्य आंदोलनात भाग घेतला. तुरुंगवासामुळे बापट साने गुरुजी, एस.एम.जोशी, ना.ग.गोरे आदी समाजवादी नेत्यांच्या संपर्कात आले. तुरुंगातून सुटल्यावर त्यांनी पुन्हा महाविद्यालयीन अभ्यासाला सुरुवात केली. १९४६ साली बापट संस्कृत विषय घेऊन प्रथम श्रेणीत बी.ए. आणि १९४८ साली संस्कृत विषय घेऊन एम.ए.ची परीक्षा उत्तीर्ण झाले. १९४८ साली धारवाड महाविद्यालय, १९४९-१९६४ नॅशनल महाविद्यालय, बांद्रे येथे बापटांनी प्राध्यापक म्हणून नोकरी केली.

१९७४-१९८२ मुंबई विद्यापीठात 'गुरुदेव रवींद्रनाथ टागोर' तौलनिक साहित्याचे प्राध्यापक म्हणून काम करून मुंबई विद्यापीठाच्या सेवेतून बापट निवृत्त झाले. जवळजवळ ३५ वर्षे अध्यापनाच्या क्षेत्रात सक्रिय असलेल्या बापटांनी अनेक उपक्रमांत सहभागी होऊन आपले नैपुण्य प्रकट केले आहे. उदाहरणार्थ १९८३ ते १९९८ 'साधना' साप्ताहिकाचे सहसंपादक, १९४६ ते १९८१ राष्ट्र सेवा दलाच्या कलापथकाची जबाबदारी सांभाळताना 'महाराष्ट्र दर्शन', 'भारत दर्शन', 'आझादी की जंग', 'शिवदर्शन', 'गोमंतक दर्शन' इत्यादी कार्यक्रमांचे लेखन, दिग्दर्शन व निर्मिती केली. 'पुढारी पाहिजे', 'बिनबियांचे झाड', 'गल्ली ते दिल्ली' या वगनाट्यांत भूमिका; 'श्यामची आई', 'उंबरठा' या चित्रपटांसाठी गीतलेखन; भारतात व विदेशात काव्यवाचनाचे कार्यक्रम; 'सुंदरा मनामध्ये भरली' या अमेरिकेत सादर झालेल्या कार्यक्रमासाठी लेखन; साधना ट्रस्ट, राष्ट्र सेवा दल, आंतरभारती, साने गुरुजी आरोग्य मंदिर, सांताक्रुझ या संस्थांचे अनेक वर्षे विश्वस्त; साहित्य अकादमी, संगीत अकादमी, इंडियन इन्स्टिट्यूट ऑफ मास कम्युनिकेशन, नवी दिल्ली; महाराष्ट्र राज्य चित्रपट, रंगभूमी व सांस्कृतिक विकास मंडळ, तसेच चित्रपट सेन्सॉर मंडळ ह्या संस्थांचे ते सदस्य होते. याशिवाय आंतरभारती विश्वस्त निधीतर्फे प्रवासवृत्ती (१९६३-१९६४) मिळाल्याने भारत भ्रमण, अमेरिका, नेपाळ, मॉरिशस या देशांचा प्रवास केला.

वसंत बापटांचा 'बिजली' हा १९५२ साली पहिला काव्यसंग्रह वाचकांसमोर आल्यानंतर १९९८ साली प्रसिद्ध झालेल्या 'धडपडणाऱ्या मुलांचे साने गुरुजी' या पुस्तकापर्यंत पंचेचाळीस वर्षांत बापटांनी ३४ पुस्तके सिद्ध केली आहेत. त्यांत १३ कविता संग्रह, ६ बालकविता संग्रह, १ बालनाट्य, १ बाल नृत्य-नाट्य, ३ प्रवासवर्णने, १ व्यक्तिदर्शन, १ ललितगद्य, १ राजकीय उपहास, २ समीक्षा, ३ संपादित/सहसंपादित आणि २ संकीर्ण अशी वेगवेगळी पुस्तके आहेत.

'सेतु' (१९५७), 'अकरावी दिशा' (१९६२), 'मानसी' (१९७७), 'प्रवासाच्या कविता' (१९८२), 'तेजसी' (१९९१) हे स्फुट कवितांचे संग्रह, आणि 'चंगा मंगा' (१९८३), 'अबडक तबडक' (१९८३), 'गरगर गिरकी' (१९९२), आणि 'बालगोविंद' (१९६५, बालनाट्य), 'परीच्या राज्यात' (१९९४, बालनृत्य नाट्य), ही बापटांची उल्लेखनीय काव्यविषयक पुस्तके आहेत. याशिवाय 'बारा गावचं पाणी' (१९६६), 'जिंकुनि मरणाला' (१९८१), 'ताणे बाणे' (१९९९) ही प्रवासवर्णन-व्यक्तिदर्शन-ललितगद्य ह्या गटांत मोडणारी पुस्तके बापटांनी लिहिली आहेत. 'विसाजीपंतांची वीस कलमी बखर' हे राजकीय परिस्थितीवर उपहासपर भाष्य करणारे पुस्तक बापटांनी बखरीच्या शैलीत लिहिले आहे.

वसंत बापटांच्या आयुष्याची घडण आणि त्यांची कविता यांच्यात निकटचे नाते आहे. राष्ट्रीय जाणिवेचे भान असलेल्या बापटांनी आपल्या काव्य-लेखन प्रवासात विविध काव्यप्रकार हाताळले आहेत. १९४२चे आंदोलन, राष्ट्र सेवा दलातील सहभाग, पंढरपूर विठ्ठल मंदिर मुक्ती लढा, गोवा मुक्ती आंदोलन, संयुक्त महाराष्ट्र आंदोलन, भूदान चळवळ, राष्ट्र सेवा दल कलापथक

ब

यांत त्यांचा प्रत्यक्षाप्रत्यक्ष सहभाग होता. सामाजिक आणि राष्ट्रीय आंदोलनाच्या काळात समाजात जागृती निर्माण व्हावी म्हणून त्यांनी काव्य-लेखन केले. राष्ट्रीय गीते, स्फूर्तिगीते, पोवाडे, राष्ट्रीय तमाशा, वगनाट्ये यांसारखे लेखन त्यांनी प्रारंभीच्या काळात केले. 'जनजागरण' हे त्यांच्या प्रारंभीच्या कवितेचे एक महत्त्वाचे प्रयोजन आहे. ह्या कवितेवर समाजवादी विचारधारेचा प्रभाव आहे. त्यामुळे बापटांच्या कवितेचे रूप काहीसे प्रचारात्मक झाले आहे. त्यांच्या कवितेत सामाजिक जिव्हाळा, सामाजिक समता, माणसाबद्दलचे प्रेम, मानवतावाद, आशावाद, शुचित्व यांचे दर्शन घडते. मंगलाची- विश्वमंगलाची आकांक्षा बाळगणारा हा कवी अन्याय, विषमता, दांभिकता, ढोंगीपणा यांचे उपरोधपूर्ण चित्रण करतो.

बापटांची राष्ट्रीय जाणिवेची कविता अधिक प्रभावी असून ती सामाजिक रूप घेऊन अवतरते. मात्र काही वेळा तिच्यात चिंतनशीलतेचा अभाव जाणवतो. ती क्वचित भाबडी, कृत्रिम आणि प्रासंगिक होते. वीर विभूति-पूजनाची प्रवृत्ती अंगी बाणल्यामुळे देशभक्ती, राष्ट्रप्रेम, जनजागृती निर्माण करण्यासाठी बापटांनी पोवाडे लिहिले. अशा वेळी समकालीन समाजस्थितीशी बापट एकरूप झालेले दिसतात. 'बिजली' पासून 'रसिया' पर्यंत बापटांच्या कवितेत सामाजिक भावनेचा विकास झाला आहे. तरीही बापट मूलतः प्रेमकवीच आहेत. प्रणयभावनेचे अनेकविध रंग त्यांच्या कवितेत आविष्कृत झाले आहेत. त्यांच्या कवितेत विवाहपूर्व आणि विवाहबाह्य प्रणयाचे चित्रण झाले आहे. प्रामुख्याने पुरुषी व्यक्तिमत्त्वाचा किंवा प्रेमिकांचा प्रणयाविष्कार बापटांच्या कवितेत आढळतो. प्राचीन संस्कृत काव्यपरंपरेतील प्रेमभावनेचा आणि मराठी लावणीमधील शृंगाराचा प्रभाव बापटांच्या प्रेमकवितेत जाणवतो. त्यांनी लिहिलेली आधुनिकतेचा स्पर्श झालेली लावणी लोककलांच्या अनुषंगाने विकसित झाली आहे. त्यांनी लिहिलेल्या लावण्या शृंगारिक, नखरेल, मनोरंजनात्मक असून गेयता, नादमयता, तालबद्धता, नाट्यमयता, भावनेतील उत्कटता आणि मुक्तपणा हे तिचे ठळक विशेष आहेत. पुरुषी दृष्टिकोनातून व्यक्त होणारी स्त्री-सौंदर्याची अभिलाषा हाही तिचा आणखी एक ठळक विशेष आहे. बापटांच्या कवितेतील निसर्गचित्रण किंवा निसर्गरूपे पारंपरिक मराठी कवितेतील निसर्गरूपापेक्षा वेगळी आहेत. प्रेमभावना आणि निसर्गचित्रण यांचे साहचर्य बापटांच्या कवितेत दिसून येते. प्रेमभावनेच्या आविष्कारासाठी पार्श्वभूमी म्हणून बापटांनी निसर्ग स्वीकारला आहे.

विषय कोणताही असो, एका अर्थी बापटांची कविता ही समूहमनाची कविता आहे. तिचे आवाहन साऱ्या समाजाला, अखिल मानवजातीला असते. त्यामुळे आयुष्याच्या अखेरपर्यंत बापटांच्या कवितेत सामान्यांच्या, शोषितांच्या परिवर्तनाचा ध्यास प्रकटत राहिला. लोकपरंपरेशी असलेल्या नात्यामुळे बापट सेवादलासाठी, सर्वसाधारण रसिकांसाठी जोमाने कविता लिहीत राहिले. काव्यवाचनासारखे प्रभावी माध्यम सापडल्यामुळे बापटांची समाजाभिमुख कविता महाराष्ट्राच्या कानाकोपऱ्यांत सर्वदूर पसरली. काव्यगायन मागे पडून काव्यवाचन, काव्यसादरीकरण, काव्यदर्शन ही कला विकसित करण्याचे श्रेय विंदा करंदीकर, वसंत बापट आणि मंगेश पाडगावकर यांना दिले जाते. ह्या कवि-त्रयीच्या जाहीर काव्यदर्शनामुळे मराठी मनाची रसिकता वाढत गेली. कविता कशी सादर करावी, याची विलक्षण जाण बापटांना होती. 'बिजली', 'दख्खनची राणी', 'फुंकर', 'झेलमचे अश्रू', 'सावंत', 'रंगाने तू गव्हाळ', 'मायकेलँजेलोपनिषद', 'सांभाळ जरा', 'अमेरिके अमेरिके दार उघड', 'आंबा पिकतो', 'लावणी: अखेरच्या विनवणीची' इत्यादी कवितांना रसिक श्रोत्यांची उत्स्फूर्तपणे दाद मिळत असे. अलीकडच्या दोन दशकांत मराठी साहित्यविश्वात काव्यवाचनाला मिळणारा प्रतिसाद ही वसंत बापट आणि त्यांच्याबरोबर काव्यवाचन करणाऱ्या विंदा करंदीकर व मंगेश पाडगावकर या कवींची देणगी म्हणावी लागेल. वसंत बापटांवर संस्कृत साहित्य आाणि भाषा यांचे संस्कार बालपणापासून झाले होते. कविकुलगुरू कालिदासांचे 'मेघदूत' हे अजरामर

प्रेमकाव्य आहे. बापटांनी 'मेघदूता'च्या अनुवादासाठी प्रवृत्त होण्यामागे काही कारणे आहेत. 'मेघदूता'च्या अजोड, अतुलनीय काव्यसौंदर्याचा आस्वाद रसिकांना घेता यावा, असे सौंदर्यवादी बापटांना वाटले. छंदावर व वृत्तावर प्रभुत्व असूनही बापटांनी 'मेघदूत'च्या अनुवादासाठी मुक्तछंदाचा अंगीकार केला आहे. या अनुवादासाठी सोपी, उत्कट आणि नित्याच्या वापरातील भाषा आहे. 'मेघहृदय' ह्या शीर्षकाने मराठीत अनुवादित केलेल्या संस्कृत मेघदूताची चौकट बापटांनी सांभाळली आहे. तसेच बापटांच्या व्यक्तिमत्त्वाचा ठसाही अनुवादावर उमटला आहे.

वसंत बापट कवी म्हणून रसिकप्रिय असले, तरी त्यांची गद्यलेखनातील कामगिरीही लक्षणीय ठरली आहे. साने गुरुजींच्या इच्छेनुसार त्यांनी 'साधना' साप्ताहिकाच्या प्रारंभकाळात साने गुरुजींना सहकार्य केले. १९८३ पासून १९९८ पर्यंत 'साधना' साप्ताहिकाच्या प्रमुख संपादकपदाची जबाबदारी बापटांनी निष्ठापूर्वक सांभाळली होती. त्यासाठी अग्रलेख, टीकालेख, प्रासंगिक लेख या स्वरूपाचे लेखन केले. खट्याळ विनोदबुद्धी, धारदार उपहास, बखरीची शैली आणि नाट्यमयता अशा गुणांनी ढंगदार बनलेल्या स्फुटांतून बापटांचे 'विसाजी पंतांची वीसकलमी बखर' (१९८७) हे पुस्तक सिद्ध झाले. 'जिंकुनि मरणाला' (१९८१) या व्यक्तिचित्रणपर पुस्तकात बापटांनी त्यांना भावलेल्या व्यक्तींविषयी समरसतेने लिहिले आहे. त्यांत बालगंधर्व, आचार्य अत्रे, साने गुरुजी, बॅ. नाथ पै, आवाबेन देशपांडे, नाना नारळकर अशी भिन्नधर्मी व्यक्तिमत्त्वे आहेत. 'ताणे बाणे' (१९८७) हा बापटांच्या आत्मपर स्तंभलेखनातून तयार झालेला लेखसंग्रह आहे. तर 'बारा गावचं पाणी' (१९६६) हे प्रवासवर्णन आहे. १९७४ ते १९८२ ह्या काळात बापटांनी मुंबई विद्यापीठात 'गुरुदेव रवींद्रनाथ टागोर तौलनिक साहित्याभ्यास' या केंद्रात प्रमुख प्राध्यापक म्हणून काम केले. तौलनिक साहित्याभ्यास ह्या शाखेच्या विद्यार्थ्यांना मार्गदर्शन आणि अध्यापन करीत असताना बापटांनी 'तौलनिक साहित्याभ्यास: मूलतत्त्वे आाणि दिशा' (१९८७) ह्या वैचारिक पुस्तकाची निर्मिती केली.

बापटांना अनेक पुरस्कारांनी आणि मानसन्मानांनी गौरविण्यात आले आहे. 'सेतु', 'मानसी', 'बालगोविंद' या पुस्तकांना महाराष्ट्र राज्य शासनाचे पुरस्कार प्राप्त झाले आहेत. बापटांनी अनेक साहित्य संमेलनांचे अध्यक्षस्थान विभूषित केले आहे. उदाहरणार्थ मुंबई महानगर मराठी साहित्य संमेलन, मुलुंड, १९८३; ३३ वे अखिल भारतीय गुजराती साहित्य संमेलन, पुणे, १९८५; ग्रामीण साहित्य संमेलन, विटा, १९८७; ७२ वे अखिल भारतीय मराठी साहित्य संमेलन, मुंबई, १९९८.

मुंबईच्या सांताक्रुझ परिसरात साने गुरूजी आरोग्य केंद्र स्थापन करण्यात बापटांचा सक्रिय सहभाग होता. या संस्थेतर्फे कवी वसंत बापट यांच्या स्मरणार्थ आंतरशालेय समूह गीतगायन स्पर्धेचे गेली २५ वर्षे आयोजन करण्यात येत आहे. साने गुरुजी आरोग्य केंद्राच्या इमारतीत 'कवी वसंत बापट संगीत-नृत्य-नाट्य दालन' उभारण्यात आले आहे.

सौंदर्यवेधी, आशावादी, ध्येयासक्त वसंत बापटांचे समकालीन कवींमध्ये जसे स्वतंत्र स्थान आहे, तसेच ते समग्र मराठी कवितेतही आहे.

– वि. शं. चौघुले

**संदर्भ :**

*१. गुंजाळ बाळासाहेब; 'वसंत बापट: कवी आणि कविता', अक्षरमुद्रा प्रकाशन, नाशिक; २००६.*

ब

## बाबर, सरोजिनी कृष्णराव

**लोकसाहित्य अभ्यासक**

**७ जानेवारी १९२० – २० एप्रिल २००८**

डॉ. सरोजिनी कृष्णराव बाबर ह्यांचा जन्म बांगणी (जिल्हा सांगली) येथे झाला. प्राथमिक व माध्यमिक शिक्षण इस्लामपूर येथे झाले. वडील शिक्षक असल्याने बालवयातील संवेदनक्षम मनावर शैक्षणिक वातावरणाचा, अभ्यासाचा परिणाम होत होता. विविध क्षेत्रांतील नामवंत मंडळींची उठबस घरात असल्यामुळे बहुआयामी



व्यक्तिमत्त्व घडण्याची बीजे त्याच काळात रुजली. १९४० साली शालान्त परीक्षा (मॅट्रिक) उत्तीर्ण. सर परशुरामभाऊ महाविद्यालय, पुणे येथे महाविद्यालयीन शिक्षण घेतले व मुंबई विद्यापीठाची बी.ए.ही पदवी प्राप्त केली. प्रथम क्रमांक मिळवून सुवर्णपदकाची धनी होऊनही ते मिळाले मात्र नाही. पुढे एम.ए. आणि 'मराठी साहित्यात लेखिकांचे योगदान' हा प्रबंध लिहिला. समाजकार्याची आवड असल्यामुळे एकीकडे साहित्यात घोडदौड चालू असताना दुसरीकडे स्वातंत्र्याच्या चळवळीत उडी घेतली.

महाविद्यालयीन शिक्षणात प्रा. श्री. म. माटे, प्रा. वाळिंबे, प्राचार्य सोनोपंत दांडेकर यांचे मौलिक मार्गदर्शन व संस्कार झाले. 'लई' या शब्दावरून महाविद्यालयात अवहेलना झाली, पण अपमान गिळून स्वाभिमानाने ध्येयवेडे मन साहित्यात रमत राहिले. लोकसाहित्याची आवड असल्याने वडील चालवीत असलेल्या 'समाजशिक्षणमाला' या पुस्तकाचे संपादन कार्य १९५० पासून केले व जवळजवळ साडे-पाचशे पुस्तके प्रकाशित केली. लोकसाहित्य हे कालप्रवाहात लुप्त होण्यापूर्वी जतन करून ठेवण्याची गरज आहे, असा त्यांचा आग्रह होता. त्यासाठी त्यांनी शासनाचे दरवाजे ठोठावले. सानेगुरुजींपासून प्रेरणा घेऊन १९५५ मध्ये 'महाराष्ट्र लोकसाहित्य समिती'ची स्थापना केली या समितीतर्फे १४ पुस्तके प्रकाशित केली.

१९५२ मध्ये काँग्रेसच्या तिकिटावर शिराळे मतदार संघातून निवडून येऊन विधानसभेत प्रवेश झाला. १९५७ पर्यंत विधानसभेच्या सदस्या होत्या. पुढे १९६४ ते १९६६ विधानपरिषदेच्या सदस्या म्हणून काम केले.

१९६८ ते १९७४ या काळात राज्यसभेच्या सभासद झाल्या. अशी अनेक राजकीय पदे मिळाली, पण मूळ पिंड साहित्यिकाचा, समाजकारणाचा आणि लोकशिक्षकाचा होता. सरोजिनीबाईंना छत्तीस कथा, सात कादंबऱ्या, दोन प्रदीर्घ प्रबंध ह्यांचे लेखन केले व ललित लेख आणि सहाशे ग्रंथांचे संपादन केले. लोकसाहित्याचे सर्व संस्कार घेऊन त्यांच्या कथा प्रकट होतात. त्यांच्या कथांतून ग्रामीण स्त्रियांचे जीवन, त्यांच्या व्यथा, चालीरिती यांचे मनोज्ञ दर्शन घडते. 'कमळाचं जाळं', 'अजिता', 'अठवतंय तेवढे सांगते', 'स्वयंवर' इत्यादी लक्षणीय कादंबऱ्या त्यांनी लिहिल्या 'झोळणा' हा काव्यसंग्रह प्रसिद्ध. 'अशानं असं झालं', 'अशीच एक आठवण', 'असू दे मी खुळी', 'काळी मखमल', 'भारतीय स्त्री-रत्ने', 'वडीलधारी माणसं', 'देवदर्शन', 'बांधिलकी' इत्यादी साहित्य लोकप्रिय झाले. त्याशिवाय 'एक होता राजा', 'साजशिंगार', 'जनलोकांचा सामवेद' आदी लोकसाहित्यविषयक ग्रंथांचे संपादन केले.

लोकसाहित्याच्या प्रसारकार्याबरोबरच काव्य, कथा, कहाण्या, म्हणी, उखाणे इत्यादींचे जतन ध्वनिमुद्रणाद्वारे करणे, लोकसंगीत, लोकनृत्य ह्यांचे कार्यक्रम सादर करणे, लोकसाहित्याचे प्रदर्शन भरवणे, विधानसभेत आणि राज्यसभेत आपल्या भाषणांतून स्त्रियांचे प्रश्न तसेच गोंधळी, कडकलक्ष्मी, बहुरूपी, तमासगीर, शाहीर यांच्यासाठी काहीतरी केले पाहिजे याची दखल त्यांनी घेतली. 'माझ्या खुणा माझ्या मला' हे आत्मचरित्रही त्यांनी लिहिले. त्यांची 'रानजाई' ही मराठी अस्मितेची ओळख सांगणारी सांस्कृतिक मालिका दूरदर्शनवर अतिशय लोकप्रिय झाली. संगीतकार गोंविदराव टेंबे ह्यांच्या आग्रहामुळे आकाशवाणीवरील कार्यक्रमात त्यांनी म्हटलेले भोंडल्याचे गाणे त्यांना लोकसंगीत गायकांच्या यादीत मानाने बसवून गेले.

''डॉ. सरोजिनी बाबर यांनी लोकजीवनात जाऊन लोकधन वेचले व त्यांच्या आविष्कारातून मौखिक लोकवेध उभा केला.'' असे उद्गार लोकसाहित्याचे गाढे अभ्यासक रामचंद्र देखणे यांनी काढले आहेत. लोकसाहित्याची विलक्षण आवड असणाऱ्या सरोजिनी बाबरांच्या साहित्यातून त्याचा प्रत्यय आपणास येतो.

पुणे विद्यापीठ आणि टिळक महाराष्ट्र विद्यापीठ यांनी डी. लिट. ही पदवी देऊन आणि पुणे विद्यापीठाने 'जीवन साधना गौरव' हा पुरस्कार देऊन त्यांसा सन्मान केला.

– निशा रानडे

**संदर्भ :**

*१. खांडगे मंदा आणि इतर, संपादक; 'स्त्री साहित्याचा मागोवा', खंड – २; साहित्यप्रेमी भगिनी मंडळ, पुणे.*

*२. लोकसत्ता; २१ एप्रिल २००८*

*३. मानिनी दिवाळी अंक; २००८*

## बाबा पद्मनजी

**निबंधकार, कोशकार, आत्मचरित्रकार, कादंबरीकार**

**मे १८३१ – २९ ऑगस्ट १९०६**



बाबा पद्मनजी यांच्या वडिलांचे नाव पद्मनजी माणिकजी होते. कासार जातीत जन्मलेल्या बाबा पद्मनजी यांनी ख्रिस्ती धर्माची दीक्षा घेतली. ३ सप्टेंबर १८५४ला धर्मांतर करून ते ख्रिस्ती झाले.

बाबा पद्मनजी बहुप्रसव ग्रंथकार म्हणून ओळखले जातात. ते मराठी–ख्रिस्ती वाङ्मयाचे जनक होते. आत्मचरित्र, चरित्र, कथा, कादंबरी, टीका, कोश, इतिहास, स्त्रीविषयक, शिक्षणविषयक, धार्मिक, स्फुट असे सर्व वाङ्मयप्रकार त्यांनी लिहिले. 'उदयप्रभा', 'प्रभोदय', 'सत्यदीपिका' (धाकटी व थोरली), 'सत्यवादी', 'कुटुंबमित्र', 'ऐक्यदर्शन' इत्यादी नियतकालिके चालविली. त्यांच्या प्रचंड ग्रंथसंपदेमुळे ते ख्रिस्ती वाङ्मयाचे 'भीष्माचार्य' म्हणून ओळखले जातात. त्यांनी नव्या समाजघडणीचे महत्त्व ओळखून समकालीनांपेक्षा वेगळे कार्य केले. ऐन तारुण्यात ख्रिस्ती धर्माकडे आकृष्ट होऊन ख्रिस्ती धर्माचा स्वीकार श्रद्धापूर्वक केला. हिंदू धर्माचा व ख्रिस्ती धर्माचा तुलनात्मक अभ्यास केला, शाळा चालविल्या, आयुष्यभर कर्मयोग अंगीकारला.

ते शालेय जीवनापासून लेखन करीत असत. १८५१ पासून १८५४ पर्यंत त्यांची ५ पुस्तके प्रकाशित झाली होती. दक्षिणा प्राईज सोसायटी त्राक्ट सोसायटीकडून त्यांना रोख बक्षिसेही मिळाली होती. लेखनाबरोबर मुद्रणाबाबतही ते साक्षेपी होते. वाचकांच्या सोयीसाठी पुस्तिकांनाही सूची जोडलेली असे. पुस्तके अधिकाधिकांपर्यंत पोहोचण्यासाठी ते जाहिराती करीत. प्रकाशनपूर्व सवलती जाहीर करीत असत.

पद्मनजींची 'यमुनापर्यटन' ही मराठीतील आद्य सामाजिक कादंबरी मानली जाते. १९व्या शतकातील सामाजिक वास्तवाचे प्रत्ययकारी चित्रण, उत्कट व्यक्तिचित्रण, आत्मनिवेदन, संवाद, पत्रलेखन, कथन प्रसंगांतून केलेले स्वभाव रेखाटन; साधी, चटकदार व गोड भाषा; प्रौढ शैली, वेचक शब्दसंपदा ही कादंबरीची वैशिष्ट्ये सांगता येतील. महाराष्ट्रातल्या विधवांची त्या काळीही शोचनीय स्थिती होती, त्याचे हृदयद्रावक चित्रण या कादंबरीत आहे. काही समीक्षकांच्या मते, विधवांचा प्रश्न केवळ निमित्तमात्र असून ख्रिस्तीधर्म प्रचार व प्रसार हा मूळ हेतू असावा.

१९८८ साली 'अरुणोदय' हे त्यांनी लिहिलेले आत्मचरित्रही महत्त्वपूर्ण आहे. आपण का व कसे ख्रिस्ती झालो, याचे वर्णन त्यात अंतर्भूत केले आहे. हिंदू धर्मातील रूढी, चाली–रीतींची कल्पना देत, हिंदू धर्मातील रूढिप्रिय समाजाचे जिवंत वर्णन ते करतात. ललित वाङ्मयक्षेत्रातला हा एक चमत्कार मानला जातो. 'अरुणोदय' हे 'प्रसिद्धीचा प्रकाश' लाभलेले असे अव्वल दर्जाचे मराठीतील पहिले आत्मचरित्र आहे.

तत्कालीन जग, भोवताली वावरणारी व्यक्तिमत्त्वे, त्यांची मनोहारी शब्दचित्रे, तत्कालीन लोकसमजुती, प्रस्थे, धेंडे, लोकविलक्षण व्यक्ती, धर्म व नैतिकता यांची झालेली फारकत, मराठमोळी साधी भाषा, वाचकाला आपलेसे करण्याची हातोटी ह्या साऱ्या वैशिष्ट्यांमुळे ते जिव्हाळ्याचे आत्मकथन वाटते. त्यांचा आयुष्यक्रम म्हणजे सत्याचा शोध व ध्येयाची साधना वाटते.

या आत्मचरित्राची इंग्रजी, जर्मन, चिनी या पाश्चात्त्य भाषांत तर तमिळ, तेलगू, बंगाली, उर्दू ह्या भारतीय भाषांत भाषांतरे प्रसिद्ध झाली आहेत. हा तत्कालीन समाज, संस्था व व्यक्तींचे दर्शन घडविणारा ग्रंथ मानला जातो.

पद्मनजींच्या लिखाणाचे ३ खंड प्रसिद्ध झाले आहेत.

१. मुंबईच्या फ्री चर्च मिशनच्या शाळेत जाईपर्यंतचा १८४९ पर्यंतच्या नेपोलिअनची शकुनवंती, बोधनिबंध, वर्तमान पत्रातील फुटकळ लेखनाचा.

२. १८५०-१८५४ फ्री चर्च शाळा ते ख्रिश्चन धर्म स्वीकारण्यापर्यंतचा स्त्रीविद्याभ्यास निबंध, हिंदू लोकांच्या सणांविषयी निबंध, व्यभिचारनिषेधक बोध, कुटुंबसुधारणा, सर्वसंग्रही उर्फ निबंधमाला, ५ निबंधस्वरूप पुस्तके, तत्कालीन जिव्हाळ्याच्या विषयावर निबंधलेखन करताना ख्रिस्तप्रणीत मानवतावादाचा पुरस्कार केला.

३. १८५५-१९०६ यमुनापर्यटन, सत्यदीपिका (धाकटी व थोरली) प्रभोदय, उदयप्रभा, सत्यवादी, ऐक्यदर्शक पत्रिका इत्यादी.

पद्मनजींच्या बालपणीचा काळ हा देशातील नवजागृतीचा काळ होता. त्या काळातील ज्ञानोदय, ज्ञानप्रकाश, प्रभाकर वगैरे नियतकालिकांचा पद्मनजींवर प्रभाव दिसतो. लहानपणी रामविजय, हरिविजय, पांडवप्रताप यांची पारायणे केल्याने श्रीधर कवींच्या सुबोध, सोज्ज्वळ, प्रसन्न शैलीचा प्रभाव त्यांच्या लेखनावर जाणवतो. पत्रलेखन हाही पद्मनजींचा विशेष असून त्यांनी आयुष्यभरात हजारो पत्रे लिहिली.

वयाच्या ७५व्या वर्षी पद्मनजी यांचे निधन झाले. ख्रिस्ती लोकरत्न, नामांकित वीर पुढारी, मसलतीचा आधार, गरिबांचा आश्रय, बहुतांचा प्रेमळ मित्र या विशेषणांनी त्यांना संबोधले गेले. त्यांच्या स्मृतिप्रीत्यर्थ शालान्त परीक्षेत जास्तीतजास्त गुण मिळवणाऱ्या ख्रिस्ती विद्यार्थ्याला 'बाबा पद्मनजी स्कॉलरशिप' दिली जाते.

– प्रा. संध्या टेंबे

**संदर्भ :**

*१. पद्मनजी बाबा; 'अरुणोदय', बॉम्बे ट्रॅक्ट अ‍ॅण्ड बुक सोसायटी, मुंबई १९५५.*

## बारलिंगे, सुरेंद्र शिवदास

**कथाकार, कादंबरीकार, तत्त्वचिंतक, ललितलेखक**

**२० जुलै १९१९ – १९ डिसेंबर १९९७**



सुरेंद्र बारलिंगे यांचा जन्म आणि बालपण नागपूर येथे गेले. त्यांचे वडील वकील होते, तसेच ते अनेक विषयांचे विद्वानही होते. गांधीजींच्या आवाहनानुसार त्यांनी वकिली व्यवसायाचा त्याग केला. सुरेंद्र बारलिंगे यांना शाळेत न घालता एका खाजगी शाळेत शिक्षण दिले गेले. १९३४ साली मॅट्रिक झाल्यानंतर त्यांनी मॉरिस कॉलेजमधून बी.ए.ची पदवी घेतली. त्याच काळात ते सामाजिक चळवळीत सक्रिय होते.

१९४२ साली ते एम.ए.ची परीक्षा तत्त्वज्ञान विषय विषय घेऊन प्रथम क्रमांकाने उत्तीर्ण झाले. त्यानंतर, 'इंडियन इन्स्टिट्यूट ऑफ फिलॉसॉफी' या अमळनेरच्या संस्थेत ते 'फेलो' म्हणून रुजू झाले. १९४२ ते १९४५ या काळात 'भारत छोडो' चळवळीत त्यांचा सहभाग होता. पुढे छत्तीसगड कॉलेज, हैद्राबाद व नांदेड येथील महाविद्यालयात १९५० ते १९५८ या काळात त्यांनी अध्यापन केले. नांदेड येथील महाविद्यालयाचे ते पहिले प्राचार्य होते.

१९५७ साली त्यांनी तत्त्वज्ञानात पीएच.डी. मिळवली. १९५८ साली त्यांनी ऑक्सफर्डला प्रयाण केले. १९६२ साली युगोस्लाव्हियातील झागरेब विद्यापीठात त्यांनी प्राध्यापक म्हणून काम केले. काही काळ दिल्ली विद्यापीठात काम करून १९६८ साली ते ऑस्ट्रेलियात गेले. नंतर त्यांनी पुणे विद्यापीठात तत्त्वज्ञान विभागाचे प्रमुखपद (१९७० ते १९८०) सांभाळले. दरम्यान, १९७६ साली सिमला येथील भारतीय उच्च अध्ययन संस्थेत 'फेलो' म्हणून त्यांची नेमणूक झाली. १९८१ ते १९८७ या काळात ते 'महाराष्ट्र राज्य साहित्य संस्कृती मंडळा'चे अध्यक्ष होते. डॉ. बारलिंगे

यांच्या नावावर तेरा मराठी, सहा हिंदी, आठ इंग्रजी पुस्तके आहेत. 'क्रांतिपूजा', 'सौंदर्याचे व्याकरण', 'तर्करेखा' या तत्त्वज्ञानविषयक पुस्तकांव्यतिरिक्त, 'मी पण माझे' ही कादंबरी; 'माझे घर माझा देश', 'गोष्टीचं गाठोडं' हे कथासंग्रह; 'पुन्हा भेटू या', 'आभाळाच्या सावल्या' हे ललितलेखसंग्रह, ही त्यांची काही पुस्तके होत.

'मी पण माझे' ही लैंगिक विषयावरील कादंबरी आहे. विषय खूप स्फोटक असूनही कादंबरीला तात्त्विक, वैचारिक पार्श्वभूमी न लाभल्यामुळे ती अपेक्षेइतकी प्रभावी होत नाही, असे समीक्षकांचे मत आहे.

तत्त्वज्ञानविषयक लेखनातून बारलिंगे यांची विचारपद्धती अगदी तर्कशुद्ध आहे हे लक्षात येते. कुठल्याही गोष्टीचे विश्लेषण ते मार्मिकपणे करत. त्यांनी 'इंडियन फिलॉसॉफिकल क्वार्टरली' (परामर्श) आणि 'थिंकर्स अकॅडमी जर्नल' (ताज) ही नियतकालिके सुरू केली. तत्त्वज्ञान या विषयाचे त्यांचे अनेक निबंध वेगवेगळ्या राष्ट्रीय-आंतरराष्ट्रीय नियतकालिकांमध्ये प्रसिद्ध झालेले आहेत.

– अशोक बेंडखळे

## बालकवी

***ठोमरे त्र्यंबक बापूजी***

**कवी, समीक्षक**

**१३ ऑगस्ट १८९० – ५ मे १९१८**

त्र्यंबक बापूजी ठोमरे यांचा जन्म जळगाव जिल्ह्यातील धरणगाव येथे झाला. वडील पोलीस खात्यात फौजदार असल्याने, त्यांच्या फिरतीच्या नोकरीमुळे बालकवींचे शिक्षण रखडले. तत्कालीन क्रांतिकारक व देशभक्तीपर वातावरणामुळे इंग्रजी शिक्षणाकडे दुर्लक्ष झाले. एरंडोल, यावल, जामनेर, बेटावर येथे त्यांचे शिक्षण जेमतेम इंग्रजी तिसरीपर्यंत झाले. त्यानंतर एक वर्ष ते धुळे येथे समर्थभक्त कै. शं. कृ. देव यांच्या प्रिपरेटरी इंग्रजी शाळेत शिकले. तेथे त्यांचा दासबोधाचा अभ्यास झाला.



मोठी बहीण जीजी यांचा त्यांच्यावर मोठा प्रभाव होता. त्यांनी लहानपणापासून पोथ्या-पुराणे, महाभारत, मोरोपंत वगैरेंचे वाचन केले. वयाच्या पंधराव्या वर्षी राष्ट्रीय कीर्तनकार रा. कृ. वैद्य ऊर्फ 'वनवासी' यांच्याबरोबर त्यांनी उत्तरभारतात प्रवास केला. कीर्तनासाठी गीतांचे लेखन केले. बडोदे येथेही त्यांनी शिक्षणासाठी काही काळ वास्तव्य केले. तेथे त्यांना सुप्रसिद्ध गुजराती कवी 'कलापी' यांच्या काव्याचा परिचय झाला. वयाच्या तेराव्या वर्षी त्यांनी पहिली कविता लिहिली. तिचे नामकरण पुढे त्यांच्या कवितांचे पहिले संपादक प्रा. भा. ल. पाटणकर यांनी 'वनमुकुंद' असे केले.

१९०७ साली जळगाव येथे भरलेल्या पहिल्या कविसंमेलनात त्यांनी धीटपणे कविता सादर करून तत्कालीन कवींचे व रसिकांचे लक्ष वेधून घेतले. संमेलनाध्यक्ष कर्नल कीर्तिकर यांनी त्यांचा 'बालकवी' म्हणून गौरव केला व तेव्हापासून 'बालकवी' हे नाव रूढ झाले. तेथेच रेव्हरण्ड नारायण वामन टिळक यांच्याशी ओळख झाली. व त्यांच्या घरच्या नगर येथील वास्तव्यामुळे त्यांच्या व्यक्तिमत्त्वाला नवे पैलू पडले व त्यांची कविता बहरली. लक्ष्मीबाई टिळकांच्या 'स्मृतिचित्रे'मध्ये बालकवींचे हृद्य चित्र आहे. 'ठोमरे हा कवीपेक्षा 'बाल' अधिक होता', असे त्यांनी म्हटले, आहे.

वडिलांच्या मृत्यूनंतर तत्कालीन प्रथेप्रमाणे एका वर्षाच्या आतच पार्वतीबाईंशी त्यांचा विवाह झाला. पण दोघांचे सूर शेवटपर्यंत जुळले नाहीत. त्यानंतर नगर येथील मिशन स्कूलमध्ये त्यांचा इंग्रजी पाचवीत प्रवेश झाला. पुण्यातल्या वास्तव्यात सुप्रसिद्ध कवी व नाटककार राम गणेश गडकरी यांच्याशी त्यांचा परिचय व घनिष्ठ मैत्री झाली. पुढे पुण्यात मिशन स्कूलमध्ये, तसेच महाबळेश्वर येथे शिक्षक म्हणून त्यांनी मिशनच्या शाळेत नोकरी व मडमांना मराठी शिकवण्याचे काम काही काळ



Copied [illegible] भाई गल्ली.
अहमदनगर. १४।१।१३

प्रियबंधु:- मुंबईहून आल्या पासून आजा[illegible]
झालो त्यामुळे कांहींच करतां आले नाहीं. आता
[illegible] आपल्या दोन कविता व 'निर्झर' मनोरंजन
कडे पाठवून देतो. [illegible] प्रकृती ताळ्यावर येत
नाहीं. असो.

'निर्झर' या कवितेंत लिहितां लिहितां फिरून
फारच फरक झाला आहे व पहिल्यान दुसऱ्या नि-
र्झरशीं कोणता [illegible]
येत नाहीं पहिला आपण ऐकला आहे आता
सोबत दुसरा म्हणजे [illegible] बदल होऊन बनलेले
निर्झर आपणाकडे पत्रा सोबत पाठवीत आहे
जर त्या पहिल्या पेक्षां आपणांस हा पसंत
असेल तर परभारें मनोरंजन कडे पाठवा
नाहींतर मला पत्र लिहा मी पुढच्या [illegible]
[illegible] लिहून पाठवतो [illegible] तेनुलकर
[illegible] आहेच [illegible] पत्र पाठविण्यास
उशीर होतो [illegible] क्षमा असावी.
[illegible] त्र्यं. ठोंबरे

खटका उडालेला असतानाच, रमाईला भेटण्यासाठी ते घाईघाईने जळगावला निघाले. भादली स्टेशनजवळ विमनस्क स्थितीत रेल्वेचे रूळ ओलांडत असताना त्यांना इंजिनाची धडक बसून त्यांचा मृत्यू झाला. तो अपघात होता की, आत्महत्या, याचे रहस्य अजूनही गूढ आहे. रमाईचेही गूढ तसेच!

**सामर्थ्यवान निसर्गकवी**

आधुनिक मराठी कवितेचे कुलगुरू केशवसुत यांचा प्रभाव ज्यांच्यावर पडला, त्यांत रेव्हरण्ड टिळक, गोविंदाग्रज, विनायक व बालकवी हे प्रमुख होत. मात्र, केशवसुत परंपरेचा परिणाम बालकवींवर अल्प प्रमाणात झाला.! तो 'धर्मवीर'सारख्या 'तुतारी'च्या क्षीण पडसादापुरताच जाणवतो. निसर्गकविता हेच बालकवींचे सामर्थ्य! केशवसुतांची सामाजिक दृष्टी, रे. टिळकांची आध्यात्मिकता, गोविंदाग्रजांची प्रणयप्राधान्यता यांहून बालकवींची सुरुवातीची निसर्गकविता सौंदर्याने व निसर्गातील दिव्यत्वाच्या साक्षात्काराने रसरसलेली, तर उत्तरायुष्यातील कविता निराशेने, परिस्थितीचे चटके बसून काळवंडलेली आहे. 'काव्यदेवता अंतरली मज गरिबाला आज' असे खिन्न उद्गारही ती काढते. 'कविबाळे ती खेळत होती,' तेव्हा कोठूनतरी तीव्र विषारी वारा आला आणि ती स्वप्नसृष्टी जळाली व मग एक 'अंधारयात्रा' सुरू झाली. 'काय बोचते हृदयाच्या अंतर्हृदयाला' हे कळेनासे झाले. याचे तीव्र पडसाद 'खेड्यातील रात्र'सारख्या कवितेत व 'औदुंबर' या गाजलेल्या कवितेत आहेत.

पहिल्या खंडातील निसर्गकविता अनेक अंगांनी फुलली, बहरली. १९१० सालानंतरचे बालकवींचे नगर,

केले. वडील भाऊ क्रांतिकारकांच्या चळवळीशी संबंधित होते. त्यांच्या आग्रहामुळे नोकरी सोडून खेड्यात वास्तव्य करण्याचा प्रयोग फसल्यावर ते नगरच्या शाळेत नोकरीसाठी परत आले.

जळगाव येथील सुप्रसिद्ध वकील सोनाळकर यांच्याशी बालकवींची मैत्री झाली. त्यांच्यामुळेच आयुष्यातील 'रमाई' हे एक गूढ प्रकरण ठरले.! ५मे रोजी 'आई (रमाई) आली, भेटायला या', अशी सोनाळकरांची तार मिळाल्यावर आणि घरी पत्नी व भाऊ यांच्याशी काही

ब

पुणे येथील वास्तव्य, रेव्हरण्ड टिळक पति-पत्नी, तात्यासाहेब केळकर, श्री. कृ. कोल्हटकर, गडकरी यांचा सहवास; यांमुळे त्यांनी 'अरुण', 'बालविहग', 'आनंदी आनंद गडे', 'फुलराणी', 'निर्झर', 'श्रावणमास' अशी मराठीतील अजरामर गीते त्यांनी लिहिली. आजही मराठी निसर्गकविता ग्रेस, महानोर यांसारख्या कवींनी समृद्ध केली असली, तरी बालकवींच्या वरील गीतांचे महत्त्व अबाधित आहे. ''मराठीतील खऱ्या अर्थाने नवकवी एकच व तो म्हणजे बालकवी'' असे बा. सी. मर्ढेकरांनी म्हटले व त्यामुळे पुन्हा एकदा बालकवींच्या कवितेने रसिकांचे लक्ष वेधून घेतले. खुद्द मर्ढेकरांनाही बालकवींप्रमाणेच दोन मर्ढेकर दिसतात, हाही एक योगायोग. मात्र, मर्ढेकरांची कविता पुढे वेगळ्या वाटेने गेली. बालकवींचे तसे झाले नाही. त्यांचे कविताविश्व मर्यादितच राहिले. 'आनंदी आनंद गडे' म्हणत निसर्गात रंगून गेलेले व 'खेड्यातील रात्र'सारख्या कवितांत निसर्गाची भयाण रूपे रंगवणारे बालकवींचे व्यक्तिमत्त्व दुहेरी व दुभंगलेले वाटते.

केशवसुतांप्रमाणे त्यांचा पिंड वैचारिक नव्हता. १९१४ साला पर्यंतचा काळ निसर्गात रंगून जाऊन एकरूप होण्याचा, तर पुढचा १९१६ साला नंतरचा काळ भयाण आर्थिक परिस्थितीचा काढा गळ्याखाली उतरल्यानंतर आलेली निराशा, औदासीन्य व विमनस्कतेचा आहे. त्यांच्या कवितेतील निसर्गचित्रणाबद्दलही समीक्षकांचे मतभेद आहेत. त्यांच्या निसर्गाच्या स्थलकालाविषयी काहींनी शंका व्यक्त केलेली आहे.

श्री. म. माटे, रा. शं. वाळिंबे इत्यादींनी त्यांच्या निसर्गाला प्रादेशिकतेचे रंग नसल्याचा आक्षेप घेतलेला आहे. ''त्यांचा निसर्ग वास्तव सृष्टीपेक्षा कल्पनांचे रंगरूप घेऊन आलेला दिसतो. त्यांच्या कवितेत निसर्गावर मानवी भावनांचा आरोप करणारी चेतनोक्ती नाही. त्यांचा निसर्ग स्वतःच बालरूप घेतो. निसर्गाची आकृती तीच ठेवून त्याचा आकार बदलवणारा आहे. तो प्रतिनिसर्ग आहे, जपानी 'बॉनसाय' केलेला आहे'', असे प्रा. द. भि. कुळकर्णी यांनी म्हटले आहे. मात्र, कुळकर्ण्यांनी बालकवींच्या निसर्गाची बॉनसायशी केलेली तुलना पटण्यासारखी नाही. कारण, निसर्गाची कापाकापी व मोडतोड करून व त्याला खुरटवून टाकण्याची क्रूरता बॉनसायमध्ये आहे. ''बालकवींचा निसर्ग बालरूप असला, तरी तो चैतन्याने रसरसलेला व जिवंत आहे. तो त्यांच्या ताणलेल्या 'इमॅजिनेशन'मधून निर्माण झालेला आहे'', असे प्रा. कृ. ब. निकुम्ब यांनी म्हटलेले आहे.

त्यांचे साम्य अंगणात दाणे टिपणाऱ्या चिमण्या पाहून आपणही चिमणी आहो असे वाटणाऱ्या कीट्स या कवीशी आहे. त्यांची निसर्गसृष्टी ही मनःकल्पित मायानगरी आहे. तिथे दुःख व हीन भावना ह्यांना स्थान नाही. ते त्यांच्या निसर्गसृष्टीशी पूर्णतः एकरूप झालेले वाटतात. बहुचर्चित 'औदुंबर' या कवितेतील पाण्यात पाय टाकून स्थितप्रज्ञ बसलेल्या औदुंबराप्रमाणे त्यांची कविप्रकृती आहे.

त्यांच्या अन्य प्रकारच्या कवितेची फारशी समीक्षा झालेली नाही, याचे कारण त्यांच्या निसर्गकवितेची रसिक मनावर पडलेली जबरदस्त मोहिनी हेच आहे. मात्र, डॉ. माधवराव पटवर्धन यांनी म्हटल्याप्रमाणे त्यांची उदासीनतेची गाणीही जिव्हाळ्याची व हृदयाच्या अंतर्हृदयातून आलेली असल्याने काळजाला भिडतात. त्यात एक प्रकारचे वृत्तिगांभीर्य जाणवते.

मराठी कवितेत बालकवींचे स्थान अत्यंत महत्त्वाचे आहे. ''केशवसुतांचे मन सृष्टीच्या गोचर सौंदर्यापेक्षा तत्त्वाचा शोध घेण्यात रंगलेले, तर बालकवींचे सौंदर्यपिपासू मन क्षणोक्षणी नित्यनूतन रूप धारण करणाऱ्या सृष्टीच्या गोचर सौंदर्यात रंगलेले होते; परंतु, शिवाय त्यातील चैतन्यतत्त्वाचाही एकसारखा शोध घेत होते,'' असे वा. ल. कुलकर्णी यांनी म्हटले आहे, तर गंगाधर गाडगीळ यांनी म्हटले आहे की, ''ज्यांना खरोखरच कलात्मक मूल्य नाही, पण ज्यांच्यामुळे मनाला भुरळ पडते, मन वेडावून जाते, असे काही गुण बालकवींमध्ये आढळतात.''

पण बालकवी हे सुंदरतेच्या सुमनावरचे दव चुंबून घेणारे व त्यात पलायनवाद शोधणारे केवळ स्वप्नाळू

कवी नव्हेत. 'आनंदी आनंद गडे' म्हणून नाचणारे बालकवी जितके खरे, तितकेच 'पारव्या'त खिन्न, निरस एकांतगीत गाणारे बालकवीही खरे वाटतात.

– डॉ. प्रल्हाद वडेर

**संदर्भ :**
*१. अधिकारी गो. गो.; 'बालकवींची कविता'; १९२५.*
*२. प्रा. पाटणकर भा.ल; 'बालकवींची समग्र कविता' १९४२.*
*३. ठोमरे पार्वतीबाई; 'समग्र बालकवी' १९६६.*
*४. आपटे नंदा, नाडकर्णी एस.एस.; 'समग्र बालकवी' २००५.*
*५. मराठे कृ. बा; 'बालकवी', चरित्र; १९६२.*

## बाळ फोंडके

☞ **फोंडके बाळ**

## बाळ, विद्या

**संपादक, कथाकार**
**१२ जानेवारी १९३७**



पूर्वाश्रमीच्या सुधा केशव केळकर म्हणजेच विद्या बाळ यांचे बी. ए. पदवीचे शिक्षण अर्थशास्त्रातून पूर्ण झाले. 'स्त्री' मासिकात संपादक म्हणून कामाला सुरुवात केली. तीन वर्ष मुख्य संपादक म्हणून काम केले. 'मिळून साऱ्याजणी' या मासिकाच्या पहिल्या अंकापासून (१९८९) संपादक, नारी समता मंच या संघटनेच्या संस्थापक, ग्रामीण स्त्रियांसाठी राबवल्या जाणाऱ्या 'ग्रोइंग टुगेदर' या प्रकल्पात प्रकल्पप्रमुख, म्हणून काम केले. स्त्रीविषयक परिषदांच्या निमित्ताने अनेक देशांना भेटी दिल्या.

लिखाणाची सुरुवात कथालेखनाने केली. परंतु त्यानंतरच्या काळात विविध क्षेत्रांत भेटलेली माणसे आणि त्यांचे प्रश्न अधिक अर्थपूर्ण वाटल्यामुळे त्यासंबंधीचे स्फुटलेखन केले. सामाजिक बांधिलकीची भावना आणि स्त्रीविषयक अन्यायाची जाणीव हा त्यांच्या सर्व लिखाणाचा गाभा आहे. आजूबाजूला घडणाऱ्या घटना, परिषदा, नाटक, साहित्य यांमधून उपस्थित केलेले प्रश्न यासंबंधी लेखन केले. लिखाण करत असतानाच अंधश्रद्धा निर्मूलन, नर्मदा बचाव, पर्यायी विकासनीती यांसारख्या चळवळींत सक्रिय सहभाग घेतला. त्यामुळे सामाजिक प्रश्नांविषयीची जाणीव अधिक टोकदार आणि परिपक्व होण्यास मदत झाली. स्त्री-मुक्तीची चळवळ ही समाजपरिवर्तनाची चळवळ आहे, हे ओळखून लिंगभावविरहित समाजाच्या निर्मितीसाठी सातत्याने प्रबोधन आणि लेखन केले. संपादकीय लेखन हे अनेक व्यक्तींशी संवाद प्रस्थापित करण्याचे प्रभावी माध्यम कसे ठरू शकते याची जाणीव त्यांचे लिखाण वाचताना आणि त्याला मिळालेला प्रतिसाद वाचताना होते. त्यांची 'शोध स्वतःचा' (१९८४), 'संवाद' (१९९२ 'तुमच्या माझ्यासाठी' (१९९६), 'साकव' (२००२) ही पुस्तके प्रसिद्ध आहेत.

स्त्रियांवरील अत्याचाराच्या विरोधात स्त्री-पुरुषांनी एकत्र काम करण्याची आवश्यकता जाणून 'नारी समता मंच' या संघटनेमध्ये पुरुषांना सभासदत्व खुले ठेवले. या संघटनेद्वारा १९८९ साली एकट्या राहणाऱ्या स्त्रियांची परिषद भरविण्यात आली. एकटे राहताना स्त्रियांच्या वाट्याला येणारे दाहक अनुभव, त्यांनी केलेला प्रतिकार आणि कमावलेली आत्मनिर्भरता या सर्व अनुभवांचे संकलन आणि संपादन त्यांनी 'अपराजितांचे निःश्वास' (१९९४) या पुस्तकात केले तर 'डॉटर्स ऑफ महाराष्ट्र' (१९९७) या संपादित ग्रंथात महाराष्ट्रातील श्रेष्ठ स्त्रियांच्या कर्तृत्वाची ओळख करून दिली आहे. याशिवाय 'तेजस्विनी', 'जीवन हे असे आहे', 'रात्र अर्ध्या चंद्राची' या अनुवादित कादंबऱ्या आणि 'कमलाकी' (१९७२) हे चरित्र प्रसिद्ध आहे. 'कमलाकी'मध्ये वैधव्य आणि अनेक अडचणींसह मनस्वी आयुष्य जगताना स्त्री-शिक्षणासाठी झटणाऱ्या आणि परदेशात जाऊन डॉक्टरेट मिळवणाऱ्या कमलाबाई देशपांडे यांच्या धडाडीचे चित्रण आहे.

सामाजिक प्रश्नांचे सहृदय आणि वस्तुनिष्ठ आकलन त्यांच्या सर्व लिखाणाच्या केंद्रस्थानी आहे.

– मृणालिनी चितळे

**संदर्भ :**

१. *खांडगे मंदा, संपादक; 'स्त्री-साहित्याचा मागोवा'; साहित्यप्रेमी भगिनी मंडळ, पुणे; खंड १-३.*

**बाळकराम**

☞ **गडकरी, राम गणेश**

**बाळूताई खरे**

☞ **विभावरी शिरूरकर**

**बी**

***गुप्ते, नारायण मुरलीधर***

**कवी**

**१ जून १८७२ – १६ ऑगस्ट १९४७**



नारायण गुप्ते यांचा जन्म वऱ्हाडात, मलकापूर या गावी झाला. 'बी' कवींचे घराणे मूळचे कुलाबा (रायगड) येथील वाशीकर गुप्ते. या घराण्याकडे पूर्वी पेण, वाशी इत्यादी गावांचे कुळकर्णीपद होते. पुढे आर्थिक आपत्ती ओढवल्यामुळे 'बीं'चे वडील मुरलीधर गुप्ते हे कुलाबा सोडून वऱ्हाड प्रांतात येऊन स्थायिक झाले. बुलढाणा येथे डेप्युटी कमिशनरच्या ऑफिसमध्ये त्यांना नोकरी मिळाली. पुढे ते वकीलही झाले.

निवृत्तीनंतर वकिलीसाठी त्यांनी आधी यवतमाळ व नंतर वणी येथे वास्तव्य केले. 'बी' कवींच्या आईचे नाव लक्ष्मीबाई . 'बी' हे सर्वांत मोठे चिरंजीव, त्यामुळे आईवडिलांच्या माघारी संसाराची जबाबदारी येऊन पडल्याने 'बीं'चे शिक्षण मॅट्रिकपर्यंतही होऊ शकले नाही. त्यांचा पहिला विवाह मार्तंडराव प्रधान यांच्या मुलीशी झाला. ती लवकरच वारल्यामुळे दुसरा विवाह गोविंद रावजी मुळे यांची कन्या सुंदरा हिच्याशी झाला. तेव्हा त्यांचे वय १६-१७ होते. त्यांची नोकरी कारकुनाची होती. नोकरीच्या निमित्ताने वाशीम, मूर्तिजापूर इत्यादी ठिकाणी बदल्या होत शेवटी अकोला येथे त्यांची नायब तहसीलदार म्हणून नेमणूक झाली; पण पुन्हा कारकून म्हणून नेमणूक होऊन, पुढे जून १९२९ मध्ये ते सेवानिवृत्त झाले. त्यांचे सर्वांत धाकटे भाऊ गजाननराव हे पुढे अध्यात्माकडे वळले. ते 'गजानन महाराज' या नावाने प्रसिद्ध असून नाशिक येथे त्यांचे वास्तव्य होते. 'बी' कवींची वृत्तीही आध्यात्मिक होती. त्यांच्याबद्दल 'ही ईज ए वेलनोन पोएट बट अननोन सेन्ट', असे म्हटले जाते.

सन १९०८पर्यंत त्यांनी गद्यलेखनही केले व त्याची त्यांना आवडही होती. त्यांची पहिली कविता 'प्रणयपत्रिका' ही १८९१ साली 'करमणूक'मधून प्रसिद्ध झाली. पण, पुढे काव्यलेखनात बराच खंड पडून नंतर १९११ साली त्यांची 'वेडगाणे' ही कविता 'मनोरंजन'मध्ये प्रसिद्ध झाली व रसिकांचे त्यांच्याकडे लक्ष वेधले गेले. त्यामुळे 'वेडगाणे' हीच त्यांची पहिली कविता समजली जाते. येथून पुढे त्यांच्या कविता 'मनोरंजन', 'विविध ज्ञान विस्तार', 'महाराष्ट्र साहित्य' या नियतकालिकांमधून प्रसिद्ध होत गेल्या. पुढे 'फुलांची ओंजळ' या नावाने त्यांच्या कवितांचा संग्रह 'गोविंदाग्रज मंडळा'तर्फे सन १९३४ मध्ये श्री.प्र.के.अत्रे यांच्या विवेचन प्रस्तावनेसह प्रसिद्ध झाला. त्या संग्रहात 'बी' कवींच्या एकूण ३८ कविता समाविष्ट आहेत. या संग्रहाची दुसरी आवृत्ती सन १९४७ मध्ये प्रसिद्ध झाली व त्यात एकूण ११ नवीन कवितांची भर पडली.

'पिकले पान' या शीर्षकाखाली या ११ कविता स्वतंत्र विभागात संग्रहित करण्यात आलेल्या आहेत व त्याला वा.ना.देशपांडे यांनी प्रस्तावना लिहिली आहे. म्हणजेच, संख्येने या कविता अवघ्या ४९ आहेत. रसिकांचे लक्ष वेधून घेण्याचे सामर्थ्य यांतील बहुसंख्य कवितांमध्ये आहे. प्र.के. अत्रे यांनी ''नावाने 'बी'

असले, तरी कविता A1 आहेत,'' असे त्यांच्याबद्दल म्हटले आहे. 'बी' या टोपणनावासंबंधी कवी म्हणतात, ''बी ह्या नावाची आवड वा निवड माझी नाही. माझ्या 'वेडगाणे' या कवितेवर शंकर विठ्ठल दीक्षित या मित्राने 'Bee' हे नाव घातले, आणि कोणत्याही नावाशी माझे वाकडे नसल्यामुळे, मी ते तसेच पुढे चालू ठेवले.'' (वा. ना. देशपांडे यांना ७/८/१९२८ रोजी पाठविलेले पत्र.)

'बी' कवी हे केशवसुत, विनायक, रेव्हरण्ड टिळक यांच्या पिढीतील होते; पण त्यांच्या काव्यलेखनाचा काळ बघता ते गोविंदाग्रज, रेंदाळकर, बालकवी, नागेश यांच्या कालखंडातील ठरतात. आध्यात्मिक दृष्टी, तत्त्वचिंतन, विचारशीलता हे सारे त्यांच्या काव्यलेखनाच्या मुळाशी आहे. इंग्रजी, मराठी व संस्कृत या तीनही भाषांमधील ग्रंथ त्यांच्या वाचनात होते. वर्ड्स्वर्थ, कीट्स, शेले, कोलरीज, ब्राउनिंग, स्कॉट, शेक्सपिअर यांचे काव्य; मराठीतील ज्ञानेश्वर, तुकाराम, मुक्तेश्वर, मोरोपंत इत्यादी कवी; आणि रामजोशी, होनाजीबाळा यांच्या लावण्या, तसेच संस्कृतमधील भवभूती इत्यादी कवी त्यांच्या वाचनात होते. त्यांचे संस्कार 'बीं'च्या काव्यावर झालेले दिसतात.

काव्यलेखनाच्या संदर्भात, त्यांच्याआधी काव्यलेखनास प्रारंभ केलेल्या केशवसुतादी कवींची कविता त्यांच्यासमोर होती, तरी त्या कवितेचे अनुकरण 'बी' कवींनी केले नाही. तसेच, त्यांच्या बरोबरीने कविता लिहिणाऱ्या गोविंदाग्रज, बालकवी आदी कवींच्या काव्यलेखनाशीही ह्यांच्या कवितेचा धागा जुळलेला नाही. पुढील काळात त्यांच्या कवितेचे अनुकरण करणारेही कोणी दिसत नाही. त्या दृष्टीने 'बी' कवी हे एकांडे कवीच होते. अंतःप्रेरणा, स्वयंस्फूर्ती यांतून लिहिली गेलेली ही कविता फक्त त्यांच्याशीच जुळलेली राहिली. एकमार्गी आयुष्यक्रम, एकलकोंडा स्वभाव व प्रसिद्धि पराङ्मुख वृत्ती यांमुळे ते एकाकी कवी राहिले. कदाचित म्हणूनच 'त्यांची उपेक्षा झाली', असे म्हटले गेले असावे. याच्या जोडीलाच, त्यांच्या कवितेतील संस्कृत शब्दप्राचुर्य, सामासिक शब्दांचे आधिक्य, यांमुळे अर्थामध्ये येणारी क्लिष्टता, दुर्बोधता, विषय आणि रचना या बाबतींत जाणवणारी कठीणता अशा वैशिष्ट्यांमुळेही त्यांची कविता रसिकांपासून लांब राहिली.

'बी', च्या कवितेमधील हा उणेपणा लक्षात घेऊनही त्यांची कविता रसिकांचे लक्ष वेधून घेणारी ठरली. कारण, या कवितेने मराठी कवितेला एक वेगळा पैलू प्राप्त करून दिला. त्यांच्या 'वेडगाणे' या पहिल्याच कवितेने रसिकांचे त्यांच्या कवितेकडे लक्ष वेधले गेले, आणि त्यानंतर एकाहून एक अशा सरस कविता रसिकांसमोर येत राहिल्या. विशुद्ध प्रेमाचे गाणे गाणारी 'चाफा' कविता, पित्याचे प्रेमळ मन व्यक्त करणारी 'माझी कन्या', बंडाचे निशाण उभारून क्रांती करू पाहणाऱ्यांचा 'डंका', थोरातांच्या कमळेवरील वेधक कथाकाव्य 'कमला' त्याच जातीचा, महाराष्ट्राच्या प्रभातकाळात गायला गेलेला 'प्रभात-पोवाडा', संतांच्या परंपरेत बसणारी, अध्यात्माचा रंग घेऊन येणारी 'पिंगा' ही कविता, अशा सुंदर कवितांमुळे 'बी' कवींचे नाव रसिकांच्या मनावर कोरले गेले.

'चाफा' कवितेचा वेगवेगळा अन्वयार्थ लावण्यात समीक्षक आजही गुंतलेले दिसतात. संख्येने मोजकी; पण बहुगुणी, बहुमोल अशी 'बीं'ची कविता मराठी कवितेच्या प्रांतात गौरवाने उल्लेखिली जाते.

'आधुनिक कवींतील भीष्माचार्य', असा गौरव श्री. कृ. कोल्हटकरांनी केलेल्या कवीचे निधन छिंदवाडा येथे वयाच्या शाहत्तराव्या वर्षी झाले.

— डॉ. नंदा आपटे

**संदर्भ :**


१. *निर्मला कणेकर, संपादक; 'बी कवी : चरित्र व काव्यचर्चा'; श्रीलेखन वाचन भंडार, पुणे, १९७२.*

२. *अत्रे प्र.के : 'फुलांची ओंजळ '('बी' कवींची समग्र कविता), कॉन्टिनेन्टल प्रकाशन, पुणे, आवृत्ती सहावी; १९६९.*


ब

## बी. रघुनाथ

*कुळकर्णी, भगवान रघुनाथ*

**कथाकार, कवी, कादंबरीकार**

**२५ ऑगस्ट १९१३ - ७ सप्टेंबर १९५३**



बी. रघुनाथ यांचा जन्म सातोना, जिल्हा परभणी येथे झाला. बालपण सातोन्यातच गेले. वडिलांच्या मृत्यूनंतर हैद्राबादला नातेवाइकांकडे वास्तव्य. मॅट्रिकपर्यंत तेथे विवेकवर्धिनी या शाळेत शिक्षण घेतले, पण महाविद्यालयीन शिक्षण घेता आले नाही. १९३२ साली परभणी येथे आले व सरकारी बांधकाम खात्यात नोकरी केली. प्रतिकूल परिस्थितीशी झगडताना, आर्थिक हलाखी सोसताना, मानसिक ताण आणि जुलमी सरंजामी राजवट यांना तोंड देता-देता त्यांचे शरीर इतके खंगले की, कार्यालयाध्येच हृदयक्रिया बंद पडून त्यांचा मृत्यू झाला. अवघे चाळीस वर्षांचे आयुष्य त्यांना लाभले.

इतक्या अल्प काळातही त्यांनी विपुल लेखन केले. १९३० साली लिहिण्यास सुरुवात झाली आणि २० वर्षांच्या काळात त्यांनी १५० च्या आसपास कविता, ६० कथा, ७ कादंबऱ्या असे लिखाण केले. त्यांचा पहिला कवितासंग्रह 'आलाप आणि विलाप' १९४१ साली प्रसिद्ध झाला. त्यांच्या कवितांवर निसर्गाचा, बालकवींचा, गोविंदग्रजांचा व मर्ढेकरांचा प्रभाव जाणवतो. त्यांचा स्वभाव अत्यंत मनस्वी व बोलणे कमी त्यामुळे त्यांची कविता आत्ममग्न आहे. 'रे ओल्या काष्ठा', 'वर्ष नवे', 'अजुनि गाव दूर' इत्यादी कविता आत्मभानाचे प्रकटीकरण करताना दिसतात. तर 'रस्ता नगर झाला', 'अन्नदेवता', 'राव अधिकारी झाले', 'धुराड', 'आज कुणाला गावे', 'एक गरजते ढगाड', 'उजेड झाला', 'गरिबांचा संसार', 'देव आणि दासी' या सामाजिक जाणिवेच्या कविता आहेत. बी. रघुनाथांच्या मनात असलेली स्त्री कशी विविधरूपी आहे, हे त्यांच्या 'उन्हात बसली न्हात', 'ज्वार', 'दर्पण', 'रात्र संपली तरी', 'ये मनात राया कधी', 'रंगाऱ्याचे गाणे', 'नेस नवी साडी', 'नगरभवानी', 'उजेड झाला' या कवितांतून प्रकट होते. तसेच त्यांच्या कवितेत स्त्री-देह, शृंगार, प्रणय यांचे सुंदर चित्रण दिसते. 'देखियला चल एक हिमालय', 'लहर', 'पांढऱ्या पऱ्या' या काहीशा गूढ कविता त्यांनी लिहिल्या. 'टिचकी', 'पडली बघ झाकड', 'लागली जीवास घरची वड' या कवितांतून परभणीच्या अस्सल बोली भाषेचा अनोखा सौंदर्याविष्कार आढळतो. 'स्वस्त धान्याचे दुकान', 'कुरण', 'माझी चिमणी' आणि 'मुद्रिका' या चार दीर्घ कविता त्यांनी लिहिल्या. 'काळास मिटव नेत्र तेव्हाच' या चिंतनात्मक व अंतर्मुख करणाऱ्या कविता आहेत.

बी. रघुनाथ यांचा पहिला कथासंग्रह 'साकी' १९४० साली प्रसिद्ध झाला. त्यानंतर 'फकिराची कांबळी', 'छागल', 'आकाश', 'काळी राधा' या कथा प्रसिद्ध. त्यांच्या कथा तीन विभागांत मोडतात. पहिल्या प्रतीक कथा, दुसऱ्या निझामी राजवटीतील आराजकतेच्या आणि तिसऱ्या प्रकारात निझामी नोकरशाहीचे आणि समाजाचे वर्णन करणाऱ्या कथा. 'बेगम सकीना' ही गाजलेली कथा! या कथेतील चपराश्याचे दारिद्र्य, त्याचे मनोरथ, लाचारी आणि शेवटी अपेक्षाभंग यांचे सुरेख चित्रण आहे.

'अभावती' ही बी. रघुनाथांचे अनुभवांचे मर्म लेवून उभी राहते. या कथेत लावण्याबरोबर संयमाचा सुसंस्कृतपणा आहे. भावनिक रस आहे. 'गंगाधर' ही स्टोअरकीपरची कथा, एक हंगामी जागा व बारा रुपड्यांवर उरी फुटेपर्यंत काम करणाऱ्या कारकुनाची कथा. 'थैली' ही आत्मनिवेदन असणारी, त्यांच्या मनातील तडफड व्यक्त करणारी, मनाला चटका लावणारी कथा आहे.

'प्रधानांचा दौरा', 'पैसा कुठे जातो', 'जिथं तांबड फुटायचं आहे', 'शेख मस्तान' इत्यादी कथांतून सरंजामशाहीचे विस्तृत भेदक वर्णन येते. गंगाधर

गाडगीळ त्यांच्याबद्दल म्हणाले होते, ''बी. रघुनाथांनी मराठी नवकथेची पायवाट तयार केली.'' तर अरविंद गोखले म्हणाले, ''बी रघुनाथांनी हळवा ध्येयवाद व फसवा बोधवाद यांतून मराठी कथेला बाहेर काढून अंतर्मुख आणि काव्यात्म बनवले.''

बी. रघुनाथ यांनी एकूण सात कादंबऱ्या लिहिल्या. त्यांची पहिली कादंबरी 'ओ' १९३६ मध्ये प्रसिद्ध झाली. तत्कालीन समीक्षकांना आणि रसिकांना मान्य नसलेला वास्तववादी वेगळा मार्ग त्यांनी स्वीकारला. 'हिरवे गुलाब' या कादंबरीतील अमीर जानकीराम यांच्या व्यक्तिरेखेवरून व्यक्तींची स्वभाववैशिष्ट्ये, त्यांच्या मुळाशी असलेल्या प्रेरणांचा ते शोध घेतात आणि विविधस्तरीय सामाजिक वास्तवाचे चित्र रेखाटतात. 'बाबू दडके', 'उत्पात' या कादंबऱ्यांतून त्यांना आनुभवास आलेली आत्मवंचना व न्यूनगंडाच्या जाणिवेचा अविष्कार दिसतो. 'जगाला कळलं पाहिजे', 'म्हणे लढाई संपली' यांतील बाबूराव, डी. हानुमंतराव, रावजी या व्यक्तिरेखा म्हणजे जीवनमूल्ये पायदळी तुडवणे, अन्याय करणे, विवेकापासून भ्रष्ट होणे यांची उदाहरणे आहेत.

लहान-मोठे विविध तपशील, लहान-सहान व्यक्तिरेखा यांचे विस्तृत वर्णन बी. रघुनाथ यांच्या कादंबऱ्यांतून अढळते. टांगेवाले, टॅक्सी ड्रायव्हर, हॉटेलातील पोरे, पानपट्टीवाले, कारकून इत्यादी विविध स्तरांतील व्यक्तींचे सुस्पष्ट वर्णनही दिसते.

अत्यंत प्रतिभासंपन्न अशा या साहित्यकाराचा त्या काळी योग्य सन्मान झाला नाही; की कोणत्याही पारितोषिकाने त्यांना सन्मानित करण्यात आले नाही.

– निशा रानडे

**संदर्भ :**


१. *खानोलकर गं. दे.; 'मराठी वाङ्मयसेवक चरित्रकोश', खंड पहिला.*

२. *भालेराव इंद्रजित, उमरीकर श्रीकांत, संपादक; 'बी. रघुनाथ यांचे वाङ्मय - एक परिसंवाद'*

३. *हातकणंगलेकर म. द.; 'बी. रघुनाथांची कथा'*

४. *राजाध्यक्ष विजया; 'बी. रघुनाथ यांची सुसंस्कृत कविता'.*


## बुवा, विनायक आदिनाथ

**कथाकार, विनोदकार**

**४ जुलै १९२६**



विनोदाशी कायम नाते जोडून रसिकांच्या मनात स्थान मिळवणाऱ्या वि. आ. बुवा यांचा जन्म पंढरपूर येथे झाला. पंढरपूर आणि मिरज येथे त्यांचे मॅट्रिकपर्यंत शिक्षण झाले. व्ही. जे. टी. आय. (मुंबई) येथे ४२ वर्षे नोकरी करून ते १९८६ मध्ये निवृत्त झाले. त्यांचे वास्तव्य कल्याण येथे आहे. १९५० पासून त्यांनी लेखनाला प्रारंभ केला. आत्तापर्यंत त्यांची १४१ पुस्तके प्रसिद्ध झाली असून आणखी ९ पुस्तके प्रकाशनाच्या मार्गावर आहेत. मुंबई आकाशवाणीसाठी त्यांनी सहाशे कार्यक्रमांचे लेखन केले आहे. महाराष्ट्रात आणि महाराष्ट्राबाहेर त्यांचे व्याख्यानांचे आणि कथाकथनाचे सुमारे एक हजार कार्यक्रम झाले आहेत. शासकीय नाट्यस्पर्धेसाठी त्यांनी अनेक वर्षे परीक्षक म्हणून काम केले आहे. काही काळ त्यांची विशेष कार्यकारी दंडाधिकारी म्हणून नेमणूक झाली होती. अनेक नियतकालिकांमधून त्यांचे सुमारे दोन हजार लेख प्रसिद्ध झाले आहेत. गेली साठ वर्षे ते दिवाळी अंकांसाठी लेखन करीत आहेत. त्यातून आणि निरनिराळ्या विशेषांकांमधून सुमारे १००० कथा आणि लेख असे त्यांचे साहित्य प्रसिद्ध झाले आहेत. संस्कृतची त्यांना विशेष आवड आहे.

वि. आ. बुवा यांनी कथा, लघुकादंबरी, ललितलेख, एकांकिका, व्यक्तिचित्रे, लोकनाट्य अशा अनेक क्षेत्रांत लेखन केले. यांमध्ये त्यांनी लिहिलेल्या नाटकांचा आणि अन्य लेखनाचाही समावेश आहे. वि. आ. बुवा यांचे 'उगीच काहीतरी', 'एकविसावा नग' , 'ओष्ठतंत्रम्', 'कशासाठी पैशासाठी', 'खटाटोप', 'खट्याळ काळजात घुसली' हे कथासंग्रह प्रसिद्ध झाले आहेत. तसेच 'इकडे अंबू तिकडे गंगू', 'एक एक चमचा', 'चिंटू द ग्रेट' या

लघुकादंबऱ्या त्यांनी लिहिल्या आहेत. 'एकापेक्षा एक' आणि 'पुढे चालू ठेवू' या एकांकिकांचे लेखन त्यांनी केले आहे. त्यांनी लिहिलेली टिकोजीराव, वासुदेव शेख महंमद ही व्यक्तिचित्रे प्रसिद्ध आहेत. त्यांनी 'तीन दांडेकर आणि एक मालन' या नाटकाचे लेखनही केले आहे. आकाशवाणीसाठी त्यांनी 'सहज सुचलं म्हणून', 'पुन्हा प्रपंच' आणि 'आंबट गोड' या श्रुतिकांचे तसेच 'पोपटपंची' या लोकनाट्याचे लेखन केले आहे. हलक्याफुलक्या विनोदी विषयावरचे ललित लेखन वि. आ. बुवा सहजगत्या करतात. 'पापाकडून पपाकडे', 'पुस्तक बहात्तरी', 'प्रेमाची ऐशी की तैशी' 'निवडक नवरे', 'निवडक बुवा', 'नुकतंच सोळावं संपून सतरावं', आदी त्यांची पुस्तके प्रसिद्ध आहेत.

वि. आ. बुवा यांचे लेखन सुरू झाले ते प्रभाकर पाध्ये यांच्या प्रेरणेने! 'सोबत' साप्ताहिकातून त्यांचा लेखनप्रवास सुरू झाला. १९५०च्या सुमारास ते काही वर्षे 'इंदुकला' नावाचे हस्तलिखित काढत असत. या अंकात मराठीतल्या नामवंत लेखकांचे साहित्य प्रसिद्ध होत असे. 'अकलेचे तारे' हे त्यांचे पहिले पुस्तक बलवंत पुस्तक भांडाराचे अण्णासाहेब परचुरे यांनी प्रकाशित केले. महाराष्ट्र ग्रंथ भांडारच्या शं. वा. कुलकर्णी यांनी काढलेला वि. आ. बुवा यांचेच साहित्य असलेला 'बुवा' हा दिवाळी अंक तुफान लोकप्रिय झाला.

विपुल प्रमाणात लिहिलेले त्यांचे लेखन प्रामुख्याने सामान्य वाचकांसाठी आहे. त्यामुळे सामान्य माणसाचे दैनंदिन जीवन, त्याच्या आशाआकांक्षा, त्याची सुखदुःखे, त्याच्या जीवनातील विसंगती यांचेच दर्शन त्यांच्या साहित्यातून होते. त्यांच्या साहित्याला अफाट लोकप्रियता लाभली. कित्येक दिवाळी अंक त्यांच्या लेखनाशिवाय वाचकांच्या पसंतीला उतरत नाहीत. 'आवाज' दिवाळी अंकाशी त्यांचे जवळचे नाते जुळले आहे. वि. आ. बुवा आणि विनोदी साहित्य असे समीकरणच मराठी वाचकांच्या मनात तयार झाले आहे. ही त्यांच्या साहित्याला वाचकांनी दिलेली पावतीच आहे.

१९७२ साली कल्याण येथे भरलेल्या साहित्यसंमेलनाचे ते स्वागताध्यक्ष होते. पंढरपूर, ठाणे, पुणे येथे त्यांचे सत्कार झाले. त्यांच्या 'प्रेमाची ESSO स्टाइल' या पुस्तकाला महाराष्ट्र शासनाचा विनोदी साहित्याचा पुरस्कार मिळाला.

– डॉ. ज्योत्स्ना कोल्हटकर

**संदर्भ :**

*१. बुवा वि. आ.; 'वि. आ. बुवा'; कल्याण; १९९१.*

## बेंद्रे, दत्तात्रेय रामचंद्र

**कवी, कथाकार, नाटककार**

**१३ जानेवारी १८९६ – २६ ऑक्टोबर १९८१**



दत्तात्रेय रामचंद्र बेंद्रे यांचे मूळ घराणे रत्नागिरी जिल्ह्यातील केळशीचे. कारणपरत्वे त्याचे कुटुंब तासगाव, शिरहट्टी व धारवाड येथे स्थायिक झाले. त्यांचे मॅट्रिकपर्यंतचे शिक्षण धारवाड येथे झाले. बी. ए. ची पदवी फर्गसन महाविद्यालय पुणे येथून घेतली तर एम. ए. ची पदवी मुंबई विद्यापीठातून प्राप्त केली. 'अंबिकातनयदत्त'या टोपणनावाने त्यांनी लिखाण केले. त्यांना संतवाङ्मयाचा परिचय त्यांच्या आईमुळे झाला.

१८१८ ते १८३२ या काळात व्हिक्टोरिया हायस्कूल, धारवाड येथे तसेच राष्ट्रीय शाळा धारवाड आणि गदग, हुबळी येथे शिक्षक म्हणून काम केले. १९४३नंतर न्यू इंग्लिश स्कूल (पुणे) येथे इंग्रजीचे अध्यापक आणि कॉमर्स कॉलेज (पुणे) येथे भाषासाहित्याचे प्राध्यापक म्हणून काम केले. तत्पूर्वी १९३२ साली 'नरबली' या कवितेमुळे त्यांना तुरुंगवास आणि अज्ञातवास भोगावा लागला.

१९४४ ते १९५६ ह्या काळात डी. ए. व्ही. कॉलेज सोलापूर येथे ते कन्नडचे प्राध्यापक होते. १९५६ ते १९६६ ह्या काळात धारवाड आकाशवाणीवर साहित्य

सल्लागार म्हणून काम केले. काही काळ जीवन, कर्नाटक, वाग्भूषण, स्वधर्म या कन्नड पाक्षिकांचे संपादन केले. मातृभाषा मराठी असली, तरी १९१६च्या आधीपासूनच त्यांनी मराठी, कन्नड, इंग्रजी व संस्कृत ह्या भाषांमधून काव्यरचना केली.

मराठी गद्यपद्यसंग्रह– 'संवाद' (१९६५), 'विठ्ठलसंप्रदाय' (१९६५), 'संतमहंतांचा पूर्ण शंभू विठ्ठल' (१९८०) हे त्यांचे उल्लेखनीय मराठी ग्रंथ होत. मराठी, हिंदी, इंग्रजी आणि कानडी या चार भाषांमधून लेखन केले. त्यांच्या व्यक्तिमत्त्वाचे सांसारिक, समीक्षक, कवी, तत्त्वज्ञ असे विविध पैलू दिसून येतात. मात्र काव्य हाच त्यांच्या प्रेमाचा विषय आहे.

'नाकुतंती' या काव्यसंग्रहात मी, तू, ते आणि कल्पक आत्मा ही कवीच्या व्यक्तिमत्त्वाची चार अंगे दिसून येतात. कवीचे व्यक्तिमत्त्व या चार तत्त्वांचा शोध आध्यात्मिक आणि सौंदर्यात्मक अनुभवांच्या क्षेत्रात घेते. शब्द, अर्थ, लय आणि सहृदयवर्णन या काव्याच्या चार मूल घटकांचे वर्णन. ऐंद्रिय, कल्पनात्मक, बौद्धिक व आदर्शात्मक ही त्यांच्या सौंदर्यकल्पनेची चार अंगे.

रवींद्रनाथ टागोर आणि योगी अरविंद यांच्याविषयी अपार श्रद्धा त्यांचे ठायी होती. सर्त्रचाही त्यांनी अभ्यास केला होता.

योगी अरविंदाचे साहित्य आणि तत्त्वज्ञान यांवर बेंद्रे यांनी 'साहित्य – द विराट स्वरूप' यामध्ये विवेचन केले आहे. त्यांनी लोकपरंपरांचा वापर करून कन्नड भाषेला सामर्थ्य प्राप्त करून दिले आणि मानवी भावनांच्या आणि अनुभवांच्या आविष्काराचे साधन म्हणून कन्नड भाषेला स्थान प्राप्त करून दिले. त्यांच्या कन्नड कवितेने गूढवादाचा शोध घेतला, तसेच निसर्ग, प्रेम, देशभक्ती, सामाजिक जाणीव आणि आध्यात्मिक चिंतन हेही त्यांच्या काव्याचे विषय झाले. त्यांना गांधीयुगातील सर्वश्रेष्ठ स्वच्छंदतावादी कवी मानले जाते.

बेंद्रे यांना मिळालेले पुरस्कार पुढीलप्रमाणे आहेत.

'संवाद' (१९६५ मराठी गद्यपद्य संग्रह)– न. चिं. केळकर पुरस्कार मिळाला. 'अरळुमरळु'ला (१९५८) साहित्य अकादमी पुरस्कार प्राप्त झाला. १९९८ साली भारत सरकारने 'पद्मश्री देऊन त्यांचा गौरव केला.

मातृभाषा मराठी असूनही त्यांनी कानडी भाषेत साहित्यनिर्मिती केली, त्यामुळे कवी बेंद्रे ही महाराष्ट्राने कर्नाटकला दिलेली खास देणगी आहे, असे मानले जाते. जशी रवींद्रनाथ टागोरांमुळे बंगाली भाषेला प्रसिद्धी मिळाली, तशी बेंद्रे यांच्यामुळे कानडी भाषेला प्रसिद्धी मिळाली. म्हणूनच त्यांना 'कर्नाटकाचे टागोर' म्हणून गौरवले जाते.

– डॉ. ज्योत्स्ना कोल्हटकर

**संदर्भ :**

*१. बेंद्रे द. रा., देशपांडे दा. गो., संपादक; 'संवाद'; पॉप्युलर प्रकाशन; १९६५.*

*२. बेंद्रे द. रा.; 'विठ्ठल संप्रदाय'; पब्लिकेशन डिव्हीजन, माहिती आणि नभोवाणी मंत्रालय, दिल्ली.*

## बेडेकर, दिनकर केशव

**समीक्षक, संपादक**

**८ जून १९१० – ३ मे १९७३**



तत्त्वचिंतक, समीक्षक, विचारवंत, संपादक म्हणून परिचित असलेल्या दिनकर बेडेकरांचा जन्म सातारा येथे झाला. त्यांचे आजोबा इंदूरला राहत; त्यामुळे बेडेकरांचे प्राथमिक, माध्यमिक शिक्षण सातारा, इंदूर येथे झाले. त्यांचे वडील इंजिनिअरिंगचे पदवीधर होते. ते कराचीला सरकारी नोकरी करत होते.

मॅट्रिकनंतर दि. के. बेडेकर दोन वर्षे फर्गसन कॉलेज येथे होते. त्यानंतर ते कराची येथील इंजिनिअरिंग कॉलेजात दाखल झाले. पण कंटाळून ते चित्रकलेचे शिक्षण घेण्यासाठी शांतिनिकेतनला गेले. तिथे मलेरिया झाल्यामुळे त्यांना शांतिनिकेतन सोडावे लागले. त्यानंतर

ब

ते बनारस हिंदू विश्वविद्यालयात गेले आणि त्यांनी १९३२ साली तत्त्वज्ञान व अर्थशास्त्र या विषयांत बी.ए.ची पदवी घेतली.

१९३२ ते १९५० या काळात त्यांनी कम्युनिस्ट पक्षाचा कार्यकर्ता म्हणून काम केले. १९४८ सालाच्या सुमारास कम्युनिस्ट पक्षाच्या राजकीय धोरणांशी मतभेद होऊन १९५० साली त्यांनी पक्षाचा राजीनामा दिला. त्यानंतर बेडेकरांनी तत्त्वज्ञानाचा अभ्यास सुरू केला. १९५४ साली त्यांनी तत्त्वज्ञान हा विषय घेऊन पुणे विद्यापीठाची, एम.ए.ची परीक्षा दिली. त्यानंतर दोन वर्षे त्यांनी नाशिकच्या हंसराज प्रागजी ठाकरसी कॉलेजात तत्त्वज्ञानाचे प्राध्यापक म्हणून काम केले.

१९५८ सालापासून पुढची अडीच वर्षे पुणे येथील गोखले अर्थशास्त्र संस्थेत त्यांनी संशोधक-प्राध्यापक म्हणून काम केले. १९६२ साली विश्वकोशाचे एक संपादक म्हणून, तसेच 'महाराष्ट्र साहित्य पत्रिके'चे संपादक म्हणून त्यांनी काम केले. गोखले अर्थशास्त्र संस्थेच्या 'अर्थविज्ञान' या त्रैमासिकाचे ते संपादक होते.

१९३५ सालाच्या सुमारास दि. के. बेडेकरांनी लेखनाला सुरुवात केली. धार्मिक, तत्त्वज्ञानात्मक, राजकीय व सामाजिक, अशा विविध विषयांवर त्यांनी स्फुट लेख लिहिले. हिंदुधर्म, त्याचे तत्त्वज्ञान, हिंदुधर्मातील धर्मविपाक, सृष्टिकल्पनेचा विकास, संतसाहित्य व त्यातील तत्त्वज्ञान, भारतीय साहित्यशास्त्र या तत्त्वज्ञानपर विषयांवर त्यांनी मोलाचे विचार मांडले. त्यांनी हेगेलच्या तत्त्वज्ञानाची रूपरेषा स्पष्ट केली. त्यांनी आधुनिक तत्त्वज्ञानातील अस्तित्ववाद ह्या विचारसरणीचा परिचय करून देणारे पुस्तक लिहिले, 'हिंदी उद्योगधंद्यात राबणाऱ्या स्त्रिया व मुले'(१९३६), तसेच 'टूवर्ड्स अंडरस्टँडिंग गांधी' (१९७७), 'धर्मचिंतन आणि धर्मश्रद्धा : एक पुनर्विचार' ही त्यांची महत्त्वाची अन्य पुस्तके होत. 'समाजवाद प्रेरणा व प्रक्रिया' हा बेडेकरांच्या गौरवार्थ काढण्यात आलेला ग्रंथ १९७१ साली प्रसिद्ध झाला. बेडेकरांच्या सर्व लेखनाची सूची त्यात समाविष्ट केलेली आहे.

ब

स्वातंत्र्योत्तर काळातील साहित्य आणि संस्कृतीचा सामाजिक दृष्टीने विचार करणारी समीक्षा बेडेकरांनी केली. सामाजिक वर्ग, समजुती, मूल्यविचार यांनी लेखकाची निर्मिती प्रभावित झालेली असते. लेखकाचा वर्ग, लिंग, वैयक्तिक आवडनिवड, युगभान, वाचकांचा सामाजिक वर्ग, तसेच सामाजिक, राजकीय, आर्थिक घडामोडींचे परिणाम, साहित्यकृतीचा रूपबंध, साहित्यकृतीमधून व्यक्त होणारा अनुभव, त्याचा विकास आणि भाषाशैली यांच्यावर होत असतात. हे ध्यानात घेऊन दि. के. बेडेकर यांनी 'मराठी वाङ्मयाची सामाजिक पार्श्वभूमी' विशद केली.

व्यक्तीस्वातंत्र्यवादी सुधारणा, विज्ञानदृष्टी आणि शिक्षक-प्रेषिताची भूमिका या मूल्यांचा प्रभाव आंग्लशिक्षित वर्गावर होता. त्याचा परिणाम १८८० ते १९२०साला पर्यंतच्या मराठी साहित्यनिर्मितीवर झाला. १९२० साला नंतर इथल्या सुशिक्षित वर्गाला आपले नेतृत्व समाजाने स्वीकारले नसल्याची जाणीव झाली. त्यामुळे १९३० साला पर्यंतचा काळ भ्रमनिरासात गेला. १९३० साला नंतर मराठी सुशिक्षितांच्यासमोर गांधीवाद, फ्रॉइड, रसेल यांच्या नीतिकल्पना, समाजवाद, परंपरागत मूल्ये हे चार आदर्श उभे राहिले. पुरोगामी, ध्येयवादी, रंजनप्रधान साहित्याची निर्मिती या काळात झाली. त्याचबरोबर, 'विशुद्ध' कला म्हणून साहित्याकडे वळण्याचा प्रयत्नही याच काळात सुरू झालेला दिसतो.

नवसाहित्यातील दुर्बोधता, मनोविश्लेषण, साहित्याची स्वायत्तता यांचा समाजमनाशी संबंध जोडण्याचा प्रयत्न दि. के. बेडेकर यांनी केलेला आहे.

१९२० सालापूर्वीच्या प्रेषितपणाच्या अभिनिवेशाचा त्याग केल्यानंतर, आणि त्यानंतरच्या पुरोगामी आवेशातून मुक्त झाल्यानंतर एक पोकळी निर्माण झाली. साहित्यिकांच्या मनातील निर्वासन (ॲलिनिएशन) सर्वंकष भ्रमनिरासातून आलेले होते. एकंदरीत, मराठी सुशिक्षित वर्गच अधांतरी व किङ्कर्तव्यमूढ झालेला होता. हेच या अनवस्थेचे मुख्य कारण होते, असे दि. के. बेडेकर यांनी नमूद केलेले आहे. 'निर्वासन' करणे व स्वायत्त कलेची

साधना करणे म्हणजे इतर क्षेत्रांत हस्तक्षेप न करणे व दुसऱ्यांचा हस्तक्षेप निवारण करणे होय. स्वायत्त कलावादी लेखकांना दुसऱ्यांचा हस्तक्षेप आक्षेपार्ह वाटतो, असे निरीक्षण त्यांनी मांडलेले आहे.

दि. के. बेडेकरांनी केलेला साहित्याचा समाजसंबद्ध विचार साहित्यसमीक्षेमध्ये सदैव मोलाचा मानला जातो.

– प्रा. रूपाली शिंदे

**संदर्भ :**

१. *बेडेकर दि.के; 'साहित्य विचार'; कॉन्टिनेन्टल प्रकाशन, पुणे; १९६४.*

२. *जोशी लक्ष्मणशास्त्री; 'मराठी विश्वकोश', खंड ११; महाराष्ट्र राज्य साहित्य संस्कृती मंडळ, मुंबई; १९८७.*

## बेडेकर, मालती विश्राम

☞ **विभावरी शिरूरकर**

## बेडेकर, विश्राम

***बेडेकर विश्वनाथ चिंतामण***

**कादंबरीकार**

**१३ ऑगस्ट १९०६ – ३० ऑक्टोबर १९९८**



मराठी साहित्य विश्वामध्ये एक श्रेष्ठ प्रतिभावंत लेखक म्हणून विश्राम बेडेकरांचे नाव घ्यावे लागेल. त्यांचा जन्म अमरावती येथे झाला. वडील विद्वान व घनपाठी; त्यांनी मुलाला लहानपणीच रुद्र, पवमान, पुरुषसूक्ताचे पाठांतर करायला लावले. वडील अमरावतीच्या राममंदिराचे पुजारी; पगार मासिक रुपये १५. घरची गरिबी, त्यामुळे नादारीवर व मित्रांच्या सहकार्यावर 'शिक्षण' झाले.

'मैत्री'ला बेडेकरांच्या आयुष्यात लहानपणापासूनच खूप वरचे स्थान मिळालेले आहे. त्यांचे पाळण्यातले नाव 'विश्वनाथ' असे होते. शाळेमध्ये श्रीराम खरे हा त्यांचा जिवलग मित्र होता. स्वतःच्या नावातील 'विश्' व श्रीरामाच्या नावातील 'राम' हे श्रीरामाच्या मैत्रीचे प्रतीक म्हणून घेऊन त्यांनी 'विश्राम' हे नाव घेतले व तेच पुढे रूढ झाले.

ते अमरावतीच्या ए. व्ही. स्कूलमधून मॅट्रिक झाले. शाळेमध्ये असताना अमरावतीच्या जनरल लायब्ररीतर्फे होणाऱ्या 'वक्तृत्वोत्तेजक' स्पर्धेमध्ये ते सहभाग घेत, त्यासाठी त्यांचे मामा केळकर मास्तर त्यांना मदत करीत. त्यांना स्पर्धेत एकदा पहिले बक्षीसही मिळाले होते. किंग एडवर्ड विदर्भ महाविद्यालयातून ते चांगल्या तऱ्हेने बी. ए. उत्तीर्ण झाले. त्यामुळे त्यांना फेलोशिप मिळाली. नागपूर महाविद्यालयातून एम. ए. झाले. पुढे ते एलएल. बी. झाले.

बेडेकरांच्या लेखनाला त्यांच्या महाविद्यालयीन आयुष्यातच सुरुवात झालेली दिसते. 'मध्यकाल' नावाच्या ऐतिहासिक कादंबरीची काही प्रकरणे 'गणेश चतुर्थीचा चंद्र' ही कविता, लघुकथा, नाट्यछटा, 'बंधनाच्या पलीकडे' कादंबरीचे परीक्षण इत्यादी लेखन त्यांनी हस्तलिखितासाठी केले होते. १९२८ साली बी. ए. च्या वर्गात असतानाच त्यांनी 'ब्रह्मकुमारी' हे नाटक लिहिले, पण ते प्रकाशित व्हायला जून १९३३ साल यावे लागले. बळवंत संगीत मंडळातर्फे या नाटकाचा प्रयोग झाला. पुढे या नाट्यसंस्थेचे रूपांतर चित्रपटसंस्थेत झाले. बेडेकरांचे चित्रपटांचे, पटकथालेखनाचे, निर्मितीचे आकर्षण प्रत्यक्षात यायला ही संस्था कारण ठरली. 'नरो वा कुंजरो वा' (१९६१), 'वाजे पाऊल आपुले' (१९६७), 'टिळक आणि आगरकर' (१९८०) ही त्यांची नाट्यक्षेत्रातली कामगिरी.

ब्रह्मकुमारी' हे पौराणिक नाटक, तर 'नरो वा कुंजरो वा' हे स्वतंत्र सामाजिक नाटक आहे. फाशीच्या शिक्षेतील अमानुषता दाखविणारे हे नाटक आहे. 'वाजे पाऊल आपले' हे नाटक म्हणजे नॉर्मन बराश आणि कॅरोल मूर यांच्या 'सेंड मी नो फ्लॉवर्स' या नाटकाचा अनुवाद आहे. प्रेमपूर्ण गैरसमजातून विनोदी प्रसंग निर्माण करीत रसिकांच्या चित्तवृत्ती प्रसन्न ठेवणारे हे नाटक आहे.

ब

या नाटकाच्या वेळी ‘कुत्र्याला माणूस चावला’ या नाटकाची ‘आगामी’ म्हणून जाहिरात झाली; पण ते प्रत्यक्षात लिहिले गेले नाही.

यानंतर तेरा वर्षांनी लिहिले गेलेले व लोकप्रिय होऊन खूप गाजलेले नाटक म्हणजे ‘टिळक आणि आगरकर’ या दोन्ही महापुरुषांचा अभ्यास बेडेकरांनी कमीतकमी एक तप तरी केला होता. या नाटकाला मराठी नाट्य परिषदेचे ‘विष्णुदास भावे’ सुवर्ण पारितोषिक मिळाले. पुण्यात यावर परिसंवाद झाले. लक्षणीय, वेगळे, वादग्रस्त, जोडनायकांचे नाटक; चरित्रनाटक; शोकात्मिकेच्या उंचीचे नाटक अशा विविध प्रतिक्रिया नोंदवल्या गेल्या. ‘भरतशास्त्र’ने ऑगस्ट-सप्टेंबर १९८२चा खास अंक यासाठी काढला. आगरकरांचे चित्र या नाटकामध्ये हिणकस उतरले आहे हे य. दि. फडके यांचे मत बेडेकरांनी नाटकाच्या पुस्तकातच सौम्य भाषेत नोंदविले. हेच मत ‘बेडेकर हे मूळचे चित्रपट दिग्दर्शक.’ पटकथेचे अनेक विशेष ‘टिळक आणि आगरकर’मध्येही जाणवतात. आगरकरांबद्दल बेडेकरांना लहानपणापासून ओढ असावी; पण या ओढीपेक्षा त्यांची टिळकभक्ती अधिक जाज्वल्य असावी,’ ह्या शब्दांत राजीव नाइकांनी नोंदविले. ह्या नाटकाबद्दल इतके उलटसुलट विचारप्रवाह आहेत की, टिळक-आगरकर ही दोन्ही उत्तुंग व्यक्तिमत्त्वे, उदात्त नायक एवढाच परिणाम करून घेणे चांगले; कारण त्या काळच्या त्या इतिहासाची, आगरकरांच्या पत्नीच्या आठवणीची, कशाचीच निश्चिती झालेली नाही. पण, त्याकडे नाटक ह्या दृष्टिकोनातून बघणे जास्त श्रेयस्कर आहे.

बेडेकरांच्या पहिल्या नाटकाचा प्रयोग सांगलीला, जून १९३३मध्ये झाला. तो प्रयोग करणारी बळवंत संगीत कंपनी चित्रपट क्षेत्रात गेल्यावर बेडेकरही चित्रपट क्षेत्रात गेले. त्यांच्या ‘कृष्णार्जुन युद्ध’ (१९३४) चित्रपटाची सर्व जबाबदारी बेडेकरांवर होती. मात्र तो चित्रपट प्रचंड नुकसानीत गेला; पण बेडेकरांचे चित्रपटसृष्टीचे आकर्षण टिकून राहिले. ‘ठकीचे लग्न’ (१९३५) हा मराठीतील पहिला विनोदी चित्रपट; ‘एक नन्ही मुन्नी लडकी थी’ हा हिंदी चित्रपट. बेडेकरांचे ‘पहिला पाळणा’, ‘शेजारी’, ‘सत्याचे प्रयोग’, ‘अमर भूपाळी’, ‘रामशास्त्री’, ‘होनाजी बाळा’ हे यशस्वी चित्रपट. काहींचे दिग्दर्शन त्यांनी केले होते, तर काहींचे पटकथा-संवाद त्यांनी लिहिलेले होते. याशिवाय ‘ज्ञानेश्वर’, ‘कंगाल’, ‘सूनबाई’, ‘पैसा बोलतो आहे’, ‘लोकमान्य टिळक’, ‘शहीद भगतसिंह’, ‘विनोबा भावे’, ‘भोळा शंकर’, ‘वासुदेव बळवंत फडके’ (अपूर्ण) अशी श्रेयनामावली आहे. त्यांची आर्थिक बाजू मात्र कायम त्रासदायक राहिली.

बेडेकरांना नाटक व चित्रपट या क्षेत्रांत यश तर मिळालेच, पण त्याहीपेक्षा जास्त यश त्यांच्या एकमेव ‘रणांगण’ (१९३९) या कादंबरीने व ‘एक झाड दोन पक्षी’ (१९८४)या आत्मचरित्राने मिळवून दिले. बेडेकरांचे लग्न डिसेंबर १९३८मध्ये बाळूताई खरे (विभावरी शिरुरकर) यांच्याशी झाले व भारत सरकारच्या फ्लिम्स् डिव्हिजनची शिष्यवृत्ती मिळाल्याने लग्नाच्या दुसऱ्याच दिवशी मालतीबाई सोलापूरला व बेडेकर इंग्लंडला गेले.

प्रशिक्षणाचे सहा-सात महिने पूर्ण व्हायच्या सुमारासच, १९३९साली महायुद्ध सुरू झाले व इटालिअन बोटीतून ११दिवसांचा प्रवास करून बेडेकरांना मायदेशी परत यावे लागले. या बोटीवर बरेच निर्वासित ज्यू होते. हिटलरने केलेल्या त्यांच्या छळाच्या कहाण्या, महायुद्धाचे भीषण पडसाद यांमुळे बेडेकरांचे मन अपार कारुण्याने, मानवतेने भरून आले. ही विश्वव्यापी मानवता, समुद्राची व बोटीची पार्श्वभूमी, हॅर्टा, चक्रधर, शिंदे, लुई इत्यादी पात्रे, देशी-विदेशी प्रवासी ह्या साऱ्या गोष्टी बेडेकरांच्या डोक्यात घोळत होत्या. त्यातच ‘विरलेले स्वप्न’वर बेडेकरांनी केलेली टीका ऐकून मालतीबाईंनी त्यांना जणू आव्हानच दिले होते. मालतीबाई म्हणाल्या की, ‘‘नुसती टीका करायला काय लागतं? कादंबरी लिहून पाहा.’’

मालतीबाईंचे हे बोलणे आठवून बेडेकरांनी आठवड्याच्या आत ही (१९३९) अद्वितीय, केवळ

ब

१२२ पृष्ठांची कादंबरी लिहून पूर्ण केली. आपल्या हाताला यश नाही, अशी त्या वेळी बेडेकरांची समजूत होती. म्हणून लेखकाचे नाव न घालता; पण 'संपूर्ण स्वतंत्र कादंबरी' असे प्रथमदर्शनी लिहावयास सांगून ह. वि. मोटे यांच्याकडे ती प्रकाशनाला दिली. कादंबरीत थोडा विस्कळीतपणा जाणवला असावा म्हणून 'लेखकाने जशी-जशी पाने लिहिली व युरोपातून आणली, तशी-तशी ती छापली', अशा तऱ्हेचे स्पष्टीकरण प्रकाशकाच्या नावावर छापायला लावले.

बेडेकरांची कादंबरी काळाच्याआधी वीस वर्षे जन्माला आली. १९४० साली एका वाङ्मय मंडळातर्फे (ज्याचे परीक्षक ना. सी. फडके, न. चि. केळकर व वि. सी. गुर्जर हे होते) त्याला द्वितीय पारितोषिक मिळाले एवढेच त्या वेळी झालेले कौतुक.

१२०० प्रती संपायला ५-६ वर्षे गेली. फक्त वसंत तांबेंनी तिचे कौतुक केले होते. 'रणांगण'च्या नवतेचे महत्त्व त्यांनी ओळखले होते. कोणी ती कादंबरी चिरतरुण असल्याचे प्रतिपादले, तर कुणाला बेडेकर जर्मन, इंग्रज, फ्रेंच, मराठी, हिंदी माणसाच्या अंतर्विश्वाला प्राधान्य देत आहेत हे जाणवले, तर कुणाला बेडेकरांच्या अल्पाक्षरी, सुबक आणि देखण्या भाषाशैलीचे कौतुक वाटले.

१९६० सालानंतरच्या समीक्षकांनी 'रणांगण'ची थोरवी ओळखली. गंगाधर गाडगीळांनी 'रणांगण'ला 'साहित्याच्या मानदंडा'त नेऊन बसविली. 'रणांगण'च्या निवेदन पद्धतीतील चित्रपटकथातंत्र हा मुद्दा श्री. माधव आचवलांनी सर्वप्रथम मांडला. प्रा. अरुण दुभाषी व भाई-भगत यांनीही तसेच मत नोंदविले आहे. कुसुमावती देशपांडे यांनी तिचा मोठेपणा विशद केला; उषा हस्तकांनी 'रणांगण'चे अनेक संदर्भ-सूचकत्व दाखविले. डॉ. द. भि. कुळकर्णी यांनी आपल्या 'तिसऱ्यांदा रणांगण' (१९७६) व 'पहिल्यांदा रणांगण' (१९९३) मध्ये 'रणांगण'चे दीर्घ भावकाव्यत्व दाखवून 'रणांगण' ही कादंबरी, कादंबरी लेखनप्रकाराचा अत्युच्च घाट आहे हे दाखवून दिले. दर वेळी एक वेगळेच सौंदर्य घेऊन ती त्यांच्यापुढे येत असल्याने, तिच्या वेगवेगळ्या कलात्मक पैलूंचे दर्शन रसिकांना ते घडवीत असतात.

'रणांगण'वर समीक्षकांनी इतके लिहिले की, 'रणांगण समीक्षेची समीक्षा' (१९९९) व 'रणांगण समीक्षेची साठ वर्षे' (२००६) हे दोन समीक्षाग्रंथ तयार झाले. महाविद्यालयाच्या अभ्यासक्रमात ही कादंबरी लावल्याने मराठीतील अभ्यासकांचे लक्ष तिच्याकडे गेले.

बेडेकरांनी 'एक झाड दोन पक्षी' हे आत्मचरित्र १९८२-१९८३ साली लिहिले. १९८४ साली ते प्रकाशित झाले. त्याला १९८५ साली साहित्य अकादमीचा पुरस्कार मिळाला. स्वित्झर्लंडमधील वास्तव्यात त्यांनी मालतीबाईंना लिहिलेली पत्रे 'सिलिसबर्गची पत्रे' या नावाने प्रसिद्ध झालेली आहेत. विदर्भ साहित्य संमेलनाच्या तिसाव्या अधिवेशनाचे अध्यक्षपद (१९७३), तसेच मुंबई येथे झालेल्या अखिल भारतीय मराठी साहित्य संमेलनाचे अध्यक्षपद (१९८६) हे दोन्ही बहुमान त्यांना मिळाले. कादंबरी, आत्मचरित्र, पटकथा, नाटक ह्या क्षेत्रांमध्ये आपला आगळावेगळा ठसा उमटवून ३० ऑक्टोबर, १९९८ रोजी ते काळाच्या पडद्याआड गेले.

– डॉ. उषा कोटबागी

**संदर्भ :**

*१. सोमण मंजूषा; 'रणांगण': समीक्षेची समीक्षा'.*
*२. 'रणांगण'- समीक्षेची साठ वर्षे'; २००६.*

## बेहरे, गणपती वासुदेव

☞ **मुख्य नोंद – पत्रकारिता आणि ललितेतर साहित्य खंड**

## बोकील, मिलिंद श्रीधर

**कथाकार, कादंबरीकार, समाजशास्त्रज्ञ**

**१ मे १९६०**

वंचित समाजघटकासाठी सामाजिक जाणिवेतून क्रियाशील असणारे समाजशास्त्राचे अभ्यासक मिलिंद श्रीधर बोकील यांचा जन्म पुणे जिल्ह्यातील राजगुरुनगर

ब



येथे झाला. त्यांचे शालेय शिक्षण डोंबिवली येथे तर अकरावी-बारावीचे शिक्षण मुंबईच्या रुईया महाविद्यालयात झाले. नंतर त्यांनी मुंबईतील सेन्ट झेव्हिअर्स टेक्निकल इन्स्टिट्यूट या संस्थेतून डिप्लोमा इन इलेक्ट्रॉनिक्स ॲण्ड रेडिओ इंजिनिअरिंग ही पदविका मिळविली. पुढे त्यांचा वेगवेगळ्या स्वयंसेवी संस्थांशी संबंध आला. आदिवासी विभागात कार्य करणाऱ्या बोकील यांच्यावर विनोबा, गांधी, जयप्रकाश यांच्या विचारांचा बराच परिणाम झाला. १९७९ पासून ते जयप्रकाशांच्या 'संपूर्ण क्रांती आंदोलना'त सहभागी झाले व 'छात्रयुवा संघर्ष वाहिनी'शी संबंधित कार्य करू लागले. काही काळाने आंतरिक प्रेरणेतूनच समाजशास्त्र या विषयातील बी.ए. (१९८४) व एम.ए. (१९८६) या पदव्या त्यांनी मुंबई विद्यापीठातून संपादन केल्या. १९९२ मध्ये समाजशास्त्र या विषयातील पीएच.डी. या पदवीसाठीचे संशोधन त्यांनी पुणे विद्यापीठातून पुरे केले. 'उदकाचिया आर्ती' (१९९४), 'झेन गार्डन' (२०००) हे कथासंग्रह; 'समुद्रापारचे समाज' (२०००) हा विदेशी समाजचित्रण करणारा प्रवासलेखांचा संग्रह; 'जनाचे अनुभव पुसतां' हा समाजशास्त्रीय अभ्यासपर लेखांचा संग्रह, 'कातकरी: विकास की विस्थापन' हे मानवशास्त्रीय संशोधन; 'शाळा' (२००४), 'एकम्' (२००८) व 'समुद्र' (२००९) या कादंबऱ्या असे बोकील यांचे एकंदर लेखन आहे.

सामाजिक कार्यात निमग्न असणाऱ्या बोकिलांच्या सर्जनशील लेखनातून सामाजिक वास्तवाची, त्यातील पेचप्रसंगांची व समस्यांची समज प्रकट होते. त्यामुळेच त्यांच्या कथा व्यक्तींचे चित्रण करताना व माणसाच्या एकाकीपणाचा बोध घडविताना व्यक्ती व समाज आणि व्यक्ती व तिचा परिसर यांच्यातील आंतरक्रियांशी निगडित असतात. 'उदकाचिया आर्ती' या त्यांच्या गाजलेल्या कथेमधून समकालीन राजकीय-सामाजिक समस्यांचे साक्षात संदर्भ असले, तरी ती कथा केवळ विशिष्ट व्यक्ती व परिस्थिती यांपुरतीच मर्यादित राहत नाही. व्यक्तीला आयुष्यातील निर्णायक प्रसंगांना सामोरे जाताना निर्णय घ्यावे लागतात व तदुत्पन्न परिणामांचा स्वीकार करावा लागतो, याचे भान बोकील मर्मग्राही पद्धतीने उत्पन्न करतात. सामाजिक कार्यकर्त्याचा पिंड असणाऱ्या मिलिंद बोकील यांची तीव्र संवेदनशीलता समाजातील विविध समस्यांशी निगडित अनुभवांचा बारकाव्याने वेध घेते. माणूस आणि यंत्र यांच्यातील नाते स्पष्ट करणारी 'यंत्र', स्त्री-स्वातंत्र्याच्या संकल्पनेवर प्रकाश टाकणारी 'अधिष्ठान', जीवनाच्या अनाकलनीयतेचा बोध घडविणारी 'झेन गार्डन' यांसारख्या कथा बोकिलांची कथालेखनावरील पकड स्पष्ट करणाऱ्या आहेत. व्यामिश्र जीवनानुभव साकार करणाऱ्या व व्यंजनेने अनेक गोष्टी सुचविणाऱ्या बोकिलांच्या कथालेखनात वाचनीयतेला ढळ पोचत नाही की त्यांत क्लिष्टता वा अकारण गूढता येत नाही. अनुभवाला अचूक शब्दरूप देण्याची त्यांची क्षमता उल्लेखनीय आहे.

त्यांची 'शाळा' ही कादंबरी नववीच्या वर्गात शिकणाऱ्या जोशी या विद्यार्थ्याचे शाळेतील वेगवेगळे अनुभव चित्रित करते. कुमारवयीन मानसिकता आणि तरुण व प्रौढ मानसिकता यांना थेट भिडणाऱ्या बहुविध प्रसंगांचे रेखाटन करणारी ही कादंबरी संबंधित अनुभवांतर्गत वास्तवाभिमुख नाट्यात्मता रंगवते. कुमारवयातील लैंगिकतेची स्फुरणे शालेय वातावरणात कोणता आकार धारण करतात, ते सूक्ष्मपणे सूचित करताना कादंबरीकाराने जोशी, चित्रे, सुऱ्या, केवडा, शिरोडकर इत्यादी मुलामुलींचे मनोव्यापार प्रभावीपणे शब्दांकित केले आहेत. अणीबाणीच्या काळाचा व तत्कालीन वातावरणाचा संदर्भ देऊन शालेय वातावरणाशी राजकीय घडामोडींचा संबंध जोडल्यामुळे या कादंबरीला एक सुदृढ परिमाण आपोआप प्राप्त होते. शालेय जीवनाला वाहिलेली मराठीतील ही पहिली कादंबरी आहे. कुमारवयातील मुले, त्यांची मानसिकता, लैंगिक अनुभवांसंबंधी त्यांना असणारी उत्सुकता व कुतूहल,

ब

मुलींबद्दल त्यांना वाटणारी ओढ, त्यांच्याशी घडणारे वर्तन, अल्पजीवी ठरणारे त्यांचे प्रेमजीवन, भावी आयुष्यासंबंधीच्या त्यांच्या अनिश्चित कल्पना, शिक्षकांविषयीच्या त्यांच्या उत्स्फूर्त व स्वाभाविक प्रतिक्रिया इत्यादींचे सूक्ष्म आकलन 'शाळा' या कादंबरीच्या यशास कारणीभूत ठरले आहे.

आत्मसंवादाचा आकृतिबंध धारण करणारी 'एकम्' ही त्यांची दुसरी कादंबरी एका समर्थ, ताकदवान लेखिकेच्या अंतर्मनातील विविध गुंते उकलून दाखवते. आपल्या एकटेपणाच्या अवस्थेत लेखिकेने एकटेपणाशीच तटस्थपणे केलेला हा संवाद आहे. स्वत:ला स्वत:पासून वेगळे करत व स्वत:लाच न्याहाळत एकंदर आयुष्याचा, त्यात आलेल्या स्त्री-पुरुषांचा व लेखनासाठी निश्चयपूर्वक किंमत मोजणाऱ्या स्त्रीच्या मनोरचनेचा वेध घेणारी ही कादंबरी आहे.

नंदिनी व भास्कर या आनंदी दाम्पत्याच्या जीवनात नंदिनीला येऊन गेलेल्या परपुरुषसंबंधाच्या अनुभवामुळे उत्पन्न झालेली गुंतागुंत, तिचा संबंधित व्यक्तीच्या - भास्करच्या - भावविश्वावर झालेला परिणाम आणि घायाळ मनाची आंदोलने 'समुद्र' या कादंबरीत प्रत्ययकारी पद्धतीने व्यक्त झाली आहेत. भावनिक वादळानंतर स्वत:ला आवरून प्रगल्भ आंतरिक समजुतीच्या साहाय्याने आपले ढासळते भावविश्व सावरणारे बोकिलांनी निर्मिलेले हे जोडपे समकालीन स्त्री-पुरुषांच्या सहजीवनाला उपकारक अशी दिशा दर्शविते. बोकील सर्जनशील लेखनातून समूहजीवनाचे व्यक्तिमनावर होणारे परिणाम आणि व्यक्तीच्या व्यक्तिमत्त्वाचा स्वत:च्या निर्णयावर पडणारा प्रभाव, यांचा एकात्म असा सुमेळ साधताना पारंपरिक संचिताचे सातत्य कायम राखतात.

'कातकरी: विकास की विस्थापन' हे बोकील यांनी केलेले मानवशास्त्रीय संशोधन आहे. कातकरी समाज हा आदिम समाज असून त्याच्या आजवरच्या ससेहोलपटीचा आढावा त्यांनी प्रस्तुत ग्रंथातून घेतलेला आहे. खैराच्या झाडापासून कात तयार करणे हा व्यवसाय शेकडो वर्षे करणाऱ्या कातकरी समाजाचे भवितव्य; हा लेखकाच्या चिंतेचा विषय आहे. ब्रिटिश काळापासून जंगले शासनाच्या ताब्यात आली व जंगलांवरचे कातकऱ्यांचे पारंपरिक हक्क व अधिकार संपुष्टात आले. परिणामतः कंत्राटदार आले आणि स्वतंत्र उद्योग करणारे कातकरी बांधील मजूर झाले व त्यांचे शोषण सुरू झाले. तथाकथित वेगवेगळ्या विकास-योजना आखल्या जात असल्या, तरी कातकऱ्यांना उत्पन्नाचे कायमस्वरूपी साधन नसल्यामुळे हा समाज देशोधडीला लागण्याची वेळ आली. अशा परिस्थितीत जागतिकीकरणाच्या रेट्यामध्ये कातकरी समाजाचा विकास होणार की विस्थापन होणार, हा गंभीर प्रश्न विचारार्थ घेऊन, रायगड जिल्ह्यामधील कातकऱ्यांचा बारकाईने अभ्यास करून बोकिलांनी हा ग्रंथ लिहिला आहे.

'समुद्रापारचे समाज' या प्रवासलेखसंग्रहातून बोकील यांनी आशिया-युरोपपासून दक्षिण अमेरिकेपर्यंत पसरलेल्या विविध समाजांच्या जीवनपद्धती आणि समस्या स्पष्ट केल्या आहेत. हा प्रवास केवळ भौगोलिक स्वरूपाचा नसून आपल्या सामाजिक प्रश्नांच्या संदर्भात संस्कृतिचक्राच्या प्रगती-अधोगतीचा, प्रकृति-विकृतीचा आणि शोषणाचा विविध पातळ्यांवरील वैचारिक शोध आहे. फिलिपिन्स,-थायलंड,-जपानपासून-बैराईट,-ॲमस्टरडॅम ते झिम्बाब्वे,-कोस्टारिकापर्यंत पसरलेल्या विविध समाजांच्या जीवनपद्धतींचे अवलोकन बोकील करतात. पाश्चात्त्य लोकांच्या संपर्कामुळे व प्रभावामुळे आदिवासी समाजातील निसर्गसन्मुख जीवनपद्धती लोप पावत चालल्याची भीती त्यांना वाटते. प्रगत देशांतील वाढत्या चंगळवादामुळे विकसनशील समाजाचे होत असणारे शोषण त्यांच्या चिंतेचा विषय ठरते. जागतिकीकरण आणि संस्कृतिसंवर्धन यांचे दार्शनिक विश्लेषण करणारे हे पुस्तक बोकील यांच्या प्रगल्भ वाङ्मयीन व्यक्तिमत्त्वाचा आणि संयतशील लेखनशैलीचा प्रत्यय आणून देते.

'जनाचे अनुभव पुसतां' (२००२) या लेखसंग्रहातून लेखकाने माणसे, त्यांच्या भोवतालची नैसर्गिक

ब

साधनसंपत्ती व तिचा ते करीत असलेला वापर या अनुषंगाने एका सामाजिक स्थित्यंतराचा समग्रतेने घेतलेला शोध मांडला आहे. ही मांडणी क्षेत्रीय पाहणी, स्वयंस्फूर्त संस्थांच्या कार्यपद्धतीचे अवलोकन व संबंधित विषयाचा ऐतिहासिक मागोवा अशा वेगवेगळ्या दृष्टिकोनांतूनन केलेली आहे. शेतजमिनीचे प्रश्न, औद्योगिकीकरणाबरोबर येणाऱ्या नागरीकरणातून निर्माण होणारे प्रश्न, पर्यावरणाचे प्रश्न, जंगलखात्याच्या जमिनीचे प्रश्न, भारतीय शेतीचे प्रश्न असे विविध प्रश्न मुळात बोकील यांना त्यांच्या समाजकार्यातील सहभागामुळे पडलेले आहेत. आणि त्यांचा उलगडा करण्याच्या प्रयत्नातून त्यांनी केलेल्या समाजशास्त्रीय संशोधनाचे फलित म्हणजे हा लेखसंग्रह. बोकिलांच्या सूक्ष्म निरीक्षणशक्तीमुळे व निर्मितिशील लेखनशैलीमुळे यातील प्रत्येक लेख चित्रदर्शी स्वरूपात प्रकटतो. या दृष्टीने ‘भूमिकन्यांचे भालप्रदेश’, ‘किनाऱ्यावरचा कल्पवृक्ष’, ‘भरती आणि ओहोटी’, ‘प्राण्यांना अभय, माणसांना वनवास’ हे लेख विचारप्रवर्तक असूनही कोरडे झालेले नाहीत, तर रोचक बनले आहेत. एक समाजशास्त्रज्ञ म्हणून बोकिलांची सकारात्मक दृष्टी या लेखांमधून प्रकटते. नैसर्गिक साधनसंपत्ती टिकविण्याविषयी व ती अधिक उत्पादक करण्याविषयी त्यांनी मांडलेली भूमिका, विकासप्रक्रियेविषयीची त्यांची कल्पना यांमधून त्यांचा आशावादी दृष्टिकोन व्यक्त झाला आहे. तो त्यांना अपेक्षित परिवर्तन घडविण्यास साहाय्यकारी ठरणारा आहे.

बोकिलांच्या ‘उदकाचिया आर्ती’ या कथेला १९९४ साली दिल्लीतील ‘कथा’ या संस्थेने विशेष पुरस्कार देऊन गौरविले आहे. शिवाय या कथासंग्रहास ‘महाराष्ट्र फाउंडेशन’ पुरस्कार प्राप्त झाला आहे. ‘समुद्रापारचे समाज’ या पुस्तकास ‘केशवराव कोठावळे पारितोषिक’ लाभले आहे.

– प्रा. डॉ. विलास खोले

**संदर्भ :**

१. *बोकील मिलिंद श्रीधर; ‘उदकाचिया आर्ती’; मौज प्रकाशन गृह, मुंबई; १९९४.*

ब

## बोकील, विष्णू विनायक

**कथाकार, कादंबरीकार**

**२ जून १९०३ – २२ एप्रिल १९७३**



विष्णू विनायक बोकील यांचा जन्म पुणे मुक्कामी झाला. पुण्याच्या नूतन मराठी विद्यालयातून माध्यमिक आणि स.प. महाविद्यालय, पुणे येथे त्यांचे महाविद्यालयीन शिक्षण झाले. बी.ए.बी.टी. झाल्यावर बार्शी येथे त्यांनी शिक्षकी पेशाला सुरुवात केली. नंतर, अखेरपर्यंत पुण्याच्या नूतन मराठी विद्यालयात त्यांनी शिक्षक म्हणून काम केले. अत्यंत व्यवस्थित, टापटिपीत राहणारे, उपक्रमशील आणि विद्यार्थीप्रिय शिक्षक म्हणून ते ओळखले जात. प्रारंभापासूनच त्यांना वाचनाची व लेखनाची आवड होती.

बोकीलांनी आपली साहित्यिक म्हणून कारकीर्द शिक्षकी पेशात पडल्यावर कथाकार म्हणून सुरू केली. तत्कालीन प्रसिद्ध ‘यशवंत’ मासिकात ‘कटुसत्य’ ही त्यांची पहिली कथा प्रसिद्ध झाली असली, तरी १९२९ साली प्रसिद्ध झालेल्या ‘बेबी’ या दीर्घकथेने कथाकार म्हणून त्यांचा सन्मानाने उल्लेख होऊ लागला. ‘फोल आशा’ ही १९३० साली प्रसिद्ध झालेली त्यांची पहिली कादंबरी होय. त्यांनी अनेक प्रकारचे विपुल लेखन केले असून त्यात नाटके, चित्रपटकथा, बालसाहित्य इत्यादीचा समावेश आहे. त्यांच्या बालसाहित्यातील ‘वसंत’ हा हूड पण प्रेमळ बालनायक ना. धों. ताम्हनकरांच्या ‘गोट्या’ इतकाच प्रसिद्ध झाला होता.

बोकीलांनी आपल्या लेखनात विविध विषय हाताळले असले तरी त्याला प्राधान्येकरून आणि स्वाभाविकपणे मध्यमवर्गीय पार्श्वभूमी लाभलेली होती. विनोदी कथाकार म्हणूनही त्यांची ख्याती होती. ‘आवाज’ या विनोदी वार्षिकात त्यांच्या विनोदी कथा हटकून असत. त्यांचा विनोद खोडकर; पण निर्विष

आणि मध्यमवर्गीय मानसिकतेवर बेतलेला असे. त्यांच्या लेखनात प्रारंभी स्वातंत्र्यपूर्वकालीन परिस्थितीचेही चित्रण होत असे.

त्यांची भाषा साधी, सोपी, प्रवाही, अकृत्रिम आणि संवाद साधल्यासारखी असे. त्यामुळे त्यांची व्यक्ती व शब्दचित्रे चटका लावून गेली. 'झंझावात' (१९४०), 'चल पुढे' (१९४४), 'आबा' (१९४४), 'बेबीची बहीण' (१९४५) अशी  त्यांच्या कादंबऱ्यांची संख्या मोठी होती, त्यांतील 'तू तिथं मी' (१९४६), 'मायेची शाल' (१९४९) या जास्त वाचकप्रिय ठरल्या.

बोकीलांच्या लेखनात काहीसा पसरटपणा होता. जाता जाता खिल्ली उडवण्याची त्यांची अशी खास शैली होती. त्यांनी अनेक चित्रपटकथा लिहिल्या; पण त्यांतला 'चिमुकला संसार' हा चित्रपट खूप गाजला. जवळपास चाळीस वर्षे बोकीलांनी आपला वाचकवर्ग टिकवून ठेवला होता.

– मधू नेने

## बोरकर, बाळकृष्ण भगवंत

**कवी, कथाकार, कादंबरीकार, अनुवादक**

**३० नोव्हेंबर १९१० – ८ जुलै १९८४**



कवी बाळकृष्ण भगवंत बोरकर यांचा जन्म कुडचडे ह्या गोव्यातील गावी, त्यांच्या आजोळी झाला. बोरी हे त्यांचे मूळ गाव होय. त्यांचे शिक्षण मराठी तीन इयत्तांपर्यंत, इंग्रजी मॅट्रिकपर्यंत, पोर्तुगीज माध्यमिक आणि टीचर्स डिप्लोमा, असे झाले होते. १९३० ते १९४५ सलांपर्यंत गोव्यातील निरनिराळ्या शाळांत त्यांनी अध्यापन केले. त्यानंतर १९४६ साली त्यांनी गोवा स्वातंत्र्यलढ्यात उडी घेतली. 'आमचा गोमंतक' (मराठी) आणि 'प्रजेचो आवाज' (कोंकणी) या नियतकालिकांचे त्यांनी १९४८ व १९५५ साली केले. १९५५-१९७० आकाशवाणी पुणेपणजी केंद्रांवर वाङ्मय विभागाचे संचालन केले.

कवी भास्कर रामचंद्र तांबे यांच्या रूपाने आपल्या कवितेला घराणे लाभले ही बोरकरांची धारणा होती. परंतु; तांबे ज्या संस्थानी वातावरणात जगले, तेथे त्यांनी उत्तान वाटणाऱ्या कविता फाडून टाकल्या. तांब्यांनी कवितेत शरीर पूर्णतः नाकारले नाही; पण मनाच्या नाट्यपूर्ण चित्रणावर भर दिला, तर पोर्तुगीज संस्कृतीतील लॅटिन प्रभाव आणि ख्रिश्चन संस्कृतीतील स्त्री आणि पुरुषांमधील मुक्त सख्यभाव ह्या अनुभवाने भारून जाऊन कवी बोरकर पार्थिवता जपत प्रणयाने झणाणून जात 'लावण्याचा लागून बाण' हा भाव जपू शकतात.. त्यातून स्त्री-मनाप्रमाणे स्त्री-शरीराचे वर्णन करीत, भोग न नाकारताही त्याचे नैसर्गिक भान राखत ते अनुभव जिवंत करू पाहतात. त्यामुळे त्यांची कविता एकाच वेळी सुंदरता आणि अभिरुचिसंपन्नता यांतून प्रेमाची बेहोषी जपत राहते.

'पार्थिव्यातच वास हवा, परि दिव्याचा हव्यास हवा' ही त्यांची दृष्टी सौंदर्यवादाच्या उत्कटता, बंडखोरी, सौंदर्याकांक्षा, बेभान अवस्था अशा वैशिष्ट्यांनी वेगळी

ब

होते. कवी तांबे यांच्यात त्यांना 'समानधर्मा' भेटला आणि मूळचे निसर्गभान प्रेमभानाच्या स्पर्शाने अधिक चेतोहर बनले. त्यात अस्सल भारतीय संस्कृतीचे बळ मिसळल्यामुळे निसर्ग, प्रेम आणि अंतःसंगीत यांतून नवा स्वानुभूतिनिष्ठ भारतीय सौंदर्यवाद त्यांच्या कवितेत साकारला, ज्यात तांब्यांपेक्षा वेगळी अशी विमुक्तता आणि सौंदर्यपिपासू मनाचा बेभानपणा मिसळला. 'लॅटिन एलिमेन्ट' आणि ज्ञानेश्वर तुकाराम यांच्या अमृतवाणीची ओढ यांतून शृंगार आणि शांत रस तिथे एकवटला.

निसर्गातून जीवनसाक्षात्कार या सूत्रातून जगताना ज्ञानेश्वर, टागोर, यांचे बोट पकडून त्यांना निसर्गाच्या आदिप्रेरणेपर्यंत जाता आले आहे. म्हणून तांबे 'प्रेमप्रतीतिधर्मी' झाले, तर बोरकरांचा पिंड 'निसर्गप्रतीतिधर्मी' असा उमटला. मातीच्या धर्माकडून त्यांना ज्योतीच्या मर्मापर्यंत जाता आले. त्यांना निसर्गाबरोबर आत्मरंगाचे उदयास्त पाहता आले; आणि रंगागंधातून मकरंद टिपता आला. प्रतिमांमधून निर्माण झालेले लावण्यविश्व निसर्गप्रतिमांच्या गाळीव अर्करूपाने कवीच्या मनाला 'नितळ निळा स्फटिकावाणी' करून गेला. डॉ. रा. चिं. ढेरे म्हणाले त्याप्रमाणे, 'बोरकरांच्या भावविश्वात 'यौवनाचे झाड' अखंड मोहरलेले आहे' पण त्याच्या पालवीच्या आड परम सत्याचा चंद्र आहे; जो 'अमृताचा' आहे.

ब

कवितेला बा. भ. बोरकरांनी 'लययोगाची हृदयंगम कला' असे म्हटले आहे. म्हणूनच 'रसोत्सवी खोल' बुडून कवीने 'जरेतदेखील माती माझी कशी तयांची धरिते ओल' असा प्रश्न केलेला आहे. मग त्यांची कविता विराग–अनुराग, रती–विरक्ती अशा द्वंद्वांतून प्रेमसोपानाच्या वाटेने शिवत्वाला जाऊन भिडते.

'प्रतिभा' (१९३०), 'जीवनसंगीत' (१९३७), 'दूधसागर' (१९४७), 'आनंदभैरवी' (१९५०), 'चित्रवीणा' (१९६०) 'बोरकरांची कविता' (संपादन मंगेश पाडगावकर १९६०), 'गितार' (१९६५), 'चैत्रपुनव' (१९७०), 'चांदणवेळ' (बोरकरांची निवडक कविता संपादन : कुसुमाग्रज व गो. म. कुलकर्णी १९७२), 'मेघदूत' (१९८०), 'कांचनसंध्या' (१९८१), 'अनुरागिणी' (१९८२), 'चिन्मयी' (१९८४), 'बोरकरांची प्रेमकविता' (संपादन : डॉ. रा. चिं. ढेरे १९८४), 'कैवल्याचे झाड' (निवडक भक्ति कवितांचे संकलन १९८७), हे कवितासंग्रह ही कवी बोरकर यांची कमाई आहे. 'कोकणी – गीताय' (१९६०), 'पाथजणां' (१९६०), 'सासाय' (१९८०) हे त्यांचे कोकणी कवितासंग्रह होत.

ह्या काव्यवाटचालीत त्यांच्या कवितेत झालेले बदल हे कवीचे वृत्तीबदल होते, तो नवकाव्याचा प्रभाव नव्हता. 'चित्रवीणा' ह्या संग्रहात त्यांना आत्मरूप गवसले, तर 'गितार' मधील कवितेत गीतप्रकाराबद्दलचे प्रेम काहीसे कमी होऊन गद्यसदृश वळण आले आणि नवे प्रयोग डोकावू लागले, तर 'चैत्रपुनव'मध्ये खिन्नमनस्कतेतूनही घेतलेला आत्मशोध प्रत्ययास आला, ज्यामुळे सौंदर्यदर्शनाची उत्कटता वाढली. 'अनुरागिणी'मध्ये सामाजिकता, ध्येयवाद गळून कविता अधिक आत्मशोधी बनत आत्मतत्त्व धारण करणारी दिसते.

कवी बोरकरांच्या काव्यप्रवासाच्या उत्तरार्धात रसप्रसन्नता व भारतीय संस्कृतिसंचितात पाय घट्ट रोवून उभे राहण्याची प्रतीती प्रकटलेली आहे. 'चिन्मयी'मध्ये माती व ज्योतीची सांगड आणि कृतार्थता यांचे दर्शन आहे. 'मेघदूताच्या अनुवादात साक्षात्कारी प्रत्यय आहे, तर 'कांचनसंध्या' व 'अनुरागिणी' प्रेमनिसर्गयोगी बनून देहभानापल्याड जाता, जाता शाश्वताचे भान आणि रसमय जीवनवृत्तीचा कृतज्ञ स्वीकार दिसतो. 'महात्मायन' पूर्ण झाले नाही आणि कवितेत जे जसे साधले ते कथालेखन, कादंबरीलेखन व ललितगद्यात साधले नाही.

'कागदी होड्या' (१९३८), 'घुमटावरील पारवे' (१९८६), 'चांदण्यातील कवडसे' (१९८२) आणि 'पावलापुरता प्रकाश' (१९८३) या ललितनिबंध–संग्रहांमध्ये काव्यमयता आणि तत्त्वचिंतन यांचे रसायन आहे. 'घन वरसे रे'सारख्या ललितनिबंधात कविता–स्फुरणाचे चित्र दिसते, तर इतरत्र निसर्गवर्णनपर ललितनिबंधात सौंदर्यपूजन करणारे रसिक मन दिसते.

'प्रियदर्शिनी' (१९६०) आणि 'समुद्रकाठची रात्र' (१९८१) ह्या कथासंग्रहांमध्ये गोव्याच्या मातीचा सांस्कृतिक वारसा आहे तसा ठरीव निसर्गही आहे. वास्तवापासून दूर गेल्यामुळे लेखकाला व्यक्तिमनांचा तळ गाठता आलेला नाही.

'मावळता चंद्र' (१९३८), 'अंधारातील वाट' (१९४३), 'भावीण' (१९५०), 'प्रिय कामा' (१९८३) यांमध्ये 'भावीण'मधील गोमंतकीय वातावरण व देवाला अर्पण केलेल्या स्त्रीच्या जीवनाचे चित्र प्रभावी होते. देवदासीजवळही निष्ठा असतात हे दाखविणारी शेवंती हे उदात्त विचारसरणी व मूल्यकल्पना यांचे स्त्री-चित्र होते. 'प्रिय-कामा' मध्ये रामायणातील कैकेयीकडे बघताना त्यांनी पुराणाला आधुनिकतेचा स्पर्श दिला.

बोरकरांनी ज्या हिंदी कविता रचल्या, त्यांबद्दल ग. दि. माडगूळकरांनी 'तीळ आणि तांदूळ' ह्या ललितलेखनसंग्रहात नोंदवून ठेवलेले आहे. त्यातही 'अध्यात्माची आलापी' होती, असे माडगूळकर सांगतात.

कवी बोरकरांना मुलासारखे प्रेम करणाऱ्या दोना प्रोपेयर्स ह्या विदुषींमुळे पोर्तुगीज व फ्रेंच भाषेवर प्रभुत्व मिळविता आले होते. 'महात्मायन' लेखनात बोरकरांना गांधीवादी विचाराने भारले, भारावलेले बोरकर महात्माजींची अलौकिकता टिपताना दिसले होते. त्याची निष्ठा खोटी नव्हती; पण भ्रष्टाचार, सत्तांधता यांच्या दर्शनातून झालेल्या वेदनांमुळे त्यातील भाव काहीसा ओसरला. 'काही स्वप्नानुभव' या लेखात बोरकर कुणावर तरी चिडले, तेव्हा गांधींनी ओठावर बोट ठेवले असे दिसले आणि जाग आली. म्हणून क्रोध जिंकला नाही तोवर 'महात्मायन' चालविण्याची आपल्याला मुभा नाही, असा त्यांनी समज करून घेतला होता.

'आनंदयात्री रवींद्रनाथ' (१९६४) हा प्रबंध, 'महामानव रवींद्रनाथ' (१९७०) हा चरित्रग्रंथ ह्या त्यांच्या टागोर-व्यक्तित्वाशी जवळीक असल्याच्या खुणा होत. बोरकरांनी केलेले 'बापूजींची ओझरती दर्शने' व 'आम्ही पाहिलेले गांधीजी' हे अनुक्रमे काका कालेलकर आणि चंद्रशेखर शुक्ल यांच्या पुस्तकांचे अनुवाद १९५० साली प्रसिद्ध झाले, तर जानकीदेवी बजाज यांच्या 'माझी जीवनयात्रा' ह्या आत्मचरित्राचा अनुवाद १९६० साली प्रकाशित झाला. 'रसयात्रा' या कुसुमाग्रजांच्या निवडक कवितेचे संपादन त्यांनी शंकर वैद्य ह्यांच्या सहकार्याने १९६९ साली केले. विनोबांच्या गीताप्रवचनांना त्यांनी १९५६ साली कोकणीत आणले. अरविंद घोष यांच्या मूळ कलाकृतीवरून 'वासवदत्ता : एक प्रणयनाट्य' (१९७३), खलिल जिब्रान यांच्या मूळ कलाकृतीवरून 'पैगंबर' (१९७३), टागोरांच्या मूळ कलाकृतीवरून 'बामण आनी अभिसार' (१९८१), धर्मानंद कोसंबींच्या मूळ विचारांवरून 'भगवान बुद्ध' असे कोकणीत अनुवाद करून त्यांनी मायभाषेचा गौरव केला.

बा. भ. बोरकर यांना काही सन्मान व पुरस्कार प्राप्त झाले. महाराष्ट्र साहित्य संमेलनाचे पहिले सुवर्णपदक (१९३४), 'भावीण' कादंबरीसाठी गोमंतक मराठी साहित्य संमेलनाचे सुवर्णपदक (१९५०), 'आनंदभैरवी', 'चित्रवीणा', 'गितार' ह्या कवितासंग्रहांना महाराष्ट्र राज्य पारितोषिके, 'आनंदयात्री रवींद्रनाथ' ह्या पुस्तकासाठी महाराष्ट्र राज्याचे रु. ५०००/- चे विशेष पारितोषिक हे त्यांना मिळालेले पुरस्कार होत.

१९६७ साली भारत सरकारतर्फे त्यांना 'पद्मश्री' प्राप्त झाली. त्याच वर्षी त्यांनी अखिल भारतीय कोकणी परिषदेचे अध्यक्षपद भूषविले होते. महाबळेश्वर येथे महाराष्ट्र साहित्य परिषदेच्या विभागीय अधिवेशनाचे अध्यक्षपद भूषविण्याचा सन्मान त्यांना १९७० साली प्राप्त झाला.

स्टीफन झ्वाइग यांच्या कथा, कादंबरीचा अनुवाद त्यांनी मराठीत आणला. 'जळते रहस्य' (कादंबरी १९४५, आणि 'काचेची किमया' (कथा १९५१) ह्या त्या कलाकृती होत.

त्यांनी साहित्याचे विविध प्रकार हाताळले, तरीही बोरकरांची खरी भूमिका कवीचीच होती. सौंदर्य, प्रेम, निसर्ग ह्या निष्ठांमुळे त्यांना दुःख अनुभवूनही निखळ प्रसन्नतेचा गाभा जपता आला. गोव्याच्या सौंदर्यचा वेध घेताना बोलीतील शब्द, संस्कृत अभिजात शब्द यांचा वापर करून एक अनवट शैली निर्माण करून दृक्, श्राव्य,

स्पर्श, गंध ह्या इंद्रियसंवेदनांचा पृथगात्म वापर करीत त्यांनी प्रदेशाच्या रंगाला संस्कृतिस्पर्शाचे सौंदर्य दिले.

त्यांची कविता गुणगुणतच जन्माला आली. तिने अरूप, अशब्द अनुभवांना निसर्गभाषेतून साकार केले. कवी तांब्यांच्या दृष्टीचा दिवा करूनही आत्मत्वाच्या बळाने त्यांनी वाटचाल केली आणि निसर्गप्रतीतिधर्मी (Nature Mystic) हीच आपली पृथगात्मता सिद्ध केली; जिचा गाभा गीतात्मता (Lyricism) हाच होता. बोरकरांच्या जीवनप्रवासाचे खरे वर्णन त्यांच्याच शब्दांत करायचे झाले तर म्हणावे लागेल :

'नाही पुण्याची मोजणी, नाही पापाची टोचणी
जिणे गंगौघाचे पाणी.'

– डॉ. आशा सावदेकर

**संदर्भ :**


१. *कुसुमाग्रज, कुलकर्णी गो. म., संपादक ; बोरकरांची निवडक कविता; कॉन्टिनेन्टल प्रकाशन, पुणे; १९७२.*

२. *पाडगावकर मंगेश, संपादक ; 'चांदणवेल' बोरकरांची कविता; मौज प्रकाशन गृह, मुंबई; १९६०.*

३. *बोरकर बा. भ.; 'चित्रवीणा'; मौज प्रकाशन गृह, मुंबई; १९६०.*


## बोराडे, रावसाहेब रंगनाथ

**कथाकार**

**२५ डिसेंबर १९४०**



ग्रामीण कथाकार रावसाहेब रंगनाथ बोराडे यांचा जन्म, घडण, शिक्षण लातूर (मराठवाडा) जिल्ह्यातील काटगाव येथे झाले. शेतकरी कुटुंबातले लहानपण जगताना, मराठवाड्यातील मराठा समाज हा त्यांच्या अवलोकनाचा आणि नंतर चिंतनाचा विषय झाला.

मॅट्रिकला असताना 'सकाळ' कथास्पर्धेतील 'वसुली' कथेने त्यांची छापील अक्षरांशी ओळख झाली. परभणी येथील शिवाजी महाविद्यालयातून पदव्युत्तर शिक्षण घेऊन ते प्राध्यापक झाले. तोवर कथालेखनाने वेग घेतला होता. वैजापूर येथील विनायकराव पाटील विद्यालयाचे प्राचार्य आणि नंतर देवगिरी कॉलेज, औरंगाबादचे ते प्राचार्य झाले.

शैक्षणिक क्षेत्रातल्या कार्याला समांतर असे त्यांचे साहित्यिक कार्यही जोमाने चालू होते. बालसाहित्य, वगनाट्य, ग्रामीण साहित्य (समीक्षा) असे लेखन असले, तरी त्यांची ठळक नाममुद्रा एका कथाकार म्हणून उमटली आहे. 'पेरणी' (१९६२), 'ताळमेळ' (१९६६), 'मळणी', 'वाळवण' (१९७६), 'राखण' (१९७७), 'खोळंबा' (१९८३), 'नातीगोती' (१९९५), 'कणसं आणि कडबा' (१९९४) असे त्यांचे पंधरा कथासंग्रह प्रसिद्ध झालेले आहेत. कथासंग्रहाच्या शीर्षकावरूनच त्यांचा आशय समजतो. मराठवाडी बोलीभाषेचा वास्तव वापर त्यांच्या कथांतून केलेला दिसून येतो.

'पाचोळा' (१९७१), 'सावट' (१९८७), 'चारापाणी' (१९९०) आणि ज्या कथानकावर नाटक निघाले ती 'आमदार सौभाग्यवती' (१९८८) या कादंबऱ्या त्यांच्या एकूणच साहित्य कर्तृत्वाची साक्ष देतात. मराठवाड्यातले ग्रामीण वास्तव, बलुतेदार, सणवार, श्रद्धा-अंधश्रद्धा, कुटुंबरचना, कुचंबणा झालेल्या बायकामुली, खाणीलेणी, सरकारी योजनांचे आमिष, फसगती, प्रगती आणि अधोगती, गावगाड्याचे राजकारण असा सम्यक ग्रामीण परिसर त्यांच्या साहित्यात समूर्त होतो.

ग्रामीण साहित्याचे मनोहारी दर्शन घडवणारे बोराडे यांचे साहित्य योगदान जितके महत्त्वाचे आहे, तितकेच शैक्षणिक क्षेत्रातील योगदानही आहे. महाराष्ट्र राज्य साहित्य संस्कृती मंडळाचे अध्यक्षपदही त्यांनी भूषवले आहे.

कथाकार, कादंबरीकार आणि ग्रामीण पार्श्वभूमीवर विनोदी कथा लिहिणारे मिस्कील शैलीचे बिनीचे कथाकार म्हणून बोराडे परिचित आहेत.

– डॉ. सुवर्णा दिवेकर

* * *

# भ



## भगत, दत्ता

*भगत, दत्तात्रेय गणपत*

☞ **मुख्य नोंद – पत्रकारिता आणि ललितेतर साहित्य खंड**

## भट, गोविंद केशव

**संस्कृतज्ञ, कथाकार, कादंबरीकार, नाटककार**

**२ मे १९१४ – १८ जुलै १९८९**



गोविंद केशव भट यांचा जन्म नाशिक येथे झाला व त्यांचे मॅट्रिकपर्यंतचे शिक्षणही तेथेच झाले. नंतर मुंबईत संस्कृत हा विषय घेऊन, कधीही प्रथम श्रेणी न सोडता त्यांनी स्नातकोत्तर एम. ए. पर्यंतचे शिक्षण घेतले व १९४४ साली 'विदूषक' या विषयावर मराठी, इंग्रजी व गुजराती ह्या भाषांतून प्रबंध प्रकाशित करून त्यांनी प्रतिष्ठित असे व्ही. एन. मंडलिक सुवर्णपदक मिळवले. 'भासकृत नाटके' या विषयात त्यांना पीएच. डी. मिळाली.

डॉ. भट यांनी सुमारे २५ पुस्तके व अनेक शोधप्रबंध इंग्रजी, मराठी व गुजराती ह्या भाषांत सादर करून साहित्यिक मान्यता मिळवली. कुशल चिकित्सक विद्वान व रसिक, व्यासंगी गोविंदराव हे हाडाचे शिक्षक असून अत्यंत मनमिळाऊ, निगर्वी व नम्र होते. अभिजात वाङ्मय, नाटके व नाट्यशास्त्र, तसेच काव्य हे त्यांचे आवडते विषय होते. 'मास स्टडीज' (१९६८) 'अपॉइंटमेंट विथ कालिदास', 'ट्रॅजेडी इन संस्कृत ड्रामा', 'संस्कृत ड्रामा', 'ए पर्स्पेक्टिव्ह इन थिअरी अँन्ड प्रॅक्टिस', 'भरत नाट्यमंजरी', 'नाट्यमंजरी सौरभ', 'थिएट्रिक ॲस्पेक्ट्स ऑफ संस्कृत ड्रामा' हे त्यांचे काही महत्त्वाचे ग्रंथ होत.

नाट्यतत्त्वे व त्यांचे रंगभूमीवर अवतरण यांचा सखोल, चिकित्सक अभ्यास यांत रुची असल्यामुळे संस्कृत नाटके बसविण्यात ते वाकबगार होते. रंगभूमीसंबंधी चळवळीत तत्संबंधी संस्था त्यांना आग्रहाने निमंत्रणे देत असत. विद्वत्तापूर्ण समालोचन, कलात्मक मूल्यांकन व मनोहारी अभिव्यक्ती यांचा दुर्लभ संगम त्यांच्यामध्ये दिसून येई. समाजाभिमुखता व नर्म विनोदप्रियता हे त्यांचे स्वभाववैशिष्ट्य होते. इंग्रजीवर असाधारण प्रभुत्व व कालिदासाच्या व्यक्तित्वासंबंधी मूलग्राही चिंतनाची प्रतीती त्यांच्या सुगम, रसाळ, ओगवत्या शैलीतून येते.

'गृह दाह' (नाटक, १९४४) व 'विदूषक' या त्यांच्या दोन पुस्तकांना महाराष्ट्र शासनाची पारितोषिके मिळालेली आहेत. 'अमृत' मासिकातून त्यांनी संस्कृत नाटककार व त्यांची नाटके यांचा मराठी वाचकांना सुबोध आणि सुगम परिचय करून दिला. 'प्रणय' (१९४३) ही कादंबरी, 'अंधार-उजेड' (१९६२) हा लघुकथासंग्रह, 'कालिदास दर्शन' (१९६८), 'संस्कृत नाटके आणि नाटककार' (१९८०) आणि 'भवभूती' (१९८६) ही त्यांची आणखी उल्लेखनीय साहित्यसंपदा.

– वि. ग. जोशी

**संदर्भ :**


१. *कामत श्रीराम पांडुरंग, संपादक; 'मराठी विश्वचरित्र कोश', खंड-३,*

२. *Annals of the Bhandarkar Oriental Research Institute, 1989.*


भ

## भट, सुरेश श्रीधर

**कवी, गीतकार, गझलकार, पत्रकार, संपादक**

**१५ एप्रिल १९३२ – १४ मार्च २००३**



गझलकार सुरेश भटांचा जन्म अमरावती येथे रामनवमीच्या दिवशी झाला. त्यांचे मूळ घराणे मध्य प्रदेशातील जबलपूरचे होय. सुरेश भटांचे वडील श्रीधरपंत भट हे कान-नाक-घसा तज्ज्ञ होते. ते विदर्भातील अमरावती शहरात ज्या भागात राहत, तो भाग विविध जातिधर्माच्या लोकांचा होता. शिवाय श्रीधरपंताना मराठीपेक्षा हिंदी व इंग्रजी ह्या भाषाच जास्त जमत. कारण त्यांच्या वर्तुळात मुस्लीम, पारशी, ख्रिश्चन अशा अ-मराठी लोकांचाच भरणा अधिक असे. सुरेश भटांच्या मातोश्री शांताबाई ह्या गृहिणी व सामाजिक कार्यकर्त्या होत्या. त्यांना लेखनाची आवड होती. वयाच्या आठव्या वर्षी सुरेश भटांचा डावा पाय पोलिओमुळे अधू झाला. त्यामुळे पुढे आयुष्यभर त्यांना चालताना काठी किंवा साहाय्यक ह्यांचा आधार घ्यावा लागला.

भटांनी वयाच्या बाराव्या वर्षी, १९४४मध्ये काव्यलेखनास प्रारंभ केला. १९४६-१९४७च्या दरम्यान आपल्या सुमारे ५०-६० कवितांची वही त्यांनी एका वैतागलेल्या मनःस्थितीत विहिरीत टाकून दिली. १९४९-१९५० साली मॅट्रिक झाल्यानंतर ते सकसपणे काव्यलेखन करू लागले. अमरावती येथे विदर्भ महाविद्यालयात शिक्षण घेत असताना त्यांनी महाविद्यालयातील मराठी विषयाचे एक शिक्षक व नामवंत कवी भ. श्री. पंडित ह्यांच्याकडून मार्गदर्शन घेतले. १९५०नंतरच्या त्यांच्या ५०-६० कवितांची वही महाविद्यालयातील एका कविसंमेलनात गहाळ झाली होती. उमेदवारीच्या काळात त्यांच्यावर केशवसुत, तांबे व कुसुमाग्रज अशा तीन कवींचा प्रभाव होता.

मराठी काव्यलेखन चालू असतानाच भटांना उर्दू गझलाचे आकर्षण वाटू लागले व पुढे ते वाढतच गेले. त्यातून ते गझल म्हणजे काय, तो कसा लिहायचा असतो वगैरे गोष्टी शिकत गेले. उर्दू भाषा व उर्दू गझल ह्या गोष्टी सुरेश भट पुस्तकांचा अभ्यास करून जितके शिकले, त्याहून अधिक प्रमाणात ते उर्दू भाषकांच्या सहवासातून, त्यांच्याशी संभाषण करण्यातून व रात्ररात्र जागून ऐकलेल्या मुशायऱ्यांमधून शिकले. अधूनमधून त्यांच्या मराठी कविता प्रकाशित होत होत्या. परंतु हळूहळू नकळतच ते नेहमीच्या मराठी कवितेऐवजी मराठीतून गझल लिहिण्याकडे वळले. अशा प्रकारची गझलाच्या बंधामधील भटांची पहिली कविता 'का मैफलीत गाऊ?' (१९५४) ही आहे.

अभ्यासापेक्षा अवांतर वाचनाकडे भटांचा विलक्षण ओढा होता. त्यामुळे दोन-दोन वेळा नापास होऊन शेवटी ते १९५५ साली कसेबसे बी. ए. झाले. नंतरच्या काळात संयुक्त महाराष्ट्राच्या चळवळीत त्यांनी भाग घेतला. त्यात त्यांना तीन महिन्यांची सक्तमजुरीची शिक्षा झाली. ह्या सर्व घडामोडींमुळे त्यांचे सरकारी नोकरीचे वय उलटून गेले. त्यामुळे मग त्यांची पुढील सात-आठ वर्षे खासगी नोकरी धरणे व सोडणे ह्यांत व त्या निमित्ताने गावे फिरण्यात, भटकण्यात गेली.

भटांनी १९५४पासून मराठी गझल लिहिण्याचा प्रयत्न चालवला असला, तरी त्यांच्या दृष्टीने खरा व बरा असा 'शेवटी' गझल त्यांच्या हातून २० मे १९५७ रोजी लिहिला गेला. पुढे त्यांनी ७२ कवितांचा 'रूपगंधा' हा आपला पहिला कवितासंग्रह १५ मार्च १९६१ रोजी स्वतः च प्रकाशित केला. ह्या संग्रहाला महाराष्ट्र शासनातर्फे दुसरे पारितोषिक विभागून देण्यात आले. १९६४मध्ये मूळच्या पुण्याच्या, परंतु माधान (जि. अमरावती) ह्या गावी शिक्षिका म्हणून नोकरी करीत असलेल्या कु. पुष्पा मेहेंदळे ह्यांच्याशी ते विवाहबद्ध झाले.

भटांनी जाणिवेच्या पातळीवरील गझल-लेखनास साधारणपणे १९६३-१९६४पासून प्रारंभ केला. १९६७ साली भोपाळला झालेल्या अखिल भारतीय मराठी साहित्य संमेलनात त्यांनी आपले गझल सादर केले

आणि ते उपस्थित रसिकांनी अक्षरशः डोक्यावर घेतले. हे पाहून संमेलनाला उपस्थित असलेले ‘सत्यकथा’चे संपादक श्री. पु. भागवत ह्यांनी भटांना ‘सत्यकथे’साठी कविता पाठविण्याचा आग्रह केला व त्याचबरोबर ‘मौज’ प्रकाशनामार्फत कवितासंग्रहही प्रकाशित करण्याची तयारी दर्शविली. पुढे सप्टेंबर १९७०च्या अंकापासून भटांच्या कविता, विशेषतः गझल ‘सत्यकथे’तून सातत्याने प्रकाशित होऊ लागले. पुढे श्री. पुं. नी मार्च १९७४मध्ये भटांचा ‘रंग माझा वेगळा’ हा ९२ कवितांचा दुसरा संग्रह मौज प्रकाशनामार्फत प्रकाशित केला. ह्या संग्रहाला महाराष्ट्र शासनाचे ‘केशवसुत पारितोषिक’ मिळाले. हा कवितासंग्रह आजपर्यंत अनेक विद्यापीठांनी विविध वर्गांसाठी अभ्यासक्रमात नेमलेला असून त्याच्या अनेक आवृत्त्याही निघालेल्या आहेत.

१९७५ ते १९७९ ह्या कालावधीत भटांनी नागपूर येथे राहून ‘बहुमत’ नावाचे साप्ताहिक चालवले. नंतर ते बंद करून ३ सप्टेंबर १९८०पासून ते ‘रंग माझा वेगळा’ हा स्वतःच्या गझलांचे वाचन-पठण-गायन असा जाहीर कार्यक्रम तिकीट लावून महाराष्ट्रभर करू लागले. डिसेंबर १९८३ मध्ये त्यांचा ‘एल्गार’ हा ९६ कवितांचा तिसरा संग्रह त्यांनी स्वतःच प्रकाशित केला. ह्या संग्रहाला सोलापूरचा दमाणी पुरस्कार लाभला. २६ डिसेंबर १९८६ रोजी त्यांच्या अध्यक्षतेखाली गडचिरोली येथे ३९वे विदर्भ साहित्य संमेलन पार पडले. गझलाच्या माध्यमातून त्यांनी उर्दू व मराठी ह्या दोन भाषांना जवळ आणल्याबद्दल त्यांचा ‘महाराष्ट्र राज्य उर्दू अकादमी’ने एप्रिल १९८७मध्ये पारितोषिक देऊन गौरव केला. १९८९मध्ये अमरावती येथे पार पडलेल्या अखिल भारतीय मराठी साहित्य संमेलनात त्यांची प्रकट मुलाखत घेण्यात आली. २००३मध्ये विदर्भ साहित्य संघाने ‘जीवनव्रती माडखोलकर’ पुरस्कार प्रदान करून त्यांचा गौरव केला. ‘झंझावात’ (१९९४), ‘सप्तरंग’ (२००२) व ‘रसवंतीचा मुजरा’ (२००७) हे त्यांचे शेवटचे तीन कवितासंग्रह होत. ज्येष्ठ कवयित्री शिरीष पै ह्यांनी ‘सुरेश भट ह्यांची निवडक कविता’ (१९९७) हा त्यांच्या निवडक कवितांचा संग्रह संपादित केलेला आहे. ‘काफला’ (१९९०) हा त्यांनी व मराठी गझल अभ्यासक डॉ. अविनाश कांबळे (सांगोलेकर) ह्यांनी मिळून संपादित केलेला मराठीतील पहिला प्रातिनिधिक गझलसंग्रह आहे. ‘गझलेची बाराखडी’ ही पुस्तिकाही त्यांच्या नावावर आढळते. त्यांच्या जयंतीचे औचित्य साधून २००३मध्ये त्यांच्या जन्मतिथीला म्हणजे रामनवमीला त्यांच्या चाहत्यांनी ‘सुरेश भट: एक झंझावात’ हा त्यांच्यावरील स्मृतिग्रंथ प्रकाशित केला.

भटांचे अनेक गझल व अनेक गीते ह्यांचे गायन लता मंगेशकर, आशा भोसले, हृदयनाथ मंगेशकर, सुमन कल्याणपूरकर, सुरेश वाडकर, रवींद्र साठे, सुधाकर कदम, भीमराव पांचाळे अशा अनेक नामवंत गायक-गायिकांनी केले आहे. पैकी काही गझलांचा व गीतांचा अंतर्भाव ‘निवडुंग’, ‘घरकुल’, ‘उंबरठा’ इत्यादी मराठी चित्रपटांमध्ये करण्यात आलेला आहे. ‘मलमली तारुण्य माझे’, ‘पूर्तता माझ्या व्यथेची’, ‘समजावुनी व्यथेला’, ‘रंगुनी रंगात साऱ्या’, ‘तरुण आहे रात्र अजुनी’, ‘सुन्या सुन्या मैफलीत माझ्या’ हे त्यांचे गझल व ‘मेंदीच्या पानावर’, ‘सखि, मी मज हरपून बसले गं’, ‘हासताना प्राण गेला’, ‘उषःकाल होता होता’, ‘आज गोकुळात रंग खेळतो हरी’, ‘मालवून टाक दीप’, ‘पहाटे पहाटे’, ‘रंग माझा तुला’ ही गीते विलक्षण लोकप्रिय आहेत.

भट हे गझलकार व गीतकार म्हणून मराठी जनमानसाला सुपरिचित असले, तरी त्यांनी काही गद्यलेखनही केले आहे. त्यांचे हे गद्यलेखन सदरांच्या स्वरूपाचे असून ही सदरे त्यांनी ‘बहुमत’, ‘लोकमत’, ‘केसरी’, ‘मेनका’ अशा नियतकालिकांमधून चालवली होती. पैकी ‘गझलिस्तान’ (मेनका), ‘भटकंती’ (केसरी) ही त्यांची सदरे विशेष लोकप्रिय ठरली.

अनेक गझलकार, गझलगायक, गझलअभ्यासक ह्यांच्या जडणघडणीत भटांचा मोलाचा वाटा आढळतो. भीमराव पांचाळे ह्यांच्या नेतृत्वाखालील ‘गजल सागर प्रतिष्ठान’ ही संस्था गझललेखन व गझलगायन ह्या उपक्रमांसाठी समर्पित असून तिचे प्रेरणास्थान व

मार्गदर्शक सुरेश भट हे राहिलेले आहेत. मराठी गझलच्या आजपर्यंतच्या वाटचालीमध्ये अमृतराय–मोरोपंत, माधव जूलियन व सुरेश भट असे तीन प्रमुख टप्पे असून त्यातील भटांचा तिसरा टप्पा हा अनेक कारणांनी आजपर्यंतचा सर्वांत मोठा आणि महत्त्वाचा टप्पा म्हणता येईल. भटांनी मराठीत तंत्रशुद्ध गझल रुजवला, वाढवला आणि लोकप्रियही केला. त्यांच्या गझलाइतकेच त्यांचे हे गझल–कार्यही तितकेच महत्त्वाचे आहे, ह्यात शंका नाही.

– डॉ. अविनाश सांगोलेकर

**संदर्भ :**


१. *सांगोलेकर अविनाश; 'मराठी गझल', १९२० ते १९८५; नीहारा प्रकाशन, पुणे; १९९५.*

२. *सांगोलेकर अविनाश, संपादक; 'मराठी गझलविश्व'; गझल सागर प्रतिष्ठान, मुंबई; २००५.*

३. *कुलकर्णी द. भि.; 'सुरेश भट: नवे आकलन'; आकांक्षा प्रकाशन, नागपूर; २००५.*


## भणगे, श्रीनिवास जगन्नाथ

**कथाकार, नाटककार**

**२४ डिसेंबर १९४६**



श्रीनिवास जगन्नाथ भणगे यांचा जन्म कर्जत (जि. अहमदनगर) येथे झाला. शिक्षण अहमदनगर येथे झाले. अहमदनगर महाविद्यालयातून १९६० मध्ये भणगे यांनी पदवी मिळवली. काही वर्षे बँकेत नोकरी केल्यावर त्यांनी पूर्ण वेळ लेखनास वाहून घेतले.

त्यांचे प्रारंभीचे लेखन तत्कालीन लोकप्रिय मासिकांतून प्रसिद्ध झाले. कथा–कादंबऱ्यांपेक्षा त्यांचा कल नाट्यलेखनाकडे अधिक आहे. सुरुवातीला त्यांनी 'चोरावर मोर (१९६५), 'हातोहात' (१९६८) आदी एकांकिका लिहिल्या. त्यानंतर व्यावसायिक रंगभूमीवर यशस्वी ठरलेली 'अरे अश्वत्थामा' (१९७१), 'शांतेचं कार्टं चालू आहे' (१९७१), 'मॅडम' (१९८२), 'आकाशाशी जडले नाते' (१९८२) आदी नाटके लिहिली. 'मुखवटे आणि चेहरे' (१९७५), 'समान्तर' (१९७१) अशा काही कादंबऱ्या आणि काही बालनाट्ये त्यांच्या नावावर जमा आहेत

– संपादक मंडळ

**संदर्भ :**


१. *पुंडे रमेश; 'चित्र नाट्यश्री श्रीनिवास भणगे'; निहार–दिवाळी १९८९.*

२. *भणगे श्रद्धा; 'नाते मैत्रीचे'; महाराष्ट्र टाइम्स–१३ ऑक्टोबर २००२.*


## भवाळकर, तारा चिंतामण

**समीक्षक**

**१ एप्रिल १९३९**



लोकसंस्कृतीविषयी विपुल लेखन करणाऱ्या ताराबाई भवाळकर यांचा जन्म पुणे येथे झाला. ताराबाईंच्या वडिलांच्या सतत बदल्या होत, त्यामुळे त्यांचे शालेय शिक्षण एका ठिकाणी होऊ शकले नाही. एस.एस.सी. नंतरचे सर्व शिक्षण त्यांनी नोकरी करून बहि:स्थ पद्धतीने केले. १९६७ साली त्या एम.ए. झाल्या. त्याखेरीज राष्ट्रभाषा पंडित व अनुवाद पंडित या परीक्षाही त्या उत्तीर्ण झाल्या. पीएच.डी. साठी त्यांचा विषय होता 'मराठी पौराणिक नाटकाची जडणघडण' (प्रारंभ ते १९२०). त्यांच्या या प्रबंधाला पुणे विद्यापीठाचे सर्वोत्कृष्ट प्रबंधासाठीचे पारितोषिक मिळाले.

ज्ञानाच्या आवडीतून त्यांनी अध्यापन हेच क्षेत्र निवडले. १९५८ पासून १९७० पर्यंत माध्यमिक शाळेत शिक्षिका, १९७० पासून १९९९ पर्यंत सांगली येथील श्रीमती चंपाबेन वालचंद शाह महिला महाविद्यालयात प्राध्यापिका म्हणून त्या कार्यरत राहिल्या. विद्यावाचस्पती

भ

(पीएच. डी.) मार्गदर्शक या नात्यानेही त्यांचे कार्य उल्लेखनीय आहे. बृहन्महाराष्ट्रातील अनेक संस्था आणि विद्यापीठातून त्यांनी विविध विषयांवर व्याख्याने दिली आहेत. 'मायवाटेचा मागोवा' हे पुस्तकही स्त्रीवादी दृष्टिकोनातून संशोधन करणाऱ्यांना मूल्यवान संदर्भ म्हणून उपयुक्त आहे.

पारंपरिक, अगदी ब्राह्मणी वळणाच्या मध्यम कुटुंबात जन्मलेल्या ताराबाईंनी वस्तुनिष्ठ व यथार्थ चिकित्सक दृष्टी प्रयत्नपूर्वक जोपासून, स्त्री-जीवनाविषयी विशेष आस्थेने, लोकसंस्कृतीचे, लोकसाहित्याचे, लोककलेचे सखोल व व्यापक दर्शन घडविण्यात प्रशंसनीय कामगिरी बजावली आहे. त्यांचे बहुतेक लेखन लोकसंस्कृती व नाटक या दोन विषयांवर असून त्यांनी पूर्वसुरींचे संशोधनपर साहित्य अभ्यासले आहे. बालजीवनातल्या समृद्ध अनुभवांची शिदोरी त्यांच्या चांगलीच कामाला आली. डॉ. श्रीधर व्यंकटेश केतकर, वि. का. राजवाडे, धर्मानंद कोसंबी, तसेच दुर्गाबाई भागवत, डॉ. रा. चिं. ढेरे प्रभृती महानुभावांच्या प्रत्यक्ष व अप्रत्यक्ष प्रेरणेचा व मार्गदर्शनाचा ताराबाई कृतज्ञतेने उल्लेख करतात.

'लोकसाहित्यातील स्त्री प्रतिमा' या आपल्या प्रथम पुस्तकाविषयी निमित्त म्हणून आंतरराष्ट्रीय महिला मुक्ती वर्ष १९७५ झाले तरी त्यांना तीव्रतेने जाणवले की, 'आजवर पारंपरिक स्त्रीविषयी जे लिहिले-बोलले जात आहे, (गेले आहे) त्या सर्वांचे आधार पुरुष लेखकांच्या लेखनात आहेत.... मग खऱ्या अर्थाने स्त्रीचे मन कुठे भेटत असेल, तर ते स्त्री-रचित परंपराशील देशी भाषेतील लोकसाहित्यात.' त्यांना करुणेने, वेदनेने ओथंबलेली बाई दिसली त्यापेक्षा अधिक विद्रोह करणारी ही बाई त्यांना ओव्यांतून, कथागीतांतून दिसली. नाट्यक्षेत्रात पौराणिक नाटक, लोकनाट्य, दशावतार, तंजावरची नाटके, यक्षगान, कथकली अशा विविध नाट्यप्रकारांची जडणघडण शोधताना ताराबाईंनी दक्षिण भारताचा प्रवासही केला. रंगभूमीवर अभिनय, दिग्दर्शन, लेखन इत्यादी नात्यांनी काम केल्यामुळे नाट्याभ्यासात त्यांना भरीव मदत झाली. 'लोकपरंपरा आणि स्त्री प्रतिभा' हे ताराबाईंचे पुस्तक म्हणजे त्यांच्या सैद्धान्तिक अभ्यासाचा पुरावाच म्हटले पाहिजे. आकाशवाणीच्या कै. पु. मं. लाड व्याख्यानमालेच्या निमित्ताने 'स्त्री-मुक्तीचा आत्मस्वर' प्रकटला (१९९४).

मराठी विश्वकोश, मराठी वाङ्मयकोश, मराठी ग्रंथकोश आदी महत्त्वाच्या कार्यात त्यांचे योगदान आहे. १९९१ साली अमेरिकेतल्या अरिझोना स्टेट युनिव्हर्सिटीत आयोजित, 'भारतीय समाज, संस्कृती आणि स्त्री' या विषयावरील चर्चासत्रात भाग घेण्यासाठी खास निमंत्रित म्हणून त्यांची भूमिका होती.

ताराबाई यांना मिळालेल्या अनेक पुरस्कारांत महाराष्ट्र राज्य उत्कृष्ट ग्रंथनिर्मिती पुरस्कार (१९९२), 'मराठी नाटक : नव्या दिशा, नवी वळणे' साठी वाङ्मय समीक्षा पुरस्कार व कै. मालतीबाई दांडेकर जीवन गौरव पुरस्कार (२००४) आदींचा समावेश आहे. जागर साहित्य संमेलन, कोकण मराठी साहित्य परिषद पहिले महिला साहित्य संमेलन, महाराष्ट्र-कर्नाटक सीमा प्रदेशातील साहित्य संमेलन व इतरही काही संमेलनांचे अध्यक्षपद त्यांनी भूषविले आहे. ताराबाई यांची ग्रंथसंपदा विपुल असून त्यात विविधताही आहे. 'मधुशाला' (काव्यानुवाद), 'प्रियतमा' (गडकरी साहित्यातील स्त्री प्रतिमा), 'लोकांगण', 'लोकसाहित्य : वाङ्मय प्रवाह', 'मायवाटेचा मागोवा', 'आकलन आणि आस्वाद' (समीक्षा) ही त्यातील काही खास पुस्तके आहेत.

– वि. ग. जोशी

**संदर्भ :**

१. *'चित्रलेखा', दिवाळी अंक; २००८.*

## भांड, बाबा साळूबा

**कादंबरीकार, बालवाङ्मयकार, प्रकाशक**

**२८ जुलै १९४९**

बाबा भांड यांचा जन्म वडजी, तालुका पैठण, जिल्हा औरंगाबाद येथे एका सर्वसाधारण शेतकरी कुटुंबात झाला. त्यांचे प्राथमिक शिक्षण केंद्रीय प्राथमिक शाळा, पिंपरीराजा,

भ



जिल्हा औरंगाबाद येथे, तर माध्यमिक व उच्च माध्यमिक शिक्षण औरंगाबादच्या सरस्वती भुवन हायस्कूलमध्ये पूर्ण झाले. १९६८ मध्ये ते मॅट्रिक उत्तीर्ण झाले. या परीक्षेत ते गुणवत्ता यादीतही झळकले. सरस्वती भुवन महाविद्यालय, औरंगाबाद येथून त्यांनी १९७२ मध्ये बी.ए.ची पदवी प्राप्त केली. १९७५ मध्ये ते मराठवाडा विद्यापीठातून इंग्रजी विषय घेऊन एम.ए. झाले. १९७९ मध्ये त्यांनी उस्मानिया विद्यापीठाची बी.एड.ची पदवी प्राप्त केली.

शालेय जीवनात बालवीर (स्काउट गाइड) चळवळीत सक्रिय सहभाग घेतला होता. प्रारंभिक लेखनालाही त्याच काळात सुरुवात झाली. सहाव्या वर्गात 'वहीतलं बालपण' या शीर्षकांतर्गत रोजनिशी-लेखन केले. इयत्ता आठवीत असताना बालवीर चळवळीतले सर्वोच्च राष्ट्रपतिपदक डॉ.राधाकृष्णन यांच्या हस्ते १९६६ मध्ये प्राप्त झाले. १९६९ मध्ये जागतिक स्काउट गाइड मेळाव्यासाठी भांड यांची निवड भारत शासनातर्फे झाली आणि युवक-युवती मेळाव्यासाठी अमेरिका व कॅनडा या देशांचा प्रवास केला. त्याचनिमित्ताने इतरही अनेक देशांचा प्रवास केला. हे प्रवासवर्णन १९७५ मध्ये 'लागेबांधे' या नावाने प्रकाशित झाले. तत्पूर्वी औरंगाबादच्या 'कैलास', 'अजिंठा', 'जिकाय' इत्यादींतून व 'मनोहर' या नियतकालिकातून सुरुवातीचे लेखन प्रकाशित झाले. १९७२-१९७३ मध्ये महाविद्यालयीन जीवनात 'स्वाती' या काव्यविषयक मासिकाचे संपादन केले. स्काउट कार्यालयातर्फे प्रकाशित होणाऱ्या 'युवक-पत्रिका'चेही त्याच काळात संपादन केले. 'शब्दसंगत' या नवसाक्षरांसाठीच्या पक्षिकाचेही १९७८ पासून संपादन केले. १९९३ मध्ये 'साकेत-सवंगडी' या मासिकाचे संपादन केले. १९७५ मध्ये 'धारा प्रकाशन' नावाची प्रकाशन संस्था सुरू केली. यातूनच पुढे १९८७ मध्ये 'साकेत प्रकाशन' या संस्थेचा जन्म झाला. साकेततर्फे आजवर अनेक मान्यताप्राप्त लेखकांची हजरावर पुस्तके प्रकाशित झाली असून मराठवाड्यातील आणि महाराष्ट्रातील ती एक नामवंत प्रकाशनसंस्था बनली आहे. १९६८-१९७२ या काळात औरंगाबादच्या स्काउट कार्यालयात कारकून म्हणून कार्यरत होते, तर १९७३ ते १९७८ दरम्यान मराठा विद्यालय, औरंगाबाद येथे अध्यापन कार्य केले. १९७६-१९७७ दरम्यान वीटभट्ट्यांचा व्यवसायही केला. प्रारंभी बालसाहित्यकार म्हणून प्रसिद्ध असलेल्या बाबांना १९९५ मध्ये प्रकाशित झालेल्या 'दशक्रिया' ह्या कादंबरीने बाबा भांड ह्यांना एक दर्जेदार लेखक म्हणून मराठी साहित्यविश्वात प्रसिद्धी मिळवून दिली. अंत्यसंस्कार करणाऱ्या वर्गाच्या जीवनावर 'दशक्रिया'चे कथानक बेतले होते. याशिवाय 'जरंगा' (१९७८), 'काजोळ' (१९८४), 'तंट्या' (२००१) या त्यांच्या कादंबऱ्या प्रसिद्ध झाल्या आहेत.

'कोसलाबद्दल' (संपादन, १९७९), 'पांगोरे' (ललितगद्य, १९८१), 'पारंब्या' (प्रवासलेखन, १९८३), 'कायापालट' (कथा, १९८८) आनंदघन (ललित, २००५) हे त्यांचे साहित्य प्रसिद्ध झाले आहे. 'होरपळ' (१९९१), 'दुष्काळ' (१९९१), 'पाण्यासाठी दाहीदिशा' (२००१) हे एकांकिकासंग्रहही प्रकाशित झाले आहेत. याशिवाय त्यांचे बाल-कुमार वाचकांसाठी लिहिलेले साहित्य मोठ्या प्रमाणावर प्रकाशित झाले आहे. बाल-कुमार साहित्यासह बाबा भांड यांची एकंदरीत ७० पेक्षा अधिक पुस्तके आजवर प्रकाशित झाली आहेत. यांपैकी १० पुस्तकांना महाराष्ट्र शासनाचे उत्कृष्ट वाङ्मय-निर्मितीचे पुरस्कार प्राप्त झाले आहेत. यांमध्ये 'पांगोरे', 'काजोळ', 'दशक्रिया', 'तंट्या' ह्या साहित्यकृतींचा समावेश होतो. 'दशक्रिया'ला दमाणी साहित्य पुरस्कार, कुरुंदकर पुरस्कार, महाराष्ट्र साहित्य परिषदेचा ह.ना.आपटे पुरस्कार इत्यादी सन्मानही प्राप्त झाले आहेत. वाङ्मयासोबतच सामाजिक कार्यातही बाबांचा लक्षणीय सहभाग आहे. १९८८ साली त्यांनी वडजी येथे 'शाहू छत्रपती सार्वजनिक वाचलानल' सुरू

भ

केले. १९९०मध्ये शेतकऱ्यांच्या अपंग व मूकबधिर मुलांसाठी 'आनंद मूक-बधिर विद्यालय' ह्या संस्थेची स्थापना करून त्यांच्यासाठी मोफत शिक्षणाची सोय उपलब्ध करून दिली. १९९० मध्ये 'नाथ निवासी अपंग विद्यालय' ह्या संस्थेचा प्रारंभ झाला. १९९५-२००० या काळात वडजी या जन्मगावी व आसपास पाणलोट क्षेत्र विकासाचे महत्त्वपूर्ण कार्य बाबा भांड ह्यांनी केले आहे.

– डॉ. राजेंद्र नाईकवाडे

**संदर्भ :**

*१. सानप किशोर; 'दशक्रियेची उत्तरक्रिया'; साकेत प्रकाशन, औरंगाबाद १९९५.*

## भांडारकर, प्रभाकर रामकृष्ण

☞ **मुख्य नोंद – पत्रकारिता आणि ललितेतर साहित्य खंड**

## भागवत, दुर्गा नारायण

**संशोधक, ललितगद्यकार, अनुवादक, संपादक, लोकसाहित्याभ्यासक**

**१० फेब्रुवारी १९१० – ७ मे २००२**



दुर्गा नारायण भागवत यांचा जन्म इंदूर (म.प्र.) येथे मोठ्या, एकत्र कुटुंबात झाला. वडिलांचे वडील बाळाजी आबाजी भागवत हे वकील व त्या वेळी इंदूर संस्थानात दिवाण होते. १९१५ साली भागवत कुटुंबाचे मुंबईस स्थलांतर झाले. १९२० ते १९३० या काळात दुर्गाबाई काही दिवस नगर, नाशिक येथे राहिल्या; तरी १९३० सालापासून शेवटपर्यंत मुंबईला, गिल्डरलेन येथेच त्यांचे वास्तव्य होते.

आई लक्ष्मी यांचा मृत्यू खूप लवकर, १९१९ साली झाला. दुर्गा व तिन्ही लहान भावंडे (डॉ. कमल सोहोनी, विमल गोडबोले व डॉ. राजाराम भागवत) आजी-आजोबा व आत्या सीताबाई यांच्याजवळ वाढली. भागवत कुटुंब उदारमतवादी, देशप्रेमी, सुशिक्षित मूल्यनिष्ठा असणारे, स्वाभिमानी कुटुंब होते. दुर्गाबाईंचे वडील वैज्ञानिक होते. त्यांनी वनस्पती तूप तयार करण्याचा भारतातील पहिला यशस्वी प्रयोग केला. त्या राष्ट्रपातळीवरील टेनिस चॅम्पियन होत्या.

दुर्गाबाईंचे शालेय शिक्षण गावदेवीची मराठी शाळा, सेंट कोलंबा आणि नगर व नाशिकच्या हायस्कूलमध्ये झाले. १९२७ साली नाशिक हायस्कूलमधून मॅट्रिकची परीक्षा त्या प्रथम वर्गात उत्तीर्ण झाल्या. मॅट्रिकनंतर त्यांनी मुंबईला सेंट झेवियर्स महाविद्यालयात, कलाशाखेकडे प्रवेश घेतला. राष्ट्रीय स्वातंत्र्य चळवळ त्या वेळी भरात होती. त्यात सक्रिय सहभाग घेऊन त्यांनी १९२९ साली कॉलेज सोडले. पण घरात आर्थिक परिस्थिती फार बिकट झाल्याने शिक्षण पूर्ण करण्याची आवश्यकता वाटून त्यांनी १९३० साली पुन्हा कॉलेजात प्रवेश घेतला. १९३२ साली त्यांनी संस्कृत व इंग्रजी घेऊन बी.ए.ची पदवी प्रथम वर्गात संपादन केली. पुढे लगेच एम.ए.साठी त्यांनी बौद्ध भिक्षूंच्या मठजीवनाशी संबंधित असा विषय घेतला. त्यांनी त्यावर संशोधन करून प्रबंधलेखनाद्वारे एम.ए. पूर्ण केले (१९३५). या वेळी अर्धमागधी व पाली या भाषांचा अभ्यास करून त्यांनी बौद्ध वाङ्मय मुळातून वाचले. देशीपरदेशी अभ्यासकांनी त्यांच्या प्रबंधाची वाखाणणी केली.

त्यानंतर त्यांनी डॉ. जी.एस. घुर्ये यांच्या मार्गदर्शनाखाली समाजशास्त्र विषयात या आदिवासी समस्या आणि 'आदिवासी व हिंदुधर्म यांचे नाते' यावर संशोधन करण्यास आरंभ केला. त्यांनी मध्य भारतातील आदिवासी भाग स्वतः अभ्यासदौरे करून पिंजून काढला. गोंड व इतर आदिवासींच्या बोलीभाषा त्यांनी शिकून घेतल्या. १९४०-१९४१ च्या शेवटच्या दौऱ्यात त्यांना विषबाधा झाली. पुढे सात-आठ वर्षे त्यांना अंथरुणाला खिळून राहावे लागले. संशोधन पूर्ण होऊन निष्कर्ष हाती आले होते. प्रबंधलेखनाचे बरेचसे काम झाले असूनही पूर्ण करता न आल्याने त्यांची पदवी हुकली. मिळालेल्या

शिष्यवृत्तीचे सगळे पैसे त्यांनी आपणहून विद्यापीठाला परत केले.

यश, पदवी, प्रकृती या साऱ्यांनी पाठ फिरवली, तेव्हा निसर्गाचे सान्निध्य व वाचन यांनी त्यांना संजीवनी लाभली. या कठीण काळातही ज्ञानलालसा, उच्च दर्जाची मूल्यनिष्ठा, निःस्पृहपणा हे त्यांच्या व्यक्तित्वातले दुर्मीळ गुण प्रकर्षाने अनुभवास आले.

यानंतर आयुष्याचे वळण बदलले. विषबाधा एवढी तीव्र होती, की रूढ चाकोरीबद्ध आयुष्य जगणे शक्य नव्हते. वडिलांनी मुलीचा उदरनिर्वाह साधेपणाने होईल एवढी तरतूद केली आणि तिने लेखनावर लक्ष केंद्रित करावे असे सुचवले. यामुळे दुर्गाबाईंनी नोकरी कधीच केली नाही. फक्त १९५७ ते १९५९ या दोन वर्षांत त्यांनी पुण्याच्या गोखले इन्स्टिट्यूटमध्ये, समाजशास्त्र विभागप्रमुख म्हणून काम केले.

१९५० साली सानेगुरुजींच्या आग्रहावरून त्यांनी 'साधना' साप्ताहिकात लिहायला सुरुवात केली. पहिला लेख 'वाळूतील पावले!' यातूनच पुढे बारा महिन्यांचे, सहा ऋतूंचे बदलते रूप दाखवणारे 'ऋतुचक्र' (१९५६) शब्दबद्ध झाले. मराठीतील हे त्यांचे पहिले, स्वतंत्र ललितलेखन होय.

१९५० सालानंतर पुढे तीस-पस्तीस वर्षे त्यांचे स्वतंत्र लेखन ललितगद्य या वाङ्मयप्रकारातच झाले. मराठी वाङ्मयातील त्या वेळेपर्यंतच्या ललितगद्यलेखनाचा साचेबंद आकृतिबंध त्यांनी मोडला आणि नवीन, मुक्त, विकसित होणारा असा घाट त्याला दिला. या वाङ्मयप्रकाराला त्यांनी नवीन परिमाणे देऊन तो बहरास आणला. कुसुमावती देशपांडे व इरावती कर्वे यांच्या ललितलेखनातून ज्याच्या अस्पष्ट खुणा जाणवत होत्या, त्या मुक्त, आत्मनिर्भर वृत्तीचा रम्य आविष्कार या ललित लेखनात दिसतो. दुर्गाबाईंचे ललितलेखन हे अजोड व त्या प्रकारात एकमेव म्हणावे असे ठरले. कारण, त्यातील विषयवैविध्य, भरपूर व्यासंगातून आलेली संदर्भसंपन्नता आणि चिंतनशील वृत्तीचा आविष्कार, त्यातील भावगर्भ, नादपूर्ण, लयबद्ध व चित्रमय शब्दकळा आणि प्रसन्न, मुक्त भाववृत्ती ही दुर्गाबाईंची खास वैशिष्ट्ये होत. त्यामुळे वाङ्मयीन दृक्प्रत्ययवादी शैलीचे मनोरम आविष्करण मराठीत प्रथमच अनुभवास आले. 'भावमुद्रा' (१९६०), 'व्यासपर्व' (१९६२), 'रूपरंग' (१९६७), 'पैसे' (१९७०), 'डूब' (१९७५), 'प्रासंगिका' (१९७५), 'लहानी' (१९८०) हे त्यांचे ललितलेखसंग्रह आहेत. मराठी ललितलेखनाला गतिशीलता देणारे, या प्रकारचे विकसित रूप दाखवून अंतर्मुख करणारे असे हे दर्जेदार लेखन आहे.

'ऋतुचक्र', 'भावमुद्रा', 'रूपरंग', 'व्यासपर्व' व 'डूब' यांना राज्यशासन पुरस्कार, तर 'पैसे'ला साहित्य अकादमी पुरस्कार प्राप्त झालेला आहे.

लोकसाहित्य हे एक व्यापक, विस्तृत अभ्यासक्षेत्र आहे आणि महाराष्ट्राचे हे संपन्न संचित आहे याची अभ्यासकांना जाणीव करून देण्याचे ऐतिहासिक कार्य दुर्गाबाईंच्या 'लोकसाहित्याची रूपरेखा' (१९५६) या पुस्तकाने प्रथम केले. 'धर्म आणि लोकसाहित्य' (१९७५) या आणखी एका स्वतंत्र पुस्तकाबरोबरच रवींद्रनाथ टागोरांच्या 'लोकसाहित्य' (१९६७) याचा त्यांनी अनुवाद केला. 'महानदीच्या तीरावर' (१९५३), 'तुळशीचे लग्न' (१९५७) या नावलिका 'पूर्वा' (१९५७), 'बालजातक' (१९९०) 'पाली प्रेमकथा' (१९५३) हे कथासंग्रह, आणि आदिवासींच्या परंपरा, कथा, रीतीरिवाज यांवरील शोधनिबंध म्हणजे बाईंच्या लोकसाहित्यविषयक संशोधनाचे फलित आहे. याबरोबरच संपूर्ण भारतातील राज्यांमध्ये, विविध भाषांमध्ये प्रचलित असलेल्या लोककथा त्यांनी मराठीत आणल्या. त्यांचे ४० भाग प्रसिद्ध झालेले आहेत.

लोककथांच्या अनुवादाबरोबरच 'तत्त्वचिंतक हेन्री डेव्हिड थोरो' यांचे निबंध (१९६८), 'वॉल्डनकाठी विचार विहार' (१९६५) हे पुस्तक व त्यांचे चरित्र (१९६९) अनुवादित करून त्यांनी या तत्त्वचिंतकाची समग्र ओळख मराठी वाचकांना करून दिली. आणखी महत्त्वाचे दोन अनुवाद त्यांनी केले. 'सिद्धार्थजातका'

भ

ज्ञानोबाचे हे पैसाचे रूप अगदी साधे
ना कुठे नक्षी. ना आरास. खांबही साध्या
पाषाणाचा खांब आहे. कारागिराने कलापूर्ण
साज दिला नाही. निव्वळ टेकू आहे तो
या टेकूचे टेकूपण अभंग आहे. काळाने
ते डळमळीत केलेले नाही. आता आधुनिक
इमारत भोवती उठली आहे. तिच्याशी
हा खांब फटकून वागतो असे वाटते.
आपल्या जुन्या जिंदगीशी याचे हितगुज
चालले असते, आणि त्या हितगुजातून
ज्ञानेश्वरीचे पडसाद उठत असतात, हे
ज्ञानोबाच्या भावनादाचे जिथे कुणाला
भासत आले असते की नसते कोणाला

दुर्गा भागवत

पैसाचा खांब,

पैस

१९७५ साली भारतात आणीबाणी जाहीर झाली. सर्व प्रकारच्या अभिव्यक्ती स्वातंत्र्यावर बंदी घालणाऱ्या आणीबाणीचा जाहीर निषेध तर त्यांनी केलाच; पण शासनाचा निषेध म्हणून तेव्हापासून शेवटपर्यंत, त्यांनी कोणताही पुरस्कार स्वीकारला नाही, आणि प्रसार-माध्यमांवर बहिष्कार घातला. जनतेच्या स्वातंत्र्यासाठी त्यांनी पाच महिने तुरुंगवासही भोगला. १९७५ साली कऱ्हाड येथे भरलेल्या साहित्य संमेलनाच्या त्या अध्यक्ष झाल्या. या अध्यक्षपदावरून त्यांनी स्वातंत्र्याचा उद्घोष केला. आणीबाणी दूर व्हावी, आविष्कार स्वातंत्र्य मिळावे यासाठी आपल्या शब्दसामर्थ्याचा वापर करीत त्यांनी जनजागृती केली. 'शासन, साहित्यिक व बांधीलकी' (१९८८) यासारख्या वैचारिक पुस्तकातून, 'मुक्ता' (१९७७), 'सत्यं, शिवं, सुंदरम्' (१९७८), 'जनतेचा सवाल', या भाषणसंग्रहातून त्यांची याबाबतची वैचारिक भूमिका व स्वातंत्र्यप्रियता स्पष्ट होते.

तील ५४७ जातकांपैकी ५४४ जातककथा त्यांनी मूळ पाली भाषेतून मराठीत अनुवादिल्या. त्या सात खंडामध्ये प्रसिद्ध आहेत. संस्कृत कवी बाणभट्ट याची 'कादंबरी' ही प्रचंड मोठी, गुंतागुंतीच्या भाषाशैलीतील कलाकृती त्यांनी नऊ वर्षांच्या परिश्रमांनंतर मराठीत आणली व त्याचा प्रस्तावना खंड 'रसमयी' नावाने स्वतंत्रपणे लिहिला.

ज्ञानकोशकार डॉ. केतकर यांच्या कादंबऱ्यांची समीक्षा त्यांनी 'केतकरी कादंबरी'त केली (१९६७).

'अस्वल' (१९८२) हे 'प्राणिगाथा' या संकल्पित मालेतील एक पुस्तक व 'कदंब' (१९९३) हे 'वनदा' या संकल्पित मालेतील एक पुसतक ही त्यांच्या संशोधनाची, व्यासंगाची साक्ष देणारी पुस्तके आहेत. या माला पुढे अपूर्ण राहिल्या.

मराठीबरोबरच त्यांनी इंग्रजीतून ही लेखन केले. 'सात पुस्तके, दहा शोधनिबंध असे हे लेखन आहे, यातील शोधनिबंध व लेख परदेशातील नियतकालिकांतून प्रसिद्ध झाले.' बौद्ध वाङ्मय, धर्म, लोकसाहित्य या त्यांच्या अभ्यासविषयांशी संबंधित व त्यांवर आधारित असे हे लेखन आहे. यांत मानववंशशास्त्र व भाषाशास्त्र या विषयांवरचे, विद्यार्थ्यांना मार्गदर्शन करणारे, विषयाचे प्राथमिक स्वरूप स्पष्ट करणारे एक-एक पुस्तक आहे.

ज्ञानकोशकार केतकर यांच्या काही लेखांचा त्यांनी इंग्रजीत अनुवाद केला आणि आवश्यक तेथे स्वतः टिपणे लिहून 'Hinduism and its Place in the New World' (१९४७) हे पुस्तक प्रकाशित केले. प्रसिद्ध विचारवंत व समाजसुधारक राजारामशास्त्री भागवत

या आपल्या चुलतमामेआजोबांच्या जन्मशताब्दीच्या निमित्ताने त्यांच्या असंकलित, उपेक्षित वाङ्मयाचे संकलन व संपादन करून त्यांनी पाच खंडांत ते प्रसिद्ध केले. त्यांनी स्वतः एक प्रस्तावना खंडही त्याला जोडला.

जवळपास शंभरावर अनुवादित, स्वतंत्रपणे संपादित, संशोधित ग्रंथांचे लेखन करणाऱ्या दुर्गाबाईंनी अगदी तरुणपणी रवींद्रनाथांची गीतांजली संस्कृतात अनुवादित केली होती, प्रेमकविता लिहिल्या होत्या आणि अमरकोशाच्या धर्तीवर समानार्थक शब्दांचा कोशही तयार केला होता. परंतु, हे सारे लेखन मनासारखे जमले नाही असे वाटून ते त्यांनी स्वतःच नष्ट केले होते.

१९५८ साली 'सन्माननीय लेखिका' म्हणून त्यांनी रशियाला भेट दिली होती. १९८८ साली जर्मनीत हेडलबर्ग येथे झालेल्या 'भारतातील लोककला' या विषयावरील चर्चासत्रासाठी खास, सन्माननीय अध्यक्षा म्हणून त्यांना निमंत्रित केले गेले होते.

मुंबई उपनगरातील बोरिवली येथे त्यांच्या स्मृतिप्रीत्यर्थ 'दुर्गा भागवत शब्द पुरस्कार' दिला जातो. अनुवाद, ललितलेखन व वैचारिक लेखन यांतील उत्कृष्ट साहित्यकृतीसाठी हा पुरस्कार आहे.

समाजशास्त्र, लोकसाहित्य, अनुवाद, समीक्षा, ललितलेखन या सर्वच क्षेत्रांत त्यांच्या संशोधनाचा, व्यासंगाचा व आशयगर्भ, नादमधुर शैलीचा प्रभाव निर्माण झाला. ज्ञानार्जनाची लालसा, सनातन विषयांचा शोध घेण्याची ओढ, चिंतनशीलता, स्वातंत्र्यप्रियता, बाणेदारपणा आणि भाषाप्रभुत्व यांमुळे त्यांचे वाङ्मयीन व लौकिक व्यक्तित्व समाजमनावर ठसा उमटवून गेले.

– डॉ. मीना वैशंपायन



## भागवत, भास्कर रामचंद्र
**बालसाहित्यिक**
**३१ मे १९१० – २७ ऑक्टोबर २००१**

भास्कर रामचंद्र भागवत या बालसाहित्य लेखकाचा जन्म इंदूर येथे झाला. शालेय शिक्षण पुणे, जळगाव व धुळे येथे झाल्यावर त्यांनी महाविद्यालयीन शिक्षण मुंबईला घेतले. आकाशवाणीत वृत्त अनुवादक व निवेदक म्हणून त्यांनी काम केले. 'प्रकाश' साप्ताहिकासाठी साहसप्रेमी भागवतांनी काबालींच्या उघड्या विमानातून प्रवास केला. विमानात वैमानिक आणि भागवत, असे दोघेच होते. प्रवासात, सहलीत अडचणी, फजिती उडविणारे प्रसंग आले की त्यांना गंमत वाटे आणि तो अनुभव त्यांच्या विशिष्ट हातोटीने ते शब्दबद्ध करून आपल्या प्रिय बालवाचकांना ते भरभरून देत.



आयुष्यभर भरपूर, विविध प्रकारचे लेखन करून त्यांतल्या प्रत्येक लेखन प्रकाराला लोकप्रियता मिळवून देण्याचे दुर्मीळ असे साहित्यगुणसंपन्न असलेले भा. रा. भागवत किशोरांच्या गळ्यातले ताईत होते. भागवतांना लहानपणापासून साहस, रहस्य आणि विनोद या गोष्टींची आवड होती. शाळकरी वयातच त्यांनी एक रहस्यकथा लिहिली होती. त्यांचा विनोद वाचकप्रिय होण्याचे मुख्य कारण म्हणजे तो कुठल्याही व्यक्तीवर वा व्यक्तिगत व्यंगावर प्रहार करीत नाही; तर एखाद्या प्रवृत्तीला, पद्धतीला, समाजातल्या विक्षिप्त रीतीभातींना कोपरखळ्या मारून वाचकांना खुसखुशीत हास्याचा रसास्वाद घडवितो. स्वतःपासूनच सगळीकडे विनोद शोधण्याची भागवतांची प्रकृती व प्रवृत्ती असल्याने त्यांच्या विनोदी लेखनाला मर्यादा नाहीत. स्वतःच्या जीवनातील प्रसंग, भेटलेली माणसे, त्यांचे अनुभव गांभीर्याने न घेता ते खेळकरपणे व सहजपणे प्रस्तुत करतात. दैनंदिन जीवनातल्या अडचणीतून, साहसातून मजा घेत ते विनोद साधतात. ते विचारतात, 'भागवत' शब्दाचा अर्थ ठाऊक आहे? 'भागवत' म्हणजे 'भाड्याने गवत वाहणारे तट्टू!' यातून त्यांच्या मनाचा निकोप व निखळपणा प्रत्ययास येतो.

शाब्दिक कोट्यांची त्यांना जबरदस्त आवड! त्यांची शीर्षकेच त्यांच्या खेळकर, विनोदी प्रवृत्तीची चुणूक

दाखवतात. 'बुक लव्हर' ला त्यांनी 'बुकलवार' बनविले. 'जीवननाट्याची ऐशीतैशी', 'मुद्रण पिशाच्च' इत्यादी पुस्तके त्या वृत्तीची साक्ष देतात. श्री. वि. स. खांडेकरांनी त्यांच्यातली खुबी ओळखून म्हटले आहे, ''श्री. भागवत यांच्या 'वैतागवनातील वाफाऱ्यात' सापडलेला वाचक हसतमुखाने बाहेर येईल यात शंका नाही. शाब्दिक कोट्यांपासून ते उपरोधापर्यंतचे विनोदाचे सर्व प्रकार श्री. भागवतांना अवगत असून मुंबईतील सामान्य मनुष्याच्या कोंडमाऱ्याचे वर्णन करताना आपल्या विनोद शक्तीचा उपयोग त्यांनी कौशल्याने केला आहे. स्त्रीदाक्षिण्य, वक्ते, श्रोते व व्याख्याने इत्यादी विषय निवडण्यात लेखकाची मार्मिकता दिसून येते. कॅ. लिमये व चिंतामणराव जोशी यांच्या लेखनाची परंपरा भागवत चांगल्या रीतीने चालवू शकतील.''

भागवतांनी बऱ्याच इंग्रजी रहस्यकथांची भाषांतरे केली, स्वतंत्र कथाही लिहिल्या. मराठी वाचकांसाठी अत्यंत आकर्षक असे बालवाङ्मय त्यांनी सातत्याने निर्माण केले. चतुर, खेळकर, धडपडत राहणारा 'फास्टर फेणे' मुलांचा जानी दोस्त. फास्टर फेणेच्या कथा त्यांनी प्रसिद्ध केल्या. त्यांनी 'विझार्ड ऑफ ओझ' या परीकथेचे 'पाचूनगरीत जुई', 'रॉबिन हुड'चे 'जाईची नवलकहाणी' ही उत्कृष्ट भाषांतरे करून त्यांना देशी साज दिला. 'ॲलिस इन वन्डर लॅन्ड'चेही भाषांतर केले. भागवतांचे कुमार नायक मोठ्यांनाही भावतात. भागवतांची भाषा खेळकर, नर्म विनोदी, मुलांच्या बोलण्यासारखी असून शैली रेखीव तशीच गतिमान आहे. शब्दांच्या कोट्यांमुळे कवी मोरोपंत भागवतांना आवडतात. भागवतांनी वृत्तपत्र व्यवसायाची सुरुवात 'सकाळ'पासून केली. चेस्टरटन, वुडहाउस हे त्यांचे आवडते लेखक. वि. सी. गुर्जरांच्या प्रेमकथाही त्यांना आवडत. विज्ञानाची आवड असणाऱ्या भागवतांनी उडत्या तबकड्यांच्या युगात 'उडती छबकडी' वाचकांसमोर ठेवली. ज्यूल व्हर्नच्या डझनभर कादंबऱ्यांचा त्यांनी अनुवाद केला पण, शास्त्रीय माहिती आत्मसात करूनच! 'मधुचंद्र मनमाडला' ही अतिशयोक्त फार्सिकल ढंगाची श्रुतिका त्यांनी आकाशवाणीसाठी लिहिली. १९४२च्या स्वातंत्र्यलढ्यात भागवत विसापूरच्या तुरुंगात सुमारे दोन वर्षे होते. तेथे त्यांनी 'मुद्रण पिशाच्च' कादंबरी लिहायला घेतली. ती पूर्ण होण्यापूर्वी त्यांची कारागृहातून मुक्तता झाली व ती अपूर्णच राहिली. बालविश्वातल्या नाजूक विनोदाला भागवतांनी किती हळुवारपणे शब्दबद्ध केले आहे त्याची एक चुणूक पाहा:

'उंद्रोबा उंद्रोबा भागलास का
चहाच्या किटलीत लपलास का...'

स्वतः प्रेमात पडण्याच्या वयात भा. रा. भागवतांनी 'दुसऱ्यांच्या प्रेमकथांची भंबेरी उडालेली कशी लिहिली' हे त्यांच्या पत्नी लीलावतींना कधीच न उलगडलेले कोडे होते. विविधरंगी निर्मिती करीत राहून मुलांना रमविणारा लेखक म्हणून भा. रा. भागवतांचे नाव घेतले जाते

'फास्टर फेणे' मालिका, (१ ते २० पुस्तके). 'शाबास शेरलॉक होम्स' (१ ते ५ पुस्तके), 'बिपिन बुकलवार सांगतो आहे' (१ ते ७ पुस्तके), 'मायापुरचे रंगेल राक्षस' हे भा. रा. भागवत यांचे महत्त्वपूर्ण साहित्य आहे.

– वि. ग. जोशी

**संदर्भ :**

*१. भागवत लीलावती, संपादक; 'भाराभर गवत'; उत्कर्ष प्रकाशन, पुणे; १९८८.*

## भागवत, राजारामशास्त्री रामकृष्ण

☞ **मुख्य नोंद – पत्रकारिता आणि ललितेतर साहित्य खंड**

## भागवत, लीलावती भास्कर

**बालसाहित्यकार**

**५ सप्टेंबर १९२१**

कुलाबा जिल्ह्यातल्या रोहे येथील त्र्यंबक नारायण पोतदार यांच्या लीलावती भागवत ह्या कन्या होत. लहानपणी त्यांच्यावर झालेल्या संस्कारात त्यांचे मामा, तात्या क्षीरसागर यांचा आवर्जून उल्लेख करावा लागेल. सूर्यनमस्कार, स्वसंरक्षणासाठी शारीरिक शिक्षण,



स्वातंत्र्यवीरांच्या व स्वातंत्र्यसमराच्या रोमांचक कथा व संपूर्ण गीतेचे पाठांतर करून घेण्यात मामांनी भाचरांच्या मनात देशभक्तीचा अंकुर रुजवला. पुढच्या आयुष्यात लीलावतींना लहानपणीच्या या कमाईचा पुरेपूर उपयोग झाला. मामा हे सर्वंकष, प्रेमळ शिक्षक होते. लीलावतींचे शिक्षण कर्व्यांच्या कन्याशाळेत झाल्यावर त्या नाथीबाई दामोदर ठाकरसी महाविद्यालयातून जी.ए. झाल्या. १९४० साली त्यांचा विवाह श्री. भास्कर रामचंद्र भागवत यांच्याशी झाला.

बाल व कुमार ह्यांच्यासाठी केलेल्या लेखनासाठी मुख्यतः ख्यातनाम असलेल्या भागवत पति-पत्नींनी जीवनभर इतरही विपुल लेखन केले. मुंबई आकाशवाणीवर त्यांनी नोकरी केली. 'मराठी बालसाहित्य: प्रवाह आणि स्वरूप' (१९९५) हा त्यांचा बालसाहित्यासंबंधीचा सांगोपांग विवरण करणारा ग्रंथ महत्त्वाचा आहे. भा.रा.भागवत यांच्या विविधढंगी चुरचुरीत साहित्याचे संपादन त्यांनी 'भाराभर गवत' (१९८८) या ग्रंथात केले असून त्यांच्या विनोदी व खुसखुशीत लेखन-प्रवृत्तचे दर्शन मार्मिक परंतु जिव्हाळ्याने घडविले आहे. त्यांच्या अनेक कादंबऱ्यांपैकी 'स्पर्शवेली' (१९६७), 'छाया झालीसे प्रकाश' (१९६९), 'हुंकार' (१९७८), 'मा निषाद' (१९७८) व 'घरटं' (१९८०) या उल्लेखनीय आहेत. 'जे नेत्री साठविले' (१९६४) या प्रवासवर्णनाबरोबरच 'पांढरा चाफा' (१९६८) हे व्यक्तिचित्रणात्मक पुस्तक अत्यंत मनोवेधक आहे. हिंदी कथासम्राट प्रेमचंद यांच्या काही कथांचा मराठी अनुवाद करून लीलावतींनी मराठी साहित्यात भर घालण्याची कामगिरी केली आहे. लीलाताईंनी बालांसाठी व कुमारांसाठी कविता, कथा व कादंबरी असे प्रचुर लेखन केले आहे.

– वि. ग. जोशी

**संदर्भ :**


१. *शेवाळकर राम, अकोलकर ग.वि., थत्ते यदुनाथ, संपादक; 'अमृत'; २४ डिसेंबर १९७८.*

२. *भागवत लीलावती; संपादक, 'भाराभर गवत'; उत्कर्ष प्रकाशन, पुणे; २००१.*


## भागवत, सखाराम जगन्नाथ

☞ **मुख्य नोंद – पत्रकारिता आणि ललितेतर साहित्य खंड**

## भातम्ब्रेकर, प्रकाश लक्ष्मणराव

**भाषांतरकार**

**१९ मे १९४७**



प्रकाश लक्ष्मणराव भातम्ब्रेकर यांचा जन्म निलंग गावी झाला. लातूर, अंबाजोगाई आणि औरंगाबाद येथे महाविद्यालयीन शिक्षण घेऊन ते विज्ञानशाखेचे पदवीधर झाले. राष्ट्रभाषेच्या (पुणे) परीक्षा देऊन ते 'पंडित'ही झाले (१९६७). बालपणी, संघाच्या शाखेतील संस्कारांमुळे शिक्षणाचे महत्त्व मनावर ठसले होते. बी.ए.(ऑनर्स, शिवाजी विद्यापीठ, कोल्हापूर १९७२), एम.ए. (हिंदी, राजस्थान, विश्वविद्यालय, जयपूर, १९७४) झाल्यानंतर अजमेरच्या डी.ए.वी. उच्चस्तर माध्यमिक विद्यालयात विज्ञानाचे अध्यापक म्हणून त्यांनी नोकरी केली (१९६७-१९६८). औरंगाबादच्या दैनिक मराठाचे मुद्रितशोधक (१९६८-१९६९), महाराष्ट्र राज्य मत्स्यव्यवसाय विभागाचे साहाय्यक सचिव (१९६९-१९७२), राजस्थान उद्योग विभागाचे सूचना साहाय्यक (जयपूर, १९७४), युनियन बँक ऑफ इंडिया राजभाषा अधिकारी (१९७६-१९८८), अशा विविध पदांवर कार्य केलेले भातम्ब्रेकर साहित्य अकादमीचे विभागीय सचिव म्हणून मुंबईत स्थिरावले (१९८८-२००७). १९७४ साली प्रेमविवाह केल्यामुळे वेगळा संसार थाटावा लागला, तेव्हा सुरुवातीचे

काही दिवस भातम्ब्रेकरांना बेकारीचा अनुभव घ्यावा लागला होता. त्या वेळी पुष्पा भारती यांच्या 'शुभागता' या पुस्तकाच्या अनुवादाने त्यांना हात दिला. याच वेळी 'अनुराधा' मासिकातूनही त्यांचे अनुवादलेखन चालू होते. अनुवादकार्यात डॉ. बांदिवडेकर यांच्या मार्गदर्शनाचा लाभ भातम्ब्रेकरांना त्या काळात झाला.

भातम्ब्रेकर यांच्या नावावर त्यांनी हिंदीत अनुवाद केलेली ३४ पुस्तके, ९० कथा, २५ कविता आणि वेगवेगळ्या विषयांवर त्यांनी लिहिलेले जवळपास पावणेदोनशे लेख आहेत. हिंदीतून चार आणि गुजरातीतून पाच पुस्तके त्यांनी मराठीत अनुवादित केली. ही संख्या कमी असली तरी त्यांच्या अनुवादाचा दर्जा कमी नाही. 'सिंहासन' व 'दुर्दम्य' यांसारख्या कादंबऱ्या हिंदी वाचकांना परिचित करून देण्याचे श्रेय भातम्ब्रेकरांकडे जाते. या कादंबऱ्यांसाठी हिंदीतर भाषक हिंदी लेखक म्हणून त्यांना १९८०-८१ व १९८८-८९ ह्या वर्षांचे भारत सरकारचे पुरस्कार लाभले. याशिवाय, द्विवागीश पुरस्कार (भारतीय अनुवाद परिषद, दिल्ली, १९९२), सांगाती पुरस्कार (सांगाती साहित्य अकादमी, बेळगाव, १९९४), ग.मा. मुक्तिबोध पुरस्कार (हिंदी साहित्यातील कामगिरीसाठी महाराष्ट्र राज्य हिंदी साहित्य अकादमी पुरस्कार, १९९७-९८) ह्या पुरस्कारांचेही ते मानकरी ठरले. त्यांच्या 'अग्निसर्प' या कथेला 'सारिका'तर्फे द्वितीय पुरस्कार लाभला (१९८२).

आंतरराष्ट्रीय कविसंमेलनासाठी रुमानिया येथे निमंत्रित कवी म्हणून उपस्थित राहिल्यावर शेवटच्या वार्षिक सन्मान प्राप्त झालेल्या तीन कवींपैकी भातम्ब्रेकर हे एक होते. हॉलंड, जर्मनी, स्वित्झर्लंड, इटली, रोम, मोनॅको, फ्रान्स, ब्रिटन इत्यादी देशांचा प्रवास त्यांनी केलेला आहे (२०००).

लेखनाव्यतिरिक्त दूरदर्शनसाठी सूत्रसंचालकाची भूमिकाही भातम्ब्रेकरांनी केलेली आहे आणि आकाशवाणीवर बातम्या देण्याचेही काम केले, आहे.

– अनुपमा उजगरे

**संदर्भ :**

*१. दोडे, अरविंद; 'महाराष्ट्र टाइम्स ': रविवार, १७ जानेवारी १९९९.*
*२. मिश्र, विमल; 'नवभारत टाइम्स ': १५ नोव्हेंबर १९९८.*
*३. सेंगर, कैलास; 'नवभारत टाइम्स ': २७ जून १९९३.*
*४. सेंगर, कैलास; 'जनसत्ता टाइम्स ': २५ जून १९९३.*

## भालेराव, अमृत नारायण

☞ **मुख्य नोंद – नाटक खंड**

## भालेराव, इंद्रजित नारायण

**कवी, ललित लेखक**
**५ फेब्रुवारी १९६२**



ग्रामीण जीवनाचे अस्सल भावविश्व आपल्या कवितेतून व ललितलेखनातून साकारणारे सिद्धहस्त कवी, ललितलेखक. हिंगोली जिल्ह्याच्या वसमत-नगर तालुक्यातील रिधोरा या गावचे मूळ रहिवासी. वडील नारायणराव व आई रुख्मिणीबाई यांनी स्वतः अत्यंत खस्ता खाऊन, त्यांना शिकण्यासाठी बळ दिले. वसमतच्या बहिर्जी नाईक महाविद्यालयात महाविद्यालयीन शिक्षण व औरंगाबादच्या डॉ. बाबासाहेब आंबेडकर मराठवाडा विद्यापीठात, मराठी विषयात पदव्युत्तर शिक्षण पूर्ण केले. १९८२ साली बारावीत शिकत असतानाच बालमैत्रीचे अत्यंत प्रत्ययकारी दर्शन घडविणारा 'हीरा' हा लेख लिहून लेखनसेवेला प्रारंभ केला. सध्या परभणीच्या ज्ञानोपासक महाविद्यालयात मराठीचे प्राध्यापक म्हणून कार्यरत आहेत.

विसाव्या शतकाच्या अखेरीस शिक्षणाच्या प्रसारामुळे, ग्रामीण युवामत सजग झाले. आपले जगणे शब्दांमधून अभिव्यक्त करण्याची ओढ त्यांना लागली. तशातच ग्रामीण साहित्य चळवळ उभी राहिली. विभागीय साहित्य संमेलनांनी या नव्या पिढीला विचारप्रवण केले आणि

भ

त्यातून अस्सल ग्रामीण कवितेचे अनेक लवलवते अंकुर उदयास आले. इंद्रजित भालेराव हे त्यांपैकी एक अत्यंत यशस्वी नाव आहे. 'पीकपाणी' (१९८९), 'आम्ही काबाडाचे धनी' (१९९२), 'दूर राहिला गाव' (१९९४) हे अस्सल मातीचा गंध अनुभवायला देणारे कवितासंग्रह त्यांच्या प्रतिभेतून स्फुरले. स्वतः काव्यलेखन करताना ग्रामीण माय-माउल्यांच्या जिभेवर बसणाऱ्या लोकगीतांकडेही त्यांनी तेवढ्याच आस्थेने लक्ष दिले आहे. त्यातून 'समरत' (१९९०) व 'उगवले नारायण' (१९९५) हे लोकगीतांचे संग्रह त्यांनी संपादित केले.

कविवर्य बी. रघुनाथ यांच्या कवितांचे संपादनही त्यांनी केलेले आहे. ग्रामीण बालकांच्या मनोविश्वाचे दर्शन 'रानमळ्याची वाट' या बालकवितासंग्रहाद्वारे त्यांनी घडविले आहे. 'भिंगुळवाणा' ही त्यांची कादंबरी त्यांच्या सिद्धहस्त लेखनाची साक्ष देणारी आहे. 'गाई घरा आल्या' (१९९७) हा ललितलेखसंग्रह वैशिष्ट्यपूर्ण आहे. त्यातून त्यांनी ग्रामीण जीवनात जिवापाड जपल्या जाणाऱ्या मानवी नात्यांचा वेध विविध अंगांनी घेतला आहे. ग्रामीण जीवनाची वास्तवता, बोलीभाषेचा चपखल वापर, निसर्गाची समृद्धी व त्याचा लहरीपणा, शेतकऱ्यांच्या वाट्याला आलेले जगणे, ग्रामीण जीवनाला व्यापणाऱ्या प्रथा, परंपरा, वहिवाटी व ग्रामीण जीवनात जपल्या जाणाऱ्या मानवी नात्यांच्या अनोख्या भावबंधांचे दर्शन त्यांच्या कवितांमधून व ललितलेखांमधून घडते. जन्मजात प्राप्त झालेली सदोष व अपूर्ण समाजव्यवस्था स्वीकारून आणि आपले लहानपण स्वीकारूनही ग्रामीण माणूस त्याच्या अंतरातला माणूसकीचा आणि करुणेचा झरा कसा सांभाळतो, याचे यथार्थ चित्रण त्यांच्या साहित्यविश्वात दिसते.

त्यांचे लेखन बावनकशी सोन्यासारखे असल्याने त्यांना अनेक पुरस्कार प्राप्त झालेले आहेत. अनंत काणेकर, यशवंतराव चव्हाण, पद्मश्री विखे पाटील, वि. द. घाटे, इत्यादी नामवंतांच्या नावे दिले जाणारे पुरस्कार त्यांना प्राप्त झाले आहेत तसेच मराठी साहित्य परिषदेचा पुरस्कार त्यांना मिळाला आहे. त्यांना साहित्य अकादमीची प्रवासवृत्ती मिळालेली आहे. शिवाजी विद्यापीठ, अमरावती विद्यापीठ, डॉ. बाबासाहेब आंबेडकर मराठवाडा विद्यापीठ, स्वामी रामानंदतीर्थ मराठवाडा विद्यापीठ, महाराष्ट्र टाइम्सच्या दशकातील निवडक पुस्तक योजना, इयत्ता नववीची बालभारती, मराठी विश्ववेचक आणि वेधक, इंडियन लिटरेचर इत्यादींसाठी त्यांच्या पुस्तकांची आणि कवितांची निवड झालेली आहे.

आपल्या अस्सल काव्यातून व ललित-लेखनामधून इंद्रजित भालेराव यांनी ग्रामीण साहित्यविश्वात आपले स्थान निर्माण केले आहे.

– डॉ. संजय देशमुख

**संदर्भ :**


१. *सार्वेकर कैलास; 'ग्रामीण कविता : कालची आणि आजची'; धुळे.*

२. *गुंदेकर श्रीराम; 'मराठवाड्यातील नवग्रामीण लेखकांची निर्मिती : १९७५-२००२'; लातूर.*


## भावे, पुरुषोत्तम भास्कर

**कथाकार, कादंबरीकार, पत्रकार**

**१२ एप्रिल १९१० – १३ ऑगस्ट १९८०**



पुरुषोत्तम भास्कर भावे यांचा जन्म नागपूर येथे झाला. त्यांचे वडील भास्कर भावे हे ख्यातनाम डॉक्टर होते. बालपणीच आईचे निधन झाल्यामुळे पु.भा. भाव्यांचे संगोपन त्यांच्या आजोबांनी केले. नागपूरच्या हिस्लॉप आणि लॉ कॉलेजमधून त्यांनी महाविद्यालयीन शिक्षण पूर्ण केले.

पु. भा. भावेंना शालेय जीवनापासून लेखनाची आवड होती. 'फुकट' ही त्यांची पहिली कथा 'किर्लोस्कर' मासिकात प्रकाशित झाली, तेव्हा ते पंधरा वर्षांचे होते.

कट्टर हिंदुत्ववादी पत्रकार म्हणून ते पुढे नावारूपाला आले. त्यांनी 'सहदेवा, अग्नी आण', यासारखे जळजळीत राजकीय लेख लिहिले. 'रक्त आणि अश्रू' या संग्रहात ते समाविष्ट आहेत. आक्रमक आणि प्रखर शैलीचा पत्रकार म्हणून आरंभीच्या काळात नावारूपाला आलेले भावे नंतर कथाकार म्हणून गाजले. नवकथेच्या आद्य प्रवर्तकांमध्ये त्यांचा समावेश करावा लागेल.

'पहिला पाऊस (१९४६) या पहिल्याच कथासंग्रहाने त्यांना प्रतिष्ठा मिळवून दिली. त्यांचे एकूण २६ कथासंग्रह प्रसिद्ध झाले. 'स्वप्न' (१९४८), 'सतरावे वर्ष' (१९४९), 'ध्यास' (१९५०), 'फुलवा' (१९५३), 'मुक्ति' (१९५४), 'देव्हारा' (१९५६), 'बंगला' (१९५६), 'रूप' (१९५६), 'वैरी' (१९६२), 'हिमानी' (१९६६), 'ओवाळणी' (१९६८), 'प्रेम' (१९७३), 'आवर्त' (१९७७) हे त्यांचे कथासंग्रह विशेष गाजले.

भावनाप्रधान, विलक्षण संवेदनक्षम आणि तत्काळ प्रतिक्रिया नोंदविणारी पात्रे हे भाव्यांच्या कथेतील पात्रांचे खास वैशिष्ट्य. पाकिस्तानच्या निर्मितीच्या वेळी हिंदू-मुसलमानांमध्ये भडकलेला संघर्ष, बदलती मूल्यव्यवस्था स्वीकारायला तयार नसलेली परंपराप्रिय मानसिकता, स्त्री-पुरुष नात्यांतील गुंतागुंत यांसारखे विषय पु. भा. भाव्यांच्या कथेच्या केंद्रस्थानी आढळतात. उपदेशपर कथांचा बाज भाव्यांनी नाकारला. घटना, कथानक यापेक्षाही मानवी नातेसंबंधांतील अर्थता आणि अनर्थता समर्थपणे टिपत, स्वतःच्या वेगळ्या शैलीत भाव्यांनी मांडलेल्या कथा लोकप्रिय झाल्या.

कथाकार म्हणून नावारूपाला येत असताना भाव्यांनी कादंबऱ्या आणि नाटकेही लिहिली. त्यांच्या सतरा कादंबऱ्या आणि आठ नाटकेही प्रसिद्ध आहेत. त्यांची 'विषकन्या' (१९४४), 'स्वामिनी' (१९५६), 'पडछाया' (१९६०), 'महाराणी पद्मिनी' (१९७१) इत्यादी नाटके प्रसिद्ध झाली. 'अकुलिना' ही भाव्यांची पहिली कादंबरी १९५० साली प्रसिद्ध झाली. पुढे त्यांनी याच कादंबरीवर आधारित नाटकही लिहिले.

स्त्री-पुरुषांमधले शारीरिक आकर्षण, वाढत जाणाऱ्या अपेक्षा, त्यांतून वाट्याला येणारी हतबलता आणि खिन्नता अशा चक्रात सापडलेली माणसे भाव्यांच्या कादंबऱ्यांमध्ये दिसतात. स्वातंत्र्योत्तर कालखंडात एकत्र कुटुंबव्यवस्था नष्ट झाली. विभक्त झालेल्या कुटुंबांत राहणाऱ्या माणसांच्या एकटेपणाचे पदर, तुटलेपणाची भावना आणि पारंपरिक श्रद्धा आणि संस्कारांना हादरे बसल्यामुळे व्यथित झालेल्या माणसांची सैरभैरता त्यांच्या अनेक कादंबऱ्यांच्या केंद्रस्थानी आहे. 'अंतराळ' (१९५७), 'वर्षाव' (१९५८), 'आग' (१९६२), 'रोहिणी' (१९६२), 'चोरांचा बाजार' (१९६३), 'अडीच अक्षरे' (१९६३), 'जादूचे पाणी' (१९६८), 'व्याघ्र' (१९७०), 'दोन भिंती' (१९७२) या कादंबऱ्या विशेष गाजल्या. 'वाकुल्या' (१९५२), 'वायबार' (१९६०) हे लेखसंग्रहही भाव्यांच्या नावावर आहेत.

भावे हिंदुत्ववादी होते. आपली भूमिका त्यांनी परखडपणे मांडली. पण, साहित्यक्षेत्रात वावरताना ते कलावादी म्हणून वावरले. 'सावधान' व 'आदर्श' ही दोन वर्तमानपत्रे त्यांनी चालविली. त्यांचे एकूण बारा लेखसंग्रह प्रसिद्ध झाले. 'वाघनखे' (१९६१), 'लवंगवेलदोडे' (१९६३), 'आनंदसोपान' (१९६५), 'पणत्या' (१९७०), 'रांगोळी' हे त्यांचे इतर स्फुटलेखन प्रसिद्ध आहे. 'प्रथमपुरुषी एकवचनी' हे त्यांचे आत्मचरित्र विशेष गाजले.

आचार्य अत्रे आणि पु.भा. भावे यांच्यातला वाद 'आदेश खटला' म्हणून ओळखला जातो. भाव्यांनी आपल्या 'आदेश' पत्रातून अत्र्यांवर जळजळीत टीका केली. अत्रेंनी भाव्यांवर खटला भरला. उलटतपासणी करताना अत्र्यांची जास्त बदनामी होऊ लागली. त्यामुळे मित्रांच्या सल्ल्यावरून अत्रेंनी हा दावा मागे घेतला. १९७७ साली पुणे येथे भरलेल्या अ. भा. मराठी साहित्य संमेलनाचे अध्यक्षपद भाव्यांनी भूषविले. अभूतपूर्व गोंधळामुळे ते गाजले.

– प्रा. मिलिंद जोशी

भ

## भावे, पुष्पा अनंत

**समीक्षक**

**२६ मार्च १९३९**



पूर्वाश्रमीच्या पुष्पा प्रभाकर सरकार यांनी मराठी व संस्कृत विषय घेऊन एम.ए. केले. त्यांनी रामनारायण रुईया महाविद्यालयात अध्यापन केले. अनेक चर्चासत्रांत शोधनिबंध सादर केले. विविध पुस्तकांमध्ये ते समाविष्ट करण्यात आलेले आहेत. त्यांनी संपादित केलेल्या 'वेचक पुंडलिक' (१९८५) या पुस्तकाच्या प्रस्तावनेत पुढील मुद्दे समोर ठेवून पुंडलिकांच्या कथांचे विश्लेषण केलेले आहे; कथेची घडण, अंतर्गत बांधीवपणा, कथात्म अनुभवाचे अंतर्लक्षी स्वरूप, कथेतून प्रतीत होणारी मृत्यू, बालमन आणि एकाकीपणाची विविध रूपे, प्रतिमा व प्रतिमास्वरूप होणारी वर्णने, या बाबींचा परामर्श घेताना त्यांनी उपस्थित केलेले मुद्दे कोणाही कथालेखकाच्या कथांचे मूल्यमापन करायला उपयुक्त ठरू शकतील हे विशेष.

'रङनायक' (१९८५) या पुस्तकात 'प्रायोगिक रंगभूमी' हा लेख समाविष्ट केलेला आहे. त्यामध्ये प्रायोगिक म्हणजे काय?, प्रायोगिक रंगभूमीची गरज, मराठी नाट्यव्यवहारात त्याचा नकारात्मक दृष्टीने होणारा वापर, त्याच्या यशापयशाची कारणे; अशा विविध प्रश्नांचा ऊहापोह केलेला आहे.

'आम्हांला भेटलेले डॉ. श्रीराम लागू' या संपादित केलेल्या पुस्तकाच्या प्रस्तावनेत त्यांनी लागूंची नाट्यनिष्ठा, डॉक्टरी ज्ञान आणि रंगमंचीय भान यांचा त्यांनी घातलेला मेळ, वाचिक व कायिक अभिनय, त्यांच्या कलात्मक जाणिवा/उणिवा समीक्षकाच्या भूमिकेतून टिपलेल्या आहेत. याशिवाय लागूंची सामाजिक बांधीलकीची जाणीव, नास्तिकवाद, तर्कनिष्ठ विचारसरणी आणि त्यामध्ये जाणवलेली संगती आणि विसंगती यांचा अन्वयार्थ लावण्याचा प्रयत्न भावे यांनी केलेला आहे. अवघ्या काही पानांमध्ये एखाद्या व्यक्तिमत्त्वाचा वा कथांचा आरपार छेद घेण्याची विलक्षण हातोटी भावे यांच्यापाशी आहे.

प्रगल्भ आणि सुस्पष्ट विचारधारा, व्यासंग आणि कृतिशीलता यांमुळे त्यांनी राजकारण, शिक्षण, रंगभूमी, साहित्य, समीक्षा अशा विविध विषयांवर लिखाण केले व वेळप्रसंगी तत्सम चळवळीत भाग घेतला.

स्त्रीवादी दृष्टिकोनाविषयीचा समग्र विचार करायचा असेल तर तो मानववंशशास्त्र, भाषाशास्त्र, मानसशास्त्र, वाङ्मयीन समीक्षेचे तत्त्वज्ञान या विविध ज्ञानक्षेत्रांतील मर्मदृष्टी योजून करायला पाहिजे, असे मत त्यांनी स्त्री, अभ्यासासंबंधीच्या अनेक लेखांतून मांडले आहे. 'अभिरुची : ग्रामीण आणि नागर' (संपादक : गो.म. कुलकर्णी), 'मराठी टीका' (संपादक : वसंत दावतर), 'महात्मा फुले गौरवग्रंथ' अशा अनेक पुस्तकांमध्ये त्यांचे लेखन समाविष्ट केलेले आहे. 'विविधज्ञानविस्तार लेख सूची' चे (१९६८) संकलन त्यांनी केले आहे.

दलित व स्त्रिया यांच्यासंबंधीच्या चळवळीमध्ये मानवतावादी दृष्टिकोन केंद्रस्थानी असावा या मताचा पुरस्कार करून त्या अनेक चळवळींमध्ये सहभागी झालेल्या आहेत. १९९४ साली स्थापन झालेल्या 'पाकिस्तान - इंडिया पीपल्स फोरम फॉर पीस ॲण्ड डेमॉक्रसी' या संघटनेच्या महाराष्ट्र शाखेच्या त्या अध्यक्षा आहेत. दोन्ही देशांची भूमिका सामान्य माणसाचे हित डोळ्यांसमोर ठेवून युद्धविरहित असली पाहिजे, या मताचा त्यांनी सातत्याने पुरस्कार केला आहे.

– मृणालिनी चितळे

**संदर्भ :**

*१. भावे पुष्पा; 'वेचक पुंडलिक'; १९८५.*

## भावे, विनोबा

☞ **मुख्य नोंद – समाजकारण खंड**

## भावे, विष्णुदास अमृत

☞ **मुख्य नोंद – नाटक खंड**

## भावे, सदाशिव शिवराम

**समीक्षक**

**१८ डिसेंबर १९३१ – ३ ऑक्टोबर १९८६**

समीक्षक म्हणून नावलौकिक मिळविणाऱ्या सदाशिव शिवराम भावे यांचा जन्म रत्नागिरीला झाला. सातारा येथील न्यू इंग्लिश स्कूलमधून १९४८ साली मॅट्रिक झाल्यावर ते पुण्याच्या फर्गसन महाविद्यालयातून क्रमशः १९५२ साली बी.ए. आणि १९५४ साली एम.ए. झाले. नंतर त्यांनी कायद्याची परीक्षा उत्तीर्ण केली. उच्चशिक्षाविभूषित सदाशिवराव सांगलीच्या विलिंग्डन कॉलेजात मराठी विषयाचे अध्यापन करू लागले.

प्रा. भावे यांचे समीक्षात्मक लेख 'साधना', 'सत्यकथा', 'समाज प्रबोधन पत्रिका', 'मौज', 'प्रतिष्ठान'सारख्या मराठी व 'इंडियन लिटरेचर', 'इंडियन राइटिंग टुडे' अशा इंग्रजी नियतकालिकांतून प्रकाशित झाले. तर्कशुद्ध व नेटके प्रतिपादन, वाङ्मयाची अभ्यासपूर्ण जाण यांमुळे त्यांच्या सुमारे तीनशे लेखांनी समीक्षेची एक विशिष्ट उंची गाठली.

पुणे विद्यापीठ आणि मध्य अमेरिकेतील काही प्रमुख कॉलेजे यांच्या सहकार्याने चालू असलेल्या एका शैक्षणिक उपक्रमात दहा वर्षे (१९६५ ते १९७४चा कालखंड) ते अध्यापक या नात्याने सहभागी झाले. अभ्यागत प्राध्यापक म्हणून भावे यांना अमेरिकेतील मिनेसोटा राज्याच्या मिनेआपोलिस या राजधानीपासून ४० मैल अंतरावरील 'नॉर्थफील्ड' खेड्यातील कार्लटन कॉलेजात निमंत्रित केले होते. तेथे जाऊन त्यांनी तिथल्या ज्ञानेच्छू विद्यार्थ्यांना 'भारतीय साहित्य आणि हिंदू परंपरा' या विषयाचा परिचय करून दिला.

११८ वर्षांची सुदीर्घ परंपरा असलेले हे कार्लटन कॉलेज राज्यातील पहिल्या क्रमांकाचे व देशातील पहिल्या दर्जाच्या निवडक कॉलेजांतील एक म्हणून मान्यता पावलेले आहे.

अमेरिकेत राहून तेथील समाज, संस्कृती, चालीरीती, परंपरा यांचे अत्यंत बारकाईने व भारताच्या संदर्भात तौलनिक निरीक्षण करून प्राध्यापक भावे यांनी 'अमेरिका नावाचे प्रकरण' हा उत्कृष्ट ग्रंथ लिहिला. या ग्रंथाच्या माध्यमातून त्यांनी उभे केलेले अमेरिकेचे चित्र भारतातील शिक्षणक्षेत्राला उत्तम मार्गदर्शक होईल यात शंका नाही. भावे यांच्या तर्कशुद्ध व मौलिक चिंतनाची या पुस्तकात प्रचिती येते.

– वि. ग. जोशी

**संदर्भ :**

*१. भावे स.शि.; 'अमेरिका नावाचे प्रकरण'; मॅजेस्टिक प्रकाशन, मुंबई मे १९८६.*

## भिडे, गणेश रंगो

☞ **मुख्य नोंद – पत्रकारिता आणि ललितेतर साहित्य खंड**

## भिडे, विद्याधर वामन

**कवी, कथाकार, कादंबरीकार, कोशकार**

**१८६१ – १९३६**



विद्याधर वामन भिडे यांचे पाच इयत्तांपर्यंतचे प्राथमिक शिक्षण हुबळी, धारवाड या ठिकाणी झाले. १८७८मध्ये ते मॅट्रिक झाले. १८८३मध्ये ते बी.ए. झाले. सरकारी शाळा खात्यात नोकरी करून १९१२मध्ये ते निवृत्त झाले.

काव्य, व्याकरण, साहित्यशास्त्र इत्यादींचा त्यांचा व्यासंग मोठा होता. मराठी भाषेतील शास्त्र आणि कविता यांच्या संयोगाने रचलेले त्यांचे आगळेवेगळे पुस्तक आहे. 'साहित्यकौमुदी' (१९३२). मम्मटाच्या काव्यप्रकाशच्या १,२,३,९,१० या पाच उल्लासांच्या आधाराने केले. पद्यरूप लक्षणांसह मराठीत संक्षिप्त निरूपण केलेले हे एक आगळेवेगळे प्रयोगशील पुस्तक आहे. या पुस्तकातील उदाहरणार्थ दिलेली बहुतेक पद्ये भिडे यांचीच आहेत हे विशेष होय.

'मराठी भाषेचा सरस्वती कोश': या २०६० पानांच्या कोशात मराठी भाषेतील शब्द, व्युत्पत्त्यांसह दिले आहेत.

'मराठी भाषेचे व्याकरण आणि म्हणी', आणि निबंध कसे लिहावेत, अनुवाद कसा करावा, याचे मार्गदर्शन करणारे पन्नास निबंध आणि वीस अनुवाद असे उदाहरणांसह लिहिलेले भिडे यांचे पुस्तक आहे 'निबंधलेखन आणि अनुवाद' (१९१०). 'मराठी म्हणींविषयी चार शब्द' (१८९१) या पुस्तकात म्हणींची मनोरंजक माहिती मिळते. 'अर्थालंकाराचे निरूपण' मध्ये प्रत्येक अलंकाराचे लक्षण आणि स्पष्टीकरणार्थ भरपूर उदाहरणे दिली आहेत. या पुस्तकात विद्यार्थ्यांनी अलंकार ठरविण्यासाठी, अभ्यासासाठी १६५ गद्य, पद्य उतारे दिले आहेत-हे विशेष.

'मराठी भाषेचे उद्घाटन' (१९०५) यामध्ये मराठी शब्दांच्या अभ्यासापासून मराठ्यांच्या इतिहासाचे, नीतिमत्तेचे ज्ञान आपणांस कसे प्राप्त होते, हे मनोरंजक रितीने सांगितले आहे.

या कोशविषयक ग्रंथास डेक्कन व्हर्न्याक्युलर ट्रान्सलेशन सोसायटीचे बक्षीस मिळाले होते. याव्यतिरिक्त 'राघवीय परीवाह' (पूर्वार्ध) आणि 'राघवीय परीवाह' (उत्तरार्ध) या दोन्ही पुस्तकांत रामजन्मापासून ते रामाचा राज्याभिषेक येथपर्यंतचा कथाभाग आला आहे.

'कमळीची सुटका' हे २०९ आर्यांचे काव्य, आणि 'पिलाजी आणि शिवाजी' हे ११३ आर्यांचे काव्य प्रसिद्ध आहे. 'मुक्तामाला' यात कविवर्य मोरोपंत यांच्या ११५ आर्यांची सुधारित आवृत्तीही प्रसिद्ध आहे.

'मंदारमंजिरी', 'गजेंद्रमोक्ष', 'रथरूपक', 'जीवजागृती' इत्यादी काव्यसंग्रहही प्रकाशित झाले आहेत.

'कोरलाईचा किल्लेदार' (१९२५), 'केंजळगडचा कबजा', 'पण तिसरा कोण?', 'गणबगडाचा गडकरी', 'आबाजीरावाची साडेसाती', 'सवाईराम', 'एका गुलामाचे स्ववृत्तकथन' या रहस्यमय कादंबऱ्या त्यांनी लिहिल्या आहेत.

तसेच, 'चिमुकले रामायण', 'अकरा मनोरंजक गोष्टी', 'गोवर्धनपंत', 'चंपूबाई', हे त्यांचे कथासंग्रहही प्रसिद्ध आहेत.

- प्रा. मंगला गोखले

भ

## भेण्डे, सुभाष वासुदेव

**कथाकार, कादंबरीकार, नाटककार, समीक्षक, संपादक**



**१४ ऑक्टोबर १९३६**

साठोत्तरी मराठी साहित्यातील चतुरस्र लेखक सुभाष भेण्डे यांचा जन्म गोव्यातील बोरी येथे झाला. त्यांचे शिक्षण सांगली व पुणे येथे झाले. पुण्याच्या गोखले इन्स्टिट्यूट ऑफ पॉलिटिक्स अॅन्ड इकॉनॉमिक्स या संस्थेत डॉक्टरेटचा अभ्यास करताना त्यांना 'फोर्ड फाउंडेशन स्कॉलरशिप' मिळाली. वयाच्या सव्विसाव्या वर्षी 'अॅग्रिकल्चरल इन्कम टॅक्सेशन इन इंडिया' या विषयावर प्रबंध लिहून त्यांनी पीएच.डी. संपादन केली. हा त्यांचा प्रबंध 'एशिया पब्लिशिंग हाउस'ने प्रकाशित केला. १९६२ ते १९६८ दरम्यान त्यांनी गोव्याच्या महाविद्यालयात अध्यापन केले. नंतर मुंबईला कीर्ती महाविद्यालयामध्ये ते पंचवीस वर्षे अर्थशास्त्र विभागप्रमुख व नंतर राजस्थान सेवा संघ महाविद्यालयात तीन वर्षे प्राचार्य होते. मुंबई विद्यापीठाच्या सिनेट व अॅकॅडमिक काउन्सिलचे ते अनेक वर्षे सदस्य होते. सध्या ते सारस्वत बँकेचे संचालक म्हणून कार्यरत आहेत.

विविध स्वरूपाचे लेखन केले असले तरी सुभाष भेण्डे यांची खरी ओळख मराठी साहित्यविश्वात निर्माण झाली ती प्रामुख्याने कसदार कादंबरीकार आणि विनोदी लेखक म्हणून. महाविद्यालयीन जीवनात त्यांची 'ज्योत' नावाची कथा प्रसिद्ध झाली आणि लेखनाचा श्रीगणेशा झाला. भेण्डेंचे पहिले पुस्तक प्रकाशित झाले १९६४मध्ये. ते 'स्वर्ग दोन बोटं' या शीर्षकाचे. या पुस्तकानंतर 'कागदी बाण' (१९६६) आणि 'स्मितकथा' (१९६९) ही दोन विनोदी पुस्तके प्रकाशित झाली आणि भेण्डेंनी अगदी उमेदीच्या वयातच एक विनोदी लेखक म्हणून आपले स्थान मराठी विनोदी परंपरेत निर्माण केले.

एकीकडे विनोदी लेखन करीत असतानाच अचानक भेण्डे कादंबरी लेखनाकडे वळले. 'वीणा' या दिवाळी अंकासाठी त्यांनी गोवामुक्तिसंग्रामाची पार्श्वभूमी घेऊन मुक्तिसंग्राम आणि त्यानंतरच्या गोमंतकीय जीवनातील परिवर्तने यांचा पट या कादंबरीत मांडला आणि सुभाष भेण्डे कादंबरीकार म्हणून जाणकार वाचकांसमोर आले. त्यांची ही पहिली कादंबरी, 'आमचे गोय, आमका जाय' या नावाने १९७० मध्ये प्रकाशित झाली. मराठीतील एक कसदार, प्रादेशिक पार्श्वभूमी असलेली कादंबरी म्हणून मराठी समीक्षकांनी – जाणकारांनी या कादंबरीला पसंतीची पावती दिली. यानंतर मात्र भेण्डेंचे कादंबरीलेखन सातत्याने सुरू राहिले. नंतर 'अदेशी' (१९७१), 'जोगीण' (१९७४), 'अंधारवाटा' (१९७८), 'चकवा' (१९८१), 'पैलतीर' (१९८२), 'उद्ध्वस्त' (१९८४), 'बॉनसाय' (१९८८), 'किनारा' (१९९४), 'काजळल्या दिशा' (२०००) आणि 'होमकुंड' (२००७) या कादंबऱ्या प्रसिद्ध झाल्या.

भेंण्ड्यांच्या या कादंबऱ्यांचे विषय विविधस्वरूपी आहेत. या कादंबऱ्यांना जशी गोमंतकाची पार्श्वभूमी आहे, तशीच मुंबईचीही पार्श्वभूमी आहे. तसेच या कादंबऱ्यांचे विषयही आजच्या जगण्याशी विविधांगांनी नाते सांगणारे आहेत. गोवा, गोवामुक्ती, गोव्यातील जनजीवनाचे बदलते पोत मांडणाऱ्या कादंबऱ्या (आमचे गोय, आमकाजाय, जोगीण, चकवा, उद्ध्वस्त आणि होमकुंड); ब्रेनड्रेनची समस्या (अदेशी); आजच्या बदलत्या महानगरीय, स्पर्धात्मक उद्योगाच्या क्षेत्रातल्या कादंबऱ्या (अंधारवाटा, किनारा); शिक्षणक्षेत्रातील भ्रष्ट प्रवृत्तींचे चित्रण (बॉनसाय), वृत्तपत्रव्यवसायातील काजळलेल्या निष्ठा आणि नैष्ठिकतेचा संघर्ष (पैलतीर); दलित चळवळीतील कृतक निष्ठा आणि राजकारण (काजळल्या दिशा) हे या कादंबरीविश्वाचे ज्वलंत विषय आहेत. आपल्या अवतीभोवतीच्या जगण्यातील सारे ताणेबाणे, पदर अधिक प्रामाणिकपणे आणि नैष्ठिकपणे आपल्या कादंबऱ्यांमध्ये मांडण्याचा प्रयत्न सुभाष भेण्डे यांनी केला आहे. जीवनातील अनेक क्षेत्रांत होणारा मूल्यांचा ऱ्हास त्यांना अस्वस्थ करतो.

कादंबरी वाङ्मयाच्या पाठोपाठच भेण्डे यांनी विपुल असे विनोदी लेखन केलेले आहे. श्रीपाद कृष्ण कोल्हटकर, राम गणेश गडकरी, आचार्य अत्रे, चिं. वि. जोशी, पु. ल. देशपांडे या मराठीतील विनोदी वाङ्मयीन परंपरेत सुभाष भेण्डे यांनी आपले स्थान निश्चित केले आहे. मानवी जीवनातील विसंगतीवर हलकीफुलकी टिपण्णी करीत नर्मविनोदी अंगाने समाजाकडे पाहत, त्यांच्यातल्या विनोदकाराने लेखन केलेले आहे. 'स्वर्ग दोन बोटं' (१९६४), 'कागदी बाण' (१९६६), 'दिलखुलास' (१९७५), 'जित्याची खोड' (१९७५), 'हसवेगिरी' (१९७८), 'हास परिहास' (१९७८), 'झारीतला शुक्राचार्य' (१९७९), 'द्राक्ष आणि रुद्राक्ष' (१९८४), 'सुरस आणि चमत्कारिक' (१९८८), 'जेथे जातो तेथे' (१९९०), 'पितळी दरवाजा' (१९९३), 'हलकंफुलकं' (१९९६), 'मयसभा' (१९९९), 'हास्ययात्रा' (२०००) आदी विनोदी लेखसंग्रह त्यांच्या नावावर जमा आहेत.

कादंबरी आणि विनोदी लेख या सोबतच भेण्डे यांनी लिहिलेल्या कथांचा संग्रह 'लांबलचक काळीशार सावली' या शीर्षकाखाली १९८० मध्ये प्रकाशित झाला. कथेसोबतच त्यांनी प्रवासवर्णन या वाङ्मयप्रकारातही आपली प्रतिमा स्वतंत्रपणे उमटू शकेल अशी प्रवासवर्णने लिहिली आहेत. ती 'चंषक आणि गुलाब' (१९८०), 'गड्या आपुला गाव बरा' (१९८५) आणि 'पुण्याई' (२००७) या शीर्षकांनी प्रकाशित झाली आहेत. 'मोनिकाच्या धमाल कथा' (१९९२) हा बालकथासंग्रह, 'कुमाँऊचे नरभक्षक' (१९८२) हा जिम कॉर्बेटच्या पुस्तकाचा अनुवाद, 'साहित्य आणि संस्कृती' हा समीक्षालेखसंग्रह, 'ऐसी कळवळ्याची जाती' (२००१) हे व्यक्तिचित्रणात्मक पुस्तक आणि 'धनंजयराव गाडगीळ: व्यक्ती आणि कर्तृत्व' (२००६) हे चरित्र, ही त्यांची प्रकाशित साहित्यसंपदा आहे.

सुभाष भेण्डे यांनी जसे विविध वाङ्मयप्रकार ललित साहित्याच्या प्रांतात हाताळले, तसेच संपादनासारखे काहीसे वेगळ्या वाटेने जाणारे कार्यही केले आहे. या

कार्यातून पूर्वसूरी, समकालीन व्यक्तींबद्दलचा, साहित्यिकांबद्दलचा त्यांचा आदरच व्यक्त होतो, असे दिसते. ‘अ.का. प्रियोळकर स्मृतिग्रंथ’ (१९७४), ‘स्मृतिपूजा, प्रभावती भावे’ (१९८८), ‘गंभीर आणि गमतीदार’ (१९९०), ‘बेस्ट ऑफ जयवंत दळवी’ (१९९५), ‘महाराष्ट्राची मानचिन्हे’ (१९९६-२०००) खंड १ व २, सहलेखक प्रा. एकनाथ साखळकर, इत्यादी संपादनांतून व्यक्ती- समाज, समकालीन वाङ्मयीन विश्वाविषयीचा आस्थाभाव आणि निरपेक्ष, निष्पक्ष भूमिका इत्यादी संपादक म्हणून सुभाष भेण्डे यांच्या व्यक्तिमत्त्वाची ओळख पटते. या लेखनासोबतच सुभाष भेण्डे यांनी त्यांच्या ‘अंधारवाटा’ या कादंबरीवर आधारित ‘मार्ग सुखाचा’ (१९८४) हे नाटक लिहून मराठी नाट्यक्षेत्रात नाटककार म्हणून आपल्या वेगळ्या लेखनप्रकृतीची ओळख पटवून दिली.

सुभाष भेण्डे यांच्या काही कादंबऱ्यांचे हिंदीमधून अनुवादही प्रकाशित झाले आहेत. ‘भिक्षुणी’ (जोगीण), ‘अनजानी राहें’ (अंधारवाटा), ‘कुछ तो वजह है’ (अदेशी) या नावांनी हे अनुवाद प्रकाशित झाले आहेत. ‘पैलतीर’, ‘ती वाट दूर जाते’, ‘छत्रपती शिवाजी महाराज’ या दूरदर्शन मालिकांसाठीही त्यांनी लेखन केले आहे.

सुभाष भेण्डे यांच्या या लेखनप्रवासात त्यांच्या अनेक पुस्तकांना विविध पुरस्कार प्राप्त झालेले आहेत. त्यांपैकी ‘जोगीण’, ‘चषक आणि गुलाब’, ‘मार्ग सुखाचा’, ‘बॉनसाय’ (याचा कानडी अनुवादही प्रकाशित झाला आहे), ‘हलकंफुलकं’ आणि ‘होमकुंड’ या पुस्तकांना महाराष्ट्र शासनाचे पुरस्कार, ‘अदेशी’ आणि ‘जोगीण’ या कादंबऱ्यांना गोवा कला अकादमीचा पुरस्कार, ‘किनारा’ला गोमंतक मराठी अकादमी पुरस्कार, ‘काजळल्या दिशा’ ला महाराष्ट्र साहित्य परिषदेचा शंकर पाटील पुरस्कार, ‘जेथे जातो तेथे’ या पुस्तकाला महाराष्ट्र साहित्य परिषदेचा चिं. वि. जोशी पुरस्कार, नाशिकच्या सार्वजनिक वाचनालयाचा पुरस्कार इत्यादी पुरस्कारांनी त्यांच्या लेखनकर्तृत्वाचा गौरव केला आहे. या विविध साहित्य पुरस्कारांसोबतच सुभाष भेण्डे यांना विविध सन्मानांनीही गौरवान्वित केले आहे. महाराष्ट्र शासनाच्या विश्वकोश निर्मिती मंडळावर सदस्य, नॅशनल बुक ट्रस्टतर्फे ‘लेखक तुमच्या भेटीला’ मध्ये सहभाग, वळवई येथे भरलेल्या एकविसाव्या गोमंतक मराठी साहित्य संमेलनाचे अध्यक्ष, २००३ मध्ये कराड येथे भरलेल्या अखिल भारतीय मराठी साहित्य संमेलनाचे अध्यक्ष हे त्यांच्या यशःशिखरावरील काही शिरपेच म्हणून नोंदवता येतील. ‘आधुनिक महाराष्ट्राची जडणघडण - शिल्पकार चरित्रकोश’ या महत्त्वाकांक्षी प्रकल्पातील ‘साहित्य’ खंडाच्या मुख्य संपादकपदाची जबाबदारी त्यांनी सांभाळली आहे.

कथा, कादंबरी, विनोद, संपादन, प्रवासवर्णन इत्यादी वाङ्मयप्रकारांत आपल्या लेखनाचा स्वतंत्र ठसा उमटविणाऱ्या या लेखकाला जीवनातील नावीन्याचा शोध घेण्याची सतत आस्था आहे. सामाजिक, राजकीय स्थित्यंतरे आणि त्यातून घडत, घसरत, उभा राहणारा माणूस हे सुभाष भेण्डे यांच्या गंभीर लेखनाचे सूत्र आहे, असे म्हणता येईल.

— डॉ. रवींद्र शोभणे

**संदर्भ :**


१. *वडेर प्रल्हाद, खोले विलास, संपादक; ‘सुभाष भेण्डे यांचे साहित्य विश्व’; मॅजेस्टिक प्रकाशन, मुंबई; २००३.*

२. *कांदोळकर सचिन, संपादक; ‘सुभाष भेण्डे : व्यक्ती आणि वाङ्मय’; गोमंतक मराठी अकादमी, पणजी; २००४.*


भ

## भोपटकर, लक्ष्मण बळवंत

***अण्णासाहेब भोपटकर***

**राजकीय ग्रंथकार, पत्रकार**

**१० मे १८८० - २४ एप्रिल १९६०**

लक्ष्मण बळवंत उर्फ अण्णासाहेब भोपटकर हे प्रसिद्ध कायदेपंडित होते. स्वातंत्र्यपूर्वकालीन राजकारणात प्रत्यक्ष सहभाग, वृत्तपत्रांचे संपादन, राजकीय, तसेच व्यायाम व कुस्ती या विषयांवर लेखन आणि ललित गद्य लेखन अशी विविधांगी कामगिरी त्यांच्या नावावर आहे.



लक्ष्मण बळवंत उर्फ अण्णासाहेब हे उच्चशिक्षित होते. १९०४ साली त्यांनी एम.ए. व १९०७ साली एल्एलबी. या पदव्या संपादन करून ते वकिलीच्या व्यवसायात कार्यरत होते. 'भाला' या वृत्तपत्राचे संपादक, प्रसिद्ध फौजदारी वकील व फर्डे वक्ते म्हणून नावाजलेल्या भास्कर बळवंत उर्फ 'भाला'कार भोपटकरांचे ते धाकटे बंधू होते. आपल्या बंधूप्रमाणेच तेही लोकमान्य टिळकांचे खंदे अनुयायी होते. लोकशाही स्वराज्य पक्ष व हिंदू महासभा या पक्षांमधून त्यांची राजकीय कारकीर्द घडली. पुण्यातील सोन्या मारुती सत्याग्रहात व हैद्राबाद सत्याग्रहात त्यांनी सक्रिय सहभाग घेतला होता; त्यामध्ये त्यांना तुरुंगवासही घडला. गांधीहत्या खटल्यात स्वातंत्र्यवीर सावरकरांचे वकील म्हणून त्यांनी काम पाहिले.

अण्णासाहेबांनी 'मराठा' साप्ताहिकातून राजकारण व तत्त्वज्ञानविषयक लेखन केले. वृत्तपत्रातील जहाल लेखनाबद्दल 'भालाकार' भोपटकरांना तुरुंगवासाची शिक्षा झाल्यानंतर त्यांच्या अनुपस्थितीत अण्णासाहेबांनी 'भाला'च्या संपादकपदाची धुरा सांभाळली. पुढे त्यांनी 'लोकसंग्रह' या दैनिकाचे संपादनही केले. या वृत्तपत्राद्वारे त्यांनी महात्मा गांधी यांना टीकेचे लक्ष्य केले. त्यांनी 'पर्मनन्ट एलिमेन्ट्स ऑफ रिलिजन' ही इंग्रजी लेखमाला लिहिली. बिपिनचंद्र पाल यांच्या व्याख्यानांचे, तसेच लाला लजपतराय यांच्या 'माझ्या हद्दपारीची कहाणी' या पुस्तकाचे अनुवाद त्यांच्या नावावर जमा आहेत. विशेष म्हणजे, ही दोन्ही पुस्तके इंग्रज सरकारकडून प्रक्षोभक ठरविण्यात आली व ती जप्त करण्यात आली होती. काँग्रेसचे कायदेमंडळ, स्वराज्याची मीमांसा, हिंदू समाज दर्शन, अशी राजकीय विचार मांडणारी पुस्तके त्यांनी लिहिली.

अण्णासाहेबांना व्यायाम व कुस्ती यांमध्ये विशेष रस होता. 'माझी व्यायाम पद्धती', 'कुस्ती', 'दांडपट्टा', 'स्त्रियांचे व्यायाम' ही व्यायाम व कुस्तीच्या प्रकारांबाबत प्रबोधन करणारी व त्यांचा प्रसार करणारी पुस्तके त्यांनी लिहिली.

राजकीय, तत्त्वज्ञानविषयक व कुस्तीविषयक पुस्तकांच्या तुलनेत त्यांचे वाङ्मयीन लेखन अल्प आहे. त्यांनी 'नवरत्नांचा हार' हे मराठा वीरांच्या शौर्यगाथा कथन करणारे प्रेरणादायी पुस्तक लिहिले. याशिवाय, 'मृत्यूच्या मांडीवर' ही त्यांची कादंबरी प्रसिद्ध आहे. या कादंबरीमध्ये वीर व करुण रसाचा आविष्कार आढळतो.

– मनोहर सोनावणे

* * *

# म



## मंगरूळकर, अरविंद गंगाधर

**संपादक, संशोधक, समीक्षक**

**२९ एप्रिल १९१० - २७ मे १९८६**



मराठी आणि संस्कृतचे जाणकार असलेल्या अरविंद गंगाधर मंगरूळकर यांनी संस्कृत आणि प्राकृत (मराठी) या दोन विषयांत एम.ए.ची पदवी प्राप्त केली होती. पुण्याच्या नूतन मराठी विद्यालयात शिक्षक म्हणून अध्यापन कार्यास सुरुवात करणाऱ्या मंगरूळकरांनी पुढे पुण्याच्याच सर परशुरामभाऊ महाविद्यालयात संस्कृत-मराठीचे प्राध्यापक आणि विभाग-प्रमुख म्हणून काम केले. मराठी आणि संस्कृत साहित्याच्या व्यासंगाचा त्यांचा अवाकही प्रचंड होता. साहित्य, संगीत आणि कला या तिन्हींचे ते मर्मज्ञ होते. या क्षेत्रातील त्यांचा अभ्यास थक्क करून सोडणारा होता. या विषयांतील 'ज्ञानकोश' अशी त्यांची यथार्थ ख्याती होती.

मराठी भाषाशास्त्राचा त्यांचा व्यासंग मोठा होता. या संदर्भात 'मराठी: घटना, रचना आणि परंपरा' हा त्यांनी १९५८ साली संपादित केलेला ग्रंथ अभ्यासकांसाठी आजही उपयुक्त आहे. त्यांनी स्वतंत्र लेखन फारसे केले नसले, तरी 'मेघदूत'चे (१९६१) त्यांचे संपादन अभ्यासपूर्ण आणि नेटक्या संपादनाचा वस्तुपाठ ठरावा. वि.मो.केळकरांबरोबर तयार झालेला त्यांचा 'ज्ञानदेवी' हाही अभ्यासक-संशोधकांत मान्यता पावलेला ग्रंथ आहे. 'नीतिशतक' हा ग्रंथ त्यांनी १९६१ मध्ये संपादित केला असून मृत्यूपूर्वी दोनच वर्षे आधी त्यांचा 'शेफालिका' (१९८४) हा ग्रंथ प्रसिद्ध झाला असून तो हालसातवाहनाच्या ग्रंथाचा मराठी अनुवाद (गद्य) आहे.

महाराष्ट्र साहित्य पत्रिका (पुणे) ह्यांच्या अनेक अंकांत त्याचे मराठी-संस्कृत साहित्यावर संशोधन-समीक्षात्मक विपुल लेख प्रसिद्ध झाले आहेत. महाराष्ट्र साहित्य परिषदेचे कार्यवाह म्हणून जवळपास दहा वर्षांची त्यांची कारकीर्द प्रशासन आणि साहित्यविषयक उपक्रम या दोन्हींनी वैशिष्ट्यपूर्ण ठरली.

'मम्मटाचा काव्यप्रकाश' हा अर्जुनवाडकर आणि मंगरूळकर यांनी भाषांतरित व संपादित केलेला हजार पृष्ठांचा विवेचक ग्रंथ चाळून आचार्य अत्रे स्तिमित होऊन गडबडा लोळले, ही आख्यायिका नसून सत्य घटना आहे; अशी नोंद म.श्री.दीक्षित यांनी केली आहे. अग्निहोत्री संपादित पंचखंडी मराठी शब्दकोशानिर्मितीतही त्यांचा मोठा वाटा आहे. मंगरूळकर हे अभिजात रसिक आणि साक्षेपी साहित्य-समीक्षक होते.

— मधू नेने

**संदर्भ :**

*१. मंगरूळकर अरविंद; म.सा.पत्रिका; जुलै-ऑगस्ट-सप्टेंबर १९८६.*

## मंगळवेढेकर राजा

***मंगळवेढेकर, वसंत नारायण***

**बालसाहित्यकार, चरित्रकार, कवी**

**११ डिसेंबर १९२५ - १ एप्रिल २००६**

बालसाहित्यकार वसंत नारायण मंगळवेढेकर यांचे संपूर्ण लेखन 'राजा मंगळवेढेकर' याच टोपणनावाने प्रसिद्ध आहे. त्यांनी बी.ए.पर्यंतचे शिक्षण घेतले होते. भारताच्या स्वातंत्र्य चळवळीमध्ये त्यांचा सक्रिय सहभाग होता.



राष्ट्रसेवादल, साने गुरुजी कथामाला, आंतरभारती इत्यादी सांस्कृतिक कार्य करणाऱ्या संस्थांशी त्यांचा निकटचा संबंध होता. कथाकथन, बालमेळावे, शिबिरे इत्यादींच्या निमित्ताने त्यांनी भारतभर भटकंती केली. या अनुभवविश्वातून त्यांची अनेक पुस्तके आकारास आली आहेत. अनेक ठिकाणी ते कथाकथनाच्या कार्यक्रमासाठी जात. यातूनच आकारास आलेल्या त्यांच्या 'कथा आणि कथाकथन' या पुस्तकात त्यांनी कथाकथनाची तंत्रे सांगितली आहेत. या पुस्तकाच्या अनेक आवृत्त्या निघाल्या असून महाराष्ट्र शासनाचे उत्कृष्ट ग्रंथाचे पारितोषिकही या पुस्तकास प्राप्त झालेले आहे. 'साने गुरुजी जीवनचरित्र' हा साने गुरुजींच्या जीवनसंघर्षावर प्रकाश टाकणारा असा त्यांचा अतिशय वैशिष्ट्यपूर्ण ग्रंथ आहे.

कथाकथनांमधून बालगोपाळांची मने जिंकणाऱ्या राजा मंगळवेढेकरांनी बालवाचकांसाठी अनेक पुस्तकेही लिहिली आहेत. त्यांचे बहुतांश लेखन चरित्रे, वृक्ष, निसर्ग व विज्ञान या विषयांवर आधारित आहेत. त्यांच्या पुष्कळशा पुस्तकांना राज्य व केंद्रशासनाचे पुरस्कार प्राप्त झालेले आहेत.

मराठी साहित्याच्या दालनात आपल्या विविधांगी अशा समृद्ध साहित्यप्रयत्नांनी राजा मंगळवेढेकरांनी मोलाची भर घातली आहे. तसेच बालगोपाळांसाठीही चरित्रे, नाटके, कथा अशा विविध साहित्यप्रकारांची निर्मिती केलेली आहे.

आपल्या भारत देशाची विविधतेतून एकतेचा संदेश देणारी संस्कृती आणि भारतातल्या सर्वच राज्यांची सर्व प्रकारची वैशिष्ट्ये आपल्या सहज-सुंदर शब्दांत प्रकट करणारी अशी प्रत्येक राज्याविषयीचे स्वतंत्र पुस्तक लिहिणारे राजा मंगळवेढेकर यांची छोटी-मोठी अशी जवळपास तीनशे पुस्तके प्रसिद्ध आहेत.

– डॉ. संध्या पवार

## मंचरकर, रत्नाकर बापूराव

**समीक्षक, संशोधक**

**६ ऑक्टोबर १९४३**



रत्नाकर मंचरकर यांचा जन्म वडनिरे, ता. पारनेर, जि. अहमदनगर येथे झाला. जून १९६६ पासून रयत शिक्षण संस्थेच्या विविध महाविद्यायां-मधून त्यांनी मराठीचे अध्यापन केले. अनेक सार्वजनिक शैक्षणिक, साहित्यिक संस्थांशी ते संबंधित होते व त्यात त्यांनी सक्रिय सहभाग घेतला. जुनी नवी साहित्य मीमांसा, नवे वाङ्मयप्रवाह, तौलनिक साहित्याभ्यास ही मंचरकरांच्या अभ्यासाची क्षेत्रे होत. विविध नियतकालिकांतून त्यांचे लेखन प्रकाशित झाले. त्यांना विविध ग्रंथपुरस्कार व संशोधन पुरस्कार, पारितोषिके मिळाली. त्यांनी संपादने, संहिता संपादने आणि सर्वांगीण संशोधनात्मक लेखन, सूत्रसंचालने इत्यादी कार्य केले. विशेषतः मध्ययुगीन मराठी वाङ्मयाचा सखोल व संशोधनात्मक अभ्यास व लेखन केले.

त्यांच्या 'भाषाशास्त्रविचार' (१९७५) या ग्रंथाला शिवाजी विद्यापीठाचा सर्वोत्कृष्ट ग्रंथ पुरस्कार (१९७६) मिळाला. 'मुक्तेश्वरांची कविता : खंड पहिला : आख्यानक व स्फुट कविता' (१९८३), 'मुक्तेश्वरांची कविता : खंड दुसरा : संक्षेपरामायण' (१९८३), या दोन्ही खंडांना महाराष्ट्र शासनाचा 'समीक्षा आणि सौंदर्यशास्त्र' या विभागातील सर्वोत्कृष्ट वाङ्मयनिर्मितीचा प्रथम क्रमांकाचा पुरस्कार (१९८४) मिळाला.

'मुक्तेश्वरांची कविता : खंड तिसरा : महाभारत' (१९८७) या खंडाला हणमंते संशोधन पारितोषिक, महाराष्ट्र ग्रंथोत्तेजक सभा, पुणे (१९८९) मिळाले.

तसेच वरील तिन्ही खंडांना आधारभूत असलेल्या पीएच.डी. प्रबंधास 'वि. रा. करंदीकर संशोधन पारितोषिक' शिवाजी विद्यापीठ, कोल्हापूर (१९८२) मिळाले आहे.

म

'गो. म. कुळकर्णी यांची समीक्षा: परिचय आणि परामर्श' (१९९०) या ग्रंथाला गो. म. कुळकर्णी गौरव समिती, पुणे (१९९०) व महाराष्ट्र ग्रंथोत्तेजक सभा पुणे, यांचे पारितोषिक (१९९१) मिळाले.

त्यांची 'एकनाथ आणि मुक्तेश्वर' (१९८५), 'धर्मसंप्रदाय आणि मध्ययुगीन मराठी वाङ्मय' (२०००), 'तौलनिक साहित्याभ्यास आणि मध्ययुगीन मराठी वाङ्मय' (२००६) ही पुस्तके प्रसिद्ध आहेत. 'ज्ञानेश्वरी' अध्याय दुसरा (१९६८), सातवा (१९७२), अध्याय पहिला (१९९५) 'सामराजकृत रुक्मिणीहरण' (१९६९) ही त्यांची संहिता संपादने आहेत.

'त्रिदल' - साहित्य, समाज व शिक्षणविषयक लेखसंग्रह (१९८३), 'वाङ्मयाचे महाविद्यालयीन अध्यापन', 'दु.का. संत गौरवग्रंथ' (१९८७), 'वीरशैव संप्रदाय': डॉ. वा. ग. कल्याणकर गौरवग्रंथ (१९८९) ही सूत्र संपादने व 'राजकीय तत्त्वप्रणाली- सिद्धान्त आणि व्यवहार', ॲड. रावसाहेब शिंदे गौरवग्रंथ सहकार्याने, भोर गौरव समिती (१९८९) अशी त्यांची साहित्यसंपदा आहे.

वेगवेगळे ग्रंथ, प्रस्तावना, कोश आणि वाङ्मयीन नियतकालिकांतून त्यांचे निरनिराळ्या विषयांवरील शोधनिबंध प्रकाशित झाले. विषय व शोधनिबंध पुढीलप्रमाणे आहेत: 'भाषा आणि भाषाविज्ञान' (८ लेख) 'मध्ययुगीन मराठी वाङ्मय' (१०१ लेख); त्यांत 'संतकवी आणि संतसाहित्य' (३४ लेख), 'पंडित कवी आणि पंडिती काव्य' (२४ लेख), 'धर्मसंप्रदाय आणि मध्ययुगीन मराठी वाङ्मय' (९ लेख), 'मध्ययुगीन मराठी वाङ्मयाचा तौलनिक अभ्यास' (१३ लेख), 'मध्ययुगीन मराठीचा साहित्यिक भूगोल' (५ लेख), 'मध्ययुगीन मराठी वाङ्मयाचा इतिहास' (२ लेख), 'मध्ययुगीन मराठी वाङ्मयाच्या समीक्षकांचा परामर्श' (१० लेख), 'प्राचीन साहित्यविचार' (४ लेख) तसेच 'वाङ्मयाचे अध्यापन' (५ लेख), 'वाङ्मयाचे संशोधन' (७ लेख) यावरचे लेख अभ्यासकांना, विशेषतः प्राचीन मराठी वाङ्मयाच्या अभ्यासकांना अत्यंत उपयुक्त ठरतात.



अर्वाचीन मराठी वाङ्मयातील काही विषयांवरही मंचरकरांनी प्रकाश टाकला आहे. 'अर्वाचीन मराठी साहित्य आणि साहित्यिक' (१९ लेख), 'ग्रामीण-दलित-स्त्रीवादी-जनसाहित्य' (१६ लेख), तसेच 'अर्वाचीन मराठी साहित्यविचार आणि समीक्षा यांविषयीचे चिंतन', 'अर्वाचीन साहित्यविचार' (८ लेख), 'अर्वाचीन मराठी वाङ्मयाच्या समीक्षकांचा परामर्श' (६ लेख) आणि 'समीक्षा आणि समीक्षापद्धती' (११ लेख), असे बहुविध लेख लिहून त्यांनी समीक्षकाची योगदान करण्याची भूमिका पार पाडली आहे.

मराठीतील प्राचीन, अर्वाचीन साहित्याविषयी समकालीन वाङ्मयप्रवाहाच्या संदर्भात सातत्याने चिंतन-लेखन करून मंचरकरांनी मराठी वाङ्मय क्षेत्राला न्याय दिला आहे. मूलगामी संशोधन, सहृदय आकलन, चिकित्सक प्रतिपादन आणि विश्लेषक निष्कर्षण यांमुळे मंचरकरांचे संशोधनात्मक लेखनही सर्वांना आकर्षित करते आणि म्हणून वैशिष्ट्यपूर्ण ठरते.

— प्रा. अनुराधा साळवेकर

## मंत्री, रमेश राजाराम

**विनोदी लेखक, कथाकार, प्रवासवर्णनकार**

**६ जानेवारी १९२५ - १९ जून १९९८**



विनोदी लेखक, प्रवासवर्णनकार, कथाकार म्हणून मराठी साहित्यात स्वतःचे स्थान निर्माण करणारे रमेश मंत्री यांचे मूळचे नाव, रमेश शंकर कुळकर. त्यांचा जन्म कोकणात, कुडाळ-जवळच्या झाराप या गावी झाला. राजाराम मंत्री यांना दत्तक गेल्यानंतर त्यांचे नाव रमेश राजाराम मंत्री झाले. त्यांचे शिक्षण कोल्हापूरला झाले. एम.ए. करीत असतानाच त्यांनी पत्रकारितेत प्रवेश केला तो 'पुढारी' दैनिकात 'सहसंपादक' या नात्याने.

नंतर वृत्तपत्र व्यवसायाचे प्रगत शिक्षण घेण्यासाठी ते इंग्लंडला गेले.

१९५८ साली अमेरिकन सरकारच्या माहिती खात्यात अधिकारी या नात्याने ते वास्तव्यासाठी अमेरिकेत गेले. १९७८ सालापर्यंत ते तिथे होते. त्या काळात देश-विदेशांत त्यांचा भरपूर प्रवास झाला. त्या प्रवासातील अनुभवांवर त्यांनी प्रवासवर्णने लिहिली. त्यांच्या लेखनाचा झपाटा वाखाणण्याजोगा होता. १९७९ साली एकाच वर्षात ३४ पुस्तके लिहिण्याचा विक्रम त्यांच्या नावावर आहे. साहित्य व कला क्षेत्रातील अनंत काणेकर, गजानन जहागीरदार, सी. रामचंद्र, ग. वा. बेहरे, श्री. ज. जोशी, वसंत सरवटे, बाळ गाडगीळ, उमाकांत ठोंबरे हे त्यांचे खास स्नेही तर रवीन्द्र पिंगे व प्रमोद नवलकर हे कौटुंबिक मित्र होते.

रमेश मंत्री यांच्या नावावर १३०हून अधिक पुस्तके आहेत. त्यांतली बरीचशी प्रवासवर्णने व विनोदी पुस्तके आहेत. 'थंडीचे दिवस', 'सुखाचे दिवस', 'नवरंग' ही त्यांची वैशिष्ट्यपूर्ण प्रवासवर्णने आहेत. प्रांजळ, प्रसन्न, दिलखुलास लेखणीतून उतरलेली त्यांची प्रवासवर्णने वाचकांना त्या स्थळांच्या प्रत्यक्ष भेटीचा आनंद देतात. 'आंध्र', 'ओरिसा', 'एलिझाबेथ टेलर आणि मी', 'ओ कलकत्ता', 'करीन ती पश्चिम', 'दिशांतर', 'गांधीजींचा गुजरात', 'चार मीनार', 'जपानी आटापिटा', 'सूर्यपुत्रांचा देश', 'बारा लाखांत जगाची सफर', 'बंगलोर ते बदामी', 'संगमरवरी प्रदेश', 'सोमनाथ ते साबरमती' ह्यासारखी अनेक प्रवासवर्णने त्यांनी लिहिली.

विनोदी फॅण्टसी हा सर्वस्वी नवा साहित्यप्रकार त्यांनी मराठी वाङ्मयात रूढ केला. त्यातूनच जेम्स बॉण्डच्या धर्तीवर जनू बांडे ही विडंबनात्मक व्यक्तिरेखा त्यांनी निर्माण केली. 'सह्याद्रीची चोरी', 'सचिवालयात हत्ती', 'अति झालं नि हसू आलं', 'ओठ सलामत तो', 'एका हाती टाळी', 'झाली काय गंमत', 'हसण्याचा तास तिसरा', 'थट्टा मस्करी', 'चोरांचा सौजन्य सप्ताह' ह्यांसारखी आणखीही 'विनोद' याप्रकारात मोडणारी पुस्तके त्यांच्या नावावर आहेत. 'मुलखावेगळी माणसं', 'अशी असतात एकेक माणसं', 'तुमच्या पायी ठेविले मन' ही व्यक्तिचित्रणात्मक पुस्तके आणि 'साप्ताहिकी', 'चटक चांदणी', 'कुंकू', 'उत्तरकाल', 'उत्तरकांड', 'गुजगोष्टी', 'चंदेरी', 'आटापिटा' यांसारखी नाट्य, कथा, कादंबरी प्रकारांतील साहित्यनिर्मितीही त्यांनी केली.

मात्र लेखन करताना समीक्षक काय म्हणतील याची फिकीर करण्याऐवजी हलक्याफुलक्या मजकुराला मनापासून दाद देणारा सामान्य रसिक वाचक डोळ्यांसमोर ठेवूनच ते लिहीत गेले. आपल्या लेखनाशी ते इतके प्रामाणिक होते, की दररोज सकाळी ३-४ तास, सर्व शक्ती एकवटून ते लिहायला बसतच. त्यांचे सर्व लेखन एकटाकी असे.

मुंबई मराठी साहित्य संघात 'साहित्यिक गप्पा' हा अतिशय अभिनव कार्यक्रम सुरू करण्याचे श्रेय त्यांनाच जाते. १९९२ सालच्या कोल्हापूरच्या अखिल भारतीय मराठी साहित्य संमेलनाचे ते अध्यक्ष होते. त्या वेळी अध्यक्षपदावरून सोडलेल्या संकल्पाच्या पूर्तीसाठी त्यांनी गावोगावी पुस्तकांची प्रदर्शने भरवली. त्यांनी लेखकांच्या भाषणांचे ९५ कार्यक्रम वर्षभरात घडवून आणले. 'वाचन-संस्कृती' वृद्धिंगत करण्याचे त्यांचे हे काम महत्त्वाचे होते. इंग्लंडमध्ये असताना अवकाशवीर नील आर्मस्ट्राँग व अभिनेत्री एलिझाबेथ टेलर ह्यांना प्रत्यक्ष भेटण्याची मिळालेली संधी ही त्यांच्यासाठी अतीव समाधानाची बाब होती. आपले एक तरी पुस्तक रशियाचे अध्यक्ष गोर्बाचेव्हला अर्पण करण्याची आणि कर्मयोगी बाबा आमटे यांचे चरित्र लिहिण्याची, अशी त्यांची दोन स्वप्ने जागीच विरली.

मूर्तिमंत उत्साह, उत्सवप्रियता हा स्वभाव; सहजता, मौलिक, तल्लख विनोदबुद्धी, त्यातून आलेला हजरजबाबीपणा, कोणत्याही गोष्टीतले मर्म चटकन पकडण्याचे कौशल्य ही त्यांच्या व्यक्तिमत्त्वाची ठळक वैशिष्ट्ये म्हणता येतील. अंतर्गत कठोर शिस्तीचे पालन करणाऱ्या रमेश मंत्री यांच्या डोक्यात काळ-काम-वेग यांचे गणित पक्के बसलेले होते. असे सतत कार्यमग्न असणारे चैतन्यमूर्ती रमेश मंत्री हे आयुष्यात कृतकृत्य

होते; पण अखेरीस अर्धांगवायूमुळे उजवी बाजू अचेतन झाल्याने त्यांच्या भ्रमंतीला आणि गप्पाटप्पांना खीळ बसली हा दैवदुर्विलास होय.

– सविता टांकसाळे

**संदर्भ :**


*१. पिंगे रवींद्र; 'लोकसत्ता', 'लोकरंग' पुरवणी; २८ जून १९९८.*

*२. सरवटे वसंत; 'महाराष्ट्र टाइम्स', 'मैफल' पुरवणी; २८ जून १९९८.*


## मतकरी, रत्नाकर रामकृष्ण

☞ **मुख्य नोंद – नाटक खंड**

## मनमोहन

***नातू, गोपाळ नरहर***

**कवी, कादंबरीकार**

**११ नोव्हेंबर १९११ – ७ मे १९९१**



कवितेला अवघे जीवन वाहिलेले कल्पक प्रतिभेचे कवी म्हणून ओळखले जाणारे लोककवी मनमोहन तथा गोपाळ नरहर नातू यांचा जन्म माणगाव (जि. कोल्हापूर) येथे झाला. त्यांचे शिक्षण पुणे, मुंबई, कल्याण व तळेगाव येथे झाले. त्यांनी मॅट्रिकपर्यंतचे शिक्षण घेतल्यावर १९३२ साली पुणे येथे ते 'यूथलीग'चे डिक्टेटर बनले. त्यांना इंग्रजी, संस्कृत, हिंदी व गुजराती भाषा अवगत होत्या. स्वातंत्र्य चळवळीत त्यांचा सहभाग होता.

त्यांचे 'अफूच्या गोळ्या' (१९३३), 'कुहूकुहू', 'दर्यातील खसखस', 'फील्ड मार्शलची सलामी', 'मंजूळ भावगीते', 'शंखध्वनी' (बोंबाबोंब), 'युगायुगांचे सहप्रवासी', 'सुनीत गंगा', 'शिवशिल्पांजली' हे काव्यसंग्रह प्रसिद्ध झालेले आहेत. तर 'उद्धार', 'कॉलेजियन', 'जीवनाधार' ह्या खंडकाव्यांचेही त्यांनी लेखन केले आहे. 'ताई तेलीण' हा त्यांनी लिहिलेला पोवाडा प्रसिद्ध आहे. त्यांनी 'गोपाळकृष्ण', 'नरशार्दूल नेताजी' ही पद्ये मेळ्यासाठी लिहिली. त्यांनी 'बॉम्ब' हे महात्मा गांधींच्या जीवनावरील काव्य लिहिले.

कादंबरीलेखनात त्यांनी विविध प्रकारचे विषय हाताळले. त्यांत त्यांनी 'अभिलाषा', 'आनंदघन', 'इंद्रधनुष्याची गोष्ट', 'कड्यावरून कोसळलेली कामिनी', 'गुरुजींची आत्महत्या झपूर्झा', 'टिपरी पडघमवर पडली' आदी सामाजिक विषयांवरच्या कादंबऱ्या लिहिल्या. 'इंद्रायणी', 'चिमाजी अप्पा', 'चंद्रभागा', 'छत्रपती भाग–१ ते ४', 'छत्रपती राजाराम', 'छत्रपती शाहू', 'छत्रपती संभाजी', 'पहिला पेशवा', 'पानपत' आदी एकूण तीस ऐतिहासिक कादंबऱ्या लिहिल्या. 'थांबा थोडं दामटा घोडं' आणि 'दोन रणांगण' या नाटकांचेही त्यांनी लेखन केले आहे. त्यांना क्रिकेटची खूप आवड होती. त्यांनी क्रिकेटविषयक लेखन केले. 'डॉन ब्रॅडमन' (चरित्र व खेळांची माहिती), 'नॉट आउट', 'सी.के. नायडू', 'अॅज आय सी' ही त्यांची क्रिकेट विषयीची पुस्तके प्रसिद्ध आहेत.

लोककवी मनमोहन नातू यांनी छत्रपती शिवाजी, छत्रपती संभाजी, त्रिंबकजी डेंगळे, या ऐतिहासिक व्यक्तींच्या आणि म. गांधी, सुभाषचंद्र बोस, सावरकर या आधुनिक व्यक्तींच्या गौरवगाथा लिहिल्या. लोकविलक्षण स्वैर, आणि अनिर्बंध कल्पकता हे मनमोहनांच्या काव्याचे विशेष होते. त्यांच्यावर तळेगावच्या शाळेतले शिक्षक वि. गो. विजापूरकर, कायकर्ते शि. म. परांजपे, सुप्रसिद्ध कवी ज. के. उपाध्ये, गं. दे. खानोलकर यांचे संस्कार झाले होते. त्यांची प्रारंभीची कविता कथाकाव्यात्मक आणि सामाजिक आशय व्यक्त करणारी होती. त्यात ते विनोद आणि उपहास यांचा वापर करीत असत. १९४७ नंतर ते भावकवितेकडे वळले. त्यांच्या रचना आटोपशीर आणि बांधेसूद असत. 'कवींनी आपले स्वत्व आणि स्वातंत्र्य सदैव जपले पाहिजे', अशी श्रद्धा ते जहालपणे व्यक्त करीत.

म

आपल्या 'युगायुगांचे सहप्रवासी' या काव्यात त्यांनी हिंदू-मुसलमान दंग्याचे वर्णन केले. दारिद्र्य, सत्तापिपासा, यंत्रयुगामुळे वाढलेले दुःख, भीषणता यांतून मानवी जीवनाला आलेली अवकळा त्यांनी वर्णन केली.

'उंबरठ्यावरी माप ठेविले', 'मैत्रिणींनो सांगू नका नाव घ्यायला', 'ती पहा ती पहा बापूजींची प्राणज्योती', 'राधे तुझा सैल अंबाडा' ही त्यांची गीते खूप लोकप्रिय झाली. काव्यनिर्मितीत आनंद शोधणारा आणि कवितेसाठी जीवन व्यतीत करणारा प्रतिभावंत ही त्यांची खरी ओळख आहे.

त्यांच्या 'युगायुगांचे सहप्रवासी' या काव्याचा इंग्रजी अनुवाद दिलीप चित्रे यांनी केलेला आहे. तसेच 'आदित्य' या त्यांच्या निवडक कवितांच्या संग्रहाचे संपादन ज्येष्ठ कवी प्रा. शंकर वैद्य यांनी केले आहे.

कवी मनमोहन यांची वृत्ती कल्पनाविश्वात रमणारी असली तरी बौद्धिकदृष्ट्या ते सतत भोवतालच्या वास्तवाशी आणि वर्तमानकाळाशी निगडित राहिलेले आहेत. ते 'लोककवी' म्हणूनच सदैव ओळखले गेले.

– डॉ. ज्योत्स्ना कोल्हटकर

**संदर्भ :**


*१. जोशी अनंत; संपादक, 'महाराष्ट्र सारस्वत'; अनमोल प्रकाशन.*

*२. पाठक वा. भा.; 'आधुनिक मराठी काव्याचे अंत:प्रवाह'.*

*३. पंडित भ. श्री.; 'आधुनिक मराठी कविता'.*


## मनोहर, माधव बलवंत

**कथाकार, कादंबरीकार, अनुवादक, कलासमीक्षक, नाट्यसमीक्षक**

**२० मार्च १९११ – १६ मे १९९४**

माधव बलवंत मनोहर यांचा जन्म नाशिक येथे झाला. त्यांचे माध्यमिक शिक्षण नाशिक शहरात झाले, तर उच्च शिक्षण मुंबईत झाले. त्यांनी मुंबई विद्यापीठाची बी.ए.ची पदवी प्राप्त केली. नाथीबाई ठाकरसी मुलींच्या शाळेत त्यांनी मराठीचे अध्यापन केले. पुढे त्यांनी पिंगेज क्लासमध्ये महाविद्यालयीन विद्यार्थ्यांना मार्गदर्शन केले.



१९४० साली त्यांची 'ज्वाला' ही कादंबरी प्रकाशित झाली. त्यानंतर 'एक आणि दोन' (१९४८), 'सुखदुःख' (१९७५), 'कैफियत' (१९७७), 'दौरा' (१९७८), अशा अनेक कादंबऱ्या प्रकाशित झाल्या. कृष्णचंद्र यांच्या 'अन्नदाता' या उर्दू कादंबरीचा त्यांनी अनुवाद केला. कॅरेल कॅपेक ह्यांच्या 'मदर'चा 'आई' हा नाट्यानुवाद १९४२ साली प्रकाशित झाला. 'सत्यकथा' ह्या नियतकालिकात त्यांनी सतत वर्षभर, कॅरेल कॅपेकच्या कथांचे केलेले अनुवाद प्रसिद्ध होत होते. माधव मनोहरांनी २००हून अधिक कथा लिहिल्या.

त्यांच्या नाट्यविषयक स्तंभलेखनामुळे ते विशेष गाजले. ललित मासिक, सोबत साप्ताहिक आणि नवशक्ती दैनिकातून त्यांनी स्तंभलेखन केले. 'सोबत'मध्ये त्यांचे 'पंचम' नावाचे नाट्यविषयक सदर अनेक वर्षे चालू होते. ह्या सदरातून ते नाटकाची संहिता आणि नाटकाचा प्रयोग असे द्विस्तरीय परीक्षण लिहीत असत. 'केसरी'मध्येही 'चौपाटीवरून' हे सदर ते 'पवन' ह्या टोपणनावाने लिहीत असत. 'नवशक्ती'मध्ये 'शब्दांची दुनिया' या सदरातून ते पुस्तक-परीक्षणे लिहीत. 'ललित'मधून त्यांनी अनेक पाश्चात्त्य लेखकांचा परिचय करून दिला. त्यांचे समीक्षालेखन परखड व निर्भीड होते. अनेकांचे वाङ्मयचौर्य त्यांनी उघडकीस आणले. त्यामुळे तत्कालीन वाङ्मय व्यवहारावर त्यांचा जबरदस्त वचक होता; ह्याचे कारण त्यांची वाचनाची भूक आणि प्रचंड व्यासंग होय.

त्यांनी 'सशाची शिंगे', 'झोपलेले नाग' ही नाटके लिहिली. ही नाटके आत्माराम भेंडे इत्यादींनी रंगमंचावर १९५० ते १९५४ ह्या काळात आणली. नाट्यसमीक्षक म्हणून त्यांचा गवगवा झाला तरीही नाटककार म्हणून त्यांना यश मिळू शकले नाही. मात्र एक चिकित्सक समीक्षक म्हणून त्यांचे नाव आदराने घेतले जाते.

– नरेंद्र बोडके

**संदर्भ :**

१. *मतकरी प्रतिभा; 'आता स्मृती पपांच्या'; लोकसत्ता-२९ मे १९९४.*

२. *दवणे प्रवीण; 'वाग्यज्ञाचा मी साक्षीदार'; लोकसत्ता-२९ मे १९९४.*

## मनोहर, यशवंत राजाराम

**कवी, समीक्षक**

**२६ मार्च १९४३**



प्रा. यशवंत मनोहर यांचा जन्म येरला, ता. काटोल, जि. नागपूर येथे झाला. तेथील जनपद सभा प्राथमिक शाळेत त्यांचे प्राथमिक शिक्षण झाले. १९६१ मध्ये ते मॅट्रिक परीक्षा उत्तीर्ण झाले. त्यानंतर औरंगाबादच्या मिलिंद महा–विद्यालयातून ते बी.ए. (१९६५) व मराठवाडा विद्यापीठातून एम.ए. परीक्षा (१९६७) उत्तीर्ण झाले. साहित्यविषयक विशेष अभिरुची असल्याने त्यांनी काव्यलेखनास व समीक्षालेखनास १९६० मध्ये प्रारंभ केला. दैनिक अजिंठा, साप्ताहिक गावकरी ह्या नियतकालिकांतून त्यांनी लेखनास प्रसिद्धी मिळाली. त्यांनी डॉ. आंबेडकरांसंबंधी अनेक वैचारिक निबंध लिहिले. दलित कवितेला त्यांनी वैचारिक अधिष्ठान प्राप्त करून दिले. नागपूर विद्यापीठाची पीएच.डी. ही पदवी १९८४ मध्ये संपादन करून त्यांनी नागपूर विद्यापीठात मराठीचे अध्यापन केले.

यशवंत मनोहर यांचा पहिला कवितासंग्रह 'उत्थानगुंफा' (१९७७) प्रसिद्ध झाल्यानंतर ते कवी म्हणून ओळखले जाऊ लागले. पुढे त्यांचे 'मूर्तिभंजन' (१९९५), 'जीवनायन' (२००१) असे दोन काव्यसंग्रह प्रसिद्ध झाले. त्यांच्या दलितकवितेने शोषणाचा तीव्र निषेध केला; समाजाच्या मूल्यव्यवस्थेवर त्यांच्या क्रांतिकारी कवितेने प्रहार केला. कवितेबरोबरच काव्यसमीक्षाविषयक ग्रंथही त्यांनी लिहिले. 'शरच्चंद्र मुक्तिबोधांची कविता' (१९९२), 'मराठी कविता आणि आधुनिकता' (१९९८) या काव्यसमीक्षेप्रमाणे त्यांनी इतरही समीक्षालेखन केले. 'डॉ. आंबेडकर – एक चिंतन काव्य' (१९८२), 'दलित साहित्य: सिद्धांत आणि स्वरूप' (१९७८), 'स्वाद आणि चिकित्सा' (१९७८), 'बा. सी. मर्ढेकर' (१९८७), 'निबंधकार डॉ. आंबेडकर' (१९८८), 'समाज आणि साहित्य समीक्षा' (१९९२), 'परिवर्तनवादी जीवनमूल्ये आणि वाङ्मयीन मूल्ये' (१९९९) ही त्यांची समीक्षात्मक पुस्तके आहेत. यांशिवाय त्यांची 'रमाई' (१९८७) ही कादंबरी आणि 'स्मरणांची कारंजी' हे प्रवासवर्णनही प्रसिद्ध आहे.

त्यांच्या कवितेवर आंबेडकरी विचारांचा प्रभाव आहे. समीक्षेवर मात्र त्यांच्या स्वतःच्या विचारसरणीचा ठसा उमटलेला जाणवतो.

– डॉ. रजनी अपसिंगेकर

**संदर्भ :**

१. *नेरूरकर प्र.श्री.; 'डॉ. यशवंत मनोहर: एक मनस्वी मुलाखत'; आकंठ दिवाळी अंक १९८९.*

## मयेकर, प्रभाकर लक्ष्मण

☞ **मुख्य नोंद – नाटक खंड**

## मराठे, संजीवनी रामचंद्र

☞ **संजीवनी**

## मराठे, हनुमंत मोरेश्वर

☞ **मुख्य नोंद – पत्रकारिता आणि ललितेतर साहित्य खंड**

## मर्ढेकर, बाळ सीताराम

**कवी, कादंबरीकार, नभोनाट्यलेखक, समीक्षक**

**१ डिसेंबर १९०९ – २० मार्च १९५६**

बाळ सीताराम मर्ढेकर हे युगप्रवर्तक कवी; त्यांना मराठी नवकवितेचे जनक म्हटले जाते. कवी,

म



कादंबरीकार, नभोनाट्यलेखक, सौंदर्य-शास्त्राचे चिकित्सक-समीक्षक म्हणूनही त्यांचे कर्तृत्व विशेष लक्षणीय आहे.

त्यांचा जन्म खानदेश जिल्ह्यातील फैजापूर येथे झाला. मर्ढेकरांचे मूळ घराणे सातारा जिल्ह्यातील मर्ढे या गावचे. त्यांच्या घराण्याचे मूळ उपनाम गोसावी होते. बा.सी. मर्ढेकरांचे चुलत चुलते उपजिल्हाधिकारी होते. त्यांनीच गोसावीऐवजी मर्ढेकर हे उपनाम प्रथम स्वीकारले. पुढे त्यांचे घराणे मर्ढेकर या नावाने ओळखले जाऊ लागले. मर्ढेकरांचे वडील सीतारामपंत हे प्राथमिक शिक्षक होते. शाळा तपासनीस म्हणूनही त्यांनी कार्यभार पाहिला. त्यांच्या खानदेशातील नोकरीमुळे मर्ढेकरांचे प्राथमिक शिक्षण बहादूरपूर येथे तर इंग्रजी तिसऱ्या इयत्तेपर्यंतचे शिक्षण फैजपूर-सावदे येथे झाले. पुढे धुळे येथील गरुड हायस्कुलात त्यांनी मॅट्रिकपर्यंतचे शिक्षण घेतले. बा.सी. मर्ढेकरांचे मूळ नाव 'रमेश' होते. घरी त्यांना 'बाळ' या नावाने संबोधले जात असे; त्यामुळे तेच नाव पुढे सर्वतोमुखी झाले. शाळेत असताना मर्ढेकरांनी त्यामुळेच 'रमेश-बाळ' या टोपणनावाने लेखन केले.

शालेय जीवनातच त्यांच्यावर भाषेचे आणि वाङ्मयाचे संस्कार झाले. पुण्याच्या फर्गसन महाविद्यालयातून (१९२४-१९२८) त्यांनी मुंबई विद्यापीठाची पदवी १९२८ साली प्राप्त केली. उप-जिल्हाधिकारी असणाऱ्या आपल्या चुलत चुलत्याच्या प्रेरणेने आय.सी.एस. होण्यासाठी म्हणून कर्जाऊ मदत घेऊन ते इंग्लंडला गेले. पण दोन वेळा परीक्षेस बसूनही त्यांना यश मिळाले नाही. आय.सी.एस. परीक्षेत इंग्रजी वाङ्मयाच्या पेपरमध्ये मात्र त्यांनी विक्रम नोंदवला. या काळात इंग्रजी वाङ्मय, मानसशास्त्र, इटालियन, फ्रेंच व स्कँडेनेव्हिअन ह्या भाषांचा व त्यांतील साहित्याचा त्यांनी सखोल अभ्यास केला. त्यातून त्यांचा वाङ्मयीन व वैचारिक पिंड घडला. प्रा.जेम्स सदरलॅन्ड यांच्या विचारांचा प्रभावही त्यांच्या व्यक्तिमत्त्वावर पडला. त्यांनी युरोपात चित्रसंग्रहालये पाहिली आणि सौंदर्यशास्त्राच्या अभ्यासार्थ इटलीत वास्तव्य केले. सौंदर्याचे स्वरूप व आस्वादनाबद्दलची त्यांची मते त्यातूनच घडली. विलायतेहून परतल्यानंतर त्यांनी 'टाइम्स ऑफ इंडिया' या मुंबईच्या वृत्तपत्रात उपसंपादक म्हणून काही काळ कार्य केले. मुंबईच्या एल्फिन्स्टन, जोगेश्वरीच्या इस्माइल, अहमदाबादच्या सिडनॅहॅम व धारवाड येथील कॉलेजात त्यांनी अध्यापन कार्य केले.

१९३८ साली आकाशवाणीच्या मुंबई केंद्रात कार्यक्रम नियोजक म्हणून त्यांनी जबाबदारी स्वीकारली. आणि आयुष्याच्या अगदी अखेरपर्यंत म्हणजे जवळजवळ १८ वर्षे एक कर्तबगार अधिकारी म्हणून त्यांनी कार्य केले व आपला ठसा उमटवला. कोलकाता, पटणा, त्रिचनापल्ली, दिल्ली येथील आकाशवाणी केंद्रांवर त्यांनी कार्य केले.

मर्ढेकरांचा पहिला विवाह १९४० साली होमाय नल्लाशेठ या त्यांच्या पारशी विद्यार्थिनीशी झाला. पण तो फार काळ टिकला नाही. १९४९ साली त्यांनी घटस्फोट घेतला. त्यांच्या खात्यातीलच अंजना सयाल यांच्याशी १९५२ साली त्यांनी दुसरा विवाह केला. १० फेब्रुवारी १९५३ रोजी त्यांना पुत्रलाभ झाला. त्याचे नाव राघव असे ठेवले.

'शिशिरागम' हा मर्ढेकरांचा पहिला कवितासंग्रह १९३९ साली प्रकाशित झाला. त्यानंतर 'कांही कविता' (१९४७), 'आणखी काही कविता' (१९५१) हे त्यांचे काव्यसंग्रह निघाले. या तिन्ही संग्रहांतील एकूण १२६ कविता व कवितासंग्रहांत समाविष्ट न झालेल्या सहा कविता, अशा एकूण १३२ कविता मर्ढेकरांच्या नावावर आहेत. 'रात्रीचा दिवस' (१९४२), 'तांबडी माती' (१९४३), 'पाणी' (१९४८) या कादंबऱ्या; 'कर्ण' (१९४४), 'संगम' (१९४५), 'औक्षण' (१९४६), 'बदकांचे गुपित' (१९४७) या संगीतिका त्यांनी लिहिल्या. त्यांचा 'नटश्रेष्ठ व इतर संगीतिका' हा

संगीतिकांचा संग्रह प्रकाशित झाला आहे. 'आर्ट्स अ‍ॅन्ड मॅन' (१९३७), 'वाङ्मयीन महामत्ता' (१९४१), 'टू लेक्चर्स ऑन अ‍ॅन इस्थेटिक ऑफ लिटरेचर' (१९४१), 'सौंदर्य आणि साहित्य' (१९५५) या समीक्षात्मक आणि सौंदर्यशास्त्रीय ग्रंथांची निर्मिती त्यांनी केली.

मर्ढेकरांच्या 'शिशिरागम' या कवितासंग्रहावर रविकिरण मंडळाचा प्रभाव जाणवतो. त्यात माधव जूलियनांचे मर्ढेकर हे चाहते होते. त्यामुळे त्यांचा प्रभाव विशेषत्वाने त्यांच्या या सुरुवातीच्या संग्रहातील कवितांवर दिसतो. पुढील संग्रहांतून मात्र मर्ढेकरांनी कवितेची आपली अशी स्वतंत्र वाट चोखाळत आपल्या नावाची स्वतंत्र मुद्रा उमटवली.

मानवी जीवनातील क्षुद्रतेचे, हीनतेचे, उद्ध्वस्ततेचे भेदक चित्रण करीत असतानाच शाश्वत जीवनमूल्यांविषयी गाढ श्रद्धा त्यांच्या कवितेतून व्यक्त झाली आहे. यंत्रयुगाने निर्माण केलेली दुःखे आणि वैफल्य यांचा कधी आर्त तर कधी उपहास-उपरोधाच्या साहाय्याने आविष्कार करणारी मर्ढेकरांची कविता वृत्तीने चिंतनशील आहे. आध्यात्मिक मूल्यांबद्दल वाटणारी ओढ हादेखील मर्ढेकरांच्या कवितेचा एक लक्षणीय विशेष होय. संतवाङ्मयातील कळकळ, लोकवाङ्मयातील आवेश व पाश्चात्त्य वाङ्मयातील प्रतिमानिर्मितीचे सामर्थ्य, आध्यात्मिक व आधुनिक विज्ञान-संस्कृतीतील तात्त्विक विचारधन यांतून प्रतिबिंबित होणारा आशय, दुर्दम्य आशावाद व मांगल्यपूजनाचा अंगभूत गुण यांमुळे मर्ढेकरांची कविता विशेष लक्ष वेधून घेते.

म

मर्ढेकरांच्या कवितेवर दुर्बोधतेबरोबरच अनेक आक्षेप सुरुवातीच्या काळात घेण्यात आले. परंतु तिचे महनीयत्व काळाबरोबरच जाणत्या साहित्यरसिकांनीही नंतर अचूक जोखले. मर्ढेकरांच्या सर्जनशील मनाने तात्त्विक, साम्यवादी जाणिवांचे दर्शन आपल्या कवितेतून घडवले. वर्तमानाला बिनदिक्कतपणे भिडण्याची त्यांच्या कवितेची वृत्ती ही मराठी काव्यपरंपरेला नवी होती. व्यक्तिगत भावानुभवांचे व्यापक आणि व्यापक जीवनजाणिवांचे व्यक्तिगत स्तरावरील आविष्करण हा त्यांच्या सर्जन प्रकृतीचा धर्म होता. व्यामिश्र जाणिवांच्या अभिव्यक्तीसाठी त्यांनी प्रतिमा, प्रतीक, शीर्षक, प्राक्कथा, भारतीय-अभारतीय संदर्भ, निसर्ग संवेदना यांचा अत्यंत कलात्मक स्तरावर उपयोग करून घेतला. यंत्रयुगातील गतिमानतेत हरपत चाललेल्या सौंदर्याची व माणुसकीची खंत त्यांनी आपल्या कवितांमधून अत्यंत नावीन्यपूर्ण व प्रभावी शैलीत टिपली.

नव्या शब्दांची घडण, शब्दांची मोडतोड, बहुभाषा संकरातून सिद्ध झालेली भाषा, उपमा, विशेषणे, क्रियाविशेषणे, म्हणी यांचे कलापूर्ण उपयोजन हे त्यांच्या कवितेचे एक ठळक वैशिष्ट्य म्हणता येईल. या अभिनव प्रयोगांमुळेही मर्ढेकर टीकेचे धनी झाले. पण, त्यातील कलाप्रत्यय निर्विवाद मोठा आहे. मर्ढेकरांच्या भावानुभवात खिन्नता, क्षोभ, त्वेष, उपरोध असला; तरी संतांची करुणा आणि मांगल्यपूजकता तसेच वैज्ञानिक दृष्टीचे वरदानही आहे.

मर्ढेकरांच्या कादंबऱ्यांमधून भिन्नभिन्न जीवनसरणी, संमिश्र समाज, ग्रामीण आणि नागरी जीवन, यंत्रयुगाने उद्ध्वस्त झालेले मानवी जीवन, मानवी मनातील गुंतागुंतीचा वेध, जीवनातील अनिश्चितता, असंबद्धता, आभासमयता, अगतिकता, संभ्रम अशा विविध विषयांवर प्रकाश टाकला गेला आहे. रेखीव व्यक्तिदर्शने, दांभिकतेचे चित्रण आणि संज्ञाप्रवाहाचे कलात्मक उपयोजन हीदेखील त्यांच्या कादंबरी वाङ्मयातील काही वैशिष्ट्ये होत.

'नटश्रेष्ठ अप्पासाहेब रेळे' या शीर्षकाची लघुकथाही मर्ढेकरांनी लिहिली. मनोविश्लेषणात्मक स्वरूपाची ही कथा आहे. या लघुकथेवरूनच त्यांनी 'नटश्रेष्ठ' हे चार अंकी नभोनाट्य लिहिले. त्यांनी 'कर्ण' ही पहिली संगीतिका लिहिली. त्यामुळे नवकवितेप्रमाणेच नभोनाटिकांचे प्रणेते म्हणूनही त्यांची ओळख आहे. 'संगीतिका' हा नवा वाङ्मयप्रकार त्यांनी मराठीत आणला. आकाशवाणीवरील नोकरीत असताना आकाशवाणीवर कादंबरीवाचनाचा उपक्रम त्यांनी सुरू केला. डॉ. ग. य. चिटणीस यांची 'कुसुम' ही कादंबरी

त्यांनी वाचली. आकाशवाणीवरील अभिवाचनाचा तो एक आदर्श मानला जातो. त्यांनी पार्श्वसंगीताचे वेगवेगळे प्रयोग केले.

मर्ढेकरांच्या समीक्षात्मक लेखनात सौंदर्यशोध, साहित्यसिद्धान्त आणि प्रत्यक्ष समीक्षा असे त्रिविध स्वरूपाचे लेखन समाविष्ट आहे. त्यांनी ललितकलांचा एकत्रित विचार करून त्या अनुषंगाने साहित्यविषयक चर्चा केली आहे. 'सौंदर्य हे ललितकलांचे स्वायत्त मूल्य आहे', हा विचार त्यांनी मांडला. सौंदर्यमूल्य मांडताना त्यांनी सौंदर्यभावनेचे स्वरूपही उलगडून दाखवले आहे. अनुभवातील इंद्रियसंवेदनांच्या गुणधर्मांची संगती संवाद-विरोध-समतोल या लयतत्त्वांच्या अनुरोधाने लावली की, सौंदर्याचा अनुभव येतो, असा लयतत्त्वाचा सिद्धान्त त्यांनी मांडला. कलावंताची प्रतिभा 'भावनानिष्ठ समतानता' निर्माण करते. असे मत त्यांनी मांडले.

मर्ढेकरांनी शुद्ध कलावादी भूमिका मांडली. नावीन्य, वाङ्मयीन महात्मता, वाङ्मयीन तादात्म्य या संकल्पना त्यांनी विशद केल्या. बालकवी, माधव जूलियन यांच्या कवितेची त्यांनी समीक्षा केली. ग.दि. माडगूळकर व गंगाधर गाडगीळ यांच्याविषयी लिहिण्याची इच्छाही त्यांनी व्यक्त केली होती. कलाद्रव्य आणि कलामाध्यम यांतील भेद स्पष्ट करताना त्यांनी, 'शब्द हे साहित्याचे साधन आणि भावनात्मक अर्थ हे साहित्याचे माध्यम होय', असे म्हटले. 'सौंदर्य आणि साहित्य' या त्यांच्या ग्रंथास साहित्य अकादमी पुरस्काराचा सन्मान लाभला.

मर्ढेकरांच्या 'कांही कविता' या संग्रहातील नवकवितांवर अश्लीलतेचा आरोप ठेवून त्यांच्यावर खटला भरण्यात आला (१९४८). तो त्या काळात खूपच गाजला. मर्ढेकरांनी त्याला मोठ्या धैर्याने तोंड दिले व त्यातून ते निर्दोष ठरले. परंतु या खटल्याचा मानसिक त्रास मर्ढेकरांना खूप झाला. त्याचा परिणाम मर्ढेकरांच्या सर्जनशीलतेवरही झाला. १९४८ ते १९५६ या काळात त्यामुळेच मर्ढेकरांच्या प्रतिभेचा पूर्वीचा बहर पाहायला मिळत नाही.

कामाचा अतिरिक्त ताण, रक्तदाब व काविळीची लागण यांमुळे दिल्ली येथील रुग्णालयात त्यांची प्राणज्योत मालवली.

मराठी कवितेत मूलभूत बदल घडवून आणणारे प्रवर्तक, पृथगात्म अनुभवाच्या प्रकटीकरणासाठी भाषासंकराचे प्रयोग करूनही आपले जातिवंत मराठीपण अबाधित राखणारा कवी, मानवी मूल्यांवर गाढ श्रद्धा असणारा कलावंत, मराठी टीकादृष्टीला 'संस्कारवादी' दृष्टिकोनाकडून 'दर्शनवादी' टीकेकडे नेणारा थोर समीक्षक म्हणून बा.सी. मर्ढेकरांचे स्थान अद्वितीय आहे.

– प्रा. डॉ. सुहास गोविंद पुजारी

**संदर्भ :**


१. *मनोहर यशवंत 'बा.सी. मर्ढेकर'; साहित्य अकादमी, दिल्ली; १९८७.*

२. *महाम्बरे गंगाधर; 'पायाभरणीचे दिवस'; साहित्यसूची- दिवाळी-१९९९.*


## महांबरे, गंगाधर मनमोहन

**कवी, गीतकार, नाटककार, बालसाहित्यकार**

**३१ जानेवारी १९३१ – २२ डिसेंबर २००८**



चटकदार गाण्यांचे रचनाकार आणि चतुरस्र लेखक म्हणून प्रसिद्ध असलेल्या गंगाधर मनमोहन महांबरे यांचा जन्म सिंधुदुर्ग जिल्ह्यातील मालवण येथे झाला. त्यांचे प्राथमिक व माध्यमिक शिक्षण मालवण येथे झाले. १९४८ साली शालान्त परीक्षा उत्तीर्ण होऊन त्यांनी पुढे १९५६ मध्ये पुणे विद्यापीठातून बी.ए.ची पदवी मिळवली. त्यांनी प्रारंभी मुंबईला शिक्षण विभागामध्ये नोकरी केली. एल्फिन्स्टन कॉलेजमध्ये विविध पदांवर नोकरी करून ग्रंथालय शास्त्रातील पदविका मिळवली. पुढे त्यांनी पुण्याच्या फिल्म इन्स्टिट्यूटमध्ये, किर्लोस्कर ऑइल इंजिनच्या ग्रंथालयात तसेच पुण्याच्या ऑटोमोटिव्ह रिसर्च

म

इन्स्टिट्यूटमध्ये ग्रंथपाल म्हणून काम केले. नोकरी करीत असतानाच (१९४८) त्यांनी मुक्त पत्रकारिता आणि लेखन सुरू केले होते. १९५४ पासून केलेल्या गीतांमधील ध्वनिमुद्रित झालेली त्यांची अनेक भावगीते आजही लोकप्रिय आहेत. वृत्तपत्रे, मासिके, नभोवाणी, दूरदर्शन, चित्रपट, रंगभूमी कॅसेट्स इत्यादींसाठी त्यांनी विविध प्रकारचे लेखन केले. त्यांचे साहित्य नाटिका, बालसाहित्य, चरित्रे, गाण्यांचे संपादन आणि गीतसंग्रह अशा विविध प्रकारांत आहे.

'दिलजमाई' (१९५२), 'रंगपंचमी' (१९५३), 'सिंधुदुर्ग' (१९५५), 'कोल्हा आणि द्राक्षे' (१९६०) अशा अनेक नाटिका; 'देवदूत' (१९५२), 'संतांची कृपा' (१९५५), 'नजराणा' (१९५५) ही नाटके; 'गौतमबुद्ध' (१९५६), 'जादूचा वेल' (१९६१), 'जादूची नगरी' (१९६२), 'बेनहर' (१९७२), 'शुभम् करोती' (१९७४), 'किशोरनामा' (२००३), 'मॉरिशसच्या लोककथा' (२००४) इत्यादी बालसाहित्याची पुस्तके; 'वॉल्ट डिस्ने' (१९७६), 'चार्ली चॅप्लिन' (२००२), 'भावगीतकार ज्ञानेश्वर' (२००२), 'फिल्मउद्योगी फाळके' (२००४), 'सैगल' (२००६), 'कविश्रेष्ठ राजा बढे' (२००७) यांची चरित्रे त्याचबरोबर 'स्कूटर्स: देखभाल, दुरुस्ती', 'आदिवासींसाठी लघुउद्योग', 'अपंगांसाठी लघुउद्योग', 'महिलांसाठी उद्योग व्यवसाय', 'इलेक्ट्रॉनिक्स उद्योग व्यवसाय' अशी उपयुक्त पुस्तकेही त्यांनी लिहिली.

या गद्यलेखनाबरोबर 'आपली आवड' (१९६३), 'उषःकाल' (१९७१), 'रसिका तुझ्याचसाठी' (१९७६), 'मराठी गझल' (१९८१), 'आनंदाचे डोही' (१९८६) इत्यादी गीतसंग्रह त्यांच्या नावावर आहेत. महाराष्ट्र गौरवगीते, मौलिक मराठी चित्रगीते, आचार्य अत्रे, पी. सावळाराम, खांडेकर, माडगूळकर, पु. ल. देशपांडे यांच्या चित्रगीतांचे संग्रह त्यांनी संपादित केले. त्यांची गद्यलेखन शैली साधी, सरळ, प्रासादिक आहे आणि गीतांमध्ये सोपी रचना व शब्दांची अचूक निवड हे त्यांचे वैशिष्ट्य आहे.

त्यांच्या 'मौलिक मराठी चित्रगीते' या पुस्तकाला २००१ साली राष्ट्रपतींनी सुवर्णकमल देऊन राष्ट्रीय सन्मान केला आणि 'ग्रामीण उद्योगाच्या यशस्वी वाटा' ह्या पुस्तकाला २००८ सालचा, महाराष्ट्र शासनाचा वसंतराव नाईक पुरस्कार लाभला.

– अशोक बेंडखळे

## महाजनी, हणमंत रामचंद्र

☞ **मुख्य नोंद – पत्रकारिता आणि ललितेतर साहित्य खंड**

## महानोर, नामदेव धोंडो

**कवी**

**१६ सप्टेंबर १९४२**



कवी नामदेव धोंडो महानोर यांचा जन्म औरंगाबाद जिल्ह्यातील अजिंठा लेण्यां–जवळ असलेल्या पळसखेडा या गावी झाला. पाचशे लोकवस्ती असलेल्या या आडबाजूच्या गावात तेव्हा शेतीला पर्याय असणे शक्यच नव्हते. महानोरांचे आईवडीलही शेतीच करीत होते. दुष्काळी आणि कोरडवाहू शेतकऱ्याच्या मुलाला तेव्हा शेतात राबण्याशिवाय पर्याय नव्हता. पुष्कळ धडपड करूनही शिक्षण न घेता आल्यामुळे महानोरही शेतीच करू लागले.

शिक्षण घेताना वाचलेल्या कवितांनी महानोर झपाटून गेले होते. बालकवी, ना. घ. देशपांडे, बा. भ. बोरकर यांच्या कवितांनी त्यांना वेड लावले. शिक्षण सुटले, तरी हे वेड सुटेना म्हणून त्यांनी कवितांचे वाचन सुरूच ठेवले. शेती आणि वाचन या परस्परविरुद्ध गोष्टींनी महानोरांना एकाच वेळी झपाटल्यामुळे त्यांची ओढाताण होऊ लागली. शेवटी महानोरांनी दोन्हीही गोष्टींत जीव ओतला आणि एक नवाच मानदंड निर्माण केला. तेव्हाची त्यांच्या मनाची अवस्था त्यांनी पुढील ओळींत मांडली आहे –

म

गुंतलेले प्राण ह्या रानात माझे,
फाटकी ही झोपडी काळीज माझे,
मी असा आनंदुनी बेहोश होता,
शब्दगंधे तू मला बाहूंत घ्यावे.

महानोरांच्या आधीही, रविकिरण मंडळापासून शेताशिवराची कविता लिहिली जात होतीच. जे शेतापासून दुरावले आहेत किंवा ज्यांनी दुरूनच शेत पाहिलेले आहे, अशांच्या कवितेपेक्षा महानोरांच्या कवितेला अनुभवांचा जिवंतपणा लाभल्यामुळे ती वेगळी होऊन उमटली. अनुभवांच्या जिवंत उत्कटतेबरोबरच अभिव्यक्तीसाठी स्वीकारलेल्या लोकलयींच्या चिरंजीव सौष्ठवामुळे जाणकारांबरोबरच सामान्य मराठी वाचकांनाही या कवितेने वेड लावले.

या पार्श्वभूमीवर १९६७ साली प्रकाशित झालेला 'रानातल्या कविता' हा महानोरांचा पहिलाच कवितासंग्रह मराठी कवितेतील त्यांचे स्थान निश्चित करणारा ठरला. त्याच्या वेगळेपणाची आणि वाङ्मयीन गुणवत्तेची दखल मराठी वाङ्मयविश्वाने मोठ्या आस्थेने घेतली. नंतर 'वही' (१९७०), 'पावसाळी कविता' (१९८२), 'अजिंठा' (१९८४), 'प्रार्थना दयाघना' (१९९०), 'पानझड' (१९९७), 'गाथा शिवरायाची' (१९९८), तिची कहाणी (२०००), 'जगाला प्रेम अर्पावे' (२००५), 'गंगा वाहू दे निर्मळ' (२००७) असे त्यांचे एकूण दहा कवितासंग्रह प्रकाशित झाले. महानोरांचे एकूणच काव्यलेखन मराठी कवितेला समृद्ध करणारे ठरले.

सुप्रसिद्ध समीक्षक सुधीर रसाळ यांनी महानोरांच्या कवितेचे वेगळेपण सांगताना लिहिले आहे, ''बालकवींची कविता काय किंवा बोरकर-पाडगावकर यांची कविता काय, ती निसर्गाच्या शहरी कौतुकापासून जन्माला आलेली आहे. आधुनिक शहरी संस्कृतीच्या काळात माणूस निसर्गापासून तुटला व त्याला निसर्गाची ओढ लागली. या ओढीतून आजची निसर्गकविता लिहिली-वाचली जाते. येथे (महानोरांच्या कवितेत) कवी हा रानाचाच जणू एक भाग बनला आहे. या रानाने त्याची संवेदनशीलता घडवली आहे व ती या रानाला एक अर्थपूर्णता देत आहे. हे रान शेतकऱ्याचे आहे. हे रान व शेतकरी दोघेही बीजारोपण, अंकुर संवर्धन व बीजरक्षण या निर्मितिचक्रात मग्न आहेत. या रानाची वेगळी रूपे म्हणजे या निर्मितीच्या वेगवेगळ्या अवस्था आहेत.'' ('प्रतिष्ठान', मार्च-एप्रिल १९६९)

१९७२ साली महानोरांची 'गांधारी' ही कादंबरी प्रकाशित झाली. गांधारी नावाच्या मराठवाड्यातल्या एका गावाची स्वातंत्र्यपूर्व व स्वातंत्र्योत्तर पन्नास वर्षांचा जीवनपट चित्रित करणारी ही कादंबरीदेखील बरीच गाजली. 'नॅशनल बुक ट्रस्ट' या राष्ट्रीय संस्थेने तिचा हिंदी अनुवाद प्रकाशित केला. हिंदीतही या कादंबरीला लोकप्रियता मिळाली.

१९८२ साली महानोरांचा 'गावातल्या गोष्टी' हा कथासंग्रह प्रकाशित झाला. व्यंकटेश माडगूळकरांच्या कथालेखनाची आठवण करून देणारा हा कथासंग्रह खास देशी वाणाच्या मराठी वाचकांच्या पसंतीस उतरला.

महानोरांच्या एकूणच लेखनाला लोकसाहित्याच्या अभ्यासाची जोड आहे. याला पुष्टी देणारे, 'गपसप' हा लोककथांचा तर 'पळसखेडची गाणी' हा लोकगीतांचा, असे दोन संग्रह महानोरांनी संपादित केलेले आहेत, तसेच 'पुन्हा कविता' (१९६७) आणि 'पुन्हा एकदा कविता' (१९९०) हे समकालीन कवितांचे प्रातिनिधिक संग्रह महानोरांनी संपादित केलेले आहेत.

गीतलेखन हाही महानोरांचा आवडीचा प्रांत आहे. ग. दि. माडगूळकर आणि शांता शेळके यांची दर्जेदार गीतलेखनाची परंपरा महानोरांनी आपल्या गीतलेखनाने पुढे नेलेली आहे. मुळातच असलेली त्यांच्या कवितेतली लोकगीतांची लय, गीतलेखन करताना त्यांना उपयुक्त ठरली. हृदयनाथ मंगेशकर आणि आनंद मोडक यांच्यासारख्या प्रयोगशील संगीतकारांच्या साथीने महानोरांनी मराठी चित्रपट गीतलेखनात नवे युग निर्माण केले. 'जैत रे जैत' (१९७८), 'सर्जा' (१९८४), 'एक होता विदूषक' (१९९४), 'अबोली' (१९९४), 'मुक्ता' (१९९५), 'दोघी' (१९९६), 'उरूस'

(२००८) या चित्रपटांसाठी त्यांनी केलेली गीतरचना तुफान लोकप्रिय ठरली. साचेबद्ध झालेल्या मराठी चित्रपट गीतलेखनाला महानोरांनी प्रवाही केले.

जगविख्यात गायिका लता मंगेशकर यांनी स्वतः रस घेऊन तयार केलेली 'माझ्या आजोळची गाणी' ही महानोरांच्या कवितांच्या गायनाची ध्वनिमुद्रिकाही अशीच गाजली. अभिरुचिसंपन्न मराठी रसिकवर्गात ना. धों. महानोर या नावाला प्रतिष्ठा प्राप्त झाली.

ज्यांच्या सहवासात महानोरांचे आयुष्य घडले, अशांबद्दल कृतज्ञता व्यक्त करणारे आठवणीपर ललित गद्यलेखनही महानोरांनी पुष्कळ केलेले आहे. शेतकरी दिंडी आणि शेतकऱ्यांच्या आत्महत्या ह्यांविषयक लेखनातून महानोरांनी शेतकऱ्यांच्या प्रश्नांना भिडण्याचा प्रामाणिक प्रयत्न केलेला आहे. 'शेतकरी दिंडी' (१९८०), 'यशवंतराव चव्हाण' (१९९०), 'ऐसी कळवळ्याची जाती' (१९९४), 'जे रम्य ते बघुनिया' (२०००), 'हा काळोखाचा रस्ता आपुला नाही' (२००६), 'शरद पवार आणि मी' (२००७) अशा काही पुस्तकांतून त्यांचे ललितगद्यलेखन संकलित आहे.

शेतीविषयक माहिती देणारे गद्यलेखनही महानोरांनी पुष्कळ केलेले आहे. 'शेतीसाठी पाणी' (१९८७), 'जलसंधारण' (१९९२), 'फलोत्पादन' (१९९२), 'ठिबक सिंचन' (१९९२) अशी काही शेतीविषयक पुस्तके त्यांनी लिहिली आहेत. कृषिशास्त्राला अनुभवांची जोड देऊन केलेले हे लेखन शेतकरीवर्गात मोठी मान्यता पावलेले आहे. यांतील अनेक पुस्तके वेगवेगळ्या पुरस्कारांनी सन्मानित झालेली आहेत. शेतीच्या क्षेत्रातले 'कृषिभूषण'सारखे पुरस्कारही महानोरांना मिळालेले आहेत.

महानोरांचे एकूणच कर्तृत्व लक्षात घेऊन त्यांना राज्य आणि राष्ट्रीय पातळ्यांवरचे अनेक पुरस्कार आणि मानसन्मान मिळालेले आहेत. राज्यपालांनी आत्तापर्यंत त्यांची दोनदा विधान परिषदेवर नियुक्ती केली आहे. या बारा वर्षांत महानोरांनी शेती, साहित्य व संस्कृती या क्षेत्रांतले अनेक प्रश्न धसास लावण्याचा प्रयत्न केला. अनेक महत्त्वाचे निर्णय घेण्यास भाग पाडून आपल्या कामाचा विधायक ठसा त्यांनी सभागृहावर उमटविला आहे.

महानोरांचे सर्वस्पर्शी कर्तृत्व लक्षात घेऊन १९९१ साली भारत सरकारने त्यांना 'पद्मश्री' हा किताब बहाल केला. १९९७ साली प्रकाशित झालेल्या त्यांच्या 'पानझड' या कवितासंग्रहास राष्ट्रीय साहित्य अकादमीचा पुरस्कारही प्राप्त झाला. महानोरांना मिळालेल्या या दोन राष्ट्रीय सन्मानांमुळे एकूण मराठी कवितेचाच राष्ट्रीय पातळीवर गौरव झालेला आहे. महाराष्ट्र शासनाचे आणि महाराष्ट्रातील अनेक संस्थांचे उत्कृष्ट वाङ्मयनिर्मितीचे अनेक पुरस्कार त्यांना मिळालेले आहेत. २००९ चा मानाचा 'जनस्थान पुरस्कार' त्यांना मिळाला आहे.

'मराठवाडा साहित्य संमेलन', 'जलसाहित्य संमेलन', 'औदुंबर साहित्य संमेलन' अशा अनेक साहित्य संमेलनांचे अध्यक्षपद त्यांनी भूषविलेले आहे. मराठवाडा साहित्य परिषद, मराठी साहित्य महामंडळ अशा संस्थांची अध्यक्षपदेही त्यांच्याकडे अविरोध चालत आले. 'जागतिक मराठी अकादमी', 'साहित्य अकादमी', 'महाराष्ट्र राज्य साहित्य आणि सांस्कृती मंडळ', 'चित्रपट महामंडळ', 'विश्वकोश निर्मिती मंडळ' अशा ठिकाणी त्यांना सन्माननीय सदस्यत्व बहाल करण्यात आले. तिथेही त्यांनी महत्त्वाची कामगिरी बजावली आहे.

– इंद्रजित भालेराव

**संदर्भ :**

*१. रसाळ सुधीर; 'प्रतिष्ठान'; मार्च-एप्रिल १९६१.*

*२. 'प्रतिष्ठान': ना. धों. महानोर विशेषांक; जुलै-ऑगस्ट २००१*

## मांडवकर, भाऊ मारोती

**कवी, कथाकार, कादंबरीकार**

**२० मे १९३० – २७ एप्रिल २००८**

भाऊराव मारोती मांडवकर यांचा जन्म यवतमाळ जिल्ह्यातील कळंब येथे झाला. कळंब येथेच त्यांचे प्राथमिक शिक्षण पूर्ण झाले. लहानपणापासूनच लाभलेल्या राष्ट्रसंत तुकडोजी महाराजांच्या सहवासातून

म

१९५२ साली राष्ट्रसंतांचे चरित्र लिहून त्यांनी साहित्यनिर्मितीस सुरुवात केली. ही साहित्यनिर्मितीची सरिता त्यांच्या आयुष्याच्या अखेरपर्यंत सातत्याने वाहतच राहिली आणि वेगवेगळ्या साहित्यप्रकारांतली अशी जवळपास शंभरावर पुस्तके भाऊंनी लिहिली.

प्राथमिक शिक्षक म्हणून नोकरीची सुरुवात करणाऱ्या भाऊंनी अधिव्याख्याता, अमरावती विद्यापीठ; संस्थापक प्राचार्य डॉ. बाबासाहेब आंबेडकर महाविद्यालय, अमरावती; पहिले संस्थापक प्राचार्य, कळंब अशा पदांवर कार्य केले आहे.

१९५७ साली नागपूर विद्यापीठातून एम.ए.ची पदवी भाऊंनी सुवर्णपदकासह प्राप्त केली. आदिवासींच्या अभ्यासातून आकारास आलेल्या 'कोलाम' या ग्रंथाने त्यांना पीएच.डी.ची पदवी मिळवून दिली. त्यांच्या या कार्यामुळेच महाराष्ट्र शासनाने त्यांना 'आदिवासी सेवक' या पदवीने गौरवान्वित केले. त्यांची अनेक पुस्तके प्रकाशित असली तरी त्यांचे 'पानोळ्या', 'दुनन', 'रासुंडा' हे काव्यसंग्रह; 'रानबोरे', 'करवंदे', 'राणीचा निवाडा' इत्यादी बालसाहित्य तसेच लेखसंग्रहांत 'गळती', 'कुचंबना', 'तुकारामाची रांडापोरे', 'गजरा', 'चिंतनी', 'आदिम' हे लेख; त्याचप्रमाणे 'चाळीस भावंडे' ही कादंबरी हे साहित्य विशेष प्रसिद्ध आहे. या कादंबरीच्या चार आवृत्त्या निघाल्या असून तिचा हिंदीतही अनुवाद झाला आहे.

भाऊंच्या मार्गदर्शनाखाली जवळपास वीस विद्यार्थ्यांना पीएच.डी.ची पदवी प्राप्त झाली आहे. नागपूर, अमरावती विद्यापीठात अनेक महत्त्वाची पदे भूषविणाऱ्या भाऊंनी महाराष्ट्र राज्य पाठ्यपुस्तक निर्मिती मंडळ व मराठी मंडळाचे सदस्य म्हणून कार्य पाहिले आहे.

भाऊसाहेब कवी, कादंबरीकार म्हणून परिचित असले तरी संशोधक म्हणूनही ते विशेषत्वाने ओळखले जातात. त्यांचे आदिवासी व कोलाम जातीवरील संशोधन तसेच महानुभाव पंथावरील 'आऊसा', 'चिंतनी' आणि 'चिंतनिका' ही पुस्तके प्रसिद्ध आहेत. त्यांच्या 'मुक्तागिरी' या पुस्तकास महाराष्ट्र शासनाचा पुरस्कार मिळाला आहे.

१९९१ मध्ये लाखनी येथे भरलेल्या त्रेचाळिसाव्या विदर्भ साहित्य संमेलनाचे ते अध्यक्ष होते. ग्रामीण वऱ्हाडी भाषेला त्यांनी त्यांच्या साहित्यातून मानाचे स्थान दिले. साहित्य, कला, शिक्षण आणि समाजसेवा हे त्यांच्या जीवनाधिष्ठानाचे चार खांब होते. त्यांची साहित्यविषयक कामगिरी लक्षात घेता महाराष्ट्र शासनाने त्यांची 'महाराष्ट्र राज्य महोत्सव समिती', 'लोक साहित्य समिती', 'पुरस्कार समिती' इत्यादी समित्यांवर निवड केली होती. त्यांनी आयुष्यभर साहित्याची व समाजाची सेवा करणारा उत्साहाने केली.

– डॉ. संध्या पवार

## माचवे, प्रभाकर बळवंत

**कवी, समीक्षक, भाषांतरकार**

**२६ डिसेंबर १९१७ – १७ जून १९९१**



महाराष्ट्राबाहेर राहून तेथील भाषेसह मराठी भाषेची ज्यांनी सातत्याने सेवा केली त्यामध्ये डॉ. प्रभाकर माचवे हे एक प्रमुख नाव आहे. काव्य, समीक्षा आणि भाषांतर या क्षेत्रांत त्यांचे उल्लेखनीय कार्य आहे. ग्वाल्हेर येथे जन्मलेले माचवे यांचे शिक्षण रतलाम व इंदूर येथे झाले. तत्त्वज्ञान आणि इंग्रजी साहित्य या दोन विषयांत आग्रा विद्यापीठाची एम.ए.ची पदवी त्यांनी संपादन केली. 'हिंदी व मराठी के निर्गुण काव्य का तुलनात्मक अध्ययन' या विषयावर १९५८मध्ये त्यांना डॉक्टरेट मिळाली. १९३८ ते १९४८ या काळात उज्जैनला तत्त्वज्ञानाचे प्राध्यापक म्हणून त्यांनी काम केले. त्यानंतर केंद्रीय लोकसेवा आयोग, साहित्य अकादमी, अमेरिका, श्रीलंका आणि जर्मनी येथील विद्यापीठे, भारतीय भाषा परिषद कलकत्ता इत्यादी अनेक संस्थांत त्यांनी प्रशासकीय व प्राध्यापक

आदी विविध पदे साधारणतः १९५४ ते १९७५ या काळात भूषवून प्रत्येक ठिकाणी आपल्या विद्वत्तेची व प्रशासकीय कौशल्याची छाप पाडली.

त्यांनी विविध प्रकारचे ऐंशीपेक्षा जास्त ग्रंथ लिहिले असून त्यांत कादंबरी, कविता, समीक्षा, एकांकिका, निबंध, चरित्र इत्यादी अनेक आकृतीबंधांचा समावेश असून त्यांत भाषांतरित ग्रंथांचाही समावेश आहे. त्यांच्या ग्रंथांचे अन्य भाषांमधून अनुवाद प्रसिद्ध झालेले आहेत. हिंदीतून त्यांचे विपुल लेखन झाले असून प्रामुख्याने मध्य प्रदेश, उत्तर प्रदेश, दिल्ली येथील अनेक साहित्यविषयक नियतकालिके व दैनिके-साप्ताहिके यांमधून प्रभाकर माचवे हे नाव आघाडीवर असे.

माचवे यांचे वाचन चौफेर होते. इंग्रजी, मराठी, हिंदी या भाषांमधील साहित्यविषयक वाचन अद्ययावत व सर्व प्रकारांतील होतेच; पण अन्य भारतीय भाषांतील प्राचीन ते समकालीन वाङ्मयाचा त्यांचा गाढा अभ्यास होता. 'जगजीवनराम : व्यक्ती आणि विचार' या १९७७मध्ये प्रसिद्ध झालेल्या त्यांच्या ग्रंथातून तत्कालीन एका प्रमुख मागासवर्गीय राजकीय नेत्याचा जीवनप्रवास स्पष्ट झाला असून काळाच्या दृष्टीनेही पुस्तकप्रसिद्धीचा कालखंड ऐतिहासिक महत्त्वाचा आहे. मराठी साहित्य अनुवादित करून भारतीय स्तरावर तत्कालीन परिप्रेक्ष्यात नेण्यात त्यांचा मोठा वाटा आहे.

– मधू नेने

म

## माटे, श्रीपाद महादेव

**सुधारक, विचारवंत, साहित्यिक, ज्ञानोपासक, वक्ते, शिक्षक**

**३१ ऑगस्ट १८८६ – २५ डिसेंबर १९५७**

प्रा. श्रीपाद महादेव माटे यांचा जन्म वऱ्हाडातील शिरपूर या गावी झाला. त्यांचे वडील महादेव हे संस्कृतविद्या पंडित म्हणून 'महादेवशास्त्री' या नावाने परिचित होते. त्यांच्या मातोश्री उमाबाई. त्यांच्या कुटुंबाची आर्थिक स्थिती हलाखीची होती. त्या दांपत्याला पाच मुलगे होते व श्री.म.माटे हे त्यांचे शेवटचे अपत्य. ते एक वर्षाचे



असतानाच त्यांच्या पित्याचे छत्र हरपले. त्यानंतर त्यांच्या आईने माहेरचा आश्रय घेतला खरा; पण दारिद्र्याशी झगडण्यात व हालअपेष्टा सोसण्यात माटे व त्यांच्या भावांचे बालपण गेले.

विटे येथील प्राथमिक शाळेत माटे यांनी दुसरीत प्रवेश घेतला, तेव्हा त्यांचे मूळ नाव 'श्रीपती' हे बदलून 'श्रीपाद' झाले. १९०५ साली मॅट्रिकची परीक्षा उत्तीर्ण झाल्यावर १९०६ साली त्यांनी पुण्याच्या फर्गसन महाविद्यालयात उच्च शिक्षणासाठी प्रवेश घेतला. मात्र घरच्या गरिबीमुळे त्यांना तो विचार सोडावा लागला. १९०७ साली साताऱ्यातील 'न्यू इंग्लिश स्कूल'मध्ये ते शिक्षक म्हणून रुजू झाले. १९१२ साली शिक्षणाच्या हव्यासापोटी ते बी.ए.ची परीक्षा उत्तीर्ण झाले आणि पुन्हा त्याच शाळेत शिक्षकाची नोकरी करू लागले. १९११ साली ते लक्ष्मीबाईंशी विवाहबद्ध झाले. त्याच सुमारास त्यांनी पुण्यात स्थायिक होण्याचा निर्णय घेतला.

१९१५ साली ते इंग्लिश व मराठी विषय घेऊन एम.ए.ची परीक्षा उत्तीर्ण झाले. 'सरकारी नोकरी करणार नाही', असा त्यांनी निर्धार केलेला असल्यामुळे १९१३ पासूनच विष्णुशास्त्री चिपळूणकर आणि लोकमान्य बाळ गंगाधर टिळक यांनी स्थापन केलेल्या पुण्याच्या 'न्यू इंग्लिश स्कूल'मध्ये ते इंग्रजी विषयाचे अध्यापक झाले.

विसाव्या शतकाच्या पूर्वार्धात शिक्षकाचे उत्पन्न अगदीच तुटपुंजे असायचे. त्यामुळे उत्पन्न वाढावे म्हणून त्यांनी इंग्रजी विषयाच्या खासगी शिकवण्या घेणे सुरू केले. पुढे त्याचेच रूपांतर 'इंग्रजीच्या क्लास'मध्ये झाले. उत्पन्न वाढले खरे; पण त्याच वेळी त्यांनी हाती घेतलेल्या अस्पृश्योद्धाराच्या कामी ते उत्पन्न खर्ची पडू लागले.

त्याच सुमारास 'वसंत व्याख्यानमाले'च्या चिटणीसपदाची जबाबदारी त्यांनी स्वीकारली आणि

तेव्हापासून त्यांच्या सार्वजनिक जीवनाला सुरुवात झाली. १९१७पासून त्यांच्या अस्पृश्यता-निवारणाच्या कार्याला गती मिळाली. १९२०पासून पुण्याच्या 'नूतन मराठी विद्यालया'त इंग्लिश विषयाचे शिक्षक म्हणून ते रुजू झाले. १९३५मध्ये त्यांची पुण्याच्या सर परशुरामभाऊ महाविद्यालयात मराठीचे प्राध्यापक म्हणून नेमणूक झाली. १९१७ ते १९३७ ही वीस वर्षे त्यांनी अस्पृश्यांच्या सेवेत व्यतीत केली. १९४३ साली सांगली येथे भरलेल्या 'अखिल भारतीय मराठी साहित्य संमेलना'चे ते अध्यक्ष झाले. १९४५ साली स.प.महाविद्यालयातून निवृत्त झाल्यावर पुण्याच्या 'महाराष्ट्र साहित्य परिषदे'चे ते कार्याध्यक्ष म्हणून काम पाहू लागले. १९४९ साली पुण्याच्या नातूबागेत त्यांनी स्वतःची 'अनामिका' नावाची बंगली बांधली. तेथेच त्यांचे शेवटपर्यंत वास्तव्य होते.

न्यू इंग्लिश स्कूलमध्ये शिकवत असतानाच गोपाळ गणेश आगरकर यांचे अनुयायी सीतारामपंत गणेश देवधर आणि लोकमान्य टिळक यांच्या विचारसरणीचा प्रभाव माटे यांच्यावर पडलेला होता आणि त्यातूनच त्यांना निरपेक्ष बुद्धीने सार्वजनिक कार्य करण्याची प्रेरणा मिळाली. दारिद्र्याचा अनुभव त्यांनी बालपणी घेतलेला होता; त्यामुळे अस्पृश्य समाजाची उच्चवर्णीयांकडून होणारी अक्षम्य उपेक्षा, शिक्षणाचा अभाव, त्यांची सामाजिक व आर्थिक मुस्कटदाबी, गुणांना वाव न मिळाल्यामुळे त्यांच्या वाट्याला आलेले दारिद्र्य, त्यांचा इतरांकडून होणारा अपमान, हीन लेखल्यामुळे त्यांच्या वाट्याला आलेली तुच्छता या साऱ्यांची जाणीव माट्यांना तीव्रतेने झाली. उच्चवर्णीयांची या उपेक्षित व वंचित वर्गाकडे पाहण्याची पूर्वग्रहदूषित दृष्टी बदलणे त्यांना अत्यावश्यक वाटले. समाजाची खरी प्रगती व्हायची असेल, तर संपूर्ण समाजाचे परिवर्तन होणे गरजेचे आहे. उपेक्षित समाजाला विकासाची संधी मिळालीच पाहिजे, अशी त्यांची धारणा होती.

पुण्यातील मातंग वस्तीत रात्रीच्या शाळा स्वखर्चाने चालविण्याचे अत्यंत मोलाचे, समाजसुधारणेचे कार्य त्यांनी आपल्या आयुष्याच्या ऐन उमेदीच्या काळात (तिशीपासून ते पन्नाशीपर्यंत) अविरतपणे, निष्कामबुद्धीने आणि जिद्दीने चालविले. मांगवाड्यात पहिली शाळा, मंगळवार पेठेतील महार वस्तीत दुसरी शाळा, नारायणपेठेत नदीकाठी तिसरी शाळा अशा एकूण बावीस शाळा त्यांनी सुरू केल्या. या कार्यामागील हेतू अस्पृश्योद्धार करणे व शिक्षणाचा संस्कार करणे हा होता.

माट्यांनी 'अस्पृश्य' या शब्दाऐवजी 'अस्पृष्ट' या शब्दाची योजना हेतुपूर्वक केली. (अस्पृश्य- स्पर्श करण्यास अयोग्य; अस्पृष्ट- एके काळी अस्पृश्य मानले गेलेले पण आता बरोबरीच्या नात्याने वागवले जाणारे.) या कार्यात त्यांना त्यांच्या विद्यार्थ्यांचे बहुमोल सहकार्य मिळाले. या उपेक्षित वर्गाला त्यांनी स्वच्छतेचे धडे दिले; त्यांच्या अडचणी, व्यथा सहानुभूतीने ऐकून, त्यांना शक्य तेवढी मदत करण्याचा वसा माट्यांनी घेतला होता. हे कार्य करीत असताना पुण्यातील कर्मठ, सनातनी वर्गाकडून त्यांना अपमान, मनस्ताप सोसावा लागला. 'महार माटे', 'महारडे माटे' अशी बिरुदे त्यांना कुत्सितपणे बहाल करण्यात आली; पण या विरोधाला आणि सनातन्यांच्या निंदानालस्तीला न जुमानता आपल्या ध्येयावरील निष्ठा त्यांनी अबाधित ठेवली.

या सामाजिक कार्याबरोबरच समाजप्रबोधनाचे इतर उपक्रमही त्यांनी हाती घेतले होते. 'वसंत व्याख्यानमाले'ची धुरा सांभाळत असताना अनेक मान्यवरांची, विचारवंतांची व्याख्याने आयोजित करून त्यांनी महाराष्ट्रातील श्रोत्याला अनेक महत्त्वाच्या प्रश्नांवर विचार करण्यास उद्युक्त केले. 'महाराष्ट्र साहित्य परिषदे'च्या कार्याध्यक्षपदी असताना त्यांनी केलेली कामगिरी विशेष उल्लेखनीय आहे. कोशवाङ्मयासाठी निधिसंकलन, विष्णुशास्त्री चिपळूणकर सभागृहाची उभारणी, चिपळूणकर सभागृहातील 'वा.गो.आपटे संदर्भ संग्रहालया'ची निर्मिती असे अनेक उपक्रम त्यांनी यशस्वीपणे राबविले. वाङ्मयेतिहासाची अकरा खंडांची भव्य कल्पना मात्र पुढे प्रत्यक्षात येऊ शकली नाही.

म

**जीवनवादी लेखक**

श्री. म. माटे यांनी आपल्या आयुष्यातील पंचेचाळीस वर्षांचा प्रदीर्घ काळ साहित्याची निर्मिती करण्यात आणि महाराष्ट्राच्या सामाजिक आणि सांस्कृतिक विकासाच्या कार्यात व्यतीत केला. त्यांची वाङ्मयनिर्मिती ही त्यांच्या सामाजिक कार्याचेच एक अविभाज्य अंग आहे; त्यांचे जीवनविषयक तत्त्वज्ञान व त्यांनी लिहिलेले ललित वा ललितेतर वाङ्मय यांत एक अतूट अनुबंध आहे. मानवी जीवन सुंदर, समृद्ध आणि अर्थपूर्ण बनविण्याच्या ध्यासातून त्यांचे साहित्य सिद्ध झाले आहे. 'ललित वाङ्मयाने मतप्रचार आणि मतपरिवर्तन होत नाही, असे म्हणणाऱ्यांचा दावा चुकीचा आहे'; असे त्यांचे स्पष्ट मत होते. 'जे-जे समाजहिताचे वाटते, ते-ते लिहून प्रकट करायला आपण बांधील आहोत,' या भूमिकेतूनच त्यांनी वाङ्मयनिर्मिती केली. आचार्य अत्रे यांनी माटे यांना 'खरे जीवनवादी लेखक' म्हटले आहे, ते सर्वार्थाने योग्य आहे.

विविध विषयांवरची त्यांची एकूण चाळीस पुस्तके प्रसिद्ध आहेत. ('विज्ञानबोधनाची प्रस्तावना' ही प्रदीर्घ प्रस्तावना धरून)

त्यांच्या साहित्यनिर्मितीतील परिश्रमपूर्वक सिद्ध केलेला अत्यंत महत्त्वाचा, पण उपेक्षित राहिलेला ग्रंथ म्हणजे 'अस्पृष्टांचा प्रश्न.' या पुस्तकातील पहिल्या साडेचारशे पृष्ठांत अस्पृश्यतेच्या समस्येची सांगोपांग तात्त्विक चर्चा त्यांनी केलेली आहे. उरलेल्या पृष्ठांत अस्पृश्यता निवारणाच्या कार्यातील त्यांना आलेल्या अनुभवांचे वास्तव कथन आहे. भटक्या जमातींच्या समस्यांचा ऊहापोहही या ग्रंथात केलेला आहे. सर्वेक्षण, आकडेवारी, विविध प्रश्नावली व त्यांच्या उत्तरांतून मिळालेली महत्त्वाची माहिती आणि या सर्वांच्या आधारे माटे यांनी मांडलेले महत्त्वाचे सिद्धान्त असे या ग्रंथांचे स्वरूप आहे.

या ग्रंथामागील त्यांची भूमिका प्रचारकाची नसून समाजशास्त्रज्ञाची आहे. 'हा ग्रंथ म्हणजे अस्पृश्यतेच्या प्रश्नांचा ज्ञानकोश आणि समाजशास्त्रीय अभ्यासकांसाठी अमोल खजिना आहे', असे प्रा. स. गं. मालशे यांनी समर्पक शब्दांत प्रस्तुत ग्रंथाचे मूल्यमापन केलेले आहे. मात्र या ग्रंथात माट्यांनी वंशशुद्धीचे जे समर्थन केलेले आहे, ते कालबाह्य वाटल्यामुळे आचार्य अत्रे यांनी त्यांना 'सनातनी सुधारक' म्हटले आहे. ह्या ग्रंथातून माट्यांच्या पांडित्याचे, तर्कनिष्ठतेचे, चिंतनशीलतेचे आणि सहृदयतेचे दर्शन घडते, हे निःसंशय.

'परशुरामचरित्रा'त हिंदू समाजरचनेतील तत्त्वांची सूक्ष्म दृष्टीने केलेली चिकित्सा असून, हिंदू समाजाच्या जडणघडणीचा वेध 'पंचमानव हिंदू समाज' म्हणून घेण्याचा त्यांचा प्रयत्न दिसतो. 'विज्ञानबोध' या ग्रंथाला लिहिलेली प्रदीर्घ प्रस्तावना ही त्यांच्या विज्ञाननिष्ठेची द्योतक आहे. 'विज्ञाननिष्ठेची जोपासना झाल्याशिवाय सांस्कृतिक जीवन खऱ्या अर्थाने समृद्ध होणार नाही,' असे आग्रहाचे प्रतिपादन प्रस्तुत प्रस्तावनेत आहे. 'गीतातत्त्वविमर्श' या ग्रंथातील लेखातून लोकमान्य टिळकांच्या काही विधानांशी, निष्कर्षांशी असलेला त्यांचा मतभेद, गीतेत त्यांना जाणवलेली अतार्किकता त्यांनी निर्भीडपणे व्यक्त केली आहे.

'साहित्यधारा', 'विवेकमंडन', 'विचारशलाका' इत्यादी ग्रंथांतील निबंध हे अनेक विषयांवरील स्फुटलेख आहेत. जीवनाच्या विविध पैलूंवर प्रकाश टाकणारे हे लेख माट्यांनी तात्त्विक व व्यावहारिक अशा दोन्ही दृष्टींनी लिहिलेले आहेत. या लेखांतून त्यांची तर्कशुद्ध विचारसरणी, तत्त्वनिष्ठा, सत्यशोधक वृत्ती, सामाजिक जाणीव, सूक्ष्म अवलोकन, सहृदयता, आंतरिक तळमळ, प्रवृत्ती व परमार्थ यांची सांगड घालण्याचा समतोलपणा यांचे लोभस दर्शन घडते.

प्राचीन मराठी वाङ्मयाचा – विशेषतः संतसाहित्याचा चिकित्सक अभ्यास, हे माट्यांचे अत्यंत आवडते क्षेत्र होते. 'रामदासांचे प्रपंचविज्ञान' आणि 'संत, पंत आणि तंत' या त्यांच्या पुस्तकांत संतसाहित्याचे परिशीलन ते सामाजिक दृष्टिकोनातून करतात. तुकाराम, चोखोबा इत्यादी संतांच्या वाट्याला विषमतेमुळे आलेला छळ त्यांना व्यथित करतो. ज्ञानेश्वर, तुकाराम, रामदास हे

म

त्यांचे विशेष आवडते संत होते. सर्वच संतांबद्दल त्यांना वाटणारी आत्मीयता व्यक्त करताना माट्यांची रसिकता, सश्रद्धता आणि हळुवारपणा ह्यांचा प्रत्यय येतो, त्याचप्रमाणे त्यांची तर्कनिष्ठता आणि सामाजिक आशय शोधण्याची वृत्तीही जाणवते.

**उपेक्षितांच्या अंतरंगात**

कथावाङ्मयाकडे माटे उशिराच- म्हणजे वयाच्या पन्नाशीत- वळले खरे; पण एक अत्यंत यशस्वी लेखक म्हणून त्यांना मान्यता मिळाली, ती त्यांच्या 'उपेक्षितांचे अंतरंग' यातील कथांमुळे. तंत्रात न बसणाऱ्या, पण विलक्षण जिवंत अनुभूतींनी रसरसलेल्या वास्तववादी घटना व व्यक्तिचित्रे यांचे समर्थपणे रेखाटन करणाऱ्या आणि म्हणून वाचकाच्या हृदयाला हात घालणाऱ्या या अत्यंत प्रभावी कथा आहेत. या कथांचे वेगळेपण लेखकाच्या जीवनदृष्टीत आहे. लोकानुरंजन हा ह्या कथांचा हेतू नाही. उपेक्षितांच्या अंतरंगाचे दर्शन घडवणे आणि वाचकाला अंतर्मुख करणे हे या कथांच्या निर्मितीमागील हेतू आहेत.

कथावाङ्मयात त्या काळात चित्रित न झालेले उपेक्षितांचे विश्व माट्यांनी प्रथमच या कथांतून साकारले. प्रत्यक्ष पाहिलेल्या या उपेक्षित वर्गाच्या व्यथा-वेदना, त्यांच्यावर होणारे अन्याय, त्यांना नाकारलेल्या संधी हे सारे त्यांनी आपल्या कथांमधून शब्दबद्ध केल्या, मुक्या वेदनांना बोलके केले आणि मराठी रसिकांची मने जिंकली. या कथांतील अनुभवांचा सच्चेपणा, हेच या कथांचे सामर्थ्य होय.

'शैलीकार माटे' हे भूषणही त्यांना कथालेखनानंतर मिळाले. लेखकाची उत्कट संवेदनशीलता, सामाजिक अन्यायाबद्दल कणव आणि तो दूर व्हावा यासाठी त्यांची धडपड, उपेक्षित वर्गाच्या भाषेचे वेगळेपण आत्मसात करण्याची वृत्ती, सहज स्वाभाविकपणे साकारणारे जिवंत अनुभव आणि प्रतिभेचा दिव्य स्पर्श ही त्यांच्या कथेची सामर्थ्ये आहेत. त्यांच्या कथा म्हणजे जीवनावरील भाष्याचे उत्कृष्ट नमुनेच होत. 'अनामिका', 'माणुसकीचा गहिवर', 'भावनांचे पाझर' इत्यादी संग्रहांतील कथाही उत्कट अनुभव व लेखकाची प्रामाणिक तळमळ यांमुळे अत्यंत प्रत्ययकारी झालेल्या आहेत.

त्यांनी लिहिलेले आत्मचरित्र - 'चित्रपट- मी व मला दिसलेले जग' माट्यांचे हे आत्मकथन वाचकांना अनेक प्रकारचे ज्ञान देते. माट्यांचा काळ, त्या काळची प्रसिद्ध व्यक्तिमत्त्वे, जिवंत व रोचक वर्णने, आपले खासगी जीवन व आलेले बरेवाईट अनुभव, अलिप्तपणे केलेले आत्मपरीक्षण, परिपक्वता व सहृदयता यांचा सुरेख संगम अशा कितीतरी दृष्टींनी हे आत्मचरित्र वाचनीय झालेले आहे. त्यांच्या चिंतनशील व्यक्तिमत्त्वाचा सुंदर आविष्कार म्हणजे हे आत्मचरित्र होय. त्यांचे हे आत्मचरित्रदेखील सामाजिक बांधीलकीच्या भूमिकेतून त्यांनी लिहिलेले आहे. सारांश, महाराष्ट्राचे एक महत्त्वाचे व प्रमुख शिल्पकार म्हणून त्यांचे नाव अजरामर झाले आहे.

- डॉ. यास्मिन शेख

**संदर्भ :**


१. *जोशी य. गो., प्रकाशक; 'माटे व्यक्ती आणि वाङ्मय'; १९४६.*
२. *शेळके शांता; 'वडीलधारी माणसे'.*
३. *'निवडक श्री. म. माटे'; खंड १, २; देशमुख प्रकाशन.*
४. *'त्रैमासिक युगवाणी'; श्रीपाद महादेव माटे जन्मशताब्दी विशेषांक; १९८६.*
५. *'त्रैमासिक महाराष्ट्र साहित्य पत्रिका' - श्री. म. माटे जन्मशताब्दी विशेषांक; १९८६.*
६. *काटदरे दत्तप्रसन्न; मासिक 'वसंत'; 'महाराष्ट्राचे विचारवंत साहित्य-ऋषी कै. श्रीपाद महादेव माटे'.*




## माडखोलकर, गजानन त्र्यंबक

**कवी, कथाकार, कादंबरीकार, समीक्षक, पत्रकार**

**२८ डिसेंबर १८९९ - २७ नोव्हेंबर १९७६**

विविध वाङ्मय प्रकारांत महत्त्वाचे योगदान देणारे, राजकारणाचे सखोल अभ्यासक व भाष्यकार गजानन त्र्यंबक माडखोलकर यांचा जन्म मुंबईत झाला. गणित विषयात गती नसल्याने मॅट्रिक परीक्षेत अनुत्तीर्ण झाल्यावर त्यांनी शिक्षण सोडले पण त्यांचा संस्कृतचा व मराठीचा मोठा व्यासंग होता. 'केसरी'चे संपादक न. चिं. केळकर



यांचे काही काळ लेखनिक होते. पुण्याच्या भारत सेवक मंडळातील कर्मचारी व 'दैनिक ज्ञानप्रकाश'चे साहित्य विभागाचे संपादक, नागपूर येथे 'दैनिक महाराष्ट्रा'त प्रवेश व तेथे साहाय्यक संपादक, पुढे तेथील 'नर केसरी ट्रस्ट'तर्फे प्रकाशित होणाऱ्या 'तरुण भारत' दैनिकाचे १९४४ पासून १९६७ पर्यंत प्रमुख संपादक अशा अनेक जबाबदाऱ्या संभाळल्या. संस्कृतप्रचुर, प्रौढ व सालंकृत अशी त्यांची भाषा होती. जागतिक व भारतीय राजकारणाचा मोठा व्यासंग होता. ते काँग्रेसचे व गांधीजींचे कडवे टीकाकार होते. त्यांनी विदर्भातील राजकारणाचे चित्रण कादंबऱ्यांतून केले. १९४८ मध्ये महात्मा गांधींचा खून झाल्यावर तरुण भारतच्या कचेरीवर व त्यांच्या घरावर हल्ला झाला त्याचा उल्लेख 'एका निर्वासिताची कहाणी' व 'दोन तपे' या आत्मचरित्रातही आहे. माडखोलकर यांना साहित्य प्रांतातही आपल्या खळबळजनक विधानांनी वाद निर्माण करण्यात रस होता. केशवसुत, गडकरी, बालकवी व अन्य प्रमुख मराठी लेखकांसंबंधी त्यांनी वेळोवेळी केलेली विधाने गाजली.

**संयुक्त महाराष्ट्र चळवळीचे जनक**

१९४६ साली बेळगाव येथे भरलेल्या मराठी साहित्य संमेलनाच्या अध्यक्षपदावरून त्यांनी संयुक्त महाराष्ट्र निर्मितीची कल्पना पहिल्यांदा मांडली व ती सर्वांनी उचलून धरली. तिची परिणती १९६० मध्ये महाराष्ट्राचे स्वतंत्र राज्य स्थापन करण्यात झाली. त्या अर्थाने माडखोलकर हे संयुक्त महाराष्ट्र निर्मिती कल्पनेचे जनक ठरतात.

म

प्रारंभी संस्कृत व मराठी कवितालेखन पुण्यातील कवी यशवंत, माधव जूलियन, गिरीश, श्री. बा. रानडे इत्यादींनी स्थापन केलेल्या 'रविकिरण मंडळां'चे ते एक सदस्य होते. मंडळाच्या 'उषा' या प्रातिनिधिक काव्यसंग्रहात माडखोलकरांच्या कवितेचा समावेश आहे.

'मुक्तात्मा' ही पहिली कादंबरी १९३३ मध्ये प्रसिद्ध झाली. त्यानंतर 'भंगलेले देऊळ' (१९३४), 'शाप' (१९३६), 'कांता' (१९३९), 'डाक बंगला' (१९४२), 'नागकन्या' (१९४१), 'मुखवटे' (१९४०), 'नवे संसार' (१९४१), 'चंदनवाडी' (१९४३), 'प्रमद्वरा'(१९४३), 'अनघा' (१९५०), 'रुक्मिणी (१९५९) इत्यादी २० कादंबऱ्यांचे लेखन केले. तत्कालीन कादंबरीकारांपैकी ना. सी. फडके, वि. स. खांडेकर यांच्याबरोबर माडखोलकरांनाही कादंबरीकार म्हणून महत्त्वाचे स्थान आहे. त्यांतील बऱ्याच कादंबऱ्या विदर्भातील काँग्रेस राजकारणाचे चित्रण करणाऱ्या व त्यांत गांधीजींवर टीका असल्याने त्या जनतेच्या रोषाला बळी पडल्या. पण मराठीत खऱ्या अर्थाने राजकीय कादंबरी माडखोलकरांनीच लिहिली, असे जवळजवळ सर्व समीक्षकांचे मत आहे. 'मुक्तात्मा' पासून 'प्रमद्वरा' पर्यंत त्यांच्या कादंबऱ्यांचा एक कालखंड विविध वैशिष्ट्यांनी गाजला. दुसऱ्या कालखंडातील 'प्रमद्वरे'नंतरच्या कादंबऱ्या काहीशा फिक्या वाटतात. त्यांच्या 'डाक बंगला' व 'नागकन्या' या कादंबऱ्यांतील भडक शृंगारामुळे खळबळ उडवली.

कादंबरीप्रमाणेच त्यांनी अन्य वाङ्मय प्रकारही बऱ्याच यशस्वीपणे हाताळले. 'रातराणीची फुले' (१९४०) व 'शुक्राचे चांदणे' (१९४८) या दोन कथासंग्रहांत त्यांच्या काही लक्षणीय कथा आहेत. 'देवयानी' (१९६४) हे नाटक व काही पौराणिक कादंबऱ्याही त्यांनी लिहिल्या.

समीक्षक म्हणूनही त्यांनी विपुल लेखन केले. त्यांत 'आधुनिक कविपंचक' (१९२१), 'विष्णू कृष्ण चिपळूणकर' (१९२३), 'विलापिका' (१९२७), 'स्वविचार' (१९३८), 'माझे आवडते कवी' (१९३९), 'अवशेष' (१९४९), 'जीवन साहित्य' (१९४३), 'परमार्थ' (१९४३) याचबरोबर 'माझे लेखनगुरू', 'महाराष्ट्राचे विचारधन', 'व्यक्ती तितक्या प्रकृती' व 'श्रद्धांजली' असे विविध लेखन त्यांनी केले. 'दोन तपे' व 'एका निर्वासिताची कहाणी', 'मी आणि माझे साहित्य', 'मी आणि माझे वाचक' ही

आत्मचरित्रपर पुस्तकेही त्यांच्या व्यक्तिमत्त्वावर प्रकाश टाकतात.

पत्रकार म्हणून त्यांनी देशात व परदेशांत पुष्कळ प्रवास केला. अमेरिकेच्या व पश्चिम जर्मनीच्या प्रवासामुळे त्यांची प्रवासवर्णने लिहिली गेली. 'मी पाहिलेली अमेरिका' (१९६८) ह्या प्रवासवर्णनात प्रवासातील अनुभवांबरोबरच त्यांचे राजकीय व सांस्कृतिक विचारही लक्ष वेधून घेतात.

माडखोलकर यांनी १९३०च्या व १९४२च्या राष्ट्रीय आंदोलनांत भाग घेतला. संयुक्त महाराष्ट्राच्या चळवळीतही त्यांचा सक्रिय सहभाग होता. पुणे येथे पत्रकारितेचे धडे घेणाऱ्या माडखोलकरांची कर्मभूमी नागपूर ठरली. तिथेच वयाच्या ७७व्या वर्षी त्यांचे निधन झाले.

– डॉ. प्रल्हाद वडेर

**संदर्भ :**


*१. देशपांडे मा. का.; 'माडखोलकर: कवी आणि वाङ्मय'.*

*२. देशपांडे कुसुमावती; 'मराठी कादंबरी: पहिले शतक'; १९५४.*


## माडगूळकर, गजानन दिगंबर

**कवी, गीतरामायणकार, कादंबरीकार, पटकथालेखक**

**१ ऑक्टोबर १९१९ – १४ डिसेंबर १९७७**

आपल्या 'गीतरामायणा'मुळे 'आधुनिक वाल्मिकी' म्हणून गौरविले गेलेले गजानन दिगंबर माडगूळकर साहित्यक्षेत्रात आणि जनमानसात 'गदिमा' म्हणून प्रसिद्ध होते. माडगूळकरांचा जन्म शेटेफळ, ता. आटपाडी, जि. सांगली येथे झाला. शिक्षण आटपाडी, कुंडल, औंध संस्थानात झाले. आटपाडी हे सोळाव्या शतकात विजापूरच्या आदिलशाही राज्यात होते. नंतर ते औंध संस्थानात आले. हे गाव आटपाडी-महाल म्हणून ओळखले जाई.

आटपाडीने महाराष्ट्राला 'गदिमा', त्यांचे कथाकार आणि ग्रामीण जीवनदर्शन घडविणारे धाकटे भाऊ व्यंकटेश आणि



शंकरराव खरात असे तीन साहित्यिक दिले. आयुष्यभर त्यांच्यावर आईच्या (बनुबाई) अभंग, ओव्यांचा, स्वाभिमानी असण्याचा व वडिलांच्या प्रामाणिकपणाचा, कष्टाळू-पणाचा, अशा सर्व सुसंस्कारांचा खोल परिणाम होता. माडगूळला, महाराष्ट्रात त्या काळी असलेली बारा बलुतेदार पद्धती होती. गल्ल्यांची नावेही जातिवाचक ब्राह्मणगल्ली, वाणीगल्ली, कासारगल्ली, कुंभारगल्ली, परीटगल्ली अशी होती. माडगूळकरांचे शेतातले घरही 'बामणाचा पत्रा' म्हणून ओळखले जायचे. लहानपणी माडगूळकरांचे सायन्स व गणिताशी सख्य नव्हते; पण प्रतिभेचे लेणे होते. अंगात अभिनय व नाट्यगुण होते. त्याची औंधच्या महाराजांना व शिक्षकांना कल्पना होती. ह्या प्रतिभेमुळे आणि कष्ट, जिद्द व सुसंस्कारांमुळे ते महाकवी म्हणून ओळखले गेले.

घरी अठराविसे दारिद्र्य. घरामध्ये 'गदिमा' सगळ्यांत मोठे. आईवडिलांचे कष्ट कमी करायला हवेत, भावंडांना आर्थिक मदत करून कुटुंब वर आणायला हवे हा विचार लहानपणापासून त्यांच्या मनात होता. वडिलांचे पायी जायचे कष्ट वाचावे म्हणून लक्ष्मणराव किर्लोस्करांकडे 'हिशेबाचे काम मला द्या. वडिलांऐवजी मी ते काम करीन', असे सांगायला 'गदिमा' गेले, तेव्हा ते फक्त इयत्ता चौथीत होते.

अभ्यासाची ठरावीक पठडी पार न करू शकल्याने गदिमा मॅट्रिक उत्तीर्ण होऊ शकले नाहीत. त्यांच्या तरुणपणाचा काळ हा स्वातंत्र्यपूर्व काळ होता. स्वातंत्र्यचळवळीने भारण्याचे ते दिवस होते. शिवाय औंधच्या शाळेचे संस्कार होते. फैजपूर काँग्रेसला शेतकऱ्यांची प्रचंड उपस्थिती व त्यांचे गांधीजींवरील प्रेम बघून ते प्रभावित झाले. मित्रामुळे त्यांनी नीरा आश्रमात सूतकताईपासून मैला वाहण्यापर्यंत सर्व सेवाभावी कामे केली. बेळगाव काँग्रेसला गांधीजी जात असताना नीरा स्टेशनवर त्यांची प्रत्यक्ष भेट झाली. गांधीजींनी निधी

म

मागितला, तर तिथल्यातिथे थोड्या घोषणा, थोडे भाषण असे करून त्यांनी निधी जमवून दिला. शंकरराव देवांनी सांगितल्यावरून कुंडलला जाऊन त्यांनी प्रौढशिक्षणाचे वर्ग चालविले.

गांधी व काँग्रेस यांच्या संयुक्त सहवासाचा परिणाम म्हणून 'वंदे मातरम्' सिनेमासाठी 'वेदमंत्राहुनी आम्हां वंद्य वंदे मातरम्', अशी गीते पुढे लिहिली गेली. कुंडलमध्ये समाजकार्य चालू होते, पण अर्थार्जनाचा पत्ता नव्हता. 'हरिश्चंद्राचे पुण्य गाठीला मारायला आधी धन जमवावे लागते', अशा अर्थाचे आईचे बोलणे व कमवत नाही म्हणून हितचिंतकाचे त्याच दिवशी बोलणे मनाला लागून त्यांनी पुण्याचा रस्ता धरला. पुण्यात 'दीनबंधू' साप्ताहिकात त्यांनी नोकरी धरली; पण गांधीजींच्या विरोधात न लिहिण्याची तत्त्वनिष्ठा आड आली. त्यांनी स्वतःच्या मतांसाठी नोकरी सोडली. पराडकरांची 'सुगंधी धूप सोंगटी' ते विकू लागले. अशा वेळी त्यांना त्यांचे पूर्वीचे औंधच्या शाळेचे मुख्याध्यापक भा. वि. काळे भेटले. काळे सरांनी माडगूळकरांमधील कलागुण ओळखलेले होते. त्यांनी आचार्य अत्र्यांना गदिमांसाठी चिठ्ठी दिली.

अत्र्यांची व गदिमांची भेट मार्च १९३८ मध्ये झाली. आचार्य अत्रे 'झेंडूच्या फुलां'मुळे कीर्तीच्या शिखरावर पोहोचले होते. त्यांनी माडगूळकरांना कोल्हापूरला मा. विनायकांकडे जायला सांगितले. आणि 'ब्रह्मचारी' सिनेमापासून गदिमांची चित्रपट कारकीर्द सुरू झाली. येथून पुढे १५७ मराठी आणि २३ हिंदी चित्रपटांच्या श्रेयनामावलीत पटकथालेखक, संवाद, गीते, अभिनेते, कशात ना कशात श्रेयनामावलीत आणि रसिकांच्या हृदयात गदिमांचे नाव कायम विराजमान झाले.

कोल्हापूरमध्ये असतानाच प्रसिद्ध लेखक वि. स. खांडेकर यांचे लेखनिक म्हणून काम करण्याची संधी गदिमांना मिळाली. त्या निमित्ताने त्यांच्या पाठीवर शाबासकीचा हात व 'लेखन करा, यशस्वी व्हाल' हा आशीर्वाद त्यांना मिळाला. लेखनाबद्दल ओढ, व्यासंगाची गोडी वाढली. 'ब्रह्मचारी'त बाबूराव पेंढारकरांच्या बापाची भूमिका केली. त्याचे पुढे व्ही. शांताराम यांनी कौतुक केले. बाबूरावांनी त्यांना 'नवहंस' या संस्थेत स्टाफवर 'कवी' म्हणून घेतले. तेथे नव्या विचारांचे व अभ्यासू दिग्दर्शक विश्राम बेडेकरांशी त्यांचा संपर्क आला. 'पहिला पाळणा' या चित्रपटासाठी गदिमांनी लिहिलेली सर्व गीते बाबूराव व विश्राम बेडेकरांना पसंत पडली. रसिकांकडूनही पसंतीची पावती मिळाली.

'हंस' नंतर मा. विनायकांनी 'प्रफुल्ल पिक्चर्स' काढले. त्यातही त्यांनी गदिमांना स्थान दिले. एच. एम. व्ही. कडून त्यांना मागणी होतीच. शिवाय हंसमधील पूर्वीचे खजिनदार वामनराव कुलकर्णी यांनी 'मंगळचित्र' म्हणून संस्था काढली होती. त्यात 'जयमल्हार', 'जिवाचा सखा' या चित्रपटांचे नामांकन, पटकथालेखन, गीते, संवाद हे सर्व गदिमांवर सोपविले होते. याच वेळी भालजी पेंढारकरांशी त्यांचा संपर्क आला. 'भक्त दामाजी' या भालजींच्या चित्रपटातील गाणी गदिमांना करायला मिळाली. आणि या वेळेपासून अभिनय, उत्तम शब्दकला आणि देवदत्त प्रतिभेच्या जोरावर वाङ्मयाच्या सर्व क्षेत्रांत माडगूळकरांचा यशस्वी संचार सुरू झाला. 'भक्त दामाजी', 'संत जनाबाई'ची गीते लिहिणारे गदिमा आणि 'रामजोशी'मधील सवाल-जवाब लिहिणारे गदिमा एकच का अशी शंका यावी, इतकी प्रतिभेची विविधता त्यांत आहे.

तमाशा चित्रपटांचे एक नवे पर्व 'रामजोशीं'च्या रूपाने गदिमांनी सुरू केले. 'लाखाची गोष्ट', 'पेडगावचे शहाणे' व 'रामजोशी'मधील त्यांच्या भूमिकाही गाजल्या. 'सवाल-जबाब' हा शाहिरी प्रकार रामजोशीत आणून त्यांनी 'रामजोशी' चित्रपटाची सांस्कृतिक बाजू उंचावली. 'माझ्या व्हटाचं डाळिंब फुटलं', 'काठेवाडी घोड्यावरती पुढ्यात घ्या हो मला' ह्या त्यांच्या लावण्या गाजल्या. 'जगाच्या पाठीवर'मधील 'उद्धवा, अजब तुझे सरकार', 'एक धागा सुखाचा'मधील 'थकले रे नंदलाला','बाई मी विकत घेतला श्याम', 'विठ्ठला तू वेडा कुंभार' इत्यादी गीतांमधून त्यांची नादमधुरता, गेयता, लयकारी ही सारी वैशिष्ट्ये दिसतात.

कोल्हापूरच्या 'हंस', 'नवहंस', 'प्रफुल्ल' ह्या चित्रपटकंपन्या बंद पडल्या. १९४८ साली भालजी पेंढारकरांचा सुसज्ज स्टुडिओ आगीत जळाला आणि मराठी चित्रपटसृष्टी पुण्याकडे वळली. 'संत जनाबाई'च्या वेळी प्रभातच्या स्टाफवर गदिमा होते. 'प्रभात समयो पातला। आता जाग बा विठ्ठला' ही काकड आरती गाजली होती. कोल्हापूरपासूनच राम ऊर्फ सुधीर फडके त्यांच्या बहुतेक गीतांचे संगीत दिग्दर्शक होते. पुण्याच्या श्रीविजय पिक्चर्सने 'सीतास्वयंवर' काढले. त्यातील 'मनोरथा चल त्या नगरीला, एक गुपित सांगते गडे, हे वदन तुझे की कमळ निळे?' ही गदिमांची गाणी घरोघरी म्हटली जात असत. शब्दसुरांची एक अलौकिक वीण गदिमा सुधीर फडके यांनी लावणी, काकड आरती, अभंग, भावगीत या सर्वांमध्ये दाखविली.

याच सुमारास पुण्यात रेडिओ स्टेशन सुरू झाले. आपली लेखणी पैसा देते; पण काळावरती कायमचा ठसा उमटवत नाही ही रुखरुख ह्या महाकवीला होती. 'रामायणा'वर गीते करायला सीताराम लाडांनी भरीस घातले व या रामभक्ताने भारतीय आदर्शाची ओळख करून देणारे, ५६ गीते असलेले व्यक्तिचित्र, समूहगीत या विविध प्रकारांनी भरलेले 'गीतरामायण' लिहिले. त्यातील सर्वच गीते एकापेक्षा एक सुरेख, भारतीय संस्कृतीची ओळख करून देणारी आहेत. 'स्वये श्रीरामप्रभू'पासून शेवटपर्यंत बहुतेक गीते महाराष्ट्राच्या पिढीच्या ओठांवर आहेत. सुगंधी धूप विकणाऱ्या ह्या महाकवीने पुढील पिढीसाठी भारतीय संस्कृतीचा हा धूप महाराष्ट्राच्या घराघरांतून दरवळत ठेवला आहे.

सुगंधी वीणा, जोगिया (राज्य पुरस्कार), पूरिया, काव्यकथा, चार संगीतिका, चैत्रबन (राज्य पुरस्कार), दोन नृत्यनाटिका (राज्य पुरस्कार), गीतगोपाळ, गीतसौभद्र; हिंदी, बंगाली, कानडी, तेलगू यांत भाषांतरित झालेले 'गीतरामायण', 'वैशाखी' हे काव्यसंग्रह, १४ लघुकथासंग्रह, 'मंतरलेले दिवस' हे राज्य पुरस्कारित आत्मचरित्र, 'दे टाळी ग घे टाळी' (बालवाङ्मय) केंद्र पुरस्कार, दोन कादंबऱ्या, नाटक, असे विविध प्रकारचे वाङ्मय त्यांनी लिहिले. संगीत नाटक अकॅडमीने १९५७चे अवॉर्डही त्यांना मिळाले होते. परंतु, सर्वसामान्यांना 'गदिमा' ज्ञात आहेत ते आधुनिक वाल्मिकी गीतरामायणकार म्हणूनच.

१४ डिसेंबर १९७७ रोजी या महाकवीने इहलोकीची यात्रा संपवली. त्यांच्या जन्मगावी, शेटेफळ येथे त्यांचे स्मारक आहे. दरवर्षी तेथे स्मृतिदिन साजरा होतो आणि महाराष्ट्राच्या मनामनांत ते गीतरामायणाने भरून उरले आहेत.

– डॉ. उषा कोटबागी

**संदर्भ :**

१. *माडगूळकर ग. दि.; 'मराठी साहित्यदर्शन'; अ. वि. गृह प्रकाशन, पुणे; प्रथम आवृत्ती, मार्च १९६१.*

२. *मराठे अ. द.; मारूलकर दत्ता; 'गीतरामायण : मागोवा स्वरशब्दांचा'; मानसन्मान प्रकाशन, पुणे..*

३. *तेंडुलकर रमेश; 'गीतभान'; विश्वमोहिनी प्रकाशन, पुणे..*

४. *भट रवींद्र; 'देवाची पाऊले'; पुष्पक प्रकाशन, पुणे..*

## माडगूळकर, व्यंकटेश दिगंबर

**कथाकार, कादंबरीकार, नाटककार**

**६ जुलै १९२७ – २९ ऑगस्ट २००१**



प्रतिभेची अलौकिक देणगी लाभलेल्या, सांगली जिल्ह्यातील माडगूळ या छोट्या गावात जन्मलेल्या व्यंकटेश दिगंबर माडगूळकरांनी केवळ मराठी साहित्यसृष्टीतच नव्हे; तर जगभरातील साहित्यात स्वतःचा ठसा उमटवला. साहित्य समृद्ध करता–करताच त्यांच्या बहुरंगी प्रतिभेचे अनेक आविष्कार रसिकांना दिपवून गेले. ते उत्तम चित्रकारही होते. समाजाप्रमाणे निसर्गाकडेही त्यांनी डोळसपणे पाहिले. प्रतिकूल परिस्थितीमुळे चित्रकलेची साधने परवडली नाहीत आणि मग आपण लेखक झालो, अशी खंत त्यांनी अनेकदा बोलून दाखवली; पण रेखाटनातून त्यांच्यातल्या

म

चित्रकाराचे दर्शन मात्र घडत राहिले. पाच भाऊ, (विख्यात साहित्यिक ग. दि. माडगूळकर हे थोरले बंधू) दोन बहिणी, वडील (दिगंबर माडगूळकर) आणि मातोश्री (सौ. बनुताई) असा त्यांचा परिवार होता. घरात गरिबी आणि वास्तव्य कायम दुष्काळी प्रदेशात; यांमुळे शालेय शिक्षणाची आबाळ झाली, वडिलांची कथा रंगवून सांगण्याची शैली आणि आईची चित्रकला हे दोन्ही गुण त्यांनी उचलले. संत, शाहिरी वाङ्मय, कीर्तन-कथा यांचे संस्कार, वैदू, फासेपारधी, रामोशी, धनगर, न्हावी, तेली, मुसलमान अशा सर्व तऱ्हेच्या लोकांच्या संगतीत त्यांचे आयुष्य गेले. त्यामुळे साहित्य, चित्र, लोककला, बोलीभाषा यांच्या संस्कारांचा वैशिष्ट्यपूर्ण मेळ त्यांच्या व्यक्तिमत्त्वात घडून आला.

त्यांचे शिक्षण माडगूळ, कुंडल, आटपाडी, विभूतवाडी आणि किन्हाई या गावांत जेमतेम सहावीपर्यंत झाले; पण तरीही स्वप्रयत्नाने मराठी आणि इंग्रजी साहित्याचा त्यांनी व्यासंग केला. १९४२ सालच्या 'चले जाव' चळवळीतही त्यांनी सक्रिय भाग घेतला. त्यांनी सुरुवातीला काही काळ पत्रकारिताही केली. १९४६ मध्ये त्यांची पहिली कथा 'काळ्या तोंडाची' प्रकाशित झाली. त्यानंतर 'सत्यकथा', 'समीक्षक', 'अभिरुची', 'मौज' या नियतकालिकांमधून त्यांच्या कथा प्रसिद्ध होऊ लागल्या. १९४९ मध्ये 'माणदेशी माणसे' हा कथासंग्रह प्रसिद्ध झाला आणि एक श्रेष्ठ ग्रामीण कथाकार म्हणून त्यांना मान्यता मिळाली. याशिवाय 'वाघाच्या मागावर', 'गावाकडच्या गोष्टी', 'हस्ताचा पाऊस', 'सीताराम एकनाथ', 'काळी आई', 'जांभळाचे दिवस', 'उंबरठा', 'कांगारूचं चांगभलं', 'घरदार', 'डोहातील सावल्या', 'बाजार', 'रानमेवा', 'वाळूचा किल्ला', 'घराकडील गोष्टी', 'जंगलातील दिवस', 'नागझिरा', 'परवचा', 'पांढऱ्यावर काळे', 'वाटा', 'सखा', असे अनेक कथासंग्रह आणि प्रवासवर्णने असे साहित्य प्रकाशित झाले. त्यांच्या कथालेखनाचा प्रवास मराठी साहित्यात अपूर्व असा ठरला. ग्रामीण जीवनातील शेतकरी, ब्राह्मण, मुसलमान, स्पृश्य-अस्पृश्य बलुतेदार यांच्याबरोबरच निसर्ग आणि प्राणिजीवन हे त्यांच्या लिखाणाचे महत्त्वाचे विषय झाले. मराठी साहित्याला अनोखे असणारे ग्रामीण जीवनाचे अस्सल चित्रण त्यांच्या कथांमधील व्यक्तिरेखांनी घडवले. गावाच्या परिसरात असणाऱ्या सुतार, लोहार, न्हावी इत्यादी बलुतेदारांप्रमाणेच महार, मांग, चांभार, रामोशी हेही ग्रामजीवनाचेच अपरिहार्य घटक असतात. त्यांच्याही श्रद्धा, अंधश्रद्धा, रूढी, रिवाज, आस्था यांचे आर्थिक, भावनिक, सांस्कृतिक संबंधांसह आकलन हा माडगूळकरांच्या कथेतला उजवा भाग ठरला व या अर्थाने दलितांच्या सामाजिक जीवनाच्या आकलनाचा त्यांचा आवाका वाचकांबरोबरच समीक्षकांनाही आश्चर्यचकित करून गेला.

**बनगरवाडी : ख्यातप्रधान प्रयोगशीलता**

कथेप्रमाणेच कादंबरी क्षेत्रातही त्यांनी महत्त्वाची कामगिरी बजावली. १९५५ मध्ये 'बनगरवाडी' प्रसिद्ध झाली आणि साहित्याच्या क्षेत्रात ती मैलाचा दगड बनली. आधुनिक मराठी कादंबरीतील आशयाला स्थानप्रधानता हा नवीन पैलू या कादंबरीने मिळवून दिला. स्थानिक परिसरातील भाषा, संस्कृती, दुष्काळ, सण, कंगालपण, श्रद्धा, संकेत यांचे एकसंध वास्तव चित्रण नायक-निवेदकाच्या शब्दांतून त्यांनी समर्थपणे समोर उभे केले. रूढ अर्थाने या कादंबरीला कथानक नाही. बनगरवाडी या लहानशा गावातील सामूहिक जीवनाचे चित्रण त्यात आले आणि बनगरवाडीलाच नायकत्व प्राप्त झालेले आहे. माडगूळकरांच्या शैलीतील खास प्रयोगशीलता या कादंबरीतून जाणवली.

याशिवाय 'वावटळ', 'करुणाष्टक' आणि 'कोवळे दिवस' या त्यांच्या कादंबऱ्या आत्मचरित्रपर आहेत. गांधीखुनानंतर झालेल्या भीषण दंगली, जाळपोळ यांमुळे ब्राह्मण समाजावर झालेल्या आघाताची 'वावटळ' ही कहाणी आहे. 'कोवळे दिवस'मध्ये एक कोवळा स्वातंत्र्यसैनिक भेटतो, तर 'करुणाष्टका'त दारिद्र्याने ग्रासलेली आठ मुलांची आईसमोर उभी राहते. 'पुढचं

म

पाऊल' ही त्यांच्याच एका कथेवरून त्यांनी लिहिलेली कादंबरी होय. 'समांतर' या साहित्य अकादमी पुरस्कारप्राप्त कादंबरीत आरंभापासून अखेरीपर्यंत वानरांच्या टोळ्यांचे सूक्ष्म मार्मिक चित्रण येते. वानरांच्या प्रत्येक टोळीचे जंगलातील क्षेत्र, टोळ्यांची घुसखोरी, त्यांचे संघर्ष, त्यांची बचावाची भूमिका, नायकत्व आणि माद्या मिळवण्यासाठी वानरांना कराव्या लागणाऱ्या हाणामाऱ्या यांचे विलक्षण परिणामकारक दर्शन या छोट्याशा कादंबरीत येते. वानरांच्या या कथेतून मानवी जगातील वृत्तीचा प्रत्यय लेखक देत राहतो.

याशिवाय त्यांनी 'काळाबरोबर चला', 'जाणार कुठे?', 'तो वेडा कुंभार', 'नाना सातपुते', 'पती गेले ग काठेवाडी', 'बिकट वाट वहिवाट', 'सती', ही नाटकेही लिहिली. 'कुणाचा कुणाला मेळ नाही', 'बिन बियांचे झाड' ही त्यांची लोकनाट्येही विशेष गाजली.

'पांढरी मेंढरं, हिरवी कुरणं' हे प्रवासवर्णन; 'प्रवास एका लेखकाचा' (आत्मचरित्रात्मक); 'चित्रे आणि चरित्रे' (व्यक्तिचित्रण) ही पुस्तके लिहिली आणि चित्रपटांच्या कथाही त्यांनी लिहिल्या. 'जशास तसे', 'पुढचं पाऊल', 'मी तुळस तुझ्या अंगणी' 'रंगपंचमी', 'वंशाचा दिवा', 'सांगत्ये ऐका' इत्यादींच्या पटकथाही त्यांच्याच!'रानमेवा', 'चित्रे आणि चरित्रे' यांमध्ये त्यांचे शिकारविषयक लेख व त्याबरोबरच 'रानातली रेखाटनं', 'राजस्थानची रेखाटनं', 'चित्रकार देऊसकर', 'रंगरेषांचे मृगजळ' असे चित्रकलाविषयक लेखही प्रसिद्ध झाले.

माडगूळकरांनी अनुवादाच्या क्षेत्रातही मोलाचा ठसा उमटवला. 'सिंहाच्या देशात' हा बर्नार्ड आणि ग्रझीमिक यांच्या ग्रंथांचा संक्षिप्त अनुवाद, 'बिग सिटी लिटील बॉय'चा 'मंतरलेले बेट', 'द शॅडो फ्रॉम लडाख'चा 'सुमीता', 'लाफ्टर विथ माय फादर'चा 'मी अन् माझा बाप' या नावाने त्यांनी अनुवाद केले. याशिवाय जॉर्ज ऑरवेल या लेखकाच्या अनेक ललित लेखांचाही अनुवाद त्यांनी केला.

त्यांचे स्वतःचे साहित्यसुद्धा अनेक पाश्चात्त्य भाषांमध्ये अनुवादित झाले. 'बनगरवाडी'चा अनुवाद इंग्रजी, जर्मन, हिंदी, डॅनिश या भाषांत व 'नॅशनल बुक ट्रस्ट'तर्फे इतरही भाषांमध्ये झाला. 'वावटळ' कादंबरी इंग्रजी, रशियन भाषांत व 'समांतर' कन्नडमध्ये, असे अनुवाद झालेले आहेत. अनेक कथाही जर्मन, डॅनिश, उर्दू, हिंदी या भाषांमध्ये अनुवादित झालेल्या आहेत.

रानोमाळ स्वच्छंद भ्रमंती करणारे निसर्गप्रेमी, शिकारी तसेच चित्रकार म्हणूनही त्यांची प्रचंड ख्याती झाली. जागतिक कीर्तीच्या चित्रकारांच्या चित्रशैलीचा त्यांनी रसिकतेने शोध घेतला. त्यांची अनेक रेखाटने प्रसिद्ध आहेत.

त्यांच्या पाच पुस्तकांना 'महाराष्ट्र शासन पुरस्कार' मिळाले. १९८३ साली आंबाजोगाईला भरलेल्या अखिल भारतीय मराठी साहित्य संमेलनाचे अध्यक्षपद त्यांनी भूषविले होते.

– मीरा तारळेकर

## माधव

***काटदरे, माधव केशव***

**कवी**

**३ डिसेंबर १८९२ – ३ सप्टेंबर १९५८**



माधव केशव काटदरे यांनी 'कवी माधव', 'एक खेळगडी', 'एम. के. के.', 'जामदग्न्य', 'बाळू', 'यशवंताग्रज', 'रमाकान्त', 'हंस कृष्ण इन्द्रसेन' अशी टोपण नावे घेतल्याचे आढळते. मात्र 'कवी माधव' या नावाने ते ओळखले जातात. माधव काटदरे यांचे प्राथमिक शिक्षण प्रथम घरी व मग गुहागर, हेदवी येथे झाले. इंग्रजी चौथीपासून पुढे ते रत्नागिरी हायस्कूलमध्ये शिकले. १९११ साली ते स्कूल फायनल परीक्षा पास झाले.

मुंबईत किंग जॉर्ज शाळेत वर्षभर ते शिक्षक होते व नंतर त्यांनी कस्टममध्ये नोकरी केली. निवृत्तीनंतर

म

१९४२पासून ते चिपळूणला स्थायिक झाले. कवी माधवांचे कवी, इतिहासाभ्यासी लेखक, बालसाहित्यकार म्हणून मराठीला विशेष योगदान आहे. प्राथमिक शाळेत असतानाच काव्याचे व्यासंगी शिक्षक माधवराव जोगळेकर यांच्यामुळे त्यांना संस्कृत-मराठी काव्याची गोडी लागली. पुढे वॉल्टर स्कॉटच्या ऐतिहासिक कवितेचा त्यांच्यावर एवढा प्रभाव पडला, की कवी माधवांनी शालेय जीवनातच ऐतिहासिक कविता लिहिण्याचा संकल्प केला. नोकरीव्यतिरिक्त बाकीच्या वेळात ते केवळ साहित्यात रमले. व त्यांनी स्वत:चा ग्रंथसंग्रह वाढविला.

न्यायमूर्ती रानडे यांनी मराठ्यांच्या इतिहासाकडे पाहण्याची जी नवी दृष्टी दिली, ती कवी माधवांनी, काव्यरचना करताना अंगीकारली. बालकवींचे निसर्गप्रेम, विनायकांचा ओजस्वी देशाभिमान, गोविंदाग्रजांच्या भाषेचा शाहिरी थाट यांचा प्रभाव त्यांच्या काव्यावर झाला व यातून त्यांनी स्वत:ची स्वतंत्र शैली तयार केली.

कवी माधवांची भाषा जुन्या बखरी, शाहिरी कविता, प्राचीन वाङ्मय यांच्या अभ्यासाने समृद्ध झाली. त्यांच्या कवितेतील शब्दयोजना अर्थवाही, वेधक व वेचक आहे. गतइतिहासातील ओजस्वी प्रसंगचित्रणांत व स्फूर्तिदायी चरित्रवर्णनांत त्यांची कविता अधिक फुलली, रमली. चित्रदर्शी शैली व शाहिरी थाटाची काव्यशैली ही त्यांच्या कवितेतील खास वैशिष्ट्ये सांगता येतील.

'ध्रुवावरील फुले' (१९१५), 'फेकलेली फुले'(१९२१), 'कवी माधव यांची कविता' (१९३५ - संपादन ह. वि. मोटे), 'गीतमाधव' असे चार स्फुटकवितासंग्रह प्रकाशित झाले. १९१० साली बाजीप्रभूंवर, १९१७ला शिवराज स्तवन, अखेरचा संग्राम, बापू गोखल्यांच्या पराक्रमावर 'गोकलखा', घेरियाची लढाई ही त्यांची सर्वोत्कृष्ट ऐतिहासिक काव्ये आहेत. 'सह्याद्रीच्या तळी शोभते हिरवे तळकोकण' ही त्यांची गाजलेली कविता होय. शिवकालीन रायगड, शाहूंचे दक्षिणेत आगमन, शाहूराजाचा उमराव, तारापूरचा संग्राम, आंग्रांचे आरमार, जिवबाबाबा बक्षी, सवाई माधवरावाचा मृत्यू, रावबाजींचे राज्यदान असा मराठ्यांचा इतिहास त्यांनी सलगपणे काव्यांत चित्रित केला आहे.

विश्वकवी टागोरांच्या सात कवितांचा अनुवाद, ऋग्वेदातील सुक्तांना काव्यरूप, गोल्डस्मिथच्या स्कूलमास्टरवरून लिहिलेली 'तात्या पंतोजी' या त्यांच्या अनुवादित रचना उल्लेखनीय आहेत. का. रा. पालवणकरांच्या खेळगडीतील लोककथा, अद्भुतकथा, गोष्टी, कविता, तसेच 'पाजव्याचा पराक्रम व इतर गोष्टी', 'ऊठ सोट्या! तुझेच राज्य', 'डोंगरातील काका व इतर गोष्टी', 'पऱ्यांची देणगी व इतर गोष्टी', 'सोनसाखळी व इतर गोष्टी', 'तीन रणयोद्धे' इत्यादी चित्ताकर्षक बालवाङ्मय प्रसिद्ध आहे.

हंस कृष्ण इंद्रसेन या टोपणनावाने त्यांनी हॅन्स अँडरसनच्या परीकथांची भाषांतरे ही मासिक 'मनोरंजन'मधून प्रसिद्ध केली.

त्यांनी भारताच्या प्राचीन व मध्ययुगाचा अभ्यास करून संस्कृत वाङ्मय, शिलालेख, नाणी यांवर, 'भासकवी आणि त्याचा राजसिंह', 'बालकवी व त्याचा हर्षदेव', 'भवगूती', 'कालिदास व त्यांचा विक्रमादित्य', 'सुवर्णयुगातील सम्राट' असे लेख 'रत्नाकर' व मासिक 'मनोरंजन'मधून लिहिले.

आयुष्यभर कवी माधवांनी इतिहासाप्रमाणे लोकवाङ्मयाचाही व्यासंग केला.

सर्वांत महत्त्वाचे म्हणजे वाङ्मयक्षेत्रातील पंथ-संप्रदायगट यांपासून ते सदैव अलिप्त राहिले.

एक यशस्वी ऐतिहासिक कवी म्हणून महाराष्ट्राच्या कविमंडलात त्यांना गौरवाचे स्थान प्राप्त झाले आहे.

– प्रा. संध्या टेंबे

**संदर्भ :**


१. *जोग, दत्तात्रेय; 'कवी माधव व्यक्तिपरिचय'; 'ज्योत्स्ना'; डिसेंबर १९५०.*

२. *नेर्लेकर, गं.वि; 'माधवांची कविता एक अभ्यास'; 'नवभारत'; सप्टेंबर १९५९.*


म

## माधव जूलियन

***पटवर्धन, माधव त्र्यंबक***

**कवी**

**२१ जानेवारी १८९४ – २९ नोव्हेंबर १९३९**



कवी माधव जूलियन यांचा जन्म त्यांचे थोरले मामा महादेव विश्वनाथ सहस्रबुद्धे यांच्या घरी, बडोद्याला झाला. आरंभीची आठ-नऊ वर्षे ही गुजरातमधील बडोदा, भडोच, पुणे जिल्ह्यातील मुळशी पेट्यातील आवळस येथे गेली. १९०४ साली ते आवळसहून बडोद्याला आले. तेथेच त्यांचे बहुतेक शालेय शिक्षण व पुढे महाविद्यालयीन शिक्षण झाले. बडोद्यातील त्यांचे वास्तव्य त्यांच्या व्यक्तिगत व वाङ्मयीन जीवनाच्या घडणीत विशेष महत्त्वाचे आहे.

त्यांच्या सुधारकी विचारांमुळे ते मामांच्या घरातून बाहेर पडून स्वतंत्रपणे राहू लागले. याच काळात त्यांच्याभोवती रा. वि. मराठे, विठ्ठलराव घाटे, शांता हेर्लेकर प्रभृतींचे काव्यप्रेमी मित्रमंडळ जमा झाले. राजकवी चंद्रशेखर यांच्याशीही त्यांचा निकटचा संबंध आला. इथेच त्यांच्या 'माधव' नावाला 'जूलियन' या नावाची जोड मिळून ते 'माधव जूलियन' झाले. मारी कौरेलीच्या 'God's Good Man' या कादंबरीत 'जूलियन ॲडाले' हे एक पात्र आहे. तो स्वच्छंदी, बड्या दांभिकांचे दंभ उघड करणारा, रोमॅन्टिक कवी आहे. माधवरावांची मैत्रीण शांता हेर्लेकर यांनी माधवरावांना सांगितले की, ''तुम्ही त्या जूलियन ॲडालेसारखे आहात.'' त्यातील 'जूलियन' हे नाव आपल्या 'माधव' नावाला जोडून ते 'माधव जूलियन' झाले. त्याच टोपणनावाने ते कविता लिहू लागले.

१९१६ साली ते फारसी विषय घेऊन बी.ए. झाले व १९१८ साली फारसी-इंग्रजी घेऊन ते एम.ए. झाले, आणि पुण्याला डेक्कन एज्युकेशन सोसायटीच्या फर्गसन महाविद्यालयात फारसी व इंग्रजी या विषयांचे प्राध्यापक झाले. इथेच त्यांचा सर्व तऱ्हेच्या नवतेचा उत्साहाने पुरस्कार करणाऱ्या श्री. बा. रानडे यांच्याशी स्नेह जमला. यातूनच आधुनिकतेचा जीवनात व साहित्यात हिरिरीने पुरस्कार करणाऱ्या रविकिरण मंडळाची स्थापना झाली (९ सप्टेंबर १९२३). या वातावरणात, मित्रांच्या सहवासात माधवरावांचे कवित्व बहरले; त्यांना प्रतिष्ठा, मान्यता मिळत गेली.

अशा चढतीच्या काळातच त्यांच्यावर मोठा आघात झाला. डेक्कन एज्युकेशन सोसायटीतील काही विरोधकांच्या कटकारस्थानांनी माधवरावांना प्रथम दोन वर्षे निर्वेतन रजेवर जावे लागले, आणि नंतर सोसायटीचा राजीनामा द्यावा लागला (१९२५). या मधल्या दोन वर्षांत माधवरावांनी अंमळनेरच्या प्रताप हायस्कूलमध्ये शिक्षकाची नोकरी केली (१९२४ ते १९२६). तेथून सुटल्यावर १९२६ ते १९२८ या दोन वर्षांत त्यांनी पुण्याच्या भावे स्कूलमध्ये शिक्षकाची नोकरी केली. त्यानंतर १९२८ सालापासून अखेरपर्यंत (१९३९) त्यांनी कोल्हापूरला राजाराम कॉलेजात फारसी व इंग्रजी विषयांचे प्राध्यापक म्हणून काम केले. राजाराम कॉलेजात रुजू होण्यापूर्वी त्यांनी गंगूताई गरुड (विवाहानंतर लीलाबाई पटवर्धन) यांच्याशी लग्न केले (२९ मे १९२८). यापुढे लौकिकार्थाने त्यांच्या जीवनास स्थैर्य आले. १९३६ साली जळगावला भरलेल्या महाराष्ट्र साहित्य संमेलनाचे ते अध्यक्ष झाले. फेब्रुवारी १९३९ मध्ये त्यांना 'छंदोरचना' या बृहत् ग्रंथासाठी मुंबई विद्यापीठाची सर्वोच्च अशी डी. लिट. पदवी मिळाली. असे चढतेवाढते यश मिळत असतानाच, पुण्यात नव्यानेच बांधलेल्या (१९३६) आपल्या 'निवान्त' या बंगल्यात, अवघ्या शेहेचाळिसाव्या वर्षी २९ नोव्हेंबर १९३९ या दिवशी या अशांत आत्म्याला चिरशांती मिळाली.

मराठी साहित्य-संस्कृतीच्या क्षेत्रात माधवरावांनी मोलाचे वाङ्मयीन कार्य केले असले, तरी त्यांची पहिली, मुख्य ओळख कवी– माधव जूलियन म्हणूनच

आहे. काव्यक्षेत्रात माधवरावांचे कार्य चतुर्विध आहे. त्यांनी प्रत्यक्ष स्फुट, दीर्घ काव्यरचना केली; उमरखय्यामच्या रुबायांचे तीन वेळा, तीन प्रकारांनी भाषांतर केले; काव्यविचार केला, काव्यसमीक्षा केली; आणि पद्यरचनाशास्त्रावर 'छंदोरचना' हा बृहत् ग्रंथ निर्माण केला. त्यांचे स्फुट काव्याचे संग्रह: 'गज्जलांजलि' (१९३३, १०८ गज्जल); 'स्वप्नरंजन' (१९३४, ११३ स्फुट भावकविता); आणि 'मधुलहरी व इतर कविता' (प्रकाशन माधवरावांच्या निधनोत्तर–१९४०, २६ स्फुट भावकविता). यांखेरीज 'तुटलेले दुवे' हा सुनीतसंग्रह अथवा सुनीतमाला (१९३८, १०१ सुनीते). 'गज्जलांजलि'मध्ये सामान्यतः फारसी वृत्तांमधील गज्जलांचा संग्रह आहे. 'प्रस्तुत पद्यसंग्रह हा एक हौसेचा प्रयोग आहे.' (माधव जूलियन, प्रस्तावना). यातील बहुसंख्य गज्जला या प्रेमविषयक आहेत. फारसीतील गज्जल हा पद्यप्रकार त्यांनी मराठीत आणला; अनेक फारसी वृत्ते मराठीत आणली; पुढील कवींना अभिव्यक्तीसाठी अनेक पद्यरचनाबंध उपलब्ध करून दिले. माधवरावांनी फारसी गज्जलांची वृत्ते वापरली; पण फारसी गज्जलांतील अनेक शेरांची साखळी असे त्यांचे स्वरूप न ठेवता, त्या स्वतंत्र–स्वयंपूर्ण मराठी भावकविता केल्या.

'स्वप्नरंजन' हा त्यांच्या भावकवितांचा दुसरा, महत्त्वाचा संग्रह. याच्या प्रस्तावनेत माधव जूलियनांनी लिहिले आहे, 'आत्मरचनेसाठी आरंभ केला, तरी काव्याची समाप्ती ही रसिकरंजनासाठीच असते.' या कवितांतून माधव जूलियनांच्या भावजीवनाची सलग प्रतीती येते. यांतल्या बऱ्याच कविता ह्या आत्मभावजीवनाचा आविष्कार करणाऱ्या आहेत; त्यांची ध्येयवादी, तत्त्वनिष्ठ भाववृत्ती आणि व्यावहारिक जीवनात होणारी तिची ओढाताण यांचा आविष्कार यांतील अनेक कवितांतून होतो. या संग्रहात काही नाट्यगीतेही आहेत. संसारात स्थिर झालेले, कुटुंबवत्सल माधवराव 'मधुलहरी आणि इतर कविता' या संग्रहातील अनेक कवितांतून दिसतात. तरी अजूनही काही कवितांतून अंतरंगातील ओढाताण उसळून येतेच. यात काही कविता सामाजिक जाणिवेच्याही आहेत.

'तुटलेले दुवे' हा माधवरावांनी वेळोवेळी लिहिलेल्या १०१ सुनीतांचा संग्रह आहे. माधवरावांनी केलेले सुनीतरचनेचे अनेक प्रयोग या संग्रहात आहेत. म्हटले तर हा स्वतंत्र, सुट्या सुनीतांचा संग्रह आहे; पण ही सुनीते एका धूसर, विफल प्रेमकहाणीच्या सूत्रात गुंफलेली असल्याने ती एक अखंड सुनीतमालिकाही आहे.

माधवरावांनी उमरखय्याम या पर्शियन कवीच्या (तो केवळ कवी नव्हता, उत्तम गणिती; खगोलशास्त्रज्ञही होता) रुबायांचे तीन वेळा, तीन वेगवेगळ्या प्रकारांनी भाषांतर केले आहे. 'उमरखय्यामकृत रुबाया'मध्ये मूळ पर्शियन रुबायांचे यथामूल भाषांतर केलेले आहे. फिज्जेरल्डने उमरखय्यामच्या काही फारसी रुबायांचे जे स्वतंत्र रूपांतर इंग्रजीत केले, त्याच्या पहिल्या आवृत्तीचे 'द्राक्षकन्या' हे निवळ भाषांतर आहे. 'मधुलहरी' हे फिज्जेरल्डच्या रुबायांच्या भाषांतराच्या चौथ्या आवृत्तीचे यथामूल भाषांतर आहे. यात फिज्जेरल्डने सव्वीस रुबायांची भर घातलेली आहे.

'विरहतरंग' (१९२६) 'सुधारक' (१९२८), 'नकुलालङ्कार' (१९३९) ही माधवरावांची तीन दीर्घ कथाकाव्ये. 'विरहतरंग' हे हळवे, तरल प्रेमकाव्य आहे. प्रभाकर हा काव्यात्मक वृत्तीचा महाविद्यालयीन तरुण, आणि इंदू ही विधवा महाविद्यालयीन तरुणी यांच्या काहीशा गूढतरल प्रेमसंबंधांची कहाणी यात आहे (३३ तरंग, २३२ श्लोक). 'सुधारक'मध्येही प्रेमभावनेची विविध चित्रे आहेत, पण ते एक सामाजिक दीर्घकाव्यही आहे. बोलक्या सुधारकांच्या पार्श्वभूमीवर वासू हा आदर्श सुधारक, हा नायक या दीर्घकथाकाव्यात उभा केलेला आहे. याचे उपोद्घात, उपसंहार आणि अठरा अध्याय आहेत. 'नकुलालङ्कार'मध्ये (४४ खंड) नकुल ही खटपटी–लटपटी व्यक्ती अखेरीस एका विद्यापीठाची कुलगुरू कशी होते याची अलंकारिक भाषेत सांगितलेली चित्रकहाणी आहे. मोरोपंती थाटाचे हे दीर्घकथाकाव्य असल्याने त्यातील भेदक उपरोध हा दुर्लक्षित राहिला

म

आहे. साहित्य आणि शिक्षण या क्षेत्रांतील अनाचारांचे परखड दर्शन यात घडविलेले आहे.

**भावपूर्ण पंडित कवी**

प्रत्यक्ष काव्यनिर्मितीबरोबर माधवरावांनी काव्यविचार व काव्यसमीक्षाही केलेली आहे. त्यांच्या अशा लेखांचे 'काव्यविहार' (१९४७) व 'काव्यचिकित्सा' (१९६४) हे दोन संग्रहही आहेत. काव्याचे जे बहिरंग पद्यरचना, त्याचे समग्र आलोकन करून त्यांनी 'छंदोरचना' (आ.१, १९२७, आमूलाग्र नवसंशोधित द्वितीयावृत्ती, १९३७) हा बृहत्ग्रंथ सिद्ध केला. या ग्रंथासाठीच त्यांनी मुंबई विद्यापीठाची डी.लिट.ही सर्वोच्च पदवी संपादन केली. माधवराव हे मराठीतील पहिले डी.लिट. (फेब्रुवारी १९३९) होत. शाळेतील शिक्षकांना उपयुक्त व्हावे या हेतूने यानंतर माधवरावांनी 'पद्यप्रकाश' (१९३८) हे छोटेखानी पुस्तक तयार केले.

याखेरीज माधवरावांनी 'फारसी-मराठी-कोश' सिद्ध केला (१९२५). मराठीमधील हा पहिलाच ''फारसी-मराठी-कोश'. या दिशेने नंतर हे काम डॉ.यू.म.पठाण यांनी पुढे नेले.

मराठी साहित्य व भाषा यांच्या सर्वांगीण उन्नतीकडे माधवरावांचे लक्ष होते. मराठी भाषेवरील हिंदी व इंग्रजी भाषांच्या आक्रमणाविरुद्ध त्यांनी भाषाशुद्धीची चळवळ केली. भाषाशुद्धीच्या चळवळीमागील माधवरावांची भूमिका सांस्कृतिक होती. भाषाशुद्धीवरील त्यांचे लेख, भाषणे यांचा संग्रह त्यांनी 'भाषाशुद्धिविवेक' (१९३८) या नावाने काढला होता. 'भाषाशुद्धी' या शब्दप्रयोगामुळे काही चुकीचा समज होण्याचा संभव असतो. म्हणून त्यांनी एका लेखात 'Purism' या शब्दाऐवजी 'Swadeshism' हा शब्द वापरला आहे. भाषाशुद्धीची चळवळ ही 'स्वत्वसंरक्षणाची आणि स्वत्वसंवर्धनाची' आहे. भाषाशुद्धीबरोबरच लेखनशुद्धीवरही त्यांनी काही लेख लिहून 'मराठी लिपी'मध्ये काही सुधारणा सुचवल्या.

मराठी रसिकांना, जाणकारांना माधवराव पटवर्धनांची मुख्य ओळख 'कवी' म्हणून आहे - त्यातही 'प्रणयपंढरीचा वारकरी' म्हणून आहे. वासनाविरहित, निरपेक्ष, उत्कट प्रेमाची ओळख त्यांनी मराठी मनाला करून दिली. त्यांनी फारसी वृत्तांमध्ये पद्यरचना करून मराठी कवींना त्या वृत्तांची माहिती करून दिली, आणि काव्यरचनेसाठी अनेक नवे पद्यबंध उपलब्ध करून दिले. त्यांनी मराठी छंदोविचारांचा भरभक्कम पाया घालून दिला. ना.ग.जोशी यांनी याच दिशेने मराठी छंदोविचार पुढे नेला.

माधवरावांना 'पंडित कवी' असे संबोधण्याची एक प्रथा आहे. पण, त्यांच्या एकंदर लेखनात कवित्व आणि पांडित्य एकमेकांवर मात करीत नाहीत, या दोन्ही प्रवृत्ती परस्परपूरक व पोषक होतात. मराठी भाषेचा व इतिहासाचा प्रखर अभिमान त्यांनी जागवला. स्व (मराठी) भाषेचा विचार व वापर गंभीरपणाने, जागरूकपणाने करावयाला हवा याची तीव्र जाणीव त्यांनी मराठी माणसांमध्ये निर्माण केली. आज तर अशा जाणिवेची निकडीची गरज आहे.

– प्रा.डॉ.सु.रा.चुनेकर

## माने, लक्ष्मण बापू

**आत्मकथाकार, संशोधक, सामाजिक कार्यकर्ते**

**१ जून १९४९**



लक्ष्मण बापू माने यांचा जन्म निरगुडी, तालुका फलटण, जिल्हा सातारा येथे कैकाडी या भटक्या जमातीत झाला. त्यांचे प्राथमिक शिक्षण अनेक गावांतून झाले, तर मॅट्रिक फलटण येथून पूर्ण केले. त्यांनी उच्च शिक्षण कोल्हापूरच्या कीर्ती कॉलेजमध्ये घेतले. 'समाजवादी युवक दला'चे कार्यकर्ते व 'भारतीय भटके विमुक्त विकास व संशोधन संस्थे'चे अध्यक्ष झाले. १९८८ साली त्यांनी राज्यपाल नियुक्त आमदार म्हणून कार्य केले.

लक्ष्मण माने यांची 'उपरा' (१९८०), 'बंद दरवाजा' (१९८४), 'विमुक्तायन' (१९९७) ही महत्त्वाची पुस्तके

म

प्रकाशित झाली. विधानसभेत भटक्या, विमुक्तांच्या समस्या मांडणाऱ्या भाषणाचे 'भटक्याचे भारूड' हे संपादित पुस्तक प्रकाशित झाले आहे.

भटक्या-विमुक्तांचे शोषण, जुनाट रीती, परंपरा, अंधविश्वास आणि भटक्या-विमुक्तांवर होणारे अन्याय-अत्याचार हे लक्ष्मण मानेंच्या लेखनाचे मूलभूत विषय आहेत. त्यांच्या लेखनातून भटक्या-विमुक्त समाजाचे दैन्य, दुःख त्यांनी चव्हाट्यावर मांडले. १९७२ पासून भटक्या-विमुक्तांची चळवळ चालवणारे लक्ष्मण माने आपल्या अनुभवाला शब्दरूप देतात. 'उपरा' या आत्मकथनातून केवळ वेदना आणि विद्रोहाचा सूर लावण्याचा लक्ष्मण माने यांचा हेतू नाही. 'उपरा'मध्ये जेवढे लक्ष्मण माने आहेत, तेवढाच कैकाडी समाज आहे. कैकाडी जमातीच्या जातपंचायतीचे आणि समाजजीवनाचे सूक्ष्म तपशिलांसह चित्रण मानेंनी केले आहे. कैकाडी भाषेचा मुक्त वापर माने या आत्मकथनात करतात.

'बंद दरवाजा' या पुस्तकात भटके-विमुक्त, गुन्हेगारीचा शिक्का घेऊन अपमानित जगणे जगणाऱ्या समाजाचा आढावा घेतला आहे. 'विमुक्तायन' या पुस्तकात भटक्या-विमुक्त समाजाचा इतिहास, त्यांच्या समस्या यांची मांडणी करून त्यांनी या पुस्तकात काही शिफारशी सुचवल्या आहेत.

'उपरा' या आत्मकथनास साहित्य अकादमी पुरस्कार लाभला (१९८१). पुण्याच्या केसरी-मराठा संस्थेचा तात्यासाहेब केळकर पुरस्कार, फोर्ड फाउण्डेशन, न्यूयॉर्क या संस्थेकडून दोन लाखांची आर्थिक मदत व परदेश दौरा भारती विद्यापीठ पुरस्कार, दैनिक 'केसरी'मध्ये, 'पालावरचं जग' हे सदर चालू असताना पु. ल. देशपांडे यांच्या प्रयत्नांतून डॉ. होमी भाभा फेलोशिप मिळाली. भारत सरकारचा 'पद्मश्री' हा पुरस्कार मिळाला.

१९८९ साली त्यांनी नंदूरबार येथे झालेल्या चौथ्या आदिवासी साहित्य संमेलनाचे अध्यक्षपद व पंधराव्या अस्मितादर्श लेखक, वाचक मेळाव्याचे (रत्नागिरी) अध्यक्षपद भूषविले.

लक्ष्मण मानेंची ही साहित्यिक कामगिरी असली तरी ते स्वतःला कायम कार्यकर्ता समजतात. ते म्हणतात, ''मी लेखक नाही. मी स्वतःला रस्त्याच्या कडेचा मानतो. लेखनात मी स्वतःला गुरफटवून घेणार नाही. कारण, मला लेखक बनण्याचे आकर्षण नाही. मी चळवळी मानतो. चळवळ नसेल तर त्या लेखनावर कोणताही अर्थ राहत नाही.''

भटक्या-विमुक्तांच्या स्थितिगतीचे लेखन करताना लक्ष्मण माने आपल्या कृतीतून समाजाच्या विकासाचे स्वप्न प्रत्यक्षात आणत आहेत.

– रवींद्र गोळे

**संदर्भ :**

*१. वाल्हेकर ज्ञानेश्वर; 'लक्ष्मण माने यांचे साहित्य, एक समाजशास्त्रीय अभ्यास'; स्वरूप प्रकाशन; जुलै २००८.*

## माने, वसुधा वसंत

**ललितगद्यलेखिका, अनुवादक**

**५ जून १९३३**

वसुधा माने ह्यांनी बी. ए. करून लायब्ररी सायन्सचा डिप्लोमा पूर्ण केला. त्यांचा वसंत माने ह्यांच्याशी विवाह झाला. वसंत माने हे आकाशवाणीवर नोकरी करत होते. त्यांच्या बदल्यांच्या निमित्ताने वसुधाताईंचे दिल्ली, गोवा ह्या ठिकाणी अधिक वास्तव्य घडले.

वसुधाताईंना समाजकार्याची विशेष आवड होती. पणजीत राहत असताना त्यांनी 'बालकलाकेंद्रा'तर्फे विविध कार्यक्रमांचे आयोजन केले. त्यांनी अनेक समाजोपयोगी उपक्रम राबवले. शिवाय घर संभाळून कुटुंबनियोजनाचे प्रचारकार्य केले.

वसुधाताईंनी मोजकेच, परंतु लक्षवेधी ललितलेखन केले. 'गोव्यातील दिवस' (१९८६), 'सरहद्द आणि इतर' (१९८६) हे त्यांचे आत्मचरित्रपर ललितलेखसंग्रह वैशिष्ट्यपूर्ण आहेत. गोव्याच्या वास्तव्यात असताना त्यांनी तेथील 'धालो' ह्या लोकगीतांचा अभ्यास करून त्यांचा एक संग्रह प्रसिद्ध केला. 'गोव्यातील धालो' हा तो संग्रह होय. वसुधा माने एक उत्तम अनुवादक आहेत.

म

'नीलशैल' (१९७४) हा हिंदी कादंबरीचा अनुवाद आणि 'सैबेरियातून पलायन' (१९८७) हा इंग्रजी प्रवासवृत्ताचा अनुवाद, हे दोन्ही अनुवाद वेधक आणि उत्कंठावर्धक आहेत.

वसुधाताईंच्या सर्वच लेखनातून त्यांची भाषाशैली वाचकाच्या मनाची पकड घेते. तसेच त्यांच्या लेखनातून त्यांची निसर्गाकडे बघण्याची सौंदर्यपूर्ण दृष्टी, रसिकतेने आस्वाद घेण्याची वृत्ती दिसून येते. अनेक छोटी-मोठी माणसे त्यांच्या सहवासात आली. त्यांचे अचूक निरीक्षण करण्याची त्यांची दृष्टी आणि त्यांच्याकडे बघण्याचा सकारात्मक दृष्टिकोन हे वसुधाताईंच्या लेखनाचे विशेष त्यांच्या सर्वच लेखनातून दिसून येतात.

– अंजली जोशी

**संदर्भ :**

*१. माने वसुधा वसंत; 'गोव्यातील दिवस'; १९८६.*

## मायदेव, वासुदेव गोविंद
**कवी**
**२६ जुलै १८९४ – ३० मार्च १९६९**



रत्नागिरी जिल्ह्यातील संगमेश्वरजवळच्या माभळे ह्या आजोळच्या गावी वासुदेव मायदेव यांचा जन्म झाला. आई पार्वतीबाई लहानपणी वारली. त्यामुळे नंतर ते वडिलांबरोबर मिरजेस आले. नंतर धारवाड व पुढे पुण्यास आले. १९१० मध्ये मॅट्रिक्युलेशन, १९१६ मध्ये बी.ए.बी.एड. नंतर एम.ए. अशा प्रकारे त्यांची पहिली २२ वर्षे बालपणात आणि शिक्षणात गेली. त्यांनी पुढील ४५ वर्षे सामान्यतः स्त्री-शिक्षण, मराठी भाषा यांच्या विकासाप्रीत्यर्थ व्यतीत केली. त्यांची राहणी साधी, निर्व्यसनी, काटकसरी जीवन होते. त्यांनी काही काळ अनाथ बालिकाश्रमात चिटणीस म्हणून काम केले. पुढे हिंगणे स्त्री-शिक्षण संस्था, नाथीबाई दामोदर ठाकरसी महिला विद्यापीठ, मुंबई मराठी ग्रंथसंग्रहालय, पुणे सेवासदन व सूतिकासेवा मंदिर या संस्थांची त्यांनी यथाशक्ति सेवा केली.

मराठी भाषेतील जुन्या व नव्या कवींचा योग्य सत्कार व योग्य पुरस्कार ह्यांसाठी त्यांनी विशेष प्रयत्न केले. मराठी वाङ्मयाची चरित्र, कोश, काव्य ह्या दालनांची सेवा केली. वीर सावरकरांचे 'माझी जन्मठेप' या पुस्तकाचे इंग्रजी भाषांतर प्रा. वसंतराव नाईक यांच्याकडून करवून घेताना त्यांनी त्या प्रांतात मदतीचा हात पुरविला. ईश्वरावर त्यांचा विश्वास होता. त्यांना सगुण उपासना आवडे. त्यांना संत ज्ञानेश्वर हे खरे मार्गदर्शक वाटत.

मायदेवांनी 'वेचलेले क्षण' हे आत्मचरित्र १९६२ मध्ये लिहिले. त्यांची भाषा अत्यंत सुबोध, सरळ आणि कौटुंबिक असल्याने त्यांच्या लिहिण्यातील खरेपणा जाणवतो. मायदेवांनी प्रामुख्याने कविता, अधिक लिहिल्या. त्यांच्या 'भावतरंग', 'अभिनय गीत', 'शिशुगीत', 'भावनिर्झर', 'बालविहार', 'सुधा', 'किलबिल', 'भावविहार', 'क्रीडागीत', 'छंदगीत', 'भावपरिमल' या रचना लोकप्रिय झाल्या. तसेच त्यांनी 'भा. रा. तांबे कविता भाग १ व २' यांचे संपादनकार्य केले. तसेच त्यांनी सावरकर-कविता, सावरकर-काव्य-समालोचन केले.

आपण समाधानी असल्याचे ते आत्मचरित्रात म्हणतात. 'जगाने उपेक्षा केली नाही, काही कमी पडू दिले नाही, उलट योग्यतेपेक्षा जास्त प्रेम, पैसा व मान मिळवून दिला', असे ते नमूद करतात.

"ये केव्हा येणार! मंगला ये जेव्हा येणार!
आल्यावरती खोटी क्षणभर नाही तुझी करणार।।"

असे आपल्या कवितेत मृत्यूला उद्देशून म्हणताना आपण मृत्यूची प्रतिक्षा करीत नाही; परंतु त्याच्या जाणिवेने भयभीतही होत नाही, असा समाधानी व धैर्यपूर्ण भावच कवी व्यक्त करतो.

– निशा रानडे

**संदर्भ :**

*१. 'लोकसत्ता', ३१ मार्च १९६९.*

म

## मालशे, मिलिंद सखाराम

**समीक्षक, भाषावैज्ञानिक**

**१४ जुलै १९५१**



मिलिंद सखाराम मालशे यांचा जन्म मुंबई येथे झाला. इंग्रजी व सौंदर्यशास्त्र हे विषय घेऊन ते एम.ए. झाले. नंतर 'साहित्य-प्रकार' हा विषय घेऊन त्यांनी इंग्रजी विषयात मुंबई विद्या-पीठाची पीएच.डी. मिळवली. त्याचप्रमाणे हैद्राबाद येथून 'भाषाविज्ञान' या विषयासाठी एम.लिट. ही पदवीही त्यांनी मिळवली.

मानव्यविद्या आणि सामाजिक विज्ञान विभाग, आय.आय.टी. पवई, मुंबई येथे ते प्राध्यापक म्हणून इंग्रजी भाषा व साहित्य या विषयाच्या अध्यापनाचे कार्य करीत आहेत. त्यांनी साहित्य व सौंदर्यशास्त्र या विषयात पंधरा विद्यार्थ्यांना पीएच.डी.साठी मार्गदर्शन केले आहे.

भाषाविज्ञान, शैलीमीमांसा, चिन्हमीमांसा इत्यादी क्षेत्रांत विपुल व दर्जेदार लेखन करून आपला ठसा उमटवणारे भाषातज्ज्ञ म्हणून प्रा. मिलिंद मालशे यांची ओळख मराठी लेखन क्षेत्रात आहे. त्याचबरोबर 'सौंदर्यशास्त्र' या मराठीतील काहीशा दुर्लक्षित विषयावरही त्यांनी अभ्यासपूर्ण लेखन केले आहे. सौंदर्यशास्त्राचा केवळ अभ्यास करूनच ते थांबले नाहीत, तर संगीत कलेतील सौंदर्याचा शोध घेण्यासाठी मुंबई विद्यापीठाची शास्त्रीय संगीताची पदविका घेऊन या विषयावर त्यांनी अनेक व्यासंगपूर्ण लेख लिहिले आहेत. त्याचप्रमाणे देशात, तसेच देशाबाहेर त्यांनी गायनाच्या मैफलीही केल्या आहेत.



त्यांच्या 'साहित्याभ्यासाची शैलीलक्षी पद्धत' व 'अत्याधुनिक भाषाविज्ञान : सिद्धान्त आणि उपयोजन' या ग्रंथांमधून मराठी भाषाविज्ञानाला नवे वळण मिळाले असे आपल्याला दिसून येते. यातून भाषाविज्ञानातील अनेक आधुनिक विचारप्रवाहांचे दर्शन घडते. त्यांच्या 'आधुनिक समीक्षा-सिद्धान्त' व 'Aesthetics of Literary Classification' या ग्रंथातूनही खऱ्या अर्थाने संशोधन करून नवीन विचार मांडल्याचा प्रत्यय येतो. यामध्ये 'वर्णनात्मक भाषाविज्ञान : स्वरूप व पद्धती' या ग्रंथातील लेखांचा समावेश करावा लागेल.

कॉलिंगवुड, चॉम्स्की, याकबसन, डेल हाइम्स इत्यादी विचारवंतांचे ग्रंथ व लेख मराठीत भाषांतरित करण्याचे महत्त्वपूर्ण कार्यही त्यांनी केले आहे. मराठी तसेच इंग्रजी नियतकालिकातून ते सातत्याने लेखन करत असतात. देशात व देशाबाहेरही विविध विद्यापीठातून आंतरराष्ट्रीय चर्चासत्रांमध्ये त्यांनी संशोधनात्मक निबंध सादर केले आहेत. १९९४ साली केंब्रिज सेमिनारमध्ये भाग घेण्यासाठी ब्रिटिश काऊन्सिलतर्फे त्यांची निवड झाली होती. त्यांच्या 'आधुनिक भाषाविज्ञान: सिद्धान्त व उपयोजन' या ग्रंथाची दखल महाराष्ट्र शासनाने घेऊन त्याला उत्कृष्ट ग्रंथाचा पुरस्कार दिला, तर 'आधुनिक समीक्षा सिद्धान्त' या ग्रंथाला उत्कृष्ट समीक्षा ग्रंथ म्हणून श्रीमती विभावरी पाटील अनुष्टुभ पुरस्कार, इचलकरंजी आपटे वाचनालय पुरस्कार व म.सा.प.चा प्रा.रा.श्री.जोग पुरस्कार असे तीन पुरस्कार मिळाले आहेत.

एकंदरीतच भाषाविज्ञान, सौंदर्यशास्त्र व संगीत या तीनही क्षेत्रांत डॉ. मालशे यांनी महत्त्वपूर्ण भर घातली आहे असे म्हणता येते.

– वैखरी वैद्य

**संदर्भ :**

*१. काळे कल्याण, सोमण अंजली, संपादक; 'वर्णनात्मक भाषाविज्ञान : स्वरूप आणि पद्धती'; प्रकाशन कॉन्टिनेन्टल; प्रथम आवृत्ती; १९८२.*

## मालशे, सखाराम गंगाधर

**समीक्षक, संशोधक**

**२४ सप्टेंबर १९२१ – ७ जून १९९२**

सखाराम गंगाधर मालशे यांचा जन्म गांगई, ता. चिपळूण, जि. रत्नागिरी येथे झाला. डॉ. स.गं. मालशे



यांनी कोकणात राहून मॅट्रिकपर्यंतचे शिक्षण पूर्ण केले आणि पुढील शिक्षणासाठी ते मुंबईला येऊन राहिले. स्वावलंबनाने शिक्षण पूर्ण करीत असताना प्रारंभी त्यांनी मुंबईतील शाळेत शिक्षक म्हणून काम केले.

१९४९ मध्ये सिद्धार्थ महाविद्यालयातून ते एम.ए. झाले व त्याच महाविद्यालयात १९५६ पर्यंत आणि पुढे १९६६ पर्यंत कीर्ति महाविद्यालयात ते मराठीचे प्राध्यापक होते. प्रा. अ. का. प्रियोळकर यांच्या मार्गदर्शनाखाली त्यांनी १९६१ मध्ये पीएच. डी केली. १९६७–१९६८ या कालखंडात ते मुंबई मराठी संशोधन मंडळाचे संचालक म्हणून कार्यरत होते आणि पुढे १९६८ ते १९८२ या काळात ते मुंबईच्या श्रीमती नाथीबाई दामोदर ठाकरसी विद्यापीठाच्या मराठी विभागाचे प्रमुख होते.

‘मराठी संशोधन पत्रिका’, ‘महाराष्ट्र साहित्य पत्रिका’, ‘इये मराठीचिये नगरी’ अशा दर्जेदार संशोधनपर नियतकालिकांचे संपादक म्हणून त्यांनी अनेक दुर्मीळ ग्रंथांना व संशोधनपर लेखांना प्रसिद्धी दिली. त्यांचे हे कार्य मोलाचे ठरले. मराठी नाटके, एकोणिसावे शतक, राम गणेश गडकरी, स्वातंत्र्यवीर सावरकर, आचार्य प्र. के. अत्रे हे त्यांच्या आवडीचे विषय होते. सुमारे ६० हून अधिक समीक्षात्मक आणि संशोधनपर लहान–मोठी पुस्तके त्यांच्या नावावर असून त्यांतील काही महत्त्वाच्या व मोजक्या पुस्तकांचा मागोवा घेतला, तरी या क्षेत्रातील त्यांची मोलाची कामगिरी लक्षात येईल.

या सर्वच लेखनांतून त्यांची ‘ना मूलं लिख्यते किंचित’ ही संशोधनातील निष्ठा पुरेपूर आढळते. कुणाचेही ‘नीट पण झूट’ लेखन त्यांनी कधी सहन केले नाही. सुरुवातीच्या काळात त्यांनी कथा, ललितनिबंध, एकांकिका असे मोजके लेखन केले असले तरी समीक्षक आणि संशोधक म्हणूनच ते महत्त्वाचे लेखक ठरले. त्यांनी समीक्षा, संशोधन, संपादन, अनुवाद, बालसाहित्य, नाटक असे विविधांगी लेखन केले आहे.

‘तारतम्य’ (१९८७) असे त्यांच्या एका पुस्तकाचे नाव आहे. त्यांच्या लेखनातही हे तारतम्य कधी सुटलेले दिसत नाही. डॉ. मालशे यांचे महत्त्वाचे लेखन पुढीलप्रमाणे सांगता येईल: ‘आवडनिवड’ (१९५९) –लघुकथा, ग्रामीण कादंबरी, आत्मचरित्र, इ. विषयांवरील लेखन; ‘आगळंवेगळं’ (१९८६) – विविध पुस्तकांची परीक्षणे; ‘संतर्पण’(१९८६) – मध्ययुगीन साहित्याची समीक्षा; ‘नीरक्षीर’(१९८९) – नाट्यसमीक्षात्मक लेखन इत्यादी.

एकोणिसावे शतक हा त्यांच्या अभ्यासामधील आवडीचा भाग होता. या शतकाचा त्यांचा किती गाढा अभ्यास होता, हे त्यांनी या शतकातील जी पुस्तके संपादित केलेली आहेत आणि या पुस्तकांना ज्या प्रस्तावना लिहिल्या आहेत, त्यांवरून लक्षात येते. त्यांतील काही पुस्तके अशी: ‘अव्वल इंग्रजीतील ग्रंथनिर्मितीची नांदी’, ‘दोन पुनर्विवाह प्रकरणे’ (१९७७), ‘शेट माधवदास रघुनाथदासकृत आत्मलिखित पुनर्विवाह चरित्र’ (१९८१), ‘डेक्कन एज्युकेशन सोसायटी’– अनुवाद (१९६०), ‘मुंबई इलाख्यातील इनाम कमिशन खात्यातील गैरइन्साफ’ (१९७८), ‘बॉम्बे असोसिएशनचे दोन अर्ज’ (१९७६), न्या. रानडेकृत ‘मराठी वाङ्मयाची अभिवृद्धी’– अनुवाद (१९८१), ‘सत्तावनी उठावाची समकालीन कात्रणे’ (१९७७), ‘छत्रपती प्रतापसिंह यांची लेखी तसबीर’, गोपाळ हरी देशमुखकृत ‘जातिभेद’ (१९७४), विष्णुबुवा ब्रह्मचारीकृत ‘राजनीतिविषयक निबंध’ (१९७५), महात्मा फुलेकृत ‘शेतकऱ्याचा आसूड’ (१९६७), ताराबाई शिंदेकृत ‘स्त्री–पुरुष तुलना’ (१९७५) इत्यादी. याचबरोबर ‘गोविंद नारायण माडगावकर यांचे संकलित वाङ्मय’: भाग १ ते ३ (१९६८) आणि ‘महात्मा फुले समग्र वाङ्मय’ (१९८८) ही सहसंपादनेही महत्त्वाची आहेत.

एकोणिसाव्या शतकासंबंधित आणखी दोन महत्त्वाची पुस्तके म्हणजे ‘विधवाविवाह चळवळ १८०० ते

म

१९००’ (१९७८) आणि ‘गतशतक शोधिताना’ (१९८९).

एकोणिसाव्या शतकाशी संबंधित सर्वच पुस्तकांमधून त्यांनी घेतलेला त्या शतकाचा वेध समग्र, परिपूर्ण आणि त्या शतकाची बारकाव्यानिशी ओळख करून देणारा आहे. ‘एकोणिसाव्या शतकाचा चालता-बोलता कोश’ असे त्यांचे वर्णन केले तर ते अतिशयोक्त ठरणार नाही.

त्यांनी केलेल्या अनुवादांच्या निवडीमधून त्यांची अभ्यासू, चिकित्सक वृत्ती दिसते. उदा. रेने वेलेककृत ‘थिअरी ऑफ लिटरेचर’चे ‘साहित्यसिद्धान्त’ हे भाषांतर (१९८२), यूजिन ओमीलच्या ‘स्ट्रेंज इंटरल्यूड’ या नाटकाचा ‘सुख पाहता’ हा अनुवाद (१९६९), जॅक शॉफर या लेखकाच्या लघुकथांचा ‘सुखाची सुरुवात’ हा अनुवाद (१९५६) इत्यादी.

‘गडकरी सर्वस्व’ (१९८४) हे गडकऱ्यांवरील अत्रे यांनी लिहिलेल्या लेखांचे संपादन, ‘क्रांतिकारकांचे कुलपुरुष सावरकर’ (१९८३) हे अत्रेलिखित सावरकरांवरील लेखांचे संपादन, सावरकर आत्मचरित्र ‘माझ्या आठवणी: भगूर’ (१९७२) व ‘माझ्या आठवणी : नाशिक, (१९७३) ही संपादने, ‘सावरकरांच्या अप्रसिद्ध कविता’ (१९६९) आणि अत्रे यांची ‘झेंडूची फुले’ (१९७२), ‘अध्यापक अत्रे’ (१९८५), ‘हुंदके’ (१९८९) ही सर्व संपादनेही महत्त्वाची आहेत. एकूण सर्वच संपादने डॉ. मालशे यांची सखोल, मार्मिक दृष्टी दर्शविणारी आहेत.

संशोधनशास्त्र हे डॉ. मालशे यांच्या अभ्यासाचे खास क्षेत्र. ‘शोधनिबंधाची लेखनपद्धती’ (१९७०) हे छोटेखानी पुस्तक संशोधनक्षेत्रात पाऊल टाकणाऱ्या संशोधकांना उत्तम मार्गदर्शनपर, असे आहे. ‘केशवसुतांच्या कवितांचे हस्तलिखित’ (१९६६) ही केशवसुतांच्या हस्तलिखिताची पुढील काळातील मुद्रित आवृत्त्यांशी तुलना करून सिद्ध केलेली संहिता संशोधनाचा एक उत्तम नमुना आहे. ‘साहित्याभ्यासाची शैलीलक्ष्यी पद्धत’ (१९८१) हे पुस्तकही आधुनिक सैद्धान्तिक विवेचनामुळे महत्त्वाचे ठरते.

‘भाषाविज्ञान: वर्णनात्मक आणि ऐतिहासिक’ (१९८२) आणि ‘भाषाविज्ञानपरिचय’ (१९८५) ही सहसंपादने डॉ. मालशे यांच्या अभ्यासाचा वेगळा पैलू दाखविणारी आहेत. महाराष्ट्र साहित्य परिषदेचा ‘मराठी वाङ्मयाचा इतिहास’, खंड दुसरा, भाग १ व २ (१९८२) हे संपादनही डॉ. मालशे यांचे संपादनकौशल्य दाखविणारे आहे.

संशोधनपर नियतकालिकांचे दर्जेदार विशेषांक काढणे हे संपादकापुढे एक आव्हान असते. महाराष्ट्र साहित्य पत्रिकेचा ‘श्री. कृ. कोल्हटकर विशेषांक’ (१९७१) आणि ‘साहित्यसम्राट न. चिं. केळकर विशेषांक’ (१९७२) पाहिले की हे आव्हान डॉ. मालशे यांनी समर्थपणे पेलले आहे, हे लक्षात येते.

डॉ. मालशे यांच्या लेखनाचा आणखी एक पैलू म्हणजे ‘काझीचा न्याय’ (१९६४), ‘ऊस घरातला गुरगुऱ्या’ (१९७७), ‘चतुर गणपतराय’ (१९७७), ‘जादूचा ढोल’ (१९७७) इ. रूपांतरित बाल-लोककथा होत.

– डॉ. नंदा आपटे

## माळी, गजमल नारायणराव

**कवी**

**१५ मार्च १९३४**



गजमल नारायणराव माळी यांनी मराठी विषय घेऊन एम.ए. ही पदवी मिळवली. त्यांनी अनेक संस्थांमधून उपाध्यक्ष, अध्यक्ष अशी पदे भूषविली आहेत. प्रारंभी ते एस.एस.सी. बोर्डात क्रमिक पुस्तक मंडळाचे सदस्य होते. पुढे ते महाराष्ट्र राज्य तमाशा परिषदेचे उपाध्यक्ष झाले. त्यानंतर मराठवाडा साहित्य परिषदेचे अध्यक्ष, अखिल भारतीय मराठी साहित्य महामंडळाचे अध्यक्ष, म. जोतिबा फुले शिक्षणसंस्थेचे अध्यक्ष, औरंगाबाद येथील

सत्यशोधक समाजसंस्थेचे अध्यक्ष, सावित्रीबाई फुले ग्रामीण प्रतिष्ठानचे अध्यक्ष; औरंगाबादच्या पं. जवाहरलाल नेहरू महाविद्यालयाचे प्राचार्य अशा पदांवर राहून त्यांनी कार्य केलेले आहे.

साहित्यिक म्हणून त्यांचे लेखन थोडे असले, तरी लक्षणीय आहे. डॉ. बाबासाहेब आंबेडकर मराठवाडा विद्यापीठाने विद्यार्थ्यांच्या अभ्यासासाठी जगद्‌गुरू तुकाराम महाराजांचे निवडक असे शंभर अभंग नेमले होते. त्या अभंगांचा अर्थ, त्यांचे विवेचन आणि तुकोबांचे चरित्र देऊन 'तुकारामांचे निवडक शंभर अभंग' या नावाचे पुस्तक माळींनी संपादित केले.

'गंधवेणा' हा प्रा. माळी यांचा कवितासंग्रह आणि 'कामायनी' ही लघुकादंबरी आहे. 'राष्ट्रीय काँग्रेस आणि सत्यशोधक समाज' हा त्यांचा समाजशास्त्र आणि राज्यशास्त्र या विषयांवरील ग्रंथ आहे. याशिवाय त्यांनी 'लोकसाहित्य शब्दकोश'ही तयार केलेला आहे.

त्यांची मनाला चटका लावणारी कृती म्हणजे 'नागफणा आणि सूर्य' हे दीर्घकाव्य! कवीने आपल्या मनात सामाजिक विषमतेमुळे झालेला अन्याय त्याच्या ओल्या जखमा जाणल्या होत्या. आपल्या तीसएक वर्षांच्या परीटघडीच्या जीवनात झाकून ठेवल्या होत्या. पण मराठवाडा विद्यापीठाच्या नामविस्ताराच्या वेळी जे आंदोलन झाले; त्यामुळे त्या जखमा उघड्या झाल्या. कवीच्या गरीब पित्याचे शेतीतील आणि आईचे घरातील कष्ट, आंदोलनकाळात दलितांवर झालेले अत्याचार यांतून कवीच्या मनात साठलेले दुःख बाहेर पडले.

या दीर्घ काव्याचे तीन भाग आहेत. पहिल्या भागात मराठवाड्याची परंपरा सांगितलेली आहे. दुसऱ्या भागात कवीच्या आईवडिलांचे आणि एकंदरच दलितांचे अंधारलेले कष्टमय जीवन यांचे वर्णन आलेले आहे, आणि तिसऱ्या भागात मराठवाडा विद्यापीठाच्या नामविस्ताराच्या वेळी दलितांवर झालेल्या अत्याचारांचे वर्णन आलेले आहे. कवीला या सर्वांचे कमालीचे दुःख आहे. पण त्याच्या मनात प्रस्थापित समाजव्यवस्थेविरुद्ध विद्रोह करावा, अशी भावना नाही. कारण सामाजिक संघर्षाची परिणती मानवतेत व्हावी, असे त्यांना वाटते. अशा रीतीने आपल्या मर्यादित साहित्यसंपदेद्वारा प्रा. माळी यांनी मनावर ठसा उमटविला आहे.

– शशिकांत मांडके

## मित्र, काशीनाथ रघुनाथ

**अनुवादक, संपादक**

**२ नोव्हेंबर १८७१ – २३ जून १९२०**



काशीनाथ रघुनाथ मित्र हे रत्नागिरी जिल्ह्यातील सावंत–वाडीजवळील आजगावचे. त्यांचे मूळ आडनाव 'आजगावकर' असे होते. १८९३ साली ते मुंबईला आले आणि १८९५ साली बा.स. कुलकर्णी यांच्या साहाय्याने त्यांनी मुंबईत 'मासिक मनोरंजन'ची सुरुवात केली.

टागोरांना याच काळात नोबेल पारितोषिक मिळाले होते. शरच्चंद्र चटर्जींच्या कादंबऱ्यांनी वाचक मोहीत होत होता. स्वतः आजगावकर, वि.सी.गुर्जर, भा.वि.वरेरकर यांनी बंगाली भाषा शिकून घेतली होती आणि आपापल्यापरीने बंगाली कथा–कादंबऱ्यांची रूपांतरे केली होती. 'मासिक मनोरंजन'मध्ये असे लेखन प्रकाशित होत होते. दिवाकर कृष्ण, कॅप्टन गो.गं.लिमये या तत्कालीन कथाकारांच्या लेखनावर बंगाली साहित्याचा दाट प्रभाव जाणवतो. आजगावकरांनी तर बंगाली भाषेच्या प्रेमापोटी आपले 'आजगावकर' हे आडनाव बदलून त्याऐवजी 'मित्र' हे घेतले.

आजगावकरांवर सुधारणावादी विचारांचा पगडा होता. विशेषतः स्त्रियांनी शिक्षण घेतले पाहिजे, त्यांनी कुटुंबाबद्दल, कुटुंबातील व्यक्तींच्या व स्वतःच्या आरोग्याबद्दल, स्वतःच्या लेखनाबद्दलही जागरूक असायला हवे, अशी त्यांची धारणा होती. त्यामुळे 'मासिक मनोरंजन' हे प्रायः स्त्रियांना डोळ्यांसमोर ठेवून जन्माला आलेले होते. 'यत्र नार्यस्तु पूज्यन्ते रमन्ते तत्र देवताः' असे

म

त्याचे घोषवाक्य असे. 'प्रिय भगिनींनो, आपल्या सुशिक्षित भगिनींजवळ 'मनोरंजन'ची शिफारस कराल ना? आपल्या मैत्रिणींकडून 'मनोरंजन'ला उत्तेजन द्याल ना? 'मनोरंजन' आपले उपकार विसरणार नाही.' किंवा, 'कुल-स्त्रियांच्या लेखास योग्य उत्तेजन देण्यात येईल. आपल्या स्त्री-समाजामध्ये लेखक-स्त्रिया तयार व्हाव्यात अशी 'मनोरंजना'ची मनापासून इच्छा आहे,' असे ते निवेदन करीत.

'मनोरंजन'मध्ये कोणत्या प्रकारच्या लेखनाला स्थान मिळेल हे स्पष्ट करताना, '...लेख, कविता वगैरे सर्व मजकूर आबालवृद्धांस, विशेषतः स्त्रीवर्गास रुचेल, हितकर होईल असा सुबोध आणि सोप्या भाषेत असावा. प्रचलित राजकीय विषयांवरील, सामाजिक बाबतीत प्रगतीपर उदार धोरणाविरुद्ध, त्याचप्रमाणे पारिभाषिक शब्दांना दुर्बोध झालेले, अगर नीरस, अश्लीलता या दोषांनी दूषित अशा लेखांस 'मनोरंजना'त केव्हाही स्थान मिळणार नाही.'

इथे त्यांना नेमके कोणत्या प्रकारचे साहित्य वाचकांना द्यायचे व कोणत्या प्रकारचे द्यायचे नाही, याविषयी निश्चित व ठोस असे भान होते हे कळते.

'मनोरंजना'च्या ध्येयधोरणाविषयी त्यांनी लिहिले आहे की, 'पाश्चात्त्य देशात जी-जी म्हणून श्रेष्ठ दर्जाची मासिक पुस्तके आहेत, त्यांच्या सर्व बाबतींत 'मनोरंजना'ची बरोबरी व्हावी, अशी आमची उत्कट इच्छा असून हे ध्येय साधण्यासाठी, त्या दिशेने आजपर्यंत... आम्ही यथाशक्ती व यथासाध्य शिकस्तीचे प्रयत्न करीत आलो आहोत आणि यापुढेही अशा प्रकारच्या प्रयत्नात आमच्याकडून कोणत्याही बाबतीत कसलीच कसूर होणार नाही, अशी आमच्या प्रिय आश्रय-दात्यांना व वाचकांना आम्ही खात्री देतो. ''Best at any price'' काय वाटेल ते मोल देऊन, उत्तम तेवढे मिळवून वाचकांना अर्पण करावयाचे' हे कित्येक उच्चप्रतीच्या आंग्ल मासिक पुस्तकांचे तत्त्व पूर्णपणे कृतीत उतरविण्याची 'मनोरंजना'ची महत्त्वाकांक्षा असून या कामी आमच्या प्रिय महाराष्ट्र बंधुभगिनींनी आम्हांला प्रेमाने, कळकळीने व सहानुभूतीने शक्य ते साहाय्य करण्याची कृपा करावी, अशी त्यांना आमची नम्र विनंती आहे.' या कामात त्यांनी विठ्ठल जिवाजी नाडकर्णी (१९१०), वि. सी. गुर्जर आणि एकनाथ पांडुरंग रेंदाळकर (१९१३) यांची साहाय्यक संपादक म्हणून मदत घेतली होती. काशीनाथपंतांच्या मृत्यूनंतर, पुढे काही वर्षांनी, जुलै १९२८ पासून मालती काशीनाथ मित्र (संपादक), दामोदर रघुनाथ मित्र (साहाय्यक) अशी व्यवस्था होती. 'मनोरंजना'चे नेहमीचे अंक काढताना लहान-मोठ्या व ठिकठिकाणच्या लेखक-लेखिकांच्या लेखनाला त्यांनी आवर्जून स्थान दिले; वेगवेगळे वाङ्मयप्रकार आणि भिन्न-भिन्न सदरे दिली. 'नाटक्याचे तारे', 'सुदाम्याचे पोहे', 'आनंदीबाई जोशी', 'बाळकराम', 'आमच्या स्त्रियांचे शिक्षण व सुधारणा', 'सुखाचा शोध' अशा लेखनमाला प्रसिद्ध करण्यावर ते भर देत असत. स्वतंत्र वा अनुवादित कथा-कादंबऱ्या क्रमशः देण्यावरही त्यांचा भर राहिला. त्यांच्यासमोर उत्तमोत्तम पाश्चात्त्य नियतकालिके असावीत हे तर उघड आहे आणि त्यांच्या तुलनेत मनोरंजन कुठेही कमी पडू नये याकडे त्यांचे विशेष लक्ष राहिले. कथेबरोबर कथालेखकांची नावे छापण्याला मित्र यांनीच सुरुवात केली.

का. र. मित्र यांनी 'धाकट्या सूनबाई' (दुसरी आवृत्ती, १९०२), 'मृणालिनी' (दुसरी आवृत्ती, १९०५), यांसारख्या बंगाली कादंबऱ्या; 'बंगजागृती अथवा जागा झालेला बंगाल' (१९०६) हे बंगाली नाटक तसेच 'प्रियंवदा' (चौथी आवृत्ती, १९१७) ही गुजराती कादंबरी यांचे अनुवाद केले होते. 'लक्ष्मणमूर्च्छा आणि रामविलाप' (१८९६) हा त्यांचा स्वतंत्रपणे लिहिलेला ग्रंथ आहे.

वेगवेगळे प्रयोग करीत राहणे हे त्यांचे वैशिष्ट्य राहिले. 'वसंत विशेषांक', 'दिवाळी अंक', 'दिल्ली दरबार अंक', 'आगरकर अंक', 'अण्णासाहेब कर्वे अंक' यांसारखे विशेषांक त्यांनी काढले. दिवाळी अंकाची प्रथा सुरू करण्यात त्यांचा मोलाचा वाटा होता.

'मनोरंजन'च्या काळात हरिभाऊंच्या स्फुट गोष्टीचे स्वरूप बदलले. ती संपूर्ण गोष्ट झाली. 'मनोरंजन'मधून अशा संपूर्ण गोष्टी प्रसिद्ध होऊ लागल्या. त्यामुळे मराठी कथेच्या इतिहासात 'मनोरंजन'ची कामगिरी मोलाची ठरते आणि तिचे सारे श्रेय काशीनाथपंतांना द्यायला हवे.

काशीनाथपंतांनी 'मनोरंजक ग्रंथप्रसारक मंडळी', असे प्रकाशन सुरू केले होते व त्याच्याद्वारे त्यांनी काही पुस्तकेही प्रकाशित केली होती. त्यांपैकी एक म्हणजे त्यांनी १९१५च्या सुमारास धोंडो केशव कर्वे यांच्याकडून आत्मचरित्रात्मक लेख लिहून घेऊन तो 'मनोरंजन'मध्ये प्रसिद्ध केला होता व त्यात त्यांना पुढे भर टाकायला सांगून 'आत्मवृत्त' हे अण्णांचे आत्मचरित्र प्रथम प्रकाशित करण्याचा मान देवविला होता.

स्वतः काशीनाथरावांचा समकालीन ज्येष्ठ व कनिष्ठ लेखकांशी जिव्हाळ्याचा संबंध राहिला. त्यामुळे नामदार गोखले, मोती बुलासा यांच्या मृत्यूनंतर त्यांनी अप्रतिम मृत्युलेख लिहिल्याचे दिसून येते.

१९०९ साली मराठीतला पहिला दिवाळी अंक प्रकाशित करतानाही 'इंग्लिश, अमेरिकन वगैरे पाश्चात्त्य मासिक पुस्तकांच्या 'ख्रिसमस नंबर'च्या धर्तीवर या वर्षी आम्ही 'मनोरंजना'चा 'दिवाळी अंक' प्रसिद्ध करण्याचे साहस केले', असे त्यांनी लिहिले आहे. याचा अर्थ त्या काळात मुंबईत जी-जी पाश्चात्त्य नियतकालिके येत होती, ती-ती ते पाहत होते व 'मनोरंजन'चा दर्जा व स्वरूप तसा कसा राहील, यावर त्यांचा कटाक्ष असे. त्यामुळे 'मनोरंजन'मध्ये वेगवेगळे विषय, वेगवेगळे वाङ्मयप्रकार, वेगवेगळे लेखक, कवी, चित्रकार यांचे अनोखे संमेलन आढळते, त्याला कारण काशीनाथरावांची त्यासंबंधीची चिवट जिद्द नि अथक प्रयत्न होत.

त्यांच्या १९२० साली झालेल्या मृत्यूनंतरही १९३५ पर्यंत ते मासिक चालू राहिले; कारण काशीनाथरावांनी त्याची केलेली व्यवस्थित आखणी होय. ते केवळ संपादक, प्रकाशक नव्हते, त्यांनी स्वतः काही स्वतंत्र आणि अनुवादित लेखनही केले होते. मराठी साहित्यविश्वावर काशीनाथरावांचा ठसा निश्चितपणे आढळतो.

— सुखदा कोरडे

**संदर्भ :**

*१. 'मासिक मनोरंजन': मित्र स्मृती; जुलै १९२०.*

## मिरजकर, निशिकांत धोंडोपंत

**समीक्षक, तौलनिक साहित्याचे अभ्यासक**

**४ डिसेंबर १९४२**



तौलनिक साहित्याभ्यासाचे प्रध्यापक आणि अनुवादक निशिकांत धोंडोपंत मिरजकर यांचा जन्म कोल्हापूर येथे झाला. पुणे येथील राजा धनराजगिरजी हायस्कूलमधून शालान्त परीक्षा उत्तीर्ण झाल्यानंतर १९६२ साली नौरोसजी वाडिया महाविद्यालय पुणे येथून ते बी. एस्सी. झाले. त्यानंतर त्याच महाविद्यालयातून १९६४ साली मराठी व संस्कृत हे विषय घेऊन पुणे विद्यापीठाची बी. ए. आणि १९६६ मध्ये पुणे विद्यापीठाची एम. ए. या पदव्या प्रथम वर्गात प्रथम क्रमांकाने त्यांनी संपादन केल्या. बी. ए. च्या परीक्षेत सुवर्णपदक तर एम. ए. च्या परीक्षेत सर्व पारितोषिके त्यांनी मिळविली. त्यानंतरच्या काळात त्यांनी कऱ्हाड व सांगली येथे मराठीचे अध्यापन केले.

१९७८ मध्ये ते दिल्ली विद्यापीठातील आधुनिक भारतीय भाषा व साहित्याभ्यास विभागात मराठी आणि तौलनिक साहित्याभ्यास यांचे अध्यापन करू लागले. हे त्यांचे कार्य २००७ पर्यंत चालू होते. सहा वर्षे विभागप्रमुख व तीन वर्षे आर्ट्स फॅकल्टीचे डीन म्हणून त्यांनी काम केले. त्यांच्या लेखनाची सुरुवात काव्यलेखनाने झाली. तथापि मराठी वाचक त्यांना संतसाहित्याचे, आधुनिक मराठी साहित्याचे व तौलनिक साहित्याभ्यासाचे तज्ज्ञ म्हणून ओळखतात. 'श्रीनामदेव दर्शन' (१९७०), 'श्रीनामदेव चरित्र आणि काव्य' (१९७०), 'नामदेवांची अभंगवाणी' (१९७८) ही त्यांनी सहकार्याने केलेली संपादने त्यांच्या नामदेवाभ्यासाची ग्वाही देणारी आहेत. 'कवितेची रसतीर्थे' (१९८२), 'साहित्यगंगा: प्रवाह आणि घाट', 'साहित्य: रंग आणि अंतरंग' (२००९) हे त्यांचे समीक्षालेखांचे संग्रह. याशिवाय साहित्य अकादमीसाठी त्यांनी

म

कुसुमाग्रजांविषयीचा परिचयग्रंथ लिहिला आहे. समग्र कविताएँ: विनायक दामोदर सावरकर (स्वातंत्र्यवीर सावरकरांच्या कवितांचा काव्यरूप हिंदी अनुवाद) 'महाभारत एक चींटी का' (गंगाधर गाडगीळ यांच्या 'एका मुंगीचे महाभारत' या आत्मचरित्राचा अनुवाद) इत्यादी पुस्तके प्रकाशित झाली आहेत. भारतात व भारताबाहेर आंतरराष्ट्रीय चर्चासत्रांत त्यांनी संशोधनपर निबंधांचे वाचन केले आहे. मराठीतील वेगवेगळ्या नियतकालिकांतून त्यांचे समीक्षात्मक लेखन प्रसिद्ध झाले आहे. 'भारतीय भाषांतील स्त्री-साहित्याचा मागोवा' (१८५० ते २०००) खंड १ व २ या ग्रंथांचे ते सहसंपादक आहेत. त्यांच्या एकंदर साहित्यसेवेचा गौरव महाराष्ट्र साहित्यपरिषदेच्या वतीने करण्यात आला असून त्यांना कै. गं. ना. जोगळेकर पुरस्काराने सन्मानित केले गेले आहे.

– प्रा. डॉ. विलास खोले

## मिरासदार, दत्तात्रेय मारुती

**विनोदी कथाकार**

**१४ एप्रिल १९२७**



दत्तात्रय मारुती मिरासदार यांचा जन्म, बालपण तसेच शालेय शिक्षण पंढरपूर येथे झाले. पुण्याला येऊन त्यांनी पुढील शिक्षण घेतले. एम. ए., बी. टी. या पदव्या त्यांनी संपादन केल्या.

दै. तरुण भारत, दै. त्रिकाळ या वृत्तपत्रांमध्ये कामही त्यांनी केलेले आहे. १९६१ ते १९६९ या काळात पुण्यातील शाळांमधून अध्यापन, तर पुढे १९७७पर्यंत गरवारे कॉलेज ऑफ कॉमर्स, पुणे येथे मराठी विभाग-प्रमुख हे पद मिरासदार यांनी भूषविले.

१९५१ साली 'सत्यकथा' या वाङ्मयीन मासिकातून त्यांची 'रानमाणूस' ही पहिली कथा प्रसिद्ध झाली. त्यांचे एकूण २४ कथासंग्रह प्रसिद्ध झाले आहेत. 'माझ्या बापाची पेंड', 'विरंगुळा' या दोन कथासंग्रहांना महाराष्ट्र शासनाचे पारितोषिक मिळाले. याशिवाय 'भुताचा जन्म', 'हसणावळ', 'माकडमेवा', 'गुदगुल्या', 'भोकरवाडीच्या गोष्टी' इ. कथासंग्रह प्रकाशित झाले आहेत. द. मा. मिरासदार यांच्या निवडक कथांचा संग्रह 'मिरासदारी' तसेच 'निवडक द.मा.' अशा दोन स्वतंत्र संग्रहांमध्ये प्रसिद्ध झालेला आहे. शंकर पाटील, व्यंकटेश माडगूळकर यांच्यासह कथा-कथनाचे अनेक कार्यक्रम त्यांनी केले.

'सरमिसळ', 'गप्पांगण', 'बेंडबाजा', 'खडे-ओरखडे' हे त्यांचे विनोदी लेखसंग्रह होत. द. मा. मिरासदारांनी 'सुट्टी आणि इतर एकांकिका', 'गाणारा मुलूख' या कुमारांसाठी दोन नाटिका लिहिल्या आहेत. 'मी लाडाची मैना' हे त्यांचे वगनाट्य (१९७५) तसेच 'सोनियाचा दिवस' ही कादंबरी त्यांनी लिहिलेली आहे. याखेरीज मिरासदारांनी अनेक मराठी चित्रपटांसाठी कथा-पटकथा-संवाद मिरासदारांनी केले आहे.

द. मा. मिरासदारांनी ग्रामीण विनोदी कथांचे लेखन केलेले आहे. व्यंकटेश माडगूळकरांनी खेड्यातील दुःख, दारिद्र्य यांच्यासह जगणाऱ्या सोशिक माणसांचे जग त्यांच्या कथांमधून उभे केले. परंतु, द. मा. मिरासदार यांनी हास्यकथेच्या अंगाने ग्रामीण कथेला पुढे नेण्याचे काम केले. दारिद्र्य, दुःख घेऊन जगणारी माणसे जिवाला चार घटका विरंगुळा मिळावा म्हणून हसत असणार. माणसाच्या चेहऱ्यावर उमटणारे 'हास्य' ही त्याची वैशिष्ट्यपूर्ण ओळख आहे हे लक्षात घेऊन मिरासदारांनी ग्रामीण जीवनातील हास्य-विनोद शोधण्याचा प्रयत्न कथांमधून केला.

खेडेगावातल्या माणसांनी आनंद मिळविण्यासाठी, मनोरंजनासाठी गावातल्या चावडीवर, पारावर एकत्र जमून जमवलेला गप्पांचा फड हा खेडेगावातल्या माणसांनी आनंद मिळविण्यासाठी, मनोरंजनासाठी शोधलेला सहज, सोपा मार्ग असतो. या अघळपघळ गप्पांमध्ये माणसाच्या अंगी असलेल्या वात्रटपणा, फाजीलपणा, प्रसंग रंगवून सांगण्याची हौस, अतिशयोक्ती, ग्रामीण इरसाल शिव्या या सर्व गुणांचा मुक्तपणे आविष्कार होत असतो. दुसऱ्याच्या

प्रत्यक्ष घडलेल्या घटनेचा आधार घेऊन, एक नवीनच मध्यवर्ती घटना घेऊन मिरासदारांनी कथा लिहिलेल्या आहेत. या मध्यवर्ती घटनेशी एकरूप झालेला भोवतालचा परिसर, कथेतली माणसे, वातावरणनिर्मिती यांच्या एकत्र परिणामातून संपूर्णपणे नवीन ग्रामीण कथा मिरासदारांनी लिहिली. त्यांच्या कथेत असणारी मुख्य घटना, त्या घटनेमध्ये सहभागी असणारी माणसे, त्यांचे विशिष्ट असे स्वभाव, त्या स्वभावांमुळे घडणारे गमतीदार प्रसंग, माणसांच्या वैशिष्ट्यपूर्ण स्वभावांतून व्यक्त होणाऱ्या मानवी वृत्ती, प्रवृत्ती, यांचे चित्रण केलेले दिसते. द. मा. मिरासदारांच्या ग्रामीण विनोदी कथांमध्ये त्यांच्या स्वतंत्र कल्पनाशक्तीमधून जन्माला आलेले प्रसंग कथेमध्ये विनोद उत्पन्न करतात. कथेतल्या एखाद्या पात्राची होणारी फजिती, साक्षीदार असणारी दुसरी पात्रे त्या माणसाच्या फजितीला हसतात. हसताहसता आपणही इतरांच्या दृष्टीने कसे आणि कधी हास्यास्पद झालो, हे माणसांच्या लक्षात येत नाही. मिरासदारांच्या कथांमध्ये एका व्यक्तीकडून पसरत जाणारी हास्याची लाट कथेमध्ये जिवंतपणा आणते. 'बापाची पेंड', 'नव्याण्णवबादची सफर' यांसारख्या त्यांच्या कथा त्या दृष्टीने वाचण्यासारख्या आहेत.

अतिशयोक्ती, उपहास, स्थानांतर, प्रसंगनिष्ठ विनोद, स्वभावनिष्ठ विनोदही सर्व विनोदी लेखनाची वैशिष्ट्ये त्यांच्या कथांमध्ये आढळतात. त्यांच्या कथेतला प्रसंग सहजगतीने उलगडत जातो. त्यात नाट्यमयता, दृश्यमयता, कथेला नवी कलाटणी देणारा प्रसंग, त्यातील अनपेक्षितपणा कथेच्या निवेदनातून जपलेला असतो. कथेचे निवेदन रंजक, वाचकाच्या मनातील कुतूहल जागे ठेवणारे, अधूनमधून मार्मिक टिप्पणी करणारे, आटोपशीर असे असते.

भानगडी जाणून घेण्याची उत्सुकता, चार जणांमध्ये बसून नेहमीपेक्षा वेगळी काहीतरी घटना सांगताना बोलण्याचा खास ढंग, हावभाव, हातवारे या साऱ्याच गोष्टी या शिळोप्याच्या गप्पांमध्ये जिवंतपणा आणतात.

द. मा. मिरासदार यांना कथालेखनाची प्रेरणा गावातला सुस्त कारभार, गावात जमणाऱ्या गप्पांच्या अड्ड्यांमधून मिळाली. मिरासदारांचे वडील व्यवसायाने वकील असल्याने गावातल्या नाना भानगडींचा काथ्याकूट घरी येणारी पत्रकार माणसे करीत असत. त्यामुळे खेडेगावाची नमुनेदार माणसे त्यांना जवळून पाहायला मिळाली. परंतु हा सगळा त्यांच्या कथांना मिळणारा कच्चा माल होता, असे म्हणता येईल.

प्रत्यक्ष पाहिलेले, ऐकलेले काही प्रसंग, भेटलेली नमुनेदार माणसे यांना मिरासदारांच्या कथेत नवे रूप लाभले. त्यांचे कथालेखन स्वतंत्र वळणाने घडत गेले

म

ग्रामीण कथेचे निवेदन प्रमाणभाषेत, तर संवाद खास ग्रामीण बोलीभाषेतले असतात. या संवादांमध्ये बोलीभाषेतले खास ठेवणीतले, इरसाल ('निवडक' या अर्थाने) शब्द, शब्द उच्चारणातला ठसका, बोलीभाषेतल्या म्हणी-वाक्प्रचार आणि पात्रांशी एकरूप झालेली भाषा हे सारे गुण आढळतात. मिरासदारांनी ग्रामीण जीवनाची पार्श्वभूमी घेऊन व्यक्त होणाऱ्या माणसांच्या वृत्ती-प्रवृत्तींचा आविष्कार मनोरंजन करणाऱ्या ग्रामीण विनोदी कथांचे लेखन करताना रंजकतेने मांडला आहे.

– प्रा. रूपाली शिंदे

**संदर्भ :**

१. *सबनीस वसंत; 'पंढरपुरचा विनोदाचा मिरासदार'; नवशक्ति- ११ एप्रिल १९९८.*
२. *बनकर बादाडे सुरेखा; 'कथाकार द.मा.'; मुंबई सकाळ-११ एप्रिल १९९८.*

## मुक्तिबोध, शरच्चंद्र माधव

**कवी, समीक्षक, कादंबरीकार**

**२१ जानेवारी १९११ – ३१ ऑक्टोबर १९८४**



मार्क्सवादी जाणिवेचे मराठी-तील एक प्रमुख साहित्यिक शरच्चंद्र मुक्तिबोध यांचा जन्म इंदूरला झाला. त्यांचे शिक्षण एम. ए., एलएल. बी. पर्यंत झाले आणि नागपूरच्या मॉरिस महाविद्यालयामध्ये त्यांनी अध्यापन केले. मार्क्सवादी वैचारिक आणि सैद्धान्तिक अधिष्ठानावर ललित लेखन आणि समीक्षात्मक / वैचारिक लेखन करून शरच्चंद्र मुक्तिबोधांनी मराठी साहित्यविश्वात स्वतःचे आगळेवेगळे स्थान निर्माण केले आहे.

'नवी मळवाट' हे त्यांचे कवितेचे पहिले पुस्तक १९४९ मध्ये प्रकाशित झाले. पहिली कादंबरी 'क्षिप्रा' ही १९५४ मध्ये प्रकाशित झाली आणि पहिले समीक्षात्मक पुस्तक 'काही निबंध' १९६२ मध्ये प्रकाशित झाले.

आपल्या लेखनाच्या पूर्वपर्वातच शरच्चंद्र मुक्तिबोधांनी कविता, कादंबरी आणि समीक्षा या प्रांतांत आपला अधिकार प्रस्थापित केला होता. ह्या तिन्ही वाङ्मयात मुक्तिबोध एकाच वेळी लेखन करीत होते. मुक्तिबोधांच्या कवितेची आणि वाङ्मयीन प्रकृतीची जातकुळी तपासून पाहायची झाल्यास पुढील कविता अधिक अर्थघन म्हणून दाखविता येईल.

'फाडीन या तमाचे मी पटावरी पट
गिळीन या विषाचे मी घटावरी घट
या तमपटाआड विश्वसुंदरी उदास
तिच्या पदचुंबनेच ज्वराचा निरास'
('नवी मळवाट', पृ.७)
किंवा
'फोडा ते घुमट खुले निंच खुल्या क्षितिजाचे
राख करा श्यामसूर्य गेल्या जुन्या जमान्याचे
पेटवा पेटवा सारी उरातली अडगळ
चेतवा चेतवा उरी जीवनाची तळमळ'
('नवी मळवाट', पृ.७६)

या कवितेतून व्यक्त होणारी क्रांतिप्रवणता, मार्क्सवादी विचारांशी असलेली बांधीलकी हा त्यांच्या पुढील कवितेत विकसित होणारा धागा होता.

'नवी मळवाट' नंतर त्यांचा 'यात्रिक' हा दुसरा कवितासंग्रह १९५७ मध्ये प्रकाशित झाला. हा काळ म्हणजे मर्ढेकरांच्या कवितेने भारावलेला आणि नवसाहित्याच्या उभारीचा असा काळ होता. विशेष म्हणजे, मार्क्सवादी कवितेशी ज्या कवीचे नाते सांगितले जाते, त्या विंदा करंदीकरांच्याही काव्यलेखनाचा हाच काळ होता.

'सत्याची जात' (१९९८) हा मुक्तिबोधांचा तिसरा व अखेरचा कवितासंग्रह त्यांच्या मृत्यूनंतर प्रकाशित झाला. मुक्तिबोधांच्या एकूणच कवितेसंबंधीचे आकलन समोर ठेवत रा. भा. पाटणकर म्हणतात – 'मुक्तिबोधांचे स्वाभाविक क्षेत्र साहित्याचे. बांधीलकी मानणारे एक

म

ध्येयनिष्ठ लेखक हेच त्यांचे समर्पक व पर्याप्त वर्णन ठरेल. वाङ्मयात प्रतीत होणारे त्यांचे व्यक्तित्व एकमार्गी व मनस्वी असे आहे. अशा मनस्वी साहित्यिकाचा इतर प्रकारच्या साहित्यिकांशी विनिमय होणे कठीणच. म्हणून त्यांनी शेवटी शेवटी या प्रकारच्या साहित्यिकांपासून स्वतःला हद्दपार करून घेतले आहे.' (मुक्तिबोधांचे साहित्य, पृ.१७०)

केवळ कविताच नव्हे, तर एकूणच वाङ्मयीन व्यक्तित्वाविषयीचे हे आकलन मुक्तिबोधांच्या संदर्भात अधिक बोलके ठरते. क्रांतिप्रवणता आणि मार्क्सवाद ही तत्त्वे त्यांच्या कवितेतून एकजिनसी स्वरूपात व्यक्त होताना दिसतात. त्यांच्या केवळ तीन कवितासंग्रहांनी मुक्तिबोधांना मराठी कवितेत अमर केले आहे.

त्यांच्या कवितेच्या संदर्भात हे विधान जसे खरे आहे, तसेच ते त्यांच्या कादंबऱ्या व समीक्षेच्या संदर्भातही खरे ठरते. 'क्षिप्रा' (१९५४), 'सरहद्द' (१९६१) आणि 'जन हे वोळतु जेथे' (१९६९) या तीन कादंबऱ्या– कादंबरीत्रयीच्या स्वरूपात लिहून मराठी कादंबरीला त्यांनी एका वेगळ्या वळणावर आणून ठेवले. मराठीतील रोमँटिक प्रकृतीच्या कादंबऱ्यांना फाटा देऊन ज्यांनी या कादंबरीला वास्तववादाच्या, वैचारिकतेच्या बैठकीवर उभी करण्याचे कार्य केले, त्यात शरच्चंद्र मुक्तिबोधांचा मोठा वाटा आहे.

मार्क्सवादाचे वैचारिक अधिष्ठान ज्या काही मोजक्या मराठी कादंबऱ्यांना प्राप्त झाले, त्यांपैकी मुक्तिबोधांच्या कादंबऱ्यांचा अव्वल म्हणून विचार करावा लागतो. याचबरोबर मराठीतील पहिली अशी कादंबरीत्रयी म्हणूनही सार्थपणे या कादंबऱ्यांचा विचार करावा लागतो. बिशू आणि मधू या दोन भावांच्या उमलत जाणाऱ्या, विकसित होणाऱ्या व्यक्तिमत्त्वाचा आलेख 'क्षिप्रा', 'सरहद्द' आणि 'जन हे वोळतु जेथे' या कादंबऱ्यांमध्ये चितारला आहे. मध्यप्रदेशातील इंदूर– उज्जैन या परिसरातील स्वातंत्र्यपूर्व काळातील समाजजीवन, या समाजजीवनाचे बदलते रंग या कादंबरीत्रयीमध्ये मुक्तिबोधांनी रेखाटले आहेत.

या कादंबऱ्यांचा लेखनकाळ हा जरी १९५४ ते १९६९ या पंधरा वर्षांतला असला, तरी यात येणारी वर्णने, कालिक मांडणी ही स्वातंत्र्याची चळवळ, दुसरे महायुद्ध या दरम्यानची आहे. तत्कालीन व्यक्ती आणि समष्टीच्या नात्याचा कलात्मक पातळीवरचा वेध मुक्तिबोधांनी या त्रयीच्या निमित्ताने घेतलेला आहे. मुक्तिबोध फक्त या तीन कादंबऱ्यांवरच थांबले. कदाचित, त्यांनी आणखी पुढे हे कादंबरीलेखन सुरू ठेवले असते तर त्यांनी गुणवत्तेने आणि वैचारिकदृष्ट्या संपन्न अशा कादंबऱ्या निश्चितच मराठीला दिल्या असत्या.

कविता आणि कादंबरी या वाङ्मयप्रकारांसोबतच मुक्तिबोधांनी समीक्षात्मक / वैचारिक प्रकृतीचेही लेखन 'काही निबंध' आणि 'सृष्टी, सौंदर्य आणि साहित्यमूल्य' या दोन पुस्तकांच्या माध्यमातून केले आहे. प्राचीन भारतीय साहित्यातील रससिद्धान्त आणि मर्ढेकरांचा लयसिद्धान्त या दोन्ही वैचारिक प्रवाशांना खोडून काढत मुक्तिबोधांनी मानुषतेचा सिद्धान्त 'सृष्टी, सौंदर्य आणि साहित्यमूल्य' या ग्रंथातून मांडला आहे.

समीक्षक म्हणून मुक्तिबोधांच्या एकूणच वाङ्मयीन पिंडाचा विचार करताना पुढील विधान अधिक अर्थपूर्ण असे आहे: 'कोणत्याही कलाकृतीचा जन्म एका व्यक्तीच्या मनात होत असला तरी तिचा वाङ्मयकृतीपणा जो प्राप्त होतो, तो कोणाच्याही व्यक्तिगत संदर्भातील तिच्या स्थानावर अवलंबून नसून समाजजीवनात रूढ असलेल्या वाङ्मयीन व सांस्कृतिक परंपरा, संकल्पनाव्यूह इत्यादीमधील तिच्या स्थानावर अवलंबून असतो. एकूण वाङ्मयाची समाजाभिमुखता लक्षात घेतल्यास यापुढे जाऊन असेही म्हणणे योग्य ठरेल, की वाङ्मयकृतीला तिचा वाङ्मयकृतीपणा देणाऱ्या वाङ्मयीन परंपरेलाच आकार देणाऱ्या समाजजीवनाला, समाजरूपी विशिष्ट – संपृक्त सामान्याला वाङ्मयसमीक्षेत व्यक्तिजीवनापेक्षा जास्त महत्त्व मिळणे योग्यच आहे.' (मुक्तिबोधांचे साहित्य: पृ.१८५) हे विधान मुक्तिबोधांच्या समष्टिप्रधान व्यक्तिमत्त्वाच्या संदर्भात अधिक बोलके आहे.

मुक्तिबोधांची ही वैचारिक बैठक जरी समष्टीच्या संदर्भात महत्त्वाची असली, तरी कला व समष्टी यांचे द्वैत हे मुक्तिबोधांनी कधीच नाकारले नाही. सामाजिक बांधीलकीच्यापलीकडचा विचार मुक्तिबोध एका वेगळ्या पातळीवर जाऊन करतात. तो विचारही खुद्द त्यांच्याच शब्दांत समजून घेणे अधिक महत्त्वाचा ठरावा. ते म्हणतात –

'जीवनपरिवर्तनाचे शास्त्र कळणे म्हणजे जीवन कळणे नव्हे. समस्येचे रूप कळणे म्हणजे माणूस कळणे नव्हे. मानवी जीवन हे चिरगतिशील, नित्यनूतन रूप धारण करणारे आहे. मानवी जीवनाचे व अनुभवाचे अनेक प्रकार व अनेक पातळ्या असू शकतात. कलावंतांचा संबंध मानवी जीवनाच्या सुखदुःखाशी असतो. तो जसा संकुचित असू शकणार नाही, तसाच तो प्रणालीपीडित व प्रणालीसीमितही असू शकणार नाही. उलट, कलावंताची साक्ष विचारप्रणालींनाही मोलाची व महत्त्वाची मानावी लागेल'. (नवी मळवाट : प्रस्तावना : पृ.३१)

कविता, कादंबरी आणि समीक्षेच्या क्षेत्रांत आपल्या नावाचा अमीट ठसा उमटविणाऱ्या या प्रतिभावंत लेखकाला त्यांच्या 'सृष्टी, सौंदर्य आणि साहित्यमूल्य' या समीक्षणात्मक ग्रंथासाठी १९७९ चा साहित्य अकादमीचा पुरस्कार बहाल करण्यात आला. समष्टीला प्राधान्य देणाऱ्या मुक्तिबोधांनी मात्र स्वतःला वाङ्मयीन संस्था, संमेलने, सोहळे यांपासून कटाक्षाने दूर ठेवले.

– डॉ. रवींद्र शोभणे

**संदर्भ :**

*१. पाटणकर, रा. भा.; 'मुक्तिबोधांचे साहित्य'; मौज प्रकाशन, मुंबई .*

म

## मुझुमदार, वासंती अरुण

### ललितलेखिका, कवयित्री

### ५ एप्रिल १९४० – ७ नोव्हेंबर २००३

ललित गद्य लेखन, कविता, चित्रकला, संगीत अशा सर्व कलागुणांनी संपन्न व्यक्तिमत्त्व लाभलेल्या वासंती मुझुमदार यांचा जन्म कऱ्हाड येथे झाला. अतिशय तरल व



संपन्न असे भावविश्व लाभलेल्या या कवयित्रीला चित्रकला व संगीत यांचेही देणे असल्याने त्यांच्या कवितेला व ललितलेखनाला एक वेगळी उंची लाभली होती. आपल्या नादपूर्ण व लयबद्ध शैलीने त्यांनी प्रथमपासूनच काव्य–रसिकांना भुरळ घातली होती. एम.ए.ही पदवी संपादन केल्यानंतर त्यांनी अधिक आत्मविश्वासाने काव्यलेखन केले. वासंती वळवडे या आपल्या पूर्वाश्रमीच्या नावानेच त्यांनी कविता लिहित. पुढे रसिकांचा प्रतिसाद मिळाल्यावर वळवडेचे मुजुमदार झाले. काहीसे गूढ, धूसर तरीही भावविभोर असे भावविश्व त्यांच्या काव्यातून प्रकटते. त्यांच्या काव्यलेखनावर इंदिरा संत यांचा प्रभाव होता.

'सहेला रे' (१९८३), 'सनेही' (१९९७) हे त्यांचे काव्यसंग्रह कृष्णाकाठच्या गावाचे व संस्कृतीचे दर्शन घडवणारे 'नदीकाठी' हा त्यांचा ललितलेखसंग्रह. 'रुची' (संगीत विशेषांक), 'श्री.पु.व्यक्ती आणि संपादक' (१९९३), 'साहित्याची भूमी' (१९९७) इत्यादी पुस्तकांचे संपादनही त्यांनी केले होते. वासंती मुझुमदार यांची पुस्तकांच्या मुखपृष्ठांवरची चित्रेही वाखाणण्यासारखी आहेत. 'इंडियन हेरिटेज' या ग्रंथांचे संपादन व सजावट वासंती मुझुमदार यांची आहे. मानवी नाती व त्यांचा परस्पर संबंध यांचे मनोज्ञ दर्शन त्यांच्या साहित्यात घडते. लेखकाच्या व कवीच्या मनातले भाव नेमकेपणाने चित्रात टिपण्याची ताकदही त्यांच्या कुंचल्यामध्ये होती. लेखणी व कुंचला यांचा दुर्मीळ संगम असणारे हे व्यक्तिमत्त्व ७नोव्हेंबर, २००३ रोजी काळाच्या पडद्याआड गेले.

– प्रा. सुहास द. बारटक्के

**संदर्भ :**

*१. 'साहित्य सूची'; डिसेंबर २००३.*
*२. 'ललित'; डिसेंबर २००३.*
*३. 'रूची'; जानेवारी २००४.*
*४. 'तारका' दिवाळी २००१.*

## मून, वसंत वामनराव

**संपादक, संशोधक**

**२२ जानेवारी १९३२ – १ एप्रिल २००२**



संपादन-संशोधनाला वाहून घेणारा सक्रिय कार्यकर्ता अशी वसंत मून यांची ओळख आहे. त्यांचा जन्म नागपूर येथे झाला. घरातील शैक्षणिक, संस्कारक्षम वातावरणात बालपण गेले. वाचनात गोडी निर्माण झाली. अभ्यासू वृत्ती मूळ होतीच. नागपूर येथेच शिक्षण झाले. एम.ए. झाल्यानंतर १९५५ मध्ये शासकीय सेवेत प्रवेश केला. १९५६ साली नागपूरला नायब तहसीलदार म्हणून काम केले.

डॉ. बाबासाहेब आंबेडकरांच्या साहित्याचा व बुद्ध धर्माचा अभ्यास व व्यासंग असल्याने त्यांच्या लेखनाचे व भाषणाचे खंड वसंत मून यांनी मोठ्या परिश्रमाने तयार केले. नायब तहसीलदार असताना डॉ. बाबासाहेब आंबेडकर यांच्या धम्मदीक्षाप्रसंगी एक शासकीय अधिकारी या नात्याने ते उपस्थित होते. नागपूर येथे त्यांच्या प्रयत्नातून 'डॉ. आंबेडकर रिसर्च इन्स्टिट्यूट' ही संस्था त्यांनी स्थापन केली. डॉ. बाबासाहेब आंबेडकर साहित्याच्या संपादन-संशोधन कार्याला वाहून घेणारा सक्रिय कार्यकर्ता अशी त्यांची ओळख सर्वश्रुत आहे.

वसंत मून यांनी बाबासाहेब आंबेडकर यांच्या विचारांची ओळख करून देणारे अभ्यासपूर्ण ग्रंथ लिहिले 'डॉ. आंबेडकरांचे नेतृत्व' (१९८६), 'आंबेडकर आणि धम्मक्रांती' (१९८६), 'जातिसंस्थेचे उच्चाटन' (१९८६), 'मध्यप्रांत वऱ्हाडातील आंबेडकरपूर्व दलित चळवळ' (१९८९), बुद्धधम्मातील अनात्मवाद' (१९८५) इत्यादी याशिवाय महाराष्ट्र शासनातर्फे डॉ. बाबासाहेब आंबेडकर यांच्या कार्याविषयीचे, त्यांच्या भाषणाविषयीचे संकलन लेखन असे एकूण अठरा खंड प्रकाशित झाले त्यात वसंत मून यांचा सिंहाचा वाटा आहे. वसंत मून यांनी लिहिलेल्या लहान-मोठ्या लेख व पुस्तिकाही प्रसिद्ध आहेत. त्यांनी 'वस्ती' हे त्यांचे आत्मकथनही पुस्तकरूपाने प्रसिद्ध केले आहे.

– डॉ. रजनी अपसिंगेकर

## मेश्राम, केशव तानाजी

**कवी, कथाकार, कादंबरीकार**

**२४ नोव्हेंबर १९३७ – २९ नोव्हेंबर २००७**



केशव मेश्राम हे सिद्धार्थ महाविद्यालय, मुंबई येथून एम.ए. (मराठी) झाले. त्यांना प्रारंभी मोलमजुरीची हलकी-सलकी कामे करावी लागली. नंतर महाविद्यालयीन शिक्षण घेत असताना त्यांनी रेल्वे खात्यात नोकरी केली. त्याच काळात 'रूपगंधा' नियतकालिकात काम केले. पुढे, महाविद्यालयीन शिक्षण पूर्ण होताच रेल्वे खात्यातील नोकरीचा राजीनामा देऊन ते महाड येथील डॉ. बाबासाहेब आंबेडकर महाविद्यालयात मराठीचे अधिव्याख्याता म्हणून रुजू झाले. तेथील एक वर्षाच्या नोकरीनंतर त्यांनी मुंबई येथे, महर्षी दयानंद सरस्वती महाविद्यालयात अध्यापनकार्य केले. मुंबई विद्यापीठाच्या मराठी विभागातही प्रपाठक व विभागप्रमुख म्हणून सेवा केल्यानंतर नोव्हेंबर १९९७ मध्ये ते सेवेतून निवृत्त झाले.

**चिंतनशील कवी**

वेगवेगळ्या साहित्यप्रकारांतून लेखन करणाऱ्या मेश्रामांचा मूळ पिंड कवीचा होता. 'कविता' हा त्यांचा विशेष आवडीचा साहित्यप्रकार. 'रहस्यरंजन' विशेषांकात त्यांची 'मेळा' ही पहिली कविता प्रसिद्ध झाली (१९५८). त्यानंतर त्यांनी सातत्याने काव्यलेखन केले. 'उत्खनन' (१९७७), 'जुगलबंदी' (१९८२), 'अकस्मात' (१९८४), 'चरित' (१९८९), 'कृतकपुत्र' (२००१), 'अनिवास' (२००५) हे त्यांचे काव्यसंग्रह प्रसिद्ध झाले. डॉ. सुमतेन्द्र नाडिग यांच्या मूळ कन्नड

म

भाषेतील चिंतनकाव्याचा त्यांनी 'दाम्पत्यगीता' हा मराठी भावानुवाद केला.

दलित कवितेच्या प्रारंभ काळातील एक प्रमुख कवी म्हणून त्यांचा उल्लेख होतो. सर्व प्रकारच्या अनुभवांना मोकळेपणाने सामोरी जाणारी त्यांची कविता असून पारंपरिक लयीतील, तसेच मुक्तछंदात्मक लयीतील काव्यलेखनातून त्यांचे काव्यमूल्य सिद्ध होते. समाजातील दैन्य, दारिद्र्य, विषमता व जीवनाच्या सर्वच क्षेत्रांतील अनास्था भाव हे त्यांच्या काव्यलेखनाचे विषय होत. नव्या पिढीच्या ध्येयशून्य तडजोडीची वेदनाही त्यांच्या काव्यात उमटलेली दिसते. म्हणूनच 'निसर्गाच्या विविध कळा – त्यांतल्या सर्व तरल छटांसह रंगवणाऱ्या मेश्रामांच्या लेखनात शहरी जीवनातील रूक्ष व कडवट अनुभव तीव्रपणे चित्रित झालेले आहेत,' असे शांता शेळके यांना वाटते.

सर्वच काव्यसंग्रहांतून सामाजिक दुःखाची आच व्यक्त होते. जीवनातील रूक्ष, कडवट अनुभव काव्यात मांडताना त्यांच्या शब्दांना तीक्ष्ण शस्त्राची धार येते. ते वृत्तीने आत्मरत असले तरीही त्यांची सामाजिक बांधीलकीशी निष्ठा होती. 'उत्खनन', 'जुगलबंदी' ह्या काव्यसंग्रहांमध्ये धर्मव्यवस्थेने लादलेल्या मानहानीच्या जीवनाविरुद्ध विद्रोहाचे भावप्रकटन आले आहे. 'चरित', 'कृतकपुत्र', 'अनिवास'मध्ये त्यांची प्रखर आंबेडकरवादी जाणीव व्यक्त होते. गतकाळाचे वास्तव नजरेसमोर ठेवून वर्तमानाला सामोरी जाणारी त्यांची कविता असून 'आत्मपीडेकडून आत्मशोधाचा प्रत्यय' हा त्यांच्या कवितेचा स्थायिभाव आहे.

म

'हकिकत' आणि 'जटायू' (१९७२) व 'पोखरण' (१९७९) ह्या प्रसिद्ध कादंबऱ्या आहेत. 'हकिकत'मध्ये 'स्व'चे वास्तवदर्शन, तर 'जटायू'मध्ये अंधश्रद्धेला बळी ठरणाऱ्या अस्पृश्य वर्गातील तरुणाच्या मनाची घुसमट दिसते. समाजव्यवस्थेतील जळजळीत अनुभवांची मांडणी त्यात आहे. 'हकिकत' आत्मनिवेदनाचा घाट असलेली, तर 'जटायू', 'आम्ही'च्या समूहभावाने निवेदित होत जाणारी अभिव्यक्ती. 'जटायू' हे एक मिथ आहे. (दुर्बल घटकांसाठी रक्तबंबाळ होणारा रामायणातील 'जटायू'– मिथ.) 'हकिकत आणि जटायू' ही कलाकृती आत्मकथन, स्वकथन, दीर्घकथा की कादंबरी?, असा प्रश्न पडतो. परंतु, ही कलाकृती म्हणजे आत्मकथा निवेदन करणारी कादंबरीच होय.

'पोखरण' ही दुसरी कादंबरी. या कादंबरीत आर्य – अनार्य अशा दोन विचारसरणींची मांडणी केली आहे. धम्मिल हा आर्य संस्कृतीचा प्रतिनिधी. जामालिन ही अनार्यांचे प्रतिनिधित्व करणारी टोळी. टोळी समूहाने राहणारा आदिम समाज आपली वसाहत कशी तयार करतो आणि आपल्या संस्कृतीचे रक्षण कसे करतो, याचे या कादंबरीत दर्शन होते. 'आदिम प्रवृत्तीच्या असंस्कृत लोकांतील आत्मशोधाच्या जाणिवेतून दलितत्वाचा शोध' हे या कादंबरीचे सूत्र आहे. यालाच 'पुरावास्तवाच्या शोधाचे' सूत्रही म्हणता येईल. ह्या दोनही कादंबरी लेखनाच्या प्रयोगामुळे मेश्रामांचे मराठी दलित कादंबरी विश्वातील स्थान अढळ झाले आहे.

त्यांचे 'खरवड', 'पत्रावळ', 'धगाडा', 'मरणमाळा', आदि नऊ कथासंग्रह प्रसिद्ध आहेत. या कथालेखनात सामाजिक विषमता, अस्पृश्यता, अन्याय – अत्याचार, अपमान, विटंबना, अवहेलना, गुन्हेगारी अशा वास्तवाचे चित्रण आहे. त्यातून दलितत्वाची जाणीव प्रामुख्याने अभिव्यक्त झालेली आहे.

याशिवाय 'सातपुड्यातील खजिना' (१९७८) हा त्यांचा बालकथासंग्रह प्रसिद्ध आहे. प्रा.म.द. हातकणंगलेकर यांनी मेश्रामांच्या निवडक कथांचा 'ज्वाला कल्लोळ' (१९९६) हा संग्रहही संपादित केला आहे. मेश्रामांच्या सर्वच कथांतून समाजवास्तवाचे दर्शन घडते.

'छायाबन' (१९७३), 'रुतलेली माणसे' (१९८२), 'गाळ आणि आभाळ' (१९७९), 'गळतीचे क्षण' (१९९७), 'ओलाव्याचे ठसे' (२००४) इत्यादी ललितगद्यसंग्रहातून दलित जीवनातील दुःखपूर्ण अनुभवाच्या आकांताची मांडणी असली तरी त्यात एक भावस्पर्शी काव्यात्मता आहे. हे ललितगद्य वाचताना

ही रिकामी धर्मशाळा
आश्रयाला मीच आलो
येथला वाटा मिळाला
तृप्त झालो! तृप्त झालो!

- केशव मेश्राम...

आठरा वर्षांचा हा अवघा कालखंड. अनेक बरेवाईट प्रवाह मनाच्या कातळावर धडका मारू लागतात. माझी किती रूपे मी नित्य नव्या डोळ्यांनी न्याहाळतो. माझ्यात अनेकांना बघतो. कधी मी एकदम नवा वाटतो, तर केव्हा आदिपुरुषाइतका जुनाट. चौथ्या वर्गात नापास झाल्यावर केविलवाणा बनलेला, महात्म्याच्या मृत्यूची वार्ता ऐकणारा मी. कुणाची चैन, खिशातून आणलेल्या चपात्या, रिक्शा, स्मशान, प्रवास... मित्राच्या घरी महार ठरलेला मी.

'हकिकत व जटायू' या कादंबरीतून
पृष्ठ ८०

- केशव मेश्राम...

'गद्यकाव्य' वाचत असल्याचा प्रत्यय येतो. ह्या ललित निबंधात चिंतनशीलता, आत्मपरता, उत्कटता, कल्पनारम्यता व सौंदर्यदर्शन इत्यादी गुणांचा मेळ असल्याचे प्रत्ययास येते.

**समाजदृष्टिकोनातून समीक्षा**

मेश्रामांची 'समन्वय' (१९७९), 'शब्दांगण' (१९८०), 'बहुमुखी' (१९८४), 'प्रश्नशोध' (१९७९), 'साहित्य-संस्कृती मंथन', 'साहित्य प्रवर्तन', 'प्रतिभा स्पंदने' आदी समीक्षेची ग्रंथसंपदा आहे. ह्या समीक्षाग्रंथात संत साहित्य, दलित साहित्य, नवसाहित्य, आधुनिक साहित्य, ग्रामीण साहित्य, शाहिरी वाङ्मय, धर्म संकल्पना, समाज परिवर्तनाची बदलती दिशा, साहित्यातील तात्त्विक, सैद्धान्तिक व आस्वादनाच्या पातळीवरचे हे समीक्षालेखन आहे. त्यांची समीक्षादृष्टी जशी आस्वादकाची, तशीच ती समाजचिंतकाचीही आहे. म्हणूनच, त्यांच्या समीक्षालेखनात वाङ्मयाच्या निर्लेप आस्वादनाबरोबरच समाजशास्त्रीय, मानवतावादी, समतावादी, प्रबोधन, आणि परिवर्तनवादी अशाही वृत्तींचा आढळ होतो. 'समन्वय', 'बहुमुखी' तसेच 'विद्रोही कविता' या संपादित काव्यसंग्रहाच्या प्रस्तावनेतून त्यांचा 'काव्यविचार' प्रामुख्याने व्यक्त झाला आहे.

'डॉ. आंबेडकर चिंतन' (१९९२) व 'दलित साहित्य आणि समाज' (२००५) ही वैचारिक लेखनाची दोन पुस्तके त्यांनी लिहिली. 'डॉ. आंबेडकर चिंतन' या ग्रंथातून त्यांनी डॉ. आंबेडकरांच्या व्यक्तित्व-विचाराचा वेध घेतला आहे. आंबेडकरी चळवळीचा ज्वलंत इतिहास असून 'दलित साहित्य आणि समाज' या ग्रंथातून दलित साहित्याच्या सामाजिक बांधीलकीविषयीची चर्चा- चिकित्सा आहे.

'विद्रोही कविता' (१९७८), 'वाङ्मयीन प्रवृत्ती : तत्त्वशोध' (२००७) ही संपादने त्यांनी केलेली असून, 'दलित साहित्यातील स्थितिगती' (१९७९) आणि 'नवी विद्रोही कविता' (२००६) ही संपादनेही त्यांनी अनुक्रमे उषा मा. देशमुख आणि डॉ. गंगाधर पानतावणे यांच्या सहकार्याने केली आहेत. मुंबई साहित्य संघाच्या अखिल भारतीय साहित्य संमेलन विशेषांकाचे संपादनही त्यांच्या नावावर आहे (१९८६). ही सर्व संपादने त्यांच्या साक्षेपी संपादनाची साक्ष आहेत.

याशिवाय साहित्य - संस्कृती मंडळ, विश्वकोश निर्मिती मंडळ, कायदा व सल्लागार मंडळ इत्यादी मंडळांवर त्यांनी सदस्य म्हणून केलेले कार्य उल्लेखनीय असून महाराष्ट्र शासनाच्या डॉ. बाबासाहेब आंबेडकर चरित्र-साधन समितीवरही ते सदस्य होते. दूर शिक्षण संस्था, मुंबई विद्यापीठ: एम.ए. (मराठी)च्या विद्यार्थ्यांसाठी अभ्यासपुस्तके तयार करवून घेणे आणि

मार्गदर्शन करणे हेही कार्य त्यांनी सांभाळले. तसेच, जनता शिक्षण प्रसारक मंडळ, अलिबाग, जि. रायगड या संस्थेत समन्वयक म्हणून त्यांनी काम केले.

मेश्रामांनी अनेक साहित्य संमेलनांचे अध्यक्षपद भूषविले. त्यांत अस्मितादर्श लेखक-वाचक मेळावा (१९७८), मुंबई उपनगर साहित्य संमेलन, विलेपार्ले, मुंबई (२००१), कामगार साहित्य संमेलन-अकरावे, पिंपरी, चिंचवड, पुणे (२००४), मराठी कोकणी नवोदितांचे साहित्य संमेलन-नववे, पुणे (२००४), आणि अ. भा. मराठी साहित्य संमेलन, नाशिक (२००५) अशा काही महत्त्वाच्या साहित्य संमेलनांचा समावेश होतो.

मेश्रामांना वाङ्मयीन योगदानासाठी विविध पुरस्कारही प्राप्त झाले. त्यांत म. सा. परिषदेचा डॉ. भालचंद्र फडके पुरस्कार (२०००), दलित समीक्षा पुरस्कार (२०००), महाराष्ट्र फाउण्डेशनचा पुरस्कार (२००३), शाहू- फुले परिवर्तन अकादमीचा लेखक सन्मान पुरस्कार (२००३), जीवन गौरव पुरस्कार (२००५) ह्या पुरस्कारांचा समावेश असून महाराष्ट्र शासनाचे: कवी केशवसुत पुरस्कार ('उत्खनन'), विशेष पुरस्कार ('चरित'), आणि कादंबरी लेखनासाठी ह. ना. आपटे पुरस्कार ('हकिकत' आणि 'जटायू'), विशेष पुरस्कार ('पोखरण') इत्यादी पुरस्कार मिळाले आहेत. 'पत्रावळ' आणि 'धगाडा' या कथासंग्रहांसाठी महाराष्ट्र शासनाचा दिवाकर कृष्ण पुरस्कार, तसेच यशवंतराव चव्हाण प्रतिष्ठानचा कऱ्हाड पुरस्कार प्राप्त झाला आहे.

राष्ट्रीय काव्य चर्चासत्र, पटणा - बिहार (१९८८), साहित्य अकादमी, शिलाँग-मेघालय (२००३), जपानमधील टोकियो येथील चर्चासत्र, तसेच गोवा स्वातंत्र्यदिन सार्वभाषिक कविसंमेलनात मराठी भाषेचे प्रतिनिधी म्हणून मेश्रामांचा सहभाग होता.

मराठी दलित साहित्यातील कविता आणि कादंबरी या साहित्यप्रकारांना त्यांचे विशेष योगदान आहे, असे म्हणता येईल.

– डॉ. शोभा रोकडे

**संदर्भ :**


१. *कुंभार प्रकाश पी.; 'दलित कथा साहित्य'; प्रियदर्शनी प्रकाशन, कोल्हापूर.*
२. *खोले विलास; 'विसाव्या शतकातील मराठी समीक्षा'; प्रतिमा प्रकाशन, पुणे; २००४.*
३. *जाधव रा. ग.; 'निळी पहाट', श्रीविद्या प्रकाशन, पुणे, तृतीय आवृत्ती; १९९१.*
४. *फडके भालचंद्र; 'दलित साहित्य: वेदना व विद्रोह'; श्रीविद्या प्रकाशन, पुणे; १९८०.*


## मेश्राम, भुजंग

**कवी**

**९ ऑक्टोबर १९५८ – २७ ऑगस्ट २००७**



किनवट तालुक्यातील तुळशी-मलकागुडा या गावात जन्मलेले भुजंग मेश्राम यांचे प्राथमिक शिक्षण याच गावी, तर माध्यमिक शिक्षण किनवट येथे झाले. किनवटच्या आदिवासी वसतिगृहात राहून त्यांनी शिक्षण पूर्ण केले. मातृभाषा गोंडी असलेल्या मेश्राम यांनी शालेय जीवनापासूनच गोंडी भाषेत काव्यलेखनास प्रारंभ केला. नांदेड येथे बारावीपर्यंत शिक्षण घेऊन ते मुंबईच्या सिद्धार्थ महाविद्यालयात उच्चशिक्षणासाठी आले. पत्रकारिता करता-करता गोंडी भाषेसंबंधी संशोधन व लेखनाचे कामही त्यांनी केले.

'ऊलगुलान' (१९९०) या पहिल्याच कवितासंग्रहातून आपले वेगळेपण दाखवणाऱ्या या कवीचा हा संग्रह अत्यंत गाजला तो प्रमाण मराठीसह गोंडी, परधानी, गोरीमाटी, अशा बोलीभाषेतल्या कवितांमळे. 'ऊलगुलान' म्हणजे सर्व पातळ्यांवरून केलेला सार्वत्रिक उठाव. बिरसा मुंडा या आदिवासी चळवळीचे नेतृत्व करताना केलेली 'ऊलगुलान' ही घोषणा त्यांच्या कवितेचे स्वरूप स्पष्ट करते. एका जंगलातून दुसऱ्या जंगलाकडे जाणाऱ्या माणसांचा जीवनाशी चाललेला संघर्ष हे त्यांच्या कवितेचे विश्व

म

स्वातंत्र्य उपभोगता येते उपभोक्त्यास
गरीबांना आणखी गरीब होण्याचे स्वातंत्र्य
श्रीमंतांना गर्भश्रीमंत होण्याचे स्वातंत्र्य
स्वातंत्र्याची नव्याने करता येईल खरेदी विक्री
भरता येईल त्यावर स्वेच्छाकर
स्वातंत्र्यातून घेताही येईल निवृत्ती
स्वातंत्र्याच्या स्वैराचाराने निपजते संस्कृती
स्वातंत्र्याच्या विषमतेतून सुपीक बनते भूमी

भुजंग मेश्राम, मुंबाय.

असून ते सर्वथा अनोखे असे आहे. 'बिरसा मुंडा', 'भेटलेल्या कविता', 'भेदिक', 'गावबांधणी', 'पांडवानी', यांसारख्या कविता उपरोधिक आणि वेदना व्यक्त करणाऱ्या आहेत.

'अभुज माड' (२००८) हे भुजंग मेश्राम यांच्या 'ऊलगुलान' या पहिल्या संग्रहानंतरच्या बहुतेक सर्व प्रकाशित आणि अप्रकाशित कवितांचे संकलन आहे. अरण्यवसतीतून आलेल्या आणि पन्नाशीच्या आतच हे जग सोडून निघून गेलेल्या भुजंग मेश्राम यांच्या या कविता समकालीन मराठी कवितेतला प्रखर आणि अनन्यसाधारण टप्पा आहे.

प्रचंड सर्जनशक्ती अद्‌भुत भाषासामर्थ्य, कुठल्याही कवितेत प्रमाण भाषेतून बोलीभाषेत आणि बोलीभाषेतून प्रमाण भाषेत अगदी सहजपणे होणारी अकृत्रिम स्थित्यंतरे, विलक्षण शब्दयोजना आणि नव्या व अर्थसंपृक्त शब्दरूपांची निर्मिती, समकालीन जागतिक वास्तवाची जाण, भावात्मकतेतून बौद्धिकतेत होणारे संक्रमण, बौद्धिक आकलनातून येणारी चिंतनशीलता, साशंकतेतून आणि सतर्कतेतून येणारा खोलवरचा व तीव्रतर उपहास-उपरोध, अनुभवांनाच ज्ञानतंतू करण्याचा प्रयत्न, अढळ बांधिलकी इत्यादी अनेक गुणवैशिष्ट्यांनी त्यांची कविता महत्त्वाची झाली आहे. समकालीन जगण्यातल्या एकूणएक घटनांचे, विकारांचे आणि विचारांचे धागेदोरे राजकीय वास्तवाशीच जोडलेले आहेत, या त्यांच्या दृढ विचारामुळे त्यांची कविता अनन्य होते.

– प्रा. सुहास बारटक्के

**संदर्भ :**

*१. भुजंग मेश्राम; 'अभुज माड', संपादन : चंद्रकांत पाटील; लोकवाङ्मय गृह, मुंबई; २००८.*

## मोकाशी, दिगंबर बाळकृष्ण

**कथाकार, कादंबरीकार**

**२७ नोव्हेंबर १९१५ – २९ जून १९८१**



दिगंबर मोकाशींचा जन्म रायगड जिल्ह्यात उरण येथे झाला. मॅट्रिकपर्यंत शिक्षण झाल्यावर त्यांनी खासगी संस्थेतून अभियांत्रिकीमधील पदविका घेतली. पुढे चरितार्था-साठी त्यांनी पुण्यात रेडिओ रिपेअरिंगचे दुकान सुरू केले.

दि. बां. चे व्यक्तिमत्त्व अत्यंत प्रसन्न होते. सरळ, सात्त्विक स्वभाव, शांत, संथ, अल्पसंतोषी, अजातशत्रू असे दि. बा. आयुष्याचा एकूणच अर्थ उमगलेले असे व्यक्तिमत्त्व होते.

१९४१ सालापासून ते नियमित लेखन करू लागले. १९४१ ते १९८१ सालापर्यंत त्यांनी १४०च्यावर कथा लिहिल्या. त्यांचे एकूण अकरा कथासंग्रह प्रसिद्ध आहेत. त्यांपैकी 'कथामोहिनी' (१९५३), 'लामणदिवा' (१९४७), 'आमोद सुनासि आले' (१९६०), 'वणवा' (१९६५), 'चापलूस' (१९७४), 'एक हजार गाई' (१९७५), 'आदिकथा' (१९७६), 'माउली' (१९७६), 'तू आणि मी' (१९७५), 'जरा जाऊन येतो' (१९८७) हे काही आहेत.

त्यांनी 'स्थलयात्रा' (१९५८), 'पुरुषास सर्व गुन्हे माफ' (१९७१), 'देव चालले' (१९६१), 'आनंदओवरी' (१९७४), 'वात्स्यायन' (१९७८) या

म

कादंबऱ्या लिहिल्या. त्यांपैकी 'आनंदओवरी' व 'वात्स्यायन' या चरित्रात्मक कादंबऱ्या असून अनुक्रमे संत तुकाराम आणि वात्स्यायन यांचे भावजीवन त्यांत रेखाटलेले आहे.

'पालखी' (१९६४), 'अठरा लक्ष पावले' (१९७१) ही प्रवासवर्णनात्मक पुस्तके आहेत. वेगळ्या दृष्टिकोनातून, नवीन तंत्रातून लिहिलेली ही पुस्तके समाजजीवनाचा शोध घेणारी आहेत. वारकऱ्यांसोबत त्यांनी चालत प्रवास केला आणि पंढरपूर गाठले. 'अठरा लक्ष पावले' हे त्या अनुभवावर आधारलेले आहे.

'गुपित', 'जगाच्या कोलांट्या', 'अंधारदरी' ही मुलांसाठी लिहिलेली पुस्तके असून हे बालवाङ्मय अद्‌भुत, विनोदी, रोजच्या जीवनातील प्रसंगांतून रेखाटलेले असून सुसंस्कार करणारे आहे. मराठी राज्य पाठ्यपुस्तक निर्मिती व अभ्यासक्रम संशोधन मंडळाने प्रकाशित केलेल्या संस्कार वाचनमालेत त्यांच्या बालकांसाठीच्या कथा समाविष्ट करण्यांत आलेल्या आहेत.

दि. बां. ना शास्त्रीय विषयावर पुस्तके लिहायलाही आवडत. रेडिओ दुरुस्तीवरील त्यांचे पुस्तक, 'यंत्र व तंत्र' व 'जमीन आपली आई' ही विज्ञानविषयक पुस्तकेही प्रकाशित झालेली आहेत. विज्ञानकथेतही त्यांनी अल्पशी कामगिरी बजावली आहे. विज्ञानकथा, कुमारकथा, प्रवासवर्णन, कादंबरी इ. विविध वाङ्मयप्रकार हाताळूनही दि. बा. अभिजात कथाकार म्हणूनच अधिक ओळखले जातात.

म

लहानपणापासून त्यांना वाचनाचे वेड होते. नाथ माधवांच्या कादंबऱ्या, प्रिन्स बिस्मार्कचे चरित्र अशा वाचनातून स्वतः लेखन करावे ही ऊर्मी त्यांच्यात निर्माण झाली. लहानपणी मोरोपंतांच्या आर्यांचे पाठांतर वडिलांनी करून घेतल्याने लेखनबीज मनात रुजले. स्वातंत्र्यलढ्यातला किंचितसा सहभाग, शिक्षणानंतर वाट्याला आलेली बेकारी, भुकेल्या स्थितीत केलेली भ्रमंती यांतून लेखन हाच आधार बनला. 'अनंता' ही पहिली कथा निर्मिली गेली. परंतु, पुढे स्वतःच्या आयुष्यावर, त्यातील समस्यांवर ते लेखन करीत राहिले नाहीत. भोवतालचे केलेले निरीक्षण, त्यातून केलेल्या नोंदी, खेड्यापाड्यांत, मुंबईत केलेला प्रवास, वेगवेगळ्या स्थळी अनुभवलेल्या, पाहिलेल्या आगळ्या-वेगळ्या गोष्टी यांतून केलेली टिपणे व कोऽहम या कोड्याने त्यांच्यातील कलाकार आकारत गेला. मी कोण ?, मी इथे का?, माझ्या जगण्याचा हेतू काय?, आयुष्याचा खेळ कशासाठी ? अशा विचारांतून लेखनाला सखोलता, व्यापकता येत गेली. कथा प्रगल्भ, जीवनदर्शी बनली. त्यांच्या बहुसंख्य कथा या प्रथमपुरुषी एकवचनी आहेत. सरळ, साधी कथा, संयत भाषा, अनलंकृतता व ओघवता प्रवाह; घटना सौम्य रोजच्या आयुष्यातले प्रसंग पण खटकेबाज प्रवाही संवाद, विषयाला हात घालणारी सुरुवात यांमुळे त्यांच्या कथा वैशिष्ट्यपूर्ण झाल्या आहेत.

आपल्या कथालेखनाबद्दल ते म्हणतात, ''कथा हा उत्स्फूर्त वाङ्मयप्रकार आहे. संतांच्या अभंगांइतकाच जीवनाच्या गाभ्यावर बाण मारणारा'' त्यांच्या मते, कथेमधून व्यक्तिरेखा, त्यांच्या जीवनाचे ठोकताळे, आणि सौंदर्यलक्षणे सांगितलेली असतात. कथेचा परिणाम वाचकावर होण्यासाठी व्यक्तीमध्ये जास्त एकाग्रता, जास्त संवेदनक्षमतेची गरज असते.

त्यांच्या कथांत, एका बाजूने खेड्यापाड्यांतील अंधश्रद्धांविषयी टीकाटिप्पणी टाळून, मार्मिक चित्रे रेखाटलेली दिसतात. दुसऱ्या बाजूने विज्ञानातील अतिप्रगत शोधांमुळे मानवी जीवनात काय घडू शकेल याची स्वप्ने ते रंगवितात. जगापलीकडच्या कहाण्या लिहिण्यातही त्यांची लेखणी रमते. विज्ञानकथा हा शब्द रूढ होण्याअगोदर 'रेडिओची' गोष्ट', 'शाश्वती', 'ग्रहयोग'सारख्या विश्वाबाहेरची वस्ती, ग्रहमाला, अंतराळ वगैरे शास्त्रीय अस्तर असलेल्या कथा त्यांनी लिहिल्या.

अरविंद गोखल्यांच्या मते, 'दि. बा. साध्या प्रसंगातून, प्रमेयातून अत्यंत वाचनीय, विचारांना झोका देणारी कथा लिहितात. प्रांजळ मनाचे जगाच्या व्यवहाराकडे कुतूहलाने आस्थेने पाहणारे असे हे कलावंताचे लेखन आहे. दि. बां. ची कथा 'घट्ट विणलेली गोळीबंद' कथा असते.

माणूस साप्ताहिकातून दि. बां. नी 'संध्याकाळचे पुणे' हे चालविलेले सदरही त्यांच्या सुरेख शैलीने अत्यंत लोकप्रिय ठरले होते.

कथेच्या वाढ व विकासात स्वतःचे स्वतंत्र स्थान निर्माण करणारी अशी दि. बां. ची कथा आहे. त्यांचे समकालीन कथाकार तर त्यांच्या शैलीला मानतातच; पण पुढच्या पिढीतल्या लेखकांपैकी विजय तेंडूलकरांसारख्या चतुरस्र लेखकालाही दि. बां. ची कथा भुरळ घालते.

– प्रा. संध्या टेंबे

**संदर्भ :**

*१. गोखले अरविंद, संपादक; 'दि. बा. मोकाशी यांची कथा'.*

*२. अदवंत म. ना., संपादक; 'मराठी विश्वकोश', खंड १३.*

## मोटे, कृष्णाबाई हरी

**कथाकार, कादंबरीकार**

**२८ जुलै १९०३ – १७ फेब्रुवारी १९९१**



कृष्णाबाई मोटे यांचे माहेरचे नाव मनोरमा अनंतराव खरे. 'काळाची पावले' ओळखून 'दृष्टीआडच्या सृष्टीत' काय चालले आहे याचा वेध घेत लालित्यपूर्ण, चिंतनशील आणि संशोधनात्मक लेखन करणाऱ्या कृष्णाबाईंचे प्राथमिक शिक्षण शिरूर येथे झाले. १९२२ साली त्यांनी कर्वे युनिव्हर्सिटीची 'गृहिंतागमा' ही पदवी मिळवली. समाजकार्य करण्याच्या उद्देशाने शिक्षणक्षेत्रात नोकरी केली. वयाच्या तिसाव्या वर्षी 'लंडन स्कूल ऑफ सोशिऑलॉजी' येथून समाजशास्त्राची पदविका मिळवण्यासाठी त्यांनी लंडनला प्रयाण केले. तेथील वास्तव्यात कामगार क्षेत्राचा अभ्यास करून परतल्यावर प्रकाशक, संपादक हरिभाऊ मोटे यांच्याशी त्यांचा प्रेमविवाह झाला. त्यांनी १९३४ साली रजिस्टर्ड लग्न केले हे विशेष. त्यांनी मुंबईला समाजकल्याण खात्याच्या रेशनिंग ऑफिसमध्ये नोकरी केली. कृष्णाबाईंचा समाजकार्यात सक्रिय सहभाग होता. गिरणी कामगारांच्या मुलांसाठी पाळणाघर, नोकरी करणाऱ्या स्त्रियांसाठी वसतिगृह यांसारख्या योजना प्रत्यक्षात उतरवण्यासाठी त्यांनी पुढाकार घेतला.

१९३० सालापासून त्यांनी नियतकालिकांमधून लेखनाला सुरुवात केली. 'मीनाक्षीचे जीवन' (१९४२) या कादंबरीतून पारंपरिक नातेसंबंध आणि स्वत्वाची जाणीव यांमध्ये स्त्री–जीवनाची होणारी घुसमट व्यक्त होते. 'दृष्टीआडच्या सृष्टीत' (१९३९) या पुस्तकातील निरीक्षणपर लेख आणि 'काळाची पाउले'मधील (१९७६) संशोधनपर लेख यांमधून झोपडपट्टीतील दारिद्र्याने भरडली गेलेली स्त्री, समाजात मातृत्वाची रुजलेली दुटप्पी मूल्यव्यवस्था, स्त्रीच्या नोकरीसंबंधी लावले जाणारे दुहेरी मापदंड, विज्ञान युगाचा कुटुंबसंस्थेवर होणारा परिणाम, घटस्फोटित स्त्रीचा एकटेपणा, यांसारख्या अनेक मूलभूत प्रश्नांना त्यांनी हात घातलेला आहे. 'शार्लटचे जाळे' (१९५२), 'असे आहे आपले मन' (१९८५), 'प्राचीन माणसे' (१९६७), 'सामाजिक मानवजातीचा यथायोग्य अभ्यास' (१९६७) ही त्यांची अनुवादित पुस्तके आहेत. 'माझी गुणाची पोर अथवा हरितालिकेची पूजा' (१९४९) या नाटकातून मुलीला प्रेमविवाहाचा अधिकार देताना जुन्यानव्या विचारांची सांगड हलक्याफुलक्या पद्धतीने घातली आहे.

'लग्नानंतरचे पहिले वर्ष' (१९६८) यामध्ये 'महाराष्ट्र टाइम्स'ने आयोजित केलेल्या स्पर्धेतील ७०० लेखांचे संपादन आणि संकलन केलेले आहे. त्यामधून खेडे आणि शहर यांमधील स्त्रियांच्या विचार–पद्धतीतील पिढीगणीक होत गेलेला बदल अधोरेखित होतो. याखेरीज मुलांसाठी त्यांनी चार पुस्तके लिहिलेली आहेत.

कृष्णाबाईंच्या लिखाणाचे महत्त्व म्हणजे, त्या प्रचलित समाजव्यवस्थेचा फक्त आढावा घेत नाहीत, तर त्यावर उपाययोजनाही सुचवतात. त्या योजना राबविण्यासाठी त्यांनी स्वतः केलेली धडपड त्यांच्या जबाबदार व्यक्तिमत्त्वाची आणि दूरदृष्टीची साक्ष देतात.

– मृणालिनी चितळे

**संदर्भ :**

*१. खांडगे मंदा, दीक्षित लीला; संपादित; 'स्त्री साहित्याचा मागोवा'; साहित्यप्रेमी भगिनी मंडळ.*

*२. खडपेकर, विनया; 'स्त्री साहित्याचा मागोवा- विसाव्या शतकातील परिवर्तन'; पॉप्युलर प्रकाशन.*

## मोटे, हरीभाऊ विष्णू

☞ **मुख्य नोंद – पत्रकारिता आणि ललितेतर साहित्य खंड**

## मोरजे, गंगाधर नारायण

**अभ्यासक, संशोधक**

**३० ऑक्टोबर १९३० – ९ जुलै २००५**



लोकसाहित्याचे अभ्यासक-संशोधक गंगाधर मोरजे यांचा जन्म नवाबाग, वेंगुर्ले, जिल्हा सिंधुदुर्ग येथे झाला. त्यांचे शिक्षण बी.ए. (मराठी ऑनर्स), मुंबई विद्यापीठ, (१९५७), एम.ए. (मराठी, संस्कृत), मुंबई विद्यापीठ, (१९५९), बी.एड. (मराठी-भूगोल), गारगोटी विद्यापीठ, (१९६१) येथे झाले. पी.एच.डी. शिवाजी विद्यापीठचा विषय 'मराठी लावणी वाङ्मय' हा होता.

लोकसाहित्य, संतसाहित्य, ख्रिस्ती-मराठी साहित्य या संदर्भात त्यांनी अभ्यासू वृत्तीने आणि चिकित्सक पद्धतीने लेखन केलेले आहे. 'लोकबंध' हा त्यांचा आवडीचा विषय होता. त्या दृष्टीने इंग्लिश भाषेतील निबंधलेखनही याच विषयाच्या संदर्भात आहे. भाषांतरासाठी त्यांनी निवडलेल्या ग्रंथांचे स्वरूप याच प्रकारचे आहे. या संदर्भात रशियन लोकसाहित्यविषयक दोन ग्रंथांचा उल्लेख करता येईल. प्रस्तावना लिहिण्यासाठी त्यांनी निवडलेले ग्रंथही याच विषयाशी नाते सांगणारे आहेत.

लोकवाङ्मय जुनेही नसते, नवेही नसते, ते सदैव वर्तमान असते. ते काळाबरोबरच मौखिक-लिखित-मौखिक या गतीने प्रवास करते ही डॉ. मोरजे यांची भूमिका आहे. त्याचबरोबर लोकसाहित्यविषयक पुस्तकी अभ्यास-संशोधनाला क्षेत्रीय अभ्यास, संशोधनाची जोड असली पाहिजे, असे त्यांचे मत होते. त्या दृष्टीने 'माणकोजी बोधले' यांच्यासंबंधी त्यांनी केलेल्या लेखनाचा उल्लेख या संदर्भात करता येईल. प्रत्यक्ष त्या-त्या ठिकाणी जाऊन माहिती गोळा करणे, त्या माहितीचे संकलन, संपादन करणे, वर्गीकरण-विश्लेषण करून निष्कर्ष काढणे हा लोकसाहित्य अभ्यास-संशोधनाचा कणा आहे या दृष्टिकोनातून त्यांनी त्यांचे लेखन केलेले आहे.

लोकसाहित्याची व्याप्ती बरीच व्यापक आहे. लोकसाहित्यात लोककथा, लोकगीते, लोकभाषा, म्हणी, उखाणे, आहाणे, तमाशा, ललिते, भारुडे, गोंधळ, लोकविधी, चालीरीती, पेहराव, सण, उत्सव इत्यादी घटकांचा समावेश होतो. त्या दृष्टीने लोकवाङ्मय, त्याच्या प्रेरणा, त्याचे रचनाबंध, स्वरूप, आस्वाद प्रक्रिया, संहिता स्वरूप या सर्व घटकांचा एकत्रित अभ्यास करून लोकसाहित्य हे एक स्वतंत्र अभ्यासक्षेत्र कसे आहे, त्याचे विवेचन डॉ. मोरजे यांनी लोकसाहित्यविषयक ग्रंथात केलेले आहे. लोकसाहित्याचे सादरीकरण हा डॉ. मोरजे यांचा प्रमुख निकष आहे. त्या दृष्टीने त्यांनी एक चित्रफीतही तयार केली आहे. त्यामध्ये प्रात्यक्षिकासह व्याख्यान देऊन लोकसाहित्याचे रंगस्वरूप स्पष्ट केलेले आहे. त्या दृष्टीने लोकसाहित्याचे स्वरूप आणि सादरीकरण या दोन्ही बाबींवर प्रकाश पडतो.

डॉ. मोरजे यांची लोकसाहित्य-वाङ्मयविषयक एकूण सतरा पुस्तके प्रकाशित झालेली आहेत. 'रामजोशीकृत लावण्या', 'मराठी लावणी वाङ्मय', 'शाहीर वरदी परशराम' (संपादन), 'लोकसाहित्य कलाविचार', 'लोकसाहित्य: आकलन आणि आस्वाद', 'लोकसाहित्य: बदलते संदर्भ - बदलती रूपे', 'इतिहास आणि लोकसाहित्य', 'कूटकथेची कूळकथा', 'लोकरहाटीच्या वाटे, 'कहाणी लोकसाहित्याची' आदी ग्रंथ त्यांनी लिहिले आहेत.

तसेच ‘ख्रिस्ती-मराठी वाङ्मय’, ‘महाराष्ट्रातील सांस्कृतिक परिवर्तन आणि ख्रिस्तीधर्मीय’, ‘ज्ञानोदय लेखन सारसूची प्रकल्प’, ‘गोमंतकातील ख्रिस्ती-मराठी वाङ्मय : शोध आणि बोध’ इत्यादी उल्लेखनीय ग्रंथ आहेत. मराठी भाषेत नियतकालिकांची अशी वर्णनात्मक सारसूची (ज्ञानोदय लेखन सारसूची) ही पहिलीच आहे. याचे दोन खंड प्रकाशित झालेले आहेत.

‘मराठी दोलामुद्रिते’ या ग्रंथाच्या तीन आवृत्त्या प्रकाशित झालेल्या आहेत. हा संपादित ग्रंथ म्हणजे अतिसंक्षिप्त वाङ्मयेतिहासच आहे. यामध्ये १९०० नोंदी आहेत.

डॉ. गंगाधर मोरजे यांचे ३१ शोधनिबंध, १७ संदर्भ ग्रंथांत समाविष्ट लेख, ११ ग्रंथांना प्रस्तावना, असे वाङ्मयविषयक भरीव कार्य आहे.

डॉ. मोरजे यांना विविध पारितोषिके प्राप्त झालेली आहेत:

महाराष्ट्र शासन पारितोषिक (१९७५-१९७६) सौंदर्यशास्त्र आणि समीक्षा शास्त्रातील उत्कृष्ट निर्मितीबद्दल, ‘मराठी लावणी वाङ्मय’ या ग्रंथासाठी; महाराष्ट्र ग्रंथोत्तेजक संस्था, पुण, पारितोषिक १९८२, ‘अक्षरवेध’ या ग्रंथासाठी, तर विष्णुशास्त्री चिपळूणकर पारितोषिक, पुणे विद्यापीठ, १९८६-१९८७, ‘ख्रिस्ती मराठी वाङ्मय’ या ग्रंथासाठी मिळाले. तसेच प्रा. अ. का. प्रियोळकर स्मृती पारितोषिक, मुंबई विद्यापीठ, १९९९, एकूण संशोधन कार्यासाठी; महाराष्ट्र गौरव विशेष पुरस्कार, महाराष्ट्र फाउण्डेशन, यु. एस. ए, २००२, लोकसाहित्यविषयक कामगिरीबद्दल आणि महाराष्ट्र शासन उत्कृष्ट ग्रंथ पारितोषिक, २००२, ‘लोकरहाटीच्या वाटे’साठी इत्यादी पारितोषिके मिळाली आहेत.

एकूणच मराठी वाङ्मयाच्या इतिहासात डॉ. गंगाधर नारायण मोरजे यांचे नाव लोकवाङ्मयामुळे सुवर्ण अक्षरांनी लिहिता येते. त्या दृष्टीने त्यांचे स्थान गौरवपूर्ण आहे.

– डॉ. मधुरा कोरान्ने

**संदर्भ :**


*१. कुळकर्णी महादेव; ‘मोरजाई’; संपादक: डॉ. धोंडिराम वाडकर, डॉ. गंगाधर मोरजे स्मृतिग्रंथ; पद्मगंधा प्रकाशन, पुणे.*

*२. मोरजे गंगाधर; ‘लोकसाहित्य: आकलन आणि आस्वाद’; दास्ताने रामचंद्र आणि कंपनी, पुणे.*

*३. मोरजे गंगाधर; ‘लोकवाङ्मयशास्त्र’; पद्मगंधा प्रकाशन, पुणे.*


## मोरे, नारायण रामचंद्र

***अशोक***

**कवी, संपादक**

**९ एप्रिल १९०२**

नारायण रामचंद्र मोरे यांचा जन्म नवेदरबेली (अलिबाग) येथे झाला. त्यांचे प्राथमिक शिक्षण रेवदंडा येथे व नंतर मॅट्रिकपर्यंतचे शिक्षण अलिबाग येथे झाले.

शालेय वयापासूनच त्यांना काव्यलेखनाची आवड निर्माण झाली. खानापूर येथून प्रसिद्ध होणाऱ्या ‘लोकमित्र’ या मासिकात ‘कवितेस प्रणयपत्रिका’ ही त्यांची पहिली कविता प्रसिद्ध झाली. त्यानंतर अनेक मासिकांतून त्यांचे काव्यलेखन प्रसिद्ध होत होते. १९२५ पासून १९३२ पर्यंत ते मासिक ‘मनोरंजन’चे प्रथम सहसंपादक आणि नंतर कार्यकारी संपादक होते. त्यानंतर त्यांनी आपली स्वतःची ‘नवजीवन’ आणि ‘सुवर्ण’ ही मासिके अनेक वर्षे उत्तम प्रकारे चालवली. ‘अशोक’ या टोपणनावाने मासिक ‘मनोरंजन’मध्ये अनेक लघुकथा कित्येक स्फुटलेखही त्यांनी लिहिले; पण त्यांना खरी ओढ होती ती कवितेचीच!

कवी माधव (माधव केशव काटदरे) यांच्यामुळे मोरे यांना इतिहासाची आणि काव्याची गोडी निर्माण झाली. तसेच त्यांच्या संगतीत कविताही अधिक विकसित झाली. १९२३-२४च्या सुमारास वयाच्या केवळ विसाव्या वर्षी मोरे यांनी चारचारशे पानांची दोन खंडकाव्ये लिहिली. मुरारबाजी देशपांडे यांच्यावर ‘संग्रामसिंह’ आणि नरवीर तानाजी मालुसरे यांच्या स्फूर्तिप्रद पराक्रमावर ‘शिवशार्दुल’- ही दोन्ही काव्ये महाराष्ट्रात अतिशय लोकप्रिय झाली होती.

म

स्वभावाने भिडस्त, शालीन, प्रसिद्धिपराङ्मुख असलेले मोरे सार्वजनिक सभासंमेलनांत, कवींच्या मेळाव्यात फारसे नसायचेच; कारण सतत चौदा वर्षे त्यांना ध्यास होता तो 'शिवायन' या महाकाव्याचा!

''शिवाजी महाराजांचे संपूर्ण चरित्र अजून काव्यात कोणी लिहिले नाही. ही गोष्ट मराठी कवींना खासच स्पृहणीय नाही.'' असे १९५२ मध्ये शिवराज्याभिषेकानिमित्त मुंबईत शिवाजीपार्कवर भरलेल्या सभेत, प्रा. कृ. पां. कुळकर्णी यांनी विधान केले. सभा संपल्यावर बाहेर पडताक्षणीच कवी नारायण मोरे यांनी निश्चय केला की, मी शिवाजी महाराजांचे संपूर्ण चरित्र काव्यबद्ध करणार आहे. अखेर चौदा वर्षांच्या अखंड परिश्रमानंतर ८२७६ पद्यसंख्या असलेले, चंद्रकांता वृत्तातील 'शिवायन' हे महाकाव्य त्यांनी लिहिले. सुप्रसिद्ध संगीतकार स्नेहल भाटकर यांनी 'शिवायन'मधील सर्गांना सुमधुर चाली लावल्या. प्रसंगानुकूल, सहजसुंदर, ओघवत्या भाषेतील हे काव्य आचार्य अत्रे यांना खूपच आवडले. ते मोरे यांचा उल्लेख 'महाकवी' असा करीत. अत्रे नेहमी म्हणायचे. ''शिवायन म्हणजे मोरे आणि मोरे म्हणजे शिवायन!''

– प्रा. मंगला गोखले

**संदर्भ :**

*१. मोरे नारायण रामचंद्र; 'शिवायन', महाकाव्य; १९७१.*

## मोरे, शेषराव बापूराव

☞ **मुख्य नोंद – पत्रकारिता आणि ललितेतर साहित्य खंड**

म

## मोरे, सदानंद श्रीधर

**कवी, संत साहित्यकार**

**२५ जून १९५२**

सदानंद श्रीधर मोरे यांचा जन्म अहमदनगरमध्ये झाला. डॉ. मोरे यांचे मूळ गाव संत तुकारामांचे देहू, जि. पुणे. ते तुकारामांचे दहाव्या पीढीतील वंशज आहेत. वडिल श्रीधरबुवा देहूकर यांच्याकडे संतवाङ्मयाचा अभ्यास पारंपारिक पद्धतीने केला. त्यांच्या वडिलांचे वास्तव्य देहूत



असे. गावचे कार्यकर्ते म्हणून त्यांचा मान होता. मोरे यांची आई संस्कृत शिक्षिका होती. सदानंद मोरे १९६८ मध्ये एस. एस. सी. झाले. नंतर पुण्याच्या सर परशुरामभाऊ महाविद्यालयातून बी. ए. आणि पुणे विद्यापीठातून १९७४ साली एम. ए. (तत्त्वज्ञान) झाले; शिवाय प्राचीन भारतीय संस्कृती आणि इतिहास हे विषय घेऊन एम. ए. पदवी संपादन केली. विद्यापीठ अनुदान मंडळाचे UGC करिअर ॲवार्ड मिळाले आहे. 'द गीता : अ थिअरी ऑफ ह्यूमन ॲक्शन' या विषयावर प्रबंध सादर करून मोरे पीएच. डी. झाले. या सर्वोत्कृष्ट प्रबंधासाठी त्यांना गुरुदेव रानडे–दामले पुरस्कार मिळाला.

डॉ. सदानंद मोरे विद्यापीठीय व्याख्याते असून पुणे विद्यापीठाच्या अंतर्गत विविध अध्यासनांचे समन्वयक प्राध्यापक म्हणून कार्यरत आहेत. संतसाहित्यविषयक अनेक ग्रंथांचे तसेच सामाजिक ग्रंथांचे त्यांनी संपादन केले आहे. तत्त्वज्ञान, साहित्य आणि इतिहास या विषयांमध्ये विपुल निबंध–लेखन केले आहे. सुमारे ५० संशोधनपर निबंधांचे विविध नियतकालिकांमध्ये प्रकाशन झाले आहे. 'संदर्भाच्या शोधात', 'वाळूचे किल्ले', 'बखर' हे तीन कवितासंग्रह आणि 'The Geeta : A Theory of Human action', 'Krishna : The man and his mission' हे त्यांचे इंग्रजी ग्रंथ प्रसिद्ध आहेत. 'मंथन' (लेखसंग्रह), 'ताटीचे अभंग: एक विवेचन', 'पालखी सोहळा: उगम व विकास', 'म. फुले यांचे राजकीय विचार', 'वारकरी साहित्य: स्वरूप आणि भूमिका' (समीक्षा), 'त्रयोदशी', 'तुकाराम दर्शन', 'लोकमान्य ते महात्मा', 'निवडक पाळेकर', 'उजळल्या दिशा' (नाटक) आदी ग्रंथ प्रसिद्ध आहेत.

त्यांच्या 'तुकारामदर्शन' या ग्रंथासाठी साहित्य अकादमीसह १५ संस्थांचे पुरस्कार त्यांना लाभले; त्याचप्रमाणे 'उजळत्या दिशा' या नाटकासाठी त्यांना

राज्यशासनासह १० संस्थांचे पुरस्कार मिळाले आहेत. डॉ. बाबासाहेब आंबेडकर अकादमीचा ‘कै. रा. भि. जोशी’ पुरस्कार त्यांना मिळालेला आहे. डॉ. सदानंद मोरे यांच्या ‘लोकमान्य ते महात्मा’ या दोन खंडांत प्रसिद्ध झालेल्या बृहत ग्रंथांविषयी डॉ. य. दि. फडके यांचा अभिप्राय बोलका आहे, ‘‘या ग्रंथाद्वारे डॉ. मोरे यांनी आधुनिक महाराष्ट्राच्या इतिहासाचा आणि लोकव्यवहाराचा सर्वांगीण आंतरविद्याशाखीय वेध घेतला आहे. अनेक अभ्यासकांनी एकत्र येऊन करायचे कार्य त्यांनी एकट्याने पार पाडले, ही बाब खचितच गौरवास्पद आहे.’’

– विद्याधर ताठे

**संदर्भ :**

१. *डॉ.मोरे सदानंद; ‘लोकमान्य ते महात्मा खंड पहिला’; राजहंस प्रकाशन, पुणे, २००७.*

* * *

म

# य



## यशवंत

*पेंढरकर, यशवंत दिनकर*

**कवी**

**९ मार्च १८९९ – २५ नोव्हेंबर १९८५**



कवी यशवंत पेंढरकर यांचा जन्म तारळे, ता. पाटण, जि. सातारा येथे झाला. लहानपण जवळच्याच चाफळ या समर्थ रामदास स्वामींच्या वास्तव्याने पुनीत झालेल्या गावात गेले. त्यांचे वडील शिक्षक होते आणि साहित्यप्रेमीही होते. तत्कालीन प्रसिद्ध साहित्यिक आणि कादंबरीकार ह. ना. आपटे आणि सामाजिक कार्यकर्ते लोकहितवादी गोपाळ हरी देशमुख त्यांचे मित्र होते.

गोपाळरावांनी त्यांची काही पुस्तके भेटीदाखल दिली होती. घरात 'लोकमित्र' आणि 'मासिक मनोरंजन' दरमहा येत असे. वडिलांचेही वाचनप्रेम, त्यामुळे यशवंतांनाही लहानपणापासून वाचनाची आवड आणि गोडी लागली. मात्र काही कारणांमुळे त्यांना मॅट्रिकपर्यंतही पोहोचता आले नाही. वडील लवकर मृत्यू पावले. त्यांच्या मृत्यूनंतर यशवंतांनी स्कूल फायनलची परीक्षा दिली. ती उत्तीर्ण झाल्यामुळे त्यांना शिक्षण खात्यात नोकरी मिळाली. प्रारंभीचे एक वर्ष त्यांनी अलिबागला नोकरी केली व पुढे त्यांची पुणे येथे बदली झाली. परंतु, प्रकृतीने असहकार पुकारल्यामुळे त्यांनी १९४० साली नोकरी सोडून मुदतपूर्व निवृत्ती स्वीकारली. निवृत्तीच्या वेळी त्यांना दरमहा रु.८०/– पगार होता आणि सत्तावीस रुपये निवृत्तिवेतन मिळू लागले.

यशवंत यांना शिक्षणानिमित्त काही काळ सांगली येथे राहावे लागले; त्या काळात सांगलीतील तत्कालीन ज्येष्ठ कवी साधुदास यांचा त्यांना सहवास, मार्गदर्शन आणि प्रेरणा मिळाली. इथेच त्यांच्यातला कवी जन्माला आला. त्यांनी वयाच्या विसाव्या वर्षी 'मित्रप्रेमरहस्य' हे आपले पहिले काव्य प्रसिद्ध केले. या काळात त्यांनी यशवंत, दासानुदास, तारकानाथ या टोपणनावांनी काव्यलेखन केले. त्यांच्या कविता पुण्याच्या 'लोकसंग्रह' या दैनिकात प्रसिद्ध होत. पुण्यात आल्यावर त्यांना व्यापक प्रसिद्धी मिळाली. त्यांच्या कविता वाचून 'अनंततनय' नावाचे प्रख्यात कवी पत्ता शोधीत यशवंतांना भेटायला आले. त्या वेळी पुण्यात 'महाराष्ट्र शारदा मंडळ' या नावाने काही तरुण कवी एकत्र येत आणि कवितांचे आदानप्रदान करून चर्चा करीत. अनंततनय यांनी यशवंतांना या गटात येण्याचे निमंत्रण दिले. दरम्यान या मंडळातूनच काही नव्या तरुण कवींचा गट 'रविकिरण मंडळ' या नावाने निघून त्यांनी काव्यगायनास सुरुवात केली. त्या वेळचा तो अभिनव प्रकार साहित्य व काव्यरसिकांना फारच आवडला. त्यांचे महाराष्ट्रभर कार्यक्रम होऊ लागले.

या मंडळात माधव जूलियन, गिरीश, श्री. बा. व सौ. मनोरमाबाई रानडे हे पति–पत्नी, दिवाकर (नाट्यछटाकार शं. का. गर्गे), द. ल. गोखले, ग. त्र्यं. माडखोलकर, वि. द. घाटे इत्यादींचा समावेश होता. यशवंत त्यात सामील झाले. ते त्या वेळी येरवड्याच्या रेफर्मेटरी स्कूलमध्ये नोकरीस होते. तिथल्या त्यांच्या घरीच सुरुवातीच्या काळात रविकिरण मंडळाच्या बैठका होत. दरम्यान त्यांचे 'यशवंत' हे नाव कवी म्हणून चांगलेच प्रसिद्धीस आल्यामुळे त्यांनी ते कायम ठेवले.

रविकिरण मंडळाच्यावतीने या कवींची काही एकत्रित पुस्तके प्रसिद्ध झाली. काही कवींचे स्वतंत्र संग्रहही प्रसिद्ध झाले. या मंडळाच्या स्थापनेच्या दिवशीच म्हणजे ९ सप्टेंबर १९२३ रोजी मंडळाचे 'किरण' हे पहिले पुस्तक प्रकाशित झाले. त्यात सात पुरुष आणि एक कवयित्री (सौ. मनोरमाबाई रानडे) होत्या. त्यामुळे सप्तर्षी आणि अरुंधती त्यांचे प्रतीक बनले. दिवाकर त्यातून लवकरच बाहेर पडले.

रविकिरण मंडळाचे महाराष्ट्राच्या साहित्यिक आणि सांस्कृतिक इतिहासात स्वतंत्र स्थान आहे, यातील सर्व कवींनी मराठी कवितेला नवा चेहरा दिला. या मंडळाची अनेक पुस्तके गाजली. माधव जूलियन यांचे निधन (१९३९) झाल्यावर मंडळाची ताकद थोडी कमी झाली. दरम्यान अत्रे यांनी मंडळातील कवींच्या कवितांची विडंबने केली, ती 'झेंडूची फुले' या नावाने प्रसिद्ध झाली, मात्र मंडळाचा उत्साह कमी झाला नाही. मंडळाने १९६५ मध्ये कवी गिरीश यांनी लिहिलेले माधवराव पटवर्धन यांचे 'स्वप्नभूमी' हे पन्नासावे आणि बहुधा शेवटचे पुस्तक प्रसिद्ध केले. मंडळात सर्वच मान्यवर कवी असले तरी पटवर्धनांनंतर कवी यशवंतांचा ठसा त्यावर ठसठशीतपणे उमटला. 'बंदिशाळा, जयमंगल' हे त्यांचे खंडकाव्यसंग्रह रसिकमान्य झाले. प्रसिद्ध टीकाकार श्री. के. क्षीरसागर यांनी, 'गझल आणि खंडकाव्य ही रविकिरण मंडळाने मराठी साहित्याला दिलेली देणगी आहे', अशा शब्दांत मंडळाच्या कार्याचा गौरव केला होता. मंडळातील कवींच्या काव्याचा प्रभाव मर्ढेकरांवरही पडला होता.

यशवंत यांचे 'यशवंत' (१९२१), 'वीणाझंकार' (१९२२), 'भावमंथन' (१९३०), 'काव्यकिरीट' (१९४१), 'यशोगंध' व 'यशोनिधी' (१९४१), 'यशोगिरी' (१९४६), 'ओजस्विनी' (१९४६), 'पाणपोई' (१९५१), 'वाकळ' (१९५६) हे काही उल्लेखनीय संग्रह होत. त्यांचे एकूण एकवीस काव्यसंग्रह असून ते सर्वच बहुधा रसिकमान्य झालेले आहेत. त्यांच्या काव्यगायनाने त्यांची कविता अधिकाधिक लोकप्रिय बनली.

सुप्रसिद्ध साहित्यिक डॉ. द. ना. भोसले यांनी कवी यशवंत यांच्या काव्याची मीमांसा करताना म्हटले आहे: ''मराठी काव्यप्रवाहात विविध अंगांनी मोलाची भर घालणाऱ्या आणि सामान्य माणसांच्या जीवनातील असामान्य असे भावानुभव व्यक्त करीत त्या मनाला सुसंस्कारित करणाऱ्या कवी यशवंतांचे काव्यातील स्थान मोलाचे आहे असेच म्हणावे लागेल. पूर्णतः केवलायवी आणि क्षणाक्षणाला नवता उत्पन्न करणारी शुद्ध सौंदर्यात्मक अनुभूती आजच्याप्रमाणे त्यांच्या काव्यात फारशी जाणवणार नाही हे खरे असले, तरी मराठी कवितेपुरता अभिजातवाद, वास्तववाद आणि सौंदर्यवाद यांचा संगम साधून मानवी जीवनातील सर्वस्पर्शी भावनांचा अन् कारुण्याचा त्यांनी मनःपूर्वक आविष्कार केला. ऐहिक निष्ठांचा स्वीकार करूनही त्यांची कविता दिव्यत्वाचा आणि पूर्णत्वाचा ध्यास घेणारी आहे, असेच म्हणता येईल. म्हणूनच एक आत्मनिष्ठ कवी संस्कृतीच्या संचिताचा प्रतिभाशाली भाष्यकार होऊ शकतो. यावर आपला विश्वास बसतो.'' (म. सा. पत्रिका जाने-मार्च १९८६, पृ.१४)

यशवंतांची कविता कनिष्ठ मध्यमवर्गीय मानसिकतेची आहे. या वर्गाच्या आकांक्षा, त्यांचे देशप्रेम, त्यांच्या मर्यादा या सर्वांची जाणीव त्यांना होती. टीका म्हणून त्यांच्यावर केला जाणारा हा आरोप त्यांना मान्य होता. त्यांनी तसे म्हटल्याचे डॉ. भोसले यांनी उपरोल्लिखित लेखात स्पष्ट केले आहे. यशवंत हे भोसले यांना म्हणाले होते, 'बदलत्या कवितेप्रमाणे पिंड व प्रवृत्ती नसताना नवी कविता करीत राहिलो असतो तर मी स्वतःशी व कवितेशी प्रतारणा तर केली असतीच; कातडे पांघरून वाघांच्या कळपात वावरल्याने वाघ होता येत नाही अन् स्वजातीलाही मुकावे लागते.' (पूर्वोक्त : पृ.१२)

यशवंत यांच्या नसानसांत देशभक्ती आणि राष्ट्रप्रेम भरलेले होते. समर्थांच्या आणि शिवरायांच्या कर्मभूमीत त्यांचे बालपण गेले असल्याने या दोघांच्याही असामान्य कर्तृत्वाबद्दल त्यांच्या मनात प्रीती आणि भक्ती होती. 'छत्रपती शिवराय' या महाकाव्यात यशवंतांनी छत्रपतींची

जी गौरवगाथा गायिली, ती असामान्यच होती. महाराजांच्या जीवनातील अनेक नाट्यमय प्रसंग त्यांनी त्यात अशा रीतीने गुंफले आहेत, की त्याला महाकाव्याबरोबर महानाट्याचाही दर्जा प्राप्त व्हावा. त्यांच्या एकूणच कवितेत राष्ट्रनिष्ठा, समाजाबद्दल प्रेम, कुटुंबवत्सलता, नात्यांची जपणूक, प्रेमाची उत्कटता आदी अनेक बाबी स्पष्ट होतात.

बडोदा संस्थानाकडून त्यांना ‘राजकवी’ हा किताब १९४० साली मिळाला. १९५० सालच्या मुंबईस झालेल्या तेहेतिसाव्या साहित्यसंमेलनाचे ते अध्यक्ष होते. अध्यक्षीय भाषणात त्यांनी संयुक्त महाराष्ट्र, नभोवाणी, नवकाव्य, अश्‍लीलता अशा अनेक विषयांचा परामर्श घेतला होता. या भाषणात साहजिकच कवितेला प्राधान्य होते. ते म्हणाले, ‘‘विद्वत्तेशिवाय जीवित्वाला कणखरपणा नसला तर कवित्वाशिवाय त्याला शोभा नाही. किंबहुना, विद्वान जिथे हार खाईल, तिथे कवित्व बहार करील.’’ याच व्याख्यानात त्यांनी छंदोबद्ध कवितेचा जोरदार पुरस्कार करून मुक्तछंदावर टीका केली होती. १९६० साली ‘महाराष्ट्र’ हा स्वतंत्र मराठी भाषक प्रांत झाल्यावर राज्य सरकारने ‘महाराष्ट्र कवी’ म्हणून त्यांचा गौरव करून त्यांना तहहयात मासिक रु. ५००/- पुरस्कार दिला. १९६१ साली त्यांना केंद्र सरकारने ‘पद्मभूषण’ पुरस्काराने गौरविले. त्यांना इतरही मानसन्मान मिळाले.

कवी म्हणून ख्यातनाम असलेल्या यशवंतांनी तेरा गद्य पुस्तके लिहिली असून त्यांतील ‘प्रापंचिक पत्रे’ व ‘समर्थ रामदास’ हे दोन ग्रंथ अभ्यास-व्यासंगपूर्ण आहेत. ‘कातिणीचे घर’ हा त्यांचा लघुनिबंधसंग्रहही वाचनीय आहे. बालकुमारांसाठीही त्यांनी काही पुस्तके लिहिली आहेत. ‘महाराष्ट्र साहित्य पत्रिके’चे संपादक म्हणून त्यांनी १९४७ ते १९५० या काळात काम केले. त्यांनी साहित्यशास्त्र, ग्रंथपरीक्षणे इ. लेखांना पत्रिकेत महत्त्वाचे स्थान देऊन पत्रिका सर्वसमावेशक केली. त्या काळात पत्रिकेचे स्वरूप ललित, वैचारिक, संशोधनपर असे बहुआयामी करण्यासाठी त्यांनी आपल्या संपादन कौशल्याचा वापर केला.

यशवंतांच्या काव्यामागे नाट्यदृष्टी होती असा निष्कर्ष सुप्रसिद्ध समीक्षक डॉ. आशा सावदेकर यांनी त्यांच्या ‘कवी यशवंत : एक आकलन’मध्ये काढलेला आहे. ‘सर्वाधिक लोकप्रिय असलेल्या यशवंतांची कविता कमालीची आत्मपर आहे; पण तीत कडवट निराशाही मिसळली आहे’, असा मराठी विश्वकोश खंड १२मध्ये ‘मराठी साहित्य’ या नोंदीत (पृ.१२२१) अभिप्राय नोंदविलेला आहे. मराठी कवितेत ‘यशवंतपर्व’ होते हे मात्र खरे!

– मधू नेने

**संदर्भ :**


१. *कानिटकर रा. प्र.; ‘साठ संमेलनाध्यक्ष’; उत्कर्ष प्रकाशन, पुणे; १९८८.*
२. *महाराष्ट्र साहित्य पत्रिका सूची-२००६*
३. *महाराष्ट्र साहित्य पत्रिका; जाने-मार्च १९८६.*
४. *जोशी महादेवशास्त्री; भारतीय संस्कृति कोश, खंड सहावा.*
५. *सावदेकर आशा; म. सा. पत्रिका अंक २५०-जुलै-सप्टें १९८९.*


य

## यादव, आनंद रतन

**कथाकार, कादंबरीकार, समीक्षक, ललित लेखक, लघुनिबंधकार**

**१३ नोव्हेंबर १९३५**



डॉ. आनंद यादव यांचा जन्म कोल्हापूर जिल्ह्यातील कागल गावी एका गरीब शेतमजुराच्या कुटुंबात झाला. अत्यंत प्रतिकूल परिस्थितीत घरातून पूर्णपणे विरोध असताना, शेतात मजुरी करून, वेळ मिळेल तेव्हा शाळेत जाऊन त्यांनी आपले शालेय शिक्षण पूर्ण केले. तशाच परिस्थितीत त्यांनी महाविद्यालयीन शिक्षण घेऊन मराठी व संस्कृत भाषांत एम.ए.च्या पदव्या प्राप्त केल्या आणि त्यानंतर मराठी भाषेतच ‘मराठी लघुनिबंध, प्रेरणा, प्रवृत्ती

व विकास' या विषयात पुणे विद्यापीठातून पीएच. डी.ची पदवी मिळवली.

प्रारंभी पंढरपूर येथे अध्यापन व नंतर आकाशवाणी केंद्रावर नोकरी करून अखेरीस त्यांनी दीर्घकालपर्यंत पुणे विद्यापीठात मराठी विभाग प्रमुख म्हणून कार्य केले. डॉ. यादव यांची ८२ व्या अखिल भारतीय मराठी साहित्य संमेलनाचे अध्यक्ष म्हणून त्यांची बहुमताने निवड झाली होती. परंतु त्यांनी लिहिलेल्या 'संतसूर्य तुकाराम' या चरित्रात्मक कादंबरीतील काही मजकुरावरून वाद निर्माण झाला. वारकऱ्यांच्या दबावामुळे डॉ. यादवांना अध्यक्षपदाचा राजीनामा द्यावा लागला.

या अध्यक्षपदापूर्वी त्यांनी अनेक प्रादेशिक, विभागीय आणि कामगार साहित्य संमेलनांचे अध्यक्षपद भूषविले आहे. जळगाव येथील १९९८चे पहिले समरसता साहित्य संमेलन, १९८६ चे बेळगाव येथील चौथे दक्षिण महाराष्ट्र साहित्य संमेलन, १९८७चे साक्री येथील पहिले दलित आदिवासी ग्रामीण संयुक्त साहित्य संमेलन, १९९० मधील भंडारा येथील चौथे जनसाहित्य संमेलन, १९९४चे नाशिक येथील कामगार साहित्य संमेलन, १९९६ चे तिसरे ठाणे जिल्हा मराठी साहित्य संमेलन, अशा सर्व संमेलनांत अध्यक्ष म्हणून त्यांनी आपल्या अभ्यासू वृत्तीची छाप पाडली होती.

**प्रतिकूलतेशी झोंबी**

शेतमळ्यात शेतमजूर म्हणून राबणारे रत्नू जकाते हे त्यांचे वडील व आयुष्यभर नवऱ्याच्या धाकात राहून, नवऱ्याचा मार खात मुलांना वाढवणारी तारा ही त्यांची आई. डॉ. आनंद यादवांना एकूण १० भावंडे होती, पण त्यांच्यापैकी शिक्षणाचे वेड, त्यासाठी वाटेल ते दिव्य करण्याची तयारी फक्त आनंद यादव ह्यांनीच दाखवली. घरातील दारिद्र्य, खाणारी भरपूर तोंडे, त्यामुळे घरादाराला आलेली अवकळा, शिक्षणाविषयी घरातून असणारे औदासीन्य आणि शिक्षण घेण्यासाठी आनंद ह्यांची होणारी तडफड, साऱ्या विरोधी शक्तींशी आणि प्रतिकूलतेशी झोंबी घेत-घेत, शिक्षणाची पायवाट सुटू न देता शिक्षणातून वाङ्मयाचे संस्कार घेत, वाङ्मयातील स्वप्निल जगाचा आधार घेत त्यांनी शिक्षणाचे शिखर यशस्वीपणे सर केले.

शालेय जीवनातच त्यांना वाचनाची गोडी लागली. पुस्तक वाचणे हे भिकेचे लक्षण आहे, असे म्हणणाऱ्या वडिलांच्या नकळत त्यांनी पुस्तके मिळवली आणि वाचली. शेतात राबताना भोवतीचा निसर्ग, हिरवाई यांनी त्यांच्यावर जणू गारूड केले. उपजत प्रतिभा असल्यामुळे शालेय जीवनातच त्यांनी जानपदगीते लिहून शिक्षकांची शाबासकी मिळवली. त्यानंतर १९५९ साली 'हिरवे जग' हा शेतीवरील कवितांचा ग्रामीण कवितासंग्रह प्रसिद्ध झाला. डॉ. आनंद यादव यांची साहित्यसंपदा विपुल असून त्यांची ४० पेक्षा अधिक पुस्तके प्रकाशित झाली आहेत.

**नवा साहित्यप्रकार**

'झोंबी' (१९८७) या त्यांच्या आत्मचरित्रमालिकेतील पहिल्या कादंबरीत दारिद्र्याचे आसूड खात जीव जगवीत ठेवणाऱ्या कुटुंबातील एका पोराच्या हाती 'पाटी पेणशील' आल्यापासून तो मॅट्रिक होईपर्यंत कराव्या लागलेल्या झोंबीची कथा आली आहे. 'नांगरणी' (१९९०) ह्या कादंबरीतून मॅट्रिकनंतर पुढील शिक्षणासाठी करावी लागलेली खडतर तपस्या चित्रित झाली आहे. 'घर' (१९९२), 'काचवेल' या सदर मालिकेतील पुढच्या दोन कादंबऱ्या. त्यांची पहिली कादंबरी 'गोतावळा' (१९७१) अतिशय प्रसिद्ध झाली.

आधुनिक यंत्रपद्धतीच्या आगमनामुळे कृषिसंस्कृतीचा कसा विस्फोट झाला, जुन्या संस्कृतीत असलेल्या निसर्ग, मानव, पशुपक्षी यांचा असलेला गोतावळा यंत्रयुगात कसा नामशेष झाला, याचे हृद्य चित्रण ग्रामीण बोलीत करणारी ही वाचकप्रिय कादंबरी आहे. 'नटरंग' ही तमाशा कलावंताच्या जीवनसंघर्षाचे दर्शन घडविणारी कादंबरी. एका मांजर कुटुंबाच्या कथेतून माणसाच्या आदिमनाचा शोध घेणारी 'माऊली' ही आगळी कादंबरी आहे. 'एकलकोंडा', 'कलेचे कातडे' यांशिवाय अगदी अलीकडच्या काळातील त्यांच्या दोन चरित्रात्मक कादंबऱ्या 'लोकसखा ज्ञानेश्वर', 'संतसूर्य तुकाराम' या

आहेत. दोन्ही संतांच्या जीवनातील विविध घटना, त्यांचे श्लोक, अभंग यांचा अभ्यास करून लिहिलेल्या या दोन साक्षेपी कादंबऱ्या आहेत. 'खळाळ' (१९८४) हा काव्यात्म ग्रामीण कथांचा त्यांचा पहिला कथासंग्रह आहे. 'घरजावई', 'माळावरची मैना', 'शेवटची लढाई', 'आदिताल', 'डवरणी', 'उखडलेली झाडं', 'भूमिकन्या', 'झाडवाटा', 'उगवती मने' हे त्यांचे कथासंग्रह होत.

'स्पर्शकमळे', 'पाणभवरे', 'मातीखालची माती', 'साहित्यिकाचा गाव', 'ग्रामसंस्कृती' ही ललित पुस्तकेही त्यांनी लिहिली.

'हिरवे जग' (१९५९), 'मळ्याची माती' हे त्यांचे काव्यसंग्रह आहेत. तसेच 'मायलेकरं', 'रानमेवा', 'सैनिकहो तुमच्यासाठी' हे बालकवितांचा संग्रह आहेत. 'ग्रामीण साहित्य, स्वरूप व समस्या', 'ग्रामीणता: साहित्य आणि वास्तव', 'मराठी साहित्य, समाज, आणि संस्कृती', 'साहित्याची निर्मिती प्रक्रिया', 'मराठी लघुनिबंधाचा इतिहास', 'आत्मचरित्र मीमांसा', '१९६० नंतरची सामाजिक स्थिती व साहित्यातील नवे प्रवाह', 'ग्रामसंस्कृती' हे त्यांचे वैचारिक व समीक्षात्मक लेखन होय. 'मातीतले मोती', 'निळे दिवस', 'तिसऱ्या पिढीची ग्रामीण कथा', 'कथावैभव', 'माझ्या आठवणी आणि अनुभव – 'विठ्ठल रामजी शिंदे' यांसारख्या ग्रंथांचे संपादन करून एक सव्यसाची संपादक म्हणून त्यांनी मान्यता मिळवली.

**'झाड' फुलून आले**

ग्रंथ नावाच्या वस्तूला जिथे अजिबात थारा नव्हता, अशा वातावरणात वाढलेल्या आनंद यादवांना साहित्य-निर्मितीची भूतबाधा झाली आणि 'झाड' फुलून आले. साहित्यनिर्मितीमुळे लाभलेल्या यशाच्या एका उंच पायरीवरून हा लेखक त्याच्यासारख्या साहित्याच्या भुताने पछाडलेल्या आणि उपेक्षेच्या अंधारातून प्रकाशाकडे झेपावणाऱ्या ग्रामीण भागातील तरुणांना हात देण्याच्या कामात गुंतला आहे. ग्रामीण समाजाचे प्रश्न, व्यथा, वेदना, सामाजिक जाणिवा साहित्यजगतात उमटाव्यात म्हणून १९७४ पासून डॉ. यादवांनी ग्रामीण साहित्य चळवळ सुरू केली, त्यासाठी खेड्यापाड्यांतील

य

अनेक सामाजिक, सांस्कृतिक, शैक्षणिक संस्थांमधून व्याख्याने, ग्रामीण साहित्यिकांसाठी शिबिरे, साहित्यिक मेळावे, कार्यशाळा घेऊन, ग्रामीण भागातील लेखक, शिक्षक यांचे संघटन करून त्यांची एक फळी निर्माण करण्याचे महत्त्वाचे कार्य डॉ. यादव अजूनही करीत आहेत.

त्यांच्या अनेक साहित्यकृतींचे कन्नड, हिंदी, उर्दू, तेलुगू, इंग्रजी, जर्मन या भाषांत अनुवाद झाले आहेत. कोलकाताच्या राष्ट्रीय हिंदी अकादमीचा उत्कृष्ट मराठी साहित्य निर्मितीचा पुरस्कार त्यांना १९९४ मध्ये मिळाला. त्यांच्या अनेक पुस्तकांना मिळून ४० पेक्षा अधिक पुरस्कार मिळाले आहेत. 'झोंबी'ला साहित्य अकादमी पुरस्कारासह आठ पुरस्कार मिळाले आहेत. तसेच त्यांना महाराष्ट्र राज्य शासनाचे एकूण चौदा पुरस्कार मिळाले आहेत.

त्यांच्या पीएच. डी. च्या प्रबंधास पुणे विद्यापीठाचे दोन पुरस्कार मिळाले आहेत. मराठी साहित्य पत्रिकेचे १९७९ ते १९८२ या काळात ते संपादक होते. राज्य मराठी विकास संस्था, जागतिक मराठी अकादमी या संस्थेच्या कार्यकारिणीचे सदस्य होते. राज्य माध्यमिक शिक्षण मंडळ, राज्य साहित्य आणि संस्कृती मंडळ यांचे सदस्य. मराठी साहित्य परिषद पुणे ह्या संस्थेचे १९९८ ते २००० या काळात उपाध्यक्ष. 'विचारभारती'चे ते काही काळ संपादक होते.

डॉ. आनंद यादव यांची मूळ प्रवृत्ती काव्यात्म असल्यामुळे, त्यांच्या गद्यातही काव्यात्मक भाषेचा साक्षेपी उपयोग झाल्याची अनेक उदाहरणे त्यांच्या लेखनात सापडतात. त्यांचे सर्व लेखन अभ्यासातून झाल्याचे जाणवते.

ग्रामीण साहित्याची जी एक गोंडस चौकट मराठी साहित्यात निर्माण झाली होती, ती डॉ. आनंद यादव यांच्या साहित्याने पार मोडून पडली. ग्रामीण जीवनातील कष्ट, हाल, सहनशक्तीची कसोटी पाहणारे प्रसंग यांचे अत्यंत वास्तव चित्रण, कोणत्याही अभिनिवेशाशिवाय त्यांनी केले आहे. अशा प्रकारे ग्रामीण साहित्याला वेगळा व कणखर आवाज देणाऱ्या, ग्रामीण जीवनाचे वास्तववादी चित्रण करणाऱ्या कथा, कविता, आणि कादंबऱ्यांचा लेखक म्हणून त्यांचे कर्तृत्व नक्कीच गौरवाला पात्र आहे.

– सविता टांकसाळे

**संदर्भ :**


१. *यादव आनंद; 'झोंबी'.*

२. *लोकसत्ता, महाराष्ट्र टाइम्स, सकाळ, सामना, लोकमत, पुढारी, केसरी व प्रभात या वृत्तपत्रांचे अंक (१७ जानेवारी २००९).*

३. *मेहता ग्रंथ जगत; जानेवारी २००९.*


* * *

य




## रसाळ, सुधीर नरहर
**समीक्षक**
**१० ऑगस्ट १९३४**



सुधीर नरहर रसाळ हे स्वातंत्र्योत्तर मराठी साहित्य-विश्वातील एक व्यासंगी व परखड समीक्षक. 'कविता आणि प्रतिमा' ह्या काव्यविषयक सैद्धान्तिक समीक्षाग्रंथांचे ते कर्ते आहेत. मराठवाडा विद्या-पीठाच्या मराठी विभागाचे ते प्रमुख असल्याने त्यांनी दीर्घकाळ अध्यापन, संशोधन व संपादनकार्य केले. औरंगाबादजवळील गांधिली हे रसाळ घराण्याचे मूळ गाव होय. वडील नरहर माणिक कुळकर्णी व आई इंदिराबाई. गावचे कुळकर्णीपद असल्याने वडिलांनी कुळकर्णी हे आडनाव लावले, परंतु इतर सर्व जण रसाळ हेच आडनाव लावीत. सुधीर रसाळ ह्यांचा जन्म औरंगाबाद जिल्ह्यातील वैजापूर येथे झाला. त्यांचे बिगरीपासून मॅट्रिकपर्यंतचे पूर्ण शिक्षण औरंगाबादच्या सरस्वतीभुवन हायस्कूल येथे झाले. पुढे डॉ. बाबासाहेब आंबेडकरांनी स्थापन केलेल्या पीपल्स एज्युकेशन सोसायटीज कॉलेजचे (मिलिंद महाविद्यालय) पहिल्यावहिल्या फळीचे ते विद्यार्थी होते.

र

बी.ए.ची पदवी १९५४मध्ये प्राप्त करून पदव्युत्तर शिक्षणासाठी ते हैद्राबाद स्टेटच्या उस्मानिया विद्यापीठात दाखल झाले व एम.ए. मराठी प्रथम श्रेणीत, प्रथम क्रमांकासह उत्तीर्ण झाले (१९५७). अध्ययनानंतर औरंगाबादच्याच शासकीय ज्ञानविज्ञान महाविद्यालयात तीन वर्षे अधिव्याख्यातापदावर त्यांनी अध्यापन कार्य केले. १९५९मध्ये मराठवाडा विद्यापीठात मराठी विभाग सुरू झाला, तेव्हा पहिल्याच वर्षी सुप्रसिद्ध समीक्षक वा.ल. कुलकर्णी व यु.म. पठाण यांच्यासमवेत त्या विभागात रसाळ हे अधिव्याख्याता म्हणून रुजू झाले. त्यानंतर निवृत्त होईपर्यंत, ऑगस्ट १९९४पर्यंत याच विभागात अधिव्याख्याता- प्रपाठक- प्राध्यापक अशा पदांवर ३४ वर्षे कार्यरत होते. वा.ल. कुलकर्णी ह्यांच्या मार्गदर्शनाखाली 'काव्यातील प्रतिमासृष्टी: मराठी काव्याच्या संदर्भात' ह्या विषयावर त्यांनी पीएच.डी.साठी संशोधन केले. ह्या पीएच.डी.प्राप्त प्रबंधाचे संस्कारित रूप म्हणजे 'कविता आणि प्रतिमा' हा गाजलेला काव्यविषयक मीमांसा-ग्रंथ होय. जून १९८२मध्ये तो ग्रंथ मौज प्रकाशनातर्फे प्रकाशित झाला. गुरुवर्य म.भि.चिटणीस यांना अर्पण केलेला हा मराठी साहित्यसमीक्षेतील काव्यविषयक सैद्धान्तिक विवेचनाचा एकमेव ग्रंथ कवितेचे स्वरूप शोधण्याच्या प्रेरणेतून सिद्ध झाल्याचे लेखक सांगतात. 'प्रतिमा' ही संकल्पना आणि तिचे काव्यातील महत्त्व व कार्य ह्यांची सांगोपांग मांडणी करणारा असा ग्रंथ मराठीत दुसरा नाही.

या ग्रंथाच्या चार भागांपैकी पहिल्या भागात कवितेचे स्वरूप, दुसऱ्या भागात भाषा व तिची निर्मितिप्रक्रिया, तिसऱ्या भागात प्रतिमेचे स्वरूप व चौथ्या भागात विविध काव्यप्रकार आणि त्यांतील प्रतिमा अशी विस्तृत, संदर्भसंपन्न मांडणी करण्यात आली आहे. कविता व प्रतिमा यांचा सांगोपांग विचार मांडतानाच कथात्म वाङ्मय आणि नाटक या प्रकारांतील प्रतिमेच्या कार्यावरही ते विवेचक प्रकाश टाकतात. भारतीय आणि

पाश्चात्त्य मतांतरांचा परामर्श घेत, अनेक गुंतागुंतींची उकल करीत, कठीण विषय सुगम पद्धतीने समजावून सांगण्याची रसाळांची समीक्षाशैली ह्या ग्रंथरूपाने आदर्श म्हणून स्थापित झाली. ह्याशिवाय त्यांचे 'काही मराठी कवी: जाणिवा आणि शैली' (१९८४) हे काव्यसमीक्षेचे पुस्तक प्रसिद्ध आहे. प्रमुख संपादित ग्रंथांमध्ये 'साहित्य: अध्यापन आणि प्रकार' (वा.ल. कुलकर्णी गौरव ग्रंथ, सहकार्याने संपादन, १९८७), 'गंगाधर गाडगीळ: निवडक समीक्षा' (१९९६), 'दासोपंत: गीतार्णव' (मराठवाडा विद्यापीठ) यांशिवाय जवळजवळ दीडशेवर समीक्षालेख विविध वाङ्मयीन नियतकालिकांतून व काही संपादित ग्रंथांतून प्रसिद्ध आहेत.

बहुतेक प्रमुख व गाजलेल्या चर्चासत्रांतून त्यांनी महत्त्वपूर्ण वाङ्मयीन विषयांवर निबंधलेखन केले आहे. विविध ललितसाहित्यकृतींच्या समीक्षणांप्रमाणेच मराठी भाषेची सद्यःस्थिती, मराठी साहित्याचे अध्यापन, वाचनसंस्कृती, मराठीच्या पीछेहाटीची कारणमीमांसा इत्यादी विषयांवर डॉ. रसाळांनी महाराष्ट्रभरातील विविध व्यासपीठांवरून मौलिक चिंतन मांडलेले आहे. त्यांच्या महत्त्वपूर्ण शोधनिबंध लेखांमध्ये 'मराठी समीक्षा' (मराठी: साहित्य प्रेरणा आणि स्वरूप, पॉप्युलर प्रकाशन, १९८६), 'ललित साहित्याचे अध्यापन: उद्दिष्टे व स्वरूप' व वा.ल. कुलकर्णी: साहित्यसमीक्षक व अध्यापक' (साहित्य: अध्यापन आणि प्रकार, १९८७) 'कविता' (वाङ्मयीन शैली आणि तंत्र, संपादक: हातकणंगलेकर), 'एक शून्य बाजीराव' (प्रतिष्ठान नाट्यविशेषांक, १९७१), 'वाचनसंस्कृती' (युगवाणी, ऑक्टोबर-नोव्हेंबर-डिसेंबर २००६) इत्यादी काही उदाहरणादाखल सांगता येतील.

रसाळांच्या प्रसिद्धिविन्मुख वृत्तीमुळे इतके महत्त्वपूर्ण समीक्षालेखन मराठीच्या अभ्यासकांना अजूनही ग्रंथरूपात एकत्रपणे उपलब्ध झालेले नाही. १९६० पासून जवळजवळ पुढली २० वर्षे मराठवाडा साहित्य परिषदेच्या 'प्रतिष्ठान' मासिकाचे संपादक म्हणून त्यांनी केलेले कार्यही वाङ्मयीन क्षेत्रातील साक्षेपी व रचनात्मक कार्याचा नमुना ठरावा. त्यांनी आपले बरेचसे समीक्षालेखन 'प्रतिष्ठान'च्या निमित्ताने केलेले आहे. ना. धों. महानोरांसारख्या प्रथितयश कवींच्या कविता प्रारंभी ७० च्या दशकात 'प्रतिष्ठान'मध्येच प्रसिद्ध करण्यात आल्या होत्या.

मराठवाडा साहित्य परिषद, मराठी साहित्य महामंडळ, विश्वकोश निर्मिती मंडळ, साहित्य अकादमी, इत्यादी विविध संस्थांमध्ये अध्यक्ष, सचिव व प्रमुख पदाधिकारी आदी पदांवर त्यांनी दीर्घकाळ कार्य केले. मराठवाडा विद्यापीठांतर्गत मराठीविषयक विविध समित्यांवर, अभ्यासमंडळांवर ते कार्यरत राहिले.

पीएच. डी. आणि एम. फिल. ह्या पदव्यांसाठी अभ्यास करणाऱ्या विद्यार्थ्यांना मार्गदर्शन करणाऱ्या रसाळ ह्यांना १९९२ चा महाराष्ट्र शासनाचा आदर्श शिक्षक पुरस्कार प्राप्त झाला. त्यांच्या 'कविता आणि प्रतिमा' या ग्रंथाला 'रा. श्री. जोग पुरस्कार' व 'महाराष्ट्र शासन साहित्य पुरस्कार' असे पुरस्कार मिळून सर्वस्तरीय मान्यताही प्राप्त झाली आहे.

विविध वाङ्मयीन विषयांवरील मूलगामी आणि मूल्यवेधी अशी निर्मळ, निकोप, पारदर्शक व वस्तुनिष्ठ दृष्टीची रसाळांची समीक्षा आहे. वाद-विचारांनी डागाळलेल्या, दुराग्रही-आक्रस्ताळ्या व कंपूबाजीत गुरफटलेल्या एकूण मराठी समीक्षेच्या गजबजाटात स्वतःच्या पृथगात्म तेजस्वितेने ती उठून दिसते. सर्वसाधारण निरपेक्ष वाङ्मयाभ्यासकाला आधार, दिलासा आणि निर्मळ दृष्टी देणारी त्यांची ही समीक्षाशैली आहे.

— डॉ. राजेंद्र नाईकवाडे

**संदर्भ :**


१. *रसाळ सुधीर, संपादक; 'साहित्य: अध्यापन आणि प्रकार'; मौज प्रकाशन गृह व पॉप्युलर प्रकाशन, मुंबई; १९८७.*

२. *पवार, हातणंगलेकर, संपादक; 'मराठी साहित्य: प्रेरणा व स्वरूप'; पॉप्युलर प्रकाशन; १९८६.*

३. *खोले विलास; 'विसाव्या शतकातील मराठी समीक्षा'; प्रतिमा प्रकाशन, पुणे; २००४*


र

## रांगणेकर, कुमुदिनी

**कादंबरीकार, कथाकार, अनुवादक**

**२५ मार्च १९०६ – १७ मार्च १९९९**



कुमुदिनी रांगणेकर (प्रभावळकर) यांचा जन्म कोल्हापूर येथे झाला. त्यांचे शिक्षण बी.ए.पर्यंत झाले. त्या लोकमान्य कन्याशाळेच्या मुख्याध्यापिका होत्या. त्यांचे वास्तव्य मुंबईला होते. कुमुदिनी रांगणेकरांची २३६ पुस्तके प्रकाशित झाली आहेत. कथा, कादंबरी, नाटक, एकांकिका असे विविध प्रकारचे साहित्य त्यांनी लिहिले. मात्र कादंबरी हा त्यांचा आवडता साहित्यप्रकार.

'नवल' मासिकातून अनेक इंग्रजी कादंबऱ्यांचे मराठी अनुवाद त्यांनी केले.

'अनियमित जग' (१९३४) ही त्यांची पहिली अनुवादित कादंबरी. 'प्रीतीचा शोध' (१९८०), 'फुललेली कळी'(१९८४), 'शकुनी मोहर' (१९८४), 'हरपलेलं गवसलं' (१९८७), 'क्षणाचं वैधव्य' (१९८८) या त्यांच्या काही लोकप्रिय कादंबऱ्या आहेत.

'चार उणे एक बरोबर दोन', 'स्वप्नातली कळी', 'मखमली वल्ली' (१९७८), 'मर्मबंध', 'सोन्याची शिडी', 'गंधाविना चंदन', 'स्वप्नाळू प्रीतशकुनी मोहर' (१९३२), 'एकेरी गाठ' (१९३७), 'कल्पना' (१९३८), 'बेसूर संगीत' (१९३८), 'विरलेले वस्त्र' (१९४०), 'परतदान' (१९४३), 'माळावरील खून' (१९५४), 'पुनर्जीवन' (१९५५), 'पैजेचा विडा' (१९५६), 'प्रीतीचा गोलघुमट' (१९५७), 'मोही नयना मना' (१९७९), 'नियती' (१९७९), 'रिती ओंजळ' (१९७९), 'कवठी चाफा'(१९७९), 'काजळरात' (१९८१), 'चकवा' (१९८१), 'कुस्करलेलं हृदय' (१९८२), 'रंगेल राजा' (१९८२), 'कडू अमृत' (१९८४), 'एकलीच दीपकळी' (१९८५), 'एकटी दुकटी' (२०००), 'ढगाळलेलं मन' (१९९६) अशा आणखी कादंबऱ्या आहेत. त्यांच्या कादंबऱ्यांची शीर्षके अर्थपूर्ण व आकर्षक असत.

सर्वसामान्य वाचकांचे मनोरंजन करणाऱ्या लोकप्रिय कादंबऱ्या त्यांनी सातत्याने लिहिल्या. विपुल लिहिणाऱ्या बहुप्रसव लेखिका म्हणून त्या वाचकवर्गात ख्यातनाम झाल्या.

– प्रा. अनुराधा साळवेकर

## रांगणेकर, मोतीराम गजानन

☞ **मुख्य नोंद – नाटक खंड**

## राजवाडे, राजाराम प्रभाकर

**कवी, विनोदकार, कथाकार, कादंबरीकार, ललितलेखक**

**१ जानेवारी १९३६ – २१ जुलै १९९७**



विनोदी लेखक म्हणून अधिक लोकप्रिय असलेल्या राजा राजवाडे यांनी कथा, कादंबरी, कविता, बालसाहित्य, ललितलेख इत्यादी वाङ्मय–प्रकारही लीलया हाताळले. राजा राजवाडे यांचा जन्म देवरूखजवळच्या (जिल्हा रत्नागिरी) निवे या छोट्या गावी झाला. त्यांचे वडील प्रभाकर राजवाडे यांचे देवरूखच्या बाजारपेठेत छोटेसे हॉटेल होते.

देवरूखच्या न्यू इंग्लिश स्कूलमधून एस.एस.सी. झाल्यावर ते मुंबईला खालसा महाविद्यालयात दाखल झाले. तिथे बी.ए. करून त्यांनी महानगरपालिकेत नोकरी मिळवली आणि पुढे सिडकोमध्ये ते प्रसिद्धी अधिकारी म्हणून रुजू झाले. तेथून ते प्रमुख जनसंपर्क अधिकारी म्हणून निवृत्त झाले. कोकण मराठी साहित्य परिषदेचे मुंबई जिल्हाध्यक्ष म्हणून ते कार्यरत होते. याच संस्थेची सभा आटोपून येत असताना पनवेलजवळ त्यांचे अपघाती निधन झाले.

गिरगावमधील वाङ्‌मयीन वातावरण, प्रगत साहित्य सभेमधील मित्रपरिवार व चांगले वाचन यांचा परिणाम म्हणून महापालिकेत नोकरी करीत असतानाच त्यांनी लेखनाला सुरुवात केली. त्यांचे प्रारंभीचे लेखन सामाजिक जाणिवांनी प्रभावित झालेले आहे. त्यांच्या प्रारंभीची दीर्घ कविता 'किलावेनमानीची रात्र' (१९६९), त्याचप्रमाणे 'धुमसणारं शहर' (१९७५), 'कार्यकर्ती' (१९७९), 'अस्पृश्य सूर्य' (१९७८) 'दुबई दुबई' (१९८०) या कादंबऱ्यांचा त्या दृष्टीने उल्लेख करता येतो.

एकाच वेळी कथा, कादंबरी, विनोदी लेख, विनोदी कादंबऱ्या, स्तंभलेखन, ललित-गद्य, व्यक्तिचित्रे, बालसाहित्य, कविता असे वेगवेगळ्या प्रकारचे लेखन करणाऱ्या राजवाड्यांनी चित्रपटकथा नाटक व लोकनाट्य यांसारखे प्रयोगशील प्रकारही हाताळले आहेत. राजवाड्यांनी लहानमोठ्या अशा जवळपास ७६ पुस्तकांचे लेखन चाळीस वर्षांत केले. उच्च मध्यमवर्गीय व मध्यमवर्गीय जीवनाचे स्त्री-पुरुषांच्या जीवनातील ताणतणाव, नोकरी करणाऱ्या विवाहित व अविवाहित स्त्रियांचे प्रश्न, त्यांची नोकरीत होणारी कुचंबणा, प्रेमी युगुलांचे प्रणयाराधन, बलात्कारित व फसवणूक झालेल्या असाहाय्य अबलांची दुःखे, सिने व नाट्यसृष्टीतील स्त्री-पुरुष कलावंतांच्या जीवनातील संघर्ष इत्यादींचे चित्रण राजवाडे यांच्या लेखनात प्रामुख्याने आढळते.

त्यांनी विविध विषयांवर चटपटीत स्वरूपाचे रंजनपर लेखन केले असले तरी लक्षवेधक लेखनही केले आहे. 'दोस्ताना' (व्यक्तिचित्रे), 'डॉग व्हॅन' (कथा, १९८९), 'घर आमचं कोकणातलं' आणि 'माणसं आमच्या कोकणातली' (ललित लेख, १९९० व १९९८) अशा काही पुस्तकांचा व लेखांचा उल्लेख या संदर्भात करता येतो.

– अशोक बेंडखळे

**संदर्भ :**

*१. राजवाडे माधव (संपादक, प्रकाशक); 'या मृत्यूला क्षमा नाही'; मुंबई; १९९८.*

## राजवाडे, विश्वनाथ काशीनाथ

☞ **मुख्य नोंद – पत्रकारिता आणि ललितेतर साहित्य खंड**

## राजाध्यक्ष मंगेश विठ्ठल

**समीक्षक, ललित लेखक**

**७ जून १९१३**



इंग्रजी वाङ्‌मयाच्या गाढ्या व्यासंगाने सिद्ध झालेल्या भूमिकेतून, संवेदनशीलपणे व तेवढ्याच रसिकतेने सामाजिक, सांस्कृतिक व वाङ्‌मयीन क्षेत्राचा मार्मिक वेध घेणारे समीक्षक, ललित लेखक म्हणून मंगेश राजाध्यक्ष महाराष्ट्राला परिचित आहेत. त्यांचा जन्म मुंबईत, शिक्षण छबिलदासमध्ये तर महाविद्यालयीन शिक्षण मुंबईच्या एल्फिन्स्टन महाविद्यालयात झाले. १९३६ ते १९७१ या काळात ते अहमदाबाद, कोल्हापूर व मुंबई येथील शासकीय महाविद्यालयांमध्ये इंग्रजीचे प्राध्यापक म्हणून कार्यरत होते.

'अभिरुची' या मासिकातून त्यांच्या लेखनाला प्रारंभ झाला. त्यात त्यांनी 'वादसंवाद' हे सदर 'निषाद' हे टोपणनाव घेऊन लिहिले. 'पाच कवी' हा १९४६ साली प्रसिद्ध झालेला त्यांचा महत्त्वपूर्ण ग्रंथ. यामध्ये केशवसुत, ना.वा.टिळक, विनायक, गोविंदाग्रज, बालकवी यांच्या निवडक कविता व त्या कवींवर व त्या काळच्या कवितेवरील निबंधांचे संपादन त्यांनी केले आहे. यात आधुनिक कवितेचे अंतरंग त्यांनी उलगडून दाखविले आहे. तसेच आधुनिक मराठी साहित्याची ऐतिहासिक उपपत्तीही मांडली आहे. अंतर्मुखता हे नव्या काव्याचे प्रमुख लक्षण सांगून काव्यातील ऐहिकतावाद, निसर्गप्रेम व गूढवादाचा उलगडाही त्यांनी केला आहे, आणि कवितेच्या बहिरंगामध्ये कसा बदल झाला हे स्पष्ट केले आहे. त्यांचा 'अम्लान' (१९८३) हा समीक्षात्मक ग्रंथही मराठी समीक्षाव्यवहाराला वेगळी दृष्टी देणारा आहे.

र

'खर्डेघाशी' (१९८३) या पुस्तकातून साहित्यसृष्टीचे उपहासात्मक दर्शन त्यांनी घडविले आहे. संवेदनशीलता, रसिकता, चौफेर दृष्टी आणि प्रगल्भ विश्लेषण यांमुळे त्यांचे हे लेखन साहित्यसृष्टीच्या गुणदोषांवर नेमकेपणाने बोट ठेवते. 'शब्दयात्रा' (१९८६) हे त्यांचे साहित्यविषयक टिपणांचे पुस्तकही साहित्यविषयक जाणिवा समृद्ध करणारे आहे.

समीक्षात्मक लेखनाबरोबरच हलकेफुलके पण तेवढेच दर्जेदार असे लघुनिबंध व ललितलेखही त्यांनी लिहिले आहेत. 'आकाशभाषिते' (१९६३), 'पाक्षिकी' (१९८६), 'पंचम' (१९८६), 'शालजोडी' (१९८३) ह्या त्यांच्या पुस्तकांचा वेध घेतला म्हणजे त्यांच्या संवेदनशीलतेचे आणि प्रगल्भतेचे दर्शन घडते.

कोणताही विषय असो, त्यांच्या लेखणीतून तो साकारला म्हणजे त्याचे अंतर्बाह्य स्वरूप आपल्यासमोर प्रकट होणारच. शिवाय विषयाला बंधन नाही. 'आंबोली'सारखे निसर्गसौंदर्याने नटलेले गाव ते आपल्या लेखातून जसे जिवंतपणे साकारतात तसेच शामगढसारखे आडवळणाचे रेल्वे स्टेशनही. कविवर्य अनिल आणि बाबूराव चित्रे या दिग्गजांची व्यक्तिचित्रे आपल्या लेखामधून ते जेवढ्या सहृदयतेने रेखाटतात, तेवढ्याच सहृदयतेने 'शेवटच्या ट्रॅम'वर ते लेख लिहून जातात. त्यांचा टीकालेख असो, व्यक्तिचित्र असो, स्थलचित्र असो वा विनोदी लेख असो, त्यातून जाणवते की सत्याला आंतरिक प्रतिसाद आणि असत्यावर प्रहार हे त्यांच्या लेखणीचे ब्रीद आहे, आणि ते त्यांनी कसोशीने पाळलेले आहे.

त्यांचा कुसुमावती देशपांडे यांच्या सहकार्याने लिहिलेला 'हिस्टरी ऑफ मराठी लिटरेचर' हा ग्रंथही महत्त्वपूर्ण आहे. 'अभिरुची' या मासिकामधून राजाध्यक्ष, पु.ल.देशपांडे आणि अळूरकर या तिघांनी मिळून 'पुरुषराज अळूरपांडे' या आगळ्यावेगळ्या नावाने स्फुट लेखन केले आणि ते खूप गाजले. तीन लेखकांनी मिळून लेखन करण्याचा हा एक अभिनव प्रयोग मराठी साहित्यजगताला अनुभवायला मिळाला.

लेखनाबरोबरच राजाध्यक्षांनी नॅशनल बुक ट्रस्ट, भारतीय ज्ञानपीठ निवड समिती, साहित्य अकादमी मराठी समिती, चित्रपट सल्लागार समिती, इत्यादी समित्यांवर सभासद म्हणून कार्य केलेले आहे. तसेच महाराष्ट्र राज्य पाठ्यपुस्तक व अभ्यासक्रम संशोधन मंडळाचे मुख्य संपादक म्हणूनही जबाबदारी पार पाडलेली आहे. 'अम्लान' या त्यांच्या ग्रंथास राज्यशासनाचा पुरस्कार प्राप्त झालेला आहे.

राजाध्यक्षांच्या साहित्यलेखनाचे चिंतन केले म्हणजे खंत वाटते ती ही की, त्यांनी लेखनाचे सातत्य ठेवले नाही आणि जे लिहिले त्याला पुस्तकरूप दिले नाही. त्यामुळे मराठी साहित्यसृष्टीला, रसिकांना आणि अभ्यासकांना त्यांनी एक प्रकारे अतृप्त ठेवले आहे. असे असले तरी, त्यांचे लेखन सत्यनिष्ठेवर पोसलेले असल्यामुळे बावनकशी सोन्याप्रमाणे झळाळणारे आहे. समीक्षाव्यवहाराला नवीन दृष्टी प्रदान करणारा समीक्षक आणि शैलीदार ललितलेखक म्हणून त्यांचे योगदान सर्वमान्य आहे.

– डॉ. संजय देशमुख

**संदर्भ :**


१. *'पाच कवी'; कर्नाटक प्रकाशन संस्था, मुंबई; १९८२.*

२. *राजाध्यक्ष मं.वि.; 'अम्लान'; चेतश्री प्रकाशन, अमळनेर; १९८३.*

३. *जोशी लक्ष्मणशास्त्री; 'आधुनिक मराठी साहित्याची समीक्षा व रससिद्धांत'; व्हीनस प्रकाशन, पुणे; १९७२.*


## राजाध्यक्ष, विजया मंगेश

**कथाकार, समीक्षक, संशोधक**

**५ ऑगस्ट १९३३**

मराठी नवकथेने निर्माण केलेल्या नव्या वाङ्मयीन वातावरणात लिहू लागलेल्या साहित्यिकांपैकी एक प्रमुख साहित्यिक विजया राजाध्यक्ष यांचा जन्म मिरज येथे झाला. आईचे नाव सरस्वती गणेश आपटे, वडिलांचे नाव गणेश रामचंद्र आपटे. कोल्हापूरला, प्रतिष्ठित असणाऱ्या एकत्र कुटुंबात संगोपन झाले. सुसंस्कारित असे बालपण आणि



शालेय व महाविद्यालयीन जीवन गेले. ब्रँच राजाराम हायस्कूलमधून एस.एस.सी. (१९५०), राजाराम महाविद्यालयातून बी.ए. (१९५४), पुणे विद्यापीठाची एम.ए.ची पदवी (१९५६) घेतली. लेखक व समीक्षक असणाऱ्या प्रा.मं.वि.राजाध्यक्ष यांच्याशी विवाह (१९५६) त्यानंतर मुंबईत वास्तव्य केले. एल्फिन्स्टन मुंबई विद्यापीठाची पीएच.डी. (१९८०) श्रीमती नाथीबाई दामोदर ठाकरसी महिला विद्यापीठात पदव्युत्तर मराठी विभाग प्रमुख निवृत्त झाल्यानंतर याच विद्यापीठात 'सुप्रतिष्ठ प्राध्यापक' (Professor Emeritus) म्हणून नियुक्ती झाली. दोन्ही विद्यापीठांतील एम.फिल. व पीएच.डी. करणाऱ्या विद्यार्थ्यांच्या मार्गदर्शक आहेत.

कोल्हापूर ते मुंबई हे स्थलांतर विजयाबाईंच्या वैयक्तिक आयुष्याबरोबर वाङ्मयीन जीवनाच्या दृष्टीनेही महत्त्वाचे ठरले. 'कलापूर' असणाऱ्या लहानशा गावातील पारंपरिक, जुन्या जीवनसरणीचे संचित घेऊन मुंबईसारख्या मोठ्या, बहुरंगी, आधुनिक जीवनशैली असणाऱ्या शहरात आल्यानंतर प्रत्येक कलाक्षेत्रातील नवतेचे भान वाढत गेले. १९५० मध्ये 'कशाला आलास तू माझ्या जीवनात!' ही त्यांची पहिली कथा, 'स्त्री' मासिकात प्रकाशित झाल्यानंतर; 'अधांतर' (१९६५) ते 'जास्वंद' (२००७) या कालावधीत 'विदेही' (१९७२), 'अनोळखी' (१९७३), 'अकल्पित' (१९७६), 'कमान' (१९७८), 'हुंकार' (१९८४), 'अनामिक' (१९९०), 'समांतर' (१९९९) असे एकूण वीस कथासंग्रह प्रसिद्ध झाले आहेत.

विजयाबाईंची कथानिर्मितीची प्रदीर्घ वाटचाल अनेक दृष्टींनी विकसनशील असल्याचे जाणवते. जाणिवांची व्यामिश्रता व अभिव्यक्तीतील प्रयोगशीलता यातून ही कथा सकस होत आली आहे. आत्मकेंद्रित, स्वप्नाळू चित्रणाकडून कौटुंबिक व सामाजिक वास्तवाच्या दर्शनाकडे, अतिरिक्त काव्यात्मता व अलंकारिकता जाऊन साध्यासोप्या भाषेकडे, भावनात्मकतेपेक्षा मूल्यात्मक जाणिवेकडे, विविध घाटांचे उपयोजन करण्याचा प्रयोग, वानप्रस्थाश्रमाच्या संवेदनशीलतेतून घेतलेला जीवनाचा वेध, नाट्य व काव्य यांचा समन्वय साधणारी 'त्रिवेणी'सारखी कथा, कादंबरीच्या पाऊलखुणा उमटवणाऱ्या दीर्घकथा ('आधी-नंतर' हा संग्रह) असा हा कथाप्रवास आहे. गौरी देशपांडे यांच्या कथेत प्राधान्याने नित्यमुक्त, सहजमुक्त स्त्री आहे, तर विजयाबाईंच्या कथेत वेगवेगळ्या पिढ्यांतील बद्धमुक्त स्त्रीची जीवनकहाणी आहे. 'लेखकांत लिंगभेद मानू नये' ही विजयाबाईंची धारणा लक्षात घेऊनही 'जन्म', 'कमल', 'विदेही', 'देह मृत्यूचे भातुके', 'ऋतुचक्र' यांसारख्या कथा विजयाबाईंसारखी लेखिकाच लिहू शकते, असे वाटल्यावाचून राहत नाही.

विजया राजाध्यक्ष यांचे कथाविश्व स्त्रीलक्ष्यी असले, तरी मानवी मन व जीवन यांविषयीचे त्यातील आकलन स्त्रीवादी वा अशा कोणत्या विचारप्रणालीच्या चौकटीतले नाही. आयुष्यातल्या गुंतागुंतीचे भान त्यातून प्रकट होते, जीवनाकडे पाहण्याच्या विविध दृष्टी त्यातून सूचित झाल्या आहेत. जन्म-मृत्यू, श्रद्धा-अश्रद्धा, न्याय-अन्याय, साफल्य-वैफल्य यांच्यातील जटिलतेचे भान राखत, मानवी अस्तित्व, संस्कृती व मूल्यविचार अशा अनेक संदर्भातील स्वत्वाचा शोध हे त्यांच्या कथेचे बलस्थान आहे. परंपरा व आधुनिकता यातील निरंतर द्वंद्वाची जाण ठेवत जुन्या-नव्याचा पुनर्विचार, संतुलन व समन्वय अशा जाणिवा त्यातून व्यक्त होतात. ज्या नवसाहित्याच्या प्रभावकाळात विजयाबाईंच्या लेखनाला आरंभ झाला, त्यातील नवतेच्या जाणिवेत, रोमॅन्टिक परंपरेला छेद हा एक ठळक विशेष होता. पण विजयाबाईंच्या एकूण लेखनात सूक्ष्मपणे व व्यापक अर्थाने आशावादी जीवनजाणीव प्रत्ययाला येते. साध्या माणसाची निरागसता, स्त्रीचे सर्जनशील मनोबल, माणुसकी, मानवी अस्तित्वाचे सातत्य, सहजीवनातून मिळणारी मनःशांती, अभागी जीवांसाठी जगण्याचे मूल्य, आणि मानवी

र

निर्मितिशीलता यावरील दृढ विश्वास प्रकट होत राहतो. संवादाची व समन्वयाची एक व्यापक अशी मूल्यजाणीव विजयाबाईंच्या व्यक्तित्वात आहे. त्यांची समीक्षाही केवळ जाणकारांसाठी नाही तर सर्वसामान्य रसिकाला आस्वादाची प्रेरणा देणे व चिकित्सेला पोषक वातावरण निर्माण करणे ही संवादाची भूमिका त्यामागे असल्यामुळे सुगम भाषाशैली हे तिचे महत्त्वाचे वैशिष्ट्य आहे. विजयाबाईच्या आस्वादक व विश्लेषक दृष्टींचा संगम त्यात आहे.

'कथा' या वाङ्मयप्रकाराशी विजयाबाईंची प्रधान निष्ठा असली तरी, 'ललित लेख' या रचनाप्रकारातही त्यांनी लक्षणीय लेखन केले आहे. 'कदंब' (१९७९), 'स्वच्छंद' (१९८७) आणि 'अनुबंध' (१९९८) या संग्रहामध्ये आत्मपर लेख व व्यक्तिचित्रे यांचा समावेश आहे. अनेक प्रतिभावंतांच्या कर्तृत्वाचे काही अपरिचित पैलू त्यात प्रकट झाले आहेत. 'नित्य नवा दीस जागृतीचा' या सदरलेखनात एका मध्यमवर्गीय, चाळिशीच्या टप्प्याशी पोचलेल्या स्त्रीच्या आयुष्यातील 'जागृती'च्या दिवसांची रेखाटने आहेत; तर 'अवतीभवती' (१९८२) या संग्रहात मुंबईच्या बहुरंगी जीवनाशी आणि माणसे, नाटके, चित्रपट, संगीत, पुस्तके (विशेषतः कविता) या सगळ्याशी संवाद साधू पाहणाऱ्या विजयाबाईंच्या रसिक, संवेदनशील व्यक्तिमत्त्वाचे दर्शन घडते. 'तळ्यात...मळ्यात'मधील (१९९७) लेखन, वानप्रस्थाश्रमातील संवेदनशीलतेतून आकारला आले आहे. 'साठ वर्षांच्या जगण्यातून कळत गेलेले सत्य विजयाबाईनी मांडले आहे; ते आयुष्याविषयी, जगण्यातील श्रेयाविषयी आहे. 'बहुपर्यायी आयुष्य जगताना अनेक वाटा खुल्या होतात, संपूर्णत्वाचा शोध अधिक आत्मविश्वासाने घेता येतो. त्यासाठी त्या वाटांचे एकमेकांशी काही नाते मात्र हवे. ते नाते शोधणे म्हणजेच जगणे!' 'स्वतःभोवती वेगाने फिरणाऱ्या नातेसंबंधाच्या, कर्तव्याच्या, कामाच्या चक्रात स्वतः एखाद्या स्थिर आसासारखे राहणे, आणि तरीही ते चक्र फिरते ठेवणे हे खरे श्रेय.' विजयाबाईंचा जीवनाकडे पाहण्याचा दृष्टिकोन या चिंतनातही अनुस्यूत आहे.

समीक्षक व संशोधक या नात्यांनीही विजयाबाईंची कामगिरी अतिशय महत्त्वाची आहे. १९५५ च्या सुमाराला परीक्षणे (मुख्यतः 'सत्यकथेत') लिहिल्यापासून त्यांनी समीक्षात्मक लेखन सुरू केले. 'कवितारती' (१९७९), 'जिव्हार स्वानंदाचे' (१९८१) आणि 'वेध कवितेचा' (१९९०) या त्यांच्या समीक्षा-लेखसंग्रहात तसेच 'कविता दशकाची' (१९८०) या सहकार्याने केलेल्या संपादनांत, विविध प्रवृत्ती असणाऱ्या कवींच्या अनुभवविश्वाचे व आविष्कार-विशेषांचे विवेचन आहे. 'संवाद' (१९८५) या निराळ्या, वैशिष्ट्यपूर्ण पुस्तकात, वा. ल. कुलकर्णी, गंगाधर गाडगीळ व गो. वि. करंदीकर यांच्या प्रदीर्घ वाङ्मयीन मुलाखतीतून मराठी साहित्य व समीक्षा यांच्या अभ्यासासाठी उपयुक्त अशी साधनसामग्री विजयाबाईंनी उपलब्ध करून दिली. श्रेष्ठ व युगप्रवर्तक नवकवी बा.सी.मर्ढेकर हा विजयाबाईंचा आयुष्यभराचा ध्यास आहे. 'मर्ढेकरांची कविता : स्वरूप आणि संदर्भ' (१९९१) ह्या त्यांच्या द्विखंडात्मक ग्रंथात मर्ढेकरांच्या काव्याचा संशोधनपूर्वक केलेला सर्वांगीण अभ्यास आहे. या संशोधनातून मिळालेल्या चरित्रात्मक सामग्रीच्या आधारे, मर्ढेकरांच्या आयुष्याशी व कवितेशी संबंधित अशा लेखांचा संग्रह 'पुन्हा मर्ढेकर'मध्ये (२००८) आहे, तर 'शोध मर्ढेकरांचा' (२००९) या पुस्तकातील लेखन, मर्ढेकरांच्या व्यावसायिक व वाङ्मयीन जीवनावर भर देणारे आहे. 'आदिमाया' (१९९०) (विंदा करंदीकरांच्या प्रेमकवितांचे संपादन व प्रस्तावना) आणि 'करंदीकरांचे समग्र लघुनिबंध' (१९९६) (संपादन व प्रस्तावना) या पुस्तकानंतरचा 'बहुपेडी विंदा' (खंड १- २००५ व खंड २- २००६) हा विजयाबाईंचा ग्रंथ लक्षणीय आहे. गो. वि. करंदीकर यांच्या समग्र साहित्याचे परिशीलन करणारा, हा मराठीतील पहिलाच द्विखंडात्मक समीक्षाग्रंथ आहे. 'मराठी वाङ्मयकोश (खंड ४)- समीक्षा-संज्ञा' (२००२) (महाराष्ट्र राज्य साहित्य आणि संस्कृती मंडळ) या मौलिक ग्रंथाच्या समन्वयक संपादक या नात्याने विजयाबाईंनी महत्त्वाची जबाबदारी पार पाडली. सुनीता देशपांडे यांच्या आत्मकथनावरील, 'आहे

र

मनोहर तरी: वाचन आणि विवेचन' (२०००) हे श्री.पु.भागवत यांच्या सहकार्याने संपादित केलेले पुस्तकही वैशिष्ट्यपूर्ण आहे. श्रीमती नाथीबाई ठाकरसी महिला विद्यापीठात आयोजित केलेल्या कार्यशाळा, चर्चासत्रे व संशोधनप्रकल्प अशा उपक्रमांतून विजयाबाई व त्यांचे सहकारी यांनी मिळून संपादित केलेली उपयुक्त पुस्तके सिद्ध झाली; 'हास्य-विनोद-सुखात्मिका' (१९९२), 'वाङ्मयीन पत्रव्यवहार' (१९९३), 'कथाशताब्दी' (१९९३) आणि 'प्रबंधसार' (१९९३). अशा तऱ्हेने लेखिका, समीक्षक व अध्यापक अशी तीन रूपे विजयाबाईंच्या वाङ्मयीन व्यक्तिमत्त्वात समाविष्ट आहेत. गेल्या अर्धशतकातील वाङ्मयीन संस्कृतीच्या त्या साक्षीदार तर आहेतच, शिवाय ही संस्कृती घडवण्यातही त्यांचा महत्त्वपूर्ण सहभाग आहे. त्यांच्या या बहुविध साहित्यिक कर्तृत्वाचा उचित असा गौरव करणारे अनेक पुरस्कार, पारितोषिके व मानसन्मान त्यांना लाभले आहेत. 'अधांतर', 'विदेही', 'पारंब्या' या तीन कथासंग्रहांना व 'बहुपेडी विंदा' या ग्रंथाला महाराष्ट्र शासन राज्यपुरस्कार; 'कवितारती'ला राज्य पुरस्काराबरोबर रा.श्री.जोग समीक्षा पारितोषिक, तसेच ह.श्री.शेणोलीकर पुरस्कार; मर्ढेकरांची कविता स्वरूप आणि संदर्भ या द्विखंडात्मक ग्रंथाला 'साहित्य अकादमीचा पुरस्कार', तसेच 'कै.केशवराव कोठावळे पुरस्कार', सर्वोत्कृष्ट विद्यापीठ अध्यापक गौरव पुरस्कार इत्यादी. त्याचबरोबर विद्यापीठ अनुदान आयोगातर्फे 'एमिरिटस फेलोशिप' ही त्यांना प्रदान करण्यात आली होती. मराठी वाङ्मय परिषद, बडोदे, कोकण मराठी साहित्य परिषद, मुंबई महानगर संमेलन, इंदूर येथे झालेल्या ७४व्या अखिल भारतीय साहित्य संमेलनाच्या अध्यक्षपदाचा मान त्यांना प्राप्त झाला. आशा बगे, अंबिका सरकार व सानिया या कथाकारांनी, त्यांच्या कथालेखिका म्हणून झालेल्या घडणीत, विजयाबाईंच्या कथांचा वाटा होता, असे कृतज्ञतापूर्वक उल्लेख केलेले आढळतात.

– प्रा.मीना गोखले

**संदर्भ :**


*१. देशपांडे शिरीष गोपाळ, संपादक; 'कथाकार विजया राजाध्यक्ष'; नाथीबाई दामोदर ठाकरसी विद्यापीठ प्रकाशन; १९९५.*

*२. राजाध्यक्ष विजया; 'अन्वयार्थ'; मौज प्रकाशन गृह; २००१.*


## राजे, शैलजा प्रसन्नकुमार

**कथाकार, कादंबरीकार, चरित्रकार**

**१२ एप्रिल १९२०**



पूर्वाश्रमीच्या शकुंतला दत्तात्रय कोतवाल म्हणजेच शैलजा राजे यांचा जन्म मुंबईचा. त्यांनी कला शाखेतून पदवीपर्यंत शिक्षण घेतले. त्यांनी विपुल प्रमाणात साहित्य निर्मिती केलेली असून कथा, कादंबरी, ललितगद्य, बाल-साहित्य, अनुवाद, चरित्र असे साहित्याचे विविध प्रकार हाताळले आहेत. त्यांची १२०पेक्षा अधिक पुस्तके प्रकाशित झाली आहेत.

स्वातंत्र्योत्तर काळात स्त्री-विषयक नियतकालिकांची संख्या वाढल्यामुळे ज्या लेखिकांच्या लेखनाला उत्तेजन मिळाले आणि विशेष लोकप्रियता लाभली त्यांपैकी एक शैलजाताई आहेत. बहुतेक कथा-कादंबऱ्या तारुण्यातील प्रेम, प्रेमाचा कैफ, स्वप्नभंग, विवाहबाह्य संबंध, निपुत्रिकाचे दुःख, मन एकापाशी आणि शरीर दुसरीकडे असल्यामुळे येणारी अगतिकता यांसारख्या विषयांभोवती गुंफल्या आहेत. कथानकाची साधीसोपी मांडणी आणि आयुष्यातले पेचप्रसंग सहजगत्या सोडविण्याची हातोटी, यांमुळे त्यांचे लिखाण रंजकतेकडे झुकते. घटनाप्रधानता, स्वप्नरंजन आणि आदर्शवाद हा त्यांच्या लिखाणाचा स्थायिभाव आहे. एकंदर ५३ कादंबऱ्या, ३९ कथासंग्रह, ४ ललितगद्य, २ चरित्रे, मुलांसाठीची सुमारे २५ पुस्तके प्रसिद्ध झाली आहेत. 'स्वरवंदन' (१९७०) हे ज्योत्स्ना भोळे यांचे नाट्यपूर्ण चरित्र आहे तर

स्वातंत्र्यवीर सावरकरांच्या आयुष्यावर लिहिलेल्या ‘यज्ञ’ (१९६८) या कादंबरीसाठी भा.द.खेर यांच्याबरोबर त्यांनी सहलेखन केले. ‘वतन’ (१९७९) या चरित्रात्मक कादंबरीत त्यांनी रंगोबापू गुप्ते यांची सत्यकथा मांडली आहे. छत्रपती प्रतापसिंह राजांना न्याय मिळावा म्हणून आलवण नेसून ब्रिटिशांच्या हातावर तुरी देऊन पळून जाणाऱ्या रंगो बापूंची व्यक्तिरेखा रंगवताना त्यांनी घेतलेले परिश्रम जाणवतात. ‘तुळशीपत्र’ (१९७३) ही कादंबरी सावरकरांच्या येसूवहिनींवर लिहिली आहे. ‘खणानारळाची ओटी’ या ललितगद्यातून आई–मुलीचा पत्रव्यवहार समोर येतो. त्यामधून संसारात जमवून घेण्याचा उपदेश आई मुलीला करते.

चमत्कृतिपूर्ण मांडणी, योगायोग, सुखद शेवट या लेखनवैशिष्ट्यांमुळे शैलजा राजे यांचे लेखन त्या काळात लोकप्रिय ठरले. त्यांच्या लेखनात पारंपरिक साचेबद्धता जाणवत राहते, तरीही काही आदर्श मूल्ये वाचकांच्या मनावर बिंबवण्याचे काम त्यांनी लेखनाद्वारे केल्याचे जाणवत राहते.

– मृणालिनी चितळे

**संदर्भ :**

१. *डॉ. फडके भालचंद्र; ‘मराठी लेखिका चिंता आणि चिंतन’; श्रीविद्या प्रकाशन, पुणे.*

२. *खाडगे मंदा, ‘दीक्षित लीला: स्त्री साहित्याचा मागोवा’.*

## रानडे, अशोक दामोदर

☞ **मुख्य नोंद – संगीत खंड**

## रानडे, प्रतिभा पंढरीनाथ

**कथाकार, कादंबरीकार**

**२० ऑगस्ट १९३७**

प्रतिभा रानडे (पूर्वाश्रमीच्या प्रतिभा गणेश भिडे) यांचा जन्म पुण्याचा असून त्यांचे बालपण कोल्हापुरात गेले. १९५४ साली ‘महाराणी लक्ष्मीबाई गर्ल्स हायस्कूल’मधून त्या शालान्त परीक्षा उत्तीर्ण झाल्या. १९५८ साली राजाराम महाविद्यालयामधून त्या पदवीधर



झाल्या व नंतर त्यांनी पत्रकारितेतही पदविका घेतली. ‘टाटा इन्स्टिट्यूट ऑफ सोशल सायन्सेस’ येथे त्यांनी काही काळ संशोधनकार्य केले. लेखिका म्हणून त्यांचे नाव विवाहानंतरच झाले. १९७४ साली ‘केसरी’तून पहिला लेख प्रसिद्ध झाला. अमृता प्रीतम या ज्ञानपीठ विजेत्या लेखिकेच्या ‘बंद दरवाजा’ या कादंबरीचे त्यांनी उत्कृष्ट भाषांतर केले आहे. १९७९मध्ये एकाच वर्षी त्यांनी ‘परकं रक्त’ हा कथासंग्रह आणि बहादूरशहा जफर या बादशहाच्या जीवनावरील ‘बदनसीब’ ही ऐतिहासिक कादंबरी वाचकांना दिली.

शाम (पंढरीनाथ) म्हणजेच प्रसिद्ध वास्तुविशारद श्री. फिरोझ रानडे यांच्या प्रतिभा रानडे ह्या पत्नी होत. पतीच्या परदेशी असणाऱ्या नोकरीमुळे इतर लेखिकांपेक्षा त्यांना वेगळा समाज, वेगळे जीवन यांचा जवळून परिचय झाला. त्यावर आधारित असे त्यांचे लेखन अनुभवाधिष्ठित, निरीक्षण आणि अभ्यासपूर्ण विवेचन असणारे आहे. त्यांनी त्यांच्या लेखनातून तेथील स्त्री–विश्वाचा विशेष वेध घेतला आहे. त्यामुळे त्यांच्या लेखनाचे स्वरूप केवळ प्रवासवर्णन असे न राहता ते सांस्कृतिक, ऐतिहासिक, राजकीय गाभ्यापर्यंत जाऊन परकीय भूमीवरील जीवनाचा वेध घेते. १९८२मध्ये प्रसिद्ध झालेली त्यांची ‘अफगाण डायरी’ केवळ नोंदस्वरूपातली नाही. १९८३मध्ये आलेल्या ‘काबूल कंदाहारकडील कथा’ याच वाटेवरून जाणाऱ्या ठरल्या. ‘बुरख्याआडच्या स्त्रिया’ (१९८७), ‘ऐरणीवरचे प्रश्न: समान नागरी कायदा’ (२०००) ही त्यांची पुस्तके म्हणजे भारतीय स्त्री–मनाने मुस्लीम स्त्रियांच्या सामाजिक व धार्मिक प्रश्नांचा वस्तुनिष्ठ आलेख आहेत.

प्रतिभा रानडे ह्यांनी ‘मानुषी’ (१९८४), ‘रेघोट्या’ (१९९९) या कादंबऱ्या लिहिल्या. ‘शुक्रवारची कहाणी’

र

(१९८७) नावाचा लेखसंग्रहही त्यांच्या नावावर आहे. सत्यान्वेषी आलेख मांडत त्या वैचारिक अंगानेच लेखनविश्वात रमतात.

वैचारिक घडण अभ्यासण्यासाठी त्यांनी काही व्यक्तींवरही लेखन केले आहे. 'यशोदाबाई आगरकरांच्या आठवणी: एक आकलन' (१९९६), 'स्त्री-प्रश्नांची चर्चा: १९ वे शतक' (१९९१) आणि अतिशय गाजलेले असे पुस्तक म्हणजे 'ऐसपैस गप्पा: दुर्गाबाईंशी' (१९९८) या पुस्तकांतून प्रतिभाताईंची वैचारिक कुवत व्यक्त होते. म्हणूनच त्यांची ही पुस्तके आपल्याला अंतर्मुख करतात.

त्यांना राज्य पुरस्कार लाभले आहेत. 'मुंबई महानगर मराठी साहित्य संमेलना'च्या (२००८) त्या अध्यक्षा होत्या. अफगाणिस्तानात वास्तव्य असताना खान अब्दुल गफारखान (सरहद्द गांधी) यांनी त्यांच्या घरी अचानक भेट दिली. हा त्यांना त्यांच्या जीवनातला सर्वांत मोलाचा आणि अविस्मरणीय प्रसंग वाटतो. इतर मराठी लेखिकांपेक्षा वेगळा संचार, वेगळी वृत्ती आणि वेगळी अभिव्यक्ती असलेली ही लेखिका अनुभवसमृद्ध ठरते.

– प्रा. सुहासिनी कीर्तिकर

**संदर्भ :**


१. *खानोलकर गं. दे., टाकळकर उषा, संपादक; 'मराठी वाङ्मयकोश'.*

२. *'साहित्य', अध्यक्षीय भाषण, मुंबई मराठी साहित्य संघ प्रकाशन; मार्च २००८.*


## रानडे, महादेव गोविंद

**ग्रंथकार, समाजसुधारक**

**१८ जानेवारी १८४२ – १६ जानेवारी १९०१**

☞ **मुख्य नोंद – पत्रकारिता आणि ललितेतर साहित्य खंड**

महाराष्ट्रातील थोर राष्ट्रपुरुष व समाजसुधारक महादेव गोविंद रानडे ह्यांच्या सार्वजनिक कार्याचा आरंभ वयाच्या विसाव्या वर्षी, त्यांनी चारेक महिने केलेल्या 'इंदुप्रकाश'च्या इंग्रजी विभागाच्या संपादनापासून झाला. १८६८ साली रानडे प्रार्थनासमाजाच्या कार्यात सहभागी झाले. १८७४मध्ये मुंबईला उभारल्या गेलेल्या प्रार्थनासमाजाच्या मंदिरात, पायामध्ये ठेवलेल्या कुंभात इतर साहित्याबरोबर रानड्यांच्या 'अ थीइस्ट्स कन्फेशन ऑफ फेथ' या लेखाची एक प्रत ठेवण्यात आली आहे. पुणे आणि मुंबई येथील प्रार्थनासमाजात त्यांनी धर्मावर अनेक प्रवचने दिली.

१८७०मध्ये स्थापन झालेल्या सार्वजनिक सभेला रानड्यांनी स्थानिक पातळीवरून राष्ट्रीय पातळीवर नेले. तत्कालीन इंग्रज राजसत्तेस सार्वजनिक सभेमार्फत वेळोवेळी जी निवेदने पाठविली, त्यांवर मुख्यत्वे रानड्यांचाच ठसा होता. सार्वजनिक त्रैमासिक पत्रिकेत त्यांनी नियमितपणे विपुल निनावी लेखन केले.

रानड्यांनी केलेले जे लेखन आज उपलब्ध आहे, त्याळत 'राइज ऑफ द मराठा पॉवर' हा इतिहासविषयक ग्रंथ, 'एसेज इन इंडियन इकॉनॉमिक्स' हे अर्थशास्त्रविषयक लेखन, 'द मिसलेनिअस रायटिंग्ज ऑफ द लेट ऑनरेबल मि. जस्टिस एम. जी. रानडे' हा त्यांच्या संकीर्ण लेखांचा संग्रह, 'रिलिजस अ‍ॅन्ड सोशल रिफॉर्म' हा निबंधसंग्रह, 'न्यायमूर्ती रानडे यांची धर्मपर व्याख्याने' हा प्रवचनसंग्रह यांचा निर्देश करता येईल. 'सार्वजनिक सभे'च्या नियतकालिकांतून आणि 'इंदुप्रकाश'च्या अंकांतून त्यांनी जे लेखन केले, ते बव्हंशी आज अनुपलब्ध आहे. प्रार्थनासमाजात त्यांनी केलेली प्रवचने वा वाचलेले निबंध हेदेखील उपलब्ध नाहीत. रानड्यांची तत्त्वज्ञानपर दृष्टी व धर्ममीमांसा समजण्याच्या दृष्टीने 'अ थीइस्टस् कन्फेशन ऑफ फेथ', 'फिलॉसॉफी ऑफ इंडियन थीइझम', 'हिंदू प्रोटेस्टंटिझम' आणि 'धर्मपर व्याख्याने' हे लेखन महत्त्वाचे आहे.

रानडे यांनी वाङ्मयीन क्षेत्रात केलेली कामगिरी त्यांच्या इतर क्षेत्रांतील कार्याच्या मानाने अल्प असली, तरी त्या वेळचे पर्यावरण, देशकाल परिस्थिती लक्षात घेता बहुमोल होती; असेच म्हणावे लागते. त्यांचे बहुतांशी लेखन इंग्लिशमधून होते. रानडे यांना जे लिहावयाचे होते, त्याचे स्वरूप अखिल भारतीय असल्याने व साऱ्या भारतास सामान्य अशी इंग्लिशशिवाय दुसरी भाषा नसल्यामुळे त्यांनी इंग्लिशचा आश्रय घेतला.

१८९४ पासून पुढील पाच-सहा वर्षे न्यायमूर्ती रानडे यांनी विविध संस्थांतून आणि सभांतून मराठ्यांच्या इतिहाससंबंधी आपले शोधनिबंध वाचले. ते पुढे 'राइझ ऑफ द मराठा पॉवर अ‍ॅन्ड अदर एसेज' (म. शी. मराठ्यांच्या सत्तेचा उत्कर्ष, १९६४) या पुस्तकात संग्रहित करण्यात आले. या लेखनाला जोडूनच मराठी सत्तेचा विस्तार आणि ऱ्हास यासंबंधीही पुढील दोन खंड लिहिण्याचा त्यांचा मानस होता; परंतु त्यांच्या निधनामुळे (१९०१, मुंबई), तो पूर्ण होऊ शकला नाही. स्वकीयांच्या दृष्टिकोनातून मराठ्यांच्या इतिहासाची वैशिष्ट्ये नि:पक्षपातीपणे सादर करणे व युरोपीय इतिहासकारांच्या लेखनामुळे त्यासंबंधी निर्माण झालेले अपसमज दूर करणे, हा या लेखामागील हेतू होता. या ग्रंथातील विवेचनामुळे संतसाहित्याकडे पाहण्याची नवी दृष्टी महाराष्ट्राला प्राप्त झाली. 'ना.न्या.म.गो.रानडे यांचे भागवत धर्मावर प्रार्थनासमाजात झालेले पहिले दोन उपदेश' (१८९५), 'धर्मपर व्याख्याने' (१९१०), 'व्यापारासंबंधी व्याख्याने' (१८७३), 'एकनाथी भागवतांतील वेंचे' (१८९४) ही त्यांच्या इतर ग्रंथांची नावे होत.

काव्य-कादंबरीसारखी ललित रचना त्यांनी केली नसली, तरी ट्रान्सलेटरच्या जागेवरून व दक्षिणा प्राइझ कमिटीचे परीक्षक म्हणून ललित वाङ्मयावर अभिप्राय देऊन त्यांनी टीका केली, मार्गदर्शन केले. वाङ्मयाचे अवलोकन करून त्यातील प्रवृत्तीचे दिग्दर्शन करणे व त्यातील इष्टानिष्ट बाबींची चर्चा करून त्यांचे नि:पक्षपाती मूल्यमापन करणे, हे त्यांनी दोनदा केले. मराठी वाङ्मयविषयक व्यापक टीकेचा हा इंग्लिशमधील पहिला प्रयत्न त्यांनी केला. ही त्यांची कामगिरी अत्यंत महत्त्वाची आहे. A note on the growth of Marathi literature, 1898 याचे 'मराठी वाङ्मयाची अभिवृद्धी: एक टिपण' हे मराठी भाषांतर डॉ.स.गं.मालशे यांनी केले. मराठी संशोधन मंडळाने ते १९८२ साली प्रसिद्ध केले आहे.

मराठी साहित्य संमेलनाची गंगोत्री ठरलेल्या पहिल्या मराठी ग्रंथकार संमेलनाचे (११ मे, १८७८) रानडे हे अध्यक्ष होते. मराठीला विद्यापीठाच्या अभ्यासक्रमात स्थान असले, तरी ते फार दिवस टिकले नाही. वाङ्मयाच्या व भाषेच्या उन्नतीसाठी म्हणूनच विद्यापीठाच्या अभ्यासक्रमात मराठीला स्थान मिळावे, म्हणून रानडे यांनी फार खटपट केली होती. पण त्यांच्या हयातीत विद्यापीठात मराठीचा पुन्हा प्रवेश झाल्याचे त्यांना पाहावयास मिळाले नाही. एकूणच रानडे यांची दृष्टी व्यापक होती.

– प्रा. डॉ. विलास खोले

**संदर्भ :**


१. *फाटक न. र., 'न्यायमूर्ती महादेव गोविंद रानडे यांचे चरित्र'; नीळकंठ प्रकाशन, पुणे; १९६६.*

२. *इनामदार हे. वि., गोसावी मो. स. (संपादक); 'आधुनिक भारतीय तत्त्वज्ञ', गोखले एज्युकेशन सोसायटी, नाशिक; १९९०.*


## रानडे, श्रीधर बाळकृष्ण

**कवी, बालसाहित्यकार**

**२४ जून १८९२ – २१ मार्च १९८४**



श्री. बा. तथा श्रीधर बाळकृष्ण रानडे यांचा जन्म नागपूर येथे झाला. त्यांनी मुंबई विद्यापीठातून बी.ए., एम.एस्सी. पर्यंत शिक्षण घेतले. ते प्राध्यापक होते. ते स्वतः आणि त्यांच्या पत्नी मनोरमाबाई या दोघांनी लिहिलेल्या ७५ स्फुट कवितांचा संग्रह 'श्रीमनोरमा' या नावाने प्रसिद्ध आहे.

त्यांचे 'काळाच्या दाढेतून' हे खंडकाव्य १९१५ साली प्रसिद्ध झाले. ते एकदा कॉलऱ्याने आजारी पडले असता बालपणीच्या अनेक आठवणी त्यांच्या मनात जाग्या झाल्या. प्रत्यक्ष मृत्यूच्या दारात जाऊन परत येण्याचा अनुभव त्यांनी घेतला. त्या वेळच्या मनःस्थितीचे वर्णन या खंडकाव्यात आहे. 'माधुकरी' आणि 'लेझीम' या त्यांच्या कविता विशेष गाजल्या.

त्यांनी संपादन केलेले 'महाराष्ट्र रसवंती'चे भाग १ ते ३ १९३५ ते १९३९ या काळात प्रसिद्ध झाले. तसेच त्यांनी संपादन केलेल्या 'मराठी गद्यवैभव' भाग १ ते ३ यांचे प्रकाशनही १९३५ ते १९३९ या काळात झाले. तसेच 'नवयुगवाचनमाला'चे संपादनही त्यांनी केले. या तिन्ही संपादनकार्यांत त्यांना श्री.ग.दे.खानोलकर यांचे सहकार्य लाभले.

श्री.बा.रानडे यांनी 'तिंबूनानांचा रेडिओ', 'दिवाळीची डाली' (१९३८) ही प्रहसने लिहिली. तसेच 'कुंपणावरून'(१९४७) आणि 'बोबडकांदा', 'कवडसा', 'गोपाळकृष्ण', 'चिक्कूमामा', 'येरेयेरे पावसा' या बालसाहित्याचे लेखन केले. त्यांच्या बालसाहित्याचे वैशिष्ट्य म्हणजे मुलांच्या भावनांशी व विचारांशी एकरूप होऊन त्यांनी बालसाहित्याची निर्मिती केली. अगदी ढेकूण, डास, झुरळ, माशी हेही त्यांच्या कवितांचे विषय झाले. अत्यंत सोपी, रसाळ, चमत्कृतीपूर्ण आणि खेळकर भाषा असल्याने त्यांची कविता लोकप्रिय झाली. निरनिराळे कीटक, त्यांच्या सवयी त्यांची वैशिष्ट्ये हेही त्यांच्या काव्याचे विषय झाले. आपल्या देशातल्या आणि परदेशांतल्या नद्या, पर्वत, निसर्ग यांचे वर्णन त्यांनी केले. 'तिंबूनानांचा रेडिओ' हा त्यांच्या नवकल्पनेचा चमकदार आविष्कार आहे. वस्तुनिष्ठ कुमारकथा लिहिणारे, मुलांना नवनवे प्रयोग करायला उद्युक्त करणारे निष्ठावंत बालसाहित्यकार म्हणून त्यांना गौरवले जाते. म्हणूनच आधुनिक बालसाहित्यकार त्यांना गुरुस्थानी मानतात.

१९१२ साली त्यांनी आपल्या पत्नी मनोरमाबाई यांच्यासह काव्यरचनेला सुरुवात केली. १९२० नंतर मराठी कवितेला नवीन वळण मिळाले. १९२० ते १९२३ या काळात पुण्यात वास्तव्य करणारे कवी एकत्र जमत. दर रविवारी कुणा एकाकडे जमून कवितांचे वाचन किंवा गायन करायचे, त्यावर चर्चा करायची ही प्रथा सुरू झाली. या मंडळाला 'सन-टी-क्लब' म्हणत असत. याचेच पुढे 'रविकिरण मंडळा'त रूपांतर झाले. श्री.बा.रानडे आणि त्यांच्या पत्नी मनोरमाबाई हे या मंडळाचे संस्थापक सदस्य होते. ह्या दांपत्याला रविकिरण मंडळाच्या काव्यात्म जीवनाचे अधिष्ठान मानले जाते.

श्री.बा.रानडे यांनी 'काळाच्या दाढेतून' या खंडकाव्यामधून जीवनासंबंधी मार्मिक विचार मांडले. त्यांची कविता केशवसुतांच्या काव्यपरंपरेतली असूनही अधिक धीट बनली. त्यातून सर्वसामान्य माणसाच्या भावनांचा आविष्कार घडला. त्यामुळे ती लोकप्रिय झाली. सुनीतरचना, गझल, जानपदरचना ही रविकिरण मंडळाची वैशिष्ट्ये होती. मात्रावृत्तांचे प्रयोगही केले गेले. मंडळातील सर्व कवींनी प्रथम सामूहिक आणि नंतर वैयक्तिक काव्यसंग्रह प्रसिद्ध केले. रविकिरण मंडळाने काव्यगायनाची प्रथा सुरू केली. त्यामुळे काव्यप्रकार लोकप्रिय होण्यास मदत झाली.

साध्या सोप्या भाषेतल्या रचनांमुळे लोकप्रिय झालेल्या रविकिरण मंडळाच्या कवितेने वाचकांना कवितेकडे पाहण्याचा नवा दृष्टिकोन दिला. या दृष्टीने श्री.बा.रानडे यांचे काव्यक्षेत्रातले आणि बालसाहित्यातले योगदान निश्चितच महत्त्वाचे आहे.

– डॉ. ज्योत्स्ना कोल्हटकर

**संदर्भ :**


१. *'मराठी विश्वकोश' खंड १४; महाराष्ट्र राज्य विश्वकोश निर्मिती मंडळ, मुंबई; १९८९.*

२. *'बालसाहित्याची रूपरेषा'; मुंबई मराठी ग्रंथसंग्रहालय प्रकाशन; १९६४.*

३. *पाठक वा. भा.;'आधुनिक मराठी काव्याचे अंतःप्रवाह'; ठोकळ प्रकाशन, पुणे.*


## रामाणी, शंकर पांडुरंग

**कवी**

**२६ जून १९२२ – २८ नोव्हेंबर २००३**

आधुनिक मराठी कवितेतील एक लक्षणीय नाव कवी शंकर रामाणी हे असून त्यांचा जन्म गोवा प्रदेशातील बारदेस भागातील वेरे येथे झाला. त्यांचे प्राथमिक शिक्षण मराठी व पुढचे शिक्षण वास्को येथील पोर्तुगीज शाळेत झाले. ते मॅट्रिकपर्यंत शिकले. निम्न मध्यमवर्गीय

र



स्तरातील शंकर रामाणी यांची राहणी साधी होती.

गोवा सरकारच्या नदी परिवहन खात्यात त्यांनी नोकरी केली आणि वरिष्ठ कारकून ह्या पदावरून ते निवृत्त झाले व बेळगाव येथे स्थायिक झाले.

रामाणींचा ओढा कवितालेखनाकडे होता. त्यांची पहिली कविता १९३७मध्ये ‘मनोहर’ मासिकात प्रसिद्ध झाली. रामाणींनी सातत्याने व निष्ठेने, अंतर्मुख वृत्तीने काव्यलेखनास जन्मभर वाहून घेतले. त्यांची कविता नेहमीच समकालीन प्रवृत्तींचा संस्कार व्यक्त करीत राहिली. ती आत्ममग्न राहून प्रीती, निसर्ग आणि जीवन ह्यांचा दुःखात्म प्रत्यय हळुवारपणे प्रकट करते. ‘दर्पणीचे दीप’ हा त्यांचा प्रसिद्ध कवितासंग्रह (१९९२). प्रसिद्ध समीक्षक आणि मौजेचे प्रकाशक श्री. पु. भागवत यांच्याबद्दल त्यांना विशेष ओढ होती. समकालीन पु. शि. रेगे, प्रल्हाद वडेर, इंदिरा संत ह्यांसारख्या स्नेहमंडळींशी त्यांचे सख्य होते. साहित्यक्षेत्रातील अनेक दिग्गजांशी त्यांचा पत्रव्यवहार असे. इंदिराबाईंच्या ‘गर्भरेशमी’ ह्या काव्यसंग्रहाचे शीर्षक रामाणींनी सुचविल्याचे नमूद आहे. अतिशय आत्ममग्न असा हा कवी, कवितेला साधना मानणारा होता. प्रामुख्याने छंदोबद्ध व गेय कविता लिहिण्याचा त्यांचा प्रघात होता. त्यांची कविता औदासीन्याने वेढलेली निराशेचे स्वर आपलेसे करणारी आणि दुःखात्म प्रत्यय प्रकट करणारी आहे, म्हणूनच की काय; ती कधी-कधी दुर्बोधतेकडे झुकते.

रामाणींच्या कवितेचे स्वतःचे असे काहीसे गूढ, अज्ञेयाची वाट शोधणारे भावविश्व आहे. गोव्यात वास्तव्य असूनही निसर्गसौंदर्य टिपण्याची किंवा निसर्गप्रतिमांनी आशय व्यक्त करण्याची तिला ओढ नाही. पु. शि. रेगे यांच्या कवितेचे संस्कार रामाणी ह्यांच्या प्रारंभिक कवितेवर दिसतात. निसर्गाचे शोकमग्न रूप, जीवनाची गूढता हे त्यांच्या कवितांचे विषय होते. क्वचित त्यातून अध्यात्माची ओढ जाणवे.

त्यांची लौकिक जीवनातील वृत्ती दुःख, नैराश्य वा अडचणी यांविषयी तक्रार न करण्याची होती. तसेच अनाम दुःख सहन करून सारायचे, ही रीत होती. विनापत्य असल्याचा सल त्यांना कधी-कधी जाणवत असे.

कवी ग्रेस यांच्या कवितेचे विशिष्ट आकर्षण त्यांना वाटत असे. त्यांच्या स्वतःच्या कवितेत अनाम दुःखाचे प्रकटन करताना प्रतिमांचा गुंता झाल्याचे जाणवते. कवी द. भा. धामणस्कर यांची कविता आवडत असल्याचे त्यांनी नमूद केले आहे.

कवितेत मग्न असणाऱ्या या कवीचे ‘कातरवेळ’ (१९५९), ‘आभाळवाटा’ (१९६७), ‘पालाण’ (१९७९), ‘दर्पणीचे दीप’ (१९९२), ‘गर्भागार’ हे काव्यसंग्रह प्रसिद्ध आहेत. ‘सूर्यफुले’ हा बालगीतसंग्रह (१९४९) त्यांच्या नावावर आहे.

‘निळे निळे ब्रह्म’ या त्यांच्या कोकणी काव्यसंग्रहाला साहित्य अकादमीचा पुरस्कार मिळाला. ‘आभाळवाटा’ आणि ‘दर्पणीचे दीप’ या काव्यसंग्रहांना महाराष्ट्र शासनाने पुरस्कार देऊन गौरविले.

कवितेव्यतिरिक्त कोणताही साहित्यप्रकार त्यांनी हाताळलेला दिसत नाही. भावमग्न अशा त्यांच्या कवितेने ‘दिवे लागले रे दिवे लागले, तमाच्या तळाशी दिवे लागले’ ही भावना उजागर केली आहे.

– प्रा. अनुराधा साळवेकर

## रॉय किणीकर

*किणीकर, रघुनाथ रामचंद्र*

**नाट्यलेखक, कादंबरीकार**

**१९०७ – ५ सप्टेंबर १९७८**

रॉय किणीकर हे विसाव्या शतकात मराठी साहित्यात होऊन गेलेले एक विलक्षण व्यक्तिमत्त्व होय. कलंदर किंवा अवलिया हे शब्दही फिके पडावेत अशा पद्धतीने स्वतःचे, स्वतःच्या पद्धतीने स्वतंत्र आयुष्य जगणारा हा काहीसा

र



आगळावेगळा साहित्यिक होय. प्रामुख्याने कवी म्हणून त्यांची मराठी साहित्यसृष्टीला ओळख असली तरी नाट्यलेखन, कादंबरी आणि संपादन या क्षेत्रातही त्यांची वेगळी नाममुद्रा उमटलेली आहे. गुलबर्ग्यात जन्मलेल्या रॉय यांनी इंग्रजी आणि तत्त्वज्ञान या विषयांत एम.ए.ची पदवी स्वतंत्रपणे प्राप्त केली होती. या दोन विषयांसह मराठी साहित्याचाही त्यांचा व्यासंग लक्षणीय होता.

प्रारंभीच्या काळात किणीकरांनी वेगवेगळ्या क्षेत्रांत धडपड केली. सुरुवातीचे लेखन 'धनुर्धारी', 'नवयुग' साप्ताहिकांमधून प्रसिद्ध झाले. 'नवयुग' चित्रपट कंपनीतील कथाविभागात आणि आकाशवाणीवरही त्यांनी काही काळ काम केले. त्यांच्या कथेवरील 'पन्ना' चित्रपट गाजला. त्यांच्या श्रुतिका, एकांकिकाही गाजल्या. 'मंगळसूत्र', 'देव्हारा', 'येगं येगं विठाबाई', 'खजिन्याची विहीर' ही त्यांची १९५० ते १९७९ या काळातली नाट्यसंपदा होय.

आठ वर्षांच्या काळात, अनुक्रमे १९७१ आणि १९७९ साली प्रसिद्ध झालेल्या 'रात्र' आणि 'उत्तररात्र' या कवितासंग्रहांनी काव्यरसिकांना एक वेगळी भेट जशी दिली, तसेच अंतर्मुखही केले. छोट्या-छोट्या कवितांमधून त्यांनी चिंतनशील अस्वस्थतेचे एक वेगळे दर्शन घडवले. जीवनात घडणाऱ्या प्रसंगांतून अस्थिरता, अर्थहीनता, सर्जन आणि विसर्जन यांचे अटळ, पण अनाकलनीय अस्तित्व, संस्कृतीचा उथळपणा इत्यादी अनेक विषयांवर खास रॉय किणीकरांची वैचारिक प्रगल्भता कधी गोंधळात टाकणारी, तर कधी विचार करायला लावणारी वाटते. त्यांच्या कवितेला असलेली 'चिंतनाची डूब' हे त्यांचे वैशिष्ट्य आहे. 'शिर्डीचे साईबाबा' ही त्यांची स्वतंत्र, तर अन्य काही अनुवादित कादंबऱ्या त्यांच्या नावावर आहेत. जीवनाच्या विविध भावच्छटा त्यांच्या लेखनातून उमटताना दिसतात.

संपादक म्हणून त्यांचे स्थान आगळेवेगळे आहे. दीनानाथ दलाल यांच्या 'दीपावली' या वार्षिकाचे ते संस्थापक-संपादक होते. पहिली दहा वर्षे त्यांच्या संपादनकौशल्याने मराठी दिवाळी अंकांना वेगळे वळण दिले. 'धरती' मासिकाचे त्यांचे संपादन आणि त्याचे विशेषांक यांनी मराठी नियतकालिकांची सृष्टी एक काळ बहरून गेली होती. त्यांचे विपुल लेखन प्रसिद्ध असून त्यांच्या लेखनाची जातकुळी प्रामाणिक अस्वस्थतेची आहे.

– मधू नेने

**संदर्भ :**

*१. किणीकर रॉय; 'रात्र', १९७१.*
*१. किणीकर रॉय; 'उत्तररात्र', १९७९.*

## रेंदाळकर, एकनाथ पांडुरंग

**कवी**

**१ जुलै १८८७ – २२ नोव्हेंबर १९२०**



आधुनिक काव्याच्या प्रारंभिक काळाचे एक महत्त्वपूर्ण कवी म्हणजेच एकनाथ पांडुरंग रेंदाळकर होत. अल्पायुष्य लाभलेल्या रेंदाळकरांनी विपुल काव्यलेखन केले आहे. तत्कालीन काही वाङ्मयीन नियतकालिकांच्या संपादन-कार्यातही त्यांचा मोलाचा वाटा होता. त्या वेळच्या कोल्हापूर संस्थानातील रेंदाळ या गावी त्यांचा जन्म झाला. रेंदाळकर हे कुटुंब मूळचे वतनदार कुळकर्णी होते. वडील पांडुरंगपंत हे रेंदाळात एका व्यापाऱ्याकडे नोकरीला होते. आजोळी कुरुंदवाड येथे आणि रेंदाळ येथे त्यांचा बाल्यकाळ व्यतीत झाला. प्राथमिक शिक्षण रेंदाळला पूर्ण झाले. मराठी चौथीनंतर पुढील शिक्षणासाठी ते कागल संस्थानातील शाळेत दाखल झाले. इंग्रजी चौथ्या इयत्तेत असताना वडील निवर्तल्यामुळे शाळा सोडून मनःशांतीसाठी नरसोबाची वाडी येथे दत्तसेवेला सुरुवात केली.

रेंदाळकरांना बालपणापासूनच वाचनाचा नाद होता. शालेय जीवनातच काव्यलेखनाला प्रारंभ झाला. प्राचीन मराठी व संस्कृत काव्याचा खोल संस्कार त्यांच्या काव्यशैलीवर झालेला दिसतो. काव्यलेखनाच्या संदर्भात आईचे प्रोत्साहन असल्याचे रेंदाळकर सांगतात. दरम्यान, कागल येथून व्हर्न्याक्युलर फायनल परीक्षा उत्तीर्ण झाले.

१९०५ मध्ये चिकोडी तालुक्यातील कुन्नूर या गावी असिस्टन्ट मास्तर म्हणून त्यांच्या नोकरीला सुरुवात झाली. दोन वर्षांनंतर प्राचीन महाकाव्यांचा अभ्यास करण्यासाठी ते सांगलीच्या संस्कृत पाठशाळेत दाखल झाले. १९०९ मध्ये कोल्हापूरला रेंदाळकरांनी बाळशास्त्री हुपरीकर यांच्याकडे संस्कृत भाषा आणि काव्यशास्त्र यांचा अभ्यास केला. प्रारंभीचे काव्यलेखन त्यांनी 'मंदार' ह्या टोपणनावाने केले. 'विजयी मराठा' ह्या साप्ताहिकात त्यांचे प्रारंभिक काव्य व गद्यलेखन प्रकाशित झाले. १९१० मध्ये त्यांचा पहिला काव्यसंग्रह 'मन्दार-मञ्जरी' प्रसिद्ध झाला. त्याच काळात त्यांनी 'धर्मविचार' या नियतकालिकाचे सहसंपादक म्हणून कार्य केले. उल्लेखनीय वाङ्मयीन कार्यासाठी शंकराचार्यांनी त्यांना 'कविभूषण' ही पदवी बहाल केली.

१९१० मध्येच रेंदाळकरांचा विवाह संपन्न झाला. 'मनोरंजन' व 'करमणूक' ह्या तत्कालीन गाजलेल्या नियतकालिकांचे साहाय्यक संपादक म्हणून अतिशय मोलाचे कार्य रेंदाळकरांनी केले. ज्या निर्यमक काव्यरचनेचे जनक म्हणून रेंदाळकर विख्यात आहेत, तशी काव्यरचना त्याच सुमारास 'विविधज्ञानविस्तार' व 'मनोरंजन' यांमधून त्यांनी केली. हरिभाऊ आपटे ह्यांचे साहाय्यक म्हणून 'करमणूक'चे काम करताना त्यांनी महाभारतावरील ग्रंथलेखनासाठी हरिभाऊंना टिपणे काढण्यात सहकार्य केले. याच काळात बंगाली साहित्याशी रेंदाळकरांचा परिचय झाला. मायकेल मधुसूदन दत्त यांच्या 'वज्रांगना'चे 'विरहिणी राधा' हे, तर वंगनाट्यकवी द्विजेंद्रलाल रॉय यांच्या 'चंद्रगुप्त' नाट्यकृतीचे 'मौर्यविजय' ही यशस्वी रूपांतरे त्यांनी केली. स्वतःला केशवसुतांचे निष्ठावंत अनुयायी मानणाऱ्या रेंदाळकरांनी अल्पायुष्यातच विपुल असे काव्यलेखन केलेले दिसते. अत्यंत संघर्षमय आणि खडतर अशा जीवनक्रमातून अखेरपर्यंत ते काव्यवाट शोधत राहिले. 'काव्य' हा रेंदाळकरांच्या दगदगीच्या आयुष्यातला एक महत्त्वाचा विरंगुळा असल्याचे त्यांचे चरित्रकार सांगतात. प्रामुख्याने त्यांची कविता 'रेंदाळकरांची कविता - प्रथम खंड' (१९२४) व 'रेंदाळकरांची कविता - द्वितीय खंड' (१९२८) या दोन संग्रहांत समाविष्ट असून ह्या दोन्ही खंडांचे संपादन रेंदाळकरांचे घनिष्ठ मित्र, सांगलीचे वामन जनार्दन कुंटे ह्यांनी केले आहे. प्रथम खंडाला ग. त्र्यं. माडखोलकरांची प्रस्तावना असून त्यात त्यांनी रेंदाळकरांच्या निर्यमक काव्यशैलीचा नवतेच्या व बंडखोरीच्या अंगाने गौरव केला आहे. तद्वतच निर्यमक रचनेची स्फूर्ती त्यांना इंग्लिशमधील ब्लँक व्हर्स ऐवजी संस्कृत काव्यरचनेतून झाल्याचे मत व्यक्त केले आहे.

दोन काव्यखंडांशिवाय 'मोहिनी' (१९१३) 'अन्योक्तिमुक्तांजली- भाग-१' (१९११), 'अन्योक्तिमुक्तांजली - भाग-२' (१९१५), 'विरहिणी राधा' (१९१६), 'बुद्धनीती' (१९१६) ही त्यांची पुस्तके प्रकाशित झाली होती. केशवसुतांच्या निधनानंतर आणि गोविंदाग्रजांचा उदय होण्यापूर्वी मधला काळ ए. पां. रेंदाळकरांनी गाजविला. त्यांच्या कवितेच्या प्रथम खंडात 'मन्दारमञ्जरी', 'काव्यकुसुममाला', 'कर्णमंगल', 'काव्यगुंफा' व 'स्फुटकविता' ह्या पाच शीर्षकांतर्गत जवळजवळ साडेतीनशे स्फुटकविता संग्रहित आहेत. विषयाची आणि वृत्तरचनेची विविधता इथे पाहायला मिळते. हे दोन्ही खंड उत्तम संपादनाचेही नमुने ठरावेत असे आहेत. दुसऱ्या खंडात १५ विविध खंडकाव्ये-दीर्घकविता समाविष्ट आहेत. रेंदाळकर हे 'चतुरस्र कवी' असल्याचा अभिप्राय ह्याचमुळे भ. श्री. पंडितांनी त्यांच्या 'आधुनिक मराठी कविता' या पुस्तकात व्यक्त केला असावा. त्यांनी आपल्या काव्यातून प्लॅटॉनिक प्रेमाचा पुरस्कार केला. संस्कृत, बंगाली व इंग्लिश ह्या भाषांमधल्या चांगल्या काव्याचे सरस अनुवादही त्यांनी

केले. जुन्या वातावरणाचे संस्कार असले, तरी त्यांची मते काळापुढेच होती. 'प्रतिवंचित स्त्रीवर्ग', 'स्त्रीसुधारणा', 'जगदीशचंद्र बोस', 'जर्मनीचा कैसर' 'भारतमाता', 'भारतभूमी', 'द्रौपदी', 'धर्महानीचे भय' इत्यादी कवितांतून त्यांची आधुनिकता आणि समकालीनता स्पष्टपणे प्रतीत होते. टेनिसनच्या 'एनॉक आर्डन'चे 'सारजा' या नावाने त्यांनी रूपांतर केले. त्यांच्या काही महत्त्वपूर्ण कवितांमध्ये 'उघडि नयन रम्य उषा', 'निजू दे स्वस्थपणे आता', 'वनराणीपरी असावयासी हिंडत शेतातुनी', 'अजुनि चालतोचि वाट, माळ हा सरेना, विश्रांतिस्थळ केव्हा यायचे कळेना' ह्या गीतसदृश रचनांचा समावेश होतो. निर्यमक रचनेचा हा कर्ता आपल्या एका कवितेत जे म्हणतो हे ''निसर्गमृदुपाद हे रुचिर काव्य, देवी! तुझे / कशास मग सांग या यमकशृंखला घातल्या?'' तेही रसिकांना पटते. परंतु, त्यांच्या अनेक सुंदर रचना ह्या सयमक आहेत, हेही लक्षात घेतले पाहिजे.

– डॉ. राजेंद्र नाईकवाडे

**संदर्भ :**


१. *कुंटे वामन जनार्दन; संग्राहक,'रेंदाळकरांची कविता' प्रथम खंड, सारस्वत प्रकाशक मंडळ, पुणे; १९२४.*

२. *कुंटे वामन जनार्दन; 'रेंदाळकरांची कविता' द्वितीय खंड प्रकाशक : वामन जनार्दन कुंटे, सांगली; १९२८.*

३. *एकसंबेकर सुहास, संपादक; 'कविता कोल्हापूरची' लोकवाङ्मय गृह, मुंबई; २००८.*

४. *'मराठी विश्वकोश', खंड १४, महाराष्ट्र राज्य मराठी विश्वकोश निर्मिती मंडळ, मुंबई;१९८९.*

५. *पंडित भ. श्री.; 'आधुनिक मराठी कविता'; सुविचार प्रकाशन मंडळ, नागपूर; १९५२.*


## रेगे, पुरुषोत्तम शिवराम

### कवी, कथाकार, कादंबरीकार

### २ ऑगस्ट १९१० – १७ फेब्रुवारी १९७८

पुरुषोत्तम शिवराम रेगे यांचा जन्म मिठबाव (जि. रत्नागिरी) येथे झाला. त्यांचे शालेय शिक्षण वडील कराचीला असल्याने तेथे झाले व पुढे मुंबईच्या विल्सन



हायस्कूल व एल्फिन्स्टन महाविद्यालयातून शालेय व महाविद्यालयीन शिक्षण घेतल्यानंतर १९३२ साली रेगे यांनी लंडन स्कूल ऑफ इकॉनॉमिक्स ॲन्ड पॉलि-टिकल सायन्स या मुंबईच्या संस्थेतून अर्थशास्त्राची बी.एस्सी. पदवी संपादन केली. त्यानंतर मुंबईच्या व अहमदाबादच्या महाविद्यालयांमध्ये अर्थशास्त्राचे प्राध्यापक म्हणून तसेच मुंबईच्या एल्फिन्स्टन व गोव्याच्या कॉमर्स कॉलेजमध्ये प्राचार्य म्हणून त्यांनी आपली व्यावसायिक कारकिर्द पूर्ण केली.

१९५४ ते १९६० या काळात त्यांनी 'छांदसी' या नियतकालिकाचे संपादन केले तसेच १९७७ साली 'अनुष्टुभ' या वाङ्मयीन नियतकालिकाच्या निर्मितीत त्यांनी सक्रिय सहभाग दिला. १९६१ साली केरळ येथे ते अखिल भारतीय लेखक परिषदेचे उद्घाटक होते व त्यानंतर त्यांनी वर्धा येथे अखिल भारतीय मराठी साहित्य संमेलनाचे अध्यक्षपद भूषविले.

१९३१ साली त्यांचा 'साधना आणि इतर कविता' हा पहिला काव्यसंग्रह प्रसिद्ध झाला. त्यानंतर 'फुलोरा' (१९३७), 'हिमसेक' (१९४३), 'दोला' (१९५०), 'गंधरेखा' (१९५३), 'पुष्कळा' (१९६०), 'दुसरा पक्षी' (१९६६), 'स्वानंदबोध' (१९७०), 'प्रियाळ' (१९७२), 'सुहृदगाथा' (१९७५) आणि 'मरणोत्तर' (अनिह) असे एकूण अकरा काव्यसंग्रह प्रकाशित झाले.

पु. शि. रेगे हे मर्ढेकरांचे समकालीन होत. मर्ढेकरांच्या कवितेत तत्कालीन महायुद्धाच्या झळा, मानवी संबंधांतील परात्मता, मानवी मूल्यांच्या आणि सौंदर्याच्या ओसाडीचे नकारात्मक दर्शन घडते; परंतु पु. शि. रेगे यांच्या कवितेत मात्र जीवनोत्सुकतेचे उत्कट दर्शन घडते. याचे कारण वाङ्मयाकडे व जीवनाकडे पाहण्याची त्यांची भूमिका वेगळी होती. तात्कालिकतेमध्ये ते रमत नसत. स्त्री–शक्तीची 'अजाणबाला', 'मुग्धाप्रिया' इथपासून

‘आदिमाते’पर्यंतची विविध रूपे त्यांच्या कवितेतून चित्रित झाली आहेत. या सर्व विविधतेत एक समान सूत्र आहे. स्त्री-शक्ती ही सर्जनशक्ती आहे, आनंदाचे केंद्र आहे; त्यामुळे प्रेमभाव, सौंदर्यभाव, कामभाव हा सर्व या सर्जनशक्तीचा विलास आहे, सर्जनाचा उत्सव आहे, अशी त्यांची धारणा आहे.

रेगे यांची अनुभव घेण्याची रीतच त्यांच्या कवितेचा घाट घडवते. शब्द हे अनुभवद्रव्य बनून येते. त्यामुळे स्त्रीच्या शारीर संवेदनांगांचा अनुभव शब्दस्वरूप मुशीतून अर्थरूप धारण करतो. प्रा. गंगाधर पाटील यांनी त्यांच्या कवितेचे वेगळेपणा नेमक्या शब्दांत पुढीलप्रमाणे सांगितले आहेत:

‘‘रूप-गंध-स्पर्शादी प्रतिमित संवेदनांनी विणलेला कल्पकतापूर्ण ऐंद्रिय अनुभव हा रेगे यांच्या अनुभवविश्वाचा प्राथमिक आधार आहे. शारीरिक अनुभवातून एक निकोप, शालीन कामविश्व उमलले जाते. हा शरीरानुभव, हा कामभाव स्वतःपलीकडे जातो. प्रत्यक्षातीत होऊन तो मानसिक अंगाने उन्नत होत जातो. प्रेमप्रवृत्ती ही एक मूलभूत सहजप्रवृत्ती असून रेग्यांच्या कवितेत ह्या आल्हादिनी शक्तीचे व प्रेममय जीवनवृत्तीचे दर्शन घडते. सर्जन, शृंगार, प्रेम, आनंद, करुणा हे भाव या आदिप्रतिमेचा भावार्थ मूर्त करतात.’’ (सुहृदगाथा, १९७५) त्यांच्या ‘पुष्कळा’, ‘त्रिधाराधा’, ‘शहनाज’, ‘मस्तानी’ इत्यादी कवितांतून स्त्रीच्या आदिप्रतिमेचा विविधांगी प्रत्यय कवितेतून वाचकाला मिळतो.

पु. शि. रेगे यांनी १९५० पासून आपल्या कथालेखनाला प्रारंभ केला. ‘रूपकथ्थक’ (१९५६) आणि ‘मनवा’ (१९६८) या दोन कथासंग्रहांतून या कथा समाविष्ट झाल्या आहेत. मात्र रेग्यांची कथा समकालीन नवकथेच्या प्रवाहातून पूर्णपणे अलिप्त होती. गंगाधर गाडगीळ, अरविंद गोखले यांच्या नवकथेतून ज्या वेळी किडलेल्या माणसांचे चित्रण होत होते, त्याच वेळी पु. शि. रेगे यांच्या कथेतून जीवनातल्या वेल्हाळ कथांची अलवार वेचणी सुरू होती. आपल्या कथांना कथा म्हणण्याऐवजी गोष्ट म्हणणे त्यांनी पसंत केले. भारतीय साहित्य परंपरेतील ‘वृत्तक’ या प्रकाराशी नाते सांगणारी कथा त्यांनी लिहिली. ‘स्वतःच स्वतःच्या मनाशी केलेली गोष्टीवेल्हाळ क्रीडा’ असे रेग्यांच्या कथांचे स्वरूप आहे. ‘मनू’ ही त्यांची कथा बरीचशी आत्मचरित्रात्मक गोष्ट आहे. त्यांच्या कथेतील नायक बरेचसे अनासक्त आहेत. या कथांतल्या स्त्रिया स्त्री-पुरुष संबंधांत स्वतःहून पुढाकार घेणाऱ्या असल्या तरी उच्छृंखल नाहीत. मनभाविनी, आनंदभाविनी अशा स्वभावविशेषांच्या या स्त्रिया पुरुषांच्या सहवासात वावरताना स्वतःला विसरू पाहतात. आपल्या ‘होण्याच्या’ शक्यता अजमावतात. मितभाषी शैली, आटोपशीर संवाद व वेल्हाळ कथनपद्धती ही रेग्यांच्या कथेची वैशिष्ट्ये आहेत.

‘सावित्री’ (१९६२), ‘अवलोकिता’ (१९६४), ‘रेणू’ (१९७२) आणि ‘मातृका’ (१९७८) अशा चार कादंबऱ्या लिहून रेग्यांनी कादंबरीलेखनात आपली स्वतंत्र ओळख निर्माण केली. त्यांची कादंबरी मराठीतल्या वास्तववादी वा समस्याप्रधान कादंबरीलेखनाच्या परंपरेत बसत नाही. याचे कारण तात्कालिकतेत त्यांना रस नाही. ‘सावित्री’त येणारे युद्धाचे संदर्भ, ‘रेणू’तली राजकीय क्षेत्रातल्या माणसांची वर्दळ, ‘मातृका’तले स्थानांतरण हे स्थळकाळाचे संदर्भ केवळ पार्श्वभूमीच्या पडद्यासारखे असून कथानकाला आधार पुरविण्यापुरते असतात. त्यांच्या सर्व कादंबऱ्यांमध्ये माणसांच्या परस्पर संवादांचा आणि स्वतःचा स्वतःशी असलेल्या आत्मसंवादाचा प्रश्न केंद्रस्थानी असतो. स्वात्मसंवादातून, परस्परांच्या संपर्कातून व देवघेवीतून विकसित होणारे मानवी अनुभवविश्व हा त्यांच्या कुतूहलाचा विषय आहे.

‘सावित्री’ या कादंबरीला १९३९ ते १९४७ या युद्धकालाची पार्श्वभूमी आहे. रूढ अर्थाने या कादंबरीला कथानक नाही. सावित्रीने आठ वर्षांत प्रियकराला लिहिलेली ३९ पत्रे म्हणजे ही कादंबरी. अर्थात या कादंबरीला सांकेतिक प्रेमकथेचे स्वरूप येत नाही. प्रियकर-प्रेयसीने परस्परांना ‘आपलंसं’ ‘तुमचंसं’ करून घेण्याचा हा प्रवास आहे. या देवघेवीतून दोघांनी अधिक व्हायचे, अनुभवसमृद्धीच्या दृष्टीने उत्क्रांत होत जायचे; हे

या कादंबरीचे आशयसूत्र आहे. राधेने स्वतःला विसरून कृष्णमय होणे आणि कृष्णाने स्वतःला विसरून राधेत आपले रूप पाहणे, या देवघेवीचे मिथक उलगडण्याचा कवितेतला छंद रेग्यांनी या कादंबरीतही जोपासला आहे. दुसरे कुणी नसतेच, सारेकाही आपणच असतो, हे रहस्य एकदा उलगडले की सर्व द्वंद्वे, युद्ध संपेल आणि विश्वशांती नांदेल हा चिरंतन मूल्यविचार या कादंबरीतून पुढे येतो.

'अवलोकिता' या कादंबरीत जे. कृष्णमूर्तींच्या तत्त्वज्ञानाप्रमाणे प्रत्येक क्षण साक्षात अनुभवण्यात जीवन आहे, हे सूत्र कथानकात गुंफले आहे. 'रेणू' या कादंबरीचा बाज मात्र वेगळा आहे. तिथे छोट्याशा चित्रफलकावर बऱ्याच पात्रांचा वावर आहे. एखाद्या कोलाजासारखी पात्रांची गर्दी पसरली आहे. यांतला प्रत्येक जण स्वतंत्र आहे आणि तरीही सर्व सर्वांशी जोडलेले आहेत. रेणू ही त्यातलीच एक. या कादंबरीत कम्युनिकेशन हा विषय हाताळलेला आहे. आपण संवाद साधतो म्हणजे नेमके काय करतो, हा प्रश्न कादंबरीच्या केंद्रस्थानी आहे. या कादंबरीतली रेणू म्हणते, ''आपण आपल्याशी संपर्क काही न करता, काहीही मनात न आणता, मन, विचार सगळे विसरून साधू शकतो.'' आत्मसंपर्काची ही निराळी रीत हाच रेणूचा विषय आहे.

एखादे भव्य अनाकलनीय असे नाट्य असते, पण खरी पात्रे दोनच असतात. एक मागचा पडदा आणि एक पुढचा पडदा. या कादंबरीत रेणू मागच्या पडद्यासारखी सगळ्यांना उठाव देणारी आहे, तर पूर्णिमा या सर्वांना सामावून पुन्हा पुढच्या पडद्यासारखी निर्विकार उरणारी आहे. रेग्यांच्या कादंबरीलेखनाचे हे तंत्र असे संवादीभ्रमात्मक सौंदर्यरचना साधणारे तंत्र आहे.

'मातृका' ही रेग्यांची शेवटची कादंबरी आहे. 'रिलेटिव्हिटी ऑफ लव्ह' हे या कादंबरीचे आशयसूत्र आहे. भोवतालच्या माणसांच्या कोलाहलातही माणसाची एक वेगळी आत्मशोधाची यात्रा कशी सुरू असते, याचा शोध हे या कादंबरीचे कथानक आहे. 'आपणच आपल्याला लपवीत असतो. घुंगट असलाच, तर तो आपला असतो. बाहेर सगळे स्वच्छ मोकळे असते,' हे मानवी संज्ञापनाचे रहस्य या कादंबरीतून लेखकाने उलगडले आहे. सारांश, कलावंत नवीन काही निर्माण करीत नसतो. तो आपल्या साक्षात्काराच्या प्रकाशात कलाद्रव्याची एक नवीन जुळणी करीत असतो. पूर्णापासून पूर्ण उदीत होते, पूर्णातून पूर्ण काढून घेतले तरी पूर्णच शिल्लक राहते. रेग्यांची सर्जनशीलता या जातीची होती. त्यांचे वाङ्मयीन व्यक्तिमत्त्व एखाद्या यक्षासारखे होते. आणि त्यांचे साहित्यविश्वही असेच अलौकिक व वेगळ्या धाटणीचे होते. त्यामुळेच कदाचित रेग्यांच्या गद्यलेखनाची परंपरा पुढे फारशी विस्तारित झाली नाही. कवितेच्या क्षेत्रात मात्र ग्रेस, आरती प्रभू इत्यादी अनेक कवींवर रेग्यांच्या कवितेची छाप आढळते.

– डॉ. रमेश वरखेडे

**संदर्भ :**

*१. जोशी रा. भि.; 'पु. शि. रेगे: एक तरल प्रतिभासंपन्न'; मांडवी, दिवाळी अंक, १९६८.*

## रेगे, मेघश्याम पुंडलिक

☞ **मुख्य नोंद – पत्रकारिता आणि ललितेतर साहित्य खंड**

## रेगे, सदानंद शांताराम

**कवी, कथाकार, अनुवादक**

**२१ जून १९२३ – २१ सप्टेंबर १९८२**



मराठी कविता व कथेमध्ये नवे प्रवाह रुजविणाऱ्या साहित्यिकांच्या सुरुवातीच्या पिढीतील कसदार कवी व लेखक सदानंद रेगे यांचा जन्म त्यांच्या आजोळी, रत्नागिरी जिल्ह्यातील राजापूर येथे झाला. १९४० मध्ये मुंबईत दादर येथील छबिलदास हायस्कूलमधून मॅट्रिकची परीक्षा उत्तीर्ण झाल्यानंतर चित्रकलेच्या शिक्षणासाठी ते जे. जे. स्कूल ऑफ आर्ट्समध्ये दाखल झाले होते. परंतु घरच्या

र

परिस्थितीमुळे १९४२ साली त्यांनी शिक्षण सोडून नोकरीची वाट धरली. सुरुवातीला काही किरकोळ नोकऱ्या केल्यानंतर पश्चिम रेल्वेमध्ये ते १८ वर्षे सेवारत होते. नोकरी करीत असतानाच पुढील शिक्षण घेऊन १९५८ मध्ये त्यांनी बी. ए. ही पदवी संपादन केली.

सदानंद रेगे यांच्या वाङ्मयीन कारकिर्दीची सुरुवात कवितेपासून झाली. त्यांची पहिली कविता १९४८ मध्ये 'अभिरुची' या नियतकालिकात प्रसिद्ध झाली. मर्ढेकर प्रणीत नवकाव्याच्या परंपरेतील कवी म्हणून ते ओळखले जातात. १९५० मध्ये प्रकाशित झालेला 'अक्षरवेल' हा त्यांचा पहिला कवितासंग्रह; त्यानंतर त्यांचे 'गंधर्व' (१९६०), 'देवापुढचा दिवा' (१९६५), 'ब्राँकुशीचा पक्षी' (१९८०), 'वेड्या कविता' (१९८०) हे कवितासंग्रह प्रकाशित झाले.

मानवी अस्तित्वाविषयीचे विविधांगी चिंतन, मानवी मनाच्या अंतःस्तराचा शोध हे त्यांच्या कवितेचे विशेष आहेत. प्रतिमांचा विपुल वापर, कवितेच्या आकृतिबंधाबाबत वेगळे प्रयोग हीदेखील त्यांच्या कवितेची वैशिष्ट्ये आहेत. माणसांच्या आदिम प्रेरणांचा वेध घेणारी, तसेच माणूस आणि त्याचा भोवताल यांच्या नात्यांमधील सूक्ष्म कंगोऱ्यांना स्पर्श करणारी त्यांची कविता आशयसमृद्ध आहे. रेग्यांची प्रतिमासृष्टी विलक्षण आहे. ती व्यामिश्र, बहुपदरी व गूढतेकडे झुकणारी आहे. त्यामुळेच त्यांच्या कवितेवर दुर्बोधतेचा आक्षेपही येतो.

रेगे यांनी मराठी कथा वाङ्मयातही मोलाचे योगदान दिलेले आहे. विशेषतः कथेचे आशय-विषय, मांडणी व आकृतिबंध यांमध्ये त्यांनी वेगळे प्रयोग केले; म्हणूनच नवकथेच्या प्रवाहातील ते एक महत्त्वाचे लेखक मानले जातात. १९५१ मध्ये 'धनुर्धारी' या नियतकालिकात त्यांची पहिली कथा प्रसिद्ध झाली. 'काळोखाची पिसे' हा त्यांचा पहिला कथासंग्रह १९५४ मध्ये प्रकाशित झाला. त्यानंतर 'चांदणे' (१९५९), 'चंद्र सावली कोरतो' (१९६३), 'मासा आणि इतर विलक्षण कथा' (१९६५) हे त्यांचे कथासंग्रह प्रकाशित झाले.

मानवी गुढाचा शोध ही प्रेरणा रेगे यांच्या कवितेप्रमाणेच कथेतही आढळते. माणसाच्या व्यामिश्र मनोव्यापाराचा उलगडा करण्याचा प्रयत्न त्यांनी आपल्या कथांमधून केला आहे. जगण्यातल्या दुःखाचे, हतबलतेचे दर्शनही त्यांच्या कथांमधून घडते. कवितेप्रमाणेच त्यांच्या कथांमध्येही प्रतिमांचा उदंड वापर आढळतो. रेगे यांनी पाश्चात्त्य साहित्याचा व्यासंग जपला. त्यांच्या साहित्यामध्ये पाश्चात्त्य कलाकृतींचे संदर्भ प्रतिमा, प्रतीकांच्या रूपात येतात.

पाश्चात्त्य साहित्यातील काही उत्तम कलाकृतींचे अनुवाद त्यांनी मराठीमध्ये केले आहेत. त्यांमध्ये प्रामुख्याने नाटक व कविता या वाङ्मयप्रकारांचा समावेश आहे. 'ब्रांद' (मूळ लेखक हेन्रिक इब्सेन) 'बादशहा' मूळ लेखक युजीन ओनील), 'गोची' (मूळ लेखक तारोझ रुझिविच) व 'राजा ईडिपस' (मूळ लेखक सोफोक्लिज) ही त्यांची अनुवादित नाटके आहेत. त्यांनी ब्लादिमीर मायकोव्हस्की यांच्या कवितांचा अनुवाद त्यांनी केला आहे. 'पँट घातलेला ढग' (१९७१) या शीर्षकाखाली या अनुवादित कवितांचा संग्रह प्रकाशित झाला आहे. त्यांनी वॉल्ट व्हिटमन यांच्या कवितांचा अनुवादही केलेला आहे. या अनुवादित कवितांचा संग्रह 'तृणपर्णे' (१९८२) या शीर्षकाखाली प्रकाशित झालेला आहे. 'जयकेतू' हे 'ईडिपस'चे रूपांतर आहे.

'चांदोबा चांदोबा', 'झोपाळ्याची बाग' हे रेगे यांचे बालसाहित्य प्रसिद्ध आहे. रेगे यांच्या निवडक साहित्याच्या संकलनाचे दोन ग्रंथ संपादित झालेले आहेत. अरविंद गोखले यांनी रेगे यांच्या निवडक कथांचे संकलन संपादित केलेले आहे (१९८८). वसंत आबाजी डहाके यांनी रेगे यांच्या निवडक साहित्याचे संपादन केलेले आहे. (१९९६).

**– मनोहर सोनवणे**

* * *

र

## ल



### लिंबाळे, शरणकुमार हणमंता
**कवी, कथाकार, कादंबरीकार, संपादक**
**१ जून, १९५६ (अंदाजे)**



शरणकुमार हणमंता लिंबाळे यांचा जन्म अक्कलकोट तालुक्यातील हन्नूर येथे झाला. त्यांचे प्राथमिक शिक्षण जिल्हा परिषदेच्या शाळेत व चपळगावच्या ग्रामीण विद्यालयात झाले. १९७४ साली ते एस.एस.सी. झाले. दयानंद महाविद्यालयामधून १९७८ साली बी.ए. झाल्यावर त्यांनी एम.ए. पीएच.डी. पदव्या संपादन केल्या.

'अक्करमाशी' या आत्मनिवेदनात ते म्हणतात, ''मला माझा इतिहास माझ्या आईपुरता सांगता येईल. जास्तच झालं तर आईच्या आईपुरता. यापलीकडे मला माझं कूळ नाही... माझी आई महार, तर वडील लिंगायत. आई झोपडीत, तर बाप माडीत. वडील जमीनदार तर आई भूमिहीन. मी अक्करमाशी. गाव, भाषा, आई, वडील, जात, धर्म या सर्वच बाबतींत मी दुभंगलेला. व्यक्तिमत्त्व हरवलेला... माझा जन्मच अनैतिक ठरवला गेला.... माझे शब्द म्हणजे माझे अनुभव. आयुष्यातून अनुभवांना वजा केले तर शिल्लक काय राहील? एक सजीव कलेवर. माझी आई समाजव्यवस्थेची बळी आहे याचं आकलन मला दलित चळवळ व दलित साहित्यातून झालं. मी अक्करमाशी म्हणून, मी अस्पृश्य म्हणून, मी दरिद्री म्हणून जे जीवन जगलो; तेच शब्दांत मांडलं आहे. ही आत्मकथा जशी माझी आहे, तशी मी ज्या समाजात वाढलो आणि ज्या गावात जगलो, त्यांचीही आहे.''

'राणीमाशी' हे त्यांचे 'भावविश्व' आहे. ते निवेदन करतात, ''राणीमाशी एक मधमाशी, जिच्याबरोबर नराचा संयोग झाला की तो मरतो. वापरणं व मारणं ही तर राणीमाशीची प्रवृत्ती, जी माणसातही असते. अशी माणसं मला भेटली, ज्यांच्यामुळं ही पानं भरली.'' त्यांच्या विविध साहित्यांत 'उत्पात' (१९८२) व 'श्वेतपत्रिका' (१९८९) हे कविता संग्रह; 'हरिजन' (१९८८), 'रथयात्रा' (१९९२), 'दलित ब्राह्मण' (१९९७) हे कथासंग्रह; 'भिन्न लिंगी' (१९९१) व 'उपल्या' (१९९८) या कादंबऱ्या; 'अक्करमाशी' (१९८४), 'बारामाशी' (१९८८), 'पुन्हा अक्करमाशी' (१९९९) ही आत्मनिवेदने प्रकाशित असून 'अक्करमाशी'चे हिंदी, कन्नड, पंजाबी व इंग्लिश ह्या भाषांत अनुवादही झाले, आहेत.

त्यांच्या संपादित साहित्यात 'दलित प्रेम कविता' (१९८६), 'भारतीय रिपब्लिकन पक्ष' (१९९२), 'मराठी वाङ्‌मयातील नवीन प्रवाह' (१९९३), 'ज्ञानगंगा घरोघरी' (२०००) आदी ग्रंथांचा समावेश आहे. अन्य साहित्यात 'भारतीय दलित पँथर' (१९९२) या वैचारिक लेखनाचा व 'दलित साहित्याचे सौंदर्यशास्त्र' (१९९६) या समीक्षात्मक लेखनाचा विशेष उल्लेख करावा लागेल.

– संपादक मंडळ

**संदर्भ :**


१. *लिंबाळे शरणकुमार हणमंता; 'अक्करमाशी'; श्रीविद्या प्रकाशन, पुणे, १९८४.*

२. *लिंबाळे शरणकुमार हणमंता, 'राणीमाशी'; दिलीपराज प्रकाशन प्रा. लि., पुणे; द्वितीय आवृत्ती, २००३.*

## लोंढे, लक्ष्मण बाळकृष्ण

**विज्ञानकथाकार, कादंबरीकार, प्रवासवर्णनकार**

**१३ ऑक्टोबर १९४४**



लक्ष्मण बाळकृष्ण लोंढे यांचा जन्म बाळकृष्ण-राधाबाई या माता-पित्यांच्या पोटी सातघर (अलिबाग) या गावी झाला. त्यांचे प्राथमिक शिक्षण वरसई (पेण), आगाशी येथे झाले व नंतरचे (विज्ञानशाखेची पदवी) महाविद्यालयीन आणि कायदेविषयक शिक्षण (एल.एल.एम.) मुंबईत झाले.

त्यांनी रिझर्व बँक, न्यू इंडिया ॲश्युअरन्स कंपनी, आय.सी.आय.सी.आय.बँक येथे कायदेविषयक सल्लागार म्हणून काम केले व त्यानंतर निवृत्ती घेतली.

त्यांना आधी लेखनाची पार्श्वभूमी नव्हती; परंतु त्यांचे विविध विषयांवर भरपूर वाचन होते. त्यातूनच त्यांना लिखाणाची ऊर्मी आली आणि त्यांनी पहिली कथा लिहिली: 'मग मी तुझीच आहे.' आणि एका गमतीदार योगायोगाने ती प्रथम कन्नड मासिकात व नंतर मराठी मासिकात छापून आली. त्यांच्या सुरुवातीच्या कथांना असे कन्नड-मराठी भाषांतर लाभले. त्यांचे विषय कौटुंबिक, सामाजिक, प्रेमविषयक होते व कथा छोटेखानी होत्या.

परंतु, खऱ्या अर्थाने त्यांची पहिली विज्ञानकथा म्हणजे, 'मला फाशी द्या.' प्रथम पदार्पणातच या कथेला मराठी विज्ञान परिषदेचे पारितोषिक मिळाले.

विज्ञान साहित्याला मराठीत परंपरा-इतिहास म्हणावे, असा अवधी लोटलेला नाही. सुरुवातीच्या भाषांतरांनंतर काही तुरळक प्रयत्न सोडले, तर १९५५ सालानंतर तिला थोडा आकार येऊ लागला. परंतु, वैज्ञानिक क्षेत्रातील संशोधनात्मक कार्याचे वलय असलेल्या डॉ.जयंत नारळीकर यांच्यामुळे विज्ञानकथेला लक्षणीयता प्राप्त झालीच, पण तिच्याकडे गांभीर्यतेने पाहिले गेले.

ते लिहीत असतानाच निरंजन घाटे, बाळ फोंडके, सुबोध जावडेकर, इत्यादी मंडळी विज्ञान साहित्याचे दालन समृद्ध करू लागली. लक्ष्मण लोंढे यांनी विज्ञान-कथेला स्थिरपद केले. १९७१-१९७२ मध्ये या लेखनाला सुरुवात झाली.

**विज्ञाननिष्ठ लेखन**

लोंढे यांची आजवर ३१ पुस्तके प्रकाशित झालेली आहेत. 'देवांसी जीवे मारिले' (१९८३), 'गिनिपिग' (१९८४), 'पाण्यात राहणारा मासा' (१९८५), 'विज्ञानयात्रा' (१९८८), 'दुसरा आइन्स्टाइन' (१९८९), गुंता इत्यादी विज्ञान कादंबऱ्या; 'झोका', 'झरोका', 'लक्ष्मणझुला', 'वाळूचं गाणं' यांसारखे ललित लेख; 'आभाळ फाटलंय' हे सत्यघटनेवर आधारलेले चित्तथरारक लेखन; 'युरोसफर' हे प्रवासवर्णन, 'तप्तमुद्रा' हा गूढकथासंग्रह; 'कोऽहम्', 'आरण्यक'(१९९५) यांसारख्या चिंतनात्मक दीर्घकथा. अशा विविध प्रांतांत ते लीलया विहरत असले, तरी त्यांच्या लिखाणात केंद्रस्थानी माणूस आहे.

विज्ञान-तंत्रज्ञान यांत होणारे बदल आणि त्यांचा मानवी जीवनावर होणारा परिणाम ते तपासून पाहतात. अनेक वेगवेगळे संदर्भ, श्रुतयोजना ह्यांचा ते वापर करतात. 'कुंती', 'परशुराम' या पुराण-व्यक्तींना वेगळी परिमाणे लावतात. कीटकसृष्टी, वात्स्यायन, राजकीय संघर्ष, परग्रह, यंत्रमानव, 'आत्महत्यारा'मध्ये क्लोनिंग, 'इहलोक'मध्ये श्रॉडिंजरचे समीकरण, 'प्रेषित'मध्ये विविध मिती, 'नारदाच्या चिपळ्या'मध्ये ज्ञान आणि देव या संकल्पनांचा वेगळा पैलू दिसतो. 'आमेन' या कथेतही देव 'एकमेवाद्वितीय' म्हणून एकाकी, 'सर्वज्ञ' म्हणून नवे शिकण्याचा आनंद नाही, त्याला 'अशक्य' काही नाही म्हणून प्रयत्नांनी काही मिळवण्याची गोडी नाही, 'अमर' म्हणून जन्माचा आनंद नाही आणि मृत्यूच येणार नसल्यामुळे जीवनात असणारा थरारही नाहीसा झालेला; त्यामुळे 'तुम्ही देव बनू नका' असा संदेश देवच देतो, अशी गमतीदार कल्पनाही ते मांडतात. त्यांच्या व्यक्तिरेखाही कधी सरळ-साध्या तर कधी व्यामिश्र, कधी

कणखर तर कधी मोडून पडणाऱ्या, कधी चैतन्यदायी तर कधी उदास असतात.

विज्ञानकथेतील पार्श्वभूमी अधिक कल्पकतेने रंगवावी लागतेच. कारण, येथे जबाबदारी वाढलेली असते. कृतकतेचा धोका निर्माण झालेला असतो. पण मुळात समस्या विज्ञानाधिष्ठित असायला हवी. त्यामुळे व्यक्तिरेखांचे उन्नयन-अधःपात, घडणे-बिघडणे हवे; तरच त्याला विज्ञानकथा म्हणता येईल. मुळात कलात्मकतेला पर्याय नाही. लक्ष्मण लोंढे यांच्या कथा या 'कथा' म्हणून उत्तम दर्जाच्या आहेत. त्यातील 'विज्ञान' हा भाग त्या अनुषंगाने सहज येतो.

विज्ञान हेच 'जालीम औषध' वा 'विज्ञान भस्मासुर' असा कुठलाही अट्टहासी पवित्रा ते घेत नाहीत. विज्ञानाचे भले-बुरे पैलू ते समोर आणतात. ते 'नैतिकता' हे मूल्य मानतात. धर्म, न्याय, राजसत्ता यांप्रमाणे विज्ञानाकरिता अशी एखादी आदर्श सत्ता असावी, की जी संपूर्ण मानवजातीचा साकल्याने आणि दूरदृष्टीने विचार करील अशी कल्पना ते मांडतात.

विज्ञान हे दुधारी शस्त्राप्रमाणे आहे. त्याचा वापर तारतम्याने व्हायला हवा. त्यासाठी वैज्ञानिक साक्षरता वाढवणे, पूर्वग्रहरहित दृष्टी असणे, शाश्वत मानवी मूल्यांची कसोटी असणे, यासाठी संपूर्ण जीवसृष्टी - मानववंश यांचा विचार त्यांना अभिप्रेत आहे.

माणसाला बुद्धीची देणगी मिळालेली असेल, तर भावना हे एक वरदान आहे. त्याच मानवाला एक उंची प्राप्त करून देतात. हे सर्व सांगणारी त्यांची भाषाशैली ओघवती व रसाळ आहेच, पण अतिशय नेमकेपणा पोहोचवणारी आहे. त्यासाठी 'हिमदिव्य'सारखा शब्द वापरून ते ध्रुवप्रदेशातील थंडी जाणवून देतात. कधी ते तटस्थपणे भाष्य करतात, तर कधी मिस्कीलपणे समाजाचा आणि पृथ्वीचाही जणू एक उभा छेद घेऊन ते प्रत्येक पातळीवरील संघर्ष दाखवतात.

**निसर्गप्रेम**

'निसर्ग' हा त्यांच्या आत्म्याचा गाभा आहे. त्या दृष्टीने ते कृतिशील आहेत. जाणकार रसिकांचा गट घेऊन ते निसर्गरम्य ठिकाणी जातात आणि आपण मानलेल्या पंचमहाभूतांशी आणि त्यापासूनच बनलेल्या आपल्या शरीराशी जिव्हाळ्याचे संबंध, पर्यावरणाशी असलेले नाते, सारे ते उलगडून दाखवतात. जग आहे त्यापेक्षा थोडेतरी सुंदर करून जाणे - हेच त्यांचे तत्त्वज्ञान!

विज्ञानकथा लेखक म्हणून ते विशेष परिचित असले, तरी त्यांनी सामाजिक कथा, एकांकिका, नभोनाट्य, बालवाङ्मय, विज्ञान कादंबरी, ललित गद्य, प्रवासवर्णन, वृत्तपत्रीय स्तंभ-लेखन असे विविध साहित्यप्रकार हाताळले आहेत. ते विज्ञान-कथा-कथनही करतात.

त्यांना पाच वेळा राज्यशासनाचे उत्कृष्ट वाङ्मय निर्मितीबद्दलचे पुरस्कार मिळाले आहेत. त्यांत '२२ जुलै १९९५' आणि 'दुसरा आइन्स्टाइन' (१९८९) या विज्ञान कथांबरोबरच 'लक्ष्मणझुला'- ललितगद्य, 'धर्मयोद्धा'-लघुकथा, 'ध...ध...धाडसाचा' बालवाङ्मय हे वेगळे प्रकारही समाविष्ट आहेत.

कोकण मराठी साहित्य परिषदेतर्फे दिला जाणारा कथावाङ्मयाचा पुरस्कार त्यांना २००५ व २००८ मध्ये मिळाला.

जगातील सर्वोत्कृष्ट विज्ञान-कथासंग्रह - युनिव्हर्सिटी ऑफ कॅन्सासमध्ये 'दुसरा आइन्स्टाइन' ही एकमेव भारतीय कथा निवडली गेली.

२००५ मध्ये ब्राझील येथे भरलेल्या विज्ञानप्रसारकांच्या जागतिक परिषदेत त्यांनी 'विज्ञान प्रसारकांचे समाजाच्या विज्ञान-शिक्षणात स्थान' या विषयावर शोधनिबंध सादर केला.

त्यांच्या कथांचे भारतीय भाषांमध्ये आणि इंग्लिश, जर्मन, चिनी भाषांमध्येही अनुवाद झालेले आहेत. तसेच त्यांचे लेखन पाठ्यपुस्तकातही समाविष्ट करण्यात आलेले आहे.

मानवी मनाच्या समृद्धीसाठी ललित कथा, आनंदासाठी निसर्ग आणि बुद्धीच्या विकासासाठी विज्ञानदृष्टी हवी आणि यांचे एकजीव रसायन त्यांच्या लेखनात आढळते.

- प्रा. मीना गुर्जर

**संदर्भ :**
१. 'महाराष्ट्र साहित्य पत्रिका', विज्ञानकथा विशेषांक, अंक क्रमांक ३१९; (ऑक्टोबर २००६-डिसेंबर २००६).
२. घाटे निरंजन; 'निवडक मराठी विज्ञान कथा'; प्रस्तावना.

## लोकमान्य टिळक
*टिळक, बाळ गंगाधर*
☞ **मुख्य नोंद – राजकारण खंड**

## लोकहितवादी
*देशमुख गोपाळ हरी*
☞ **मुख्य नोंद – समाजकारण खंड**

## लोखंडे, प्रज्ञा
**कवयित्री**
**११ फेब्रुवारी १९६६**



प्रज्ञा लोखंडे (पवार) यांचा जन्म सोलापूर येथे झाला. त्यांचे शिक्षण एम.ए. पर्यंत झाले आणि त्यांचे पीएच.डी.चे संशोधन सुरू आहे. ज्ञानसाधना महाविद्यालय ठाणे येथे त्या व्याख्यात्या व मराठी विभागप्रमुख म्हणून काम करतात. 'परिवर्तनाचा वाटसरू' या पाक्षिकाच्या त्या संपादक आहेत.

दलित कवितेच्या तिसऱ्या पिढीचे प्रतिनिधित्व करणाऱ्या कवयित्री म्हणून त्या ओळखल्या जातात. 'अंतस्थ' (१९९३), 'उत्कट जीवघेण्या धगीवर' (२००२), 'मी भीडवू पाहतेय समग्राशी डोळा' (२००७) हे त्यांचे तीन कवितासंग्रह प्रकाशित झालेले आहेत.

ख्यातनाम लेखक दया पवार यांची कन्या असल्याने त्यांना लेखनाचा वारसा घरातच मिळाला. आई हिरा पवार या प्राथमिक शिक्षिका, मुख्याध्यापिका, कार्यकर्त्या होत्या. प्रज्ञा पवारांच्या अगदी पहिल्यावहिल्या 'कोकिळा' या कवितेतही स्त्रीचे शोषण आणि शोषणमुक्त होण्यापर्यंतचा प्रवास हे आशयसूत्र लक्षात येते.

त्यांच्या तीन कवितासंग्रहांमध्ये दलित कवितेला सांकेतिकतेच्यापलीकडे नेण्याची शक्ती असल्याचे मत जाणकारांनी नोंदविले. वास्तवाचे अचूक भान व्यक्त करीत स्त्री आणि संस्कृती यांसंबंधीच्या प्रचलित मांडणीला त्यांनी मुळातून छेद दिला. त्यांची कविता मानवमुक्तीशी नाते सांगणारी आहे.

त्यांना अनेक मोलाचे पुरस्कार प्राप्त झाले. महाराष्ट्र शासनाचा बालकवी पुरस्कार, विशाखा पुरस्कार, आळंदी साहित्यसंमेलनातील बा.सी. मर्ढेकर पुरस्कार, सर्वोत्कृष्ट कवितासंग्रहाचा महाराष्ट्र फाउण्डेशन पुरस्कार हे त्यांतील प्रमुख होत.

'केंद्र आणि परीघ' (२००४) हा लेखनसंग्रह, 'धादांत खैरलांजी' (२००७) हे नाटक ही त्यांची अन्य प्रकाशित पुस्तके. 'मी भयंकराच्या दरवाजात उभा आहे' हा नामदेव ढसाळ यांच्या निवडक कवितांचा संग्रह त्यांनी सतीश काळसेकर यांच्याबरोबर संपादित केलेला आहे.

– नरेंद्र बोडके

* * *

ल

# व



## वडावाला सुमेध

*रिसबूड, सुबोध श्रीकृष्ण*

**कथाकार**

**११ एप्रिल १९६२**



विसाव्या शतकाच्या अखेरच्या दशकात (१९९१ ते २०००) मराठी कथेत सुमेध वडावाला नावाचा कथाकार प्राधान्याने पुढे आला. अर्थात, १९८६ पासून कथालेखन करणारे ते मूळचे रिसबूड आडनावाचे असून कोकणातील रत्नागिरी जिल्ह्यातील खेड हे त्यांचे मूळ गाव. ते मुंबईच्या माझगाव डॉक्समध्ये नोकरीत आहेत.

'डुफलीवाले' ही त्यांची वेगळ्या प्रकारची कथा 'धनुर्धारी' मासिकातून प्रसिद्ध झाली. त्यानंतर १९८९ साली 'स्त्री'मधील 'बाजार' या कथेने त्यांच्यावर कथाकार म्हणून शिक्कामोर्तब झाले आणि पुढच्या दशकात त्यांचे 'सांजवा' (१९९३) आणि 'चांदणफुला' (१९९५) हे तोपर्यंत लिहिल्या गेलेल्या प्रारंभिक कथांचे संग्रह प्रसिद्ध झाले.

वडावाला यांच्या कथेबद्दल लिहिताना समीक्षक डॉ. अंजली सोमण म्हणतात, 'त्यांच्या कथा दीर्घ आणि वेगळ्या प्रकारच्या असतात. आधुनिकतेपेक्षा परंपरा त्यांना अधिक भावत असावी, असे त्यांच्या कथेचा आशय आणि अभिव्यक्ती लक्षात घेतल्यानंतर वाटत राहते. त्यांच्या कथेतील प्रश्नही नव्या जमान्यातले, नव्या जाणिवेने विचार करणाऱ्या स्त्री-पुरुषांमधील नसतात. हे प्रश्नही बरेच वेळा पारंपरिकच वाटतात...'

सुमेध वडावाला यांच्या भाषेवरील प्रभुत्वाबाबत त्या म्हणतात, 'त्यांच्या निसर्गवर्णनपर भाषेला अंगभूत लय असते. प्रतिमांचा ते अतिशय सुंदर उपयोग करून घेतात. त्यांची लयबद्ध वाक्ये मनात घर करून राहतात. या दशकातील कथाकारांमध्ये शैलीचा असा बाज फारच थोड्या कथाकारांपाशी सापडतो.' (म. सा. पत्रिका अंक २८७, ऑक्टो.-डिसें.१९९८; डॉ. अंजली सोमण)

वडावाला यांच्या कथेने मानवी मनाचा शोध घेण्याचा प्रयत्न आपल्या कथांतून केला आहे. मानवातील वैषयिक भावनांचे धीटपणे चित्रण हे त्यांच्या लेखनाचे वैशिष्ट्य आहे. 'धर्मयुद्ध', 'ब्रह्मकमळ', 'तृष्णा' इत्यादी त्यांच्या कादंबऱ्या असून पैकी धर्मयुद्ध पूर्ण संवाद-स्वरूप अशी आहे.

अल्पावधीतच श्रेष्ठ कथाकार म्हणून पुढे येत असलेले सुमेध वडावाला अल्पावधीतच तशा कथालेखनापासून दूर जात आहेत ही दुर्दैवाची गोष्ट आहे. गेल्या काही वर्षांत ते परिचयात्मक वृत्तपत्रीय धाटणीचे लेखन करतात; त्यांची पुस्तके प्रसिद्ध होत असली तरी चांगली क्षमता असलेला त्यांच्यातील कथाकार हरवत चालल्याची खंत निश्चितच आहे. जुन्यांतून वेगळे काहीतरी देणारा कथाकार म्हणून त्यांची नोंद आहे. त्यांना अनेक प्रतिष्ठेचे साहित्यिक पुरस्कार मिळाले आहेत.

– मधू नेने

**संदर्भ :**


१. *सोमण अंजली; 'दशकातील मराठी कथा'; म. सा. पत्रिका अंक २८७-ऑक्टो.-डिसें..१९९८.*

२. *वडावाला, सुमेध; 'सांजवा' (१९९३).*

## वडेर, प्रल्हाद बापूराव

**कथाकार, समीक्षक**

**४ मार्च १९२९**



प्रल्हाद वडेर ह्यांचा जन्म निपाणी (जि. बेळगाव) येथे झाला. तेथेच त्यांचे प्राथमिक शिक्षण झाले. १९४७ साली निपाणीपासून सात मैलांवर कणगले या गावातल्या म्युनिसिपल हायस्कूलमधून ते मॅट्रिकची परीक्षा उत्तीर्ण झाले. पुढे राजाराम महाविद्यालयामधून बी. ए. झाले (१९५१). पदवीनंतर ते ए.जी. ऑफिसमध्ये नोकरी करू लागले. १९६६ मध्ये रुईया महाविद्यालयातून ते एम.ए व मुंबई विद्यापीठातून ना. सी. फडके यांच्या साहित्याचा अभ्यास करून १९९० मध्ये पीएच. डी झाले. गोव्यातील चौघुले महाविद्यालयात ते प्राध्यापकपदी रुजू झाले (१९६२). १९७३ नंतर गोवा विद्यापीठात ते मराठीचे प्राध्यापक म्हणून काम करू लागले.

१९६१ मध्ये मंगला राजहंस यांच्याशी त्यांचा विवाह झाला. प्रारंभापासून त्यांचा ओढा कथा–लेखनाकडे होता. ‘चढण’ (१९६२) व ‘वीज’ (१९७७) हे सुरुवातीचे कथासंग्रह असून ‘कोणीकडून कुणीकडे’ (१९७५) हा अनुवादित कथासंग्रह आहे. नंतर ते समीक्षेकडे वळल्याचे दिसते. ‘अनुभव आणि आविष्कार’ (१९६८) हा त्यांचा पहिला समीक्षा–संग्रह होय. त्यांनी देशीवाद, कलावाद, मराठीतील चरित्रात्मक कादंबरी अशा अनेक साहित्य प्रकारांची समीक्षा केली आहे. ‘प्रतिभा आणि प्रतिमा’ (१९९७) यात त्यांनी साहित्यातील सर्व प्रकारांत वाङ्मयीन विचारप्रणालीतील रसपूर्ण समीक्षा केली आहे. डॉ. सुभाष भेण्डे यांच्या समग्र साहित्यावर समीक्षा दृष्टिकोनातून समीक्षा–संपादनही त्यांनी केले आहे.

वडेर यांची समीक्षा पूर्णपणे कलावादी आहे, असे नाही. ही सामाजिक, आस्वादक समीक्षा आहे. कथा, कादंबरी, ललित लेखन, काव्य अशा निरनिराळ्या वाङ्मय प्रकारांवर त्यांनी चिकित्सक समीक्षा केली आहे. साहित्यात वैशिष्ट्यपूर्ण स्थान असणाऱ्या नव्या–जुन्या लेखकांच्या उत्कृष्ट वाङ्मयावर परखडपणे टीका–समीक्षा केली आहे. ही समीक्षा करताना ते आपल्यातील लेखकत्व जागृत ठेवतात. ‘प्रमेय आणि प्रबंध’ (१९९७) हा त्यांचा आणखी एक समीक्षाग्रंथ. सगळ्यात महत्त्वाचा ग्रंथ म्हणजे ‘प्रा. ना. सी. फडके : एक चिकित्सक अभ्यास’ (१९९०) हा त्यांचा पीएच. डीचा प्रबंध होय. प्रा. फडक्यांच्या यथासांग वाङ्मयाचा समीक्षक व अभ्यासू दृष्टिकोनातून त्या–त्या वाङ्मय प्रकाराच्या संदर्भात ते अभ्यास करतात व जे निष्कर्ष हाती आले, ते स्पष्टपणे व बारकाईने मांडण्याचा प्रयत्न करतात. फडक्यांच्या वाङ्मयावर व समीक्षेवर प्रकाश टाकणाऱ्या अनेक दुर्मीळ व इतर ग्रंथांचा संदर्भ ते देतात. त्यामुळेच त्यांची समीक्षा एका वेगळ्या प्रकारे वैशिष्ट्यपूर्ण आहे, हे जाणवते.

बोरकरांच्या कादंबऱ्या, गोमंतक मराठी साहित्य संमेलनातील अध्यक्षीय भाषणांतील वैशिष्ट्ये, त्यांतील भाषा, त्यातील साहित्यविचार, मुक्तिपूर्व गोमंतकातील स्त्री साहित्य आणि मुक्तीनंतरचे मराठी साहित्य यांचाही त्यांनी लक्षणीय व वैचारिक परामर्श आपल्या समीक्षेतून फार वेधकपणे आणि अभ्यासपूर्वक घेतला आहे.

नवबौद्धांची समीक्षा करताना त्या समाजाचा जिवंत अनुभव त्यांच्याकडूनच घडला पाहिजे, असा ते जाणीवपूर्वक आग्रह धरतात. वडेरांचा पाश्चात्त्य साहित्याचा प्रचंड व्यासंग आहे. एकूणच त्यांचे वाचन वैविध्यपूर्ण आणि अफाट आहे. त्यांच्या गाढ व्यासंगाचा परिणाम त्यांच्या समीक्षा–लेखनावर झालेला जाणवतो. साहित्याचे मूल्यमापन करताना ते आपल्या भूमिकेवर ठाम असतात. विरोधी मतांचा ते तटस्थपणे परामर्श घेतात. म्हणूनच त्यांची समीक्षा मोलाची व उंची गाठणारी वाटते. ‘साहित्य शब्द व अर्थ’ (२००८) यात त्यांची विचारी, परखड भूमिका स्पष्टपणे दिसते.

– रागिणी पुंडलिक

व

**संदर्भ :**

*१. वडेर प्रल्हाद; 'मी आत्मचरित्र का लिहीत नाही?' हेमांगी; दिवाळी १९९३.*

## वनारसे, तारा
**कवयित्री, कथाकार, कादंबरीकार**
**१३ मे १९३०**



निष्णात स्त्री-रोग तज्ज्ञ डॉ. तारा वनारसे यांचा जन्म पुणे येथे एका सुसंस्कृत, मध्यमवर्गीय, सुखवस्तू कुटुंबात झाला. सुरुवातीपासूनचे सर्व शिक्षण पुण्यात झाले व बी. जे. मेडिकल महाविद्या-लयातून वैद्यकीय पदवी मिळविली. लंडनच्या 'रॉयल कॉलेज ऑफ आब्टेट्रिक्स ॲन्ड गायनाकॉलाजी'ची फेलोशिप त्यांना मिळाली.

१९५८ पासून लंडनमध्ये वास्तव्य केले. पुढे तेथील बेनेडिक्ट रिचर्डस या इंग्रज डॉक्टराशी विवाह करून त्या तेथेच स्थायिक झाल्या. साहित्य, संगीत, नाटक यांची आवड व त्यातून लेखन केले. त्यांचा 'पश्चिमकडा' हा पहिला कथासंग्रह १९६३ मध्ये प्रसिद्ध झाला. त्यानंतर 'केवल कांचन' हा अलीकडचा संग्रह २००७ मध्ये प्रसिद्ध झाला. या दोन्ही संग्रहांतून मानवी नातेसंबंध- विशेषतः पति-पत्नी, प्रियकर-प्रेयसी यांच्यावर प्रकाश पडतो. त्यांच्या प्रत्येक कथेच्या केंद्रस्थानी स्त्री अनेक सूखवस्तू पुरुष आयुष्यात येऊनही स्त्रीला क्वचितच प्रेमसाफल्य लाभते. मनुष्य स्वभावातील ज्ञान-अज्ञान अशा अनेक कंगोऱ्यांचे दर्शन सूचकपणे घडविण्याचा लेखिकेचा प्रयत्न जाणवतो.

'केवल कांचन' मध्ये (२००७) आठ कथा असून 'केवल कांचन' ही दीर्घकथा आहे. या आठही कथा काहीशा गूढतेकडे झुकतात. 'केवल कांचन' कथेतील केवल कर्णिक हे संस्कृतचे प्राध्यापक असून कांचन ही त्यांची विद्यार्थिनी त्यांच्या एका चिठ्ठीने तिच्या मनातील आदराचे रूपांतर प्रेमात होते, पण पुढे काही घडत नाही. ते आपले अयशस्वी लग्न पुढे ढकलत राहतात व ती दोन पुरुष आयुष्यात येऊनही त्यांची वाट पाहत राहते. केवल यांचे निधन झाल्याचा फोन ती झोपेत असताना घेते. मात्र शेवटपर्यंत ते खरेच वारले की तो भास होता असा संभ्रम वाचकांच्या मनात कायम राहतो. शेवटी ऑलिव्हर या मित्राशी ती लग्न करते. सूचकता, संभ्रम, भास, अतृप्तता, श्रीमंतीतही सुखाच्या अभावाचा सल, अशी त्यांच्या कथालेखनाची काही वैशिष्ट्ये जाणवतात. 'नर्सेस क्वॉर्टर्स' (एकांकिका), 'सूर' (कादंबरी) आणि 'बारा वादावर घर' (कविता) ही आपली मोजकीच निर्मिती त्यांनी १९५४ ते २००० या प्रदीर्घ काळात केली असून ती वाचकांचे लक्ष वेधून घेते.

रामायणातील शूर्पणखेच्या जीवनाची शोकांतिका व्यक्त करणारी 'श्यामिती' (२०००) ही कादंबरी त्यांची महत्त्वाची कलाकृती आहे. रामाच्या सांगण्यावरून लक्ष्मणाने तिला विद्रूप केल्याची त्रोटक कहाणी रामायणात येते. पण लेखिकेने रावणाच्या या बहिणीच्या प्रेमकहाणीला एक उदात्त रूप देऊन आर्य-अनार्य संघर्षाला एक वेगळा अर्थ देण्याचा प्रयत्न केला आहे व एका मिथकाची पुनर्निर्मिती केली आहे. शूर्पणखा जर आर्य, असती तर तिची अशी विटंबना झाली असती का आणि रामावर प्रेम करणे हा तिचा गुन्हा होता काय असे प्रश्न आजच्या स्त्री-मुक्ती चळवळीच्या संदर्भात विचारून लेखिकेने शूर्पणखा प्रकरणाला एक वेगळा अन्वयार्थ देण्याचा यशस्वी प्रयत्न केला आहे. या कादंबरीत तत्कालीन वातावरण, भौगोलिक तपशील, निसर्गाची विविध रूपे, भाषा या पार्श्वभूमीवर राम, सीता, लक्ष्मण, शूर्पणखा, अगस्ती व अन्य ऋषी व त्यांच्या बायका आणि विशेषतः अर्धा आर्य व अर्धा अनार्य असलेल्या अर्यमा यांची व्यक्तिमत्त्वे लेखिकेने जिवंत केली आहेत. अर्यमा लिहिणार असलेल्या रामायणाची नव्हे तर 'रावणायण' या महाकाव्याची व तेही अनार्यांच्या भाषेतील महाकाव्य; यातून पुढील काळातील इतिहासाची

दिशा सूचित होते. शूर्पणखेच्या उदात्तीकरणाचे रंग काहीसे भडक वाटले, तरी त्या मिथकाकडे एका वेगळ्या दृष्टिकोनातून विचार करायला लावणारी ‘श्यामिती’ ही कादंबरी वनारसे यांच्या लेखनातला एक महत्त्वाचा टप्पा ठरते.

– डॉ. प्रल्हाद वडेर

## वरखेडकर, वसंत श्यामराव
**कादंबरीकार, नाटककार**
**१० सप्टेंबर १९१८ – १६ मार्च १९८५**

वसंत श्यामराव वरखेडकर यांचा जन्म नागपूरला झाला. मॉरिस महाविद्यालयातून ते एम.ए.झाले. त्यांनी ‘समाधान’, ‘भवितव्य’ या वृत्तपत्रांत उपसंपादक म्हणून काही काळ काम केले. नंतर ते शासकीय सेवेत माहिती अधिकारी होते. वरखेडकरांनी थोडेच, पण महत्त्वपूर्ण आणि प्रयोगशील लेखन केले आहे. त्यांच्या ‘संक्रमण’ (१९४१), ‘पाहुणे’ (१९५१), ‘राजपुत्र’ (१९६१), ‘प्रतिनिधी’ (१९७२), ‘आई याज्ञवल्क्याची’ (१९८३) या कादंबऱ्या प्रसिद्ध झाल्या आहेत.

त्यांची ‘ध्येयाचा ध्यास’ (१९४२), ‘आनंदीबाई’ (१९८१), ‘नीरो’ (१९८४), ‘सृष्टीचा संकेत’, ‘पूर्वग्रह’ इत्यादी नाटकेही प्रकाशित झाली आहेत. ‘सार्वभौम’ (१९८५) हा त्यांचा वैचारिक लेखसंग्रह आहे. त्यांची लक्षणीय साहित्यकृती म्हणजे ‘सत्तावन्नचा सेनानी’(१९७७) ही कादंबरी होय. एका सामान्य कुटुंबातून जन्माला आलेल्या पण स्वकर्तृत्वाने पुढे आलेल्या तात्या टोपेंनी अठराशे सत्तावन्नच्या स्वातंत्र्ययुद्धात मोलाची कामगिरी बजावली. तात्या टोपेंच्या स्फूर्तिदायक नेतृत्वाची ही चरित्र-कादंबरी आहे.

व

वरखेडकरांचे बरेचसे लेखन चरित्रात्मक आहे. मात्र त्यांनी त्या-त्या विषयाला समकालीन संदर्भ दिलेला आहे. स्वातंत्र्योत्तर काळातील सामाजिक, राजकीय स्थिती या संदर्भातले रूपकात्मक चिंतन असे त्यांच्या लेखनाचे स्वरूप आहे. ‘गडकऱ्यांची नाट्यप्रकृती व नाट्यसृष्टी’ (१९६१) ही त्यांची व्याख्यानेही पुस्तकरूपाने प्रसिद्ध आहेत.

– प्रा. मंगला गोखले

**संदर्भ :**


१. *लोही म.ना.; ‘नाटककार वरखेडकर’; सौरभ दिवाळी अंक १९८५.*

२. *व्यवहारे कल्पना; ‘वसंत वरखेडकर: एक महत्त्वाकांक्षी लेखक’; आरती जानेवारी, १९८५.*


## वरेरकर, भार्गवराम विठ्ठल
☞ **मुख्य नोंद – नाटक खंड**

## वर्टी, अनंत वामन
**संपादक, लेखक**
**२ डिसेंबर १९११– २ फेब्रुवारी १९८७**



डॉ.अनंत वामन वर्टी यांचा जन्म जळगाव येथे झाला. त्यांचे वैद्यकीय विभागाचे शिक्षण झाले. ते एम.बी.बी.एस. परीक्षा उत्तीर्ण झाले. नाशिक नगरपालिकेत वैद्यकीय अधिकारी या पदावर त्यांनी १९६२ ते १९७२ या दरम्याने सेवा केली. त्यांना लहानपणापासून वाचनाची आवड होती. श्रीपाद कृष्ण कोल्हटकर, चिं.वि.जोशी, ना.धों.ताम्हनकर यांच्या विनोदी साहित्याचे त्यांना आकर्षण होते. राम गणेश गडकरी यांच्या नाटकातील ‘गोकुळ’, ‘तळीराम’ या पात्रांच्या तोंडचे विनोदी संवाद त्यांना भावले होते. या साऱ्यांचा परिणाम त्यांच्यावर झाला. आपणही विनोदी लेखन करायचे याचे बीज त्यांच्या मनात रुजले.

एकीकडे वैद्यकीय सेवा, तर त्याच वेळी सामाजिक व साहित्यक्षेत्रात त्यांचे कार्य चालू राहिले. ज्ञान आणि मनोरंजन यांचा सुरेख मिलाप असणाऱ्या ‘अमृत’ या

मासिकाचे ते १९५३ ते १९५९ या काळात संपादक होते. नंतर त्यांनी स्वतः 'श्रीयुत' मासिक काढले व १९५९ ते १९६६ ह्या काळात 'श्रीयुत' मासिकाचे संपादन केले. नाशिक येथील सार्वजनिक वाचनालयात त्यांनी विविध पदांवर कार्य केले. नाशिक शहर सांस्कृतिक महामंडळाचे ते तीन वर्षं अध्यक्ष होते. नाशिक जिमखाना कार्यकारी मंडळावर ते ३० वर्षे कार्यरत होते. नाशिक एज्युकेशन सोसायटीमध्ये त्यांनी दहा वर्षे कार्यकारिणीवर काम केले. ते देशी व विदेशी खेळांत पारंगत होते. बुद्धिबळ या खेळात त्यांना विशेष रुची होती.

'आपले शरीर' (१९६८) आणि 'वैद्यकातील महान शोध' ही त्यांची पुस्तके त्यांच्या वैद्यकीय व्यवसायातील अनुभवांवर आधारित आहेत. तणावमुक्तीसाठी विनोद हे मानवाला मिळालेले वरदान आहे, याची जाण ठेवून अ. वा. वर्टी यांनी त्यांच्या साहित्यातून मराठी वाचकांना विपुल प्रमाणात उच्चभ्रू प्रतीच्या विनोदाची मेजवानी दिली. त्यांचे सर्वाधिक लिखाण झाले, ते विनोदी कथांसाठी. 'कामसेना', 'अल्लामिया देनेवाला', 'अकरावा गडी', 'परिपाक', 'कागदी घोडे', 'कठपुतळ्या', 'दंतकथा'(१९४७), 'नवा देव', 'पतिव्रता', 'पाऊस! पाऊस!', 'म. चा. मा टूवे', 'मुमताज', 'मंत्र्यांचा मंत्री', 'रुपेरी स्वप्न', 'सायरा बानू' हे त्यांचे कथासंग्रह लोकप्रिय झाले. 'अखेरचा आघात' (१९५७) हा लघुकथांचा व 'पिसारा'(१९४८) हा लघुनिबंधांचा संग्रहही वाचकांना भावला.

वर्टींनी 'राणीचा बाग' हे नाटक लिहिले. 'नाट्यनिकेतन'च्या मो. ग. रांगणेकरांनी ते रंगभूमीवर आणले. त्या नाटकाला पारितोषिक मिळाले. ह्या एकाच नाटकाने वर्टी हे नाटककार म्हणून ओळखले जाऊ लागले. 'इडली डोसा'आणि 'सुलूचा रामा' (१९५८) या त्यांच्या एकांकिका संग्रहाचाही खूप नावलौकिक होता.

विनोदावर सर्वांगांनी विचार करून विनोदी अंगाने मांडलेले त्यांचे 'विनोद एक व्याख्यान' हे पुस्तक आजही सर्व विनोदकारांना मार्गदर्शन करणारे आहे.

त्यांनी त्यांच्या साहित्यातून विनोदाचा फार मोठा खजिना मराठी रसिकांसाठी ठेवलेला आहे.

– श्याम भुर्के

**संदर्भ :**

*१. वर्टी अ. वा.; 'विनोद एक व्याख्यान'.*

## वर्तक, चंद्रकांत रामचंद्र

**कथाकार, समीक्षक, प्रवासवर्णनकार**

**२७ जुलै १९३०**



चंद्रकांत रामचंद्र वर्तक यांचे मूळ गाव हर्णेजवळील केळशी हे होय. त्यांचा जन्म महाडचा. प्राथमिक शिक्षणापासून एम. ए. पर्यंतचे त्यांचे शिक्षण मुंबईत झाले. महाविद्यालयीन शिक्षण रुईया महाविद्यालय, दादर येथे झाले. बी. ए. (ऑनर्स) १९५२, एम. ए. (मराठी-इंग्रजी) १९५५. पुणे विद्यापीठातून 'मराठी साहित्यातील प्रवासवर्णने: प्रेरणा व स्वरूप' या विषयावर पीएच. डी मिळवली.

कारकुनी नोकरीपासून ते मराठीचे अधिव्याख्याते, रिडर आणि नंतर प्राध्यापक आणि एस. एन. डी. टी. विद्यापीठात मराठी विभागप्रमुख या पदावरून ते निवृत्त झाले. बेचाळीस वर्षांच्या कार्यकाळाचा हा प्रवास वर्धा, नाशिक आणि मुंबई येथे झाला.

चंद्रकांत वर्तकांची पहिली कथा 'एलिझा' ही 'सह्याद्री' दिवाळी अंकात (१९५२) प्रसिद्ध झाली. 'पारंब्या' (१९६८), 'फुलपंखी दिवस' (१९६८), 'अंकुर' (१९७१), 'मनमोर' (१९७४), 'धून' (१९८७), 'षड्ज' (१९९८), 'गंधार' (२००९) हे कथासंग्रह प्रसिद्ध झाले. त्यांच्या कथांना 'सत्यकथा', 'मौज', 'साधना', 'माणूस', 'विवेक', 'अंतर्नाद' इत्यादी नियतकालिकांतून प्रसिद्धी मिळाली. 'वळणावरचे साकव' (व्यक्तिचित्रे, १९९६) 'भ्रमण चित्रे' (प्रवासलेख, २००२) 'लू यू चीन' (प्रवासवर्णन,

२००४) 'देशादेशातून' (प्रवासलेख, २००९) 'मावंदे' (प्रवासवर्णनांची समीक्षा, १९९३), 'सफर बहुरंगी रसिकतेची' (गाडगीळांच्या प्रवासलेखांचे संपादन आणि प्रदीर्घ प्रस्तावना, १९९९) 'संशोधनाची लेखनशैली', 'साहित्याचे अध्यापन' हे संशोधनपर लेखन आहे. 'कॉन्व्हर्सेशन्स विथ स्टॅलिन', 'एक शर्थीची झुंज' (१९६७-६८), 'केटलिक वार्ताओ' हा गुजरातीत अनुवादित कथासंग्रह प्रसिद्ध आहेत.

त्यांच्या कथांतील वातावरण सहसा मध्यमवर्गीय, पात्रे मध्यमवयीन, भट-भिक्षुक, प्राध्यापक, गृहिणी, मागल्या पिढीतील मध्यमवयीन जोडपी, त्यांच्यातला विजोडपणा वा समरूपता, स्त्रियांची मानसिकता, त्यांच्या समस्या, नात्यांतील ताणे-बाणे-तिढे, साहित्यिक कलावंत यांचे श्रेष्ठपण वा त्यांचे मातीचे पाय, असे असते. आणि तरीही त्यांतील अनुभवांची विविधता थक्क करणारी आहे.

शिक्षणक्षेत्राशी संबंधित 'द्वैत', 'ललिता', 'पुरुष प्रकृती' या कथा घेतल्या तर त्या पूर्ण भिन्न अनुभव देतात. तणाव, भ्रष्टाचार याबरोबरीनेच माणूस-निसर्ग हे नाते कथेच्या निर्मितीप्रक्रियेचा शोध, बाप-मुलगी, आई-मुलगी, मावशी -भाचा यांमधील प्रगल्भ नाते; वासना, त्यांचा उपभोग, तो पुरेसा न मिळाल्याने आलेली अतृप्ती-कोंडमारा, तिचा प्रत्यक्ष मुलापुढे केलेला उच्चार; सहाणेसारखी झिजलेली आई, ऐन तारुण्यातील वैधव्यामुळे तिने दडपून टाकलेल्या वासना ('कोरडा'), त्र्यंबकेश्वर- त्रिमुखी ज्योतिर्लिंगाला प्रदक्षिणा घालणारे जोडपे आयुष्यालाही पालाण घालून जाते; त्यातून नकळत अनेक सत्ये बाहेर येतात ('प्रदक्षिणा'); अशा विविध विषयांवरील कथा वैचारिक प्रगल्भता दर्शवितात.

श्रीधरने त्याचा कलावंताचा कंद ठेव लाभावी तसा व्रतस्थपणे जतन करणे आणि कृष्णाने वणिक वृत्ती दाखवून प्रकाशन व्यवसायात नाव, यश, पैसा कमावून आपल्यातल्या कलावंताला संपवून टाकणे; लोकांनी मात्र यालाच 'यशस्वी' समजणे! 'लागेबांधे' व 'यशस्वी' या एकाच बीजावरच्या दोन कथा वेगवेगळे रूप घेताना ज्या पद्धतीने त्या फुलतात; समाज, नातेसंबंध, मूल्यकल्पना यांवर संथपणे प्रकाशझोत टाकत जातात; ते विलक्षण आहे.

सर्वसामान्यांच्या आयुष्यातले साधेसुधेच प्रसंग; पण वेगवेगळे कोन, दिशा, परिप्रेक्ष्य यांमुळे वर्तकांच्या हातात ते अनुभव येताच, त्यांच्या शैलीमुळे कथारूप घेताच तो अनुभव फुलून, डवरून येतो. ते संपूर्ण मानवी जीवनाचा वेध घेतात. शिल्पे जशी कोरीव व कातीव त्याप्रमाणे त्यांच्या कथांतील माणसांची मने रूपाला-आकराला येतात. उजेडालाही पालवी फुटते.

प्रवास हा वर्तकांचा दुसरा श्वास आहे. ती अनिवार ओढ त्यांच्या लेखनातून सतत जाणवते. जवळपास २० देशांमधून (अमेरिका, रशिया, मॉरिशस, चीन, वगैरे) त्यांनी प्रवास केला आहे. स्थळवर्णन करताना इतिहास-भूगोल यांबरोबरच रस्त्यांची आखणी, राजकीय-धार्मिक परिस्थिती, प्रथा-परंपरा हे सारे सांगत असतानाच ते प्रचलित लोककथा-पुराणकथा सांगतात. एकातून एक वेल्हाळपणे गप्पा निघतात, पण गायकाने समेवर यावे; तसे ते पुनः मूळ विषयाला भिडतात. समुद्राचे पांढरे-निळे पाणी अंजीरी-करडे-काळे डोंगर अशा रंग-रंगच्छटा ते चित्रकाराच्या कौशल्याने शब्दांनी रेखाटतात आणि ते-ते प्रत्येक स्थळ अनेकानेक पैलूंनी दृग्गोचर होते.

'शाश्वताचा कृष्णरंग'मध्ये वर्तक द्वारकेत असतात; पण ते वेरावळ, प्रभास, पाटण येथेही फिरवून आणतात. कधी मॉरिशसच्या प्रसन्नतेतून अचानक सोमनाथाच्या उद्ध्वस्त, भकास वातावरणात प्रवेश करतात. निरागस बालकासारखे खेळकर व्यक्तिमत्त्व एकदम प्रौढ, परिपक्व बनते. ही किमया त्यांच्या शैलीची आणि त्या-त्या स्थळांशी समरसून जाण्याची आहे! यांत विविध श्रुतयोजना दिसतात. तसेच ते काही नवे अर्थवाही शब्दबंध, 'कृष्णयोग', 'गर्भसूत्र', 'सोलीव गर्भ', 'डोंगराची वनाळलेली डोकी' वापरतात.

'लू यू चीन'मधील चीन वा 'देशादेशांतून'मधील 'व्हिएटनाम', 'कंबोडिया', 'इण्डोनेशिया', 'बाली' अशा विविध देशांची वर्णने वाचताना साक्षात त्या स्थळी, त्यांच्यासमवेत आपण उभे आहोत; असा आभास ते

वाचकाला घडवतात, हे त्यांच्या लेखणीचे सामर्थ्य! कधी त्यांचे प्रवासलेख कथारूपही धारण करतात.

'वळणावरचे साकव'मध्ये आयुष्याच्या वळणावर वेळोवेळी भेटलेले न.र.फाटक, कुसुमाग्रज, विजय तेंडुलकर, वसंत कानेटकर, माधव मनोहर, विद्याधर पुंडलिक असे गुरुजन, मित्र, सहकारी कधी दीपस्तंभ बनतात तर कधी आधारवड! आणि श्री. वर्तकांचे आयुष्य आपल्या सहवासाने सधन करून टाकतात. त्यात रंग भरतात. वर्तक त्यांचे हे ऋण अत्यंत कृतज्ञतेने मान्य करतात. त्या-त्या व्यक्तीबद्दलच्या गुणदोषांच्या छटाही ते सांगतात. परंतु त्यात कटुता वा खळबळ माजवावी असे होत नाही. त्याचबरोबर स्वतःच्या चुका, त्या-त्या माणसाला ओळखण्यात झालेली गफलत किंवा स्वतःला वाटणारा वृथा अभिमान, आपल्या मर्यादा हे सारे ते सहज व्यक्त करतात आणि मग त्या दिग्गजांबरोबरचे ऋणानुबंध ठळक होऊ लागतात.

लेखकाचे स्वच्छ, मोकळे, स्वीकारशील असे प्रांजल मन, साहित्याची सघन जाणीव, मैत्राकरता आसुसलेले मन, आपल्याच नात्यांचा घेतलेला शोध, घरची सर्व जबाबदारी लहानशा वयात खांद्यावर घेणारा कर्तव्यदक्ष, शिक्षणासाठी धडपडणारा, काही आकांक्षा उरीपोटी धरणारा तरुण, एक सजग गुणग्राहक वाचक आणि या सर्वांनी घडलेले श्रीमंत व्यक्तिमत्त्व!

त्यांना प्रवासाबद्दल आवड आहेच, पण प्रवासवर्णनांबद्दलही प्रेम आहे. याची प्रचिती 'मावंदे'मधून येते. 'माझा प्रवास', 'क्षत्रींचे प्रवासवर्णन', 'न. चिं. केळकरांची बातमीपत्रे', 'धुक्यातून लाल ताऱ्याकडे', 'अपूर्वाई' इत्यादींवरील त्यांचे लेख म्हणजे सर्जनशील समीक्षेचा नमुना! वाचकाला मूळ कलाकृतीकडे वळवण्याचे सामर्थ्य त्यांच्या लेखनात आहे. प्रवासवर्णनाची तांत्रिक बैठक आणि संशोधनाची शिस्त प्रस्तावनेतून आणि प्रवासवर्णनांच्या पुस्तकांच्या शेवटी दिलेल्या सूचीमधून दिसते (१८५२पासून १९९०पर्यंत).

त्यांचा प्रत्येक शब्द नेमका, कोरीव असतो. लेखन ही एक गांभीर्यपूर्वक स्वीकारलेली गोष्ट आहे, असे त्यांच्या लेखनावरून स्पष्ट जाणवते. मराठी विश्वकोश, मराठी वाङ्मयकोश, तसेच आकाशवाणीवर 'ऐसी अक्षरे रसिके'मध्ये नाशिक जिल्ह्यातील साहित्यिकांचा परिचय करून देणाऱ्या लेखमालेची संहिता, १९व्या शतकातील मराठीतील नियतकालिकातील साहित्यविचार अशा विविध स्तरांवर त्यांनी लेखन केले आहे.

उत्कृष्ट पीएच.डी प्रबंधाबद्दल डॉ. वर्तकांना पुणे विद्यापीठाचे 'न.चिं.केळकर पारितोषिक', आणि 'डॉ. परांजपे पारितोषिक' प्राप्त झाले आहे. तसेच त्यांना नाशिक महानगरपालिकेतर्फे 'लोककल्याण' पुरस्कार प्राप्त झाला आहे. 'आधुनिक महाराष्ट्राची जडणघडण - शिल्पकार चरित्रकोश' या महत्त्वाकांक्षी प्रकल्पातील साहित्य खंडाचे सहसंपादक म्हणून त्यांनी कायभार सांभाळला.

सर्वोत्कृष्ट मराठी कथा, खंड १३ (संपादक कोलारकर) आणि किर्लोस्कर उत्कृष्ट कथा, खंड ४ यांमध्ये त्यांच्या कथा समाविष्ट आहेत.

- प्रा. मीना गुर्जर

## वऱ्हाडपांडे, वसंत कृष्ण

**कथाकार, ललित लेखक, समीक्षक**

**१९ डिसेंबर १९२७ - २९ जून १९९२**



वर्धा जिल्ह्यातील महाबळ येथे जन्मलेले वसंत वऱ्हाडपांडे १९४९ साली नागपूर विद्यापीठातून बी.ए व १९५१ साली त्याच विद्यापीठातून एम.ए., पीएच.डी. झाले. काही काळ शिक्षक व नंतर मध्यप्रदेश सरकारच्या भाषा विभागात अनुवादक म्हणून काम केल्यानंतर ते नागपूरच्या हिस्लॉप कॉलेजात मराठीचे अध्यापन करू लागले (१९५५). १९८७नंतर वसंतराव निवृत्त झाले.

वऱ्हाडपांडे यांनी कथा, कविता, कादंबरी, नाटक, समीक्षा, बालसाहित्य अशा विविध क्षेत्रांत मुक्त विहार

करून कीर्ती संपादन केली. त्यांनी हाताळलेल्या साहित्याच्या प्रत्येक प्रकारातील त्यांचे कसब जाणकारांच्या पसंतीस उतरले. 'हा माणूस विलक्षण सौजन्यशील व स्नेहशील होता. मध्यमवर्गीय माणसाचे सुखी संसाराचे चित्र त्यांच्या घरात सफलपणे आकाराला आले होते', असे प्रा. राम शेवाळकर त्यांच्या 'उजेडाची झाडे' या पुस्तकात म्हणतात.

डॉ. वऱ्हाडपांडे यांच्या अपघाती निधनानंतर त्यांच्या दोन सुकन्यांनी (डॉ. अंजली कुलकर्णी व डॉ. अनुराधा हरकरे) प्रकाशात आणलेल्या 'ऊर्मिला' या कादंबरीला वऱ्हाडपांडे यांचे समकालीन साहित्यिक श्री. के.ज. पुरोहित यांची प्रस्तावना लाभली आहे. त्यांत पुरोहित म्हणतात, 'पत्रे हा या कादंबरीचा एक कौशल्यपूर्ण वापरलेल्या परिणामकारक तंत्राचा महत्त्वाचा भाग आहे. सगळी पत्रे अत्यंत समर्पक आणि कथानकाच्या रचनेचे सौंदर्य वाढवणारी आहेत..., वऱ्हाडपांडे बोधवादी नव्हतेच नव्हते तर ते आनंदवादी होते... वऱ्हाडपांडे निश्चितच चांगले कादंबरीकार झाले असते.. 'ऊर्मिला' याची खात्री देते.' 'ऊर्मिला'च्या 'स्मृतिगंध'मध्ये डॉक्टरांच्या कन्या आवर्जून सांगतात, 'त्यांच्या सर्व साहित्यातून त्यांनी मानवी नातेसंबंध आणि त्यांच्यातील खरेपणा शोधण्याचा प्रयत्न केला. त्यांचं सारं साहित्य दर्जेदार संस्कृतिमूल्य जपणारं आणि मांगल्याची छाप असणारं आहे.'

११ कथा समाविष्ट असणारा 'वास्तु' हा वऱ्हाडपांडे यांचा पहिला कथासंग्रह (१९५७) होय. त्यातील 'मधला दुवा' या कथेला 'प्रसाद' मासिकाच्या दीपावली कथास्पर्धेत दुसरे पारितोषिक मिळाले. फॅकल्टी ऑफ आर्ट्स, मराठी बोर्ड ऑफ स्टडीज, मराठी पाठ्यपुस्तक समिती इत्यादींवर ते सदस्य म्हणून कार्यरत होते. पीएच.डी. पदवीचे मार्गदर्शक व परीक्षक म्हणूनही त्यांची कामगिरी उल्लेखनीय आहे.

त्यांच्या 'नागपुरी बोली : भाषाशास्त्रीय अभ्यास' व 'उत्सव' या दोन पुस्तकांना महाराष्ट्र शासनाचा पुरस्कार अनुक्रमे १९७४ व १९८७ साली मिळाला. पु. भा. भावे : साहित्यस्वरूप आणि समीक्षा; याशिवाय त्यांचे 'भारतीय स्त्रीरत्ने' (चरित्रकथा), 'कोल्होबाची करामत' (बालसाहित्य), 'मानसी' (कथासंग्रह), 'या मनाचा पाळणा' (कवितासंग्रह १९७३) इत्यादी साहित्य प्रसिद्ध आहे. संपादित ग्रंथांत 'मुक्तेश्वरकृत हरिश्चंद्राख्यान' (१९६३) आणि सामराज विरचित 'रुक्मिणीहरण' (१९६९) यांचा समावेश आहे.

– वि. ग. जोशी

**संदर्भ :**


१. *वऱ्हाडपांडे वसंत कृष्ण; 'उत्सव', इंदिरा प्रकाशन, नागपूर; १९८६.*

२. *हरकरे अनुराधा, 'ऊर्मिला'; स्मृतिगंध प्रकाशन, नाशिक; २००८.*


## वाघ, विठ्ठल भिकाजी

**कवी**

**१ जानेवारी १९४५**



विठ्ठल भिकाजी वाघ यांचा जन्म विदर्भातील अकोला जिल्ह्यातील तल्हेरा तालुक्यातील हिंगणी या मूळ गावी मोठ्या शेतकरी कुटुंबात झाला. त्यांचे प्राथमिक व माध्यमिक शिक्षण विदर्भातच झाले. त्यांना वैद्यकीय डॉक्टर व्हावयाचे होते; पण मोठ्या कुटुंबामुळे ते शक्य न झाल्याने ते मानव्यविभागाकडे (आर्ट्स फॅकल्टी) वळले आणि १९६९ साली मध्य प्रदेशातील इंदूर विद्यापीठाची एम.ए.ची पदवी त्यांनी संपादन केली. त्यांचा विषय मराठी हा होता. त्याच वर्षी ते अकोला येथील श्री. शिवाजी महाविद्यालयात प्राध्यापक म्हणून रुजू झाले.

तेथील अठ्ठावीस वर्षांच्या प्रदीर्घ सेवेनंतर त्याच महाविद्यालयाचे प्राचार्य म्हणून त्यांनी १९९७ साली सूत्रे स्वीकारली. या पदावरून ते २००५ साली निवृत्त झाले. दरम्यान, त्यांनी अमरावती विद्यापीठातून 'पारंपरिक वऱ्हाडी

म्हणींचा सर्वांगीण अभ्यास' या विषयावर १९८२ साली वाचस्पती (पीएच.डी.) पदवी प्राप्त केली. हा प्रबंध पुस्तकरूपाने प्रसिद्ध झाला आहे.

त्यांचे लहानपण सातपुडा पर्वतरांगांमध्ये, निसर्गाच्या कुशीत गेल्याने त्यांना निसर्गाची, त्यांच्या विविध विभ्रमांची, काळ्या मातीची आवड असल्याने त्यांची कवी म्हणून ओळख 'ग्रामीण संस्कृतीतील वैदर्भीय निसर्ग कवी' अशीच झाली. त्यांनी मोठ्या प्रमाणावर गीत व कविता रचना केल्या असून त्यांतील बव्हंशी गेय आहेत आणि ते स्वतः खड्या आवाजात उत्तम रितीने सादर करतात. ख्यातनाम वक्ते म्हणूनही ते प्रसिद्ध आहेत. त्यांची काव्यप्रेरणा बहिणाबाई चौधरी या आहेत.

विठ्ठल वाघ यांनी पंचेचाळिसावे विदर्भ साहित्य संघ संमेलन, कारंजा (१९९२), दहावे वऱ्हाडी साहित्य संमेलन इत्यादी अनेक साहित्य संमेलनांचे अध्यक्षपद भूषविले असून 'म्हणी आणि लोकधर्म' हे त्यांनी संकल्पित व संपादित केलेले म्हणींचे पुस्तक लोकवाङ्मयात महत्त्वाचे मानले जाते.

वाघ यांची 'काया मातीत मातीत, तिफण चालते, तिफण चालते' ही कविता सर्वदूर लोकप्रिय असून मातीशी माणसाचे असलेले सनातन नाते त्यातून नेमकेपणाने व्यक्त होते. वाघ यांची समग्र कविता 'काया मातीत, मातीत' याच शीर्षकाने संस्कृती प्रकाशन, पुणे यांच्यामार्फत याच वर्षी (२००९) प्रकाशित होत असून तिचे संपादन प्रा. मिलिंद जोशी यांनी केले आहे.

डॉ. वाघ यांनी अमरावती विद्यापीठाच्या मराठी अभ्यास मंडळाचे अध्यक्ष, सिनेटचे सदस्य व अन्य अनेक शैक्षणिक समित्यांवर काम केले आहे.

– मधू नेने

## वाघमारे, जनार्दन माधव

**विचारवंत, शिक्षणतज्ज्ञ**

**१४ नोव्हेंबर १९३४**

जनार्दन वाघमारे यांचा जन्म लातूर जिल्ह्यातल्या औसा तालुक्यातील कौठा या गावी झाला. लातूरच्या राजस्थान



विद्यालयातून १९५३ साली शालान्त परीक्षा, चार वर्षांनी हैद्राबादच्या निजाम महा-विद्यालयातून पदवी परीक्षा, पुणे विद्यापीठातून १९५९ साली एम.ए. आणि मराठवाडा विद्यापीठातून 'निग्रो साहित्य आणि संस्कृती' या विषयावर प्रबंध लिहून १९८० साली त्यांनी डॉक्टरेट संपादन केली.

प्रा. डॉ. वाघमारे दीर्घकाल प्राचार्य होते व पुढे स्वामी रामानंद तीर्थ विद्यापीठाचे कुलगुरू झाले. त्यांनी १९६२ सालापासून लेखन सुरू केले.

जून १९८८ मध्ये, नाशिक येथे भरलेल्या दलित-आदिवासी-ग्रामीण संयुक्त साहित्य संमेलनाच्या अध्यक्षपदावरून त्यांनी आपले विचार व्यक्त केले: ''वाङ्मयीन क्षेत्रात ज्या विविध चळवळी निर्माण झाल्या आणि होत आहेत, त्या चळवळींचा एक डोळस साक्षीदारमात्र मी निश्चितच आहे. त्या चळवळींचा स्पर्श माझ्या शब्दांना व लेखणीला होणे क्रमप्राप्त होते आणि म्हणून तो झाला आहे.''

संयुक्त संमेलनाला स्पष्टपणे मार्गदर्शन करताना ते म्हणाले की, ''राजकीय आणि आर्थिक लढ्यांपेक्षा सांस्कृतिक लढे हे अधिक गुंतागुंतीचे व दीर्घकाल चालणारे असतात, हे आपण लक्षात ठेवले पाहिजे. समग्र, सम्यक परिवर्तन हीच या युगाची साद असून संस्कृतिचक्र परिवर्तन हेच दलित-आदिवासी-ग्रामीण साहित्याचे अंतिम उद्दिष्ट असले पाहिजे.''

वाघमारे यांनी नारायण सुर्वे, ना. धों. महानोर, वर्ड्‌सवर्थ, वि. वा. शिरवाडकर यांची समर्पक उद्धरणे देऊन, संमेलन भरवण्याचा हेतू स्पष्ट करून, सर्वांनी निश्चितपणे, पण निर्धाराने युगयात्रा चालू ठेवावी, असे आवाहन केले. डॉ. जनार्दन वाघमारे यांनी मूल्य जोपासणाऱ्या एकवीस व्यक्तींची हृद्य ओळख 'जीवनरेखा' या आपल्या ग्रंथात करून दिली आहे.

डॉ. राधाकृष्णन, प्रा. शिवाजीराव भोसले, देवीसिंग चौहान, गोविंदभाई श्रॉफ इत्यादींचा त्यात समावेश आहे. यातले व्यक्तिचित्रण लेखकाच्या दृष्टिकोनातून केलेले असले, तरी त्याला वास्तवाचा आधार आहे. कुशल प्रशासक, शिक्षणतज्ज्ञ व प्रत्यक्ष कर्ते सुधारक असा डॉ. जनार्दन वाघमारे यांचा लौकिक आहे.

वाघमारे यांची 'हाक व आक्रोश' (१९८४), 'महाराष्ट्रातील राजकारण व समाजकारण' (१९८०), 'शिक्षण: सामाजिक परिवर्तन व राष्ट्रीय विकास' (१९८४), 'आजचे शिक्षण: स्वप्न आणि वास्तव' (१९९३), 'चिंतन एका कुलगुरूचे' (१९९९) व इतर काही पुस्तके प्रकाशित झाली आहेत. 'मूठभर माती' हे त्यांचे आत्मचरित्र २००६ साली प्रकाशित झाले.

– वि. ग. जोशी

**संदर्भ :**


१. *लिंबाळे शरणकुमार, संपादक: 'दलित साहित्य', प्रचार प्रकाशन, कोल्हापूर; १९९१.*

२. *वाघमारे जनार्दन; 'जीवनरेखा', अभय प्रकाशन, नांदेड; २०००.*


## वाटवे, केशव नारायण

**साहित्यविमर्शकार, समीक्षक**

**१९ एप्रिल १८९५ – ९ मे १९८१**



केशव नारायण वाटवे यांचा जन्म अजरा येथे झाला. प्राथमिक शिक्षण जन्मगावी झाल्यानंतर पुढचे सर्व शिक्षण पुणे येथे झाले. फर्गसन महाविद्यालयातून एम. ए. केल्यानंतर काही काळ शिक्षकाची नोकरी केली व पुढे सर परशुरामभाऊ महाविद्या-लयात संस्कृतचे आणि मराठीचे प्राध्यापक म्हणून ते रुजू झाले. निवृत्तीनंतरही ते बेळगाव येथे मराठीचे प्राध्यापक म्हणून कार्यरत होते. विद्यार्थिप्रिय प्राध्यापक, व्यासंगी लेखक आणि संस्कृतचे प्रसारक अशा तीन पैलूंनी प्रा. के. ना. वाटवे यांचे जीवन समृद्ध होते. संस्कृत वाङ्मय, त्यातही नाटके हा त्यांचा अत्यंत जिव्हाळ्याचा विषय होता. प्रतिपाद्य विषयाचा सांगोपांग अभ्यास करून विद्यार्थ्यांना त्यातील सौंदर्यस्थळे उकलून दाखविण्यात त्यांचा हातखंडा होता. संस्कृत व्याकरण, वाक्यरचना व वाङ्मय यांच्या अध्ययनासाठी तयार केलेल्या 'संस्कृत सुबोधिनी' (भाग १ ते ३) ह्यांतून त्यांच्यातील हाडाचा शिक्षक दिसून येतो. 'भागवतातील कथा' (भाग १ ते ६), 'दशावतारांच्या कथा', 'पंचतंत्रातील कथा' (भाग १ ते ३), संस्कृत कविकथा यांतही गोष्टींच्या माध्यमातून संस्कृत साहित्यविश्वाची ओळख करून देणारा शिक्षक प्रतीत होतो.

प्रा. के. ना. वाटवे यांचे लेखन संस्कृत साहित्यशास्त्र या विषयाशी संबंधित आहे. 'मराठी पंडित कवी' (१९५३) हे त्यांचे पुस्तकही समीक्षेच्याच अंगाने जाणारे आहे. 'रसविमर्श' (१९६१), 'संस्कृत नाट्यसौंदर्य' (१९६२) आणि 'संस्कृत काव्याचे पंचप्राण' (१९४७) ह्या त्यांच्या पुस्तकांचे स्वागत विद्वानां, संशोधक, हौशी व जिज्ञासू वाचक आणि विद्यार्थी अशा सर्वांकडून सन्मानपूर्वक झाले.

'रसविमर्श'मध्ये भारतीय आणि पाश्चात्त्य साहित्यशास्त्राचा परामर्श घेऊन ऐतिहासिक व तौलनिक दृष्टिकोनांतून रसविषयक चर्चा केली आहे. रसनिष्पत्तीची प्रक्रिया आणि रसास्वाद यांचे मानसशास्त्रदृष्ट्या परीक्षण करून रसांच्या गौणप्रधान भावाचीही चर्चा केली आहे. भक्ती हा रस मानावा की नाही, याचीही चर्चा यात केली आहे. या पुस्तकाचे आणखी एक महत्त्वाचे योगदान म्हणजे मराठीचे स्वतंत्र साहित्यशास्त्र निर्मिण्याचा हा पायाभूत प्रयत्न आहे.

संस्कृत नाट्यसौंदर्य या ग्रंथातून संस्कृत नाट्यशास्त्र आणि नाट्यवाङ्मय यांची विषयाच्या सर्व आयामांनिशी परिपूर्ण माहिती दिली आहे. संस्कृतातल्या नऊ प्रमुख नाट्यकृतींच्या नाट्यकथांचे मूळ, त्यांच्या संविधानक रचनेची वैशिष्ट्ये आणि नाट्यगृह या अंगांनी चर्चा करून संस्कृत नाटकांच्या उत्कर्षाच्या आणि ऱ्हासाच्या कालखंडांचीही समीक्षा केली आहे.

रघुवंश, कुमारसंभव, किरातार्जुनीय, शिशुपालवध आणि नैषधीय चरित ही संस्कृतमधील प्रसिद्ध पाच महाकाव्ये. ह्या महाकवींची आणि महाकाव्यांची काव्यशास्त्राला धरून रसवाही ओळख 'संस्कृत काव्याचे पंचप्राण' या ग्रंथात करून दिली आहे आणि त्याचबरोबर 'महाकाव्य' या विषयाचीही एकूणच शास्त्रीय माहिती दिली आहे.

या सर्व पुस्तकांमधून प्रा. वाटवे यांच्या व्यासंगाबरोबरच त्यांच्यातील संशोधकवृत्ती आणि काव्यरसिकता यांचेही दर्शन घडते.

याखेरीज या प्रत्येक महाकाव्याचा स्वतंत्रपणे परिचय करून देणारी, आणि कादंबरी, मेघदूत यांचाही रसाळ भाषेत परिचय करून देणारी पुस्तके त्यांनी लिहिली.

'व्यवहार संस्कृत' (१९६४) हे त्यांचे छोटेसे पुस्तक संस्कृत साहित्यावर आधारित पाठ आणि सोपे वेचे या स्वरूपाचे आहे, पण त्यातूनच संस्कृतचे बोलीतले लोकाभिमुख, प्रवाही व जिवंत असे भाषारूप दिसून येते.

संस्कृतातील ही रसगंगा मराठीत आणून त्यांनी मराठी वाचकांना संस्कृतची गोडी लावली. भारतीय ऐक्य हे संस्कृतनेच साधणार आहे, यावर त्यांचा विश्वास होता. या विश्वासाच्या बळावरच त्यांच्यातील संस्कृतच्या प्रसारकाचा पिंड घडत गेला. पुणे विद्यापीठाच्या बहिःशाल व्याख्यानमालांतून संस्कृत भाषा, वाङ्मय आणि त्यातील सौंदर्यस्थळे यावर त्यांनी महाराष्ट्रभर व्याख्याने दिली. मराठीवर त्यांचे निर्विवाद प्रभुत्व होते. पण संस्कृतमध्येही ते अस्खलित बोलत असत.

प्रा. वाटवे जसे सौंदर्यग्राही समीक्षक होते, तसेच प्रगल्भ विचारवंतही होते. पुराणांतल्या अद्भुतांमागेही काही विचारणीय अंश असतो आणि त्यातल्या अवतार कथा ह्या सामाजिक व राजकीय क्रांती घडवून आणणाऱ्या महापुरुषांच्या कथा असतात, असे ते मानतात (भागवतातील कथा, प्रस्तावना). सामाजिक बाबतीत समता व औदार्य यांवर त्यांचा भर होता. नवीन गुणनिष्ठ समाजव्यवस्था व्हावयास हवी, दैववाद हा व्यवहारतः कमी उपयोगी असून प्रयत्नवादच खरा उपयोगी असल्याचे त्यांनी त्यांच्या आत्मचरित्राच्या उपसंहारात म्हटले आहे.

– डॉ. भाग्यलता पाटसकर

**संदर्भ :**


१. *वाटवे के.ना.; 'माझी वाटचाल' (आत्मचरित्र); जोशी लोखंडे प्रकाशन, पुणे, १९६४.*

२. *जोशी मोरेश्वर शास्त्री संपादक; 'विद्वत्परिमल', इगतपुरी नाशिक.*


## वाड, विजया

**कथाकार, कादंबरीकार, बालसाहित्यकार, ललित लेखक**

**१८ जानेवारी १९४५**



विद्यार्थिप्रिय शिक्षिका आणि साहित्यिका म्हणून प्रसिद्ध असलेल्या विजया वाड या पूर्वाश्रमीच्या विजया दातीर. त्यांचा जन्म नाशिक येथे सुसंस्कृत, सुशिक्षित, मध्यम-वर्गीय कुटुंबात झाला. त्यांचे शिक्षण पनवेल, पुणे, मुंबई येथे झाले. त्या बी.एस्सी.-बी.एड. नंतर त्यांनी एम.ए. आणि पीएच.डी. या पदव्या संपादन केल्या. 'आकाशवाणी आणि दूरदर्शन यांचे शालेय शिक्षणातील स्थान' हा त्यांच्या प्रबंधांचा विषय होता. श्रीलंकेतील 'इंटरनॅशनल युनिव्हर्सिटी ऑफ कॉम्प्लिमेन्टरी मेडिसिन' या संस्थेतर्फे त्यांना डी.लिट. ही सन्माननीय पदवी २००८ साली प्राप्त झाली.

विजयाताईंना लहानपणापासूनच वाचनाची आवड होती, त्यातूनच लेखनाचा संस्कार होत गेला आणि शिक्षिकेची नोकरी मिळाल्यामुळे या दोन्हींना अधिक वाव मिळत गेला, त्याचा त्यांनी यथार्थपणे उपयोग केला. उदयाचल हायस्कूल, विक्रोळी; राजा रामदेव पोद्दार शाळा येथे त्यांनी शिक्षिका ते प्राचार्य आणि संस्थेच्या संचालिका ते विश्वस्त अशी जबाबदारीची पदे भूषविली. सामाजिक कार्यातही त्या

आघाडीवर आहेत. अंध, कर्णबधिर, आदिवासी इ. क्षेत्रांत त्यांनी मोठे काम केले आहे.

साहित्यक्षेत्रात त्यांची ओळख प्राधान्याने बालसाहित्यकार असल्याने २००७च्या बालकुमार साहित्य संमेलनाच्या त्या अध्यक्षा होत्या. त्यांचा बालसाहित्याचा प्रसार मोठ्या प्रमाणावर असून आकाशवाणी व दूरदर्शनवरून कथांवर आधारित 'लाडी', 'बंडू बॉक्सर' व 'अखंड सौभाग्यवती' हे चित्रपट तयार झाले असून पहिले दोन मुलांसाठी आहेत. त्यांची एकूण ७५पेक्षा जास्त पुस्तके प्रसिद्ध झाली असून त्यांच्या अनेक पुस्तकांना महाराष्ट्र शासन, महाराष्ट्र साहित्य परिषद, पुणे इत्यादी संस्थांचे पुरस्कार मिळाले असून त्यांच्या पर्यावरणावरील कवितेला राष्ट्रीय स्तरावर दुसरे पारितोषिक मिळाले आहे.

त्यांनी कादंबरी, कथा, कविता, चरित्र, प्रवासवर्णन, ललित अशा विविध आकृतिबंधांत लेखन केले असून, 'अभोगी', 'अक्षांश, रेखांश', 'त्रिदल' इत्यादी कादंबऱ्या त्यांच्या नावावर आहेत. 'ऋणानुबंध', 'गस्तिंड', 'अवेळ', 'गुजगोष्टी' हे त्यांचे काही कथासंग्रह होत.

डॉ. वाड या 'मराठी विश्वकोशा'च्या विद्यमान अध्यक्षा व प्रमुख संपादिका आहेत. त्यांच्या कारकिर्दीत विश्वकोशाचे १७ व १८ हे खंड, १ ते १७ खंडांची सी.डी., विश्वकोशाचे संकेत स्थळ, अंधांसाठी बोलका विश्वकोश इत्यादी उपक्रम झाले. विश्वकोशाच्या प्रचार-प्रसारासाठी त्यांनी खूप परिश्रम घेतले. त्यांना 'मुलुंडभूषण'सह अनेक पुरस्कार मिळाले असून नुकताच 'निवडक विजया वाड' हा ग्रंथ प्रसिद्ध झाला. 'कन्याकोश' हा त्यांचा नियोजित संकल्प आकारास येत आहे.

– मधू नेने

## वाळंबे, मोरेश्वर रामचंद्र

**भाषातज्ज्ञ, अनुवादक, चरित्रलेखक**

**३० जून १९१२ – २१ मार्च १९९२**



शालेय व महाविद्यालयीन विद्यार्थ्यांना मराठी व्याकरणाचे व शुद्धलेखनाचे ज्ञान व्हावे म्हणून तळमळीने



ग्रंथलेखन करणारे भाषातज्ज्ञ, अनुवादक व चरित्र लेखक मोरेश्वर वाळंबे यांचे शिक्षण बी.ए.बी.टी.पर्यंत झाले. कोल्हापूर येथे पाच वर्षे, सातारा येथे पंधरा वर्षे, हिंदुस्थान अँटिबायोटिक्स प्रशाला, पुणे येथे दोन वर्षे, न्यू इंग्लिश स्कूल, पुणे येथे चौदा वर्षे, अशी १९३७ ते १९७३ सालापर्यंत तीन तपे शिक्षक, पर्यवेक्षक, शाळाप्रमुख म्हणून ते कार्यरत होते. त्यानंतर महाराष्ट्र राज्य माध्यमिक शिक्षण मंडळ व महाराष्ट्र राज्य पाठ्यपुस्तक मंडळात नऊ वर्षे, मराठीचे संयोजक म्हणून त्यांनी काम पाहिले. महाराष्ट्र राज्य साहित्य व संस्कृती मंडळाच्या वतीने प्रसिद्ध झालेल्या मराठी शब्दकोशाचे साहाय्यक संपादकपदही त्यांनी भूषविले होते.

'डॉ. बाळकृष्ण चरित्र, कार्य व आठवणी' (१९४२) हे मो.रा.वाळंबे यांचे पहिले पुस्तक. या पुस्तकातून त्यांनी इतिहास संशोधक डॉ. बाळकृष्ण यांचे जीवनदर्शन घडविले आहे. इंग्रजी भाषेचा चांगला व्यासंग असल्याने, इंग्रजी भाषेतील अलंकारांची मराठीतून ओळख करून देण्यासाठी त्यांनी १९४५मध्ये 'आंग्लभाषेचे अलंकार' हे पुस्तक लिहिले. 'बॉर्न फ्री' या इंग्रजी ग्रंथाचा 'वनराणी एल्सा' या नावाने संक्षिप्त अनुवाद करून तो ग्रंथ त्यांनी प्रसिद्ध केला.

'शिकारीच्या सत्यकथा' (१९६०) हे त्यांचे शिकारविषयक लेख असलेले पुस्तक लक्षवेधी आहे. मात्र त्यांची प्रमुख कामगिरी म्हणजे शालेय व महाविद्यालयीन विद्यार्थ्यांसाठी व सर्वसामान्यांना उपयुक्त ठरतील असा दृष्टिकोन ठेवून 'मराठी शुद्धलेखन प्रदीप' (१९६५), 'मराठी व्याकरण' (इयत्ता पाचवी ते सातवी), 'शुद्धलेखन परिचय' (१९६५), 'सुगम मराठी व्याकरण व लेखन' (इयत्ता आठवी, नववी, दहावी), 'सुगम मराठी शुद्धलेखन' (१९७२) अशी व्याकरणविषयक व शुद्धलेखनावरची ग्रंथरचना होय.

ते हाडाचे शिक्षक होते. त्यामुळे मराठी व्याकरणासारखा विद्यार्थ्यांना अवघड वाटणारा विषय सहज, सोप्या भाषेतून व उदाहरणे देऊन त्यांनी समजावून दिलेला आहे. विद्यार्थ्यांची मराठी भाषाविषयक जाणीव समृद्ध व्हावी यासाठी तळमळीने कार्य करणारा भाषातज्ज्ञ म्हणून त्यांची ओळख कायम राहील.

– डॉ. संजय देशमुख

**संदर्भ :**

१. *'मराठी व्याकरण'; (इयत्ता पाचवी, सहावी, सातवी); म. रा. पाठ्यपुस्तक मंडळ, पुणे; १९७१.*
२. *'मराठी शुद्धलेखन प्रदीप'; गो. य. राणे प्रकाशन, पुणे; १९६५.*

## वाळिंबे, रामचंद्र शंकर

**टीकाकार, समीक्षक**

**९ नोव्हेंबर १९११ – ८ फेब्रुवारी १९८९**



रामचंद्र शंकर वाळिंबे यांचा जन्म सातारा जिल्ह्यातील शिरवळ येथे झाला. त्यांचे प्राथमिक, माध्यमिक शिक्षण बदलापूर येथे, तर महा–विद्यालयीन शिक्षण स. प. महाविद्यालय, पुणे येथे झाले. पदव्युत्तर शिक्षण, तसेच बी. एड. सुद्धा त्यांनी पुणे मुक्कामीच केले. प्रथम शिक्षक, नंतर प्राध्यापक व नंतर पुणे विद्यापीठात मराठीचे विभाग प्रमुख अशी त्यांची शिक्षणक्षेत्रातील कारकीर्द होती. त्यांनी 'म. सा. पत्रिका' व 'लोकशिक्षण' या नियतकालिकांचे संपादन केले.

मराठी टीकाकारांमध्ये मौलिक आणि विधायक टीका लिहिणारे श्रेष्ठ टीकाकार म्हणून रा. शं. वाळिंबे ख्यातकीर्त होते. इंग्रजी, संस्कृत आणि मराठी या तिन्ही भाषांतील अभिजात साहित्याचा आणि समीक्षेचा त्यांचा व्यासंग होता. 'साहित्याचा ध्रुवतारा', 'सुधाकर की एकच प्याला', 'वाङ्मयीन टीका', 'साहित्यमीमांसा', 'बालकवी', 'वाङ्मयीन संप्रदाय', 'नाटककार गडकरी', 'मुक्तात्म्यापासून प्रमद्वरेपर्यंत', 'ज्ञानेश्वरीतील विदग्ध रसवृत्ती', 'गडकऱ्यांचे अंतरंग', 'साहित्य आणि अश्लीलता', इत्यादी ग्रंथांची सूची पाहूनच त्यांचे समीक्षा कर्तृत्व समजते.

त्यांच्या समीक्षेचे वैशिष्ट्य म्हणजे साहित्यविषयक विवाद्य प्रश्नांना त्यांनी साधकबाधक उत्तरे दिली आहेत. त्यांचे साहित्यकृतीचे परीक्षण अतिशय रसाळ भाषेत लिहिलेले असते. त्यांच्या टीकालेखनात विद्वत्ता, रहस्योद्‌घाटन, कलात्मकता आणि समतोलपणा आढळतो. साहित्याचे मूल्यमापन हे केवळ सौंदर्यशास्त्रीय आणि वाङ्मयीन मूल्यांवर अवलंबून ठेवता कामा नये. काही साहित्यबाह्य निकषही त्यासाठी लावले पाहिजेत, असे त्यांचे मत होते.

'वाङ्मयीन टीका' या ग्रंथात त्यांनी टीकाशास्त्रविषयक अनेक मूल्यांची सप्रमाण चर्चा केलेली आहे. टीकापद्धतींचा समन्वय साधणारे रा. शं. वाळिंबे टीकालेखक, आणि ज्ञान आणि आल्हाददायक विवेचन करणारे समीक्षक म्हणून हे नाव महत्त्वाचे आहे.

– डॉ. सुवर्णा दिवेकर

**संदर्भ :**

१. *जेस्ते मीना दे; 'विद्वान व्यासंगी रा. शं. वाळिंबे'; लोकसत्ता– १२ फेब्रु. १९८९.*
२. *पराडकर मो. दी.; 'एका ज्ञानयज्ञाची इतिश्री'; वसंत, ऑगस्ट १९८९.*

## वाळिंबे, विनायक सदाशिव

**लेखक, पत्रकार**

**११ ऑगस्ट १९२८ – २२ फेब्रुवारी २०००**

विनायक वाळिंबे यांचा जन्म मुंबई येथे झाला. त्यांनी माध्यमिक आणि महाविद्यालयीन शिक्षण पुणे येथे घेतले. त्यांनी 'अग्रणी', 'केसरी', 'ज्ञानप्रभात', 'लोकशक्ती' या वृत्तपत्रांत पत्रकारिता केली. केसरीतील त्यांची कारकीर्द (रविवार आवृत्ती संपादक) विशेष गाजली. त्यांनी लंडनला पत्रकारितेचे शिक्षण घेतले आणि त्या

व



अनुभवावर आधारित सदर लेखन त्यांनी ‘सह्याद्री’मधून केले. पत्रकारिता करतानाही राजकीय सूत्र हे विशेष अधोरेखित झाले, कारण राजकीय स्वरूपाचे लेखन करणारे ते एक महत्त्वाचे लेखक मानले जात. राजकीय विषय केंद्रस्थानी धरून साहित्यनिर्मिती करणारे लेखक, जातिवंत पत्रकार म्हणून विनायक वाळिंबे यांची नोंद महत्त्वाची ठरते.

‘व्होल्गा जेव्हा लाल होते’ (१९६८) हे त्यांचे पुस्तक अतिशय गाजले. ‘इंदिराजी’ (१९९४), ‘बेंगलोर ते रायबरेली’ (१९७७), ‘रायबरेली आणि त्यानंतर’ (१९७८) ही इंदिरा गांधींवरची त्यांची अभ्यासपूर्ण पुस्तके विशेष गाजली. राजकीय पार्श्वभूमीवरील वस्तुनिष्ठ आणि अभ्यासपूर्ण पुस्तके म्हणजे ‘इस्रायलचा वज्रप्रहार’, ‘तीन युद्धकथा’, ‘स्टॅलिनची मुलगी’ (१९६८), ‘पराजित अपराजित’ (१९७१), ‘दुसरे महायुद्ध’, ‘हिटलर’ (१९८२), अशी ५०पेक्षा अधिक पुस्तके त्यांनी लिहिली आहेत. खेरीज ‘वुई द नेशन’ या पालखीवालांच्या पुस्तकाचा अनुवाद, राजमाता विजयाराजे सिंदियांचे ‘आत्मकथा राजमाता’, ‘फ्रीडम अॅट मिडनाइट’, ‘ट्वेंटी टू फेथफुल डेज’चा अनुवाद, ‘इन जेल’ या कुलदीप नय्यर यांच्या खळबळजनक पुस्तकाचा अनुवाद, ‘ऑल द जनता मेन’ जनार्दन ठाकूर यांच्या पुस्तकाचा अनुवाद, असे अनेक अनुवाद त्यांनी केलेले आहेत. त्याशिवाय त्यांनी ‘अठराशे सत्तावन्न ते एकोणीसशे सत्तेचाळीसच्या स्वातंत्र्यलढ्याची संस्मरणीय कहाणी’चे दोन भाग (१९७७) हे स्वतंत्र इतिहास लेखनही केलेले आहे.

स्वतंत्र रचना असोत वा अनुवाद, राजकीय वास्तव, विदेशातला राजकीय इतिहास, त्या इतिहासाचे छाप काटे, महत्त्वाच्या राजकीय व्यक्ती, राजकीयदृष्ट्या परिवर्तनाचा कालखंड हे आशय त्यांच्या केंद्रस्थानी होते.

– डॉ. सुवर्णा दिवेकर

**संदर्भ :**


१. *कोठावळे, अशोक; ‘आस्थेवाईक लेखक’; ललित-एप्रिल-२०००.*

२. *काणे, वसंत; ‘पत्रकारितेचा पिंड लाभलेला विचारवंत साहित्यिक’; सकाळ-२७ फेब्रु, २०००.*


## विंदा करंदीकर

***करंदीकर, गोविंद विनायक***

**ज्येष्ठ कवी, लघुनिबंधकार,**
**समीक्षक, बालगीतकार,**
**२३ ऑगस्ट १९१८**



कवितालेखन विंदा करंदीकर व गद्यलेखन गो. वि. करंदीकर या नावाने.

इंग्रजी व मराठी समीक्षक, अनुवादक अशा अनेक क्षेत्रांत व वाङ्मयप्रकारांत लक्षणीय योगदान.

त्यांचा जन्म रत्नागिरी जिल्ह्यातील देवगड तालुक्यातील धालवल येथे झाला. प्राथमिक शिक्षण तेथेच झाल्यावर मॅट्रिक व महाविद्यालयीन शिक्षण वार लावून कोल्हापूर येथे झाले. तेथील राजाराम महाविद्यालयातील नामवंत प्राध्यापक ना. सी. फडके व माधव जूलियन यांचा विंदा करंदीकर ह्यांच्यावर बराच प्रभाव पडला. त्याच वेळी हैद्राबाद येथील सत्याग्रहात सहभाग व कैदेची शिक्षा. पुढे इंग्रजी विषय घेऊन इ. स. १९९४मध्ये एम. ए. नंतर बागलकोट (कर्नाटक), कागल, रत्नागिरी येथे सुरुवातीला अध्यापन केल्यानंतर मुंबईला प्रथम रुइया व नंतर स्वेच्छानिवृत्ती घेईपर्यंत एस. आय. ई. एस. महाविद्यालयात अध्यापन केले. १९७६मध्ये ते निवृत्त झाले. ‘स्वेदगंगा’ हा त्यांचा पहिला कवितासंग्रह १९४९मध्ये प्रसिद्ध झाला.

त्यांची कविता प्रामुख्याने ‘मृद्‌गंध’ (१९५४), ‘धृपद’ (१९५९), ‘जातक’ (१९६८), ‘विरूपिका’ (१९८१) व ‘अष्टदर्शने’ (२००३) या संग्रहांतून

प्रकाशित झाली आहे. १९८० मध्ये त्यांनी आपले काव्यलेखन थांबवले. त्याचे कारण सर्जनशक्ती संपली असे नव्हे, तर अत्मोल्लंघनाची कुवत संपली व पूर्वीच्याच कामगिरीची पुनरावृत्ती करण्याची बिलकूल इच्छा नव्हती, असे त्यांनी म्हटले आहे.

**बहुपेडी विंदा**

करंदीकरांच्या व्यक्तिमत्त्वावर व कवितेवर आरंभीच्या काळात माधव जूलियनांचा काहीसा प्रभाव असला, तरी 'स्वेदगंगा'नंतरच्या कवितेने स्वतंत्र वळण घेतले. त्यांचे विविध प्रयोग व आकृतिबंध दिसतात. तालचित्रे, गझल, मुक्त सुनिते, विरूपिका, आततायी अभंग इत्यादी प्रयोगांनी ती समृद्ध झाली आहे. वैज्ञानिक दृष्टिकोनाबरोबरच सामाजिक जाणीव, सामान्य माणसावर होणारा अन्याय व त्याच्यातील सामर्थ्य व सुप्तशक्तीच्या यांवर दृढ विश्वास, स्त्री-शक्तीच्या सामर्थ्याचा व तिच्यातील आदिमायेचा व आदिशक्तीचा साक्षात्कार व त्याबरोबरच करुणा, यंत्रयुगाचे स्वागत व साम्यवादी विचारसरणीवर श्रद्धा व दृढ विश्वास यांतून जीवनाच्या समग्रतेचा, प्रेमकवीतेतील शारीरिक प्रेमाचा, तृप्तीचा, सफल-विफलतेचा उत्कट आविष्कार ही करंदीकरांच्या कवितेतील काही आशयसूत्रे यांच्या 'स्वेदगंगा', 'यंत्रावतार', 'माझ्या मना बन दगड', 'ईव्ह', 'सरोज नवानगरवाली', 'रक्तसमाधी', 'दातापासून दाताकडे', 'ती जनता अमर आहे', इत्यादी कवितांतून प्रभावीपणे व्यक्त होताना दिसतात.

तत्त्वचिंतनाला काव्याच्या पातळीवरून व्यक्त करण्याचे असाधारण सामर्थ्य, हा ते व केशवसुत-मर्ढेकर ह्यांच्यामधील एक प्रमुख दुवा. उपरोध, फटकळपणा, उपहास आणि अधुनिक तसेच कोकणातील प्रादेशिक लोकजीवन, श्रद्धा, अंधश्रद्धा, रहस्ये यांतून आलेली विलक्षण खोल व समृद्ध प्रतिमासृष्टी ही त्यांची वैशिष्ट्ये जाणवतात. 'ईव्ह' हे त्यांना सैतानी बळ न जुमानणाऱ्या स्त्री-शक्तीचे प्रतीक वाटते. तसेच 'मीरा' हेही विरूपिकेच्या अंगाने उभे केलेले मुक्त स्त्रीचे रूप आहे. 'संहिता' या मुक्तसुनीतांमधून ते प्रभावीपणाने व्यक्त होताना दिसते. त्यांची यंत्रनिष्ठा ही त्यांच्या विज्ञाननिष्ठेतून आली आहे. यंत्र हा परमेश्वराचाच एक अवतार वाटतो व त्यामुळे दुःख आणि दारिद्र्य नष्ट होईल, अशी त्यांची श्रद्धा आहे. त्यांची विज्ञाननिष्ठा 'हे आइन्स्टीनपासून 'आततायी अभंगा'पर्यंत विविध वळणांनी व्यक्त होते.

'गोंधळ' या दीर्घकवितेतून जुना पारंपरिक गोंधळ या लोकप्रकाराला त्यांनी नवे रूप देऊन हिटलर, मार्क्स, नू यांपासून गांधींपर्यंत सर्वांनाच आमंत्रण देऊन आधुनिक काळातील गोंधळाचे व्यापक रूपक मांडण्याचा प्रयत्न केला आहे. करंदीकरांचे कवितेतील व्यक्तिमत्त्व हे दुपेडी नसून बहुपेडी आहे. करंदीकरांच्या कवितेत व्यक्तिचित्रे व प्रसंगचित्रे यांचाही वेगळेपणा आहे. धोंड्या न्हावी, कीर्तन बकी, सरोज नगरवाली, कावेरी, डोंगर, नेहरू, आईन्स्टीन, मर्ढेकर, टिळक वगैरे व्यक्तिचित्रे वेगवेगळे आकृतिबंध घेऊन व्यक्त होतात. क्वचित काही वेळा त्यांच्या कवितेत काहीशी दुर्बोधताही जाणवते.

करंदीकरांनी वसंत बापट व मंगेश पाडगावकर यांच्याबरोबर 'ज्ञानेश्वर ते मर्ढेकर' हा काव्यवाचन कार्यक्रम करून कविता घरोघरी नेली.

करंदीकरांनी काही अनुवादही केले. त्यात स्वतःच्या कवितेचे 'पोएम्स् ऑफ विंदा'(१९७५), 'त्रिमूर्ती', 'थ्री मेजर पोएम्स' (१९७९), 'सम मोअर पोएम्स ऑफ विंदा'(१९८३) व 'ओंकार' (१९९६) हे अनुवाद आहेत. तसेच त्यांनी संत ज्ञानेश्वरांच्या अमृतानुभवाचे अर्वाचीनीकरण (१९८१) केले आहे. 'अष्टदर्शने' (२००३) हा सात पाश्चात्त्यदर्शने व एक भारतीय दर्शन यांचा अभंगरूपाने परिचय करून देणारा भाष्य ग्रंथ, हा अभिनव उपक्रम आहे.

**लघुनवलनिबंध**

कवितेप्रमाणे करंदीकरांनी लघुनिबंध या वाङ्मयप्रकाराला दिलेले नवे वळण लक्षणीय आहे. फडके, खांडेकर, काणेकर ते ना. मा. संत यांच्या जुन्या लघुनिबंधांपेक्षा नवकाव्य व नवकथा याप्रमाणेच लघुनिबंधानेही कात टाकली व नवा ललित निबंध इरावती कर्वे, दुर्गा भागवत, कुसुमावती देशपांडे यांनी

व

आकारास आणला. करंदीकरांच्या लघुनिबंधावर चेस्टरटन व विशेषतः चार्लस लँम्बचा प्रभाव असला, तरी तो अस्सल भारतीय असून तो रोजनिशी, कथा, कहाणी, पत्र, प्रवास, शब्दचित्र इत्यादी विविध रूपे कशी घेतो, हे दाखवून दिले आहे. त्यांच्या 'स्पर्शाची पालवी' (१९५८) व 'आकाशाचा अर्थ' (१९६५) या दोन संग्रहांतून अधिक लवचीक व प्रवाही केला. त्याला कवितेचा स्पर्श आहे, तसाच तो चिंतनपरही आहे. इरावती कर्वे, दुर्गा भागवत यांचे निबंध सखोल व संशोधनपर आहेत. त्यामुळे त्याला ललित हे विशेष जोडणे त्यांना आवश्यक वाटले असावे. करंदीकर मात्र आपल्या लेखनाला लघुनिबंध किंवा लघुनवलनिबंध असे म्हणतात. अद्‌भुत, भयानक, वैचारिक व ललित या सर्वांचे त्यांत मिश्रण आहे. त्याला प्रादेशिक स्पर्शही आहे.

लघुनिबंधाप्रमाणेच त्यांच्या बालकविताही वैशिष्ट्यपूर्ण आहेत. १९६१ मध्ये त्यांच्या 'राणीचा बाग' या संग्रहानंतर त्यांचे एकूण आठ संग्रह प्रसिद्ध झाले आहेत. ''मुलांच्या आंतरिक जीवनाशी बालकवितेला संवाद साधता आला पाहिजे. पण त्याचबरोबर आपल्या परीने प्रौढ रसिकतेचे सावधान करण्याचे अंतिम ध्येयही तिला गाठता येईल.'' ही करंदीकरांनी व्यक्त केलेली आशा त्यांच्या बालकवितांतून पूर्ण होते. विलक्षण कल्पना, लयबद्धता, अद्‌भुतता व भयानकता व कोकणातील निसर्गाची रूपे ही त्यांच्या बालकवितेची वैशिष्ट्ये आहेत.

**काव्य – अ व्हायटल आर्ट**

करंदीकरांनी इंग्रजीत व मराठीतही साहित्य समीक्षा लिहिली तसेच भाष्य व अनुवादही केले. अनुवादात 'ॲरिस्टॉटलचे काव्यशास्त्र' (१९५७), 'फाउस्ट भाग १' (१९६५) व 'राजा लियर' (१९७४) हे अनुवाद व 'लिटरेचर ॲज ए व्हायटल आर्ट' (१९९१) व 'अ क्रिटिक ऑफ लिटररी व्हॅल्यूस' (१९९७) हे आहेत. करंदीकरांच्या या शेवटच्या पुस्तकाचा अनुवाद 'साहित्य मूल्यांची समीक्षा' या नावाने प्रा. आ. ना. पेडणेकर यांनी २००६ मध्ये केला आहे. त्यांच्या इंग्रजी व मराठी समीक्षा-लेखनांतून त्यांचा कलेकडे पाहण्याचा दृष्टिकोन व्यक्त होतो. कला हा माणसातील सर्जनशक्तीचा आविष्कार आहे, असे ते मानतात व काव्याला ते एक जीवनवेधी कला 'अ व्हायटल आर्ट' मानतात. 'परंपरा व नवता' (१९६७) या ग्रंथामधील समीक्षा-लेखांतूनही कोणत्याही विशिष्ट सिद्धान्ताचा आग्रह न धरता ते कलाविषयक खुला दृष्टिकोन मांडताना दिसतात. निरनिराळ्या विचारप्रणाली ह्या जीवनावर व कलेवर टाकणारे प्रकाशझोत आहेत, असे ते समजतात. आपली जीवनविषयक व कलाविषयक जाणीव अधिक सखोल व डोळस करण्यासाठी त्यांचा त्यांना जरूर उपयोग झालेला आहे. मात्र कुणाही कलावंताने किंवा कवीने एखाद्या विशिष्ट विचारप्रणालीच्या आहारी जाऊन आपल्या प्रतिभेचा संकोच करू नये. आपला दृष्टिकोन खुला ठेवावा, असे आपण मानत असल्याचे त्यांनी डॉ. विजया राजाध्यक्षकृत 'दुपेडी विंदा- खंड २'च्या 'नवा दृष्टिकोन'मध्ये व्यक्त केले आहे.

आयुष्यात त्यांना अनेक मानसन्मान व पुरस्कार लाभले. त्यांची यादी मोठी आहे. त्यांमध्ये २००३ चा भारतीय ज्ञानपीठ पुरस्कार (२००६)याचा समावेश आहे. त्याशिवाय एन.सी.आर.टी. (४ पुरस्कार), महाराष्ट्र शासन (१० पुरस्कार), सीनिअर फुलब्राइट पुरस्कार, जनस्थान, सेव्हिएत लॅन्ड, जनपथ, कबीर, साहित्य अकादमी पुरस्कार, असे विविध सन्मान त्यांना लाभले. पुरस्कारांतून मिळालेली जवळ-जवळ सात लाख रुपयांची रक्कम त्यांनी झोपडपट्टी निर्मूलन, वेश्यांच्या एड्सग्रस्त मुलींचे पुनर्वसन, भूकंप, दुष्काळ निवारण, मराठी भाषा व साहित्यभवन वास्तू व माधव जूलियन व्याख्यानमाला इत्यादी विविध सार्वजनिक संस्थांना उदार-विचारे वाटून टाकली. पुरस्कारांच्या निमित्ताने त्यांनी अमेरिका व रशिया येथे प्रवासही केला. समग्र मानवी जीवन आपल्या काव्य व अन्य साहित्यातून कवेत घेण्याचा त्यांचा प्रयत्न जाणवतो.

– डॉ. प्रल्हाद वडेर

व

**संदर्भ :**

१. राजाध्यक्ष विजया , 'कुळकर्णी, वा. ल., गाडगीळ गंगाधर व करंदीकर गो. वि. यांच्याशी संवाद'; १९८५.
२. राजाध्यक्ष विजया ; 'बहुपेडी विंदा, खंड १' (२००५).
३. राजाध्यक्ष विजया ; 'बहुपेडी विंदा, खंड २' (२००६).
४. सद्रे केशव ; 'कवितेतील अधुनिकतावाद' (२०००).
५. जोशी गीता ; 'लेणे प्रतिभेचे', करंदीकर विं.दा. (२००४).

## विजापुरे, आनंदीबाई

**आत्मचरित्रकार, कथाकार, कादंबरीकार**

**५ मार्च १९१७**



आनंदीबाई विजापुरे ह्या पूर्वाश्रमीच्या गोदावरी महा–गावकर. त्यांचे काही दिवस महागाव येथे शिक्षण झाले. त्यांनी 'जवानीची हाक', 'अर्पिता', 'विषवृक्ष' आणि 'दुर्गी' या कादंबऱ्या; 'सन्मान' हा कथासंग्रह आणि 'अजुनी चालतेची वाट' हे आत्मचरित्र अशी पुस्तके लिहिली.

१९२९ साली ग.पां.विजापुरे यांच्याशी त्यांचा विवाह झाला व त्यांनी किर्लोस्करवाडीत वास्तव्य केले. वाडीतल्या आधुनिक वातावरणात त्यांच्या व्यक्तिमत्त्वाचा विकास होऊन साहित्य, नाटके इत्यादींची त्यांना आवड निर्माण झाली. वाडीत त्यांच्या कलागुणांना वाव मिळाला. नंतर त्यांनी नर्सिंगचे शिक्षण घेऊन नर्सिंग होम काढले, तसेच सेमिनारसाठी परदेशी प्रयाणही केले.

पती वयस्क आणि अरसिक म्हणून घुसमट झाली. १९४२साली ग.वा.बेहेरे यांच्याशी परिचय होऊन त्यांच्याबद्दल तीव्र आकर्षण निर्माण झाले; त्यामुळे त्यांनी विजापुरे यांच्यापासून घटस्फोट घेतला. बेहेऱ्यांबरोबर त्यांचे चौदा वर्षे सहजीवन झाले; पण त्यांची सहधर्मचारिणी होण्याचे स्वप्न भंग झाल्यावर बाई आपल्या मुलाबाळांत परतल्या आणि त्यांनी आत्मचरित्र लिहिले.

आनंदीबाईंनी चार कादंबऱ्या लिहिल्या त्या आपल्या मैत्रिणीच्या, मोलकरणीच्या अनुभवावर; पूर्णपणे जुळवलेल्या, स्त्री–पुरुष संबंधांभोवती घोटाळणाऱ्या अशा आहेत. मात्र 'सन्मान' या कथासंग्रहात स्त्रियांचे कुटुंबाच्या परिघात होणारे अपमान, हाल आणि दुर्दशा यांचे वर्णन आहे. 'अजुनी चालतेची वाट' या त्यांच्या आत्मचरित्राने त्या प्रसिद्धीच्या झोतात आल्या. आपल्या जीवनाचा आणि सोबतकार ग.वा.बेहेरे यांच्याशी असलेल्या आपल्या संबंधांचा शोध घेण्याचा प्रयत्न त्यात त्यांनी केलेला आहे. अशा प्रकारचे अनुभव साहित्यात प्रथमच मांडले गेल्याने साहित्यजगतात आणि समाजात प्रचंड खळबळ माजली.

त्यांच्या आत्मचरित्रात लहानपणी ज्या समाजात त्या वावरल्या, त्या समाजाचे सूक्ष्म निरीक्षण आणि त्या समाजाचे त्यांनी पोटतिडकीने वर्णन केलेले आहे. समाजातल्या अनिष्ट रूढींमुळे स्त्रियांची होणारी होरपळ, बालविधवांचे दुःख आणि सामाजिक बहिष्काराची भीती यांचे त्यात चित्रण आहे. त्या काळातली गरिबी, हलाखी, पुरुषांची होणारी गोची, त्यांची हतबलता, मनाविरुद्ध घ्यावे लागणारे कठोर निर्णय यांचा घेतलेला सूक्ष्म वेध, गरिबीमुळे मुलीपेक्षा २० वर्षांनी मोठ्या असलेल्या विजापुरेंना देण्याचा निर्णय, 'तुझ्या लग्नामुळेतरी या गरिबीची कोंडी फुटेल', हे त्यांच्या आईचे व्याकूळ उद्गार, मनाविरुद्ध लग्न झाल्यामुळे तगमग, तडफड, बाईंची प्रेमभावी वृत्ती आणि सत्य परिस्थिती यांतली तफावत पचवल्यावर त्यांनी आपल्या व्यक्तिमत्त्व विकासाचे प्रयत्न केले. आपले दुःख विसरण्यासाठी त्यांनी लोकांची सेवा करण्याचे ठरवले. नर्सिंगचा कोर्स करून त्यांनी नर्सिंग होम काढले. त्यांनी हेल्थ व्हिजिटरचा कोर्स केला आणि पुढे हीच नोकरी केली.

बेहेऱ्यांची भेट झाल्यावर आनंदीबाईंच्या आयुष्याची दिशा बदलली. त्यांची कलासक्त वृत्ती बेहेऱ्यांच्या सोबतीमुळे तृप्त झाली. त्यांना साहित्यिकांचा सहवास लाभला. त्यांनी निरनिराळ्या कलांचा आस्वाद घेतला. प्रियकर आणि मुले यांच्यामध्ये त्यांची

व

चिरफाळल्यासारखी स्थिती झाली. शेवटी मनस्वी आणि जिद्दी स्वभावामुळे त्यांनी बंडखोरीचा निर्णय घेतला. चौदा वर्षांच्या सहजीवनानंतर ग.वा.बेहेरे आपल्या पत्नीकडे परत गेले. आनंदीबाईंचा दारुण पराभव झाला. आत्मचरित्रात त्यांनी आपली चूक कबूल करण्याचे धैर्य दाखवले. बेहेऱ्यांचे वास्तव रूप स्वीकारल्यावर पतीचे गुण कबूल करून त्यांच्यावर केलेल्या अन्यायाचे त्यांनी परिमार्जन केले. तसेच बेहेऱ्यांबरोबर घालवलेले आनंदाचे क्षणही नाकारले नाहीत.

चांगले जगण्याची तीव्र इच्छा, हे त्यांच्या जीवनाचे सूत्र होते. त्यांचा मनस्वीपणा, प्रणयाच्या अनुभवात आपले सर्वस्व झोकून देण्याची बेदरकार वृत्ती आणि त्याचबरोबर फसवणूक, अपमान, मानहानी यांतल्या विरोधाभासामुळे मराठीत एका परखड आत्मचरित्राची भर पडली. या आत्मचरित्राला महाराष्ट्र राज्य शासनाचा पुरस्कार लाभला.

– डॉ. अपर्णा लव्हेकर

**संदर्भ :**

*१. 'सत्यकथा'; जून १९७५.*
*२. 'स्नेहश्री'; २२ जानेवारी १९७४.*
*३. 'रुद्रवीणा'; दिवाळी १९७२.*

## विभावरी शिरूरकर

***बेडेकर, मालती विश्राम***

***बाळूताई खरे, कटूसत्यवादिनी, बी. के., बी. श्रद्धा***

**कादंबरीकार, कथाकार**

**१ ऑक्टोबर, १९०५ – ६ मे २००१**

स्त्रियांचा खराखुरा आवाज आपल्या वाङ्‌मयाद्वारे धीटपणे प्रथमच मांडणाऱ्या मालतीबाई बेडेकर यांचा जन्म त्यांच्या आजोळी, आवास, तालुका अलिबाग येथे झाला. जन्मनाव बाळूताई असे होते. त्यांच्या आईचे नाव इन्दूताई व वडिलांचे नाव अनंतराव खरे असे होते. वडील गुहागर येथून मुंबईस शिक्षणासाठी आले, पण कोणाचा आधार नव्हता. गुहागरच्या फाटक नावाच्या गृहस्थाकडे शिवणकाम व इतर कामे करत राहिले. दुपारी



दुकान बंद असताना चित्रकलेच्या वर्गाला जाऊन चित्रकलेच्या परीक्षा दिल्या. नंतर फणसवाडीत बिऱ्हाड केले. मुंबईत असताना रावसाहेब रेगे यांच्या संपर्कात येऊन टिळक-आगरकर यांच्या विचारांचा पगडा त्यांच्यावर बसला. मुंबईत प्लेग सुरू झाल्यामुळे त्यांना मुंबई सोडावी लागली. त्याच वेळी घोडनदी, शिरूर येथे अमेरिकन मिशन स्कूलमध्ये चित्रकलेचे शिक्षक म्हणून नोकरी मिळाली. बाळूताई ह्या स्वतः त्यांच्या आईवडिलांची दुसरी मुलगी. पहिली मुलगी म्हणजे कृष्णाबाई मोटे. इतर दोन बहिणींपैकी एक स्टॅटीस्टिशिअन होती व एक डॉक्टर होती. दोघे भाऊ स्वतंत्र व्यवसायात होते. बाळूताईंचे वडील पुरोगामी विचारांचे असल्यामुळे आपल्या मुलींना द्विपदवीधर करण्याचा निश्चय त्यांनी मुली लहान असतानाच केला होता. मुलींबाबत अत्यंत संकुचित व प्रतिगामी विचारसरणीच्या काळात वडिलांचे विचार काळापुढे ५०-६० वर्षे धावणारे होते; त्यांनी आपल्या मुलींना मिशनच्या मुलांच्या शाळेत घातले. बाळूताईंचे सातवीपर्यंतचे शिक्षण शिरूरला झाले. लहानपणी मुलीला सायकल शिकविणे, त्या काळात शिरूरमध्ये आलेल्या पहिल्या ट्रकने शिक्षणासाठी कर्वे शिक्षण संस्थेत पुण्याला पाठवणे, जातिभेद न पाळणे हे वडिलांचे प्रगतिपर विचारांचे द्योतक समजायला पाहिजे. स्वतःच्या वडिलांवर 'खरे मास्तर' ही कादंबरी लिहून सामान्य माणसातील असामान्यत्वाचे दर्शन घडविण्यात बाळूताई यशस्वी झालेल्या आहेत. बाळूताई पुण्याला कर्वे शिक्षण संस्थेच्या वसतिगृहात राहत. त्या संस्थेच्या मॅट्रिकच्या परीक्षेत १९१९ साली त्या सर्वप्रथम आल्या. कर्वे विद्यापीठाच्या जी.ए.(गृहीतागमा) परीक्षेतही त्यांना प्रथम क्रमांकाचा सन्मान मिळाला. प्रघोगमा या पदवीसाठी 'अलंकारमंजूषा' हा प्रबंध १९२८ साली सादर केला. पुण्याच्या कन्याशाळेमध्ये १९२३ ते

व

१९३३ या कालावधीत शिक्षिका व लेडी सुप्रिन्टेन्डन्ट म्हणून त्यांनी काम केले. तेथे असतानाच मुंबईत जाऊन त्या बी.टी. झाल्या. त्याच वेळी महिलाश्रमाचे सेविकापद स्वीकारून कर्वे आश्रमाचे तहहयात सभासदत्व त्यांनी घेतले होते.

श्री.म.माटे यांच्या व्याख्यानांमुळे त्याच्या अस्पृश्योद्धार कार्यामध्ये त्या सहभागी झाल्या. गुल्टेकडी विभागात सायकलने जाऊन साक्षरतेचे व स्वच्छतेचे कार्य त्या करीत. वसंत व्याख्यानमाला, गडकरी स्मृतिदिनानिमित्त फर्गसन महाविद्यालयामधील सभा अशा सभांमधून आपले पुरोगामी विचार त्या समर्थपणे मांडीत असत. अशी एकूण दोन हजार व्याख्याने त्यांनी दिलेली आहेत. महाराष्ट्राची विद्युल्लता म्हणून त्यांना ओळखले जात असे.

**कळ्यांचे निःश्वास : स्त्रीचा स्वतंत्र आवाज**

कर्वे आश्रमात राहिल्यामुळे तसेच साक्षरता व अस्पृश्योद्धार ह्या कामांमुळे स्त्रियांच्या वास्तव प्रश्नांचे त्यांना प्रत्यक्ष दर्शन घडले. समाजात भरडली जाणारी स्त्री, तिच्या विविध समस्या, परित्यक्ता, बालविधवा, माणूस म्हणून जगण्याच्या स्त्रीच्या हक्कांची होणारी पायमल्ली या सर्व गोष्टींचा त्याच्या संवेदनशील मनावर परिणाम झाला. शिवाय स्वतःचे वडील आणि टिळक-आगरकर, कर्वे, माटे यांच्या विचारांचा प्रभाव होताच. स्त्रीमुक्ती म्हणजे काय, याची कल्पना १९६०-१९७० पर्यंत आपणाकडे फारशी नव्हती. ह्या स्त्रीमुक्तीचा खराखुरा वास्तववादी आद्य हुंकार 'कळ्यांचे निःश्वास' (१९३३) या कथासंग्रहातून उमटला. पाठोपाठ 'हिंदोळ्यावर' (१९३४) व 'विरलेले स्वप्न' (१९३५) ह्या कादंबऱ्या ह.वि.मोटे यांनी प्रकाशित केल्या. हे सारे लेखन विभावरी शिरूरकर ह्या टोपणनावाने प्रसिद्ध झाले. संस्कृतीची आवड, रात्रीची नीरव शांतता आवडायची; म्हणून 'विभावरी' हे नाव व शिरूरला वास्तव्य होते; म्हणून शिरूरकर या अर्थाने हे टोपणनाव घेतले होते. 'कळ्यांचे निःश्वास' हा मराठी साहित्यविश्वातील एक महत्त्वाचा ऐतिहासिक टप्पा आहे, त्यामध्ये ११ भावकथा आहेत. आता या पुस्तकाला ७५ वर्षे झाली; परंतु स्त्रियांच्या मूलभूत प्रश्नांमध्ये फारसा फरक पडलेला नाही. स्त्री कितीही शिकली, तरी तिची घुसमट थांबलेली नाही. उलट प्रौढ कुमारिकेचे प्रश्न जास्त तीव्र झालेले आहेत. लग्नाच्या वेळी स्वतःला दाखवून घेण्याच्या तडजोडीपासून पुढे अनेक तडजोडी सतत कराव्या लागतात. मानवी जीवनात पुरुषांप्रमाणे स्त्रियांनाही असणारी कामभावना अत्यंत नैसर्गिक आहे. त्या भावनेचे संयत व कलात्मक वर्णन त्यांच्या या भावकथांमध्ये आहे. परंतु 'बाबांचा संसार माझा कसा होणार!' ह्यासारखे निर्भीड सत्यकथन सनातनी संस्कृति-रक्षकांना झोंबले, टोपणनावाने कोण लिहीत आहे, ह्याचा कसून शोध झाला. अनेक ठिकाणी चर्चा, महाराष्ट्रामध्ये ठिकठिकाणी सभा, वाद, प्रतिवाद झाले. १९४९ साली निघालेल्या 'विभावरीचे टीकाकार' या पुस्तकात याची सविस्तर माहिती आहे. 'विविधवृत्त' त्यातील 'अलमगीर' हे विरोधाबाबत आघाडीवर होते. विश्ववाणीमध्ये ना.र.अळतेकरांनी दहा लेख लिहिले. 'विभावरीबाई पत्ता द्या' अशी एकच हकाटी झाली. त्र्यं.शं.शेजवळकर 'निःस्पृह' नावाने लिहिणारे तुळजापूरकर विरोधात होते. न.चिं.केळकर आचार्य अत्रे, वा.म.जोशी, मामा वरेरकर, कमलाबाई टिळक इत्यादींनी विभावरीच्या वाङ्‌मयाची प्रशंसा केली.

**स्त्री वादी लेखनाच्या उद्गात्या**

विभावरी शिरूरकर ह्यांच्या वाङ्‌मयावर प्रभात, त्रिकाल वगैरे नऊ दैनिकांतील मजकूर सोडूनही दोन हजार पृष्ठांची टीका नीटपणे आलेली होती. हा सारा गदारोळ उठण्याचे कारण 'कळ्यांचे निःश्वास' (१९३३) इतकीच 'हिंदोळ्यावर' (१९३४) ही कादंबरी होती. 'अचळा' ही या कादंबरीतील नायिका. ती शाळेत शिक्षिका असते, तिचा पती व्यसनी व गुन्हेगार असतो; त्या काळी घटस्फोटाची कायदेशीर सोय नव्हती. लग्न न करता चिरागवर प्रेम करून मातृत्वाचा अधिकार मिळविण्याबाबत अचळा ठाम असते. अचलेचे मातृत्व हा तिचा स्वैराचार नसून, तो तिचा हक्क आहे असा क्रांतिकारी विचार विभावरींनी ६०-६५ वर्षांपूर्वी मांडला.

विभावरींच्या समाजचिंतनाची साक्ष म्हणून त्याकडे बघायला हवे. स्त्रीचा माणूस म्हणून विचार केला नाही, तर काय घडू शकते; याचे ते वास्तवचित्रच आहे. ह्यापूर्वी ह. ना. आपटे, वा. म. जोशी, माडखोलकर यांनी स्त्रियांविषयी सहानुभूतीपर लेखन केलेले आहे. विभावरींनी स्त्रीच्या भावनांची नैसर्गिक उलघाल संयमित रितीने मांडली आहे. या वैचारिक पुरोगामित्वाचा विभावरींना इतका त्रास झाला की, विरोधकांनी त्यांची प्रेतयात्रा काढण्यापर्यंत मजल गेली. स्त्रीवादी लेखनाचे कुठलेही दिशादर्शन समोर नव्हते. वैचारिकदृष्ट्या स्त्रीमुक्तीचा फार महत्त्वाचा टप्पा 'हिंदोळ्यावर' (१९३४) ह्या कादंबरीने गाठला आहे. 'हिंदोळ्यावर' ह्या कादंबरीतून विभावरींनी सामाजिक समस्येचे सर्जक रूप मांडले आहे.' असे डॉ. भालचंद्र फडके म्हणतात, ते खरे आहे.

त्यानंतर 'विरलेले स्वप्न' (१९३५), 'बळी' (१९५०), 'जाई' (१९५२), 'दोघांचे विश्व आणि इतर कथा' (१९५७), 'शबरी' ही सर्व पुस्तके विभावरी शिरूरकर या नावाने लिहिलेली आहेत. 'रानफुले', 'हिंदू-व्यवहार धर्मशास्त्र', 'स्त्रियांच्या हक्कांची सुधारणा' ही पुस्तके बाळूताई खरे या नावाने; तर 'चार भाषांतरे', 'घराला मुकलेल्या स्त्रिया' आणि 'काळाची चाहूल', 'संकटमुक्त स्त्रियांचे पुनर्वसन' (१९६४), 'उमा' (१९६६); काही नाटके, 'साखरपुडा' (१९६२) चित्रपट, मनस्विनीचे चिंतन, प्रौढ साक्षरांसाठी लेखन अशी विविध वाङ्मयीन कामगिरी त्यांच्या मालतीबाई या नावावर आहे, 'बळी', 'शबरी', 'घराला मुकलेल्या स्त्रिया' व 'काळाची चाहूल' यांना राज्यपुरस्कार मिळालेले आहेत. 'कळ्यांचे निःश्वास'चा पुरस्कार टोपण नावामुळे घेता आला नाही. 'घराला मुकलेल्या स्त्रिया' मध्ये १९४१ ते १९५६ या काळातील स्त्रियांच्या संस्थांची पाहणी करून काढलेले निष्कर्ष आहेत. 'पारध' या नाटकाला मुंबई साहित्य संघाचा पुरस्कार मिळाला होता. श्रेष्ठ व प्रदीर्घ वाङ्मयीन कामगिरीसाठी; १९९२ सालचा महाराष्ट्र साहित्य परिषदेचा पुरस्कार व जुलै, १९९८ मध्ये साहित्य संस्कृती मंडळाची गौरववृती हे सन्मान त्यांना देण्यात आले. अखिल भारतीय स्त्री परिषदेच्या अध्यक्षा म्हणून नागपूर, कऱ्हाड, जळगाव, अलिबाग, मडगाव येथे त्यांची निवड झाली. १९५१ साली प्रजासमाजवादी पक्षातर्फे त्या विधानसभेला उभ्या होत्या. १९५२ साली पीस मिशनतर्फे त्यांना रशियाला आमंत्रित केले गेले होते. प्रौढशिक्षण व बालशिक्षण ह्या समित्यांवर नियुक्ती तसेच इंग्लंड, रशिया, फ्रान्स येथील स्त्री-जीवनाचा अभ्यास व त्या कारणाने त्या देशांना भेटी झाल्या. १९८१ साली मुंबई येथे भरलेल्या 'समांतर' मराठी साहित्य संमेलनाचे अध्यक्षपद त्यांनी भूषवले.

१९३७ ते १९४० ही तीन वर्षे विभावरी सोलापूर येथील बॅकवर्ड क्लास ऑफिसमध्ये, रिमांड व रेस्क्यू होममध्ये स्त्री-विभागावर पर्यवेक्षिका म्हणून काम करीत होत्या. १९४० साली त्यांनी सोलापूर सोडले. पण तेथील मुले, माणसे त्यांना पुण्याला भेटायला येत. त्या मुलांचे विषय त्यांच्या डोक्यात ठाण मांडून बसलेले होते. त्यातूनच 'बळी' या कादंबरीची निर्मिती झाली. ही कादंबरी मराठी कादंबरीच्या क्षेत्रात मैलाचा दगड ठरावी अशीच आहे. १९५० साली दलित साहित्याची वेगळी चूल मांडली गेलेली नव्हती. अशा काळात एका सवर्ण स्त्रीने मांग, गरुडी यांसारख्या गुन्हेगारी समाजाच्या सामूहिक मनाची व आबा, चांगुणा यांची मनोविश्लेषणात्मक व्यक्तिचित्रे अप्रतिम रेखाटली आहेत. तेथील परिसराचे रेखाटनही अस्सल उतरले आहे. विभावरींच्या व्यापक जाणिवेच्या, विशाल मानवतेचा जीवनासंबंधीच्या सखोल चिंतनाचा तो पुरावा आहे. विभावरींचे निरीक्षण व आकलन, त्यांची जात-धर्म यांना पार करून जाणारी अपार करुणा ह्या साऱ्यांचे दर्शन कादंबरीत घडते. माणूस सुधारू शकतो, ह्या तत्त्वावर त्यांचा विश्वास होता. क्षमाशीलता त्यांच्या ठिकाणी भरपूर होती. म्हणूनच की काय सोलापूरच्या त्यांच्या घरातील मोलकरीण ही एके काळची दरोडेखोर स्त्री होती व २-३ खुनांचा आरोप असलेला मनुष्य त्यांचा रखवालदार होता. त्यांच्या परिवर्तनशील क्रांतिकारी विचारसरणीला

कृतिशीलतेची जोड होती. १९५६ नंतर 'महिला सेवाग्रम'मध्ये त्यांनी विनावेतन काम केले. अनाथ मुलींना त्या वेळप्रसंगी घरी संभाळीत. श्री. विश्राम बेडेकरांसारख्या वादळाबरोबर त्यांनी संसार केला.

– डॉ. उषा कोटबागी

**संदर्भ :**


१. *खाडगे मंदा; 'स्त्री साहित्याचा मागोवा', खंड १ ला, साहित्यप्रेमी भगिनी मंडळ, पुणे.*

२. *निमदेव मालती; 'मालतीबाई बेडेकर', ज्ञानेश प्रकाशन, नागपूर.*

३. *कर्णिक द्वा. भ., नाडकर्णी ब्र. मु.; संपादक; 'विभावरीचे टीकाकार'; बकुळ प्रकाशन, मुंबई.*


## वैद्य, शंकर विनायक

**कवी**

**१५ जून १९२८**



शंकर वैद्य यांचा जन्म ओतूर (जि. पुणे) येथे झाला. ओतूरला निसर्गसान्निध्यात बालपण घालवलेले आणि प्राथमिक शिक्षण घेतलेले शंकर वैद्य वयाच्या तेराव्या वर्षी माध्यमिक शिक्षणासाठी जुन्नरला गेले. शिवाजी आणि तानाजी यांच्या ऐतिहासिक खाणाखुणा असलेल्या परिसरात त्यांच्यावर राष्ट्रभक्तीचे संस्कार झाले. कवी वा. ज्यो. देशपांडे हे त्यांचे शिक्षक होते. शंकर वैद्य यांना काव्यलेखनासाठी त्यांचे मार्गदर्शन लाभले. नंतरच्या काळात आपल्या ह्याच गुरूच्या 'स्वस्तिका' ह्या काव्यसंग्रहाचे संपादन करून त्यांनी त्याला प्रस्तावनाही लिहिली. शाळेत असताना संभाजी व औरंगजेब यांच्या संवादात्मक कवितेने त्यांना 'कवी शंकर वैद्य' ही ओळख दिली. शालेय वयात भर्तृहरी, वामन पंडित, रघुनाथ पंडित अशा जुन्या कवींच्या कवितांचे वाचन झाल्यामुळे विविध विषयांवर विविध वृत्तांमध्ये रचना करण्याचा छंद त्यांना जडला.

महाविद्यालयीन शिक्षणासाठी १९४६ साली पुण्यात आल्यावर शिकत असतानाच पूर्णवेळ नोकरी, काव्यलेखन, मनन हेही चालू होते. कवी यशवंत, बोरकर, मनमोहन, कुसुमाग्रज ह्यांच्या कविता त्यांनी जुन्नरला असताना वाचल्या होत्या, ते आता प्रत्यक्ष भेटल्यामुळे स्वतःच्या कवितेचे कठोर परीक्षण करण्याची दृष्टी वैद्य यांना लाभली. महाविद्यालयात चार काव्यस्पर्धांमध्ये कवितांना पारितोषिके मिळाली. बी.ए. व एम.ए. च्या परीक्षांमध्ये मराठी विभागात प्रथम आल्याबद्दल पुणे विद्यापीठाच्या पारितोषिकांचे ते मानकरी ठरले.

शंकर वैद्य यांनी एलफिन्स्टन महाविद्यालय, मुंबई (१९५३–१९६०), विदर्भ महाविद्यालय, अमरावती (१९६०–१९६३) आणि इस्माईल युसुफ महाविद्यालय, मुंबई (१९६३–१९८६) येथे मराठी विषयाचे अध्यापन केले.

शंकर वैद्य यांनी स्वा. सावरकर, केशवसुत, इंदिरा संत, बालकवी, गोविंदाग्रज, भा.रा. तांबे, मर्ढेकर, मनमोहन यांच्या काव्याचे परीक्षण, रसग्रहण आणि समीक्षालेखन 'सत्यकथा' इत्यादी मासिकांतून केले. कुसुमाग्रजांच्या 'रसयात्रा', 'प्रवासी पक्षी' आणि 'इस मिट्टी से' (कुसुमाग्रजांच्या मराठी कवितांचे हिंदी रूपांतर: डॉ. चंद्रकांत बांदिवडेकर) या तीन संग्रहांचे संपादन प्रस्तावनालेखनासह केले. ज्ञानदेव व तुकाराम यांच्या काव्यावरही वैद्य यांनी लेखन केले.

'कालस्वर' आणि 'दर्शन' हे त्यांचे काव्यसंग्रह असून 'मैफल', 'सांध्यगुच्छ', 'पक्ष्यांच्या आठवणी' असे कवितांचे गुच्छ प्रसिद्ध झालेले आहेत. छंदांवर विलक्षण हुकूमत असल्याने कवितेच्या विषयानुरूप रचनाबंध त्यांच्या कवितेत दिसतात. प्रीतीची ओढ व प्रेयसीविषयी वाटणारे गाढ आकर्षण ते संयत भाषेत व्यक्त करतात.

कल्पना चमत्कृतीबरोबर तत्त्वचिंतनात गुंतलेली त्यांची कविता गेय आहे. काव्यवाचन नाट्यमय पद्धतीने करणारे शंकर वैद्य हे रसिकांचे आवडते कवी आहेत.

– डॉ. अनुपमा उजगरे

व

## वैद्य, सरोजिनी शंकर

**समीक्षक, ललित लेखक**

**१५ जून, १९३३ – ३ ऑगस्ट २००७**



डॉ. सरोजिनी शंकर वैद्य यांचा जन्म व शिक्षण पुणे येथे झाले. त्यांनी १९५६ मध्ये पुणे विद्यापीठातून प्रथमवर्गात, प्रथम क्रमांकाने एम.ए. (मराठी) उच्च पदवी प्राप्त केली. १९५७ ते १९९३ अशी एकूण सदतीस वर्षे त्यांनी अध्यापन क्षेत्रात निष्ठेने काम केले. या कालखंडात त्यांनी मराठीचे अध्यापन केले.

१९५७ ते १९६२ दरम्यान सर परशुरामभाऊ महाविद्यालय, पुणे; १९६९ ते १९७२ दरम्यान रुईया महाविद्यालय, मुंबई येथे अध्यापन व १९७२ ते १९८५ दरम्यान या काळात मुंबई विद्यापीठात प्रथम अधिव्याख्याता व नंतर मराठी विभागप्रमुख म्हणून त्यांनी काम पाहिले व अध्यापनही केले.

निवृत्तीनंतरही त्यांनी महाराष्ट्र 'राज्य मराठी विकास संस्था' या संस्थेच्या संस्थापक व संचालक म्हणून कार्य केले आणि त्या संस्थेची पायाभरणी केली. कार्यकालादरम्यान कोशवाङ्मयसूची, चरित्र माहिती, परिभाषाकोश अशा मूलगामी योजना आखून त्या पार पाडल्या. १५ जून, १९९९ पासून ४ जुलै, २००१ पर्यंत शासकीय, तसेच खासगी स्तरांवर अनेक संस्थांना मार्गदर्शन केले. मराठी भाषेच्या व वाङ्मयाच्या अभिवृद्धीसाठी अथक परिश्रम केले. अखेरच्या श्वासापर्यंत मराठी वाङ्मयलेखन करीत राहणाऱ्या साहित्यिकांपैकी त्या एक आहेत.

त्यांनी पीएच.डी.साठी लिहिलेल्या प्रबंधाचा विषय होता, 'नाट्यछटाकार दिवाकर शंकर गर्गे यांच्या समग्र साहित्याचा समीक्षात्मक अभ्यास' या विषयाचे सतत चिंतन असल्याने, त्यावर त्यांनी वारंवार लेखन केले. त्यांची ग्रंथसंपदा विविधांगी आहे. ललितलेखन, चरित्रलेखन, वैचारिक लेखसंग्रह, समीक्षा आणि आत्मलेखनपर वेध घेणारे अत्यंत कसदार असे लेखन त्यांनी केले. त्यांच्या अनेक ग्रंथांना शासनाचे पुरस्कार मिळाले.

त्यांचा पहिलाच ललितलेखसंग्रह 'पहाटपाणी' (१९७५) त्यानंतर 'माती आणि मूर्ती' (समीक्षा, १९७५), 'काशीबाई कानिटकर', 'चरित्र व आत्मचरित्र' 'टी.एस. इलियट आणि नवीन मराठी कविता', (समीक्षालेख), 'समग्र दिवाकर', (नाट्यछटाकार दिवाकरांचे अप्रकाशित लेखन, १९९६) 'संक्रमण' (वैचारिक लेख) अशा विविधांगी दृष्टीनी त्यांचे लेखन संपन्न झाले आहे. भारतीय शिक्षण प्रतिष्ठानाकडून त्यांना उत्कृष्ट शिक्षक पुरस्कार (१९८८) प्राप्त झाला. सत्यशोधक पुरस्कार (ओतूर १९९४) हा शैक्षणिक कार्यासाठीचा पुरस्कार त्यांना देण्यात आला. त्यांनी बडोदा वाङ्मय परिषदेचे अध्यक्षपद भूषविले. राज्यशासनातर्फे दिले जाणारे अनेक वाङ्मयपुरस्कार त्यांच्या ललितलेखनाला, चरित्रवाङ्मयाला देण्यात आले. महाराष्ट्र साहित्य परिषद, पुणे पुरस्कार, सु.ल.गद्रे पुरस्कार, नगर वाचनमंदिर पुरस्कार इत्यादी पुरस्कार त्यांना मिळाले.

'पहाटपाणी', 'माती आणि मूर्ती' यापाठोपाठ 'गोपाळ हरी देशमुख उर्फ लोकहितवादी' (१९७८), 'काशिबाई कानिटकर आत्मचरित्र आणि चरित्र' (१९८७), 'ललित निबंध' (१९८०), 'जीवनलेखन' – नाटक, 'रमाबाई रानडे, व्यक्ती आणि कार्य', 'संक्रमण' (वैचारिक, १९९६), 'आठवणी काळाच्या आणि माणसांच्या' (महाराष्ट्र राज्य वाङ्मय पुरस्कार), 'समग्र दिवाकर' (जांभेकर पुरस्कार) 'लंडनच्या आजीबाईंची गोष्ट' इत्यादी चरित्रवाङ्मय, 'वाङ्मयीन महत्ता' (१९९१), अशी महत्त्वपूर्ण पुस्तके त्यांनी लिहिली.

विद्यापीठात विभागप्रमुख असताना त्यांनी डॉ. वसंत पाटणकरांच्या सहसंपदनाने समीक्षालेख प्रकाशित केले. मराठी व्याकरणासारख्या विषयाच्या मूलगामी विवेचनाला (कृ.श्री. अर्जुनवाडकरकृत) ग्रंथ प्रकाशनासाठी साहाय्य

आपण ज्यांना आपली माणसे म्हणतो ती एका विशिष्ट वाटेनेच का जातात? एखाद्याची वाट दुसऱ्याला कितपत बदलता येते? समांतरपणे जाणाऱ्या वाटासुद्धा कधी एखाद्या अर्वाचीन क्षणी एकमेकांवर येऊन आदळतात ते का? कशासाठी? या सगळ्याच प्रश्नांना नेमकी व अखेरची अशी उत्तरे नाहीत; पण काही एका मर्यादेपर्यंत कळते की, आपली वाट आपल्या समोर आणि कदाचित आपल्याकडून आकाराला येत असते. ती तीच का असते? कळत नाही, पण तशी आकाराला येत असते, एवढे खरे. मनाच्या एखाद्या हट्टातून, एखाद्या योगायोगातून किंवा विचारपूर्वक म्हणून घेतलेल्या एखाद्या निर्णयातून सुद्धा... कुठून तरी एखाद्या विशिष्ट क्षणी, एका विशिष्ट दिशेच्या वाटचालीला आपला प्रारंभ झालेला असतो. भोवताली घडणाऱ्या घटना, प्रसंग, वावरणारी माणसे... असे अनेक घटक आपले अदृष्ट घडविणाऱ्या सूत्र शक्ती ठरतात किंवा वावरत असतात. वरवर पाहताना, माणसाला सुखाचे, दुःखाचे असे सुटेसुटे क्षण दिसत असतात, पण सुटे असे काहीच नसते. कशाने तरी कुठेतरी नाते असलेली ती एक गिचमीड, परंतु सलग अशी साखळी असते....

सरोजिनी वैद्य
२१. ७. ९०.

मराठीतील चरित्रवाङ्मयाचा जेव्हा विचार होतो, विशेषतः अर्वाचीन काळातील प्रबोधन चळवळींच्या काळातील व्यक्तींची चरित्रे हा चर्चेचा विषय असतो; तेव्हा सरोजिनीबाईंचे नाव आवर्जून घ्यावे लागते. हा काळ वैचारिक प्रबोधनाचा, खळबळीचा असून तो सरोजिनीबाईंच्या चिंतनाचा, औत्सुक्याचा आणि विशिष्ट संस्कारित जीवनाचा विषय आहे. म्हणून त्यांनी दिवाकरांवर लिहिले, गोपाळ हरी देशमुखांवर लिहिले, काशिबाई कानिटकरांवर लिहिले आणि लंडनच्या आजीबाई वनारसेंवर त्यांच्या कुटुंबीयांच्या विनंतीवरून लिहिले. त्या-त्या व्यक्तींच्या वेळचा काळ सजीव केला. त्या व्यक्ती चरित्रातून मूर्तिमंत उभ्या केल्या. त्यासाठी खूप परिश्रम केले आणि जाणकारीने माणसे वाचली. आपल्या कल्पनाशक्तीचा कस

केले. तसेच, अमराठी मंडळींसाठी मराठी शिक्षणक्रम बनवून त्यांना नोकरीत आवश्यक असणाऱ्या प्रमाणपत्राची व पदविकेची सुविधा उपलब्ध करून दिली. सातत्याने आणि मूलगामी कार्य करीत राहणे व त्याचबरोबर इतरांना त्यात सहभागी करून प्रगतीची वाट दाखवणे, हा त्यांचा स्वभाव होता. श्रमसातत्याला तर तोडच नव्हती.

त्यांनी केलेले आणखी एक अत्यंत महत्त्वपूर्ण कार्य म्हणजे 'ज्ञानदेवी'चे संपादन आणि लेखन. केळकर-मंगरूळकरांनी संपादिलेल्या ज्ञानदेवीचे 'हार्द' त्यांनी आपल्या प्रस्तावनेतील १५० पानांत उलगडून दाखविले (१९९४). ज्ञानदेवीच्या या तीन खंडांचे संपादन हा त्यांच्या विद्वत्तेचा, सहृदयतेचा आणि मौलिक वैचारिकतेचा परिपाक होय. या प्रकल्पाने त्यांना श्रमसाफल्याचा आनंद दिला आहे आणि मराठी मनाला संस्मरणीय भेट बहाल केली आहे.

लावून वास्तव उमजून घेऊन त्यांनी काहीशा वेगळ्या वैशिष्ट्यपूर्ण व्यक्तींचे चित्रण परिश्रमपूर्वक केले आहे. त्यांनी चरित्रवाङ्मयाला एक वेगळे कसदार वळण दिले.

काशिबाई कानिटकरांसंबंधी सरोजिनीबाईंना एक भावनिक आकर्षण असल्याचे जाणवते. कानिटकर कुटुंबाच्या आठवणी, समकालीन लेखक, पत्रव्यवहार यांचे साहाय्य घेऊन एकूणच त्या काळाचे सांस्कृतिक वळण लक्षात घेऊन सरोजिनीबाईंनी कानिटकरांच्या आयुष्याचा अन्वयार्थ शोधला आहे. त्यातूनही काही वगळले गेले, काही चुकीचे वाटले त्यासाठी 'उत्तरायणा'चा प्रपंच केला. त्या-त्या चरित्रनायकांबरोबर त्या काळात त्या 'जगल्या' असे म्हटले तरी योग्य होईल. लंडनच्या आजीबाईंच्या चरित्राबाबत त्या म्हणतात, "विशिष्ट स्थितीचा मागोवा घेत मी आजींच्या आयुष्यातलं वास्तव पाहिलं आहे आणि शब्दांकित केलं

व

आहे. वाचकांना ते मराठी स्त्री-जीवनाचा, मनुष्याच्या पिंडप्रकृतीचा आणि आपल्या जगातील मूल्यविचारांचा वेध घ्यायला लावील, असा विश्वास वाटतो.'' हा विश्वास सार्थच आहे.

'पहाटपाणी', 'शब्दायन' यांमधील ललित लेख प्रसन्न शैलीत अनुभवरूपाला साकार करणारे, 'आत्मीय' अनुभव प्रकट करणारे आहेत. आजूबाजूचा समाज, त्यातील माणसांचे जगणे, वागणे व स्वतःला आलेले अनुभव यांवर त्यांनी या लेखातून नेमकेपणाने बोट ठेवले आहे.

त्यांनी अखेरच्या टप्प्यावर लिहिलेला 'वासुदेव बळवंत पटवर्धन' यांच्यासंबंधीचा ग्रंथ वेगवेगळ्या कारणांनी महत्त्वाचा आहे. सुमारे वीस वर्षे हा विषय लेखिकेच्या मनात होता. मराठीच्या समीक्षेसंदर्भात जे काम पूर्वी झाले नाही, आणि पुढे होणार नाही; असे काम म्हणजे 'मासिक मनोरंजन'विषयी. १८८५ ते १९३५ या काळात 'मासिक मनोरंजन'ने फार मोठे कार्य केले. या वेळी वासुदेव बळवंत पटवर्धन हे फर्गसन महाविद्यालयाचे प्राचार्य होते. त्यांनी समीक्षेपर दिलेली व्याख्याने ऐकण्यासाठी बालकवी येत. माधवराव पटवर्धनही येत. यासंबंधी का. र. मित्र यांनी केलेला पत्रव्यवहार या संदर्भातले महत्त्वाचे संदर्भ-दुवे सरोजिनीबाईंनी दाखवून दिले आहेत.

मराठी समीक्षेचा पाया या वासुदेव बळवंत पटवर्धनांच्या व्याख्यानांमधून घातला गेला. त्यांच्याविषयीचा हा ग्रंथ अत्यंत महत्त्वाचा असून तो लिहून पुरा करण्याचा ध्यास बाईंनी घेतला होता. मराठी वाङ्मय समीक्षेविषयी वासुदेव बळवंत पटवर्धन यांचे हे महत्त्वपूर्ण कार्य मराठी वाङ्मयविश्वापुढे आले पाहिजे, म्हणून हा ग्रंथ निर्माण झाला. आज त्याचे महत्त्व अधोरेखित होत आहे.

बाईंनी आयुष्यभर ज्ञानसाधना केली. त्यांना 'वाग्विलासिनी' म्हणून मानले गेले. दादर वनिता समाजाने त्यांना जीवनगौरव पुरस्काराने गौरविले. महाराष्ट्र सेवा पुरस्कार, द. ग. गोडसे यांच्या कलामीमांसेसाठी दिलेला पुरस्कार, त्यांच्या एकूण पाच पुस्तकांना मिळालेले महाराष्ट्र शासनाचे पुरस्कार आणि भारतीय शिक्षण प्रतिष्ठानाने केलेला गौरव हेच प्रमाणित करतात की, सरोजिनीबाईंनी वाङ्मयसेवक म्हणून केलेले कार्य अत्यंत मौलिक आहे.

मराठी वाङ्मयात काही दाम्पत्यांनी लक्षणीय कार्य केले आहे. कवी अनिल आणि कुसुमावती, इंदिरा संत आणि ना. मा. संत यांप्रमाणेच डॉ. सरोजिनी वैद्य आणि कवी शंकर वैद्य हे दाम्पत्यही मराठी वाङ्मयक्षेत्रातील त्यांच्या कार्यासाठी लक्षात राहील असे आहे.

– प्रा. अनुराधा साळवेकर

**संदर्भ :**

*१. वैद्य सरोजिनी; 'समग्र दिवाकर'; पॉप्युलर प्रकाशन, मुंबई; १९९६.*

## व्हटकर, अशोक नामदेव

**संशोधक, कथाकार, कादंबरीकार**

**२० ऑक्टोबर १९४७ – जून २००१**



अशोक व्हटकर यांचा जन्म कोल्हापूर जिल्ह्यातील वडगाव येथे झाला. शालेय जीवनापासून त्यांना लेखनाची आवड होती. त्यांनी संस्कृत विषय घेऊन एम.ए. केले. संस्कृत साहित्यावर संशोधनपूर्ण लेखन करणाऱ्या मोजक्या दलितवर्गीय व्यक्तींपैकी अशोक व्हटकर हे एक प्रमुख नाव आहे. ऋग्वेदाचा काळ ठरविण्यासाठी त्यांनी संशोधन केले. संस्कृत विषयात पीएच.डी. घेऊन त्यांनी राजाराम कॉलेज, कोल्हापूर येथे संस्कृत विभागप्रमुख म्हणून काम केले.

रुद्रदेवतेच्या संशोधनासाठी हिमालय ओलांडून चिनी तिबेटमधील मानस सरोवर व कैलास पर्वतावर जाऊन संशोधन करणारा अलीकडच्या काळातील हा एकमेव भारतीय होय. त्या पार्श्वभूमीवर 'कैलास-मानस' (१९८८) हे त्यांचे अनुभव कथन करणारे प्रवासवर्णनपर पुस्तक प्रसिद्ध झाले आहे.

महाविद्यालयीन जीवनापासून त्यांना गूढकथा, साहसकथा किंवा तत्सम कथा लिहिण्याची सवय होती. यांतील कथा वेळोवेळी नियतकालिकांमधून प्रसिद्ध झाल्या. मात्र, पुढे व्हटकर यांनी प्रामुख्याने कादंबऱ्याच लिहिल्या. 'अथर्वीय जग' ही १९८० साली प्रसिद्ध झालेली त्यांची कादंबरी साहसकथेशी नाते सांगणारी आहे. त्यांच्या इतर कादंबऱ्या अशा, 'फॉस्कर' (१९८०), 'क्रॅब' (१९८३) 'पब्लिक' (राजकीय पार्श्वभूमी असलेली कादंबरी, १९८३) तसेच 'गोरी बायको' (१९८४) व 'बगाड' (१९८४). 'मेलेले पाणी' या कादंबरीस महाराष्ट्र शासनाचा उत्कृष्ट कादंबरी लेखनाचा पुरस्कार (१९८४) मिळाला आहे. 'सलामी' (१९८८), 'विलक्षण विद्यापती' १९९० ह्या त्यांच्या इतर कादंबऱ्या होत. त्यांची अगदी पहिली कादंबरी, 'मंगळावरचा प्रवास' ही १९७४ साली प्रसिद्ध झाली, जिच्यात विज्ञान आणि गूढकथा यांचे मिश्रण आहे.

'७२ मैल' या १९८९मध्ये प्रसिद्ध झालेल्या आत्मकथनात्मक कादंबरीत त्यांच्या बालपणापर्यंतचा कालखंड चित्रित केला आहे. 'मेलेले पाणी' (१९८४) ही कादंबरीही आत्मकथनात्मक आहे.

व्हटकर यांनी दलितांच्या आणि एकूणच शोषितांच्या व्यथावेदनांना शब्दरूप दिले आहे. माणसाच्या वृत्ती–प्रवृत्ती, सहिष्णूता–असहिष्णुता इ.चे वेधक दर्शन त्यांच्या कादंबऱ्यांतून प्रभावीपणे चित्रित झाले आहे. लेखनगुण असूनही त्या मानाने दलित साहित्यिक म्हणून ते काहीसे दुर्लक्षित राहिले.

महाराष्ट्र शासनाच्या संस्कृत स्थायी समितीवर त्यांनी अनेक वर्षे काम केले.

– मधू नेने

**संदर्भ :**

*१. 'मराठी सारस्वत', खंड २ पहिली आवृत्ती; अनमोल प्रकाशन, पुणे; १९९२.*

*२. व्हटकर अशोक; '७२ मैल'; १९८९.*

* * *

# श



## शनवारे, श्रीधर कृष्ण

**कवी, नाटककार, समीक्षक, बालसाहित्यकार**

**५ ऑक्टोबर १९३५**



श्रीधर कृष्ण शनवारे यांचे मूळ गाव साऊर (जि. अमरावती) हे होय. त्यांचे शिक्षण एम. ए. पीएच. डी.पर्यंत झाले. नाग-पूरच्या धनवटे नॅशनल महाविद्यालयामधून त्यांनी मराठीचे अध्यापन केले व तिथूनच विभागप्रमुख म्हणून ते निवृत्त झाले.

'उन्हउतरणी' (१९७५), 'आतून बंद बेट' (१९७८), 'थांग-अथांग' (१९८६), 'तीन ओळींची कविता' (२००७) हे त्यांचे प्रकाशित कवितासंग्रह होत. त्याशिवाय 'अतूट' हे नाटक (१९७६), 'कोलंबसची इंडिया' (प्रवासवर्णन, १९९९), 'कथाकार वामन चोरघडे' (समीक्षा ग्रंथ, १९९५), 'प्रेमचंद : निवडक कथा' (अनुवाद, १९९९), 'राक्षसांचे वाडे' (बालकुमार कवितासंग्रह, १९९३), 'अभिनव मराठी व्याकरण' (नागपूर, १९९४) ही त्यांची ग्रंथसंपदा होय.

रोहिणी कळमकर यांनी १९९८ साली त्यांच्या साहित्यावर पी. एच. डी. मिळविली. 'आकांक्षा' मासिकाने मे २००६ मध्ये त्यांच्यावर विशेषांक काढला. २००२ मध्ये 'गहिवरलेला महाशब्द' हा त्यांच्या कवितेवरील नरेंद्र बोडके यांचा समीक्षा ग्रंथ प्रकाशित झाला. शनवारे यांना महाराष्ट्र शासनाचा कविवर्य 'केशवसुत' पुरस्कार १९८६ साली प्राप्त झाला. त्याशिवाय, कविवर्य कुसुमाग्रज पारितोषिक, कवी उ. रा. गिरी पारितोषिक, विदर्भ साहित्य संघाचे 'वसंतराव वऱ्हाडपांडे' स्मृती पारितोषिक त्यांना मिळाले आहे. दर्यापूर येथील विदर्भ साहित्य संमेलनाचे ते अध्यक्ष होते.

नागपूरला मराठीचे प्राध्यापक म्हणून काम करून ते निवृत्त झाले. शनवारे यांच्या कवितेत सत्याचा शोध घेण्याची प्रवृत्ती प्रबळ आहे. पु. शि. रेग्यांच्या तोडीचा घोटीव रूपबंध आणि जी. एं. ची आठवण करून देणारी आशयघनता यांचा अपूर्व संगम त्यांच्या कवितेत झालेला दिसतो. तत्त्वचिंतन हे त्यांच्या कवितेचे एक वैशिष्ट्य आहे. पण कुठलीही एक बाजू घेऊन ते उभे राहत नाहीत. समग्र देशवास्तव कवेत घेण्याची तिची क्षमता आहे. मराठीतील ही खरीखुरी भारतीय कविता आहे.

– नरेंद्र बोडके

**संदर्भ :**

१. *शनवारे, श्रीधर कृष्ण; 'उन्हउतरणी'; माग्रस प्रकाशन, १९७५.*

२. *शनवारे, श्रीधर कृष्ण; 'आतून बेट बंद', मौज प्रकाशन, मुंबई; १९७८.*

## शांताराम

***पुरोहित, केशव जगन्नाथ***

**कथाकार**

**१५ जून १९२३**

'शांताराम' या टोपण नावाने लेखन करणारे केशव जगन्नाथ पुरोहित यांचा जन्म नागपूर येथे झाला. चामोर्शी (जि. गडचिरोली), चंद्रपूर अशा ठिकाणी शालेय शिक्षण घेतल्यानंतर १९४० साली ते मॅट्रिक झाले. १९४६ मध्ये एम. ए. (इंग्लिश) झाल्यानंतर विदर्भ महाविद्यालय, अमरावती; नागपूर महाविद्यालय आणि नंतर मुंबईचे

श



इस्माइल युसूफ महाविद्यालय येथे त्यांनी इंग्लिशचे अध्यापन केले. तेथूनच १९८१ मध्ये प्राचार्य म्हणून ते निवृत्त झाले. १९४० साली वयाच्या सतराव्या वर्षी 'सह्याद्री' मासिकाच्या डिसेंबर अंकातील 'वाऱ्यावरील विचार' या लेखाने त्यांच्या लेखनाला आरंभ झाला. 'अनिल कवींच्या काव्यवैशिष्ट्यांवरील एका तरुण लेखकाच्या शंका' असे या लेखाचे सूत्र होते. 'सह्याद्री' मासिकाच्या सप्टेंबर १९४१ च्या अंकात 'भेदरेखा' ही शांतारामांची पहिली कथा प्रसिद्ध झाली. वर्षाच्या आत त्यांच्या आणखी पंधरा लघुकथा प्रकाशित झाल्या आणि १९४२ मध्ये 'संत्र्यांचा बाग' हा सोळा लघुकथांचा पहिला संग्रह बाहेर पडला.

त्यानंतर 'मनमोर' (१९४६), 'शिरवा' (१९५७), 'छळ आणि इतर कथा' (१९५९), 'जमिनीवरची माणसं' (१९५९), 'लाटा' (१९६२), 'धर्म' (१९६२), 'चंद्र माझा सखा' (१९६९), 'अंधारवाट' (१९७७), 'उद्विग्न सरोवर' (१९८२), 'चेटूक' (१९८४), 'निवडक शांताराम' (संपादित) (१९८९), 'काय गाववाले' (१९८९), 'संध्याराग' (१९९०), 'रेलॉं रेलॉं' (१९९२), 'चैत्रागम' (२००४), 'कृष्णपक्ष' (२००६) असे शांतारामांचे स्वतंत्र पंधरा कथासंग्रह आजवर प्रसिद्ध झाले आहेत आणि त्यांच्या काही कथा अजून संग्रहनिविष्ट व्हावयाच्या आहेत. 'सावळाच रंग तुझा' (१९५०) हा लघुनिबंधसंग्रह, एक अपुरी कादंबरी, एक अप्रकाशित नाटक, काही अनुवाद असेही लेखन त्यांनी केले आहे. 'प्रातिनिधिक लघुनिबंधसंग्रह' (१९६२) हे त्यांचे संपादन, त्यांची लघुनिबंधविषयक दृष्टी व्यक्त करणारे आहे. 'व्रात्यस्तोम' (१९९५), 'मी असता' (१९९८), 'आठवणींचा पार (१९९८), 'ठेवणीतल्या चिजा' (२००३) हे आत्मपर लेखन त्यांच्या समाधानी, प्रसन्नचित्त व आशावादी व्यक्तिमत्त्वाचे दर्शन घडविते. 'सफरनामा' (२००९) हा त्यांचा प्रवासलेखांचा संग्रह त्यांच्या परदेशप्रवासाचे वेगवेगळे अनुभव चित्रित करणारा आहे. त्यातून ज्याप्रमाणे नवा देश, नवी माणसे, नवे जीवन पाहिल्याचा आनंद प्रत्ययास येतो, त्याप्रमाणेच त्यांचे चिंतनशील मन, भारतीय संस्कृती व पाश्चिमात्य संस्कृती यांच्यासंबंधी त्यांच्या मनात उठणारे विचारतरंग यांचेही दर्शन घडते. 'बीजाक्षरे' (२००६) हा त्यांचा समीक्षात्मक लेखांचा संग्रह. त्यांच्या साहित्यमीमांसेमधून, दीर्घकालीन अभ्यासातून व व्यासंगातून निष्पन्न होणारी प्रौढता व प्रगल्भता व्यक्त झाली आहे. या पुस्तकातून व पुस्तकाबाहेरील लेखांतून प्लेटो-ॲरिस्टॉटलपासून मराठी कादंबरीपर्यंत, आणि तौलनिक भाषाभ्यासापासून मराठी कथेपर्यंत बहुविध विषयांसंबंधीची त्यांची चिकित्सक दृष्टी प्रकटते. वेगवेगळे साहित्यप्रकार त्यांनी हाताळले असले, तरी त्यांच्या वाङ्‌मयीन व्यक्तिमत्त्वावर मोहर आहे ती कथाकाराचीच. अमरावती येथे १९८९ मध्ये झालेल्या अखिल भारतीय मराठी साहित्य संमेलनाचे ते अध्यक्ष झाले ते मुख्यत्वे कथाक्षेत्रातील कामगिरीमुळेच.

एकाच उत्कट भाववृत्तीने भारलेला, एकाच एका अंगाने विकास पावणारा एकलक्ष्यी अनुभव हा त्यांच्या 'खार', 'चंद्र माझा सखा', 'जाणीव' यांसारख्या कथांचा गाभा आहे. 'खार' या कथेने रसिक वाचकांचे व समीक्षकांचे लक्ष दीर्घ काळापासून वेधून घेतले आहे. स्फूर्तीचे चांचल्य व चापल्य, स्फूर्तीच्या निसटत्या स्पर्शानेही साफल्याची प्राप्ती घडण्याची शक्यता, तिच्या साहचर्यातील दिव्य आनंदाचा अनुभव, जे केवळ कलावंतच उमगू शकतो ते स्फूर्तीच्या प्राप्तीविना वाढणारे अनाम दुःख, कलानिर्मितीचा क्षण, निर्मितीचा कष्टकारक अनुभव - या साऱ्यांची प्रतीकात्मक अभिव्यक्ती 'खार' या कथेत झाली आहे. पत्नीच्या सुखद सहवासातील आनंदाची जोड कलानिर्मितीच्या आनंदाला देऊन शांतारामांनी कथेला आणखी एक परिमाण दिले आहे.

केवळ आधुनिकतेच्या तीव्र जाणिवेनिशी शांताराम कथालेखनास प्रवृत्त होत नाहीत. त्यांच्या संवेदनशीलतेचे नाते सनातन मानवी संबंधांशी आहे. त्यामुळे परंपरेने

चालत आलेल्या या संबंधांतील भावसत्य उत्कटतेने जाणवले म्हणजे त्यांची कथा आकार धारण करते. कथालेखनाच्या दृष्टीने शहर, खेडे वा आदिवासींची वसाहत ही त्यांना सारखीच वाटतात. शहरी जीवनाचा अनुभव आणि खेड्यातील जीवनाचा अनुभव यांमध्ये त्यांचा विशेष काही अग्रक्रम असत नाही. शहरातला असो की खेड्यातला, माणूस तो माणूस, त्यात त्यांना भेद करावासा वाटत नाही. शांतारामांनी साकार केलेली ही सारी माणसे 'जमिनीवरची माणसं' आहेत. सामान्य माणसांच्या साऱ्या मर्यादांची अटक त्यांच्या जीवनाला वेढून राहिलेली आहे. गुणदोषांची संमिश्रता हीच माणसाची प्रकृती आहे, याची जाणीव त्यांच्या कथा करून देतात. शांतारामांच्या बऱ्याच कथांतील व्यक्ती या केवळ सुट्या व्यक्ती म्हणून न येता समाजघटक म्हणून येतात. त्यांच्या कथेतील व्यक्तिदर्शनाचा परीघ मोठा आहे आणि वास्तवदर्शी जीवनचित्रणाला पूरक अशी समावेशक दृष्टी त्यांच्याजवळ आहे. सधन, संपन्न, रसिक आणि सौंदर्यवान स्त्री-पुरुषांप्रमाणेच गरीब, विपन्नावस्थेतील, मठ्ठ, कष्टकरी आणि बेताच्या रूपाच्या स्त्री-पुरुषांनाही त्यांची कथा नाकारत नाही. सामान्य स्थितीतील दरिद्री माणसांविषयीची लेखकाची जाण विशेष खोल आहे. त्यांचे कथाविश्व मध्यमवर्गीय विचारपद्धती, जीवनमूल्ये व नीतिसंकेत यांचे दर्शन घडविते. सामाजिक वास्तवाचा वेध घेणारे शांतारामांच्या कथांचे दुसरे रूप म्हणून भौगोलिक दृष्ट्या चामोर्शी, चांदा आणि गडचिरोली या प्रदेशात घडणाऱ्या कथांचा उल्लेख करावा लागतो. या कथांच्या रूपाने वैनगंगेच्या परिसराला मराठी कथेच्या इतिहासात पहिल्यांदाच ठसठशीत असे वाङ्मयीन अस्तित्व लाभले आहे.

शांतारामांच्या कथेचे एक रूप शहरी जीवनचित्रणातून उभे राहते. मुंबईखेरीज नागपूर, अमरावती, अकोला, रायपूर, बडनेरा, खांडवा, जबलपूर, कलकत्ता, दिल्ली अशा अनेक शहरांचा नामनिर्देश त्यांच्या कथांत येत असला, तरी मुंबईच्या विशिष्ट स्वरूपाचा प्रभाव त्यांच्या कथांतील जीवनव्यवस्थेवर विशेषत्वाने पडलेला आहे. मुंबई शहराचे अनेक तपशील कथानिवेदक सांगतात. या शहरातील ऐश्वर्य, सुखलोलुपता, विलासी जीवनमान ही एक बाजू; या शहरातील गर्दी, दारिद्र्य, झोपडपट्ट्या, सुखाच्या ओढीने धडपडणारे जीव ही दुसरी बाजू; मुंबईतील चित्रपटसृष्टी व तिच्या ओढीने उद्ध्वस्त झालेली माणसे ही तिसरी बाजू. शांतारामांच्या कथेतील स्त्री-पुरुषसंबंधाचे चित्रण अनेक प्रकारे वैशिष्ट्यपूर्ण आहे. विवेक, विकार व संस्कार यांतील संघर्षातून उत्पन्न होणारे ताण त्यांची कथा समर्थपणे पेलते. लैंगिक संबंधांचे मनमोकळे चित्रण ते करतात. त्या संबंधांतून कोणत्याही विशिष्ट मनोवैज्ञानिक समस्येची उकल करण्याचा त्यांचा खटाटोप नसतो. त्यामुळे त्यांच्या कथांत स्पष्टता व सहजता स्वाभाविकपणे उतरते. स्त्री, स्त्रीदेहाची आवाहकता, स्त्रीचा मोह, त्याचे स्वरूप व परिणाम यांचा प्रभावी आविष्कार 'रती', 'अंधारवाट', 'विवस्त्र', 'अतिरेकी' अशा कथांतून घडतो. स्त्री-पुरुषसंबंधांतील भीती व वासना यांचा माणसाला होणारा जाच 'वाघ'सारख्या प्रतीकात्मक कथेत नेमकेपणाने मूर्त होतो. ज्या काळात मनोव्यापारांवर आणि मनोविश्लेषणावर फार भर दिला जात होता, त्या काळात मराठी कथेत शारीर अनुभवांची जाण ठेवण्याचे काम शांतारामांनी केले आहे. शांतारामांच्या कथांतील स्त्री आपले पाय जमिनीवर पक्के रोवून उभी आहे. संसारात वा पुरुषसंबंधात आपले स्थान (रोल) कोणते आहे, आणि आपली किंमत काय आहे, या वास्तवाचे तिला अचूक भान आहे. ती केवळ भावनेच्या भरात वाहून जाणारी नाही, तर स्वतःच्या शक्तीची जाणीव असणारी आहे. ('गोपिका', 'प्रवास').

शांताराम आपल्या कथानुभवांना कथारूप देताना प्रथमपुरुषी निवेदनपद्धती, तृतीयपुरुषी निवेदनपद्धती आणि या दोन पद्धतींना दिलेली संवादांची जोड अशा निवेदनाच्या तीन पद्धती मुख्यत्वे उपयोगात आणतात. त्यांच्या कथांतील निवेदकाचे अस्तित्व नेहमी ठसठशीतपणे जाणवते. ऐसपैस भाषेत संथ सुरात सुरू होणारी शांतारामांची कथा निवेदकाच्या निवेदनातूनच व्यक्तीवर, घटनांवर वा वृत्तिप्रवृत्तींवर भाष्य करीत करीत

श

अशा एका क्षणाशी येते की, तेथून कथेचा पुढचा रोख पूर्णपणे बदलून जातो. हा परिवर्तनाचा क्षण एक प्रकारे साक्षात्काराचाच क्षण म्हणता येईल. त्या क्षणातून काही वेळा जीवनाचा न्याय, व्यवहार सूचित होतो ('गोपिका'), काही वेळा तो क्षण जीवनाची दिशा बदलून टाकतो ('स्वार्थ-परमार्थ', 'दीक्षा'), काही वेळा तो जीवनसाफल्याचा अनुभव देतो ('ओलावा'), काही वेळा तो पुढचे जीवन जगायला, त्या जीवनाला दिशा लाभायला साहाय्यक ठरतो ('जाणीव').

मानवी जीवनातील वैयक्तिक आणि सामाजिक नीतिमूल्यांचे सजग भान व्यक्त करणारी आणि प्रामाणिकपणा, सत्यनिष्ठा, सामंजस्य या मूल्यांची जपणूक करणारी पात्रसृष्टी शांतारामांनी निर्माण केली आहे. तसेच साठ वर्षांच्या प्रदीर्घ कालखंडात खेड्याकडून शहराकडे, सामंतशाहीकडून लोकशाहीकडे, एकत्र कुटुंबाकडून विभक्त कुटुंबाकडे आणि घराच्या दावणीला बांधलेल्या स्त्रीकडून आत्मभान आलेल्या स्त्रीकडे अशा बहुविध सामाजिक स्थित्यंतरांचा आलेख त्यांच्या कथासाहित्याने रेखाटला आहे.

– प्रा. डॉ. विलास खोले

**संदर्भ :**

*१. खोले विलास; 'शांताराम कथा'; प्रतिमा प्रकाशन, पुणे; १९९८.*

## शिंदे, ताराबाई

☞ **मुख्य नोंद – शिक्षण खंड**

## शिंदे, फकिरा मुंजाजी

**कवी, समीक्षक, अनुवादक,**
**कविसंमेलनाचे प्रभावी सूत्रसंचालक**
**१२ ऑगस्ट १९४८**

फकिरा मुंजाजी शिंदे यांचा जन्म रुपूर (जि. हिंगोली) या गावी झाला. त्यांचे प्राथमिक शिक्षण स्थानिक खाजगी शाळेत, तसेच सालेगावच्या प्राथमिक शाळेत पूर्ण झाले. ते एस.एस.सी. कळमनुरीच्या माध्यमिक शाळेतून उत्तीर्ण



झाले, तर परभणीच्या शिवाजी महाविद्यालयातून त्यांनी बी.ए. पूर्ण केले. डॉ. बाबासाहेब आंबेडकर मराठा विद्यापीठातून त्यांचे एम.ए. (मराठी) पर्यंतचे शिक्षण झाले. १९७२ पासून औरंगाबादच्या देवगिरी महाविद्यालयात ते सुमारे तीस वर्षे मराठीचे प्राध्यापक होते.

लहानपणापासून त्यांना काव्य आणि साहित्याची आवड होती. त्यांची पहिली कविता वयाच्या विसाव्या वर्षी, 'अस्मितादर्श' या मराठी मासिकात प्रसिद्ध झाली. तेव्हापासून (१९६८) कवी म्हणून त्यांना मिळालेली प्रसिद्धी पुढे वाढतच गेली. १९७२ साली 'जुलूस' हा त्यांचा पहिला कवितासंग्रह प्रसिद्ध झाला. त्यानंतर त्यांचे अनेक संग्रह प्रसिद्ध झाले असून त्यांतील काही महत्त्वाचे असे आहेत 'आदिम' (१९७५), 'वृंदगान' (१९७८), 'दिल्ली ते दिल्ली' (१९८३), 'फकिराचे अभंग' (१९८६), 'आई आणि इतर कविता' (१९९०), 'आयुष्य वेचताना' (१९९२), 'भूकंपाची मरणगाणी', 'मनाचे अभंग', (१९९४), 'मेणा' (१९९८), 'मिथक' (२०००), 'सृष्टी' (२००२) इ. यानंतरही त्यांचे कवितालेखन सातत्याने चालू आहे.

फ.मुं.च्या काव्यलेखनात वैविध्य आहे. एकाच प्रकारची कविता त्यांनी लिहिली नाही; त्यामुळेही त्यांच्या वाचकप्रियतेत भर पडत गेली एवढेच नव्हे, तर त्यांचा स्वतःचा एक मोठा चहाता वर्ग निर्माण झाला असून तो दोन पिढ्यांतला आहे. स्वातंत्र्योत्तर काळात जन्मलेला आणि स्वातंत्र्याबरोबर वाढत असलेला हा कवी असल्याने या काळातील सामाजिक, राजकीय, सांस्कृतिक परिस्थिती, जाणिवा, स्पंदने त्यांच्या कवितेत यथार्थतेने प्रकटतात; कारण शिंदे यांनी स्वतःची स्वतंत्र शैली जोपासली आहे. विद्रोहापासून विडंबनापर्यंत आणि उपहासापासून भावदर्शीपणापर्यंत सर्व आविष्कार त्यांच्या कवितेत प्रतिबिंबित होतात. म्हणून ती सर्वस्पर्शी झाली आहे.

बहिणाबाई चौधरींबद्दलच्या साऱ्यांच्याच भावना शिंदे, 'माझी बहिणाई सांगे नीतिविचाराची पोथी। पानपान निसर्गाचं तिच्या आनंदलं हाती॥', अशा शब्दांत नेमकेपणाने व्यक्त करतात. 'स्पर्शातून' ही त्यांची कविताही सामाजिक जाणिवेचं भान असणारी आहे. 'आई'वरची त्यांची कविता सार्वकालिक आहे.

त्यांनी समीक्षात्मक लेखन केले आहे. ते 'स्वान्त' व 'कालमान' या पुस्तकांतून प्रसिद्ध झाले असून त्यांचा एक अनुवादही प्रसिद्ध झाला आहे. काही बालगीतेही त्यांच्या नावावर आहेत. कविसंमेलनांचे सूत्रसंचालन हा त्यांचा स्वतंत्र प्रांत असून त्याच्यावर त्यांची चांगली 'हुकमत' आहे.

– मधू नेने

## शिखरे, दामोदर नरहर

**पत्रकार, चरित्रकार, कादंबरीकार**

**२२ नोव्हेंबर १९०३ – ९ सप्टेंबर १९८०**



दामोदर नरहर शिखरे यांचा जन्म सातारा जिल्ह्यातील उंब्रज येथे झाला. त्यांचे शिक्षण एम.ए.पर्यंत झाले. राष्ट्रप्रेम आणि समाजसुधारणाविषयक तळमळ, त्यामुळे त्यांच्यावर राष्ट्रकार्यास जोडलेले लोकमान्य टिळक, महात्मा गांधी यांचे संस्कार झाले. एम.ए. झाल्यानंतर त्यांनी वृत्तपत्रक्षेत्रात पत्रकार म्हणून काम केले. १९२९ साली ते 'केसरी'त उपसंपादक झाले. 'केसरी'चे धोरण गांधीविरोधी झाल्यानंतर त्यांनी 'केसरी'चे काम सोडले. गांधीवादाचा पुरस्कार करण्यासाठी त्यांनी स्वतःचे 'अग्रणी' (१९३९) हे साप्ताहिक सुरू केले. कालांतराने (३ – ४ वर्षांत) ते बंद पडले.

महात्मा गांधी आणि गांधीवाद हा त्यांच्या चिंतनाचा अन् लेखनाचा विषय होता. 'गांधी जीवनकथा' (१९४२), 'गांधीचरित्र' (१९४४) हे ग्रंथ लिहिताना स्वतःला माहीत झालेले सत्य सर्वांगांनी प्रकट व्हावे, अशी त्यांची भूमिका होती. गांधीजींना अहिंसेचा पाठ कसा मिळाला, त्यांनी पहिला यशस्वी सत्याग्रह कसा केला, दांडीयात्रेने राष्ट्राच्या आत्म्याला कशी हाक घातली, ऑगस्ट आंदोलनाचा ज्वालामुखी कसा भडकला इत्यादींचे चित्रण यात केले आहे.

त्यांनी 'गांधी रणगीता', 'महात्मा गांधी व त्यांचे सहकारी' (१९६९), अशी अनेक पुस्तके लिहिली. गांधी वाङ्मय प्रकाशन समितीतर्फे गांधी वाङ्मयाच्या अनुवादाचे वीस खंड प्रकाशित झाले. 'गांधी गौरव ग्रंथ' (१९६९) हा एक महत्त्वाचा ग्रंथ त्यांनी संपादित केला. 'जातीय ऐक्य' (१९६१), 'अर्थकारण' (१९६२) हे संपादन, अनुवादाचे कार्यही त्यांनी केले.

राजकीय कादंबऱ्यांमध्ये शिखरे यांची 'थोरली आई' (१९३४) ही राजकीय कादंबरी या नात्याने थोर कलाकृती होती. थोरली आई म्हणजे आपली जन्मभूमी. तिच्या सेवेकरिता आपल्या ध्येयवादी प्राध्यापकाच्या मार्गदर्शनानुसार कौटुंबिक स्नेह आणि प्रणयीजनाच्या अनुरागाला बाजूला सारून या कादंबरीचा नायक तुरुंगवास पत्करतो. राजकीय आंदोलनाच्या आणि तुरुंगवासाच्या वर्णनात वास्तवतेची बूज राखण्यात लेखक शिखरे हे यशस्वी झाले आहेत.

ग्रामोद्धाराशी संबंध असलेल्या विविध चळवळीचे चित्रण 'आईची कृपा' (१९३८) या कादंबरीत आहे. 'देशाविषयीची तळमळ' हा 'क्रांतिकिरण' (१९३१) या कथासंग्रहाचा विशेष विषय आहे. आधुनिक एकलव्याच्या 'भावकथा' (१९३३) यात त्यागबुद्धीने दुःख सहन करणाऱ्या दुर्दैवी स्त्रियांचे करुणाजनक चित्रण आहे.

'गंगेचे थेंब' (१९४५), 'टिळकांचे चरित्र' (१९४१), 'डॉ. राधाकृष्णन यांचे चरित्र' (१९४२), 'राष्ट्रमाता कस्तुरबा' (१९४४), 'आजकालचे साहित्यिक' (१९३९) असे चरित्रपर ग्रंथ त्यांनी लिहिले. '१९३५ सालातील मराठी वाङ्मयाचे समालोचन' त्यांनी १९३६ साली 'सह्याद्री'मध्ये लिहिले, तसेच 'सर्वश्रेष्ठ

श

हिंदुधर्म' हा निबंध, 'दिव्यभाव' हे काव्य त्यांनी लिहिले. चरित्रात्मक ग्रंथात आगरकर (१९५०), नेहरू (१९५५), जमनालाल बजाज (१९५६) आदींची चरित्रे, कथा, कादंबऱ्या, नाटके अशी सुमारे १५० पुस्तके त्यांनी लिहिली व प्रकाशित झाली, त्यांत 'डॉन क्विक्झोट' (१९७४) हा अनुवाद, 'हीच माझी कमाई (१९७४) हे आत्मचरित्र यांचाही समावेश आहे.

'मराठीचे पंचप्राण' या ग्रंथमालेतून शिखरे यांनी संतसाहित्यापासून १९५०पर्यंतच्या साहित्याचा सोप्या पद्धतीने करून दिलेला परिचय हा साहित्यविषयक अभ्यास करणाऱ्यांसाठी महत्त्वाचा ऐतिहासिक ऐवज ठरणार आहे.

– डॉ. रजनी अपसिंगेकर

**संदर्भ :**


१. *कुलकर्णी अ. अ., संपादक; 'प्रदक्षिणा', खंड १, २; कॉन्टिनेन्टल प्रकाशन.*

२. *खानोलकर गं. दे.; 'अर्वाचीन मराठी वाङ्मयसेवक', खंड १ ते ४; स्वस्तिक पब्लिशिंग हाउस, मुंबई.*

३. *'मराठी वाङ्मयाचा इतिहास', खंड ५; महाराष्ट्र साहित्य परिषद, महाराष्ट्र राज्य साहित्य आणि संस्कृती मंडळ, पुणे.*


## शिरूरकर, विभावरी

***बेडेकर, मालती विश्राम***

☞ **विभावरी शिरूरकर**

## शिर्के, आनंदीबाई शिवराम

**कथाकार**

**३ जून १८९२ – ३१ ऑक्टोबर १९८६**

'सांजवात' या आत्मचरित्रामुळे मराठी साहित्यात मानाचे स्थान मिळवणाऱ्या आनंदीबाई शिर्के या शंभर वर्षांपूर्वीच्या काळातील एक मान्यवर लेखिका होत. ज्या काळात स्त्री-शिक्षणालाच समाजाचा मोठ्या प्रमाणात विरोध होता, त्या काळात खानदानी मराठा कुटुंबातील या स्त्रीने आपली सुधारक मते ठामपणे मांडली आणि दृढपणाने ती अमलातही आणली.



आनंदीबाई म्हणजे पूर्वाश्रमीच्या अनसूया गोविंदराव शिंदे. त्यांचा जन्म मुंबईतील चिंचपोकळी येथे झाला. त्यांचे मूळ गाव होते पुणे जिल्ह्यातील मंचर तालुक्यातील रांजणी, पण आजोबा व्यापारानिमित्त चिंचपोकळीला स्थायिक झाले होते. त्या काळच्या प्रथेप्रमाणे त्यांचा बालविवाह झाला नव्हता. वयाच्या अठराव्या वर्षापासून त्या लेखन करू लागल्या होत्या. 'मराठा मित्र'मध्ये त्यांची 'बेगम आरा' ही कथा प्रकाशित झाली, त्या वेळी 'मराठा मित्र'चे सहसंपादक शिवराम शिर्के यांच्याशी त्यांचा परिचय झाला. त्यातूनच दोघांचा पत्रव्यवहार व नंतर स्नेह वाढला. दोघांचा विवाह होण्यात दोन्ही पक्षांचा विरोध होता, तसेच कोकणातले खानदानी शिर्के व देशावरील शिंदे यांच्यातील विवाहाला तत्कालीन मराठा समाजातूनही फार मोठा विरोध झाला. अखेरीस, १८ डिसेंबर १९१३ रोजी, वयाच्या एकविसाव्या वर्षी त्यांचा विवाह झाला. विवाहानंतर काही वर्षे त्यांचे वास्तव्य जळगाव व नंतर पुणे येथे होते.

आनंदीबाईंचे वडील बडोद्याला गायकवाड सरकारच्या सेवेत नोकरी करीत असल्यामुळे आनंदीबाईंचे बालपण गुजरातमधील नवसारी, पाद्रा, बडोदा, मेहसाणा येथे गेले. तेथील विविध गुजराती शाळांमधून त्यांचे शिक्षण झाले. परंतु, कौटुंबिक अडचणींमुळे शिक्षणात खंड पडला. त्यांनी नर्सिंगचे शिक्षण घेतले; पण त्यालाही घरातून विरोध होता. त्याच काळात लेखनाची आवड उत्पन्न होऊन त्यांनी 'कुमारी आनंदी' या नावाने कथालेखन सुरू केले.

१९१०मध्ये त्यांची पहिली कथा 'शारदाबाईंचे संसारशिल्प' 'मासिक मनोरंजन'मध्ये प्रसिद्ध झाली. त्याच वर्षी 'मासिक मनोरंजन'मध्येच त्यांचा 'स्वच्छता' हा निबंध प्रसिद्ध झाला. विवाहानंतर पती शिवरामपंत शिर्के यांच्या साहित्यक्षेत्रातील वावरामुळे आनंदीबाईंचा अनेक नामवंत साहित्यिकांशी परिचय होऊन मैत्री झाली. श्री. कृ. कोल्हटकर, प्र. श्री. कोल्हटकर, भा. ल. पाटणकर,

श

तिचें असे मनोमंथन चाळलें असतां सारी सभा कशी चित्रासारखी स्तब्ध झाली होती. कुणी कुणी आश्चर्याने आ वासला होता, त्यांना तोंड मिटून घेण्याची शुद्ध उरली नव्हती. जो तो आपल्या नेत्रांनीं त्या अधोमुखीला जणू प्राशन घेत होता. डाळिंबाच्या फुलाच्या रंगाचे ओष्ठद्वय. चाफेकळी सारखी सरळ नासिका. पारिजातकाच्या नाजूक फुलासारखा टवटवीत गौरवर्ण. डौलदार बांधा. सारें कसे आकर्षक होतें. सारी सभा विधात्याचें तें अपूर्व कौशल्य तन्मयतेने पहात होती. तिथून दृष्टि काढून घेणें कुणाच्या स्वाधीनचें राहिलें नव्हते. त्या स्तब्धतेचा भंग करीत महाराज म्हणाले, "अहाहा! काय हें अपूर्व लावण्य! जगांत एक असेंच हें स्त्री-रत्न आहे खरं!"

हे ऐकताच साऱ्यांच्या नजरा लक्ष्मणी महाराजांच्याकडे वळल्या. त्यांत ओतप्रोत विस्मय होता. कांहीं निराळेंच कानीं पडल्याचा विषाद होता. महाराज पुढें म्हणाले. "आमच्या मासाहेब जर अशा सुंदर असत्या तर आम्हीं सुद्धां असेच बहुत सुंदर झालों असतों! नाहीं का?" हे ऐकतांच कानांत एकाग्रित होऊन बसलेले साऱ्यांचे प्राण स्वस्थानीं गेले. ..... धन्य धन्य महाराज! धन्य धन्य जिजाई मातुःश्री! त्रिवार धन्य! असा साऱ्यांनीं जयजयकार केला.

धीरगंभीरवाणीनें महाराज म्हणाले. "आबाजी आणि सभाजन हो. स्त्रिया मग त्या कोणत्याहि जातीजमातीच्या असोत. त्या आमच्या माता-भगिनी आहेत असे आम्हीं मानतों. आमच्या राज्यांत स्त्रियांचा अवमान होता कामा नये हें लक्षांत ठेवा. स्त्रियांचा अपमान म्हणजे राज्याचा ऱ्हास हें पक्के लक्षांत असूं द्या!"

आनंदीबाई शिर्के.

वि. द. घाटे यांच्या सल्ल्याने इतिहासाच्या पुस्तकांसाठी त्यांनी लेखन केले. अनेक गुजराती पुस्तकांचे अनुवादही त्यांनी केले आहेत. 'सांजवात' हे त्यांचे आत्मचरित्र १९७२ साली, म्हणजे वयाच्या ऐंशीव्या वर्षी प्रकाशित झाले. वि. द. घाटे यांची प्रस्तावना त्याला लाभली आहे. हे आत्मवृत्त अत्यंत प्रांजल, हृदयस्पर्शी व वाचकाला अंतर्मुख करणारे आहे. माधवराव पटवर्धन, वि. द. घाटे, केशवराव सोनाळकर इत्यादी साहित्यिकांचे विविध प्रसंगांचे उल्लेख 'सांजवात'मध्ये आले आहेत.

१९२८ मध्ये त्यांचा पहिला कथासंग्रह 'कथाकुंज' प्रकाशित झाला. त्याला श्री. कृ. कोल्हटकरांची प्रस्तावना लाभली आहे. १९३४ मध्ये 'कुंजविकास' हा कथासंग्रह, १९३९ मध्ये 'जुईच्या कळ्या' हा कथासंग्रह, १९४३ मध्ये 'भावनांचे खेळ व इतर गोष्टी' (कथा), १९६४ मध्ये 'साखरपुडा' (कथा), १९५८ मध्ये 'तृणपुष्पे', १९८१ मध्ये 'गुलाबजाम' (कथा) याचबरोबर, 'रूपाळी' ही कादंबरी व बालसाहित्याच्या दालनात 'कुरूप राजकन्या', 'तेरावी कळ व इतर गोष्टी', 'वाघाची मावशी व इतर गोष्टी' हे त्यांचे बालकथासंग्रह प्रसिद्ध आहेत.

निबंध, कथा, बाल-साहित्य, स्त्री-साहित्य, अनुवादित साहित्य, आत्मवृत्त अशी बहुविध साहित्यनिर्मिती आनंदीबाईंनी केली. स्त्रियांशी निगडित अशा सामाजिक समस्यांचे चित्रण, पुरोगामी विचारसरणी, मराठा समाजातील स्त्रियांची स्थिती, गुजरातमधील सामाजिक वातावरण, जुन्या मराठी भाषेतील शब्द व म्हणींचे वैपुल्य ही त्यांच्या रचनेची वैशिष्ट्ये होती.

त्यांच्या प्रारंभीच्या कथांवर वि. सी. गुर्जरांच्या प्रणयकथांचा प्रभाव पडलेला दिसून येतो. पण, नंतर त्यांच्या शैलीत लक्षणीय बदल झालेला आढळतो. नर्मशृंगार सहजतेने कथेत आणणाऱ्या त्या पहिल्या स्त्री-कथाकार होत्या हे त्यांच्या 'दाम्पत्य जीवन'सारख्या कथेतून दिसून येते. स्वभावचित्रणावरील कौशल्य, तंत्रावरील हुकमत व स्त्रियांच्या भाषेचा परिणामकारक वापर यांमुळे समकालीन काळातील त्या महत्त्वाच्या स्त्री-लेखिका ठरतात.

१९३६ मध्ये जळगाव येथे भरलेल्या अ. भा. मराठी साहित्य सम्मेलनाचे अध्यक्ष माधवराव पटवर्धन (माधव जूलियन) होते. त्या सम्मेलनात स्वागताध्यक्षपदाचा सन्मान या स्त्री-लेखिकेला मिळाला होता. त्या वेळी त्यांनी केलेल्या भाषणाला वृत्तपत्रांमधून खूप प्रसिद्धी

मिळाली होती. १९३८ मध्ये पुणे येथे झालेल्या अ. भा. मराठा महिला परिषदेच्या अध्यक्ष म्हणून आनंदीबाईंची निवड झाली होती.

पुणे येथे आकाशवाणीवर अनेक प्रसंगी, अनेक विषयांवरील त्यांची भाषणे गाजली. अत्यंत विचारी, संयमी, कष्टाळू, प्रगल्भ, चिंतनशील अशा आनंदीबाईंची लेखनशैली अतिशय प्रसन्न व मधुर होती.

मराठी साहित्य परिषदेच्या वर्धापन दिनानिमित्त दरवर्षी उत्तम कथासंग्रहासाठी 'आनंदीबाई शिर्के' पारितोषिक दिले जाते. त्या निमित्ताने गतशतकातील या महत्त्वपूर्ण लेखिकेचे स्मरण महाराष्ट्रात केले जाते.

– सविता टांकसाळे

**संदर्भ :**

*१. खांडगे मंदा, दीक्षित लीला, संपादक; 'स्त्री साहित्याचा मागोवा', खंड २; साहित्यप्रेमी भगिनी मंडळ.*

## शुक्ल, सदाशिव अनंत

**कथाकार, कादंबरीकार, कवी, नाटककार, गीतकार**

**२६ मे १९०२ – २७ जानेवारी १९६८**



साहित्याच्या कथा, कादंबरी, काव्य, नाटक अशा विविध क्षेत्रांत सदाशिव अनंत शुक्ल सुमारे चाळीस वर्षे कार्यरत होते. 'भरारी' (१९३७), 'कागदी बदाम' (१९४२), 'आठवा सर्ग आणि इतर लघुकथा' (१९४६) आणि 'असत्याचे प्रयोग' (१९५९) हे त्यांचे कथासंग्रह प्रसिद्ध झाले आहेत. 'शेठ! एक सिंगल'सारखी एखादीच कथा चांगली, परिणामकारक उतरली आहे असा समीक्षक अ. ना. देशपांडे यांचा त्याबाबत अभिप्राय आहे. 'कमलेची कहाणी' या कादंबरीव्यतिरिक्त त्यांनी 'तीन आणे माला'मधून लघुकादंबऱ्या लिहिल्या.

शुक्ल यांची विशेष प्रसिद्धी कवी व गीतकार म्हणून आहे. श्री. ग. त्र्यं. माडखोलकरांच्या मते, 'शुक्ल यांच्या 'काळाचा खेळ' या खंडकाव्याला सोडून बहुधा सर्वच कविता भावनात्मक आहे.... आनंदाच्या व उद्वेगाच्या फार सूक्ष्म नव्हेत, अशा भावनामात्र ते चांगल्या रितीने रेखाटतात... स्वतःचे आणि समाजाचे दुःख तीक्ष्ण शब्दांनी बोलून दाखविण्याची त्यांना फार हौस आहे... 'काळाचा खेळ' या खंडकाव्याची भाषा शुक्ल सफाईने व सहज लिहितात.'

जुनी मराठी वृत्ते वापरण्याच्या फंदात ते पडले नाहीत. त्यांची 'वंदे मातरम्', 'प्रेमाची फसवणूक', 'भवानी तलवार', 'बा कदंबा!' वगैरे अनेक गीते प्रमुख नियतकालिकांतून प्रकाशित झाली. शुक्ल म्हणतात, '१९३४ पासून ध्वनिमुद्रणासाठी आणि पुढे चित्रपटांसाठीही मी गीते लिहू लागलो, आणि गेल्या वीस वर्षांत तीच माझ्या हातून शेकडो लिहिली गेली (१९५५).'

'सौभाग्यलक्ष्मी' या शुक्लांच्या पहिल्या स्वतंत्र, सामाजिक नाटकाविषयी प्रिं. गोविंद चिमणाजी भाटे लिहितात,'ते विधवाविवाहाला जनमत अनुकूल करून घेण्याच्या बुद्धीने लिहिले आहे.' याच विषयावर गडकरी यांनी लिहिलेल्या नाटकासही भाटे यांनीच प्रस्तावना लिहिली होती. त्यांनी 'सिंहाचा छावा' हे अभिमन्यूच्या वधासंबंधी नाटक; 'स्वर्गावर स्वारी', 'साक्षात्कार' (आम्ही एकशे पाच –१९३०), 'सत्याग्रही' ही पौराणिक व 'साध्वी मीराबाई' (ऐतिहासिक) अशी नाटके लिहिली. त्यांतली पदे अतिशय लोकप्रिय झाली.

प्रचलित, राजकीय व सामाजिक विचारांचा धागा गुंफण्याची प्रवृत्ती शुक्लांच्या पौराणिक नाटकांत दिसते. दैवी चमत्कारांचा आश्रय घेतल्याने, 'नाट्यरूप प्रयत्नातली परिणामकारकता कमी झालेली आहे' असे श्री. अ. ना. देशपांडे यांनी म्हटले आहे. शालेय जगतातल्या त्यांच्या काही ('जंगल्या भिल्ल', 'नवलनगरची राजकन्या') नाटकांनी रमविले यात शंका नाही. जातिभेद नष्ट करण्याची जरुरी पटविण्यासाठी शुक्लांनी 'झुणका भाकर'सारखी प्रचारकी स्वरूपाची नाटिका लिहिली.

शुक्ल यांनी जॉन स्टाइनबेकच्या 'द मून इज डाउन' या कादंबरीचा 'नवी राजवट' हा अनुवाद केला होता. ख्यातनाम गायकांच्या ध्वनिमुद्रिकांनी शुक्लांच्या गाण्यांना घरोघर पोहोचवले होते; कारण तो भावगीतांच्या बहराचा काळ होता. 'हर हर महादेव' या तीन अंकी संगीत पौराणिक नाटकाच्या आत्तापर्यंत सात आवृत्त्या निघाल्या. याचा पहिला प्रयोग विजयानंद नाट्यगृह, पुणे येथे १९२८मध्ये झाला होता. या नाटकाच्या कथानकावरून 'मिनर्व्हा मुव्हिटोन'ने सोहराब मोदी दिग्दर्शित भव्य हिंदी चित्रपट 'नृसिंहावतार' १९४७ साली प्रकाशित केला.

'कुमुदबांधव' या टोपणनावाने कविता लेखनास आरंभ करणाऱ्या सदाशिव अनंत शुक्लांनी 'प्रेम मरता काय उरले हाय संसारी आता' असे उद्गार काढूनही, 'देशभक्त मोक्षदाता मंत्र वंदे मातरम्। हिंदवीरा सत्त्वधीरा! बोल वंदे मातरम्।।', असा अमोल व प्रेरक मंत्र जनतेला दिला.

– वि. ग. जोशी

**संदर्भ :**


१. *शुक्ल स. अ.; 'कागदी बदाम'; रामकृष्ण प्रकाशन मंडळ, मुंबई; १९४२.*
२. *शुक्ल स. अ.; 'साध्वी मीराबाई'; 'परचुरे, पुराणिक आणि मंडळी'; मुंबई; १९३०.*
३. *शुक्ल स. अ.; 'सौभाग्यलक्ष्मी'; 'यशवंत संगीत नाटक मंडळी, पुणे; १९२५.*
४. *शुक्ल स. अ.; 'जयजयवंती' केशव भिकाजी ढवळे, मुंबई; १९५५.*
५. *देशपांडे अ. ना.; 'आधुनिक मराठी वाङ्मयाचा इतिहास', भाग दुसरा; व्हीनस प्रकाशन, पुणे; पुनर्मुद्रण १९७०.*


## शेवडे, इंदुमती रामकृष्ण

**कथाकार, कादंबरीकार, प्रवासवर्णनकार, संशोधक, समीक्षक**

**१६ ऑक्टोबर १९१७ – १४ मार्च १९९२**

इंदुमती शेवडे ह्यांचा जन्म शिवनी (मध्य प्रदेश) येथे झाला. त्यांनी इंग्रजी विषयात एम.ए. पदवी प्राप्त केली. विवाहानंतर त्या नागपूरला आल्या. मराठी लघुकथा या विषयावर त्यांनी पीएच.डी. मिळविली. नागपूरहून प्रसिद्ध



होणाऱ्या 'इण्डिपेन्डन्ट' या साप्ताहिकाच्या उपसंपादक, पत्रकार म्हणून काम केल्यावर प्रथम १९५७पासून १९६८पर्यंत आकाशवाणीत व नंतर १९६८पासून १९७५पर्यंत लोकसेवा आयोगात मराठी विभागप्रमुख म्हणून त्या कार्यरत होत्या. इंदुताई शेवडे यांच्या लेखनाला सुरुवात कथेपासून झाली.

'मिर्झा गालिब' (१९८०) ही कादंबरी; 'आम्ही तो बदनाम' (१९८८) ही गोविंदपंत बुंदेले यांच्याविषयीची चरित्रात्मक कादंबरी; 'बाबा नावाचा झंझावात' (१९९१) हे बाबा आमट्यांच्या जीवनासंबंधीचे कादंबरीरूप चरित्र; 'गणदेवता', 'आपका बंटी' या कादंबऱ्यांचे अनुवाद; 'पु. य. देशपांडे' हा परिचयपर दीर्घलेख असे त्यांचे विविध स्वरूपाचे लेखन प्रसिद्ध आहे. लघुकथाविषयक प्रबंधामुळे त्यांच्या एकूणच लेखनाला एक चिकित्सक परिमाण लाभले आहे. मौलिकता प्राप्त अशा या लेखनाचे श्रेय इंदुमती शेवडेंना दिले जाते.

– प्रा. अनुराधा साळवेकर

## शेवाळकर, राम बाळकृष्ण

**वक्ते, ललितनिबंधकार, समीक्षक, संपादक, संशोधक**

**२ मार्च १९३१ – ३ मे २००९**

वक्ते, ललितनिबंधकार, समीक्षक, संपादक, संशोधक राम शेवाळकर यांचा जन्म बाळकृष्ण व गोपिका ह्या दाम्पत्याच्या पोटी, विदर्भाच्या अमरावती जिल्ह्यातील अचलपूर (जुने एलिचपूर) ह्या गावी झाला. हिंगोली – नांदेड मार्गावर कयाधू नदीकाठावरचे शेवाळा हे शेवाळकर घराण्याचे मूळ गाव. हे घराणे धार्मिक, परंपरावादी, कीर्तन – प्रवचनाची व साधुपुरुषांची परंपरा असलेले होते. मूळ आडनाव धर्माधिकारी. पणजोबा रामशास्त्री उपाख्य



रामकृष्णानंदस्वामी महाराज हे तत्कालीन ख्यातनाम प्रवचनकार होते. वडील बाळकृष्ण उर्फ भाऊसाहेब हेसुद्धा कीर्तनकेसरी म्हणून विख्यात होते.

त्यांचे प्राथमिक ते मॅट्रिकपर्यंतचे शिक्षण अचलपूरच्या नगरपरिषद शाळांमध्ये झाले, तर पुढचे महाविद्यालयीन शिक्षण अमरावतीच्या विदर्भ महाविद्यालयात झाले. तिथेच शेवाळकरांच्या व्यक्तित्वाची व वक्तृत्वाची जडणघडण होत गेली. लेखक, वक्ता व सार्वजनिक कार्यकर्ता या तीनही भूमिकांची पायाभरणी अमरावतीला झाली असे शेवाळकरांनी स्वतः नमूद केले आहे. १९५०मध्ये बी.ए. झाल्यावर नागपूरच्या मॉरिस महाविद्यालयामधून त्यांनी संस्कृत विषयात एम.ए.ची पदवी प्राप्त केली. दरम्यान, नागपुरातच कवी - साहित्यिकांच्या सहवासात त्यांच्या काव्यलेखनाला प्रारंभ झाला व साहित्यविषयक जडणघडण होत गेली. त्यानंतर वाशीमच्या शासकीय शाळेत शिक्षक म्हणून त्यांनी अध्यापनास शुभारंभ केला. पुढे यवतमाळच्या 'यवतमाळ महाविद्यालया'त ते प्राध्यापक म्हणून रुजू झाले. त्याच काळात खासगीरीत्या मराठी विषयात एम.ए.ची पदवी ना.के. बेहेरे सुवर्णपदकासह त्यांनी नागपूर विद्यापीठातून प्राप्त केली. १९५५ ते ६५ या कालावधीत पीपल्स कॉलेज नांदेड येथे मराठीचे अध्यापक व पुढे १९६५ ते १९८८ या दीर्घकाळात लोकमान्य टिळक महाविद्यालय वणी, जि. यवतमाळ येथे प्राचार्यपदावर कार्य केले. आपल्या कार्यकाळातून त्यांनी वणीमध्ये अनेक साहित्यिक, सांस्कृतिक, शैक्षणिक, सामाजिक उपक्रमांचा श्रीगणेशा केला आणि विदर्भातील सांस्कृतिक चळवळीचे एक केंद्र म्हणून त्यास नावारूपास आणले. ह्याच काळात शेवाळकरांच्या व्यक्तिमत्त्वाचे प्रभावी वक्ता आणि सांस्कृतिक, सामाजिक चळवळीतील कार्यकर्ता व नेता हे पैलू विदर्भात व महाराष्ट्रात सुप्रतिष्ठित झाले.

साठोत्तरकालीन महाराष्ट्राचे सांस्कृतिक नेतृत्व करतानाच मराठी रसिकांच्या अभिरुचीची जडणघडण ज्या काही मंडळींनी केली, त्यांमध्ये शेवाळकरांचे नाव अग्रस्थानी घ्यावे लागते. ललित लेखक किंवा समीक्षक किंवा संशोधक - संपादक म्हणून मराठी साहित्यविश्वात फारशी मान्यता न मिळताही जे नेतृत्व व मानसन्मान त्यांना मिळाले, ते केवळ त्यांच्या प्रभावी वक्तृत्वशैलीमुळे! रसाळ, ओघवती, संदर्भसंपृक्त, प्रसन्न, सोज्ज्वळ, शैलीदार आणि पल्लेदार अशा वाक्‌कौशल्यामुळे ते साहित्यजगतात व मराठी रसिकविश्वात मान्यता पावले. भारतात आणि जगात जिथे-जिथे मराठी समाज आहे, तिथे-तिथे शेवाळकरांची विविध विषयांवरची व्याख्याने झालेली आहेत. रामायण, महाभारत, त्यांतील विविध व्यक्तिरेखा, ज्ञानेश्वर, स्वा. सावरकर, प्राचीन मराठी साहित्य, विनोबा आणि त्यांचे विचार, गांधीजी आणि त्यांचे विचार, भारतीय तत्त्वज्ञान, भारतीय परंपरा आणि संस्कृती, आधुनिक मराठी साहित्य आणि साहित्यिक इत्यादी विषयांवर त्यांनी शेकडो व्याख्याने गुंफली.

रूढ अर्थाने ते साहित्यिक ठरले नाहीत, तरी वाणीमय वाङ्मयाचे ते श्रेष्ठतम निर्माते ठरले. त्यांचे वक्तृत्व हेच त्यांचे वाङ्मयीन कर्तृत्व ठरले. त्यांच्या भाषणांचे एक संपादन 'वक्ता दशसहस्रेषु' (सं. डॉ. वि. स. जोग, विदर्भ साहित्य संघ, १९९४) व निरूपणांची तीन ग्रंथरूपे 'अवसेचे चांदणे' (मानसन्मान प्रकाशन, पुणे, १९९६), 'अमृताचा घनु' (नीलकंठ प्रकाशन, पुणे, १९९९), 'गाभारा' (साहित्य प्रसार केंद्र, नागपूर, २००१) प्रसिद्ध आहेत. याशिवाय काही ध्वनिफिती व चित्रफिती प्रसिद्ध आहेत. त्यात स्वा. सावरकर, योगेश्वर कृष्ण, विनोबा, कर्ण, कानडा वो विठ्ठलु, ज्ञानेश्वरमाउली, पसायदान इत्यादींचा समावेश होतो.

त्यांच्या लिखित वाङ्मयनिर्मितीतही वक्तृत्व प्रक्रियेचा मोठा वाटा आहे. भाषणासाठी पूर्वतयारीतून व भाषणांमधून त्यांच्या अनेक लेखसंग्रहांची निर्मिती झाली. त्यांच्या कवितेवर आणि लेखनशैलीवर वक्तृत्वाचा प्रभाव स्पष्टपणे जाणवतो. वक्ता - व्याख्याता शेवाळकरांच्या

मध्यवर्ती व्यक्तिमत्त्वाचे ते साहित्यरूप आविष्कार ठरले.

'असोशी' या १९५६ मध्ये प्रकाशित काव्यसंग्रहापासून सुरू झालेला त्यांचा वाङ्मयप्रवास शंभरावर ग्रंथनिर्मिती करीत आज 'पाणियावरी मकरी' (२००७) या आत्मचरित्रापर्यंत येऊन विसावला आहे. यात प्रामुख्याने काव्य, ललित निबंध, वैचारिक गद्य, चरित्र, आत्मचरित्र, समीक्षा, संपादन इत्यादी साहित्यव्यवहारांत त्यांनी मुशाफिरी केली. त्यांचे 'रेघा' (१९६७) व 'अंगारा' (१९८९) हे इतर दोन काव्यसंग्रह आणि 'उजेडाची झाडे' (१९६४), 'अमृतसरी' (१९७६), 'त्रिदल' (१९७६), 'सारस्वताचे झाड' (१९८९), 'पूर्वेची प्रभा' (१९८८), 'प्रवास आणि सहवास' (१९९८), 'मोरपीस' (२००१), 'रामसेतू' (२००४), 'माणिकाच्या वाती' (२००५), 'आकार आणि सुवास' (२००६) इत्यादी अनेक ललितनिबंधसंग्रह प्रसिद्ध आहेत. ललितनिबंधाच्या 'आठवणी – अनुभव', 'लघुनिबंध', 'व्यक्तिचित्र', 'प्रवासलेख' आणि 'ललितलेख' ह्या पाच उपप्रकारांत समाविष्ट होणाऱ्या लेखनांत लालित्य आणि वैचारिकता ह्यांच्या सम्यक समन्वयातून आकारास आलेले दिसतात.

शेवाळकरांनी ह्याशिवाय केलेले संशोधन संपादनकार्यही मराठी साहित्यासाठी महत्त्वाचे ठरणारे आहे. त्यांच्या महत्त्वपूर्ण संपादनांमध्ये 'यशोधन' (डॉ. य. खु. देशपांडे, १९८८), 'अक्षरमाधव' (डॉ. बापूजी अणे, खंड १ व २, अनुक्रमे १९६९ व १९८१), 'निवडक मराठी आत्मकथा' (साहित्य अकादमी, १९९४), 'लोकमान्य टिळकांचे निबंध' (नॅशनल बुक ट्रस्ट, १९९९), 'तुलाधर', 'चित्रगुप्त', 'त्रिविक्रम' (वा. ना. देशपांडे, खंड १, २ व ३, २००४) इत्यादींचा समावेश होतो. याशिवाय अनेक गौरवग्रंथ – स्मृतिग्रंथ समित्यांचे अध्यक्ष व संपादक म्हणूनही त्यांनी कार्य केले.

नवोदितांना प्रोत्साहन देण्यासाठी नानासाहेबांनी अक्षरशः शेकडो ग्रंथांना प्रस्तावना लिहिल्या. ग्रंथनिर्मितीविषयक शासकीय व अशासकीय समित्यांवर कार्य करताना अनेक शिक्षणक्रमविषयक व अन्य पुस्तकांच्या – प्रकल्पांच्या निर्मितीत त्यांनी मार्गदर्शन केले. 'श्रीवत्स' आणि 'दीपकळी' या दोन वार्षिकांकांचे संपादनही त्यांनी केले.

शेवाळकरांच्या कार्यकर्तृत्वाची व्याप्ती साहित्याला लागूनच विशाल अशा संस्कृतीच्या परिघापर्यंत पसरली आहे. समाजप्रबोधनाचे कार्य करणाऱ्या विविध संस्थांची निर्मिती त्यांनी केली, तसेच अशा अनेक संस्थांचे मार्गदर्शक – आधार ते बनले. पु.भा. स्मृती समिती, विश्व संतसाहित्य प्रतिष्ठान, मध्यभारत संशोधन संस्था, विदर्भ साहित्य संघ, म. रा. पाठ्यपुस्तक निर्मिती व अभ्यासक्रम मंडळ, अ. भा. सानेगुरुजी कथामाला, महाराष्ट्र साहित्य परिषद, विश्वकोश निर्मिती मंडळ, साहित्य अकादमी, म. रा. साहित्य व संस्कृती मंडळ, नागपूर विद्यापीठ मराठी प्राध्यापक परिषद इत्यादी अनेक संस्थांचे ते सक्रिय पदाधिकारी होते. या कार्यात शेवाळकरांचा पक्ष – विचारधारा निरपेक्ष व केवळ समाजसापेक्ष अशा दृष्टिकोनातून दिसून येतो. विशेषतः, गांधीवादी – सर्वोदयी अशा वर्तुळात ते वावरले तरी हिंदुत्ववादी वा अन्य विचारविश्वाचे त्यांनी वावडे मानले नाही. गांधीजी आणि गुरुजी किंवा विनोबा आणि सावरकर अशी परस्परविरोधी मानली जाणारी व्यक्तिमत्त्वे शेवाळकरांच्या कार्यप्रवासात एकत्र नांदली.

अनेक आघाड्यांवर काम करणाऱ्या शेवाळकरांच्या वाट्याला साहित्य – संस्कृतीच्या क्षेत्रातील अनेक प्रमुख मानसन्मान सहजपणे आले. विदर्भ साहित्य सम्मेलन, भंडारा, १९७८, अ. भा. मराठी साहित्य सम्मेलन, पणजी, गोवा, १९९४, बृहन्महाराष्ट्र मंडळ अधिवेशन, बोस्टन, अमेरिका १९९७, जागतिक मराठी सम्मेलन, नागपूर, २००४ इत्यादींची अध्यक्षपदे त्यांनी भूषविली. दीनानाथ मंगेशकर प्रतिष्ठान कुसुमाग्रज पुरस्कार (१९९९), मानद डी.लिट. नागपूर विद्यापीठ (२००१), डॉ. सर्वपल्ली राधाकृष्णन पुरस्कार (२००१), अ. भा. कीर्तनकुल समाजभूषण पुरस्कार (२००३), विदर्भ गौरव (२००३), वि. सा. संघाचा जीवनव्रती पुरस्कार (२००६), इत्यादी अनेक पुरस्कार त्यांना प्राप्त झाले.

२००६ हे शेवाळकरांचे अमृतमहोत्सवी वर्ष संपूर्ण महाराष्ट्रात अनेक सत्कारसमारंभांसह आयोजित करण्यात आले. त्यांच्या व्यक्तिमत्त्वाचा लोकसंग्रह – गुणसंग्राहक लोकनेता हा पैलू या निमित्ताने उजळून निघाला. 'मराठी कविता: परंपरा आणि दर्शन' (संपादक: डॉ. रवींद्र शोभणे, विजय प्रकाशन, नागपूर २००६) हा गौरवग्रंथ यानिमित्त प्रकाशित झाला. डॉ. मेधा देशपांडे यांचा 'राम शेवाळकर : शारदीय चांदणे' (विसा बुक्स, नागपूर २००७) हा ग्रंथही प्रकाशित झाला आहे. शिवाय 'शेवाळकर नावाचा माणूस' (माधव सरपटवार, २००५), 'पत्रसंवाद' (शोभा उबगडे, २००५), 'प्राचार्य राम शेवाळकर : साहित्यसूची' (डॉ. व. वि. कुलकर्णी, २००७) ही पुस्तके त्यांच्या कार्यकर्तृत्वाचा वेध घेतात.

ललित साहित्यिक, संपादक, संशोधक, अध्यापक, संघटक, शिक्षणतज्ज्ञ इत्यादी अनेक पैलूंनी त्यांचे व्यक्तिमत्त्व बहरलेले असले तरी समकाळातील सर्वश्रेष्ठ मराठी भाषक वक्ते हाच त्यांच्या व्यक्तित्वाचा प्रधान पैलू असल्याचे दिसून येते.

– डॉ. राजेंद्र नाईकवाडे

**संदर्भ :**

*१. शेवाळकर राम; 'पाणीयावरी मकरी' (आत्मचरित्र); साहित्य प्रसार केंद्र, नागपूर; २००७.*

*२. डॉ. देशपांडे मेघा; 'राम शेवाळकर :शारदीय चांदणे'; विसा बुक्स, नागपूर; २००७.*

*३. सरपटवार माधव; 'शेवाळकर नावाचा माणूस'; साहित्य प्रसार केंद्र, नागपूर; २००५.*

## शेळके, उद्धव जयकृष्ण

**कथाकार, कादंबरीकार**

**८ ऑक्टोबर १९३१ – ३ एप्रिल १९९२**

आचार्य अत्रे यांना कादंबरीचा विषय बनवून त्यावर 'साहेब' नावाची कादंबरी लिहिणारे उद्धव ज. शेळके हे एक वैशिष्ट्यपूर्ण लेखक ठरले. 'साहेब'मध्ये त्यांनी आ. अत्रे यांच्या व्यक्तिमत्त्वाचे विविध पैलू चांगल्या रितीने



दाखविले. तसेच, त्यांचा जीवनविषयक दृष्टिकोन काय होता, हेही त्यांनी स्पष्ट केले. कादंबरीकार उद्धव शेळके यांचा जन्म हिंगणघाट, जिल्हा वर्धा येथे झाला. शिक्षण संपल्यावर त्यांनी 'हिंदुस्थान' दैनिकात सहसंपादक म्हणून काम केले. त्यानंतर त्यांनी अमरावतीला डॉ. शिवाजीराव पटवर्धन यांनी स्थापन केलेल्या 'जगदंबा कुष्ठनिवासातील मुद्रणालयात व्यवस्थापक म्हणून काम केले. पुढे काही काळ 'किशोर' या मुलांसाठी असलेल्या मासिकाचे संपादकपद त्यांनी सांभाळले.

ही कामे करत असताना त्यांनी जीवनात जे पाहिले, ऐकले, अनुभवले; त्यांतून त्यांच्या लेखनाकृती तयार झाल्या. 'अगतिका', 'आग', 'आडवाट' वगैरे त्यांच्या कादंबऱ्या असून 'शिळान' हा त्यांचा कथासंग्रह प्रातिनिधिक समजायला हरकत नाही. याशिवाय त्यांनी नाटक, बालवाङ्मय, वैचारिक वाङ्मय या क्षेत्रांतही मुशाफिरी केली.

'अनौरस' ही त्यांची संपादकाच्या जीवनावर लिहिलेली कादंबरी असून तीमध्ये त्यांनी मनुष्यस्वभावाच्या विविध छटांचा चांगला मागोवा घेतलेला आहे. कुलशीलाच्या गोष्टी करून स्त्रीला फसविणाऱ्या दांभिक पुरुषवर्गावरची कडवट टीका त्यांच्या 'देवदासी' या लघुकादंबरीत आलेली आहे. सुहास मंगेशकर ही या कादंबरीची नायिका, एका देवदासीची मुलगी, शिकलेली व सुसंस्कृत. देवदासीची मुलगी म्हणून तिचे लग्न जमत नाही, पण तिचा वापर करून घ्यायला मात्र पुरुष तयार. म्हणून ढोंगी पुरुषांबद्दल सुहासच्या मनात चीड, तुच्छता आहे. हाच या कादंबरीचा विषय आणि आशय. 'अजब तुझा संसार'मध्ये एका विषयासक्त स्त्रीशी लग्न करून उद्ध्वस्त झालेल्या मनुष्याची परवड आलेली आहे.

'धग' ही १९६० साली प्रसिद्ध झालेली शेळके यांची सर्वांत श्रेष्ठ म्हणता येईल अशी कादंबरी आहे. कौतिक

या कादंबरीची नायिका आहे. गरिबीसह अनेक संकटांची धग तिला भाजू पाहते. पण, अशा विपरीत परिस्थितीशी कुठेही, कधीही न वाकता झुंज घेणारे विलक्षण पीळदार, तसेच चटका लावणारे हे व्यक्तिमत्त्व आहे. लेखकाने संपूर्ण कादंबरी वऱ्हाडी ग्रामीण बोलीत लिहिल्यामुळे तिची शैलीही वाचकाचे लक्ष वेधून घेते.

'शिळान' हा शेळके यांच्या अनेक कथासंग्रहांपैकी एक कथासंग्रह. यातील ज्या-ज्या कथांमधून स्त्री-नायिका आलेल्या आहेत, त्या सर्व नायिका विदर्भातील खेड्यांतील आहेत. त्या अत्यंत गरीब आहेत. पण तरीही, कुणासमोरही न वाकता जीवनाच्या खडबडीत रस्त्यावरून त्या संसाराचा गाडा जिद्दीने ओढत आहेत.

श्री. शेळके यांच्या सर्वच लेखनांतून वैदर्भीय जीवन प्रकट होते. त्यांनी विपुल लेखन केले.

– शशिकांत मांडके

## शेळके, शांता जनार्दन

**कवयित्री, कथाकार, कादंबरीकार**

**१२ ऑक्टोबर १९२२ – ९ जून २००२**



विविध साहित्य प्रकारांत लीलया चौफेर मुशाफिरी करणाऱ्या शांता जनार्दन शेळके यांचा जन्म इंदापूर, पुणे येथे झाला. पुण्याजवळ मंचर या गावी शेळक्यांचा भला मोठा वाडा होता. एकत्र कुटुंबामुळे वाडा सदैव गजबजलेला असे. वाड्याच्या मागच्या दालनात साड्या विणण्यासाठी मागावर कोष्टीकाम चाले. त्याचा आवाज आणि वास शांताबाईंच्या मनात घर करून राहिलेला असे. शांताबाईंचे आजोबा (वडिलांचे वडील अण्णा) हे शाळामास्तर होते. त्यामुळे शेळक्यांचे घर शिकलेले होते. शांताबाईंचे वडील वन खात्यात अधिकारी होते. त्यांच्या बदलीच्या नोकरीमुळे शांताबाईंचे बालपण चिखलदरा, नांदगाव, खर्डी या पुण्याच्या परिसरात गावोगाव फिरत-फिरतच गेले.

त्यांच्या वडिलांना त्या दादा आणि आईला (अंबिका वहिनी) वहिनी म्हणत असत. त्यांना पाच मुले झाली. त्यांत शांताबाई सगळ्यांत मोठ्या! शांताबाई वडिलांच्या नोकरीच्या प्रत्येक गावी आईसोबत सतत होत्या; त्यामुळे आईच्या मृदू स्वभावाचे, तिच्या चित्रकलेचे, वाचनवेडाचे संस्कार कळतनकळत त्यांच्यावर होत राहिले. शेळक्यांच्या वाड्यात आजी-आजोबांकडे अथवा सुट्टीत आजोळी गेले की लहानपणी विविध पारंपरिक गीते, ओव्या, श्लोक त्यांच्या कानांवर पडत. त्यामुळे कवितेची आवड, वाचनाची आवड त्या संस्कारक्षम वयात कळतनकळत रुजत गेली. शांताबाईंच्या कवितेचा अंकुर उशिरा फुलला असेल, पण त्याची बीजे मात्र बालपणीच खोलवर रुजली गेली.

१९३० मध्ये काविळीचे निमित्त होऊन शांताबाईंच्या वडिलांचे निधन झाले. त्या वेळी शांताबाई केवळ नऊ वर्षांच्या होत्या. त्यानंतर सारे जण पुण्याला, काकांकडे आले. त्या वेळी शांताबाईंचे शिक्षण चौथीपर्यंत झाले होते. बरीच खटपट केल्यानंतर शाळा बदलत-बदलत अखेर पुढील शालेय शिक्षण पुण्याच्या हुजूरपागेत झाले. सुविद्य, सुसंस्कृत आणि अभिजात अशा शाळेतील वातावरणाचे संस्कार त्यांच्या मनावर झाले. १९३८ मध्ये त्या मॅट्रिक झाल्या. पुण्याच्याच सर परशुरामभाऊ महाविद्यालयातून त्या बी.ए. झाल्या. प्रा. श्री. म. माटे, प्रा. के. ना. वाटवे, प्रा. रा. श्री. जोग यांच्यामुळे अभ्यासाच्या पुस्तकांव्यतिरिक्त अवांतर वाचनाची, कवितेची गोडीही वाढत राहिली. या काळात त्यांच्यावर साहित्याचे सखोल संस्कार झाले. यातूनच केव्हातरी आपण स्वतःही काही लिहून बघावे, अशी ऊर्मी मनात दाटून आली आणि महाविद्यालयाच्या नियतकालिकासाठी त्यांनी लेख लिहिला. प्रा. श्री. म. माटे यांच्या वरील अभिप्रायाने त्यांना हुरूप आला. हळूहळू शांताबाई कविता, लेख लिहू लागल्या. बी.ए. झाल्याबरोबर त्यांचा 'मुक्ता आणि इतर गोष्टी' नावाचा एक कथासंग्रहही निघाला. याला माटेसरांनी प्रस्तावना दिली, पण परखड मते मांडून खडसावलेसुद्धा!

श

शांताबाई १९४४ मध्ये संस्कृत घेऊन एम.ए. झाल्या. बी.ए.ला हुकलेले सुवर्णपदक एम.ए.च्या परीक्षेत मिळाले. पहिल्याच वर्षीचे तात्यासाहेब केळकर सुवर्णपदक त्यांना खुद्द तात्यासाहेबांच्याच हस्ते मिळाले, ही विशेष गोष्ट होय. 'देवांग कोष्टी' समाजातील एम.ए. झालेल्या त्या पहिल्या महिला होत. एम.ए. झाल्यावर त्या मुंबईला आल्या. सुरुवातीला त्यांनी आचार्य अत्रे यांच्या 'समीक्षक' या मासिकात व नंतर 'नवयुग' या अत्र्यांच्याच साप्ताहिकात आणि 'दैनिक मराठा'त दोन–तीन वर्षे काम केले. विविध प्रकारच्या लेखनाच्या अनुभवाची शिदोरी त्यांना इथे मिळाली. साहित्यविषयक अनेक गोष्टी त्यांना शिकता आल्या.

नागपूरचे हिस्लॉप कॉलेज, मुंबईचे रुईया महाविद्यालय आणि महर्षी दयानंद महाविद्यालय येथे त्यांनी प्राध्यापक म्हणून अध्यापनाचे कार्य केले. एकीकडे लेखन चालूच होते. कविता, कथा, कादंबरी, गीते, चित्रपटगीते, बालवाङ्मय, अशा विविध साहित्यप्रकारांत जवळपास शंभर पुस्तके त्यांच्या खाती जमा आहेत. लेखिका म्हणून साहित्यक्षेत्रात त्या वावरत होत्या; पण त्यांची खरी ओळख, खरी जवळीक राहिली ती कवितेशीच! हळुवार भावकवितेपासून नाट्यगीते, भक्तिगीते, कोळीगीते, चित्रपटगीते, बालगीते, प्रासंगिक गीते अशा विविध रूपांतून त्यांची कविता वाचकांना भेटत असते.

गरजेनुसार, मागणीनुसार भालजी पेंढारकर, दिनकर द. पाटील, लता मंगेशकर, सुधीर फडके, हृदयनाथ मंगेशकर, सलील चौधरी यांसारख्या अनेक संगीत दिग्दर्शकांसाठी, चालीबरहुकूम गीते लिहून दिली. 'पुनवेचा चंद्रमा आला घरी', 'ही चाल तुरुतुरु, उडती केस भुरुभुरु'सारखी चालीबरहुकूम अशी त्यांची खटकेबाज गीते आजही लोकप्रिय आहेत. आणि त्यामुळेच 'तोच चंद्रमा नभात' या त्यांच्या पहिल्या गीतसंग्रहाचेही रसिकांनी मनापासून स्वागत केले.

हृदयनाथ मंगेशकरांनी चाली दिलेली, सर्वांत गाजलेली लोकप्रिय गीते आहेत कोळीगीते : 'वादलवारं सुटलं ग', 'वल्हव रे नाखवा', 'राजा सारंगा माझ्या सारंगा' ही सारी कोळीगीते समुद्र न पाहिलेल्या शांताबाईंसाठी एक प्रयोग होता; पण तो प्रचंड यशस्वी प्रयोग ठरला हे निश्चित.

जितेंद्र अभिषेकी यांनी संगीत दिलेल्या 'वासवदत्ता' आणि 'हे बंध रेशमाचे' या दोन्ही नाटकांसाठी शांताबाईंनी गाणी लिहिली. तसेच, गारंबीचा बापू या चित्रपटासाठी शांताबाईंनी गाणी लिहिली. अशा प्रकारे कवितेच्या विविध रूपांत, विविध लेखनप्रकारांत त्या रमलेल्या होत्या.

वैशिष्ट्य असे की, त्यांना मनापासून भावलेल्या कवितेची, त्यांच्या काव्यलेखनाची सुरुवात मात्र खूपच उशिरा सुरू झाली. शांताबाई बी.ए.च्या पहिल्या वर्षात असताना म्हणजे १९४१ मध्ये त्यांची पहिली कविता 'शालापत्रक' मासिकात छापून आली. तीही काहीशी योगायोगाने, बालगीत या स्वरूपात. एकीकडे अनेक कवींच्या कवितांचे वाचनही मनापासून सुरू होते. रविकिरण मंडळातील कवींचा, विशेषतः माधव जूलियन यांच्या काव्याचा त्यांच्यावर फार मोठा प्रभाव होता. त्यामुळे सुरुवातीला त्या वळणाची कविताच त्या लिहीत राहिल्या.

१९४७ मधील त्यांचा 'वर्षा' हा पहिला काव्यसंग्रह व त्यानंतरचा 'रूपसी' (१९५६). या दोन्ही संग्रहांतील कवितांवर रविकिरण मंडळाच्या कवितेचा प्रभाव दिसतो. या दोनही संग्रहांचे शांताबाई स्वतःच पुढे जाऊन – 'माझे अगदी वाईट संग्रह' म्हणून वर्णन करतात. यानंतर 'गोंदण' (१९७५), 'अनोळख' (१९८५), 'कळ्यांचे दिवस', 'फुलांच्या राती' (१९८६), 'जन्मजान्हवी' (१९९०), 'पूर्वसंध्या' (१९९६), 'इत्यर्थ' (१९९८), 'किनारे मनाचे' हे सारे काव्यसंग्रह प्रसिद्ध होत राहिले.

'गोंदण'पासून शांताबाईंची कविता कुणाच्याही अनुकरणापासून दूर असलेली होती. 'त्यांची'च कविता म्हणून शांताबाईंच्या कवितेला चेहरा मिळाला. त्यांची कविता अधिकाधिक अंतर्मुख, चिंतनशील व प्रगल्भ होत गेली. बालपणाच्या सुखद आठवणी, प्रेमवैफल्य, मानवाच्या अपुरेपणाचा वेध, एकाकीपण, नाही मी इथली, नसेन तिथली अशी मनाची हुरहुर, सृष्टीची

गूढता हे सारे काव्यविषय 'गोंदण'पासून पुढील कवितेत अधिक प्रगल्भपणे प्रतिमारूप धारण करून आपल्यापुढे येतात. वृत्तबद्ध कविता जशी त्यांनी लिहिली, तेवढ्याच सहजतेने त्यांनी गीते, बालगीते, सुनीते आणि मुक्तछंद रचनाही केल्या. ग. दि. माडगूळकरांप्रमाणेच उत्कृष्ट भावानुकूल चित्रपटगीते लिहिणारी गीतलेखिका म्हणून त्यांना प्रसिद्धी मिळाली.

१९९६ मध्ये आळंदी येथे भरलेल्या एकोणसत्तराव्या अखिल भारतीय साहित्यसंमेलनाच्या अध्यक्षा म्हणून त्यांना सन्मानित करण्यात आले. याशिवाय अनेक मानसन्मान शांताबाईंना लाभले. 'जन्मजान्हवी' या काव्यसंग्रहासाठी कॉन्टिनेन्टल प्रकाशनाचा 'कुसुमाग्रज' पुरस्कार (१९९१) मुलुंडच्या महाराष्ट्र मंडळाचा सु. ल. गद्रे 'मातोश्री' पुरस्कार (१९९४), उत्कृष्ट गीतलेखनाबद्दलचा पुण्याचा 'गदिमा' पुरस्कार (१९९५).

शांताबाईंच्या प्रकाशित ग्रंथसंपदेपैकी विशेषत्वाने उल्लेख करावा लागेल त्यांपैकी 'मुक्ता' (१९४४), 'गुलमोहोर' (१९४९), 'प्रेमिक' (१९५६), 'काचकमळ' (१९६९), 'अनुबंध' (१९८०) इत्यादी कथासंग्रह. 'पुनर्जन्म' (१९५०), 'ओढ' (१९७५) (देवांग कोष्टी समाजाच्या जीवनावर आधारित), 'माझा खेळ मांडू दे' इत्यादी कादंबऱ्या; 'शहांच्या दुनियेत' (१९५९), 'पावसाआधीचा पाऊस' (१९८५), 'संस्मरणे' (१९९०) इत्यादी वाङ्मयीन लेखसंग्रह; 'धूळपाटी' (१९८२) हे आत्मपर लेखन; 'वडीलधारी माणसे' (१९८९), 'अलौकिक' (१९९३) इत्यादी व्यक्तिचित्रात्मक लेखन; 'एक पानी' (१९८९) हे सदरलेखन यांशिवाय अनेक विदेशी इंग्रजी चित्रपटकथांचे अनुवाद, इंग्रजी कादंबऱ्यांचे अनुवाद; 'संस्कृत सुभाषित रत्नभंडार' आणि मेघदूताचे मराठी रूपांतर; 'पाण्यातील पाकळ्या' हे दोनशे जपानी 'हायकू' कवितांचे मराठी रूपांतर, 'चिमणचारा' (१९६०), 'थुई थुई नाच मोरा' (१९६१) इत्यादी बालगीतसंग्रह.

''साहित्यावर जीवतोड प्रेम करणारी व्यक्ती अशीच माझी खरी ओळख,'' असं शांताबाई म्हणतात, त्यांचा हा आत्मविश्वास मनाला भिडणारा आहे.

– मंगला गोखले

**संदर्भ :**


*१. शेळके शांता; 'धूळपाटी', १९८२.*
*२. उपाध्ये नीला; 'शब्दव्रती शांताबाई'; १९९६.*


## शोभणे, रवींद्र केशवराव
**कथाकार, कादंबरीकार, ललितलेखक**
**१५ मे १९५९**



कादंबरीकार रवींद्र शोभणे यांचा जन्म नागपूर जिल्ह्यातील नरखेड तालुक्यातील खरसोली या गावी झाला. खरसोलीच्या आदर्श विद्यालयातून त्यांचे शालेय शिक्षण पूर्ण झाले. त्यांचे महाविद्यालयीन शिक्षण नरखेड येथे, तर पदव्युत्तर शिक्षण नागपूरच्या मॉरिस कॉलेजमधून झाले. नागपूर विद्यापीठ, नागपूर येथून त्यांनी 'कादंबरीकार श्री. ना. पेंडसे' या विषयावर प्रबंध सादर करून १९८९ साली पीएच. डी. ची पदवी प्राप्त केली.

प्रा. डॉ. रवींद्र शोभणे हे सध्या नागपूर येथील धनवटे नॅशनल कॉलेज येथे मराठी विभागप्रमुख म्हणून कार्यरत आहेत. कथा, कादंबरी, नाट्य, कविता, समीक्षा, ललित, अशा विविध साहित्यप्रकारांत लेखन करणाऱ्या डॉ. रवींद्र शोभणे यांची वयाच्या विसाव्या वर्षी पहिली कविता, पहिला समीक्षात्मक लेख आणि पहिली कथा प्रकाशित झाली होती. सुरुवातीपासूनच वाचनाची प्रचंड आवड असलेले हे व्यक्तिमत्त्व सामाजिक, राजकीय, राष्ट्रीय, सांस्कृतिक, प्रांतीय स्थित्यंतरांचा जाणीवपूर्वक अभ्यास करीत, परिस्थितीचे डोळसपणे अवलोकन करीत लेखक म्हणून घडत गेले आणि १९८३ मध्ये वयाच्या चौतिसाव्या वर्षी त्यांची 'प्रवाह' ही पहिली कादंबरी

श

प्रकाशित झाली. 'सव्वीस दिवस' सारख्या स्वानुभव कथनात्मक लघू कादंबरी लिहिणाऱ्या रवींद्र शोभणेंच्या लेखणीतून 'उत्तरायण' ही महाभारतावर आधारित बृहद् कादंबरीही आकारास आली आहे.

कथालेखक म्हणूनही डॉ. रवींद्र शोभणे परिचित आहेत. १९९१ मध्ये त्यांचा 'वर्तमान' हा पहिला कथासंग्रह मॅजेस्टिक प्रकाशनाने प्रकाशित केला. त्यानंतर १९९४ ते २००८ या काळात त्यांचे 'दाही दिशा', 'शहामृग', 'तद्‌भव', 'अदृष्टाच्या वाटा' असे पाच कथासंग्रह प्रकाशित झाले.

'कादंबरीकार श्री.ना. पेंडसे', 'सत्त्वशोधाच्या दिशा', 'संदर्भासह' अशी त्यांची समीक्षात्मक पुस्तकेहि प्रकाशित झालेली आहेत. 'कथांजली' आणि 'मराठी कविता परंपरा आणि दर्शन' या दोन पुस्तकांचे संपादन डॉ. शोभणे यांनी केलेले आहे. 'ऐशा चौफेर टापूत' हा त्यांचा ललित लेखसंग्रह २००७ मध्ये प्रकाशित झाला.

१९९२ मध्ये प्रकाशित झालेल्या 'कोंडी' या कादंबरीने त्यांना खऱ्या अर्थाने कादंबरीकार म्हणून लौकिक मिळवून दिला. वैदर्भीय प्रादेशिकतेची वैशिष्ट्ये, वैदर्भीय बोली भाषा, तेथील व्यक्तिमत्त्वे, त्यांची स्वभाववैशिष्ट्ये, त्यांचा सांस्कृतिक वारसा, त्यांचे राजकीय डावपेच या सर्वांचे वास्तव चित्रण करीत विलक्षण ताकदीने शोभणे यांनी 'कोंडी'चे कथानक उभे केलेले आहे. त्यांच्या या कादंबरीला अनेक पुरस्कार प्राप्त झाले. त्यांमध्ये महाराष्ट्र साहित्य परिषदेचा ग.ल.ठोकळ पुरस्कार, महाराष्ट्र शासनाचा वाङ्मय पुरस्कार असे काही महत्त्वाचे पुरस्कार प्राप्त झाले आहेत. त्यांच्या मानवी वास्तवाचा नवस्पर्श लाभलेल्या महाभारतावरील 'उत्तरायण' या बृहद् कादंबरीला वि.सा.संघाचा पु.ल.देशपांडे पुरस्कार, घनश्यामदास सराफ पुरस्कार, महाराष्ट्र फाउण्डेशनचा पुरस्कार हे पुरस्कार प्राप्त झालेले आहेत, तर त्यांच्या 'पडघम' या सामाजिक व राजकीय कादंबरीला महाराष्ट्र शासनाचा ह.ना. आपटे पुरस्कार प्राप्त झाला आहे.

१९७५ ते १९८४ या कालखंडातील महाराष्ट्रीय, तसेच भारतीय समाजजीवनातील ऱ्हासपर्वाचे, विविध राजकीय पक्ष संघटनांचे, आणीबाणीनंतरच्या राजकीय जीवनाचे असे बहुकेंद्री पडसाद 'पडघम' या महाकादंबरीमध्ये उमटलेले आहेत. 'रक्तधृव' या आगळ्या आशयाच्या व विचार प्रवृत्त करणाऱ्या कादंबरीलाही तल्हार स्मृती पुरस्कार व लोकमत पुरस्कार प्राप्त झालेला आहे. त्यांच्या चिरेबंद' या देशमुख आणि कंपनी, पुणे यांनी १९९५ मध्ये प्रकाशित केलेल्या कादंबरीला ग्रंथोत्तेजक पुरस्कार, तसेच रणजीत देसाई पुरस्कार प्राप्त झालेला आहे.

डॉ. रवींद्र शोभणे यांना त्यांच्या विविधांगी साहित्यसंपदेची दखल घेणारे अनेक प्रकारचे सन्मान प्राप्त झाले आहेत. २००३ मध्ये यवतमाळ जिल्ह्यातील पुसद येथे भरलेल्या विदर्भ साहित्य संघाच्या पहिल्या युवा साहित्य संमेलनाचे अध्यक्षपद या युवा साहित्यिकाने भूषविले होते. त्यांना साहित्य अकादमीची प्रवासवृत्ती १९९४ साली प्राप्त झाली. मराठी भाषा साहित्य अकादमीमध्ये सल्लागार सदस्य म्हणून (२००७ – २०१२) ते कार्य करीत आहेत.

वास्तवाचे भान ठेवत सामाजिक, राजकीय, धार्मिक, सांस्कृतिक अशा सर्वच स्थित्यंतरांची वैशिष्ट्ये डॉ. रवींद्र शोभणे यांनी आपल्या कथा–कादंबरी या साहित्यप्रकारांमधून जपली आहेत. सामाजिक परिवर्तनांचे ग्रामीण व नागरी समाजजीवनावर होणारे चांगले व वाईट परिणाम टिपत कथा, कादंबरी, समीक्षा, ललित अशा विविध साहित्यप्रकारांत आकारास आलेल्या त्यांच्या साहित्यनिर्मितीने आपले वेगळेपण जपले आहे.

बोलीभाषेच्या संवादशैलीचा गोडवा, कथा–कादंबऱ्यांच्या आशयगर्भाशी एकरूप होत जाणारी संवादांची लयबद्धता, अस्सल वऱ्हाडी भाषेची जाणीवपूर्वक केलेली पेरणी त्यांच्या कथा–कादंबऱ्यांना एक प्रकारचा जिवंतपणा प्रदान करणारी ठरली आहे. म्हणूनच त्यांच्या कथा–कादंबऱ्या वाचकांच्या मनाला मोह घालतात, शेवटपर्यंत बांधून ठेवतात.

– डॉ. संध्या पवार

## श्याम मनोहर

*आफळे, श्याम मनोहर*

**कादंबरीकार, नाटककार**

**२७ फेब्रुवारी १९४१**



मराठी 'ब्लॅक कॉमेडी' म्हणून ज्यांच्या लेखनाला दिलीप चित्र्यांनी गौरवले, त्या श्याम मनोहरांचे संपूर्ण नाव श्याम मनोहर आफळे. त्यांचा जन्म भिकार, तासगाव (जिल्हा सातारा) येथे झाला. त्यांचे प्राथमिक शिक्षण लिंब, अंगापूर आणि तासगाव येथे झाले व माध्यमिक शिक्षण साताऱ्याच्या न्यू इंग्लिश स्कूलमध्ये झाले. १९५८ साली एस.एस.सी. झाले. सातारा येथे छत्रपती शिवाजी व कराड येथे विज्ञान महाविद्यालयात उच्च शिक्षण घेतले. १९६४ मध्ये ते बी.एस्सी. १९६७ मध्ये झाले. पुणे विद्यापीठातून फिजिक्स आणि इलेक्ट्रॉनिक्स हे विषय घेऊन एम.एस्सी. झाले. चिपळूण येथील डॉ. दातार महाविद्यालय व पुणे येथील ज्ञानप्रबोधिनीत त्यांनी काही काळ अध्यापन केले. नंतर सर परशुरामभाऊ महाविद्यालयात प्राध्यापक म्हणून अनेक वर्षे काम करून ते निवृत्त झाले.

नववीत असल्यापासून त्यांच्या लेखनाला सुरुवात झाली. 'कॉम्पिटिशन' ही त्यांची पहिली कथा, 'सैनिक समाचार'मधून प्रसिद्ध झाली. १९६७ पासून ते नियमित लेखन करू लागले. नवकथेला ओहोटी लागण्याच्या काळात त्यांचे कथालेखन प्रकाशित झाले; पण ते रूढ परंपरेच्या साच्यातील नसल्याने दुर्लक्षित झाले. 'आणि बाकीचे सगळे' (१९८०), 'बिन मौजेच्या गोष्टी' (१९८६) हे त्यांचे कथासंग्रह प्रसिद्ध झाले. श्याम मनोहर यांच्या कथा व्यक्ती आणि समाज यांच्या वर्तनाचे सूक्ष्म तपशील भरतात. त्यांच्या कथा व्यक्ती, समूह, कुटुंब, सामाजिक संस्था, त्यांचे परस्पर संबंध, व्यक्तीचे सामाजिक स्थान, त्याला पार पाडाव्या लागणाऱ्या भूमिका, त्यांतील नैतिक अंतर्विरोध, त्यातून निर्माण होणारा ताण यांमुळे व्यामिश्र (मिश्रित) आहेत. 'कंटिन्युइटी', 'वासू अमक्यातमक्या ठिकाणी ऐसपैस', 'तात्पर्य', 'गुरुत्वाकर्षणाचे प्रदेश', 'सॅम्युएल बेकेटसाठी' या कथा; तसेच 'मि. थिंकर मंकी' या कथेतून तत्त्वज्ञान प्रकट होते. आपल्या कथांतून मध्यमवर्गीय प्रवृत्तीचे, तरीही उपरोधिक भाष्य करताना ते मध्यमवर्गीयांच्या मनातील गोंधळांचा वेध घेत, जीवनातील विसंगतिपूर्ण कोलाहलाचे अस्वस्थ करणारे दर्शन घडवितात.

'हे ईश्वरराव, हे पुरुषोत्तमराव', 'शीतयुद्ध सदानंद', 'कळ', 'खूप लोक आहेत' या कादंबऱ्या रचनात्मक अंगाने विचार केल्यास, कादंबरीच्या वर्तुळात बसत नाहीत. 'हे ईश्वरराव...'मध्ये भरपूर पात्रे, घटना, प्रसंग आहेत; माणसाच्या स्वभावाचे बारकावे आहेत; पण कादंबरीच्या रचनात्मक वैशिष्ट्यांना त्यांनी टाळले आहे. 'शीतयुद्ध सदानंद' आणि 'कळ' यांत कोणत्याही राजकीय, सामाजिक, धार्मिक, आर्थिक वर्तनाच्यामागे असलेल्या व्यक्तीची अंतरक्रिया कशी चालते, याचे चित्रण असून आधुनिकता आणि आत्मभान यांतील द्वंद्वाचे प्रभावी चित्रण आहे. 'कळ' ही कादंबरी लेखकाला एका विशिष्ट उंचीवर घेऊन जाते.

'उत्सुकतेने मी झोपलो' या कादंबरीत त्यांनी कुटुंब व्यवस्थेसंदर्भात भाष्य केले असून स्थैर्य या मूल्यावर उभ्या राहिलेल्या 'कुटुंब' या व्यवस्थेत ज्ञानाला स्थान का नाही, हे तपासण्याचा प्रयत्न केला आहे (लोकसत्ता, २४ डिसेंबर २००८). 'उत्सुकतेने मी झोपलो' या कादंबरीत मध्यमवर्गीय कुटुंबव्यवस्थेचे सूक्ष्मदर्शक यंत्रातून निरीक्षण केलेले आहे, इतके वास्तव दर्शन होते. कुटुंबव्यवस्थेत जगताना मनाची तगमग अत्यंत तरल पद्धतीने व्यक्त होते. भरपूर पात्रे असूनही कथानकाची चौकट टाळणारे कथन, आत्मीयतेने मृदू पोत असलेली तरीही गर्भित चिकित्सेने वाचकाला कुंठीत करणारी शैली आहे. डॉ. किशोर सानप यांच्या मते, 'त्यांच्या लेखनाला 'श्याम मनोहरांचे' गद्य लेखन असेच म्हणावे लागेल. अशा प्रकारचे लेखन मराठीत पहिल्यांदा झाले.'

'हृदय', 'यकृत', 'येळकोट', 'प्रेमाची गोष्ट', 'दर्शन' ही त्यांची नाटके समकालीन समाज व संस्कृती यांच्यापुढे नैतिक प्रश्न उभे करणारी, प्रचलित रूढी, मानवी व्यवहार व व्यक्तीच्या वर्तनामागची गुंतागुंत यांचे विश्लेषण करणारी आहेत. 'यकृत' आणि 'हृदय' ही नाटके स्वातंत्र्योत्तर भारतातील सुखवादाची तीव्र चिकित्सा करणारी आहेत, तर 'प्रेमाची गोष्ट' या नाटकात स्वातंत्र्याच्या काळात वाढलेल्या पिढीतील आंतरिक द्वंद्वाचा आविष्कार झाला आहे. ज्ञान म्हणजे काय?, हा त्या नाटकातील प्रश्न आहे. ज्ञानाची आच आणि आस्था नसलेला समाज हा नाटकाचा विषय आहे. अमूर्त, तात्त्विक प्रश्नावर उभारलेले हे नाटक एक अनोखा प्रयोग आहे. 'यकृत' हे दोन अंकी नाटक मनुष्याला विचार करायला प्रवृत्त करते.

श्याम मनोहरांचे लेखन शोकात्म जाणीव व्यक्त करीत असूनही भावुक, निराशावादी, नियतिशरणता प्रकट करणारे नाही. त्यांची भाषा सर्वसामान्यांच्या भाषेचाच अतिशय ताजेपणाने आणि सहजतेने वापर करते.

श्याम मनोहरांबद्दल अनुष्टुभच्या संपादकीयामध्ये लिहिले आहे, ''साठीच्या दशकाअखेरीस ते लिहू लागले; पण पुस्तकरूपात प्रकाशित व्हायला ऐंशीच्या दशकाची सुरुवात झाली. त्यांचा वाचकवर्ग मर्यादित राहिला. त्यांच्या साहित्यात सामान्य वाचकाला आकर्षून घेणारे, असामान्य माणसाच्या जीवनातील भयोत्कट भावनांचे नाट्यही नाही, की विदूषकी वर्तनाने खदखदून हसायला लावणारे शब्द नाहीत; पण त्यांचे लेखन अनपेक्षितपणे मूलभूत मानवी प्रवृत्तींना स्पर्श करण्याची क्षमता प्रकट करते व आपण वस्त्रविहीन झाल्याची जाणीव करणारे आहे. अशी अस्वस्थता सामान्य वाचकांना नको असते. स्वतःची विरूपे दाखविणारे आरसे त्याला नको असतात.'' अशा प्रकारे परंपरेतून काहीही न स्वीकारणारे, परंपरा निर्माण न करणारे असे मूलभूत आणि संपूर्णपणे स्वतंत्र आहे, स्व-तंत्र आहे.

''भाषेच्या अंगाने माणसाच्या जगण्यात शिरणं हा माझा आवडता खेळ आहे,'' असे श्याम मनोहरांचे म्हणणे आहे. त्यांना अनेक पुरस्कारांनी सन्मानित करण्यात आलेले आहे. २००८ सालचा साहित्य अकादमी पुरस्कार त्यांच्या 'उत्सुकतेने मी झोपलो' या कादंबरीला प्राप्त झाला, कऱ्हाड पुरस्कार 'बिनमौजेच्या गोष्टी' १९८३, सर्वोत्कृष्ट हौशी नाटककार - नाट्यदर्पण पुरस्कार - नाटक 'यळकोट' १९८४, गंगाधर गाडगीळ पुरस्कार - १९८४.

— निशा रानडे

**संदर्भ :**


१. *देशपांडे अभिजित; 'आपला परम मित्र'; वर्ष पहिले, अंक ४.*

२. *'अनुष्टुभ'; जुलै-ऑगस्ट, १९९५.*

३. *'साक्षात'; जुलै-ऑगस्ट, २००२.*


* * *

श



# स

## संजीवनी

*मराठे, संजीवनी रामचंद्र*

**कयवित्री**

**१४ फेब्रुवारी १९१६ – १ एप्रिल २०००**



संजीवनी मराठे यांनी शालेय जीवनापासूनच काव्यलेखनास व काव्यगायनास सुरुवात केली. त्यांनी एम.ए.(मराठी, हिंदी) ही पदव्युत्तर पदवी धारण केली.

“कशी अचानक जनी प्रकटते मनातली उर्वशी, मी न कुणाला सांगायची कविता स्फुरते कशी,” असे म्हणणाऱ्या संजीवनी यांनी शेकडो उत्तमोत्तम कविता लिहून मराठी काव्यक्षेत्रात आपले नाव दीर्घकाळ चमकत ठेवले होते.

आपल्या भावमधुर अशा काव्यगायनामुळे त्या प्रथम रसिकांना परिचित झाल्या. त्यांनीच गायलेली त्यांची गीते खूप गाजली. प्रासादिक शैली व नादपूर्ण रचना यांमुळे १९३२ (काव्यसंजीवनी) ते १९९४ (आत्मीय) या कालखंडात त्यांनी कवितेच्या प्रांतात आपला ठसा उमटवला.

‘काव्यसंजीवनी’ (१९३२), ‘राका’ (१९३९), ‘संसार’ (१९४३), ‘चित्रा’ (१९५७), ‘छाया’ (१९४९), ‘भावपुष्प’, ‘परिमला’ हे त्यांचे सात काव्यसंग्रह खूप गाजले. त्याखेरीज ‘गंमत’ आणि ‘बरं का गं आई’ हे बालगीतांचे संग्रह प्रसिद्ध झाले आहेत. ‘चंद्रफूल’ (१९७१), ‘मी दिवाणी’ (१९८१), ‘आत्मीय’ (१९९४) या पुस्तकांतील कवितांमधून भावनांची उत्कटता, आर्तता जाणवते. कवी कुसुमाग्रज व जोग यांनी संपादित केलेल्या ‘काव्यवाहिनी’च्या चौथ्या खंडात संजीवनी मराठे यांच्या चार कविता समाविष्ट केलेल्या आहेत. पुण्याच्या ‘अनाथ विद्यार्थी गृह’ प्रकाशन संस्थेने प्रसिद्ध केलेल्या ‘मराठी साहित्य दर्शन’च्या दहाव्या खंडात त्यांच्या काव्याचा परिचय करून देण्यात आलेला आहे. संजीवनी मराठे यांच्या सुमारे १२५ कविता या खंडात देण्यात आल्या आहेत.

कवितांखेरीज ‘ट्युलिप्सच्या देशातून’ (१९९३) आणि ‘गीतांजली दर्शन’ (१९९८) ही त्यांची अनुक्रमे पत्रसंकलन व काव्यानुवाद असलेली पुस्तके प्रसिद्ध आहेत.

रा.चिं.मराठे यांच्याशी विवाहबद्ध झालेल्या संजीवनींवर रविकिरण मंडळाचा, तसेच तांबे यांच्या गीत–काव्याचा प्रभाव होता. कुसुमाग्रज, बा.भ.बोरकर, पु.शि.रेगे, पद्मा गोळे, वा.रा.कान्त, बा.सी.मर्ढेकर यांच्या बरोबरीने काव्यलेखन करणाऱ्या संजीवनी यांच्या कविता आजही, पाठ्यपुस्तकातून वाचायला मिळतात आणि आकाशवाणीवर अचानक त्यांची ‘शांत सागरी कशास उठविलीस वादळे’ किंवा ‘सत्यात नाही आले स्वप्नात येऊ का’ अशी भावमधुर गीते ऐकायला मिळतात.

– प्रा. सुहास बारटक्के

**संदर्भ :**

१. *‘तरुण भारत’, पुणे; दिवाळी १९८१.*
२. *‘साहित्य सूची’; फेब्रुवारी २०००.*
३. *‘श्रीदीपलक्ष्मी’; दिवाळी १९७२.*

स

## संत, इंदिरा नारायण
☞ **इंदिरा संत**

## संत, प्रकाश नारायण
**कथाकार**

**१६ जून १९३७ – १५ जुलै २००३**



कथाकार प्रकाश नारायण संत हे सुप्रसिद्ध कवयित्री इंदिरा संत आणि ज्येष्ठ लघुनिबंधकार ना.मा. संत यांचे सुपुत्र. त्यांचा जन्म बेळगाव येथे झाला. मातापित्यांच्या वाङ्मयीन प्रतिभेचा वारसा घेऊनच ते जन्माला आले. कलाप्रेम आणि अभिजात रसिकता या देणग्या त्यांना आईवडिलांकडूनच मिळाल्या. ना. मा. संत यांच्या अकाली मृत्यूमुळे प्रकाश संत वयाच्या नवव्या वर्षी पितृसुखाला पारखे झाले. १९४६ साली झालेल्या ना.मा. संत यांच्या मृत्यूनंतर, १९४७ साली प्रकाश संत यांना त्यांच्या आजीने (इंदिरा संत यांच्या आईने) दत्तक घेतले. आपल्या आजोळी दत्तक गेलेले प्रकाश संत, लौकिक जीवनात भालचंद्र गोपाळ दीक्षित म्हणून वावरले.

त्यांनी शालेय शिक्षण बेळगाव येथील ठळकवाडी हायस्कुलात पूर्ण करून इंटर सायन्सपर्यंतचे शिक्षण बेळगावचे लिंगराज महाविद्यालय येथे घेतले. त्यानंतरच्या महाविद्यालयीन शिक्षणासाठी ते पुण्याच्या फर्गसन महाविद्यालयामध्ये दाखल झाले. जिओलॉजी या विषयात (भूगर्भशास्त्रात) बी.एस्सी. करून, एम.एस्सी.ला प्रवेश घेण्यापूर्वी त्यांनी बेळगावजवळ असलेल्या कुवेशी या गावी, मँगनीजच्या खाणीवर सहा महिने Junior Geologist म्हणून काम केले. त्यानंतर त्यांनी पुन्हा फर्गसन महाविद्यालयामध्ये एम.एस्सी.साठी प्रवेश घेतला.

भूगर्भशास्त्रातच एम.एस्सी केल्यानंतर एक वर्ष फर्गसन महाविद्यालयामध्ये बी.एस्सीच्या वर्गावर त्यांनी डेमॉन्स्ट्रेटर म्हणून काम केले. १९६१ साली कराड येथे यशवंतराव चव्हाण विज्ञान महाविद्यालयामध्ये ते जिओलॉजी विभागात, विभागप्रमुख–असिस्टन्ट प्रोफेसर म्हणून रुजू झाले. कालांतराने त्यांना प्रोफेसर म्हणून बढती मिळाली. १९९७ साली, ३६ वर्षे प्राध्यापक म्हणून नोकरी केल्यानंतर ते सेवानिवृत्त झाले. दरम्यानच्या काळात, १९८२ साली पुणे विद्यापीठातून ‘सावंतवाडी, वेंगुर्ल्याजवळच्या मठ, होडावडा परिसरातील Hard Rockचा अभ्यास’ या विषयावर त्यांनी पीएच.डी केली.

कथालेखक प्रकाश नारायण संत व भूगर्भशास्त्राचे प्राध्यापक डॉ. भालचंद्र गोपाळ दीक्षित ही एकाच व्यक्तिमत्त्वात नांदत असलेली दोन रूपे होती. भूगर्भशास्त्राच्या त्यांच्या व्यासंगाच्या खुणा, ‘वनवास’ ते ‘झुंबर’ या सर्वच कथासंग्रहात आढळतात. भूगर्भशास्त्राचे त्यांचे ज्ञान कथासृष्टीत अत्यंत लालित्यपूर्ण रूप धारण करून येते. डॉ. दीक्षित पक्षितज्ज्ञ होते. त्याच्याही मनोरम खुणा या कथासृष्टीत विखुरलेल्या आहेत.

### चतुरस्र व्यक्तिमत्त्व

प्रकाश संत यांच्या चतुरस्र व्यक्तिमत्त्वाला अनेक पैलू होते. ते उत्कृष्ट चित्रकार होते. त्यांच्या कथासंग्रहातील बरीचशी रेखाटने या गोष्टीची साक्ष देतात. संगीत हे त्यांचे दुसरे प्रेम होते. ते चांगले व्हायोलिनवादक होते. अभिजात शास्त्रीय संगीताची त्यांना विलक्षण आवड होती. लेखन हे त्यांचे तिसरे प्रेम होते. त्यांनी अगदी मोजके आणि कसदार लेखन केले. त्यांचे वाचन चौफेर होते. विद्यार्थिदशेतच त्यांनी जागतिक अभिजात कलाकृती वाचल्या होत्या. इंग्रजी साहित्याचा त्यांचा व्यासंग दांडगा होता. आयुष्यभर त्यांनी जागतिक वाङ्मयाचा संग्रह केला. त्यावर मननचिंतन केले. आपल्या कलाछंद, भूगर्भशास्त्राचा व्यासंग, पशुपक्ष्यांचे ज्ञान या सगळ्या गोष्टी त्यांनी आपल्या मानसपुत्राला म्हणजे लंपनला बहाल केल्या.

### लंपनचे भावविश्व

आपल्या सर्व सर्जनशील साहित्यनिर्मितीमागे आईवडिलांच्या वाङ्मयीन प्रतिभेचा समृद्ध वारसा

स

असल्यामुळे, त्यांची आठवण म्हणून लेखन करताना त्यांनी प्रकाश नारायण संत हेच नाव धारण केले. प्रकाश संत यांच्या सुरुवातीच्या लेखनावर वडिलांच्या साहित्याचा प्रभाव मोठ्या प्रमाणात आहे. प्रारंभी त्यांना लघुनिबंध लिहावेसे वाटले. सुरुवातीची काही वर्षे मोजके लघुनिबंध लिहून पाच-सहा वर्षांतच त्यांनी कथालेखनास प्रारंभ केला.

१९६० ते १९६४ या काळात त्यांच्या 'फुलाची गोष्ट', 'अर्थ', 'वीज' आणि 'वनवास' या चार कथा प्रसिद्ध झाल्या. त्यानंतर जवळजवळ २६ वर्षांनी, १९९० सालानंतर संतांनी पुन्हा कथालेखन सुरू केले. वरील चार कथा आणि नंतरच्या नऊ कथा, अशा तेरा कथांचा समावेश १९९४ साली प्रसिद्ध झालेल्या त्यांच्या पहिल्या कथासंग्रहात, 'वनवास'मध्ये आहे. कथालेखनात काळाचा फरक असूनही तेरा कथांमधील अनुभवविश्वात आणि भावविश्वात विलक्षण एकात्मता आहे. 'वनवास'मध्ये एक संपन्न बालविश्व, बालमनाच्या जाणिवेसह, कोणतीही भूमिका न घेता सहजगत्या साकार होते. पौगंडावस्थेतील लंपनच्या अनेक भावावस्था संतांनी मोठ्या सूक्ष्मतेने टिपल्या आहेत. सुमी आणि लंपनच्या रमणीय भावबंधाचे अनेक आविष्कार, लंपनसारख्या मुलांची क्रीडाशील, वृत्ती मानवेतर जगाबद्दल त्याच्या मनात असलेली विलक्षण आस्था त्यांनी 'वनवास'मध्ये चित्रित केली आहे.

लंपनच्या भावविश्वाचा पुढचा टप्पा 'शारदा संगीत' या दुसऱ्या संग्रहातल्या कथांतून साकार झाला आहे. लंपनचे विस्तारलेले जग, तसेच त्याच्या कलासक्त मनाचे सुंदर आविष्कार यात प्रकट झाले आहेत. 'शारदा संगीत'मधला लंपन इतरांच्या मनाचा वेध घेऊ लागला आहे. 'परचक्र' ही कथा वगळता, या संग्रहातल्या सर्व कथा बहुकेंद्री आहेत. त्या जसे व्यक्तीचे अंतरंग प्रकट करतात, तसे समूहमनही प्रकट करतात.

२००१ साली प्रसिद्ध झालेल्या तिसऱ्या 'पंखा' या कथासंग्रहातल्या कथांमधून, लंपनचे मानवी मनाचे आकलन वाढल्याचे व त्याची जीवनदृष्टी उत्तरोत्तर प्रगल्भ होत चालल्याचे जाणवते. प्रकृती आणि विकृती, मंगल आणि अमंगल, नीती आणि अनीती यांनी व्यापलेले हे जग आहे तसे स्वीकारावे लागते, आपल्या जगण्याचा तो अपरिहार्य भाग आहे याची लंपनला येत चाललेली जाण या कथांमधून प्रभावीपणे प्रकट झाली आहे.

पहिले तीन कथासंग्रह प्रकाश संत यांच्या हयातीत प्रसिद्ध झाले. चौथा आणि दुर्दैवाने शेवटचा ठरलेला 'झुंबर' हा कथासंग्रह त्यांच्या मृत्यूनंतर एक वर्षाने, २००४ साली प्रसिद्ध झाला. स्कूटर अपघातात, डोक्याला लागलेल्या जबर मारामुळे प्रकाश संत यांचे निधन झाले.

संतांच्या प्रतिभेचे नवेनवे उन्मेष 'झुंबर'मधल्या कथांतून पाहायला मिळतात. खळाळते हास्य आणि जीवघेणी व्याकूळता या दोन्हींचा या कथांमधून सारखाच प्रत्यय येतो. वरवर विनोदी वाटणाऱ्या या कथा अंतर्यामीचे दु:खाचे कढ प्रकट करतात. या कथांमधून भेटणारा लंपन जीवनातील अटळ दु:खांकडे समंजसपणे पाहताना, त्यांचा समंजस स्वीकार करताना दिसतो.

**संतांचे भाषावैशिष्ट्य**

संतांच्या कथालेखनातील वैशिष्ट्यांचा विचार करताना एक गोष्ट प्रकर्षाने जाणवते, ती म्हणजे भाषा या घटकाला असलेले स्थान. ती आशयसंपन्न आणि अर्थसमृद्ध आहे. या भाषेचे तीन विशेष आहेत. पहिला विशेष म्हणजे कानडीचा प्रभाव असलेली मराठी बोली. दुसरा विशेष म्हणजे 'खास' मुलांची असणारी भाषा आणि तिसरा विशेष म्हणजे लंपनची स्वत:ची खास भाषा. कानडीचा प्रभाव असलेली सीमारेषेवरील मराठी बोली ही विलक्षण भावनोत्कट, विविध रसांचा प्रत्यय देणारी आहे. ती जेवढी खमंग आहे, तेवढीच तरल संवेदना प्रकट करणारी आहे. संतांच्या कथांतील व्यक्ती आपल्या बोलीतून भावनांची उत्कट अभिव्यक्ती करतात. मराठी गद्य साहित्यात, विशेषत: कथेच्या क्षेत्रात मुलांची भाषा एवढ्या मोठ्या प्रमाणात आणि सातत्यपूर्वक पहिल्यांदाच प्रकाश संत यांच्या कथांतून प्रकट झाली आहे.

या कथांच्या काळाचा विचार केला की त्यातील सांस्कृतिक आणि वाङ्मयीन संदर्भावरून असे जाणवते की हा काळ भारतीय स्वातंत्र्याच्या आगेमागे असलेला आहे. पण, या कथांतून सदोदित वर्तमानच जाणवतो. कोणत्याही बाल्याचा हा वर्तमान आहे; कोणासही आस्वाद्य असा. हे बाल्य भूतकाळात जमा होत नाही. ते वर्तमानातच राहते. ही लंपनची कथा आत्ता-आत्ता घडलीय असा अनुभव वाचकाला येतो. काळाचे बंधन तोडून आजच्या कुमारवयीन पिढीलाही आपलीशी वाटणारी कथा हे संतांच्या कथांचे, तसेच लेखक म्हणून संतांचे असलेले वैशिष्ट्य आहे.

हे चारही कथासंग्रह विविध पुरस्कारांनी सन्मानित करण्यात आले आहेत. 'वनवास' या कथासंग्रहाला १९९३ सालचा श्री.दा. पानवलकर पुरस्कार, १९९४-१९९५चा महाराष्ट्र राज्य पुरस्कार, १९९५ सालचा इचलकरंजीहून दिला जाणारा ग्रंथोत्तेजक पुरस्कार, १९९६ सालचा डॉ. अ.वा. वर्टी पुरस्कार आणि १९९७ सालचा महाराष्ट्र फाउण्डेशन पुरस्कार प्राप्त झाला आहे. 'शारदा संगीत' या कथासंग्रहालाही १९९७-९८ सालचा महाराष्ट्र राज्याचा पुरस्कार लाभला, तर 'पंखा' या कथासंग्रहाला २००१ साली इचलकरंजी साहित्य संमेलन स्मृती ट्रस्ट पुरस्काराने सन्मानित करण्यात आले.

या पुरस्कारांच्या बरोबरीनेच संतांच्या काही कथांचे अनुवादही करण्यात आलेले आहेत. एका मराठी लेखकाची कथा अन्य भाषांमध्ये अनुवादित होणे या घटनेचे मोल पुरस्काराइतकेच आहे. १९९५ साली 'शारदा संगीत' या कथेचा अनुवाद धनंजय कापसेंनी केला आहे, तर सुप्रसिद्ध समीक्षक म.द. हातकणंगलेकर यांनी 'समज' ही कथा 'The Age of Awakening' या शीर्षकाने अनुवादित केलेली आहे. तसेच कमल संन्याल यांनी 'ओझं' या कथेचे 'Burden' असे भाषांतर केलेले आहे. के.ज. पुरोहित, सुधा जोशी यांनी २००४ साली संपादित केलेल्या 'मराठी कथा- विसावे शतक' या ग्रंथात 'आदम' या कथेचा समावेश करण्यात आला आहे.

प्रकाश संत यांच्या चारही कथासंग्रहांतील निवडक कथांचे पुणे आकाशवाणीसाठी 'शारदा संगीत' या नावाने नभोनाट्यात रूपांतर करण्यात आले होते. २००४ साली या कथा नभोनाट्याच्या रूपात प्रसारित झाल्या. तसेच, 'ओझं' या कथेचे कोल्हापूरच्या प्रत्यय कला केंद्राने नाट्यरूपांतर करून त्याचे प्रयोग केले.

– संपादक मंडळ

**संदर्भ :**

*१. गंधे विनायक; 'लंपनचं भावविश्व'; पद्मगंधा प्रकाशन, पुणे.*

## सबनीस, वसंत

***सबनीस, रघुनाथ दामोदर***

**कथाकार, नाटककार**

**६ डिसेंबर १९२३ – १५ ऑक्टोबर २००२**



बिनीचे विनोदकार वसंत सबनीस जन्माने सोलापूरकर होते. पंढरपूर येथे प्राथमिक-माध्यमिक शिक्षण घेऊन त्यांनी फर्गसन, पुणे येथून पदवी प्राप्त केली. मुंबईला शासकीय नोकरी करता करता ते विनोदी लेखनाकडे वळले. त्यांनी 'पानदान' (१९५८), 'चिल्लर खुर्दा' (१९६०), 'भारूड' (१९६२), 'मिरवणूक' (१९६५), 'पंगत' (१९७८), 'आमची मेली पुरुषाची जात' (२००१), 'खांदेपालट' (१९७२), 'परवाल' (१९७७), 'आत्याबाईला आल्या मिशा' (१९८५), 'थापाड्या' (१९८७), 'विनोदी द्वादशी' (१९८८), 'बोका झाला संन्यासी' (२००१) असे कथासंग्रह त्यांनी लिहिले. खेरीज 'सोबती' (व्यक्तिचित्रे); 'महिश्वरी' (आत्मपर लेख) असे त्यांनी संख्येने आणि गुणाने विपुल लेखन केले. प्रसन्न भाषा, सामाजिक भान, संवादभाषेवर पकड अशा गुणांनी सबनीसांची लेखणी समृद्ध आहे.

'विच्छा माझी पुरी करा' (१९६८) हे लोकप्रिय लोकनाट्य लिहून जागतिक कीर्ती मिळवणारे लेखक

म्हणून वसंत सबनीसांचा खास नामोल्लेख करावा लागतो. तमाशाच्या कनातीआड बंदिस्त असणारा आणि भद्र लोकांना न आवडणारा लोकनाट्य हा नाट्यप्रकार समाजमान्य, लोकमान्य करणारी सबनीसांची संवादभाषा लोकनाट्याला वेगळेच परिमाण देऊन गेली. (दादा कोंडकेंच्या सादरीकरणालाही याचे श्रेय जाते.) सैंय्या भये कोतवाल' हे त्याचे हिंदी रूपडेही रसिकमान्य झाले.

सबनीसांची ओळख विनोदी नाटककार म्हणून महत्त्वाची आहे. 'गेला माधव कुणीकडे' (१९९४), 'कार्टी श्रीदेवी' (१९८८), 'मामला चोरीचा' (१९८६), 'म्हैस येता घरा' (१९६९), 'मेजर चंद्रकांत' (१९७७) आणि अतिशय गाजलेले नाटक 'सौजन्याची ऐशीतैशी' (१९७५) अशी विनोदी नाट्यसंपदा आणि त्याचबरोबर त्यांनी अनेक एकांकिका, 'अदपाव सुतार'सारखी वगनाट्ये आणि 'निळावंती' (१९६३), 'माझे घरटे माझी पिले' (१९६८) अशी वेगळ्या घाटाची नाटके लिहिली.

'प्रेक्षकांनी क्षमा करावी' (१९६१) आणि 'चिलखतराज जगन्नाथ' (१९७१) हे त्यांचे एकांकिकासंग्रह प्रयोगक्षम आहेत. संवादभाषा सिद्धहस्त असल्याने त्यांनी अनेक यशस्वी पटकथाही लिहिल्या.

– डॉ. सुवर्णा दिवेकर

**संदर्भ :**


*१. शेळके शुभदा संक.; 'जमलेली पानं'; शेळके शुभदा, मुंबई; १९८७.*

*२. सबनीस वसंत; 'संस्कार पंढरी'; श्रीदीपलक्ष्मी-दिवाळी अंक, २०००.*


## सरकार, अंबिका रमेशचंद्र

**कथालेखिका, अनुवादक**

**२९ जानेवारी १९३२**

अंबिका सरकार यांचे माहेरचे नाव अंबिका नारायण भिडे असून त्यांचा जन्म मुंबईत झाला. गिरगावातील शारदासदनमध्ये त्यांचे मॅट्रिकपर्यंतचे शिक्षण झाल्यावर त्या



विल्सन महाविद्यालयातून बी.ए. झाल्या. मुंबई विद्यापीठाच्या स्कूल ऑफ इकॉनॉमिक्समधून १९५४ साली त्यांनी एम.ए.ची पदवी संपादन केली. १९५५ ते १९६० पर्यंत एल्फिन्स्टन महाविद्यालयात व नंतर १९९२ साली निवृत्त होईपर्यंत त्या सिडनॅहॅम कॉलेज, मुंबई येथे अर्थशास्त्राच्या प्राध्यापिका होत्या.

समकालीन लेखिकांच्या कथालेखनाचा प्रभाव त्यांच्यावर पडला असल्याचे जाणवते. कमीत-कमी शब्दांत जास्तीत जास्त आशय, उत्कट भावभावना, कथा-भाग समर्थपणे व्यक्त करण्याचा प्रयत्न अंबिका सरकार यांनी केला. 'नकळत्या वयापासून १९५० पर्यंत माझे भरपूर वाचन झाले होते,' असा त्यांनी उल्लेख केलेला आहे. त्या संस्कारी वाचनातून त्यांना लेखनाची प्रेरणा मिळाली.

१९५२-१९५३ मध्ये त्यांनी ७-८ कथा एका मागोमाग एक लिहिल्या. त्यांतील एका कथेला स्पर्धेत पारितोषिक मिळाले. स्त्रीचे स्वत्व, आचार व विचार यांचे स्वातंत्र्य, परंपरागत मूल्ये बाजूला ठेवून स्वतः केलेला मूल्यामूल्य विवेक यांतून त्यांनी स्त्री-जीवनाच्या सुख-दुःखांचा वेध भावपूर्ण व संयत शैलीने आपल्या कथांतून घेतला आहे.

'चाहूल' (१९८०) आणि 'प्रतीक्षा' (१९८१) हे दोन कथासंग्रह; 'एका श्वासाचं अंतर' ही त्यांची कादंबरी प्रकाशित झालेली आहे. (१९९०). त्यांचे लिखाण मोजकेच असले तरी आशयपूर्ण आहे. त्यांच्या कथा 'सत्यकथा', 'दीपावली', 'हंस' यांसारख्या मासिकांतून प्रसिद्ध झाल्या होत्या.

विशेष उल्लेखनीय म्हणजे थिऑसफी आणि बौद्धधर्म हे त्यांच्या आवडीचे विषय असून भिक्खू संघ रक्षित यांच्या 'हिस्टरी ऑफ माय गोइंग फॉर रेफ्यूज' या पुस्तकाचा 'माझ्या शरण गमनाचा इतिहास' आणि 'द

बोधिसत्त्व आयडिअल’ या पुस्तकाचा ‘बोधिसत्त्व आदर्श’ हो अनुवाद त्यांनी केलेला आहे.

– वि. ग. जोशी

**संदर्भ :**

१. *राजाध्यक्ष विजया, रानडे अशोक, संपादक; ‘कथाशताब्दी’ ग्रंथाली प्रकाशन; १९९३.*

## सरदार, गंगाधर बाळकृष्ण

**संतसाहित्याचे अभ्यासक, विचारवंत**

**२ ऑक्टोबर १९०८ – १ डिसेंबर १९८८**



संतसाहित्याचा सामाजिक दृष्टीने विचार करणारे मराठीतील एक महत्त्वाचे अभ्यासक तसेच महाराष्ट्रातील प्रबोधन काळ, त्या काळातील व्यक्तींचे कार्य व समकालीन प्रश्न यांविषयी विचार करणारे विचारवंत अशी गं.बा. सरदार यांची महाराष्ट्राला ओळख आहे. ठाणे जिल्ह्यातील जव्हार संस्थानात गं.बा. सरदार यांच्या वडिलांचे दुकान होते. पाच बहिणी, तीन चुलत भावंडे, काकू, आत्या, मावशी अशा एकत्र कुटुंबात त्यांचे बालपण गेले. मराठी सातवीपर्यंतचे त्यांचे शिक्षण जव्हार येथील कृष्ण विद्यालयात झाले. पुढील शालेय शिक्षणासाठी ते चुलत्यांकडे मुंबईला आले. दादर येथील छबिलदास हायस्कूलमधून १९२४मध्ये ते मॅट्रिकची परीक्षा उत्तीर्ण झाले. १९२५च्या सुमारास महाविद्यालयीन शिक्षणासाठी ते पुण्याला गेले. पुण्याच्या सर परशुरामभाऊ महाविद्यालयातून १९३२मध्ये बी.ए. व १९३४ मध्ये एम.ए. या पदव्या त्यांनी संपादित केल्या. १९३४ ते १९४१ या काळात त्यांना बेकारी अनुभवावी लागली. १९४१ ते १९६८ या काळात पुण्याच्या श्रीमती नाथीबाई दामोदर ठाकरसी महाविद्यालयात मराठीचे प्राध्यापक म्हणून त्यांनी काम केले. १९६८मध्ये नोकरीतून निवृत्त झाल्यानंतर अखेरपर्यंत लेखन व समाजप्रबोधन याच कार्याला त्यांनी वाहून घेतले.

गं. बा. सरदार हे गांधीवाद व मार्क्सवाद या दोन्ही विचारसरणींचा संस्कार असणारे एक समाजवादी विचारवंत म्हणून महाराष्ट्रात परिचित आहेत. जव्हारमधील बालपणीच्या वास्तव्यात त्यांनी आजूबाजूचे जे जीवन अनुभवले, त्याचे खोल संस्कार त्यांच्या मनावर झाले. एका मुलाखतीत त्यांनी त्याचा आवर्जून उल्लेख केला आहे. ‘जव्हारला आमचं दुकान होतं. ठाणे जिल्हा सर्वांत गरीब आणि जव्हार हे ठाणे जिल्ह्यातील सर्वांत गरीब. तिथले सगळ्यांत गरीब असलेले उघडे–नागडे वारली मी वर्षानुवर्ष रोज पाहत होतो. कुणबी, चांभार, मुसलमान हे त्या गावातले माझे मित्र. ते सगळे व्हर्नाक्युलर फायनलच्या पुढे गेले नाहीत... त्यांचं आयुष्य मातीमोल झालेलं मी पाहिलं आहे. त्याचा परिणाम माझ्या मनावर खूप झाला. समाजवादाची प्रेरणा मी तिथूनच घेतली. मग पुस्तकातून मी थोडं वाचलं. पण प्रेरणा पुस्तकातून आली नाही.’ याचबरोबर ‘ज्याला आपण romantic nationalism म्हणू शकू त्याचाही परिणाम जव्हारमुळे माझ्यावर झाला’, असेही त्यांनी नोंदविले आहे.

१९२५च्या सुमारास महाविद्यालयीन शिक्षणासाठी पुण्यात आल्यानंतरही स्वातंत्र्य चळवळीशी त्यांचा सतत संबंध आला. १९३०मध्ये टिळक महाराष्ट्र विद्यापीठाच्या तुकडीतून ते सत्याग्रहात सामील झाले व त्यासाठी त्यांना तुरुंगवास भोगावा लागला. ‘पुण्यातल्या सरकारमान्य महाविद्यालयातून सत्याग्रहात जाणारा मीच पहिला विद्यार्थी होतो’, असे सरदारांनी म्हटले आहे. या काळात सरदारांनी गांधीवादाचा स्वीकार केला. तो केवळ वैचारिकदृष्ट्याच केला असे नाही. गांधीवादाचे प्रत्यक्ष आचरण करण्याचा त्यांनी प्रयत्न केला. ‘अंगात आचार्य पद्धतीचे खादीचे कुडते, कमरेला आखूड पंचा, वाढलेली दाढी आणि अनवाणी चालणे’ अशा रूपात १९३०–१९३२च्या सुमारास त्यांना पाहिल्याचे ह. श्री. शेणोलीकर यांनी नमूद केले आहे. १९४२च्या चळवळीनंतर त्यांचा मार्क्सवादी विचारसणींतील संबंध

आला. गांधीवाद व मार्क्सवाद या दोन्ही विचारसरणीतील माणसाला केंद्रस्थानी ठेवून विचार करण्याची पद्धती त्यांनी स्वीकारली.

स्वातंत्र्य चळवळीशी संबंध येऊनही १९३० च्या चळवळीनंतरच्या आयुष्यात सरदार क्रियाशील राजकारणाकडे वळले नाहीत. 'ज्याला मॅन ऑफ ॲक्शन म्हणावे, तसा मी नाही. काही प्रमाणात चिंतन, विचार हेच क्षेत्र मी निवडलं नि तेच माझ्या स्वभावाला मानवणारं आहे असं मला वाटत', असे याबद्दलचे स्पष्टीकरण सरदारांनी स्वतःच दिलें आहे.

१९३४ मध्ये एम.ए. झाल्यानंतर १९४१ पर्यंत सरदारांना नोकरी नव्हती. त्या काळात पीएच.डी. ची पूर्वतयारी म्हणून एकोणिसाव्या शतकातील गद्याचा त्यांनी अभ्यास केला. त्यामधून 'अर्वाचीन मराठी गद्याची पूर्वपीठिका' हा सरदारांचा पहिला ग्रंथ सिद्ध झाला (१९३७). निबंधमालापूर्व गद्याचे स्वरूप विशद करणारा 'मराठी गद्याचा इंग्रजी अवतार' हा दत्तो वामन पोतदार यांचा ग्रंथ १९२२ मध्येच प्रसिद्ध होऊन मान्यता पावलेला होता. अव्वल इंग्रजीतील मराठी गद्य केवळ शालोपयोगी व दर्जाने बेताचेच होते या दृष्टिकोनातून पोतदारांच्या ग्रंथातील विवेचन केले गेले होते. सरदारांनी आपल्या ग्रंथातून त्या गद्याची जमेची बाजू साधार विशद केली आहे, हे या ग्रंथाचे वैशिष्ट्य होय.

या अभ्यासाचाच एक भाग म्हणून एकोणिसाव्या शतकातील सामाजिक प्रश्नांविषयी विचार करताना ज्या व्यक्तींचे कार्य सरदारांना महत्त्वाचे वाटले; अशा भाऊ महाजन, लोकहितवादी, विष्णुबुवा ब्रह्मचारी, जोतीराव फुले व विष्णुशास्त्री पंडित यांच्या कार्याचे विवेचन करणारे सरदारांचे लेख महाराष्ट्र साहित्य पत्रिक या नियतकालिकातून प्रसिद्ध झाले. या लेखांचाच 'महाराष्ट्राचे उपेक्षित मानकरी' हा ग्रंथ सिद्ध झाला (१९४१). सरदारांचे हे दोन्ही ग्रंथ विषय व विवेचनपद्धती यामुळे मान्यता पावले.

महाराष्ट्राच्या या उपेक्षित मानकऱ्यांपैकी जोतीराव फुले यांच्याविषयी सरदारांनी पुन्हापुन्हा लिहिले. अनाथ विद्यार्थिगृहाच्या स्वाध्यायमालेसाठी 'जोतीराव फुले' ही पुस्तिका त्यांनी लिहिली (१९४५) तर पुढे 'महात्मा फुले व्यक्तित्व आणि विचार' (१९८१) या ग्रंथात फुल्यांचे कार्य व विचार या विषयीचे विस्तृत विवेचन सरदारांनी केले.

मराठी साहित्यक्षेत्रात सर्वाधिक मान्यता मिळालेला सरदारांचा ग्रंथ म्हणजे 'संतवाङ्मयाची सामाजिक फलश्रुती' हा होय (१९५०). (या ग्रंथाची अलीकडची आवृत्ती पाहिली तर १९४७ ते १९८२ या काळात संतसाहित्याविषयी लिहिलेल्या लेखांचा संग्रह, असे या ग्रंथाचे स्वरूप आहे हे जाणवते.) मराठी समाजावरील संतसाहित्याचा प्रभाव लक्षात घेऊन सामाजिक दृष्टीने संतसाहित्याची मीमांसा करण्याची परंपरा मराठी साहित्यक्षेत्रात न्यायमूर्ती रानड्यांपासून आहे. गं.बा. सरदारही याच परंपरेतील विचारवंत होत. आपल्या ग्रंथातील विवेचनातून सरदारांनी न्यायमूर्ती रानडे यांच्या भूमिकेचाच पुनरुच्चार केला आहे. संतांनी समाजाला पंगू बनविले, या वि.का. राजवाडे यांच्या निष्कर्षाचा साधार प्रतिवाद करून, संतवाङ्मय ही एक प्रबोधनाचीच चळवळ होती. 'मध्ययुगीन समाजरचनेचा पाया खणून काढून स्वतंत्रपणे नवी समाजव्यवस्था स्थापण्याची प्रेरणा या प्रबोधनात नव्हती. ही मर्यादा ओळखून संतांचे कार्य पाहिले तर मोठ्या धैर्याने व चिकाटीने त्यांनी समाजजीवनावर मौलिक व चिरंतन संस्कार घडविले याबद्दल शंका उरत नाही', असे ठाम प्रतिपादन सरदारांनी प्रस्तुत ग्रंथात केले आहे. साहित्याचे साहित्य म्हणून असणारे महत्त्व अबाधित ठेवून सामाजिक दृष्टीने साहित्याकडे कसे पाहावे, याचा एक चांगला नमुनाच या ग्रंथाद्वारे मराठीत सिद्ध झाला आहे. या ग्रंथाचे इंग्रजी भाषांतर 'Saint Poets of Maharashtra : There Impact on Society' या नावाने प्रसिद्ध झाला आहे (१९६९). डॉ. कुमुद मेहता यांनी हे भाषांतर केले आहे.

संतसाहित्य हा सरदारांच्या आस्थेचा एक विषय राहिला आहे. म्हणूनच ज्ञानेश्वरांचे व्यक्तित्व, तत्त्वचिंतन

व कामगिरी यांचे समालोचन करणारी तीन व्याख्याने त्यांनी 'कौशिक व्याख्यानमाले'त दिली (१९७१). तीच 'ज्ञानेश्वरांची जीवननिष्ठा' या नावाने पुस्तक रूपाने प्रसिद्ध झाली. पु. मं. लाड व्याख्यानमालेत दिलेल्या 'संतसाहित्याची सामाजिक व राष्ट्रीय कामगिरी' या आकाशवाणीवरील व्याख्यानांचाही पुस्तकात समावेश झाला आहे.

याशिवाय तुकाराम, रामदास व एकनाथ या संतांच्या समग्र काव्यसंपदेतून प्रातिनिधिक वेचे निवडून त्यांचे संपादन सरदारांनी केले आहे. 'तुकाराम दर्शन' (१९६८), 'रामदास दर्शन' (१९७२) व 'एकनाथ दर्शन' (१९७८) या नावांनी ही संपादने प्रकाशित झाली आहेत. या प्रत्येक ग्रंथाला विवेचक प्रस्तावना असून त्यामध्ये त्या-त्या संताचा काळ, चरित्रपट, व्यक्तित्वाची जडणघडण व लेखनाचा विकासक्रम यासंबंधी विवेचन आले आहे. निवडलेल्या वेच्यांचे केलेले विषयवार वर्गीकरण व सूचक शीर्षके यांमुळे विद्यार्थ्यांसाठी ही संपादने उपयुक्त ठरली आहेत.

१९६० मध्ये संयुक्त महाराष्ट्राची स्थापना होत असतानाच सरदारांनी दोन मोठ्या ग्रंथांचे संपादन केले. 'महाराष्ट्र जीवन: परंपरा, प्रगती आणि समस्या' खंड १ व खंड २ (१९६०), 'महाराष्ट्र जीवन'च्या पहिल्या खंडात इतिहास, परंपरा, धर्मसंस्था, तत्त्वमीमांसा, समाजकारण, राजकारण, अर्थकारण हे विषय आले आहेत. तर दुसऱ्या खंडात साहित्य व कला यासंबंधीचे उपविषय आले आहेत. महाराष्ट्रातील तीस विचारवंतांनी या ग्रंथासाठी लेखन केले आहे. या ग्रंथाच्या दुसऱ्या खंडात 'नव्या महाराष्ट्राचे भवितव्य' हा सरदारांचा दीर्घ लेख आहे.

त्यानंतर 'संक्रमण काळाचे आव्हान' (१९६६) हा ग्रंथ सरदारांनी संपादित केला. 'देशातील विचारवंतांनी सर्वसामान्य लोकांना व सार्वजनिक कार्यकर्त्यांना आपल्यापुढील समस्यांची स्थूलमानाने पण स्पष्ट कल्पना द्यावी' या हेतूने हे संपादन केले आहे. अन्नपरिस्थिती, आर्थिक विकास, नेतृत्व, शिक्षण, राजकारण अशा विषयांवर त्यात्या ज्ञानशाखेतील चौदा विचारवंतांचे लेख या ग्रंथात आले आहेत.

गं. बा. सरदार हे सामाजिक परिवर्तनाच्या चळवळींकडे जागरूकतेने व आस्थेने पाहणारे विचारवंत होते. साहजिकच या विषयांवरही त्यांनी विपुल लेखन केले आहे. 'न्यायमूर्ती रानडेप्रणित सामाजिक सुधारणेची तत्त्वमीमांसा' (१९७५), 'आगरकरांचा सामाजिक तत्त्वविचार' (१९७५), 'महाराष्ट्राच्या प्रबोधनाची वाटचाल' (१९८६), 'गांधी आणि आंबेडकर' (१९८७) हे सरदारांचे ग्रंथ त्या दृष्टीने महत्त्वाचे आहेत. याचबरोबर महाराष्ट्राचे समाजकारण, धर्मकारण, राजकारण व मराठी साहित्य यांच्या स्थितिगतीचा शोध घेणारे जे स्फुटलेखन सरदारांनी केले, ते 'प्रबोधनातील पाऊलखुणा' (१९७८), 'नव्या युगाची स्पंदने' (१९८२), 'नव्या ऊर्मी नवी क्षितिजे' (१९८७), 'परंपरा आणि परिवर्तन' (१९८८) या ग्रंथांतून संग्रहित झाले आहे. या सर्व लेखनातून सरदारांची समाजविषयक असणारी आस्था व समाजातील सर्व हालचालींकडे समतोल वृत्तीने पाहण्याची दृष्टी व्यक्त होते.

अव्वल इंग्रजीतील गद्य, महाराष्ट्रातील समाजसुधारक, संतसाहित्य व समाजप्रबोधन ही सरदारांच्या लेखनाची प्रमुख क्षेत्रे आहेत. मराठी साहित्यक्षेत्रातील अलीकडील प्रवाशांचा विचार करताना दलित साहित्यावर त्यांनी समरसतेने लिहिले आहे. हे सर्व लेखन करीत असताना सरदारांची भूमिका केवळ अभ्यासकाची वा संशोधकाची नाही, ती ज्ञानप्रसाराची आहे.

सरदारांच्या या भूमिकेनेच त्यांची लेखनशैली घडविली आहे. म्हणूनच त्यांच्या प्रतिपादनात एक प्रकारचा सरळपणा आढळतो. त्यांच्या लेखनात क्वचित वक्तृत्व गुण असला; तरी अलंकारिकता, भावनांना चेतविणारे युक्तिवाद, उपहास, उपरोध इत्यादींचा अभाव असतो. सात्त्विक संयमपूर्ण लेखन हेच सरदारांच्या शैलीचे वैशिष्ट्य जाणवते. दि. के. बेडेकर यांनी सरदारांचे वर्णन 'ज्ञानप्रसारकांपुढील आदर्श' असे केले आहे.

आयुष्याच्या उत्तरार्धात सरदारांना काही सन्मान प्राप्त झाले.

१४ जानेवारी १९७८ सालच्या मुंबई येथे भरलेल्या दलित साहित्य संमेलनाचे अध्यक्षपद त्यांनी भूषविले तसेच बार्शी येथील चौपन्नाव्या अखिल भारतीय मराठी साहित्य संमेलनाच्या अध्यक्षपदाचा मानही त्यांना मिळाला.

महाराष्ट्र साहित्य परिषद, भारत इतिहास संशोधन मंडळ, गोखले एज्युकेशन सोसायटी, महाराष्ट्र मानव विज्ञान परिषद, समाज प्रबोधन संस्था, लोकायन प्रतिष्ठान, पुणे इत्यादी संस्थांच्या कार्यात सरदारांचा सहभाग होता. तसेच 'नवभारत' मासिकाच्या सुरुवातीच्या काळात त्या नियतकालिकाशी ग. बा. सरदार संबंधित होते.

– प्रा. दिगंबर पाध्ये

## सरदेशमुख, त्र्यंबक विनायक
**कादंबरीकार, समीक्षक**
**२२ नोव्हेंबर १९२२**



त्र्यंबक सरदेशमुख यांचा जन्म अक्कलकोट (जि. सोलापूर) येथे झाला. त्यांचे प्राथमिक शिक्षण अक्कलकोट व सोलापूर येथे झाले. एम. ए. बी. टी. पर्यंत शिक्षण झाल्यावर त्यांनी १९४२ ते १९६० पर्यंत सोलापूरच्या चांडक हायस्कूलमध्ये शिक्षक म्हणून आणि पुढे सोलापूरच्याच दयानंद महाविद्यालयात प्राचार्य म्हणून काम केले. सेवाकालानंतर त्यांनी मराठी अभ्यास मंडळ, मुंबई विद्यापीठ, महाराष्ट्र राज्य साहित्य आणि संस्कृती मंडळ, शिवाजी विद्यापीठाचे सिनेट या संस्थांचे सदस्य म्हणून काम पाहिले.

प्रा. देशमुख यांची समीक्षक आणि कादंबरीकार म्हणून असलेली कारकीर्द जास्त लक्षणीय आहे.

'उच्छाद', 'ससेमिरा', 'बखर एका राजाची', 'डांगोरा एका नगरीचा' या त्यांच्या काही उल्लेखनीय कादंबऱ्या आहेत. त्यांपैकी पहिल्या कादंबरीसाठी त्यांना महाराष्ट्र शासन आणि मराठी साहित्य परिषद, पुणे यांचे पुरस्कार लाभले, तर दुसऱ्या कादंबरीसाठी महाराष्ट्र शासनाचा व दमाणी संस्थेचा पुरस्कार लाभला.

'उत्तररात्र' हे त्यांचे काव्य आहे, तर 'टाहो', 'थैमान' ह्या त्यांच्या नाट्यकृती होत. 'नदीपार' हा अनुवाद असून 'अंधारयात्रा', 'धुके आणि शिल्प', 'प्रदेश साकल्याचा', 'गडकऱ्यांची संसारनाटके' आणि 'रामदास : प्रतिमा आणि प्रबोध' ही त्यांची समीक्षात्मक पुस्तके असून त्यांपैकी गडकऱ्यांवरील पुस्तकांसाठी महाराष्ट्र शासनाचा तर रामदासांवरील पुस्तकांसाठी मराठी साहित्य परिषद, रा. श्री. जोग समीक्षा, सोनोपंत दांडेकर प्रकाशन मंडळ यांचे पुरस्कार लाभलेले आहेत.

खलील जिब्रान या लेबनॉनमधील ख्रिश्चन लेखकाने 'दि प्रॉफेट' नावाचे पुस्तक लिहिले. सरदेशमुखांनी त्याचा 'देवदूत' या नावाने अनुवाद केलेला आहे. ते म्हणतात की, खलीलच्या अनोख्या शैलीचे मुक्त पडसाद म्हणजे माझा हा अनुवाद आहे. खलीलचा देवदूत आवाहनातून, उपदेशातून सनातन सत्याचे आणि शिवतत्त्वाचे जागरण करू पाहतो. सुख–दुःखाच्या प्रसंगांत तो लोकांचा सांगती होतो.

'रामदास : प्रतिमा आणि प्रबोध' हे समीक्षात्मक पुस्तक म्हणजे अभिनिवेशमुक्त मनाने त्या महामानवाचे मनोगत जाणून ते सादर करण्याचा एक प्रयत्न आहे. रामदास जे आहेत आणि जसे आहेत, ते आणि तेवढे आमच्या आकलनाचा आणि प्रीतीचा विषय व्हावेत, अशी लेखकाची अपेक्षा आहे. समर्थांचा गौरव करणारे आणि त्यांच्यावर टीका करणारे, दोघांनीही समर्थ नीट समजून घेतलेले नाहीत. ते समजून सांगण्याचा प्रयत्न या पुस्तकात सरदेशमुखांनी केलेला दिसतो.

'गडकऱ्यांची संसारनाटके' ह्या समीक्षणात्मक पुस्तकात सरदेशमुखांनी गडकऱ्यांच्या 'प्रेमसंन्यास', 'पुण्यप्रभाव', 'भावबंधन' आणि 'एकच प्याला' या चार नाटकांचा विचार केलेला आहे. या नाटकांवरून गडकऱ्यांचा केला जाणारा उपरा गौरव, तसेच व्यंगरूप वाळवी खरवडून काढण्याचा हा एक प्रयत्न आहे. त्यांच्या मते, तीन गोष्टींमध्ये गडकऱ्यांचे सामर्थ्य एकवटलेले आहे :

स

१. त्यांची कथानके पात्रांच्या व्यक्तिमत्त्वदर्शनाला शरण गेलेली आहेत.

२. हे व्यक्तिमत्त्वदर्शन अतिबौद्धिकतेचा पांगुळगाडा डावलून सुजाणपणे भावात्मक झालेले आहे.

३. परिणामस्वरूप गडकऱ्यांची ही संसारनाटके एका अंगाने व्यक्तींचे मनोमंथन करीत विकसू पाहतात, तर दुसऱ्या बाजूला नैतिक-आत्मिक समस्यांचे उलट-सुलट फासे मांडून संसाराचा सारिपाट कसा बिकट आहे, याचे दर्शन घडवितात.

व्हिक्टर ह्यूगो ह्या फ्रेंच लेखकाची 'हसणारा' या नावाची एक कादंबरी आहे. तिचे सरदेशमुखांनी केलेले 'थैमान' हे नाट्यरूपांतर आहे. त्याचा नायक ज्या व्यक्तींपाशी आणि ज्या परिस्थितीत मोठा होतो, त्या व्यक्तींचा आणि परिस्थितीचा साम्यांश या नाटकाचा आधार आहे, असे ते म्हणतात.

'प्रदेश साकल्याचा' या समीक्षणात्मक पुस्तकात सरदेशमुखांचे सहा लेख आहेत. त्यांचे म्हणणे असे की, ''मी साहित्याचा आणि समीक्षेचा जीवनाशी असलेला संबंध शोधण्याचा प्रयत्न या पुस्तकात केलेला आहे. तसेच कलाकृती आणि तिची समीक्षा वाचकाची जाणीव संपन्न व विस्तृत करतात.''

'बखर एका राजाची' ही त्यांची सर्वोत्तम म्हणून गाजलेली कादंबरी आहे. आपल्या देशातील राजघराणी कालपरवा इतिहासात विलीन झाली. तसल्या राजकुळातील एका स्मृतिशेषाची ही शोकात्म आणि शोकांत कहाणी आहे. लेखकाने ती आत्मनिवेदनात्मक पद्धतीने लिहिलेली आहे. या कादंबरीचा नायक-संस्थानचा राजा भोवतीच्या परिस्थितीने त्याला स्वत:चे अस्तित्वच शारीरिक आणि मानसिक पातळीवर निरर्थक आणि कृतिशून्य वाटल्याने, अखेरीस तो आत्महत्या करतो, असे दाखविलेले आहे.

अशा रीतीने आपल्या बहुविध लेखनाने श्री. सरदेशमुखांनी मराठी वाङ्मयात आपले एक स्थान निर्माण केलेले आहे.

– शशिकांत मांडके

**संदर्भ :**

*१. सरदेशमुख त्र्यं. वि.; 'उन्हाचे दिवस आणि सावलीच्या जागा'; अबकडई-दिवाळी अंक, १९८६.*

*२. ठकार निशिकांत; 'सत्त्वसंपन्न प्रतिभावंताचा सार्थ गौरव'; सामना-११ जाने. २००४.*

## सरदेसाई, गोविंद सखाराम

**रियासतकार, लेखक**

**१७ मे १८६५ – १९ नोव्हेंबर १९५९**



रियासतकार गोविंद सरदेसाई यांचा जन्म गोविल (जि. रत्नागिरी) येथे झाला. त्यांचे मॅट्रिकपर्यंतचे शिक्षण रत्नागिरीला झाले. मुंबईच्या एल्फिन्स्टन कॉलेजमधून बी.ए.ची पदवी घेतल्यावर १८८९ पासून १९२५ पर्यंत बडोदे येथे श्रीमंत सयाजीराव गायकवाड महाराजांकडे त्यांनी 'रीडर' आणि युवराजांचे 'ट्यूटर' म्हणून काम केले. सयाजीराव महाराजांबरोबर त्यांनी संपूर्ण भारत, इंग्लंड आणि युरोपाचा पाच वेळा प्रवास केला. त्यामधून जगातील विविध समाज, तेथील चालीरीती, रूढी, परंपरा यांचे जवळून निरीक्षण करण्याची संधी त्यांना मिळाली.

नोकरी करत असतानाच त्यांनी इ.स.१००० ते १८५८ पर्यंतच्या प्रदीर्घ कालखंडाचा इतिहास लिहिण्याचे काम हाती घेतले. त्यांच्यापूर्वी लिहिल्या गेलेल्या बहुतांश ऐतिहासिक लेखनांत घटनांचे कथन करणे हाच उद्देश असे; सरदेसाईंनी मात्र घटनांचे पृथक्करण करून उपलब्ध झालेल्या पुराव्यांची यथार्थता परखडपणे पडताळून पाहिली. त्यासाठी आवश्यक असलेली चिकाटी, पूर्वग्रहविरहित दृष्टी आणि संशोधन वृत्ती त्यांच्यापाशी होती.

मुसलमानी रियासतीमध्ये (दोन खंड) सुलतान घराणी व मोगल बादशाही असा इ. स. १००० ते १७०७ पर्यंतचा सुमारे ७०० वर्षांचा कालखंड, मराठी

रियासतीमध्ये (तेरा खंड) इ.स. १६०० ते १८१८पर्यंतचा २०० वर्षांचा कालखंड, तर ब्रिटिश रियासतीमध्ये (दोन खंड) इ.स. १४९८ ते १८५८ असा २५० वर्षांचा कालखंड समाविष्ट केलेला आहे. वेगवेगळ्या राजवटींचे भारताच्या अर्थकारण, राजकारण व समाजकारण यांवर झालेले परिणाम त्यांनी विस्तृतरीत्या नोंदवले आहेत.

रियासतीबरोबरच 'न्यू हिस्टरी ऑफ महाराष्ट्र', 'मेन करंट्स ऑफ मराठा हिस्टरी' असे इंग्रजी ग्रंथ; 'पेशवे दप्तर' (पंचेचाळीस खंड), 'पूना रेसिडन्सी कॉरस्पॉण्डन्स' (पाच खंड) असे संशोधित व संपादित, सुमारे १०५ ग्रंथ आणि २७५ लेख, शिवाय इंग्लंड देशाचा विस्तार ('एक्सपॅन्शन ऑफ इंग्लंड' - जॉन सीली) व राजधर्म ('प्रिन्स' - मॅकिएव्हेली) हे दोन भाषांतरित ग्रंथ त्यांच्या नावावर जमा आहेत.

हिन्दुस्थानच्या अर्वाचीन इतिहासाविषयी सखोल संशोधन आणि लेखन केल्यामुळे गो. स. सरदेसाई याच्या नावामागे 'रियासतकार' सरदेसाई ही उपाधी जोडली गेली आहे, यातच त्यांच्या कामाची थोरवी आहे. रावसाहेब, रावबहादूर, पद्मभूषण (१९५७), पुणे विद्यापीठाची डी. लिट. अशा अनेक पुरस्कारांचे ते मानकरी ठरले.

– मृणालिनी चितळे

**संदर्भ :**

*१. कुलकर्णी, व. दि., संपादन; 'मराठी वाङ्मयाचा इतिहास' - खंड ६.*

## सरदेसाई, रघुनाथ गोविंद

**कथालेखक, संपादक, लघुनिबंधकार**

**विनोदी लेखक, नाट्य-चित्रसमीक्षक, क्रीडालेखक**

**७ सप्टेंबर १९०५ – ११ डिसेंबर १९९१**

रघुनाथ सरदेसाईंची खरी ओळख आहे ती क्रीडाविषयक पुस्तकांचे लेखक म्हणूनच. त्यांचा जन्म कोल्हापूरचा व शिक्षणही कोल्हापुरातच झाले. १९२५ मध्ये ते मॅट्रिक झाले. त्यांनी पुण्याच्या 'स्फूर्ती' व 'चित्रमयजगत्' या मासिकाचे संपादक, सहसंपादक म्हणून काही काळ कार्य केले. नंतर मुंबईच्या 'विहार', 'विविधवृत्त', 'नवयुग', 'तारका' इत्यादी साप्ताहिकांत; 'चित्रा', 'मराठा' या दैनिकांत आणि 'यशवंत' या मासिकात त्यांनी संपादकीय विभागात काम केले. १९७० पासून ते 'नवा काळ' मध्ये सहसंपादक होते. या वृत्तपत्रातून त्यांनी क्रीडा व चित्रपट-नाट्यविषयक अभ्यासपूर्ण असे भरपूर लेखन केले.

'स्वाती' (१९३९), 'चित्रा' (१९४०), 'महाश्वेता नि इतर कथा' (१९४६) हे कथासंग्रह व 'सुरसरी' (१९४१), 'आमचा संसार' (१९४८) हे विनोदी लेखसंग्रह प्रकाशित झालेले आहेत. त्यांनी काही रहस्यकथाही लिहिल्या. पण त्यांची वाचकप्रिय गाजलेली पुस्तके आहेत ती क्रीडाविषयावरीलच.

'हिंदी क्रिकेट' (१९४८) हे त्यांचे पुस्तक, क्रिकेटसंबंधीचे मराठीतील पहिले पुस्तक आहे. तसेच टेनिस या खेळासंबंधी ऐतिहासिक दृष्टिकोनातून माहिती देणारे असे 'खेळांचा राजा – लॉन टेनिस' हेपण मराठीतील पहिलेच पुस्तक आहे.

'खेळांच्या जन्मकथा' (१९६६), 'महान क्रिकेट कर्णधार' (१९७०), 'क्रीडाकथा' (१९७२), 'ऑलिम्पिक सामने', 'खेळ किती दाविती गमती' (१९७६) अशी क्रीडाविषयक अनेक पुस्तके त्यांनी लिहिली. क्रिकेट, फुटबॉल, हॉकी, लॉन टेनिस, टेबल टेनिस, बुद्धिबळ, गोल्फ, मुष्टियुद्ध, ॲथलेटिक्स, पत्ते, क्रीडानौका शर्यती– अशा नानाविध क्रीडाप्रकारांतील गमतीजमती व त्या वेळी घडलेल्या घटनांचे त्यांचे वाचनीय पुस्तक आहे, 'क्रीडाकथा' (माहिती आणि मनोरंजन). विविध क्रीडा प्रकारांतील गमतीजमतींची, त्या खेळांची एकत्र माहिती देणारे हे मराठीतील बहुधा पहिलेच पुस्तक असावे.

एकूणच क्रीडा – खेळ हा त्यांच्या लेखनाचा, जिव्हाळ्याचा विषय होता. लेखकाला लहानपणापासूनच खेळांची आवड असल्यामुळे आणि त्यातून व्यवसाय वृत्तपत्रकाराचा, त्यामुळे ३०-३५ वर्षे ते सातत्याने क्रीडाविषयक लेखन अत्यंत आवडीने करीत होते.

ललित वाङ्मयापेक्षाही क्रीडाविषयक लिखाण अधिक आवडीने, उत्सुकतेने वाचणारे वाचक भरपूर आहेत हे लक्षात आल्यावर, संधी मिळेल तेव्हा विविध खेळांच्या जन्मकथा, इतर माहिती मिळवून ते अभ्यासपूर्ण, सखोल लेखन करीत राहिले. जगात जे अनेक खेळ आहेत ते मुळात कसे निघाले, वाढले ते समजून घेण्याच्या जबरदस्त जिज्ञासेतून त्यांनी हे क्रीडाविषयक लेखन मराठीतून सातत्याने केले आहे.

– प्रा. मंगला गोखले

## सहस्रबुद्धे, पुरुषोत्तम गणेश

**विचारवंत, निबंधकार, कथालेखक**

**१० जुलै १९०४ – ४ मार्च १९८५**



भारतीय तत्त्वज्ञान आणि तत्कालीन लोकसत्ताक राष्ट्रधर्माचा विचार करणाऱ्या डॉक्टर पु. ग. तथा पुरुषोत्तम गणेश सहस्रबुद्धे यांनी लोकशाहीचा, तसेच विज्ञान–प्रणीत समाजरचनेचा आयुष्यभर सातत्याने पाठपुरावा केला, समाजप्रबोधनासाठी व्याख्याने दिली, लेखमालांसह ग्रंथलेखनेह केले. 'ग्रंथ हेच गुरू' ही त्यांची धारणा होती. या विचारवंताचा जन्म पुणे येथे झाला.

लहानपणी मनात वैराग्यभावना निर्माण झाल्यामुळे त्यांनी हिमालयात जाऊन जपाचा आणि ध्यानाचा प्रयोग केला. पण त्यातले वैयर्थ्य जाणवल्याने लौकिकात परतून ते १९२४ मध्ये मॅट्रिक झाले. याच वर्षी त्यांचा प्रा. श्री. म. तथा बापूसाहेब माटे यांच्याशी परिचय झाला; तो त्यांच्या आयुष्याला वळण लावणारा, संस्कार करणारा ठरला. १९२८ मध्ये स. प. महाविद्यालयातून बी. ए. झाल्यावर ते नूतन मराठी विद्यालयात शिक्षक म्हणून काम करू लागले. १९२९ मध्ये मित्रवर्य वि. कृ. दातार यांच्या भगिनी द्वारकाबाई यांच्याशी त्यांचा विवाह झाला. त्यानंतर १९३१ मध्ये ते एम. ए. झाले.

१९३१ मध्ये सहस्रबुद्धे यांनी 'किर्लोस्कर' मासिकातून कथालेखनाला आरंभ केला. १९३४ मध्ये त्यांच्या 'लपलेले खडक' या लघुकथासंग्रहाचे प्रकाशन झाले. कथांतून 'कुणबी'सारख्या बोलीभाषेतून संवाद साधणाऱ्या या कथांत जिवंतपणा असला, तरी त्यांचे वळण बोधवादी होते. येथे केतकर, वा. म. जोशी, सावरकर यांच्या ललित लेखनाशी जवळीक जाणवत होती. १९३३ मध्ये त्यांचे पहिले नाटक 'सत्याचे वाली' हे प्रसिद्ध झाले आणि दुसरे नाटक 'वधू संशोधन' १९३७ मध्ये प्रसिद्ध झाले. मात्र त्यांचे प्रयोग झाल्याचे उल्लेख नाहीत.

याच सुमारास हिंदूंच्या समाजरचनाशास्त्रावरचा गो. म. जोशींचा ग्रंथ त्यांच्या वाचनात आला. प्राचीन हिंदू समाजाला स्मृतिकारांनी दिलेली शिकवण आजच्या काळात निरुपयोगी असून तीत आमूलाग्र बदलाची गरज त्यांना जाणवली. लोकांच्या आचार–विचारांतील भ्रम दूर करण्याच्या उद्देशाने सूक्ष्म आणि दीर्घ अभ्यासाअंती त्यांनी उद्योगप्रधान 'विज्ञानप्रणीत समाजरचने'च्या प्रयोगावर भर दिला. भोवतालच्या समाजातील धर्मादी व्यावहारिक प्रश्न, समोरची आव्हाने तपासून आणि विज्ञानाच्या मर्यादा ध्यानी घेत त्यांनी नवे चिंतन मांडले. आपल्या १९३६ मध्ये प्रसिद्ध झालेल्या 'विज्ञानप्रणीत समाजरचना' या ग्रंथातून व्यक्तिस्वातंत्र्याचे माहात्म्य सांभाळत समाजकल्याणासाठीचा नवा मार्ग त्यांनी दाखवला. या ग्रंथाचे अभ्यासकांत स्वागत झाले. शिवाय त्यास भोरचे 'शंकराजी नारायण' हे पारितोषिकही मिळाले.

यानंतर त्यांनी १८५८ ते १९३८ या काळातील मराठी ललित साहित्यातील 'स्वभावलेखन' या विषयावर प्रबंध लिहिला. त्यांना साहित्यसम्राट न. चिं. केळकर हे मार्गदर्शक लाभले, तर वा. म. जोशी हे परीक्षक होते. १९३९ मध्ये ते मुंबई विद्यापीठाचे पहिले पीएच.डी. झाले. आपण 'ग्रंथकार' व्हायचे असा मनोमन निर्णय करून आणि 'भारताचा उत्कर्ष' हे ध्येय डोळ्यांसमोर ठेवून त्यांनी ललित लेखनाकडे पाठ फिरवली आणि

आपल्या समाजाचा, तसेच समाजशास्त्राचा, राजकारणाचा अभ्यास सुरू केला. १९३९ ते १९४३ या काळात ते केवळ अभ्यास, मनन आणि चिंतन करत होते.

याच काळातच ते 'नूतन मराठी विद्यालयात' शिक्षकही होते. शाळेत त्यांचा पांढरा पोलो कॉलरचा शर्ट, काळा कोट, काळी टोपी, धोतर व वहाणा असा वेश असे; आणि त्यातूनही त्यांचे व्यायामाने कमावलेले शरीर लक्षात येई. ताठ मानेने झपझप चालण्याची त्यांची सवय प्रारंभापासून होती. ते शाळेत मुलांच्या शिस्तबद्ध सहली काढत. त्यांना निसर्गाचे रौद्ररूप आवडे. मुलांबरोबरीने व्हॉलीबॉल, बास्केट बॉल हे मैदानी खेळ खेळत; पण त्यांचे विशेष प्रेम धसमुसळ्या रग्बीवर होते. इतके की, त्यासाठी त्यांनी 'गेंडा क्लब' स्थापन केला होता. मैदानी खेळातून शिस्त येते असे त्यांचे मत होते. १९४३ नंतर जवळजवळ बारा वर्षे ते नियमित रोज दीड-दोन तास फिरायला जात असत.

१९२८ ते १९४६ पर्यंत शाळेत शिक्षक म्हणून काढल्यावर १९४६ पासून ते १९६४ मध्ये निवृत्त होईपर्यंत ते सर परशुरामभाऊ महाविद्यालयात प्राध्यापक म्हणून अध्यापन करत होते. विद्यार्थ्यांविषयी मनात ममता असली, तरी बाह्यतः ते कठोर होते. पण अभ्यासू, हुशार मुलांसमोर तो कठोरपणा फार काळ टिकत नसे. १९४६ च्या प्रारंभीच्या काळात समाजजागृती करणारे लेखक-वक्ते विद्यार्थ्यांमधून निर्माण व्हावेत, या हेतूने ते विद्यार्थी मंडळही चालवत होते. त्यांनी १९४९ पर्यंत हा प्रयोग केला.

१९४३ मध्ये त्यांचे मित्र दत्तप्रसन्न काटदरे यांनी 'वसंत' मासिक सुरू केले. १९४३ च्या 'वसंत' दिवाळी अंकात त्यांनी 'राष्ट्रीय अहंकार' या विषयावर लिहिले. त्यातूनच 'अहंकार'विषयक लेखमाला तयार झाली. तेव्हापासून १९७९ पर्यंत ते सातत्याने 'वसंत'साठी लिहिते राहिले.

त्यांचे गुरू - माटे मास्तरांनी - ललित लेखनातून जे समाज जागरण करण्याचा प्रयत्न केला, त्याची पुढची पायरी डॉ. सहस्रबुद्धे यांनी आपल्या निबंधांतून गाठली. त्यांची अशी एक लेखनप्रवृत्तीही ठरून गेली. ते श्रेष्ठ निबंधकार होते; ते चिपळूणकर, आगरकर, टिळक, राजवाडे, माटे या परंपरेतले; जवळजवळ शेवटचेच शिलेदार होते. राजकीय विश्लेषणाबरोबरच सामाजिक निदानही त्यांच्या दृष्टीने महत्त्वाचे होते.

आपला विषय मांडताना ते विवेकनिष्ठा, विज्ञाननिष्ठा व बुद्धिस्वातंत्र्य ह्यांचा पुरस्कार करतात. विषयाचा प्रवास विश्लेषणातून विचारमंथनाच्या मार्गाने प्रबोधनाकडे होतो; त्यांच्या लेखना/व्याख्यानातून काहीसा अहंकारयुक्त आवेश असे. विवेचनाच्या ओघात पूर्वपक्ष-उत्तरपक्ष करत, खंडनमंडनात्मक पद्धतीने जाताना प्रसंगी विनोद, कोट्या असत. त्यांची वाणीही लेखणी-उद्दीपक आणि वेधक जाणवे. केवळ मुद्द्यांधारे विषय मांडताना श्रोत्यांच्या/वाचकांच्या बुद्धीस आवाहन केलेले असे. तर्काचे बारकावे सांभाळत आधार-प्रमाणे देत विषय मांडताना ते श्रोत्यांना कधी ताब्यात घेत, हे कळतही नसे. उपहास, उपरोध, व्याजोक्ती, वक्रोक्ती, व्यंजना यांच्याबरोबरीने विषय प्रतिपादनार्थ समर्पक उपमा-दृष्टान्तही येत; पण विशेषत्वाने भर जाणवे तो उपहास-उपरोधाच्या धारेचा प्रभाव. आणि व्याख्यानान्ती विषयासंबंधीचा नवा दृष्टिकोन मिळाल्याचे समाधानही अभ्यासूंना मिळत असे.

आपल्या निबंधांची सुरुवात बऱ्याचदा ते नाट्यमय, चित्रमय रितीने करत, तसाच शेवटही नाट्यपूर्ण, लालित्यपूर्ण असे. त्याचे काहीसे आकर्षणच मनात असे. सुरुवातीस ते भाषासौंदर्यासाठी प्रयत्न करत असत. नंतर ते साधले व त्यांच्या शैलीचेच अविभाज्य अंग झाले. निबंधाची जडणघडण कुशलतेने करणाऱ्यास जीवनात कोणतीही जबाबदारी पार पाडता येते अशी श्रद्धा असल्याने, त्यांनी प्रत्येक विषय त्याच पद्धतीने मांडला.

डॉक्टर मूलतः मराठीचे प्राध्यापक होते. त्यांचा साहित्यविचारही त्यांच्या राजकीय व सामाजिक विचारांशी निगडित होता. त्यांची वाङ्मयविषयक भूमिका स्थिर असल्याने बदलत्या वाङ्मयप्रवाहाशी तसेच टीकाविचारातील नवतेशी ते समरस होऊ शकले नाहीत.

डॉ. पुरुषोत्तम गणेश सहस्रबुद्धे

जन्म १०-८-१९०४, पुणे.

आजपर्यंत मानवाने आपल्या उत्कर्षासाठी अनेक धर्म प्रस्थापित केले, अनेक संस्कृती निर्माण केल्या, कलांची उपासना केली, आणि ज्ञानविज्ञानांचे संवर्धन केले. या सर्वांचे सारभूत तात्पर्य ज्या एका महाशब्दात सांगता येईल तो शब्द म्हणजे व्यक्तित्व. धर्म, संस्कृती, कला, विज्ञान हे सर्व मानवाच्या व्यक्तित्वाचेच आविष्कार आहेत. आणि लोकसत्ता ही त्या व्यक्तित्वाच्या परिपालनासाठी, संवर्धनासाठी व परिपोषासाठी निर्माण झालेली आहे. म्हणूनच लोकसत्ता हा सर्व धर्मांपेक्षा अत्यंत श्रेष्ठ धर्म होय असे म्हटल्यास त्यात मुळीच अतिशयोक्ती नाही. मानवाच्या हजार वर्षांच्या इतिहासातून काळाच्या अनिष्टांपासून विशुद्ध होऊन निघालेले धर्म, संस्कृती, कला, विज्ञान यांतले लौकिक उत्कर्षाला उपकारक असे एकही तत्त्व लोकसत्तेने धिक्कारलेले नाही. म्हणूनच लोकसत्ता हा सर्व धर्मांचा धर्म होय असे म्हणतात.

पु. ग. सहस्रबुद्धे

मांडलेला आहे. त्यांनी बोरकर, तांबे, माधव जूलियन शिकवले; पण एकंदरीत कवितेचे अंग त्यांना नव्हते, हेच लक्षात येते. काही वर्षे त्यांनी मॅट्रिक स्तरावर मराठी गद्य-पद्याविषयी मार्गदर्शिकांचेही लेखन केले. ग्रंथांना गुरू मानणारे डॉक्टर ग्रंथरचनेची तुलना राष्ट्ररचनेशी करत. ग्रंथ नष्ट करणारा परमेश्वराची मूर्ती अशी बुद्धी नष्ट करतो, असे ते मानत व ग्रंथरचना करणाऱ्याला परमेश्वराची मूर्ती व्यक्तीच्या चित्रात स्थापन करणारा मानत.

त्यांचा भर नेहमीच राष्ट्रवादावर असे. ते त्यास प्रागतिक शक्ती मानत. त्यांना ते संघटित समाजजीवनाचे अधिष्ठान वाटे. राष्ट्राचा गौरव करताना राष्ट्रशत्रूंचा द्वेषही ते आवश्यक मानत. राष्ट्रवाद विचारात राष्ट्र घडवण्याची दुर्दम्य इच्छाशक्ती त्यांना महत्त्वाची वाटे. मार्क्सवाद, समाजवाद, गांधीवाद यांचा विचार करून, दंडशक्तीचा अभ्यास करून ते आव्हान स्वीकारत. डॉक्टरांनी सतत लोकशक्ती आणि लोकसत्तेचाच पुरस्कार केला. टिळक आणि महात्माजींच्या कार्याचे लक्षणीय विश्लेषण केले. लोकशाहीला तारक आणि मारक प्रवृत्तींचा विचार करून समतोल विवेचन केले.

रंगसत्तेची यशस्विता संशयास्पद वाटल्याने लोकसत्ता-लोकशाहीविषयक विचार ते अधिक गांभीर्याने करतात. गांधीवाद आणि साम्यवाद यांविषयीचे वैयर्थ्य व धोके सांगताना या विचारप्रणाली त्यांना पटत नसल्याचे जाणवते. या सर्व राजकीय, सामाजिक लेखनामागे देशहिताची तळमळ आणि विद्यार्थी - तरुणांना कार्यप्रवण करण्याचा त्यांचा हेतू स्पष्ट आहे. राष्ट्रनिष्ठेबरोबरच त्यांनी समाजावर व्यक्तिस्वातंत्र्य आणि बुद्धिवादाचे संस्कार

वैचारिक साहित्याविषयीची भूमिका आणि ललित साहित्याविषयीच्या कल्पना, यांत फारसा फरक नव्हता. त्यांचे संतवाङ्मयविवेचन समतोल होते; पण समाजावर विशेषतः राष्ट्रावर त्याचा अपेक्षित परिणाम होत नाही हे त्यांनी मांडले.

स्वभावलेखनविषयक प्रबंधात त्यांची मते सापडतात, पण प्रामुख्याने बोधवादाचा पुरस्कारच आढळतो. वाङ्मयीन महानतेविषयीचे मर्ढेकर त्यांना धक्का देणारे होते. आत्मविष्काराचा विचार करताना केशवसुतांचा 'नेमका आत्मा' कोणता, हा प्रश्न त्यांना पडे. 'औदुंबर'मधले बालकवींचे व्यक्तिमत्व व कवितेचे श्रेष्ठत्व त्यांना समजणे अवघड जाई, तर गंगाधर गाडगिळांचे दुर्बोधतेचे समर्थन त्यांना अक्षम्य गुन्ह्यासारखे वाटे. त्यांनी विविध टीकाकारांचा अभ्यास करून साहित्यिकांच्या व्यक्तिमत्व, अनुभव, आत्माविष्कार यांवर मते मांडली आहेत. साहित्याचे कार्य, प्रयोजन, स्वरूप यांचाही त्यांनी विचार

स

केले. बहुजन समाजासही याची गरज असल्याचे प्रतिपादन त्यांनी केले.

राष्ट्रीय स्वयंसेवक संघाचे बौद्धिक प्रमुख या नात्यानेही त्यांनी अनेक ठिकाणी व्याख्याने दिली. १९४६ ते १९५३ या काळात सर परशुरामभाऊ महाविद्यालयात त्यांनी प्रतिवर्षी चोवीस व्याख्याने दिली. वर उल्लेख आलेल्या विषयांप्रमाणेच रशिया-चीन आणि अमेरिका-इंग्लंड ह्यांच्या लोकसत्तेवरही ते लिहीत/बोलत. तसेच मराठी कादंबरी, ह.ना.आपटे, संतसाहित्य यांवरही ते भाष्य करत. सावकारांपासून विल ड्यूरांटपर्यंत आणि मार्क्सवादापासून ते बांगलादेशाच्या मुक्तिवाहिनीपर्यंत, विविध विषयांवर ते विवेचन करत होते. आफ्रिकन नवोदित राष्ट्रांच्या माहितीपर अठ्ठावीस लेखांबरोबरच त्यांनी शेवटी १९७९ मध्ये जगाच्या प्रगतीविषयीही पाच लेखांक लिहिले आहेत.

निबंधरचनाकार म्हणून गौरवल्या गेलेल्या डॉक्टरांच्या राजकीय-सामाजिक विचारांची झेप जशी मोठी होती, तशीच त्यांची साहित्यनिष्ठा, विज्ञान-विवेकनिष्ठा ही तितकीच जबर होती. ज्ञानकोशकारांची परंपरा लाभलेले डॉक्टर पु.ग.सहस्रबुद्धे सर्वार्थाने ऐश्वर्याच्या राजविद्येचे जाणते प्राध्यापक होते.

– जयंत वष्ट

**संदर्भ :**

*१. सहस्रबुद्धे, पु. ग.; 'षष्ट्यब्दी गौरवग्रंथ'.*

*२. सहस्रबुद्धे व. ग.; 'डॉ. पु. ग. सहस्रबुद्धे यांचे चरित्र'.*

## साठे, अण्णाभाऊ तुकाराम

**कथाकार, कादंबरीकार**

**१ ऑगस्ट १९२० – १८ जुलै १९६९**

अण्णाभाऊ साठे यांचा जन्म सांगली जिल्ह्यातील वाटेगाव या गावी अस्पृश्य समजल्या जाणाऱ्या मांग (मातंग) समाजात झाला. त्यांनी बालपणापासूनच अस्पृश्यतेचे चटके सोसले. त्यांची शाळा दीड दिवसातच सुटली. वडिलांबरोबर वाटेगाव सोडून ते मुंबईत आले. ओझेवाला, हमाल, नाका कामगार, मिल कामगार अशा



वेगवेगळ्या कामांतून त्यांनी अर्थार्जन केले आणि मुंबईतील दुकानाच्या पाट्या वाचता-वाचता त्यांना अक्षरज्ञान झाले.

१९४२ च्या आंदोलनात नाना पाटलांच्या प्रतिसरकारात त्यांनी सक्रिय भाग घेतला. त्यामुळे त्यांना भूमिगत व्हावे लागले. १९४४ साली टिटवाळा येथे लाल बावटा पथकाची स्थापना झाली. त्यामध्ये अण्णाभाऊ साठे, शाहीर अमरशेख, शाहीर गव्हाणकर सहभागी झाले होते.

१९४९ साली 'मशाल' साप्ताहिकात 'माझी दिवाळी' ही त्यांची पहिली कथा प्रकाशित झाली. लेखक म्हणून अण्णाभाऊ साठेंची ही पहिली कलाकृती प्रकाशित झाली. पुढील काळात 'बरबांधा', 'कंजारी', 'चिरानगराची भुतं', 'निखारा', 'नवती', 'पिसाळलेला माणूस', 'आबी', 'फरारी', 'भानामती', 'साडी', 'कृष्णाकाठच्या कथा', 'खुळंवाडी', 'गजाआड', 'गुऱ्हाळ' इत्यादी १३ कथासंग्रह प्रकाशित झाले. तर 'इनामदार', 'पेंग्याचे लगीन', 'सुलतान', 'अकलेची गोष्ट', 'खापऱ्या', 'चोर', 'कलंत्री', 'बिलंदर बुडवे', 'बेकायदेशीर', 'शंरजीचे इलेक्शन', 'पुढारी मिळाला', 'मूक मिरवणूक', 'माझी मुंबई', 'देशभक्त घोटाळे', 'दुष्काळात तेरावा', 'निवडणुकीतील घोटाळे', 'लोकमंत्र्याचा दौरा', इत्यादी तमाशे व नाटके लिहिली. 'माझा रशियाचा प्रवास' हे त्यांचे प्रवासवर्णनही प्रसिद्ध आहे.

अण्णाभाऊ साठेंच्या एकूण पस्तीस कादंबऱ्या प्रकाशित असून त्यांमध्ये 'आग', 'आघात', 'अहंकार', 'अग्निदिव्य', 'कुरूप', 'चित्रा', 'फुलपाखरू', 'वारणेच्या खोऱ्यात', 'रत्ना', 'रानबोका', 'संघर्ष', 'तास', 'गुलाम', 'डोळे मोडीत राधा चाले', 'ठासलेल्या बंदुका', 'जिवंत काडतूस', 'चंदन', 'मूर्ती', 'मंगला', 'मथुरा', 'मास्तर', 'चिखलातील कमळ', 'अलगूज', 'रानगंगा', 'माकडीचा माळ', 'केवड्याचे कणीस',

'वैजयंता', 'आवडी', 'वारणेचा वाघ', 'फकिरा', 'वैर', 'पाझर', 'सरनोबत' इत्यादी कादंबऱ्यांचा समावेश आहे.

या कादंबऱ्यांपैकी बारा कादंबऱ्यांतून त्यांनी समाजापुढे जनसंस्कृती आणली आहे. अण्णाभाऊंचे कादंबरीविश्व हे जनजीवननिष्ठा दृष्टीतून सुख-दुःख, आशा-आकांक्षा. ईर्षा-संघर्ष, आदर्श-अधःपात या साऱ्यांचे व्यापक दर्शन घडविणारे असे जिवंत, गतिशील विश्व आहे. ज्वलंत जननिष्ठा व परिवर्तनाची दुर्दम्य आंतरिक तळमळ यांतून उपलब्ध साधनसामग्रीच्या बळावर अण्णाभाऊंनी कादंबऱ्यांची निर्मिती केली आहे.

'आपण का लिहितो?' यासंबंधी अण्णाभाऊ साठे लिहितात, 'माझा माझ्या देशावर, जनतेवर व तिच्या संघर्षावर अढळ विश्वास आहे. हा देश सुखी, समृद्ध व्हावा, इथे समता नांदावी, या महाराष्ट्रभूमीचे नंदनवन व्हावे अशी मला रोज स्वप्ने पडत असतात. ती मंगळ स्वप्ने पाहता-पाहता मी निद्रिस्त होत असतो.' अण्णाभाऊ स्वप्न पाहत लिहीत असले, तरी त्यांना वास्तवाचे भान होते. ते लिहितात, 'मी जे जीवन जगतो, पाहतो, अनुभवतो, तेच मी लिहितो. मला कल्पनेचे पंख लावून भरारी मारता येत नाही. त्याबाबत मी स्वतःला बेडूक समजतो. माझी सारी पात्रे या ना त्या नात्याने माझ्या आयुष्यात येऊन गेली आहेत. माझी माणसं वास्तवातील आहेत. जिवंत आहेत.'

अण्णाभाऊ साठे साहित्याकडून अपेक्षा व्यक्त करताना म्हणतात, ''आम्हांला गंगेसारखे निर्मळ साहित्य हवे. आम्हांला मांगल्य हवे आहे. आम्हांला मराठी साहित्याच्या थोर परंपरेचा अभिमान आहे. कारण, मराठी साहित्याची नांदी आमच्याच जीवन-संघर्षातून झडली आहे. जेव्हा दलिताची सावली असह्य होत होती, तेव्हा महानुभावपंथीय साहित्यिकांनी सर्वांना ज्ञान मिळाले पाहिजे, ज्ञान हे मोक्ष असे समजून बंड केले. ते आमचे साहित्यिक माणसांना माणूस म्हणून जगता आले पाहिजे असा दावा मांडून ज्यांनी दलितांच्या भाषेत महाराष्ट्राला सुंदर ज्ञानेश्वरी दिली, ते आमचे साहित्यिक आणि चुकलेले महाराचे मूल कडेवर घेऊन जाणारे ते एकनाथ, ते आमचे साहित्यिक.'' अण्णाभाऊ साठे आपल्या साहित्यलेखनात ही परंपरा जोपासतात. चांगल्या रूढी, परंपरा त्यांचे समर्थन करतात. अंधविश्वास, अंधश्रद्धा यांवर कोरडे ओढतात. ते म्हणतात, ''जुन्या चालीरिती दूर कराव्यात आणि लोप पावलेल्या; पण प्रगत प्रथांना पुन्हा पुढे आणावे. हेवेदावे, दुष्टावे, वैर यांचा घोर परिणाम दाखवावा आणि या महाराष्ट्रातून प्रेम, सलोखा यांची वाढ व्हावी. जनता सुखी, संपन्न व्हावी आणि महाराष्ट्रात समाजसत्तावादाचा अरुणोदय झालेला आपण पाहावा अशी श्रद्धा मनात घेऊन मी लिहितो.''

अण्णाभाऊ साठे यांच्या साहित्याची वैशिष्ट्ये वरील उताऱ्यावरून लक्षात येतात. त्याचप्रमाणे त्यांच्या लेखनप्रेरणाही कळतात. अण्णाभाऊ साठेंच्या 'वैजयंता' 'चिखलातील कमळ', 'वारणेचा वाघ', 'फकिरा' इत्यादी कादंबऱ्यांवरून चित्रपट तयार करण्यात आले. 'फकिरा' या कादंबरीला महाराष्ट्र शासनाचा पुरस्कार लाभला. 'फकिरा' या चित्रपटात अण्णाभाऊ साठेंनी निळू मांगाची भूमिकाही केली.

अण्णाभाऊ साठेंनी जसे विपुल लेखन केले, तसे शाहिरीच्या क्षेत्रातही भरीव काम केले आहे. त्यांची 'महाराष्ट्राची परंपरा', 'स्तालिनग्राडचा पोवाडा', 'मुंबईचा गिरणी कामगार', 'माझी मैना गावाकडे राहिली', 'जग बदल घालुनी घाव', 'मुंबईची लावणी' इत्यादी पोवाडे व गीते विशेष गाजली. संयुक्त महाराष्ट्र आंदोलनात अण्णाभाऊ साठे, अमरशेख यांच्या शाहिरी पथकाने सारा महाराष्ट्र पिंजून काढला होता.

दुःख, दैन्य, सामाजिक शोषण, जातीपातीचे चटके, अस्पृश्यता, समाजविघातक रूढिपरंपरा यांनी गांजलेल्या दलित, वंचित समाजाचे चित्रण अण्णाभाऊ करतात. त्याचबरोबर संस्कारांचे आणि परंपरांचे जतन व्हावे, अशी भूमिका घेतात. त्यांच्या लेखनातून विरोधासाठी विरोध नाही. स्वाभिमानाचे, शीलाचे रक्षण करून जगणारी माणसे ते रेखाटतात. अण्णाभाऊ साठे लिहितात, 'स्त्रीचे शील, पुरुषांचा स्वाभिमान आणि देशाचे स्वातंत्र्य यांत कोणतीही तडजोड नसते.'

अण्णाभाऊंच्या साऱ्या व्यक्तिरेखा अशाच आहेत. समाजात असणाऱ्या अनंत समस्या, त्यांत भरडली जाणारी तळागाळातील अज्ञानी, अशिक्षित, वंचित जनता ही अण्णाभाऊंच्या लेखनाची पार्श्वभूमी आहे. यामध्ये दलित, वंचित, भटके-विमुक्त यांचा समावेश आहे, तसाच सद्‌गुणाचा आगर असणारा विष्णुपंत कुलकर्णीही आहे. अण्णाभाऊंनी मराठी साहित्यात 'माकडीचा माळ', व 'बरबांद्या कंजारी' ह्यांच्या रूपाने सर्वप्रथम भटक्या-विमुक्तांचे चित्रण केले. त्यांच्या परंपरा, जात, पंचायत आणि पोटाची आग विझवण्यासाठी करावा लागणारा संघर्ष त्यांनी शब्दबद्ध केला.

१९४९ ते १९६९ या वीस वर्षांच्या काळात अण्णाभाऊ साठे यांचे विपुल लेखन झाले. गिरणी कामगार, शाहीर, लोकनाट्याचे जनक, संयुक्त महाराष्ट्र आंदोलनातील सहभाग, १९५८ साली अंबरनाथ येथे झालेल्या पहिल्या दलित साहित्य संमेलनाचे उद्‌घाटक, चित्रपटकथाकार, पटकथाकार, गीतकार अशा विविध रूपांत अण्णाभाऊ साठे महाराष्ट्राला दिसले. त्यांना सतत दारिद्र्याशीच झुंजावे लागले. आणि शेवटी त्यातच त्यांचा अंत झाला.

– रवीन्द्र गोळे

**संदर्भ :**


१. *डांगळे अर्जुन, उपाध्ये नीला, पेंडसे-नाईक वसुंधरा, डॉ. सावरकर सुभाष, संपादक; 'लोकशाहीर अण्णाभाऊ साठे निवडक वाङ्मय'; महाराष्ट्र राज्य साहित्य आणि संस्कृती मंडळ, मुंबई; १९९८.*


## सातवळेकर, श्रीपाद दामोदर

**संस्कृताभ्यासक, लेखक, चित्रकार, छायाचित्रकार**

**१९ सप्टेंबर १८६७ – ३१ जुलै १९६८**

श्रीपाद सातावळेकर यांचा जन्म कोलगाव, सावंतवाडी येथे झाला. प्रामुख्याने कोलगाव, औंध, हैद्राबाद, पीठापुरम, कांगडी, लाहोर व पारडी या ठिकाणी त्यांचे वास्तव्य व कार्य झाले.



गाढा संस्कृताभ्यासक, प्रगल्भ वैदिक, प्रेरक साहित्यिक, कृतिशील राष्ट्रभक्त आणि प्रतिभाशाली चित्रकार असे विविध आयाम असलेले गेल्या शतकातील एक शतायुषी व्यक्तिमत्त्व म्हणजे पंडित श्रीपाद सातवळेकर!

पंडितजीचे घराणे वैदिकाचे असल्याने वेदाचे आणि व्याकरणशास्त्राचे त्यांचे अध्ययन घरीच झाले. त्यांचे चित्रकलेचे शिक्षण मात्र मुंबईच्या जे. जे. स्कूल ऑफ आर्ट्‌समध्ये झाले.

भारतीय संस्कृतीतील अत्यंत मौलिक गोष्टी म्हणजे चार वेद, उपनिषदे, रामायण, महाभारत, भगवद्‌गीता यांच्या निर्दोष, सटीप व सानुवाद आवृत्त्या लोकांना उपलब्ध झाल्या पाहिजेत, हे त्यांचे ध्येय होते. त्यासाठी उभ्या केलेल्या स्वाध्याय मंडळाने वेदप्रसार आणि वैदिक विचारांचे प्रबोधन या दृष्टीने मोठी मौलिक कामगिरी बजावली. 'संस्कृत स्वयं शिक्षक' या मालिकेच्या २४ भागांमुळे संस्कृताचे दालन सर्वसामान्य जिज्ञासूंना खुले झाले. संशोधकाची वृत्ती आणि प्रसारकाची जिद्द अंगी बाळगून त्यांनी जी आजीवन वेदसेवा केली, तिचे फलित म्हणजे पारतंत्र्याच्या काळातील एक पिढी भारतीयांच्या सांस्कृतिक संचिताबद्दल अभिमान आणि आस्था बाळगणारी तयार झाली.

पंडितजींनी दीर्घकाळ चालविलेली 'पुरुषार्थ' (मराठी), 'वैदिकधर्म' (हिंदी), 'वेदसंदेश' (गुजराती), 'अमृतलता' (संस्कृत) ही नियतकालिके तसेच राष्ट्रीय दृष्टिकोनातून केलेले वेदविषयक लेखन, व्याख्यान इ. कार्य हे पारतंत्र्याच्या काळात राष्ट्रीय अस्मिता रुजविण्यास, ती परिपुष्ट करण्यास आणि राष्ट्रभक्तीचा स्फुलिंग चेतविण्यास कारणीभूत ठरले. हैद्राबादहून प्रसिद्ध झालेले त्यांचे 'वैदिक राष्ट्रगीत' हे पुस्तक जप्त करून सरकारने त्याच्या प्रती जाळून टाकल्या होत्या. १९०८ साली 'विश्ववृत्ता'त प्रकाशित झालेल्या 'वैदिक प्रार्थनांची तेजस्विता' या

लेखामुळे त्यांच्यावर राजद्रोहाचा खटला भरण्यात आला होता. मराठीबरोबरच त्यांनी हिंदी, गुजराती व इंग्रजी भाषेतही लेखन केले होते. त्यांचे एकूण ४०९ ग्रंथ प्रकाशित झालेले आहेत.

राष्ट्रीय शिक्षणाच्या हेतूने पंडितजींनी हैद्राबाद येथे विवेकवर्धिनी शाळा तसेच कन्याशाळा व व्यायाम शाळा सुरू केली. पुढे त्यांनी प्रत्यक्ष 'राज्यकारणा'त भाग घेतला. सातारा काँग्रेस समितीचे अध्यक्ष, अन्याय्य कायदेभंगाचा पुरस्कार करणाऱ्या सातारा जिल्हा परिषदेच्या अधिवेशनाचे अध्यक्ष, जमखिंडीच्या संस्थान प्रजापरिषदेचे अध्यक्ष म्हणून पंडितजींनी संस्मरणीय कामगिरी केली. औंध संस्थानात ग्रामराज्यसंस्थापनेचा आराखडा आखून तो बॅ. अप्पासाहेब पंतांकडून राबविला. पंडितजींचे घर म्हणजे अनेक क्रांतिकारकांचे, भूमिगत कार्यकर्त्यांचे आश्रयस्थान असे.

या सर्वांबरोबरच पंडितजींच्या व्यक्तिमत्त्वाचा एक चमकदार पैलू म्हणजे चित्रकार सातवळेकर! चित्रकला शिक्षक, औंध संस्थानाचे चित्रकार आणि व्यावसायिक चित्रकार अशा या प्रवासातील त्यांची प्रामुख्याने तैलरंगातील निसर्गचित्रे व व्यक्तिचित्रे उपलब्ध आहेत. औंध, मद्रास, हैद्राबाद, पीठापुरम, जयपूर, जोधपूर व लाहोर येथील संग्रहालयांत त्यांची चित्रे आहेत. लाहोरात त्या वेळी सातवळेकर स्टूडिओ प्रसिद्ध होता. फोटोग्राफर म्हणूनही त्यांनी मोठा नावलौकिक मिळविला होता. पंडितजींच्या चित्रकलेत वास्तवता, सौंदर्य व रेखीवपणा यांचा उत्कृष्ट मिलाफ आढळतो, असे कलासमीक्षक त्याविषयी गौरवाने म्हणतात.

पंडितजींचे आचरण म्हणजे साधेपणा, स्वावलंबन शुचिता व सात्त्विकता यांचा मूर्तिमंत परिपाठ होता. पंडितजींच्या या बहुपेडी कार्याचा गौरव राज्यकर्ते, विद्वान आणि सामान्य नागरिक या सर्वांनी हौसेने, कौतुकाने आणि कृतज्ञतेने केला. ब्रह्मर्षी, महामहोपाध्याय इ. पदव्यांनी त्यांना गौरविले. राष्ट्रपतींकडूनही त्यांचा सन्मान झाला. पंडितजींचे प्रकांड पांडित्य, प्रचंड साहित्यसंसार आणि लोकांचा वैचारिक पिंड घडविण्याची क्षमता लक्षात घेता, त्यांच्या चरित्रकाराने त्यांना दिलेली 'वेदव्यास' ही उपाधी सार्थ ठरते.

– भाग्यलता पाटसकर

**संदर्भ :**


*१. गोखले पुरुषोत्तम पांडुरंग; 'वेदव्यास पं. सातवळेकर'; उषा प्रकाशन, पारडी (वलसाड); १९६७.*


## सातोस्कर, बाळकृष्ण दत्तात्रेय

**कादंबरीकार, अनुवादक, पत्रकार**

**२६ मार्च १९०९ – २७ नोव्हेंबर २०००**



बाळकृष्ण दत्तात्रेय सातोस्कर यांचा जन्म गोव्यातील माझेरू या गावी झाला. त्यांचे शिक्षण म्हापसे आणि मुंबई येथे झाले. इंग्रजी विषय घेऊन ते बी.ए. आणि त्यानंतर ग्रंथालयशास्त्र परीक्षा उत्तीर्ण झाले. त्यांचे पोर्तुगीज भाषेवर चांगलेच प्रभुत्व होते. त्यानी मुंबई प्रकाशन आणि मुद्रण असा जोडधंदा मुंबई येथे सुरू केला. त्यांनी 'कथासागर' मासिकाचे संपादन केले.

अनुवाद, संशोधन आणि स्वतंत्र साहित्यनिर्मिती करणारे सर्जनशील साहित्यिक म्हणून सातोस्कर प्रसिद्ध आहेत. पर्ल बकच्या 'मदर' कादंबरीचा 'आई' हा अनुवाद त्यांनी १९४४ मध्ये केला. त्यानंतर त्यांनी 'धरित्री' (गुड अर्थ), 'दिग्या' (ऑलिव्हर ट्विस्ट), 'पंचविशीतले पाप' (मोपाँसा) हे अनुवाद केले. निवडक पोर्तुगीज कथांचा अनुवाद त्यांनी 'द्राक्षांच्या देशात' या नावाने केला.

'अभुक्ता' आणि 'प्रीतीची रीत' या त्यांच्या कथासंग्रहांतील कथा मध्यमवर्गीय कौटुंबिक समस्या केंद्रस्थानी ठेवून लिहिलेल्या आहेत. माणसामाणसांतील नातेसंबंध शोधताना त्यांची कथा गोमंतकीय संवेदनशीलता व्यक्त करते. गोमंतकातील संस्कृती, आचारविचार, व्यक्तिमूल्ये यांचा प्रभाव त्यांच्या कथेत जाणवतो.

'जाई', 'मेनका', आणि 'अनुजा' या आपल्या सामाजिक कादंबऱ्यांत गोमंतकीय समाजाच्या स्थितिगतीचा वेध त्यांनी घेतला आहे. गोव्याच्या मुक्तिसंग्रामावर आधारलेली 'आज मुक्त चांदणे' ही कादंबरी गोव्यातील राजकीय व सामाजिक परिवर्तन अधोरेखित करते.

'अभिराम' आणि 'वासुदेव' या त्यांच्या कादंबऱ्यांमधील विषय पौराणिक असून वेगवेगळ्या युगांतील दोन अवतारी पुरुष कादंबऱ्यांचे नायक आहेत. अमानवी, अलौकिक नायकांचे मानवी रूप दाखविण्याचे कार्य त्यांनी यशस्वीपणे केले आहे.

ग्रंथालयाशी संबंधित 'ग्रंथ व ग्रंथालयीन चळवळ' आणि 'द्विबिंदू वर्गीकरण पद्धती' ही सातोस्करांची पुस्तके ग्रंथालयातील कार्यकर्त्यांना उपयुक्त ठरणारी आहेत. विविध साहित्यप्रकार सहजपणे हाताळणाऱ्या सातोस्करांनी वयाची साठी गाठलेली असताना, 'गोमंतक : प्रकृती आणि संस्कृती' हा तीन खंडांचा विस्तृत साहित्य प्रकल्प हाती घेतला आणि सतत परिश्रम करून दहा वर्षांत तो पूर्णत्वास नेला. तिसरा खंड १९८७ मध्ये प्रकाशित झाला. अडीच हजार वर्षांतील गोमंतकाचे चित्र त्यांनी वाचकांपुढे उभे केले आहे. हे तीन खंड गोव्याच्या इतिहासलेखनातील फार मोठे योगदान आहे, असे म्हटले पाहिजे. १९९३ साली त्यांचे 'बादसायन' हे आत्मचरित्र प्रसिद्ध झाले.

गोवामुक्तीनंतर ते मुंबईहून गोव्यात आले. 'गोमंतक' दैनिकाचे संपादक म्हणून ते पाच वर्षे कार्यरत होते. सातोस्करांना सार्वजनिक कार्याची विलक्षण आवड होती. अनेक सामाजिक संस्थांशी त्यांचे निकटचे संबंध होते. १९८२ साली मंगेशी येथे झालेल्या गोमंतक साहित्य संमेलनाचे ते अध्यक्ष होते.

– डॉ. सुभाष भेण्डे

**संदर्भ :**

१. *'कै.बा.द.सातोस्कर : जन्मशताब्दी स्मृतिग्रंथ'; गोवा सांस्कृतिक संचालनालय, पणजी; २००९.*

२. *'गोमंतकीय मराठी साहित्याचे शिल्पकार'; गोवा सांस्कृतिक संचालनालय, पणजी; १९७६.*

## साधले आनंद

***साधले, आत्माराम नीळकंठ***

**समीक्षक, संशोधक, अभ्यासक**

**५ जुलै १९२० – ४ एप्रिल १९९६**



रामायणाचे, महाभारताचे आणि एकूणच प्राचीन व पौराणिक संस्कृत साहित्याचे चिकित्सक अभ्यासक, संशोधक असलेल्या साधल्यांनी मूळ नाव बाजूला सारून 'आनंद साधले' याच नावाने बहुतेक साहित्य लिहिले. ते प्राधान्याने 'समीक्षा' या प्रकारात मोडणारे आहे. मराठी आणि संस्कृत या दोन्ही भाषांवर त्यांचे प्रभुत्व आणि प्रावीण्य होते. परिचयात्मक लिखाण असले, तरी त्यांच्या अभ्यास-संशोधनाची वेगळी छाप उमटते.

सिंधुदुर्ग ह्या जिल्ह्यातील साळगाव येथे जन्मलेल्या साधले यांनी सावंतवाडी व मुंबई येथे अनुक्रमे माध्यमिक आणि महाविद्यालयीन शिक्षण घेतले. ते मराठी आणि संस्कृत या दोन्ही विषयांतील मुंबई विद्यापीठाचे, बी.ए.चे पदवी प्राप्तक आहेत. टपाल आणि तार खात्यात १९४० ते १९७५ अशी पस्तीस वर्षांची प्रदीर्घ सेवा करून त्यांनी मुदतपूर्व स्वेच्छानिवृत्ती स्वीकारली. 'लढाई संपल्यावर' ही त्यांची पहिली कादंबरी त्यांच्या वयाच्या ऐन पंचविशीत प्रसिद्ध झाली. साधले यांच्या विविध विषयांवरच्या ग्रंथसंपदेने साठाची संख्या ओलांडलेली आहे.

संस्कृत साहित्याचा साधल्यांचा साक्षेपी अभ्यास असल्याने, त्यातील महत्त्वाच्या विषयांना त्यांनी स्वतःच्या वेगळ्या दृष्टिकोनातून, त्या काळातील घटनांचा लाक्षणिक, तार्किक आणि व्यावहारिक अर्थ लावून ते मराठी वाचकांसमोर विचक्षक पद्धतीने मांडलेले आहेत. महाभारतावरील 'हा जय नावाचा इतिहास आहे' ही प्रदीर्घ लेखमाला 'नवशक्ती' दैनिकातून प्रकाशित होत असतानाच ती लोकप्रिय झालीच; पण अभ्यासकांत

स

त्यावर वेगळ्या अंगांनी चर्चा झाली. प्रस्तुत ग्रंथ म्हणजे इतिहास, ललित यांचा सुरेख संगम आहे.

'महाराष्ट्र रामायण' ही रामायणाची कथा खंडकाव्यातून प्रदीर्घपणे कथन करणारी त्यांची ग्रंथरचनाही, त्यातील आशय आणि अभिव्यक्तीने गाजली. साधले यांनी 'दशोपनिषद' या मालिकेतून दहा उपनिषदांचा मर्मग्राही आणि रसग्राही परिचय करून दिला आहे. 'आनंदध्वजाच्या कथा' या पुस्तकाच्या माध्यमातून प्राचीन कथांतील शृंगार धीटपणे मराठीत पुढे आणला. 'मातीची चूल' हे त्यांचे आत्मचरित्रही गाजले.

त्यांची लेखनशैली सुटसुटीत तरी रंजक आणि अभ्यास-संशोधन-समीक्षात्मक असूनही प्रासादिक आणि रोचक होती. संस्कृतमधील साहित्य आधुनिक काळात मराठी वाचकांपुढे आणणाऱ्या मोजक्या लेखकांत त्यांचे स्थान मोठे आहे.

– मधू नेने

**संदर्भ :**

*१. साधले, आनंद; 'हा जय नावाचा इतिहास आहे'; १९८८.*

## साधू, अरुण मार्तंडराव

**कादंबरीकार, कथाकार**

**१७ जून १९४१**

अरुण मार्तंडराव साधू यांचा जन्म अमरावती जिल्ह्यातील परतवाडा या गावी झाला. प्राथमिक शिक्षण परतवाडा-अचलपूर येथे तर माध्यमिक शिक्षण अमरावती येथे झाले. विदर्भ महाविद्यालय, अमरावतीतूनच त्यांनी बी.एस्सी. केले. पुणे विद्यापीठातून एम.एस्सी.चे शिक्षण अर्धवट सोडून पूर्णवेळ पत्रकारिता केली. १९६२ पर्यंत परतवाडा व अमरावती येथे वास्तव्य केले. १९६२ पासून १९६७ पर्यंत पुण्यात व पुढे १९६७ पासून मुंबईत वास्तव्य झाले. केसरी, इंडियन एक्सप्रेस, टाइम्स ऑफ इंडिया, द स्टेट्समन आदी वर्तमानपत्रांसाठी वार्ताहर, विशेष प्रतिनिधी म्हणून कार्य केले. फ्री प्रेस जर्नलचे संपादक म्हणूनही त्यांनी कार्यभार सांभाळला. १९८९ पर्यंत सक्रिय



पत्रकारिता केली. पुढे क्रियाशील पत्रकारिता सोडून ते स्तंभलेखनाकडे वळले. स्तंभलेखक ते कथाकार-कादंबरीकार-विज्ञानलेखक-इतिहासलेखक म्हणून त्यांनी आजतागायत भरगच्च लेखनकार्य केले आहे.

माणसाच्या अंतर्बाह्य विश्वाचा सूक्ष्मपट त्यांनी उभा केला. महानगर-लोकसत्ता-लोकमत या नियतकालिकांतून स्तंभलेखन केले. 'माणूस-केसरी', 'इंडियन एक्सप्रेस', 'टाइम्स ऑफ इंडिया', 'द स्टेट्समन', 'फ्री प्रेस जर्नल' आदी इंग्रजी नियतकालिकांमधून संपादन-स्तंभलेखन व पत्रकारिता केली. १९९५ पासून २००१ पर्यंत पुणे विद्यापीठात वृत्तपत्रविद्या व संज्ञापन विभाग येथे प्राध्यापक व विभागप्रमुख म्हणून कार्यरत होते. १९८५ मध्ये इंटरनॅशनल रायटर्स वर्कशॉप, आयोवा सिटीअमेरिका येथे भारताचे प्रतिनिधित्व केले. नागपूरच्या ८० व्या अखिल भारतीय मराठी साहित्य संमेलनाचे अध्यक्षपद त्यांनी भूषविले.

अरुण साधू जसे पत्रकार म्हणून प्रख्यात झाले, तसेच ते त्यांच्या कथा-कादंबऱ्यांतील महानगरीय छायाचित्रणात्मक शैलीसाठीही मराठी साहित्य प्रांतात प्रस्थापित झाले. 'मुंबई दिनांक' (१९७२) आणि 'सिंहासन' (१९७७) ह्या दोन्ही कादंबऱ्यांनी महानगरीय वास्तव जीवनाचा आणि महाराष्ट्रातल्या मराठा राजकारणाचा जो टोकदार आणि तिरकस दृष्टीतून वेध घेतला, तो मराठी मनात घर करून बसला. ह्या कादंबऱ्या चित्रपटाच्या माध्यमांतूनही समाजमनावर बिंबल्या. 'सत्तांध', 'बहिष्कृत', 'शापित', 'स्फोट', 'विप्लवा', 'त्रिशंकू', 'शोधयात्रा', 'तडजोड', 'झिपऱ्या', 'मुखवटा' आदी सामाजिक आणि वैज्ञानिक कादंबऱ्यांतून त्यांनी महाराष्ट्राच्या अंतर्बाह्य जीवनाचा आणि विज्ञानाच्या नवनवीन आविष्कारांचा शोध घेतला आहे.

"आज पाऊल टाकताच डॉ. मुंजे दचकले आणि त्यांची वसुंधरेच्या दंडावरची पकड अधिकच घट्ट झाली. जिकडे तिकडे माणसंच माणसं होती. काही दिशांनी माणसं येत होती आणि काही दिशांना पांगत होती. एकमेकांना धक्के देत, गर्दीतून वाट काढीत नेमकी आपली गाडी पकडण्यासाठी धावत होती. पातेलीत उकळणाऱ्या पाण्यामध्ये अनेक तऱ्हेचे प्रवाह एकमेकांना छेद देत फिरत रहावे तसं त्या गर्दीचं होतं. प्रचंड राक्षसी अमानुष गर्दी. श्वास गुदमरवून टाकणारी, डोळे फाडणारी, डोकं भणाणून टाकणारी. बूट, पाय, हात, धड, डोके, केस, डोळे यांचा नुसता एक विशाल समुद्र. आणि त्यातल्या प्रत्येक घटकाला स्वतंत्र अस्तित्व आहे, मन आहे, लालसा आहे, जग जिंकण्याची आशा आहे. अशा ह्या मानवी आशा-आकांक्षांचा महाप्रचंड भयकारी समुद्र. आणि समुद्रात वादळाने गर्जना करीत लाटा उठवाव्यात तशा गर्दीच्या लाटांवर लाटा येऊन प्रचंड वेगाने डॉ. मुंजेंच्या अंगावर कोसळत होत्या आणि नाकातोंडात पाणी जावं तसे डॉ. मुंजे हबकून जात होते. आणि या गर्दीच्या लाटांनी आदळत डॉ. मुंजेंच्या निर्धाराला न जुमानता पुन:पुन्हा एकसारखी होतच होती........ डॉ. मुंजेंना वाटलं ही आदिम पृथ्वी मानवी प्राण्यांनी खच्चून भरलेली आहे आणि या मानवांची आयुष्यं आकाशापासून टपकत आहेत, सूर्याच्या कक्षेतून निसटत आहेत, वेगानं अज्ञाताच्या दिशेनं निघाली आहे ---- ."

स्फोट पान ३४

'आणि क्रांती', 'तिसरी क्रांती', 'ड्रॅगन जागा झाल्यावर' ह्या पठडीत समकालीन देशीविदेशी इतिहासावरही त्यांनी ग्रंथलेखन केले. 'अ सूटेबल बॉय- शुभमंगल' ही त्यांची भाषांतरित कादंबरी असून त्यांच्या 'मुंबई दिनांक', 'सिंहासन' या कादंबऱ्यांचे देशी-विदेशी भाषांमध्ये भाषांतरेही प्रकाशित झाली आहेत. डॉ. जयसिंगराव पवार यांच्या छत्रपती राजर्षी शाहू महाराज या बृहत् ग्रंथाचा इंग्रजी अनुवादही त्यांनी केला आहे. जब्बार पटेल दिग्दर्शित डॉ. आंबेडकर या चित्रपटाच्या संहितालेखनातही साधू सहभागी होते.

अरुण साधूंनी केलेल्या वैविध्यपूर्ण ग्रंथसंपदेला राज्य शासनाचे 'उत्कृष्ट वाङ्मय निर्मिती पुरस्कार', 'भैरू रतन दमाणी पुरस्कार', 'न. चिं. केळकर पुरस्कार', 'आचार्य अत्रे पुरस्कार' तसेच साहित्यातील व पत्रकारितेतील योगदानासाठी 'फाय फाउंडेशन' पुरस्कारही प्राप्त झालेला आहे. मराठी कथा-कादंबरीला पत्रकार-लेखक साधूंनी आपली स्वयंभू दृष्टी आणि

'माणूस उडतो त्याची गोष्ट', 'बिनपावसाचा दिवस', 'मुक्ती', 'मंत्रजागर', 'बेचका' ह्या कथासंग्रहांतून आणि 'पडघम', 'प्रारंभ', 'बसस्टॉप' आणि इतर एकांकिकांतून त्यांनी वैविध्यपूर्ण विषयांना न्याय दिला. 'काकासाहेब गाडगीळ', 'महाराष्ट्र: लँड अँड पिपल' (इंग्रजी), 'अक्षांश-रेखांश', 'निश्चिततेच्या अंधारयुगाचा अंत', 'संज्ञापन क्रांती-स्वरूप व परिणाम', 'पत्रकारितेची नीतिमूल्ये' आदी ललितेतर पुस्तकांतून त्यांनी चरित्र- समाजज्ञान-विज्ञान-तंत्रज्ञान असे विषय हाताळले. 'आणि ड्रॅगन जागा झाला', 'फिडेल-चे

शैली दिली. नागरीपासून महानगरीपर्यंतच्या परिप्रेक्ष्यात आपल्या ललित-लेखनांतून जगण्याचा कोलाहल मांडला. अरुण साधूंचे वाङ्मय म्हणजे एकोणिसाव्या-विसाव्या शतकात आकाराला आलेल्या महाराष्ट्राचे सर्वंकष वास्तववादी सामाजिक आणि राजकीय जीवन-चरित्र होय...

'अरुण साधू यांच्या सामाजिक कादंबऱ्या' या लेखात अरुण साधूंच्या वाङ्मयनिर्मितीचे माहात्म्य व्यक्त करतांना दीपक घारे म्हणतात, 'पत्रकारिता आणि ललित लेखन यांचा संबंध मराठी साहित्यात पूर्वीपासून

स

चालत आलेला आहे. तरी राजकीय शब्दाला एक वेगळा अर्थ प्राप्त झाला तो विसाव्या शतकातील सत्तरीच्या दशकात. 'मुंबई दिनांक' आणि 'सिंहासन' या कादंबऱ्यांमुळे साधू यांची प्रतिमा एक राजकीय कादंबरीकार म्हणून झाली. साधूंच्या लेखनामागच्या प्रेरणा समजून घ्यायच्या असतील, तर सत्तर आणि ऐंशीया दशकांतील सामाजिक वास्तव लक्षात घेणे आवश्यक आहे. महाराष्ट्राच्या सामाजिक इतिहासातला हा संक्रमणाचा काळ होता. सारी जीवनशैलीच या काळात झपाट्याने बदलत होती. राजकीय म्हणजे स्वप्नाळू राष्ट्रवाद ही कल्पना मागे पडली. त्याची जागा सर्वच क्षेत्रांतल्या दबावगटांच्या सत्तास्पर्धेने घेतली. याचे चित्रण कथा-कादंबऱ्यांतून होऊ लागले. अरुण साधू हे या काळातले एक महत्त्वाचे नाव आहे. विसाव्या शतकाच्या उत्तरार्धात बदलणाऱ्या महाराष्ट्राच्या राजकीय सामाजिक जीवनाचे ललित भाष्यकार म्हणून अरुण साधूंच्या एकूण ललित आणि ललितेतर वाङ्मयाकडे पाहता येते.'

खुद्द अरुण साधू आपल्या लेखन निर्मिती प्रक्रियेवर भाष्य करतांना म्हणतात, 'स्वयंभू व्यक्तींच्या अथवा अखिल समाजाच्या भव्य सर्जनशीलतेमधूनच कलाकार अथवा लेखक निर्मितीच्या प्रेरणा घेतात. प्रत्येक व्यक्ती स्वतःच्या नकळत आपले अभिव्यक्तीचे माध्यम शोधत असतो. हा शोध आयुष्याच्या अंतापर्यंत चालूच असतो. आद्रेलीन प्रवाही होते, ते माध्यम आपले. एखादी गोष्ट अंगात विषासारखी भिनली, अस्वस्थ करू लागली, दाह होऊ लागला की लिहिण्याखेरीज गत्यंतर नसते...' अरुण साधूंनी ह्या अंत:प्रवाही ऊर्मीतून कथा, कादंबरी, नाटक, एकांकिका आणि स्तंभ अशा माध्यमांतून केलेले लेखन समकालीन इतिहासाचा मागोवा घेणारे आहे.

– डॉ. किशोर सानप

**संदर्भ :**

*१. साधू अरुण; ललित विशेषांक, मुंबई फेब्रुवारी २००७.*

## सानिया

***बालरामन सुनंदा***

**कथाकार, कादंबरीकार**

**१० नोव्हेंबर १९५२**



सानिया यांचा जन्म सांगली येथे झाला. पूर्वाश्रमीच्या त्या सुनंदा कुळकर्णी. 'सानिया' या टोपण नावानेच त्यांनी सारे लेखन केले. वडिलांच्या बदलीच्या नोकरीमुळे, पुणे, मुंबई, नागपूर, अमरावती, नाशिक अशा अनेक ठिकाणी महाराष्ट्रभर फिरत, अनेक शाळांतून त्यांचे शालेय शिक्षण झाले. अखेर नाशिकच्या सरकारी कन्याशाळेतून मॅट्रिक झाल्यानंतर नाशिक कॉलेज आणि पुणे येथे त्यांचे महाविद्यालयीन शिक्षण झाले. १९७४मध्ये त्या एम.कॉम. झाल्या. पदवीधर झाल्यावर, लग्नाअगोदर काही दिवस त्यांनी नोकरीही केली.

सानियांच्या घरात साहित्यिक वातावरण नव्हते; पण त्या मात्र शाळेत असल्यापासूनच लिहू लागल्या. शालेय मासिकातून त्यांचे लेखन छापून येऊ लागले. सुरुवातीच्या काळात त्यांनी कविताही लिहिल्या. १९७०पासून त्या लेखन करीत आहेत. पण १९७५पासून 'सत्यकथा', 'मौज' 'हंस' 'कथाश्री', 'किस्त्रीम', 'अक्षर', 'तरुण भारत', 'केसरी' यांसारख्या मासिकांतून त्यांचे कथालेखन सातत्याने सुरू आहे.

विवाहानंतर नवऱ्याच्या नोकरीमुळेच देश-परदेशांत त्यांचे वास्तव्य राहिले. त्यांनी तिथला समाज बघितला, माणसे पाहिली. हे सगळे अनुभवून त्यांनी लेखन केले. गेली अनेक वर्षे त्यांचे वास्तव्य महाराष्ट्राबाहेर, बंगलोरलाच आहे.' ''समाजात वावरताना जे अनुभवले, जाणवले, त्यातूनच लेखनाला सुरुवात झाली. तेव्हा हे सारे लेखन मी ठरवून केलेले नाही. ते नैसर्गिकपणे झाले आहे,'' असे त्या म्हणतात. कथा, कादंबरी, दीर्घकथालेखनाबरोबरच काही अनुवादही त्यांनी

शब्दांकित केले आहेत. 'वाट दीर्घ मौनाची' हा स्वैर अनुवाद व 'सानिया की कहानियाँ' - हा दीर्घकथासंग्रह हिंदीमध्ये प्रसिद्ध झाला आहे.

त्यांच्या प्रगल्भ संवेदनशील साहित्याची दखल अनेकांनी घेतली आहे. त्यांना राज्यशासन पुरस्कार, साहित्य परिषद पुरस्कार, वर्टी पुरस्कार, वि.स. खांडेकर स्मृती पुरस्कार, जयवंत दळवी स्मृती पुरस्कार, असे अनेक पुरस्कार त्यांच्या लेखनासाठी मिळाले आहेत.

सानियांनी सुरुवातीला कथा हा वाङ्मयप्रकार हाताळला. 'शोध' हा त्यांचा पहिला कथासंग्रह १९८० मध्ये मौज प्रकाशनाने प्रकाशित केला. त्यानंतर 'खिडक्या' (१९८९), 'भूमिका' (१९९४), 'वलय' (१९९५), 'परिमाण' (१९९६), 'प्रयाण' (१९९७) हे त्यांचे कथासंग्रह प्रसिद्ध झाले आहेत.

'प्रतीती' (१९८९), 'दिशा घराच्या' (१९९१), 'ओळख' (१९९२) 'आपण आपले' (२००३) हे त्यांचे दीर्घकथासंग्रहही प्रकाशित झाले आहेत.

मानवी संबंधाचा, त्यातही मानवी नात्यातील दुरावा, कोरडेपणा, अकारण निर्माण होणारे समज-गैरसमज यांतून वाट्याला येणारे एकाकीपण त्यांच्या कथांतून आधिक्याने जाणवते. स्त्री-केंद्रीभूत असेच हे लेखन आहे.

त्यांचे अनुभव, त्यांना जे लिहायचे, सांगायचे, व्यक्त करायचे आहे ते लघुकथा या वाङ्मयप्रकारात व्यक्त करणे अशक्य वाटल्यावर सानियांनी 'दीर्घकथा' लिहिल्या. तर, विषयाचा आवाका, अभिव्यक्ती याही पलीकडची आहे हे लक्षात आल्यावर त्यांनी कादंबरीलेखन केलेले दिसते. 'स्थलांतर' (१९९०), 'आवर्तन' (१९९६), 'अवकाश' (२००१) या त्यांच्या तीन कादंबऱ्या प्रसिद्ध झाल्या आहेत. 'स्थलांतर' कादंबरीचे लेखन त्यांनी पत्रात्मक निवेदनपद्धतीने केले आहे.

सानिया यांच्या कादंबरीतील स्त्री-व्यक्तिरेखा- नंदिता, सुरुची, जान्हवी या सगळ्याच सुशिक्षित, कमवत्या स्वतःच्या अस्तित्वाचे भान असलेल्या, स्वातंत्र्याची आस धरणाऱ्या आहेत. स्वतःप्रति सजग होत जाणारी स्त्री सानियांच्या कादंबरीत विशेषत्वाने भेटते. मुद्दाम स्त्रीवादी म्हणून त्यांनी लेखन केलेले नाही. स्त्रीच्या भूमिकेतून 'ती एक माणूस' म्हणून सहजपणे मांडली आहे.

स्त्रीचे अस्तित्व, तिची महत्त्वाकांक्षा, तिचे व्यक्ती म्हणून जगणे, स्वतःच्या अस्तित्वाचा शोध घेणे या दृष्टिकोनांतूनच एका कलात्मक पातळीवर त्यांनी हे सारे चित्रण केले आहे. आणि इथेच त्यांचे हे वेगळेपण अधोरेखित होते.

– प्रा. मंगला गोखले

**संदर्भ :**

*१. वैद्य, डॉ. सरोजिनी; 'स्त्री साहित्याचा मागोवा', साहित्यप्रेमी भगिनी मंडळ; खंड २, ३; डिसेंबर २००२.*

## साने, गीता जनार्दन

**कादंबरीकार**

**३ सप्टेंबर, १९०७ – १२ सप्टेंबर १९९१**



गीता जनार्दन साने यांचा जन्म विदर्भातील वाशीम येथे झाला. त्यांचे वडील नामवंत वकील होते. बालपणीच त्यांनी शिक्षणासाठी हिंगणे येथील शाळेत प्रवेश घेतला. पुढे अमरावतीमध्येच गव्हर्नमेंट गर्ल्स हायस्कूलमधून मॅट्रिक उत्तीर्ण झाल्यानंतर त्यांनी नागपूरच्या सायन्स कॉलेजमधून बी.एस्सी व एम.एस्सी. पदव्या प्राप्त केल्या.

१९३१ ते १९४४ या काळात कुटुंबाची आर्थिक जबाबदारी घेण्यासाठी त्यांनी मीरत येथे शिक्षिकेची नोकरी पत्करली. त्यानंतर नरसिंग भगमवार यांच्याशी त्यांचा विवाह झाला. १९४४ साली नोकरीचा राजीनामा देऊन त्यांनी पतीसोबत धनबाद येथे वास्तव्य केले.

'धनुर्धारी', 'प्रतिभा' यांसारख्या नियतकालिकांतून त्यांच्या प्रारंभीच्या कथा प्रसिद्ध झाल्या. १९३६ ते १९४२ या काळात गीताबाईंच्या 'निखळलेली हिरकणी'

स

(१९३६), 'वठलेला वृक्ष' (१९३६), 'हिरवळीखाली' (१९३६), 'लतिका' (१९३७), 'फेरीवाला' (१९३८), 'आविष्कार' (१९३९), 'माळरानात आपले वैरी' (१९४१), 'धुके आणि दहिवर' (१९४२), अशा अनेक कादंबऱ्या प्रकाशित झाल्या.

गीता साने यांना राजकारण, समाजकारण यांचे आकर्षण होते. समाजसेवेची मनापासून आवड होती. भोवतालचे जीवन डोळसपणे पाहून त्यांनी स्वानुभवावर आधारलेल्या कादंबऱ्या लिहिल्या. स्त्री-मुक्तीचा परखड भाषेत उदो-उदो करणाऱ्या गीता साने त्या काळातील बंडखोर लेखिका ठरल्या.

'चंबळची दस्युभूमी' हा त्यांचा ग्रंथ एक महत्त्वाचे योगदान म्हणता येईल. डाकूंचा प्रदेश म्हणून ओळखल्या जाणाऱ्या चंबळखोऱ्यात भ्रमंती करून व दस्यूंच्या जीवनाची प्रत्यक्ष पाहणी करून त्यासंबंधी आपली निरीक्षणे त्यांनी या ग्रंथात मांडली. त्यातील ऐतिहासिक, आर्थिक निष्कर्ष महत्त्वाचे ठरले. केवळ ललित लेखनात गुंतून न राहता, तळागाळातील स्त्री-समाजाच्या वेदनामय जीवनाचा त्यांनी घेतलेला साक्षेपी वेध त्यांच्या 'भारतीय स्त्री-जीवन' या ग्रंथात समाविष्ट झालेला आहे.

शतकानुशतके स्त्रियांच्या वाट्याला आलेली उपेक्षा, त्यांच्यापुढे उभ्या राहणाऱ्या समस्या व त्यांवरील उपाय यांचा मूलगामी शोध घेण्याचा गीताताईंचा प्रयत्न त्यांच्या व्यक्तिमत्त्वाला विचारवंताची उंची देतो यात शंका नाही.

– संपादक मंडळ

**संदर्भ :**

१. *धर्माधिकारी तारा; 'गीता साने: बंडखोर साहित्यकर्तृत्व'; युगवाणी-दिवाळी अंक, १९८४.*

२. *सप्रे मधुवंती; 'गीता साने: समाजकार्याचे संशोधनात्मक स्वरूप'; लोकसत्ता- ४ जून १९८९.*

## साने गुरुजी

***साने, पांडुरंग सदाशिव***

☞ **मुख्य नोंद – पत्रकारिता आणि ललितेतर साहित्य खंड**

## साबळे, कृष्णराव गणपतराव

☞ **मुख्य नोंद – लोककला खंड**

## सामंत, बाळ गंगाधर

**विनोदी कथाकार, लेखक**

**२७ मे १९२४ – १८ जानेवारी २००९**



बाळ गंगाधर सामंत यांचा जन्म चंदगड जि. बेळगाव येथे झाला. मुंबईच्या रुईया महाविद्यालयातून मराठी घेऊन ते बी.ए.झाले आणि मुंबई विद्यापीठाची एम.ए.पदवी त्यांनी प्राप्त केली. प्रारंभीच्या काळात त्यांनी पत्रकारिता केली. १९४९ पासून ते शासनाच्या प्रसिद्धी खात्यात नोकरी करू लागले. शासकीय खात्यात त्यांनी विविध पदे भूषविली. मुख्यमंत्र्यांचे साहाय्यक म्हणूनही त्यांनी काम केले. १९६६ नंतर बड्या खासगी कंपन्यांचे संपर्काधिकारी म्हणून ते कार्यरत होते. निवृत्तीपूर्वी ते रिलायन्स इंडस्ट्रीजमध्ये सल्लागार होते.

प्रारंभीच्या काळात त्यांनी प्रामुख्याने विनोदी लेखन केले. 'खिरापत', 'गोंधळ', 'नवराबायको', 'करामत', 'खुषमस्करी' आदी चाळीसएक विनोदी कथा व लेखांचे संग्रह त्यांच्या नावावर आहेत. शासकीय कारभाराचा प्रत्यक्ष अनुभव असल्यामुळे त्यांतील बारकावे सामंतांना ठाऊक होते. त्यामुळे त्यांचा मार्मिक उपहास करणाऱ्या, त्यांतील त्रुटींवर हलक्याफुलक्या पद्धतीने टीकाटिप्पणी करणाऱ्या अनेक कथा त्यांनी लिहिल्या आहेत.

चौफेर वाचन, नाट्यसंगीताविषयी आकर्षण, प्रवासाची आवड यांमुळे सामंतांचे उत्तरकालीन लेखन विविधांगी आहे. बालगंधर्वांचा निकटचा सहवास त्यांना लाभला. त्यांनी 'तो राजहंस एक' (१९८८) हे बालगंधर्वांसंबंधी चरित्रात्मक पुस्तक लिहिले. 'मरणात खरोखर जग जगते' (१९९३), 'प्रेमग्रंथ' (१९९६) ही तत्त्वचिंतनात्मक पुस्तके त्यांनी लिहिली. 'हिटलर, एक महान

शोकांतिका', 'आधुनिक महाराष्ट्राचे शिल्पकार' 'गजराज' अशी काही वैशिष्ट्यपूर्ण पुस्तके त्यांनी लिहिली आहेत. २००४ साली 'पद्मश्री' ही पदवी देऊन केंद्रशासनाने त्यांचा गौरव केला.

– डॉ. सुभाष भेण्डे

**संदर्भ :**

*१. भेण्डे सुभाष; 'साहित्य संस्कृती'; श्रीविद्या प्रकाशन, पुणे; १९९९.*

## सामंत, रघुवीर जगन्नाथ

**कथाकार, कादंबरीकार**

**२४ डिसेंबर १००९ – १७ सप्टेंबर १९८५**



रघुवीर जगन्नाथ सामंत यांचे मूळचे नाव 'रघुनाथ' होते; पण १९३२ साली सामंतांचा 'हृदय' हा शब्दचित्रांचा संग्रह प्रकाशित झाला तो 'कुमार रघुवीर' या टोपणनावाने. चौतीस शब्दचित्रे असलेल्या या त्यांच्या लेखनाला वाचकांची उत्तम दाद मिळाली, आणि मग तेव्हापासून पुढे त्यांनी रघुनाथऐवजी 'रघुवीर' हेच नाव लावायला सुरुवात केली. त्यांचे शिक्षण बी.ए.बी.टी. पर्यंत झाले. मुंबईच्या चिकित्सक समूह शाळेत त्यांनी अनेक वर्षे अध्यापन केले.

त्यांचे वडील स्मॉलकॉज कोर्टात जज्ज होते. त्यामुळे ठाणे, पुणे, सांगली अशा ठिकाणी वडिलांच्या बदल्या झाल्याने त्यांचे शालेय शिक्षण अशा विविध ठिकाणच्या शाळांतून झाले. १९२६ साली ते मॅट्रिक झाल्यावर त्यांनी एलफिन्स्टन कॉलेजमध्ये प्रवेश घेतला. नंतर, १९३४ साली ते झेवियर कॉलेजमधून बी.ए. झाले. काही वर्षे त्यांनी चिकित्सक समूह शाळेत अध्यापन केले. या काळातच ते लेखन करू लागले होते.

१९२९ साली 'सुभान्या' हे व्यक्तिचित्र 'प्रगती' साप्ताहिकात प्रसिद्ध झाले आणि मग संपादकांच्या प्रोत्साहनामुळे सामंतांनी भरपूर लेखन केले. आकाशवाणीवरील त्यांचे नाट्यविषयक आणि काव्यगायनाचे कार्यक्रमही रसिकप्रिय होते. १९३४ साली त्यांनी 'पारिजात' या मासिकाचे संपादन केले; पण अखेर आर्थिक कारणासाठी ते बंद करावे लागले. पण, तरीदेखील 'पारिजात प्रकाशना'तून त्यांनी आपली ग्रंथनिर्मिती सुरूच ठेवली होती. पुढे १९४० साली त्यांनी 'ज्योती' या मासिकाचे संपादन केले व १९४२–१९४४ सालांत त्यांनी 'अमर ज्योती वाङ्मय' विभागातून योजनाबद्ध बालवाङ्मयाचा एक प्रयोग केला. 'आजची गाणी' (१९३९), 'रक्त निशाई' (१९४७) हे गीतसंग्रह; 'गीत–ज्योती' (१९४४) हा किशोरगटासाठी गेय नाट्यगीत संग्रह, शिवाय त्यांनी 'मडक्यातला न्याय', 'जलदेवतेचा न्याय' ही बालवाङ्मयाची पुस्तके लिहिली.

१९३८ साली त्यांनी 'उपकारी माणसे' ही प्रदीर्घ कादंबरी लिहिली. तीन खंडांत विस्तारलेली मराठीतील ही एक अभिनव, स्वतंत्र, सामाजिक, प्रदीर्घ कादंबरी आहे. याशिवाय 'जीवनगंगा' (१९४७), 'आम्ही खेडवळ माणसं' (१९४८), 'आम्हांला जगायचंय' या कादंबऱ्या, आणि 'घरोघरच्या देवी' ही नाट्यात्मक कादंबरी, अशा कादंबऱ्या प्रसिद्ध झाल्या आहेत. 'पणत्या', 'तारांगण', 'दिलजमाई' हे लघुनिबंधसंग्रह; 'मासलेवाईक प्राणी' (१९४०) ही भावस्पर्शी स्वभावचित्रे; 'एम व्हिटॅमिन' हे शिक्षकांच्या जीवनावरील नाटुकले; 'माणसाचे शेपूट', 'आपले व्यक्तित्व' ही शास्त्रीय, मानसशास्त्रीय चर्चात्मक पुस्तके; यांशिवाय 'सुरंगीची वेणी'(१९३५) हा रशियन कथांचा अनुवाद, अशी अनेक पुस्तकेही त्यांनी लिहिली.

विविध वाङ्मय प्रकारांत विपुल निर्मिती करणाऱ्या रघुवीर सामंतांची काही पुस्तके ही विश्वविद्यालयीन व शालेय अभ्यासक्रमात पाठ्यपुस्तके, पुरवणीवाचन पुस्तके म्हणून नेमली गेली होती. त्यांतील अनेक वेचक उतारे क्रमिक पुस्तकांतही समाविष्ट झाले होते. वास्तववादी, सोज्ज्वळ लेखन ही सामंतांची सहजप्रवृत्ती होती.

अध्यापक, मुख्याध्यापक, संपादक, प्रकाशक, लेखक अशा विविध नात्यांनी सामंतांनी वैशिष्ट्यपूर्ण वाङ्मयीन सेवा केली आहे.

– मंगला गोखले

**संदर्भ :**

*१. सामंत रघुवीर; 'जिवंत झरे'; १९५९.*

## सारंग, विलास गोविंद

**कवी, कथाकार, कादंबरीकार, समीक्षक**

**११ जून १९४२**



विलास गोविंद सारंग यांचा जन्म कारवार येथे झाला. इंग्रजी विषयात एम.ए. पदवी मिळविल्यानंतर त्यांनी डब्ल्यू. एच. ऑडेन यांच्या कवितेवर मुंबई विद्यापीठाची पीएच.डी. प्राप्त केली. नंतर इंडियाना विद्यापीठात त्यांनी कम्पॅरेटिव्ह लिटरेचर या विषयावर पीएच. डी. प्राप्त केली.

मुंबईत एसआयईएस, तसेच मुंबई विद्यापीठात त्यांनी मराठीचे अध्यापन केले. १९७४ सालापासून इराकमधील बसरा विद्यापीठात व नंतर कुवैत येथे सारंगांनी इंग्रजीचे अध्यापन केले. त्यांनी मराठीत 'सार्त्र', 'कापका', 'कामू', 'बेकेट', 'टी.एस. इलियट' यांच्याविषयी लेखन केले. त्यांचा 'कविता' (१९६९ ते १९८४ – १९८६) हा कवितासंग्रह; 'सोलेदाद' (१९७५) व 'आतंक' (१९९९) हे कथासंग्रह, 'एन्कीच्या राज्यात' (१९८३) ही कादंबरी, 'सिसिफस आणि बेलाक्वा', 'मॅनहोलमधला माणूस' (२००८) ही पुस्तके प्रसिद्ध असून 'रुद्र' आणि 'झडत्या इतिहासाची वाळू' ही पुस्तके प्रसिद्धीच्या मार्गावर आहेत. तसेच, 'Fair Tree of the Void' हा इंग्रजीतील कथासंग्रह पेंग्विनने प्रसिद्ध केलेला आहे. ह्या कथासंग्रहाचे 'ब्लर्ब'सुद्धा अत्यंत वाचनीय असे आहे. त्यात पाश्चात्त्य लेखक व कलाकृती यांचे विश्लेषण आहे.

'मराठी नवकादंबरी' या पुस्तकात त्यांनी किरण नगरकर, कमल देसाई, भालचंद्र नेमाडे, चिं. त्र्यं. खानोलकर यांच्या कादंबऱ्यांची समीक्षा केली आहे. 'अक्षरांचा श्रम केला' हा त्यांचा समीक्षा लेखांचा संग्रह लक्षणीय आहे.

१९६० सालानंतरच्या पिढीतील महत्त्वाचे प्रयोगशील लेखक अशी त्यांची ओळख आहे. त्यांची कथा पारंपरिक कथेपेक्षा पूर्णतः वेगळी आहे. मानवी स्वातंत्र्याची गळचेपी त्यांच्या अनेक कथा-कादंबऱ्यांतून व्यक्त होते. ते जीवनासंबंधीच्या मूलभूत प्रश्नांची मांडणी करतात. कवितेत अतिशय सरधोपट शैलीतून तिरकस आशय व्यक्त करतात. त्यांच्या समीक्षेला वैश्विक साहित्याच्या अभ्यासाची जोड मिळाली आहे.

– नरेंद्र बोडके

**संदर्भ :**

*१. सारंग विलास; 'स्वागत'; ललित-जून १९७७.*

## सावंत, वसंत लाडोबा

**कवी, समीक्षक**

**११ एप्रिल १९३५ – २३ डिसेंबर १९९६**



वसंत लाडोबा सावंत यांचा जन्म कोकणात झाला. सावंत-वाडीच्या संस्थानिक सावंत घराण्याशी त्यांचा जवळचा संबंध होता. त्यांचे वडील शेतकरी आणि वारकरी. सावंतांचे प्राथमिक व माध्यमिक शिक्षण अनुक्रमे फोंडाघाट व मालवण येथे झाले. त्यांनी एम. ए., पीएच. डी. ह्या पदव्या घेऊन काही काळ वडिलांना शेतीव्यवसायात मदत केली. नंतर रेल्वेत अल्पकाळ कारकुनी केल्यावर १९६३ सालापासून सावंतवाडीच्या पंचम खेमराज महाविद्यालयात ते निवृत्तीपर्यंत अध्यापन करीत होते.

'स्वस्तिक' (१९७३), 'उगवाई' (१९८४), 'देवराई' (१९९०), 'माझ्या घरातले सोनचाफ्याचे झाड'

(१९९३) हे त्यांचे काव्यसंग्रह होत. जन्मभूमी आणि कर्मभूमी कोकणच असल्याने तिथल्या निसर्गावर, माणसांवर, मातीवर त्यांनी मनापासून प्रेम केले आणि तेच त्यांच्या काव्याचे सामान्यपणे विषय झाले. सावंत श्रद्धावान पठडीतले असले, तरी त्यांना नैसर्गिक प्रतीकांमधूनच ईश्वराच्या अस्तित्वाची जाणीव होई, त्यामुळे त्यांच्या काव्यप्रतिभेला चिंतनशील, आध्यात्मिक पार्श्वभूमी लाभलेली आहे. त्यांची प्रेमकविताही काहीशी त्याच पातळीवर विरह आणि व्याकुळता, बंध आणि अनुबंध यांच्या सीमारेषेवर उभी राहणारी आहे.

त्यांच्या 'देवराई' या काव्यसंग्रहाचे समीक्षण ज्येष्ठ कवी डॉ. वि. म. कुलकर्णी यांनी, 'निसर्ग आणि लोकजीवन यांच्याशी जोडलेले सौंदर्यदृष्टीचे नाते', अशा शब्दांत केलेले आहे. त्यांची कविता शक्यतो कटुतेपासून दूर राहिली आहे. सावंत यांनी स्वतः 'स्वस्तिक'मधील 'बैल' या कवितेसंबंधी 'एक अमृतानुभव' असे म्हटले आहे. ते म्हणतात, ''काही, काही जीवनानुभव कवीला भाग्याने लाभत असावेत असे वाटते. त्यांपैकी 'बैल' या कवितेचा अनुभव आहे, असे मला वाटते. तिच्या रूपाने मी माझ्याच आतल्या ऊर्मीचे, ऊर्जेचे एक रूप मराठी साहित्यात कोरून ठेवले आहे असे माझा एक मित्र म्हणतो, ते खरे असावे.'' (पृ. ९३ व ९७, म. सा. प. दिवाळी १९९०).

वसंत सावंत यांनी आवडीने काही ग्रंथपरिचयात्मक आणि समीक्षात्मक लेखनही केले आहे. त्यांचा पीएच.डी.चा प्रबंध 'प्रवासवर्णन : एक वाङ्मयप्रकार' या नावाने पुस्तकरूपाने प्रसिद्ध झाला आहे. प्रवासवर्णनांचा विस्तृत आढावा घेणारे अशा प्रकारचे मराठीतील हे पहिलेच पुस्तक असल्याचे समीक्षक शंकर सारडा म्हणतात. महाविद्यालयातील अध्यापनकार्याच्या निवृत्तीनंतर अल्पकाळात वसंत सावंत मृत्यू पावले.

– मधू नेने

**संदर्भ :**


१. *सावंत वसंत लाडोबा; 'कविता विसाव्या शतकाची'; शेळके शांता, परांजपे प्र. ना., डहाके वसंत आबाजी, गुंडी नीलिमा; संपादक; उत्कर्ष प्रकाशन, पुणे; दुसरी आवृत्ती.*

२. *सारडा शंकर; म. सा. पत्रिका, पुणे, अंक २५०; जुलै-सप्टेंबर १९८९.*

३. *सावंत वसंत; 'बैल : एक अमृतानुभव', 'म.सा. पत्रिका', पुणे, अंक २५५; दिवाळी १९९०.*

४. *'डॉ. कुलकर्णी वि. म.; देवराई', 'म.सा. पत्रिका', पुणे, अंक २५६; जानेवारी – मार्च १९९१*

५. *सावंत वसंत लाडोबा; 'स्वस्तिक', 'उगवाई' काव्यसंग्रह..*


## सावंत, शिवाजी गोविंद

**कादंबरीकार**

**३१ ऑगस्ट १९४० – १८ सप्टेंबर २००२**



कादंबरीकार शिवाजी गोविंद सावंत यांचा जन्म कोल्हापूर जिल्ह्यातील आजरा या गावी झाला. बी.ए.च्या प्रथम वर्षाचे शिक्षण घेतल्यावर त्यांनी कॉमर्सचा डिप्लोमा घेतला व काही काळ कोल्हापूरच्या मेन राजाराम हायस्कूलमध्ये अध्यापक म्हणून नोकरी केली. नंतर, पुणे मुक्कामी, राज्यसरकारच्या शिक्षणखात्यात त्यांनी 'लोकशिक्षण' मासिकाचे सहा वर्षे संपादन केले. त्यानंतर सावंतांनी केवळ चरित्रात्मक कादंबरी-लेखनाला वाहून घेतले.

अमाप साहित्य उपलब्ध असलेल्या व भारतीयांचा मानबिंदू असलेल्या प्रसिद्ध महाभारतातील कर्णाच्या जीवनावर आधारलेली 'मृत्युंजय' ही कादंबरी सावंतांनी १९६७ साली प्रकाशित केली. या कादंबरीच्या वीस आवृत्त्या निघून हजारो प्रती संपल्या, यावरून तिच्या प्रचंड लोकप्रियतेची सहज साक्ष पटावी. यावरच आधारित नाटकही सतत बारा वर्षे रंगभूमीवर यशस्वी ठरले. इतकेच नव्हे, तर 'मृत्युंजय'ची कन्नड, गुजराती, मल्याळी, बंगाली, हिंदी व राजस्थानी भाषांतील भाषांतरेही लोकप्रिय झाली.

'अशी मने असे नमुने' या शिवाजी सावंतांच्या पुस्तकाच्या चार आवृत्त्या निघाल्या. त्यात ते म्हणतात,

'माझ्या साहित्यिक वाटचालीत आजऱ्याला फार मोलाचे आणि अविस्मरणीय असे स्थान आहे. ही आहेत त्या गावाकडची म्हणजे आजऱ्याकडची घाटोळी माणसं. माझं त्यांचं प्रत्यक्ष रक्ताचं जमलेलं असं कोणतंच नातं नाही; पण रक्तापेक्षा माती अधिक दाट असावी ! माणसाच्या अबोध व कोऱ्या मनाची पाटी जिथं घडते, बनत असते, तो परिसर फार फार महत्त्वाचा असतो, असं मला वाटतं.'

'मोरावळा' या पुस्तकात ते सहज आपले मत व्यक्त करतात, 'शेवटी साहित्याचं सर्वश्रेष्ठ मौलिक तत्त्व कोणतं? 'वाचकाला लेखकानं समानानुभूती देणं हेच नाही का?' मोरावळा गुणकारी तर असतोच; पण लज्जतदार, पौष्टिक व खुमासदारही असतो.' या संग्रहातील व्यक्तिचित्रे तशीच आहेत.

चरित्रात्मक कादंबरी लेखन हे आवडते क्षेत्र असल्याने शिवाजीरावांनी छत्रपती संभाजीच्या जीवनावर 'छावा' (१९७९), पद्मश्री विखे पाटील यांच्या जीवनावर आधारलेली 'लढत' (१९८५), श्रीकृष्ण चरित्रावर 'युगंधर' (२०००) ही प्रदीर्घ कादंबरी लिहिली. याशिवाय, 'शेलका साज', 'कांचनकण' हे ललित लेखनही त्यांनी केलेले आहे. सावंत यांची आणखीही ग्रंथसंपदा आहे. उदा. युगंधर : एक चिंतन.

शिवाजी सावंत यांना भारतीय ज्ञानपीठाचा 'मूर्तिदेवी' पुरस्कार, 'पूनमचंद भुतोडिया' हा बंगाली पुरस्कार, कोल्हापूर भूषण, पुणे विद्यापीठाचा 'जीवनगौरव' हा पुरस्कार, असे नामांकित पुरस्कार लाभले. चरित्रात्मक कादंबरीच्या क्षेत्रात शिवाजी सावंतांनी आपले नाव अजरामर करून ठेवले आहे.

– वि. ग. जोशी

**संदर्भ :**

१. *सावंत शिवाजी; 'अशी मने असे नमुने'; कॉन्टिनेन्टल प्रकाशन, पुणे, १९९७.*

२. *सावंत शिवाजी, 'मोरावळा'; मेहता पब्लिशिंग हाउस, पुणे; १९९८.*

## सावदेकर, आशा अरविंद

**समीक्षक**

**२६ ऑगस्ट १९४८**



डॉ. आशा सावदेकर मूळच्या नागपूरच्या असून त्यांचे माहेरचे नाव आशा गजानन भवाळकर आहे. नागपूर येथील भिडे कन्याशाळेत त्यांचे माध्यमिक शिक्षण, तर तिथल्याच नागपूर महाविद्यालयातून त्या १९६८ साली बी.ए. व १९७० साली एम.ए. (मराठी) झाल्या. १९७५ साली त्यांना पीएच.डी. ही पदवी मिळाली. 'कविवर्य भा.रा.तांबे यांच्या कवितेचा चिकित्सक अभ्यास' हा त्यांच्या प्रबंधाचा विषय होता. पुढे १९७९ साली पुस्तकरूपाने तो प्रसिद्ध झाल्यावर साक्षेपी समीक्षक म्हणून त्यांची प्रसिद्धी झाली.

मराठी साहित्यावर ज्यांचा महत्त्वपूर्ण प्रभाव पडलेला आहे, अशा अनेक नामवंत प्रतिभावान साहित्यिकांच्या लेखनाची त्यांनी चिकित्सक समीक्षा केली आहे. त्यांमध्ये कथाकार पु.भा.भावे, कादंबरीकार ना.सी.फडके, कवी ज.के.उपाध्ये इत्यादींचा समावेश असून या संदर्भातील त्यांची 'पु.भा.भावे: साहित्यवेध' (१९८९), 'भारतीय साहित्याचे शिल्पकार: ना.सी.फडके' (१९९५), 'मुशाफिरी' (२०००) ही पुस्तके प्रकाशित झाली आहेत.

त्यांचा काव्याचा व्यासंग आणि अभ्यास मोठा असून 'मुशाफिरी' या नावाने मराठी कवितेची समीक्षा करणारा त्यांचा ग्रंथ २००० साली प्रकाशित झाला आहे. जयकृष्ण केशव उपाध्ये हे विदर्भातील एक मान्यवर कवी होत. त्यांची कविता आशाताईंनी अभ्यासपूर्ण प्रस्तावनेसह संपादित केली आहे (१९८५).

त्यांचे कविताविषयक महत्त्वाचे संपादन म्हणजे 'कविता विदर्भाची' (१९९१). या ग्रंथात त्यांनी विदर्भातील निवडक कवींच्या वैशिष्ट्यपूर्ण कवितांचे

संकलन केले आहे. डॉ. वि. वा. प्रभुदेसाईंच्या सहकार्याने 'आजचे मराठी साहित्य' हा ग्रंथही त्यांनी लिहिला आहे. त्यांचे अनेक समीक्षात्मक लेख वाङ्मयविषयक विविध नियतकालिकांमधून सातत्याने प्रसिद्ध होत असतात. त्या स्वतः 'युगवाणी' या विदर्भ साहित्य संघाच्या मुखपत्राच्या संपादक (१९८६-१९८९) होत्या. महाराष्ट्र साहित्य पत्रिकेचा अंक क्र.२५० मध्ये (जुलै-सप्टेंबर१९८९) त्यांनी 'कवी यशवंत: एक आकलन' या लेखातून यशवंतांच्या कवितेचा परामर्श घेतला आहे. जवळपास ३० वर्षे त्यांनी समीक्षक म्हणून मान्यता मिळविली असली तरी 'मी तुळस तुझ्या अंगणी' (१९७७) ही एक कादंबरी त्यांच्या नावावर आहे. विदर्भातील ख्यातनाम कवींचा परिचय त्यांनी एका लेखमालेतून करून दिला आहे. त्यांची समीक्षा वस्तुस्थितिनिदर्शक, तरीही आस्वादक आहे.

– मधू नेने

**संदर्भ :**

*१. मराठी वाङ्मयाचा इतिहास, खंड १; महाराष्ट्र साहित्य परिषद; पुणे..*

## सावरकर, विनायक दामोदर

**कवी, कादंबरीकार, आत्मचरित्रकार, नाटककार, विचारवंत, निबंधकार**

**२८ मे १८८३ – २६ फेब्रुवारी १९६६**

☞ **मुख्य नोंद – राजकारण खंड**

प्रखर देशाभिमान, हिंदुत्वनिष्ठा, स्वातंत्र्यप्रेम हे समीकरण म्हणजेच स्वातंत्र्यवीर सावरकर होय. वीर सावरकरांच्या जीवनाचा एकूण आलेख बघताना एक गोष्ट लक्षात येते ती अशी की, देशभक्ती आणि स्वातंत्र्य हेच त्यांच्या वाङ्मयनिर्मितीचे प्रयोजन होय. इंग्रजांविरुद्ध दिलेला सशस्त्र लढा, राजद्रोहाच्या आरोपाखाली झालेली जन्मठेपेची शिक्षा, मातृभूमीच्या लढ्यासाठी फ्रान्सच्या बंदरापाशी घेतलेली साहसी उडी, अंदमानचा कारावास ह्या सगळ्याच घटनांचे प्रतिबिंब त्यांच्या साहित्यातून उमटलेले दिसते. वाङ्मय केवळ आनंदनिर्मितीसाठी नसावे तर जीवनावरचे भाष्य असावे; ही त्यांची वाङ्मयाविषयीची भूमिका होती. साहित्यिकाने सामाजिक बांधिलकी स्वीकारलीच पाहिजे हा त्यांचा आग्रह होता.

भारतीयांना स्वातंत्र्याची खरी ओळख व्हावी या हेतूने 'जोसेफ मॉझिनी, आत्मचरित्र नि राजकारण' (१९०७), अठराशे सत्तावनचे भारतीय स्वातंत्र्यसमर' (१९६५), 'शिखांचा इतिहास' ह्या तीन ग्रंथांची निर्मिती झाली. हिंदुत्वासंबंधीचे विचार मांडण्यासाठी लिहिलेले 'हिंदुत्व' (१९२५) व 'हिंदुपदपादशाही' (१९२८) हे दोन ग्रंथ होत. धर्मनिष्ठा, स्वातंत्र्यनिष्ठा या सोबतच माणसाने विज्ञाननिष्ठा जपावी यासाठी 'सावरकर साहित्य'ची (१९३७-५०) पाच भागांत निर्मिती झाली. 'माझी जन्मठेप' (१९२७) या आत्मचरित्रामधून वैयक्तिक तसेच राजकीय घडामोडी दिसून येतात. 'कमला' (१९३४) 'महासागर', 'विरहोच्छवास' ही वीररसाने परिपूर्ण अशी तीन खंडकाव्ये होत.

भारतातील लोकांची ऐहिकदृष्ट्या अधोगती झाली आहे, असे स्वातंत्र्योत्तर कालखंडात सावरकरांच्या लक्षात आल्यावर त्यावरील उपाय म्हणून नाटक ह्या माध्यमाचा वापर केला. 'सन्यस्त खड्ग'(१९३१), 'गोमांतक' (१९२४) ही ती दोन नाटके होत तर 'संगीत उःशाप' (१९२७), 'संगीत उत्तरक्रिया' ही त्यांची सामाजिक विचारसरणीवर आधारलेली नाटके होत.

स्वातंत्र्यवीर सावरकरांचे वाङ्मय भव्य, दिव्य, उदात्त अशा प्रेरणेने भारलेले, प्रत्यक्ष अनुभूतीतून निर्माण झालेले होते याची प्रचिती त्यांच्या काव्यातून दिसून येते. 'ने मजसी ने परत मातृभूमीला' ह्या शब्दांमधूनच मायभूचे प्रेम आंतरिक तळमळीतून आलेले दिसून येते. 'मृत्यूपत्र', 'स्वतंत्रतेचे स्तोत्र', 'जगन्नाथाचा रथ', 'सप्तर्षी', 'तारकांस पाहून' या कवितांमधून ओजस्विता, कोमल भावना, आत्मसमर्पणाची वृत्ती, चिंतनशीलता ह्यांचे प्रकटन होते.

सावरकरांनी नेहमीच भाषाशुद्धीचा आग्रह धरला. स्वत्वच्या अभिमानातून इंग्रजी व उर्दू भाषांच्या जोखडातून मराठी भाषा मुक्त व्हावी ही त्यांची धडपड होती. यासाठी भाषाशुद्धी व लिपीशुद्धी या दोन वाङ्मयीन

चळवळी त्यांनी उभ्या केल्या. 'एका उच्चारास एक अक्षर' हे तत्त्व त्यांनी मांडले व काव्य-रचनेला अनुकूल असे 'वैनायक' वृत्त तयार केले.

राजकारणात शिरल्यावर हिंदू महासभेच्या अध्यक्षपदासाठी केलेली भाषणे ग्रंथबद्ध आहेत. 'भारताच्या इतिहासातील सहा सोनेरी पाने' (१९६३), 'नेपाली आदोलनाचा इतिहास', 'माझ्या आठवणी व शत्रूच्या शिबिरात', 'तेजस्वी तारे', 'लंडनची बातमीपत्रे व अंदमानच्या अंधेरीतून' (इंग्रजी) आदी पुस्तके त्यांच्या राजकीय वैचारिकतेचा दाखला देतात. 'काळे पाणी' व 'मला काय त्याचे' ह्या दोन कादंबऱ्या तसेच 'सावरकरांच्या गोष्टी' व 'समाजचित्रे' हे कथासंग्रह वाङ्मयाच्या सर्वच क्षेत्रांतील त्यांची मुशाफिरी दर्शवतात. जाज्वल्य देशाभिमान, बुद्धिवादी विचारसरणी, वैज्ञानिक दृष्टिकोन धर्माभिमान या त्यांच्या गुणांमुळे त्यांचे लेखन आजही तेवढेच प्रभावी ठरले आहे. कवी, नाटककार, कादंबरीकार, आत्मचरित्रकार, चरित्रकार या नात्याने मराठी साहित्याला स्वातंत्र्यवीर सावरकरांच्या लेखणीने समृद्ध केले आहे.

– सुपर्णा कुलकर्णी

## सासणे, भारत जगन्नाथ

**कथाकार, कादंबरीकार, नाटककार**

**२७ मार्च १९५१**



भारत सासणे यांचा जन्म जालना येथे झाला. अहमदनगरच्या कॉलेजातून बी.एस्सी. पदवी मिळवून ते शासकीय अधिकारी झाले. शालेय जीवनातच त्यांची पहिली कविता प्रकाशित झाली. दर्जेदार नियत-कालिकातून त्यांच्या आरंभीच्या कथा प्रसिद्ध झाल्या. ग्रामीण परिसरातील माणसे, त्यांच्या श्रद्धा, दैवते, वेगवेगळे सामाजिक, सांस्कृतिक संदर्भ यांची सूक्ष्म वीण गुंफत ते मानवी मनोविश्वाची गूढ गुंतागुंत व्यक्त करतात. जगावेगळे अनुभवविश्व चित्रित करणारी त्यांची कथा दीर्घत्वाकडे झुकते.

सासणे म्हणतात, ''माणसाचा बौद्धिक एकटेपणा आणि त्याचं तुटलेपण याचं मला कुतूहलजनक आकर्षण वाटत आलं आहे. तालुक्यापलीकडचं जिणं मी पाहतो, तेव्हा जिण्याला अमर्याद मर्यादा दिसतात.''

समकालीन कथेच्या प्रकृतीविषयी चर्चा करताना त्यांना जाणवते की कथा खोल, गंभीर व वास्तवाशी संलग्न न राहता बऱ्याचदा निरर्थक, रोगी, वर्गवारीजन्य व समाजजीवनापासून दूर झालेली दिसते. १९६० सालापर्यंत चांगल्या, सृजनशील कथाकारांनी जीवनातील काही भाग अस्पर्श्य मानला व पुनःपुन्हा समाजातल्या एका विशिष्ट वर्गावर, विशिष्ट प्रदेशावर, त्या प्रदेशातल्या अनैसर्गिक व दैन्या निर्मित दुःखावर लक्ष केंद्रित केले आहे. त्यामुळे ग्रामीण कथेला स्थान मिळविण्यासाठी भांडावे लागले. दलित कथेचा त्याच सुमारास उद्रेक झाला.

''माझी कथा कोणत्याही वर्गवारीत बसत नाही असे जेव्हा सांगितले जाते, तेव्हा मला आनंद वाटतो. माझ्या कथेतील पात्रे अर्धी स्वप्नात व अर्धी वास्तवात वावरतात अशी टीका मी जेव्हा वाचली, तेव्हा मला आनंद झाला.

५० वर्षांनंतर जी.ए. इत्यादींच्या कथा जशा राहिल्या, तशा आपल्याही राहतील असा सासणे यांना विश्वास आहे. त्यांच्या मते, 'माणसाची जटिलता कथेचं आव्हान असतं.' 'आयुष्याची छोटी गोष्ट' (२०००) या संग्रहात ते नमूद करतात : 'या माझ्या काही कथा माणसाच्या आणि त्याच्या आत्मशोधाचा वेध घेण्याचा प्रयत्न करतात.' 'चिरदाह'च्या निमित्ताने मी 'दीर्घकथा' या फॉर्मबद्दल काही तांत्रिक भूमिका मांडली होती. 'अस्वस्थ', 'विस्तीर्ण रात्र'च्या निमित्तानं नातेसंबंधांबद्दल काही सूचन केले होते. जन्माधिष्ठित नातेसंबंधापेक्षा आयोजनजन्य नातेसंबंधांच्या यशस्वितेवर (आणि अयशस्वितेवर) माणसाचे मानसिक आणि लौकिकही समाधान अवलंबून असते.'

'शुभवर्तमान' (२००४) या संग्रहामध्ये सासणे म्हणतात, 'अथक साधनेनंतर लेखक स्वतःची शैली सिद्ध करतो आणि सिद्धतेतून निर्मिती करीत राहतो.'

शैलीत बंदिस्त न राहता, भारत सासणे सतत नवतेच्या शोधात व शैलीच्या प्रयोगात राहणे पसंत करतात. त्यांच्या लेखनप्रवासात 'जॉन आणि अंजिरी पक्षी' (१९८०), 'कँप किंवा बाबीचे दुःख' (१९८२), 'लाल फुलांचे झाड' (१९८४), 'क्षितिजावरची रात्र' (२०००) असे कथासंग्रह; 'दूर तेथे दूर तेव्हा' या दोन लघुकादंबऱ्यांचा संग्रह (२०००), 'मरणरंग' (१९९९), 'नैनं दहति पावक:' (१९९९) ही नाटके, तसेच लहान मुलांसाठी कादंबरी व बालनाटिकाही प्रकाशित झाल्या आहेत.

– वि. ग. जोशी

**संदर्भ :**


१. राजाध्यक्ष विजया, संपादक; 'कथाशताब्दी'; ग्रंथाली प्रकाशन, मुंबई; १९९३.

२. सासणे भारत; 'शुभवर्तमान'; मॅजेस्टिक प्रकाशन, मुंबई; १९९८, २०००, २००४.


## साळुंखे, आ. ह.

☞ मुख्य नोंद – पत्रकारिता आणि ललितेतर साहित्य खंड

## सुर्वे, नारायण गंगाराम

**कवी**

**१५ ऑक्टोबर १९२६**

कवी नारायण सुर्वे यांचा जन्म मुंबई येथे झाला. आपल्या जन्माविषयी नारायण सुर्वे लिहितात, 'मी अनाथ मुलगा म्हणून जन्माला आलो, ही अतिशय दुःखद गोष्ट आहे. भूषणास्पद नाही. ही जन्मदात्री आई जेव्हा माझी नाळ कापून, माझ्यापासून अलग झाली असेल, तेव्हा तिच्या डोईवर आकाश फाटले असेल...; परंतु पुढल्या भवितव्याने काही वेगळेच ठरवलेले दिसते.... माझी नाळ कापली जाऊन मी अलग झालो खरा; परंतु कुणीतरी चटकन मला आपल्या स्तनाशी घेतलेही. ही माझी दुसरी



माय. जन्मदात्रीपेक्षाही थोर. मी जन्मलो तेव्हा काही नाम धारण करून जन्मलो नाही. मात्र मी नसेन तेव्हा ह्या पृथ्वीच्या पाठीवर एक नाम ठेवून जाईन – ते म्हणजे नारायण गंगाराम सुर्वे...'(मनोगत, 'सनद')

मुंबईच्या इंडिया वुलन मिलमधील स्पिनिंग खात्यात साचेवाले म्हणून काम करणारे श्री. गंगाराम कुशाजी सुर्वे आणि कमला मिलमध्ये बाइंडिंग खात्यात काम करणाऱ्या श्रीमती काशीबाई गंगाराम सुर्वे या जोडप्याने या अनाथ मुलाला स्वीकारले, सांभाळले, वाढवले आणि आपले नाव दिले. आपले आईवडील कामगार होते, त्यांच्यामुळेच मुंबईच्या कामगारवर्गाशी आपण जोडले गेलो, याविषयी नारायण सुर्वे यांना विलक्षण अभिमान आहे. हा अभिमान त्यांनी आपल्या लेखनातून, भाषणांतून अनेकदा व्यक्तही केला आहे. ही अभिमानाची भावना सुर्वे यांच्या कवितेमधूनही वारंवार डोकावताना दिसते.

मुंबईच्या गिरणगावात, गिरणी कामगारांच्या जगात नारायण सुर्वे यांचे बालपण गेले. महाराष्ट्राच्या वेगवेगळ्या प्रांतांमधून मुंबईत आलेल्या, पोटासाठी श्रम विकणाऱ्या आणि त्यासाठी पूर्णपणे गिरण्या-कारखान्यांवर अवलंबून असलेल्या कामगारांशी सुर्वे यांचा अगदी जवळून संबंध आला. हा कामगारवर्ग व्यवसायाने मूळचा शेतकरी असलेला, पण पोटासाठी शहरात आलेला आणि शहरावर पूर्णपणे अवलंबून असलेला असा होता. परंतु, मनातून मात्र हा वर्ग आपल्या खेड्याशी आणि खेड्यातील जीवनपद्धतीशी नाते ठेवून होता. या वर्गाच्या या द्विधा अवस्थेचे आणि सुखदुःखांचे अगदी जवळून निरीक्षण सुर्वे यांनी केले.

सुर्वे स्वतः या जगाचा एक भाग असल्यामुळे या जगाचे प्रश्न त्यांनी फार जवळून समजून घेतले. कामगारवर्गावर होणारा अन्याय, या वर्गाची होणारी आर्थिक आणि

राजकीय पिळवणूक, या वर्गाच्या वाट्याला आलेली 'सर्वहारा' अवस्था सुर्वे यांनी प्रत्यक्ष अनुभवली. या सर्व अनूभवांतूनच कवी नारायण सुर्वे यांची जीवनदृष्टी घडत गेली, असे म्हणता येईल.

कामगार चळवळीमुळे सुर्वे यांचा परिचय मार्क्सवादी तत्त्वज्ञानाशी झाला. या तत्त्वज्ञानामुळे सुर्वे यांच्या विचारांना आणि त्यांच्या निष्ठेला विशिष्ट दिशा मिळाली. यातूनच परिस्थितीला सामोरे जाण्याचे धैर्य असलेला आणि परिवर्तनासाठी लढणारा नारायण सुर्वे हा कार्यकर्ता निर्माण झाला, असे म्हणता येईल. कार्यकर्ता म्हणून सुर्वे यांनी कामगार चळवळीमध्ये प्रत्यक्ष भाग घेतला. लालबागच्या चाळीत आपल्या शेजारीपाजारी राहणाऱ्या कामगारांना सभांची माहिती देणे, पुस्तके वाचून दाखवणे आणि कम्युनिस्ट विचारांचा परिचय करून देणे; ही कामे नारायण सुर्वे करीत. म्हणून त्यांना सर्व जण 'मास्तर' म्हणत. याशिवाय थाळीप्रचार करणे, खडूप्रचार करणे, पोस्टरे चिकटवणे, संपाच्या वेळी पिकेटिंग करणे, युनियनची वर्गणी गोळा करणे, निवडणुकांमध्ये कामे करणे, मिरवणुकीत सहभागी होणे, इत्यादी अनेक कामे सुर्वे यांनी केली. शाहीर अण्णाभाऊ साठे, शाहीर अमरशेख आणि शाहीर गवाणकर यांनी कम्युनिस्ट चळवळीच्या प्रचारासाठी निर्माण केलेल्या कलापथकांमध्येही सुर्वे सहभागी झाले.

१९५८च्या सुमारास नारायण सुर्वे यांनी काव्यलेखनाला प्रारंभ केला. त्या वेळी ते शाळेत शिपाई म्हणून काम करीत होते. मुख्यतः ते कामगारांचीच वस्ती असलेल्या बोगद्याच्या चाळीतील अंधाऱ्या खोलीत राहत होते. आपले अल्पशिक्षण, साहित्यक्षेत्राशी दुरान्वयानेही नसलेला संबंध, आपली अभावग्रस्त परिस्थिती आणि सामाजिक स्थान यांचा विलक्षण दबाव सुर्वे यांच्या मनावर होता. असे असूनही या दबावाखाली त्यांची कविता गुदमरली नाही किंवा दडपली गेली नाही.

सुर्वे कविता लिहू लागले आणि बाबूराव बागुलांच्या प्रयत्नांमुळे 'नवयुग'मध्ये त्यांची कविता छापूनही आली. त्यानंतर सुरुवातीच्या काळात नवयुग, युगांतर, मराठा, इत्यादी नियतकालिकांमधून त्यांच्या कविता प्रसिद्ध झाल्या. १९६२ साली 'ऐसा गा मी ब्रह्म' हा सुर्वे यांचा पहिला कवितासंग्रह प्रकाशित झाला. समकालीन कवितेपेक्षा सुर्वे यांच्या कवितेचे असलेले वेगळेपण या संग्रहामुळे स्पष्टपणे जाणवू लागले. १९६३ साली 'ऐसा गा मी ब्रह्म'ला महाराष्ट्र शासनाचा पुरस्कार जाहीर झाला. या पुरस्कारामुळे सुर्वे प्रसिद्धीच्या झोतात आले आणि वाचक-रसिकांचे लक्ष त्यांच्याकडे वेधले गेले.

१९६६ मध्ये 'माझे विद्यापीठ' हा सुर्वे यांचा दुसरा कवितासंग्रह प्रसिद्ध झाला. 'ऐसा गा मी ब्रह्म'मध्ये दिसून येणारी कवीच्या सामर्थ्याची बीजे या दुसऱ्या संग्रहात अधिक विकसित रूपात प्रकट झाली. १९७५ मध्ये प्रसिद्ध झालेल्या 'जाहीरनामा' या तिसऱ्या संग्रहाने नारायण सुर्वे यांच्या कवितेचे स्वरूप अधोरेखित केले. यानंतर 'सनद' हा निवडक कवितांचा संग्रह (१९८२), 'नव्या माणसाचे आगमन' (१९९५) आणि 'नारायण सुर्वे यांच्या गवसलेल्या कविता' हा अप्रकाशित कवितांचा संग्रह (१९९५) असे तीन संग्रह प्रसिद्ध झाले आहेत.

नारायण सुर्वे यांच्या कवितेतून मराठी कवितेत तोवर कधीच व्यक्त न झालेले असे कष्टकऱ्यांचे जग आपल्या सर्व पैलूंसकट व्यक्त होते; हे सुर्वे यांच्या कवितेचे प्रथमदर्शनी जाणवणारे वैशिष्ट्य होय. या कष्टकऱ्यांच्या जगाला दाहक अशा राजकीय, सामाजिक आणि आर्थिक वास्तवाची आणि जीवनसंघर्षाची पार्श्वभूमी लाभली आहे. समकालीन सामाजिक परिस्थितीवर, त्यातील अन्याय्य गोष्टींवर, प्रश्नांवर, माणसाच्या माणूसपणाचा अपमान करणाऱ्या व्यवस्थेवर प्रत्यक्षाप्रत्यक्ष भाष्य करणे हा सुर्वे यांच्या कवितेचा स्थायिभाव आहे. हे भाष्य करीत असताना सुर्वे यांच्या कवितेतून मार्क्सवादी विचारांची दिशा स्पष्टपणे व्यक्त होते. परंतु माणसाशी असलेल्या आत्मीय संबंधांमुळे आणि त्या संबंधांतून कवितेत प्रकट होणाऱ्या मार्क्सवादी जाणिवेमुळे सुर्वे यांची कविता मार्क्सवादी विचारांचे सूचन करीत असली, तरी प्रचारकी स्वरूप धारण करीत नाही.

जीवनावर आणि माणसांवर सुर्वे यांची दृढ श्रद्धा आहे. माणूस हा त्यांच्या आस्थेचा, प्रेमाचा आणि शोधाचा विषय आहे. सुर्वे यांच्या मते माणूस हाच साहित्याचा केंद्रबिंदू

आहे. माणूस किंवा व्यक्ती ही एकटी नसते. ती समाजाचा घटक असते. म्हणूनच साहित्य आणि समाज यांचा अतूट संबंध असतो, असे सुर्वे मानतात. म्हणूनच समाज, आणि त्या समाजाच्या पार्श्वभूमीवर माणूस हा सुर्वे यांच्या कवितेचा गाभा आहे. माणसाचा, त्याच्या स्वभावधर्माचा, माणसाच्या सर्जनशीलतेचा आणि सामर्थ्याचा कुतूहलाने घेतलेला शोध सुर्वे यांच्या कवितेत सातत्याने जाणवत राहतो. माणसावरील आणि जीवनावरील या श्रद्धेमुळे आणि प्रेमामुळेच सुर्वे यांच्या कवितेतील आशावादी सूर कधीही लोप पावलेला दिसत नाही.

सुर्वे यांच्या कवितेला विलक्षण लोकप्रियता लाभली आहे. आजवर त्यांच्या काव्यवाचनाला उदंड प्रतिसाद लाभला आहे. सुर्व्यांच्या कवितेतील प्रासादिकता हे याचे एक कारण म्हणता येईल. अगदी परिचित वाटणारी, रोजच्या वापरातल्या बोलीभाषेसारखी भासणारी, प्रमाण मराठी आणि बोली यांची स्वाभाविक सरमिसळ असणारी भाषा, ओळखीची वाटणारी प्रतिमासृष्टी आणि सहज वाचता येतील, समजून घेता येतील अशा गद्यसदृश लयी यांमुळे सुर्वे यांची कविता समाजाच्या सर्व थरांतील लोकांच्या तोंडी वसलेली दिसते.

एका बाजूला गद्यसदृश लयीची कविता निर्माण करणाऱ्या सुर्व्यांनी सुरुवातीला गाणीही लिहिली आहेत. शाहीर अण्णाभाऊ साठे, शाहीर अमरशेख, शाहीर गवाणकर यांच्याबरोबर कलापथकांमध्ये वावरताना सुर्वे यांच्यावर जे संस्कार झाले, त्यांतून प्रेरणा घेऊन त्यांनी १९५६मध्ये 'डोंगरी शेत' हे आपले पहिले गीत लिहिले. स्त्रीच्या कष्टांचा आणि वेदनेचा अनुभव स्त्रीसुलभ भाषेतून देणाऱ्या या गीताला समाजाच्या सर्व थरांतील लोकांकडून उत्स्फूर्त प्रतिसाद लाभला. शाहीर अमरशेखांनी हे गीत खेड्यापाड्यांत, अगदी घरोघरी पोहोचवले. त्या काळी लोकप्रियतेमुळे हे गीत केवळ सभासंमेलनांत किंवा चळवळींच्या विविध उपक्रमांत नव्हे, तर धंदेवाईक तमाशांच्या खेळांमध्येही गायले जात होते. या गीताची रेकॉर्ड हातोहात खपली. या गीतानंतर सुर्वे यांनी 'गिरणीची लावणी', 'महाराष्ट्राच्या नावानं' हा गोंधळ, 'गाडी आणा बुरख्याची' हे गीत, अशी सुमारे पंधरा ते वीस गीते लिहिली. त्यांपैकी आठ गीते 'ऐसा गा मी ब्रह्म' या संग्रहात आढळतात.

पुढे मात्र सुर्वे यांनी गीते लिहिली नाहीत. आपला पिंड किंवा वृत्ती गीतकाराची नाही हे त्यांनी ओळखले आणि कवितेवरच लक्ष केंद्रित केले, असे दिसते. 'कविता श्रमाची' आणि 'गाणी चळवळीची' हे दोन गीतसंग्रह सुर्वे यांनी संपादित केले आहेत.

नारायण सुर्वे यांनी फारसे गद्यलेखन केलेले नाही. कारणपरत्वे त्यांनी लिहिलेले लेख, व्यक्तिचित्रे, दिलेल्या मुलाखती व भाषणे यांपैकी काही लेखन एकत्रित स्वरूपात 'माणूस, कलावंत आणि समाज' या संग्रहात प्रसिद्ध झाले आहे. या लेखनामधून सुर्वे यांची जीवनदृष्टी आणि साहित्यविषयक भूमिका स्पष्टपणे व्यक्त झाली आहे. समकालीन साहित्याविषयीचे आणि समीक्षेविषयीचे त्यांचे विचारही या संग्रहातील लेखनामधून प्रकट झाले आहेत.

आपल्या ८३ वर्षांच्या आयुष्यात नारायण सुर्वे यांना अनेक मोठे पुरस्कार, मानसन्मान, शिष्यवृत्ती आणि गौरववृत्ती मिळाल्या. १९९५ मध्ये परभणी येथे झालेल्या अखिल भारतीय मराठी साहित्य संमेलनाचे अध्यक्षस्थान सुर्वे यांनी भूषविले होते. अनेक आंतरराष्ट्रीय संमेलनांमध्ये, परिषदांमध्ये सुर्वे सहभागी झाले आहेत. त्यांच्या कवितांचे अन्य अनेक भाषांमध्ये अनुवाद झाले आहेत. आणि सुर्वे यांना अन्य भाषक रसिकांचीही भरघोस दाद मिळाली आहे. भारतातच नव्हे, तर जगभरात त्यांच्या कवितेचे चाहते आहेत. १९६० नंतरच्या मराठी कवितेचा विचार करताना नारायण सुर्वे यांची कविता हा एक महत्त्वाचा टप्पा ठरतो, यात शंका नाही.

– डॉ. अरुणा दुभाषी

**संदर्भ :**


१. *राजापुरे तापस पुष्पा, संपादक; 'सुर्वे यांचे विद्यापीठ'; संदर्भ प्रकाशन, ठाणे; १९९३.*

२. *शिरवाडकर वसंत, संपादक; 'सर्व सुर्वे' डिंपल प्रकाशन, ठाणे; १९८५.*


* * *

स

# ह



## हडप, विठ्ठल वामन
**ऐतिहासिक कादंबरीकार, नाटककार**
**१८ नोव्हेंबर १८९९ – १२ मार्च १९६०**



विठ्ठल वामन हडप यांचा जन्म कोतकाम्ता, जि. रत्नागिरी येथे झाला. त्यांचे शिक्षण पुणे व मुंबई येथे झाले. वयाच्या सतराव्या वर्षी ‘झाकली मूठ’ ही त्यांची पहिली कादंबरी लिहिली गेली. कादंबरीकार नाथमाधव यांना त्यांनी गुरुस्थानी मानले होते. त्यांनी समाजातील दुष्ट प्रवृत्तीचे विदारक चित्रण केले. दुष्टांचा नाश करून सत्प्रवृत्तीचा विजय दर्शविणारे त्यांचे साहित्य आहे.

भारतीय स्वातंत्र्यलढ्याची ओळख करून देण्याचे कार्य त्यांच्या साहित्याने केले. नाथमाधवांच्या प्रभावामुळे त्यांनी ऐतिहासिक कादंबऱ्या लिहिल्या. इतिहासाचा सखोल अभ्यास केला. आपला उज्ज्वल इतिहास वाचकांपुढे प्रभावीपणे मांडला. ‘कादंबरीमय पेशवाई’, ‘पेशवाईचे पुण्याहवाचन’, ‘पेशवाईचे मन्वंतर’ अशा तेरा कादंबऱ्या त्यांनी लिहिल्या. ‘शिवशाहीची पहाट’, ‘समरदेवता ५७ ची’ याही त्यांच्या ऐतिहासिक कादंबऱ्या होत.

पुढे त्यांच्यावर साम्यवादी विचारसरणीचा प्रभाव पडला. गरीब-श्रीमंत यांच्यातील आर्थिक दरी पाहून ते अस्वस्थ झाले. त्यांनी मॅक्झिम गॉर्की, टर्जिनिव्ह यांच्या कादंबऱ्यांची भाषांतरे केली. त्यांच्या सामाजिक कादंबऱ्यांमध्ये वास्तव चित्रण आहे. ‘धरणीकंप’, ‘वादळ’, ‘अन्नदाता उपाशी’, ‘गोदाराणी’ यांमध्ये शेतकऱ्याला महत्त्व दिलेले आहे. त्यात सामाजिक, राजकीय विषमतेचे विदारक चित्रण आहे. ‘आजचा प्रश्न’ ही कादंबरी साम्यवाद्यांच्या भारतातील ऑगस्ट क्रांतीमागील भूमिका विशद करते.

इंग्रजांविरुद्धचे भारतातील आंदोलन, फैजपूर काँग्रेस, १९४२ सालचा ‘चलेजाव’ लढा, १९४७ सालचा स्वातंत्र्यदिन, नेताजी सुभाषचंद्र बोस यांचे कार्य हे त्यांनी जवळून पाहिले होते, त्यांनी त्या अनुभवावर आधारित लिखाण केले. त्यांनी ‘भारतमाते ऊठ’, ‘भारतमातेची हाक’, ‘भारतमाता वनवासी’, ‘भारतमातेचा शाप’ ‘भारतमातेचे दिव्य’, ‘भारत माता की जय’ या कादंबऱ्या लिहिल्या. ‘स्वतंत्र नवभारत’मधून त्यांनी इतिहासकथा मांडल्या. त्यांनी ‘संगीत देवकी’, ‘सह्याद्रीचा सिंह’, ‘पानिपत’, ‘प्रभुचरणी’ ही नाटके लिहिली.

कालांतराने ते गांधीवादाकडे आकर्षित झाले. काँग्रेस चळवळीमध्ये रममाण झाले. राजकीय, सामाजिक व ऐतिहासिक या तीनही विषयांचा सुरेख संगम त्यांच्या साहित्यात झालेला आहे. मात्र, त्यांना प्रामुख्याने ऐतिहासिक कादंबरीकार म्हणून लोकप्रियता मिळाली.

– श्याम भुर्के

## हरदास, बाळशास्त्री व्यंकटेश
☞ **मुख्य नोंद – पत्रकारिता आणि ललितेतर साहित्य खंड**

## हलसगीकर, दत्ता
***हलसगीकर गणेश तात्याराव***
**कवी**
**७ ऑगस्ट १९३४**

समकालीन प्रसिद्ध कवी दत्ता हलसगीकर यांचा जन्म अळगी, ता. अफझलपूर, जि. सोलापूर येथे झाला. ते



एस.एस.सी. आणि साहित्य विशारद आहेत. त्यांचे शिक्षण सोलापूर येथे झाले. त्यांची कर्मभूमी सोलापूर हीच होती. १९५३-१९९४ अशी एकेचाळीस वर्षे त्यांनी तिथल्याच लक्ष्मी-विष्णू या एकेकाळच्या प्रसिद्ध टेक्स्टाइल कंपनीत स्टेनोग्राफर म्हणून काम पाहिले.

वयाच्या विशीतच त्यांनी काव्यलेखनास प्रारंभ केला. त्यांची पहिली कविता १९५४ साली 'आविष्कार' या तत्कालीन नवोदित व अन्य कवींच्या प्रातिनिधिक कविता-संग्रहात समाविष्ट होती. 'आषाढघन' (१९७४) हा त्यांचा पहिला काव्यसंग्रह. त्यानंतर त्यांचे अनेक कवितासंग्रह प्रसिद्ध झालेले आहेत. 'सहवास' या २००१ साली प्रसिद्ध झालेल्या छोट्याशा कवितासंग्रहात त्यांच्या कणिका स्वरूपाच्या कविता प्रसिद्ध झाल्या असून त्यांत प्रेम हाच विषय आहे. प्रेमाचा धर्म, प्रेमाची उत्कटता आदी बाबी त्यांतून मार्मिकपणे पुढे आल्या असून विशेष म्हणजे, त्या वेळी ते सदुसष्ट वर्षांचे होते.

वयाच्या साठाव्या वाढदिवशी त्यांनी स्वतःचे पाच कवितासंग्रह एकदम प्रसिद्ध केले. महाराष्ट्रातील अनेक दिवाळी अंकांना गेली अनेक वर्षे दत्ता हलसगीकर हे नाव अपरिहार्य ठरले आहे. 'चाहूल वसंताची' (१९९९) हाही त्यांचा एक प्रसिद्ध कवितासंग्रह होय, तसेच 'करुणाघन' हा कवितासंग्रह २००१ साली प्रसिद्ध झाला.

त्यांची कविता 'मूल्यांचे जीवनभान देणारी आहे,' असा अभिप्राय डॉ. लीला दीक्षित यांनी व्यक्त केला आहे. त्यांचे व्यक्तिमत्त्व साधे, सत्त्वशील, विशिष्ट सांस्कृतिक विचारांच्या मुशीत घडलेले, माणुसकीवर श्रद्धा असलेले आणि जीवनाचा विविध अंगांनी वेध घेणारे असल्याने, त्यांची कविता एकसुरी न होता सर्वस्पर्शी झाली आहे. तिला प्रबोधनाचे आकर्षण आहे. प्रेमावर त्यांचे प्रेम आहे आणि एक चिंतनशील विचारधारा ही त्यांच्या लेखणीची तीन रूपे आहेत. त्यांच्या कवितेची भाषा सहजसुंदर, प्रसन्न वाटावी अशी आहे. त्यांच्यात एक ईश्वरी तत्त्व आहे. त्याच्यावर त्यांचा विश्वास असून तो आर्ततेने प्रकटतो. 'हे जीवन अतिसुंदर, तरीही अशिवाची छाया। अशा जगाची किती लावलिस दयाघना माया। ही त्यांची धारणा आहे.

दै. 'संचार'मधून त्यांनी 'कवितांतील अमृतघन' या सदरातून अनेक मान्यवर मराठी कवींच्या काव्यांचा परिचय, समीक्षात्मक आढावा घेतला आहे. त्यांनी सोलापूर 'तरुण भारत'मधील 'अवतीभोवती' या वाचकप्रिय सदरातून ललित स्फुटलेखन केले.

सोलापूरची महाराष्ट्र साहित्य परिषद शाखा, तिथले वाचनालय आणि अन्य साहित्यिक-सांस्कृतिक उपक्रमांत ते क्रियाशील आहेत. कार्यकर्ता आणि कवी या दोन्ही रूपांत ते अजूनही कार्यतत्पर आहेत.

– मधू नेने

**संदर्भ :**

*१. दीक्षित लीला; 'महाराष्ट्र साहित्य पत्रिका, मार्च २००४.*

*२. हलसगीकर दत्ता; 'आषाढघन'; १९७४.*

## हातकणंगलेकर, मधुकर दत्तात्रेय

**समीक्षक**

**१ फेब्रुवारी १९२७**



म. द. हातकणंगलेकर यांचा जन्म कोल्हापूर जिल्ह्यातील हातकणंगले या गावी झाला. त्यांचे प्राथमिक शिक्षण हातकणंगले येथे, माध्यमिक कोल्हापूरच्या आयर्विन ख्रिश्चन हायस्कुलात, तर सांगलीच्या प्रताप मॉडेल हायस्कूलमधून १९४४ साली ते मॅट्रिक झाले. ते इंटर आर्ट्स १९४६ साली व बी.ए. १९४८ साली पास झाले. सांगलीच्या विलिंग्डनमधून त्यांनी महाविद्यालयीन शिक्षण पूर्ण केले. १९५२ साली त्यांनी इंग्रजीत एम.ए.ची पदवी प्राप्त

केली. धारवाड (कर्नाटक) येथील शेतकी महाविद्यालयातून इंग्रजीच्या अध्यापनकार्याला त्यांनी प्रारंभ केला (१९५२ ते १९५६). याच काळात सुप्रसिद्ध कथाकार जी.ए. कुलकर्णी यांच्याशी त्यांचा स्नेहबंध जुळला. पुढे १९५६ ते १९८७ दरम्यान सांगलीच्या विलिंग्डन महाविद्यालयात त्यांनी इंग्रजीचे अध्यापनकार्य करतानाच १९७३ ते १९७८ दरम्यान प्राचार्य म्हणून कार्य केले.

हातकणंगलेकरांनी आपल्या महाविद्यालयीन जीवनातच लेखनाला प्रारंभ केला. त्यांनी सुरुवातीला इंग्रजी कथांचे अनुवाद केले. तत्पूर्वी त्यांनी शालेय जीवनात कथा व निबंधलेखनाचे प्राथमिक धडे गिरविले होते. ‘लास्ट अटेम्प्ट’ या इंग्रजी कथेचा ‘शेवटचा प्रयत्न’ हा अनुवाद ‘किर्लोस्कर’ मासिकात प्रसिद्ध झाला. त्यानंतर इंग्रजी कथांचे अनुवाद विविध नियतकालिकांतून प्रकाशित होत राहिले. त्याच काळात ‘काव्य नवे आणि जुने’ हा काव्यपरीक्षणपर लेख ‘मनोहर’मध्ये, तर ‘हे दुःख आणि ते दुःख’ हा इंदिरा संत व मुक्तिबोधांच्या काव्यावरील तुलनात्मक समीक्षालेख ‘समाज प्रबोधन पत्रिके’त प्रसिद्ध झाला.

आपली वैचारिक जडणघडण स्पष्ट करताना एम.एन. रॉय, प्रा. शहा, प्रा. मे.पुं. रेगे, लक्ष्मणशास्त्री जोशी आदींच्या मार्क्सवादी – समाजवादी प्रभावाची माहिती स्वतः म.दं.नी ‘उघडझाप’ ह्या आत्मकथनपर लेखसंग्रहात दिली आहे. त्यांच्या संपूर्ण समीक्षा लेखनातून मात्र वाद–विचार निरपेक्ष, वाङ्मयीन, समन्वयशील अशा विचारदृष्टीचा प्रत्यय येतो. इंग्रजी व मराठी साहित्याचा ऐसपैस व्यासंग आणि विविधांगी अनुभवविश्व यांतून म.दं.ची उदार व समावेशक समीक्षादृष्टी घडली आहे असे दिसते.

१९५० सालानंतरच्या दोन–तीन दशकांत विविध साहित्यकृतींचे आणि साहित्यकारांचे अंतरंग उलगडून दाखविणारे आस्वादपर दीर्घ लेख त्यांनी लिहिले. जी.ए. कुलकर्णी, श्री.दा. पानवलकर, सखा कलाल, चारुता सागर, श्रीनिवास कुळकर्णी, मर्ढेकर – सौंदर्यशास्त्र, श्री.के. क्षीरसागर – टीकाविवेक, प्रभाकर पाध्ये – सौंदर्यमीमांसा, मराठी लघुकथेचा प्रवास इत्यादी विषयांवरील त्यांची समीक्षा सदैव चर्चेत राहिली. त्यांचा पहिला लेखसंग्रह मात्र १९८० साली, ‘साहित्यातील अधोरेखिते’ या पुस्तकाच्या रूपाने सुपर्ण प्रकाशनाने प्रकाशित केला. याशिवाय, ‘मराठी कथा : रूप आणि परिसर’ (१९८६), ‘साहित्यविवेक’ (१९९७), ‘आठवणीतील माणसे’, ‘साहित्यसोबती’, ‘भाषणे व परीक्षणे’ (श्रीविद्या, २००८) व ‘उघडझाप’ (आत्मकथनपर लेखसंग्रह,२००५) ही त्यांची स्वतंत्र पुस्तके प्रकाशित झाली.

त्यांच्या महत्त्वपूर्ण संपादित ग्रंथांमध्ये ‘मराठी साहित्य : प्रेरणा व स्वरूप’ (सहकार्य : गो.मा. पवार, १९८६), ‘विचारधारा’ (निवडक प्रभाकर पाध्ये, १९७९), ‘डोहकाळिमा’ (निवडक जी.ए. १९८७), ‘वाङ्मयीन शैली आणि तंत्र’ (१९८१), ‘श्री.दा. पानवलकर यांची कथा’ (साहित्य अकादमी, १९८९), ‘निवडक मराठी समीक्षा’ (सहकार्य : गो.मा. पवार, साहित्य अकादमी, १९९९), ‘जी.एं.ची निवडक पत्रे’ (खंड १ ते ४, मौज प्रकाशन), ‘निवडक ललित शिफारस’ (१९९०), ‘व्यंकटेश माडगूळकर : माणदेशी माणूस आणि कलावंत’ (२०००) या ग्रंथांचा समावेश होतो.

हातकणंगलेकरांच्या आस्वादक समीक्षेने मराठी समीक्षेचा प्रवाह समृद्ध केला. रा.भा. पाटणकरांनी आस्वादक समीक्षेवर घेतलेल्या आक्षेपांना ‘आस्वादक समीक्षेची कैफियत’ या लेखातून त्यांनी समर्पक उत्तर दिले.

‘ललितकला, साहित्य यांचे स्वरूप बऱ्याच प्रमाणात अंतःप्रेरणेने जाणायचे असते. त्याची वस्तुनिष्ठता पदार्थ–विज्ञानातील तथ्यासारखी असत नाही. भाषा आणि विचार ही सत्यशोधनाची साधने असली तरी त्यात सर्वकाही पकडता येत नाही. आस्वादकाच्या भूमिकेवर त्यांचे समाधान असते. ही भूमिका अचिकित्सक अगर पोरकट नसते. ती वेगळी असते; पण हास्यास्पद अगर टाकाऊ असत नाही.’ (उघडझाप, पृ.२०३) अशी

आपली भूमिका मांडताना, तीच आपली 'सहजप्रेरणा' होती, असे ते सांगतात. अनुवादातून विश्वसाहित्य व मराठी साहित्य यांत देवाणघेवाण घडविण्याचे मोलाचे कार्य त्यांनी केले. साहित्य अकादमीच्या 'लिटररी जर्नल'मध्ये त्यांनी सलग दहा वर्षे मराठीतील साहित्यप्रवाहांवर लेखन केले.

'वि.स. खांडेकर' हे इंग्रजी पुस्तक साहित्य अकादमीतर्फे प्रकाशित (१९८६), 'माचीवरला बुधा' (गोनिदा), 'सती' (व्यंकटेश माडगूळकर), 'किरवंत' (गज्वी) इ. वाङ्मयकृतींचे इंग्रजी अनुवादही त्यांनी केले. त्यांनी 'क्वेस्ट', 'न्यू क्वेस्ट', 'थिएटर युनिट्स बुलेटिन' यांतून इंग्रजीत लेखन केले. त्यांनी 'उगवाई' या मासिकाचे काही वर्षे संपादन केले, तसेच साहित्य आणि संस्कृती मंडळ, विश्वकोश निर्मिती मंडळ, साहित्य अकादमी, ज्ञानपीठ इत्यादी संस्थांमध्ये सदस्य म्हणून भरीव कार्य केले.

१९७६ साली त्यांना महाराष्ट्र शासनाचा आदर्श शिक्षक पुरस्कार प्राप्त झाला. १९९२ साली 'तौलनिक साहित्याभ्यास : तत्त्वे आणि दिशा' हा चंद्रशेखर जहागीरदार संपादित गौरवग्रंथ प्रकाशित झाला. सांगली येथे झालेल्या एक्याऐंशीव्या अखिल भारतीय साहित्य संमेलनाच्या अध्यक्षपदी त्यांची निवड करून मराठी वाङ्मयप्रेमी रसिकांनी हातकणंगलेकरांच्या प्रदीर्घ वाङ्मयसेवेचाच एक प्रकारे गौरव केला.

इंग्रजीचे प्राध्यापक असल्याने, त्यांच्या मराठी समीक्षेला इंग्रजी वाङ्मयाच्या व्यासंगाची व्यापक, समावेशक आणि उदार बैठक प्राप्त झाली. आपल्या दीर्घ आयुष्यक्रमात, सातत्याने गेली ५० वर्षे आधुनिक मराठी साहित्यातील विविध प्रवृत्ती-प्रवाहांची सूक्ष्म, मर्मग्राही अन् स्वागतशील समीक्षा करणारे हातकणंगलेकर हे मराठी समीक्षेचे भीष्मपितामह ठरतात. जागतिक वाङ्मय आणि मराठी वाङ्मय यांच्यातील वाङ्मयमूल्यांचा एक सेतूच त्यांच्या समीक्षा-व्यापाराने सिद्ध केला आहे.

– डॉ. राजेंद्र नाईकवाडे

**संदर्भ :**

*१. जहागीरदार चंद्रशेखर, संपादक; 'तौलनिक साहित्याभ्यास : तत्त्वे आणि दिशा'; सौरभ प्रकाशन; कोल्हापूर, १९९२.*
*२. हातकणंगलेकर म. द.; 'उघडझाप', मौज प्रकाशन; २००५.*

## हेगडे, लीलाधर दामोदर

**कथाकार, कादंबरीकार, शाहीर**

**९ नोव्हेंबर १९२७**

हाडाचे शाहीर असलेले लीलाधर हेगडे बालसाहित्यकार, कथाकार, कादंबरीकार, ललित गद्यलेखक म्हणूनसुद्धा प्रसिद्ध आहेत. त्यांचा जन्म ठाण्याचा व बालपणही तिथेच गेले. त्यांचे शिक्षण मॅट्रिकपर्यंत झाले. १९४२ सालच्या स्वातंत्र्य आंदोलनात त्यांनी भाग घेतला होता. १९४५ साली राष्ट्र सेवा दलाच्या शिबिरात ते वसंत बापट यांच्या सहवासात आले आणि कायमचे शाहीर झाले. राष्ट्रसेवा दलाचे ठाणे जिल्हा संघटक म्हणून त्यांनी काम केले. १९४६ ते २००६, अशी साठ वर्षे त्यांनी शाहिरीतून समाजाचे प्रबोधन केले. महाराष्ट्र कला पथकामधून पु.ल. देशपांडे, वसंत बापट, शंकर पाटील यांच्या राष्ट्रीय तमाशांचे, तसेच व्यंकटेश माडगूळकरांच्या लोकनाट्यांचे त्यांनी असंख्य प्रयोग केले. 'द्विभाषिकाचा फार्स', 'भारत दर्शन', 'आजादी की जंग', 'स्वतंत्र संग्रामदर्शन' आदी कार्यक्रमांचे शेकडो प्रयोग त्यांनी महाराष्ट्रात व देशभरात केले आणि त्यांतून जनजागृतीचे काम केले.

१९८१ साली राष्ट्रसेवादलातून मुक्त होऊन त्यांनी सांताक्रूझ (पश्चिम) च्या साने गुरुजी आरोग्यमंदिराची जबाबदारी घेतली. ही बहुउद्देशीय शिक्षण संस्था तयार करून इथे शिक्षणाबरोबर कला, क्रीडा, व्यवसाय, आरोग्यसेवा हे सर्व एका छताखाली आणले. तसेच, आंतरभारती कला केंद्राची सुरुवात करून त्यांनी इथे ओडिसी या नृत्यशैलीचे शिक्षण सुरू केले.

त्यांनी नवसाक्षरांसाठी, मुलांसाठी व प्रौढांसाठी तिसाच्यावर पुस्तके लिहिली आहेत. 'गुंतागुंत' (१९६७), 'फेडाफेडी' (१९७१), 'पुन्हा प्रपंच'

(१९७८) यांमध्ये ललित स्वरूपाचे गद्यलेखन आहे. 'तरीही हात शिवशिवतच राहिले' (१९६५) ही कादंबरी भारत-चीन युद्धावर आधारित आहे. 'एका जवान नावाच्या माणसाची कहाणी' (१९८६) या कादंबरिकेत बांगला देश युद्धातील एका जवानाला आलेल्या अनुभवाची नोंद आहे. 'बैलांचा गोंधळ' (१९८५) मध्ये विनोदी कथा आहेत. त्यांनी 'पाचूचे बेट', 'मनी हरवली मनी सापडली', 'हणम् वेरूळचे वैभव', 'सशाची फजिती' अशी अनेक बालसाहित्याची पुस्तके आणि 'जादूची पेटी', 'हिरवी क्रांती', 'दूधगंगा', 'रामू मास्तर' अशी नवसाक्षरांसाठी सोप्या भाषेत पुस्तके लिहिली.

हेगडे यांची लेखनशैली मनमोकळेपणाची आहे; पण फाजील सलगी करणारी नाही. आवश्यक तेथे ती दैनंदिन गप्पाटप्पांसाठी सहजता धारण करते, तर कधी समर्थपणे एखादे चित्र रंगवताना ती प्रौढ, गंभीर होते. त्यांच्या पाच पुस्तकांना महाराष्ट्र शासनाचे आणि तेवढेच पुरस्कार मध्यवर्ती शासनाकडून मिळालेले आहेत. त्यांच्या शाहिरी कलेचा सन्मान राज्य शासनाच्या सांस्कृतिक खात्याने 'शाहिरी लोककला पुरस्कार' (१९९५) आणि महाराष्ट्र फाउण्डेशनने 'विशेष गौरव पुरस्कार' (२००५) देऊन केला आहे.

– अशोक बेंडखळे

**संदर्भ :**


१. *'मंथन २००५'; महाराष्ट्र फाउण्डेशन समाजकार्य गौरव पुरस्कार समिती.*

२. *शाहीर हेगडे, लीलाधर; 'मी साहित्यिक'; साने गुरुजी आरोग्यमंदिर प्रकाशन, २००६.*


## हेबळेकर, अरुण कृष्णराव

**कथाकार, कादंबरीकार, एकांकिकाकार**

**३ फेब्रुवारी १९४२**

अरुण कृष्णराव हेबळेकर यांचा जन्म मुंबई येथे एका उच्चमध्यमवर्गीय, सारस्वत कुटुंबात झाला. त्यांचे सर्व शिक्षण मुंबई येथे झाले. मुंबई विद्यापीठातून त्यांनी एम.एस्सी. (१९६४) व पीएच.डी. (१९८०) ह्या



पदव्या घेतल्या. प्रारंभी मुंबईतील विल्सन व नंतर के.जे. सोमय्या या महाविद्यालयांतून पदार्थ-विज्ञान या विषयाचे अध्यापन केल्यावर १९६४ सालापासून मडगाव (गोवा) येथील श्रीमती पार्वतीदेवी चौघुले महाविद्यालयात १९७४ पर्यंत अध्यापन केले. नंतर त्यांनी पणजी येथे मुंबई विद्यापीठाच्या अध्यापन व संशोधन केंद्रात १९७४ ते १९७५ या काळात व नंतर गोवा विद्यापीठात १९८५ ते १९८८ सालापर्यंत काम केले. नंतर १९८८ पासून १९९३ पर्यंत फोंडा एज्युकेशन सोसायटीच्या कला व विज्ञान महाविद्यालयात ते प्राचार्य होते. मध्यंतरी, काही काळ ते गोवा विद्यापीठाचे कुलसचिव व नंतर पुन्हा १९९५ ते २००३ सालापर्यंत, निवृत्तीपर्यंत त्यांनी प्राचार्यपदावर काम केले.

आजवर त्यांचे 'थिऑरेटिकल फिजिक्स' या विषयावरील सात शोधनिबंध प्रकाशित झालेले आहेत. गोवा कोकणी अकादमीच्या 'नवो सोद' या शास्त्रीय विषयाला वाहिलेल्या नियतकालिकाचे ते काही काळ मानद संपादक होते.

हेबळेकरांनी विपुल ललित लेखन केलेले असून त्यांतील विषयांची झेप व विविधता लक्ष वेधून घेते. त्यांचे कादंबरीलेखन वास्तववादी, तसेच ते भविष्याचा वेध घेणारे विज्ञानपरही आहे. 'सलोमीचे नृत्य' (१९८३), 'रुद्रमुख' (१९८५), 'आदित्य' (१९९०), 'भृगुसेतू' (१९९०), 'जोनास आर्क' (१९९९), 'भद्रमुखी' (२००६), या विज्ञान कादंबऱ्यांतून भविष्यात डोकावून पुढील काळातील विज्ञान प्रगतीचा व त्याचा दुरुपयोग करून अरिष्टे ओढवून घेण्याच्या मानवी प्रवृत्तीवर बोट ठेवण्याचा प्रयत्न आहे. विज्ञानाचे फायदे आहेत, तसेच त्यातून देशद्रोह, गुन्हेगारी व विनाश यांनाही ते कसे कारणीभूत ठरते, याचे त्यांनी प्रभावी चित्रण केले आहे. 'आदित्य' हा अणुसंकल्प

जैविक संघटना न बनता तो नियंत्रणाबाहेर का गेला याभोवती कथानक फिरते ठेवून, विज्ञान व मानव यांच्यातील संबंधांवर मार्मिक प्रकाश टाकण्याचा प्रयत्न ‘आदित्य’मध्ये लक्ष वेधून घेतो. अन्य कादंबऱ्यांना आंतरराष्ट्रीय गुन्हेगारीची पार्श्वभूमी आहे.

त्यांच्या विज्ञान कादंबऱ्या केवळ रहस्यकथा नसून त्यांत विज्ञानाच्या पार्श्वभूमीवर निसर्गाचे आव्हान, माणसाचा स्वार्थ व त्याची हतबलता यांचेही दर्शन घडते, तर ‘ओ जॉनी’सारख्या लघुकादंबरीतून गोव्यातील फुटबॉलच्या विश्वातील जीवघेणी स्पर्धा व कारस्थाने यांचे दर्शन घडते.

त्यांच्या ‘रिंग ऑफ सॅटर्न’ (१९८०), ‘पाय नसलेली माणसे’ (१९८२ व ‘पुरंध्रा’ (२००६) या कथासंग्रहांतून माणसा-माणसांमधल्या नात्यांचा कधी करकचून आवळला जाणारा, तर कधी सुटून मोकळा होणारा गोफ विणला जातो. वैशिष्ट्यपूर्ण व्यक्ती, उत्कट प्रसंग, निकोप पुरोगामी दृष्टी, बोलीभाषेची सहजता व शैली ही त्यांच्या कथांची प्रमुख वैशिष्ट्ये आहेत.

भविष्याचा वेध घेत प्रत्यक्षात घडणाऱ्या वैज्ञानिक घटनांच्या आधारे मानवाचा स्वार्थ, निर्घृण निसर्ग आणि अदम्य प्रवृत्ती यांच्या परस्पर संघर्षांतून हेबळेकरांमधील कलावंत भविष्याचा जो वेध घेतो, तो दुर्मीळ आहे. रूपक व फँटसीचा गोडवा, त्यातील गूढता आणि केवळ विज्ञानाकरिता विज्ञानाची भलामण असा एकेरी दृष्टिकोन न स्वीकारता, विज्ञानालाही एक मानवी चेहरा असू शकतो हे हेबळेकरांनी दाखविले आहे. त्यांच्या ‘भद्रमुखी’ या २००६ साली प्रकाशित झालेल्या कादंबरीत ही सर्व वैशिष्ट्ये दिसून येतात तर ‘सलोमीचं नृत्य’मधील गोमंतकाच्या निसर्ग व संस्कृतीचा भविष्यकाळात होऊ घातलेला विनाश अस्वस्थ करून सोडतो. त्यामुळे विज्ञानकथा लिहिणाऱ्या मराठीतील मोजक्या लेखकांत त्यांची दखल घ्यावी लागते.

त्यांनी कोकणीमध्ये लिहिलेल्या ‘भुरग्यारवातीर’ (मुलांसाठी) या चरित्रमालिकेत ‘आर्यभट्ट’ (१९८०) व ‘भास्कराचार्य’ (१९८२) यांचा समावेश आहे. तसेच, विज्ञानमालिकेत ‘विश्वाची उत्पत्ती’ (२००४) हे पुस्तक आहे.

त्यांना आजवर मिळालेल्या मानसन्मानांत ‘रिंग ऑफ सॅटर्न’ (१९८०) व ‘रुद्रमुख’ / ‘ओ जॉनी’ (१९८६) यांना गोव्याच्या कला अकादमीने दिलेल्या पुरस्कारांचा समावेश आहे. तसेच ‘आदित्य’ व ‘जोनास आर्क’ या कादंबऱ्यांना महाराष्ट्र शासनाचा उत्कृष्ट वाङ्मयनिर्मितीचा पुरस्कार मिळाला आहे. गोमंतक मराठी अकादमीचा प्रतिष्ठेचा ‘कृष्णदास शामा पुरस्कार’ त्यांच्या ‘आदित्य’ (१९९२) या कादंबरीला मिळालेला आहे. गोव्यातील नियतकालिकांतून त्यांनी अनेक वैज्ञानिक संकल्पनांवर लेखन केले आहे.

– डॉ. प्रल्हाद वडेर

## होनाजीबाळा

☞ **मुख्य नोंद – लोककला खंड**

## होवाळ, वामन गोविंद

**कथाकार**

**१ एप्रिल १९३८**



वामन होवाळ यांचा जन्म सांगली जिल्ह्यातील तडसर येथे झाला. तेथेच त्यांचे प्राथमिक व माध्यमिक शिक्षण झाले. १९५६ साली ते मॅट्रिक झाले. नोकरीनिमित्त वडील मुंबईत होते. त्यामुळे होवाळही मुंबईस आले. बी.ए.ची परीक्षा उत्तीर्ण झाल्यावर त्यांनी रेल्वेमध्ये नोकरी केली.

बालपणी ‘किर्लोस्कर’ मासिकातील कथा वाचल्यामुळे त्यांना कथालेखक होण्याची प्रेरणा मिळाली. सन १९६३ साली ‘माणूस’ ही त्यांची पहिली कथा ‘कथालक्ष्मी’ अंकात प्रसिद्ध झाली. पुढे ‘धनुर्धारी’, ‘वसुधा’, ‘राजश्री’, ‘यशवंत’, ‘सत्यकथा’ यांमधून त्यांच्या कथा प्रसिद्ध झाल्या. त्यांचा पहिला कथासंग्रह ‘बेनबाड’

१९७३ साली प्रकाशित झाला. 'येळकोट', 'वारसदार', 'वाटा आडवाटा' हेही कथासंग्रह प्रसिद्ध झाले. त्यांच्या कथा मराठीचा उंबरठा ओलांडून अन्य भारतीय भाषांतही अवतरल्या. त्यांच्या 'मजल्याचं घर', 'पाऊसपाणी' या कथांचे अनुवाद इंग्रजी व फ्रेंच भाषांत प्रसिद्ध झाले.

शाहीर अमरशेख यांच्या कलापथकाने त्यांचे 'नाम्या म्हणे मी उपाशी' हे लोकनाट्य सादर केले. 'जपून पेरा बेणं', 'आंधळ्याची वरात, बहिऱ्याच्या घरात' ही लोकनाट्ये रसिकांची वाहवा मिळवून गेली.

त्यांच्या लेखनातून त्यांनी विषमता आणि अंधश्रद्धा यांवर धारदार हल्ला चढविला. समाजात मागे पडलेला माणूस, तळागाळातला माणूस हा होवाळांच्या कथेचा केंद्रबिंदू आहे. खेड्यातील सर्व घटकांची त्यांना कणव आहे. त्या वातावरणाबद्दल त्यांना जिव्हाळा आहे. तो त्यांच्या साहित्यातून सातत्याने दिसत राहतो. त्यांच्या कथेचा स्थायिभाव विशिष्ट जाती हा नसून विशिष्ट प्रवृत्ती हा आहे. प्रसंगी ती मिस्कील, विसंगती टिपणारी, विनोदाच्या अंगाने जाणारी होते. माणसाबद्दलची त्यांच्या मनातील कणव व्यापक आहे. महानगरातील झोपडपट्टीमध्ये राहणारा माणूस, पदपथावर आयुष्य कंठणारा बेघर हा त्यांच्या अंतःकरणाचा ठाव घेतो. दाटून आलेल्या भावना शब्दबद्ध होतात.

लेखणीप्रमाणेच विनोदी बाजाच्या त्यांच्या कथा खूप लोकप्रिय आहेत. प्रभावी वाणीचा वापर करून ते यशस्वी कथाकथनकारही झाले. वाचकांच्या हृदयाचा ठाव घेणाऱ्या साहित्याची निर्मिती होवाळ यांनी केली.

– श्याम भुर्के

✻ ✻ ✻




## क्षीरसागर, श्रीकृष्ण केशव

**समीक्षक, विचारवंत**

**६ नोव्हेंबर १९०१ – २९ एप्रिल १९८०**



श्री. के. क्षीरसागर यांचा जन्म सातारा जिल्ह्यातील खंडोबाची पाल या गावी झाला. त्यांचे प्राथमिक शिक्षण पाल व सातारा येथे झाले. साताऱ्याच्या शासकीय शाळेतून १९१८ साली मॅट्रिक झाल्यावर त्यांचे महाविद्यालयीन शिक्षण प्रथम धारवाड, कर्नाटक येथे झाले. पुण्याच्या फर्गसन कॉलेजमधून त्यांनी १९२२ साली बी.ए.ची पदवी प्राप्त केली. पुण्यातील महाराष्ट्र एज्युकेशन सोसायटीच्या हायस्कूलमध्ये शिक्षक म्हणून त्यांच्या अध्यापनसेवेला सुरुवात झाली. पुढे १९४५ सालापासून याच संस्थेच्या एम. इ. एस. महाविद्यालयात ते प्राध्यापक झाले. १९६२ साली ते अध्यापनकार्यातून निवृत्त झाले.

विद्याव्यासंगाचे आणि वाङ्मयप्रेमाचे संस्कार क्षीरसागरांना घरीच मिळाले. त्यांना आजोबांकडून प्राचीन भारतीय वाङ्मय, वडिलांकडून इंग्रजी साहित्य आणि चुलत्यांकडून सौंदर्यवादी व आदर्शवादी दृष्टिकोनाचे संस्कार प्राप्त झाले. पुण्यातील वाङ्मयीन वातावरणात गोपीनाथ तळवलकर व भय्यासाहेब उमराणी या मित्रांच्या सहवासात त्यांची जडणघडण होत गेली.

१९२५ सालापासून त्यांनी फुटकळ लेखनास प्रारंभ केला. १९३१ साली शेजवलकरांच्या 'प्रगती' साप्ताहिकात त्यांनी क्रमशः, दीर्घ भावकथालेखन केले. पुढे 'राक्षसविवाह' या कादंबरीरूपाने ते प्रसिद्ध झाले. १९२६ साली 'बायकांची सभा' हे त्यांचे पहिले पुस्तक प्रसिद्ध झाले. त्यांनी प्रारंभी कविता, कथा असे ललितलेखन केले. १९३६ साली सावरकर आणि पटवर्धन यांच्या भाषाशुद्धीविषयक विचारांवर 'सह्याद्री' मासिकातून परखड टीका केल्याने ते प्रकाशात आले. याच काळात भाई डांगे यांच्या मार्क्सवादी भूमिकेवर व साने गुरुजी यांच्या उपदेशप्रधान वाङ्मयीन भूमिकेवर टीका करून त्यांनी आपल्या झुंजार, निर्भय आणि निःस्पृह वृत्तीचा परिचय दिला.

पुढील आयुष्यात श्री. के. क्षी. अनेक मातब्बरांशी वाङ्मयीन वाद खेळले. ते वाद म्हणजे एकेक वाङ्मयीन चळवळ ठरली. 'श्रीकेक्षी : वाङ्मयीन लेखसंग्रह' या पुस्तकात या विविध वादांची झलक पाहायला मिळते.

भाषाशुद्धीप्रमाणेच अश्लीलतेसंबंधीचाही वाद खूप गाजला. श्रीकेक्षींच्या मते, ''अश्लीलतेचा गाभा, अनैतिकता व कामुकता हा नसून अनौचित्य हा आहे... अश्लीलता हा नीतीच्या कायद्याचा भंग नसून कलेच्या कायद्याचा भंग आहे.'' साहित्यक्षेत्रातील एक विचारवंत–समीक्षक म्हणून स्वातंत्र्यपूर्व आणि स्वातंत्र्योत्तर कालखंडात श्रीकेक्षींचा लौकिक झाला. साहित्यकृतींच्या आस्वादातून व अनुभूतीच्या विश्लेषणातून त्यांनी आपली साहित्यतत्त्वे अनुभवली व साहित्यशास्त्र उभारले. अक्षरवाङ्मयाच्या गुणविशेषांतून त्यांचे साहित्यविषयक तत्त्वज्ञान सिद्ध झाल्याचे दिसते. वास्तववाद, सौंदर्यवाद आणि गूढवाद यांना श्रीकेक्षी 'वाङ्मयाचे त्रिनेत्र' मानतात. आणि स्वतःस ते 'सौंदर्यवादी–अध्यात्मवादी' म्हणवतात.

''वाङ्मयीन टीका म्हणजे सृष्टीचे रहस्य आणि विश्वाचा आत्मा यांचा वाङ्मयाद्वारा शोध घेणे... सौंदर्यदर्शन आणि रहस्यदर्शन हे टीकाव्यापाराचे एकमेव

कार्य होय. आधुनिक टीकाकार कलाकृतीच्या मुखाने कवीच्या मानससरोवरापर्यंत उलटा प्रवास करतो; कवीची संपूर्ण कृती मनाने पुन्हा रचतो. हे तादात्म्यचित्र म्हणजेच आधुनिक टीका... टीकाकाराची ही तादात्म्यावस्था सर्जनाच्या पातळीवर पोहोचली म्हणजे 'काव्यात्म टीका' जन्म पावते.'' अशी त्यांची भूमिका आहे.

आधुनिक मराठी समीक्षाविश्वातील व विचारविश्वातील त्यांचे स्थान अनन्यसाधारण आहे. मराठी समीक्षेत सैद्धान्तिक वा तत्त्वचिंतनपर समीक्षेचा प्रवाह निर्माण करण्याचे श्रेय त्यांच्याकडे जाते. मराठी, अन्य भारतीय व जागतिक वाङ्मयातील श्रेष्ठ साहित्यकृतींचे व कलावंतांच्या व्यक्तिमत्त्वांचे अंतरंग त्यांनीच विशेषत्वाने उलगडून दाखविले. वाङ्मयीन महात्मता व जीवनसौंदर्य यांच्याविषयीच्या अगाध आस्थेतून त्यांनी सुप्रसिद्ध सारस्वतकारांचा, तत्त्ववेत्त्यांचा, समाजपुरुषांचा व महात्म्यांचा जीवनवेध घेतला.

श्रीकेक्षींच्या विचारविश्वाला भारतीय संस्कृती आणि अध्यात्म यांचे व्यापक अधिष्ठान प्राप्त झालेले आहे. ते भाषा, साहित्य आणि संस्कृती यांचे, म्हणजे व्यापक अर्थाने एकूण जीवनाचेच टीकाकार आहेत. त्यांच्या आजवर प्रकाशित पुस्तकांमध्ये 'बायकांची सभा' (१९२६), 'डॉ. श्रीधर व्यंकटेश केतकर : अश्रुविमोचन आणि गुणनिमज्जन' (१९३७), 'व्यक्ती आणि वाङ्मय' (१९३७), 'राक्षसविवाह' (कादंबरी, १९४०), 'सुवर्णतुला' (प्रमुख भारतीय व्यक्तिमत्त्वांचा वेध, १९४५), 'एकच प्याला' (१९४६), 'वाङ्मयीन मूल्ये' (१९४६), 'सागरमंथन' (संपा. तळवलकर, जागतिक व्यक्तिमत्त्वांचा वेध, १९५६), 'वादसंवाद' (१९६०), 'उमरखय्यामची फिर्याद' (काव्यात्म टीका, १९६१), 'साहित्याच्या दरबारात' (अध्यक्षीय भाषणे, १९६१), 'बायका' (संपा. व.दि. कुलकर्णी, १९६२), 'बृहदारण्यक' (भाषांतर, १९६२) 'वादे वादे' (लघुनिबंध, १९६२), 'सेतुपार्वती' (कथा, १९६२), 'टीकाविवेक' (१९६५), 'आधुनिक राष्ट्रकवी रवींद्रनाथ ठाकूर' (१९७०), 'तसबीर आणि तकदीर' (आत्मचरित्र, १९७६), 'केशवसुत आणि तांबे' (१९८०), 'श्रीकेक्षी : वाङ्मयीन लेखसंग्रह' (१९८४), 'निवडक श्री.के. क्षीरसागर' (संपा. व.दि. कुलकर्णी, साहित्य अकादमी, १९९३) इत्यादींचा समावेश होतो. याशिवाय, काही संपादने त्यांच्या नावावर आहेत. त्यांच्या काही इंग्रजी कविता व लेख अप्रकाशित आहेत.

स्वातंत्र्योत्तर काळातील नवसाहित्याशी, विशेषतः मर्ढेकरांच्या कवितेशी त्यांचे सूर जुळू शकले नाहीत. 'नवकाव्यात जे नवे आहे ते काव्य नाही आणि जे काव्य आहे ते नवे नाही', अशी त्यांची भूमिका होती. साठोत्तर काळातील समीक्षकांच्या एका गटाने (नेमाडे गट) त्यांची शत्रुवत उपेक्षा केली. तरीसुद्धा मराठी समीक्षेच्या इतिहासातील श्रीकेक्षींचे कार्य ऐतिहासिक व मौलिक स्वरूपाचे ठरते.

१९५९ सालच्या मिरज येथील अखिल भारतीय मराठी साहित्य संमेलनाचे अध्यक्षपद भूषविण्याचा सन्मान त्यांना प्राप्त झाला. याशिवायही त्यांनी अनेक वाङ्मयीन परिषदांची आणि संमेलनांची अध्यक्षस्थाने भूषविली. 'टीकाविवेक' या मान्यताप्राप्त ग्रंथास महाराष्ट्र शासनाचा व अन्य पुरस्कार प्राप्त झाले. व.दि. कुलकर्णी यांनी संपादिलेल्या 'निवडक क्षीरसागर' या ग्रंथात श्रीकेक्षींच्या वाङ्मयकार्याचे सूक्ष्म व सम्यक मूल्यमापन पाहायला मिळते.

– डॉ. राजेंद्र नाईकवाडे

**संदर्भ :**


१. *कुलकर्णी व.दि. (संपा); 'निवडक श्री.के. क्षीरसागर'; साहित्य अकादमी, नवी दिल्ली, १९९३.*

२. *क्षीरसागर श्री.के.; 'तसबीर आणि तकदीर'; पॉप्युलर प्रकाशन, मुंबई, १९७६.*


## क्षेत्रमाडे, सुमती बाळकृष्ण

**कथाकार, कादंबरीकार**

**२७ फेब्रुवारी १९१६ – ८ ऑगस्ट १९९८**

डॉ. सुमती क्षेत्रमाडे हे नाव मराठी साहित्यप्रेमींना सुपरिचित आहे. सुमतीबाईंनी सातत्याने चाळीस वर्षे मराठी



कादंबरी लेखनावर आपला स्वतंत्र आणि वैशिष्ट्यपूर्ण ठसा उमटवला आहे. कादंबरीकार म्हणून प्रसिद्ध झालेल्या सुमतीबाईंची वैद्यकीय कारकिर्दही तितकीच यशस्वी ठरली होती. वैद्यकीय व्यवसायातही प्रसूतिगृह आणि मनमोकळा, रिकामा वेळ यांचा छत्तिसाचा आकडा ! मात्र, स्वतःच्या व्यस्त दिनक्रमातून जमेल तसा वेळ काढून, केवळ छंदापायी लिहिता लिहिता, सुमतीबाईंनी विपुल साहित्यनिर्मिती केली. सुमारे ३१ कादंबऱ्या, २६ कथासंग्रह, २ नाटके आणि १ काव्यसंग्रह अशी त्यांची साहित्यसंपदा आहे.

ज्या काळात डॉक्टर आणि साहित्य यांचा फारसा संबंध येत नव्हता आणि साहित्यातही डॉक्टरेट मिळविणे ही तशी दुरापास्तच गोष्ट होती, त्या काळात डॉक्टर आणि साहित्य या दोन्ही क्षेत्रांत यशस्वी ठरणारी ही लेखिका. व्यक्तीचे आणि समाजाचे जीवन कथांमध्ये जवळून हाताळता येते असा वैद्यकीय व्यवसाय त्यांनी स्वीकारलेला होता. मात्र, त्याचबरोबर मानवी वर्तनाचे अचूक ज्ञान, मानवी वर्तनाचे सूक्ष्म निरीक्षण आणि सहजसंवेदनशील मन यांमुळेच त्या वैद्यकीय व्यवसायाबरोबरच साहित्यातही यशस्वी ठरल्या.

**प्रतिकूल परिस्थितील शिक्षण**

कादंबरीकार सुमती क्षेत्रमाडे यांचा जन्म रत्नागिरी जिल्ह्यात, राजापूर तालुक्यात, झापडे या गावी झाला. त्यांचे वडील बाळकृष्णपंत रेगे हे रेव्हेन्यू खात्यात इन्स्पेक्टर होते. त्यांच्या घराण्याचे मूळ आडनाव रेगे, मात्र क्षेत्रमाडे हा त्यांना मिळालेला किताब होता. सुमतीबाईंनी आपल्या वडिलांप्रमाणेच ही पदवी स्वीकारली होती. काही कारणास्तव त्यांनी विवाह न केल्यामुळे हीच पदवी कायम टिकली. बाईंचे शालेय शिक्षण नाशिकला झाले. शालेय जीवनात त्या नेहमी प्रथम क्रमांकावरच असत. नाशिक सेंटरमधून मॅट्रिक परीक्षा उत्तीर्ण होणाऱ्या त्या पहिल्याच विद्यार्थिनी होत्या.

शाळेत असताना त्यांनी अनेक वेळा मासिकांमधून, हस्तलिखितांमधून लिखाण केले होते. मॅट्रिकला त्या मराठी विषयात सर्वप्रथम आल्याने स्वाभाविकपणे त्यांनी कलाशाखेकडे प्रवेश घ्यावा, असेच साऱ्यांचे म्हणणे होते. मात्र, डॉक्टर होण्याचे त्यांचे स्वप्न असल्याने त्यांनी शास्त्रशाखेत प्रवेश घेतला. त्यांचे वैद्यकीय शिक्षण पुण्यात झाले. घरच्या गरिबीमुळे त्यांचे सर्व शिक्षण शिष्यवृत्तीवरच झाले.

आई वारल्याने लहान भावंडांची जबाबदारी त्यांच्यावर लहान वयातच पडली. म्हणून एम.बी.बी.एस.पर्यंत शिक्षण पूर्ण झाल्यावर त्यांनी काही काळ बडोदा संस्थानात नोकरी केली. १९४८ साली त्या पुढील शिक्षणासाठी आयर्लंडला गेल्या. १९५० साली परत येऊन त्यांनी कोल्हापूरला स्वतःचा दवाखाना थाटला. याच काळात त्यांची पहिली कथा 'वादळ' ही 'स्त्री' मासिकात प्रकाशित झाली होती. १९४७ साली झालेल्या किर्लोस्कर कथास्पर्धेत त्यांना दुसरा पुरस्कारही मिळालेला होता.

बडोद्याला सयाजीराव महाराजांकडे त्या नोकरीला होत्या. ही त्यांची नोकरी फिरतीची होती. या काळात त्या बडोद्यातील दभोई, पादरा, कडी, अमरोली, नवसारी या ठिकाणी फिरल्या. त्यांच्या बडोदा वास्तव्यात त्यांचा मालतीबाई दांडेकरांशी परिचय होऊन लेखनप्रेम अधिक वाढीस लागले. गुजरातमध्ये असताना त्यांनी आपली पहिली 'आधार' ही कादंबरी लिहायला घेतली. त्यामुळेच या कादंबरीच्या स्थलकालनिर्मितीवर गुजरातच्या वातावरणाचा, चालीरीतींचा, परंपरांचा फार मोठा प्रभाव आढळतो. या त्यांच्या पहिल्याच कादंबरीला वि.स. खांडेकरांची प्रस्तावना लाभली आहे. खांडेकरांना त्या गुरुस्थानी मानत असत. 'आधार' ही एका असहाय, पतिप्रेमवंचित स्त्रीच्या जीवनावर आधारलेली कादंबरी आहे. स्वतःच्या हिमतीवर उभे राहून संकटांशी लढणारी नायिका रेखाटताना त्यांनी परंपरेत पिचणाऱ्या स्त्रीचे चित्रण केले आहे.

**'स्त्री-भावविश्व' लेखनाचा गाभा**

प्रेम हा सुमतीबाईंच्या लेखनाचा स्थायिभाव आहे. त्यांच्या सर्व नायिका या ताठ मानेने परिस्थितीशी झुंजत असतात. मात्र, तरीही त्या विद्रोही वाटत नाहीत. आक्रस्ताळेपणा हा त्यांचा स्वभावधर्म नाही. नायिकाप्रधान लेखन करणाऱ्या सुमतीबाईंनी केलेले स्त्री-चित्रण म्हणजे स्त्रीच्या भावविश्वातील आणि अंतःकरणातील शक्ती ओळखून त्यांनी तिचे रेखाटन केलेले आढळते. स्त्रीच्या दुर्बलतेतच तिची शक्ती असते हे सूत्र त्यांच्या संपूर्ण लेखनात आढळते. म्हणूनच गौरांग महाप्रभूंच्या जीवनावर आधारलेली त्यांची 'अनुहार' ही कादंबरी प्रत्यक्षात मात्र गौरांगपत्नी विष्णुप्रियेला केंद्रस्थानी ठेवून साकारली. 'वृंदा' या त्यांच्या कादंबरीवर आधारित 'सुखाची सावली' हा चित्रपट त्या काळी गाजला होता. बंगाली साहित्यिक शरच्चंद्र चटर्जी यांच्या जीवनावर त्यांनी 'जीवनस्वप्न' ही कादंबरी लिहिली.

पौराणिक व्यक्तिरेखांना कवेत घेऊन 'मेघमल्हार', 'मैथिली', 'योगेश्वर श्रीकृष्ण', 'सत्यप्रिय गांधारी', 'नल-दमयंती' अशा अनेक कादंबऱ्या त्यांच्या लेखणीतून साकारल्या. त्यांची 'महाश्वेता' ही कोड झालेल्या तरुणीच्या जीवनावरील कादंबरीही खूप लोकप्रिय झाली. त्यावर आधारित मालिकेचेही चित्रण झाले होते. या कादंबरीने भारावून जाऊन त्या काळी अनेकांनी कोड झालेल्या तरुणींशी विवाह केल्याची उदाहरणे आहेत.

सुमतीबाईंच्या लेखनाची साहित्यिक मूल्ये कोणती, त्याचा दर्जा काय, यापेक्षा त्यांनी भारावलेला हा युगधर्म महत्त्वाचा ठरतो. त्यांनी समाजात जी प्रेरक शक्ती उभी केली, त्यामुळे त्यांचे कर्तृत्व निर्विवादपणे सिद्ध झाले आहे.

मराठीखेरीज कानडी, गुजराती, हिंदी, इंग्रजी, बंगाली या भाषांवरही सुमतीबाईंचे विलक्षण प्रभुत्व होते. गुजरातेत केलेल्या दीर्घ वास्तव्यामुळे त्यांचा गुजराती संस्कृतीशी जवळून परिचय होता. त्यांच्या अनेक कादंबऱ्यांची गुजराती भाषांतरे झालेली आहेत. अशा या यशस्वी लेखिकेचे विश्व शेवटपर्यंत लिखाण आणि प्रसूतिगृह एवढेच मर्यादित राहिले. वाचकांनी त्यांच्या लिखाणाला दिलेल्या भरघोस प्रतिसादात त्या कायम समाधानी होत्या.

– निवेदिता सावंत

**संदर्भ :**

*१. दैनिक 'लोकमत'; ऑक्टोबर, १९९८.*
*२. दैनिक 'सामना'; ऑक्टोबर, १९९८.*
*३. 'ललित'; दिवाळी १९९८.*

* * *

# परिशिष्ट



## १ - लेखक परिचय

**डॉ. रजनी अपसिंगेकर** एम.ए., एम.फिल., पीएच.डी.

**डॉ. नंदा आपटे** एम.ए., पीएच.डी.
मराठी संशोधन साहाय्यक, श्रीमती ना.दा.ठा. महिला विद्यापीठ

**संजय आर्वीकर** आय.आय.एस.
प्रमुख, प्रादेशिक वृत्त विभाग, 'आकाशवाणी', औरंगाबाद

**डॉ. अनुपमा उजगरे** एम.ए., पीएच.डी.
प्रकाशिका, मुद्रित शोधक

**शशिकला उपाध्ये** एम.ए.
संचालिका, चंद्रकला प्रकाशन, पुणे

**डॉ. विद्याधर करंदीकर** बी.डी.एस. (दंत वैद्य), एम.ए., पीएच.डी.
कवि, लेखक, दंत वैद्यकीय व्यावसायिक

**अरुण करमरकर** बी.कॉम., डी.बी.एम., बी.जे.
माजी संपादक, सोलापूर तरुण भारत

**बाळकृष्ण कवठेकर** एम.ए.
मराठी विभाग प्रमुख-डॉ.बाबासाहेब आंबेडकर मराठवाडा विद्यापीठ, अध्यक्ष-समरसता साहित्य परिषद

**डॉ. सिसिलिया कार्व्हालो** एम.ए., एम.फिल., पीएच.डी.
प्राध्यापक, वर्तक महाविद्यालय

**सतीश काळसेकर** बी.ए.
सदस्य-महाराष्ट्र राज्य साहित्य संस्कृती मंडळ
सदस्य-साहित्य अकादमी संपादक मंडळ

**प्रा. सुहासिनी कीर्तिकर** एम.ए.
निवृत्त उपप्राचार्य-सिद्धार्थ महाविद्यालय, मुंबई,
व्याख्याता-मुंबई विद्यापीठ

**सुपर्णा कुलकर्णी** बी.एससी., बी.एड., एम.ए.
लेखिका

**डॉ. महेश केळूसकर** एम.ए., पीएच.डी.
कार्यक्रम अधिकारी-आकाशवाणी

**डॉ. उषा कोटबागी** एम.ए., एम.फिल., पीएच.डी.
संचालिका-हिंदुस्थान पेट्रोलियम

**डॉ. सोमनाथ कोमरपंत** एम.ए. (मराठी/संस्कृत), पीएच.डी.
निवृत्त मराठी विभाग प्रमुख-गोवा विद्यापीठ

**सुखदा कोरडे** एम.ए., एम.फिल.

**डॉ. मधुरा कोरान्ने** एम.ए., पीएच.डी.
प्राध्यापिका-मॉडर्न महाविद्यालय, पुणे

**डॉ. ज्योत्स्ना कोल्हटकर** एम.ए., पीएच.डी.
कार्यवाह-सातारा नगर वाचनालय

**डॉ. विलास खोले** एम.ए., पीएच.डी.,
निवृत्त मराठी विभाग प्रमुख, एस.एन.डी.टी., राज्य व केंद्र सरकारच्या विविध समित्यांचे सदस्य

**डॉ. ललिता गुप्ते** एम.ए., पीएच.डी., 'साहित्य रत्न' (हिंदी)
निवृत्त मुख्याध्यापिका-न्यू इंग्लिश हायस्कूल, रमणबाग, पुणे

**प्रा. मीना गुर्जर** एम.ए., एम.फिल.
निवृत्त मराठी विभाग प्रमुख-सिद्धार्थ महाविद्यालय, मुंबई

**प्रा. मंगला गोखले** एम.ए.
निवृत्त प्राध्यापिका

**प्रा. मीना गोखले** बी.ए., एम.ए.
निवृत्त मराठी विभाग प्रमुख-रुईया महाविद्यालय, मुंबई, अध्यक्ष-मराठी अभ्यास मंडळ, मुंबई विद्यापीठ, समीक्षक

**मंगला गोडबोले** एम.ए.
माजी संपादिका-'स्त्री' आणि 'माहेर' मासिके

**रवींद्र गोळे** बी.ए.
पत्रकार, कार्यवाह-समरसता साहित्य परिषद

**निरंजन घाटे** एम.एससी.
विज्ञान लेखक

**मृणालिनी चिंतामणी चितळे** एम.ए.

**डॉ. सु.रा. चुनेकर** एम.ए., पीएच.डी.
माजी मराठी विभाग प्रमुख-संगमनेर महाविद्यालय,
निवृत्त प्रपाठक-मराठी विभाग, पुणे विद्यापीठ

**प्रा. वि.शं. चौघुले** एम.ए.
निवृत्त मराठी विभाग प्रमुख-एल.जे.एन.जे. महिला महाविद्यालय, मुंबई

**प्रा. रा.ग. जाधव** एम.ए.
निवृत्त प्राध्यापक, माजी संमेलनाध्यक्ष-अखिल भारतीय मराठी साहित्य संमेलन

**प्रा. मधु जामकर** एम.ए.
माजी मराठी विभाग प्रमुख -परळी महाविद्यालय

**डॉ. अंजली जोशी** एम.ए., एम.फिल., पीएच.डी.
कार्यकारी संपादक, दिलीपराज प्रकाशन

**प्रा. मिलिंद जोशी** एम.टेक.(सिव्हील)
प्राध्यापक-भारती विद्यापीठ अभियांत्रिकी महाविद्यालय,
कार्यवाह-महाराष्ट्र साहित्य परिषद, पुणे

**वि.ग. जोशी** एम.ए.
अनुवादक

**डॉ. शुभलक्ष्मी जोशी** एम.ए., पीएच.डी.
माजी ग्रंथपाल, दै.सकाळ

**डॉ. सुधा जोशी** एम.ए., पीएच.डी.
निवृत्त मराठी विभाग प्रमुख-झुनझुनवाला महाविद्यालय,
पीएच.डी. साठी मार्गदर्शिका-मुंबई विद्यापीठ

**प्रा. सविता टांकसाळे** एम.ए., बी.एड.
निवृत्त प्राचार्या-टिळक विद्यालय कनिष्ठ महाविद्यालय

**प्रा. संध्या टेंबे** एम.ए., बी.एड.
प्राध्यापिका-एन.के.आय.टी. कनिष्ठ महाविद्यालय, ठाणे

**डॉ. वासुदेव डहाके** एम.ए., बी.एड., पीएच.डी.
निवृत्त प्राध्यापक-पंढरीनाथ महाविद्यालय, नरखेड, नागपूर

**विद्याधर ताठे** बी.कॉम., एम.ए., बी.जे.
पत्रकार, संपादक-'एकता' मासिक, पुणे
सचिव, पुणे प्रेस क्लब

**प्रा. मीरा तारळेकर** एम.ए.,
प्राध्यापिका, जी.एस.एस. महाविद्यालय

**डॉ. केशव तुपे** एम.ए., एम.फिल. पीएच.डी.
प्राध्यापक-भांडवलकर महाविद्यालय, देवगांव रंगारी

**वामन तेलंग** डिप्लोमा(सिव्हील इंजी.)
निवृत्त संपादक, दै. तरूण भारत, नागपूर

**डॉ. सुवर्णा दिवेकर** एम.ए., पीएच.डी.
सल्लागार संपादक - 'विपुलश्री'

**मधुकर श्रीधर दीक्षित**
माजी कार्यवाह व विश्वस्त - महाराष्ट्र साहित्य परिषद, पुणे

**डॉ. अरुणा दुभाषी** एम.ए., पीएच.डी.
प्रपाठक -पदव्युत्तर मराठी विभाग, एस.एन.डी.टी.

**डॉ. दुलारी देशपांडे** एम.ए., पीएच.डी.

**डॉ. सुधाकर देशपांडे** एम.ए., पीएच.डी.
निवृत्त प्राचार्य

**डॉ. अनंत देशमुख** एम.ए., पीएच.डी.
निवृत्त प्राध्यापक - ना.दा.ठा.महिला विद्यापीठ, मुंबई

**डॉ. संजय देशमुख** एम.ए., पीएच.डी.

**विनया विश्वेश देसाई** बी.एससी., डी.एड.
शिक्षिका

**डॉ. छाया नाईक** एम.ए., एम.एड., पीएच.डी.
निवृत्त प्राध्यापिका

**डॉ. राजेंद्र नाईकवाडे** एम.ए., एम.फिल., पीएच.डी.
अधिव्याख्याता-सी.पी. अँड बेरार महाविद्यालय, नागपूर

**मधू नेने** एम.एससी.
पत्रकार, कार्यकारिणी सदस्य, म.सा.प.

**डॉ. संध्या पवार** एम.ए., एम.ए., पीएच.डी.
मुख्याध्यापिका, जि.प.प्राथमिक शाळा

**अवधूत परळकर** बी.एससी., डिप्लोमा (पत्रकारिता)
निर्माता अधिकारी, मुंबई दूरदर्शन

**डॉ. वसंत पाटणकर** एम.ए., पीएच.डी.
मराठी विभाग प्रमुख -मुंबई विद्यापीठ

**डॉ. भाग्यलता पाटसकर** एम.ए., पीएच.डी.
संचालक -वैदिक संशोधन मंडळ

**प्रा. आशुतोष पाटील** एम.ए., यु.जी.सी. नेट
अधिव्याख्याता-उत्तर महाराष्ट्र विद्यापीठ, जळगांव

**प्रा. दिगंबर पाध्ये** एम.ए.
माजी विभाग प्रमुख-साठ्ये महाविद्यालय, मुंबई

**रागिणी पुंडलिक**
लेखिका

**डॉ. सुहास पुजारी** एम.ए., पीएच.डी.
अधिव्याख्याता-संगमेश्वर महाविद्यालय, सोलापूर

**शैलजा पुरोहित** एम.ए.

**डॉ. नीलकंठ बापट** एम.कॉम., पीएच.डी.

**प्रा. सुहास बारटक्के** एम.कॉम., डी.एच.ई.
प्राध्यापक -जी.बी.जे. महाविद्यालय, चिपळूण

**अशोक बेंडखळे** बी.ई. (टेली.)
लेखक, निवृत्त उप महाव्यवस्थापक -एम.टी.एन.एल.

**नरेंद्र रघुवीर बोडके** एम.ए.
माजी निवासी संपादक -दै.प्रभात, पुणे

**डॉ. तारा भवाळकर** एम.ए., पीएच.डी.
निवृत्त प्राध्यापिका

**मंदाकिनी प्रल्हाद भारद्वाज** बी.ए. (ऑनर्स)

**प्रा. इंद्रजीत भालेराव** एम.ए.
प्राध्यापक -ज्ञानोपासक महाविद्यालय, परभणी

**जयंत भिडे** एम.कॉम., एम.पी.एम.
जाहिरात प्रमुख - प्रसार भारती (आकाशवाणी/दूरदर्शन)

**श्याम भुर्के** एम.कॉम., एल.एल.बी., सी.ए., आय.आय.बी.
माजी उप महाव्यवस्थापक, बँक ऑफ महाराष्ट्र

**डॉ. सुभाष भेंडे** एम.कॉम., पीएच.डी.
निवृत्त प्राचार्य

**प्रा. शशिकांत मांडके**
नामवंत लेखक

**डॉ. उज्ज्वला मेहेंदळे** एम.ए., पीएच.डी.
प्राध्यापिका -श्रीमती ना.दा.ठा. महिला विद्यापीठ, मुंबई

**प्रा. रेखा मैड** एम.ए., एम.फिल.
मराठी विभाग प्रमुख -प्र.दा.कारखानीस महाविद्या., अंबरनाथ

**डॉ. पुष्पलता राजापुरे - तापस** एम.ए., पीएच.डी.,
माजी मराठी विभाग प्रमुख - मुंबई विद्यापीठ

**निशा रानडे** एम.ए. (हिंदी)
शिक्षिका, निसर्गोपचार तज्ञ

**डॉ. शोभा रोकडे** एम.ए., एम.फिल., पीएच.डी.
प्रपाठक - इंदिराबाई मेघे महिला महाविद्यालय, अमरावती

**डॉ. अपर्णा लव्हेकर** एम.ए., एम.फिल., पीएच.डी.
प्राध्यापिका - एल.एस.रहेजा महाविद्यालय, मुंबई

**डॉ. ज्योती लांजेवार** एम.ए., बी.एड., एम.फिल., पीएच.डी.
मराठी विभाग प्रमुख - एस.बी.सी.टी. महाविद्यालय, नागपूर

**डॉ. प्रल्हाद वडेर** एम.ए., पीएच.डी.
निवृत्त मराठी विभाग प्रमुख - गोवा विद्यापीठ

**डॉ. रमेश वरखेडे** एम.ए., पीएच.डी.
संचालक - मानव्य विद्या विभाग, यशवंतराव चव्हाण मुक्त विद्यापीठ, नाशिक

**डॉ. चंद्रकांत वर्तक** एम.ए., पीएच.डी.
निवृत्त मराठी विभाग प्रमुख, श्रीमती ना.दा.ठा. महिला विद्यापीठ

**जयंत वष्ट** बी.ए., एल.एल.बी., पीएच.डी.
बँक ऑफ इंडिया मधून निवृत्त

**डॉ.वैखरी वैद्य** एम.ए., पीएच.डी.
प्राध्यापिका, मॉडर्न महाविद्यालय, पुणे

**डॉ. मीना वैशंपायन** एम.ए., बी.एड., पीएच.डी.
शिक्षिका, सचिव - एशियाटिक सोसायटी,
संपादक मंडळ सदस्य - महाराष्ट्र राज्य मराठी विकास परिषद

**प्रा. रुपाली शिंदे** एम.ए., एम.फिल.
प्राध्यापिका, फर्गसन महाविद्यालय

**यास्मिन शेख** एम.ए., बी.टी.
विभाग प्रमुख - एस.आय.ई.एस. महाविद्यालय

**डॉ. रवींद्र शोभणे** एम.ए., पीएच.डी.
मराठी विभाग प्रमुख - धनवटे राष्ट्रीय महाविद्यालय, नागपूर

**डॉ. अविनाश सांगोलेकर** एम.ए., पीएच.डी.
प्रपाठक - मराठी विभाग प्रमुख, पुणे विद्यापीठ

**डॉ. किशोर सानप** एम.ए., बी.एड., एम.फिल., पीएच.डी.
आधिव्याख्याता - जी.एस. महाविद्यालय

**निवेदिता सावंत** एम.ए.

**डॉ. आशा सावदेकर** एम.ए., पीएच.डी.
प्रपाठक - स्नातकोत्तर मराठी विभाग, नागपूर विद्यापीठ

**प्रा. अनुराधा साळवेकर** एम.ए., बी.एड., एम.फिल.
प्राध्यापक - मुंबई विद्यापीठ

**मनोहर रामदास सोनवणे** बी.कॉम., बी.जे.

**प्रा. म.द. हातकणंगलेकर** एम.ए.
निवृत्त प्राचार्य, विलिंग्डन महाविद्यालय, सांगली

**डॉ. सुलभा हेर्लेकर** बी.एससी., एम.ए., पीएच.डी.
प्राध्यापिका - सेंट फ्रान्सिस डिफेन्स महाविद्यालय

* * *

# २ - अखिल भारतीय मराठी साहित्य संमेलने

| वर्ष | स्थळ | अध्यक्ष |
|---|---|---|
| १८७८ | पुणे | महादेव गोविंद रानडे |
| १८८५ | पुणे | कृष्णशास्त्री राजवाडे |
| १९०५ | सातारा | रघुनाथ पांडुरंग करंदीकर |
| १९०६ | पुणे | गोविंद वासुदेव कानिटकर |
| १९०७ | पुणे | विष्णु मोरश्वर महाजनी |
| १९०८ | पुणे | चिंतामण विनायक वैद्य |
| १९०९ | पुणे | काशिनाथ रघुनाथ कीर्तिकर |
| १९१२ | अकोला | हरी नारायण आपटे |
| १९१५ | मुंबई | गंगाधरराव पटवर्धन |
| १९१७ | इंदूर | गणेश जनार्दन आगाशे |
| १९२१ | बडोदे | नरसिंह चिंतामण केळकर |
| १९२६ | मुंबई | माधवराव विनायक किबे |
| १९२७ | पुणे | श्रीपाद कृष्ण कोल्हटकर |
| १९२८ | ग्वाल्हेर | माधव श्रीहरी अणे |
| १९२९ | बेळगाव | शिवराम महादेव परांजपे |
| १९३० | मडगाव | वामन मल्हार जोशी |
| १९३१ | हैदराबाद | श्रीधर व्यंकटेश केतकर |
| १९३२ | कोल्हापूर | सयाजीराव गायकवाड |
| १९३३ | नागपूर | कृष्णाजी प्रभाकर खाडिलकर |
| १९३४ | बडोदा | नारायण गोविंद चापेकर |
| १९३५ | इंदूर | बाळासाहेब पंतप्रतिनिधी |
| १९३६ | जळगाव | माधव त्रिंबक पटवर्धन |
| १९३८ | मुंबई | विनायक दामोदर सावरकर |
| १९३९ | अहमदनगर | दत्तो वामन पोतदार |
| १९४० | रत्नागिरी | नारायण सीताराम फडके |
| १९४१ | सोलापूर | विष्णू सखाराम खांडेकर |
| १९४२ | नाशिक | प्रल्हाद केशव अत्रे |
| १९४३ | सांगली | श्रीपाद महादेव माटे |
| १९४४ | धुळे | भार्गव विठ्ठल वरेरकर |
| १९४६ | बेळगाव | गजानन त्र्यंबक माडखोलकर |
| १९४७ | हैदराबाद | नरहर रघुनाथ फाटक |
| १९४९ | पुणे | शंकर दत्तात्रय जावडेकर |
| १९५० | मुंबई | यशवंत दिनकर पेंढारकर |
| १९५१ | कारवार | अनंत काकबा प्रियोळकर |

| वर्ष | स्थळ | अध्यक्ष | वर्ष | स्थळ | अध्यक्ष |
|---|---|---|---|---|---|
| १९५२ | अंमळनेर | कृष्णाजी पांडुरंग कुळकर्णी | १९८५ | नांदेड | शंकरराव पाटील |
| १९५३ | अहमदाबाद | विठ्ठल दत्तात्रय घाटे | १९८६ | मुंबई | विश्राम बेडेकर |
| १९५४ | नवी दिल्ली | लक्ष्मणशास्त्री बाळाजी जोशी | १९८८ | ठाणे | वसंत शंकर कानेटकर |
| १९५५ | पंढरपूर | शंकर दामोदर पेंडसे | १९८९ | अमरावती | केशव जगन्नाथ पुरोहित |
| १९५७ | औरंगाबाद | अनंत आत्माराम काणेकर | १९९० | पुणे | युसूफ महंमदखान पठाण |
| १९५८ | मालवण | आत्माराम रावजी देशपांडे | १९९० | रत्नागिरी | मधू मंगेश कर्णिक |
| १९५९ | मिरज | श्रीकृष्ण केशव क्षीरसागर | १९९२ | कोल्हापूर | रमेश राजाराम मंत्री |
| १९६० | ठाणे | रामचंद्र श्रीपाद जोग | १९९३ | सातारा | विद्याधर संभाजीराव गोखले |
| १९६१ | ग्वाल्हेर | कुसुमावती आत्माराम देशपांडे | १९९४ | पणजी | राम शेवाळकर |
| १९६२ | सातारा | नरहर विष्णू गाडगीळ | १९९५ | परभणी | नारायण गंगाधर सुर्वे |
| १९६४ | मडगाव | विष्णू वामन शिरवाडकर | १९९६ | आळंदी | शांता जनार्दन शेळके |
| १९६५ | हैदराबाद | वामन लक्ष्मण कुलकर्णी | १९९७ | अहमदनगर | नारायण संतराम इनामदार |
| १९६७ | भोपाळ | विष्णू भिकाजी कोलते | १९९८ | परळी | दत्तात्रेय मारूती मिरासदार |
| १९६९ | वर्धा | पुरुषोत्तम शिवराम रेगे | १९९९ | मुंबई | वसंत विश्वनाथ बापट |
| १९७३ | यवतमाळ | गजानन दिगंबर माडगूळकर | २००० | बेळगाव | यशवंत दिनकर फडके |
| १९७४ | इचलकरंजी | पुरुषोत्तम लक्ष्मण देशपांडे | २००१ | इंदूर | विजया मंगेश राजाध्यक्ष |
| १९७५ | कराड | दुर्गा भागवत | २००२ | पुणे | राजेंद्र श्रीनिवास बनहट्टी |
| १९७७ | पुणे | पुरुषोत्तम भास्कर भावे | २००३ | कराड | सुभाष वासुदेव भेंडे |
| १९७९ | चंद्रपूर | वामन कृष्णाजी चोरघडे | २००४ | औरंगाबाद | रावसाहेब गणपत जाधव |
| १९८० | बार्शी | गंगाधर बाळकृष्ण सरदार | २००५ | नाशिक | केशव मेश्राम |
| १९८१ | अकोला | गोपाळ नीळकंठ दांडेकर | २००६ | सोलापूर | मारुती चितमपल्ली |
| १९८१ | रायपूर | गंगाधर गोपाळ गाडगीळ | २००७ | नागपूर | अरुण साधू |
| १९८३ | अंबाजोगाई | व्यंकटेश दिगंबर माडगूळकर | २००८ | सांगली | म. द. हातकणंगलेकर |
| १९८४ | जळगाव | शंकरराव रामचंद्र खरात | २००९ | महाबळेश्वर | आनंद रतन यादव * |

टीप : संमेलन १ ते ६ ‘ग्रंथकार संमेलन’ या नावाने भरवण्यात आली. १९०७ ते १९६४ या काळातील संमेलने महाराष्ट्र साहित्य परिषदेतर्फे भरविण्यात आली.

* महाबळेश्वर येथील २००९ चे संमेलन निर्वाचित अध्यक्ष आनंद यादव यांनी राजीनामा दिल्यामुळे अध्यक्षाविना पार पडले.

* * *

